भारतवर्षीय

# मध्ययुगीन चरित्रकोश

( मौर्य चंद्रगुप्तांपासून पेशवाईअखेर ख्रि. पू. ३२१-इ. स. १८१८ )



स. १९३७

# प्रस्तावना

आज 'मध्ययुगीन चरित्रकोश' लोकांच्या हातीं देतांना आम्हांस अतिशय आनंद होत आहे. 'प्राचीन चरित्रकोशा'-नंतर हा ग्रंथ पांच वर्षांनीं प्रसिद्ध करण्याचा योग आला. या चरित्रकोशां'त श्रुति, स्मृति, पुराणें, सूत्रें आणि या ग्रंथांतील व्यक्तींचीं चरित्रें देण्यांत आलीं होतीं. त्यांतील व्यक्ति यांच्या कालावद्दल विद्वानांत विरुद्ध मतें प्रचलित असल्यानें कालापेक्षां वरील ल व्यक्तींचीं चरित्रें देण्याची मर्यादा स्वीकारून रणें सोयीचें होतें. कितीहि प्रयत्न केला तरी त्या काम करतांना ऐतिहासिक व पौराणिक माहितीची सरणें अपरिहार्य असतें. पण या भागाची तशी नाहीं. मौर्य चंद्रगुप्ताच्या आरंभींच्या कालापासून ऐतिहासिक साधनें म्हणतां येईल अशी सामग्री मिळू पुराणादि ग्रंथ हें निःसंशय ऐतिहासिक साहित्य प्रचारादिकाकरितां रचलेल्या माहात्म्यात्मक किंवा स्वरूपाच्या भागापासून ऐतिहासिक स्वरूपाचा भाग ळ आणि अविकृत ठेवावयास पाहिजे, याचीहि पुराण-ना कल्पना होती; आणि त्यांचें स्वरूप शुद्ध राहावें न सूत वगैरे स्वतंत्र जातींची त्यांनीं प्रतिष्ठा केली आणि ग्रंथांना धार्मिक महत्त्वहि प्राप्त करून दिलें. पण तें ाय ऐतिहासिक साधनांच्या पहिल्या किंवा दुसऱ्या रच्या साहित्यांत आपल्यापुढें नाहीं, ही गोष्ट खरी हे. म्हणून तो काल आणि ऐतिहासिक साधनें अस्सल अविकृत स्वरूपांत जेव्हांपासून उपलब्ध होऊं शकतात तो मौर्य चंद्रगुप्ताच्या प्रारंभापासूनचा काळ हे दोन्ही अगदीं भिन्न ठरतात. प्राचीन इतिहासाच्या बाबतींत मोहेंजोदारो, हराप्पा वगैरे ठिकाणच्या उत्खननांत उपलब्ध झालेलीं साधनें पहिल्या प्रतीचीं असलीं तरी त्यांचा उपयोग करण्याच्या बाबतींत अद्यापि बऱ्याच अडचणी आहेत.

मौर्य चंद्रगुप्त या हिंदुस्थानांतील सम्राटाच्या वेळेपासून हिंदुस्थानचा पूर्ण ऐतिहासिक स्वरूपाचा काल सुरू होतो. त्याचे ब्राह्मी व खरोष्ठी लिपींतील लेख उपलब्ध आहेत; आणि त्याच्या पूर्वायुष्यांत हिंदुस्थानावर चालून आलेल्या युरोपांतील जगज्जेत्या सिकंदराच्या लोकांनीं लिहिलेल्या ऐतिहासिक ग्रंथाचे त्रुटित भागहि आपणांस पाहावयास मिळतात. म्हणून समकालीन, अस्सल व अविकृत ऐतिहासिक साधनें मौर्य चंद्रगुप्ताच्या वेळेपासून आपणांला उपलब्ध होतात; आणि तीच प्राचीन आणि मध्ययुगीन कालाची मर्यादारेषा दिसते. सबब आम्हीं या ग्रंथाला मध्ययुगीन चरित्रकोश असें नांव दिलें आहे; आणि मौर्य चंद्रगुप्तापासूनच्या व्यक्तींचीं चरित्रें यांत दिलीं आहेत. त्यापूर्वीच्या गौतम बुद्ध, महावीर वगैरे व्यक्तींचीं चरित्रें संदर्भाकरितां या ग्रंथांतहि आम्हीं दिलीं आहेत. त्यांचीं या ग्रंथांतील आणि प्राचीन चरित्रकोशांतील चरित्रें तुलनेनें वाचलीं असतां त्यांच्यावद्दल असलेल्या प्राचीन व मध्ययुगीन सांप्रदायिक दृष्टीचा सहज परिचय होईल.

मध्ययुग–मौर्य चंद्रगुप्तापासून पेशवाईअखेरपर्यंतच्या कालास आम्हीं 'मध्ययुग' असें नांव दिलें आहे. आमचा हा मध्ययुग शब्दाचा अर्थ इतरांच्या पेक्षां निराळा असल्यामुळें त्यासंबंधीं थोडें स्पष्टीकरण करणें जरूर आहे. या देशावर राज्य करण्याच्या बुद्धीनें सिकंदरापासून आरंभ करून परक्यांनीं हिंदुस्थानावर आक्रमण केल्याचा इतिहास उपलब्ध आहे. सिकंदर, कुशान, चीन, क्षत्रप आणि हूण यांची हिंदुस्थानावर मुसलमानांपूर्वीं राज्यसत्ता होती. मुसलमानांच्या सत्ताकालांतच पोर्तुगीज, डच, फ्रेंच आणि इंग्रज यांचा हिंदुस्थानांत प्रवेश झाला. यांना तोंड देत देत हिंदुस्थानांतील लोकांनीं आपली संस्कृति आणि धर्म टिकविण्याचा प्रयत्न केला; आणि स. १८५७ सालीं अखेरचा राज्य घेण्याचा प्रयत्न फसल्यामुळें तें इंग्रजांच्या ताब्यांत गेलें आणि अर्वाचीन कालाला सुरुवात झाली. मुसलमानांच्या पूर्वकाळचे परके लोक शेंकडों वर्षें येथें राजे म्हणून राहिले; तरी ते येथील लोकांत धर्म व संस्कृति या दृष्टीनें एकरूप झाले असावेत असें कांहीं उदाहरणांवरून दिसून येतें. याप्रमाणेंच मुसलमानांचें झालें असतें, पण त्यांनीं दुसऱ्यांना त्यांची संस्कृति आणि त्यांचा धर्म यांसह पूर्ण नष्ट करून स्वतः त्यांच्या प्रतिस्पर्ध्याच्या रूपांत टिकण्याचा प्रयत्न केला. यामुळें ते व त्यांचेंच अनुकरण करणारे युरोपीय पोर्तुगीज, डच, फ्रेंच व इंग्रज हे ख्रिश्चन स्वतंत्रपणें राहिले; आणि त्यांच्यापासून आपलें संरक्षण व्हावें म्हणून येथील रहिवाश्यांनीं सध्यांची अभेद्य जातिसंस्था व सर्वांना अत्यंत सुलभ असणाऱ्या 'मुखीं नाम हातीं मोक्ष' या बिरुदाच्या वैष्णवादि पंथासारख्या धार्मिक संस्था उभारल्या. राष्ट्रीय वृत्ति किंवा देशाभिमान

हा यंत्रयुगामुळें यंत्राच्या पाठोपाठ आत्मसंरक्षणाच्या बुद्धीनें उत्पन्न झाला. त्याप्रमाणें सध्यांच्या स्वरूपांतील वरील संस्थांची उत्पत्ति मुसलमानांच्या आक्रमणानंतरची आहे. ख्रि. पू. ४ थ्या शतकाच्या सुमारास मातुलकन्यापरिणय, मत्स्याहार व सीधुपान यासारख्या विशिष्ट प्रांतिक ब्राह्मणी आचारांची नोंद बौधयनानें केलेली आढळते. तथापि साधारणतः इसवी सनाच्या बाराव्या शतकापूर्वी ब्राह्मणांतील पोटजातींचा इतिहास जाऊं शकत नाहीं हें याचें उत्तम गमक आहे. यावरून हिंदुस्थानावर परकेपणानें राज्य करूं पाहणाऱ्या मुसलमानांच्या व अन्य परक्यांच्या आक्रमणाचा काल म्हणजे ऐतिहासिक हिंदुस्थानांतील मध्ययुगें म्हणतां येईल.

**मध्ययुगांतील ऐतिहासिक साधनें**—या कालांत मौर्य, शुंग, काण्व, आंध्र ( शालिवाहन ), कुशान, भारशिव, वाकाटक, गुप्त, हूण, हर्ष, गुहिलोत, गाहडवाल, चौहाण, चालुक्य, राष्ट्रकूट, होयसळ, विजयनगर, मराठे वगैरे सम्राट्‌पदवीचीं राजघराणीं उत्पन्न झालीं. याशिवाय प्रांतोप्रांतीं सम्राटाशीं स्पर्धा करणारीं पल्लव, चोल, पांड्य, पाल, सेन वगैरे घराणीं आपल्या अस्तित्वाची जाणीव अव्याहतपणें शेंकडों वर्षें या राष्ट्राला देत होतीं, आणि या सर्वांच्या आश्रयानें शेंकडों लहान घराणीं राजपदवीला चढलीं. त्यांच्या इतिहासाचीं विपुल साधनें देशभर पसरलीं आहेत. त्यांचें संकलन करून तीं प्रसिद्ध करण्याचें काम साउथ् इंडियन् इन्स्क्रिप्शन्स्, एपिग्राफिया कर्नाटिका आणि एपिग्राफिया इंडिका वगैरे पुस्तकांच्या द्वारें चालू आहे; आणि या साधनावरून ठरणाऱ्या गोष्टींची शोधपूर्वक नोंद करण्याचें काम रॉयल् एशियाटिक् सोसायटीचीं जर्नलें व इंडियन अँटिक्वेरीसारखीं नियतकालिकें पुष्कळ वर्षांपासून करीत आहेत. पण जेव्हां लॉर्ड कर्झन यांच्या कारकीर्दीत अर्कीऑलॉजिकल् डिपार्टमेंट्‌ची पुनर्घटना होऊन सर्व प्रांतांतून या कामाला अधिक जोरानें सुरुवात झाली, तेव्हां या कामाकडे सर्वांचें लक्ष विशेष वेधलें आणि मुख्य सरकारचें अनुकरण करून बहुतेक संस्थानांतूनहि असें खातें निर्माण करण्यांत आलें. त्यांचे वृत्तान्त प्रायः दरवर्षी इंग्रजी भाषेंतून प्रसिद्ध होत असून पुराणवस्तुसंरक्षणाचें व संशोधनाचें काम सध्यां आश्चर्यकारक रीतीनें होत आहे.

अशा रीतीनें कामाचा पसारा वाढल्यानें त्यांत शिलालेख, ताम्रपट, नाणीं, मुद्रा, वस्तु, शिल्प व
साधनांचे अनेक प्रकार निर्माण झाले.
त्यांत पुनः जुने, नवे व प्रांतिक भेद उत्पन्न
शिक्षण, वाङ्मय, समाज, नीति, अर्थ, तत्त्व
आणि सांस्कृतिक विरोधी चळवळी यांचा
विचार करण्याची आवश्यकता उत्पन्न झाली.
शाखेवर आज महत्त्वाचे ग्रंथ निर्माण होऊन
विभागाला स्वतंत्र शास्त्राचें स्वरूप आलें आहे.
वरील साधनांप्रमाणेंच ग्रंथ, तवारिखा, बखरी
मर्यादित कालांतील अस्सल पत्रव्यवहार हें
लोक यांनीं परिश्रमपूर्वक प्रसिद्ध करण्याचें
चालू ठेवलें आहे. त्यांत महाराष्ट्रांतील,
संशोधक मंडळ, पुणें; सत्कार्योत्तेजक सभा,
म्युझियम, सातारा; शारदाश्रम, यवतमाळ;
संशोधनमंडळ, नागपूर, या महाराष्ट्र
नागरीप्रचारिणी सभा, बनारस, ही हिंदी
रांची संस्था; कर्नाटक इतिहाससंशोधन
ही कर्नाटकाची संस्था, वारेंद्र रिसर्च सोसायटी
वंगीयसाहित्यपरिषद ( कलकत्ता ) या
आणि फादर हेरास यांची इंडियन हिस्टॉरिकल
यटी, मुंबई, यांना प्रामुख्य आहे. याशिवाय
संशोधनसमिति, पुणें व बुद्धिस्ट रेकॉर्ड
कत्ता, या संस्था व वीरशैव (लिंगायत),
शीख, वगैरे अनेक संप्रदायांचे वैयक्तिक
आपआपल्यापुरतें संशोधन करून
व इतिहास प्रसिद्ध करण्याचे प्रयत्न करतात.
पण पुष्कळ वेळां त्यांत शास्त्रशुद्ध
बुद्धीपेक्षां आत्मगौरवाच्या भावनेचा पगडा
महाराष्ट्रांत ऐतिहासिक कागदपत्र
याचें श्रेयहि इतिहासप्रेमापेक्षां आत्मगौरवाला
अधिक द्यावें लागेल. इतर प्रांतांतहि
भरपूर आहे आणि शोधल्यास आणखी
पण तात्स्थलिक इतिहास आत्मगौरवाचा
राष्ट्राबाहेरील लोकांना त्याचें महत्त्व वाटत
तो प्रसिद्ध करण्याची त्यांना उत्सुकता
सर्व प्रयत्नांचा इतिहासाला आणि
लेल्या कोशासारख्या कामाला अत्यंत

याचप्रमाणें प्रांतिक इतिहासाचें व

---

१. स. ६००–१२०० (चिं. वि. वैद्य-मध्ययुगीन भारत), स. ६००–१८३४ (लेनपूल-मध्ययुगीन
स. ६४७–१५२६ हर्षमृत्यु–बाबरजय ( श्री. ईश्वरीप्रसाद), यापेक्षां युरोपमधील मध्ययुग पुढील
स. ४८६–१४८६ ( हॅलम ), स. ७१३–१४५३ ( केंब्रिज मिडीव्हल हिस्टरी, युरोप ).

…त्त्व राष्ट्राच्या इतिहासांत फार आहे. एक एक …सुंदर आणि भव्य प्रासाद तयार होतो, त्या-…ना प्रांतिक व वांशिक इतिहासाच्या तयार …एक एक भागानें संपूर्ण राष्ट्राचा इतिहास तयार …दृष्टीनें सर डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांचा …प्राचीन इतिहास' आणि पं. गौरीशंकर हिराचंद …चा 'राजपुतानेका इतिहास' हा प्रसिद्ध झालेला …हे आदर्श म्हणून दाखवितां येण्यासारखे आहेत. …हि कांहीं प्रयत्न दाखवितां येतील. आंध्र व कुशान …नष्ट झाल्यावर गुप्तांच्या साम्राज्याची प्रस्थापना …मधल्या काळांत सर्व हिंदुस्थानावर सत्ता गाज-…सम्राट् घराणीं नव्हतीं असें व्हिन्सेंट स्मिथनें …आहे. पण त्याच स्मिथच्या वाक्यानें आरंभ करून …शीप्रसाद जयस्वाल यांनीं आपला हिंदुस्थानचा …स लिहिला आणि त्यांत किलकिला म्हणजे नाग, …व आणि वाकाटक घराण्यांचा इतिहास शोधपूर्वक …करून हिंदुस्थानच्या इतिहासांतील त्रुटि भरून …आणि हिंदुस्थानच्या इतिहासाशीं आपलें नांव …चें निगडित केलें.

…राण्यांच्या इतिहासांत मौर्य, शालिवाहन, गुप्त, …री, राष्ट्रकूट, कदंब, चोल, शिलाहार, पाल, सेन …ग आरविडु वगैरे घराण्यासंबंधीं प्रसिद्ध झालेले स्वतंत्र …फार महत्त्वाचे आहेत. पण या ग्रंथांत राजकीय …मोडीच्या ढोबळ माहितीपेक्षां वर निर्दिष्ट केलेल्या …विषयांची फारच थोडी माहिती आलेली आहे.

…इतर विषयांच्या बाबतींत साहित्य, धर्मशास्त्र, समाज, …, संस्कृत, प्राकृत आणि प्रांतिक भाषांतील साहित्याचे …हास वगैरेंचे प्रयत्न सर्वांगपूर्ण इतिहासाच्या दृष्टीनें …र महत्त्वाचे आहेत.

…महाराष्ट्रांतील जनता स्वाभिमानी आहे, आणि त्यांना …पल्या इतिहासाबद्दलचा अभिमान मूळचाच दिसतो. ऐति-…सिक घटनांची नोंद करण्याची त्यांच्यांत परंपरागत वहि-…ाट आहे असें जेधे, शिवापूरकर देशपांडे, गदाधर प्रल्हाद, …डेगांवकर यांच्या शकावल्या आणि देशपांडे व …डफळे यांच्या प्रसिद्ध झालेल्या याद्यांवरून दिसून येतें. …त्यांत घडफळे वगैरे घराण्यांत तर स्वयंस्फूर्तीनें वंशपरं-…परेनें अशा नोंदी करण्याची पद्धत होती, व त्यावरूनच पुरंदरे …व पेशवे यांच्याहि रोजनिशा लिहिल्या जात, असें आतां …सिद्ध होत आहे. सभासद, चित्रगुप्त, चिटणीस वगैरेंनींहि …बखरी लिहिण्याचें काम शिवाजीमहाराजांपासून चालू …ठेवलें असून, मल्हार रामराव चिटणिसांनीं तर आपल्या सर्व बखरींचें काम अत्यंत परिश्रमपूर्वक केलें आहे; आणि त्यांना छत्रपति प्रतापसिंहाची प्रेरणाहि असावी; तसेंच त्यांना अस्सल कागदपत्रांचीहि महती कळत होती. त्यानंतर ग्रँड डफनें आपली बखर लिहिली. तिलाहि माहिती कशी पुरविली गेली यासंबंधीं पेशवे दप्तरांत माहिती आली आहे. त्यानंतर कीर्तने, न्यायमूर्ति रानडे आणि निबंधमालाकार यांनीं इतिहासाच्या अभ्यासाची जोपासना केली आणि अस्सल कागदपत्र एकत्र करण्यास सुरुवात केली. मोडक, साने वगैरेंनीं काव्येतिहाससंग्रहाच्या द्वारां अस्सल कागदपत्रें व बखरी प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली; आणि यानंतर पारसनीस, खरे, राजवाडे आणि सध्यां सरदेसाई वगैरेंनीं अस्सल कागदपत्रांची प्रसिद्धि आणि संकलन यांच्या द्वारां मराठ्यांच्या इतिहासाला शास्त्राची पदवी प्राप्त करून दिली. या चौघांचें काम वरील क्रमानें पण स्वयंस्फूर्तीनें वेगवेगळ्या ठिकाणीं सुरू झालें. राजवाड्यांना प्रथम प्रो. विष्णु गोविंद विजापूरकर यांचें, पारसनिसांना डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीचें आणि सरदेसाई यांना ब्रिटिश सरकारचें साहाय्य झालेलें दिसतें. पण खरेशास्त्री स्वावलंबीच दिसतात. मराठी इतिहासाच्या या चार मुनींपैकीं तिघेजण भरपूर कष्ट करून कायमची विश्रांति घेत आहेत, पण चवथे सरदेसाई अदम्य उत्साहानें आपलें काम करीत आहेत. यांपैकीं आपला सांप्रदाय उत्पन्न करण्याचा मान अनाहूतपणें राजवाड्यांना लाभला असून त्यांची परंपरा त्यांचे शिष्य नेटानें चालवीत आहेत. पारसनिसांच्या प्रचंड कार्याचें संरक्षण सरकारनें स्वीकारलें असून संप्रदायाचें स्वरूप न येतां त्यांचें काम पारसनीस म्युझियम सातारा, या संस्थेतर्फे अखंड चालणार असें दिसतें. खरेशास्त्रयांचें काम त्यांचे चिरंजीव यशवंतराव पुढें चालवीत आहेत. मराठ्यांच्या इतिहासाप्रमाणेंच गुरखे, बुंदेले, जाट आणि शीख यांचा इतिहासहि नुकताच घडलेला आहे आणि त्याबद्दल भरपूर साहित्य उपलब्ध होऊन त्याचें योग्य संकलन होईल तर तो त्यांच्या आणि राष्ट्राच्या गौरवांत भर घालण्यासारखा आहे. पण तिकडे अद्यापि संशोधन करण्याची प्रवृत्ति झालेली दिसत नाहीं.

ऐतिहासिक साधनें शिलालेख, ताम्रपट, नाणीं, पत्रव्यवहार, बखरी, आख्यायिका, काव्यें वगैरे अनेक प्रकारचीं असतात. त्यांत पहिल्या चोहोंचें महत्त्व विशेष असून पुढल्यांना आनुषंगिक प्रामाण्य आहे. पुनश्च समकालीन साधनांचें महत्त्व विशेष असून साधन उत्तरकालांतील असेल तर त्याचें महत्त्व कमी कमी होत जातें. प्रशंसात्मक

लिखाणांतील बराचसा भाग बाद करावा लागतो. लेखक, स्थल, काल आणि परस्पर संबंध यांच्याहि बाबतींत विसंवाद उत्पन्न होतां उपयोगी नाहीं. अशा स्थितींत लेखकानें कोणच्या दृष्टीनें लिहिलें आहे हें सर्व पाहून लेखाचें प्रामाण्य स्वीकारावयास पाहिजे. शिवाय पाठाचा, वाचनाचा व कालनिश्चयाचा अत्यंत महत्त्वाचा भाग आहे. त्यावद्दल अतिशय मतभेद होऊं शकतात, आणि त्यामुळें नव्या माहितीनंतर पहिली अनुमानें पार लयास जातात. एवंच अस्सल लेखावरून इतिहास जुळविण्याचें काम वरील अनेक अडचणींमुळें सर्वसाधारण इतिहासज्ञाच्या आवांक्या-बाहेरचें आहे. त्याकरितां तज्ज्ञाचीच जरूर आहे.

नित्यशः अनेक ऐतिहासिक लेख प्रसिद्ध होत असले आणि त्यांचें वाचन वगैरेहि प्रसिद्ध होत असलें तरी त्यामुळें सध्यां उपलब्ध असलेल्या इतिहासाच्या तपशी-लांत कोणती भर पडली, बदल झाला किंवा जुना तपशील खोटा ठरला हें सांगणें बरेंच अभ्यासाचें काम असतें. त्या त्या प्रसंगाचीं सर्व साधनें कालक्रमानें मांडूनच नवा कोणता धागा हातीं लागला किंवा कोणत्या तप-शीलाचा अधिक खुलासा झाला हें ठरवावें लागतें. अगदीं हाताच्या बोटावर मोजण्यासारखीं अल्प साधनें असतील तेव्हांची गोष्ट निराळी. पण, विपुल साधनें असल्यास त्यांची मांडणी क्रमवार केलीच पाहिजे, आणि प्रथम साधनांची मांडणी आणि नंतर कालक्रमानें शोधपूर्वक लेखन हा इतिहासलेखनाचा राजमार्ग होय. मराठींत शिवचरित्राच्या साधनांची जुळवणी श्री. द. वि. आपटे यांच्या नेतृत्वाखालीं याच पद्धतीनें चालू आहे. यापूर्वी 'सोर्सेस ऑफ दि विजयनगर हिस्टरी' हा ग्रंथहि कानडी, संस्कृत, तेलगू व तामीलमधील साधनें एकत्र करून प्रसिद्ध करण्यांत आला आहे. पण त्यावरून इतिहासाचा कोणता भाग जुळवला गेला किंवा कोणत्या भागावर नवा प्रकाश पडला हें दाखविण्याचें काम अजून पूर्ण झालेलें दिसत नाहीं. प्रसिद्ध झालेले शेंकडों शिलालेख व ताम्रपट अद्यापि अशाच कच्च्या मालाच्या अवस्थेंत आहेत. मराठींतील प्रसिद्ध झालेल्या ऐतिहासिक पत्र-व्यवहारावरून ही गोष्ट अधिक स्पष्ट होते. कालक्रम-विरहित आणि पुष्कळावर कालाचीहि नोंद नसलेला पत्रव्यवहार मराठींत प्रसिद्ध आहे, आणि तो कोठें उपलब्ध झाला किंवा त्याचा संदर्भ काय आहे याचाहि खुलासा पुष्कळ ठिकाणीं केलेला नाहीं. त्याचप्रमाणें सूच्यादि साधनें नसल्यामुळें पुष्कळसा पत्रव्यवहार असून नसल्या-सारखा झालेला आहे. तसेंच कांहीं ग्रंथांचें पुनर्मुद्रण करतांना त्यांचे क्रमांक वगैरे पार बदलून टाकले आहेत. त्यामुळें संदर्भ शोधतांना किंवा देतांना अतिशय घोटाळा उडतो. पण आतां ती स्थिति पालटत आहे.

**साधनांचा एक नवा प्रकार**—मध्ययुगापैकीं मौर्य चंद्रगुप्तापासून हर्षाच्या मृत्यूपर्यंतचा काळ हिंदुस्थानचें सुवर्णयुग समजला जातो. या कालांत धर्म व राजकारण या दृष्टीनें हिंदुस्थानांतल्या लोकांचा सर्व जगाशीं संबंध आला. येथील व्यापारी आपलीं गलबतें युरोपांत नेत असत आणि येथील धर्मप्रचारक जगांतील सर्व प्रदेशांत जात. आशिया खंडांतील चीन, तिबेट किंवा पारसीक देशाशीं हिंदुस्थानचें पूर्ण दळणवळण चालू होतें. चिनी प्रवाशांची व राजकारणी लोकांची हिंदुस्थानांत सारखी रहदारी सुरू असे. आणि या देशांतील मोठमोठे शास्त्रज्ञ त्या देशांत सन्मानानें बोलावले जात. इकडून तिकडे नेलेल्या शेंकडों शास्त्रीय ग्रंथांचीं भाषान्तरें तिकडे उपलब्ध झालीं आहेत. डॉ. सतीशचंद्र विद्याभूषणांच्या न्याय-शास्त्राच्या इतिहासावरून ही गोष्ट आपणास पूर्वीच कळली होती. आणि आतां राहुल सांकृत्यायन यांनीं तिबेट व चीन येथें राहून व तेथील भाषांचा स्वतः अभ्यास करून तेथें उपलब्ध व भाषांतरित झालेल्या ग्रंथांची जी माहिती प्रसिद्ध केली आहे, त्यावरून आपल्याला हिंदुस्थानच्या इतिहासाचें एक अगदीं नवेंच निधान उपलब्ध झालें आहे. सांकृत्यायनजींनें आपल्या अचाट साहसानें तरुणांना साहस करण्याचा एक अगदीं नवा रस्ता दाखवून दिला आहे. मोहेंजोदारो, हरपा वगैरे ठिकाणच्या उत्खननामुळें हिंदुस्थानांतल्या उच्च दर्जाच्या प्राचीन संस्कृतीची जगाला माहिती झाली. त्याचप्रमाणें हिंदुस्थानच्या वैभवशाली कालाची अधिक ओळख सांकृत्यायनजींनें घालून दिलेल्या मार्गानें पटणारी आहे. मात्र अमेरिकेंत उपलब्ध होणारे हिंदु संस्कृतीचे अवशेष मध्ययुगापेक्षां प्राचीन दिसतात.

**साधनांची भाषा**—संस्कृत नंतर प्राकृत व त्यापासून उत्पन्न झालेल्या प्रांतिक भाषा यांना प्रत्यक्ष व्यवहारांतल्या म्हणून महत्त्व आलें असलें तरी मूळ भाषा म्हणून संस्कृत-कडेहि सर्व प्रांतांतील लोकांचें लक्ष कायम राहिलेलें दिसतें. वैदिक हिंदूंची तर ती धार्मिक भाषा होती आणि तिला ते देववाणी म्हणत. त्यांचें सर्व महत्त्वाचें लिखाण मधल्या काळांतहि संस्कृतांतच चालू होतें आणि आजहि अंशतः चालू आहे. वास्तविक हिंदूंची राष्ट्रभाषा संस्कृत होय. आणि हिंदूंची सांस्कृतिक भाषा तीच राहणार यांत शंका नाहीं. अशोकानें आपलीं शासनें जरी प्राकृत भाषेंत काढलीं असलीं तरी कनिष्कासारख्या परकीय कुशान वंशांतील

राजानें आपलीं आज्ञापत्रें संस्कृतांत लिहिण्यास सुरुवात केली, त्या वेळीं समिति भरून बौद्ध वाङ्मयाची नवी प्रत तयार करण्यांत आली आणि महायान पंथ अस्तित्वांत आला. त्यानें सर्व वाङ्मय संस्कृतांत लिहिण्याची प्रथा पाडली. गुप्तांनीं वैदिक धर्माला उत्तेजन देऊन आपलीं शासनें संस्कृतांत लिहिलीं. त्यांचेंच पुढील सर्व वैदिक, जैन व इतर पंथीयांनींसुद्धां अनुकरण केलें. त्यामुळें प्रांतिक भाषेच्या तुलनेनें संस्कृतांतहि पुष्कळच लेख प्राप्त होतात. दक्षिणेंतहि बहुतेक मोठाल्या राजांचीं आज्ञापत्रें कानडी वगैरे भाषांप्रमाणें संस्कृतांतहि उपलब्ध होतात. गुप्तांच्या वेळेपासून राजाश्रयांतहि संस्कृत ग्रंथकारांना महत्त्वाचें स्थान प्राप्त होऊं लागलें. मुसलमानांच्या भरभराटीच्या काळांतहि पंडितांची व संस्कृत ग्रंथकारांची परंपरा अखंडित राहून जगन्नाथपंडितासारखीं पंडितरत्नें अत्यंत सन्मानानें राहिलीं. त्यापूर्वींच तोडरमल्लासारखे राजकारणी पुरुष दरबारची भाषा फार्सी असावी असें प्रतिपादीत आणि संस्कृत, हिंदी, फार्सी वगैरे सर्व भाषांत ग्रंथरचना करीत. पहिल्या पठाण वगैरे राजांच्या नाण्यांवर देवनागरींत नांवें लिहिलेलीं आढळतात.

पूर्वींच्या प्राकृत आणि अलीकडील पोर्तुगीज, डच, फ्रेंच व इंग्रजी या भाषांच्या मधल्या काळांत मुसलमानांचा हिंदुस्थानाशीं निकट संबंध आला. प्रथम त्यांना येथील भाषेचा व लिपीचा स्वीकार करावा लागला. त्यांची सत्ता जों जों दृढ होत चालली तों तों प्रथम अरबी आणि नंतर फार्सी भाषेचें महत्त्व एकंदर सर्व व्यवहारांत अत्यंत वाढलें. प्रथम दरबारांत सर्व व्यवहार हिंदीमध्यें चाले, पण बादशाहाच्या खास व्यवहारांत फार्सी किंवा हिंदुस्थानाबाहेरील बादशाहा ज्या प्रांतांतील असे त्या भाषेचें महत्त्व असे. पण यामुळें हिंदुस्थानांतील लोक राजकारणांतील प्रत्यक्ष व्यवहारापासून दूर राहूं लागले आणि परक्यांचें महत्त्व वाढूं लागलें. ही गोष्ट लक्षांत आल्यावर राजा तोडरमल्लसारख्या मुत्सद्द्यानें दरबारची भाषा फार्सी असावी असें बादशाहाकडून ठरविलें आणि फार्सीचें शिक्षण घेण्यास उत्तेजन दिल्यानें बादशाहाच्या खास राजकारणांत येथील स्थानिक लोकांचा प्रवेश झाला आणि त्या मानानें परक्यांचा दरबारांतील वर्चष्मा कमी होत चालला. सध्यांच्या इंग्रजीप्रमाणें फार्सी भाषेशिवाय राजकीय व्यवहार करणें त्या कालीं कमीपणाचें समजत. कवि वगैरे वाङ्मयांतील लोकहि इतर भाषेंत काव्यादि करणें कमीपणाचें मानीत.

अल्बेरुनीचा मूळ हिंदुस्थानविषयक ग्रंथ अरबींत आहे. बाबरचें विख्यात आत्मचरित्र मूळ तुर्की भाषेंत आहे आणि पुढील मोगल बादशाहांच्या आणि दक्षिणेंतील सुलतानांच्या तवारिखा व फर्मानें प्रायः फार्सींत आहेत. पण पुढें दुसऱ्या इब्राहीम आदिलशाहा आणि गोवळकोंड्याचा अबदुल कुत्बशाहा यांच्या कारकीर्दीपासून मराठी व फार्सी-मिश्रित दक्षिणी ऊर्दूंत काव्यें निपजूं लागलीं आणि उत्तरेंतहि शेवटीं शेवटीं ऊर्दूनें बादशाही दरबारचा पूर्णपणें कबजा घेतला. शिवाय सर्वसामान्य व्यवहारांतहि उत्तरेंत ऊर्दू भाषेचें महत्त्व वाढलें. त्याचप्रमाणें दक्षिणेंत महाराष्ट्राबाहेरहि सर्वसामान्य व्यवहारांत मराठी भाषा आणि मोडी लिपी यांनीं आपला पगडा बसविला. सामान्यतः सर्व खासगी आणि सरकारी जमाखर्च मोडी लिपींत लिहिले जात आणि पत्रव्यवहाराकरितांहि मराठी भाषा व मोडी लिपी वापरली जाई. या प्रकारचीं मराठींतील टिपूचीं पत्रें, म्हैसूर दरबारचे जमाखर्च, खासगी, व्यापारी आणि सरकारी पाटीलकुलकर्ण्यासारख्या गांवकामगारांचें शंभर वर्षांपूर्वीचें मराठींतील भरपूर लिखाण उपलब्ध आहे.

मात्र या सर्व साधनांचा परामर्ष घेतांना अत्यंत सावधगिरी ठेवली पाहिजे. जैमिनीनें वेदाचा अर्थ करतांना श्रुति, लिंग, वाक्य, प्रकरण, स्थान आणि समाख्या हीं प्रमाणें सांगून एकापुढें एक कमी दर्जाचें ठरविलें आहे. आणि वरच्या दर्जाचा आधार मिळत गेल्यास त्यावरून निश्चय करावयास पाहिजे असें लिहिलें आहे. तोच न्याय इतिहासाच्या प्रमाणांची पारख करतांना स्वीकारावयास पाहिजे. इंग्रजी, फ्रेंच, डच व पोर्तुगीज भाषेंत आपल्या इतिहासाचें साहित्य असलें तरी त्याला पहिल्या दर्जाचें महत्त्व कधींच लाभण्यासारखें नाहीं. कारण, त्यांत ऐकीव माहितीवर भर फार असतो. त्यामुळें खुद्द त्यांच्या हालचालीशिवाय इतर माहिती त्यावरून स्वीकारतांना फारच सावधगिरी ठेवावयास पाहिजे.

**शब्दोच्चार**—हें काम करतांना शब्दोच्चाराबद्दलहि बरीच अडचण भासली. ग्रीक, अरबी, तुर्की, फार्सी, ऊर्दू, चिनी, तिबेटी, तार्तर, पोर्तुगीज, डच, फ्रेंच व इंग्रजी शब्दांच्या उच्चाराबद्दलची अडचण तर आहेच पण हिंदुस्थानांतील प्रांतिक भाषांतील व्यक्ति, ग्रंथ, स्थलें किंवा पदार्थांच्या नांवांचे उच्चार बहुतेक इंग्रजीद्वारां आमच्या कानांवर येत असल्यामुळें प्रांतिक उच्चारांपेक्षां इंग्रजी उच्चारांचा मनावर पगडा बसलेला असतो. वास्तविक इंग्रजी भाषेपेक्षां लोकरूढ उच्चार आम्हीं स्वीकारावयास पाहिजेत. शिवाय प्रांतिक बोलींत एकाच शब्दाचा भिन्नभिन्न उच्चार आढळतो

आणि इंग्रजी वगैरे भाषेतील स्पेलिंग एकच असतां प्रांतिक लोक त्याचे उच्चार वेगळाल्या पद्धतीनें करतात. मराठींतहि कांहीं शब्दांचे उच्चार जसे असावयास पाहिजेत त्यापेक्षां निराळेच उच्चार रूढ झाले आहेत. त्यामुळें मोठीच अडचण भासते. आमच्या या ग्रंथांत कानडी, फार्सी व ऊर्दू शब्दांचे उच्चार ठरविण्याच्या कामीं बहुभाषाकोविद ग. ह. खरे यांचा आम्हांस फार उपयोग झाला. तथापि कांहीं रूढ उच्चार बदलण्याचें आम्हांस साधलें नाहीं. कारण त्यामुळें निराळेच घोटाळे होऊं लागले. हिंदींतून आम्हीं जो मजकूर घेतला तेथेंहि उच्चारवैचित्र्याचा प्रकार आढळलाच. तथापि हिंदुस्थानांतील स्थलांचीं आणि व्यक्तींचीं नांवें मात्र आम्हीं प्रांतिक उच्चाराप्रमाणें देण्याचा प्रयत्न केला आहे. गंगेबद्दल गॅंजीस, आमूबद्दल ऑक्सस, अयोध्येबद्दल औध, मथुरेबद्दल मुत्रा किंवा उरीयाबद्दल ओरिसा म्हणणें अगदीं बरोबर नाहीं.

**इतिहासाची उपयुक्तता**—इतिहासाच्या उपयुक्ततेबद्दल शंका प्रदर्शित करणारा एक वर्ग आहे. त्यांच्या म्हणण्याप्रमाणें जुनीं मढीं उकरीत बसण्यापेक्षां कांहींतरी नवीन करावयास पाहिजे, तसेंच इतिहासाची पुनरावृत्ति कधींच होत नसल्यामुळें व नव्या कालांत उत्पन्न होणाऱ्या अडचणींना तोंड देण्याकरितां प्रतिभाबलानें हस्तगत होणारीं नवीनच साधनें उपयोगांत आणावयास पाहिजेत, असें असल्यामुळें इतिहासाच्या अभ्यासाचा खटाटोप व्यर्थ आहे. पण ही सर्व विचारसरणी गृहीत गोष्टींवर उभारलेली असल्यामुळें हेत्वाभासपूर्ण आहे. इतिहास हा कर्तृत्व करण्याला उत्तेजनच देत असतो. आणि तसें उत्तेजन देतांना मागील चुकांची पुनरावृत्ति होऊं नये म्हणून सूचना देतो. इतिहासाची पुनरावृत्ति अक्षरशः किंवा प्रसंगशः होत नसली तरी सामान्य मनुष्यस्वभाव पुरातन कालापासून प्रायः आतांपर्यंत सारखाच असल्याचें आढळून येतें. राग, लोभ किंवा द्वेष, मत्सर या भावना अनादि कालापासून आतांपर्यंत अबाधित आहेत. आणि पुढेंहि त्या टिकणार आहेत असें दिसतें. फार तर त्या भावना व्यक्त करतांना नवीन साधनें उपयोगांत आणलीं जातात असें दिसतें. अशा स्थितींत जास्तींत जास्त घटना आणि त्यावरील उपाययोजना आणि परिणाम आम्हांला ठाऊक असतील तर त्यांचा उपयोग प्रतिभेनें उपाययोजना करितांना खांचखळगे टाळण्याकरितां झाल्याशिवाय कसा राहील? जुन्या राज्यक्रांत्याचे किंवा धर्मपरिवर्तनाचे इतिहास आमच्यापुढें असल्यानें नवीन राज्यक्रांतीची भाषा बोलतांना किंवा धर्मपरिवर्तन प्रतिपादितांना आम्हांला बिलकुल संकोच वाटत नाहीं. शास्त्रज्ञहि आपल्या प्रयोगशाळेंत नवा शोध लावतांना जुन्याचा अभ्यास करीतच नवे शोध प्रसवीत असतो.

**इतिहासलेखन**—आपल्याकडे इतिहासलेखनाकडे प्रायः दुर्लक्ष आहे असा प्रवाद आहे. तथापि आपलें नांव दीर्घकाळ आपल्यामागें टिकावें, आपल्या हातून महत्त्वाच्या गोष्टी घडाव्यात आणि त्यांची नोंद केली जावी अशी इच्छा प्राचीन काळापासून या देशांतील लोकांत दिसून येते. आपल्याजवळचें ज्ञान व धन पुढच्या पिढीपर्यंत पोंचविण्याचा मनुष्यस्वभाव आहे. आणि त्या दृष्टीनें शिलाशासनें, मंदिरें, ताम्रपत्रें, स्मारकें, ग्रंथ वगैरे अनेक मार्गांनीं इकडील पूर्वकाळच्या लोकांनीं प्रयत्न केले. वेगळाले जे मतवादी लोक निघाले, त्यांत वेदान्त्यांनीं प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द, अर्थापत्ति आणि अनुपलब्धि हीं सहा प्रमाणें मानलीं. पण, पौराणिकांनीं संभव आणि ऐतिह्य अशा दोन प्रमाणांचा समावेश करून इतिहासालाहि धर्माधर्मविचारांत प्रमाणपदवीला नेऊन पोंचविलें. अथर्ववेदाचा उपवेद इतिहास हा आहे आणि अनेक वेदवाक्यांत इतिहासाला पुराणापेक्षांहि आद्यस्थान दिलेलें आहे. आजहि पुराणावरून पुष्कळ ऐतिहासिक गोष्टींचा उलगडा होतो व नवा इतिहास कळतो हें आपण पाहतच आहोंत. मौर्य चंद्रगुप्ताच्या पूर्वीच्या इतिहासासाठीं तर अद्यापि पुराणाशिवाय आपणांस दुसरा साधन-ग्रंथच नाहीं. त्यानंतर मुसलमानांच्या उदयापर्यंतच्या इतिहासाचीं साधनें श्री. ओझांच्या ' भारतवर्ष के प्राचीन इतिहास की सामग्री ' या पुस्तकांत पाहावयास मिळतात. राजा किंवा त्या योग्यतेच्या पुरुषानें प्रेरणा देऊन लिहवलेलें कवींद्र परमानंदाचें शिवभारत, पर्णालपर्वताख्यान, शंभूचरित किंवा राजारामचरित वगैरे संस्कृत व अनंत फंदीकृत 'माधवनिधन' मराठी भाषेंत लिहिलेले ऐतिहासिक ग्रंथ आपल्यापुढें आहेत आणि त्यांतले कांहीं ऐतिहासिक कसोटीलाहि उतरत आहेत.

शाहूमहाराजांच्या व पेशव्यांच्या रोजनिशा आजहि आपणांस उपलब्ध आहेत. मधल्या काळांतील ग्रंथ, शिलालेख, कांहीं ताम्रपट, शिल्प व नाणीं याशिवाय अन्य साहित्य नष्ट झाल्यामुळें थोडें उपलब्ध होतें. त्यामुळें अनुमानावर भर ठेवावा लागतो. तथापि असें कांहीं इतिहासलेखनाचें साहित्य पूर्वकालीं असें आणि त्याचें महत्त्व जाणून तें योग्य इतिहासलेखकाला पुरवलें जाई याचा अनेक चरित्रांतून उल्लेख आला आहे (उत्बी, बाण, कल्हण, मुहणोत नेणसी, फेरिस्ता, अमृतराय). मधल्या काळांतहि असा इतिहासलेखकांचा वर्ग होता आणि त्यांनीं लिहिलेलें प्रामाणिक लेखन इतिहास या पदवीला योग्य असावें, पण तें राज्यक्रांतीच्या

विनाशक उलाढालींत टिकूं शकलें नाहीं आणि इतिहास-लेखनाच्या बाहेरच्या क्षेत्रांतील कवींचीं काव्यें जीं आमच्या-पुढें आलीं आहेत, त्यावरून आम्हीं त्यांना इतिहास-लेखनाची कल्पना नव्हती असें म्हणतों. पण तें विधान वास्तविक होऊं शकणार नाहीं असें वाटतें. सूत, चारण किंवा भाट आणि मुसलमान अमदानींतील तवारिखनवीस यांना तर दरबारांत राजकीयच काय पण धार्मिक महत्त्वहि प्राप्त झालें होतें आणि त्यांनीं लिहिलेल्या अनेक ग्रंथांत त्यांना राजाकडून पुरविल्या जाणाऱ्या साधन-ग्रंथांचाहि निर्देश आहे, ही गोष्ट विसरतां उपयोगी नाहीं. शिवाय हेंहि ध्यानांत धरलें पाहिजे कीं, लेखनाच्या पद्धतींतहि रोज बदल होत आहे. काल टॉड, ग्रँड डफ वगैरेंनीं लिहिलेले इतिहास आज अपूर्ण, चुकीचे व जुने वाटूं लागले आहेत. मग मध्ययुगांतील इतर इतिहासाची गोष्ट काय सांगावी ?

**हिंदुस्थानावरील सत्ता**—या ग्रंथांतील माहिती-वरून हिंदुस्थानाच्या जवळ असणाऱ्या अरब, अफ-गाण, इराण, मध्य आशिया, तार्तर, तिबेट आणि चीन या प्रांतांतील पराक्रमी व्यक्तींनीं एक-एकदां हिंदुस्थानावर साम्राज्य गाजविलें आहे हें दिसून येईल. पण चंद्रगुप्त मौर्यानंतर खरा सम्राट् असा कोणी हिंदूंत अगर मुसलमानांतहि झालेला नाहीं आणि आज इंग्रजांनाहि हिंदुस्थानाच्या दृष्टीनें अफगाण व हिंदुकुशाच्या भोंवतालचे प्रदेश काबीज करतां आले नाहीं. समुद्रगुप्त, हर्ष हे मोठे सम्राट् होते. पण चंद्रगुप्तापेक्षां त्यांच्याहि राज्याचा विस्तार कमीच होता. अकबर व राज्य-विस्ताराच्या दृष्टीनें सर्वांत मोठा मोगलसम्राट् औरंगजेब याची तीच स्थिति होती. मुहम्मद तुघ्लकाच्या वेळीं मदुरेपर्यंत त्याचे सुभेदार ठाणीं देऊन राज्य करीत असत आणि बंगालमधून चीनवर त्यांनीं स्वारी केली असली तरी त्याच्या सत्तेला राजकीय संघटनेचा पाया नव्हता. त्यामुळें बंडाचे वणवे सारखे पेटून पसरत असत. विजयनगरचें महत्त्व मुसलमानांच्या ऐन माध्यान्हकालीं हिंदुसंस्कृतीच्या रक्षणार्थ पराक्रमानें पुढें येण्यांत आहे. मराठ्यांनीं त्यापेक्षांहि थोडें अधिक यश प्राप्त केलें. त्यांनीं दक्षिण ताब्यांत घेऊन दिल्लीच्या सिंहासनावरहि अनभिषिक्त सत्ता गाजविली. स्वतंत्र राज्य निर्माण करण्याची धडाडी त्यांनीं दाखविली असली तरी दुसऱ्याचा राजमुगुट स्वतःच्या डोक्यावर चढविण्याचें राजकीय कौर्य किंवा नीति त्यांच्या-पाशीं नसल्यानें त्यांनीं फक्त बादशाहाच्या वजीरीवर संतोष मानला; आणि उलट इतरांच्या सत्ता मात्र नामशेष करून इंग्रजांचा मार्ग साफ करून दिला. पण आपल्यापेक्षां वरचढ शत्रु घरांत शिरत असतां तिकडे मात्र द्यावें तितकें लक्ष त्यांनीं दिलें नाहीं.

पूर्वी सम्राट्पद हा सन्मानाचा व कांहीं विशेष जबाब-दारीचा भाग होता. देशांत शांतता ठेवून परक्यांच्या लुटारू आक्रमणापासून देशांतील धर्मसंस्था, ग्रामसंस्था आणि कुटुंबसंस्था यांच्यांत हात न घातल्यास कोणाहि पराक्रमी आणि महत्त्वाकांक्षी माणसाला सम्राट्पद घेतां येई आणि तें पद सत्कृत्यें, औदार्य, नीति आणि पराक्रम यांच्या जोरावर लोकानुरंजन करून संभाळतां येई. पण मुसलमानांनीं तें वरील सर्व धोरणें संभाळून कांहीं वेळां उघड पण पुष्कळ वेळां पर्यायानें धर्मप्रसाराचें साधन बनविलें. पण युरोपियन लोकांनीं त्यांत व्यापाराचीहि दृष्टि ठेवलेली दिसते. आपल्या देशांत उत्पन्न होणारा माल परदेशांत राजसत्तेचें पाठबळ घेऊन त्यांनीं खप-विण्यास सुरुवात केली, आणि त्याच पद्धतीनें आपल्यावर आक्रमण होऊं नये म्हणून देशाभिमान किंवा राष्ट्रीयता यांचें कवच उत्पन्न केलें. सम्राट् हर्षाच्या मृत्यूपर्यंत लोक फक्त सांस्कृतिक बंधनानें संघटित झालेले दिसतात. मुसलमानांच्या आक्रमणाला सुरुवात झाल्यापासून धार्मिक बंधनानें संघटनेला सुरुवात झाली, आणि युरो-पियनांच्या आक्रमणापासून व्यापार किंवा व्यावसायिक बंधनानें लोकांची संघटना होत असल्याचें दिसतें. मग त्याला देशाभिमान, राष्ट्रीयता किंवा स्वदेशप्रेम यांपैकीं कोणचेंहि नांव दिलेलें असो. हे सर्व आत्मसंरक्षणार्थ संघटित होण्याचे मार्ग आहेत. पण याच विचारानें ताब्यांतील देश वागूं लागल्यास आणि स्वातंत्र्याची इच्छा करूं लागल्यास मर्यादित लोकसत्ताहि निर्माण करण्याची त्यांची तयारी आहे. शस्त्रानें धर्माधर्मनिर्णय करण्याचें युग संपलें असून बुद्धीनें कोणत्याहि कठीण प्रश्नाचा निर्णय लावण्याचें युग अवतरलेलें दिसतें.

पण अशा अनेक घटना, त्यांची कारणपरंपरा आणि परिणाम यांचा उलगडा करण्यास सर्व हिंदुस्थानचा एकात्मतेनें विचार करण्याची आपणास संवय पाहिजे. सर्वप्रांतिक किंवा जागतिक दृष्टीच्या व भौतिक शास्त्रीय ज्ञानाच्या अभावीं मध्ययुगांत हिंदुस्थानचें अपरिमित नुकसान झालें आहे.

**मध्ययुगीन चरित्रकोश**—या कालांतील इति-हासाचें काम विशेष अवघड, त्याचीं साधनें अनेक भाषांत, लिपींत व प्रांतांत विखुरलेलीं आणि त्यांचें संकलनहि अद्यापि अपूर्ण; मग संशोधन आणि

प्रथन तर दूरच. वेगवेगळ्या प्रांतांत रोज नवे शोध लागत असून ते लोकांपुढेंहि मांडले जात आहेत. अशा स्थितींत आजतागायत वाचन असलेल्या त्या त्या क्षेत्रांत सतत व्यासंग करणाऱ्या माणसांची अशा कामाला आवश्यकता. पण तशा साहाय्याची योजना प्रयत्न करून शेवटपर्यंत पूर्ण यशस्वी करितां आलेली नाहीं. तसा थोडासा प्रयत्न केल्याचें या ग्रंथाचें सूक्ष्म अवलोकन केलें असतां ध्यानांत येईल. पण शेवटीं तसा प्रयत्न आवांक्याच्या बाहेरचा वाटल्यामुळें सोडून देऊन ग्रंथनिविष्ट झालेली आजतागायतची माहिती नमूद करण्याकडे लक्ष ठेवावें लागलें. आणि ग्रंथमर्यादा लक्षांत घेऊन ती माहिती देण्याचा प्रयत्न केला आहे. जरूर तेथें आधारहि दिले आहेत. पण आमचा हा प्रयत्न कितपत यशस्वी झाला आहे हें बिनचूक व हजरजबाबी उपयोगावरून ठरणार आहे. स्थलसूचि, कांहीं परिशिष्टें व नकाशे तयार असूनहि ग्रंथाची पृष्ठसंख्या मर्यादेबाहेर वाढल्यामुळें देतां आलीं नाहींत.

**कार्य व आभार**—बाहेरून लिखाण मिळविण्याच्या बाबतींत विशेष यश प्राप्त झालेलें नसलें तरी श्री. बाळकृष्णशास्त्री महानुभाव यांनीं केवळ आम्हीं केलेल्या जाहीर विनंतीवरून महानुभावसांप्रदायाचे आद्यसंस्थापक चक्रधर यांचें चरित्र आम्हांकडे पाठविलें. तसेंच येथील शिवचरित्रकार्यालयाचे प्रमुख श्री. द. वि. आपटे, बी. ए., यांनीं शहाजीराजे व शिवाजीमहाराज यांचीं चरित्रें लिहून दिलीं. श्री. मा. ग. बावडेकर यांनीं आपले पूर्वज कृष्णाजी नाईक व बाबूजी नाईक बारामतीकर यांचीं चरित्रें लिहून दिलीं आणि अलीबागचे श्री. ढबू वकील यांनीं आंग्रे घराण्यांतील कांहीं व्यक्तींचीं चरित्रें लिहून पाठविलीं. याशिवाय भारत-इतिहास-संशोधक मंडळांतील वर निर्देश केलेले प्रसिद्ध इतिहाससंशोधक द. वि. आपटे, ग. ह. खरे, शंकरराव जोशी वांईकर आणि कृष्णाजी वासुदेव पुरंदरे यांनीं चर्चा करणें, सूचना देणें या बाबतींत आपलेपणानें साहाय्य केलें. वरील मंडळाचे चिटणीस प्रो. द. वा. पोतदार यांनीं तर संदर्भ-पुस्तकांच्या बाबतींत बिलकुल अडचण भासूं दिली नाहीं. मंडळांतील आणि मंडळाचीं सर्व पुस्तकें मुक्तहस्तानें वापरण्यास दिलीं. तसेंच ओरिएंटल बुक सप्लाइंग एजन्सीचे चालक डॉ. न. गो. सरदेसाई यांनींहि आम्हांला पुस्तकांची उणीव भासूं दिली नाहीं.

पण या कामाकडे आपलेपणानें सतत लक्ष ठेवून काम निर्दोष करण्याच्या कामीं श्री. गजानन शंकर देशमुख, एम्. ए., आमची पुतणी सौ. आनंदीबाई लोणकर, बी.ए. (ऑनर्स), डॉ. गणेश रंगनाथ धडफळे आणि त्यांच्या पत्नी सौ. शारदाबाई धडफळे, राधारमण बाळकृष्ण देव, के. ह. कुलकर्णी यांनीं आणि जैन आचार्य व ग्रंथकार यांचीं चरित्रें निर्दोष व बिनचूक बठविण्याच्या बाबतींत येथील व्यासंगी व्यापारी मोतीराम लाधाजी यांनीं वाचनादिकाचें साहाय्य केलें. तसेंच आमचे मित्र श्री. त्रिंबक बाळकृष्ण भोपळे, बी.ए., यांनीं भाषांतर, रूपांतर व उच्चार वगैरे बाबतींत सतत लक्ष दिलें.

तसेंच श्री. ज. स. करंदीकर, श्री. श्री. ना. ताडपत्रीकर आणि श्री. वि. के. खासनीस यांनीं तयार झालेला मजकूर वाचून पाहिला.

श्री. श्रीधर गणेश भालेराव, बी. एजी., नडियाद; गुलबर्ग्याच्या वैश्य-समाजाचे अध्यक्ष श्री. लक्ष्मय्या जाजी, श्री. वा. गो. विजापूरकर, एम्. ए., एलएल. बी., न्या. एम्. व्हीं. भिंडे, आय. सी. एस्., केसरीसंस्था, लोकमान्य ज्युबिली नॅशनल फंड व श्री. ना. गो. चाफेकर, बी. ए., एलएल. बी., यांनीं आम्हांस प्रारंभीं आर्थिक साहाय्य केलें आणि केवळ याच भागाकरितां श्री. पांडुअण्णा शिराळकर, एम्. एल. ए., कऱ्हाड, यांनीं दोनशें रुपयांची मदत केली.

आम्हांला आरंभिलेल्या कामांत नेहमीं आपलेपणानें मदत करणारे हैदराबादचे धर्मवीर वामनरावजी नाईक निवर्तल्याचें नमूद करण्यास आम्हांस फार दुःख वाटतें.

हा ग्रंथ सुबक व शुद्ध स्वरूपांत प्रसिद्ध करण्याच्या बाबतींत समर्थ भारत छापखान्याचें मालक श्री. स. रा. सरदेसाई यांनीं आम्हांस मदत केली.

या सर्वांच्या मदतीबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोंत.

एकंदर चरित्रकोशाच्या संकल्पित दोन हजार पृष्ठांपैकीं पूर्वीं प्रसिद्ध केलेला प्राचीन चरित्रकोश आणि हा मध्ययुगीन चरित्रकोश मिळून सोळाशें पृष्ठें वाचकांना सादर केलीं आहेत. अत्यंत मेहनतीचें आणि महत्त्वाचें काम झालें आहे. प्रकृतीची प्रतिकूलता आणि कागद वगैरेची महागाई यामुळें अर्वाचीन चरित्रकोशाचें काम या मध्ययुगीन चरित्रकोशाच्या स्वागतावर अवलंबून ठेवावें लागत आहे.

श्रावण, शुद्ध १५।१८५९. **सिद्धेश्वरशास्त्री चित्राव.**

# कोश कसा पहावा ?

१. या कोशांत व्यक्तींचा निर्देश अकारादि क्रमानें केला आहे. अनुस्वार बाराखडींतील प्रत्येक वर्णाच्या शेवटीं घेतला आहे. म्हणजे अचा अनुस्वार अच्या शेवटीं, आचा अनुस्वार आच्या शेवटीं याप्रमाणें दिला आहे. आणि क्ष व ज्ञ हीं संयुक्त व्यंजनें क किंवा ज मध्यें न देतां मराठीप्रमाणें सर्वत्र शेवटीं स्वतंत्र घेतलीं आहेत. तात्पर्य, अनुस्वार हा सोयीकरितां आम्हीं स्वतंत्र दिला आहे आणि क्ष व ज्ञ हे मराठीप्रमाणें स्वतंत्र जोडले आहेत.

२. प्रारंभीं मूळ शब्द जाड्या ठशांत आणि त्याचा पाठभेद किंवा प्रचारांतील उच्चार तेथेंच कंसांत दिला आहे आणि इतर पाठभेद शेवटीं किंवा आरंभीं दिले आहेत.

३. शक्य तोंपर्यंत मूळ ग्रंथोक्त व लोकरूढ उच्चार देण्याचा प्रयत्न केला आहे. सन्मानदर्शक उपपदें गाळलीं आहेत. तथापि क्वचित् लोकरूढ उच्चाराचें संस्कृतीकरण झालें आहे; आणि सन्मानदर्शक व सहज ओळख पटण्यास आवश्यक उपपदें गाळलीं गेलीं आहेत.

४. जाड्या ठशांतील शब्दानंतर कंसांत कालाचा निर्देश सनांत केला आहे. जेथें जन्ममृत्यूचा काल देतां आला नाहीं तेथें कारकीर्दीचा, ग्रंथकर्तृत्वाचा किंवा जो उपलब्ध झाला तो दिला आहे. जेथें अदमासानें काळ काढावा लागला तेथें सुमार असा शब्द जोडला आहे. सुमार म्हणून दिलेला काळ आयुष्याच्या कर्तृत्वाचा काळ धरला आहे. शक्य तोंवर प्रत्येक चरित्रांत काळ, स्थळ आणि वंश यांचा निर्देश करण्याची काळजी घेतली आहे. सनाला शक व संवताची बहुतेक ठिकाणीं जोड दिलेली आहे. शक व संवतावरून सन काढतांना एकाद्या वर्षाची चूक होण्याचा संभव असतो. बहुतेक सर्व उपलब्ध कालगणना शेवटीं परिशिष्टांत दिल्या आहेत. आणि त्यावरून सन, शक काढण्याची पद्धतिहि दिली आहे.

५. प्रत्येक चरित्र देतांना प्रथम नांव, काल, वंश, आईबाप, जन्मस्थळ, शिक्षण, विवाह, कर्तृत्व, संतति, वैशिष्ट्य, ग्रंथ वगैरे क्रमानें माहिती नमूद करण्याचा प्रयत्न केला आहे. विशेष विवेचन न करितां समकालीनता, परिस्थिति व परिणाम नमूद करण्यांत आला आहे.

६. शक्य तोंपर्यंत नक्की ठरलेली माहिती देण्याचा प्रयत्न केला असून कांहीं मतभेदहि नमूद केले आहेत.

७. एकाच नांवाच्या अनेक व्यक्ती असतां त्या कालक्रमानें देण्याचा प्रयत्न केला आहे.

८. पुनरुक्ति टाळण्याकरितां, विशेष माहितीकडे लक्ष वेधण्याकरितां व सारखेपणाची जाणीव होण्याकरितां 'अमुक शब्द पाहा' असें कंसांत म्हटलें आहे. अनेक शब्द असल्यास कितवा शब्द पाहा हेंहि लिहिलें आहे.

९. बरेच वंशवेल या ग्रंथांत दिले आहेत. बरींच राजघराणीं वंशवेल न देतां केवळ कालक्रमानें गादीवर आलेल्या व्यक्ति देऊन दाखविलीं आहेत. आणि कांहींच्या राजवटीचें समालोचन करणारी माहिती जोडली आहे. त्यांची प्रारंभीं अनुक्रमणिका दिली आहे.

१०. जात, धर्म, प्रांत किंवा कोणत्याहि उच्चनीचतेच्या भावनेचा स्पर्श होंऊ न देतां माहिती देण्याचा प्रयत्न केला आहे.

११. जुन्या पाली, मागधी वगैरे दहा प्रकारच्या प्राकृत आणि त्यांपासून उत्पन्न झालेल्या सध्यांच्या प्रांतिक भाषा, तसेंच कानडी, तेलगू, तामील आणि मल्याळि आणि प्राचीनकाळीं संबंध आलेली ग्रीक, मधल्या काळांत संबंध आलेल्या अरबी, तुर्की, फार्सी आणि ऊर्दू या भाषेंतील व्यक्ति, व ग्रंथ वगैरेंचीं विशेषनामें आम्हीं शोधपूर्वक वापरण्याचा प्रयत्न केला आहे. तसेंच चिनी, तिबेटी व क्वचित् तार्तर शब्द आले आहेत. त्यांच्या शुद्धतेबद्दल काळजी घेणें अशक्य झालें आहे.

१२. आधारग्रंथांचे संक्षेप प्रस्तावनेनंतर दिले आहेत. बाकीचे महत्त्वाचे ग्रंथ जेथल्या तेथें नमूद करण्याची काळजी घेतली आहे.

१३. क्वचित् माहिती अपुरी, विवेचन न पटणारें, मतप्रदर्शन बोचक किंवा नामोल्लेख रूढ पद्धतीला सोडून झालेला असल्यास त्याबद्दल ग्रंथकर्त्यांवर कोणत्याहि हेतूचा आरोप न करितां वाचक क्षमा करतील अशी आशा आहे.

१४. अशा तऱ्हेनें व्यक्तींच्या चरित्राची मांडणी करणाऱ्या ग्रंथाची कल्पना नवीन आहे. तसेंच शेंकडों थोर लोकांच्या चरित्राची इतिहासांतील प्रासंगिक उल्लेखापलीकडे कोणालाहि माहिती नाहीं. आम्हीं स्वीकारलेल्या मध्ययुगांतील प्रारंभींचा दीड पावणेदोन हजार वर्षांचा काल इतिहासाच्या दृष्टीनें अगदींच त्रुटित आणि साधन-अवस्थेंत आहे. त्यामुळें अशा ग्रंथांत कांहीं त्रुटि राहणें स्वाभाविक आहे. पण हें सर्व लक्षांत घेऊनहि झालेल्या कामाची आवश्यकता आणि त्याबद्दल समाधान वाटल्याशिवाय राहणार नाहीं असा विश्वास आहे.

# अनुक्रमणिका



---

# ग्रंथसंक्षेप

खालीं फक्त आम्हीं ज्यांचे संक्षेप वापरले आहेत, तेवढेच दिले आहेत. बाकीचे आधार-ग्रंथ पूर्ण नांवानें जेथल्या तेथें नमूद केले असल्यामुळें त्यांची येथें पुनरुक्ति केली नाहीं.

| | |
|---|---|
| अ. को. | अर्वाचीन कोश |
| इ. सं. | इतिहाससंग्रह |
| —ऐ. टि. | — ऐतिहासिक टिपणें |
| | — ऐतिहासिक गोष्टी |
| | — ऐतिहासिक चरित्रें |
| इ. आर्. | एपिग्राफिकल ॲन्युअल रिपोर्टस् ( गव्हर्नमेंट ऑफ मद्रास ) |
| इलियट | इलियट ॲंड डौसन यांची हिस्टरी ऑफ इंडिया सीरीज |
| इंडि. ॲंटि. / इं. ॲं. | इंडियन ॲंटिक्वरी |
| इं. हि. क्वा. / हि. क्वा. | इंडियन हिस्टॉरिकल क्वार्टर्ली. |
| एपि. इंडि. | एपिग्राफिया इंडिका |
| एपि. कर्ना. | एपिग्राफिया कर्नाटिका |
| एस्. आय्. आय्. | साउथ इंडियन इन्स्क्रिप्शन्स. |
| ऐ. गो. | ऐतिहासिक गोष्टी ( इ. सं. पाहा ) |
| ऐ. प. | ऐतिहासिक पत्रव्यवहार ( चित्रशाळा व समर्थ भारत छापखाना ) |
| ऐ. पो. | ऐतिहासिक पोवाडे ( शाळिग्राम व य. न. केळकर ) |
| ऐ. ले. सं. | ऐतिहासिक लेखसंग्रह ( खरे ) |
| ऐ. स्फु. ले. | ऐतिहासिक स्फुट लेख |
| क. क. च. | कर्नाटक कविचरित्र ( कानडी ) ( आर्. नरसिंहाचार्यप्रणीत ) |
| क. कौ. | कविताकौमुदी ( हिंदी ) |
| क. च. | कविचरित्र ( मराठी ) |
| काणे | १ हिस्टरी ऑफ धर्मशास्त्र<br>२ संस्कृत साहित्याचा इतिहास |
| का. दो. | काव्यदोहन ( गुजराथी ) |
| का. प्र. इ. सा. | कायस्थ प्रभूंच्या इतिहासाचीं साधनें |
| काव्यमी. | काव्यमीमांसा ( संस्कृत ) |
| काव्यें. / का. सं. प. या. | काव्येतिहाससंग्रहांतील पत्रें, यादी वगैरे |
| कुमार. | कुमारसंभवकाव्य ( संस्कृत ) |
| कें. हि. | हिस्टरी ऑफ इंडिया, व्हॉ. ३ |
| कोटा द. | कोटादप्तर |
| ख्रि. पू. | ख्रिस्तशकापूर्वी |
| ज. रा. ए. सो. किंवा जे. आर. ए. एस. | जर्नल ऑफ रॉयल एशियाटिक सोसायटी |
| जा. ऐ. का.गु. डा. | जॉन ऐलनकृत कॉइन्स ऑफ दि गुप्त डिनॅस्टीज |
| जे. श. | जेधेशकावली |
| जे. क. शि. च. प्र. | जेधे करिना, शिवचरित्रप्रदीप |

| | |
|---|---|
| टॉड | टॉडचें राजस्थान म्हणजे ॲनल्स ऑफ मेवार |
| टि. ए. एस. | त्रावणकोर अर्कालॉजिकल सर्वे रिपोर्ट |
| डफ | मिस् माबेल डफची क्रॉनॉलजी |
| ग्रँड डफ् | हिस्टरी ऑफ दि मराठाज ( दोन भाग, दुसरी आवृत्ति ) |
| तं. किंवा त. | तंजूर |
| तं. रा. घ. | तंजावरचें राजघराणें ( इ. सं. ) |
| द. इ. सा. | दक्षिणेंतील इतिहासाचीं साधनें |
| ना. सा. रो. | नानासाहेब पेशव्यांची रोजनिशी |
| ना. भो. ब. | नागपूरकर भोसल्यांची बखर |
| ना. प्र. प. | नागरी-प्रचारिणी पत्रिका |
| ना. प्रां. इ. | नागपूर प्रांताचा इतिहास |
| प. सा. / पत्र. सा. / प. सा. सं. | पत्रसारसंग्रह |
| पं. सं. वृ. | पंचमसंमेलनवृत्त |
| पु. द. | पुरंदरे दप्तर |
| पे. द. | पेशवे दप्तर |
| फ्ली. गु. इं. | फ्लीटस् गुप्त इन्स्क्रिप्शन्स |
| बंगा. रा. ए. सो. | बंगाल रॉयल एशिआटिक सोसायटी |
| बार्नेट | इंडियन क्रॉनॉलजी बार्नेटकृत |
| बॉं. ब्रँ. रा. ए. सो. | बाँबे ब्रँच रॉयल एशिआटिक सोसायटी |
| बील | बायोग्राफिक डिक्शनरी ऑफ एन्शन्ट इंडिया |
| बेन्द्रे | कुत्बशाहीचा इतिहास |
| बौ. सं. प. | बौद्ध संघाचा परिचय |
| ब्र. स्वा. च. | ब्रह्मेंद्रस्वामींचें चरित्र ( पारसनीस ) |
| ब्रि. रि. | ब्रिटिश रियासत (पूर्वार्ध व उत्तरार्ध) |
| ब्रि. रि. पू. | ब्रिटिश रियासत पूर्वार्ध |
| भक्त. वि. / भाक्ति. वि. | भक्तविजय |
| भा. इ. सं. मं. किंवा मं. | भारत-इतिहाससंशोधक मंडळ |
| भा. ज्यो. | भारतीय ज्योतिषशास्त्राचा इतिहास |
| भा. व. | भारतवर्ष |
| भा. व. श. | भारतवर्षशकावलि |
| भा. सा. ब. | भाऊसाहेबांची बखर |
| भांडारकर | अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन ( इंग्रजी ) |
| म. इ. सा. | मराठयांच्या इतिहासाचीं साधनें |
| म. क. च. | महाराष्ट्र कविचरित्र |
| म. द. | मराठी दप्तर |
| म. द. बा. | महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें (पारसनीस) |
| म. भा. / म. यु. भा. | मध्ययुगीन भारत ( वैद्य ) |
| म. रि. पू. | मराठी रियासत पूर्वार्ध ( रावसाहेब गो. स. सरदेसाई, बी. ए. कृत ) |
| म. रि. म. १, २, ३ व ४ भाग | मराठी रियासत मध्यविभाग |
| म. रि. उ. १, २, ३, भाग | मराठी रियासत उत्तरविभाग |
| म. वा. इ. | मराठी वाङ्मयाचा इतिहास १–२ (ह. भ. प० ल. रा. पांगारकर-कृत ) |
| म. सा. | महाराष्ट्र सारस्वत १–२ (वि.भावे) |
| मं. अ. | भारत-इतिहाससंशोधक मंडळ अहवाल |
| मं. इ. वृ. | भारत-इतिहाससंशोधक मंडळ इतिवृत्त |
| मं. वा. इ. | भारत-इतिहाससंशोधक मंडळ वार्षिक इतिवृत्त |
| मं. त्रै. | भारत-इतिहाससंशोधक मंडळ त्रैमासिक |
| मं. तृ. सं. वृ. | भारत-इतिहाससंशोधक मंडळ–तृतीय संमेलनवृत्त |
| मा. पे. रो. | माधवराव पेशवे रोजनिशी |
| मु. रि. | मुसलमानी रियासत दुसरी आवृत्ति |
| रघु. | रघुवंश ( कालिदासकृत ) |
| रा. इ. | राजपुतानेका इतिहास ( हिंदी ) |
| रा. खं. | मराठयांच्या इतिहासाचीं साधनें |
| रा. तं. | राजतरंगिणी |
| रा. मा. चं. | राधामाधवविलासचंपू |
| रा. प्र. | राजवाडे यांच्या प्रस्तावना |
| राष्ट्रकूट (आळतेकर) | राष्ट्रकूट ( इंग्रजी ) |
| ले. श. | लेखन शक |
| लेनपूल | मिडीव्हल पीरियड अंडर महॅमेडन रूल ( स. ७१२-१७६४ ) |
| वि. वि. | विविधज्ञानविस्तार |

| | |
|---|---|
| शक. | शालिवाहनशक |
| शा. च.,शा. म. च. | शाहूचरित्र |
| शा. श. | शालिवाहनशक |
| शाहू म. ब. | शाहूमहाराज बखर |
| शि. च. सा. | शिवचरित्र-साहित्य |
| शिवाजी | ( गो. स. सरदेसाईकृत ) |
| स. | इसवी सन |
| स. मा. रो. | सवाई माधवराव रोजनिशी |
| स.·प. | सनदापत्रें |
| सं. सू. | संतकविकाव्यसूचि ( गो. का. चांदोरकरकृत ) |
| संभाजी | ( गो. स. सरदेसाईकृत ) |
| सा. इ. | साहित्यशास्त्राचा इतिहास ( काणे-मराठी प्रत ) |
| सिवेल व आयंगार— | दि हिस्टॉरिकल इन्स्क्रिप्शंन्स ऑफ सदर्न इंडियां (कलेक्टेड टिल१९२३) रॉबर्ट सिवेल आणि एस्. कृष्णस्वामी आयंगार, एम्.ए., पीएच्. डी. |
| सि. सं. ग्रामर | सिस्टिम ऑफ दि संस्कृत ग्रामर ( डॉ. बेलवलकर ) |
| सी. सी. | कटलॉगस कॅटलागोरम ( इंग्रजी ) |
| स्मिथ | अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया एन्शन्ट ( इंग्रजी ) |
| हिस्टरी इं. लॉ. }<br>हि. ऑ. इं. लॉ. | हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक ( सतीशचंद्र विद्याभूषणकृत इंग्रजी ) |
| हि. का. | इंडियन हिस्टॉरिकल क्वार्टर्ली |
| हि. सं. लि. | हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर ( डॉ. विंटर्निट्झ १–२ ) |
| ज्ञा. का. | ज्ञानकोश |
| Annals of the B. O. R. I. } | भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिटयूट |

| | |
|---|---|
| B. | बार्नेट क्रॉनॉलजी |
| B. B. R. A. S. | जर्नल ऑफ बाँबे ब्रँच रॉयल एशियाटिक सोसायटी |
| C. C. | Catalogus Catalogorum |
| Ep. In. | Epigraphia Indica |
| Ep. Carn. | Epigraphia Carnatica |
| History of India | 150 A. D. to 350 A. D. by K. P. Jayaswal, M.A., Ph. D. (1933) |
| I. A. | Indian Antiquary |
| I. H. Q. | इंडियन हिस्टॉरिकल क्वार्टर्ली |
| J. A. S. B. | Journal of the Asiatic Society of Bengal |
| J. B. B. R. S. | जर्नल ऑफ दि बाँबे ब्रँ. रॉयल ए. सो. |
| J. B. O. R. S. | जर्नल ऑफ दि बिहार ओरिसा रिसर्च, सोसायटी |
| J. R. A. S. | जर्नल ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी, ग्रेटब्रिटन |
| J. R. A. S. B. | जर्नल ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी, बंगाल |
| J. R. A. S. P. | जर्नल ऑफ दि रॉ. ए. सो. पंजाब |
| S. S. | जिन-विजय |
| V. Smith | The Early History of India, Ancient–Fourth Edition, revised by S. M. Edwardes, C. S. I., C. V. O. |
| Lanepool | Mediaeval India under Mahomedan rule ( A. D. 712–1764 ) |

भारतवर्षीय

# मध्ययुगीन चरित्र कोश

## अ



**अकण्णा**—कुतबशाहीच्या अखेरच्या कालांतील एक मुत्सद्दी. हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. शाखा आश्वलायन, गोत्र भारद्वाज, त्रिप्रवर. याचें आडनांव पिंगळी. यांचे वंशज वारंगळनजीक हनमकोंडा येथें व आसपास आपल्या देशमुखी वृत्तीवर उपजीविका करितात. निजाम सरकारचे हद्दींत भानजी पेठ म्हणून गांव आहे. हें गांव यांच्या वडिलांच्या स्मरणार्थ वसलेलें असावें, असा तर्क आहे ( मादण्णा पाहा ).

**अकनिष्ठ**—बौद्ध मताचा एक साधु.

**अकबर**—हा दिल्लीच्या मोगल घराण्यांतील तिसरा बादशहा. याचा बाप हुमायून वनवासांत असतां ता. १५ आक्टोबर सन १५४२ रोजीं याचा उमरकोट येथें जन्म झाला. याच्या आईचें नांव हमीदाबानू. याचें संपूर्ण नांव जलालुद्दीन मुहम्मद अकबर असें होतें. हा चौदा महिन्यांचा असतांना याची आईबापांपासून ताटातूट होऊन हा आपल्या चुलत्याच्या ताब्यांत गेला. पुढें दोन वर्षांनीं हा आपल्या आईबापांस भेटला. लहानपणीं यास अनेक वेळां कडक कैदहि भोगावी लागली व जिवावरचे प्रसंग कित्येक आले; परंतु त्या सर्व संकटांतून याचा बचाव झाला. या संकटांमुळें लहानपणीं याचा विद्याभ्यास मुळींच झाला नाहीं. हुमायुनानें याच्यासाठीं एक शिक्षक ठेविला होता. पण त्याचा विशेष उपयोग झाला नाहीं. हुमायुनानें याची फारशी काळजी घेतली नाहीं. धामधुमीच्या वेळीं प्रत्यक्ष अनुभवानें मिळणारें शिक्षण मात्र अकबरास बरेंच मिळालें. बुद्धि चलाख असल्यामुळें, अशा शिक्षणाचा यास चांगला उपयोग झाला. बहरामखान हा एकनिष्ठ व शूर असल्यामुळें हुमायुनानें अकबरास त्याच्या स्वाधीन केलें होतें. त्यानें अकबराचें उत्तम प्रकारें पालन केलें. हुमायूनच्या मरणसमयीं अकबराचें वय अवघें तेरा वर्षें तीन महिने इतकेंच होतें. त्यामुळें राज्याचा सर्व कारभार बहरामखान पाहूं लागला. त्या वेळीं दिल्ली व आग्रा या शहरांपलीकडील फारसा मुलूख अकबराकडे नव्हता; परंतु पुढील ५० वर्षांत अकबरानें उत्तर हिंदुस्थानचा सर्व भाग आपल्या अमलाखालीं आणिला, त्यामुळें, व चांगल्या राज्यव्यवस्थेमुळें याची जगांतील थोर राज्यकर्त्यांमध्यें गणना करण्यांत येते.

अवघ्या चौदा वर्षांच्या वयांत अकबरास अनेक संकटांस तोंड द्यावयाचें होतें. पंजाबांत सिकंदरशाह सूर, पूर्वेकडील प्रांतांत मुहम्मदशाह आदिली व हिमू, मध्यहिंदुस्थानांत व राजपुतान्यांत हिंदू राजे, जुने पठाण सरदार व अफगाणिस्थानांतील अंमलदार हे सर्व अकबराचे शत्रु असून ते याच्याशीं लढाई करण्याच्या तयारींत होते. पण अकबरानें वरील सर्व शत्रूंशीं मोठ्या धिम्मेपणानें तोंड देऊन त्यांचें पारिपत्य केलें आणि आपला राज्यविस्तार वाढविला. या वेळेपर्यंत सर्व राज्यकारभार बहरामखानाच्या हातीं होता. पण अकबर व बहरामखान यांस एकत्र काम करण्याचा प्रसंग आल्यावर त्यांचा मतभेद होऊं लागला. बहराम हा निष्ठुर, एककल्ली व खुनशी असून त्यानें अनेक लोकांचीं मनें दुखविलीं होतीं. त्यामुळें पुष्कळ लोकांनीं बहरामविरुद्ध तक्रारी केल्या. तेव्हां अकबरानें सर्व राज्यकारभार आपल्या हातीं घेऊन बहरामास कामावरून बडतर्फ केलें. त्यामुळें बहरामखानानें बंड केलें, पण त्याचा अकबरानें मोड केला. शेवटीं बहराम मक्केस जात असतां एका पठाणानें त्यास ठार मारिलें. स. १५६१ सालीं अकबरानें जेव्हां बहरामखानापासून राज्यकारभार आपल्या हातीं घेतला, तेव्हां याजकडे पंजाब, वायव्येकडील प्रांत, ग्वाल्हेर, अजमीर, लखनौ व अलाहाबादसुद्धां जौनपूरपर्यंत बाकीचा अयोध्या प्रांत एवढा मुलूख होता. नंतर स. १५६२ सालीं यानें

माळवा, विजागड व बऱ्हाणपूर हे प्रांत काबीज केले आणि रावळपिंडीच्या कांहीं भागांतील गखर लोकांचीं बंडें मोडलीं. स. १५६४ मध्यें चुनारचा किल्ला, नरसिंगपूर जिल्हा, व हुशंगाबादचा कांहीं भाग यानें आपल्या राज्यास जोडला. स. १५६५ च्या उन्हाळ्यांत यानें आग्र्याचा किल्ला बांधण्यास सुरवात केली व ३५ लक्ष रुपये खर्च करून आठ वर्षांत तो पुरा केला. स. १५६८ त चितोड व स. १५६९ त जयपूरच्या राजाचा रतनभोर किल्ला यानें काबीज केला. स. १५६९ मध्यें फत्तेपूर-शिक्री हें शहर वसविलें. स. १५७२ पर्यंत बहुतेक रजपूत संस्थानिक याच्या अमलाखालीं आले. याच्या कारकीर्दीच्या अकराव्या वर्षाच्या अखेरीस याच्या अमलाखालीं पंजाब व काबूल यांसुद्धां वायव्य, मध्य व पश्चिम हिंदुस्थानचा बहुतेक भाग आला होता. पूर्वेस कर्मनाशा ही नदी याच्या राज्याची मर्यादा होती. पुढें स. १५७५ त बहुतेक सर्व बंगाल व बहार प्रांत मोंगल सत्तेखालीं आला. स. १५८१ मधील महत्त्वाची गोष्ट म्हणजे जिझिया कर माफ करण्यांत आला. स. १५८४ पासून स. १५९८ पर्यंत याची राजधानी लाहोर ही होती. स. १५८८ मध्यें सिंध प्रांत यानें आपल्या राज्यास जोडला. अशा रीतीनें यानें एकामागून एक असे प्रांत घेऊन उत्तर हिंदुस्थानांतील सर्व प्रदेश आपल्या सत्तेखालीं आणला. दक्षिणेंतील अहमदनगरवरसुद्धां यानें आपली फौज पाठविली होती. पुढें स. १६०० मध्यें अहमदनगर घेऊन खानदेश, वऱ्हाड वगैरे प्रांत काबीज करून स. १६०१ मध्यें हा आग्र्यास परत आला.

याचीं शेवटचीं वर्षे फार त्रासांत गेलीं. याच्या नातलगांपैकीं व मित्रमंडळींपैकीं बरेच लोक एकामागून एक मरण पावल्यामुळें यास फार दुःख झालें. याला मुलांपासून कांहींच सुख झालें नाहीं. याला प्रथम दोन जुळीं मुलें झालीं तीं बालपणांतच मेलीं. याचा तिसरा मुलगा सेलीम ऊर्फ जहांगीर, चौथा दानियाल व पांचवा मुराद. यांपैकीं दानियाल हा हुशार असून हिंदुस्थानींत कविता करीत असे. मुराद हा थोड्याच वर्षांपूर्वी दक्षिणेकडील मोहिमेंत जालना येथें मरण पावला होता, व १६०५ मध्यें दानियाल हाहि त्याच कारणानें मरण पावला. तेव्हां अकबर अगदीं भ्रमिष्ट बनला व आजारी पडून लवकरच आग्रा येथें मरण पावला (१६ आक्टोबर १६०५). याची कबर शिकंदरा येथें आहे. हा अतिसारानें मेला. पण कांहीं लोक म्हणतात, याच्यावर विषप्रयोग झाला होता. पुढें स. १६९१ मध्यें जाट लोकांनीं बंड करून याचें थडगें उकरून याचीं हाडें जाळलीं. हा आजारी असतांना गादीविषयीं तंटे सुरू झाले होते. परंतु सेलीमनेंच गादीवर बसावें, असें अकबरानें अखेरीस ठरविलें.

याला १ मानबाई, २ जोधबाई, ३ खाजाहसनची मुलगी, ४ राठोडबाई अशा चार प्रमुख बायका होत्या. मानबाईपासून खुश्रु, जोधबाईपासून शहाजहान, खाजाहसनच्या मुलीपासून पर्विझ व राठोडबाईपासून शहर्यार असे पुत्र होते. शिवाय सेलीम, मुराद व दानियाल असे पुत्र होते.

हा लठ्ठ व गोरा असून याचें कपाळ रुंद होतें व चेहरा पाणीदार होता. याची राहणी अगदीं साधी असून हा फार नियमितपणें वागे. नेहमीं उद्योगांत निमग्न असे; फार थोडा वेळ झोंप घेई. हा लहानपणीं फार खादाड होता, परंतु हळुहळू फारच मिताहारी बनला. हा कधीं कधीं मद्य, अफू व गांजा यांचें सेवन करी. सर्दानी खेळ याला फार आवडत. शिकार करण्याचा याला फार नाद होता. हा मोठा शोधक बुद्धीचा असून याला यांत्रिक कलेची आवड होती. यानें अनेक युक्त्या स्वकल्पनेनें बसविल्या होत्या.

मनुष्याचा मूळ धर्म कोणता हें पाहण्यासाठीं यानें कांहीं अगदीं लहान मुलांस एकत्र कोंडून ठेवून तेथें कोणीहि जाऊन बोलूं नये, अशी व्यवस्था केली. पुढें तीन चार वर्षांनीं त्या मुलांस बाहेर काढण्यांत आलें, त्या वेळीं तीं मुकीं असल्याचें आढळून आलें. यानें गंगेच्या उगमाचा शोध केला. यास चित्रकलेची आवड असून त्या कलेस उत्तेजन देऊन यानें तींत अनेक सुधारणा केल्या. यास गाण्याचाहि नाद होता. याच्या वेळेस हिंदुस्थानांत तंबाखू प्रथम आली व यानें ती स्वतः वापरून पाहिली. हा मित्र संपादण्यांत फार कुशल होता. हा स्वतः शिकलेला नव्हता, तरी सर्व प्रकारच्या विद्वान् लोकांशीं फार खुबीनें भाषण करी. तथापि स्वतःची विद्वत्ता बेताचीच असल्यामुळें कोणत्याहि गोष्टीवर याचा सहज विश्वास बसे. याचा मोठा गुण म्हणजे प्रजावात्सल्य हा होय. हा सशक्त व धीट असून निशाण मारण्यांत फार कुशल होता. मृदुपणा व कठोरता यांचें विलक्षण संमेलन याच्या स्वभावांत झालें होतें. तरी एकंदरींत हा दयाळू व मनमिळाऊच होता. सरदार व बडे लोक यांवर मात्र याचा वचक होता.

यानें हिंदूंना खूष करण्याकरितां अनेक कृत्यें केलीं. तथापि, याला न आवडणाऱ्या अशा ज्या चाली त्यांच्यामध्यें प्रचलित होत्या त्या यानें बंद करविल्या. बालविवाह, पशुयज्ञ वगैरे बंद केले व पुनर्विवाहास परवानगी देऊन सती जाण्याविषयीं कोणत्याहि बाईवर सक्ती केली जाऊं नये,

असा नियम केला. तसेंच वधूवर व त्यांचे आईबाप यांच्या संमतीशिवाय लग्नें होऊं नयेत, असाहि यानें कायदा केला. मुसलमान व हिंदु यांच्या हाडांमांसाचें मिश्रण झाल्यानें फार फायदा होईल, असें याला वाटलें. परंतु ही योजना तडीस नेतांना मुसलमानी धर्म आडवा आल्यामुळें यानें आपल्या धर्मसमजुतींत फेरफार केला.

प्रथम मुसलमानी धर्माचा अकबर अनादर करी व पुढें तर त्या धर्मावरील त्याचा विश्वासहि उडाला. तेव्हां हा दुसऱ्या धर्माची माहिती करून घेऊं लागला. आत्म्याचें जन्मांतर व त्याचा मूल प्रकृतींत लय होणें, सूर्य व अग्नि यांस परमेश्वराचे अंश मानणें या गोष्टींवर याचा विश्वास बसला, व ख्रिस्ती धर्माकडेहि याचा थोडासा कल दिसूं लागला ( अक्काविया पहा ). तेव्हां सर्व धर्मांतून चांगल्या गोष्टी निवडून घेऊन अकबरानें एक नवीन धर्म स्थापिला. त्याचें नांव ‘ दीने इलाही ’ असें ठेविलें व स्वतः त्या धर्माचा पैगंबर झाला. सर्व धर्मांतील चांगल्या चांगल्या तत्त्वांचा यांत समावेश केलेला होता. सर्व जातींच्या लोकांस एकछत्री अमलाखालीं आणावयाचें, हा याचा मुख्य उद्देश होता. पण नवीन धर्म स्थापण्याचें काम यास साधलें नाहीं. याचा नवीन धर्म एकानेंहि मनापासून न स्वीकारल्यामुळें तो याच्याबरोबरच समाप्त झाला. राज्यव्यवस्थेच्या बाबतींत आपल्या नवीन धर्माचा अडथळा येतो, असें दिसतांच आपल्या नवीन धर्माचा प्रचार करण्याचा वेग यानें स्वतःच कमी केला.

यानें आपल्या राज्याचे एकूण मुख्य सोळा सुभे केले होते. जमीनमहसुलाचा महत्त्वाचा प्रश्न असल्यामुळें त्यावर तोडरमलसारख्या हुषार माणसाची नेमणूक करून त्याच्याकरवीं जमिनीची मापणी करून तिची प्रतवारी ठरविण्यांत आली; व कुळांकडून रोकड रकम घेण्याची वहिवाट यानें प्रचारांत आणली. सामान्यतः उत्पन्नाचा तृतीयांश सरकारांत घेण्याचा प्रघात होता. जमिनीच्या साऱ्याशिवाय शेतकऱ्यास इतर सर्व कर माफ केले आणि गांवें मक्त्यानें देण्याची पद्धतहि बंद करण्यांत आली. हिंदु व मुसलमान यांपासून सारख्या प्रमाणांत कर घेण्यांत यावेंत, हिंदूंवर करांचें जास्त ओझें पडूं नये, असें अकबराचें मत होतें. यानें आपल्या लष्कराची व्यवस्था चांगली ठेविली होती. रजपूत राजांस लष्करांत मोठमोठ्या जागा देऊन खूष ठेवलें होतें व विश्वासांत घेतलें होतें. रजपूतांशीं विरोध कायम ठेवून राज्य टिकविणें कठिण आहे असें जुन्या इतिहासावरून लक्षांत घेऊन यानें त्यांच्याशीं विवाहसंबंध करण्यासहि सुरुवात केली.

कित्येकांच्या मतें अकबर औरंगजेबाहूनहि अधिक क्रूर होता. हा गरीब व दयाळू दिसतो, याचें कारण हा रागाच्या आवेशांत क्रूर कर्म करीत नसे, हें होय. आरंभीं व चितोडच्या वेढ्यानंतर अकबरानें कठोर आचरण केलें असलें ( २ उदयसिंग व दुर्गावती पाहा ) तरी पुढील वयांत यानें प्रजाहिताच्या अनेक गोष्टी केल्या. यानें स्वतः दुसऱ्यांच्या बायकांविषयीं अभिलाष धरून त्यांस भ्रष्ट केलें आहे. तथापि व्यभिचार बंद करण्यासाठीं यानें अनेक उपाय योजून मद्यप्राशनाच्या अतिरेकाबद्दल शिक्षा ठरविली. एकंदरींत अकबर हा फार थोर राज्यकर्ता होऊन गेला, यांत शंका नाहीं.

हा गुणग्राही व लोकसंग्रही असल्यामुळें सद्गुणी माणसें याच्यापाशीं जमा झालीं. अबुल फज्ल व त्याचा भाऊ फैजी हे दोघेहि विद्वान् व हुशार इसम अकबरापाशीं होते. फैजी हा मोठा कवि होता, म्हणून त्यास अकबरानें कविराज ही पदवी दिली होती. अबुल फज्ल याची बुद्धिमत्ता फार विलक्षण असून त्यानें आपल्या विद्वत्तेची छाप बादशाहावर बसविली. ‘ अकबरनामा ’ नामक एक मोठा ग्रंथ त्यानें लिहिला. त्या ग्रंथाचें इंग्रजी भाषांतर झालें आहे. याचा सेनापति राजा मानसिंग होता. त्यास ‘ मिर्झा ’ म्हणजे ‘ राजपुत्र ’ ही मुसलमानी पदवी बादशाहानें दिली होती. राजा तोडरमल या सुप्रसिद्ध पुरुषाकडे अकबरानें जमाबंदीचें काम सोपविलें होतें. त्याचप्रमाणें याच्या पदरीं सुप्रसिद्ध बुद्धिमान् पुरुष राजा बिरबल हा होता. यांशिवाय तानसेनसारखा उत्कृष्ट गवई आणि बदाऊनी नामक हुशार व विद्वान् गृहस्थ याच्या पदरीं होते. यानें लीलावती, जातक, हरिवंश, नलदमयंती वगैरे अनेक ग्रंथांचीं फारशी भाषांतरें करविलीं.

हा सूर्योपासक होता. राजा बिरबलापासून हा सूर्योपासना करण्यास शिकला. याच्या जैन गुरूंपैकीं एकाकडून हा ‘ सूर्यसहस्रनाम ’ शिकला. ( V. Smith's *Akbar the Great Mogal*, pp. 164-5, 237; *Sarasvati*, 1912, pp. 289 ff. ), अबुल फज्लनें आपल्या यादींत याचे तीन जैन गुरु दिलेले आहेत. हीरविजय सूरींची आणि अकबराची भेट झाल्यानंतर हीरविजय सूरींनें अकबराजवळ भानुचंद्र यास ठेविलें आणि त्या भानुचंद्राबरोबर अकबर ‘ सूर्यसहस्रनाम ’ वाचीत असे, असें कादंबरीवरील भानुचंद्राच्या टीकेच्या शेवटील मजकुरावरून सिद्ध होतें. भानुचंद्राचा शिष्य सिद्धिचंद्र हाहि याचा एक गुरु होता. याच्या जैन गुरूंनीं यास जैन धर्मांतील सांगितलेलीं तत्त्वें यास मान्य असून त्याप्रमाणें हा आचरणहि करी. उदाहरणार्थ, यानें मांसभक्षण करण्याचें सोडून दिलें.

ज्यामध्यें सूर्यदेवतेचीं १००० नांवें आहेत, असें अकबराच्या वेळचें एक चक्र उपलब्ध असून, तें इंडियन हिस्टॉरिकल क्वॉर्टर्लीच्या १९३३ च्या मार्चच्या अंकांत प्रसिद्ध झालें आहे. हिंदु हे सूर्य-उपासक आहेत, आणि वास्तविक पाहतां हिंदूंच गुरु अकबरास 'सूर्यसहस्रनाम' शिकविण्यासाठीं पाहिजे होता. असें असतांहि अकबरानें जैन साधूस आपला गुरु केलें. परंतु जैन हे सूर्योपासक नाहींत. तेव्हां याच्या गुरूविषयीं कांहीं जरी असलें तरी अकबर हा सूर्योपासक असून 'सूर्यसहस्रनाम' वाचीत असे, हा त्यांतील मुख्य मुद्दा होय.

वरील माहिती बेंगलोर येथील जैनमुनि श्रीविचक्षण-विजय यांच्याजवळ असलेल्या हस्तलिखितावरून मिळाली आहे (*Indian H. Quarterly*, 1933 March, pp. 137-140).

**२.** हा औरंगजेबाचा मुलगा होय. कांहीं कारणावरून ह्या दोघांचें बिनसलें व हे एकमेकांपासून वेगळे राहूं लागले. कांहीं दिवसांनंतर यानें औरंगजेबाबरोबर लढाई पुकारली. यानें जर आपल्याकडून दिरंगाई केली नसती तर औरंगजेबाचा पराभव झाला असता. राजपुतान्यामध्यें पराभव झाल्यानंतर हा दक्षिणेंत संभाजीकडे आश्रयाला येऊन राहिला होता. त्याच्या अगोदर हा स्वतंत्र राजा असून यानें आपल्या नांवाचें व शिक्क्याचें नाणेंहि पाडलें होतें.

याचा जन्म औरंगाबाद येथें ११ सप्टेंबर १६५७ त झाला व इराणामध्यें नोव्हेंबर स. १७०६ मध्यें हा मरण पावला.

**३.** हा मोंगल घराण्यांतील जो शहाअलम त्याचा पुत्र होय. हा इंग्रजांकडून नेमणूक घेऊन बादशहा म्हणून दिल्लीस राहत असे. स. १८३७ त हा मरण पावला.

**अकलंकदेव**—अकलंक, अकलंकदेव अथवा अकलंकचंद्र असें यास म्हणत असत. हा एक मोठा तर्कज्ञानी असून जैन धर्मापैकीं दिगंबर पंथाचा होता. याला कवि अशी पदवी होती. यानें समंतभद्राच्या आप्तमीमांसेवर अष्टशती नांवाची टीका लिहिली. जैनांच्या तर्कज्ञान-ग्रंथांमध्यें याचा हा ग्रंथ फार मोठा समजला जातो. माणिक्यनंदीचा परीक्षामुखसूत्र हा ग्रंथ याच्या न्यायविनिश्चय या ग्रंथावरच उभारलेला आहे. अकलंकानें इतरहि अनेक ग्रंथ लिहिले आहेत. उ० अकलंकस्तोत्र, लघीयस्त्रय, स्वरूपसंबोधन व प्रायश्चित्त. लघुसमंतभद्र हा आपल्या अष्टसहस्रीविषमपदतात्पर्यटीका या ग्रंथांत अकलंकास सकलतार्किकचक्रचूडामणि असें म्हणतो. यानें तत्त्वार्थराजवार्तिक या ग्रंथांत जैनेन्द्र सूत्राचा निर्देश केला आहे असें डॉ. एस्. के. बेलवलकरकृत सिस्टिम ऑफ दि संस्कृत ग्रामर या पुस्तकांत म्हटलें आहे (पा. ६३).

पांडवपुराणांत अशी एक दंतकथा आहे कीं, अकलंकाचा एका बुद्ध तर्कज्ञान्याशीं वादविवाद चालला असतां याच्या प्रतिस्पर्ध्यास त्याच्याजवळ असलेल्या भांड्यांतील मायादेवी मदत करीत आहे. ही गोष्ट याला कळतांच यानें त्या भांड्यास लाथ मारून तें उपडें केलें व अशा रीतीनें आपल्या प्रतिस्पर्ध्याच्या स्फूर्तीस आळा घातला.

अकलंकाचा धर्मकीर्तीबरोबर निर्देश केला जातो. हा राष्ट्रकूट राजा शुभतुंग अथवा पहिला कृष्णराज याचा समकालीन होता. हा स. ७५० च्या सुमारास होऊन गेला. (सतीशचंद्र विद्याभूषणकृत हिस्ट्री ऑफ इंडियन लॉजिक, पा. १८५-१८६).

यानें कांची येथील हिमशितल राजाच्या दरबारांत बौद्धांचा पराभव केला. या पराभवानें दक्षिणेंतून बौद्धांची हकालपट्टी झाली (रामस्वामी आयंगारकृत दक्षिणेंतील जैनधर्माचा इतिहास). हें वरील पांडवपुराणांतील दंतकथेवरून लिहिलेलें दिसतें.

**अकंपित**—महावीर नांवाच्या चोविसाव्या तीर्थंकराचा शिष्य.

**अक्कादेवी**—कल्याणीच्या चालुक्य राजघराण्यांतील दुसऱ्या जयसिंहाची वडील बहीण. हिचा उल्लेख बऱ्याच कागदपत्रांतून व अंकित लेखांतून सांपडतो. हिला 'गुणदबे डंगी' (सद्गुणांची नवलाई) व 'एकवाक्ये' (एकवचनी) अशीं विशेषणें लावलेलीं आहेत. शिवाय 'लढाईंत आणि शत्रुपक्षीय राजांना मारण्यांत भैरवी' असें हिचें वर्णन केलें आहे. स. १०२१ किंवा १०२२ मध्यें दुसऱ्या जयसिंहाच्या सार्वभौमत्वाखालीं किसुकाड (सप्तती) वर ही राज्य करीत होती. (इं. अँ. पु. १८ पा. २७५). पुढें पहिल्या सोमेश्वराच्या अमदानींतसुद्धां ही अधिकारारूढ असलेली दिसते. कारण, स. १०४७ च्या एका लेखांवरून बेळगांव जिल्ह्यांतील गोकागे (गोकाक) च्या किल्ल्याला वेढा देऊन बसलेली आढळते (विजापुर जिल्ह्यांतील अरसिबिडी येथील शिलालेख). स. १०५० किसुकाड (सप्तती), तोरगरे (पद) आणि मासवाडि (एकशतचत्वारिंशत्) या मुलुखावर हिचें राज्य होतें (धारवाड जिल्ह्यांतील सूडि गांवचा शिलालेख). पुनः स. ११५३ किसुकाड (सप्तती) वर हिच्या वर्चस्वाचा उल्लेख आढळतो (अरसिबिडी येथील दुसरा एक शिलालेख) व त्याच लेखांत विक्रमपुर (हल्लींचें अरसिबिडी गांव, हुनगुंद तालुका,

विजापुर जिल्हा ), हीं हिची राजधानी असल्याचें ध्वनित होतें. स. १०६६ मधील जी एक नोंद आहे तींत बनवासी ( द्वादशसहस्र ) आणि पानुंगल ( पंचशत ) यांचा अधिपति, कादंब महामंडलेश्वर तोयिमदेव याची मातोश्री म्हणून अक्कादेवीचें नांव आहे ( धारवाड जिल्ह्यांतील होत्तूर गांवचा शिलालेख ). त्यावरून हिचा नवरा हानगळच्या कदंबांपैकीं असावा, असें दिसतें. पण त्याचें नांव मात्र सांपडत नाहीं.

( बॉम्बे ग्या. दि डिनॅस्टीज ऑफ दि कनरीज डिस्ट्रिक्ट ऑफ बॉबे, पु. १. भा. २. पा ४९५ ).

**अक्काविया**—मध्यंतरीं अकबराचा कल थोडासा ख्रिस्ती धर्माकडे होता. तेव्हां एवढ्या मोठ्या बादशहास आपल्या धर्मांत ओढण्याची ही संधि चांगली आहे असें वाटून पोर्तुगीज सरकारनें अक्काविया, हेन्रीक व मान्सेराट अशा तिघा असामींस फत्तेपूर-शिक्रीस पाठविलें. त्याचा परिणाम जरी अकबराचें धर्मांतर होण्यांत झाला नाहीं, तरी पण अकबराच्या विचारांत अक्कावियाच्या सान्निध्यानें थोडासा बदल झाला (मु. रि. भाग २ रा. पृ. ९५ व १०५).

**अखंडानंदसरस्वती**—यानें तत्त्वदीपन नांवाचा शंकराचार्यांच्या मताचा ग्रंथ लिहिला.

**अगस्त्य**—प्राचीन कवि. हा जातीनें शूद्र असून पुराणप्रसिद्ध अगस्त्य ऋषीचा हा अवतार होता, असें कांहींचें मत आहे. तामिळ भाषेचें व्याकरण प्रथम यानेंच रचिलें. व त्यामुळें त्या व्याकरणास ' अगस्त्य-व्याकरण ' हें नामाभिधान लावतात. न्याय, वैद्यक, रसायनशास्त्र इत्यादिकांवरहि याचे पुष्कळ ग्रंथ आहेत, असें म्हणतात. वर जो याचा काल दाखविला आहे, तो डॉ. कॉल्डवेल यांच्या मतानुसार आहे, अशी माहिती ग्यारेट कोश वगैरे ग्रंथांवरून अर्वाचीन कोशकारानें दिली आहे.

**अग्निमित्र**—मगधच्या शुंग घराण्यांतील पुष्यमित्राचा हा मुलगा होय.

स. पू. १७० मध्यें हा विदिशा ( भेलसा ) येथील सुभेदारीवर होता. त्या वेळीं यानें यज्ञ-सेन शातकर्णी याचा पराभव केला. पुढें स. पू. १४८ मध्यें हा आपला बाप पुष्यमित्र हा मरण पावल्यावर गादीवर आला.

स. पू. १४० त अग्निमित्र मरण पावला व याच्यानंतर सुज्येष्ट हा मगध देशांत राज्य करूं लागला ( बार्नेट ).

विदर्भ देशचा राजा यज्ञसेन याची मुलगी मालविका हिच्याशीं याचें लग्न ठरलें होतें. परंतु ही गोष्ट मालविकेच्या माधवसेन नांवाच्या भावास पसंत न पडून त्यानें मालविकेला आणण्याकरितां अग्निमित्रानें पाठविलेल्या सैन्यावर हल्ला केला. त्यांत मालविका पळून अग्निमित्राकडे आली. परंतु तिला कोणींच न ओळखल्यामुळें धारिणी राणीनें तिला आपल्याजवळ ठेविली व तिला नृत्य शिकवण्याची व्यवस्था केली. पुढें विदूषकाच्या मध्यस्थीनें यानें तिचें नृत्य पाहिलें व हा खूष झाला. पुढें तिच्या भेटीचा योग विदूषकानें दोनदां जुळवून आणला. परंतु इरावती राणीनें विघ्न उपस्थित केल्यामुळें तो बेत सफल न होतां तिला धारिणी राणीनें तुरुंगांत टाकलें. पुढें विदर्भ देश जिंकण्याकरितां गेलेल्या सैन्याचा जय झाला व त्यांतील दूतांनीं मालविकेला ओळखल्यामुळें तिची तुरुंगांतून सुटका झाली व अग्निमित्रानें तिच्याशीं विवाह केला, अशी कथा कालिदासाच्या मालविकाग्निमित्रांत आहे. परंतु यांत काव्य किती आणि ऐतिहासिक सत्य किती, याचा उलगडा करण्यास साधन नाहीं.

**अग्निशर्मा**—ईश्वर कृष्णाचें नामान्तर.

**अचवेसिंग**—हा यशवंतरावाच्या एका रक्षेचा पुत्र असून अतिशय शूर होता. यशवंतराव होळकरास यानें प्रत्येक मोहिमेंत मदत केली होती ( म. रि. उ. वि. ३ पृ० ३५२).

**अचलोजी मोहिते**—सुवर्णदुर्गाचा किल्लेदार. हबशांशीं लढतांना कच खाऊन किल्ला ताब्यांत देऊं लागला, तेव्हां तुकोजी आंग्रे यानें पराक्रम करून किल्ला संभाळला म्हणून किल्लेदारी त्याच्याकडे गेली.

**अचिंतिपा**—हा चौऱ्यांशी सिद्धांपैकीं अडतिसावा सिद्ध ( सिद्ध पाहा ). हा जातीनें लकड्हारा होता. धनिरूप ( ? ) हें याचें राहण्याचें ठिकाण होय. यानें तीर्थिकचंडालिका नांवाचा ग्रंथ लिहिला आहे ( त. ४८-६७ ).

**अच्युत नायक**—हा यादव घराण्यांतील रामचंद्र यादवाचा एक संस्थानिक. हा ब्राह्मण असून यानें दिलेल्या देणग्यांचा उल्लेख ठाणें येथील शिलालेखांत आढळतो ( रा. गो. भांडारकरकृत अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन, पा. १६२ ).

**अच्युतप्पा नायक**—हा सेवाप्पा नायकाचा पुत्र. हा तंजावरचा एक नायक होय. याचा मुलगा प्रसिद्ध रघुनाथ नायक यानें विजयानगरचा वेंकटपतिदेवराय २ रा याला वेळोवेळीं मदत केली. बापाच्या उतारवयांत हाच कारभार पाहत असे. यानें सोनारांना कांहीं जमिनी इनाम दिल्या.

**अच्युतराय**—हा विजयानगरच्या तुळुव घराण्यांतील कृष्णदेवरायाचा सावत्र भाऊ होय. हा नरसा किंवा नरसिंह यास अंबांबिकेच्या पोटीं झाला. याला रंगराय नांवाचा एक सख्खा भाऊ होता. याचा काल स. १५३० ते १५४१ असा आहे.

याला व याच्या दुसऱ्या बंधूंना व एका पुतण्याला, फंद-फितुरी होऊं नये म्हणून, कृष्णदेवरायानें चंद्रगिरीच्या किल्ल्यांत कैदेंत ठेविलें होतें. हा गादीवर बसतो न बसतो तोंच अपशकुनादाखल, रायचूर व मुदगल हे सरहद्दीवरील महत्त्वाचे किल्ले हातचे गेले. यानें क्रूर व जुलमी वर्तनानें सारी प्रजा व स्नेही यांचीं मनें विटविलीं. याचा उपजत भागूबाईपणा साऱ्या साम्राज्यभर महशूर होऊन गेला. 'याचें वर्तन व राज्यकारभाराची तऱ्हा यांच्यामुळें दक्षिण हिंदुस्थानांतील हिंदु लोकांचा अधिकार व राजकारण यांचा समूळ नाश होण्याला साधन होऊन, परकीयांना साऱ्या देशांत धुमाकूळ घालण्याला चारी वाटा मोकळ्या झाल्या. पुरता उच्छेद पाहण्याला मात्र हा उरला नाहीं.' वगैरे वर्णन 'नुनीज'नें याच्याविषयीं केलें आहे. कृष्णरायाचा मुख्य मंत्री जो 'साळुवा तिम्मा' तोच याचा प्रधान होता. साळुवा तिम्मानंतर रामराय हाच मुख्य प्रधान झाला. याच्या कारकीर्दींत मंत्री प्रबल होऊन राजा नुसता नामधारी बनला. याला मुसलमानांशीं सारखें झग-डावें लागलें.

यानें देवस्थानांना बऱ्याच देणग्या दिल्या आणि पुष्कळसा धर्मादाय केला. याच्या वेळीं विठ्ठलरायाचें मंदिर बांधलें गेलें. हा स. १५४१ मध्यें मरण पावला व याच्यानंतर याचा पुत्र वेंकट १ ला हा विजयानगरच्या गादीवर आला. पण तो १ वर्षभरसुद्धां गादीवर नव्हता (एक नष्टस्मृतिसाम्राज्य).

**अच्युत रावजी मोडक**—हा एक संस्कृत कवि होय. हा नाशिक मुक्कामीं राहत असे. रघुनाथभट्टजी हे त्यांचे गुरु होत. याची कृष्णलीला म्हणून संस्कृत कविता मनोवेधक आहे. शिवाय इतर सुंदर काव्यें बरींच आहेत. त्र्यंबकराज बाबा गोसावी–नाशिककर हे याचेच शिष्य होत.

याचा जन्म शके १७०० मध्यें झाला व वयाच्या ५५ व्या वर्षीं शके १७५५ मध्यें नाशिक क्षेत्रींच मरण पावला, असें लोक सांगतात.

**अच्युताश्रम**—हा एक कवि होता. याचा 'वैरागर' नांवाचा एक (व्याकरण) ग्रंथ अप्रकाशित आहे. तो अपूर्ण असून त्याची प्रत आपचंद मठांत आहे. याच्या गुरूचें नांव सहजानंद असें होतें. हा कवि श्रीएकनाथकालीन होता (मं. श. १८३५ वा. इ. लें. ३०).

**२.** हे स्वतःस चिदानंदानुचर म्हणवितात. यावरून यांचे गुरु चिदानंद. यांचे शिष्य गोपाळ याज्ञवल्की (कृष्ण याज्ञ-वल्कीचे पुत्र). यांचे विनंतीवरून शिवकल्याणांनीं अनु-भवामृतटीका रचली (श. १५५७).

ग्रंथ—भगवद्गीता (१६१४ ?), ब्रह्मकथा, रामवोवीया (सं. सू.). (४ ब्रह्मानंद पाहा).

**अजमशाह**—हा औरंगजेबाचा दुसरा मुलगा. यासच अज्जम असेंहि म्हणत. लहानपणीं यानेंच औरंगजेबाच्या आज्ञेनुसार झोंपलेल्या मुरादचा खंजीर काढून आणला होता. सातारचा किल्ला प्रयागजी लढवीत असतां शेवटीं तो औरंगजेबाच्या स्वाधीन करणें त्यास भाग पडलें. याची मेहनत त्याला उपयोगी पडली म्हणून किल्ल्याचें नांव अजीमतारा असें ठेवण्यांत आलें.

हा जरी वडील मुलगा नव्हता, तरी पण हा मुसलमान स्त्रीपासून औरंगजेबास झाला असल्यामुळें बादशहाचे पश्चात् यासच गादी मिळवून द्यावी, असें रोशन-आरा हिला वाटत होतें. कारण त्यामुळें तिचें महत्त्व कायम राहणार होतें. त्याप्रमाणें तिनें मोठमोठ्या अमीर उमरावांना अनेक पत्रें लिहिलीं व बादशहा बेसावध असतां एक दिवस त्याच्या बोटांतील आंगठी काढून तिनें तीं पत्रें मोर्तब केलीं. पण औरंगजेब बरा झाल्यावर त्याला आपल्या बहिणीचा या बाबतींत जबर संशय येऊं लागला. ही सर्व खटपट केवळ यास गादीवर बसविण्यासाठींच होती.

पुढें औरंगजेबाचे पश्चात् गादीविषयीं तंटे होऊन वडील भाऊ मुअज्जम व हा यांचें आग्रा येथें निकराचें युद्ध झालें, त्यांतच हा शत्रूकडून मारला गेला (मु. रि. भाग २ पृ. २७६ व ३८६).

**अजयदेव**—हा माळव्याच्या दुसऱ्या जयवर्म्याचा महाप्रधान होता. याला तेथें राजा असें म्हटलें आहे.

**अजयदेव चव्हाण**—हा चव्हाण घराण्यापैकीं तिसऱ्या दुर्लभराजाचा मुलगा. यानें स. ११०० च्या सुमारास अजमेर येथें राज्य स्थापन केलें. याच्या पत्नीचें नांव सोमलादेवी. यानें आपल्या व पत्नीच्या शिक्क्याचीं नाणीं पाडलीं होतीं (स्मिथ).

**अजयपाल**—(स. ११७३–११७७) गुजरा-थच्या (सोळंकी) चालुक्यवंशांतील कुमारपालानंतरचा राजा. याच्या बापाचें नांव महीपाल. कुमारपाल निपुत्रिक मेल्यामुळें अजयपाल हा त्याच्या भावाचा पुत्र विक्रमसंवत् १२२९ मध्यें गादीवर आला (द्याश्रयकाव्य व वेरावळ येथें असलेला पाटणचा अंकित लेख पाहा). कुमारपाल-प्रबंधांत म्हटलें आहे कीं, कुमारपालाच्या मनांत आपल्या मुलीचा मुलगा प्रतापमल्ल यास राज्य द्यावयाचें होतें. पण अजयपालानें बंड करून विषप्रयोगानें कुमारपालाचा खून केला. सुकृतसंकीर्तनाचा कर्ता लिहितो कीं, अजयपालाच्या

दरबारीं असलेलें रुप्याचें छत सपादलक्ष( शिवालिक )च्या राजाकडून आलेली नजर होती. जैन ग्रंथांत याचा उल्लेख सांपडत नाहीं. कारण हा जैनधर्माच्या विरुद्ध होता. कीर्तिकौमुदींत अजयपालाचा केवळ नांवाला उल्लेख आला असून प्रबंधचिंतामणिकारानें तर अजयपालानें आपल्या चुलत्यानें बांधलेलीं जैन देवालयें उध्वस्त केलीं, असें स्पष्ट म्हटलें आहे. आंबडा वगैरे कुमारपालाचे जैन अमात्य याच्या मर्जींत नव्हते. अजयपाल हा निर्दय व गर्विष्ठ स्वभावाचा होता, असें दिसतें. उदयपूरच्या अंकित लेखांत स. ११७३ च्या सुमारास सोमेश्वर हा अजयपालचा कारभारी होता, असा उल्लेख आहे. यानें कपर्दि नांवाच्या इसमास तो ब्राह्मणानुयायी होता म्हणून आपला कारभारी नेमलें होतें. पण त्याचें पटेनासें झालें, तेव्हां यानें त्याला उकळत्या तेलाच्या कढईंत टाकण्याचा हुकूम केला. दुसऱ्या एका प्रसंगीं यानें रामचंद्र नांवाच्या जैन पंडितास तांब्याच्या तापलेल्या पत्र्यावर बसण्याची शिक्षा दिली. उपर्युक्त आम्रभट ऊर्फ आंबडा नामक याच्या सरदारानें याचा हुकूम मान्य करण्याचें नाकारल्यानें दोघांची लहानशी लढाई होऊन आंबडा मारला गेला. मेवाडचा राजा सामंतसिंह याच्याबरोबर झालेल्या युद्धांत हा जखमी झाला. पण त्या वेळीं आबूच्या प्रल्हादन परमारानें गुजराथचें संरक्षण केलें ( ना. प्र. प. १ पा. १७८ ). संवत् १२३३ ( स. ११७६ ) मध्यें अजयपालाच्या विज्जलदेव नांवाच्या द्वारपालानें खंजीर खुपसून याचा वध केला. अजयपाल मुसलमान झाला होता, हें टॉडचें विधान खरें मानण्यास सबळ पुरावा पाहिजे. याच्या पश्चात् याचा पुत्र दुसरा मूळराज हा पाटणच्या गादीवर बसला. मूळराज अल्पवयस्क असल्यामुळें त्याची आई नैकीदेवी कादंबराजा परमादि ( स. ११४७–११७५ ) याची कन्या ही सर्व कारभार पाहूं लागली, व तिचा भाऊ भीमदेव हा सेनापति झाला. भीमदेव हा मोठा शूर होता. परंतु दोन वर्षांच्या आंतच बालवयीं मूळराजा मरण पावला ( बॉंबे गॅझेटियर, गुजराथ; यशःपाल पाहा ).

**अजयवर्मा**—माळव्याच्या परमारांपैकीं यशोवर्म्याचा दुसरा पुत्र. हा जयवर्म्याचा उत्तराधिकारी होता किंवा त्याचें राज्य यानें घेतलें होतें हें समजत नाहीं. याच्या वेळेपासून माळव्याच्या परमारांच्या दोन शाखा झाल्या. मोठ्या शाखेचे लोक आपणांस माळव्याचे स्वामी मानीत होते, आणि छोट्या शाखेचे आपणांस महाकुमार म्हणवीत असत. महाकुमार उदयवर्म्याचे वि. सं. १२५६ ( स. १२०० ) मधील दानपत्रांत म्हटलें आहे कीं, ‘ परमभट्टारक महाराजाधिराज परमेश्वर जयवर्मा याचें राज्य नष्ट झाल्यावर महाकुमार लक्ष्मीवर्म्यानें आपल्या तलवारीच्या जोरावर राज्य कमावलें.’ यावरून असें अनुमान निघतें कीं, अजयवर्म्यानें जयवर्म्याचें राज्य घेतलें त्या वेळीं लक्ष्मीवर्मा हा जयवर्म्याच्या पक्षांत होता व त्यानें राज्याचा कांहीं भाग ताब्यांत घेतला होता. महाकुमार हरिश्चंद्रवर्माच्या दानपत्रांत जयवर्म्याच्या कृपेनें राज्य मिळाल्याचा निर्देश वरील म्हणण्याला पोषक आहे. अजयवर्म्याचा पुत्र विंध्यवर्मा हा नंतर गादीवर आला ( रा. इ. पा. १९७-१९८ ).

**अजयसिंह**—( इ. स. १२९०–१३०१ ) चितोडच्या राणा लखमसीच्या पश्चात् चितोडचा खरा वारस अजयसिंह हा मेवाडच्या पश्चिम सरहद्दीवर अरवली डोंगराच्या खोऱ्यांत केळवाडा नामक जें स्थळ आहे तेथें जाऊन राहिला. लखमसीनें जोंहारास निघते समयीं जयसिंगास असें सांगितलें होतें कीं, तूं वृद्ध होऊन राज्य पाहण्यास असमर्थ होशील तेव्हां मागून तुझा वडील भाऊ अरिसिंग हा प्रारंभीं या लढाईंत मेल्यामुळें त्याच्या पुत्रास ( हंमीरास ) राज्यावर बसीव. अलाउद्दीनाच्या हातीं चितोड आल्यावर तो कांहीं दिवस तेथें राहिला व तेथील देवळें वगैरे उध्वस्त करून त्यानें तो झालोरच्या मालदेव नांवाच्या आपल्या एका सामंताच्या स्वाधीन केला. मेवाडांत दिल्लीचे शिपाई व स्वार जिकडे तिकडे रक्षणास ठेविले होते. त्यांच्याशिवाय अजयसिंहास डोंगरांतील भिल्ल वगैरे लोकांच्या नायकांशींहि झगडावें लागे. यां सर्वांत मूंजा भिल्ल म्हणून एक अतिशय बलिष्ठ नाईक होता. त्यानें एकदां शेरोनाल्यावर स्वारी करून अजयसिंहाच्या मस्तकावर भाल्याचा वार केला. यास सज्जनसिंह व क्षेमसिंह असे अनुक्रमें दोन पुत्र होते, परंतु ते या संकटप्रसंगीं कामास आले नाहींत. म्हणून अजयसिंहानें हंमीर अजोळीं होता त्यास बोलावणें पाठविलें व मूंजाचा सूड घेण्याची त्यास आज्ञा केली. तेव्हां थोड्याच अवधींत हंमीरानें मूंजाचें शिर कापून आपल्या चुलत्यापुढें ठेवलें. तेव्हां अजयसिंह खूष झाला व ‘ तुझ्या कपाळीं दैवानें साम्राज्योपभोग लिहिला आहे ’ असें म्हणून त्यानें आपल्या पुतण्याच्या कपाळीं रक्ताचा टिळा लावला. याच्या पुत्रांपैकीं धाकटा लवकरच केळवाडा येथें मरण पावला. दुसऱ्या सज्जनसिंहानें राज्याकरितां हंमीराशीं भांडूं नये म्हणून त्यास यानें हद्दपार केलें. हद्दपार केल्यावर सज्जनसिंह दक्षिणेस आला व पुढें त्याच्याच कुलांत शिवाजी झाला. मेवाडच्या बखरींत अजयसिंहापासून शिवाजीपावेतों अजयसिंह, सज्जनसिंह, दलीपसिंह,

शिवजी, भोराजी, देवराज, उग्रसेन, माहूलजी, खेलजी, जनकोजी, सटवाजी, संभाजी आणि नंतर छत्रपति शिवाजी असा वंशवृक्ष दिला आहे. लोकहितवादींनीं माहूलजीच्या जागीं मालोजी व संभाजीच्या जागीं शहाजी अशीं निराळीं नांवें दिलीं आहेत ( रा. इ. पा. ५१४ ).

**२.** त्रिपुरीच्या कलचुरी घराण्यापैकीं हा विजयसिंहाचा मुलगा.

**अजातशत्रु**—हा शिशुनागवंशांतील राजा. पुराणांत भविष्यकालीन म्हणजे भारतीय युद्धोत्तरकालीन राजे सांगतांना याचा निर्देश आला आहे. ब्रह्मांडपुराणांत हा विधिसाराचा पुत्र दिला असून विष्णुपुराणांत बिंदुसाराचा म्हणून दिला आहे. मत्स्यपुराणांत भूमिमित्राचा पुत्र आणि वायुपुराणांत क्षेमवर्मनचा पुत्र म्हणून दिला आहे. जैन ग्रंथांत याच्या आईचें नांव वैदेही असें दिलेलें आढळतें.

याला कूणिक किंवा कूणिय अशीं नामान्तरें आहेत. याचा पिता बिंबिसार यानें आपल्या वृद्धापकाळीं राज्य याच्या स्वाधीन केलें, अशी जैन ग्रंथांत दंतकथा आहे. पण राज्य मिळविण्याच्या उत्कण्ठेनें यानें पित्याचा वध केला, असें बौद्ध व ब्राह्मी दन्तकथा प्रतिपादन करितात. पुराण बौद्ध-कथांत हें कृत्य गौतमबुद्धाचा शालक देवदत्त याच्या चिथावणीवरून झालें, असें सांगितलेलें आढळतें ( ऱ्हीस डेव्हिड्स, बुद्धिस्टिक इंडिया ). अखेरीअखेरीस व्हि. स्मिथचें, अजातशत्रूच्या पितृवधाची हकीगत बनावट असावी, असें मत झालें होतें ( ऑक्सफर्ड हिस्टरी ऑफ इंडिया पाहा ). मात्र एवढें खरें कीं, बापाला तुरुंगांत टाकून यानें राज्य बळकावलें आणि तो तुरुंगांतच मेला.

बिंबिसाराच्या कारकीर्दींत वर्धमान महावीर व गौतम बुद्ध हे महान् धर्मसंस्थापक मगध देशांत स्वमतप्रचार करीत होते. महावीर हा अजातशत्रूच्या आईचा एक जवळचा आप्त होता. महावीर व गौतम बुद्ध हे दोघेहि अजातशत्रूच्या कारकीर्दींतच निवर्तलेले दिसतात. सामञ्ञ फळसुत्तांत अजातशत्रु व गौतमबुद्ध यांच्या भेटीची कथा आहे. त्यांत अजातशत्रूनें आपल्या पितृघाताच्या अपराधाबद्दल पश्चात्ताप दर्शवून बुद्धावर आपली असलेली भक्ति व्यक्त केल्यावरून गौतमानें याला क्षमा केली, असें वर्णन आहे. बर्हुतस्तूपावर या प्रसंगाचें चित्र आहे.

कोसल राजाची बहीण अजातशत्रूची सावत्र आई होती. ती नवऱ्याच्या खेदप्रद मृत्यूनें दुःख पावून मृत्यु पावली. तेव्हां कोसल राजा अजातशत्रूवर चालून आला. पुष्कळ दिवस लढाई चालून शेवटीं यानें कोसलावर मात केली व कोसल राजकन्येचें पाणिग्रहण करून त्याच्याशीं तह केला ( ज्ञा. को. बुद्धोत्तर जग पा. १६८ पाहा ).

या जयानें अजातशत्रूची आकांक्षा न शमतां यानें गंगेच्या उत्तरेकडील–हल्लीं ज्याला तिरहूत म्हणतात त्या–लिच्छवींच्या राज्यावर स्वारी केली. या देशाची राजधानी वैशाली असून तेथील राजकन्या अजातशत्रूची आईच होती. तरी यानें अजोबाचा मुलूख आपल्या ताब्यांत घेतला. पुढें यानें हिमालयाच्या पायथ्यापर्यंतचा प्रदेश आपल्या राज्यास जोडला, व अशा रीतीनें गंगा व हिमालय यांमधील भाग मगध राजाच्या अंकित करून सोडला. यानें लिच्छवींना अटकाव करण्याकरितां शोणतीराच्या उत्तरेस त्याच्या गंगेशीं होणाऱ्या संगमाजवळ पाटली गांवीं एक किल्ला बांधला; व पुढें याचा नातू उदय यानें पाटली नगराची स्थापना केली. पुढें हें नगर कुसुमपुर, पुष्पपुर किंवा पाटलीपुत्र या नांवानें प्रसिद्धीस आलें; मौर्यांच्या अमदानींत हें मगधाचेंच नव्हे तर अखिल भारताचें केन्द्र बनलें. या नगररचनेचा निर्देश पुराणांत आहे.

अजातशत्रु सुमारें स. पू. ५२७ मध्यें वारला. पण परंपरागत महावीर निर्वाणाशीं ( ५२७ ) हा काळ जमत नाहीं. खारवेलच्या शिलालेखामुळें सर्व शिशुनागांचा काळ मागें गेला आहे. पण त्यावरूनहि नीट उलगडा होत नाहीं. बार्नेटनें बापाच्या खुनाचा काळ स. पू. ५०० व याच्या मृत्यूचा काळ स. पू. ४७५ हा दिला आहे.

बिहार-ओरिसा रिसर्च सोसायटीच्या जर्नल ( स. १९१९ डिसेंबर ) च्या अंकांत रा. के. पी. जयस्वाल यांनीं राजा अजातशत्रूची मूर्ति शोधून काढल्याचें वृत्त दिलें आहे ( मॉडर्न रिव्ह्यू, फेब्रुवारी १९२० ). पूर्वी ही यक्षाची मूर्ति म्हणून समजत. पण त्या मूर्तीच्या आसनावर एक लेख आहे. त्यांत सेनि ( श्रेणि ) अज (ात ) शत्रू कुणिक सेवासिनगो ( शिशुनाग ) मगधनम् राज इत्यादि अक्षरें स्पष्ट आहेत. त्यांवरून शंका घेण्याचें कारण नाहीं, असें जयस्वाल यांनीं दाखविलें आहे. आनंदाच्या रक्षेवर यानें स्तूप उभारला.

हा राजा झाल्यावर आठ वर्षांनीं बुद्ध मरण पावला. यानें एकूण ३२ वर्षे राज्य केलें. जेव्हां जैन धर्माचा मुख्याधिकारी सुधर्मन् हा याच्या शहरास भेट द्यावयास आला, तेव्हां हा स्वतः अनवाणी शहराबाहेर गणधर पाहण्याकरितां गेला. बिंबिसारच्या मृत्यूनंतर यानें आपली राजधानी चंपा शहरीं नेली. पण याच्या मृत्यूनंतर याचा मुलगा उदायीन यानें तेथून बदलून पाटलीपुत्र ही आपली राजधानी केली. यानें प्रथम महावीराला आश्रय दिला होता.

पण नंतर यानें बुद्धाला आपला आश्रय दिला होता. जैन लोक याला ' कूनीय ' या नांवानें संबोधतात.

हा एकदां आपला मुलगा उदय किंवा उदायीन याला आपल्या मांडीवर घेऊन जेवावयास बसला असतांना उदायीन याचे ( कूनीय ) ताटांत मुतला. या गोष्टीकडे अजातशत्रूनें दुर्लक्ष केलें आणि आपलें जेवण तसेंच पुढें चालू ठेविलें. त्या वेळीं याची आई चेल्लना याचे शेजारीं बसली होती. तेंव्हां कूनीय आईला म्हणाला, ' आई ! माझ्याइतकें प्रेम, दुसऱ्या कोणत्याहि बापानें आपल्या मुलावर केलें आहे काय ? ' तेंव्हां आईनें उत्तर दिलें, ' ए मूर्खा ! ज्या वेळीं तूं जन्माला आलास, त्या वेळीं मी तुझा अव्हेर केला आणि तुला अशोक झाडामध्यें लपवून ठेविण्यास सांगितलें. ही बातमी तुझ्या बापास मिळतांच त्यानें स्वतः आपणास अशोक झाडामध्यें लपवून घेतलें आणि तुझी मुक्तता केली. आणखी दुसरी एक अशाच प्रकारची गोष्ट आहे. एकदां तुझें बोट नासलें होतें. त्यामुळें तुला वेदना होत होत्या. तेंव्हां तुझा बापानें तुझें बोट, रक्त आणि पू वाहत असतांही, आपल्या तोंडांत धरलें, कारण तुला वेदना होऊं नयेत. ' हें आईचें भाषण ऐकल्यावर कूनीयला आपण आपल्या बापास विनाकारण कैद केल्याबद्दल पश्चात्ताप झाला व याच्या मनांत आपल्या बापाविषयीं पूज्यभाव उत्पन्न झाला अशी माहिती चंदुलाल शहाकृत जैनिझम इन नॉर्थ इंडिया या पुस्तकांत आढळते.

**अजितनाथ**—हा जैनांचा दुसरा तीर्थंकर होय ( तीर्थंकर पाहा ).

**अजितसिंग**—(स. १६७८–१७३१) हा मारवाडच्या यशवन्तसिंगाचा पराक्रमी मुलगा. फर्रुखसियर गादीवर असतांना त्यानें यास पुढील आशयाचें एक पत्र धाडलें. ' तुम्हीं हुसेन सय्यदास मारून टाकावें म्हणजे त्याची सर्व संपत्ति आम्हीं तुम्हांस देऊं !' वास्तविक अजितसिंग ह्यानें बादशाहीचा सुभा हस्तगत केला म्हणून याच्यावर स्वारी करण्याकरितां बादशहानें सय्यदास पाठविलें व आंतून अजितसिंगास वरील पत्र लिहिलें. परंतु अजितसिंगानें सय्यदाचा पाडाव न करितां तहच केला व बादशहास आपला मुलगा व मुलगी दिली. मुलीला मुसलमानी दीक्षा ( स. १७१५ ) देण्यांत आली. मुलास बादशहाच्या तैनातीस ठेविला. पुढें कांहीं वर्षांनीं यानें व याच्याच मुलांनीं गुजराथ व मोंगलांचा बराच मुलूख काबीज केला. हा मोठा कपटी व स्वार्थी होता.

ता. २३–२–१७३१ मध्यें बादशहा व सय्यद यांची भेट ज्या वेळेस सरकारवाड्यांत झाली, त्या वेळेस सबंध रात्र हा त्यांच्याजवळ जाग्रण करून होता. याच्या सांगण्यावरून सय्यदानें जिजिया कर पुढें बंद केला. याच्या मुलानें ( अभयसिंग ) पिलाजी गायकवाडाचा खून केला. हा पुढें आपल्या मुलाच्या हस्तें मारला गेला. यानें बादशहाचा भरपूर सूड घेतला. कारण बादशहानें याच्या बापास वाईट रीतीनें वागविलें होतें ( म. रि. म. १, पृ. ७६–९१ ).

**२.** बुंदी संस्थानचा हा एक राजा होय. हा, याच घराण्यांतील उमेदसिंग याच्यानंतर गादीवर आला.

याच्या हातून उदेपूरचा राणा शिकारीच्या वेळीं चुकीनें मारला गेला. त्यामुळें ह्या दोन घराण्यांत हाडवैर आलें. स. १८१८ सालीं हें संस्थान ब्रिटिश अंमलाखालीं आलें.

**अजितसेनाचार्य**—या जैन ग्रंथकारानें अलंकारचिंतामणि व यक्षसेनाच्या चिंतामणीवर चिंतामणिप्रकाशिका टीका असे दोन ग्रंथ संस्कृतांत लिहिले आहेत ( चावुण्डराय व राजमल्ल पाहा ).

**अजितापीड**—प्रदीपकार कैयटाच्या वेळीं असलेला काश्मीरचा राजा.

**अजोगिपा**—हा चौऱ्यांशी सिद्धांपैकीं सव्विसावा सिद्ध होय. जात गृहपति, गांव सालिपुत्र. याचे ग्रंथा-चित्तसंप्रदाय, व्युदस्थान ( त. ४८।१२ ).

**अझीझ कोका**—हा अकबराचा दूधभाऊ होय. हा अतिशय लहरी असे. यानें अनेक वेळां अकबरास चीड येण्यासारखीं कृत्यें केलीं, तथापि अकबर यास नेहमीं क्षमा करी. अझीझच्या बापानें अकबराचे लहानपणीं फार लाड केले, हें स्मरून तो याच्या दुष्कृत्याकडे दुर्लक्ष करी. जहांगिर म्हणतो, ' अकबरानें स्वप्नांत येऊन मला सांगितलें कीं, बाबारे ! कसेंहि करून अझीझचे अपराध पोटांत घाल. त्यास शासन करूं नको. ' ( मु. रि. भाग २ पृ. १०५; झैनखान कोक पाहा ).

**अझीझ खम्मार**—माळव्याचा सुभेदार ( १३४४ ते १३४५ ). मुहंमद तघ्लक यानें १३४४ मध्यें दख्खनचा लोकप्रिय सुभेदार कुतलघखान यास बडतर्फ करून दक्षिणेंतील आपल्या राज्याचे चार विभाग केले व त्या प्रत्येक विभागावर एकएक स्वतंत्र सुभेदार नेमला. माळव्याचे सुभेदारीवर अझीझ खम्मारची याच वेळीं नेमणूक झाली. अझीझ खम्मार हलक्या कुळांत जन्मास आलेला अविचारी अधिकारी होता. सुभेदार होण्यापूर्वीं हा अम्रोहा प्रांतांतील हजार खेड्यांच्या एका गटावरील वसुलीचे कामावरील अधिकारी होता. व त्या कामावर असतां अनन्वित छळ करून सारा ठराविक रकमेइतका वसूल करण्याची कामगिरी यानें बजाविली होती,

म्हणून यास बढती मिळाली. या बढतीमुळें अझीझ फारच शेफारला. त्यांतून सुलतानानें सारा ठराविक रकमेइतका वसूल करण्याकरितां वाटेल तो उपाय योजण्याची मुभा दिल्यामुळें तर निष्ठुर व कठोर मार्गांचा ह्यानें सर्रास सार्वत्रिक उपयोग केला. सुलतानाचें असें मत होतें कीं, दक्षिणेकडे उत्पन्न झालेल्या परिस्थितीस वसूलकामगारच कारणीभूत आहेत व म्हणून त्यांचा प्रथम समाचार घेतल्याशिवाय दक्षिणेंत स्थिरस्थावर व्हावयाचें नाहीं. दक्षिणच्या बंदोबस्ताची कामगिरी यशस्वी करण्याकरितां सुलतानानें अझीझला पुरेसें सैन्य व पैसा दिला होता, त्यामुळें हा बेसुमार निष्ठुर बनला. त्या कालीं जमाबंदीचे कामाकरितां १०० खेड्यांचा एक याप्रमाणें गट करून एकएका गटावर वसुली अधिकारी नेमलेले असत. त्यास थोडेंफार पण वसुली कामास आवश्यक असें सैनिकसामर्थ्य व सैन्याधिकारहि दिलेले असत. ते आपल्या गटांतील खेड्यांचा वसूल करण्यास जबाबदार असत. या कामाबद्दल त्यांस शेंकडा ५ प्रमाणें मुशाहिरा मिळे.

अझीझ खम्मार आपल्या नव्या अधिकारक्षेत्रांतील ठाण्यावर धारला आल्यावरोबर यानें ९० जमावंदी अधिकारी पकडून आणिले व आपल्या सरकारी वाड्यासमोर त्या सर्वांची यानें कत्तल केली. या अमानुष मनुष्यवधामुळें माळव्यांत जिकडे तिकडे हाहाःकार उडाला. जमाबंदी कामावरील अधिकारी तर फारच चिडले. या अमानुष कृत्याबद्दल सुलतान अझीझला शासन करील अशी लोकांस अपेक्षा होती ती खोटी ठरली. सुलतानानें या अमानुष कृत्याबद्दल यास दरबारी पोषाक नजर करून व त्या कृत्याबद्दल याची स्तुति करणारें बादशाही फर्मान जाहीर करून याचा गौरव केला. आतां मात्र जमाबंदी खात्यांतील अधिकारी फार चिडले व त्यांनीं या कृत्याबद्दल सूड घेण्याचा निश्चय केला. अशा प्रकारें एके बाजूस सुलतान व दुसरे बाजूस जमाबंदी कामावरील अधिकारी यांमधील यादवीस आरंभ झाला. याच सुमारास गुजराथचे सुभेदारानें आपल्या प्रांतांतील वार्षिक वसुलाची रक्कम दिल्लीस पोहोंचती करण्याकरितां संरक्षक सैन्यावरोबर पाठविली. या संधीचा फायदा घेऊन या असंतुष्ट लोकांनीं त्या खजिन्यावर हल्ला करून तो लुटला व बंडास आवश्यक तें द्रव्य मिळविलें. सुलतानास ही बातमी कळतांच ५ फेब्रुवारी १३४५ रोजीं तो दिल्लीहून बंडखोरांचें पारिपत्य करण्याचे उद्देशानें निघाला, तो पुन्हा दिल्लीस परत गेला नाहीं. दक्षिणेकडील राज्यास तर त्यास मुकावेंच लागलें. सुलतान माळव्यांत येण्यापूर्वीच अझीझनेंहि बंडखोरांवर स्वारी केली, परंतु यास त्यांना वठणीवर आणतां आलें नाहीं. उलट बंडखोरांनींच याचा पराभव केला व यास ठार मारलें ( कें. हि. ).

**अझीझखान**—शिवनेरीचा विजापूरकरांचा किल्लेदार. स. १६७३ मध्यें याच्याशीं गुप्त तह करून शिवाजीनें किल्ला घेण्याचा घाट घातला होता, पण हा ऐन वेळीं फिरल्यामुळें तो घाट फसला ( चित्रमय शिवाजी पा. ९ ).

तसाच स. १६७८ मध्येंहि वर चढलेल्या मराठयांची कत्तल होऊन बेत फसला.

**२.** हा बेदरच्या बहामनी राज्यांतील एक सरदार होय. मुहंमद गवानानें युसफ आदिलशाहास ( विजापूरच्या आदिलशाही घराण्याचा संस्थापक ) व्यापाऱ्याकडून विकत घेतल्यावर युसफास अझीझखान या सरदाराचे हाताखालीं ठेविलें. अझीझखानानें युसफची हुशारी पाहून त्याचेवर आपलें सर्व काम सोंपविलें. त्यामुळें युसफचा आणि बेदरच्या बहामनी राजाचा वारंवार संबंध येऊं लागला, व बहामनी राजास युसफची हुषारी कळून आली. अझीझखान मरण पावल्यावर याचें काम बहामनी राजानें युसफवर सोंपविलें ( विजापूरचें आदिलशाही घराणें-मोडकवृत ).

**अझीमुश्शान**—दिल्लीच्या मोगल घराण्यांतील बहादुरशहाचा हा मुलगा होय. याला फर्रुखसियर नांवाचा मुलगा होता.

स. १७१२ मध्यें याला ठार मारण्यांत आलें.

मुअज्जमचें व अजमचें जेव्हां युद्ध झालें, त्या वेळीं हा युद्धांत बापाकडे होता. हा बंगाल्यांत असे ( मु. रि. भाग २ पृ. ३८५ ).

**अझ्झुद्दीन**—दिल्लीचा बादशाह जहांदार-शाह त्याचा हा मुलगा होय. फर्रुखसियरनें याचे डोळे काढून याला कैद केलें होतें.

**अझ्झुद्दीन खालिद खानी**—सुलतान फीरूझशाह तुघ्लकाचे कारकीर्दीतील दरबारी कवि.

१३५१ चे सुमारास सुलतान फीरूझशाहानें कांग्राकडे जात असतां वाटेंत ज्वालामुखी येथील सुप्रसिद्ध देवालयास भेट दिली. कांहीं बखरकारांचें असें म्हणणें आहे कीं, सुलतानानें देवळांतील देवाकरितां छत्र नजर केलें. दुसरे कांहीं म्हणतात कीं, पूर्वी असलेलें छत्र वापरण्यास मनाई केली. कसेंहि असलें तरी येवढें खरें कीं, या देवालयांत सुमारें १३०० संस्कृत ग्रंथ होते, त्यांचेपैकीं कांहींचें पर्शियन भाषेंत भाषांतर करण्याचें काम सुलतानानें दरबार कवि अझ्झुद्दीन खालिद खानी याजवर सोंपविलें. या राजकवीनें हुकुमास अनुसरून ग्रंथ लिहिला. त्याचें नांव 'दला इल् फीरूझशाही.' फेरिस्तानें या पुस्तकासंबंधानें

असें नमूद करून ठेविलें आहे कीं, हा ग्रंथ संग्राहक स्वरूपाचा आहे. यांत अनेक शास्त्रांची व कलांची माहिती संग्रहित केलेली आहे. बदाउनी हा कर्मठ मुसलमान असल्यामुळें परधर्मी लोकांच्या ग्रंथांची स्तुति करण्याचें पातक सहसा करावयाचा नाहीं, तरी त्यानें या ग्रंथासंबंधानें काढलेल्या 'ग्रंथ सर्वसाधारणपणें बरा आहे, दोष असले तरी गुणहि त्यांत आहेत,' अशा उद्गारांवरून ग्रंथ चांगलाच असला पाहिजे असें दिसतें ( कें. हि. ).

**ॲडॉम्स** ( कर्नल )—हा इंग्रजांचा उत्तमपैकीं लढवय्या सरदार होता. शिवनीच्या लढाईंत यानें बराच पराक्रम करून दुसऱ्या बाजीरावास पळतां भुई थोडी केली. ही लढाई १०-४-१८१८ त झाली. त्यांत बाजीरावाच्या सैन्याची फार वाताहात झाली ( म. रि. उ. वि. भा. ३ पृ. ५०१ ).

**अण्णाजी दत्तो**—शिवाजीच्या अष्ट प्रधानांतील एक अधिकारी. हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण असून स. १६४७ च्या सुमारास शिवाजीस येऊन मिळाला. हा संगमेश्वर तालुक्यांतील कुलकर्णी होता. याचें आडनांव प्रभुणीकर.

अफझलखानास भेटण्यास शिवाजी प्रतापगडावरून निघाला ( १० नोहें. १६५९ ), तेव्हां याला गडावर जिजाबाई व संभाजी वगैरेंच्या संरक्षणास ठेवलें होतें. अफझलखानास चीत केल्यावर यास पन्हाळा घेण्यास पाठविलें. नंतर २८ नोहें. १६५९ रोजीं शिवाजीनें स्वतः जाऊन पन्हाळा घेतला. याच्या कर्तबगारीची शिवाजीला चांगली जाणीव झाल्यामुळें त्यानें यास २९ आगष्ट १६६१ रोजीं वाकनिशी सांगितली आणि पालखी दिली. हिशेबी व लेखनकुशल असणाऱ्या या माणसास हें योग्य क्षेत्र मिळालें. वाकनिशींत खासगीचा कारभार, पत्रव्यवहार, दप्तर संभाळणें इत्यादि कामें असत. भोजनाची तजवीज, आमंत्रणें करणें इत्यादि कामेंहि वाकनिसासच करावीं लागत. शिवाय हा दादोजी कोंडदेवाच्या मागें जमिनीची पाहणी व सारावसुलाचीं कामें जरूर पडेल तेव्हां करीत असे. त्या कामांतहि याचा लौकिक चांगला होता. 'राज्याची चांगली मशागत केली यास्तव शिवाजीनें कृपाळू होऊन यास ता. ३ एप्रिल १६६२ रोजीं सुरनिशी देऊन याचा यथोचित सन्मान केला.' सुरनीस किंवा सचिव यानें राजपत्रें होतील त्यांत न्यूनाधिक अक्षर मजकूर शोध करून नीट करावीं व तसेंच महाल, परगणे यांच्या हिशेबाचे शोध करावे, राजपत्रावर संमत करून बार चिन्ह रुजू करावें, युद्धादि प्रसंग करून राजहित करावें, असें होतें.

यानें युद्धप्रसंगहि कांहीं केलेले आढळतात. शिवाजीनें सुरत लुटली त्या वेळीं हा शिवाजींबरोबर होता ( ६ जानेवारी १६६४ ). प्रतापराव कर्नाटकच्या स्वारीवर गेला तेव्हां यानें हुबळी लुटली ( १८ जून १६७३ ). हुबळीस बरीच लूट मिळाली असावी. स. १६५९ मध्यें मिळविलेला पन्हाळा विजापूरकरांनीं स. १६६२ मध्यें पुनः परत घेतला. पण मराठ्यांनीं आपल्या अमलांत आणलेल्या मुलुखांत खवासखान अधिक व्याप करूं लागला म्हणून शिवाजीनें दक्षिणेंतील बंदोबस्ताचें मुख्य ठिकाण पन्हाळा १६७३ मध्यें परत घेण्याचें ठरविलें आणि याला आज्ञा केली. बाबाजी नाईक पुंडे विजापुरास वकिल होता, त्यास बोलावून माघारें आणलें आणि कोंडाजी फर्जंदास पालखी देऊन पन्हाळ्यावर रवाना केलें. अण्णाजी २ मार्च १६७३ रोजीं जाऊन हेराकडून बातमी आणणें वगैरें काम करीत होता. ५ मार्चला कोंडाजी वगैरेंनीं निबिड अंधकारांत किल्ल्यावर छापा घालून किल्ला सर केला. अण्णाजी सैन्यासह मागील अरण्यांत पिछाडीचें संरक्षण करण्याकरितां लपून राहिला होता. अशा प्रकारें पन्हाळा सर करण्यांत यानें भाग घेतला होता. स. १६७४ सप्टेंबरच्या पहिल्या आठवड्यांत फोंड्यावर अचानक छापा घालण्याकरितां हा कुडाळास गेला होता, पण गुप्तपणा न राहिल्यामुळें याला प्रथम अपयश आलें, पण पुढें तो किल्ला याच्या नेतृत्वाखालीं सर झाला.

शिवाजीनें राज्याभिषेकाच्या वेळीं अष्ट प्रधानांना कारभार वांटून दिले. त्यांत यास चेऊलपासून दाभोळ, राजापूर, कुडाळ, बांदे, फोंडा, अकोल्यापर्यंत सर्व कोंकणचा कारभार सांगितला होता. हा मुलूख समुद्रकांठीं असल्यामुळें युरोपियन व्यापाऱ्यांशीं याचा नेहमीं संबंध येई व ते लोक यास सुभेदार ( व्हाइसरॉय ) असें म्हणत. शिवाय जमीनमहसुलाचें काम पूर्वीप्रमाणें याच्याकडे होतेंच. याच्याकडे रत्नागिरी तालुक्याचें देशपांडेपण व कोल्हापूर इलाख्यांतील भूधरगडाजवळील सामानगडाची सबनिशीहि दिली होती. यानेंच सामानगड बांधला, असें म्हणतात.

शिवाजी संभाजीसह दिल्लीस गेला तेव्हां ज्या तिघांवर राज्याची जबाबदारी सोंपविली होती, त्यांत हा एक होता. ५ मार्च तें २० नोहेंबर १६६६ पर्यंत शिवाजी दिल्लीकडे असतां राज्य उत्तम सांभाळलें म्हणून 'तुम्ही राज्याचे आधारस्तंभ' असा याचा गौरव केला आहे. तसेंच राज्याभिषेकाच्या वेळीं हा अन्तर्गत व्यवस्थेचा अधिकारी असल्यानें छत्र धरण्याचा मान याच्याकडे आला होता. त्या प्रसंगीं याला वस्त्रें, पोषाख, कंठी, चौकडा, तुरा, शिरपेंच, शिकेकट्यार, ढाल, तलवार, हत्ती, घोडा असें देऊन याचा

सन्मान करण्यांत आला. याला पालखी, सालीना १०००० होनांची व मासिक ३००० होनांची नेमणूक होती. याच्या अष्टकोनी व लांबट शिक्क्यांत पुढील अक्षरें असत. '१ श्री शिवचरणी २ निरंतर दत्त ३ सुत अनाजिपं ४ त तत्पर.' जोडावर मारण्याचा किंवा लेखनसीमेचा शिक्का लहान व वर्तुळाकार असून त्यांतील मजकूर '१ लेख २ नावधिरे ३ धते', असा आहे ( आकडे ओळींचे आहेत ).

स. १६७४ नंतर शिवाजीनें पुनः सर्व पाहणी करण्याचें ठरविलें आणि त्यांतच अण्णाजीचीं ४।५ वर्षें गेलीं. स. १६७८ मध्यें शिवाजी कर्नाटकांत जावयास निघाला. त्या वेळीं मागें यासच राज्यरक्षणार्थ ठेविलें होतें. हा बहुतेक रायगडींच असे. हा जेव्हां गांवें पाहण्यास जात असे तेव्हां मागें याचा मुतालिक सुरनिशीचें सर्व काम पाही.

शिवाजीमहाराजांना संभाजी व राजाराम असे दोन मुलगे होते. त्यांपैकीं संभाजी हा वडील होता, तरी दुर्वर्तनामुळें शिवाजीच्या मनांतून उतरलेला होता. त्याचप्रमाणें शत्रूला जाऊन मिळणें या दोषामुळें त्याला शिवाजीनें पन्हाळ्यावर ठेवलें होतें. अशा स्थितींत राजारामाला गादी मिळावी अशी त्याच्या आईस–सोयराबाईस–इच्छा होणें साहजिक आहे. संभाजी कैदेंत आहे आणि शिवाजी वारला अशा स्थितींत या योजनेला जोर आला आणि त्यांत यानें पुढाकार घेतला. शिवाजीच्या मृत्यूनंतर अठरा दिवसांनींच म्हणजे २१ एप्रिल १६८० रोजीं यानें सर्वाधिकार आपल्याकडे घेऊन नऊ दहा वर्षांच्या राजारामास 'मंचकारोहण' करविलें आणि मोरोपंतास आपल्या मसलतींत अनुकूल करून घेऊन दोघे संभाजीस कैद करण्यास निघाले. पण सेनापति हंबीरराव मोहिते यानें यांना विरोध करून संभाजीस गादीवर बसविलें. याला कैद केलें होतें तें ४।५ महिन्यांनीं ( सप्टेंबर ) मुक्त करून मजमूहि याजकडे दिली. पण याला आपलें कारस्थान हाणून पाडलें गेलें, यामुळें समाधान नव्हतें. औरंगजेबाचा मुलगा संभाजीकडे आश्रयार्थ होता. त्याच्यामार्फत शिरक्यांना चिथावण्याचें यानें काम केलें. तें अकबरानें संभाजीच्या भीतीस्तव स्वतःच संभाजीस कळविलें. त्यामुळें संभाजीचा क्रोध जागृत झाला आणि त्याला शिरके मंडळी, दरबारांतील जुने मातबर सरदार आणि अण्णाजी हे बळी पडले. याला परळीच्या खालीं हत्तीच्या पायाखालीं तुडवून ठार केलें. अशा रीतीनें या पुरुषाचा शेवट स. १६८१ च्या ऑगष्ट महिन्याच्या अखेरीस झाला.

**अतिरात्र यज्विन्**—हा नारायण दीक्षिताचा पुत्र, अप्पया दीक्षिताचा पौत्र, नीलकंठ दीक्षिताचा कनिष्ठ बंधु ( स. १६३६ ). यानें रामाचा पुत्र कुश व त्याची भार्या कुमुद्वती यांच्या संबंधीचें एक पंचांकी नाटक 'कुशकुमुद्वतीय' या नांवाचें संस्कृतांत लिहिलें आहे.

**अतिविरराम ऊर्फ श्रीवल्लभ**—( स. १५५७ ते १५९६ पर्यंत ) याच्याबरोबर अभिराम वरतगुण ऊर्फ वीरपांड्य राज्य करीत होता. यानें जे अयोग्य रीतीनें कर घेऊन पैसे जमा केले होते, ते सर्व देवळाला खर्च केले.

**अतिवीर**—हा पाण्ड्यांच्या तिसऱ्या शाखेंतील जो तिसरा सुंदर त्याचा बाप होय. हा तामिल कवि व विद्वान् होता. याची तामिल प्रांतांत अद्यापि प्रख्याति आहे. याचा याच्या मुलानें ( तिसरा सुंदर ) खून केला.

**अतीतानंद** ( अतीत )—याचे ग्रंथावरून याचे गुरु ब्रह्मानंद, स्वानंदानंद कीं शिवानंद हें निश्चित सांगतां येत नाहीं. रा. चांदोरकरांचें मत, शिवानंद असावे, असें आहे. ग्रंथ–योगवासिष्ठ ( सं. सू. )

**अतीश**—अतीश किंवा दीपंकर हा बौद्धधर्मीय साधु हिंदुस्थानचा रहिवाशी होता, तरी यानें तिबेटांत जाऊन तेथें लामाधर्मांत बरीचशी सुधारणा घडवून आणिली. स. १०३८ त जेव्हां यानें तिबेटांत पाऊल टाकलें, तेव्हां त्या वेळचा तेथील बौद्ध धर्म अनीतिमान् भिक्षुकांच्या हातांत असून त्यांतील पिशाचभक्तीमुळें तो अवनतीस पोंचला आहे, असें याला आढळून आलें. शुद्धतम बौद्धधर्माचा नमुना पुढें ठेवून यानें एक नवीन कादम नांवाचा पंथ काढिला. या पंथांतूनच पुढें हल्लीं तिबेटचा राष्ट्रधर्म असणारा गेलुग ( पीत-शिरस्त्राण ) पंथ निघाला. ब्रह्मचर्यपालन व पिशाचभक्तीचें उच्चाटण या अतीशानें केलेल्या कांहीं धार्मिक सुधारणा होत. यानें जे अनेक तात्त्विक ग्रंथ लिहिले, त्यांमध्यें 'बोधिपंथप्रदीप' हा प्रख्यात आहे. यानें हिंदुस्थानांतील बौद्ध ग्रंथांचीं तिबेटींत भाषांतरें केलीं. अतीशाच्या उपदेशाचा हितकारी परिणाम म्हणजे सस्क्य व कर्ग्यु नांवांचे दोन अर्धवट सुधारलेले पंथ पुढें निर्माण झाले व त्यांमध्यें सस्क्य पंथाचें वर्चस्व तर बरेच दिवस टिकून होतें. स. १०५२ त अतीश ल्हासाजवळ ने-टंग ( Ne–tang ) येथें मरण पावला. तेथें याच्या समाधीवर उभारलेला स्तूप अद्याप दिसतो ( ज्ञानकोश ).

हा पाल राजांपैकीं रामपालाच्या वेळीं त्याच्या उत्तेजनावरून बौद्धधर्मप्रसारार्थ तिबेटांत गेला होता.

अतीश हें दीपंकर श्रीज्ञान याचें तिबेटी नांव असावें व

हा विक्रमर्णापूरच्या राजाचा मुलगा असावा, असें पं. हरप्रसादशास्त्री यांचें मत आहे ( Intro. to Mr. N. N. Vasu's *Modern Budhism and Its followers in Orisa*, Calcutta 1911 and *Lit-Hist. of Pala Period* in J. B. and O. Res. Soc. Vol. V. P. II. P. 171 ).

**अत्ताल्लु रूपय्या**—तैलंगणांतील एक प्रख्यात कवि. तेलगू भाषेंत याची कविता बरीच आहे. याच कवीच्या ग्रंथांचें अध्ययन करून कावेल्ली व्यंकट बोरय्या नांवाचा ब्राह्मण विद्वान् झाला ( कविचरित्र ).

**अत्रिदाम**—वल्लभीच्या रुद्रशहाचा मुलगा. याच्या एका नाण्यावर २१४ वें वर्ष आहे ( असा दाम पाहा ).

**अथर्वण गंगाधर**—हा एक मराठी कवि होता. यानें 'शिवरात्रि' या नांवाचें एक प्रकरण रचलेलें आहे. हें श्लोकबद्ध असून त्याची संख्या ४२ आहे. लिखाईवरून हा फार जुना असावा असें दिसतें ( मं. वा. इ. श. १८३७ ले. १६७ ).

**अथर्वणाचार्य**—तेलगू जुना कवि. हा तेलंगी ब्राह्मण होता. संस्कृत व तेलगू या दोनहि भाषा यास उत्कृष्ट येत असत. महाभारताच्या सारांशावर लिहिलेला याचा ग्रंथ तुटक उपलब्ध आहे. पुढील कवींनीं याचा पुष्कळ भाग उतारे म्हणून दिलेला दिसतो ( तेलगू वाङ्मय, जनार्दन रामचंद्रकविचरित्र ).

**अद्दीदेम्म**—हा प्रतापरुद्राचा तिसरा सेनापति होता. यानें मन्मगंद गोपाल ( तेलगू चोंड राजा ) याचा खून केला. व मिशरगंद हीं पदवी घेतली ( एन्शन्ट डेक्कन-सुब्रह्मण्य अय्यरकृत ).

**अद्वैतानंद**—काशीक्षेत्रांतील सुप्रसिद्ध संन्यासी. हा मूळचा महाराष्ट्रीय ब्राह्मण असून मोठा विद्वान् होता. याच्याजवळ शिकण्याकरितां पुष्कळ विद्यार्थी असत म्हणून काशींत याची प्रसिद्धि गुरुस्वामी या नांवानें असे. हा शंकराचार्यांच्या मताचा असून 'ब्रह्मविद्याभरण' नांवाचा याचा ग्रंथ आहे. सदानंदकृत वेदांतसारावर याची संस्कृत टीका आहे. मध्वमुनीश्वर व कटाव करणारा अमृतराय हे याचे शिष्य होते. हा श. १६८७ पार्थिव नाम संवत्सरीं समाधिस्थ झाला ( अर्वाचीन कोश ). अमृतरायाचा गुरु अंबिकासरस्वती होता, असें त्याच्याच 'अविनाशसंदेहहरण' ग्रंथांत आढळतें. मध्वमुनींनीं आपला गुरु अद्वैतानंद याजकडून रायास उपदेश देवविला, अशी एक दन्तकथा आहे. अविनाशसंदेहहरण ग्रंथाची भाषा कटावाच्या भाषेहून फारच साधी दिसते. त्याअर्थी तो कटावकार अमृतरायाचा नसून दुसऱ्या एखाद्या अमृतरायाचा असावा, हें आजगांवकरांचें म्हणणें बरोबर दिसतें ( म. क. च. १ पा. ३५४ ).

**अधिराज मारवर्मन् अवनिशुलमणि**—हा कडुंगण ( इ. स. ५६०–५९० ) याचा मुलगा होय. यानें ५९० ते ६२० पर्यंत राज्य केलें. याचा काल भरभराटीचा गेला.

**अधिराज राजेन्द्र**—हा चोल घराण्यांतील वीर राजेन्द्राचा पुत्र. वीरसोळीयम् नांवाचें बुद्धमित्रानें केलेलें तामिळ व्याकरण याच्याच आश्रयानें झालें. यानें एक वर्ष राज्य केलें. याला गादीवर बसविण्यांत याचा मेहुणा विक्रमादित्य चालुक्य यानें फार मदत केली होती. पुढें याच्या प्रजेनें बंड करून याला ठार केलें. एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, यास राजेन्द्र कुलोत्तुंग ऊर्फ राजीग केशरी वर्मा यानें बंड उभारून ठार केलें व याचें राज्य घेतलें. तेव्हां विक्रमादित्यानें त्याच्यावर स्वारी करून कुलोत्तुंगाला पिटाळून लावलें. पण याला पुत्र नव्हता, त्यामुळें कुलोत्तुंग हा राजा झाला आणि पूर्व चालुक्याच्या वंशांत चोळराज्य कायमचें सामील झालें. कारण कुलोत्तुंग हा पूर्व चालुक्यांपैकीं असून त्याची पत्नी मदुरान्तकी ही चोल राजाची कन्या होती. यानें स. १०७०–७४ पर्यंत राज्य केलें असावें, असें हिंदुभारताचा अन्त या ग्रंथावरून दिसतें.

**अनघडशाह**—हा एक अवलिया फकीर होऊन गेला. याचा तकिया पुणें येथें भवानी पेठेंत आहे. या तकियांत असलेल्या विहिरींत रामेश्वरभट्ट नांवाच्या ब्राह्मणानें याच्या परवानगीवांचून स्नान केल्यामुळें त्याच्या अंगाचा दाह झाला व तो तुकारामाच्या अभंगानें शांत झाला. ही गोष्ट यास कळल्यावर याला आश्चर्य वाटून यानें तुकारामाची भेट घेतली व त्याशीं कांहीं संभाषण केल्यावर आनंदानें परत आला.

**अनहिन**—( चाहमान पाहा. )

**अनंगपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं एक्यांशीवा सिद्ध होय. हा जातीनें शूद्र असून गौड देशचा राहणारा होता.

**अनंगपाल**—महमूद गिझनीनें ज्याचा अनेकदां पराभव केला, तो लाहोरचा राजा. महमूदानें हिंदुस्थानावर पहिली स्वारी केली, तेव्हां ( स. १००१ ) याचा बाप जयपाल यानें प्रथम त्याला तोंड दिलें. पण या लढाईंत जयपालाचा पराभव झाला व त्याला बरीच खंडणी देऊन आपली सुटका करून घ्यावी लागली.

नंतर अनंगपाल हा कांहीं दिवस महमूदाशीं सलोख्यानें वागून त्याला निमूटपणें दरसाल खंडणी पाठवीत असे. पण पुढें हा महमूदास विचारीनासा झाला.

तेव्हां महमूदानें याच्यावर स्वारी करून याला पळवून लाविलें. महमूद परत गेल्यावर यानें उज्जैन, ग्वाल्हेर, कनोज, दिल्ली, अजमीर, इत्यादि ठिकाणच्या राजांचा एक संघ स्थापून महमूदाला पार हाकून लावण्याची जंगी तयारी केली. शेवटीं पेशावरचे मैदानांत लढाई होऊन तींत पंजाबांतील गोखर लोकांनीं मदत न केल्यामुळें हिंदूंचा पराभव झाला. स. १०२१-२३ त महमूदानें लाहोर प्रांत खालसा केला. अनंगपाल कधीं वारला याचा उलगडा होत नाहीं. एके ठिकाणीं हा १०१३ च्या सुमारास निवर्तल्याचें लिहिलें आहे, तर दुसऱ्या एका इतिहासांत महमूदानें लाहोर प्रांत खालसा केला, त्या वेळीं (१०२१-२३) हा जिवंत असल्याचें दृष्टीस पडतें.

अनंगपालाचें पुष्कळ ठिकाणीं 'आनंदपाल' असें दुसरें नांव सांपडतें. हें दुसरें नांव बरोबर आहे असें वाटतें. लल्ली यानें स्थापन केलेल्या काबूलच्या ब्राह्मणी राज्याच्या घराण्यांत (स. ८८०-१०२१) जयपाल, नंतर अनंगपाल, नंतर त्रिलोचनपाल असे शेवटचे तिघे राजे होऊन गेले व १०२१ त महमूदानें तें घराणें बुडविलें, असा उल्लेख सांपडतो व या राजांचा कालहि वरील जयपाल, अनंगपाल यांच्या काळांशीं जुळतो. तेव्हां अनंगपाल किंवा आनंदपाल हा काबूलच्या ब्राह्मणी घराण्यांतील असला पाहिजे, हें उघड झालें (स्मिथ व म. भा. २ प्र. ११).

**अनंगपाल तोमर**—तुवर किंवा तोमर घराण्याचा संस्थापक अनंगपाल हाच असून याचा राज्याभिषेक स. ७३६ मध्यें झाला.

यानें प्रथम दिल्लीस गादी स्थापिली. पण याच्या वंशजांनीं ती तेथून हलवून कनोजला नेली. तेथून त्यांना राठोडांचा मूळ पुरुष चंद्रदेव यानें हांकून दिल्यावर, तिसरा अनंगपाल दिल्लीस आला व त्यानें दिल्ली आपली राजधानी केली. अनंगपालानें दिल्लीस राज्य केल्याचा सन तेथें असलेल्या प्रख्यात लोहस्तंभावर 'संवत् दिहली ११०९ अनंगपाल बही' अशा अक्षरांनीं दिला आहे. यावरून स. १०५२ मध्यें अनंगपाल दिल्लीस राज्य करीत होता, हें उघड दिसतें. पण तो तिसरा होय.

**२.** यानें नवव्या शतकांत दिल्ली शहर वसविलें. शिलालेखांत तोमर असें नांव असलें तरी लोकांत तुवर असा उच्चार आहे. हे तोमर किंवा तुवर इंद्रप्रस्थ स्थापणाऱ्या पांडवांचे वंशज मानतात. टॉडच्या राजस्थानांत असें म्हटलें आहे कीं, स. ७९२ मध्यें पांडवांचा वंशज अनंगपाल यानें इंद्रप्रस्थास पुनः पांडवांची गादी स्थापली (म. यु. भा. २.२५८; टॉड. ९१-९२). तोमरांचा अद्यापि एकहि लेख सांपडला नाहीं. मात्र इतरांच्या लेखांत तोमरांचा निर्देश येतो. अल्बेरुनीच्या वेळीं दिल्ली हें शहर महत्त्वाचें नव्हतें. तसेंच कुतुबुद्दीनच्या वेळीं दिल्लीजवळ इंद्रपत नांवाचें खेडें होतें. हें तत्कालीन इतिहास ताज्-उल्-मासर यावरून स्पष्ट आहे (इलियट २. पान २१०). तोमरांचें नांव चव्हाणांच्या लेखांत आलें आहे.

**३.** दिल्ली येथील प्रसिद्ध लोहस्तंभ मथुरेहून उपटून आणून जुन्या दिल्लीजवळ स. १०५२ मध्यें ज्यानें उभा केला असें त्या स्तंभावरील लेखांत म्हटलें आहे, तो अनंगपाल तिसरा होय.

तसेंच दिल्ली गॅझेटियरमध्यें यानें लालकोटचा किल्ला बांधल्याचेंहि लिहिलें आहे.

**४.** हा तुवरवंशी असून दिल्ली येथें राज्य करीत होता. याच्या वेळीं शहाबुद्दीन घोरी हा हिंदुस्थानावर स्वाऱ्या करीत होता.

पृथ्वीराज चव्हाण यानें याचा पराभव करून दिल्लीचें राज्य जिंकलें. तेव्हां यानें वानप्रस्थाश्रम स्वीकारला. याला दोन मुली होत्या. पहिली कमलादेवी ही अजमीरच्या सोमेश्वर राजास दिली होती व दुसरी कनोजच्या विजयपाल राजास दिली होती. याच्याविषयीं पृथ्वीराजरासामध्यें खालील कथा दिलेली आहे. 'तुवर वंशांतील (तोमर वंशांतील) हाच शेवटचा राजा होय. कारण हा निपुत्रिक असल्यामुळें यानें आपलें राज्य आपल्या मुलीचा मुलगा (नातू) जो पृथ्वीराज चव्हाण त्यास दिलें व आपण स्वतः बद्रिकाश्रमास प्रयाण केलें.' पण हें वरील विधान काल्पनिक आहे, असें चिंतामणराव वैद्य यांनीं म्हटलें आहे. कारण पृथ्वीराजांची आई तोमर कुलांतील नसून चेदी कुलांतील होती.

कनोजच्या सम्राटांची सत्ता महमूदानें तोडल्यामुळें तोमर प्रबळ झाले. एक शतकभर यांची भरभराट होती. शेवटीं पृथ्वीराज चव्हाणाचा चुलता वीसलदेव ऊर्फ विग्रहराज यानें तोमरांचा स. ११५२ मध्यें पराभव केला. (हिं. भा. अ. ३. पा. ४५२).

**अनंगभीम**—हा कलिंग देशाचा राजा होय. यास लांडदेव असेंहि दुसरें नांव होतें. यानें शके १०९४ मध्यें जगन्नाथाचें देऊळ बांधिलें, अशाबद्दलचा एक शिलालेख त्या देवळांतील एका खांबावर आहे. याच्या पदरीं जे लेखक व ग्रंथकर्ते होते, त्यांत प्रसिद्ध कल्याणमल्ल हाहि होता. कल्याणमल्लाकडून यानें मुद्दाम अनंगरंग नांवाचा ग्रंथ करविला होता, असें सांगतात.

**अनंगहर्ष मात्रराज**—हा नरेन्द्रवर्धनाचा मुलगा असून यानें तापसवत्सराजचरित्र नांवाचें नाटक संस्कृतांत लिहिलें. आनंदवर्धन व त्याचा टीकाकार अभिनवगुप्त यांच्या ग्रंथांत या नाटकाचें नांव आलेलें आहे. तापसवत्सराजचरित्राचें कथानक भासाच्या स्वप्नवासवदत्तेवरून घेतलें असलें, तरी त्यांत कांहीं निराळे प्रसंगहि आहेत. याचें हें नाटक सातव्या व नवव्या शतकाच्या दरम्यान लिहिलें असावें.

**अनंगापीड**—हा कर्कोटक घराण्यांतील शेवटचा राजा होय. याच्या कारकीर्दींत या घराण्यास उतरती कळा लागली. याला स. ८५५ मध्यें उत्पल घराण्यांतील अवन्तिवर्मा यानें पदच्युत करून स्वतः गादी बळकावली ( म. भा. १. २. पा. ९८ ).

**अनंत**—क्षेमेन्द्रकवीचा आश्रयदाता काश्मीरचा राजा.

२. हा कात्यायन श्रौतसूत्राचा टीकाकार होय. यानें 'प्रतिज्ञापरिशिष्टभाष्य' नामक ग्रंथ लिहिला. यानें वसुदेव, कर्क, पितृभूति, यशोगोमिन् व भर्तृयज्ञ यांच्या ग्रंथांतून उतारे घेतलेले आहेत, परंतु देवभद्र व याज्ञिकदेव यांनीं अनंताच्या ग्रंथांतून उतारे घेतले आहेत ( सी. सी. व पिटरसन-रिपोर्ट ४ ).

३. ( शक १४४७ ). याच्या पित्याचें नांव श्रीकांत होतें. यानें अनंतसुधारस नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. सुधाकर म्हणतात कीं, हा सारिणी ग्रंथ आहे.

बऱ्याचशा आधारावरून हा मुहूर्तमार्तंडकाराचा पिता असावा असें वाटतें, परंतु अनंतकृत सुधारस ग्रंथावर सुधारस-करण-चषक नांवाची टीका ढुंढिराजाची आहे. तेव्हां हा ग्रंथ करणग्रंथ असून त्यांत पंचांगोपयोगी सारण्याहि आहेत, असें दिसतें. यानें दोन ठिकाणीं वंशवर्णन केलें आहे. त्यांत अनंताच्या पित्याचें नांव सर्वत्र हरि असेंच आहे, श्रीकांत असें कोठेंहि नाहीं; यामुळें हा मुहूर्तमार्तंडकाराचा पिताच कीं काय, याविषयीं संशय आहे ( भा. ज्यो. २७२ ).

४. कामधेनु या नांवाचा तिथ्यादिक पंचांगसाधनाचा ग्रंथ आहे, त्यावर या अनंताची टीका आहे. या टीकेचा काल सुमारें शक १४८० असावा. जातकपद्धति या नांवाचा अनंताचा एक जातकग्रंथ आहे.

याचें गोत्र गार्ग्य होतें. विदर्भ देशांतील गोदाथडींत धर्मपुरी येथील अनंत हा रहिवासी होता. याच्या पत्नीचें नांव पद्मा. तेथून पुढें अनंत हा काशीस राहण्यास गेला. याच्या पुढील पुरुष काशीस होते. नीलकंठ व राम असे याला दोन विद्वान् पुत्र होते. अनंत–नीलकंठ–गोविंद–माधव असा यांचा वंश आहे ( भा. ज्यो. पा. २७४ ).

५. एक कवि. हा शिरपूरचा ( सरस्वतीतीरस्थ ) राहणारा. यानें गर्भगीताप्रकरण लिहिलें. श. १६८७ ( मं. वार्षिक श. १८३४ ले. १५७ ).

६. हा जयरामस्वामी वडगांवकराचा शिष्य. हा व याचा गुरुबंधु गोपाल या दोघांनीं मिळून काव्य केलें आहे ( सं. सू. ).

७. ( श. १५८०–१६४५ ). रामदासस्वामींचा शिष्य. हा साताऱ्याजवळील मेथवडचा. याचे ग्रंथ रामचरित्र, बभ्रुवाहनाख्यान, सुधन्वाख्यान, सुलोचनाख्यान, सीतास्वयंवर, गोपीगीत, रामदासस्तुति, सुलोचनागहिवर, लहुकुशाख्यान, श्रियाळचरित्र, सिंहध्वजाख्यान, गरुडगर्वपरिहार, गजगौरीव्रत, अहिल्योद्धार, अहिमहिआख्यान, याशिवाय ब्रह्मस्तुति, माधवगुण, द्रौपदीस्वयंवर, रुक्मिणीस्वयंवर, रुद्रयामल हे ग्रंथ अनंत नांवाच्या एका कवीचे आहेत ( सं. सू. ).

८. रंगनाथस्वामीच्या शिष्यांपैकीं एक. याचीं कांहीं पदें आहेत ( सं. सू. ).

**अनंतगुण**—हा पाण्ड्य घराण्यांतील जो कुलोत्तुंग त्याचा मुलगा होय. हा आपल्या बापाच्या मागून गादीवर बसला. हा जैनांचा फार द्वेष्टा होता.

**अनंततनय**—यानें महाभारताचें उद्योगपर्व मराठींत केलें ( सं. सू. ).

**अनंतदास**—यानें वेताळपंचविशी मराठींत कवितेंत लिहिली ( सं. सू. ).

**अनंतदेव**—हा ठाण्याच्या शिलाहार राजांपैकीं नागार्जुनाचा पुत्र. हा आपला चुलता मामवानीनंतर गादीवर आला. याचा स. १०९४ मधील लेख खारेपाटण येथें सांपडला आहे ( एपि. इंडि. ९ पा. ३३ ). एका मंत्र्याचीं जहाजें कोंकणच्या बंदरांत आलीं असतां त्यांवरील जकात माफ केल्याबद्दल हा ताम्रपट आहे. या राजाचें नांव अनंतपाल असेंहि आढळतें. यानें स. १०८५–११२५ पर्यंत राज्य केलें असावें. याच्या राज्यांत आपसांत तंटे होऊन देवाब्राम्हणांचा छळ झाला, असें बॉंबे गॅझेटियरमध्यें शिलाहारांच्या एकत्र जुळवून लिहिलेल्या हकीगतीवरून दिसतें ( व्हा. १ भा. १ ). हा कोंकणांतील तंटा राजघराण्यांतील असून त्या संधीस मुसलमानांनीं देवब्राम्हणांचा छळ केला असावा. परंतु शेवटीं अनंतपाल विजयी झाला व यानें बंडाचा बिमोड करून गुन्हेगारांना जबर शिक्षा केल्या ( एपि. इंडि. ९

पा. १७ ). यामुळें कोंकण आणखी दोन शतकें हिंदु राहिलें ( हिं. भा. अ. पा. ३६५–३६६ ).

२. हा भास्कराचार्याचा नातू. यानें ब्रह्मगुप्ताच्या सिद्धान्तांतील विसाव्या अध्यायावर आणि बृहज्जातकावर टीका केली आहे. याचा शककाल ११४४ होय, असें बहाळ येथील शिलालेखावरून दिसतें ( भा. ज्यो. पा. २५४ ). याच्या बापाचें नांव गणपति. हा यादव घराण्यांतील दुसऱ्या सिंधणाच्या पदरीं होता.

३. कृष्णभक्तिचंद्रिका नाटकाचा कर्ता. याच्या बापाचें नांव आपदेव होतें. अनंतदेव हा बाजबहादूर चंद्राचा आश्रित होता. याचा पिता आपदेव हा एका पूर्वकालीन अनन्तदेवाचा पुत्र व एका पूर्वकालीन आपदेवाचा नातू होता ( सी. सी. व पीटर्सन रिपोर्ट ४ ).

४. हा स. १७ वे शतकाच्या उत्तरार्धांत होऊन गेला असावा. कारण याचा धाकटा भाऊ जीवदेव यानें आपल्या आशौचनिर्णय यामध्यें निर्णयसिंधु हा ग्रंथ स. १६११–१२ चे सुमारास लिहिला, असा उल्लेख केला आहे. यावरून याचा काल १७ वे शतकाच्या उत्तरार्धांत असावा, असें ठरतें.

यानें स्मृतिकौस्तुभ हा ग्रंथ लिहिला. याचे संस्कार आचार, राजधर्म, दान, उत्सर्ग, प्रतिष्ठा, तिथि आणि संवत्सर असे विभाग केले आहेत. याच्या मताप्रमाणें बहिणीचा मुलगा किंवा मुलीचा मुलगा दत्तक घेतां येत नाहीं. फक्त शूद्र लोकांस मुलींचा किंवा बहिणीचा मुलगा दत्तक घेण्यास हरकत नाहीं. याशिवाय यानें दत्तकाविषयीं बरीच माहिती दिलेली आहे. यानें आपल्या स्मृतिकौस्तुभ नांवाच्या ग्रंथांत पुष्कळ ग्रंथांचा व ग्रंथकारांचा उल्लेख केलेला आहे. याच्या राजधर्मकौस्तुभ ग्रंथाचे बरेच भाग आहेत. यामध्यें राज्याविषयीं सर्व गोष्टींचें स्पष्टीकरण केलें आहे. यानें आपल्या ग्रंथांत आपल्यास आश्रय देणाऱ्या राजाच्या घराण्याविषयीं माहिती दिलेली आहे.

वरील ग्रंथांशिवाय यानें भगवद्भक्तिनिर्णय किंवा विवेक, मथुरासेतु, प्रायश्चित्तप्रदीपिका, अन्त्येष्टिपद्धति, ऋत्विग्वरणनिर्णय, दत्तकपुत्रविधान असे ग्रंथ लिहिले आहेत.

याच्या घराण्याचा मूळ पुरुष एकनाथ होय. त्याचा मुलगा आपदेव, त्याचा मुलगा अनन्त, त्याचा मुलगा आपदेव आणि या आपदेवास दोन मुलगे, एक अनंतदेव व दुसरा जीवदेव.

५. ( सूर्यमती पाहा ).

**अनंतदेवी**—गुप्तवंशांतील कुमारगुप्ताची पत्नी. हिला स्कंदगुप्त व पुरगुप्त असे दोन पुत्र होते.

**अनंतनाथ**—हा जैनांचा चवदावा तीर्थंकर होय ( तीर्थंकर पाहा ).

**अनंतपाल**—पहिल्या अनंतदेवाचें नामांतर.

**अनंतफंदी**—नगर जिल्ह्यांतील संगमनेरचा हा राहणारा होय. याचें गोत्र कौंडिण्य असून हा वाजसनेयी ब्राह्मण होता. भवानीबावा हे याच्या बापाचें नांव असून राजूबाई हे याच्या आईचें नांव होतें. याचें आडनांव घोलप. मलीकफंदी म्हणून एक चमत्कारिक फकीर संगमनेरास होता. याचा व त्याचा फार स्नेह जमल्यावरून लोकांनीं त्याचे फंदी हे उपपद यास जोडलें. याचा जन्म शके १६६६ रक्ताक्षीनाम संवत्सरीं झाला व हा ७५ वर्षांनीं म्हणजे शालिवाहन शक १७४१ त वारला.

हा पूर्वी तमाशे करीत असे. स्वतः रचलेल्या लावण्या तमाशांत म्हणून पोऱ्यांस नाचवीत असे. एकदां अहल्याबाई होळकरीण संगमनेरास येऊन तिनें याला असें सांगितलें कीं, ‘ तुम्हीं जें कृत्य करतां तें ब्राह्मणांस अयोग्य आहे.’ तेव्हां यानें तमाशाचा नाद सोडून दिला, व हा कथा करूं लागला. परंतु एकदां लोकाग्रहास्तव फंदी तमाशा करीत असतां अहल्याबाई अवचित संगमनेरास आली, तेव्हां तिला हें वृत्त कळतांच तिनें फंदीचें डोकें उडविण्याचा हुकूम दिला. परंतु हें वृत्त याला कळतांच यानें तमाशाचें रूपांतर लगेंच कीर्तनांत केलें. तेव्हां बाई खूष होऊन याला बक्षीस दिलें.

याची कविता कटाव, फटके, लावण्या व क्वचित् श्लोक, आर्या आणि ओंव्या अशा प्रकारची असून ती प्रायः सर्व मराठी भाषेंत आहे. याला श्रीपति ऊर्फ सवाई फंदी व बापु फंदी असे दोन पुत्र होते.

याचा एक ‘माधवनिधन’ नांवाचा एक ग्रंथ आहे. त्यांत फंदीनें सवाई माधवरावाच्या मृत्यूची कथा वर्णन केली आहे. याचे अध्याय ६ असून ३६० ओंव्या आहेत. याला ऐतिहासिक कवि म्हणतात. खर्ड्याच्या लढाईचा पोवाडा चांगला प्रसिद्ध आहे. सवाई माधवराव, नाना फडणीस, दुसरा बाजीराव, होळकर वगैरे त्या वेळच्या थोर व्यक्तींवर फंदीनें फटके रचिले आहेत.

सवाई फंदीचा राव बाजीवरचा पोवाडा सर्वांच्या तोंडीं होता. त्यांत तत्कालीन दुःस्थिति, व पेशव्यांचे दुर्गुण चांगले रेखाटले आहेत. यानें चेंडुफळी व विठ्ठलस्तुति लिहिलेली आहे.

याप्रमाणें याच्याविषयीं माहिती आजपर्यंत प्रसिद्ध होती. रा. य. न. केळकर यांनीं आपल्या ‘ ऐतिहासिक पोवाडे ’ या पुस्तकांत ( प्रस्तावना पृ. ७३–७९ ) वरील

साथीदार यासंबंधीं वरीलपेक्षां थोडी निराळी माहिती देऊन याची योग्यता दाखविणारें पुढील अर्थाचें वर्णन केलें आहे.

याच्या पूर्वजांचा धंदा गोंधळीपणाचा व सराफीचा असा सजोड असे. याच्या वडिलाविषयीं कांहींच माहिती मिळत नाहीं. पण फंदीबुवाच्या बाळपणाच्या वगैरे ज्या आख्यायिका उपलब्ध आहेत त्यांवरून फंदीबुवाचे वडील याच्या लहानपणींच निवर्तले असून याच्या आईनें म्हणजे राऊबाईनेंच नंतर या एकुलत्या एक लहानग्याचा प्रतिपाळ केला असावा असें म्हणतां येतें. लहानपणीं याला कोणाचाच दाब नव्हता. त्यामुळें हा लवकरच गांवांतला एक खोडकर उनाड पोरगा बनला. यानें लिहिणें पुसणें अगदीं सोडलें. व सगळा दिवस उनाडक्यांत घालवावा आणि नंतर सगळी रात्र उजाडून येईपर्यंत तमासगिरांच्या फडांत काढावी हा क्रम यानें धरिला. याच वेळीं एक दिवस आईशीं भांडून रागारागानें हा भवानीबोवाच्या मठांत जाऊन बसला असतां याची आई तेथें आली व भवानीबोवाजवळ आपल्या मुलाचीं गाऱ्हाणीं सांगूं लागली. तेव्हां अकस्मात् त्या बरवी पुरुषाच्या कृपेनें फंदीबोवाला कवित्वस्फूर्ति झाली, अशी आख्यायिका आहे.

या विद्येच्या जोरावर तरुणपणांतच फंदीबोवानें आपला तमाशाचा फड निर्माण केला आणि राजरोस रीतीनें लावण्या रचून त्या म्हणण्याचा किंवा म्हणविण्याचा उद्योग करून यानें चरितार्थाची सोय केली. या कामांतले याचे मुख्य साथीदार मलकफंदी, रतनफंदी व राघवफंदी असे तिघेजण असत, असें याच्या लावण्यांवरून दिसतें. आपल्या उमेदींत असतां यानें निरनिराळ्या प्रांतांत अनेक वेळां मुलुखगिऱ्या केल्या. दुसऱ्या बाजीरावाचे कारकीर्दीत याचा फारच गौरव झाला. खुद्द बाजीरावाची याच्यावर बहाल मर्जी इतकी बसून गेली कीं, आपल्या पत्रव्यवहारावरून स्वतःच्या राज्यारोहणाच्या राजकारणाची सर्व हकीकत लिहून देऊन त्यानें फंदीबोवाकडून 'माधवनिधन' काव्य लिहून घेवविलें. या काव्याच्या प्रत्येक अध्यायाचे शेवटीं "ही कथा बाजीराव रघुनाथें। लिहोनि दिधली आपुल्या हातें। त्या पत्राबरहुकुम टीका येथें। कवित्व केलें कवीनें" अशी किंवा "ही कथा राघवात्मजें। लिहिली आपुल्या स्वकरांबुजें। लेखांवरहुकूम काय जें। कवित्व केलें फंदीनें" अशी ग्वाही दिली असल्यामुळें ऐतिहासिक पुराव्याचे दृष्टीनें या आख्यानाचें महत्त्व पहिल्या प्रतीचें मानावें लागतें. पटवर्धनी दप्तरांवरील पत्रांच्या प्रत्यंतर पुराव्यानें हें आख्यान सर्वस्वीं सत्य व सुसंगत आहे असें दिसून येतें. 'माधवनिधन' काव्यांतला सहावा अध्याय यशवंतराव होळकरानें पुणें लुटल्यानंतरच यानें जोडला. कारण त्या अध्यायांतील स्वतःला दूषणात्मक असा मजकूर बाजीराव अनंतफंदीला कसा लिहून देईल? पण सहाव्या अध्यायांतील भाषा थेट पहिल्या पांच अध्यायांसारखी आहे. म्हणून अनंतफंदीनें स्वतः पाहिलेली व ऐकिलेली हकीकत एकत्र करून तो अध्याय मागाहून जोडला असें दिसतें.

याची पुणें प्रांतांत केवढी छाप बसली होती, यासंबंधीं दुसराहि एक महत्त्वाचा पुरावा उपलब्ध आहे. महाराष्ट्रांतील अतिविख्यात शाहीर होनाजी बाळ यानें फंदीबोवाच्यावर एक उत्कृष्ट लावणी रचलेली आहे. त्यांत त्यानें याचें सुंदर चित्र काढलें आहे. 'फंदी अनंत कवनाचा सागर,' 'वाचा वाचस्पतीसारखी बहुतांचें तनमन हरकी। लांगेलुंगे कवि भेदरले अवघ्यावर त्याची गुर्की,' 'समोर गाता कोणी टिकेना,' 'धन ज्याचा हातचा मळ,' 'फंदी अनंदी छंदी वरदी ब्राह्मण त्यावर गुरुकृपा,' 'अकट निकट कवनाच्या चाली नित्य नव्या अक्षयि थापा,' 'विद्या-अभिमान नाहीं जयाला असा कवि कंचा धुंडा,' 'कीर्तनरंगीं सडा घालिती मानवला सर्वत्रासि असे। पुढें मागें ऐसा नसे दुसरा मृत्युलोकींचा रहिवासी,' 'पहावें रत्न पंधरावें' इत्यादि वर्णनानंतर जास्त कांहीं लिहिण्याचें कारण नाहीं. समकालीन प्रसिद्ध कवींकडून स्तुतीचा करभार मिळविण्याचें आणि प्रत्यक्ष पेशव्याच्या हातानें काव्यसामग्री लिहून मिळण्याचें परमभाग्य मराठे शाहीरांतील दुसऱ्या कोणासहि लाभलेलें नाहीं.

**अनंत रामचंद्र बडवे**--अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत हा कवि होऊन गेला. हा प्रल्हाद शिवाजी बडवे या कवीचा नातू होय. याच्या पित्याचें नांव रामचंद्र. यानें आपल्या आजापासून कवित्वशक्ति उचलली होती. यानें आपल्या गुरूवर गोपाळाष्टक नांवाचें रचिलेलें कवन फार मधुर आहे.

यानें लिहिलेले ग्रंथ--(१) मल्लारिमाहात्म्य (ओव्या १३८); (२) श्रीमद्भागवताच्या पंचमस्कंधांतील भरताख्यान (ओ. १०२); ब्रह्मोत्तरखंडाच्या आधारानें लिहिलेलें (३) शिवरात्रीमाहात्म्य (ओ. ७३) व (४) प्रदोषमाहात्म्य (ओ. ७५). यांखेरीज कांहीं स्फुट पदेंहि आहेत (महाराष्ट्रकविचरित्र, भा. १, पा. ३१५-३१६). काव्यसंग्रहांत ज्या अनंताचीं काव्यें छापलीं आहेत, तो रामदासशिष्य अनंत कवीहून वेगळा होय. याचा रामचंद्र हा मुलगाहि कवि होता. यानेंच मुकुंद-

राजाचा विवेकसिंधु संस्कृतमध्यें भाषान्तरित केला ( श. १६७५ च्या सुमारास ). याच्या आजोबानें म्हणजे प्रल्हाद शिवाजी बडवे यानें अमृतानुभव संस्कृतमध्यें केला.

२. ( आनंदमूर्ति पाहा ).

३. चोखामेळ्याची कविता लिहून ठेवणारा ब्राह्मण.

**अनंतराज**—हा काश्मीरच्या संग्रामराजाचा उत्तराधिकारी. यानें स. १०२९-१०३९ पर्यंत राज्य केलें. याच्या वेळीं एका देशद्रोही काश्मीरी सरदारानें काश्मीरावर तुर्कांची स्वारी आणली व तीस दरदांनीं मदत केली. पण यानें त्यांचा पराभव केला. याची राणी त्रिगर्त-राजकन्या सूर्यमती होय. शेवटीं यानें आपला पुत्र कलश याला गादीवर बसवून आपण वनवास पत्करला, पण कलशानें याचे फार हाल केले ( हि. भा. अ. ४५८-४५९ ). राजतरंगिणीवरून असें दिसतें कीं, यानें चंपावर स्वारी करून सालवर्मन् यास जिंकलें ( पा. ४६२ ).

**अनंतराम**—याचें एक संस्कृतांत अन्योक्तिपर नाटक लिहिलें आहे. त्याचें नांव ' स्वानुभूति नाटक ' असें आहे.

**अनंतवर्मन्**—हा त्रिकलिंगाच्या प्राच्य गंगांपैकीं राजराज व रूपसुंदरी यांचा मुलगा. हा चोलगंग नांवानें विशेष प्रसिद्ध आहे. कारण हा गंग वंशांतील असून याची माता रूपसुंदरी ही वेंगीची सत्ता नष्ट करणाऱ्या प्रसिद्ध राजेन्द्र चोलाची मुलगी होती. म्हणून दोनहि मोठ्या घराण्यांचें निदर्शक चोलगंग असें नांव हा वापरी. यानें पश्चिमेच्या उत्कलराज्यास व पूर्वेच्या वेंगीराज्यास मदत केली. याचे स. १०८१, १०८८, ११३५ वगैरे सालांतील बरेच लेख प्रसिद्ध झाले आहत ( एपि. इंडि. १८. १६३-१६५ ). यांपैकीं एका लेखांत राजराजेश्वर नांवाचें याच्या पित्यानें बांधलेलें एक शिवालय होतें, त्यास यानें गांव दिल्याचा निर्देश आहे.

तसेंच दुसऱ्या एका लेखांत उत्कल व ओरिसा जिंकून आपल्या राज्यांत सामील केल्याचा व त्यामुळें भूमि, द्रव्य, हत्ती, घोडे वगैरे विपुल संपत्ति मिळाल्याचा निर्देश आहे. तसेंच जगन्नाथाचें मंदिर यानें बांधलें, असें त्या लेखांत अठ्ठाविसाव्या श्लोकांत म्हटलें आहे. हा आपणास परमवैष्णव म्हणवतो. यानें एका मंदार राजाला पराभूत करून गंगेपार घालविलें. पण हा मंदार कोण हें समजत नाहीं. यानें सत्तर वर्षें राज्य केलें, असें या लेखांत म्हटलें आहे. याचा मुलगा कामार्णव याला स. ११४२ मध्यें राज्याभिषेक झाला ( हिं. भा. अ. पा. ४३९-४०१ ). त्याप्रमाणें यानें जयपुर येथें गंगेश्वर नांवाचें देऊळ बांधलें. स्मिथनें स. १०७६-११४६ असा याचा राज्यकाल दिला आहे.

२. ( ४५०-४७५ ) मौखरी वंशांतील जो शार्दूलवर्मन् त्याचा हा मुलगा होय. हा आपल्या बापाप्रमाणेंच कुशल योद्धा असून विशेषतः तीर मारण्यांत याची फार ख्याती होती. बापाबरोबर यानें पुष्कळशा लढायांमध्यें आपली मर्दुमकी गाजविली. हा अतिशय लोकप्रिय असून मौखरी वंशांतील एक दागिना होता असें म्हणतात. याच्या अंगीं याच्या बापाइतकें दातृत्व नव्हतें. तरी पण याच्याविषयीं जनतेला सहानुभूति वाटत होती. असें सांगतात कीं, हा जर शिकारीस गेला तर हरीण, याच्या हातून आपण मरावें या हेतूनें, स्तब्ध उभें राहत असें.

याच्या मागून हरिवर्मन् हा गादीवर आला. परंतु याचें व हरिवर्मनचें नातें समजत नाहीं. याला पुत्र वगैरे कांहीं नव्हतें. तेव्हां हरिवर्मन् हा याच्या बहिणीचा किंवा भावाचा मुलगा असावा ( मौखरी By E. A. Pires, P. 51-53 ).

**अनंतवीर्य**--हा जैनधर्मी दिगंबरपंथी होता. यानें माणिक्यनंदीच्या परीक्षामुख या ग्रंथावर परीक्षामुखपंजिका अथवा प्रमेयरत्नमाला या नांवाची एक टीका लिहिली आहे. तसेंच यानें अकलंकाच्या न्यायविनिश्चय या ग्रंथावरहि न्यायविनिश्चयवृत्ती नांवाची एक टीका लिहिली आहे. पैकीं पहिली टीका यानें शांतिसेनाकरितां विजय आणि नन्दाम्बा यांचा पुत्र हिरपाच्या सांगण्यावरून लिहिली.

शांतिसेन व शांतिसूरी हे एकच होत, असें समजलें जातें. हा शांतिसेन संवत् १०९६ अथवा स. १०३९ मध्यें मरण पावला. तेव्हां याचा समकालीन असा हा अनंतवीर्य याच सुमारास झाला असावा. हा १४ व्या शतकाच्या अगोदर झाला असावा एवढें मात्र निर्विवाद आहे. कारण माधवाचार्यानें आपल्या सर्वदर्शनसंग्रहामध्यें जैनदर्शन या भागांत याचा उल्लेख केला आहे ( हिस्ट्री ऑफ इंडियन लॉजिक, पा. १९८ ).

**अनंतसुत** ( मुद्गल )—हाच कृष्णदास मुद्गल आहे कीं काय असा संशय आहे. हा नाथ महाराजांपूर्वी एक वर्ष समाधिस्थ झाला असावा असें महिपतिबाबा म्हणतात. त्यावरून समाधिशक १५२० निघतो. याचे ग्रंथः—रामायण, रुक्मिणीस्वयंवर व कालियामर्दन हे होत ( सं. सू. ).

**अनंतसुत त्र्यंबक**—याचें ओवीबद्ध उद्योगपर्व उपलब्ध आहे आणि तें सरस आहे ( मं. तृतीय सं. १८३७ पा. १०२-१०६ ).

२. रुक्मिणीस्वयंवराचा कर्ता.

३. कालेयामर्दन गाणारा.

४. विठ्ठलस्तुति व चेंडूफळी लिहिणारा.

**अनंतसुत विठ्ठल**—हा कवि सुमारें ७० वर्षांपूर्वी बडोदें येथें होऊन गेला. याचे वडील अनंत हांगा नदीच्या कांठीं पिंपळगांव (माहूरजवळ) येथें राहत असत. त्यांच्याकडे एकंदर तीन गांवचें जोशीपण व कुळकर्णपण होतें. विठ्ठलाच्या आईचें नांव राधाबाई. विठ्ठलानें वडिलांनाच गुरु केलें होतें. याचा दत्तप्रबोध हा एकच ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्याचे पहिले ३७ अध्याय शिवपुराण, नारदपुराण, पद्मपुराण यांच्या आधारें लिहिले असून त्यांत यानें दत्तात्रयाच्या कथा वर्णिल्या आहेत. पुढील २४ अध्यायांत दत्तसांप्रदायांतील संतांच्या कथा वर्णिल्या आहेत. त्यांत कवीनें आपली दत्तभक्तांची गुरुपरंपरा दिली आहे. यानें आपल्या तीर्थरूपांची भक्ति व त्यांना झालेला साक्षात्कार चांगला वर्णिला आहे. यानें आपली गुरुपरंपरा, जनार्दन–एकनाथ–नरहरी–निंबराज–नारायण–जयराम–नारायण–अनंत–विठ्ठल अशी दिली आहे. या परंपरेंतील बहुतेक पुरुष प्रसिद्ध आहेत ( महाराष्ट्र कविचरित्र भा. २, पा. २२९ ).

२. संत-कविकाव्य–सूचीकार एका अनंतसुत विठ्ठलाची माहिती देतात तो व हा एक नसावेत. कारण याचे ग्रंथ–वस्त्रहरण ( श. १५९४ ), गजगौरीव्रत, सुधन्वाख्यान तारकावध, गरुडहनुमंतभेट वगैरे होत.

**अनंतसुत संत पुरोहित तुकदेव**--यानें स्वात्मानुभवतरंगिणी नामक सप्ततरंगात्मक प्राकृत ग्रंथाची स्वहस्तानें लिहिलेली अशी संपूर्ण पोथी आहे. ग्रंथसंख्या ८६१ असून ग्रंथ वेदान्तपर आहे ( मं. श. १८३५ वा. इ. लें. ३५ ).

**अनंताचार्य**—याच्या पित्याचें नांव नागदेवभट्ट असें होतें. हा शुक्लयजुर्वेदापैकीं कण्वशाखेचा असून यानें आपल्या समग्र संहितेवर भाष्य लिहिलें आहे.

**अनंतोपाध्याय**—पंढरपूरचे बाबा पाध्ये व तात्या पाध्ये यांचा पिता.

**अनाथ**—हिन्दींतील विचारमाला व सर्वसार या ग्रंथांचा कर्ता.

**अनाथ पिण्डक**—यानें गृहपति असूनहि शंभर कोट रुपये भगवान् बुद्धाकरितां दान केले. यानें गौतम बुद्धाकरितां जेतवन पाहिजे होतें म्हणून जमिनीवर रुपये पसरून जमिनीइतके रुपये दिले. त्याचें एक प्राचीन चित्र बर्हुतस्तूपावर उपलब्ध आहे. अशोकावदान या ग्रंथांतहि या कथेचा निर्देश आहे. याचें नांव सुदत्त असें होतें ( सुदत्त पाहा ).

**अनामक**—हा एक मराठी कवि होता. यानें द्रौपदीस्वयंवर नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे. श्लोकांची रचना आनंदतनयासारखी असून भाषा सवाई माधवरावाच्या कालांतील आहे. ह्या दोन बाबींवरून हा कवि दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीच्या सुमारास होऊन गेला असावा. यानें आर्या सुद्धां रचिल्या आहेत ( मं. श. १८३६ वा. इ. ले. ८४ ).

**अनार्कली**—( डाळिंबाची कळी ) हें एका स्त्रीचें नांव होतें. हिचेंच दुसरें नांव नादिरा बेगम असें होतें. ही जहांगीर बादशहाच्या कारकीर्दींत होऊन गेली. हिची कबर लाहोर येथें अनार्कली नांवाच्या ठिकाणीं आहे. या नांवासंबंधानें अनेक निरनिराळ्या गोष्टी सांगण्यांत येतात. कोणी म्हणतात कीं, जहांगीरच्या राजकन्येचें हें एक नांव होतें व कोणी म्हणतात कीं, ही एक दासी होती. हिच्यावर जहांगीरचें प्रेम बसलें म्हणून हिला अकबरानें जिवंत पुरून टाकली. ही जरी दंतकथा असली तरी एवढें मात्र खरें कीं, वर निर्देश केलेली एक स्त्री होती व ती अकबर अथवा जहांगीर यांच्या कारकीर्दींत होती. आणि हिच्यावर कोणी तरी राजपुत्र मोहित झाला होता व हिला अशा परिस्थितींत मृत्यु आला कीं, त्या योगानें त्या प्रेमी पुरुषाचें हृदय विदीर्ण होऊन त्यानें पुढील अर्थाच्या पद्यमय ओळी हिच्या थडग्यावर लिहून ठेवल्या आहेत.

"अरेरे! जर माझ्या नष्ट प्रियेचें मुख मला पुनः पाहावयास मिळेल, तर मी सृष्टीच्या अन्तापर्यंत देवाचे आभार मानीत राहीन" ( बील ).

'अर्ली ट्रॅव्हेल्स इन् इंडिया' या ग्रंथांत विल्यम फिंच यानें ही कबर प्रत्यक्ष पाहून तिचें वर्णन येणेंप्रमाणें दिलें आहे:—

"अनार्कली ही अकबराची एक बायको व राजपुत्र दानियल याची ही आई होती. राजपुत्र सेलीमशीं हिचा कांहीं संबंध उघडकीस आल्यानें अकबरानें हिला भिंतींत चिणून ठार मारलें. पुढें सेलीम बादशहा झाल्यावर हिच्या स्मरणार्थ त्यानें ही सुंदर कबर बांधली."

वरील ग्रंथांत एडवर्ड टेरी नांवाच्या दुसऱ्या प्रवाशानेंहि फिंचसारखेंच लिहिलें आहे.

**अङ्गिग**--पल्लव घराण्यांतील एक राजा. याचा राष्ट्रकूट घराण्यांतील तिसऱ्या कृष्णानें पराभव केला ( स. ९४० ).

याला अंतिम असें म्हटलेलें आहे (Bhand. P. 290,304). याच्यानंतर याचा भाऊ दिलिपय्य हा गादीवर आला.

**अनियक भीम**--हा त्रिकलिंगाच्या प्राच्यगंगांपैकीं अनंतवर्मन् ऊर्फ चोडगंग याचा चौथा पुत्र. याला अनंगभीम असेंहि म्हणत. ओरिसा या वेळीं गंगाच्या पूर्ण ताब्यांत होता. कारण याचा एक मांडलिक स्वप्नेश्वर यानें ओरिसांत स्वप्नेश्वर मेघवाहन नांवाचें देवालय बांधलें. याच्याकरितां स्वप्नेश्वरानें अनेक लढाया जिंकल्या होत्या. स्वप्नेश्वर येथें मंदिरावर लावलेल्या प्रशस्तींत बरीच माहिती मिळते ( JRASP ६१.१८; वज्रहस्त चवथा पाहा).

**अनिरुद्ध**—हा उदायीनंतर मगधच्या गादीवर आला असें बुद्धांनीं केलेल्या परंपरेंत आहे. त्याच परंपरेप्रमाणें याच्यानंतर मगधच्या गादीवर मुंद हा राजा आला.

**२.** बुद्धाचा चुलत भाऊ. हा दिव्यचक्षु होता.

**३.** हा गंगेच्या तीरावरील विहारपाठक या गांवचा रहिवासी होय. यानें कुमारिलभट्टाच्या तत्त्वांचा चांगला अभ्यास केला होता. याच्या ग्रंथावरून हा धर्माध्यक्ष होता असा निष्कर्ष निघतो. हा बंगाली ब्राह्मण होता. हा स्वतःला धर्माधिकारी असें म्हणवीत असे. हा बंगालच्या बल्लाळसेन राजाचा गुरु होता, त्याच्या ( राजा )-पासून त्याला ग्रंथ लिहिण्यास बरीच मदत मिळाली.

याचा हारलता हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. हा ग्रंथ कलकत्ता येथें प्रसिद्ध झालेला आहे. या ग्रंथामध्यें जन्माशौच, मृताशौच यांचे नियमांविषयीं विवरण केलेलें आहे. पितृदयिता हा ग्रंथ सामवेदी लोकांच्या करितां लिहिलेला आहे. यामध्यें स्नान, संध्या, तर्पण वगैरे गोष्टींचें स्पष्टीकरण आलेलें आहे.

हा १२ व्या शतकाच्या उत्तरार्धांत होऊन गेला. कारण गोविंदानें आपल्या श्राद्धक्रियाकौमुदी या ग्रंथांत याचा वेळोवेळीं उल्लेख केलेला आहे. शिवाय यानें भोजदेव, गोविंदराज यांचा उल्लेख केलेला आहे ( हिस्ट्री ऑफ धर्मशास्त्र, पा. ३३७–३३९ ).

**४.** हा ब्रह्मदेशांतील अकराव्या शतकांत राज्य करणाऱ्या वगान घराण्यांतील प्रसिद्ध पुरुष होय. ब्रह्मदेशांत नवीन मन्वंतर घडवून आणण्यासाठीं अनेक राष्ट्रहिताचीं कामें यानें केलीं. यानें देशांतील बौद्ध धर्माची सुधारणा करून मोठमोठीं देवस्थानें बांधलीं. हें एक काम होय. हीं देवळें बांधण्यासाठीं खेड्यांतून शेतकीवरील पुष्कळशा लोकांना जबरीनें धरून आणून त्यांच्याकडून यानें काम करून घेतलें. देवस्थानांची झाडलोट व रक्षण करण्यासारखीं इतर कांहीं कामें हीं सक्तीनें घेण्याची पद्धति तिकडे आहे. उत्तरेकडे इरावती नदीचे कांठीं पगार येथें अनिरुद्ध नांवाच्या ब्रह्मी जातीच्या राजानें जेव्हां पहिली ब्रह्मी बादशाही स्थापिली, तेव्हां दक्षिणेंत थट्टन येथें मनुहा राज्य करीत होता. याच्या प्रांतांत द्रविड देशांतून कांची येथें गेलेला हीनयान पंथ जोरावत होता. अनिरुद्धाला उत्तरेकडील भ्रष्ट बौद्ध धर्माची सुधारणा करावयाची होती. अनायासेंच त्यास एक बौद्ध भिक्षु मार्गदर्शक मिळाला. त्यानें थट्टन येथें त्रिपिटक नांवाच्या ग्रंथाच्या प्रति आणण्याची अनिरुद्धास सल्ला दिली. सामोपचारानें मागूनहि मनुहा ग्रंथाच्या प्रति देण्यास तयार होत नाहीं, असें पाहून यानें त्यावर मोठी स्वारी केली व ग्रंथासहित त्याचें सर्वस्व हरण केलें. मौल्यवान् चिजांबरोबर प्रजेसहि गुलाम केलें. तेव्हांपर्यंत दक्षिण ब्रह्मदेशांतील संस्कृति आंध्र व द्रविड देशांतून आलेल्या हीनयान बौद्ध धर्मानें व्यापिली होती. ती संस्कृति या युद्धामुळें उत्तरेस फैलावूं लागली.

थट्टनचे प्रजाजन व राजघराणें यांना गुलामाप्रमाणें वागविण्यांत येऊन त्यांना पॅगोडांमध्यें राहणें भाग पाडिलें. पश्चिम भागांत श्यझिंगो यानें पॅगोडा बांधण्यास सुरवात केली ( १०४४–७७ ). त्याची पूर्ति त्याच्या मानलेल्या मुलानें म्हणजे कान्झिटा राजानें केली. जिंकून आणिलेल्या मनुहानें 'मनुहाचें देऊळ' म्हणून प्रसिद्ध असलेला पॅगोडा बांधिला. पुढें मनुहास मोकळें ठेवणें इष्ट न वाटल्यावरून त्यास गुलाम बनविण्यांत येऊन एका देवळाची व्यवस्था करण्याचें काम त्याजकडे सोपविलें ( मि. जी. ई. हार्पे यांनीं लिहिलेला 'ब्रह्मदेशाचा इतिहास' ).

**अनीस**--एक उर्दू कवि. याचें नांव मीर बबरअली असून अनीस हें उपनांव होय. याच्या बापाचें नांव मुस्तहसन खलीक असें असून आजोबाचें नांव मीर हसन होतें. याचा जन्म लखनौ येथें स. १८०२ मध्यें झाला.

याचें प्राथमिक शिक्षण मौलवी हैदरअलीपाशीं झालें. कविता तर याची वडिलार्जित संपत्ति होती. कवितेचें बीज याच्यामध्यें पूर्णपणें बिंबलें होतें. जोंपर्यंत याचे वडिल हयात होते, तोंपर्यंत याला वडिलांच्या कविता पाहावयास आणि ऐकावयास मिळत. त्यांचे पश्चात् हा स्वतः कविता करूं लागला.

ही एक संतोषी व्यक्ति असून मितभाषिणी होती. आणि जें कांहीं बोलत असे तें मोहक आणि त्यामध्यें योग्य शब्दांचाच उपयोग केलेला असे. हिंदीमध्यें याच्या नांवावर एक घनाक्षरी छंद नांवाचें पुस्तक फार लोकप्रिय आहे. पण तें याचेंच आहे कीं आणखी दुसऱ्या कोणाचें आहे हें मात्र निश्चित ठरलेलें नाहीं.

हा जन्मभर लखनौ येथेंच राहिला. पण आपली वागणूक दिल्लीवरहुकूम ठेवीत असे. याला गर्व होता.

याचा, मुलें, स्त्रिया, पुरुष, योद्धा, प्रेमी त्याचप्रमाणें सेवक इत्यादिकांच्या मनोभावना व्यक्त करण्याचा प्रयत्न सरस वठला आहे. कांहीं ठिकाणीं सृष्टीचीं वर्णनें फार उत्तम साधलीं आहेत.

याचा मृत्यु स. १८७४ मध्यें झाला (क. कौं. भा. ४ था).

**अनुभूति स्वरूपाचार्य**—यानें सारस्वतप्रक्रिया नांवाचें व्याकरण रचिलें. याच्याविषयीं एक गोष्ट अशी सांगतात कीं, हा एकदां सभेंत भाषण करीत असतां याच्या मुखावाटें एक अशुद्ध प्रयोग निघाला. यास पंडितांनीं आधार विचारतांच यानें 'उद्या सांगेन' असें सांगून घरीं जाऊन सरस्वतीची आराधना केली. त्या वेळीं यास जें व्याकरण सरस्वतीकडून मिळालें तें पंडितांना दुसरे दिवशीं सांगून त्यांची शंका यानें निरसन केली.

सारस्वतप्रक्रियेशिवाय आख्यातप्रक्रिया व धातुपाठ हेहि यानें केले होते असें दिसतें (सी. सी.). हा स. १२५०-१४५० पर्यंतच्या काळांत होऊन गेला असावा (सिस्टिम ऑफ दि संस्कृत ग्रामर, पा. ९६).

**अनुला**—ही महानग राजाची पत्नी होय. हिला बौद्ध धर्माचीं तत्त्वें पूर्णपणें पटलीं होतीं. व त्याप्रमाणें हिनें सिलोनमध्यें ह्या धर्माचा प्रचार प्रथम सुरू केला. धर्म स्वतः पाळून तो लोकांकडून कसा पाळला जाईल हें पाहण्याची हिला फार आवड असे. संघमित्रा नांवाच्या हिच्या नणंदेनें हिला बौद्धधर्माची आचार्या असें वारंवार संबोधिलें आहे (ग्यारे. कोश).

२. ही कोरांग राजाची राणी होय. ही अत्यंत दुर्वर्तनी असल्याचा उल्लेख सांपडतो. हिनें आपल्या पतीस व पुत्रास विष घालून मारल्याविषयींची आख्यायिका प्रसिद्ध आहे; व त्यानंतर एकामागून एक असे चार उपपतीहि तसेच हिनें मारिले. शेवटीं हिचा पुतण्याच विरुद्ध जाऊन त्यानें इ. स.च्या पूर्वी ४१ व्या वर्षी हिचा खून करविला व गादी आपणाकडे घेतली (ग्यारे. कोश).

**अनूपसिंग**—विकानेर संस्थानचा एक राजा. हा त्याच घराण्यांतील करणसिंग याच्यानंतर गादीवर आला. यानें गोवळकोंडा घेण्याचे कामीं मोंगलास मदत केली म्हणून यास महाराजा हा किताब देण्यांत आला.

**अनूबाई घोरपडे**—बाळाजी विश्वनाथ पेशव्यांची सर्वांत धाकटी कन्या. हिच्या वयाच्या ६ व्या वर्षी सातारा मुक्कामीं इचलकरंजी घराण्यांतील व्यंकटराव नारायणराव घोरपडे यांच्याशीं विवाह झाला. अनूबाईस वर्षांतून बरेच दिवस आपणाजवळ राहतां यावें म्हणून पेशव्यांनीं स. १७२२ सालीं पुण्यास एक वाडा बांधून दिला व मौजे वडगांव तर्फ चाकण हा सबंध गांव व आणखी कांहीं बागा इनाम करून दिल्या. हिला पूर्ववयांतच नारायणराव व वेणूताई हीं अपत्यें झालीं. वेणूताई त्रिंबकराव पेठे यांस दिली होती.

अनूबाईच्या पतीस क्षयरोग होऊन तो वारला. त्याच्या कारकीर्दींत इचलकरंजी संस्थान जें वैभवाच्या शिखरास जाऊन पोंहोचलें तें अनूबाईच्या योगानें. हिनें आपल्या पेशव्यावरील वजनामुळें आपल्या मुलास लाखों रुपये मिळवून दिले व त्याला पतीच्या सरदारकीस योग्य असा तयार केला.

अनूबाईस बाळाजीमुळें शाहूमहाराजहि बरेच मानीत होते. अनूबाईचा नवरा वारल्यावर शाहूनें हिला सबंध अजरेमहाल इनाम करून दिला. पुढें हिनें ३१ खेड्यांची रीतसर सनद मिळविली. १७५६ सालीं सावनुरावरील मोहिमेंत ही पेशव्यावरोबर हजर होती. पुढें हिनें आपल्या कर्तृत्वावर धारवाडच्या विस्तृत सुभ्याची मामलत किल्ल्यासह मिळविली.

हिचा मुलगा नारायणराव हा वयांत आला तेव्हां आईच्या ओंजळीनें पाणी पिण्याचें न रुचून मातापुत्रांत वितुष्ट आलें. हिच्या प्रांतासच जोडून कोल्हापूर प्रांत असल्यामुळें व संभाजी मृत्यु पावल्यामुळें हिनें ती हकीकत पेशव्यास कळवून तें राज्य खालसा करण्याची सल्ला दिली. नारायणराव व्यसनाधीन बनला व त्यामुळें त्याची जबाबदारी पेशव्यांनीं काढून घेण्याचें ठरविलें. परंतु हिनें पुण्यास येऊन भीड खर्चून मामलतीचें देणें चार महिन्यांत देण्याचा करार केला. परंतु पुढें हिचा मुलगा वारला. पुढें लगेच १७७४ सालीं त्रिंबकराव मामा मारले गेले. व मुलीच्या वैधव्याची भर हिच्या पुत्रशोकांत पडली. पुढें आयुष्याच्या शेवटीं शेवटीं हिनें एक मोठी चूक केली. भाऊसाहेबांच्या तोतयाची चौकशी केली असतां तो भाऊसाहेबच आहे असें समजून हिनें त्याला मदत केली. तेव्हां पेशव्यांनीं हिची सर्व जहागीर व मामलत जप्त केली. तेव्हां कांहीं प्रमुख लोकांच्या सांगण्यावरून तें प्रकरण सव्वा लाख रुपये दंड भरून मिटलें. शेवट असा झाल्यामुळें ही काशीस गेली व स. १७८३ त तुळापुरास वारली.

पतीच्या निधनानंतर मुलगा ४६ वर्षांचा व त्यानंतर नातू या दोघांनाहि पोर समजून व त्यांचें कांहींएक चालूं

न देतां हिनें ३८ वर्षे संस्थानचा कारभार केला. हिनें मोठमोठ्या सर्व मसलती अंगावर घेऊन पार पाडल्या. हिची हिंमत, धोरण व महत्त्वाकांक्षा जबरदस्त होती (ज्ञा.को.).

**अन्नपूर्णाबाई**--गंगाधर यशवंत चंद्रचूड याची बायको. ही मोठी हुशार व दक्ष होती. ती नेहमीं राजकारणांत लक्ष घालीत असे ( म. रि. म. ४, पा. ८ ). मोंगलांनीं पुणें जाळलें, तेव्हां चंद्रचूड घराण्यांतील बायकामंडळीवर कठीण प्रसंग आला होता. गंगोबा, अज्याबा वगैरे मंडळी हैदराबादेकडे गुंतलेली, दादाजी वगैरे मुलें लहान व तशांत हिची धाकटी सवत आजारी पडून मृत्यु पावली. असें चहूंकडून आकाश कोसळलें असतां हिनें धैर्य खचूं दिलें नाहीं. उलट धीराचें पत्र लिहिलें. 'देशांत थोर अनर्थ झाला,' 'कित्येक स्त्रियांच्या इज्जती घेतल्या,' 'इकडे अतिशय गलबल झाली आहे,' 'चिठीचें कार्य ( हुंडीचे पैसे मिळणें ) होत नाहीं,' वगैरे हकीकत लिहून आपल्या संरक्षणाकरितां निघून येण्याबद्दल न लिहितां 'बहुत सावधपणें बुद्धीनें वर्तणूक करोन शरीर संरक्षण करणें,' असा शांतपणें हिनें स्वारीवर गेलेल्या घरच्या मंडळीस उपदेश केला आहे ( चंद्रचूड दप्तर ले. ७७ ).

२. ही बीडचे निंबाळकराची मुलगी व महादजी शिंदे याची पत्नी. हिला यमुना नांवाची मुलगी होती.

**अन्नमदेव**--हा दुसऱ्या प्रतापरुद्राचा धाकटा बंधु होय. प्रतापरुद्रानेंच स्वतः गादीवरून खालीं होऊन भावास गादी दिली. अन्नमदेव हा सुद्धां सुज्ञ असल्यामुळें प्रत्येक गोष्ट भावाच्या सल्ल्यानें करीत असे. पण भावाला मलिक काफूरनें पकडून नेल्यावर यानें बस्तर येथें राज्य स्थापिलें.

विद्यानाथानें प्रतापरुद्रावर एक नाटक लिहिलें होतें व तें प्रतापानें गादी सोडल्यावर पुरें झालें. त्या नाटकाबद्दल बक्षीस म्हणून प्रतापानें त्यास एक आंगठी दिली व ती अन्नमदेवाकडे घेऊन जाण्यास सांगून लागेल तितकें द्रव्यहि देण्यास अन्नमदेवास सांगितलें. त्याप्रमाणें अन्नमदेवानें विद्यानाथास द्रव्य देऊन तृप्त केलें. त्यास पुढें एक विद्यालय काढून देऊन मुख्य अध्यापकाची जागा दिली ( २ प्रतापरुद्र पाहा ).

**अन्नलदेव**—हा प्रतापरुद्राचा सेनापति होता. याचा उल्लेख स. १२९१ च्या शिलालेखांत आढळतो. हा महाप्रधान गन्नयप्रेग्गड याचा मुलगा. अन्नयप्रेग्गड आणि गन्नयप्रेग्गड हे एकच असावेत. याचा उल्लेख स. १३०६ ( प्रेद गल्लपल्लेच्या ) व स. १३१७ च्या ( तिरुपतीच्या ) शिलालेखांत आढळतो ( सुब्रमणि अय्यर कृत एन्शन्ट डेक्कन भा. १, पा. २९७ ).

**अन्नय्याचारी**—तेलंगी भाषेंत दोन भागांनीं रचलेलें याचें पितामहचरित्र प्रसिद्ध आहे. त्यांत सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवाचें यानें वर्णन केलें आहे.

**अन्नवेमरेड्डी**—तैलंगणांतील कोंडवीडू येथें हा राज्य करीत होता. एकदां तेनाल रामलिंगानें कृष्णदेव रामलुकरितां कंदाहारी घोडा आणविला होता. तो घोडा ह्याच अन्नवेमरेड्डीचा होय ( कविचरित्र ).

हा संस्कृत आणि आन्ध्र भाषेंत अत्यंत प्रवीण होता. अमरु शतकावरील याची संस्कृतमध्यें लिहिलेली व्याख्या प्रसिद्ध आहे. यानें आन्ध्र प्रांतांतील प्रसिद्ध कवित्रयांपैकीं एराप्रग्गड यास आश्रय दिल्यामुळें याची कीर्ति अजरामर झाली आहे ( तेलगू वाङ्मय पा. १५ ).

**अन्नंभट्ट**--हा जातीचा तैलंग ब्राह्मण. हा मोठा नैय्यायिक होता. गरिकपाद ( तेलंगण ) येथें याचा जन्म झाला. कौंडिण्यपूर ज्यास कोंडवीडू असें म्हणतात, तेथील संस्कृत शाळेंत यानें १२ वर्षे राहून न्यायशास्त्राचें पूर्ण ज्ञान संपादिलें.

यानें वैशेषिक तर्कज्ञानावर तर्कसंग्रह नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे. तशीच त्या ग्रंथावर दीपिका नांवाची टीकाहि लिहिली आहे. या दोनहि ग्रंथांस मिळून अन्नंभट्टीयम् असें म्हणतात. उदयनाच्या न्यायपरिशिष्टा'वरील न्यायपरिशिष्टप्रकाश नांवाची टीकाहि यानेंच लिहिली, असें म्हणतात. हा आंध्र ( तेलगू ) असून दक्षिण अर्काट ( चित्तूर ) येथील रहिवासी होता. १७ व्या शतकाच्या सुरवातीस हा बनारस येथें राहण्यास गेला. यानें आपल्या दीपिकेंत कांची येथील पल्लव राजा त्रिभुवनतिलक याचा उल्लेख केला आहे. वेबरच्या कॅटलॉगवरून असें कळून येतें कीं, तर्कसंग्रहाच्या एका हस्तलिखितावर स. १७२४ ( संवत् १७८१ ) हें साल आहे [ No. 683 p. 203 ]. प्रो. J. R. Ballantyne यानें तर्कसंग्रहाचें इंग्रजींत भाषांतर केलें आहे. अन्नम्भट्टानें तत्त्वचिंतामणीवरहि टीका लिहिली, असें कांहींचें म्हणणें आहे. हा १७ व्या शतकाचे पूर्वी होऊन गेला नसावा ( हिस्टरी ऑफ इंडियन् लॉजिक, पा. ३८८ ).

हा आपल्या वयाच्या ५५ व्या वर्षी फक्त श्रीक्षेत्र मल्लिकार्जुनाच्या दर्शनास गेला. याशिवाय यानें प्रवास असा केला नाहीं. हा कोणत्याहि राजाकडे द्रव्याच्या आशेनें गेला नाहीं. हा संतोषवृत्तीचा असल्यामुळें वडिलांच्या वेळच्या मिळकतीवरच आनंदी असे. पुढें उरलेला काळ यानें स्नानसंध्येंत व विद्यार्थ्यांना शिकविण्यांत घालविला. याला

मुलें पुष्कळ होतीं, पण तीं याच्या मरणापूर्वींच निवर्तलीं, असें सांगतात.

**अन्वरुद्दीनखान**—हा स. १७२५ च्या सुमारास दिल्लीहून दक्षिणेकडे आला. हा निजामच्या माहिताचा होता. हुशार असल्यामुळें याची नेमणूक निजामानें हैदराबादच्या कारभारावर केली ( म. रि. मध्य. १ पृ. १७० ).

२. हा कर्नाटकचा नवाब होय. शिपाईगिरीवर यानें आपलें नशीब उघडलें. हा प्रथम कर्नाटकच्या बालराजाचा कारभारी होता. नंतर बालराजाचा खून झाल्यावर यानें स्वतःच ती गादी बळकाविली. प्रथम हा मोंगलांच्या पदरीं होता. परंतु याच्या हलगर्जीमुळें याला नेमलेल्या प्रांताचा वसूल करतां येईना, म्हणून हा ती नोकरी सोडून गाजिउद्दीनाकडे आला. त्यानें याला सुरतेस जबाबदारीच्या जागेवर नेमलें. गाझीउद्दिननंतर त्याच्या मुलानें याला कर्नाटकच्या व राजमहेंद्री प्रांतावर नेमलें. पुढें त्याच प्रांताचा हा नवाब झाला. मुजफरजंगाशीं झालेल्या लढाईत हा मारला गेला. त्या वेळीं याचें वय १०७ वर्षांचें होतें, असें म्हणतात. अबदी नांवाच्या कवीनें याच्यावर एक वीररसप्रधान काव्य केलें आहे. पुढें याचा मुलगा महंमदअल्ली कर्नाटकच्या सुभेदारीवर कायम झाला ( इ. सं. पु. ३ पृ. ६७. ).

**अन्सारी**—हा एक प्रसिद्ध फारसी कवि होय. हा गजनीच्या महंमूदाच्या पदरीं होता; व त्याच्याच आश्रयाखालीं हा प्रसिद्धीस आला ( मु. रि. भा. १ पृ. ७५ ).

**अपग्गा**—अव्हेयरची ही भागिनी होय.

**अपराजित**—मेवाडांतील उदेपूरच्या गादीवर हा शीलादित्यानंतर आला. याच्या वेळच्या वि. सं. ७१८ ( स. ६६१ ) मार्गशीर्ष शुद्ध ५ चा शिलालेख नागद्याजवळ कुंडेश्वराच्या मंदिरांत पडलेला मिळाला. तो आतां उदेपूरच्या अजबखान्यांत आहे. याच्या पुढें अनेक राजे मस्तक नमवीत होते. यानें महापराक्रमी शिवसिंहाचा पुत्र वराहसिंहाला आपला सेनापति बनविलें. वराहसिंहाची पत्नी यशोमती हिनें विष्णूचें मंदिर बांधलें ( एपि. इंडि. ४. ३१-३२ ). या प्रशस्तीचें महत्त्व असें कीं, ही कविता खोदकामाची कला या दृष्टीनें अत्यंत सुंदर आहे. याच्यानंतर महेन्द्र दुसरा गादीवर आला.

२. पल्लवांपैकीं नृपतुंगाचा मुलगा. याचें राज्य आदित्य चोलानें हस्तगत केलें.

३. हा कोंकणच्या शिलाहारांपैकीं पहिला स्वतंत्र राजा. याचा एक ताम्रपट शा. श. ९१५ ( स. ९९३ )चा सांपडला आहे. त्यांत हा आपणास राष्ट्रकूटांचा मांडलिक असें अभिमानानें म्हणवीत असून त्यांची प्रशंसायुक्त वंशावळहि यानें दिली आहे. यांत राष्ट्रकूटांना रट्टराज्य हा शब्द वापरला आहे (म. यु. भा. २. ४४७). दुसऱ्या एका स. ९९७ मधल्या लेखांत आपणास महामंडलेश्वर असें यानें म्हणवून घेतलें आहे. शिवाय राष्ट्रकूटांची पुनः वंशावळ देऊन कक्कल राष्ट्रकूटास मारून तैलप चालुक्यानें राज्य घेतलें म्हणून दुःखोद्गार काढले आहेत ( एपि. इंडि. ३ पा. २५७ ). याच वेळीं हा स्वतंत्र झाला असावा. तथापि मांडलिकदर्शक महामंडलेश्वर हा किताब यानें कायमच ठेवला होता. या कुलाच्या पुढील लेखांत यास मृगांक व बिरुदकराम या पदव्या लावलेल्या आढळतात. गोमराजाचा यानें उत्तम सत्कार केला. ऐय्यपदेवाशीं लढाई केली व सेऊण देशाच्या भिल्लमास मदत केली. याचें राज्य 'कोंकण चोदाशें राजधानी पुरी' असें वर्णिलेलें असतें. पण पहिल्या लेखावरून कुलाबा, रत्नागिरी, ठाणें व डोंगरावरील मावळ याच्या राज्यांत होतें, असें दिसतें. हा स्वतंत्र झाला होता व याचें राज्य प्रमुख राज्यांत गणलें जाऊं लागलें ( हिं. भा. अ. पा. ३६१–३६४. ). हा सुमारें स. ९९० पासून स. १०१० पर्यंत गादीवर असावा.

तैलपाचा पुत्र सत्याश्रय यानें याचा पुरा मोड केला, असें रन्न कवीच्या कानडी काव्यांत म्हणजे गदायुद्धांत आहे. पण तें बरोबर नसावें असें दिसतें.

**अपरादित्य**—हा कोंकणचा शिलाहारवंशी राजा. याचा स. ११३८ ( शक १०६० ) च्या उरणनजीक सांपडलेल्या शिलालेखांत उल्लेख सांपडतो. डॉ. बुल्हर यास काश्मीरमध्यें सांपडलेल्या मंखाच्या श्रीकण्ठचरितांत ज्या अपरादित्य नामक कोंकणच्या ( कुंकुणेश्वर ) राजाचा उल्लेख आला आहे तो हाच होय असें मानतो ( श्रीकण्ठचरित सर्ग २५ श्लो. १०९-१११ ). या पुस्तकाचा काळ डॉ. मजकुरांनीं ११३५-४५ असा ठरविलेला आहे. सदरहू श्रीकण्ठचरितोल्लिखित अपरादित्यानें शूर्पारकाहून (सोपारा) तेजकंठ नामक पंडितास काश्मीर येथें भरलेल्या पंडितांच्या सभेस आपल्या देशातर्फे प्रतिनिधि म्हणून पाठविलें होतें. ही गोष्ट काश्मीर येथील जयसिंह राजाच्या कारकीर्दींत घडली ( बॉ. ब्रँ. रॉ. ए. सो. जादा अंक १२, १८७७; बॉ. गॅ. व्हॉ. १. पा. २ ). यानें स. ११२५ ११४५ पर्यंत राज्य केलें असावें ( हिं. भा. अ. पा. ३६५ ).

२. कोंकणचा शिलाहारवंशी राजा. याचे भूमिदान

केल्याचे पांच शिलालेख उपलब्ध आहेत. स. ११८४ त भिवंडी तालुक्यांत एक, स. ११८७ त तीन, पैकीं एक परळला व दोन वसई तालुक्यांत. स. १२०३ च्या मांडवीजवळील सांपडलेल्या केशिदेवाच्या शिलालेखांत ज्याचा अपरार्क असा उल्लेख आला आहे तो हाच असावा. केशिदेव हा अपरार्काचा मुलगा होता. हा याज्ञवल्क्यस्मृतीवरील अपरार्कटीकेचा कर्ता होता. हेमाद्रीनें याच्या टीकेचा निर्देश केला आहे. यानें मिताक्षरेचा अभ्यास केलेला दिसतो.

परळच्या शिलालेखांत अपरादित्यानें स्वतःचा राजाधिराज व कोंकणचा चक्रवर्ती, असा उल्लेख केला आहे. पश्चिम चालुक्य घराण्यांतील राजांच्या आपसांतील भांडणांचा फायदा घेऊन हा स्वतंत्र झाला असावा ( बॉं. गॅ. व्हॉ. १, पा. २; बॉं. ब्रॅं. रॉ. ए. सो. ज. पु. ९; १२ व जादा अंक; इं. अँ. ९ ). अपरार्क हा याचा ग्रंथ काश्मीरसारख्या दूरच्या देशांत प्रमाण मानतात. पहिल्या व दुसऱ्या अपरादित्याच्या माहितीवरून कोंकणचें व काश्मीरचें दळणवळण दिसून येतें. याचा राज्यकाल स. ११७५–१२०० असा दिसतो ( हि. भा. अ. ३६८ ).

**ॲप्टन**—हा स. १७७६ पासून स. १७७७ पर्यंत पुणें दरबारीं इंग्रजांचा वकील म्हणून होता. यानें ता. १–३–१७७६ रोजीं पुरंदर येथें पुणें दरबारशीं तह केला ( म. रि. उत्तर वि. १, पा. ५७–६५ ).

**अप्पय्य दीक्षित**—हा जातीचा द्रवीड ब्राह्मण होता. हा कांचीच्या अग्नेय दिशेस अग्रहारांत राहत असे. हा सामवेदी होता. गोत्र भारद्वाज, पित्याचें नांव रंगराज व आजाचें आचार्य दीक्षित म्हणजे वक्षस्थलाचार्य. विजयनगरचा कृष्णराज, नरस ऊर्फ नरसिंह, चिन्नबोम्म व वेंकट यांचा आश्रयदाता म्हणून किंवा उदाहरण म्हणून दिलेल्या स्वकृत श्लोकांत यानें उल्लेख केला आहे. सिद्धान्तकौमुदीकार भट्टोजी दीक्षित याचा शिष्य होता. हा निर्मत्सरबुद्धि असल्यानें शैव व वैष्णव या दोघांसहि मान्य असे. याला तीन बायका व ११ मुलें होतीं.

याचें नांव अप्प दीक्षित किंवा अप्पय्य दीक्षित असें आहे. यानें शंभरांवर ग्रंथ लिहिले असून त्यांतील तीन साहित्यशास्त्रावर आहेत. वृत्तिवार्तिक, कुवलयानंद, आणि चित्रमींमासा हे ते तीन ग्रंथ आहेत. वृत्तिवार्तिक काव्यमालेंत छापला असून बाकीचे दोन स्वतंत्रपणें प्रसिद्ध आहेत. वृत्तिवार्तिकांत दोन परिच्छेद आहेत. त्यांत रूढि, योगरूढि व योग या तीन प्रकारची अभिधा व चार प्रकारची लक्षणा या दोन प्रकारच्या शब्दशक्तींचें सविस्तर विवेचन केलें आहे. कुवलयानंद हा विद्यार्थ्यांच्या उपयोगी असा अलंकारग्रंथ आहे. चंद्रालोकांत शंभर अलंकार सांगितले असून यानें त्यांत अधिक चोवीसांची भर घातली आहे. कुवलयानंदांत अलंकारांचीं लक्षणें व उदाहरणें बहुधा चंद्रालोकांतून घेतलीं आहेत. बाकीचीं यानें रचलीं आहेत. आणि त्यावर इतर कवींचीं उदाहरणें देऊन यानें सुबोध विवेचन केलें आहे. हा ग्रंथ वेंकटपती राजाच्या आज्ञेवरून लिहिला. चित्रमीमांसा हा ग्रंथ यापेक्षां अधिक शास्त्रीय आहे. चित्रमीमांसा हा ग्रंथ अतिशयोक्तीचें विवेचन चालू असतांच ग्रंथकारानें संपविला आहे; आणि अरुणाची व अर्धचंद्राची उपमा दिली आहे. या चित्रमीमांसेचें खंडन जगन्नाथ पंडितानें केलें आहे. तोहि ग्रंथ उपलब्ध चित्रमीमांसेच्या कांहीं भागाचें खंडन करणारा आहे. याला आश्रय देणारा वेंकटपति हा विजयनगरचा पहिला राजा होय. त्याचें स. १६०१–२ मधील एक दानपत्र उपलब्ध आहे ( एपि. इंडि. ४. २६९ ). त्यावरून याचा काल ठरतो. जगन्नाथ पंडिताचा ग्रंथकर्तृत्वकाळ स. १६२०–१६५० आहे. महालिंगशास्त्री यांनीं याचा काळ स. १५२०–१५९२ असा निश्चित केला आहे ( जर्नल ऑफ ओरिएन्टल रिसर्च, मद्रास व्हा. ३, पा. १४८ ). याच त्रैमासिकांत याच्या रक्षणरत्नावलि या ग्रंथाचा थोडासा भाग छापला आहे. त्यांत नाट्यांतील नान्दी वगैरे संज्ञांचें विवेचन आहे. त्यावर वेंकटपतीच्या आज्ञेनें एक टीकाहि यानें लिहिलेली दिसते. शिवार्कमणिदीपिका ग्रंथाच्या शेवटीं चिनवीराचा पुत्र चिन्नबोम्म हा अप्पय्य दीक्षिताचा आश्रयदाता होता, असें सांगितलें आहे. तो वेलोरचा राजा होता. व त्याच्या शिलालेखांचा काळ शके १४७१ व १४८८ (स. १५६६) आहेत ( इंडि. अंटी. व्हा. १३. पा. १४५; एपि. इंडि. व्हा. ३. पा. २३८ ).

यानें कित्येक ग्रंथ लिहिले आहेत. शिवार्चनचंद्रिका, शिवतत्त्वविवेक, शिवार्कमणिदीपिका, शिवकर्णामृत, वीरशैवग्रंथ, आत्मार्पणग्रंथ, सिद्धान्तलेशसंग्रह, रामायणतात्पर्यसंग्रह आणि नामसंग्रहमाला. शिवाय कल्पतरुपरिमळ याचाच होय. मुक्तामाला, राजनीतिशास्त्र, रसमंजरी, सकलकथासार वगैरे ग्रंथ यानें लिहिले असें म्हणतात. आत्मार्पण ग्रंथाविषयीं हिंदुस्थानांतील सर्व लोक आश्चर्यचकित झाले आहेत. हा लिहिण्याकरितां यानें धोत्र्याच्या बिया खाण्याचा उपक्रम सुरू ठेवला होता. हा मोठा नैष्ठिक असल्यानें यानें कावेरी नदीतीरीं अनेक यज्ञ केले.

याचें एक वसुमतीचित्रसेनविलास नांवाचें नाटकहि आहे.

हा प्रत्येकाजवळ शिवाची स्तुति करीत असे. एकदां चुकून हा विष्णूच्या देवळांत गेला व तेथें शिवाचें नमन यानें म्हटलें. त्यावरोबर विष्णुमूर्ति अदृश्य होऊन शिवमूर्ति तेथें प्रगट झाली. तेव्हां लोकांनीं हें यास सांगितलें, म्हणून यानें पुनः विष्णुनमन केलें असतां पूर्ववत् विष्णुमूर्ति त्या ठिकाणीं दिसूं लागली, अशी आख्यायिका आहे.

यानें संस्कृतांतहि कांहीं पदें रचिलीं आहेत. हा पुढें काशीस जावें व तेथेंच राहावें, या हेतूनें तयारी करीत होता. पण लोकाग्रहास्तव हा गेला नाहीं. याची जन्मभूमि चिदंबर येथें हा जाऊन राहिला. याच्याजवळ पांच स्फटिकाचीं लिंगें होतीं, तीं यानें ब्राह्मणास दोन, पुतण्यास एक, मुलांस एक देऊन एकाची चिदंबर येथें स्थापना केली. हा वयाच्या ९० व्या वर्षी चिदंबर येथें मरण पावला ( जगन्नाथ पंडित पाहा ).

**अप्पर**--एक शैव साधु. यानें पल्लव राज्यांतून जैनांस हाकलून दिलें. ही गोष्ट सनाच्या आठव्या शतकाच्या प्रारंभीं झाली.

२. हा तामिळांपैकीं कवि असून जैनधर्मी होता. याला गणाविषयींच्या वादांत पराभूत झाल्यानें पुनः वैदिकधर्म स्वीकारावा लागला. तामीळ भाषेंतील याची कविता उपलब्ध नाहीं.

**अप्परस**--( तिम्मरस पाहा ).

**अप्पलंबा**--विजयनगरच्या रामरायाची दुसरी पत्नी. ही जिल्लेल्ला घराण्यांतील पेद्दनंदी राजूची मुलगी. हिला पुत्र नव्हता.

**अप्पाकवि**--हा जातीचा तैलंग होय. हा उत्तम कवि म्हणून म्हटला जात असे. मात्र याच्या जन्माचा नक्की सन कळत नाहीं. तैलंगी भाषेंत आंध्रप्रयोगरत्नाकर व वृंदासंभावना असे याचे दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. यांतील पहिला छंदशास्त्रावर आहे ( कविचरित्र ).

**अप्पाजी माणकेश्वर**--(दामाजी माणकेश्वर पाहा).

**अप्पादेवी**--ही रघुवंशी प्रतिहारांपैकीं रामभद्राची पत्नी. हिचा पुत्र भोज.

**अप्पानाथ**--तंजावरचा राजा शहाजी (१७३८-३९) याच्या वेळीं असलेला टिप्पा अध्वरिन् व नरसाम्बा यांचा पुत्र व रसविलासभाण याचा कर्ता. यानें एक पंचांकी कान्तिगतीपरिणय नांवाचें नाटक संस्कृतांत लिहिलें आहे ( ज्ञा. को. वि. १६ पृ. १३५ ).

**अप्पायिका**--एक राजा. यानें चालुक्य घराण्यांतील कीर्तिवर्मन्‌पुत्र पुलकेशी याजवर स्वारी केली होती, पण पराभव झाल्यामुळें हा पळून गेला.

**अप्पाशास्त्री**--यानें लवलीपरिणय आणि सारस्वतादर्श नांवाचीं नाटकें लिहिलीं. शिवाय आप्पाशास्त्रीवादार्थ आणि चिल्लरवादाः हे ग्रंथ लिहिल्याचे उल्लेख आढळतात. ( सी. सी. ).

**अफजलखान**--अबदुल्ला भटारी अफजलखान हा आदिलशाहाचा दासीपुत्र असावा, असें वांई येथें सांपडलेल्या हुकूमनाम्यांत आढळतें. याच्या बापाकडे आदिलशाहाच्या मुदपाकखान्यावरील देखरेखीचें काम होतें. म्हणून यास भटारी असें संबोधितात.

हा चांगला धिप्पाड पुरुष असून मुहम्मद आदिलशाहाच्या कारकीर्दींत उदयास आला. याची पहिल्या प्रतीच्या सरदारांत गणना होत होती. स. १६४४ त रणदुल्लाखान वारल्यावर वाईची सुभेदारी अफजलखानास मिळाली. हिंदूंच्या देवस्थानाचीं उत्पन्नें चालवीत होता असें याच्या, ' निंबच्या मठाचीं उत्पन्नें पूर्वीप्रमाणें चालूं द्यावीत,' या हुकमावरून समजून येतें.

विजापूरच्या मुहम्मदशाहाच्या हुकमानें कर्नाटक जिंकण्याचें काम चालू होतें. सेनापति रणदुल्लाखानाचे हाताखालीं अफजलखान व शहाजी हे दोन मुख्य सरदार होते. कर्नाटकांत प्रवेश केल्यावर रणदुल्लानें अफजलखानास शिऱ्यावर पाठविलें. शिरें येथें मजबूत किल्ला असून तेथें कस्तुरीरंग नाईक याचा अंमल होता. यानें किल्ल्यास वेढा घालून नायकास जेर केलें. तेव्हां नाइलाज होऊन त्यानें खानाकडे तहाची याचना केली. यानें त्यास अभयवचन देऊन भेटीस बोलावलें. पुढें भेटीच्या प्रसंगीं विश्वासघात करून यानें नायकाचा शिरच्छेद केला आणि किल्ला व संपत्ति घेऊन पुढें प्रयाण केलें. याच्या या विश्वासघातकीपणाचा चहूंकडे अत्यंत बोभाटा होऊन आदिलशाही दरबारावरील लोकांचा विश्वास उडाला आणि पुढें वीस वर्षांनीं शिवाजीनें याच्यासंबंधीं जें वर्तन केलें, तें याच्या अशा कृत्यामुळेंच होय. ही स्वारी स. १६३८ मध्यें झाली ( शहाजीचें चरित्र, पा. ६४ ).

मीरजुम्ला, मुस्ताफाखान, असदखान आणि रुस्तुमजमा आणि शहाजी हे जिंजीवर चालून गेले. तेथें मुस्ताफाशीं बाकीच्या सर्वांचा विरोध सुरू झाला. शहाजीनें कुत्वशहाकडे ता. २३-१२-१६४७ मध्यें नोकरींत घेण्याविषयीं अर्ज केला. हीहि बातमी मुस्तफास कळली. तेव्हां त्याला पकडण्याचें ठरवून त्याप्रमाणें हुकूम आणवला. ता. २५-७-१६४८ मध्यें शहाजीस पहाटे पकडून

अफजलखानाच्या देखरेखीखालीं विजापूरकडे रवाना करण्यांत आलें.

कनकगिरीचा पाळेगार आपाखान आदिलशाहीचा ताबेदार होता. त्यानें बंडखोरी केली म्हणून पारिपत्य करण्याकरितां याची रवानगी झाली. अफजलखान व संभाजी ( शिवाजीचा ज्येष्ठ बंधु ) एकत्र होऊन कनकगिरीवर चालून गेले. त्या प्रसंगीं तोफेचा गोळा लागून संभाजी मेला ( स. १६६४ ). अफजलखानानें प्रथम संभाजीस लढाईत पुढें करून मागून त्याचा पाठपुरावा बरोबर केला नाहीं म्हणून शहाजीस खानाचा भारी राग आला. शहाजीनें पुढें किल्ला सर केला. शिवाजीला हें चांगलें माहीत असलें पाहिजे.

पुढें विजापूर दरबारनें याचीच शिवाजीवर रवानगी केली व हाहि तेथून "शिवाजीस उंदरासारखा धरून आणतों" असा विडा घेऊन निघाला होता. यानें स्वारीवर निघण्यापूर्वी आपल्या हातानें आपल्या ६३ बायकांना मारलें व त्यांच्या कबरा बांधल्या, अशी आख्यायिका आहे.

पुढें हा शिवाजीवर चालून येत असतां वाटेंत यानें अनेक देवालयें भ्रष्ट केलीं. हा शिवाजीस 'उंदरासारखा पकडतों,' अशी नेहमीं बढाई मारीत असे. पुढें यानें कृष्णाजी भास्करास शिवाजीस भेटीस येण्याविषयीं सांगण्यास सांगितलें. शेवटीं त्यांची भेट प्रतापगडाच्या पायथ्याशीं व्हावी असें ठरलें. या भेटींत खानाचा सद्धेतु मुळींच नाहीं, असें शिवाजीस अगोदरच कृष्णाजीपंतानें सांगितलें होतें. याप्रमाणें ते परस्पर तयारींत होते. भेट झाली तेव्हां खानानें शिवाजीस मारण्याचा प्रयत्न केला, परंतु शिवाजीनें आपल्या वाघनखाच्या माऱ्यानें याचा कोथळा बाहेर काढला. आणि तशाच स्थितींत हा निघाला असतां याला शिवाजीच्या हस्तकानें दुपारीं दोनच्या सुमारास ठार करून ( १० नवं. १६५९ ) याच्या सैन्याची दाणादाण केली ( जिऊ महाला पाहा ).

**अबदाली**--( अहमदशाहा अबदाली पाहा ).

**अबदुल अझीझ**--तारीख-इ-हुसैनी या ग्रंथाचा कर्ता. या ग्रंथांत गुलबर्गा येथें मशिद ( थडगें ) असलेल्या शद्रुद्दीन हुसैनी याचें चरित्र वर्णिलें आहे.

वरील ग्रंथ यानें अहमदशा बहामनी या राजास स. १४४५ मध्यें अर्पण केला ( बील. ).

**२.** ( शेख ) हा एक पंडित असून दिल्ली येथें राहत असे. दिल्लीचा मोंगल बादशहा अकबर याचा हा समकालीन होय. याचा मृत्यु स. १५६७ मध्यें झाला ( बील ). बदाऊनीनें याची प्रशंसा केली आहे.

**३.** ( शेख )—काव्यामध्यें हा इझ्झत या नांवानें ओळखिला जातो. दिल्लीच्या औरंगजेबाचे कारकीर्दीत याला ७०० स्वारांची मनसब मिळाली होती. यानें साकीनामा या नांवाचें काव्य लिहिलें. हा स. १६८० मध्यें मरण पावला ( बील ).

**४.** हा सिदी जोहार ऊर्फ सलाबतखान याचा मुलगा. हा पन्हाळ्याच्या वेढ्यांतून शिवाजी निसटल्यानंतर त्याचा पाठलाग करीत होता ( १६६० ऑगष्टनंतर ).

**५.** ( मौलन शाह )—दिल्लीच्या शाह-वलीउल्लाह या मुसलमान विद्वानाचा मुलगा होय. यानें कुराणावर फारसीमध्यें एक टीका लिहिली आहे. त्या टीकेचें नांव तफसीर-फदूल-अझीझ असून याशिवाय यांचीं पुष्कळ पुस्तकें आहेत. याचा मृत्यु स. १८२४ च्या जून महिन्यांत झाला ( बील ).

**अबदुल करीम**—हा एक सिंधचा रहिवाशी. हा स. १४४१ च्या सुमारास उदयास आला. हा महमूद गावानच्या पदरीं दक्षिणेंत नोकर होता. यानें तारिख-इ-महमूदशाही या नांवाचा दुसऱ्या महमूदशाहा बहामनीचा इतिहास लिहिला आहे.

**२.** हा दिल्लीचा राहणारा होय. नादिरशाहानें हिंदुस्थानावर स्वारी केली, तेव्हां हा त्याच्याबरोबर इराणला गेला. तेथें यानें बयान-इ-बाकी नांवाचा नादिरशाहाचा इतिहास लिहिला आहे ( १७५४ ).

**३.** हा एक मुनशी होता. यानें तारिख-इ-अहमद ( अहमदशहा दुराणीचा इतिहास ), मुहारब-इ-काबूल-व कंदाहार, ( दोस्त मुहम्मदाचा मुलगा अकबरखान यांचीं शूर कृत्यें यांत वर्णिलीं आहेत ) व तारिख-इ-पंजाब तुहफतन लिल-अहबाब ( शीख युद्धावर ग्रंथ ) असे याचे प्रसिद्ध ग्रंथ होत. हा गेल्या शतकाच्या मध्यांत वारला ( बील ).

**४.** कुतबशाहीपैकीं सुलतान कुलीचा चौथा मुलगा. यानें बंड केल्यावरून यास ठार करण्यांत आलें ( बेन्द्रे ).

**५.** हा मूळचा अफगाणिस्थानचा पठाण फिरत फिरत हिंदुस्थानांत आला. मोंगल सरदार खानजहान याजकडे हा आश्रयार्थ गेला. यालाच बहलूलखान असें नांव होतें. खानजहानची दाक्षिणच्या सुभेदारीवर शहाजादा पर्वीझचा मदतनीस या नात्यानें स. १६०९ त नेमणूक झाली. त्याच वेळीं अबदुल करीम आपल्या धन्याबरोबर दक्षिणेंत आला. खानजहाननें पुढें बादशहा शहाजहानविरुद्ध बंड केलें. परंतु बादशाही सैन्यापुढें त्याचा टिकाव न लागून तो पळून

गेला, व पुढें स. १६२९ त कलिंजर येथें मारला गेला. त्या वेळीं खानजहानची उरलीसुरली संपत्ति अबदुल करीमला मिळाली. नंतर हा विजापूर दरबारीं गेला. पूर्वी खानाबरोबर हा तेथें एकदां गेला होताच. दरबारनें याला बंकापुरचा नबाब नेमून याची कर्नाटकांत रवानगी केली. स. १६३६ पासून स. १६७२ पर्यंतच्या काळांत विजापूरच्या इतिहासांत जे तीन क्रांतिकारक प्रसंग आले त्या तीनहि प्रसंगीं हा हजर होता. त्यांपैकीं तिसऱ्या प्रसंगीं याचा दरबारीं चंचुप्रवेश झाला. पुढें विजापूरच्या गादीवर सिकंदर आल्यावर राज्यांत दोन पक्ष पडले. एक दक्षिणी मुसलमानांचा पुढारी खवासखान त्याचा व दुसरा पठाण लोकांचा पुढारी हा म्हणजे बहलूलखान याचा. नंतर संधि मिळतांच बहलूलखानानें ता. ११ नोव्हें. स. १६७५ रोजीं खवासखानास कैद करून बंकापूर येथें कैदेंत ठेविलें. अशा प्रकारें यानें आपल्या हातीं विजापूरची सर्व सत्ता घेतली. याचा सल्लागार खिजरखान पन्नी हा होता. तो स. १६७६ त दक्षिणी मुसलमानांकडून मारला गेला. त्यामुळें चिडून जाऊन बहलूलनें खवासखानाचा वध केला. तेव्हां खवासखानाची बाजू घेऊन सर्जाखान उघडपणें युद्धास तयार झाला. मरहूम पन्नीचे दोन पुत्र व बहलूलखान यांनीं लढाई दिली. सर्जाखानाचा मोड होऊन तो बहादुरखानाकडे गेला. बहादुरखानानें जंगी फौज घेऊन सर्जाखानास पाठीशीं घातलें व बहलूलखानास झुंजाची सलामी दिली. तथापि या युद्धाचें पर्यवसान आदिलशाही पूर्णपणें मोंगल सत्तेच्या अंकित होण्यांत झालें, आणि सीदी मसाऊद यास बादशाही मान्यतेनें वजिरीचे अधिकार देण्यांत आले. मात्र बहलूलखानाची महत्त्वाकांक्षा जागच्याजागींच राहिली. तह पक्का होऊन मसाऊद वजीरीच्या पदावर आरूढ होण्यापूर्वींच बहलूलखान ता. २३ डिसेंबर १६७७ रोजीं हिरापूर येथें मृत्यु पावला ( का. सं. प. या. ४३८ ).

**अबदुल कादिर**—हा लखनौ प्रांतांतील देवी गांवचा राहणारा. स. १८२३ च्या मे महिन्यांत मेजर हर्बर्टच्या विनंतीवरून जामि-उत्-तवारिख या रसिदउद्दीनच्या ग्रंथांतून सोप्या फारसी भाषेंत पतंजली ग्रंथ असें ज्याला म्हणतात, त्या भागाचें यानें भाषांतर केलें आहे. यांत सर्व शास्त्रें आलीं असून हिंदुस्थानांतील मोठ्या अमूल्य ग्रंथांपैकीं हा एक ग्रंथ आहे. निरनिराळ्या पंथांची माहिती, प्राचीन राजांचा इतिहास आणि शाक्यमुनींचें चरित्र यांत आहे ( ज्ञा. को. ).

२. गोवळकोंड्याच्या कुत्बशाही घराण्यांतील इब्राहिमचा मुलगा. देवरकोंड्याच्या कैदेंत वारला ( वा. सी. बेंद्रेकृत कुत्बशाही, पा. ४६ ).

३. अहमदनगरच्या निजामशाहींतील पहिल्या बुऱ्हाणचा मुलगा. केंब्रिज हिस्ट्री व सिवेल लिस्टमध्यें फक्त याचा उल्लेख आढळतो.

**अबदुल कादिर बदाऊनी**—याच्या बापाचें नांव मलूकशाहा असून हा नागोरच्या शेख मुबारकचा शिष्य होता. यानें मुंतखबुत्तवारीख नांवाचा ग्रंथ लिहिला. हा मोठा विद्वान् होता. अकबर राजानें याला पुष्कळ वेळां संस्कृत आणि अरबी या भाषांचें भाषांतर फारसीमध्यें करावयास सांगितलें होतें. याशिवाय यानें नीतिपर आणि धार्मिक पुस्तकें लिहिलीं. स. १५९१ मध्यें यानें काश्मीरचा इतिहास थोडक्यांत लिहिला. याचा मृत्युकाल उपलब्ध नाहीं. पण हा स. १५९६ मध्यें जिवंत होता. काव्यामध्यें हा कादिरी या नांवानें उल्लेखिला जातो ( बील ).

मुल्ला अबदुल कादिर बदाऊनी हा बदाऊन येथें स. १५४० त जन्मास आला. त्यास गायन, इतिहास व ज्योतिष यांचा फार नाद असे. बदाऊनीची व बादशहाची मुलाखत करून देण्यास जलालुद्दिन कुडची हा कारण झाला.

बदाऊनी हा अबुल फज्ल व फैजी यांच्या संगतींत ४० वर्षे होता, परंतु यास त्यांच्या विचाराचें वारें सुद्धां लागलें नाहीं. हा मुळांत त्या दोघांचाहि द्वेष करीत असे. अकबराच्या सांगण्यावरून यानें रामायणाचें व महाभारताच्या कांहीं भागाचें भाषांतर फारसींत केलें. वास्तविक हें काम करण्याची याला हौस नव्हती, परंतु केवळ हुकमाखातर हा करीत असे. एवढेंच काय पण यानें म्हटलें सुद्धां आहे कीं, ‘ खऱ्या मुसलमानानें असलें काम करावें ! मी एक दोन प्रकरणांचें भाषांतर केलें. त्यांतील बालिश व असंबद्ध प्रलाप ऐकूनहि सर्व जगताला आश्चर्य वाटेल ! असलीं वचनें कधीं कोणीं ऐकलीं सुद्धां नसतील. काय म्हणे, निषिद्ध पदार्थांची यादी ! पण माझें नशीब केवढें बलवत्तर ! माझ्याच कपाळीं असलें काम कां यावें ? ह्या पातकापासून अल्लाच आमचें रक्षण करो.’

यानें मुन्तखबुत्तवारीख म्हणजे ( इतिहासांतील उतारे ) अकबराच्या कारकीर्दीचा इतिहास लिहिला. बदाऊनी हा अकबराचा द्वेष्टा असल्यामुळें इतर ग्रंथांच्या पडताळ्यास याचा फार उपयोग होतो ( मु. रि. भाग २ रा. पृ. १४६ ).

**अबदुल कादिर बेदिल (मिर्झा)**—हा एक कवि होय. याची बेदिल या नांवानें फार प्रसिद्धि आहे.

बिल्रॉस येथील हा तार्तर वंशांतील होय. औरंगजेबाचा मुलगा जो अजमशाह त्यानें याला तरुणपणीं नोकरीस ठेविलें होतें. पण एकदां राजपुत्रानें स्तुतिकाव्य लिहिण्यास याला सांगितलें, तेव्हां यानें राजीनामा देऊन यापुढें यानें कोणाचीहि नोकरी केली नाहीं.

यानें पुष्कळ ग्रंथ लिहिले. त्यांपैकीं मुहीत-इ-अजम, चार उनसूर, इन्शा-इ-बेदिल हे ग्रंथ आणि कांहीं काव्यें केलीं आहेत. रुकात-इ-बेदिल हाहि ग्रंथ यानेंच लिहिला आहे. याचा मृत्यु स. १७२० मध्यें झाला ( बील ).

**अबदुल गनी**—( मिर्झा ) हा काश्मीरचा राहणारा होय. ग्रंथामध्यें हा आपणास कबूल या नांवानें उल्लेखितो. याचा मृत्यु स. १७२६ मध्यें झाला ( बील ).

**अबदुल गफूर**—अब्दुर्रहमान जामीचा हा शिष्य होय. हा लाहोरचा राहणारा असून हा एक फारसी ग्रंथकार होय. स. १५०६ त हा मरण पावला.

**२** ( शहा ) अबदुल गफूर या साधूस बाबा कपूर असें नेहमीं म्हणत असत. हा काल्पीचा राहणारा असून हा शहामदारचा एक शिष्य होता. स. १५७१ त हा मरण पावला. याची कबर ग्वाल्हेर येथें आहे ( बील).

**अबदुल चक**—काश्मीर राजा युसुफखानाचा चुलता. हा त्याच्यानंतर गादीवर आला. अकबराचा समकालीन.

**२.** ( मीर सय्यद )—हा अयोध्या प्रांतांतील बिलग्रामचा राहणारा होय. हा मोठा विद्वान् आणि कवि होता. काव्यामध्यें याचा वासिती या नांवानें उल्लेख केला आहे. हा बिलग्रामच्या सय्यद अहमदचा मुलगा होय. याचा जन्म स. १६६१ मध्यें झाला.

ज्या वेळीं औरंगजेबाची छावणी विजापूर येथें होती, त्या वेळीं यानें औरंगजेबाची भेट घेतली. तेव्हां औरंगजेबानें याला पगार वांटणीचे कामावर ठेविलें; व नंतर त्या जागेवरून याची नेमणूक गुजराथमधील बातमीदाराचे कामावर झाली. पण पुढें फर्रुखसियरचे कारकीर्दींत येथील कोर्टांत कांहीं भानगड झाल्यामुळें याला पुनः परत बोलाविलें ( स. १७१४ ). यापुढें हा स. १७२१ पर्यंत दिल्ली येथेंच होता.

शेवटीं यानें आपला मुलगा मीर सय्यद मुहंमद यांच्या नांवानें अधिकार करून दिला. हा स. १७२४ मध्यें मरण पावला. याची कबर याच्या बापाशेजारीं बिलग्राम येथें आहे. यानें पुष्कळ ग्रंथ लिहिले. त्यांपैकीं आदाब-उल-मुसलीन नांवाचा फारसी ग्रंथ प्रख्यात आहे ( बील ).

**अबदुल नबी**—विजापूरच्या अली आदिलशहाच्या कारकीर्दींतील एक प्रसिद्ध ( फारसी ) कवि.

**अबदुल बकी**—मासिर-इ-रहीमी ( अबदुल रहिमान खान-खानान याचें चरित्र ) या ग्रंथाचा कर्ता. हा एक दिल्लीच्या अकबर बादशहाचा आश्रित असून वरील ग्रंथ यानें स. १६१६ मध्यें पूर्ण केला. हा स. १६४२ मध्यें शहाजहानच्या कारकीर्दींत मरण पावला ( बील ).

**अबदुल मजीद**—एक फारशी पंडित. शहाजहाननामा नांवाचा इतिहासग्रंथ यानें लिहिला आहे ( बील ).

**अबदुल मुहम्मद**—विजापूरच्या दुसऱ्या अलीचा दिवाण. हा इब्राहिम दिवाणचा मुलगा. त्यानंतर हा दिवाण झाला ( विजापूरचें आदिलशाह घराणें ).

**अबदुल रहमान**—हा लोकप्रिय कवि होता. हा पेशावरचा राहणारा होता. याची कविता फार ओजस्वी व जोरदार आहे. वीरवृत्तीच्या लोकांना ती फार आवडते. ओजाबरोबरच सहजताहि भरलेली असल्यानें काव्यलोलुपांनाहि ही फार आवडते. पेशावरपासून जवळच असणाऱ्या हजरखान नांवाच्या याच्या जन्मस्थानाच्या रस्त्यावर याचें थडगें आहे ( बील ).

**२.** हा अकबर बादशहाच्या पहिल्या प्रधानाचा मुलगा होय. खान मिर्झा या टोपण नांवानें हा प्रसिद्ध होता. ता. १० डिसेंबर १५५६ रोजीं हा जन्मला. याच्या बापाचा खून झाला, तेव्हां हा अवघा चार वर्षांचा होता. पुढें वयांत आल्यावर याला फौजेंत नोकरी मिळाली. गुजराथवरील स्वारींतील सैन्याच्या एका भागाचा हा मुख्य होता. पुढें हा वाढत जाऊन शेवटीं तोडरमल्लानंतर मुख्य प्रधान झाला. राजपुत्र दानियालशीं याच्या मुलीचें लग्न झालें होतें. यानें बाबरानें तुर्की भाषेंत लिहिलेल्या आत्मचरित्राचें फारसी भाषेंत भाषांतर केलें. अकबरानंतर यानें जहांगीरचीं २१ वर्षें नोकरी केली. स. १६२७ मध्यें ७२ वर्षांचा होऊन हा मरण पावला. याची कबर दिल्लीनजीक दर्ग्यांत आहे ( बील ).

**३.** बादशहा जहांगीर याच्या विरुद्ध खुस्त्रवनें जेव्हां बंड केलें, तेव्हां यानें खुस्त्रवास मदत केली. परंतु बंड मोडून खुस्त्रवबरोबर हाहि पकडला गेला. पुढें याला शिक्षा म्हणून गाढवाच्या ओल्या कातड्यानें घट्ट शिवण्यांत येऊन तें कातडें नेहमीं ओलें ठेवण्याची व्यवस्था केली. अशा वाईट स्थितीमध्यें २४ तास ठेवल्यावर याला सोडून देण्यांत आलें.

**४.** झज्जरचा हा नबाब होय. १८५७ सालच्या बंडांत हा

दोषी ठरून याला २३ डिसेंबर रोजीं फाशीं देण्यांत आलें. हा नजावत अलीखान याचा वंशज होय. याला सर जॉर्ज बार्लो यानें १८०६ त झज्जर, बदली, करौंद इत्यादि १२॥ लक्षांची जहागीर देऊन शिवाय ४०० घोडेस्वार ठेवण्याकरितां वडवान आणि दद्रि हीं गावें दिलीं. १८५७ पर्यंत हा इंग्रजांचा पक्का दोस्त होता, परंतु बंड उपस्थित होतांच हा बंडांत सामील झाला.

**अबदुल लतीफ**—मीर अबदुल लतीफ हा लहानपणीं अकबराचा शिक्षक होता. याला मोठमोठ्या कवींचे ग्रंथ तोंडपाठ येत असत. त्यांपैकीं पुष्कळशीं कवनें यानें अकबराकडून गाण्याच्या सुरावर पाठ म्हणवून घेतलीं ( मु. रि. भाग २ पृ. ९७. ).

**अबदुल हकीम**—( सियालकोटचा ) हा काश्मीरच्या कमालउद्दीन मौलानाचा शिष्य होता. यानें तफशीर-बैझावी यावर हाशिया ( टीका ) लिहिली आहे. याशिवाय अबदुल गफर यावरहि याची हाशिया आहे. हा स. १६५६ मध्यें मरण पावला ( बील ).

**अबदुल हक्क**—(शेख) सैफउद्दीनचा हा पुत्र दिल्लीस राहत असे. हा तैमूरलंगाबरोबर आलेल्या एका त्याच्या अनुयायाचा वंशज होय. स. १५९६ त तारीख-इ-हकी या नांवाचा यानें एक ग्रंथ लिहिला. यात्रेसाठीं मक्का व मदीना येथें जाऊन हा फार दिवस राहिला होता. यानें तेथें अनेक विषयांवर सुमारें शंभर ग्रंथ लिहिले. यांपैकीं अतिप्रख्यात म्हणजे मदीना सकीना, मझ उल-अनवार, मदारीज-उन-तुबुवत, जझ्ब-उल-कुलूब, अखबार-उल-अखयार, हे होत. स. १५५१ च्या जानेवारींत हा जन्मला. वयाच्या नव्वदाव्या वर्षींहि याची प्रतिभा कमी झाली नाहीं. हा स. १६४२ त मरण पावला. दिल्लीस ( जलाजशाच्या ) काठावर याची कबर आहे. याची साधुपुरुषांत गणना होते. याच्या शेख नूर-उल-हक्क नांवाच्या मुलानें झुब्दुत तवारीख नांवाचा ग्रंथ लिहिला आहे ( बील ).

**अबदुल हमीद**—( लाहोरचा ) हा पादशाह-नामा-इ-शाहजहानी या नांवाच्या ग्रंथाचा कर्ता होय ( बील ).

**अबदुल हसन**—विजापूरच्या आदिलशाही घराण्यांतील जो इब्राहीम दुसरा त्याचा हा एक सरदार होय.

जेव्हां अहमदनगर, गोवळकोंडें आणि वऱ्हाड या तीन प्रांतांचे राजे एकत्र होऊन त्यांनीं विजापुरास सतत बारा महिने वेढा घातला होता, तेव्हां एकट्या अबदुल हसनानें आपल्या बुद्धिवैभवानें फार थोड्या मुदतींत वीस हजार सैन्य जमविलें आणि त्याच्या बळावर शत्रूंच्या सैन्याची फजिती उडवून त्यांतील एकाची तर त्याच्या राज्याच्या वेशीपर्यंत पाठ पुरविली आणि शेंकडों हत्ती व दुसरी लूट मिळविली ( विजापूरचें आदिलशाही घराणें मोडकसकृत ).

**अबदुल्ला**—विजापूरच्या आदिलशाही घराण्यांतील जो इस्माईल त्याचा हा मुलगा होय.

याला अल्लू, मल्लू व इब्राहिम असे तीन भाऊ होते. त्यांपैकीं मल्लू व इब्राहिम गादीवर आले. पुढें हा गोव्यांस पळून गेला.

**अबदुल्ला कुत्बशाह**—( स. १६११-१६५८ ) हा गोवळकोंड्याच्या कुत्बशाही घराण्यांतील सहावा सुलतान होय. शहाजहाननें अहमदनगर घेऊन विजापूरच्या राजापासून खंडणी घेण्याचा ठराव केला, तेव्हां यानेंहि खंडणी देण्याचें कबूल केलें. परंतु स. १६५६ मध्यें शहाजहानचें व याचें वांकडें आलें, व त्यामुळें याच्यावर आपत्ति आल्या.

याचा प्रधान मीरजुम्ला हा तैलंगणांत गेला असतां त्याच्या मुलानें कुत्बशहाशीं गैरशिस्तीचें वर्तन केलें. तें यास न आवडून यानें त्याला कैदेंत टाकलें. पुढें मीरजुम्लानें आपल्या मुलास सोडविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, परंतु तो व्यर्थ गेला. तेव्हां तो औरंगजेबास जाऊन मिळाला. औरंगजेबास संधीच पाहिजे होती. त्यानें आपल्या बापाकडून मीरजुम्ल्याच्या मुलास सोडून देण्याविषयीं हुकूम आणून तो कुत्बशाहाकडे पाठविला. परंतु कुत्बशाहानें उलट चिडून जाऊन मीरजुम्ल्याच्या मुलाची कैद सक्त केली व त्याची सर्व दौलत जप्त केली. पुढें शहाजहाननें अबदुल्लास वठणीवर आणण्यासाठीं औरंगजेबाची रवानगी केली. औरंगजेबानें आपल्या मुलाच्या लग्नाचें सोंग करून एकदम हैदराबादेवर चाल केली. गैरसावध असल्यानें अबदुल्लास बचाव करतां आला नाहीं. हा कसाबसा मीरजुम्ल्यास त्याची संपत्ती देऊन व त्याच्या मुलास मोकळें करून गोवळकोंड्याच्या किल्ल्यांत गेला. विजापूरकरांची मदत मागितली पण ती येण्याचें चिन्ह दिसेना, तेव्हां अबदुल्लानें औरंगजेबाच्या सर्व अटी मान्य केल्या. दरसाल एक कोट रुपये देण्याचें यानें कबूल केलें. याच्यानंतर याचा जावई अबुल हसन कुत्बशाह यास गादी मिळाली.

**अबदुल्लाखान सय्यद**—हा मुहम्मद पैगंबराच्या वंशजांपैकीं एक होय. औरंगजेबाच्या वेळीं याचा बाप विजापूर व अजमीर या प्रांताचा सुभेदार होता. याला दोन मुलें होतीं. तींच सय्यदबंधू म्हणून पुढें प्रसिद्धीस आलीं. पैकीं एक अबदुल्लाखान-कुत्ब-उल्मुल्क या नांवानें

प्रसिद्ध आहे. हा प्रथम स. १६९७-९८ मध्यें खानदेश, बागलाण, वगैरे ठिकाणीं फौजदारीवर होता. पुढें बहादुरशाहानें याला स. १७२१ त अलाहाबादची सुभेदारी दिली. याच्या साहाय्यानेंच फर्रुखसियर हा गादीवर बसला. त्यानें याला आपला मुख्य प्रधान नेमलें. पुढें या दोघां सय्यदबंधूंनीं ७ वर्षे पुढील राजांस बाहुलीं बनवून कारभार केला. पुढें मुहंमदशहाच्या चिथावणीवरून याच्या भावाचा खून झाला; व हाहि त्याच्या सैन्याच्या हातीं लागून मारला गेला ( ११ ऑक्टोबर १७२२ ) ( सय्यदबंधु पाहा ).

**अबदुल्ला बिन अली**—यानें फारसी भाषेंतील ग्रंथांचें उर्दूमध्यें भाषांतर करून सिरक अल हिंद नांवाचा ग्रंथ लिहिला. हा ग्रंथ मूळचा फारसी भाषेंतील नसून संस्कृत ग्रंथाचें फारसींत भाषांतर करून हा लिहिलेला होता ( बील ).

**अबुल फज्ल**—अबुल फज्ल ऊर्फ अल्लामी हा शेख मुबारिक याचा मुलगा. स. १५५१ त आग्र्याजवळ जन्मला. याचा बाप विद्वान् असल्यानें त्यानें याला चांगलें शिक्षण दिलें. याचा थोरला भाऊ मोठा कवि होता व हाहि पुढें फार मोठ्या योग्यतेस चढला.

अकबरानें याची विद्वत्ता ओळखून याला आपल्या दरबारीं ठेविलें. वडील भावाच्या कवनानें बादशहा खूष झाला होता. त्यायोगानें यानेंहि आपली बादशाहाशीं दाट ओळख करून घेतली होती. याचा स्नेह जमला तेव्हां अकबर मोठ्या पेंचांत सांपडला होता. धर्मनिष्ठ उलेमा हे फार मगरूर झाले होते. तेव्हां सर्व धार्मिक प्रश्नांचा निकाल आपल्या देखत लागावा, असें अकबरानें ठरविलें आणि अबुल फज्लच्या मदतीनें त्यानें उलेमांचा पाडाव केला. तेव्हां बादशहास कुराणास अनुसरून नवीन सुधारणा घडवून आणण्याचा अधिकार आहे, असें उलेमांनीं कबूल केलें. याचें सर्व श्रेय अबुल फज्ल यासच होतें. तेव्हां बादशहास याच्याविषयीं फारच आदर वाटूं लागला. बादशहानें याच्या सल्ल्यानें दीनें-इलाही नांवाचा नवीन धर्म स्थापन केला. पण तो पंथ पंचवीस वर्षांनीं याचा खून झाल्यामुळें नष्ट झाला. अकबरलाहि त्याचा पश्चात्ताप झाला.

या कृत्यानें फज्ल मुसलमानांस अत्यंत दुःसह झाला. प्रत्यक्ष राजपुत्र सेलीम हाहि याच्याविरुद्ध होता. त्यानें एक वेळ अकबरास फज्लची कुराणावर भक्ति आहे, असें दाखवून दिलें. तेव्हां अकबराची फज्लवर थोडी इतराजी झाली. परंतु हें कृत्य फज्लच्या शत्रूंनीं मुद्दाम केलें आहे, असें कळून येतांच अकबर व फज्ल यांचें पूर्ववत् प्रेम जुळलें.

पुढें सेलीमनें बापाविरुद्ध केलेल्या बंडांत फज्ल सामील झाला नाहीं म्हणून त्यानें याला जगांतून नाहींसा करण्याचा बेत केला व वीरसिंहाच्या साहाय्यानें त्यानें तो तडीस नेला. हें अकबरास कळतांच तो एकदम बेशुद्ध पडला व त्याला हें मरेपर्यंत दुःख झालें. कांहीं लोकांचें म्हणणें कीं, हा सुधारक असल्यानें कर्मठ मुसलमानांनीं याचा खून केला ( स. १६०० ).

अबुल फज्लची योग्यता याचा बाप व भाऊ या दोघांपेक्षांहि श्रेष्ठ होती. याचें लेखनकार्य याच्या अनेक ग्रंथांवरून दिसून येतें. याच्या लेखांत अपशब्द बिलकुल सांपडत नाहींत. अकबरनामा हा याचा सर्वांत मोठा ग्रंथ होय. यांत उलेमांच्या कृत्यांची भरपूर चर्चा आहे. प्रतिपक्षावर द्वेषमूलक शब्दांचा वर्षाव केलेला कोठेंहि दिसत नाहीं. ब्लॉकमनचा अबुल फज्लविषयीं अभिप्राय येणेंप्रमाणें—“ अबुल फजलची सत्यप्रीति, परमसहिष्णुता, त्याचा दरबारचा फार दिवसांचा अनुभव, त्याची सुंदर भाषा व बादशहाचा त्याजवरील भरंवसा यांमुळें त्याच्या ग्रंथास विशेष किंमत आली आहे. हें त्यानें आपल्या बादशाहाच्या थोरपणाचें व स्वतःच्या विद्वत्तेचें एक प्रकारचें कायमचें स्मारकच करून ठेवलें आहे. ”

अबुल फज्लचें वैर मनांत न ठेवतां जहांगीरनें ( सेलीमनें ) याच्या मुलास बहार प्रांताचा कारभार दिला होता.

यानें अनेक संस्कृत ग्रंथांचीं फारशींत भाषान्तरें केलीं. तसेंच हिंदु, फारशी व ख्रिस्ती धर्मांचे विद्वान् आग्र्यास आणवून त्यांच्याशीं धर्मसंबंधीं वादविवाद केले.

**अबुल फैझी**—हा सुफीपंथी कवि अकबराच्या दरबारांत प्रसिद्ध होता. याचा जन्म ता. १६ सप्टेंबर सन १५४७ त आग्रा येथें झाला. याचीं कवनें वाचून अकबरास समाधान वाटलें व त्यानें फैजीस आपल्या भेटीस बोलाविलें. त्या वेळीं याला आपणास बादशहानें शिक्षा करण्यास बोलाविलें, असें वाटलें. पण उलट याचा तेथें सत्कारच झाला.

फैजी याचेकडे कांहीं दिवस राजपुत्र मुराद यास पढविण्याचें काम होतें. पुढें याची आग्र्याच्या सदरेच्या जागीं नेमणूक झाली. स. १५८८ त याला कविराज या अर्थाचा किताब मिळाला. हिंदुस्थानांत दोनच मोठे फारसी कवि होऊन गेले. पहिला अमीर खुस्त्रव व दुसरा फैजी. इतिहास, तत्त्वज्ञान, वैद्यकी, पत्रव्यवहार व कवित्व या विषयांत याचा हात धरणारा कोणी नव्हता. प्रथम प्रथम

यानें आपल्या कवितेंत फैजी असें नांव घातलें. परंतु मृत्युपूर्वी एक दोन वर्षें हा फैयाजी असें नांव घालीत असे.

बादशहाच्या आज्ञेवरून यानें महाभारतांतील नलदमयंती-आख्यानावर फारसीमध्यें काव्य केलें होतें. हिंदु वाङ्मयाचा व शास्त्राचा काळजीपूर्वक अभ्यास करणारा पहिला मुसलमान, फैजी हाच होता. यानें एकंदर १०१ ग्रंथ रचिले, असें म्हणतात. याची वकील म्हणूनहि कधीं कधीं नेमणूक होत असे.

हा बापाच्या पश्चात् अवघ्या दोन वर्षांनीच मरण पावला (स. १५९५). मरणापूर्वी थोडा वेळ अकबर आपला विद्वान् हकीम घेऊन फैजीच्या समाचारास गेला असतां फैजीचें बोलणें बंद झालें होतें. बादशहा बोलला, 'शेखजी, माझे हकीम औषध द्यायला आणले आहेत, औषध घ्या.' त्यावर कांहींच उत्तर आलें नाहीं. असें पाहून बादशहास कळवळा आला. त्यानें वैतागानें डोकींचें पागोटें आपटलें व पुष्कळ शोक केला, असें म्हणतात.

**अबुल हसन (ऊर्फ तानाशाहा)**—गोवळकोंड्याच्या कुत्बशाहींतील शेवटला राजा. हा अबदुल्ला कुत्बशाहाचा जांवई होय. त्याची तिसरी मुलगी ताजमहाल यास दिली होती. याचें पूर्ववृत्त विशेषसें उपलब्ध नाहीं. फार काय याच्या बापाचें नांवहि अद्यापि माहीत झालेलें नाहीं.

याचा बाप अरब असून चांगल्या प्रसिद्ध घराण्यांतील होता. त्याचा इराणी पेहेराव व फारसी बोली यांवरून अबदुल्लानें त्याला आपल्या नोकरींत ठेवून घेतलें. तो बराच वाढला पण त्याला जहागिर वगैरे नसल्यानें त्याच्यामागें अबुल हसनला गरीबींत दिवस घालवावे लागले. अबदुल्ला कुत्बशाहाच्या घोडदळांत यानें दरमहा पंधरा पागोड्यांचे वेतनावर नोकरी पत्करली. बापाच्या मृत्यूनंतर चवदा वर्षे अशा हलाखींत यानें दिवस काढले.

याच वेळीं अबदुल्ला कुत्बशाहानें आपल्या तिसऱ्या व आवडत्या मुलीकरितां सुलतान मुहम्मद नांवाच्या एका सय्यद घराण्यांतील तरुणाची योजना केली होती. पण त्याच्या उद्दामपणामुळें मुत्सद्दी लोकांनीं ती मुलगी याला दिली. सर्वांची मर्जीहि यानें संपादन केली. अशीं अकरा वर्षे गेलीं. याला दोन मुली व एक मुलगाहि झाला. आगाऊ ठरल्याप्रमाणें अबदुल्लानंतर हा कुत्बशाहीच्या तख्तावर बसला. हा २१ एप्रिल १६७२ मध्यें मुसाखान, सय्यद मुझावर व त्याचे दोन पेशकर मादण्णा व अकण्णा यांच्या साहाय्यानें तख्तनशीन झाला (२१ एप्रिल १६७२).

याच सुमारास शिवाजीचा हेजीब निराजीपंत भागानगरास जाऊन एक लक्ष होनांचा तह करून भागानगरीहून (हैद्राबादहून) सहासष्ट हजार होन घेऊन शिवाजीकडे ज्येष्ठ शु. ५ (२१ मे १६७२) रोजीं परत आला.

हा गादीवर येण्यापूर्वीच नेकनामखान वारला होता. त्याचे जागीं मुसाखानाची ता. २५ एप्रिलपूर्वीच नेमणूक झाली होती. त्यास खान-इ-खानन अशी पदवी दिली. सय्यद मुझावर याजकडे सरखेली होती. सय्यद मुझावरखानास पेशवाई व दिवाणीचें काम सांगितलें व मीरजुम्ला हा किताब दिला. मादण्णा यास मुजुमदारी व अकण्णा यास सबनविसी दिली.

हा आळशी व विलासी होता. तरी राज्य चांगलें चालवून प्रजेस सुख देण्याच्या कामीं हा नेहमीं तत्पर असे. त्यामुळें लोकांची याच्यावर प्रीति होती.

यानें मदनपंत नामक ब्राह्मणास आपला वजीर नेमलें होतें. मदनपंतानें सर्व बंदोबस्त चांगला ठेवला होता. शाहाचा त्याजवर पूर्ण विश्वास होता व त्याच्याविरुद्ध मुसलमानांनीं केलेल्या कागाळ्या शाहा ऐकत नसे. या मत्सरी मंडळींत शाहाचा सेनापतिहि सामील होता. त्यास मदनपंताचें वजन सहन होईना. औरंगजेबानें दक्षिणेंत स्वारी केली तेव्हां शाहानें संभाजीशीं मैत्रीचा तह केला. त्यामुळें औरंगजेब रागावून त्यानें गोवळकोंड्याचें राज्य जिंकण्यास फौजा पाठविल्या. तेव्हां कुत्बशाहाचा सेनापति इब्राहिमखान त्या फौजेस मिळाला व या गडबडींत मदनपंत मारला गेला. शाहानें तात्पुरता तह करून कसेंबसें राज्य वाचविलें. परंतु औरंगजेबानें, 'तुम्हीं ब्राह्मण दिवाण नेमला, परधर्मी संभाजी राजाशीं दोस्ती केली व स्वतः बदफैली वर्तन सुरू ठेवलें म्हणून आम्ही तुम्हांशीं लढाई करणार,' असें सांगितलें. व शेवटीं गोवळकोंड्यास वेढा दिला. अबू हसनास पदच्युत करून दौलताबादेस कैदेंत टाकलें व याचें राज्य खालसा केलें. याच्या शौर्याच्या शेकडों गोष्टी त्या प्रांतीं अद्यापि लोकांच्या तोंडीं आहेत.

ता. १२ सप्टेंबर १६८६ रोजीं विजापूरची आदिलशाही बुडविल्यानंतर औरंगजेबानें गोवळकोंड्याच्या कुत्बशाहीकडे लक्ष फिरविलें. अबुल हसननें सामोपचाराचें धोरण स्वीकारलें, पण त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. संभाजीराजास मदत केल्याचा आरोप ठेवून तहाचें बोलणें धुडकावण्यांत आलें. शेख मिनाज, सर्जाखान, अबदुल रझ्झक लारी ऊर्फ मुस्तफाखान यांनीं मोंगली सैन्यावर हल्ले करून ते चांगलेच यशस्वी करण्यास सुरवात केली. पावसानेंहि याला उत्तम साहाय्य केलें. मोंगली सैन्यानें गोवळकोंड्यास वेढा दिला.

पण दुष्काळामुळें त्यांना धान्याचा पुरवठा होईना. संभाजीनें १२००० घोडदळ व ५० हजार पायदळ याला मदत म्हणून पाठविलें. त्यांनीं तर मोंगलांची रसदच बंद केली. रोगराई, सुलतान अकबरानें हिंदुस्थानांत चालवलेला दंगा यांमुळें बादशहा अगदीं त्रस्त झाला. फितुरीचा प्रयत्नहि फारसा यशस्वी होईना. शेख निजाम मोंगलांस मिळाला. त्याचा फारच सन्मान झालेला पाहून अबुल हसनचा भाचाहि मोंगलांस मिळाला. उलट मोंगलांचे सरदारहि लढाईतून अंग काढून पळूं लागले. कांहीं याला उघड व कांहीं गुप्तपणें मिळाले. पण औरंगजेबानें तहाचें बोलणें पुनः झिडकारून युद्धाचाच मार्ग स्वीकारला. अबदुल रझ्झकनें शौर्याची कमाल केली. सुरुंगाचा प्रयत्नहि दारूंत पाणी ओतून व वाती तोडून अयशस्वी करण्यांत आला. तेव्हां मोंगली सैन्याचें सेनापतित्व मुहंमद अझमकडे देण्यांत आलें. आणि फितुरीनें भोंवतालचा प्रान्त काबीज करण्याकडे लक्ष पुरविण्यांत आलें. शेवटीं अबदुल्लाखान पणी हाहि फितुर झाला आणि अबदुल रझ्झकखान हा एकच शूर सरदार याचा राहिला. यानें मोंगली सैन्य पणीच्या फितुरीनें खिडकीदरवाज्यांतून आंत शिरतांच शौर्याची कमाल केली. सर्व शरीर जखमांनीं भरून गेलें तरी तोंड दिलें. औरंगजेबानेंहि याचें कौतुक करून याची योग्य शुश्रूषा केली. हाहि शान्तपणें राज्य सोडून औरंगजेबास भेटला. त्यानेंहि चांगल्या रीतीनें वागविण्याचा हुकूम केला. याला दरबारांत येण्याची माफी दिली. ही गोष्ट २२ सप्टेंबर १६८७ च्या सुमारास घडली ( प्रो. सरकार–औरंगजेब व्हा. ४ पृ. ३५६–८६ ). याप्रमाणें कुत्बशाहीचा नाश केल्यावर त्याचा मानलेला मुलगा अबदुल्ला यास मनसबी देऊन याला वार्षिक ५० हजारांची नेमणूक देऊन दौलताबादेस ठेवलें. तेथें हा चवदा वर्षें कारागृहांत होता. हा स. १७०० मध्यें आवेच्या विकारानें वारला असावा. दौलताबादेस याचें दफन सय्यद राजू कातलच्या शेजारीं करण्यांत आलें ( परिशिष्ट २-१८१-२ ).

यास बंदी सुलतान नांवाचा एक मुलगा होता. तो औरंगजेबांच्या गोटांत राहत असे. मोठा झाल्यावर त्याला दरबारांतहि जावें लागे. परंतु दक्षिणी सरदार त्याला बादशहाप्रमाणें लवून सलाम करीत, हें पाहून त्यास दरबार मना करण्यांत आला. अबुल हसनची एक बहीण त्याचेजवळच होती. तिचा नवरा व मुलगा मात्र शेवटीं औरंगजेबास जाऊन मिळाला.

अबुल हसनचें एका धनगरणीच्या मुलीशीं लग्न झालें होतें व ती याची फार आवडती होती. त्यामुळें याची पट्टराणी ताजमहाल हिला तिचेविषयीं असूया उत्पन्न झाली व तिनें तिला ठार केलें.

२. हा आरबी ज्योतिषी होय. यानें बऱ्याच संस्कृत ग्रंथांचें आरबींत भाषांतर केलें. याचे ग्रंथ सध्यां उपलब्ध आहेत.

**अबुल फतह दाऊद**—स. १००५ चे दरम्यान मुलतानचें राज्य कमावलेल्या शेख हमीद लोदीचा नातू. शेख हमीद लोदी गझनीच्या सबक्तगिनाशीं मित्रभावानें वागत असे. परंतु त्याच्या नातवानें इस्माएलीपंथाची दीक्षा घेतल्यामुळें महमूद गझनवीस हिंदु मूर्तिपूजकाइतकाच तिरस्करणीय वाटूं लागला. बज्र राजाचा पराभव करून उच्छहून लूट घेऊन महमूद गझनवी गझनीकडे परत जात असतां वाटेवर दाऊदनें त्याजवर हल्ले करून त्याचें पुष्कळच नुकसान केलें. स. १००५ मध्यें महमूदानें त्याजवर स्वारी केली. तेव्हां भिऊन दाऊदनें मुलतान शहरांत स्वतःस कोंडून घेतलें. महमूदानें मुलतानला वेढा देण्याची धमकी देतांच दाऊदनें महमूद गझनवीस २०००० दिनार वार्षिक खंडणी देण्याचें कबूल करून व इस्मायली पंथाच्या काफीर मतांचा त्याग करण्याचें कबूल करून त्याच्याशीं तह केला ( कें. हि. ).

**अबु होला**—ही मथुरेच्या राजुल क्षत्रपाची सासू. हिच्या मुलीचें नांव नदसी अकसा. ( नदसी अकसा पाहा ).

**अबू तालिब कलीम**—इराणांतील हमदानचा हा प्रसिद्ध कवि जहांगीर बादशहाच्या वेळीं हिंदुस्थानांत आला व स. १६१९ मध्यें परत स्वदेशास गेला. परंतु पुनः हा शहाजहान बादशहाचे वेळीं आला. बादशहानें त्याला 'राजकवि' पदवी देऊन पदरीं ठेवलें. याची दोनदां सुवर्णरौप्य तुला करण्यांत येऊन ती याला बक्षीस देण्यांत आली. १९ नोव्हेंबर १६५१ रोजीं हा दिवंगत झाला. झफर–नामा–इ–शहाजाहान हें याचें एक शहाजहानवरचें काव्य आहे.

**अबू तालिबखान**—हा हाजी मुहंमद बेगखानाचा मुलगा लखनौ येथें स. १७५२ त जन्मला. असउद्दौल्याच्या दिवाणानें याला गंगा-यमुना नद्यांमधील अनेक जिल्ह्यांचा अधिकारी नेमलें. तेथें यानें दोन वर्षें काम केलें. पुढें दिवाणाच्या मृत्यूमुळें याची बढती होईना तेव्हां हा लखनौला परत आला. नबाबानें याला साठ हजारांचें वर्षासन दिलें. पुढें आपला दुय्यम म्हणून कर्नल हॅनेनें यानें याला नबाबापासून मागून घेतलें. तेथें तीन वर्षें

काम केल्यावर याला लखनौच्या रेसिडेंटानें राजा बलभद्रसिंगावर पाठविलें. पुढें हा राजा बलभद्रसिंगाच्या वधानंतर संकटांत सांपडला, व एका ब्रिटिश अधिकाऱ्याबरोबर यूरोपला गेला. इराणी राजपुत्र म्हणून तिकडे हा ओळखला जाई. प्रवासांचीं टांचणें करून ठेवून तीं यानें कलकत्त्यास परत आल्यावर प्रसिद्ध केलीं. त्याचें नांव मआसिर-उत्-तालिबी-फी बिलादी-इफ्रंजी. याचें भाषांतर चार्लस स्टुअर्टनें लंडन येथें प्रसिद्ध केलें. याचा आणखी एक ग्रंथ आहे. हा १८०६ च्या सुमारास वारला ( बील ).

**अबू तालिब हुसेन**—यानें तुझुक-इ-तैमूरी नांवाचा ग्रंथ लिहिला. तैमूरलंगानें चघताइ तुर्की भाषेमध्यें आपल्या पहिल्या सत्तेचाळीस वर्षांची माहिती असलेला हा ग्रंथ लिहिला; त्याचें फारशी भाषांतर म्हणजे वरील तालिबचा ग्रंथ होय. हा ग्रंथ यानें शहाजहानला अर्पण केला. या ग्रंथाचें भाषांतर मेजर चार्लस स्टुअर्ट यानें इंग्रजीमध्यें केलेलें आहे ( बील ).

**अबू बकर**—हा एक सुलतान होता. अमीर तैमूरचा मुलगा जो शाहरुख मीर्झा त्याचा हा मुलगा होय. याचा खून याचा भाऊ मीर्झा उलूघ बेग यानें स. १४४८ मध्यें केला ( बील ).

**अबू बकरशाह**—सुलतान फीरूझशाह तुघ्लकाचा पुतण्या.

स. १३८८ मध्यें सुलतान फीरुझशाह तुघ्लक वारल्यावर तख्तासंबंधानें त्याचे मुलगे घियासुद्दीन तुघ्लकशाह व मुहम्मदखान यांजमध्यें तंटे लागले. दरबारचा अधिकारीवर्ग मुहम्मदखानाचे विरुद्ध असल्यानें घियासुद्दीन तुघ्लकशाहास गादीवर बसविण्यांत आलें. गादीचे सर्व वारसांचा बंदोबस्त करण्याचे उद्देशानें घियासुद्दीननें आपला भाऊ सालरशाह यास कैदेंत ठेविलें. त्यामुळें घियासुद्दीनचा चुलतभाऊ अबू बकर यास स्वतःचे जीविताबद्दल भीति वाटूं लागली. यानें दिल्लींतील कांहीं समर्थ लोकांस अनुकूल करून घेऊन दिल्लीचें तख्त हस्तगत करण्याचा कट केला. घियासुद्दीन तुघ्लकानें मलीक फीरूझ अलीस वजीर केलें होतें. त्याच्या हाताखालील अधिकारी रुक्नुद्दीन अबू बकरला अनुकूल झाला. तेव्हां अबू बकरचे कारस्थानास जोर चढला. रुक्नुद्दीनचें राजवाड्यांतील संरक्षक फौजेवर वजन होतें, त्यामुळें अबू बकर जवळ जवळ सत्ताधीश झाला. घियासुद्दीन तुघ्लक व मलीक फीरूझ अली यांस अबू बकरला मिळालेल्या यशाची खबर लागतांच दोघेहि राजवाड्याचे यमुनेकडील एका दरवाजानें बाहेर पडून राजवाड्यांतून निसटले. पण लवकरच रुक्नुद्दीनचे हातीं लागले व ठार झाले.

१३ फेब्रुवारी १३८९ रोजीं दिल्लींतील सरदारांनीं व अमीरउमरावांनीं अबू बकरला दिल्लीचा सुलतान होण्यास संमति देऊन तख्तावर बसविलें. अबू बकरनें रुक्नुद्दीनची वजीराचे जागेवर नेमणूक करावी, हें क्रमप्राप्तच होतें. त्याप्रमाणें त्यानें केलें, पण लवकरच रुक्नुद्दीननें अबू बकर यास पदच्युत करण्याचें केलेलें कारस्थान उघडकीस आलें. त्यामुळें त्याचा वध करण्यांत आला. दिल्लीस अबू बकरची सत्ता सुस्थिर झाली खरी, तरी प्रांतोप्रांतींच्या सुभेदारांनीं याचे तख्ताधिष्ठित्वास मान्यता दिली नव्हती. शिवाय मुहम्मदखान जालेसर येथें राहून दिल्लीचें तख्त मिळविण्यास योग्य संधीची वाट पाहत होताच. पुष्कळशा सुभेदारांनीं मुहम्मदखानास मदतीचीं आश्वासनें देऊन अबू बकरशाहाचें उच्चाटण करण्यास त्यास प्रोत्साहन दिलें. मुहम्मदखान जालेसरहून दिल्लीस यावयास निघाला तेव्हां वाटेंत त्यास सुभेदारांनीं पाठविलेल्या कुमकेमुळें त्याजबरोबर ५०,००० सैन्य होतें. अबू बकरनें मुहम्मदखानावर हल्ला केला व त्याचा पुरा मोड केला. मुहम्मदखानास फक्त २००० सैनिक बरोबर घेऊन परत जावें लागलें. पुनः सैन्य जमवून मुहम्मदखान दिल्लीवर चालून आला तरीहि कोंडली येथें अबू बकरनें त्याचा पुनः पराभव केला. या विजयामुळें अबू बकरला मुहम्मदखानाचे ठाण्यावर स्वारी करण्याचा हुरूप आला. १३९० मध्यें फेब्रुवारीचे सुमारास अबू बकरशाहा जालेसरवर चालून गेला. मुहम्मदखानानें यास चुकवून ४००० सैन्यानिशीं दिल्लीकडे जाऊन राजवाड्यांत ठाणें दिलें. अबू बकरशाहा जालेसरहून तावडतोब परत आला. तेव्हां यास तोंड देण्याचें धैर्य नसल्यानें मुहम्मदखान दिल्ली सोडून पुन्हां जालेसरला परत गेला. या घडामोडीनंतर दिल्लींतील अबू बकरशाहाचे शत्रूंपैकीं इस्लामखानानें आपल्या पक्षाचे सर्व लोकांस एकत्र जमवून मुहम्मदखानास दिल्लीस बोलविलें. इस्लामखानाचें कारस्थान अबू बकरला कळलें तेव्हां हा इतका घाबरला कीं आपले शक्य तेवढे सर्व अनुयायी व मदतनीस बरोबर घेऊन हा मेवाडमध्यें निघून गेला. ३१ ऑगस्ट १३९० रोजीं मुहम्मदखानानें दिल्लींत प्रवेश केला व प्रथम अबू बकरशाहाच्या पक्षाचे लोकांची कत्तल केली. पुढें डिसेंबरमध्यें मुहम्मदखानाचा मुलगा युवराज हुमायून अबू बकरशाहाचें पारिपत्य करण्याकरितां मेवाडमध्यें गेला. अबू बकरशाहास शरण जावें लागलें. यास जीवदान देऊन मीरतला कैदेंत ठेवण्यांत आलें, पण पुढें लवकरच हा मरण पावला ( कें. हि. )

**अबू रैहान अल्बीरूनी**—याचा अल्बीरूनी या नांवानेंहि उल्लेख करितात किंवा अबू रैहन मुहम्मद असेंहि

म्हणतात. याचा जन्म ख्वारझ्मा (खिव) प्रांतांतील बीरून शहरीं स. ९७१ मध्यें झाला.

ज्योतिष, भूमिति, इतिहास व तर्कशास्त्र वगैरे विषयांत हा तज्ज्ञ होता. याशिवाय हा जादूचे प्रयोगांत निष्णात होता. यानें निरनिराळ्या देशांत प्रवास केला होता. आपल्या आयुष्याचा बराचसा काल यानें हिंदुस्थानांत घालविला व हिंदूंच्या संस्कृत भाषेंतील ग्रंथांशीं दाट परिचय करून घेतला.

यानें पुष्कळ ग्रंथ लिहिले. जर याचे सर्व ग्रंथ एकत्र केले असते तर तें ओझें एका उंटाला गेलें नसतें, असें म्हणतात. याचे तारीखुल-हिंद (तहकीके-हिंद) आणि कानून-इ-मसूऊदी हे दोन ग्रंथ सर्वोत्कृष्ट होत. यानें आपला 'कानून-इ-मसूऊदी' हा ग्रंथ गझनीचा सुलतान मसूद याला अर्पण केला. त्याबद्दल सुलतानानें याला एका हत्तीला जाईल इतकें चांदीचें नाणें देणगीदाखल दिलें. हा सुलतान महमूद आणि मसूद यांचा समकालीन होता. यानें आपल्या जादूच्या प्रयोगानें सुलतानास खुष केलें होतें.

याच्या अरबींतील तारीखुल-हिंद याचें इंग्रजी भाषान्तर सचौनें जर्मनींत (स. १८८४) व इंग्रजींत (स. १८८८) केलें आणि तें प्रसिद्धहि आहे.

हा एक विद्वान् आणि इतिहासकार होता. याचा मृत्यु स. १०३९ मध्यें झाला (बील).

**अब्जदी**—हा एक कवि होता. अब्जदी हें याचें टोपण नांव असून, मीर मुहम्मद इस्माइलखान हें याचें पूर्ण नांव होतें. उमदत-उल-उमरा याचा हा शिक्षक होता. यानें नवाब अनवरखान याचा इतिहास लिहून उमदत उल उमराकडून ६७०० रु. बक्षीस मिळविलें. हा इतिहास अनवरनामा म्हणून प्रसिद्ध आहे. हा ग्रंथ १७६० मध्यें समाप्त झाला. याला पुढें १७७४ मध्यें मलिक-उश-शुअरा हा किताब नबाबानें दिला. या ग्रंथांत इंग्रज व फ्रेंच यांच्या पहिल्या पहिल्या लढायांचें सुद्धां वर्णन आहे. मेजर लॉरेन्सचाहि पराक्रम यानें यांत वर्णिला आहे (बील).

**अब्दुल्ला सय्यद**—औरंगजेबाच्या पदरीं हा एक हुशार सरदार होता. हा कांहीं दिवस विजापूर व पुढें अजमीर व अलाहाबाद या प्रांतांचा सुभेदार झाला. याला बरींच मुलें होतीं. पैकीं हसनअल्ली व हुसेनअल्ली हे दोन प्रसिद्धीस आले. तेच इतिहासांत सय्यदबंधु या नांवानें ओळखले जातात. याचें दुसरें नांव सैयदमिया असें होतें. याला बादशहानें कुत्बुल्मुल्की असा किताब व वजिरी दिली. हा बहुतेक राजधानींतच असे. ज्या वेळेस बादशहा व सय्यदबंधु यांची सरकार वाड्यांत भेट झाली, त्या वेळेस (१७१९) मध्यें हा तेथें होता. हा विलासी व थंड होता. पुढें याचें व बादशहाचें वांकडें आलें. यानें दुसरा शहाजादा तख्तावर बसवून लढाईची तयारी केली. परंतु पुढें हसनपूर येथें ता. १४-११-१७२० रोजीं लढाई होऊन हा कैद झाल्यामुळें याची कारकीर्द संपली. पुढें दोन वर्षांनीं ता. ११-१०-१७२२ रोजीं याचा खून झाला (म. रि. म. १ पृ. ७५-१५०).

**अब्बास अली**—याचें काव्यात्मक नांव बेताब असें आहे. गुलाब मुहम्मदखानाचा मुलगा जो नबाब सयादत अलीखान त्याचा हा मुलगा होय. हा स. १८ वे शतकांत रामपूर येथें नबाब होता.

**अब्बास बिन अली शीरवानी**—यानें शेरशाहाचा इतिहास लिहिला असून त्यांत यानें हुमायुनाला हाकलून देऊन शेरशहा दिल्लीच्या गादीवर बसल्याचें वर्णन केलें आहे.

वरील इतिहास यानें अकबरास नजर केला व त्याचें नांव 'तुहफ-इ-अकबरशाही' असें दिलें. या फारसी ग्रंथाच्या पूर्व भागाचें उर्दू भाषांतर मजहर अलीखान यानें लॉर्ड कॉर्नवॉलीस याच्या वेळीं केलें व त्यास 'तारीख-इ-शीरशाही' असें नांव दिलें (बील).

**अब्बास मीर्झा**—नबाब इक्तिदार उद्दौला ही याची पदवी असून याला उर्दू काव्यांत मस्नवी असें म्हणतात. हा स. १८४९ मध्यें लखनौ येथें जिवंत होता. त्या वेळीं याचें वय ८० वर्षांचें होतें.

**अभयदेवसूरि**—(स. १००० सुमारें) हा जैन-धर्मी श्वेतांबरपंथी राजगच्छ शाखेचा असून प्रद्युम्नसुरीचा शिष्य होता.

याच्या मागाहून मुंजराजाचा समकालीन जिनेश्वर-सुरि होऊन गेला. स. ११८५ मध्यें प्रवचनसारोद्धारवृत्ती नांवाचा ग्रंथ करणाऱ्या सिद्धसेनसूरीचा हा ९ वा पूर्वज होता.

अजितसेनाच्या चरित्रांत याचा उल्लेख आलेला आहे. नैय्यायिकग्रंथकाननांत स्वैर केसरीप्रमाणें संचार करीत असल्याबद्दल याचें वर्णन केलेलें आहे. अनेक परस्पर-विरुद्ध मतांनीं सन्मार्गाचा नाश होऊं नये, या उद्देशानें यानें वादमहार्णव ग्रंथ रचिला. याच्यानंतर जिनेश्वर अधिकारी झाला. संवत् १२७६ त पार्श्वनाथचरित्राचा कर्ता माणिक्यचंद्र हा अभयदेवसूरीपासून मी नववा उत्तरा-धिकारी आहें, असें म्हणतो. या अधिकारवंशावली-प्रमाणें अभयदेवानंतर धनेश्वरसूरी झाला. याच अभय-देवानें संमतिसूत्रावर टीका लिहिली असून 'तत्त्वार्थबोध-

विधायिनी ' असें तिचें नांव आहे. शांतिसूरीच्या दोन अध्यापकांपैकीं अभयदेवसूरि हें नांव असलेला, जगप्रसिद्ध सूरी व प्रस्तुतचा अभयदेवसूरि हे दोघे एक असावेत.

शांतिसूरि स. १०३९ मध्यें हा मरण पावला असावा ( हिस्ट्री ऑफ इंडियन लॉजिक, पा. १९६ ).

२. हा बृहत् खरतर गच्छाचा संस्थापक होता. ३ ते ११ या नऊ अंगांवर यानें टीका लिहिल्या म्हणून याला नवांगवृत्तिकार असें म्हणतात. हा धार येथें जन्मला. याच्या बापाचें नांव धन व आईचें धनदेवी असें होतें. याचा बाप व्यापारी होता. याचें दीक्षा घेण्यापूर्वीचें नांव अभयकुमार असें होतें. याचा कुष्ठरोग केवळ दैवी उपायानें बरा झाला. १६ व्या वर्षी यानें आचार्यपद संपादन केलें. वर्धमानसूरीच्या विनंतीवरून जिनेश्वरसूरीनें यास सूरि केलें. हा गुजराथेंत कप्पडवंज गांवांत मरण पावला. याचा प्रमाणभूत मरणकाल संवत् ११३९ स. १०८३ आहे. यानें अनेक ग्रंथ तयार केले. स्थानांगावरील टीका, भगवतीसूत्रावरील टीका, ज्ञाताधर्मकथांगावरील टीका, समवायांगावर टीका, उपासकदशांगटीका, प्रश्नव्याकरणांगावरील टीका वगैरे अशा अनेक आहेत.

३. याला मलधारिन् ही पदवी गुजराथच्या राजापासून मिळाली. सौराष्ट्राच्या खेंगार राजावर याचें फार वजन होतें. अभयदेवसूरीनें खेंगार राजाला जैनधर्माची दीक्षा दिली. याच्या सांगण्यावरूनच गिरनारच्या यात्रेकरूंवरील कर खेंगार राजानें माफ करविले. हा अभयदेवसूरि प्रश्नवाहन कुलांतला होय. जयसिंहसूरीचा हा शिष्य असून भवभावना ग्रंथ रचणाऱ्या चंद्रदेवसूरीचा हा गुरु होता. यानें अनेक ब्राह्मणांना जैन दीक्षा दिली. यानें मेंदेरा शहरीं एक महावीराचें देवालय बांधविलें.

४. जिनशेखरापासून अभयदेवसूरि हा पट्टावलींतील तिसरा पुरुष होय. हा संवत् १२०४ सालीं होऊन गेला अशी प्रसिद्धी आहे. याला दुसरा अभयसूरी असें नांव आहे. याच्याच हाताखालीं रुद्रपल्लीयगच्छ महत्त्वाला चढला. संवत् १२०४ त रुद्रपल्ली येथें जिनशेखराचार्यांनीं रुद्रपल्लीय खरतर शाखा स्थापिली. हा दुसरा गच्छभेद होता. काशीच्या राजानें याला वादीसिंह अशी पदवी दिली होती असा उल्लेख आहे. जयंतविजयकाव्य नांवाचा ग्रंथ यानें संवत् १२७८ सालीं लिहिला.

५. हा गुणाकरसूरीचा समकालीन होता. संवत् १४२६ सालीं गुणाकरसूरीनें सरस्वतीपट्टण येथें भक्तामरस्तोत्रटीका लिहिली. याच अभयदेवसूरीनें संवत् १४५१ सालीं विजयपहुत्तस्तोत्र रचिलें.

**अभयमल्ल**—हा नेपाळच्या ठाकूरी घराण्यांतील एक राजा होय. हा अरिदेव याच्यामागून गादीवर बसला. यानें एकंदर ९ वर्षे राज्य केलें.

**अभयसिंग**—( स.१७३०–१७४९ ) मारवाडांतल्या जोधपूरच्या अजितसिंहाचा हा मुलगा. हा मोठा चळवळ्या असून दिल्लीच्या कारस्थानांत विशेष लक्ष ठेवून स्वतःचा फायदा करण्यांत निमग्न असे. बापलेकांनीं बादशाहाचा प्रदेश उद्ध्वस्त करून थेट दिल्ली–आग्रापावेतों चाल केली. सरबुलंदचे पारिपत्यास कोण जातो असें बादशाहानें विचारलें असतां भर दरबारांत विडा उचलून यानें ही कामगिरी उचलली. या प्रसंगाचें रसभरित वर्णन टॉडनें केलें आहे. वाटेंत जयसिंगाची भेट घेतली. स. १७३० मध्यें गुजराथेंत येऊन अहमदाबाद काबीज करून सरबुलंदखानास पकडून नेलें. अभयसिंगानें जातांना गुजराथेंतून चार कोटी रुपये व एक हजार लोकांइतकी लूट जोधपुरास आणली असें टॉड म्हणतो. यास गुजराथचा लोभ होता. त्यामुळेंच याचें व गायकवाडांचें पुढें वांकडें येऊन यानें पिलाजी गायकवाडाचा खून करविला ( स. १७३२ ). पण पिलाजीचा पुत्र दमाजी यानें गुजराथेंत खूपच दंगल केल्यामुळें अभयसिंगानें दमाजी गायकवाडास चौथाई व सरदेशमुखी देण्याचा करार लिहून दिला. शिवाय अहमदाबादच्या खजिन्यांतून ८० हजार रुपये रोख देण्याचें ठरविलें. रक्कम पदरांत पडेपर्यंत जवानमर्दखान यास ओलीस ठेविलें. जोधपूरचा बचाव होण्यासाठीं याला गुजराथ सोडून तिकडे जावें लागलें. शेवटीं हा स. १७४९ मध्यें अमजेर येथें वारला.

**अभिनवकालिदास**—हा काश्यपगोत्रोत्पन्न होता. यानें शृंगारकोशभाण लिहिलें.

२. यानें अभिनवभारतचंपू व भागवतचंपू हीं काव्यें लिहिलीं.

**अभिनवगुप्त**—हा वराहगुप्ताचा नातू व चुखलचा पुत्र. मनोहरगुप्त नांवाचा याला एक धाकटा भाऊ होता ( डॉ. बुल्हरचें काश्मीरग्रंथसंशोधन, पा. १५७ ). याचे गुरु बरेच असावेत, असें दिसतें. भट्टेन्दुराज हा त्यांतील एक गुरु असून त्याचा उल्लेख लोचनांत आला आहे. हा मोठा ग्रंथकार असून याचे विसाहून अधिक ग्रंथ प्रसिद्ध आहेत. याची ध्वन्यालोकावरील लोचन नांवाची टीका प्रसिद्ध आहे. भगवद्गीतेवर याची टीका आहे.

याचे गुरु–१ भट्टेन्दुराज, २ भट्टतौत, ३ उत्पल, हा याचा परम गुरु, ४ लक्ष्मणगुप्त ( शैवविद्येंतील गुरु ), ५ तंत्रालोकांतील ( आह्निक १० श्लोक २८७ ) श्लोकावरून

सुमतिनाथ हा अभिनवगुप्ताचा परमगुरु होता, असें जयरथ टीकाकार म्हणतो.

काश्मीरीय शैवसिद्धान्ताची (प्रत्यभिज्ञाशास्त्राची) गुरुपरंपरा पुढीलप्रमाणें आहेः—वसुगुप्त-सोमानंद-उत्पल-लक्ष्मणगुप्त- अभिनवगुप्त.

अभिनवगुप्ताचा ग्रंथ लिहिण्याचा काल स. ९९३ पासून १०१५ पर्यंत होता. याचा प्रत्यभिज्ञाविमर्शिनी नांवाचा प्रत्यभिज्ञाशास्त्रावरील सविस्तर टीकाग्रंथ ( बृहती वृत्ति ) लौकिक शक ९० व गतकाली ४११५ (स. १०१५ ) या वर्षी लिहिलेला आहे आणि याचें भैरव-स्तोत्र स. ९९३ या वर्षांतील आहे ( बुल्हर काश्मीर-ग्रंथवृत्त, पा. १६२. )

भट्टनारायण, भट्टदिवाकरवत्साचा विवेकांजन ग्रंथ, विद्यापतिसोमनंदाचा शिवदृष्टिसार ग्रंथ यांचा गुप्तानें आपल्या बृहत्प्रत्यभिज्ञाविमर्शिनींत उल्लेख केला आहे. आणि क्षेमेंद्र, मम्मट, माधवाचार्य इत्यादींनीं याचाहि उल्लेख आपल्या ग्रंथांतून केला आहे. ईश्वर-प्रत्यभिज्ञानविमर्शिनी, घटकर्परकुलकवृत्ति, तंत्रसार, तंत्रालोक, ध्वन्यालोकलोचन ( सहृयालोकलोचन, काव्यालोकलोचन ), परमार्थसंग्रह, परमार्थसार ( आधानकारिका ), भैरवस्तव, बिंबप्रतिबिंबवाद, अभिनवभारती ( नाट्यशास्त्रावरील टीका ), काव्यकौतुकविवरण, परात्रिंशिकाविवरण, शाक्तभाष्य, स्पंद इत्यादि ग्रंथ यानें रचिले आहेत.

हा जातीचा ब्राह्मण असून आसामामधील राहणारा होय. श्रीमत् शंकराचार्य दुसरे, यांचा याच्याशीं वाद होऊन यास हार खावी लागली. त्यामुळें बाह्यांगीं यानें शंकराचार्यांचें शिष्यत्व पत्करलें. परंतु मनाशीं पक्कें ठरविलें कीं, मी दैवी उपायानें तरी शंकराचार्यांस पराभूत करीन; व त्याप्रमाणें यानें केलेंहि. वैद्यासहि असाध्य असा भगंदर रोग शंकराचार्यांचे ठिकाणीं यानें उत्पन्न केला. पण आचार्यांच्या समाधानी वृत्तीमुळें व शंकराच्या प्रार्थनेनें अश्विनीकुमार त्या ठिकाणीं प्रगट होऊन त्यानें ही करणी आहे असा इषारा दिला. तात्काळ शिष्यमंडळीपैकीं एकानें मांत्रिक उपाय योजून रोग बरा केला. पण इकडे अभिनवगुप्त तात्काळ मरण पावला, असें माधवपंडितानें शांकर दिग्विजयांत लिहिलें आहे. पण यांत ऐतिहासिक सत्य नाहीं.

**अभिनवचंद्र**—( स. १४०० सुमार ) कानडी कवि. ब्राह्मण. पिता–काळपय्य, आई–अत्तिमब्बे, स्थळ–बागेवाडी. ग्रंथ–अश्वशास्त्र. चंद्रकवीचे वाजीशास्त्राचा हा आपल्या अश्वशास्त्रांत उल्लेख करतो. म्हणून यानें अभिनवचंद्र असें नांव घेतलें असावें ( क. क. च. भा. १ पा. ४४५ ).

**अभिनवमंगराज**—( स. १३९८ ) कानडी कवि. ब्राह्मण.गोत्र–विश्वामित्र. पिता–रेम्मार्य रामरस.यानें शशिपूरच्या सोमेश्वराच्या कृपेनें आपला निघंटु लिहिला आहे. याचे ग्रंथ– अभिनवनिघण्टु अथवा कविमंगाभिधान, चिंतामणिप्रतिपद. यानें आपल्या कोशांत संस्कृत शब्दांचा कानडींत अर्थ दिला आहे ( क.क.च.भा. १ पा. ४३८).

**अभिनववाण**—( वामनभट्ट पाहा ).

**अभिनंद**—योगवासिष्ठसार व कादंबरीकथासार या संस्कृत ग्रंथांचा कर्ता. गौडकवी. याच्या वडिलाचें नांव भट्टजयंत असें होतें. याचा काल स. ८४० हा असावा. कारण त्याच्या मागील ४ थ्या पिढींतील पूर्वज ( खापर पणजा ) शक्तिस्वामिन् हा काश्मीरच्या मुक्तापिडाच्या अमदानींत ( स. ७२६ ) होता. अभिनंदाचा जन्म काशी येथें झाला होता. धर्मपालच्या वंशांतील विक्रमशिलाचा मुलगा युवराज हारवर्ष हा याचा आश्रयदाता होता. भवभूति, बाण, कमलायुध, केशव, वाक्पतिराज (?) यांचा नामनिर्देश अभिनंदानें केला आहे (सी. सी.).

२. रामचरित महाकाव्याचा कर्ता अभिनंद निराळा असावा. हा रामचरित महाकाव्य करणारा अभिनंद सनाच्या अकराव्या शतकांत झाला. त्यांत यानें कालिदासाचा निर्देश ‘ ख्यातिं कामपि कालिदासकृतयो नीताः शकारातिना ’ असा केला आहे.

**अभिनंदभू**—या नांवच्या एका श्रीमंत दरबारी गृहस्थानें एक मोठें देऊळ बांधून त्याच्या साफसफाईसाठीं स्वतःला, आपल्या बायकोला व मुलांना गुलाम म्हणून वाहिलें ( हार्वेकृत ब्रह्मदेशाचा इतिहास ).

**अभिमन्यु**—राष्ट्रकूट घराण्यांतील एक राजा. हें राष्ट्रकूट घराणें महाराष्ट्रावर राज्य करणाऱ्या घराण्यांहून निराळें होतें. याच्या वेळच्या देणगीचा उल्लेख पंडित भगवान्लाल यांनीं केला आहे ( Bhand. P. 206).

**अभिराम वरतुंगराम ऊर्फ वीर पांड्य**— हा कदाचित् जटिलवर्मन् त्रिभुवनचक्रवर्तिन्‌च असावा. याचें १० वें वर्ष शके १५१७ ( स. १५९५ ) होतें, असें करीवलम् वदनल्लुर येथें आढळतें. यावरून हा स. १५८५-६ मध्यें राज्यावर आला. हा अतिवीरराम श्रीवल्लभ याबरोबर राज्य करीत होता ( एन्शन्ट डेक्कन, भा. १ पा. १८० ).

**अभिषेक**—हा पांडव घराण्यांतील एक राजा होय. हा या घराण्यांतील जो वीर राजा त्याच्यामागून गादीवर बसला असावा.

**अमजद अलीशाह**—अयोध्येचा नबाब मुहम्मदअल्ली-शाहानंतर त्याचा पुत्र अमजदअल्ली गादीवर येऊन त्यानें स. १८४७ पावेतों राज्य केलें. हा विषयासक्त निघाल्यानें अयोध्येची स्थिति फार बिघडली. याच्या कारकीर्दींतील सार्वजनिक महत्त्वाच्या गोष्टी म्हणजे गोमती नदीवरील लोखंडी पूल व कानपूर-लखनौ रस्ता या होत.

**अमर**—पश्चिम चालुक्य घराण्यांतील दुसऱ्या पुलकेशीचा मुलगा ( Bhand. P. 263 ). यालाच अंबेरा म्हणत असावेत.

**अमर गांगेय**—यादव घराण्यांतील मल्लुगीचा पुत्र. हा आपल्या बापानंतर गादीवर आला.

**अमरचंद्र**—यानें जिनेंद्रचरित्र लिहिलें. हा जिनदत्तसूरीचा शिष्य होता. याचा मित्र अरिसिंह यानें काव्यकल्पलता नांवाचा ग्रंथ अर्धाच लिहिला होता. तो अमरचंद्रानें पूर्ण करून त्या साग्र ग्रंथावर टीका केली. तिचें नांव कविशिक्षावृत्ति असें आहे. यानें छंदोरत्नावली, कलाकलाप व बालभारत हीं पुस्तकें संस्कृतांत लिहिलीं. अरिसिंह व अमरचंद्र सहाध्यायी होते. हे वीसलदेवाच्या काळीं असावेत ( स. १२४३ ).

**अमरचंद्रसूरि**—( आनंदसूरि प.हा. )

**अमरदास**—( स. १५०९-१५७४ ) हा तिसरा शीख गुरु होय. याचा जन्म १५०९ त झाला. याला १५५२ त राज्याधिकार प्राप्त झाला. हा अंगद ऊर्फ अंगडशाहाचा विश्वासू शिष्य होता. क्षमा व सहनशीलता धारण करण्याविषयीं याचा सर्वांना उपदेश असे. यानें जातिभेद मोडण्याचा प्रयत्न चालविला होता. कारण जात्यभिमान हा अनेक पापांच्या मुळाशीं असतो असें याचें म्हणणें होतें. कोणीं तुम्हांस वाईट रीतीनें वागविलें तर तें निदान तीन वेळा सहन करा म्हणजे देव त्याला आपोआप शिक्षा करील, अशी याची शिकवण होती. यानें सतीची चाल बंद पाडण्याचा प्रयत्न केला. यानें कजरावळ नांवाचा किल्ला बांधला. याच्या मनांत स्वतंत्र राज्य स्थापन करावयाचें होतें. परंतु राज्याच्या नादीं लागलें म्हणजे धर्म बुडतो या समजुतीनें याच्या पुष्कळ अनुयायांनीं यास सोडलें. हा स. १५७४ त मृत्यु पावला.

**अमर मल्लुगी**—हा यादव घराण्यांतील एक राजा होय. हा या घराण्यांतील बल्लाळ राजाच्या मागून गादीवर आला.

**अमरसारसूरि**—( स. १६३८-१७०६ ) मूळ नांव अमरचंद्र. उदयपूरचा राहणारा. हा धोलका येथें वारला. याच्या कारकीर्दींत उपदेशचिंतामणीची एक हस्तलिखित प्रत लिहिली गेली.

**अमरसिंग**—( पतियाळा ) पतियाळाचा जो अलासिंग त्याचा हा नातु होय. हा स. १७६५ मध्यें गादीवर बसला.

याला अहमदशाह दुराणीकडून राजा-इ-राजगान हा किताब मिळाला होता. स. १७८१ सालीं याच्या मृत्यूपर्यंत यानें, पैल, तिब्बा, पिंजोर, फत्तेहाबाद, सिरस वगैरे मुलूख व किल्ले सर केले होते. स. १५७९ सालीं मोंगल सैन्यानें पतियाळा घेण्याचा प्रयत्न केला, पण तो फसला. याच्या मागून याचा ५ वर्षांचा साहेबसिंग नांवाचा मुलगा गादीवर आला.

**अमरसिंह**—विक्रमादित्याच्या सभेमध्यें जीं पंडित रत्नें होतीं त्या नवांपैकीं हा तिसरा होय, असें एका प्रसिद्ध श्लोकावरून लोक समजतात. याच्या नांवापुढें सिंह हे उपपद असल्यामुळें हा क्षत्रिय होता, हें दिसून येतें. अमरकोश आरंभितांना जैन किंवा बौद्ध सांप्रदायाप्रमाणें केलेल्या प्रारंभीच्या श्लोकावरून हा जैन किंवा बौद्ध असावा. याच्या अमरकोशावर पुष्कळ पंडितांनीं टीका लिहिल्या आहेत.

उज्जयिनीच्या गुणरात पंडितानें सनाच्या सहाव्या शतकांत अमरकोशाचें चिनी भाषेंत भाषांतर केल्याचें मॅक्समुल्लरनें नमूद केलें आहे. तिबेटी भाषेंतहि एक भाषांतर झाल्याचा शोध लागला आहे. याचा काळ स. ४००-४५० हा आहे. हा शबरस्वामीला शूद्र जातीच्या स्त्रीपासून झाला, असें एका सुप्रसिद्ध श्लोकांत म्हटलें आहे.

ह्यूएनत्संगाच्या उल्लेखावरून या अमरसिंहाचा आश्रयदाता विक्रमादित्य, हा चंद्रगुप्त विक्रमादित्य असला पाहिजे, असें दिसून येतें.

२. ( स. १५९७-१६२० ) हा प्रतापसिंहाचा ज्येष्ठ पुत्र. स. १५९७ त उदेपूरच्या गादीवर आला. यानें लहानपणापासून वडिलांच्या बरोबर काळ घालविल्यानें संकटांचा याला चांगला सराव झाला होता. हा गादीवर आला त्यानंतर अकबर पुढें आठ वर्षें हयात होता. परंतु तो मेवाडच्या राज्याच्या वाटेस गेला नाहीं.

या शांततेच्या काळांत यानें खर्चवेंचादि सर्व व्यवस्था नवीन करून सरदारांचा दर्जा ठरवून त्यांनीं पगडी कशी बांधावी हें सुद्धां ठरविलें. अमरसिंहाची पगडी अद्याप प्रसिद्ध आहे. यानें आपल्या बापाच्या मरते वेळच्या शब्दांकडे दुर्लक्ष करून तळ्याकाठीं अमरमहाल नांवाचा महाल बांधला.

जहांगीरनें आपले अंतस्थ कलह मिटवून मेवाडचें राज्य घेण्याचें अकबराच्या वेळेपासून पार न पडलेलें काम पुरें करण्याचा निश्चय केला. जहांगीरचें सैन्य मेवाडवर चालून आलें तेव्हां ऐषआरामामुळें अमरसिंहास त्याच्याशीं तह करण्याची फार इच्छा झाली. परंतु याच्या चोंडावत कारभाऱ्यानें राण्यास याच्या बापाच्या मरते-वेळच्या शब्दांची आठवण करून दिली. तेव्हां राण्यास अवसान येऊन हा आपल्या सरदारांसह शत्रूस तोंड देण्यास निघाला. या दोन्ही सैन्यांची देवारी घाटाच्या तोंडाशीं गांठ पडून त्यांत मुसलमानांचा पराजय झाला. परंतु यांत निष्पन्न कांहीं झालें नाहीं. पुन्हा स. १६१० त दुसरी लढाई रानपूरच्या घाटांत झाली व ह्यांतहि मुसलमानांस यश मिळालें नाहीं. अशा यानें एकंदर सतरा लढाया दिल्या व त्या सर्वांत यश संपादिलें. परंतु पुढें खुर्रम ऊर्फ शहाजहाननें मोठें सैन्य घेऊन स्वारी केली व या वेळेस रजपूत लोकांची संख्या घटत आल्या-मुळें मुसलमानांस जय मिळाला. पुढें राण्यानें जहांगीरशीं तह केला. याचा मुलगा कर्ण याला पांच हजारांची मनसब देण्यांत आली. परंतु अमरसिंहास दरबारीं हजर राहण्याचा कधींच आग्रह करण्यांत आला नाहीं. उलट याच्याबद्दल आदरबुद्धि व्यक्त करण्यासाठीं जहांगीरनें याचा व याच्या मुलाचा असे दोन संगमरवरी दगडाचे पूर्ण आकाराचे पुतळे तयार करवून ते आग्र्यास बागेंत बसविले. अमरसिंहानें तह केला खरा, परंतु उदेपूरच्या घराण्याची सर्वस्वी मानहानि झाली असें पाहून यानें सर्व कारभार मुलाच्या स्वाधीन करून उदेपूर शहरांतील नौचौकी वाड्यांत तो जो शिरला तो आमरण उंबरठ्याबाहेर आला नाहीं. हा स. १६२१ त मरण पावला ( टॉडचें राजस्थान, पा. ३६४-३८१ ).

**३.** राठोड घराण्यांतील गजसिंहाचा वडील पुत्र. हा शहाजहान बादशहाच्या फौजेंत नोकर होता. हा उद्दामपणें वागत असे. एकदां रजेशिवाय हा १५ दिवस बाहेर राहिला. म्हणून बादशहानें याला दंड करून तो मीरबक्षीला वसूल करण्यास सांगितलें. हा मीरबक्षीला आपल्यापुढें येऊं देईना, तेव्हां याला दरबारांत बोलावलें. परंतु तेथें यानें मीरबक्षीस ठार केलें व हा पळाला. वाटेंत लढाई होऊन आग्रा किल्ल्याच्या दरवाजापाशीं हा फार शौर्यानें लढून मेला. त्या दरवाजाला अद्याप 'अमरसिंह दरवाजा' असें म्हणतात. याच्या तेरा बायका याच्या समवेत सती गेल्या.

मोगल बादशहा शहाजहानच्या कारकीर्दीत राजा अमरसिंग यांनां उदेपूरच्या महाराण्यापासून दोन लाख रुपये देऊन फार उत्तम असे दोन मारवाडी घोडे खरेदी केले होते. त्या काळांत ही किंमत फार मोठी समजली जात असे. या दोन घोड्यांपैकीं एका घोड्याची हकीगत खालीं देण्यांत येत आहे.

राजा अमरसिंग हा शहाजहान बादशहाच्या पदरीं घोडदळाचा सेनापति होता व या वेळीं तो आग्रा किल्ल्याचा किल्लेदार होता. एके रात्रीं आग्रा किल्ल्यांत कांहीं सरदारां-बरोबर जुगार खेळत असतां भांडण होऊन त्या भांडणांत राजा अमरसिंग यानें बादशहाच्या आवडत्या मेहुण्यास ठार मारलें. त्यामुळें राजा अमरसिंगासहि त्याच वेळीं बादशहाच्या एका सरदारानें तेथेंच ठार केलें.

हा बनाव ज्या वेळीं बनला त्या वेळीं राजा अमरसिंगाची स्त्री आग्रा शहरांत आपल्या वाड्यांत राहत होती. आपल्या पतीच्या मरणाची हकीगत तिला समजतांच तिनें आग्रा शहरांत राहत असलेल्या सर्व रजपूत सरदारांस बोलावून विनंति केली कीं, माझ्या पतीचें शव कसेंहि करून किल्ल्यांतून आणून माझ्या स्वाधीन करावें. हें काम करणें अशक्य होतें; तरी कानसिंग या नांवाच्या एका रजपूत सरदारानें हें काम करण्याचें आपल्या शिरावर घेतलें.

राजा अमरसिंगाच्या ज्या प्रसिद्ध घोड्याची हकीगत देण्यांत येणार आहे तो घोडा या वेळीं आग्रा किल्ल्यांत राजाच्या तबेल्यांत होता.

सरदार कानसिंग यानें गुप्त रीतीनें आग्र्याच्या किल्ल्यांत प्रवेश केला व तबेल्यांत जाऊन राजा अमरसिंगाच्या घोड्यावर सामान ठेवून तो तयार केला. नंतर ज्या ठिकाणीं अमरसिंगाचें शव पडलें होतें तेथें तो गेला व आपल्या जिवावर उदार होऊन जवळच्या लोकांशीं लढून त्यानें राजा अमरसिंगाचें शव घेऊन घोड्यावर जलदीनें स्वार झाला. या गडबडीनें सर्व किल्ला जागा झाला व किल्ल्यांतून बाहेर पळून जाण्याचे सर्व मार्ग बंद करण्यांत आले व त्या ठिकाणीं शिपायांचा पक्का बंदोबस्त ठेवण्यांत आला. कित्येक स्वार त्यास धरण्याकरितां त्याच्या मागें लागले. कानसिंगानें हा प्रकार पाहतांच आपला घोडा किल्ल्याच्या तटावर चढविला व तेथून राजाच्या शवासह खालीं कुदविला. तटाखालीं ७० फुटांवर हा घोडा जमिनीवर उतरला. या घोड्याच्या मरणासंबंधीं दोन आख्यायिका सांगण्यांत येतात.

पहिली आख्यायिका अशी आहे कीं, ७० फूट खालीं जमिनीवर उतरल्यावर तो घोडा तोंडावर पडला; परंतु त्यास फारशी इजा झाली नव्हती. तो तसाच उठून आपल्या

मालकिणीच्या वाड्यांत आपल्या मालकाचें शव घेऊन गेला व नंतर त्यानें तेथें प्राण सोडला.

दुसरी आख्यायिका अशी सांगण्यांत येते कीं, जमिनीवर उतरतांच तो घोडा ठार झाला, तरी पण कानसिंगानें तेथून राजा अमरसिंगाचें शव नेऊन याच्या स्त्रीच्या स्वाधीन केलें. दुसरी आख्यायिका खरी वाटते.

कानसिंगाचा पाठलाग चालला असतां बादशहा शहाजहान आपल्या राजवाड्यांतून ही मजा पाहत होता. घोड्यानें किल्ल्याच्या तटावरून खालीं उडी घेतलेली पाहतांच बादशहास फार आश्चर्य वाटलें व त्यानें हा घोडा ज्या ठिकाणीं खालीं जमिनीवर उतरला होता त्या ठिकाणीं या घोड्याचा पुतळा--त्यावर राजा अमरसिंग स्वार झालेला असा--तयार करून बसविला आणि या घोड्याच्या अजब कर्तबगारीबद्दल आपलें प्रेम व्यक्त करून त्याचें कायमचें स्मारक करून ठेविलें.

यावरून मोंगल आणि रजपूत लोकांस घोड्यांची किती आवड होती हें उघड होत आहे. या घोड्याचा पुतळा—त्याचा मालक त्यावर स्वार झालेला असा--अद्याप आग्रा किल्ल्याच्या बाहेर रेल्वे स्टेशनचे समोर पाहण्यांत येतो. राजा अमरसिंगापेक्षां कानसिंगाचा जर पुतळा या घोड्यावर बसविला असता तर तें अधिक योग्य झालें असतें; कारण कानसिंगानें हिंमत करून या घोड्यास जिवाची पर्वा न करितां किल्ल्याच्या तटावरून खालीं ७० फूट खोल कुदविलें होतें. या घोड्यावर पुष्कळ कवनें करण्यांत आलीं आहेत. देशी घोडे पूर्वी किती उत्तम असत, याचें हें एक ठळक उदाहरण आहे (हॉर्स ब्रीडिंग मॅगेझिन, एप्रिल १९३१ वरून-जनरल नानासाहेब शिंदे, बडोदें).

आग्र्यास किल्ल्यासमोर असणारा पुतळा दुसऱ्या अमरसिंहाचा असावा.

४. (स. १७००-१७१०) उदेपूरचा राणा. हा जयसिंहाचा पुत्र असून याला स. १७०० त गादी मिळाली. हाहि पहिल्या अमरसिंहाप्रमाणें शूर व तडफी स्वभावाचा होता (२ अमरसिंह पाहा). परंतु याच्या वडलांशीं झालेल्या भांडणांत याचें नैतिक दृष्ट्या वजन कमी झालें.

यानें औरंगजेबाच्या मुलांच्या तंट्याचा फायदा घेऊन राजपुत्र मुअज्जमशीं एक गुप्त तह केला. मुअज्जम सिंध प्रांताच्या पश्चिमेकडील मोहिमेंत असतां याच्या पथकानें उत्तम साहाय्य केलें होतें. परंतु पुढें याला लवकरच मोंगलांविरुद्ध शस्त्र उपसावें लागलें. चंबळा नदीकडील एक रजपूत जहागीरदार दक्षिणेंत औरंगजेबाच्या मदतीस होता. परंतु त्याच्या मुलानें जहागीर सर्व हातांत घेऊन स्वतः मुसलमान झाला; तेव्हां अर्थातच जहागीरदाराच्या म्हणण्याकडे औरंगजेबानें लक्ष दिलें नाहीं. परंतु जहागीरदार राण्यास येऊन मिळाला व त्यानें आपली जहागीर मिळवून देण्याची राण्यास विनंति केली. परंतु औरंगजेबास हें कृत्य पसंत पडलें नाहीं. त्यानें अजम याला राण्याच्या हालचालींवर लक्ष ठेवण्यास सांगितलें. परंतु मध्यंतरींच औरंगजेब मरण पावला व हा सर्व तंटा मिटला.

पुढें राजपुत्र मुअज्जम यानें आपला भाऊ अजम याचा पराभव करून रजपुतांच्या साहाय्यानें गादी मिळविली. परंतु पुढें मात्र रजपूत त्याच्या ताब्यांत राहिले नाहींत. कारण औरंगजेबाच्या वर्तनानें त्यांचा मुसलमानांवरील विश्वास पार उडून गेला होता. मारवाड व अंबर येथील राजे बादशहास न विचारतांच छावणींतून निघून जाऊन मेवाडच्या राण्यास येऊन मिळाले. या तिघांनीं एक संघ स्थापन केला. मेवाडच्या राण्यानें इतर रजपुतांच्या मुलींशीं लग्नव्यवहार सुरू करून मुलीच्या संततीस वारस नेमण्याची अट कायद्यानें मान्य केली. परंतु ही मोठी चूक होऊन यामुळें मराठ्यांस पुढें रजपुतांच्या भानगडींत पडण्यास अवसर मिळाला.

पुढें बहादुरशाहानें रामपुऱ्याच्या वाटग्या जहागिरदारांस मदत केली. परंतु जयपूर, जोधपूर व उदेपूर या तिन्ही ठिकाणच्या सैन्यांनीं एकत्र जमून शत्रूशीं टक्कर दिली व जेवढ्या म्हणून मुसलमानी अमदानींत देवळांच्या मशीदी झाल्या होत्या त्या सर्व जमीनदोस्त केल्या व सर्व काजी अधिकाऱ्यांस अपमान करून वागविण्यांत आलें. या प्रसंगीं रजपुतांनीं जशास तसें या नात्यानें वर्तन केलें.

परंतु पुढें लवकरच पहिला शहाअलम वारला व या वरील त्रिकूटांतहि एकी राहिली नाहीं. मारवाडचा राजा अजितसिंह यानें पुनः मोंगलांशीं मैत्री केली व बादशहा फर्रुखसियर याचें त्याच्या मुलीशीं लग्न झालें. जरी ही मैत्री झाली तरी हिंदूंवरील मध्यंतरीं उठलेला जिझिया कर पुनः बसविण्यांत आला.

इतकें झालें तरी अमरसिंह हताश न होतां त्यानें रजपुतांचें एक स्वतंत्र राष्ट्र करण्याचे प्रयत्न दुप्पट जोमानें केले. बादशहाशीं झालेल्या तहांत सुद्धां त्याचा स्वतंत्र बाणा दृष्टोत्पत्तीस येतो. त्यांतील दुसरेंच कलम जिझिया कर उठवा, असें होतें. वरील तह हें त्याच्या आयुष्यांतील शेवटचेंच कृत्य होतें. हा स. १७१० त मरण पावला. हा मोठा तडफदार व उदार अंतःकरणाचा राणा होता.

तशा कालांतहि यानें आपल्या राज्याचा बडेजाव कायम राखून तें बरेंच भरभराटीस आणलें. मेवाडच्या लोकांत याच्याबद्दल आदर अद्यापहि वसत आहे. ( टॉड, पा. ४१०-४२० ) याच्या मृत्यूचा काल टॉडनें १७१६ दिला आहे. पण गौरीशंकर ओझा यांनीं स. १७१० दिला आहे आणि तो बरोबर आहे.

५. ( तंजावरचे राजे ) स. १७८७ मध्यें तंजावरचे तुळाजीराजे मृत्यु पावल्यानंतर त्यांचे सापत्न बंधू हे तंजावरच्या गादीवर आपला हक्क सांगण्यास सिद्ध होऊन ते तंजावर येथें दाखल झाले. त्यांनीं मद्रासचे गव्हर्नर सर आर्चिबॉल्ड कॅम्बेल यांशीं पत्रव्यवहार करून गादीचे खरे वारस आपण आहोंत व सरफोजीचें दत्तविधान अशास्त्र आहे, असें सिद्ध करून दाखविण्याचा प्रयत्न केला. सर आर्चिबॉल्ड कॅम्बेल ह्यांनीं तंजावरास येऊन चौकशी केली व कांहीं विद्वान् पंडितांच्या साक्षी घेऊन अमरसिंग राजे यांस तंजावरच्या गादीवर बसविण्याचें ठरविलें. व त्यांच्याबरोबर एक नवीन तह केला. तो फार महत्त्वाचा असून त्यायोगानें तंजावरचें राज्य बहुतेक ईस्ट इंडिया कंपनीच्या ताब्यांत आलें ( इ. सं. पु. ३ रें, तं. रा. घ. पृ. ९६ ).

सरफोजीस व त्याच्या मातोश्रीस अमरसिंह राजानें चांगलें वागवलें नाहीं अशी तक्रार मि. स्वार्झ ह्यांनीं मद्रास सरकारचे कानावर घालून स. १७९३ मध्यें सरफोजी व त्याची आई ह्यास मद्रासेस नेऊन ठेवलें.

मद्रास येथें गेल्यावर सरफोजीच्या आईनें तंजावरच्या गादीवर आपल्या मुलाचा हक्क आहे म्हणून ग. ज. लॉर्ड कॉर्नवॉलीस याजकडे बोलणें लावलें. या कामीं तिला रे. स्वार्झ ह्यांचें चांगलें पाठबळ मिळालें. याच वेळीं राजे अमरसिंह याजकडील खंडणीची बाकी थकली व राज्यकारभारांत पुष्कळ अव्यवस्था झाली, असा बोभाटा मद्रास सरकारचे कानावर गेला. पुढें ३० डिसेंबर १७९६ रोजीं सरफोजीचें दत्तविधान सशास्त्र आहे व अमरसिंग हे गादीस लायक नाहींत, असा सर जॉन शोअर यांनीं निकाल दिला.

मद्रासचे गव्हर्नर होबर्ट ह्यांनीं वरिष्ठ सरकारच्या म्हणण्यास पुष्टि देऊन, हें प्रकरण मंजुरीसाठीं कोर्ट ऑफ डायरेक्टर्सकडे पाठवलें. स. १७९८ मध्यें डायरेक्टर्सनीं या वादग्रस्त प्रश्नाचा निकाल सरफोजीच्या वतीनें देऊन अमरसिंहास पदच्युत केलें व त्यास तंजावरपासून २९ मैलांवर मध्यार्जुन म्हणून एक ठिकाण आहे तेथें नेऊन ठेवलें. ते तेथें दरसाल पाऊण लाख नेमणूक घेऊन पुढें बरींच वर्षें राहत होते. ते स. १८०२ मध्यें मृत्यु पावले.

यास प्रतापसिंह या नांवाचा मुलगा होता. तो स. १८४९ मध्यें मेला. त्यास औरस संतति नसल्यामुळें त्यानें एकोजी नांवाचा एक पुत्र दत्तक घेतला. त्यास ब्रि. सरकाराकडून दरमहा १ हजार रु० नेमणूक मिळत असे. तो १८८३ पर्यंत विद्यमान होता.

अमरसिंह राजे यांच्या कारकीर्दीचें गुणावगुणवर्णन करण्याचें काम फार कठीण व नाजूक आहे. यांच्याबद्दल तंजावर व मध्यार्जुन येथें अद्यापपर्यंत जो लौकिक ऐकूं येतो त्यावरून ते मोठे सात्त्विक, दयार्द्रबुद्धीचे आणि उदार असे राजे होते असें दिसून येतें; परंतु रे. स्वार्झ व इतर इंग्रज लेखक यांनीं यांच्याविरुद्ध ज्या कागाळ्या लिहिल्या आहेत, त्यांवरून ते अतिशय जुलमी, क्रूर, राज्यकारभार करण्यास अयोग्य असे होते, असें मानणें भाग पडतें ( तं. रा. घ. पृ. १०१-११२. ).

६. काशीचा राहणारा. याचें टोपणनांव खुपगो असें होतें. कोएल जिल्ह्यांत याला सरकारी नोकरी होती. यानें अकबराचा राजवाडा व आग्याचा ताजमहाल यांचा संक्षिप्त इतिहास लिहिला असून तर्जुमा बहारदानिश हें काव्य फारसींत केलें. हें उर्दू इझारदानिशहून निराळें आहे ( बील ).

**अमरु**—शंकराचार्यांनीं ज्या वेळेस परकायाप्रवेश केला, तेव्हां हाच राजा मेला होता, व त्यांनीं याच्या मृत शरीरांत प्रवेश करतांच हा जिवंत झाला. याच्याच रूपानें शंकराचार्य कामशास्त्र शिकले. याची कथा शांकरविजयांतील ५८ व्या प्रकरणांत दिली आहे. याच्या नांवावर अमरुशतक नांवाचें शृंगाररसप्रधान काव्य आहे. अमरूच्या शरीरांत प्रवेश केला तेव्हां त्यानें अमरुशतक केलें असेल. अमरुशतकावर रसिकसंजीवनी नांवाची अर्जुनवर्म्यानें टीका लिहिली आहे ( शंकराचार्य पाहा ).

**अमलानंद**—हा कृष्ण यादवाच्या दरबारीं उदयास आला. वाचस्पतिमिश्राच्या भामती नांवाच्या ग्रंथावर यानें 'वेदान्त-कल्पतरु' या नांवाची टीका लिहिली आहे. शिवाय याचा शास्त्रदर्पण ( ब्रह्मसूत्रभाष्य ) हा ग्रंथ आहे. हा अनुभवानंदाचा शिष्य होता. याचा काळ सुमारें स. १२४७-६० असा आहे. याचें नांव अमलानंद व्यासाश्रम असें दिलेलें आढळतें ( C. C. ).

२. यानें पंचपादिकादर्पण नांवाचा वेदांत ग्रंथ लिहिला आहे.

**अॅमहर्स्ट**—( स. १७७३-१८५७ ) हा हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल होता. हा बाथ ( इंग्लंड ) येथें १७७३ त जन्मला. अॅमहर्स्ट हें घराणें बरेंच जुन्यापैकीं

आहे. याचें प्राथमिक शिक्षण वेस्टमिन्स्टर शाळेंत होऊन ऑक्सफर्ड येथील कॉलेजांत त्यानें एम्. ए. ची डिग्री संपादन केली. याची फिमथचा अर्ल व कौंटेस याच्याशीं ओळख झाली. पुढें कौंटेस मेला. तेव्हां त्याच्या विधवा बायकोबरोबर यानें स. १८०० त लग्न लावलें. पुढें याचा राजदरबारांत लवकरच प्रवेश झाला; व याच्या प्रामाणिकपणामुळें हा चीन दरबारीं वकील म्हणून नेमला गेला. परंतु चीनच्या बादशाहाला त्याच्या रिवाजाप्रमाणें यानें मुजरा करण्याचें नाकारलें. तेव्हां हा परत इंग्लंडांत गेला, व पुढें लवकरच स. १८२३ मध्यें हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल होऊन आला.

याचें येथें आल्यावर कंपनी सरकारतर्फे मोठें स्वागत करण्यांत आलें. लेडी ॲमहर्स्टनें देखील येथें असतांना निरनिराळ्या गोष्टींविषयीं दिनचर्या लिहिली आहे. ॲमहर्स्ट आला तेव्हां मुद्रणस्वातंत्र्याचा बिकट प्रश्न याचे पुढें होता. हा शांतताप्रिय होता. परंतु नाइलाजानें याला ब्रह्मी युद्ध सुरू करावें लागलें. यानें अगोदर कमिशन नेमून सरहद्दीचा तंटा मिटवावा, असें सुचविलें होतें. तें ब्रह्मी सरकारास न आवडून युद्ध सुरू झालें. यांत ॲमहर्स्ट सर्वस्वीं यशस्वी झाला व कंपनीसरकारास योग्य असा तह यानें घडवून आणला. या कामीं प्रथम त्याला १३कोट रु. खर्च आला, म्हणून दोष देण्यांत आला. परंतु चहाचे मळे व तांदळाचें आगर असलेला प्रांत मिळालेला पाहिल्यावर याची उलट वाखाणणीच करण्यांत आली. दुसरें महत्त्वाचें कृत्य म्हणजे भरतपूरच्या किल्ल्याचा पाडाव हें होय. तें यानेंच केलें.

ब्रह्मी युद्धावर जाण्यापूर्वी बंगाली शिपायांनीं योग्य वाहनें व पगारवाढीची मागणी केली होती, परंतु ती यानें नाकारून तिला बंडाचें स्वरूप देऊन त्या शिपायांची कत्तल करण्यांत आली, हें कृत्य तेवढें त्याच्या कारकीर्दीत वाईट घडलें. हा स्वदेशीं जाऊन स. १८५७ त मरण पावला.

**अमाई**—तुकारामाचा पूर्वज विश्वंभर याची पत्नी.

२. शहामुनीची आई व मानसिंहाची पत्नी.

**अमात्यांचा वंशवृक्ष**—

सोनभट बहुतकर
├ आवाजी
└ निळो
  └ **रामचंद्र नीळकंठ अमात्य**
    └ भगवंतराव ( स. १७१८-१७५५ )

भगवंतराव ( स. १७१८-१७५५ )
| ल. व्यंकूबाई-निळोपंत पिंगळे
कृष्णराव ( स. १७५०-१७६१ )
सुबराव ( स. १७६१-१८१० )
├ मोरेश्वर ( स.१८१३-२६ )
│ गोविंदराव ( स. १८२६-३४ )
│ रघुनाथ द. ( स. १८३५-४५ )
│ रामराव द. ( स. १८४७-४९ )
│ मोरेश्वर द. ( स. १८५०-६७ )
│ माधवराव द. ( स. १८६८-१९२९ )
│ परशुरामराव ( स. १९३१ चालू ).
└ रामचंद्र ( स.१८११-१३ )

हें घराणें सध्यां गगनबावडा येथें राज्य करीत आहे.

**अमानतखान**—ज्या वेळेस निजाम औरंगाबाद सोडून दिल्लीस जावयास निघाला त्या वेळेस दक्षिणचा कारभार त्यानें मुबारिझखान नामक सरदारचे हवालीं केला. हेंच ह्याचें मुळचें नांव. यांस अमानतखान व शाहमतखान हे वेळोवेळीं किताब मिळत गेले. केव्हां केव्हां यास कंमरजखान असें म्हणतात. हा निजामाप्रमाणें वृद्ध व अनुभवी होता. बारा वर्षे हा हैद्राबादच्या कारभारावर होता. हा पूर्वी सय्यदपक्षाचा असून निजामाचा द्वेष करी (१७२१). पण दक्षिणचा कारभार मिळतांच यानें मराठ्यांशीं निकाराचें धोरण आरंभिलें. आपण सय्यदाचे करार पाळत नाहीं व चौथाईचा वसूल साफ देत नाहीं, असें त्यांना कळविलें ( म. रि. म. १ पृ. १६२; मुबारिझखान पाहा ).

**अमार भुजंग**—वीरपांड्यानंतरचा राजा असावा; कारण वीरपांड्यानंतर राजराज १ ला (९८५ ते १०१३) चोल राज्य करीत असतां त्यांनीं अमारभुजंग पांड्य व चेर यांचा पराभव केल्याचा उल्लेख तंजावर--शिलालेखांत आढळतो. चेर, पांड्य व चोल यांच्यामधील ही लढाई मलई नाडू येथें झाली.

मदुरा आणि तिन्नेवेली प्रांतांतील राजराजाच्या शिलालेखांत असा उल्लेख आढळतो कीं, स. ९९५ मध्यें पांड्याचा जय झाला, परंतु तो जय म्हणजे राजराजानें पांड्य राजावर वर्चस्व मिळवून सर्व पांड्यराज्य चोलांच्या स्वाधीन करून घेऊन पांड्य देशाला पांडीनाडू असें नांव दिलें व सर्व पांड्यराज्यावर आपली सत्ता प्रस्थापित केली.

तेव्हां पासून पांड्यराजांनीं चोलांच्या हाताखालीं राहण्याचें कबूल केलें.

राजराजानंतर त्याचा मुलगा राजेंद्र चोल स. १०११ ते १०४५ हा गादीवर होता. त्यानें सर्व पांड्य राज्यावर चोल मांडलिक ठेवून पांड्यांची सत्ता नष्ट केली. त्याच्या राज्यांत पांड्यांचा उल्लेख शिलालेखांत आढळत नाहीं.

**अमितगति**—हा जैनधर्मी दिगंबर पंथापैकीं एक साधू होता. हा नामांकित कवि व धर्मग्रंथकारहि होता. हा मुंजराजाच्या वेळेस होऊन गेला. या राजाच्या पदरीं अनेक कवि व धर्मग्रंथकार होते. त्या सर्वांत अमितगति, धनंजय व धनपाल यांनाच श्रेष्ठत्वाचा मान होता असें दिसतें.

धर्मपरीक्षा व श्रावकाचार या ग्रंथांमुळें याची धार्मिक वाङ्मयांत फार प्रसिद्धी आहे. यानें आपला सुभाषित-रत्नसंदोह हा ग्रंथ विक्रम संवत् १०५० पौ. शु. ५ ला पूर्ण केल्याचा उल्लेख दिला आहे. म्हणजे स. ९९४ मध्यें हा ग्रंथ रचिला गेला. धर्मपरीक्षा ग्रंथाच्या शेवटीं तो ग्रंथ संवत् १०७० मध्यें म्हणजे स. १०१४ त रचल्याचा उल्लेख आहे. यावरून हा कवि मुंजाच्या वेळीं म्हणजे दहाव्या शतकाच्या उत्तरार्धांत व ११ व्या शतकाच्या पूर्वार्धांत होऊन गेला हें ठरतें. मुंजाच्या नंतरहि यानें ग्रंथरचना केलेली दिसते. यानेंच प्रथम संवताशीं संबद्ध असणारा विक्रम शब्द विक्रमादित्य नृप अशा अर्थाचा आहे असें निःसंदिग्ध लिहिलें आहे.

याचें जन्मस्थान, आईबाप वगैरे माहिती मिळण्यास कांहींच साधन नाहीं. याच्या श्रावकाचार ग्रंथांत जैनांनीं पाळावयाचा आचार अथपासून इतिपर्यंत आहे. यांतील परिच्छेद १५ असून श्लोकसंख्या सुमारें १३।। शें आहे.

सुभाषितरत्नसंदोह हाहि याचा ग्रंथ नांवाप्रमाणेंच सुभाषितश्लोकरूपी रत्नांनी भरलेला आहे. कोप, माया, अहंकार, द्यूत, वेश्यासंग अशा अनेक अधोगतीला नेणाऱ्या मनोविकारांचें वर्णन यानें केलें आहे.

धर्मपरीक्षा हा ग्रंथ एकूण सुमारें दोन हजार श्लोकांचा आहे. हा यानें दोन महिन्यांत संपविला असें ग्रंथांतील उल्लेखावरून दिसतें ( ज्ञा. को. ).

**अमितभ**—बौद्ध लोकांत ज्या मुनींची विशेष ख्याती आहे त्यांत याची गणना होते.

**अमीनखान**—हा निजामुल्मुल्कचा चुलता. हा पूर्वींपासून सय्यदांचा शत्रू होता. स. १७१८ मध्यें मराठ्यांनीं माळवा प्रांतांत ठाणें दिलें. त्यांस काढून लावण्याकरितां बादशहानें याची नेमणूक केली. परंतु हा मध्येंच हुसेन-अली सय्यद येत आहे असें ऐकतांच कारभार सोडून दिल्लीस आला. त्यामुळें बादशाहाची याच्यावर मोठी इतराजी झाली. हाच पुढें सय्यदाच्या पाडावांत मुख्य असून कांहीं दिवस वजिरीवर होता. दिल्लीस याच्याशीं मराठ्यांची मारामारी झाली तींत १५०० मराठे कापले गेले. यानें रतनचंदास हालहाल करून मारलें. स. १७२० च्या नोव्हेंबरांत याला वजिरी मिळाली, पण पुढें हा अवघ्या ३ महिन्यांनीं मरण पावला.

**अमीर उमर**—हा सुलतान अलाउद्दीन खल्जीच्या बहिणीचा मुलगा. अमीर उमर व त्याचा भाऊ तंगूखान यांनीं अलाउद्दीन रतनभोरच्या वेढ्यांत गुंतला असतां बदाऊन व अयोध्या येथें बंड केलें व स्वतंत्र सुलतान झाल्याची द्वाही फिरविली. त्या भागांतील राजनिष्ठ सरदारांनीं या दोघां भावास शह देऊन पकडिलें व दोघांसहि त्यांच्या मामा सुलतान अला उद्दीन यांकडे रवाना केलें. त्यानें यांचे डोळे काढून यांस आंधळें केलें.

**अमीरखान**—इराणांतील यज्द येथें राहणारा एक हुषार व शूर सरदार. हा औरंगजेबाच्या वेळीं अफगाणिस्थानच्या कामावर होता. याची बायको साहेबजीबाई होय ( मु. रि. भा. २ पा. ३२६ ).

**२.** हा मुरादाबाद जिल्ह्यांतील संबळ गांवचा राहणारा. याचा बाप मुल्ला असून त्याचा थोडा जमीनजुमला होता. यानें आपलें गांव सोडलें, त्या वेळेस हा वीस वर्षांचा होता. याच्या बरोबर याचे दहा विश्वासू अनुयायी होते. पुढें माळव्यामधील पेशव्यांच्या एका सरदारानें यांना शिबंदी म्हणून आपल्या जवळ ठेवलें. यांना तीनचार रुपये पगार मिळत असे. पुढें याला लवकरच चांगले दिवस आले. भोपाळ दरबारच्या दिवाणाचा अंत झाला व तेथें बरीच खळबळ माजली. तेव्हां हा आपले ६० स्वार व ६० शिपाई घेऊन मुहंमद-खानाकडे नोकरीस राहिला. पुढें हा दुर्जनलाल व जयसिंग या राघवगडच्या संस्थानिकांच्या तैनातीस राहिला व त्यांचा जेव्हां मराठ्यांशीं तंटा झाला तेव्हां यानें आपली मर्दुमकी गाजवून दाखविली. त्यामुळें याला ५०० स्वारांचें आधिपत्य मिळून पालखीचा मान मिळाला व पंधरा हजार पेंढारी सैन्यामध्यें याला महत्त्वाचा दर्जा प्राप्त झाला. परंतु याचें रजपुतांशीं पुन्हां भांडण होऊन हा इंगळ्यांच्या पदरीं राहिला. तेथें याला फत्तेगडच्या किल्ल्याची देखरेख

मिळाली. परंतु ती याला लवकरच सोडावी लागली. नंतर मात्र यशवंतराव होळकराशीं याची मैत्री जमून याचें चांगलेंच बस्तान बसलें. यशवंतरावाचें व याचें नातें जरी सेव्यसेवकाचें होतें तरी यशवंतराव याला भाऊ म्हणून संबोधी व इतर सरदारांपेक्षां याचा बडेजाव जास्त राखी.

अमीरखान अगदीं स्वतंत्र होता, तरी याची स्थिति तितकी चांगली नव्हती. एकदां तर याच्या सैनिकांनीं याला बेदम ठोकून पागोट्याचा फांस लावून ते याचा जीव घेणार होते. परंतु यशवंतरावानें ही बंडाळी मोडून बंडखोरांना शिक्षा ठोठावल्या. परंतु त्यांचा समूळ नायनाट करण्यास हा परवानगी देईना. प्रत्यक्ष पुण्याशेजारीं गोहत्या करून याचे शिपायी हिंदूंना चिडवीत असत. एवढ्यावरूनच याचे सैनिक किती उद्दामपणानें वागत होते याची कल्पना होते.

यानें यशवंतरावाला स. १८०४ त इंग्रजाशीं झालेल्या युद्धांत बरीच मदत केली; भरतपूरचा वेढा उठविण्यासाठीं यानें रोहिलखंडांत जाऊन जाळपोळ व लुटालूट आरंभिली. परंतु इंग्रज सैन्यानें यास गांठून याचा पराभव केला. तेव्हां हा पुनः होळकरास येऊन मिळाला. परंतु स. १८०५ मध्यें से. लेक याजबरोबर यशवंतरावानें तह केला. पुढें याचा संबंध यशवंतरावाशीं फारसा आला नाहीं. पुढें जयपूर व जोधपूर येथील राजे उदेपूरच्या राजकन्येसाठीं आपसांत भांडत असतां जयपूरच्या राजानें यशवंतरावाजवळ मदत मागितली तेव्हां त्यानें अमीरखानास मदतीस रवाना केलें.

या भांडणामुळें दोनहि संस्थानचें अतोनात नुकसान झालें. अमीरखानाची लायकी लुटारूंचा पुढारी होण्यापलीकडे नव्हती. जय मिळाला असतांनाहि त्याचें मोठें बक्षीस घेण्याचें सोडून हा लुटालूट करण्यांत धन्यता मानीत असे. यानें अतिशय कपटानें सवाईजयसिंगास कठंस्नान घातलें. याच्या ठिकाणीं नीतिमत्ता बिलकुल वास करीत नव्हती.

पुढें यशवंतरावास वेड लागलें. तेव्हां तुळसाबाईस पुढें करून सर्व कारभार अमीरखानानें पाहावा, असें ठरलें. पुढें होळकर व भोसले यांच्यांत कांहीं हक्कांचे तंटे होते ते मिटविण्याचे उद्देशानें हा भोसल्यांच्या मुलखांत शिरला व यथेच्छ लुटालूट करूं लागला. परंतु तें कार्य शेवटीं यास इंग्रज मध्यें पडल्यामुळें करतां आलें नाहीं. इंग्रजांनीं याला नर्मदापार हाकून लावलें.

हा नंतर पुनः रजपुतांकडे वळला व भांडणाचें जें मूळ कृष्णाकुमारी हिलाच जगांतून नाहींशीं करावी म्हणजे झालें, असा यानें उदेपूरच्या मंत्र्यापुढें प्रश्न मांडला. परंतु ही गोष्ट प्रथम कोणासच रुचली नाहीं. परंतु कृष्णाकुमारीनेंच ही युक्ति मान्य केली व ती विष पिऊन जगांतून नाहींशी झाली.

पुढें हा दोन वर्षे राजपुतान्यांतच होता. परंतु सर डेव्हिड ऑक्टर लोनी हा पेंढाऱ्यांचा नायनाट करण्याकरितां जेव्हां राजपुतान्यांत उतरला तेव्हां यानें इंग्रजांपुढें आपलें कांहीं चालणार नाहीं हें ओळखून व १५ लक्षांवर जहागीर घेऊन यानें त्याच्याशीं तह केला. तरी हा तह करण्याचें कामीं यानें बरीच दिरंगाई केली. यानें एकदम इंग्रजांचे वैर सोडून त्यांच्याशीं दोस्ती कशी केली याचें जरा आश्चर्यच आहे. याच्यांत जर कोणता एक सद्गुण असेल तर तो मित्रप्रेम हा होय. यशवंतरावाशीं यानें अखंड मित्रत्वाचेंच नातें ठेविलें. यशवंतरावाच्याहि दुष्ट संवयी घालविण्याचा यानें आटोकाट प्रयत्न केला; याचें कारण मित्रप्रेम हेंच होय. धर्मकुवराशीं झालेल्या युद्धांत यानें आपल्या जिवाची पर्वा न करतां मित्राची बाजू सांभाळिली. याचे कट्टे दुष्मनहि याचा हा गुण कबूल करतात ( मालकमकृत मेमॉयर्स ऑफ सेंट्रल इंडिया ).

**अमीरखान अलीशाह**—याला केंब्रिज हिस्टरीमधील वंशावळींत मीरखान अलीशाह असें म्हटलें आहे. काश्मीरच्या मुसलमानी राज्यांतील सिकंदर बुतिशिकनचा मुलगा. हा आपल्या बापानंतर गादीवर आला ( स. १४१६ ).

गादीवर येते वेळीं यानें अलीशाह हा किताब धारण केला. हिंदुस्थानांत प्रवास करण्याचें मनांत येऊन यानें आपल्या भावास राज्याची व्यवस्था सांगितली आणि काश्मीरांतून दक्षिणेंत प्रयाण केलें स. १४२२ ( मु. रि. भा. १ पा. ३१६ ).

**अमीर बरीद**—( स. १५०४–१५४९ ) बेदरच्या बरीदशाही घराण्यांतील कासीम बरीदाचा हा पुत्र. बापानंतर बेदरच्या गादीवर आला. बहामनी राज्याची अखेर करणाऱ्या पांच प्रमुख लोकांपैकीं हा एक होय.

यानें विजापूरच्या इस्माईल राजाचा दिवाण जो कमालखान त्यास मदत करण्याचें कबूल करून गुलबुर्ग्यास वेढाहि दिला होता. पण जेव्हां कमालखानाचा खून झाला तेव्हां याला गुलबुर्ग्याचा वेढा उठवून परत जावें लागलें.

यानें युसुफ आदिलशाह याला आणि इस्माईल याला फार त्रास दिला. इस्माईलचा एक सरदार असदखान यानें याच्या छावणीवर एकदां हल्ला करून हा दारू पिऊन धुंद

झाला असतां कैद केलें आणि इस्माईलपुढें उभें केलें. तेव्हां शाहानें याचें डोकें उडविण्याचा हुकूम दिला. त्या वेळीं यानें बेदरचा किल्ला देण्याचें कबूल करून जीवदान मागितलें. तें इस्माईलास पसंत पडून तसें करण्याचें ठरविलें. यापुढेंहि यानें विजापुरच्या राजास त्रास देण्याचें काम चालू ठेविलें. पण नंतर याला पश्चात्ताप झाला. तेव्हां यानें इस्माईलशीं वैरत्व सोडून देऊन त्याच्याशीं सख्य केलें, व शेवटीं तर हा इस्माईलचा परममित्र झाला. स. १५२९ त विजापूरच्या शाहानें याच्यावर हल्ला करून अमीर बरीद याचें बहुतेक राज्य हिरावून घेतलें. मात्र बेदर व सभोंवारचा चार पांच लाखांचा मुलूख याजकडे राहिला. हा स. १५४९ त मरण पावला ( मु. रि. भा. १ पा. २४० ). याला अली बरीद नांवाचा एक मुलगा होता ( विजापूरचें आदिलशाही घराणें, मोडककृत ).

२. बेदरच्या बरीद वंशांतील खानजहानचा हा पुत्र असावा. याचा काल स. १५८९ असा आहे. याचा संशयित उल्लेख केंब्रिज हिस्टरीशिवाय इतरत्र कोठें केलेला आढळत नाहीं.

**अमीशाह ( ऊर्फ दिलावरखान घोरी )**— हा स. १३८७ मध्यें फीरूजशाह तुघ्लकाच्या अमदानींत माळव्याच्या सुभेदारीवर होता. फीरूझशाहाच्या पश्चात् दिल्लींत बरेच बखेडे माजले व गुजराथ, खानदेश जौनपूर वगैरे प्रांतांच्या सुभेदारांनीं दिल्लीच्या बादशहाची सत्ता झुगारून देऊन आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें. परंतु त्यांच्याबरोबर दिलावरखानानें मात्र आपलें स्वातंत्र्य जाहीर करण्याची घाई केली नाहीं. हा मोठा धोरणी व मुत्सद्दी होता.

स. १३९८ त तैमुरलंगानें दिल्लीवर स्वारी केली असतां मुहम्मद तुघ्लक याजकडे आश्रयास आला. उदारहृदय दिलावरखानानें त्याला सन्मानपूर्वक तीन वर्षे आपणाजवळ ठेवून घेतलें व पुढें दिल्लीवरचें अरिष्ट टळून जिकडे तिकडे स्थिरस्थावर झाल्यावर त्याला परत दिल्लीस पोंचतें केलें. या सदुचित कृत्यामुळें पुढें दिलावरखानास आपलें उद्दिष्ट साध्य करून घेण्याच्या बाबतींत दिल्लीदरबाराकडून कोणताहि अडथळा न होतां उलट मोकळीकच मिळाली. यानंतर दिलावरखानानें योग्य संधि येतांच एकदम संपूर्ण राजचिन्हें धारण करून माळव्याचा स्वतंत्र सुलतान म्हणून आपल्या नांवाची सर्वत्र ग्वाही फिरविली व आपल्या नांवानें खुद्बा पढण्याविषयीं व स्वतंत्र नाणें पाडण्याविषयीं हुकूम सोडले. अशा प्रकारें स. १४०१ मध्यें माळव्यांत स्वतंत्र सुलतानी सत्तेची स्थापना दिलावरखानाच्या हातून झाली.

दिलावरखान हा जरी धोरणी, मुत्सद्दी होता तरी याचा स्वभाव अत्यंत धिम्मा होता. हा याचा स्वभाव याचा मुलगा अलफखान म्हणजे हूशंगशाह यास बिलकूल पसंत नसल्यामुळें या बापलेकांत बेबनाव होता. त्या बेबनावाचा शेवट पुढें मुलाच्या हातून बापास विषप्रयोग होण्यांत झाला. स. १४०५ ( क्षेत्रसिंह पाहा ).

**अमृत**—एक मराठी कवि. गुरु-निरंजन. ग्रंथ-सिद्धान्तबोध ( सं. सू. ).

**अमृतचंद्रसूरि**— कुंदकुंदाचार्यांच्या समयसार ग्रंथावर यानें टीका लिहिली आहे. या टीकेचें नांव आत्मख्याती असें आहे. हा वि. सं. ९०६ त हयात होता व त्यानें खालील ग्रंथ लिहिले:—( १ ) समयसारटीका, ( २ ) प्रवचनसारटीका, ( ३ ) पंचास्तिकायटीका, ( ४ ) तत्त्वार्थसार, ( ५ ) पुरुषार्थ सिद्ध्युपाय आणि ( ६ ) तत्त्वदीपिका.

**अमृत ( चिन्मय )**—एक मराठी कवि. चिन्मय कृष्ण हें याच्या गुरूचें नांव असून तें गणेशभारतींना लावीत असत. याचा ग्रंथ-तुरजास्तवराज (श.१७१७) (सं. सू. ).

**अमृत जयानंद**—हा 'कर्मविपाक' ग्रंथाचा कर्ता होय. कर्मविपाक या नांवाचा ग्रंथ संस्कृतांत आहे. त्याचाच तर्जुमा आपण केला आहे, असें यानें स्वतःच लिहिलें आहे ( मं. अहवाल श. १८३४, पृ. ६२-६३ ).

**अमृत ( देवदास )**—पदें, अभंग वगैरे करणारा मराठी कवि ( सं. सू. ).

**अमृतदेवी**—आबूच्या परमारांपैकीं धुंधुकाची पत्नी.

**अमृतराय**—भक्तकथामृत ग्रंथांत हा औरंगाबादेचे विसामोरो ( मुत्सद्दी ) यांचा आश्रित होता, असें म्हटलें आहे. अमृतराय याचा जन्म शके १६२० व मृत्यु शके १६७५ ( स. १७५३ ) असें काव्यसंग्रहकार ओकांच्या आधारें आजगांवकर लिहितात.

मध्वमुनीश्वराकडून यानें उपदेश घेतला, अशी आख्यायिका प्रसिद्ध आहे. परंतु कुडची वीर म्हणतो कीं, यानें चैतन्यसांप्रदायांतील म्हणजे राघवचैतन्यापासून ५ वे पुरुष यशवंतराव याजपासून उपदेश घेतला होता. कुडची वीराचा अमृतराय हा आजे गुरु असल्यानें तें विश्वसनीय आहे ( म. क. च. भा. १ पा. ४७८ ).

ध्रुवचरित्रांत 'माता उमा परमशंकर तात झाला.' अशी अमृतराय स्वतःविषयीं माहिती देतो. मध्वमुनींच्या

उपदेशानें अमृतराय ईश्वरभक्तीकडे वळला, अशी आख्यायिका आहे. याचें मूळ नांव अंबाजी.

याच्या कवितांत 'श्रीगुरु मच्छनाथपर अमृतराय बलहारी' असेंहि आढळतें. शिवाय 'अमृत म्हणे तुम्हीं भजा निरंतर श्रीधरगुरुचे पाय' असाहि उल्लेख आहे. अद्वैतानंद व ब्रह्मानंद हेहि गुरु आढळतात. या गुरुत्रयीवरून अनेक अमृतराय झाले असावेत, अशी आजगांवकर शंका काढतात. औरंगाबाद येथें याची समाधि आहे ( सं. सू. ).

याचे शिष्य पुष्कळ होते. पैकीं माधव व ब्रह्मगिरी हे कवी होते. अमृतरायाचीं काव्यें:—१ गणपतिवर्णन, २ जगदंबावर्णन, ३ ध्रुवचरित्र, ४ शुकचरित्र, ५ सुदामचरित्र, ६ नारदी, ७ कृष्णचरित्र, ८ द्रौपदीवस्त्रहरण, ९ रामचंद्रवर्णन, १० कृष्णवर्णन, ११ राधावर्णन, १२ कृष्णध्यान, १३ मृत्तिकाभक्षण, १४ वत्सलाहरण, १५ रासक्रीडा, १६ कुंजवनविहार, १७ कृष्णलीला, १८ चंद्रावळी, १९ दुर्वासयात्रा २० पारिजातकाख्यान, २१ जीवदशावर्णन, २२ उपदेश, २३ पूतनावध, इ०

यांशिवाय ३४ प्रकरणें व १५० पदें छापलीं आहेत. 'दामाजीची रसद' हें काव्य याचें नसून तें याचा शिष्य ब्रह्मगिरी याचें आहे.

अमृतरायाची वर्णनशैली फार अप्रतिम आहे. सुदामचरित्रांत कृष्णाच्या अप्रतिम ऐश्वर्याचें वर्णन, द्रौपदीवस्त्रहरणांत अनेक वस्त्रांचीं नांवें व तीं मिळणाऱ्या पेठांचींहि नांवें, भोजनांतील पदार्थ, रासक्रीडेंत रागरागिण्या वगैरे पाहिल्यास वरील वाक्याचें प्रत्यंतर येईल. याची कविता कटावबद्ध असल्यानें ती वर्णनास फार साजेशी आहे. कीर्तनकार या कवितांचा फार उपयोग करतात.

**अमृतराव**—हा राघोबादादाचा दत्तक पुत्र. हा भुस्कुटे घराण्यांतून साडेतीन वर्षांचा असतांना दत्तक घेतला ( स. १७६८ मे महिना ). परंतु दत्तविधान झाल्यावर राघोबास दोन औरस पुत्र झाले ते दुसरा बाजीराव व चिमणाजीआप्पा. त्यामुळें अर्थातच अमृतरावाचा पेशवाईवरचा हक्क बुडाला.

अमृतराव बहुतेक राघोबाजवळच असे. परंतु पुढें आनंदीबाई, बाजीराव, चिमणाजी आप्पा यांना पेशव्यांच्या कैदेंत राहावें लागलें, तेव्हां त्यांच्याबरोबर हाहि कैदेंत होता.

याची पहिली बायको मे स. १८०३ त बाळंत होऊन मेली. तिच्या मृत्यूपूर्वी ता. १८-३-१८०३ रोजीं यानें दुसरें लग्न केलें. याला पहिल्या बायकोपासून स. १७९२ मध्यें विनायकराव नांवाचा मुलगा झाला.

याचें लग्न टोकें मुक्कामीं मोठ्या थाटानें राघोबानें केलें. हा नाशकाजवळ आनंदवल्ली येथें राहत होता व पुढें हा शिवनेरीस नाना फडणिसांच्या प्रतिबंधांत होता.

सवाई माधवरावाच्या मृत्यूनंतर परशुरामभाऊ पटवर्धनांनीं बाजीरावास पुण्यास नेलें. परंतु याला मात्र शिवनेरीसच ठेवलें. पुढें शिंद्याच्या दिवाणांस ही हकीगत समजली तेव्हां त्यानें याला जांवगांवास प्रतिबंधांतच ठेवलें.

सन १७९६ त बाजीरावास जेव्हां छत्रपतीकडून पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं तेव्हां यालाहि मोठा उंची पोषाख ( रु. ११८२॥≈ ) देण्यांत आला. बाजीरावानेंहि याच्या खर्चास बरेच महाल तोडून दिले. स. १७९७ सालीं नानास कैद करण्याच्या बाजीरावाच्या कटांत हाहि सामील होता. त्या सालच्या डिसेंबर महिन्यांत नानास कैद केल्यावर बाजीरावानें अमृतरावास आपला मुख्य कारभारी नेमलें व याच्या मदतीस विश्वासांतले दोन इसम दिले.

यानें राघोबाबरोबर इंग्रज सैन्याची शिस्त पाहिल्यामुळें तशी फौज तयार करण्यासाठीं यानें मि. वुइल्यम टोन नांवाचा एक युरोपियन सरदार नेमला. बाजीरावानें जर अमृतरावाशींच कायमचें सख्य ठेवून कारभार केला असता तरी त्याचें हित झालें असतें. परंतु त्यानें अमृतरावाशीं विरोध मांडला व दौलतरावाशीं सख्य केलें. पुण्यांतील लोकांकडून पैसे काढण्यास त्या वेळेस जे अत्याचार करण्यांत आले ते आपल्या भावांकडूनच करविण्यांत आले आहेत, याची कल्पनाहि अमृतरावास नव्हती. याला त्या कृत्याची फार चीड आली. इतकेंच काय, पण दौलतरावास कैद करण्याचाहि सल्ला बाजीरावानें अमृतरावास दिला. परंतु अमृतरावानें दौलतरावास तुम्हांस कैद करण्याचा बेत आहे असा स्पष्ट इषारा दिला. त्याच वर्षी घाटगे शिंद्याच्या बायका पकडण्याच्या खटपटींत असतां अमृतरावानें त्या बायांना आश्रय दिला व घाटग्याचा छापा उधळून लावला. अशा तऱ्हेनें बाजीराव आपल्या हस्तकांकरवीं अनन्वित कृत्यें करूं लागला, तेव्हां पुणें सोडून हा जुन्नर येथें राहिला.

पुढें होळकरानें आपल्या भावाच्या वधाचा सूड घेण्यासाठीं पुण्यावर चाल केली. तेव्हां बाजीराव पळून जाऊन सिंहगडास राहिला. पुणें लुटल्यावर यशवंतरावानें बाजीरावास पुण्यास आणण्याचा फार प्रयत्न केला. परंतु तो येईना. तेव्हां त्यानें अमृतरावास येण्याची विनंति केली. परंतु हा जरी आला तरी यानें गादीवर बसण्याचें नाकारलें व हा आपला दरबार तंबू ठोकून भांबुर्ड्यास भरवूं लागला. परंतु जेव्हां बाजीराव महाडास गेला तेव्हां

अमृतरावानें आपल्या मुलास गादीवर बसण्याची परवानगी दिली. परंतु दोनच महिन्यांनीं बाजीरावानें स. १८०२ त इंग्रजांशीं दोस्ती करून पेशवाई मिळविली. तेव्हां अमृतराव नाशकाकडे गेला व तिकडे यानें लुटालूट केली. यानें बाजीरावाशीं सख्य करण्याचा बराच प्रयत्न केला, पण तो व्यर्थ गेला.

पुढें हा जनरल वेलस्लीशीं आपल्या पथकासह सामील झाला व त्याकरितां याला आठ लक्ष रुपयांचें वेतन करून देण्यांत आलें. यानें काशीक्षेत्र राहण्यास पसंत करून तेथें हा जाऊन राहिला. तेथें यानें पुष्कळ दानधर्म केला; घाट व देवालयें बांधलीं; अन्नसत्रें स्थापिलीं. अमृतराव पेशव्याच्या दानधर्माचा अद्यापि काशी येथें मोठा लौकिक आहे. याचा मृत्यु ६-९-१८२४ रोजीं झाला. याच्या पश्चात् याचा मुलगा विनायकराव हा त्याच्या जहागिरीचा व अपार संपत्तीचा मालक झाला (इ. संग्रह पुस्तक ५ वें, अंक ४-६; भिऊबाई बारामतीकर पाहा).

स. १८१४ त गव्हर्नर जनरल लॉर्ड हेस्टिंग्जनें अमृतरावाची भेट घेतली; त्याची मनोरंजक हकीकत त्यानें आपल्या खाजगी रोजनिशींत लिहून ठेविली आहे. ती अशी–

'ता. ३१-८-१८१४ रोजीं अमृतराव माझ्या भेटीस आले. ते हत्ती, घोड्यांच्या स्वारीनें प्रवेशद्वारापर्यंत येऊन तेथून पुढें पालखींतून बंगल्यांत आले. त्यांच्या अंगावर भर्लीमोठीं मौल्यवान् रत्नें होतीं. लॉर्ड वेलस्लीनें मराठ्यांचें राज्य लवकर नाहींसें करण्याकरितां अमृतरावास सात लाखांची नेमणूक देऊन भावापासून फोडलें. मी अमृतरावास एक नवीन कृतीची चांगली बंदूक व विनायकरावास दोन नळी पिस्तूल नजर केले, त्याबद्दल त्यास फार संतोष वाटला.'

ता. ५ सप्टेंबर १८१४ रोजीं हेस्टिंग्जनें अमृतरावाचे वाड्यावर जाऊन यास भेट दिली. गाडीजवळ सामोरे येऊन, बागेंतच उघड्या मंडपांत बैठकीवर अमृतरावानें पाहुण्यांस नेलें. पुढील बाजूस फवाऱ्यांचीं सुंदर कारंजीं चालू असल्यामुळें मंडपाची हवा त्यास आल्हाददायक वाटली. लेडी हेस्टिंग्जनें अमृतरावच्या पत्नीची भेट आंतल्या बाजूस घेतली. अमृतरावाची एक नात सात वर्षांची असून मोठी चलाख व सुस्वरूप होती. ती धीटपणानें पुरुषांत येऊन साहेबांस भेटली, त्याबद्दल तिचें त्यास मोठें कौतुक वाटलें. हेस्टिंग्जनें रत्नाच्या ताटावरील सरपोस तेवढा घेऊन त्यानें अमृतरावाचे आभार मानले, आणि हा सरपोस तुमची आठवण माझे मनांत सदैव कायम ठेवील, असें कळविलें. उठण्यापूर्वी गुलाबपाण्याचा मृदुतुषार एकदम मंडपाचे छतांतून सर्वांचे अंगावर सुरू झाल्यामुळें मंडळास संतोष वाटला (म. रि. उत्तर वि. ३ पृ. ५३२, ६३). याचा वंश सध्यां उत्तरहिंदुस्थानांत रायबरेली येथें नांदत आहे.

२. (जत) जत संस्थानांतील यशवंतरावाचा पुत्र. हा आपल्या बापानंतर जतच्या गादीवर आला.

याला पेशव्यांनीं देशमुखी वेतन व जहागीर कायम केल्याची सनद दिली होती. हा स. १७९० त वारल्यावर याचा मुलगा कान्होजीराव गादीवर बसला.

**अमृतराव शंकर**—हा बळवंतराव मेहेंदळे याचा कारभारी होता. त्याच्या स. १७५७-५८ त झालेल्या कर्नाटकांतील उद्योगांत हा विशेष प्रसिद्धीस आला होता. हा पेशव्यांचे विश्वासांतील इसम असून, अर्काटचे नबाबाकडून खंडणी वसूल करण्याचे बाबतींत याचा संबंध मद्रासकर इंग्रजांशीं आला. जॉन स्पेन्सर (फॉरेस्ट) लिहितो, अमृतराव हा पूर्वी पेशव्याचा चिटणीस असून अलीकडे तें काम आपला भाचा गोविंद शिवराम यांजकडे सोंपवून तो आतां (स. १७९१ ?) नाना व सदोबा यांचा कारभारी होऊन मुख्य सरदाराची पदवी पावला आहे. दरबारांत याचें वजन फार आहे. मुरारराबाकडील व कर्नाटकांतील सर्व काम याच्या हातीं आहे. कारण त्या बाजूची सर्व माहिती यास चांगली आहे (म. रि. म. वि. २; पृ. ४१५-२४).

**अमृतानंद** (माधवसरस्वती)—यानें आपली परंपरा देतांना पहिलें नांव श्रीआदिनाथ विष्णूचें दिलें आहे व गुरूचें नांव अंबिका असें दिलें आहे. कटावकार अमृतरायाचे गुरु अंबिकासरस्वती होते, अशी समजूत अमृत या नामसादृश्यामुळें झालेली दिसते. याचे ग्रंथ स्वरूपनिर्णय, योगराजतिलक (ले. श. १६३०, सं. सू.).

**अमृतेश्वर**—एक मराठी ग्रंथकार. गुरु, श्रीसमर्थ. ग्रंथ–आत्मबोध, तत्त्वबत्तिशी, गणेशगीता, उपासनाप्रकरण, तत्त्वझाडा (सं. सू.).

**अमेरदास**—नानकाचा अंगदशाह नांवाचा एक शिष्य होता. त्याचाच अमेरदास हा शिष्य होय. अंगदशाहाच्या मागून गादीचा हक्क याजकडेच आला.

**अमोघवर्ष**—(स. ८१४-८७८) राष्ट्रकूट वंशांतील तिसऱ्या गोविन्दराजाचा पुत्र. यास अगदीं सहा वर्षांचा असतांनाच राज्य मिळालें. त्यामुळें राज्यकारभार अर्थात् प्रतिनिधिमंडळ नेमून त्यामार्फत चालत होता. या प्रतिनिधिमंडळाचा मुख्य कर्क सुवर्णवर्ष–याचा चुलतभाऊ–हा होता.

प्रारंभीं बराच कालपर्यंत अमोघवर्षाची कारकीर्द शांततेची झाली. परंतु लवकरच आगामी संकटांचीं चिन्हें दिसूं

लागलीं. आतांपर्यंतच्या एकंदर काळांत जणूं काय राष्ट्रकूट घराण्यांत वहिवाटच पडून गेली होती कीं, कोणताहि नवीन राजा सिंहासनावर येई तो आपसांत लढाई अगर रक्तपात वगैरे केल्याशिवाय येतच नसे. अमोघवर्षच काय तो या नियमास अपवाद होता. परंतु बालराजा सिंहासनावर आला हें पाहतांच घराण्यांतील इतर महत्त्वाकांक्षी पुरुषांना राजपदाची अभिलाषा उत्पन्न झाली. इतकेंच नव्हे, तर प्रधानमंडळांतहि दुहीचीं चिन्हें दिसूं लागलीं. अमोघवर्षाच्या पित्यानें गंगराजावर स्वारी करून त्यास आपला अंकित करून टाकलें होतें. पण गोविंदराजाच्या मृत्यूनंतर हाच गंगराजा शिरजोर होऊन सार्वभौम सत्तेचें जूं झुगारून देण्याचा विचार करूं लागला. इतर मांडलिकांनींहि त्याचेंच अनुकरण आरंभिलें. सगळीकडे बेबंदशाही माजली; व शेवटीं अमोघवर्षावर राज्यसंन्यासाची पाळी आली.

ही स्थिति सरासरी तीन चार वर्षे टिकली असावी. पण लवकरच प्रतिनिधिमंडळाचा मुख्य कर्क यानें सर्व परिस्थिति कह्यांत आणली व अमोघवर्षास पुनः राजपद प्राप्त झालें. या वेळीं याचें वय सुमारें १२।१३ वर्षांचें असावें. अर्थात् यास पुनः राज्य मिळालें, त्याचें सर्व श्रेय कर्क व इतर मुत्सद्दी यांजकडेच आहे.

यानंतर यानें लवकरच वेंगी येथील चालुक्यावर स्वारी केली व विजयादित्याचा पूर्ण पाडाव करून तें राज्य यानें आपल्या राज्यास जोडलें. चालुक्यानंतर याची दृष्टि अंग, वंग व कलिंग या देशांकडे वळली; व तेथील राजांनाहि यानें आपलें मांडलिकत्व कबूल करावयास लावलें.

दक्षिणेकडे मात्र याचें धोरण चढाईचें नव्हतें. यानें दक्षिणेकडे ज्या थोड्या स्वाऱ्या केल्या त्यांचा उद्देश नवीन मुलूख जिंकणें हा नसून केवळ आत्मरक्षण हाच होता. इतकेंच नव्हे, तर गंगवाडीच्या राजानें याची सार्वभौम सत्ता झुगारून देऊन स्वातंत्र्य पुकारलें तरी त्याचें पारिपत्य यानें केलें नाहीं. त्याचप्रमाणें गंगराजाशीं सख्यत्व कायम ठेवण्याचे याचे प्रयत्न सारखे चालूच होते. आपली मुलगी चन्द्रोबेलब्बा ही गंगराज भूतुग यास देऊन यानें या दोन घराण्यांतील सख्य दृढ करण्याचा प्रयत्न केला.

याच वेळीं अमोघवर्षावर पदच्युत होण्याचा दुसरा प्रसंग आला. इतका वेळपर्यंत गुजराथच्या राष्ट्रकूटांशीं याचें सख्य होतें. पण पुढें या दोन्ही घराण्यांत वितुष्ट येऊन लढाईचा प्रसंग आला; व अमोघवर्षास पुनः एकदां राज्यास मुकावें लागलें. पण लवकरच यानें आपल्या बंकेय नांवाच्या शूर सेनापतीच्या साहाय्यानें राज्यपद परत मिळविलें; व दोन्ही घराण्यांचा समेट झाला. या समेटास एक तात्कालिक कारणहि घडलें. दोन्ही घराण्यांत यादवी माजली आहे हें पाहून पहिला भोज यानें राष्ट्रकूटांचा पाडाव करावयाचें ठरविलें. आपल्या भांडणामुळें अशा तऱ्हेनें परकाच शिरजोर होणार हें पाहून दोन्ही राष्ट्रकूट घराण्यांनीं अपापसांत समेट केला व भोजाचा पाडाव केला.

याप्रमाणें आपली सर्व कारकीर्द धामधुमीमध्यें घालवून अमोघवर्ष स. ८८० च्या सुमारास मरण पावला. यानें सरासरी ६४ वर्षे राज्याचा उपभोग घेतला. यास कृष्ण या नांवाचा एक पुत्र व चन्द्रोबेलब्बा ही कन्या एवढींच दोन अपत्यें होतीं. याच्या मागून कृष्ण हा गादीवर आला.

अमोघवर्षाची कारकीर्द बरीच मोठी ६४ वर्षांची झाली. परंतु लष्करी दृष्टीनें पाहतां ती तितकीशी उज्ज्वल नव्हती. वेंगीच्या चालुक्याचा पराजय हें एकच काय तें नांव घेण्यासारखें असें शौर्याचें कृत्य याच्या हातून झालें. पण एकंदरींत पाहतां याच्या ठिकाणीं याच्या बापाची अगर आजाची तडफ व युद्धलालसा दिसून येत नाहीं. युद्धापेक्षां शांतता व वाङ्मयाचें परिशीलन, हेंच याला जास्त आवडे. धर्माकडे याचा ओढा विशेष होता. यानें अनेक पंडितांना आपल्या पदरीं ठेवलें होतें. नृपतुंगाचा कविराजमार्ग हा कानडींतील छंदःशास्त्रावरील ग्रंथ याच्याच कारकीर्दीत झाला.

यानें मुख्यतः जैन धर्माचा पुरस्कार केला. आदिपुराणाचा कर्ता जिनसेन हा आपणास याचा गुरु म्हणवितो. त्याचप्रमाणें गणितसारसंग्रह या महावीराचार्यानें लिहिलेल्या गणितविषयक ग्रंथांत याचा उल्लेख स्याद्वाचा पुरस्कर्ता असा केला आहे. जरी याप्रमाणें जैन धर्माकडे याचा कल विशेष होता तरी हा हिंदुधर्माचा द्वेष्टा मुळींच नव्हता. इतकेंच नव्हे तर महालक्ष्मीचा हा निःसीम भक्त होता. एका प्रसंगीं विपत्तिनिवारणार्थ यानें आपलें बोटहि महालक्ष्मीस समर्पण केल्याचा उल्लेख आहे.

याला आपल्या कारकीर्दीत अनेक संकटें भोगावीं लागलीं. सिंहासन सोडून पळून जाण्याचा प्रसंग याच्यावर एकंदर तीन वेळा आला. शेवटच्या प्रसंगीं तर प्रत्यक्ष याचा मुलगा कृष्ण हा याच्या विरुद्ध बंडांत सामील होता. त्यामुळें सांसारिक गोष्टींसंबंधीं याचें मन उदासीन होऊं लागलें व धर्मावर याची विशेष श्रद्धा बसली. शेवटीं शेवटीं तर यानें राज्यपद नांवालाच आपल्याकडे ठेवलें होतें. वास्तविक राज्यकारभार युवराज कृष्ण हाच पाहत असे (राष्ट्रकूट, पान ७१-८९).

राज्यत्यागानंतर यानें प्रश्नोत्तरमालिका नांवाचा ग्रंथ लिहिला, असें दिगंबरपंथी जैन म्हणतात.

याला शर्व असें नांव होतें. हा बापाच्या पश्चात् गादीवर आला. नवसारीच्या शिलालेखांत याला वल्लभ असें म्हटलें आहे व राजांचा राजा असें उल्लेखिलें आहे. यानें चालुक्यांचें राज्य जाळलें. याच्या कारकीर्दीत मान्यखेट ( मालखेड, निजामस्टेट ) हें शहर अतिशय भरभराटीस असून तीं याची राजधानी होती. कान्हेरी शिलालेखावरून कोंकण प्रांत याचे अमलाखालीं होता, असें दिसतें. हा जैनधर्माचा भोक्ता होता, असें गुणभद्राच्या उत्तर-पुराणावरून दिसतें. याचा देवळी येथील शिलालेखांत नृपतुंग असा उल्लेख आढळतो व यानें मान्यखेट म्हणजे मालखेड शहर स्थापिलें, असें म्हटलें आहे.

याला महाराजषंड व अतिशयधवल अशींहि नांवें होतीं. शिवाय याच्या अनेक पदव्या होत्या. याला लत्तालूर-पुरपरमेश्वर अशा अनेक शब्दांनीं गौरविलें आहे. लत्तलूर म्हणजे लातूर होय. लातूर हें उस्मानाबाद जिल्ह्यांतील लातूर तालुक्याचें मुख्य ठिकाण होय. सूडीच्या लेखावरून पश्चिम गंगराजांनीं दिलेल्या दानपत्रावरून याला अब्ब लब्बे नांवाची मुलगी होती, असें ध्वनित होतें.

शिरूरच्या लेखांत असें म्हटलें आहे कीं, अंग, वंग, मगध, मालव व वेंगी येथील राजे याच्या सेवेला होते. परंतु ही अतिप्रशंसाच दिसते. तरी पण याच्या वेळेस सारखीं युद्धें मात्र चाललीं होतीं.

अमोघवर्षाच्या वेळची बरीच माहिती देणारे शिलालेख, ताम्रपट वगैरे उपलब्ध आहेत. अतिशय म्हातारपणामुळें यानें राज्यत्याग केला व आपला मुलगा दुसरा कृष्ण यास गादी दिली.

२. मालखेडच्या राष्ट्रकूट वंशांतील तिसऱ्या इन्द्राचा पुत्र. फ्लीटच्या मतें याला राज्यपद प्राप्त झालें नव्हतें. पण देवळी व कऱ्हाड येथील शिलालेखांवरून यानें राज्य केलें असावें, हें स्पष्ट दिसतें. याच्या मागून राज्यावर आलेल्या गोविन्दराजाचें सांगली येथील कोरविलेल्या शिलालेखांत नांव आढळत नाहीं. पण याचें कारण त्या दोघांमधील वैर हेंच असावें.

अमोघवर्षास राज्यपद फार कालपर्यंत लाभलें नाहीं. राज्यावर आल्यापासून एका वर्षाच्या आंतच हा मरण पावला. याच्या मागून त्याचा धाकटा भाऊ गोविन्दराज चवथा हा गादीवर आला ( राष्ट्रकूट, पान १०५-१०६ ). यानें चेर राजाचा पराभव केला होता ( इंडि. अँटि. व्हा. १६ पा. ३३२; भांडारकर पा. २८२, २८८, २९६, ३०९).

३. हा जगत्तुंगाचा पुत्र. हा चवथ्या गोविंदानंतर गादीवर बसला. याला बद्दिग असें म्हणत.

४. राष्ट्रकूट घराण्यांतील निरुपमाचा पुत्र. याला कक्कल, कारक इत्यादि नांवें होतीं ( भांडार. पा. १०८-११९ ).

**अयसिअ कुमुसअ**—हा मथुरेच्या पहिल्या राजुल क्षत्रपाचा सासरा. याच्या मुलीचें नांव नदसी अकसा ( नदसी अकसा पाहा ).

**अयाम**—हा नहपान क्षत्रपाचा मुख्य प्रधान. हा ब्राह्मण असून याचें गोत्र वत्स होतें. याचा उल्लेख जुन्नर येथील शिलालेखांत सांपडतो. त्या ठिकाणीं नहपानाच्या आज्ञेनें यानें एक दिवाणखाना व पाणी पिण्याकरितां टाकें बांधलें ( जुन्नरशिलालेख नं. २५ ).

**अयीन उद्दीन** ( शेख )—हा एक विजापूरचा रहिवाशी होता. यानें मुल्हिकत आणि किताब-उल-अन्वर हे ग्रंथ रचिले. याच्या ग्रंथांत मुसल्मानी सर्व साधूंचीं चरित्रें आलीं आहेत. हा सुलतान अलाउद्दीन हसन बहामनी याच्या कारकीर्दीत उदयास आला.

**अयीन-उल्-मुल्क** ( ख्वाजा )—हा दिल्लीचा सुलतान मुहंमदशाह तुघलख आणि फीरूझशाह बारबक यांच्या पदरचा एक प्रख्यात सरदार होता. यानें बरेच ग्रंथ लिहिले आहेत. त्यांपैकीं तरसील-अयीन-उल्-मुल्क हा एक होय. सुलतान अलाउद्दीन शिकंदर सानी ( १२९६-१३१६ ) यानें संपादिलेल्या विजयाचा इतिहास ज्यांत आहे, तो फतहनामा ग्रंथ यानेंच लिहिला असावा.

**अय्यण**—पश्चिम चालुक्यांपैकीं तिसऱ्या विक्रमादित्या-नंतरचा राजा.

फ्लीटच्या मतें हा दुसऱ्या भीमाचा मुलगा होय. यानें राष्ट्रकूट राजा दुसऱ्या कृष्णाच्या मुलीशीं लग्न लाविलें. याला विक्रमादित्य चवथा या नांवाचा एक मुलगा होता. याचा काल स. ८७७-९१३ असा आहे.

२. हा कल्याणीच्या पश्चिम चालुक्य घराण्यांतील यशोवर्मन् अथवा दशवर्मन् याचा मुलगा होय. याच्या आईचें नांव भाग्यवती असें होतें. याचा काल स. १०१४-१५ च्या सुमारास आहे.

३. मालखेडच्या राष्ट्रकूटांपैकीं दुसऱ्या कृष्णाचा मुलगा. पश्चिम चालुक्याच्या घराण्यांत दिलेली कृष्णनन्दना ही याची मुलगी.

**अय्यल राजु रामभद्र**—हा नियोगी ब्राह्मण कडाप्पा प्रांतांतील वोंटिमिट्टा येथील राहणारा होय. हें गांव

प्रसिद्ध आहे. कारण तेलगू भागवताचा कर्ता बम्मन पोतराज याची ही जन्मभूमि होय.

हा वैष्णव होता. यानें लहानपणीं वीरराघवस्वामी नामक देवावर रघुवीरशतक नामक शतक रचिलें. याला विजयनगरच्या कृष्णरायानें सकलकथासारसंग्रह ग्रंथाचें तेलगू कविताबद्ध भाषांतर करण्यास सांगितलें. परंतु तें पूर्ण होण्यापूर्वींच कृष्णराय मरण पावला. त्याचा उल्लेख यानें काव्याच्या प्रस्तावनेंत केला आहे. श्रीराम, पुरूरवा वगैरेंची माहिती त्यानें वरील ग्रंथांत दिली आहे. हें काव्य यानें स. १५३० मध्यें लिहिण्यास सुरवात केली असावी, असें वाटतें. याला सुमारें १२ अपत्यें होतीं. हा फार गरीब होता ( तेलगूवाङ्मय पा. ३२ ).

**अय्या दीक्षित**—हा अप्पय दीक्षितांचा पुतण्या होय. यास सर्व शास्त्रांतील थोडें थोडें ज्ञान होतें. आपल्या बुद्धिचातुर्यानें हा मदुरेच्या राजाचा (तिरुपति मल्लनायकचा) प्रधान झाला.

यानें ' नीलकंठविजय ' नांवाचा एक चंपु रचिला आहे व त्यांत नाना देशांचें वर्णन संवादरूपानें लिहिलें आहे.

**अय्याशास्त्री**—रामशास्त्री प्रभुणे यांच्यामागून हा पुण्याचा न्यायाधीश झाला. हा सवाईमाधवरावाच्या कारकीर्दीत फार प्रसिद्धीस आला. ग्रामण्याचा निवाडा करण्याचें काम याच्याकडे पुष्कळ वेळां सोंपविण्यांत आलें होतें.

हा द्रविड ब्राह्मण होता. श्रावणमासीं दक्षिणा देण्यासाठीं रमण्याच्या एका दरवाजावर हा बसत असे. हा मान फक्त कांहीं थोड्या थोर व्यक्तींनाच मिळत असे.

**अरिकुलकेसरी**—हा चोल घराण्यांतील पहिल्या परान्तकाचा पुत्र. हा बापाच्या व भाऊ अरिंजय याच्या कारकीर्दींत सेनापति असे.

**अरिकेसरी**—हा चालुक्य घराण्यापैकीं धारवाड प्रांतांतील जोल येथें राज्य करणाऱ्या घराण्यांतील युद्धमल्लाचा पुत्र. असा उल्लेख पंपानें लिहिलेल्या कानडी भारतांत आहे. याचा काल शके ८६३ असावा. त्यांत खालील वंशावळ आढळते.

युद्धमल्ल–अरिकेसरीन्–नरसिंह–दुग्धमल्ल–बडीग–युद्धमल्ल–नरसिंह–अरिकेसरीन् (Bhand. A. 110).

२. हा ठाण्याच्या शिलाहारांपैकीं वज्जडानंतर गादीवर आला. वज्जड हा याचा थोरला भाऊ होता. याचा एक ताम्रलेख सांपडला आहे ( ठाणा ताम्रपट ). हा ताम्रलेख स. १०१७ मधला आहे. याच्या वेळीं भोज परमारानें याचा पराभव केला असें त्याच्या एका स. १०२० मधल्या दानलेखावरून दिसतें ( एपि.इंडि. ११ पा.८१ ). याचा उत्तराधिकारी वज्जडाचा पुत्र छित्तराज याचा एक लेख स. १०२८ मधील सांपडला आहे ( भांडुपलेख, एपि. इंडि. ५ पा. २७७ ), त्यावरून हा स. १०१५-१०२५-पर्यंत राज्य करीत असावा असें दिसतें ( हिं. भा. अ. पा. ३६४ ).

३. यालाच लोक केशिदेव म्हणतात. नवसाहसांकचरितांत वर्णिलेला शशिखंडाचा पिता शिखण्डकेतु व हा एकच असावा.

**अरिमर्दन**—हा पांड्याच्या एका शाखेंतील राजा. याचा उल्लेख कुलेशनंतर आला आहे. याचा प्रधान माणिक्य हा फार विद्वान् आणि शैवपंथी होता. याच्या वेळीं जैनांच्या छळास सुरवात झाली.

**अरियारुक**—पंजाबचा एक तुर्की अधिकारी.स.१०३० चे सुमारास महमूद गझनवीनें अरियारुक यास पंजाब प्रांताच्या राज्यकारभारावर नेमिलें होतें. महमूदचा मुलगा मसूद गादीवर आल्यावर दरबारांत अरियारुक जुलमी व पैसेखाऊ आहे, असा बोभाटा झाल्यामुळें मसूदनें यास गझनीस येण्याचा हुकूम पाठविला. पंजाबांत याची सत्ता इतकी दृढमूल झाली होती कीं, अरियारुक मसूदचा हुकूम पाळील अशी कल्पना नव्हती. तरीहि हा बरोबर मोठें हिंदी सैन्य घेऊन बाल्खला गेला व दरबाऱ्यांशीं संधानें बांधून राज्यकारभाराची होणारी चौकशी यानें तहकूब करून घेण्याचा प्रयत्न केला. याच्या वाईटावर असणाऱ्या कांहीं दरबाऱ्यांनीं हा दारू पिऊन झिंगला असतां यास बोलावून मसूदला चौकशी करण्यास उद्युक्त केलें. बेभान असतांहि कांकूं करीत हा हजर झाला. तेव्हां यास विचारलेल्या प्रश्नांचीं उडवउडवीचीं उत्तरें दिल्यामुळें मसूदनें कैद करण्याचा हुकूम केला. यास कैद झाल्याचें वर्तमान कळलें, तेव्हां हिंदी सैन्य बिथरलें व त्यांनीं अरियारुकला सोडविण्याचा प्रयत्न केला. तेव्हां त्यास धमकी देऊन व सुभेदार बदलला तरी त्याचें नुकसान होणार नाहीं, असें आश्वासन देऊन गप्प करण्यांत आलें. अरियारुकचा खजिना व कागदपत्र जप्त करण्यांत आलें. कागदपत्रांत हिशेबाच्या वह्या होत्या, त्यांवरून याच्या गुन्ह्याची शाबिती झाली. तेव्हां यास घोरला रवाना करून याचा वध करण्यांत आला.

**अरिष्टनेमि**—जैनांचा बाविसावा तीर्थंकर ( तीर्थंकर पाहा ).

**अरिसिंह**—हा सीसोदे येथील राणा शाखेपैकीं लक्ष्मसिंहाचा ज्येष्ठ पुत्र. हा चितोडच्या लढाईत अला उद्दीन खिलजीच्या लोकांकडून मारला गेला.

हा एकदां शिकारीस गेला असतां एक डुक्कर जखमी होऊन एका शेतांत शिरलें. हा शेतांत शिरूं लागला तेव्हां शेताची राखण करणाऱ्या एका मुलीनें याला सांगितलें कीं, शेतांत शिरून पिकाचा नास व्हायला नको. मीच डुक्कर बाहेर पिटाळतें. असें म्हणून तिनें हातांत काठी घेऊन शेतांतून डुक्कर बाहेर काढला. तेव्हां तिच्या धैर्याबद्दल याला आश्चर्य वाटलें. पुढें हा झाडाखालीं विश्रांति घेत बसला असतां तिच्या गोफणीच्या दगडानें याच्या मित्राच्या घोड्याचा पाय तुटला. पुढें ती दुधाची घागर व दोन म्हशींचीं पारडें घेऊन जातांना यानें पाहिलीं. तेव्हां याला तिच्या शक्तीचें कौतुक वाटलें. तिची जात विचारतां ती चंदाणे रजपूत आहे, असें कळलें. तेव्हां सहजच तिचा जो पुत्र होईल तो किती बलवान् होईल, याबद्दल याच्या मनांत विचार आला व याच्या मनांत तिच्याशीं लग्न करावें, असें आलें. तिच्या बापाची संमति खुषीनें मिळाली. लग्न केलें, पण पित्याच्या भीतीनें त्याला कळविलें नाहीं. शिकारीच्या मिषानें ऊनवां गांवीं हा तिच्यासह राही. तेथें तिला हंमीर नांवाचा मुलगा झाला (१ हंमीर पाहा).

**२.** लावण्यसिंह अगर लवणसिंह याचा हा मुलगा. याचा आश्रयदाता जैनमंत्री वस्तुपाल हा होता. त्याच्या सन्मानार्थ यानें सुकृत-संकीर्तन नांवाचा ग्रंथ लिहिला. हा वस्तुपाल, धोलक्याचा राणा वीरधवल आणि त्याचा मुलगा वीसलदेव या तिघांचाहि प्रधान होता. बालभारत, काव्यकल्पलता व पद्मानंद इ. ग्रंथांचा हा कर्ता होय. अमरपंडित हा अरिसिंहाचा समकालीन होता आणि अमरचंद्राचाहि हा सहाध्यायी होता. यानें अमरचंद्राला पुस्तकें लिहिण्याच्या कामीं मदत केली, असें दिसतें. अरिसिंहानें कवितारहस्य नांवाचें अलंकारशास्त्रावरील छोटें पुस्तक लिहिलें.

**३.** (स. ११२७) हा विजयसिंहानंतर मेवाडच्या गादीवर आला. याच्यानंतर चोडसिंह आला.

**४.** उदेपूरचा राणा महाराणा राजसिंह हा निपुत्रिक मरण पावल्यामुळें त्याच्या कारभारी मंडळांत गादी कोणास द्यावी याबद्दल बराच वादविवाद होऊन, अखेर दुसऱ्या जगतसिंहाचा मुलगा अरिसिंह यास गादी देण्याचें ठरवून, याला तारीख ३ एप्रिल स. १७६१ त राज्याभिषेक झाला.

ह्याच्याविरुद्ध असलेल्या सरदारांनीं याला राज्यच्युत करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण कांहीं फायदा झाला नाहीं. याला लालसिंहानें अतिशय त्रास दिला. याचा एक सरदार नाथसिंह यास लालसिंहानें ठार मारलें. यानें आपला एक हितचिंतक सालुंबरचा रावत जोधसिंह यास विष देऊन ठार केलें. ह्याच्या राज्यांत एकी नसल्यामुळें याचें अत्यंत नुकसान झालें.

बाजीरावानें बसविलेली खंडणी घेण्याच्या उद्देशानें होळकरानें उदेपूरवर स्वारी करून ५१ लक्ष रुपये नेले. याच वर्षी राज्यांत मोठा दुष्काळ पडून धारण रुपयास पाऊण शेर झाली (स. १७६३).

पुढें लवकरच चार वर्षांनीं भाऊबंदी कलह माजून राज्यांत आपसांत लढाया सुरू झाल्या. याचें मूळ कारण कांहीं समजत नाहीं. परंतु याच्या उद्दाम वर्तनानेंच अशी स्थिति निर्माण झाली व दोनतीन ठाकूर सरदार खेरीज करून बाकीच्या सर्वांनीं याचा पुत्र रत्नसिंहास राणा करून यास पदच्युत करण्याचा विचार केला. त्यांनीं १। कोट रुपये बक्षीस लावलें व शिंद्यांची मदत मागितली.

राण्यानेंहि प्रतिपक्ष्याच्या कडेकोट तयारीस न जुमानतां शत्रूच्या छावणीवर हल्ला करून त्यांची दाणादाण केली व उज्जनीच्या दरवाजापर्यंत लोकांस पिटाळून लावलें. परंतु शत्रूकडील पक्षानें पुन: राण्याच्या लूट मिळविणाऱ्या सैन्यावर हल्ला केला व त्यांना उदेपूरला जाणें भाग पाडलें. पुढें शत्रुपक्षानें महादजीच्या मदतीनें उदेपुरास वेढा दिला. यानें अमरचंद नांवाच्या हुशार माणसाच्या साहाय्यानें वेढा सहा महिनेपर्यंत लांबविला. शेवटीं ६३॥ लाख रुपये घेऊन महादजी शिंद्याला हा वेढा कसातरी उठविणें भाग पडलें. पैकीं कांहीं रक्कम रोख मिळाली व कांहींचे बद्दल मुलूख तारण मिळाला. तो तसाच शिंद्यांनीं पुढें बळकावला. शिंद्यानें अशा तऱ्हेनें तोतयाचा पक्ष सोडतांच सर्व ठाकूर पुनः राण्यास येऊन मिळाले; व तोतयाच्या खुळाचा समूळ नायनाट झाला (स. १७६९ जुलै २१).

ह्याच्या वेळच्या सांपडलेल्या शिलालेखावरून याची तत्कालीन माहिती मिळते. याची राजनीति चांगली नव्हती. ज्याच्यावर विश्वास ठेवावयास पाहिजे त्यावर हा विश्वास ठेवीत नसे व भलत्यावरच विश्वास ठेवित असे. याचे स्वामिभक्त असे थोडेच सरदार होते. हा एककल्ली असल्यामुळें प्रजा असंतुष्ट बनली.

याच्या राज्यांत जास्त गोंधळ जर कशामुळें माजला असेल तर लालसिंह आणि अजितसिंह ह्या दोन पुरुषांमुळेंच होय. अजितसिंहाच्या गांवावर राण्यानें स्वारी करून त्याला त्या गांवांतून जाण्यास सांगितलें पण अजितसिंह गेला नाहीं. त्याचा विरोध शेवटपर्यंत वाढतच गेला.

महाराणा अरिसिंह हा फार शूर, अभिमानी पण कठोर हृदयाचा होता. अदूरदर्शी असल्यामुळें याला राज्य चालवितां आलें नाहीं. यानें आपल्या सरदारांना कठोर भाषण बोलून नाराज केलें. कांहीं स्वामिभक्त सरदारांचा नाश केला; यामुळें घरांत जास्त कलह झाल्यानें याच्या शत्रूस जास्त फावलें.

हा स्वतः कवि असून यानें रसिकचमन नामक हिंदी ( उर्दू मिश्रित ) काव्य केलें ( देवीप्रसादकृत राजरसनामृत पृ. १८ ). यानें कांहीं कविहि आपल्या आश्रयाला ठेवले होते.

हा शिकारीचा शोकी असल्यामुळें यानें राज्यकारभारापेक्षां जवळ जवळ निम्में लक्ष तिकडेच दिलें. शेवटीं बुंदीच्या अजितसिंहानें यास शरण आल्यासारखें करून सांगितलें कीं, मी तुम्हांला एका डुकराची शिकार दाखवितों; त्यावर हा फसला व यास बरेंच लांब नेल्यावर त्यानें याच्या छातींत बर्ची खुपसून याला ठार मारिलें ( ता. ६ मार्च स. १७७३).

याला आठ राण्या होत्या. त्यांच्यापासून याला दोन मुलगे हंमीरसिंह व भीमसिंह आणि दोन मुली चंद्रकुंवर व अनूपकुंवर ह्या झाल्या ( राजपुतानेका इतिहास पा. ९५६–९७६ ).

**आरिंजय**—( स. ९६५ सुमार ) हा चोल घराण्यांतील पहिल्या परान्तकाचा पुत्र. याला अर्जुन मधुरकोंड राजकेसरी म्हणत. याचा पुत्र दुसरा परान्तक किंवा सुंदर परकेसरी होय.

गंडरादित्याचा मुलगा अल्पवयी असल्यानें हा थोडे दिवस गादीवर होता. याची लढण्याबद्दल ख्याति होती. याची पत्नी कोदुंबालुर राजकन्या होती. याच्या राज्यांत पांड्यांनीं बंड केलें होतें.

**अरुण गिरिनाथ डिण्डिम**—हा संस्कृत कवि होता. याची सार्वभौम कवि म्हणून प्रसिद्धी होती. यानें सोवल्लीयोगानंद नांवाचें प्रहसन लिहिलें.

**अरुणदत्त**—वाग्भटाचा टीकाकार. हा सनाच्या तेराव्या शतकाच्या पहिल्या पंचवीस वर्षांत झाला.

**अरुणाश्व**—( १ अर्जुन पाहा ).

**अर्कलीखान जलालउद्दीन फीरूझ खल्जी**—

ज्या मलिक जलालुद्दीन फीरूझ खल्जीनें आपल्या घराण्यास राजवंशाचें महनीय स्थान प्राप्त करून दिलें, त्या प्रेमळ, विनयशील व शांत स्वभावाच्या थोर राजपुरुषाचा अर्कलीखान हा मुलगा. बापाच्या मागें हाच दिल्लीच्या मुसलमानी साम्राज्याचा सुलतान व्हावयाचा. सन १२९२ मध्यें सुलतान फीरूझनें आपल्या मागें अर्कलीखानासच सुलतानपदाचा मान मिळावा अशी आपली इच्छा असल्याचें जाहीर केलें होतें. स्वतः अर्कलीखान कर्तबगार व यशस्वी सेनानी होता. झझ्झूखान, हातिमखान वगैरे असंतुष्ट तुर्की सरदारांनीं सन १२९१ मध्यें राज्यक्रांतीचे हेतूनें बंड केलें होतें, तें अर्कलीखानानेंच बंडखोरांचा पराभव करून मोडिलें. सन १२९२ मध्यें एक लाख मोंगल लोकांनीं पंजाबावर स्वारी केली. तेव्हां या प्रचंड टोळधाडीचा पुरा मोड करण्याचे कामींहि अर्कलीखानाचे पराक्रमाचा विशेष उपयोग झाला होता. तरीहि सुलतान होण्याचें याचे नशीबीं नव्हतें. अर्कलीखानास दोन चुलत भाऊ होते त्यांपैकीं अला उद्दीन खल्जी हा पराक्रमी व कर्तबगार पण विश्वासघातकी होता. अर्कलीखानाचे वडील जलालुद्दीन फीरूझशाहाचें अला उद्दीनावर पुत्रवत् प्रेम असल्यामुळें अधिकाराचे जागेवर त्याची नेमणूक करून त्याचे महत्त्वाकांक्षेस योग्य अशी संधि देण्यांत आली. त्या संधीचा उपयोग विश्वासघातानें चुलत्याचा खून करून त्या सुलतानपदाचा अपहार करण्याकडे त्यानें केला. त्यामुळें अर्कलीखानास सुलतानपद मिळालें नाहीं ( अला उद्दीन पाहा ). जलालुद्दीनाचा माणिकपूरजवळ स. १२९६मध्यें खून झाला. तेव्हां अर्कलीखान मुलतानला होता. बहुतेक सुभेदार व सरदार अर्कलीखानाचे पक्षास अनुकूल होते. त्यामुळें अला उद्दीनास एकदम दिल्लीस जाऊन तख्त हस्तगत करणें शक्य नव्हतें. त्यामुळें दिल्लीवर स्वारी करावी कां बंगालमध्यें जाऊन योग्य संधीची वाट पाहावी, असा त्यास विचार पडला होता. अशा संधींत जलालुद्दीनाचे विधवा राणीनें मूर्खपणा केल्यामुळें त्याचा मार्ग मोकळा झाला. पित्यानें अर्कलीखानास आपल्यामागें सुलतानपद देण्याचें जाहीर केलें होतें; तरी त्याचा खून झाला तेव्हां यास दिल्लीस बोलावून किंवा हा येण्याची वाट पाहून यासच तक्तावर बसविण्याऐवजीं राणीनें तक्त मोकळें राहतां कामा नये, अशा विचारानें सुलतान मारला गेल्याची बातमी समजतांच रुक्नउद्दीन इब्राहिम या अर्कलीखानाचे धाकट्या भावास राजपदाधिष्ठित केल्याचें जाहीर केलें. अर्कलीखानास दिल्लीस जाऊन आपल्या भावाकडून राजपद हिसकाऊन घेणें बरें वाटलें नाहीं म्हणून हा मुलतानला तसाच चरफडत राहिला व तिकडे दिल्लीस तेथील सरदार याच्या धाकट्या भावाला मान्य करीनात. या फाटाफुटीमुळें अला उद्दीनास दिल्लीवर चालून जाण्याचें धाडस करतां आलें. दक्षिणेंतून आलेल्या लुटीमुळें पैशाची खैरात करून लोकप्रियता संपादन करण्याची त्यास अनुकूलता होती. दिल्लीचे स्वारीचे वेळीं प्रत्येक मुक्कामाचे गांवीं पुढें

माणसें पाठवून मुक्कामाचे गांवीं त्यानें सोन्याची खैरात केली. अला उद्दीनाजवळच्या सोन्याच्या साठ्यांतून बक्षिसी मिळविण्याचे आशेनें दिल्लीस पोहोंचते वेळीं अनेक सरदार त्याचे पक्षास येऊन मिळाले. ६०००० घोडदळ व ६०००० पायदळ सैन्यानिशीं अला उद्दीन दिल्लीस पोहोंचला तेव्हां त्याचा इब्राहिमशिवाय कोणींहि प्रतिकार केला नाहीं व विशेष त्रास न पडतां दिल्लीचें सुलतानपद त्यास प्राप्त झालें. सुलतान झाल्यावर अला उद्दीनानें उलूघखान आणि हिजबरुद्दीन या दोघा सरदारांबरोबर ४०००० सैन्य देऊन मुलतानवर स्वारी करून अर्कलीखान, इब्राहिम व त्यांची आई यांस पकडून आणण्याकरितां पाठविलें. शहर एकदम कावीज झालें व राजघराण्यांतील अर्कलीखान, रुक्नुद्दीन इब्राहिम, त्यांची आई व त्यांचे मदतनीस सर्व उलूघखानाचे हातीं लागले. राजाज्ञेस अनुसरून या राजपुत्रांचे, यांच्या आईचे व यांजबरोबर मोंगल सरदार उलूघखान व अहमद चाप यांचे डोळे काढून उलूघखानानें त्यांस आंधळे केलें ( कें. हि. ).

**अर्चत**—स. १४०९ मध्यें होऊन गेलेला षड्दर्शनसमुच्चयवृत्ति या ग्रंथाचा कर्ता सुप्रसिद्ध जैनधर्मी गुणरत्नसूरि, यानें अर्चताच्या तर्कटीका या ग्रंथाचा उल्लेख केला आहे. तसेंच स० ११८१ त होऊन गेलेला स्याद्वादरत्नाकरावतारिका या ग्रंथाचा कर्ता जैन तत्त्वज्ञ रत्नप्रभसूरि यानेंहि अर्चताचा निर्देश केला आहे [ अर्चतचर्चचतुरःपुनराह । इह प्रेक्षावतां प्रवृत्तिः प्रयोजनवत्तयाव्याप्ता... । स्याद्वदारत्नाकरावतारिका] ( Chap. I, p. 17 बनारसच्या जैन यशोविजय ग्रंथमालेंत प्रसिद्ध झालेली प्रत ). जैन न्यायावतारविवृत्तिवरून असें दिसून येतें कीं, अर्चतानें स० ८४७ च्या सुमारास होऊन गेलेल्या धर्मोत्तराचार्यावर टीका केलेली आहे असें कलकत्त्याच्या इंडियन रिसर्च सोसायटीनें प्रसिद्ध केलेल्या प्रतीवरून दिसून येतें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे हा सनाच्या ९ व्या शतकांत होऊन गेला.

अर्चतानें हेतुबिंदुविवरण नांवाची धर्मकीर्तीच्या हेतुबिंदु या ग्रंथावर टीका लिहिली आहे. या टीकेचें तिबेटी नांव Gtautshigs-thigs-pahi-hgrel-wa असें आहे. मूळ संस्कृत प्रत उपलब्ध नाहीं. परंतु तिबेटी भाषांतर मात्र उपलब्ध आहे ( Bstan-hgyur, Mdo, She, Folios 205-375 ). या टीकेचे ४ भाग आहेत. टीकेच्या सुरवातीस अर्चत हा ब्राह्मण असून शेवटीं हा काश्मीरचा रहिवाशी होता असें दिलें आहे ( हिस्ट्री ऑफ इंडियन लॉजिक, पा. ३३१-३३२ ).

**अर्जुन** ( अथवा **अरुणाश्व** )—ठाणेश्वरच्या हर्षवर्धनाचा हा एक प्रधान ( सेनापति ) होय.

स. ६४७-८ च्या सुमारास हर्षवर्धन मेल्यावर यानें ठाणेश्वरचें राज्य बळकाविलें. त्या वेळीं वँगहुएन्सु हा चिनी वकील आपल्या परिवारासह हर्षवर्धनाकडे येत असतां अर्जुनानें त्याला लुटलें, तेव्हां तो पळून तिबेटांत गेला. आणि तिबेटचा राजा स्रोंग-बत्संगमपो ( Srong btsan-sgm-po ) याचें साहाय्य घेऊन त्यानें याचा पराभव केला व यास कैद करून नेलें. अशा प्रकारें ठाणेश्वरच्या राज्याचा निकाल लागला ( B ). याला हर्षवर्धनाचा बौद्ध धर्माचा अभिमान सहन होत नसे, कारण हा वैदिक धर्माचा अभिमानी होता.

२. हा यादव घराण्यांतील विसुर्गानंतर गादीवर बसला.

३. माळवा प्रान्ताचा एक राजा. याचा देवगिरीच्या यादव घराण्यांतील जैत्रपालपुत्र सिंघणानें पराजय केला Bhand.P.150; जल्हणकृत सूक्तिमुक्तावलीची प्रस्तावना.

**अर्जुनदेव**—हा वाघेल वंशांतील वीसलनंतर गादीवर आला. हा वीसलचा थोरला भाऊ प्रतापमल्ल नांवाचा होता त्याचा पुत्र. यानें निःशंकमल्ल अशी पदवी धारण केली होती. सिरोही राज्यांतील अजारी गांवीं गोपाळजीच्या मंदिरांतील फर्शीवर वि. सं. १३२० ( स. १२६३ ) चा याचा एक शिलालेख आहे. त्यावरून दिसून येतें कीं याच्या वेळपर्यंत आबूचे परमार याच्या ताब्यांत होते. यानें वि. सं. १३१८-१३३१ ( स. १२६१-१२७४ ) पर्यंत राज्य केलें. याला रामदेव आणि सारंगदेव असे दोन पुत्र होते ( राजपुतानेका इतिहास पा. २२३ ).

**अर्जुन मधुरकोंड**—( अरिंजय पाहा).

**अर्जुनमल्ल**—हा पांचवा शीख गुरु होय याला अर्जुन असेंहि म्हणत. चवथा शीख गुरु रामदास यानें आपल्या पहिल्यां दोन मुलांच्या दुर्वर्तनामुळें आपला तिसरा मुलगा अर्जुन यास वारस केलें. परंतु अर्जुनानें आपल्या थोरल्या भावास गादीच्या वारसानें बांधावयाचें जें पागोटें असतें तें खुशाल निमूटपणें दिलें. तेव्हां ही गोष्ट शीखांना न आवडून त्यांनीं अर्जुनास आपल्या हक्काची जाणीव उत्पन्न करून दिली.

अर्जुनानेंच आदिग्रंथाची रचना केली. त्यांत पूर्वी होऊन गेलेल्या गुरूंचे लेख गोविले. यामुळें यानें गुन्हा केला असा याच्यावर आरोप येऊन याला पकडण्यांत आलें. परंतु परमतसहिष्णु अकबरानें याला दोषमुक्त केलें.

पुढें जहांगीरच्या वेळीं त्याचा मुलगा खुस्रव याला पळून जाण्यास मदत केली असा याच्यावर दोष ठेवून याची

सर्व संपत्ति जप्त करण्यांत आली. व याला मरेपर्यंत तुरुं-गांत ठेवून याचे हालहाल करण्यांत आले.

राजपुत्र खुस्रव हा मोठ्या संकटांत सांपडला म्हणून त्यानें गुरु अर्जुन याजपाशीं भिक्षेची याचना केल्यावरून अर्जुनानें त्याला पांच हजार रुपये दिले. हें जहांगिरला कळल्या-वर व गुरूचें अभिमानाचें उत्तर ऐकल्यावरून त्यानें गुरूला दोन लाख रुपये दंड केला. तो देण्याचें साफ नाकारल्या-वरून अर्जुनाचा पांच दिवस हाल करून जीव घेण्यांत आला ( स. १६०६ ).

तरवारीच्या जोराशिवाय आपला पंथ टिकणार नाहीं हें जाणून यानें आपला मुलगा हरगोविंद याला मरतांना सशस्त्र गादीवर बसण्याचा व शक्य तेवढें सैन्य ठेवण्याचा उपदेश केला. या उपदेशामुळेंच शीखांच्या इतिहासाला निराळें वळण लागलें.

आतांपर्यंत शीखधर्म हा केवळ धार्मिक पंथ गणला जात असे. परंतु यापुढें मुसलमानांचा कट्टा द्वेष्टा व रणशूर असा प्रमुख पंथ म्हणून पुढें आला.

**अर्जुनमिश्र**—( स. १३००–१५०० सुमार ) हा महाभारताच्या गौडी प्रतीवरील टीकाकार. हा व याचा पिता ईशान हे आपणास भारताचार्य म्हणवून घेतात. हा उत्तर बंगालमधील वारेंद्र ब्राह्मण होय. बंगालच्या सत्यखान राजाच्या आश्रयाखालीं यानें आपली वरील टीका लिहिली. पुरुष-सूक्तावरहि याची टीका आहे.

**अर्जुनवर्मा**—( स. १२११-१२१६ ) माळव्याच्या परमारांपैकीं सुभटवर्म्याचा पुत्र. याच्या स. १२१६ मधील दानपत्रांत लिहिलें आहे कीं, यानें बाललीलेसारख्या युद्धांत जयसिंहाला पळावयास लावलें होतें ( जर्नल ऑफ दि अमेरिकन् ओरिएंटल सोसायटी, भा. ७., पृ. २५--२७ ). याचा गुरु मदन ( बालसरस्वती ) यानें रचलेली ' पारिजात-मंजरी ' ( विजयश्री ) नाटिकेवरून याचें गुजराथच्या जयसिंह राजाशीं पर्वपर्वता (पाळागढा) पाशीं युद्ध झाल्याची माहिती मिळते. गुजराथचा निर्बल राजा दुसरा भीमदेव याचें राज्य त्यापासून त्याच्याच कुटुंबांतील जयसिंहानें लुबाडलें होतें. तोच अर्जुनवर्म्यानें पराभूत केलेला जयसिंह असावा. त्याचें एक दानपत्र स. १२२४ मधील मिळालें आहे (इं. अँटि. भा. ६, पृ. १९६--९८). त्यांत याचें नांव जयंतसिंह असें लिहिलें आहे. तें जयसिंहाचें रूपान्तर दिसतें.

'प्रबंधचिंतामणि' मध्यें लिहिलें आहे कीं, दुसऱ्या भीमदेवाच्या वेळीं यानें गुजराथचा नाश केला होता ( पृ. २५० ). हा विद्वान् कवि आणि गानविद्या यांत निपुण होता. याच्या वेळचीं तीन दानपत्रें मिळालीं आहेत. त्यांतलें एक वि. सं. १२६७ फाल्गुन शुद्ध १० ला मंडप-दुर्ग ( मांडू ) येथून दिलेलें आहे. दुसरें वि. सं. १२७० वैशाख वद्य अमावास्या रोजीं भृगुकच्छ( भडोच )हून व तिसरें वि. सं. १२७२ भाद्रपद शुद्ध १५ चे रेवा (नर्मदा) व कपिला यांच्या संगमावर अमरेश्वर तीर्थाहून दिलेलें आहे. या तीनहि दानपत्रांची रचना राजगुरु मदन यानें केली आहे. पहिलीं दोन ताम्रपत्रें लिहिण्याच्या वेळीं याचा महासांधिविग्रहिक बिल्हण पंडित होता, पण तिसऱ्या दानपत्राच्या वेळीं त्या स्थानीं सलक्षण होता. याच्या प्रधा-नाचें नांव नारायण असें होतें. याचा देहान्त वि. सं. १२७२--७५ मध्यें झालेला दिसतो. कारण वि. सं.१२७५ मार्गशीर्ष शुद्ध ५ चे मध्य प्रदेशांतील हुशंगाबाद जिल्ह्यांतील हरसोडा येथून याचा उत्तराधिकारी देवपालाचा शिलालेख मिळाला आहे. त्यांत धारानगरीचा राजा परमभट्टारक इत्यादि राजांचीं उपपदें आढळतात ( रा. इ. पा. २०० ).

यानें अमरुशतकावर रसिकसंजीवनी नांवाची टीका लिहिली आहे.

**२.** माळव्याच्या परमारांपैकीं तिसऱ्या जयसिंहाचा उत्तराधिकारी. कोटा राज्यांतील कवालजीच्या कुंडावरील शिलालेखांत रणथंभोरच्या हंमीर चौहानानें याला जिंकून माळव्याची लक्ष्मी ताब्यांत घेतली असें लिहिलें आहे. हंमीर काव्यांत हम्मीर गादीवर बसण्याचा संवत् १३३९ व प्रबंधकोशांत शेवटल्या वंशावळींत वि. सं. १३४२ दिला आहे. वरील कुंडावरचा शिलालेख वि. सं. १३४५ मधला आहे. त्याअर्थी वि.स.१३३९-१३४५(स.१२८३-१२८९) च्या मध्यें केव्हां तरी माळव्याचा कांहीं भाग हंमीरानें आपल्या राज्याला जोडला असावा ( रा. इ. पा. २०३ ).

**अर्णवराज**—हा सपादलक्ष ( अजमीर ) येथील चौहान राजा. हा सिद्धराज जयसिंहाचा जांवई होता. सिद्धराजाची कांचनदेवी नांवाची मुलगी यास दिली होती. यानें सिद्धराजाचा दत्तकपुत्र बाहड यास गादीवर बसविण्या-करितां कुमारपालाशीं युद्ध केलें. पण त्यांत याचा पराभव झाला. ही लढाई अबूच्या पहाडांत झाली ( स. ११४४ ). तेव्हां यानें कुमारपालाची बहीण देवलदेवी हिच्याशीं लग्न केलें. पण तिला हा वाईट रीतीनें वागवूं लागला. म्हणून याच्याशीं त्याचें दुसरें युद्ध झालें. एकदां यानें तिच्या देखत कुमारपालाचा अपमान केला होता. त्याचा सूड उगविण्याकरितां कुमारपालानें याच्याशीं दुसरें युद्ध केलें व याचा पराजय करून याला गादीवरून काढून टाकलें. याला आनल्लदेव,आनक,आनाक किंवा आना असें म्हणतात.

**२.** हा वाघेल घराण्याचा संस्थापक होय. हा कुमार-

पालाच्या मावशीचा मुलगा. याच्या पित्याचें नांव धवल होय. याच्या जहागिरीचें गांव व्याघ्रपल्ली असें होतें आणि त्यावरून याच्या वंशास वाघेल हें नांव मिळालें. याचा मुलगा लवप्रसाद हा दुसऱ्या भीमाचा प्रधान होता. हा शूर असून यानें माळव्याच्या व मारवाडच्या राजांचा पराभव केला. याला अर्णोराज, अनाक किंवा आना असें म्हणत असत.

**अर्थपति**—हा कुबेरभट्टाचा पुत्र व बाणभट्टाचा आजा.

**अर्सलान**—गझनीच्या यामीनी घराण्यांतील तिसऱ्या मसूदचा हा मुलगा. याला शीरझाद व बहरामशाह असे भाऊ होते. हा शीरझाद याच्यानंतर गादीवर आला.

याचा काल स. १११६ च्या अगोदर असावा. कारण याच्यानंतर याचा भाऊ बहरामशाहा हा स. १११६ मध्यें गादीवर आला.

**अर्सेकस**—या ग्रीकांपैकीं असीरियन राजानें पार्थियाचें राज्य स्थापन केलें. ही गोष्ट स. पू. २४८ मध्यें झाली.

**अर्हद्दास** (अथवा **रट्टकवि**)—(स. १३०० सुमार) जैनधर्मी कानडी कवि. यानें रट्टमत नांवाचा पर्जन्य, भूकंप, शकुन, उत्पात, ग्रह वगैरे संबंधीं एक ग्रंथ लिहिला आहे. हा मारसिंह गंगराजाचा ( स. ९६१-९७४ ) चमूपति काडमरसाच्या वंशांतील आहे. हाहि आपणास जिननगरपति, गिरिनगराधीश्वर असें म्हणवून घेत असल्यामुळें हा एखाद्या नगराचा अधिपति असावा. याच्या पित्याचें नांव नागकुमार. नागकुमाराला भूतुग म्हणत असत. यानें आपला रट्टमत हा ग्रंथ चंद्रलेखा नांवाच्या आपल्या मुलीला सांगितला. याचें नांव अभयाम्बुधि असें असावें. चवदाव्या शतकांतील भास्कर नांवाच्या आंध्र कवीनें याच्या रट्टमताचें तेलगूंत भाषान्तर केलें आहे ( क. क. च. भा. १, पा. ४०० ).

**अलक**—हा संस्कृत भाषेंतील एक अलंकारशास्त्रज्ञ होऊन गेला. रत्नाकाराच्या हरविजय नांवाच्या ग्रंथावर विषमपदोद्योत नांवाची अलकानें टीका लिहिली आहे. हा जयानक याचा मुलगा होता. मम्मटाचा अपूर्ण राहिलेला काव्यप्रकाश अलकानें परिकर अलंकारापासून पुढें पूर्ण केला. अलंकार सर्वस्वावर अलकानें टीका लिहिली आहे.

**अलकदत्त**—कल्याण कवीचा गुरु. हा कल्याण म्हणजे राजतरंगिणीकार कल्हण असावा. याचा उल्लेख जोनराजानें श्रीकंठचरितटीकेंत सांधिविग्राहिक असा केला आहे ( २५.७८-८० ).

**अलख बुलाखी**—हा कवि साठोदश गुजराथी ब्राह्मण जातीचा असून अमदाबाद येथें राहत असे. हा शांकरमतानुयायी होता. याची मान्यता लोकांत चांगली असल्यामुळें लोक याच्या पादुकांची पूजा करितात. यानें गुजराथी भाषेंत पदें वगैरे कविता पुष्कळ केलेली आहे व हा ( स. १८३८ ) १७६० शकामध्यें होता, असाविषयीं चांगला पुरावा आहे ( अ. को. ).

**अलखान**—काबुलच्या लल्लीय शाही राजाचा सरदार. पंजाबांत चिनाबच्या पश्चिम भागावरील प्रदेशाला गुर्जर असें म्हणत असत. त्यांतच हल्लींचें टोकी खोरें म्हणजे पूर्वीचा टक्क प्रदेश याचा समावेश होत असावा. ह्या अलखानाचा काश्मीरच्या शंकरवर्म्यानें पराजय केला, तेव्हां अलखानानें टक्क प्रदेश शंकरवर्म्याला देऊन आपली सुटका करून घेतली (राजतरंगिणी तरंग ५ श्लोक १४०-६०).

**अलप्तगीन**—( सन ९६७-९७६ ) यामिनी राज्याच्या पडत्या काळांत तुर्क लोकांनीं आपलें महत्त्व वाढविलें. त्या वंशाचा पांचवा सुलतान अब्दुल मलीक ह्याजवळ अलप्तगीन नांवाचा हा एक तुर्क गुलाम द्वाररक्षक होता. याजवर राजाची मर्जी बसून यास सन ९६७ त खुरासान प्रांताची सुभेदारी मिळाली. सन ९६७ त अब्दुल मलीक मरण पावल्यानंतर, त्याचा मुलगा मनसूर यास बुखारा येथील गादी मिळूं नये अशी अलप्तगीनानें खटपट चालविली. त्यावरून मनसूरनें अलप्तगीनास खुरासानचे सुभेदारीवरून दूर केलें. तेव्हां हा पळून काबूलकडे गेला. आणि कांहीं फौज जमवून यानें गज्नी येथें एका स्वतंत्र राज्याची स्थापना केली. त्या वेळीं पंजाबापासून काबूलपर्यंतच्या प्रदेशावर शाही ब्राह्मण राजा जयपाल राज्य करीत असल्यामुळें या नूतन गज्नवी राज्याचा विस्तार पूर्वेकडे होऊं लागतांच त्यांचा कलह जुंपला. जयपालाची राजधानी वाहिंद सिंधूच्या पश्चिमेस असून पूर्वेस लाहोर ही दुसरी राजधानी होती. हा स. ९७६ त मरण पावला ( मु. रि. भा. १ ला, पृ. ६२-६३ ).

**अलफखान**—खल्जी घराण्यांतील अला उद्दीनाचा हा एक सरदार होय. स. १२९६ मध्यें मध्य तुर्कस्थानाचा बादशहा, चंगीझखानाचा वंशज, अमीर दाऊद ह्यानें एक लाख लोकांनिशीं सिंध व पंजाब प्रांतावर स्वारी केली. त्यावर अला उद्दीनानें अलफखानास पाठविलें. तेव्हां लाहोरनजीक युद्ध करून यानें मोगलाचा पराभव केला, आणि त्यांचीं पुष्कळ बायकामुलें पकडून त्या सर्वांचा यानें शिरच्छेद केला.

अलाउद्दीनानें अलफखानाकडे मुलतान प्रांताची सरंजामी व सुभेदारी दिली होती ( स. १२९६ ). स. १३०५ मध्यें तेथून बदलून गुजराथचे सुभेदारीवर याची नेमणूक झाली. पुढें एक वर्षानें देवगिरीच्या

राजानें एलिचपूर प्रांताचें उत्पन्न दिल्लीचे सुलतानास द्यावयाचें तें बरींच वर्षे दिलें नव्हतें, म्हणून त्यास वठणीवर आणण्याचे कामगिरीवर मलिक नायब काफूरचे मदतीस यास पाठविलें. गुजराथचा राजा कर्ण याची मुलगी देवलदेवी ही बापाबरोबर देवगिरीचे राज्यांत आश्रयार्थ गेली होती. तिला पकडून दिल्लीस तिची आई सुलतानाचे झनानखान्यांत होती तीस भेटण्यास आणण्याचीहि कामगिरी या स्वारींत पार पाडावयाची होती. या सुमारास राजा कर्ण नंदुरबारच्या किल्ल्यांत राहून आसपासच्या लहान मुलखाचा कारभार पाहत असे. मुसलमानांची स्वारी येत आहे असें समजतांच त्यानें देवलदेवीस देवगिरीच्या राजाचा भाऊ शंकरदेव यास देण्याचें ठरवून तिची देवगिरीकडे रवानगी केली. देवलदेवी देवगिरीचे वाटेवर असतांच यानें नंदुरबारवर स्वारी करून कर्णरायाचा पराभव केला व राजा देवगिरीकडे जात असतां त्याचा पाठलाग चालविला. वाटेंत वेरूळचे लेण्याजवळ आल्यावर ३००–४०० सैनिकांस लेणीं पाहावयास जाण्याची यानें परवानगी दिली. हे ३००–४०० सैनिक लेणीं पाहत असतां लेण्यांकडे येणारें एक लहानसें हिंदु सैन्य त्यांचे दृष्टीस पडलें. आपणास परत जाण्यास अटकाव करण्यास हिंदु सैन्य आलें असावें असें समजून सैनिकांनीं हिंदूंवर बाणांचा वर्षाव केला. हें हिंदु सैन्य देवलदेवीस पोहोंचविण्याकरितां तिच्या संरक्षणार्थ दिलेलें होतें. एक बाण चुकून देवलदेवीच्या घोड्यास लागला व घोडा कलंडला, तेव्हां देवी खालीं पडली. मुसलमान सैनिक देवलदेवीजवळ येऊन चौकशी करूं लागले. तेव्हां तिच्या संरक्षकांनीं मूर्खपणानें तिचें नांवगांव सांगून ही राजकन्या स्वतःच्या लग्नाकरितां देवगिरीस जात आहे म्हणून तिच्या अब्रूवर घाला न घालण्याविषयीं विनंति केली. देवलदेवीस लागलीच पकडून याच्याकडे नेण्यांत आलें. यानें तिची तावडतोब दिल्लीकडे रवानगी केली. सुलतानास खूष करण्याचें हें नाजुक काम मलिक नायब काफूरनें करावयाचे ऐवजीं यानें त्याची संमतिसुद्धां न घेतां परस्पर पार पाडलें. त्यामुळें काफूर फार रागावला. तो खुनशी असल्यानें काफूरखानानें याचा पुढें चांगलाच सूड घेतला. सन १३१५–१६ चे सुमारास सुलतान अलाउद्दीन आजारी असतां त्यानें मलिक नायब काफूर जवळ युवराज खिजरखान व सुलताना हे आपल्याशीं निष्ठुरपणानें वागतात,आजारी असतांहि ख्यालीखुशालींत दिवस लावितात अशी कुरकूर केली. याच सुमारास राणीचे मनांत आपला मुलगा शादीखान यास याची मुलगी करून घेण्याची कल्पना आली व तिनें अला उद्दीनास परवानगी विचारली. अला उद्दीनानें शिरस्त्याप्रमाणें मलिक नायब काफूरचा सल्ला विचारला. मलिक नायबचे मनांतून तिघांचाहि सूड घ्यावयाचा होता, म्हणून त्यानें बादशहाच्या मनांत असें भरविलें कीं, युवराज खिजरखान, त्याची आई सुलताना यांनीं राज्यलोभानें सुलतानाविरुद्ध कटाची उभारणी केली आहे. या कटास निष्ठावंत मदतनीस मिळविण्याकरितां याशीं नातें जोडण्याची ही कारवाई आहे. अलाउद्दीनाचा यावर विश्वास बसला व त्यानें युवराजास हद्दपार केलें व आपले बायकोस नजरकैदेंत ठेविलें. पुढें युवराज खिजरखान बापाची प्रकृति सुधारल्याचें ऐकून परवानगी न घेतां दिल्लीस आला. तेव्हांहि काफूरनें अला उद्दीनास असें सांगितलें कीं, युवराजाची सुलतानाची आज्ञा मोडून कट सिद्धीस नेण्याची इच्छा आहे. अला उद्दीनास तें खरें वाटलें व त्यानें युवराजास ग्वाल्हेरचे किल्ल्यांत कैदेंत ठेविलें व स. १३१६ मध्यें अलफखानाचा वध केला ( कें. हि. ).

२. माळव्याचा सुलतान हूशंगशाहचें नामांतर.

३. पहिला मुहम्मद घियासुद्दीनचें नामांतर.

**अलफझारी**—यानें अरबी भाषेंत ज्योतिषविषयावर ग्रंथ लिहिले आहेत. याच्या ग्रंथांत कालमान, ग्रहकक्षा, योजनें वगैरे माहिती दिली आहे. खंडनखंडखाद्याचें भाषांतर अरबींत यानेंच केलें असावें.

**अलबेली अली**—हा हिंदी भाषेंतील कवि होय. हा विष्णुस्वामीच्या सांप्रदायांतील वंशीमालीचा शिष्य होय. यानें समयप्रबंधपदावली नांवाचा ३१३ पदांचा एक ग्रंथ केला आहे. सर्व पदें भक्तिपर आहे. हा सनाच्या अठराव्या शतकांतील होय.

**अलमेलम्मा**—श्रीरंगपट्टणच्या आरविडु घराण्यांतील तिरुमल ( विजयानगरच्या आरविडु घराण्यांतील दुसऱ्या वेंकटांचा हा पुतण्या होय ). राजाची ही एक बायको होय.

जेव्हां तिरुमल राज्यत्याग करून तालकड येथें राहिला त्या वेळीं हीहि त्याच्याबरोबर राहिली होती.

**अलंकार**—काश्मीरच्या जयसिंह (स. ११२९–५० ) राजाचा दिवाण. हा जातीचा ब्राह्मण होता. याच्या बापाचें नांव विश्वकर्ता. याचा भाऊ प्रख्यात मंख कवि होय. यानें श्रीकंठ-चरित्र नांवाचा संस्कृत ग्रंथ लिहिला व तो कसा काय झाला हें पाहण्यासाठीं अलंकारानें ३० पंडितांची सभा भरवली. जमलेल्या पंडितांचीं नांवें येणेंप्रमाणें:—आनंदनैयायिक, आनंदकवि दुसरा, कल्याणकवि, गर्गकवि, गोविंदकवि, जनकराजवैदिक,

वैयाकरणी जल्हण, जिंदुकमीमांसक, तेजकंठ, त्रैलोक्यकवि, दामोदर, नंदन, नागकवि, पद्मराजकवि, गुप्त ( प्रगट ), भुट्टमंडन ( मंखाचा गुरुबंधु ), रम्यदेव, रुय्यक ( मंखाचा गुरु ), लक्ष्मीदेव, लोष्ठदेवकवि, श्रीकंठ, श्रीगर्भ, श्रीगुप्त, श्रीवत्स, षष्ठ व सुहल. ही माहिती मंख कवीच्या श्रीकंठचरित्राच्या पंचविसाव्या सर्गावरून मिळते. याचा श्रीकंठचरित्रांत लंकक या नांवानेंहि निर्देश आहे.

**अलंप्रभु**—( स. ११६० सुमार ). याला अल्लमप्रभु व प्रभुलिंग असेंहि म्हणतात. हा आराध्य जातीय तैलंग ब्राह्मण होता, अशी समजूत आहे. ह्या पुरुषाच्या ऐतिहासिकत्वाबद्दल शंका आहे. लिंगायतधर्माचा संस्थापक जो बसव त्याच्याहि अगोदरचा हा पुरुष होता, असें वीरशैव समजतात. 'प्रभुलिंगलिले' म्हणून जो कानडी भाषेंत चामरस कवीनें षट्पदी वृत्तांत रचलेला ग्रंथ आहे, त्यांत याचें वर्णन आढळतें. या काव्यांत प्रभुलिंग गणपतीचा अवतार मानला आहे व प्रत्यक्ष पार्वतीनें याची परीक्षा पाहण्याकरितां आपल्या अंशानें एक वनवासी राजकन्या उत्पन्न केली व त्याची परीक्षा पाहिली. हा अत्यंत पवित्र वर्तणुकीचा, शांत, पुष्कळ प्रवास केलेला व जागोजाग अनेक चमत्कार दाखविल्यामुळें लोकांत प्रख्यातीस आलेला असा होता. कोल्हापूर संस्थानांतील अळतें गांवीं जें अलंप्रभूचें देवालय आहे, तें याचें नसून औरंगजेबाच्या स्मरणार्थ देवीला नांव दिलें आहे ( कोल्हापूर गॅ. पाहा ). त्याची सांप्रदायिक कथा देणें म्हणजे प्रभुलिंगलीलेचा गोषवारा देणें होय. याची अल्लम नांवानें विशेष प्रसिद्धी आहे. याला मायाकोळाहळ अशी पदवी होती. लिंगायतांपैकीं प्रसिद्ध सत्पुरुष.

ग्रंथ—षट्स्थळज्ञानचारित्र्य, शून्यसंपादने, मंत्रगोप्य, सृष्टीयवचन, बेडगिनवचन ( सुंदर वचन ), मंत्रमाहात्म्य, कालज्ञानवचन.

चन्नबसवपुराणांतहि याचें चरित्र आहे. हा कदळी येथें मृत्यु पावला. याचें चरित्र चमत्कारप्रधान असून अनेक लिंगायत कवींनीं तें भक्तिपुरस्सर गायिलेलें आहे. याच्या वचनांत गुहेश्वर हें टोपण नांव वापरलें आहे ( क. क. च. भा १ पा. १८० ).

**अलसानी पेद्दण**—सुप्रसिद्ध तेलगू कवि. हा जातीनें ब्राह्मण असून विजयानगरच्या नरसिंहराय व कृष्णदेवराय यांचा याला आश्रय होता. त्याच्या दरबारांतील अष्टदिग्गजांत याची गणना होती. स्वारोचिष–मनुचरित्र हें याचें लोकप्रसिद्ध काव्य होय. हें यानें मार्कंडेयपुराणाच्या आधारें रचलें. या काव्याच्या प्रस्तावनेंत कृष्णदेवरायानें मुसलमानांवर मिळवलेल्या जयाच्या वेळीं केलेल्या पराक्रमाचें वर्णन आहे. याची प्रसिद्धी विशेषतः माधुर्याबद्दल आहे. याच्या पूर्वींचे कवि केवळ संस्कृत ग्रंथांचे आधारें तुटक काव्यरचना करीत, पण यानें स्वतंत्रपणें प्रबंधात्मक काव्यरचना केली. म्हणून याला आंध्रकवितापितामह असें बहुमानाचें पद प्राप्त झालें. राजानें स्वतः याच्या पालखीला खांदा दिला होता व याच्या पायांत सोन्याचा तोडा घातला होता. यानें मुसलमानी शब्द तेलगू भाषेंत वापरण्यास प्रथम सुरवात केली. कृष्णदेवरायाच्या मृत्यूवर यानें लिहिलेलें काव्य आजहि वाचकांच्या डोळ्यांतून अश्रू काढतें. हा स. १५३५ मध्यें आपली जन्मभूमि दोरनाला येथें मृत्यु पावला ( तेलगूवाङ्मय पा. २६-२८ ). कृष्णदेवरायाच्या नांवावर असलेले आमुक्तमाल्यादा वगैरे काव्यग्रंथ यानेंच केले असावेत असें म्हणतात.

**अला उद्दीन खल्जी**—( स. १२९६-१३१६ ) दिल्लीच्या खल्जी घराण्याचा संस्थापक जो जलालुद्दीन त्याचा हा पुतण्या होय. याच्या बापाचें नांव शहाबुद्दीन मसूद असें होतें. जलालुद्दीन गादीवर आल्यापासून त्यानें यास व याच्या भावास आपल्याजवळ बाळगिलें होतें. अलाउद्दीनानें मोंगलांस हटविलें म्हणून त्यास जलालुद्दीनानें गंगा व यमुना या नद्यांमधील अंतर्वेदींतील कोरा प्रांताचा सुभेदार नेमिलें. स. १२९२ त अला उद्दीनानें माळव्याच्या स्वारींत भिलसा वगैरे कित्येक ठिकाणच्या हिंदु लोकांस जिंकलें म्हणून जलालुद्दीनानें यास आणखी अयोध्येचा सुभा सांगितला. माळव्यांत यानें पुष्कळ किल्ले व लूट मिळविल्यामुळें यास मोठी फौज बाळगितां आली.

पुढें स. १२९३ त यास दक्षिणेंतील देवगिरी नामक धनाढ्य शहराची खबर कळून याच्या तोंडास पाणी सुटलें. व आपला खरा बेत कोणास न कळवितां हा ८००० हजार स्वार घेऊन त्याच वर्षी कोराहून निघाला आणि बुंदेलखंडाच्या जंगलांतून दक्षिणेकडे गेला. सहा महिनेपर्यंत याचा मागमूस पाठीमागें कोणासहि कळला नाहीं. अशा रीतीनें अला उद्दीन नर्मदापार होऊन एकाएकीं देवगडच्या तटाखालीं उतरला. त्या वेळीं तेथील राजा रामदेवराव याची फौज दुसरीकडे गेली होती. शिवाय आयत्या वेळीं किल्ल्यांत धान्याच्या ऐवजीं मिठाचीं पोतीं भरलीं गेलीं असल्याचें रामदेवरावास आढळून आलें. तेव्हां घाबरून जाऊन त्यानें एकदम पुष्कळ द्रव्य देऊन याच्याशीं तह केला. इतक्यांत रामदेवरावाचा पुत्र शंकरदेव मोठी फौज जमवून बाहेरून आला. त्यानें वडिलांच्या तहास न जुमानतां अला उद्दीनाशीं लढाई दिली. या लढाईंत मुसलमानांचा समूळ नाश होण्याची

वेळ आली होती. पण इतक्यांत किल्ल्याच्या रक्षणार्थ ठेवलेला रामदेवरावाचा सरदार शंकरदेवरावाच्या मदतीस येत असतां, त्याच्या लोकांच्या पायांनीं उडालेली धूळ पाहून, अला उद्दीनाच्या मदतीस दिल्लीहून मोठी फौज येत आहे असें वाटून, हिंदु लोक रणांगण सोडून सैरावैरां पळूं लागले व अला उद्दीनास जय मिळाला. तेव्हां रामदेवरावानें याला अपरंपार द्रव्य देऊन शिवाय आणखी एलिचपूर व आसपासचे प्रांत देऊन आपला बचाव करून घेतला.

अशा प्रकारें विजय मिळवून हा कोरा येथें परत आला. त्या वेळीं जलालुद्दीन यास भेटावयास आला. परंतु अला-उद्दीनानें त्या प्रसंगीं जलालुद्दीनाचा आपल्या मारेकऱ्यांकडून खून करविला ( जुलै १२९६ ) व नंतर देवगिरीच्या लुटींत मिळालेल्या पैशाच्या साहाय्यानें जे सरदार व फौजेंतील अंमलदार कांकूं करीत होते त्यांस वश करून यानें छपन्न हजार स्वार व साठ हजार पायदळ एवढी फौज जमा केली. यामुळें स. १२९६ च्या आक्टोबर महिन्यांत यास दिल्लीचें तख्त बिनहरकत प्राप्त झालें ( अर्कलीखान पाहा ). नंतर अलफखान नामक आपल्या दूधभावाकडून यानें मुलतानहून दोघां राजपुत्रांस धरून आणून त्यांचे डोळे काढून त्यांस ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत बंदींत ठेविलें.

राज्यावर येतांच यानें लांचखाऊ अंमलदारांची पुरी खोड मोडली. ज्यांस यानें पैसे देऊन वश केलें होतें त्यांस त्यांच्या कृतघ्नतेबद्दल चांगलें शासन करून चुलत्याच्या वधाच्या घातकी कृत्यांत ज्यांनीं स्वतःस सहाय्य केलें होतें, त्यांची यानें अत्यंत दुर्दशा केली. ज्यांनीं याच्या लांचास न जुमानतां जलालुद्दीनास सोडलें नाहीं त्यांना अला उद्दीनानें कांहींएक त्रास दिला नाहीं.

स. १२९६ मध्यें मध्यतुर्कस्थानचा बादशहा व गीझचे खानाचा वंशज अमीर दाऊद हा पंजाब प्रांतावर चाल करून आला असतां त्याच्यावर आपला अलफखान नांवाचा सरदार पाठवून यानें अमीर दाऊदचा पराभव केला. नंतर अला उद्दीनानें स. १२९७ मध्यें अलफखान व वजीर नुसरतखान यास गुजराथ प्रांत जिंकण्यासाठीं पाठविलें. गुजराथेंत अनहिलवाड येथें राजा कर्णराज राज्य करीत होता. मुसलमान फौज आल्याबरोबर तो पळून देवगडास रामदेवराव याजकडे आश्रय मागण्यासाठीं गेला. परंतु मागें त्याचें राज्य व बायकामुलें मुसलमानांनीं काबीज केलीं. शिवाय या स्वारींत मुसलमानांनीं सोमनाथाचें देवालय पुनरपि लुटलें व तेथील मूर्ति फोडून तिचे तुकडे दिल्लीस नेऊन मशिदीच्या पायास लाविले. त्या मूर्तीचा उपयोग यानें आपल्या सिंहासनाच्या पायरीप्रमाणें केला; असाहि कांहीं ठिकाणीं उल्लेख आला आहे.

कर्णराजाची लावण्यवती स्त्री कमलदेवी मुसलमानांनीं पकडून दिल्लीस नेली होती. तिला यानें आपली पट्टराणी केली. तिजवर याची फार मर्जी बसली.

**मोंगलाची दुसरी स्वारी**:—अमीर दाऊदची स्वारी होऊन दोन वर्षे होतात न होतात तोंच स. १२९९ च्या सुमारास दाऊदचा मुलगा कुतलघखान हा हिंदुस्थानांत प्रवेश करून दिल्लीनजीक यमुनेच्या काठीं तळ देऊन राहिला. तेव्हां अला उद्दीनानें स्वतः कुतलघखान याच्यावर बऱ्याच मोठ्या सैन्यानिशीं चालून जाऊन त्याचा पूर्ण मोड केला.

**राजपुतान्यावरील स्वारी**:—स. १२९८ मध्यें अला उद्दीनानें रतनभोर नांवाचा किल्ला काबीज केला. या स्वारींत याचा पुतण्या आकतखान यानें याचा खून करून राज्य बळकविण्याचा प्रयत्न केला, पण याच्या नशिबानें तो फसून आकतखानास देहान्तशासन भोगावें लागलें (आकतखान पाहा). स. १३०० त यानें पुनः राजपुताना जिंकण्याचा बेत ठरवून रतनभोरास वेढा घातला. माळवा व गुजराथ हे प्रांत याच्या ताब्यांत आले होते, परंतु राजपुतान्यांतील शत्रूंचा मोड केल्याशिवाय हे दूरचे प्रांत दिल्लीच्या सुलतानाच्या ताब्यांत राहणें दुरापास्त होतें. दिल्लीहून राजपुतान्यांत उतरतांना रतनभोराचा किल्ला लष्करी दृष्ट्या महत्त्वाचा आहे म्हणून पुढें जाण्यापूर्वी तो सर करणें जरूर होतें. तो किल्ला जिंकल्यावर यानें चितोडवर स्वारी केली. कारण चितोडचे राजे हे बाप्पा-रावळचे वंशज राजपुतान्यांत प्रमुख असून त्यांचा मोड झाला म्हणजे सर्वांना दरारा बसेल, असें यास वाटलें. चितोड येथें रत्नसिंह राज्य करीत होता. त्याची बायको पद्मिनी ही फार सुस्वरूप होती, तिचाहि लोभ अला उद्दीनास होताच. चितोडवर यानें दोन स्वाऱ्या केल्या, त्यांपैकीं पहिल्या स्वारीच्या वेळीं यानें दगलबाजी करून रत्नसिंगास कैद करून पद्मिनी मिळाल्या-शिवाय त्याची सुटका होणार नाहीं असें कळविलें. तेव्हां पद्मिनीनें एक युक्ति योजली व स्वतः येण्यास कबूल असल्याचें सुलतानास कळविलें. पद्मिनीचा लवाजमा म्हणून बुरखा घेतलेल्या अनेक पालख्या तिनें भोयांबरोबर पाठविल्या. वास्तविक त्यांत पद्मिनी नव्हती व दासीहि नव्हत्या. प्रत्येक पालखींत शूर हत्यारबंद शिपाई होते व भोईहि हत्यारबंद रजपूतच होते. त्यांनीं अला उद्दीनाचे गोटांत शिरून आयत्या वेळीं एकच गोंधळ उडवून दिला व रत्नसिंगास मुक्त केलें. या प्रकारामुळें अला उद्दीनास

तेथून कशीबशी सुटका करून घेणें भाग पडलें. पण पुढील वर्षी म्हणजे स. १३०३ सालीं यानें मोठ्या तयारीनिशीं चितोडवर स्वारी केली. या वेळीं चितोड जिंकलें जाणार असें पाहतांच सर्व रजपूत स्त्रियांनीं पुढील बेअब्रू टाळण्याकरितां खुषीनें अग्नींत उड्या टाकिल्या. त्या कृत्यास जोहार असें म्हणतात. यानें चितोड काबीज केलें. परंतु याच्या मृत्यूपूर्वींच स. १३१३ सालीं हंमीर नांवाच्या शूर रजपूत राजानें चितोडास पुनः स्वातंत्र्य मिळवून दिलें.

चितोडच्या स्वारींत हा गुंतला असतां मोंगलांनीं पुनः हिंदुस्थानांत स्वाऱ्या करण्यास सुरुवात केली. परंतु यानें मोंगलांची अत्यंत दुर्दशा केली. त्यामुळें त्यांचा धीर इतका खचला कीं, ते पुष्कळ दिवसपर्यंत हिंदुस्थानांत पाय ठेवण्यास धजले नाहींत. देवगिरीचा रामदेवराव खंडणी पाठविनासा झाला म्हणून स. १३०६ मध्यें यानें आपला सरदार मलीक काफूर व गुजराथचा अलफखान यास दक्षिणेंत पाठविलें. काफूरनें या स्वारींत सर्व महाराष्ट्रांत लुटालूट करून रामदेवरावास दिल्लीस आणलें. तेथें त्याचा अला उद्दीनानें चांगला सन्मान केला. स. १३०८ मध्यें काफूरनें पूर्व किनाऱ्यावर तैलंगण प्रांतावर स्वारी केली व वारंगळचा किल्ला सर केला. तेव्हां तेथील राजानेंहि दिल्लीच्या सुलतानाचें आधिपत्य कबूल करून त्यास खंडणी देण्याचें कबूल केलें. पुढें रामदेवरावाच्या मुलाकडून खंडणी वेळेवर न आल्यामुळें स. १३१२ मध्यें काफूरनें दक्षिणेंत शेवटची स्वारी केली व त्यानें रामदेवरावाच्या मुलास ठार मारून देवगड राजधानी घेतली व महाराष्ट्र पूर्णपणें मुसलमानांच्या ताब्यांत आणून तो अपार संपत्ति घेऊन दिल्लीस परत आला.

यास आरंभापासून एकामागून एक विजय मिळत गेल्यामुळें याचे डोळे धुंद झाले व हा मोठमोठे बेत करूं लागला. क्षणांत यास वाटे कीं, आपण एक निराळाच धर्म स्थापन करून प्रतिपैगंबर व्हावें तर दुसऱ्या क्षणांत यास वाटे कीं, पैगंबर होण्यापेक्षां सैन्य घेऊन जग जिंकण्यास निघावें व प्रतिअलेक्झांडर व्हावें. ह्या काळांत पाडलेल्या कांहीं नाण्यांवर यानें आपल्या नांवापुढें ' दुसरा अलेक्झांडर ' अशी पदवी कोरलेलीहि आहे. परंतु लवकरच अलाउल्मुल्क या निर्भीड मुसलमान गृहस्थाच्या सल्ल्यावरून यानें आपले वरील दोन्ही बेत रद्द केले. अला उल्मुल्कनें अला उद्दीनास चक्क सांगितलें कीं, धर्मस्थापना करणें हें तुझें काम नव्हे. आणि तूं जग जिंकण्याची हांव बाळगतोस त्यापेक्षां तुझ्या अगदीं जवळच्या रजपुत राजांना तूं कां जिंकीत नाहींस ? व मोंगलाच्या हल्ल्यांचा अजिबात बंदोबस्त कां करीत नाहींस ? या बोलण्याचा यानें राग न मानतां उलट त्यास बक्षीस दिलें.

काफूरच्या शेवटच्या स्वारीनंतर अला उद्दीनाची सत्ता शिखरास पोंचली. ह्या वेळीं मुसलमानी साम्राज्य अगदीं कळसास पोहोंचलें. सबंध हिंदुस्थानभर अला उद्दीनास कोणीहि शत्रु उरला नाहीं. अशा प्रकारची परिस्थिती पुढील काळांतील मोंगली साम्राज्यांतहि आलेली नव्हती. काफूरवर याची बहाल मर्जी असे. या कृपेचा दुरुपयोग करून काफूरनें अला उद्दीनाजवळ आपल्याशिवाय दुसऱ्या कोणाचें चालेनासें केलें. प्रत्यक्ष राणी व मुलगे यांच्याशीं सुद्धां सुलतानाचें वैमनस्य काफूरनें पाडून त्यांस अटकेंत ठेविलें. यामुळें उमराव लोक त्रासले, गुजराथेंत बंड झालें, चितोडगड हातचा गेला, दक्षिणेंत रामदेवरावाचा जांवई हरपाळदेव यानें मोठा उठावा करून तो मुसलमान किल्लेदारास हांकून लावून स्वतंत्रपणें राज्य करूं लागला. इकडे अला उद्दीनाची तब्येत अव्यवस्थित राहण्यानें दिवसानुदिवस बिघडत चालली होती. वरील बातम्यांमुळें यास क्रोधाच्या लहरी येऊं लागल्या व दुखणें बळावून थोड्याच दिवसांनीं याचा अंत झाला. यानें वीस वर्षें राज्य केलें. कोणी म्हणतात काफूरनेंच याला विषप्रयोग केला. फेरिस्ताप्रमाणें याच्या मृत्यूची तारीख १९ डिसेंबर १३१६ ही आहे; पण (अमीर) खुस्त्रव हा याच्या कारकीर्दीतील कवि आपल्या दिवाणाच्या बकिय-इ-नकिय भागांत अजमासें ३० डिसेंबर १३१५ देतो. पण २ जानेवारी १३१६ हा दिवस केंब्रिज हिस्ट्रीच्या तिसऱ्या भागाच्या ११९ पानांत दिला आहे.

हा स्वभावानें छांदिष्ट, निर्दय व जुलमी होता, तथापि याचा राज्यकारभार प्रशंसा करण्यासारखा झाला. यानें दिल्ली येथें मजबूत किल्ला बांधला व नवीन तोफा ओतून हत्यारें तयार करवून राजधानीच्या बचावाचा चांगला बंदोबस्त केला. हातीं घेतलेल्या कामांत यास एकसारखें यश येत गेल्यामुळें हा उर्मट व बेपरवा झाला, व स्वतःच्या इच्छेस येईल तसे कायदे करूं लागला. चैनी लोकांस रिकामपणा मिळून मग ते राज्याविरुद्ध कारस्थानें करण्यास प्रवृत्त होतात हें लक्षांत घेऊन यानें एका लेखणीच्या फटकाऱ्यासरशीं पुढील गोष्टी केल्या. सरकारच्या परवानगीशिवाय मेजवान्या, लग्नकार्यें वगैरे कोणीं करूं नयेत किंवा एकत्र जमून दरबारप्रकरणीं वादविवाद करूं नयेत. असे कायदे करून गुप्त हेरांची नवीन व्यवस्था सुरू केली. लोकांस गांव, जमिनी इनाम दिल्या होत्या त्या यानें

खालसा केल्या, व कांहींना कांहीं सबबीवर यानें सर्व लोकांस पिळून त्यांजपासून पैसा उकळला. शेतकरी लोकांनीं अमुकच जमीन, गुरें व नोकर ठेवावेत असें ठरविलें व घरावर, दुभत्या गाईम्हशींवर आणि कपड्यालत्त्यांवर कर बसविले. सरकारी वसूल सक्तीनें वसूल केला, तथापि वसुलाच्या बाबतींत लोकांवर जुलूम झाल्यास त्याची चौकशी करण्यास यानें योग्य कामगारहि नेमले होते. यानें जिनसांचे दर कायमचे ठरवून त्याच दरांनीं लोकांना माल विकण्यास लाविलें. हा सरकारी पैसा कर्जाऊ देई. यानें दरबारांत दारू पिण्याची बंदी केली. एकदां यानें शिल्लक असलेली सर्व दारू ओतून दिली. त्यामुळें रस्ताभर पावसाळ्याप्रमाणें चिखल झाला. हिंदूंचा छळ करण्यांत तर यानें कमाल केली. हा क्रूर व धर्मवेडा परंतु शूर, धाडसी व कर्तबगार पुरुष होऊन गेला. याच्या राज्यांत जिकडेतिकडे वाडे, मशिदी, स्नानगृहें, किल्ले, कबरी, विद्यापीठें वगैरे बांधकामें यक्षिणीनें कांडी फिरविल्याप्रमाणें थोड्या अवधींत दिसूं लागलीं. याच्या कारकीर्दींत विद्वान् मंडळी बरीच पुढें आलेली दिसतात. यास स्वतःस आरंभीं लिहितां येत नव्हतें. तथापि यास पुढें ही गोष्ट लांछनास्पद वाटून हा लिहिण्यावाचण्यास शिकून हुशार झाला. याच्या पदरीं झियाउद्दीन बर्नी नांवाचा इसम होता. त्यानें याच्या कारकीर्दीचा इतिहास लिहिला आहे. याला खिजरखान, शादीखान, शहाबुद्दीन उमर व मुबारक कुत्बुद्दीन नांवांचे मुलगे होते. याच्या पत्नीचें नांव मलिकजहां असें होतें ( अलफखान, अला उल्मुल्क, अलीमर्दनखान खल्जी, कमलदेवी व खिजरखान पाहा ).

**अला उद्दीन इमादशाह**—( स. १४८४-१५२७ ) वऱ्हाडच्या इमादशाहींतील फत्तेउल्लाच्या नंतर हा इमादशाहाचे गादीवर आला ( १५१३ ). बापाचें नांव फत्तेउल्ला हें होय. याची पत्नी युसुफ आदिलशाहची मुलगी खदीजा होय.

यानें गाविलगड ही आपली राजधानी केली. कित्येक कारणांवरून अहमदनगरच्या निजामशाहाशीं अलाउद्दीनाचें वैर जडलें आणि त्याशीं युद्ध करण्याकरितां खानदेश व गुजराथ येथील राजांची यास मदत घ्यावी लागली. त्यासाठीं गुजराथच्या राजास यानें आपला बराच मुलूख दिला. स. १५२७ त हा मरण पावला आणि याचा ज्येष्ठ पुत्र दर्या इमादशाह तख्तावर बसला. हा स. १५३२ च्या सुमारास मरण पावला असें बीलनें म्हटलें आहे.

**अला उद्दीन तर्माशिरीन घियासुद्दीन मुहम्मद्**—हा बगदादच्या अल्मुस्तन्सिर नांवाच्या स. १२२६ ते १२४२ मध्यें खिलाफतीचे गादीवर असलेल्या अब्बासीद वंशाच्या खलिफाचे घराण्यांतील एक पुरुष होता. हा ट्रन्सोक्सियानाचा सुलतान मुघलखान याचे आश्रयास असे. स. १३४०-४१ चे सुमारास यानें दिल्लीस सुलतान मुहंमद तुघ्लकाकडे भेटण्यास येण्याची परवानगी मिळविण्याकरितां दोन दूत पाठविले. सुलतान मुहम्मद तुघ्लकाची अशी समजूत होती कीं, कोणाहि सुलतानास त्याच्या सत्तेमागें धर्माचें व ईश्वराचें अधिष्ठान असल्याशिवाय खरी सत्ता गाजविण्याचा अधिकार नीतिदृष्ट्या प्राप्त होत नाहीं. धर्माचें व ईश्वराचें अधिष्ठान आपल्या सत्तेमागें निर्माण करावें असेंहि त्यास वाटे. ईश्वरी अधिष्ठानानें निर्माण झालेल्या खिलाफतीच्या सत्ताधारी खलिफाचा आशीर्वाद आपणास मिळाला व त्यानें आपली सत्ता मान्य केली तर ईश्वराचें अधिष्ठान आपल्या सत्तेमागें असल्याचें तें निदर्शक चिन्ह होईल. अशी मुहम्मद तुघ्लकाची कल्पना असल्यामुळें त्यानें हे दूत दिल्लीस आल्यावरोबर अल्लाउद्दीन तर्माशिरीन हा खरोखरच अब्बासिद वंशांतील आहे किंवा नाहीं याची खात्री करून घेतली व खात्री पटल्यावरोबर तर्माशिरीन याचें मोठ्या थाटानें व आदरानें स्वागत केलें. याच्या दूतांसच पांच पांच हजार तन्न दिलें. तर्माशिरीनकरितां दूतांजवळ ३०००० तन्न देऊन यास दिल्लीस घेऊन येण्यास सांगितलें. तर्माशिरीन हिंदुस्थानांत येऊन पोहोंचल्यावर दिल्लीचे वाटेवर याचें स्वागत करण्याकरितां दिल्लींतील मुख्य धर्माधिकाऱ्यांस लवाजम्यानिशीं शिर्सा येथें पाठविण्यांत आलें. स्वतः सुलतान मसुदाबाद ( बहादूरगड ) पर्यंत गेला. दरबारी पद्धतीस अनुसरून नजराणे झाले व नंतर दिल्लीकडे जावयास निघण्याची तयारी झाली. तेव्हां ज्या घोड्यावर तर्माशिरीन बसावयाचा होता त्याची रिकीबी सुलतानानें स्वतः हातीं धरून तर्माशिरीन यास घोड्यावर बसविलें; व मग दोघांवरहि राजछत्र धरण्यांत आलें. दिल्लीस आल्यावर तर्माशिरीन याचा सुलतानानें जो सन्मान केला तो तर अभूतपूर्व होता. याला एक राजवाडा राहावयास देण्यांत आला. या राजवाड्यांतील यच्चयावत् भांडींकुंडीं सोन्याचांदीचीं होतीं. स्नानाचें भांडें सोन्याचेंच होतें. ज्या दिवशीं राजवाड्यांत तर्माशिरीननें प्रथम स्नान केलें त्या दिवशीं या सन्मानाची भेट म्हणून ४०००० तन्न नजराणा देण्यांत आला. अनेक दासदासी गुलाम याच्या तैनातीस देण्यांत आले व रोजच्या हातखर्चाकरितां ३०० तन्नांची नेमणूक दिली. शिवाय रोजचा शिधा, नोकरांचा पगार राजवाडयामार्फतच होई. अला उद्दीनानें बसविलेलें

शिरी शहर त्यांतील सर्व राजवाडे, बागा, मळे या सुद्धां यास जहागीर देण्यांत येऊन या जहागीरींत दिल्लीचे आसपासच्या ३०० खेड्यांचा समावेश करण्यांत आला होता. दिल्ली प्रांताच्या पूर्व भागाची सुभेदारीहि यास देण्यांत आली. इतका ज्याचा सन्मान करण्यांत आला व ज्यास तो केवळ एका पूज्य व उच्च कुळांत जन्मला म्हणूनच बहाल करण्यांत आला तो तर्माशिरीन मनानें कद्रु, कवडी-चुंबक व नादान होता. इब्न बतूतानें याच्या वागणुकीचें निरीक्षण करून खालील माहिती नमूद करून ठेविली आहे. "यास राजवैभव प्राप्त झालें असूनहि हा एकटाच भोजन करी. एकटा जेवण्याचें अभिमान हें कारण नव्हतें. हा स्वतःच असें सांगे कीं, दुसऱ्यांनीं आपलें अन्न खाल्लेलें आपणांस पाहवत नाहीं." निष्कारण खर्च नको म्हणून रात्रीच्या आपल्या बसावयाच्या दालनांत दिवा न लावतां अंधारांतच हा बसे. जाळण्याकरितां बागेंतल्या काटक्या स्वतः जमा करी व त्या सांठवून ठेवी. याच्या दिमतीला दिलेल्या दासदासींस व हुजऱ्यांस हा शेतावरील काम करावयास लावी (कें. हि.).

**अला उद्दीन पूर्वी**—हा एक बंगालचा सुलतान होय. हा फीरूझ पूर्वी याच्यानंतर स. १४९६ मध्यें बंगालच्या गादीवर आला. हा पराक्रमी व सज्जन होता. हा मोठ्या ऐश्वर्यानें सन १५२३ पर्यंत राज्यकाभार करून मरण पावला. याच्यानंतर याचा मुलगा नशीव हा गादीवर आला (मु. रि. भा. १, पृ. ३२०).

**अला उद्दीनशाह बाहमनी**—(स. १३४७-१३५८) दक्षिणेंतील बाहामनी राज्याचा संस्थापक. याचेंच दुसरें नांव हसनगंगू ऊर्फ जाफरखान (हसन गंगू पाहा).

**२.** (स. १४३५-१४५८) बाहामनी राज्याचा सुलतान अहमदशाहाचा हा मुलगा होय. हा अहमदशाहानंतर सुलतानाचे गादीवर आला.

विजयानगरच्या राजानें ५ वर्षे खंडणी न दिल्यामुळें त्याजवर यानें आपल्या भावास पाठविलें. परत येतांना याच्या भावानें बंड केलें. यानें त्याचा बेदरानजीक पराभव केला. विजयानगरच्या देवरायानें मुसलमानांचा पराभव करण्याच्या हेतूनें याजवर स्वारी केली. पहिल्या लढाईत हिंदूंचा व दुसऱ्या दोन लढायांत मुसलमानांचा जय झाला. देवरायानें दरसाल खंडणी देण्याचें कबूल केलें. शेवटीं यानें आपल्या भावास क्षमा करून उदारपणानें रायचुरचा किल्ला व मुलूख दिला. यानंतर स. १४५८ मध्यें हा मरण पावला व याच्यानंतर याचा मुलगा हुमायूनशाह गादीवर बसला. यानें मुलकी व लष्करी खात्यांत सुधारणा केली.

गादीवर आल्यावर यानें एक मशीद बांधिली. यानें अनेक धर्मकृत्यें केलीं. हा दर शुक्रवारीं स्वतः खुत्बा पढून लोकांस धर्मोपदेश करी. यानें मद्यप्राशनाची बंदी केली. यानें अनेक बंडें मोडलीं. मुहंमद गवान प्रथमतः याच्या वेळीं प्रसिद्धीस आला. हा धूर्त व विद्येचा भोक्ता होता. याच्याच कारकीर्दीत नरसिंहसरस्वती हा साधु उदयास आला. गुरुचरित्रांतील बेदरच्या शाहाच्या पायाचा फोड बरा केल्याची गोष्ट याच्याच बद्दलची आहे, असें रा. चिं. वि. वैद्य म्हणतात.

**३.** (स. १५२१-२३) हा दुसऱ्या महमूदशहा बाहामनीचा मुलगा होय.

हा बाहामनी राज्यांतील दुसऱ्या अहमदाचा भाऊ होय. हा आपल्या भावानंतर गादीवर बसला. परंतु वजीर अहमद बरीद यानें याला पदच्युत करून याचा वडील भाऊ वली-उल्लाह यास गादीवर बसविलें.

शेवटीं याचा खून झाला. याच वेळीं बाहमनी राज्याचे पांच तुकडे होऊन निजामशाही, आदिलशाही, कुत्बशाही, बरीदशाही व इमादशाही हीं पांच राज्यें अस्तित्वांत आलीं.

**अला उद्दीन मसूद**—(स. १२४२-४६) दिल्लीच्या गुलामघराण्यांतील बहिरामचा पुतण्या. हा बहिराम नंतर गादीवर आला. हा रुक्नुद्दीनचा मुलगा.

याच्या वेळींहि दंगेधोपे चालून होते. हा क्रूर व चैनी असल्यामुळें राज्यकारभाराकडे याचें लक्ष नसे. दरबारच्या लोकांनीं याला कैद करून याचा चुलता नासिरुद्दीन यास राज्यपद दिलें. हा कैदेंतच मरण पावला. याच्या वेळीं मोंगलांनीं हिंदुस्थानावर दोन स्वाऱ्या केल्या. परंतु दोन्ही वेळां यास माघार घ्यावी लागली.

**अला उद्दीन सय्यद**—दिल्लीच्या सय्यद घराण्यांतील मुहंमदाचा हा मुलगा. हा आपल्या बापानंतर दिल्लीच्या गादीवर आला (स. १४४५).

हा बापापेक्षांहि दुर्बळ निघाल्यामुळें दिल्लीपतीची सत्ता राजधानीच्या शहराबाहेर फारशी उरली नाहीं. तैमूरलंग परत गेल्यावर पुष्कळ सुभेदार स्वतंत्र झाले, तरी राजधानीचे सभोंवार बराच मुलूख राहिला होता. पण तोहि आतां गेला. तशांत बहलूलसारखा कावेबाज मनुष्य अनुकूल प्रसंगाची वाट पाहत होता. बदाऊन म्हणून अला उद्दीनानें स्वतः वसविलेलें व याच्या आवडीचें एक शहर होतें. तेथें हा जाऊन राहिला. हें

ह्याच्या वजीरास पसंत नव्हतें. त्यामुळें दोघांत वितुष्ट आलें. शेवटीं अला उद्दीननें स्वतःच्च खुशीनें सर्व राज्य बहलूल लोदी याच्या स्वाधीन करून आपण बदाऊन येथें राहण्याचें कबूल केलें. तेथें सन १४७८ त याचा अंत झाला ( मु. रि. भा. १ ला, पृ. १८७–८८ ).

**अला उद्दौला** ( उर्फ **अल् करीम गझनवी** )— ( स. १०९९ ते १११५ ) इब्राहिम गझनीचा हा २३ वा मुलगा. हा स. १०९९ मध्यें गझनीचा अमीर झाला. यानें १७ वर्षें शांततेनें राज्य केलें. याच्या कारकीर्दींतील दोनच गोष्टी महत्त्वाच्या अशा सांगण्यासारख्या आहेत. तुघासिगिन यानें गंगापार स्वारी केली, पण त्याची हकीगत उपलब्ध नाहीं. शंसबानी राजघराण्यांतील सामचा मुलगा हुसेन याची प्रप्रांतावर केलेली नेमणूक. या दुसऱ्या गोष्टीचें महत्त्व इतकेंच कीं, गझनीच्या साम्राज्याच्या या पडत्या काळांतही शंसबानी राजघराणें गझनीचें मांडलिक समजलें जात होतें. हा वयाच्या सत्तावन्नाव्या वर्षी स. १११५ त वारला ( कें. हि. ). गझनीच्या यामिनी वंशांतील तिसरा मसूद म्हणून हा प्रसिद्ध आहे.

**अला उल्मुल्क कोतवाल**—( स. १२९४-१२९९ ) अला उल्मुल्क हा अला उद्दीन खल्जीचे कारकीर्दींत त्यास ज्या चार सरदारांनीं विशेष मदत केली त्यांपैकीं एक होता. स. १२९४ चे सुमारास अला उद्दीनाचे मनांत देवगिरीवर स्वारी करून आपली सत्ता, सामर्थ्य, संपत्ति व कीर्ति वाढवून जमल्यास दिल्लीचे तक्तावर विराजमान होण्याची महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली. देवगिरीवर स्वारी करण्यास जाण्यास आपला चुलता सुलतान जलालुद्दीन फीरूझशाह परवानगी देणार नाहीं म्हणून त्यानें अला उल्मुल्कला आपल्या मसलतींत घेतलें. अला उल्मुल्क याजकडे कोराच्या सुभेदारीचे आपले सर्व अधिकार त्यानें दिले. सुलतानास पाठवावयाच्या नियतकालिक अहवालांवरून अला उद्दीन काराहून कोठें पसार झाला आहे अशी शंका सुलतानास येणार नाहीं किंवा ज्या कामगिरीवर तो निघाला होता त्या कामगिरींत यश मिळाल्यास अला उद्दीन आपला घात करील अशीहि शंका सुलतानास येणार नाहीं, अशा खुबीनें अहवाल पाठविण्याची कामगिरीहि अला उल्मुल्ककडे सोपविण्यांत आली होती. दोन्हीहि कामगिऱ्या अला उल्मुल्कनें मोठ्या चातुर्यानें व खबरदारीनें पार पाडल्यामुळें अला उद्दीनास देवगिरीचे कारवाईंत यश मिळून तो प्रचंड लूट बरोबर घेऊन काराकडे परत फिरेपर्यंत त्याच्या देवगिरीच्या स्वारीची व कारस्थानाची यत्किंचितहि माहिती सुलतानास मिळाली नाहीं. स. १२९६ मध्यें विश्वासघात करून आपल्या चुलत्याचा माणिकपूरजवळ खून करून दिल्लीचे सुलतान पदावर विराजमान होण्याची महत्त्वाकांक्षा यशस्वी केल्यावर अला उद्दीनानें या यशाचें बक्षीस म्हणून दिल्लीच्या कोतवालाच्या मोठ्या अधिकारावर अला उल्मुल्कची नेमणूक केली. या सुमारास अला उल्मुल्कचे अंगांत वात शिरून हा बेसुमार लठ्ठ झाला असल्यामुळें सेनापतित्वास नालायक झाला होता. नाहींतर एखादी सुभेदारीहि यास अला उद्दीनानें खुषीनें दिली असती.

अला उद्दीनास सवाई सिकंदर होऊन जगज्जेत्यांच्या बरोबरीचें आपण व्हावें असें वाटत असे. त्याचप्रमाणें राजकीय सत्ताधीशत्वाबरोबर धार्मिक सत्ताधीशत्वहि आपणाकडेच असावें असेंहि त्यास वाटे. सिकंदराप्रमाणें जगज्जेत्याचें ऐहिक ऐश्वर्य व मुहंमदाप्रमाणें धर्मसंस्थापकाची राजर्षीची ऐहिकपारलौकिक थोरवी अशा दोन्हीहि सिद्धी प्राप्त होण्याची आपली लायकी आहे असें तो समजत असे. आपल्या जिगरदोस्तांस तो नेहमीं विचारी कीं, सिकंदर व मुहंमद या दोघांच्याहि ऐश्वर्याहून सरस ऐश्वर्य मिळविविण्याची माझी धमक नाहीं का ?

त्याचे दोस्त जगज्जेता होण्याच्या त्याच्या महत्वाकांक्षेचें कौतुक करून त्यास प्रोत्साहन देत. परंतु राजर्षि होण्याच्या त्याच्या इच्छेसंबंधीं मात्र मूकवृत्ति स्वीकारून त्यास तितकेंच नाउमेद करीत. धर्माध्यक्षाचा मुकुट धारण केल्याचें जाहीर करावें किंवा न करावें याची भवति न भवति करण्याकरितां अला उद्दीन राजवाड्यांत मजलसीहि करी. परंतु कोतवाल अलाउल्मुक वातबद्धतेमुळें याचें शरीर अस्ताव्यस्त वाढल्यानें या मजलसीस हजर राहत नसे. या विषयावर आपलें मत उघडपणें राजवाड्यांतील मजलसींत जाहीर करण्याचा यास एकदां हुकूम झाला. या धार्मिक विषयावरील मतप्रदर्शनाचे वेळीं दारूपान अयोग्य म्हणून दारूच्या सुरया उचलून ठेवण्यास प्रथम सांगून राजाच्या अत्यंत विश्वासांतील उमरावांशिवाय बाकीच्यांनीं सभागृह सोडून जावें, अशी यानें सर्वांस विनंती केली. अगदीं शेलके लोक शिल्लक राहिल्यावर हा म्हणाला, ' मी स्पष्ट बोलतों याबद्दल मजवर कृपा करून रागावूं नका. पण रागावलांत तरी या महत्त्वाच्या विषयावरील माझीं मतें स्पष्टपणें प्रदर्शित करतांना मी आपल्या रागाची पर्वा करणार नाहीं. धार्मिक सुधारणा करण्याचें काम प्रेषितांचें आहे, राजांचें नव्हें. आर्थिक अथवा सैनिक सत्तेचे जोरावर धर्मसुधारणा यशस्वी करतां यावयाच्या नाहींत. धर्मसुधारणा यशस्वी होणें न होणें ईश्वरी इच्छेवर सर्वस्वीं अवलंबून आहे. राजा कितीहि सामर्थ्यवान्

असला तरी नवधर्मसंस्थापना करण्याच्या प्रयत्नांत त्यास यश मिळावयाचें नाहीं. ' हें विवेचन ऐकून अला उद्दीन विचारमग्न झाला व कांहीं वेळानें मस्तक वर करून म्हणाला, 'अला उल्मुल्कनें केलेल्या कानउघाडणीमुळें मी जागा झालों आहें. माझी चूक माझ्या चांगली ध्यानांत आली आहे. यापुढें नवधर्मसंस्थापनाचा धर्मद्रोही प्रयत्न मी कधींहि करणार नाहीं. ' राजाचें हें आश्वासन ऐकून अला उल्मुल्कला धीर आला व यानें अला उद्दिनासमक्ष त्याच्या दुसऱ्या महत्त्वाकांक्षेसंबंधानें व त्याच्या कांहीं घातुक संवयींसंबंधानें आपले मत निर्भीडपणें व्यक्त केलें. ' सवाई सिकंदर होण्याची महत्त्वाकांक्षा नीति अनीतींचा संबंध नसल्यानें दोषार्ह नाहीं. तरी या महत्त्वाकांक्षेस मूर्त स्वरूप आणण्याचा विचार पुढचा आहे. हिंदुस्थानांत अद्याप दिल्लीचे सत्तेबाहेर असलेले पुष्कळ प्रांत आहेत. '

'मोंगल लोक स्वाऱ्या करून लोकांचे वारंवार हाल करीत आहेत व शिवाय, राजेसाहेब, आपण सिकंदरप्रमाणें मुलूखगिरीवर जाल, तेव्हां आपल्या सध्यांच्या राज्याचा कारभार मुत्सद्दीपणानें चालविण्यास सिकंदरप्रमाणें एखादा ॲरिस्टॉटलहि आपले पदरीं नाहीं. जिंकाल त्या प्रांतांचा बंदोबस्त करावयास आपल्या पदरीं पुरेसें कर्तबगार सरदारहि नाहींत. तूर्त राजेसाहेबांनीं, दारूपान सोडून देऊन शिकारींत व्यर्थ जात असलेला वेळ राज्यकारभाराकडे खर्च करण्याची महत्त्वाकांक्षा धरावी हेंच उचित आहे. ' सुलतान अला उद्दीनानें या निर्भीड सल्ल्याबद्दल अला उल्मुल्कचें आभार मानले व यास योग्य असें बक्षीसहि दिलें.

स. १२९९ मध्यें मोंगलांची स्वारी दिल्लीपर्यंत येऊन दिल्लीस वेढा घालण्याची मोंगलांनीं तयारी केली, तेव्हां अला उद्दीनानें मोंगलांचा मोड करावयास दिल्लींतून बाहेर पडतांना अला उल्मुल्कला दिल्लीचे राज्यकारभाराचे सर्वाधिकार दिले होते. यानंतर पुढें थोडयाच दिवसांनीं अलाउल्मुल्क वारला ( कें. हि. ).

**अला दाउद बीदरी**—फीरूजशाह बाहामनी यानें हिंदूंवर एकंदर चोवीस स्वाऱ्या केल्या. यांविषयीं सर्वांचें एकमत आहे. पण ह्यांपैकीं कांहीं स्वाऱ्यांचें वर्णन यानें तुहफत उसलातीन या ग्रंथांत केलें आहे ( बहमनी रा. इतिहास-मोडक, पान ८६ ).

**अलाविर्दीखान**—(स.१७४०–५६ ) अलाविर्दीखान असा शुद्ध उच्चार आहे. पण डफनें अलीवर्दीखान असें याचें नांव दिलें आहे. अलीवर्दीखान याचा बाप अजमशाहाचा नोकर होता. हा प्रथम बंगालचा नबाव सुजाउद्दीनखान याच्या पदरीं होता. याला पुढें बहारचा सुभेदार नेमिलें. यानें डोईजड राजांची पुरी खोड मोडली. पुढें सुजाउद्दीनच्या मरणानंतर हा बंगाल, बहार, ओरिसा प्रांतांवर सत्ता गाजवूं लागला. यानें पहिलीं ११ वर्षें मराठयांच्या बंगालवरील स्वाऱ्या परतविण्यांत घालविलीं. यानें वरील तीन प्रांतांवर १६ वर्षें राज्यकारभार केला. हा स. १७५६ त मरण पावला. यानें राजकारणांत फारच दुष्ट कृत्यें केलीं.

स. १७४४चा पावसाळा संपल्यावर भोसल्यानें बंगालवर स्वारी केली. तेव्हां यानें सलोखा करण्याच्या मिषानें भोंसल्याच्या मुख्य भास्करराम कोल्हटकर यास मेजवानीस बोलावून विश्वासघातानें त्याचा खून केला (स. १७५५).

**अलासिंग**—( पतियाळ ) हा पतियाळाचा संस्थानिक असून याला अहमदशाहा दुराणीनें स. १७६२ सालीं राजा हा किताब दिला. त्या वेळेपासून या संस्थानास खरी सुरवात झाली.

परंतु खरी सुरवात स. १७६३ सालीं शीख लोकांनीं अहमदशाहाच्या सुभेदारांपासून सरहिंदचा किल्ला घेऊन प्रांताची विभागणी केली तेव्हांपासून होते. या विभागणींत, सरहिंद व त्याच्या आजूबाजूचा प्रदेश याच्या वांटयाला आला. हा स. १७६५ त वारला. याच्यानंतर याचा नातू अमरसिंग गादीवर आला.

**अलिकसुंदर**—अलेक्झांडर शब्दाचें संस्कृतीकरण ( सिकंदर पाहा ).

**अली बिन अझीझ उल्लह तबातबा**—हा मुसलमान इतिहासकार. यानें बुर्हान-इ-मआसिर नांवाचा इतिहास लिहिला. त्यांमध्यें बाहमनी व अहमदनगरच्या निजामशाहीचा इतिहास आहे. इंडियन ॲंटिक्केरीमध्यें किंग व हेग यांनीं त्याचें इंग्रजी भाषांतर केलें.

**अली अबुल हसन गझनवी**—(२९ डिसेंबर१०४९ ते १०५२ ) अली अबुल हसन हा मौदूद गझनवीचा भाऊ. मौदूद २९ डिसेंबर १०४९ रोजीं वारला. तेव्हां राजवाडयांतील चाकरांनीं त्याच्या इच्छेस अनुसरून त्याचा अल्पवयी मुलगा मसूद तीन वर्षांचा होता त्यास अमीर केल्याचें जाहीर केलें व त्याचे आईस राज्यकारभार पाहण्यास सांगितलें. हा प्रकार गझनीच्या उमरावांस न विचारतां केलेला असल्यानें त्यांनीं मसूद यास पदच्युत केल्याचें व त्याचा चुलता अली अबुल हसन यास अमीर केल्याचा जाहीरनामा २९ डिसेंबर १०४९ रोजीं काढला. अलीनें आपल्या भावाची बायको सल्जूकराजकन्या इजबरोबर विवाह केला. अली दुबळा होता. राज्यकारभाराची जबाबदारी यास रेटेना. तेव्हां स. १०५२ मध्यें महमूदचा मुलगा इझुद्दौला अब्दुल रशीद कैदेंतून

सुद्न गझनीवर चाल करून आला व अलीला त्यानें पदच्युत केलें. स. १०५२ ( कें. हि. ).

**अली आदिलशाह**— ( स. १५५७-१५८० ) विजापूरच्या आदिलशाही घराण्यांतील पहिल्या इब्राहीमचा हा पुत्र होय. हा असदखानाचे कन्येपासून इब्राहीमास झाला.

लहानपणीं याचा कल शियापंथाकडे असल्यामुळें याजवर राजाची गैरमर्जी झाली व याची रवानगी असदखानाकडे केली. याची असदखानाकडे रवानगी केल्यावर 'गादीचा वारस, आपला धाकटा पुत्र तहमास्प हा आहे' असें इब्राहीमानें जाहीर करून अलीस विषप्रयोग करावा किंवा ठार मारून टाकावें, असा निरोप असदखानाकडे पाठविला. त्या वेळीं असदखानाचा पुत्र कीश्वरखान हा हुजूर चाकरीवर मिरजेस होता. त्यानें ज्योतिषास बोलावून तहमास्प आणि अली यांच्या दैवाची परीक्षा करविली. त्यांत तहमास्प हा दुर्दैवी दिसून बहुतेक ग्रह अनिष्ट व प्रतिकूल दिसले. अलीस ग्रहगणाची अनुकुलता व नक्षत्राची उत्तम दृष्टी दिसली, आणि मोठा दैववान् व यशस्वी होणार असें ज्योतिषांच्या गणितावरून समजलें. तेव्हां कीश्वरखानानें वरील ज्योतिष्याची माहिती गुप्त रीतीनें असदखानास कळवून त्यास सुरक्षित ठिकाणीं ठेवण्यास सांगितलें. तेव्हां असदखानानें बादशाहाचे समाधानाकरितां हरणाचे दोन डोळे काढून व मुलाचें एक बोट तोडून बादशाहाकडे रवाना केलें आणि विनंतिपत्रांत लिहिलें कीं, हुकुमाप्रमाणें अली याचे दोन्ही नेत्र काढून व एक बोट तोडून त्याजला ठार केलें आहे.

नंतर इब्राहीम वारला. तेव्हां जयदखान हवालदार विजापूरकर यानें बादशाहाचें प्रेत गोगीस पाठवून शाहाजादा तहमास्प याजला कैदेंत ठेविलें. आणि असदखानास लिहून पाठविलें. खानानें हें वर्तमान ऐकतांच अली याजला कैदेंतून मुक्त करून बादशाही पोषाखानिशीं त्यास बाहेर काढलें आणि सरंजामानिशीं मिरजेहून विजापुरास पाठविलें. अली विजापूरास आल्यावर सर्व सरदारांनीं आणि कामदारांनीं सामोरे येऊन यास नजरनजराणे केले व नंतर हा बादशाही ऐश्वर्यानें विजापूरच्या आदिलशाही तख्तावर बसला. पुढें यानें तहमास्प व त्याचे कुटुंबांतील मंडळींना प्रतिबंधांत ठेविलें.

याला लहानपणींच मोठ्या विद्वान् गुरूपासून चांगलें शिक्षण मिळालें होतें. अनेक लिपींचीं अक्षरें अली चांगलीं लिहीत असे. व्युत्पत्ति चांगली झाली असून हा अनेक ग्रंथ पढला होता. याला बहुत बैता (कविता) आणि दृष्टांत पाठ येत असत. लहानपणापासून मोठा धर्मनिष्ठ व दयावंत होता. तख्तावर आल्यापासून यानें आपली वागणूक शिस्तवार ठेविली. जरी यानें शिया पंथ स्वीकारला होता तरी सुनी पंथाच्या लोकांना उपद्रव न होईल अशी व्यवस्था केली. याची दातृत्वशक्ति विलक्षण होती. जरी हिंदु जातीचा साधु आला तरी त्याची परीक्षा घेऊन त्याच्या योग्यतेनुरूप त्यास हा संभावना देत असे. हा स्वतः ऐषआराम व चैन कधीं भोगींत नव्हता व आपले अंगावर अलंकारभूषणें घालीत नसे. बादशाही तख्तावर बसून न्याय आणि इन्साफ अगदीं निःपक्षपातानें करी. या सद्गुणास यानें आरंभापासून अखेरपर्यंत सोडलें नाहीं. प्रजेच्या सुखाकडे व त्यांच्या हक्काकडे व मानापमानाकडे लक्ष देऊन अगदीं यथान्याय वसूल घेऊन पृथ्वीवरील मोठ्या न्यायी व नीतिमान राजांत यानें आपली गणना करून घेतली.

यानें गादीवर आल्यावर पहिल्याच वर्षीं कीश्वरखान यास विजयानगरच्या रामराजाशीं तह करण्याकरितां पाठविलें. नंतर हा स्वतः विजयानगरास रामराजाच्या भेटीस गेला. रामराजानें याचा चांगल्या प्रकारें सत्कार करून याच्याशीं मैत्री संपादिली. हुसेन निजामशाहा यानें याच्याविरुद्ध युद्ध पुकारलें. तेव्हां यानें रामराजाची मदत घेऊन हुसेनचा पूर्ण पराभव केला व त्याचा बराचसा मुलूख ओसाड पाडला. नंतर हुसेननें कल्याणीचा किल्ला अली आदिलशाहास देऊन याच्याशीं तह केला. प्रत्येक वेळेस रामराजाची मदत मागितल्यामुळें रामराजास गर्व होऊन तो अलीस डोईजड होऊं लागला व मुसलमानांच्या मुलुखास बेधडक उपद्रव देऊं लागला. यामुळें अली फार कंटाळला आणि रामराजाचा फडशा केल्याशिवाय मुसलमानी अमलाचा बचाव करण्यास दुसरा मार्ग नाहीं अशी याची खात्री झाली. तेव्हां यानें दक्षिणेंतील सर्व मुसलमानांची एकी करून रामराजाचा फडशा उडविण्याचा व्यूह रचिला. त्याप्रमाणें उभयतांची लढाई तालीकोट किंवा राक्षस-तागडी येथें होऊन त्यांत रामराजाचा पूर्ण पराभव झाला व त्याच लढाईंत रामराजा मारला गेला ( स. १५६५ ). रामराजाच्या मृत्यूनंतर यानें राज्यविस्तार बराच करून आपलें महत्त्व वाढविलें.

याला पुत्र नव्हता म्हणून यानें सन १५७९ मध्यें आपला बंधु तहमास्प याचा पुत्र इब्राहीम यास आपल्या मागें गादी मिळावी असा ठराव केला. पुढील सालीं स. १५८० मध्यें याचा एका खोजानें वध केला. (चांदबिबी पाहा.) याचें कारण त्यास बेदरच्या दरबारांतून त्याची खुषी नसतांना अली आदिलशाहानें जुलुमानें विजापुरीं आणलें होतें.

यास विजापूर शहरींच पुरलें. याचे कबरेस रोझाअली असें म्हणतात व ती अद्याप आहे. याजकडे अकबर बादशहाकडून दोन वकील आले होते. शेवटीं आलेला वकील, राजा मरण पावला त्या वेळीं विजापुरींच होता. जुम्मा-मशीद, हावझी शहापूर, शहरचा तट आणि रस्तो-रस्तीं पाणी नेण्याचे नळ हीं कामें अली आदिलशाहाच्या कारकीर्दीत झालीं ( विजापूरचें आदिलशाही घराणें, मोडककृत. ).

२. ( स. १६५७-१६७२ )—विजापुरच्या मुहंमद आदिलशाहाचा हा पुत्र होय. याचा जन्म स. १६३८ या सालीं झाला. याच्या वयास चार वर्षे चार महिने चार दिवस होतांच सुलतान मुहंमदानें (याचा बाप) याच्या विद्याभ्यासाकडे लक्ष पोहोंचवून व सर्व प्रकारच्या विद्या शिकविण्यास योग्य शिक्षक नेमून स. १६४२ मध्यें बिस्मील्लाचा समारंभ केला. स. १६४४ मध्यें म्हणजे याच्या वयाच्या सातव्या वर्षी याची सुन्नत केली. थोड्याच दिवसांत याला लिहिणें, वाचणें, कसरत, तीर, भाला, बर्चा, तलवार वापरण्यास व घोड्यावर बसण्यास शिकविलें. याला सुलतान मुहंमद मरण पावल्यावर व वयाच्या १९ व्या वर्षी स. १६५७ मध्यें तक्तावर बसविलें.

प्रथम मदारखान मुहंमद हाच याचा कारभार पाहत असे. पण त्याच्या मृत्यूनंतर दिवाणाच्या कामावर इब्राहीमखानाची नेमणूक केली. कांहीं दिवसांनीं इब्राहीम मक्केच्या यात्रेस गेला म्हणून इब्राहीमचा मुलगा अबदुल्ला मुहंमद हाच दिवाणाचें काम पाहूं लागला व याच्या कारकीर्दीच्या अखेरपर्यंत याच्याच तंत्रानें सर्व कारभार चाले.

याला गादीवर येऊन एक वर्ष झालें नाहीं तोंच औरंगजेबानें याच्यावर स्वारी करून याचे दोन किल्ले घेतले. त्याच वेळीं मराठ्यांचा राजा शिवाजी यानेंहि याच्या राज्यांत धुमाकूळ चालविला होता. तेव्हां यानें औरंगजेबाचा बंदोबस्त करण्याकरितां खानखानान मुहंमद यास पाठविलें. खानखानानें औरंगजेबास चारी बाजूंनीं कोंडून त्याची दाणावैरण अजिबात बंद करून टाकली. तेव्हां निरुपायास्तव औरंगजेबानें खानखानाची विनवणी करून सुटका करून घेतली. नंतर यानें शिवाजीची बंडाळी मोडण्याकरितां अफझुलखानास दहा हजार निवडक सैन्यासह पाठविलें. पण शिवाजीनें मोठ्या युक्तीनें अफझुलखानाचा वध करून त्याच्या सैन्याचा पराभव केला ( स. १६५९ ). ही बातमी कळतांच यास फार वाईट वाटलें. नंतर अफझुलखानाच्या सूडाकरितां यानें शिवाजीवर सलाबतखानास पाठविलें. पण त्याचाही कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं अली मोठ्या फौजेनिशीं शिवाजीवर चालून गेला. अलीच्या स्वारीमुळें शिवाजीचें फारसें नुकसान न होऊन अलीस परत विजापुरीं यावें लागलें. याच वेळीं याला सिद्दी जोहाराशीं लढाया कराव्या लागल्या. वरील सर्व शत्रूंत शिवाजीनें विजापूरच्या राज्यांत फारच बंडाळी माजविली होती व शिवाजीमुळें मोंगलांच्या स्वाऱ्या विजापूरच्या राज्यावर झाल्या. मोंगलांचा सरदार जयसिंग याच्या विजापूरच्या राज्यावर सारख्या स्वाऱ्या होत होत्या. पण त्याचा आदिलशाही सैन्याकडून वेळोवेळीं पराजय होत असे. स. १६६६ मध्यें याच्या सैन्यानें जयसिंग या मोंगलीसरदाराचा पूर्ण पराभव केला. अशा प्रकारें याला मोंगल व मराठ्यांचा शिवाजी असे दोन शत्रु होते.

याचें प्रजापालनाकडे चांगलें लक्ष होतें. हा विद्वान् असून गुणीजनांचा भोक्ता होता. ख्यालीं खुशालीकडे जरी याचें लक्ष होतें, तरी हा नियमित आचरणी होता. याला स्वतः कविता करितां येत असून याचा हिंदुस्थानी कवितेकडे ओढा फार असे. दरबारांत बहुतेक कविता करणारांचा भरणा जास्त होता. या कवींत मिया नसती हा सर्वांत श्रेष्ठ गणला जाई. त्याच वेळीं मियाहषम हा एक जन्मांध कवि होता. त्यानेंहि आपल्या कविता उर्दु भाषेंत फार नामी केल्या आहेत. दुसरे आणखी कांहीं कवि याच्या दरबारीं होते. हा जिवंत होता तोंपर्यंत दरबारांतील अंतर्गत वैमनस्यें उघडकीस आलीं नव्हतीं. स. १६७२ मध्यें याचा मृत्यु झाला.

हा तख्तावर बसला त्याच्या पहिल्या वर्षी यानें हसनी महाल बांधिला. स. १६६० त यानें शिवाजीकडून पन्हाळा घेतला. हा फार विषयी होता. याला तीनशें बायका असून त्यांच्याशीं सुखोपभोगाकरितां यानें शयनमंदिर बांधिलें व त्यास 'आरसेमहाल' असें नांव दिलें. स. १६६२ सालीं शाहा पेठ बांधिली.

मृत्युसमयीं याचें वय ३५ वर्षांचें असून यानें १६ वर्षे सहा महिने राज्य चालविलें ( मोडककृत-विजापूरचें आदिलशाही घराणें ).

**अली कुली**—शिवाजी आग्र्याहून पळून गेल्यावर बादशहानें सर्व अधिकाऱ्यांना तो सांपडेल तेथें पकडण्याचा हुकूम काढला. तेव्हां एके दिवशीं बैराग्याच्या वेषांत असणाऱ्या शिवाजीस व त्याचे लोकांना यानें पकडलें. तेव्हां अटकेंत असतां शिवाजीनें अलीच्या समोर जाऊन मीच तो शिवाजी असें सांगितलें आणि आपल्या जवळचा एक मौल्यवान हिरा याचे हातावर ठेवला.

एवढ्यानें याचें समाधान झालें व शिवाजी सुरक्षितपणें निसटला. अली कुलीच्या गांवाचें नांव सांपडत नाहीं ( श्री. सरकारकृत शिवाजी अँड हिज टाइम्स, पृ. १८९ ).

**अलीखान**—काश्मीरच्या मुसलमान वंशांतील शीरशामक शिहाबुद्दीनाचा हा दुसरा मुलगा.

**अलीखान लूरी**—हा गोवळकोंड्याच्या मुहंमद-कुली कुत्बशाह याचा एक सरदार होता. पण यानें मुहंमदाचे विरुद्ध रंगराय ( विजयानगरचा राजा ) याचा जांवई जो मिकर तिम्म यास विजयानगरचे जिंकलेले प्रांत परत मिळविणेस मदत केली.

**अली गौहर**—( शहा अलम पाहा ).

**अली बरीद शाहा**—(स. १५४९-१५६२) बेदरच्या बरीदशाही वंशांतील अमीर बरीदाचा मुलगा. यानेंच प्रथमतः शाहा हा किताब धारण केला. अहमदनगरच्या निजामशाहानें याच्या राज्याचा बराच भाग हल्ला करून घेतला. हा स. १५६२त मरण पावला. याच्यानंतर त्याचा पुत्र इब्राहीम बरीद शाहा हा बेदरच्या गादीवर आला.

२. ( स. १६०९-१९ ) बेदरच्या बरीद वंशांतील हा अली बरीदाचा मुलगा.

**अली बहादर**—( स. १७६०-१८०२) हा पहिल्या बाजीराव पेशव्याचा नातू व समशेर बहादरला मेहेरबाई नांवाच्या स्त्रीच्या पोटीं झालेला पुत्र. याला कृष्णसिंग असेंहि म्हणत. याचा जन्म सन १७५८ असा रियासतकार देतात. पण भा. इ. सं. मंडळाच्या त्रैमासिकांत याचा जन्म स. १७६० मध्यें झाल्याचें दिलें आहे ( ६·१०६ ).

यानें आपला शिक्षक जो यमाजीपंत यास आपणांस शिकविण्याबद्दल सरकारांतून पगार चालू व्हावा व आपला पहिला घोडा मेला असून दुसरा चांगला घोडा पाठवावा, असें पत्र पेशव्यास ता. १९-११-१७६६ (?) रोजीं लिहिलें होतें ( पे. द. ३२, ३५ ). तेव्हां पेशव्यांनीं ता. १२-१२-१७६६ रोजीं नाना फडणिसास पत्र लिहून कळविलें कीं, अली बहादरास जरूर असणाऱ्या किरकोळ गोष्टींचा सुद्धां पुरवठा करावा आणि त्यास लागणाऱ्या गोष्टींकडे लक्ष पुरवावें ( पे. द. ३२, ३६). यावरून पेशव्यांचे व याचे संबंध दिसून येतात.

बापापेक्षांहि हा शूर व पराक्रमी निघाला. महादजी शिंदे यांना मदत करण्याकरितां व बुंदेलखंडांतील पेशव्यांच्या मुलखाची व्यवस्था करण्याकरितां याला नानांनीं रवाना केलें. प्रत्यक्ष महादजी शिंदे व हा यांनीं सलोख्यानें कामेंहि केलीं. पण हिंमतबहादरच्या प्रकरणापासून महादजींशीं याचा विरोध सुरू झाला. शेवटीं तर हा पेशव्यांसहि न जुमानतां स्वतंत्रपणें वागूं लागला असे दिसतें (मं. त्रै. ४.२२ व सप्तम संमेलनवृत्त). यानें बुंदेलखंडांत पराक्रम करून पाऊण कोटीचा मुलूख काबीज केला. त्या वेळचीं स. १७८८-१८०१ मधील पत्रें इतिहाससंग्रहांत व मराठीदप्तर रुमाल तिसऱ्यांत छापलीं आहेत. गुलाम कादरच्या छळापासून बादशाहची मुक्तता करण्याकरितां स. १७८८ मध्यें राणेखान दिल्लीस गेला तेव्हां त्याचेबरोबर हा होताच.

हिंमतबहादर गोसाव्यास शिंद्याचे शिपाई पकडून नेत असतां तो पळाला व याच्या आश्रयास आला. महादजीनें त्याला स्वाधीन करण्याविषयीं सांगितलें असतां यानें नाना फडणिसाचा हुकूम पाहिजे असें सांगितलें. आणि तसा हुकूम येण्यापूर्वींच त्याला पळून जाण्यास संधि दिली. हिंमतबहादरच्या प्रेरणेनें यानें बुंदेलखंड बहुतेक जिंकलें. त्या कामांत याचे बरेच दिवस गेले. पण पराक्रमानें तें काम यानें पार पाडलें ( स. १७९२ ). पुढें पेशव्यांच्या संमतीनें सागरच्या ईशान्येस बांदा येथें आपलें वास्तव्य केलें. व तेथें पुण्याहून लोक नेऊन अठरा कारखाने स्थापिले. गोरे नांवाचा एक इसम यानें आपला दिवाण नेमला होता. त्याचे वंशज अद्यापि बांदा येथें आहेत. अशा रीतीनें स. १७८८ मध्यें बांद्याची जहागीर उत्पन्न झाली. कालिंजरचा किल्ला घेत असतां हा मारला गेला ( स. १८०२ ).

याची पत्नी बादशहा बेगम लहानपणींच वारली. तिच्याशिवाय यास दुलन बेगम व बक्षी बेगम अशा दोन स्त्रिया होत्या. दुलन बेगमचा मुलगा दुसरा समशेरबहादर व बक्षी बेगमचा मुलगा झुल्पिकार अली. यांशिवाय रहिमत बिबी नांवाची यास एक रक्षा होती. याशिवाय दादा व प्यारी अशीं दोन मुलें आढळतात ( मराठी दप्तर ३.४०; १३५ ). याची मुद्रा—श्रीमाधव चरणीं तत्पर। अली बहादर निरंतर ॥ हे मुसलमान असूनहि पेशव्यांचे अभिमानी व कृष्णभक्त होते.

**अलीमर्दानखान**—हा एक हुशार मुत्सद्दी शहाजहानच्या पदरीं होता. हा जसा मुत्सद्दी तसा शूरहि होता. यानेंच इराणच्या शाहाकडे असलेला कंदाहारचा किल्ला काबीज केला ( स. १६३७ ) व तेव्हांपासून पुढें हा कंदाहारासच राहूं लागला. पुढील वर्षीं बादशहानें लाहोर येथें याची भेट घेतली, व यास मोठी मनसब दिली. पुढें कांहीं वर्षें हा काश्मीरच्या सुभ्यावर होता. नंतर पंजाब प्रांताची सुभेदारीहि यालाच बहाल करण्यांत आली.

यानें लोकोपयोगी अशा बऱ्याच कामगिऱ्या केल्या. रावी नदीला एक मोठा फांटा फोडून एक दिल्लीस व एक लाहोरास असे दोन कालवे तयार केले. अद्यापिहि त्यास 'अलिमर्दानखान-कालवा' असेंच नामाभिधान देण्यांत येतें.

मध्य आशिया व इराण इकडील कारस्थानांत बादशहास याचा फार उपयोग झाला. तेव्हां यास 'अमिरुल-उमरा' हा किताब बहाल करण्यांत आला. यास सालीना तीस लाख रुपयांचें उत्पन्न होतें. हा स. १६५७ त मरण पावला. याची कबर लाहोरला आहे. बादशहास याच्या मृत्यूमुळें अनिवार दुःख झालं (मु.रि.भाग २ पृ.२४९-५०).

**अलीमर्दानखान खल्जी**—( स. १२१०-१२१३ ) बंगालमध्यें मुसलमानी सत्ता स्थापन करणाऱ्या इखत्यार उद्दीनच्या हाताखालील एक सरदार. इखत्यार उद्दीननें अचाट कृत्य करण्याच्या भरीस पडून स. १२०५ मध्यें तिबेटवर स्वारी केली. पण त्यांत सर्व सैन्याचा नाश झाला आणि अपयश आलें. यामुळें लखनावती राजधानींत असंतोष उत्पन्न झाला. या स्थितीचा फायदा घेऊन यानें इखत्यारचा खून केला. पण इखत्यारचे मागें मुहंमद शीरान हा बंगालचा सुभेदार झाला आणि याला त्याच्या कैदेंत राहावें लागलें. पण तेथून हा निसटला आणि कुतुबुद्दीन ऐबककडे गेला. ऐबककडून बंगालच्या मुलुखाची सरदारांत फेरवांटणी करण्याकरितां यानें अधिकारी नेमून घेतला. पण मुलुखाची वांटणी करण्याच्या गडबडींत मुहंमद शीरान हा याचा मुख्य शत्रु मारला गेला आणि ऐबकची मनधरणी करून यानें बंगालची सुभेदारी मिळवली. स. १२१०मध्यें ऐबक वारतांच यानें अलाउद्दीन असें नांव घेऊन आपण स्वतंत्र झाल्याचें जाहीर केलें. हा अत्यंत जुलमी होता. भोवतालचे हिंदु राजे याला स्वस्थ बसविण्याकरितां वाटेल तितका पैसा देत. त्यामुळें याच्या खजिन्यांत खूप पैसा साठला. अकस्मात् राज्य मिळून तें सहज वाढवतां आल्यामुळें हा आपणास जगज्जेता समजत असे. आपल्याकडे येणाऱ्या याचकास हा वाटेल त्या प्रांताचें राज्य लिहून देई. अशाच याचकांपैकीं इस्पाहानच्या एका गरीब व्यापाऱ्यास यानें त्याचें राहतें गांव इनाम म्हणून लिहून दिलें. तो वाटेंत चोरीस गेलेल्या आपल्या मालाची दाद मागण्यास आला होता. याच्या राज्यांत कोणालाहि आपल्या जीविताची शाश्वती वाटत नव्हती. शेवटीं याच्या कारभाराचीं दोन वर्षें पुरीं झाल्यावर याच्या जुलमास कंटाळलेल्या कांहीं सरदारांनीं याला ठार केलें ( कें. हि. ).

**अलीमुहिबखान** ( प्रीतम )—हा हिंदी कवि होय. हा आग्रा येथें राहत असे. यानें स. १६७३ मध्यें 'खटमलबाईसी' नांवाचें एक हास्यरसयुक्त पुस्तक लिहिलें. याच्या कांहीं भागांत साहित्तिक महत्त्व आढळतें. याची भाषा व्यावहारिक असून हास्यरस चोहींकडे आहे. याची कल्पनाहि चांगल्या प्रकारची आहे.

**अली शाहकार बहिरा**—(स. १३३९-४०) दौलताबादचा सुभेदार कुतलघखान याच्या हाताखालीं हा असे. हा बहिरा होता. गुलबर्ग्याच्या अधिकाऱ्याकडे बराच वसूल थकला होता, तो वसूल करून दौलताबादेस पोंचविण्याचे कामावर स. १३३९ मध्यें याची नेमणूक झाली. गुलबर्ग्यास गेल्यावर स्वतंत्र राज्य स्थापण्याचा यास मोह झाला. तेथील भैरव नांवाच्या हिंदु अधिकाऱ्याचा यानें खून केला व वसुलाचे पैसे सैन्य तयार करण्यांत खर्च केले. यानें बेदरवर स्वारी करून तेथील सुभेदाराचा वध केला व शहरांत ठाणें दिलें. तेव्हां कुतलघखान याच्यावर चालून गेला, तेव्हां पराभूत होऊन हा शरण आला. पण याला कैद करून दिल्लीस पाठविण्यांत आलें. तेथें मुहंमद तुघ्लकनें फिरतीवरून आल्यावर यास बंडखोर म्हणून गझनीस हद्दपार केलें. पण हा बिगरपरवाना हिंदुस्थानांत आला म्हणून यास फाशी देण्यांत आलें ( कें. हि. ).

**अलीशीर खल्जी**—माळव्याच्या घोरी घराण्यांतील दिलावरखान घोरीची बहीण याला दिली होती. हें खल्जी घराणें माळव्यांत राज्य करीत होतें.

**अलीशेर अलाउद्दीन**—( स. १५३० ) काश्मीरचा राजा.

**अलक्झांडर**—( सिकंदर पाहा ).

**अल् इस्तारवरी**—एक अरबी प्रवासी. हा स. ९५१ च्या सुमारास हिंदुस्थानांत आला होता. यानें राष्ट्रकूटांचा अम्मल खंबायतपासून चौल (चेउल) पर्यंत असल्याचें लिहिलें आहे. तसेंच त्यांचे पुष्कळ मांडलिक राजे असून त्यांत एक मुसलमान मांडलिक असल्याचेंहि यानें लिहिलें आहे. ( म. भा. २. २७० ). अल् हें नांवाच्या मागें लागणारें अरबी भाषेंतील उपपद आहे.

**अल्बीरुनी**—( अबू रैहान अल्बीरुनी पाहा ).

**अल्बुकर्क आल्फान्सो**—( स. १५०९-१५ ) हा हिंदुस्थानांतील एक पोर्तुगीझ अधिकारी. याचा जन्म स. १४५३ मध्यें एका उच्च कुलांत झाला. यासंबंधानें १४४४, १४५२, १४६१ व १४६२ असे सन निरनिराळ्या ग्रंथकारांनीं दिले आहेत. पांचव्या आल्फान्सो राजानें याला आपल्या मुलांबरोबर विद्या शिकवून वाढविलें. याला गणितशास्त्राचा विशेष नाद असे. तत्कालीन पद्धतीप्रमाणें युद्ध व साहस करून लौकिक मिळविण्याची यास हौस

होती. स. १४७१ त मोरोक्को जिंकण्याकरितां गेलेल्या फौजेबरोबर हा होता. तेथें दहा वर्षे यास राहावें लागल्यामुळें यास बहुमोल अनुभव मिळाला. स. १४८१ त स्वदेशीं परत आल्यावर यास घोडदळाची मुख्य जागा मिळाली. दुसऱ्या जॉन राजाची याजवर मेहेरनजर होती. स. १४९६त जॉन मरण पावल्यावर त्याचा मुलगा इमान्युएलची याजवर इतराजी होऊन पुनः याची नेमणूक मोरोक्कोच्या कामगिरीवर झाली. तेथें असतांना मुसलमानांविषयीं याचे मनांत अत्यंत वैर उत्पन्न झालें. तेथून परत आल्यावर राजानें यास स. १५०३ तील सफरीबरोबर हिंदुस्थानांत पाठविलें. या वेळीं याच्या हातून महत्त्वाचें कृत्य कांहीं झालें नाहीं. मात्र पुढें उपयोगी पडणाऱ्या परिस्थितीचा अनुभव मिळवून हा स. १५०४ त लिस्बन येथें परत आला. तांबडा समुद्र व इराणी आखात ह्यांतून चालणारा मुसलमानांचा संचार कायमचा बंद केला पाहिजे, अशी यानें राजास सल्ला दिली, व तदनुसार सोकोट्राचें बेट जिंकण्याकरितां स. १५०६ मध्यें राजानें याची रवानगी केली. कांस्टांटिनोपलच्या सुलतानानें पूर्वेकडील मुसलमानांस मदत करूं नये म्हणून इमान्युएल राजानें एक आरमार भूमध्यसमुद्रांतून तुर्कस्तानवर पाठविलें. तुर्कस्तान व इजिप्त ह्यांचें वैमनस्य होतें, ही गोष्ट पोर्तुगीझांस ठाऊक नसल्यामुळें, ते एक होऊन आपला नाश करतील अशी भीति पोर्तुगीझ राजास वाटत होती. सोकोट्रा जिंकल्यावर अल्बुकर्कनें मलबार किनाऱ्यावर जाऊन आल्मीडाची मुदत संपतांच प्रतिनिधीचें काम पाहावें, असा यास राजाचा हुकूम होता.

आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्यावरील मोंबासा, अंगोजा, वगैरे ठिकाणांचा यानें प्रथम समाचार घेऊन त्यांजकडून खंडणी घेतली. नंतर हा सोकोट्रावर आला. तेथें कांहीं ख्रिस्ती लोकांची वस्ती असून मुसलमानांचा एक मजबूत किल्ला होता, तो यानें तेव्हांच जिंकून घेतला, आणि त्यावर आपले अंमलदार नेमून नवीन व्यवस्था केली; तसेंच मुसलमानांच्या जमिनी व उत्पन्नें खालसा करून तीं यानें तेथच्या ख्रिस्ती लोकांस दिलीं. सोकोट्राहून निघून अल्बुकर्क मस्कत येथें गेला. तेथच्या अधिकाऱ्यास जिंकल्यावर इराणी आखातांत नाकें व व्यापाराचें उत्तम ठिकाण जें ओर्मझ तें जिंकण्यास हा आला. पण हाताखालचे लोक याजवर उठल्यामुळें ओर्मझचें काम अर्धवट टाकून यास मलबारकडे यावें लागलें. अशा याच्या कृत्यांवरून याचें धोरण व्यक्त होण्यासारखें आहे. आफ्रिकेच्या दक्षिण टोंकापासून मलाक्कापर्यंतचा सर्व किनारा, बेटें, व नाक्याचीं बंदरें पोर्तुगीझांच्या ताब्यांत राहावीं, ठिकठिकाणीं किल्ले बांधून तेथें पोर्तुगीझ फौज ठेवावी, म्हणजे मुसलमानांचा व्यापार सर्वस्वीं बंद पडून पोर्तुगीझांचा उद्योग निर्वेध चालेल, असें याचें मत होतें. उलटपक्षीं पुष्कळ किल्ले वगैरे बांधून आपल्या सत्तेचा पसारा करून ठेवणें अनुचित होय, अशी आल्मीडाची यास ताकीद होती. कोचीन येथें असतांच अल्बुकर्क व आल्मीडा या दोघांची बरीच चकमक उडून अल्बुकर्क यास कांहीं दिवस कैदेंत कंठावे लागले. पुढें पोर्तुगालहून आणखी एक आरमार हिंदुस्थानांत आलें, तेव्हां आल्मीडा आपला कारभार सोडून स्वदेशास परत गेला (नोव्हेंबर स. १५०९). तेव्हांपासून हा हिंदुस्थानांतील पोर्तुगीझ राज्याचा मुख्य झाला. यानें कोचीनच्या राजास गादीवर बसविण्यास मदत करून कोचीन येथें पोर्तुगीझांचा किल्ला बांधिला.

मुख्याधिकार प्राप्त झाल्यावर यानें त्या वेळची हिंदुस्थानची परिस्थिति अवलोकन करून (१) हिंदु राजांशीं कायमचें सख्य करावयाचें, (२) मुसलमानांचा पाडाव करावयाचा, (३) आणि येणेंकरून पोर्तुगीझांचा व्यापार व अंमल दृढ करावयाचा, हे तीन उद्देश ठरविले. ओर्मझहून उत्तमोत्तम अरबी व इराणी घोडे मलबार किनाऱ्यावर येत, ते घोडे आपण आणून विजयानगरच्या राजास पुरवावे आणि त्या राजानें मुसलमानांशीं लढण्यास आपणांस मदत करावी, अशा प्रकारचा तह विजयानगरास आपला वकील पाठवून यानें सिद्धीस नेला.

स. १५१० मध्यें कालिकतच्या राजानें याचा पराभव केला. पुढें ता. १ मार्च स. १५१० मध्यें यानें इस्माईल आदिलशहाकडून पणजीचा किल्ला घेऊन पुढें दोन दिवसांनीं शहरहि हस्तगत केलें. यानें आपल्या कारकीर्दीत गोवें हस्तगत करून त्याचा उत्तम प्रकारें बंदोबस्त ठेविला. गोव्याच्या पायीं अनेक संकटें येऊं लागलीं. त्यामुळें तें सोडून द्यावें, अशाबद्दलचा हुकूम पोर्तुगीझ राजाकडून यास आला होता. परंतु तसें करण्याचें यानें नाकारलें. एडन आपल्या ताब्यांत घेऊन तांबड्या समुद्रांतील मुसलमानांच्या व्यापाराचे रस्ते कायमचे बंद करून टाकावे हें आणखी एक मोठें काम अल्बुकर्क यास करावयाचें होतें, पण तें याच्या हातून तडीस गेलें नाहीं. यानें गोवा, गोव्याचें बेट, व पणजी ह्या सर्वांस मिळून एक मोठा मजबूत तट बांधिला. तसेंच कालिकतचा झामोरीन मरण पावला व त्याच्या मुलानें कालिकत येथें पोर्तुगिझांस किल्ला बांधून दिला. हा किल्ला विशेष मजबूद झाला. स. १५१४ साल अल्बुकर्कनें अंतर्व्यवस्था करण्यांत घालविलें. स. १५१५त

ओर्मझवर स्वारी करून तें यानें काबीज केलें. हेंच याच्या कारकीर्दीचें शेवटचें कृत्य होय. ओर्मझहून परत येत असतां प्रकृति बिघडली आणि हा स. १५१५ च्या डिसेंबरांत गोव्याच्या बंदरांत येत असतां जहाजावर मरण पावला. त्या वेळीं याचा अंतसंस्कार गोवा येथें झाला, पण पुढें स. १५१६त याचे अवशेष लिस्बन येथें नेऊन पुरण्यांत आले. यानें ६ वर्षे कारभार केला. शौर्य, मुत्सद्दीपणा, चातुर्य व स्वराष्ट्रसेवा इत्यादि गुणांनीं अल्बुकर्कचें नांव पोर्तुगीज इतिहासांत स्मरणीय आहे. त्यांचा इकडील सर्वांत मोठा अंमलदार हाच झाला ( ब्रिटिश रियासत, पूर्वार्ध, पृ. १००-११६ ).

याच्या पक्षाचें म्हणणें, आरमाराऐवजीं किनाऱ्यावरील मोक्याचा बंदरें ताब्यांत घेऊन व तेथें शिबंदी वगैरे ठेवून आणि हिंदु बायकांशीं लग्नें लावून राज्यविस्तार करावा. त्यांत याच्या पक्षाचें म्हणणें अपुरें ठरलें. यानें मुसलमानी अधिकारी काढून त्यांच्या जागीं फिरंगी व हिंदू लोक नेमले. हिंदु शिपायांची पलटण प्रथम तयार करून सतीची चाल बंद केली; आणि ग्रामपंचायतीस उत्तेजन दिलें. राज्यविस्ताराबरोबरच हिंदुस्थानचा परदेशांशीं होणारा व्यापार जो मुसलमानांच्या (मूर) हातीं होता तो सर्वस्वीं आपल्या हातीं घेण्याचाहि यानें प्रयत्न चालविला व त्यांत याला थोडेंबहुत यशहि येत चाललें. विशेषतः मसाल्याचा व्यापार यानें बळकावला. मलाक्का हें बंदर या मसाल्याच्या व रवराच्या व्यापारासाटीं उतार पेठ म्हणून प्रख्यात होतें म्हणून तें यानें काबीज केलें (स. १५११). मिश्र लग्नें लावून आपल्या राज्यास बळकटी आणण्याचें याचें धोरण चुकलें. कारण या मिश्र प्रजेच्या ठिकाणीं युरोपियनांचे राज्यकर्त्यास आवश्यक असणारे गुण उत्पन्न न होतां उलट ते खालावत चालले. यानें झामोरिनला विषप्रयोग करविण्याचे कामीं मागेंपुढें पाहिलें नाहीं.

**अल्मसूदी**—एक अरब प्रवासी. यानें बारकाईनें हिंदुस्थानचें वर्णन केलें आहे. याचें प्रवासवृत्त स. ९५३ मध्यें लिहिलेलं आहे. मालखेडच्या वल्लभराय (बल्हारा) राष्ट्रकूटाशीं अरबांचें चांगलेंच सख्य होतें. कनोजच्या राजाचाहि चांगला दबदबा असे. त्याच्यापुढें अरब व राष्ट्रकूट यांचें कांहीं चालत नसे. यानें लिहिलें आहे कीं, मूर्तिपूजक जेव्हां मुलतानवर स्वारी करतात व मुलतानच्या लोकांची लढण्याची तयारी नसते तेव्हां ते सूर्याची मूर्ति फोडून टाकूं अशी धमकी देतात, तेव्हां हे युद्ध न करतांच परत येतात ( म. भा. २. २७० ).

**अल्मास बेग खल्जी**—हा अलाउद्दीन खल्जीचा भाऊ.

**अल्लट**—हा मेवाडचा राजा दुसरा भर्तृभट्ट याचा मुलगा. याच्या मातेचें नांव महालक्ष्मी. ख्यातकार याच्या नांवाचा उल्लेख आलु असा करतात. याच्या वेळचा एक शिलालेख मिळाला आहे. तो आहाडच्या नजीक सारणेश्वर नांवाच्या नवीन शिवालयांत बसविला आहे. प्रथम हा लेख याच्या वेळच्या एका वराहमंदिरावर बसविला होता. त्यांत राणी महालक्ष्मी ( याची माता ), राजा अल्लट, त्याचा पुत्र नरवाहन यांच्याशिवाय मंदिराशीं संबंध असलेल्या गोष्ठीकांची ( मंदिराकरितां मदत देणारांची ) मोठी यादी जोडली आहे. त्यावरून याचा मुख्य मंत्री मंमट, सांधिविग्रहिक दुर्लभराज, अक्षपटलिक मयूर आणि समुद्र, ( अक्षपटल म्हणजे हिशेब ठेवणारा ), बंदिपति ( मुख्य भाट ) नाग आणि भिषगाधिराज ( मुख्य वैद्य ) रुद्रादित्य होता. या मंदिराचा प्रारंभ वि. सं. १००८ ( स. ९५१ ) मध्यें सूत्रधार अग्रटनें आणि वि. सं. १०१० ( स. ९५३ ) वैशाख शुद्ध ७ ला त्यांत वराहाची मूर्ति स्थापिली. मंदिराचा रोजचा खर्च चालण्याकरितां हत्ती विकला तर एक द्राम, घोड्यावर दोन रुपये, शिंगवालें जनावर एका द्रामाचा चाळिसावा अंश, लाट (बलुते) पैकीं पांच शेर, आठवड्याच्या बाजारावर आडक ( साडेतीन शेर ), शुद्ध एकादशीस प्रत्येक हलवायाकडून एक घागर दूध, जुगाऱ्याकडून एक वेळेला जिंकलेलें धन, प्रत्येक तेलाच्या घाण्यांतून एक पळीभर तेल, गांवजेवणावर एक रुपया, माळ्याकडून चौपदरी माळ मिळावी, अशी राजानें व्यवस्था केली होती. कर्नाटक, मध्यदेश, लाट आणि टक्क ( शाकल नगर राजधानी असलेला मद्र किंवा वाहिक या नांवानें ओळखला जाणारा प्रदेश ) देशचे पण येथें राहणाऱ्या व्यापाऱ्यांनींहि या मंदिराला दान दिलें होतें. यावरून त्या वेळीं आहाड नगराची योग्यता काय होती हें समजेल. गंगोद्भेद तीर्थामुळें हें ठिकाण पूर्वीच प्रसिद्ध होतें. तरी याच्या वेळीं तें विशेष प्रसिद्धीस आलें; व यानें हें नगर वसविलें, अशी प्रसिद्धी झाली. आहाडच्या एका जन मंदिराच्या देवकुलिकेला ( भोंवतालच्या छोट्या मंदिराला ) शक्तिकुमाराच्या वेळचा एक शिलालेख लावला आहे. त्यांत याचें वर्णन आहे. यानें आपल्या गदेनें देवपालाला ठार केलें. देवपाल हा कनोजचा प्रतिहार राजा असावा. याहि लेखांत अक्षपटलाधीशाचें नांव मयूर असेंच दिलें आहे ( आहाडाचा अप्रकाशित लेख ). आहाड येथें मिळालेल्या शक्तिकुमाराच्या वि. सं. १०३४ ( स. ९७७ ) च्या लेखांत याच्या राणीचें नांव हरियदेवी असें दिलें आहे आणि ती हूण राजाची मुलगी होती.

हरियदेवीनें हर्षपुर नांवाचा गांव वसविला ( इंडि. अँटि. भा. ३९, पृ. १९१; रा. इ. पा. ४२६-४२८ ).

**अल्लू**—विजापूरच्या आदिलशाही घराण्यांतील इस्माईलाचा मुलगा. याला मल्लू, इब्राहीम व अबदुल्ला असे तीन भाऊ होते. त्यांपैकीं इब्राहीम व मल्लू हे विजापूरच्या गादीवर आले.

**अवचितसुत काशी**—( स. १६६२ सुमार ) एक मराठी कवि. हा जातीनें चंद्रवंशीय क्षत्रिय होता. याचा बाप अवचितराव हा भारम ( नाशिक जिल्हा ) गांवचा देशमुख होता. काशी कवि महानुभावपंथी होता. या कवीची वाणी प्रासादिक व रसाळ आहे. यानें ओवीबद्ध द्रौपदी-स्वयंवर लिहिलें. या ग्रंथाच्या शेवटीं दिलेल्या माहितीवरुनच याचें पुढील थोडें चरित्र देतां येतें. याची मराठी भाषेवर फारच भक्ति होती. याचें आडनांव सोळंखी व गोत्र अत्रि. अवचितराव हा पंढरीचा वारकरी होता. याच्या उपासनेमुळें भारम-गांवाला लोक विठ्ठलपुर म्हणूं लागले. पुढें यानें भारम-गांवजवळचा एक किल्ला हस्तगत केला व त्याचें नांव गोपाळगिरी ठेवलें. औरंगजेबाच्या सैन्यानें किल्ला युद्धानें सर होत नाहीं असें पाहून फितुरीनें किल्ला ताब्यांत घतला व यांना दिल्ली येथें तुरुंगांत ठेवलें. तेथें अवचितराव मेला व हा कांहीं दिवसांनीं सुटून आला.

याचे द्रौपदीस्वयंवरावर एक ओवीबद्ध व दुसरा श्लोक-बद्ध असे दोन ग्रंथ आहेत. याच्या द्रौपदीस्वयंवराच्या समाप्तीचा काळ शके १६१८ पौष वद्य १० गुरुवार हा आहे.

‘हरीची भगिनी म्हणे सुभद्रा’ ही प्रसिद्ध लावणीहि याच कवीची आहे. तसेंच ‘तारीं तारीं गुरुराया । गेला गेला जन्म वांया’ हें पद्यहि याचेंच आहे. मुक्तेश्वराप्रमाणें याची ओवी अत्यंत प्रासादिक असून श्लोकरचना सरस, पण जरा ओबडधोबड आहे ( आजगांवकरकृत काव-चरित्र भा. १, पा. २८९-३०६ ).

**अवधून**—( ज्ञानसागरेन्द्रसरस्वती ) हा सातारा जिल्ह्यांतील विटें गांवचा कुलकर्णी, चैतन्यसंप्रदायी असून याचें पूर्वींचें नांव भैरव असें होतें. हा ज्योतिलिंग व यमुनाबाई यांचा पुत्र.

याच्या ग्रंथावरून याचें ज्ञानसागर असें आडनांव मिळालें याच्या चुलत्यानें याला दत्तक घेतलें होतें.

याची गुरुपरंपरा—कृष्णचैतन्य, तळशी, अद्वय, चिद्-घन ( हे अद्वयांचे पुत्र व शिष्य), नागेश (पुत्र व शिष्य), याची बहीण निराबाई व पुत्र शिवलिंग, याचा बंधु ज्योतिर्लिंग, शिवलिंगाचा दत्तकपुत्र व शिष्य अवधूत, ( १७३४ चे पूर्वी ) अशी होती.

याचें कुलदैवत क्षेत्रपाल असून हा विश्वामित्रगोत्री होता. यानें शके १७३४ मध्यें ‘ज्ञानसागर’ व शके १७६४ मध्यें ‘ज्ञानसागरानंद’ असे ग्रंथ लिहिले (सं.सू.).

**२.** ( निरंजन ) याचे मूळ पुरुष जे चितारपंत ते चितेंतून निघाले, अशी हे आख्यायिका देतात. याचे पुत्र सिद्धेश्वर, त्याचे विश्वेश्वर, त्याचे श्रीधर व पुढें शामराज.

हें आपणा स्वतःस अवधूत निरंजन असें म्हणवीत असून याचे गुरु गोविंद हे होतें.

यानें कपिलगीता ( शक १६३० ), मूलस्तंभ, अभंग, फटके वगैरे ग्रंथ लिहिले ( सं. सू. ).

**अवधूतदास**–नृसिंहचरित्र या मराठी काव्याचा कर्ता ( सं. सू. ).

**अवधूत ( मल्यावृत्ति )**–( निवृत्ति अवधूत पाहा).

**अवधूतसुत**—गणपतिजन्म या मराठी काव्याचा कर्ता (सं सू. ).

**अवनिवर्मन**—हा सोरठच्या सोलंकीवंशापैकीं बाहुक धवलाचा पुत्र. याचा पुत्र बळवर्मा.

**२.** (योग)– चालुक्य महासामन्त घराण्यांतील बल-वर्मन्चा मुलगा. स. ८९९ मध्यें हा आपल्या बापानंतर गादीवर आला.

यानें यक्ष-दास आणि धरणी-वराह ( बहुतेक वर्धमानचा बाप ) यांचा पराभव केला (B.), अशी बानटनें ज्याची माहिती दिली आहे, त्याचीच राजपुतानेका इतिहास या हिन्दी ग्रंथाचे कर्ते श्री. गौरीशंकर ओझा यांनीं पुढील माहिती दिली आहे. कालांतहि फारच फरक आहे.

हा सोरठच्या सोलंकीवंशांतील बळवर्म्याचा पुत्र. याचें दुसरें नांव योग असें होतें. यानें यक्षदास वगैरे राजांच्या देशावर स्वारी केली, आणि त्यांना पराजित केलें. धरणीवराहाच्या सेनेला पळवून लावलें. हा धरणी-वराह काठेवाडांतील चावडा राजा होता. तोहि कनोजच्या महेंद्रपाळ राजाचा सामंत होता. यानें वि. सं. ८५६ ( स. ८०० ) माघ शुद्ध षष्ठीला अंबळक गांव तरुणा-दित्य सूर्यमंदिराला दिलें ( ना. प्र. प. १, २१२-१५).

**अवंतिवर्मन् उत्पल**–(स. ८५७-८८४) काश्मीरचा एक राजा. यानें कर्कोटक घराण्यांतील अनंगपीडास पदच्युत करून काश्मीर येथें आपल्या उत्पल घराण्याची स्थापना केली. याच्या अंगीं कर्तृत्वशक्ति आणि जागृत सदसद्विवेक-बुद्धि हे गुण होते. याची जमीनमहसुलाची पद्धत चांगली होती. हा फार धार्मिक होता. यानें शेतीची सुधारणा

केली, नवे कालवे काढले व वाङ्मयाला उत्तेजन दिलें (राज. ४. ७१५-७१९ ). यानें आपल्या राज्यांत प्राणीहिंसा बंद केली. हा स. ८८४ त मरण पावला.

**अवंतिवर्मन् गंग**—हा त्रिकलिंगाच्या प्राच्य गंगांपैकीं राजराजाचा पुत्र. यानें वेंगीच्या विजयादित्यास चोल राजाविरुद्ध मदत केली, व उत्कलाच्या राजासहि मदत केली. उत्कलराजे म्हणजे बहुधा सेन असावेत (इंडि. अँटि. १८ पा. १६६ ). याच्या एका वनराज नांवाच्या मांडलिकानें चोलाशीं युद्ध केलें व वेंगी लुटून दानार्णवास ठार केलें, असें स. १०७५ मधल्या लेखांत आढळतें ( एपि. इंडि. ४ पा. ३१४ ). या सर्व गोष्टी राजराजाच्या कारकीर्दीत घडल्या. सिवेलकृत हिस्टॉरिकल इन्स्क्रिप्शन ऑफ सदर्न इंडियामध्यें याचें नांव नाहीं. कदाचित् जयवर्मन् म्हणून दिलेला हा असावा.

**अवंतिवर्मन् मौखरी**—( स. ५७९-६०० ) मौखरी वंशांतील हा एक होय. मौखरी राजा जो शर्ववर्मन् त्याच्या नंतर हा गादीवर आला. याचें व शर्ववर्मनाचें काय नातें होतें हें मात्र उपलब्ध नाहीं. हा कदाचित् शर्ववर्मनाचा मुलगा किंवा पुतण्या असावा. परंतु या म्हणण्यास कांहीं आधार नाहीं. रा. वैद्य म्हणतात कीं, हा शर्ववर्मनाचा नातु होय Vaidya, History of Mediæval Hindu India I, p. 39 ). हा प्रभाकर वर्धनाचा समकालीन होता. यानें माळव्याचे महासेन राजास प्रोत्साहन देऊन पैसा आणि माणसें यांची मदत करून त्याला कामरूप येथील सुस्थितवर्मन या राजाचे विरुद्ध लढण्यास पाठविलें. अशा रीतीनें कामरूप येथील राज्य बाल्यावस्थेंतच नाश करून टाकण्याची खटपट केली.

संस्कृतमधील मुद्राराक्षसाचा कर्ता जो विशाखदत्त तो याच्या पदरीं होता ( Aravamuthan, the Kaveri, the Maukharis and the Sangam Age, p. 95, Rapson. J. R. A. S., 1900. pp. 535-536 ). याला गृहवर्मन् आणि पूर्णवर्मन् असे दोन मुलगे होते. याची राजधानी पाटलीपुत्र येथें होती ( मौखरी by E. A. Pires, p. 102-106 ).

**अव्वनकवि**—एक तेलगू कवि. यानें पुरूरव्याचें चरित्र तेलगू व संस्कृत भाषेंत लिहिलें आहे.

**अव्वोका**—श्रीधराची माता व बळदेवाची पत्नी.

**अशरफ अलीखा**—( फुगा पाहा ).

**अशोक मौर्य**—( स. पू. २७२-२३२ ) या सम्राटाची जगांतील अत्यंत थोर पुरुषांत गणना होते. याचें साम्राज्य मोठें होतेंच. पण याचा मोठेपणा जगाचें धार्मिक स्वरूप बदलणारा थोर धर्मप्रसारक म्हणून आहे. यानें आशिया खंडभर बुद्धधर्माचा प्रसार केला. युरोपमध्येंहि यानें आपले धर्मप्रसारक धाडले होते. पुढें उत्पन्न झालेल्या एस्रा, ख्रिस्तालाहि ख्रिस्ती धर्माची स्फूर्ति बुद्धधर्माच्या शिकवणीमुळें झाली असें पुराव्यावरून सिद्ध झालें आहे. हा प्रथम अत्यंत क्रूर होता पण पुढें हा इतका कनवाळू बनला कीं, कृमिकीटकांच्या हालअपेष्टेनेंहि याचें मन कळवळूं लागलें. प्रथम यानें परधर्मीयांचा छळ करण्याकरितां यमपुरी स्थापन केली होती. पण पुढें यानें पशुपक्ष्याकरितांहि दवाखाने काढले आणि रस्त्यानें झाडें लावून सावलीची व्यवस्था केली. यानें आपल्या लेखांत आपणास देवांना प्रिय असें म्हणून घेतलें आहे.

मौर्यवंशांतील बिंदुसाराचा मुलगा. वायु व ब्रह्मांडपुराणांत याच्या पित्याचें नांव भद्रसार असें दिलें आहे. भागवतांत पित्याचें नांव वारिसार असें दिलें आहे. विष्णुपुराण व भविष्यपुराण यांत याच्या पित्याचें नांव बिंदुसार असेंच दिलें आहे. भागवत व विष्णुपुराण यांत याचें नांव अशोक असें दिलें नसून अशोकवर्धन असें दिलें आहे.

स. पू. २७२ बिन्दुसाराचा मृत्यु झाल्यामुळें हा नंतर गादीवर आला. बिन्दुसाराला सोळा राण्या व एकशेंएक पुत्र होते, असें महावंशांत म्हटलें आहे. त्यांपैकीं अठ्याण्णव किंवा नव्याण्णव भाऊ मारून यानें गादी मिळवली असें महावंश व दीपवंश या बौद्धग्रंथांत म्हटलें आहे. निदान दिव्यावदान ग्रंथांत म्हटल्याप्रमाणें आपला ज्येष्ठ बंधु सुसीम यास मारून यानें गादी मिळवली असें दिसतें. शिलालेखांत अशा गोष्टींचा उल्लेख नसणें स्वाभाविक आहे. यानें नव्याण्णव भावांना ठार करून राज्य मिळविलें ही महावंशांतील गोष्ट दे. रा. भांडारकर ( अशोक पहिला भाग ) किंवा स्मिथ ( V. Smith, p. 163 ) यांच्याप्रमाणें सर्वांनींच अविश्वासार्ह मानली पाहिजे. कारण अशोकाच्या शिलालेखांत याच्या पुढें जिवंत असलेल्या अनेक भावांचा निर्देश आहे.

बिन्दुसाराच्या मनांत आपला वडील मुलगा सुसीम याला राज्य देण्याची इच्छा असणें स्वाभाविक आहे. बिन्दुसारानें याला आपल्या हयातींत उज्जयनीचा सुभेदार नेमलें होतें. हा बिन्दुसाराच्या मृत्यूच्या वेळीं पाटलीपुत्र येथें पोहोंचला होता व सुसीम हा तक्षशिलेकडे बंड मोडण्यास गेला होता, असें दिव्यावदान ग्रंथांत लिहिलें आहे.

राजाला हा एका ब्राह्मणकन्येपासून झाला व याच्यावर बिन्दुसाराचें प्रेम नव्हतें. तसेंच हा कुरूप होता, असें दिव्यावदान ग्रंथांत वर्णन आहे.

बिन्दुसार मेला व अशोक गादीवर बसला. यांत कांहीं काळ गेला असला पाहिजे हें निश्चित आहे. पण बौद्ध ग्रंथांत लिहिल्याप्रमाणें चार वर्षे गेलीं किंवा नाहीं, हें सांगतां येत नाहीं.

यानें राज्यावर येऊन आठ वर्षे पुरीं झाल्यावर कलिंग देशावर स्वारी केली. कलिंग देश म्हणजे बंगालच्या उपसागराला लागून महानदी व गोदावरी यांच्यामधील प्रदेश होय. मॅगस्थनीजच्या म्हणण्याप्रमाणें तेथील राजाजवळ साठ हजार पायदळ, एक हजार घोडेस्वार व सातशें हत्ती होते. त्यावर अशोकानें स्वारी केल्यावर तुंबळ युद्ध झालें. चतुर्दशशिलालेखांतील तेराव्या शिलालेखांत पुढीलप्रमाणें कलिंगयुद्धाचें यानें वर्णन केलें आहे. "त्या युद्धांत दीड लाख लोक कैद केले, एक लाख लोक मारले गेले, व याच्यापेक्षां कितीतरी पटीनें अधिक लोक (महामारी वगैरेंनीं) मले. पण या संहाराचा याच्या मनावर फार परिणाम होऊन याला अत्यंत पश्चात्ताप झाला, व यानें युद्धानें विजय मिळवण्याचें सोडून धर्मानें विजय मिळवण्याचें ठरविलें" (जनार्दनभट्ट, एम्. ए. कृत अशोकके धर्मलेख). नंतर कलिंगाच्या भोंवतालीं असलेल्या रानटी जातीनें उठाव केला असतां यानें युद्ध न करितां त्यांना धर्मानें विश्वासांत घेण्याचें ठरविलें. या युद्धानंतरच याचा बौद्धधर्माकडे कल झाला.

याशिवाय यानें काश्मीर प्रांत जिंकून तेथें श्रीनगर नांवाचें शहर वसविल्याचें राजतरंगिणीवरून कळतें. वास्तविक कलिंगविजयानंतर यानें युद्ध करण्याचें बंद केलें, त्याअर्थी हा त्यापूर्वीचा विजय असावा. राजतरंगिणींत काश्मीरावरील याच्या पूर्वीच्या राजांचीं नांवें दिलीं आहेत. त्यांत मौर्यवंशांतील कोणीहि नाहीं. कल्हणाचें हें लिहिणें विश्वासार्ह धरल्यास यानेंच काश्मीर जिंकून आपल्या राज्याला जोडलें असें दिसतें (राजतरंगिणी ७. १०१-१०६).

गौतमबुद्धाच्या धर्माचा प्रसार त्याच्या हयातींत हिंदुस्थानच्या बाहेर झाला नव्हता. लंकेंतील प्राचीन माहितींत बुद्ध लंकेंत अनेक वेळां गेला असल्याची माहिती मिळते. पण ती विश्वासार्ह मानीत नाहींत. बुद्धाच्या वेळीं किंवा बुद्धानंतर शंभर वर्षे बुद्धधर्माचा हिंदुस्थानाबाहेर प्रचार झाला नाहीं. उलट हिंदुस्थानांत अन्तस्थ कलहानें या धर्माची अधोगति होत चालली होती. त्यामुळें अनेक पोटसांप्रदायांना जन्म मिळाला. वादविवाद सुरू झाले. आणि आपल्या इच्छेप्रमाणें बुद्धवचनाचे अर्थ लावण्यांत येऊं लागले. यावर उपाय म्हणून तत्कालीन बुद्धांनीं महासभा भरवून निर्णय करण्याचें ठरविलें. बुद्धाच्या निर्वाणानंतर पहिली महासभा भरली, व दुसरी बुद्धनिर्वाणानंतर शंभर वर्षांनीं भरली. या महासभांमुळें अन्तर्गत झगड्यांना नियमबद्ध स्वरूप येऊन बजबजपुरी नाहींशी झाली. धर्म या दृष्टीनें विशेष पावित्र्य निर्माण करण्याचा या वेळीं मोठा शिस्तीचा प्रयत्न झाला. पण भारताच्या बाहेर या धर्माचा प्रचार करण्यास सुरवात अशोकापर्यंत झाली नव्हती.

धर्मप्रचार करण्याची आवश्यकता गौतमबुद्धाला पूर्णपणें माहिती होती व पद्धत अवगत होती. हें त्याच्या धर्मचक्रप्रवर्तन करतांना केलेल्या भाषणावरून स्पष्ट होतें (महावग्ग १. २. १, पृ. १८८). पण त्याची इच्छा पूर्ण करणारा अशोकासारखा सम्राट् निघावा हें त्याचें विशेष प्रकारचें सुदैव होय. शिवाय हा त्याच्या तत्त्वज्ञानाकडे राजकीय दृष्टीनें पाहत नसून धार्मिक पवित्रतेच्या भावनेनें आकृष्ट झाला होता. म्हणून याच्या सर्व प्रयत्नांत सात्त्विक जिव्हाळा दिसून येतो. यानें प्रथम बुद्धाच्या हालचालींचीं महत्त्वाचीं स्थळें पाहण्याकरितां धर्मविजयप्रक्रम नांवाची वैभवशाली यात्रा काढली आणि प्रत्येक महत्त्वाच्या ठिकाणीं स्तूप, लेख, विहार अशा प्रकारें टिकाऊ स्मारकें उभारलीं. हा डोंगर, गुहा किंवा खडक पाहून त्यांवर शिलालेख कोरून ठेवीत असे. जेथें खडक मिळाले नाहींत तेथें भव्य स्तंभ उभारलेले आहेत. त्यांपैकीं अयोध्या प्रांतांतील एक स्तंभ सुमारें ५० फूट उंच असून एकसारखा चिरेबंद आहे. त्या स्तंभाचें वजन अजमासें ५० टन तरी भरेल असा तज्ज्ञांचा अंदाज आहे. यानें विदेशीं प्रचार करण्याकरितांच बौद्ध लोकांची तिसरी महासभा भरवली. या सभेकरितां आपल्या राज्यांतील सर्व बौद्धांना एकत्रित करण्याचा प्रयत्न झाला. अशोकाचा गुरु मोग्गलिपुत्त तिष्य हा या सभेचा अध्यक्ष होता. धर्मविषयक अनेक प्रश्नांवर विचार झाले व हजार भिक्षूंची एक परिषद् निश्चित झाली. या परिषदेचें अधिवेशन नऊ महिने चाललें होतें. तेथें धार्मिक ग्रंथांची पुनरावृत्ति झाली. तिष्याचा कथावत्थु हा ग्रंथ प्रामाणिक पुस्तक म्हणून मान्य करण्यांत आला. व देशोदेशीं प्रचारक पाठविण्याची योजना मान्य करण्यांत आली. दीपवंशांत दिलेली प्रचारकांची यादी व देश पुढें देत आहें.

| देश | मुख्य प्रचारक |
|---|---|
| १ काश्मीर व गान्धार | मज्झन्तिक |
| २ महीश-मण्डळ (म्हैसूर) | महादेव |
| ३ वनवासी (उत्तर कानडा) | रक्खित |

४ अपरान्तक ( कोंकण ) योनक धम्मरक्खित
५ महारट्ठ ( महाराष्ट्र ) महाधर्म रक्खित
६ योन (उत्तर पश्चिम हिंदुस्थान) महारक्खित
७ हिमवन्त मज्झिम, कस्सप इत्यादि
८ सुवण्ण भूमि (पेगू व मालमीन) सोण, उत्तर
९ लंका ( सिलोन ) महीन्द इत्यादि
( दीपवंश ८.१-११; महावंश ५ ).

वरील माहितींत लंकेस पाठविलेल्या धर्मप्रचारकाचें नांव आलें आहे, त्याला पोषक असे कोरीव लेख सांपडले आहेत. सांचीच्या स्तूपांत एक पात्र सांपडलें आहे. त्याच्या आंतल्या बाजूवर 'मज्झिम' असे शब्द आहेत, व बाहेरच्या बाजूवर 'कासपगोत' असे शब्द कोरलेले आहेत. तसेंच दुसरा एक अवशेष तेथेंच उपलब्ध झाला आहे. त्यावर या दोनहि शब्दांबरोबर हेमवताचार्य असा शब्द उत्कीर्ण आहे. वरील दीपवंश व महावंश यांवरून दिलेल्या माहितीस त्यामुळें दुजोरा मिळतो. मज्झिम कस्सपगोत्त हा हिमालयावरील अशोकानें भरवलेल्या बौद्ध-महासभेनें नेमलेला प्रचारक होता, ही गोष्ट ऐतिहासिक ठरते. सांची येथें आणखी एक अवशेष सांपडला आहे त्यावर मोग्गलिपुत्र अशीं अक्षरें आहेत. तो बहुतेक मोगलिपुत्र तिष्य असावा.

याशिवाय हिंदुस्थानांत याच्या विजयाला पाठिंबा देणाऱ्या देशांचीं नांवें अशोकाच्या शिलालेखांत आढळतात. तसेंच हिंदुस्थानच्या बाहेरच्या देशांचींहि नांवें शिलालेखांत आढळतात. सीरिया व पश्चिमेकडील आशियाचा राजा अन्तियोक ( एन्टियोकस थियोस द्वितीय ), इजिप्तचा राजा तुरमय ( टॉल्मी फिलाडेल्फस ), मगदूनियाचा राजा ऍंटिगानस, साइरिनि ( उत्तरीय आफ्रिकेंत ) चा राजा मक ( मेगस ) व यूपिरसचा राजा अलिकसुन्दर (अलेक्झेण्डर) यांच्या राज्यांत अशोक धर्मविजयाकरितां गेला व त्यांच्याशीं याची मैत्री होती.

या पश्चिमेकडील लांबच्या देशांशिवाय दक्षिणकडेहि अशोकाचे लोक गेले होते. दक्षिणेंत अशोकाच्या राज्याबाहेर चोल, पाण्ड्य, केरलपुत्र, सातियपुत्र व ताम्रपर्णी येथील स्वतंत्र राज्यें होतीं. ताम्रपर्णी हें लंकेचें प्राचीन नांव आहे, व सातियपुत्र शब्दानें केरलच्या नजीकचा प्रदेश घेतां येईल. याच्या साम्राज्यांत असणारे आंध्र, पुलिन्द वगैरे लोकांत यानें धर्माची स्थापना केली. पांचव्या शिलालेखांत गान्धार व राष्ट्रीक ( महाराष्ट्र ) हे दोन देश आणखी अधिक आढळतात. ( जनार्दन-भट्टसंपादित अशोकेके शिलालेख-दुसरा व पांचवा शिलालेख ).

अशोकानें आपल्या धर्मविजयाचें कार्य धर्ममहामात्र व धर्मयुत या नांवानें प्रसिद्ध असणाऱ्या आपल्या अधिकारीवर्गाकडून चालविलें होतें. या अधिकाऱ्यांचें काम अशोकाचा संदेश घरोघर पोंचवणें हें होतें. संदेशांत लोकांचें हित व सुख, अनाथ व वृद्ध यांचें संरक्षण करणें, कैद व प्राणदंड नियंत्रित करणें हीं कामें मुख्य होतीं. या गोष्टींचा प्रचार करणें हा अशोकाच्या धर्मविजयांतील मुख्य भाग होता. तसेंच मनुष्य व पशु यांना औषध मिळावें अशीहि यानें व्यवस्था केली होती. ज्या देशांत औषधी नव्हत्या तेथें त्यांच्या लागवडीची व्यवस्था केली. रस्त्यावर मनुष्य व पशु यांना सावली मिळावी म्हणून वृक्ष लावले. धर्मशाळा बांधिल्या, विहिरी खोदल्या. आपल्या प्रजेची स्थिति प्रत्यक्ष कळावी म्हणून हा स्वतः राज्यांतून हिंडत असे. 'माझी प्रजा हीं माझीं मुलें आहेत' असें हा म्हणे व 'मी दरबारांत, भोजनगृहांत, शयनगृहांत, किंवा कोठेंहि असलों तरी प्रतिवेदकांनीं ( हेरांनीं ) येऊन प्रजेच्या संबंधींची हकीकत सांगण्यास हरकत नाहीं,' असें यानें त्यांना बजावलें होतें. अशा पद्धतीनें परोपकार करण्यांत आपलें सामर्थ्य व ऐश्वर्य खर्च करणारा अशोक परक्या राज्यांतील लोकांनाहि आपलासा वाटूं लागल्यास आश्चर्य कसलें ! केवळ प्रेम व परोपकाराच्या जोरावर अशोकाचा धर्मविजय यशस्वी झाला यांत शंका नाहीं. आणि या परोपकाराच्या उच्च वर्तणुकीनें बुद्धधर्माचा प्रसार करणें सोपें झालें असलें पाहिजे यांत शंका नाहीं.

पण प्रचारक कशा पद्धतीनें काम करीत असत याची माहिती उपलब्ध नाहीं. सीलोनांत महेन्द्रानें कसा धर्मप्रचार केला याची माहिती महावंश व दीपवंश यांत मिळते. चीन व खोतान या भागांत बुद्धधर्माचा प्रचार करण्याकरितां गेलेल्या लोकांची माहितीहि आढळते. चीन देशांतील जुन्या ग्रंथांत स. पू. २१७ च्या सुमारास बौद्ध भिक्षु धर्मप्रसारार्थ चीनच्या राजधानींत आल्याचा निर्देश आहे. कांहीं ऐतिहासिकांचें म्हणणें आहे कीं, स. पू. २०० च्या पूर्वी चीनमध्यें बुद्धधर्माचा चांगला प्रचार झाला होता. ( एच्. जी. वेल्सचा 'दि आउटलाइन आफ् हिस्ट्री,' पा. २१३ ). खोतानमध्यें अशोकाचा पुत्र कुस्तन यानें धर्मप्रचार केला, अशी चिनी ग्रंथ व खोतानी पुस्तकें यांवरून माहिती मिळते.

ब्राह्मण, बौद्ध, आजीवक व जैन यांशिवाय अशोकाच्या वेळीं कोणचे साम्प्रदाय होते याची माहिती अशोकाच्या शिलालेखांवरून मिळत नाहीं. पण समकालीन साहित्यावरून त्याचा बोध होतो. बौद्धग्रंथांतील निर्देशावरून पुढील

सांप्रदायांची माहिती मिळते. जटिल, परिव्राजक, अवरुद्धक, हत्तीचे उपासक, अश्व, गो, कुत्रा, काक, वासुदेव, बलदेव, पुण्णभद्द, मणिभद्द, अग्गि, नाग, सुपण्ण, यक्ष, असुर, गन्धर्व, महाराज, चन्द्र, सूर्य, इन्द्र, ब्रह्मा, देव व दिशांचे उपासक. यांतील वासुदेवसाम्प्रदायाचा निर्देश विशेष उल्लेखनीय आहे. अशोकानें त्याचा निर्देश केलेला नाहीं. तसेंच इतर यांदीतहि त्याला महत्त्व दिलेलें नाहीं. पण तो भारतवर्षाचा एक दिवस मुख्य धर्म झाला. तो पाणिनीच्या पूर्वी उत्पन्न झाला होता, पण त्याचा उत्कर्ष गुप्तांच्या वेळीं झाला. पण मौर्यकालींहि वासुदेवसांप्रदायाचें अस्तित्व दाखविणारे दुसरेहि चांगले पुरावे उपलब्ध झाले आहेत. मौर्यकाळचा एक शिलालेख राजपुतान्यांतील गोसुण्डीनामक गांवीं सांपडला आहे. त्यांत संकर्षण व वासुदेव यांच्या मंदिराच्या चारी बाजूंस भिंत बांधल्याबद्दल निर्देश आहे. त्यावरून मौर्यकालीं वासुदेवसाम्प्रदाय रूढ झाल्याचें दिसून येतें. मौर्यकाळाच्या अखेरीस लिहिलेला बेसनगर येथें एक शिलालेख उपलब्ध झाला आहे. पूर्व माळव्याचा राजा भागभद्र याच्याकडे यवनराजा अन्तलिकित यानें हीलीओद्रा नांवाच्या इसमाला आपला राजदूत म्हणून पाठविलें होतें. हीलीओद्रा हा यवन होता तरी या भागवतधर्म किंवा वासुदेवधर्माचा उपासक होता. या शिलालेखांत त्यानें आपण गरुडध्वज केल्याचें सांगितलें आहे. त्यावरून केवळ त्याचें अस्तित्व ठरतें असें नाहीं, तर तो यवन लोकांनीं स्वीकारण्यासारखा शक्तिशाली व विस्तृत होता असें ठरतें ( Sir R. G. Bhandarkar, Vaishnavism, Saivism and Minor Religions of India, p. 3 ).

अशोकाच्या वेळीं समाजांत अन्धविश्वास कितपत होता हें अशोकाच्या पुढील लिहिण्यावरून स्पष्ट होतें. देवानांप्रिय प्रियदर्शी राजा लोकांना सांगतो कीं, लोक संकटांत असतां, पुत्र व कन्या यांच्या विवाहाच्या वेळीं, संतति झाल्यावर किंवा परदेशीं जाते वेळीं किंवा अशाच दुसऱ्या वेळीं अनेक प्रकारचे मंगलाचार करतात. अशा वेळीं स्त्रिया अनेक प्रकारचे क्षुद्र व निरर्थक मंगलाचार करतात. मंगलाचार जरूर करावेत पण असे मंगलाचार. . . . . . ( चतुर्दश शिलालेख, लेखसंग्रह ९ ).

यानें स्त्रियांच्या निवासस्थानाकरितां अवरोधन शब्द वापरला आहे. तसेंच कौटिल्यानें अन्तःपुर वापरला आहे व स्त्रियांना अनिष्कासिनी असें म्हटलें आहे ( कौ. अर्थ. ३. १ ). यावरून तत्कालीं पडद्याची चाल होती असें दिसतें.

अशोकाच्या वेळीं बरेच सांप्रदाय होते व त्यामुळें सांप्रदायिक वादविवादहि मोठ्या प्रमाणांत चालत. याला आळा घालण्याकरितां अशोकानें वादविवादापेक्षां धर्मतत्त्वें अंगांत बाणविण्याकडे लक्ष पुरविलें; दुसऱ्या धर्माची निंदा करणें त्याज्य ठरविलें आणि वाक्संयम हा धर्मप्रचार आणि धर्माचरण ठरविलें. याचा परिणाम स्वाभाविकच चांगला झाला ( चतुर्दश शिलालेख, १२ ). अशोकाला यामुळेंच ' ध्यानामुळें धर्माची वृद्धि, प्राण्यांची अहिंसा, व यज्ञांत प्राणिघात न होणें या गोष्टी वाढल्या ' म्हणून संतोष प्रदर्शित करतां आला ( सप्तस्तम्भलेखांतील सातवा लेख ). या गोष्टी सर्वांशीं सम बुद्धीनें वागून केल्या जात असल्यामुळें राज्यांत शांतता होती.

अशोककालीन अधिकारी पुढीलप्रमाणें आढळतात.
कुमार—प्रांताधिपति.
राजा—उपप्रांताधिपति.
महामात्र—धर्माधिकारी व जिल्हाधिकारी.
लाजुक ( रज्जुक ) राजूक.
पोदेसिक ( प्रादेशिक ).
भांडागारिक—कोशाध्यक्ष.

याच्या मध्यवर्ति राजसत्तेच्या हाताखालीं प्रांतोप्रांतीं ' रज्जुक ' नांवाचे अधिकारी असत. रज्जुकांच्या हाताखालीं प्रादेशिक नांवाचे अधिकारी असत. प्रत्येक खात्यावरील अधिकाऱ्यास महामात्र असें म्हणण्यांत येत असून ज्या खात्यावर त्याची नेमणूक झाली असेल त्या खात्याचें नांव त्याच्या हुद्याला जोडण्यांत येई. कारभार चालविणाऱ्या कामगारांना ' पुरुष ' अशी संज्ञा असे, व जिल्ह्याचे मुख्यास स्थानिक म्हणत.

याचें राज्य म्हैसूर प्रांतापर्यंत पसरलें होतें असें दिसतें ( Mysore Gaz. 1897, 1,289 ). यानें पाटलीपुत्र आपली कायमची राजधानी केली होती ( Hiuen Tsang in Beal Records, 11, 85 ). हा स. पूर्वी २७२ त गादीवर बसला. यानें स. पूर्वी २६१ त कलिंगाचें राज्य जिंकलें व स. पूर्व २५९ त युद्धाचा विचार सोडून देऊन परप्रांतांत धर्मप्रसारार्थ भिक्षु पाठविण्याचें ठरविलें. हा स. पूर्व २३२ त मरण पावला ( V. Smith, p. 206–7 ). यानें स. पूर्व २४३ त एक कायदा पास करून त्यामुळें सर्व प्रकारची पशुहत्त्या राज्यांतील सर्व जातींच्या लोकांकडून बंद करविली व सदर कायदा मोडणारास ५० पण दंड ठेवला.

यानें राज्याचे चार भाग पाडून त्यांच्यावर सुभेदार नेमून व्यवस्था केली होती. पंजाब, सिंध, काश्मीर वगैरे उत्तरेकडील सुभेदार तक्षशिला येथें राहत असे. कलिंग प्रांताकडील सुभेदार तोसली येथें राहत असे. माळवा, गुजराथ, काठेवाड येथील सुभेदार उज्जयनीला होता. नर्मदेच्या पलीकडील प्रदेशावर चवथा सुभेदार होता ( V. Smith, p. 172 ).

यानें राज्यांत राजाचीं माणसें म्हणून कांहींजण ठेवले होते. त्यांनीं राज्यांत होणाऱ्या सर्व घडामोडींची बित्तंबातमी लिहून ठेवून ती वेळोवेळीं राजाला कळवावी, अशी व्यवस्था होती.

हा प्रत्येक वर्षी राज्यारोहणदिन साजरा करीत असे व त्या दिवशीं पुष्कळशा कैद्यांना शिक्षेची माफी देऊन सोडून देण्यांत येत असे. चिनी यात्रेकरू इत्सिंग हा अशोक बुद्ध भिक्षूंच्या वेषांत राहत असे असें म्हणतो (Takakusu's Trans. of I-tssing—A Record of Budhist Practices, p. 73). यानें नेपाळांत ५ स्तूप बांधविले. यानें आजीवकांना राहण्यासाठीं डोंगरांतून गुहा तयार केल्या व भिक्षूंना राहण्यासाठीं पाटलीपुत्र नगराजवळ अशोकाराम व कुक्कुटाराम नांवाचे दोन भव्य मठ बांधले. याच्या कारकीर्दींत काठेवाड येथील तुषास्प नांवाच्या ( इराणी ) पारसीक प्रांताधिकाऱ्यानें गिरनार पर्वताजवळ नद्यांचे प्रवाह अडवून सुदर्शन नांवाचा एक तलाव बांधला. यानें काश्मीरचें श्रीनगर व नेपाळांतील देवपाटण हीं शहरें वसविलीं.

याच्या कारकीर्दींत वाङ्मय व कला यांचा अभ्युदय उत्तम रीतीनें झाला. निरनिराळ्या स्तूपांवरून व बऱ्याच मूर्तींवरून तत्कालीन कारागिरांचें कला-नैपुण्य उत्तम तऱ्हेनें निदर्शनास येतें. सारनाथस्तम्भशिरावरील सिंहामध्यें दिसून येणारी कारागिरी इराणी अगर ग्रीक कारागिरांपेक्षां सरस आहे, असें सहज दिसतें. मौर्य शिल्पज्ञ फार निष्णात होते याविषयीं शंकाच नाहीं. अशोकाच्या वेळीं बौद्ध भिक्षू हे शिक्षणाचें पवित्र काम करीत असत, असें दिसतें. त्या वेळीं शिक्षणाचें प्रमाण समाधानकारक होतें. याच्या शिलालेखांतील भाषा जोरदार व उत्तम आहे. पुष्कळ ग्रंथहि याच्या कारकीर्दींत झाले असावेत.

याचें एक चरित्र तारानाथानें तिबेटी भाषेंत लिहिलें आहे. त्या चरित्राचें भाषांतर जर्मन भाषेंत होऊन त्या जर्मनीचें भाषांतरहि कार्टलींच्या १९३० च्या जूनच्या अंकांत इंग्रजींत प्रसिद्ध झालें आहे. हें चरित्र विश्वासार्ह नसून त्यांत बहुतेक सर्व गोष्टी चमत्कारिक आहेत. उदाहरणार्थ, नेमित राजास एका व्यापाऱ्याच्या बायकोपासून मूल होऊन त्याचें नांव अशोक ठेवण्यांत आलें. कारण अशोकाच्या जन्माच्या वेळीं नेमित राजाच्या आईच्या मरणाच्या दुःखाचा शेवट झाला होता (Indian H. Quarterly, Vol. VI, pp. 334–344).

यानें अनेक विवाह केले होते. तीवरची माता कारुवाकी हिच्या दानाचें वर्णन अशोकानें आपल्या एका शिलालेखांत केलें आहे.

हा उज्जयनीला ‘कुमार’ ( गव्हर्नर ) असतांना सेट्टी जातीच्या वेदिसागिरी( बेसनगर )च्या देवी नांवाच्या मुलीशीं याचें लग्न झालें. तिच्यापासून याला महेन्द्र व संघमित्रा अशीं दोन मुलें झालीं. संघमित्रेचें लग्न ‘अग्निब्रह्मा’ नांवाच्या ब्राह्मणाशीं झालें व तिला सुमन नांवाचा मुलगा झाला.

याला महेन्द्र, कुस्तन, तीवर, कुनाल ( सुयशस् ) व जालौक नांवाचे मुलगे आणि संघरक्षिता व चारुमती नांवाच्या मुली होत्या. याच्यामागें कुनालाचा मुलगा दशरथ ऊर्फ बंधुपालित हा गादीवर आला.

अशोकानें आपली गादी आपला नातु दश-रथ यास देऊन आपण आपलें धार्मिक आयुष्य घालविण्याकरितां सुवर्ण-गिरी येथें जाऊन राहिला. पण एक वर्षांतच हा तेथें मरण पावला (B.; कुनाल पाहा ). वास्तविक याच्या मृत्यूसंबंधाची माहिती उपलब्ध नाहीं. तिबेटी दंतकथेवरून असें दिसतें कीं, हा तक्षशिलेला वारला.

**२. बुद्धतर्कज्ञ,** पंडित अशोक अथवा आचार्य अशोक या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या या अशोकास तिबेटी भाषेंत Mya-nanomed असें नांव होतें. याच्या दैवी ज्ञानामुळें चंद्रगोमिन् यास परमदयाळू अवलोकितेश्वर व देवी तारा यांचें दर्शन घडलें. अशोकानें धर्मोत्तराचार्याचा निर्देश केला आहे. यावरून हा स. ८४७ च्या नंतर झाला असला पाहिजे. हा स. ९०० च्या सुमारास बहुतेक होऊन गेला असावा.

यानें तर्कज्ञानावर दोन ग्रंथ लिहिले आहेत–( १ ) अवयविनिराकरण, ( २ ) सामान्य-दूषण-दिक्-प्रसारिता. अवयविनिराकरणाच्या शेवटच्या श्लोकावरून असें दिसतें कीं, अशोकास ब्राह्मण तत्त्वज्ञांशीं झगडावें लागलें ( हिस्ट्री ई. ला., पा. ३३२).

**अश्वघोष**—हा जातीनें ब्राह्मण असून मूळचा अयोध्येचा राहणारा व कुशानवंशीय सम्राट् कनिष्क याचा हा समकालीन होता. पुष्कळ हिंदी व युरोपीय विद्वानांच्या मतें कनिष्कानें स. ७८ मध्यें सुरू होणारा सध्यांचा शालिवा-

हनशक सुरू केला. यावरून अश्वघोषाचा काळ ख्रिस्तोत्तर पहिलें शतक हा धरला आहे. याच्या गुरूचें नांव पार्श्व.

अश्वघोषाच्या ग्रंथांतील उताऱ्यांवरून यानें उपनिषदें, भगवद्गीता व सांख्यादि दर्शनें यांचा चांगला अभ्यास केला होता असें दिसतें. पुढें यानें बौद्धधर्माचा स्वीकार केला. संस्कृत वाङ्मयांत अश्वघोषाचें नांव त्याच्या 'सौंदरनंद' व 'बुद्धचरित' या काव्यांनीं चिरकाल राहील. यांपैकीं पहिल्या काव्याचे १८ सर्ग आहेत व त्यांत गौतमबुद्धानें नंद नामक आपल्या सावत्र भावास बौद्धधर्माची दीक्षा दिली त्या प्रसंगाचें सविस्तर वर्णन केलें आहे. 'बुद्धचरिता' चे १७ सर्ग आहेत, पण त्यांपैकीं पहिले १३ च अश्वघोषाचे असून बाकीचे गेल्या शतकांत अमृतानन्द नामक कवीनें रचले असा त्यांत स्पष्ट उल्लेख आहे. पहिल्या १३ सर्गांत गौतमबुद्धाच्या जन्मापासून मारविजयापर्यंतची कथा आली आहे.

'सौंदरनंद' काव्याच्या शेवटीं कवीनें हें काव्य आपण आनंदप्राप्तीकरितां लिहिलें नसून विषयोपभोगमग्न लोकांचें लक्ष बौद्धधर्मांत उपदेशिलेल्या मोक्षमार्गाकडे लागावें म्हणून रचलें आहे, असें स्पष्ट म्हटलें आहे. अश्वघोष स्वतः मोठा प्रतिभावान् कवि होता. शिवाय यानें रामायणादि पूर्वकालीन काव्यांचा चांगला अभ्यास केला होता, म्हणून याचीं हीं दोन्ही काव्यें सरस वठलीं आहेत. याची भाषा साधी, पण मनोहर आहे. यानें बुद्ध व नंद यांच्या चरित्रांतील वेचक काव्यमय प्रसंग घेऊन त्यांना उपमादि अलंकारांनीं भूषविलें आहे. नंदानें भिक्षु होण्याचा निश्चय केल्याचें समजल्यावर सुंदरीनें केलेला शोक, गौतम उद्यानांत जातांना पौरस्त्रियांची उडालेली धांदल, ज्या रात्रीं तो आपलें घर सोडून निघाला त्या रात्रीं त्यानें पाहिलेलें स्त्रियांचें किळसवाणें स्वरूप, गौतमाला वनांत पोंचवून छदक एकटाच कपिलवस्तूला आला त्या वेळीं पौरजनांस झालेलें दुःख वगैरे प्रसंग कवीच्या अप्रतिम वर्णनशैलीनें वाचकांच्या मनश्चक्षूंपुढें हुबेहूब उभे राहतात. तथापि अश्वघोषाचें व्याकरणशुद्धतेकडे फारसें लक्ष नव्हतें.

स. १९१० मध्यें हस्तलिखित ताडपत्रांचे कांहीं लहानमोठे तुकडे सांपडले. त्यांपैकीं एकाचें नांव 'शारिपुत्रप्रकरण' किंवा 'शारद्वतीपुत्रप्रकरण' असें होतें. तें अश्वघोषानें रचलें होतें, असा स्पष्ट उल्लेख त्या नाटकाच्या शेवटच्या पत्रावर केलेला आढळतो. यांत शारिपुत्र व मौद्गलायन्य यांनीं बुद्धाचा उपदेश ग्रहण करून बौद्धधर्म स्वीकारला हा विषय आला आहे.

अश्वघोषाच्या सूत्रालंकाराच्या चिनी भाषांतरांत एका मुलीची गोष्ट आलेली आहे. तिनें आपलें सर्वस्व म्हणून जवळ असलेलीं व पूर्वी मातींत सांपडलेलीं दोन पितळी नाणीं भिक्षूंना दिलीं. या देणगीचें महत्त्व श्रीमंतानें आपल्या सर्व संपत्तीचें दान केल्यापेक्षांहि अधिक आहे, असें बुद्धानें वर्णिलें. या दानप्रभावानें पुढें ती राजाची राणी झाली. हा सूत्रालंकार ग्रंथ सध्यां उपलब्ध असलेला दिसत नाहीं.

याशिवाय अश्वघोषाचा 'प्रबुद्धधर्म' नांवाचाहि एक ग्रंथ आहे. त्यामध्यें भगवद्गीतेसारखे विचार प्रदर्शित केले असून भगवद्गीतेंतल्या वचनांसारखीं वचनेंहि त्यांत आहेत. प्रबुद्धधर्मांत 'सुखवतीसूत्रा'चा उल्लेख आलेला आहे. सुखवतीसूत्राचें महत्त्व असें आहे कीं, त्यांत बुद्धाचें वर्णन अनादि अशा शब्दानें केलें असून त्याच्या मानवी अवताराची कल्पनाहि त्यांत मांडलेली आहे. म्हणजे अश्वघोषाच्या पूर्वीं आणि सुखवतीसूत्राच्या काळीं बुद्धाला अवतारत्व प्राप्त झालें होतें.

अश्वघोष हा वसुमित्र अथवा वसुबंधु याचा समकालीन होता. कनिष्कानें जालंदर येथें जी समिती भरविली होती तिचा अध्यक्ष वसुमित्र होता. यावरून अश्वघोष व वसुमित्र यांचे काल निश्चित होतात.

कनिष्काच्या कारकीर्दीत एक धर्मसमिति भरविण्यांत आली होती. तिबेटी, चिनी, व मंगोली लेखकांनीं या समितीचा पूर्वीच्या काळांत उल्लेख केलेला आहे. या समितीचा राजकारणाशीं कांहींएक संबंध नव्हता.

कनिष्क एका भिक्षूच्या मदतीनें बौद्ध सांप्रदायिक ग्रंथाचा अभ्यास करीत असतां त्यांतील परस्परविरोधी मतें पाहून त्याचा गोंधळ उडाला. तेव्हां आपला सल्लागार पार्श्व याच्या संमतीनें कनिष्क राजानें बौद्ध सांप्रदायिक ग्रंथ जाणणाऱ्या विद्वानांची सभा बोलावली. त्या सभेंतील सर्व पंडित हीनयान पंथांतील सर्वास्तिवादी मताचे अनुयायी होते. या मंडळाच्या सभा काश्मीरच्या राजधानीनजीक कुंडलवन नामक मठांत भरल्या. त्या सभेचा वसुमित्र हा अध्यक्ष व पाटलीपुत्राहून आणलेला अश्वघोष हा उपाध्यक्ष होता. त्या सभेंत पांचशें सभासद होते. त्यांनीं अगदीं प्राचीन काळापासूनच्या सांप्रदायिक ग्रंथांचें नीट परीक्षण करून बौद्ध सांप्रदायिक तत्त्वांच्या तीन मुख्य विभागांवर मोठाले टीकाग्रंथ लिहिले. त्यांपैकीं महाविभाषा नांवाचा बौद्ध तत्त्वज्ञानाचा ज्ञानकोशासारखा मोठा ग्रंथ अद्याप चीनमध्यें आहे. याच्या वेळीं राजकीय व लौकिक व्यवहार संस्कृतमध्यें सुरू झाले असें दिसतें.

स. १०० च्या सुमारास सम्राट् कनिष्कानें बौद्ध सिद्धान्त-निश्चयाकरितां जी परिषद बोलाविली होती ती तारानाथादिकांच्या मतें जालंदर येथील एका मठांत भरली होती. परंतु ह्यू-एन्-त्संग याचें म्हणणें असें कीं, ही सभा काश्मीरमध्येंच भरली. कदाचित् असेंहि असेल कीं, प्रथम जालंदर येथें ही सभा भरून पुढें उन्हाळ्यानिमित्त तिचीं अधिवेशनें काश्मीर येथें झालीं.

याच्या बुद्धचरित्रपर बुद्धचरित या संस्कृत काव्याचें चिनी व तिबेटी भाषांत भाषान्तर झालें आहे. सूत्रालंकार या ग्रंथांत हीनयानी धोरणाचीं अनेक कथानकें आहेत.

कनिष्कानें धार्मिक सभेकरितां आमंत्रण पाठविलें असतां हा अतिशय वृद्ध असल्यामुळें यानें आपला शिष्य ज्ञानयश यास पाठविलें, असा उल्लेख आढळतो. ( Journal of the Buddhist Text-Soc., 1893, Pt. III, p. 13 ). तर कनिष्कानें पाटलीपुत्रावर स्वारी करून यास आपले बरोबर नेलें असेंहि (Schiefer's Taranath, Ch. VII, and Watters XII, 104 ) आढळतें.

**अश्वमित्र**—जैनतीर्थंकर महावीराचा प्रतिस्पर्धी.

**अश्वसेन**—जैनधर्मांतील तीर्थंकर पार्श्वनाथाचा हा पिता होय. याच्या बायकोचें नांव यामा. यामा बायकोपासून याला पार्श्वनाथ नांवाचा मुलगा झाला.

हा राजा असून काशी ( बनारस ) येथें राज्य करीत होता. हा क्षत्रियांपैकीं 'इक्ष्वाकु' वंशांतील होय ( जैनिझम इन् नॉर्थ इंडिया ).

**असदखान**—हा प्रख्यात तुर्कोमान् घराण्यांतील होता. याचें खरें नांव इब्राहिम. याच्यावर शहाजहानाची फारच मर्जी होती. बादशहानें असफखानाची मुलगी यास दिली. पुढें हा वजीर झाला. बहादुरशहाच्या वेळीं हा वकील मुतलक झाला. त्याला पुढें फर्रुखसियरनें कामावरून काढलें. हा स. १७१७ मध्यें वारला ( बील ).

**२.** विजापूरच्या आदिलशाही घराण्यांतील इस्माईल राजाचा एक सरदार. इस्माईल हा नेहमीं याच्याच सल्ल्यानें राज्यकारभार करी.

यानें राज्यकारभाराच्या बाबतींत इस्माईलला फार मदत केली. त्याचप्रमाणें यानें विजापूरचें राज्यविस्ताराचें काम फार जारीनें केलें. एकदां यानें अमीर बरीदच्या छावणीवर हल्ला केला. त्या वेळीं जिकडे तिकडे शांतता होती. यानें शांततेचा भंग न करतां ज्या ठिकाणीं अमीर बरीद झोंपला होता या ठिकाणीं गुपचुप आपल्या साथीदारांसह गेला, आणि राजास पलंगासह उचलून आपल्या गोटांत आणलें. अशा प्रकारचीं यानें शूर कृत्यें केलीं होतीं.

जेव्हां इस्माईल मृत्यु पावला तेव्हां इस्माईलनें 'आपल्या पश्चात् आपला ज्येष्ठ पुत्र मल्लू यास गादीवर बसवावें, व आपण सर्व राज्यकारभार पहावा.' असें याला सांगितलें होतें. त्याप्रमाणें यानें मल्लूस गादीवर बसविलें, पण थोड्याच दिवसांत याचें व मल्लूचें वांकडें येऊन यानें आपल्या जागेचा राजिनामा दिला.

पुढें मल्लूनंतर इब्राहिम हा विजापूरचे गादीवर आला. त्या वेळीं यानें विजयानगरच्या रामराजाचा भाऊ व्यंकटाद्री याचा चांगलाच पराभव केला. त्यामुळें इब्राहिमानें याला दिवाणाचीं आणि सेनापतीचीं वस्त्रें दिलीं व याच्या एका मुलीशीं लग्न लाविलें. अशा रीतीनें असदखानाचें वर्चस्व वाढूं लागलें. याचा हा उत्कर्ष दरबारांतील इतर लोकांस सहन न होऊन ते याचा द्वेष करूं लागले. दरबारांतील इतर लोकांनीं राजाचें मन याच्याविषयीं कलुषित करून याला राजाकडून बडतर्फ करविलें.

बडतर्फ केल्यावर हा इमामशाहास जाऊन भेटला व त्याला 'राजाचा आपल्याविषयीं गैरसमज झाला आहे' अशी खात्री पटवून दिली. तेव्हां इमामशाहानें इब्राहिमाची गांठ घेऊन त्याला असदखानाची खरीखरी हकीकत सांगितली. त्यावर राजाचा विश्वास बसून राजानें यास परत बोलाविलें. व नंतर याच्याविषयीं ज्या लोकांनीं मन कलुषित केलें त्यांना कैदेंत टाकलें. यापुढें राजा याच्याच तंत्रानें चाले.

हा वारला तेव्हां याचें वय शंभर वर्षांहून अधिक होतें. त्यांपैकीं सुमारें पन्नास वर्षें यानें बादशहाचे सेवेंत खर्च केलीं. जे मोठमोठे योद्धे व मुत्सद्दी झाले, त्यांत गणना करण्याच्या योग्यतेचा हा पुरुष होता.

यश आणि विजय हे तर याचे जणूं काय आज्ञाधारक सेवकच होते. हा मोठा एकनिष्ठ, दृढनिश्चयी व दूरदृष्टि होता. हा मोठ्या थाटानें आणि मिजाशीनें राहत असे. यानेंच प्रथम हत्तीस अंकुशाच्या ऐवजीं लगाम घालून हत्तीवर बसण्याची चाल पाडली ( विजापूरचें आदिलशाही घराणें, मोडककृत ).

**३.** औरंगजेबाचा वजीर व झुल्फिकारखानाचा पिता. जिंजीच्या वेढ्याच्या वेळीं हा मुलाच्या मदतीस आला होता.

**असदुद्दीन खल्जी**—हा खल्जी घराण्यांतील मघुशीखानाचा मुलगा. याला स. १३१८ मध्यें फाशीं दिलें.

**असफउद्दौला**—सुजा उद्दौल्याचा वडील पुत्र मीर्झा अमानी हा असफउद्दौला हें नांव धारण करून गादीवर

बसला. त्या वेळीं रेसिडेंटानें यांच्या बापाच्या वेळचा तह मोडून नवीन तह केला. त्यांत २३ लक्षांचा मुलख तोडून मागितला व २,६०,००० रु. दरमहा लष्करी खर्च म्हणून देण्याचें ठरलें. असा हा घातुक तह झाला होता. व यानेंच पुढें याच्या कारकीर्दींत अयोध्या प्रांताचें वैभव नष्ट झालें.

असफउद्दौल्यानें आपल्या आईजवळून ६२ लक्ष रुपये घेतले. परंतु पुढें रेसिडेंटाच्या मध्यस्थीनें आईपासून आपण पैसे घेणार नाहीं असा कौलनामा लिहून दिला. यानें नंतर सहा वर्षें राज्यकारभार सुरळीत चालविण्याचा प्रयत्न केला. परंतु रेसिडेंटानें नबाबाच्या सैन्यांत वाटेल तसे इंग्रज लोक भरले व मन मानेल तसा कारभार सुरू केला. त्यामुळें एतद्देशीय सैन्यानें बंड केलें. इतक्या सगळ्या भानगडींत कंपनीची बाकी तुंबत चालली. वॉरन हेस्टिंग्जनें नबाबाकडे ५५ लक्ष रोख व २० लक्ष कांहीं मुदतीनें इतक्या पैशाची मागणी केली. काशीच्या चेतसिंगास नबाबाच्या आईनें मदत केली असा खोटा पुरावा जमवून हेस्टिंग्जनें तिच्याकडून ७५ लक्ष रुपये काढले ( मि. मिलचा इतिहास पाहा ). अशा तऱ्हेनें हेस्टिंग्जच्या वेळीं अयोध्या प्रांतांत हाहाःकार उडाला. कॅप्टन एडवर्ड यानें असें म्हटलें आहे कीं, स. १७७४ त सुजाउद्दौल्याचे कारकीर्दींत अयोध्या प्रांत अतिशय भरभराटींत होता तो स. १७८३ मध्यें उध्वस्त व उच्छिन्न बनला.

कॉर्नवालिसच्या कारकीर्दींत मात्र त्यानें लष्करी खर्च मुकर केला व तो ५० लक्ष असावा असें ठरलें. इतर सर्व न लागणाऱ्या मोठ्या पगाराच्या जागा रद्द केल्या. व कंपनीच्या नांवाखालीं कित्येक युरोपियन व्यापाऱ्यांना जे हक्क प्राप्त झाले होते, ते सर्व काढून घेतले. नबाबानें दोन हिंदु मुत्सद्यांच्या कडून अयोध्या प्रांताची बरीच सुधारणा केली. परतु पुनः सर जॉन शोअरनें ५॥ लक्षाचा लष्करी खर्च नबाबावर जादा लादला. तेव्हां या धक्यानें नबाब जो आजारी पडला तो औषधपाणी कांहीं न घेतां स. १७९७ त मरण पावला. हा फार दानशूर होता.

**असफखान**—हा एक सरदार असून याचें नांव अबदुल मजीद. स. १५६५ मध्यें यानें गढामंडळ येथील दुर्गावती राणीवर चाल करून तिचा पराभव केला. आपण शत्रूच्या हातीं लागूं नये म्हणून दुर्गावती राणीनें स्वतः खंजीर खुपसून घेऊन प्राणत्याग केला. तेव्हां तिचा सर्व खजिना याच्या हातीं लागला. यानें तो खजिना तसाच गुप्त रीतीनें आपल्याजवळ ठेविला. त्यामुळें याला पुढें अकबराचे विरुद्ध बंड करतां आलें. परंतु अकबरानें यास क्षमा करून यानें जिंकिलेला वरील प्रांत यास जहागीर म्हणून दिला ( बील ).

**२.** नूरजहानचा भाऊ. याचें मूळचें नांव अबुल हसन. जहांगीर बादशहानें यास वझीर केलें. याची मुलगी मुम्ताजमहाल ही शहाजहान बादशहास दिली होती. हा १६४२ त मरण पावला. हा निजामशाही जिंकण्याकरितां दक्षिणेंत होता. १६३३ पर्यंत याला विजापूर वगैरे जिंकण्यांत यश आलें नाहीं.

**३.** हा मीर्झा जाफर या नांवानें प्रसिद्ध आहे. हा कझ्वीनचा रहिवासी होता. हा अकबराच्या पदरीं होता. हा उत्तम कवि होता. यानें 'शीरीन व खुश्रो' नांवाचें काव्य रचिलें. अकबरानें यास मुख्य दिवाणाची जागा दिली ( स. १५९८ ). हा १६१२ मध्यें वारला. याच्या बापाचें नांव मीर्झा-बदी-उद-झमान असून स. १५७७ मध्यें हिंदुस्थानांत आला. अकबरच्या दरबारीं यास असफखान हें नांव मिळालें. यानें 'तारीख-अल्फी' नांवाचा ग्रंथ लिहिला ( बील ).

**४.** शहाजहानचा आवडता खानखानन हाच बहुधा जगन्नाथ पंडिताच्या 'आसफ-विलासां'तील आसफ असावा. याच्या मृत्यूबद्दल पंडित जगन्नाथानें दुःख प्रदर्शित केलें आहे. हा स. १६४१ मध्यें मरण पावला. खानखानन हें नांव नसून सन्मानाची पदवी आहे.

**५.** अकबराचा एक प्रधान. हा मुसलमान असून सुद्धां संस्कृत चांगलें जाणत असे. उत्तम कविता करण्याचें याचे अंगीं कौशल्य होतें.

एकदां हा एका पंडिताकडे गेला असतां त्या पंडितानें "म्लेच्छक्षयोस्तु" असा कठोर आशीर्वाद दिला. त्यावर "म्लेच्छक्षयोस्तु, पंचमीतत्पुरुष एवास्तु" असें उत्तर दिलें व यावरून त्या दोघांचें सख्य झालें.

दुसऱ्या एका प्रसंगीं यानें दिलेल्या काव्याची समस्या इलेश्वरोपाध्यायानें पूर्ण केली अशी हकीकत आहे.

**असहाय**—एक धर्मशास्त्रावरील ग्रंथकार. हा ७ व्या शतकाच्या सुमारास होऊन गेला असावा. याचा काल निश्चित सांगतां येत नाहीं. तरी पण हा ६ व्या शतकानंतर झाला, असें कांहींचें म्हणणें आहे. यानें नारदस्मृतीवर भाष्य लिहिलें, असा उल्लेख आहे. त्याची संशोधित प्रत कल्याणभट्टांनीं केली आहे. पण त्यामध्यें व मूळ भाष्यामध्यें बराच फरक आहे. अद्भुतसागर ग्रंथाचा कर्ता म्हणतो कीं, यानें गौतम-धर्मसूत्रावर भाष्य लिहिलें.

यानें वारसासंबंधीं बरीच माहिती दिलेली आहे. याच्या म्हणण्याप्रमाणें निपुत्रिक बापाची मिळकत त्याच्या गुरूकडे,

नंतर गुरूच्या मुलाकडे ( निपुत्रिक असल्यास गुरूच्या बायकोकडे ), गुरूस संतति नसल्यास त्याच्या बायकोनंतर ती मिळकत शिष्याकडे जाते. नंतर शिष्याच्या मुलाकडे व नंतर त्याच्या नातवाकडे जाते. त्याचप्रमाणें ब्राह्मणाला क्षत्रिय स्त्रीपासून झालेल्या संततीच्या वारस, हक्कासंबंधीं व सावत्र भाऊ-बहिणीच्या वारसासंबंधीं माहिती दिलेली आहे. पुढें याचें लोकांना इतकें विस्मरण झालें कीं, बालंभट्टीनें याच्या नांवाचा विशेषणासारखा उपयोग केलेला आहे. बालंभट्टीनें मेधातिथीला महत्त्व देऊन याला मेधातिथीचें विशेषण केलें आहे.

**असंग**—( वसुबंधु पाहा ).

**असद**—याचें पूर्वज समरकंद येथें राहत असत पण याचा जन्म आग्रा येथें झाला. याचें मूळ नांव असदुल्लाखान किंवा मीर्झा नौशाह असे होतें. हा प्रख्यात कवि व फारसी लेखक होता. शेवटचा मोंगल बादशहा बहादुरशाहा यानें यास नबाब अशी पदवी दिली व काव्यशास्त्राध्यापक नेमिलें.

**असादाम**—हा वलभी धराण्यांतील रुद्रशाहाचा पुत्र. यानें अत्रिदामपुत्र विश्वशाह याच्यानंतर ३३ वर्षें राज्य केलें असावें ( J. B. B. R. A. S., Vol. VII ). धरसेन दुसरा व शिलादित्य दुसरा यांचे दरम्यान ८४ वर्षांचा काळ गेला. त्या काळांत या लोकांनीं राज्य केलें असावें.

**असित**—एक ऋषि. चिनी प्रवाश्यांनीं याचें नांव ' आए ' असें लिहिलें आहे. हा मोठा ज्योतिषी होता. हा हिमालयापाशीं राहत होता. यानें बुद्धाचा जन्म झाला तेव्हां त्याला प्रत्यक्ष पाहून त्याच्या धोरणाविषयीं भविष्य सांगितलें होतें. याच्या नांवाचा निर्देश प्राचीन ज्योतिषग्रंथांत मिळतो. वराहमिहिरानें याची संहिता पाहून बृहत्संहिता लिहिली (भा. ज्यो. ३, पा. ३४२ व ४६८ ).

**अस्करी**—हा बाबरचा मुलगा. याची आई गुलरुखबेगम. हुमायुनानें याला गुजराथ प्रांतावर नेमलें. हा विलासी असल्यानें गुजराथ बहादूरशाहनें पुनः परत घेतला तेव्हां हा पळून गेला. शेरखानाशीं झालेल्या युद्धांत हा हुमायुनाबरोबर होता. हा मक्का येथें स. १५५८मध्यें मेला.

**अहमद**—( स. १४०९-२७ ) बंगालचा सुलतान. जितमल्ल ऊर्फ जलालुद्दीनचा पुत्र. याला केंब्रिज हिस्ट्रीमधील वंशावळींत शम्सुद्दीन महमूदशाह असें म्हटलें आहे.

**अहमद आदिलशाह**—हा पहिल्या इब्राहिमाचा पुत्र ( कें. हि. ).

**अहमदखान घोरी**—( हूशंगशाह पाहा ).

**अहमदखान बंगष**—फरूकाबादचा नबाब. मुहंमदशाह बंगषचा हा पुत्र. याचा भाऊ काईमजंग वारल्यावर त्याची दौलत सफदरजंगानें आपल्याकडे ओढली. ती स्वारी करून यानें परत घेतली. पानपतानंतर मराठ्यांकडून आपला पूर्वीचा मुलूख मिळविण्याचा यानें प्रयत्न केला. पण रामचंद्र गणेश व महादजी शिंदे यांनीं फरुखाबादेवर स्वारी करून याला शरण येणें भाग पाडलें. पानपतच्या लढाईच्या वेळीं हा हजर होता. हा फार शूर होता. मृत्यु स. १७७१ ( ११ जुलै ).

**अहमद निजामशाह बहिरी**-(स.१४८९-१५०८) हा अहमदनगरच्या निजामशाही घराण्याचा मूळ पुरुष होय. हा ब्राह्मणकुलोत्पन्न होता. याचा आजा बहिरंभट नांवाचा ब्राह्मण असून तो गोदेच्या उत्तरेस वऱ्हाडांतील पाथरी नांवाच्या शहराचा देशपांडे होता. दुर्गादेवीच्या दुष्काळांत याचा आजा आपल्या तिमाजी नांवाच्या मुलास घेऊन विजयानगरकडे गेला. बाहामनी सुलतान अहमदशाहावली याच्या शिपायांनीं विजयानगरच्या स्वारींत तिमाजीस कैद केलें व गुलाम म्हणून सुलतानाकडे आणलें. सुलतानानें त्यास मुसलमानी धर्माची दीक्षा दिली व त्याचें मलीकनायन नांव ठेविलें ( स. १४६० ). पुढें सुलतान मुहंमद यानें त्यास आपला कारभारी जो खानजहान त्याच्या शिफारशीवरून मोठ्या योग्यतेस चढविलें व त्यास निजाम-उल्मुल्क हीं पदवी देऊन तेलंगणच्या सुभ्याच्या जागीं त्याची नेमणूक केली ( स. १४७० ).

परंतु निजामउल्मुल्कनें मलिक महमद ( मलिक अहमद असेंहि अहमद निजामास म्हणत ) नांवाच्या आपल्या मुलास नेमणुकीच्या जागीं पाठविलें, व आपण स्वतः सुलतानाच्या दरबारींच राहिला. येथें त्यानें खानजहानाविरुद्ध कारस्थान रचून सुलतानाच्या हुकुमानें त्याचा वध करविला, व आपण स्वतः ( अहमद निजामशाहाचा बाप ) कारभारी झाला. यानंतरचा सुलतान मुहम्मदशाह याच्या कारकीर्दींत निजामउल्मुल्कानें आपल्या अगोदरच मोठ्या असलेल्या जहागिरींत बीड व दुसऱ्या कित्येक जिल्ह्यांची भर टाकली व आपल्या मुलास तेलंगणच्या सुभेदारीवरून परत बोलावून त्याची दौलताबाद सुभ्यावर नेमणूक केली.

पुढें निजामउल्मुल्काचा वध झाल्यावर हा बंड करून स्वतंत्र झाला ( स. १४८९ ) व स्वतःस निजामशाहा ही पदवी यानें लावून घेतली. तीच पुढें अहमदनगरच्या सर्व राजांनीं लाविली, व त्यांच्या राज्यास यामुळेंच निजामशाही असें नांव पडलें. शिवाय मूळ पुरुष बहिरंभट याच्या स्मरणार्थ या वंशांतील प्रत्येक शाहा आपल्याला ' बहिरी ' अशी पदवी लावून घेत असे.

स्वतंत्र होण्यापूर्वीच यानें कोंडाणा (सिंहगड), शिवनेर, लोहगड, वगैरे पुण्याच्या आसपासचे सर्व किल्ले व कोंकणांत दंडराजपुरी पावेतोंच बरेचसे किल्ले बंडखोर किल्लेदारांपासून आपल्या कबजांत घेतले. पैकीं शिवनेरी किल्ल्यांत याला पुष्कळ द्रव्य सांपडलें. नंतर यानें चंदनवंदन हे किल्ले काबीज केले. यानें आपल्या मुलुखाची व्यवस्था इतकी उत्तम ठेवली होती कीं, याच्या राज्यांत एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत काठीला सोनें बांधून लोकांनीं खुशाल फिरावें अशी आख्यायिका होती. अहमद निजामशाहा याच्या हुकमाशिवाय राज्यांत पानदेखील हालत नसे.

बाहामनीशाहानें याजवर स्वारी केली, तींत त्या शहाचाच पराभव झाला. अखेरीस अहमद हा निजामशाहा या नांवानें स्वतंत्रतेनें राज्य करूं लागला. यानें दौलताबाद व जुन्नर यांचे दरम्यान अहमदनगर नांवाचें शहर वसविलें. स. १४९४ या वेळेस मराठे लोक दक्षिणेंत पुंडाई करू लागले होते. तेव्हां यानें दौलताबादेस वेढा घालून तो किल्ला घेतला. पुढें अनेक पराक्रम करून हा स. १५०८ सालीं निवर्तला.

याच्या आंगचे गुण वर्णन करण्यास आपण असमर्थ आहों, असें फेरिस्ता म्हणतो. यानें एकपत्नीव्रत पाळलें. द्वंद्वयुद्ध करून तंट्याचा निकाल करण्याची चाल यानेंच दक्षिणेंत पाडिली. राजानें अनुकरण करून सर्व लहान थोर लोकांत खेड्यापाड्यांतून सुद्धां या खेळाची अभिरुची वाढून, जिकडे तिकडे तलवारीचा पट्टा व बोथाटी खेळण्याचे आखाडे स्थापन झाले.

२. (स. १५९४) हा शाहा ताहीरचा मुलगा. याचा उल्लेख मुसलमानी रियासतींत आहे.

**अहमदबक्षखान**—पंजाबांतील लोहारु संस्थानचा संस्थापक. एक मोंगल सरदार. अल्मोराच्या राजानें लॉर्ड लेककडे तहाचें बोलणें करण्याकरितां यास धाडलें होतें (स. १८०३). ती कामगिरी चांगल्या प्रकारें बजावल्यामुळें यास त्यानें लोहारु गांव इनाम दिला, व लॉर्ड लेकनें लष्करी नोकरीच्या अटीवर यास फिरोजपूर परगणा तहहयात दिला.

**अहमदशाहा**—(स. १४११-१४४२). हा एक गुजराथचा सुलतान होय. हा आपल्या वयाच्या एकविसाव्या वर्षी गुजराथच्या मुझफरशाहानंतर गादीवर बसला. हा तातारखानाचा मुलगा होय. फीरूझखान हा याचा चुलता होय असा उल्लेख केंब्रिज हिस्ट्रीमधील वंशावळींत आला.

याचा चुलतभाऊ फीरूझखान त्यानें बंड केल्यामुळें यानें त्याच्यावर स्वारी केली व त्याचा पराभव केला. त्या स्वारीहून परत येत असतां कर्णावती नगरास यानें आपलें नांव दिलें (स. १४१२). कर्णावतीला श्रीनगर किंवा राजनगर असेंहि म्हणत असत. तें सध्यां अहमदाबाद या नांवानें प्रसिद्ध आहे. नंतर यानें पट्टण येथून आपलें तख्त उठवून तें अहमदाबादेस आणिलें. तेव्हांपासून अहमदाबाद शहर गुजराथची राजधानी झालें.

हा पराक्रमी असून यानें माळवा, सौराष्ट्र वगैरे सभोंवारच्या प्रांतावर आपली खंडणी बसविली व हिंदुधर्माचा पाडाव करण्याकरितां विशेष मेहनत घेऊन त्या कामीं यानें आपलें नांव अजरामर करून ठेविलें आहे. यानें स. १४१४ त ताजुल्मुल्क नामक एक मोठा धर्माभिमानी गृहस्थ मुसुलमानी धर्मप्रसाराच्या स्वतंत्र खात्यावर मुख्य नेमून त्यास हिंदूंच्या देवालयांचा व मूर्तींचा दरोबस्त नाश करण्याची सक्त ताकीद दिली. त्याप्रमाणें ताजुल्मुल्कनें हुकुमाची अंमलबजावणी केला. देवस्थानांप्रमाणें राज्येंहि खालसा करण्याचा सपाटा चालू होता. सन १४२० पासून बरींच वर्षे स्वस्थ बसून यानें विश्रांति घेतली. कारकीर्दीच्या अखेरीस महाराष्ट्रांतील बाहामनी सुलतानाबरोबर उत्तर कोंकण प्रांतीं याचे युद्धप्रसंग झाले त्यांत बहुधा यासच जयप्राप्ति झाली. हा सन १४४३ त जुलईच्या ४ थ्या तारखेस अहमदाबाद येथें मरण पावला, असें सरदेसाई लिहितात, पण स्मिथ याचा मृत्युसन १४४१ हा देतो.

हा मोठा न्यायी होता अशी याची कीर्ति आहे. यानें रजपुतांशीं शरीरसंबंध केले. याच्या पश्चात् याचा पुत्र मुहंमदशाहा गुजराथच्या तख्तावर बसला.

२. (स. १५५४-६१) गुजराथच्या सुलतान घराण्यांतील दुसऱ्या लतीफखानाचा मुलगा. हा याच घराण्यांतील जो तिसरा महमूद त्याच्या नंतर सुलतानपदावर आला (कें. हि.).

हा गादीवर आल्यावर सय्यद मुबारिक या सरदारानें आपणाकडे वजीरी घेतली. हा अल्पवयी असल्यामुळें दरबारांतील तंटे जास्तच वाढले. इतक्यांत खानदेशाच्या सुलतानानें गुजराथवर स्वारी केली, पण गुजराथच्या फौजेनें त्यास मागें हटविलें. सन १५६१ त उमराव लोकांकडून सुलतानचा खून झाला (मु. रि. भा. १, पा. २१०).

**अहमदशाहा अब्दाली**— स. १७२४ मध्यें याचा जन्म सद्दोझाई जातमिध्यें झाला. हाच पुढें अहमदशाहा अब्दाली या नांवानें प्रसिद्धीस आला. याच्या बापाचें नांव सम्मौनखान असें होतें.

हा लहानपणीं घिलजाईस या शत्रु टोळीच्या हातीं सांपडला असतां नादीरशाहानें याची स. १७२८ त सुटका केली व याला एका घोडदळाचा मुख्य केलें. नादीरशाहानें हिंदुस्थानावर स्वारी केली तेव्हां हा त्याजबरोबर होता. स. १७४७ च्या जूनमध्यें नादीरशाहाचे खुनानंतर हा स्वतंत्र झाला, व यानें नादीरशाहाची तीस लक्ष रुपयांची ठेव आणि कंदाहार काबीज केलें, व आपल्या टोळींचें नांव बदलून दुराणी असें ठेविलें. कारण अब्दाली हें नांव अपेशी आहे, अशी याची समजूत होती.

स. १७४८ मध्यें यानें हिंदुस्थानावर पहिली स्वारी केली. परंतु दिल्लीचा युवराज अहमद याजकडून याचा सरहिंद येथें पराभव झाला. पुनः स. १७४८ च्या हिंवाळ्यांत यानें दुसरी स्वारी केली, व नंतर स. १७५२ मध्यें तिसरी स्वारी केली. ही तिसरी लढाई लाहोरचा सुभेदार मीर मन्नु व हा यांच्यामध्यें झाली. तींत मीरमन्नुचा पराभव होऊन तो अब्दालीस शरण गेला. यानंतर स. १७५५-१७५६ मध्यें यानें चौथी स्वारी केली. मोगल बादशाहाचा वजीर मीर शहाबुद्दीन यानें मुलतान व काबूल हे याचे प्रांत घेतले होते ते यानें परत मिळविले. पुढें यानें दिल्ली व मथुरा हीं शहरें लुटलीं व तेथील लोकांची कत्तल करून स्त्रिया भ्रष्ट केल्या. स. १७५८ त राघोबादादानें याचे लाहोर व मुलतान हे प्रांत घेतल्यामुळें यानें स. १७५९-६१ मध्यें हिंदुस्थानावर स्वारी केली. तेव्हां मराठे व अब्दाली यांच्यांत युद्ध झालें. तें मराठ्यांचे इतिहासांत पानिपतचें घनघोर युद्ध म्हणजे पानिपतचें तिसरें युद्ध या नांवानें फार प्रसिद्ध आहे. यानें या लढाईंत मराठ्यांचा पूर्ण पराभव करून मराठ्यांच्या वाढत्या सत्तेस आळा घातला. यानंतर यानें स. १७६२ मध्यें साहवी, स. १७६४ मध्यें सातवी आणि स. १७६७ मध्यें आठवी अशा लागोपाठ हिंदुस्थानावर आठ स्वाऱ्या केल्या.

सन १७५२ सालीं त्यानें तिसरी स्वारी केली. तींत व पुढें स. १७६१ सालीं केलेल्या स्वारींत पुष्कळच साम्य आहे. या वेळीं अब्दालीचा मुक्काम रावी नदीच्या पलीकडील तीरास असून लाहोरचा सुभा मीरमन्नूहि अलीकडेस होता. पुढें लवकरच दोन्हीं सैन्यें समोरासमोर येऊन त्यांची लढाई झाली. तींत मीरमन्नू मागें सरला व त्यानें लाहोरचा आश्रय केला. यानें त्याची रसद बंद केली. तेव्हां मीरमन्नूच्या सैन्याची उपासमार होऊं लागली. शेवटीं ता. १२ एप्रिल १७५२ रोजीं मीरमन्नूनें आपल्या सैन्यासह अब्दालीवर चाल केली; व त्यांचा भयंकर संग्राम झाला. लढाई ऐन रंगांत आली व मीरमन्नूचा जय होईल असें अब्दालीला वाटूं लागलें. इतक्यांत मीरमन्नूचा सेनापति कौरमल्ल हा हत्तीवर बसून लढत असतां त्याच्या हत्तीचा एक पाय खळग्यांत गेला व तें जनावर एकदम खालीं बसलें. इतक्यांत एकानें कौरमल्लाचें डोकें कापून नेलें. सेनापतीची ही अवस्था होतांच सैन्यांत एकदम हाहाकार उडाला व जो तो जीव वांचवण्यासाठीं पळूं लागला, व याप्रमाणें मीरमन्नूचा पराजय झाला. या वेळीं मीरमन्नूचा याच्या प्रत्यक्ष भेटींत मनोरंजक संवाद झाल्याचें लतीफ यांनीं नमूद करून ठेविलें आहे. मीरमन्नूस अहमदशाहा म्हणाला, ' मीं पूर्वी तुझी लाहोरच्या सुभ्यावर स्थापना केली त्याअर्थी मीच तुझा खरा धनी असल्यानें, मी हिंदुस्थानांत येतांच खंडणी घेऊन तूं मला सामोरा कां आला नाहींस ? ' हें ऐकून मीरमन्नूनें उत्तर दिलें, ' दिल्लीच्या बादशहाची चाकरी करावी लागत असल्यानें मला आपल्याकडेस येणें शक्य झालें नाहीं. ' यावर हा म्हणाला, ' मग तो तुझा दिल्लीचा धनी आतां तुला संकटांतून सोडविण्यास कां आला नाहीं ? ' यावर मीरमन्नूनें उत्तर दिलें, ' आपला (दिल्लीच्या बादशहाचा) चाकर ( म्हणजे मीरमन्नू ) स्वतःचें रक्षण करण्यास समर्थ आहे अशी त्याची खात्री असल्यानें तो आला नाहीं. ' नंतर पुनः अहमदशाहा म्हणाला, ' ज्याप्रमाणें आतां तूं पराभव पावून माझ्या हातांत सांपडला आहेस त्याप्रमाणें मी जर तुझ्या हातांत सांपडलों असतों तर तूं काय केलें असतेंस ? ' हें ऐकून मीरमन्नू म्हणाला, ' आपलें डोकें कापून दिल्लीच्या बादशहाकडेस तें नजराणा म्हणून रवाना केलें असतें.' यावर अहमदशाहा म्हणाला, ' मग मीं तुझें आतां काय करावें ? ' तेव्हां मीरमन्नूनें कुशलतेनें सांगितलें, ' आपण सौदागर असाल तर गुलाम म्हणून माझी विक्री करा, जुलमी राज्यकर्ते असाल तर डोकें कापा, पण खरोखरींचे राजे असाल तर राजासारखी दया दाखवून माझा जीव वांचवा. ' मीरमन्नूचें हें समयसूचक, धीट व कुशलतेचें भाषण ऐकून अहमदशाहा खूष झाला, व त्यानें त्यास ' फर्जंदखान बहादुर रुस्तमें हिंद ' असा किताब दिला. असो. या स्वारींत मीरमन्नूला ज्याप्रमाणें त्यानें लाहोरास कोंडून त्याच्या फौजेची उपासमार केली त्याचप्रमाणें पानपतच्या स्वारींत भाऊसाहेबांच्या सैन्याची अन्नान्नदशा केली. हें युद्ध रावी नदीच्याजवळ झाले तर पानपतची लढाई यमुना नदीचे तीरावर झाली. या लढाईंत हत्तीवर बसलेला कौरमल्ल मारल्यामुळें अहमदशाहास जय मिळाला, तर

पानपतच्या युद्धांत हत्तीवर बसलेल्या विश्वासरावास मारल्यामुळें जयाचें पारडें अहमदशाहाकडे वळलें, असें या दोन स्वाऱ्यांत कांहीं महत्त्वाच्या गोष्टींत चमत्कारिक साम्य आहे.

यानें स. १७५५-५६ च्या सुमारास हिंदुस्थानावर चौथी स्वारी केली. सिंधु उतरून लाहोरचा सुभा अदिनाबेग यास हाकलून लावलें आणि दिल्लीपर्यंत हा सहज येऊन धडकला. यानें दिल्ली येथें दोन महिने मुक्काम केला. तेथें अत्यंत क्रूरपणें वागून लोकांना नादीरशाहाची आठवण करून दिली. मथुरा व आग्रा हीं शहरें लुटून हिंदु व मुसलमान अशा सर्व लोकांत यानें भयंकर दहशत उत्पन्न केली.

यानें कशी लूट केली याचें वर्णन देणारें एक पत्र नमुन्याकरितां पुढें दिलें आहे. हें वर्णन स. १७५६ मधल्या स्वारीबद्दलचें आहे.

'दोन शत ऊंट मालाचे आपले समागमे दिल्लीहून नेले ते द्रव्य व जवाहीरहि अबदालीचेच कपाळचे होते. ते गेले. अबदालीचे सरकारांत अठावीस हजार ऊंट, हाती व खेचरें व गाढवे व बईल व छकडे व गाड्या व यारेदी (लहान गाड्या) मालाची लादली गेली. याशिवाय ऐशी हजार स्वार प्यादे त्याजसमागमें होते. त्याही नेले ते वेगळे. चार शहरें दिल्ली, आगरा, मथुरा, वृंदावन सारखी त्यानें धून नेली. तेव्हा इतकी बारबारदार (ओझेवाले) त्यास लागले म्हणोन कोणाचे घरीं घोडा, ऊंट त्यानें सोडला नाहीं, परिटाचे गाढवहि सांपडले तेंहि घेऊन गेला. त्याचे स्वार जातीवेळेस पायीं गेलेत. आपले घोड्यावर माल लावून गेलेत. तोफखाना जाटाचे गड घेण्यास आणिला होता तोंहि बैल मालाखालीं लादला गेला म्हणून सोडून गेला. तो जाटानें आपले गडांत नेला. दिल्लीमध्यें कोणापाशीं तरवार सोडली नाहीं. तोफखाना पातशाही किल्ल्याचे बुरुजावर होता तो निवडून घेऊन गेला. बाकी खाली टाकला व मोडला' (पे. द. २. ७१).

पुनः दिल्लीस आला आणि आपला मुलगा तयमूर याचें बादशाहाच्या एका मुलीशीं लग्न केलें. आपणहि एका बादशहाच्या मुलीशीं लग्न लावलें. पुष्कळ खंडणी उकळली आणि आलमगीरला पुनः गादीवर बसवून हा स्वदेशीं परत गेला (स. १७५७). दिल्लीच्या बादशाहीचें संरक्षणाकरितां मराठ्यांशिवाय मुत्सद्यांना तरणोपाय राहिला नाहीं. रघुनाथरावानेंहि पंजाबांतील याची सत्ता उधळून लावून याला आव्हानच दिलें होतें. पण रघुनाथराव पेशवे पंजाबांतील याची सत्ता उलथून घाईनें दक्षिणेकडे निघून आला (स. १७५८ आक्टो.), तोंच हा हिंदुस्थानांत पुनः दाखल झाला (नवंबर स. १७५९). मराठ्यांपैकीं दत्ताजी शिंद्यांशीं याचें निकराचें युद्ध होऊन त्यांत दत्ताजी पडला. नंतर मल्हारराव होळकर यांनीं गंगाधर यशवंत यांच्या साहाय्यानें लांबलांब मजला मारून गनिमीकाव्यानें अब्दालीला दमविण्याचा प्रयत्न केला, पण त्यालाहि अब्दाली पुरून उरला. बहुतेक मराठे सरदारांना अब्दालीची दहशत खाली होती. गनिमी कावा, लांबच्या मजला किंवा समोरासमोर युद्धाच्या बाबतींत याच्यापुढें मराठे फिके पडले होते. म्हणूनच जुन्या सर्वांना बाजूस सारून उत्तरेकडे सदाशिवरावासारख्या अगदीं कोऱ्या माणसाला जबरदस्त तोफखाना देऊन पाठविण्यांत आलें. तेव्हां सदाशिवरावानें मोठ्या सैन्यासह दिल्लीवर स्वारी करून दिल्ली ताब्यांत घेतली. तेथून पुढें जाऊन यमुनातीरावरील कुंजपुराहि त्यानें सर केला. पण अब्दालीनें मोठ्या धैर्यानें दिल्ली व कुंजपुरा यांच्यामध्यें यमुना उतरून सदाशिवरावाचा दिल्लीशीं व दक्षिणेशीं असलेला संबंध तोडून टाकला. त्यामुळें अन्नान्नदशा होऊन पानपतावर याच्याशीं मराठ्यांना युद्ध करणें भाग पडलें.

त्या दिवशीं यानें रोहिल्यांना पुढें केलें त्यामुळें दुराण्याचा बचाव होऊन रोहिल्यांचा संहार झाला. पण ऐन वेळीं मराठे दमले आहेत असें पाहून ताज्या दमाच्या राखीव सैन्याला यानें युद्धाचा हुकूम दिला, तेव्हां मराठ्यांची पूर्णपणें वाताहत होऊन याला जय प्राप्त झाला (सदाशिवराव पेशवे पाहा).

होळकरानें सांगितल्यावरून नारो शंकरानें दिल्ली सोडली, ती सोडली नसती व ग्वाल्हेरपर्यंत आलेल्या दक्षिणेंतील फौजा पुढें चालून येत्या तर अब्दाली परभारें पानपतावरून देशीं गेला असता. दिल्ली सोडून मराठे पळून गेले असें पाहून पानपतच्या संग्रामानंतर सातवे दिवशीं हा दिल्लीस आला. राजधानीचा कबजा घेऊन सुजास वजिरी व नजीबखानास बक्षीगिरी दिली. दीडदोन महिने याचा दिल्लींतच मुक्काम झाला. तेवढ्यांत सुजा यास सोडून गेला. नजीबखानानें आपले वकील पेशव्याकडे सलूखास पाठविले. सर्वांचें लक्ष पेशव्याकडे लागलें. याच्या सैन्याचा दोन वर्षांचा पगार थकला होता. त्यांनीं पगार चुकता करून देशीं चलावें अशी निकराची मागणी केली. आणि ती अमान्य होतांच बंडाचें निशाण उभारलें. अब्दालीच्या छावणींत एकच गोंधळ उडाला. हा प्रकार पाहून सुजाउद्दौला अब्दालीस सोडून अयोध्येस निघून गेला. पैशाची अडचण मिटविण्यासाठीं यानें नजीबास निकड लावली.

तेव्हां मोठ्या शिकस्तीनें त्यानें यास चाळीस लक्ष रुपये दिले. मध्यंतरीं इराणी फौजेनें अफगाणिस्थानावर चाल केल्याची खबर आली. तेव्हां अनेक विवंचनांनीं त्रासून यानें २२।३।१७६१ रोजीं शालिमारची आपली छावणी उठवून स्वदेशीं प्रयाण केलें.

पण शिखांनीं लाहोर घेतल्यामुळें स. १७६१ च्या अखेरीस हा पुनः पंजाबांत आला. यानें लाहोर परत हस्तगत केलें आणि लुधियानानजीक शिखांचा पराभव केला. पण हा परत गेला नाहीं तोंच शिखांनीं पुनः सर्व पंजाब परत घेतला. तेव्हां याचे गुलराज व आनंदराम नांवाचे दोन वकील हिंगण्यामार्फत थोडी वाटाघाट होऊन दक्षिणेंत पेशव्याकडे आले. फेब्रुवारी व मार्च ( स.१७६३ ) चे सुमारास एक महिना यांचा मुक्काम इकडे होता. त्यांजबरोबर करार झाला कीं 'ती. कैलासवासी यांच्या वेळेस ज्याप्रमाणें अमल होता, त्याप्रमाणें परगणियांत अंमल शहांनीं ताकीद करून देवावा. याप्रमाणें झाल्यास वकिलास चाळीस हजारांची जहागीर अंतर्वेदींत देण्याचा करार ' पेशव्यानें लिहून दिला ( तारीख ८-३-१७६३. मा. पे. रो. १. १, ६, ७, इ. सं. ऐ. टि. १. ५६ ). या वकिलांचा बंदोबस्त पेशव्यांनीं अहमदनगरास ठेवला होता. वकिलांनीं पेशव्यास अब्दालीकडील पोपाख दिला, तसेंच पेशव्यांनीं भद्रगज हत्ती याला नजर केला. याप्रमाणें मराठ्यांशीं गोडी करूनहि पंजाबांत शिखांची लाट याला थांबवितां आली नाहीं. शिखांनीं पंजाब पूर्ण ताब्यांत घेतला. स. १७६७ मध्यें हा आणखी एकदां शिखांकरितां पंजाबांत आला. पण उपयोग झाला नाहीं.

अशा प्रकारें हिंदुस्थानच्या इतिहासांत कायमचें स्थान मिळालेला हा प्रसिद्ध पुरुष वयाचे ४८ वे वर्षी ता. १९-१०-१७७२ रोजीं काळपुळीच्या विकारानें चमननजीक मरण पावला. याचा मुलगा तयमूरशाहा ( म. रि. म. ३ पा. २०८-२१० ).

हा स्वभावानें अतिशय गरीब होता. कधीं कधीं या गरीबीचा कडेलोट होत असे; व याच्या हाताखालचे लोक याच्या हुकमाविरुद्ध वागत आणि याला टाकून बोलण्यास कमी करीत नसत. अशा प्रसंगीं, हा मनाविरुद्ध बोलणाऱ्या व करणाऱ्याविषयीं क्षमावृत्तिच धारण करीत असे. याविषयीं एक मजेदार गोष्ट याचा चरित्रकार मुहम्मदखान बारूक्झाई यानें सांगितली आहे, ती अशीः—

एकदां अब्बास कुलीखान बयात याच्या ताब्यांत असलेलें इराणांतील निशापूर शहर घेण्यासाठीं हा गेला असतां याला बरेच दिवसपर्यंत आपल्या सैन्याचा पगार देणें शक्य झालें नाहीं. यामुळें चिडून जाऊन याच्या सैन्यांतील लोकांनीं एकत्र होऊन बादशाही खजिना लुटला. ही तक्रार खजीनदारानें याच्याकडे नेली. पण यानें कांहींच हालचाल केला नाहीं. त्यामुळें खजानजी रागावला व अपशब्द बोलूं लागला. त्यावर यानें येवढेंच सांगितलें कीं, ' अरे मूर्खा, मी त्यांच्याच मदतीनें महत्पदास चढलों आहें, व त्यांना मी स्वतःचे भागीदार म्हणत आलों आहें. तेव्हां हा खजिना माझा व त्यांचा दोघांचाहि आहे. अर्थात् त्यांना गरज लागेल त्या वेळीं खजिन्यांतून पैसे घेण्याचा अधिकारच आहे. मीं जर त्यांस पैसे घेऊं दिले नाहींत तर परमेश्वराचा अपराधी होईन.' या गोष्टीवरून याच्या ठिकाणीं सहनशीलता व गरीबी किती होती हें ज्याप्रमाणें दिसतें त्याप्रमाणेंच आपल्या शिपायांना खूष ठेवण्यासाठीं आपल्याच लोकांनीं केलेली मानहानीहि प्रसंगीं हा कशी गिळून टाकी हें समजून येतें.

याच्या अत्यंत गरीब स्वभावाचें याच चरित्रकारानें आणखीहि एक उदाहरण दिलें आहे. पानिपतच्या लढाईनंतर हा कंदाहाराला गेला. तेथें गेल्यावर याच्या मनांत उत्तम हवेच्या ठिकाणीं एक शहर वसविण्याचें आलें. पण त्यासाठीं यानें जी जागा पसंत केली, ती अलुक्झाई जातींतील एका पोटजातीच्या ताब्यांतील प्रदेशापैकीं होती व त्या जातीस यानें आपल्या जागेंत शहर वसवावें हें आवडेना. म्हणून यानें आपला हा बेत सोडून दिला. कारण, पूर्वीप्रमाणेंच या जातीलाहि आपण दुखवूं नये असें यास वाटलें. शेवटीं याचें नातें व याच्याविषयीं सहानुभूति असलेल्या पोपलझाई जातीनें जागा दिल्यावर तेथें यानें आपल्या इच्छेप्रमाणें अहमदशाही नांवाचें शहर वसविलें.

यानें आपल्या मुलकीं व लष्करी नोकरींत पाश्चात्य व हिंदी कसबी लोक ठेविले होते. या लोकांच्या साहाय्यानें यानें आपला तोफखाना सुधारला होता असें म्हणण्यास जागा आहे. पण याच्या सैन्यांत कडक शिस्त होती असें वाटत नाहीं. कारण अनेक वेळां याच्या हुकमाशिवायच याचे लोक लुटालूट वगैरे करीत. पानिपतसारख्या लढाया मारूनहि त्यांचा फायदा यास घेतां आला नाहीं. याचें कारण म्हणजे याचे शिरजोर असलेले शिपाई व सेनापति येथें बरेच दिवस एकसारखें राहण्यास व विशेषतः उन्हाळ्याचे दिवस येथें काढण्यास अत्यंत नाखुष असत. शिपायांचा वारंवार अंत पाहणें हेंहि सेनापतीस फायदेशीर नसतें. यामुळें उत्तम लढाया मारून जो फायदा करून घ्यावयाचा तो यास घेतां आला नाहीं.

पण शत्रूशीं हा अत्यंत क्रूरपणें वागे. हिंदुस्थानांत हा ज्या ज्या वेळीं आला त्या त्या वेळीं यानें मथुरा, दिल्ली, पंजाब वगैरे ठिकाणीं भयंकर कत्तली, लुटालूट, जाळपोळ वगैरे गोष्टी केल्या, व त्यामुळें येथील जाट, मुसलमान, शीख, मराठे, यांच्या मनांत याजविषयीं विलक्षण दहशत बसली होती. लुटालूट, कत्तल, जाळपोळ इत्यादि निष्ठुरपणाचे प्रकार राज्य व द्रव्य यांच्या तृष्णेनें हा स्वधर्मीयांशींहि करण्यास कमी करीत नसे. या याच्या निष्ठुर वृत्तीचें उदाहरणहि मोठें बोधप्रद आहे. स. १७५६–५७ सालीं हा हिंदुस्थानांत आला असतां दिल्लीच्या मुक्कामांत यानें दिल्लीचा मयत वजीर कमरुद्दीनखान याचा मुलगा इन्तिजामउद्दौला यास दोन कोट रुपये देण्याच्या करारावर वजीर केलें. पण नेमलेल्या दिवशीं त्या रकमेपैकीं एक कोट रुपयाचा पहिला हप्ता यास मिळण्याचा रंग दिसेना. त्यामुळें यानें इन्तिजामउद्दौलास लांकडी खोड्यांत घालण्याची धमकी दिली. तेव्हां लाचार होऊन त्यानें शुअलापुरी बेगमेपाशीं पैसे असल्याचें सांगितलें. बेगमहि पैशाची तजवीज चटकन करीत नाहीं, असें पाहून यानें तिच्या बोटाच्या नखांतून लोखंडी खिळे ठोकण्यास फर्माविलें. याचा योग्य तो परिणाम होऊन यास सुमारें ८३ लाखांची प्राप्ति झाली. पैसे न मिळते तर यमदूतांशीं स्पर्धा करणाऱ्या याच्या नोकरांनीं योग्य रीतीनें चाकरी करण्यास कमी केलें नसतें, अशी यास खात्री असल्यामुळें यानें केवळ दहशतीनेंच अनेक कामें केलीं. याच्या या निष्ठुर व लोभी वृत्तीचें वर्णन एका मराठी पत्रांत उत्कृष्ट रीतीनें केलें आहे. तें हा स. १७५६–५७ सालच्या स्वारींत दिल्लीस राहिल्या वेळचें आहे. पत्रलेखक म्हणतो, 'अब्दालीचें वर्तमान तरी दिल्लींत किल्ल्यांत आहे. खानखानाचे मायेपासून तीन करोड रुपये घेतले व खानखानास वेगळाच तानून क्रोड रुपये घेतले. वजीरापासून पन्नास लक्षांचें जवाहीर व ५० लाख रुपये घेऊन कैदेंत ठेविले होते. खानखानासहि कैदेंत टाकले होते. कुलशहरांत सध्यां खणत्या लाविलेल्या आहेत. पांच रुपयेपावेतों माणसापासून निघाले ते घेऊन खजिन्यांत दाखल करीत होते. शहरांत जो ज्याचे घरीं राहिला तो त्याचेंच म्हणून वर्तणूक करतो. माणसें बहुत मारलीं गेलीं; व स्त्रिया बहुत भ्रष्टिल्या. कित्येकांनीं प्राण दिले व कित्येकांनीं जलप्रवाह केला. जितक्या बादशाहजाद्या होत्या तितक्यांस आपले लोकांस विवाह करून दिल्या. जितक्या पातशाहाच्या व शाहाजाद्याच्या बायका होत्या त्या आपले घरांत निका पढून घातल्या. जेथवरी चांगली बायको हिंदूची होती तेथवर लोकांनीं बाटविल्या. व घरांत घातल्या' (पे. द. २१, १०४). हें वर्णन दिल्लींतून तत्कालीं लिहिलेलें असल्यामुळें त्यांत सत्याचा अंश फार आहे, हें सांगावयास नकोच. यानें मथुरा, वृंदावन, व जाटांचें ठाणें बल्लभगड या ठिकाणीं जी कत्तल, जाळपोळ व लुटालूट केली त्यांचें विस्तृत पण अंगावर शहारे आणणारें वरील वर्णन या गोष्टी स्वतः ज्यानें पाहिल्या अशा एकानें केलें आहे. यावरून याच्या ठिकाणीं क्रूरपणा, निष्ठुरता वगैरे गोष्टी किती मोठ्या प्रमाणांत होत्या हें वरील दोन्ही वर्णनांपेक्षांहि जास्त उत्तम कळून येतें.

याची जरब किंवा दहशत शत्रुपक्षीयांस किती वाटत असे हें अनेक ठिकाणीं आलेल्या उल्लेखांवरून चांगलें स्पष्ट होतें. पानिपतच्या लढाईनंतर स. १७६२ सालीं शिखांचा पाडाव करण्यासाठीं हा हिंदुस्थानांत आला होता. त्या वेळचें वर्णन "वाकियात-इ-दुर्रानी" मध्यें एके ठिकाणीं आलें आहे. त्यांत या पुस्तकाचा कर्ता अब्दुल करीम म्हणतोः 'एके दिवशीं रात्रीं हा उठला व कांहीं घोडेस्वार आपल्याबरोबर घेऊन हिंदुस्तानांत आला. ज्या वेळीं हा जंदियालला पोहोंचला त्या वेळीं याजबरोबर फक्त १०-१२ लोक होते. तरी याच्या नांवाची दहशत लोकांस इतकी बसली कीं, शीखसैन्य ही बातमी ऐकतांच पळून गेलें.' भाऊसाहेबांनीं अब्दालीशीं ठासून लढाई दिली हें खरें, पण त्यांच्या पत्रांत अनेक ठिकाणीं याच्या फौजेच्या नुसत्या आवईनें मराठे ठाणेदार आपलीं ठाणीं टाकून पळत असत, असें नमूद असून अशा लोकांच्या बाबतींत 'तिकडे त्यांची फौज आली तर ठाणेदार मरत न पळत' (रा. खं. १. २१७) 'पंच पडल्यास झुंजत, परन्तु कांहीं भय मानून जागा न सोडीत' (रा. खं. १. २०८) असें करण्याबद्दलचा हुकूम त्यानें गोविंदपंत बुंदेल्यास पाठविला आहे. येवढेंच नव्हे, तर 'जो ठाणें टाकून अवाईनेंच येईल त्याचें पारिपत्य तुम्हीं उत्तम प्रकारें करावें,' (रा. खं. १. १९५). अशी परवानगी भाऊसाहेबांनीं गोविंदपंत बुंदेल्यास देऊन टाकली होती. याच्या भयानें लोक गर्भगळीत होऊन घरेंदारें सोडून पळून जात असत व शहरें ओस पडत, अशा प्रकारचे अनेक उल्लेख आले आहेत. फौज बाळगून राहणाऱ्या लोकांचीहि अशीच स्थिति होती (पे. द. २१. १०३-१०७, रा. खं. १ ले. १३९, १४१, १४२, १४३).

हा अनुभवानें शाहणा होत गलो होता. यामुळें मागील अनुभवाचा उपयोग करून घेण्यांत याचा हातखंडा असे. याविषयीं एक बोधप्रद हकीकत आहे ती अशीः हिजरी १०६३ मध्यें यानें इराणचा राजा शाहारुख याला उखडून

टाकण्यासाठीं प्रथम हिरात येथें असलेल्या त्याच्या सरदारास मारून हिरात घेतलें. नंतर मशहद्द येथें असलेल्या शाहारूख यासहि बेजार करून त्याजकडून आपणास अनुकूल असा तह करविला. यानंतर निशापूर घेण्याच्या उद्देशानें यानें आपला मोर्चा त्या शहराकडे वळविला. तेथील सरदार अब्बास कुलीखान यास कळून चुकलें कीं, आपला टिकाव याच्यापुढें लागणार नाहीं. तेव्हां त्यानें आपल्या चुलत्याच्या सल्ल्यावरून निराळाच डाव टाकला. या वेळीं कडक हिंवाळा सुरू होण्यास २ महिने अवकाश होता. अब्बास कुलीखानानें याच्याशीं तहाचें बोलणें सुरू केलें, व तें दोन महिने लांबविलें. दोन महिन्यांनंतर ज्या वेळीं कडक हिंवाळा सुरू झाला तेव्हां यास कोणत्याच प्रकारची हालचाल करणें अगदीं अशक्य झालें. येवढेंच नव्हे, तर पूर्वी तरतूद केलेली नसल्यामुळें निशापूरचा वेढा चालू ठेवणें म्हणजे स्वतःच्या सैन्याचा पुरा नाश, हेंहि यास कळून चुकलें. या वेळीं यास हेंहि कळून चुकलें कीं, अब्बास कुलीखानानें आपणांस तहाचें बोलणें सुरू करून पूर्णपणें फसविलें. या वेळीं याच्या मनांत अब्बास कुलीखानाविषयीं राग व सूड यांच्या भावना उत्पन्न झाल्या असल्याच पाहिजेत. पण आपला तोल अविचाराच्या बाजूस न जाऊं देतां किंवा लोक आपणांस काय म्हणतील याचा बिलकुल विचार अगर पर्वा न करितां हा तेथून हिरातला निघून गेला. हिरात येथें गेल्यावरहि कडक थंडीमुळें याच्या सैन्याचा नाश व खराबी पुष्कळ झाली. यावरून नमतें कोठें घ्यावयाचें व कोठें घ्यावयाचें नाहीं म्हणजे पर्यायानें सारासारविचारशक्ति ही याच्या ठिकाणीं जागृत होती, असें दिसून येतें. या वेळचा कटु अनुभव हा जन्मांत विसरला नाहीं. हिंदुस्थानावरील स्वाऱ्यांत अनेक ठिकाणीं या युक्तीचा अवलंब करून शत्रुसैन्य जेरीस आणण्याचे यानें प्रयत्न केले व बहुतेक ठिकाणीं याचे प्रयत्न यशस्वीहि झाले. उदाहरणार्थ, तहाची थाप देतां देतांच दत्ताजीचा नाश नजीबखानानें घडविला. भाऊसाहेबांशींहि याची तहाची वाटाघाट बरेच दिवस चालू होती. दोन्ही वेळां तहाची वाटाघाट निष्फळ ठरल्यावर दोघांनाहि दिसून आलें कीं, आपणांस शत्रुपक्षानें फसविलें. भाऊसाहेब फसले गेले असा मराठी पत्रांचा जरी आशय नसला तरी युद्धाचे अगोदर मराठ्यांचे लष्करांत महागाई व अब्दालीच्या लष्करांत स्वस्ताई, मराठ्यांना रसद पोहोंचेना व यास मात्र भरपूर रसद मिळत होती. नाना फडणीसाच्या पत्रांत ‘लष्कर गडबडलें’ सारखे असलेले विचार, या गोष्टी काय दाखवितात? ही तहाची भूलथाप देण्याची युक्ति यानें आपल्या हिंदुस्थानावरील पहिल्या स्वारींत स्वतःचा पराजय होत असतांहि उपयोगांत आणली होती. तिचा परिणाम असा झाला कीं, त्या स्वारींत जरी यानें माघार घेतली तरी तसें करण्यांत याचें नुकसान शक्य तितकें कमी झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

याच्या युद्धपद्धतींत आणखी एक विशेष आहे. हा बहुधा जेथून याचें भय कमी अशा ठिकाणांवरूनच अगदीं अनपेक्षितपणें येत असे. यामुळें शत्रुसैन्यांत एकदम गडबड उडे. तसेंच लोकांच्या अपेक्षेपेक्षांहि हा लवकर चालून जात असे. त्यामुळें शत्रूमध्यें गडबड उडे. ‘अब्दाली अकस्मात आला’ अशा प्रकारचे उल्लेख आढळतात (रा.खं १. १५०). या गडबडीचा योग्य फायदा घेतल्याशिवाय हा राहत नसे. याची उदाहरणें यानें केलेल्या स्वाऱ्यांत पदोपदीं आढळतात. युद्धांतील डावपेंचांत हा अत्यंत निष्णात असे. स. १७५६।५७ च्या स्वारींत एकदां समशेरबहाद्दर, अंताजी माणकेश्वर, जाट वगैरेंनीं याला त्रास देण्यास सुरवात केली. तेव्हां यानें अबदुल समदखानास सांगितलें कीं, तूं आपल्या सैन्यासह लपून बैस व शंभर लोकांना त्यांच्यावर पाठव. या शंभर लोकांनीं मारामारी करीत व माघार घेत लपलेल्या लोकांपर्यंत यावें व नंतर लपलेल्या लोकांनीं बाहेर पडून शत्रूचा मोड करावा. या युक्तीप्रमाणें वागून अबदुल समदनें जय मिळविला. असें करीत असतां यास मोठाल्या तोडी कराव्या लागत. याप्रमाणें हा करीत असावा असें यानें अनेक वेळा लोकांना दिङ्मूढ केल्यावरून वाटतें. याचमुळें भाऊसाहेबांच्या एका पत्रांत ‘चाळीस कोस पन्नास कोस धावतात’ अशी वदंता अब्दालीविषयीं लिहिलेली आढळते.

शत्रूच्या हालचालींची अचूक बातमी ठेवण्यांत आणि हाताखालच्या सर्व सैन्याकडून काम घेण्यांत हा अत्यंत कुशल होता. गोविंदपंत बुंदेल्याचा वध, पाराजीपंत बाघाच्या खजिन्याची लूट आणि बागपतावर सैन्यासह यमुना उतरणें या तीन गोष्टी याच्या सर्वांगीण युद्धकौशल्याच्या उत्कृष्ट निदर्शक आहेत. तसेंच ऐनवेळीं राखीव सैन्य उपयोगांत आणण्याची याची पानपतावरील कल्पतिहि ध्यानांत घेण्यासारखी आहे.

हा एकाद्या फकीराप्रमाणें राहत असे. हा अगदीं सामान्य मनुष्याप्रमाणें कपडे घाली व त्यामुळें कधीं कधीं हा शत्रूंस ओळखूंहि येत नसे. याला लोकांनीं आपणांस लवून सलाम करावे किंवा स्वतःस लोकांनीं फार पूज्य समजावें हें आवडत नसे. म्हणून यानें लोकांस चालू

पद्धतीनें सलाम करण्याची बंदी करून याच्यापुढें येतांना फक्त डोक्यास हात लावावा, असें मुलाकरवीं फर्माविलें होतें. हा विद्वानांचा मोठा चाहता होता. हा दर शुक्रवारीं विद्वान् व वृद्ध लोकांना एकत्र बोलावून शास्त्रें व इतिहास यांवर चर्चा करवीत असे, व त्यांचा सन्मान करीत असे.

हा मुसलमानी धर्मांतील आचारविषयक आज्ञा उत्तम तऱ्हेनें पाळीत असावा, याबद्दल इतर धर्मांचे लोक यास नांवें ठेवणार नाहींत. पण सामिन यानें निरनिराळ्या ठिकाणीं याच्या तोंडांत किंवा याच्याविषयीं बोलतांना इतरांच्या तोंडांत जीं वाक्यें घातलीं आहेत तीं वस्तुस्थिति-निदर्शक अशीं मानलीं तरी हा परधर्माचा—विशेषतः हिंदूंचा मोठा द्वेष करीत असावा असें म्हणतां येतें.

या द्वेषाचें अगदीं हिडिस उदाहरण सामीननें मथुरेच्या कत्तलींत स्वतः पाहिलें होतें व त्याचें वर्णन त्यानें केलें आहे. तें असें:—मीं यमुनेच्या कडेला वैराग्यांच्या व संन्याशांच्या कित्येक झोपड्या पाहिल्या. त्यांपैकीं प्रत्येकींत मनुष्याच्या मुंडक्याच्या तोंडास गाईचें मुंडकें लागेल अशा बेतानें दोन्ही मुंडकीं बांधून टाकलेलीं होतीं ( इंडि. अँटि. १६; ३६; हितचिंतक मासिकाचा पानपत अंक ).

**अहमदशाह फारुकी**—( स. १५३७ ) हा खानदेशच्या फारुकी घराण्यांतील पहिल्या मुहम्मदशाहाचा पुत्र.

**अहमदशाह बाहामनी**—बाहामनी राजवंशांतील अल्लाउद्दीन हसन कांगो त्याचा हा मुलगा. याला फीरूझ व अहमद पहिला असे दोन मुलगे होते, याप्रमाणें सिवेलनें आपल्या वंशावळींत उल्लेख केला आहे. परंतु हें सिवेलचें मत चुकीचें आहे, असें मुसलमानी रिसायत व फेरीस्ता यांनीं दिलेल्या वंशावळींवरून दिसतें. फेरीस्तानें आपल्या वंशावळींत याचा उल्लेखच केला नाहीं. याचे मुलगे फीरूझ व अहमद पहिला हे दाऊदखानाचे मुलगे होत, असें फेरीस्तानें उल्लेखिलें आहे. हा गादीवर आला नाहीं.

२. ( स. १४२२-१४३५ ) हा एक बाहामनी राजा होय. आपला भाऊ सुलतान फीरूझ यास पदच्युत करून हा गादीवर आला ( १४ सप्टेंबर १४२२ ). हा फीरूजशाहाचा भाऊ होय.

नेहमींप्रमाणें विजयनगर व केरळ येथील राजांनीं याच्यावरोबर युद्ध आरंभिलें. स. १४२४ सालीं वरंगळच्या राजावर यानें स्वारी केली, आणि राजास ठार मारून बहुतेक सर्व प्रांत जिंकिला. मजबूत घोडे आणि तिरंदाज यांच्या साहाय्यानें हा जय मिळवीं. तसेंच यानें अनेक हिंदु लोकांस ठार मारिलें आणि बायकापोरांस बाटवून मुसलमान केलें. ह्या स्वारींत शाहास एक हिऱ्याची खाण सांपडली. सर्व मुलुखांत हिंदु लोकांचीं असलेलीं देवळें पाडून तेथें यानें मशिदी बांधल्या. वऱ्हाड प्रांतांतील गाविलगड व नरनाळा हे दोन जुने किल्ले यानें दुरुस्त केले. स. १४२६ त माळव्याच्या सुलतानाशीं लढाई करून त्याचा यानें पराभव केला. नंतर बेदरनजीक हा शिकारीस गेला असतां, तेथें एक नवीन शहर वसवावें असें मनांत येऊन, यानें अहमदाबाद–बेदर नांवाचें शहर वसविलें. बेदरास यानें खडकावर एक किल्ला बांधिला, तो अत्यंत बळकट म्हणून नांवाजलेला होता. हें नवीन शहर यानें आपली राजधानी केली. नंतर कित्येक दिवसपर्यंत कोंकणपट्टी व गुजराथ ह्या प्रांतांत याच्या स्वाऱ्या चालू होत्या. स. १४३५ त हा मरण पावला. याची कबर अहमदाबाद-बेदर येथें बांधली. याच्या मागें दुसरा अलाउद्दीन बाहामनी गादीवर आला ( २७ फेब्रु. १४३५ ).

यानें अनेक दानधर्म केले, व इराण वगैरे देशांतून पुष्कळ साधूंस इकडे आणविलें. हा विद्वान् व साधु लोकांस फार मान देत असे, म्हणून यास वली ( साधु ) हें नांव मिळालें. सय्यद मुहंमद जिसू दुराज ह्या साधूच्या घराण्यास यानें मोठमोठीं इनामें करून दिलीं, माजी शाहाच्या प्रधानास त्याच्या पहिल्या जागेवर कायम केलें आणि फौजेची शिस्त सुधारली. येणेंप्रमाणें अनेक सत्कृत्यांनीं यानें रयतेची प्रीति संपादन केली.

३. ( स. १५१८–२१ ) हा बाहामनी वंशांतील दुसऱ्या महमूदशाहाचा पुत्र. हा बापानंतर गादीवर आला.

**अहमदशाह मोगल**—( स. १७४८–५४ ) दिल्लीचा एक बादशहा. हा मुहम्मदशाह आणि ऊधमबाई यांचा पुत्र. याचा जन्म दिल्लीच्या किल्ल्यांत झाला (स. १७२५), व स. १७४८ मध्यें पानपत येथें याला राज्याभिषेक झाला. याचें संपूर्ण नांव मुजाहिद उद्दीन मुहम्मद अबुन नश्र अहमदशाह बहादुर असें होतें. राज्यारोहण करण्यापूर्वीं यानें अहमदशाहा अब्दालीचा सरहिंद येथें चांगलाच पराभव केला होता. इतक्यांत यास आपल्या बापाच्या मृत्यूची बातमी लागली, तेव्हां हा ताबडतोब दिल्लीकडे वळला आणि सफदरजंग यास वजीर नेमून यानें आपल्या कारकीर्दीसच सुरवात केली. पण लवकरच याच्या प्रमुख सरदारांत अधिकारासंबंधा तंटे उपस्थित झाले. अहमदशाहा अब्दाली पुनः स. १७५१ मध्यें पंजाबांत आला असतां यानें त्याला लाहोर व मुलतान हे परगणे देऊन वाटेस लावलें. मरा-

त्यांच्या स्वाऱ्या बादशाही मुलखांत धुमाकूळ घालीत होत्याच. अली मुहम्मद नांवाच्या रोहिल्यांच्या पुढाऱ्यानें स्वतंत्र राज्य स्थापिलें. पण अधिकाऱ्यांची आपसांत फूट असल्यानें आणि हा विषयी असल्यानें कोणींच आवरता नाहीं अशी स्थिति झाली. शेवटीं गाजीउद्दीन नांवाच्या सरदारानें वजीरीच्या लोभानें मराठ्यांचें साहाय्य घेऊन याला कैद केलें आणि याचे डोळे काढले. त्यानंतरहि हा २१ वर्षे जगला; व दुखण्यानें स. १७७५ मध्यें मेला. याच्यानंतर दुसरा आलमगीर बादशाह झाला.

**अहल्याबाई होळकर**-हिच्या जन्मकालाविषयीं आज कोणत्याहि प्रकारचा प्रत्यक्ष पुरावा उपलब्ध नाहीं. ही मृत्युसमयीं म्हणजे स. १७९५ तसुमारें ६० वर्षांची होती, असें मालकमसाहेब म्हणतो. परंतु स. १७८०-८१ च्या दोन अस्सल पत्रांत आपल्या वयास ५५ वर्षे झालीं असल्याचे अहल्याबाईचे उद्गार आहेत ( विविध-ज्ञानविस्तार, वर्ष ३८, अंक ५, पृष्ठ १४६ ). त्यावरून व स. १७४३ च्या सुमारास मल्हारराव होळकर नाशिकच्या यात्रेस गेला असतां त्यानें तेथें आपल्या उपाध्यायास अहिल्याबाई लग्नसमयीं ( स. १७३३ त ) ८ वर्षांची होती म्हणून जें लिहून दिलें होतें, त्यावरून हिचा जन्म स. १७२५ त झाला असें ठरतें. हिचा बाप माणकोजी शिंदे हा औरंगाबाद जिल्ह्याच्या बीड तालुक्यांतील चौंढें गांवचा पाटील होता. स. १७३३-३४ मध्यें मल्हारराव होळकराचा पुत्र खंडेराव याशीं हिचा विवाह झाला. त्या समयीं खंडेराव दहा वर्षांचा होता.

पुढें खंडेराव व्यसनी निघाल्यामुळें हिच्या वृत्तीमध्यें उदासीनता दिसूं लागली. खंडेराव वरकड कसाहि असला तरी अहल्याबाईपुढें त्याची बिलकुल मात्रा चालत नसे. ही हजर असतां खंडेरावाला आपल्या सर्व अव्यवस्थित वृत्तीस रजा द्यावी लागे. हिला मालेराव नांवाचा मुलगा स. १७४५ त देपालपूर मुक्कामीं झाला, व त्याच्या पाठीवर तीन वर्षांनीं मुक्ताबाई नांवाची एक मुलगी झाली. वरील दोनच अपत्यें हिला होतीं. हिच्या नशिबीं सौभाग्यसुख फार दिवस नसल्यामुळें, स. १७५४ सालीं डीगेजवळ कुंभेरीच्या किल्ल्यास मराठ्यांच्या सैन्याचा वेढा पडला असतां हिचा पति खंडेराव हा गोळी लागून मरण पावला. हें वर्तमान समजतांच हिनें पतीबरोबर सहगमन करावयाचें ठरविलें. 'तूं आम्हांकडे पाहून मागें राहिलीस तर खंडू राहिला व अहल्या गेली,' अशी मल्हाररावानें गळ घातल्यामुळें हिला आपलें सहगमन तहकूब करावें लागलें. तेव्हां मल्हाररावानें संस्थानचा सर्व कारभार आपल्या सुनेकडेच सोंपविला. ३ जून स. १७६६ त मल्हारराव मरण पावल्यावर राज्याची कुलजबाबदारी अहल्याबाईवरच येऊन पडली. मल्हाररावानंतर २१ वर्षांचा मालेराव गादीवर बसून त्याच्या नांवचा शिक्कामोर्तब सुरू झाला. परंतु तो गादीवर बसल्यानंतर सारा दहा महिनेच काय तो जिवंत होता. त्याला लवकरच वेडेपणाच्या लहरी येऊं लागल्या व त्याच्यापासून इतरांस त्रास होऊं लागला. ब्राह्मणांचा छळ केला म्हणून हिनें आपल्या मुलासहि देहान्तशासन केलें, अशी हिच्या न्यायनिष्ठुरतेबद्दल आख्यायिका आहे. अहल्याबाईनें त्याला मारिलें किंवा मारविलें, अशा ज्या दंतकथा आहेत त्या अगदीं निराधार आहेत, असें मालकमसाहेबांनीं लिहिलें आहे. मालेरावाच्या मृत्यूनंतर होळकर घराण्यांतील एखादा मुलगा दत्तक घ्यावा, असें हिला सुचविण्यांत आलें. पण तसें करण्याचें हिनें नाकारलें. पुढें वंश नाहीं असें जाणून अहल्याबाईनें जानोजीचा मुलगा तुकोजी याला ओटींत घेऊन गादीवर बसविलें, असें वाक्य सरस्वतीमंदिरांतील वंशावळींत आहे. जरी तुकोजीच दौलतीचा वारस अशी सर्वत्र भावना होती तरी त्याचें यथाविधि दत्तविधान मात्र कधींच झालेलें नव्हतें ( म. रि. उत्तर वि. २. पृ. ७. ).

मल्हारराव होळकराचे मृत्यूनंतर अहिल्याबाईचा मुलगा मालेराव यास २३-७-१७६६ रोजीं सरदारीचीं वस्त्रें मिळालीं. परंतु तो ता. २७-३-१७६७ रोजीं मरण पावल्यामुळें होळकरांच्या घरांत कोणीहि वारस उरला नाहीं. पुत्राचे मृत्यूमुळें अहल्याबाईस फार दुःख झालें. अशा परिस्थितींत राघोबादादास या सरदारीची व्यवस्था आपले मर्जीप्रमाणें करून द्रव्य मिळविण्याची इच्छा झाली. होळकरांचा कारभारी गंगाधर यशवंत ऊर्फ गंगोबा तात्या चंद्रचूड हा राघोबाचा हस्तक होता. या दुकलीनें बाईचे मांडीवर दत्तक देऊन गंगोबानें कारभार चालवावा, असें ठरविलें. परंतु ह्या बुद्धिमान् व बाणेदार बाईनें त्यास साफ कळविलें कीं, जहागिरीची व फौजेची व्यवस्था मला पाहिजे. त्यांत कोणीहि ढवळाढवळ केलेली आपणास खपणार नाहीं. हिचें हें करणें माधवराव पेशव्यास पसंत पडलें. परंतु दादानें आपला आग्रह सोडला नाहीं. त्यानें एकदम फौजेनिशीं इंदुरावर चाल करण्याचा धाक घातला. हें पाहतांच या बाईनेंहि लढण्याची सिद्धता दाखवली, आणि तुकोजी होळकरास फौजेवर मुख्य नेमलें व गंगोबास कारभारावरून काढून टाकलें. वरील व्यवस्था होण्यापूर्वीच दादानें शिंदे, भोसले, गायकवाड आणि दाभाडे वगैरे सरदारांसह हालचालीस सुरवात केली. अशा कठीण परि-

स्थितींत बाईनें डगमगून न जातां, माधवराव पेशव्याकडे तातडीनें दूत रवाना केले; व युक्तीनें भोसले, गायकवाड व दाभाडे या सरदारांस आपणाकडे वळविलें. इंदूरवर स्वारी करण्याचा दादाचा हुकूम महादजीनें नाकारला. भोसले व गायकवाड तर उघडच बाईस सामील झाले. बाईची तयारी व 'माझा पराभव झाला तर मी अबलाच आहें, पण आपणांवर तो प्रसंग आल्यास जग काय म्हणेल याचा विचार करून युद्धास तयार व्हावें.' हा बाईचा निष्ठुर जबाब पाहतांच राघोबा नरमला. बाई रक्तपात न करतां या प्रसंगांतून पार पडली. सर्व सरदारांनीं त्यांची पुष्कळ निर्भर्त्सना केली. यावरून बाईच्या कर्तबगारीबद्दल लहानमोठ्या नोकरांत केवढी मान्यता व खात्री होती हें दिसून येतें. दादांस तर आपला बेत सोडूनच द्यावा लागला ( ८ एप्रिल १७६७ ).

मेवाडच्या राणा अरीसिंह उर्फ अलसी याच्याकडून महादजी शिंदे यांनीं कांहीं परगणे घेतले, तेव्हां हिनेंहि शिंदे, होळकर व पेशवे यांचे हिस्से सारखे असतात असें म्हणून राण्याकडून कांहीं मुलूख मिळवला ( रा. इ. पा. ९८० ). ही गोष्ट स. १७७१ च्या सुमारास झाली.

रामपुऱ्याच्या जहागीरदाराच्या बंडाचा मोडहि हिनें पूर्णपणें केला.

दत्तक न घेतां सैन्याच्या मदतीनें राज्य चालविण्याचा विचार करून हिनें त्या कामीं महादजी शिंदे व पेशवे यांची सुद्धां पूर्ण सहानुभूति मिळविली. स्त्री असल्यामुळें सैन्याचें आधिपत्य तुकोजी होळकर याच्याकडे सोपविलें. तुकोजी महत्त्वाच्या प्रसंगीं अहल्याबाईचा सल्ला घेत असे ( होळकरांच्या राज्याचें सामान्य वर्णन, पा. १० ). हिच्या कारकीर्दीत हिचा व तुकोजीचा वास्तविक विरोध चारपांच महत्त्वाच्या प्रकरणांत झाला, व त्यालाहि तुकोजीचा भोळसर स्वभाव व अव्यवस्थित खर्च हींच दोन कारणें होतीं. त्यांपैकीं अहल्याबाईच्या हाताखालीं तिच्या अत्यंत विश्वासांतल्या शिवाजी गोपाळ नांवाच्या इसमाची पुणें दरबाराकडून पुण्यास बदली झाली असतां तुकोजीनें भोळसरपणानें अहल्याबाईची मंजुरी न विचारतां त्या बदलीस संमति दिली हें एक होय ( पुरुषोत्तमकृत देवी श्री. अहल्याबाई-च. पृ. १६१-६२ ). हिनें घरांतला कारभार आपल्याकडे ठेवून बाहेरचा कारभार तुकोजीच्या हातीं दिला होता. पण प्रत्येक गोष्टीवर हिची करडी नजर असल्यानें तुकोजीला स्वतंत्रपणें वागण्याला सवडच मिळत नसावी. शेवटीं तर तो फारच व्यसनी झाला होता. स्वतः अहल्याबाईच्या राज्यांत लढाया व कलह हे बोटांवर मोजण्याइतकेच झाले. गोविंदपंत गानु नांवाचा एक सज्जन मनुष्य हिचा मंत्री होता. पुणें, हैद्राबाद, श्रीरंगपट्टण, नागपूर, लखनौ, कलकत्ता इत्यादि ठिकाणीं होळकराकडून जे वकील नेमले जात, त्यांची नेमणूकहि हिच्याचकडून होत असे. हिला प्रजेची तर भीति नव्हतीच. पण इतर राजेरजवाड्यांनींहि कधीं हिच्या राज्यावर स्वारी केली नाहीं. हिच्या कारकीर्दीत चंद्रावतांनीं जें बंड उभारिलें तो केवळ स्वजात्यभिमानाचा व स्वसंरक्षणाचा प्रयत्न होता. हिनें स्वतःच बंडवाल्यांशीं तोंड देऊन पळसुडा येथील लढाईंत त्यांचा पराभव केला. आपल्या राज्यांत धाड घालून त्यावर उपजीविका करणाऱ्या गोंड लोकांचा अहल्याबाईनें त्यांना संरक्षण करणारे रखवालदार नेमून बंदोबस्त केला. त्याजवरून हिचें व्यवहारचातुर्य फार उत्तम रीतीनें व्यक्त होतें. पुष्कळ दिवसांच्या करारानें जमीन पट्ट्यानें देण्याची पद्धत अहल्याबाईनेंच सुरू केली, असें म्हणतात ( मालकम भाग २ ).

हिचें जें आज सर्वतोमुखीं नांव झालें आहे तें हिच्या युद्धकौशल्यामुळें किंवा मुत्सद्दीपणामुळें नसून औदार्य, न्यायप्रियता, भूतदया, सदाचरण, इत्यादि लोकोत्तर गुणांमुळेंच होय. या गुणांमुळें हिला आपली कारकीर्द यशस्वी करून दाखवितां आली; येवढेंच नव्हे, तर पाटीलबाबासारख्या मुत्सद्दी मंडळीसारखें अखेरपावेतों हिचें वजन राहिलें. हिच्या धर्मशील वर्तनामुळें तत्कालीन राजेरजवाड्यांचा हिजवर इतका विश्वास होता कीं, आसपासचीं संस्थानें हिच्याकडे आपले तंटे घेऊन येत ( महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें-भाग १, पा. १२४, भाग २, पा. १७० ). आपल्या हातीं पुष्कळ पैसा असतांहि हिनें त्याचा दुरुपयोग केला नाहीं. शिल्लक उरलेल्या पैशाचा विनियोग हिनें हिंदुस्थानांत लोकोपयोगी सार्वजनिक कामें करून ठेवण्यांत केला. हिनें लोकांच्या सोयीसाठीं जागोजागीं अन्नछत्रें, धर्मशाळा, विहिरी, रस्ते व घाट बांधिले. काशीविश्वेश्वराचें मंदिर व गया येथील विष्णुपदाचें मंदिर पुनः नवें बांधलें आणि कलकत्त्यापासून काशीपावेतों मोठा थोरला रस्ता बांधला ( हरप्रसाद शास्त्री– 'स्कूल हिस्टरी ऑफ इंडिया' ). काशीचा मणकर्णिकाघाट, दशाश्वमेघ घाट व सोरटी सोमनाथाचें देवालयहि हिनें नवें बांधवून त्यांत मूर्तींची प्राणप्रतिष्ठा केली ( महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें, भाग २, पानें ८६–८७ ).

ही दिसण्यांत फार सुंदर नव्हती, तरी हिचा चेहरा अत्यंत तेजस्वी दिसे. हिचीं वस्त्रें पांढरीं शुभ्र पण साधीं असत. हिची वृत्ती शांत असे, परंतु ही असत्य बोलणाराचा तिटकारा

करी. हिचीं धार्मिक व्रतें व उपवास खडतर असून तीं हिनें अखेरपावेतों चालू ठेविलीं होतीं. हिला पूर्व वयांतच लिहिणें, वाचणें समजूं लागलें. ही मोडी अक्षरहि लिहीत असे. पुराण ऐकण्याची गोडी असल्यामुळें हिच्या अंगीं लवकरच बहुश्रुतपणा व चतुरस्रता आली. हिची कुशाग्र बुद्धि व कामांतील हुशारी पाहून मल्हाररावानें आपल्या हयातींतच हिच्यावर सरकारी कामें सोंपविलीं. अर्थात् राज्य चालविण्यास जे गुण लागतात त्यांचा उगम हिच्या अंगीं पूर्वीच झाला असला पाहिजे. मालकमसाहेबानें हिची दिनचर्या मोठ्या काळजीनें व कौतुकानें लिहिली असून तींत तो म्हणतो, "ही सूर्योदयापूर्वी घटका दीड घटका उठून स्नान करी, व पूजाअर्चा करी. नंतर नियमित कालपर्यंत पुराणश्रवणास बसे. नंतर ही तीन दानें देऊन आपणासमक्ष ब्राह्मणांस भोजनें घाली. नंतर हिचें ताट वाढून येई. हिच्या भोजनांत सारे शाकभाज्यांचे पदार्थ असत. भोजन आटोपल्यावर पुनः कांहीं वेळ परमेश्वर-स्तव करून थोडा वेळ वामकुक्षी करी. नंतर पोषाख करून सरकारी कामकाज करावयास दरबारांत जात असे. तेथें सूर्यास्तापर्यंत बसे. यानंतर दोन तीन तास पूजा-अर्चा व फराळ वगैरे कृत्यांत जात. मग ही नऊ वाजा-वयाच्या सुमारास सरकारी काम पुनः पाहूं लागे. तें अकरा वाजेपर्यंत पाही व त्यानंतर निजावयास जात असे."

हिच्या कारकीर्दीत अखेरपर्यंत हिच्या मुलाच्या नांवाचाच शिक्कामोर्तब सरकारी कामावर होत होता. १७ नवंबर १७९० त हिचा नातू–मुलीचा मुलगा नथ्याबा उर्फ धोंडिबा फणशे वारला. ता. ३ डिसेंबर १७९१ जांवई यशवंतराव फणशे वारला. या प्रसंगीं त्यांच्या स्त्रियाहि सती जात. हे सर्व प्रसंग हिनें मोठ्या धैर्यानें सहन करून राज्य-कारभार सुरळीत चालविण्यांत कसूर केली नाहीं. हिच्या राज्यांत सर्वत्रांस न्याय मिळून प्रजा सुखी होती. हिच्या राज्याचा सर्वत्र धर्मराज्य म्हणून उल्लेख होई. ही ता. १३ ऑगष्ट १७९५ (शके १७१७ श्रावण व. १४) रोजीं इहलोक सोडून गेली. हिच्या ३० वर्षांच्या कार-कीर्दीच्या वार्षिक उत्पन्नाची सरासरी काढल्यास ती १,६०,२९,७३४।ॐ।। इतकी निघते. ही आपला धार्मिक खर्च खासगी उत्पन्नांतून करी. तो खर्च आजमितीस चालू ठेवला असून त्याकरितां आजतागायत दरसाल ७०,००० रुपये खर्ची पडत आलेले आहेत. ८ प्रहरांतील २ प्रहर हिचे धार्मिक कार्यांतच जात. धर्म, राज्यव्यवहार, नैतिक आचरण, स्वतःची आकर्षक शरीरयष्टि व पावित्र्य या गुणांनीं हिची प्रजा तर धर्मराज्यांतच होती. परंतु त्या काळचे मुत्सद्दी, राजेरजवाडे एवढेंच नव्हे, तर पाश्चि-मात्य इतिहासकारहि हिच्या दरवळलेल्या कीर्तिसुगंधानें मोहित झालेले आहेत (विविधज्ञानविस्तार ३६. ९ पा. ३४१).

महादजी शिंदे जुना संरक्षणाचा दिलेला बेलभंडार बाजूला सारून गोहदवाल्यावर चढाई करूं लागला तेव्हां हिनें पाठविलेला इषारा हिच्या स्वभावाचा निदर्शक आहे. ही म्हणते 'सर्वांशींच आपण वाईट झाल्यास आपल्या बेलभंडारास कोणी विचारणार नाहीं. मग हिंदुस्थान हस्तगत कसें होईल? सलूख राखून पुढील कामें करा. अद्यापि इंग्रजांचेंहि पारिपत्य पुरतेपणीं झालें नाहीं.' (महे-श्वर दरबारचीं बातमीपत्रें भा. १, पा. १२४). हें पत्र २८ मे स. १७८१ चें आहे.

या थोर स्त्रीच्या उदात्त चारित्र्यामुळें मराठ्यांचा नैतिक दर्जा वाढला यांत शंका नाहीं. हिचें उदात्त चारित्र्य आणि सुव्यवस्थित राज्य यांचे गोडवे अनेक देशी किंवा मालकमसारख्या परदेशी लेखकांनीं मुक्तकंठानें गायिले आहेत. अस्तंगत होणाऱ्या मराठेशाहींतील नररत्नें म्हणून अहल्याबाईसारखीं दैवी माणसें डोळ्यापुढून दूर होणें केव्हांहि शक्य नाहीं. तीर्थयात्रा करणाऱ्या धार्मिक माण-साला प्रत्येक क्षेत्रांत अहल्याबाईचें मूर्तिमंत दर्शन घडत असतें. विशाल मंदिरें, भव्य घाट, अन्नसंतर्पण करणारीं अन्नछत्रें आणि तीर्थक्षेत्रांचे पवित्र मार्ग हे अद्यापिहि या स्त्रीच्या औदार्याची ग्वाही सर्वत्र देत आहेत. काशीची गंगा रामेश्वरला आणि रामेश्वराचा सेतु काशीला प्रत्यहीं पडावी अशी व्यवस्था बाईनीं करून ठेविली आहे, आणि अद्यापिहि चालू आहे अशी लोकप्रसिद्धी आहे. रघुनाथराव पेशवे यांच्याशीं झालेल्या प्रसंगांत हिनें आपला राजकारणी-पणाहि चांगलाच व्यक्त केला. होळकरांच्या कैफियतीचा कांहीं अप्रसिद्ध भाग मागाहून इतिहाससंग्रहांत प्रसिद्ध झाला आहे. त्यांत हरिपंत फडके यांची गैरवाजवी राज-कारणाबद्दल बाईनीं जी कानउघाडणी केली आहे, तीवरूनहि बाईचें राजकारणचातुर्य चांगलें व्यक्त होतें. पैशाच्या व्यव-हारांत विशेष दक्ष असणें, व आपल्या व्यवहारांत दुस-ऱ्याचा वरचष्मा न होऊं देणें वगैरे वागणूकहि व्यवहार-चातुर्याचीच आहे. केवळ स्त्रियांचेंच लढाऊ सैन्य हिनें तयार केलें होतें अशी आख्यायिका आहे. पेशव्यांबद्दल निष्ठा, कै. मल्हारराव होळकराबद्दल अभिमान आणि स्वाभिमान यांच्या जोरावर हिनें आपलें वर्चस्व शेवटपर्यंत राखलें होतें. तुकोजी होळकराच्या व्यसनीपणामुळें सैन्याची स्थिति असावी तशी शेवटीशेवटीं राहिली नव्हती. तथापि योग्य

वेळीं पेशव्यांना किंवा शिंद्यांना मदत करण्यास ही तयार असे. तत्कालीन नाना, महादजी वगैरे प्रमुख मुत्सद्यांनीं हिच्या कर्तृत्वाबद्दल व थोरपणाबद्दल उघडपणें प्रशंसा केलेली आढळते.

**अहसनखान फारुकी**—खानदेशच्या फारुकी घराण्यांतील कैसरखानाचा हा मुलगा होय. याला आदील तिसरा या नांवाचा एक मुलगा होता. वरील उल्लेख केंब्रिज हिस्टरीमधील वंशावळींत आला आहे. पण मुसलमानी रियासतीमधील वंशावळींत यास हसन असें म्हटलें आहे. परंतु तो हसन ( मलीक ) नसीरचा मुलगा आहे असें दर्शविलें आहे.

**अहंकिंगंगाधर**—हा तपतीसंहरणोपाख्यानाचा कर्ता. याचा आंध्र कवींना मोठा आश्रय असे.

**अहीर**—( आभीर पाहा ).

**अहोबल**—' संगीतपारिजात ' नांवाच्या प्रसिद्ध संस्कृत ग्रंथाचा कर्ता. हा दक्षिणेकडील द्रविड ब्राह्मण. याच्या पित्याचें नांव श्रीकृष्ण पंडित. यानें बापाजवळ संस्कृतभाषा व संगीतशास्त्राचा अभ्यास केला. नंतर धनवड संस्थानच्या आश्रयाला राहून उत्तरेकडील संगीताचा अभ्यास केला. याचा संगीत-पारिजात ग्रंथ उत्तरपद्धतींत पुढील कारणांनीं सर्वमान्य समजला जातो. श्रुति व स्वर हे भिन्न नसून एकच आहेत. षड्ग्रामांतील पहिल्या चार स्वरांच्या दिढीनें पुढील चार स्वर ध्वनिदृष्टीनें उच्च आहेत. हा आपल्या रागांत सात शुद्ध व पांच विकृत असे जे बारा स्वर मोजी त्या स्वरांचीं स्थानें यानें तारेच्या लांबीनें कायम करून ठेविलीं आहेत. म्हणजे अमुक स्वराचा ध्वनि निघण्यास अमुक लांबीची तार पाहिजे. हीच गोष्ट पाश्चात्यांनीं १९ व्या शतकांत शोधली. पण सुधारलेल्या साधनांच्या अभावीं तें काम यानें केलें म्हणून याचें महत्त्व आहे. हा सनाच्या सत्राव्या शतकाच्या प्रारंभीं होऊन गेला.

**२.** ( रायस )–विजयनगरच्या पहिल्या रंगराजाचा मंत्री होय. हा कविहि होता. यानें कुवलयविलास नांवाचें नाटक संस्कृतांत लिहिलें आहे. याशिवाय अहोबल नांवाचे बरेच पंडित होऊन गेले आहेत.

**३.** याचें अध्ययन पायगुंडे यांच्या जांवयाजवळ झालें. नीलकंठशास्त्री थत्ते याचे विद्यार्थी होत.

**अक्षपाद**—( स. १५० च्या सुमारास) न्यायसूत्राचा कर्ता. हा षोडशपदार्थवादी होता.

न्यायसूत्रावरील जुन्या टीकांतूनसुद्धां न्यायसूत्राचा कर्ता अक्षपाद होता असेंच आहे. चवथ्या शतकांत होऊन गेलेला न्यायभाष्याचा कर्ता वात्स्यायन म्हणतो कीं, न्यायसूत्र हें अक्षपादाच्या पूर्वीच संगतवार असें रचलें गेलें होतें. परंतु ६ व्या शतकांत होऊन गेलेला न्यायवार्तिकेचा कर्ता उद्योतकर वार्तिकांच्या प्रारंभीं असें म्हणतो कीं, अक्षपादानेंच प्रथम संगतवार असें न्यायसूत्र रचलें. ' न्यायवार्तिक-तात्पर्य-टीका ' ( स. ८१ ) व न्यायमंजरी ( न्यायमंजरी प्रकरण १ लें ) या दोन ग्रंथांत अक्षपाद हाच न्यायसूत्राचा कर्ता आहे असें म्हटलें आहे. माधवाचार्य ( स. १३५० च्या सुमारास ) हा आपल्या सर्वदर्शनसंग्रहांत न्यायशास्त्रास ' अक्षपाददर्शन ' म्हणजे अक्षपादाचें शास्त्र असें म्हणतो.

परंतु पद्मपुराण ( उत्तरखंड अध्याय २६३ ), स्कंद-पुराण व शिवपुराण उमासंहिता ( २. ४३–४७ ) यांत गोतम अथवा गौतम या नांवाच्या माणसानें न्यायशास्त्र निर्माण केलें आहे असें म्हटलें आहे. न्यायसूत्रवृत्तीचा कर्ता विश्वनाथ न्यायसूत्रास " गौतमसूत्र " म्हणजे गौतमानें निर्माण केलेलें सूत्र असें म्हणतो. तेव्हां न्याय-सूत्राचा कर्ता अक्षपाद कीं गौतम असा प्रश्न उद्भवतो. अनंतयज्वन् हा आपल्या पितृमेधसूत्राच्या टीकेंत अक्षपाद व गौतम हे दोघेहि एकच होते असें म्हणतो.

गौतम हा तत्त्वज्ञानाचा विचार करण्यांत इतका गढून गेलेला असे कीं, चालतां चालतां तो एका विहरींत पडला. त्यांतून त्यास बाहेर काढण्यास फार त्रास पडला. तेव्हां देवानें त्यावर पुनः असा प्रसंग येऊं नये, म्हणून त्याच्या पायास डोळे दिले. परंतु या गोष्टींत बिलकुल तथ्य नाहीं. ही गोष्ट अक्षपाद या शब्दाचें विवरण करण्यासाठींच केवळ रचण्यांत आली असावी.

दुसरी एक दंतकथा अशी आहे कीं, व्यास हा गौतमाचा शिष्य होता, व त्यानें गौतमास साष्टांग नमस्कार घातला असतां गौतमानें आपल्या खऱ्या डोळ्यांनीं न पाहतां पायांतील डोळ्यांनीं पाहिलें. पण ही भाकडकथा गौतमा-नंतर होऊन गेलेल्या तर्कज्ञांनीं व्यासाचा अपमान करण्या-साठीं रचली असावी. कारण व्यासानें महाभारत व वेदांत-सूत्र या ग्रंथांतून न्यायशास्त्रावर टीकेची झोड उठवली आहे.

वास्तविक आन्वीक्षिकीचा कर्ता गोतम अथवा गौतम व अक्षपाद दोघेहि भिन्न होते. एक मिथिलेंत राहत असे, तर दुसरा काठेवाडांत प्रभास येथें राहत असे. ब्रह्माण्डपुराणांत असें सांगितलें आहे कीं, अक्षपाद व कणाद हे दोघेजण सोमशर्मा नांवाच्या एका ब्राह्मणाचे मुलगे होते. हा ब्राह्मण

शिवाचा प्रति अवतारच असून प्रभास येथील देवळांत त्यानें खडतर तपश्चर्या केली होती. प्रभास हें सरस्वती-नदीच्या पूर्व किनाऱ्यावर वसलें असून हें श्रीकृष्णाचें निर्वाणस्थान आहे अशी याची ख्याति आहे.

आतां न्यायसूत्राचा खरा कर्ता कोण हें ठरविणें फार कठीण आहे. गौतम व अक्षपाद या दोघांनींहि तें लिहिलें असावें असें दिसतें. न्यायसूत्रांत एकंदर पांच विषय आहेत: ( १ ) प्रमाण, ( २ ) प्रमेय, ( ३ ) वाद, (४) अवयव, (५) अन्यमतपरीक्षा. या विषयांपैकीं पहिल्या तीन विषयांचा खल जुन्या ब्राह्मण, बुद्ध व जैन ग्रंथांतून केलेला आहे. गौतमानेंहि आपल्या आन्वीक्षिकी-विद्येंत अद्यापि अपक्व स्थितींत असलेल्या उपरिनिर्दिष्ट विषयांचाच ( १, २, ३ ) खल केला आहे. परंतु अक्षपादानें वरील विषयांपैकीं १, ४, व ५ या विषयांचें आन्वीक्षिकींत यथाक्रम विवरण केलें आहे. नंतर आन्वीक्षिकी-विद्येस 'न्यायसूत्र' असें म्हणूं लागले, तेव्हां अक्षपाद हा न्याय-सूत्राचा खरा कर्ता होय. याच्या सूत्रांत गौतमाच्या आन्वीक्षिकी-विद्येंतील बराच भाग आला आहे. ज्याप्रमाणें चरकानें आत्रेयाच्या अग्निवेशतंत्रास अथवा आयुर्वेदास ग्रंथाचें स्वरूप प्राप्त करून दिलें त्याचप्रमाणें अक्षपादानें गौतमाचे आन्वीक्षिकीस न्यायसूत्राचें स्वरूप प्राप्त करून दिलें. तेव्हां न्यायशास्त्रास "गौतमी विद्या" अथवा "अक्षपाददर्शन" असें म्हणतात.

**अक्षर अनन्य**—एक हिंदी कवि. हा स. १६५४ मध्यें झाला. हा दतिया येथील पृथ्वीचंद राजाचा दिवाण होता. पुढें हा विरक्त होऊन पन्ना येथें राहिला. प्रसिद्ध छत्रसाल राजा याचा शिष्य झाला. कांहीं कारणावरून हा महाराजावर अप्रसन्न झाला आणि जंग-लांत जाऊन राहिला. त्याचा पत्ता लागल्यावर महाराज त्याची क्षमा मागण्याकरितां गेले.

यानें योग आणि वेदांत यांवर कांहीं ग्रंथ लिहिले आहेत. राजयोग, विज्ञानयोग, ध्यानयोग, विवेकदीपिका, ब्रह्मज्ञान, अनन्यप्रकाश, वगैरे ग्रंथ यानें लिहिले आहेत. शिवाय दुर्गासप्तशतीचा हिंदी पद्यांमध्यें अनुवाद केलेला आहे. याच्या लिखाणांत इतर निर्गुणमार्गी संतांप्रमाणेंच चुका आहेत. असे निर्गुणमार्गी संत थोडे आहेत कीं, ज्यांचे ग्रंथ साहित्याच्या दृष्टीनें बरोबर आहेत. निर्गुण-मार्गी संतांप्रमाणें सध्यांहि या संतमालिकेची परंपरा चालू आहे; आणि नवीन नवीन पंथ स्थापन होत आहेत.

**अक्षोभ्यतीर्थ**—मध्वाचार्यांच्या चार प्रमुख शिष्यां-पैकीं शेवटले. यांच्या नंतर मध्वाचार्यांच्या पीठावर जयतीर्थ ऊर्फ टीकाचार्य या नांवानें प्रसिद्ध असणारे आचार्य आले.

**अज्ञानदास**—शिवकालीन एक शाहीर. यानें अफ-झुलखानाचा वध या ऐतिहासिक प्रसंगावर दोन पोवाडे रचले आहेत. हे पोवाडे खुद्द जिजाबाईनें रचण्यास सांगून ते शिवाजीकडून ऐकविले; व कवीच्या रचनाचातुर्याबद्दल एक घोडा व शेर सोन्याचा तोडा यास बक्षिस मिळाला. हे दोन्ही पोवाडे छापून प्रसिद्ध झाले आहेत ( ॲकवर्थ व शालिग्रामकृत पोवाडे ). हल्लीं प्रसिद्ध असलेल्या सर्व पोवाड्यांपैकीं अज्ञान किंवा ( अग्निन ) दासाचा पोवाडा सर्वांत जुना आहे. याची रचना एकतारीवर म्हणतां येईल इतकी साधी आहे. शिवाय या पोवाड्यांत वर्णि-लेल्या प्रसंगानंतर लवकरच रचिलेला व शिवाजी आणि त्याचे मावळे सरदार यांनीं खुद्द ऐकलेला तेव्हां हा बराच विश्वसनीय म्हणण्यास हरकत नाहीं. हा पोवाडा वाचून त्या वेळेचें चित्र डोळ्यापुढें चांगलें उभें राहतें.

**अज्ञानसिद्ध नागेश**—यांनीं आपल्या ग्रंथांत नाग-नाथ हें आपल्या गुरूचें नांव म्हणून दिलें आहे. व हे स्वतःचें नांव नुसतें अज्ञान असें देतात. यानें अविंध भाषेंत पंचीकरणप्रमेय रचिलें आहे. यावरून यांचा काल शके १४०० चा सुमार येतो. वरदनागेश व हे एकच असें वाटतें.

यांचे ग्रंथ:—कालज्ञान व पंचीकरणप्रमेय हे आहेत. वरदनागेशाचे नांवावर वरदनागेश व गुरुशिष्यसंवाद हे ग्रंथ सूचिकारांनीं दिले आहेत ( सं. सू. ).

**अंक**—चालुक्य घराण्यांतील त्रैलोक्यमल्लाचा एक संस्थानिक. याच्या एका देणगीचा उल्लेख शके ९७० मध्यें आहे ( भांडारकर पा. २०७ ).

२. हा रट्ट घराण्यांतील एक राजा. हा या घराण्यांतील एरगराजाच्या मागाहून गादीवर आला. हा जैनधर्मी असून यादवांचा मांडलिक होता.

**अंगडशाह**—( स. १५३९-१५५२ ) हा एक शिखांचा गुरु होय. स. १५०४ मध्यें याचा जन्म झाला. हा नानकाप्रमाणेंच खत्री जातीचा असून नानकामागून स. १५३९ मध्यें शिखांचा गुरु झाला. नानकानेंच याला आपला वारस केलें होतें. याच्याविषयीं अशी एक दंतकथा आहे कीं, आपल्या अनुयायांसह गुरु नानक प्रवास करीत असतां त्यानें रस्त्याच्या कडेला पडलेलें प्रेत पाहिलें. तेव्हां नानक म्हणाला कीं, ज्याअर्थीं तुमचा माझ्यावर विश्वास आहे, त्याअर्थीं तुम्ही हें अन्न ( प्रेत ) खावें. अंगडाशिवाय सर्वजण याला कचरले. पण अंगडानें

खालीं बसून त्या प्रेताला खाण्याकरितां विवस्त्र करण्यास सुरुवात केली. तोंच तें प्रेत अंतर्धान पावून त्या जागीं याला पवित्र अन्नाचें ताट आढळून आलें. तेव्हां नानकानें याला आलिंगन देऊन म्हटलें कीं, तूं माझीच प्रतिमा असून माझें तेज तुझ्या ठिकाणीं राहील. त्या वेळेपासून शीख लोक गुरु नानकाचा अंश त्याच्या मागून गादीवर आलेल्या प्रत्येक गुरूंत असतो असें मानीत आले आहेत.

याच्या कार्याची फारशी माहिती मिळत नाहीं. यानें गुरुमुखी लिपी शोधून काढिली व 'ग्रंथसाहेब' विस्तृत केला असें म्हणतात. याची राहणी अगदीं साधी असे. दोर विणून हा उदरनिर्वाह करी. स. १५५२ मध्यें हा दिवंगत झाला. अमरदासाला आपल्यामागें यानें गुरु निवडलें होतें.

**अंगनदेव**—हा कलचुरी घराण्यांतील अर्जुनाचा पुत्र. याच्या विजव्वा नांवाच्या मुलीचें लग्न इंद्र नित्यवर्ष राजाशीं झालें होतें ( भांडारकर, पा. २७८ ).

**अंगापूरकर हरि**—( जन्म स. १७५२-मृत्यु ? ) एक मराठी कवि. याचा केदारविजय हा ग्रंथ बेळगांवच्या रामतत्त्वप्रकाश छापखान्यांत छापून प्रसिद्ध झाला आहे ( स. १८९४ ). त्यावरून याची कांहीं माहिती मिळते. याच्या पित्याचें नांव गोपाळराव व आईचें नांव यमुना. आडनांव देशमुख, गोत्र वसिष्ठ. याचा गुरु हरिनारायण. याला बद्रीकेदार येथें केदारविजय ग्रंथ लिहिण्याविषयीं दृष्टान्त झाला. त्याप्रमाणें चार महिने दहा दिवसांत यानें ग्रंथ पूर्ण केला. याच्यावर केदारेश्वराची कृपा होती. ग्रंथाचे ३५ अध्याय असून ६११० ओव्या आहेत. शिवाय यानें महाभारतापैकीं उद्योग व भीष्म हीं पर्वेंहि मराठींत लिहिलीं, असें केदारविजयाच्या प्रस्तावनेंत कवीनें म्हटलें आहे. केदारविजय ग्रंथांत केदारनाथ नांवाचा एक नाथसंप्रदायी अवतारी पुरुष होऊन गेला त्याचें चरित्र वर्णिलें आहे. केदारनाथाचें स्थान कोल्हापूरपासून चार मैलांवर असलेला जोतिबाचा डोंगर होय ( म. क. च. ११. पा. ४०२-४०८ ).

**अंगुलिमाल**--हा श्रावस्तीचा राजा प्रसेनजित् याचा पुत्र होय. हा तांत्रिक प्रयोग करणारा असल्यामुळें प्रयोगाकरितां गळ्यांत कापलेल्या बोटांची माळ घाली म्हणून यास अंगुलिमाळ म्हणत. एकदां बुद्धदेव भिक्षेला जात असतां हा म्हणाला, ' भिक्षु, उभा रहा. ' तेव्हां बुद्धदेवानें उत्तर दिलें, ' मी उभा आहें. ' असें म्हणून ते पुढें चालूं लागले. तेव्हां हा म्हणाला, ' तूं खोटें बोलतोस. ' तेव्हां बुद्धदेव म्हणाले, ' मी सत्य सांगतों कीं, जगांत मींच फक्त अढळ असून बाकी सर्व लोक अस्थिर म्हणजे चल आहेत. ' हें अध्यात्मपूर्ण उत्तर ऐकून याला ज्ञान झालें.

**अंडरसन**—हा वॉरन हेस्टिंगचा वकील होय. वॉरन हेस्टिंगनें शिंद्यांच्या मार्फत पुणें दरबारशीं तह करण्याकरितां यास संपूर्ण अधिकार देऊन याला शिंद्याकडे पाठविलें (स.१७८१) होतें. याचा तह नानांस बिलकुल पसंत नव्हता, तो नाकबूल करावा असाच जवळ जवळ नानाचा ग्रह झाला. अंडरसन दीड वर्ष महादजीचें सान्निध्यांत होता. यानें लिहून ठेविलेला महादजीसंबंधाचा अभिप्राय मार्मिक आहे. वरील सालबाईचा तह ठरण्यास अतोनात विलंब लागला. याबद्दल शिंद्यास अत्यंत वाईट वाटलें. या शब्दाचें संस्कृतीकरण इंद्रसेन असें केलेलें आढळतें ( दिल्ली येथील मराठ्यांचीं राजकारणें भा. १. ८५; ८८; १०० इत्यादि).

**अंड्रोकोटस्**--चंद्रगुप्त मौर्याचा ग्रीक उच्चार.

**अंतला**—श्रीवर्धन येथें राज्य करणारा एक राजा. याचा यादव घराण्यांतील मौलगीपुत्र पहिल्या भिल्लमानें पराभव केला ( भांडारकर, पा. १४८ ).

**अंताजी कृष्ण फडणीस**—हा नाना फडणिसाचा पुतण्या होय. स. १७७६ मध्यें हा परशुरामभाऊ पटवर्धनाच्या बाजूनें प्रतिनिधीच्या फौजा घेऊन करवीरकराशीं लढत होता. स. १७९८ सालीं कोल्हापूरकर छत्रपति सातारकर छत्रपतींना पेशव्याविरुद्ध मदत करण्याकरितां निघाले असतां मध्यें वाटेंत त्यांचा तळ कऱ्हाड मुक्कामीं पडला. कऱ्हाड हें प्रतिनिधीचें मुख्य ठाणें होय. त्या प्रसंगीं अंताजी कृष्ण हा प्रतिनिधीस सल्लामसलत देत होता ( म. रि. उत्तर वि. ३ पृ. ८० ).

**अंताजी दामोदर शितुत**—हे महाराष्ट्रांतील देवरुखे ब्राह्मण. यांचें मूळ गांव कोंकणांतील जांबरूण. गोत्र वसिष्ठ. सुखवस्तु शब्दाचा शितूत हा अपभ्रंश असावा. गुजराथेंतील पंचमहाल जिल्ह्यांतील नायक जातीच्या दरोडेखोरांचा बंदोबस्त केल्यामुळें हे मोठ्या योग्यतेस चढले. हे शिंद्यांच्या दरबारीं असून शिंदेशाहींत यांचें फार वजन होतें. शिंदे सरकारनें यांना नाणें पाडण्याचा परवाना दिला होता. यांच्या रुपयाला अन्तुशाही रुपया म्हणत.

**अंताजी नागेश**—हा एक पेशव्यांचा सरदार होय. गुजराथच्या बंदोबस्ताचें काम याचेकडे होतें.

जेव्हां फत्तेसिंग गायकवाडानें पेशव्यांचे महालांस उपद्रव आरंभिला, तेव्हां हा व गणेशपंत बेहेरे हे दोघे फत्तेसिंगावर चालून गेले. पण पुढें फत्तेसिंगास करार करून देण्याचें ठरलें. त्याप्रमाणें ता. २३-१०-१७७७ रोजीं कराराची सनद पेशव्यांनीं करून दिली, आणि अंताजी नागेश यास

फत्तेसिंगाचा कारभार करण्यासाठीं मुजुमदार नेमून पाठविलें. अपाजी गणेश बेहेरे, व अंताजी नागेश रगड्न कारभार करूं लागले. तेणेंकरून फत्तेसिंग केवळ नामशेष झाला ( म. रि. उत्तरार्ध भा. १ ).

**अंताजी ( बाबुराव ) मल्हार बर्वे**—हा मल्हारपंतांचा वडील मुलगा असून फार हुशार होता. याचें दुसरें नांव बाबूराव असें होतें. प्रथम हा निजामाकडे औरंगाबादेस व पुढें दिल्लीस पेशव्यांचे तर्फे वकिलातीचे कामावर होता. नादीरशाहाच्या स्वारीच्या वेळचीं याचीं पत्रे महत्त्वाचीं आहेत. याचें व सदाशिवराव भाऊंचें पटलें नाहीं, तेव्हां हा साताऱ्यास शाहूकडे गेला. हा स. १७४९ त कोडुरें येथें मरण पावला. या घराण्याचा स्वतंत्र वृत्तान्त छापलेला आहे ( म. रि. म. १, पृ. ४२८ ).

याची आत्या ही बाळाजी विश्वनाथ पेशवे यांची बायको राधाबाई होय. याची बायको पिंगळे ( पेशवे ) घराण्यांतील होती. हा देशस्थकोकणस्थविवाह दिसतो. यानें हिंगणे व दीक्षित यांच्या मदतीनें उत्तरहिंदुस्थानांत जाट, बुंदेले वगैरे सर्व लहानमोठे हिंदु संस्थानिक एकत्र करून मुसलमानांविरुद्ध एक जंगी कारस्थान उभारलें होतें, परंतु तें शेवटास गेलें नाहीं.

**अंताजी माणकेश्वर गंधे**—हा नगर जिल्ह्यांतील कामरगांव येथील राहणारा. देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. गोत्र भारद्वाज. वडिलांचें नांव माणकोजी. आजाचें नांव लिंगोजी. उपनांव गंधे.

अंताजीस दिल्लीहून सात हजार स्वारांची मनसब मिळाली होती. उत्तरेकडील राजकारणांत शिंदेहोळकरांप्रमाणें सेनापति म्हणून याला महत्त्व आलें होतें.

अंताजींस तीन मुलगे होते. त्यांचीं नांवें अनुक्रमें बहिरोपंत, व्यासराव व भगवंतराव ( मं. त्रै. वर्ष ८ अंक ३ ले. २१ पृ. १३५ ). हा चिमाजी अप्पाचा मनुष्य होता.

अंताजीचें पूर्वायुष्य पुणें परगण्यांतील कऱ्हेपठार प्रान्तांत गेलें. राघोबल्लाळ अत्र्यांच्या सख्ख्या भावाचे नातू त्रिंबकपंत अत्रे हे अंताजीपंताचे मावसभाऊ होत. शके १६२० चे सुमारास त्रिंबकपंत अत्रे वारले. त्यांचे मागें त्यांचीं मुलें लहान असल्यानें व घरांत कोणीच कर्ता पुरुष नसल्यानें त्यांचें संगोपन व चांबळी वगैरे वतनी गांवचे जोशीकुळकरणाची वहिवाट अंताजी माणकेश्वर व त्यांचे वडील बंधु हरि माणकेश्वर हे करूं लागले. अंताजीपंतास पुढें येण्यास वेळ लागला नाहीं. हा गरीबींत वाढला होता, तरी लवकरच पुढें सरसावला. याच्या शिक्क्यावरून असें दिसतें कीं, हा प्रथम शाहूच्या पदरीं नोकर असून शाहूकडून पेशव्यांकडे आला असावा. याच्या पदरीं कऱ्हेपठारकडील माणसांचा भरणा होता; व लष्करांत चांबळी, गराडे भागांतील लोक होते. कोढीत येथील बाबुराव अत्रे अंताजीच्या विशेष भरंवशाचे असून ते याच्यातर्फे पिछोरच्या राजाजवळ वकील होते.

स. १७५३ मध्यें दिल्ली येथें बादशाह व वजीर यांमध्यें युद्धप्रसंग झाला. त्या वेळीं पेशव्यांचे तर्फे अंताजीनें बादशहास मदत केली. लढाई चालू असतां लढाईची हकीगत अंताजींनीं बाबुरावास कळविली आहे. ती मोठी मनोरंजक असून मननीय आहे. या लढाईत मराठ्यांनीं जाटास पळतां भुई थोडी केली. बादशहातर्फे अंताजीनें समाधानकारक कामें केल्यानें बादशहाकडून इटावा व फफुंद हे दोन परगणे जहागीर मिळाले. हे जरी तिकडे दीर्घकाल राहत असले तरी इकडेहि यांनीं आपला संबंध कायम ठेवला होता. त्याच्या कामरगांवी अद्यापि भव्य वाड्याचा कोट याच्या वैभवाची ग्वाही देत आहे. सखाराम बापू बोकील व हा हे व्याहीव्याही होते. सखाराम बापूची मुलगी याच्या मुलास दिली होती असें वाटतें. अंताजीपंताच्या पश्चात् याचा मुलगा बहिरो अनंत बराच प्रसिद्धीस आला होता ( मं. त्रै. ३. २-४, पा. १०८ ).

हा बाजीराव व मुहम्मदखान बंगष यांच्या लढायांत आपल्या सैन्यासह हजर होता. बंगषानें याचा उज्जनीस पराभव केला होता ( ता. १९-५-१७३१ ). हा स. १७५५ मध्यें पुनः हिंदुस्थानांत जाऊन नागोरास दत्ताजी शिंद्यास मिळाला ( काव्ये. ४५१ ). स. १७५७ मधील लढाईंत यानें अबदालीला चांगलाच हात दाखविला होता. परंतु अबदालीची फौज भारी असल्यानें याचा उपाय चालेना. दिल्लीस असतां बादशाही कारस्थानांत याचा चांगलाच हात होता. याचा वाढत चाललेला वरचढपणा हिंगण्यास बिलकुल सहन होत नसे. त्यामुळें दोघांचें बिलकुल जमेना. हिंगणे-गंधे यांचें भांडण म्हणजे पेशव्यांच्या घरांतील भाऊबंदकीचा प्रतिध्वनि होता. दिल्लीदरबारांत याच्यावर कोणी विश्वास ठेवीत नसे म्हणून यास पुण्यास पाठविण्यांत आलें, असें रामराव निळकंठाच्या पत्रांत आहे. त्याप्रमाणें स. १७५९ मध्यें हा पुण्यास गेला. या सालच्या डिसेंबरांत सदाशिवरावानें पुणें येथें याच्या कारभाराची झडती घेऊन यास निर्दोषी ठरविलें. ( रा. खं. ३. २३३ ). यावरून याच सुमारास दत्ताजीच्या रोहिलखंडाच्या मसलतींत हा होता, असें भाऊसाहेबांच्या बखरींत लिहिलें आहे तें बरोबर आहे किंवा नाहीं, हें सांगतां येत नाहीं.

पानपतच्या युद्धांतून हा, बाजी हरि, नाना पुरंदरे, व मल्हारराव होळकर असे रात्रौं दिल्लीचे सुमारास चालले असतां दांडग्यांच्या हुल्लडींत फरुखाबादच्या जमीनदाराच्या हातून हा व बाजी हरि हे ठार झाले (म. रि. म. ३ पा. २०५). याची मुद्राः-मुद्रेषा शंभुचरणद्वंद्वनिष्ठस्य सर्वदा। माणिकेश्वरसंभूत अनंतस्य विराजते।

**अंताजी रघुनाथ कावळे**—कावळे हा मालाडचा सरदेसाई व इनामदार होता. हा फारच शूर व हिंदुधर्माचा अभिमानी होता. यानें साष्टी प्रांत पोर्तुगिजांकडून जिंकून घेण्याचा पेशव्यांकडे सारखा लकडा लावला होता. एकदां तर दाभाड्याकडून साष्टी जिंकवण्याचें कारस्थान यानें उभें केलें होतें. शेवटीं पेशव्यांनीं याच्या सांगण्यावरून साष्टीवर हल्ला केला; व बहुतेक साष्टी प्रांत काबीज केला. वसईच्या मोहिमेंत यानें चिमाजी अप्पाला सर्व प्रकारें साहाय्य केलें. कावळे आपणांस पुढें जावळे म्हणवून घेऊं लागले (गंगाजी नाईक पाहा).

**अंताजी शिवदेव मुतालिक** (कऱ्हाडकर)—हा यमाजी शिवदेवाचा भाऊ असून हे दोघे राजारामाच्या कारकीर्दीत परशुराम त्रिंबकाचे हाताखालीं कारकुनी करूं लागले; आणि अंगच्या हुशारीनें लवकरच प्रसिद्धीस आले. स. १७३०-३१ त विशाळगड काबीज करण्याचे कामीं श्रीनिवासराव प्रतिनिधींचे हाताखालीं यास शाहूनें पाठविलें होतें व त्या कामगिरीबद्दल शाहूनें यास पुष्कळ इनाम दिलें. याला एक पुत्र असून त्याचें नांव वासुदेव असें होतें. याच्याबद्दल खालील उल्लेख आढळतो. रा. यमाजी शिवदेव यांनीं उंब्रजचे मुक्कामीं स्वामींसंनिध विनंती केली—' कै. राजाराम महाराज चंदीचे मसलतीस गेले ते समयीं किल्ले जगदेवगड हस्तगत करावयाचेविशीं अंताजी शिवदेव यांसीं आज्ञा झाली. त्यावरून किल्ल्यावरी हल्ला करून दरवाजावरी चालून गेले. स्वामींचे दृष्टीं ठार झाले. त्याजकरितां महाराजांनीं त्यांची स्त्री मनूबाई यांस मौंजे कोरेगांव इनाम करून दिला. त्या वेळचीं इनामाचीं पत्रें अग्नीचा उपद्रव होऊन दग्ध झालीं. तरी नूतन पत्रें करून देऊन इनाम चालविलें पाहिजे, म्हणून त्याजवरून मौंजे मजकूर गांव इनाम दिला असें ' (म. रि. म. वि. ३ पृ. ३०६-७).

**अंतिओक योनराज**—अशोकाच्या शिलालेखांत त्याच्या सिरियन साम्राज्यापैकीं एण्टियोकसकरितां हें नांव आलें आहे.

**अंतिग**—(अग्निग पाहा).

**अंतोबा गोसावी**—समर्थांचा शिष्य. मेथवड (जि. सातारा) चा राहणारा. समर्थ प्रथम स्वतःच आषाढी-कार्तिकीला पंढरीस जात, पण त्या वाऱ्या पुढें त्यांनीं याला करावयास सांगितल्या.

**अंतोबा नाईक भिडे**—हें सावकार घराणें पेशव्यांची पोतदारी करून प्रसिद्धीस आलें. यांचें मूळ ठिकाण कोंकणांतील गणपतिपुळें. पहिला प्रसिद्ध पुरुष अंताजी नरहर साताऱ्यास सराफी करून राहत असतां पेशव्यांबरोबर स्वारींत जाऊन संपन्न झाला, आणि पेशव्यांनीं पुण्यास वास्तव्य केल्यावर तेथें बुधवारांत भिड्यांनीं आपला वाडा बांधिला. शाहू छत्रपतीस अंताजीनें द्रव्यसाहाय्य केलें, त्यावरून त्यांस छत्रपतीनें रोहिडखोऱ्यांतील तिटेघर गांव ता. १४-४-१७१८ रोजीं इनाम दिला. फत्तेसिंग भोंसल्यासहि अंताजीनें पैशाचें साहाय्य केलें. यास ता. २५-१२-१७४१ रोजीं पेशव्यांची पोतदारी व पालखीचा मान शाहूकडून मिळाला. अंतोबा नाईक ता. ९-२-१७४२ रोजीं मृत्यु पावला. याला रामाजी नाईक हा मुलगा होता (म.रि. उत्तर वि. १ ला, पृ. ४९७).

**अंदलीब**--खाजा मुहम्मदचें नामान्तर.

**अंबनाक काननाक**—कोरेगांवच्या लढाईत पेशव्यांच्या विरुद्ध इंग्रजांतर्फे कामीं आलेला एक महार सैनिक.

**अंबरनाक**—दामाजीपंत नांवाचा ब्राह्मण मंगळवेढ्याचा कमावीसदार होता. त्यानें दुष्काळपीडितांस सरकारी धान्य वांटलें. त्यामुळें सरकारी देण्याची तोहमत दामाजीपंतावर आली. तीमधून विठु महार यानें आपल्याजवळील पुरलेलें धन सरकारांत भरून त्याची सुटका केली. आणि महारांच्या बाबत हक्काची सनद दामाजीपंताच्या हातची लिहिलेली, बाहामनी बादशहाकडून मिळविली. त्या उपलब्ध सनदेंत अंबरनाक असें नांव आहे. अमृतनाक महारास ही सनद मिळाली असें कित्येक महारांचें म्हणणें आहे ( वि. रा. शिंदे कृत ' भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न ' पृ. १९४ ).

**अंबरनाथ**--मराठी कवि. कऱ्हाडजवळ कुंभारगांव म्हणून आहे तेथील कायस्थ. पूर्वी बालेघाटीं मामलत करीत असत. अमणापुरी मठ केला. यांनीं जिवंत समाधि घेतली. हे चैतन्यसांप्रदायी होते. यांचा काल एकनाथांनंतर दिसतो. यांचें अर्जुनगर्वपरिहार हें एक काव्य आहे ( सं. सू. ).

**अंबाजी**--अमृतरायाचें नांव.

२. (कल्याण गोसावी पाहा).

**अंबाजी इंगळे**—(स. १७८४-१८०९) शिंद्यांचा एक मराठा सरदार. याच्या बापाचें नांव त्रिंबकजी. स. १७८४ सालीं महादजी पातशाहीचा बंदोबस्त करण्यासाठीं दिल्लीकडे गेला तेव्हां हा उत्तर हिंदुस्थानांत त्याजबरोबर होता. त्या प्रसंगीं याच्या हांतून कित्येक जबाबदारीचीं कामें घडलीं. उदाहरणार्थ, याच सालच्या जुलै-आगस्ट महिन्यांत हा व शेख सरदार यांचा तह ठरला. ता. २ नोव्हेंबर रोजीं अफरासियाबखानाचा खून झाला तेव्हां यास फौजे-सुद्धां मुसलमानी लष्करांत ठेवलें होतें. स. १७८७ च्या आक्टोबरांत महादजीनें खोडी-पाटोडीहून 'गुलामकादरच्या पारिपत्यास येऊं काय' म्हणून पातशहास विचारण्यासाठीं याची नेमणूक केली होती.

थोड्याच वर्षांनीं यास याहून जास्त स्वतंत्रतेनें कारभार करण्याची संधि मिळाली. स. १७९१ च्या सुमारास महादजीनें यास उदेपूरच्या राजाच्या विनंतीवरून त्याच्या राज्यांतील चोंडावत सरदारांचें बंड मोडण्यासाठीं कांहीं पलटणी देऊन पाठविलें. तेव्हां यानें चोंडावतांचा मुख्य साळुंब्रा यास राण्याची माफी मागावयास लावून त्याजकडून राण्यास वीस लक्ष रुपये दंड देवविला, व राण्याची सत्ता प्रस्थापित करून बंडखोर सदरारांकडून त्याच्या जमिनी सोडविल्या. शिवाय यानें तोतया राण्यास कमलमीरांतून हांकून लावण्याचीहि राण्याची दुसरी एक कामगिरी बजा-विली. एवढ्या गोष्टी करावयास अंबाजीस दोन वर्षें लागलीं. याशिवाय मेवाडच्या राण्यास याच्याकडून आणखीहि कांहीं कामगिऱ्या करून घ्यावयाच्या होत्या. शिवाय मेवाडच्या राण्यास चोंडावत सरदारांचेंहि भय वाटत होतेंच. म्हणून त्यानें अंबाजीच्या सैन्याच्या खर्चाकरितां सालीना आठ लाख रुपये उत्पन्नाचा मुलूख तोडून देऊन यास मेवा-डांत ठेवून घेतलें. अशा रीतीनें मेवाडच्या कारभाराचीं सूत्रें याच्या हातीं येऊन हा आपणास मेवाडचा सुभेदार म्हणवूं लागला. स. १७९५ सालच्या सुमारास याची शिंद्यांचा प्रतिनिधि म्हणून उत्तर हिंदुस्थानांत नेमणूक झाली. त्या वेळीं दौलतराव शिंदे हा वयांत आलेला नसल्यामुळें प्रथम प्रथम याच्या हातीं उत्तर हिंदुस्थानांत 'कर्तुमकर्तुं' सत्ता आली. पण लवकरच यास लखबादादा हा प्रतिस्पर्धी उत्पन्न झाला. लखबादादानें राण्यास याच्या-विरुद्ध कट करण्यास सांगून याचें वर्चस्व झुगारून देण्या-विषयीं गुप्तपणें उत्तेजन दिलें. त्यामुळें याच्या पक्षाच्या व राण्याच्या पक्षाच्या लोकांत कित्येक चकमकी होऊन यांपैकीं बहुतेकांत याच्या पक्षाच्या लोकांचा पराजय होत गेला. अशा स्थितींत स. १८०० च्या सुमारास हिंदुस्थानचा कारभार याच्याकडून काढून तो शिंद्यांनीं लखबाकडे सोंपविला. स. १८०३ मध्यें यानें आपल्या कारस्थानांना पेरॉन यास हुसकून लावून त्याची जहागीर व शिंद्यांच्या सैन्याचें आधिपत्य मिळविलें.

ज्या वेळेस यशवंतराव होळकरांनीं पुण्यावर स्वारी केली तेव्हां, याचा महाळुंग्यास असलेला वाडा त्यानें लुटून जाळला. हा पुढें दौलतराव शिंद्याच्या हिंदी फौजेचा मुख्य सेनापति झाला. स. १८०३ मध्यें झालेल्या युद्धांत इंग्र-जांनीं यास स्वतंत्र राज्याचें आमिष दाखवून फितूर केलें. तेव्हां यानें ग्वाल्हेर किल्ला व शहर आणि त्याचे उत्तरेकडील यमुनेपर्यंतचा प्रदेश सोडून दिला, आणि त्याच वेळीं यास दक्षिणेकडील प्रदेशाचें राज्य स्वतंत्र तोडून मिळालें (१६-१२-१८९३). परंतु पुढें हा अगदीं तोंडघशीं पडला. कारण दौलतराव शिंद्यापाशीं हा तर उघड राजद्रोही ठरला, आणि इंग्रजांकडील राज्य यास मिळालेंच नाहीं. स. १८०५ त यशवंतराव होळकरांनीं याला गांठून याचे फार हाल केले. शिवाय याजपासून पन्नास लाख रुपये वसूल करून यास वरील फितुरीचें भरपूर प्रायश्चित्त दिलें (१८-४-१८०५). हा ८१ वर्षांच्या वृद्धावस्थेंत ता. ४-६-१८०९ रोजीं मरण पावला. मरेपर्यंत हा प्रकृतीनें अगदीं खडखडीत होता. याचा रंग काळा असून चेहरा तरतरीत होता. याचा पोषाख साधा असून स्वभाव थट्टेखोर होता. याच्या पायांत चोळणा असून अंगांत रुदार बंडी व डोक्यास पांढरें पागोटें असे. हा कधींकधीं अंगावर शालजोडी घेत असे. अजमीरचे कारभारावर असतां हा आजारी पडला. तेव्हां युरोपियन डॉक्टरांस बोलावून कांहीं उपचार केला; पण बरें वाटेना. तेव्हां बनास नदीच्या कांठाजवळच बायकामुलें होतीं तेथें जाऊन सर्वांचा निरोप घेऊन यानें देह ठेवला. याजपाशीं द्रव्यसंचय मोठा असावा अशी सर्वांची कल्पना होती. सर्जेराव घाटग्यानें यास छळून याचें द्रव्य उपटण्यास कमी केलें नाहीं. त्यासाठीं तेलाचे बोळे याच्या बोटांवर ठेवून ते सर्जेरावानें पेटवून दिले होते. ५ मे १८०९ असा याचा मृत्युकाल डफनें दिला आहे. याची छत्री कोट्यास आहे. त्याअर्थीं हा तेथेंच मृत्यु पावला असें दिसतें. मराठा रियासत उत्तर विभाग २ मध्यें हा जयपुराजवळ मरण पावला, असें लिहिलें आहे. मरणापूर्वी थोडे दिवस याचें लग्न ठरलें होतें, पण पोरीच्या नशिबीं वैधव्य नसल्यानें तें घडून आलें नाहीं. याचे पश्चात् याचा भाऊ बाळोबा हा पुढें याच्या दौलतीची व्यवस्था पाहत होता. याला त्रिंबकराव नांवाचा एक मुलगा होता.

अंबाजी इंगळ्यांचे बंधु खंडोजी इंगळे नागपुरास रघूजीराव भोसल्याकडे गेले, पण शेवटीं भोसल्याबरोबर त्यांचीहि जहागीर इंग्रजांनीं खालसा केली.

मराठे हे राज्यकर्ते नसून केवळ पैशावर दृष्टि ठेवणारे लुटारू आहेत, अशी इतर प्रांतांत मराठ्यांची प्रायः प्रसिद्धी होती. अशी अपकीर्ति होण्याला कारण झालेल्या मराठा सरदारांपैकीं हा एक आहे.

**अंबाजी त्रिंबक पुरंदरे**—हा सासवडचा देशपांडे व कुलकर्णी. अंबाजीपंत व तुकोपंताचा मुलगा मल्हार तुकदेव पुरंदरे हे शाहू सुटून येतांच त्याच्या पक्षास सामील झाले; व पुढील उद्योगांत शाहूला यांचा फार उपयोग झाला. तेव्हां यास शाहूनें मुतालिकी दिली. शिवाय बाळाजी विश्वनाथानें आपली पोतनिशी व जामदारखाना याजकडे सोंपविला होता. तीं कामें हा आपल्या विश्वासूक माणसाकडून करून घेत असे. बाजीरावास पेशवाई मिळाल्यावर त्यानें दिवाणगिरीवर याची नेमणूक केली. तेव्हां मल्हार तुकदेव ऊर्फ दादोबा मुतालिकी पाहूं लागला. याशिवाय बहुतेक सरदारांकडे अंबाजीपंताच्या असाम्या असत. शाहूच्या खास मर्जींतील लोकांत याचा समावेश होता. ही मंडळी शाहूच्या दरबारांत पेशव्याचा पाठपुरावा करीत, व जातीनें स्वारीवर हजर असत. त्यामुळें पेशवा निर्धास्तपणें मुलूखगिऱ्या करी. याचें नांव आबाजी असेंहि लिहिलेलें आढळतें. मुतालिक हा शाहूजवळ राही आणि दिवाण हा पेशव्याजवळ राही. पुरंदरे आणि पेशवे यांचा शेवटपर्यंत घरोबा राहिला. गादीवरील पेशवा वयानें लहान असला तरी पुरंदरे घराण्यांतील पुरुषास पत्रांत चिरंजीव लिही. बाळाजीनें शाहूला कर्ज पाहिजे होतें तें सावकाराकडून अंबाजीपंताच्या साह्यानें दिलें. बाळाजीस जेव्हां दमाजी थोरातनें पकडलें होतें, तेव्हां अंबाजी पुरंदरे यांनींच दंड भरून बाळाजीची सुटका केली. स. १७२४ मध्यें यानें स्वतंत्रपणें माळवा काबीज केला.

शाहूनें १३।२।१७२७ रोजीं यास पत्र लिहिलें. शाहूची त्या वेळीं एवढी तारांबळ उडाली होती कीं, प्रत्यक्ष पेशवा व सेनापति हे तरी आपणांस मनापासून मदत करतील कीं नाहीं ह्याबद्दल त्यास शंका होती. शाहू लिहितो, "तुम्हीं बाजीरावांस चार गोष्टी विचारावयास सांगून अमित्राचें पिच्छावरी जाऊन फितुरी तुटे तो अर्थ करणें; तुम्हीं स्वामीजवळ बोलून गेला काय, करितां काय, हा विचार करीत नाहीं, सेनापति व प्रधान यांचे मनांत विचार तरी काय आहे याचा शोध घेऊन लिहून पाठविणें. यावरून स्वामी निश्चित मानतील. वारंवार लिहावयाची सीमा झाली, परंतु कार्यभागाचा विचार दिसत नाहीं. याउपरी (अमित्राचें) गुज काढावें आणि फितूर तुटावा, ऐसें चितांत असेल तरी पत्र दर्शनीं अमित्राचें पिच्छावरी येऊन वाताहात करणें" (काव्ये. १६७).

साताऱ्याहून संभाजीस आणण्याकरितां हा व याच्या बरोबर कित्येक सरदार गेले. शाहूनें चौथाईबद्दल ता. २३।४।१७२६ ला एक पत्र कदम बांडे व पिलाजी गायकवाड यांस लिहिलें त्यांत ह्याचें नांव आहे. ज्या वेळेस पवार, बांडे बाजीरावाच्याविरुद्ध कारस्थानें करूं लागले, त्या वेळेस बाजीरावानें त्यांच्या बंदोबस्तासाठीं याला व पुष्कळ सरदारांना पाठविलें. दंडराजपुरी येथें पराभव पावल्यावर सर्व सिद्दी सरदार जंजिऱ्यांत जाऊन बंदोबस्तानें राहिले. त्या वेळच्या हकीकतीचें पत्र बाजीरावानें ता. २६।५।१७३३ रोजीं साताऱ्यास अंबाजीस पाठविलें. या पत्रावरून कळतें कीं, जंजिरा ताब्यांत येईना तेव्हां मराठ्यांनीं, राजापुरी, खोकरी, अंतोणें, नागोठणें, अश्वधारा वगैरे ठिकाणें लढून घेतलीं. मानाजी आंग्रे हा जंजिऱ्यास आरमारासह आला व त्यानें सिद्दीचा मोड केला (म. रि. म. १). पुरंदरे घराणें पेशव्यांचे कारभारी आणि छत्रपतींचे उपमंत्री होय. याचा मृत्यु भाद्रपद शु. ८।१६५६ रोजीं माहुलीस झाला (स. १७३५). बाजीराव पेशवे यांनीं याच्या हाताखालींच राज्यकारभाराचें शिक्षण घेतलें होतें. याला तात्या असें म्हणत. याची पत्नी बयाबाई. बयाबाईनें सहगमन केलें. यांना महादोबा व सदाशिव असे दोन पुत्र होते.

**अंबादास**—समर्थशिष्य कल्याणाचें नामान्तर.

**अंबादेव महाराज**—(स. १२७२–१२९१) रुद्रम्बानें नेमलेला एक सुभेदार. याची राजधानी कांदी कोट-मनोरथपुर ही होती.

रुद्रम्बा हें राणीचें राज्य म्हणून पुष्कळसे सुभेदार त्याचा फायदा घेण्यास प्रवृत्त झाले; परंतु अंबादेवानें त्या सर्वांना पराभूत केलें. यानें श्रीपती गणपतीस जिंकलें व राजसहस्रमल्ल पदवी घेतली. त्याचप्रमाणें एरुवमल्लीदेव, केशव, स्वामिदेव, अल्लूगंग, दामोदर आणि मल्लिकार्जुन यांस पराभूत केलें. हा रुद्रम्बानें फार हुशार अधिकारी निवडला होता (सुब्रमणि अय्यरकृत एन्शन्ट डेक्कन भा. १ पृ. २१३).

**अंबाबाई**—हिचीं मराठींत कांहीं पदें आहेत (सं. सू.).

**अंबांबिका**—विजयनगरच्या तुळुव घराण्यांतील नरसिंहराय ऊर्फ नरसा याची पत्नी. हिचे पुत्र रंगराय व अच्युतराम.

**अंबिकादेवी**—पश्चिम चालुक्यांपैकीं दुसऱ्या सत्याश्रयाची पत्नी.

**अंबाप्रसाद**–मेवाडच्या गादीवर शक्तिकुमारानंतर हा आला. चितोडच्या किल्ल्यावर मिळालेल्या रावल समरसिंहाच्या वेळच्या वि. सं. १३३१ ( स. १२७४ ) मधील प्रशस्तींत याचें नांव आम्रप्रसाद असें लिहिलें आहे. याची राणी सोळंकीवंशांतील राजाची मुलगी होती, असें एका फुटक्या शिलालेखावरून दिसतें. सांभरच्या दुसऱ्या वाक्पतिराज चौहानानें याला ठार मारलें, असें पृथ्वीराजविजय नांवाच्या जयानक कवीच्या महाकाव्यावरून दिसतें. नृवर्मा ( नरवर्मा ), अनन्तवर्मा व यशोवर्मा असे याला तीन भाऊ होते. नंतर शुचिवर्मा गादीवर आला ( रा. इ. पा. ४३८ ).

**अंबिकाबाई दाभाडे**—ही यशवंतराव दाभाड्याची बायको असून प्रसिद्ध उमाबाईची सून होती. सासूसुनेचें वांकडें आल्यामुळें ही सासूबाईपाशीं न राहतां आपल्या मुलास–त्रिंबकरावास घेऊन चांदखेड येथें स्वतंत्र राहत असे. परंतु उमाबाईनीं हिला सणसणीत पत्र धाडून आपणाजवळ आणलें. हिला एकच मुलगा असून त्याचें नांव त्रिंबकराव होतें. पुढें हिला व उमाबाईला पेशव्यांनीं सिंहगडावर बंदोबस्तांत ठेविलें ( भा. व. श. २७ ). ही शितोळे देशमुख याची मुलगी असून हें लग्न ता. १२-५-१७५२ मध्यें झालें. परंतु हिचा नवरा यशवंतराव लवकरच मरण पावला ( म. रि म. वि. २, पृ. ३००-२१ )

**अंबिकाबाई भोसले**– रुस्तुमराय जाधवाची कन्या व छत्रपती शाहूची पत्नी. शाहू तुरुंगांत असतां हिचें लग्न औरंगजेबानें शाहूशीं मोठ्या थाटानें करून दिलें. ही गोष्ट स. १६९९ मध्यें झाली ( म. रि. म. वि. २. पृ. १७८ ).

**अंबिकाबाई महाडिक**–ही शिवाजीची मुलगी होती. हिच्या आईचें नांव सईबाई असून तिची ही तिसरी मुलगी. ही हरजीराजे महाडिक तारळेकर यांस दिली. महाराजांनीं हरजीराजे यांस जिंजी प्रान्तांत जहागिरी देऊन त्या प्रान्ताची सुभेदारीहि त्यांजकडे सोंपविली होती ( शिवाजीनिबंधावली १, पृ. २२५ ).

**अंबिगळ चौडय्य**—( स. ११६० ) कानडी लिंगायत कवि. कानडींत याचीं तात्त्विक वचनें फार प्रसिद्ध आहेत.

**अंबुदास ( संन्यासी )**—यानें मराठींत कांहीं पदें केलीं आहेत. याचें भक्तिज्ञान-वैराग्यनिरूपण नांवाचें एक प्रकरण उपलब्ध आहे ( सं. सू ).

**अंबूराव हणमंते**—याचें नांव बाळकृष्ण वासुदेव ऊर्फ अंबूराव हणमंते होतें. याला शाहूमहाराजानें राज्याभिषेकाच्या वेळेस अमात्य ही पदवी दिली ( १२।१।१७०८ ). तेव्हांपासून हा अमात्य होता ( बाळकृष्ण वासुदेव हणमंते पाहा ).

**अंम चालुक्य** ( अम्म )—( स. ९१८–९२५ ) हा चवथ्या विजयादित्याचा वडील मुलगा. याचें नांव विष्णुवर्धन असेंहि होतें. याच्या कारकीर्दींत राजमहेंद्री शहर चालुक्यांनीं जिंकलें. राष्ट्रकूटांबरोबर याच्या आप्तांनीं याच्याविरुद्ध कट केला होता, परंतु सिद्धीस गेला नाहीं.

**२.** ( स. ९४५-९७० ) हा चालुक्यांपैकीं दुसऱ्या भीमाचा धाकटा मुलगा होय. याचें दुसरें नांव सहावा विजयादित्य असें होतें. या वेळीं पांचव्या विजयादित्यापासून चालत आलेला गृहकलह थांबला. कामराज व नायमोंबा यांची मुलगी ती याची राणी होय. हा स. ९४५च्या डिसेंबरच्या पांचव्या तारखेला शुक्रवारीं गादीवर बसला. त्या वेळीं हा बारा वर्षांचा होता.

**अंमंगदेवी**—ही पहिल्या राजेन्द्र चोलाची मुलगी व पहिल्या राजराज पूर्वचालुक्याची पत्नी. हिचा मुलगा राजेन्द्र दुसरा किंवा कुलोत्तुंग चोल पहिला होय.

**अंमाल आचार्य** अथवा **वरदाचार्य**—हा घटिकाशत सुदर्शनाचार्य यांचा मुलगा होय. हा कानेंडचा वैष्णव आचार्य होता. यानें रामानुजांचीं तत्त्वें व दिग्विजय यांसंबंधीं सहा अंकी नाटक लिहिलें. या नाटकाचें नांव यतिराजविजय अथवा वेदांतविलास असें आहे. तसेंच चोलभाण व वसंततिलकभाण अशीं नाटकें यानें लिहिलीं.

**अंलात**—हा एक शक राजा होता. यानें इ. स. च्या सुमारास पाटलिपुत्रावर स्वारी केली व तें शहर ताब्यांत आल्यावर तेथील लोकांची सरसहा कत्तल केली. तसेंच चातुर्वर्ण्याबाहेरचे शक लोक तेथें आणून त्यांची वस्ती केली. शकयवनांच्या स्वाऱ्यांमुळें देशांत जी भीषण परिस्थिति उत्पन्न झाली होती तिचें हृदयद्रावक वर्णन गर्गाचार्यांनीं आपल्या युगपुराणांत येणेंप्रमाणें केलें आहे. 'या दारुण महायुद्धांत राष्ट्रांतील सर्व पुरुष कामास आल्यामुळें स्त्रियांना सर्व कामें करावीं लागलीं. त्यांनीं नांगर धरले व धनुष्यबाण घेऊन शेतांचें रक्षण केलें. जिकडे तिकडे स्त्रिया संघानें राहूं लागल्या. पुरुष इतके दुर्मिळ झाले कीं, एक एक पुरुषाला दहादहा वीसवीस स्त्रिया वरूं लागल्या, जिकडे तिकडे दांभिकपणा पसरून चातुर्वर्ण्य विस्कळित झालें. याच लोकांत दोन वर्षें अवर्षण पडून हजारों लोक मृत्युमुखीं पडले.' गेल्या महायुद्धानंतरचें वर्णन अद्यापि स्मरणांत असल्यानें यांत खोटें मानण्यासारखें कांहीं नाहीं ( गर्गाचार्य पाहा ).

**अंशुवर्धन**—हा नेपाळच्या ठाकुरी वंशांतील पहिला राजा होय. हा शेवटल्या सूर्यवंशी राजाचा जांवई असून फार शूर व विद्वान् होता. यानें शब्दविद्याशास्त्र हा ग्रंथ लिहिला आहे. ह्यूएनत्संग म्हणतो कीं, अंशुवर्धन व अंशुफलो हे एकच आहेत. हा प्रथम श्रीहर्षाचा मांडलिक होता. त्याच्या पश्चात् हा स्वतंत्र झाला ( स. ६४८ ). हा पश्चिम नेपाळचा राजा होता. यानें आपली राजधानी मध्यलखु येथें नेली. यानें एक सात तोट्यांची पाणपोई बांधिली व तीवर एक शिलालेखहि लिहिला.

# आ

**आई आदिपुरुष**—समर्थांचा शिष्य जो देवदास त्यानें या सत्पुरुषाचा आपल्या कवितेंत उल्लेख केला आहे. पंत प्रतिनिधी यांच्या ऐतिहासिक पत्रव्यवहाराच्या शिरोभागीं ' श्री आई आदिपुरुष ' असें नांव आढळतें. यावरून असें वाटतें कीं, पंत प्रतिनिधींच्या वंशांत ' आई आदिपुरुष ' या नांवाचे कोणी सत्पुरुष होऊन गेले असावेत किंवा त्यांच्या वंशांतील कोणी पुरुषानें, त्या नांवाच्या सत्पुरुषापासून उपदेश ग्रहण केला असावा ( महाराष्ट्र कविचरित्र भा. १, पृ. २६४ ).

काशियासी दिधलें लक्षघर । आई आदिपुरुषा दिधला वर
मोरेश्वराचा वाडवार । वाढविला त्वां गोविंदा ॥

( देवदासकृत संतमालिकास्तोत्रांतील ओवी )

श्रीसमर्थांची कविता भाग १ ला ( धुळें ), पृष्ठ २९१ स्फुट ओवी संख्या २४३ मध्यें आई आदिपुरुषाचा उल्लेख आहे.

" आई आदिपुरुष हेंची विचारावें । आपुलें करावें
समाधान ॥ १ ॥

यांच्या शिष्यपरंपरेंतील कांहीं लोकांना देणग्या दिलेल्या आढळतात (सन १७४०). हे शिष्य जालनाजवळील सोमठाणें व गोलटगांव या गांवचे होते ( पे. द. २२. १४२ ). राणोजी शिंदे वगैरेंशींहि या सत्पुरुषाचा संबंध असावा.

**आईनाथ**—उत्तमश्लोक हे वऱ्हाडांत पैनगंगेच्या काठीं आले तेव्हां तेथें आईनाथ महाराज वास्तव्य करीत होते. त्यांच्या साधुत्वाबद्दल शंका घेणाऱ्या कुटाळ लोकांनीं त्यांना मजेखातर एका खोल खड्ड्यांत पुरलें. दोन महिने त्या स्थितींत होते. उत्तमश्लोक त्या मार्गानें चालले असतां भूगर्भांतून आर्तस्वर ऐकूं आला. म्हणून त्यांनीं यांना बाहेर काढलें. आईनाथांनीं यात्रेहून परत येऊन आपली क्रिया करण्यास उत्तमश्लोकांस सांगितलें ( कविचरित्र भा.६, पा. १७१-१७२ ). आई आदिपुरुष व आईनाथ एकच काय ?

**आकतखान खल्जी**–( स. १३०० ) हा अलाउद्दीन खल्जीचा पुतण्या. आकतखानाचा बाप उलूघखान याचें अलाउद्दीनावर फार प्रेम होतें. फीरूझशाह खल्जीचा खून करून दिल्लीचे तख्ताचा अपहार करण्याचे मसलतींत उलूघखानानें जी एकनिष्ठेनें मदत केली ती केली नसती तर अलाउद्दीनाचें सर्व कपटनाटक फसलें असतें. उलूघखानाचें अलाउद्दीनावर असें निस्सीम प्रेम होतें, तरी त्याचा मुलगा आकतखान यास अलाउद्दीनाचा खून करण्याचा मोह झाला. स. १३०० मध्यें रतनभोरचे स्वारींत उलूघखानाचा पराभव झाला. म्हणून त्याचे मदतीस अलाउद्दीन स्वतः निघाला. वाटेंत तिलपतजवळ शिकारीकरितां मुक्काम करून एक दिवस सकाळीं शिकारीवर गेला. त्यास येण्यास उशीर लागला म्हणून आकतखान १०० मोंगल घोडेस्वार बरोबर घेऊन त्याचे शोधास गेला. अलाउद्दीन थोड्याशा लोकांनिशीं एकटाच दूर जंगलांत दृष्टीस पडला. तेव्हां आकतखानास त्याचा वध करण्याचा मोह झाला. त्यानें आपल्या स्वारांस सुलतानावर शरसंधान करण्याचा हुकूम केला. स्वार सर्वच मोंगल असल्यानें त्यांनीं हुकमाप्रमाणें शरसंधान सुरू केलें. अलाउद्दीन चौरंगावर बसलेला होता. हल्ला होतांच तो उठला व चौरंग समोर धरून त्यानें बाण चुकवून स्वतःचें धैर्यानें रक्षण केलें. माणिक नांवाचा त्याचा विश्वासू गुलाम बरोबर होता. त्यानेंहि राजास बाण लागूं नयेत म्हणून त्याजपुढें उभें राहून बाण आपल्या अंगावर घेतले. तरीहि राजाच्या खांद्यास जखम झालीच व तो निश्चेष्ट होऊन जमिनीवर पडला. तेव्हां कांहीं पायदळांतले सैनिक बरोबर होते, ते पुढें झाले व आपल्या तरवारी म्यानांतून काढून राजाचे भोंवतालीं त्याचें रक्षण करण्यास उभे राहिले. ' अलाउद्दीन मेला आहे. ' असा त्यांनीं पुकारा केला. आकतखानानें छावणीकडे धूम ठोकली व छावणींत पोहोंचल्याबरोबर ' आपण अलाउद्दीनास ठार केलें आहे. सर्व सैन्यानें आपण जिंकलेल्या सुलतानपदास मान्यता देऊन राजनिष्ठेची शपथ घ्यावी ' अशी द्वाही फिरविली. त्यानें झटपट दरबारहि भरविला. कांहीं उल्लू सरदारांनीं दरबारांत हजर राहून आकतखानास राजनिष्ठ राहण्याच्या शपथाहि घेतल्या. परंतु आकतखानानें जनानखान्यांत शिरण्याचा प्रयत्न केला, तेव्हां मात्र जनानखान्यावरील संरक्षकांनीं ' अलाउद्दीनाचें शिर प्रत्यक्ष दाखवून अलाउद्दीनाचा वध सिद्ध केल्याशिवाय आपण जनानखान्यांत तुम्हांस जाऊं देणार नाहीं. ' असें म्हणून आकतखानास मज्जाव केला.

छावणींत आकतखानाचा दरबार भरला असतां इकडे अरण्यांत भटकणाऱ्या सैनिकांपैकीं ५०–६० सैनिक राजा मृतवत् पडला होता तेथें जमा झाले. त्यांनीं

अलाउद्दीनाच्या जखमा बांधल्या. अलाउद्दीन हुषार झाल्याबरोबर छावणीकडे जावयास निघाला. वाटेंत त्यास आणखी सैनिक भेटले. नंतर तो एका टेंकडीवर चढून गेला व सैनिकांस राजछत्र उघडून डोक्यावर धरण्याचा त्यानें हुकूम दिला. राजछत्र पाहतांच सैनिक व सरदार भराभर त्याच्या मदतीस धांवून गेले. शेवटीं पाठलाग करून याचा वध करण्यांत आल्यावर याच्या साथीदारांसहि हालहाल करून ठार करण्यांत आलें ( कें. हि. ).

**आक्काबाई**—कऱ्हाडचे रुद्राजीपंत देशपांडे यांची ही कन्या व रामदासस्वामींची शिष्यीण होय. ही बालविधवा होती. हिच्या मनांत पुढें परलोकप्राप्तीचा विचार आला; तेव्हां हिनें पित्याच्या आज्ञेनुसार समर्थांचा उपदेश घेतला, व समर्थांची सेवा करीत राहिली. हिची गुरूवर दृढभक्ति होती. हल्लींची परळी येथील रामदासस्वामींची समाधि व दगडी सभामंडप हें सर्व समर्थांच्या मागें हिनेंच बांधिलें. समर्थांच्या वडील बंधूंच्या मुलांस चाफळास आणून, स्थापून ३६ वर्षें कारभार केला. समर्थांच्या मागून ४० वर्षांनीं हिनें परलोकीची वाट धरली. हिचें वृंदावन सज्जनगडावर आहे. शके १६४३ कार्तिक शुद्ध प्रतिपदेस हिनें देह ठेवला ( मंडळ-षष्ठसंमेलनवृत्त पा. १८९ ).

**ऑक्झिंडेन**—इंग्रजांचा शिवाजीकडील वकील. हा शिवाजीच्या राज्याभिषेकाच्या दिवशीं रायगडावर हजर होता. याचे शिवाजीच्या दरबारांतील प्रत्येक थोर माणसाशीं संबंध आलेले होते. त्यासंबंधाचें यानें बारकाईनें टिपण करून ठेविलें आहे. त्यावरून तत्कालीन परिस्थिति ध्यानांत येते. ' परदेशांतील राजकारणाकडे लक्ष देणारे किंवा परद्वीपस्थ राजांच्या उदयास्तांचा विचार करणारे ह्या देशांत कोणीहि नाहींत ' असें यानें म्हटलें आहे (पत्रसारसंग्रह १६५० ). शिवाजीच्या राज्याभिषेकाचेंहि यानें बारकाईनें वर्णन केलेलें आहे ( पत्रसार सं. १६४३). याचें सबंध नांव हेन्री आक्झिंडेन असें होतें.

**ऑक्टर लोनी** सर डेव्हिड–( स. १७५८–१८२५ ) हा ब्रिटिश सेनापति, बोस्टन येथें स. १७५८ मध्यें जन्मला आणि केडेट म्हणून ( १७७७ त ) हिंदुस्थानांत आला. यानें कोईल, अलीगड आणि दिल्ली येथील लढायांतून लॉर्ड लेकच्या हाताखालीं काम केलें. पुढें स. १८०३ मध्यें दिल्ली येथें याला रेसिडेंट नेमण्यांत आलें. १८१४ मध्यें मेजर जनरल असतांना होळकराच्या हल्ल्यापासून यानें त्या शहराचा मोठ्या शौर्यानें बचाव केला.

पुढें काटमांडूवर चाल करून जाणाऱ्या सर्व सेनेचें आधिपत्य जेव्हां याला देण्यांत आलें तेव्हां यानें मोठ्या हुषारीनें गुरखे लोकांचा पराभव केला व स. १८१६ मध्यें सेगवली येथें तह घडवून आणला. या मर्दुमकीबद्दल याला जी. सी. बी. केलें. हिंदी सैन्यांत हा मान मिळविणारा हा पहिला अधिकारी होय (स.१८१७–१८१८). पुढें याच्याकडे राजपुताना-पथक दिलें होतें. यानें अमीरखानाशीं स्वतंत्र करार करून त्याला इतर पेंढाऱ्यांपासून विभक्त केलें. १८१८ मध्यें राजपुतान्यांत याला रेसिडेंट नेमिलें. जेव्हां दुर्जनसालनें भरतपूरचा बालराजा बलवंतसिंग याच्या विरुद्ध बंडाळी माजविली ( स १८२५ ), तेव्हां यानें स्वतःच्या जबाबदारीवर राजाला मदत करण्याचा सैन्याला हुकूम दिला. त्या वेळचा गव्हर्नर जनरल लॉर्ड ॲम्हर्स्ट याला याचें करणें पसंत पडलें नाहीं. तेव्हां याला अतिशय अपमान वाटून यानें राजीनामा दिला व हा दिल्लीस गेला.

आपल्या इतक्या दिवसांच्या इमानेंइतबारें केलेल्या नोकरीची गव्हर्नर जनरलला कांहींच किंमत वाटूं नये याचा याला खेद होऊन याला लवकर मृत्यु आला असें म्हणतात. १५ जुलै १८२५ रोजीं मिरत येथें याचा अंत झाला. कलकत्ता येथें ऑक्टर लोनीचें स्मारक म्हणून एक स्तंभ उभारिलेला आहे.

**आखो**—हा गुजराथी कवि जातीचा सोनार असून लहानपणापासूनच यास जगाचा वीट आला होता. याचा पहिला गुरु वाल्लभपंथी होता; पण त्याच्याविषयीं संशय येऊन आखोनें काशीस दुसऱ्या गुरूपाशीं वेदाचें अध्ययन केलें.

चित्तविचारसंवाद, आखोगीता, गुरुशिष्यसंवाद वगैरे याचे ग्रंथ होत. वेदान्ताच्या अभ्यासामुळें याच्या काव्यांत भरपूर वेदान्त भरलेला आहे. आखो हा जरी विद्वान् अगर भाषातज्ज्ञ नसला तरी योग्य वेळीं व योग्य स्थळीं शाब्दिक कोरडे ओढण्यांत याचा हात धरणारा कोणी नव्हता.

हा स्वतःला कवि मानीत नसे. तर लोकांनीं आपणास तत्त्वज्ञ अगर ज्ञानी म्हणावें असें यांस वाटे. याची उपमा व रूपकें योग्य व समर्पक आहेत. यानें काव्यास निराळें वळण देण्याचा प्रयत्न केला व तो बऱ्याच अंशीं सिद्धीसहि गेला.

**आगाखान**—( स. १८००-१८८१ ) हसनअल्ली शाहा ( जन्म इराणांत १८०० त ) याला, जेव्हां तो मुंबईस ब्रिटिश राज्याच्या आश्रयाला प्रथम येऊन राहिला त्या वेळीं " हिज हायनेस आगाखान " ही पदवी देण्यांत आली. त्याचा पूर्वज अली-मुहंमद पैगंबराचा जामात–होता, असें मानितात. अलीचा मुलगा हुसेन यानें इराणच्या एका राजकन्येशीं लग्न लाविलें होतें. तेव्हां अर्थातच आगाखानानें आपला संबंध इतिहासपूर्व काळांतील इराणच्या राजघराण्याशीं जोडला. शिवाय याच्या पूर्वजांनीं, ख्रिस्ती

धर्मयुद्ध चालू असतां बेनिफतिमी लोकांचे खलीफ म्हणून अनेक वर्षे इजिप्तमध्यें राज्य केलें होतें. इराण सोडण्यापूर्वी बादशाह फत्तेअलाशाहानें आगाखानाला कर्मान या मोठ्या व महत्त्वाच्या प्रांताचा सुभेदार नेमिलें होतें. याची तेथील कारकीर्द, चिकाटी, नियमितपणा आणि उच्च राजकीय धोरण या दृष्टीनें वाखाणण्याजोगी म्हणतां येईल. याच्या प्रतिस्पर्ध्यांनीं व शाहाच्या मर्जीतल्या लोकांनीं आंतून कारस्थानें चालवून देशांत अंतःक्षोभ उत्पन्न केला होता. तरी पुष्कळ दिवसपर्यंत यानें शाहाचा स्नेह व प्रीति संपादन केली होती. सरतेशेवटीं याच्यावरची शाहाची मर्जी अजिबात खप्पा होऊन, स्वसंरक्षणासाठीं ब्रिटिश हद्दींत याला पळून जावें लागलें. राहावयास हिंदुस्थान पसंत करून यानें मुंबईला आपलें ठाणें दिलें. त्या वेळीं पहिलें अफगाणयुद्ध जोरांत होतें. तेव्हां इराणहून अफगाणिस्थानांतून इकडे येतांना, ब्रिटिश सैन्याला उत्तम प्रकारची मदत करण्यास याला आयतीच संधी मिळाली व अशा रीतीनें आपलें दैव यानें ब्रिटिशांच्या हातीं दिलें. नंतर कांहीं वर्षांनीं सिंधच्या मोहिमेंत हा असाच ब्रिटिशांच्या चांगला उपयोगी पडला. त्या वेळीं सरहद्दीवरच्या जातींतील अनेकांचा हा गुरु असल्यानें नेपियरनें या जातींचा बंदोबस्त करण्याकरितां आगाखानाची नेमणूक केली. या आपल्या मुसलमान स्नेह्याची नेपियर फार वाहवा करी व शौर्य आणि मुत्सद्दीगिरी या गुणांविषयीं तो याला फार मान देई. उलट आगाखानानेंहि ब्रिटिश सरकारशीं एकनिष्ठ राहून नेपियरच्या स्नेहास व विश्वासास आपली पात्रता दर्शविली. हा जेव्हां हिंदुस्थानांत कायम राहूं लागला तेव्हां सरकारनें मोठ्या इस्मायली संप्रदायाचा हा वरिष्ठ पुढारी असें कबूल करून, " हिज हायनेस " ही पदवी व मोठें पेन्शन याला बहाल केलें. त्या वेळेपासून तों हा मरेपर्यंत ( स. १८८१ ) आगाखानानें ब्रिटिशांच्या छत्राखालीं मोठ्या शांततेनें काळ कंठिला व त्याचप्रमाणें आपल्या अनुयायांचीं धर्मकृत्यें पार पाडिलीं. याची धार्मिक सत्ता मानणारे लोक केवळ हिंदुस्थानांतच नव्हे तर अफगाणिस्तान, खोरासान, इराण, अरबस्तान, मध्य आशिया, सीरिया, मोरोक्को वगैरे देशांत पुष्कळ आहेत. हा शेवटपर्यंत ब्रिटिश राज्याशीं पूर्णपणें एकनिष्ठ राहिला, व सरहद्दीवरील जातींवर याचा मोठा वचक असल्यानें वायव्य सरहद्दीवरच्या ब्रिटिशांच्या मोहिमांना याचें अमूल्य साहाय्य मिळालें. हिंदुस्थानांत देखील मुसलमान लोक जेव्हां धार्मिक किंवा राजकीय स्वरूपाचे दंगे करीत तेव्हां त्यांना शांत करण्याचे कामीं याचा उपयोग होत असे.

याच्या मृत्यूनंतर याचा वडील मुलगा आगाखान दुसरा याच्या अधिकारावर आला. त्यानें आपल्या वडिलांचा कित्ता इतका चांगला गिरविला कीं, स्थानिक सरकारची त्याच्यावर मर्जी बसली व त्याला Knigthood of the Order of the Indian Empire ही मोठी पदवी मिळून मुंबईच्या कायदे कौंसिलांत स्थान मिळालें.

**आग्रदास**—एक हिंदी कवि. हा नाभादासाचा गुरु आणि तुलसीदासाचा समकालीन होता. याचें गांव जयपूर राज्यांतील गलता. हा वल्लभाचार्याच्या अष्टछापांतील श्री. कृष्णदासजी पयहरीचा शिष्य. तथापि हा रामभक्तिपूर्ण भजन करीत असे. याचे चार ग्रंथ मिळाले आहेत. हितोपदेश, उणखाणा बावनी, ध्यानमंजरी ( रामध्यानमंजरी ) व कुंडलिया हे ते ग्रंथ होत (हिंदीशब्दसागर प्रस्ता. पा.९९).

**आच किंवा आचग**–हा दुसऱ्या विक्रमादित्य चालुक्याचा मांडलिक. याचें राज्य दक्षिणेकडे होतें. हा शूर होता ( भांडार. भा. ३, पृ. १२० ).

**आचवल**–( मनभट उपाध्ये पाहा ).

**आचण्ण**–(स. ११९५ ) कानडी जैन कवि. गोत्र-भारद्वाज. पिता-केशवराज. माता-मल्लांबिके. ग्रंथ-वर्धमानपुराण; श्रीपदाशीति. गुरु–नंदीयोगीश्वर. याचें गांव-पुलिगेरे म्हणजे हल्लींचें लक्ष्मेश्वर. याचा पिता केशवराज यानें रेवण चमूपाच्या सांगण्यावरून वर्धमानपुराण लिहावयास आरंभ केला. पण तें त्याच्या हातून पुरें न झाल्यामुळें यानें तें पुरें केलें. रेवण चमूप हा प्रथम कळचुरी राजाचा मंत्री होऊन नंतर होयसळ वीर बल्लाळाचा ( स. ११७३-१२२० ) मंत्री झाला, असें शिलालेखावरून समजतें ( अरसीकेरे नं ७७; क. क. च. भा. १, पा. ३०० ).

**आचुगि** ( दुसरा )—हा सिंध घराण्यांतील एक राजा होय. यानें पश्चिम चालुक्य घराण्यांतील सार्वभौम राजा विक्रमादित्य ( साहवा ) याच्या आज्ञेवरून होयसळ बल्लाळ राजाबरोबर युद्ध केलें आणि जय मिळवून गोवें घेतलें. यानें पांड्यराजास पळवून लावलें. पश्चिम घाटांतील मलय लोकांचा मोड करून कोंकण घेतलें. यानें गोवें व उप्पिनकट्टि ( उप्पिनगट्टी-दक्षिण कानडा ) हीं शहरें जाळलीं. याचा काल स. ११२२ हा होय.

**आच्चा दीक्षित**—अप्पय्य दीक्षितांचा धाकटा बंधु. याचा नातू नीलकंठ. नीलकंठानें नीलकंठविजय नांवाचा संस्कृत भाषेंत ग्रंथ स. १६३७-३८ मध्यें लिहिला ( साहित्यशास्त्राचा इतिहास, पा. २५२ ).

**आजमखान**–( इरादतखान पाहा ).

**आझीम**–घाझीचें नामान्तर.

**आण्णा पिलीवकर**—अक्कलकोटच्या जहागिरींत पिलीव नांवाचा गांव सोलापूर जिल्ह्यांत आहे. आण्णा हा तेथचा ग्रामजोशी होय. हा पेशवाईच्या अखेरीस होता. हा संस्कृत व प्राकृत कविता चांगल्या करी. अक्कलकोटकराच्या फौजेबरोबर हा खडर्याच्या लढाईंत गेला होता. ह्यानें त्या लढाईवर उत्तम कविता केली आहे, असें म्हणतात. ती कविता पाहून सवाई माधवरावांनीं यास मोठें बक्षिस दिलें होतें. राजेरजवाडे व सरदार ह्यांच्या प्रशंसापर कविता करून त्यावर द्रव्य मिळवून हा आपला निर्वाह चालवी. यानें परशरामभाऊ पटवर्धनावर खालीलप्रमाणें कविता केली आहे:—

ज्यानें स्वराज्यपट विस्तृत फार केला।
शोभे म्हणून पटवर्धन नाम त्याला॥
त्याच्या पुढें गमति येरहि शूर माते।
साळी बहू किरिति ते पटवर्धनातें॥ १॥

(भा. व. खं. ३, जु. ऐ. गो. पृ. १८)

**आतिश**-याचें नांव ख्वाजा हैदर अली असें असून आतिश हें उपनांव आहे. हा लखनौंचा राहणारा असून याच्या बापाचें नांव ख्वाजा अलीबक्ष होतें. याचा जन्म लखनौं येथें झाला. याला पद्यरचनेचा नाद असून यानें शाहीरी पेशा पत्करला. हा मसहफींचा शिष्य. हा सरळ, साधा आणि भोळा होता. याला लखनौं दरबारांतून दरमहा ८० रुपये मिळत. त्यांपैकीं १५ रुपये स्वतःकरितां ठेवून बाकीचे हा गोरगरीबांना वांटी. हा स्वतंत्र वृत्तीचा असे. नासिख आणि हा समकालीन होता. प्रसिद्ध 'गुलजार नसीम' या पुस्तकाचा कर्ता दयाशंकर हा याचा शिष्य होता. याचा दीवान (कवितासंग्रह) प्रसिद्ध आहे. याला गजल व महफिलो यांचा नाद होता. याची जोरदार उर्दू भाषा हा लखनौंचा एक नमुना होय. मृत्यु स. १८४४ (क. कौ. भा. ४).

**आत्मवास**—आनंदबोधमतीचा गुरु.

**आत्मानंद**—यानें 'अस्यवामीय' (ऋ. १. १६४) सूक्तावर भाष्य लिहिलें आहे. हा सायणाच्या पूर्वीच्या स्कंद, उद्गीथ, भास्कर या भाष्यकारांचा निर्देश करतो. पण सायणाचा निर्देश करीत नाहीं. त्या अर्थी हा सायणाच्या पूर्वीचा असावा. यानें लिहिलें आहे कीं, स्कन्दादिकांचें भाष्य अधियज्ञविषयक आहे. निरुक्त अधिदेवविषयक आहे. पण माझें भाष्य अध्यात्मविषयक आहे. याचा शाकपूर्णीच्या निरुक्ताशीं विशेष परिचय होता असें दिसतें.

**आत्माराम**-हा एक गुजराथी ब्राह्मण. गुजराथ भाषेंतील कवि होता. रामवनवासवर्णन यानें फार उत्कृष्ट केलें आहे (काव्य. दो.).

२. जयकृष्णभट्टाचा मुलगा. कर्काच्या कात्यायनश्रौतसूत्र-भाष्यावर यानें भावविबोधिनी नांवाची टीका लिहिली आहे (सी. सी.).

३. याशिवाय कामंदकीय वगैरे टीकाग्रंथ लिहिणारा आणखी एक आत्माराम झालेला आहे (सी. सी.)

४. एक मराठी कवि. याचा अपरोक्षानुभूति हा ग्रंथ, कांहीं पदें व लावण्या प्रसिद्ध आहेत (सं. सू.).

**आत्माराम तांबोळी**—दुसरे बाजीरावाचा एक सरदार. यानें परशुराम श्रीनिवास उर्फ थोटेपंत यांस पकडण्याची कामगिरी केली (ता. ५-७-१८००).

**आत्माराम पांडे**—तुळसीदासाचा पिता.

**आत्मारामबुवा चरेगांवकर**-एक रामदासी. यानें संतविजय व हनुमंतस्वामींची बखर यांच्या आधारें शके १७८९ (स. १८६७) च्या सुमारास समर्थांचें ओवीबद्ध चरित्र लिहिलें.

**आत्मारामामहाराज एकेहाळीकर**—यानें श्रीदासविश्रामधाम नांवाचा १६३०२ ओव्यांचा प्रचंड समर्थचरित्रग्रंथ शके १७०० ते १७३८ चे सुमारास निर्माण केला असें आंतील उल्लेखावरून दिसतें (पृ. ९७०). हे समर्थांपासून (कल्याण, शिवराम, रामचंद्र, आत्माराम) पांचव्या पिढीचे शिष्य होत. हा ग्रंथ ऐतिहासिक म्हणण्यापेक्षां पौराणिक स्वरूपाचा आहे. याशिवाय आत्महित, अक्षरमालिका, क्रमसार हे यांचे ग्रंथ असल्याचें सं. क. का. सूचींत दिलें आहे. या प्रचंड ग्रंथाला रामदासी 'सांप्रदायाचा विश्वकोश' अशा शब्दांनीं प्रस्तावनेंत श्री. शं. श्रीं. देवांनीं गौरविलें आहे.

**आत्माराम शिवराम बाकडे**-हा दौलतराव शिंद्याचा वकील होता (ऐ. प. ३६८). यास यशवंतराव होळकरानें रघूजीचें मन वळविण्यासाठीं नागपुरास पाठविलें (ऐ. प. ३९६). याचा व बाजीरावाचा झालेला पत्रव्यवहार उपलब्ध आहे. यास तीन मुलगे असून त्यांचीं नांवें अनुक्रमें चिंतो, कृष्ण व शिवराम अशीं होतीं. आसईच्या लढाईंत याचा बराच उपयोग झाला (म. रि. उ. वि. ३, पृ. २६७-३०६).

**आत्मारामस्वामी शिंदखेडकर**— हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होता. हा पूर्वाश्रमीं चाळीसगांवीं राहत होता. यानें आपल्या वृद्धावस्थेंत श्रीनिर्मलानंद परमहंस स्वामीपासून संन्यासदीक्षा घेतली व आनंदसांप्रदाया-

प्रमाणें आपला मठ सिद्धपूर—ज्यास हल्लीं शिरपूर ( वाशीम तालुका ) असें म्हणतात, तेथें स्थापन केला.

श्रीसमर्थ रामदास, तुकाराम प्रभृति साधुवृंद ज्या वेळीं दक्षिणेंत उदयास येऊन आपले सामर्थ्यानें हिंदुधर्माचें रक्षण करीत होते त्या वेळीं म्हणजे शके १६०० चे सुमारास हा आत्माराम खानदेश व वऱ्हाड येथें उदयास येऊन वऱ्हाडांतील वाशिमाजवळील शिरपूर येथें राहत असे. यानें आपल्या अलौकिक सामर्थ्यानें आनंदसांप्रदाय प्रसिद्ध करून पुष्कळ लोकांस स्वधर्माचरणाकडे वळविलें, आणि योगबळानें व भक्तिबळानें हिंदुमुसलमानांत ऐक्य करून जातिभेदभाव मोडून श्रीशाहादत्ताचे चरणीं भक्तजनांस तल्लीन करून सोडलें. आणि औरंगजेब बादशहास आपल्या शिष्याकडून शुद्धीवर आणवून देवगड—ज्यास दौलताबाद म्हणतात—तेथें राहण्यास सांगितलें, व त्या औरंगजेबाला त्यानें अल्ला व आलम एकरूप आहे असें सिद्ध करून दाखविलें. ह्या आत्माराम परमहंसांनीं हिंदुधर्मावर महदुपकार करून ठेविला. तो हा कीं, हजारों हिंदु यवनधर्माचे दीक्षेपासून वांचविले ( सदानंद पाहा ).

यानें श्रीमाहूर येथें अत्युग्र तपश्चर्या केली. त्या वेळीं श्रीदत्तात्रय प्रभु कृपाळू होऊन याला त्यांनीं प्रत्यक्ष दर्शन दिलें. नंतर हा निर्मलानंदस्वामींकडे गेला. निर्मलानंदांनीं यास उपदेश देऊन आत्मवत् केलें. यापुढें हा स्वच्छंदगामी बालोन्मत्त अवस्थेंत शिरपुरास राहत असे. याचें नित्याचें भिक्षाटन वगैरे बालोन्मत्तावस्थेंतच चालत असे. असे कित्येक दिवस चालल्यानंतर श्रीआत्मारामस्वामी सिद्धपुराहून निघून धरणगांवास आले. नंतर चोपडें येथें यानें सदाशिव धर्माधिकारी यांस पूर्ण वैराग्याच्या कसोटीस लाविलें व पुढें संन्यासदीक्षा देऊन आत्मवत् केलें. तेव्हांपासून सदाशिव धर्माधिकारी हे सदानंद परमहंस या नांवानें प्रसिद्धीस आले.

आत्माराम परमहंस यानें नाना लोकोत्तर चमत्कार लोकांना दाखवून त्यांना भक्तिमार्गास व योगमार्गास लाविलें. यानें केलेले पुष्कळ ग्रंथ आहेत. त्यांतील कांहीं ग्रंथांची माहिती येणेंप्रमाणें:—आत्मबोध, उत्तर अजपा, चतुर्दश चक्रावली, परज्ञानसागर, महार्णव चित्प्रकाश, नीलांबर शास्त्र, जंगमाकरितां श्रीरंगपट्टण येथें आत्मारामस्वामींनीं केलेले टीकेसह निलांबरी आहे. याशिवाय कानडी, तेलगू, फार्सी, खानदेशी, वऱ्हाडी, गोंडी वगैरे भाषांत यांची स्फुट कविता पुष्कळ आहे. वचनसमुद्र (सं.), अनील पुराणज्ञान ( सं. ), खेचरीमुद्रा त्रिविध प्रकार, वेदवच ( सं. ), देहचतुष्टय ( सं. ), मुसलमानांचे निमाज (प्रा.), मन, स्वरूप, जीव, शिव, निर्वाणगीता—तत्वसार, योगशास्त्र—आदि व सांप्रदायग्रंथ आहेत.

स्वामींचा समाधिकाल शके १६५३ चे सुमारास असावा असें वाटतें. कारण श्रीआनंदसार हा ग्रंथ श्री. आत्मारामस्वामींचेच समक्ष शके १६५१ त यांच्याच सान्निध्यांत झाल्याचें श्रीमत्परमहंस सदानंदस्वामी लिहीत आहेत. माघ शु० १५ दोन प्रहरीं सर्व देवतांसमक्ष श्रीमत्परमहंस आत्मारामस्वामी समाधींत जाऊन बसले. त्या वेळीं श्रीशाहादत्तानें प्रत्यक्ष मलंगवेषानें येऊन स्वामीस समाधि दिली. आणि वर बांधून घेण्यास आज्ञा दिली. त्याप्रमाणें समाधि बांधून घेतली. त्या वेळीं स्वरूपज्ञान राऊळासच झालें. श्रीदत्तमहाराजांचें आगमन यास कळलें व यानेंच श्रींची प्रार्थना केली कीं, आपणहि तेथें वास करावा. ती विनंति प्रभूनें मान्य केल्यावर तेथें औदुंबर वृक्ष उत्पन्न झाला. हा सर्व विद्यापारंगत असल्याचें याच्या ग्रंथांवरून दिसून येतें. सिद्धपुरास बुद्धमतानुयायी आणि जंगमानुयायी तसेंच वेदमतानुयायी, या सर्वांस याच्या संबंधानें सारखाच आपलेपणा वाटत असे. आणि प्रत्येकाचें आपापलेपरी उत्तम प्रकारें समाधान करून ज्यावर अनुग्रह करणें योग्य दिसेल त्यास अनुग्रह करून हा कृतार्थ करीत असे ( महाराष्ट्र कविचरित्र, भा. ४ पृ. ६५-८४ ).

**आत्रेय व्यंकट**—संस्कृत भाषेंतील उत्तरचंपू ग्रंथाचा कर्ता.

**आदन**—चेरापैकीं राजा.

**आदमखान**—काश्मीरच्या मुसलमानी वंशांतील जो शाहीखान झैन-उल आबिदीन त्याचा हा एक पुत्र होय. याचाच मुलगा फथशाह हा होय.

**आदमल्ल**—वैद्यकांतील शार्ङ्गधर ग्रंथाचा टीकाकार.

**आदित्य चोल**—( स. ८८०-९०७ ) विजयालय चोलराजाचा पुत्र. याला राजकेसरीवर्मा ही पदवी होती. यानें पुष्कळ प्रान्त काबीज केले. अपराजित पल्लव व कोंगूराज यांचा यानें पराभव केला. आपली सरहद्द राष्ट्रकूटांच्या सरहद्दीशीं भिडवली. परान्तक पहिला हा याचा पुत्र होय. चेरराजा स्थाणुरवीशीं याची मैत्री होती.

हा धार्मिक राजा होता. कालहस्तीजवळील तोंडमनाड येथील शिलालेखावरून असें दिसतें कीं, ह्या राजाच्या मृत्यूनंतर याच्या दहनाचे जागीं याचें देऊळ बांधिलें व हा मरणानंतर लोकांच्याकडून पूजिला जात होता. तोंड्इमान आररूर हें याचें मृत्युस्थान होय. याचें एक देऊळ नॉर्थ आरकॉट प्रांतांत मेलपांडी येथें होतें.

तोंडमनाड व तोंडइमान एकच. हा स. ८६१ मध्यें गादीवर आला असें एपी. इंडिकामध्यें उल्लेखिलेलें आहे ( व्हा. १९ पा. ८१-८७ ).

२. (स. ९६५-६९) हा दुसऱ्या परान्तकाचा पुत्र. याला करिकाल राजकेसरी असेंहि म्हणत. यानें पल्लव व पांड्य राजांचा पराभव केला होता. याच्या मागें याचा चुलत चुलता परकेसरीवर्मन् मधुरान्तक उत्तम हा स. ९६९ मध्यें राजा झाला व याला पदच्युत केलें.

**आदित्यदास**—वराहमिहिराचा पिता.

**आदित्यदेव**—( संगय्या पाहा ).

**आदित्य यादव**—( स. १४६१ ) त्रावणकोर येथें राज्य करणारा यदुवंशांतील एक राजा. हा मोठा गुणी असून यानें आपल्या पराक्रमानें केरळाला विभूषित केलें, अशी माहिती हिस्ट्री ऑफ केरळवरून मिळते.

**आदित्यवर्धन**—वैसवंशी रजपुतांपैकीं राज्यवर्धनाला अप्सरादेवीपासून झालेला पुत्र. याच्या पत्नीचें नांव महासेनगुप्ता. यास प्रभाकरवर्धन नांवाचा पुत्र झाला. महासेनगुप्ता ही माळव्याच्या गुप्तवंशापैकीं होती.

**आदित्यवर्मन् कदंब**—हा बनवासी येथील कादंब घराण्यांतील पहिल्या कीर्तिवर्म्याचा पुत्र होय.

**आदित्यवर्मन् चालुक्य**—हा चालुक्यांपैकीं दुसऱ्या पुलकेशीचा मुलगा. फ्लीटच्या मतें हा वडील मुलगा होय. हा कृष्णा आणि तुंगभद्रा यांच्यामधील प्रांतावर राज्य करीत असे. याचा एक ताम्रपट कर्नुल प्रांतांत सांपडला असून त्यांत याच्या देणगीचें वर्णन आहे (इंडि. अँटि. १०. २४४; ११.६६). मिरज शिलालेखांतहि याचा उलेख आहे

**आदित्यवर्मन्पल्लव**—हा पल्लवांपैकीं एक. हा गादीवर आला नव्हता.

**आदित्यवर्मन् मौखरी**—( स. ५००-५२५ ) हा हरिवर्म्यानंतर गादीवर आला. याची पत्नी हर्षगुप्ता होय. याचा समकालीन गुप्तांपैकीं हर्षगुप्त होय. याला आदित्यसेन असेंहि म्हणत असावेत ( मध्ययुगीन भारत भा. १ पा. १६ ). याचा शिलालेख मध्ययुगीन भारतांत छापलेला आहे ( भा. १ पृ. २६२ ).

**आदित्यसेन गुप्त**--(स. ६५५-६९०) कुमारगुप्तानंतर जे ११ राजे झाले त्यांत हा विशेष प्रख्यात आहे. यानें पुनः एकवार स्वतंत्र राज्य स्थापून अश्वमेधयज्ञ केला. याच्या बापाचें नांव माधवगुप्त असें होतें. याच्या पत्नीचें नांव कोणदेवी.

**आदित्यसेन मौखरी**-(आदित्यवर्मन् मौखरी पाहा).

**आदिनाथ**—नवनाथांपैकीं एक. नेवासें गांवच्या जवळील मर्मरगिरींत आदिनाथाचें स्थान आहे. त्यास म्हातारदेव किंवा वृद्धेश्वर असें म्हणतात. याच्या आसपास ज्ञानराजाच्या परंपरेंतील मत्स्येंद्रनाथ, गोरक्षनाथ व गहिनीनाथ यांच्या समाधि आहेत.

२. ( ऋषभदेव पाहा ).

**आदिनारायण**--एक वैदिक व गवई ब्राह्मण. शक १६०० च्या सुमाराची याची संस्कृत व प्राकृत पदें आहे ( सं. सू. ).

**आदिलखान फारुकी**—( स. १४३७) हा नासीरखान फारुकीचा मुलगा.

२. ( स. १४५७-१५०३ ) हा मुबारकखानाचा मुलगा होय. खानदेशांतील फारुकी राजांपैकीं हा एक राजा होय. हा या घराण्यांतील मिरान मुबारिक याच्यामागून गादीवर आला.

यानें ४६ वर्षांच्या राजवटींत आपलें राज्य भरभराटीस व मजबुतीस आणलें. यानें गोंडवन व गढामंडळ ( गढा म्हणजे हल्लींचें जबलपूर ) येथील राजांना आपलें मांडलिक बनवून भिल्ल व कोळी या वाटमाऱ्यांचा बंदोबस्त केला. यानें अशीरगडची जास्त बळकटी केली, मलेगड बांधला, बऱ्हाणपुरास बरेच राजवाडे बांधले व शाह-इ-झरकुंड ( जंगली शहा ) ही पदवी घेतली. याचें थडगें बऱ्हानपुरास दौलतमैदानजवळील राजवाड्यानजीक आहे.

३. ( स. १५११-१५२० ) खानदेशांतील फारुकी राजांपैकीं दाऊदखानाचा मुलगा.

हा व याचा भाऊ आलम या दोन भावांत भांडणें लागलीं. आलमला निजामशाहाचें व याला गुजराथच्या मुहंमद बेगड्याचें पाठबळ होतें. बेगड्यानें आपली नात याला देऊन व पैशाची आणि सैन्याची मदत करून याला गादीवर बसविलें. राज्यांत स्वतःच्या विरुद्ध अनेक कट झाले असतां, व गुजराथच्या राजानेंहि त्रास दिला असतां आदिलनें आपली सत्ता बळकट करून दहा वर्षे राज्य केलें. हा हसन (मु. रियासतींत) किंवा अहसनखान ( केंब्रिज हि. मध्यें ) याचा मुलगा होय, असे उल्लेख मु. रियासत व केंब्रिज हि. मध्यें आले आहेत.

याचेंच नांव आलमखान होतें, असें केंब्रिज हि. मधील वंशावळीवरून दिसतें. गुजराथचा सुलतान दुसऱ्या मुज्फरशाहाचा हा जांवई होता. म्हणून याचा मुलगा मुहंमद बहादुरशाहानंतर गुजराथच्या गादीवर आला.

४. खानदेशच्या फारुकी घराण्यांतील दुसऱ्या मुबारकशाहाचा मुलगा. याला मुहंमदशाहा २ रा या नांवाचा एक भाऊ होता. याचाच मुलगा बहादूरशाह हा होय ( कें. हि. ). यालाच मु. रिसायतीमध्यें राजा अली असें म्हटलें असावें.

# आदिलशाही घराणें–( विजापूरचें )




१ गादीवर आलेल्यांच्या मागें आंकडे घातले आहेत.

**आदिलखान सूर**—हा फरीदखान उर्फ शीरशाहाचा मुलगा. त्यानंतर वडील म्हणून हाच गादीवर यावयाचा, पण धाकटा भाऊ जलालखान हा लोकप्रिय असल्यानें त्यासच राज्य मिळालें ( स. १५७७-७८ ).

**आदिवराह**—भोजदेव ऊर्फ मिहिर याचें एक नांव.

**अदिलराय ( दलवई )**--विजयनगरच्या आरविदु घराण्यांतील दुसऱ्या वेंकटपति देवरायाचा हा सेनापति. जेव्हां लिंगमा नायक ( वेलोरचा ) यानें बंड केलें तेव्हां राजानें याला लिंगमाचा मोड करण्याकरितां पाठविलें. शेवटीं याला ओबरायाचें वर्चस्व सहन न होऊन यानें आपला एक पक्ष पाडला व अशा रीतीनें विजयनगरच्या राज्यांत दुही पडली.

**आधमखान**—हा हुमायूनचा दासीपुत्र असून याच्या आईचें नांव माहूम अनग असें होतें. माहूम ही अकबराच्या दायांपैकीं एक होती. अकबर राज्यावर येईपर्यंत त्याचें दायीत्व माहूमकडे होतें. आधमखानानें आपल्या नांवा-प्रमाणेंच अधमपणाचीं कृत्यें केलीं. पांच हजार सैनिकांचा हा अधिकारी होता. रूपमतीचा प्रियकर जो माळव्याचा बाज बहादूर त्याचा यानें पराभव केला.

बाजबहादुराची अत्यंत रूपवती रजपूत जातीची स्त्री याच्या हातीं लागली होती. तिनें याच्याशीं लग्न करण्या-पेक्षां मृत्यु बरा म्हणून आत्महत्या करून घेतली. रूपवतीनें याला भेटण्याची वेळ ठरवून त्या वेळीं तिनें उत्तम पोशाख करून विष ग्रहण केलें. आणि आपल्या अंगावरील वस्त्रानें आपलें तोंड झांकून घेऊन ठरलेल्या जागीं पडून राहिली. ठरलेल्या वेळीं हा येऊन पाहतो तों ती मरून पडल्याचें याच्या दृष्टोत्पत्तीस आलें ( लेनपूल, पा. २४५). बाजबहादूराकडील इतर स्त्रियाहि याच्याकडे होत्या. त्यांस चहाड्या करण्यास सवड सांपडूं नये म्हणून याच्या आईनें त्यांना ठार केलें ( खापीखान, एल्फिस्टन ५०१ टीप ). ही हकीगत अकबराला कळल्यावर त्याला अत्यंत राग आला व याला त्यानें नोकरीवरून दूर केलें. स. १५६२ मध्यें यानें आपला शत्रु जो अतगहखान त्याचा खून केल्यामुळें अकबराच्या हुकुमावरून यास ठार मारण्यांत आलें. याला बकीखान नांवाचा एक भाऊ होता ( बील ).

**आधिकनान**—अव्हेयरच्या तीन भावांतील एक. हा मोठा दैववान् होता. पिरलीनें ( बाप ) यास अरण्यांत सोडल्यावर यास एका राजानें वाढविलें. पुढें मोठा झाल्यावर राजानें यास चांगला आश्रय दिल्यामुळें अनेक विषयांवर तामिळ भाषेत यानें काव्यें लिहिलीं. असें सांग-तात कीं, यानेंहि आपल्या भावाप्रमाणें लग्न मुळींच केलें नव्हतें ( क. च. ).

**आनंद**— गौतमबुद्धाचा चुलत भाऊ. हा गौतमाचा शिष्य झाला होता. हा अत्यंत स्मरणशील आणि गौतमाचा अत्यंत आवडता शिष्य होता. हा खरा भक्त होता. भगवं-ताच्या परिनिर्वाणापर्यंत याला अर्हत्पद मिळालें नाहीं. हा केवळ 'स्रोतआपन्न' होता. तरी भगवंतावर याचें निःसीम प्रेम होतें. कोणच्या वेळीं भगवंताला काय पाहिजे असतें, कोणाची भेट कशी करून द्यावी यांत हा फार कुशल होता. एक तेवढें महापरिनिब्बानसुत्त वाचलें म्हणजे गौतमाच्या सेवेकऱ्यांत याला मोठेपणा कां मिळाला हें सहज समजतें. सर्वांत जास्त पांच सुत्तें याच्या नांवावर आहेत. गौतमाच्या त्रिपिटकांचा संग्रहकार हाच झाला ( बौद्धसंघाचा परिचय, पा. १९४ ). याचें निर्वाण पाटलिपुत्रापासून एक योजना-वर व वैशालीच्या सीमेवर गंगेच्या मध्यावर झालें. यानें आपलें शरीर योगाग्नीनें जाळून घेतलें. याची राख अजात-शत्रु व लिच्छवी यांनीं अर्धी अर्धी वांटून घेतली व त्यावर आपल्या देशांत स्तूप बांधले. हा पुढें बुद्ध होणार आहे. यानेंच स्त्रियांनाहि प्रव्रज्या ( संन्यास ) देण्याविषयीं बुद्धदेवाला प्रार्थना केली होती.

२. एक नैय्यायिक. मंखाच्या काव्याची परीक्षा करण्याकरितां एकत्र झालेल्या तीस पंडितांपैकीं एक.

३. याला आनंद राजानक असेंहि म्हणत. हा कवि काश्मीरांत राहणारा असून शैव होता. यानें मम्मटाच्या काव्यप्रकाशावर काव्यप्रकाशनिदर्शन नामक टीका लिहिली (स. १६६५). याशिवाय नैषधीयटीका हा याचा ग्रंथ आहे (सी. सी. ). परमानंद चक्रवर्ति भट्टाचार्याच्या 'विस्तारिका' टीकेचा निर्देश यानें केला आहे ( वि. वि. पु. २२ अंक १-२ ). याला अनिंदकहि म्हटलेलें आहे.

४. धर्मसंप्रदायदीपक ग्रंथाचा कर्ता.

५. हा एक कवि होता. यानें 'माधवानलकथानकम्' नांवाची एक संस्कृतमध्यें कथा रचिली. हें संस्कृत कथानक कान्हूरास सांपडलें (मं. श. १८३७, वा. इ. ले. १३०).

६. मराठी कवि. सूर्यविजय काव्याचा कर्ता.

**आनंदगिरि**—श्रीमत् शंकराचार्यांचा हा शिष्य होय. यास आनंदबोध असें नामान्तर होतें. यानें 'शंकरविजय' नांवाचा ग्रंथ केला. त्यांच्या देखत घडून आलेल्या सर्वांचें निवेदन यानें केलें आहे. हा बृहस्पतीच्या अंशानें जन्मला होता, असें माधव पंडितानें आपल्या शंकरविजयांत लिहिलें आहे. यानें शंकराचार्यांच्या प्रत्येक भाष्यावर महत्त्वाची टीका लिहिलेली आहे. शतश्लोकीवरील टीकेंत वेदावरील रावण-भाष्य व सायणभाष्य यांतील उतारे आले आहेत. सायण-

भाष्यांतील उतारे सायणभाष्याशीं ताडून पाहतां ते अक्षरशः जुळतात. सायणभाष्यांतील उतारे ज्या अर्थी याच्या भाष्यांत आहेत त्या अर्थी हा सायणानंतरचा असला पाहिजे, किंवा त्या भाष्यांत तो उतारा तरी मागाहून घातला गेला असला पाहिजे. आनंदगिरीचा शंकराचार्यांचें चरित्र लिहिलेला शंकरविजय पाहतां हा शंकराचार्यांचा साक्षात् शिष्य नसून त्यांच्यानंतर बऱ्याच कालानें झालेला असावा.

२. तत्त्वावलोक ग्रंथ करणाऱ्या जनार्दनाचें नामान्तर.

**आनंदतनय**—हा कवि देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. हा कर्नाटकांतील अरणीचा राहणारा. याचें नांव गोपाळपंत असून पित्याचें नांव आनंदराव असें होतें. तथापि आनंदतनय, आनंदनंदन व अरणीचा शिपाई यांपेक्षां अधिक उल्लेख यानें आपल्या स्वतःबद्दल केला नाहीं. याच्या गुरूचें नांव मुरार परब्रह्म.

विजापूर दरबारचे मुत्सद्दी वेदोभास्कर यांना अरणी प्रांत जहागीर मिळाला, तेव्हां त्यांच्याबरोबर याचे वडील तिकडे गेले. वेदोभास्करानें शहाजीला पकडण्याचें काम केलें म्हणून ही जहागीर मिळाली. यानें शेवटीं संन्यास घेतला आणि पुत्राला उपदेश दिला. हे रामोपासक होते. यांचें रामपंचायतन अद्यापि तंजावरच्या वंशजांकडे आहे. आनंदतनय व रघुनाथ पंडित हे व्याही होते अशी आख्यायिका आहे. यांचें भाषेवर चांगलेंच प्रभुत्व असून रचना यमकप्रधान आहे. यांचीं आख्यानें-१ विश्वामित्राभिगमन, २ ताटकावध, ३ विश्वामित्रयज्ञरक्षण, ४ सीतास्वयंवर, ५ शबर्याख्यान, ६ सेतुबंध, ७ बालचरित्र, ८ पूतनावध, ९ कंदुकाख्यान, १० कृष्णचरित्र, ११ गोरसक्रीडा, १२ महाबळचरित्र, १३ नवरसचरित्र, १४ सुदामचरित्र, १५ गणिकोद्धार, १६ उमारमासंवाद, १७ मार्कंडेयाख्यान, १८ शिबिआख्यान, १९ मृगीचरित्र, २० स्फुट सवाया, २१ विषयपंचक व १५६ संस्कृत व हिंदी पदें ( महाराष्ट्र कविचरित्र भा. १, पा. ११४-१३५).

**आनंदतीर्थ**—( मध्वाचार्य पाहा ).

**आनंदनाथ**—हे मूळ कुरोळीचे. यानें कऱ्हाडास जगदंबेची आराधना केली व तेथेंच मठस्थापना केली. समाधिशक १७२५ माघ व।। १२. शिष्य प्रल्हादबाबा. ग्रंथ-भक्तमंजरी ( सं. सू. ).

**आनंदपाल**—( स. १००१-१००९ ) पंजाबांतील शाही घराण्यांतील जयपाळाचा मुलगा. गझनीच्या महमूदानें याच्यावर स्वारी केली, त्या वेळीं दूरदूरचे हिंदु राजे सेना घेऊन याच्या मदतीला आले. इतकेंच नव्हे, तर देशोदेशींचे लोक व स्त्रिया यांनीं या हिंदु राज्याच्या संरक्षणार्थ आपले वस्त्रालंकार विकून याच्याकडे मदतीकरितां संपत्ति पाठविली (ब्रिग, फिरिश्ता भा. १ पृ. ४६; अनंगपाळ पाहा). महामूदाशीं झालेल्या लढाईंत शेवटपर्यंत यास जय होता. परंतु दुर्दैवानें याचा हत्ती बुजून मागें फिरला. हें दृश्य पाहतांच सर्व सैन्यास असें वाटलें कीं, 'आपला राजा लढाईतून पाय काढून पळत सुटला.' तेव्हां तेहि सैरावैरा पळूं लागले. पण महमूदानें त्यांची कत्तल केली. अशा प्रकारें त्या लढाईंत याचा पराभव झाला (लेनपूल पृ.२०).

**आनंदबोधयति**--हा "न्यायमकरंद" ग्रंथाचा कर्ता होय. यानें न्यायदीपावली, प्रमाणमाला, आणि न्यायमकरंद असे तीन ग्रंथ लिहिले असून हा अकराव्या किंवा बाराव्या शतकांत होऊन गेला, असा उल्लेख डॉ. दासगुप्त यांनीं आपल्या हिस्टरी ऑफ इंडियन फिलॉसफी भाग २ रा. पृ. ११६ यामध्यें केला आहे. यानें न्यायदीपावली, व त्यावरील प्रमाणरत्नमाला नांवाची टीका, न्यायमकरंद आणि न्यायापदेशमकरंद, असे ग्रंथ केले ( C. C. ). हा आत्मवासाचा शिष्य असून यानें प्रकाशात्मनाच्या शब्दनिर्णयदीपिका या ग्रंथावर 'न्यायदीपिका' नांवाची टीका स. ११५० सुमारास लिहिली ( Journal of the Andhra Historical Research Society, Vol. V, part 3, p. 188, foot-note). परंतु डॉ. दासगुप्तांनीं प्रकाशात्मनाचा काल स. १२०० असा ठरविला आहे (History of Indian Philosophy, Vol. II, p. 103). आणि प्रकाशात्मनाच्या ग्रंथावर यानें टीका केली, तेव्हां हा स. १२०० नंतर झाला असें निश्चित ठरतें. चंदुपंडितानें आपल्या श्रीहर्षाच्या 'नैषधचरितम्' या ग्रंथावरील टीकेंत आनंदबोधाच्या न्यायमकरन्द ग्रंथांतील कांहीं उतारे घेतले आहेत. चंदुपंडितानें आपली टीका स. १२९७ मध्यें लिहिली (Handiqui: Naisadha-Carita-English Translation 1934, Punjab Ori. Series Intro. p. II) यापूर्वीं हा केव्हांहि झाला असला पाहिजे. यावरून आनंदबोध हा स. १२५०च्या सुमारास झाला असें ठरतें ( The Calcutta Oriental Journal, Vol. II, 1934, p. 137-139).

**आनंदभट्ट जातवेदभट्ट चतुर्वेदी**–याचा गुरु वासुदेवपुरी संन्यासी होय. याच्या शेवटच्या लिहिण्यावरून यानें समग्र काण्वसंहितेवर भाष्य लिहिलेलें दिसतें.

**आनंदमल्ल**—हा नेपाळच्या दुसऱ्या ठाकुरी घराण्यांतील राजा. हा जयदेवमल्लाचा भाऊ.

यानें भक्तपूर किंवा भाटगांव, वेणीपूर, पणौती, नाला, धोमखेल, खड्पू, आणि चौकटशंगा अशीं गांवें वसविलीं.

हा भाटगांव येथें राज्य करीत असे. याच्या व याच्या भावाच्या राज्यांत दक्षिणेंतून कर्नाटक घराण्यांतील नान्यदेव या मूळ पुरुषानें प्रवेश केला (जयदेवमल्ल पाहा). यानें एकंदर २५ वर्षे राज्य केलें.

**आनंदमूर्ति ब्रह्मनाळकर**—( मृत्यु स. १६९६ ) याचें मूळचें नांव अनंत. याचा जन्म आगळगांवीं झाला. याच्या आईबापांचीं नांवें, सावित्री व ब्रह्मदेव असून आडनांव जोशी होतें. हा वशिष्ठ गोत्री असून ऋग्वेदी होता. याच्या आनंदित वृत्तीवरून याचें आनंदमूर्ति असें नांव पडलें. हा नाशिकच्या रघुनाथस्वामींचा शिष्य. त्यांनीं याला स्वतःच्या ब्रह्मनाळ येथें ठेवला, व लोकहि यास मान देऊं लागले. परशुराम त्रिंबक प्रतिनिधींची याच्यावर श्रद्धा होती. हा पुरुष अत्यंत समाधानी होता, व समर्थ रामदासस्वामी यांच्या पंचायतनांत याची गणना होती. याची समाधि शके १६१८ मध्यें कार्तिक शुद्ध १४ चे दिवशीं ब्रह्मनाळींच झाली. याचे ग्रंथ प्रसिद्ध नाहींत, पण पदें आहेत. याची वाणी रसाळ असून हे फार प्रेमळ कीर्तन करीत असत, असें महाराष्ट्रसारस्वतकार लिहितात. याचा पुत्र कृष्णमूर्ति, याचीं पदें प्रसिद्ध आहेत.

**आनंदरंग तिरुवेंगड पिल्ले**-(स. १७०९-१७६१) एक दुभाष्या. याचा जन्म ता. ३० मार्च इ. स. १७०९ रोजीं मद्रासजवळ असलेल्या पेरांबूर नांवाच्या एका लहानशा गांवीं झाला. पूर्वी याचे वडील व्यापार करीत होते, पण लवकरच त्यांना फ्रेंच गव्हर्नरजवळ एतद्देशीय वकील किंवा कोर्टिअरची जागा मिळाली. फ्रेंच गव्हर्नर एम्. लिनो यानें याची जागा कायम केली. तें काम यानें इतकें चांगल्या रीतीनें बजावलें कीं, फ्रेंच गव्हर्नरास याच्या कर्तबगारीबद्दल विशेष आनंद होऊन, त्यानें यास पोर्टोनोव्हो येथील फ्रेंचांच्या वखारीवर मुख्य अंमलदार नेमिलें. तेथें यानें चांगली खटपट करून, फ्रेंच कंपनीकरितां व खाजगी व्यापाराकरितां, निळ्या रंगाचें पुष्कळ कापड तयार करण्याचे कारखाने सुरू केले, आणि स्वतःच्या खर्चानें फ्रेंच कंपनीचा व्यापार वाढविण्यासाठीं लालपेठ व अर्काट एथें नवीन पेठा वसविल्या. त्यामुळें तेथें व्यापाराची विशेष भरभराट होऊन याचें फ्रेंच दरबारीं अतिशय महत्त्व वाढलें. एम्. लिनो याच्या मागून स. १७३५ मध्यें एम्. डूमास या नांवाचा फ्रेंच गव्हर्नर झाला. त्याचेंहि याच्याबद्दल चांगलें मत होऊन त्यानें याची राजकारणांत सल्लामसलत घेण्यास सुरवात केली. याच्या कर्तृत्वशक्तीमुळें फ्रेंचांचा व्यापार एकसारखा वाढत चालला होता.

एम्. डूमासनंतर एम्. डुप्ले याची नेमणूक झाली त्याची व याची पूर्वीपासून चांगलीच ओळख होती. त्यामुळें आतां याचा उत्कर्ष होण्याचा चांगलाच योग आला, व याच्या अंगीं वसत असलेल्या प्रामाणिकपणा व दूरदृष्टि ह्या सद्गुणांमुळें याचें डुप्लेजवळ विशेष वजन वाढलें. त्यानें यास आपल्या दरबारीं मुख्य सल्लामसलतगार नेमून यास लवकरच चीफ दुभाष्याची जागा दिली. पूर्वी ही जागा एका ख्रिश्चनास मिळाली होती, त्यानंतर ती याला देण्यांत आली व तेथें हा कायम झाला. ही जागा इतकी महत्त्वाची होती कीं, यास दक्षिणच्या सुभेदारापासून तों सर्व संस्थानिकांकडून मोठमोठे मानमरातब मिळाले, आणि याची फार वाहवा झाली. हा स. १७५४ पर्यंत—डुप्लेच्या कारकीर्दीची भरभराट संपेपर्यंत—त्या जागेवर होता. त्यानंतर मात्र याची सत्ता व वजन फ्रेंच अधिकाऱ्यांजवळ कमी कमी होऊं लागलें. आणि स. १७५६ मध्यें शरीरप्रकृतीच्या नादुरुस्तीमुळें, फ्रेंच गव्हर्नरानें ( एम्. डी. लेरीट ) यास नोकरीवरून दूर केलें. त्यानंतर फ्रेंच सत्तेचा विलय होत चालला, आणि ता. १६ जानेवारी स. १७६१ रोजीं कर्नल कूटनें पांदेचेरी हस्तगत केली. ह्याच सुमारास हा मृत्यु पावला (१२ जाने. १७६१).

याची ही सर्व माहिती यानें लिहिलेल्या रोजनिशीवरून मिळते. कारण याच्या मनावर जे पाश्चात्य सहवासाचे संस्कार घडले होते त्याच्या योगानें यास आपली रोजनिशी लिहून ठेवण्याची प्रेरणा उत्पन्न झाली असावी. यानें ६ सप्टें. स. १७३६ ते १७६१ पर्यंत कर्नाटकांतील सर्व राजकारणांचे व सर्व लहानथोर घडामोडींचे वृत्तांत आपल्या रोजनिशींत लिहून ठेविले आहेत. इतिहासाच्या दृष्टीनें या रोजनिशा फारच महत्त्वाच्या आहेत.

हा मेल्यानंतर सुमारें एका शतकानंतर याच्या रोजनिशांचा पत्ता लागला. एम्. ग्यालो मॉंट्ब्रुन्, एम्. अरीयल, एम्. व्हीनसन्, एम्. लाड वगैरे निरनिराळ्या फ्रेंच विद्वानांनीं याच्या रोजनिशांच्या निरनिराळ्या नकला व भाषान्तरें करण्याचे बरेच प्रयत्न केले व मूळ प्रत पॅरीस येथील नॅशनल लॉयब्ररींत नेऊन ठेविली. ह्या रोजनिशीमुळें याची ख्याति सर्व यूरोपांत पसरली आहे ( इ. सं. ऐ. च. ४९-५३ ). याची रोजनिशी मूळ तामीळ भाषेंत लिहिली असून तिचें इंग्रजी भाषांतर मद्रास सरकारनें आतां सात भागांत प्रसिद्ध केलें आहे. त्याच्या प्रस्तावनेंत याचें चित्र व चरित्र दिलें आहे. इंग्लंडची सतराव्या शतकांतील सामाजिक व धार्मिक गोष्टींची माहिती पेपी नांवाच्या गृहस्थाच्या डायरीवरून ज्याप्रमाणें कळून येते त्याप्रमाणें

अठराव्या शतकांतील हिंदुस्थानांतील घडामोडी समजण्यास याची डायरी अत्यंत उपयुक्त आहे. यानें लिहिलेल्या रोजनिशीची पुष्कळ मोठमोठ्या लोकांकडून तारीफ झाली.

**आनंदराय मखिन्‌**—हा भारद्वाजकुळांतील नृसिंह किंवा नरसिंह याचा पुत्र असून तंजावरचे राजे शहाजी (स. १६८१-१७११) व शरभोजी (स.१७११-१७२७) यांच्या कारकीर्दींत होऊन गेला. याचें सप्तांकी 'विद्यापरिणय' हें संस्कृत नाटक खरोखरच वेदकवीनें लिहिलें असून तें त्यानें याच्या नांवानें प्रसिद्ध केलें. तंजावरचा राजा शहाजी याच्या एका स.१६९३ सालच्या दानपत्रिकेंत वेदकवीचा उल्लेख असल्यामुळें त्याचा काल निश्चित करतां येतो.

विद्यापरिणय नाटकांत प्राकृत भाग मुळींच नाहीं व विदूषकाचेंहि पात्र नाहीं. हें नाटक शरभोजीच्या कारकीर्दींत लिहिलें असून तें त्यांत उल्लेख केलेल्या प्रबोधचंद्रोदय नाटकाच्या स्वरूपाचें आहे. या नाटकांत शिवभक्ति ही निवृत्तीच्या मदतीनें जीवराजा व विद्या यांचा विवाह घडवून आणण्याकरितां जीवराजा व त्याची पत्नी अविद्या यांच्यामध्यें बिघाड उत्पन्न करते; आणि राजाचा नर्मसचिव चित्तशर्मन्‌ याचीहि तिला मदत असते. जीवानें विद्येचें रूप पाहिल्यापासून त्याच्या ठिकाणीं तिच्याविषयीं आवड उत्पन्न होते. अविद्या ही आपल्या बाजूनें आपले हस्तक, आपलीं पाखंडी मतें, आपले मनोविकार, यांच्या साह्यानें जीवास आपल्या कह्यांत ठेवण्याचा प्रयत्न करते. पण तिचीं सर्व साधनें निरुपयोगी ठरून जीव व विद्या यांच्या विवाहाचा काळ प्राप्त झाला आहे, असें जाहीर होतें.

आनंदरायानें 'जीवनंदन' नांवाचें दुसरें एक सप्तांकी अन्योक्तिरूप नाटक लिहिलें आहे. ज्या अर्थी हें नाटक शहाजी राजाकरितां लिहिलें आहे त्या अर्थी तें आधींचें असावें. त्यांत जीवराज व राजयक्ष्मा यांच्या युद्धाचें वर्णन आहे. त्या राजयक्ष्म्यास निरनिराळ्या व्याधी मदत करतात, परंतु जीवराज व राणी बुद्धि हे आपल्या प्रधानांच्या सल्ल्यावरून शिवाकडे जातात व त्यांच्यापासून रसगंधक व इतर पुष्कळ गुणकारी वनस्पती मिळवितात व त्यायोगानें शत्रूंचा पाडाव करतात. हें युद्ध बरेंच निकराचें होतें व अखेर शिवाच्या मदतीनें राजास योगसिद्धि प्राप्त झाल्यामुळें विजय प्राप्त होतो.

विद्यापरिणय नाटकांत आनंदरावानें व्यंकटनाथ वेदान्ताचार्य कवितार्किकसिंह यानें केलेल्या 'संकल्पसूर्योदय' नाटकाचा उल्लेख केलेला आहे. यावरून हें नाटक आनंदराय याच्यापूर्वी लिहिलें असावें असें दिसतें. हें दशांकी अन्योक्तिरूप नाटक असून त्यांत रामानुजाचीं तत्त्वें प्रतिपादन केलीं आहेत. या नाटकाच्या अनेक हस्तलिखित प्रतींवरून तें बरेंच लोकप्रिय होतें असें दिसून येतें.

**आनंदराव**—स. १८००-१८०८ पर्यंत पुणें दरबारीं असलेला निजामाचा वकील.

**२.** ( हंबीरराव मोहिते पाहा ).

**आनंदराव काशी**—( स. १७७६-१८१८ ) पेशव्यांच्या वेळचा पुणें येथील एक कोतवाल. ता. १६-७-१७७६ रोजीं याची कोतवालीवर नेमणूक झाली. हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण, भारद्वाज गोत्र, आडनांव 'वाचासुंदर' पालीचा जोशी. आबाजी कृष्ण शेलूकराचा व याचा आप्तसंबंध होता.

खर्ड्याच्या लढाईच्या वेळीं आनंदराव कोतवालीवर असून हा व राघोपंत गोडबोले यांच्याकडे मशीरुन्मुल्क याजवर देखरेख ठेवण्याचें काम होतें.मराठ्यांच्या अखेरीपर्यंत हा कामावर होता, असें मंडळाच्या वा. इ. वृ. शके१८३७ ले. १०८ यांत नमूद आहे. म्हणजे दुसऱ्या बाजीरावाचे वेळेस धनी व चाकर एकमेकांस शोभतील असेच होते.

याची वर्तणूक चांगली नसून याच्याबद्दल अनेक तक्रारी पेशव्यांकडे व नानाफडणिसांकडे गेल्या होत्या. त्यावरून पुण्यास खुद्द पेशव्यांच्या राजधानीमध्यें कोतवालाचा जुलूम चालू होता असें आढळून येतें.

"गरती बायका बदकर्माबाबद धरून व ब्राह्मणी व परदेशिणी वगैरे आणतात. त्यासी खुद्द मशारनिले आपलें घरीं नेऊन त्यांजवळ बदकर्मे करितात. याप्रमाणें ज्या बायका सुट्न येतात, त्या लोकांचे घरीं फिरतात कीं, आमची धन्याजवळ दाद लावावी. परंतु कोणी स्वामी कानावर घालीत नाहीं. हल्लीं ब्राह्मण बायका सुटून आल्या आहेत. त्यांचे मनास आणावयाविषयीं परवानगी कीं, मशारबिलेचें बदकर्माची चौकशी करणें"(ऐ.स्फु.ले.भा.३,पृ. ४९-५०).

शहरची कोतवाली म्हणजे वाटेल तसा जुलूम करण्याची व चरण्याची जागा. विशेषतः आनंदराव काशी व घाशीराम या दोघांवरही नानांची मर्जी असल्यामुळें त्यांनीं आपल्या अमदानींत वाटेल तसा हात मारून घेतल्याचे उल्लेख ठिकठिकाणीं आहेत. याच्यानंतर घाशीराम ता. ८-२-१७७७ मध्यें कोतवालीवर नेमला. पण घाशीरामाचा पुढें लवकरच खून होऊन, कोतवालीचे कामावर याची स. १७९१ मध्यें पुनः नेमणूक झाली. १७९१ पासून कोतवालीचें कामावर हा अखेरपर्यंत होता ( म. रि. उत्तर वि. २ रा, पृ. ५००-५०५ ).

**आनंदराव गायकवाड**—( स. १८००-१८१९ ) हा गोविंदराव गायकवाडानंतर बडोद्याच्या गादीवर आला.

पत्नीचें नांव तख्ताबाई असें होतें. गोविंदरावाच्या औरस मुलांमध्यें हा सर्वांत वडील होय. हा स्वतः मंदबुद्धीचा असल्यामुळें संस्थानांत निरनिराळे पक्ष उद्भवून ते आपल्या तंत्रानें कारभार चालविण्यासाठीं धडपड करीत होते. कान्होजी नांवाचा गोविंदरावाचा एक दासीपुत्र होता. त्यानें आपल्या हातीं कारभाराचीं सूत्रें येण्याकरितां बरीच खटपट केली. पण त्याच्या जुलमी कृत्यामुळें त्याला दिवाणाच्या जागेवरून कमी व्हावें लागलें. कान्होजीच्या अत्याचाराबद्दल यानें कान्होजीस अटकेंत ठेवण्याचा हुकूम दिला. कान्होजीनंतर पूर्वीचा दिवाण रावजीअप्पा यास पुनः दिवाणगिरीचा अधिकार प्राप्त झाला.

अशा प्रकारें कान्होजीस कैद केल्यावर कान्होजीची आई गजराबाई ही सुरतेस होती, तिनेंहि कडीचा जहागीरदार खंडेरावाचा मुलगा मल्हारराव यास रावजीअप्पाविरुद्ध उचल करण्यास चिथवलें. मल्हाररावाच्या वतीनें लढणारे लोक आनंदरावाचीं ठाणीं काबीज करूं लागले. तेव्हां रावजीनें इंग्रजांशीं बोलणें लावून मल्हाररावाविरुद्ध आपणांस मदत केल्यास इंग्रजांच्या पांच पलटणी चाकरीस ठेवण्यास आपली तयारी आहे, असें मुंबई सरकारास कळविलें. ही विनंति ऐकून मुंबई सरकारास मोह अनिवार झाला; व गव्हर्नर जनरलकडून परवानगी आली नव्हती तरी त्यांनीं मेजर वॉकर याजबरोबर १६०० लोकांची तुकडी देऊन गायकवाडांच्या मदतीस पाठविलें. इंग्रजांनीं कडी शहर काबीज करून बडोदें सरकारच्या हवालीं केलें, तेव्हां मल्हारराव शरण आला. त्यामुळें गायकवाड घराण्याच्या दोन्ही शाखा पुनः एकत्र होऊन त्यांचा मुलूख एका सत्तेखालीं आला. मोहीम संपतांच इंग्रजांनींहि आपलें बक्षीस सव्याज पदरांत पाडून घेतलें. नंतर रावजीअप्पानें इंग्रजांच्या कुमकी सैन्याची एक तुकडी पाठवून सणखेडा काबीज करून घेतला (स. १८०२). बडोद्याच्या लष्करांत अरब लोकांचाच भरणा जास्त होता. त्यामुळें रावजीअप्पा व त्याचे सल्लागार इंग्रज यांनीं बडोद्याचें लष्कर कमी करण्याचें काम हातीं घेतलें. तेव्हां अरब शिपायांस ही गोष्ट मुळींच आवडली नाहीं. त्यांनीं खुद्द गायकवाड सरकारास कैद करून आपल्या बाकीची फेड केल्याशिवाय त्याला मुक्त करणार नाहीं असें जाहीर केलें. त्या वेळीं मुंबईहून युरोपियन पलटण मागविण्यांत येऊन अरब लोकांचा पाडाव केला आणि त्यांची योग्य व्यवस्था लाविली. जेव्हां अरब लोकांनीं आनंदरावास कैद केलें तेव्हां त्यांनीं कान्होजीस कैदमुक्त केलें होतें. त्यामुळें कान्होजी स्वतंत्र होऊन गायकवाडांचे राज्यांत बंडाळी करूं लागला. तेव्हां मेजर होम्स यानें कान्होजीचा पाठलाग करून त्याचा पराभव केला, व त्यास उज्जनीस पळून जाणें भाग पाडलें. अशा रीतीनें इंग्रजांनीं लवकरच बडोदें सरकारवर आपला पगडा बसविला व अतःपर त्या राज्यांतील महत्त्वाच्या सर्व गोष्टी ब्रिटिश रेसिडेंट ले. क. वॉकर याच्या तंत्रानें होऊं लागल्या.

पुढें स. १८०३ मध्यें रावजीअप्पाजी मरण पावल्यामुळें त्याचा पुतण्या सिताराम यास मुख्य कारभाराची जागा देण्यांत आली. पण सिताराम हा त्या कामांत नालायक असल्याचें दिसून आल्यामुळें गायकवाडाचा भाऊ व त्याच्या जहागिरीचा वारस जो फत्तेसिंह, त्यास स. १८०६ पासून राजप्रतिनिधि म्हणून नेमण्यांत आलें. फत्तेसिंहानें गंगाधरशास्त्री नामक एका इसमाची आपल्या चिटणीसाच्या जागेवर नेमणूक केली. पुढें लवकरच सर्व मुख्य कारभाऱ्याचे अधिकार गंगाधरशास्त्र्याच्या हातीं आले. यानंतर इंग्रजांनीं पुनः तह करून त्या तहान्वयें, दोन हजाराच्या ऐवजीं तीन हजार पायदळ व तोफखान्याची एक कंपनी ठेवण्याचे गायकवाडांनीं कबूल केलें व सैन्याच्या खर्चाकरितां १०,७०,००० रुपये उत्पन्नाचे ७ जिल्हे तोडून देऊन काठेवाडावर एक लक्षाच्या हुंड्या दिल्या. शिवाय आपल्या पदरीं कोणीहि युरोपीय माणूस चाकरीस न ठेवण्याचा व ब्रिटिशांच्या अनुमतीशिवाय कोणत्याहि परक्या संस्थानिकाशीं कलागत उपस्थित न करण्याचा करार केला. या उलाढालींत पेशव्यांच्या देण्याघेण्यासंबंधीं कांहींच हिशेब केला नव्हता. तेव्हां पेशव्यांचा हिशेब मिटविण्याकरितां गायकवाडांनीं बापू मैराळ नांवाचा आपला एक वकील पुण्यास पाठविला, पण त्याचा कांहींएक उपयोग न झाल्यामुळें त्या कामाकरितां गंगाधरशास्त्र्याची पुण्यास रवानगी करण्यांत आली. गंगाधरशास्त्र्यांनीं पेशव्यांची वर्तणूक पाहिल्यावर, वादाच्या प्रश्नाचा निकाल लावण्याचें काम इंग्रजांकडे सोंपविलें. ही बातमी बाजीराव पेशवे (दुसरा) व त्रिंबकजी डेंगळे यांना समजतांच त्यांच्या वृत्तींत फरक पडला; व त्रिंबकजीनें पंढरपूर मुक्कामीं संधि साधून गंगाधरशास्त्र्याचा खून करविला (स. १८१५). त्याबद्दल इंग्रजांनीं त्रिंबकजीस कैद केलें.

पुढें स. १८१८ मध्यें फत्तेसिंग वारला. तेव्हां आनंदरावानंतर बडोद्याच्या गादीचा वारस त्याचा धाकटा १९ वर्षांचा भाऊ सयाजी असून शिवाय तो स्वभावानें शांत पण चलाखहि होता, म्हणून त्यास इंग्रजांनीं राजप्रतिनिधि नेमिलें. नंतर स. १८१९ मध्यें आनंदराव मरण पावला. मरणसमयीं याचें वय पंचावन्न वर्षांचें होतें.

**आनंदराव धुळप**—( स. १७६४-१७९५ ) यांच्या घराण्याचें मूळचें नांव मोरे असून शिवाजीनें जावळी येथें ज्या मोरे घराण्याची धूळधाण केली तें हेंच होय. जावळीहून हकालपट्टी झाल्यावर याचे पूर्वज स्वसंरक्षणार्थ विजापूरदरबारीं येऊन राहिले, व तेथें त्यांनीं समशेर गाजविल्यामुळें त्यांस धुळप हा बहुमानाचा किताब मिळाला.

पुढें शिवाजीच्या भीतीनें याचे वंशज धवडे बंदरीं जाऊन राहिले. स. १७६४ मध्यें आनंदराव ह्या दर्यायुद्धांत नाणावलेल्या गृहस्थाकडे मराठ्यांच्या आरमाराचें आधिपत्य आलें. पेशव्यांच्या डायरींत आनंदराव याच्या नांवाचा आरमाराकडील सरदार म्हणून पहिला हुकूम आढळतो. पेशवाई नष्ट झाल्यावर याच्या वंशजांस इंग्रजांनीं पोलिटिकल पेन्शनें करून दिलीं ( मं. अहवाल शके १८३३ पृ. ११५ ).

याची कर्तबगारी स. १७६७-६८ त दिसून आली. नारायणरावाच्या वधानंतर पेशवाईंत झालेल्या खळबळीमुळें इंग्रजांनीं आपले हातपाय पसरण्यास सुरवात केली. तेव्हां पेशव्यांनीं आनंदराव धुळप व रघुजी आंग्रे यांनीं एकत्र मुंबई शहरांत जाऊन शहर लुटून फस्त करावें व नंतर साष्टीस इंग्रज बसला आहे त्याचें पारिपत्य करावें, असा हुकूम दिला ( ता. २१-१२-१७७४ ). पण आनंदरावाला आपली पुरी कर्तबगारी दाखविण्यास स. १७८१ नंतर संधि मिळाली. स. १७८३ सालीं यानें इंग्रजांविरुद्ध एक मोठा जय मिळविला. त्या वेळीं इंग्रजांची एक लढवई दुधोशी बोट, एक बतेला व तीन शिबाड अशीं पांच गलबतें, सरंजाम, दारूगोळा वगैरे भरून जात असतां यानें सर्व गलबतांचा पाडाव केला. या बहाद्दरीबद्दल पेशव्यांनीं ता. २५ मे स. १७८३ (शके १७०५ चैत्र व. ९) रोजीं आनंदरावास 'बहुमान खासगीचा पोषाख व कंठी' देऊन शाबासकीचें पत्र पाठविलें तें उपलब्ध आहे ( मं. अहवाल शके १८३३ पृ. १२० ).

हा स. १७९५ मध्यें मरण पावला. याचा एक सुंदर पोवाडा ऐतिहासिक पोवाड्यांत छापलेला असून त्यांत इंग्रजांविरुद्ध याच्या झालेल्या युद्धाचें वर्णन आहे. याचा वंश विजयदुर्गास आहे ( म. रि. उत्तर वि. १ ला पृ. ३९५ ).

**आनंदराव धुंडिराज कोठेकर**—देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. गंगथडीचा प्रांत भोसल्यांचे ताब्यांत आल्यावर दुसऱ्या रघूजीनें हरिपंत फडके यांच्या मार्फतीनें आनंदराव धुंडिराज कोठेकर याजपासून एक लक्ष रुपये घेऊन त्यास दिला व यानें या सुभ्याचें काम १०।१२ वर्षे केलें.

कोठेकर हा त्याच प्रांतांतील म्हणजे हल्लींच्या मोंगलाईतील कोठे या गांवचा राहणारा असून पुढें हा नागपुरास आला. गंगथडीचा सुभा भोसल्यांकडून दुसऱ्या मराठा युद्धानंतर झालेल्या तहानें गेला ( स. १८०३ ).

कोठेकर याचे भाऊबंद वऱ्हाडचे दक्षिणेस मोगलाईंत कोठे येथें असून आनंदरावाचे वंशज नागपूर बालाघाट येथें आहेत ( बखर पा. १६४ टीप; ना. प्रां. इ. पृ. २१५).

**आनंदराव नरसी वेरुळकर**—हैदरच्या दरबारीं पेशव्यांचे वकील असणारे नरसिंगराव वेरुळकर यांचे चिरंजीव. हे महादजी शिंदे यांच्या पदरीं असून, त्यांच्या वतीनें दिल्लीच्या शहाअलम बादशहाजवळ कांहीं दिवस वकिलीवर होते. यांनींच बादशहाचीं सोंगें आणून बादशहाचा अपमान केला, असें महादजीस कळलें. तेव्हां महादजी शिंदे लिहितात ( स. १७८६ च्या सुमारास):— यानें धुळवडीचे दिवशीं बादशहाचें सोंग आणून बादशहापुढें नेलें, असें मला बादशहाकडून कळलें आहे. त्याअर्थीं यास तोफेच्या तोंडीं देण्यांत यावें. असा दोनदां हुकूम झाला. पण बादशहाचा निरोप आला कीं, ब्राह्मण आहे यास मारूं नये. लष्करांतून काढून देऊन देशीं वाटेस लावणें. त्यावरून वस्तभाव राहुटीसुद्धां तोफखान्यांत पहाऱ्यांत आहे ( इ. सं. ऐतिहासिक टिपण ४२ ). हीच गोष्ट इब्रतनामा या फारशी तवारिखेंतहि आली आहे (इलियट-हिस्टरी ऑफ इंडिया, व्हा. ८ पा. २४३-२४४).

**आनंदराव पवार**—( स. १७२८-३६ ) धार संस्थानचा मूळ उत्पादक उदाजी पवार, त्याचा हा धाकटा भाऊ. याचा बाप सुपेकर संभाजी बुवाजी होय.

पुढें हा व याचे बंधू शाहूपाशीं उदयास आले. स. १७२८ च्या सुमारास बाजीरावाचें व उदाजीचें वांकडें आल्यामुळें बाजीरावानें उदाजीस कैदेंत ठेवून आनंदरावास धारेस नेमिलें ( धार संस्थानचा इतिहास, पृ. ३८० ). स. १७३१ च्या डभईनजीक झालेल्या लढाईंत हा बाजीरावाच्या विरुद्ध दाभाड्याच्या बाजूनें लढत होता. त्या वेळीं हा जखमी झाला.

बाजीरावाच्या कांहीं आज्ञापत्रांवरून व मंडलोई दप्तरांतील एका पत्रावरून रियासतकारांनीं स. १७३६ हा आनंदरावाचा मृत्युकाल ठरविलेला आहे. पण उलटपक्षीं ग्रँटडफ यानें मराठी कागदपत्राच्या आधारावर असें नमूद केलें आहे कीं, स. १७४२ च्या पावसाळ्यांत बाजीरावाचा नर्मदातीरीं मुक्काम होता. तेव्हां त्यानें आनंदरावाची

डभइच्या लढाईनंतर प्रथमच भेट घेऊन याच्याकडे धार व तिच्या आसमंतांतील मुलूख कायम केला. इतकेंच नव्हे, तर स. १७५० च्या सुमारास देखील आनंदराव हयातच होता, असा ग्रँटडफचा समज झालेला दिसतो ( पु. १, पृ. ४४६ पाहा ).

याला यशवंतराव व रायाजी असे दोन पुत्र असून त्यांपैकीं यशवंतराव हा आनंदरावाच्या मागून धारचा अधिकारी झाला, व रायाजीस महाराष्ट्रांत सरंजामी उत्पन्न नेमणूक मिळाली. याची मैनाबाई नांवाची स्त्री असून ती याच्या मागून बरींच वर्षे म्हणजे सवाई माधवरावांच्या कारकीर्दीपर्यंत जिवंत होती, असें दिसतें. हा सर्पदंशानें मृत्यु पावला ( ज्ञानकोश ).

याची छत्री उज्जयनीस मंदाकिनीघाटावर आहे. याची मुद्रा 'श्रीशिवचरणीं दृढभाव । संभाजीसुत आनंदराव पवारराव ।.'

**२.** (स. १७८०-१८०७) धारच्या खंडेराव पवार यास गोविंदराव गायकवाडाची कन्या मैनाबाई हिच्यापासून झालेला हा पुत्र होय. यास खंडेरावामागून स. १७८० मध्यें धारचा अधिकार प्राप्त झाला. त्या वेळीं हा केवळ अर्भक असल्यामुळें वयांत येईपर्यंत याचें संगोपन याच्या आजोळीं गायकवाडांच्या घरीं झालें.

याच्या गायकवाड घराण्याशीं असलेल्या संबंधामुळें गोविंदरावाच्या मृत्यूनंतर बडोद्यास अराजकता माजली, तेव्हां गायकवाडाच्या घराण्यांतील असंतुष्ट मंडळी धार संस्थानच्या आश्रयास आली. आनंदरावास पुढें करून गायकवाडाच्या राज्यांत बखेडा उपस्थित करण्याचाहि प्रयत्न करण्यांत आला. याला मैनाबाई नांवाची स्त्री असून रामचंद्रराव नांवाचा एक पुत्र होता. याच्याकडे पूर्वी स. १८०१ त यशवंतराव होळकर हा नोकरीस राहिला होता. परंतु दौलतराव शिंद्यानें यास धाक घातल्याबरोबर यानें त्यास कामावरून दूर केलें. हा ता. १०-६-१८०७ रोजीं मरण पावला ( म. रि. उ. वि. ३, पृ. ३८६ ).

**आनंदराव फाकडे**—हा मानाजीचा दत्तक पुत्र. यानें दौलतरावाच्या सांगण्यावरून सर्जेराव घाटग्याचा खून केला. हा दौलतरावाजवळ देवडीवरील पाहऱ्यावर अंमलदार होता. दौलतरावाच्या बायकोनें-बायजाबाईनें-वरील खुनाबद्दल यास शिक्षा करण्याचा हट्ट धरिला. तेव्हां अंतस्थ रीतीनें यास बरीच रक्कम पोंचवून दौलतरावानें यास पळून जाण्यास सांगितलें. तेव्हां शिंदेशाही सोडून हा पुढें बडोद्यास गायकवाडांचे आश्रयास गेला. तेथें हें फाकडे घराणें हल्लीं नांदत आहे ( म. रि. उ. वि. ३ पृ. ५७५ ).

**आनंदराव माधव**—हा भोसल्यांचा वकील होय. स. १८०३ मध्यें याला भोसल्यानें वेलस्लीकडे बोलणें करण्यास पाठविलें होतें.

**आनंदराव यशवंत चंदावरकर**—दुसऱ्या बाजीरावाचा वकील. बाजीरावास जेव्हां धूळकोट येथें सर्व बाजूंनीं घेरलें ( स. १८१८ चे सुमारास ), तेव्हां त्यानें यास माल्कम या इंग्रज अधिकाऱ्यास महू येथें भेटावयास पाठविलें. हा ता. १६ मे १८१८ रोजीं महू येथें पोंचला ( म. रि उ. ३ पा. ५०४ ).

**आनंदराव रामजी**—हा रामजी महादेवाचा पुत्र होय. स. १७७४ मध्यें जेव्हां इंग्रजांनीं ठाण्याच्या किल्ल्यावर स्वारी केली, तेव्हां हा किल्ल्याच्या बाहेर होता. पण मोठी शिताफी करून पांचशें लोकांनिशीं हा किल्ल्यांत गेला. परंतु याचा उपयोग न होऊन इंग्रजांनीं किल्ला सर केला ( म. रि. उत्तरवि. १ पृ. २४ ).

**आनंदराव रामजी यादव**—मल्हारराव होळकराचा सरदार. हा अब्दालीशीं लढतांना पडला ( मार्च १७६१).

**आनंदराव रास्ते**—(मृ. १७९९) यांच्या वडिलांचें नांव भिकाजी शामजी गोखले असें असून शाहूनें किंवा विजापूरच्या बादशहानें यांच्या एका पूर्वजाची सचोटी पाहून त्याचें पूर्वीचें 'रसदे' हें पद मोडून रास्ते म्हणजे रास्त वागणारे हें नांव दिल्यापासून हें घराणें नवीन नांवानें प्रसिद्धीस आलें. नानासाहेब पेशव्यांची स्त्री गोपिकाबाई ही याची सख्खी बहीण होती.

याचा ज्येष्ठ बंधु मल्हारराव मृत्यु पावल्यानंतर याच्या कर्तृत्वावर सरकारची मेहेरनजर होऊन याच्या नांवें सरदारी केली गेली ( कैफियती व यादी). नारायणरावाचा वध झाला तेव्हां हा पेशव्यांतर्फे कर्नाटक प्रांतांत अधिकारी होता ( मं. संमेलनवृत्त शके १८३७ ). पुण्यांत असलेली रास्त्याची पेठ यानेंच वसविलेली असून तिच्याकरितां पेशव्यांकडून यास जमीन देण्याविषयीं हुकूम झाला ( पेशव्यांची रोजनिशी ८. पृ. ३५३ ).

हा मरण पावल्यावर किल्ले पांडवगड सरंजामाचे गांवसुद्धां आनंदरावाच्या निसबतीस होता तो सरकारांत जप्त करून बाजीरावानें याची कमावीस ता. १ एप्रिल स. १८०१ रोजीं बाळोजी कुंजर यांस सांगितली (पेशव्यांची रोजनिशी ५ पृ. ९८).

यास महिपतराव म्हणून पुत्र होता. पण तो मृत्यु पावल्यामुळें स. १७९४-९५ सालीं वडील भाऊ गणपतराव याचा कनिष्ठ पुत्र माधवराव यास यानें दत्तक घेतलें

( पंत प्रधान यांची दुसरी शकावली ). हा बाराभाईंस अनुकूल होता. यानें अनेक लोकोपयोगी कामें केलीं ( गोखले घ. इ. पा. ११ ).

**आनंदराव वाघ**—पहिल्या रघूजीच्या वेळच्या प्रमुख मराठे सरदारांपैकीं आनंदराव वाघ हा एक होय. याचा मुलगा रामचंद्र वाघ हा मुधोजीचे वेळेस प्रसिद्धीस आला ( ना. प्रां. इ. पा. १०६ ).

**आनंदराव सुमंत**—याचें समग्र नांव आनंदराव रघुनाथ भोपळे असें असून याला औरंगाबादकर असेंहि म्हणत. यानें थो. शाहू महाराजांना राज्यावर आणण्याच्या कामीं श्रम केले होते म्हणून शाहूनें यास सुमंताचें पद दिलें ( स. १७०८ ). यापूर्वी सुमंताचें पद हणमंते यांच्याकडे होतें. याचें काम परराष्ट्रीय राजकारण करणें, राजपत्रावर ' संमत सुमंत ' लिहिणें. याची मुद्रा-श्रीराजा शाहु छत्रपति स्वामिचरणीं तत्पर । रघुनाथसुत आनंदराव सुमंत निरंतर । हा गृहस्थ जाधवरावाचे तर्फेचा असून मोगलाईतील माहितगार होता. हा शाहूकडील बरींच कारस्थानें चालवीत होता. शाहूनें याजकडून आंतून नबाब ऐवजखानाकडे तडजोड चालविली, परंतु बाहेरून नाजूक कामाकरितां पाठविलें म्हणून प्रसिद्ध केलें ( २३-३-१७२४ ). हा साताऱ्यास न राहतां शाहूतर्फे निजामाजवळ राही. बाजीरावाचा याजवर विश्वास नव्हता असें दिसतें. कारण बाजीरावानें शिवाय दोन वकील निजामाकडे बोलीस पाठविले. हा कांहीं दिवस सवाई जयसिंगाकडे होता ( म. रि. म. १ पृ. ३७३-३८२ ).

**आनंदराव सोमवंशी**—हा दावलजी सोमवंशीचा कदाचित् पुत्रहि असेल. हा सरलष्कर असून पेशव्यांच्या बहुतेक युद्धांत असे. याला प्रतिनिधीसह अंजनवेलीस पाठविलें होतें ( स. १७२३ ). हा स. १७३२ मध्यें थो. शाहूचा सरलष्कर होता. याच्या पथकाचें नांव धाकट्या बाजीरावाच्या राजवटींतहि आढळतें. मुद्रा-श्रीराजा शाहु चरणी तत्पर। आनंदराव सोमवंशी सरलष्कर ।

**आनंदराव हुपीकर**—याजकडे कर्नाटकाचा सरसुभा होता. हा मृत्यु पावला तेव्हां याचे जागीं १६।९।१८०९ रोजीं बाजीरावानें मोदीची नेमणूक केली ( म. रि. उ. ३ पा. ३७५ ).

**आनंदराव होळकर**—यशवंतराव होळकरांचा पुण्याच्या दरबारीं असलेला एक वकील व नातेवाईक.

**आनंदवर्धन**—हा सुप्रसिद्ध पंडित काश्मीरच्या अवंतिवर्मा नांवाच्या राजाच्या राजवटींत उदयास आला. अवन्तिवर्म्याचा काल स. ८५७-८८४ हा निश्चित आहे. ध्वन्यालोक हा याचा सुप्रसिद्ध ग्रंथ होय. त्याशिवाय अर्जुनचरितकाव्य, प्राकृतांत लिहिलेलें विषमबाणलीला काव्य हेहि ग्रंथ याचेच होत. ध्वन्यालोकानंतर यानें धर्मकीर्ति या बौद्ध ग्रंथकाराच्या प्रमाणविनिश्चय या ग्रंथावर धर्मोत्तमा नांवाची टीका लिहिलेली दिसते. देवीशतक नांवाचें यानें केलेलें एक स्तोत्रहि आहे. त्यांत यमक, भाषाश्लेष म्हणजे अक्षरें तींच पण संस्कृत, मागधी, शौरसेनी इत्यादि निरनिराळ्या भाषानुसार अर्थ निराळा होईल अशीं पद्यें, गोमूत्रिका व इतर चित्रबंध यांची रेलचेल केली आहे. त्यांतील एकशें एकाव्या पद्यावरून याच्या पित्याचें नांव नोण होतें, असें कळतें. देवीशतकावर कैय्यकटाची टीका आहे. याशिवाय आनंदवर्धनाचा तत्त्वालोक नांवाचा आणखी एक ग्रंथ असावा. ध्वन्यालोकावरील लोचनटीकेंत 'वहुमम इन्ति भेणिन्तऊ' ( ध्वन्यालोक पा. २४३ काव्यमाला-प्रत ) हें पद्य सैंधव भाषेंतील म्हणजे जुन्या सिंधी भाषेंतील आहे असें म्हटलें आहे.

व्याकरणशास्त्राच्या इतिहासांत पाणिनीच्या सूत्रांचें जें महत्त्व आहे तेंच महत्त्व अलंकारशास्त्रांत याच्या ध्वन्यालोकाचें आहे. ध्वन्यालोक हा ग्रंथ कारिका, वृत्ति व उदाहरणें अशा तीन भागांत विभागला आहे. यांपैकीं कारिका व वृत्ति हीं दोन्हीहि याचींच आहेत, असें कांहींचें म्हणणें असून कारिका दुसऱ्याच्या असून वृत्ति तेवढी याची आहे, असें कांहीं म्हणतात. सहृदय नांवाच्या याच्या गुरूनें कारिका लिहिल्या आणि त्यावर यानें वृत्ति लिहिली, असेंहि म्हणण्यांत येतें ( सा. इ. पा. ११२-१३० ).

**आनंदसूरी व अमरचंद्रसूरी** ( स. १०९३-११५० ) या दोघांचाहि जन्म गुजराथेंत झाला. लहानपणींच यांनीं आपल्यापेक्षां बलाढ्य अशा तर्कज्ञान्यांचा वादांत पराभव केल्यामुळें यांना अनुक्रमें वाघाचा छावा व सिंहाचा छावा अशीं टोपणनांवें मिळालीं ( व्याघ्रशिशुक व सिंहशिशुक ). हे दोघेहि नागेंद्रगच्छ शाखेच्या महेंद्रसुरीचे शिष्य होते. हरिभद्रसूरी हा यांचे मागाहून झाला. ज्या सिद्धराजानें यांना टोपणनांवें दिलीं तो स. १०९३ मध्यें गादीवर आला. तेव्हां हे दोघे १२ व्या शतकाच्या सुरवातीस होऊन गेले असावेत. गणेश उपाध्यायानें आपल्या तत्त्वचिंतामणि ग्रंथांत यांचा निर्देश केलेला दिसतो ( हिस्ट्री ऑफ इंडियन लॉजिक, पा. ४७-४८ ).

**आनंदस्वामी**—मराठी कवि. भवभ्रमहारक भजनानंदलहरीचा कर्ता.

**आनंदज्ञान**—तत्त्वावलोक ग्रंथ करणाऱ्या जनार्दनाचें नामान्तर.

**आनंदीबाई जाधव**—चंद्रसेन जाधवांची पत्नी.

**आनंदीबाई निंबाळकर**—ही सुप्रसिद्ध महादजी शिंदे यांची बहीण असून निजामाचा सरदार रावरंभा महाराव निंबाळकर यास दिली होती. हिला एकदां निजामाचा वकील बाबाराव गोविंद याच्याबरोबर निजामानें महादजींकडे पाठविलें होतें. हिला कर्ज फार झालें म्हणून ही एकदां महादजींकडे मदत मागण्यास आली होती. वाटेंत हिनें आक्टोबर स. १७८३ मध्यें महेश्वराला मुक्काम करून अहल्याबाईचा पाहुणचार घेतला. त्याचें वर्णन वाचण्याजोगें आहे. 'आनंदीबाईस निजामांनीं तीन लक्षाची जहागीर देऊन पाटीलबाबाकडे अंतस्थ राजकारणास पाठविली' असा त्या वेळीं बाहेर लौकिक होता. पण हिच्या रदबदलीचा उपयोग झाला नाहीं. शरीरेंकरून विकल, म्हणून परत जात होती. त्रासून दोनतीन कोस निघून गेली. लाखो रुपये देण्याऐवजीं बाबांनीं तीस एक हजाराचे हवाले घेतले. ही बाई ग्वाल्हेर येथें स. १७८५ मध्यें मृत्यु पावली ( म. रि. उ. २ पा. २२३-२४ ).

**आनंदीबाई पेशवे**—( स. १७५५-१७९४ )—राघोबादादा ऊर्फ रघुनाथराव पेशव्यांची ही दुसरी बायको होय. ही राघो महादेव ओक मलठणकर यांची कन्या असून हिचें लग्न तारीख १७ डिसेंबर १७५५ मध्यें झालें. हिच्या मातुश्रींचें नांव काकूबाई ओक असें होतें.

ही मराठ्यांचे इतिहासांत कारस्थानी स्त्री म्हणून प्रसिद्ध आहे. हिचें राघोबावर बरेंच वजन असून तो राजकारणांत हिच्या सल्ल्याप्रमाणें चालत होता, असें दिसतें ( ऐ. ले. सं. भाग ४ पृ. १९६८ ). नारायणरावाचा वध, 'ध' चा 'मा' करून हिनेंच केला असें पांडुरंग नामक कवीचें नारायणरावाच्या वधावरील काव्य इतिहाससंग्रहांत ( मार्च १९१० ) प्रसिद्ध झालें आहे त्यावरून दिसतें. आपल्यावरील हा आरोप स्वतः आनंदीबाईहि जाणून होती, असें इतिहाससंग्रहांत छापलेल्या मेणवली दप्तरांतील एका पत्रावरून कळतें. राघोबादादाचें अस्सल पत्र रामशास्त्रयांच्या हातीं पडलें (ग्रँटडफ) त्यावरून 'ध'चा 'मा' झाला होता, हें जरी सिद्ध झालें असलें तरी तो कोणीं केला हें त्यांस गूढच राहिलें असावें. ' उगाच निष्कारण कैदेंत ठेविलें आहे " 'ज्याचें बोट सांपडलें त्याचा हात धरला. ' 'नारायणरावास दगा झाला तोहि आम्हांस ठाऊक नाहीं. याविसीं आमचे आंगी लावणारानी लावावे. ...उगीच हाल करावे हे काय ?' ( पे. द. ) अशा तऱ्हेचे निर्वाणीचे उद्गार निघतात व एकदां तर बाई स्पष्ट कानांवर हात ठेवून सांगते कीं, ' नारायणरावाच्या खुनाची माहिती आपल्याला नाहीं ! पूर्वी साहेबानीं प्रायश्चित्त केलें ते समयींच मला बलाविलें नाहीं. किमर्थ...माझी ममता विशेष म्हणून नारायणरावाच्या गर्दीचा मार मला सांगत नव्हते. यांणीं चौकशी किमर्थ केली नाहीं. यादीचीं अक्षरें ' ध ' चा ' मा ' कोणी केला याची चौकशी किमर्थ न केली ? माझा दस्ताऐवज किंवा निरोप कांहीतरी निवडायचें होतें. कांहींच न करितां उगेच पेचांत ठेविलें. दैवास उपाय नाहीं."

खुनाच्या आरोपाची ही कैफियत नव्हे तर काय ? नारायणरावांचे खुनांत आनंदीबाईचें अंग होतें हें सिद्ध करण्यास पुरावा उपलब्ध नाहीं. हिच्या मागच्या पुढच्या कृत्यांवरून अनुमानानेंच हिचा या कामांत संबंध मानला जातो. ही मोठी धूर्त व सावध दिसते. हिनें गंगाबाईस मारण्याचे प्रयत्न केले. बारभाईशीं युद्ध चालू असतां हिनें शक्य तितक्या रीतीनें नवऱ्यास साह्य केलें. ' बाई तुम्हांस माहीतच आहेत. शंभर राजकारणें करतील ' असे हिच्याबद्दल ठिकठिकाणच्या पत्रांत उल्लेख आहेत. इकडे सखाराम हरि वगैरे स्वपक्षांतील मंडळीस ही उत्तेजन देते, तर त्याच वेळीं सवाई माधवरावाच्या प्रकृतीविषयीं खबर काढून त्यास जपा म्हणून लिहिते; आणि नवऱ्याचा डाव फसल्यावर पुनः या सर्व अपकर्षाचें दूषण ती सखाराम बापू, नानाफडणीस वगैरे कारभाऱ्यांस देते. यावरून करून सवरून नामानिराळी, अशी हिची वागणूक हिच्या एकंदर चरित्रांत दिसते. अंतःकरणाच्या वृत्ती ताब्यांत ठेवण्याची कला तिला चांगली अवगत होती.

नारायणरावास पेशवाईचीं वस्त्रें देतांना दादानें विरोध केला त्या वेळीं आनंदीबाईनें नवऱ्याचें मन वळवून नारायणरावासच वस्त्रें देवविलीं. जर हिच्या मनांत नारायणरावास दूर करावयाचें असतें तर हीच चांगली संधि होती. मुद्दाम पुढें त्याच्या खुनापर्यंत प्रकरण आणण्याचें कारणच नव्हतें. पुतण्याचे खुनाबद्दल दादानें प्रायश्चित्त घेऊन गोपिकाबाईचें दर्शन घ्यावें, आणि मातुश्रीसमान त्या वडील व पुण्यशील बाईचा शुभाशीर्वाद मरणापूर्वी संपादावा, अशी भर आनंदीबाईनें आपल्या नवऱ्यास आसन्नमरण स्थितींत दिली. यावरून नवऱ्याचे हातून घडलेल्या पापाचें क्षालन धार्मिक दृष्ट्या तरी व्हावें, अशीच हिची भावना दिसते. त्या पापांत हिचा स्वतःचा हात असावा असें दिसत नाहीं. धार्मिक दृष्ट्या ही गोपिकाबाईइतकीच श्रद्धाळू होती. पेशव्यांच्या घराण्याच्या लौकिकाबद्दल हिला कळकळ वाटे, तशीच

मराठी राज्यास उतरती कळा लागलेली पाहून हिला हळहळ वाटत असे. हिचीं यासंबंधींचीं पत्रें व उल्लेख मोठ्या शहाणपणाचे व मार्मिक आहेत. पुतण्याच्या खुनाशीं आपला संबंध जोडून लोक आपणांस पाण्यांत पाहतात, याबद्दल हिचा जीव तिळतिळ तुटे, आणि ' पुराव्याचें माप माझ्या पदरांत घाला, उगाच साप साप म्हणून भुई बडवूं नका ' असें कंठशोष करून ही कारभाऱ्यास विचारी. यावरून वाटतें कीं, नवऱ्याच्या अविचारामुळेंच हिच्या शहाणपणाचें मातेरें झालें. आणि नवऱ्याचा दोष उगाच आनंदीबाईचे माथीं आला.

आनंदीबाईच्या कृष्णकारस्थानाचा किंवा दुष्ट स्वभावाचा पुरावा कोठेंहि आढळत नाहीं. ही देखणी स्त्री नवऱ्यास भुरळ पाडून त्याच्याकडून वाटेल तें कृत्य करवी असा सामान्य समज त्या वेळीं होता. त्याचाच अनुवाद पूर्वी डफनें व अलीकडे इतिहाससंग्रहाचे संपादक रा. ब. पारसनीस व त्यांचे साहाय्यानें इतिहास लिहिणारे ना. किंकेड यांनीं ठिकठिकाणीं केलेला आढळतो; पण त्याचा पुरावा मात्र कोणत्याहि प्रकारचा एवढ्या मोठ्या वाङ्मयांत ते देत नाहींत ( म. रि. म. भा. ४. पा. ३४५–४८ ).

पुढें स. १७७५ मध्यें हिला धारच्या किल्ल्यांत अटकेंत ठेवण्यांत आलें.

स. १७७६ मध्यें विसाजी गोविंद आठवले, खंडेराव त्रिंबक ओढेकर यांनीं आनंदीबाईस पकडण्यासाठीं धारेस वेढा घातला तेव्हां हिनें मोठ्या शौर्यानें लढून कांहीं काळ टिकाव धरला. पण लवकरच किल्ल्यांतील सामान संपल्यामुळें ही खंडेरावाच्या स्वाधीन झाली ( म. रि. उत्तर वि. १ ला, पृ. ७८ ).

अटकेंत असतांना स. १७७८ च्या सप्टेंबर महिन्यांत हिनें नानाफडणविसास खालीलप्रमाणें पत्र लिहिलें. 'हल्लीं यवनाक्रांत ब्राह्मणी दौलत फितुरानीं होऊं पाहते. तुमच्या चित्तांतील उगीच आटी जात नाहीं. आम्हीं तुमच्या स्वाधीन, पावणेदोन वर्षे जाहाली. कार्यसिद्धी तुमची कांहींच न जाहली. नुकसान पांच हजार फौजेचें, सरंजामीं गुंतलें, ही झाली. विशेष कांहींच न झाले. तुमची फौज गुंतून आमचा धन्याचे पायासीं वियोग." या वाक्यावरून हिचा निरपराधीपणा दाखविण्याचा बहाणा व मुत्सद्दीपणा चांगला ध्यानांत येतो. त्याच दिवशीं सखाराम बापू बोकील यांना लिहिलेल्या पत्रांतील पुढील भाग हिच्या राजकारणी दूरदृष्टीची चांगली माहिती देणारा आहे.

'हल्लीं इंग्रेज घरांत येऊ पाहातात. तमाम अंमल उठवून आपलें अंमल बसवितात. आमचे निमित्त करून सर्व दौलतीस गिऱ्हाईक होतील. सुजाउद्दौले व महमदअल्ली यांच्या घरांतून प्रथम चाकरीस येतो म्हणून नम्रतेनें पायरव करून घेतली. आणि आतां उभयतास पोटापुरतें देऊन सर्व दौलतीचे धनी झाले आहेत. या सर्व गोष्टी तुम्हास ठाउक आहेत. तसेंच आमच्या घरांत होईल. ते जातीनें खबरदार व मनुष्यें जवळ चांगली असें असोन उभयतांच्या गती याप्रमाणें झाल्या. आमचे येथें तर कारभारी जवळ मातबर कोण आहे, व पारख कोणाची आहे. व मर्जी ही कोणत्या तऱ्हेची आहे. तुम्हास ठाऊक असोन, तुम्ही तिही पिढ्याचे कारभारी, ही ब्राह्मणी दौलत बुडावयाजोगी करितां हे तुम्हास करणें ठीक दिसत नाहीं. + + हे कालचक्र विपरीत आलें. परंतु आम्हास हाच भरंवसा आहे कीं, तुम्ही कालचक्रासहि फिरवाल. हे जाणून तुम्हास पत्र लिहिलें आहे. जन्मभर चांगले केले आणि शेवटीं म्हातारपणीं इंग्रेजांच्या[1] घरांत ब्राह्मणी दौलत घातली हे अपेश येई तो अर्थ न करावा. हुजुर (रघुनाथराव दादा) ऐकत नाहीं असें म्हणाल, तर ज्यापेक्षा तुम्ही प्राण घेता किंवा पेंचांत आणता, त्यापक्षीं काय होईल ते होवो, परंतु तुमचे हातीं नच लागावें हा निश्चय आहे ' ( इं. सं. ऐ. टि. पा. २८–३० ).

आनंदीबाईच्या पत्रांत खोंचदारपणाहि बराच आढळतो. वरील पत्रांतच ही नानाफडणीसाच्या नवीन लग्नास उद्देशून लिहिते, "नवी भावजय लाडकी केली तिचें नांव काय ठेविलें व दुसरी करावयाची कधीं?" तथापि वरील उपरोधिक वाक्यें लिहिणाऱ्या स्वतः आनंदीबाईच्या यजमानांनीं, हिच्या जिवंतपणींच भिकाजीपंत पेंडश्यांच्या मथुराबाई नामक कन्येशीं लग्न केलें होतें, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

राघोबाच्या मृत्यूनंतर कारभाऱ्यांच्या नजरकैदेंत असतांनाची हिची हकिकत हिच्या दिनचर्येवरून दिसून येते (पे.द.४, सप्टेंबर १७८६ ते ऑक्टोबर १७८८). कोपरगांवीं आनंदीबाईस सालीना २ लाख रुपयांची नक्त नेमणूक होती. पूर्वीच्या वैभवाची आठवण होऊन चालू सरंजाम कांहींच नाहीं असें वाटून हिला फार खेद होत असे. " स्वसत्तेंत जन्म गेला, त्यामुळें परस्वाधीनता–साहवत नाहीं. भावीस उपाय नाहीं. " असें कधीं कधीं हीच आपलें समाधान करून घेई. " आम्ही केवढी माणसें होतो आणि कोणत्या योग्यतेस आलों. अन्याय कोणी पहात नाहीं. उगेच निष्कारण कैदेंत ठेवलें आहे....धनी आसते म्हणजे ताकत नवती " अशा तऱ्हेचा खेद होऊन ही चरफडत असे.

हिला घालून पाडून–टोचून बोलण्याची फार संवय होती. बारभाई-कारभारी मंडळीवर व त्यांतल्या त्यांत नानावर हिचा फार राग. कारण लहानपणापासून नानाची हिला माहिती आणि तोच आतां वरचढ बनला होता. बाई दानधर्म फार करी व कधीं कधीं कामनिक अनुष्ठानें करवी, म्हणून नाना फडणीस त्या धर्मकृत्यांना लवकर परवानगी पाठवीत नसे. तेव्हां हिचा तडफडाट होई. "आमचे मर्जीचे अगत्य कोणास नाहीं." असें वैतागून ती बोलत असे. नानास मूलबाळ संसारिकांचें सुख नाहीं असें पाहून एखादे वेळेस हिला नानाची कींवहि येत असे व त्याच्या परिस्थितीपेक्षां आपलीच बरी असें हिला वाटे.

आपल्या चालू दुःस्थितीबद्दल आनंदीबाईचा जसा नानावर राग, तसाच तो मागील दुःस्थितीबद्दल गोपिकाबाई व माधवराव यांच्यावर होता. हिच्या बोलण्यांत वारंवार जावेला टोमणे मारलेले आढळतात.

जसें नानाबद्दल तसेंच गोपिकाबाईबद्दलहि आनंदीबाईला कधीं कधीं वाईट वाटे. 'बाईची धन्य आहे. दोन मूल हत्तीप्रमाणें गेले. आम्हांस किती वाईट वाटतें. मग त्यांचे काय पुसावे.' असें अंतःकरणापासून उद्गार निघत. गोपिकाबाई पंचवटीस वारल्याचें कळल्यावर हिनें सवाईमाधवरावाचें बहुतप्रकारें समाधान करण्याविषयीं कारभाऱ्यांस दुखवट्याचें जें पत्र पाठविलें तें खरोखरीच मननीय आहे.

"चिरंजिवास (सवाईमाधवरावास) आई, बाप, भाऊ कोणीच नाहीं. आम्ही दूरच आहो, येक आजी तीहि दूरच होती. परंतु ममतेचें तेवढेच मनुष्य होतें. याअर्थी चिरंजिवास श्रम बहुत होतील. परंतु बहुतप्रकारें समजोन सांगावें, त्यांचाहि कालच जाला होता. सृष्टीची वाट हीच आहे. त्यापक्षीं अशा गोष्टी सांगोन त्याचे शांतवन होय ते करावें." (पे. द. ४. ७०).

माधवराव पेशवे व शिंदे यांच्या संबंधानें बाई नेहमीं कुत्सित बोलतांना दिसते. माधवरावानें हिला व राघोबाला कैदेंत ठेवलें होतें म्हणून, व शिंद्यानें कारभाऱ्यांविरुद्ध आपल्याला राज्य काबीज करण्याच्या कामीं मदत केली नाहीं म्हणून त्या दोघांवर हिचा राग होता. घरगुती प्रश्नामुळेंहि हिचें माधवरावासंबंधीं अगदीं वाईट मत बनलें होतें. बारभाईचा यशस्वी कारभार शिंद्यांच्या बळावर चालला आहे, हें आनंदीबाई ओळखून होती. पण शिंदा आपल्याशीं "गुलामपणा" करितो म्हणून ही त्याची निंदा करी.

धाकटा बाजीराव फार अर्वाच्यपणा करी, तेव्हां त्याला सुधारण्याविषयीं कारभारी कांहींच करीत नाहींत. "मूल शहाणें होऊं नये असें साऱ्यांस वाटतें." अशी ही नेहमीं तक्रार करीत असे.

नारायणरावाविषयीं बाईचें मत चांगलें असल्याचें पाहून आश्चर्य वाटतें. "माधवराव छचोरीपणा करीत असत. पण नारायणराव बहुत मर्यादशील होता, असा ग्रह झाला होता."

पुष्कळदां बाईच्या तोंडून कांहीं नवीन माहिती मिळते. माधवराव पेशव्यापासून दादासाहेबांपर्यंत कोणाच्याच अस्थींचें विसर्जन झालें नव्हतें हें कळून येतें. दादासाहेबांच्या अस्थी काशीस पाठवीत नाहींत म्हणून बाई नेहमीं चरफडत असे.

बाजीरावाचे बेशिस्त वागण्याबद्दल आनंदीबाई त्याला सारखी बोलत असे व कारभारी या राजपुत्राची काळजी घेत नाहींत म्हणून त्यांनाहि हासडीत असे. "यांचें दैवच खोटें आहे." "यांचे पत्रिकेंत आहे कीं, याजवळ वडिलांचें कांहीं राहूं नये" असें ही भाकीत करीत असे (लोकशिक्षण वर्ष ४, अंक ८).

दु. बाजीरावास पेशवाई प्राप्त होईपर्यंत हिला स्वातंत्र्य मिळालें नाहीं. राघोबाच्या मृत्यूपर्यंत ही त्याजबरोबर कोपरगांवास नानाफडणिसाच्या प्रतिबंधांत होती. कारभारी मंडळींचें हिच्याशीं वर्तन एकंदरींत बरेंच निष्ठुरपणाचें होतेंसें दिसतें. काव्येतिहाससंग्रहांतील (ले. ४९४) एका यादींत, राघोबादादा मृत्यु पावल्यावर हिच्या अंगावरील सौभाग्यालंकार काढून आणण्यास नानानें ताबडतोब आपला हस्तक पाठविला होता, असा उल्लेख आहे. ही ता. २७ मार्च १७९४ रोजीं आनंदवल्ली येथें मरण पावली (मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३५, धडफळे यादी). हिला दुर्गाबाई ऊर्फ गोदूबाई नांवाची कन्या आणि बाजीराव व चिमणाजीअप्पा असे दोन पुत्र होते. ता. १०–१–१७७५ रोजीं धारच्या किल्ल्यांत हिला बाजीराव नांवाचा पुत्र झाला, व चिमाजीअप्पा हा ता. ३०-३-१७८४ मध्यें झाला.

**आनंदीबाई भोसले**—(स. १७८६–१८२२) ही दुसऱ्या शाहूची चवथी बायको असून शिर्के यांची कन्या होती. हिला माईसाहेब असें म्हणत. हिचें लग्न ता. २५–३–१७८६ रोजीं झालें. नवऱ्याच्या पश्चात् प्रतापसिंह लहान असतां साताऱ्याचा कारभार हिनें दक्षतेनें चालविला. एल्फिन्स्टननें हिची प्रशंसा केली आहे. एक इंग्रजी प्रवासी लिहितो, 'ही बाई घोड्यावर बसण्यांत फार प्रवीण होती. मुळच्याच सौंदर्यास हिचा भरजरी पोषाख चांगला खुलून दिसे. ही पडद्यांतून उघडपणें बाहेर भेटी घेई, त्या वेळीं

हिचा बोलका व प्रेमळ स्वभाव सहज निदर्शनास येई. हिंदु स्त्रियांचे अंगीं सामान्यतः जो भित्रेपणा असतो तो हिच्या ठिकाणीं मुळींच नव्हता. व्यवहारचातुर्य व प्रसंगावधान या गुणांच्या योगानें हिची कर्तबगारी विशेष झळकत असे.' हिला तीन पुत्र झाले: प्रतापसिंह, रामचंद्र व शहाजी. प्रतापसिंह हा थोरला असून राज्यारोहणप्रसंगीं तो अवघा पंधरा वर्षांचा होता. हिच्या भावास ( खंडेराव मामा शिर्के ) सरलष्कर म्हणत. ही राजकारणांत मोठी चतुर होती. ही तुळजापुराहून परत येत असतां भीमातीरीं धूळखेड येथें पौष शु० १० रोजीं ( ३-१-१८२२ ) मरण पावली. तेव्हांपासून प्रतापसिंहास कुटुंबांतला आधार असा राहिला नाहीं ( म. रि. उ. वि. ३, पृ. ५९५ ).

२. बिंबाजी भोसल्यास दोन बायका होत्या. एक उमाबाई व दुसरी आनंदीबाई. पैकीं उमाबाई ही त्याजबरोबर सती गेली, व आनंदीबाई ही रतनपूर येथेंच राहिली. तिचेजवळ कारभारी कृष्णंभट उपाध्ये, महिपतराव काशी व महादजी भोसले हे होते. आनंदीबाईचा विचार रघूजीच्या विरुद्ध दिसल्यामुळें व बिंबाजीस पुत्र नसल्यामुळें छत्तिसगडचा सुभा आपल्या ताब्यांत घेण्याचा रघूजीनें निश्चय केला.

भवानीकाळोचा पुत्र यशवंतराव, भवानीशंकर व नथू भोसले यांस रघूजीनें सैन्यासह छत्तिसगडास रवाना केलें. महिपतराव काशी व कृष्णंभट यांनीं आनंदीबाईची व यशवंतरावाची सफाई करून दिली व यशवंतरावास रघूजीबरोबर पुण्यास जाणें असल्यामुळें रघूजीनें महिपतराव दिनकर यांस आपले तर्फेनें छत्तिसगडास रवाना करून यशवंतरावास परत आणिलें.

बिंबाजी मेल्यावर एक वर्षभर आनंदीबाईनें छत्तिसगडाचा कारभार पाहिला. परंतु त्यानंतर रघूजीनें छत्तिसगडचा अंमल आपणाकडे घेतला व आपल्या तर्फेचे सुभेदार छत्तिसगडचे सुभ्यावर पाठविले ( ना. प्रा. इ. पृ. २९४ ).

**आनंदीबाई होळकर**—ही यशवंतराव होळकराची पत्नी. शिंदे-होळकरांच्या युद्धांत सर्जेराव घाटग्यानें हिचा खासगी तालुका लुटला ( म. रि. उ. ३, पृ. १८६ ).

**आपग्गा**—ही तामीळ जातीची कवयित्री अव्हैयरची बहीण होय. हिचा जन्म अर्काटप्रांतांतील ऊटकाडू येथें झाला व पिरलीनें तेथेंच रानांत हिला सोडून दिलें. हीच पुढें एका परटाच्या स्त्रीस सांपडली. पुढें तिनें हिचें पालनपोषण केलें. हिला शास्त्रज्ञान कसें झालें असेल तें असो, हिनें नीतिशास्त्रावर 'नीतिपात्तल' नांवाचा एक ग्रंथ रचिला व इतर भावंडांप्रमाणें लग्न केलें नाहीं ( क. च. ).

**आपदेव**—हा अनंतदेवाचा बाप होय. यानें 'मीमांसान्यायप्रकाश' किंवा 'आपदेवी' या नांवाचा ग्रंथ लिहिला.

**आपनतिम्म**—( स. १७५२-७१ ) म्हैसूरच्या बेडादचा मुलगा. याला हेमनअली गांव मिळालें. याचा निर्वंश झाला.

**आपाजी बाळाजी धामले**—हा नानाचा खास भरंवशाचा सरदार होय. बाहेरच्या कारभारांत खुद्द पेशव्यांचें धोरण संभाळण्याकरितां अलीबहादराबरोबर याला नानानें दिलेला होता. हा स. १७८६-८७ त बडोद्यास असून तेथून यास अलीबहादरास मिळण्याची आज्ञा झाली. याचीं कित्येक पत्रें भारतवर्षाच्या दुसऱ्या वर्षांत १६-२९ छापलेलीं आहेत ( म. रि. उ. २, पा. १५२ ).

**आपा कवि**—( अप्पा कवि पाहा ).

**आपा खंडेराव**—( खंडेराव हरी पाहा ).

**आपाजी गणेश**—हा अहमदाबाद येथील पेशव्यांचा सुभेदार होय.

स. १७७७ मध्यें फत्तेसिंग गायकवाडास कराराची सनद पेशव्यांनीं करून दिल्यावर आपाजी गणेश, बेहेरे व अंताजी नागेश हे फत्तेसिंगाचा कारभार रगडून करूं लागले, तेणेंकरून फत्तेसिंग केवळ नामशेष झाला. स. १७७७ च्या डिसेंबरांत याचा मुलगा अमृतराव अमदाबादेंत होता. त्यास फत्तेसिंगानें भेटीस म्हणून बोलाविलें. तेव्हां तो जात असतां वाटेंतच एका गारद्यानें त्याला जिवें मारिलें. 'ही गोष्ट आपणाकडून घडली नाहीं' असें फत्तेसिंग म्हणाला. पण हा प्रकार त्याजकडूनच झाला असें लौकिकांत आहे ( म. रि. उत्तर. १. २४२ ).

**आपाजी नामदेव लांडे**—हे मूळचे सर्जापूर-कळंबे, किल्ले वैराटगड, ता. वंदन, येथील राहणारे. आपाजीचा बाप नामाजी व त्याचे भाऊ बाळाजी व नरसोबा हे होनप देशपांड्याकडे नोकरीस राहिले. नामाजीचे पश्चात् गुमास्तेगिरीचें त्याचें काम आपाजीकडे आलें. यानें होनपांचें देशपांडेपण बळकावण्याचा दोनदां प्रयत्न केला. पण तो सफळ झाला नाहीं. संभाजीच्या वेळीं मोगलाई अम्मल झाला. किल्ले कोंढाण्यास वेढा पडला असतां याची आई गोदूबाई हिनें कर्यात मावळचें देशपांडेपण आपणांस द्यावें असा अर्ज औरंगजेबास केला. वतन मिळविण्यासाठीं आपाजीचा चुलता बाळाजीकृष्ण हा बाटून मुसलमान

झाला. तेव्हां त्यास स. १७०६ मध्यें कर्यात मावळचें देशपांडेपण मिळालें. मुसलमान झाला म्हणून यास नांव लांडे देशपांडे पडलें. यास डोणजेकर देशपांडे असें म्हणतात ( श्या. म. मराठे ).

**आपाजी भगवंत रानडे**—हे न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे यांचे पणजे असून पटवर्धनांचा मामलेदार बाळकृष्णपंत लागू याचे हस्तक होते. स. १८०० च्या सुमारास हे व बाळकृष्णपंत लागू वेलस्लीस आणण्यास हरिहरावर सामोरे गेले ( म. रि. उ. ३ पृ. १६० ).

**आपाजी राम**—हैदरचा वकील आपाजीराम हा पुण्यास दादाचे मसलतींत राहून केवळ आपल्या धन्याचें हित साधीत होता. त्यानें पुण्याहून हैदरास लिहिलें: "संधी फार चांगली आली आहे. आपण क्षण विलंब न करितां फौजा पाठवून शिरे, मदगिरी, चेनरायदुर्ग, होसकोटे, बाळापूर, वगैरे तालुके लगोलग हस्तगत करावे." हैदरानें या सूचनेचा फायदा घेऊन वरील ठिकाणें ताबडतोब काबीज केलीं ( म. रि. म. भा. ४, पा. ३५४ ).

**आपाजी राम गाडगीळ**—हे नानासाहेब पेशव्यांचे साडू व लोभांतले. हे अक्कलकोटकर फत्तेसिंगबाबाचे कारभारी होते. हे युद्धावर जात. हावेरीच्या युद्धास हे होते ( स. १७६४ ). यांची पत्नी भिकाजीपंत रास्ते यांची कन्या सगुणाबाई.

**आपाजी राम दाभोळकर**—हा रामाजी अनंताचा पुत्र. रामाजी अनंत पानपतावर मृत्यु पावला ( म. रि. उ. वि. २ पृ. २४३ ). हा महादजी शिंद्याचा कारभारी होता. हा स. १७९० च्या सुमारास मारवाडच्या स्वारींत मरण पावला. महादजी याच्याशीं कधीं रागानें व कधीं लोभानें सारखी वाटाघाट करी ( म. रि. उ. १, पा. ३४६ ).

**आपाजी राम सहस्रबुद्धे**—हा दुसऱ्या बाजीरावाचा एक हस्तक होय.

**आपाजीराव द्वारकोजीराव पाटणकर**—याच्या आजाचें नांव चांदजीराव. हे सर्व पेशव्यांचे सरदार होते. याचें मूळ आडनांव साळुंखे. एकदां गुलटेकडीजवळ श्री. माधवराव आणि नारायणराव हे गजयुद्ध पाहत असतां एक हत्ती थेट श्रीमंतांच्या अंगावर आला, तेव्हां यानें त्याला सोंडेवर कटयार मारून परतविलें. त्यासाठीं यांना चौघडा मिळाला.

**आपाजी हरी**—वसई खाडीच्या मुखाशीं एक इंग्रजी जहाज मराठ्यांनीं जाळिलें. तेव्हांपासून इंग्रजावर पुणेंकरांचा बेभरंवसा झाला. त्यामुळें नारो आपाजीनें फेब्रुवारींत पुरंदरास कळविलें कीं, आपाजी हरी, शिवाजी विठ्ठल व विसाजी केशव यांना निक्षून लिहावें कीं, इंग्रजास दहशत पडेल अशी हरएक तरतूद करावी ( म. रि. उ. १, पृ. २५ ).

**आपा देसाई निपाणकर**—याचें नांव सिधोजीराव निंबाळकर असून हा प्रथम दौलतराव शिंद्याच्या पदरीं नोकर होता. स. १८०० मध्यें शिंद्यानें याला आपली पलटण देऊन परशुरामभाऊ पटवर्धनाची जहागीर काबीज करण्याकरितां रवाना केलें होतें. हा स. १८०३ मध्यें जनरल वेलस्लीस बाजीरावातर्फे येऊन मिळाला. बाजीरावाच्या पदरीं बापू गोखले वगळल्यास हा एकटाच उत्तम सेनानायक होता. पुढें बाजीरावाची फूस मिळाल्यानें यानें चिकोडी व मनोळी हे दोन्ही जिल्हे आपल्या ताब्यांत घेतले. नंतर यानें खेमसावंताच्या मुलाचा गळा दाबून प्राण घेवविला. पण या खुनामुळें याचा मुळींच फायदा झाला नाहीं, कारण पुंडसावंत नांवाच्या इसमानें, आपाजीचें सैन्य कोल्हापूरकरांशीं लढण्यांत गुंतलें असतां, ती संधी साधून याचें सर्व सैन्य देशाबाहेर हाकून दिलें. बाजीरावाच्या कपटीपणामुळें स. १८१३ च्या सुमारास याला विनाकारण आपल्या चतुर्थांश जहागिरीस मुकावें लागलें. स. १८१८ सालीं जी कोपरगांवची लढाई झाली, तींत हा पेशव्याचे बाजूनें लढत होता. हा एक बाजीरावाचा नाणावलेला सेनापति होता, तरी बाजीरावाचें राज्य इंग्रजांनीं घेतल्यावर त्यांनीं याची जहागीर खालसा केली नाहीं. पेशव्यांशीं युद्ध चाललें असतांच याचा इंग्रजांशीं पत्रव्यवहार सुरू होता ( ग्रँ. ड. ).

कोणे दिवशीं याच्या वाड्यांत कीर्तन झालें. आप्पासाहेब कीर्तन ऐकत बसला होता. याच्या समोरच एका खांबाशीं टेकून याचा एक कारकून बसला होता. त्याच्या अंगरख्यांत एक ढेकूण शिरला होता. त्यामुळें तो कारकून वारंवार चुळबूळ करी. त्याच दिवशीं अशी गोष्ट झाली कीं, आपासाहेबाच्या पागोट्यांत भला मोठा विंचू जाऊन बसला होता. हुजऱ्यानें तसेंच पागोटें आणून दिलें; तेंच डोईस घालून आपासाहेब कीर्तनास येऊन बसला. कीर्तनास आरंभ झाल्यापासून विंचवानें सारखे डोक्यावर तडाखे मारण्यास आरंभ केला. कथा संपेपर्यंत आपासाहेब ते तसेच सोशीत होता.

कथा संपल्यावर आपासाहेबानें समोर बसलेल्या कारकुनास हाक मारून विचारलें कीं, कथेस आरंभ झाल्यापासून चुळबूळ कसली चालली होती ? कारकुनानें सांगितलें कीं, कपड्यांत ढेकूण शिरल्यामुळें अशी गोष्ट घडली.

मग आपासाहेबानें डोईचें पागोटें काढून झाडलें तों त्यांतून भला मुठीसारखा विंचू बाहेर पडला. आपासाहेब कारकुनास म्हणाला, वेड्या, ढेकणानें इतकी तुझी तारांबळ उडवली, हा तर प्रहरभर सारखें माझें डोकें फोडीत आहे ( भा. व. खं. ३ जु. ऐ. गो. पृ. ४० ).

**आपा पुरंदरे ( धोंडो मल्हार )**—( मृ. स. १७८५ ) हा तुकोपंत पुरंदऱ्याचा नातू. पुरंदऱ्यांच्या घरांत तंटे होते. नीळकंठ आबा पुरंदरे दादाचे पक्षांत असून हा माधवरावाचे पक्षांत होता. कोळ्याच्या दंग्याच्या बाबतींत याचा सरंजाम जप्त झाला होता ( माधवराव पेशवे पाहा ). हा पुणें प्रान्ताचा सुभा होता. कात्रजच्या तलावाचें काम याच्या कारकीर्दींत झालें.

**आपा बळवंत ऊर्फ कृष्णराव बळवंत मेहेंदळे**—( स. १७४८–१७९८ ) हा पानपतवर पडलेल्या बळवंतरावाचा पुत्र. हा एक पेशवाईंतील सरदार असून प्रथम राघोबादादाच्या बाजूस होता. पण जेव्हां हरिपंत फडक्यानें दादाचा पाठलाग सुरू केला आणि दादा नर्मदापार होऊन इंदुरास होळकरांकडे गेला, त्या वेळीं दादाची परिस्थिति पाहून, या वेड्यापिराच्या नादीं लागण्यांत आतां अर्थ नसून उलट हानि आहे, अशी याची व दादाच्या पक्षपात्यांची खात्री झाली. तेव्हां यानें ‘ आपल्याच्यानें तुम्हांबरोबर पळवत नाहीं’ असें दादास सांगून, हा आपल्या सर्व सामानासह नर्मदेवरून परत येऊन तापीतीरीं चांगदेवावर हरिपंतास मिळाला; व यास हरिपंतानें आपल्याजवळ ठेवून घेतलें.

पुढें स. १७७५ मध्यें इसफ नांवाच्या गृहस्थानें दोन हजार गारदी व एक हजार राउतांनिशीं सातपुड्याचे आजूबाजूस राहून नेमाड तालुक्यांत उपद्रव करण्यास सुरवात केली. तेव्हां हरिपंतानें याला इसफावर पाठविलें. नापारच्या लढाईंतून राघोबादादा पळून गेल्यावर हरिपंतानें याला व आणखी कांहीं सरदारांना मिळून गोविंदराव गायकवाडावर रवाना केलें. नंतर दादा जेव्हां सुरतेजवळ अश्विनीकुमार येथें इंग्रजांच्या आश्रयास गेला तेव्हां हा हरिपंतांचे तर्फेनें राघोबादादाशीं पत्रव्यवहार करूं लागला (खरे.१८४०, १८४२, १८४६, १८४९, १८५३). स. १७८६ मध्यें हरिपंतानें याला, बाजीपंत आण्णा आणि रघुनाथराव पटवर्धन यांना टिपूविरुद्ध निजामाच्या मदतीस पाठविलें. पण अखेरीस गजेंद्रगड येथें तह झाला ( स. १७८७ ). ( म. रि. उत्तर वि. २, पृ. २८४ ).

पुढें हा बहुतेक नानाफडणीसाचे सहवासांत असे. नंतर दौलतरावानें नानास कैद केल्यावर, बाजीरावानें आपाबळवंत व नानाचे दुसरे साथीदार यांना अटकेंत ठेविलें व प्रत्येकाचा जो द्रव्यसंचय असेल तो लुबाडून घेऊन त्यांना त्रास देण्याचा उपक्रम सुरू केला. तेव्हां मराठी राज्यांतील चाळीस वर्षांच्या घडामोडी पाहिलेल्या या पुरुषानें एकाएकीं आत्महत्या केली ( ता. १५-४-१७९८ ) याच्याविषयीं खालीलप्रमाणें उल्लेख आहे.

‘ आपा सारखा पुरुष होणें नाहीं. त्याजपाशीं पैका मागों लागले, तेव्हां अब्रूसाठीं अमृत प्राशन केलें, आणि देवाधीन झाले. ’

**आपासाहेब पटवर्धन**—परशुरामभाऊचा मुलगा. नाना फडणीसाच्या वेळीं हा सैन्याधिकारी होता. इंग्रजांच्या मदतीस जाण्यास नानानें यास सांगितलें पण यानें तें नाकारलें.

**आपासाहेब भोसले**—हा ककाजी भोसल्याचा ( भांबोरे येथील ) मुलगा होय. याला चिमणाजी नांवाचा वडील भाऊ होता.

हा मोठा बलवान् व रागीट असा होता. याच्या धाडसाविषयीं अनेक आख्यायिका जुनीं माणसें सांगतात. हा व याचा वडील बंधु चिमणाजी असे दोघेजण सायंकाळचे समयास महादेवाच्या दर्शनाकरितां चालले असतां वाटेंत दोघा हल्यांची मोठी टक्कर झाली, व ते दोघे लढत लढत जवळच एक गाय बांधिली होती तिजवर जावयास लागले. हे पाहून चिमणाजीनें भावास सांगितलें कीं, “ अरे अप्पा, गाईला वाचीव. ” हे भावाचे शब्द ऐकून हा एकदम दोन्ही हल्यांचे मध्यें घुसला व दोन्ही हातीं दोन्ही हले दोन्हीकडे सारून त्यांची झुंज सोडविली. याला मूलबाळ कांहींच नव्हतें ( मं. सप्तम सं. वृ. श. १८४१ पृ. ६९ ).

२. ( मुधोजी भोसले पाहा ).

**आबदार बेगम**—अकबर बादशहाची एक राणी.

**आबा काळे**—हा शिंद्यांच्या पलटणीवरचा अधिकारी. पुढें याचा व प्रतिनिधींचा बेबनाव होऊं लागला. कांहीं दिवस वाड्यांत व शहरांत कारभार करूं लागला. याच्या मदतीस विश्वनाथभट मामा व चिंतोपंत देशमुख हे होते. याचीं पत्रें उपलब्ध आहेत ( म. रि. उ ३ पृ. ६५ ).

**आबा कृष्ण शेलूकर**—आनंदराव काशीचा आप्त. यानें जातीनें बंदगान निजामचा ज्येष्ठ पुत्र अलिज्याहा याचा सैन्यासह जाऊन बंदोबस्त केला. पुढें निजामाशीं याची औरंगाबाद येथें मुलाखत झाली, तेव्हां यानें निजामाला लक्षावधि रुपयांचे नजराणे दिले व यालाहि त्यांनीं अनेक गावें दिलीं ( पे. द. ३१.१६४ ).

सातारा जिल्ह्यांत कोरेगांव तालुक्यांत फत्यापूर म्हणून एक गांव आहे, तेथचा हा कुलकर्णी. हा घरचा फार दरिद्री होता, परंतु मोठा हुषार कारकून होता. होतां होईल तितकें आपलें ठिकाण सोडूं नये, अशी वतनदार लोकांना एक खोडच असते. त्याप्रमाणें हाल सोशीत हा तसाच घरीं होता; परंतु शेवटीं कंटाळून यानें घर सोडिलें आणि पुण्यास आला. तेथें पुष्कळ खटपटी करून ह्यानें फडांत कारकुनीची जागा मिळविली. ह्याचें अक्षर इतकें उत्तम होतें व लिहिण्याची शैली इतकी उत्कृष्ट होती कीं, जेव्हां जेव्हां ह्याचें काम नाना फडणिसासमोर जाई तेव्हां तेव्हां तें पाहून नाना फार संतुष्ट होई. पुढें नानानें आपल्या खाजगी कारकून मंडळींत याची नेमणूक केली. तेव्हां तर नानाची यावर फारच मर्जी बसली. पुढें खुद्द नानाचा कागदपत्रांचा रुमालहि नानानें याच्या ताब्यांत ठेवला. नानाचीं जीं अति विश्वासू माणसें होतीं त्यांत आबा शाळूकर व गोविंदराव पिंगळे हे मुख्य होते. नानाच्या कृपेनें पुढें ह्याला गुजराथची सुभेदारी मिळाली होती. पुण्यास शाळूकराच्या बोळ प्रसिद्ध आहे ( भा. व. खं. ३ जु. ऐ. गो. पृ. ३७–३८ ).

दुसरा बाजीराव आल्यावर चिमाजीआप्पाला गुजराथचा सुभेदार केला व यास दुय्यम सुभेदार नेमलें. नानाला कैद केलें तेव्हां याच्यावरहि तीच पाळी आली. पण दहा लक्ष रुपये देऊं करून हा सुटला. शिंद्याला रुपये देण्याकरितां यानें गायकवाडींत सक्तीनें कर वसूल केला तेव्हां गोविंदराव गायकवाडाचें द याचें भांडण जुंपलें व त्यांत इंग्रजाशीं संगनमत करून त्यानें याला कैद केलें. पण पुणें दरबारनें याला आपल्याकडे बोलावून घेतलें ( १५–१० –१८०१ ) ( म. रि. उ. वि. ३, पृ. ३८० ).

**आबाजी महादेव सोवनी**—हा एक राघोबादादाचा सरदार होय. जेव्हां हरिपंत फडक्यानें दादाचा पाठलाग सुरू केला तेव्हां हा व सदाशिव रामचंद्र हे दोघे राघोबादादातर्फे हरिपंताशीं मध्यस्थी करीत.

पुढें यानें दादाचा पक्ष सोडून हा हैदराजवळ नोकरीस राहून कारस्थानें करूं लागला. स. १७७७ त मानाजी फांकडे दादाचा पक्ष सोडून हरिपंताबरोबर कर्नाटकांत हैदरावरच्या मोहिमेंत होता. त्या वेळीं हैदराजवळ तुळ्या पवार, आबाजी महादेव व बाजीराव बर्वे हे होते. ह्या तिघांनीं मानाजीस कळविलें कीं, 'पैका पाहिजे तो पाठवितों, हरिपंताची फौज फोडावी, हैदरखान लढाईस उभे राहतील ते समयीं सर्वांनीं येऊन त्यास मिळावें.' याला मानाजीनें खालीलप्रमाणें उत्तर दिलें. 'आपल्या म्हणण्याप्रमाणें आम्हीं अडवून बसतो, तुम्हीं चालून यावें.' त्याप्रमाणें मानाजीनें हैदराकडून पैसे घेऊन हरिपंतांचे सैन्यांतील यशवंतराव माने, निळकंठराव थोरात व महादजी भोंसले मुंगीकर वगैरे मराठे सरदार फितविले.

अशा प्रकारचीं भयंकर कारस्थानें यानें हैदराजवळ असतांना केलीं.

**आबाजी रघुनाथ चिटणीस**—हा देशस्थ ब्राह्मण असून शिंद्याचा कारभारी होता. याला शिंद्याच्या लष्कराची चांगली माहिती होती. तेव्हां याचे मार्फत नानानें फितुरी करून शिंद्याची फोडाफोड मांडली.

पुढें हा आपल्या मंडळीसह नानास येऊन मिळाला. नंतर दौलतराव शिंद्यानें याला कैद केलें. पण कांहीं कारणामुळें स. १७९९ च्या जानेवारी मध्यें दौलतरावानें याला कैदेंतून सोडवून जवळ आणिलें. शिंद्यानें सामोरें जाऊन याचा सत्कार केला. हा सरकारवाड्यांत जाऊन बाजीरावास भेटला. नानांचीही भेट घेतली. अशीं सर्वांशीं खलबतें करून यानें शिंद्याचा कारभार पुन्हा हातीं घेतला. हा आल्यापासून लुच्चांचा कारभार कमी झाला. याला कृष्णोबा नांवाचा एक भाऊ होता. हे दोघेहि नानाजवळ जेव्हां महाडास होते, तेव्हां नानाचे आग्रहावरून दहा लाख रुपये शिंद्यानें नजराणा घेऊन कृष्णोबाच्या नांवानें चिटणिसी करून दिली.

**आबाजी लक्ष्मण लाड**—हा लखबादादाचा मुलगा. हा यशवंतराव होळकरानें पुण्यावर केलेल्या स्वारींत हजर होता. त्या वेळीं यानें बरीच लूट मिळवली. प्रथम यानें अहमदनगर प्रांतांत लुटालूट केली. नंतर महादजीनें बांधलेला जामगांवचा उत्कृष्ट वाडा यानें खणून काढला ( म. रि. उ. ३ पृ. १९४–९६ ).

**आबाजी विश्वनाथ प्रभु**—याचा जन्म स. १६३१ मध्यें झाला. हा नेहमीं बाजी पासलकराबरोबर काम करीत असे. स. १६४९ मध्यें शिवाजीनें आपल्या सरदारांत दाखल करून घेतलें. मोरे याजवर जय मिळवून यानें जावळी काबीज केली. रोहिडा किल्ला घेतांना बाजी प्रभूबरोबर युद्ध करून त्याचा पराजय केला. बाजी प्रभूस शिवाजीकडे येण्यास यानें त्याचें मन वळविलें. संभाजी व राजाराम याच्या वेळीं हा मोंगलाशीं शौर्यानें झुंजला. स. १६९४ त औरंगजेबानें तोरणा ऊर्फ प्रचंड किल्ल्याला वेढा घातला असतां यानें मर्दुमकीनें किल्ल्याचें रक्षण केलें. पण परत येत असतां हा धारातीर्थी पतन पावला ( स. १६९४ ). याचा मुलगा जनाजी.

**आबाजी शंकर**—हा बाळोजी कुंजराचा कारभारी. याचा काल दुसऱ्या बाजीरावाच्या वेळचा होय. पुण्यांत याचा वाडा असलेला एक कसब्यांतील बोळ यांचे नांवें प्रसिद्ध आहे. याचें उपनांव शालिग्राम असावें.

**आबाजी सोनदेव बहुतकर**—हा कल्याण भिवंडी-कडील सोनोपंताचा मुलगा. हा दादोजी कोंड-देवाच्या हाताखालीं तयार झाला. यानें स. १६४८ मध्यें कल्याण प्रांतावर स्वारी केली, व तेथील सुभेदार मुल्ला अहमद याजला कैद करून तो किल्ला व प्रांत हस्तगत केला. शिवाजी कल्याणास गेला आणि याची हुषारी पाहून यालाच तेथील सुभेदार नेमलें. याच स्वारींत मुल्ला अहमदची सुंदर सून याच्या हातीं आली. तिची शिवाजीनें सन्मानपूर्वक पाठवणी केली आणि याला दोष देऊन आपल्या लोकांस नीतिमत्तेचा धडा घालून दिला, असें सप्तप्रकरणात्मक शिवचरित्रांत लिहिलें आहे. राज्या-भिषेकाच्या वेळीं वसूली व हिशेबाचें काम याच्याकडे होतें. याच्या खात्यांत तीनशें कारकून होते. हणमंते कुटुंबांत हें मुज्मूचें काम पूर्वी असल्यानें त्याशीं याची चुरस होती. याचा धाकटा भाऊ निळो सोनदेव होय. पण याच्याकडे मुज्मू दिली होती, हें डफचें म्हणणें राजे-वाडे खोटें आहे असें ठरवितात ( रा. प्रस्तावना, पा. ४४४ ).

**आबा पुरंदरे** ( नीलकंठ महादेव )— ( मृत्यु स. १७६५ ) हा महादोबा अंबाजी पुरंदरे याचा पुत्र. याच्या पत्नीचें नांव उमाबाई. हा माधवराव पेशव्याचा मुख्य दिवाण आणि सखाराम बापू बोकील हा दुय्यम दिवाण होता. माधवराव पेशवे व रघुनाथराव दादा यांच्या तंट्यांत हा रघुनाथराव पेशव्याच्या बाजूचा होता. याचा मृत्यु शा. श १६८७ मार्ग व. ५ रोजीं झाला. याला औरस संतति नसल्यानें यानें आपला चुलत भाऊ त्रिंबक पुरंदरे याचा मुलगा दत्तक घेतला. त्याचें नांव नारायण असून तो महादजीपंत ऊर्फ बाबा या नांवानें प्रसिद्धीस आला.

**२.** ( मृ. स. १८२६ ) ( नीलकंठ महादेव पाहा. )

**आभीर**—पुराणांत भविष्यकालीन राजे सांगतांना आंध्रांनंतर दहा आभीर राजांचा निर्देश आहे ( ब्रह्मांड ३. ७४.; वायु. २, ३७; विष्णु. ४. २४; भा. १२. १; मत्स्य. २७३. १८ ). आंध्रांनंतर हे झाले असें पुरा-णांत म्हटलें आहे. त्यावरून आभीरांचा काल आंध्रांनंतरचा ठरतो. आंध्रांपैकीं शेवटला राजा पुलोमायी हा स. २२५ पर्यंत राज्य करीत होता हें निश्चित ठरलें आहे. त्यानंतर यांनीं सदुसष्ट वर्षें राज्य केलें असें मत्स्यपुराण, ब्रह्मांडपुराण व वायुपुराण यांत स्पष्ट म्हटलेलें आहे. पण यांची नांवनिशी स्पष्टपणें कोणींच दिलेली नाहीं.

रुद्रभूति आभीराचा निर्देश शक १०३ मधील गुंडाच्या शिलालेखांत आला आहे. पण हा रुद्रभूति राजा नसून रुद्रसिंह क्षत्रपाचा सेनापति होता.

वीरसेन ऊर्फ ईश्वरसेन अहिर याचें वर्चस्व शक ३४१ मध्यें खानदेशावर होतें असें नाशिकच्या शिलालेखांत म्हटलें आहे ( E. I. Vol. VIII. P. 88 ). आभीर शब्दाचें अहीर हें अपभ्रष्ट रूप आहे. हा शिलालेख याच्या राज्या-रोहणानंतर नवव्या वर्षीचा आहे. याच्या आईचें नांव दमरी व पित्याचें नांव शिवदत्त आभीर असें आहे. आंबेरी येथील देवगिरीचा सिंहदेव यादव याच्या शिलालेखांत ‘ गुर्जर व मालव राजे हे नम्र झाले व शूर आभीर राजांची सर्व जात नाश पावली.’ असें वर्णन आहे. हे शूर आभीर राजे म्हणजे द्वारसमुद्राच्या बल्लाळराजांपैकीं नरसिंह होय. याचा कांहीं मुलुख सिंह ऊर्फ सिंघण यादवानें घेतला होता ( Burgess. Arch. Sur. Rep. 1878–86 ).

शालिवाहनानंतर तीनशें वर्षांत आभीर राजे खानदेश, नाशिक, काठेवाड, पालनपूर व कच्छ येथें राज्य करीत होते असें दिसतें. आठव्या शतकांत जेव्हां काठी लोक गुजराथेंत आले तेव्हां तेथें सर्वत्र आभीरांचा ताबा होता असें इतिहासावरून समजतें. हेमचंद्राच्या द्व्याश्रय काव्यांत जुनागडजवळील वनथली येथील चूडासम ग्रहरिपु राजा हा आभीर होता असें म्हटलें आहे. चूडासमाची अहेर राणे म्हणून पुढेंहि प्रसिद्धी दिसते. ख्रिस्ती शकांच्या आरंभीं नेपाळाकडे अहीर राजे झाले. आंबेरीच्या शिला-लेखांत लिहिल्याप्रमाणें सिंघणाचा सेनापति खोलेश्वर यानें त्यांचा निःपात केला.

दिल्ली ऊर्फ हस्तिनापूर येथेंहि एका अहिरवंशानें राज्य केलें आहे. त्याच्या एकमेकींशीं मेळ नसलेल्या बऱ्याच याद्या उपलब्ध आहेत. त्यांपैकीं कांहीं पुढें देतों.

१. दिल्लीच्या मित्रपाळ वंशांतील शेवटला राजा विक्रमपाळ यास अहीर नामक त्याच्या वजीरानें मारिलें व तो अहीर गादीवर बसला. त्यांत पुढीलप्रमाणें आठ पुरुष झाले आणि त्यांनीं १२५ वर्षें राज्य केलें. १ अहीर २४ वर्षें, २ विक्रम अहीर ३३ वर्षें, ३ मुलुखचंद्र २ महिने, ४ विक्रमचंद्र १२ वर्षें, ५ मूळचंद्र २ वर्षें, ६ रूपचंद्र १४ वर्षें, ७ मलराणचंद्र १२ वर्षें, ८ सूरचंद्र २६ वर्षें ( अर्वाचीन कोश ).

२. दयानंद सरस्वतीनें आपल्या सत्यार्थ प्रकाशांत मलुकचंदवंश म्हणून अशींच थोड्या फरकानें दहा नांवें दिलीं आहेत. त्यांनीं १९१ वर्षें एक महिना सोळा दिवस राज्य केलें असें दिलें आहे.

३. अनंत धोंडूजीकृत भारतेतिहास या पुस्तकांत अहीर वंशांतील सोळा नांवें दिलीं असून त्यांनीं २२७ वर्षे सात महिने व सत्तावीस दिवस राज्य केलें. त्यांतील पहिलीं आठ नांवें थोड्या फरकानें वरच्या सारखींच आहे.

या दंतकथेसारख्या माहितीवरून असा एक बराच बलिष्ठ वंश हिंदुस्थानांत होऊन गेला एवढीच गोष्ट सिद्ध होते.

या टिपणांतील बरीच माहिती मं. चे त्रै. वर्ष ७, अं. १-४, पा. १६५-१६७ वरून घेतली आहे.

**आमन(ण) यादव**—यादव घराण्यांतील महादेवाचा पुत्र. बापाचे पश्चात् गादीवर बसला (Paithana Grant, Ind. Ant. vol. XIV. p. 317). परंतु थोडक्याच दिवसांत कृष्णपुत्र रामचंद्रानें याला गादीवरून काढून टाकून आपण गादीवर बसला (स. १२७१).

**आम्रदेव**—अनहिलपट्टणच्या नरपतिचा पिता. हा धारा नगरीस राहत असे (भा. ज्यो. पा. ४७६).

**आम्रभट**—याला आंबडा असेंहि म्हणत (अजयपाळ पाहा).

**आयर्व्हिन वुइल्यम**—(जन्म स. १८४० मृ. १९११) हा बंगाल प्रांतांत नोकरीवर असून याला फार्सीची आवड व हिंदी लोकांविषयीं सहानुभूति विशेष होती.

याला फार्सी कागद जमविण्याचा नाद असून उत्तर मोंगलशाहीचे अनेक कागद व बखरी यानें जमविल्या. औरंगजेबाच्या पुढचा म्हणजे स. १७०७ पासून १८०३ मध्यें मोंगल बादशाही बुडाली तोंपर्यंतचा संगतवार इतिहास अस्सल कागदांच्या आधारें लिहिण्याचा याचा संकल्प होता. संशोधनाचें काम करण्यांत हा निष्णात असून वृद्धवेतन घेऊन स्वदेशीं गेल्यावर यानें हा उद्योग जोरानें सुरू केला. सर जदुनाथ सरकारांस औरंगजेबाचे कागद हेच पुरवीत असत. इतर संशोधकांनाहि मदत करण्यास हे नेहमीं तयार असत. यांच्या ग्रंथाचें नांव 'लेटर मोगल' असें असून त्यांत स. १७०७-१७३९ पर्यंतचा इतिहास आला आहे. या ग्रंथांतील स. १७१२-२० च्या मोंगल कारभारास सय्यदांची कारकीर्द असें नांव असून आयर्व्हिनचे लेख 'अरेबियन नाईट्स्' सारखें चटकदार झाले आहेत. स. १७१२-२० पर्यंतच्या दहा वर्षांच्या कारकीर्दीचा इतिहास लिहिल्यावर हा मरण पावला. त्यापुढील भाग याच्या लिखाणावरून संपादकानें तयार केला व प्रसिद्ध केला. संपादक सर यदुनाथ सरकार आहेत.

**आयामल्ल**—याला राजा म्हणत असून हा जयसिंहाचा मंत्री होता. याचा विहारी सतसई करणाऱ्या कृष्ण नांवाच्या हिंदी कवीला आश्रय होता. हा जयसिंह म्हणजे सवाई जयसिंह असावा.

**आयेशा**—अबू बकरची कन्या आणि मुहम्मद पैगंबरची अत्यंत लाडकी बायको होती. ही ७ वर्षांची कुमारिका असतांना लग्न झालें. ही महत्त्वाकांक्षी व उद्धट होती तरी हिच्याविषयीं लोकांत आदर असे. मुहम्मद पैगंबरावर हिचें फार वजन होतें.

हिनें मुहंमदाच्या निधनानंतर अलीला गादीवर न येऊं देण्याबद्दल कसून विरोध केला, व त्याच्याबरोबर लढाया केल्या.

पैगंबरी व धर्मनिष्ठांची माता असें हिला मुसुलमान संबोधीत असत. स. ६७८ मध्यें हिच्या वयाच्या ६७व्या वर्षी ही मरण पावली.

हिच्या मृत्यूविषयीं एक आख्यायिका सांगतात. येझिदशीं एकनिष्ठपणें वागण्याचें हिनें मोठ्या उद्दामपणानें नाकारल्यावर पहिल्या मुआवियानें हिला मेजवानीस घरीं बोलाविलें. हिच्या खुर्चीखालीं न दिसेल असा खड्डा खणून त्यावर पानें फुलें पसरून ठेविलीं होतीं, तीं अशीं कीं त्यायोगें धोका दिसूं नये. जेव्हां ही खुर्चीवर बसली तेव्हां आयतीच खड्ड्यांत पडली व नंतर चुना, दगड वगैरेंनीं तोंड बंद करून घेतलें.

**आरजु**—(स. १६७१-१७२३) याचें नांव सिराजुद्दीन अलीखान असून आरजु हें उपनांव आहे. याच्या पित्याचें नांव हसमुद्दीन रहसाम असें होतें. हा स. १६९५ मध्यें फर्रुखसियरच्या वेळीं दिल्लीस आला. दिल्लीविषयीं याला मोठें प्रेम वाटत असे. हा उर्दूपेक्षां फार्सीतील नामांकित कवि आहे. यानें असे शिष्य तयार केले कीं, त्यामुळें हा उच्चपदास पोंचला. जानजाना मजहर, सौदा, मीर तकी, मीर दर्द वगैरे याचे शिष्य होत. यानें उर्दू भाषेची सुधारणा केली. याचे फार्सी कवितांचे दोन दिवान (ग्रंथ) प्रसिद्ध आहेत. याशिवाय यानें कांहीं उपयुक्त पुस्तकें लिहिलीं आहेत. सिराजुल्लुकात, चिरागे हिदायत, शरह गुलिस्ताने सादी, शरह सिकंदरनामा, हीं त्यांतील कांहींचीं नांवें होत. वास्तविक हा उर्दू कवि नव्हता (क. कौ. भा. ४).

**आयल्लू भासेअर**—हा एक तेलगू कवि होय. हा विजयानगरच्या २ऱ्या वेंकट राजाचा आश्रित होता.

यानें राजाच्या सांगण्यावरून हले ( जुन्या ) कानडी भाषेंतील रट्ट कवीच्या कवितांचें भाषांतर तेलगूंत करून त्यांस रेत्त मतमु असें नांव दिलें ( अरविदु डिनस्टी ५२१ ).

यालाच आयला भास्कर म्हणत असावेत. यानें केतुमतन नांवाच्या ग्रंथाचें तेलंगींत श्लोकबद्ध भाषांतर केलें ( तेलगू वाङ्मय, पा. ५६ ).

**आरण्यराज**—अबूच्या परमारांपैकीं उत्पलराजाचा पुत्र.

**आरनेरळ चामराज**—( स. १४७८-१५१३ ) यालाच आर्वेरळ चामराज दुसरा असें सिवेलनें म्हटलें आहे. हा म्हैसूरच्या तिम्मराजाचा पुत्र. याला बद्दाद ( बेत्तड ) नांवाचा मुलगा होता.

**आरबखान**—हा अहमदाबादचा सुभेदार होता. हा अत्यंत हुशार होता. याला एक अत्यंत रूपवान् मुलगी असून ती दिल्लीचा शहाजादा सुजा यास दिलेली होती. ती सासरीं गेली तेव्हां आरबखानानें तिच्याबरोबर २० हत्ती, १ हजार घोडे व निरनिराळ्या जिनसांनीं भरलेले ६ हजार गाडे नजर पाठविले. अहमदाबाद येथील याच्या कचेरींत पांचशें नोकर असून शिवाय याच्या घरचे चारशें नोकर होते. ते सर्व याच्या घरीं जेवीत. याच्या घरचा खर्च दरमहा सुमारें १२-१३ हजार होता. याचे खाजगी घोडे पांचशें व हत्ती पन्नास होते. त्यांचा खर्च वेगळाच. याच्या नोकर-चाकरांचे पोषाख मौल्यवान् होते, तरी याचें राहणें अगदीं साधें होतें. फ्रेंच गृहस्थ मंडेल्स्लो हा आरबखानाला भेटला होता व आरबखान त्याशीं अत्यंत सन्मानानें वागला. आरबखान बराच क्रूर व कडक असे ( ब्रि. रि. पृ. १, ३१० ).

**आरम गुलाम**—दिल्लीच्या गुलाम घराण्याचा संस्थापक जो कुतुबुद्दीन त्याचा हा मुलगा होय.

हा बापाच्या पाठीमागून तख्तनशीन झाला. परंतु प्रबळ सुभेदारांच्या हाताखालीं असलेलें एवढें अफाट राज्य चालविण्याची यास शक्ति नव्हती, त्यामुळें यास चहूं बाजूंनीं शत्रू उत्पन्न झाले. अशा स्थितींत दिल्लीच्या प्रमुख दरबारी मंडळीनें कुत्बचा जांवई अल्तमश, बदाऊन प्रांताचा अंमलदार, ह्यास दिल्लीस येऊन राज्यकारभार हातीं घेण्याविषयीं विनंति केली.

याचा काल स. १२१० असून यानें फक्त कांहीं महिनेच राज्य केलें असावें. यास कांहीं पुस्तकांत आरामशाहा असेंहि म्हटलें आहे ( म. रि. भा. १ ला ).

**आर्द्रक ( भद्रक ) शुंग**—शुंग घराण्यांतील एक राजा. याला वायुपुराणांत ध्रुक किंवा भद्र, तसेंच मत्स्यपुराणांत अंतक असें म्हटलेलें आहे. याच्या पित्याचें नांव भागवतांत वसुदेव व ब्रह्मांडपुराणांत वसुमित्र असें दिलेलें आहे. यानें दोन वर्षे राज्य केलें.

**ऑर्म**—याचें नांव रॉबर्ट ऑर्म. कॅ. अलेक्झँडर हॅमिल्टन याजबरोबर हा व्यापार करण्याकरितां हिंदुस्थानांत आला. हा बंगाल प्रांतांत राहत असे. यानें व बर्नियर यांनीं बंगाल प्रांताविषयीं बरीच माहिती दिली आहे. ऑर्म यानें मराठ्यांचा इतिहाससुद्धां लिहिला आहे. त्याचें नांव हिस्टॉरिकल फ्रॅग्मेंटस्. यानें अनेक ठिकाणचे उतारे संग्रहित केले ते इंडिया ऑफिसमध्यें ठेविले आहेत. यानें नकलून घेतलेल्या कित्येक कागदांच्या अस्सल प्रती आज उपलब्ध नसल्यामुळें ह्या संग्रहाचें विशेष महत्त्व आहे. यांतील शिवकालीन पत्रांतील उतारे पत्रसारसंग्रहांत मराठींत दिले आहेत.

**आर्य असंग**—( स. ४५० सुमारें ) यास चिनी भाषेंत Mucak असें म्हणत असत. या बुद्ध तत्त्वज्ञाचा जन्म गांधार येथें झाला. प्रथम हा महिशासक पंथाचा अनुयायी असून हीनयान पंथांतील वैभाषिक तत्त्वज्ञानाचें अनुसरण करीत असे. तदनंतर हा मैत्रेयाचा शिष्य बनला व महायान पंथांतील योगाचार्य तत्त्वज्ञानाचें अनुसरण करूं लागला. कांहीं दिवस नालंद येथें पंडित म्हणून हा राहत असे. हा स. ४५० च्या सुमारास होऊन गेला.

स० ५३१ त याच्या ' महायानसमपरिग्रहशास्त्र ' या ग्रंथाचें चिनी भाषेंत भाषांतर करण्यांत आलें. तेव्हां याची जास्तींत जास्त अलीकडची तारीख म्हणजे स. ५३१ ही धरली जाते. हा कौशंबी व अयोध्या या ठिकाणीं कांहीं वर्षे राहत असे. त्या दोन्ही ठिकाणचा नष्टप्राय संघाराम सनाच्या ७ व्या शतकांत ह्युएन्संगानें पाहिला होता.

यानें एकंदर १२ ग्रंथ लिहिले, त्यांपैकीं बऱ्याच ग्रंथांच्या चिनी व तिबेटी प्रती उपलब्ध आहेत. डॉ. सुगिउरू ( Sujiuru ) यांनीं चिनी प्रतीवरून असें सिद्ध केलें आहे कीं असंगानें जेनिओच्या ( Genyo ) १० व्या भागांत तत्त्वज्ञानावर लिहिलें आहे. परंतु या ठिकाणीं त्यानें आपला गुरु मैत्रेय याच्या विधानांचीच पुनर्वाच्यता केली आहे. परंतु जःच्छुः ( Zaschuh ) च्या १६ व्या भागांत मात्र तत्त्वज्ञानावर लिहितांना यानें स्वतंत्र विचार प्रगट केले आहेत ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक ).

**आर्यक (घनश्याम)**—हा महादेव व काशी यांचापासून झालेला मुलगा असून तुकोजी नांवाच्या मराठी राजाचा प्रधान होता. तसेंच हा एक संस्कृत भाषेंतील नाटककार होता.

यानें राजशेखर कवीचा उल्लेख आपल्या ग्रंथांत केलेला आहे. यानें कुमारविजय नांवाचें पंचांकी नाटक लिहिलें. त्यांत तारकासुरावर कुमारानें मिळविलेल्या जयाचें वर्णन केलेलें आहे. तसेंच यानें डमरूक, मदन-संजीवन, नवग्रहचरित नांवाचें तीन अंकी नाटक, प्रचंड राहूदय नांवाचें अन्योक्तिपर नाटक, अशीं नाटकें लिहिलीं.

**आर्यकाळ**—धर्मप्रचारक तिबेटी ग्रंथांवरून असें दिसतें कीं हा खि. सनाच्या दुसऱ्या शतकांत हिंदुस्थानांतून चीनमध्यें बौद्धधर्माच्या प्रचारार्थ गेला.

**आर्यचक्रवर्ति**—हा तामीळ लोकांतील मुख्य होता; हा आर्य नव्हता. सिलोनमध्यें स. १२७७-८८ मध्यें जेव्हां भुवनेश्वरबाहु १ ला राज्य करीत होता व मोठा दुष्काळ पडला होता, तेव्हां तामीळ शत्रु पांड्य राजानें हाकून दिल्यामुळें सिलोनच्या पुढल्या किनाऱ्यावर उतरले होते. तेथें आर्यचक्रवर्तीस मोठ्या सैन्यानिशीं पांड्य राज्यांनीं पाठविलें.

आर्यचक्रवर्तीनें सुम्भागिरि देशांत प्रवेश केला व पुष्कळ संपत्ति व दांताचे अवशेष असे घेऊन पांड्य देशास परत आला.

या वेळीं पांड्यराजा कुलशेखर पहिला राज्य करीत होता. यास ते अवशेष दिले. पुढें पराक्रमबाहु ३ रा (स. १२८८-९३) यानें पांड्य देशांतून अवशेष परत आणून, पराक्रमबाहु ४ था यानें बांधलेल्या देवळांत ते आणून ठेविले; असें सिंव्हलीस लोकांच्या महावंश ग्रंथांमध्यें लिहिलें आहे ( एन्शन्ट डेक्कन भा. १, पा. १७० ).

**आर्यदीक्षित**—हा द्रविड स्मार्त ब्राह्मण असून कवि होता. हा शके १६०० मध्यें अग्रहार गांवीं होता. याची मान्यता लोकांत चांगली होती.

यानें अलंकारशास्त्र व अध्यात्मविद्या या दोहोंवर मिळून एकंदर ८४ ग्रंथ लिहिले. आपल्या वयाच्या ९० व्या वर्षी द्रविड देशांतील चिलंब्रम गांवीं हा मरण पावला. ग्यारेटसाहेबांनीं याचें नांव आपल्या कोशांत आर्यहिच्छित असें चुकून लिहिलेलें आहे. ऑफ्रेक्टसूचींत याचें नांव आढळत नाहीं.

**आर्यदेव**—माध्यमिक तत्त्वज्ञानावर लिहिणारा हा दुसरा बुद्ध ग्रंथकार होय. यास, कर्णरिप, काणदेव, नीलानेत्र व पिंगलानेत्र इत्यादि उपनांवें आहेत. याचा जन्म दक्षिणेंत झाला असून हा नागार्जुनाचा पट्टशिष्य होता. सुएन्संगच्या म्हणण्याप्रमाणें आर्यदेवानें महाकोशल, स्रुघ्न, प्रयाग, चोल व वैशाली ह्या देशांत फिरून लोकांस तेथील तार्किक वादांत जिंकून व तो त्थांल बुद्धधर्माचीं खरीं तत्त्वें शिकवून मोठी कीर्ति संपादन केली. लामा तारानाथाच्या म्हणण्याप्रमाणें आर्यदेव नालंद येथें बरेच दिवस राहत असून तेथें हा पंडित होता. आर्यदेव चंद्रगुप्त मौर्याच्या कारकीर्दींत भरभराटीस आला. स. ४०१ मध्यें कुमारजीवानें आर्यदेवाच्या चरित्राचें चिनी भाषेंत भाषांतर केलें. तेव्हां आर्यदेव हा जास्तीत जास्त अलिकडे म्हणजे स. ४०१ च्या सुमारास होऊन गेला असावा. यानें माध्यमिक तत्त्वज्ञानावर बरेच ग्रंथ लिहिले आहेत. उ० शतकशास्त्र, ब्रह्मप्रमथन, मुक्तिहेतुसिद्धि, इत्यादि. या सर्व ग्रंथांवरून याचें तत्त्वज्ञानाचें अगाध ज्ञान दिसून येतें ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक ).

**आर्यनाथ**—दक्षिणेंत मुसलमानांना विरोध करणारा एक राजा. हा मुसलमानांशीं युद्ध करण्यांत गुंतलेला असे. यानें लोकोपयोगी कामेंहि पुष्कळ केलीं. यानें सिलोनवर स्वारी केली व तेथें हा लढाईत मारला गेला ( स. १५७३ च्या पूर्वी ). याच्या मागून सिलोनचा राजा कुमार कृष्णप्पा झाला.

**आर्यभट**—( जन्म स. ४७६ ) भारतीय ज्योतिःशास्त्रांमध्यें हा पहिला आर्यभट होय. याचा आर्यभटीय नामक ग्रंथ प्रसिद्ध आहे. उपलब्ध असलेल्या पौरुष ज्योतिष ग्रंथांत याच्याहून प्राचीन दुसरा नाहीं. याच्या ग्रंथास 'आर्यसिद्धांत' म्हणतात. आर्यसिद्धांताचे दोन भाग केलेले असून त्या ग्रंथावर सूर्ययज्वन् नांवाच्या ज्योतिष्यानें टीका केलेली आहे. स. १८७५ सालीं डॉ. केर्न यानें आर्यसिद्धांत टीकेसहित हॉलंड देशांत लेडेन येथें छापून काढला. यानें थोडक्यांत संख्या दाखविण्याकरितां जी परिभाषा योजली ती पूर्वीं दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथांत आढळत नाहीं, यावरून ही मूळ कल्पना आर्यभटाची असली पाहिजे. या पद्धतीनें काम फार थोडक्यांत होतें. याची युगपद्धति इतर सिद्धांतांहून थोडीशी भिन्न आहे. एका मनूचीं युगें आर्यभट७२ म्हणतात व इतर ७१ म्हणतात. महायुगाचें प्रमाण यांचें व इतरांचें सारखेंच आहे. गणितशास्त्राची वाढ ज्योतिषाच्या आश्रयानें झाली व त्यांत अंकगणित, बीजगणित व गोलगणित अशा तीन शाखा मानून हें शास्त्र अभ्यासलें पाहिजे ही

गोष्ट प्रथम यानें आपल्या ग्रंथांत मांडली आहे. हा वेध घेण्यांत म्हणजे आकाशाचें सूक्ष्म अवलोकन करण्यांत प्रवीण होता व वेधसिद्ध आंकड्यांची संगति लावण्यासाठीं नवीन उपपत्ति मानण्यास तयार होता.

याचें वसतिस्थान कुसुमपूर होतें. हें बंगाल्यांतील पाटणा होय, असें समजतात. परंतु बंगाल्यांत आर्यसिद्धांत मुळींच चालत नाहीं, यावरून आर्यभटाचें कुसुमपूर हें दक्षिणेंत असेल, असा तर्क पूर्वी कै. दीक्षित यांनीं केला होता, तो आतां—याच्या सिद्धांतावरील विस्तृत भाष्यग्रंथ उपलब्ध झाला असून तो त्रिवेंद्रम् येथें छापण्यांत आला आहे, त्यावरून—खरा ठरतो. त्यावरून हा केरल प्रांतांतील होता असें आतां निश्चित ठरलें आहे. पृथ्वी प्रत्यहीं आपल्या भोंवतीं फिरते म्हणजे तिला दैनंदिन गति आहे, असें मानणारा ज्योतिषी हिंदुस्थानांत एक आर्यभटच झाला, पण पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते असें याचें मत होतें असें दिसत नाहीं. याचा एखादा करणग्रंथ असावा पण तो सांप्रत उपलब्ध नाहीं.

याच्या ग्रंथावरून याची योग्यता फार मोठी आहे. याच्या ग्रंथांतील कांहीं उतारे व आधार पुष्कळ लोकांनीं घेतले आहेत. लल्ल या नांवाचा जो एक ज्योतिषी होऊन गेला तो याचा अनुयायी होता. याचे सिद्धांत दक्षिण हिंदुस्थान व मलबार प्रांतांत विशेष मान्य आहेत. बंगाल व महाराष्ट्रांत जे ज्योतिषग्रंथ आहेत त्यांत आर्यसिद्धांताचीं वचनें आढळत नाहींत.

अल्बीरूनी याजपाशीं आर्यभटीय ग्रंथाचा कांहीं तरी भाग व त्याचें अरबी भाषांतर होतें. हें भाषांतर खलीफ मनसूर याच्या कारकीर्दींत झालें असावें (भा. ज्यो.) याच्या आर्यभटीय ग्रंथास आर्यभटीयलघुसिद्धांत किंवा लघुआर्यसिद्धांत असेंहि म्हणतात. या ग्रंथाच्या पहिल्या भागास 'दशगीतिका' आणि दुसऱ्या भागास 'आर्याष्टशत' असें म्हणतात. दशगीतिकेवर भूतविष्णूची टीका असून आर्याष्टशतावर सोमेश्वराची टीका आहे. यानें सूर्य सिद्धांतावर एक टीका लिहिली आहे. तिचें नांव सूर्यसिद्धांतप्रकाश असें आहे.

**२.** या आर्यभटाच्या एका सिद्धांताची एक प्रत पुणें डेक्कन कॉलेजच्या ग्रंथसंग्रहालयांत आहे. तन्मध्यें त्या सिद्धांतास 'लघु आर्यसिद्धांत' असें म्हटलें आहे; परंतु स्वतः ग्रंथकारानें 'लघु' असें कोठेंच म्हटल्याचें आढळत नाहीं. त्यानें केलेल्या आर्येमध्यें सुद्धां तो 'सिद्धांत'च म्हणतो.

हा पूर्वीच्या आर्यभटाहून अर्वाचीन आहे, म्हणून यास द्वितिय म्हणण्यांत येतें; आणि द्वितीय हें नांव आर्यसिद्धांतास देणें सोईचें पडतें म्हणून तसें करण्यांत येतें. यानें आपला काल सांगितला नाहीं. एके ठिकाणीं आपल्या ग्रंथांत हा म्हणतोः

एतत्सिद्धांतद्वयमीषद्याते कलौ युगे जातं ॥ २ ॥

यावरून कलियुग लागल्यावर लवकरच हे दोन सिद्धांत झाले असें दाखविण्याचा याचा उद्देश आहे; परंतु ब्रह्मगुप्तानंतर हा झाला अशी खात्री वाटते. कारण हा आपला सिद्धांत कलियुगारंभानंतर लवकरच झाला असें म्हणतो, तरी आपली गणना पौरुष ग्रंथांतच करतो.

याच्या ग्रंथांत युगपद्धति आहे. कल्पारंभ रविवारीं आहे. या प्रमाणावरून खात्रीनें वाटतें कीं ब्रह्मगुप्तानंतर, शके ५८० च्या नंतर हा झाला. ही याची कालाची मर्यादा झाली. अर्वाचीन मर्यादा पाहिली तर भास्कराचार्यांनीं याचा उल्लेख केलेला आहे. यावरून शके १०७२ पूर्वी दुसरा आर्यभट झाला असला पाहिजे, हें उघड आहे. यानें अयनांश काढण्याची रीत दिलेली आहे, परंतु ती प्रत्येक वेळीं बरोबर ठरतेच असें नाहीं.

याच्या ग्रंथाचे १८ अधिकार आहेत; व त्यांत सुमारें ६२५ आर्या आहेत. पहिल्या १३ अध्यायांत करणग्रंथांतील निरनिराळ्या अधिकारांत असणाऱ्या सर्व गोष्टी आहेत. यानें संख्या दाखविण्याकरितां पाटीगणितांत मात्र प्रसिद्ध संज्ञा योजिल्या आहेत, बाकी सर्वत्र संख्या दर्शविण्यास अक्षरसंज्ञा योजिल्या आहेत.

**आर्यशूर**—हा बराच प्रसिद्ध कवि असून अश्वघोषाच्या संप्रदायांतील असावा.

यानें 'जातकमाला' (समूहाचें नांव) लिहिल्या असून त्यांत नवीन गोष्टी लिहिण्याची तसदी घेतली नाहीं. परंतु जुन्याच गोष्टी सुंदर खुबीदार भाषेंत पुन्हा कथन केलेल्या आहेत. त्यांतील गद्य व पद्य काव्यदृष्ट्या उत्कृष्ट व शुद्ध असून त्यांत कृत्रिमतेपेक्षां खुबीदारपणा अधिक दिसून येतो. हा बहुधा राजदरबारीं धर्मोपदेशकाचें काम करीत असे. जातकमाला या ग्रंथांत चौतीस जातकें असून तीं चरियापिटकांतील पस्तीस जातकांप्रमाणेंच, बोधिसत्त्वाच्या पारमित्तांचें ज्ञान करून देण्यासाठीं लिहिलेलीं आहेत. पालिजातकसमुच्चयांत ज्या थोड्या गोष्टी सोडून दिलेल्या आहेत, त्यांपैकीं एक 'क्षुधापीडित व्याघ्री आपल्या पिल्लांना खाऊन टाकण्याच्या बेतांत आहे असें पाहतांच तिला अन्न पुरविण्यासाठीं बोधिसत्त्वानें स्वतः आपला प्राण दिला' ही पहिली गोष्ट आहे.

त्या वेळीं हिंदुस्थानांत विशेष लोकप्रिय व बऱ्याच प्रचलित असलेल्या ग्रंथांपैकीं एक—अशी इत्सिंगानें जातक-

मालेची स्तुति केली आहे. अजिंठ्याच्या लेण्यांतील चित्रांमध्यें जातकमालेंतील कथांसंबंधीं चित्रें असून समर्पण लेखामध्यें आर्यशूरानें केलेलें श्लोक आहेत. प्राचीन लिपीविद्येप्रमाणें हे खोदीव लेख इ. सनाच्या सहाव्या शतकांतील असावेत. ज्या अर्थी आर्यशूराच्या दुसऱ्या ग्रंथाचें स. ४३४ त चिनी भाषेंत भाषांतर झालें होतें, त्या अर्थी हा कवि बहुधा स. चौथ्या शतकांत झाला असावा ( विंटरनिझ–हिस्टरी ऑफ इंडिया, बौद्ध काळ ).

**आर्यश्रुतकीर्ति**—हा पञ्चवस्तुग्रंथाचा कर्ता. याचा काल न. १०३ असा प्रो० पाठकांनीं ठरविला आहे ( सि. सं. ग्रामर पृ. ६७ ).

**आर्यसमुद्र**—हरदत्ताचा उत्तराधिकारी.

**आर्यसुस्थित**—यानें कोटिशः मंत्राचा जप केला. त्यावरून यास कोटक व काकंदिक नगरांत जन्मला म्हणून काकंदिक अशीं दोन बिरुदें होतीं. याचें गोत्र व्याघ्रापत्य होतें. ९६ व्या वर्षी वीरसंवत् ३१३ त हा मरण पावला. यापासून कोटिकगच्छ शाखा उत्पन्न झाली. सुप्रतिबुद्ध याचा धाकटा भाऊ होता.

**आर्यावर्त**—( हुइनि पाहा ).

**आलम**—(स.१६५६)हिंदी भाषेंतील कवि. हा सनाढ्य ब्राह्मण होता, असें शिवसिंह म्हणतो. एकदां यानें आपलें शिरस्त्राण शेख नांवाच्या रंगारणीकडे रंगवावयास दिलें. त्यांत एक अर्धी कविता चुकून गेली. ती शेखनें पुरी करून कपड्याबरोबर याच्याकडे दिली. तेव्हां यानें तिला एक हजार रुपये बक्षीस दिले. तेव्हांपासून दोघेहि एकमेकांवर प्रेम करूं लागले. शेवटीं यानें मुसलमानी धर्म स्वीकारून शेखशीं लग्न केलें. याच्या कवितेचे तीन चरण हा करी व चवथा शेख करी. याचा कवितासंग्रह आलमकेलि नांवानें प्रसिद्ध आहे. शिवाय यानें 'माधवानलकामकंदला' नांवाची गोष्ट पद्यात्मक रचली आहे. याची कविता प्रेम व चमत्कारपूर्ण आहे ( क. कौ. १; शब्दसागर प्रस्तावना ).

**आलम अली**—( स. १७१८ ते १७२० ) हा सय्यद हुसेनचा पुतण्या होता. याला दत्तक घेऊन त्यानें मुख्य प्रतिनिधी म्हणून औरंगाबादेस ठेवून दिलें. हुसेनकडून खबर येतांच हा निजामावर चालून गेला. याच्याजवळ एकंदर तीस हजार फौज होती. पराभूत दिलावरची फौज याला येऊन मिळाल्यामुळें याला जोर आला. निजाम आणि हा यांच्यांत नरमाईचें बोलणें सुरू झालें. निजाम नको नको म्हणत असतां यानें आपली फौज पुढें नेली. पुढें याला मराठ्यांची बरीच मदत मिळाली. निजामानें परत जोराचा हल्ला ता. १०–६–१७२० रोजीं चढविला, तेव्हां निजामानें याला गोळी घालून ठार मारलें. निजामाच्या एका सरदारानें याचें शिर कापून नेलें. ही लढाई वऱ्हाडांत पैन घाटांत बालापूर येथें झाली ( मु. रि. भा. २, पृ. ३९९ ).

**आलम फारुकी**–दाऊदखान फारुकीचा मुलगा आदिल तिसरा त्याचें हें नांव आहे, असें केंब्रिज हिस्टरी म्हणते.

**आलमगीर मोगल**—( औरंगजेब पाहा ).

**२.** दिल्लीच्या मोगल घराण्यांतील जहांदरचा हा मुलगा. हा स. १७५४ मध्यें गादीवर बसला व सर्व कारभार स्वतःच्या हातीं घेतला.

या वेळीं मराठ्यांचें वर्चस्व उत्तर हिंदुस्थानांत फार असल्यामुळें सर्व मुसलमान मराठ्यांच्या विरुद्ध बनून त्यांनीं अब्दालीस हिंदुस्थानांत बोलाविलें. अब्दालीनें पंजाब खालसा केला, तेव्हां तो परत घेण्यासाठीं मराठ्यांनीं स्वारी करून अब्दालीच्या मुलास तेथून हांकलून दिलें. त्यावर अब्दालीनें पुन्हा स. १७५९ सालीं स्वारी केली. त्या धामधुमींत आलमगीराचा खून झाला.

**आलम लोदी**—लोदी घराण्यांतील जो बहलूल त्याचा हा एक पुत्र होय. याला निजामखान, मुबारक, याकूब, फतहखान, मूसा व जलालखान असे सहा भाऊ होते. त्यांपैकीं फक्त निजामखान दिल्लीच्या गादीवर आला.

**आलिमशाह**—हा सय्यद घराण्यांपैकीं दिल्लीचा एक बादशहा होय. हा स. १४४५ मध्यें गादीवर आला. याच्यापासून बहलोल लोदी यानें स. १४५१ मध्यें राज्य घेतलें. अलाउद्दीन आलिमशाह सय्यद असें याचें नांव आहे.

**आलीबेग**—महादजी शिंद्यांचा सरदार. अलाउद्दीन सय्यदचें नामान्तर.

**आलु**—( अल्लट पाहा ).

**आल्बुकर्क**—( अल्बुकर्क पाहा ).

**आल्मीडा**—( स. १५०५–०९ ) हा पोर्तुगीझ अधिकारी होय. पोर्तुगीझ राजानें आपल्या हिंदुस्थानांतील आरमारावर व सर्व व्यापारावर देखरेख ठेवण्याबद्दल फ्रान्सिस्को ड आल्मीडा या वजनदार मनुष्याची नेमणूक करून त्यास इकडे पाठविलें. स. १५०५ च्या सप्टेंबरांत कान्नूर येथें दाखल झाल्याबरोबर आल्मीडानें 'कोचीन, कान्नूर व सीलोन' ह्या ठिकाणचा पोर्तुगीझ 'व्हाइसरॉय' अशी भपकेदार पदवी धारण केली. हा अधिकार याजकडे तीन वर्षे चालणारा होता.

किल्ले, तट वगैरे बांधून आपल्या वसाहती मजबूत करून मुसलमानांचा उच्छेद करावयाचा, आणि आरबी समुद्रावर व एकंदर हिंदी महासागरावर दुसऱ्या कोणाचा शह राहूं द्यावयाचा नाहीं, हें मुख्य काम आल्मीडानें हातीं घेतलें. यानें आफ्रिकेच्या पूर्वकिनाऱ्यावर किल्वा येथें किल्ला बांधला, आणि मोंबासा येथील अधिकाऱ्यास आपला मांडलिक बनविलें. तसेंच गलवतांच्या रस्त्याचे वाकबगार खलाशी पाहिजे तेव्हां मिळावे म्हणून त्यांसाठीं कायमची नेमणूक करून दिली. यानें होनावर व कान्नूर येथील राज्यें जिंकून कोचीन येथें मुख्य ठाणें वसविलें. याचा मुलगाहि पराक्रमी होता. त्याचा अंत मलीक आयझ याच्याबरोबर झालेल्या लढाईत (स. १५०८) झाला. मलीक आयझ यास जय मिळाला तरी त्यानें उदार अंतःकरणानें हातीं लागलेल्या पोर्तुगीझ लोकांस चांगलें वागविलें आणि असा शूर पुत्र पोटीं निपजल्याबद्दल गौरवदाखल आल्मीडास त्यानें पत्र लिहिलें.

इतक्यांत आल्मीडाचीं तीन वर्षें भरून अल्बुकर्कची पुन्हां नेमणूक होऊन तो लिस्बनहून हिंदुस्थानांत आला. पुत्राच्या मरणाचा सूड उगविल्याशिवाय हा काम सोडीना. अल्बुकर्कहि ह्याच्या आड आला नाहीं. आल्मीडा वेगानें मुसलमानांवर चालून आला. स. १५०९ त दीव नजीक उभय पक्षांची निकराची लढाई होऊन तींत तीन हजार मुसलमान व बावीस पोर्तुगीझ पडले. अहमदाबादचा सुलतान महंमद बेगडा यानें मलीक आयझाचा पराभव झालेला पाहून त्याचा पक्ष सोडून पोर्तुगीझ लोकांशीं तह केला. अशा प्रकारें काम करून हा कोचीन येथें परत आला व स. १५०९ च्या नवंबर महिन्यांत परत जात असतां रस्त्यांत आफ्रिकेच्या किनाऱ्यावर मारामारी होऊन तींत हा मारला गेला.

फ्रान्सिस्को ड आल्मीडा हा हिंदुस्थानचा पहिला पोर्तुगीझ व्हाइसरॉय होय. हिंदुस्थानांत पोर्तुगीझ लोकांचें राज्य स्थापन करणें शक्य नाहीं, फक्त आरमार ठेवून वखारींचें संरक्षण करावें म्हणजे झालें, असें याचें मत होतें. कोचीन येथें असतांच अल्बुकर्क व अल्मीडा ह्या दोघांची बरीच चकमक उडून अल्बुकर्क यास कांहीं दिवस कैदेंत कंठावे लागले (ब्रि. रि. पूर्वार्ध, पृ. १००-१०५).

**आल्हण** (आहलांदन)--नदोल येथील चाहमान घराण्यांतील जो आशा-राजा त्याचा हा मुलगा होय. स. ११५३ मध्यें हा गादीवर येऊन यानें ११६१ पर्यंत राज्य केलें. यानें सौराष्ट्रिक जिंकून चालुक्य राजा कुमारपाल यास मदत केली. याला केल्हण, गजसिंह, आणि कीर्तिपाल असे तीन मुलगे होते. याच्या नंतर याचा मुलगा केल्हण हा स. ११६५ मध्यें गादीवर आला.

**आल्हणदेवी**—ही हूणकन्या असून कलचूरींपैकीं कर्णाची पत्नी होय.

२. ही मेवाडच्या वैरिसिंहाची कन्या असून कलचूरींपैकीं गयकर्णाची पत्नी. हिचा भेलाघाटच्या शिवमंदिरावर कलचूरी संवत् ९०७ (स. ११५५) मधील लेख आढळतो. या विधवेनें दोन घराण्यांची माहिती दिली आहे. हिला नरसिंहदेव व जयसिंहदेव नांवाचे दोन पुत्र होते. ते दोघे क्रमानें चेदिदेशाचे राजे झाले.

**आल्हा**—(ऊदल पाहा).

**आवजी**—नानासाहेब पेशव्याचा चिटणीस होय. ह्याला महिपति नांवाचा एक भाऊ असून तोहि नानासाहेब पेशव्यांचा चिटणीस होता.

**आवजी कवडे**—(स. १७३७-१७५७) हा थो. बाजीराव पेशव्याचा सरदार होता. याचा डभई येथें पिलाजी गायकवाड याचा मुलगा दमाजी गायकवाड यानें पराभव केला (एप्रिल १७३१; म. रि. म. भा. १, पा. ३८६). भोपाळच्या स्वारींत बाजीरावानें रघूजी भोसले यास मदतीस बोलाविलें असतां तो आला नाहीं. तेव्हां बाजीरावाचा व त्याचा विघाड होऊन त्यानें रघूजीस शासन करण्याचें ठरविलें.

निजामाचे भानगडींतून मुक्त होतांच त्यानें स. १७३९ त आवजी कवड्यास रघूजीवर पाठविलें, व त्याचे मदतीस अंताजी माणकेश्वर यास दिलें. पदमजी जाचकहि आवजीबरोबर होता.

रघूजीनें आवजीवर आपले सरदार भास्कर हरी, कृष्णाजी आटोळे व अलीखान यांस पाठविलें. उमरावतीजवळ त्यांची लढाई झाली. ती साधारण सारखीच झाली. पुनः दुसरी लढाई नागपूर प्रांतांत झाली. तींत आवजीच्या पक्षाचा मोड होऊन हा पळून गेला (पे. द. १५. ४१-४३). रघूजीची व आवजीची प्रत्यक्ष लढाई झाल्याचें दिसत नाहीं.

नंतर आवजी कवड्यांनीं रघूजीच्या मुलखांत लुटालूट आरंभिली. तेव्हां रघूजीनें बाजीरावाविरुद्ध शाहूकडे तक्रार केली. तेव्हां शाहूनें, आपले सरदार वऱ्हाडांत न पाठवण्याविषयीं बाजीरावास लिहिलें (ऐ. प. ले. ४३७).

आवजीस थो. बाजीरावानें अंतर्वेदींत पाठविलें होतें, परंतु तो मरतांच आवजी दक्षिणेंत परत आला ( ना. प्रा. इ. पृ. ७८, ७९ ).

याचा वाडा पुण्यांत कसबा पेठेंत होता. तेथें उमाबाई दाभाडे या स. १७५२ मध्यें राहिल्या होत्या. याचा मृत्यु स. १७५७ च्या पूर्वी झाला. याचे पुत्र महिपतराव कवडे हेहि शूर होते.

**आवजी पंडित**—हा संभाजीचा वकील मुंबईस इंग्रजांकडे बोलणें करण्यास असे. याला संभाजीनें कामावरून काढलें तेव्हां हा पोर्तुगीजांचे नोकरीस राहिला. आणि त्यांचे तर्फेनें बादशाहाकडे जाऊं येऊं लागला ( जून १६८२ ). हा बहुधा आवजी नीळकंठ पारसनीस असावा ( चिटणीसकृत राजारामचरित्र, पृ. ५५ ).

हा रामचंद्रपंत अमात्याच्या निसबतीस होता. स. १७३७ च्या एप्रिलमध्यें यानें वसई भागातील मनोर व तांदुळवाडी घेण्याची कामगिरी केली होती (वसईची मोहीम).

**आवजी बल्लाळ चिटणीस**—हा बाळाजी आवजी चिटणीस याचा मुलगा असून अण्णाजी दत्तोचा साह्यकारी होता. याला संभाजीनें हत्तीचे पायाखालीं देऊन ठार मारिलें ( म. रि. पू. २ पृ. ३९० ).

**आवजी हरि चित्रे मुजुमदार**—हा एक प्रभु गृहस्थ जंजिऱ्याचे सीदीजवळ दिवाण होता. याजवर सीदी सरकारची इतराजी होऊन याला व याचे भावाला ठार करण्यांत आलें; आणि याच्या बायकामुलांस मस्कतला नेऊन गुलाम म्हणून विकण्याचा हुकूम झाला. याची पत्नी गुलबाई ही धूर्त होती. तिनें खलाशाचें मन वळवून मस्कतच्या ऐवजीं राजापुरास नेऊन सोडून देण्याची व्यवस्था केली. तेथें विसाजी शंकर नांवाचा गुलबाईचा भाऊ होता. लिंगोजी असेंहि त्याचें नांव आढळतें त्यानें ओळख न देतां आपल्या बहिणीस विकत घेतलें. विसाजी हा इभ्रतदार व्यापारी होता. यानें बाळाजी, चिमणाजी व श्यामजी या तीनहि भावांचें चांगलें शिक्षण करविलें. पुढें बाळाजीनें शिवाजीचें नांव ऐकून त्याकडे आपली, नांवानें प्रगटहि होतां येत नाहीं ही करुणाजनक कहाणी कळविली. पुढें शिवाजी राजापुरीं आला असतां गुलबाईनें आपली कहाणी शिवाजीस निवेदन केली. तेव्हां हें घराणें शिवाजीच्या आश्रयास गेलें आणि बाळाजीनें आपल्या कर्तबगारीनें शिवाजीची चिटणीशी मिळविली ( स. १६५८ ). आणि या घराण्यानें आपली स्वामिभक्ति व राजकारण यांचा लौकिक पुढें शेवटपर्यंत कायम ठेवला.

**आबरू**—उर्दू कवि. याचें प्रसिद्ध नांव शाहामुबारक असून याचें मूळचें नांव नजमुद्दीन होय. हा ग्वालेरच्या शाह मुहमद गौस याच्या वंशांतील होय. पण याच्या जन्ममृत्यूच्या कालाविषयीं माहिती मिळत नाहीं. पण हें मात्र निश्चित आहे कीं, हा मुहम्मदशाहाचे वेळीं मेला. याचा व कमाल बुखारीचा मुलगा मीर मक्खन यांचा चांगला स्नेह होता. आबरूनें आपल्या कवितांमध्यें मीर मक्खनचा उल्लेख केला आहे. यानें पुष्कळ कविता लिहिली ( क. कौ. भा. ४ ).

**आशाधर**—व्याघ्रेरवाल कुलांतील, सल्लक्षणाचा मुलगा. हा सपादलक्षाचा रहिवासी होता. पण याचें राज्य मुसलमानांनीं जिंकून घेतल्यानंतर हा माळव्यांत धार येथें जाऊन राहिला व तेथें यानें जैन धर्मतत्त्वांचा अभ्यास केला आणि (स. १२३६) 'त्रिषष्टिस्मृति' व (स. १२४४) 'भव्यकुमुदचंद्रिका' असे दोन ग्रंथ लिहिले. यापैकीं 'भव्यकुमुदचंद्रिका' हा ग्रंथ म्हणजे यानें परमार देवपालाचा मुलगा जैतुगिदेव याच्या कारकीर्दींत स्वतः लिहिलेल्या 'धर्मामृत' नांवाच्या काव्यावरील टीका होय. यानें 'जिनयज्ञकल्प' आणि पुष्कळ इतर ग्रंथ लिहिले आहेत. यानें रुद्रटाच्या काव्यालंकार नांवाच्या ग्रंथावर संस्कृतांत टीका लिहिली आहे.

**आशाधरभट्ट**—याच्या पित्याचें नांव रामजीभट्ट आणि गुरूचें नांव धरणीधर. संस्कृतांत याचे ग्रंथ पुढीलप्रमाणें आहेतः—( १ ) कोविदानंद, ( २ ) त्रिवेणिका, ( ३ ) अलंकारदीपिका, ( ४ ) अद्वैतविवेक, ( ५ ) प्रभापटल. पहिले तीन ग्रंथ साहित्यविषयक आहेत. शेवटले दोन अप्रसिद्ध आहेत. हा सतराव्या शतकांतील असावा ( साहित्यशास्त्राचा इतिहास काणेकृत ).

**आशाराम**—एक गुजराथी कवि. याची कविता व पदें बरींच आहेत.

**आसड**—( स. ११९२ ) भिल्लमाळ कुलांतील राजकटुक याचा मुलगा. यानें विवेकमंजरी या नांवाचा जैन ग्रंथ व कालिदासाच्या मेघदूतावर टीका संस्कृतांत लिहिली आहे.

**आसफखान**—( असफखान पाहा ).

**आसाध**—जैन महासाधु. महावीरांचा प्रतिस्पर्धी. महावीराच्या विरुद्ध जे सात पाखंडी होते, त्यांमध्यें याची गणना होते. यानें आपलें पाखंडी मत पसरविण्याचा बराच प्रयत्न केला.

**ऑस्टिन**—इंग्रजांचा वकील ( पत्रसार स. १७३२ ).

**आहवमल्ल कलचुरी**—(स. ११८१-८३) हा कल्याणीच्या बिजल कलचुरीचा तिसरा मुलगा. याला (वीर) राय नारायण असेंहि दुसरें एक बिरुद होतें. हा बिजलाचा तिसरा मुलगा असून याचे वडील भाऊ सोमेश्वर अथवा सोविदेव आणि संकम यांच्या नंतर हा स. ११८१ मध्यें गादीवर आला. हा आपणाला कलचुर्यचक्रवर्ती आणि कळचुर्य भुजबलचक्रवर्ती, परमभट्टारक इत्यादि विशेषणें लावीत असे. याची राजधानी कोणती होती यावद्दल उल्लेख आढळत नाहीं. शिलालेखांवरून याच्या अधिकाऱ्यांचीं नांवें महाप्रधान, अंतःपुर वेर्गडे, महापसाइत, दंडनायक इत्यादि असावीं असें दिसतें.

याचा सर्वांत उत्तरकालीन उल्लेख भाद्रपद व॥ त्रयोदशी शोभकृत संवत्सर शक ११२५ या मितीचा आढळतो. याची इंग्रजी तारीख १७ सप्टेंबर ११८३ येते. यानंतर याच्या कारकीर्दीचा अंत लवकरच झाला असावा असें याच्या मागून गादीवर बसलेल्या याचा धाकटा भाऊ सिंघण याच्या इतर शिलालेखांवरून दिसतें.

**आहवमल्ल चालुक्य**—प. चालुक्यांपैकीं सत्याश्रय, सोमेश्वर पहिला. हा ही पदवी वापरीत असे.

**आहवादित्यवीर गुत्त**--(स. ११८२-१२१३) हा गुत्त घराण्यांतील दुसऱ्या गुत्ताचा पुत्र होय. हा आपल्या बापानंतर गादीवर बसला. हा चालुक्य राजांचा मांडलिक असावा. हा आपणास महामण्डलेश्वर असें म्हणवून घेत असे. याचें राज्य म्हैसूर प्रांतांत होतें.

**आळवंदान**—राजाधिराज चोलाचा वडील भाऊ.

**आळूप ( अळव अळूव ) वंश**—यांना जुन्या काळीं ( पूर्वीं ) आलु व खेद असें म्हणत. यांनीं स. ७ व्या शतकापासून ११ वें शतकापर्यंत राज्य केलें. यांचें मुख्य ठिकाण पत्ती-पोंबुच्च, ( सध्यांचें हुंच ) शिमोग जिल्ह्यांतील आणि नगर तालुक्यांतील, ह्या गांवीं हाते. त्या वेळच्या होयसल राजांनीं यांचा उल्लेख केलेला आहे.

गुणसागर—(कोदम्ब-मंडळ किंवा वनवासीप्रांत येथें विजादित्य चालुक्य ( स. ६८०-६९७ ) याच्या वेळीं किंवा अगोदर राज्य केलें. )
|
चित्रवाहन २ रा— स. ६९२.
|
चित्रवाहन १ ला—तिसऱ्या गोविंद राष्ट्रकूटाचा समकालीन. यानें उदीयवार घेतलें
रणसागर—(श्वेतवाहन यानें याला हाकून दिलें.)
|
श्वेतवाहन—
|
पृथ्वीसागर—
|
' उदयादित्य '—' उत्तम पांड्य.'
|
विजयादित्य मारम्म—' उत्तम पांड्य. '
|
कवी आळुपेन्द्र भुजबल—
|
कुलशेखर आलुपेन्द्र—स. १२०५।६.
|
बंकीदेव आळुपेन्द्र—(मंगलारे येथें राहत असे स. १३०२।३ ).
सोयीदेव आळुपेन्द्र--( स १३१५।१६-१३२४।२५. )

**आज्ञात कौंडिन्य**—( कौंडिन्य पाहा. )

**आंगरे घराणें**—यांचें मूळ उपनाम सकपळ; कुलाब्या-नजीक आंगरवाडीचे राहणारे म्हणून आंगरे नांव पडलें. तुकोजी आंगरे स. १६५८ मध्यें शिवाजीकडे प्रथम बारगिरी करून होता. पुढें हळुहळू वाढत जाऊन सुवर्णदुर्गाच्या सुभ्यावर त्याची नेमणूक झाली. त्यापूर्वी सुवर्णदुर्गाचा सुभा अचलोजी मोहिते याजकडे होता. पण हबशांशीं पराक्रमानें न लढल्यामुळें तो याच्याकडे आला. तेथून हें घराणें वाढत गेलें. ( वंशावळ १२८ पानावर पाहा ).

**आंडय्य**—( स. १२३५ सुमार ) कानडी जैन कवि. बाप-सांत; आई-बल्लव्वे.

ग्रंथ-कब्बिगरकाव ( कवींचा रक्षक ). हा कवि कानडी भाषेचा अभिमानी होता. यानें संस्कृत शब्द न वापरतां प्रतिज्ञेनें कानडींत ग्रंथ केला आहे. याचें काव्य कर्नाटकांत सोबगिन या नांवानें प्रसिद्ध व संस्कृत जाणणारे लोक मदन विजय असें त्यास म्हणतात. याचा ग्रंथ सुभाषितें व म्हणी यांचें आगर आहे. याचा ग्रंथ सुंदर कानडीचा नमुना आहे ( क. क. च. भा. १, पा. ३६६ ).

**आँजिअर**—प्रथम हा सुरतेचा प्रेसिडेंट असून ( स. १६६९ ) नंतर मुंबईचा गव्हर्नर व कमांडर-इन्-चीफ झाला. यानें मुंबई शहर सुधारण्याकरितां अनेक उपाय केले. पोर्तुगीझांनीं चालविलेला धर्मच्छल बंद केला; व्यापाराच्या सोयी नवीन करून राज्यकारभाराची व्यवस्था लावून दिली, टांकसाळ घातली व तटबंदी केली. लंडन शहर त्या वेळीं नुकतेंच म्हणजे स. १६६६ त जळून खाक झालें होतें, तें पुन्हां बांधण्यासाठीं जे नकाशे व नियम करण्यांत आले, तेच कंपनीनें हिंदुस्थानांत मुंबई शहरासाठीं पाठवून दिले. यानें मुंबई हें गलबतांचें व व्यापाराचें मुख्य बंदर केलें, आणि तेथें वखारींच्या व वसाहतीच्या

## आंगऱ्यांची वंशावळ



सेखोजी संकपाळ रा. आंगरवाडी, हर्णैनजीक
तुकोजी आंगरे स. १६९०
कान्होजी, सरखेल १६९०–१७२९
१ पत्नी मथुराबाई, २ लक्ष्मीबाई ( मानाजी जगतापाची कन्या ).
सेखोजी
१७२९–३३
संभाजी
१७३४–३५ मृत्यु ४१
३ गहिनाबाई ( दिनकरराव भोसले याची कन्या )
तुळाजी
१७३४–५६
मानाजी
१७३५-५८
येसाजी
धोंडजी
बायका
१राधिकाबाई २भागीरथीबाई
१ महिमाजी, २ रघूजी, ३ चिमाजी, ४ हिरोजी, ५ धोंडजी, ६ तुकोजी, ७ कृष्णाजी, ८ सुभानजी, ९ तुळाजी, १० राम.
रघूजी १७५८-९३
राधाबाई
रघूजीच्या बायका-नर्मदाबाई (कुडवे)
(शिताळे)
आनंदीबाई (भोसले)
जयसिंग- खून १८००
[अथवा संभाजी]
स्त्री सकवारबाई
मुरारराव
मानाजी २रा
कान्होजी
प्रथम १७९४-१७९९, नंतर कैद पुनः १८१३-१८१७
१ स्त्री
२ री राजराबाई (नरसिंहराव कदम)
रघूजी २ रा. १८१७-३८
स्त्रिया ५: भागीरथी, कमळा, भवानी, यशोदा, अंबिका
कान्होजी २ रा १८३८–३९ ( स. १८४० मध्यें राज्य खालसा )
मेनाबाई
( दौलतराव शिंद्याची आई )
महादाजी
संभाजी (सवाई सरखेल १८४५)
(१८४५-९२) बाबुराव
(९२-१९०२) संभाजी
चंद्रोजी ( प्रस्तुत )
बाबुराव
१७९९-१८१३

जागीं इंग्रज अधिकारी नेमले. तसेंच एतद्देशीय व्यापाऱ्यांस व कारागिरांस नानाप्रकारच्या सवलती देऊन यानें त्यांना मुंबईस आणलें. त्यांजवर धर्मसंबंधीं जुल्म होऊं नये व गाई वगैरे मारून त्यांस दुखवूं नये, अशी यानें व्यवस्था ठेविली. एतद्देशीय लोकांपैकीं प्रत्येक जातीचे पंच नेमून त्यांनीं आपले खटले तोडावे, अशी परवानगी आँजिअरनें विलायतेहून आणविली. यानें मुंबईची हवा सुधारून तेथें रोग्यांच्या शुश्रूषेकरितां दवाखाने बांधिले; एक मोठें प्रार्थनालय स्थापिलें; आणि पोलीसचीं व इनसाफाचीं कोर्टें निर्माण केलीं. एकंदरींत यानें मुंबईची सर्व बाजूंनीं भरभराट होण्यासाठीं भयंकर प्रयत्न केले. हाच सध्याच्या मुंबईचा संस्थापक होय.

मुंबईची भरभराट झाल्यामुळें सुरतेचें महत्त्व कमी झालें. सुरत सोडून इंग्रजांनीं मुंबईसच कायमचें यावें असें आँजिअरचे मनांत होतें, पण तें या वेळीं विलायतेंत कंपनीच्या कोर्टानें मंजूर केलें नाहीं. आँजिअर हा स. १६७७ त सुरत येथें मरण पावला. इंग्रजांची पश्चिम किनाऱ्यावर सत्ता कायम करणारा हाच पहिला पुरुष होय. ' याचा थोरपणा शब्दांनीं वर्णन करतां येत नाहीं 'असें कौन्सिलनें लिहिलें आहे. एतद्देशीय सत्ताधीशांना कागदी दपटशा दाखवून कांहीं उपयोग नाहीं. हातीं तलवार घेऊनच आपला व्यापार चालविला पाहिजे. परमेश्वराच्या मनांत तुमच्यावर मोठी मेहेरबानी आहेशी दिसते. दुसऱ्या कोणत्याहि युरोपियन राष्ट्रापेक्षां तुमचा पाया हिंदुस्थानांत जास्त मजबूत झाला आहे यांत संशय नाहीं, असें यानें कंपनीस लिहून पाठविलें (ब्रि. रि.पूर्वार्ध पृ.२९७-३०३).

**आंदिल**—( आलम फारुकी पाहा ).

**आंध्र**—कण्व राजघराण्याच्या समाप्तीनंतर हें घराणें विशेष उत्कर्षाला चढलें. यांचें सैन्य बरेंच मोठें असून नांवाजलेलें होतें. त्यांमध्यें एक लाख पायदळ, दोन हजार घोडेस्वार व एक हजार हत्ती इ. चा समावेश केला होता. यांच्या प्रांतांत ३२ मोठालीं शहरें असून त्यांच्या भोंवतीं तट असत. त्यांची राजधानी कृष्णाकाठीं श्रीकाकुलाम नांवाचें शहर होतें. अशोकाच्या मृत्यूनंतर सिमुक नांवाच्या राजानें आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें व आंध्र घराणें चालू झालें. आंध्र राजे हे शातवाहन किंवा शालीवाहन या घराण्यांतील होते व त्यांपैकीं बऱ्याच राजांनीं आपल्या नांवापुढें शातकर्णी असें पद जोडलेलें आढळतें. आंध्र राजे हिंदु धर्माचे कट्टे पुरस्कर्ते असून त्यांनीं जातीसंस्था पुनः चालू केल्या. यांनीं बुद्धांनाहि बऱ्याच मोठाल्या देणग्या देऊन विहार बांधून दिले. यांनीं ब्रांझ, रुपें व शिसें इत्यादींचीं नाणीं पाडलीं होतीं व त्यांपैकीं कांहींवर जहाजाचें चित्र खोदलेलें आढळतें. या घराण्यांत एकंदर ३० राजे झाले व त्यांनीं ४५० वर्षे राज्य केलें. हे अश्वमेध व गवामयन नांवाचे यज्ञ करीत असून त्या वेळीं सर्व ब्राह्मणांना मोठाल्या दक्षणा देत असत. हे शिवाचे उपासक असून कृष्णाला संकर्षण व वासुदेव म्हणून त्याची पूजा करीत असत.

कुटुंबपद्धति अमलांत आणलेली असून कटुंबांतील मुख्याला गृहपति असें म्हणत. यांच्या कारकीर्दींत व्यापारी, तेली, वीणकरी, धान्य विकणारे, बांबूचीं कामें करणारे इ. लोकांच्या सोसायट्या असून त्यांत ते व्याजानें रकमा गुंतवीत असत ( V. Smith, p. 217–32 ). आंध्र घराण्याची पुराणांत उपलब्ध होणारी वंशावळ मतभेदासह आमच्या प्राचीन चरित्रकोशांत दिली आहे ( पा. ६८४–६८५ ).

आंध्रांना आंध्रभृत्य असें पुराणांत संबोधण्यांत आलें आहे. पुराणांत यांना शूद्र म्हटलें आहे. यांचा सर्वांत प्राचीन निर्देश ऐतरेय ब्राह्मण या वैदिक ग्रंथांतील होय ( ७.१८ ). तेथें यांचा विश्वामित्राशीं संबंध जोडला असून दस्यू वगैरे बरोबर हीन जातीचे म्हणून निर्देश आहे. पण शिलालेखांत यांनीं आपणांस द्विज म्हणून घेतलें आहे. तेलंगणापेक्षां महाराष्ट्राशीं यांचा विशेष संबंध दिसतो. यांचे शिलालेख, पुतळे व नाणीं हीं नानाघाट, कान्हेरी वगैरे महाराष्ट्रांतील ठिकाणीं आढळतात. हालाची गाथा सप्तशती महाराष्ट्री नांवाच्या प्राकृत भाषेंत आहे.

१९–३० पर्यंत व्यक्तींचीं नांवें पुढें समकालीन इतर पुराव्यासह कोष्टक रूपानें दिलीं आहेत. पुराणांतील नांवांचा उपलब्ध इतर साधनांतील नांवांशीं मेळ घालण्याचें काम कांहीं ठिकाणीं दुर्घट आहे. व्यक्तिशः माहिती देतांना आम्ही त्यांचा अधिक खुलासा करूं. यानंतर पल्लव व वाकाटक घराणीं उदयास आलीं.

**आंध्र कालिदास**—हा तैलंगजातीचा ब्राह्मण कवि होय. हा वारंगळ शहरचा राहणारा असून शके ९०४ मध्यें होता. ओळखण्यासाठीं म्हणून याच्या मागें आंध्र हें पद जोडत असत. तेलंगी भाषेंतील याचा 'स्मार्थविजय' हा ग्रंथ प्रसिद्ध होय ( तेलगू वाङ्मय पा० ५५. कालिदास व भोज पाहा). तेलंगी लोक तच्या जागीं थ उच्चार करितात.

**आंबडा**—गुजराथच्या सोलंकी पैकीं कुमारपालाचा प्रधान. याला आम्रभट असेंहि म्हणत. हा जैन होता.

**आंभी (आम्फिस)**—हा तक्षशिलेचा राजा. सिकंदरची हिंदुस्थानावर स्वारी झाली तेव्हां यानें सिकंदरची अधीनता एकदम स्वीकारली. शिवाय पोरसवर स्वारी करण्यास त्यास उत्तेजन दिलें. म्हणजे यानें स्वकीय शेजाऱ्याशीं द्रोह करून परक्यांना मदत केली ( मौर्य साम्राज्यका इतिहास, पा. ११४ ). सिकन्दर परत जातांना त्यानें हिंदुस्थानच्या जिंकलेल्या प्रदेशाचे तीन भाग केले. त्यांत शेलमपासून सिन्धुनदापर्यंतच्या भागावर यास क्षत्रप नेमलें.

# आंध्र घराण्यांतील शेवटचे राजे

| नांवें. | काल | असलेले शिलालेख Ep. Ind.. Vol. X. App. | नाणीं | महाराष्ट्रांतील क्षहरात सत्रप राजे व त्यांचा काल | उज्जयनीचे शक सत्रप राजे व त्यांचा काल | शेरा. |
|---|---|---|---|---|---|---|
| १९ पुरीकसेन. | २१ वर्षें स. ५९ | | वासिष्ठीपुत्र (१) विलिवायकुर याचीं धनुष्य आणि बाण असलेलीं नाणीं या तीन राजापैकीं एकाचीं असावींत (See Rapson pp. 5–6 ). परंतु ते निराळ्या घराण्यांतील असण्याचा संभव आहे (See Ind. Anti. votl XLIX 1920 pp. 30–4 ). | भूमक, सत्रप ( फक्त नाणीं; शिलालेख किंवा काल उपलब्ध नाहीं ). स. ७–१० ? किंवा इ. स. पूर्व. | चष्टन; राजा ही पदवी लावीत असे. स. ८० | टॉलेमी चष्टनास टेस्टनस् असें म्हणतो. |
| २० सुंदर शातकर्णी. | १ व. स. ८० | | | | | |
| २१ चकोरशातकर्णी. | ½ व. स. ८१ | | | | | |
| २२ शिवस्वाती. | २८ व. स. ८१ | नं. १२७९ अमरावती राज श्री शिवमक सत; नंबर २५ किंवा २६ पाहा. | माथुरीपुत्र सिवलकुर याचीं धनुष्य आणि बाण असलेलीं नाणीं याचीं आहेत असें रॅपसन म्हणतो (Rapson p. 7) ती नाणीं दुसऱ्याच घराण्यांतील असण्याचा संभव आहे. | नहपानचें भूमकाशीं नातें. परंतु तें माहित नाहीं. नहपान सत्रप स. ४० किंवा त्यापूर्वी. | | |
| २३ गौतमी पुत्र | २१ व. स. १०२ | नं. ११२३, ११२५, ११२६ नाशिक. | नहपानाचीं असलेलीं नाणीं पुनः यानें राज गौतमीपुत्र श्री शातकर्णी या नांवानें पाडलीं (Rapson pp. LXXXIX 64–70 ). | नहपानची मुलगी दक्षमित्रा ही नाशिकचा सुभेदार ऋषभदत्त किंवा उषवदत्त यास दिली होती. नहपान स. ८० च्या सुमारास मेला असावा. आंध्र राजा गौतमीपुत्र यानें याच्या घराण्याचें राज्य जिंकलें, सुमारें स. ११९. स. ११९–१२४ पर्यंतचे या घराण्याचे शिलालेख आहेत. | जयदामन् सत्रप चष्टनचा मुलगा. स. ११० | टॉलेमीनें गौतमीपुत्रास बेलिओ कोरस असें म्हटलें आहे. परंतु तें नांव गौतमीपुत्राच्या वेळच्या दुसऱ्या एखाद्या राजाचें असावें. |

| | | | |
|---|---|---|---|
| २४ पुलोमा ( वी ) २ रा गौतमीपुत्राचा मुलगा २८ व. स. १२३ | नं. ९९४ कन्हेरी; ११२२-४, ११४७ नाशिक; ११००, ११०६ कार्ले आणि १२४८ अमरावती. राज वासिष्ठीपुत्र श्री पुलोमायी. कांहीं ठिकाणीं श्रीपूर्वी स्वामी शब्द घातलेला आहे. नं. ९९४ मध्यें श्री वासिष्ठीपुत्र श्री शातकर्णी असा उल्लेख केला आहे. | पूर्वेकडील नाणीं; राज-वासिष्ठीपुत्र श्री पुलोमायी या नांवानें आहेत(Rapson p.20). | रुद्रदामन् १ ला, जयदामनचा मुलगा, स. १३०-१५० आंध्र राजा पुलोमावी याचा दोनवेळां पराभव केला. |
| २५ शिवश्री पुलोमा ( वी ३ ) रा. ७ व. १५६ | नंबर २२, २६ पाहा. | राज वासिष्ठीपुत्र शिव श्री शातकर्णी या नांवानें याचीं नाणीं आहेत. | दामजदश्री रुद्रदामन् १ त्याचा मुलगा. स. १५५ |
| २६ शिवस्कंध शातकर्णी ३ व. स. १६३ | नं. ११८६ बनवासी, नंबर २२ आणि २५ पाहा. | | |
| २७ यज्ञश्री शातकर्णीक २९ व. १६६ | नं. ९८७, १०२४ कन्हेरी आणि ११४६ नाशिक. राज गौतमीपुत्र स्वामी श्री यज्ञ शातकर्णी नं. १३४०. | नाण्याचे पुष्कळ प्रकार. त्यावर राज गौतमीपुत्र श्री यज्ञ शातकर्णी किंवा याचा कांहीं भाग लिहिलेला असे ( Rapson pp. 34, 35 ). | जयदामन् सत्रप दामजदश्रीचा मुलगा. स. १७८ |
| २८ विजय ६ व. स. १९५ | | | रुद्रसिंह १ ला रुद्रदामन् १ त्याचा मुलगा स. १८० |
| २९ छंदश्री ( चंद्र ) शातकर्णी १० व. स. २०१ | नं.१३४१ गोदावरी जिल्ह्यांतील कोडवोल. राज वासिष्ठीपुत्र श्री चंड ( चंद्र ) शात. | राज वासिष्ठीपुत्र श्री चंद्र साती या नांवाचीं याचीं नाणीं ( Rapson, pp. 30, 33 ). | रुद्रसेन १ ला, रुद्रसिंह १ त्याचा मुलगा स. १९९ |
| ३० पुलोमा ( वी ) ४ था ७ व. स. २११ | बहुतेक नाहींत. | नाहींत. परंतु कांहीं पुलोमावी याचीं नाणीं संशयातात आहेत. | संघदामन् रुद्रसिंह १ त्याचा मुलगा स. २२२ |
| घराण्याचा शेवट स. २२५ | | | दामसेन हा रुद्रसिंह १ त्याचा मुलगा स. २२३ |

## इ

**इकबालखान**—तुघ्लग घराण्यांतील बादशाहा फीरूजशाहाच्या मृत्यूनंतर राज्यांत अंदाधुंदी माजली. तेव्हां हा बादशाहाच्या तर्फेनें प्रतिस्पर्ध्याशीं लढला व राज्यांत थोडाबहुत बंदोबस्त केला. पण इतक्यांत हिंदुस्थानावर तैमूरलंगाची धाड आली. तिला तोंड देण्याकरितां बादशाहा व इकबालखान यांनीं तयारी केली, पण शेवटीं पराभव झाला.

तैमूर गेल्यानंतर इकबालखान दिल्लीस आला. त्या वेळीं महमूद बादशाहा तैमूरच्या भीतीनें गुजराथेंत पळून गेला होता. तेव्हां यानें दिल्ली व त्या भोंवतालच्या प्रदेश काबीज करून घेतला आणि बादशाहिपद बळकाविण्याचा यत्न केला. पुढें यानें, दुसऱ्या महमूदशाहाला कनोज येथें वेढलें, परंतु याला इटावा घेतां न आल्यामुळें हा दिल्लीला परत गेला. स. १४०५ मध्यें हा सामानच्या बहरामखानावर चाल करून गेला, तेव्हां बहराम डोंगराळ प्रदेशांत पळून गेला व इकबाल त्याचा पाठलाग करीत त्याच्या मागोमाग गेला. अजोधन येथें याची मुलतानचा सुभेदार खिझ्झरखान याशीं गांठ पडली. तेव्हां त्यांच्या मध्यें लढाई होऊन तिच्यांत इकबाल पराभव पावून ठार मारला गेला. महमुदाची पुनः दिल्लीच्या तख्तावर स्थापना झाली.

**इखलासखान**—विजापूरच्या आदिलशाही घराण्यातील दुसऱ्या इब्राहीम आदिलशहाचा एक प्रधान. इब्राहिमाचा दिवाण कीश्वरखान याचा कारभार जुलमी होऊं लागल्यामुळें इखलासखानानें कीश्वरखानास ठार करून त्याची जागा आपण बळकाविली व आपण कारभार पाहूं लागला. यानें कीश्वरखानाच्या वेळचे सर्व कामगार काढून टाकून त्या जागा आपल्या वतीच्या लोकांना दिल्या. पण हा कारभार पाहूं लागल्याला फार दिवस झाले नाहीं, तोंच दिलावरखानानें कृतघ्नपणानें याचे डोळे काढून यास कैद केलें व अशा रीतीनें दिलावरखान दिवाणाचे जागेवर आला. हा एक हबशी सरदार होता. विजयनगरच्या रामरायाशीं झालेल्या तालीकोट येथील लढाईंत हा हजर होता ( आरविदु डिनॅस्टी पृ. १०१–१०२ ).

**२.** ( स. १६७२–१६८९ ) हा एक मोगल सैन्याधिकारी होय. स. १६७२ मध्यें मोगल सेनापति महाबतखान यानें याला शिवाजीच्या सैन्यावर पाठविलें. त्या वेळीं मराठी सैन्य प्रतापरावाचे हाताखालीं होतें. प्रतापरावानें मोगली सैन्याची दाणादाण करून याचा पूर्ण पराभव केला. हा शेखनिजामचा मुलगा. मुकरबखान ही शेखनिजामची पदवी होय ( शेख निजाम पाहा ). स. १६८९ मध्यें संगमेश्वरीं असलेल्या संभाजीवर छापा घालून त्याला पकडण्यास यानें आपल्या बापाला मदत केली ( डफ् भा. १ ला, पृ. १९६,२७६ ). संभाजीस पकडण्यास व तळघरांतून वर आणण्यास साहाय्य केलें म्हणून यास पंचहजारी मनसब मिळाली होती ( संभाजी. ९६,१०० ).

**इख्तियार उद्दीन अल्तूनिया**—( स. १२३६-१२४० ) रुकनुद्दीन फीरुझ व सुलताना रझियाचे कारकीर्दीत इख्तियार उद्दीन अल्तूनिया हा भातिंदाचा सुभेदार होता. मुलतान, हांसी, लाहोर व बुदांनच्या सुभेदारांनीं कट करून रझियास पदच्युत करण्याचा कट उधळून लावल्यावर रझियाचे मर्जीतला जलालुद्दीन याकूत याचा पाडाव करण्याकरितां व जमल्यास रझियास पदच्युत करण्याकरितां दिल्लीच्या दरबारांतील तुर्की सरदारांनीं मुख्य वाकनीस शंसुद्दीन आल्तमस ऐतिगिन याचे नेतृत्वाखालीं दुसरा कट करून यास बंड करण्याची भर दिली. कारस्थानांस बळी पडून यानें बंड केलें तेव्हां रझिया व याकूत यांनीं दिल्लींतील सैन्य बरोबर घेऊन भातिंदावर स्वारी केली. सैन्यांतील असंतुष्ट सरदारांनीं याकूतला ठार मारलें व रझियास कैद करून याचे स्वाधीन केलें. तिकडे दिल्लीस असलेल्या सरदारांना ही बातमी कळतांच शंसुद्दीनचे तिसरे मुलास–मुइझ्झुद्दीन बहराम यास तक्तावर बसविलें. राज्यपद मिळवून दिल्याबद्दल जी मानसन्मानांची व अधिकारांच्या जागांची खैरात झाली तींत सर्व सरदारांनीं आपले हातांत हवें तें पाडून घेऊन अल्तूनियाला तसेंच कोरडें ठेविलें. रझियास कैद करण्याचे कारस्थानांत याची कामगिरी सर्वांत अधिक असूनहि याची सरदारांनीं उपेक्षा केल्यामुळें हा चिडला व यानें रझियास कैदेंतून मुक्त करून तिच्याशीं लग्न केलें. आपल्या नूतन परिणीत वधूस पुनः तिच्या गेलेल्या तक्तावर बसवून सर्व सरदारांची खोड मोडण्याकरितां अल्तूनियानें मोठें सैन्य जमविलें व रझियास बरोबर घेऊन दिल्लीवर स्वारी करण्याकरितां हा निघाला. वाटेंत बहरामनें यास गाठून लढाई केली. त्या लढाईंत पराभूत होऊन रझिया व अल्तूनिया कैद झाले ( १३ आक्टोबर १२४० ). दुसरे दिवशीं दोघांचाहि सैनिकांनीं खून केला.

**इख्तियार उद्दीन ऐतिगिन**—( स. १२४० ) इखत्यार उद्दीन ऐतिगिन हा रझियाचे कारकीर्दीत मुख्य वाकनीस होता. दिल्लीचे दरबारांत जलालुद्दीन याकूत या सिद्दी गृहस्थास सुलताना रझियानें मोठ्या अधिकारावर नेमलें. तिची याकूतवर मर्जी असल्यामुळें दिल्लीचे दरबारीं याकूतचें वजन व वर्चस्व फार वाढलें. एक तर याकूत परकी इसम व दुसरें त्याजवरील सुलतानाचे मर्जीमुळें शिरजोर झालेला म्हणून त्याचा पाडाव करण्याचें याचे मनांत आलें. शिवाय जमल्यास स्त्रीचे हातांत गेलेली राजसत्ता याकूतचा पाडाव झाल्यावर डळमळेल असा विचार करून यानें दरबारीं लोकांस कटांत घेऊन भातिंदाचा सुभेदार इख्तियार उद्दीन अल्तूनिया यास बंडाचें निशाण उभारावयास चिथविलें. अल्तूनियास मोह होऊन बंड केलें, तेव्हां रझिया, याकूत व दिल्लीचें सैन्य बरोबर घेऊन अल्तूनियास वठणीस आणण्यास भातिंद्यावर चालून गेली. भातिंद्यास पोहोंचल्यावर सैन्यांतील असंतुष्ट सरदारांनीं याकूतला ठार केलें व रझियास कैद केलें. सरदारांनीं रझियास अल्तूनियाचे स्वाधीन करून दिल्लीस असलेल्या आपल्या साथीदारांस मुइझुद्दीन बहराम या मृत सुलतान शंसुद्दिन अल्तमसच्या तिसऱ्या मुलास तक्तावर बसविण्यास सांगितलें. २२ एप्रिल १२४० रोजीं बहरामचे नांवाची द्वाही फिरली व ५ मेला सैन्य दिल्लीस परत आलें. तेव्हां सरदारांनीं दरबार भरवून बहरामचे सुलतानपदास मान्यता देतांना अशी अट घातली कीं, इख्तियार उद्दीन ऐतिगिन यास मुख्य वजीर करून हुकमतपन्हाचे अधिकार दिले पाहिजेत. राजास हें कबूल करणें भाग होतें. ऐतिगिननें बहरामचे बहिणीशीं म्हणजे रझियाशीं लग्न करून सर्व सत्ता आपले हातीं घेतली व प्रतिराजाप्रमाणें वागूं लागला. बहरामला ऐतिगिनच्या बेमुर्वतखोर वर्तनाचा व जाचणुकीचा त्रास सहन होईनासा झाला. तेव्हां ३० जुलई रोजीं बहरामनें दोन तुर्कांस रागाचे भरांत आपल्या समक्ष ऐतिगिनावर वार करण्यास चिथविलें. वार वर्मी लागून ऐतिगिन तात्काळ मरण पावला.

**इख्तियार उद्दीन मुहम्मद खल्जी**--(स.११९३ते १२०६ ) बंगालमध्यें मुसलमानी सत्ता प्रस्थापित करणारा गझनीचे राजाचा सुभेदार. हा तुर्की लोकांतील खल्ज ज्ञातीचा इसम कुरूप, बेडौल, पण कर्तबगार व महत्त्वाकांक्षी होता. याच्या कुरूपतेमुळें याच्या महत्त्वाकांक्षेस योग्य नोकरी बरींच वर्षे मिळाली नाहीं. पुढें ह्यास हिजबर उद्दीन हसन अदीब नांवाच्या धाडशी अधिकाऱ्याकडे नोकरी मिळाली व नंतर हा अयोध्या प्रांतांत इस्लामी राज्य स्थापणाऱ्या हिसाम उद्दीन आघूल बक नांवाच्या मुसलमान अधिकाऱ्याचे नोकरींत शिरला. यानें गंगा व शोण या नद्यांमधील प्रांतांत कांहीं मुलूख मिळविला व त्यांत आपलें बस्तान नीट बसवून बिहार व तिरहुत प्रांतांत स्वाऱ्या करण्यास सुरुवात केली. प्रथम प्रथम यानें फक्त लूटमार केली व द्रव्यसंचय केला, तेव्हां द्रव्याचे लोभानें नशीब काढूं इच्छिणारे अनेक लोक यास येऊन मिळाले. पुरेसें सैन्य जमल्यावर यानें औदंतपुरी नांवाच्या विहारच्या राजधानीवर स्वारी केली. तेथील सुप्रसिद्ध विहारांत वस्तीस असलेल्या भिक्षूंची कत्तल करून राजधानी लुटली. लूट व तेथील ग्रंथसंग्रह बरोबर घेऊन हा हिंदुस्थानांतील इस्लामी राजाचा मुख्य सुभेदार कुतुबुद्दीन ऐबक यास दिल्लीस भेटण्यास गेला. इखत्यारचें यश असेंच कायम टिकलें तर हा शिरजोर होईल म्हणून याचा बऱ्या वाईट मार्गानें पाडाव करूं इच्छिणाऱ्या याच्या शत्रूंनीं अनेक कारस्थानें करून ऐबकचें मन कलुषित करण्याचे प्रयत्न केले. ते व्यर्थ गेल्यावर यास ठार करण्याची खालील युक्ति केली. बेफाम झालेला हत्ती आपण कह्यांत आणूं शकतों, अशी इखत्यारला घमेंड आहे, अशी खोटी बातमी उठवून हा प्रयोग प्रत्यक्ष करून दाखवून आपलें म्हणणें खरें करून दाखविण्याची याच्या शत्रूंनीं याला भर दिली. इखत्यारनेंहि माघार न घेतां हा प्रयोग करून दाखविण्याचें कबूल केलें व हत्ती कह्यांत आणून सर्वांची फजिती केली. ऐबक खूष होऊन त्यानें याला ह्यानें जिंकलेल्या व पुढें जिंकील त्या सर्व मुलखाचा राज्यकारभार पाहण्याचीं अधिकारसूत्रें देऊन याची बिहार प्रांतांत रवानगी केली. बिहारमध्यें परत आल्यावर यानें बंगालच्या उपसागरापासून हिमालयाच्या पायथ्यापर्यंत इस्लामी राज्याचा विस्तार करण्याची महत्त्वाकांक्षा आंखून उद्योगास आरंभ केला. दक्षिण बंगालप्रांताचें राज्य ह्या वेळीं लक्ष्मण नांवाच्या सेन घराण्यांतील राजाकडे होतें. राजा लक्ष्मण वृद्ध असून नवद्वीप किंवा नदिया नांवाचे राजधानींत राहत असे. नदिया या वेळीं बहुतेक उजाड झालेलें होतें. असें सांगतात कीं, तुर्की लोकांकडून नदिया उध्वस्त व्हावयाचें आहे असें भविष्य वर्तविलें गेलें होतें, म्हणून तेथील बहुतेक सर्व श्रीमान् लोक पूर्वेकडे दूर वस्तीस गेले होते. लक्ष्मण राजानें मात्र राजधानी सोडण्याचें नाकारिलें होतें. हा बरोबर मोठें सैन्य घेऊन नदियावर स्वारी करण्याकरितां निघाला; परंतु यानें प्रवास इतक्या झपाट्यानें केला कीं, हा जेव्हां नदियास पोहोंचला तेव्हां याजबरोबर फक्त १८ च स्वार होते. उत्तरेकडील

घोडेवाले आहेत, अशा समजुतीनें यास द्वारपालांनीं शहरांत जाऊं दिलें. हा राजवाड्याजवळ आला तेव्हां राजा लक्ष्मण जेवावयास बसला होता. यानें द्वाररक्षकांवर एकदम तुटून पडून कत्तल सुरू केली. त्यामुळें सगळीकडे गोंधळ व हाहाःकार उडाला. राजा लक्ष्मण जेवीत असल्यानें उघडाच होता. तो जेवण तसेंच टाकून मागील दारानें उघडाच बाहेर पडून नावेंत बसून पसार झाला. बाकीचें सैन्य नदियास येऊन पोहचेतों हा व याचे अठरा संवगड्यांनीं प्रतिकारास दाद दिली नाहीं. सैन्य आल्यावर शहर लुटण्यांत आलें. खजिन्यांत लक्ष्मण सेन राजाच्या ८० वर्षांच्या शांततेच्या कारकीर्दीत जमविलेलें सर्व द्रव्य याचे हातीं लागलें. यानें गौर अथवा लखनावतीला जाऊन तेथें आपली राजधानी करून बंगाल प्रांतांत मुसलमानी सत्ता दृढमूल केली. लखनावतीस (गौर) मशीदी बांधल्या. पाठशाळा काढल्या. धर्मशाळा बांधल्या. बंगालमध्यें आपल्या सत्तेची स्थापना झाल्यावर यानें हिमालयाच्या पायथ्यापर्यंत राज्यविस्तार पोहोंचविण्याचे प्रयत्न केले व ते शेवटास नेले. कोच, मेच आणि कचारी नांवाच्या मोगल वंशीय लोकांस यानें आपल्या सत्तेखालीं आणिलें. या ज्ञातीपैकीं एक राजा अली मेच असें नांव धारण करून मुसलमान झाला व त्यानें याला हिमालयापलीकडील प्रांत जिंकण्यास, त्या बिकट पर्वतश्रेणींतले मार्ग दाखवून मदत करूं असें आश्वासन दिलें. अलीच्या महत्त्वाकांक्षेस मर्यादा नसल्यानें तो स. १२०५ मध्यें १०००० घोडदळ बरोबर घेऊन याच्यासह घातुक कामगिरीवर निघाला. कामरूप प्रांताच्या राजाशीं तह करून मदतीचें आश्वासन घेऊन देवकोटहून हा एका नदीच्या कांठानें १० दिवस चाल करून बुर्धनकोटला पोहोंचला. तेथें नदीवर एक दगडी पूल होता, त्या पुलाचे अलीकडे राहून रक्षणाचें काम करण्यास सैन्य ठेवून, बुर्धनकोटचा राजा वसंतऋतु येईतों पुढें जाणें घातुक आहे असें बजावून सांगत असतांहि तिबेटकडे जाण्यास निघाला. १५ दिवस चालून गेल्यावर हा एका मोठ्या वस्तीच्या किल्ल्याजवळ जाऊन पोहोंचला. हा किल्ला तिबेटच्या कोणत्या भागांत होता व त्याचें नांव काय यासंबंधानें माहिती उपलब्ध नाहीं. तेथील लोकांनीं जोराचा प्रतिकार केल्यामुळें याचे बरेच सैनिक पडले व त्यास परत फिरावें लागलें. वाटेवरील लोकांनीं रस्ते नादुरुस्त करून, उपासमार करण्याकरितां पिकें, वैरण जाळून व हल्ले करून याला जर्जर केलें. नदीजवळ हा येऊन पोहोंचला तेव्हां असें आढळून आलें कीं, नदीवरील पूल उध्वस्त करण्यांत आला होता व नदीस भयंकर मोठा पूर आला असल्यानें नदीपार जाणें अशक्य होतें. कामरूपच्या राजानें वचनभंग करून याचे सैन्यावर पडला करून नदींत यास उतरावयास लाविलें. नशीब थोर म्हणून हा १०० घोडेस्वारांनिशीं नदीपार आला व लखनावतीस परत जाऊं शकला. हिंदुस्थानांत मुसलमानी सैन्याचा अशा प्रकारचा मोड कधीं झाला नव्हता. याचें सर्व सैन्य गारद झालें व लखनावतीस लज्जेनें तोंड दाखविण्याची सोय राहिली नसल्यानें मेलों असतों तर बरें होतें असें यास वाटूं लागलें. मेलेल्या सैनिकांच्या आया, बहिणी, बायका, पोरें यास शिव्याशाप देऊं लागले. त्यामुळें पश्चात्ताप होऊन हा आजारी पडला व स. १२०६ मध्यें मरण पावला, असें कांहीं बखरकार म्हणतात. तथापि खरी गोष्ट अशी दिसते कीं, याच्या वेड्या धाडसानें झालेल्या मनुष्यहानीमुळें संतापून अलीमर्दान नांवाच्या सरदारानें याचा खून केला ( कें. हि. ). याला बख्त्यार खल्जी, मुहंमदबी इख्त्यार खल्जी असेंहि म्हणत. याला अफगाण म्हटलेलें आढळतें ( हि. का. १. १२६–१२८ ).

**इख्तियार उद्दीन युझ्बक**—( स. १२४६–५८ ) बंगालचा सुभेदार.

**इचलकरंजीकर ( जोशी) यांची वंशावळ**—



( ७ ) केशवराव तात्या सा. ( मृ. ७-२-१८५२ )
|
( ८ ) व्यंकटराव ( द. ) ( मृ. ८-४-१८५४. )
|
(९) गोविंदराव आबासा. (द.)(मृ०१५-२-१८७६)
|
(१०) नारायणराव बाबासा.(द.)ता. १०-८-१८७६.

* टीप—संताजीराव घोरपडे यानें नारो महादेव यास नोकरीस ठेविलें आणि पुत्र मानलें. शेवटीं सरंजाम देऊन या घराण्याची इचलकरंजी येथें स्थापना केली. यानें कृतज्ञता म्हणून मूळचें आडनांव सोडून घोरपडे हें नांव स्वीकारलें ( म. रि. म. १ पृ. ४१६).

**इच्छनीकुमारी**—अबूच्या परमार घराण्यांतील जैत राजाची मुलगी. ही फार रूपवान असल्यामुळें गुजराथचा राजा ( भोळा ) भीमदेव यानें हिच्याविषयीं परमार राजाकडे मागणी केली. जैत राजानें भीमदेवाची मागणी नाकारून युद्धाची तयारी केली. युद्धाची सिद्धता झाल्यावर साबरमतीच्या कांठीं लढाई होऊन भीमदेवाचा पुरा मोड झाला. या लढाईंत पृथ्वीराजानेंहि हिच्या प्राप्तीकरितां भाग घेतला होता ( मु. रि. भा. १ ला, पृ. ९०- १९७ ).

**इच्छाराम**—एक गुजराथी कवि. हा डाकूरचा गुजराथी ब्राह्मण. यानें गुजराथींत दशावतारवर्णन नांवाचें काव्य केलें आहे ( का. दो. ).

**इच्छारामपंत ढेरे**—माधवराव पेशवे आजारी असतां थेऊरास त्यांचे आजाराचे शेवटचे दिवसांत त्यांच्या शुश्रूषेस राहिलेल्या मंडळींपैकीं इच्छारामपंत ढेरे हा एक होता. माधवरावास यातना सहन होत नसल्यामुळें तो सारखा जीव देण्यासाठीं खंजीर मागत होता. तो न दिल्याबद्दल त्यानें इच्छरामपंतास मुसक्या बांधून चोप दिला. इच्छारामपंत हा माधवरावाचा खाजगीकडील विश्वासू कारकून होता. नारायणरावांचे खुनाचे दिवशीं गारदी वाड्यांत शिरून पगाराकरितां गलगा करूं लागले. तेव्हां " कचेरीच्या वेळेस पगार मागा, आतां यजमान निजले असतां गलगा करण्याचें कारण नाहीं." असें त्यांना हा दरडावून सांगूं लागला. तेव्हां गारद्यांनीं यास ठार मारलें ( म. रि. म. भा. ४, पा. ३३६ ).

**इझुद्दीन**—( मुहम्मद शीरान खल्जी पाहा ).

**इझुद्दौला अब्दुर रशीद गझनवी**—(स.१०५२) हा महमूद गझनवीचा सहावा मुलगा किल्ल्यांत कैदेंत होता. मौदूद गझनवी स. १०४९ मध्यें वारल्यावर त्याचा भाऊ अली अबू अल् हसन ( अली बहाउद्दौला ) यास गझनीचे उमरावांनीं तक्तावर बसविलें होतें. परंतु तो दुबळा होता. त्यास राज्यकारभाराची जबाबदारी रेटेना. तेव्हां यास कैदेंतून सोडण्यांत आलें. यानें गझनीवर स्वारी करून अलीस पदच्युत केलें व आपण अमीरपदाधिष्ठित झाला. इझुद्दौला अभ्यासू पंडित होता; व धर्मशास्त्राचें अध्ययन करी. मात्र शिस्त बिघडलेल्या स्वतःच्या राज्याचा कारभार पाहण्यास हा फारसा लायक नव्हता. यानें पंजाबच्या राज्यकारभाराचे कामगिरीवर नूष्तिगिन नांवाचे हुषार अधिकाऱ्यास नेमिलें. नूष्तिगिननें कांग्रा किल्ला हिंदू राजा महीपाल याजकडून परत मिळविला, व प्रांताच्या कारभारांतील बिघडलेली शिस्त सुधारली. सीस्तानचे राज्यकारभारावर नेमलेल्या तुघ्रीलनें विश्वासघात करून सीस्तान प्रांतांत दरारा व शिस्त बसविली, परंतु अमीराऐवजीं आपली सत्ता प्रस्थापित केली. सल्जुकांचा पराभव करून त्यानें मोठें सैन्य जमविलें व गझनीवर स्वारी केली. इझुद्दौलाचा पराभव करून त्यास व राजघराण्यांतील १० इसमांस ठार मारून तुघ्रील तक्तनशीन झाला ( कें. हि. ).

**इझुद्दीन बल्बन**-( स. १२५९ ) बंगालचा सुभेदार.

**इत्सिंग**—(स.६७१-७१३)हा एक चिनी प्रवासी होय. हा बौद्ध श्रमण असून यानें हिंदुस्थानला जाण्याकरितां स. ६७१ त ह्यूएन्संग परलोकवासी झाल्यावर चीन देश सोडला व जावा, मलाक्का या मार्गानें हुगळीच्या मुखाशीं असलेल्या ताम्रलिप्तीमध्यें हा स. ६७३ त जाऊन पोंचला. कांहीं कालपर्यंत यानें नालंद येथें अभ्यास केला व बुद्धगया, वाराणशी, श्रावस्ती, कुब्ज, राजगृह, वैशाली, कुशिनगर या ठिकाणीं हा फिरला. स. ६९२ मध्यें चीनला जात असलेल्या तत्सइन नामक चिनी उपाध्यायाबरोबर यानें आपला ग्रंथसंग्रह चीनला पाठविला. स. ६९५ मध्यें हा स्वतः चीनला परत गेला, त्या वेळीं तेथें राज्य करीत असलेल्या वु-हाऊ राणीनें याचें चांगलें स्वागत केलें. स. ७०० व ७१२ यांमधील कालांत यानें ५६ ग्रंथांचें भाषांतर केलें, आणि ७१३ मध्यें ७९ व्या वर्षी वारला.

**इन्शा**—( स. १७१५ ) याचें नांव सैयद इन्शा अल्लाखाँ हें असून इन्शा हें उपनांव होय. याचा बाप हकीम मीर माशा अल्ला खाँ हा असून याचा जन्म दिल्ली येथें झाला.

याचे पूर्वज समरकंदाहून हिंदुस्थानांत आले. लहानपणापासूनच हा चलाख आणि प्रतिभावान् होता. याच्या इतका ऐटदार कवि उर्दूमध्यें दुसरा कोणी नव्हता असें म्हणतात. जो विषय हा हातांत घेई तो विषय हा मनापासून तडीस

नेई. याला गाण्याचाहि नाद होता. सतार वाजविण्यासहि हा शिकत होता. हा जन्मतःच कवि होता. हा दिल्ली सोडून मुर्शिदाबादेस गेला. पण तेथें फार दिवस न राहतां परत पुनः दिल्लीस आला. या वेळीं दिल्ली दरबारांत बेबंदशाही माजली होती. तरी पण शाहआलम बादशाहनें याचा सन्मान करून आपल्या दरबारीं ठेवलें. हा गुणी, मधुरभाषणी, हजरजबावी, विनोदी आणि कवि असल्यामुळें याचा प्रभाव दरबारांत चांगला पडून याच्याशिवाय शाहआलम बादशाहास चैन पडत नसे. याचा वर्ण गोरा असून हा देखणाहि होता.

फायक नांवाच्या कवीनें याच्यावर निन्दात्मक कविता लिहिली. ती ऐकून इन्शा खूष झाला. कांहीं गोष्टींविषयीं याचीं व बादशाहाचीं मतें जुळत नसत. ज्या गोष्टी बादशाहास आवडत नसत त्या गोष्टी इन्शा बादशाहास न विचारतां करीत असे व पुढें अशाच कांहीं गोष्टीवरून बादशाहा याच्यावर रुष्ट होऊन याचें वेतन बंद केलें.

१ उर्दू गजलों का दीवान, २ दीवान रेख्तो, ३ उर्दू के कसीदे, ४ फारसी के कसीदे, ५ दीवान फारसी, ६ मसनवी शेर बिरंज, ७ मसनवी फारसी बेनुक्त, ८ शिकार नामा फारसी, ९ निन्दात्मक पद्य, १० मसनवी आशिकाना, ११ हाथी और चंचल प्यारी हथिनी की शादी, १२ फुटकर शेर, १३ दीवान बेनुक्त, १४ मातए आमिल (फार्सी), १५ मुर्ग नामा (उर्दू) हे सर्व ग्रंथ इन्शाचे होत. याशिवाय यानें 'दरियाय' आणि 'राणी केतकी की कहानी' हींहि पुस्तकें लिहिलीं आहेत.

याला हिंदुस्थानांतल्या बऱ्याचशा भाषा येत होत्या. कधीं पंजाबी, कधीं काश्मीरी, कधीं मराठी, कधीं अफगाणी, कधीं व्रज वगैरे भाषा हा बोलत असे. तात्पर्य हा बहुभाषाभिज्ञ असून प्रतिभाशाली पुरुष होता. याचा मृत्यु स. १७९५ मध्यें झाला (क. कौ. भा. ४ था).

**इब्न खुर्दादबा**—एक अरबी प्रवासी. यानें मान्यखेट वल्लभराय (ब-हारा) व बंगालच्या पाल राजाची माहिती दिली आहे. तसेंच यानें सात जातींचें सविस्तर वर्णन केलें आहे. हा स. ९१२ या सुमारास मेला (म.भा.२ २६६). हा मक्केच्या यात्रेस गेला होता (बील).

**इब्न बतूता**—आफ्रिका खंडांतील तांजर्स येथें राहणारा इब्न बतूता नामक एक विद्वान गृहस्थ आशिया खंडांत फिरत फिरत सन १३४० त दिल्लीस आला.

यानें मुहंमद (जौना ऊर्फ उलुघबेग) तुघ्लखाच्या दरबारची बरीच हकीकत दिली आहे. यानें दिल्ली शहराचें विस्तीर्ण वर्णन केलें आहे. हा दिल्लीस पोंचला तेव्हां तेथें सुलतान नव्हता. सुलतानच्या आईनें या परदेशी पाहुण्याचें स्वागत अत्युत्तम केलें. सुलतान आल्यावर त्यानें याच्या खर्चाचा बंदोबस्त चांगला करून दिला. याची मुलगी दिल्लीस वारली, तेव्हां सुलताननें तिचा उत्तरविधि मोठ्या समारंभानें करविला. त्या समारंभांत सुलतानचे वतीनें त्याचा वजीर हजर होता. यांस मुहंमदानें न्यायाधीशाचें काम सांगितलें आणि त्याबद्दल मोठें वेतन करून दिलें. याचें पंचावन्न हजार दिनारांचें कर्ज सुलतानानें वारिलें. तुघ्लख घराण्यांतील जो मुहंमद (जौना ऊर्फ उलुगबेग) त्याच्या क्रूर कृत्यांचें यानें चांगलें वर्णन केलें आहे. तें वर्णन वाचून अंगावर कांटा उभा राहतो. मुहंमदाचीं क्रूर कृत्यें यानें स्वतः पाहिलेलीं होतीं. यानें मुहंमद सुलतानाच्या स्वभावाचें वर्णन येणेंप्रमाणें केलें आहे:—

'लोकांवर उपकार करणें व त्यांस तलवारीच्या धारेखालीं धरणें ह्या दोन्ही गोष्टी एकदम करणारा मनुष्य या सुलतानाशिवाय दुसरा कोणी सांपडणार नाहीं. सुलतानच्या हातून द्रव्य मिळवून दुःख निवारण झालेला भिकारी, आणि त्याच्याच हातून शिक्षा झालेल्या इसमाचें प्रेत, अशांची जोडी त्याच्या वाड्याच्या दारांत सदैव दिसून येते. ............ वगैरे.' (मु. रि. भा. १ ला, पृ. १५२, १५९, १६१; अलाउद्दीन तमोशिरीन घियासुद्दीन मुहंमद पाहा). यानें 'इब्न बतूताचे प्रवास' या नांवाचा ग्रंथ लिहिला. त्याचें स. १८२९ मध्यें इंग्रजी भाषांतर रेव्ह. एस. ली. बी. डी. लंडन, यानें केलें (बील).

**इब्न हौकल**—एक अरबी प्रवासी. यानें स. ९७६ च्या सुमारास आपलें प्रवासवृत्त लिहिलें. यानें वल्लभराय राष्ट्रकूटाच्या राज्यांतील सुवत्तेचें वर्णन केलें आहे (म. भा. २, २७०).

**इब्राहीम**—(स. १५२६ सुमार) काश्मीरच्या मुहम्मदशाहाचा मुलगा. हा फत्तेशाहानंतर गादीवर आला.

**२.** (स. १५५२) काश्मीरच्या मुसलमान राजांपैकीं नाझुकशाहाचा पुत्र. पित्यानंतर हा गादीवर आला.

**३.** (शंसुद्दीन इब्राहीमशाहा पाहा).

**४.** विजापूरच्या आदिलशाही घराण्यांतील दुसऱ्या अलीचा हा एक दिवाण.

ममलकत मदारखान मुहंमद याच्या नंतर हा दिवाणाचे कामावर आला. हा जरी दिवाण होता तरी अली आदिलशाहाची मातोश्री बडीसाहेबीण हिच्या सल्लयाशिवाय कोणतीहि गोष्ट होत नसे. बडीसाहेबीण मक्केच्या यात्रेस

निघाली, तेव्हां तिजबरोबर हाहि निघाला. म्हणून, याचा मुलगा अबदुल मुहंमद यास सर्व अधिकार दिला.

( विजापूरचें आदिलशाही घराणें मोडककृत ).

५. शिवाजीचा इमानी नोकर. ता. १५ एप्रिल स. १६७४ रोजीं शिवाजीनें फोंडा किल्ल्यास वेढा दिला. मोर्चा लावून हल्ले चढवीत असतां आदिलशाहीचा सरदार बहलोल-खान किल्लेकऱ्याच्या उपराळ्यास येत असल्याचें कळलें. तेव्हां त्यास पिटाळून लावण्याचा शिवाजीनें बेत केला. वेढ्याची ढिलाई पाहून किल्ल्यांतील शिबंदीचे स्वार तटावर व बुरुजावर उभे राहिले. शिवाजीनें ही संधि साधून आधींच तयार असलेले सुरुंग उडवले. तेव्हां आंतील शिबंदाची पळापळ झाली. या गर्दीत यानें मोठ्या धैर्यानें किल्ल्यावर निशाण चढविलें म्हणून शिवाजीनें यास तेथील सुभेदारी दिली.

**इब्राहीम आदिलशाह**—( स. १५३४–१५५७ ) हा विजापूरच्या आदिलशाही घराण्यांतील इस्माईलचा पुत्र. हा याचा थोरला भाऊ मल्लू याचे नंतर विजापूरचे गादीवर आला.

गादीवर आल्यावर यानें प्रथम इमामांच्या नांवानें खुत्बा पढण्याचें बंद करून सुनी पंथ राज्यांत चालू केला. परदेशीय शिपायांस रजा देऊन त्यांचे जागीं दक्षणी व मोंगल शिपायांस नोकरीस ठेविलें. इस्माईलचे कारकीर्दीत ज्या रीति व वहिवाटी चालू होत्या, त्या सर्व इब्राहीमानें बंद केल्या. सर्व सरकारी हिशोब व दप्तर आजपर्यंत फार्सी भाषेंत व लिपींत ठेवीत असत, तें बंद करून मुलकी कामावर ब्राह्मणांस नेमून त्यांच्या करवीं सर्व हिशोब व दप्तर मराठी भाषेंत व मोडी लिपींत ठेवण्यास सुरवात केली. येणेंकरून मराठ्यांचें प्राबल्य दिवसेंदिवस वाढत चाललें.

जेव्हां विजयनगरचा व्यंकट ( १ ला ) याचा प्रधान सलाकम तिम्म राजु याचा कारभार जनतेस असह्य व जुलमी होऊं लागला तेव्हां वरदादेवी–अमाल, आणि दोवागर या राण्यांनीं मिळून याच्याकडे मदत मागितली आणि सलाकमास बडतर्फ करून आपल्या मुलास गादी-वर बसविण्याबद्दल विनंति केली. या विनंतीस मान देऊन यानें विजयनगरवर स्वारी केली. पण सला-कमानें अन्य प्रयत्नानें हा डाव फसविला. ज्या वेळीं विजयनगरचा सदाशिव राजा गादीवर बसला, त्या वेळे-पासूनच हिंदु व मुसलमान यांच्या भांडणास सुरुवात झाली. विजयनगर येथें सदाशिव राजाच्या राज्याभिषे-काची गडबड चालू असतां यानें असदखानाच्या मदतीनें विजयनगरच्या राज्यांतील आडोनी किल्ल्यावर स्वारी केली. तेव्हां रामरायानें आपल्या भावास पाठवून याच्याशीं तह केला. एकदां रामराय आणि बुर्हाण निजामशाह यांनीं याच्यावर स्वारी केली तेव्हां यानें आपल्या मंत्र्याच्या सल्ल्यानें या दोन बलिष्ठ शत्रूंशीं सख्य केलें. याप्रमाणें याच्या व विजयनगरच्या राजामध्यें नेहमीं झटा-पटी होत.

एकदां याचा सरदार असदखान यानें विजयनगरच्या रामराजाचा भाऊ वेंकटाद्री याचा पराभव केला व त्याच्या छावणींतून बरेंच जडजवाहीर लुटून आणलें. तेव्हां इब्रा-हीमानें असदखानास प्रधानकीचीं व सेनापतीचीं वस्त्रें दिलीं, आणि त्याच्या एका कन्येशीं लग्न केलें. त्या कन्येच्या पोटीं जो पुत्र होईल त्यास आपल्यामागून गादीवर बस-वावें असें इब्राहीमानें सांगितलें. या लग्नानें असदखानाचें प्रस्थ जास्त माजलें. तेव्हां दरबारांतील लोक त्याच्या विरुद्ध वाटेल त्या कंड्या पिकवूं लागले व त्याचा हेवा करूं लागले. दरबारांतील विरुद्ध असलेल्या लोकांनीं राजाचें मन असदखानाविषयीं कलुषित करून त्याला राजाकडून दिवाणाचे जागेवरून कमी करविलें. पुढें असदखानानें इमादशाहास आपली सर्व हकीकत सांगून त्याची खात्री पटविली व त्याच्याकडून राजाचा आपल्याविषयीं असलेला गैरसमज दूर करविला. हा गैरसमज दूर केल्यावर राजानें असदखानास आलिंगन दिलें. त्याच्याविषयीं आपलें मन कलुषित करणाऱ्या सर्व लोकांस कैदेंत ठेविलें; व असदखान पुनः कारभार पाहूं लागला. यानंतर असदखान थोड्याच दिवसांनीं मरण पावला.

इब्राहीमला बहुतेक आपली सर्व कारकीर्द विजय-नगरच्या रामराजाशीं लढण्यांत खर्च करावी लागली. विजयनगरशीं शेवटची लढाई होऊन तींत विजयनगरचा पराभव झाला. याप्रमाणें स्थिरता झाल्यावर इब्राहीमास जबरदस्त दुखणें आलें. अलीकडे बरेंच दिवसांत हा दारू फार पिऊं लागून, पाहिजे त्या वाईट स्त्रियांशीं संभोग करूं लागला होता. या व्यसनापासूनच ज्वर, मस्तकशूळ, घेरी, श्वास, असे अनेक रोग होऊन यास जिवावरचें दुखणें आलें; व त्या दुखण्यांतच हा स. १५५७ मध्यें मरण पावला. यानें एकंदर २४ वर्षें व कांहीं महिने राज्य केलें. अलाउद्दीन इमादशाहाची मुलगी रबिअसुलताना ही याला दिली होती. याला अली वगैरे पुत्र व तानीबिबी आणि बयदासुलताना अशा दोन कन्या होत्या. पहिलीचें लग्न अलीबरीद याशीं आणि दुसरीचें निजाम-शाहाशीं झालें.

हा शूर व पराक्रमी होता. यानें शूरत्वानें आणि निर्भयपणें युद्धें केलीं. हा सर्वदा शत्रूंवर दौड करून जात असे. आणि त्यांच्या मुलखांची नासाडी करीत असे. विद्वानांची व गुणीजनांची याला पारख होती. पण हा राज्याच्या अखेरीस मोठा क्रूर, निर्दय आणि दुर्गुणी झाला. अल्प अपराधास मोठी शिक्षा करूं लागला, आणि क्षमा व दया कोणावर करीत नसे (विजापूरचें आदिलशाही घराणें-मोडककृत).

२. (स. १५८०–१६२७) विजापूरच्या आदिलशाहाच्या घराण्यांतील तहमास्पाचा मुलगा. अलीस पुत्रसंतान नसल्यामुळें अलीनंतर हा विजापूरच्या गादीवर बसला.

गादीवर बसला तेव्हां याचें वय अवघें नऊ वर्षांचें होतें. आरंभापासूनच याचें राजतेज नजरेस येऊं लागलें. याच्या विस्तीर्ण भाळावरून हा पुढें चांगला निघेल, असा सर्वांचा तर्क असून तो बहुतांशीं खरा झाला. एकदां हा दरबार बरखास्त झाल्यावर वाड्यांत जात असतां याच्या एका सरदारानें साहजिकच ह्यास म्हटलें कीं, 'आज सरकारांस विशेष तसदी पडली.' तेव्हां यानें उत्तर दिलें कीं, 'ईश्वरी कृपेनें आतां जें काम मजकडे आलें आहे त्यांत विश्रांति मिळण्याची मीं इच्छा करणें म्हणजे राजनीतीस किंवा बादशाहा या नांवास बाध आणणें होय.' अशा याच्या कित्येक समर्पक आणि चटकदार भाषणांवरून लोकांनीं साहजिकच ताडलें कीं याच्या कारकीर्दीत प्रजा बहुधा आबादानींत राहील.

हा अल्पवयी असल्यामुळें याचा कारभार कामीलखान दक्षणी हा पाहत असे. याची चुलती चांदबिबी ही याच्या विद्याभ्यासावर देखरेख करी व याचें पालनपोषण करी. पुढें कामीलखानानें चांदबिबीची अदबी ठेवण्याचें एका बाजूस झुगारून उन्मत्तपणा आरंभिला, तेव्हां चांदबिबीनें त्याच्या नाशाचे उपाय चालविले. आणि शेवटीं (हाजी) कीश्वरखान नांवाच्या एका सरदाराकडून कामीलखानाचा खून करविला. कामीलखानानें दोन महिने दहा दिवस काम पाहिलें. याच्या नंतर कीश्वरखान दिवाणाचें काम पाहूं लागला. पण कीश्वरखानाविषयींहि लोकमत प्रतिकूल होऊन त्याच्या नाशाच्या खटपटीस सरदार लोक लागले. पुढें कांहीं कारणावरून कीश्वरखानानें चांदबिबीस कैद करण्याचा हुकूम बादशाहाकडून घेतला व चांदबिबीस सातारच्या किल्ल्यांत कैदेंत ठेविलें. चांदबिबीस कैद केल्यावर कीश्वरखान निर्धास्त झाला आणि आपल्यास वाटेल तसा कारभार करूं लागला. त्यामुळें प्रजेस फार त्रास होऊं लागला. शेवटीं कांहीं कारणावरून हबशी लोकांनीं कीश्वरखानास ठार मारिलें. कीश्वरखानानें एकंदर चार महिने बारा दिवस काम केलें. कीश्वरखानास मारावयाचें काम इखलासखान यानें केलें. त्यानंतर इखलासखान हा दिवाणाचें काम पाहूं लागला. इखलासखानानें चांदबिबीस कैदमुक्त करून कीश्वरखानाच्या वेळचे सर्व अधिकारी काढून टाकले. शेवटीं दिलावरखानानें कृतघ्नपणानें इखलासखानाचे डोळे काढून त्यास कैद केलें, व विजापूरचा कारभार दिलावरखान पाहूं लागला. दिलावरखान दिवाणाचें काम पाहूं लागला, ही गोष्ट हमीद यास पसंत पडली नाहीं. तेव्हां दिलावरखानानें हमीदास कैद केलें. अबदुल हसन हा क्षणांत काय करील याचा त्याला विश्वास नव्हता म्हणून त्यानें त्याला जिवें मारिलें. दिलावरखान चांगला विचारी असून राजकीय व धर्म या विषयांवर वादविवाद करण्याची त्याला फार गोडी असे! राज्यांत नेहमीं स्वस्थता असावी, कोठेंहि दंगाधोपा नसावा, असें त्यास वाटे. अदोनीचा किल्लेदार घालीबखान यानें बंड केलें होतें, त्यास आपल्या बुद्धिचापल्यानें पकडून त्याचे डोळे काढिले. याप्रमाणें यानें (दिलावरखान) सतत आठ वर्षेपर्यंत अबाधित राज्यकारभार चालवून आणि राज्याचें उत्पन्न वाढवून आदिलशाही राज्य भरभराटीस आणिलें.

स. १५८६ मध्यें इब्राहीम आदिलशाहा प्रौढदशेंत आल्यामुळें त्याच्या लग्नाचा विचार निघाला व कुतबशाहाची बहीण मलिकाजहान हिचेबरोबर त्याचा विवाह झाला. त्या वेळीं राज्यांत दिलावरखानाचें प्रस्थ फार माजलें होतें. दिवाणाच्या हुकमाशिवाय राज्यांतील एक पानहि हालत नसे. त्यामुळें इब्राहीमास दिवाणापासून फार त्रास होऊन एके दिवशीं यानें दिवाणास, कांहीं सरदारांच्या मदतीनें राज्यत्याग करणें भाग पाडलें. नंतर इब्राहीम आदिलशाहा दिलावरखानाच्या धाकदराऱ्यांतून व जाचांतून सुटतांच याच्या खऱ्या स्वरूपावर जो बुरखा होता तो एकीकडे झाला, आणि यानें त्याच ठिकाणीं मसनदीवर चढून सर्वांच्या भेटी व नजरनजराणे घेतले.

यानें राज्यसूत्रें हातीं घेतांच सर्व खात्यांचा उत्तम बंदोबस्त ठेवून चांगली व्यवस्था केली. सर्व कामें न्यायानें, दयाळूपणानें आणि शाहाणपणानें करण्याकडे याची एकसारखी नजर असे. प्रजेची दादहि चांगली लागे. त्यामुळें ती सर्वदा सुखांत राहून राजाचें कल्याण चिंती. येणेंकरून मागील दंग्याचें तिला लवकरच विस्मरण पडलें. दिलावरखान यानें राज्यत्याग केल्यावर तो दुसऱ्या बुर्हाण निजामशाहाकडे

गेला. तेथें त्याचा चांगला सत्कार झाला. पुढें दिलावरखानानें बुर्हाण निजामशाहास चढवून इब्राहीम आदिलशहावर स्वारी करण्याचा निश्चय केला व या मुलुखांत बंडाळी माजविली. तेव्हां इब्राहीमानें दिलावरखानास पुनः आपला दिवाण नेमण्याचें कबूल करून त्यास विजापूरीं बोलविलें. दिलावर विजापुरास आल्यावर इब्राहीमानें त्याचे डोळे काढून त्यास सातारच्या किल्ल्यावर कैदेंत ठेविलें. दिलावरखानाची अशा प्रकारें वाट लाविल्यावर यानें बुर्हाणशाहावर स्वारी करून त्याचा पूर्णपणें मोड केला. स. १५९५ सालीं याची व इब्राहीम निजामशाहाची लढाई होऊन तींत निजामशाहाचा पराभव झाला व त्यांत तो मारला गेला. त्या वेळीं इब्राहीम आदिलशाहाचा सेनापति हमीदखान होता.

हा वरचेवर कर्नाटकावर स्वाऱ्या करीत असे. विजयनगरचा दुसरा वेंकट याच्या कारकीर्दींत यानें पेनुकोंडावर स्वारी केली होती. पण दुर्दैवानें त्या स्वारींत याचा पूर्ण मोड झाला. यानंतर यानें विजयनगरवर स्वारी न करतां त्याच्याशीं सख्य करण्याचा प्रयत्न केला. कारण उत्तरेकडील मोंगल साम्राज्य प्रबळ होऊन दक्षिणेकडील राज्यें जिंकण्यास सुरवात झाली होती. त्यामुळें आतां त्यांच्यांत दोस्तीचा तह झाला होता.

याला गायनाचा नाद असे. आणि तो पुढें हळूहळूं वाढत गेला. स. १६०५ मध्यें इब्राहीम आदिलशाहाची कन्या फातेमा सुलतान, ऊर्फ बादशाहासांहेबा हिचें लग्न १७ वे वर्षी शाहा हाबिबुल्लाह बिन शाहा यदुल्लाह हुसनी या श्रेष्ठ कुलांतील पुरुषाशीं झालें. यास आणखी एक मुलगी असून ती अकबराचा मुलगा दानियाल यास दिली होती. याला चार बायका असून त्या चौघींनाहि मुलगे होते आणि आपल्या मुलाला राज्य मिळावें म्हणून त्या कारस्थानें करीत. या घरगुती प्रकरणानें शेवटीं हा अगदीं त्रस्त होता ( दर्वीश पाहा ). यानें निजामशाहीच्या मलिकंबरास मदत केली होती.

हा कविताहि करीत असे. याच्या बऱ्याच फर्मानांवर 'पूजा ( पूज्य ) श्री सरस्वती ' असें लिहून प्रारंभ केलेला असतो. यानें एक संगीतमहाल बांधून त्यांत सरस्वतीच्या मूर्तीची स्थापना केली होती. यामुळें हिंदू लोकांनीं याला 'जगद्गुरु' अशी पदवी देऊन गौरविलें होतें. याचेच कारकीर्दींत मुहंमद कासीम फेरिस्त्यानें आपला इतिहास लिहिला.

गायनकलेंत निपुण असल्यानें याचें सुंदर गाणें ऐकून अन्तरिक्षांतून जाणारा तपस्व्याचा शिष्य याच्या माडीवर उतरला. तेथें गायन ऐकत असतां त्यास निद्रा लागली. ज्या एका गुटिकेच्या साहाय्यानें तो आकाशांत संचार करूं शकत असे ती गुटिका जवळच पडली व ती याला सांपडली. पण तो जागा झाल्यावर गुटिकेकरितां आक्रोश करूं लागला तेव्हां ती यानें त्यास परत दिली. तो शिष्य नित्य रामेश्वरचें उदक गुरूला स्नानार्थ देत असे. याची माहिती ऐकून याला जगद्गुरु अशी पदवी गुरूनें धाडून दिली अशी आख्यायिका आहे. लोक याला जगद्गुरु पातशा म्हणत ( प. सा. ५० ).

गायनाकडे विशेष झोंक असल्यामुळें यानें हिंदु लोकाशीं बराच परिचय ठेविला होता. सरस्वतीपूजन व सेवा केल्याशिवाय आवाज सुधारणार नाहीं आणि चांगलें गातां येणार नाहीं म्हणून बहुधा सर्व जातींचे लोक प्रथम सरस्वतीपूजन करून नंतर गायन शिकतात. त्याप्रमाणें यानें केलें होतें. त्यामुळें यानें मुहंमदी धर्माचा परित्याग केला, असें लोक म्हणूं लागले. हें सर्वथैव जरी खरें नसलें तरी गायनाच्या छंदामुळें याचें हिंदुधर्माकडे विशेष लक्ष असावें, यांत शंका नाहीं. स. १६२० मध्यें यास भगेंद्र रोग झाला. तेव्हांपासून वैद्य, हकीम इत्यादिकांनीं रोगपरिहारार्थ सतत उद्योग चालविले होते, तरी गुण नव्हता. इतक्यांत फारनालीब म्हणून कोणी उत्तम फिरंगी वैद्य आहे, असें वर्तमान समजलें. तेव्हां त्याला बोलावून आणून औषधोपचार केले पण त्याचाहि कांहींएक उपयोग न होतां, हा भगेंद्र रोगानेंच १२ सप्टें. स. १६२७ मध्यें मरण पावला. याच्यानंतर याचा मुलगा मुहंमद विजापूरचे तक्तावर बसला.

**इब्राहीम कुत्बशाह**—( स. १५५०–१५८१ ) हा गोवळकोंड्याचा एक सुलतान होय. याची हुसेन निजामशाहाशीं कल्याणीजवळ भेट झाली. तेव्हां हुसेन निजामशाहनें आपली मुलगी बिबी जमाली हिचा विवाह याच्याशीं थाटानें करून दिला.

यानें प्रथम विजयनगरच्या रामरायास मदत केली, आणि त्याच्याशीं सख्य केलें. पण ही मैत्री फार दिवस टिकली नाहीं. यानें अली आदिलशाहाची आणि दक्षिणेकडील इतर राजांची एकी शरीरसंबंधानें घडवून आणून विजयनगरच्या रामरायाविरुद्ध कारस्थान चालविलें. या कारस्थानांत याचा उद्देश विजयनगरच्या वाढत्या सत्तेस आळा घालणें हा होता. शिवाय यानें लढाईची तयारी चालविली.

पुढें स. १५६५ मध्यें राक्षस–तागडी येथें मुसलमानांची व विजयनगरच्या रामरायाची लढाई झाली. त्या वेळीं

हा मुसलमानांतील एक प्रमुख होता. राक्षस-तागडीच्या लढाईनंतर यानें व पहिला मुर्तझा निजामशाहा यानें मिळून विजापूरच्या अली आदिलशाहावर स्वारी केली होती. विजयनगरच्या श्रीरंगाचे (तिरुमलाचा मुलगा) राज्यावर जेव्हां विजापूरच्या अली आदिलशाहानें स्वारी केली तेव्हां यानें श्रीरंग यास मदत केली होती. पण पुढें स. १५७९ मध्यें यानें विजयनगरवर स्वारी केली व तींत हिंदूंचा पूर्ण मोड केला. हीच याची विजयनगरवरची शेवटची स्वारी होय.

यानंतर हा स. १५८० मध्यें मरण पावला व त्याची गादी त्याचा मुलगा मुहम्मद कुली कुत्बशाहा यानें घेतली (आरविदु डिनेस्टी ऑफ विजयनगर).

**इब्राहीमखान**—थो. शिवाजीच्या आरमारांतील एक सरदार.

**इब्राहीमखान गारदी**—(स. १७५७–१७६१) हा अंगानें अगदीं किरकोळ व वर्णानें काळा असून, देवीच्या वणांनीं याचें तोंड अगदीं विद्रूप झालेलें होतें. पांदीचरी येथें ड ब्यूरी नांवाचा एक कामगार होता. त्याच्या पालखीपुढें छडी घेऊन धांवणारा एक लहानसा शिपाई म्हणून हा नोकरीस लागला. यास थोडें पोर्तुगीज येत असल्यामुळें कांहीं लष्करी कवाईत माहीत होतांच ड ब्यूरोनें यास शिपायांचा नाईक केलें. त्यानंतर यास लवकरच फौजेंत अमलदारी मिळून याच्या हाताखालीं दोन हजार पायदळ व दोनशें स्वार जमा झाले. अशा रीतीनें फ्रेंच फौजेंत अमलदारी मिळतांच पुष्कळसे इसम स्वतंत्र उद्योग करूं लागत. तदनुसार यानें फ्रेंचांची नोकरी सोडली आणि निरनिराळ्या दरबारांत यानें आपला शिरकाव करून घेतला (सय्यद गुलाम हुसेनखान कृत सैयरुल मुताखरीन, भा. ३, पा. ३५५).

गारद्यांची फलटण हिंदुस्थानांत प्रथम मूसाबुसीनें तयार केली आणि त्यांत हा तयार झाला अशी प्रसिद्धी आहे.

स. १७५७ सप्टेंबरच्या सुमारचें एक पत्र प्रसिद्ध आहे (ऐ. प. ९१). त्यावरून त्या वेळीं हा सदाशिवराव भाऊ पेशव्यासारख्यांना लक्ष देण्यासारखा योद्धा प्रसिद्ध होता असें दिसतें. तें पत्र बहुधा निजाम व पेशवे यांच्यांत झालेल्या सिंदखेडच्या लढाईबद्दल असावें. त्या वेळीं हा निजामाकडून लढत होता. पण हा स. १७५८ च्या जूननंतर मराठ्यांस येऊन मिळाला (म. इ. सा. १. १५४). हा वऱ्हाडांत निजामअल्लीकडे कांहीं दिवस होता. तेथून बुसीनें याला फोडून पुनः आपणाकडे घेतलें होतें (पे. द. २०.९३,५५). पण बुसीच्या तोफखान्याचा प्रभाव सदाशिवरावावर पडून त्यानें मराठ्यांकडे नसलेला तोफखाना प्रथमच उभारला आणि याच्यासारखीं माणसें जवळ केलीं असें दिसतें. उदगीरच्या लढाईंतहि यानें महत्त्वाची कामगिरी केली आणि भाऊचा हा एक विश्वासाचा माणूस झाला होता (पे. द. १.६६,७९). याला विश्वासांत घेणें मल्हारराव होळकरास पसंत नव्हतें. म्हणून त्या दोघांचें वैर जुंपलें होतें. पूर्वी मराठे गनिमी काव्यानें लढत असत. गनिमी कावा म्हणजे शत्रु गैरसावध असतां त्यावर हल्ला करावयाचा आणि शत्रु सावध झाला कीं, पळ काढावयाचा अशा रीतीनें धांवपळीचें युद्ध करावयाचें.

हा उदगीरच्या लढाईंत भाऊसाहेबाबरोबर होता. तेथून सर्व पानपतकडे निघाले तेव्हां भाऊसाहेबाशीं याचा झालेला संवाद भाऊसाहेबाचे बखरींत पुढीलप्रमाणें दिला आहे.

इब्राहीम–तुम्ही गनीम लोक दहा वेळ पळाल व दहा वेळ उभे राहाल. आम्ही गारदी केवळ पाय उतारे, आम्हास पळावयास पाय नाहींत आणि गांठ तों रोहिल्याची पडणार.

भाऊसाहेब–निदान प्रसंग पडला तरी आम्ही तुम्हांस सोडून निघणार नाहीं. तुम्ही गाडून उभे राहाल तेथें मीहि उभा राहीन. यास अंतर करणार नाहीं.

असें म्हणून भाऊसाहेबानें बेलभंडार दिला आणि यानें दिलेली साजकरोटी आपण घेतली.

दिल्लीकडे चालून जातांना याच्या हाताखालीं दहा हजार गारदी होते. आणि शंभर तोफांचा तोफखाना होता.

दिल्ली घेऊन कुंजपुऱ्याकडे भाऊसाहेब निघाले तेव्हां त्यांना बातमी लागली कीं, कुत्बशाह व शाहमतखान कझलबाज हे कुंजपुऱ्याच्या किल्ल्यांत अडकले असून त्यांना अबदाली कुमक पाठविणार आहे. तेव्हां सदाशिवरावभाऊनें यास स्वार पाठवून तांतडीनें बोलावून घेतलें. तेव्हां हा रातोरात कूच करून दाखल झाला. तेव्हां सदाशिवरावभाऊनें हल्ल्याकरितां ठरविलेल्या मुहूर्तास तीन घटका अवकाश होता. भाऊनें निरोप पाठविला कीं, 'मुहूर्तास तीन घटका अवकाश आहे. तूर्त न उठावें.' तेव्हां यानें उत्तर पाठविलें कीं, 'मुहूर्त कशास पाहिजे? आम्ही किल्ला फत्ते करितों आणि हुजूर येतों.' त्याप्रमाणें यानें हल्ला करून किल्ला सर केला. हा मुहूर्ताकरितां थांबला असता तर शत्रूला कुमक आल्यामुळें याला किल्ला सर करणें जड गेलें असतें.

याप्रमाणें पानपतावर मुक्काम झाल्यावर तीन मोठीं युद्धें झालीं. त्या वेळीं इब्राहीमखानानें चांगलाच पराक्रम केला. पण पानपतावरील दीर्घकालीन मुक्काम मराठ्यांना फारच भोंवला. शेवटीं सर्व सैन्यासह निघून जावें असें ठरलें. परंतु अबदालीची फौज वाटेंत असतां तिच्या अंगावरून निघून जाणें शक्य नाहीं असें मल्हारराव होळकरादिकांचें म्हणणें होतें. शेवटीं निघून जावेंच असें ठरवून याला बोलावून घेतलें.

इब्राहीम–भाऊसाहेब, तुम्ही ज्या वेळीं इकडे याव-यासी मसलत केली ते समयीं तुमचे आमचे इनाम प्रमाण झाले तेंच करार आहे. आमचे गैर इनाम असते तरी प्रचीत दाखवितों. म्हणोन बोलोन दुराणी व नजीबखान रोहिला व सुजाउद्दौला यांचीं पत्रें पंचवीस दाखविलीं कीं, 'तुम्ही आम्ही एकजात आहों, यासमयीं आम्हाकडे यावें म्हणजे तुम्हांस पंचवीस लक्षाचा मुलूख देऊं. पातशाही उमरावीहि देऊं. पत्रें म्हणोन दाखविलीं प्रविष्ट केली. भाऊसाहेबांनीं वाचून पाहिलीं तेव्हां त्यांचीहि याच्या प्रामाणिकपणाविषयीं खात्री झाली.

भाऊसाहेब–तुमचे आमचे इमान आहे तेंच करार (शाबूत) आहे. परंतु आतां दिल्लीस जाऊन पोंचावयाची मसलत कोणती करावी ? निभावणी कैशी होईल ?

इब्राहीम–तुम्ही गनीम लोक, तुम्हास हिंमत पुरवणार नाहीं. तुम्ही आम्हास ते कांहीं निभावणी करावयाची दिसत नाहीं. रणांत आम्हास सोडून जाल. आम्हास मात्र मृत्यूनें गांठलें हेंच खरें.

भाऊसाहेब–तुम्हास सोडून आम्ही कदापि जाणार नाहीं. तुम्ही जेथें उडी टाकून उभे राहाल तेथें आम्हीहि कत्तल होऊन जाऊं. परंतु रण सोडून जाऊं हें घडणार नाहीं.

इब्राहीम–हरप्रयत्नें दिल्लीस पोंचावें हे खरेंच आहे. कीं देशीं मोंगल निजामअली नबाब तुम्हाशीं लढाई हमेशा करतो, त्याचप्रमाणें गोल बांधून मध्यें बुणगे घालावे, व भोंवती मातब्बर सरदार ठेवून बाजवा वाटून द्याव्या. आणि कोस दोन कोस लढत, भांडत दिल्लीस जाऊन पोंचावें.

पण भाऊसाहेबानें पूर्वी ठरलेला बेत ऐन वेळीं बदलल्या-मुळें यानें आपल्याकडून अत्यंत शिकस्त करूनहि उपयोग झाला नाहीं. याच्या तोफखान्यावर सदाशिवरावाचा फार विश्वास होता. यानें आठ हजार रोहिल्यांना ठार केलें असें म्हणतात. पण सैन्य जमून नसल्यानें मदत कोणाचीच कोणाला होईना. तोफखानाहि बंद पडला. पांच हजार गारदी कापले गेले. याचा पुत्र व भाचाहि कापला गेला. पुरंदरे दप्तर भाग १, ले. ४२५ मध्यें भाच्याच्या ऐवजीं मेहुणा असें आहे. हाहि जखमी झाला तरी लढतच होता. शेवटीं हत्यार चालेना तेव्हां कैद झाला. शेवटीं अब्दालीनें विचारलें असतां भाऊला दिलेल्या वचनाकरितां यानें अब्दालीकडे जाण्याचें नाकारलें, तेव्हां याचा वध करण्यांत आला.

**इब्राहीमखान सूर**—सूर घराण्याचा हा एक पूर्वज. हा बहलोल लोदीच्या कारकीर्दींत नोकरीसाठीं दिल्लीस आला. परंतु तेथें नोकरी न मिळाल्यामुळें, जोनपुरच्या जमालखान नामक सरदाराच्या पदरीं यानें नोकरी धरली. याचा पुत्र हसनखान हा जोनपुरच्या राज्यांत पांचशें स्वारांचा असामदार होता.

२. (स. १५५३–५५) सूर घराण्यांतील मुहंमदशाह सूर आदिलीचा हा मेहुणा. मुहंमदशाह व्यसनी असल्या-मुळें त्याची गादी यानें बळकावली. परंतु मुहंमदशाहाचा दुसरा मेहुणा अहमदखान यानें याचा पराभव करून सिकंदर हें नांव धारण केलें आणि तो गादीवर बसला (स. १५५४ सुमार).

**इब्राहीम गझनवी**—(राज्यारोहण मार्च स. १०५९ आगष्ट २५, १०९९) हा पहिल्या मसूद गझनवीचा मुलगा. फरुख-झाद मार्च स. १०५९ मध्यें वारल्यावर हा गझनीचे गादी-वर बसला. तुघ्रील नांवाच्या कृतघ्न नोकरानें अमीर इझ्झुद्दौला अब्दुल रशीद यास ठार मारून गझनीचें राज्य बळकाविलें, पण ४० दिवसांनीं त्याचा खून झाला. तेव्हां गादी कोणास द्यावी याचा विचार झाला. त्यांत या इब्राहीमला गादी देण्याचें घाटत होतें. परंतु त्या वेळीं याची प्रकृति बिघ-डून हा अशक्त झालेला असल्यानें याचा भाऊ फरुखझाद यास गादीवर बसविण्यांत आलें. फरुखझादनें फार थोडे वर्षे राज्य केलें. व त्याच्या मृत्यूनंतर यास अमीर होण्याचा मान मिळाला. फरुखझादनें गझनीच्या राज्यास त्रास देणाऱ्या सल्जूक घराण्यांतील राजपुरुषांशीं तह केला होता. तोच पुन्हां अंमलांत आणून इब्राहीमनें आपला मुलगा मसूद याचा मलिकशाहा अर्सलानच्या मुलाच्या मुलीशीं विवाह घडवून आणून सल्जूकांशीं तहानें जोडलेली मैत्री दृढतर केली. त्यामुळें यास हिंदुस्थानकडे लक्ष देण्यास सवड सांपडली. स. १०७९ मध्यें पंजाबची दक्षिण सरहद्द ओलांडून यानें अजुधान–म्हणजे हल्लींचें पाकपट्टण-वर स्वारी करून तें ठाणें हस्तगत केलें. याच स्वारींत रूपाल नांवाचें शहर जिंकल्याचाहि उल्लेख आहे. यानें न्यायानें आणि दयाशीलतेनें राज्य केलें. हा अत्यंत धर्म-शील होता. यानें कुराणाचें फार्सीत भाषांतर केलें. याल

चाळीस मुली व छत्तीस मुलगे होते. यानें आपल्या मुलींचीं विद्वान लोकांशीं लग्नें लाविलीं. त्यांपैकीं एक मुलगी प्रसिद्ध ग्रंथकार नासिरी याच्या पणजास दिली होती. हा शाहूसारखा होता. शांतींत व वैभवांत दीर्घकाल राज्य करून हा स. १०९९ त मरण पावला. याचें नांव इब्राहीम झहीर उद्दौला गझनवी असें होतें.

**इब्राहीम तुघ्लक**--दिल्लीच्या तुघ्लक घराण्यांतील राजबाचा तिसरा मुलगा. याचा फीरूझ नांवाचा एक भाऊ दिल्लीच्या तख्तावर आला.

**इब्राहीम धौशा जावितजंग**—हा एक निजामअलीचा सरदार होय. स. १७७५ मध्यें यानें बारभाईच्या तर्फेनें मुधोजीच्या वऱ्हाड प्रांतावर स्वारी केली आणि त्याला जेरीस आणलें.तेव्हां मुधोजीनें बारभाईस दहा लाख रुपये दंड भरून आपला बचाव करून घेतला. पुरंदरच्या तहाच्या अगोदर याची मदत हरिपंत फडक्यानें मागितली होती, पण हा उशिरा येऊन हरिपंतास मिळाल्यामुळें पुरंदरचा तह कायम झाला. यानंतर हैंदरखरच्या स्वारींत यानें हरिपंतास मदत केली; पण याचें धोरण दुटप्पी होतें.

**इब्राहीम निजामशाह**—( स. १५९५ ) हा अहमदनगरच्या निजामशाहींतील दुसऱ्या बुऱ्हाणचा पुत्र. हा व्यसनी होता. विजापूरकरांशीं झालेल्या युद्धांत हा मारला गेला. यानें चारच महिने राज्य केलें.

**इब्राहीम बरीद**—( स. १५६२-६९ ) बेदरच्या बरीदशाही वंशांतील अली बरीदाचा हा पुत्र. हा आपल्या बापानंतर बेदरच्या गादीवर आला. याच्या नंतर याचा धाकटा भाऊ दुसरा कासीम बरीद हा गादीवर आला. कासीम बरीद हा याचा मुलगा असून यास खानजहान नांवाचा एक भाऊ होता, असें केंब्रिज हिस्टरी ऑफ इंडिया यामधील वंशावळींत दर्शविलें आहे.

**इब्राहीम बीन हरिरी**—यानें 'तारीख-इ-इब्राहीमी' या नांवाचा हिंदुस्थानचा इतिहास लिहिला आहे. त्यामध्यें बाबरापर्यंतचा प्राचीन इतिहास आहे. याचा इतिहास संक्षिप्त असून तो यानें स. १५२८ मध्यें बाबरास अर्पण केला ( बील ).

**इब्राहीम लोदी**—( स. १५१७-१५२६ ) दिल्लीचा बादशहा सिकंदर लोदी याचा हा मुलगा होय. स. १५१७ मध्यें सिकंदर मरण पावल्यावर त्याच्या मागून हा दिल्लीच्या गादीवर आला. परंतु हा लवकरच अप्रिय झाला. याचें कारण असें कीं, अफगाण लोकांस वरिष्ठांचा करडा अम्मल बिलकुल सहन होत नाहीं. किंबहुना वरिष्ठांस ते आपल्या बरोबरीचे समजतात व आपल्या प्राणापेक्षांहि स्वातंत्र्यास अधिक जपत असतात. अफगाण लोकांचा हा स्वभाव आजतागायत कायम आहे. लोदी सुलतानांचे ठिकठिकाणचे अधिकारी आपापल्यापरी स्वतंत्रेनें वागत. दिल्लीच्या सुलतानांच्या हातीं मोठी सत्ता येऊन ते फार प्रबळ होऊं नयेत म्हणून त्यांनीं सिकंदरच्या मृत्यूनंतर याचा धाकटा भाऊ जलालखान ह्यास जोनपूरच्या तख्तावर बसविलें. परंतु यास तें न आवडून यानें त्याचा मोड केला व पुढें पदरच्या सरदारांस फारच कडक रीतीनें वागविण्यास सुरवात केली.

हा त्यांना आपल्या समोर हात जोडून स्तब्ध उभे करीत असे. कित्येकांस तर यानें क्षुल्लक अपराधाबद्दल ठार मारिलें व इतरांचा अपमान करावा म्हणून त्यांच्या हाताखालच्या लोकांस यानें त्यांच्या बरोबरीचा दर्जा दिला. ह्याचा परिणाम लवकरच दिसून आला. दर्याखान लोहानी नांवाचा अफगाण सरदार अयोध्या, जोधपूर, बहार ह्या प्रांतांत स्वतंत्र झाला. दौलतखान लोदीनें पंजाबांत आपलें स्वातंत्र्य स्थापित केलें. इतकेंच नव्हे, तर त्यानें काबूलच्या तख्तावर राज्य करणारा बाबर यास मदतीस बोलावून इब्राहीम लोदीस पदच्युत करण्याचा बेत केला. बाबरानें त्याप्रमाणें येऊन हिंदुस्थानावर स्वारी केली व पानिपत येथें याचा पूर्ण पराभव करून यास ठार मारलें ( २१ एप्रिल स. १५२६ ).

## इमादशाही घराणें ( वऱ्हाडचें )

( १ ) फत्ते उल्लाह इमादशाह ( स. १४८४ ).

|

( २ ) अलाउद्दीन इमादशाह ( स. १४८४–१५२७ ) ( स. १५०४ )

| रबिअसुलताना (१) इब्राहीम आदिलशाहाची पत्नी. | पत्नी युसफ आदिलशाहाची मुलगी खदीजा. |
|---|---|

( ३ ) दर्या इमादशाह ( स. १५२७–१५७२ )

| बुर्‍हाण इमादशाह ( १५७२ ? ) काल मुसलमानी रियासतीप्रमाणें दिला आहे. | मुलगी –दौलतशाह= अहमदनगरच्या पहिल्या हुसेन निजामशाहाची पत्नी |
|---|---|

**इमादुल्मुल्क**—हा निजामुल्मुल्कचा नातू. यालाच धाकटा गाजीउद्दीन ऊर्फ मीर शहाबुद्दीन असें म्हणत असत. हा दिल्लीच्या बादशहाचा वजीर होता. मराठ्यांप्रमाणें ह्याला नजीब आपण मित्र आहों असें भासवीत होता. यानें सफदरजंग वजीराविरुद्ध उभारलेलें कारस्थान वाचण्यासारखें आहे ( ऐ. प. ८९ ).

**इमामबक्ष**—(नासीख पाहा).

**इम्मडी**—( स. १६३७-३८ ) म्हैसूर संस्थानांतील राजाधिराज ( उडीयर ) चा मुलगा.

हा गादीवर आल्यावर याचा खून झाला व याच्या मागून याचा चुलत भाऊ कंठीरवनरस हा राजा झाला.

**इम्मडी बिज्जल कलचुरी**—कलचुरी घराण्यांतील बिज्जलाचा हा मुलगा. याचा काल स. १२ व्या शतकांतला असून यानें लिंगायतांचा आद्य पुरुष जो बसव याला पकडून आणण्याविषयीं व बाकीच्या लिंगायतांना फाशीं देण्याविषयीं आज्ञा केली होती ( भांडारकर भा. ३ पृ. १३१ ).

इम्मडी या कानडी शब्दाचा अर्थ दुप्पट असा आहे. आपल्याकडील सवाई शब्दासारखा हा नांवाच्या माथें जोडतात.

**इरादतखान**—महाबतखानाचा मुलगा. मोंगलांनीं स. १६३६ मध्यें निजामशाही बुडविली. त्यानंतर हा दौलताबादेचा सुभेदार होता. यानें शहाजी भोसले यास मोंगलाकडे मिळवून घेण्याची पुष्कळ खटपट केली. पण शहाजीनें दहा वर्षांचा एक मुलगा तख्तीं बसवून निजामशाही जिवंत ठेवण्याचा प्रयत्न केला. यालाच स. १६३० मध्यें खानजहान लोदीचें बंड मोडण्याकरितां शहाजहाननें दक्षिणेंत पाठविलें, तेव्हां आजमखान अशी पदवी दिली होती ( शहाजीचें चरित्र पा. ४१ ).

**इरावती**—अग्निमित्राची पत्नी.

**इरिविवेडंग नोळम्ब घटेयङ्ककार**—( स. ९९७-१००८ ) मोरिगेरीचा पल्लव राजा. हा पश्चिम चालुक्यांपैकीं दुसऱ्या सत्याश्रयाचा मांडलिक होता.

**इरुक्कदेव पांड्य**—हा उच्चंगीचा होय. हा पलन्त पांड्याचा मुलगा.

**इरुक्कपाल पांड्य**—( स. १०९८ ) हा उच्चंगीचा होय. याची पत्नी चोल राजकन्या. याची मुलगी महादेवी. ही एरेयंग होयसलला दिली होती.

**इरुग**—विजयनगरच्या संगम वंशांतील पहिल्या बुक्करायाच्या चैच नांवाच्या मंत्र्याचा हा मुलगा होय.

हा विजयनगरच्या हरिहर दुसरा या राजाचा एक सेनापति होता, असा उल्लेख स. १३८५ सालच्या कामलापूराजवळील एका जैन मंदिरांतील शिलालेखांत आलेला आहे.

**इरेयप्प गंग**—पश्चिम गंग घराण्यांतील पहिल्या शिवमाराचा हा मुलगा. कांहीं ठिकाणीं याचें नांव गाळलेलें आहे. याचा पुत्र श्रीपुरुष.

**२.** हा पश्चिमगंगांपैकीं श्रीपुरुषाचा पुत्र. यास दुर्गमार असेंहि म्हणत.

**३.** हा पश्चिमगंगांपैकीं पहिल्या राचमल्लाचा पुत्र. याला एरेयंग असेंहि म्हणत. कांहीं ठिकाणीं याचें नांव गाळलें आहे.

**४.** ( स. ९१३-३८ ) पश्चिमगंगांपैकीं पहिल्या भूतुगाचा मुलगा. याचें अस्तित्व संशयास्पद आहे. याच घराण्यांतील दुसऱ्या राचमल्लाच्या मदतीनें यानें राज्य मिळविलें असें म्हणतात. याची पत्नी जाकबा ही चालुक्यांपैकीं होती. याचा मृत्यु स. ९३८ मध्यें झाला.

**इलम तिरैयन चोल**—हा कांचीच्या चोल घराण्यांतील एक राजपुत्र होय.

याच्याविषयीं बरीच माहिती तामीळ कवितेंत आलेली आहे. याच्यानंतर कांची येथें पल्लव राजे राज्य करूं लागले.

**इलंजेर सेन्नी चोल**—हा चोलांपैकीं एक. याला उरुउप्पहरेर इलयोन, असें म्हणत. याला राज्य नव्हतें. करिकाल चोलाचा हा पिता असें प्राचीन कवितेंत येतें.

**इलेश्वरोध्याय**—तेलंगी कवि. हा महाविद्वान ब्राह्मण शालिवाहन शकाच्या सातव्या शतकांत होता. हा श्रीशैल-मल्लिकार्जुन क्षेत्रानजीक इलेश्वर येथें राहत असे.

हा जातीचा तेलंग ब्राह्मण होता. न्याय, व्याकरण, अलंकार, मीमांसा व धर्मशास्त्र यांत याची प्रवीणता दिसून येत असे. यानें आपल्या वयाच्या १५ व्या वर्षींच मोठमोठ्या राजांच्या भेटीस जाऊन ओळख करून घेतली. यानें शांकर मताच्या प्रतिपक्षाशीं वाद करून त्यांचें खंडन केलें. याच्या विद्वत्तेबद्दल पुष्कळ राजांकडून इनामें, पारितोषकें, बक्षिसें वगैरे मिळालीं.

यानें रघुपतिपेठ व नारायणगड इत्यादि ठिकाणच्या राजांस काव्यें व छंदशास्त्र पढविल्यामुळें त्यांनीं याचा बहुमान करून विद्यालय स्थापण्याइतकें द्रव्य दिलें. विद्यालयांत बरेच विद्यार्थी मूढमती असल्यानें यानें ‘ ज्योति-ष्मती ’ नांवाचा एक ग्रंथ करून विद्यार्थ्यांना विद्वान् केलें.

या कवीस फक्त तीन कन्या होत्या. थोरली सुखानें नांदत होती. दुसरी विधवा (नाचां पाहा ) होती व तिसरीनें, पति ब्राह्मण नसल्याचें कळल्यानें स्वतःस जाळून घेतलें. या दुःखावेगांत यानें ‘ इलेश्वरविजय ’ नांवाचा ग्रंथ लिहिला व पुढें हा लवकरच मरण पावला. कविचरित्रांत अकबराचा सरदार व हा यांची भेट झाल्याचा निर्देश आहे. त्याशीं वरील काळ जुळत नाहीं.

**इलय**—विजयनगरचा एक कवि. ज्योतिषशास्त्रांत हा पारंगत असल्यानें विरूपाक्ष राजानें यास आपल्या पदरीं ठेवलें. यानें सूर्यसिद्धान्तावर टीका लिहिली. हा विजयनगर येथेंच मरण पावला. भारतीय ज्योतिषशास्त्राच्या इतिहासांत याचा उल्लेख नाहीं ( कविच. )

**इष्टुर फांकडा**—कॅ. स्टुअर्टला मराठे लोक, शौर्यामुळें मोठ्या कौतुकानें ' इष्टुर फांकडा ' असें म्हणत.

पुणें दरबारशीं लढण्याकरितां स. १७७८ मध्यें श्रीमंत रघुनाथराव दादासाहेब पेशवे यांच्या मदतीस इंग्रजातर्फे हा बोरघाटामध्यें आला होता. त्या वेळीं याच्याकडे एका तुकडींचें अधिपत्य दिलें होतें. हा योद्धा फार पटाईत असून यास सर्व रस्त्यांची व घाटनाक्यांची पूर्ण माहिती होती. मराठ्यांचे सर्व सरदार आपापल्या सैन्यानिशीं तळेगांवापासून बोरघाटापर्यंत मान्याच्या जागा रोखून युद्धास सिद्ध होते. तरीपण यानें ता. २५ रोजीं खंडाळ्याच्या उंच टेकडीवर आपलें निशाण लाविलें. तेव्हां लढाईस तोंड लागून मराठ्यांच्या तोफांचा भडिमार सुरू झाला. यानें तशा तोफांचा भडिमार सहन करून कारल्यापर्यंत आपली फौज नेऊन पोहोंचविली. त्या योगानें मराठे सेनापतीस याच्या शौर्याचा प्रभाव फार अलौकिक वाटून त्यांनीं याची फार वाहवा केली, व मोठ्या कौतुकानें यास ' इष्टुर फांकडा ' असें अभिधान दिलें. शेवटीं याच लढाईंत याला एक तोफेचा गोळा लागून हा ता. ४ जानेवारी स. १७७९ रोजीं मरण पावला. त्या प्रसंगीं मराठी सैन्यानें “इष्टुर फांकड्या शाबास” अशी शाबासकी दिली ( ऐ. ले. सं. ७, नं. २४६४ ). याच्या शौर्याबद्दल, धैर्याबद्दल व युद्धचातुर्याबद्दल फार प्रशंसनीय उल्लेख आहेत. याच्या नांवापुढें ' लढाव ' म्हणजे ' लढवय्या ' असें विशेषण मराठ्यांनीं लावलेलें तत्कालीन मराठी अस्सल पत्रांत दिसतें. परशुरामभाऊ पटवर्धनांचा कारकून शिवाजी बाबाजी यानें ता. २२ जानेवारी स. १७७९ च्या पत्रांत पुढील उद्गार काढले आहेत “मुख्यत्वें श्रीमंतांचें पुण्य विचित्र ! अवतारी पुरुष ! त्यासारखे योग घडले. ज्या माष्टीनानें मसलत केली तो घाटावर येतांच समाधान नाहीं म्हणून मुंबईस गेला, तेव्हां मृत्यु पावला. इष्टुर फांकडा लडाव, इकडील फौजेंचा, कारल्याच्या ठिकाणीं गोळा लागून ठार जाहला. कर्णेल के म्हणोन होता त्यास बाण लागून जेर जाहला. आकारिक ' कर्ते ' होते त्यांची अशी अवस्था झाली.........सारांश श्रीमंतांचा प्रताप हें खरें.” ( ऐ. ले. सं. भा. ७ पृ. ३३९७ ).

याच्या मृत्यूबद्दल मुंबई सरकारच्या रिपोर्टामध्यें पुढील वाक्य आहे तें किती सार्थ आहे हें निराळें सांगावयास नकोच.

“On the same day they met with a very heavy loss by the death of Captain Stewart, who was a most active, gallant, and judicious Officer, and possessed of the true military spirit.” ( इ. सं. ४. १०, पृ. १५१-१५४ ).

**इस्कंदरखान**—काश्मीरच्या फत्तेशाहाचा पुत्र.

**इस्माईल आदिलशाहा**— ( स. १५१०-१५३४ ) हा विजापूरच्या युसफ आदिलशाहाचा पुत्र. गादीवर आला तेव्हां याचें वय अवघें नऊ वर्षांचें होतें.

राजा अल्पवयी असल्यानें राज्याचा कारभार याचा प्रधान कमालखान हा पाहूं लागला. कमालखान राज्यकारभार पाहूं लागल्यापासून थोड्याच दिवसांत त्यानें लोकप्रीति संपादिली. पुढें कमालखानास दुष्ट वासना होऊन राज्यप्राप्तीची हाव सुटली. त्याकरितां त्यानें अमीर बरीदची मदत घेऊन इस्माईलास आणि त्याची आई बुबूजीखानुम या उभयतांस विजापूरच्या किल्ल्यांत कैद करून सोलापूरचा किल्ला घेतला. तेव्हां त्याखालीं असलेले साडेपांच परगणे कमालखानास मिळाले. नंतर कमालखानानें विजापुरास येऊन तेथील लोकांचें मत आपलेंसारखे करून घेऊन आपला हेतु उघड उघड सांगितला.

कमालखानाचा हेतु इस्माईल आणि त्याच्या आईस कळतांच त्यांना भीति वाटूं लागली व ते या संकटांतून पार पडण्याची युक्ति शोधूं लागले. इकडे कमालखानानें एका ज्योतिष्यास बोलावून त्याला राज्यारोहणाकरितां चांगला ( शुभ ) दिवस विचारला. तेव्हां ज्योतिष्यानें “आपणास पंधरा दिवस फार अशुभ असून आपल्याला दगा होण्याचा संभव आहे. तेव्हां आपण आपल्या शत्रूस जवळ येऊं न देतां त्यापासून दूर व सुरक्षित राहावें. पंधरा दिवसांनंतर सोळावा दिवस आपणास शुभ आहे” असें सांगितलें. त्याप्रमाणें खानानें राजवाड्यांतील सुरक्षित जागीं आपणास कोंडून घेतलें.

इस्माईलाची आई बुबूजीखानुम आणि त्याची चुलती दिलषाद आगा या उभयतां अक्कलवान् व हुशार स्त्रिया होत्या. या प्रसंगीं फौज जमा करून दिवाणाशीं लढून पळून जाणें श्रेयस्कर नसून दिवाणाचा वध होणें हेंच श्रेयस्कर होतें हें त्यांनीं ताडलें. तेव्हां दिवाणाच्या वधाकरितां युसफ तुर्क ( हा इस्माईलचा पालक काका होय ) यास तयार करून हर प्रयत्नांनीं त्या दोन स्त्रियांनीं दिवाणाचा खून करविला.

कमालखानाची बायको मर्दानी हिंमतीची होती. तिनें शोक न करितां सर्व नोकरांस खानाच्या खुनाचा गवगवा न करण्याविषयीं सांगून जिकडे तिकडे सर्वांस शांत केलें. नंतर खानाच्या प्रेतावर कपडे वगैरे घालून दोहों बाजूंनीं गाद्या, गिरद्या लावून वाड्याच्या एखा सज्जावर जणूं काय लोकांचे मुजरे घेण्याकरितां मसनदीवर प्रेत बसविलें, व सर्व लोकांस हत्यारबंद होण्यास आज्ञा केली. नंतर आपला पुत्र सफदरखान यास बोलावून आणिलें, व त्यास या वेळीं धैर्य धरून बापाच्या वधाचा सूड घेण्यास आणि इस्माईलाला ठार करून राज्य घेण्यास सांगितलें. त्याप्रमाणें सफदरखानानें सैन्य घेऊन राजवाड्यावर हल्ला केला.

या प्रसंगीं दिलपाद आगानें राणीस (बुबूजीखान) असा सल्ला दिला कीं, अशा समयीं नम्रपणापेक्षां शौर्य व धारिष्ट यांचाच अधिक उपयोग होईल. तिनें लागलीच राजवाड्याचे दरवाजे बंद करण्याचा हुकूम दिला आणि जनानखान्याबाहेरच्या बाजूस पहाऱ्यावर वगैरे जे थोडेबहुत इराणी व तुर्की लोक होते त्यांचीं मनें वळविलीं व त्यांना दिवाणाच्या विरुद्ध लढण्यास उत्तेजन दिलें. राजवाड्यांतील लोक पुरेसे न वाटून तिनें शहरांतील लोकांचें मन वळविलें व सफदरखानाशीं तोंड देण्यास सज्ज झाली. शेवटीं तिनें सफदरखानाशीं मोठ्या धैर्यानें तोंड दिलें आणि त्या गडबडींत सफदरखान मारला गेला. सफदरखान मारला गेल्यावर त्याचें सैन्य पळत सुटलें व याच्या सैन्याचा जय झाला.

दुसरे दिवशीं सकाळीं इस्माईल आदिलशाहा मसनदीवर चढला. यानें सर्वांच्या भेटी घेतल्या. दरबारांतील सर्व कामगारांनीं व शहरच्या नागरिकांनीं भेटीस येऊन मोठ्या अदबीनें मुजरे केले. संकटसमयीं ज्यांनीं साहाय्य दिलें व जे स्वामिकार्यार्थ प्राण अर्पण करण्यास सिद्ध झाले त्यांस यानें प्रथम बक्षिसें व इनामें वांटलीं. नंतर जे सरदार कमालखानाच्या जुलुमास कंटाळून पळाले होते त्यांना दरबारीं परत येऊन आपापल्या कामावर रुजू होण्यासाठीं पत्रें पाठविलीं. दिवाणाची आई व दुसरीं त्याच्या कुटुंबाचीं माणसें कैदेंत होतीं तीं कैदमुक्त करून त्यांस द्रव्य देऊन राज्याच्या हद्दीबाहेर घालविलें. ज्या ज्योतिषानें कमालखानाच्या संकटाचें भविष्य केलें होतें त्याला आपल्या पदरीं नोकरीस ठेविलें. थोड्याच दिवसांत त्याजपाशीं तुर्की व मोंगल लोकांची बडी फौज जमली. जे दक्षिणी व हबशी लोक फौजेंत नोकरीस होते त्यांस बडतर्फ केलें आणि त्यानें पुढें १२ वर्षांत परदेशी लोकांशिवाय इतरांस नोकरीस ठेविलें नाहीं.

मुद्गल व रायचूर हे प्रांत विजयनगरच्या राजानें घेतले होते. ते परत घेण्यासाठीं याची व विजयनगरच्या हिंदु राजाची लढाई होऊन त्यांत मुसलमानांचा पुरा मोड झाला. यापुढें याला एकसारखीं युद्धें करावीं लागलीं. पुढें जेव्हां वारंवार युद्धें होऊन विजापूर इलाख्याची खराबी व पायमल्ली होऊं लागली तेव्हां सरहद्दीवरील राजांशीं सख्य करण्याकडे याचें फार लक्ष लागलें; व त्याकरितां यानें वऱ्हाडच्या अलाउद्दीन इमादशाहाशीं शरीरसंबंध जोडून सख्य केलें ( अमीर बरीद पाहा ).

यानंतर यानें विजयनगरच्या राजाचा पराभव करून त्याच्याकडून मुद्गल आणि रायचूर हे दोन प्रांत परत मिळविले. त्या वेळीं विजयनगरच्या राज्यांत गोंधळ माजला होता. यापुढें यानें अमीर बरीद यास जेरीस आणलें. त्यामुळें बरीद कंटाळून जाऊन त्यानें इस्माईलशीं सख्य केलें व तेलंगणावर हल्ला करण्यास इस्माईलच्या कुमकेस गेला.

पुढें गोवळकोंड्याच्या किल्ल्याला वेढा दिला असतां हा तेथेंच ज्वरानें आजारी पडला व त्यांतच याचा शेवट झाला. स. १५३४ मध्यें हा मरण पावला. हा न्यायशील, क्षमाशील, उदार व दूरदर्शी असा होता. हा कवि आणि विद्वानांचा आश्रयदाता होता. याच्यानंतर याचा वडील मुलगा मल्लू हा गादीवर बसला. यानें मोठ्या ऐश्वर्यानें एकंदर २५ वर्षे राज्य केलें ( विजापूरचें आदिलशाही घराणें, मोडक-कृत ).

**२.** विजापूरच्या आदिलशाही घराण्यांतील तहमास्पचा मुलगा.

**३.** विजापूरच्या आदिलशाही घराण्यांतील पहिल्या इब्राहिमाचा मुलगा.

**इस्माईलखान दक्षिणी**—हा विजापूरचा मल्लू आदिलशहाचा दिवाण. पहिला दिवाण असदखान यानें राजिनामा दिल्यावर हा काम पाहूं लागला.

**इस्माईलखान मका**—औरंगजेबाचा कर्नाटकांत रवाना केलेला एक सरदार.

**इस्माईल गझनवी**—( स. ९९७ ) गझनी येथील यामीनीच्या गुलाम राजघराण्यांतील सबक्तगिनाचा धाकटा मुलगा. सबक्तगीन स. ९९७ च्या आगष्टमध्यें बाल्ख येथें वारल्यावर त्याच्या इच्छेस अनुसरून बल्खच्या उमरावांनीं इस्माईल यास राज्यपद दिल्याचें जाहीर केलें. एक पक्ष असा होता कीं, त्यास वडील व अधिक तेजस्वी मुलगा महमूद यास राज्यपद

मिळावें असें वाटत होतें. महमुदानेंहि इस्माईल यास पत्र लिहून, 'गझनीचें राज्यपद सोडल्यास बल्खची सुभेदारी त्याजकडे ठेवण्यांत येईल,' असें कळविलें. परंतु महमुदाच्या मागणीस इस्माईलनें नकार दिला. तेव्हां निशापुराहून महमूद व बल्खहून इस्माईल असे दोघेहि बंधू गझनीवर चाल करून गेले. त्या शहराजवळ दोघांमध्यें झालेल्या लढाईंत पराभव होऊन यास एका किल्ल्यांत आश्रयार्थ जावें लागलें. याच्या सरदारांनीं यास दगा देऊन महमुदाचे स्वाधीन केलें. तेव्हां महमुदानें यास कैदेंत ठेविलें. पुढें जन्मभर यास तसेंच कैदेंत राहावें लागलें.

२. काश्मीरच्या नाझुकशाहाचा पुत्र. हा आपला भाऊ दुसऱ्या इब्राहिमानंतर गादीवर आला. याच्यानंतर याचा मुलगा हबीब हा गादीवर आला ( स. १५५७ ).

**इस्माईल निजामशाह**—( स. १५८९-९० ) निजामशाहींतील मिरन हुसेनचा हा चुलतभाऊ. हा प्रथम लोहगडावर कैदेंत होता. याचा बाप बुर्‍हाण २ रा हा अकबराच्या आश्रयास होता. त्यानें अकबराची मदत घेऊन यावर स्वारी करून यास कैद केलें व गादी बळकावली.

**इस्माईल बेग**—आग्ऱ्याचा सुभेदार जो हमदानी त्याचा हा पुतण्या. यानें ता. २३-९-१७८३ रोजीं मीर्झा शफीचा खून केला.

स. १७८८ मध्यें यानें चारपांच हजार सैन्यानिशीं आग्ऱ्यावर चाल केली. पण त्यांत याचा पराभव होऊन याला पळ काढावा लागला. त्या वेळीं दिल्ली येथें असलेल्या मराठी सैन्याविरुद्ध हा सारखीं कारस्थानें करी, त्यामुळें याच्यापासून मराठी सैन्यास फार त्रास होऊं लागला. म्हणून खंडेराव हरीनें स. १७९१ च्या डिसेंबरांत कानोंडास याला कोंडून चहूंकडून हल्ला केला; व पुढें लवकरच कानोडचें ठाणें हस्तगत केलें. त्याच वेळीं खंडेराव हरीनें यास कैद केलें.

पुढें आग्ऱ्यांत आठ वर्षे कैद भोगून हा शेवटचा मोगल मुत्सद्दी व शिपाई स. १७९९ त मरण पावला. कैदेंत असतांहि पूर्वींचे खेळ खेळण्यास यानें कमी केलें नाहीं. यानें आपला चुलता जो हमदानी त्याच्या मुलीशीं लग्न लाविलें होतें ( म. रि. उ. २, पृ. २४४,५० ).

**इस्माईल लोदी**—लोदीं घराण्यांतील निजामखानाचा मुलगा.

**इस्माईल सामानी**—सामानी वंशाचा पहिला प्रख्यात राजा. हा स. ९०३ मध्यें गादीवर आला. याचें राज्य समरकंद व बुखारा या प्रांतांवर होतें. यानें शास्त्र आणि वाङ्मय यांचा पुरस्कार केला आणि बुखारा शहर प्रख्यातीस आणलें. पर्शियन व आरबी भाषेचें महत्त्व या वेळीं फारच वाढलें. या बादशहास अमीर असें म्हणत. हिंदुस्थानांतील हम्मीर हा अमीर शब्दापासूनच निघालेला असावा. याच्याच वंशांत पुढें सबक्तगीन, महमूद गझनवी वगैरे लोक निघाले ( हिं. भा. अं. पा. १५ ).

**इस्माईल हाजी मौलवी मुहम्मद**—( स. १७८१-१८३१ ) हा मुसलमानी धर्मसुधारक दिल्लीजवळील फोव्हा गांवीं जन्मला. सय्यद मुहम्मदच्या साहाय्यानें हिंदुस्थानांतील मुसलमानी धर्म येथील हिंदुपंथाच्या तावडींतून सोडविण्याचा यानें बराच प्रयत्न केला. आपल्या कामाकरितां हा पुष्कळ वर्षे फिरला व मक्केला देखील जाऊन आला होता. हिंदुस्थानांत आल्यावर यानें शुद्ध इस्लामी धर्माचें नवमत उपदेशण्याचें काम सुरू केलें व अनेक अनुयायी जमविले. पण याची चळवळ सरकारी मुसलमानी पुढाऱ्यांस पसंत न पडून, त्यांचें व याचें भांडण लागल्यामुळें स. १८२७ त ब्रिटिश सरकारनें 'इस्माईली' पंथाला विरोध केला. तेव्हां हा पंजाबांत गेला. तेथें अफगाणांचे मदतीनें शीखांचे विरुद्ध लढाई केली. त्या लढाईंत हा पडला ( स. १८३१ ). तथापि याची चळवळ नाहींशी झाली नाहीं वायव्य सरहद्दीवरील पर्वतांतून अद्याप याचे कांहीं अनुयायी भेटतात. मक्केला गेला असतां 'वाहाबी' चळवळ आपल्या धोरणावरच चालली आहे, असें याला तेथें आढळून आलें.

**इस्लामखान**—सुलतानशाह लोदीचें नामांतर.

**इस्लामशाह सूर**—( स. १५४५ ) यानें स. १०-१-१६८८ रोजीं कांचीचा विध्वंस केला. हा दिल्लीच्या सूर घराण्यांपैकीं शीरशहानंतर गादीवर आला.

### इंगळे यांची वंशावळ




( म. रि. उ. २, पृ. ४४५ ).

**इंदुकांत**—चार्वाकाचा पिता.

**इंदुराज**—तौतुकाचा नातू व श्रीभूतिराजाचा पुत्र. हा कात्यायन-गोत्री ब्राह्मण होता व काश्मीराकडे राहत असे, असें भगवद्गीतेच्या टीकेच्या शेवटीं म्हटलें आहे. यालाच भट्टेन्दुराज किंवा इंदुभट्ट म्हणतात.

या इंदुराजाचा गुरु मुकुल. इंदुराजानें कोंकणांतून जाऊन काश्मीरामध्यें मुकुलापाशीं साहित्यशास्त्राचें अध्ययन केलें.

**इंद्र**—संस्कृत भाषेंतील एक व्याकरणकार. याचें व्याकरण स्वतंत्र तऱ्हेनें उपलब्ध आहे असें दिसत नाहीं. परंतु 'कथासरित्सागरा'च्या चौथ्या तरंगामध्यें असें म्हटलें आहे कीं, पाणिनीच्या पूर्वीचा व पाणिनीमुळें लुप्त झालेला सांप्रदाय म्हणजे ऐंद्र व्याकरणकारांचा होय. व्याडी, वररुची किंवा कात्यायन व इंद्रदत्त हे व्याकरणकार या परंपरेंतील होत. डॉ. बर्नेल म्हणतो कीं, तामील भाषेचें अति पुरातन व्याकरण म्हणजे तोल्कापियम नामक सर्वसंग्रहांतील कांहीं भाग होत, व यांतील व्याकरणपद्धति ऐंद्र सांप्रदायाची आहे. पांड्य राजाचे दरबारांत हें व्याकरण वाचलें जाई व तेथें हें पसंत पडे. यावरून असें दिसतें कीं, याचें व्याकरण नष्ट झालेलें असून पाणिनि, कात्यायन वगैरे आचार्यांनीं याचा प्राचां, एके वगैरेसारख्या नांवानें उल्लेख केलेला असावा. जरी याचा ग्रंथ सांपडत नाहीं तरी बोपदेवानें आपल्या कविकल्पद्रुमांत याचा उल्लेख केला आहे. तसेंच अभिनवशाकटायनाच्या शब्दानुशासनामध्यें याचा उतारा दिला आहे. इंद्र आणि इंद्रगोमिन् हे दोघे एकच होत ( सि. ऑ. सं. ग्रामर, पृ. १० ). हेमचंद्राच्या बृहद्वृत्तीवरील न्यासांत याचा उतारा दिलेला आहे ( सी. सी. ).

**इंद्र (राष्ट्रकूट)**—(स.६७०-९०) हा राष्ट्रकूटराजांचा मूळ पुरुष म्हणून याचा उल्लेख वेरूळ येथील शिलालेखांत आला आहे. हा दन्तिवर्मनाचा मुलगा असून याला गोविंद पहिला या नांवाचा एक मुलगा होता ) भांडारकर, भा. ३, पृ. ८५). याचा काल सुमारें स. ६७०-६९० असा असावा ( आळतेकर, पृ. २८ ).

**२.** ( स. ७३०-४५ ) मालखेडच्या राष्ट्रकूटवंशांतील कर्क पहिला याचा मुलगा. याला ध्रुव, कृष्ण (१) व नन्नराज असे तीन भाऊ होते. पण सर्व भावांमध्यें हाच फार महत्त्वाकांक्षी असल्यानें यानें बापाच्या मागें मालखेडची गादी मिळविली.

हा ज्या वेळेस गादीवर आला त्या वेळेस याच्या राज्याभोंवतालीं बरींच लहानमोठीं स्वतंत्र राज्यें इतस्ततः विखुरलेलीं होतीं. त्यांमध्यें दक्षिणेंतील चालुक्य घराणें सर्वांत बलिष्ठ गणलें जात होतें. या चालुक्य राजांच्या इतर राजांशीं नेहमीं लढाया चालत. स. ७२५ मध्यें भडोचचा राजा तिसरा जयभट्ट यानें गुजराथचा चालुक्य राजा मंगलरस याच्या मदतीनें वलभीच्या चालुक्यांचा पराभव केला. या लढाईंत इंद्र चालुक्य ( दक्षिण ) राजाच्या वतीनें त्यांचा मांडलीक म्हणून होता. ही लढाई खेडा प्रांतांत झाली. तींत चालुक्याचा पूर्ण पराभव होऊन खेडा प्रांत व पंचमहाल प्रांत हे जयभट्टानें चालुक्यांपासून जिंकले. यात्र सुमारास इंद्रानें भवनागा या चालुक्य राजकन्येचें लग्नमंडपांतून हरण करून तिच्याशीं राक्षसविधीनें विवाह केला.

इंद्रास भवनागेपासून दंतिदुर्ग नांवाचा मुलगा झाला. इंद्राच्या कारकीर्दीबद्दल नक्की असें कांहींच बोलतां येत नाहीं. पण याच्यामागून याचा पुत्र दंतिदुर्ग हा स. ७५० च्या पूर्वी एकदोन वर्षे गादीवर आला होता. त्यावरून याची कारकीर्द जवळजवळ १५ वर्षें ( ७३०-७४५ ) असावी ( E. I. XVIII. 235-36).

**३.** (स ८१२ च्या पूर्वी) राष्ट्रकूट घराण्यांतील जो ध्रुव त्याचा हा मुलगा व तिसऱ्या गोविंदाचा भाऊ होय. गोविंदानें याला गुजराथ प्रांत देऊन तेथील सुभेदार केलें. यानें आपला भाऊ गोविंद यास वेळोवेळीं मदत केली. स. ८०० च्या सुमारास गुजराथ याचे ताब्यांत आला. यानें नागभट्टाचा आणि इतर राजांचा पराभव केला. राष्ट्रकूटांच्या गुजराथ येथील शाखेचा हा मूळ पुरुष होय. स. ८१२ मध्यें याचा मुलगा कर्क सुवर्णवर्ष हा गुजराथच्या गादीवर आला ( आळतेकर-कृत राष्ट्रकूट, पृ. ६२, ६५,६६,७९ ). हा शके ७३१ (स. ८०९) पर्यंत गादीवर आला नसावा. यानें फार तर तीन वर्षे राज्य केलें असावें ( द. म. इ. सा. खं. ३, ३० टीप ).

**४.** (स. ९१४) मालखेडच्या राष्ट्रकूट वंशांतील जगत्तुंग राजाचा पुत्र. जगत्तुंग राज्यप्राप्तीपूर्वीच एका लढाईंत मारला गेल्यामुळें याला याच्या आजानंतर स. ९१४ मध्यें गादी मिळाली. हा आपल्या वयाच्या सुमारें ३५ व्या वर्षी गादीवर आला व याची कारकीर्द अगदीं लहान म्हणजे पांचच वर्षांची झाली. परंतु येवढ्या थोड्या कालांत यानें राष्ट्रकूट घराण्याचा दरारा सर्वत्र बसविला ( E. I.VII. Appendix, p. p. 16 ).

युवराज असतांनाच यानें कनोजच्या राजाचा पराभव केला. नंतर राज्यावर आल्यावर यानें आपली दृष्टि परमारांकडे वळविली. परमार घराणें हे गुर्जर प्रतीहारांचे मांडलिक होतें व प्रतीहारांच्या प्रोत्साहनानुसार परमारराजा उपेन्द्र यानें राष्ट्रकूटांवर स्वारी केली. पण यानें परमारांचा पुरा मोड करून त्यांना आपल्या सत्तेखालीं आणलें.

परमारांवर मिळविलेला हा जय म्हणजे इंद्राच्या उत्तर दिग्विजयाचा आरंभच होय. या वेळीं कनोजच्या राज-

घराण्यांत वारसासंबंधीं अंतःस्थ कलह सुरू झाला होता. इंद्रानें या संधीचा योग्य फायदा घेऊन कनोजच्या महीपालाचा पराभव केला.

याप्रमाणें हा उत्तर दिग्विजयांत गुंतला असतां दक्षिणेकडे सुद्धां याच्या सेनापतींनीं मुलुख पादाक्रांत करण्याचा सपाटा चालविलाच होता.

याप्रमाणें अल्पकाल कां होईना पण मोठ्या शौर्यानें राज्य करून इंद्रानें राष्ट्रकूटांचा जात चाललेला बोज कायम राखला. आपल्या अल्पशा कारकीर्दीत यानें आपणास सार्वभौम म्हणविणाऱ्या प्रतीहारसत्तेस धक्का दिला. व राष्ट्रकूट-सैन्याचा वचक पुन्हां एकदां उत्तरेकडे बसविला. हा जर अल्प कालांतच मरण पावला नसता तर राष्ट्रकूट-सत्ता पुढें बराच कालपर्यंत टिकली असती ( राष्ट्रकूट, पानें ९९–१०४).

चेदीच्या घराण्यांतील राजकन्या जी विजाम्बा तिच्याशीं यानें लग्न लाविलें होतें. तिच्यापासून याला अमोघवर्ष आणि गोविंद असे दोन मुलगे झाले. पैकीं अमोघवर्षानें याच्यानंतर अवघे कांहीं महिने राज्य करून त्याच्यानंतर श. ८४१ मध्यें गोविंद गादीवर आला ( भांडारकर भा. ३, पृ. ९८-१०१ ).

५. ( स. ९८२ मृत्यु ) मालखेडच्या राष्ट्रकूट घराण्यांतील खोत्तिग राजाचा पुत्र. खोत्तिगाच्या कारकीर्दीत चालुक्य राजा दुसरा तैल यानें राष्ट्रकूट घराण्याचा बहुतेक नाश करून टाकला होता. परंतु मारसिंह नांवाच्या याच्या मामानें याला हाताशीं धरून राष्ट्रकूट घराणें पुन्हां नांवारूपास आणण्याची धडपड चालविली, व त्याप्रमाणें याला कांहीं कालपर्यंत सिंहासन मिळालें सुद्धां. पण हा अत्यंत अननुभवी व लहान असल्यानें याला बलिष्ठ चालुक्य सत्तेपुढें टिकाव धरतां येईना, व शेवटीं याला सिंहासन सोडावें लागलें (राष्ट्रकूट १३१–३२ ).

हा गंगवंशांतलि राणीपासून झालेला असल्यामुळें धर्मशील जैन होता. कारण गंगराजे जैन होते. उत्तर चालुक्यांनीं शेवटचा राष्ट्रकूट राजा कक्कल याचा शिरच्छेद केला. तेव्हां यानें राष्ट्रकूटांच्या सत्तेची पुनः स्थापना करण्याचा प्रयत्न केला, पण तो सिद्धीस गेला नाहीं. तेव्हां यानें सल्लेखनविधीनें आपला प्राण दिला ( स. ९८४ ). सल्लेखनविधि हें एक प्रायोपवेशनासारखें जैनांचें व्रत असून कट्टे जैन लोक तें प्रसंगीं आचरतात.

**इंद्र (भट्टारक)**—हा जयसिंहाचा धाकटा भाऊ स. ६६३ त गादीवर आला. कोठें कोठें याला इंद्रराज असेंहि म्हटलें आहे. एका राजसंघानें याला गादीवरून काढण्याचा प्रयत्न केला. त्यांत अधिराजेंद्र हा मुख्य होता. अधिराजेंद्र बहुधा कलिंग नगराच्या गंगवंशाचा इंद्रवर्मा असावा. यानें सात दिवसच राज्य केलें, असें एके ठिकाणीं म्हटलें आहे.

**इंद्रकुमारी**—ही अजितसिंगाची मुलगी असून हिला अजितसिंगानें– फर्रुखसियाला दिली. बादशाहानें हिला स. २३–९–१७१५ मध्यें मुसलमानी दीक्षा देऊन हिच्याशीं लग्न लाविलें. फर्रुखसियरच्या मरणानंतर पुढें कांहीं वर्षांनीं सय्यदांनीं हिला अजितसिंगाच्या ताब्यांत दिलें व हिची संपत्ति एक कोटीपेक्षां अधिक होती ती हीस दिली. अजितसिंगानें परत हिला आपल्या राज्यांत नेऊन प्रायश्चित्त देऊन हिला परत हिंदुधर्मांत घेतलें ( म. रि. म. १, पृ. ७९–१४२ ).

**इंद्रदत्त**—ऐंद्र पिठाचा हा पहिला अनुयायी. हा पाणिनीचा समकालीन असून पाणिनीबरोबर अभ्यास करीत असे ( सि. ऑ. सं. ग्रामर, पृ. १०,१९ ). कथासरित्सागराप्रमाणें हा उपवर्षाचा शिष्य. यानें ऐंद्र व्याकरण केलें असें तेथें म्हटलें आहे.

**इंद्रद्युम्न**—हा पाल घराण्यांतील शेवटचा राजा स. ११९७ त मगध येथें राज्य करीत असे. पण याच्यावर मुसलमानांनीं स्वारी केल्यामुळें हा ओरिसा प्रांतांत पळून गेला व तेथें यानें स. ११९८ त एक जगन्नाथाचें देऊळ बांधलें ( J. N. Samadar's 'Raja Indradyumna' in J. B. & O. Res. Soc., Vol. V, Part ii, pp. 295-7; महेंद्रपाल पाहा ).

**इंद्रभूति**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं बेचाळिसावा सिद्ध होय. हा जातीनें राजा असून लंकापूरचा राहणारा होता. हा अनंगवज्र आणि कंबळपा यांचा शिष्य होता. याचा ग्रंथ सत्त्वैकदृष्टि ( त. ४८।१२ ) ( सिद्ध पाहा ).

**इंद्रभूति गौतम**—(स. पूर्व ६०७-५१५ ) इंद्रभूति किंवा यांस गौतम अथवा गोतम असें म्हणत असत. हा जैनधर्मसंस्थापक महावीर याचा शिष्य होता. यानें महावीरानें शिकविलेली जैनधर्माची सर्व शिकवण एकत्रित करण्याचें काम केलें. हा अत्यंत विद्वान् असून जैन धर्माचा पहिला नेता होता.

महावीराच्या वर याचें अत्यंत प्रेम होतें. महावीराच्या निर्वाणसमयीं हा हजर नव्हता, त्यामुळें याला फार दुःख झालें. हा महावीराच्या अकरा गणधरांपैकीं एक होता ( जैनिझम इन् नॉर्थ इंडिया ).

याच्या बापाचें नांव ब्राह्मण वसुभूति व आईचें नांव ब्राह्मणी पृथ्वी असें होतें. याचा जन्म मगधदेशांतील गोंबर गांवीं झाला व वयाच्या ९२ व्या वर्षी महावीरास निर्वाणपदाची प्राप्ति झाल्यावर १२ वर्षांनीं राजगृहप्रांतांतील गुणय गांवीं मरण पावला. महावीरास निर्वाणपदाची प्राप्ति स. पूर्व ५२७ या सालीं झाली असें गृहीत धरल्यास याचा जन्म स. पूर्व ६०७ या सालीं झाला असावा व हा स. पूर्व ५१५ या सालीं निर्वाणपदाला गेला असावा.

**इंद्रायुध**—कनोजचा एक राजा. हा स. ७८३ मध्यें गादीवर आला, पण बंगाल व बहार देशाचा राजा धर्मपाल यानें याला स. ८१० मध्यें पदच्युत केलें ( स्मिथ पृ. ३९२,४१३ ). याला इंद्रराज असेंहि म्हणत असावेत ( वत्सराज पाहा ).

**इंद्रोजी कदम**—कदम घराण्यांतील एका शाखेंत कंठाजी कदमाच्याच कालांत इंद्रोजी कदम या नांवाचा एक प्रख्यात मराठा सरदार होऊन गेला. हा सातारा जिल्ह्यांतील साप गांवचा राहणारा असून आपल्या पराक्रमानें मोठ्या योग्यतेस चढला होता. शाहूच्या काळीं याचें महाराष्ट्रांत प्राबल्य फार माजलें होतें; इतकेंच नव्हे, तर कर्दनकाळासारखाच सरकारला हा वाटत असे. याच्या पराक्रमाप्रमाणें याचा थाट व सरंजामहि दांडगा होता. याच्याजवळ ७००० निवडक सैन्य असून घोडेस्वारहि बरेंच होते. गर्विष्ठपणामुळें हा सर्व जगास तुच्छ मानीत असे. इतकेंच काय, पण यानें आपल्या पागेंतलि घोड्यांना रुप्याचे नाल मारून असा हुकूम सोडला कीं, हे रुप्याचे नाल परकीयांच्या प्रदेशांत पडावे व त्यांनीं आपल्या वैभवानें दिपून जावें.

एके दिवशीं सदरहू सरदाराच्या पुंडाईची हकीकत शाहूच्या कानावर गेली, तेव्हां त्यानें मुद्दाम यास बोलावणें केलें. शाहूच्या आज्ञेप्रमाणें इंद्रोजी कदम साताऱ्यास येऊन तळ देऊन बसला; व शाहूला निरोप पाठविला कीं, '' मी इतर आपल्या प्रधानांप्रमाणें नजीक येतांच नौबती बंद करणार नाहीं. '' शाहूनें यास तशी परवानगी दिली व खास राजवाड्यांतील दरबारांत मुलाखत घेण्याचें ठरविलें. कदम पुढें येण्यापूर्वींच शाहूनें त्याचा डामडौल व गर्विष्ठपणा ओळखून आपल्या अंगावरचें जडजवाहीर आपल्या कुत्र्याच्या अंगावर घालून आपण सफेत कपडे करून बसला. याची अशी कल्पना होती कीं, शाहू महाराजांचे सर्व प्रधान आपलें वैभव पाहून तोंडांत बोट घालतील. परंतु दरबारांत जातांच यानें कुत्र्यानेंच फक्त जडजवाहीर घातलें आहे व शाहूमहाराज स्वच्छ आणि पांढरा पोषाख करून बसले आहेत, हें पाहून हा ओशाळला व मर्म ओळखून शाहूमहाराजांच्या पायावर डोकें ठेविलें. शाहूनें याचा योग्य सत्कार केला. इंद्रोजीनें सोन्याच्या सिंहासनावर शाहूस बसवून आपल्या जवळचें जडजवाहीर त्यास अर्पण केलें. शाहूनें सैन्यास मोठें जेवण व पोषाख देऊन परत पाठविलें.

पुढें इंद्रोजी यास मोगलांचा पराभव करते वेळीं दोन बोटांस गोळी लागून दोन बोटें उडालीं (ऐ. स्फु ले. भा. ३, पा. ३५ ).

**इंपे, सर एलिजा**—( स. १७३२-१८०९ ) हा एक बंगालचा सर न्यायाधीश होय. याचा जन्म १३ जून १७३२ मध्यें झाला.

याचें शिक्षण वॉरन हेस्टिंग्सबरोबर वेस्टमिन्स्टर येथें झालें. स. १७७३ मध्यें याला कलकत्त्याच्या नवीन वरिष्ठ कोर्टामध्यें पहिला सर न्यायाधीश नेमण्यांत आलें; स. १७७५ त नंदकुमाराचा खटला याच्याच पुढें चालला होता, त्यामुळेंच याची इतिहासांत ख्याति झाली. स. १७८७ मध्यें हाउस ऑफ कॉमन्समध्यें याच्यावर नंदकुमाराचा कायद्यानें खून करण्याच्या आरोपावरून खटला करण्यांत आला. बर्क, मिल्ल, मेकाले इत्यादिकांनीं याच्यावर अनेक गुन्हे लादून याला दोषी ठरविण्याचा आटोकाट प्रयत्न केला, पण तो सफळ झाला नाहीं.

स. १७८० मध्यें याला कंपनीच्या कोर्टाचा म्हणजे ' सदर दिवाण अदलत'चा मुख्य नेमण्यांत आलें; व त्या कामाकरितां महिना ५००० रु. जादा वेतन ठरविलें. पण हा कारभार बेकायदेशीर होता, तेव्हां डायरेक्टरांनीं याला परत बोलाविलें व पुढें याच्यावर खटला भरला.

हा फार धोरणी व हुषार न्यायाधीश होता. यानें मोठ्या मेहनतीनें स. १७८१ त एक कोड तयार केलें. हिंदूंचे आचारविचार ओळखून हा न्याय देत असे, व साम्राज्यांत स्वास्थ्य राहावें याविषयीं याची खटपट असे. पण याच्या गुणांचें शेवटीं चीज झालें नाहीं. हा पार्लमेंटांत होता. स. १८०९ मध्यें याचा अंत झाला.

# ई

**ईतिकदखान**--( झुल्फिकारखान पाहा ).

**ईल**—स. १०५८ च्या सुमारास एलिचपूर येथें ईल नांवाचा राजा राहत होता. हा जैनधर्मी असून याचे कारकीर्दीत वऱ्हाडांत जैनधर्माचा फार प्रसार झाला होता. यानें जैनधर्मास फार उत्तेजन दिलें. यानेंच शिरपुर येथील प्रसिद्ध पार्श्वनाथाचें मंदिर बांधलें, असा समज आहे. त्याचप्रमाणें एलिचपूरजवळ मुक्तागिरी येथेंहि यानें अनेक जैन मंदिरें बांधल्याचें सांगतात. त्यांपैकीं कांहीं बांधलेलीं आहेत आणि कांहीं खडकांत कोरलीं आहेत.

हा एलिचपूर येथें राज्य करीत होता. एकदां गझनी येथील एक फकीर फिरत फिरत याचे दरबारांत आला, त्याचा कांहीं कारणावरून यानें अपमान केला. ही हकीकत त्या फकीरानें गझनी येथें जाऊन त्या वेळीं तेथें राज्य करीत असलेल्या सुलतान महमूद याच्या दरबारांत सांगितली. त्या वेळीं सुलतान महमुदाचा भाचा रहिमानशाह याचें लग्न ठरलें असून लग्नाचें कंकणहि त्यानें बांधलें होतें. तेव्हां फकीर त्याला म्हणाला कीं, ‘ तुमच्या धर्माची दुसरे लोक विटंबना करितात, आणि तुम्ही लग्नासारख्या सुखासमाधानांत दंग राहतां !’ अशा तऱ्हेनें त्या फकीरानें शहाजाद्याची निर्भर्त्सना केली. रहिमानशाहाचीहि धर्मावर फार प्रीति होती. वरील भाषणानें त्यालाहि चेव आला; व त्यानें प्रतिज्ञा केली कीं, ‘मी ईल राजावर स्वारी करून त्याला ठार मारीन तेव्हांच लग्न करीन.’ असें म्हणून त्यानें लग्नाची तयारी तहकूब केली. लग्नाकरितां रहिमानशाह नवरदेव बनला होता व तशा स्थितींतच तो लढाईस निघाला. फार्सी भाषेंत नवरदेवाला दूला म्हणतात. या कारणामुळें याचें नांव दूला रहिमानशाह असें प्रचारांत आलें.

वरीलप्रमाणें सर्व बेत करून दूला रहिमानशाह १०।१२ हजार सैन्य बरोबर घेऊन लढाईस निघाला. पुढें हा आपल्या सैन्यासह एलिचपूर येथें आल्यावर ईल राजाची भेट घेऊन त्याला लढाईचें आव्हान दिलें. ईल राजाचें स्वधर्मावर प्रेम असल्यानें त्यानें वरील आव्हान स्वीकारलें व तो लढाईस सज्ज झाला. उभय सैन्यांची घनघोर लढाई होऊन रहिमानशाह आणि ईल हे दोघेहि त्या लढाईंत मृत्यु पावले. याप्रमाणें हे दोघेहि वीर स्वधर्माच्या रक्षणाकरितां कामीं आले. एलिचपूर येथें बीचन नदीच्या कांठीं दूला रहिमानशाहा याची कबर करून त्यावर एक मोठी इमारत बांधली आहे. त्या इमारतीच्या पायांतच ईल राजाची समाधि करण्यांत आली होती, असें म्हणतात.

दूला रहिमानशाहाच्या बरोबर लढाईंत पडलेल्या अकरा हजार वीरांची एकच कबर बांधण्यांत आली. त्याला गंजीशहीदा म्हणतात. गंजीशहीदा याचा अर्थ लढाईंत पडलेल्या सर्व वीरांची कबर असा आहे. दूला रहिमानशाहा हा मोठा पीर म्हणून मानण्यांत येतो व त्याचा उरूस भरत असतो. दूला रहिमानशाहाच्या कबरेवरची मूळ इमारत आज तेथें नाहीं. दिल्लीचा सुलतान अलाउद्दीन खल्जी यानें हल्लींची इमारत चौदाव्या शतकाच्या आरंभीं बांधली, असें म्हणतात. त्यानंतर त्या इमारतीभोंवतीं कोट, मुख्य दरवाजा वगैरे इमारती नागपूरकर भोसले यांनीं बांधल्या आहेत. या सर्व इमारती आज अस्तित्वांत आहेत व त्या ईल राजा आणि दूला रहिमानशाहा यांच्यामधील झालेल्या लढाईचें स्मारक आहेत. या लढाईनंतर दूला रहिमानशाहाला गाझी हें नांव प्राप्त झालें आहे. गाझी म्हणजे लढाईंत शौर्य दाखवून नांव कमावणारा अथवा जिंकणारा ( एलिचपूर प्र. ६–९ ).

**ईशान**—(स. ११७०-१२००) हा तिसऱ्या हलायुधाचा थोरला भाऊ होय. यानें संस्कृतमध्यें द्विजाह्निकपद्धति हा ग्रंथ लिहिला.

**२.** बाणभट्ट कवीचा हा बालमित्र असून कवि होता.

**ईशानदेवी**—अशोकपुत्र जालौकाची पत्नी. ही शैवपंथानुयायी होती. हिनें अनेक शिवालयें बांधलीं ( स्मिथ प्र. २०१ ).

**ईशानवर्मन् मौखरी**—कनोजच्या मौखरी घराण्यांतील जो ईश्वरवर्मन् त्याचा हा मुलगा होय. स.५६० मध्यें हा आपल्या बापानंतर गादीवर आला.

स.५६४ मध्यें मगधच्या कुमारगुप्तानें याच्यावर मोहीम केली व ती तशीच पुढें कुमारगुप्ताचा मुलगा दामोदरगुप्त यानें चालविली. पण त्या लढाईंत दामोदरगुप्त मारला गेला.

याच्यानंतर याचा मुलगा शर्ववर्मन् हा गादीवर आला ( B. ). याच्यापूर्वीच्या राजांना ‘महाराज’ अशी पदवी लावलेली आढळते. परंतु याच्या मागें मात्र महाराजाधिराज असें म्हटलें आहे ( आशिरगडचा मुद्रालेख

नं. ४७, कॉर्पस इन्स्क्रिप्शन व्हॉ. ३). याची पत्नी उपगुप्ता. हा जीवितगुप्ताचा समकालीन होता.

**ईश्वर कवि**—(स. १५०० सुमार) कानडी कवि. ब्राह्मण असावा. पिता-कच्चुटेश. याला अभिनव 'केशिराज' अशी पदवी होती. ग्रंथ-कविजिह्वाबंधन, (छंदोंबुधि). याला बाण व फणिवर्म अशीं नामान्तरें होतीं. हा आंध्रकवि आप्पचा निर्देश करतो. याचा ग्रंथ बायकोला उद्देशून लिहिला आहे असें दिसतें (क. क. च. भा. २, पा. १५१).

**ईश्वरकृष्ण**—सांख्यकारिकांचा कर्ता. हा वसुबंधूचा समकालीन असावा, असें सांख्यसिस्टिममध्यें कीथ म्हणतो. याच्या कारिकांचें भाषांतर चिनी भाषेंत स. ५५७–५८३ ह्याच्या दरम्यान झालेलें असल्यामुळें हा निदान पांचव्या शतकाच्या नंतरचा तरी नसावा; आणि कदाचित् त्या पूर्वीचाहि असणें संभवनीय आहे. याच्या ६९ आर्या असून त्यांत संक्षिप्त रीतीनें पण फार सुसंगतपणें सांख्य-सिद्धांतांचें दिग्दर्शन केलेलें आहे. कालांतरानें त्यांत आणखी तीन आर्या वाढविण्यांत आलेल्या आहेत. ह्या ग्रंथानें पंचशिखाच्या सूत्रांस मागें टाकिलें असावें. ह्यांत पंच-शिखाला सांख्यमताचा मुख्य प्रवर्तक असें म्हटलें आहे. स. ७०० च्या सुमारास गौडपादानें रचिलेली, व स. ११०० नंतर वाचस्पतिमिश्रानें लिहिलेली अशा दोन उत्तम टीका सांख्यकारिकेवर आहेत (पेंडसेकृत संस्कृत वाङ्मयाचा इतिहास, पृ. ३९२–३९३).

यांत कै. लोकमान्य टिळकांनीं एक कारिका नवी शोधून काढली.

**ईश्वरदत्त आभीर**—हा एक आभीर घराण्यापैकीं होय. हा रुद्रभूति सेनापतीच्या नंतर ५० वर्षांनीं झाला. यानें विजयसेन क्षत्रपाचें (स. २३८–२४९) राज्य जिंकून गुजराथ, काठेवाड व दक्षिणचा कांहीं भाग आपल्या राज्यांत समाविष्ट केला असें दिसतें. ईश्वरदत्त आपल्या लेखांत स्वतःच्या कारकीर्दीचें वर्ष देत नसल्यामुळें याचा काळ खात्रीपूर्वक ठरवितां येत नाहीं. तथापि याचीं जीं नाणीं सांपडतात त्यांची घडण वगैरे विजयसेनाच्या नाण्यां-प्रमाणें दिसते, यावरून हा विजयसेनाचा समकालीन असावा असें वाटतें. नाशिक लेण्यांतील ईश्वरसेनाच्या बापाच्या नांवाप्रमाणें (शिवदत्त) याच्या नांवाच्या शेवटीं दत्त असें पद असल्यामुळें हा ईश्वरसेनाप्रमाणेंच आभीर असावा. हा स्वतः महाक्षत्रप म्हणवून नवीन शक सुरू करतो, यावरून तो मागील क्षत्रपांचा पाडाव करून राजा झाला असला पाहिजे, असें मत प्रतिपादण्यांत येतें. तथापि यानें फार थोडीं वर्षें राज्य केलें.

**ईश्वरदास नागर**—यानें औरंगजेबाच्या कारकीर्दीचा इतिहास फार्सी भाषेंत लिहिला (मु. रि. २ पा. ३२०). हा रजपूत सरदार औरंगजेबाबरोबर दक्षिणेंत आला होता.

**ईश्वरसिंग**—(स. १७४३) जयपूरचा राजा सवाई जयसिंग सन १७४३ त मरण पावल्यावर त्याचा वडील मुलगा ईश्वरसिंग हा गादीवर आला. परंतु याचा धाकटा भाऊ माधोसिंग हा गादीवर आपला हक्क सांगूं लागला व मेवाडच्या जगतसिंगाचें साहाय्य घेऊन त्यानें याशीं युद्ध सुरू केलें. ईश्वरसिंगानें शिंदे-होळकरांची मदत मागितली, गादीचा वारस ठरवितांनाच हे अडथळे उत्पन्न झाले होते; व माधोसिंगानें पातशहास एक कोट रुपये देण्याचें ठरवून राज्य आपणास मिळावें अशी खटपट चालविली. तेव्हां नानासाहेब पेशव्यानें ईश्वरसिंगाचा पक्ष घेतल्यामुळें दिल्लीच्या मुहम्मदशाह बादशहानें ईश्वरसिंगासच राज्य दिलें होतें. या वेळीं पेश-व्यानें सांगितल्यावरून शिंद्यांनीं होळकरास साह्य करून राजमहाल येथें माधोसिंग व राणा जगतसिंग यांचा पराभव केला. हें प्रकरण १७४५ चे अखेर घडलें असावें. रा. सरदेसायांनीं १७४७ च्या आरंभीं म्हटलें आहे तें चुकीचें वाटतें.

यानंतर माधोसिंगानें मल्हारराव होळकरास ६५ लाख रुपयांची लालूच दाखवून त्याची मदत मागितली. होळकरा-च्या तोंडास पाणी सुटून त्यानें ह्या गोष्टीस पेशव्यांची मंजुरी मागितली. ही गोष्ट जयाप्पा शिंदे व त्याचा दिवाण रामचंद्रबाबा यास बिलकुल आवडली नाहीं. त्यानें असें करणें चांगलें नाहीं, असें नानासाहेबांस निक्षून बजावलें. पण या वेळीं पेशवा कर्जग्रस्त असल्यामुळें (पु. द. ले १५९, २१३) त्यासहि हें राजकारण पसंत पडलें. रामचंद्रबाबाचें म्हणणें "माधोसिंगाचें राजकारण लटकें त्यांत जीव नाहीं. पैका प्राप्त होणें नाहीं." हें पुढें खरें झालें. पण ह्या वेळीं मात्र तो आपलें राजकारण बिघडवितो म्हणून मल्हारराव त्याजवर खूप चिडला होता (पे. द. २, २५).

हीं प्रकरणें १७४६ च्या बुंदेलखंडाच्या स्वारीच्या वेळीं चालू होतीं. अखेर मल्हाररावाचा पक्ष घेऊन नानासाहेब पेशव्यानें माधोसिंगास ईश्वरसिंगानें चार परगणे टोक, तोडा, मालपुरा व नेवाई एकूण अठरा लाखांची जागा द्यावी, असा निकाल दिला. हा निकाल ऐकतांच मराठ्यांनीं पगडी बद-लली म्हणून संतापानें ईश्वरसिंगानें युद्धाची तयारी आरं-भिली (स. १७४७ आरंभ). स. १७४७ च्या फेब्रुआरींत मल्हाररावाचा मुलगा खंडेराव माधोसिंगाच्या बाबतीतला

करार अमलांत आणण्यासाठीं हजार स्वारांनिशीं उदेपूरच्या राज्यास साह्य करण्यास गेला ( पे. द. २,३ ).

स. १७४८ च्या स्वारींत पेशव्यानें ईश्वरसिंगाची गांठ घेऊन जयपूरच्या गादीच्या बाबतींत झालेला आपला निकाल त्यास पुन्हां सांगितला. पण पेशव्याची पाठ फिरतांच ईश्वरसिंगानें तो निकाल धाब्यावर बसविला. तदाप्रमाणें वर्तन केलें नाहीं म्हणून माधोसिंगाचा कैवारी मल्हारराव होळकर यानें १ जुलै १७४८ रोजीं ईश्वरसिंगावर स्वारी केली ( राजवाडे खंड ६, १९०-१९१; कोटा द. १ ले. ८० ).

शिंद्यानें होळकरास या वेळीं मदत केली नाहीं. मल्हाररावानें ईश्वरसिंगास नरम करून त्याजकडून नानासाहेबानें ठरविलेला करार पुरा करून घेतला. या लढाईंत सुरजमल जाटानें ईश्वरसिंगास मदत केली होती, तेव्हां मल्हाररावानें त्याच्यावर स्वारी केली.

ईश्वरसिंगाच्या पाठीमागें हात धुऊन लागण्याचें कारण या वेळीं सफदरजंग वजिराच्या मार्फतीनें ईश्वरसिंगास नाहींसें करून अजमीरचा सुभा आपण घ्यावा,अशी मल्हाररावाची अंतःस्थ खटपट चालू होती. ईश्वरसिंगाचा पराभव केल्यावर त्यानें जोधपूरच्या अभयसिंग व बख्तसिंग या दोन भावांच्या भांडणाचा सलोखा करून दिला.

स. १७५० त जोधपूरचा राजा अभयसिंग मरण पावला. तेव्हां त्याचा भाऊ बख्तसिंग व मुलगा रामसिंग यांच्यामध्यें जोधपूरच्या गादीसाठीं भांडणें सुरू झालीं. अभयसिंगाच्या वेळेपासून भावांभावांतहि भांडणें सुरू होतीं, व स. १७४८ च्या अखेर मल्हाररावाच्या मध्यस्थीनें सलोखा झाल्याचा उल्लेख एका पत्रांत आढळतो (पु. द. भा. १, ले. १५७ ). मल्हाररावाचा ओढा बख्तसिंहाकडे होता. या चुलतापुतण्याच्या भांडणांत जयपूरच्या ईश्वरसिंगास पडावें लागलें; कारण रामसिंग हा त्याचा जांवई होता. तेव्हां बख्तसिंगाचा पक्ष घेऊन ईश्वरसिंगाचें पारिपत्य करण्याचा मल्हाररावानें विचार केला.

सुभेदार जयपुरावर आले हें कळतांच ईश्वरसिंगानें दोन लाख रुपये देऊन वकिलास पाठविलें. पण मल्हारराव कांहीं केल्या ऐकेना. राजानें जुना कारभारी केशवदास यास ठार मारिलें त्याचा सूड आपण घेणार, असें मल्हारराव म्हणूं लागला. “ मग राजा उगाच राहिला. संध्याकाळ जाहली. वर्तमान ऐकिलें कीं सुभेदार येथून दहा कोसांवर आले. खिजमतगारास सांगितलें कीं काळा नाग जिवंत आणवणें व सोमलखार घेऊन येणें, औषध करणें आहे. त्यांनीं आणून दिलें. दोन प्रहर रात्रीस जहर राजे यानें घेतलें, नाग अंगास डसविले. पहाटे ईश्वरसिंग राजा याचा प्राण गेला. तिघी बायकांनीं जहर घेतलें व एक कलावंतिणीनें जहर घेतलें.’

ईश्वरसिंगाची हृदयद्रावक आत्महत्या मराठ्यांच्या उत्तरहिंदुस्थानांतील कारभाराला काळिमा आणणारी आहे. ता. १४ डिसेंबर रोजीं होळकराची फौज जयपुरांत येऊन दाखल झाली त्याच्या आदल्या रात्रीं हा प्रकार घडला.

ईश्वरसिंगानें आत्महत्या केल्याचें कळतांच मल्हाररावानें माधोसिंगास सांडणीस्वार पाठविला, व आपण शहरांत चौक्या बसवून खंडणीच्या वसुलास प्रारंभ केला. पंधराव्या दिवशीं माधोसिंग आला. त्याच्या आठव्या दिवशीं जयाप्पाहि होळकरास येऊन मिळाला. माधोसिंग मल्हाररावाचा मित्र व जयपूरची गादी त्याला आतां अनायासें मिळालेली, अर्थात् आतां पैसे उकळण्याचें एक चांगलेंच साधन प्राप्त झालें, असें होळकरास वाटलें. पण त्याची प्रचीती माधोसिंगानें लवकरच आणून दिली. त्यानें मल्हाररावास, जयाप्पास व दहापांच हजार खाशांस जेवावयास बोलाविलें. “ पांच सात दिवस पक्वान्नें केलीं होतीं. त्यांत अवघें वीख घातलें. पाणियांत वीख घातलें आणि ब्राह्मणास पेढे विखाचे केले. सोमलखार दोन मण घेतला होता. ” अशा तऱ्हेनें साऱ्या मराठी फौजेस विषप्रयोग करण्याचा त्याचा बेत होता. पण आयत्या वेळीं जयाप्पानें मोडा घातल्यामुळें कोणी गेलें नाहीं, व तो प्रसंग टळला. हा बेत फसल्यानंतर एक दिवस माधोसिंगानें सर्व खाशा सरदारांस लवाजम्यानिशीं शहरांत बोलाविलें. जयाप्पाकडचे बरेच खासे व इतर जवळजवळ पांच हजार लोक शहर पाहावयास गेले. तेव्हां पूर्वसंकेताप्रमाणें शहराचे दरवाजे लावून घेण्यांत आले; व मराठ्यांची सरसहा कत्तल करण्याचा माधोसिंगानें हुकूम केला. दोन प्रहरापासून तों प्रहररात्रीपर्यंत कत्तल चालू होती. एकंदर तीन हजार मराठे ठार झाले; व एक हजार जखमी झाले. कित्येक गांवकुसांवरून उड्या टाकून पळाले. पौष वद्य ९ गुरुवारीं ( १० जाने. १७५१ ) मराठ्यांची ही कत्तल झाली. “ माधोसिंग बेइमानी त्याचें राजकारण लटकें,” हे रामचंद्रबाबाचे शब्द या वेळीं मल्हाररावाच्या प्रचीतीस आले असतील. दहशत खाऊन मल्हाररावानें १२ जानेवारीस शहराअलीकडे तीनचार कोस येऊन तेथें मुक्काम केला. “ झाला प्रकार माझ्या हुकमानें झालेला नाहीं. पोरासोरी झाली. ” असें माधोसिंगानें वकिलामार्फत कळविलें. पण त्यांत कांहीं अर्थ नव्हता. तहाच्या आशेनें मल्हाररावानें आणखी

पंधरा दिवस फुकट घालविले. २२ जानेवारीपर्यंत त्याचा मुक्काम जयपुराजवळ होता (पे. द. २, ३१ यांतील या पत्राची २१ फे. १७५१ ही तारीख चुकीची असून ती २२ जाने. १७५१ पाहिजे). अशा पद्धतीनें या ईश्वरसिंग-प्रकरणाचा तात्पुरता शेवट झाला. पण या वेळेपासून रजपूत मराठ्यांचे विरुद्ध झाले. मराठे हे राज्यकर्ते नसून लुटारू आहेत, अशी रजपुतांची शेवटपर्यंत समजूत होती. पानपतसारख्या भारतीय युद्धावर याचाहि बराच परिणाम झाला.

**ईश्वरसेन**—(धर्मकीर्ति पाहा).

**ईश्वरसेन आभीर**—हा दमरी व शिवदत्त आभीर यांचा पुत्र होय. याचें नांव डॉ. भांडारकर जे. बी. बी. आर. एस. पु. ७ नं. १५ वरून वीरसेन आभीर असें देतात. हा आंध्रांची सत्ता बळकावणाऱ्यांपैकीं एक असावा. याची सत्ता नाशिक, खानदेश या भागांत होती. यापेक्षां विशेष माहिती आढळत नाहीं. याचे नाशिक येथील शिलालेख उपलब्ध आहेत (E. I. Vol. VIII. p. 88). यानें स. २४० मध्यें आभीर-राज्य स्थापन केलें.

**ईश्वरा**—सिंधपूरच्या (पंजाबांतील सिंहपूर) यादव घराण्यांतील भास्कर-वर्मन् रिपु-घंघल याची ही मुलगी होय.

ही, जालंधरचा राजपुत्र चंद्रगुप्त यास दिली होती. हिचा काल स. ७०० चे सुमारास आहे (B).

**ईश्वरानंद**-भाष्यप्रदीपविवरण व भाष्यप्रदीपव्याख्या यांचा कर्ता.

**ईसरादेवी**—रघुवंशी प्रतीहारांपैकीं नागभटाची पत्नी. हिचा पुत्र रामभद्र.

**ई-हुई**—एक चिनी प्रवासी. हा चीनमध्यें लोयांग येथें राहत होता. हा भारतवर्षांत बौद्ध ग्रंथांचा शोध करण्याकरितां आला व येथें यानें अनेक ग्रंथांच्या प्रती करून घेतल्या. नंतर हा परत गेला.

**ईळी शैवल्लभी**—कुलोत्तुंगाची द्वितीय पत्नी.

# उ

**उग्र**—वरगुणवर्मन्च्या वेळेचा एक राजा (स. ८६२). वरगुणवर्मन् पांड्याचा धाकटा भाऊ परांतक वीरनारायण यानें यास जिंकलें होतें.

**उग्र पांड्य**—पांड्यांपैकीं सुंदराचा मुलगा.

**उग्रभूति**—जयपालाचा मुलगा जो आनंदपाल त्याचा हा गुरु होय. हा एक व्याकरणकार असून याचीं पुस्तकें काश्मीरमध्यें बरींच लोकप्रिय आहेत. याला राजपुत्राकडून बरीच देणगी मिळत असे (स्मिथ पृ. ३९७ फुटनोट). यानेंच जगद्धराच्या बालबोधिनीवर न्यास नांवाची टीका लिहिली. हा शिष्यहितान्यास ग्रंथाचा कर्ता होय. याचा ग्रंथ व्याकरणविषयक आहे (सी. सी.).

**उग्रसेन पल्लव**—नेलोर प्रांतांतील पालक्कचा राजा. याचा समुद्रगुप्तानें पराभव केला होता.

**उच्छला सातवाहन**—(स. ११०१–११११) काश्मीरांतील सातवाहन घराण्याचा पहिला राजा. यानें हर्षाला ठार करून लोहर घराण्याकडून राज्य घेतलें. शिवरथ नांवाचा याचा प्रधान होता.

**उज्वलदत्त**--याची शाकटायनाच्या उणादिसूत्रावर वृत्ति आहे. तिचा भट्टोजी दीक्षितानें सिद्धांतकौमुदींत उणादिसूत्रावर व्याख्या करतांना निर्देश केला आहे. याच्या-पूर्वी उणादिवर पुष्कळ टीका होत्या. यानें त्या पाहिल्या होत्या. वृत्ति, न्यास, रक्षित, कलिङ्ग, हट्टचन्द्र यांचे ग्रंथ पाहून यांनीं आपली वृत्ति लिहिली आहे व जागोजाग यांनीं यांतील उतारेहि दिलें आहेत. यालाच जाजलि असें दुसरें नांव होतें, असें टीकेच्या शेवटीं दिलेल्या संकल्पावरून म्हणावें लागतें. याची वृत्ति संशोधून प्रथम आफ्रेजनें प्रसिद्ध केली.

**उडीयार**--(स. १५७८-१६१७) म्हैसूर संस्था-नांतील हिरे (वडील-ज्येष्ठ) चामराजाचा हा मुलगा. यानें राज्यविस्तार करून श्रीरंगपट्टण काबीज केलें (स. १६१०).

याचा मुलगा नरसराज हा बापाच्या देखत मरण पावला. यालाच सिवेलनें राजाधिराज असें म्हटलें आहे.

**उत्कर्ष**--काश्मीरचा राजा जो कलश त्याचा हा मुलगा होय. हा प्रथम लाहोरचा सुभेदार होता. स. १०८९ मध्यें हा आपल्या बापानंतर काश्मीरच्या गादीवर आला.

गादीवर आल्यापासून अवघे २२ दिवस यानें राज्य केलें. कारण याला गादीवर बसल्यापासून २२ व्या दिवशीं याचा

भाऊ हर्ष यानें गादीवरून काढून टाकिलें आणि आपण राज्य करूं लागला (B)

याचा पिता कलश स. १०७३ मध्यें मेला. तेव्हां नोनक नांवाच्या मंत्र्यानें हर्षाला कैदेंत ठेवून याला गादीवर बसविलें; व यानेंहि प्रजेला न जुमानतां मन मानेल तसा कारभार केला. पण पुढें याचा तिसरा भाऊ विजयमल्ल यानें पुष्कळ लोकांचें साह्य मिळवून याचा पराभव करून याला ठार केलें; व हर्षाला गादीवर बसविलें. याच्या कालाविषयीं मतभेद आहे (म. भा. १.२.११५).

**उत्तम चोल**--हा स. ९६९ त राज्यावर आला असावा. कारण पहिल्या राजराजच्या अगोदर हा १६ वर्षे राज्यावर होता, असा उल्लेख आढळतो. हा स. ९८५ पर्यंत होता. यास परकेसरीवर्मन् ही पदवी होती. हा दुसऱ्या आदित्य चोलाबरोबर राज्य करीत होता ( सुंदर चोल परान्तक २ रा पाहा ).

**उत्तमश्लोक**—( स. १७०९–१७८६ ) हा एक कवि होऊन गेला. याचें देहावसान पैठण मुक्कामीं झालें. यानें प्रबोधसार नांवाचा एक ग्रंथ लिहिला. त्यांत एकंदर ओवीसंख्या ३२१ आहे. याचें मूळ नांव माधवराव व्यापारी असें होतें. कृष्णदयार्णवानें याचें नांव उत्तमश्लोक असें ठेविलें. कृष्णदयार्णवाचा हा एक पट्टशिष्य होता. याची समाधि पैठणास आहे. हा शके १७०८ चैत्र शु. ४ या दिवशीं समाधिस्थ झाला ( मं. त्रै. व. १२, ४ ले. २६ ).

हा नाथसांप्रदायी असून याचा जन्म शके १६३१ ( स. १७०९ ) सालीं बीड येथें झाला. हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. गोत्र भारद्वाज. वडलांचें नांव बाळाजी महादेव. हे व्यापारी होते. आईचें नांव चिऊबाई. ही बीडच्या देशपांडे घराण्यांतील मुलगी. याचें पाळण्यांतलें नांव माधवराव. वडील तेराव्या वर्षी व आई सोळाव्या वर्षी वारली. याला मुकुंदराव नांवाचा एक विद्वान् पुत्र होता. त्याचे वंशज सध्यां उमरखेड येथें आहेत. कृष्णदयार्णवाचा हा पट्टशिष्य. कृष्णदयार्णवानें सांगावें व यानें लिहावें, अशा पद्धतीनें भागवत-दशमस्कंधावरील उत्तरार्धाच्या सत्यायशीव्या अध्यायाच्या तेविसाव्या श्लोकापर्यंत ग्रंथ झाल्यावर कृष्णदयार्णव समाधिस्थ झाले (श. १६६२). यानें सत्त्यायशीवा अध्याय पुरा केला; आणि पुढील तीन अध्याय लिहून ग्रंथ शके १६६५ मध्यें पुरा केला. यानें गीतेवरहि एकदोन अध्याय टीका लिहिली होती. यानें सप्तशतीवर एक ग्रंथ लिहिला आहे ( आईनाथ पाहा ).

**उत्तर**—( सोण पाहा ).

**उत्पल**— काश्मीरचा शैव तत्त्ववेत्ता. उदयकराचा मुलगा उत्पल. हा स. ९३० च्या सुमारास उदयास आला. हा सोमनंदाचा शिष्य होता. यानें प्रत्यभिज्ञासूत्र, अजडप्रमातृसिद्धि आणि परमेशस्तोत्रावलि हे ग्रंथ लिहिले आहेत. त्याच वेळीं भट्ट नारायण हा होऊन गेला. यानें स्तव-चिंतामणि हा ग्रंथहि लिहिला आहे.

२. चिप्पट जयापीड नांवाच्या काश्मीरच्या राजाचा मामा. चिप्पट जयापीड अल्पवयी गादीवर आला असतां यानें आपल्या हातांत सत्ता घेतली. मम्म नांवाचा दुसरा एक मंत्री याचा जोडीदार होता. चिप्पट वयांत आल्यावर यानें अजितापीड नांवाच्या दुसऱ्या एका अज्ञानाला पुढें करून सत्ता आपल्या ताब्यांत ठेवण्याचा प्रयत्न केला. तेव्हां मम्मानें तसाच प्रकार करून दोघांत युद्ध झाल्यामुळें उत्पलाला जय मिळाला. यानंतर कर्कोटक घराण्यांतील म्हणून एका अल्पवयी अनंगापीड नांवाच्या मुलाला शेवटीं गादीवर बसविण्यांत आलें. पण उत्पलाचा नातू अवन्तिवर्मा यानें त्याला पदच्युत करून पुढें स्वतः गादी बळकावली. व स. ८५५ च्या सुमारास काश्मीरांत उत्पल घराण्याची स्थापना झाली ( म. भा. २, पा. ९७ ).

**उत्पलभट्ट**—( भट्टोत्पल पाहा ).

**उत्पलराज परमार**—अबूच्या परमार घराण्यापैकीं सिंधुराजाचा उत्तराधिकारी. सिरोही राज्यांतील वसंतगड येथें पूर्णपाल परमाराच्या वेळचा म्हणजे वि. सं. १०९९ (स. १०४२ ) या शिलालेखांत परमाराची वंशावळ या उत्पलराजापासून सुरू होते.

**उत्वी**–हा गझनीच्या महमुदाचा समकालीन ग्रंथकार होय. हा महमुदाचा चिटणीसहि होता. हिजरी स. ४१२ ( स. १०२१ ) मध्यें यानें आपला वृत्तान्त थांबविला आहे. हा याच्याहि पुढें जिवंत होता, असें याच्या ग्रंथांतील उल्लेखावरून दिसतें. महमुदाच्या स्वारीचीं वर्णनें समजण्यास प्रायः याचाच एक ग्रंथ सध्यां उपयोगी आहे. मात्र त्यांतील शत्रुपक्षाकडील तपशील किंवा अतिशयोक्तीचीं काव्यमय वर्णनें वजाबाकी करून स्वीकारलीं पाहिजेत. तत्कालीन कागदपत्रांचाहि यानें उपयोग केलेला दिसतो. स्वाऱ्यांच्या नोंदीचें रजिस्टर अथवा महमुदानें लिहून ठेवलेल्या आठवणी अशा तऱ्हेच्या सरकारी कागदपत्रांचा यानें निर्देश केला आहे. याच्या ग्रंथाचें नांव तारिख-इ-यामीनी असें आहे.

**उदय**—उदयनाचें नामान्तर.

**उदयकर**—( उदयनाचार्य पाहा ).

**उदयचंद्र**—हा पल्लवसेनापति होता. यानें नंदीवर्मन् यास जेव्हां द्रमिळ राजपुत्रानें नंदीपुर येथें वेढा घातला तेव्हां मदत केली. आणि शत्रूंचा पराभव करून पल्लव-राजा चित्रमाय यास ठार मारलें ( नंदीवर्मन् पल्लव-मल्ल पाहा ).

२. यानें हेमचंद्राच्या बृहद्वृत्तीवर अनेक न्यास लिहिले आहेत. हा चांद्रांच्या संघांतील होता. याचा देवेन्द्रसूरि नांवाचा शिष्य होता.

**उदयन**—पांडवांच्या कुरुवंशांत भारतीय युद्धानंतरच्या राजांच्या यादींत याचें नांव येतें. हा शतानीकाचा पुत्र असें मत्स्य, विष्णु व भागवत पुराणांत दिलें आहे. पण बृहत्कथेंत म्हणजे कथासरित्सागरांत शतानीक-सहस्रानीक-उदयन असा क्रम दिला आहे. म्हणजे बृहत्कथेप्रमाणें उदयनाचा पिता सहस्रानीक होय. जैनवाङ्मयांत सहस्रानीक-शतानीक-उदयन असाच क्रम आहे. याचा पुत्र मत्स्यपुराणाप्रमाणें वहीनर होय. कथासरित्सागरांत याच्या पुत्राचें नांव नरवाहन असें दिलें आहे. वह-इ-नर हें नरवाहन शब्दाचें इराणी रूप आहे, असें दिसतें.

याला उदय, उदयन, उदयिन, उदयाश्व, वत्सराज अशीं नांवें आढळतात. बौद्ध याला उदयीभद्र असें संबोधितात.

हा वत्सदेशाचा राजा होता. वत्सदेश म्हणजे प्रयागच्या पश्चिमेकडील गंगायमुनांच्या दुआबांतील प्रदेश होय. याची राजधानी कौशांबी. सध्यां कोसम नांवाचें खेडें यमुनेच्या डाव्या बाजूस आहे तेंच हें होय. याचा काळ स. पूर्व ५०३ होय. यानें गंगेच्या कांठीं कुसुमपुर हें शहर वसवेंल. याची राणी ही अवंतीच्या महासेन प्रद्योत राजाची कन्या होय ( स्मिथ पृ. ३८-३९ ).

अशोकापूर्वीच्या राजांपैकीं वत्सदेशाचा हा राजा बौद्ध बनला होता, असें बौद्ध ग्रंथांतून सांगितलें आहे; व हा जैन होता असें जैन ग्रंथ सांगतात.

यानें केलेली बुद्धाची पांच फूट उंचीची चंदनी मूर्ति कौशाम्बी येथील राजवाड्याच्या देवळांत अद्याप आहे, असें ह्यूएन्संग आपल्या प्रवासवृत्तांत म्हणतो.

हा पांडवांच्या कुळांतील होता, असें स्वप्नवासवदत्त नाटकांत म्हटलें आहे. याच्या प्रथम पत्नीचें नांव वासवदत्ता. वासवदत्ता ही अवन्तिराज प्रद्योत याची कन्या होती. वासवदत्ता व उदयन यांच्या वयांत फारसें अंतर नव्हतें. याला मगधदेशचा राजा दर्शक याची बहीण पद्मावती ही दुसरी पत्नी होती. ती वासवदत्तेपेक्षां वयानें थोडी लहान होती. तिचें लग्न दर्शकाच्या कारकीर्दींत झालें. दर्शकाची राजधानी राजगृह दिसते. दर्शकाच्या वेळीं अवंतिदेशचा राजा प्रद्योत होता, अशी माहिती भासाच्या स्वप्नवासवदत्त या नाटकावरून मिळते. पुराणावरून पाहतां हा व त्या-बरोबरचे इतर राजे गौतमबुद्धाच्या समकालीन किंवा दहा-वीस वर्षें पुढें असावेत. तथापि उदयनानें बुद्धधर्म किंवा जैन-धर्म खरोखरच स्वीकारला होता किंवा ग्रंथकारानें आपल्या धर्माला राजाश्रय मिळाला होता हें दाखवून धर्माचा प्रसार करण्याकरितां ही गोष्ट मागाहून रचली, याबद्दल शंका आहे.

हा वीस पादचारी योद्धयांसह हत्ती पकडण्यास गेला असतां कृत्रिम कातडी हत्तींत लपून बसलेल्या लोकांनीं यावर छापा घालून याचे सर्व लोक मारले, ही गोष्ट भासाच्या यौगंधरायण नाटकांत आली आहे. क्षेमेन्द्राच्या बृहत्कथामंजरींत ( लंबक २ अ. २ ) ही कथा आहे. पण एकटाच शिकारीस गेल्याचें तेथें दिलें आहे. कथासरित्सागरांत हीच गोष्ट बरीच विस्तृत दिली आहे. इतरहि दहाबारा काव्यनाटकांत थोड्याफार फरकानें ही कथा आली आहे. याच्या कथा सर्व उज्जयनींत लोकांच्या तोंडीं होत्या, असें मेघदूतांत कालिदासानें म्हटलें आहे.

हा वीतभय येथील राजा होय. याला वैशा-लीच्या चेतक या लिच्छवी राजाची सर्वांत मोठी मुलगी जी प्रभावती ही दिली होती. वीतभय या देशाला जैन वाङ्मयांत सिंधु-सौवीर देश असें म्हटलें आहे. हा बिंबि-सारचा समकालीन होता.

डॉ. श्री. व्यं. केतकरांनीं प्राचीन महाराष्ट्राच्या इति-हासांत याचा काळ स. पूर्व आठवें शतक होय असें ठरविलें आहे. तसेंच कथासरित्सागरांतील याच्या दिग्वि-जयाचें वर्णन ऐतिहासिक आहे, असेंहि ते म्हणतात.

२. हा शबर राजा होता. यास नेलवेली येथें उदयचंद्र पल्लवसेनापति यानें ठार मारलें (स.७३५); (नंदी-वर्मन् पल्लवमल्ल पाहा).

**उदयनाचार्य**—(स.९८४) बऱ्याच बुद्ध तर्कज्ञांनीं वाच-स्पतिमिश्रावर टीकेची झोड उठवली आहे. तेव्हां त्याचें वस्त्रें काढण्यासाठीं ह्यानें 'न्यायवार्तिक-तात्पर्यटीका' या ग्रंथावर 'न्यायवार्तिकतात्पर्यटीकापरिशुद्धि' या नांवाची एक उप-टीका लिहिली. यास उदयकर असेंहि म्हणत असत. हा जातीनें ब्राह्मण असून याचा जन्म मिथिला येथें झाला.

उदयनाचार्यानें इतरहि बरेच ग्रंथ लिहिले आहेतः कुसुमाञ्जलिः, आत्मतत्त्वविवेक, कर्णावली व न्यायपरिशिष्ट अथवा बोधसिद्धि अथवा बोधशुद्धि. यास बुद्धधिक्कार असेंहि म्हणतात.

उदयनआचार्य या नांवानें हा जास्ती प्रसिद्ध होता. यानें 'लक्षणावली' नांवाचा आणखी एक ग्रंथ लिहिला आहे.

हा ग्रंथ शके ९०६ म्हणजे स. ९८४ त लिहिला, असें यानें त्यांत म्हटलें आहे. मिथिलच्या उत्तरेस २० मैलांवर कमला नदीच्या तीरावर वसलेल्या मोनिरोनी या गांवीं याचा जन्म झाला.

यानें वादांत बऱ्याच वेळां बुद्धलोकांस जिंकिलें होतें, परंतु ते याचा जय कबूल करीत नसत. ईश्वराच्या अस्तित्वाविषयीं एक दिवस याच्यांत व बुद्धलोकांत मोठा कडाक्याचा वाद झाला. अनुमानानें यास ईश्वराचें अस्तित्व पटवून देतां न आल्यामुळें एक ब्राह्मण व एक श्रमण ( बुद्ध ) बरोबर घेऊन हा एका टेकडीवर गेला, व तेथून दोघांसहि यानें खालीं फेंकून दिलें. पडतां पडतां ब्राह्मण ओरडला, 'ईश्वराचें अस्तित्व मला मान्य आहे.' श्रमण ओरडला, 'तें मला मान्य नाहीं.' तेव्हां खालीं पडतांच तो बुद्ध गतप्राण झाला. परंतु ब्राह्मणाच्या केसासहि धक्का पोंचला नाहीं. या प्रसंगावरून ईश्वराचें अस्तित्व सिद्ध झालें.

यास अशा रीतीनें जरी विजय मिळाला तरी याजवर खुनी असा आरोप करण्यांत आला. तेव्हां टेकडीवरून खालीं उतरून हा उदयनपुरी येथील जगन्नाथाच्या देवालयाकडे चालता झाला. जगन्नाथासंबंधीं त्या वेळीं अशी प्रसिद्धि होती कीं, तो फक्त पुण्यवानांनाच दिसत असे.

तेथें हा तीन दिवस राहिला तेव्हां जगन्नाथानें याचे स्वप्नांत येऊन यास सांगितलें कीं, 'बनारस येथें तुझ्या पापाचें प्रायश्चित्त म्हणून स्वतःस जाळून घेतल्याखेरीज तुला माझें दर्शन घडणार नाहीं.' तेव्हां उदयनानें बनारस येथें जाऊन आपला देह अग्नीस अर्पण केला. ईश्वराचें अस्तित्व राखण्यासाठीं आपण एवढे श्रम घेतले तरीं जगन्नाथानें आपणावर दया केली नाहीं, हें पाहून यास राग आला. मरतांना यानें पुढील उद्गार काढलेः--

'ऐश्वर्यमदमत्तोऽसि मामवज्ञाय वर्तसे ।
प्रवृत्ते बौद्धसंपाते मदधीना तव स्थितिः ॥'

"बुद्धलोक मातले असतां ज्याच्यावर तुझें अस्तित्व अवलंबून होतें, त्या माझा, आपल्या श्रेष्ठत्वाच्या जोरांत तूं धिक्कार करीत आहेस!" ( हिस्ट्री आफ् इंडियन लॉजिक पा. १४३ ). असें म्हटल्यानंतर याला जगन्नाथानें दर्शन दिलें.

**उदयनाथ**--कवीन्द्राचें नामांतर.

**उदयप्रभसूरि**--'धर्माभ्युदय महाकाव्य' आणि 'आरंभसिद्धि' या संस्कृत ग्रंथांचा कर्ता. वीरधवलाचा ( स. १२४१ ) मंत्री वस्तुपाल यानें याला आश्रय दिला होता.

**उदयभानु**--उदेभान राठोड. स. १६७० त तानाजी मालुसऱ्यानें सिंहगड किल्ल्यावर रात्रींच्या वेळीं अचानक हल्ला केला, तेव्हां उदयभानु हा किल्ल्याच्या संरक्षणार्थ मोगलांकडून नेमलेला अधिकारी होता. या हल्ल्यांत ह्याचा पराभव होऊन त्यांत हा मारला गेला. हा मूळचा रजपूत पण बाटून मुसलमान झाला होता ( जेधे शकावली ). यालाच उदेभान राठोड म्हणतात.

**उदयमती**--ही अनहिलवाडच्या सोलंखींपैकीं पहिल्या भीमदेवाची बायको. हिनें अनहिलवाड्यास 'राणीनी बाव' ( विहीर ) बांधविली (स. १०४५). हिचा पुत्र पहिला कर्ण होय.

**उदयराज परमार**--अबूच्या परमारांपैकीं किराडूच्या शाखेंतील सोच्छराजाचा पुत्र. हा गुजराथच्या सिद्धराज जयसिंहाचा सामंत होता; आणि सिद्धराजाकरितां चोड, गौड, कर्नाटक आणि माळव प्रांतांत लढाईस गेला होता (रा. इ. ).

**उदयवर्मा परमार**--माळव्याच्या परमारांपैकीं महाकुमार. शाखेंतील हरिश्चंद्रवर्म्याचा थोरला पुत्र. याचें वि. सं. १२५६ मधील दानपत्र मिळालें आहे ( राजपुतानेका इतिहास, पा. १९८ ).

**उदयसिंह**--( स. १४६८--७२ ) हा आपला पिता राणा कुंभा यास ठार मारून वि. सं. १५२५ ( स. १४६८ ) मध्यें मेवाडचा राजा झाला. पितृघाती माणसाला हत्यारा असें म्हणतात व त्याचें मुखावलोकन करणें पाप समजतात. वंशावळी लिहिणारांनीं अशा माणसांचीं नांवें वंशावळ देतांना गाळलेलीं आढळतात. याच्याशींहि असाच व्यवहार लोकांनीं केला. राजभक्त लोकांनीं याला टाळण्याचा प्रयत्न केला. यानें राज्यांतील लोक वश होत नाहींत असें पाहून भोंवतालच्या राजांना मुलूख देऊन मैत्री करण्यास सुरवात केली. तेव्हां राज्यांतील लोक अधिक विरुद्ध झाले आणि रावत चूंडाचा पुत्र कांधल याच्या नेतृत्वाखालीं जूट करून उदयसिंहाचा धाकटा भाऊ रायमल यास गादीवर बसविण्याचें ठरविलें. या वेळीं रायमल सासुरवाडीला इडर

येथें होता. त्याला बोलावतांच तो आपल्या सैन्यासह ऋषभदेवाकडून ( केसरियानाथ ) जावर ( योगिनीपुर )च्या जवळ आला. इकडचे सरदारहि आपल्या सैन्यासह त्याला जाऊन मिळाले. जावरजवळ झालेल्या लढाईंत रायमलचा विजय झाला; व तेथें त्याचा अधिकारहि सुरू झाला. पुनः दाडिमपुराजवळ घोर युद्ध झालें. तेथेंहि याचा पराजय झाला व क्षेम नृपति मारला गेला. या लढाईंत याचे हत्ती, घोडे, नगारा व निशाण हें सर्व रायमलच्या हातांत गेलें. याच क्रमानें पावी व पानगड येथील लढायांत विजय मिळवून त्यानें चितोडला वेढा दिला. चितोडलाहि विजय झाला; व उदयसिंह तेथून पळाला व त्यानें कुंभगडचा आश्रय घेतला. तेथून हा पळाला व साऱ्या मेवाडवर रायमलचा अधिकार झाला. ही गोष्ट वि. सं. १५३० मध्यें झाली. शेवटीं आपले दोन पुत्र सैसमल व सुरजमल यांच्यासह आपल्या सासुरवाडीला सोजत येथें जाऊन हा राहिला. नंतर बिकानेरला राहून मांडूच्या सुलतानाकडे गयासशाह ( गयासुद्दीन) खल्जीकडे गेला व तेथून मेवाडचें राज्य मिळविण्याचा प्रयत्न सुरू झाला. शेवटीं त्याला आपली मुलगी देण्यास हा तयार झाला. पण हें बोलणें करून बाहेर पडत असतां वीज पडून हा मृत्यु पावला ( रा. इ. पा. ६३६-३९ ).

२. हा मेवाडचा महाराणा संगाचा पुत्र होय. याच्या आईचें नांव करमेती ( कर्मवती ) होय. विक्रमादित्याला वणवीरानें ठार केल्यानंतर स्वतःच्या पुत्राचा बळी देऊन पन्ना दाईनें याला वांचविलें. पन्ना याला घेऊन देवलियाचा रावत रायसिंहाकडे आली. त्यानें याच्या संरक्षणाची व्यवस्था करून डुंगरपुरला यांना पाठवून दिलें. येथील रावळ आसकरणनें कुंभलमेर येथें पोंचवलें. तेथील किल्लेदार आशा देफरा ( महाजन ) होता. सर्वच लोक वणवीरला भीत होते. शेवटीं आपल्या आईच्या उत्तेजनानें त्यानें आपल्या अन्नदात्याला आश्रय दिला. ही बातमी थोडक्याच दिवसांत सर्वत्र पसरली व वणवीरानेंहि 'खरा उदयसिंह मीं मारला. हा तोतया आहे.' असें जाहीर केलें. पण हा या वेळीं लहान नव्हता, पंधरा वर्षांचा होता. त्यामुळें अनेक सरदार व आजोळचे बुंदीकडील लोक याला चांगले ओळखीत होते. त्यामुळें लवकरच याला मेवाडचा स्वामी मानून सरदारांनीं नजराणे केले. ही गोष्ट वि. सं. १५९४ ( स. १५३७ ) मध्यें झाली. पण हा तोतयापणाचा आरोप निखालस नाहींसा करण्याकरितां सोनगरे अखैराज( रणधीरोत )ची मुलगी याला देण्यांत आली व सर्वांनीं एकत्र जेवण केलें. इतर सरदारांनाहि बोलावण्यांत आलें व सेना एकत्र झाली. वणवीरानें कुंवरसी तंवर याच्या प्रामुख्याखालीं आपली सेना रवाना केली. माहोली( मावली )पाशीं युद्ध होऊन याचा जय झाला. चितोडलाहि वेढा देऊन यानें तो ताब्यांत घेतला व आपल्या पैतृक राज्याचा हा मालक झाला. वणवीर मारला गेला कां पळाला, याचा पत्ता लागला नाहीं.

पुढें याचें झाला अज्जाचा पुत्र जैतसिंह याच्या मुलीशीं लग्न झालें. ती जोधपुरच्या राव मालदेवाची मेव्हणी ( बायकोची धाकटी बहीण ) होती, व तिच्याशीं मालदेवाला लग्न करण्याची इच्छा होती. तेव्हां त्या बाबतींत याच्याशीं त्याचे दोन हात झाले. पण तो पराजित झाला.

नंतर शेरशहा सूरनें अजमेर घेतलें आणि तो चितोडकडे वळला. यानें चितोडच्या किल्ल्या त्याच्याकडे पाठवून दिल्या व शेरशहानें चितोड घेतला, असें तारीखे शेरशाहीमध्यें अब्बासखां सरवानी लिहितो. पण चितोड पुनः याच्याकडे कसा आला, याचा उलगडा होत नाहीं.

बुंदीचा राव सुरताणाबद्दल सरदारांवर अत्याचार करतो म्हणून भारी तक्रारी येत, म्हणून बुंदीचें राज्य यानें हाडा अर्जुनचा पुत्र सुरजन याला दिलें. तो सैन्यासह बुंदीवर जातांच सुरताण रायमल खीचीकडे पळाला ( स. १५५४ ).

शेरशहा सूरचा गुलाम हाजीखां हा एक प्रबळ सेनापति होता. अकबर गादीवर आला तेव्हां हाजीखांचा अकबरवर अधिकार होता. अकबरानें मुहम्मद सरवानी ( नासिरउल्मुल्क ) यास त्यावर पाठविलें. तेव्हां हाजीखां अजमेरला पळाला. राव मालदेवनें त्याला लुटण्याकरितां पृथ्वीराज जैतावतला पाठविलें. हाजीखानें महाराण्याची मदत मागितली. महाराण्यानेंहि राव सुरजन, दुर्गा सिसोदिया, राव जयमल मेडतिये वगैरे लोक पाठविले. पण रजपुतांनीं आपसांत युद्ध खेळून पराक्रमी लोक नाहींसे करणें बरें नाहीं असें ठरवून सर्व परत गेले. पण या मदतीच्या बदला हाजीखांची रखेली रंगराय पातर (वेश्या) महाराण्यानें मागितली. ती देण्याचें नाकारतांच मालदेवाच्या मदतीनें हाजीखानें याच्यावर स्वारी केली व त्यांत अनेक रजपूत योद्धे धारातीर्थीं पडले. हा महाराणाहि त्यांत जखमी झाला.

एकदां हा चितोडहून एकलिंगजीच्या दर्शनाला गेला आणि तेथून आहाडच्या बाजूला शिकारीला गेला. वाटेंत याला बेडच नदी डोंगरांतून पटांगणांत गेलेली आढळली. त्या मैदानांत यानें उदयपुर वसविण्याचें ठरविलें. कारण चितोड पहाडांत आहे. त्यामुळें त्याला शत्रूचा सहज वेढा पडतो; व वेढलें कीं रसद बंद होते. त्यामुळें सध्यांच्या

ठिकाणीं यानें उदयपुर वसविण्यास सुरुवात केली. यांत याची दूरदृष्टि दिसून येते.

यानंतर अकबरानें चितोडवर स्वारी केली. यापूर्वी तीनशें वर्षें मुसलमान हिंदुस्थानांत आले असूनहि शंभर वर्षेपर्यंत एक वंश राज्य करूं शकला नव्हता. याचें कारण प्रबळ रजपूत हयात होते आणि त्यांचें साहाय्य मिळविण्याचा प्रयत्न झाला नव्हता. त्यांच्या साहाय्याशिवाय हिंदुस्थानांत एकछत्री राज्य चालवणें अशक्य आहे, हें लक्षांत घेऊन त्यांना आपल्या बाजूला घेण्याचा त्यानें प्रयत्न केला. अकबरानें प्रथम आंबेरचा राजा भारमल कछवाहे याला आपला सेवक बनवून त्याची प्रतिष्ठा वाढविली, पण रजपुतांतील प्रमुख असणारा चितोडचा राणा याला आपल्या ताब्यांत घेण्याची त्याला आवश्यकता वाटली. याच सुमारास माळव्याचा सुलतान बाजबहाद्दुर अकबराच्या भीतीनें पळाला व चितोडच्या महाराण्याच्या आश्रयाला राहिला. ही संधि साधून अकबरानें चितोडवर स्वारी केली. स्वारीची बातमी याचा पुत्र शक्तिसिंह यानें अगोदरच चितोड येथें पोंचविली होती. बापाशीं विरोध असल्यामुळें तो अकबराकडे गेला होता, पण चितोडवर स्वारी करण्याचें ठरलेलें कळतांच तो तेथून बदनामीला भिऊन रातोरात पळून आला. अकबराच्या स्वारीची बातमी कळतांच सर्व रजपूत एकत्र झाले. महाराण्यानें परिवारासह डोंगरांत जावें, कारण गुजराथशीं लढून आपण कमजोर झालों आहोंत असें ठरविलें. त्याप्रमाणें हा राठोड जयमल व पत्ता सिसोदिया यांना सेनाध्यक्ष नेमून आपण सपरिवार पहाडांत गेला. लढाई जोरांत सुरू झाली. महाराण्याचा पाठलाग होऊनहि महाराण्याचा पत्ता लागला नाहीं. दोही बाजूंनीं तोफांचा उपयोग केला जात होता. सुरुंग पुनःपुन्हां पाण्यासारखा पैसा खर्चून दुसरे तयार केले जात. शेवटीं सुरुंगानें चितोडची भिंत उडविण्यांत आली, पण तेथें तेल, कपडे व कापूस सारखा जाळून कोणालाहि आंत येणें रजपुतांनीं अशक्य केलें. पण शेवटीं अन्नसामग्री संपल्यामुळें स्त्रिया व मुलें यांनीं जोहार करून देह अग्नीला अर्पण केले. आणि दुसऱ्या दिवशीं किल्ल्याचे दरवाजे उघडून प्राणावर उदार होऊन रजपुतांनीं लढण्यास सुरुवात केली. राठोड जयमल पायानें लंगडा झाला असल्यामुळें त्याला घोड्यावर बसतां येत नव्हतें. पण लढण्याची इच्छा तर होती; तेव्हां त्याचा एक कल्ला नांवाचा कुटुंबी त्याला आपल्या खांद्यावर घेऊन निघाला. राठोड जयमल व पत्ता सिसोदिया हे दोघेहि हनुमानपोळ व भैरवपोळच्या मध्यें पराक्रमाची शर्थ करीत असतां कामास आले. त्यांचे घोड्यावर बसलेले दगडी पुतळे अकबर आग्र्यास गेल्यावर तयार करून चितोडच्या दरवाजांत बसविण्यांत आले होते, असें फ्रेंच प्रवासी बर्नियर यानें लिहिल्यावरून दिसतें (बर्नियर्स ट्रॅव्हल्स, पृ. २५६, स्मिथ-संपादित). पण ते औरंगजेबानें फोडून टाकले असें म्हणतात. अनेक योद्धयांबरोबर प्रजाहि मारली गेली. कारण प्रजेनेंहि युद्धांत भाग घेतला होता. आणि अकबरानेंहि यामुळेंच सरसहा कत्तल करण्याचा हुकूम दिला होता. वि. सं. १६२४ चैत्र वद्य १३, ता. २५ मार्च स. १५६८ मध्यें दुपारीं चितोड पूर्णपणें अकबराच्या ताब्यांत आलें. तेथें तीन दिवस राहून अब्दुल मजीद आसफखानाला किल्ल्यावरील अधिकारी नेमला, व अकबर अजमेरकडे निघून गेला.

महाराणा चार महिने डोंगरांत राहून नंतर उदेपूरला आला आणि अर्धवट राहिलेलीं कामें पुरीं केलीं.

चितोड घेतल्यानंतर पुढल्या वर्षी याचा रणथंभोर हा अजिंक्य किल्ला अकबरानें घेतला. आणि मेवाडचें स्वातंत्र्य पूर्णपणें नष्ट झालें.

याचा पौत्र अमरसिंह यावर त्याच्या वेळीं लिहिलेल्या अमरकाव्यांत आणखीहि याच्यासंबंधीं कांहीं पराक्रमाच्या गोष्टी दिल्या आहेत; व यांनीं पराक्रमी लोकांना उत्तेजन दिल्याचेंहि लिहिलें आहे. यानें उदेपूर येथें कांहीं महाल, तलाव, व उदयश्यामचें मंदिर बांधलें. चितोड गेल्यानंतर हा कुंभलगडला राहत असे. कारण उदयपुर पुरें वसलें नव्हतें. हा कुंभलगडावरून गोगूंदा गांवीं आला असतां आजारी पडून फाल्गुन शुद्ध १५ (२८ फेब्रुवारी, स. १५७२) मध्यें मृत्यु पावला. याला वीस बायका व पंचवीस मुलें होतीं. मुलांचीं नांवें—प्रतापसिंह, शक्तिसिंह, वीरमदेव, जैयतासिंह, कान्ह, रायसिंह, शार्दूलसिंह, रुद्रसिंह, जगमाल, सगर, अगर, सीया, पंचायण, नारायणदास, सुरताण लूंवकरण, मणेशदास, चंदा, भावसिंह, नेतासिंह, सिंहा, नगराज, वैरिशाल, मानसिंह, साहिबखान. तसेंच याला वीस मुलीहि होत्या.

याला विशेष कर्तृत्व व दूरदर्शीपणा होता असें दिसत नाहीं. हाजीखां पठाणाशीं रंगराय वेश्येकरितां यानें युद्ध केलें. तसेंच शेवटींहि आपला योग्य वारस असतां आपल्या एका प्रेमपात्र असणाऱ्या भाटयाणीच्या पुत्राला—जगमाळला राज्य देऊन मूर्खपणा केलाच. चितोड स्वतः न लढवतां डोंगरांत लपून बसला. या सर्व गोष्टी याच्या नादानपणाच्या द्योतक आहेत.

यानें जगमाळला राज्याधिकारी केलें होतें तरी सर्व सरदारांच्या संमतीनें राणा प्रताप मेवाडच्या गादीवर आला व जगमाळ अकबराला जाऊन मिळाला (रा.इ.पा.७१४).

**उदयसिंह राठोड**—हा जोधपूरच्या मालदेवाचा मुलगा होय. स. १५८६ मध्यें हा अकबराचे नोकरींत होता, आणि त्याच वर्षी यानें आपली बालमती नांवाची मुलगी जहांगीर यास दिली. बालमतीपासून जहांगीरास शाहजहान नांवाचा पुत्र झाला. अकबरानें याला मोठ्या पदास चढवून जोधपूरची जहागीर दिली. यालाच मोठा राजा असें शरीर अवजड असल्यामुळें म्हणत. स.१५९४ मध्यें लाहोर येथें हा मरण पावला. त्या वेळीं याच्या चार बायकांनीं याच्या चितेंत उड्या टाकिल्या. याच्यानंतर याचा मुलगा सूरजसिंह हा गादीवर आला.

**उदयसौभाग्य**—हा 'ढुण्ढिका' या संस्कृत ग्रंथाचा कर्ता होय. यानें आपला ग्रंथ स. १५३३ मध्यें लिहिला. त्या वेळीं गुजराथेंत बहादूरशहा राज्य करीत होता. याचा ढुण्ढिका हा ग्रंथ हेमचंद्राच्या बृहद्वृत्तीवर आहे ( सिस्टीम ऑफ संस्कृत ग्रामर, पृ. ७८ ).

**उदयाकर**—उत्पलाचा पिता.

**उदयादित्य**—बिट्टिदेवाचें नामान्तर.

२. हा एरयंगचा तिसरा मुलगा. हा बिट्टिदेवाचा भाऊ होय. हा बिट्टिदेवानंतर गादीवर बसला असावा.

३. तिसऱ्या नागवर्म्याचा आश्रयदाता. वनवासीचा राजा ( भुवनैकमल्ल चालुक्य पाहा ).

४. ( स. ११५० सुमार ) कानडी कवि. हा चोळ घराण्यांतील असून याच्या पित्याचें नांव सोमनाथ. हा राजपुत्र दिसतो. यालाहि राज्याभिषेक झाला होता. तथापि मांडलिक असावा.

हा आपणांस उदेग असेंहि म्हणवून घेतो. ग्रंथ–उदयादित्यालंकार. याचा हा ग्रंथ ७२ कवितांचा लहान असला तरी त्यांत जयदेवाच्या चंद्रालोकाप्रमाणें लक्ष्य, लक्षण व उदाहरण हें सर्व एकाच श्लोकानें सांगितलें आहे. या ग्रंथांत काव्यभेद, रीति, रस, काव्यगुण व अलंकार हे विषय याच क्रमानें सांगितले आहेत. याच्या ग्रंथांतील कांहीं भाग दंडीच्या काव्यादर्शाचें भाषांतर आहे ( क. क. च. १, पा. १५९ ).

**उदयादित्य परमार**—माळव्याच्या परमारांपैकीं जयसिंहाचा उत्तराधिकारी. हा राज्यावर आल्यानंतर सांभरच्या तिसऱ्या विग्रहराज ( विसळदेव ) चौहानाच्या साहाय्यानें यानें आपल्या राज्याची स्थिति सुधारली व विग्रहराजानें दिलेल्या घोड्यावर बसून गुजराथच्या भीमदेवाचा मुलगा कर्ण यास जिंकलें (पृथ्वीराजविजय सर्ग ५). ही लढाई भीमदेवाचा सूड घेण्यांकरितां असावी. भोजानें वीर्यराम चौहानाला मारलें होतें. तथापि यानें सांभरच्या चौहानाशीं सख्य केलें असण्याचा संभव आहे. यानें आपल्या नांवानें उदयपुर ( ग्वाल्हेर राज्यांतील ) नगर बसविलें. त्या यपुरांतून परमारांचे पुष्कळ शिलालेख मिळाले आहेत. हाहि विद्यानुरागी होता. भोजाच्या पाठशाळेच्या खांबावर नरवर्म्याचे नागबंधांत संस्कृतांतील वर्ण व नाम आणि धातु यांचे प्रत्यय दिले आहेत. ती योजना याची आहे. त्याबरोबर याच्या नांवाचे श्लोकहि खोदलेले आहेत. असेंच उज्जयनीस महाकालमंदिराच्या मागें व उनगांवीं याच्या नांवाचे श्लोक खोदलेले आहेत.

याला लक्ष्मदेव व नरवर्मा असे दोन पुत्र व श्यामळदेवी नांवाची एक मुलगी होती, असे शिलालेखावरून दिसतें. श्यामळदेवीचें लग्न मेवाडांतील गुहिलवंशी विजयसिंहाशीं झालें होतें.

उदयपुर येथें मिळालेल्या एका शिलालेखांत वि. सं. १११६–शा. श. ९८१ (स. १०५९) मध्यें हा राजा झाला असें म्हटलें आहे ( एपि. इंडि. भा. ५ चें परिशिष्ट १ नं. ६८ व टीप १). हें अशक्य नाहीं, पण याबद्दल संशय आहे. याच्या वेळचे आतांपर्यंत दोन शिलालेख मिळाले आहेत. त्यांपैकीं ग्वाल्हेर राज्यांतील उदयपुर येथें एक वि. सं. ११३७ ( स. १०८० ) मधील व दुसरा झालरापाटण ( राजपुताना ) येथें वि. सं. ११४३ मधील.

भाटांच्या ख्यातामध्यें याचा पुत्र जगदेव याची एक सुंदर कथा आढळते. घरांतील द्वेषामुळें तो गुजराथेंतील ( सिद्धराज ) जयसिंहाकडे गेला व तेथें शौर्य व स्वामिभक्ति यांच्या जोरावर त्यानें जहागीर मिळविली. उदयादित्यानें आपल्या मागें यालाच राज्य दिलें वगैरे. यांत कांहीं भाग कविकल्पनेंतील असला तरी एवढें खरें कीं, या नांवाचा पुरुष माळव्याच्या परमारांत झाला होता हें निश्चित. माळव्याचा परमार राजा अर्जुनवर्मा यानें अमरुशतकावर रसिकसंजीवनी नांवाची टीका लिहिली आहे. त्यांत जगद्देव किंवा जगदेव यासंबंधीं एक श्लोक उद्धृत करून त्याला तो आपला पूर्वज होता असें म्हणतो. बार्नेटनें आपल्या क्रॉनॉलजींत याच्यानंतर लक्ष्मदेव गादीवर आला असें म्हटलें आहे ( पा. १९२ ).

याचा एक शत्रु कर्नाटक राजा होता. यानें बंगालपासून अफगाणिस्थानपर्यंत स्वाऱ्या केल्या होत्या व जय मिळविले होते, असें याच्या जयपूरच्या लेखावरून सिद्ध होतें. हा एक भोजाचा नातलग असावा.

**उदंडिन् अथवा उदंडनाथ**--भवभूतीनंतर विशेष नांव घेण्यासारखें उदण्डिन्‌चें 'मल्लिकामारुत' हें एकच प्रकरण लिहिण्यांत आलें आहे. 'मल्लिकामारुत' या नाटकाच्या कर्त्याचें नांव त्याचा टीकाकार जो रंगनाथदंडी यानें निर्दिष्ट केलें आहे. हा नाटककार व सुप्रसिद्ध साहित्यकार दंडी, हे दोघे एकच होते, असेंहि कांहीं लोक म्हणतात. वास्तविक पाहिलें तर तो कुक्कुटक्रोड येथील झामोरीन मानविक्रम याच्या दरबारीं पंडित होऊन गेला; व त्याच्याच विनंतीवरून प्रस्तुत नाटक लिहिण्यांत आलें होतें.

'मल्लिकामारुत' नाटकाचे दहा अंक आहेत. त्यांत विद्याधर राजाची कन्या मल्लिका हिचा कुंतल राजपुत्र मारुत याच्याशीं विवाह कसा घडून आला, ही कथा वर्णिली आहे. प्रथम सिंहल राजा मल्लिकेस मागणी घालतो व त्यामुळें मारुताचें मन खिन्न होतें. मारुताचा मित्र कलकंठ हाहि आपली प्रियतमा रमयंतिका हिच्या प्राप्तीच्या बाबतींत तसाच खिन्न असतो. अशा स्थितींत या दोघांनाहि आपापल्या प्रियतमेस मदांध हत्तीच्या तडाख्यांतून सोडविण्याचा प्रसंग येतो. या हत्तीच्या झटापटींत कलकंठ हा गतप्राण झाला असें कळतें आणि म्हणून मारुत आत्महत्या करण्यास उद्युक्त होतो. पण ऐन वेळीं कलकंठ प्रकट होऊन तसें करण्यापासून मारुतास परावृत्त करतो. पुढें कांहीं काळानें मल्लिकेस एक राक्षस घेऊन जातो व मारुत तिला त्याच्यापासून सोडवून आणतो; व ज्या अर्थी ती व सिंहल राजा यांचा विवाह होण्याचें घाटत असतें त्या अर्थी मारुत तिला घेऊन पळून जातो. मल्लिकेस फिरून एक राक्षस घेऊन जातो व त्यामुळें मारुतास वेड लागतें. शेवटीं सर्व अडचणी नाहींशा होऊन दोन्हीहि जोडप्यांच्या मनासारखी स्थिति घडून येते, असें दाखविलें आहे.

**उदाजी पवार**—मलठणचा पाटील संभाजी पवार याचा हा मुलगा. संभाजी पवार हा शिवाजीच्या वेळीं मलठण येथें होता. हा सध्यांच्या धारच्या पवारांचा मूळ पुरुष होय. पवार हा परमार शब्दाचा अपभ्रंश आहे.

औरंगजेबाच्या विरुद्ध रजपुतांस मराठ्यांनीं मदत केली, त्या वेळीं स.१६९८ मध्यें यानें माळव्यांत शिरून मांडवगडास तळ दिल्याचा उल्लेख सांपडतो. तेव्हांपासून याचा माळव्याकडे रावता सुरू झाला. स. १७०९ मध्यें यानें मांडवगड काबीज केलें. स. १७१८ सालीं हा बाळाजी विश्वनाथाबरोबर दिल्लीस गेला होता.

हा बाजीरावाचा लहानपणापासून मित्र होता. स. १७२४ मध्यें यानें आपलें ठाणें धार येथें बसविलें. पुढें हा बाजीरावास डोईजड झाला.

हे थोरले बाजीराव बल्लाळ पेशवे यांचे दिवाण म्हणून काम करीत होते, असें स. १७२८।२९ चे कांहीं कागदपत्र छापले आहेत त्यांवरून ठरतें (धारसंस्थानचा इतिहास २, पा. ३०). प्रथम हे माळव्यांत आले, आणि मराठ्यांचा अंमल माळवा व त्याच्याहि पलीकडे पोंचविण्याचा धाडसी उद्योग यांनींच यशस्वी केला. सोरठ, काठेवाड, बागड, बुंदीकोट व बुंदेलखंड हे प्रांतहि यांनीं जिंकले असून तेथील चौथाई-सरदेशमुखीचा अंमल होण्याविषयीं लिहिलेलीं ताकीदपत्रें उपलब्ध आहेत. त्यावरून स. १७२८।२९ च्या सुमारास उत्तरेकडील राजकारणांत यांचें केवढें स्थान होतें हें चांगलें ध्यानांत येतें. एवढा पसारा आवरण्यास कठीण म्हणूनच स. १७२८ च्या मे महिन्याच्या पूर्वी मल्हाररावांची व यांची उत्तरेकडे नेमणूक झाली.

माळवा व गुजराथ या ठिकाणीं मराठ्यांचा जम बसविणारा मुख्य इसम उदाजीच होय, असें स. १७२६ मध्यें शाहूनें ठरवून दिलेल्या सहा कलमी तहावरून दिसून येतें. १७२८ मध्यें बाजीरावाचें व याचें बांकडें आलें व याला कैद करण्यांत आलें. पुढें कैदेंतून सुटल्यावर यानें मांडवगड काबीज केलें.

डभईच्या लढाईंत हा बाजीरावाच्या विरुद्ध म्हणजे दाभाड्याकडून हजर होता.

पुढें मांडवघाटावरील तिरलाच्या लढाईत यानें विशेष पराक्रम गाजवला (ता.१२–१०–१७३१).

वढवाणीचा ठाकूर अनूपसिंग मराठ्यांस सामील झाला होता. त्याच्या मुलखास उपद्रव देऊं नये, असें आज्ञापत्र शाहूनें स. १७३५ मध्यें यास व मल्हारराव होळकर यास काढलें होतें (शा. रो. २०२ व २४१).

बाजीरावानें याला माळवा व गुजराथचा अर्धा मोकासा दिला. त्या सनदेंत 'आमची सर्व इमारत तुम्हावरच आहे. येविसी आपलें समाधान असो देणें.' असें शब्द आहेत (मं. ८.१–२, पा. ३८–३९).

स. १७३६ मध्यें सिद्दीवरील मोहिमेस जाण्याकरितां शाहूमहाराजांनीं यास बोलावलें आहे.

सिद्दी अंबर अफवानी याच्याशीं लढाई करून त्याला रायगडाखालीं वाडीपाचाड येथें (ब्रह्मेंद्रस्वामींचें चरित्र, लेखांक २७८) यानें ठार मारलें व गोवळकोंड्यास वेढा दिला (स. १७३६ आक्टोबर). यानंतर याचा भाऊ आनंदराव पवार धारचा अधिकारी झाला (स. १७३६).

हे फार शूर असल्यानें ' जिधर उदा उधर खुदा ' अशी म्हण तिकडे होती. मुद्रा–' श्रीशिवचरणीं दृढभाव। संभाजीसुत उदाजी पवारराव।'. याचा मृत्यु मलठण येथें झाला. स. १७६० ( ? ).

**उदाजी पडवळ**—संभाजी-पुत्र शिवाजीच्या वेळीं सागरगड बंदरावरचा अधिकारी होता ( राजवाडे प्रस्तावना–१५४ ).

**उदाराम**—हा खानखनान, जाधवराव यांचेबरोबर शहाजहानला मिळाला, परंतु राजपुतान्यांतील दोन्हीहि स्वाऱ्यांत यश न आल्यामुळें त्यांनीं शहाजानचा पक्ष सोडून बादशहाची नोकरी पत्करिली. यामुळें शहाजानास बादशहाची क्षमा मागावी लागली.

उद्धवराव, जगजीवनराव, रायबागन वगैरेंच्या घराण्यास राजे उदाराम अशी शहाजहाननें पदवी दिली होती ( मु. रि. भाग २ रा, पृ. १८१ ).

**उदेपुरी गोसावी**—उदेपुरी गोसावी हा साताऱ्याच्या बनसीगीर गोसाव्याचा चेला होता. ह्या मठाचे महंत फार श्रीमंत असून सर्व मराठी संस्थानांत सावकारी करीत. त्याचप्रमाणें उदेपुरी हा नागपुरास आला. सावकारी करतां करतां हा वकिली करूं लागला, व पुढें कलकत्तेकर इंग्रज व भोंसले यांचेमध्यें सर्व महत्त्वाच्या उलाढाली याचे मार्फत होऊं लागल्या.

लॉर्ड क्लाइव्हनें चौथाईच्या रकमेचा निकाल करण्यासाठीं मीर झैनुल आबिदीन नांवाचा आपला वकील नागपुरास जानोजीकडे पाठविली. तेव्हां जानोजीनेंहि उदेपुरी गोसाव्यास आपला वकील म्हणून कलकत्त्यास पाठविलें.

चौथाईच्या प्रश्नाबद्दल व ओरिसाच्या प्रश्नाबद्दल, जानोजीनें सर्व हवाला उदेपुरीवर दिला.

फेब्रु.स.१७६८ मध्यें गव्हर्नरानें जानोजीस कळविलें कीं, ओरिसाप्रांत तुम्हीं खालीं करून आम्हांस द्याल तरच आम्ही चौथाईची रक्कम देऊं, नाहीं तर देणार नाहीं. जानोजीस अर्थातच हें कबूल झालें नाहीं. त्यानें आपल्या नाखुलीचें पत्र गव्हर्नरास पाठवून ' आम्ही आतां बंगाल्यांत लष्कर पाठवूं ' अशी धमकी दिली; व उदेपुरी गोसावी यास परत बोलावून दुसरा वकील लाला आनंदरूप नांवाचा पाठविला.

उदेपुरीचा मुलगा गणेश संभाजीकडे कटक येथें होता.

उदेपुरीस दोन चेले असून त्यांस तो पुत्रांप्रमाणें वागवीत असे. त्यांपैकीं एका मुलाची एक राख ठेवलेली होती. एकदां रात्रीं तो तिच्या घरीं गेला असतां ती त्यास मरून पडलेली सांपडली. त्यावरून त्या मुलावरच खुनाचा आरोप ठेवून त्यास पकडण्यासाठीं मुधोजीनें शिपाई पाठविले. त्या गर्दीत ते दोघेहि मुलगे मारले गेले. त्यांतच उदेपुरीसहि धाक दाखवून राजाचे पन्नास लाखांचे रोखे उदेपुरीकडून जबरदस्तीनें काढून घेतले. तेव्हांपासून उदेपुरी अगदीं गरीब झाला व नागपुरास निघून गेला ( ना. प्रां. इ. ).

उदेपुरी हा रांडा ठेवतो, अशा तक्रारी नागपुराहून त्याचा गुरु बनसीराम याकडे साताऱ्यास गेल्या होत्या ( मंडळांतील अ. प्र. पत्रें नं. ६८४१–६८७५–६८७८ ).

**उदेपुरी बेगम**—औरंगजेब बादशहाची एक बायको. कोणी म्हणतात कीं, ती रजपूत असून उदेपूरच्या शिसोदिया घराण्यांतील होती. औरंगजेबाचा समकालीन प्रसिद्ध व्हेनेशियन प्रवासी मनुची हा सांगतो कीं, ही दाराच्या जनानखान्यांतील एक जॉर्जियन बटीक असून त्याच्या वधानंतर औरंगजेबाची रखेली होऊन राहिली ( आयर्व्हिन, स्टोरिया डो मोगोर १, ३६१, २, १०७ ).

औरंगजेबाची हिच्यावर फार मर्जी असे. हिला मद्यप्राशनाची मोकळीक दिली होती. औरंगजेबाच्या मृत्युसमयीं उदेपुरी सारखी त्याच्या उशाशीं रडत बसली होती. एकदां उदेपूरच्या राजाशीं युद्ध चालू असतां रजपुतांनीं हिला पळवून नेली होती, परंतु लवकरच परत आणून दिली.

औरंगजेबाच्या मृत्युसमयीं हिनें स्वतःला जाळून घेण्याची इच्छा दर्शविली. त्यावरून टॉड कल्पना करितो कीं, ही रजपूत असावी ( ॲनल्स ऑफ मेवार, प्र. १३ टीप ).

पण मुसलमान झालेल्या रजपूत स्त्रियांना मुसलमानी धर्माप्रमाणें मूठमाती देत, जाळीत नसत. तेव्हां ती जाळून घेणार होती ह्यावरून ती रजपूत ठरत नाहीं ( सरकार, हिस्टरी ऑफ औरंगजेब १, प्र. ४ ). हिच्यापासून औरंगजेबास कामबक्ष नांवाचा मुलगा झाला (७ मार्च १६६७). त्याच्यावर औरंगजेबाचें फार प्रेम होतें. ही जून स. १७०७ मध्यें ग्वाल्हेर येथें मृत्यु पावली.

**उद्गीथाचार्य**—यानें ऋग्वेदावर भाष्य लिहिलें. त्यापैकीं कांहीं उपलब्ध आहे.

**उद्धव गोसावी**—स. ( १६०४-१६९३. ) श्रीसमर्थ रामदासस्वामींचे पहिले शिष्य. यांजविषयींची हकीकत अशीः टाकळी येथें रामदासस्वामी त्रयोदशाक्षरी मंत्राचें पुरश्चरण करीत असत. ते एकदां असेच गंगातीरीं बसले असतां शेजारच्या दशकपंचक गांवांतील सदाशिवपंत दशपुत्रे नांवाचा पुरुष निवर्तला व त्याचें दहन करण्यास सर्व मंडळी

नदीतीरीं आली होती. मृताची पत्नी उमाबाईहि सहगमनाच्या इच्छेनें तेथें आली होती. तिचें लक्ष रामदासस्वामींकडे गेलें व त्यांना तिनें नमस्कार केला. समर्थांनीं 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' म्हणून आशीर्वाद दिला. बाईस आश्चर्य वाटलें व ती तशीच उभी राहिली. तेव्हां समर्थांनीं कारण विचारतांच तिनें सांगितलें, "महाराज, आपण म्हणतां तें सत्य होवो, पण माझा पति तर कालच मृत झालेला आहे व मी आज सहगमनासाठीं आलें आहें." त्यावर समर्थ उठले व त्या जागीं जाऊन प्रेतावरून त्यांनीं हात फिरविला व जे पळत सुटले ते दिसेनासे झाले. इकडे सदाशिवपंत खडखडीत जागा झाला. सदाशिवपंताची इच्छा कीं ज्यांनीं मला देहदान दिलें त्यांस मला भेटवा. त्याप्रमाणें त्यास दुसरे दिवशीं समर्थ भेटले. भेटींत, पहिला मुलगा समर्थांना देण्याचे ठरलें. तोच हा उद्धव होय. उद्धव मोठा झाल्यावर तो टाकळीसच राहूं लागला. तेथें समर्थांनीं यास मठ बांधून दिला (रामदासच.).

**उद्धव चिद्धन**—यांपैकीं उद्धव हें याचें व चिद्धन हें गुरूचें नांव होय. पण अशा जोड नांवानें याची प्रसिद्धी आहे. याचें उपनांव कोकिळ. हा मोगलाईत आंबेजोगाईजवळ असणाऱ्या धारूरचा राहणारा. हा चैतन्यसांप्रदायांतील एका परंपरेंत येतो. म्हणजे तुकाराम महाराज व हा हे एकाच चैतन्यसांप्रदायांतील होत. खालीलप्रमाणें याची गुरुपरंपरा आहेः




या परंपरेपैकीं अनेक पुरुषांनीं मराठींत ग्रंथरचना केली आहे. यांपैकीं याचा गुरुबंधु राघवस्वामी यानें शके १६११ मध्यें संदेहहरण नांवाचा ओवीबद्ध ग्रंथ तयार केला आहे. या ग्रंथाच्या समाप्तीनंतर उद्धवास चिद्धनाचा अनुग्रह झाला असें याच परंपरेंतल्या माधवदास कवीनें आपल्या 'अलक्षविधान' ग्रंथांत सांगितलें आहे. म्हणजे शके १६११ नंतर यास गुरूपदेश झाला असें होतें. माधवदासानें याच्या कीर्तनाच्या लौकिकाचेंहि वर्णन केलें आहे. राजवाडे यांनीं ग्रंथमालेंत निश्चित केलेला कालहि या कालाशीं जमतो.

याची उपलब्ध सर्व कविता काव्यसंग्रहांत छापली आहे. याची छापलेली कविता विविध वृत्तांत आहे. याचें अनुभवशतक अनेक वृत्तांत रचलेलें आहे. गीतार्थमंजरी सवाईवृत्तांत आहे. याचा शुकरंभासंवाद दिंडीवृत्तांत आहे. नागनाथ व त्याचे शिष्य, हेगराज, बहिरंभट, बहिरापिसा यांचीं चरित्रें, तसेंच मृत्युंजय, गोराकुंभार हीं यानें दिंडीवृत्तांत गायिलीं आहेत. यानें श्रियाळचरित्र गाइलेलें आहे. पण याच्या 'भक्तकथामृतसार' या ग्रंथावरून याचें नांव प्रसिद्ध आहे. पण हा ग्रंथ अद्यापि उपलब्ध नाहीं. मात्र असा स्वतंत्र चरित्रात्मक ग्रंथ असतां, वर सांगितलेलीं सुटीं चरित्रें कवीनें पुनः लिहिलीं याचें कारण भक्ति हेंच दिसतें. याची समाधि पंढरपुरास असून मठ श्रीक्षेत्र काशी येथें आहे (मं. तृतीय सं. १८३७, पा. ११०-१११). यानें त्रिलोचनचरित्र हिंदीमध्यें लिहिलें आहे तें भा. इ. सं. मंडळाच्या शके १८३८ च्या अहवालांत प्रसिद्ध झालें आहे (पा. ११९-१२२). याचें रामदासचरित्रहि प्रसिद्ध आहे. यानें केलेल्या ग्रंथांची एक मोठी यादी सं. सूचीकारांनीं दिलेली आहे.

याची कविता अगदीं साधी परंतु भक्तिरसपूर्ण आहे. भाषा अत्यंत सुलभ असून, तींत परकीय भाषेंतले शब्द फारसे आढळत नाहींत. कवीचा कटाक्ष केवळ अर्थबोधाकडेच विशेष असल्यामुळें, एका प्रेमळ सत्पुरुषाचे उद्गार या दृष्टीनें पाहिल्यास कवि म्हणूनहि याची योग्यता मोठी आहे (महाराष्ट्र कविचरित्र, भाग ३, पृ. ११९-१२०).

**उद्धव (चैतन्य)**—उद्धव चिद्धनाचें नामांतर.

**उद्धव मल्हार**—मल्हार त्रिंबक काशीस गेल्यावर हा वयांत आला आणि व्यवहाराकरितां सुरजी अंजनगांवाहून व्याडी मांडव्यास येऊन राहिला. याचा मुलगा उद्धवसुत यानें समर्थांचें ओंवीबद्ध चरित्र लिहिलें. हे पितापुत्र केशवाचे अनुग्रहित होते.

**२.** (उद्बोधनाथ पाहा).

**उद्धव मुल्हेरकर**—हा रामानुजसांप्रदायी कृष्णोपासक होता. मुल्हेर येथें याचें संस्थान आहे. याचा काल स. १५४०-१६००. याचे गुरु काशिराज. याचे ग्रंथः–उद्धवबोध, बोधरहस्य, संतमाळ, स्वरूपानुभव, पदें व अभंग (सं. सू.).

**उद्धव योगदेव**—स. १६९० मध्यें औरंगजेबानें येसूबाई व शाहू यांना रायगडावरून पकडून नेलें तेव्हां हा त्यांच्याबरोबर होता. शाहू कैदेंत असतां त्याचा राजकीय कारभार हाच पाही ( म. रि. म. वि. ३, पृ. ३०१). याला राजाज्ञा अशी त्या वेळीं पदवी होती.

**उद्धवराव**—( स. १५९२-१६३२ ) हा 'उदाराम' घराण्याचा मूळ पुरुष होय. याचे वडिलांचें नांव 'रामाजीपंत' असें होतें. हा मूळचा वाशीमचा राहणारा. ऋ. दे. ब्रा. हा त्या वेळच्या रीतीप्रमाणें संस्कृत, फार्सी, अरबी वगैरे विद्येंत तरबेज होता. गरीबीमुळें व अंगच्या तरतरीमुळें हा दिल्लीस गेला. तेथें याच्या मामामार्फत याचा सरकारी कामांत प्रवेश होऊन, याची हुशारी अकबराचे ध्यानांत येऊन त्यानें यास वाढवीत वाढवीत अखेरीस पांच हजारांची मनसब दिली. लष्करी कामांतहि यानें फार बहादुरी दाखविली. त्यावरून अकबरानें वाशीम व माहूर हे दोन जिल्हे याचे ताब्यांत दिले व यास दक्षिणेंत पाठविलें. शहाजहानाचे वेळींहि यास वरील दोन्ही जिल्ह्यांतील देशमुखी वतन व कांहीं जहागिर मिळाली. यानें मोगल बादशहाची एकंदर ४० वर्षें नोकरी केली. याला एक मुलगा असून त्याचें नांव जगजीवनराव असें होतें. उद्धवरावाची सून म्हणजे जगजीवनरावाची बायको फार शूर होती. ( रायबागीण पाहा ).

याला अकबरानें ५२ महालांची देशमुखी व ५०० ची मनसब देऊन वाढविलें ( अनंतकविकृत भक्तरहस्य, शारदाश्रम हस्तलिखित ).

याला शहाजहाननें राजे उदाराम असा वंशपरंपरेनें किताब दिला होता.

स. १६३२ मध्यें आपल्या वयाच्या ६६ व्या वर्षी मरण पावला ( मं. त्रै. व. २·१ तें ४ ले. ४ ).

वरील आधार-पुस्तकांत 'रायबागन' उद्धवरावाची बायको होती असें म्हटलें आहे तें चूक आहे. ती याची बायको नसून त्याच्या मुलाची बायको म्हणजे याची सून होती ( मं. त्रै. व. ४, अं. १-४, पृ. ४९–५०).

शहाजहाननें जहांगीरविरुद्ध बंड केलें ( सं. १६२१–२२ ) तेव्हां याची त्याला मदत होती. जहांगीराविरुद्ध यानें आपल्या माहूरच्या किल्ल्यांत शहाजहानला आश्रय दिला होता. तेव्हां शहाजहान, मुमताजमहाल, पुत्र दारा, सुजा, औरंगजेब यांसह होता. हा भातोडीच्या लढाईंत मोंगलांतर्फे लढत होता ( स. १६२४ ).

**उद्धवसुत**--याच्या पित्याचें नांव उद्धव. उद्धवाचा पिता मल्हार आणि मल्हार त्रिंबकाचा पुत्र. हा वऱ्हाडांतील सुरजी अंजनगांवचा राहणारा. गोत्र अगस्ति, कुलदैवत मल्हारीमार्तंड व तुळजापुरवासिनी. उद्धव व उद्धवसुत यांना केशवानें अनुग्रह दिला होता. यांनीं समर्थांचें ओंवीबद्ध चरित्र लिहिलें आहे. या चरित्रांत समर्थसंस्थानावर गंगाधरस्वामींची स्थापना होईपर्यंतचा कथाभाग आला आहे. यावरून हें चरित्र शके १६३२ नंतर पण १७०० चे आंत रचलें असावेंसें दिसतें. यांत शकमिति नाहीं व सर्व माहिती ऐकीव असावी, असें अन्तःप्रमाणावरून वाटतें.

**उद्बोधनाथ**—एक मराठी कवि. राशिनगांव. यजुर्वेदी वाजसनेयी ब्राह्मण. मूळ समग्र नांव उद्धव मल्हार ठिपसे. पुढें उद्बोध असें नांव घेतलें. शिष्य—केसरी शिवदिन. यांचीं पदें आहेत ( सं. सू. ).

**उद्भटभट्ट**—हा काश्मिरी पंडित महाराज जयापीडाचा आश्रित होता. जयापीडाच्या दरबारांतील पंडितांचा हा सभापति होता. याचें दररोजचें वेतन एक लक्ष दीनार होतें असें राजतरङ्गिणींत वर्णन आढळतें ( स. ४ श्लो. ४९५). महाराज जयादित्य स. ७७९ पर्यंत राज्य करीत होते. जयापीडाच्या दुर्वर्तनामुळें शेवटीं त्याचा ब्राह्मणांनीं त्याग केला होता. त्यावरून हा प्रारंभीं त्याच्याजवळ असावा. म्हणजे स. ८०० च्या सुमाराचा होय. ध्वन्यालोककार आनंदवर्धनाचार्यांनीं याचा वारंवार उल्लेख केला आहे. पण यांनीं त्याच्या ध्वनिमताचा चांगलासा उल्लेख केलेला नाहीं. यावरून वरील कालाला दुजोरा मिळतो. यांनीं तीन ग्रंथ केले. १ भामहविवरण, २ कुमारसंभवकाव्य, ३ अलंकारसारसंग्रह. याशिवाय भारताच्या नाट्यशास्त्रावर यानें टीका लिहिली होती असें संगीतरत्नाकरांतील 'व्याख्यातारो भारतीये लोल्लटोद्भटशंकुकाः' या वाक्यावरून दिसतें. याच्या काव्यालंकारसारसंग्रह ग्रंथावर कोंकणांतील इन्दुराज किंवा प्रतिहारेन्दुराज यानें टीका लिहिली आहे. यानें उद्भटालंकार नांवाचाहि एक ग्रंथ केलेला दिसतो. (काणेकृत साहित्यशास्त्राचा इतिहास, पा. १८९).

**उद्योतकर**--ह्यानें न्यायसूत्रावर 'न्यायवार्तिक' नांवाची एक टीका लिहिली आहे.

सुबंधूनें आपल्या वासवदत्तेमध्यें उद्योतकराचा निर्देश केला आहे ( न्यायस्थितिमिवोद्योतकरस्वरूपां बौद्धसंगतिमिवालङ्कारभूषिताम्...वासवदत्तां ददर्श पृ० २३५ Hall's ed. )

उलट बाणानें आपल्या 'हर्षचरितां'त वासवदत्तेचा सर्वोत्कृष्ट काव्य म्हणून उल्लेख केला आहे ( उच्छ्वास १ ). हर्षचरितावरून बाण हा राजा हर्ष अथवा हर्षवर्धन याचे दरबारीं होता, असें दिसून येतें. ग्रंथांत स्वतःचा उल्लेख करतांना योजलेल्या विशिष्ट पद्धतीवरून बाण स्वतः अगदीं तरुण असावा व त्याचा आश्रयदाता हा वयानें व अनुभवानें मोठा असावा, असें दिसून येतें. चिनी यात्रेकरू हुएन्संग हिंदुस्थानांत आला असतां हर्षवर्धन ठाणेश्वर येथें राज्य करीत होता ( स. ६२९-६४४). ह्यावरून असें दिसतें कीं, बाण हा स. ६३५ च्या सुमारास होऊन गेला असावा व हीच, उद्योतकराची शेवटची कालमर्यादा ठरवतां येईल.

'न्यायवार्तिक' या आपल्या ग्रंथांत उद्योतकरानें 'वादविधि' नांवाच्या एका तर्कशास्त्रावरील ग्रंथाचा उल्लेख केला आहे. वादविधि हे धर्मकीर्तीच्या वादन्यायाचेंच दुसरें नांव असावें ( न्यायवार्तिक 1-33 pp. 121 A. S. B. ) उलटपक्षीं धर्मकीर्तीनें आपल्या न्यायबिंदूंत एका शास्त्राचा व शास्त्रकाराचा उल्लेख केला आहे. तें शास्त्र म्हणजे 'न्यायवार्त्तिक' व शास्त्रकार म्हणजे उद्योतकर असावा, असें दिसतें. तेव्हां असें सिद्ध होतें कीं, धर्मकीर्ति व उद्योतकर हे दोघेहि समकालीन होते; व ते स. ६३५ च्या सुमारास होऊन गेले.

उद्योतकरास भारद्वाज हें नांव त्याचा जन्म भारद्वाज गोत्रांत झाला असल्यामुळें पुढें मिळालें ( इति श्रीपरमर्षि भारद्वाजपाशुपताचार्य श्रीमदुद्योतकरकृतौ न्यायवार्त्तिके प्रथमोध्यायः। ).

हा पाशुपत शैव पंथाचा आचार्य असल्याकारणानें यास पाशुपताचार्य असेंहि म्हणत असत.

याचा जन्म कोठें झाला हें नक्की माहित नाहीं. ठाणेश्वरापासून ४० मैलांवर यमुनानदीच्या पूर्व भागावर वसलेल्या स्रुघ्न या गांवाचाच फक्त त्याच्या ग्रंथांत उल्लेख आलेला आहे ( एष पन्थाः स्रुघ्नं गच्छति । न्यायवार्त्तिक १-३३ ). ठाणेश्वराहून स्रुघ्नें येथें जाण्यास एक मोठा रस्ता आहे. सतीशचंद्र विद्याभूषणांच्या मतें 'न्यायवार्त्तिक' लिहितांना उद्योतकर ठाणेश्वर येथें राहत होता. ठाणेश्वर येथील राजदरबारीं कधींकाळीं यास राजाश्रय असण्याचा संभव आहे.

दिङ्नाग, नागार्जुन व आपणापूर्वीं होऊन गेलेल्या इतर बुद्ध तर्कज्ञांचीं मतें हाणून पाडणें हाच न्यायवार्त्तिक लिहितांना उद्योतकराचा उद्देश होता. ही गोष्ट न्यायवार्तिकेच्या सुरुवातीच्या ओळींवरूहि दिसून येतें. दिङ्नागाचा यानें आपल्या ग्रंथांत 'भदंत' असा उल्लेख केला आहे. तसेंच यानें नागार्जुन व वसुबंधु यांच्यावरहि टीका केली आहे (हिस्ट्री ऑफ इंडियन लॉजिक पा. १२३-१२७).

**उद्योतकेसरी**—ओरिसाच्या केसरी घराण्यांतील एक राजा. याचे दोन लेख मिळाले आहेत. एक खंडागिरीच्या टेकड्यांतील व दुसरी ब्रह्मेश्वराच्या देवळांतील.

**उद्योतन**—हल्लीं अस्तित्वांत असलेल्या ८४ गच्छांची उत्पत्ति याचेपासूनच झाली. याचा ऋषभाची पूजा करण्याचा मानस होता. आपले मनोरथ पूर्ण करण्यासाठीं हा मालवक देशाहून शत्रुंजयाकडे जावयास निघाला, पण यात्रा पुरी झाली नाहीं तोंच वाटेंत यास मृत्यूनें गांठलें.

**उद्योतनसूरि**—जैनांच्या कथासाहित्य या ग्रंथांतील कांहीं भागांचा कर्ता. कथासाहित्य हा ग्रंथ स. ७७९ मध्यें पूर्ण झाला ( जिनविजय, S. S. V. 26 p. 180). यानें हरिगुप्त या जैन आचार्याचा पुष्कळ ठिकाणीं निर्देश केला आहे.

**उधलिमा**—यालाच उधरिपा असेंहि म्हणतात. हा जातीनें वैश्य होता. हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं एकाहत्तरावा सिद्ध होय. हा देवीकोट येथील राहणारा होता. हा कर्परिपा याचा शिष्य होय.

**उन्मत्तावंति उत्पल** (स. ९३७-३९)—हा काश्मीर येथील उत्पल घराण्यांतील शेवटचा राजा होय. पार्थ राजाचा पुत्र. यानें आपल्या प्रजेवर भयंकर जुलूम केला. उत्पल घराण्यांत हा जुलमी राजा म्हणून प्रसिद्ध आहे. स. ९३७ मध्यें आपल्या बापानंतर गादीवर आला. याची प्रजेशीं अन्यायाची वर्तणूक होती. हा स. ९३९ मध्यें मरण पावला ( स्मिथ पृ. ३८९ ).

**उपकोशा**—वररुचिनामक कवीची स्त्री. ही मोठी कवयित्री होती ( ग्यारे. इं. को. ).

**उपगुप्त**—हा अशोकाचा गुरु. याचा बाप गुप्त असून याचा जन्म बनारस अगर मथुरा येथें झाला असावा. बहुतेक याचें वास्तव्य मथुरा येथें असे. त्या ठिकाणीं यानें आपल्या पंथाचा एक मठ बांधिला ( स्मिथ पृ. १९९ ).

**उपगुप्ता**—ही माळव्याच्या गुप्त घराण्यापैकीं हर्षगुप्ताची मुलगी व ईश्वरवर्मन् मौखरीची पत्नी.

**उपनिषद्ब्रह्म**—संक्षेपशारिरकाचा टीकाकार.

**उपयादत्त होयसळ**—हा होयसळापैकीं एरेयंगचा पुत्र ( मृत्यु स. ११२२ ).

**उपवर्ष**—पाणिनी वगैरे याचे शिष्य, असें कथासारसागरांत लिहिलें आहे.

**उपसेन**—याला अश्वजित् असेंहि म्हणत. बुद्धदेवानें सारनाथ येथें याला प्रथम उपदेश केला. सारिपुत्र व मौद्गलायन यांनींहि याच्या सांगण्यावरून बुद्धदेवाकडे जाऊन दीक्षा घेतली.

**उपसेन वंगंतपुत्त**—हा सारिपुत्ताचा धाकटा भाऊ. सारिपुत्ताला जसें आईच्या नांवावरून सारिपुत्त म्हणत तसें याला बापाच्या नांवावरून वंगंतपुत्त म्हणत. तरुणपणीं वेदाभ्यास झाल्यावर हा भिक्षु झाला. उपसंपदेनंतर एकाच वर्षानें संघाची अभिवृद्धि करण्याच्या हेतूनें दुसऱ्या एका तरुणाला प्रव्रज्या दिली. पण ही गोष्ट गौतमाला कळतांच त्यानें या गोष्टीचा निषेध केला व 'भिक्षु होऊन दहा वर्षें झाल्याशिवाय आपल्या हाताखालीं दुसऱ्याला उपसंपदा देऊं नये' असा नियम केला. (महावग्ग, ओल्डेनबर्ग एडिशन, पृ. ५९). याचा परिणाम याच्यावर चांगलाच झाला. यानें पुढें दहा वर्षें व्रतपूर्वक घालवून अनेक शिष्य केले व सर्वांना साधें व नियमानें वागण्याचें उत्तम वळण घालून दिलें. यामुळें गौतमालाहि हा अत्यंत प्रिय झाला. सलायतन-संयुत्ताच्या दुसऱ्या पण्णासकाच्या दुसऱ्या वग्गाच्या सातव्या सुत्तांत याच्या अंतकाळची गोष्ट आली आहे. याला सर्पदंश झाला असतांहि हा बिलकुल विचलित न होतां यानें अत्यंत शान्तपणें देह ठेवल्याचें तेथें वर्णन आहे. म्हणून प्रसाद उत्पन्न करणाऱ्या भिक्षूंत याला अग्रस्थान मिळालें आहे (बौ. सं. प., पा. १९०).

**उपाध्ये**—(मनभट पाहा).

**उपानहपा**—(पनहपा पाहा).

**उपालि**—हा कपिलवस्तु येथें राहणारा एक न्हावी होता. हा अनिरुद्ध वगैरे राजपुत्रांबरोबर बुद्धदेवाकडे गेला. बुद्धदेवानें याला सर्वांआधीं प्रव्रज्या दिली, व आपला शिष्य केला. महात्मा बुद्धदेव निर्वाणाला गेल्यावर हा विनयपिटकाचा पहिला प्रवक्ता आचार्य झाला. बुद्धदेवानें याला प्रव्रज्या दिल्यावर राजकुमारांना मोठेपणाचा गर्व नाहींसा व्हावा म्हणून याला नमस्कार करण्याची आज्ञा दिली होती.

पहिल्या सभेंत महाकाश्यपानें ह्यालाच विचारून विनयाचा संग्रह केला, असें विनयअट्ठकथेंत म्हटलें आहे (बौ. सं. प. पा. २००).

**उपेन्द्र परमार**—(कृष्णराज परमार पाहा).

**उपेन्द्रभान**—ओरिसा प्रांतांतील गमसर संस्थानचा राजा. यानें शब्दमाला व गीताभिमान असे दोन कोश केले (स. १५००).

**उमर खय्याम**—एक सुप्रसिद्ध फार्सी कवि. याचें पूर्ण नांव घियासुद्दीन अबुल्फतह उमर बिन इब्राहिम अल्खय्यामी. हा इराण देशांतील खुरासान प्रान्तांतील निशापूरचा राहणारा. खुरासान या शब्दाचा अर्थ 'सूर्याचा प्रदेश' असा आहे. सृष्टिसौंदर्याबद्दल या देशाची प्रसिद्धी असून हा कविहि सौंदर्याचा उपासक म्हणून प्रसिद्ध आहे. निशापूर येथें याचा जन्म अकराव्या शतकाच्या पूर्वार्धांत झाला. याच्या वेळीं खुरासान प्रान्तावर सल्जुक वंशांतील शेवटचा प्रतापी सुलतान मलिकशाह याचें राज्य असून आक्सस नदीपासून भूमध्यसमुद्रापर्यंत त्याची सार्वभौमसत्ता पसरलेली होती. यानें आपल्या एका रुबाईंत या शहाचें पुढील वर्णन केलें आहे:–'आणि तुझा घोडा सोन्याचे नाल मारलेले आपले पाय जिथें जिथें टाकतो, तिथें तिथें भरजरी गालिचा घातल्याप्रमाणें भूमि झळकते!' (व्हिनफील्डचें भाषान्तर). याच्या कारकीर्दींत वैभव, व्यापार आणि विद्वत्ता या तिहींचें निशापूर हें केन्द्र होऊन बसलें होतें. धर्मशास्त्र, तत्त्वज्ञान आणि शास्त्रें यांचें शिक्षण देणारीं सहा विद्यालयें तेथें होतीं. मलिकशहाचा विद्याप्रिय मंत्री निजामुल्मुल्क यानें तिथें एक वेधशाळाहि उभारली होती. निजामाच्या नांवावर मोडणाऱ्या 'वसाया' नामक प्रबंधांत पुढील माहिती आली आहे: 'निजामुल्मुल्क, इस्माईली पंथाचा अत्याचारी पुढारी हसन-इब्न-सब्बाह व हा हे सहाध्यायी होते. आणि तिघांपैकीं ज्याचा भाग्योदय होईल त्यानें इतरांचा परामर्श घ्यावा, असा त्यांचा आपसांत करार असल्यामुळें निजामाकडून मिळणाऱ्या देणगीवर उमर कालक्रमणा करीत असे.'

हा जन्मानें इराणी पण जातीनें अरब होता. अल्खय्यामी हें एका अरबी जमातीचें नांव होतें असें म्हणतात. खय्याम या शब्दाचा अर्थ 'तंबू शिवणारा' असा होतो. पण हा स्वतः तंबू शिवून उपजीविका करीत असेल असें दिसत नाहीं. यानें मोवराफिक नांवाच्या एका विख्यात गुरूपाशीं शिक्षण घेतलें. धर्मशास्त्र, बीजगणित, भूमिति, ज्योतिष, वैद्यक इत्यादि अनेक शास्त्रांचें यानें अध्ययन केलें होतें; आणि विद्यार्थ्यांना शिक्षणहि देण्याचा याचा क्रम असे. अरबी व फार्सी या दोन भाषांत मिळून यानें एकंदर दहा ग्रंथ केले. त्यांपैकीं तीन सृष्टिज्ञानपर, चार गणितावर, व दोन अध्यात्मावर असून, एका ग्रंथांत यानें आपल्या वेळोवेळीं लिहिलेल्या त्रुटित रुबायांचा संग्रह केलेला होता. पण यांपैकीं आज याचे फक्त तीनच ग्रंथ उपलब्ध आहेत. 'अल्हकीम' म्हणजे शास्त्रज्ञ म्हणून

याची कीर्ति सर्व इराणभर पसरली व स. १०७४ सालीं मलिकशहानें याला राजज्योतिषी नेमून याच्या विद्वत्तेचा गौरव केला. या जागेवर असतां यानें ‘ झिज्-इ-मलिक्-शाही ’ हा ज्योतिषकोष्टकांचा ग्रंथ रचून, सात ज्योतिर्विदांच्या साहाय्यानें जुन्या फार्सी पंचांगांत सुधारणा केली. याची नवीन जलाली कालगणना लोकप्रिय न होतां जुनें हिजरी पंचांगच प्रचारांत राहिलेलें आहे. तथापि याचा प्रयत्न शास्त्रज्ञांच्या दृष्टीनें महत्त्वाचा आहे. युक्लिडच्या भूमितींतील कठीण स्थळांवरील याचा ग्रंथ लीडन ग्रंथालयांत ठेवलेला असून याच्या बीजगणितावरील ग्रंथाचें वोपेकनें फ्रेंचमध्यें भाषांतर केलें. हा ग्रंथ अनेक शतकें प्रमाण मानला जात असे. याच ग्रंथांत अबू ताहिर नामक कोणा गृहस्थाचा आपला आश्रयदाता म्हणून यानें उल्लेख केलेला आहे. कदाचित् निजामुल्मुल्काच्या खुनानंतर यानें ताहिराचा आश्रय घेतला असावा. याला शंभर वर्षांचें आयुष्य लाभलें होतें.

याच्या विद्वत्तेविषयीं अनेक फार्सी लेखकांनीं आदरपूर्वक लिहिलें असलें तरी याच्या धार्मिक मतांविषयीं त्यांना तिटकारा असे. सुफीपंथाचे लोक याच्या कवितांत आपलीं मतें प्रतिपादन केलीं आहेत असें भासवितात. पण तें पूर्णपणें बरोबर नाहीं.

हा मदिरासक्त, एकान्तप्रिय, व आळशी प्रकृतीचा असे. सध्यां जरी जगांत कवि म्हणून याची प्रसिद्धी असली तरी हा जिवंत असतां याला कवि म्हणून कोणीहि समजत नसत. हा मेल्यानंतरहि फिट्जेरल्डच्या अनुवादाच्या रूपानें पुनरुज्जीवन होईपर्यंत याला इराणांतहि फारसे चाहते नव्हते. पण आतां मात्र याच्या रुबाया सुखवादी संशयात्म्याचें बायबल होऊन बसल्या आहेत. यानें आत्म्याच्या मरणोत्तर स्थितीविषयीं निराशा प्रगट केली आहे. याचा मृत्यु स. ११२३।२४ सालीं शंभर वर्षें आयुष्य भोगल्यावर झाला ( रत्नाकर, ग. त्र्यं. मालखोडकरांच्या लेखावरून ).

**उमरखान**—माळव्याच्या घोरी घराण्यांतील जो हुशंगशाहा त्याचा हा एक पुत्र होय.

२. दिल्लीच्या अलाउद्दीन खल्जीचा मुलगा.

**उमर बिन खताब**—मुहम्मद पैगंबराचा जिवलग स्नेही व सासरा. हा अबू बकर सादिकनंतर दुसरा खलीफ झाला. यानें सिरिया आणि फीनशीआ जिंकून मोठ्या निकराची लढाई दिली; आणि स. ६३७ मध्यें जेरुशलेम घेतलें. याच्या सेनापतीनें इराण आणि इजिप्त पादाक्रान्त करून मुहम्मदाचे अनुयायी वाढविले. याच्या सैन्यानें अलेक्झांड्रिया काबीज केल्यावर यानें तांबडा समुद्र व नाईल नदी यांमध्यें कालवा सुरू केला. यालाच प्रथम अमीर-अल-मोमीनीन ही खलिफांना असलेली पदवी मिळाली. स. ६४४ मध्यें एका इराणी गुलामानें हा सकाळचा नमाज पढत असतां याचा खून केला.

**उमरशेख मीर्झा**—दिल्लीचा पहिला मोगल बादशहा बाबर याचा पुत्र होय. याच्या पित्याचें नांव अबसुईद मीर्झा. यास अकरा भाऊ होते. त्यांपैकीं हा चवथा होय. तैमूरलंगानें जिंकलेला विस्तृत प्रदेश अबसुईदच्या हाताखालीं होता. त्याच्या त्या मुलखाच्या अकरा वांटण्या झाल्या. याला प्रथम काबूलचें राज्य मिळालें. परंतु तें जाऊन पुढें फरघाना प्रांत मिळाला ( मु. रि. २·२ ).

**उमरावगीर गोसावी**—हा सुजाउद्दौल्याचा एक सरदार. यानें विश्वासराव, तुकोजी शिंदे, संताजी वाघ व यशवंतराव पवार या पानपतच्या युद्धांत पडलेल्या योध्यांचे मुडदे तीन लक्ष रुपयांस सोडवून त्यांस ब्राह्मणांकडून विधियुक्त अग्निसंस्कार केला ( म. रि. म. ३, पा. २०५ ). उमरावगीर व अनूपगीर ऊर्फ हिंमतगीर यांच्या पानपतयुद्धापासूनच्या हालचाली लक्षांत घेतल्या म्हणजे यांचा कारस्थानीपणा व परस्पर संबंध उलगडतात ( हिंमतबहाद्दर गोसावी पाहा ).

**उमाजी पंडित**—शिवाजीचा शिक्षक. संभाजी दिलेलखानाकडे गेल्यावर हा बिदनूरकडे वकील होता, असें प्रभात नांवाच्या ९१ कलमी बखरीवरून दिसतें.

**उमाजी संभाजी भोसले**—हा शहाजी राजाचा नातू. याचा जन्म तारीख २५-११-१६५४ सालीं झाला असें जेधें शकावलींत दिलें आहे. याला सुरतसिंग नांवाचा एक वडील भाऊ होता.

**उमादेवी**—ही कूपक घराण्यांतील असून यदुघराण्यांतल्या जयसिंह राजाशीं हिचें लग्न झालें होतें. ही आपल्या नवऱ्याबरोबर केरळ देशाचा राज्यकारभार पाहत असे ( हिस्ट्री ऑफ केरळ ).

**उमापति**—यानें विजयनगरच्या हरिहरदेव याच्या कारकीर्दींत ‘ पारिजातहरण ’ नांवाचें सत्यभामाकलहावर नाटक लिहिलें.

**उमापतिधर**—हा संस्कृतज्ञ पंडित बंगालचा राजा लक्ष्मणसेन याचा आश्रित होता.

**उमापति शिवाचार्य**—शालिवाहन शकाच्या तेराव्या शतकांतील तामीळ ग्रंथकार. तामीळांतील चार तत्त्वज्ञानी आचार्यांपैकीं एक. हा ब्राह्मण असून दिगंबरमच्या देवळांतील पुजारी होता. याचा गुरु ‘ मरई गणसंबंध ’ ( ब्राह्मणेतर ) होता. यानें कोदिकवि हा ग्रंथ लिहिला.

शके १२३५ सालीं 'अनि' उत्सवाच्या प्रसंगीं यानें जे वादविवाद केले ते 'शंकरपनिकरणं' या ग्रंथांत ग्रथित केलेले आहेत. याचे ग्रंथ पुष्करागमावर संस्कृत भाष्य, 'फोईर पुराण,' दिगंबर देवळाचा इतिहास, शिवप्रकाशकं, व थिरु वारुत्पयत वगैरे होत.

ईश्वर रूपी, अरूपी व रूपारूपी आहे. मल तीन प्रकारचे आहेतः १ अनवमल, २ कर्ममल, ३ मायामल. यांचे भागः १ ईश्वरस्वरूप, २ आत्म्याचें स्वरूप, ३ पाशस्वरूप, ४ अरुल स्वरूप, ५ सद्गुरुस्वरूप, ६ मार्गदीपिका, ७ आत्मप्रकाश, ८ मोक्षमार्ग, ९ पंचाक्षरसत्य, १० जीवन्मुक्तलक्षण वगैरे होत, ही तत्त्वें यांनीं आपल्या ग्रंथांत प्रतिपादिलीं आहे.

**उमाबाई**—रामदासाचा शिष्य उद्धवगोसावी याची आई.

**उमाबाई दाभाडे**—( मृत्यु स. १७५३ ) खंडेराव दाभाडे यांची ही पत्नी. ही मोठी पराक्रमी व दक्ष होती. आपल्या मुलानें कांहीं तरी पराक्रम करावा म्हणून हिनें शिकस्त केली, परंतु उपयोग झाला नाहीं.

डभईच्या लढाईत हिचा पुत्र त्रिंबकराव हा बाजीराव पेशव्याशीं लढत असतां भावसिंगराव टोके याच्या बारगिरानें दगा करून जोडगोळीनें हत्तीवर ठार केला ( रा. खं. ३·१६६ ). शाहूनें तळेगांवीं जाऊन बाजीरावाला हिच्या पायावर घालून हिचा राग शांत केला ( रा. खं. ३.१६६ ). तेव्हां स्वतः बाजीरावानें हिची समजूत घातली ( दाभाडे बखर ). पुढें गायकवाडास आपले दुय्यम नेमून हिनें जातीनें कांहीं काळ गुजराथचा कारभार केला. शाहूला दाभाडे घराण्याबद्दल आपलेपणा वाटे व दाभाड्यांनाहि शाहूबद्दल पूज्यभाव होता. पण दाभाडे व पेशवे यांचें ठीक नव्हतें. अशा स्थितींत वरच्या हिंदुस्थानशीं दळणवळणाला सोयीचा गुजराथप्रांत ताब्यांत घेण्याच्या दृष्टीनें बाजीरावानें दाभाड्यांना गुजराथेंतून नाहींसें केलें. स. १७५० मध्यें हिच्यावर निजामाशीं संगनमत केल्याचा आरोप ठेवून पेशव्यांनीं गुजराथ आपणाकडे घेतली. अशा रीतीनें शाहूचाहि आधार गेलेला पाहून हिनें ताराबाईची भेट घेऊन पेशव्याविरुद्ध कारस्थान उभारलें. २० आक्टो. १७५० रोजीं हिनें आपला वकील पेशव्याकडे पाठविला, त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तेव्हां हिनें स्वतः आळंदीस पेशव्यांची भेट घेतली ( २२ नवंबर ) परंतु दाद लागेना, तेव्हां हिनें स.१७५१ मध्यें दमाजीस पेशव्यावर पाठविलें. युद्ध होऊन दमाजी गायकवाडाचा पुरा मोड झाला. ३० एप्रिल १७५१ रोजीं वेणेचा तह होऊन हिनें निरुपायानें गुजराथ पेशव्यास दिली.

१७५१ एप्रिल ते नवंबरपर्यंत ही पेशव्यांच्या कैदेंत होती. दाभाड्यांची इतर मंडळीहि पुण्यामध्यें कैदेंत होती. ती मंडळी १६ नवं. १७५१ मध्यें कैदेंतून पळाली. तेव्हां ही व हिची सून अंबिकाबाई यांना सिंहगडावर कैदेंत ठेवलें. सासूसुनांचेंहि बरें नव्हतें.

१७५२ फेब्रुवारी १४ रोजीं हिला पुण्यास आणलें. ५ एप्रिल १७५२ मध्यें अखेरचा तह झाला. त्यांत—गायकवाड पूर्ववत् दाभाड्यांची चाकरी करतील. दाभाड्यांनीं राज्यांत बखेडा करूं नये. रामराजाला अनुकूल होऊं नये. पेशव्यांचे विचारें चालावें. दाभाड्यास खर्चास दरमहा ५० हजार रुपये मिळतील. पूर्वींचे मोकासे यांच्याकडे चालतील, अशीं कलमें होतीं.

यानंतर बाईचा जप्त केलेला सरंजाम पेशव्यांनीं २ नवं. १७५२ मध्यें सोडला ( ना. सा. रा. ले. ६१ ) आणि दाभाड्यास वस्त्रें दिलीं. यापुढें पेशवे व दाभाडे यांचें चांगलें सूत होतें.

या बाईनें जातीनें अहमदाबाद ( गुजराथ) सर केल्याबद्दल शाहू महाराजांनीं हिच्या पायांत सोन्याचे तोडे घातले होते ( दाभाडे बखर, पृ. २९८ ).

हिचा मृत्यु २८ नवं. १७५३ रोजीं नडगेमोडीपाशीं डेरे देऊन राहिली होती तेथें झाला.

हिचा साग्र वृत्तांत वॅट्सनच्या हिस्ट्री ऑफ गुजराथ या पुस्तकाच्या तिसऱ्या भागांत सांपडेल.

**उमाबाई भोसले**—(उमा. वा) फलटणच्या निंबाळकर घराण्यांतील मालोजी नाईक २ रा याची ही मुलगी व मालोजी भोसल्याची बायको. हिला वणगोजी ऊर्फ जगपाळराव नांवाचा भाऊ होता. शहाजी व शरीफजी हीं हिचीं दोन मुलें होत. हिला माहेरचें दिपाबाई असें नांव होतें.

**२.** मुधोजी ऊर्फ अप्पासाहेब भोसल्यांची बायको. ही मोठी कर्तव्यनिष्ठ बाई होती. अप्पासाहेबांस इंग्रजांनीं पकडल्यावर हिनेंच गंगासिंग नांवाच्या मनुष्यास गुप्त रीतीनें त्यांस सोडविण्यास पाठविलें होतें.

हिनें अप्पासाहेबांस त्यांचे पलायनांत व नंतर बरेंच द्रव्य पुरवलें. ही शोकामुळें जून १८१८ मध्यें मरण पावली ( ना. प्रा. इ. पृ. ४४७, ४६६ ).

**उमाबाई होळकर**—ही मल्हारराव होळकरांची पत्नी. हिला अमीरखानानें स. १८१५ मध्यें ठार मारलें ( म. रि. उ. वि. ३, पृ. ४३८ ).

**उमास्वाती**—( स. १–८५ ) हा वाचक श्रमण या नांवानें विशेष ओळखला जातो. याला नमक

वाचक असेंहि म्हणत असत. हें नांव बहुतेक त्याच्या शाखेस उद्देशून असावें. हिंदु तत्त्वज्ञानी यास उमास्वाती वाचकाचार्य असें म्हणत. हा ४८ वर्षें, ८ महिने व ६ दिवस जगला व संवत् १४२ म्हणजे स. ८५ त परलोकवासी झाला.

यानें 'तत्त्वार्थाधिगमसूत्र' नांवाचा एक ग्रंथ व त्यावरील श्वेतांबर सांप्रदायमतें एक भाष्य लिहिलें आहे. आपल्या ग्रंथांत स्वतःविषयीं हा खालील माहिती देतोः—

याचा जन्म 'न्यग्रोधिका' नांवाच्या एका खेडेगांवीं झाला. यानें आपला ग्रंथ पाटलीपुत्र अथवा कुसुमपुर (हल्लींचें पाटणा) येथें लिहिला. याच्या बापाचें नांव स्वाती असें असून यास कधींकधीं स्वातितनय असेंहि म्हणत असत. याची आई उमा ही वत्सगोत्री असल्यामुळें यास कधींकधीं 'उमास्वातिसुत' असेंहि म्हणत असत. जिनप्रभसूरीच्या तीर्थकल्पांत, उमास्वातीनें ५०० संस्कृत प्रकरणें लिहिलीं असें म्हटलें आहे. याच्या काळीं श्वेतांबर व दिगंबर यांच्यामधील भेद जरीं अस्तित्वांत आला नव्हता, तरी हा श्वेतांबर पंथाचा होता असें श्वेतांबर म्हणतात (हिस्ट्री ऑफ इंडियन लॉजिक). हा कौंभीषानिण गोत्राचा होता. यानें बरींच पुस्तकें लिहिलीं आहेत. त्यांपैकीं पुढील पुस्तकें सध्यां उपलब्ध आहेतः (१) तत्त्वार्थाधिगम-सूत्र, (२) भाष्य (तत्त्वार्थाधिगमसूत्रावर), (३) पूजाप्रकरण, (४) जंबूद्वीपसमास, (५) प्रशमरति.

**उमीचंद**—हा जातीनें शीख होता. हा मोठा वजनदार सावकार कलकत्त्यास राहत असे. कलकत्त्याचा इंग्रज गव्हर्नर ड्रेक व याची दोस्ती होती. यानें अलिवर्दिखानास बंगालची सुभेदारी मिळवून दिली. सिराजउद्दौल्यास कलकत्त्यावर आणण्याचें व इंग्रजांविरुद्ध चिडविण्याचें काम यानें केलें, या सबबीवर यास इंग्रजांनीं कैद केलें. सिराजनें इंग्रजांचा पुरा मोड केला. स. १७५७ त सिराजच्या दरबारीं हा इंग्रजांतर्फे वकील म्हणून राहिला. चंद्रनगर घेण्याचे कामीं यानें इंग्रजांस अतिशय मदत केली. प्लासीच्या लढाईत उमीचंद हजर होता. पुढें बंगालच्या सुभेदारीवर मीर जाफरला बसवून सिराज उद्दौल्यास पदच्युत करण्याचा व्यूह क्लाइव्हनें चालविला. परंतु ही गोष्ट गुप्त ठेवणें फार अत्यावश्यक होतें. तेव्हां ही गोष्ट गुप्त ठेवण्याबद्दल क्लाइव्हनें उमीचंदास तीस लाख रु. लांच देण्याचें कबूल केलें. पण क्लाइव्हचा हेतु उमीचंदास पूर्णपणें फसविण्याचा होता. त्याकरितां त्यानें एक तांबडा व एक पांढरा असे दोन कागद केले. त्यांपैकीं पांढरा कागद खरा व तांबडा खोटा होता. तो खोटा तांबडा कागद त्यानें उमीचंदास दिला. पुढें मीर जाफरची सुभेदारीवर स्थापना झाल्यावर त्यानें ठरल्याप्रमाणें सर्वांना बक्षिसें व लांच देण्यासाठीं दरबार भरविला. त्या प्रसंगीं यानें आपला कागद दाखवून पैशाची मागणी केली. तेव्हां क्लाइव्हनें यास कळविलें कीं, 'तांबडा कागद खोटा आहे, तुम्हांस कांहींएक मिळणार नाहीं.' हे शब्द ऐकतांच आकाशांतून कुन्हाड पडल्यासारखें होऊन उमीचंद बेशुद्ध पडला. तेव्हांपासून हा भ्रमिष्ट झाला. उमीचंद वेडा होऊन मरण पावला (ब्रि. रि. पू. पृ. ५३२).

**उमेदसिंग**—बुंदी संस्थानच्या बुधसिंगाचा हा मुलगा. जेव्हां याच्या बापास राज्याबाहेर हाकून दिलें तेव्हां यानें मल्हारराव होळकरांच्या मदतीनें पुन्हां गादी परत मिळविली. याच्यानंतर अजितसिंग गादीवर आला.

**उरगप्पा दंडनाथ**—हा कवि लष्करी खात्यांतील मोठ्या पदवीचा सरदार होता. कांहींच्या मतें हा विजयनगरचा राजा हरिहरराजाच्या पदरीं होता. याची गति संस्कृत व्याकरणांत चांगली होती. यानें नानार्थरत्नमाला व एकाक्षरनिघण्टु असे दोन कोश केले (कविचरित्र).

**उर्फी मौलाना**—हा कवि शीराझचा राहणारा. याचें खरें नांव जमालुद्दीन. हा स. १५८९ मध्यें खानखानानच्या द्वारां अकबराच्या दरबारांत राहिला. याच्या ग्रंथांपैकीं 'दीवाणि' आणि 'कसायद' हे ग्रंथ फार प्रख्यात आहेत. याच्या इच्छेप्रमाणें याच्या अस्थि नजफ आश्रफाच्या शेजारीं पुरल्या. हा. स. १५९१ मध्यें लाहोर येथें मरण पावला.

**उलघबेग मीर्झा**—(स. १३९४–१४४९) हा तैमूरलंगाचा नातू व मीर्झा शहारुखचा मुलगा. हा ज्योतिषशास्त्रांतील पंडित होता. हा युद्धकलेंत निपुण नव्हता. यानें राज्यांतील सर्व ज्योतिषी एकत्र जमवून 'झीज उलघबेग' नांवाचा ज्योतिष गणिताचा ग्रंथ तयार केला. स. १४४९ त याच्या मुलानें यास ठार मारलें (बील).

याच्याजवळ ताऱ्यांचे वेध घेण्याचीं मोठालीं यंत्रें होतीं. विशेषतः ताऱ्यांची उंची मोजण्याचें जे सूर्ययंत्र (तुरीप यंत्र). तें याजवळ होतें. तें १८० फूट उंच होतें.

**उलुघखान**—(स. १२९२–१२९६) याचा उच्चार उल्घूखान असाहि करीत असावेत. चंगीझखानाचे वंशांतील हुलागूखानाचा नातू. स. १२९२ मध्यें एक लाख

मोंगलांनीं पंजाबवर स्वारी केली. सुनामपर्यंत त्यांना फारसा विरोध झाला नाहीं. पण पुढें जलालउद्दीन खल्जीच्या सैन्यांनीं मोगलांचा मोड केला. आणि आल्या वाटेनें जाऊं देण्याचा तह झाला. पण यानें आपल्या सैनिकांसह इस्लामी धर्म स्वीकारून जलालउद्दीन खल्जीची नोकरी पत्करली. वरचढ झालेल्या तुर्क लोकांना तोंड देण्यास असे लोक त्याला पाहिजेच होते. कैकूबादच्या वेळीं तुर्कांच्या कत्तली करण्यांत आल्या. पण जलालउद्दीननें आपली एक मुलगी याला देऊन आपलेंसें केलें. पण अलाउद्दीन गादीवर येतांच राजनिष्ठ म्हणून याचे डोळे काढण्यांत आले. याच्याबरोबर आलेल्या मोगल सैनिकांपैकीं हवा मानवत नाहीं म्हणून कांहीं परत गेले आणि कांहीं मुसलमान होऊन येथें राहिले. पण येथील लोक त्यांना नव मुसलमान असें म्हणून त्यांचा तिरस्कार करीत. अलाउद्दीन गादीवर आल्यावर नव मुसलमानांच्या कत्तली सुरू झाल्या. त्यांत हा मारला गेला असें दिसतें.

२. हा अलाउद्दीन खल्जीचा धाकटा भाऊ व शहाबुद्दीन मसूदचा धाकटा मुलगा. याच्या पित्याचें नांव यघ्रुषखान असेंहि आढळतें (कें. हि.). अलाउद्दीनच्या प्रत्येक कामांत याचें साहाय्य असे. यानें गुजराथवर स्वारी करून अनहिलवाडला वेढा दिला आणि तें शहर जिंकलें (स. १२९७). राजा कर्णाची पत्नी कमलदेवी दिल्लीस पाठविली. रणथंभोर जिंकत असतां नुस्रतखान मेला तरी यानें नेट धरला. शेवटीं अलाउद्दीन याच्या मदतीस आला. हा वेढा चालू असतां दिल्लीस दोन बंडें झालीं (हाजी मौला पाहा). ती बातमी गुप्त ठेवून अलाउद्दीननें याला बंड मोडण्याकरितां पाठविलें. पण हा तिकडे लवकरच मरण पावला (आकतखान खल्जी पाहा).

३. बल्बनचें नामांतर.

**उवट**—याच्या पित्याचें नांव वज्रट. हा गुजराथेंतील आनंदपुर येथें राहत होता. यानें वाजसनेयी संहितेवर भाष्य लिहिलें. हा माळव्यांतील भोजाच्या वेळीं होता. भोजाचें राज्य स. १०१०–५५ पर्यंत होतें. यजुःप्रातिशाख्यावरहि याचें भाष्य आहे. संहितेवरील भाष्य यानें उज्जयनींत लिहिलें.

**उषवदात**—हा दीनीकाचा पुत्र व नहपानाच्या दक्षमित्रा नांवाच्या मुलीचा पति. हा नहपानाचा सेनापति असावा असें दिसतें. हा नहपानाच्या राज्यांत चहूंकडे हिंडत असे व वेळोवेळीं दानधर्म करीत असे. याच्या लेखावरून पत्ता लागतो कीं राजपुतान्यांत बार्णासा (बनास) नदीवर यानें तीर्थघाट बांधला व सुवर्णदान केलें. भट्टारक नहपानाच्या आज्ञेवरून पावसाळ्यांतच हा मालवांच्या तडाख्यांत सांपडलेल्या उत्तमभाद्र क्षत्रियांना सोडवण्याकरितां गेला. हा आला आहे असें कळतांच मालव पळाले. पण उत्तमभाद्र क्षत्रियांनीं त्यांच्याशीं बंधुत्व जोडलें होतें. नंतर हा पुष्करला गेला आणि स्नान करून यानें तीन हजार गाई व एक गांव दान दिलें (एपि. इंडि भा. ८, पा ७८). याचे शिलालेख पाली व संस्कृतमध्यें आहेत (डॉ. भांडारकर अर्ली हिस्ट्री ऑफ दि डेक्कन पाहा).

यानें गोवर्धन येथील वीणकरी लोकांच्या बँकेंत २००० कार्षापण शें. १०० कर्षापणाच्या व्याजानें ठेविले होते व त्यांतील कांहीं व्याज २० भिक्षूंना पावसाळ्यांत चरितार्थाकरितां मिळावें अशी व्यवस्था केली होती, व दुसऱ्या एका बँकेंत १००० कार्षापण शें. ७५ भावानें ठेवून त्याचें व्याज भिक्षूंना इतर कांहीं गोष्टी घेण्याकरितां मिळावें अशी व्यवस्था केली होती. यानें १६ गांवें ब्राह्मणांना दिलीं होतीं. प्रभासक्षेत्रीं ८ ब्राह्मणांना नेऊन त्यांचीं लग्नें लावून दिलीं. यानें बाग तयार केले, पोहण्याकरितां तळीं बांधलीं, नद्यांतून बोटी सुरू केल्या (J. B. B. R. A. S. Vol. VII. No. 6. Nasik Inscriptions). यानें बलुराका येथील गुहेंत राहणाऱ्या भिक्षूंना कर्जिका नांवाचें गांव दिल्याचें आढळतें (Archæological Survey of Western India, No. 10, No. 13, Karli Inscriptions).

**उसमान**—एक हिंदी कवि. पित्याचें नांव शेख हसन. यानें चित्रावली नांवाची प्रेमकहाणी स. १६१३ मध्यें लिहिली. याच्या काव्यांत इंग्रजांचें वर्णन आहे. हा जहांगीर बादशाहाच्या वेळीं होता (क. कौ. भा. १). हा हाजीबाबाचा शिष्य व गाजीपूरचा राहणारा.

**उस्ताद अली**—हा बाबरचा तोफखानदार होय. बाबराला यानेंच आपल्या कर्तबगारीनें पुष्कळ वेळां यश मिळवून दिलें (मु. रा. भा. १, पा. १०).

**उस्तीक स्टिफन**—इंग्रजांचा शिवाजीच्या वेळचा वकील.

राजापूरला जी नुकसानी झाली, त्याबाबत तह करण्याकरितां हा मनुष्य नेमलेला दिसतो. कांहीं ठिकाणीं याला स्टिफन युस्टिक म्हटल्याचें आढळतें.

**उस्मानखान घोरी**—माळव्याच्या घोरी घराण्यांतील हुशंगशहाचा पुत्र.

**उंगपो**—एक चिनी प्रवासी. हा सिपिन या चिनी प्रवाशाबरोबर भारतवर्षात आला होता. यानें सांचीच्या संघारामांत संस्कृत शिकण्याला सुरुवात केली, पण तें पार पडेना. हा नेपालामार्गे परत

जात असतां नेपाळांत मृत्यु पावला. हिंदुस्थानांत असतां यानें आपलें नांव मतिसिंह असें घेतलें होतें.

**उंद्-भट**—(स.९०३-९०७) सिरोनीचा एक राजा.हा स. ९०३ मध्यें गादीवर आला. हा कनोजच्या महेंद्रपालाचा प्रतिस्पर्धी असून यानें मधुवेणी नदीच्या कांठीं युवराजाशीं युद्ध केलें होतें. यानें स. ९०७ पर्यंत राज्य केलें ( B ).

---

## ऊ

**ऊकाँग**—( स. ७५३-७९० ) एक चिनी बुद्ध श्रमण. हा मध्य आशियाच्या मार्गानें प्रवास करून गांधार प्रांतांत स. ७५३ मध्यें व काश्मीरला स. ७५९ मध्यें जाऊन पोंचला. चार वर्षांनीं पुन्हां गांधारला परत येऊन हा मध्य हिंदुस्थानांत जाण्याकरितां ७६४ मध्यें निघाला. कपिलवस्तु, वाराणशी, श्रावस्ती, कुशिनगर व नालंद येथें यानें तीन वर्षें घालविलीं. स. ७८३-७८८ च्या सुमारास हा चीनला जाण्याकरितां निघून ७९० मध्यें तेथें पोहोंचला. यानें दशभूमी, दशाबल, सूत्रें वगैरे संस्कृत पुस्तकें बरोबर नेलीं होतीं ( डफ ).

**ऊदल**—पृथ्वीराज चौहानानें महोबाच्या परमर्दिदेव चंदेल्लराजावर स्वारी केली. त्या वेळीं परमर्दिदेवाचे सामंत आल्हा व ऊदल हे लढाईत हजर नव्हते. ते पूर्वीं कांहीं अप्रसन्नतेमुळें कनोजच्या जयचंदाकडे जाऊन राहिले होते. पृथ्वीराजाच्या सैन्यानें देशाची खराबी चालविली आहे असें पाहून परमर्दिदेवाच्या राणीनें आल्हा व ऊदल यांना बोलावणें पाठविलें. पण यांनीं महोब्यास परत येण्याचें नाकारलें. तेव्हां याच्या वीरमातेनें पुढील उद्गार काढल्याचें प्रसिद्ध आहे. ती म्हणाली, "हे विधाता, तूं मला वांझ कां केलें नाहींस? क्षत्रियधर्म न पाळणाऱ्या अशा पुत्रांना जन्म देण्यापेक्षां मी वांझोटी असतें तरी हरकत नव्हती. मालक संकटांत असतां ज्याचे सरदार सुखानें झोंप घेतात अशा क्षत्रियांना धिःकार असो. जो क्षत्रिय संकटाच्या वेळीं धन्याकरितां शिर देण्यास तयार होत नाहीं तो जातीचा रजपुतच नव्हे." (रासोसार, पृ. ४६१, नागरीप्रचारिणी सभेनें प्रकाशित केलेला ).

**ऊदा**—( २ उदयसिंह पाहा ).

**ऊधमबाई**—एक हिंदु स्त्री. हिचें दिल्लीचा बादशहा मुहम्मदशाहबरोबर लग्न झालें होतें. हिच्या मुलाचें नांव अहमदशाहा. अहमदशाहा गादीवर बसला तेव्हां (स.१७४८) हिला नबाबबाई, नबाब कुदसिया आणि साहेब झमानी अशा पदव्या मिळाल्या. अहमदशाहबरोबर हिचेहि डोळे काढले होते. हिचा भाऊ मानखान यास ६००० सैन्यावरील अधिकार मिळालेला होता.

**ऊहिंग**—एक चिनी प्रवासी. हा चीनमधून भारतांत आला व तेथून लंकेस गेला. लंकेंतील यात्रा केल्यावर हा भारतवर्षांत आला. येथें महाबोध विहारांत कांहीं दिवस राहून नालंदला गेला. तेथें योगाचार ग्रंथांचें यानें अध्ययन केलें. हा नालंदला परलोकवासी झाला. यानें आपलें नांव प्राज्ञदेव असें घेतलें होतें.

---

## ऋ

**ऋषभदत्त**—( उषवदात पाहा ).

**ऋषभदेव**—जैनांचा पहिला तीर्थंकर. याच्याकरितां प्राचीन चरित्रकोशांतील अर्हत्, ऋषभ, आणि या कोशांतील तीर्थंकर शब्द पाहा.

**ऋषिनाथ**—( स. १७४२-७३ ) एक हिंदी कवि. हा असनीचा राहणारा असून एक बंदीजन होय. हा प्रसिद्ध कवि ठाकुर याचा बाप होय.

यानें काशीराजाचा दिवाण सदानंदाच्या आश्रयास राहून 'अलंकारमणि-मंजरी' नांवाचें एक उत्तम पुस्तक लिहिलें आहे. यामध्यें दोहांची संख्या जास्त असून कांहीं कांहीं ठिकाणीं घनाक्षरी आणि छप्पय यांचा उपयोग केला आहे.

यानें आपल्या वृद्धावस्थेंत सुद्धां एक ग्रंथ लिहिला, असा उल्लेख आलेला आहे.

## ए

**एकनाथ**—( स. १५३३ ?–१५९९ ) यांचा जन्म केव्हां झाला याबद्दल निश्चित पुरावा नाहीं. पांगारकरांनीं शके १४५५ सालीं जन्म झाल्याचें अंदाजी दिलें आहे. समाधिशक पूर्वी शके १५३१ मानीत होते. पण आतां १५२१ हा निश्चित आहे. यांची पितृपरंपरा भानुदास–चक्रपाणी–सूर्यनारायण–एकनाथ अशी आहे. यांच्या मातेचें नांव रुक्मिणी. मूळ नक्षत्रावर जन्मलेल्या याचीं मातापितरें हा जन्मल्यानंतर लवकरच मेलीं. त्यामुळें यांचे आजे चक्रपाणी यांनीं यांचें पालणपोषण केलें. कुलाचा एकच अंकुर म्हणून याचें एकनाथ असें नांव ठेवलें. एका असेंहि याला म्हणत असावेत. सहा वर्षांचे असतां यांचें उपनयन झालें. हे बारा वर्षांचे असतांच पैठणांत गांवाबाहेरील शिवालयांत यांस असा दृष्टान्त झाला कीं, ‘ जनार्दनपंत या नांवाचे साधु देवगडावर आहेत, तेथें जाऊन तूं त्यांचा उपदेश घे.’ असा दृष्टान्त झाल्यावर आजाचीहि अनुज्ञा न घेतां हा जनार्दनस्वामीकडे गेला. तेथें यानें आपल्या गुरूची उत्तम सेवा केली. आणि ज्ञानेश्वरी व अमृतानुभव यांचा उत्तम अभ्यास केला. जनार्दनस्वामी दत्तभक्त होते तरी त्यांनीं याला दत्तभक्ति करण्यास न लावतां पंढरीचा सोपा मार्ग पतकरण्यास सांगितलें. कदाचित् भानुदासादिकांची पूर्वपरंपरा ध्यानांत घेऊन त्यांनीं तसें सांगितलें असावें; आणि विठ्ठल हा मंत्र देऊन जातीचा विचार न करितां अन्नदान करण्यास सांगितलें. तेथें यांना गुरुकृपा आणि दत्तदर्शन यांचा लाभ झाला. नंतर यांनीं देवगडावरच पण वायव्य दिशेस शूलभंजन ऊर्फ सुलभपर्वतावर रम्य जागीं सहा वर्षे तपश्चर्या केली. तेथें यांनीं योगाचा अभ्यास करून त्यांत पूर्ण प्रगति करून घेतली; आणि नंतर कृष्णाचा साक्षात्कार झाला. नंतर यांनीं कांहीं वर्षे तीर्थयात्रेंत घालविलीं. तीर्थयात्रा सुरू झाल्यानंतर चतुःश्लोकी भागवताच्या टीकेपासून यांच्या ग्रंथलेखनास प्रारंभ झाला.

एकदां देवगडावर परचक्र आलें असतां जनार्दनस्वामी ध्यानांत गुंतले आहेत असें पाहून यांनीं स्वतः घोड्यावर स्वार होऊन त्या परचक्राचा पाडाव केला.

नंतर हे गुरूच्या आज्ञेनें पैठणास आले आणि विजापूर येथील गिरिजाबाई नांवाच्या मुलीशीं यांचें लग्न झालें.

परमार्थ व प्रपंच मिळून चालविण्याची यांची हातोटी अपूर्व होती. आपल्या वर्तणुकीनें यांनीं सर्व जगास परमार्थी मनुष्यानें कसें वागावें याचा कित्ता घालून दिला. आपल्या अंगावर थुंकणाऱ्या यवनाशीं शांततेनें व सभ्यपणानें वागणें, आपल्या पितरांच्या श्राद्धाच्या वेळीं महारास जेऊं घालणें, महाराच्या येथें जेवणें, गंगेचें पाणी घरीं आणीत असतां तहानेनें तळमळत असलेल्या एका गाढवास तें पाजणें, वेश्या, चोर, जार यांना भक्तीला लावून उद्धार करणें, एका अस्पृश्य मुलास उचलून कडेवर घेणें, ज्ञानाचा अभिमान चढलेल्या पुत्राशीं म्हणजे हरिपंडिताशीं शांत रीतीनें वागणें, या व इतर अशा अनेक गोष्टींनीं एकनाथ हे शांतता, दया, अक्रोध, समता वगैरे गुणांचे मूर्तिमंत अवतार होते, असें म्हणावें लागतें.

एकदां यांच्या गळ्यास रोग झाला असतां ‘ ज्ञानदेवांच्या गळ्यास लागलेल्या अजानवृक्षाची मुळी तूं काढ. म्हणजे तुझा रोग बरा होईल,’ असा यांस दृष्टांत झाल्यानें हे आळंदीस आले. या प्रसंगाची हकीगत यांनीं स्वतःच पुढील अभंगांत दिली आहे:

श्रीज्ञानदेवें येऊन स्वप्नांत । सांगितली मात मजलागीं ।
दिव्य तेजःपुंज मदनाचा पुतळा । परब्रह्म केवळ बोलतसे ।
अजानवृक्षाची मुळी कंठास लागली । येऊनि आळंदीं काढ वेगीं ।
ऐसें स्वप्न होतां आलों अलंकापुरी । तंव नदीमाझारीं देखिलें द्वारा ।
एका जनार्दनीं पूर्व पुण्य फळलें । श्रीगुरु भेटले ज्ञानेश्वर ॥

या अभंगावरून त्या वेळीं ज्ञानदेवाच्या समाधीचें द्वार नदीमध्यें होतें. हल्लीं जेथें सिद्धेश्वरापुढील नंदी दाखविला जातो तेथें त्या वेळीं नदीचें पात्र असावें. एकनाथ त्या मार्गानें जाऊन त्यांनीं अजानवृक्षाची मुळी सोडविली असें दिसतें. नंतर हे पैठण येथें आले आणि तेथें शके १५०६ ( स. १५८४ ) तारणनाम संवत्सरीं कपिलाषष्ठीला सध्यांची ज्ञानेश्वरी जगाला दिली. यांनीं लिहिलेली ज्ञानेश्वरीची संशोधनपत्रिका पुढीलप्रमाणें आहे:

श्रीशके पंधराशें बारोत्तरीं । तारण नाम संवत्सरीं ।
येका जनार्दन अत्यादरीं । गीता ज्ञानेश्वरीप्रति शुद्ध केली ॥ १ ॥
ग्रंथ पूर्वींच अतिशुद्ध । परी पाठांतरीं शुद्ध अबद्ध ।
तो शोधूनिया एवंविध । प्रतिशुद्ध सिद्ध ज्ञानेश्वरी ॥ २ ॥
नमो ज्ञानेश्वरा निष्कळंका । जयाची गीतेची वाचितां टीका ।
ज्ञान होय लोकां । अति भाविकां ग्रंथार्थियां ॥ ३ ॥
बहु काळ पर्वणी गोमटी । भाद्रमास कपिलाषष्ठीं ॥
प्रतिष्ठानीं गोदातटीं । लेखनकामाठीं संपूर्ण झाली ॥ ४ ॥

ज्ञानेश्वरीपाठीं । जो ओवी करील मऱ्हाठी ।।
तेणें अमृताचे ताटीं । जाण नरोटी ठेविली ॥ ५ ॥
( ज्ञानेश्वरी, कुंटेप्रत )

शके पंधराशें बारोत्तरीं हा पाठ चूक दिसतो, कारण त्या सालीं तारण संवत्सर येत नाहीं. साहोत्तरीं असा पाठ कांहीं प्रतींत आहे. तो बरोबर दिसतो. कांहीं जुन्या रूपांबद्दल नवीं रूपें घालणें वगैरे किरकोळ सुधारणांखेरीज यांनीं ज्ञानेश्वरीमध्यें फारशा सुधारणा केल्या असें यांच्या शब्दावरून दिसत नाहीं, असें प्रो. रा. द. रानडे म्हणतात ( संतवचनामृत पा. २९ प्रस्तावना ). पण ज्ञानेश्वरीच्या पाठांत ओवी घुसडून देणारा अमृताच्या ताटांत नरोटी ठेवणाऱ्याप्रमाणेंच हास्यास्पद होईल, असें यांनीं आपल्या ज्ञानेश्वरीच्या संशोधनपत्रिकेंत म्हटलें आहे. यावरून तसा कांहीं प्रयत्न त्या वेळीं झाला असावा असें वाटतें. म्हणूनच याला ज्ञानेश्वरीची संहिता निश्चित करणें भाग पडलें असावें.

ज्ञानेश्वरींतील किमयेच्या ओव्या यांनीं ज्ञानेश्वरींतून काढून टाकल्या. कारण केवळ त्याच दृष्टीनें ज्ञानेश्वरीकडे लोक पाहूं लागले आणि ज्ञानेश्वरींतील इतर अत्यंत महत्त्वाच्या भागांकडे लोकांचें दुर्लक्ष होऊं लागलें अशी आख्यायिका आहे. तसेंच ज्ञानेश्वरांच्या ओवीचा चवथा चरण तोटका असतो, पण एकनाथांची ओवी पूर्ण चार चरणांची असते. पूर्ण चार चरणांच्या कांहीं ओव्या ज्ञानेश्वरींत आहेत त्या एकनाथांच्या असाव्यात.

एकनाथ हे कीर्तन करतां करतांच पैठण येथें शके १५२१ मध्यें समाधिस्थ झाले. केशवानें व महिपतीनें लिहिलें आहे कीं, यांनीं गोदावरींत देह ठेविला.

यांचें एकनाथी भागवत हें वारकऱ्यांच्या प्रस्थानत्रयीपैकीं असून अत्यंत लोकप्रिय आहे. तसेंच भावार्थरामायण आणि रुक्मिणीस्वयंवर हे ग्रंथहि प्रासादिक असून लोकांना फार आवडतात. पण यांचें मूर्तिमंत दर्शन यांच्या अभंगांमध्यें आणि भारूडांमध्यें घडतें. हे कीर्तनकार असून यांना गाण्याचें अंगहि चांगलेंच अनुकूल असावें. समाजांतील वेगळाल्या जातींच्या आचारविचारांचा तन्मयतेनें आणि सहृदयतेनें यांनीं उपयोग करून घेतला आहे; आणि त्यावर स्फुट कवनें केलीं आहेत. त्यांचा ताजेपणा व आकर्षकपणा अद्यापिहि कायम आहे. मग खुद्द नाथच त्यांचा कीर्तनांत उपयोग करीत असतलि तेव्हांचा रंग अद्भुतच असला पाहिजे. आणि हें केवळ करमणुकीकरितां केलें नसून तत्त्वज्ञानाच्या भूमिकेवर रचलेलें असल्यामुळें त्याला करमणुकीबरोबर भारदस्तपणाहि आला आहे. आजचे गोंधळी, भराडी, वासुदेव, भुत्ये, वाघे, मुरळी, बहुरूपी इत्यादि नाथांच्याच भारूडाचा उपयोग करून आपली भूमिका विनोदी दिसत असली तरी तत्त्वज्ञानावर उभारली आहे असें दाखवितात.

अनेक दृष्टींनीं पाहतां असें दिसून येतें कीं, एकनाथ हा लोकोत्तर पुरुष होता. त्याचें काम अगदीं बिनखोड आहे. याचे ग्रंथांत कांटेतोलपणा, व्यावहारिक चातुर्य, खोल अर्थ व सर्वव्यापी प्रमेयें हीं सर्वभर आढळतलि. किंबहुना या व अशा सर्व बाबींत एकनाथ केवळ हातखंडा आहे. याची राहणी आणि वागणीहि अशीच अवर्णनीय दिसते. हा जसा लौकिकांत वागतो तसेंच ग्रंथांत लिहितो. आणि तो जसें लिहितो तसाच वागतो. हें असिधाराव्रत फार कठीण आहे, पण तें एकनाथानें साधून दाखविलें. आणि यामुळेंच कृष्णदयार्णव याला 'सकळ सद्गुणीं संपूर्ण' असें म्हणतो. देवदास याला 'उदार, धीर, सर्वज्ञ' असें संबोधतो. एकेश्वर अवधूत याचे ग्रंथ पाहून याला 'व्यासाचा साक्षात् अवतार' मानतो. मोरोपंत म्हणतो, 'तो केवळ-प्रभुरूप' असा 'शांतिजलधि' आहे. कारण 'स्वापत्य तसें प्रेमें अन्नार्थि प्राणिजात तर्पावें' ही त्याची नेहमींची करणी असे. अमृतराय तर याला 'परमपुरुष परम भागवत' च लेखतो. तुकाराम याचे गुण आठवून आणि यानें वैष्णवांचा मिळवलेला मेळा पाहून 'त्याचे पायीं माथा' ठेवतो. मुक्तेश्वराला याचे आचारविचार हे 'निर्दोष आणि निर्मळ' वाटतात आणि हा सकल 'सज्जनवृंदांपेक्षां अधिक' श्रेष्ठ दिसतो. याचा सहचर व गुरुबन्धु दासोपंत याला तर याचा सगळाच चमत्कार अनुभवास येतो. तो याला दयेचें अधिष्ठान समजतो. अलीकडे विद्वान् लोकहि एकनाथाकडे पाहून कौतुकानें मानाच डोलावतात. चिपळूणकरशास्त्री, गोडबोले, राजारामशास्त्री भागवत, सहस्रबुद्धे, पावगी वगैरे मंडळी तर एकनाथाची थोरवी गातातच, पण नवीन पंथाची मंडळी देखील याचे ग्रंथ मनापासून वाचतात व अभ्यासतात. न्यायमूर्ति रानडे तर याच्या ग्रंथाचा फार प्रेमानें अभ्यास करीत व करवीत. असा हा एकनाथस्वामी केवळ अलौकिक पुरुष होता. अनाथ दुबळ्यांना साह्य करावें, बुडत्यांना हात द्यावा, विश्वकुटुंबी वृत्ती ठेवावी, असंतांनाहि संत मानावें, भक्त्यानंद आपण भोगावा व दुसऱ्यांना भोगवावा, ईश्वरचरित्रांत आपण रमावें व इतरांना रमवावें. सुंदर ग्रंथ आपण लिहावे व दुसऱ्यांकडून लिहवावे, हाच क्रम यानें आजन्म आचरला.

याच्या चरित्रांतील विलक्षण आणि चिंतनीय गोष्ट म्हटली म्हणजे निरनिराळ्या उत्तरकालीन पांच ग्रंथकारांस याच्या कृपेनें, आशीर्वादानें किंवा सामर्थ्यानें ग्रंथरचनास्फूर्ति झाली ही होय. केवळ याच्याच कृपेनें आपलें युद्धकांड पुरें करण्यास कृष्णदास मुद्गल समर्थ झाले. याशिवाय नाथांचा नातू मुक्तेश्वर हा जन्मतः मुका असतां नाथकृपेनें त्यास वाचा फुटली अशी कथा प्रसिद्ध आहे. याचा एक शिष्य गावबा हा अपंडित असतां, आपल्या भावार्थरामायणाचा उर्वरित भाग पुरा करण्याचें सामर्थ्य नाथानें त्यास दिलें. त्याचप्रमाणें, प्रसिद्ध 'हरिवरदा' ग्रंथाचा कर्ता श्रीमत्कृष्ण-दयार्णव यास सदर ग्रंथ लिहिण्याची स्फूर्ति नाथानें दिलेल्या दृष्टांतामुळेंच झाली, हें खुद्द दयार्णवस्वामींनींच 'हरिवरदा' ग्रंथांत नमूद केलें आहे. याशिवाय पेश-वाईच्या अखेरीस पुण्याच्या बाजूस होऊन गेलेल्या ठाकुरदास बाबा यांनींहि एकनाथमहाराजांच्या कृपेनेंच आपणास कवित्वस्फूर्ति झाली असा स्पष्ट उल्लेख आपल्या कवितेंत केला आहे.

१ चतुःश्लोकी भागवतटीका
२ एकनाथी भागवत ( एकादशस्कंध टीका २०००० ओंवी )
लेखनकाल शा श. १४९२–१४९५ कार्तिक शु. १५
३ रुक्मिणीस्वयंवर ( ओवीबद्ध ) (शा. श. १४९३) ( २ ) ( अभंगबद्ध )
४ भावार्थरामायण ( गावबा, जयरामसुत )
५ शुकाष्टकावर टीका ( ४५८ ओव्या )
६ आनंदलहरी ( १५४ ओव्या )
७ गीतासार ( ४५० ओव्या )
८ आनंदानुभव ( ? ) ( एकनाथ असा निर्देश )
९ हस्तामलक ( ६७४ ओव्या )
१० स्वात्मसुख ( ५११ ओव्या )
११ प्रल्हादविजय (नृसिंहजन्म, प्रल्हादचरित्र, चिलया-कथा )
१२ एकनाथीगाथा ( पदें, अभंग, भारुड वगैरे )
१३ गंगागौरींचें भांडण
१४ चिरंजीवपद ( ओव्या ४२ )
१५ गणेशविलास
१६ एकादशी–माहात्म्य
१७ मुद्राविलास
१८ बालक्रीडा व इतर दशमस्कंधांतील प्रकरणें (दशम-स्कंधाचा एक भाग. एकनाथ, जनार्दनाचा एका, असें जरी कर्त्याचें नांव असलें तरी हा ग्रंथ याचा नसावा. )
१९ रुक्मं-गदाची कथा
२० तुळशीमाहात्म्य
२१ हनूमज्जन्म
२२ शिवपार्वतीविवाह
२३ रामरावणाची व सीतामंदोदरींची एकात्मता.

भावार्थरामायण हा प्रचंड ग्रंथ पहिलीं पांच कांडें व सहाव्या युद्धकांडाचे ४४ अध्याय झाल्यावर हे समाधिस्थ झाले. बाकीचे १२५ अध्याय गावबाचे आहेत. म्हणजे मूळ ग्रंथाच्या ४० हजार ओव्यांपैकीं २५ हजार ओव्या नाथांच्या आणि १५ हजार गावबाच्या आहेत. त्यांत वाल्मिकीरामायण, अध्यात्मरामायण, भागवत, हनूमान् नाटकासारखीं संस्कृत नाटकें, योगवासिष्ठ इत्यादि ग्रंथांचे आधार घेतले आहेत. शिवाय अहिमहिचें आख्यान जयरामसुत नांवाच्या कवीनें या रामायणाला जोडलें आहे ( ८५४. ३४० ). जयरामसुत व गावबा हे भिन्न होत असें लिहिण्यावरून दिसतें. यांनीं दशावतार नांवाचें एक छोटेंसें अभंगात्मक प्रकरण रचलें आहे. त्यांत नववा अवतार विष्णु बौद्ध होऊन पंढरीस विटेवर उभे राहिले असें दिलें आहे.

याशिवाय हळदुली, कृष्णदान ( सत्यभामेनें नारदाला कृष्ण दान दिला आणि अगणित संपत्तीपेक्षां केवळ भक्तिभावानें ठेवलेल्या रुक्मिणीच्या तुळसीपत्रानें तोलला जाऊन परत मिळाला ), श्रीदत्तजन्माख्यान, अमृतानुभव टीका यांशिवाय ध्रुव, उपमन्यु व सुदामा यांचीं अभंगात्मक चरित्रें, जिवाजीपंत व आत्मारामपंत यांचा गद्य पत्रव्यवहार अशीं अनेक प्रकरणें लिहिलीं.

तो काल संस्कृत ग्रंथ लिहिणारांचा असल्यामुळें यांचा पंडित लोक तिरस्कार करीत. पण प्रत्यक्ष यांचें विवेचन ऐकल्यावर यांच्या शास्त्रशुद्ध विवेचनाची लोकांवर छाप पडे. यांचा भागवतग्रंथ प्रथम मनकर्णिकेच्या घाटावर वाचण्या-सहि विरोध झाला, पण विद्वानांनीं तपासल्यावर शेवटीं त्याच ग्रंथाची काशीक्षेत्रांतून पालखींत घालून मिरवणूक काढण्यांत आली. भागवत यांनीं काशीसच पुरें केलें. तेथें यांचा साडेतीन वर्षें मुक्काम होता ( १४९२–९५ कार्तिक ). हरिपंडित रुसून काशीस गेला असतां त्याची समजूत घालण्याकरितां आणखींहि हे काशीस गेले होते ( शा. श. १५१९ )

यांना हरिपंडित नांवाचा एक मुलगा आणि गोदुबाई व गंगाबाई नांवाच्या दोन मुली होत्या. मुक्तेश्वर कवि हा गोदुबाईचा मुलगा होय. गोदुबाई वडील असून हरि-पंडित मधले होत. गोदुबाईचें सासरचें नांव गंगाबाई होतें.

केशव नांवाच्या कवीनें शके १६८२ सालीं श्रीएकनाथ-चरित्र नांवाचें ३१ अध्यायांचें प्रकरण लिहिलें. याचाच आधार घेऊन व आणखी भर घालून महिपतीनें भक्तलीलामृत ग्रंथांत सविस्तर चरित्र लिहिलें. प्रसंगत इतर ग्रंथकारांनीं केलेले निर्देश व वरील साहित्य हेच यांच्या चरित्राचे मुख्य आधार होत.

वारकरी सांप्रदायाची संघटना हा यांच्या कर्तबगारीचा अत्यंत महत्त्वाचा भाग आहे. ज्ञानेश्वर, एकनाथ व तुकाराम हे तीन या सांप्रदायाचे मुनि होत. ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत आणि तुकारामाची गाथा हे या सांप्रदायाची प्रस्थानत्रय होय. या तिघांच्या विचारसरणींत सारखेपणा आहे. हे पक्के अद्वैतवादी असून सगुणभक्तीचे प्रचारक आहेत. पंढरीचा विठ्ठल हा यांचा देव असून शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाशीं हे समरस झाले आहेत. द्वैतीं व ज्ञानविमुख अशा इतर भागवत सांप्रदायांपेक्षां यांचा भागवतधर्म वेगळा आहे. आणि त्याचा प्रचार या तिघांपैकीं एकनाथानें विशेष तत्परतेनें आणि समंजसपणें केला आहे. ज्ञानेश्वरी शुद्ध स्वरूपांत सांभाळण्याची खटपट करून तिचा सांप्रदायाचा मूळ ग्रंथ म्हणून यानें प्रचार केला. ज्ञानेश्वरीला अद्यापि समाजांतील वरच्या वर्गांतील शास्त्रीपंडितांकडून मान्यता मिळाली नव्हती. तें काम पैठणसारख्या क्षेत्रांतील या थोर ब्राह्मणानें पार पाडलें. ज्ञानेश्वराची समाधि शोधून काढली, तिचा जीर्णोद्धार केला आणि तुकारामासारख्याला स्फूर्ति देऊन वारकरी सांप्रदायाचा भव्य आणि सर्वसंग्राहक प्रासाद उभारला. याचें वर्णन पुढीलप्रमाणें आढळतेंः

संतकृपा झाली । इमारत फळा आली ॥
ज्ञानदेवें रचिलें पाया । रचियेलें देवालया ॥
नामा तयाचा किंकर । तेणें केला हा विस्तार ॥
जनार्दन एकनाथ । ध्वज उभारिला भागवत ॥
भजन करा सावकाश । तुका झालासे कळस ॥
(४३९९)

हा तुकारामाच्या गाथ्यांत क्षेपक अभंग म्हणून दिला आहे. पण हा तुकारामाशीं समकालीन असणाऱ्या बहिणाबाईचा आहे.

एकदा जारे अलंकापुरा जन्म एरझारा चुकवा ॥

असा टाहो फोडून पंढरीबरोबर आळंदीच्या वारीस यानें उत्तेजन दिलें.

ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायांत ज्या पद्धतीनें योगशास्त्राचें विवरण आहे, अगदीं त्याच पद्धतीनें विवरण यांच्याहि भागवतांत आहे. तुकारामाच्याहि लिहिण्यांत त्यांतील कांहीं खुणा आढळतात. पण पुढें तो योग नष्ट झालेला दिसतो. तिघांच्याहि समाधिकालच्या ज्या आख्यायिका व अभंग आहेत त्यांवरून या तिघांचाहि योगशास्त्राशीं अनुभवाचा संबंध होता असें दिसतें.

नाथाच्या वाङ्मयांतील कांहीं नमुनेः—

भिंगाचें भिंगुलें खांद्यावर अंगुलें ।
नाचत तान्हुलें यशोदेचें ॥
येतीं गवळणी करिती बुझावणी ।
लागती चरणीं कान्होबाच्या ॥
गोविंद बाळिया वाजविती टाळिया ।
आमुचा कान्हया देवराव ॥
कडदोरा विंदली वाघनखें साजिरीं ।
नाचत श्रीहरि यशोदेचा ॥
पायीं घागरिया वांक्या साजरिया ।
कानींच्या बाळिया ढाळ देती ॥
एका जनार्दनीं एकत्वें शरण ।
जीवें निंबलोण उतरिती ॥

जोशी

आम्ही अलक्षपुरचे जोशी । शकुन सांगूं निश्चयेसीं ॥
तेणें चुकती चौऱ्यांशीं । मी निर्गुणपुरचा जोशी ॥
होरा ऐका दादानो । होरा ऐका दादानो ॥ ध्रु० ॥
नका जाऊं मनामागें । थोरथोरां झाले दगे ॥
मी बोलत नाहीं वाउगें । सावध रहा दादानो ॥
वासना वाईट ही बा थोर । भुलविले लहानथोर ॥
फिरती चौऱ्यांशीं लक्ष घरें । पडाल फशीं दादानो ॥
एका जनार्दनीं जोशी । सांगेल शकुन सर्वत्रासी ॥
रामनाम वाचेसी । तेणें तरती विश्वासी दादानो ॥

**एकोजी शहाजी भोसले**—(स. १६३१-१६८५) याची आई तुकाबाई. ती मोहित्यांपैकीं होती. ही शहाजीची दुसरी स्त्री. याचा जन्म स. १६३१ त झाला. शहाजी बंगलोरास असतांना, हा त्याच्याजवळ असे. याचें खरें नांव व्यंकोजी नसून एकोजी असें होतें. यानें सेंगमलानें खंड न दिल्यामुळें त्यास ठार केलें, व तंजावर काबीज केलें. हा मुसलमानांच्या बाजूनें नेहमीं शिवाजीवर हल्ला करी. शिवाजी यास निम्मा वांटा देण्यास तयार झाला. याची पत्नी दीपाबाई हिनें याला बोध केला, त्यामुळें पुढें यानें रघुनाथरावास बोलावून राज्याची वांटणी केली. याला तीन राण्या होत्या; व शहाजी, शरफोजी व तुकोजी असे तीन पुत्र होते. राज्याचे पांच सुभे होते.

शहाजीला कैद केल्यावर बंगलोर व कोंडाणा हस्तगत करण्यास रुस्तुमजमा ऊर्फ फर्हादखान व तानाजी डुरे

यास पाठविलें. त्यांचा याचा थोरला भाऊ संभाजी यानें पराभव केला व परत फिरवलें. त्या युद्धांत हा असावा ( स. १६४८ डिसेंबर–१६४९ जानेवारी ).

स. १६५७ मध्यें विजापुरास गडबड उडाल्यामुळें कर्नाटकांतल्या नाइकांनीं विजापूरचा अंमल झुगारून दिला. तेव्हां शहाजीला विजापुरकरानें तिकडे रवाना केलें. तेव्हां स. १६५८ मध्यें शहाजीनें कनकगिरीच्या पूर्वेस श्रीशैलमल्लिकार्जुन म्हणून स्थान आहे तें हस्तगत करण्यास एकोजीस रवाना केलें होतें. तेव्हां एकोजीबरोबर कवि जयराम पिंडे हा होता. शिवाजीनें जसें महाराष्ट्रांत स्वतंत्र राज्य निर्माण केलें तसें कर्नाटकांत एक राज्य निर्माण करून त्यावर एकोजीस बसवावें अशी शहाजीची इच्छा होती, पण तंजावरचा लिंगप्पा नाईक त्यास वश झाला नाहीं. पण त्याच्या हयातींत न झालेलें काम एकोजीनें शहाजीच्या मृत्यूनंतर स. १६७४ मध्यें तंजावर घेऊन तेथें स्वतंत्र राज्य स्थापून केलें ( शहाजी पा. ८ ). शहाजी तुंगभद्रातीरीं बारल्यावर ( २३।१।१६६४ ) यानें शहाजीची क्रिया केली. पुढें बंगलोर याच्याकडे राहिलें तरी तें यानें म्हैसूरच्या चिक्कदेवराज ओडियार यास स. १६८२ मध्यें खरेदी दिलें ( शहाजी पा. ).

दक्षिण हिंदुस्थानांत मराठ्यांचा प्रवेश स. १६३८ मध्यें शिवाजीचा बाप शहाजी आला तेव्हां झाला. तेव्हां शहाजी हा विजापूरच्या आदिलशाही बादशहाच्या पदरीं होता. तो सैन्य घेऊन दक्षिणेंत आला होता. या कर्नाटकांतील लढायांमध्यें शहाजी व त्याचें सैन्य तीस वर्षेंपर्यंत गुंतलें होतें. शहाजीनें म्हैसूर, वेल्लूर व जिंजी हे प्रांत जिंकून घेतले. या कामगिरीबद्दल बक्षीस म्हणून बंगलोर, कोल्लार, सीरा ऊर्फ कत्ता, व म्हैसूर प्रान्तांतील आणखी कांहीं भाग इतकी जहागीर स. १६४८ त त्याला मिळाली. या लढायांतच मदुरा व तंजावर येथील पुरातन 'नाईक' संस्थानिकांना विजापूरच्या बादशहास शरण येऊन खंडणी देण्यास शहाजीनें भाग पाडलें. बंगलोर येथें शहाजीचें मुख्य ठाणें असून दक्षिणेंत आलेल्या मराठा सैन्याचा तळ बंगलोरासच होता. शहाजी स. १६६४ ( शा. श. १५८५ ) मध्यें घोड्यावरून पडून मेल्यावर त्याची दक्षिणेकडील जहागीर त्याजजवळ असलेला त्याचा पुत्र एकोजी याजकडे आली.

यानें विजापूरच्या पक्षास राहून भावाशीं विरोध आरंभिला होता. यांत याचा सद्धेतु (आदिलशाहींच्या दृष्टीनें ) होता म्हणूनच अलीआदिलशहानें यास २ परगणे त्याबद्दल इनाम दिले आहेत. याची मिती श. १५८७ श्रा. शु. १२ ( स. १६६५ ऑगस्ट १२ ) ही आहे.

शहाजी मेल्यावर हा बंड करून स्वतंत्र न होतां विजापूरचें अधिराज्य कबूल करून त्याचा मोठा अभिमान धरून होता, त्याबद्दलहि कदाचित् वरील इनाम मिळालें असेल ( मं. त्रै. वर्ष ११. १ लें १० ).

या वेळीं तंजावर व मदुरा येथील 'नाईक' राजांमध्यें प्राणघातक तंटे सुरू होऊन त्यांत तंजावरच्या राजाचा पराभव झाला. तेव्हां तो विजापूरच्या दरबाराकडे आश्रयासाठीं गेला. त्या दरबारानें राजास गादीवर बसवावें अशी एकोजीला आज्ञा दिली. तेव्हां बारा हजार सैन्य बरोबर घेऊन एकोजीनें चाल केली, व त्या शरणागत राजास गादीवर बसविलें. तथापि त्या राजाच्या पक्षांतील लोकांत कलह होऊन एका बाजूच्या लोकांनीं एकोजीस बोलावणें धाडलें व 'तुम्हीं तंजावरचा प्रांत काबीज करा' अशी याला विनंति केली. मराठ्यांचें सैन्य येतांच तंजावरचा राजा पळून गेला. तेव्हां एकोजीनें तंजावर घेतलें ( स. १६७४ ) व बंगलोर येथील ठाणें उठवून तंजावर मुक्कामीं नेलें ( स. १६७५ ).

तंजावर येथें एकोजी राज्य करीत असतांना, एक विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट झाली. ती म्हणजे स. १६७७ मध्यें शिवाजीनें त्या प्रांतावर स्वारी केली ही होय. याचा निभाव न लागून ही कर्नाटकांतील वडिलोपार्जित जहागीर अनायासें शिवाजीच्या हस्तगत झाली. तंजावर व त्रिचनापल्ली येथील या जहागिरीवर शिवाजीचाच हक्क आहे, असें विजापूर सरकारनेंहि कबूल केलें. आपल्या सावत्र भावास जय मिळाला म्हणून याची अगदीं निराशा झाली. तेव्हां बैरागी होऊन संसारत्याग करण्याचा यानें निश्चय केला. पण शिवाजीनें यास एक खरमरीत पत्र लिहून त्यांत 'तुझें कर्तव्य काय ? व तूं करतोस काय ?' अशा प्रकारें याची नीट कानउघाडणी केली. तेव्हां याचें मन वळून बैरागी होण्याचा यानें हट्ट सोडला. या वेळेस आपल्या भावाचें समाधान व्हावें म्हणून शिवाजीनें अत्यंत उदारपणानें वडिलोपार्जित उत्पन्नावरील सर्व हक्क यास दिला. पण या औदार्याचा परिणाम राजकीय दृष्ट्या अनिष्टच झाला. मराठी राज्यापासून तें राज्य स्वतंत्र राहूं लागलें. पण स्वतंत्रपणें राहून दुसऱ्यावर दाब ठेवण्याला आवश्यक असणारे शौर्यादि गुण यापाशीं नव्हते. तेव्हां म्हैसूरकडील दूरचीं ठाणीं आपल्या ताब्यांत ठेवण्याचें अवसान यास नसल्यानें यानें म्हैसूरच्या राजास बंगलोर देऊन टाकलें व त्याचा मोबदला

म्हणून अवघे तीन लाख रुपये यास मिळाले. याप्रमाणें या राज्याचे तुकडे होऊन याच्या मागें हैदर, टिपू व इंग्रज यांनीं त्याच्या राज्याची दुर्दशा करून टाकली. हा १६८७ मध्यें मरण पावला (मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष, पा. १४४-१४६).

**एच्चम्मा नायक**—(स. १६१४-१६) विजयनगरच्या आरविडु घराण्यांतील चिक्कराय किंवा रंगराय ३ रा याचा हा एक सरदार होय.

जेव्हां जगरायानें चिक्करायाला कैद केलें तेव्हां त्याला सोडविण्याची यानें बरीच खटपट केली व गुप्त रीतीनें चिक्करायाचा एक मुलगा आपल्याजवळ आणून ठेविला.

चिक्करायाच्या वंशाचा भयंकर रीतीनें नाश झाल्याचें कळल्यावर याला जगरायाचा अतिशय राग आला व त्याला (जगरायाला) यानें लढाईचें आव्हान दिलें. जगराय व एच्चम्मा नायक यांच्यामध्यें लढाई होऊन तींत जगरायाचा पराभव झाला व त्याला जंगलाचा आणि पहाडांचा आश्रय करणें भाग पडलें. जगरायाचा पराभव केल्यावर यानें राजपुत्रास विजयनगरचे गादीवर बसविलें व तो राजा असल्याचें जाहीर केलें. त्या वेळीं बरेच सरदार लोक याच्या पक्षास येऊन मिळाले. त्यामुळें याचा पक्ष बळकट झाला व दिवसेंदिवस याच्या पक्षास यश येऊं लागलें.

अशा रीतीनें यानें एक प्रकारची मोठी कामगिरी बजाविली. वरील सर्व गोष्टी स. १६१४ पासून १६१६ पर्यंत घडल्या असाव्या.

**एडवर्ड ह्यूज**—(स. १७२१?-१७९४) इंग्रजांचा हिंदुस्थानांतील नौकायोद्धा.

ह्यास आपल्या मुत्सद्देगिरीची फार मोठी घमेंड होती व त्यामुळें हा इतरांच्या कारभारांत ढवळाढवळ करीत असे. यानें आपले कांहीं पगारी हेर पुण्यास ठेविले होते. परंतु नाना फडणवीसानें त्यांना पकडून कैदेंत ठेविलें. तेव्हां यानें २०० पगाराचा एक ब्राह्मण हेर ठेविला, व इंग्रजांशीं तह करणें किती फायद्याचें आहे, ह्याचीं पत्रें यानें पुणें दरबारीं पाठविण्याचा सपाटा चालविला होता (म. रि. उ. वि. १, पृ. ३९७).

**एडेन जॉर्ज**-(लॉर्ड ऑकलंड)—(स. १७८४-१८४९) हा एक हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल होय (स. १८३६-४२). ऑक्सफोर्ड येथें शिक्षण संपवून स. १८०९ मध्यें हा वकिली करूं लागला. स. १८१४ त बाप वारल्यावर बॅरन ऑकलंड या नांवानें हा हौस ऑफ लॉर्ड्सचा सभासद झाला. स. १८३० त बोर्ड ऑफ ट्रेड-(व्यापारी मंडळ) चा अध्यक्ष व टांकसाळीवरचा मुख्य अधिकारी झाला व स. १८३५ त हा गव्हर्नर जनरल म्हणून हिंदुस्थानांत आला.

यानें हिंदी लोकांच्या शिक्षणाकडे विशेष लक्ष दिलें. यात्रेकरूंवरील कर, देवस्थानावरचा सरकारी ताबा, लोकांच्या धार्मिक संस्कारांच्या वेळीं कंपनीचें सैन्य व अधिकारी यांनीं हजर राहणें यांसारख्या गोष्टी बंद केल्या. या वेळीं इंग्लंडचा परराष्ट्रीय मंत्री लॉर्ड पामर्स्टन हा होता. याच्या चिथावणीनें त्यानें अफगाणिस्थानांत थोडी खळवळ दिसतांच त्याशीं युद्ध पुकारलें (स.१८३८). त्या युद्धांत इंग्रजांचा पूर्ण मोड होऊन ब्रिटिश सैन्याची सरसहा कत्तल करण्यांत आली. आपलें धोरण चुकलें व पहिल्या चुकीची दुरुस्ती करण्यास अवसर न देतां डायरेक्टरांनीं दुसरा गव्हर्नर जनरल नेमला, या दुहेरी अपमानांत याला स्वदेशाचा रस्ता धरावा लागला. पण अधिकारावर असलेल्या याच्या पक्षानें याच्या चुकांवर पांघरूण घालून याला पहिला आरमारी अधिकारी नेमिलें.

**एरेप्रगड**—तेलगू कवि. यास तेलगू वाङ्मयांत फार मान आहे. यास 'प्रबंधपरमेश्वर' अशी पदवी आहे. याचें हरिवंश नांवाचें काव्य प्रसिद्ध आहे. या हरिवंशापेक्षांहि महाभारताचा वनपर्वापैकीं राहिलेला भाग यानें पूर्ण केला म्हणून याची प्रसिद्धी आहे. तेलगू भाषेंत महाभारत तीनशें वर्षांत तीन व्यक्तींकडून पुरें झालें. त्या तिघांपैकीं हा एक होय.

**एरेमाधवराय**—हा एक व्याकरणकार असून विजयनगरच्या दुसऱ्या व्यंकट राजाच्या दरबारांतील पंडितांत याची गणना होत होती.

यानें 'त्रिपद्योतिनि' हा ग्रंथ व्याकरण विषयावर लिहिला आहे (आरविंडु डिनॅस्टी, पृ. ५२१).

**एरेयंग रट्ट**—(स. १०४०) हा रट्ट घराण्यांतील एक राजा. हा कन्नकेर पहिला याच्या मागून गादीवर आला. हा जैनधर्मी व यादवांचा मांडलिक होता.

**एरेयंग होयसळ**—हा होयसळ घराण्यांतील विजयादित्याचा मुलगा. याची पत्नी महादेवी. ही उच्चंगीच्या इरुक्पाळ पांड्याची मुलगी.

**एलम्मा गारु**—वल्लभाचार्यांची माता, व लक्ष्मणभट्टाची पत्नी.

**एलय रेड्डी**—प्रतापरुद्राचा सर्वाधिकारी.

**एलल**—सिलोन जिंकणारा चोलराजा.

**एलिझाबेथ**—(स. १५३३-१६०३) इंग्लंडची राणी. हिच्या कारकीर्दीत इंग्लंडमध्यें ईस्ट इंडिया कंपनी

हिनेंच ईस्ट इंडिया कंपनीस हिंदुस्थानांत व्यापार करण्याची पहिली सनद दिली.

**एलेन्बरो**—( स. १७९०–१८७१ ) हा लॉ एडवर्डचा मुलगा. हिंदुस्थानचा एक गव्हर्नर जनरल. याचें शिक्षण ईटन व केंब्रिज येथें झालें. परराष्ट्रीय राजकारणांत याचें फार लक्ष असे. सिंधच्या अमिराशीं विनाकारण युद्ध करून तो प्रांत यानें बळकाविला. यानें गुलामगिरी अमान्य ठरविली. लॉटरी बंद केल्या. बंगालमधील पोलिसांची सुधारणा केली. अफगाणिस्थानासंबंधीं याचें धोरण, सिंधची जप्ती, ग्वाल्हेरवर मोहिम या त्याच्या कारकीर्दीतील मुख्य गोष्टी. स. १८४१ त हा हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल झाला. इंग्लंडांत हा स. १८४६ त आरमारी अधिकारी झाला.

**एलेल शिंगण**—हा तामिळ भाषेंतील कुरल काव्याचा कर्ता. तिरुवळुवर याचा मित्र होता. त्या वेळचा हा प्रमुख होता. याचे सर्व व्यवहार दर्यामार्गानें चालत होते. याच्या नांवाचा शेवटला शब्द सिंगण हा बेटाशीं संबंध दाखवितो ( मनु चोल पाहा ).

**एलफिन्स्टन मौंट स्टुअर्ट**—( स. १७७९-१८५९) पेशवाईअखेरचा पुण्याचा रेसिडेंट. हा स्कॉटलंडमधला असून याचा जन्म ता. ६-१०-१७७९ रोजीं झाला. ता. २६-२-१७९६ रोजीं कंपनींत नोकरी मिळून हा कलकत्त्यास आला. फोर्ट वुइल्यम कॉलेज, कलकत्ता, येथें परीक्षेकरितां दाखल झाला ( स. १८०० ). पुण्याच्या रेसिडेंटचा असिस्टंट सेक्रेटरी झाला ( स. १८०१ ). नागपूरचा रेसिडेंट झाला ( स. १८०३ ). नंतर शिंद्याचे दरबारीं थोडे दिवस काम केल्यावर जुलै स. १८०८पासून काबूल येथें वकील होता. तेथून स. १८१० च्या जूनमध्यें पुण्याचा रेसिडेंट झाला. स. १८१९-१८२७ पर्यंत हा मुंबईचा ले. गव्हर्नर होता. हा मुत्सद्दी तसा शिपाईहि होता. शेवटीं हा स. १८५९ मध्यें स्कॉटलंडांत गेला. याचें चरित्र मराठी व इंग्रजी भाषांत ( काटन, कोलब्रुक ) अनेकांनीं लिहिलें आहे. याचा राजकीय पत्रव्यवहार व डायरी प्रसिद्ध आहेत.

**एल्यट**—हा एक इंग्रजांचा वजनदार वकील होय. स. १७७७ त हेस्टिंग्सनें याला व जेम्स् ॲंडरसन आणि कॅ. कँपबेल यांना भोसल्यांचें मन वळविण्याकरितां नागपुरास पाठविलें. वरील तीन वकीलांपैकीं हा फार हुशार होता. पण नेमल्या ठिकाणीं पोंचण्यापूर्वीच हा वाटेंत ता. १२–९–१७७८ रोजीं मरण पावला. त्यामुळें याच्या हातून जें कारस्थान हेस्टिंग्स यास घडवून आणावयाचें होतें तें लांबणीवर पडलें ( म. रि. उत्तर वि. १ ला, पृ. २५५–५६ ).

**एल्हण**—एल्हण व चाल्हण हे दोन महानुभाव मराठी कवि, १४ व्या शतकांतील सर्वांत श्रेष्ठ कवि होत. एल्हण यानें ब्रह्मविद्येच्या किंवा मोक्षसाधनाच्या मार्गे फारसें न लागतां कृष्णचरित्राचें प्रवचन केलें आहे. याचा ‘ अष्टविवाह ’ हा ग्रंथ फार प्रसिद्ध आहे. या ग्रंथाचें नांव ‘ श्रीकृष्णषोडशसहस्रविवाहअष्टस्वयंवरवर्णन ’ असें आहे. याचे एकंदर १२ भाग किंवा प्रसंग आहेत. “ ऋषि कथांचेनि कथाविलासें। पुराण शरच्चंद्र उदेला पूर्णप्रकाशें । तेथ गळतेनि श्रीकृष्णकथामृतरसें । निर्भर भोंवरिये चकोरू ॥” असें पहिल्याच प्रसंगांत सांगून कवीनें स्वयंवरवर्णनास सुरुवात केली आहे. पहिल्यांत रुक्मिणीहरण वर्णिलें आहे. दुसऱ्यांत जांबुवंतीस्वयंवरवर्णन आहे. तिसऱ्या, चौथ्या व पांचव्या प्रसंगांत स्यमंतकमणि व सत्यभामेची प्राप्ति यांची कथा आहे. यांत इतर आख्यानेंहि ओघानें आणिलीं आहेत. याप्रमाणेंच पुढें मित्रविंदा, लक्ष्मणा, भद्रा, कालिंदी वगैरेंच्या गोड कथा गोड भाषेनें सांगत सांगत कवीनें दहाव्या भागापर्यंत ग्रंथ आणिला आहे. अकराव्यांत सोळा सहस्र रूपें धारण करून या मदनसरोवरांतल्या राजहंसानें, सौंदर्यतरंगिणीकांठच्या अखंड राजहंसींच्या गळ्यांत मंगळसूत्रें बांधल्याची हकीगत आहे. शेवटच्या प्रसंगांत या सर्व कांतांसह श्रीकृष्णानें वसंतक्रीडा केल्याचें वर्णन आहे व तें नवरसांनीं परिपूर्ण असून अत्यंत सुंदर भाषेंत लिहिलें आहे ( मंडलीक एल्हन पाहा ).

**एळेर**—( ख्रि. पू. २०५–१६१ ) यास उजु टोळींतील द्रमिळ म्हणत असत. यानें चोलांच्याकडून सिलोन घेतलें; आणि सिंहली राजा असेल यास ठार मारलें. यानें चव्वेचाळीस वर्षें राज्य केलें (मनु चोल पाहा).

**एंटियोकस दि ग्रेट**—या ग्रीक राजानें काकेशस पर्वत ओलांडून भारतांत प्रवेश केला व सोफागसेनस (वृषसेना)शीं तह केला. याला दीडशें हत्ती मिळाले, असें ग्रीक लेखक पोलिबिअस यानें लिहिलें आहे. नंतर हा परत गेला. पण याच्या सरदारांनीं शालिशूकाच्या वेळीं ( ख्रि. पू. २०७–२०६ ) पाटलीपुत्रापर्यंत देश ताब्यांत घेतला होता, असें गार्ग्यसंहितेवरून दिसतें.

# ऐ

**ऐनुद्दीन मुहम्मद खाजा जहान**--खानदेशमधील फारुकी घराण्याचा मूळ पुरुष. याचा पुत्र मलिक.

**ऐनुन्मुल्क**—( स. १३०५-१३४३ ) अयोध्या प्रांताचा सुभेदार. स. १३०४-५ चे सुमारास अलीबेग नांवाच्या मोगल सरदारानें हिंदुस्थानावर स्वारी केली आणि हिमालयाच्या पायथ्यापर्यंत त्यानें लुटालूट केली. तो परत जात असतां त्याला जोरकसपणें तोंड देणाऱ्यांपैकीं हा एक होता. म्हणून अलाउद्दीन खल्जीनें याला मुलतानची सुभेदारी दिली आणि याकडे माळव्यांतील जालोर, उज्जयनी, चंदेरी वगैरे हिंदु राज्यें जिंकण्याची कामगिरी सोंपविली. त्याप्रमाणें ९ डिसेंबर स. १३०५ रोजीं यानें माळव्याचा राजा कोक ऊर्फ हरनंद याचा पराभव करून उज्जयिनी, मांडू, धार, चंदेरी वगैरे ठिकाणीं मुसलमानी सत्ता स्थापन केली. यामुळें जालोरचा कानिरदेव चौहान याला शरण गेला आणि दिल्लीस जाऊन मांडलिक झाला. मुबारकचा खून करून खुस्रवनें दिल्लीचें तक्त घेतलें तेव्हां याला आपल्या पक्षांत ओढण्याकरितां आलमखान व अमीर-उल-उम्रा या पदव्या देण्यांत आल्या ( स. १३२० ). मुहम्मद तुघ्लकनें याला अयोध्येचा सुभेदार नेमलें. स. १३३६ मध्यें दिल्ली प्रांतांत दुष्काळ पडला आणि तो ७ वर्षें टिकला.

याच्या शांततेच्या कारभारामुळें याच्या प्रांतांत सुबत्ता होती. धान्याचीं कोठारेंहि भरलेलीं होतीं. पण लुटीच्या भीतीनें तेथील धान्य दिल्लीकडे आणतां येईना. म्हणून मुहम्मदानें गंगेच्या पश्चिमतीरावर जुन्या खोर शहराजवळ स्वर्गद्वार नांवाचें शहर वसविलें आणि दिल्लीचे लोकांस तेथें वस्तीस नेलें. आणि त्याची सर्व व्यवस्था याच्याकडे सोपविली. दिल्लीहून तेथें राहावयास आलेल्या खानदानीच्या व गुन्हेगार अशा दोनहि लोकांची याच्यावर फारच मर्जी बसली. मुहम्मदला ही गोष्ट धोक्याची वाटून गुन्हेगार लोकांना परत धाडावें असा त्यानें हुकूम धाडला आणि याची दक्षिणेंत कुतलघखानाचे जागीं बदलीहि करण्यांत आली. दक्षिणेंत मुसलमानी सत्ता डळमळीत असल्याचें याला ठाऊक असल्यानें यानें तिकडे जाण्यापेक्षां लोकप्रियतेचा फायदा घेऊन अला उद्दीन असें नांव घेऊन बंड उभारलें आणि मुहम्मदहि याच्या भीतीनें कनोजसारख्या सुरक्षित जागीं पळाला पण हाहि कनोजवर चालून आला. पण शेवटीं याचा पराभव होऊन याला अर्धनग्न स्थितींत मुहम्मदपुढें उभें करण्यांत आलें. पण त्यानें याची सेवा ध्यानांत घेऊन प्रथम तुरुंग व नंतर पुनः अयोध्या प्रांतावर नेमिलें.

**ऐबक**—( कुत्बुद्दीन पाहा ).

**ऐवजखान**—हा एक निजामाचा सरदार होता. पूर्वी हा वऱ्हाडांत कामावर होता. शाहूनें याच्याशीं सुमंतामार्फत तहाचें बोलणें सुरू केलें होतें. यानें चिमाजी अप्पावर स्वारी केली ( म. रि. म. १, पृ. १६८, २९५ ). याचा पहिल्या बाजीरावानें पराभव केला होता ( राजवाडे प्रस्तावना १३६ ).

# ओ

**ओढेकरवंश**—( खंडेराव त्रिंबकराव पाहा ).




( म. रि. उ. १, पा. ५०७ ).

**ओपीली सिद्धी २ रा**—तेलगू चोल वंशांतील प्रमुख. याचा उल्लेख गणपतीच्या शिलालेखांत आढळतो. यानें कारमांडु जिंकलें होतें. याचा उल्लेख कृष्णा प्रांतांतील कोणीदेनाजवळच्या शिलालेखांत सांपडतो.

**ओबना नायक**—( स. १५४२-१५६९ सुमार ) हा तिम्मण नायकाचा मुलगा. हा आपल्या बापानंतर चित्तळदुर्गच्या गादीवर आला. हा विजयनगरच्या सदाशिवरावाचा समकालीन होता.

**ओबराय**--( अदिलराय पाहा ).

**ओबाला**—विजयनगरच्या आरविंदु घराण्यांतील श्रीरंग राजाचा मुख्य सेनापति होता. यानें सेनापतीचें काम स. १५७२ पर्यंत केलें (आरविंदु डिनस्टी, पृ. २६७).

**ओंकार**--हा ' पळसी ' गांवचा राहणारा असून 'पहाडसिंग' नांवाच्या राजाचा आश्रित होता. याचें उपनांव ' चोरमागे '. हें उपनांव पडण्याचें कारण, याच्या कोणा पूर्वजास. 'चोर' म्हणून सुळावर देत असतां त्यास एका महानुभावपंथी साधूनें सोडविलें व त्यास आपल्या सांप्रदायांत मागून घेतलें म्हणून त्यास 'चोरमागे' हें उपनांव पडलें. त्याच्या कुलांत हा 'ओंकार चोरमागे' झाला. हा विठ्ठलाचा समकालीन होता. याचें ' लक्ष्मणास्वयंवर '- कृष्णपत्नी लक्ष्मणा हिच्या चरित्रावर काव्य आहे. याचे सात सर्ग असून ४४२ पदें आहेत. दक्षामकर, ललिता, वगैरे नवीं नवीं अक्षरवृत्तेंहि याच्या ग्रंथांत आलीं आहेत. याच्या या ' लक्ष्मणास्वयंवरां'त ' चौरसबंध ' ' नवरस-बंध ' 'गोमुत्रिकाबंध' वगैरे ' बंध ' मराठी भाषेत अगदीं नवीन घालून यानें वाङ्मयोपासना केली आहे. याचा 'गोमुत्रिकाबंध' असाः-'कुरंगणी जयापरी। परीस सांपडे वनीं॥ वनीं भवार्णवीं हरी। हरी हरी त्वरा करीं ॥' याच्या काव्याचा रचनाकाल शा. श. १६३० असें हा लिहितो. यानें छंदरचनेंत बरीच भर टाकली आहे ( म. सा. भाग २ ).

## औ

### औक अथवा अवुक घराणें

१ वुक ( मूळ पुरुष ) स. १४७३-१४८१

सिंग ( नंदेल किंवा नद्याल येथें ).

२ रामराज (स.१४८१-१५०८)- पत्नी सम्वकाम्म

३ तिम्म, कोंड, श्रीरंग

(स. १५०८-१५३६ ).

४ नल्लतिम्म (स. १५३६-५५), येसतिम्म, तिरुनाथ, अप्पळ, ओजलप्पति

५ रघुनाथ (स.१५५५-५८)

१९ नारायण (स.१७७१-८५)

६ पेद्द कृष्णम ( स. १५५८-८८ )

७ चिन्न कृष्णम (स.१५८८-१६१८)

८ ओजलवति (स.१६१८-१६४६)

९ नरसिंह(स.१६४६-६८)

१० राघव (स.१६६८-९१)

११ पेद्द कुमार राघव (स.१६९१-१७३५) निपुत्रिक

दासम

१२ अप्प नरसिंह (स.१७३५-३७)

( याची विधवा )१३ चेलम्मा

( पणतु ) नरसिंह

१६ ओजलपति (स.१७५१-५९)

१५ किचम (१७४३-५१) राघव

१४ नरसिंह (१७३९-४३) कुमार राघव (स.१७५९-६७)

व्यंकटकुमारराघव

१८ व्यंकट नरसिंह ( १७६७-७१ )

२० कृष्ण ( १७८५-१८०५ )

हें घराणें विजयनगरच्या राजघराण्यापैकीं होय. तिम्माची जहागिर औक येथें होती म्हणून यांना औक घराणें म्हणतात. यांच्या तारखा ऐतिहासिक गोष्टींशीं जमतात.

**औट्रॅम, सर जेम्स**--( स. १८०३-१८६३ ) प्रख्यात ब्रिटिश सेनापति. यानें स. १८५७ सालाच्या बंडांत लखनौचा वेढा उठविण्यांत व बंड मोडण्यांत शौर्य गाजविलें. याचें आयुष्य हिंदुस्थानांत गेलें. यास मोठया सन्मानानें वेस्ट मिन्स्टिर ॲबेमध्यें पुरण्यांत आलें.

**औमा**--गोपीचंद राजाची महाराणी. हिच्या सांगण्या-वरून गोपीचंदानें आपल्या आईच्या गुरूस -जालंदरास- लिदींत पुरलें.

**औरंगजेब**-( स. १६१८-१७०७ ) याचें संपूर्ण नांव मुहिउद्दीन मुहम्मद औरंगजेब असें आहे. हा शहाजहान

## ऐ

**ऐनुद्दीन मुहम्मद खाजा जहान**--खानदेशमधील फारुकी घराण्याचा मूळ पुरुष. याचा पुत्र मलिक.

**ऐनुन्मुल्क**—( स. १३०५–१३४३ ) अयोध्या प्रांताचा सुभेदार. स. १३०४-५ चे सुमारास अलीबेग नांवाच्या मोगल सरदारानें हिंदुस्थानावर स्वारी केली आणि हिमालयाच्या पायथ्यापर्यंत त्यानें लुटालूट केली. तो परत जात असतां त्याला जोरकसपणें तोंड देणाऱ्यांपैकीं हा एक होता. म्हणून अलाउद्दीन खल्जीनें याला मुलतानची सुभेदारी दिली आणि याकडे माळव्यांतील जालोर, उज्जयनी, चंदेरी वगैरे हिंदु राज्यें जिंकण्याची कामगिरी सोंपविली. त्याप्रमाणें ९ डिसेंबर स. १३०५ रोजीं यानें माळव्याचा राजा कोक ऊर्फ हरनंद याचा पराभव करून उज्जयिनी, मांडू, धार, चंदेरी वगैरे ठिकाणीं मुसलमानी सत्ता स्थापन केली. यामुळें जालोरचा कानिरदेव चौहान याला शरण गेला आणि दिल्लीस जाऊन मांडलिक झाला. मुबारकचा खून करून खुस्रवनें दिल्लीचें तक्त घेतलें तेव्हां याला आपल्या पक्षांत ओढण्याकरितां आलमखान व अमीर-उल-उम्रा या पदव्या देण्यांत आल्या ( स. १३२० ). मुहम्मद तुघ्लकनें याला अयोध्येचा सुभेदार नेमलें. स. १३३६ मध्यें दिल्ली प्रांतांत दुष्काळ पडला आणि तो ७ वर्षे टिकला.

याच्या शांततेच्या कारभारामुळें याच्या प्रांतांत सुबत्ता होती. धान्याचीं कोठारेंहि भरलेलीं होतीं. पण लुटीच्या भीतीनें तेथील धान्य दिल्लीकडे आणतां येईना. म्हणून मुहम्मदानें गंगेच्या पश्चिमतीरावर जुन्या खोर शहराजवळ स्वर्गद्वार नांवाचें शहर वसविलें आणि दिल्लीचे लोकांस तेथें वस्तीस नेलें. आणि त्याची सर्व व्यवस्था याच्याकडे सोपविली. दिल्लीहून तेथें राहावयास आलेल्या खानदानीच्या व गुन्हेगार अशा दोनहि लोकांची याच्यावर फारच मर्जी बसली. मुहम्मदला ही गोष्ट धोक्याची वाटून गुन्हेगार लोकांना परत धाडावें असा त्यानें हुकूम धाडला आणि याची दक्षिणेंत कुतलघखानाचे जागीं बदलीहि करण्यांत आली. दक्षिणेंत मुसलमानी सत्ता डळमळीत असल्याचें याला ठाऊक असल्यानें यानें तिकडे जाण्यापेक्षां लोकप्रियतेचा फायदा घेऊन अला उद्दीन असें नांव घेऊन बंड उभारलें आणि मुहम्मदहि याच्या भीतीनें कनोजसारख्या सुरक्षित जागीं पळाला पण हाहि कनोजवर चालून आला. पण शेवटीं याचा पराभव होऊन याला अर्धनग्न स्थितींत मुहम्मदपुढें उभें करण्यांत आलें. पण त्यानें याची सेवा ध्यानांत घेऊन प्रथम तुरुंग व नंतर पुनः अयोध्या प्रांतावर नेमिलें.

**ऐबक**—( कुत्बुद्दीन पाहा ).

**ऐवजखान**—हा एक निजामाचा सरदार होता. पूर्वी हा वऱ्हाडांत कामावर होता. शाहूनें याच्याशीं सुमंतामार्फत तहाचें बोलणें सुरू केलें होतें. यानें चिमाजी अप्पावर स्वारी केली ( म. रि. म. १, पृ. १६८, २९५ ). याचा पहिल्या बाजीरावानें पराभव केला होता ( राजवाडे प्रस्तावना १३६ ).

## ओ

**ओढेकरवंश**—( खंडेराव त्रिंबकराव पाहा ).




( म. रि. उ. १, पा.५०७ ).

**ओपीली सिद्धी २ रा**—तेलगू चोल वंशांतील प्रमुख. याचा उल्लेख गणपतीच्या शिलालेखांत आढळतो. यानें कारमांडु जिंकलें होतें. याचा उल्लेख कृष्णा प्रांतांतील कोणीदेनाजवळच्या शिलालेखांत सांपडतो.

**ओबना नायक**—( स. १५४२–१५६९ सुमार ) हा तिम्मण नायकाचा मुलगा. हा आपल्या बापानंतर चित्तलदुर्गच्या गादीवर आला. हा विजयनगरच्या सदाशिवरावाचा समकालीन होता.

**ओबराय**--( अदेलराय पाहा ).

**ओबाला**—विजयनगरच्या आरविंदु घराण्यांतील श्रीरंग राजाचा मुख्य सेनापति होता. यानें सेनापतीचें काम स. १५७२ पर्यंत केलें (आरविंदु डिनस्टी, पृ.२६७).

**औंकार**--हा ' पळसी ' गांवचा राहणारा असून 'पहाडसिंग' नांवाच्या राजाचा आश्रित होता. याचें उपनांव ' चोरमागे '. हें उपनांव पडण्याचें कारण, याच्या कोणा पूर्वजास. 'चोर' म्हणून सुळावर देत असतां त्यास एका महानुभावपंथी साधूनें सोडविलें व त्यास आपल्या सांप्रदायांत मागून घेतलें म्हणून त्यास 'चोरमागे' हें उपनांव पडलें. त्याच्या कुलांत हा 'औंकार चोरमागे' झाला. हा विठ्ठलाचा समकालीन होता. याचें ' लक्ष्मणास्वयंवर '- कृष्णपत्नी लक्ष्मणा हिच्या चरित्रावर काव्य आहे. याचे सात सर्ग असून ४४२ पदें आहेत. दक्षामकर, ललिता, वगैरे नवीं नवीं अक्षरवृत्तेंहि याच्या ग्रंथांत आलीं आहेत. याच्या या ' लक्ष्मणास्वयंवरां'त ' चौरसबंध ' ' नवरस-बंध ' 'गोमुत्रिकाबंध' वगैरे ' बंध ' मराठी भाषेंत अगदीं नवीन घालून यानें वाङ्मयोपासना केली आहे. याचा 'गोमुत्रिकाबंध' असाः-'कुरंगणी जयापरी। परीस सांपडे वनीं॥ वनीं भवार्णवीं हरी। हरी हरी त्वरा करीं ॥ ' याच्या काव्याचा रचनाकाल शा. श. १६३० असें हा लिहितो. यानें छंदरचनेंत बरीच भर टाकली आहे ( म. सा. भाग २ ).

# औ

## औक अथवा अवुक घराणें







हें घराणें विजयनगरच्या राजघराण्यापैकीं होय. तिम्माची जहागिर औक येथें होती म्हणून यांना औक घराणें म्हणतात. यांच्या तारखा ऐतिहासिक गोष्टींशीं जमतात.

**औट्रॅम, सर जेम्स**—( स. १८०३-१८६३ ) प्रख्यात ब्रिटिश सेनापति. यानें स. १८५७ सालाच्या बंडांत लखनौचा वेढा उठविण्यांत व बंड मोडण्यांत शौर्य गाजविलें. याचें आयुष्य हिंदुस्थानांत गेलें. यास मोठ्या सन्मानानें वेस्ट मिन्स्टिर ॲबेमध्यें पुरण्यांत आलें.

**औमा**—गोपीचंद राजाची महाराणी. हिच्या सांगण्या-वरून गोपीचंदानें आपल्या आईच्या गुरूस —जालंदरास— लिदींत पुरलें.

**औरंगजेब**-( स. १६१८-१७०७ ) याचें संपूर्ण नांव मुहिउद्दीन मुहम्मद औरंगजेब असें आहे. हा शहाजहान

बादशहास अर्ज मंदबानू मुमताजमहाल हिचे ठिकाणीं झालेलें सहावें अपत्य होय. जहांगीर हा अहमदनगरच्या स्वारीहून आग्र्यास परत जात असतां पंचमहाल जिल्ह्यांतील दोहद गांवीं याचा जन्म झाला ( स. २४ आक्टो. १६१८ ). जसा याचा जन्म स्वारींत झाला तसा याचा मृत्यु देखील स्वारींत झाला.

शहाजहान दक्षिणेंत होता आणि औरंगजेब व दारा लाहोर येथें नूरजहानच्या देखरेखीखालीं होते. पण लवकरच शहाजहान गादीवर आला आणि याला पंधरा हजारांची नेमणूक होऊन याच्या शिक्षणास आरंभ झाला.

शहाजहानचा प्रख्यात वजीर सादुल्लाखान, मीर मुहम्मद हशीम, मुल्ला सालिह हे याचे शिक्षक होते. याला कुराण चांगलें अवगत होतें. अरबी व फार्सी भाषा याला एखाद्या मौलवीप्रमाणें येत असत. याला हिन्दी भाषा व्यावहारापुरती येत असे. बल्क व कंदाहार प्रांतांत हा कामावर असल्यानें चघताई व तुर्की याहि भाषा याला समजत होत्या. अरबी लिपींत लिहून कुराणाच्या दोन प्रतीं यानें मक्का व मदीना येथें पाठविल्या होत्या. दिल्ली येथें याच्या हातची एक कुराणाची प्रत निजामुद्दीन अवलियाच्या दर्ग्यांत ठेवलेली आहे.

याच्या पत्रांतून निरनिराळ्या म्हणी व काव्याचे उतारे येतात. तथापि याला धार्मिक गोष्टींची आवड असे. कुराण, त्यावरील टीका, मुसलमानी धर्मशास्त्र, महमूद गझनीचे ग्रंथ व इतर धार्मिक ग्रंथांचा याचा अभ्यास असे. त्यामुळें दरवेशी व अवलिया यांची संगति यास आवडे.

हा गादीवर आला तेव्हां यानें दरबारांतून गाणें-बजावणें बंद केलें. तेव्हां सर्व गवई लोक बेकार झाले. तेव्हां त्यांनीं आपलें गाऱ्हाणें याच्या कानावर घालण्याकरितां एक मोठी मिरवणूक काढली. आणि मिरवणुकीची गडबड हा प्रार्थनेकरितां मशिदींत जातांना याच्या कानावर येईल अशी व्यवस्था केली. ठरल्याप्रमाणें बादशहाच्या कानावर गडबड येतांच यानें चवकशी केली. तेव्हां याला सांगण्यांत आलें कीं 'गायनकलेची प्रेतयात्रा निघाली आहे.' तेव्हां यानें बिलकुल न हंसतां उत्तर दिलें कीं, 'तिचें असें दफन करा कीं तीं पुनः केव्हांहि डोकें वर काढणार नाहीं.' यावरून याचा स्वभाव व्यक्त होतो.

हा चौदा वर्षांचा असतांना साठमारींतील एका हत्तीनें याच्यावर हल्ला केला. तेव्हां यानें न डगमगतां त्या हत्तीला जखमी करून हल्ला परतवला. या याच्या धाडसाबद्दल शाहजहाननें याची सुवर्णतुला केली आणि दोन लक्ष रुपये बक्षीस, तो हत्ती आणि 'बहादूर' ही पदवी दिली.

स. १६३५ मध्यें याला बुंदेल्यावर पाठविण्यांत आलें. तेथील जुझर राजा जहांगीरच्या वेळेपासून मोगलांना त्रास देत होता. त्याला ठार करून यानें त्याची राजधानीहि ताब्यांत घेतली. या वेळीं हा नांवाचा सेनापति होता. खानजहान वगैरे तीन कर्ते सेनापति होते, पण या जयामुळें याला दक्षिणचा सुभेदार नेमलें व हा दौलताबादेस राहण्यास गेला ( १४ जुलै १६३६ ).

दक्षिणेंत शहाजी भोसले हा त्या वेळीं हुसेन निजामशाहाला पुढें करून निजामशाही तगविण्याचा प्रयत्न करीत होता. पण शेवटीं त्याला हार खावी लागली व बाल निजामशाहाला मोगलांच्या ताब्यांत द्यावें लागलें. या स्वारींतहि खानजहान प्रमुख होता. तो पुढें औरंगजेबाचा सल्लागार झाला. यानंतर यानें औसा, उदगीर हीं घेऊन बागलाणचा राजा बैरामशाह याच्यावर स्वारी केली. तेथील सालेर व मुल्हेर येथील अजिंक्य समजले जाणारे किल्ले जिंकून सर्व बागलाण ताब्यांत घेतला ( ४ जून १६३८ ); आणि बैरामशाह हा मोगलांचा तीन हजारी सरदार बनला. शहाजीचा मोड केल्याबद्दल याला बढती देऊन बादशहानें बारा हजारी केलें; आणि बागलाण घेतल्याबद्दल पंधरा हजारी ( १५ हजार घोडदळ व ९ हजार पायदळ ) करण्यांत आलें ( २३ फेब्रु. १६३९ ). यानें १४ जुलै १६३६–मे १६४४ पर्यंत दक्षिणची पहिली सुभेदारी केली. या आठ वर्षांत चारदां हा आपल्या बापास भेटण्यास गेला होता. आपल्या मागें बहुधा हा शाहिस्तेखानास आपल्या कामाचा अधिकार देऊन जाई.

पूर्वी शहाजहानच्या पदरीं असणाऱ्या पण नंतर विजापूरकराकडे गेलेल्या आणि शेवटीं वेरूळ येथें राहून मोगलांविरुद्ध बंड करणाऱ्या खेळोजी भोसल्याला यानें पराभूत करून ठार केलें ( आक्टो. १६३९ ).

याची बहीण जहानआरा ही भाजल्यामुळें तिला पाहण्याकरितां हा आग्र्यास गेला ( २ मे १६४४ ). तेथें गेला असतां याला कांहीं दुष्कृत्यावरून नोकरीवरून बडतर्फ करण्यांत आलें; आणि याची नेमणूकहि बंद करण्यांत आली. पुढें जहानआराच्या सांगण्यावरून समजूत झाल्यावर याची गुजराथच्या सुभेदारीवर नेमणूक केली ( १६ फेब्रु. १६४५ ). तेथें हा स. १६४७ च्या जानेवारीपर्यंत होता. नंतर याची बल्क व बदकशान प्रांताच्या सुभेदारीवर सालिना साठ लक्षाच्या नेमणुकीवर योजना झाली.

बल्क व बदकशान येथील नजर मुहम्मदास लोकांनीं पदच्युत केलें आणि त्याचा मुलगा अबदुल अझीझ यास गादीवर बसविलें. पण ही संधि साधून शहाजहाननें 'हे प्रांत मूळ बाबरचे ' असें कारण दाखवून स्वारी केली. मुरादनें बल्क घेतलें ( २ जुलै १६४६ ). परंतु मुराद लवकरच परत आल्यामुळें तिकडे पुनः बंडाळी उत्पन्न झाली. ती मोडण्याकरितां एक लक्ष रुपयांचा नजराणा देऊन अलिमर्दान व २५,००० सैन्यासह हा रवाना गेला ( २५ मे १६४७ ). बल्क जिंकून बदकशानकडे जात असतां याचा पराभव होऊं लागला व उझबेक पठाण याला फार त्रास देऊं लागले. तेव्हां बल्क शहर व किल्ला नजर मुहम्मदाच्या नातवास देऊन हा काबूलकडे परत फिरला ( १ आक्टो. १६४७ ). वाटेंत परत येतांना पठाण व बादळ यांमुळें याचें सुमारें दहाहजार सैन्य गारद झालें. या स्वारींत मोगलांचा कवडीचाहि फायदा न होतां चार कोट रुपयांचा चुराडा झाला.

यानंतर यास मुलतानचा सुभेदार नेमलें (मार्च १६४८). या जागेवर हा १४ जुलै १६५२ पर्यंत होता. एवढ्या काळांत यानें इराणी लोकांवर दोन स्वाऱ्या केल्या; पण इराणी लोकांच्या तोफखान्यापुढें याचा कांहीं उपाय चालेना. पण या स्वाऱ्यांतील अपयशामुळें बारा कोटींचें नुकसान झालें; व बादशाहाची याच्यावर फार इतराजी झाली. वास्तविक सैन्याच्या हालचाली काबूलहून बादशहाच करीत असल्यामुळें अपयशाची जबाबदारी त्यावरच होती. यानंतर यानें सिंधची बंडाळी मोडली आणि याची पुनः दक्षिणच्या सुभेदारीवर नेमणूक झाली.

दक्षिणेंत हा बऱ्हाणपुरास आला ( १० जुलै १६५२ ) आणि गांवाबाहेर कांहीं दिवस राहिल्यावर राजवाडा तयार झाला आणि हा तेथें राहण्यास गेला. तेथेंच हिराबाई नांवाच्या आपल्या मावशीच्या तैनातीस असलेल्या स्त्रीस आपल्या ज़नानखान्यांत घेऊन तिचें नांव झैनाबादीमहाल असें ठेवलें. बादशाहाचा पुढें जाण्याचा तगादा असतांहि यानें नऊ महिने तेथें काढले. नंतर हा दौलताबादेस आला. तेथें यानें चार वर्षें काढलीं. विजापूर व गोवळकोंडा यांवर स्वाऱ्या केल्या. अकबर नांवाचा याला मुलगा झाला ( ११ सप्टें. १६५७ ). याची आवडती दिलरसबानू मेली ( ८ आक्टो. १६५७ ); आणि याची आवडती रखेली झैनाबादीहि मृत्यु पावली. येथें असतांना जवळील सातारे गांवचें खंडोबाचें देऊळ व मूर्ति फोडून यानें मुरळ्या वाहण्याची चाल बंद केली. खडकी ऊर्फ औरंगाबाद हें आपल्या नांवचें गांव वसवलें. एका छबिलराम नांवाच्या बीडच्या कानगोनें पैगंबराबद्दल अप्रयोजक शब्द वापरल्याबद्दल न्यायाचा फार्स करून त्याचा शिरच्छेद केला. त्याच्या आप्तानें बादशाहाकडे तक्रार केली असतां गुप्त पत्र लिहून हें प्रकरण मधल्यामधेंच दडपून टाकून बादशहापर्यंत न जाईल अशी व्यवस्था केली. तेथें यानें बांधलेला राजवाडा अजून अलमगिरी महाल या नांवानें पडक्या स्थितींत दाखवला जातो. या खेपेस यानें इकडे आल्यापासून मुर्शिदकुलीखानाच्या द्वारां वसुलाची चांगली व्यवस्था केली. तूट न येईल अशी व्यवस्था करून वसूल वाढविला. जिकडे तिकडे नवे लोक भरून प्रत्येक स्वाराचा वीस रुपये पगार ठरवून दिला. रद्दी लोक व हत्यारें नाहींशीं करून सैन्याचा दर्जा वाढविला. शहाजहानच्या हुकुमावरून गोंडवनच्या पैकीं देवगडचें राज्य जिंकलें. ( जाने. १६५६ ) व तेथील राजास मांडलिक बनविलें. पुढें स. १६५७ त देवगडच्या गोंड राजानें मुसलमानी धर्म स्वीकारला आणि पुढें यास मराठ्यांविरुद्ध मदत केली. यानें त्यास बुलंदबख्त ( नशीबवान् ) अशी पदवी दिली ( स. १६८६ ). जव्हारचा राजा खंडणी देईना म्हणून त्यावर रायकरण यास पाठवून त्याचा पराभव केला व त्याला मांडलिक केलें ( ४ जाने. १६५६ ).

खंडणी थकली, कर्नाटकच्या स्वारींत मोगलांची परवानगी घेतली नाहीं, वगैरे कारणें काढून यानें गोवळकोंड्याच्या अबदुल्ला कुत्बशाहावर आपल्या मुलाच्या लग्नाच्या निमित्तानें स्वारी करून विश्वासघातानें त्याला ठार करण्याचा प्रयत्न केला, पण तो हैद्राबादेहून गोवळकोंड्याच्या किल्ल्यांत पळाला व तेथें दोन महिने वेढा घालून यास तह स्वीकारावा लागला ( स. १६५६ ). पुढें मीरजुम्ला यास 'कर्नाटक द्यावा कारण तो प्रांत त्याची जहागीर आहे. ' म्हणून बादशहानें हुकूम पाठविला. पण बादशाहाच्या आजारीपणाचा फायदा घेऊन कुत्बशाहानें तसें केलें नाहीं, कर्नाटकचा राजा श्रीरंगराय यासहि उलट बाजूकडून लांच घेऊन कबूल करूनहि मदत केली नाहीं. पण विजापूर व गोवळकोंडें येथील आदिलशाही व कुत्बशाही हीं दोनहि राज्यें कांहींतरी तक्रारी काढून साम्राज्यविस्ताराच्या नादीं लागून यानें बुडवलीं.

अली आदिलशाह खरा वारस नाहीं म्हणून प्रथम यानें भांडण उकरून काढून त्यावर स्वारी केली व भालकी येथें आदिलशहाचा मोड कला (एप्रिल१६५७). पण बादशाहानें हुकूम केल्यावरून यानें आदिलशाहाशीं तह केला. याच वेळीं शिवाजीमहाराजांनीं आदिलशहाची बाजू घेऊन जुन्नर ते थेट औरंगाबादपर्यंतचा मुलूख व खुद्द अहमदनगरहि

लुटलें. यानें त्याच्यावर नौसिरखानास पाठविलें, पण त्याचाहि शिवाजीनें पराभव केला ( मे १६५७ ). पण विजापूरकरांनीं तह केल्यामुळें शिवाजीनेंहि रघुनाथपंताला पाठवून तह केला. पण शहाजहान आजारी पडल्यामुळें हा तिकडे गेला आणि विजापूरकरांशीं झालेल्या तहाची अंमलबजावणी झाली नाहीं.

शहाजहान आजारी पडून त्यानें सर्व सरदारांदेखत दारा शुकोह यास गादीचा वारस नेमलें; आणि आग्र्यास प्रकृति सुधारण्याकरितां त्यानें मुक्काम केला. नवंबरमध्यें शहाजहान बरा झाला. पण बंगालमध्यें असणाऱ्या सुजानें स्वतःस बादशाह पदवी घेऊन तो दिल्लीवर चाल करून निघाला. तेव्हां दाराचा मुलगा सुलेमान शुकोह जयसिंहासह त्यावर रवाना झाला. त्याला अनेक ठिकाणीं पराजित करून पाठलाग केला व त्याला पकडलें व विश्वासघातानें ठार केलें. मुरादनेंहि आपण बादशाह बनल्याचें जाहीर करून सुरत लुटली. तेव्हां त्याची बदली, शहाजहाननें औरंगजेबाच्या अंमलाखालील वऱ्हाड प्रांतावर केली, पण मुरादनें तो हुकूम मानला नाहीं आणि औरंगजेब मुरादला सामील झाला. तेव्हां मारवाडच्या जसवंतसिंगाला माळव्याचा सुभेदार करून औरंगजेबावर व काशिमखानास गुजराथची सुभेदारी देऊन मुरादवर रवाना करण्यांत आलें. या वेळीं औरंगजेबानें दिल्लीकडे जाणाऱ्या मीरजुम्ल्यास पकडलें आणि त्याच्याच सल्लयानें त्याचें व त्याच्या तोफखान्याचें साहाय्य मिळवलें. आदिलशाह व कुत्बशाह यांच्याशीं खंडणी माफ करून व किल्ले परत देऊन स्नेह संपादन केला. इतकी तयारी झाल्यावर 'बादशहास भेटण्यास दिल्लीस येत आहें' असा निरोप दारास पाठवून हा दिल्लीकडे निघाला. हंडियाला मलिक हुसेनला पाठवून नर्मदेच्या नावा आपल्या ताब्यांत घेतल्या आणि बादशाही सरदारांशीं होणारा पत्रव्यवहारहि ताब्यांत घेतला. गोंडवनच्या गोंड राजास मैत्रीचीं पत्रें लिहून त्याला आपले बाजूस मिळवून घेतलें. कारण त्याच्या राज्यांतून आग्र्याचा रस्ता होता. सैन्याची समजूत घातली, आगाऊ पगार सुरू केला. बऱ्हाणपुरास लष्करी दारूगोळ्याची तयारी सुरू केली. खुद्द दरबारांतील अधिकारीहि आपल्या बाजूस वळवून घेतले. मीरजुम्ल्याचे इंग्रज व फ्रेंच गोलंदाज तयार होतेच. अशी तयारी झाल्यावर मुअजमला औरंगाबादेस सुभेदार नेमलें आणि दौलताबादेच्या किल्ल्यांत नुकताच जन्मलेला मुहंमद, अकबर व जनानखाना ठेवून आणि बाकीच्या मुलांसह औरंगाबादेहून निघाला ( ५ फेब्रु. १६५८ ). बऱ्हाणपुरास आल्यावर ( १८ मार्च ) तयारीकरितां एक महिना तेथें मुक्काम केला. तेथें दरबारांतील याचा वकील इसाबेग दिल्लीहून येऊन यास मिळाला. तेव्हां याला सर्व माहिती मिळाली आणि जसवंतसिंगाची पूर्ण तयारी होण्यापूर्वींच त्याला तोंड देण्याचें ठरवून यानें बऱ्हाणपूर सोडलें (२० मार्च). मांडव, अकबरपुर, उज्जैन, देवाळपुर, असा माळव्यांत हा उतरला आणि तेथें मुरादास बोलावून त्याची भेट घेतली ( १४ एप्रिल ). सायंकाळीं धरमतला मुक्काम करून दुसऱ्या दिवशीं जसवंतसिंगाशीं युद्ध देण्याचें ठरविलें.

जसवंतसिंगाला नर्मदेवरील उतार औरंगजेबानें ताब्यांत घेतल्यामुळें याची नीटशी बातमी ठेवतां आली नाहीं. मुराद व औरंगजेब यांना एकत्र न होऊं देण्याकडेहि त्यानें लक्ष दिलें नाहीं. औरंगजेबाला मिळतो म्हणून निरोप धाडला, पण याचा रस्ताहि त्यानें रोखला. शिवाय जसवंतसिंगाला विशेष लढाई न करितां मुराद व औरंगजेब यांना पिटाळून परत लावून द्यावें, असा बादशाहाचा हुकूम असल्यामुळें त्याचें काम अवघड होऊन बसलें. पण औरंगजेब मात्र बेमुर्वतीनें तुटून पडला. शिवाय मुसलमान सरदार त्याच्या हाताखालीं लढण्यास राजी नव्हते. खुद्द कासीमखान बादशाही सैन्यासह पळून गेला आणि सर्व मुसलमान सरदार औरंगजेबाला सामील झाले. लढाईत २४ मुसलमानेतर मेले आणि मुसलमान सरदारांपैकीं फक्त एकच मेला. असा विजय मिळाल्यावर हा ३ दिवस उज्जनला राहून एक महिन्यानें ग्वाल्हेरीस पोंचला ( २१ मे ). तेथें याला बादशाही सरदार नासीरीखान येऊन मिळाला. तेथें याला समजलें कीं, दारा हा धोलपूर येथें चंबळ अडवून मोठया सैन्यासह बसला आहे. शहाजहान आग्र्याहून बलुचपुर येथें आला असतां त्याला धरमतच्या लढाईत औरंगजेबाला जय मिळाल्याची बातमी समजली ( २५ एप्रिल ). तेव्हां तो दिल्लीस न जातां आग्र्यास परत फिरला, व दारास त्यानें सैन्य जमविण्यास सांगितलें. लवकर ६० हजार सैन्य उभें करण्यांत आलें. त्यापैकीं सय्यद व रजपूत दाराच्या बाजूचे होते. याशिवाय बरेच विश्वासूक सरदार दारा शुकोहबरोबर आधींच रवाना झालेले होते. शहाजहानच्या मनांत अझून मुलांत सलोखा होईल अशी आशा होती. पण दारानें आपलें सैन्य धोलपुरास चंबळेवर पाठविलें ( ९ मे ); व आपणहि पित्याची भेट घेऊन सैन्यानिशीं निघाला. बापलेकांची ही शेवटची भेट होय. दारानें चंबळचे सर्व उतार ताब्यांत घेतले व तो मोर्चे लावून बसला. औरंगजेबाला अडवूं तितक्यांत दारा शुकोह आपणास येऊन मिळेल अशी त्याला आशा होती. पण धोलपूरच्या पूर्वेस २० कोसांवर असलेल्या भटाऊर गांवीं

एका उतारानें अचानक औरंगजेब नदी उतरला (२३ मे) व तो तडफेनें आग्र्याकडे वळला. त्यामुळें दाराचा सर्व बेत फसला आणि त्याला आपला अवजड तोफखाना टाकून आग्र्याकडे वळावें लागलें. दोनहि भावांची गांठ आग्र्यापासून पांच कोसांवरील यमुनेच्या काठच्या समुगड गांवीं पडली. पण दारानें तेथें सरळ औरंगजेबावर हल्ला न चढवतां त्याच्या हल्ल्याची वाट पाहत त्याला आडवा होऊन राहिला. पण त्याचा फायदा औरंगजेबाला झाला. त्याचें दमलेलें सैन्य ताजें झालें आणि याचें सैन्य उन्हानें जायबंदी झालें. रात्रीं औरंगजेबानें आपल्या सैन्याला अनेक आश्वासनें देऊन उत्तेजित केलें.

दुसऱ्या दिवशीं लढाई सुरू झाली. पण दाराची जागा वाईट, तोफखाना कमकुवत, सैन्यांत फितुरी, शिलकी सैन्याचा अभाव यांमुळें रजपूत लोक शौर्यानें लढले तरी दाराचा अखेर पराजय झाला. दाराला आपल्या सैन्यावर सारखा ताबा ठेवतां येईना. शेवटीं जलद हालचाल करण्याकरितां तो हत्तीवरून घोड्यावर उतरला, पण ही त्याची मोठी चूक झाली. मालक दिसेनासा झाल्यावर सैन्य पळूं लागलें, आणि याचा जय झाला. दारा रातोरात आग्र्यावरून दिल्लीकडे पळाला. शहाजहाननें आग्रहपूर्वक भेटीस बोलावलें असतां लाजेनें त्याला त्यानें तोंडसुद्धां दाखवलें नाहीं. औरंगजेबानें जय झाल्यावर मुरादचें अभिनंदन केलें आणि "तुझें राज्य सुरू झालें" असा त्याचा गौरव केला. ३ जूनला आग्रा शहर काबीज केलें आणि तेथील कोतवालाला फांशीं दिलें. शहाजहानच्या भेटीस न जातां वेढा घालून व शेवटीं तर किल्ल्याचें पाणी बंद करून किल्ला ताब्यांत घेतला; व १० जूनला उघडपणें दरबार भरवून सर्व सत्ता आपल्या ताब्यांत घेतली. दोन दिवसांत सर्वत्र आपले लोक नेमून १३ जूनला तो दिल्लीस दाराच्या पाठलागास निघाला. तत्पूर्वी मुरादास कपटानें पकडून कैद केलें; नंतर अलाहाबाद घेतलें व आग्र्याची उजवी बाजू बळकट केली. दिल्लीस थोडे दिवस विश्रांति घेण्याचें ठरवून सुलेमान शुकोहवर शाहीस्तेखानास पाठवून बहादुरखानास दारावर पाठविलें. आणि २१ जुलै रोजीं दिल्लीबाहेरील शालिमर बागेंत स्वतः तक्तारूढ झाला; व 'आलमगीर गाझी' अशी पदवी धारण केली. दाराचा पाठलाग चालू असतां सुजा दिल्लीवर चालून आला म्हणून हा गुजराथेंतून दिल्लीकडे आला. प्रथम औरंगजेबानें आपला मुलगा सुलतान मुहम्मद यास सुजावर पाठविलें. त्यांची खजवा येथें गांठ पडून लढाई झाली. औरंगजेबहि मीरजुम्ल्यासह तेथें आला. औरंगजेबाच्या सैन्याची प्रथम कांहीं हत्तींनें नासाडी केली, पण पुढें सुजाचा पराभव झाला.

दारा गुजराथेंत आल्यानंतर तेथील सुभा शहानवाझ दारास मिळाला. त्या दोघांनीं औरंगजेबाशीं देवराई येथें लढाई दिली (१२–१४ मार्च १६५९). जसवंतसिंगहि दाराला मिळाला होता, पण त्याला औरंगजेबानें फोडलें. याहि लढाईंत पराजय पदरीं आल्यानें दारा मेरट, अहमदाबाद, कच्छ मार्गे सिंधकडे गेला. वाटेंत त्याचे फार हाल झाले. शेवटीं विश्वासघातानें दाराला पकडून दिल्लीस आणण्यांत आलें. तेथें राजद्रोही व धर्मद्रोही म्हणून त्याला देहान्ताची शिक्षा देऊन क्रूरपणें त्याचा वध करण्यांत आला. तसेंच त्याचा पुत्र सुलेमान शुकोह यालाहि पकडून आणून विष पाजून ठार करण्यांत आलें.

खजव्याच्या लढाईनंतर सुजा प्रयाग, पाटणा व पुढें गंगेंतून मोंगीरास गेला. त्यावर औरंगजेबानें मीर जुम्लास पाठविलें. मीरजुम्लानें फितुरीनें गंगेच्या पश्चिमेकडील राजमहाल ते हुगळीपर्यंतचा प्रदेश काबीज केला. पण आरमाराच्या जोरावर त्यानें मीरजुम्ल्याशीं टिकाव धरला. औरंगजेबाचा मुलगा सुलतान मुहंमद सुजाच्या मुलीच्या लोभानें त्याला जाऊन मिळाला. ती मुलगीहि त्याला मिळाली (८ जून). पण अनेक घडामोडी होऊन सुजाच्या सैन्यानें त्याला सोडलें. त्यामुळें त्यानें भावाच्या हातून मरण्यापेक्षां आराकानी लोकांत जाऊन राहण्याचें ठरविलें व हिंदुस्थानला कायमचा रामराम ठोकला (१२ मे १६६०).

अशी भावांची व्यवस्था लावल्यावर पूर्वी फक्त तक्तारोहण (२१ जुलै १६५८) झालें होतें त्याच्या समारंभाकरितां ५ जून १६५९ रविवार हा दिवस नक्की करण्यांत आला. त्या वेळीं प्रारंभीं दिलेलें लांबलचक नांव यानें धारण केलें. २५ लाखांपर्यंत देणग्या व बक्षिसें दिलीं. हिजरी वर्ष सुरू केलें. पारशी नवरोझ बंद केला. हा समारंभ दोन अडीच महिने चालू होता. जुलूस (तक्तारूढ सरकारी वर्ष) २३ मे १६५८ त हा धरण्यांत आला.

राज्यारोहणाचा समारंभ झाल्यानंतर सुलेमान व मुराद यांची वाट लावल्यावर स. १६६२–६४ पर्यंत हा काश्मीरांत राहिला. शहाजहान मेला तेव्हां हा आग्र्यास आला. तेथून पुढें १६७४ पर्यंतचा काळ यानें दिल्लीस काढला. या सालीं हा आफ्रिडी लोकांचीं बंडें मोडण्याकरितां सरहद्दीकडे गेला व तात्पुरता बंदोबस्त करून परत आला (स. १६७६). याचा साहाय्यक जसवंतसिंग काबूलकडे मेल्यामुळें त्याचें अजमीरचें राज्य घशांत

घालण्याची याला दुर्बुद्धि झाली. त्या वेळीं हा दिल्लींतून बाहेर पडला ( ३ सप्टें. १६७९ ), तो पुनः दिल्लीस आला नाहीं. या वेळीं रजपूत लोकांनीं एकी करून याला विरोध केला. त्यामुळें याला जय मिळाला नाहीं आणि अजितसिंह जोधपुरचा राजा झाला. याचा पुत्र अकबरहि रजपूतांना उघड सामील झाला. आणि ज्या रजपूतांनीं मोगल बादशाही उभारण्यास मदत केली ते रजपूत याच्या विश्वासघातकी वर्तनानें विरुद्ध झाल्याबरोबर याचें बळ एकदम कमी झालें. भूपाळसिंग गोंड, भावांचे तोतये, रावकर्ण, चंपतराय बुंदेला वगैरेशीं याचे झगडे चालू होते. याचा पिता शहाजहान आग्र्याच्या किल्ल्यांत मेला तेव्हां हा त्याच्या अन्त्यविधीला सुद्धां गेला नाहीं. यानंतर हा स. १६८२ च्या मार्च महिन्यांत पुनः दक्षिणेंत आला. शिवाजीमहाराजांबद्दलच्या आदरामुळें आणि याच्या धोरणामुळें मोगलांचा दरारा बिलकुल उरलेला नव्हता. मुसलमान शाह्याहि नष्ट करण्याचें यानें धोरण स्वीकारलें होतें (सिकंदर, आदिलशाह, अबुलहसन कुत्बशाह, शहाजी, शिवाजी पाहा). मराठे तर जिवावर उदार होऊन लढत होते. शिवाजी, संभाजी, राजाराम यांना नाहींसें करूनहि मराठेशाहीचा जोर कमी होईना, तेव्हां यानें शाहूकडून भेदाचा प्रयत्न केला. पण त्याचाहि उपयोग होईना, तेव्हां हा अहमदनगर येथें येण्यास निघाला. पण वाटेंत यास मराठ्यांनीं लुटलें. या अपजयामुळें याचें दुखणें मध्यंतरीं थांबलें होतें तें उलटलें व अखेर हा नगर येथें मृत्यु पावला ( २१ फेब्रु. १७०७ ). यानें मृत्युपत्र करून आपलें राज्य तिघां मुलांस वांटून दिलें. याचा शेवट अगदीं निराशेंत झाला.

मोगल बादशहांपैकीं सर्वांत विद्वान् पुरुष हा होय. स्वधर्माचा याचा अभ्यास उत्कृष्ट होता. फतवा-इ-आलमगिरी नांवाचा मुसलमानी कायद्याचा उत्तम ग्रंथ औरंगजेबानें लिहिला आहे. या कामीं पुष्कळ विद्वान् मौलवी खपत होते. त्यांत मौलाना शेख निजाम हा मुख्य होता. औरंगजेबास कुराण तोंडपाठ येत होतें, आणि त्याचा अर्थ चांगला कळत होता. याचें हस्ताक्षर सुंदर होतें. मात्र यास कवितेची आवड नव्हती. मुसलमानी धर्मशास्त्रांतील याची विद्वत्ता अप्रतिम होती, असें मोठमोठ्या विद्वानांनीं म्हटलें आहे ( जर्नल ऑफ दि मॉस्लेम इन्स्टिटयूट, मार्च १९०७ ).

हा जितका परधर्माचा द्वेष्टा होता तितकाच स्वधर्मी शिया पंथाचा द्वेष करी. याच्या हाताखालीं शियापंथाचे अनेक लोक अधिकारी व सेनापति असतांना याचा त्या पंथाचा द्वेष कमी झाला नाहीं. 'शियांना मारणारी' असें कित्येक कव्यारींचें यानें नांव ठेविलें होतें. पत्रव्यवहारांत शियांचा उल्लेख आला तर त्यांस एखादी शिवी दिल्याशिवाय हा कधींहि राहत नसे. याच्या हाताखालचे शियापंथी कामदार याला फसवून कशी तरी वेळ भागवून नेत. विजापूर व गोवळकोंडा येथील राजे शियापंथी होते म्हणूनच त्यांना यानें समूळ नाहींसें केलें. शेख-उल्-इस्लाम नांवाचा एक विद्वान् व थोर पुरुष याजपाशीं होता त्यानें हीं राज्यें जिंकूं नयेत म्हणून याची पुष्कळ विनवणी केली, तें यानें बिलकुल ऐकलें नाहीं. तेव्हां तो शेख यास सोडून चालता झाला. यानें अनेक प्रकारें त्याला बोलावलें तरी तो पुनः आला नाहीं.

यानें अनेक देवळें उध्वस्त करून त्यांच्या मशिदी केल्या अशी प्रसिद्धी आहे. हिंदु लोकांचें पवित्र क्षेत्र जें बनारस तेथें यानें वेणीमाधवाचें जुनें देवालय मोडून मशीद बांधली ती अद्यापि प्रसिद्ध आहे. ह्या मशिदीचे उंच मनोरे औरंगजेब बादशहाची स्वधर्मनिष्ठा व हिंदुधर्माबद्दलचा द्वेष जणूं अद्यापि जगजाहीर करीत आहे असें भासतें. या मशिदीचें नांव 'माधवजीका देवडा' असें प्रचलित आहे. यावरून याचें धोरण दिसून येतें.

कलकत्ता येथील एशियाटिक सोसायटीचे सभासद बाबू रजनीरंजन यांनीं एक अस्सल सनद प्रसिद्ध केली आहे. तींत पुढील वाक्यें आहेत. 'आम्ही आमच्या पवित्र धर्मास अनुसरून, आम्हीं असा ठराव केला आहे कीं, जुनीं देवालयें पाडून टाकावयाचीं नाहींत व नवीं देवालयें बांधून द्यावयाचीं नाहींत, आमच्या न्यायी राज्यांत आम्हांस असें जाहीर झालें आहे कीं, कांहीं दुष्ट व मत्सरी लोकांनीं बनारस येथील व आसपासच्या दुसऱ्या कांहीं ठिकाणच्या हिंदु लोकांस फार त्रासवून सोडलें आहे, आणि देवालयाचे संरक्षक जे कित्येक ब्राह्मण लोक त्यांना देवालयापासून घालवून देण्याचा प्रयत्न चालविला आहे. या जुलमानें हिंदु लोकांत हाहाःकार झाला आहे. म्हणून आम्हीं तुम्हांस अशी आज्ञा फर्मावितों कीं, यापुढें कोणीहि इसमानें, ब्राह्मणास किंवा दुसऱ्या हिंदु रहिवाश्यास कोणत्याहि प्रकारें त्रास देऊं नये, किंवा त्यांच्या धर्मास हरकत करूं नये. एवढेंच नव्हे, तर त्यांना त्यांच्या वृत्तीचा शांततेनें उपभोग घेऊं द्यावा, चंद्र १५ जमादिसानी ( ९ जुन्या ऐ. गो. पा. १-२ ).

( स. १६५९ ) आमच्या धर्माप्रमाणें असें ठरलें आहे कीं, देवळाचा नाश करूं नये व नवीं देवळें बांधण्यास परवानगी देऊं नये ( पत्रसा. ७६४, स.१६६८)

बादशहाचें धर्मवेड माजत चाललें आहे. ××× एखाद्या हिंदूचें घेतलेलें कर्ज बुडवावयाचा सोपा मार्ग म्हणजे सावकार हिंदूनें मुहम्मद व मुसलमानी यांना शिव्या दिल्याची खोटीच तक्रार काजीकडे करण्याची धमकी द्यावी म्हणजे झालें. ××× देवळें पाडून मशिदी बांधण्याचा त्यानें धोशा लावला आहे ( पत्रसा. ११९२; स. १६६८ ). बादशहाचें धर्मवेड अडचणींत पकडून धर्मांतर करणें भाग पाडण्याकरितां त्यानें नेमलेले हस्तक ××× ही हिंदूंना ××× जाचक होत आहेत. स्वर्गामध्यें अशा कृत्यांनीं मुहम्मदाच्या बरोबर मान्यता मिळेल असें खूळ याच्या मुल्लांनीं त्याच्या डोक्यांत भरून दिलें आहे (पत्रसा. १२४९). ( स. १६६९ ) एका हिंदूनें काजीनें खाल्लेल्या टखुजांचा एक भाग पांच वर्षांपूर्वी खाल्ला होता, या सबबीवर त्याला मुसलमान करण्यांत आल्यामुळें त्यानें जीव दिला ( पत्रसा. १२७५ ).

याचा अकबर नांवाचा कर्तबगार मुलगा रजपूत व मराठे या याच्या शत्रूंना सामील झाला होता. तो शेवटीं आपल्या बचावाकरितां इराणमध्यें पळाला. तेथेंहि इराणच्या शहाच्या मदतीनें तो कांहीं कारस्थान उभारील म्हणून हा त्याला सारखीं आर्जवाचीं पत्रें धाडीत असे. अकबरानें धाडलेलें एक उत्तर ऐतिहासिक घडामोडी-वर व औरंगजेबाच्या स्वभावावर प्रकाश पाडणारें असल्यामुळें पुढें देत आहों. 'बाबा, तुमचें उदाहरण मीं नेहमीं डोळ्यापुढें ठेवलें आहे. इतकें चांगलें उदाहरण दुसऱ्या कोणाचें सांपडणार ? ज्या रजपुतांनीं अकबर, जहांगीर, व शहाजहान यांस मनापासून साह्य केलें, त्यांचा आश्रय मीं केला, यांत वाईट तें काय केलें ? जसवंतसिंग तुमच्या भुलथापांस भुलला नसता तर तुम्ही आज हिंदु-स्थानचे बादशाहा नसतां असे हे रजपूत लोक आपल्या राज्याचे खांब होते. पूर्वी फौजेंत रजपूत शिपाई पाहिजे असले म्हणजे एकाचे ठिकाणीं शंभर उमेदवार पुढें येत. हल्लीं तुम्ही तीनतीन वर्षें डांगोरा पिटूनहि दहापांच माणसें देखील जमा होत नाहींत. हा परिणाम कशाचा ? आज तुमचे अम्मलदार इतके आहेत पण एकाची तरी तुमच्यावर खरी भक्ति आहे काय ? फौजेंतील सर्व लोक दरिद्री झाले आहेत. कोणापाशीं हत्यार नाहीं. कवि किंवा ग्रंथकार तुमच्या अमदानींत निपजला नाहीं. व्यापारी व धनिक म्हणून आहेत त्यांची दिवसाढवळ्या लूट होते. त्यांचे खून पडतात. रयत तर धुळीस मिळाली. विजापूर, गोवळकोंडा येथील राज्यांचा दक्षिणचा प्रदेश जो पूर्वी तुम्हांसच अत्यंत संपन्न व स्वर्ग-तुल्य वाटत होता तो आतां ओसाड, कंगाल व निर्धन बनला आहे. विजापूर, औरंगाबाद वगैरे शहरें केवढीं धनाढ्य, विस्तृत व शोभिवंत होतीं. पण हल्लीं तेथें धुळी-शिवाय काय आहे, तुम्हीच सांगा ! या सर्वांचें कारण काय तर तुमचा परधर्मद्वेष. तुम्ही हिंदूंवर जिझिया बसविला, त्यानें सर्व लोक तुमच्यावर उठले. जाळपोळ व लूट करूं लागले. त्यानेंच देश धुळीस मिळाला.

तुमच्या राज्यांत एक तरी प्रकार असा आहे काय कीं ज्याची मला तारीफ करितां येईल ? थोर थोर पुरातन घराणीं नामशेष झालीं. सर्वच लुच्चांचा बाजार भरला आहे. सगळा राज्यकारभार हलकट लोकांच्या हातांत आहे. हातांत जपमाळ, काखेंत कुराण आणि डोक्यास मोठेंसें पागोटें असलें म्हणजे त्यावर तुमचा पूर्ण भरंवसा ! अशी मंडळी तुमच्या राज्याचे आधारस्तंभ !

असा सर्व राज्याचा नाश झालेला मला पाहवेना. तेव्हां अत्यंत कष्टानें मी देशत्याग करून इकडे आलों. आतां मी शांत आहें. परमेश्वर तुम्हांला दीर्घायुष्य देवो. मींच परत येऊन राज्य करावें म्हणतां, तरी तुम्ही राज्य सोडून मक्केस चालते व्हा. म्हणजे मी दाखवितों कसें राज्य करा-वयाचें तें. आजपर्यंत काय करा :त होती ती सर्व तुम्हीं करून दाखवलीत. आतां वृद्धापकाळीं परमार्थसाधनच तुम्हांस योग्य आहे. जास्त लिहून तुम्हांस त्रास होईल म्हणून पत्र पुरें करितों. ' ( मनूची ४. १७१-१७७ ).

अकबरानें आखून दिलेल्या लष्करी पण देशांतील सर्व घटकांचा समावेश करणाऱ्या राजनीतीनें शहाजहानच्या वेळीं मुसलमानी वळण स्वीकारलें. त्यामुळें हिंदु प्रजा आणि तिचा धर्म यांबद्दल नुसती सहानुभूतिसुद्धां राहिली नाहीं. औरंगजेबाच्या कारकीर्दींत मुस्लीम नीतीची परमा-वधि झाली. अकबराच्या उदार व संग्राहक धोरणाचा अधार्मिक म्हणून नाश करण्यांत आला. आणि मोगली साम्राज्य पूर्णपणें धर्मांध झालें. त्यामुळें लढाऊ वृत्तीच्या स्वातंत्र्यप्रिय हिंदूंनीं डोकें वर काढलें आणि मोगली साम्राज्य औरंगजेबाच्या देखत नष्ट केलें. स. १६७८ पासून स. १७०७ पर्यंत मराठे, रजपूत, जाट, बुंदेले व शीख यांनीं पांच ठिकाणांहून औरंगजेबाच्या हीन राज-नीतीस विरोध केला, त्याच्या सैन्याशीं युद्धें केलीं, आणि अखेरीस राज्याचीं पाळेंमुळें खणून काढलीं.

**औंधच्या प्रतिनिधींची वंशावळ—**







× असें चिन्ह ज्या आंकड्यावर केलेलें आहे ते कोल्हापूरकरांचे प्रतिनिधि होत.

## क

**ककुच्छंद**—या कल्पांतील चार बुद्धांपैकीं दुसरा. याचें जन्मस्थान क्षेमावती आहे. कांहीं ग्रंथांत नाभिका हें जन्मस्थान दिलें आहे. याचें निर्वाणहि तेथेंच जवळ झालें. नाभिका नेपाळच्या तराईंत आहे.

**ककुस्थ**—हा रघुवंशी प्रतिहार राजा नागभट याच्या बहिणीचा पुत्र.

**ककुस्थवर्मन् कदंब**—( स. ४२५-५० ) कदंब घराण्यांतील एक राजपुत्र. हा त्या घराण्यांतील रघूनंतर गादीवर आला. याच्या पित्याचें नांव भगीरथ. याला अनंतदेवी नांवाची एक मुलगी असून ती कुमारगुप्तास दिली होती.

**कक्क प्रतिहार**—हा मंदोरच्या प्रतिहारवंशांतील भिल्लादित्याचा पुत्र. यानें मुद्गगिरि ( बिहारांतील मुंगेर ) येथें गौडाशीं लढून जय मिळवला. हा व्याकरण, ज्योतिष, तर्क ( न्याय ) व सर्व भाषांतील कवित्वांत निष्णात होता. याला भट्टि ( भाटी ) वंशांतील महाराणी पद्मिनीपासून बाउक व दुसरी राणी दुर्लभदेवीपासून कक्कुक नांवाचा पुत्र झाला. याच्यानंतर बाउक गादीवर आला. हा रघुवंशी प्रतिहार राजा वत्सराजाचा सामंत असावा. कारण वत्सराजानें गौडावर विजय मिळवला, त्या लढाईंत हा होता ( वत्सराज पाहा ).

**कक्क राष्ट्रकूट**—( कर्क राष्ट्रकूट पाहा ).

**कक्कसूरि**—सिद्धसूरीचा उत्तराधिकारी व पंचप्राण नामक ग्रंथाचा कर्ता.

**कक्काजी भोसले**—हा खेळोजी भोसल्याचा ( नांदनज व भांबोरे येथील ) मुलगा होय. याला शाहाजी, रुस्तुमजी व सुभानजी या नांवांचे तीन भाऊ होते.

हा सरंजामी अंमलदार असून नानासाहेब पेशव्याचे वेळेस लष्करांत कामकाज करीत होता. हा एके वेळेस कर्नाटकांत पेशव्यांच्या स्वारीबरोबर गेला होता असा उल्लेख याच्या एका पत्रांत आला आहे. पुढें हा आपल्या कुटुंबासह भांबोऱ्यास राहावयास आला. तेव्हांपासून भोसल्यामध्यें भांबोरकरांची शाखा वेगळी पडली. याला चिमणाजी व आप्पासाहेब नांवाचे दोन मुलगे होते ( मं. सप्तम सं. वृ. पृ. ६८-६९ ).

२. हा राघोजी ऊर्फ रावसाहेब ( भांबोरे येथील ) भोसल्याचा मुलगा होय.

हा अव्वल इंग्रजींतील भांबोरें गांवचा सरंजामी वहिवाटदार होता. याचे देखत मराठेशाही बुडून नवीन इंग्रजी अंमल सुरू झाला. हा स्वभावानें भोळा व दयाळू होता. याच्या शरीराचा बांधा ठेंगणा असून राहणी अगदीं साधी होती. याला साधारण लिहितां वाचतां येत असे. याचें पहिलें कुटुंब वडूसकर शिरक्यांच्या घराण्यांतील होतें. तें वारल्यावर दुसरें कुटुंब वडगांवच्या निंबाळकर घराण्यांतील केलें. तिजपासून याला तीन मुलगे व तिघी मुली अशीं सहा अपत्यें झालीं. याची बायको आपल्या सासऱ्याप्रमाणेंच कागदपत्रांचें महत्त्व जाणत असे ( मं. सप्तम सं. वृ. पृ. ७० ).

**कक्कुक प्रतिहार**—( स. ८६१ सुमार ) हा मंदोरच्या प्रतिहारवंशांतील कक्काला दुर्लभदेवीपासून झालेला पुत्र. हा आपल्या थोरल्या सावत्र भावानंतर गादीवर आला. घटियाळ येथें मिळालेले दोनहि शिलालेख याचे आहेत. त्यावरून पुढील माहिती मिळते. हा ब्राह्मण हरिचंद्र याचा वंशज होय. यानें आपल्या सच्चारित्र्यानें मरु, माड, वल्ल, तमणी ( त्रवणी ), अज्ज ( आर्य ) व गुर्जरच्या लोकांचें प्रेम संपादन केलें होतें. वडणाणय मंडलांतील भिल्लांचीं गांवें यानें जाळलीं. रोहिन्सकूप( घटियाळ )च्या जवळ बाजार तयार करून व्यापारी लोकांना आणवलें, तसेंच मड्डाअर ( मंदोर ) व रोहिन्सकूप या गांवांत जयस्तंभ उभारले ( ज. रा. ए. सो. स. १८९५, पृ. ५१७–१८ ). हा न्यायी, प्रजापालक व विद्वान् होता. हा स्वतः संस्कृतांत काव्यरचना करी. घटियाळ येथील वि. सं. ९१८ ( स. ८६१ ) मधील शिलालेख सर्व संस्कृतमध्यें आहे. व शेवटीं यानें केलेला म्हणून एक संस्कृत श्लोक कोरला आहे; तो असाः " यौवनं विविधैर्भोगैर्मध्यमं च वयः श्रिया। वृद्धभावश्च धर्मेण यस्य याति स पुण्यवान् ॥" ( एपि. इंडि. भा. ९, पृ. २८० ).

**कडुंगण पांड्य**—हा राजा स. ५६०–५९० राज्य करीत असावा. या राजानें कळभ्राच्या कारकीर्दीचा शेवट केला. तामीळ कवीचे पहिले पिढीचा शेवट याच्या राज्यांत झाला. परंतु चेर राजांमध्यें शेरमान शेल्व राजा व कडुंगण या दोघांचा उल्लेख कपिलर कवींनीं एका श्लोकांत केला आहे. यास मुलगा होता. त्याचें नांव ( अधिराज ) मारवर्मन् ( अवनिचूडामणि ) होय ( सुब्रह्मण्य अय्यरकृत एन्शन्ट डेक्कन ).

**कडतोजी गुजर**—( प्रतापराव गुजर पाहा ).

**कचेश्वर**—एक महाराष्ट्रीय कवि. राहण्याचें गांव व जन्मस्थान चाकण. देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. आडनांव ब्रह्मे. यानें तुकारामाच्या शिष्यापासून त्याच्या अभंगांच्या वह्या मागवून अभ्यास केला. याच्या अक्षय भजनामुळें यास लोक वेडा म्हणत असत. पण पुढें मात्र साधुसंतांना मिळणारा मान याला मिळूं लागला. हा चाकणच्या रानांत आश्रम करून अयाचित वृत्तीनें राहत असे.

यानें शके १६०७ मध्यें पाऊस पाडून दाखविला. याबद्दल त्यास एक टका व एक मण धान्य असें त्या परगण्यांतील दर गांवाहून मिळत असे. यास शाहूच्या उपलब्ध पत्रांचा पाठिंबा आहे.

पुढें शाहूनें राज्याकरितां साताऱ्यांत जात असतां याचा आश्रम पाहिला. यासच आपला गुरु केलें व अर्थातच ' राजगुरु ' हें सार्थ नांव कचेश्वरास पडलें. तेंच पुढें उपनांव म्हणून चालू राहिलें. बाळाजी विश्वनाथ सुद्धां याचा फार मान ठेवीत असे, असें त्याच्या अनेक पत्रांतील मायन्यावरून सिद्ध होतें. याला साताऱ्यास नेलें होतें. पण तेथें हा राहिला नाहीं. हा उंब्रज येथें राहत असे. कचेश्वर हा शके १६५३ त उंब्रज येथें फाल्गुन शुद्ध द्वितीयेस वारला. याची समाधी माहुली येथें आहे. याचे वंशज हल्लीं पुणें जिल्ह्यांतील खेड तालुक्यांतील चाकणच्या आसपासच्या गांवीं व सातारा जिल्ह्यांतील अतीतगांवीं राहतात. यानें स्थापलेल्या पांडुरंगाच्या मूर्ति खेड व चांडोली येथें आहेत.

कचेश्वराच्या पद्यरचनेपैकीं सध्यां छापून प्रसिद्ध अशीं दोनच आख्यानें आहेत. तीं म्हणजे सुदामचरित्र व गजेंद्रमोक्ष. श्लोकबद्धतेमुळें व वृत्तभिन्नतेमुळें याचीं आख्यानें कानाला गोड लागणारीं अशीं आहेत. यानें दिलेले दृष्टांत नेहमींच्या परिचयाचे असे असल्यानें स्त्रियांच्या तोंडीं सुद्धां ही कविता बसण्यास फारसे सायास पडत नाहींत. सध्यां छापून प्रसिद्ध असें कचेश्वराचें आत्मचरित्र आहे. यानें आपलें आत्मचरित्र अभंगांत लिहिलें आहे. त्यापैकीं पाहिले ५७ अभंग गहाळ झाले असून पुढले ५४ प्रसिद्ध झाले आहेत. ते फारच प्रेमळ आहेत. काव्यसंग्रहांत विठ्ठलकविकृत कवितासंग्रहांत द्रौपदीवस्त्रहरण प्रसिद्ध झालें आहे तें याचें असावें असें म. कविचरित्रकार आजगांवकर म्हणतात ( म. क. चरित्र भा. ३, पा. १३७–१५८ ).

तसेंच यानें शिवाजीसंबंधीं लिहिलेल्या दोन कविता प्रसिद्ध आहेत. यानें शिवाजीपासून शाहूपर्यंत पिढ्या पाहिल्या होत्या असें दिसतें.

याचा शिष्य रामचंद्र खटाटोपे. याचीं इनाम गांवें:– १ सासपडे ( जि. सातारा ), २ अतीत ( जि. सातारा ), ३ वाकी ( जि. पुणें ), ४ धावडी, ५ पांगरी.

**कच्चायनो**—( कात्यायन पाहा ).

**कच्छवाह**—ग्वाल्हेरचा राजा. स. १०२२मध्यें महमूद गझनवीनें ग्वाल्हेरच्या मजबूत किल्ल्यावर स्वारी केली तेव्हां तेथें या नांवाचा हिंदु राजा राज्य करीत होता. किल्ला जिंकण्यास फार दिवस व फार मेहनत लागेल असें पाहून महमूदानें ३६ हत्ती या राजाकडून घेऊन तो कालिंजरकडे निघून गेला.

कच्छवाह रजपूत राजाचें घराणें बहुधा जिझोतीच्या चंदेल राजघराण्याचें मांडलीक असावें ( कें. हि. ).

## कच्छवाहवंश ( अंबर किंवा जयपूर )

रामाचा मुलगा कुश याजपासून
|
नळ
|
धवळराय ( स. ९६७ ) ( नळापासून चवतिसावा पुरुष )
|
कोकल ( स. १०३७ )
|
हंनूनजी
|
जानुर्देवजी
|
पंजून ( पांचवा पुरुष ) ( पत्नी-पृथ्वीराज चव्हाणाची बहीण )
|
पृथ्वीराज ( अकरावा पुरुष )
|— भीम
|— बिहारीमल
   |— भगवानदास
   |— मुलगी लग्न अकबराशीं
      (भगवानदास)
      |— जगत्सिंग
      |— मानसिंग
      |— मानसिंह
      |— ( मुलगी लग्न जहांगीरशीं )
         (जगत्सिंग)
         |— भावसिंग ( १६१५ )
         |— ( मीर्झाराजा ) जयसिंह पहिला ( स. १६२१–१६६७ )
            |— रामसिंग पहिला ( स. १६६८ )
            |— करितसिंह
            |— महासिंग ( दुर्बल )
               |
               ( सवाई ) जयसिंह ( दुसरा ) स. १६९९
               |— ईश्वरसिंह ( स. १७४३–१७५० )
               |   |— पृथुसिंह ( स. १७६३ )
               |   |— प्रतापसिंह ( स. १७७८–१८०३ )
               |         |
               |         जगत्सिंग दुसरा ( स. १८०३–१८१८ )
               |         |
               |         जयतसिंह तिसरा ( स. १८१८ )
               |         |
               |         रामसिंह दुसरा ( स. १८३५ )
               |         |
               |         माधवसिंह ( स. १८८१ )
               |— माधवसिंह ( स. १७५०–६३ )

रत्नाकर भट्टाच्या प्रशस्तीवरून रा. राजवाडे सवाई जयसिंह हा रामसिंहाचा पणतू असें म्हणतात.

रामसिंह
|
कृष्णसिंह
|
विष्णुसिंह
|
जयसिंह सवाई

( मुसलमानी रियासत, पा. ४१९ ).

**कणाद तर्कवागीश**—( स. १५६० चा सुमार ) एक तर्कशास्त्रज्ञ. कणाद तर्कवागीश व रघुनाथ शिरोमणि हे दोघे वासुदेव सार्वभौमाचे शिष्य होते अशी प्रचलित समजूत आहे. आपल्या 'भाषारत्न' या ग्रंथांत उपोद्घातांतील पहिल्या श्लोकांत कणादानें एका चूडामणीस नमन केलें आहे. हाच जानकीनाथ चूडामणि असल्यास कणाद स. १५६० च्या सुमारास होऊन गेला असला पाहिजे. यानें खालील ग्रंथ लिहिले आहेत:—

( १ ) 'मणिव्याख्या' गंगेशाच्या तत्त्वचिंतामणिवरील टीका.

( २ ) 'भाषारत्न' वैशेषिकतत्त्वज्ञानावरील ग्रंथ.

( ३ ) 'अपशब्दखण्डन' वैशेषिकतत्त्वज्ञानावरील ग्रंथ ( हिस्ट्री ऑफ इंडियन लॉजिक, पा. ४६६ ).

**कण्णकैर रट्ट**--हा रट्ट घराण्यांतील एक राजा होय. हा या घराण्यांतील कार्तवीर्य पहिला याच्या मागून गादीवर आला. हा जैनधर्मा व यादवांचा मांडलिक होता. याला कण्ण असेंहि म्हणत ( स. १००० ).

२. हा रट्ट घराण्यांतील पहिल्या सेनानंतर गादीवर आला. हा जैनधर्मा व यादवांचा मांडलिक होता ( स. १०७६ ). याला कण्ण असेंहि म्हणत.

**कण्वऋषी**--हा गंग या घराण्याचा मूळ पुरुष होय. हा काश्यपगोत्री होता असें म्हणतात.

**कण्व घराणें**—या घराण्याचा मूळ पुरुष वसुदेव हा होय. हा मगधच्या शुंग घराण्यांतील शेवटच्या देवभूमीचा प्रधान होता. यानें देवभूमीस ठार मारून त्याचें राज्य आपण बळकाविलें.

वसुदेव ( ख्रि. पू. ७२–६३ )–भूमिमित्र—( ख्रि पू. ६३–४९ ) या वेळीं शकांचें राज्य उत्तर हिंदुस्थानांत फार भरभराटींत होतें )–नारायण ( ख्रि. पू.४९–३७ )–सुशर्मन्—( ख्रि. पू. ३७–२७ ) याला आन्ध्र राजानें ठार मारलें.

यापुढें शक राजांनीं या घराण्याचा समूळ नायनाट करून, येथें कुशान घराणें स्थापन झालें व त्या घराण्यानें स. १२४ पर्यंत राज्य केलें ( सिवेल आणि आयंगार, पृ. ३२० ). जात ब्राह्मण.

**कण्हपा**--हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं सतरावा सिद्ध होय. हा जातीनें ब्राह्मण असून कर्नाटक प्रान्तांतील रहिवासी होता. याच्या वेळीं देवपाल नांवाचा राजा राज्य करीत होता ( स. ८०९–४९ ). याचे कनखला ( ६७ ), मेखला, ( ३६ ), या दोन योगिनी, धर्मपा ( ३६ ), कंतलिपा ( ३९ ), महिपा ( ३७ ), उधळिया ( ७१ ), भदेपा ( ३२ ), जवरिपा ( ६४ ) वगैरे शिष्य होते. याचे काव्यग्रंथ मागधी भाषेंत बरेच आहेत. यावरून यानें मागधींत व हिंदींतहि कविता केल्या आहेत असें दिसतें. याचे ग्रंथ–कान्हपाद (त. २८।१७ ), महाढुण्डनमूल ( त. ८६।३० ), वसंततिल (त. १२।३०), असंबंधदृष्टि (त.४८। ४७ ), वज्रगीति (त. ४७।३३), दोहाकोष (त. ४७।४४). शेवटला ग्रंथ संस्कृतांत आहे. हा हिंदी कवि होता.

**कत्त**—( कार्तवीर्य पाहा ).

**कत्तम ( कत्त ) चक्रवर्ति**—( कार्तवीर्य रट्ट तिसरा पाहा ).

**कथरुद्रदेव**—ओरिसाच्या गजपति घराण्यांतील एक राजा. याचा प्रधानानें खून केला ( स. १५४१ ).

**कदफिसेस्**—(स.४०–७७)यालाच कुझुलो कदफिसेस असें म्हणतात. हा कुशान नांवाच्या फिरत्या टोळीचा मुख्य होता. यानें स. ४० मध्यें हिंदुस्थानच्या उत्तर भागांत आपली सत्ता स्थापन केली. कुशान हें कोणत्या एका टोळीचें नांव नसून तें एका कुटुंबाचें किंवा वंशाचें नांव असावें असें एफ. डब्ल्यु. थॉमस म्हणतात ( J. R. A. S. 1906 p. 203 ). तर के. पी. जयस्वाल ( J. B. O. Res. So. VI, p. 12–22 ). हें पहिल्या कदफिसेसच्या पूर्वीच्या अधिकाऱ्याचें नांव असावें असें म्हणतात. कुशान हें कुश नांवाच्या युद्धप्रिय टोळीचें अनेकवचन असावें, असें मत प्रचलित आहे (J. R. A. S. Jan. 1914, p. 79–88). युचि ह्या नांवाची एक फिरती टोळी चीनमध्यें राहत असे, त्यांना चरितार्थाच्या अभावीं चीनची सरहद्द सोडून बाहेर पडावें लागलें. त्या टोळीपैकींच कदफिसेस् हा हिंदुकुशाच्या दक्षिणेकडे उतरला व तेथील प्रांत काबीज करून राहूं लागला. यानें नंतर गांधार, काबूल, व इराणपासून सिंधुपर्यंत राज्यें जिंकिलीं. काबुल प्रांत यानें स. ५० मध्यें घेतला असावा. यानें स. ४५–७० चे दरम्यान इंडो-पार्थियनांचा पराभव करून हिंदुस्थानची उत्तर सरहद्द काबीज केली. इंडो ग्रीक लोकांचा शेवटला राजा हरमॉइस याच्यावर स. २० मध्यें यानें स्वारी केली व त्याचा पराभव करून काबूल प्रांतांत आपली सत्ता स्थापन केली. हा वयाच्या ८० व्या वर्षी मरण पावला. याच्या पश्चात् याचा पुत्र कदफिसेस् दुसरा हा स. ७८ मध्यें गादीवर आला ( Smith p. 265--67, 293 ).

२. ( स. ७८–११० ) यालाच ओइमो कदफिसेस असें म्हणत असत. हा पहिल्या कदफिसेसचा मुलगा. स. ७८ मध्यें कदफिसेस् पहिला याची कारकीर्द संपल्यानंतर हा गादीवर आला. हा आपल्या बापाप्रमाणेंच अतिशय महत्त्वाकांक्षी होता. यानें गादीवर आल्यावर आपल्या बापाच्या वेळचें उत्तर हिंदुस्थान जिंकण्याचें काम हातीं घेतलें. पंजाब व गंगा नदीच्या जवळील बनारसपर्यंतचा सर्व प्रदेश सिंधुनदीच्या मुखाजवळील प्रदेश आपल्या राज्यास जोडिले. जिंकलेल्या सर्व प्रांतांवर हा सुभेदार नेमून राज्यव्यवस्था त्यांच्यावर टाकीत असे. यानें राज्यांत सर्वत्र नाणीं सुरू केलीं. हीं नाणीं विशेषतः तांबें व ब्रांझ धातूंचीं केलेलीं असत; व त्यांच्यावर राजांचा राजा किंवा राज्य करणारा राजा असें खोदलेलें असे. हीं नाणीं काबूल-

पासून गाझीपूर, बनारस, कच्छ, काठेवाड येथें सांपडलेलीं आहेत. याचे वेळीं चिनी सेनापती पानचाओ (Pan-chao) यानें रोमन साम्राज्यापर्यंत स्वाऱ्या करून मुलूख जिंकिले. खोतान, काशगर इ. राजांनीं चिनी साम्राज्य मान्य केलें. चिनी सेनापतीच्या या जयामुळें व चिनी साम्राज्याच्या विस्तारामुळें याला साहजिकच भीति वाटली. कारण हाहि स्वतःला सार्वभौम राजा मानीत असे व चिनांचा गुलाम होणें यास आवडत नसे. म्हणून यानें आपण होऊनच होती या नांवाच्या चिनी राजाची मुलगी लग्नाकरितां मला द्यावी असा निरोप पाठविला, परंतु ही गोष्ट चिनी सेनापतीस अपमानकारक वाटल्यानें त्यानें दूतास पकडून ठेविलें. यामुळें यानें शी नांवाच्या सेनापतीबरोबर ७०००० घोडेस्वार देऊन त्यास चीन देश जिंकण्याकरितां पाठविलें. परंतु हें सैन्य टघदुंभाष पामीर (Taghdumbash Pamir) नांवाच्या १४००० फूट उंच असलेल्या पर्वताच्या ताशघर (Tashkurghan Pass) खिंडींतून जातांना त्यांचे अत्यंत हाल झाले. बरेंचसें सैन्य रस्त्यांतच मेलें व उरलेलें चीनच्या भक्ष्यस्थानीं पडलें. चिनी साम्राज्याखालीं रोम व हिंदुस्थान आल्यामुळें या दोन देशांत व्यापार चालू झाला. हिंदुस्थानांतून रेशीम, मसाल्याचे पदार्थ, रत्नें व रंग इ. रोममध्यें जात व त्याच्या मोबदला रोममधून सोनें येई. हा सर्व व्यापार जहाजांतून चालत असे. हा शंकराचा भक्त होता व याच्या नाण्यांवर नंदीचें चित्र खोदलेलें असे. हा स. ११० मध्यें मरण पावला ( V. Smith p. 267–75, 294, 319 ).

**कदमराव**—हा बंकापूर येथील असून विजापूरचा मांडलीक होता.

मुहम्मद आदिलशाहाचे कारकीर्दींत यानें बंड केलें म्हणून शाहानें मीर्झा अलीस फौज देऊन याजवर पाठविलें. मीर्झा अलीनें कदमरावास पकडून सन १६२८ त ठार मारिलें आणि आपण विजापुरास परत आला ( मु. रि. भा. १ ला, पृ. २७० ).

**कदमवंश**—( पा. १९१ पाहा ).

**कदरखान**—हा एक बंगालचा सरदार होय. याचा काल स. १३३६–३९ असा आहे. याला केंब्रिज हिस्टरीमधील वंशावळींत 'कादरखान' असें म्हटलें आहे.

मुहंमद तुघ्लक दिल्लीस राज्य करीत असतां फकीरुद्दीन नामक एका गृहस्थानें बादशहाविरुद्ध ( सन १३३९ ) बंड करून कदरखानास ठार मारून पूर्वेकडील प्रांतावर स्वतंत्र राज्य स्थापिलें ( मु. रि. भा. १ ला, पृ. ३१९ ).

**कदंबवंश**—( पा. १९२–९३ पाहा ).

## कदंब घराणें ( गोव्याचें )

(बॉम्बे गॅझेटियर १, भा. २, पृ. ५६४ एफ्.; इंडि. अँटि. ११. २७३; १४. २८९. एपि. इंडि. ८ परिशिष्ट २. १ पाहा.) 'बनवासीचे राजे' असें गोव्याचे कदंब लोक आपल्या मागें ( व्यर्थ ) बिरुद लावीत ( एपि. इंडि. ७. १९८ ).

१ गुहल्ल १ ला
( 'व्याघ्रमारिन्'–किंवा 'गुवल १' ला )
|
२ षष्ठदेव १ ला
( 'चत्त' 'चट्टल' 'चट्टय' स. १००७ )
|
३ जयकेशिन् १ ला
( स. १०५२ सोमेश्वर १ ला )
|
├─ ४ गूवलदेव २ रा ( स. १०९८ )
└─ ५ विजयादित्य १ ला ( 'विजयार्क' बा. चट्टलादेवी ).
    |
    ६ जयकेशिन् २ रा ( स. १११९, ११४७ बा. मैलाला विक्रमादित्य ४ था या चालुक्य राजाची मुलगी)
    |
    ├─ ७ पेर्मादि–शिवचित्त ( स. ११४७–११८२ बा. कमलदेवी. कामभूपाची मुलगी ).
    └─ ८ विजयादित्य २ रा ( स. ११४७, ११५८, ११७१, 'विष्णुचित्त' 'विक्रमार्क' वाणिभूषण, बा. लक्ष्मीदेवी ).
        |
        ९ जयकेशिन्–३ रा (स. ११८७–१२१० 'वीरजय' बा. महादेवी ).
        |
        १० त्रिभुवनमल्ल ( बा. माणिक्या–देवी).
        |
        ├─ ११ षष्ठदेव २ रा (स. १२४६, १२५० १२५७. 'शिवचित्त,' 'चट्टय')
        └─ ( मुलगी कामदेव किंवा कावन याची बायको ).

( सिवेल आणि आयंगार ).

## कद्म ( बांडे ) यांची वंशावळ गांव—मौजे तोरखेड पा। सुलतानपूर ( खानदेश )




( म. रि. म. १, पृ. ४३२ )

# कदंब घराणें ( बनवासीचें )

**टीप**—राजाच्या नांवापुढें दिलेल्या तारखा जोव्हीओ दुब्रील ( Jouveau Dubreuil ) यांच्या एन्शन्ट हिस्ट्री ऑफ दि डेक्कन पृ. ९५ मधून घेतल्या आहेत.

- १ मयूरशर्मन् ( स. ३४०–३६०. यानें बनवासी आणि हळसी हे प्रांत घेतले आणि चुतुशातकर्णाला मारलें ).
  - २ कंगवर्मन् ( स. ३६०–३८५. पुष्कळ लढाया केल्या ).
    - ३ भगीरथ ( स. ३८५–४१० )
      - ४ रघू ( स. ४१०–४२५ )
      - ५ ककुस्थवर्मन् ( स. ४२५–४५० ).
        - ६ शांतिवर्मन् ( स. ४५०-४७५ )
          - ७ मृगेशवर्मन् ( स. ४७५-४८८ ‘ विजयशीव ’ बा. कैकेय-प्रभावती )
            - ९ रविवर्मन् (स. ५००-५३७).
              - १० हरिवर्मन् ( स. ५३७-५५० पुलकेशिन् १ ला. या चालुक्य राजानें याचें राज्य घेतलें ).
            - भानुवर्मन्
            - शिवरथ ( स. ५४१-४२ ).
          - ८ मांधात्रिवर्मन् (स.४८८-५००)
        - अनंतदेवी ( कुमारगुप्ताला दिली होती )
        - कृष्णवर्मन् १ ला ( बा. कैकेय राजाची मुलगी )
          - विष्णुवर्मन् १ ला किंवा ‘ विष्णुदास ’ ( रविवर्मन्नें यास ठार मारिलें. )
            - सिंहवर्मन्
              - ११ कृष्णवर्मन् २ रा. ( स. ५५०–५६५. कीर्तिवर्मन् १ ला या चालुक्य राजानें याचें राज्य घेतलें ).
                - अजवर्मन्
                  - भोगीवर्मन्
                    - विष्णुवर्मन् २ रा.
              - मुलगी ( दुसऱ्या माधव गंग राजाची बायको ).
          - देववर्मन् किंवा शिवानंदवर्मन् ( साधु झाला ).

**टीप**— १ मयूरशर्मन्बद्दल ताळगुंद येथील लेख पाहा ( एपि. इंडि. ८.३० ). हा मानव्य गोत्री ब्राह्मण होता. हा चालुक्य राजाप्रमाणें आपण हारितीचा वंशज आहों असें म्हणतो. यानें कांची येथील पल्लव राजावर स्वाऱ्या करून आपलें बनवासी येथील राज्य स्वतंत्र केलें.

# कदंब घराणें ( हानगल किंवा पानुंगल येथील )

( या घराण्याची वंशावळ फ्लीटनें बाँबे गॅझेटिअर १ भाग २, पृ. ५५९ यामध्यें दिल्याप्रमाणें घेतली आहे. )

या घराण्यांतील पहिले तेरा राजे बापानंतर मुलगा या क्रमानें एकापुढें एक असे आले आहेत. त्यांचीं नांवें:—
१ मयूरवर्मा १ ला, २ कृष्णवर्मा, ३ नागवर्मा १ ला, ४ विष्णुवर्मा, ५ मृगवर्मा, ६ सत्यवर्मा, ७ विजयवर्मा, ८ जयवर्मा १ ला, ९ नागवर्मा २ रा,
१० शान्तिवर्मा १ ला, ११ कीर्तिवर्मा १ ला, १२ आदित्यवर्मा.

१३ चट्ट याचे लेख स. ९७२, ९७३, १०१२ चे आहेत ( एपि. क. ८ ता. सोरब ४५४-५५ ).

- १४ जयवर्मा २ रा किंवा ( जयसिंह स. १०३० ) — याचे पुत्र:
  - माऊलीदेव
  - १५ तैलप किंवा तैल १ ला ( स. १०५०, बा. चाऊंडला )
    - १६ कीर्तिवर्मा २ रा किंवा कीर्तिदेव १ ला किंवा तैलणसिंग स. १०६८-१०७७ प. चालुक्य, राजाचा जहागीरदार )
  - १७ शान्तिवर्मा २ रा. किंवा शान्ति किंवा शान्तेय ( स. १०८८, बा. शिरियादेवी पांड्यराजकन्या )
    - १८ तैल २ रा. किंवा तैलप किंवा तैलह ( स. १०९९-११३५, बा. बाचला पांड्यराजकन्या आणि चामला. चामलादेवीपासून )
      - १९ मयूरवर्मा २ रा. स. ११३१. बापाच्या सरहद्दीवर प. चालुक्य सोमेश्वर तिसऱ्याचा मांडलीक म्हणून राज्य करीत होता ( एपि. क. ८, सोरब ८० पाहा )
      - २० मल्लिकार्जुन ( स.११३२, ११३५, ११४४ )
      - २१ तैलम किंवा माऊली तैल. ( न. ११४७-११६० ) आणि म्हैसूर आर्क्यालॉजिकल रिपोर्टस् ( १९२३ सं. ११२ एपि. इंडि. १६. ३१ आणि एफ् पाहा )
        - २२ कीर्तिदेव २ रा स. ११७२
        - २३ कामदेव स. ११८१-१२०७ ( बा. केतला, प. चालुक्य सोमेश्वर ४ चा मांडलीक )
          - बर्म्म
          - सोम
          - मल्ल ( ३ मार्च स. १२१८ ते ७ जानेवारी दरम्यान गादीवर बसला ) ( एपि. क. ८, सोरब १८०, २२१, २४ ).
  - चोकिदेव किंवा जोकी
  - विक्रम किंवा विक्रमांक

**कदंब**--तेलगू कवि. अदितिकुंडलाहरण नाटकाचा कर्ता.

**२.** तेलगू कवि. हा कवि प्रतापरुद्र राजाचा दिवाण होता. हा मूळचा कलिंग देशचा रहिवासी होय. ह्यास ज्योतिषशास्त्राची फार लहानपणापासून आवड असल्यानें त्या विद्येंत हा निष्णात होऊन 'ज्योतिषार्णव' नांवाचा ग्रंथ यानें केला. याच ग्रंथाच्या प्रस्तावनेंत यानें आपल्या जन्माचा शक १३८४ चित्रभानु संवत्सर लिहिला आहे (क. च.).

**कनकदास**--(स. १५५० सुमार) कानडी कवि. जातीनें बेरड किंवा महार असावा.

ग्रंथ-मोहनतरंगिणी (कृष्णचरितें), रामध्यानचरित्र, नळचरित्र, हरिभक्तिसार. यांशिवाय याचीं हरिभक्तिपर अनेक पदें प्रसिद्ध आहेत. याशिवाय नृसिंहस्तव नांवाचा ल्हानसा ग्रंथ याचा दिसतो.

हा धारवाड जिल्ह्यांतील कागिनेले गांवचा असावा. तसा याचा प्रत्येक पद्याच्या शेवटीं तेथील कागिनेले आदिकेशवाचा उल्लेख आढळतो.

हा अस्पृश्य असल्यामुळें उडुपीच्या देवळापुढें यास उभें राहूं देत नसत. म्हणून हा देवळाच्या मागें उभा राहून भजन करी. याच्या भक्तीनें मंदिरांतील देवानें मागें तोंड फिरवलें, अशी आख्यायिका आहे. आजहि देवाचें तोंड फिरलेलें आहे. ज्या बाजूस तोंड फिरलेलें आहे त्या बाजूच्या खिडकीचें नांव 'कनकाची खिडकी' असें आजहि प्रसिद्ध आहे.

धारवाड जिल्ह्यांतील कोड तालुक्यांतील बाड हें याचें जन्मस्थान असून हा कागिनेले येथें जाऊन राहिला व तेथेंच मृत्यु पावला. यानें रामानुजाची स्तुति केली असल्यामुळें हा श्रीवैष्णवाचा शिष्य असावा. यानें पुरंदरदासाची प्रशंसा केली आहे. त्याच्याच धर्तीवर यानें पदें केलीं आहेत, पण हा त्याचा शिष्य होता असें म्हणण्यास निश्चित आधार नाहीं (क. क. च. भा. २, पा. २३८).

**कनकमुनि**—याला कोनकमुनि असेंहि म्हणतात. मुख्य चार बुद्धांपैकीं हा एक आहे. भद्रकल्पांत याचा जन्म सोमवती येथें झाला. याच्या बापाचें नांव यज्ञदत्त असून हा जातीचा ब्राह्मण होता. बुद्धवंशांत याचें निर्वाणस्थान पर्वताराम असें लिहिलें आहे. पर्वताराम धौलागिरि व मुक्तिनाथ यांच्या मध्यें आहे. त्याला सध्यां सैनामैना असें म्हणतात.

**कनकसेन मैत्रक**—(स. १४४ सुमार) वलभीच्या मैत्रकांचा मूळ पुरुष. अयोध्येच्या सूर्यवंशांतील हा मनुष्य लोहकोटाहून सौराष्ट्रांत वीरनगराला गेला, व तेथें स. १४४त परमार राजापासून तेथील राज्य हस्तगत केलें. यानंतर चार पिढ्यांनीं विजयसेन नामक राजानें विजयपूर म्हणजे हल्लींचें धोल्का शहर वसविलें; व पुढें त्या घराण्यानें वलभीपूर येथें आपलें राज्य स्थापलें. या घराण्यांतील पहिला महत्त्वाचा राजा भट्टार्क होय (म. यु. भा. १. २. १४२).

**कनकाई**—तुकाराम महाराजांची माता. बोल्होबाची पत्नी.

**कनकावती**—ही बनवासीच्या कदंब घराण्यांतील मयूरवर्माची मुलगी होय. दक्षिण तुलुव येथील प्रतिनिधि चंद्रसेन त्याचा मुलगा सरदार लोकादित्य याजबरोबर हिचें लग्न झालें. म्हैसूर देशांतल्या एका राजाला लोकादित्यानें मारून त्याचा मुलूख हस्तगत केला.

**कनखलिपा** (योगिनी)--ही स्त्री असून चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं सदुसष्ठावी होय. ही जातीनें गृहपतिकन्या असून अगचेनगर येथील राहणारी होय. ही कण्हपाची शिष्या होय. हिचा सनातनावर्तत्रयसुखागम हा ग्रंथ आहे.

**कनिष्क**—(स. १२०-१६२) हा एक कुशान राजा. दुसऱ्या कदफिसेसनें स. ७८ ते १११ पर्यंत सुमारें ३३ वर्षें राज्य केल्यावर कनिष्क राज्यावर आला. कनिष्क हा दुसऱ्या कदफिसेसचा मुलगा नव्हता. त्याच्या बापाचें नांव वझेष्क असें असून याचें राज्यारोहण व दुसऱ्या कदफिसेसचा मृत्यु यांच्या दरम्यान बराच काल लोटलेला दिसतो. एकंदर कुशान राजांपैकीं याचें नांव हिंदुस्थानच्या बाहेरहि फार प्रसिद्ध आहे. तथापि याच्याबद्दल विश्वसनीय अशी ऐतिहासिक माहिती मात्र थोडी आढळते. विश्वसनीय अशा चिनी इतिहासकारांच्या ग्रंथांतहि याच्याबद्दल थोडे उल्लेख आढळतात. याच्या संबंधींचे उल्लेख असलेले कोरीव लेख पुष्कळ आहेत. परंतु ते घोटाळ्याचे असल्यामुळें ह्याच्या कालासंबंधीं अनिश्चितता आहे. कांहीं विद्वान् संशोधक कनिष्काचें राज्यारोहण ख्रि. पू. ५८ मध्यें झालें असें म्हणणारे आढळतात. नाण्यादि पुराव्यावरून स्वतः व्हिन्सेंट स्मिथचेंच एके काळीं कनिष्काच्या कारकीर्दीचा आरंभ स. ७८ मध्येंच झाला असें नक्की मत होतें. परंतु १९२४ मध्यें त्यानें हिंदुस्थानच्या इतिहासावर जें पुस्तक प्रसिद्ध केलें त्यांत याचा राज्यारोहणाचा काल कदाचित् सुमारें ४० वर्षें नंतरहि असूं शकेल अशी जबर शंका प्रदर्शित केली आहे. तेव्हां याचा

काल स. १२० ते १६२ असा धरण्यास हरकत नाहीं. हा दुसऱ्या कदफिसेसनंतर गादीवर आला, हें मात्र आतां निःसंशय ठरलें आहे.

ह्युएनत्संगनें असें लिहून ठेविलें आहे कीं, 'जेव्हां कनिष्क गंधार येथें राज्य करीत होता तेव्हां याची सत्ता आसपासच्या राज्यांवर होतीं; व दूरदूरच्या प्रदेशांवर याचें वर्चस्व होतें. याचीं नाणीं काबूलपासून गंगेकांठच्या गाझीपूरपर्यंत सांपडत असल्यामुळें याचें राज्य विस्तृत होतें व याची कारकीर्द बरीच मोठी होती असें दिसतें.

कनिष्कानें आपल्या कारकीर्दीच्या आरंभासच काश्मीर जिंकून तेथें अनेक स्मारकें उभारलीं व आपल्या नांवाचें एक शहरहि वसविलें. यानें हिंदुस्थानच्या आणखी अंतर्भागांत शिरून पाटलीपुत्र येथील अश्वघोष नांवाचा एक बौद्ध साधु आपल्या बरोबर नेला. यावरून हा अश्वघोषाचा समकालीन होता, हें निश्चित ठरतें. कनिष्काची राजधानी पुरुषपूर म्हणजे आधुनिक पेशावर होती. येथें यानें–बौद्ध सांप्रदायाचा कट्टा पुरस्कर्ता बनल्यावर–बुद्धावशेषावर एक उंच इमारत उभारली. ही इमारत कोरीव लांकडाची असून ती तेरा मजली व ४०० फूट उंचीची होती आणि तिच्यावर चांगला लोखंडी कळस होता. ही इमारत आगीनें तीन वेळां जळून खाक झाली होती, पण श्रद्धाळू राजांनीं ती पुन्हांपुन्हां बांधून दुरुस्त केली. हा एक बौद्ध धर्माचा मोठा पुरस्कर्ता असून एक मोठा बलाढ्य राजा होऊन गेला. कनिष्कासारख्या बुद्धिमान् राजास आपलें सामर्थ्य वाढविण्यास व लोकांचें साहाय्य मिळविण्यास बुद्धसंघांचे अनुयायी व्हावेंसें वाटत असल्यास नवल नाहीं. यांत याचा हेतु धार्मिक असण्यापेक्षां राजकीय असणें साहजिक व संभवनीय आहे.

कनिष्कानें हिंदुस्थानाबाहेरील पार्थियन लोकांबरोबरहि युद्ध केलें. कनिष्काचे अत्यंत महत्त्वाचे लष्करी पराक्रम म्हटले म्हणजे काश्गार, यार्कंद आणि खोतान यांवरील विजय होत. हे प्रदेश चिनी सत्तेखालीं होते. यानें चीनला खंडणी देण्याचें बंद करून चीनच्या साम्राज्यांतील एका मांडलिक राजापासून ओलीस इसम आणले. हे इसम दिसण्यांत व पोषाखांत चिनी माणसाप्रमाणें होते.

पूर्व वयांत युद्धादि निमित्तानें जीं रक्तपाताचीं क्रूर कृत्यें झालीं त्यांबद्दल विषाद वाटून यानें बौद्ध संप्रदाय स्वीकारला. याच्या कारकीर्दींत आरंभींचीं नाणीं ग्रीक भाषा, लिपी व देवता यांनीं युक्त आहेत. याच्या काळांत बौद्ध सांप्रदायाचा जो महायान म्हणून नवा पंथ निघाला तो हिंदु, झरथुष्ट्री, ख्रिस्ती, नॉस्टीक व हेलेनिक अशा अनेक पंथांच्या मिश्रणानें बनविलेला होता. कनिष्क बौद्ध संप्रदायी बनल्यावरहि जुन्या व नव्या अशा दोन्हींहि देवतांना भजत असे.

कनिष्काच्या कारकीर्दींतील आणखी महत्त्वाची गोष्ट म्हणजे अशोकाच्या पद्धतीवर त्यानें भरविलेली धर्मसमिति होय. या मंडळाच्या सभा काश्मीरच्या राजधानीनजीक कुंडलवन नामक मठांत भरल्या. त्यांत वसुमित्र अध्यक्ष आणि पाटलीपुत्राहून आणलेला सुप्रसिद्ध ग्रंथकर्ता अश्वघोष उपाध्यक्ष होता, व सभासद ५०० होते.

कनिष्क सुमारें ४३ वर्षे राज्य करून स. १६२ च्या सुमारास मरण पावला. याच्या मृत्यूसंबंधीं पुढील दंतकथा आहेः याचा माथर नांवाचा एक असामान्य बुद्धिमत्तेचा प्रधान होता. त्याच्या सांगण्यावरून राजानें दिग्विजयाचें काम सुरू केलें. तीन दिशांना याला जय मिळाला. पण उत्तरेकडे दिग्विजय मिळविण्याचें काम राहिलें. त्या वेळीं याचे चाकरनोकर त्रासून जाऊन राजाच्या लोभाविषयीं आणि क्रूरपणाविषयीं टीका करूं लागले व शेवटीं त्यांना असें वाटूं लागलें कीं 'या सर्व त्रासांतून मुक्त होण्याकरितां आपण सर्वांनीं मिळून राजालाच नाहींसा केला पाहिजे.' याप्रमाणें पुढें जेव्हां राजा आजारी पडला तेव्हां त्यांनीं कट करून याला एका दुलईखालीं झांकून टाकलें व एका माणसानें याच्यावर बसून याला गुदमरून टाकून याचा जीव घेतला.

याच्या वेळचे शिलालेख मिळाले आहेत ( एपि. इंडि. भा. १० चें परिशिष्ट, लेखसंख्या १८, २१, २२ २३; ज. रॉ. ए. सो. इ. स. १९२४, पृ. ४००. आरा येथील लेखाकरितां एपि. इंडि. भा. १४, पृ. १४३ ).

यानें काश्मीर येथें बुद्धाच्या सिद्धान्ताचा निर्णय करण्याकरितां बौद्धसंघ एकत्रित केला होता. त्यांत जे त्रिपिटक मानले गेले ते तांब्याच्या पत्र्यावर यानें खोदून काढले. आणि ते एका दगडाच्या पेटींत ठेवून तीवर एक स्तूप उभारला ( भारतीय प्राचीन लिपिमाला १ पृ. १५४. टिप्पण १; सॅम्युअल बीलकृत बुद्धिस्ट रेकार्डस् ऑफ दि वेस्टर्न वर्ल्ड, भा. १, पृ. १५५ ). यानें केलेलें संस्करण मान्य करणारे महायान या नांवानें ओळखले जातात. चरक वगैरे ग्रंथकार याच्याच कालांत झाले. यानें अनेक स्तूप बांधले व संघाराम, विहार वगैरे निर्माण केले. हा संस्कृत भाषेचा अभिमानी असून महायान पंथाचे सर्व ग्रंथ संस्कृतमध्यें आहेत. यानें राजकीय आज्ञापत्र प्रथम संस्कृतमध्यें लिहिलें.

सुमाचीनचा से-की नांवाचा ग्रंथ, शेन हान चौ नांवाचा पां-कूं चा ग्रंथ, हौ-हा-चौ-नांवाचा फां-ये-चा ग्रंथ अशा तीन चिनी ग्रंथांचा खोल अभ्यास करून विद्वानांनीं कनिष्काच्या कालाचा निर्णय करण्याचा प्रयत्न केला आहे. सेकी हा ग्रंथ स. पूर्वी ९१ या वर्षी पुरा झाला आहे. दुसरा ग्रंथ खिस्तोत्तर सन २४ आणि २२० या वर्षांतील इतिहास सांगतो ( हि. क्का. मार्च १९२९ ).

युए-चि जातीच्या कुशान घराण्यांतील हा एक कर्तृत्ववान् पुरुष होता.

स. पू. ५८ मध्यें याच्या कारकीर्दीत 'विक्रमसंवत्' नांवाचा शक सुरू झाला. तो कनिष्काच्या 'राज्याभिषेक दिनानिमित्त' अगर ( अल्पांशानें ) परंपरेनें चालत आलेल्या बौद्ध समितीनिमित्त सुरू केला वगैरे कल्पना बरोबर दिसत नाहींत.

**कन्नर**--कल्याणीच्या कलचुरींपैकीं राजलाचा मुलगा.

**कन्नारया**—राष्ट्रकूट तिसऱ्या कृष्णाच्या वेळचा सिंदेवाडीचा राजा व योद्धा ( नान्निय सिंद पाहा ).

**कन्ह**--( कृष्ण पाहा ).

**कन्हैया**--श्रीतुकाराममहाराजांचा आजा. शंकराचा मुलगा व बोल्होबाचा पिता होय.

**२.** हा नवाब वाजिदल्लीशहाचा शागीर्द असून नृत्य व भाव या कसबांत फार वाकब, अशी याची प्रसिद्धी होता.

**कपालपा**—यालाच कमळ असें म्हणतात. हा चौऱ्यांयशीं सिद्धांपैकीं बहात्तरावा सिद्ध होय. हा शूद्र राजपुरीदेशचा राहणारा.

**कपिल**—श्वेताश्वतर उपनिषदांत सांगितल्याप्रमाणें अन्वीक्षिकी ग्रंथ लिहिणारा कपिल हा फार पूर्वी होऊन गेला. याचा जन्म अजमीरजवळ पुष्कर येथें झाला म्हणतात, परंतु पद्मपुराणांत हा इंद्रप्रस्थ येथील राहणारा होता, असें सांगितलें आहे. याच्या तत्त्वांचें कालांतरानें सांख्यतत्त्वज्ञानांत रूपांतर झालें. यानें प्रथम आपलीं तत्त्वें आसुरी यास शिकविलीं ( सांख्यकारिका श्लोक ७० ) व त्यानें तीं पंचशिख यास शिकविलीं. आसुरीचा 'शतपथब्राह्मणां'त उल्लेख केला आहे व तो ब्रह्मयज्ञांतील तर्पणांत आहे. त्यावरून हा बराच प्राचीन दिसतो ( प्राचीन चरित्रकोश पाहा ).

**२.** कश्यप हा कौशांबी येथील जितशत्रु राजाचा उपाध्याय होय. त्याचा कपिल हा पुत्र. याचें बहुतेक अध्ययन 'श्रावस्ती' नामक नगरांत झालें. जैन लोकांच्या उत्तराध्ययनसूत्रवृत्तींतील आठव्या अध्ययनांत याची सविस्तर हकीकत आहे. परंतु सांख्यशास्त्रकर्ता हाच असें मात्र लिहिलें नाहीं. त्यावरून तो कपिल व हा कपिल हे दोन्ही निराळे असावेत हें दिसून येतें.

**३.** सुश्रुताच्या टीकेंत याचीं वचनें उद्धृत केलीं आहेत. त्यावरून वैद्यकावर याचा एखादा ग्रंथ असावा ( सुश्रुत सूत्र. ६ ).

**कपिलर**--अव्हैयर म्हणून जी सुप्रसिद्ध कवयित्री होऊन गेली तिच्या तीन भावांपैकीं हा एक होय. याच्या पित्यानें यास अरण्यांत सोडल्यावर एका ब्राह्मणानें याचें पालनपोषण केलें व तामिळ भाषा उत्तम तऱ्हेनें शिकविली.

यानें पुढें जे अनेक कवितावद्ध ग्रंथ लिहिले त्यांत आगवर नांवाचा एक ग्रंथ आहे. त्यांत यानें आपलें व आपल्या भावंडांचें इतिवृत्त देऊन आपला जन्म चोल देशांत झाल्याचेंहि सांगितलें आहे ( क. च. ).

**कपिलेंद्रदेव**—ओरिसाच्या प्राच्यगंग घराण्यांतील ४ थ्या भानू राजाचा प्रधान व गजपति घराण्याचा संस्थापक. दुसरा अहमद बहामनी याच्या मदतीनें यानें ओरिसाचें राज्य बळकाविलें, आणि तेथें सूरिवंश घराणें स्थापन केलें ( कटक गॅझेटिअर चा. २५ ). कटक यानें आपली राजधानी केली. याचा काल श्रीकूर्मम् येथील शिलालेखावरून स. १४२९-३० किंवा १४३१-३२ असा आहे. हा एका धनगराचा मुलगा होता. याचा मुलगा पुरुषोत्तम.

**कप्तान यांची वंशावळ**—( दे. क्र. ग्रा. )




*( हे दारव्ह्याहून आले. आरवांचे रिसालदार ).

( नागपूर प्रांताचा इतिहास, पृ. ५५९ ).

**कबीर**—एक हिंदी कवि. हिंदुस्थानांतील एक संत व धर्मसुधारक. याच्या जन्माविषयींच्या कथा बऱ्याच विसंगत आहेत. हा एक ब्राह्मण विधवेचा मुलगा असून स्वतःच्या अब्रूचा बचाव करण्याकरितां तिनें जन्म देतांक्षणींच यास काशी येथील 'लहर' तळ्याजवळ नेऊन टाकलें.

कबीरकसोटी या ग्रंथांत याचा जन्म वि. सं. १४५५ (स. १३९७) आणि मरण १५७५ (स. १५१७) मध्यें झाल्याचें लिहिलें आहे. कबीर पंथी लोक वि. सं. १२०५ ते १५०५ पर्यंत हे हयात होते असें मानतात.

पुढें निरु नांवाचा मुसलमान साळी (जुलहा) आपल्या नीमा नांवाच्या बायकोसह तेथून चालला असतां त्याचें या अर्भकाकडे लक्ष गेलें. त्यानें यास घरीं नेऊन याचें पालनपोषण केलें. तोच कबीर मोठा झाल्यावर साळ्याचा धंदा करूं लागला. याचा हिंदुधर्माकडे कल असल्यानें रामानंदास आपला गुरु करावा असें यास वाटूं लागलें. पण आपण मुसलमान असल्यामुळें हा आपणास शिष्य करणार नाहीं असें वाटल्यावरून यानें एक युक्ति शोधून काढली. रामानंदाचा गंगास्नानाचा नित्यक्रम पाहून कबीर एके दिवशीं घाटावर गेला; रामानंदाचा चालतां चालतां याच्यावर पाय पडला, तेव्हां 'राम राम' असे उद्गार रामानंदाच्या तोंडांतून निघाले. तोच गुरुमंत्र समजून कबीर उठला व रामानंद आपला गुरु आहे असें यानें ठरविलें.

दुसरी ह्याविषयींची हकीकत म्हणजे, प्रथम कबीर रडूं लागला व रामानंदानें त्याला उगी करण्याचा प्रयत्न केला. त्याच वेळीं यास 'राम राम' हा गुरुमंत्र दिला.

त्या वेळेपासून कबीर नित्य रामानंदाच्या मठांत जाऊन तेथील वादविवादांत भाग घेत असे. पुढें कांहीं वर्षे हा मणिकपूर मुक्कामीं होता. तेथें यास शेक, तक्की व एकवीस पीर यांची कीर्ति ऐकूं आली. त्यांच्या उपदेशाचा निषेध करून यानें निराळाच उपदेश केला. तक्की व कबीर यांचें शत्रुत्व होतें. सिकंदर लोदीच्या तर्फे सिकंदरानें कबीराचा भयंकर छळ करविला; परंतु केवळ दैवी चमत्कारामुळें कबीर मृत्यूच्या दाढेंतूनहि सुटला. पुढें लवकरच सिकंदराचा व याचा समेट होऊन सिकंदरानें यास आपल्या कृपाछत्राखालीं घेतलें.

कबीर मगहर येथें निवर्तला. याच्या शवाची कोणत्या पद्धतीनें विल्हेवाट लावावी याबद्दल हिंदुमुसलमानांत तंटा लागला. परंतु याच्या अंगावरील झांकलेलें वस्त्र काढतांक्षणींच त्या ठिकाणीं प्रेत नसून फुलें असल्याचें आढळून आलें. तेव्हां अर्थातच कांहीं फुलें मुसलमानांनीं पुरून त्यांवर कबर बांधली, तर हिंदूंनीं त्यांतील कांहीं फुलें घेऊन त्यांचें काशिक्षेत्रीं दहन केलें. यास लोई नांवाची बायको असून दोन अपत्यें पण होतीं. त्यांचीं नांवें कमाल (मुलगा) व कमाली (कन्या) अशीं होतीं. याविषयीं मात्र कांहीं अद्भुत गोष्टी सांगण्यांत येतात.

वरील हकीकतींत ऐतिहासिक सत्याचा भाग किती व काल्पनिक भाग किती हें ठरविणें कठीण आहे. मि. वेस्टकॉट म्हणतो कीं, हा 'सूफी' मुसलमान पंथाचा असणें अशक्य नाहीं; पण याच्या ग्रंथांत हिंदूंच्या चालीरीति यांच्याशीं इतका पूर्ण परिचय असल्याचें दिसून येतें कीं, मुसलमानी धर्मतत्त्वें याच्या मुळाशीं आहेत असें कशावरूनहि दिसून येत नाहीं. तरी पण हा धार्मिक सुधारक असून पंडित होता, हें मात्र निश्चित आहे. हा निरनिराळे टेंभा मिरविणारे ब्राह्मण व निरनिराळ्या पंथांचे आचार्य या सर्वांवर लाखोली वाही. यावरून याजवर मुसलमानी धर्माचा पगडा बसला होता असें समजतात.

कबीराच्या खुद्द स्वतःच्या ग्रंथांत रामानंदाचें नांव कोठेंहि आढळत नाहीं. तरीपण ईश्वर निर्गुण व विदेही आहे, या मताचें खंडन करणें वगैरे गोष्टी रामनंदापासून यानें घेतल्याचें संभवतें. याचीं मतें हिंदु व मुसलमान या दोन्ही वर्गांवर परणाम करणारीं होतीं. सबंध हिंदुस्थानांत याचे अनुयायी दहा लाखांपर्यंत असतील. शीख धर्माचा संस्थापक नानक यानेंहि याच्याच शिकवणीवरून आपला पंथ तयार केला. कबीर हा हिंदु कीं मुसलमान हें समजत नाहीं. कारण हा दोन्ही धर्मांविरुद्ध बोलतो. हा वेदांत, संन्यास, उपासतापास वगैरे गोष्टींना मानीत नाहीं. हा भक्तिमार्गाचा पुरस्कार करी, पण वेदांतास शिव्या देई. यावरून हा अशिक्षित असावा असें दिसतें. अनेक देवांस भजणें चुकीचें आहे. धर्मग्रंथ महत्त्वाचे आहेत, पण त्यांना डोक्यावर चढविण्यांत अर्थ नाहीं, असें याचें मत होतें.

सृष्टीच्या उत्पत्तीविषयीं हा म्हणतो, "रामतेजांत सर्व जीवनाचें मिळून झालेलें सृष्टि हें एक सूक्ष्म स्वरूपांत असलेलें द्रव्य होतें. तें द्रव्य रामतेजानें प्रकाशित झालें; नंतर स्त्रीस्वरूपांत वासना प्रकट झाली. तिला 'गायत्री' म्हणूं लागले व तेथूनच सृष्टीच्या उत्पत्तीची खरी सुरुवात होय." उपनिषदांत एकाचीं अनेक रूपें झालीं असें जें म्हटलें आहे तें 'सत्त्व' होय, साक्षात् ईश्वर नव्हे. यावरून कबीराचें मत द्वैतपर आहे, हें सिद्ध होतें. जातिभेद अगर वर्णभेद ह्या सर्व गोष्टी खोट्या आहेत, असें कबीर म्हणतो. कबीराचा सर्व उपदेश तोंडींच असे, तरीसुद्धां त्यानें कांहीं ग्रंथरचना केली असल्याचें त्याचे भक्त सांगतात. सुखनिधान, गोरखनाथाच्या गोष्टी, रामानंदाच्या गोष्टी वगैरे याचे ग्रंथ आहेत.

याचे दोहरे प्रख्यात आहेत. त्याचप्रमाणें याचीं पदेंहि बरींच प्रसिद्ध आहेत. याची कवित्वशक्ति चांगली,

स्फूर्तिदायक व हृदयंगम आहे. याचे दोहरे तुकारामाच्या ‘ तुका म्हणे ’ सारख्या शेवटच्या ओळींत ‘ कहत कबीरा’ असें म्हणून पुरे केले आहेत. ‘ कबीराचे दोहरे ’ म्हणून उपलब्ध असलेल्या पुस्तकांतील भाषा बरीच मराठीच्या वळणावर आहे.

याचे धर्मदास व सुरतगोपाळ नांवाचे दोन शिष्य प्रसिद्ध आहेत. कबीराच्या मृत्यूनंतर काशीच्या शाखेचा चालक सुरतगोपाळ झाला आणि छत्तिसगडच्या शाखेचा चालक धर्मदास झाला ( श्यामसुंदरदासकृत कबीरग्रंथा-वली–प्रस्तावना ).

याच्या साक्या लोकांमध्यें म्हणींसारख्या प्रचारांत आल्या आहेत. हे मोठे सत्यनिष्ठ होते. यांनीं स्वतः केलेला ग्रंथ नाहीं, पण यांच्या शिष्यवर्गांनीं नामांकित ग्रंथ केले आहेत. यांची कांहीं गूढ वाक्यें आहेत व त्यांचे कांहीं उलटेसुलटे अर्थहि प्रसिद्ध आहेत. लोकांचा असा समज होता कीं, मगहर येथें मृत्यु आला असतांना मुक्ति मिळत नाहीं. पण सत्यनिष्ठ कबीराला हें केव्हांच पटणें शक्य नव्हतें, म्हणून यानें तेथें देह ठेवला.

**कॅमक**—हा एक इंग्रज सैन्याधिकारी ( मेजर ) होय. भोंसल्याशीं सख्य करण्याकरितां एल्यटनंतर गॉडर्ड यास हेस्टिंग्सनें नागपुरास पाठविलें व त्याच्या मदतीस कॅमक या सेनापतीस पाठविलें ( १७७८ च्या सुमारास ). नंतर हा भेलसा येथें आल्यावर भोपाळकर सरकारांनीं याज-पाशीं विनंति केली कीं, ‘भेलसे शिंद्याकडून घेऊन आम्हांस द्यावें, त्याबद्दल आम्ही तुम्हांस तीन लक्ष रुपये देतों. कारण भेलसा परगणा पूर्वी नानासाहेब पेशव्यानें भोपा-ळचे नबाबापासून जिंकून घेतला व तो सध्यां शिंद्यांच्या ताब्यांत आहे. ’ ही गोष्ट मान्य करून यानें शिंद्यांवर स्वारी केली. पण या स्वारीचा विशेष फायदा न होऊन महादजीनें कॅमकचें पारिपत्य केलें ( स. १७८१ ).

**कमरिपा**—याला कंबल असेंहि म्हणतात. हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं तिसावा सिद्ध होय. जात राजकुमार. ओरिसा प्रांतांत राहणारा. घंटापाचा हा शिष्य.

इंद्रभूतिहि याचा शिष्य होता. याला खुद्द गौतमबुद्धाचें दर्शन झालें होतें. हा त्रिपिटकाचा पंडित होता.

यानें प्रज्ञापारमितादर्शनावर चार ग्रंथ लिहिले. याची तंत्रग्रंथसंख्या अकरा आहे. त्यांपैकीं कांहीं प्राचीन उडिया मागधी हिंदींत आहेत. असंबंधदृष्टि ( त. ४८। ३८ ), असंबंधसर्गदृष्टि ( त. ४८।३९ ), कम्बलगीतिका ( त. ४८।३७ ).

**कमरुद्दीनखान**—(स. १७२१-४८) दिल्लीच्या मुह-म्मदशाहाचा वजीर अली याचा खून झाल्यानंतर बादशहानें अमीनखानास वजीर नेमलें. त्याचाच हा पुत्र होय. कमरुद्दीन व निजामउल्मुल्क हे चुलत भाऊ होत. याचा बाप सन १७२१ त मेला. निजाम वजीर झाला व कमरुद्दीन याची सरदारींत बढती झाली. पुढें यास वजिरी मिळाली ( स. २२-७-१७२४ ). हा बाळापूरच्या लढाईत निजामाकडे होता. थोरल्या बाजीरावाविरुद्ध लढण्यासाठीं हा मोठ्या सैन्यानिशीं आला होता ( २०–११–१७३४ ). नंतर यानें तरवराहून पिलाजीवर स्वारी केली. पण त्यांची प्रथम गांठ न पडतां पुढें झील तलावावर गांठ पडली. तरीसुद्धां बाजीरावानें झुकांडी देऊन दिल्लीचीं उपनगरें लुटलीं ( स. १७३७ ).

याची वडील मुलगी निजामाच्या मुलास–गाजी-उद्दीनास दिली होती. चौदा वर्षांनीं मुलीची भेट झाल्या-मुळें याला आनंद झाला. हा निजामास पन्नास मैल सामोरा गेला. त्या वेळची फारच मजेदार माहिती आयर्व्हिननें लिहून ठेविली आहे.

नादीरशहानें यास पुढें कैद केलें, याची सर्व संपत्ति घेतली व यास उन्हांत उभें करून हत्ती, जवाहीर, वगैरे जडजवाहीर घेतलें.

यानंतर मराठ्यांचा उत्तरेंत धुमाकूळ चालू असतां हा त्यांवर चालून गेला. निजाम व हा हे दोघेहि भाऊभाऊ ( चुलत ) असल्यानें मराठ्यांचे शेवटपर्यंत शत्रू राहिले. पुढें अहमदशाहा अबदाली दिल्लीवर चाल करून येत असतां त्यास विरोध करण्यास हा जातीनें गेला; व सरहिंद येथें अबदालीचा पराभव केला. पुढें २।३ दिवसांतच हा आपल्या तंबूंत निमाज पढत असतां तोफेचा गोळा लागून मेला ( १० मार्च १७४८ ).

**कमलदेवी**—गुजराथचा राजा कर्णदेव याची बायको. स. १२९७ मध्यें उलूघखान व नुस्रतखान नांवाचे दोन सरदार गुजराथचे स्वारीवर अलाउद्दीनानें पाठविले. त्यांनीं अनहिलवाड ( हल्लीं पाटण ) वेढा देऊन शहर काबीज केलें. राजा कर्णदेव आपली मुलगी देवलदेवीस बरोबर घेऊन देवगिरीचे राज्यांत आश्रयार्थ गेला. ही मात्र उलूघखानाचे हातीं लागली. त्यानें हिला दिल्लीस पाठविलें. पुढें ही अलाउद्दीनचे झनान्यांत दिल्लीस असतां हिला आपली मुलगी देवलदेवीस भेटण्याची इच्छा झाली. तिलाहि पुढें दिल्लीस आणली ( १ अलफखान व खिजरखान पाहा ).

**कमलभव**—( स. १२३५ सुमारें ) जैनधर्मी कानडी कवि. गुरु–माघणन्दी पंडितयति.

ग्रंथ—शांतीश्वरपुराण. यांत चवदाव्या तीर्थंकराचें चरित्र आहे. १६ आश्वास आहेत.

याला देवकवि उत्तेजन देत असे. यानें देवगिरीच्या सिंघण ( स. १२१०-४७ ) यादवाचा निर्देश केला आहे ( क. क. च. भा. १, पा. ३६१ ).

**कमलशील**—( स. ७५० सुमार ) कमलशील अथवा कमलश्रील असें यास म्हणत. हा बौद्ध तर्कज्ञ शांतरक्षिताचा शिष्य. प्रथम हा नालंदा येथें तंत्रशास्त्राचा पंडित म्हणून काम करीत होता. परंतु पुढें तिबेटच्या राजा( स. ७२८-७४६ )च्या बोलावण्यावरून हा तिबेटांत गेला. तेथें यानें चिनी धर्मोपदेशक महायान होशंग यास वादांत जिंकून व त्यास हाकून देऊन गुरु पद्मसंभव व शांतरक्षित यांच्या मतांचें समर्थन केलें. यानें खालील ग्रंथ लिहिले आहेतः—

( १ ) न्याय-विन्दु-पूर्व-पक्ष ( संक्षिप्त ). या ग्रंथांत धर्मकीर्तीच्या न्यायबिंदूवर लिहिल्या गेलेल्या टीकांचा सारांश दिला आहे. या ग्रंथाची मूळ संस्कृत प्रत उपलब्ध नाहीं. परंतु तिबेटी भाषांतर मात्र उपलब्ध आहे. तिबेटी भाषांतर करण्याचें काम हिंदी साधु विशुद्धसिंह व शुचेन येथील तिबेटी भाषांतरकार या दोघांनीं मिळून केलें.

( २ ) तत्त्वसंग्रहपंजिका. ही शांतरक्षिताच्या तत्त्वसंग्रहावरील टीका आहे. टीकेची मूळ संस्कृत प्रत उपलब्ध नाहीं, परंतु तिबेटी भाषांतर उपलब्ध आहे. तिबेटी भाषांतर करण्याचें काम देवेंद्रभद्र व तिबेटी भाषांतरकार या दोघांनीं मिळून केलें ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ३२७-३२८ ).

**कमलश्रील**—( कमलशील पाहा ).

**कमलाकर**—मुल्हेरचे उद्धव यांच्या चरित्रांत एका कमलाकराचा उल्लेख आहे ( स. १६४० सुमार ). शिवकल्याणचे पणजे कमलाकर नांवाचे होते. त्यांचा काल व बालबोधकार त्र्यंबकराव योगी ( निरंजन माधवाच्या परंपरेंतील ) यांचा काल एकच. शिवकल्याणचे पणजे पयोष्णीतारीं ( खानदेश ) तापी नदीच्या उत्तरभागीं होते. भक्तिविजय अध्याय ५७ यांत कमलाकराचा उल्लेख आहे. पण ते महिपतीपूर्वीचे होत. यांचीं कांहीं पदें आहेत.

**२.** गीतगोविंद ग्रंथाचा टीकाकार.

**कमलाकर भट्ट**—( स. १६१०-१६४० ) भट्ट घराण्यांतील काशीचे महापंडित आणि धर्मशास्त्रज्ञ. यांच्या पित्याचें नांव रामकृष्ण व आजाचें नांव नारायण भट्ट. देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. यांचा काल स. १६१०-१६४० असा असावा. हा यांचा काल बहुतांशीं बरोबर असावा. कारण यानें आपल्या आजोबाचा जन्म स. १५१३ त झाला असा उल्लेख आपल्या ग्रंथांत केला आहे. हें घराणें मूळचें पैठणचें असून यांचें गोत्र विश्वामित्र. यांना दोन भाऊ होते. त्यांपैकीं धाकट्यानें यांच्या हाताखालीं अभ्यास केला. हाहि विद्वान् असून यानें मीमांसेचा फार बारकाईनें अभ्यास केला होता.

यानें २२ हून अधिक ग्रंथ लिहिलें आहेत. यानें कुमारिलाच्या वार्तिकावर निर्णयसिंधु नांवाची टीका लिहिली आहे. शिवाय निर्णयसिंधु ( वि. सं. १६६८; स. १६१० ), दानकमलाकर, शान्तिरत्न, पूर्तकमलाकर, व्रतकमलाकर, प्रायश्चित्तरत्न, विवादताण्डव, गोत्रप्रवरदर्पण, कर्मविपाक रत्न, शूद्रकमलाकर, सर्वतीर्थविधि वगैरे ग्रंथ धर्मशास्त्रावर लिहिले आहेत. यांच्या पूर्तकमलाकरामध्यें तळीं, विहिरी, झाडें ( वनस्पती ), सार्वजनिक बगीचे वगैरेविषयीं माहिती दिलेली आहे. याच्या तत्त्वकमलाकरामध्यें मीमांसेंतील तत्त्वाविषयीं स्पष्टीकरण आलेलें आहे. याच्या ‘ विवादताण्डव ’ यामध्यें न्यायदानाविषयीं बरीच माहिती आलेली आहे. पुष्कळ ठिकाणीं याचीं व याचा चुलत भाऊ जो नीळकंठ यांचीं मतें विरुद्ध आहेत. यानें आपल्या निर्णयसिंधूमध्यें २०० स्मृतींचा आणि ३०० पेक्षां जास्त निबंधकारांचा उल्लेख केलेला आहे. या ग्रंथाचे तीन विभाग केलेले आहेत. धार्मिक कृत्यें, दिनमान, संक्रांत, क्षयमास, तिथि, व्रत, संस्कार, वगैरेंची माहिती या ग्रंथांत आलेली आहे. याचा हा ग्रंथ फार प्रसिद्ध आहे. याशिवाय यानें कलिधर्मनिर्णय, कार्तवीर्यपद्धति, नीतिकमलाकर, बह्वृचाह्निक, भक्तिरत्न, रुद्रपद्धति वगैरे ग्रंथ लिहिले आहेत. मम्मटाच्या काव्यप्रकाशावर याची एक टीका आहे.

**२.** हे प्रसिद्ध ज्योतिषी होत. यांचें राहण्याचें गांव गोलग्राम असून यांनीं स्वतः लिहिलेल्या ‘ सिद्धांतविवेक ’ नांवाच्या ग्रंथावरून यांची बरीचशी माहिती मिळते. यांच्या ज्येष्ठ बंधूचें नांव दिवाकर असून बहुतेक ज्ञानप्राप्ति नृसिंहाच्या कृपेनें व दिवाकराच्या शिकवणीमुळें झाली. यानेंच पुढें वर सांगितलेला ग्रंथ लिहिला.

यावरून कमलाकरभट्टाचा निपणजा राम, आजा, कृष्ण, बाप नृसिंह व ज्येष्ठ बंधु दिवाकर, होते असें समजतें. ग्रंथरचनेचा काल व स्थळ यानें आपल्या ग्रंथाच्या

शेवटीं दिलीं आहेत. स. १५८० ते ८१ या कालांत यानें सिद्धांततत्त्वविवेक ग्रंथ लिहिला. यावरून हा ग्रंथ शहाजहान बादशहाच्या राज्याच्या अखेरीस झाला असें दिसून येतें.

याच्या ग्रंथाचे एकंदर १३ भाग आहेत; व त्यास 'अधिकार' अशी संज्ञा दिली आहे. पहिल्या भागांत ग्रहांच्या मध्यम गतींचा विचार असून ग्रहांच्या स्पष्ट गतीचा उल्लेख केलेला आहे. हा ग्रंथ बनारस सिरीजमध्यें प्रसिद्ध झाला आहे.

हा कमलाकरभट्ट सर्वस्वीं सूर्य सिद्धांतानुसारी होता. कमलाकराच्या वरील ग्रंथांतील तत्पूर्वी नाहींत अशा नवीन गोष्टी रा. दीक्षित यांनीं आपल्या ज्योतिःशास्त्रांत नमूद केल्या आहेत ( पृष्ठ २८७–८८ ).

**कमलादेवी कदंब**—पेरमादि कदंबाची पत्नी. कामभूपाची मुलगी.

**कमलाबाई पालकर**—ही थो. शिवाजीची मुलगी होती. हिच्या आईचें नांव सकवारबाई असें होतें. ही जानोजी पालकर यांस दिली होती ( शिवाजी–निबंधावली १, पृ. २२५ ).

**कमलुक**—( तोरमाण पाहा ).

**कमाल**—हा प्रख्यात साधु कबीर याचा मुलगा असें समजतात; पण पुष्कळ कबीर संप्रदायी तसें मानण्यास तयार नाहींत. कमाल नदींत वाहत असतांना कबीरास दिसला व पुढें कबीरानें याचा सांभाळ केला, म्हणून हा आपणास 'कबीरसुत' असें म्हणत असे. 'सुत' शब्दाचा अर्थ शिष्य असा सुद्धां होऊं शकतो. कबीर हा ब्रह्मचारी होता. परंतु लोई ही त्याची शिष्या त्याजपाशीं कायम असल्यानें ती त्याची बायको असावी, असा लोकांचा समज असे ( वि. विस्तार पु. ३९, पा. ६०–७१ ). कमाल व कमाली यांच्या जन्माचे प्रकार विलक्षण आहेत, असें बहुतेक कबीराचे चरित्रकार व अनुयायी म्हणतात. तेव्हां कमाल हा कबीराचा मुलगा नसावा हें खरें वाटतें. कमालाचींहि पदें बरींच आहेत.

**कमालखान**—सिंधु नदीवरील नीलाब प्रांतांतील गख्खर लोकांचा राजा सारंगाचा हा मुलगा. हा याच घराण्यांतील सुलतान आदम याच्यानंतर गादीवर आला.

हुमायूननें सुलतान आदम यास कैद करून गख्खर लोकांचें राज्य याच्या स्वाधीन केलें. तेव्हां हा सर्व गख्खर प्रदेशाचा मालक झाला.

२. ( इस्माईल आदिलशाह पाहा ).

**कमोन्स**—हा एक पोर्तुगीज कवि. गोवें येथील पोर्तुगीज अधिकारी बारेटोने याचे कारकीर्दीत यानें गोव्यांतील पोर्तुगीज अधिकाऱ्यांच्या उन्मत्तपणावर एक टीकात्मक कविता प्रसिद्ध केली. त्याबद्दल शिक्षा म्हणून या कवीस हद्दपार करून मोलक्का येथें पाठविलें. तेथून हा स. १५८१ त परत गोव्यास आला, आणि कांहीं दिवस चौल येथें रस्ते वगैरे करणाऱ्या ( पब्लिक वर्क्स ) खात्याचा हा मुख्य होता. सोळा वर्षे काम करून हा स्वदेशीं परत गेला. या कवीचे ग्रंथ युरोपांत सुप्रसिद्ध आहेत ( ब्रि. रि. पू. पृ. १२८ ).

**करण घेला किंवा वाघेला**—(कर्णदेव बघेल पाहा).

**करणसिंग**—( स. १६३१-६९ ) हा एक बिकानेर संस्थानचा राजा होय. रायसिंगनंतर हाच या घराण्यांतील थोर पुरुष होय.

यानें महाराष्ट्रांत करणपूर, पद्मपूर व केसरिसिंगपूर हीं गांवें वसविलीं. हीं गांवें इंग्रजांनीं दोन खेडीं देऊन आपल्याकडे घेतलीं.

**करन कवि**—एक हिंदी कवि. हे कान्यकुब्ज देशांत जमीनदार होते व छत्रसालच्या वंशजाच्या ( पन्ना-नरेश ) दरबारीं आश्रयाला होता. यांचा कविताकाल वि. सं. १८६० ( स. १८०२ च्या ) सुमाराचा असल्याचा समज आहे. यांनीं 'साहित्यरस' व 'रसकल्लोळ' या नांवांचीं दोन काव्यें ( रीतिग्रंथ ) लिहिलीं आहेत. साहित्यरसांत यांनीं लक्षणा, व्यंजना, ध्वनिभेद, प्रास, अनुप्रास वगैरे सर्व विषयांचें संपूर्ण विवेचन केलें आहे. यांचें काव्यहि मोठें गोड व सुरस वाटतें.

**करमतसिंग**—हा पतियाळाच्या साहेबसिंगाचा मुलगा. स. १८१३ मध्यें गादीवर आला.

**करवाराचार्य**—यांचा आर्यवैद्यकावर एखादा ग्रंथ असावा, असें माधवनिदानावरील टीकेंत ( अतिसाराधिकार ) आलेल्या निर्देशावरून वाटतें ( पं. गणनाथ सेनकृत प्रत्यक्ष शारीर प्रस्ता. ).

**करिकाल चोल**—( स. १५०–१८० ) चोल घराण्यांतील पहिला ऐतिहासिक मुख्य पुरुष हा होय. याच्या पूर्वीचीं नांवें संगमादि ग्रंथांतून आढळतात. परंतु त्यांची ऐतिहासिक माहिती फारशी आढळत नाहीं. करिकालाच्या आजाचें नांव वेरपहरदकई पेरुनर्किळ्ळी असून तो कुडक्को नेडुमशेरदालन या चेर राजाचा

समकालीन होता. हे दोघे लढत असतां दोघेहि ठार झाले असें म्हणतात. करिकालाचा पिता उरुवप्पहरेर इळचोन ( इळंजेतसेन्नी ) नांवाचा होता. तो तरुण असतांच वारला तेव्हां हा गादीवर आला. पण चेरांनीं याचें बरेंच राज्य आक्रमण केल्यामुळें याला अज्ञातवासांत राहावें लागलें. पुढें एका आगींत सांपडल्यामुळें याचे पाय अधू झाले. त्यामुळें यास नीळपाद किंवा कृष्णपाद असें म्हणत. लहानपणींच यानें न्यायनिवाड्याचें काम उत्तम केलेलें आढळतें. नानगुर वेळ कुटुंबांतील मुलीशीं यानें लग्न लाविलें. वेण्णिळ ( तंजावर जिल्ह्यांतील हल्लींचें कोईळवेण्णी ) येथें यानें पाण्ड्य व चेर या दोन्ही राजांचा पराभव करून चेर राजकन्येशीं लग्न लाविलें; आणि आपली बहीण चेर राजास दिली. यामुळें दोन्ही घराण्यांत दोस्ती घडवून आणली. सीलोनवर यानें स्वाऱ्या केल्या. आपली पहिली राजधानी उरैयूर ही बदलून कावेरीपट्टनम् नांवाचें शहर स्थापून तेथें नेली. याचें कारण आपल्या राज्याची दक्षिण व पश्चिम सरहद्द मजबूत असावी, व्यापाराची भरभराट होऊन किनाराहि सुरक्षित राहावा, म्हणून ही राजधानीची अदलाबदल झाली. तिच्या स्थापनेसाठीं करिकालानें सीलोनमधील बारा हजार लोक वेठीस पकडून आणले होते. पुढें सातव्या शतकांत गैल कुर्रम् ही राजधानी झाली. सिलप्पाधिवारम् वगैरे काव्यांतून यानें उत्तर हिंदुस्थानांत स्वाऱ्या करून थेट हिमालयावर आपला व्याघ्रध्वज रोविल्याचा उल्लेख आहे. पल्लवांचा ध्वजहि व्याघ्राचाच होता. अवंतीराज, मगधराज आणि वज्रराज ( बुंदेलखंड ) हे याचे मित्र होते. याच्या कारकीर्दींत कावेरीपट्टनम् येथें दर्यावर्दी व देशांतील व्यापार फार जोरांत सुरू होता. याच्या कारकीर्दींत कांची नगरी सोन्याची केली असें वर्णन आहे. तसेंच कावेरी नदीला बंधारे घालून कालवे काढले होते. या वेळीं चोल साम्राज्याची भरभराट झाली असून हा सम्राट् बनला होता. याच्या वर्णनपर पट्टिनप्पालै नांवाचें एक काव्य झालें. त्याच्या कर्त्यास एक लक्ष सव्वा हजार सुवर्णमुद्रा यानें बक्षिस दिल्या. हा विद्वान् असल्यानें याच्या पदरीं परनर, कळाथलैयार वगैरे संगम ग्रंथांत प्रसिद्ध असलेले कवी होते. यानें बरींच वर्षे राज्य केलें.

हा खिस्तोत्तर पहिल्या किंवा दुसऱ्या शतकांतील असावा.

२. चोल घराण्यांतील दुसऱ्या आदित्याचें नामान्तर.

३. काकतीयांचा पहिला राजा.

**करीमखान**—हा शिंदेशाहींतील पेंढारी असून यानें खर्ड्याच्या लढाईनंतर ( स. १७९५ ) निजामाच्या सैन्याची जी लूट झाली तींत बराच पैसा मिळविला. याच्या कावेबाजीनें व धूर्ततेनें हा पेंढाऱ्यांचा पुढारी बनला. अमीरखानानें करीमखानास जहागीर म्हणून एक जिल्हा दिला. त्यांतच शिंद्यांनीं कांहीं मुलूख देऊन भर टाकिली. यानें सन १८०३ मध्यें शिंद्यांचे बरेचसे किल्ले काबीज केले. एकदां तर याच्या मुलखाची वसुली १५ लाखांपर्यंत गेली होती.

आपलीं बायकापोरें व द्रव्य यांच्या रक्षणार्थ यानें एक किल्ला बांधला होता. हा शिंदेशाहींतील असला तरी वेळेस आपल्या धन्याविरुद्ध जाण्यास कचरत नसे. यामुळें शिंद्यांनीं याला कांहीं तोफा देण्याचें मिष करून आपल्या भेटीस बोलाविलें आणि कैद करून ग्वालेरच्या किल्ल्यांत ठेविलें. पण यानें पैसे भरून आपली सुटका करून घेतली ( स. १८१० ).

याच्या हाताखालीं त्या वेळीं २५००० फौज व कांहीं पायदळ इतकें सैन्य होतें. याच्या छोटू नांवाच्या विश्वासांतील माणसानें फितुरी केल्यामुळें याचा भोसल्यावर स्वारी करण्याचा बेत फसला; व अमीरखानाकडे आश्रयास जावें लागलें. शिंद्यांच्या सांगण्यावरून अमीरखानानें यास कैद केलें. हा पुढें स. १८१६ पर्यंत अमीरखानाच्याच कैदेंत होता. याच वेळीं इंग्रजांनीं पेंढाऱ्यांवर स्वाऱ्या करून त्यांचा पराभव केला; व कांहींची कत्तल केली. करीमखान हा इंग्रजांना शरण गेल्यामुळें याला गणेशपूर ही जहागिरी देण्यांत आली. तेथें कांहीं काल याचा वंश नांदत असे. परंतु पुढें स. १८५७ च्या बंडांत भाग घेतल्याच्या आरोपावरून ही जहागिरी खालसा करण्यांत आली.

**करुणाकर पिशारोती**—कालीकत येथील झामोरीन राजाच्या दरबारीं हा एक कवि होता. दक्षिण मलबारमधील प्रसिद्ध क्षेत्र मूक्कोल, येथील हा राहणारा होय.

यानें 'कविचिंतामणि' नांवाची 'वृत्तरत्नाकर' यावर एक टीका लिहिली आहे. त्या टीकेंत कालीकतचा राजा राजराजाच्या पदरीं हा होता, असा उल्लेख आला आहे. राजराज हें मानविक्रम या राजाचें नांव असावें ( Indian H. Quarterly Vol. VI, p. 90 ).

**कर्क राष्ट्रकूट**—राष्ट्रकूट घराण्यांतील पहिल्या गोविंदाचा मुलगा. हा आपल्या बापानंतर गादीवर आला. याचा काल स. ७०० नंतरचा होय. याला इंद्र १ ला, कृष्ण १ ला आणि नन्न गुणावलोक या नांवाचे तीन मुलगे होते.

हा वैदिक धर्माचा भोक्ता असून यानें आपल्या पदरीं पुष्कळ ब्राह्मणांना आश्रय दिला होता ( भांडारकर पृ. ८५ ).

२. ( स. ९७२-७३ ) मालखेडच्या राष्ट्रकूट घराण्यांतील निरुपम राजाचा पुत्र. हा खोत्तिग नांवाच्या आपल्या चुलत्याच्या मागून गादीवर आला. यावरून खोत्तिग यास औरस पुत्र नसावा अगर यानेंच युक्तीनें गादी बळकावली असावी असें वाटतें. याच्याच कारकीर्दींत राष्ट्रकूट घराण्याचा शेवट झाला.

यानें अवघे अठरा महिनेच राज्यपदाचा उपभोग घेतला. हा अत्यंत दुर्व्यसनी व दुष्ट होता; व याचे मंत्रीहि याला साजेसेच होते. राष्ट्रकूटाचा शेवटचा सामना दुसऱ्या तैल चालुक्याशीं झाला. ह्या लढाईंत याचा पुरा पराभव होऊन राष्ट्रकूटांचें साम्राज्य नाश पावलें. यालाच अमोघवर्ष चवथा असेंहि म्हणत असत.

३. राष्ट्रकूट घराण्यांतील गुजराथ शाखेपैकीं गोविंदाचा हा मुलगा व ध्रुवाचा नातू होय. याचा काल स. ७५७ असा असून हा गुजराथ येथें राष्ट्रकूटाचा सुभेदार होता. राष्ट्रकूटाच्या मुख्य शाखेंतील दन्तिदुर्गाचा हा समकालीन असून त्याच्याच कारकीर्दींत गुजराथची सुभेदारी याचेकडे आली. परंतु पुढें यानें स्वतंत्र होण्याचा प्रयत्न केला, पण तो सफल झाला नाहीं.

**कर्क सुवर्णवर्ष राष्ट्रकूट**—राष्ट्रकूट घराण्यांतील ध्रुवाचा हा मुलगा. याला गोविंद ३ रा व आणखी कांहीं भाऊ होते. ध्रुवानंतर राष्ट्रकूटांचे गादीवर गोविंद ३ रा आला. कर्क हा आपल्या वडिलांच्या वेळेपासूनच खानदेशचा कारभार पाहत होता.

२. गुजराथ येथील राष्ट्रकूट शाखेंतील इंद्राचा हा मुलगा. यानें अमोघवर्षाचें पालन केलें.

**कर्कोटक वंश**—( काश्मीरचीं राजघराणीं पाहा ).

**कर्ण**—छत्रपति राजाराम महाराज भोसले यांचा लेकवळा हा मराठ्यांच्या तत्कालीन राजकारणांत भाग घेत असे. जेधे शकावलींत स. १६९७ मध्यें राजाराम यानें कर्ण याला मोंगलाईंत पाठविल्याचा उल्लेख आहे. पुढें कर्नाटकांतहि यानें बरीच कामगिरी केली. हा पराक्रमी व योद्धा होता.

**कर्णदेव कलचुरी**—( स. १०३८-८० ) हा त्रिपुरी येथील कलचुरी घराण्यांतील गांगेयदेवाचा पुत्र. यानें हूण राजकन्या आल्हणदेवीशीं लग्न केलें. हा मोठा शूर होता. यानें काशीस 'कर्णाचा मेरु' या नांवाचें एक देऊळ बांधलें ( जबलपूर ताम्रपट ). यानें स. १०३५ त मगधच्या पालचा पराभव केला ( भेडाघाट शिला. ) व चोड, कुंग, हूण, गौंड, गुर्जर व कीर या राजांना आपल्या सेवेस लाविलें. भीमदेवगुर्जर, कीर्तिवर्मा चंदेल्ल, पहिला सोमेश्वर ( प ) चालुक्य आणि उदयादित्य परमार यांचा पराभव केला ( स. १०४२ ). यानें भीमदेव गुर्जर राजाच्या मदतीनें मालवराज भोजाचा पराभव केला. पुढें याचा काळ फिरला. याच्या शत्रूंनीं याचा स. १०७० मध्यें पराभव केला. याच्या दरबारीं गंगाधर म्हणून एक कवि होता.

२. ( स. १०४२ सुमार ) हा कल्याणीचा राजा चेदींच्या लेखांत यास त्रिकलिंगाधिपति असें म्हटलें आहे (एपि. इंडि. २ ३०८). यानें कर्णावती नांवाचें एक नवीन नगर वसवून तें वेदविद् ब्राह्मणांना अग्रहार दिलें. तें हल्लीं तेवूरजवळ कर्णबेद नांवाचें खेडें आहे ( एपि. इंडि. २. ३ ). यानें चंपारण्य उध्वस्त केलें. हें चंपारण्य म्हणजे बिहारांतील चंपारण्यच होय ( बिहार ओरिसा जर्नल १९२४ ). याला वीर-श्री आणि यौवन-श्री या नांवांच्या दोन मुली होत्या. त्यांपैकी वीर-श्री ही वर्म घराण्यांतील ( बंगाल येथील ) जतवर्म यास दिली होती व अशा रीतीनें जतवर्माचा राजघराण्याशीं संबंध आला होता. दुसरी मुलगी यौवन-श्री ही बिहारच्या तिसऱ्या विग्रहपाल राजास दिली होती ( The Modern Review for November 1932, p. 5-30 ).

**कर्णदेव बघेल**—बघेल वंशांतील सारंगदेवाचा पुत्र. गुजराथमध्यें हा करणघेला नांवानें अजूनपर्यंत प्रसिद्ध आहे. याच्या वेळीं वि. सं. १३५६ ( स. १२९९ ) मध्यें दिल्ली येथें अलाउद्दीन खल्जी याचा धाकटा भाऊ उलूघखान तसेंच नुस्रतखान जलेसरी यानें गुजराथेवर स्वारी केली आणि याचें राज्य घेतलें. हा पळून देवगिरीच्या रामदेवराव यादवाकडे गेला. अशा प्रकारें गुजराथमधील सोलंकींचें राज्य नष्ट झालें. याची राजधानी गुजराथेंतील अनहिलवाड ही होती.

याला कर्ण, करण, कर्णराय किंवा कर्णदेव असें म्हणत असत. हा बघेल वंशांतील म्हणून वाघेला असें म्हणत. तसेंच वेडसर असल्यानें घेला असें म्हणत. घेलो हा गुजराथी शब्द असून त्याचा अर्थ 'वेडा' असा आहे.

भाट लोकांनीं कर्णाच्या अनाचाराचें पुष्कळ वर्णन केलें आहे. माधव नांवाचा एक नागरी ( नागर ) ब्राह्मण याचा मुख्य प्रधान होता. तो कोठें बाहेर गेला असतां,

त्याच्या रूपवती पत्नीस कर्णानें बलात्कार करून आपल्या वाड्यांत नेलें. तिला सोडविण्याचा प्रयत्न माधवाचा भाऊ केशव यानें केला, पण त्यांत तो मारला गेला. वरील हकीकत माधवास कळतांच त्यानें अलाउद्दीन खल्जीची मदत घेऊन लढाईची तयारी केली. शेवटीं लढाई होऊन फितुरीनें याचा पराभव झाला व हा आपलीं बायका-मुलें राजधानींत सोडून पळून गेला. याच्या पश्चात् मुसलमानांनीं याचें राज्य घेतलें. त्या वेळीं याची स्त्री कमलादेवी ही मुसलमानांचे हातीं लागली. पुढें तिची अलाउद्दीनकडे रवानगी करण्यांत आली. नंतर याची मुलगी देवलदेवी हिलाहि पकडून दिल्लीस अलाउद्दीनाकडे पाठविण्यांत आलें. नंतर देवलदेवीचें लग्न शहाजादा खिजरखान याजबरोबर झालें.

इकडे हा दुर्धर यातना व दुःखें ह्यांनीं जर्जर होऊन लवकरच अज्ञातवासांत मरण पावला. या गुजराथच्या शेवटल्या राजावर भाटांनीं रासमाला वगैरे ग्रंथांत अनेक कविता केल्या आहेत.

**कर्णपार्य**—( स. ११४० सुमार ) कानडी कवि. जैन, कर्णप, कन्नमरय, कण्णप्प वगैरे नांवानीं याचा उल्लेख येतो.

ग्रंथ—नेमिनाथपुराण, माळवीमाधव ( दुर्गसिंहाच्या कानडी पंचतंत्रावरून कळतें ), वीरेशचरित्र.

याचा गुरु—कल्याणकीर्ति (मलधारीदेवाचा शिष्य).

आश्रयदाता—जीमूतवाहनवंशज लक्ष्मणराज.

**कर्ण यादव**—हा पांचव्या भिल्लम यादवाचा पिता.

**कर्णरिपा** ( आर्यदेव )—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं अठरावा सिद्ध आहे. जात ब्राह्मण. नालंदा प्रांतांत राहणारा. हा नागार्जुनाचा शिष्य.

**कर्णसिंह**—( स. १५८४–१६२८ ) उदेपूरचा महाराणा. हा अमरसिंहाचा मुलगा. ज्या वेळेस जहांगीर बादशाहानें कर्णसिंहास मनसबदारी व राजा हा किताब दिला, तेव्हां अमरसिंहानें आपला राज्यशकट याच्या ताब्यांत दिला. हा २६ जानेवारी १६२० मध्यें गादीवर बसला. याच्या राज्यांत झगडे न होण्याचें कारण यानें आपल्या राज्यांत हिंडून फिरून ठिकठिकाणीं सुधारणा केल्या व उदेपूर शहराचीहि पुष्कळ सुधारणा केली.

याच्या कारकीर्दींत लढाया अशा झाल्याच नाहींत. यानें खुर्रमला पुष्कळ वेळां लढाईच्या प्रसंगीं मदत केली. शहाजहान बादशाह होण्यास याची मदत कारणीभूत झाली.

यानें आपल्या राज्यांतील प्रत्येक गांवांत, पाटील, पटवारी, त्याचप्रमाणें चौकीदार नेमून दिले. जेणेंकरून आपली प्रजा सुखांत राहील अशी यानें फारच काळजी घेतली. त्यामुळें याच्या राज्यांतून बाहेर देशांत गेलेले लोक परत आपल्या देशांत येऊन आनंदानें राहूं लागले.

यास एकंदर सात पुत्र होते. जगतसिंह, गरीबदास, मानसिंह, छत्रसिंह, मोहनसिंह, गजसिंह, सूरजसिंह आणि दोन मुली होत्या. हा जन्मजात राजा होता. याचा चेहरा भव्य असून, डोळे मोठे व पाणीदार होते, याचा चेहरा नेहमीं हंसतमुख असे. त्यामुळें हा आपली छाप लोकांवर सहज पाडीत असे. हा स. १६२८ च्या मार्च महिन्यांत मरण पावला ( रा. इ. पा. ८२२ ते ८३० ).

**कर्ण सोळंकी**—( स. १०६३–१०९३ ) हा अनहिलवाडच्या भीमदेव सोळंकीचा उदयमतीपासून झालेला मुलगा. याची राणी मयणल्लदेवी ( मीनल किंवा मैनलदेवी ) ही गोव्याच्या जयकेशी कदंबाची मुलगी. यानें हल्लीं जेथें अहमदाबाद शहर आहे, तेथें कर्णावती नांवाचें शहर स्थापिलें ( स. १०७० ). यानें शांततेनें राज्य केलें व लोकोपयोगी अनेक कृत्यें केलीं. कर्णसागर नांवाचा तलाव यानें बांधला. याला मैनलदेवीपासून सिद्धराज जयसिंह नांवाचा सुप्रसिद्ध पुत्र झाला.

माळव्याचा राजा उदयादित्य यानें सांभरच्या तिसऱ्या विग्रहराज चौहानाच्या मदतीनें याला जिंकलें ( एपि. इंडि. भा. १० पृ. १९२ ). यानें गुजराथेंतील कोळी व भिल्ल लोकांचा उपद्रव नाहींसा केला व त्यांना ताब्यांत घेतलें. विक्रमांकदेवचरित लिहिणाऱ्या बिल्हणानें कर्णसुंदरी नांवाची नाटिका लिहिली आहे, त्या नाटिकेचा नायक असणारा कर्ण हाच होय. सिद्धराज जयसिंह अज्ञान असतांच हा मृत्यु पावला.

**कर्णावती**—उदेपूरच्या महाराणा संगाची पत्नी. बहादुरशहानें स. १६२३ त जेव्हां चितोडगड काबीज केला त्या वेळीं हिनें राखी पाठवून हुमायूनचें साहाय्य मागितलें. हिला पुढें हुमायूनच काय पण अकबर ते औरंगजेबापर्यंत सर्व आपली बहीण मानीत असत.

**कर्नाटकचे नवाब**—( पा. २०८ पाहा ).

**कर्माबाई**—ही बाई जगन्नाथक्षेत्रांत राहत असे. हिचा पति मरण पावला त्या समयीं ही गरोदर होती. पुढें हिला मुलगा झाला व मुलाचीहि वाढ होऊन नातू झाला. परंतु पुत्र मरण पावल्यानें हिला असह्य दुःख झालें.

पुढें असेच दुःखांत हिचे दिवस चालले असतां एक साधु हिच्या घरीं आला व त्यानें एक गोपालमूर्ति हिच्या

स्वाधीन केली व बजाविलें " ज्याप्रमाणें आपण एखाद्या लहान मुलाचें पालनपोषण करतों त्याप्रमाणें ह्या मूर्तीस जप. " त्याप्रमाणें हिचा क्रम चालू असतां ती मूर्ति खरोखरच हिच्या हातून जेवूं लागली.

एकदां असें झालें कीं, कांहीं कामामुळें हिला जेवावयास घालण्यास उशीर झाला. तेव्हां जगन्नाथास भुकेनें पीडा झाल्याचा दृष्टांत पुजाऱ्यास झाला. त्यावरून देवास कर्माबाईचा नैवेद्य आवडतो असें ठरून अजूनहि तोच प्रकार चालू आहे ( भक्ति. वि. अ. ३५ ).

**कर्मारपा**—यालाच कम्मरिपा असें म्हणतात. हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं पंचेचाळिसावा सिद्ध होय. जात लोहार. साळिपूरचा राहणारा. अवधूताचा शिष्य. यानें सोमसूर्यबंधनोपाय (त. ४०।७१) नांवाचा ग्रंथ लिहिला.

**कलकलपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं अठ्ठ्याऐंशीवा सिद्ध होय. जात शूद्र. स्थान भिरलीनगर ( ? ).

**कलचुरिवंश ( कल्याणीचा )**—

कृष्ण ( नासिकजवळ राज्य करीत होता )
|
शंकरगण
|
बुद्ध ( स ६०५–१०; मंगलेश चालुक्याकडून पराजय )
............
कर्ण ( कन्न, कृष्ण ) स. १०४२ ( एपि. इंडि. २. २९७ ).त्रिकलिंगचा राजा.
|
बिज्जल १ | वीरश्री | यौवनश्री | राज किंवा राजल

राज किंवा राजल
|
अम्मुगी | संकम १ | कन्नर | जोगम

जोगम
|
पेरमादि ( ११२८, सोमेश्वर (प.) चालुक्याचा मांडलिक )
|
बिज्जल २ ( त्रिभुवनमल्ल, निशंकमल्ल, (स. ११५६; खून ) | मईलुगी

बिज्जल २
|
२ सोमेश्वर ( सोविदेव सोयी रायमुरारि स.११६७–७५) | ३ शंकम (संकवर्ष) (स.११७५–८०) | आहवमल्ल (स.११८१–८३ अप्रतिमल्ल रायनारायण ) | सिंघण (स. ११८३–८४) | सिरियादेवी ( एरंबरगच्या चामुंडराय यादवाशीं लग्न )

**टीप**—चेदीच्या कलचुरींमधूनच हें घराणें निघालें आहे ( बॉंबे गॅझेटियर १. २. ४६८ फूटनोट, एपि. इंडि. १२. ३०; १५. ३१५ ). पश्चिम चालुक्य राज्याचा नाश केल्यावर दुसऱ्या बिज्जलनें राजा ही पदवी धारण केली. याच्या बायकोचा भाऊ बसव हा लिंगायत धर्माचा संस्थापक असून त्यानें याचा खून केला. बिज्जल २५ सप्टें.–६ डिसें. ११५६ च्या दरम्यान गादीवर आला ( एपि. कर्ना. ७ शिकारपूर १०२; ८ सोरब १३१ ). हा ता. २ मे ११७५ पर्यंत जिवंत होता ( एपि. क. ८ सागर ६६ ).

## २. ( त्रिपुरीचे हैहय )—

१ कोक्कलदेव स. ८५० पत्नी नट्टा ( हर्षचंदेल्लाची बहीण )
|
कलिंगराज | २ मुग्धतुंग ऊर्फ प्रसिद्धधवल स. ९००

कलिंगराज
|
कमळराज

२ मुग्धतुंग
|
३ बालहर्ष | ४ केयूरवर्ष ऊर्फ युवराज पहिला स. ९२५ ( लग्न नोहलादेवी )

४ केयूरवर्ष
|
५ लक्ष्मणदेव स. ९५०
|
६ शंकरगण स. ९७० | ७ युगराजदेव ( मुंजराजाचा समकालीन ) स. ९८०

७ युगराजदेव
|
८ कोक्कलदेव ( दुसरा ) स. १०००
|
गांगेयदेव ( स. १०१०–१०३८ )
|
कर्ण ( स. १०३८–१०८० ) ( राणी आल्हणदेवी हूणकन्या )
|
यशःकर्ण ( स. १०८०–११२४ )
|
गयकर्ण ( स. ११२४–११५२ ) ( राणी आल्हणदेवी गुहिलोतकन्या ) विजयसिंहाची मुलगी.
|
नरसिंह (स.११५२–११७०) | जयसिंह ( ११७०–११८० )

जयसिंह
|
विजयसिंह ( स. ११८०–११९८ )
|
अजयसिंह ( गौरीशंकर ओझा )
|
त्रैलोक्यवर्मन

**टीप**—चेदिशकारंभ स. २४८ सप्टेंबरच्या पांच तारखेस सुरू झाला ( एपि. इंडि. ९. २१ ). चेदिशकाला कलचुरी हें नांव मात्र आठव्या शकापूर्वी आढळत नाहीं. हें घराणें आठव्या शतकापर्यंत बौद्ध असून पुढें वैदिक झालें ( एपि. इंडि. व्हा. १, पा. २६५; व्हा. २, पा. ३०५ ).

३. **कलचुरीवंश (रतनपूर)**–पृथ्वीदेव–×नानल्लदेव (स. ११२४) ×कान्यकुब्जचा गोविंदचंद्र व जेजाकभुक्तीचा कीर्तिवर्मा हे याचे मित्र होते )–रत्नदेव–पृथ्वीदेव ( स. ११४५ )–जाजल्लदेव ( स. ११६८ )–रत्नदेव ( स. ११-८१ )–पृथ्वीदेव ( स. ११९० ).

**कलथ-थलई**—( स. ३०-६० ) हा एक तामिळी कवि असून चेर राजाच्या दरबारीं भाट होता. ज्या लढाईंत चेरल–अथन व चोलकिल्ली हे एकमेकांशीं लढणारे राजे अगदीं घायाळ होऊन पडले, त्या प्रसंगीं हा भाट हजर होता. याच्या पुढच्या लढाईंतहि म्हणजे जेव्हां दुसऱ्या एका चेरल–अथन नांवाच्या राजाचा करिकाल चोलानें पराभव केला तेव्हां हा होता. कपिलर कवि, याचा जुना कवि म्हणून उल्लेख करितो व यासंबंधीं अशी माहिती सांगतो कीं, इरुंको–वेलची राजधानी अरैयम् तेथील राजानें याचा मान ठेवला नाहीं म्हणून नष्ट झाली. या कवीनें रचलेलीं सहा पदें पुरनानुरूमध्यें आहेत ( कनकसभे–तामील्स एटीन हंड्रेड इयर्स ॲगो ).

**कलश**—हा काश्मीरच्या लोहर घराण्यापैकीं अनंतदेव व सूर्यमती यांचा हा पुत्र. मातापित्यांनीं वृद्धपणामुळें वानप्रस्थाश्रम स्वीकारून याला गादीवर बसविलें, पण यानें दुष्टपणानें त्यांना अत्यंत त्रास दिल्यामुळें पित्यानें आत्महत्त्या केली व आई सती गेली. पण त्यानंतर मात्र हा विचारपूर्वक वागूं लागला. पण पुढें लवकरच याचा पुत्र हर्ष यानें बंड उभारलें, त्यांत शेवटीं हर्षाला बंदिवास पत्करावा लागला. याच्या मागून हर्ष गादीवर बसावा अशी याचीहि इच्छा होती, पण नोनक नांवाच्या मंत्र्याच्या खटपटीनें उत्कर्ष गादीवर बसला. कलश स. १०७३ मध्यें मरण पावला ( म. भा. १. २. ११५ ). कल्याणच्या परमर्दीदेवानें पंडित मागितल्यावरून यानें बिल्हणास कल्याणास पाठविलें.

**कलिकाल गौतम**—( हरिभद्रसूरि पाहा ).

**कलिकालसर्वज्ञ**—हेमचंद्रसूरींचें नामान्तर.

**कलिवल्लभ**—ध्रुव राष्ट्रकूटाचें नामांतर.

**कलिविक्रम**–दुसऱ्या विक्रमादित्य चाळुक्याचें नामांतर.

**कलिंगराज कलचुरी**—रत्नपूर येथील कलचुरी ( हैहय ) घराण्यांतील हा पहिलाच राजा होय. स. १०२० मध्यें हा राज्य करीत होता.

त्रिपुरीच्या कलचुरी घराण्यांतील जो कोक्कल १ ला त्याचा हा वंशज होय. यानें दक्षिण कोसल जिंकलें. याच्यानंतर याचा मुलगा कमलराज हा गादीवर आला ( B ).

**कलीमुल्ला बाहामनी**—( स. १५२२-२६ ) हा बाहामनी राज्यांतील दुसऱ्या अहमदाचा पुत्र होय. याला अहमद बरीदनें गादीवर बसविलें; व वलीच्या बेगमेशीं निका लाविला. तिच्यावर आषक होऊनच यानें वलीचा खून केला होता. हा शेवटपर्यंत नगरच्या बुर्हाण निजामाकडेच राहत होता. याच्यानंतर बाहामनी वंशाचें राज्य लयास गेलें.

केंब्रिज हिस्टरी ऑफ इंडिया यामध्यें हा दुसऱ्या अहमदाचा मुलगा नसून भाऊ आहे, म्हणजे हा महमूद २ रा याचा मुलगा होय, असें उल्लेखिलें आहे.

**कल्याणकवि**—आलकदत्ताचा शिष्य. मंखाच्या ग्रंथाच्या परीक्षणाकरितां जे तीस पंडित नेमले होते त्यांपैकीं हे एक होत.

**कल्याणकीर्ति**—'संक्षेपजिनविजय' नामक ग्रंथाचा कर्ता.

**कल्याण गोसावी**—हे श्रीसमर्थ रामदासस्वामी यांचे शिष्य होत. गोदावरीच्या तीरीं असणाऱ्या बाभूळगांवच्या कृष्णाजीपंताचे हे पुत्र होत. यांचें गोत्र कौशिक असून हे आश्वलायनशाखी देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होते. यांचा जन्म शके १५४० मध्यें झाला. यांचें मूळचें नांव अंबाजी. वडील काशीयात्रेस गेल्यावर हे आपल्या बंधूसहवर्तमान कोल्हापुरास राहावयास गेले.

मामा पिराजीपंत यानें यांचा चांगल्या रीतीनें सांभाळ केल्यामुळें पुढचें शिक्षण यांना सोपें गेलें. रामदासस्वामी एकदां कोल्हापूर मुक्कामीं आले असतां पिराजीपंतांच्या मनांत अनुग्रह घेण्याचें आलें. समर्थांच्या म्हणण्याप्रमाणें सिद्धता करून त्यांनीं अनुग्रह घेतला.

त्या दिवशींचा भोजनाचा थाट अंबाजीनें केला असल्यानें श्रीरामदासस्वामींनीं आपल्या सेवेकरितां याची याचना केली. बहिणीच्या मर्जीप्रमाणें पिराजीपंतांनीं अंबाजीस श्रीसमर्थ रामदासस्वामींच्या स्वाधीन केलें. रामदासांनीं यास योग्य तें शिक्षण, लेखन व वाचन शिकविलें.

एकदां समर्थांच्या आज्ञेनुसार हा छबिना जाणाऱ्या वाटेवरील फांदी तोडीत असतां विहिरींत पडला. बऱ्याच

वेळानंतर ही बातमी रामदासस्वामींना समजली. ते तात्काळ विहिरीवर आले. त्यांनीं "अंबाजी" म्हणून हाक मारतांच यानें आंतून ओ दिली. त्यावर स्वामींनीं विचारलें "कल्याण आहेस का?" त्यावर तो "हो" म्हणाला. यावरूनच यांस पुढें कल्याण म्हणण्याचा प्रघात पडला. ही गोष्ट मसूर येथें झाली. समर्थांच्या दासबोधाचें व इतर ग्रंथांचें लेखन खुद्द कल्याणांनींच केलें आहे. हे गुरुभक्त व भरताचे अवतार होते, असें मोरोपंत आपल्या आर्येंत म्हणतात. याची कविता व पदें पुष्कळ आहेत. डोमगांव मुक्कामीं यानें मठस्थापना केली होती. तेथें यांनीं लिहिलेला दासबोध अजून आहे. हे आजन्म ब्रह्मचारी होते. यांनीं केलेल्या अनेक अचाट कृत्यांवरून यांची शक्ति अजमावतां येते.

**कल्याणचंद्र**—( स. १००० चे सुमारास ) हा 'प्रमाण-वार्तिक-टीका' या ग्रंथाचा कर्ता होय. हा स. १३५० पूर्वी झाला असला पाहिजे, कारण ज्ञानचंद्रानें याचा उल्लेख आपल्या 'रत्नाकरावतारिका-टिप्पण' या ग्रंथांत केला आहे.

**कल्याणदास्**—शके १७४८ (स. १८२६) मध्यें हा होता व डाकुरास राहत असे. सत्संग म्हणून याचा एक ग्रंथ गुजराथींत असून कांहीं पदेंहि पण याचीं प्रसिद्ध आहेत.

**कल्याणभट्ट**—जयरथ नामक कवीचा गुरु.

**कल्याणमल्ल**—( स. ११७२ सुमार ) हा कलिंग देशचा राहणारा. कविचरित्रांत हा जातीनें ब्राह्मण असल्याचें सांगितलें आहे. परंतु 'मल्ल' या पदावरून हा क्षत्रिय होता, असें कांहींचें मत आहे. कलिंग देशचा राजा अनंगभीम, याच्या पदरीं हा नोकरीस होता.

'अनंगरंग' या नांवाचा यानें एक ग्रंथ ( श. १०९४ च्या सुमारास ) रचिला आहे ( क. च. ).

**कल्याण रक्षित**—( स. ८२९ सुमार ) हा बुद्ध तर्कज्ञ धर्मोत्तराचार्याचा गुरु असून वादविवादांत अत्यंत प्रवीण होता. स. ८२९ त कालवश झालेल्या महाराज धर्मपाल याच्या कारकीर्दीत हा होऊन गेला. यानें खालील ग्रंथ लिहिलेः—

( १ ) सर्वज्ञसिद्धिकारिका—हा ग्रंथ तिबेटांत आहे. ग्रंथास सुरवात सर्वज्ञास प्रणाम करून होते.

( २ ) बाह्यार्थसिद्धिकारिका—ह्या ग्रंथाची मूळ संस्कृत प्रत उपलब्ध नाहीं, परंतु तिबेटी भाषांतर मात्र उपलब्ध आहे. तिबेटी भाषांतर करण्याचें काम काश्मीर येथील वैभाषिक शिक्षक जिनमित्र व तिबेटी भाषांतरकार या दोघांनीं मिळून केलें.

( ३ ) श्रुतिपरीक्षा—या ग्रंथाची मूळ संस्कृत प्रत उपलब्ध नाहीं. परंतु तिबेटी भाषांतर मात्र उपलब्ध आहे.

( ४ ) अन्यापोहविचारकारिका—ह्या ग्रंथाची मूळ संस्कृत प्रत उपलब्ध नाहीं. परंतु तिबेटी भाषांतर मात्र उपलब्ध आहे.

( ५ ) ईश्वरभंगकारिका—या ग्रंथाची मूळ संस्कृत प्रत उपलब्ध नाहीं. परंतु याचें तिबेटी भाषांतर मात्र उपलब्ध आहे ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ३२८-३२९ ).

२. ( स. १००० सुमार ) ह्या जैनतर्कज्ञानें बुद्धतर्कज्ञ धर्मकीर्ति ( स. ६३५ ) याच्या 'प्रमाणवार्तिक' या ग्रंथावर 'प्रमाणवार्तिकटीका' या नांवाची एक टीका लिहिली आहे. स. १३५० मध्यें ज्ञानचंद्रानें आपल्या 'रत्नाकरावतारिकाटिप्पण' या ग्रंथांत याच्या ग्रंथाचा उल्लेख केला आहे. तेव्हां त्यापूर्वींच ही टीका यानें लिहिली असली पाहिजे (हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. १९८).

**कल्याणवर्मन्**—(स.५७८ सुमार) सारावली नांवाच्या संस्कृत ग्रंथाचा कर्ता. भट्टोत्पलानें बृहज्जातकावरील 'जगच्चंद्रिका' नांवाच्या टीकेंत सारावलींतील कांहीं उतारे घेतले आहेत ( स. ९६६ ), त्याअर्थीं हा त्यापूर्वी स. ५७८ च्या सुमारास होऊन गेला असावा ( डफ ).

**कल्याणवर्मन् मौखरी**—( स. ३२६ ) कनोजच्या मौखरी वंशांतील हा सुंदरवर्मन्‌चा मुलगा. चंद्रगुप्तानें पाटलीपुत्रास ज्या वेळीं वेढा दिला त्या वेळीं आपल्या राजधानीचें संरक्षण करीत असतां याचा बाप सुंदरवर्मन् हा मारला गेला. बापाच्या मरणसमयीं हा अगदीं लहान होता. त्यामुळें चंद्रगुप्तानें याचें राज्य घेतलें. अल्पवयींच वरीलप्रमाणें आपत्ति याच्यावर आल्यानें विनयंधरा नांवाच्या एका दाईनें याला एका अरण्यांत नेऊन याचें पालन केलें. त्याचप्रमाणें मंत्रगुप्त नांवाचा याचा मुख्य मंत्री व इतर सरदार मंडळी योग्य वेळ येतांच चंद्रगुप्तास गादीवरून काढून टाकून याला गादीवर बसविण्याच्या विचारांत होती. चंद्रगुप्तानें आपल्या राज्याच्या मर्यादा वाढविल्या, पण लवकरच त्याच्या राज्यांत बंडाळी माजली. ती मोडण्याच्या कामांत चंद्रगुप्त गुंतला असतां याचा मंत्री मंत्रगुप्त यानें फंदफितुरी करून व आसपासच्या राजांची मदत घेऊन कनोजच्या गादीवर याची स्थापना केली. सुगांग राजवाड्यांत याला राज्याभिषेक झाला. राज्याभिषेकानंतर यादव राजा कीर्तिसेन याची मुलगी कीर्तिमती इच्याशीं याचें लग्न झालें ( कौमुदीमहोत्सव अंक ५ ). इतक्यांत चंद्रगुप्त मारला गेला. परंतु पुढें लवकरच समुद्रगुप्तानें याचा पराभव करून याला पाटलीपुत्र सोडून जाणें भाग पाडलें.

एकंदरींत याची कारकीर्द फारशी महत्त्वाची नव्हती. राज्य मिळविण्यामध्यें यानें कांहींच शौर्य दाखविलें नव्हतें. याला राज्योपभोग फार दिवस मिळाला नाहीं ( The Maukharis, by E. A. Pires, p. 36-41 ).

**कल्याणसिंग**—हा विकानेरचा राजा. यानें आपली मुलगी अकबरास दिली. हा आपल्या मुलासह अकबरास भेटावयास गेला होता. याचा मुलगा रायसिंग हा अकबराचा सेनापति होता.

**कल्ल सोळंकी**—सोरठ येथें राज्य करणाऱ्या सोळंकी वंशांतील पुरुष. याचा भाऊ महल्ल. या दोन भावांचें प्रेम रामलक्ष्मणांसारखें होतें. याचा पुत्र राजेन्द्र.

**कल्लट**—हा काश्मीरच्या अवंतिवर्म राजाच्या वेळीं उदयास आला ( स. ८५५-८८३ ). राजतरंगिणी-कारांनीं याचा सन्मानपूर्वक उल्लेख केला आहे.

**कल्लर**—( लल्ल किंवा लल्लीय पाहा ).

**कल्लाद्नार**—( स. १००-१३० ) तामिळ कवि. हा बहुतेक वेकडमचा रहिवासी असून भयंकर दुष्काळांत यास तें गांव सोडावें लागलें. दक्षिणेकडे येऊन हा कावेरी-च्या तीरावर राहूं लागला. तेथील पोरैयुरु व अंबर राजांनीं याचा चांगला सत्कार करून यास आपल्या दरबारीं ठेविलें. अलंकानमूच्या लढाईत पांड्य सैन्यांत हा होता. तेव्हां विजयी नेडुंजचेलीयनचीं स्तुतिपर कवनें यानें गाइल्यामुळें यास लुटींतील एक हिस्सा मिळाला. तोल्काप्पियम या तामिळी व्याकरणावर यानें टीका लिहिली असें म्हणतात, पण ती सध्यां उपलब्ध नाहीं. मदुरेंतील शिवलीलेचें वर्णन केलेला कल्लाडम नांवाचा काव्यग्रंथ यानेंच लिहिला असें म्हणतात; पण याच्या भाषेवरून व पुढील काळांत घडलेल्या गोष्टींवरून तसें दिसत नाहीं ( ज्ञानकोश ).

**कल्हण**—काश्मीरचा राजा हर्ष, त्याचा मंत्री चंपक. त्या चंपकाचा पुत्र हा होय. याचा राजतरंगिणी नांवाचा ग्रंथ सुप्रसिद्ध असून त्यांत आठ तरंग आणि ७८२७ श्लोक आहेत. यानें इतिहासाचे अकरा ग्रंथ, अनेक शिलालेख, दानपत्र आणि प्रशस्ति वगैरे साधनांचा अभ्यास करून हा ग्रंथ लिहिला आहे. यानें लिहिलें आहे कीं, सुव्रतानें विस्तृत इतिहासग्रंथांतील सार घेऊन आपला ग्रंथ लिहिला, पण त्यामुळें मूळ साधनें नष्ट झालीं. क्षेमेन्द्रानें नृपावलिग्रंथाची रचना केली, पण ती निर्दोष झाली नाहीं. याशिवाय यानें हेलाराजाची पार्थिवावलि, पद्ममिहिराचें पुस्तक आणि नीलमतपुराण यांचा निर्देश केला आहे. यानें नीलमत-पुराणाच्या आधारें गोनन्द, दामोदर यशोमती आणि दुसऱ्या गोनन्दाचा इतिहास लिहिला आहे. पहिला गोनन्द हा पांडवांचा सामन्त होता. तेव्हांपासून याचा समकालीन राजा जयसिंहापर्यंत यानें आपला ग्रंथ लिहिला आहे, आणि त्याच्याच कारकीर्दींत समाप्त केला आहे. यानें स. ११४८ ( श. १०७० ) राजतरंगिणी लिहिण्यास सुरुवात केली आणि पुढें दोन वर्षांनीं संपविला. ( रा. त. १. ५२ ). याचें अनुकरण करून पुढें जोनराजानें स. १४१२ पर्यंत भाग लिहिला. तसेंच जोनराजाचा शिष्य श्रीवदानें स. १४७७ पर्यंत भाग लिहिला. त्यानंतर प्राज्यभट्टानें अकबराच्या विजयापर्यंतचा भाग लिहिला. यानें एक 'अर्धनारीश्वरस्तोत्र' लिहि-लेलें आहे.

**कविकंकण मुकुंदराय**—( मृ. स. १६४० ) बंगाली कवि. हे एक ध्येयवादी कवि असून वास्तव वादाचे पुढारी होते. हे स. १६ व्या शतकांत होऊन गेले. त्या समयीं असणाऱ्या इंग्लिश प्रोफेसर कोवेल यानें यांची फार प्रशंसा केली आहे.

यांच्या आत्मचरित्रावरून असें समजतें कीं, हे बरद्वान जिल्ह्यांतील दामन्या नामक गांवचे राहणारे होत. त्या परगण्याचा सुभेदार फार क्रूर होता. त्याच्या अत्याचारानें आणि उपद्रवानें सर्व गांव त्रासून गेलें होतें. अशा स्थितींत हा आपलें जन्मस्थान सोडून भटेनला आला. तेथें रूपराय आणि यदुनान्दी यांनीं याला मदत करून आपल्या घरीं ठेवून घेतलें. यानें आपल्या आत्मचरित्रांत असें लिहिलें आहे कीं, स्नानाच्या वेळीं आम्हां लोकांना तेल मिळत नसून आम्हांला आमची भूक पाणी पिऊन भागवावी लागत असे. एकदां यानें फूल नांवाच्या तलावावर चंडी देवीची पूजा केली आणि थकल्यामुळें जमिनीवर झोपला. त्या वेळीं स्वप्नांत चंडी देवीनें दर्शन देऊन याला नियम शिकवून कविता करण्यास सांगितलें.

यानंतर हा आडरा ( मेदिनीपुर ) येथें आला. तेथील बाकुंडाराय राजाला याची कविता इतकी पसंत पडली कीं, राजानें याला आपल्या मुलास शिकवण्या-करितां शिक्षक नेमलें. दरबारांत याला फार मान मिळत असून शेवटीं शेवटीं तर हा राजाच्या कृपाछत्राखालीं गेला. जेव्हां देशाची परिस्थिति सुधारली तेव्हां हा पुन्हां आपल्या जन्मभूमीस परत गेला, व राहिलेलें आयुष्य चंडी देवीच्या आराधनेंत घालविलें. याचा मृत्यु स. १६४० च्या सुमारास झाला.

यांचा 'चंडी-मंगल' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. हें काव्य यानें स. १५८९ मध्यें समाप्त केलें. त्या वेळीं मानसिंह

# कर्नाटकचें नबाब घराणें

१ झुल्फीकार अलीखान ( यानें औरंगजेबाकडून कर्नाटकच्या नबाबांची उत्पत्ति करून घेतली. स. १६९० किंवा १६९२-१७०३ )

२ दाऊदखान ( यानें इंग्रजांशीं मैत्री संपादिली स. १७०३-१७१० )

अगीबत्ती मुहम्मदखान

- ३ सादत उल्लाहखान १ ला ( ‘ मुहम्मद सय्यद ’ याला विजापूरच्या बहादुरशाहा यानें नबाब केलें. स. १७१०-१७३२ )
- गुलाम अलीखान ( सादत-उल्लाह खान यानें याला वेलोरचा जहागीरदार केलें. )
  - ४ दोस्त अलीखान ( स. १७३२-१७४० ) याला सादत-उल्लाहखान यानें दत्तक घेतलें, याचा दिवाण चंदासाहेब हा होय.
  - फकीरअली ( वेलोरचा सुभेदार स. १७३२ )
  - सादत-अली
  - अकबर मुहम्मद

गुलाम मुर्तझाअली ( वेलोरचा सुभेदार )

- हुसेन ( दामलचेरुकच्या लढाईंत मारला गेला. )
- ५ सफ़दार-अली ( स. १७४०-४२ फ्रेंचांची मदत, गुलाम मुर्तझा अलीनें खून केला.)
  - ६ सादत-उल्लाह-खान २ रा. ( ‘ मुहम्मद सैय्यद ’ स. १७४२-१७४४ याचा पठाणानें खून केला. )
- मुलगी ( गुलाम मुर्तझा अलीची बायको )
  - जाद; साहिब जद्द. ( याचा खून झाला. )
- मुलगी ( तकीसाहेबाची बायको )
- मुलगी ( चंदासाहेबाची बायको )

७ अन्वरुद्दीन मुहम्मद ( निजाम-उल्-मुल्क यानें याला नबाब केलें. यानें इंग्रजांचा आश्रय धरून फ्रेंचांच्या विरुद्ध लढाया केल्या व शेवटीं लढाईतच मारला गेला. स. १७४४-१७४९ )

- महफुजखान ( हा मदुरेचा सुभेदार होता.)
- ८ मुहम्मदअली ( स. १७४९-१७९५ )
  - ९ उदत-उल-उमरा ( स. १७९५-१८०१ )
    - अलीहुसेन
  - अमीर-उल-उमरा
    - १० अझीम-उद्दौलाह ( स. १८०१-१८१९ )
      - ११ आझम जाह ( स. १८१९-१८२५ )
      - अझीम जाह बहादूर ( अर्काटचा राजपुत्र स. १८६७-१८७४ )
- अबदुलरहीम
- अबदुलवहाब
- नजीबउल्लाह

हा बंगालचा सुभेदार होता. या ग्रंथाचे ३ विभाग केलेले आहेत. पहिल्या विभागांत शिव-पार्वतींचें वर्णन आहे. दुसऱ्या भागांत शिकारी कालकेतु आणि तिसऱ्या भागांत धनपति आणि श्रीमंत यांचें वर्णन आहे ( क. कॉ. भा. ७ ). यानें चैतन्यचरित्रामृत लिहिलें आहे किंवा नाहीं हें पाहिलें पाहिजे.

**कविकलश**—( स. १६८०-८९ ). यालाच कलुषा किंवा कब्जी असें म्हणतात. संभाजीच्या कारभारांत याचें महत्त्व विशेष आहे. मात्र याचें खात्रीलायक पूर्ववृत्त उपलब्ध नाहीं. हा कनोजा ब्राह्मण प्रयागजवळचा राहणारा. काशी येथें भोसल्यांचा क्षेत्रोपाध्याय होता. स. १६६६ मध्यें आग्ऱ्याहून परत येतांना संभाजीचा व याचा प्रथम परिचय घडला. कवींमध्यें कलश म्हणजे श्रेष्ठ, अशा अर्थाचा 'कविकलश' असा यास किताब होता. तो कदाचित् शिवाजीच्या राज्याभिषेकप्रसंगीं यास मिळाला असेल. यावरून हा संस्कृत पढलेला शास्त्री असून हिंदींत कविता करीत असावा. प्रचारांत यास कविजी, कबीजी, कब्जी किंवा कलुशा अशा अपभ्रष्ट नांवानें संबोधूं लागले. याचें कागदोपत्रीं नांव कविकलश किंवा कब्कलश असें येतें. याच्या सल्ल्यानें संभाजी वागला आणि अंतीं त्याचा परिणाम विपरीत झाला. म्हणून कलुशा म्हणजे कळलाव्या किंवा कलिपुरुष असा मराठींत संकेत झाला. केशवभट कवजी नांवाचा हिंदुस्थानी ब्राह्मण मांत्रिक होता. त्यानें संभाजीस वश केलें. तो सांगेल तसें करावें ( म. द. रु. २ पृ. ७० ). यावरून याचें नांव केशव असावें असें दिसतें. हा गोडबोल्या व मंत्रतंत्र करणारा असल्यामुळें स्वकीयांबद्दल शंकित झालेल्या संभाजीनें याला जवळ केलें. कदाचित् क्षेत्रोपाध्यायांचीं भांगगांजासारखीं परंपरागत व्यसनें यास असावीं आणि संभाजीची व याची पूर्वीची ओळखहि असावी. याच्या मुद्रेवरूनहि याच्या वृत्तीचा अंदाज बांधतां येईल. ती मुद्रा अशी—

विधिरर्थिमनीषाणामवधीर्नयवर्त्मनाम् ।
शेवधिः सर्वसिद्धीनां मुद्रा कलशहस्तगा ॥

यांतील सर्वसिद्धींचा शेवधि म्हणजे ठेवा हे शब्द ध्यानांत घेण्यासारखे आहेत. त्याप्रमाणें याला समस्तराजकार्यधुरंधर, विश्वासनिधि या नेहेमींच्या मायन्याप्रमाणें कर्मकांडपरायण, दैवतैकनिष्ठाग्राहिताभिमान हींहि विशेषणें याचा मंत्रतंत्रावरील विश्वास दर्शवितात. तात्पर्य, तांत्रिक विद्येंतील अनुष्ठानाच्या जोरावर जय मिळविण्याचा प्रयत्न याच्यामार्फत चालत असावा. इतर सर्व प्रधान कायम असून याच्याकरितां छंदोगामात्य हें निराळेंच पद निर्माण करण्यांत आलें. संभाजीच्या हा सर्वांत अधिक विश्वासांतला होता. संभाजीच्या व याच्या विशेष सलगीमुळें याचें विशेष वजन होतें. तथापि संभाजी याची योग्यता जाणून होता असें दिसतें. मात्र हा औरंगजेबाला फितूर झाला होता असें वाटत नाहीं.

जंजिऱ्याचें कारस्थान यानेंच संभाजीस समजाविलें व आपली त्या कामावर नेमणूक करून घेतली. परंतु योग्य वेळीं याची कुमक न गेल्यामुळें प्रथम स्वारी केलेल्या दादजी प्रभूची फजिती झाली ( स. १६८२-८५ ).

पुढें गोव्याची स्वारी अर्धवट टाकून संभाजीला शहाअलमला तोंड देण्याकरितां परत यावें लागलें, तेव्हां भीमगडावर अकबराच्या संरक्षणाची व्यवस्था करून यानेंच तह घडवून आणला व रायगडास परत आला ( जे. श. १८-५-१६८४ ).

गोवेकरांवर फोंडें मुक्कामीं हल्ला चढविला असतां त्यांच्याशीं तह करण्यास यासच पाठविलें. पुढें १६८५ मध्यें शहादिखानावर यास पाठवून खानास पार पिटाळून देशावर आणलें. याचीं पुढील ३ वर्षे कुठें पन्हाळा, तर विशाळगड अशा किल्ल्यावरच गेलीं. हा संगमेश्वरीं असतांना याचें व शिर्के याचें वांकडें आलें. याच वांकडेपणामुळें संभाजीनें शिर्क्यांचा निर्वंश करण्याची प्रतिज्ञा केली. संभाजी खुद्द, शिरक्यांचा पराभव करण्यास गेल्यामुळें हा सुद्धां खेळणें या मुक्कामीं कांहीं दिवस होता. संभाजी खेळण्याहून निघाला ही बातमी मोंगलास समजतांच शेख निजाम हा कोल्हापुराहून दौड करीत निघाला, व संभाजीस त्यानें मोठ्या युक्तीनें पकडलें.

शेवटीं संगमेश्वरीं संभाजीबरोबर यास पकडून हाल करून ठार करण्यांत आलें. हा मेल्यानंतर याच्या मुलांस राजारामानें वतनाच्या सनदा करून दिल्या. त्यावरून हा फितूर असल्याचा तत्कालीं संशय नव्हता. औरंगजेबाचा पुत्र अकबर संभाजीकडे आला तेव्हां त्याच्यावर यास नेमण्यांत आलें होतें ( गणोजी शिर्के, येसूबाई, व संभाजी पाहा ).

**कविचूडामणि चक्रवर्ति**—यानें अन्वयबोधिनी नांवाचा ग्रंथ संस्कृतांत केला.

**कविजंग**—हा तुरेताजखाचा मुलगा. याचें संपूर्ण नांव खाजे मुहम्मदखा कविजंग. याच्या घराण्याची आतांपर्यंतची वंशावळ आहे. याच्या भावाचें नांव खाजे शरीफ असें आहे.

हा निजामाचा नोकर अहमदनगरचा किल्लेदार होता. त्या किल्ल्याचा हा बंदोबस्त उत्तम ठेवी. नगरचा किल्ला पुण्यापासून जवळ असल्यामुळें पेशव्यांना तो

पाहिजे होता. त्याकरितां दामप्रयोग करण्यांत येऊन विसाजी कृष्ण बिनीवाले यांच्या हातून राजकारण शिजून ता. ९।११।१७५९ रोजीं कविजंगानें किल्ला आंतील दारूगोळा व शस्त्रास्त्रांसहित भाऊसाहेब पेशव्यांना दिला. त्याबद्दल दरसाल पन्नास हजार उत्पन्नाची जहागीर वंशपरंपरेनें पेशव्यांनीं याला दिली.

कविजंग हें आडनांव आहे. याचें मूळ ठिकाण दिल्ली असून मूळ पुरुष शागुलखा होता. याचें नांव खाजा शरिफ ऊर्फ एकताज कविजंग असें होतें. याच्या ताब्यांत औरंगाबाद ते बालेघाटपर्यंतचा मुलूख दिला होता. निजामाकडून याला उपसर्ग झाल्यास पेशवे त्याचा बंदोबस्त करीत.

पुढें दौलतराव शिंदे व त्रिंबकजी डेंगळे यांनीं याच्या जहागिरीपैकीं कांहीं गांवें जप्त केलीं. याचें थडगें नगर येथें डांगे गल्लीजवळ कमानी मशिदींत आहे. त्यावरील चार शिलालेखांवरून हा स. १७७४–७५ त मेला असें ठरतें. कविजंग याचा अर्थ रणशूर असा आहे ( मं. अ. १८३७ इ. पा. २४० ).

**कवितार्किक**--ज्याला हल्लीं नोआखली म्हणतात तेथील राजा माणिक्यदेव याच्या पदरीं हा एक राजोपाध्याय होता. हा १६ व्या शतकांत होऊन गेला. ‘ मी कवितार्किक असून वाणीनाथाचा पुत्र आहें ’ असें हा आपल्या स्वतःचें वर्णन करतो. यानें एक ‘ कौतुकरत्नाकर ’ या नांवाचें प्रहसन लिहिलें आहे. या प्रहसनांत सुशीलांतक नांवाचा पोलीस अंमलदार जरी जवळ झोंपलेला असतो तरी राणीची चोरी होते. तथापि वसंतोत्सव साजरा करण्याचा राजा बेत करतो व त्यांत राणीची जागा एका वेश्येनें भरून काढावी असें सुचवितो. राजाच्या गुरूचें मन राणीवर जडतें; परंतु ती फक्त त्याला वर उचलून खालीं टाकून देते; त्यामुळें त्याचें नाक रक्तबंबाळ होतें. राणीला भ्रष्ट करण्याचा आरोप त्याच्यावर करण्यांत येऊन तो शावीत धरला जातो. परंतु अखेर वसंतोत्सवाच्या वेळीं सर्व गोष्टींचा खुलासा होतो.

**कविपरमेष्ठी**—( स. ५५० सुमार ) जैनांचा प्राचीन आचार्य. याचा सर्व जुन्या कानडी जैन कवींनीं जगप्रसिद्ध म्हणून उल्लेख केला आहे. यानें कांहीं ग्रंथ केले होते असे उल्लेख आहेत. पण सध्यां एकहि ग्रंथ उपलब्ध नाहीं. याला कविपरमेश्वर असेंहि म्हणत असत. याच्या नांवाचा निर्देश संमतभद्र व पूज्यपाद यांच्या मध्यें येतो. त्यावरून कालाबद्दल तर्क करितां येतो. त्रिषष्ठिशलाकापुरुषपुराण व चरितपुराण हे दोन ग्रंथ यानें केले होते, असें चामुण्डराय आपल्या ग्रंथांत म्हणतात. जिनसेनानें ( स. ७८३ ) आपलें आदिपुराण याच्या त्रिषष्ठिशलाकापुरुषपुराणावरून लिहिलें, असें चामुण्डराय म्हणतात. यावरून जिनसेनाच्या पूर्वी हा झाला हें स्पष्ट होतें (क. क. च. भा. १, पा. ४ )

**कविराज**--कविराज शेषधर असेंहि यास दुसरें नांव आहे. यानें राघवपांडवीय नामक संस्कृत काव्य केलें.

**कविराक्षस**--हा एक तेलगू कवि असून याचें मूळचें नांव भीम असें होतें. हा बाराव्या शतकाच्या शेवटीं किंवहुना तेराव्या शतकाच्या आरंभीं होऊन गेला. याचा जन्म गोदावरी प्रांतांतील वेमुलवाडा खेड्यांत झाला. याच्या जन्मासंबंधीं अनेक चमत्कारिक दंतकथा लोक सांगतात. वरील खेड्यांत सोमन्ना नामक एक तेलगू नियोगी ब्राह्मण राहत होता. त्याच्या मरणानंतर त्याच्या बायकोस अतिशय विपन्नावस्था प्राप्त झाल्यामुळें आपली उपजीविका त्या खेड्यांतील श्रीमंतांच्या घरीं गाणीं वगैरे म्हणून व त्यांच्या स्त्रियांचें मनरंजन करून करावी लागली. महाशिवरात्रीच्या दिवशीं कित्येक स्त्रियांबरोबर ही द्राचारम् येथील शिवाचे दर्शनास गेली. तेथें इतर स्त्रिया देवास निरनिराळे नवस करूं लागल्या, तेव्हां हिनेंहि देवास नवस केला कीं, “ हे देवा, मला जर मुलगा झाला तर मी पाण्यानें पणती भरून दिवा लावीन. ” पुढें दैवगतीनें ती खरोखरच गर्भार राहिली. हें पाहून गांवच्या ब्राह्मणमंडळीनें तिला जातिबहिष्कार घातला. तिनें त्यांना बजावून सांगितलें कीं, “ माझ्या हातून कोणत्याहि प्रकारचें पापाचरण झालेलें नसून केवळ परमेश्वरावरील माझ्या निःसीम भक्तीमुळें मला गर्भ राहिला आहे. ” परंतु हें कोण ऐकणार ? त्या ब्राह्मणमंडळीनें तिचा उपहास करून तिची उलट अवहेलना मात्र केली. पुढें कांहीं दिवसांनीं ती ब्राह्मणस्त्री प्रसूत होऊन तिला एक मुलगा झाला. त्याला तिनें मोठ्या प्रेमानें वाढवून ज्या देवाच्या प्रसादानें हा झाला त्याचेंच नांव ‘ भीम ’ असें ठेविलें. तिनें याला साधारण शिक्षण दिलें.

हा मोठा होऊन जेव्हां आपल्या सवंगड्यांबरोबर खेळत असे तेव्हां गांवचीं इतर मुलें याला ‘ विधवेचा पोर ’ म्हणून चिडवीत असत. अशा प्रकारचा अपमान याला सहन न होऊन एके वेळीं हा आपल्या आईकडे गेला व वरीलसंबंधानें आईला खुलासा विचारला. तेव्हां तिनें याला इत्थंभूत हकीकत सांगितली. ती सर्व ऐकून घेऊन हा तेथून गांव सोडून द्राचारम् येथें जाऊन तेथील देवालयांतील शिवलिंगास मिठी मारून बसला. तेव्हां देवानें

याला अभिवचन दिलें कीं, " तूं जें जें बोलशील, जें जें करशील तें सर्व सत्य होईल. "

यानंतर हा कांहीं काळानें आपल्या मूळच्या गांवीं आला. त्याच दिवशीं त्या गांवामध्यें एका ब्राह्मणाच्या येथें ब्राह्मणभोजन चाललें होतें. हा तेथें गेला तेव्हां याला ' विधवेचा पोर ' म्हणून त्यांनीं हाकून लाविलें. तेव्हां या तरुण भीमानें त्यांना असा शाप दिला कीं, " तुमच्या पात्रांवरील डाळीचे बेडूक होतील आणि भाताचा चुना होईल. " थोडक्याच वेळांत डाळीचे बेडूक होऊन या पानावरून त्या पानावर नाचूं लागले ! हें पाहून सर्व ब्राह्मणमंडळी घाबरून गेली व त्यांना हें कृत्य भीमन्नाचें आहे असें वाटून त्यांनीं याला सन्मानानें बोलावून विनंति केली कीं, तूं जर बेडकांची पूर्ववत् डाळ करशील व चुन्याचा भात करशील, तर तुला आम्ही जातींत घेऊं. त्यावरून यानें पूर्ववत् त्या जिनसा करून दाखविल्या; तेव्हां याला त्यांनीं जातींत दाखल केलें. यानंतर हा अनेक अद्भुत गोष्टी करणारा म्हणून प्रसिद्धीस आला; परंतु शिव्याशाप देणारा कवि म्हणून याची प्रख्याती झाली. लोक याला आडदांड आणि कविराक्षस असें म्हणत असत. हा कित्येक राजांच्या दरबारीं जाऊन ' भीमेश्वर देवाचा मी मुलगा आहें ' असें म्हणत असे.

राजनरेंद्रांचा नाश झाल्यावर बहुतेक वेंगी देशावर चोलराजांची सत्ता झाली. हा भीम कवि चालुक्यराजा चोकराजा–जो तेलंगणाच्या कित्येक भागांवर राज्य करीत होता–त्याच्या पदरीं होता. तेलगू भाषेंतील प्रसिद्ध आप्पाकाव्यावरूच असें कळतें कीं, हा कवि सेहिनी. मारा–ज्याला भास्करानें तेलगू रामायण अर्पण केलें होतें त्याच्या वेळीं होता. हा चोकराजाचा समकालीन होता.

कविराक्षस ऊर्फ भीमन्ना हा नन्नयभट्टानंतर आणि तिकन्ना याच्यापूर्वी प्रसिद्ध होता, असें वर उल्लेख केलेल्या आप्पाकाव्यावरून सिद्ध होतें. या कवीचा छंदःशास्त्रावरील टीकात्मक ग्रंथ ' भीम कवि छंदसुः ' हा रेचन्ना नामक एका वैश्यास अर्पण केला आहे.

कावेली व्यंकट रामस्वामी याच्या ' दक्षिणेंतील कविचरित्र ' नामक ग्रंथावरून असें दिसतें कीं, भीम कवीनें ज्योतिषावर ' भीमन्ना-ज्योतिष ' नामक ग्रंथ लिहिला होता व इतर कित्येक विषयांवर यानें पद्यात्मक प्रकरणें लिहिलीं होतीं. परंतु हीं सर्व सांप्रत दुर्दैवानें उपलब्ध नाहींत. भीमकविकृत कित्येक काव्यें दक्षिण हिंदुस्थानांतील कित्येक प्रसिद्ध विद्वानांच्या पुस्तकालयांत व तेलगू कविमंडळीजवळ क्वचित् कोठें आढळतात. भीमकवीनें ज्या अनेक अद्भुत व चमत्कारिक गोष्टी केल्या, त्या तेलंगणांत आबालवृद्धांच्या तोंडीं झाल्या आहेत. ह्या सर्व जरी दंतकथा आहेत, तरी तेलंगणांतील लोक त्या खऱ्या आहेत असें समजून इतरांस मोठ्या प्रेमानें सांगतात. हा मरण पावला त्या वेळीं सर्व लोक हळहळले. हा मोठा सदाचरणी व दातृत्वाविषयीं प्रसिद्ध होता ( परशाकृत तेलगू वाङ्मय, पृ. ४७–४९ ).

**कवींद्र**—एक हिंदी कवि होय. हा कालिदास त्रिवेदीचा मुलगा असून याचा जन्म वि. सं. १७३६ ( स. १६७८ ) च्या सुमारास झाला.

याचा ' रसचंद्रोदय ' हा ग्रंथ फार प्रसिद्ध आहे. याशिवाय यानें ' विनोदचंद्रिका ' आणि ' जोगलीला ' नांवांचे दोन ग्रंथ लिहिले, असा शोध लागला आहे. याचा कविताकाल वि. सं. १७७७-१८०४ (स.१७१९-१७४६) असा मानला जातो. हा अमेठीचा हिम्मतसिंह आणि त्याचा पुत्र गुरुदत्त यांच्या सहवासांत बरेच दिवस होता. याचा ' रसचंद्रोदय ' हा ग्रंथ मोठा असून शृंगारिक आहे. याची भाषा मधुर आणि प्रसादपूर्ण आहे. भगवंतराय खीची आणि बुंदीचा बुद्धसेन यांनीं याचा आदरसत्कार चांगला केला होता. याचें नांव उदयनाथ असून हा कवींद्र या नांवानें प्रसिद्ध झाला.

**कश्यप**––या कल्पांतील चार बुद्धांपैकीं पहिला. याचा परिनिर्वाणस्तूप श्रावस्तीजवळ टंडवा नांवाच्या गांवीं आहे. फाहियाननें टंडवा हें याचें जन्मस्थान आहे असें म्हटलें आहे. पण याचें जन्मस्थान काशी मानतात. हा निर्वाणाला गेला तेव्हां याचें शरीर जळालें नाहीं म्हणून याच्या शरीरावरच स्तूप बांधण्यांत आला.

**२.** या गोत्राचे तीन भाऊ होते. त्यांचीं नांवें बिल्वकश्यप, नदीकश्यप व गयकश्यप अशीं होतीं. हे तीनहि भाऊ मोठे अग्निहोत्री होते. यांनीं बुद्धदेवापासून प्रव्रज्यादीक्षा घेतली. हे तीनहि पुढें बुद्ध होणार आहेत.

**कॅस्ट्रो (जॉन)**—(स. १५४२-४८). स. १५४२चे सुमारास पोर्तुगीझांच्या हिंदुस्थानांतील कारभारांत गोंधळ माजला होता. तो मिटविण्याकरितां कॅस्ट्रो यास मोठ्या तयारीनें हिंदुस्थानांत पाठविलें. यानें हिंदुस्थानांत आल्यावर अंमलदारांचे पगार वगैरे ठरवून लांचलुचपतीचे प्रकार व खाजगी व्यापार करण्याची पद्धत यांना आळा घालण्याचा प्रयत्न केला, पण यास विशेष यश आलें नाहीं.

हा आला तेव्हां पोर्तुगीझ लोकांवर सर्व मुसलमानांनीं शस्त्र उचललें होतें. खंबायतचा सुलतान महमूद व त्याचा

मुख्य कामगार खोजा जाफर हे दीव परत घेण्याच्या उद्योगास लागले. खोजा जाफर हा मोठा अभिमानी व चतुर होता. त्यानें बाहेरून पोर्तुगीझांशीं स्नेह राखून अंतस्थ रीतीनें दीव परत घेण्यासाठीं सर्व मुसलमानांची जूट केली. पण स. १५४६ चे नोव्हेंबरांत यानें स्वतः आरमार बरोबर घेऊन दीव येथें मुसलमानांचा पूर्ण पराभव केला. कॅस्ट्रोनें विजापूरच्या पहिल्या इब्राहिम आदिलशाहशींहि युद्ध सुरू केलें होतें. त्यांत त्याचा पराभव करून पोर्तुगीझांनीं दाभोळ बंदर काबीज केलें. नंतर दोघांचा तह ठरला ( स. १५४७ ). दीवच्या विजयाची बातमी युरोपास पोंचून राजाकडून कॅस्ट्रोस शाबासकी व व्हाइसरॉयचा हुद्दा मिळाला. हा स. १५४८ त मरण पावला. गोवा काबीज करून अल्बुकर्कनें आपली कीर्ति पोर्तुगीझ इतिहासांत कायम केली. त्याचप्रमाणें दीवचा बचाव केल्याबद्दल कॅस्ट्रोची कीर्ति आहे ( त्रि. रि. पूर्वार्ध, पृ. १२१–१२३ ).

**कस्तुरी रंगप्पा नायक**—हा मदुरेच्या विरप्पा नायकाचा तिसरा मुलगा. हा आपला भाऊ कुमार कृष्णप्पा नायक याच्यानंतर मदुरेच्या गादीवर आला ( स. १६०१ ).

कांहीं लोक हा गादीवर बसल्यापासून आठच दिवसांनीं मरण पावला असें समजतात.

याच्यानंतर याचा पुतण्या मुत्तू कृष्णप्पा नायक हा मदुरेच्या गादीवर आला.

२. हा कर्नाटकांतील शिरें येथील किल्ल्यावरील नाईक. याला विश्वासानें भेटीकरितां बोलावून अफझलखानानें ठार मारलें ( स. १६३८ ).

**कळभ्र**—हा मुड्ड कुंडुमीनंतर फार थोड्या दिवसांकरितां राज्यावर आला. कडुंगण पांड्यानें याच्या राज्याचा मोड केला ( स. ५६०-९० ).

**कक्षा**—सिंधचा राजा. हा चचाचा भाऊ चंद्र याचा मुलगा. दाहीरनें महंमूद कासीमबरोबर आरोर येथें जें घनघोर युद्ध केलें त्या युद्धांत दाहर मारला गेला. तेव्हां कक्षा युद्धभूमींतून निघून आत्मसंरक्षणार्थ बाबिया येथें जाऊन राहिला. बाबियास बॅरा नदीचे तीरीं एक प्राचीन किल्ला होता. या किल्ल्यांत ठाणें देऊन त्या किल्ल्याचे आसपासचे मुलखावर यानें आपली राजवट सुरू केली. पुढें महमूद कासीमनें बाबियावर स्वारी केली, तेव्हां हा त्यास शरण गेला. महमूद कासीमच्या सरदारांच्या मनांतून कक्षाचा वध करावा असें होतें, परंतु महमूद कासीमनें सरदारांची विनंती अमान्य करून कक्षास आपले जवळ ठेवून घेतलें. त्यास याच्या मुत्सद्दीपणाविषयीं इतका आदर वाटे कीं, विचार करण्यासारखा प्रश्न निघे तेव्हां कक्षाचा सल्ला घेतल्यावांचून तो कांहीं करीत नसे. राज्याच्या आर्थिक व्यवहाराचें सर्व काम महमूद कासीमनें याकडे सोंपविलें होतें व खजिनाहि याच्याच ताब्यांत असे. महमूद प्रेमानें यास 'दैवी सल्लागार' म्हणे. महमूद कासीमनें याची मैत्री संपादन केल्यावर कांहीं लढाया मारल्या. त्या लढायांत कक्षानेंहि मर्दुमकी गाजवून त्यास बिनमोल मदत केली. मात्र मुलतानवरील स्वारीच्या वेळीं त्याच्या आरबी सैन्याचा जोर पूर्ववत् कायम आहे व त्यास आपल्या मदतीची विशेष अपेक्षा नाहीं असें पाहून यानें आपलें सैन्य बरोबर घेऊन काश्मीरची वाट धरली व तेथील राजाचा हा आश्रित झाला.

**कंकणपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं एकोणतिसावा सिद्ध होय. हा जातीनें राजकुमार असून विष्णुनगरचा राहणारा होता. हा कंबलपाच्या परिपाटींतील सिद्ध होय. चर्यादोहाकोषगीतिका ( त. ४८।७ ) हा याचा ग्रंथ होय. हा हिंदी भाषेंत कविता करीत असे, असें कांहीं कवितांवरून दिसतें.

**कंकालिपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं सातवा सिद्ध होय. हा जातीनें शूद्र व मगधदेशचा राहणारा. याचा सहजानंदस्वभाव ( त. ४८।९० ) हा ग्रंथ होय.

**कंगवर्मन् कदंब**—( स. ३६०–३८५ ). बनवासीचा राजा.

**कंचला**—गंगांपैकीं वासवाची पत्नी.

२. ही गंगांपैकीं गोविंदरसाची मुलगी. ही वीरदेव सातारला दिली होती ( स. १०५० ).

**कंचुपल्लु**—एक ज्योतिषी. यानें ज्योतिषदर्पण नांवाचा ग्रंथ लिहिला ( श. १४७९ ). याचें गोत्र वत्स असून हा कण्व शाखेचा होता. याचें नांव कोंडपल्ली. कांचीपर्यंत माझें पंचांग चालतें असें हा म्हणतो. नरगिरीचा नरसिंह हें याचें कुलदैवत. पैलुभटीय या ग्रंथाचा यानें उल्लेख केला आहे ( भा. ज्यो. पा. ४७२ ).

**कंठाजी कदम बांडे**—( स. १७२४–३४ ). हा पुणें जिल्ह्यांतील बांड्याच्या वडगांवचा राहणारा. ताराबाईच्या पदरीं अमृतराव कदम म्हणून एक पराक्रमी पुरुष होता. तो पुढें शाहूला मिळाला. त्याचाच कंठाजी कदम हा तिसरा मुलगा होय. हाहि आपल्या बापाप्रमाणें शूर असल्यामुळें पश्चिम खानदेशांतील कांहीं गांवें पेशव्यानें

यास इनाम दिलें. याच्याजवळ २०० स्वार होते व गुजराथ प्रांतावर याची नेमणूक होती.

स. १७२४ सालीं यानें गुजराथेंत चौथाईचा हक्क मिळवला. निजामाचा काका, गुजराथचा नायबसुभेदार हमेदखान यास शुजायतखानाविरुद्ध मदत केल्यामुळें याचा हा फायदा झाला, पण पुढें यास पिलाजी गायकवाड निमा हिस्सेदार झाला.

एकदां खंबायत येथून पैसा घेण्याकरितां हे दोघे त्या गांवीं गेले. गांवकऱ्यांनीं मोठ्या युक्तीनें त्या दोघांत कलागत लावून दिली. तेव्हां कंठाजी कदम व गायकवाड यांमध्यें लढाई होऊन त्यांत गायकवाडाचा मोड झाला. यानें नंतर गांवकऱ्यांपासून खंडणी वसूल केली. हमेदखानानें या वेळीं मध्यस्थी करून तंटा मिटविला ( स. १७२६ ).

हा स. १७२७ च्या निजामच्या स्वारींतहि होता.

सरबुलंदखानानें कदमाची कामगिरी त्याच्याकडे पूर्वीप्रमाणेंच चालू ठेविली. परंतु खानाच्या अपेक्षेप्रमाणें कंठाजीकडून मुलखाची व्यवस्था नीट पाहिली जात नसे. पुढें हा स. १७३१ मध्यें बाजीरावाच्या विरुद्ध बाजूनें लढत असतां पळून गेला.

स. १७३४ मध्यें माळव्यांत स्वारी करून यानें बरीच लूट मिळविली. यापुढें मात्र याचें नांव ऐकूं येत नाहीं. याला चत्रसिंग नांवाचा मुलगा होता. याचा वंश खानदेशांतील इनामगांवीं आहे ( पा. १९१ पाहा ).

**कंठीरवनरस**—( स. १६३८–५९ ). म्हैसूर संस्थानांतील इम्मडीचा हा चुलतभाऊ.

यानें आदिलशाहीचा रणदुल्लाखान याची दुसरी स्वारी परतवून स्वतःचें नाणें पाडलें व श्रीरंगपट्टणची तटबंदी केली. हा निपुत्रिक असल्यानें पुढें केम्पदेवराज दोड्ड हा राजा झाला.

**कंठीरवराज**—( स. १७०४–१७१४ ). म्हैसूर संस्थानांतील चिक्कदेवाचा मुलगा.

**कंतलिपा**—यालाच कंथालिपा असें म्हणतात. हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं एकोणसत्तरावा सिद्ध होय. हा कण्हपाचा शिष्य. जात शिंपी. देश मणिधर.

**कंति**—( स. ११००–११०६ ). पहिली कानडी कवयित्री. द्वारसमुद्राच्या बल्लाळाच्या दरबारांत ही होती. ही धर्मानें जैन होती. हिच्या पूर्वीची कानडी कवयित्री माहित नाहीं. नागचंद्रा ( अभिनवपंप ) व ही यांच्या संवादकविता प्रसिद्ध आहेत.

**कंपन**—वेदभाष्यकार सायणाचा पुत्र.

**कंपन संगम**—( स. १३५५ नंतर लवकरच मृत्यु ). हा विजयनगरच्या संगम घराण्यामधील पहिल्या हरिहराचा तिसरा भाऊ; आणि संगमाचा मुलगा. हा नेल्लोर व कडप्पा येथें हरिहराचा युवराज म्हणून कारभार पाहत होता, असें याचा मुलगा दुसऱ्या संगमाच्या बिट्रगूंटच्या ताम्रपटावरून दिसतें ( एपि. इंडि. व्हा. ३, पा. २४ ). स. १३५५ च्या फेब्रुवारींत हरिहर वारल्यावर वडीलपणाचा अनुक्रमानें साम्राज्याचा अधिकार याच्याकडेच यावयास पाहिजे, परंतु तसा तो आलेला दिसत नाहीं. याचें कारण त्या वेळीं हा आसन्नमरण असावा. बिट्रगूंटच्या ताम्रपटांत म्हटलें आहे कीं, हरिहराच्या मागून कंपनानें पृथ्वीचें राज्य चिरकाल केलें. पण त्यांत सत्यांश नाहीं. हा हरिहराच्या मागून तीनचार महिन्यांत वारला असावा. हा वारल्यानंतर याच्या मुलाकडे सत्ता न जातां आधीं सेनापति असलेल्या कर्तबगार बुक्काच्या हातांत राज्याचीं सूत्रें गेलीं. याला सायण व संगम असे दोन पुत्र होते.

२. हा विजयनगरच्या संगम वंशांतील पहिल्या बुक्काचा दुसरा मुलगा. याला हरिहर, विरूपाक्ष, भास्कर आणि मल्लिनाथ असे चार भाऊ होते.

**कंबरजखान**—हा एक मोगल सरदार असून हैद्राबादेस राहत असे. स. १७२३ च्या सप्टेंबरपासून ते १७२४ च्या जुलैपर्यंत खंडेराव दाभाडे, फत्तेसिंग भोसले व चिमणाजी बल्लाळ हे उत्तर व दक्षिण पाईन घाटांत याची गडबड थांबवीत होते. फत्तेसिंग भोसले यानें याचा शेवटीं पराभव केला.

**कंवरसेन**—( स. १५०८–१५५३ ) अहमदनगरच्या बुर्हाण निजामशहाचा मुख्य प्रधान. हा जातीनें ब्राह्मण असून बुर्हाणशहाच्या दरबारीं फार दिवस मुख्य प्रधानाचें काम पाहत होता. यानें मोठ्या हुशारीनें कारभार केला. याच्या कारकीर्दींत मराठे लोक प्रसिद्धीस येऊं लागले ( मु. रि. भा. १ ला, पृ. २४३ ).

**कंबायसिस**—( ख्रि. पू. ५२८–२१ ) इराणच्या हखामनीषीय घराण्यांतील राजा.

**कंस**—( स. १३८६–९२ ) हा बंगाल्यांतील एक हिंदु जमीनदार होय. बंगालचा सुलतान दुसरा शम्सुद्दीन दुर्वृत्त निघाल्यामुळें त्याच्या पश्चात् तें राज्य यानें बळकाविलें.

यानें स. १३९२ पर्यंत राज्य केलें व याच्या पश्चात् याचा मुलगा जितमल्ल हा बंगालच्या गादीवर आला. याला केंब्रिज हिस्टरीमधील वंशावळींत 'गणेश भादुरी'चा कंस नारायण असें म्हटलें आहे.

**काकतीय वंशावळ**—( स. १११७–१३६४ ). करिकाल- १ दुर्जय ( रघूच्या घराण्यांतला )– २ पोल पहिला– ३ बेट्ट ( त्रिभुवनमल्ल किंवा बेट्टम् )– ४ पोल दुसरा ( जगतीकेसरिन्, स. १११७–११६३ बा. मुप्पलादेवी )– ५ प्रतापरुद्र पहिला ( स. ११६३–११९९, बा. पद्मादेवी. भाऊ महादेव, त्याची बायको नायांबिका )– ६ गणपती ( महादेवाचा मुलगा. 'छलमत्ती-गंड;' सेनापति जयाच्या बहिणी नरमा व पेरमा यांच्याशीं लग्न. स. ११९९–१२६० )– मैलला ( महादेवाची मुलगी व गणपतीची बहिण. 'मेलांबिका' नातवाडी जहागीरदार बुद्धाचा मुलगा रुद्र याच्याशीं लग्न )– ७ रुद्रम्मा ( गणपतीची मुलगी. बापाच्या मागून गादीवर आली 'रुद्रमहाराज' 'छल्मत्तीगंड' हीं पुरुषनामें घेतलीं. स. १२६०–१२९१. हिनें चालुक्य राजपुत्र वीरभद्रेश्वराशीं लग्न केलें होतें. हिला गणपांबिका नांवाची बहिण होती. तिनें अमरावतीचा जहागीरदार कोटबेटाशीं लग्न केलें. हिची मुलगी मुम्मदाम्बा हिनें महादेवाशीं लग्न लावलें ). –८ प्रतापरुद्र दुसरा ( रुद्रम्माचा नातू व मुम्मदाम्बाचा मुलगा. स. १२९१–१३३०. स. १३०९ मध्यें मलिक काफूरनें याचा पराभव केला. स. १३०९ मध्यें सेनापति मुप्पीडी कांचीस जाऊन मानवीर यास सुभेदार केलें. पुढें दिल्लीच्या खल्जी सुलतानानें याचें राज्य आपले ताब्यांत घेतलें. याला अन्नमदेव नांवाचा एक भाऊ होता. तो बस्तर घराण्याचा संस्थापक झाला–एपि. इंडि. ९. १६०) –९ कृष्ण किंवा वीरभद्र ( स. १३४४ )– १० विनायक किंवा नागदेव ( स. १३६४ त मुहम्मदशाहा बहामुनीनें निर्दयपणानें याचा खून केला ).

या घराण्याची राजधानी वरंगळ किंवा अनुमकोंड येथें होती. सनाच्या आकराव्या शतकाच्या उत्तरार्धांत हें घराणें प्रबल होतें. या घराण्यांतील राजे आपण करिकाल चोलाचे वंशज आहोंत असें म्हणतात. परंतु त्यांच्या नात्याविषयींचा निर्णय लावतां येत नाहीं ( एपि. इंडि. ३. ९४; ९. १६४; २५६; इंडि. अँटि. १८९२ पृ. १९७; ॲन्यु. रि. १९०९–१०. १३० पाहा ). ( सिवेल आणि आयंगार पृ. ३५५ ).

**काकवर्ण**—( ख्रि. पू. ) शिशुनाग घराण्यांतील शिशुनागाचा मुलगा.

**काकुस्थवर्मन् कदंब**—( स. ४३५-७५ ) कुंतल येथील कदम्ब घराण्यांतील भगीरथवर्मचा हा मुलगा. हा स. ४३५ च्या सुमारास आपल्या बापानंतर गादीवर आला.

स. ३९१-३९२ च्या सुमारास याचा बाप भगीरथवर्मन् यानें काकुस्थवर्मनची मुलगी गुप्त घराण्यांतील दुसऱ्या चंद्रगुप्ताचा मुलगा पहिला कुमारगुप्त यास दिली, व तें लग्न आपल्या कारकीर्दीत लाविलें, असें रे. हिरास यानें आपलें मत प्रसिद्ध केलें आहे. परंतु एन्–लक्ष्मीनारायणराव यांनीं खालीलप्रमाणें प्रतिपादिलें आहे.

काकुस्थवर्मन् यानें आपल्या दोन मुली, एक गंग घराण्यांत व दुसरी गुप्त घराण्यांत दिल्या होत्या. यांशिवाय याची आणखी एक मुलगी वाकाटक घराण्यांतील नरेंद्रसेन या राजास दिली होती. नरेंद्रसेनाच्या कालावरून असें ठरविण्यांत येतें कीं, काकुस्थवर्मन् हा स. ४३५ मध्यें गादीवर आला; व वाकाटक घराण्यांत दिलेल्या मुलीचें लग्न स. ४४५ मध्यें केलें. या वेळीं गुप्त घराण्यांतील कुमारगुप्त म्हातारा झाला होता. तेव्हां गुप्त घराण्यांत दिलेली याची मुलगी कुमारगुप्तास दिली नसून ती कुमारगुप्ताच्या स्कंदगुप्त किंवा पुरगुप्त या मुलास दिली असावी. कारण कुमारगुप्ताचा काल स. ४१४-४५५ असा आहे. यावरून वर उल्लेखिलेलें मत चुकीचें ठरतें.

याच्या गंग घराण्यांत दिलेल्या मुलीच्या लग्नाच्या कालावरून हा स. ४७५ पर्यंत जिवंत होता, असें सिद्ध होतें. तेव्हां याचा काल स. ४३५-४७५ असा एन्. लक्ष्मीनारायणराव यांनीं ठरविला आहे. वरील माहितीवरून पहिला कुमारगुप्त, स्कंदगुप्त आणि पुरगुप्त हे गुप्त घराण्यांतील याचे समकालीन होते असें ठरतें ( Ind. H. Quarterly, March 1933, p. 197–201 ).

**कॉकेन वुइल्यम**—स. १६४३ त इंग्लंडांत वुइल्यम कॉकेन याची कंपनीच्या गव्हर्नरचे जागीं नेमणूक झाली. याच्या हाताखालीं वुइल्यम मेथ्वोल्ड हा डेप्युटी गव्हर्नर असून त्याला हिंदुस्थानांतील व्यापाराची उत्कृष्ट माहिती होती ( ब्रि. रि. पूर्वार्ध पृ. २६६).

**काच**—इसवी सनाच्या तिसऱ्या शतकांत उत्तर भारतांतील बहुतेक क्षत्रिय बौद्धधर्माचे अनुयायी असल्यामुळें वैदिक धर्माला कोणी वाली नाहीं अशी अवस्था झालेली होती. अशा स्थितींत काच हा एक महान् पराक्रमी पुरुष वैदिक धर्माचा वाली म्हणून पुढें आला. ब्राह्मणांचें याला पूर्ण पाठबळ होतें. काचाला त्या काळांतील शिवाजी म्हटलें असतां शोभण्यासारखें आहे. शिवाजीप्रमाणेंच यानें डोंगरी आणि वन्य लोकांचें सैन्य तयार केलें. या सैन्याच्या मदतीनें यानें प्रथम मगध देश हस्तगत केला; व नंतर यानें आसपासच्या बौद्धधर्मी राजांवर हत्यार उपसलें. काचानें 'सर्वराजोच्छेत्ता' असें

विरुद धारण केलें व आपल्या नांवाचीं सुवर्णनाणीं पाडलीं. विष्णूचें चक्र हें याचें ध्वजचिन्ह होतें. पुढील काळांतील सम्राट् गुप्तांच्या सत्तेचा मूळ पुरुष काच हाच होय. पुराणें काचाचा उल्लेख 'विश्वस्फटिक,' 'विश्वस्फाटि', 'विश्वस्फाणि' या नांवांनीं करतात. विंध्यशक्ति पाहा.

कांहींच्या मतें हाच समुद्रगुप्त असावा, तर कांहीं याला समुद्रगुप्ताच्यापूर्वी कांहीं महिने राज्य करणारा त्याचा भाऊ असें म्हणतात. याचीं कांहीं सोन्याचीं नाणीं समुद्रगुप्ताच्या नाण्यांसारखींच आढळतात ( J. R. A. S. 1909, p. 342, Fleet ).

**काट राजा**—( सवाई शहाजी पाहा ).

**कात्यायन**—( वररुचि पाहा ).

**कान्होजी आंगरे**—(स. १७२९ मृत्यु ) आंगऱ्यांची वंशावळ पा. १२८ पाहा. याचा बाप तुकोजी हा सुवर्णदुर्गास २५ असामींवरचा नाईक होता. याचें बाळपण जोशी नांवाच्या ब्राह्मणाकडे गुरें वळण्यांत गेलें. पण त्या ब्राह्मणानें याची तरतरी पाहून हत्यारें वगैरे पुरवून याला तयार केलें. अचलोजी मोहिते सुवर्णदुर्गाचा किल्लेदार याजकडे यास नोकरी लागली. हपशांच्या मुलुखांत लूट करावी आणि ती आपसांत वांटून घ्यावी असा याचा क्रम सुरू झाला. एकदां हपशांच्या हातांत सांपडला असतां लांकडी वेढ्या आगटींत जाळून हा पळाला. तेव्हां ताडिळ गांवच्या फकी नांवाच्या मुसलमानानें याला आपल्या बाळंत झालेल्या मुलीच्या जागेवर निजवून लपविलें. त्यामुळें हा बचावला. म्हणून यानें फकीला एक गांव इनाम दिला, तो अद्यापि त्याच्या वंशजांकडे चालू आहे. हा शिवाजीच्या वेळेपासून नोकरीस होता. तरी संभाजीच्या वेळेस विशेष पुढें आला. याचे किल्ले मोंगलांनीं घेतल्यामुळें मोंगल-मराठ्यांत तह होऊन मोंगलांनीं तिकडचा निम्मा वसूल घेतला. तेव्हां हा खांदेरी मुक्कामीं राहावयास गेला. पुढें राजारामाच्या कारकीर्दींत यानें स्वपराक्रमानें किल्ले परत घेऊन मोंगलांना पळतां भुई थोडी केली. या त्याच्या पराक्रमामुळें राजारामानें यास सुवर्णदुर्गावर नेमलें. मराठेशाहीच्या संकटसमयीं यानें पश्चिम किनाऱ्याचें उत्तमपैकीं रक्षण केलें. व त्यामुळें यास 'सरखेल' हा किताब बहाल करण्यांत आला. राजारामानें याला 'ध्वजवृंदाधिकारी' ही पदवी दिली होती.

हा राजारामाबरोबर चंदीचंदावरकडे गेला होता. जंजिरेकरांनीं सुवर्णदुर्गावर स्वारी केली आणि वेढा दिला. तेव्हां अचलोजी मोहित्याचा धीर खचला; आणि तो तहास तयार झाला. तेव्हां यानें नेट धरला आणि मोहित्याला ताब्यांत घेऊन किल्ला लढविण्यास सुरुवात केली. छत्रपति राजारामाला खरी हकीगत कळतांच त्यानेंहि यास तेथील किल्लेदार नेमलें ( स. १६९४ ). शेवटीं जंजिरेकरास वेढा उठवून परत जावें लागलें. या वेढ्यांत एकदां हा शत्रूच्या हातीं सांपडला असतां शर्थीनें समुद्र पोहून जाऊन यानें आपली सुटका करून घेतली.

स. १६९६ मध्यें हा आपल्या परिवारासह त्र्यंबकेश्वराच्या यात्रेला गेल्याचा उल्लेख तेथील क्षेत्रोपाध्यायाच्या दप्तरीं आहे.

स. १६९७ मध्यें गुजर व कान्होजी यांमध्यें तंटा लागून गुजरास कान्होजीनें अटकेंत ठेविलें. पुढें गुजर वारल्यामुळें आंग्रे हा मराठ्यांच्या आरमाराचा अधिपति झाला. पुढें इंग्रज, फिरंगी व मुसलमान या तिघांनीं छळलें तरी कान्होजीचें स्थान ढळलें नाहीं. यावरून याच्या शौर्याची, धडाडीची आणि मुत्सद्देगिरीची कल्पना येते.

नंतर कोंकणपट्टीचे किल्ले यानें मोंगलांकडून परत घेतले. जयगड व पूर्णगड हे किल्ले नवे बांधले. स. १६९८ मध्यें विजयदुर्ग याच्या आरमाराचें मुख्य ठाणें झालें. पण स. १६९९ मध्यें कुलाबा हें मुख्य ठाणें झालें. नंतर यानें आपणांस स्वतंत्र राजा म्हणवून घेतलें व जमाबंदी सुरू केली. 'तळकोंकणांत पुंडावे होऊन प्रांत बैराण पडला. महाराष्ट्रधर्म रहावा ऐसे नव्हते. त्या वेळेस फिरंगी व हपशी हेहि प्रांतांत धर्म उच्छेद करावयास आले होते. तेव्हां सरखेलसाहेबांचे पुण्यप्रतापें स्वरक्षणार्थ थोरथोर मातबर सरदार जमा होऊन शामलाची क्षिती केली. संक्राजी मोहिते, राणोजी गोळे, खंडोजी माणकर, सद्राजीराव खराडे, कृष्णाजी मोड व हसनखान जमादार यांही सरखेलसाहेबांचे समागमें युद्ध प्रसंग करून शामलाची क्षती केली आणि श्रमें पाऊन कोंकणांत धर्म रक्षिला. सरखेलसाहेब याहीं धर्मस्थापना केली ही कीर्ति या लोकीं व परलोकीं जाऊन उरली आहे' ( आडिवरेकर दीक्षित यांच्या संग्रहांतील अप्रसिद्ध कागद, स. १६९८ ).

शाहू राजे औरंगजेबाचे मृत्यूनंतर परत आले तेव्हां हे ताराबाईच्या पक्षांत होते. तेव्हां त्यानें याजवर बहिरोपंत पिंगळे यास पाठविलें, पण त्याला यानें कैद केलें. लोहगड व राजमाची हे किल्लेहि घेतले. साताऱ्यावर स्वारी करणार अशी भुमका उठली होती, पण बाळाजी विश्वनाथ यांच्या मध्यस्थीनें तह घडून आला.

या तहांत २७ किल्ले, ३४ लक्षांचा मुलूख, आरमारचा सुभा व सरखेल हें पद यास मिळालें (स.१७१५).

स. १७१७ मध्यें डच व इंग्लिश यांनीं याच्यावर हल्ला चढवला. शाहूची व याची भेट जेजुरी येथें झाली. पुनः स. १७१८ मध्यें इंग्रज खांदेरीवर हल्ला करणार अशी रामा कामटी याच्यामार्फत यास बातमी लागली व याच्या कडेकोट तयारीमुळें इंग्रजांचा हल्ला निष्फळ ठरला. शेवटीं २४ मार्च १७२३ रोजीं रामा कामव्यास फितुरीबद्दल गोळी घालून मुंबईस ठार करण्यांत आलें ( कुलाबा गॅझेटियर ).

यानें इंग्रजांचीं किंग वुइल्यम व सक्सेस हीं जहाजें लुटलीं; तेव्हां मुंबईच्या गव्हर्नरनें यास लिहिलें कीं, 'दुसऱ्याचे द्रव्याचा अभिलाष करणें ही नीति नव्हे.' त्यास याचें उत्तर 'ईश्वर स्वतःचें कांहींच कुणाला देत नाहीं. एकाचें काढून दुसऱ्याला देतो; व ज्याला घेतां येतें तो तें दुसऱ्याचें घेऊं शकतो.'

स. १७२० मध्यें इंग्रज विजयदुर्गावर व स. १७२२ फिरंग्यांच्या साहाय्यानें कुलाब्यावर हल्ला करतात. पण ते प्रयत्न फसतात. हा स. १७२८ मध्यें मृत्यु पावला, असे ग्रँट डफ म्हणतो.

बायका तीनः १ मथुराबाई—बाकाजी महाडिकाची कन्या ( वंशावळ पाहा १२८ ).

ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर याचे गुरु होत. राणी लक्ष्मीबाई आंगरे यांचीं स्वामींना लिहिलेलीं पत्रें उपलब्ध आहेत. स्वामींनीं याला अगणित द्रव्य दिलें, आणि याच्या उत्कर्षास कारण झाले. स्वामींना सावनूरच्या नवाबानें हत्ती बक्षिस दिला होता. तो कोंकणांत परशुरामक्षेत्रीं जात असतां माखजनच्या याच्या चौकीदारानें आडवला व परशुरामक्षेत्र सिदी सातानें लुटलें त्यामुळें यावर स्वामींचा राग झाला व स्वामी देशावर राहण्यास गेले. स्वामी याला ज्या रकमा देत त्या कर्जाऊ समजून परत मागण्यांत येत व त्याबद्दल कुरखुर झालेली आढळते.

यानें लोहगड किल्ला भाऊपणाची शपथ घेऊन नानासाहेब पेशव्यांस दिला. म्हणूनच बाजीराव याला पत्रांत कान्होजी काका असें संबोधून लिहीत असे ( पे. द. ३०. ५६ ).

याच्या दोन मुद्रा—१ श्रीराजारामचरणीं सागर । तुकोजीसुत कान्होजी आंगरे निरंतर ॥ २ श्रीशाहू नृपतिप्रीत्या तुकोजीतनुजन्मना । कान्होजीसरखेलस्य मुद्रा जयति सर्वदा ॥

**२.** ( स. १८३८–३९ ) हा अल्पवयी वारल्यावर दत्तकाची परवानगी न मिळाल्यामुळें संस्थान खालसा झालें.

**कान्होजी जेधे**—( स. १६६० मृत्यु ). हा मावळांतील एक प्रमुख देशमुख. हा आदिलशाही फौजेवरील एक अधिकारी होता (प. सा. ३०७). याला आदिलशहाकडून शहाजी भोसले व दादोजी कोंडदेव यांचा बंदोबस्त करण्याविषयीं हुकूम आलेला होता. हा प्रथम रणदुल्लाखानाचे हाताखालीं काम करीत असे. नंतर शहाजीनें याला आपल्याकडे मागून घेतलें. याच्या मार्फत रणदुल्लाखान व शहाजी यांचा स्नेह जडला होता. हा व याचा कुलकर्णी दादाजी नरस प्रभू यांना 'शिवाजीला सामील झाल्याबद्दल गर्दन छाटली जाईल, मगरूरी न करतां अमिनाशीं रुजू व्हावें' अशा अर्थाचा हुकूम आला होता ( ३०–३–१६४५—राजवाडे खंड १५. २६७ ). हा बाजी पासलकराचा जांवई होता. रायरीश्वरापाशीं शिवाजीबरोबर स्वराज्याच्या शपथा घेणाऱ्यांत हा एक होता. याच वेळीं मुहम्मद आदिलशहास अर्धांगवायु झाला, आणि त्याच सुमारास शहाजीला जिंजीजवळ कैद करून विजापुरास आणलें होतें. तथापि मुलाच्या अपराधाबद्दल बापास शिक्षा करूं नये, असा कुराणाचा आधार घेऊन शहाजीला सोडण्यांत आलें. शहाजीची सुटका झाल्यावर त्यानें याच्याकडून बेलरोटीवर शपथ घेवविली कीं, तुम्हीं जाऊन शिवाजीस सामील व्हावें. आणि कोणीहि शत्रु चालून आला तरी त्याचा पाडाव करावा. याचा व शहाजीचा चांगला स्नेह होता. कर्नाटकांतील स्वारींत हा शहाजीबरोबर होता आणि शहाजीबरोबर शहाजीचा मनुष्य म्हणून यालाहि कैद भोगावी लागली होती. याच्याप्रमाणें याचा मुलगा बाजी हाहि कर्ता आणि लढवय्या होता. शिवाजीच्या बाजूनें खळदबेलसरच्या लढाईंत बाजीनें विजापूरकरांविरुद्ध चांगलीच लढाई गाजविली होती. शिवाय याचें वतन शहाजीच्या जहागिरींत होतें. शहाजीचा बस कमी होत चालला असून शिवाजीचा राज्यस्थापनेचा प्रयत्न चांगलाच मूळ धरूं लागला होता. अशा वेळीं शिवाजीच्या भोंवतीं कांहीं कर्तबगार माणसें शहाजीनें पाठविलीं त्यांपैकीं हा एक होता.

चंद्रराव मोऱ्याच्यावर हल्ला झाला तेव्हांहि शिवाजीस याचा फार उपयोग झाला ( चंद्रराव मोरे पाहा ).

आपल्या जमावानिशीं अफजलखानाला सामील व्हावें असें पातशाही फर्मान याला आलें होतें ( प. सा. ७७४ ). शिवाय अफझलखानानेंहि पत्रें लिहून लालुच दाखवून माणसें आपलींशीं करण्याचा प्रयत्न केला होता. 'तुमचा बाप व बिरादर दाहावीस वेंषें शिवाजी भोसलेची चाकरी करितात तरी आम्हांला

मिळावें ' असें एका पत्रांत याला म्हटलें आहे ( प. सा. ७८२ ). अफझलखानाबरोबर असलेल्या मराठे सरदारांत घोरपडे, माढरे, खराडे, जाधव, मंबाजी भोसले, घाडगे, काटे, प्रतापराव मोरे, पिलाजी व शंकराजी मोहिते इतकीं नांवें शिवभारतांत दिलीं आहेत. विजापूरच्या दृढमूल सत्तेशीं विरोध करण्याची शक्ति शिवाजींत नसल्यामुळें त्या वेळीं शिवाजीला मिळणें धोक्याचें होतें. पण अशा आणीबाणीच्या प्रसंगीं यानें शिवाजीची बाजू धरली एवढेंच नव्हे तर इतरांनाहि शिवाजीकडे वळविलें असें जेधे शकावली व करीणा यांवरून दिसतें.

अफजलखानाचे वेळीं याला अली अदिलशहाकडून पुढील फर्मान आलें होतें ( स. १६-६-१६५९ ). 'शिवाजीनें निजामशाहि कोंकणांतील मुसलमानांचा उच्छेद व लूट करून किल्ले हस्तगत केले. त्याचे पारिपत्यासाठीं अफजलखानास रवाना केलें आहे. तरी तुम्ही शिवाजीचा पराभव करून निर्मूल फडशा करावा. त्याच्या लोकास आश्रय न देतां ठार मारून या दौलतीचें कल्याण इच्छिणें. खानाच्या सांगण्यावरून तुमची योग्यता वाढविली जाईल ' ( प. सा. सं.७७४ ). म्हणजे हा कान्होजी जेध्याला फोडण्याचा प्रयत्न होता.

याला फर्मान आलें तेव्हां तें फर्मान घेऊन हा आपल्या पांच पुत्रांसह शिवाजीच्या भेटीस गेला. शिवाजी म्हणाला, 'तुमचे शेजारी केदारजी व खंडोजी खोपडे हे अफजलखानाकडे गेले. तुम्ही पातशाही हुकूम मोडून राहिलात तर वतनास आपाय होईल. कदाचित् प्राणावरहि बेतले, तेव्हां तुम्हींहि जाणें.' कान्होजी म्हणाला, ' शहाजी महाराजांनीं तुमचें साहाय्य करण्याविषयीं आमच्या कडून शपथ घेतली आहे. त्या शपथेला आपण जागणार. मग वतनाचें कांहींहि होवो. ' शिवाजीनें वतनावर पाणी सोडण्यास सांगितलें, त्याप्रमाणें हातावर पाणी घेऊन यानें सोडलें. तेव्हां शिवाजीनें याला आपलीं मुलेंमाणसें कारीहून तळेगांवास नेऊन ठेवण्यास सांगितलें. याप्रमाणें हा पूर्णपणें शिवाजीला मिळाल्यावर परस्परांची आणभाक झाली. नंतर हा व इतर देशमुख यांची शिवाजीच्या सांगण्यावरून बैठक झाली. तेथें कान्होजी म्हणाला, ' आपण तर शिवाजीकरितां वतनावर सुद्धां पाणी सोडलें आहे. लेक व आपण शिवाजीकरितां प्राणहि वेंचण्यास तयार आहोंत. मुसलमान बेइमान आहेत. आपलें काम झाल्यावर नसतें निमित्त ठेवून नाश करतील. महाराजांचें हें मऱ्हाष्ट राज्य आहे. सर्वांनीं हिंमत धरून एकनिष्ठेनें सेवा करावी. ' याचे हे हिंमतीचे शब्द ऐकून इतरांनाहि स्फूर्ति आली. त्यामुळें बांदल, हैबतराव सिलिमकर, पासलकर, मारणे, ढमाले, मरळ, डोहर हे सर्व शिवाजीमहाराजांना मिळाले. असा कर्तबगार, नेटाचा आणि शूर पुरुष शिवाजीला मिळाल्यामुळें शिवाजीची बाजू चांगलीच बळकट झाली.

अफजलखानाचे मृत्यूनंतर उभय सैन्यांची तुंबळ लढाई झाली. या लढाईला 'प्रतापगडची लढाई' असें म्हणतात. या प्रतापगडचे युद्धांत हा वृद्ध गृहस्थ हजर असावा. याचा मुलगा बाजी यास यापूर्वीच शिवाजीनें सर्जेराव अशी पदवी दिली होती. यानंतर हा वृद्ध गृहस्थ स. १६६० च्या सप्टेंबराच्या सुमारास मरण पावला ( प. सा. ८३० ). याची कारी येथें समाधि आहे.

**कान्होजी मोहिते**—हंबीरराव मोहित्याचा मुलगा.

**कान्होजी राणोजी शिर्के**—बाळाजी व चंद्रसेन जाधव यांच्या तंट्याच्या वेळीं बाळाजीस व त्याच्या कुटुंबास पोंचविण्याच्या कामांत यानें भाग घेतला होता. म्हणून हा प्रसिद्धीस आला. याचीच भगिनी थोरल्या शाहूमहाराजांची पत्नी सकवारबाई होय. सकवारबाईचें माहेरचें नांव राणूबाई असून ती याची धाकटी बहीण होती. याची ब्रह्मेंद्रस्वामींवर भक्ति होती. ब्रह्मेंद्रस्वामी याच्यातर्फेच सकवारबाईकडे संधान बांधीत.

**कान्होजीराव गायकवाड**—( स. १८००-१ ). गोविंदराव गायकवाडाची रक्षा गजराबाईस गोविंदरावापासून झालेला हा मुलगा होय. हा मोठा पराक्रमी होता. यानें आपल्या आईच्या मदतीनें बापाचा उच्छेद आरंभिला. स. १८०० मध्यें गोविंदराव मरण पावला. तेव्हां वारसासंबंधीं तंटे उपस्थित झाले. गोविंदरावाचा औरस पुत्र आनंदराव हा भोळसर होता. त्यामुळें यानें प्रथम आनंदरावाचें मन वळवून आरबांच्या साह्यानें कारभार हातीं घेतला आणि बायकांस व आप्तांस कैदेंत टाकून खर्च भागविण्यासाठीं त्यांचें जडजवाहीर हरण केलें, त्यावरून सर्वांसच याचा वीट आला; आणि त्याच आप्तेष्टांनीं आरबांस फितवून व रावजीस पुढें करून ता. २९-१-१८०१ रोजीं कान्होजीस पकडलें आणि रणपूर येथें कैदेंत ठेविलें. पुढें इंग्रजांनीं याला कर्नाटकांत कैदेंत ठेविलें होतें (आनंदराव गायकवाड पाहा ).

**कान्होजीराव डफळे**—( स. १७९०-१८१० ). हा जतच्या अमृतरावाचा मुलगा. हा आपल्या बापानंतर जतच्या गादीवर आला ( १७९० ).

हा खर्ड्याच्या लढाईत व इतर बऱ्याचशा लढायांत पेशव्यांच्या हाताखालीं हजर असे. हा स. १८१० त मरण

पावला. याच्या वेळीं रावबाजी यांनीं मध्यंतरीं जतची देशमुखी जप्त करून त्रिंबकजी डेंगळ्याकडे सोंपविली होती. याच्यानंतर याची वडील बायको रेणुकाबाई ही कारभार पाहत होती.

**कान्होजीराव भोसले**—( दु. सेनासाहेब सुभा )—( स. १७१०-१७३० ) हा परसोजी भोसल्याचा मुलगा. परसोजीचे मृत्यूनंतर शाहूजवळून सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें घेऊन हा वऱ्हाडांत आला. यानें परसोजीच्या स्मशानस्थळाच्या पूजेकरितां शाहूराजाकडून खेड येथील कांहीं जमिनींची सनद मिळविली. वऱ्हाडांत आल्यावर यानें दारव्हा हें महत्त्वाचें ठाणें काबीज केलें, व नंतर भाम येथें कायमचें ठाणें केलें.

हा शूर व पराक्रमी होता. कटक प्रांतांत पूर्ण अम्मल बसविण्याचें काम जरी पुढें रघूजी भोसल्यानें केलें तरी त्याचा पाया यानेंच घालून दिला होता.

हा मोठा धार्मिक असून याचें सोवळें व नेमधर्म कडक असत ( ना. भो. बखर पा. ३१ ). प्रथम यास मूलबाळ कांहीं नव्हतें. तेव्हां यानें रघूजीस आपणाजवळ भाम येथें आणून ठेवलें. पुढें त्यास रायाजी ( कांहीं ठिकाणीं त्यास रामजी असें म्हटलें आहे तें चूक आहे. रायाजी हेंच त्याचें खरें नांव-पे. द. भा. २०. ३२ ) नांवाचा मुलगा झाल्यापासून याचें रघूजीवरील प्रेम कमी झालें, व याचा आणि रघूजीचा बिघाड होऊन रघूजी याचेकडून निघून गेला.

याचा अम्मल फार करडा असे. बखरकार म्हणतो, "अमल बहुत क्रूरतेचा सेनासाहेब सुभा करू लागले" ( पान २९ ). यावरून याचा स्वभाव फार तापट असावा आणि यामुळेंच याचा रघूजीशीं बेबनाव झाला असावा. याच्या फौजेचाहि असाच बेबंदशाही कारभार असावा असें वाटतें. याचे फौजेचा त्रास खुद्द याचे राज्यांतहि कितपत होता हें याच्या एका अभयपत्रावरून दिसतें ( शारदाश्रम यवतमाळ संग्रह ). परंतु यास विशेष दोष देतां येत नाहीं. कारण कमीजास्ती प्रमाणांत ही स्थिति सर्वांच्याच सैन्याची असे.

राणोजी व रघूजी भोसले दिल्लीहून परत आल्यावर त्यांनीं याजवळ वतन व सरंजाम यांमध्यें हिस्सा मागितला. तें भांडण शाहूपर्यंत जाऊन स. १७२७ त यानें तिघांत सरंजामाची वांटणी करून दिली. स. १७२५-२७ पर्यंत कान्होजी बाजीरावाबरोबर कर्नाटकांतील स्वारींत होता.

पुढें हा शाहूस जुमानीनासा झाला. याचे सुभ्याचा वसूलहि बरोबर येईना. तेव्हां शाहूनें यास साताऱ्यास समक्ष बोलावलें. परंतु यास हिशेबहि देतां आला नाहीं, व रक्कमहि पटवितां आली नाहीं. तेव्हां शाहूचा व याचा बेबनाव झाला. तेथें राहणें धोक्याचें वाटून हा शाहूची परवानगी न घेतां, सैन्यासह आपले तळावरून पळून गेला ( स. १७२५ ). यास अडविण्यासाठीं शाहूनें दोन सरदार पाठविले. एवढेंच नव्हे, तर तो स्वतःहि पहाटची प्रहर रात्र असतां याचे पाठलागार्थ निघाला. बरोबर असलेल्या यमाजी शिवदेवानें त्यास पुष्कळ सांगितलें कीं, 'मी कान्होजीचा पाठलाग करतों. तुम्ही स्वतः येण्याची जरूर नाहीं.' परंतु शाहू हट्टासच पेटला होता. तो पुसेसावळीच्या पुढें वडगांवापर्यंत गेलाच व शेवटीं यमाजी शिवदेवास पुढें पाठवून तो साताऱ्यास परत आला, व वऱ्हाडांतील सर्व सरदारांस कान्होजी त्या रस्त्यानें गेल्यास त्यास पकडण्यास सांगितलें.

परंतु कान्होजी कोणाचेहि हातीं न लागतां निजामाकडे गेला. पण निजामानें कान्होजीस चाकरीस ठेवून घेतलेलें दिसत नाहीं. हा मराठी राज्यांतच दंगाधोपा करीत कांहीं दिवस राहिला. शाहूशीं मिलाफ करण्यासाठीं येसाजी सिद्धेश्वर नांवाच्या गृहस्थास यानें साताऱ्यास पाठविलें. थोडा कालपर्यंत त्यांचा मिलाफ झालाहि, परंतु तो फार दिवस टिकला नाहीं.

कान्होजी पुढें भाम येथें जाऊन पोंचला. याच्या बंदोबस्ताचें काम शाहूनें याचा पुतण्या रघूजी यासच सांगितलें; व कान्होजीस त्याचे जागेवरून काढून टाकून त्याचे जागीं रघूजीस नेमलें, व त्यास कान्होजीस पकडून आणण्याची आज्ञा केली.

स. १७३० त वऱ्हाडांत चांगला जम बसल्यावर रघूजीनें याच्यावर चाल केली. आपलें सेनासाहेब सुभा हें पद गेल्याचें कान्होजीस माहीत होतें. परंतु हा खुषीनें प्रांताचा ताबा सोडण्यास तयार नव्हता.

कान्होजी भाम येथें असतां रघूजीनें याजवर हल्ला करून याचा सरदार तुकोजी गुजर यास ठार मारलें. तेव्हां कान्होजी भामेहून माहूरचे बाजूस पळून गेला; व रघूजीनें मंदार या गांवाजवळ याचा पराभव केला; आणि मर्यादेनें खालीं उतरून यास पालखींत बसण्यास सांगूं लागला. परंतु हा रागांत असल्यामुळें रघूजीस अद्वातद्वा बोलूं लागला. शेवटीं रघूजीनें यास कैद करून ( स. १७३० ) तो यास घेऊन साताऱ्यास गेला. शाहूनें यास तेथेंच नजरकैदेंत ठेवलें. हा पुढें नजरकैदेंतच वारला.

परंतु ना. बखर पा. ४० यांत रघूजी कर्नाटकांत चंदासाहेबाचे मोहिमेवरून परत सातान्यास आला तेव्हां कान्होजीस शाहूचे परवानगीनें घेऊन नागपुरास आला, असें लिहिलें आहे. परंतु तसें झाल्याचें दिसत नाहीं ( नागपूर प्रांताचा इतिहास ).

कान्होजीचा शिक्का—

श्रीशाहुनृपतिनिष्ठस्य पर्सोजीतनुजात्मनः ।
कान्होजी भोसलस्येयं भाति मुद्रा यशस्करी ॥
( रा. खं. १५ पा. ३२८ ).

**कान्हो पाठक**—हे केंदूर पावळचे रहिवाशी. उत्तम ग्रंथकार म्हणून प्रसिद्ध होते. त्याच गांवचें जोशीपण यांचेकडे असून हे वृत्त्यंशी होते. यांचें सर्व घराणेंच्या घराणें विद्वान् होतें. यांच्या वंशापैकीं कान्हो त्रिमल वगैरेंना श्रीज्ञानेश्वरांनीं समाधि घेतेसमयीं आपली चीजवस्त दिली होती, अशी वारकरी लोकांत अद्यापि समजूत आहे. म्हणूनच ज्ञानेश्वरांच्या आरतीच्या वेळीं विडा-खिरापतीचा मान यांच्या घराकडे आहे.

यांचा गीतासार नांवाचा ग्रंथ व इतर काव्यें उपलब्ध आहेत. गीतासारावरून यांच्या गुरूचें नांव नागनाथ असावें असें समजतें. हे विरक्त होते. काशीचा एक पंडित यांच्या दर्शनास आला असतां हे मुलाला खेळवीत होते. ब्राह्मणानें सहज प्रश्न केला, " अजून मायापाश सुटत नाहीं कां ? " हें वाक्य ऐकतांक्षणींच यानें त्या मुलास उचलून विहिरींत फेंकून दिलें. त्यास पुढें लोकांनीं काढलें.

कान्हो त्रिमलदास असेंहि यांचें कोठें कोठें नांव आढळतें. त्रिमलदासांचा 'पाताळकांड' म्हणून एक ग्रंथ आहे. त्यांनीं नागेशाचे गुरु म्हणून नांव दिलें, ते नागनाथ व नागेश एकच असावेत असें वाटतें.

खिरापतीचा मान ज्यानें मिळविला त्यानेंच मराठींत गीतासार नांवाचा ग्रंथ लिहिला अशी प्रसिद्धी आहे. पण केंदूरच्या पाठकांच्या संग्रहामध्यें सांपडलेल्या एका गीतासाराच्या पोथींत हा नागनाथाचा शिष्य होता असें म्हटलें आहे. त्यावरून या घराण्यांत याच नांवाचे दोन गृहस्थ झाले असून ज्ञानेश्वरसमकालीन कान्हो पाठकांचा ग्रंथ वेगळा असावा असें दिसतें ( मं. वा. इतिवृत्त शके १८३६ क्रमांक ९३ ).

**कान्होपात्रा**—( स. १४६८ सुमार ) महाराष्ट्रांतील एक संत-कवयित्री. मंगळवेढें येथें शामानामक कळावंतीणीच्या पोटीं हिचा जन्म झाला. ही रूपानें सुंदर असून गाणारीहि उत्कृष्ट असे. आईचा बेत, मुलीचे गुण बादशहास दाखवून धन मिळवावयाचा होता. परंतु हें मुलीस पसंत न पडून ही सरळ पंढरपुरांत जाऊन ईश्वरभजनीं लागली.

बादशहास हिच्या रूपाची कुणकुण लागतांच त्यानें हिला आणण्यासाठीं म्हणून एक कामगार पाठविला. बादशहाकडील निरोप ऐकल्यावर हिनें 'मी देवदर्शन करून येतें' असें उत्तर दिलें. हीं देवालयांत गेली व परमेश्वराची करुणा भाकूं लागली, तोंच हिचें प्राणोत्क्रमण झालें. भक्तिविजयांत ३९ व्या अध्यायांत हिचें समग्र चरित्र देण्यांत आलें आहे. हिचा काल शा. श. १३९० असावा असें इतिहाससंशोधक राजवाडे सांगतात. हिचे कांहीं अभंग प्रसिद्ध आहेत ( महाराष्ट्र कविचरित्र भा. ३, पा. ३९–४४ ).

**कान्होबा**—याचें दुसरें नांव कानीफनाथ असें होतें. याची समाधि नगर जिल्ह्यांत शेवगांव तालुक्यांत मढी म्हणून एक गांव आहे तेथें आहे. नवनाथांपैकीं हा एक आहे. याचें देऊळ लहानशा टेकडीवर आहे. हा हिंदु सत्पुरुष असून पुजारी मात्र मुसलमान आहेत. हा हिंदुमुसलमानांचा देव असून याची दोघेहि भक्तीनें पूजा करितात. हिंदु व मुसलमान याला आपलाच साधु समजतात. याच्या स्मरणार्थ जवळ आसपास पुष्कळशा इमारती आहेत. याचें दुसरें नांव 'शहा रमजान' असें होतें. याचें देऊळ स. १७३० मध्यें बांधलें. येथें हिंदु साधूंच्या जरी समाधि आहेत तरी त्या सर्व मुसलमानी पद्धतीवर बांधलेल्या आहेत. मुसलमान लोक यास 'शहा रमजान' असें समजत असल्यामुळें शहा रमजानच्याबद्दल अहमदनगर ग्याझिटियरमध्यें पुढील हकीगत दिलेली आहेः शहा रमजान महीसवार हा स. १३५० (हिजरी ७५२) च्या सुमारास पैठण येथें आला. हा मंत्रविद्येंत प्रवीण असून गोदावरी नदींतून एका मोठ्या माशावर बसून आला, म्हणून याला महीसवार हें नांव मिळालें. हा पैठणास आल्यावर सादतअली नांवाच्या एका इसमानें याला मुसलमानी धर्म दिला. तेथें हा कांहीं दिवस राहून पुढें सतत ७ वर्षे प्रवास करून मढी येथें स. १३८० ( ७८२ हिजरी ) मध्यें आला व तेथें स. १३९० ( ७९२ हिजरी ) या सालीं मरण पावला. त्या वेळीं याचें वय ९० वर्षांचें होतें. यावरून याचा जन्म स. १३०० मध्यें झाला असावा असें दिसतें. अशा प्रकारची याच्याबद्दलची माहिती आहे. जवळच मिरी या गांवास याचें स्थान आहे. शिवाय मिरी व मढी यांच्या दरम्यान याचें आणखी एक तिसरें स्थान आहे. यास तांबूलदेव असेंहि म्हणतात.

मिरीची यात्रा फाल्गुन शु. १० ला व मठीची फाल्गुन व. ५ ला होते.

एकंदरींत हा मूळचा हिंदु होता. पैठणास आल्यावर मुसलमान झाला. हा मंत्रविद्येंत निष्णात असे. हा सत्पुरुष होता.

कोणी कोणी असें म्हणतात कीं, हा व शहा रमजान हे एक नसून दोघे होते. परंतु वरच्या ह्या सर्व पुराव्यावरून एकंदरींत ते दोघे एकच आहेत, असें वाटतें. कान्होजीचा मुलगा बाबूराव आंगरे यांनीं याचें स्थान जागृत आहे असें म्हटलें आहे. याच्याबद्दलच्या बऱ्याच दंतकथा आहेत ( मं. वा. इ. श. १८३७ ले. १०६ ).

**२.** तुकारामाचा धाकटा भाऊ. तुकयाबंधु म्हणून याचे अभंग आहेत.

**काफूर**—( मलीक नायब काफूर पाहा ).

**काब्राल**—हा एक पोर्तुगीज खलाशी होय. वास्कोडगामानंतर स. १५०० मध्यें पोर्तुगालच्या राजानें याजबरोबर युद्धसामग्री व उत्तमोत्तम खलाशी देऊन याला कालिकतला पाठविलें. हिंदुस्थानच्या जलमार्गाचा वास्कोडगामानें शोध लावल्यानंतर हा पहिलाच गृहस्थ हिंदुस्थानास यावयास निघाला. त्यामुळें याचें प्रवासांत बरेंच नुकसान झालें. शेवटीं हा हिंदुस्थानांत येऊन कालिकतच्या राजाची यानें भेट घेतली. याच्या सफरीनंतर पुन्हा वास्कोडगामा हिंदुस्थानांत आला ( ब्रि. रि. पूर्वार्ध पृ. ९३ ).

**कामदेव**—गोव्याचा कदंब राजा त्रिभुवनमल्ल याची मुलगी याला दिली होती. यालाच कावन म्हणत.

**२.** प्रबोधचंद्रोदयाचा टीकाकार.

**कामदेव कदंब**—( स. ११८१-१२०७ ) हा बनवासी व हानगल येथील कदंब घराण्यांतील एक राजा. हा चौथ्या सोमेश्वर प. चालुक्याचा जहागीरदार म्हणून स. ११८९ मध्यें राज्य चालवीत होता. यानें मलेजुल्, कोंकण आणि पश्चिम घाट हे देश जिंकले होते. यानें स. ११८१ मध्यें राज्याला सुरुवात केली. स. ११९६ मध्यें होयसल बल्लाळ ( दुसरा ) यानें हानगल शहरास वेढा दिला. पण त्यास कामदेवानें हाकून दिलें. हा स.१२०३-४ या सालीं बल्लाळाबरोबर झगडत होता. यानें केतलादेवी हिच्याशीं लग्न केलें होतें.

**कामधेनु**—हा ग्रंथकार आहे किंवा हें ग्रंथकाराचें नांव आहे याबद्दल संशय आहे. हा स. १०००-११०० च्या सुमारास झाला. कल्पतरु आणि हारलता यांमध्यें याचा उल्लेख असून याचा उल्लेख मिताक्षरा किंवा मेधातिथि यांत केलेला नाहीं.

यानें धर्मशास्त्रांतील निरनिराळ्या विषयांवर पुष्कळ लेख लिहिले आहेत. याचे ग्रंथ उपलब्ध झालेले नाहींत. चंडेश्वराच्या विवादरत्नाकर यामध्यें याचा वारंवार उल्लेख आलेला आहे. याचे उतारे श्राद्धक्रिया-कौमुदी यामध्यें आलेले आहेत.

कामधेनु नांवाचाहि एक ग्रंथ होता. हा धर्मशास्त्रावर लिहिलेला आहे. पण या ग्रंथाच्या कर्त्याविषयीं दुमत आहे. हरप्रसादशास्त्री व जयस्वाल यांच्या मतें हा ग्रंथ भोजाचा आहे. आफ्रेच्नें कामधेनु हा ग्रंथ शंभूचा मानला आहे. पण काण्यांच्या मताप्रमाणें गोपाल हा या ग्रंथाचा कर्ता होय.

**कामबक्ष मोगल**—(स.१६६७-१७०९) हा औरंगजेब बादशाहाचा उदेपुरी बेगमपासून झालेला सर्वांत धाकटा पुत्र होय. याला मृत्युपत्राप्रमाणें खरी दक्षिणची सुभेदारी मिळावयाची, परंतु याच्या हेकेखोर व अरेरावी वर्तनामुळें बहादूरशहानें यावर स्वारी करून याचा पराभव केला. याच लढाईत झालेल्या जखमेमुळें याचा अंत झाला ( स. १७०९ ). याचा जन्म स. १६६७ च्या २५ फेब्रुवारींत दिल्ली येथें झाला होता. परंतु ७ मार्च ही तारीख आयर्व्हिन देतो.

हा पराक्रमी नसल्यानें याच्या हातून म्हणण्यासारखी कामगिरी झाली नाहीं, तरी पण औरंगजेबाचें याच्यावर फार प्रेम होतें. जेव्हां झुल्फिकारखानानें जिंजीस वेढा दिला त्या वेळीं हा त्याचे बरोबर होता; परंतु हा मराठ्यांशीं राजकारणें करूं लागल्यामुळें खानानें यास कैद करून बादशहाकडे रवाना केलें.

जर आपल्या हयातींत कामबक्ष आणि अजमशाहा यांची योग्य तऱ्हेनें व्यवस्था लागली नाहीं, तर या दोघांमध्यें भांडणें होऊन राज्यांत बखेडा माजेल व त्याचा फायदा मराठे घेतील, हें पूर्णपणें औरंगजेबानें ओळखल्यावरून त्यानें कामबक्ष यास विजापूरचा सुभेदार नेमलें. १६ फेब्रु. १७०७ रोजीं हा विजापुरास जाण्याकरितां निघाला. विजापुरास पोंचण्यापूर्वीच औरंगजेबाच्या मृत्यूची बातमी आली. तेव्हां बहुतेक मोगल सरदार आपल्या सैन्यासह यास सोडून अहमदनगर येथें अजमशहास जाऊन मिळाले. परंतु यानें तसेंच पुढें कूच करून विजापूर गांठलें. या वेळीं सर्व मोगल सरदार अजमशहाचे बाजूस होते. तरीपण अजमशहानें याला विजापूर येथें स्वतंत्र झाल्याबद्दल कोणत्याहि प्रकारें निर्बंध

घातले नाहींत व याच्यामध्यें कोणतीहि ढवळाढवळ केली नाहीं. यानें अजमशहास मिळण्याची आपली इच्छा दर्शविली होती, परंतु ती नाकारण्यांत आली.

यानंतर आपण स्वतंत्र आहोंत, हें दर्शविण्यासाठीं यानें आपल्या राज्यांत मंत्री, सेनापति व इतर अधिकारी यांच्या नेमणुका करून मनसब व किताब बहाल केले. यानें स्वतःस दिनपनाह Defender of the Faith हा किताब घेऊन आपल्या नांवाचीं नाणीं सुद्धां पाडण्यास सुरवात केली ( आयर्विन व सरकारकृत लेटर मोगल भा. १ ला, पृ. ५, १०, ११ ).

**कामरान मोगल**—( स. १५३८–५५ ) बाबरचा हा मुलगा. याचा वडील भाऊ हुमायून. हा स्वभावानें तिरसट व विश्वासघातकी होता. हुमायूननें यास काबूल व पंजाब सुभा दिला होता. पुढें स. १५३८ त शेरशहानें हुमायूनवर स्वारी केली असतां हा मदतीस गेला नाहीं व उलट काबूलहून चाल करून आला. शेवटीं आपल्या बचावासाठीं यानें पंजाब शेरशहाच्या स्वाधीन केला.

हुमायून इराणांतील सैन्य घेऊन येत असतां हा भीतीनें सिंधमध्यें पळाला. पण सिंधांत यास आश्रय मिळाला नाहीं. इकडे हुमायूननें काबूल काबीज करून आपला अंमल बसविला. परंतु हुमायून शेरशहाशीं युद्धांत गुंतला असतां यानें बंड करून काबूल घेतलें. परंतु हुमायूननें यास ताबडतोब पकडलें व कैदेंत ठेविलें. तेवीस वर्षे यानें हुमायूनशीं बेइमानगिरी केल्यानें हुमायूननें याचे डोळे काढले ( स. १५५३ ). एकदां दोघांची गांठ पडली असतां याची दीन स्थिति पाहून हुमायूनास रडें कोसळलें. यासहि पश्चात्ताप होऊन यानें क्षमा मागितली. पुढें कांहीं दिवसांनीं हा मक्केस जात असतां वाटेंतच मरण पावला ( स. १५५६ ).

हा शूर, धाडसी, कपटी व क्रूर होता. बील म्हणतो 'हा मक्केस पोहोंचला होता व तेथें तीन वर्षे राहिला. नंतर हा मेला.' याचा मुलगा अबुल कासीम मीर्झा हा ग्वालेरच्या किल्ल्यांत कैदी होता. त्याला अकबरानें ठार मारलें ( स. १५६६ ).

**कामलादेवी**—रामनाथ होयसळाची पत्नी. ही गंगराजकन्या होती.

**२.** माळव्याच्या गुप्त घराण्यांपैकीं देवगुप्ताची मुलगी.

**कामंदक**— ( स. ७००–७५० सुमार ) काश्मीरच्या बाजूचा हा एक कवि होऊन गेला. ह्यानें नीतिसार नांवाचा ग्रंथ लिहिला. अर्थशास्त्र ह्या लेखांत डॉ. विंटरनिझनें नीतिसाराचें सुंदर परीक्षण केलें आहे. डॉक्टरसाहेबांच्या मतें हा ग्रंथ स. ७००–७५० या कालांतील आहे. भवभूतीच्या मालतीमाधवांतील कामंदकीची आठवण या वेळीं जरूर होते. कणिक, कौटिल्य यांप्रमाणें कामंदकहि शास्त्रनीतीविषयीं प्रसिद्ध होता.

**कामाख्या**—ही एलिचपूर येथें राहत असून हिची योगिनी म्हणून फार प्रसिद्धी होती. कावड बंगाला ( बंगालचा एक भाग ) देशांतील काउरळी येथील ही मूळची राहणारी. तो प्रांत मंत्रतंत्र, जादूटोणा, हटयोग इत्यादि कामांत फार प्रसिद्ध असे. अशा देशाची ही कामाख्या असल्यामुळें हीहि हटयोगांत फार प्रवीण होती, म्हणूनच हिचें नांव कामाख्या योगिनी म्हणून प्रसिद्ध होतें. हिच्यामध्यें एक दोष फार मोठा होता. हिला आपल्या योगबळाचा फार गर्व होता. दुसऱ्याच्या योगसामर्थ्याची परीक्षा पाहण्याची आणि दुसऱ्याला योगभ्रष्ट करून त्याची मानहानि झाली म्हणजे आनंद मानण्याची हिला फार खोड होती. याप्रमाणें हिनें अनेक योग्यांची परीक्षा करून त्यांना योगीपदापासून भ्रष्ट केलें होतें. अशीच परीक्षा पाहण्याचा प्रयत्न हिनें द्वारावती येथें राहणाऱ्या श्रीचक्रपाणी या नांवाच्या सत्पुरुषासंबंधानें केला. त्याचप्रमाणें त्याला भ्रष्ट करण्याचा हिचा निश्चय होता. पण त्यांत हिला यश न येऊन श्रीचक्रपाण्यांनीं योगबळानें आपल्या प्राणांचा निरोध केला आणि अवतारसमाप्ति केली. तेव्हां हिला अतोनात दुःख झालें आणि तेव्हांपासून हिनें सत्पुरुषांचा छळ करण्याचें सोडून देऊन आपल्या योगसामर्थ्याचा दुसऱ्याच्या कल्याणाकरितां उपयोग केला. हिनें आपल्या पुढील आयुष्याचा एलिचपूर येथें सद्व्यय केला ( एलिचपूर पृ. १०–१५ ).

**कामार्णव गंग**—( स. ११५२ पर्यंत ) हा त्रिकलिंगाच्या प्राच्य गंगांपैकीं अनंतवर्मन् ऊर्फ चोडगंगाचा पुत्र. याला स. ११४२ मध्यें राज्याभिषेक झाला. यानें दहा वर्षे राज्य केलें. याला कुमार अनंतवर्मन्, जतेश्वर असेंहि म्हणत. याला मधुकामार्णव म्हणत असत. या घराण्यांत एकंदर सहासात कामार्णव झाले. त्यांची विशेष माहिती मिळत नाहीं. या घराण्यांतील तिसऱ्या कामार्णवांनीं ( स. ८७८–९७ ) आपल्या नांवाचा शक सुरू केला त्यावरून इतरांचा कालनिर्णय होतो.

**कामिलखान दक्षिणी**—विजापूरच्या दुसऱ्या इब्राहीम आदिलशाहाचा दिवाण. पण इब्राहीमची चुलती चांदबिबी हिचा उपमर्द केल्यानें तिनें कीश्वरखानाकडून यास ठार केलें. हा दोन महिने दहा दिवस दिवाण होता.

**कायगांवकर दीक्षित पाटणकर**—( नारायण गोविंद टकले )-( स. १६५०-१७४८ ) नारायण दीक्षित नांवाचा एक ब्राह्मण सतराव्या शतकांत स. १६५० नंतर गंगातीरीं पैठण मुक्कामीं तपश्चर्या करूं लागला. हा संस्कृत विद्वान् व कर्मठ होता. पुढें हा भिक्षावृत्ति पत्करून औरंगाबादेजवळ राहूं लागला. यानें सर्व हिंदुस्थानभर पर्यटण केलें. बाळाजी विश्वनाथाची याजवर अत्यंत भक्ति जडली. पुढें शाहूमहाराजहि याच्या भजनीं लागले. ब्रह्मेंद्रस्वामी व नारायण दीक्षित हे समकालीन होते.

याचें वसतिस्थान काशी हेंच बरेच दिवस होतें. हा तेथें अन्नवस्त्रें देऊन सदावर्तें घाली. बाजीराव व राघोबादादा यांचा याशीं पत्रव्यवहार होत असे. याचीं त्यांना उत्तरेंहि जात असत.

गोदाप्रवरेच्या संगमावर कायगांवास दीक्षितांनीं वास्तव्य केलें म्हणून यास कायगांवकर असें म्हणण्याचा प्रघात पडला. दीक्षित हे सावकारी करीत असत. शेंदुर्णीचे हल्लींचे जहागिरदार याचे वंशज आहेत.

दक्षिणेंतील व कोकणांतील कारस्थानांत याचें अंग होतें. काशीस दीक्षितपुरा म्हणून यानें वसविलेला एक भाग आहे. आपल्या प्रवासांत ठिकठिकाणच्या राजकारणाची बातमी ठेवून तीं हा बहुधा पेशव्यांस देत असावा असें दिसतें; कारण बाजीराव, चिमाजीआप्पा व नानासाहेब यांचा याच्याशीं पत्रव्यवहार होत होता. याच्या वडिलांचें नांव गोविंदराव असून याचें दुसरें आडनांव टकले असें होतें. कायगांव हें गोदावरीचे कांठीं असून उत्तर हिंदुस्थानच्या हमरस्त्यावर आहे. याचा उपयोग, निजामाकडील व उत्तरेकडील व्यवहारांत पेशव्यांस होत असे. याला दोन पुत्र असून त्यांचीं नांवें अनुक्रमें वासुदेव व बाळकृष्ण अशीं होतीं. हा ता. १०-१०-१७४८ मध्यें मरण पावला ( म. रि. म. वि. ३, पृ. २९७-९८ ).

**कायमखां बंगष**—पहिल्या बाजीरावानें याचा पराभव केला ( ४ मे १७२९ ).

**कायविररस**—हा बेलगुट्टी घराण्यांतील पहिला महामंडलेश्वर होय. याचा स. १०६१ चा वीरगळ आढळतो. त्यांत हा सर्व पृथ्वीवर राज्य करणारा होता, असा निर्देश आहे. पण हा बेलगुट्टीच्या भोंवतीं राज्य करीत असे. हा पहिल्या सोमेश्वर चालुक्याचा (स. १०४८-६८) मांडलिक होता. संतार राजा वीरसंतार व त्याचा मुलगा भुजबळ हे चालुक्यांशीं लढत होते. त्यांत हा चालुक्यांतर्फे लढत होता.

**कायस्थ ( साहिनी ) घराणें**—या घराण्यांतील मूळ पुरुष गंगेय साहिनी हा गणपति काकतीय राजाचा सेनापति होता. या घराण्यानें म्हैसूर आणि हैद्राबादच्या आसपासचा बराचसा प्रांत आपल्या सत्तेखालीं आणला होता. १ गंगेय साहिनी ( स. ११९९-१२६० )-२ जन्नीगदेव-३ त्रिपुरारिदेव ( स. १२७२-७३ )-४ अंबदेव ( स. १२७३-१३०२ ). यांपैकीं पहिले दोघे आपणास गंदपेंडर व मंडलीक ब्रह्मराक्षस असें म्हणवून घेत. शेवटले दोघे जन्नगदेवाचे पुत्र होत ( सिवेल आणि आयंगार पृ. ३५९ ).

**कारुवाकी**—अशोक मौर्याची पत्नी. हिचा पुत्र तीवर. हिच्या दानाचें वर्णन अशोकानें आपल्या एका शिलालेखांत केलें आहे.

**कार्तवीर्य रट्ट**—( स. ९८० ) हा रट्ट घराण्यांतील पहिला राजा होय. याच्या बापाचें नांव नन्न असें होतें. हा जैनधर्मी व यादवांचा मांडलिक होता. प. चालुक्यांपैकीं पहिल्या तैलपाशीं याचें शत्रुत्व होतें. या सर्वांना कत्त असेंहि म्हणत. हें घराणें सौंदत्तीचें होय. याला दावरी व कन्नकैर असे पुत्र होते.

**२.** (स. १०८७) हा रट्ट घराण्यापैकीं पहिल्या सेनाचा मुलगा. दुसऱ्या कण्णकैरानंतर गादीवर आला. जैन व यादवांचा मांडलिक.

**३.** ( स. ११४३-६५ ) हा रट्टांपैकीं दुसऱ्या सेनाचा मुलगा. हा यादवांचें मांडलिकत्व झुगारून देऊन स्वतंत्र झाला. याच्या पत्नीचें नांव पद्मलादेवी. याला कत्तम चक्रवर्ति असेंहि म्हणतात.

**४.** ( स. ११९९ ) हा रट्टांपैकीं पहिल्या लक्ष्मीदेवाचा मुलगा. पत्नीचें नांव मादेवी किंवा एचलादेवी.

**कार्तिकेय**—मृच्छकटिक नाटकांतील शर्विलकाच्या भाषणांत हा चौर्यशास्त्रग्रंथाचा कर्ता होता, असा निर्देश आहे.

**कॉर्नवॉलिस**—(स. १७३८-१८०५). हा बंगालचा दुसरा गव्हर्नर जनरल होय. स. १७८६ च्या सप्टेंबर महिन्यांत मोठ्या नाखुषीनें कामावर रुजू झाला. याच्यावर प्रधानमंडळाचा पूर्ण विश्वास असल्यामुळें यास सर्वाधिकार बहाल करण्यांत आले होते. हेस्टिंग्जला आपलें पद स्थिर करण्यास जशा अनेक खटपटी कराव्या लागल्या तशा यास कराव्या लागल्या नाहींत. कॉर्नवॉलिस हा शूर व धाडसी होता तरी तैलबुद्धीचा मात्र नव्हता.

यानें आपल्या कारकीर्दीच्या पहिल्या तीन वर्षांत सिव्हिल सर्व्हिसच्या नियमांची दुरुस्ती केली. याचें धोरण जरी सौम्य होतें, तरी पण सैन्याची जय्यत तयारी ठेवण्या-

विषयीं यानें कधींच हयगय केली नाहीं. कॉर्नवॉलिसनें केवळ आपल्या वजनावर अल्प आयासांत निजामाकडून गुंतुर जिल्हा घेतला. वेलेनुसार इतरांच्या हातून काम होत नाहीं असें पाहून हा खुद्द लढाईवर जात असे. जनरल मेडोजचा पराभव झालेला ऐकतांच हा स्वतःच जाण्यास तयार झाला. मात्र या युद्धांत ऐनवेळीं यास मराठ्यांचें साहाय्य मिळालें म्हणूनच याचा बचाव झाला. या लढाईमुळें बराच मुलूख इंग्रजांच्या ताब्यांत आला. याच कारणावरून यास कंपनीकडून 'मार्किस' करण्यांत आलें.

बंगाल, बहार व ओरिसा यांमध्यें कायमधाऱ्याची पद्धत सुरू केल्यामुळें हा बराच लोकप्रिय झाला. इतर बाबतींत हा जरी सुस्वभावी होता तरी न्यायदानाच्या बाबतींत याच्याकडून हयगय केली जात असे. सर जॉन शोअरला येथें नेमून हा विलायतेस परत गेला. पुन्हां शोअर व मार्क्विस वेलस्लीची कारकीर्द संपल्यावर याची नेमणूक झाली. या वेळीं मात्र संस्थानांकडे पूर्ण लक्ष पुरवावयाचें असें ठरलें, परंतु अशा अर्थाचें पत्र पोंचायच्या आंतच हा आजारी पडला व ५ मे रोजीं गाझीपूर येथें याचा अंत झाला.

**कालपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं सत्ताविसावा सिद्ध होय. राजपूरचा राहणारा. यासच शृंगालपाल म्हणतात.

**कालभोज**—( स. ७३४–५३ ) मेवाडच्या राज्यावरील एक महत्त्वाचा पुरुष. हा दुसऱ्या महेन्द्रानंतर गादीवर आला. याचें नांव शिलालेख, दानपत्र, ऐतिहासिक पुस्तकें, व सोन्याचीं नाणीं यांवर खालीं लिहिल्याप्रमाणें वेगळालें आढळतें:

बप्प, बोप्प, बप्पक, बप्प, बप्पक, बप्पाक, बाप्प, बाप्प, व बापा ( ना. प्र. प. १. २४८-५० व टीपा १०–२१ ).

बप्प व वप्प हे दोन्ही प्राकृत भाषेंतील प्राचीन शब्द आहेत. यांचा मूळ अर्थ बाप असा आहे. याच अर्थानें वरील भिन्न भिन्न रूपांचा उपयोग प्राचीन काळापासून केलेला आढळतो ( फ्ली. गु. इं. पृ. १७८; इंडि. ॲंटि. भा. १४. ९८ ). मागाहून हा शब्द बहुमानार्थक झाला आणि नांवासारखाहि त्याचा उपयोग करूं लागले. मेवाडमध्यें याच्या पुढल्या पुष्कळ लेखांत बापा रावळ असा निर्देश मिळतो.

पण हा शब्द कोणाला उद्देशून धरावा याबद्दल संशोधक लोकांत मतभेद आहे. आणि जुन्या शिलालेखांत याचें स्थान निश्चित नाहीं. यामुळें संशोधकांचा घोटाळा होणें स्वाभाविक आहे. पण मेवाडच्या भाटांचें ख्यात, राजप्रशस्ति महाकाव्य, नैणसीचें ख्यात, यांत बाप्पाचा पुत्र खुंमाण दिला आहे आणि आटपुरच्या ( आहाड ) प्रशस्तींत कालभोजाच्या पुत्राचें नांव खुंमाण दिलें आहे. त्यावरून यालाच बाप्पा म्हणत असें ठरलें, असें ओझा म्हणतात.

यानें वि. सं. ७९१–८१० ( स. ७३४–७५३ ) पर्यंत राज्य केलें.

याचें एक सोन्याचें नाणें मिळालें असून त्यावर शिव, नन्दी व भक्त व त्रिशूळ आहेत. दुसऱ्या बाजूवर सूर्य, सवत्स धनु.

हा लकुलीश संप्रदायाचा साधु हारितराशीचा शिष्य होता.

याची राजधानी नागदा होती. हारितराशीच्या कृपेनें याला जमिनींत गाडलेले कोट्यावधि रुपये सांपडले व त्याच्या जोरावर सैन्य उभारून यानें मौर्यांपासून चितोड घेतलें.

याचा देहान्त नागदा येथें झाला. याचें समाधिमंदिर एकलिंगजीच्या मंदिरापासून एक मैलावर आजहि विद्यमान आहे. याला सध्यां बापारावळा असें म्हणतात. यानें चितोड मौर्यांपासून घेतलें, या हकीगतीवरून व सांपडलेल्या सोन्याच्या नाण्यांवरून हा प्रतापी व स्वतंत्र राजा होता, हें स्पष्ट दिसतें.

याच्या संबंधीं अद्भुत कथा बऱ्याच प्रचलित आहेत. पण त्या ऐतिहासिक माहिती मिळत नसल्याच्या निदर्शक आहेत ( रा. इ. पा. ४०४–४२० ).

**काला लोदी**—लोदी घराण्यांतील मलिक बहरामाचा हा एक मुलगा होय. याला सुलतान शाहा, फीरूज, मुहम्मद व मलिक ख्वाजा असे चार भाऊ होते. याचाच मुलगा बहलोल लोदी हा होय.

**कालिदास**—( स. ३८७–४१३ सुमारें ) याच्या चरित्राविषयीं पुढील दन्तकथा सर्वत्र प्रसिद्ध आहे. हा एक ब्राह्मणाचा मुलगा. पांच सहा महिन्यांचा असतांच आईबाप वारल्यानें एका गौळ्यानें याचें पालनपोषण केलें. हा अठरा वर्षांचा झाला तरी याला शिक्षण मिळालें नव्हतें. जेथें हा राहत असे तेथील राजाला एक उपवर कन्या असून तिचा विवाह व्हावयाचा होता. तिला अनेक वर दाखवूनहि ती कोणालाच पसंत करीना. तेव्हां राजानें वरसंशोधनाचें काम प्रधानावर सोंपविलें. प्रधानाचें व राजकन्येचें ठीक नसल्यामुळें प्रधानानें या संधीचा फायदा घेतला आणि गौळ्याच्या घरीं वाढलेल्या या ब्राह्मणकुमाराबरोबर झाल्या शास्त्रीपंडितांचा लवाजमा देऊन याला वर म्हणून राज्यकन्येकडे पाठविलें. तेव्हां याच्यावरोबरच्या

शास्त्रीपंडितांपुढेंच हात टेकावे लागल्यामुळें याच्या ज्ञानाचें प्रदर्शन होण्याची वेळच आली नाहीं आणि राजकन्येचा विवाह याच्याशीं झाला. पण पुढें दोनचार दिवसांत याचें सर्व बिंग बाहेर पडलें. पण विवाह होऊन गेल्यावर राजकन्या बिचारी काय करणार? तिनें यास कालीदेवीची उपासना करावयास सांगितली. यानेंहि देवीच्या पायाशीं धरणें धरलें व शेवटीं तर शिरच्छेदहि करण्यास तयार झाला. तेव्हां देवी याला प्रसन्न झाली. आणि याच्या मस्तकावर तिनें वरदहस्त ठेवला. तेव्हांपासून हा अत्यंत विद्वान् व प्रतिभासंपन्न कवि झाला व कालिदास या नांवानें प्रसिद्धी पावला.

देवीचा वरदहस्त प्राप्त करून हा परत आला आणि राजकन्येचीहि याच्या गुणवत्तेबद्दल खात्री झाली. पण आपला भाग्योदय करणाऱ्या राजकन्येस हा मातृवत् व गुरुवत् मानूं लागला. त्यामुळें चिडून जाऊन राजकन्येनें याला 'स्त्रीच्याच हातून मृत्यु येईल' म्हणून शाप दिला. तेव्हांपासून याच्या आयुष्याला निराळेंच वळण लागलें, आणि याचा बराच काळ वेश्यांच्या सहवासांत जाऊं लागला. एकदां सिंहलद्वीपांत आपला मित्र जानकीहरण-कर्ता कुमारदास यास हा भेटण्याकरितां हा गेला असतां तेथील वेश्येचे तोंडून 'कमले कमलोत्पत्तिः श्रूयते न तु दृश्यते' या श्लोकार्धाच्या पूर्तीकरितां राजानें मोठें बक्षिस लावल्याचें यास समजलें. यानें लागलीच 'बाले तव मुखाम्भोजात्कथमिन्दीवरद्वयम्' असें श्लोकार्ध रचून त्या समस्येची पूर्ति केली. राजानें देऊं केलेल्या बक्षिसाच्या लोभानें वेश्येनें याला गुप्तपणें ठार केलें. पण कुमारदासास संशय आला म्हणून त्यानें दरडावून विचारतांच तिनें आपला गुन्हा कबूल केला. आपल्या प्रिय मित्राचा अशा रीतीनें अंत झाल्याचें समजल्यावर राजाला अतिशय वाईट वाटलें व त्यानें दुःखाच्या भरांत कालिदासाच्या चितेवरच स्वतःस जाळून घेतलें. कालिदासास जेथें अग्नि दिला ती जागा अद्यापि सिंहलद्वीपांत माटर नांवाच्या दक्षिण प्रांतांत किरींदी नदीच्या मुखाजवळ दाखवितात, असें कै. म. म. डॉ. सतीशचंद्र विद्याभूषण यांनीं म्हटलें आहे. पण कुमारदास हा राजा सिलोनमध्यें त्या वेळीं असल्याचें सिद्ध होत नसल्यानें हें स्वीकारतां येत नाहीं.

कालिदास हा ब्राह्मणकुलांत जन्मला होता, असें दिसतें. याच्या ग्रंथांत ऋषी, विद्वान् ब्राह्मण व यज्ञकर्ते यजमान यांचीं चित्रें आपलेपणानें काढलीं आहेत. शाकुंतलांत यानें स्वतः वैदिक वृत्तांत रचलेला एक श्लोक घातला आहे. यावरून हा ब्राह्मण असणें जास्त संभवनीय दिसतें. हा मंदोसरचा रहिवासी असावा असें कल्पून म. म. हरप्रसादशास्त्री यांनीं हा दसोरा ब्राह्मण असावा, असें म्हटलें आहे. पण मंदोसरपेक्षां याचा उज्जयनीशीं अधिक संबंध दिसतो.

रघुवंशाच्या पहिल्या सर्गांतील आश्रमाचें वर्णन अगदीं आत्मीयतेनें केलेलें असून अत्यंत सुंदर साधलें आहे.

शाकुंतलांतील कण्व व मारीच यांच्या व विक्रमोर्वशीयांत च्यवनाच्या आश्रमाचें मनोहर वर्णन केलें आहे. त्यावरून आश्रमांतील पद्धतीकडे आदर्श म्हणून बोट दाखविण्याचा कवीचा उद्देश दिसतो.

कालिदासाच्या काव्यांत यानें कोठें व कशाचें अध्ययन केलें होतें याचा पत्ता लागत नसला तरी याची बहुश्रुतता व वैदिक धर्माबद्दलचा आदर मात्र चांगलाच व्यक्त होतो.

कालिदासासारखा कवि आपल्या प्रान्तांतील असल्यास प्रान्तिकदृष्ट्या अभिमान वाटणें स्वाभाविक आहे. बंगाली लेखक हा बंगाली होता असें प्रतिपादन करितात. काली ही बंगाल्यांतील प्रमुख देवता असून कालिदास असें नांव तेथें अद्यापि ठेवलें जातें. तसेंच ऋतुसंहाराचा आरंभ ग्रीष्मापासून केला असून 'आषाढस्य प्रथमदिवसे' हा मेघदूताचा आरंभहि बंगाल्यांतील चालू सौरमासांतील दिवसगणनेसारखा आहे. इत्यादि कारणांनीं कालिदास हा बंगाली होता, असें तिकडील लोक निश्चितपणें प्रतिपादतात. मुर्शिदाबादेंत गड्डाशिंगरु या गांवीं कालिदासाचा जन्म झाला. तेथें याचें स्मारक करण्याकरितां कालिदास-जन्मपीठोत्सव-कमेटी त्यांनीं स्थापन केली आहे. तिनें एक कालिदासपाठशाळा चालविली आहे. प्रतिवर्षी सरस्वती-पूजोत्सवाच्या वेळीं तेथें साहित्य-संमेलनाचा व इतर मनोरंजक कार्यक्रम करण्यांत येतो. सरकारच्या मदतीनें त्यांनीं तेथें एक तलाव खोदवून त्याला कालिदाससागर असें नांव दिलें आहे. कालिदासाला तीन स्त्रिया होत्या व त्यांच्या सहवासांत तो निरनिराळ्या ठिकाणीं राहत होता. विद्युन्माला या आपल्या पत्नीसह यानें ब्रक्षानीतला गांवीं कांहीं दिवस वास केला. श्रीपाट दोगाछिया या गांवीं यानें आपला द्वितीय संबंध व पुत्राचा विवाह केला, अशा दंतकथा बंगाल्यांत अद्यापि प्रचलित आहेत. अशी माहिती कालिदास-समितीनें प्रसिद्ध केलेल्या कालिदास-जन्मपीठसंभारअनुष्ठानपत्र या पुस्तकावरून कळून येते.

कालिदास हा काश्मीरी होता, असें एक मत बरेंच व्यवस्थितपणें लोकांपुढें आलें आहे. दिल्ली युनिव्हर्सिटीचे संस्कृतचे प्रो. लक्ष्मीधर कल्ला यांनीं बर्थप्लेस ऑफ कालिदास (कालिदासाची जन्मभूमि) या आपल्या इंग्रजी

पुस्तकांत हें मत व्यवस्थित मांडलें आहे. कालिदासाच्या प्रत्येक ग्रंथांत हिमालयाबद्दल आपलेपणानें वर्णन किंवा निर्देश आढळतो. कुमारसंभवाचा प्रारंभ हिमालयाच्या वर्णनापासून झाला आहे. मेघदूताची यक्षाची नगरी अलका ही हिमालयावर होती. विक्रमोर्वशीयांत पुरुरवा व उर्वशी यांची प्रथम भेट काश्मीराजवळ गंधमादनपर्वतावर झाली. पुढें उर्वशीचा वियोग झाल्यावर राजा त्याच पर्वतावर भटकूं लागला. रघुवंशांतील पहिल्या सर्गात दिलीप वसिष्ठाश्रमांत जातो तोहि हिमालयावरच. शाकुंतलांतील कण्व व मारीच यांचे आश्रम याच पर्वतावर कवीनें वसविले आहेत. हीं सर्व स्थळें काश्मीरांत सिंधुनदीच्या खोऱ्यांत होतीं हें सिद्ध करितां येतें. वसिष्ठाश्रमाजवळ गंगाप्रपात होता, त्या ठिकाणीं दिलीप रक्षण करीत असलेल्या वसिष्ठाच्या धेनूवर एका सिंहानें झडप घातली. कालिदासानें त्या सिंहाला 'भूतेश्वरपार्श्ववर्ती' म्हटलें आहे. काश्मीरांत वरील प्रदेशांत भूतेशतीर्थ प्रसिद्ध आहे. काश्मीरांतच सिंधु व मालिनी नद्या, शचीतीर्थ, सोमतीर्थ व ब्रह्मसर हीं तीर्थें आणि शक्रघाट हीं सांपडतात. आपल्या कथानकाच्या सोयीसाठीं शचीतीर्थ व शक्रघाट हीं हस्तिनापुराजवळ होतीं असें कवीनें वर्णिलें असलें तरी तीं नांवें त्याला पूर्वपरिचित असल्यामुळेंच सुचलीं असावीं. रघुवंशांत ( २. ३५ ) वसिष्ठधेनूवर झडप घालणारा सिंह आपणास निकुंभाचा मित्र म्हणतो. हा निकुंभ कोण, याचा टीकाकारास उलगडा झाला नाहीं. पण काश्मीरच्या नीलमतपुराणांत कुबेरानें दुष्ट पिशाचांबरोबर युद्ध करून त्यांस काश्मीरांतून हाकून देण्याकरितां निकुंभाची योजना केली होती अशी कथा आली आहे, त्यावरून कालिदासास काश्मीरांतील प्राचीन कथांचें ज्ञान होतें असें दिसतें. काश्मीरच्या कांहीं विशिष्ट रीतिरिवाजांचें व लौकिक समजुतींचेंहि प्रतिबिंब कालिदासाच्या ग्रंथांत पडलेलें दिसतें. विवाहप्रसंगीं सासूनें किंवा दुसऱ्या कोणी सौभाग्यवती स्त्रीनें वराच्या मस्तकाला माला बांधावी असा काश्मीरांत रिवाज आहे, हें तद्देशीय विवाहपद्धतीवरून दिसतें. रघुवंशांतहि इंदुमतीनें अजाच्या गळ्यांत स्वतः माळ न घालतां आपल्या सुनन्दा नामक उपमातेकडून ती घालविली आहे. तसेंच हा काश्मीरी शैव म्हणजे प्रत्यभिज्ञादर्शनाचा अनुयायी होता असें दिसतें. या दर्शनांत सदाशिव हें एकच सर्वव्यापि तत्त्व मानलें आहे. त्याचीं शिव व शक्ति हीं दोन रूपें सृष्टिनिर्माणाकरितां होतात. शक्तीच्या साहाय्यानें शिव चराचर सृष्टि उत्पन्न करतो व स्वतःहि नियतीस्तव शक्तीचें आवरण घेऊन जीव बनतो. या आवरणामुळें त्याला स्वतःचें विस्मरण पडतें. पुढें गुरूपदेशानें, अध्यात्मदर्शनाभ्यासानें किंवा इतर कांहीं कारणानें जीवाचें आवरण नष्ट झाल्यावर त्याला आपल्या पूर्व स्वभावाची ओळख ( प्रत्यभिज्ञा ) पटते व नंतर त्याचें परम तत्त्वाशीं ऐक्य होतें. स्वतःचें विस्मरण आणि पुनः ओळख हें या तत्त्वज्ञानांतील मुख्य तत्त्व हें याच्या प्रत्येक नाटकांत आहे. शाकुंतलाच्या भरतवाक्यांत यानें शंकराला परिगतशक्ति असें म्हटलें आहे. इत्यादि अनेक कारणें देऊन याचा काश्मीरशीं अत्यंत निकट संबंध असावा हें वर्णिलें आहे.

तसेंच कालिदास हा विदर्भांतील होता असेंहि दाखविण्याचा प्रयत्न झाला आहे ( J. R. A. S. 1926 पा. ७२६–एफ्. जी. पिटर्सन ). कालिदासाच्या अनेक ग्रंथांत विदर्भाचा संबंध येतो. याच्या मालविकाग्निमित्रांत विदर्भराजकन्येच्या प्रेमकथेचें संविधानक आहे. मेघदूतांतील रामगिरि म्हणजे रामटेक हें प्रसिद्धच आहे. रघुवंशांतील अजपत्नी इंदुमती विदर्भराजकन्या होती ( रघु. ६ ). 'ऋद्धां विदर्भाधिपराजधानीम्' (रघु. ५·४०), 'सौराज्यरम्यानपरो विदर्भान्' ( रघु. ५·६० ) असे विदर्भाबद्दल आपलेपणाचे निर्देश आले आहेत. कवीनें आपले ग्रंथ वैदर्भी रीतींत लिहिले. तसेंच हा विदर्भांत वकील म्हणूनहि बरेंच दिवस होता. कालिदास हा विहारी होता असेंहि एक मत गंगा नांवाच्या हिन्दी मासिकांत एकानें प्रतिपादन केलें होतें.

कै. म. म. हरप्रसादशास्त्री व प्रो. शि. म. परांजपे यांनीं बारकाईच्या तपशिलावरून हा मंदोसर व विदिशा येथील असावा असें सिद्ध केलें आहे ( शि. म. परांजपे साहित्यसंग्रह, भा. १, पृ. ९६ ).

ग्रंथ व श्रेष्ठता—मम्मटानें आपल्या काव्यप्रकाशांत यशःप्राप्ति हें काव्यनिर्मितीचें प्रमुख प्रयोजन सांगितलें आहे व त्याच्या उदाहरणार्थ कालिदासाचा प्रामुख्यानें उल्लेख केला आहे. ध्वन्यालोक हा साहित्यशास्त्रावरील सर्वमान्य ग्रंथ लिहिणारा मार्मिक व सहृदय टीकाकार आनंदवर्धन यानें तर 'जगतांत कालिदासादि दोनचार किंवा पांचसहा माणसांना फार तर महाकवि म्हणतां येईल,' असे उद्गार काढले आहेत. जयदेव कवीनें कालिदासाला 'कविकुलगुरु' ही अत्यंत श्रेष्ठ पदवी अर्पण केली आहे. अकराव्या शतकांतल्या सोड्ढल कवीनें आपल्या उदयसुंदरी नामक चम्पू ग्रंथांत निरनिराळ्या कवींचे विशेष सांगतांना याला रसेश्वर अशी संज्ञा दिली आहे. अशा या अद्वितीय कवीचा सत्कार हिंदुस्थानचा शेक्सपीयर या

शब्दानें पाश्चात्य पंडितांनीं केला आहे. अशा या थोर कवीचें जीवनचरित्र अल्पांशानेंहि उपलब्ध नाहीं ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे.

याचे पुढील ग्रंथ प्रसिद्ध आहेतः—

( १ ) ऋतुसंहार, ( २ ) मालविकाग्निमित्र, ( ३ ) कुमारसंभव, ( ४ ) विक्रमोर्वशीय, ( ५ ) मेघदूत, ( ६ ) कुंतलेश्वरदौत्य, (७) शाकुंतल, (८) रघुवंश. कुंतलेश्वरदौत्य नाटक नांवाचा अनुपलब्ध ग्रंथ याचा असल्याबद्दल क्षेमेन्द्राच्या औचित्यविचारचर्चेत ( पृ. १३९ ) निर्देश आहे.

याशिवाय सेतुबन्ध किंवा रावणवहो या प्रवरसेनाच्या नांवावर प्रसिद्ध असलेल्या प्राकृत काव्यांत याचा बराच हात असावा असें दिसतें. वरील आठ ग्रंथ कोणच्या कालक्रमानें झाले असतील हे आंकडे घालून दाखविलें आहे.

रघुवंश हें याचें काव्य अत्यंत उत्कृष्ट असून इतर काव्यांच्या मानानें साध्या भाषेंत लिहिलें असल्यानें आबालवृद्ध संस्कृतज्ञास सारखेंच प्रिय झालें आहे. त्यामुळें यावर अनेक पंडितांनीं टीका लिहिल्या असून त्यांपैकीं तेहेतीस टीकांचीं नांवें प्रसिद्ध आहेत. यामुळेंच कालिदासाचा निर्देश 'रघुकार' असा संस्कृत भाषेंतील ग्रंथकार करतात. कुमारसंभव व मेघदूत हीं काव्यें दैवी संपत्तीनें युक्त असणाऱ्या नायकांवर उभारलेलीं असल्यामुळें सामान्य वाचकाला त्यांच्याबद्दल तितकासा आपलेपणा वाटत नाहीं. शंकर व यक्ष हे वरील काव्यांचे नायक होत. यांच्यापेक्षां रघुवंशांतील दिलीपापासून अग्निमित्रापर्यंतचे तीस राजे वाचकाला तन्मय होण्याच्या दृष्टीनें सोयीचे आहेत. त्यांत क्वचित् अद्भुतपणा असला तरी त्यांबद्दल कौतुक व सहानुभूति कायम राहते. दिलीपापासून दशरथापर्यंत रघुवंशांतील राजे एक एक गुणांत श्रेष्ठ असे दाखविले आहेत. दिलीप हा भक्तिमान्, रघु दानशूर, अज प्रेमळ व दशरथ राजगुणसंपन्न होता. पण रामाच्या स्वभावांत या सर्वच गुणांचें मधुर मिश्रण झालें आहे. पण रामानंतर या घराण्यांतील गुणाला ओहोटी लागलेली दिसते. कुश व अतिथि यांची स्थिति कांहीं बरी होती, पण अतिथीनंतरच्या एकवीस पिढ्यांत कवीला वर्णन करण्यासारखा प्रसंग आढळला नाहीं. अग्निवर्णानें तर विषयमग्न होऊन आपल्या घराण्याचें यश कलंकित केलें. प्रजेची पित्याप्रमाणें काळजी घेणारा दिलीप राजा आणि प्रजेनें दर्शनार्थ धरणें धरल्यावर मंत्र्याच्या आग्रहावरून खिडकींतून एक पाय बाहेर काढून 'याच्या दर्शनानें आपली तहानभूक भागवा' असें प्रजेस सांगणारा अग्निवर्ण राजा यांतील अन्तर सहज लक्षांत येतें. कालिदासानें स्वीकारलेला वंशक्रम फक्त पद्मपुराणाशीं जमतो. पण पद्मपुराणांत कालिदासावरून घेतला आहे असें वाटतें. या काव्यांत सर्वच प्रमुख रसांचा परिपोष झाला आहे.

कालिदासानें मालविकाग्निमित्र हें नाटक लिहिलें आहे. त्यांतील अग्निमित्र हा मौर्यवंशाचा उच्छेद करून मगधसाम्राज्य बळकावणाऱ्या सेनापति पुष्यमित्राचा मुलगा. त्याचा काळ खि. पूर्व १५० वर्ष हा विद्वानांनीं निश्चित केला आहे. तसेंच याच्या नांवाचा उल्लेख प्रथम उत्तरेंतील कनोजच्या सम्राट् हर्षाचा ( स. ६०६-६४७ ) आश्रित जो संस्कृत कवि बाणभट्ट, त्याच्या हर्षचरिताच्या प्रस्तावनेंत आला आहे. तसेंच दक्षिणेंतील बदामी नामक पूर्व चालुक्यांच्या राजधानीपासून ईशान्येस १५ मैलांवर असलेल्या ऐहोळे ( याचा जुना कानडी उच्चार अय्यावोळें ) या गांवीं जुन्या जैनमंदिरांत एका शिलाखंडावर कोरलेल्या स. ६३४ च्या रविकीर्ति या जैन कवीच्या प्रशस्तींत आढळतो. या दोन मर्यादा निश्चित असल्या तरी याच्या मधल्या काळांत कालिदास केव्हां झाला असेल याबद्दल अत्यंत मतभेद आहे. तो मतभेद लक्षांत यावा म्हणून कांहीं प्रमुख लोकांचीं मतें पुढें देत आहोंत.

हा संवतारंभीं असणाऱ्या उज्जयनीच्या विक्रमाच्या दरबारांत होता, असें परंपरागत मत आहे. तेंच श्री. चिं. वि. वैद्य यांनीं प्रतिपादलें आहे. स. च्या चौथ्या शतकाचा उत्तरार्ध ( डॉ. भांडारकर ).

स. चें पांचवें शतक ( प्रो. का. ब. पाठककृत मेघदूतप्रस्तावना ). स. चें सहावें शतक (प्रो. मॅक्समुल्लरकृत हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर व स. म. हरप्रसादशास्त्री; वराहमिहिर पाहा ).

याचा आश्रयदाता कोणी शकारि विक्रमादित्य असावा, असें परंपरा व विक्रम शब्दाच्या श्लेषावरून अनुमान आहे. अभिनंदकविकृत रामचरित्रांत 'ख्यातिं कामपि कालिदासकृतयो नीताः शकारातिना' असें स्पष्ट म्हटलें आहे. अभिनंदकवीचा काल अकरावें शतक हा आहे. उज्जयनीच्या गुप्तांपैकीं पहिला चंद्रगुप्त आणि त्याचा नातू दुसरा चंद्रगुप्त यांनीं विक्रमादित्य ही पदवी धारण केली होती, असें त्यांच्या नाण्यांवरून दिसतें. तसेंच दुसऱ्या चंद्रगुप्तानें स. ३९५ च्या सुमारास काठेवाडच्या परकी शकवंशीय क्षत्रपांचा समूळ उच्छेद करून तो प्रांत आपल्या राज्यास जोडला असें शिलालेख व नाणीं यांवरून सिद्ध होतें. कौत्स शाब नांवाच्या त्याच्या एका सांधिविग्रहिक मंत्र्यानें मध्य हिंदुस्थानांत उदयगिरि येथें एक लेख कोरविला आहे. त्यांत

त्यानें आपला शब्दार्थन्यायलोकज्ञ व कवि म्हणून स्पष्ट निर्देश केला आहे ( डॉ. फ्लीट, गुप्त इन्स्क्रिप्शनस् नं. ६ ). त्यावरून विद्वान् माणसास मोठ्या हुद्यावर तो नेमी असें दिसतें. कालिदास, मेंठ इत्यादि विद्वानांप्रमाणें उज्जयनीच्या सभेपुढें त्यानें स्वतःहि परीक्षा दिली होती, असें राजशेखराच्या काव्यमीमांसेंत उद्धृत केलेल्या एका प्राचीन वचनावरून दिसतें ( काव्यमी. अ. १० ‘ इह कालिदासमेण्ठावमररूपसूरभारवयः । हरिचंद्रचंद्रगुप्तौ प्रकाशितावह विशालायाम् । ). राजाच कवि असल्यास सर्व लोक काव्य करूं लागतात आणि त्यांना त्याच्याकडून उत्तेजन मिळूं लागतें. याच्या वेळीं सुप्रसिद्ध कालिदास झाला असावा असें दिसतें.

यानें कुंतलेश्वरदौत्य नांवाचें काव्य लिहिलें होतें असें क्षेमेंद्राची औचित्यविचारचर्चा ( पृ. १४० ), भोजराजाचा शृंगारप्रकाश आणि राजशेखराची काव्यमीमांसा या ग्रंथांतील आलेल्या उताऱ्यांवरून दिसतें.

त्यावरून एक गोष्ट निश्चित होते कीं, कालिदास कुंतलदेशच्या मांडलिक राजाच्या दरबारांत वकील म्हणून गेला असतां तेथील विलासमग्न राजानें याची विशेष वास्तपुस्त केली नाहीं.

हा कुन्तलेश्वर म्हणजे चंद्रगुप्त विक्रमादित्याचा नातू वाकाटक नृपति दुसरा प्रवरसेन असावा ( ऐय्यंगारस्टडीज़ इन् गुप्त हिस्टरी पा. ५४ ). चंद्रगुप्तानें आपली मुलगी प्रभावतिगुप्ता ही वाकाटक घराण्यांतील राजा रुद्रसेन यास दिली होती. हा विवाह स. ३९५ च्या सुमारास झाला असावा, असें व्हिन्सेंट स्मिथनें दाखवून दिलें आहे. रुद्रसेन लवकरच मरण पावल्यावर त्याच्या दिवाकरसेन व दामोदरसेन या दोन पुत्रांपैकीं एक पुत्र प्रवरसेन दुसरा म्हणून गादीवर आला. पण तो अल्पवयी असल्यानें प्रभावतिगुप्ता ही प्रामुख्यानें राज्यकारभार चालवी. तिच्या वेळीं तेथें गुप्तांचें वर्चस्व होतें. तिचा पुत्र प्रवरसेन दुसरा वयांत आल्यावर स्वतः कारभार पाहूं लागला. तो कसा काय राज्यकारभार करतो हें पाहण्याकरितां चंद्रगुप्ताचा वकील म्हणून कालिदास त्याच्या दरबारीं गेला होता. तेव्हां याचा विदर्भाशीं व वाकाटक नृपति यात्रेकरितां जात असलेल्या रामटेकाशीं परिचय झाला होता असें दिसतें ( मं. त्रै. ३. २-४ पृ. ९९ ). कालिदासानें कुन्तलेश दुसरा प्रवरसेन विलासांत मग्न आहे असा चंद्रगुप्ताकडे रिपोर्ट केला, असें कुन्तलेश्वरदौत्यांतील उपलब्ध श्लोकावरून दिसून येतें.

सेतुबंध किंवा रावणवहो ( संस्कृत रावणवध ) या नांवाचें प्राकृत भाषेंत लिहिलेलें एक मोठें काव्य प्रसिद्ध आहे. तें काव्य विक्रमादित्याच्या आज्ञेनें प्रवरसेनाकरितां कालिदासानें लिहिलें, असें एक टीकाकार म्हणतो. या तिघांचा कसा संबंध असावा हें वरील कल्पनेप्रमाणें लक्षांत घेतल्यास संशयास जागाच राहत नाहीं. या काव्याच्या पहिल्या आश्वासाच्या ९ व्या पद्यांत हें काव्य राजानें गादीवर आल्यावर लवकरच रचलें, असें म्हटलें आहे. यावर टीकाकार रामदासानें प्रवरसेन म्हणजे भोजदेव असें म्हटलें आहे. विदर्भाच्या राजघराण्याला भोज अशी संज्ञा होती, असें कालिदासाच्या रघुवंशावरून दिसतें. शिवाय भरतचरित या काव्याचा कर्ता कृष्णकवि यानेंहि सेतुबंध काव्य कुन्तलेशानें रचलें, असें म्हटलें आहे ( १. ४ ). वाकाटकाच्या वंशजास कुंतलेश असें म्हणत असत. यावरून हें काव्य प्रवरसेनानें केलें आणि कालिदासानें त्याला त्या कामीं मदत केली असें ठरतें व त्यामुळें कालिदासाचा काळ निश्चित होतो. म्हणजे द्वितीय चंद्रगुप्ताच्या ( स. ३८०–४१३ ) कारकीर्दींत कालिदास झाला असावा.

‘ज्योतिर्विदाभरण’ ग्रंथाच्या बाविसाव्या अध्यायाच्या दहाव्या श्लोकांत ग्रंथ शकारि विक्रमादित्याच्या आश्रयास असणाऱ्या कालिदासानें रचला व तो त्याच्या नवरत्नांपैकीं एक होता, असें म्हटलें आहे. ग्रंथांतील कांहीं ज्योतिषविषयक उल्लेखांवरून हा ग्रंथ तेराव्या शतकांतील असावा असें मानण्यांत येतें; पण या ग्रंथकारानें वराहमिहिरानें दिलेला कलियुगारंभ मानला असल्यानें ग्रंथाचा रचनाकाल स. ५८० हा येतो. या ग्रंथांत व कालिदासाच्या काव्यांत अनेक ठिकाणीं कल्पनासाम्य आढळतें. तथापि हा अनेक दोषयुक्त ग्रंथ रघुवंशादि काव्यें करणाऱ्या कालिदासाचा नसावा, असें अनेक विद्वानांचें मत आहे ( प्रो. मिराशीकृत कालिदास, पा. ३३ ).

एकदां एका पंडितानें राजसभेंत येऊन ‘अम्भोधिर्जलधिः पयोधिरुदधिर्वारानिधिर्वारिधिः’ अशी समुद्रवाचक सहा पर्याय शब्द जोंत गुंफिले आहेत अशी ओळ म्हटली, व समस्यापूर्ति करण्याबद्दल पंडितांस आव्हान केलें. सर्व पंडित स्तब्ध बसले व त्याला जयपत्र मिळणार इतक्यांत कालिदासानें पुढें होऊन खालीं दिल्याप्रमाणें श्लोक पुरा केला:

अम्बा कुप्यति तात मूर्ध्नि विधृता गङ्गेयमृत्सृज्यताम् ।
विद्वान् षण्मुख सन्ततं मयि रता तस्या गतिः का वद ॥
कोपाटोपवशाद्विरुद्धवदनः प्रत्युत्तरं दत्तवान् ।
अम्भोधिर्जलधिः पयोधिरुदधिर्वारांनिधिर्वारिधिः ॥

एके दिवशीं कुमार कार्तिकेयानें श्रीशंकराला म्हटलें, ‘बाबा, तुम्ही या गंगेला डोक्यावर चढविलेली पाहून आईला फार राग आला आहे.’ श्रीशंकरांनीं उत्तर केलें, ‘अरे, पण जी सदैव माझ्यावर प्रेम करते तिनें कोठें जावें?’ त्याबरोबर कार्तिकेयाला राग येऊन त्याच्या सहाहि मुखांतून ‘अम्भोधिर्जलधिः पयोधिः’ इत्यादि प्रकारें सागरवाचक शब्द बाहेर पडले.

ईश्वरी कृपा नसली तर विद्या संपादन करण्यास अत्यंत श्रम पडतात, हें माहीत असल्यानें कालिदास गरीब अज्ञ ब्राह्मणास राजदरबारीं पारितोषिक मिळविण्यास मदत करीत असे. एकदां एक ब्राह्मण राजसभेंत आला, त्याला पुरुषसूक्ताची पहिलीच ओळ येत होती. तेवढी त्यानें सभेंत म्हणून दाखविली, पण तेवढ्यानें राजा थोडाच संतुष्ट होणार! कालिदासानें ब्राह्मणाचें भांडवल संपुष्टांत आलें हें ताडलें आणि पुढें होऊन म्हणाला—‘महाराज, या ब्राह्मणानें आपली मोठ्या खुबीनें स्तुति केली आहे. त्याचा आशय असा––

सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात्।
चलितश्चकितश्छन्नस्तव सैन्ये प्रधावति॥

‘राजा, तुझें सैन्य शत्रूवर चाल करीत असतां शेष पृथ्वीच्या भारानें स्वस्थानापासून चळतो, इंद्र चकित होतो, व सूर्य धुळीनें झांकला जातो.’ या श्लोकांत कालिदासानें मोठ्या खुबीनें यथासंख्य अलंकार साधून राजाकडून त्या गरीब ब्राह्मणास मोठें पारितोषिक मिळवून दिलें.

कालिदासाच्या ग्रंथांत पुढील अशुद्ध प्रयोग सांपडतात. ‘लावण्य उत्पाद्य इवास यत्नः’ (कुमार. १. ३५). ‘तेनास लोकः पितृमान् विनेत्रा’ (रघु. १४. २३). या ठिकाणीं आस हें रूप ‘बभूव’ असें पाहिजे. अस् या दुसऱ्या एका धातूचें किंवा आस हें विभक्तिरूपक अव्यय म्हणून या रूपाची काव्यालंकारसूत्रवृत्तिकार वामनानें व्यवस्था लावण्याचा प्रयत्न केला आहे. ‘कामयान-समवस्थया तुलाम्’ (रघु. १९. ५०). येथें ‘कामयान’ चूक असून कामयमान असें पाहिजे. ‘तं पातयां प्रथममास पपात पश्चात्’ (रघु. ९. ६१). ‘प्रभ्रशयां यो नहुषं चकार’ (रघु. १३. ३६). ‘संयोजयां विधिवदास समेतबन्धुः’ (रघु. १६. ८६). पातयामास, प्रभ्रशयांचकार, संयोजयामास अशीं अखंड रूपें पाणिनीच्या व्याकरणाच्या दृष्टीनें शुद्ध आहेत. भाषेच्या अत्यंत कसोशीनें उपयोग करणाऱ्या कालिदासानें हे प्रयोग व्याकरणदृष्ट्या चूक असले तरी तत्कालीं चालू असल्यामुळें सहज केले असावेत. अश्वघोषाच्या बुद्धचरित्रांतहि असे कांहीं प्रयोग आढळतात.

कालिदासाच्या काव्यांत आलेल्या शास्त्रीय वाङ्मयांतील विविध निर्देशांवरून व पारिभाषिक शब्दांवरून याचें खोल ज्ञान व बहुश्रुतता चांगलीच व्यक्त होते. वेद, पुराणें, रामायणासारखे ग्रंथ, गायनादि विविध कला, राजनीति, इतिहास, भूगोल, अनेक प्रकारचे जगांतील व्यवहार, शिष्टाचार यांचें यांनीं जागोजाग इतक्या चांगल्या प्रकारें ग्रंथन केलें आहे कीं, त्या विषयांचें विशेष ज्ञान असल्याशिवाय इतकें सूक्ष्मपणें लिहितां येणार नाहीं हें सहज पटतें. केव्हांहि पाल्हाळ न करितां मनांतील आशय मोजक्या शब्दांत व्यक्त करण्याची कला कालिदासाशिवाय इतर प्रसिद्ध कवींत आढळत नाहीं, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. तसेंच थोडा रसिकपणा जवळ असल्यानें अल्पज्ञानानें कालिदासाच्या शब्दांतील आशय आपल्या ध्यानीं येईल असेंहि कोणीं समजूं नये.

हा मोठा रंगेल व विनोदी स्वभावाचा होता यांत शंका नाहीं. याच्या सर्व ग्रंथांत शृंगाररसाला प्राधान्य आहे. म्हणून याला एका सुभाषितांत ‘कवितादेवीचा विलास’ म्हणून वर्णिलें आहे. नाटकांतील विविध प्रसंग व विशेषतः विदूषकाचें पात्र निर्माण करण्यांत याचा विनोदी स्वभाव दृष्टीस पडतो. हा मोठा मोकळ्या मनाचा होता. कोणाबरोबरहि सात पावलें चाललें अथवा थोडें संभाषण केलें कीं मैत्री होते, असें यानें म्हटलें आहे (कुमार. ५. ३९; रघु. २. ५८). पुरुषांचें स्त्रियांवरचें प्रेम चंचल असेल पण त्यांचें मित्रप्रेम चिरस्थायि असतें (कुमार. ४. २८), या याच्या उक्तीवरून याच्या मित्रप्रेमाची कल्पना येते. याचें हृदय अत्यंत कोमल होतें. दिवसा सूर्यप्रकाशानें निस्तेज झालेल्या चंद्राच्या कोरीकडे पाहून याला अत्यंत दुःख होई (कुमार. ५. ४८). समाजांतील धीवरासारख्या हलक्या दर्जाच्या लोकांचींहि चित्रें यानें मोठ्या मार्मिकपणें रंगविलीं आहेत, यावरून याची सूक्ष्मदृष्टि व कला दिसून येते. कोणत्याहि व्यक्तीच्या स्वभावांतील मर्म हुडकून काढण्यांत याचा हातखंडा असावा. नाहींतर शाकुंतलांतील घटकेंत पगडी फिरविणाऱ्या शिपायाचें पात्र याच्या हातून निर्माण झालें नसतें. याला गुणाबद्दल आदर होता, व्यक्तीबद्दल नव्हता, हें याच्या ‘वृत्तं हि महितं सताम्’ (कुमार. ६. १२) या उक्तीवरून दिसून येईल. हा मोठा विनयशील, स्वाभिमानी आणि निर्भय दिसतो. हिंदुस्थानचा किंबहुना जागतिक कवि म्हणून दाखविण्यासारखा हा थोर कवि आहे. गोएटे-

सारख्या जगन्मान्य कवीनेंहि याचे ग्रंथ डोक्यावर घेऊन नाचावें यापेक्षां याच्या जागतिक मोठेपणास आणखी पुरावा कोणता पाहिजे !

२. गुजराथी कवि. याचा जन्म स. १७२५ त झाला. याची बरीच प्रसिद्धी यानें लिहिलेल्या प्रल्हाद-आख्यानानें झाली. या आख्यानाशिवाय सीतास्वयंवर, ध्रुवाख्यान, ईश्वर, विवाद इत्यादि याचीं काव्यें चांगलीं वठलीं आहेत.

**कालिदास त्रिवेदी**—एक हिंदी कवि होय. हा अंतर-वेदचा राहणारा असून कान्यकुब्ज ब्राह्मण होय. हा वि. सं. १६८७ (स. १६२९) मध्यें गोवळकोंड्याच्या स्वारींत औरंगजेबाच्या सैन्यांतील एका राजाबरोबर दक्षिणेस आला होता. या लढाईचें आणि औरंगजेबाच्या प्रशंसेचें वर्णन यानें केलें आहे. यानें वि. सं. १६९१ मध्यें 'वधू-विनोद' हा ग्रंथ लिहिला. नायिकाभेद आणि नखशिख हीं पुस्तकें याचीं होत. याच्या 'राधामाधव बुधमिलन-विनोद' या ग्रंथाचा शोध लागला आहे. याचा 'कालिदास हजारा' हा ग्रंथ फार प्रसिद्ध आहे; त्यामध्यें जुन्या २१२ कवींच्या कविता आलेल्या आहेत. आणि जंजिरा हाहि यानेंच लिहिला. याचा मुलगा आणि नातू हे दोघेहि चांगले कवि होऊन गेले. त्यांचीं नांवें अनुक्रमें कवीन्द्र आणि दुलह हीं होत.

**कालीकुमारी**--बुंदेलखंडचा राजा चंपतरायाची ही पत्नी होय. नवरा मेला असें कळतांच हिनेंहि आपला कंठ चिरून घेतला ( मु. रि. भा. २, पृ. २७० ).

**कावजी कोंढाळकर**--याचें घराणें कान्होजी जेध्याचें ऋणानुबंधी आणि जिवास जीव देणारें होतें. कान्होजीचा प्रतिस्पर्धी जो बांदल देशमुख त्याची व कान्होजीची झुंज (लढाई) होऊन त्या झुंजींत कावजीचा वडील भाऊ पोसजी हा ठार झाला. तेव्हां कान्होजीनें कावजीस आश्रय दिला; आणि पुढें निजामशाहींत व आदिलशाहींत त्यास मनसबदारी मिळाल्यावर कान्होजीनें कावजीसहि बढती देऊन गौरविलें. सन १६३५ त माहुलीच्या वेढ्यानंतर कान्होजी शहाजीकडे आला आणि त्याजबरोबर कर्नाटकांत गेला. या वेळीं दादाजीकृष्ण लोहोकरे, बाघोजी तुपे वगैरे मंडळीप्रमाणें कावजीहि त्याजबरोबर असावा. स. १६५९ त अफजलखानप्रसंगीं कान्होजीनें वतनावर पाणी सोडून शिवाजीची नोकरी बजावली. त्या वेळीं कान्होजीबरोबर कावजीहि होता. कान्होजीच्या सैन्यानें प्रथम जावळीस आणि बांदलाबरोबर पारघाटांत अफजलखानाच्या सैन्याशीं चांगलें तोंड दिलें. त्या कामीं कावजीनें आपलें शौर्य गाजविलें.

शिवाजीनें कावजी व बाघोजी तुपे या दोघांसहि कर्तीं माणसें पाहून कान्होजीपासून मागून घेतलें ( जे. श. ), आणि त्यांस पायदळावर हजारी नेमिलें ( स. १६५९ ). स. १६६० पासून शाहिस्तेखान पुण्यास राहून अंमल चालवूं लागला. त्याचे दोन सरदार बुलाखी आणि नामदारखान हे कुलाबा जिल्ह्यांत धामधूम करीत होते. कावजीची नेमणूक नुक्तीच देहरी गडावर झालेली होती. त्यास बुलाखीनें वेढा दिला. त्या वेळीं यानें पराक्रम करून वेढा उठविला ( स. १६६१ ) ( संभाजी कावजी कोंढाळकर पाहा ).

**कावन**—( २ कामदेव पाहा. )

**कावेली व्यंकट बोरय्या**—( स. १७२५ मृत्यु ) एक तेलंगी ब्राह्मण कवि. याचा जन्म एलोर येथें शके १५९८ ( स. १६७६ ) त झाला. यास लहानपणापासूनच संस्कृत कविता करण्याचा नाद असे. फार्सी व इंग्रजी भाषेचा थोडासा अभ्यास करून यानें इंग्रज फौजेंत पगार वांटण्याची नोकरी पत्करिली. टिपूबरोबर झालेल्या युद्धांत हा मॅकेन्झीसाहेबाबरोबर होता, त्यामुळें युद्धांतील सर्व वृत्तांत यास पद्यरूपानें करतां आला. मॅकेन्झीला इतिहास लिहिण्यास लागणारें साहित्य यानेंच पुरविलें. श्रीरंगचरित्र यांत श्रीरंगपट्टणाचा इतिहास आहे. हा नकाशेहि काढीत असे. स. १७२५ त अपस्मार रोगानें हा अल्पवयीच वारला. मॅकेन्झीनें याचा एक पुतळा मद्रासच्या वाळवंटावर उभा केला आहे, अशी माहिती अर्वाचीन कोशकार देतात ( अत्तालू रूपय्या पाहा ).

**काशी कवि**—मराठी कवि. याचा ग्रंथ किंचित्-रामायण. अवचितसुत काशी व हा एकच किंवा भिन्न ? ( सं. सू. ).

**काशी त्रिमल**—हा मथुरेंत मुसलमानापासून संभाजी राजाचा बचाव करण्यांकरितां संभाजीबरोबर जेवला असावा व यानें त्याला दक्षिणेंत सुरक्षित पोंचविलें ( कृष्णाजी त्रिमल पाहा ).

**काशीदास**—हा एक बंगाली कवि होऊन गेला. यानें कृत्तिवासाच्या साहाय्यानें महाभारत व रामायण यांचें बंगालींत भाषान्तर केलें.

**काशीनाथ ऊर्फ बाबा पाध्ये**—(स.१७९०–१८०६) काश्युपाध्यायाचा नातू, यज्ञेश्वराचा पुतण्या व अनंतोपाध्यायाचा ज्येष्ठ पुत्र. यास लोक बाबा पाध्ये म्हणतात.

याच्या आईचें नांव अन्नपूर्णा. याचा भाऊ विठ्ठल. यानें आपली एक मुलगी आवडी नांवाची मोरोपंत कवीच्या रामकृष्ण नांवाच्या मुलास दिली होती.

हा जातीचा कऱ्हाडी ब्राह्मण असून पंढरपूर येथील राहणारा होय.

रत्नागिरी जिल्ह्यांतील गोळवली नांवाचा गांव याच्या वंशजांस अग्रहार म्हणून दिला गेला आहे.

धर्मशास्त्रावर धर्मसिंधुसार नांवाचा यांचा ग्रंथ धर्मसिंधु या नांवानें प्रसिद्ध आहे ( स. १७९१ ).

धार्मिक बाबतींत याच्या धर्मसिंधु ग्रंथाचा दाक्षिणंत फार उपयोग केला जातो. याचें मराठींत भाषांतर झालेलें आहे. या ग्रंथाचे तीन भाग केलेले आहेत. पहिल्या विभागांत सर्वसामान्य कालाविषयीं माहिती आलेली आहे. उत्सव, उपवास, वगैरेंचे नियम दुसऱ्या भागांत आणि संस्कार, गर्भाधान, लग्न, गोत्रप्रवर वगैरेंचें स्पष्टीकरण तिसऱ्या भागांत केलेलें आहे. याशिवाय यानें प्रायश्चित्तेन्दुशेखर, वेदस्तुति टीका, विठ्ठलऋङ्मन्त्रसारभाष्य आणि कुण्डदिक्पाल असे ग्रंथ लिहिले आहेत.

**काशीनाथशास्त्री अष्टपुत्रे**—हा गोविंदाचार्य अष्टपुत्रे यांचा पुत्र होय. हा मोठा विद्वान् असून काशींत जाऊन राहिला होता. तेथें यानें पहिल्या गंधाचा मान मिळविला.

**काशीबाई पेठे**—त्रिंबक अमृतेश्वर पेठे यांची बायको. दुसऱ्या बाजीरावास पेशवाई मिळाल्यापासून त्याजकडे ही जात येत असे आणि त्यांचे मर्जीप्रमाणें वागून त्यास हरवक्त खूष ठेवी. श्रीमंत वसईहून परत आल्यावर त्रिंबकरावांचा सरंजाम जप्त केला आणि हिला वर्षाचे दोन हजार रुपये ठरवून दिले. पुढें हिच्या गैरचालीबद्दल नवऱ्यानें बाजीरावाकडे हकीकत कळविली. त्यावरून हिला कैद करून त्रिंबकचे किल्ल्यावर पाठविलें. नंतर ही ता. २७–९–१८१२ रोजीं मेली ( म. रि. उ. ३ पृ. ५५७ ).

**काशीबाई पेशवे**—( मृत्यु २७–११–१७५८ ) ही थोरल्या बाजीरावाची पत्नी व चासकर जोशी यांच्या घराण्यांतील महादजीपंत यांची मुलगी. हिचें लग्न स. १७११ चे सुमारास झालें. हिचें माहेरचें नांव लाडूबाई. पंतांचा व बाळाजी विश्वनाथाचा फार स्नेह होता. ही पतीबरोबर लढाईस जात असे. हिचा स्वभाव जरी शांत होता तरी ही सासूसारखी राजकारणांत कुशल नव्हती व त्यामुळेंच मस्तानीचें प्रस्थ माजलें. बाजीराव वारल्यावर ही रावेरहून परत आली. ही पतिनिष्ट, गरीब व शांत होती. हिनें स. १७४२ त रामेश्वराची व स. १७४६ त काशीची यात्रा केली. हिला घरांत ताई म्हणत.

**काशीबाई प्रतिनिधि**—( स. १७९८ सुमार ) ही भवानराव प्रतिनिधींची बायको होय. ही हिम्मतवान् व पराक्रमी असून हिनें करवीरकरास कोयनेवर ( कऱ्हाड ) अडवून धरलें. परोपरी विनवणी केली असतां ही करवीरच्या फौजेस आपल्या मुलुखांतून पुढें जाऊं देईना, तेव्हां कोल्हापूरकर छत्रपतींनें ता. २१–७–१७९८ रोजीं खुद्द कऱ्हाडवरच चाल केली. पण त्यांत त्याचा मोड झाला ( म. रि. उत्तर वि. ३, पृ. ८० ).

**काशीबाई भोसले**—ही शिवाजी महाराजांची सातवी पत्नी होती. हिचें लग्न शके १५७९ वैशाख शु. ५ (ता. ८ एप्रिल १६५७ ) रोजीं झालें. ही जाधवरावांची कन्या होय.

**२.** ही बिंबाजी भोसल्याची बायको व पहिल्या रघूजीची आई होय. बिंबाजी वारला तेव्हां रघूजी फार लहान असल्यामुळें हिला रघूजीविषयीं फार काळजी वाटे. हिनें त्याच्याकरितां देवांस व साधुसंतांस बरेच नवससायास केलेले आढळतात.

ब्रह्मेंद्रस्वामींनें हिला लिहिलेलीं बरींच पत्रें उपलब्ध आहेत ( ब्र. स्वा. च. पा. २९६–२९७).

**काशीबा गुरव**—सावता माळ्याची कविता लिहून ठेवणारा.

**काशीराज पंडित**—याच्या पित्याचें नांव शिवाजी. हा महाराष्ट्रीय ब्राह्मण असून दिल्लीचा वजीर सफदरजंग याच्या पदरीं प्रथम नोकरीस राहिला. सफदरजंगाची याचेवर विशेष मेहेरबानी होती. सफदरजंगानंतर हा सुजाउद्दौल्याच्याहि मर्जीत होता. याची दरबारांत मोठी प्रतिष्ठा व वजन असे. स. १७६१ मध्यें पानिपत येथें जें मराठे व दुराणी यांचें घनघोर युद्ध झालें त्या वेळीं हा तेथें हजर होता. यानें सेनापति भाऊसाहेब व विश्वासराव यांचीं प्रेतें शोधून काढून त्यांस चंदनादि काष्टें जमवून अग्नि दिला व त्यांची उत्तरक्रिया हिंदु धर्माप्रमाणें उत्तम प्रकारें केलीं व या प्रकारानें मराठ्यांवर उपकार केले. स्वतः काशीराज म्हणतो, "आणिक सेवा न घडली ! ईश्वरें हाच आम्हांस नेमला होता ! भगवदिच्छेस उपाय काय ?" पानिपतच्या लढाईचा वृत्तांत यानें फारशी भाषेंत लिहिला आहे. त्याचें इंग्रजी भाषांतर जेम्स ब्राऊन यानें स. १७९१ मध्यें 'एशियाटिक रिसर्चेस्' या ग्रंथांत प्रसिद्ध केलें. तें ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचें आहे. याच्या बखरींतील कांहीं महत्त्वाच्या चुका रा. राजवाडे यांनीं दाख-

विल्या आहेत ( प्रस्तावना १०७ ). परंतु त्यांनींहि शेवटीं असें म्हटलें आहे कीं, पानपतच्या शेवटल्या युद्धांत हा हजर होता. यानें स्वदृष्टीनें पाहिलें तेवढें बहुधा खरें आहे.

विविधज्ञानविस्तारांत याच्या पानपतच्या बखरीचें भाषांतर प्रसिद्ध झालें आहे. हा मुसलमानांचा पक्षपाती दिसतो. सुजाउद्दौला व भाऊसाहेब पेशवे यांचें बोलणें-चालणें याचेमार्फत चालत असे.

**काशीराजस्वामी**—प्रसिद्ध केशवस्वामींचे हे गुरु होत.

**काशीराम**--हा हिंदी 'कनक मंजरी'चा कर्ता होय. औरंगजेबाचा सुभेदार जो निजामतखाँ त्याचा हा आश्रित होता. याचा जन्म स. १६५७ मध्यें झाला. यानें वरील ग्रंथांत ( काव्यांत ) धनश्रीरसाह राजा आणि त्याची बायको कनकमंजरी यांचें कथानक वर्णिलें आहे.

२. व्यंकटराव काशीचा पिता.

**काशीरामदास**—( स. १६००-७८ ) एक बंगाली कवि. हे बंगाल्यांतील बरद्वान जिल्ह्यांतले राहणारे. यांचा जन्म ब्राह्मणी नदीकांठच्या ' सिंर्जी ' गांवीं झाला. याच्या कृष्णदास नांवाच्या भावानें श्रीकृष्णचरित्रा-वर कविता लिहिल्या असून दुसऱ्या भावानें जगन्मंगल नांवाचें काव्य लिहिलें आणि त्यांत श्रीजगन्नाथाची स्तुति केली. यानें पाळलेल्या नंदराम नांवाच्या मुलानें महाभार-ताचें द्रोणपर्व बंगालींत लिहिलें. यांनीं आदि, सभा, वन, विराट् हीं पर्वें लिहिलीं. यांचे ग्रंथ जरी यांनीं पूर्ण केले नसले तरी यांचें भारत बंगाल्यांत घरोघर श्रद्धेनें वाचलें जातें. शिवाय यांनीं भारतपुराण म्हणूनहि एक ग्रंथ लिहिला. हे बंगाल्यांतील आवासगड ( मिदनापूर ) येथें शिक्षक होते. सिंर्जीच्या एका तलावाला यांचें स्मरणार्थ 'केशे-पुकुर ' असें नांव दिलें आहे. यांचे स्मारक करण्याची वंगीय साहित्य-परिषद् खटपट करीत आहे ( क. कौ ७ ).

**काशीराव गुप्ते**—हा नागपूरकर भोसल्यांच्या सर-दारांपैकीं विनायकराव गुप्ते यांचा वंशज. याच्या पित्याचें नांव राजेश्वर. यानें नागपूरकर भोसले यांची बखर लिहिली.

**काशीराव गोखले**—हा बाजीरावाचा एक लष्करी सरदार कृष्णा आणि तुंगभद्रा यांच्या दुआबांतील प्रदेशाचे संरक्षणार्थ होता, असें मन्रो आपल्या पत्रांत लिहितो. याच्या हाताखालीं घोडदळ व पायदळ फौज चांगली होती. ता. १३ जूनच्या तहानें दुआबांतील हा प्रदेश बाजीरावानें इंग्रजास लिहून दिला, आणि ' तो ताब्यांत घेण्यास इंग्रज फौजा येतील तर तो त्यांच्या हवालीं करूं नये,' अशी बाजीरावानें यास आंतून ताकीद दिली होती. प्रदेश ताब्यांत घेण्याची कामगिरी मन्रो यांजकडे होती. त्यामुळें मन्रो यास मुख्यतः याशींच लढावें लागलें. नवलगुंद इंग्रजांनीं घेतलें त्यावर हा चालून आला. याची व मन्रोची डिसेंबर स. १८१७ त बरीच लढाई झाली. नवलगुंदच्या ठाण्यांत मन्रोनें म्हैसूरचा रहिवासी रामराव यास किल्लेदार नेमिलें. याचा मुलगा गोविंदराव गोखले यानें ता. १९-१२-१८१७ रोजीं रामरावावर चाल केली, पण रामरावानें नवलगुंदच्या बाहेर येऊन त्याचा पाडाव केला. त्या वेळीं हा बदामी येथें होता. तेथून हा गोविंद-रावाचे मदतीस धांवून आला. इतक्यांत इंग्रज फौजांनीं येऊन यास नवलगुंदांतून घालवून दिलें. नंतर इंग्रजांनीं गदग, डंबळ, हुबळी वगैरे ठाणीं घेतलीं. या कामीं इंग्रजांना यानें सारखा त्रास देऊन त्यांचा पिच्छा पुरविला. ता. १८-१-१८१८ रोजीं बदामीचें ठाणें इंग्रजांचे हातीं पडलें. पुढें मन्रो बेळगांवावर आला. तेव्हां हा कृष्णा उतरून भीमेवर आला ( म. रि. उ. ३, पृ. ५३७ ).

**काशीराव होळकर**—होळकराचा औरस पुत्र. तुकोजीच्या मरणानंतर गादीविषयीं भांडण जुंपलें. तेव्हां यानें शिंद्यांच्या मदतीनें सर्वांचा पाडाव केला. याच्या-नंतर यशवंतराव हा होळकर घराण्याचा मुख्य बनला. यास व याच्या बायकोस यशवंतरावानें मारेकरी घालून ठार मारलें.

**काशीविलास क्रियाशक्ति**—बुक्करायाचा मुलगा दुसरा हरिहर याचा हा कुलगुरु होता. माधवमंत्र्याचाहि हा गुरु होता. हरिहराचा कुलगुरु या नात्यानें याचा प्रथम उल्लेख स. १३७८ च्या ( श. १३०० कालयुक्त, मार्गशीर्ष ) डिसेंबरांत कोरलेल्या ताम्रपटांत सांपडतो ( एपि. कर्ना. व्हा. ५, ले. २५६, पा. ५२१ ). पण स. १३८१ च्या सुमारास रचलेल्या यज्ञतंत्रसुधानिधीवरून सायणास त्यानें आपला कुलगुरु नेमल्याचें दिसतें ( BBRAS. डॉ भाऊ दाजी मेमोरियल, पा. १-२ ). सायण मरण पावल्यावर हरिहरानें क्रियाशक्तीला पुनः कुल-गुरु नेमल्याचा आधार सांपडतो. स. १३९८ (श. १३२० बहुधान्य) व १३९९ (श. १३२१ प्रमाथी) सालीं दिलेल्या दोन ताम्रशासनांत हरिहरानें याचा उल्लेख 'राजराजगुरु पितामह ' असा केला आहे ( रिपोर्ट ऑन् दि वर्किंग ऑफ दि म्हैसूर अर्क्यालॉजिकल डिपा. १९११-१२,पा. ४८). स. १४०४ मध्यें ( श. १३२६ तारण ) हरिहर मरेपर्यंत

हाच कुलगुरु होता असें दिसतें. स. १४०३ मध्यें ( श. १३२५ सुभानु ) क्रियाशक्ति हयात असून त्या वेळीं याचा उल्लेख 'श्रीमत् क्रियाशक्ति गुरुमुनीश्वर' असा आढळतो ( एपि. कर्ना. व्हा. ६, ले ५२, पा. १८३ ). एका वेळीं दोन कुलगुरु असत असें, सायणहि कुलगुरु होता अशा निर्देशावरून वाटतें.

**काश्मीरचीं राजघराणीं**-(१) **कर्कोटक घराणें**- १ दुर्लभवर्धन ( स. ६०१-६३७ )-२ दुर्लभक ( स. ६३७-८७ )-३ चंद्रापीड ( स. ६८७-९५ )-४ तारापीड ( स. ६९५-९९ )-मुक्तापीड ऊर्फ ललितादित्य ( स. ६९९-७३५ ) हे तिघे सख्खे भाऊ होते. -६ कुवलयापीड ( स. ७३६ )-याचा भाऊ. -७ वज्रापीड ( स. ७३६-४३)-कुवलयापीडाचे पुत्र ८ संग्रामपीड (स.७४३-७५०) ९ ललितापीड ( चिप्पड जयापीड ऊर्फ बृहस्पति )-याचे पुत्र दोन-उत्पलापीड व अजितापीड-अनंगापीड. हे सर्व अल्पवयी असून चिप्पड जयापीडाचा मामा उत्पल याच्या हातांत सर्व सत्ता होती. अनंगापीडाला पदच्युत करून उत्पलाचा पुत्र अवंतिवर्म्यानें गादी बळकावली ( स.८५५ ).

(२) **उत्पल घराणें**--१ अवंतिवर्मा (स.८५५-८४)- २ शंकरवर्मा ( स. ८०४-९०२ )-याला दोन अल्पवयी पुत्र-गोपाळवर्मा व संकटवर्मा. यांचा कारभार यांची आई सुगंधा पाहत असे ( स. ९०२-०४ ).

(३) **वीरदेव वंश**—यशस्करदेव (स. ९४०-४८)- संग्रामदेव ( स. ९४९ ).

(४) **दिविरघराणें**—पर्वतगुप्त ( स. ९५०-९५८ ), क्षेमगुप्त ( स. ९५८-७२ ) राणी दिद्दा-अभिमन्यु(स. ९७३)- तीनपुत्र-नंदिगुप्त ( स. ९७५ )-त्रिभुव गुप्त ( स. ९८० )- भीमगुप्त. क्षेमगुप्ताची राणी दिद्दा ही आपल्या मुलांचा व नातवांचा कारभार पाहत असे. त्यांच्या मागून तिनें स. १००३ पर्यंत स्वतः राज्य केलें.

(५) **लोहर घराणें**—संग्रामराज, हा दिद्दाचा भाचा ( स. १०२९ )-अनंतराज ( स. १०५९ )-कलश ( स. १०७९ ), याला दोन पुत्र हर्ष व उत्कर्ष, प्रथम उत्कर्ष ( स. १०८९ )-नंतर हर्ष ( स. ११०१ ). दुसऱ्या शाखेंतील उच्चल ( स. ११११ )-भाऊ सुस्सल ( स. ११२८ )-हर्षाचा पुत्र मारला गेला. हर्षाचा पुत्र भिक्षु ( स. ११३० )-नंतर सुस्सलपुत्र जयसिंह ( स. ११४८ -११५१ ).

नंतर लहानशा संस्थानाच्या रूपांत असणारें काश्मीरचें राज्य कोटा नांवाच्या विधवा हिंदु राणीपासून स. १३३९ मध्यें शहा मीर्झा ऊर्फ शंसुद्दीन पहिला नांवाच्या धाडसी मुसल्मानानें जिंकलें.

(६) **मुसलमान घराणें**—शाहा मीर्झा शंसुद्दीन १ ला (स. १३४६) याला जमशीद, अलीशेर अलाउद्दीन, शीरशामक शिहाबुद्दीन, हिंदालकुत्बुद्दीन असे मुलगे होते (हे एकानंतर दुसरा या क्रमानें गादीवर आले)-२जमशीद (स.१३४९), ३ अली शेर-अलाउद्दीन ( स. १३५०-४ ), शीरशामक शिहाबुद्दीन ( स. १३५९ )--५ हिंदालकुत्बुद्दीन ( स. १३७८ )-६ शिकंदरबुतशिकन् ( स. १३९३ ९४) ( हिंदाल कुत्बुद्दीनचा मुलगा. याला हैबतखान नांवाचा भाऊ होता. )-७ मीरखान अलीशाह ( स. १४१६ ) ( सिकंदर बुतशिकनचा मुलगा )-८ शाहीखान झैनुल-आबिदीन ( स. १४२०. सिकंदर बुतशिकनचा दुसरा मुलगा )-९ हाजीखान हैदरशाह ( स. १४७०; यास आदमखान व बहरामखान असे भाऊ होते )-१० हसन-शाह ( स. १४७२; हाजीखान हैदरशहाचा मुलगा )- ११ मुहम्मदशाह ( स. १४८९, १४९९, १४९७-९८, १५२९; हसनशाहाचा मुलगा )-१२ फत्तेशाह ( स. १४८९-१४९८;आदमखानाचा मुलगा)-१३ इब्राहीम १ ला ( स. १५२६. अकरावा राजा मुहम्मदशाहाचा मुलगा ) -१४ नाझुकशाह ( स. १५२७, १५४०; बारावा राजा फत्तेशाहाचा मुलगा. याला इस्कंदरखान नांवाचा भाऊ होता )--१५ शंसुद्दीन २ रा ( स. १५३४-३५. अकरावा राजा मुहम्मदशाहाचा मुलगा व तेरावा राजा इब्राहीम पहिल्याचा भाऊ)--१६ मीर्झाहैदर ( स. १५४१--५१. यानें चौदावा राजा नाझुकशहापासून राज्य बळकाविलें)--१७इब्रा-हीम दुसरा ( स. १५५२. चौदावा राजा नाझुकशाहाचा मुलगा )--१८ इस्माईल ( स. १५५५. चौदावा राजा नाझुकशाहाचा दुसरा मुलगा )--१९ हबीब ( स. १५५७ --१५६१. अठरावा राजा इस्माईलचा मुलगा ).

( Cambridge History of India ).

**काश्यप मतङ्ग**—चीनच्या मिंगटी राजानें भारतांत बौद्ध धर्माचें ज्ञान संपादण्याकरितां पाठविलेल्या पंडितांनीं याला चीनमध्यें नेलें. चिनी राजाच्या निमंत्रणावरून चीन-मध्यें जाणारा पहिला धाडसी धर्मोपदेशक हा होय. हा मगध प्रदेशांतील श्रमण असून चीनच्या राजाचें निमंत्रण आलें तेव्हां हा गांधारांत म्हणजे सध्यांच्या अफगाणिस्थानांत होता. तेथून हा तिबेट-मार्गें चीनकडे प्रवास करण्यास निघाला. त्या वेळचा तिकडचा प्रवास फारच कठीण होता. ज्या मार्गानें प्रवास करावयाचा तो मार्ग डोंगराळ व वाटेंत गोबीचें रण तुडवावयाचें. दहाबारा मंडळी निघाली तर मुक्कामास पोंचेपर्यंत वाटेंत निम्मी मृत्यु पावावयाची, असें अनेक चिनी प्रवाश्यांच्या वृत्तान्तावरून दिसतें. पण

यानें हा अवघड प्रवास खुषीनें स्वीकारून चिनांत बौद्ध-धर्माच्या प्रचारकाचा पहिला मान मिळवला. राजानें याला स्वतंत्र मठ बांधून दिला व याचें शिष्यत्व पत्करण्यास अनेक पंडितांना भाग पाडलें. यानें तेथील भाषा हस्तगत करून बौद्ध ग्रंथांचें त्या भाषांत भाषान्तर केलें. अनेक शिष्य तयार करून बौद्धधर्माचें चांगलें बस्तान बसविलें; व आपला जीर्ण देह तेथेंच ठेवला. याच्यानंतर धर्मरक्ष या भारतीय गृहस्थानें तिकडे धर्मोपदेशाचें काम पुढें चालविलें.

**कासीभट विन केसोभट राजर्षि**—( मृत्यु स. १७०१ ) केशवचैतन्याचा वंशज आणि राजाराम-महाराजांच्या वेळीं राजारामाला मदत करणारा पराक्रमी सरदार. हा जिंजीस जाऊन राजारामातर्फे लढत असतां जखमी होऊन परत आला. त्या वेळीं खुद्द राजारामानें याच्याविषयीं अत्यंत गौरवाचे उल्लेख केले असून, राज्य तुमच्या चरणावर अर्पण केलें, असें म्हटलें आहे ( अप्रसिद्ध लेख ).

**कासीमखान**—( मृत्यु स. १६९६ ) हा एक औरंग-जेबाचा सरदार असून दक्षिणेंतील राज्यें बुडविण्यासाठीं औरंगजेबाबरोबर दक्षिणेंत आला होता. यानें राजाराम वगैरे मंडळी जिंजीस जात असतां मध्यें वाटेंत संशयावरून राजाराम व आणखी कांहीं मंडळी खेरीज करून खंडो-बल्लाळ वगैरे मंडळींना पकडून त्यांच्याकडून राजारामा-विषयीं बातमी काढण्याचा बराच प्रयत्न केला. परंतु तो निष्फळ झाला. याची हुकमत फक्त याच्याच सैन्यावर चाले. पुढें जेव्हां संताजी घोरपड्यानें मोंगलांना जेरीस आणून त्यांना माघार घ्यावयास लावलें, तेव्हां झालेला मोंगलांचा पाडाव याला सहन न होऊन यानें विषप्राशन करून आत्महत्या केली ( ग्रँट् डफ् ).

२. ( मुहम्मद कासीम पाहा ).

**कासीम बरीद**—( स. १४९२–१५०४ ) बेदरच्या बरीदशाही वंशांतील हा पहिला राजा होय.

हा प्रथम मुहम्मदशाहा बाहामनीपाशीं गुलाम म्हणून होता. तेव्हां मराठ्यांनीं बंड केलें तें यानें मोडलें, तेव्हां यास योग्यतेस चढविलें. त्यामुळें हा बाहामनी राज्याची राजधानी बेदर येथें स्वतंत्रपणें राज्यकारभार करूं लागला; व स. १४९२ त बेदर येथें स्वतंत्र झाला, आणि बारा वर्षें कारभार करून स. १५०४ मध्यें मरण पावला.

२. ( स. १५७२ ) अली बरीदचा पुत्र. पण त्याचा नातू असेंहि आढळतें.

**कासीमशाह**—( स. १७३० सुमार ) एक हिंदी कवि. हा सूफी पंथाचा होता. हंस राजा व जवाहीर राणी यांचें हंसजवाहीर कथानक यानें लिहिलें.

**कासीराज**—याचा अध्यात्मानुभव नांवाचा ओवी-बद्ध मराठी ग्रंथ आहे; तो शके १७४२ ( स. १८२० ) मध्यें संपविलेला आहे. याचा संतकविसूचींत निर्देश नाहीं ( मं. त्रै. १३. १ ).

**काळोजी पवार**—हा देवास राज्याचे संस्थापक तुकोजी व जिवाजी यांचा पिता. काळोजीच्या पित्याचें नांव बुवाजी. काळोजीला संभाजी नांवाचा एक भाऊ होता. त्याचाच पुत्र सुप्रसिद्ध उदाजी पवार ऊर्फ उदबा. काळोजीनें माळव्यांत मराठ्यांची सत्ता नेली व ती पुढील पिढ्यांनीं विस्तृत करून कायम केली.

**कांचनदेवी**—सिद्धराज जयसिंहाची मुलगी. ही अजमीरच्या अर्णवराव ऊर्फ आना चौहानाला दिली होती. हिचा पुत्र सोमेश्वर.

**कांचनाचार्य**—संस्कृत नाटककार.

याच्या ' धनंजयविजया 'चा काळ निश्चितपणें ठरवितां येत नाहीं. या नाटकांतील दोन श्लोक हनुमान नाटकांत सांपडतात. परंतु यावरून कांचन हा भोजाच्या पूर्वी होऊन गेला, असें खात्रीनें सांगतां येत नाहीं. शिवाय प्रस्तुत नाटकांतलि प्रास्ताविक कविता विजयनगरच्या राजांच्या अनेक शिलालेखांतून दृष्टीस पडतात. आणि त्यावरून कांचन हा विजयनगरच्या एखाद्या राजाच्या पदरीं दरबारी कवि असणें संभवनीय आहे.

याचा बाप उपाध्याय असून त्याचें नांव नारायण असें होतें. त्याला वागीश्वर हा किताब मिळालेला होता. जय-देवाच्या सांगण्यावरून याच्या नाटकाचा प्रयोग करण्यांत आला असें दिसतें. या जयदेवाच्या पदरीं कोणीएक गदाधर नामक कवि होता.

' धनंजय–विजयां 'त दुर्योधनाच्या सैन्यावर अर्जुनानें जो विजय मिळविला त्याची कथा वर्णिली आहे. हा अर्जुनाचा विजय म्हणजे पांडव अज्ञातवासांत विराटाच्या घरीं राहत असतां त्याच्या गोग्रहणाच्या वेळीं मिळविलेला होय. विराटपुत्र ज्याचें सारथ्य करीत आहे, असा अर्जुन व कौरव यांच्यांतील युद्ध विद्याधर व प्रतिहारी वर्णन करतात. अशा रीतीनें अर्जुनाला विजय प्राप्त झाल्यावर पांडव आपलें रूप प्रकट करतात व तदनंतर अर्जुनपुत्र व विराटकन्या यांचा विवाह होतो. हस्तलिखित ग्रंथांच्या यादींत 'धनंजयविजयव्यायोग' हें कोणा एका यशोधरानें

लिहिलें, असें म्हटलें आहे. हे दोन्हीहि ग्रंथ एकच असावेत असें वाटतें.

**कांक्षारेवत**—हा एक बौद्ध असून ध्यानरत श्रावकांत श्रेष्ठ होय. याचा जन्म श्रावस्तींतील एका धनाढ्य कुटुंबांत झाला. इतर लोकांबरोबर हा भगवंताचा उपदेश ऐकण्यास जात असे. हा भिक्षु झाला. लहानसहान गोष्टींतहि याला शंका वाटे म्हणून भिक्षु याला 'कांक्षारेवत' असें म्हणूं लागले, व ह्याच नांवानें पुढें हा प्रसिद्धीस आला. हा समाधिभावनेमध्यें अत्यंत दक्ष असे व त्यांतच आनंद मानी ( बौद्धसंघाचा परिचय, पृ. १७६ ).

**किरणमयी**—एक हिंदी कवयित्री. विकानेरचा राजा राजसिंहाचा भाऊ पृथ्वीसिंहाची ही पत्नी. अकबर बादशहानें हिच्यावर बलात्कार करण्याचा प्रयत्न केला, तेव्हां ही कट्यार घेऊन त्याच्या अंगावर धांवली. तेव्हां तो आई म्हणून हिला शरण आला आणि त्यानें आपला जीव वांचवला ( क. कौ. १ ).

**किलकिलाराजवंश**—आंध्रराजांचा इतिहास निवेदन केल्यावर मत्स्यादि पुराणांत 'तेषु स्थानेषु कालेन ततः किलकिला नृपाः' हें किंवा या अर्थाचीं वाक्यें येतात. नाणीं व शिलालेख यांच्या अभ्यासावरून हे किलकिला राजे म्हणजे भारशिव किंवा वाकाटक घराण्यांतील राजे होत, असें आतां सिद्ध झालें आहे.

कुशान राजवंशाचें वर्चस्व वाढूं लागलें तेव्हां बुंदेलखंडांतील पद्मावती येथें राज्य करीत असलेलें 'विदिशा नाग' नांवाचें राजघराणें विंध्याद्रीच्या पायथ्याशीं रानांत आश्रयार्थ गेलें. यासंबंधीं पुराणांत 'भोक्ष्यन्ति च समाः षष्टिं पुरीं कांचनकां च वै' असें वाक्य येतें. म्हणजे यांची राजधानी कांचनका येथें किंवा पुरीकाचनका येथें होती. नाचणा येथें हल्लीं वाकाटक व भारशिव घराण्यांसंबंधीं शिलालेख, नाणीं व ताम्रपट उपलब्ध झाले आहेत. त्याचा विचार करतां नाचणा म्हणजे पुरीकाचनका असावें, असें दिसतें.

नाचणा हें ठिकाण पन्ना शहराच्या ईशान्येस २५ मैलांवर असलेल्या गंज शहराच्या पश्चिमेस दोन मैलांवर आहे. या पुरीकाचनका येथें राज्य करणाऱ्या नागराजांनीं आपणास भारशिव असें नांव घेतलें व पुढें भारशिव घराणें, भारशिव घराण्यांतील भवनागाच्या मुलीचा वाकाटकांच्या गौतमीपुत्र नांवाच्या राजकुमाराशीं विवाह होऊन वाकाटक वंशांत विलीन झालें. वाकाटक घराण्याचा संस्थापक विंध्यशक्ति हा मूळचा वागाट नांवाच्या गांवचा राहणारा विष्णुवृद्धगोत्री ब्राह्मण. वागाट अथवा वाकाट हें गांवहि बुंदेलखंडांतील ओर्च्छा संस्थानांत झांशी जिल्ह्यांतील चिरगांवच्या पूर्वेस ६ मैलांवर आहे. हें शहर प्राचीन आहे कारण त्याचा अमरावती येथील खिस्तपूर्व १५० मधील शिलालेखांत उल्लेख आहे. किलकिला नांवाची नदीहि पन्ना नांवाच्या सुप्रसिद्ध ठिकाणाजवळ सत्ना ते पन्ना रस्त्यावर आहे. आजहि ही नदी याच नांवानें ओळखली जात आहे. त्या नदीवर स. १८७० मध्यें बांधलेल्या पुलावर 'किलकिलानदी' अशी पाटी लाविली आहे. वागाट, पद्मावती वगैरे गांवें ज्या प्रदेशांत आहेत त्याच प्रदेशांतही किलकिला नांवाची नदी आहे. व कोशला, मेकला वगैरे प्रांतिक नांवांची उत्पत्ति लक्षांत घेतां पूर्वी नाचणा, पद्मावती व वागाट हीं भारशिव व वाकाटक राजवंशाशीं संबंध असलेलीं गांवें ज्या प्रदेशांत आहेत त्या प्रदेशास किलकिला या नदीवरून पडलेल्या नांवानें ओळखीत असावे. या विचारसरणीस, पुराणांतरीं, भारशिव व वाकाटक घराण्यांतील राजांचा उल्लेख किलकिला वंशांतील राजे म्हणून आला असल्यानें व त्याच राजांचा उल्लेख 'विदिशा नागाः' असाहि आला असल्यानें बळकटी येते. वाकाटक घराण्याच्या मूळ पुरुषाचें विंध्यशक्ति हें नांवहि कर्तृत्वदर्शक आहे. या ब्राह्मण सेनापतीनें नागराजे आपल्या पडत्या काळांत पद्मावतींहून विंध्याद्रीचे आश्रयास गेले असतां विंध्याद्रीच्या सभोंवतालच्या प्रदेशावर आपली सत्ता टिकविण्यास व वाढविण्यास भारशिव राजांना मदत केली तिचें निदर्शक आहे. मध्यप्रांतांत सांपडलेल्या ताम्रपटावरून त्या भागांतील 'नागपूर' हें नांव पुरातन असल्याचें दिसतें व म्हणून त्या प्रांतांत नागराजांची सत्ता असल्याचेंहि उघड होतें.

भारतीय राजे हे शिवभक्त असून शिवभक्तिदर्शक असें हें नांव त्यांनीं सहेतुक घेतलें असावें. त्यांच्या नाण्यांवर नागवंशीय राजांचे राजचिन्हांपैकीं ताडाचें झाड व फणा पसरलेला नाग असून शिवाय गंगा-यमुनेच्या मूर्ति राजाला मूर्धाभिषेक करीत असलेल्या दाखविलेल्या असतात. त्यांचीं नांवेंहि नवनाग, वीरसेननाग, हयनाग, त्रयनाग, बर्हिणनाग अशीं असून त्यांचा उल्लेख खालीलप्रमाणें आढळतो:— "अंशभारसन्निवेशितशिवलिंगोद्वहनशिवसुपरितुष्टा समुत्पादितराजवंशानां पराक्रमाधिगतभागीरथ्यामलजलमूर्धाभिषिक्तानां दशाश्वमेधावभृतस्नानानां भारशिवानाम्" असें वर्णन असलेल्या भारशिव राजांचाच उल्लेख पुराणामध्यें 'किलकिलानृपाः' असा येत असल्यामुळें भारशिव राजे म्हणजेच किलकिला राजे

व नागवंशीय राजे असल्याविषयीं संशय राहत नाहीं. भारशिव घराण्यांतील राजांना ' नवनाग ' असेंहि पुराणांत म्हटलें आहे व असें म्हणण्याचा हेतु असा कीं, त्यांनीं नागराजांची परंपरा पुनरुज्जीवित केली, म्हणून ते नवनाग होत. भारशिव व वाकाटक सम्राट् आपल्या मुलांच्या व नातेवाइकांच्या साम्राज्यांतील प्रांतांवर नेमणुका करून त्यांस त्यांच्या ताब्यांत दिलेल्या प्रांताचा राज्यकारभार स्वतंत्रपणें पाहण्यास पूर्ण स्वातंत्र्य देत. त्यामुळें घराण्याच्या अनेक शाखा निर्माण होऊन विदिशा नागराज घराण्यांचे अथवा किलकिला राजवंशांतील राजे म्हणून ओळखल्या जाणाऱ्या राजांचे अनेक राजवंश निर्माण झाले. भारशिव राजे हे सम्राट् असून त्याच राजवंशापासून उत्पन्न झालेल्या शाखांतील राजे मांडलिक पण स्वतंत्र राजे म्हणून निरनिराळ्या प्रांतांचा राज्यकारभार पाहत. अशा शाखांपैकीं, पद्मावती व मथुरा येथील शाखा सुप्रसिद्ध आहेत. या शाखांना स्वतंत्र नांवेंहि देण्यांत आलीं होतीं. पद्मावतीच्या शाखेला टांकवंश असें म्हणत व मथुरेच्या शाखेस यदुवंश असें म्हणत. एकाच राजवंशांतील शाखांस अशीं दोन भिन्न नांवें देऊन भारशिव राजांनीं त्यांचें राजघराणें हें मूळचें नागवंशीय असून त्यांची जन्मभूमि पंजाबांतील टंक देश असल्याचा ऐतिहासिक पुरावा निर्माण करून ठेविला आहे. यावरून असें दिसून येईल कीं, किलकिलाराजवंश हा नागवंशोद्भव असून त्याची जन्मभूमि टंक देश होय. त्यांनीं बुंदेलखंडांत अथवा विदिशा प्रांतांत पद्मावती येथें आपलें राज्य स्थापिलें व कुशान राजसत्तेच्या काळांत विंध्याद्रिपर्वताचे आश्रयास चणका येथें राज्य स्थापून कुशान साम्राज्य हळुहळू खिळखिळें करून पुन्हां नागराजांचें राज्य सर्व आर्यावर्तांत स्थापन केलें. पुराणांत ' नवनागाः पद्मावत्यां कान्तिपूर्यां मथुरायाम् ' असा जो उल्लेख येतो त्याचें कारणहि असें कीं, या घराण्यांतील शाखांच्या राजधान्या मथुरा, पद्मावती व कान्तिपुरी येथें होत्या. या राजघराण्यांतील राजांनीं केलेल्या दशाश्वमेधाचा स्मृत्यवशेष काशींतील ' दशाश्वमेधघाट ' या नांवांत व ते आपणास राज्याभिषेक काशीस करीत असल्याचा दाखला हल्लीं हिंदु युनिव्हर्सिटी ज्या ठिकाणीं आहे त्या काशीच्या भागास नागव म्हणतात यांत आढळतो. भारशिवांचा काल त्यांचीं नाणीं, शिलालेख, ताम्रपट यांवरून स. १५० ते २८४ असल्याचें सिद्ध झालें आहे. ज्या वाकाटक घराण्याच्या साम्राज्यांत भारशिव घराण्याचें साम्राज्य विलीन झालें त्या वाकाटकांचें साम्राज्य हिंदुस्थानांत स. २८४ ते ३४८ पर्यंत होतें व त्या घराण्यांतील राजे स. ३४८ ते ५५० पर्यंत राज्य करीत असल्याचा पुरावा उपलब्ध आहे.

किलकिला राजांपैकीं भारशिव राजे हे क्षत्रिय होते व वाकाटक मूळचे ब्राह्मण. वाकाटकांच्या गौतमीपुत्र नांवाच्या राजकुमाराचें लग्न भारशिव घराण्यांतील मुलीशीं झाल्यावर वाकाटकांकडे सम्राट्पद आलें. भारशिवांनीं विंध्यपर्वताचे पायथ्यापासून गंगा-यमुनेच्या दुआबापर्यंत आपला राज्यविस्तार केला, परंतु वाकाटकांनीं मात्र दक्षिण हिंदुस्थानांत आपलें साम्राज्य स्थापन केल्याशिवाय वायव्येकडून येणाऱ्या परचक्रास तोंड देणें कठीण पडतें हें ओळखून दक्षिण हिंदुस्थानांतहि आपलें साम्राज्य स्थापिलें. गुप्त घराण्यांतील चंद्रगुप्त (२ रा) विक्रमादित्याची प्रभावती नांवाची मुलगी वाकाटकांच्या पृथ्विसेनाच्या रुद्रसेन नांवाच्या कुमारास दिली व तदनंतर या प्रभावतीनेंच आपलीं मुलें लहान असे तों राज्यकारभार पाहिला. गुप्त घराण्याशीं हा लग्नसंबंध झाल्यावर वाकाटक राजघराणें मागें पडलें व गुप्तांचे साम्राज्याचा विस्तार झाला. अशा प्रकारें ' किलकिला नृपाः ' या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या भारशिव व वाकाटक राजांनीं प्राचीन नागराजवंशाची परंपरा पुनरुज्जीवित करून गुप्त साम्राज्याचा उदय होईतों ती टिकविली व तिची वाढ आणि प्रसारहि केला. या किलकिला राजांचा इतिहास उपलब्ध होण्यापूर्वी आंध्र व कुशान साम्राज्यें नष्ट झाल्यावर गुप्तांच्या साम्राज्याची प्रस्थापना होईतों हिंदुस्थानांत सर्व हिंदुस्थानावर सत्ता असलेलीं साम्राज्यें नव्हतीं, असें व्हिन्सेंट स्मिथ वगैरे इतिहासकारांस वाटत असे. हें मत आतां असिद्ध ठरलें आहे. भारशिव राजांनीं पुनरुज्जीवित केलेली नागराजांची साम्राज्यपरंपरा वाकाटक राजांनीं वाढवून अखिल हिंदुस्थान आपल्या साम्राज्यांत समाविष्ट केलें व त्यामुळेंच पुढें गुप्त घराण्यास साम्राज्यस्थापन करण्यास फार प्रयास पडले नाहींत. किलकिला राजवंशाच्या साम्राज्याचा वारसाच गुप्त घराण्याकडे गेला. गुप्त घराण्यांतील राजांनीं नागराज घराण्यांतील मुलींशीं विवाह केले असल्याचे दाखले उपलब्ध आहेत. प्रभावती गुप्ताची आई कुबेरनागा ही चंद्रगुप्त ( २ रा ) याची मुख्य राणी होती. हिंदु राजवटीचा इतिहास अशा प्रकारें गुप्त घराण्याच्या साम्राज्यकालापर्यंत अत्रुटित आहे.

किलकिला राजवंशाच्या राजवटींत संस्कृत भाषेला प्रोत्साहन मिळून ती राजभाषा झाली. या वंशाचे शिलालेख, ताम्रपट, उच्च संस्कृत भाषेंत आहेत. संस्कृत

वाङ्मयाची वाढ झाल्याचेंहि दाखले आहेत. नागरी लिपीहि याच कालांत प्रचारांत आली. शिल्प व चित्रकला यांची सुधारणा झाली. सुप्रसिद्ध अजिंठ्याचीं लेणीं, भूमारा येथील देऊळ, नाचणा येथील शिल्प, हीं किलकिला राजांचीं स्मारकेंच आहेत.

यांच्या शिल्पाचे विशेष, शिखरें, मखरकमान, नागप्रतिमा, गंगा व यमुना यांच्या मूर्ति वगैरे अनेक असून या शिल्पास 'नागरशिल्प' असेंच मानसार नांवाच्या गुप्तकालांतील ग्रंथांत म्हटलें आहे.

या नाग संस्कृतीचीं प्रात्यक्षिकें अलीकडे यमुनेच्या कांठीं अलाहाबादपासून १० मैलांवर असलेल्या उत्खनित भिता नांवाच्या गांवीं उपलब्ध झालीं आहेत. सहजाति या नांवानें चेदी देशाच्या द्वारावर एक शहर होतें तें सरकारी पुराणवस्तुसंशोधन खात्यानें जमीन उकरून उघडें केलें आहे. या ठिकाणीं वाकाटकांच्या मुद्रा, नाणीं, नाणीं पाडण्याच्या मुशी व घरगुती आणि सार्वजनिक उपयोगांतील अनेक वस्तु सांपडल्या आहेत. त्यावरून तत्कालीन संस्कृतीची योग्य कल्पना करतां येते. ( जयस्वाल–हिस्टरी ऑफ इंडिया ).

**किलपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं त्र्याहत्तरावा सिद्ध होय. हा राजकुमार जातीचा. प्रहरशहर याचें वसतिस्थान होय. याचा दोहाचार्यगीतिकादृष्टि ( तं. ४८।३५ ) हा ग्रंथ प्रसिद्ध आहे.

**किशनचंद**—हा दिल्लीचा राहणारा असून कवि होता. काव्यांत यानें आपलें नांव इखलास असें दिलें आहे. याच्या बापाचें नांव अचलदास असून हा जातीनें खत्री होय. याच्या घरीं विद्वानांच्या नेहमीं बैठकी भरत असत. यानें 'हमेश बहार' नांवाचा एक चरित्र-ग्रंथ लिहिला आहे व त्यांत मुहम्मदशहापर्यंतच्या कारकीर्दींत झालेल्या सुमारें २०० कवींचीं अकारविल्हे चरित्रें दिलीं आहेत. याचीं इखलासखान अगर इखलासकेश अशीं नांवें आहेत. फार्शींत हा निष्णात असून अलमगीरच्या हाताखालीं नोकर होता. त्यानेंच यास वरील पदवी दिली. पुढें फर्रुकसियरनें यास सातहजारी सरदार बनविलें. यानें या शहाची 'बादशहानामा' या नांवाची बखर लिहिली आहे ( बील ).

**किशोरी**—हिंदी कवि. हे अयोध्येंतील वैरागी असून स. १७९७ पर्यंत होते. यांनीं भक्तिपर अनेक कवनें लिहिलीं असून 'रामचरित्रसंबोधिनी' नांवाचें काव्य लिहिलें. याखेरीज यानें अनेक ग्रंथ रचिले. आंदोलरहस्यदीपिका, तुलसीदासचरित्र, सारचंद्रिका, देहावली वगैरे बरेच ग्रंथ यांनीं रचिले आहेत.

**कीटिंग कर्नल**—( स. १७७५ ) हा एक इंग्रज सेनापति होय.

नापारचे लढाईंत राघोबादादाची अगदीं गाळण उडाली, तेव्हां राघोबादादा सुरतेस इंग्रजांच्या आश्रयास गेला. त्या वेळीं मुंबईहून इंग्रजांकडून कर्नल कीटिंग हा फौज घेऊन दादाचे मदतीस आला ( स. १७७५ ). दादांच्या अव्यवस्थितपणामुळें कर्नल कीटिंगच्या हातून व्हावा तसा उद्योग झाला नाहीं. दादाची फौज पगार नसल्यानें बिथरली, तेव्हां कीटिंगनें त्यास कांहीं रक्कम कर्जाऊ दिली. त्याबद्दल मुंबईहून यास ठपका आला. तसेंच फत्तेसिंगास आपल्या बाजूस वळविण्याची खटपट यानें केली ती याच्याच गळ्यांत आली. पुढें मुंबईकरांच्या हुकुमावरून यानें हरिपंतास लिहिलें कीं, 'आतां लढा नाहीं. आम्ही दादाचा पक्ष सोडतों.' शिवाय रघुनाथरावाचें व कीटिंगचें चांगलें जुळत नव्हतें ( म. रि. उत्तर वि. १ ला ).

**कीतू**—( स. ११६२–८१ ) याचें नांव कीतपाल चौहान. हा जोधपूर राज्यांतील नाडौलचा होता. हा मेवाडचा मांडलिक असे. हा आल्हणदेव चौहानाचा तिसरा पुत्र होय. यानें आपल्या बाहुबलानें जालोरच्या परमारांचें राज्य घेतलें व चौहानाच्या सोनगरा येथील शाखेचा मूळ पुरुष व स्वतंत्र राजा झाला. सिवाणें (जोधपूर) येथील किल्लाहि परमारांकडून यानें जिंकला होता. चौहानाच्या शिलालेखांत याचें नांव कीर्तिपाल चौहान असें सांपडत असलें ( एपि. इंडि. ९·६९ ) तरी हा कीतू या नांवानें जुन्या ख्यातांत व काव्यांत राजपुतान्यांत प्रसिद्ध आहे. याचें एक दानपत्र वि. सं. १२१८ ( स. ११३१ ) मधील मिळालें आहे (एपि. इंडि. भा. ९, पृ. ७०). त्यांत याला बापाकडून बारा गांव मिळाले आहेत. वि. सं. १२३९ ( स. ११८२ ) मधील शिलालेखांत याचा मुलगा समरसिंह गादीवर आल्याचा निर्देश आहे. त्यावरून हा त्यापूर्वीं मेला असावा.

**कीर्ति**—( धर्मकीर्ति पाहा ).

**कीर्तिदेव**—( कीर्तिवर्मा कदंब पाहा ).

२. हा हानगळ कदंबांपैकीं तैलमचा मुलगा.

**कीर्तिपाळ चौहान**—( कीतू पाहा ).

**कीर्तिभूषण पांड्य**—हा वरगुण पांड्यामागून गादीवर आला.

**कीर्तिराज सोलंकी**—लाट देशच्या सोलंकी घराण्यापैकीं गोग्गि राजाचा पुत्र. याच्या वेळचें एक दानपत्र शा. श. ९४० ( वि. सं. १०७५, स. १०१८ ) चें मिळालें आहे ( डॉ. कीलहार्न संगृहीत इन्स्क्रिप्शन्स्

ऑफ नॉर्दर्न इंडिया नं. ३५४, पृ. ५० ). याचा पुत्र वत्सराज.

**कीर्तिवर्मन्**—( स. ११२५ ) यानें कानडा गोवैद्यक नांवाचा पद्यग्रंथ केला. त्यांत गुरांच्या रोगांची माहिती आहे.

**कीर्तिवर्मा कदंब**—हा हानगळ येथील कदंब घराण्यांतील पहिल्या शांतिवर्म्याचा पुत्र.

२. ( स. १०६८-७७ ) हा हानगलच्या कदंब घराण्यांतील पहिल्या तैलाचा मुलगा. याला कीर्तिदेव पहिला किंवा तैलणसिंह असेंहि म्हणत. चावुंडला देवी ही याची माता होय. हा सहाव्या विक्रमादित्य प. चालुक्याचा जहागिरदार होय.

**कीर्तिवर्मा गुहिलोत**—मेवाडच्या गादीवर हा नरवर्म्यानंतर आला. याच्यानंतर योगराज गादीवर आला. हा व नरवर्मा भाऊ असावेत, असें कुंभलगडच्या शिलालेखा-वरून दिसतें. त्या अप्रसिद्ध लेखांत यशोवर्मा असें नांव आहे. नांवांतहि कीर्तीबद्दल यश शब्द घालणें शक्य आहे ( रा. इ. पा. ४४३ ).

**कीर्तिवर्मा चंदेल्ल**—( स. १०६०–११०० ) देव-वर्म्याचा भाऊ कीर्तिवर्मा याची कारकीर्द ह्याच्या भावाच्या पश्चात् सुरू झाली. याच्या पित्याचें नांव विजयपाळ. यानें देवगड नांवाचा प्रांत आपल्या राज्यास जोडला व तेथें कीर्तिगिरी नांवाचा किल्ला बांधला. जबलपूर जिल्ह्यांतील बलिहि शहर यानेंच वसविलें अशी दंतकथा आहे. यानें कर्ण कलचुरीचें राज्य घेतलें. याच्यानंतर याचा मुलगा सल्लक्षणवर्मन् गादीवर आला.

**कीर्तिवर्मा चालुक्य**—( स. ५५७-९७ ) हा पश्चिम चालुक्यांपैकीं पहिल्या पुलकेशीचा वडील पुत्र. ऐहोळ येथील शिलालेखांत याला नळ, मौर्य, कदम्ब यांचा काळरात्र असें म्हटलें आहे. यानें कदम्बांपैकीं कृष्णवर्मन् २ रा याचें राज्य घेतलें. याला पृथ्वीवल्लभ म्हणत. यानें अंग, वंग, कलिंग, मगध, केरळ, मद्रक, गंग, मूषक वगैरे देशांवर स्वाऱ्या केल्या. याच्यानंतर याचा धाकटा भाऊ मंगलीश गादीवर आला. याला पुलकेशिन् दुसरा, हा व आणखी दोन मुलगे होते.

२. ( स. ७४७-७५७ ) हा पश्चिम चालुक्यांपैकीं दुसऱ्या विक्रमादित्याचा मुलगा. यानें पल्लवांवर जय मिळ-विल्याचा उल्लेख आहे. पण लवकरच याच्या राज्यांत बंडाळी झाली; व बाजूच्या दंतिदुर्ग राष्ट्रकूटानें स्वारी करून याचें राज्य बुडविलें. या घराण्याचें वर्चस्व या वेळीं कमी झालें असून राष्ट्रकूटांचें वर्चस्व वाढलें होतें.

३. पश्चिम चालुक्यांपैकीं पहिल्या भीमानंतरचा राजा. याचा फ्लीटनें उल्लेख केला नाहीं.

**कीश्वरखान**—हा दुसऱ्या इब्राहीम आदिलशाहाचा दिवाण असदखानाचा पुत्र ( अली व इब्राहीम आदिल-शाह पाहा ). यानें कामीलखानाचा खून करून दिवाण-गिरी मिळविली च चांदबिबीसहि कैद केलें. शेवटीं यालाहि कंटाळून एखलासखान या हबशी सरदारानें याचा खून केला.

**कुईचुंग**—एक चिनी प्रवासी. हा समुद्रमार्गें सिंहल-द्वीपांत आला व तेथून हा भारतवर्षांत आला. तीर्थयात्रा करीत राजगृहाला पोंचला व तेथें वेणुवनांत राहिला. तेथेंच रोगी होऊन मेला.

**कुकुरिपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं चवतिसावा सिद्ध होय. जात ब्राह्मण. देश कपिलवस्तु. हे मीनपा, चर्पटीपा व मणिभद्र यांचे गुरु होत. याच्या उपलब्ध सोळा ग्रंथांपैकीं पुढील ग्रंथ हिंदींत आहेतः तत्त्वसुखभावनानु-सारियोगभावनोपदेश ( तं. ४८।६५ ), स्रवपरिच्छेदन ( तं. ४८।६९ ). हा हिंदी कवि होता. याच्या कविता उत्कृष्ट असून सर्वत्र प्रसिद्ध आहेत.

**कुचिपा**—यालाच कूसूलि असें म्हणतात. हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं पस्तिसावा सिद्ध होय. जात शूद्र. देश कपिलवस्तु. हा मीनपाचा गुरु.

**कुतबन**—( स. १४९२ ) एक हिंदी कवि. हा शेर-शाहाचा पिता असून, हुसेनशाहचा आश्रित होता. हा चिश्ती वंशांतील शेख बुर्हानचा शिष्य होय.

यानें ‘ मृगावती ’ नांवाची एक कहाणी लिहिली. तींमध्यें चंद्रनगरचा राजा गणपतीदेव याचा मुलगा आणि कंचन-पूरच्या राजाची मुलगी मृगावती यांच्या प्रेमकथेचें वर्णन आहे. हें काव्य सुंदर व रहस्यमय झालेलें आहे.

**कुत्बुद्दीन**—( स. १४५१–१४५९ ) गुजराथचा मुहंमदशहा मरण पावल्यावर त्याचा पुत्र कुत्बुद्दीन गादीवर आला. माळव्याचा मुहंमद खल्जी यानें यावर स्वारी करून याचा पराभव केला. पुढें उभयतांनीं तह करून दोघांनीं मिळून मुसलमानी धर्म वाढविण्याची खटपट करण्याचें ठरविलें. परंतु हा ठराव अमलांत आला नाहीं. मेवाडचा राणा कुंभ हा या वेळीं हिंदु राजांत अत्यंत शूर व प्रभावशाली होता. तरी सुद्धां त्यांस बुडविण्यास बरेच मुसलमान टपून होते. नागोर येथें यानें कुंभ राण्याचा सन १४५८ मध्यें पराभव केला असें म्हण-तात. नंतर हा त्याच वर्षीं मरण पावला ( मे १४५९ ).

**कुत्बुद्दीन ऐबक गुलाम**—( स. ११९१-१२१० ) दिल्लीचा बादशाह. याला लहानपणीं कोणीतरी निशापूरला पळवून नेलें आणि गुलाम म्हणून विकलें. जात तुर्क. तेथें याला शिक्षण वगैरे चांगलें मिळालें. पण तो मालक वारल्यावर याला पुनः गुलाम म्हणून विकलें. तेथें यास विकत घेणारानें शहाबुद्दीन घोरी यास नजर केलें. त्याची यावर मर्जी बसून हा सरदार झाला. पृथ्वीराज चौहाणास जिंकून शहाबुद्दीन परत निघाला तेव्हां त्यानें यास हिंदुस्थानांत जिंकलेल्या दिल्लीपर्यंतच्या मुलखाचा सुभेदार नेमलें; आणि सर्वाधिकार याच्या स्वाधीन केले. यानें दुआब, कनोज, अजमीर, गुजराथ वगैरे प्रांत स्वाऱ्या करून आपल्या सत्तेखालीं आणले. याचा सरदार इख्त्यार उद्दीननें बिहार, तिरहुत, बंगाल हे प्रांत आपल्या सत्तेखालीं आणले. तेव्हां यानें दिल्ली जिंकली आणि आपली राजधानी गुहराम येथून दिल्लीस आणली ( स.११९३ ). १५ मार्च १२०६ रोजीं शहाबुद्दीन मेल्यावर यानें आपल्या सरदारांच्या अनुमतीनें स्वातंत्र्य जाहीर केलें. किरमान प्रांताचा अधिकारी ताजुद्दीन या विरोध करणाऱ्याचा यानें पराजय केला व गजनी लुटली (स.१२०९). पण विजयोत्सवांत गर्क असतां ताजुद्दीननें यावर हल्ला करून याला लाहोरकडे पळावयास लावलें. तेथें पोलो खेळत असतां हा पडला, यावर याचा घोडा पडला आणि त्याच्या खोगराचे खिळे याला लागून हा मेला ( नवं. १२१० ). हा न्यायी, उदार व राजकार्यकुशल होता. या विजयी पुरुषाची कीर्ति कुतुबमिनार व जुम्मामशीद हीं दिल्लीस अद्यापि सांगत आहेत. याच्याच कारकीर्दीत मुसलमानांची सत्ता हिंदुस्थानच्या इतर प्रांतांत शिरली व दिल्ली येथें स्थिर झाली.

**कुत्बुद्दीन कुत्बशाह**—कुत्बशाही घराण्यांतील सुलतान कुलीचा मुलगा. सुलतान कुलीचा खून होतांच याचा भाऊ जमशीद यानें याला पकडून याचे डोळे काढले.

**२.** ( हिंदाल ( काश्मीरचा ) पाहा ).

**कुत्बुद्दीन तुघ्लक**—हा दिल्लीच्या राजबातुघ्लकाचा पुत्र. याचा फीरुझ नांवाचा भाऊ दिल्लीच्या तख्तावर होता.

**कुत्बुद्दीन फीरुझशाह**—( स. १३४१ ) अलाउद्दीन उदौजीचा जांवई. मदुरा येथील स्वतंत्र राजा. जलालुद्दीन अहसनशाहा हा मदुरेचा सुभेदार असतां त्यानें स्वातंत्र्य जाहीर केलें. पांच वर्षांनंतर त्याचा खून करून अल्लाउद्दीन उदौजी नांवाचा मनुष्य गादीवर आला. तो पांड्य व केरळ येथील राजांशीं लढत असतां डोक्यांत बाण शिरून ठार झाला. तेव्हां हा त्याचा जांवई राजा झाला. पण ४० दिवस राज्य केल्यावर राज्यांत बंड झालें, त्यांत हा मारला गेला.

**कुत्बुद्दीन मुबारक खल्जी**—(मुबारकखल्जी पाहा).

**कुत्बुद्दीन लंगा**—( स. १४४५-६९ ) मुलतानच्या शेख यूसुफ कुरेशीचा हा सासरा.

स. १४४५ मध्यें यानें आपल्या जांवयास पकडून मुलतान येथें स्वतंत्रपणें राज्य सुरू केलें. याचें मूळ नांव रायसिन्हा ( सहर ) लंगा असें होतें. यानें स. १४६९ पर्यंत शांततेनें राज्य केलें. याच्यानंतर याचा मुलगा हुसेनशाहा हा मुलतानचे गादीवर आला ( मु. रि. १. ३३० ).

**कुत्बुद्दीन लोदी**—हा सुलतानशाह लोदीचा पुत्र. याला कुत्बुद्दीन असें केंब्रिज हिस्टरीमधील वंशावळींत म्हटलें आहे.

**कुत्बुलमुल्क**—( मलीक कुत्ब उल्मुल्क पाहा ).

**कुदको नेदूम शेरम आदम**—( स. १२५ ) चेर घराण्यांतील एक राजा. पेरुनार किल्लीशीं लढत असतां दोघेहि मेले.

**कुनाल मौर्य**—(ख्रि. पू.२३२-२२४) हा मौर्यवंशांतील अशोकाचा पुत्र. वायुपुराणांत कुनाल असें नांव दिलें असलें तरी ब्रह्मांडपुराणांत हें नांव कुशाल असें आढळतें. कदाचित् ही वाचनाची चूक असावी. विष्णु व भागवत पुराणांत याला सुयशस् असें म्हटलें आहे. सुयशस् ही याची पदवी असावी. श्री. जयस्वाल यांनीं असेंच मानलें आहे; व इतर संशोधकांनाहि ही गोष्ट मानणें भाग आहे.

बौद्ध व जैन यांच्या वाङ्मयांत आलेल्या माहितीवरून हा आंधळा होता असें दिसतें. हा अत्यंत रूपवान् होता. याची सावत्र आई तिष्यरक्षिता हिनें अशोकाला एका दुखण्यांतून बरें करून अत्यंत खूप केलें. अशोकानें तिला वर म्हणून सात दिवस राज्याची सर्व सत्ता दिली. तिष्यरक्षितेची प्रेमयाचना यानें नाकारल्यामुळें याच्यावर तिचा फार राग होता. तिनें तक्षशिलेच्या अधिकाऱ्याला कुनालाचे डोळे काढण्याची आज्ञा केली. राजा अशोकाची मुद्रा असलेली ही आज्ञा तेथें पोंचतांच लोक आश्चर्यचकित झाले. पण कुनालानें अशोकाची आज्ञा म्हणून आपले डोळे आपणच काढून टाकले ( दिव्यावदान पृ. ४००-४१० ). त्यामुळें हा राज्यकारभार पाहण्यास असमर्थ होता. म्हणूनच दिव्यावदान व जैनसाहित्य यांत

हा राजा झाल्याचा निर्देश नाहीं. याचा मुलगा संप्रति किंवा संपदि अशोकाच्या वेळीं युवराजपदावर होताच. तोच अशोकानंतर राज्यपदावर आलेला दिसतो.

नंतर एक तंतुवाद्य घेऊन हा भटकत भटकत पाटलीपुत्र येथें आला. तेथें यानें आपलें तंतुवाद्य वाजवून आपली ओळख राजास पटवून दिली. तेव्हां अशोकानें हा आपला मुलगा आहे हें ओळखून याची विचारपूस केली. यानें घडलेली सर्व हकीगत सांगितली. त्या वेळीं अशोकास आपल्या राणीचा भयंकर राग येऊन त्यानें, तिला एका खोलींत कोंडून त्या खोलीस आग लावून देण्याची आज्ञा केली. परंतु तसें यानें करूं दिलें नाहीं. तेव्हां अशोकानें आपली पुढीलप्रमाणें इच्छा प्रदर्शित केली, ' जर माझें प्रेम माझ्या मुलावर आणि बायकोवर सारखेंच असेल व कोणत्याहि प्रकारचा द्वेषभाव नसेल, तर माझा मुलगा कुनाल याचे डोळे पूर्ववत् होतील. ' वरील उद्गार बाहेरपडतां क्षणींच कुनालचे डोळे पूर्ववत् झाले.

याच्या वेळीं अशोकाचा पुत्र जालौक यानें काश्मीरांत स्वतःचें वेगळें राज्य स्थापन केलें आणि आंध्राचा सीमुक याच वेळीं स्वतंत्र झाला. ग्रीक लोकांचे हल्लेहि याच वेळीं सुरू होते. त्यावरून या वेळीं अशोकाच्या विशाल राज्याला उतरती कळा लागली असून मांडलिक स्वतंत्र होऊं लागले होते.

कुनाल हा गादीवर बसला नाहीं. कुनालचा मुलगा विगताशोक हा अशोकानंतर गादीवर आला ( I. H. Q. Vol. VII, No. 1, p. 156-158 ).

तक्षशिला येथें उत्खनन करण्यांत आलें आहे. तेथें एक आभूषण ( दागिना ) सांपडलें आहे. ह्यूएन्संगनें तेथें पाहिलेल्या कुनालस्तूपाचें मार्शलनें विस्तृत वर्णन केलें आहे. पण त्याच्या मतें हा स्तूप स. च्या तिसऱ्या शतकांत बनला असला पाहिजे. मौर्यकालांतील हा स्तूप नाहीं असें त्यानें ठरविलें आहे ( John Marshall-A Guide to Taxila. See the 5th Chapter an ' Stupa of Kunal ' ). प्राचीन आख्यायिका अशी आहे कीं, अशोकाच्या आज्ञेनें त्याचा पुत्र कुनाल यास ज्या ठिकाणीं आंधळें केलें त्या ठिकाणीं हा स्तूप बांधला. पण हा स्तूप अशोकानें बांधलेला नाहीं. अशोकानें बांधलेल्या स्तूपाच्या जागीं पुढें केव्हांतरी हा स्तूप बांधला गेला असावा.

**कुवेरभट्ट**—प्रसिद्ध बाण कवींचा पणजा चित्रभानूचा आजा. यास अर्थपती नांवाचा मुलगा होता.

**कुब्ज विष्णुवर्धन चालुक्य**—पूर्वचालुक्य घराण्याचा संस्थापक ( विष्णुवर्धन पाहा ).

**कुमरिपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं त्रेसष्ठावा सिद्ध होय. हा जातीनें कृष्णकृतवणिक् असून जोमन श्रीदेशचा राहणारा होता.

**कुमारगुप्त**—(स. ४१३-४५५) गुप्तवंशांतील दुसऱ्या चंद्रगुप्ताचा मुलगा. याच्या मातेचें नांव ध्रुवादेवी.

शिलालेख व नाणीं यांवरून हा मोठा राजा होता, असें दिसतें. याच्या कारकीर्दींत साम्राज्याचा विस्तार झाला नसावा. मात्र यानें अश्वमेधयज्ञ केला होता त्यावरून यानें नवीन मुलूखहि मिळविला असला पाहिजे. स. ४५० च्या सुमारास हूण लोकांनीं स्वाऱ्या केल्यामुळें हें गुप्तांचें राज्य खिळखिळें झालें. याला महेंद्र म्हणत असत.

यानें महाराजाधिराज, परमराजाधिराज, महेंद्र, अजित-महेन्द्र, महेंद्रसिंह आणि महेन्द्रादित्य इत्यादि पदव्या धारण केल्या होत्या. यानें अश्वमेधयज्ञ केला होता. त्या यज्ञाकरितां पाडलेलीं याचीं सोन्याचीं नाणीं उपलब्ध झालीं आहेत. आपल्या पित्याप्रमाणें हाहि परमभागवत ( वैष्णव ) होता. याच्या कालचे दहा शिलालेख मिळाले आहेत. त्यांपैकीं पांच गुप्तसंवत् ९६-१२९ पर्यंतचे आहेत ( स. ४१५-४४८ ) व एक मालव ( विक्रम ) संवत् ४९३ ( स. ४३६ ) चा आहे ( फ्लीट गु. इं. लेखसंख्या १०; २१; १८ ). याचीं सोनें, चांदी व तांब्याचीं पुष्कळ नाणीं मिळालीं आहेत. त्यांपैकीं कांहींवर संवत्हि आहे. त्यांत गुप्तसंवत् ११९-१३६ ( स. ४३८-४५५ ) पर्यंतचीं आहेत. स. ४५५ मध्यें याच्या राज्यावर हूणांचा हल्ला झाला, त्यांत हा मारला गेला. याला घटोत्कच, स्कंदगुप्त व पुरगुप्त असे तीन पुत्र होते. घटोत्कचाच्या आईच्या नांवाचा शोध लागला नाहीं. स्कंदगुप्त आणि पुरगुप्त यांच्या आईचें नांव अनंतदेवी. अनंतदेवी ही वनबासिच्या कदंब घराण्यांतील ककुस्थवर्मनाची मुलगी असावी. कुमारगुप्ताच्या हयातींत घटोत्कच हा गुप्तसंवत् ११६ ( स. ४३५ ) मध्यें माळव्याचा अधिकारी होता, असें कुमारगुप्ताच्या तुमैन ( तुंबवन ) गांवच्या ( ग्वाल्हेर राज्यांतील) शिलालेखावरून दिसून येतें ( इंडि. अँटि. ४९. ११४-११५ ). याच्यानंतर स्कंदगुप्त गादीवर आला.

२. ( स. ४७२-७७ ) हा गुप्तवंशांतील स्कंदगुप्ताचा मुलगा असावा. हा नरसिंहगुप्तानंतर गादीवर आला. याचा एक शिलालेख सारनाथ ( काशीजवळ ) येथें मिळालेल्या मूर्तीच्या खालीं आढळतो. तो गुप्तसं. १५४ म्हणजे स.

४७३ मधील आहे ( भारतीय प्राचीन लिपिमाला पृ. १७४ टिपण ६ ). यानें हूणांशीं लढाया केल्या. कारण त्यांच्या सारख्या स्वाऱ्या चालू होत्या.

३. ( स. ५३०-५६४ ) गुप्त घराण्यांतील नरसिंह-गुप्ताचा हा मुलगा होय.

४. गाळव्याचा गुप्त राजा.

**कुमारजीव**—( स. ३८३-४१५ ) एक बौद्ध ग्रंथकार व भिक्षु. वसुबंधूचा हा समकालीन होता, असें म्हणतात. यानें स. ४०४ च्या सुमारास शतशास्त्र आणि बोधिचित्तोत्पादनशास्त्र या दोन ग्रंथांचें भाषांतर केलें. मात्र दंतकथेच्या आधारें असें दिसतें कीं, त्याचा भाषांतरकर्ता वसुबंधु होता. परंतु तें खरें नाहीं असें विद्वानांचें मत आहे.

गुप्तकालांत ज्या वेळीं परदेशीं धार्मिक मंडळें पाठविलीं जात होतीं त्या वेळीं याची नेमणूक चीनच्या धार्मिक-मंडळांत केली होती. स. ३८३ मध्यें हा हिंदुस्थानांतून चीनमध्यें गेला.

शिवाय ब्रह्मजालसूत्र, अश्वघोषाचा सूत्रालंकार, सद्धर्मपुंडरीक, सुखावतीव्यूह, वज्रछेदिका, दशभूमिकविभाषाशास्त्र, प्रज्ञापारमितासूत्रशास्त्र, माध्यमिकशास्त्र, वगैरे अनेक ग्रंथांचीं यानें चिनीमध्यें भाषांतरें केलीं.

हा कांहीं दिवस लुकाँग ह्याजवळ चीनमध्यें होता; व स. ४०२ ते ४१२ पर्यंत चिनीमध्यें भाषांतर केलें. याचा मृत्युकाल निश्चित नाहीं, पण स. ४१५ च्या सुमारास हा मेला असावा.

यानें नागार्जुन, अश्वघोष व आर्यदेव वगैरेंचीं चरित्रें लिहिलीं आहेत. आणि तीं सध्यां तिबेटमध्यें प्रसिद्ध आहेत ( विंटरनिझ–हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर, भा. २ ).

**कुमारदास**—( स. ७००-५० ) 'जानकीहरण–' कर्ता कुमारदास हा स. ५१७–५२६ मध्यें ज्यानें राज्य केलें तो सिंहलद्वीपचा राजा असणें शक्य नाहीं. याचा काळ स. ७००–७५० हा असावा, असें प्रो० कीथ यांनीं अनेक प्रमाणांनीं दाखविलें आहे. कालिदास व कुमारदास यांच्या संबंधाची आख्यायिका विश्वासार्ह नाहीं ( कालिदास पाहा ). जानकीहरणांतील उतारे क्षेमेंद्रानें आपल्या औचित्यविचारचर्चेत घेतले आहेत ( C. C. ).

**कुमारदेवी**—ही लिच्छवी घराण्यांतील राजकन्या व गुप्त घराण्यांतील पहिल्या चंद्रगुप्ताची राणी. हिचें लग्न चंद्रगुप्ताशीं झाल्यामुळें तो जहागिरदार होता तो मोठा राज्यकर्ता बनला. चंद्रगुप्त हा खरा पाटलीपुत्रासारख्या लहानशा शहरचा राजा. पण तोच पुढें आपला राज्यविस्तार वाढवूं शकला. त्याला हुंड्यामध्यें हें शहर मिळाल्याचें प्रसिद्ध आहे.

२. ही कनोजच्या गोविंदचंद्र गाहडवालाची पत्नी. ही देवरक्षिताला शंकरदेवीपासून झालेली कन्या होय हिचा एक अतिशय महत्त्वाचा लेख सारनाथ येथें उपलब्ध झाला आहे. त्यावरुन पाल, राष्ट्रकूट व गाहडवाल यांचा शरीरसंबंध दिसून येतो. हिनें सारनाथ येथें अतिशय विशाल बौद्धमंदिर बांधलें होतें.

**कुमारधूर्जटि**—यानें कृष्णदेवरायविजय नांवाचें ऐतिहासिक काव्य लिहिलें आहे.

**कुमारपाल**—( स. ११००–४२ ) बंगालच्या पाल राजांपैकीं रामपालाचा पुत्र. याचें नांव मागाहूनच्या एका लेखांत मिळतें. याचा मुलगा गोपाळ ( हिं. भा. अ. पा. ३४९ ) हा रामपालाच्या हयातींतच मेला ( हि. का. मार्च १९२९ ). हा याचा बाप गादीवर असतांनाच आसाममध्यें वैद्यदेव नांवाच्या एका हुशार प्रधानाच्या मदतीनें राज्य करीत असे ( V. Smith p. 416 ). हा इकडे आल्यावर कामदेव तिकडचा राजा झाला.

**कुमारपाल सोलंकी**—(स. ११४२–७३) गुजराथच्या सोलंकीवंशांतील कर्ण, कर्णाचा भाऊ क्षेमराज-देवप्रसाद–त्रिभुवनपाल असा याचा वंशसंबंध आहे. हा त्रिभुवनपालाचा पुत्र (सिद्धराज) जयसिंहास पुत्र नसल्यानें हा गादीवर आला ( वाहड व अर्णवराज चौहान पाहा ). जयसिंह याला मारण्यास टपला होता, त्यामुळें हा वेष बदलून हिंडत असे. त्यामुळें याचें राज्यावर येण्यापूर्वीचें आयुष्य खडतर गेलें. यानें अजमेरच्या आना (अर्णवराज) चौहानावर दोन स्वाऱ्या केल्या होत्या. त्यांपैकीं पहिली स्वारी वि. सं. १२०१ ( स. ११४४ ) च्या सुमारास झाली. तींत कुमारपालास विजय प्राप्त झाला होता, असें दिसत नाहीं. दुसरी स्वारी वि. सं. १२०७ ( स. ११५० ) मध्यें झाली तींत हा विजयी झाला. पहिल्या लढाईंत आबूचा विक्रमसिंह परमार आनाला सामील झाला म्हणून यानें त्यास कैद केलें व त्याचें राज्य त्याच्या भावाचा मुलगा यशोधवल यास दिलें ( ना. प्र. प. भा. ३, पृ. १७५ ). यानें माळव्याच्या बल्लाळ राजाला ठार केलें; व कोंकणच्या शिलाहारवंशी मल्लिकार्जुनावर दोन वेळां स्वारी केली. पहिल्या स्वारींत पराजय झाला पण दुसरींत जय मिळाला. त्या लढाईंत सोमेश्वर चौहानानें मल्लिकार्जुनाचें डोकें उडवलें. हा सोमेश्वर म्हणजे सिद्धराज जयसिंहाच्या मुलीचा मुलगा होय ( ना. प्र. प.

१. ३९९ ). हा मोठा प्रतापी आणि नीतिनिपुण होता. याच्या राज्याची मर्यादा लांबपर्यंत पसरली होती; व माळवा व राजपुताना यांचा बराच अंश याच्या ताब्यांत होता. जैन पंडित हेमचंद्रापासून यानें जैनधर्म स्वीकारला व जीवहिंसा आपल्या राज्यांत बंद केली होती. गुजराथच्या बाहेर माळवा व राजपुताना येथेंहि याचे कांहीं शिलालेख मिळाले आहेत. यानें वि. सं. ११९९–१२३० ( स. ११४२–७३ ) पर्यंत राज्य केलें. याचा सर्वांत वडील भाऊ महीपाल नांवाचा होता. याचा पुत्र अजयपाल याच्या मागें गादीवर बसला ( रा. इ. पा. २१८-२२० ). यानें अनहिलपट्टण येथें पार्श्वनाथाचें देऊळ बांधलें.

कुमारपालचरित नांवाचें प्राकृत भाषेंतील द्याश्रयमहाकाव्य हेमचंद्रानें लिहिलें आहे. त्यावर पूर्णकलशगणीनें रचलेल्या संस्कृत भाषेंतील टीकेसहित तें बाँबे संस्कृत सीरीजमध्यें प्रसिद्ध झालें आहे. कुमारपालाचें चरित या काव्यांत वर्णिलें आहे. साधारणतः पाणिनीच्या व्याकरणास भट्टिकाव्य तसेंच हें संस्कृत व प्राकृत व्याकरणास होय. याच काव्याचे पहिले सर्ग शुद्ध संस्कृतमध्यें असून त्यांचा उपयोग हेमचंद्र व्याकरणाच्या पहिल्या सात अध्यायांत सांगितलेल्या संस्कृतभाषेच्या उदाहरण–प्रत्युदाहरणाकरितां केला आहे. शिवाय 'अथ प्राकृतम्' म्हणून हेमचंद्रानें संस्कृत व्याकरणाबरोबर प्राकृत व्याकरणाकरितां जो आठवा अध्याय लिहिला त्याचीं क्रमानें उदाहरणें, प्रत्युदाहरणें व मतान्तरोदाहरणें या काव्यांत ग्रथित केलीं आहेत म्हणून या काव्यास द्याश्रयकाव्य असें म्हणतात. पहिल्या वीस सर्गांवर अभयतिलकगणीची टीका आहे. अभयतिलक व पूर्णकलश हे जिनेश्वर सूरीचे शिष्य होत. शेवटल्या आठ सर्गांपैकीं पहिल्या सहांमध्यें याचा दिग्विजय आहे व शेवटच्या दोन सर्गांत श्रुतदेवी नांवाच्या देवतेचा यावर अनुग्रह आहे.

**कुमारमणिभट्ट**—हा एक हिंदी कवि होय. यानें वि. सं. १८०३ ( स. १७४५ ) मध्यें रसिकरसाल नांवाचा एक सुंदर रीतिग्रंथ लिहिला आहे. आपण हरिवल्लभाचे पुत्र आहोंत असा उल्लेख यानें आपल्या ग्रंथांत केला आहे. हा गोकुळचा राहणारा होता, असें शिवसिंहानें म्हटलें आहे.

**कुमारराज**—याची राजधानी कर्णसुवर्ण ( मुर्शिदाबाद ). हा आसामचा प्राचीन राजा होय. ह्युएनत्संगाच्या वेळीं कामरूप देशाचा हा राजा होता. याला भास्करवर्मा असेंहि म्हणतात. हा हर्षाचा सहकारी मित्र असून याच्याविषयीं बाणभट्ट व ह्युएनत्संग यानें लिहून ठेवलेलीं वर्णनें तंतोतंत जुळतात.

ह्युएनत्संग म्हणतोः–" येथील गादीवरचा राजा ब्राह्मण असून नारायणदेवाचा वंशज आहे. याच्या वंशाकडे कामरूपाचें राज्य एक हजार पिढ्यांपासून चालत आहे. हा विद्येचा भोक्ता असल्यानें येथें लांबलांबचे लोक विद्याभ्यासासाठीं येतात. हा स्वतः बौद्धधर्मी नसला तरी बौद्धधर्मीयांना मान्यता देण्यांत येते."

याच्या बापाचें नांव सुस्थितवर्मा व जात क्षत्रिय होय, असें नांवावरून वाटतें. पण हा ब्राह्मण होता. कर्णसुवर्ण (मुर्शिदाबाद) येथील शशांक राजा मेल्यावर ( स. ६१९-नंतर ) तें राज्य हर्षानें याला दिलें ( डाक्का रिव्ह्यू १९१३, स. भा. १ पा. ६३; हर्षचरित्र ).

**कुमारलब्ध**—याला कुमारलात असेंहि म्हणत. हा सुप्रसिद्ध बौद्ध पंडित होता. ह्युएनत्संगच्या मतें हा 'सौत्रांतिक' पंथाचा संस्थापक होय. हा मूळचा तक्षशिला येथील राहणारा. 'कल्पनामंडितिका' अथवा कल्पनालंकृतिका हा याचा सुप्रसिद्ध ग्रंथ होय. अश्वघोषाचा म्हणून मानला गेलेला 'सूत्रालंकार' हा ग्रंथ वस्तुतः यानेंच लिहिला. वर उल्लेख केलेलाच तो ग्रंथ होय. या ग्रंथांत राजा कनिष्काचा प्राचीन राजा म्हणून उल्लेख सांपडतो. म्हणजे हा कनिष्कानंतर सुमारें २०० वर्षांनंतर झाला असावा. हा ग्रंथ संपूर्ण उपलब्ध नाहीं. परंतु याची भाषा शुद्ध संस्कृत असून व्याकरणाच्या चुकाहि थोड्या आहेत. फक्त मध्यें दोनच आर्या प्राकृतांत आढळतात.

पूर्वेस अश्वघोष, दक्षिणेस देव, पश्चिमेस नागार्जुन व उत्तरेस हा, असे समकालीन विद्वान् हिंदुस्थानांत होते. त्यांत हा श्रेष्ठ होता. हा दररोज कमींत कमी ३२ हजार अक्षरें लिहीत असे.

यानें अनेक शास्त्रांवर ग्रंथ लिहिले आहेत, असें दंतकथा म्हणून चिनी प्रवासी लिहितो ( विंटरनिट्झ–हिस्टरी ऑफ् संस्कृत लिटरेचर, भाग २ ).

**कुमार वाल्मीकि**—( १५०० सुमार ) कानडी कवि. ब्राह्मण.

ग्रंथ–रामायण. याचें रामायण तोरवे गांवीं लिहिल्यामुळें तोरवेरामायण या नांवानें प्रसिद्ध आहे. तसेंच महिरावणाच्या युद्धांसंबंधींहि प्रसिद्ध असलेला ग्रंथ याचाच असावा. यानें आपलें नांव नरहरी असें सांगितलें आहे. पण हा कुमार वाल्मीकि या पदवीदर्शक नांवानेंच विशेष

प्रसिद्ध आहे. याचें तोरवे हें गांव सोलापूर जिल्ह्यांतील असें म्हटलें असलें तरी तें विजापूरजवळचें असावें. कारण यानें उल्लेख केलेलें नरसिंहाचें देवस्थान तेथेंच आहे. नरसिंहाच्या देवळांत बसूनच यानें आपला ग्रंथ लिहिला आहे. कुमार व्यासाचा हा गौरव करतो आणि त्याप्रमाणेंच याचीं वर्णनें सरस असतात (क. क. च. भा. १ पा. १४६). कानडींत ब्राह्मण कवींनीं लिहिलेल्या रामायणांपैकीं याचें रामायण पहिलें होय.

**कुमारविष्णु पल्लव**—हा पल्लव घराण्याचा मूळ संस्थापक होय. यानें कांची येथें स्वतंत्र राज्य स्थापिलें. हा स्कंदशिष्याचा पुत्र व वीरकूर्चाचा नातू. पुढें या वंशांत शूर राजे न निपजल्यानें समुद्रगुप्तानें यांना मांडलिक बनविलें (स. ३३८) हा स. २०० च्या सुमारास झाला. हा समुद्रगुप्ताच्या प्रयाग येथील लेखांत (स. ३३८) व वेलूरच्या पल्लवांची वंशावळ असलेल्या लेखांत १९ वा विष्णुगोप म्हणून दिलेला राजा हाच असावा. हा हिंदुधर्माभिमानी व शैव होता.

२. (स. ३७५–४००) पल्लव घराण्यांतील दुसऱ्या स्कंदवर्मन्चा मुलगा. याला बुद्धवर्मन् आणि नंदिवर्मन् असे दोन मुलगे होते (जयस्वाल पृ. १९१). यानें अश्वमेध यज्ञ केला होता. याची पत्नी नागराजकन्या होती.

३. हा बुद्धवर्मन् पल्लवाचा पुत्र.

**कुमारव्यास**—(स. १४३० सुमार) कानडी कवि. जात-ब्राह्मण. माध्वसांप्रदायी असावा. गांव-कोळीवाड (गदगजवळ). ग्रंथ-यानें कानडी भाषेंत संस्कृत महाभारताचीं पहिलीं दहा पर्वें लिहिलीं.

याचें मूळ नांव नारायणप्प असें होतें. गदगच्या वीरनारायणाचा हा भक्त होता. त्या देवळांत बसून यानें आपला ग्रंथ लिहिला. राईस व किटेल हे हा विजयानगरच्या कृष्णदेवरायाच्या (स. १५०९–१५२९) कारकीर्दीच्या पूर्वभागांत होता, असें म्हणतात. पण हें म्हणणें कर्नाटक कविचरित्रकार आर. नरसिंहाचार्य यांना मान्य नाहीं.

विजयनगरच्या (प्रौढ) देवरायाच्या (स. १४१९–१४४६) वेळीं हा व याच्या बायकोचा भाऊ चामरस हे दोघेहि प्रसिद्ध कानडी कवि होते; आणि त्यांच्यांत स्पर्धाहि होती. यासंबंधीं अनेक आख्यायिका वीरशैवांच्या वाङ्मयांत प्रसिद्ध आहेत. वीरशैव ग्रंथांतील आख्यायिका खऱ्या मानल्यास याचा काळ स. १४३० असा ठरतो.

१ लेखणी हातांत न धरतां, २ एकहि शब्द न परत घेतां किंवा न खोडतां, ३ न थांबतां, आणि ४ कोणत्याहि प्रकारें दुसऱ्याचें अनुकरण न करितां ग्रंथ लिहिण्यांत याचें वैशिष्ट्य होतें. हें केवळ ईश्वरी कृपेचें फळ होय असें याचें म्हणणें. भाषा सोपी व सर्वांना आवडणारें याचें काव्य आहे. लक्ष्मीशाच्या जैमिनिभारताच्या खालोखाल कानडी लोकांचा हा आवडता ग्रंथ आहे. ग्रंथ फार मोठा आहे.

यानें ऐरावत नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे. यांत गजगौरीव्रताची कथा आहे (क. क. च. भा. २ पा. ६४).

**कुमारसिंह**—याचा थोरला भाऊ सामंतसिंह. याच्याकडून मेवाडचें राज्य कीतू चौहानानें घेतलें. तें यानें गुजराथच्या राजाच्या साहाय्यानें पुनः मिळविलें; व आपल्या वंशपरंपरागत राज्याचा हा धनी झाला (रा. इ. पा. ४५८).

**कुमारस्वामिन्**—सुप्रसिद्ध टीकाकार मल्लिनाथाचा पुत्र. याची विद्यानाथकृत-प्रतापरुद्रयशोभूषणावर रत्नापण नांवाची टीका प्रसिद्ध आहे.

२. पोटण्या कवीचा भाऊ.

**कुमारिलभट्ट**—(स. ६५०–७५० सुमार) पूर्वमीमांसाशास्त्रावरील वार्तिककार व कर्ममार्गाचा प्रवर्तक. हा विद्वान् असून बौद्ध मतास यानें मोठ्या धाष्ट्र्यानें विरोध केला व वैदिक धर्माचें पुनरुज्जीवन केलें. विद्यारण्यकृत शांकरदिग्विजयांत यास स्कंदाचा अवतार म्हटलें आहे. यानें बौद्धांचा पराजय करून कर्ममार्गाचें प्रवर्तन केलें. याचाच फायदा घेऊन पुढें आद्य शंकराचार्यांनीं अद्वैत मताचा प्रसार केला. याचा काल (स. ७००) म्हणजे हर्षानंतरचा मानितात. याच्या कालाप्रमाणें याच्या वसतिस्थानाबद्दलहि दुमत आहे. याना संस्कृताखेरीज द्राविडादि इतर भाषा अवगत होत्या, व यानें बौद्ध धर्माचा अभ्यास बौद्ध भिक्षूंपाशीं केला होता. यानें केलेल्या मातुलकन्याविवाहाच्या निषेधावरून हा महाराष्ट्रीय नसावा असें दिसतें. स. ६५० ते ७५० हा याचा काल असावा. वार्धक्यांत यानें आपला देह अग्नीस अर्पण केला. त्या वेळीं आद्य शंकराचार्य याकडे आले होते, पण त्या वेळीं हा जळूं लागल्यामुळें यानें त्यांस माहिष्मतीस मंडनमिश्राकडे जाण्यास सांगितलें. याचें कर्मप्राधान्य शंकराचार्यांनीं खोडून काढलें.

जैन लोकांच्या ग्रंथांत याच्याविषयींची माहिती अशी देतात. 'जयमंगल हें गांव उत्कल व तैलंगण यांच्या सरहद्दीवर होतें. याचा जन्म जयमंगल गांवीं झाला. हा तैत्ति-

रीय शाखेचा कृष्ण यजुर्वेदी ब्राह्मण होता. याच्या आईचें नांव चंद्रगुणा असें होतें. यानें जैनाचार्याजवळून कपटानें जैन-धर्माचीं मतें समजावून घेतलीं; व अखेर त्यांचाच घात केला. राजाच्या सांगण्यावरून यानें जर वेद खरे असतील तर मला कांहीं अपाय होणार नाहीं असें म्हणून पर्वतावरून उडी मारली, पण हा सुखरूप राहिला.

तंत्रवार्तिकांतील एका ठिकाणीं केलेल्या "आन्ध्रद्रविड-भाषायाम्" शब्दप्रयोगावरून हा तामिलनिदर्शक कांहीं तरी शब्द असला पाहिजे असा बर्नेलनें शेरा मारला आहे ( धर्मकृति पाहा ).

याचे ग्रंथः—( १ ) आश्वलायनगृह्यकारिका ( ? ), ( २ ) मीमांसातंत्रवार्तिक, ( ३ ) मीमांसाश्लोकवार्तिक, ( ४ ) लघुवार्तिक, ( ५ ) टुप्टीका, ( ६ ) बृहट्टीका. यांशिवाय आणखीहि कांहीं वार्तिकग्रंथ याच्या नांवावर आहेत.

मानव श्रौतसूत्रावर याची टीका आहे असें दिसतें. असें असेल तर हा मैत्रायणी शाखेचा असावा.

सनाच्या बाराव्या शतकाच्या पूर्वार्धांत झालेल्या मंख-कवीच्या श्रीकंठचरित्रांत तुतातित असें पद कुमारिला-करितां वापरलें आहे ( श्रीकंठचरित. २५. ६५–६६ ). जोनराजाच्या टीकेंतहि तेथें तुतातित पदाचा अर्थ कुमारिल असाच केला आहे. आणि 'महतां सम्यङ् नामग्रहणमयुक्तमिति तुतातितशब्दः प्रयुक्तः' असें स्पष्टीकरण केलें आहे. 'इति तौताः' असा निर्देशहि कुमारिलाच्या अनुयायांना उद्देशून केलेला असतो ( ना. प्र. प. १ पा. २२८ ).

यानें 'यदि वेदाः प्रमाणं' म्हणून पूर्वपक्षांत कां होईना वेदांच्या प्रामाणिकत्वाबद्दल शंका घेतली म्हणून प्रायश्चित्ता-दाखल तुषाग्नींत आपणास जाळून घेतलें अशी प्रसिद्धी आहे.

**कुमुदेंदु**—कानडी जैन कवि. यानें षट्पदी छंदांत एक रामायण लिहिलें. त्या ग्रंथाचें नांव 'कुमुदेन्दु-रामायण'. हा ग्रंथ समग्र उपलब्ध नाहीं ( स. १२७५ ).

**कुरुकुल्ला**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं असून याचा महामुद्राभिगीति ( तं. ४८।९९ ) हा ग्रंथ आहे.

**कुरुस्**—( ख्रि. पू. ५५८–२८ ) इराणच्या हखा-मनीषीय घराण्यांतील राजा. सायरस असाहि याचा उच्चार आहे. यानें हिंदुस्थानचा कांहीं भाग आक्रमण केला होता ( सायरस पाहा ).

**कुलपट्टी कलापराय**—हा तेलगू कवि असून भत्राजु जातीचा होय. रायपुर तालुक्यांतील गोंडवोलु येथील राहणारा. यानें गद्यात्मक इंद्र-नारदसंवाद नांवाचा ग्रंथ लिहिला आहे ( परशाकृत तेलगू वाङ्मय, पृ. ६६ ).

**कुलभूषण पांड्य**—हा अनंतगुण पांड्याच्या मुलगा. याच्यावर चेदिराज चालून आला, पण उलट त्याला माघार घ्यावी लागली.

**कुलपतिमिश्र**—एक हिंदी कवि होय. हा आग्रा येथील राहणारा होय. याच्या बापाचें नांव परशुराम-मिश्र असें होतें. हा ब्राह्मण असून जयपूरच्या रामसिंहाच्या दरबारीं होता. याचा 'रसरहस्य' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. यानें द्रोणपर्व, युक्ति-तरंगिणी, नखशिख, संग्रहसार, गुणरसरहस्य वगैरे ग्रंथ लिहिले.

हा रीति-काल कवींमध्यें संस्कृतांतील मोठा होय. याचा 'रसरहस्य' हा ग्रंथ, मम्मटाच्या 'काव्यप्रकाश' ग्रंथाची छाया होय. यानें आपल्या आश्रयदात्याची प्रशंसा करतांना आपल्या चरित्रांतील कांहीं उदाहरणें दिलीं आहेत. याची भाषा अलंकारयुक्त आणि रचनाहि सरस आहे.

**कुलशेखर**—हा त्रावणकोरच्या राजघराण्यांत जन्मला होता. यानें फार चांगल्या रीतीनें राज्य केलें. याच्या कारकीर्दींत दुबळ्या लोकांस जबरदस्तीपासून बिलकुल पीडा होत नसे. यानें धार्मिक ग्रंथांचा फार मेहनतीनें अभ्यास केला. विशेषतः यास रामायण फार आवडत असे.

या राजानें तिरुपति व श्रीरंग येथील यात्रा केल्या व नरसेवा म्हणजे ईश्वरसेवा करणें होय, हें आपल्या चरित्रानें दाखविलें. यानें तामिल व संस्कृत या दोन्ही भाषांत ग्रंथ लिहिले आहेत. याचा 'तेट्टरुंदिरल' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे.

**कुलशेखर पांड्य**—( स. ११६७ सुमार ) हा एक पराक्रमी पांड्याबरोबरच समान हक्कदार होता. यानें लंकापूरदंडनाथाबरोबर अनेक युद्धें केलीं. पण सर्व युद्धांत पराभव पाऊन शेवटीं हा पळून गेला. लंकापूरदंडनाथ हा पराक्रम पांड्याचा सेनापति होता. पुढें याचा मुलगा विक्रमपांड्य हा मदुरेचा राजा झाला. त्याला तिसऱ्या कुलोत्तुंग चोलाचें साहाय्य होतें.

**२.** (स. १२६८–१३१०) याचें राज्य सिलोनवरहि होतें. व्हेनेशियन प्रवासी मार्कोपोलो लिहितो कीं याचे सेनापति मुसलमान होते ( आर्यचक्रवर्ति पाहा ). याला

सुंदर पांड्य व वीर पांड्य असे दोन मुलगे होते. यानें वीरपांड्याला आपल्या पश्चात् गादी दिल्यामुळें रागावून सुंदर पांड्यानें याचा खून केला. वास्तविक सुंदर पांड्य हा याचा योग्य वारस होता.

३. ( १३१४-४५ ) याचे मदुरा, तंजावर वगैरे ठिकाणीं शिलालेख आहेत.

**कुलशेखरवर्मा**—केरळदेशांतील संस्कृत नाटककार. यानें ' सुभद्राधनंजय ' नांवाचें नाटक लिहिलें आहे. कुलशेखरवर्मा हा केरलकुलांतील एक देदीप्यमान तारा होता व हा १० व्या शतकाचा उत्तरार्ध व १२ व्या शतकाचा पूर्वार्ध यांच्या दरम्यान केव्हांतरी होऊन गेला असें दिसतें. महाभारतांतील तपती व संवरण यांच्या संबंधींचें ' तपतीसंवरण ' नाटक यानेंच लिहिलें आहे.

**कुलेश पांड्य**—एक राजा. याचा निर्देश वंशशेखरानंतर येतो. हा फार विद्वान् होता.

**कुलोत्तुंग चंगाल्व**—( स. १०९७–१११४ ) हा चंगाल्व घराण्यांतील एक राजा. याला उदयादित्य म्हणत.

२. चंगाल्व घराण्यांतील राजा. याला महादेव ऊर्फ पेम्म वीर पम्म असें म्हणत.

३. ( स. १२४६–१२५२ ) चंगाल्व घराण्यांतील राजा. याला सोमदेव भोप्प असें म्हणत.

**कुलोत्तुंग(चोल)चालुक्य**—(स. १०६३-१११८) हा पूर्व चालुक्यांपैकीं पहिल्या राजराजाचा मुलगा. याला पहिला राजेन्द्रचोल म्हणत. यानें चोलांचें राज्य जिंकलें व वेंगी प्रान्तावर प्रतिनिधी नेमून आपण चोलांचें राज्य पाहूं लागला. यानें वेंगी प्रान्तावर आपला पहिला प्रतिनिधी नेमला ( स. १०६३–१०७७ ). तो विजयादित्य सातवा होय. तो कुलोत्तुंगाचा चुलता होता. दुसरा प्रतिनिधी दुसरा राजराज (स.१०७७–१०७८), व तिसरा वीरनाथ ऊर्फ वीरदेव होता (स.१०७८-११०७). याच्यापासून वेंगीचें राज्य हा चोल देशाचा एक भाग झाला. याचा समकालीन पश्चिम चालुक्याचा राजा सहावा विक्रमादित्य होय. याचा मांडलिक कलिंग देशच्या राजावर खंडणी न दिल्यामुळें स. १०७१ मध्यें यानें स्वारी केली होती. याची राजधानी या वेळीं गंगापुरी होती. विक्रमाङ्कदेवचरित या काव्यावरून असें दिसतें कीं, चोल राज्यांतील अन्तःकलहामुळें याला चोलराज्य बळकाविण्यास संधि मिळाली ( स. १०६३–१११२ ).

चोलवंशांतील अधिराजेन्द्रास पुत्र नसल्यानें चालुक्य वंशांतील कुलोत्तुंगाकडे चोलाचें राज्य गेलें. कुलोत्तुंग हा दोनदां गादीवर बसला. एकदां स. १०७० मध्यें पैतृक राज्यावर म्हणजे वेंगीच्या सिंहासनावर व दुसऱ्यांदा सर्व चोल साम्राज्याच्या सिंहासनावर स. १०७४ मध्यें बसला, असें भट्टनाथस्वामी म्हणतात. कारण स.१०७४ मध्यें यानें कुलोत्तुंग ही पदवी धारण केली. त्यापूर्वी याचें साधें नांव राजेन्द्रच होतें. राजेन्द्र ऊर्फ कुलोत्तुंग चोल हा चालुक्यवंशी राजराज चालुक्याचा मुलगा असून राजेंद्र चोलाचा जांवई होता. याची आई अम्मंग देवी ही गंगैकोंड चोल राजाची कन्या होती. हा लहानपणीं आपल्या आजोळीं ( सासुरवाडीस ) राहत असे. याच्या बापाचे मरणानंतर याच्या चुलत्यानें वेंगीचें राज्य बळकावलें होतें. हा वेंगीचा राजा व्हावयास पाहिजे होता, परंतु चालुक्य राजवंशांत या वेळीं यादवी माजली होती व हा अज्ञान होता. मोठा झाल्यावर हा तिरुवोरीयुर प्रान्ताचा सुभेदार झाला. याला राजकेसरीवर्मा अशी पदवी होती. हा वर सांगितल्याप्रमाणें गंगैकोंड या चोल राजाचा मुलीकडून नातू होता. याचा बाप राजराज स. १०६१-६२ मध्यें वारला. हा युवराज असतां यानें वैरागरम व चक्रकोट हीं महत्त्वाचीं ठाणीं काबीज केलीं होतीं. याच्या कारकीर्दीच्या एकूणपन्नास वर्षांपर्यंतचे शिलालेख प्रसिद्ध आहेत. यावरून हा स. १०७० मध्यें वेंगीच्या व चोलराजांच्या गादीवर बसल्याचें दिसतें. त्यापूर्वी हा आपल्या आज्यावरोबर ( गंगैकोंड ) बऱ्याच लढायांत हजर असे. चोल साम्राज्याच्या सिंहासनावर बसण्याची संधि लक्ष लावून हा पाहत होता; आणि ती अधिराज राजेंद्राच्या वेळीं याला लाभली. याची पत्नी मदुरांतकी ( अधिराजराजेंद्र पाहा ). तत्पूर्वी हा आपणास चालुक्य न म्हणवून घेतां चोलच म्हणवीत असे. याची आई व आजी कुंदव्वा या चोलच होत्या. याचा ध्वज चोलांचा व्याघ्रचिन्हांकित होता, चालुक्यांच्या प्रमाणें वराहचिन्हांकित नव्हता. यानें आपल्या राज्यारोहणाच्या चवथ्या वर्षी कुलोत्तुंग ही पदवी धारण केली आणि कुंतलराजाचा व पांड्य राजांचा पराभव केला. याला कावेरीनदीतीरावर राज्याभिषेक झाला होता. यानें म्हैसूर प्रान्तावर स्वारी करून ( स. १०८१ ) विक्रमादित्य चालुक्याचा पराभव केला ( स. १०८३ ); व त्याला तुंगापार घालवून गंगामंडल व सिंघण प्रान्त काबीज केले. पाण्ड्य राजाला जिंकून मानार, तिनेवेल्ली, कन्याकुमारी, कुट्टरू, मलबार वगैरे प्रान्त काबीज केले ( स. १०८५ ); आणि त्या त्या प्रान्तीं आपले अधिकारी नेमले. याच्या एका तोंडमान चक्रवर्ती नांवाच्या लेकवळ्यानें पल्लवराजाचा पराभव करून तें राज्य खालसा

केलें होतें. याप्रमाणें कुलोत्तुंगानें चोलसाम्राज्य वाढविलें. ह्या वेळीं दख्खनमध्यें विक्रमादित्य चालुक्य व कुलोत्तुंग चोल हे बलिष्ठ सम्राट् होते. पाण्ड्य व चेर हे चोलांचे मांडलिक होते. मदुरेस कुलोत्तुंगानें आपल्या भावास अधिकारी नेमलें होतें. यानें राज्यप्रसार करतांना राज्यांतील व्यवस्थे-कडेहि लक्ष दिलें. आपल्या सर्व राज्याच्या जमीनींची मोजणी केली ( स. १०८६ ). या मोजणींतील शेवटचें परिमाण श्रीपाद ( कुलोत्तुंगाचें पाऊल ) हें होतें. यानें दोनदां कलिंगदेश जिंकला (स.१०९५,१११२), त्यामुळें याची कीर्ति फार वाढली. टेकी ताम्रपटावरून दक्षिण कलिंग चोलसाम्राज्यांत मोडत असल्याचें दिसतें. यानें शेवटीं गंगवाडी प्रान्त होयसलापासून पुनः काबीज केला. कारण त्यांनीं याच्या सुभेदाराला गंगवाडींतून हुसकून देऊन उलट याच्याविरुद्ध चालुक्यास मदत केली होती. हा शैव असल्यानें यानें रामानुजाचार्यांना हद्दपार केलें होतें.

२. ( स. ११३५–४६ ) हा पूर्व चालुक्यांपैकीं विक्रम-देवाचा मुलगा. हा पूर्व चालुक्यवंशांतील शेवटला पुरुष होय. हा स. ११२७ मध्यें गादीवर आला. यानें स. ११३२ मध्यें दिलेलें ताम्रपत्र उपलब्ध आहे. याच्या वेळीं वारंगळचे गणपतीराजे हे या सर्व चालुक्यांचा प्रदेश हळुहळू घशाखालीं उतरवीत होते. शेवटीं त्यांनीं स. ११२८ ( डॉ. बर्नेलच्या मतें ) या सुमारास या चालुक्याचें राज्य खालसा केलें असावें. पुढें हे राजे फार तर मांड-लिक असावे. याच्यावर अनेक काव्यें झालीं आहेत. यानें चिदम्बरम् येथील देवाची मूर्ति समुद्रांत टाकली. ती पुढें रामानुजानें काढली, असें एका लेखांत वर्णन आहे. याच्या मागून राजराज दुसरा हा याचा चुलतभाऊ राजा झाला ( स. ११४६ ).

३. ( स. ११८६–१२१६ ) हा चोलांपैकीं दुसऱ्या राजाधिराजाचा मुलगा. यानें उत्तरेंत स्वारी केली. वीर-पांड्याचा यानें पराभव करून मदुरा घेतली आणि ती विक्रमपांड्यास दिली. नेत्तुर येथें यानें फिरून वीर पांड्याचा पराभव करून त्याला व चेर राजाला क्षमा केली ( B. ).

कांचीच्या तेलगू चोलाला नामोहरम केलें. यानें अनेक शिवालयें बांधलीं. यानें अनेक मांडलिक उत्पन्न केले व त्यानेंच पुढें चोलसाम्राज्य खिळखिळें केलें. तसेंच होयसल, काकतीय व यादव वगैरे शेजारचे राजेहि हातपाय पसरूं लागले, त्यामुळें चोलसाम्राज्य मोडकळीस आलें. दक्षिणेंतील सर्व राज-घराण्यांत अंतःकलह माजला. याच्या वेळीं जैन भवनन्दी यानें नन्नुल हें तामील व्याकरण लिहिलें. याच्यानंतर याचा मुलगा राजराज तिसरा त्रिभुवनचक्रवर्ति, राज-केसरीवर्मा हा राजा झाला ( स. १२१६ ).

**कुलोत्तुंग पांड्य**—हा पांड्य घराण्यांतील राज-शेखराचा मुलगा.

**कुलु(ल्लु)घखान**—( स. १३२१–१३४० ) दक्षिण हिंदुस्थानचा सुभेदार. याचें मूळ नांव मलिक कुवाम उद्दीन. पण दक्षिणेचा सुभेदार नेमलें, तेव्हां यास वरील पदवी देण्यांत आली. घियासुद्दीन तुघ्लकच्या कारकीर्दीत दक्षिणेंत बंडें झालीं नाहींत. नाहीं म्हणावयास वरंगळच्या प्रतापरुद्रदेव काकतीयानें दिल्लीस खल्जीवंश नामशेष झाल्यानें खंडणी देण्याचें टाळलें. तेव्हां त्यावर युवराज मुहंमद ऊर्फ उलूघखान याची योजना झाली. त्याची पहिली स्वारी ( स.१३२१ ) फसली, पण दुसऱ्या स्वारींत यश येऊन त्यानें तो प्रांत खालसा केला आणि त्यावर याची नेमणूक केली. हा दक्षिणचा कारभार पाहत असतां प्रथम बहादुद्दीन गुरशास्प यानें बंड केलें व दुसरें अलीशाहकारनें केलें ( स. १३४० ). यापुढें मात्र प्रांताच्या वसुलाचा मक्ता देण्याची पद्धत सुरू केल्यानें प्रजा त्रस्त झाली आणि उत्पन्न कमी पडलें. पण कांहीं लोकांनीं याच्याविषयीं घियासुद्दीनचें मत कलुषित केल्यानें त्यानें याला नोकरींतून कमी करून याचा भाऊ मौलाना निजामुद्दीनची दक्षिणच्या सुभेदारीवर नेमणूक केली. पण अननुभवी माणसाच्या कारकीर्दीत बंडाचा वणवा पेटला आणि हसन कांगो बहामनी हा बंडखोरांचा पुढारी ३ आगष्ट स. १३४७ रोजीं स्वतंत्र राजा झाला.

**कुल्लूकभट्ट**—( स. ११५०–१३०० सुमार ) मनु-स्मृतीवरील एक टीकाकार. यानें भोजदेव, गोविंदराज, कल्पतरु आणि हलायुध यांचा उल्लेख केला आहे. यावरून हा स. ११५० च्या नंतर झाला असावा, आणि रघुनंदनानें याचा उल्लेख केल्यावरून हा स. १३०० शेंच्या अगोदर झाला असावा. तेव्हां याचा काल स. ११५०–१३०० असा असावा.

ह्याची 'मन्वर्थमुक्तावली' नांवाची मनुस्मृतीवरील टीका फार उत्कृष्ट आहे. या ग्रंथाच्या पुष्कळ आवृत्त्या छापलेल्या आहेत. ह्यानें निरुपयोगी चर्चा गाळून फक्त मुद्याला धरून आपला ग्रंथ लिहिला आहे. ह्यानें बराचसा भाग मेधातिथि आणि गोविंदराज यांच्या ग्रंथांतून घेऊन आपल्या ग्रंथामध्यें मिसळून दिला आहे. मेधातिथि आणि गोविंदराज या दोघांचीहि हा चिकित्सा करीत असे.

यानें आपल्या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत आपल्याविषयीं थोडीशी माहिती दिलेली आहे. हा बंगालच्या वारेंद्र ब्राह्मण घराण्यांतील होय. याचें मूळ गांव गौड देशांतील नंदनवासिन् नांवाचें होतें. याच्या बापाचें नांव भट्ट-दिवाकर असें होतें. काशीच्या पंडितांच्या संगतीमध्यें यानें आपली ' मन्वर्थमुक्तावली ' ही टीका काशी येथें लिहिली. यानें ' स्मृतिसागर ' हा ग्रंथ लिहिला असावा. त्याचप्रमाणें 'श्राद्धसागर,' 'विवादसागर,' आणि 'आशौच-सागर ' असे ग्रंथ लिहिले. श्राद्धसागर हें ' पूर्वमीमांसे'नें परिपूर्ण भरलेलें आहे. विवादसागर आणि आशौचसागर असे दोन ग्रंथ यानें बापाच्या इच्छेवरून लिहिले, असा उल्लेख केलेला आहे.

**कुवलयानंद पांड्य**—हा मकरध्वज पांड्याचा नातू होय. यानें दर्यावरील व्यापार वाढविला. हा दर्यावरील सफरींत असतांच वादळानें बुडून मरण पावला.

**कुवलयापीड**—( स. ७३५-३६ ) हा कर्कोटक वंशापैकीं सहावा राजा होय. हा ललितादित्यानंतर गादीवर आला. हा फार निर्बल मनाचा होता. एकदां याचे प्रधानानें याचा आज्ञाभंग केला. तेव्हां हा इतका अस्वस्थ झाला कीं, याला रात्रभर झोंप आली नाहीं व यानें दुसऱ्या दिवशीं राज्यत्याग करून अरण्य-वास पत्करण्याचें ठरविलें. यानें फक्त १ वर्ष १५ दिवस राज्य केलें. याच्यामागून वज्रादित्य गादीवर आला.

**कुशलसिंग**—( स. १५३० सुमार ) हा बासडा संस्थानांतील एक राजा होय. यानें आपलें संस्थान स. १५३० च्या नंतर स्वतंत्र केलें. यानें भिल्ल लोकां-पासून आग्नेय भागांतील प्रदेश घेऊन त्याला कुशलगड असें नांव दिलें. या संस्थानांतील हा एक प्रसिद्ध राजा होऊन गेला.

**कुशलिपा**—यालाच कुद्दालिपा असें म्हणतात. हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं चव्वेचाळिसावा सिद्ध होय. जात वाणी. स्थळ रामेश्वर. शांतिपाचा शिष्य. ग्रंथ अचिंत-क्रमोपदेश (तं. ४८।८२), चित्ततत्त्वोपदेश (तं. ४८।८३) व सर्वदेवतानिष्पन्नक्रममार्ग ( तं. ४८।७७ ) हे होत.

**कुशान राजघराणें**—( हिंदुस्थानांतील साम्राज्य सुमारें स. ९० तें १७५ ).

वायव्य सरहद्दीच्या दरवाजानें हिंदुस्थानांत येऊन ज्या परकी राजवंशांनीं राज्यें स्थापन केलीं, त्यांपैकीं कुशान राजघराणें प्राचीन आहे. कदफिसेसच्या कारकीर्दींत कुशान साम्राज्य पंजाबांत गंगायमुनेच्या दुआबांत बहुधा काशी-पर्यंत व दक्षिणेस सिंधूच्या भोंवतालीं असावें. या साम्रा-ज्याचा विस्तार कनिष्कानें केला. कनिष्क व वासुदेव यांचे कारकीर्दींत कुशान साम्राज्य बिहारपर्यंत पसरलें होतें. हिंदुस्थानांतील या प्रांतांशिवाय अफगाणिस्थान, बॅक्ट्रिया, मेसापोटेमिया वगैरे पश्चिम आशियांतील भागहि या साम्राज्यांत मोडत असत. शिवाय काश्मीर प्रांतहि कनिष्कानें जिंकून आपल्या साम्राज्यांत दाखल केला होता. या घराण्यांतील कनिष्क या थोर राजाची राजधानी पुरुषपुर अथवा पेशावर येथें होती. हिंदुस्थानांतील राज्या-बरोबरच या घराण्याचें राज्य मेसापोटेमियापर्यंत असल्या-मुळें हिंदुस्थानच्या या राजाला आंतरराष्ट्रीय महत्त्व प्राप्त झालें होतें व हिंदुस्थानांतून रोमपर्यंत दळणवळणाला राजमार्ग उपलब्ध झाला होता.

मूळचें परकी असूनहि या राजवंशानें हिंदु संस्कृतीचा व बुद्धधर्माचा स्वीकार करून हिंदुसंस्कृति व बुद्धधर्माचा प्रसार हिंदुस्थानाबाहेर करण्याची महनीय कामगिरी केली. हे हिंदु संस्कृतीचे अभिमानी बनले असल्याचा उत्कृष्ट दाखला यांच्यांतलि वासुदेव या नांवांत आढळतो. यांनीं अनेक विहार बांधले, धर्मतत्त्वांची चर्चा करून धार्मिक वाङ्मय निर्माण करण्याकरितां पंडितांच्या महासभा भर-विल्या व या सभांना परदेशांतील विशेषतः चीनमधील विद्वानांस बोलावून हिंदु संस्कृतीचा प्रसार केला.

ज्या नागवंशीय राजघराण्याचा पराभव करून या वंशानें आपलें साम्राज्य उत्तर हिंदुस्थानांत स्थापिलें त्या नागवंशीय राजांनीं विंध्याद्रीचा आश्रय करून कुशान साम्राज्य नष्ट करण्याचे प्रयत्न केले ( किलकिला, भारशिव व वाकाटक घराणीं पाहा ). हिंदुसमाजरचनेमध्यें परकी लोक हिंदु झाल्यास अथवा हिंदुस्थानांतील एखाद्या धर्म-मताचा स्वीकार केल्यास त्यांना उच्चवर्णीय ब्राह्मणांचा अथवा क्षत्रियांचा दर्जा व मान प्राप्त होऊं शकत नाहीं. धर्मप्रेमानें बुद्धधर्म स्वीकारून हिंदु संस्कृतीचा अंगिकार केल्यावरहि कुशान राजवंश व तत्सम लोकांना सामाजिक उच्चवर्णीयत्व मिळालें नाहीं व उच्चवर्णीयांचा विरोधहि कमी झाला नाहीं. त्यामुळें कुशान राजांनीं हिंदु समाजरचना बिघडविण्याचे प्रयत्न केले; विश्वस्फाणि किंवा वनस्पर नांवाच्या त्यांच्या एका सुभेदारानें, कैवर्त, पंचक वगैरे शूद्रांहूनहि कमी दर्जाच्या जातींतील लोकांना अधिकाराच्या जागा देऊन एक नवीनच नोकरशाही निर्माण केली असल्याचा दाखला सांपडतो. काश्मीरांतहि त्यांनीं नागपूजा बंद करून तेथील लोकांवर बुद्धधर्म सक्तीनें लादला, असें राजतरंगिणी-वरून दिसतें. कुशान कालांतील आज उपलब्ध असलेल्या शिल्पांत फक्त बुद्ध व जैनांचेंच शिल्प आढळतें. कुशानपूर्व

कालापूर्वीच्या शिल्पासंबंधानें वर्णनें ग्रंथांतरीं उपलब्ध असूनहि त्या शिल्पपद्धतीचीं देवळें, मंदिरें किंवा इमारती उपलब्ध नाहींत. यावरून जयस्वाल या सुप्रसिद्ध संशोधकांचें असें मत झालें आहे कीं, कुशानकालांत पूर्वीच्या हिंदु शिल्पाचा विध्वंस झाला असला पाहिजे.

कुशानराजांनीं हिंदुस्थानांत राज्यस्थापना करण्यास सुरवात करण्यापूर्वी ऑक्झसनदीच्या दक्षिणेकडील बॅक्ट्रिया देशांत यांचें राज्य होतें. तथापि ते याहि प्रांतांत परकीच होते. यु-ई-ची नांवानें ओळखल्या जाणाऱ्या चीनच्या वायव्य भागांतील भटक्या लोकांतून कुशान घराणें उदयास आलें. चीनच्या वायव्यभागांत तेथील तुर्की जमातींमध्यें ख्रिस्तपूर्व स. १६५ चे सुमारास यादवी उत्पन्न होऊन यु-ई-चीं ज्ञातीस तो प्रांत सोडून आपलीं खिल्लारें चारण्यास भरपूर रानें असलेल्या गोबीच्या उत्तर भागांत यावें लागलें. त्यांच्या जमातींत त्या वेळीं लाख दोन लाख स्त्रीपुरुष व घोडे, मेंढ्या व इतर जनावरांचा मोठा लवाजमा होता. कांहीं कालानंतर यु-ई-चींनीं भटकेपणा सोडून बॅक्ट्रियामध्यें कायम वस्ती केली. स. ४० चे सुमारास या यु-ई-ची जमातीचीं ५ राज्यें बॅक्ट्रियांत होतीं. त्यांपैकीं कुशाज्ञातीच्या राजघराण्यास 'कुशान' असें म्हणत. या कुशानघराण्यांत कदफिसेस नांवाचा शूर राजा उदयास येऊन त्यानें यु-ई-चींच्या पांचहि राजांवर आपलें अधिराज्य स्थापन केलें. त्यानें किपिन ( चिनी ) म्हणजे गांधार काबीज केला. त्यानंतर कदफिसेस २ रा यानें पंजाब आपल्या राज्यास जोडला ( स. ९० ). या घराण्यांतील सर्वांत थोर सम्राट् कनिष्क. त्याच्या राज्याचा विस्तार वर दिलाच आहे. कुशानघराण्याची हिंदुस्थानांतील राजसत्ता सहावा राजा वासुदेव याचे कारकीर्दीत नष्ट झाली. तरीहि अफगाणिस्थानांत यांचें राज्य टिकून होतेंच.

**कुसाजी भोसले**—हे शाहूमहाराजांचे लेकवळे होते. हे शूर असल्यानें लढाईवर जाण्याची पाळी यांचेवरच येई. साताऱ्यानजिकच्या शिराळे प्रांताची सुभेदारी यांचेकडे असे. पुढें कर्नाटक प्रांतावर बाबूजी नाईकाची नेमणूक झाली असतां त्याजकडे अर्धा कर्नाटक दिला, व अर्धा याजकडे दिला, शिराळें येथील भोसले घराण्याचे हे संस्थापक होत ( शाहूमहाराज बखर ).

**कुस्तन**—मौर्यसम्राट् अशोकाचा मुलगा. यानें खोतान प्रांतांत बौद्धधर्माचा प्रचार केला, असें बौद्ध ग्रंथ व खोतानी ग्रंथांवरून कळतें. हे खोतानी ग्रंथ सध्यां उपलब्ध नाहींत. पण तिबेटी भाषेंत आढळणारे कांहीं ग्रंथ त्या खोतानी ग्रंथांचें भाषान्तर असावेत असें वाटतें. त्या तिबेटी ग्रंथांचीं नांवें राखेलच्या 'दि लाइफ ऑफ बुद्ध' या ग्रंथांत आढळतात. त्या ग्रंथांतील माहितीवरून बऱ्याच गोष्टींवर प्रकाश पडतो. अशोकाच्या पूर्वींहि कांहीं प्रचारक खोतानकडे गेले, पण तेथील लोकांकडून अवमानित होऊन ते परत आले. नंतर तेथें कांहीं भौतिक घटनेमुळें पाण्याचे प्रवाह वाहूं लागले व देश बेचिराख झाला. अशोकाचा मंत्री यश व हा हे तेथें गेले. तेव्हां तेथें कांहीं चिनी लोकहि आले. आणि त्या दोघांनीं खोतान पुनः वसवला. धर्मप्रचाराबरोबर नवीन वसाहत करण्याचा हा इतिहास आहे.

**कुंग**—फाहियान या चिनी प्रवाशाचें मूळनांव.

**कुंडधान**—हा श्रावस्तींतील एका ब्राह्मणकुलांत जन्मला. वेदाध्ययन वगैरे करून विद्वान् झाल्यावर उतारवयांत यानें बौद्धसंघांत प्रव्रज्या घेतली. हा भिक्षेसाठीं गांवांत जात असतां याच्या मागोमाग एक स्त्रीहि जात असे; व परत येतांना ती मागोमाग येत असे. त्यामुळें गांवांतील बायकापोरें थट्टा करूं लागलीं. 'धान्याचा कोंडा झाला,' 'धान्याचा कोंडा झाला' असें तीं म्हणत, तेव्हां धानहि 'तुम्ही कोंडा' इत्यादि बोलून त्यांना शिव्या देई. त्यामुळें याला कुंडधान हें नांव मिळालें. हा असा लोकांशी भांडतो, हें भगवंताला समजलें तेव्हां याला बोलावून आणून धम्मपदांतल्या दोन गाथा भगवंतानें म्हटल्या. त्यांचा अर्थ असा 'अपशब्द बोलूं नकोस. तूं बोललास तर लोकहि तुला बोलतील. ह्याप्रमाणें हमरीतुमरी दुःखदायक आहे. त्यायोगें तुझ्यावर प्रत्याघात होतील. पालथ्या घातलेल्या भांड्याप्रमाणें जर तूं मनांतून आवाज बाहेर पडूं दिला नाहींस तर तूं निर्वाणाजवळच आहेस. कारण तुला प्रत्याघातबुद्धि राहिली नाहीं.' पुढें भगवंताच्या उपदेशाप्रमाणें वागून स्वप्रयत्नानें हा अर्हत् झाला. तरी कुंडधान हेंच याचें नांव कायम राहिलें. याची अशी कांहीं पुण्याई होती कीं, उपासकांनीं आमंत्रणपत्रिका पाठविल्या असतां बहुधा पहिली पत्रिका याला मिळे ( बौद्धसंघाचा परिचय, पृ. १८० ).

**कुंडल केसरी**—केसरी घराण्यांतील एक राजा. यानें पुरी येथील मार्कंडेश्वराचें मंदिर स. ८११–२९ चे दरम्यान बांधलें, असें हंटरनें आपल्या ग्रंथांत म्हटलें आहे.

**कुंडिन**—तैत्तिरीयशाखेचा हा वृत्तिकार असल्याबद्दल कांडानुक्रमणींत लिहिलें आहे. बौद्धायनगृह्यसूत्रांत हें नांव

कौंडिन्य असें आहे. हा फार प्राचीन म्हणजे खि. पू. पांचव्या शतकांतील असण्याचा संभव आहे.

**कुंतल** किंवा **कुंतलक**—( स. ९२५-१०२५ सुमार) याचा वक्रोक्तिजीवित नांवाचा एक अत्यंत महत्त्वाचा संस्कृत ग्रंथ अद्यापि अप्रसिद्ध आहे.

**कुंतल शातकर्णि**—याचा उल्लेख वात्स्यायनाच्या कामसूत्रांत आला आहे. कामचेष्टा सहन न झाल्यानें, महादेवी मलयवतीला यानें कात्रीनें ठार केलें (भांडारकर ५६).

**कुंथुनाथ**—जैनांचा सत्रावा तीर्थंकर ( तीर्थंकर पाहा).

**कुंदकुंदाचार्य**—(खि. पू. ५२०) सरस्वतीगच्छांतील हा जैन यति होय. हा वीर संवत् ४९ मध्यें जन्मून वयाच्या ९५ व्या वर्षी मरण पावला. यानें कांहीं ग्रंथरचना केली आहे. त्यापैकीं शिवकुमार महाराजांकरितां पंचास्तिकाय हा ग्रंथ यानें लिहिला, असें त्या ग्रंथावरील टीकेवरून समजतें. यानें षट्प्राभृत हा ग्रंथ केला असून त्यावर श्रीश्रुतसागरानें टीका लिहिली आहे. याच्या गुरूचें नांव विद्यानंदिन् असें होतें. याचा तिसरा ग्रंथ तत्त्वार्थदीपिका हा होय.

**कुंदवाई**—ही सुंदर चोल परांतक २ रा याची मुलगी ( सुंदरचोल पाहा ).

**कुंदव्वा**—ही गंग घराण्यापैकीं पहिल्या पृथ्वीपतीची मुलगी. ही विक्रमादित्य बाणाला दिली होती.

**२.** ही दुसऱ्या परान्तक चोलाची मुलगी. ही पल्लवराजाला दिली होती.

**३.** ही पहिल्या राजराज चोलाची मुलगी. ही विमलादित्य चालुक्याला दिलेली होती.

**४.** ही मधुरान्तक उत्तम चोलाची मुलगी.

**कुंभकर्ण गुहिलोत**—(स. १४३३-६८) उदेपूरचा राणा. मोकलच्या मागें त्याचा ज्येष्ठ पुत्र कुंभकर्ण ऊर्फ कुंभा हा गादीवर आला ( वि. सं. १४९०- स. १४३३ ).

यानें महाराजाधिराज, रायराय ( राजराज ), राणेराय, महाराणा, राजगुरु, दानगुरु, शैलगुरु, परमगुरु, चापगुरु, तोडरमल्ल ( गज, हय व नर यांच्या अधिपति अशा राजांना जिंकणारा मल्ल ), अभिनवभरताचार्य, व हिंदुसुरत्राण अशीं बिरुदें धारण केलीं होतीं, असें शिलालेखावरून दिसतें. त्यावरून हा राजांचा राजा, विद्वान्, दानी व महाप्रतापी असल्याचें सूचित होतें.

राज्यावर आल्याबरोबर यानें आपल्या पित्याला ठार मारणाऱ्या चाचा व मेरा यांना मंडोवरच्या रणमल्लाकडून ठार करविलें. तेव्हांपासून रणमल्लाचें वर्चस्व याच्या दरबारांत वाढत चाललें. याचा चुलता राघवदेव याचें वरेंच वर्चस्व दरबारांत होतें, तें रणमल्लाला सहन होत नसे. एकदां तर शिरपाव देण्याकरितां राघवदेवाला दरबारांत बोलावून बंद तोंडाच्या बाह्याचा अंगरखा पोषाख म्हणून त्याला घालावयास दिला व त्याचे दोनहि हात बाहींत गुंतले असतां दोहीं बाजूंनीं हल्ला करवून भर दरबारांत राघवदेवाला ठार केलें. कुंभा त्या वेळीं रणमल्लाला कांहींच बोलला नाहीं. पण याच्या कानावर वरचेवर रणमल्लाच्या प्रामाणिकपणाविषयीं संशय उत्पन्न करणाऱ्या गोष्टी येऊं लागल्या. महपा पवार व चाचाचा पुत्र एका यासहि शरणागत म्हणून यानें रणमल्लाच्या सल्ल्याविरुद्ध आश्रय दिला. याची माता सौभाग्यदेवी व तिची दासी भारमली यांच्याकडून अशाच रणमल्लाविरुद्ध कागाळ्या येऊं लागल्या. कारण भारमली रणमल्लाच्या प्रेमांतील होती. कुंभकर्णाला संशय येऊं लागला, पण राठोडाशिवाय भोंवतीं कोणीच दिसेना. तेव्हां कोणी तरी विश्वासूक सिसोदियांपैकीं जवळ पाहिजे म्हणून चूंडाला स्वार पाठवून बोलावण्यांत आलें. चूंडा अज्जासह चितोडला आला. पण रणमल्लाला संशय आला म्हणून त्यानें तक्रार केली, तेव्हां सौभाग्यदेवीनें चूंडाच्या त्यागाविषयीं रणमल्लाला स्पष्टपणें सांगून गप्प बसविलें.

रणमल्लानेंहि आपलीं मुलें दूर पाठविण्याची व्यवस्था केली. शेवटीं एक दिवस रात्रीं तो दारूच्या निशेंत असतां महपा (महीपाल) पवारानें रणमल्लाला ठार केलें. चूंडानें रणमल्लाचा पुत्र जोधा याचा पाठपुरावा केला आणि त्याचें मंडोवरचें राज्य आपल्या ताब्यांत घेतलें. पण पुढें जोध्याचें राज्य त्याचें त्याला देऊन त्याची मुलगी शृंगारदेवी राणा कुंभाचा पुत्र रायमल्लाला करण्यांत आली व हा तंटा संपला.

यानें आबूचें राज्य घेतलें व सिरोहीच्या सैसमलला जिंकून त्याच्या राज्याचा पूर्वेकडील भाग आपल्या राज्यांत मिळविला.

मेरा व चाचा यांनीं राणा मोकलला मारलें, म्हणून त्यांचा सूड उगवला गेला. पण त्यांना साहाय्य करणारा महपा पवार याला कांहींच शासन झालें नव्हतें. तो माळव्याच्या सुलतानाच्या आश्रयाला जाऊन राहिला होता. त्याला पत्र लिहून महपाला ताब्यांत देण्याविषयीं लिहिलें असतां त्यानें शरणागतरक्षणाची सबब सांगून युद्धाची भाषा काढली. तेव्हां उभयपक्षांत सारंगपुर येथें युद्ध होऊन सुलतानाला कैद करण्यांत आलें; व सहा महिने चितोड येथें ठेवण्यांत येऊन कांहीं दंड न घेतां सोडून देण्यांत आलें. अबुल फज्लनें शत्रूंपासून कांहीं दंड न घेतां त्याला भेट देऊन सोडण्याच्या या कृत्याबद्दल कुंभाची खूप प्रशंसा केली आहे. पण कर्नल

टॉडनें हिंदूंची राजनैतिक अदूरदर्शिता, अहंकार, उदारता व कुलाभिमान यांचें हें उदाहरण म्हटलें आहे ( टॉड १. ३३५ ). ज्या महपा पवाराकरितां येवढें युद्ध झालें त्याला पुनः कुंभानें शरणागत म्हणून आश्रय दिलाच. या विजयाबद्दल राण्यानें विशाळ कीर्तिस्तंभ उभारला. ही लढाई वि. सं. १४९४ ( स. १४३७ ) मध्यें झाली.

राणपूर ( जोधपूर ) येथील वि. सं. १४९६ ( स. १४३९ ) मध्यें प्रसिद्ध जैनमंदिर बांधलें गेलें. त्यावरील शिलालेखांत या राण्यानें आपल्या राज्यावरील सात वर्षांचा वृत्तांत दिला आहे. तो असा—यानें सारंगपूर, नागपूर ( नागोर—येथें फिरोजखांशीं झालेलें युद्ध असावें ), गागरण ( गागरौन ), नराणक ( नराणा ), अजयमेरू ( अजमेर ), मंडोर ( मंडोवर ), मंडलकर ( मांडलगढ ), बुंदी, खाटू, चाटसू ( चाकसू ) हे किल्ले यानें सहज जिंकले, उत्तम हत्ती मिळविले, मुसलमान सुलतान जिंकले, दिल्ली व गुजराथ यांच्यावर स्वारी केली असतां तेथील राजांनीं याला छत्र भेट दिलें व 'हिंदुसुरत्राण' अशी पदवी दिली. असा हा मोठा पराक्रमी व धार्मिक सम्राट् होता. हें वि. सं. १४९६ ( स. १४३९ ) पर्यंतचें यानें चरित्र आहे.

महाराणा मोकल मारला गेल्यावर हाडौतीच्या हाडा (चौहाना) नें स्वतंत्र होण्याचा उद्योग सुरू केला, पण यानें त्यावर स्वारी करून त्याला जिंकलें. यासंबंधीं कुंभलगडच्या वि. सं. १५१७ च्या शिलालेखांत पुढीलप्रमाणें लिहिलें आहे. 'बबावदा ( बम्बावदा ), व मण्डलकर ( मांडलगढ ) यांवर महाराण्यानें विजय मिळविला. हाडावटी( हाडौती )ला जिंकून तेथील राजाला कर देणारे केले. तसेंच षट्पुर ( खटकड ), व ब्रन्दावती ( बूंदी ) जिंकली. '

माळव्याचा सुलतान महंमूदशाह खल्जी यानें मागील पराजय धुवून काढण्याकरितां कुंभलगडावर स्वारी केली पण त्याचा पराजय झाला ( स. १४४३ ). पुनः तीन वर्षांनीं स्वारी केली त्यांतहि यश आलें नाहीं. तेव्हां त्यानें गुजराथच्या कुत्बुद्दीनकडे ताजखांला पाठविलें; व माळवा व गुजराथ मिळून स्वारी करण्याचा बेत ठरविला. पण त्यांना याच्यावर विजय मिळवितां आला नाहीं. नागोरहि शम्सखांपासून जिंकून घेतलें. तो गुजराथच्या कुत्बुद्दीनकडे गेला. त्यानें त्याच्या मुलीशीं लग्न लावलें, व नागोरवर स्वारी केली. पण त्यांतहि यश आलें नाहीं, असें फिरिस्ता म्हणतो ( भा. ४. पृ. ४०–४१ ). पण कीर्तिस्तंभाच्या प्रशस्तींत त्याचें विस्तृत वर्णन आढळतें.

अशा प्रकारें माळवा व गुजराथ येथील सुलतानांशीं याच्या संघशः किंवा व्यक्तिशः सारख्या लढाया चालू होत्या, पण त्यांत याचा नेहेमीं विजय झालेला आढळून येतो.

याशिवाय यानें पुष्कळ लढाया जिंकलेल्या दिसतात. कुंभळगडच्या प्रशस्तींत पुढीलप्रमाणें म्हटलें आहेः कुंभळगडच्या लेखाचा काळ वि. सं. १५१७ आहे. ' यानें नारदीयनगरच्या राजाशीं लढून त्याच्या स्त्रिया आपल्या दासी बनविल्या, शोध्यानगरीच्या राजाला आपल्या पायावर नमवलें, हम्मीरपुरच्या युद्धांत रणवीर विक्रमाला कैद केलें, धान्यनगरच्या राजाला पदच्युत केलें, जनकाचल ताब्यांत घेतला, चंपावती नगरीला त्रस्त केलें, मल्लारभुफर ( मलारणा ) जाळलें, सिंहपूर( सीहोर )च्या राजाचें तलवारीनें मुंडकें उडवलें, रणस्तंभ ( रणथम्भोर ) जिंकलें, आमदाद्रीचा भुगा केला, कोटकेच्या युद्धांत सिंहासारखा पराक्रम दाखवला, विशालनगर ( वीसलनगर ) समूळ नष्ट केलें, आपल्या अश्वसैन्यानें गिरिपूर ( डुंगरपूर ) आक्रमित केलें, तेव्हां वार्ता ऐकूनच तेथील राजा गैपाळ ( गैवा किंवा गोपाळ ) किल्ला सोडून गेला. त्याच संवतांतील कीर्तिस्तंभाच्या प्रशस्तींत डीडवाणेच्या मिठाची खाण सुरू केली, खंडेला जिंकणें, तसेंच एकलिंगमाहात्म्यांत वायसपूर नष्ट करणें व मुसलमानांकडून टोडा घेणें-लिहिलें आहे. पण संस्कृतीकरणामुळें यांतील कांहीं नांवांची बरोबर ओळख पटत नाहीं. उदाहरणार्थ नारदीयनगर, शोध्यानगरी, हम्मीरपूर, धान्यनगर, जनकाचल, चम्पावती, काटडा व वायसपूर हीं अशीं नांवें आहेत. पण यांतील प्रारम्भाचीं कांहीं नांवें माळव्यांतील असावींत.

हा शिल्पशास्त्रज्ञ असून यानें सुंदर कामें केलीं. अशी प्रसिद्धी आहे कीं, मेवाडांतील ८४ किल्ल्यांपैकीं ३२ किल्ले व अनेक मंदिरें व जलाशयें वगैरे यानें बांधलीं. त्यांपैकीं शिलालेखांत निर्देश आलेलीं पुढें दिलीं आहेत.

यानें चितोडच्या किल्ल्यावर अनेक शिखरें व बुरुज असलेला विचित्रकूट बांधला. वर जाण्याकरितां रस्ता नव्हता तो यानें चांगला रथ जाण्यासारखा बांधला. तसेंच रामपोल ( रामरथ्या ), हनुमानपोल ( हनुमानगोपूर ), भैरवपोल ( भैरवांकविशिखा ), महालक्ष्मीपोल ( महालक्ष्मीरथ्या ), चामुंडापोल ( चामुंडाप्रतोली ), तारापोल ( तारारथ्या ) व राजपोस ( राजप्रतोली ), या नांवांचे यानें चितोडला दरवाजे बांधले. यानें सुप्रसिद्ध कीर्तिस्तम्भ बांधला. तो वि. सं. १५०५ माघ शुद्ध १० ला

पुरा झाला. कुंभस्वामी व आदिवराह हीं मंदिरें, रामकुण्ड, जलयन्त्र( राहाट )युक्त कित्येक विहिरी, कित्येक तलाव, तसेंच वि. सं. १५०७ कार्तिक वद्य ९ ला चितोडवर विशिखा ( पोल ) बांधला.

वि. सं. १५१५ चैत्र वद्य १३ ला कुंभमेरू ( कुंभलगड ) ची प्रतिष्ठा झाली, तसेंच या किल्ल्याला चार दरवाजे बांधले. मांडव्यपुरा( मंडोवर )हून आणलेली हनुमानाची मूर्ति, तसेंच एका शत्रूकडून आणलेली गणपतीची मूर्ति तेथें स्थापन केली. खंडित झालेलें एकलिंगजीचें मंदिर नवीन बांधून मंडप, तोरण, ध्वजादंड, व कलश यांनीं सुशोभित केलें. तसेंच त्या मंदिराच्या पूर्वेस कुंभमंडप नांवाचें स्थान बांधलें.

सिरोही राज्यांतील वसंतपूर यानें पुनः वसविलें, आणि तेथें विष्णूकरितां सात जलाशय निर्माण केले. अबू जिंकून अचलेश्वराजवळच्या शृंगावर वि. सं. १५०९ माघ शुद्ध पौर्णिमेला अचलदुर्ग बांधला. अचलेश्वराजवळ कुंभस्वामीचें मंदिर व त्याच्याजवळ एक सरोवर व चार जलाशयें बांधलीं. हा कीर्तिस्तंभ व मंदिरें पाहिलीं असतां यांच्याकरितां कोट्यवधि रुपये लागले असतील हें सहज लक्षांत येतें; व याच्या वैभवाची कल्पना येते. कीर्तिस्तंभ तर हिंदु जातीच्या कीर्तीचा अलौकिक स्तंभ आहे. त्याचें महत्त्व व त्याकरितां झालेला खर्च याचा अदमास हा प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय होणें शक्य नाहीं.

हा जसा वीर आणि युद्धकुशल होता तसाच विद्यानुरागी आणि विद्वानांचा सन्मान करणारा होता. एकलिंगमाहात्म्यांत हा वेद, स्मृति, मीमांसा, उपनिषद्, व्याकरण, राजनीति आणि साहित्य यांत निपुण होता असें लिहिलें आहे. यानें संगीत विषयावर संगीतराज, संगीतमीमांसा, तसेंच सूडप्रबंध ( ? ) नांवाचा ग्रंथ लिहिला. चंडीशतकावर व्याख्या लिहिली. जयदेवाच्या गीतगोविंदावर रसिकप्रिया नांवाची टीका लिहिली. महाराष्ट्रीय, कर्नाटकी, व मेवाडी या भाषांचे प्रयोग ज्यांत आहेत अशीं चार नाटकें यानें लिहिलीं होतीं. हा कविशिरोमणि, वीणा वाजवण्यांत कुशल व नाट्यशास्त्राचा मर्मज्ञ होता. याला नव्यभरत ( अभिनवभारताचार्य ) म्हणत. हा नन्दिकेश्वराच्या मताचा अनुयायी होता. यानें संगीतरत्नाकरावर टीका लिहिली, तसेंच भिन्न राग व ताल यांत म्हटल्या जाणाऱ्या अनेक देवतांचीं पदें बनवलीं. त्यांचा एकलिंगमाहात्म्याच्या रागवर्णन या अध्यायांत संग्रह आहे.

शिल्पसंबंधीं अनेक पुस्तकें याच्या आश्रयाखालीं तयार झालीं. सूत्रधार( सुतार )मंडन यानें देवतामूर्तिप्रकरण, प्रसादमण्डन, राजवल्लभ, रूपमण्डन, वास्तुमण्डन, वास्तुशास्त्र, वास्तुसार व रूपावतार हे ग्रंथ रचले. तसेंच त्याचा भाऊ नाथा यानें वास्तुमंजरी हा ग्रंथ लिहिला; व मंडणचा पुत्र गोविंद यानें उद्धारधोरणी, कलानिधि व द्वारदीपिका नांवांचीं पुस्तकें रचलीं. जय व अपराजित यांच्या मतानुसार कीर्तिस्तंभाची रचना या विषयावर एक ग्रंथ लिहिला होता, व तो दगडावर खोदवून कीर्तिस्तंभाच्या खालच्या भागावर लावला होता. त्यांपैकीं प्रारंभींची शिला शेजारच्या दगडाच्या ढिगाऱ्यांत सांपडली ती उदयपूरच्या म्युझियममध्यें पाहावयास मिळते. बाकी उपलब्ध नाहीं. कीर्तिस्तंभावरील प्रशस्तीचा कवि अत्रि अर्धी प्रशस्ति झाल्यावर मेल्यामुळें त्याचा मुलगा महेश यानें ती पुरी केली. त्याचा यानें हत्ती, सोनें, चवरी व श्वेतछत्र देऊन सन्मान केला.

याचे वि. सं. १४९१ ते १५१८ पर्यंतचे साठ शिलालेख मिळाले आहेत. त्यांचा येथें निर्देश करणें अशक्य आहे.

याला शेवटीं उन्माद रोग झाला. त्यामुळें हा वडबडत असे. हा एकदां कुंभलगड येथें मामा ( कुंभस्वामी ) देवाच्या मंदिराजवळ जलाशयावर बसला असतां याच्या राज्यलोभी मुलानें—ऊदानें ( उदयसिंह ) कट्यारीनें याला अचानक ठार केलें. ही गोष्ट वि. सं. १५२५ ( स. १४६८ ) मध्यें झाली.

याला अकरा पुत्र होतेः उदयसिंह, रायमल्ल, नगराज, गोपाळसिंह, आसकरण, अमरसिंह, गोविन्ददास, जैतासिंह, महरावण, क्षेत्रासिंह व अचलदास. ही माहिती भाटांच्या ख्यातावरून मिळते.

जावर येथील रामकुंडाच्या जवळ असलेल्या रामस्वामी नांवाच्या विष्णुमंदिरावरील प्रशस्तविरून कळून येतें कीं, याला एक रमाबाई नांवाची मुलगी होती. तिचा विवाह जुनागडचा यादव राजा मंडलिक ( शेवटचा ) याच्याशीं झाला होता.

याला अनेक स्त्रिया होत्या. तथापि कीर्तिस्तंभावरील प्रशस्ति व गीतगोविंदावरील टीका यांत कुंभल्लदेवी व अपूर्वदेवी अशीं दोन नांवें आढळतात.

हा एकलिंगजीचा भक्त होता, तरी यानें विष्णूचीं अनेक मंदिरें बांधलीं. याच्या वेळीं जैनांचींहि बरींच प्रसिद्ध मंदिरें बांधलीं गेलीं. त्यावरून याची वृत्ति दिसून येते.

या थोर राजाचें शरीरहि चांगलेंच धष्टपुष्ट होतें. अत्यंत थोर पुरुषांपैकीं हा एक होय.

अबूच्या पहाडावरील एका मंदिरांत याची मूर्ति असून त्याची रोज पूजा होत असते.

**कुंभनदास**—एक हिंदी कवि. हा विठ्ठलनाथाच्या 'अष्टछाप' कवींतील एक. हा परमानंददासाचा समकालीन होता. याला अकबर बादशाहानें बोलावून फत्तेपूर शिक्री येथें याचा वादांत पराजय केला.

**कूचिमंचिजग्गकवि**—हा तेलंगणांतील प्रख्यात कवि होय. हा शोकगीतें सुंदर करतो. यानें चंद्रशेखरविलाप नांवाचें शृंगारपर काव्य केलें आहे.

**कूचिसंचितिम्मकवि**—( स. अठरावें शतक प्रारंभ ) तेलगू कवि. याचा लक्षणसारसंग्रह नांवाचा ग्रंथ व्याकरण व छंद या विषयांवर आहे. याच्या शुद्धांध्ररामायणांतहि एक संस्कृत शब्द सांपडावयाचा नाहीं.

**कूट**—( स. १७८०-८३ ) हा एक इंग्रज सेनापति होय. याचें संपूर्ण नांव सर आयर कूट असें आहे.

स. १७८० मध्यें हैदरानें इंग्रजांच्या फौजेची त्रेधा उडवून दिली, तेव्हां हेस्टिंग्सनें यास बंगालची फौज देऊन मद्रासेस पाठविलें. पण कूटला सुद्धां सुमारें वर्षभर हैदरानें दाद दिली नाहीं.

नंतर मराठ्यांशीं युद्ध न करतां त्यांच्याशीं तह करावा असें मत ज्यांचें होतें, त्या चौकड्यांत हा एक होता.

पुढें हा कलकत्त्यास गेला. पण हेस्टिंग्सला टिपूशीं युद्ध करावयाचें होतें. म्हणून त्यानें याला मुद्दाम भीड घालून पुनरपि मद्रासेस रवाना केलें ( २०-३-१७८३ ). तेव्हां रस्त्यांत जहाजावरच यास अर्धांगवायूचा झटका आला व किनाऱ्यावर आल्यावर ता. २७-४-१७८३ रोजीं हा शूर इंग्रज सेनापति मरण पावला.

**कून**—सुंदरपांड्याचें नामांतर.

**कूनीय**—अजातशत्रूचें नामांतर.

**कूर्मदास**—हा पैठणचा रहिवासी. याची जात ब्राह्मण. हा जन्मतः थोटा व पांगळा होता; याच्या मनांत पंढरपुरास जाऊन पडावें असें आलें. पुढें एका कार्तिकी एकादशीस पंढरीस जाण्याच्या हेतूनें हा खुरडत निघाला. जातां जातां कार्तिक शुद्ध १० स, लऊळ म्हणून करमाळें तालुक्यांत, एक गांव आहे, तेथें येऊन पोहोंचला. येथून पंढरपूर ९ कोस आहे. तेव्हां यानें विचार केला कीं आतां आपलें एकादशीस पंढरपुरास जाणें होत नाहीं. म्हणून यानें देवाची प्रार्थना करून वारकऱ्यांबरोबर निरोप पाठविला. असें सांगतात कीं निरोपाप्रमाणें विठोबानें यास येऊन दर्शन दिलें, असें भक्तविजयकार म्हणतात. याचा काल सुमारें शके १२३० चा होय ( अर्वाचीन कोश ). याची स्फुट कविता आहे.

**कृत्तिवास**—( स. १२८८ ) बंगाली भाषेंत रामायण लिहिणारा बंगाली कवि. यानें गौडाधिपतीच्या विनंतीवरून रामायण लिहिलें. याचें रामायण बंगाल्यांत घरोघर मोठ्या श्रद्धेनें वाचलें जातें. हा कुलीन ब्राह्मण असून श्रीहर्षाचा वंशज होता. आदिसूराच्या सांगण्यावरून हें घराणें बंगाल्यांत आलें ( क. कौ. ७ ).

**कृपापात्र**—केवलाद्वैतवादी कुलिज नामक ग्रंथाचा कर्ता.

**कृपाराम**—( स. १५४० ) एक हिंदी कवि होय. यानें 'हिततरंगिणी' नांवाचा ग्रंथ दोहामध्यें लिहिला आहे. हा ग्रंथ सरस असून भावपूर्ण आहे. यांतील भाषा परिमार्जित आहे.

२. ( स. १४९८ नंतर ) एक ज्योतिषी. यानें बीजगणित, मकरंद, यंत्रचिंतामणि इत्यादि ग्रंथांवर संपूर्ण टीका लिहिल्या. सर्वार्थचिंतामणि, पंचपक्षी, मुहूर्ततत्त्व, यांवर याच्या टीका आहेत आणि वास्तुचंद्रिका नांवाचा ग्रंथहि आहे. केशवकृत मुहूर्ततत्त्वाचा काळ सुमारें श. १४२० आहे. त्यावरून याचा काळ त्याहून अर्वाचीन असला पाहिजे हें सिद्ध होतें ( भा. ज्यो. २७६ ).

३. हिंदुस्थानी कायस्थ ब्राह्मण. सवाई जयसिंगाच्या पदरीं असणारा हुषार मुत्सद्दी. बाजीराव ( थोरला ) व सवाई जयसिंग यांचा स्नेह घडवून आणण्यांत याचें साहाय्य झालें, आणि बाजीरावानें याला आपला वकील नेमलें. हा मेल्यानंतर याचा मुलगा तुळजाराम हा वकिलातींत काम करूं लागला ( म. रि. मध्य. ३, पा. २९५ ). सवाई जयसिंग मेल्यावर त्याची दिल्लींतील वकिली महादेव हिंगणे याजकडे देण्यांत आली; आणि याला जयनगरांत नेण्यांत आलें ( पुरंदरे दप्तर ). याचा मुलगा तुळजाराम यानें आपल्या वडिलांची कामगिरी पुढीलप्रमाणें नमूद केली आहे. 'कै. बाजीरावसाहेब हिंदुस्थानांत आले. त्या वेळेस सेवकाच्या वडलाच्या विद्यमानें, सवाई जयसिंग याकडील मामलीतीची तडमोड झाली, ती सेवकास ठाऊक आहे. खानदौरा, मीरबक्षी व कमरूद्दीनखान वजीर हे उभयतां राव कै. यावर चालून गेले, त्या वेळेस सेवकांचे वडिलांनीं कज्जा होऊं दिला नाहीं.' तसेंच जयसिंगाचे मुलखांत आल्यावर झालेल्या जाबसालाची माहिती आहे.

**कृष्ण**—( हा. १२९० ) कोंकणचा रामचंद्र यादवानें नेमलेला सुभेदार. हा भारद्वाजगोत्री ब्राह्मण होता. सिंघण

यादवाच्या पदरीं असलेल्या पद्मनाभाचा हा नातू होय ( भांडारकर, पा. १६२ ).

२. ( स. १५५० नंतर ) हा नृसिंहाचा मुलगा. यानें मुरारिविजय नांवाचें नाटक लिहिलें आहे. यास शेषकृष्ण म्हणून जें कित्येक ठिकाणीं संबोधण्यांत येतें तें सर्वस्वीं चुकीचें आहे. यानें १६ व्या शतकाच्या उत्तरार्धात रचलेल्या नाटकाची प्रत अलवार ग्रंथसंग्रहालयांत पाहावयास मिळते. उषापरिणयचंपु, सत्यभामापरिणय नाटक, सत्यभामाविलास नाटक व असे आणखी कांहीं ग्रंथ यानेंच तयार केले आहेत ( सी. सी. ). कृष्णपंडित व हा एक नव्हे, असें पीटर्सनचें ठाम मत आहे; कारण कृष्णपंडित हा १२ व्या शतकांत होऊन गेला.

३. ( स. १५७८–१६०८ ) हा एका विद्वत्कुलांत जन्मास आला. हा बल्लाळाचा दुसरा पुत्र होय. यानें भास्कराचार्यांच्या बीजावर बीजनवांकुर नांवाची टीका केली आहे. तीमध्यें यानें स्वतःच्या बुद्धिमत्तेवर नवीन युक्त्या सांगितल्या आहेत. टीकेंतील गणितामध्यें खानखान नामक प्रधानाचा जन्मशक १४७८ होता, हें उदाहरण घातलें आहे. खानखान हा शक १५०० च्या पूर्वी प्रधान होण्याचा संभव नाहीं. तरीपण रंगनाथानें केलेल्या उल्लेखावरून हा दिल्लीचा बादशहा जहांगीर याच्या दरबारीं मोठ्या मान्यतेस चढलेला मनुष्य होता असें दिसतें व त्यावरून त्याच्या टीकेचा काल शके १५०० पासून १५३० पर्यंतचा असावा ( भा. ज्यो. पा. २८३-८५ ).

४. ( स. १६५३ ) एक ज्योतिषी. करणकौस्तुभ या नांवाचा एक करणग्रंथ शके १५७५ या वर्षीचा आहे. तो अमक्या सिद्धांताच्या आधारें लिहिला असें जरी त्यांत म्हटलें नाहीं तरी पण त्यांतील ग्रहगति आणि क्षेपक ग्रहकौतुक यांत कांहीं फेरफार करून दिले आहेत.

या ग्रंथाच्या कर्त्याच्या वर्णनावरून कृष्ण हा मावळांत राहणारा असें दिसतें. हा देशस्थ ब्राह्मण होता. यानें तंत्ररत्न नांवाचा दुसरा मोठा ग्रंथ लिहिला आहे ( भा. ज्यो. पा. २९०-९१ ). याचा करणकौस्तुभ हा ग्रंथ शिवाजीमहाराजांच्या सांगण्यावरून लिहिला असून तो श्री. द. वि. आपटे यांनीं अनेक प्रतींवरून शुद्ध करून छापून प्रकाशिला आहे ( आनंदाश्रम संस्कृत ग्रंथावली ग्रंथांक ९६ ). अशा प्रकारें महाराजांनीं ज्योतिर्गणित सुधारण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यापासून फलप्राप्ति कांहीं झाली नाहीं; त्यामुळें करणकौस्तुभ हा ग्रंथ लोकप्रचारांत आला नाहीं व त्या वेळीं प्रचलित असलेल्या ग्रहलाघवाचाच प्रचार चालू राहिला. पण त्यावरून ग्रहांचें आकाशांतील स्थान गणितानें आलेल्या स्थानाशीं मिळत नाहीं अशी याची खात्री झालेली होती, येवढें स्पष्ट दिसतें. कृष्ण दैवज्ञ यानें ग्रहलाघवाच्या गणितावर असा आक्षेप घेतला कीं, त्यांत केलेलें गणित 'ज्या' आणि 'चाप' ह्यांविरहित केलें आहे. म्हणून तें स्थूल झालें ( शिवाजी निबंधावली २ पृ. १३६ ).

५. ( स. १७२७–१७३२ काव्यकाल ) एक हिंदी कवि. हा माथुर चौबे असून बिहारीचा पुत्र होता. यानें राजा आयामल्ल याच्या आज्ञेवरून 'बिहारी सतसई' ही टीका लिहिली; व आयामल्लाचीहि यानें प्रशंसा केली आहे. वरील टीका यानें दोह्यांत लिहिली असून त्यांत काव्यगुण चांगला दिसून येतो. याच्या सवायाहि सहृदयता व रचनाकौशल्य यांनीं युक्त आहेत.

**कृष्ण कलचुरी**—हा कल्याणीच्या कलचुरी शाखेचा संस्थापक. नंतर जोगम गादीवर आला. चेदीच्या कलचुरी घराण्यांपैकीं एक. हा नाशिकजवळ राज्य करीत होता. याचा पुत्र शंकरगण हा पांचव्या शतकांत असावा.

२. याच घराण्यामध्यें आणखी एक कृष्ण झालेला असावा. हा त्रिकलिंगाचा राजा होता. याला कन्न, कर्ण असेंहि म्हणत असत ( स. १०४२, एपि. इंडि. २. २९७ ).

**कृष्णकविशेखर**—संस्कृत नाटककार. यानें 'कुवलयवती' नांवाची नाटिका लिहिली आहे. हिच्यांत माधव म्हणजे कृष्ण आणि कुवलयवती यांच्यांतील प्रणय व राधेचा मत्सर यांवर टीका केली आहे.

**कृष्ण काकतीय**—(स. १३४४–७०) हा प्रतापरुद्र काकतीयाचा मुलगा. याला वीरभद्र म्हणत. हा वरंगळ जवळ राहत होता. स. १३३९–४० मध्यें मुहम्मद तुघ्लकनें देवगिरी हें आपलें मुख्य शहर करण्याचें ठरविलें, व वरंगळचा राजाविरुद्ध जाऊन तेलंगणवर स्वारी करून मावरकडे जाण्याचें ठरविलें. हा पहिल्या बुक्काचा समकालीन होता.

यानें कर्नाटक राजा बल्लाळदेव याची मदत मागितली. त्यानें व दुसऱ्या इतर राजांनीं मदत देण्याचें ठरविलें. सर्व एकत्र होऊन मुसलमानांना धुडकावून लावलें, फक्त दौलताबाद दिल्लीच्या बादशहाच्या स्वाधीन राहिलें. पण हा विजय चिरकाल टिकला नाहीं.

परत स. १३७० मध्यें हा व विजयनगरचा राजा या दोघांनीं आपले प्रांत फिरून मिळविण्याचा शेवटला प्रयत्न केला, व दिल्लीच्या बादशहास वकीलाबरोबर निरोप पाठविला कीं 'आमचें नुकसान भरून देतां कीं लढाई करूं?' परंतु दिल्लीचा बादशहा मुहम्मदशहा यानें माणसाच्या

अभावीं व पैशाच्या अभावीं १८ महिने अळमटळम् करून दिवस घालविल्यावर एकदम मोठी रक्कम यांच्याजवळ मागितली. यांनीं ती साहजिकच नाकारल्यामुळें तैलंगणावर स्वारी केली; व हिंदूंचा पराजय करून आपलें राज्य प्रस्थापित केलें. हा मुसलमानांना विरोध करणारा दक्षिणेंतील एक मोठा राजा होता. पण दक्षिण निर्यवन करण्याचा याचा प्रयत्न अयशस्वी झाला. हा कृष्ण नाईक या नांवानेंहि प्रसिद्ध आहे.

**कृष्णकान्त विद्यावागीश**—( स. १७८० सुमार ) हा रामनारायण तर्कपंचाननाचा शिष्य असून तर्कशास्त्र व अलंकारशास्त्र या दोन्ही शास्त्रांत पारंगत होता. ह्यानें खालील ग्रंथ लिहिले आहेतः—

१ न्यायरत्नावली. २ दायभागटीका. ३ गोपाललीलामृत. ४ चैतन्यचंद्रामृत. ५ कामिनी-काम-कौतुक. ६ उपमान-चिंतामणि-टीका. ७ शब्दशक्तिप्रकाशिकाटीका.

हा काश्मीरच्या महाराज गिरीशचंद्र याचे वेळीं होऊन गेला. याला आपल्या ज्ञानाचा फार गर्व होता ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ४८४–८५ ).

**कृष्णगुप्त**—माळव्याच्या गुप्त घराण्यापैकीं पहिला राजा होय. याचीच मुलगी हर्षगुप्ता ही आदित्यवर्मन्ला ( स. ५००–५२५ ) दिलेली होती.

**कृष्णजोशी संगमेश्वरकर**—कोल्हापूरच्या जोशीरावांचा पूर्वज होय. हा पानपतच्या युद्धांत हजर होता. यानें पानपतच्या युद्धाचे वेळीं मराठ्यांची फौज जोरांत असून अब्दालीची काय दुःस्थिति आहे, याचें वर्णन केलें आहे ( ५ नवं. १७६० ). हा ८ नवंबराला त्याच युद्धांत तोफेचा गोळा लागून मरण पावला ( राजवाडे प्रस्तावना पा. ८२–८३ ).

**कृष्णडिंभ विराट**—( स. १६०२ सुमार ) हा उपाध्य आम्नायांतील मयंकराजाचा शिष्य. महानुभाव कवि. यानें कृष्णमुनि ऊर्फ कविडिंभ हें नांव धारण केलें होतें. यानें भगवद्गीतामाहात्म्य, फलटणमाहात्म्य, ऋद्धिपूरमाहात्म्य व कृष्णजन्माष्टमी इत्यादि ओवीबद्ध प्रकरणें रचिलीं आहेत. साधनामृतस्तोत्र, तीर्थमालिका इत्यादि श्लोकबद्ध रचनाहि बरीच केली आहे. यांशिवाय याचीं पदें, धावे वगैरे स्फुट रचना बरीच आहे. याचा विशेष प्रसिद्ध ग्रंथ रुक्मिणीस्वयंवर हा होय. हा ग्रंथ श्लोकबद्ध असून नवखंडात्मक आहे. याला नवखंडरुक्मिणीस्वयंवर असें म्हणतात. शिवाय कल्पद्रुम असेंहि नांव आहे.

फलटणमाहात्म्यांत श्रीचक्रपाणी यांच्या चरित्रविषयक वर्णन असून ग्रंथाचे १३ अध्याय आहेत. ऋद्धिपूरमाहात्म्यांत श्रीगोविंदप्रभूचें चरित्र असून दहा अध्याय आहेत. याचे पांच धावे वाचले कीं श्रीसमर्थांच्या 'धांवरे रामराया। किती अंत पाहासी' इत्यादि धाव्यांची आठवण होते. यानें रुक्मिणीस्वयंवरांत अक्षरगणात्मक व मात्तगणात्मक अनेक वृत्तें योजिलीं आहेत. त्यांत आपणांस पांच अक्षरांपासून सव्वीस अक्षरांपर्यंत एकेका चरणांत अक्षरें आहेत अशीं वृत्तें सांपडतील. अगदीं अपरिचित अशीं कितीतरी वृत्तें आढळतात. महानुभव कवींची ही स्वतंत्र वृत्ति वाखाणण्यासारखी आहे ( म. वा. इ. २·७६३·६५ ).

**कृष्णदत्त मैथिल**—(स. १७५१) सदाराम व आई आनंददेवी यांचा हा पुत्र होय. स. १७५१ मध्यें 'सांद्र कुतूहल प्रहसन,' ग्रंथाचा हा कर्ता असून राधारहस्य काव्य यानें रचलें आहे. वाज्जड जिल्ह्यांत भामतीय गांवांत हा राहत असे. धर्मवर्मन् राजाचा हा समकालीन होता ( सी. सी. ).

यानें कुवलयाश्वीय नांवाचें प्रहसन लिहिलें आहे. तसेंच दिवाकर पुरुषोत्तमाच्या समोर ज्याचा प्रयोग करण्यांत आला तें अन्योक्तिरूप पुरंजनचरित्र नाटक याचेंच होय.

**कृष्णदयार्णव**—( स. १६७४–१७४० ) हा कोपारूड मुक्कामीं कऱ्हाडनजीक राहत असे. हा माध्यंदिनशाखी शुक्लयजुर्वेदी ब्राह्मण असून कवि म्हणून यास लोक मान देत असत. याचें खरें नांव नरहरी. आईचें नांव बहिणा व बापाचें नांव नारायण. गोत्र गौतम. औरंगजेबाच्या धर्मच्छळामुळें याला गांव सोडून आंबें मुक्कामीं जावें लागलें. त्याच ठिकाणीं आनंदसांप्रदायी गोविंदानें यास उपदेश दिला. याचें टोपण नांव रूढ होण्याचें कारण म्हणजे हा मधुकरी मागत असतां 'कृष्णदयार्णव समर्थ' म्हणून म्हणत असे. हेंच नांव पुढें चालू झालें. खानदेशांतील पिंपळनेर मुक्कामीं कुटुंब निवर्तलें म्हणून दुसरें केलें. यांना पुढें वयाच्या ५० व्या वर्षी महारोग झाला; व त्यावर उपाय म्हणून भागवताच्या दशमस्कंधावर यांनीं श्रीधराच्या आधारें हरिवरदा नांवाची प्राकृत टीका लिहिण्यास सुरुवात केली. हे टीका सांगत व उत्तमश्लोक हे लिहीत. पूर्वार्ध शके १६५६ श्रावण ब. अष्टमीस संपविला.

यांचे ग्रंथ—दत्तजननोत्साह, विचारचंद्रिका, हरिवरदा ( टीका ), तन्मयानंदबोध.

'स्वानंदस्वामीस श्रीशिवाजीमहाराजांनीं साधूंच्या सेवेपासून होणाऱ्या आत्महितबुद्धीनें रायगड किल्ल्यावर नेऊन ठेविलें; व त्यांचा योगक्षेम चालवून त्यांची भक्तिपूर्वक

सेवा केली. तेथें छत्रपतींच्या सरदारांत पालखीचे धनी कोणी गोविंदराव या नांवाचे ब्राह्मण होते. त्यांचें पूर्वपुण्य फळास येऊन त्यांनीं स्वानंदस्वामीची सेवा केली व उपदेश घेऊन विरक्त झाले.' अशी यांनीं आपल्या गुरूची माहिती दिली आहे ( हरिवरदा उत्तरार्ध, अ. ९० ).

शिवभूपती पावतां मुक्ति । दक्षिणे येवोनि ताम्रपती ।
केली विजयपुरा समाप्ति । महाविपत्ति राष्ट्राते ॥
( हरिवरदा पूर्वा. १. ३२ ).

असें शिवाजीचा मृत्यु, औरंगजेबाची स्वारी व विजापूरच्या बादशाहीची समाप्ति यांचें यानें वर्णन केलें आहे.

हे आपल्या हरिवरदा ग्रंथाचा ८७ वा अध्याय लिहीत असतां पैठणास मार्गशीर्ष शु. ५ शके १६६२ (स.१७४०) रोजीं समाधिस्थ झाले. पण यापूर्वीच यांचा रोग बरा झाला होता. हा ग्रंथ पूर्ण होण्यास १६ वर्षे लागलीं. हा ग्रंथ चांगला आहे. यांचे बरेच अभंग आणि पदें उपलब्ध आहेत. उत्तमश्लोकानें पुढील अध्याय लिहिले. पैठण येथें वरील गुरुशिष्यांच्या समाधी जवळ जवळ आहेत ( म. क. च. १ पा. २७०-२८८ ).

**कृष्णदास ( गोविंद )** – ( स. १७८५-१८०८ ) मराठी कवि. हा स्वतःला अज्ञान कृष्णदास म्हणवितो. गुरु-हरिदास कान्हा. ग्रंथ-बालक्रीडा, रासक्रीडा, भस्मासुरवध, रुक्मिणीस्वयंवर, अश्वमेधपर्व, अंबास्तुति, शिवरात्रीचरित्र, कृष्णजन्म, गरुडगर्वपरिहार ( सं. सू. ).

२. हा मराठी कवि मुद्गल कृष्णदासाच्या वेळींच होऊन गेला. याचीं महाभारतांतील निरनिराळ्या कथानकांवर रचिलेलीं प्रकरणें आढळतात. याचें स्वतःचें नांव विश्वनाथ असावें, असें याच्या 'अभिमन्युविवाहां'तील उल्लेखावरून वाटतें. केव्हां केव्हां हा आपणांस 'विप्र-विप्रदास' असेंहि म्हणवितो. या अभिमन्युविवाहाचे सात अध्याय असून याची ग्रंथसंख्या जवळ जवळ अडीच हजार आहे.

३. यास कोणी विहारी कृष्णदास असेंहि म्हणतात. यानें बादशहा अकबर याच्या आग्रहावरून फार्सीकोश किंवा फार्सीप्रकाश नांवाचा ग्रंथ लिहिला ( पीटर्सन ).

४. कृष्णदास नामा व विष्णुदास नामा हे एकच ( सं. सू. ).

५. कथासारामृत या मराठी ग्रंथाचे कर्ते ( सं. सू. ).

६. (स. १५९८ सुमार) हा एकनाथाच्या वेळीं होऊन गेला व याचें नांव कृष्णदास लोळ्या असें महिपती व इतर चरित्रकार सांगतात. पण हा आपलें नांव 'कृष्णदास मुद्गल' असें आपल्या ग्रंथांत सांगतो. यानें रामायण युद्धकांड मराठींत लिहिण्यास सुरुवात केली. पण तो पूर्ण होण्यापूर्वीच आपण मरणार असें यास वाटूं लागलें. तेव्हां यानें एकनाथास तो ग्रंथ पुरा करण्यास विनंति केली. कृष्णदासाचा दृढनिश्चय व ग्रंथ पुरा करण्याची उत्कट इच्छा पाहून एकनाथानें सांगितलें कीं, "आपण असें हताश होऊं नये. 'तुम्ही आरंभिला ग्रंथ बरा । हा आपुल्याच मुखें पूर्ण करा ॥' ग्रंथ पूर्ण होईपर्यंत तुम्हांस काळाचें मुळींच भय नाहीं." हें ऐकून कृष्णदासास धीर येऊन रात्रंदिवस श्रम घेऊन यानें आपला ग्रंथ पूर्ण केला व नंतर लागलाच हा मृत्यु पावला. हा जर कृष्णदास लोळ्या नसेल तर कृष्णदास लोळ्या हा एक अगदीं स्वतंत्र कवि समजला पाहिजे. कृष्णदास मुद्गलाचें रामायण-युद्धकांड हल्लीं उपलब्ध आहे. याचे ७८ प्रसंग अथवा अध्याय असून याची ग्रंथसंख्या सुमारें दहा हजार आहे. हा पैठण येथील राहणारा. याच्या बापाचें नांव नृसिंह. याचें स्वतःचें नांव मुद्गल असून गुरूचें नांव 'कृष्ण' असें असलें पाहिजे. यानें आपला ग्रंथ वाल्मीकि रामायणाच्या आधारेंच लिहिला आहे. याची भाषासरणी साधारण मनोरम आहे. उपमादि अलंकारांनीं आपल्या ग्रंथाला उत्कृष्ट तऱ्हेनें नटवून यानें आपल्या ग्रंथाची रचना थाटाची करण्याचा यत्न केला आहे. या युद्धकांडाचीं पारायणें मराठेशाहींत किल्ल्याकिल्ल्यावर होत असत. रामरावणयुद्धाचे वेळीं रावण युद्धाला गेला तेव्हां कवि म्हणतो, "रावणू नोवरा केळवला । मुक्ति परणावया निघाला । म्हणोनि बाणीं मंडपू घातला । अवघें आकाश लोपलें ॥" ( म. सा. १. २७४-२७७ ).

महिपतीबावांचे उल्लेखाप्रमाणें हा नाथापूर्वी एक वर्ष म्हणजे शके १५२० मध्यें समाधिस्त झाला ( सं. सू. ).

नाथचरित्रकार 'केशव' यानें, युद्धकांड पुरें होईपर्यंत आपणांस काळाची भीति नाहीं असा विश्वास उत्पन्न करून याच्याकडून युद्धकांड पुरें करून घेतल्याची कथा चांगली वर्णिली आहे.

७. (स. १५४२ सुमार) एक हिंदी कवि. हा वल्लभाचार्यांचा शिष्य असून विठ्ठलनाथाच्या 'अष्टछाप' मंडळापैकीं एक होय. हा शूर होता. हा आचार्यांचा फार आवडता होता. याला आचार्यांनीं मंदिराचा मुख्य केलें.

याचा 'जुगलमानचरित्र' नामक छोटासा ग्रंथ प्रसिद्ध आहे. याशिवाय यानें भ्रमरगीत, आणि प्रेमसत्त्वनिरूपण असे दोन ग्रंथ लिहिले आहेत. याच्या फुटकळ कविता पुष्कळ सांपडतात. सूरदास आणि नंददास यांच्यापेक्षां याच्या कविता हलक्या दर्जाच्या होत.

८. ( स. १७९५ सुमार ) एक हिंदी कवि. हा मिर्झापूरचा राहणारा व कृष्णभक्त होता. माधुर्यलहरी नांवाचें ४२० पानांचें पुस्तक यानें लिहिलें. याची कविता मध्यम आहे.

९. ( सार्वभौम भट्टाचार्य ) ( स. १५७५ च्या सुमारास ) यानें पुढील ग्रंथ लिहिले-१ तत्त्वचिंतामणि-दीधि-ति-प्रसारिणी' हा ग्रंथ रघुनाथाच्या टीकेवरील टीका होय. २ 'अनुमानालोकप्रसारिणी ' हा ग्रंथ जयदेवाच्या आलोक ग्रंथावर टीका आहे ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पृ. ४६८ ).

**कृष्णदेव यादव**—( स. १२४७-६० ) हा यादव घराण्यांतील दुसऱ्या सिंघण यादवाचा नातु व दुसऱ्या जैत्रपाल ऊर्फ जैतुगीचा मुलगा. हाहि पराक्रमी होता. यानें गुजराथेवर स्वाऱ्या केल्या आणि पुष्कळ यज्ञ केले. माळवा व कोंकण वगैरे भागांतहि याचा दरारा होता. याचा मंत्री लक्ष्मीदेव म्हणून होता, त्याच्या नंतर जल्हण हा मंत्री झाला. हा फार विद्वान् होता. याच्या वेळीं संस्कृत विद्येची भरभराट होती. याला कन्ह, कन्हार व कंधार असें म्हणत. जैत्रपाळ अल्पवयी मेल्यामुळें सिंघणाच्या मागाहून हाच गादीवर आला. याच्याच पदरच्या अमलानंदानें वेदान्तसूत्रावर टीका लिहिली आहे.

**कृष्णदेवराय तुलुव**—( स. १५०९-१५२९ ) हा विजयनगरच्या तुलुव घराण्यांतील इम्मडी नरसा किंवा नरसिंह याचा पुत्र होय. याच्या आईचें नांव नागलाई.

हा स. १५०९ मध्यें विजयनगरच्या गादीवर बसला. हा विलक्षण व असामान्य पुरुष होता. महाराजाधिराज, सिंहासनाधीश्वर इत्यादि यास पदव्या होत्या. तसाच हा कर्तृत्ववान्, स्वतंत्र, निरंकुश सत्ता व अधिकार चालविणारा, स्वतःचें वजन व महत्त्व कायम ठेवणारा, प्रभाववान् व प्रतापी राजा होता, असें वर्णन 'पायेस' नें केलें आहे. हा मोठ्या पहाटे उठून मुद्गल, जोडी व दांडपट्टा यांचे हात करी; आणि त्यायोगें शरीरांतील सर्व स्नायू व पुठ्ठे भरदार व प्रेक्षणीय ठेवीत असे. हा पटाईत घोडेस्वार होता. याचें शरीर, रूप व चर्या भव्य असून याच्याशीं प्रसंग पडणारावर याची चांगलीच छाप बसत असे. पदरच्या अवाढव्य फौजेचें आधिपत्य हा स्वतः करी. हा फारच शूर, योग्य राजकारणी असून मनाचा उदार, अंतःकरणाचा कोमल व स्वभावाचा दिलदार होता. त्याचप्रमाणें हा फार लोकप्रिय होता. याच्या अमलाखालीं बहुतेक सारें दक्षिण हिंदुस्थान होतें.

याच्या कारकीर्दीत याचा व पोर्तुगीज लोकांचा संबंध वारंवार आलेला आहे. याच्या कारकीर्दीत इस्माईल आदिलशहाशीं एक भली मोठी लढाई रायचूरच्या किल्ल्याबद्दल रायचूरच्या आसपास झाली. या लढाईंत यानें मुसलमान लोकांचा पूर्ण पाडाव केला. या पराजयामुळें मुसलमानांना चांगलाच वचक बसला.

यानें बरींच सार्वजनिक कामें करून लोकप्रियता संपादिली. यानें जमीनीची सुधारणा करून पाटबंधारे बांधले आणि पाण्याचा मुबलक पुरवठा केला. यानें स. १५२१ मध्यें ' कोरंगल '-कुरवीगट्टा—येथें तुंगभद्रेला भलें मोठें धरण बांधलें. याशिवाय यानें विजयनगरचा राजा नरसिंहाचा प्रचंड १६ फुटी पुतळा बसविला व त्याच्या पुजाअर्चेसाठीं जमीन लावून दिली. तुलुव घराण्यांतील हा सर्वांत मोठा राजा होय. हा स. १५२९ च्या २८ जुलै-२८ डिसेंबरच्या दरम्यान मेला. हा अच्युतरायाचा सावत्र भाऊ. याच्यानंतर अच्युतराय गादीवर बसला. याला या घराण्यांतील पहिला राजा समजतात.

याचा पुत्र तिरुमल्ल हा लहानपणींच मृत्यु पावला. याची मुलगी तिरुमल्लांबा ही रामराय अरविदूची पत्नी. आणि याची दुसरी मुलगी वेंगला ही रामरायाचा भाऊ तिरुमल्ल याची पत्नी.

**कृष्णधूर्जटि दीक्षित**—( स. १७७४ ) व्यंकटेश दीक्षिताचा पुत्र. यानें तर्कसंग्रहावर सिद्धान्तचंद्रोदय नांवाची संस्कृत टीका लिहिली. ही टीका विक्रमपट्टणच्या गजसिंहाचा पुत्र राजसिंहाकरितां लिहिली ( सी. सी. ).

**कृष्णनाथ सार्वभौम भट्टाचार्य**—हा दुर्गादास चक्रवर्तिन्चा पुत्र. याचें आनंदलतिका नांवाचें एक छायानाटक आहे. या नाट्यकाव्याचें पांच कुसुम असून त्यांत सम व रेवा यांच्या प्रणयाची कथा आहे.

**कृष्ण नृसिंह शेष**—हा महाराष्ट्रीय पंडित अकबराचे वेळीं काशींत होता. यानें शूद्राचारशिरोमणी नांवाचा ग्रंथ लिहून कलियुगांत क्षत्रियांचें अस्तित्व नाहीं असें प्रतिपादन केलें. या ग्रंथाची १-१-१६७२ रोजीं नक्कलेली प्रत बडोद्याच्या लायब्ररींत आहे. पिलाजी नामक राजाचे विनंतीवरून आपण हा ग्रंथ लिहिला असें हा म्हणतो. हा कायस्थांची निंदा करतो. याच्या मताचें खंडण करण्याकरितां शिवाजी महाराजांनीं विश्वेश्वरभट्ट ऊर्फ गागाभट्ट यास हाताशीं धरलें.

**कृष्णप्पा** ( कृष्णराय )—हा विजयनगरच्या रामरायाचा पुत्र. हा रामरायास तिरुमल्लांबिका राणीपासून झाला.

२. ( स. १५७३ मृ. ) हा कुमार कृष्णप्पा या नांवानें विशेष प्रसिद्ध आहे. आर्यनाथानें सिलोनवर स्वारी केली आणि तो लढाईत मारला गेला. नंतर याच्याकडे सिंहली लोकांचें आधिपत्य आलें. हा स. १५७३ मध्यें मरण पावला.

३. हा बेल्लरचा एक नायक होय. विजयनगरचा पहिल्या रंग राजाच्या कारकीर्दीच्या सुरुवातीस हा बालम घराण्याचा पुढारी होता.

याच्यानंतर बेल्लूरच्या गादीवर याचा मुलगा वेंकटाद्रि नायक हा आला.

४. ( मृ. स. १६०१ ) हा मदुरेच्या विरप्पा नायकाचा दुसरा मुलगा. हा आपला भाऊ विश्वप्पा नायक याच्यानंतर मदुरेच्या गादीवर आला. याशिवाय याला कस्तुरी रंगप्पा नायक या नांवाचा एक भाऊ होता.

हा मोठा धार्मिक आणि पवित्र होता. हा दररोज न्यायदानाचें काम करीत असे. त्रावणकोरचा राजा याचा मांडलिक होता. पुढें हा आपल्याला 'पांड्य राजा' असें म्हणवून घेत असे. याची व पांड्य राजाची मैत्री त्या वेळीं चांगली जुळली होती.

याचे व विजयनगरच्या दुसऱ्या वेंकट राजाचे संबंध चांगल्या प्रकारचे नव्हते. तेव्हां वेंकट राजानें याच्यावर बऱ्याचशा सैन्यानिशीं स्वारी केली, त्या वेळीं यानें आपण वेंकट राजाशीं तोंड देण्यास असमर्थ आहोंत असें जाणून त्याचें वर्चस्व कबूल केलें आणि खंडणी देण्यास तयार झाला.

याचा राज्यकारभार साधारण बरा झाला. पण याची कारकीर्द फार मोठी न होतां हा स. १६०१ मध्यें मरण पावला.

**कृष्णभट्ट आद्य**--( स. १७२० सुमार ) या महाराष्ट्रीय तर्कज्ञानें 'गदाधरी' या ग्रंथावर 'गदाधरीकर्णिका' व शिरोमणीच्या तत्त्वचिंतामणीवर एक अशा दोन टीका लिहिल्या आहेत. हा बनारस येथें मरण पावला. याची उपरिनिर्दिष्ट टीका तेलगू भाषेंत प्रसिद्ध झाली आहे ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ४८६ ).

**कृष्णमिश्र**—यानें प्रबोधचंद्रोदय नांवाचें उपदेशपर नाटक चंदेल्लवंशी कीर्तिवर्मन् राजाकरितां लिहिलें. हें नाटक लिहिण्याचा काल स. १०५० ते ११९६ हा अदमासें ठरवितां येतो. यानें आपल्या नाटकांत शंकराचार्यांचें अद्वैतमत सर्वांत श्रेष्ठ कसें आहे हें प्रतिपादन केलें आहे. त्याकरितां जैन, बौद्ध, कापालिक वगैरेंचें वर्णन तत्कालीन परिस्थितीची कल्पना देणारें केलें आहे.

प्रबोधचंद्रोदय नाटकाच्या उपोद्घातांत असें म्हटलें आहे कीं, गोपाळाच्या शिफारशीनें राजा कीर्तिवर्मन्च्या समोर त्या नाटकाचा प्रयोग करण्यांत आला. सदरहू गोपाळ यानें चेदि राजा कर्ण याचा पराभव झाल्यानंतर कीर्तिवर्म्यास त्याचें गमाविलेलें राज्य फिरून प्राप्त करून दिलें होतें. यावरून कीर्तिवर्मन् हा जेजाकभुक्तीचा चंदेल्ल राजा जो कीर्तिवर्मन् तोच होय. या चंदेल्ल राजाचा देवगड येथें स. १०९८ मधला एक शिलालेख उपलब्ध आहे. महोबा शिलालेखावरून या चंदेल्ल राजानें लक्ष्मीकर्ण म्हणजे त्रिपुरीचा चेदि राजा कर्ण याचा पराभव केला होता. या चेदि राजाचा स. १०४२ मधला एक शिलालेख उपलब्ध आहे. विक्रमांकदेवचरित ( १८·९३ ) यांत कर्णाला 'कालः कलिंजरगिरिपतेः' असें म्हटलें आहे, व हें वर्णन कृष्णमिश्राच्या लिहिण्याशीं बरोबर जुळतें. गोपाळ कोण होता याविषयीं कांहीं माहिती मिळत नाहीं. महेश्वर टीकाकार म्हणतो कीं तो कीर्तिवर्मन्चा सेनापति असून ब्राह्मण होता. तें कांहीं असलें तरी कृष्णमिश्र हा ११ व्या शतकाच्या उत्तरार्धांत झाला असला पाहिजे असें दिसतें.

**कृष्णमुनि**—मराठी कवि. काव्य चेंडूफळी ( ले. श. १७१६ ). हा मानभाव असावा ( सं. सू. ).

**कृष्णमूर्ति**—हा जातीचा तेलंगी ब्राह्मण असून, शिष्टवारु कुळांतील होता. हा मद्रासमधील रामचंद्रपूरचा राहणारा होय.

यानें यक्षानंद नांवाचें तेलगू नाटक रचलें. हा शालिवाहन १७२५ व्या शकांत असावा असें अनुमान आहे ( क. च. ).

२. मराठी कवि. आनंदमूर्तींचे पुत्र. गुरुपरंपरा–दत्त–दासोपंत–अवधूत-विश्वंभर-कृष्णमूर्ति. ग्रंथ–समश्लोकीगीता, सुलभवेदान्त ( ले. श. १६८० ) ( सं. सू. ).

**कृष्ण याज्ञवल्की**—( स. १५४८–१६१३ सुमार ) हा महाराष्ट्रांतील एक प्रसिद्ध कवि होय.

याचें गोत्र कौंडिण्य असून आईबापाचीं नांवें कमळा व अंबाजी अशीं होतीं. याच्या गुरूचें नांव अनंत असून कथाकल्पतरु ग्रंथ यानें नाशिक येथें लिहिला. याची भाषा, साधी, सरळ व सोपी आहे ( गोपाळ याज्ञवल्की पाहा ). याची कुलदेवता–रेणुका, म्हाळसा. याचा भक्तविजयाच्या ५७ व्या अध्यायांत निर्देश आहे. याचे ग्रंथ–रुक्मांगदाख्यान, देवीमाहात्म्य व कथाकल्पतरु ( भागवत ) ( सं. सू. )

याच्या कथाकल्पतरूचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. त्यांपैकीं पूर्वार्ध मात्र कृष्णयाज्ञवल्कीनें

लिहिला होता. यांत सात स्तबक अथवा भाग आहेत. यांत एकट्या सातव्या स्तबकाचीच ग्रंथसंख्या २९४६ आहे. या ग्रंथांत अनेक पौराणिक कथा सांगितल्या आहेत. प्रचलित कथांपेक्षां या कवीनें सांगितलेल्या कथांत पुष्कळ फेर आढळतो. या ग्रंथांत भूगोलवर्णन, सूर्याच्या गति, चारी वर्ण व सर्व जातींची उत्पत्ति वगैरे विषयहि वर्णिले आहेत. याची भाषा अगदीं सरळ आहे ( म. सा. १. २७८ ).

**कृष्णराज ओडेयर**—( स. १७९९-१८६८ ) म्हैसूरचा राजा. वेट्टादचा पुत्र. याच्या पूर्वी म्हैसूरचें राज्य टिपू सुलतानाकडे होतें. परंतु इंग्रजांनीं व निजामानें मिळून टिपूशीं युद्ध केलें. त्या युद्धांत टिपूचा पराभव होऊन तो मारला गेला. तेव्हां इंग्रजांनीं व निजामानें याचें राज्य आपल्या ताब्यांत घेऊन त्यांतील कांहीं स्वत:स घेऊन बाकीचा प्रांत म्हैसूरच्या हिंदु राजाचा वंशज जो कृष्णराज ओडेयर यास देऊन याला म्हैसूरच्या गादीवर बसविलें ( स. १७९९ ).

हा तीन वर्षांचा असतांना गादीवर आला. हा अल्पवयी असल्यामुळें इंग्रजांनीं टिपूचा मंत्री जो पूर्णय्या त्यास याचा कारभार पाहण्यासाठीं नेमिलें. यानें आपल्या पुढील आयुष्यांत राज्याची उत्तम प्रकारें व्यवस्था ठेवली व नवीन सरदार निर्माण केले. यास संतति नसल्यानें यानें चामराजेंद्र नांवाच्या मुलास दत्तक घेतलें. हा ता. २७ मार्च १८६८ त मरण पावला. मरणसमयीं याचें वय ७२ वर्षांचें होतें ( बील ).

**कृष्णराज परमार**—आबूच्या परमारांपैकीं आरण्यराजाचा पुत्र. याला कान्हडदेव असेंहि म्हणत. हा या वंशांतील पहिला कृष्णराज होय.

बाराव्या शतकाच्या सुमारास खोदलेल्या उदेपूर प्रशस्तीमध्यें याच्या पूर्वीच्या कांहीं राजांची नामावळि दिली आहे. पण ती विश्वसनीय दिसत नाहीं. ब्यूलरसाहेबांनीं परमारांसंबंधीं सर्व लेख विचारांत घेऊन वंशावळ व माहिती दिली आहे व याचा उदयकाल स. ८०० ठरविला आहे ( इंडि. अँटि. १.२२३ ). पण चिं. वि. वैद्यांच्या मतें हा इ. स. ९१० च्या सुमारास स्वतंत्र राजा असला पाहिजे ( म. यु. भा. २.१९६ ). याला महाराजाधिराज परमेश्वर अशीं बिरुदें लावलेलीं आहेत. माळव्याची व आबूची या दोन्ही परमारांच्या शाखा याच्यापासूनच सुरू झाल्या असाव्यात.

**२.** ( स. १०५९-६५ ) आबूच्या परमारांपैकीं धंधुकाचा दुसरा पुत्र. गुजराथच्या पहिल्या भीमदेव सोलंकीनें याला कैद केलें होतें. पण नाडौलच्या बाळप्रसाद चौहानानें याला मुक्त केलें ( एपि. इंडि भा. ९, पृ. ७५-७६ ). याच्या वेळचे दोन शिलालेख भीनपाल येथें मिळाले आहेत. त्यांपैकीं एक वि. सं. १११७, आणि दुसरा वि. सं. ११२३ मधला आहे ( स. १०६० व १०६६ ). याच्यापासून आबू व केराडू अशा दोन शाखा वेगळ्या झाल्या असें दिसतें. याच्यापर्यंत आबूच्या परमारांची वंशावळ शृंखलाबद्ध मिळते. पुढली वंशावळ वास्तुपालाचा भाऊ तेजपाळानें बांधलेल्या आबूवरील देलवाडा येथील लूणवसही नांवाच्या नेमिनाथ मंदिराच्या प्रशस्तींत मिळते. ती वि. सं. १२८७ ( स. १२३० ) मधील आहे. परंतु ती पुरी नाहीं. तींत लिहिलें आहे कीं, परमारवंशांत धंधुक, ध्रुवभट इत्यादि राजे झाले. पुढें रामदेव झाला. रामदेवापासून तेथें वंशावळ सुरू आहे. आदि पदावरून रामदेवाच्या पूर्वी कांहीं पुरुष झाले असावेत. पण त्यांची माहिती उपलब्ध होत नाहीं, तोंपर्यंत कृष्णराजानंतर कांहीं पिढ्या राहतात, असें समजलें पाहिजे. त्यानंतर रामदेवापासून वंशावळ मिळते आहे ( रा. इ. पा. १७५ ).

**३.** ( स. १२३५ नंतर ) आबूच्या परमारांपैकीं सोमसिंहाचा पुत्र. याला कान्हडदेव असेंहि म्हणत.

**४.** याचें दुसरें नांव उपेन्द्र असें आढळतें. उदयपूरच्या प्रशस्तींत याच्याविषयीं लिहिलें आहे कीं, यानें पुष्कळ यज्ञ केले आणि आपल्या पराक्रमानें मोठा राजा झाला ( एपि इंडि. भा. १ पृ. २३४ ). यापासून माळव्याचें परमारघराणें सुरू झालें असावें.

**कृष्णराम**—कालिकाल नांवाच्या प्रसिद्ध गुजराथी कवितेचा कर्ता.

**२.** गुजराथी कवि. मेवाडी ब्राह्मण. यानें शिक्षा नांवाचा गुजराथींत एक ग्रंथ केला आहे ( का. दो. )

**कृष्णराय**—संस्कृत नाटककार. सोळाव्या शतकांत होऊन गेलेल्या कृष्णराय नाटककारानें आपल्या पंचांकी ‘ जांबवतीकल्याण ’ या नाटकामध्यें कृष्णाच्या जांबवतीबरोबर झालेल्या विवाहाच्या कथेसंबंधीं वर्णन केलें आहे.

**कृष्णराव नारायणराव जोशी**—याचा बाप नाना जोशी म्हणून बारभाईचे तर्फेनें नागपूरकडे संधान ठेवण्याच्या कामगिरीवर असून बापलेकांचीं पत्रें दहाव्या खंडांत आहेत ( म. इ. सा. ले. १२२-१३० व १६५ ). हा नाना फडणिसाचे तर्फेनें अनेक कामांवर असून त्यांचे पश्चात् बाजीरावानें याला सातारकर छत्रपतीजवळ ठेविलें होतें ( का. सं. प. या. १८६ व ४८३ जुनी प्रत ).

हा इंग्रजीचा वकील असल्यामुळें नानानें याला मुद्दाम हैंदराकडे पाठविलें. याचा पत्रव्यवहार म. इ. सा. या ग्रंथांच्या १९ व्या खंडांत छापलेला महत्त्वाचा आहे. नानानें जेव्हां हैदराशीं तह करून इंग्रजांविरुद्ध चौघांचें कारस्थान उभें केलें, तेव्हां हैदरानें मराठ्यांचा एक प्रतिष्ठित वकील सर्व कामें बोलून ठरविणारा असा पुण्याहून आपल्याकडे बोलाविला. तदनुसार कृष्णराव नारायणराव जोशी सातारकर यास इतमामानिशीं पुण्याहून रवाना केलें. हा गृहस्थ नारायणरावाचें वधानंतर बारभाईंकडे अंतरंगांत असून साबाजी भोसले व निजामअल्ली यांस दादाचे विरुद्ध बारभाईंकडे खंबीरपणें ठेवण्याची कामगिरी करीत होता. म. इ. सा. खं. १० ले. ८९–१४२ या पत्रांत याचा उल्लेख वारंवार असून याचा बाप नाना जोशी साबाजी भोसल्यावरोबर नागपुराजवळ मारला गेला.

पुढें स. १७८१ मध्यें पुन्हां हा हैदरकडे गेला (म. रि. उत्तर वि. १ ला).

**कृष्णराव परशुरामपंत प्रतिनिधि** (औंध)--हा कोल्हापूरकरांचा प्रतिनिधि होऊन विशाळगडकरांचा मूळ पुरुष झाला.

**कृष्णराव पानशे**—(मृ. स. १७७७) परशुरामभाऊ धारवाडजवळचीं ठाणीं हस्तगत करूं लागला तेव्हां धारवाडच्या पूर्वेस ५० मैलांवर डंबळचें ठाणें हस्तगत करतांना लढाई होऊन कृष्णराव पानशे गोळी लागून पडला (१७७७ सुमारास). (म. रि. उत्तर वि. १ ला, पृ. ४५२).

**कृष्णराव बळवंत**—(आप्पा बळवंत पाहा).

**कृष्णराव बल्लाळ काळे**—(मृ. स. १७८६) हे नाना फडणवीस यांच्या विश्वासांतले गृहस्थ होत. पेशव्यांचे वकील म्हणून निजाम-दरबारीं यांची नेमणूक करण्यांत आली होती. हे राहणार काशीचे. पण दक्षिणेंत येऊन बाबूजी नाईकातर्फें, नानासाहेबांच्या तर्फे पेशवे दरबारीं नोकरीस राहिले. दादासाहेब हे उत्तरेस स्वारी करण्यास गेले असतां हे त्यांचे बरोबर होते. यांची राजकारणांतील हुशारी पाहून पेशव्यांनीं यांस इनाम दिलें. पुढें निजामशाहींत वकिलीच्या हुद्यावर असतांना यांस १५ हजारांचा सरंजाम व पंधरा हजारांची जहागीर मिळून तीस हजारांची नेमणूक होती. निजामाकडूनहि यांस दहापंधरा हजारांची जहागीर मिळाली होती. हे हैदरावर केलेल्या स्वारींत होते. यांचा पत्रव्यवहार प्रसिद्ध आहे (म. इ. सा. ३).

यांचा मुलगा गोविंदराव हा स्वामिनिष्ठ असूनसुद्धां रावबाजींनीं त्याच्या वाढलेल्या सव्वा लाख सरंजामापैकीं बराचसा जप्त केला. थोरल्या माधवरावानें याच्याकडून रघुनाथ दादाला पकडून बंदींत ठेवलें म्हणून धाकट्या बाजीरावाचाहि या घराण्यावर राग होता. याचा मृत्यु भाद्रपद व॥ प्रतिपदा शके १७०८ (स. १७८६).

**कृष्णराव बापुराव पारसनीस**—हा पुण्याचा पारसनीस. याचा पुत्र नारायण.

**कृष्णराव भगवंत अमात्य**—हे करवीरकर भोसल्याचे अमात्य. अमात्यपदप्राप्ति शके १६७५ व मृत्यु शके १६८३ (लेखनालंकार.)

**कृष्णराव भगवंतराव खटावकर**-(मृ.स.१७१३) हे खटावचे राहणारे. हे मराठी राज्यांत यांनीं केलेल्या बंडाळीवरून बरेच प्रसिद्धीस आले. यांच्या पूर्वजांना निजामशाहींत पाटिलकी होती. हे माध्वमती वैष्णव होते. पूर्वज मूळचे कर्नाटकांतील राहणारे. ह्यांस लहानपणापासून विद्येचा फार नाद होता. यांना खटाव येथील जहागिरी दिल्लीकरांनीं दिली. परंतु यांचा वंश त्यांच्या वतनगांवीं गेला. हा फार शूर होता. यानें खटाव येथें असलेल्या मशिदीचा विध्वंस करून त्या ठिकाणीं दत्ताची स्थापना केली. त्यांत पुढें ग्रंथालयाची व्यवस्था करण्यांत आली.

हे विद्वानांचे चहाते होते व ग्रंथांचे भोक्ते होते. नवीन ग्रंथाचा उतारा घेण्यासाठीं बारा बारा लेखक यांचेजवळ असत. यांचें कुलदैवत खंडोबा होय. व्याकरण व न्याय ह्या दोन शास्त्रांत हे निष्णात होते.

कृष्णरावांची विष्णुसहस्रनामावलीवरील द्वैतमती संस्कृत टीका उपलब्ध आहे (म. रि. म. १ पृ. ४३–४४).

शाहूराजे गादीवर बसते समयीं, हे ताराबाईच्या बाजूस होते. संभाजी महाराजांनंतर हे मोंगलांस जाऊन मिळाले व यांच्या साहाय्यानें मराठ्यांच्या राज्यांत धुमाकूळ घालणें त्यांना सोपें गेलें. मूळापासून हे बंडखोरच. पुढें शाहूमहाराजांनीं बाळाजी विश्वनाथास ह्यांच्यावर पाठविलें. कृष्णरावांनीं स्वपराक्रमाची कमाल केली, परंतु यांना गोळी लागून हे लढाईत पडले. त्या वेळीं यांच्या मुलासहि फार जखमा झाल्या व तो खटावकडे पळाला. परंतु मुलाची बायको फार शूर होती. तिनें लुगडें फाडून पट्ट्या बांधल्या व स्वतः तीर घेऊन युद्ध केलें, पण तिचा पराभव झाला. लढाई चालू असतां यांचा प्राण गेला. पुढें बाळाजीनें तिला सती जाण्यास परवानगी दिली. शाहूनें यांच्या वंशजास खटाव गांव इनाम दिला. त्याचप्रमाणें याचा भाऊहि पडला व पराभव झाला.

एकदां कोल्हापूरकर शिवाजीस पकडण्याचा बेत करून त्यास मोंगलांनीं घेरलें असतां यानें त्यास बगल दिल्यामुळें

निसटून जातां आलें. हा उपकार स्मरून शिवाजी कृष्णरावाच्या जहागिरीस उपद्रव करीत नसे. जेजुरीच्या खंडोबाचें देऊळ कृष्णरावानेंच बांधलें आहे. चंपाषष्ठीच्या दिवशीं पहिला नैवेद्य खटावकरांचाच झाला पाहिजे असा मान आहे. या वेळीं पौषमासीं देवाचें लग्न होतें तेव्हां अगोदर कांहीं दिवस देवास तेल लागतें त्या प्रसंगीं तेल लावण्याचा पहिला मान खटावकरांचा आहे. तो मान यांच्या उपाध्यांकडे चालू आहे.

मूळ पुरुष नारोपंत. ह्यास औरंगजेब बादशहानें स. १६८८ मध्यें कसबे खटाव येथील ठाणेदार नेमिलें. त्यांनीं दोन वर्षें तें काम केलें. नंतर त्यांचे चिरंजीव रामचंद्र नारोजी ह्यांनीं ८ वर्षें ठाणेदारीचें काम केलें. ते खटावास ठाणेदार असतां भोंसरगांवचे माळावर त्यांची व निंबाळकर यांची लढाई झाली. तींत ते मरण पावले.

पुढें त्यांचे नातू कृष्णराव भगवंत ह्यांस स. १६९८ त 'राजे'हा किताब मिळाला. त्यास तीन चिरंजीव होते. त्यांपैकीं वडील नारायणराव ह्यास शाहूमहाराजांनीं खटावची ठाणेदारी व गांव इनाम करून दिला. इनामाची सनद राजशक ५५ ( स. १७२८-२९ ) ची आहे.

विष्णुमूर्ति खटावास आहे. ती आडांत टाकलेली होती. ती काढून कृष्णरावानें तिची स्थापना केली ( ऐ. गो. पृ. ४५-४६ ).

**कृष्णराव माधव चिटणीस**—(स.१७८०-१८०३) जात प्रभु. हा चिमणाजी रखमांगद चिटणीसाचा भाचा. चिमाजीस पुत्र नसल्यामुळें त्यानें आपले मामाचा मुलगा यासच पुत्रवत् मानून आपले मागें चिटणिशी मिळावी अशी व्यवस्था केली ( अप्र. का.). सर्व सुभ्यावर चिटणिशीचे कामावर या घराण्यातर्फे कारकून जात असत.

स. १७८० त दु. रघुजीचे कारकीर्दींत चिमणाजी रखमांगद वारला व हा चिटणीस झाला.

ता. १०-२-१७९० रोजीं भवानी मुनशी मरण पावला. त्याचे मागें त्याची दिवाणगिरी त्याचा पुतण्या श्रीधर लक्ष्मण ऊर्फ बापू मुनशी यास मिळाली. त्याचे मदतीस यास रघूजीनें नेमिलें; व दोघांनींहि मिळून कारभार करावा असें ठरवलें.

कोलब्रुकनें केलेल्या रघूजीच्या वर्णनांत त्यानें म्हटलें आहे कीं, " श्रीधर लक्ष्मण मुनशी याच्या खालोखाल मर्जींतला मुत्सद्दी कृष्णराव चिटणीस हा आहे. याचेकडे राज्यांतील अंतर्गत कारभार आहे.''

ज्या वेळीं यशवंतराव होळकरानें पुण्यावर स्वारी केली त्या वेळीं श्रीधर मुनशी व कृष्णराव हेहि पुण्यासच होते. त्यांचे मार्फत यशवंतरावानें पत्रें दिलीं होतीं, व त्यांत इंग्रजांविरुद्ध चढाई करण्याची वेळ आली आहे, असें स्वतःच सुचविलें होतें.

हा वऱ्हाडांत कुऱ्हा येथें स. १८०३ सालीं रघूजीबरोबर असतां मरण पावला. याचेच वंशज हल्लींचे नागपूरचे प्रसिद्ध चिटणीस हे होत ( ना. प्रां. इ. पृ. २१३ ).

**कृष्ण राष्ट्रकूट**—( स. ७११-७२ सुमार ) मालखेडच्या राष्ट्रकूट वंशांतील पहिल्या कर्काचा पुत्र. यास इंद्र, ध्रुव, नन्नराज असे तीन भाऊ होते. कर्काच्या मागें मालखेडचें राज्य इंद्रास मिळालें. पुढें इंद्र मरण पावल्यानंतर इंद्राचा पुत्र दंतिदुर्ग गादीवर आला. पण दंतिदुर्गहि अकालींच निपुत्रिक मरण पावला. तेव्हां हा त्याच्यामागून, ( म्हणजे आपल्या पुतण्यामागून ) गादीवर आला. ' हा आपल्या जुलमी पुतण्यास ( दंतिदुर्गास ) पदच्युत करून गादीवर आला ' असें कांहींचें मत आहे. पण तें चुकीचें आहे ( दंतिदुर्ग पाहा ). ' कृष्णानें आपल्या नातलगाचा पाडाव करून राज्य मिळविलें ' असा जो उल्लेख आहे तो बहुधा ' अंत्रोलि-चन्होली ' शिलालेखांत उल्लेखिलेल्या दुसऱ्या कर्क राजाचा असावा. कारण हा कर्क फार महत्त्वाकांक्षी असून दंतिदुर्गाच्या वेळेसच ' समधिगतपंचमहाशब्दपरमभट्टारक-महाराजाधिराज परमेश्वर ' हें बिरुद आपल्या नांवापुढें लावीत असे, व दंतिदुर्गाच्या मृत्यूनंतर हा आपणास उघड उघड ' सार्वभौम राजा ' म्हणवून घेऊं लागला. त्यामुळें कृष्णानें त्या कर्काचें पारिपत्य केलें असावें.

यास बऱ्याच प्रौढ वयांत मालखेडचें राज्य मिळालें. राज्यारोहणसमयीं ( स. ७५६ ) याचें वय जवळजवळ ४५ वर्षांचें असावें. दंतिदुर्गानें केलेल्या दिग्विजयांत हा त्याला प्रामुख्यानें मदत करीत होता. दंतिदुर्गानें चालुक्यांचा मोड करण्याचें काम आरंभिलें होतें, तें यानें शेवटास नेलें.

चालुक्यांचा मोड करून त्यांचें राज्य आपल्या राज्यास जोडल्यावर याची दृष्टि गंग राजाकडे वळली. त्या वेळीं श्रीपुरुष हा वृद्ध गंगराजा मन्न येथें राज्य करीत होता. कृष्णानें मन्न येथें त्याचा पुरा मोड केला.

गंगांचा मोड केल्यावर कृष्णाची दृष्टी वेंगी येथील चालुक्य घराण्याकडे वळली. यानें आपल्या मुलास ( गोविंदराज ) चालुक्यांवर पाठविलें. गोविंदराजानें चवथ्या विष्णुवर्धन चालुक्याचा मोड केला व त्या राज्याचा बराचसा भाग आपल्या राज्यास जोडला ( स. ७७२ ).

या सुमारास जवळजवळ सर्व मध्यप्रांत कृष्णाच्या अमलाखालीं आला होता.

यानंतर कृष्णानें दक्षिण कोंकणावर स्वारी केली व तेथील शिलाहार राजास आपलें मांडलिकत्व कबूल करावयास लावलें.

याच्या मृत्युकालासंबंधीं नक्की असें कांहींच सांगतां येत नाहीं. पण याचा मृत्युकाल साधारणतः स. ७७२ ते स. ७७५ च्या दरम्यान असावा. कारण ७७२ सालच्या तळेगांव शिलालेखांत याचें नांव आढळतें, पण स. ७७५ मध्यें खोदलेल्या पिंपरी येथील शिलालेखांत फक्त याच्या मुलाचेंच नांव आढळतें.

कृष्ण बराच कर्तबगार राजा होता. यानें आपल्या १८ वर्षांच्या अल्प कारकीर्दीत राज्याचा विस्तार जवळजवळ पूर्वीच्या तिप्पट वाढविला. यानें गंग व पल्लव या राजांचा पाडाव केला, व आपल्या पराक्रमाच्या योगानें यानें आपल्या घराण्याचा सर्व दक्षिणेंत बराच दरारा बसविला.

यानें वेरुळ येथील मनास थक्क करून सोडणारें शिवलेणें करविलें. तें एक डोंगर कोरून तयार केलें आहे.

याच्या पदरीं अकलंकदेव नांवाचा एक जैन कवि होता. परंतु पिटर्सन् रिपोर्ट नं. २, पा. ७९ मध्यें, 'अकलंकदेव हा कृष्ण राजाचा मुलगा असावा' असें प्रसिद्ध झालें आहे. पण ह्या म्हणण्यास पाहिजे तितका ऐतिहासिक पुरावा मिळत नाहीं (आळतेकरकृत राष्ट्रकूट, पा. ४०९).

यानें शके ६८० हेमलंबी संवत्सर अश्विन अमावास्येच्या सूर्यग्रहणानिमित्त पुणें प्रान्तांतील बोपखेल गांव (बोपखेल, ता. हवेली, जि. पुणें) पूगडिभट यास दिल्याचें वृत्त ताम्रपटांत आहे. यांत राष्ट्रकूट राजाची वंशावळ गोविंदराज, कक्कराज, इन्द्रराज, दन्तिदुर्ग व कृष्णराज अशी आहे, व हा अनुक्रम भांडारकरांच्या इतिहासांतील अनुक्रमाशीं सुसंगत आहे. दन्तिदुर्गानंतर त्याच्या मुलास किंवा वारसास बाजूस सारून किंवा मारून हा गादीवर आला असें भांडारकरांच्या सदर इतिहासांत म्हटलें आहे. त्याचा निर्णय करण्यांत या ताम्रपटांत साधन नाहीं पण हा कक्कराजाचा मुलगा असें मात्र यांत स्पष्ट म्हटलें आहे. याला शुभतुंग व अकालवर्ष अशींहि नांवें होतीं. श. ६८० अश्विनी अमावास्या (स. ७५८ ऑक्टोबर ६) रोजीं ग्रहण असल्याचें दीक्षित व पिले यांच्या जंत्रींत नमूद आहे. यांत पुणें प्रान्ताचा उल्लेख 'पुण्यविषयान्तर्गत' असा आहे. भा. मंडळाच्या श. १८३४ च्या इतिवृत्तांत पृ. ३७६ वर श. ६९० मधील कृष्णराजाचा दुसरा ताम्रपट छापला आहे. त्यांत 'पूनक-विषयान्तःपाति' असा पुणें प्रान्ताचा निर्देश आला आहे (मं. त्रैमा. ८. ३. पा. १६५–१६७).

२. (स. ८८०–९१४) मालखेडच्या राष्ट्रकूट वंशांतील पहिल्या अमोघवर्षाचा पुत्र. वारसासंबंधींचा कोणत्याहि तऱ्हेचा तंटाबखेडा न होतां याला निर्वेधपणें राज्य प्राप्त झालें. याचा राज्यारोहणाचा काल साधारणपणें स. ८८० हा असावा (इंडि. अँटि. १२.२४७).

राज्यावर आल्यावर मात्र याला आपल्या शेजारच्या राष्ट्रांशीं बऱ्याच टकरा द्याव्या लागल्या. याचा मुख्य प्रतिस्पर्धी वेंगी येथील विजयादित्य चालुक्य होता. याच्या कारकीर्दीत राष्ट्रकूटांचे चालुक्यांशीं वारंवार संबंध येऊं लागले. त्याबद्दल तितकासा स्पष्ट असा उल्लेख आढळत नाहीं. त्या वेळचा चालुक्य राजा विजयादित्य याचा पहिल्या अमोघवर्षानें पाडाव करून चालुक्यांना राष्ट्रकूटांचे अंकित करून टाकलें होतें. पण अमोघवर्षाच्या मृत्यूनंतर विजयादित्यानें पुन्हां हातपाय हालविण्यास सुरवात केली. याच सुमारास कृष्णानें आपली सत्ता अबाधित राखण्याकरितां एक राजकारण लढविलें. यानें चालुक्यांशीं संधान बांधून त्यांना नोदंब व गंग यांच्या विरुद्ध उठविलें. दोघांच्या लढाईत आपलें स्थान अढळ राहावें हाच याचा उद्देश होता. त्याकरितां यानें चालुक्यांच्या सैन्यास आपल्या देशांतून मार्ग देण्याचें कबूल करून इतरहि कांहीं मदत दिली. या लढाईत नोलंबांचा सेनापति मंगी हा मारला जाऊन विजयादित्याचा जय झाला.

विजयादित्याच्या या जयाचा परिणाम कृष्णाला प्रतिकूल असा झाला. गंगांवर मिळविलेल्या विजयानें चालुक्य शिरजोर झाले व विजयादित्यानें आपल्या पुतण्याच्या मदतीनें कृष्णाची सत्ता उलथून पाडण्याचा निश्चय केला; व त्याप्रमाणें किरणपुरास युद्ध करून याचा पराजय केला.

विजयादित्याच्या मृत्यूनंतर त्याचा पुतण्या पहिला भीम हा गादीवर आला. त्यानेंहि आपल्या चुलत्याचेंच धोरण पुढें चालवून याचा व याच्याशीं मित्रत्वानें असलेल्या लाट व कर्नाटक येथील राजांचा निरवद्यपुर व पेरुवंगुरग्राम या दोन ठिकाणीं पराभव केला.

याच्या कारकीर्दीतील दुसरी विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे यानें केलेला गुजराथच्या राष्ट्रकूट घराण्याचा पाडाव ही होय. गुजराथचें राष्ट्रकूट घराणें नाहींसें करून त्या ठिकाणीं यानें ब्रह्मावलोक नांवाच्या नवीन घराण्याची स्थापना केली.

यानंतर हा फार दिवस वांचला नाहीं. स. ९१४ च्या सुमारास कुरुन्धकास जाऊन पट्टबन्धोत्सव केला व आपल्या

नातवास राज्यसूत्रें अर्पण केलीं. याचा मुलगा जगत्तुंग हा पूर्वीच एका लढाईंत ठार झाला होता. यानें कोक्कल कलचुरि या चेदिराजाच्या मुलीशीं विवाह करून या दोन्ही राष्ट्रांमध्यें स्नेहसंबंध निर्माण केला होता. तसेंच आपल्या पुत्राचें लग्नहि यानें चेदि देशच्याच एका लक्ष्मी नांवाच्या राजकन्येशीं लावून दिलें होतें. त्यामुळें याला चेदिराजांचें निरनिराळ्या लढायांत बरेंच साहाय्य झालें.

एकंदरींत पाहतां याच्या कारकीर्दीत राष्ट्रकूट सत्तेची विशेष वाढ झाली नाहीं. उलट गंग व चालुक्य हीं दोन राष्ट्रें राष्ट्रकूटांच्या सत्तेंतून फुटून निघालीं होतीं. आपल्या पित्यांप्रमाणें यानेंहि जैन धर्माचाच पुरस्कार केला होता. आदिपुराणाच्या शेवटच्या पांच अध्यायांचा कर्ता गुणभद्र हा याचा गुरु होता ( राष्ट्रकूट, पानें ९०–९९ ).

३. ( स. ९१४ ) राष्ट्रकूटांच्या लाट येथील शाखेंतील दंतिवर्मन्‌चा मुलगा. याचा अकालवर्ष या नांवानेंहि उल्लेख करतात. याच्यानंतर याचा नातू शके ८३६ मध्यें गादीवर आला ( भांडारकर ).

४. ( स. ९३९–७१ ) मालखेडच्या राष्ट्रकूट घराण्यांतील तिसऱ्या अमोघवर्षाचा पुत्र. हा स. ९३९ च्या सुमारास गादीवर आला असावा. पण त्यापूर्वीच म्हणजे युवराज असतांनाच यानें बराच पराक्रम गाजविला होता; व याचा दरारा आजुबाजूच्या राष्ट्रांत चांगलाच बसला होता. त्यामुळें याला राज्यपद मिळविण्यास कोणत्याहि तऱ्हेचा अडथळा आला नाहीं.

राज्यावर आल्यावर प्रथम यानें आपली दृष्टि दक्षिणेकडील राज्याकडे वळविली. गंगराज्यावर त्या वेळीं याचा मेहुणा बूतुग हा राज्य करीत होता. वाणवाडीचा तिसरा विक्रमादित्य याचें बूतुगाशीं सख्य होतें. याच वेळीं चोलराजा परांतक यानें विक्रमादित्यावर स्वारी करून विक्रमादित्याचा पराभव केला. तेव्हां यानें विक्रमादित्यास साहाय्य करण्याकरितां चोलराजावर स्वारी केली ( स. ९४४ ). या स्वारीचा उद्देश दक्षिणेंतील शक्य होईल तितका मुलूख राष्ट्रकूट राज्यास जोडावा असाहि होता.

चोलराजाशीं झालेल्या या लढाईंत प्रथम याचा मोड झाला. पण लवकरच यानें आपल्या मेहुण्याच्या मदतीनें चोल राजांचा पुरा पाडाव केला; व चोल राज्याचा बराचसा भाग आपल्या राज्यास जोडला.

कानडी कवि पोन्न यास याचा आश्रय होता. यानें आपल्या कारकीर्दीच्या ५ व्या वर्षी म्हणजे स. ९४४ च्या सुमारास तोंडै-मण्डलम् काबीज केलें. पुढें स. ९४७ मध्यें यानें गंग राजा बूतुग २ रा याच्याशीं सख्य करून चोल राजाशीं लढाई केली. त्या लढाईंत बूतुगनें राजादित्यास तक्कोलम येथें युद्ध करून ठार मारिलें ( राजादित्य पाहा ). अशा रीतीनें विजयी झाल्यावर हा तोंडै-मंडलम् येथें आला. नंतर स. ९५९ मध्यें यानें मेल्पादी येथें तळ देऊन तोंडैमण्डलमूच्या आसपासच्या राजांस आपलें मांडलिकत्व स्वीकारण्यास भाग पाडलें. स. ९६७ मध्यें हा मरण पावला ( एपि. इंडि. १९. ८१–८७ ).

याची बिजब्बे नांवाची मुलगी मरुदेव गंगाला दिली होती.

हा याप्रमाणें दक्षिणेकडे गुंतला असतां उत्तरेकडील राजकारणांत बऱ्याच अडचणी उत्पन्न झाल्या व याच्या कारकीर्दीचा उत्तर काल बहुतेक झगड्यांत गेला. परमारांनीं राष्ट्रकूटांविरुद्ध उचल खाण्यास सुरुवात केली व चेदि आणि चंदेल्ल यांनींसुद्धां राष्ट्रकूटांवर उत्तरेकडून हल्ले करण्यास सुरुवात केली. प्रथम यानें या सर्वांचा पाडाव केला; पण तो तात्पुरताच. दक्षिणेकडे ज्याप्रमाणें यानें आपला वचक बसविला तसा तो याला उत्तरेकडे बसवितां आला नाहीं.

कृष्णास एक पुत्र होता. परंतु तो याच्या आधींच मरण पावल्यामुळें याच्यानंतर याचा भाऊ खोत्तिग हा गादीवर आला ( राष्ट्रकूट ११५–२५ ).

यानें दन्तिग आणि वप्पुग यांना ठार मारून पश्चिमगंग राजा राचमल्ल १ ला याच्या गादीवर बूतुग २ रा यास बसविलें. त्याचप्रमाणें यानें पल्लव राजा नोलम्ब अन्निग आणि कलचुरी–चेदि राजा सहस्त्रार्जुन यांचा पराभव करून कोंजिवरम् आणि तंजावर हें घेतलें. याचा धाकटा भाऊ जगत्तुंग ३ रा हा याच्या सत्तेखालीं राज्य करीत होता. यादव घराण्यांतील वद्दिग हा याचा प्रतिस्पर्धी होता. स. ९४९ मध्यें याची चोल घराण्यांतील राजादित्य याच्याशीं लढाई झाली.

**कृष्णवर्मन् कदंब**—हा बनवासीच्या कदंब घराण्यापैकीं ककुतसवर्मन्‌चा पुत्र. याची पत्नी कैकयराजाची मुलगी होती.

२. ( स. ५५०–६५ ) हा बनवासीच्या कदंब घराण्यापैकीं सिंहवर्म्याचा पुत्र. बदामीच्या चालुक्यांपैकीं कीर्तिवर्मन् पहिला यानें याचें राज्य घेतलें.

**कृष्णवर्मा चेर**—हा चेर घराण्यांतील होय. कृष्णवर्मा कदंब व हा एकच असावा.

**कृष्ण ( कन्ह ) शातवाहन** ( आंध्र )—हा आंध्राचा दुसरा राजा. याच्या कारकीर्दीत याच्या राज्याची हद्द

नाशिकपर्यंत भिडली होती ( V. Smith, 218 ). यानें स. पूर्वी ५०-४० पर्यंत राज्य केलें ( Bhand. p. 48 ).

**कृष्णसरस्वती**—यादवेंद्रसरस्वती यांचे हे शिष्य. नृसिंहसरस्वती यांनीं यांस आपले गुरु केलें होतें. यानें शंकराचार्यांच्या उपदेशसाहस्त्रीवर संस्कृत टीका लिहिली आहे.

२. गंगाधरसरस्वतीच्या सात शिष्यांतील एक.

**कृष्णसिंग**—रघुनाथराव पेशव्याचा एक लेकवळा.

**कृष्णसूरि**—यानें द्रौपदीपरिणय नांवाचें संस्कृत नाटक लिहिलें आहे.

**कृष्णस्वामी**—अन्यवृत्ति नामक संस्कृत ग्रंथाचा कर्ता.

२. जयरामस्वामी वडगांवकरांचे गुरु. यांचें लग्न चुकून एका न्हाव्याच्या मुलीशीं झालें होतें. कृष्णाजी असेंहि यांस म्हणत ( सं. सू. ).

**कृष्णंभट्ट उपाध्ये ( जोशी )**—हा रतरपुर येथें बिंबाजी भोसल्याचा कारभारी होता (ना. प्रा. इ. पृ. २१४).

**कृष्णंभट्ट जोशी**—राक्षसभुवनच्या पूर्वेस असणाऱ्या शेंबे गांवच्या गोपाळपंत जोश्यांचा हा मुलगा होय. याजविषयीं अशी हकीकत सांगतात कीं, यानें वेताळाची अतिशय भक्ति केली. त्याप्रमाणें तो प्रसन्न झाला. वेताळ म्हणाला "तुझी काय इच्छा आहे तें माग ! " त्यावर हा म्हणाला, "मी कृष्णासारखा दिसेन असें कांहींतरी कर." या याच्या म्हणण्याप्रमाणें वेताळानें यास एक मुकुट दिला व सांगितलें कीं, "जोंपर्यंत हा तुझे डोक्यावर आहे तोंवर तूं कृष्णच दिसशील व दूर काढून ठेवतांच पूर्ववत् होशील."

त्याप्रमाणें यानें आपला क्रम चालू ठेवला. याच्या कृष्णरूपास भुलून बऱ्याच स्त्रिया संभोग इच्छूं लागल्या व त्यांच्या कामना यानें पूर्ण करून धनहि बरेंच संपादिलें.

पुढें आस्ते आस्ते ही गोष्ट हेमाडपंताचे कानावर गेली. त्याला या गोष्टीचें आश्चर्य वाटून खरी भानगड काय आहे हें पाहण्याकरितां त्यानें आपलें आराध्यदैवत गणपतीची प्रार्थना करून गूढ उकलवून घेतलें. तेव्हां त्यास फार राग आला व तात्काळ यास बोलावून मोठ्या युक्तीनें पैठणास आणलें.

याचें कृष्णरूप पाहून हेमाडपंतांनीं याचा सत्कार केला व स्नानभोजन करण्याविषयीं विनंति केली. परंतु मुकुट काढण्याची पाळी येईल व सर्वच उघडकीस येईल असें समजून यानें तें नाकारलें. अखेर कारकुनास हेमाडपंतानें नेत्रसंकेत करतांच डोक्यावरचा मुकुट त्यानें एकदम काढला ! सर्वच उघडकीस आलें ! कृष्णंभट्टास कैदेंत ठेविलें व अनुयायांस हद्दपार केलें. याच्याच अनुयायांना मानभावी म्हणतात ( अर्वाचीन कोश ). ही गोष्ट केवळ महानुभावांची नाचक्की करण्याकरितां लिहिलेली दिसते.

**कृष्णंमा**—विजयनगरच्या रामरायाचा बंधु वेंकटाद्रीची पत्नी. हिला रंगप्पा व राम असे दोन पुत्र होते.

**कृष्णंमा नांदेल**—विजयनगरच्या अरविदु घराण्यांतील दुसऱ्या वेंकटपतिरायाचा हा एक शत्रु होय. याचा पराभव मातला अनंतानें केला.

**कृष्णाकुमारी**—( मृत्यु स. १८१० जुलै २१ ) मेवाडच्या भीमसिंह राण्याची ही मुलगी. हिच्याबद्दल त्या वेळीं साऱ्या रजपुतांत भांडणें लागलीं होतीं. जोधपूरचा मानसिंग व जयपूरचा जगतसिंग यांच्यांत लढा होण्यास हीच कारणीभूत झाली. शिंद्यांनीं मानसिंगाची बाजू स्वीकारली; व मेवाडनजीक येऊन तळहि दिला. तेव्हां भीमसिंहानें जयपूरकरांशीं केलेला करार मोडला. पण जयपूरकरांनींहि स्वारीची तयारी चालविल्यामुळें भीमसिंह पेंचांत पडला. तो दुर्बल असल्यानें काय करावें हें त्यास सुचेना.

शिंद्यांनीं अमीरखानाची स्वारीवर नेमणूक केली होती. या अमीरखानाचा दरारा विलक्षण होता. भीमसिंह लवकर तयार होत नाहीं असें पाहून त्यानें सडेतोडपणानें सांगितलें कीं, "एक कृष्णाकुमारीस मानसिंगास तरी द्या किंवा तिला ठार तरी मारा ! " दुर्बल भीमसिंह तिला मारण्यास तयार झाला. पण तिला मारण्याचें काम कोणीच स्वीकारीनासें झाल्यावर हिचा बंधु जवानदास याला तें काम करण्यास सांगितलें. तो ठरल्याप्रमाणें खंजीर घेऊन हिला ठार मारण्यासाठीं आला असतां हिचें अप्रतिम सौंदर्य पाहून खजिल झाला व त्याच्या हातून तें काम न होतां खंजीर मात्र गळून पडला. तरी हिचें मरण चुकलें नाहीं. भीमसिंहानें विषप्रयोगाचा उपाय अमलांत आणण्याचें ठरवून खुद्द हिची आई चांदबाईच्या हातून विषाचे प्याले भरून पाठविले. आपल्यासाठीं आपल्या वडिलांना त्रास होत आहे असें पाहून ही मरणास सिद्ध झाली. सरबतांतील तीनहि वेळचें विष उलटून पडलें तेव्हां हिला अफू देऊन मारण्यांत आलें.

हिच्या पश्चात् अन्नत्यागानें हिची आईहि थोड्याच दिवसांत मेली. पुढें केवळ कृष्णाकुमारीच्या हत्येमुळेंच मेवाडच्या स्वातंत्र्यश्रीस उतरती कळा लागली ( टॉड ).

**कृष्णाचार्य पंढरपूरकर विठ्ठलोपाध्ये**—हे पंढरींतील नामांकित पंडित होते. धर्मसिंधुकार काशीनाथ पाध्ये यांचे हे बंधु होत.

**कृष्णाजी अनंत सभासद**—शिवाजीचा सर्वांत जुना चरित्रकार. यानें प्रथम स. १६९७ मध्यें जिंजी येथें

शिवाजीची बखर लिहिली. समकालीन माणसानें लिहिलेली शिवाजीविषयक माहिती फक्त याच्याच पुस्तकांतील होय. हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण असावा असें काव्येतिहाससंग्रहकारांनीं म्हटलें आहे. हा शिवाजीमहाराजांपासून राजाराममहाराजांच्या अखेरपर्यंत दरबारीं सभासद होता. सभासद म्हणजे राजसभेंत बसून सल्लामसलत देणारा शिष्ट पुरुष असावा. यानें आपली बखर राजाराममहाराजांच्या आज्ञेवरून चंदी येथें ईश्वरनाम संवत्सरीं म्हणजे शके १६१९ त लिहिली. शके १६१६ सालीं ही बखर लिहिण्यास सुरवात केली आणि १६१९ सालीं संपविली. यानें छत्रपतींच्या खालोखाल महाराष्ट्रांतील कर्ते पुरुष म्हणून प्रल्हाद निराजी, रामचंद्र निळकंठ, संताजी घोरपडे, बहिर्जी घोरपडे, व धनाजी जाधव हीं पांच नांवें दिलीं आहेत. हा स्वतः शिवाजीच्या वेळींहि हयात असल्यामुळें यानें दिलेली त्रोटक व स्थूल माहितीहि विश्वसनीय धरण्यास हरकत नाहीं (राजवाडे प्रस्तावना पा. २१७–१८). याचें उपनांव हिरेपारखी व गोत्र काश्यप. हे जुन्नरकर देशपांड्यांचे आप्त दिसतात.

**कृष्णाजी आटोळे**—हा पहिल्या रघूजी भोंसल्याचा सरदार होता. रघूजीनें यास व अलीखान यास आवजी कवडे ( बाजीरावाचा सरदार ) याजवर पाठवलें होतें ( स. १७३९ ). उमरावतीजवळ त्यांची लढाई झाली. ती साधारण सारखीच झाली. पुन्हां दुसरी लढाई नागपूर प्रांतांत झाली. त्यांत आवजीचा मोड होऊन तो पळून गेला. जानोजी व मुधोजी यांचे भांडणांत हा जानोजीचे पक्षाकडे होता.

बखरींत व इतर लेखांत यास आठवले असें म्हटलें आहे. त्यावरून हें घराणें ब्राह्मण असावें असा भास होतो. परंतु हे ब्राह्मण नसून मराठे सरदार होते (ना. प्रां. इ. पृ. ७९).

**कृष्णाजी एकनाथ धर्माधिकारी ऊर्फ कृष्णदास बैरागी**— यांचा चैतन्यलीला नांवाचा ग्रंथ उपलब्ध झाला आहे. केशव चैतन्य प्रभृति राजर्षि घराण्यांतील थोर पुरुषांचें चैतन्यलीला या ग्रंथांत वर्णन आलें आहे. चैतन्यलीला हा ग्रंथ शके १५९६ (सन १६७४ ) वैशाख वद्य द्वादशीस पुरा केलेला आहे. या ग्रंथाचे अध्याय २१ असून त्यांत ओवीसंख्या ३३७५ आहे. यानें आपला हा ग्रंथ शिवाजीमहाराजांना राज्याभिषेकप्रसंगीं रायगडावर अर्पण केला होता. या ग्रंथाचे आधारें शके १७०९ मध्यें नाशिक येथें निरंजन राघव अथवा रघुनाथ या सद्गृहस्थानें चैतन्यविजय नांवाचा ग्रंथ लिहिला, तो स. १९१३ मध्यें राजर्षि घराण्यांतील वासुदेवराव नामक पुरुषानें मुंबईस छापला. त्यांत 'ज्या मूळ ग्रंथावरून हे ५ अध्याय निरंजन रघुनाथानें लिहिले तो मूळ ग्रंथ सांपडल्यास किती चांगलें होईल ' अशी सदिच्छा व्यक्त केली आहे. आणि तो ग्रंथ आतां प्रसिद्ध इतिहाससंशोधक रावसाहेब बाबासाहेब देशपांडे यांना राजर्षिवंशांतील माधवराव विष्णु यांच्याकडून मिळाला आहे. हा केशव चैतन्यास आपला गुरु मानतो. याची समाधिहि केशव चैतन्याच्या समाधीशेजारींच ओतूर येथें आहे; आणि त्यावर कृष्णंभट राजर्षीनें लिंगस्थापना केली आहे.

**कृष्णाजी कंक**--येसाजी कंकाचा पुत्र. संभाजीच्या वेळीं येसाजी सरनोबत होता, तर हा पदातिनाईक होता. या दोघांनींहि फोंड्याच्या लढाईत बरेंच शौर्य दाखविल्यामुळें संभाजीमहाराजांनीं उद्गार काढिले कीं, " फिरंगी यांसीं गाठ पडली तेव्हां बहुत कस्त केली आणि गनीम मारून काढला ते वक्तीं दोघानांहि जखमा लागोन चकचूर झाले."

या त्यांच्या पराक्रमामुळें खासा येसाजी यास १ हजार व कृष्णाजीस १ हजार होन अशी नेमणूक करून यांचा सन्मान केला ( राज. खंड १५.३९६; मं. चतु. संमे. १९८ ). हा त्या जखमांनीं मेला तेव्हां याच्या तीन वर्षांच्या येसाजी नांवाच्या मुलास स्मरणार्थ पुनः याचेंच नांव देऊन वतन दिलें ( शि. च. सा. २.३९७ )

**कृष्णाजी गंगाधर भोसले**—यानें भोसल्यांचे उपाध्ये बाळंभट राजोपाध्ये यांना शा. श. १६१२ ( स. १६९० ) सालीं मंगळूर प्रांतांतील कंजनकोळ हा गांव सूर्यग्रहणानिमित्त दिला. यासंबंधींच्या दानपत्रावर 'सरकार-इआली सर सेनानी ' अशा अर्थाचा फार्शी शिक्का आहे. त्यावरून हे सेनापतीच्या हुद्यावर होते असें कळतें. पण कोणाच्या हें समजत नाहीं. याशिवाय आणखीहि कांहीं दानधर्मासारख्या प्रकरणांत याचा उल्लेख येतो ( म. इ. सा. १५. ३८७ ).

**कृष्णाजी गोविंद**—ताईबाई कोल्हटकरचा कारभारी. यास प. रघूजी भोंसल्यानें, भास्करराम कोल्हटकराची स्त्री ताईबाई हिचे तर्फे वऱ्हाडच्या सुभ्याचा कारभारी नेमलें होतें. तें काम यानें पुष्कळ दिवस केलें. जानोजी व मुधोजी यांचे भांडणांत हा जानोजीस मिळाला. परंतु पुढें पंचगव्हाण व पिंजर येथील जमेदारांमध्यें सोयरिकीवरून आपसांत कांहीं तंटा उत्पन्न झाला असतां यानें पिंजरकरांचा पक्ष घेऊन पंचगव्हाणाच्या जमेदारांस कैद करून फार त्रास दिला. जानोजीनें मना केलें असतां ऐकलें नाहीं म्हणून जानोजीची यावर अवकृपा झाली व यास जानोजीनें वरील कारभारावरून काढून टाकलें ( ना. प्रां. इ. ).

**कृष्णाजी जगन्नाथ**—हा नानाफडणविसाचा वकील जोधपुरास होता. यानें ता. १०–५–१७८५ रोजीं नानास एक पत्र लिहून त्या देशांतील सर्व हकीकत कळविली आहे. त्याचप्रमाणें नानाहि याला राजकारण कसें करावयाचें व बोलावयाचें याविषयीं लिहीत असे. नानाफडणिसाचे देशभर पसरलेले बहुतेक वकील हुशार, कर्तव्यदक्ष व समयज्ञ होते. त्यांस अपवाद असेल तर तो हा जोधपूरचा वकील कृष्णाजी जगन्नाथ याचाच होय. हा लिहूं लागला म्हणजे दहा दहा, वीस वीस पानें भरकटून त्यांत काय बरळतो आहे हें समजण्याची मारामार पडते. मराठ्यांचें राजकारण काय हें तर यास बिलकुल समजलें होतेंसें दिसत नाहीं ( म. रि. उ. २ पृ. ११८; २४३ ). यानें आपलें नांव कृष्णाजी जगन्नाथ वकील असें लिहिलें आहे ( ऐ. प. २६० ).

**कृष्णाजी त्रिमल**—मोरोपंत पिंगळ्याचे हे मेव्हणे. हे पूर्वी मथुरेस राहत असत. शिवाजीची आग्र्याहून सुटका झाली. त्या वेळीं त्यांना मथुरेस मुक्काम करावा लागला. तेथें हा व याचे दोन बंधु यांजपाशीं संभाजीस ठेवून त्यांनीं पाय काढला. मोंगलांना संशय. येऊन संभाजीस पकडण्यासाठीं ते आले असतां यानें एका पानांत बसून भोजन केलें; व संभाजी आपला भाचा असल्याचें सांगून संभाजीचा बचाव केला.

कृष्णाजी त्रिमल हा शिवाजीबरोबर आधींच आला. काशी त्रिमल व त्याची आई संभाजीला घेऊन आली. आणि तिसरा विसाजी त्रिमल हा मथुरेसच राहिला. कृष्णाजी त्रिमलाला शिवाजीनें 'विश्वासराव' असा किताब दिला व रोख बक्षीस दिलें, अशी माहिती रा. खं ८ मधील २३ व्या पत्रावरून मिळते. अर्थात् संभाजीच्या ताटांत जेवल्याची गोष्ट काशी त्रिमलची असावी.

**कृष्णाजी दादो**—दादोजी कोंडदेवाचा मुलगा.

**कृष्णाजी धुळप**—माधवरावाचे मृत्यूनंतर इंग्रजांनीं ठाणें, वसई, विजयदुर्ग, रत्नागिरी वगैरे किनाऱ्यांवरील ठिकाणें हस्तगत केलीं. तेव्हां पेशव्यांनीं स. १७७३ चे जानेवारींत त्रिंबक विनायकास इंग्रजावर पाठविलें. त्यांनीं व कृष्णाजी धुळपानें मिळून इंग्रजांस विजयदुर्गातून हुसकून दिलें.

**कृष्णाजी नाईक जोशी**—( स. १६४४–१७५० सुमार ) याच्या पित्याचें नांव केशव. हा बाबूजी नाईक बारामतीकरांचा चुलता. श्रीशिवरायांचे अभिषेकाचे समयीं 'कारकून व मुत्सद्दी' मंडळींत नांव दाखल होण्याइतकी कामगिरी यांनीं केली ( भिडे कृ. अ. इ. पा. २८ ). शिवाजीकडून विजापूर दरबारीं पुंडे वकिलीवर असतां त्यांचे मदतीस हे हाते. एंकोजी राजांकडे मध्यस्ती करण्यास गेलेल्या मंडळींतहि हे होते. संभाजीच्या कारकीर्दींत व राजारामाच्या गडबडीच्या वेळीं हे दौलताबादेकडील भोसल्यांच्या जहागिरीचें काम करीत होते. राजारामांनीं शाहूच्या सेवेकरितां यांची नेमणूक केली. स. १७०७ मध्यें शाहूची सुटका झाल्यावर त्यांस स्वराज्यांत आणून राज्य मिळवून देण्याचे कामीं यांनीं फार साहाय्य केलें; म्हणून यांना स्वराज्याची पोतदारी दिली ( भा. व. ऐ. प. पत्र ५८ ). यांचे नंतर ( स. १७११।१२ ) बाळाजी विश्वनाथ यांनीं आपली कन्या भिऊबाई ही यांचे पुतणे आबाजी यांस दिली. बाळाजीपंत भट सेनाकर्ते असतांना त्यांस 'पैक्याची' मदत यांनीं केली. स. १७२० मध्यें यास पिंपरी गांव ( ता. हवेली, जि. पुणें ) इनाम मिळाला. त्यांत थोरले बाजीरावांनीं यांच्याविषयीं खालीलप्रमाणें लिहिलें आहे: "हे पुरातन राज्यांतील सेवक राजश्री स्वामीची सेवा वडील वडलांपासून करीत आले. पुढेंहि करीत आहेत." यांचे थोरले पुतणे बाबुजी हे बाळाजीपंताबरोबर स्वराज्याच्या सनदा आणण्याकरितां दिल्लीस गेले होते. यापूर्वीहि पैठण वगैरे परगण्यांत यांचा अंमल होताच. बाळाजीपंत परत आल्यावर शाहूमहाराजांनीं त्यांचे पुत्र बाजीराव यांस सरदेशमुखीची सनद दिली, त्यांत येणेंप्रमाणें उल्लेख आहेतः "( १ ) ४७५३ ।। नि ।। कृष्णाजी केशव प।। पैठण वगैरेची चौथाई. ( २ ) प्रांा गंगथडीः सरकार पैठण. नि ।। कृष्णाजी केशव १९०१३।। ≡" ( अप्रसिद्ध ). सावकार व पोतदार या नात्यानें त्या वेळच्या बहुतेक सरदारांकडे यांचें येणें जाणें असे. हे व यांचे पुतणे बाबुजी नाईक, आपल्या कर्तबगारीनें महत्त्वास चढूं लागल्यामुळें यांचेबद्दल पेशवेआदि सरदारांच्या मनांत मत्सर येऊं लागला व येनकेन प्रकारेण यांचें नुकसान करण्याची खटपट सुरू झाली. फत्तेसिंग अक्कलकोटकरांकडील कर्जाचे बाबतींत शाहूमहाराजांच्या मनांत विकल्प उत्पन्न केला गेला. "४० वर्षांची" एकनिष्ठ सेवा, स्वार्थी लोकांच्या नादानें महाराज विसरले म्हणून वैतागून यांनीं स. १७४१–४२ चे सुमारास काशीवास पत्करिला ( पे. द. १७.१५५–५७ ). यांचीं जीं कर्जे इकडे होतीं त्या सर्व कर्जफेडीची व्यवस्था व दरसाल रुपये १०,००० ची नेमणूक पेशव्यांनीं यांना करून दिली, ती यांचे पुत्र नानाजी व

पौत्र कृष्णराव यांजकडे चालत होती. काशींत "सोमयाग, गायत्रीपुरश्चरण श्रीकोटी होम" वगैरे धार्मिक कार्यांत राहिलेलीं वर्षे घालवून यांनीं स. १७४९-५० चे सुमारास देह ठेवला. यांची बुंदेलखंडाची सुभेदारी इतकी चोख व न्यायाची होती कीं, पुढें गोविंदपंत बुंदेल्यांनीं यांच्यासंबंधीं 'तपश्चर्याशील कृष्णाजी' असें म्हटलें आहे. यांचा वंश सातारा येथें नांदत आहे ( मा. ग. वा. ).

**कृष्णाजी परशुराम प्रतिनिधि**—( स. १७१८) हा परशुरामपंताचा मुलगा. परशुरामपंतानें याला विशाळगड व सभोंवारचा प्रदेश ताब्यांत घेण्यास पाठविलें. यानें किल्ला ताब्यांत घेतला. साताऱ्यास परशुरामपंताचा कायमपणा झाल्यावर मग कोल्हापुरास हाहि कायम प्रतिनिधी झाला. तोच हल्लींच्या विशाळगडकरांचा पूर्वज होय.

**कृष्णाजी पवार**—काळोजी पवाराचा पुत्र. सखाराम बापू बोकिलांनीं स. १७७४ च्या ३० मार्चला महादजी शिंदे यांना जें पत्र लिहिलें त्यामध्यें याचा उल्लेख आला आहे. हा त्या वेळीं साखारामबापूंना मिळणार होता असें दिसतें ( म. रि. उ. १, पृ. ५ ).

**कृष्णाजी बाळाजी**—कोंकण सोडून घाटावर आले. यांजबरोबर इचलकरंजीकरांचे मूळ पुरुष नारो महादेव व पटवर्धन घराण्याचे मूळ पुरुष हरभट हेहि होते. कोल्हापुराजवळ जोतिबाच्या डोंगरावर तिघांच्या आणाभाका झाल्या. त्यांत, ज्याचा प्रथम उदय होईल त्यानें इतर दोघांचा प्रतिपाळ करावयाचा असें ठरलें. नारोपंतास योग्य आश्रयस्थान मिळाल्यामुळें कृष्णाजी व गणेश यांचीं मुलें अनुक्रमें शिवराम व जिवाजी हीं ठरल्याप्रमाणें नारोपंतांच्या घरीं आश्रयास गेलीं. त्यांना नारोपंतांनीं पेशव्यांच्याकडे नोकरीस पाठविलें. पेशव्यांनीं त्यांना पडळीची कमावीस व साताऱ्याच्या सरकारी वाड्याचें काम सांगितलें. तें काम त्यांनीं चांगल्या रीतीनें पार पाडलें.

**कृष्णाजी बांदल देशमुख**—मावळांतील बलिष्ठ देशमुख.

**कृष्णाजी भास्कर कुलकर्णी**—( स. १६५९-१७१२ ) हे वाईच्या कुलकर्ण्यांचे वंशज होत. सातआठ वर्षे अफजलखान हा वाईचा सुभा असल्यानें खानाची व याची दाट ओळख होती. हा खानाच्या येथें नोकरीस होता. कारण खानानें याला आपला वकील म्हणून शिवाजीकडे पाठविलें होतें. पुढें खानाचा वध झाला (स.१६५९). त्यानंतर हा शिवाजी महाराजांच्या नोकरीस होता. कारण औरंगजेब गादीवर बसला असतांना महाराजांनीं त्या वेळीं जो वकील पाठविला होता तोच हा कृष्णाजीपंत होय ( १६५९ ). रामचंद्र अमात्य यांनीं सावंतावर ज्या सरदारांस पाठविलें तोच हा सरदार (१७०९). सारांश, हा शूर, मुत्सद्दी व शिवशाहीचा माहितगार होता (रा. खं. ८·१). किल्ले विशाळगड औरंगजेबानें हस्तगत करून उदितासिंग रजपूत यास किल्ल्यावर ठेवला. त्यासी राजकारण करून यानें किल्ला ताब्यांत घेतला. तेव्हां परशुराम त्रिंबक यानें याला एक गांव द्यावा म्हणून शिफारस केली. तेव्हां याला कलवस्ते ( संगमेश्वर ) गांव ता. २२-४-१७७२ रोजीं इनाम करून दिला ( पत्रें यादी ५ ). पत्रें यादींतील वरील सनदेंत याचें उपनांव पंडित आहे. पण हे हल्लीं उपनांव जमेनीस लावतात. याचें घराणें मलकापूर, संस्थान विशाळगड व मौजे साल्पे येथें नांदत आहे ( मावळंकर सरदेसाई घ. इ. भा. १ पृ. ६८ व भा. २, पृ. ६८-७१). येथें एकाच नांवाच्या दोन व्यक्तींची माहिती सरमिसळ झाली असावी. शिवचरित्र साहित्यांत मावळचा शिवाजीचा अधिकारी म्हणून याच नांवाचा पुरुष अफजल प्रकरणाच्या पूर्वीपासून आढळतो.

**कृष्णाजी महादेव जोशी चासकर**—(स.१७३०-१७५४) याचा भाऊ रामचंद्र महादेव हा कल्याणचा सुभेदार होता. पण तो मरण पावल्यामुळें बाजीरावानें स. १७३० मध्यें याला कल्याणचा सुभेदार नेमलें. ह्याच्या व इतर मंडळींच्या मदतीनें मराठ्यांनीं भिवंडीच्या खाडीपलीकडे कांबें म्हणून ठिकाण होतें तेथें व पुढें मनोर येथें पोर्तुगीझांशीं लढून पोर्तुगीजांचा पराभव केला ( १७३१ अखेर ) ( म. रि. म. १, पृ. २९२ ). याची बहिण लाडूबाई ही थोरले बाजीराव यांना दिली. तिचें सासरचें नांव काशीबाई. यांचे वडील महादेवराव यानें थोरले राजाराममहाराजांचे वेळीं श्रमसाहस केलें म्हणून खवली गांवची वृत्ति मिळाली. याला चासगांव मिळालें. उत्तरेकडील राजकारणांतहि हा होता. मृत्यु चैत्र शु॥ ९, १६७६ शके.

**कृष्णाजी महादेव भावे**—हा नानाचा वकील महादजीकडे होता. याचा मृत्यु ता. १४।२।१७८८ त झाला.

**कृष्णाजी मोरे**—(स. १६५६) यशवंतराव मोऱ्याचा पुत्र. यास शिवाजीनें ठार केलें ( चंद्रराव मोरे पाहा ).

**कृष्णाजी विनायक सोहोनी**—हे पेशव्यांच्या बखरीचे लेखक. हे रत्नागिरी जिल्ह्यांतील सोमेश्वराचे रहिवासी. पेशवाईच्या अखेर ते गांव सोडून देशावर आले. स्वपराक्रमानें यांनीं पेशवे दरबारीं सुभेदारी मिळविली. पुढें पेशवाईच्या मावळत्या ज्योतीबरोबर

यांचेंहि वैभव व पराक्रम फिक्के पडून संन्यासमार्गाचा अवलंब करण्याकडे लक्ष वेधलें, व त्याप्रमाणें वैजनाथाच्या देवालयांत यांनीं पुढील आयुष्य एखाद्या तपस्व्याप्रमाणें काढलें. यांनीं पेशवाईची बखर लिहिली. यांत बाळाजीपंत नाना हे श्रीवर्धनाहून निघाल्यापासून तें शनवारवाड्यावर इंग्रजांचें निशाण फडकेपर्यंतची सर्व हकीकत आली आहे. या वेळीं यांचें वय ७० च्या सुमाराचें होतें. त्यांचा जन्म सवाई माधवरावांच्या कारकीर्दीत झाला असावा. ( साने पेशवे बखर, प्रस्ता. ).

**कृष्णाजी शेट्या**—हा दौलतराव शिंद्याजवळ खिद्मतगार होता. नंतर त्याचा कारभारी झाला. हा स. १७९७ च्या मे महिन्यांत वारला ( म. रि. उ. ३ पृ. ५०-५२ ).

**कृष्णानंद आगमवागीश**—हा वासुदेव सार्वभौमाचा शिष्य. यानें बंगाल्यांत प्रथम तंत्रशास्त्राचा प्रचार सुरू केला.

**कृष्णानंद वेदव्यास**—वेदव्यास हें याच्या घराण्याचें नांव असावें असें दिसतें. हा ' संगीतरागकल्पद्रुम ' या ग्रंथाचा कर्ता असून याच्या बापाचें नांव हीरकानंद आणि आज्याचें नांव अमरानंद असें होतें.

यानें आपल्या ग्रंथांत पुष्कळ ग्रंथांचा व ग्रंथकारांचा निर्देश केला आहे. त्यामध्यें ' संगीतपारिजात ' आणि ' संगीतनारायण ' हेहि ग्रंथ आहेत. डॉ. पी. आर. भांडारकर यांनीं ' संगीतपारिजात ' या ग्रंथाचा काल स. १६५०-१७०० असा ठरविला आहे ( ' Ancient Hindu Music ' IA. XII p. 160 ). यानें आपल्या ग्रंथांत ' संगीतपारिजाता'चा फारसा उपयोग केलेला नाहीं. तेव्हां याच्या वेळीं ' संगीतपारिजात ' हा ग्रंथ नुकताच लिहिलेला असला पाहिजे. शिवाय ' संगीतनारायण ' या ग्रंथाचा काल स. १७५० असा आहे. यावरून यानें 'आपला संगीतकल्पद्रुम' हा ग्रंथ स. १७५० ते स. १८०० यामधील कालांत केव्हांतरी लिहिला असला पाहिजे ( पी. के. गोडे ).

याचा ग्रंथ स. १८४२ मध्यें कलकत्ता येथें छापून प्रसिद्ध झाला आहे. यानें ग्रंथारंभीं बरीच शास्त्रीय माहिती दिलेली आहे. याच्या लिहिण्यावरून याच्या शुद्ध स्वरांचें सप्तक 'बिलावल'. असावें असें वाटतें. यानें तीस वर्षें खपून हा ग्रंथ केला आहे. यानें आपल्या वेळच्या अनेक चिजा दिल्या आहेत, पण त्या सस्वर व सताल नाहींत ( शास्त्र व कला यांचा इतिहास, पा. १९ ).

**कृष्णाप्पा स्वामी**—शांतलिंगाप्पांचे शिष्य कृष्णाप्पा स्वामी हे उरण बहे ( अथवा उरुण बाहे ) चे कुळकर्णी. हे कांहीं दिवस कृष्णातीरीं राहत असत. यांची शाखा आश्वलायन, गोत्र काश्यप; शके १५०४ मध्यें वटग्राम ऊर्फ वडगांव येथें येऊन यांनीं तेथें मठाची स्थापना केली. कृष्णाप्पांनीं आपली शिष्यशाखाहि बरीच वाढविली. यांचीं कांहीं पदें मात्र आढळतात. त्याशिवाय यांचा ग्रंथ वगैरे कोणतीहि रचना हल्लीं उपलब्ध नाहीं. असें म्हणतात कीं कृष्णस्वामींनीं ज्ञानेश्वरीचा नववा अध्याय पुढें ठेवून तो वाचीत असतां शके १५४५ रुधिरोद्गारी संवत्सरीं माघ शु. १५ स जित समाधि घेतली.

**कृष्णाबाई**—( दर्याबाई निंबाळकर ) ही परदेशी रजपुत ( रा. खं. ८. १८४ ). घाशीरामाची थोरली बहीण. हिनें ताराबाईच्या नातवाचें म्हणजे रामराजाचें लहानपणापासून पालनपोषण केलें. हिच्या भावानें त्या मुलास ता. २६-१-१७४५ नंतर हिच्यापाशीं आणून दिलें होतें. नंतर पेशव्यांनीं पावगांवास जाऊन हिच्यासह त्याला साताऱ्यास आणलें; व नंतर त्यास ( शके १६७१ ) स. १७५० मध्यें तक्तारूढ केलें. रामराजाचे लहानपणचे दिवस मुद्दाम अज्ञातवासांत काढले. कारण त्यास मारण्याकरितां प्रथम जिजाबाई व पुढें सकवारबाई टपलेल्या होत्या. म्हणूनच बाहेर तो मेला असें सांगून इतर सर्व मंडळींनीं त्याची अशी आंतून व्यवस्था केली, म्हणूनच दर्याबाईनें त्यास संभाळला असावा, असें इतिहासकारांचें मत आहे.

२. जयरामस्वामी वडगांवकर यांची आई.

**कृष्णाम्मा**—विजयनगरच्या अरविदु घराण्यांतील दुसऱ्या वेंकटाची पत्नी. हिच्या पित्याचें नांव जिलेल्ला कृष्ण राजू असें होतें. कृष्णाम्बा या नांवानेंहि हिचा उल्लेख करतात. हिच्यापासून वेंकट राजास एकहि पुत्र झाला नाहीं.

**कृष्णोबा चिटणीस**—हा आबा चिटणीसाचा भाऊ होता. याच्या वडिलाचें नांव रघुनाथ असें होतें. हा दौलतरावाचा चिटणीस झाला. पूर्वी हा नानाच्या पक्षास मिळाला होता. तथापि नानाचे आग्रहावरून दहा लाख रुपये दौलतरावानें नजराणा घेऊन याचे नांवें चिटणिसी करून दिली. पैशावाबत यानें एकदां पठाणांवर लगट केली. त्या प्रसंगीं यास वार लागून हा घायाळ झाला. ऐनवेळीं दौलतराव तेथें आला म्हणून याचे प्राण वांचले ( १-३-१७९९ ). हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण असून महादजीच्या वेळेपासून शिंद्यांचे पदरीं होता ( आबाजी रघुनाथ चिटणीस पाहा ).

**केटर हेन्री**—( स. १७७७-१८३५ ) हा पदार्थविज्ञानशास्त्रवेत्ता होता. प्रथम याचा कायद्याचा

अभ्यास करण्याचा विचार होता. परंतु बापाच्या मृत्यूनंतर यानें सैन्यांत प्रवेश केला. यास बाराव्या रेजिमेंटमध्यें कमिशन मिळालें व हा हिंदुस्थानांत आला. त्या वेळीं यानें हिंदुस्थानची त्रिकोणमितीच्या साहाय्यानें पाहणी केली. आरोग्याकरितां यास हिंदुस्थान सोडावें लागलें. इंग्लंडांत जाऊन यानें सँढर्स्ट कॉलेजांत प्रवेश केला; व परीक्षा उत्तीर्ण होऊन कॅप्टनची जागा मिळविली. पुढें सन १८१४ सालीं पेन्शन घेऊन पुढील आयुष्य शास्त्रीय शोधांत घालविलें. यानें खगोलशास्त्रांत दुर्बिणींत कांहीं सुधारणा करून दाखविल्या. रशियाच्या मापाच्या तुलनेसंबंधानें अत्यंत परिश्रम घेऊन तीं मापें निश्चित केलीं. या याच्या कामगिरीमुळें यांस रशियानें बहुमान दिला व रॉयल सोसायटीनें यास आपला सभासद नेमलें.

**केतकादास क्षेमानन्द**—( स. १६४० सुमार ) हिंदी कवि. याचा जन्म वर्धमान जिल्ह्यांतील कांथरा गांवीं झाला. याची जात कायस्थ होय. क्षेमानन्द हें याचें नांव असून केतकादास ही याची पदवी होय.

केतका हें मनसादेवीचें नांव होय. म्हणून यानें आपलें नांव केतकादास असें ठेविलें.

यानें आपल्या 'आत्मचरित्रा'मध्यें रमीलाबादचा राजा बाराखाँ याचा उल्लेख केला आहे. आणि युद्धांत त्याचा मृत्यु झाल्याबद्दल खेद प्रकट केला आहे. आपला 'मनसामंगल' हा ग्रंथ स. १६४० च्या नंतर लिहिला. कारण त्यामध्यें बाराखाँ राजानें शिवराम भट्टाचार्य यास २० बिघे जमीन दान दिली, असा उल्लेख आला आहे. याच्या मनसाभाषण या ग्रंथांत ५००० कविता आहेत. याशिवाय याचे लहानसहान ग्रंथ असून ते अत्यंत लोकप्रिय आहेत. याची कविता सरस व रुचिपूर्ण आहे ( क. कौ. भा. ७ ).

**केत कोट**—हा अमरावतीच्या कोट घराण्यांतील एक राजा ( स. ११३० ). हा पहिल्या भीमाचा मुलगा.

**२.** ( स. ११८२–१२३१ ) कोट घराण्यांतील एक राजा. पत्नी प्रोलदेवी (?). शिवाय गणपांबा नांवाच्या गणपतीच्या मुलीनें याच्याशीं लग्न केलें होतें. याची गणपतीस फार मदत होती. याच्या मदतीनें गणपतीनें पुष्कळ लढाया केल्या. यानें स. १२०९ मध्यें भीमेश्वराचें देऊळ सुधारून बांधलें ( एन्शन्ट डेक्कन भाग १, पा. २८७ ).

**३.** ( स.१२३४-४० ) कोट घराण्यांतील एक राजा. याला मन्मकेत असेंहि म्हणत. याच्या पत्नीचें नांव बय्यला. नातवाडी घराण्यांतील रुद्राची मुलगी.

**केतलादेवी**—ही कामदेव कदंबाची पत्नी.

**केदारजी बीन नरसोजी खोपडे**—हा विजापूरकरांच्या दरबारीं असून शिवाजीच्या विरुद्ध होता. शिवाजीस पकडण्याकरितां अफजलखान आला असतां त्याच्याबरोबर हा होता. अफजलखानाच्या वधानंतरच्या युद्धांत शिवाजीनें केदारजीचा पाडाव करून त्याचा शिरच्छेद करविला ( खंडोजी खोपडे पाहा ).

**केदारजी सिंदे**—( मृ. स. १७६७ ) हा तुकोजीचा मुलगा व महादजीचा पुतण्या. पुण्यास दादा-माधवरावांचें भांडण जोरांत चालू होतें. तोंपर्यंत सिंद्यांचे सरदारीचा निकाल लागला नाहीं. माधवरावाचें लक्ष महादजीकडे होतें. म्हणून महादजीवर दादाची गैरमर्जी होती. मध्यंतरीं जनकोजी शिंद्याचा तोतया उत्पन्न होऊन घोटाळा उत्पन्न झाला. पुढें नारो शंकरानें प्रयत्न करून सिंद्याची सरदारी ता. २५–११–१७६३ रोजीं केदारजीचे नांवें केली. परंतु पुढें ता. १० जुलई १७६४ त दादानें तीन लक्ष रुपये नजराणा घेण्याचा करार करून सरदारी मानाजी सिंद्यास दिली.

केदारजी बहुधा स. १७६७ त मृत्यु पावला. पश्चात् याचे बायकोस पेशव्यांनीं लोहगडावर अटकेंत ठेवलें होतें ( म. रि. म. भा. ४ ).

**केदारनाथ**—हा एक नाथसंप्रदायी साधु होता. याचें ठिकाण कोल्हापूरजवळचा जोतिबाचा डोंगर होय. याचें चरित्र 'केदारविजय' नांवानें अंगापूरकर हरीनें लिहिलें आहे; आणि तें प्रसिद्धहि झालें आहे ( अंगापूरकर हरि पाहा ).

**केदारभट्ट**—हा 'वृत्तरत्नाकर' या संस्कृत ग्रंथाचा कर्ता होय. याचा पिता पिड्वेक. गोत्र काश्यप. डॉ. कीथ यांच्या मताप्रमाणें यानें 'वृत्तरत्नाकर' हा ग्रंथ सनाच्या १५ व्या शतकापूर्वी लिहिला असें ठरतें. परंतु, औफ्रेचनें असें लिहिलें आहे कीं, 'वृत्तरत्नाकर यावर नारायणभट्टानें स. १५४५ मध्यें टीका लिहिली.' मल्लिनाथानें 'वृत्तरत्नाकर' ग्रंथाचा उपयोग केला आहे. मल्लिनाथाचा काल प्रो. हंदिकी यानें स. च्या १५ व्या शतकांत अगर १४ व्या शतकाच्या उत्तरार्धांत दिला आहे.

चंदुपंडितानें आपल्या 'नैषधचरित' यावरील टीकेंत वृत्तरत्नाकराचा उल्लेख केला आहे. चंदुपंडित स्वतःचा काल स. १२९७ असा सांगतो. यावरून वृत्तरत्नाकराचा काल स. १२५० पर्यंत मागें ढकलला जातो. हा ग्रंथ बराच महत्त्वाचा असल्यामुळें यावर जवळजवळ २० हून अधिक टीका लिहिल्या गेल्या आहेत. या ग्रंथाच्या हस्त-

लिखिताच्या पुष्कळ प्रती ( पद्मनाथ, चित्रसेन, सुल्हण पाहा ) निरनिराळ्या ग्रंथालयांत सांपडतात ( Annals of the B. O. R. I. 16, p. 143 ).

**केनवे कॅप्टन**—( स. १७८८-९४ ) हा इंग्रज वकील निजामाजवळ होता. निजामाशीं पूर्वी स. १७६८ चा करार होता, त्यांत यानें गंटूर प्रांत इंग्रजांस देण्याचें कबूल केलें होतें, परंतु कांहीं ना कांहीं सबबीवर तो अद्याप हस्तगत झालेला नव्हता. कॉर्नवालिस यास मोठी धास्ती होती कीं, निजाम भलत्याच हरकती सांगेल. पण यानें आपलें काम उत्कृष्ट बजावून अल्पावधींत निजामास खूष करून गंटूर प्रांत ताब्यांत घेतला ( स. १७८८ ). तेव्हां कॉर्नवालिसचें मन निश्चित झालें; आणि त्याची मर्जी याच्यावर विशेष बसली. हा स. १७९४ पर्यंत निजामाचे दरबारीं होता ( म. रि. उत्तर वि. २, पृ. २९३ ).

**केयूरबाहु**—काश्मीरचा राजा. लिंगय्या कवीनें याचें तेलंगी भाषेंत चरित्र लिहिलें आहे.

**केयूरवर्ष कलचुरी**—( स. ९२५ सुमार ) हा त्रिपुरीच्या कलचुरी घराण्यापैकीं मुग्धतुंग ऊर्फ धवल याचा पुत्र होय. हा आपला ज्येष्ठ बंधु बालवर्ष याच्यानंतर गादीवर आला. याच्या राणीचें नांव नोहलादेवी असून ती चालुक्य सामंताची कन्या होती ( नोहलादेवी पाहा ). केयूरवर्षाचेंच युवराज असें दुसरें नांव होतें. चंदेल्लाच्या लेखावरून असें दिसतें कीं, त्यांच्यापैकीं कोणीतरी याचा पराभव केला असावा. याच्यानंतर याचा मुलगा लक्ष्मण हा गादीवर आला ( म. यु. भा २. २२४ ).

**केरेय पद्मरस**—( स. ११०० नंतर ) बल्लाळ राजाचा हा मंत्री होता. यानें वीरशैवसंप्रदाय वाढविला. यानें ' दीक्षा बोधे' नांवाचें संवादात्मक काव्य कानडींत लिहिलें आहे. त्यांत एक शिक्षक आपल्या शिष्यास शैव पंथाचीं तत्त्वें शिकवीत आहे.

**केरोजी पवार**—हा कृष्णाजी पवाराचा धाकटा मुलगा. याचा थोरला भाऊ बाबाजी. हा थो. शिवाजीच्या पदरीं होता. राजाराम छत्रपतीकडून यास सेनाबारासाहस्री ही शौर्यदर्शक पदवी मिळाली ( मावजी-कैफि. पा. ६९ ).

**केशरी**—ही एक महादजी शिंद्याची राख होय. ही नानाफडणिसाचे ओळखीची होती. ही उज्जनीस राहत असे. हिच्या मार्फत नानानें दौलतरावास बोध करविला कीं, नानास सोडून कारभार कराल तर तो तुम्हांस जाचक होईल. ही गोष्ट दौलतरावास पटली आणि त्यानें नानाशीं गुप्त बोलणें सुरू केलें. हिची मुलगी कोल्हापूरकरांच्या दासीपुत्रांस दिली ( स. १७९९; म. रि. उत्तर वि. ३, पृ. ३४; ७५ ).

२. ( राघोबादादा पेशवा पाहा ).

**केशव**—( जन्म स. १२४३ ) ग्रहलाघवकार गणेश दैवज्ञ यानें विवाहवृंदावन नामक ग्रंथावर टीका केली आहे, तो ग्रंथ केशवाचा आहे. याच केशवानें 'करणकंठीरव' नामक ग्रंथ लिहिला असें गणेश दैवज्ञ म्हणतो. हा अर्थात् करणग्रंथ असला पाहिजे.

केशव हा भारद्वाज गोत्री औदीच्य ब्राह्मण असला पाहिजे. याचा पिता, आजा इत्यादि त्रयींचीं नांवें राणग, श्रियादित्य आणि जनार्दन अशीं होतीं. ग्रहलाघवकार गणेशाचा पिता केशव ह्याहून हा केशव प्राचीन असला पाहिजे. रामकृत विवाहपटलाच्या शके १४४६ च्या निर्णयामृत टीकेंत विवाहवृंदावन ग्रंथाचा उल्लेख आहे. यावरून केशवाचा काल शक १४०० हून अर्वाचीन नसावा, हें सिद्ध होतें.

गणेश दैवज्ञ यांच्या मतें याचा जन्म काल शक ११६५ असावा. याचें राहण्याचें गांव नर्मदातीरीं भडोच असावें. कारण तेथील अयनांश व अक्षांशहि बरेचसे जुळत आहेत ( भा. ज्यो. पा. २५७ ).

२. प्रख्यात ग्रहलाघवकार गणेश दैवज्ञाचा हा पिता होय. हा स्वतः मोठा विद्वान् होता. पुत्र गणेश दैवज्ञ याचें ग्रहगणित विषयांत याजवर वर्चस्व झालें, हें ' सर्वत्र विजयं चेच्छेत् शिष्यादिच्छेत्पराजयम् । ' या न्यायानें केशवास मोठें भूषणच होतें. स्वतः विद्वान् होता म्हणूनच याचा पुत्र इतका विद्वान् होऊं शकला. ग्रहकौतुक म्हणून याचा एक करणग्रंथ आहे. त्यांत आरंभ वर्ष १४१८ आहे. यावरून या सुमारास हा होता. याचें गोत्र कौशिक होतें.

याच्या पित्याचें नांव कमलाकर होतें. तोहि मोठा ज्योतिषी होता. वैजनाथ हा केशवाचा गुरु होय. कोंकणांत नंदिग्राम गांवीं हा राहत असे, त्यासच हल्लीं नांदगांव ( सं. जंजिरा ) म्हणतात. याच्या पत्नीचें नांव लक्ष्मी असें होतें.

यानें गणित विषयावर बरेच ग्रंथ लिहिले परंतु याच्या मुलाच्या ग्रंथामुळें ते मागें पडले. मात्र वेधासंबंधीं केशवाची योग्यता मोठी आहे, हें कोणीहि कबूल करील.

यानें ग्रहकौतुक आणि जातकपद्धति यांवर स्वतः टीका केली आहे ( भा. ज्यो. पा. २५८ ). हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होता.

३. केशव हा नामदेवाचा एक शिष्य होय. याचें मूळ स्थान तारापूर असून हा महाराष्ट्रीय वारकरी होता.

नामदेवानें याला पंजाबांत स्वधर्मप्रसारासाठीं पाठविलें होतें. हा प्रथम शरीरानें कुबडा होता. नामदेवानें याला आपल्या दिव्य शक्तीनें घुमान ( पंजाब ) येथील 'जथोरा' नांवाच्या तळ्यांत घालून अव्यंग केलें आणि परमार्थांत लुळी, पांगळी झालेली पंजाबी प्रजा निरोगी व निर्व्यंग करण्याकरितां याचे बरोबर ज्ञानदेवाच्या अमृताची दिव्यौषधि देऊन यास आपला दवाखाना थाटण्यास नामदेवानें पंजाबांतच ठेविलें, असें जन्मसाखेवरून दिसतें.

केशवानें भावलपुरांत वरील प्रकारच्या रोग्यांकरितां एक मोठें रुग्णालय काढिलें व कित्येक मुमूर्षु मुमुक्षूंस मरणापासून मुक्त केल्याचें श्रेय घेतलें. यानें स्थापिलेल्या पीठास 'केशव कलधरकी गद्दी' म्हणून नांव दिल्याचें प्रसिद्ध आहे. सदरहू पीठ अद्यापिहि भावलपुरांत पाहावयास सांपडतें.

केशव हा संन्यासी होता, हें यास लाविलेल्या 'कलधर' ह्या विशेषणावरूनच उघड होत आहे; व नामदेवानेंहि आपल्या काव्यांत 'आवो कलंदर केशवा' (ग्रंथसाहेब पान ११६७ ) असा ज्या अर्थी याचा 'कलधर' म्हणून उल्लेख केला आहे, त्या अर्थी वरील तर्क खरा आहे असें म्हणणें भाग पडतें. 'कलधर' हा 'कलंदर' या शब्दाचा अपभ्रंश होय व याचा अर्थ 'संन्यासी' असा हिंदी कोशकार देतात (मं. त्रै. १८४७-४८ अं. १-४; पृ. ८-९ ).

४. यानें अधिक मासाचें गुजराथींत वर्णन केलें आहे ( गुजराथी काव्यदोहन ).

५. हे अकरा कावडी रामेश्वरास घालणाऱ्या समर्थशिष्य माधवाचे अनुग्रहित होते.

६. मच्छनाथाचा शिष्य ( पदसंग्रह पद. ४५३ ). एकनाथाचें चरित्र केशवानें शा. श. १६८२ मध्यें लिहिलें. तो मच्छनाथाचा शिष्य असावा. कै. तुकाराम तात्या यांनीं केलेल्या एकनाथी गाथ्याच्या आरंभीं हें केशवकृत नाथचरित्र छापलें आहे. त्याचे शेवटीं शके १७५४ परिधावी नाम संवत्सरे उत्तरायणे माघ शुक्ल १३ इंदुवासरे क्षेत्र पंचवटी श्रीसितारामचरणसन्निधाने संपूर्णम्, असा लेखनस्थलकालोल्लेख आहे. तो सदर चरित्र ज्या मूळ पोथीवरून छापलें त्या पोथीच्या लेखकानें केलेला उल्लेख असावा असें वाटतें. हा स्वतः बारा वर्षेपर्यंत भागवतश्रवणार्थ नाथांच्या जवळ होता. पण असें असेल तर वरील शक चुकीचा दिसतो. याच्या पित्याचें नांव त्रिंबकराम.

७. काशिराजशिष्य ( अर्वाचीन कोश).

**केशव चैतन्य**—( स. १५२४-७२ ) विश्वनाथबाबा ऊर्फ केशव चैतन्य यांचा पिता हा गोवळकोंड्याच्या सुभेदाराचे त्रासानें तिनीविलीहून पुणें येथें आला. त्याबरोबर त्याचा स. १५१९ मध्यें जन्मलेला त्रिंबक नांवाचा मुलगाहि होता. पुण्यास आल्यावर कसबा पेठेंत हल्लींच्या मुजुमदाराचे बोळाच्या पूर्वेकडील टोंकास असलेल्या जागीं यांचा जन्म स. १५२४ मध्यें झाला. यांचें बरेंच आयुष्य युद्धांत गेलें. पण त्यांत यश लाभलें नाहीं. यांचा वडील बंधु त्रिंबक यानें यवनाचा सेवक होऊन यांच्यावर परचक्र आणलें. त्याला तोंड देतांना यांचा धाकटा बंधु उद्धव बापु कामास आला. यामुळें यांचें मन विटून हे कुटुंबासह त्रिंबकास जाण्यास निघाले. वाटेंत ओतूर येथें मुक्काम पडला असतां राघव चैतन्यस्वामींचें दर्शन घडलें. शके १४७२ च्या सुमारास यांनीं त्यांस आपणांस संन्यास द्यावा अशी विनंति केली. पण तुम्हांस पुत्र झाल्याशिवाय संन्यास देतां येत नाहीं, असें सांगितल्यामुळें यांची निराशा झाली. पुढें स. १५५१ या वर्षी म्हणजे यांच्या सव्विसावे वर्षी यांना पुत्र झाला. त्याचें नांव नरसिंह असें ठेवण्यांत आलें. त्याचे तेरावे दिवशीं यांनीं संन्यास घेतला. तो महिना मार्गशीर्षाचा असल्यानें याचें नांव राघवचैतन्यांनीं केशवचैतन्य असें ठेवलें. यानंतर हे तीर्थयात्रेस निघाले. केशव चैतन्य यांची गुरुपरंपरा पुढीलप्रमाणें आहे. श्रीव्यास-राघवचैतन्य-केशवचैतन्य-तुकोबाराय. केशवचैतन्यांनीं श्रीतुकाराम महाराज ओतुर येथें जानू तेल्याच्या घरीं निद्रित असतां शके १५६१ माघ शुद्ध दशमी गुरुवार रोजीं स्वप्नांत उपदेश दिला ( स. १६४० ). श्रीकेशव चैतन्य यांचा काळ ओतूर येथें शके १४९३ वैशाख वद्य १२ रोजीं झाला म्हणजे हे समाधिस्थ झाल्यानंतर ६८ वर्षांनीं यांनीं तुकोबारायाला उपदेश दिला. असें होणें हें साधुसंतांच्या चरित्रांत नेहमीं दृष्टोत्पत्तीस येतें ( सोहिरोबा अंबिये, निळोबा पाहा ). यांनीं पुढील ग्रंथ केलेः--१ भक्तिप्रकाश, २ वैकुंठपद, ३ वासनामयदेह, ४ गीताभागवतसार, ५ परमार्थविचार. हे समाधिस्थ झाल्यानंतर यांचे चिरंजीव नरसिंहभट्ट यांस दिल्लीच्या अकबर बादशाहाचें श्रावण शु. १ गुरु. शके १४९४ ( स. १५७२ ) आलेलें पत्र आहे. तसेंच याच सालांत सनद दिल्याचें नमूद आहे. त्यावरून अकबर बादशाहाचा व यांचा धार्मिकदृष्ट्या निकट संबंध आलेला दिसतो.

तुकोबांस परमेश्वरप्राप्तीची तळमळ लागली तेव्हां अनेक ठिकाणीं फिरत फिरत, कोणी खरा सिद्ध पुरुष भेटतो कीं

काय, याचा तपास ते करीत होते. ते पुष्कळ ठिकाणीं हिंडले, पुष्कळ संतांच्या भेटी घेतल्या, परंतु त्यांना योग्य सिद्ध पुरुष भेटला नाहीं. तेव्हां निराश होऊन ते पंढरपुरास गेले. तेथें त्यांना असा दृष्टान्त ( स्वप्न ) झाला कीं, 'तुम्हीं ओतुरास ( उत्तमपुरास ) जावें' म्हणजे तेथें तुम्हांला गुरूपदेश मिळेल. ओतुरास केशव चैतन्यांची समाधि आहे. ओतुरास ते जानु तेल्याच्या घरीं उतरले. तेथें शके १५६१ माघ शुद्ध १० गुरुवारीं उत्तर रात्रौ स्वप्नांत केशव चैतन्यांनीं त्यांस गुरूपदेश दिला, असें 'चैतन्यलीला' या ग्रंथांत म्हटलें आहे. हा ग्रन्थ कृष्णाजी एकनाथ धर्माधिकारी ऊर्फ कृष्णदास बैरागी यांनीं लिहिला व तो छत्रपति शिवाजीमहाराज यांस त्यांच्या राज्याभिषेकप्रसंगीं स. १६७४ मध्यें अर्पण केला, हें प्रसिद्ध आहे. हा गुरूपदेश खरा व प्रत्यक्ष नसून स्वप्नांतला आहे. केशव चैतन्य स. १५७१ त समाधिस्थ झाले व तुकोबांचा जन्म स. १६०८ त झाला. अर्थातच त्यांचा गुरूपदेश प्रत्यक्ष होणें शक्यच नाहीं. राघव चैतन्याचे शिष्य केशव चैतन्य, व केशव चैतन्याचेंच नांव बाबाजी असें आतां पुराव्यानिशीं सिद्ध झालें आहे; व पूर्वाश्रमांतील बाबाजी हें नांव सांगण्याचें कारण असें कीं, केशव चैतन्याचा नातू नरसिंहभट्ट बिन विश्वनाथभट्ट यांच्या मुलाचेंहि नांव केशव राजर्षि असेंच होतें, आणि गुरूपदेश देणाऱ्या केशव चैतन्याचें पूर्वाश्रमीचें नांव विश्वनाथ बाबा राजर्षि असें होतें; व लोक त्यांना बाबाजी असें म्हणत, अशी माहिती आतां कागदोपत्रीं सदर राजर्षि घराण्यांतील विद्यमान वंशजांनीं पुरविली असल्यामुळें हा वाद आतां मिटला आहे. तेव्हां तुकोबाचे गुरु जे केशव चैतन्य त्यांचा व तुकोबांच्या समकालीन केशवभट चैतन्याचा घोटाळा होऊं नये म्हणून बाबाजी हें नांव निळोबा पिंपळनेरकर यांनीं केशव चैतन्याच्या वर्णनादाखल घातलें आहे.

वरील ऐतिहासिक विवेचनावरून सिद्ध होतें कीं, वंगदेशीय आणि महाराष्ट्रीय चैतन्य-संप्रदाय निरनिराळे आहेत.

राघवचैतन्याची समाधि मोंगलाईंत गुलबर्ग्यानजीक दीड योजनावर 'आळंदगुंजोटी' या गांवीं असल्याचें निरंजन नामक कवीनें शके १७०९ या वर्षी लिहिलेल्या 'केशवचैतन्यचरित्र' या नांवाच्या ग्रंथांत लिहिलें आहे. हें विधान खरें आहे असें, एकानें केसरींत प्रसिद्ध केलें आहे. पण कुडची वीर या कवीनें त्यांची समाधि इंदापूर येथें आहे असें म्हटलें आहे. पण तें चूक दिसतें ( म. क. चरित्र भा. १ पा. ४७८ ).

**केशव त्रिंबक प्रधान**—स. १७३१ त हा कोल्हापूरचा प्रधान झाला. हे सर्वजण ( प्रधान मंडळी ) संभाजीचे सल्लागार होते. उदाजी चव्हाणानें दंगा करण्याचें काम संभाजी व शाहू यांच्या राज्यांत चालूच ठेविलें होतें. तरी उदाजीचा व संभाजीचा प्रधान यांचा पत्रव्यवहार होता ( म. रि. म. १. पृ. २०७ ).

**केशव दामोदर पुरोहित**—राजारामचरित नांवाच्या संस्कृत ऐतिहासिक काव्याचा कर्ता. शिवाजी, संभाजी व राजाराम यांच्या वेळीं हा दानाध्यक्षाचें काम करीत असे. यानें 'धर्मकल्पलता' नांवाचा ग्रंथ संस्कृतांत लिहिला. त्यांतील दंडनीतिप्रकरण संभाजीमहाराजांच्या 'बुधभूषण' नांवाच्या संस्कृत काव्यांत स. १६८२-८३ मध्यें सामील केलें. संभाजीनें याचे मुखें रामायण ऐकलें होतें म्हणून यास राजापूर प्रांतांत संगमेश्वर तालुक्यांत भूमिदान दिलें (२९ डिसें.१६८४). ४ जाने. १६९० मध्यें यानें राजारामचरित्र लिहिलें. हा स. १६९० मध्यें वारला असावा असें दिसतें. राजारामचरित्रावरून राजारामाच्या जिंजीच्या प्रवासाची बरीच बारीक व विश्वसनीय माहिती मिळते ( बा. सी. बेंद्रे यांच्या राजारामचरित्रावरून ).

**केशवदास**— ( स. १५५४-१६१६ ) एक हिंदी कवि व संस्कृत ग्रंथकार. याचा पिता काशिनाथ व आजा कृष्णदत्त. हा ओर्छाच्या रामसिंह राजाच्या इंद्रजित्‌सिंह नांवाच्या भावाच्या सभेंत होता.

यानें कविप्रिया व रसिकप्रिया नांवांचे दोन ग्रंथ लिहिले. पहिल्या ग्रंथांत अलंकार सांगितले आहेत. तो ग्रंथ यानें आपली शिष्यिण प्रविणराय वेश्येकरितां लिहिला. दांपत्यरतिभावाचें वर्णन दुसऱ्या ग्रंथांत आहे. याच्या रामचंद्र महाकाव्यांतील संवाद फारच चांगले साधले आहेत. शब्दश्लेषहि खूप आहेत. हें काव्य साधु तुळशीदासाच्या सांगण्यावरून यांनीं लिहिलें अशी प्रसिद्धी आहे. वरील ग्रंथाशिवाय यानें विज्ञानगीता, वीरसिंहदेवचरित्र, जहांगीरचंद्रिका हे लिहिलेले ग्रंथ प्रसिद्ध आहेत. रत्नबावनी, नखशिख, हेंहि ग्रंथ यानें लिहिले आहेत.

महाराजा बिरबलनें याला एका कवितेबद्दल ६ लाख रुपये दिले होते. ती कविता पुढीलप्रमाणें होयः

केशवदास के भाल लिख्यो विधि रंक को अङ्क बनाय सँवार्यो । धोये धुवै नहिं छूटो छुटै बहु तीरथ जाय कै नीर पखार्यो ॥ ह्वै गयो रंक ते राव तबै जब बीरबली नृपनाथ निहार्यो । भूलि गयो जग की रचना चतुरानन वाय रह्यो मुख चार्यो ॥

इंद्रजित्‌सिंहाला अकबराचे एक लाख रुपये देणें होतें. ते बिरबलद्वारां माफ करविले. देव कवीनें तर 'कठिण काव्य का प्रेत' असें याला म्हटलें आहे. याच्या कवितेविषयीं पुढील म्हण हिंदींत प्रसिद्ध आहेः 'कविका दोन बच हैं बिदाई पुछै केशव कवितायै।' तथापि हे मोठे रसिक होते.

**केशवदेव**--रतलामच्या रतनसिंगाचा हा नातू होय. यानें 'सीतामऊ' संस्थानची स्थापना केली. याला स. १६९५ त औरंगजेबाकडून तिरोड, नाहरगड, व अलोट या परगण्यांची जहागीर मिळाली. पैकीं मराठ्यांच्या स्वारीच्या वेळीं ग्वाल्हेर व देवासच्या राजांनीं अनुक्रमें नाहरगड व अलोट हे परगणे बळकाविले.

**२.** (स. ११९२–१२१८) कोलनू घराण्यांतील राजा. याचे लेख उपलब्ध आहेत.

**केशवनाथ**—मारकीनाथाचा शिष्य. ग्रंथ-गर्भगीता, गुरुगीता (र. श. १६२३ भाद्रपद व. १०) (सं. सू.).

**केशव महाजन**—कोंकणच्या कामदेवराजाचा मंत्री.

**केशवमिश्र**—(स. १२७५ सुमार) यानें 'तर्कभाषा' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. मिथिलेचा रहिवाशी असून गोवर्धनमिश्राचा गुरु होता. ह्या गोवर्धनमिश्रानें तर्कभाषेवर 'तर्कभाषाप्रकाश' नांवाची टीका लिहिली आहे. 'किरणावलिभास्कर' व 'कणादरहस्यमुक्ताहार' ह्या ग्रंथांचा कर्ता पद्मनाममिश्र हा गोवर्धनाचा थोरला भाऊ होता. तेव्हां केशवमिश्र, पद्मनाम व गोवर्धन हे समकालीन होते. स. १४ व्या शतकाच्या उत्तरार्धांत विजयनगर येथील हरिहर राजाच्या दरबारीं असणाऱ्या चिनभट्टानें तर्कभाषेवर तर्कभाषाप्रवेशिका नांवाची टीका लिहिली, असें सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांनीं आपल्या स. १८८२–८३ च्या रिपोर्टस् ऑफ संस्कृत मॅन्युस्क्रिप्ट्स्मध्यें म्हटलें आहे. पद्मनाभ हा वर्धमानापेक्षां लहान असून त्यानें आपल्या किरणावलिभास्करांत याचा उल्लेख केला आहे. तेव्हां पद्मनाभ १३ व्या शतकाचा आरंभ व १४ व्या शतकाचा शेवट यांमध्यें होऊन गेला असला पाहिजे. हा बहुधा १३ व्या शतकाच्या शेवटीं होऊन गेला असावा (हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ३०१).

**२.** (स. १५५०–१६०० सुमार) याचा अलंकारशेखर नांवाचा ग्रंथ काव्यमालेंत प्रसिद्ध झाला आहे. त्याचे कारिका, वृत्ति व उदाहरणें असे तीन भाग आहेत. शौद्धोदनीच्या आहेत. या ग्रंथाचे आठ भाग असून त्यांना रत्न असें नांव दिलें आहे. उदाहरणार्थ, उपक्रमरत्न, दोषरत्न, गुणरत्न वगैरे. प्रत्येक रत्नांत अनेक 'मरिचि' आहेत. मूळ कारिका १२ व्या शतकानंतर रचिल्या आहेत. या ग्रंथांत कविकल्पलता, गोवर्धन, भार्गवसर्वस्व, भोजराज, महिमभट्ट, राजशेखर, श्रीपाद व श्रीहर्ष या ग्रंथांचा किंवा ग्रंथकारांचा उल्लेख आला आहे. हा ग्रंथ करण्यापूर्वी यानें आणखी सात ग्रंथ केलेले आहेत. ते अलंकारसर्वस्व, काव्यरत्न इत्यादि होत. हा राजा माणिक्यचंद्राचा आश्रित होता. माणिक्यचंद्र हा कांग्राचा राजा असून धर्मचंद्रानंतर म्हणजे स. १५५३ मध्यें गादीवर आला. त्याच्या सांगण्यावर हा अलंकारशेखर ग्रंथ लिहिलेला आहे (काणेकृत संस्कृत साहित्यशास्त्राचा इतिहास, पा. २४६–५०).

**केशवराज सूरि**—हे नागदेवाचार्यांचे शिष्य. यानें संस्कृत व मराठी मिळून पंधरा सोळा ग्रंथ केले आहेत. महीन्द्रव्यासाच्या लीलाचरित्रग्रंथांतील चक्रधरांचीं वचनें एकत्र करून यानें 'सिद्धांत सूत्रपाठ' नांवाचा ग्रंथ लिहिला. याच्या त्या सूत्रास आचार्यसूत्रें असेंहि म्हणतात. ह्या ग्रंथांत एकंदर १६०९ सूत्रें आहेत. त्यांचा महानुभावाला नित्यपाठ करावा लागतो. कित्येक वर्षांनीं रामेश्वर नांवाच्या ग्रंथकारानें त्याचे ११ भाग पाडले. यानें मूर्तिप्रकाश नांवाच्या आपल्या ग्रंथांत चक्रधराविषयीं माहिती दिली असून त्याच्या रूपगुणाचें वर्णन केलें आहे. यांस प्रत्यक्ष चक्रधराचा सहवास घडला असल्यामुळें याच्या ग्रंथास एकप्रकारचें महत्त्व आहे. याचा लेखनशक १२०६ (स.१२८४) हा आहे (मराठी वाङ्मयाचा इतिहास १·४५५).

**२.** शिवकल्याणाच्या गुरुपरंपरेंतील एक (श. १४५०) ग्रंथ–रामायण (सं. सू.).

**केशव रामचंद्र**—हा दुसऱ्या रघूजी भोसले नागपूरकराचा हैद्राबादचा वकील (ना. प्रां. इ. पा. २१७).

**केशवराव पटवर्धन**—(कुरुंदवाड) त्रिंबकरावाचा हा मुलगा.

यानें इंग्रजांशीं तहनामा केला. हा मिरजकरांशीं झालेल्या तहनाम्याप्रमाणेंच होता. याला चार मुलगे होते. हा स. १८२७ त वारला, तेव्हां याचे सर्व पुत्र अज्ञान होते, त्यामुळें संस्थानच्या कारभाराचा सर्व बोजा याची बायको लक्ष्मीबाई इजवर पडला.

**केशवराव पानसे**—पेशव्यांचा तोफखान्यावरील निष्णात अधिकारी.

**केशवसेन**—(स. १२०० सुमार) हा बंगाल्यांतील सेन घराण्यापैकीं लक्ष्मणसेनाचा पुत्र. याच्या वेळीं सेन घराण्याचें राजकीय महत्त्व नष्ट झालें होतें.

**केशवस्वामी**—हे रामदास-पंचायतनापैकीं होत. यांचें उपनांव भागानगरकर असें होतें. यांचे वडील आत्मारामपंत मोंगलाईंत कल्याणांचे कुलकर्णी होते. हे ऋग्वेदी होते. केशवाच्या आईचें नांव गंगाबाई होय. त्यांस हे वयाच्या ८० वर्षांनंतर झाले. केशवस्वामी हे पूर्ववयांत भागानगरच्या तानाशाह कुत्बशहाच्या पदरीं होते. यानें एकादशीचरित्र व इतर अभंग, पदें वगैरे काव्य केलें आहे. काव्यसंग्रहांत यांचीं सुमारें ५०० ते ६०० पदें छापलीं आहेत. यांची शिष्यशाखा बरीच मोठी होती. तिनें मराठी भाषेची पुष्कळ सेवा केली आहे. त्यांपैकीं शिवराम व संतराज हे शिष्य प्रमुख होत. यांचे बरेचसे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. केशवस्वामीचा समाधिकाल शके १६०४ पौष शु. १३ असून समाधिस्थळ हैद्राबादेस आहे.

**केशवाचार्य**—रामनुजाचार्याचा पिता.

**केशिदेव शिलाहार**—हा ठाण्याच्या अपरादित्याचा पुत्र.

**केशिराज**—(स. १२६०) 'शब्दमणिदर्पण' नांवाच्या कानडी श्लोकबद्ध व्याकरणग्रंथाचा कर्ता. आणखीहि यानें पांच ग्रंथ केले आहेत. पण ते अनुपलब्ध आहेत. हा जैन होता. पिता–मल्लिकार्जुन. सोमेश्वर होयसळाच्या (स. १२३३–५४) नंतर किंवा त्या सुमारास हा होता. हें घराणें कवींचें होतें. यानें आपल्या ग्रंथांत अनेक मोठाल्या कवींचे उतारे उदाहरणार्थ घेतले आहेत. यानें आठ भागांत व्याकरणविषयक फोड केली असून नवव्या भागांत थोर कवींच्या गूढ शब्दप्रयोगांचें स्पष्टीकरण केलें आहे. यानें आपल्या ग्रंथावर स्वतःच वृत्ति लिहिली आहे. नृपतुंग व नागवर्म या पूर्वीच्या कानडी व्याकरणकारांपेक्षां यानें विस्तृत, क्रमबद्ध आणि शास्त्रशुद्ध व्याकरण तयार केलें (क. क. च. भा. १ पा. ३८५).

**केसराबाई होळकर**—ही मल्हाररावाची आई होय. ही आपल्या सरदारांशीं वाटाघाटी करून राज्यकारभारांत लक्ष घालीत असे (म. रि. उत्तर वि. ३; पृ. ४४३).

**केसरी गंग**—गंग घराण्यांतील पृथ्वीपतीचें नामान्तर (पृथ्वीपति पाहा).

**केसरीनाथ**—(स. १७२४ समाधि) हे राशीन येथील नाथसंप्रदायांतील मठाचे अधिपति होत. देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. यांच्या गुरूचें नांव उद्‌बोधनाथ असें होतें. अनेक शिष्यांतून हेच राशीन मठाचे अधिकारी झाले. पूर्वाश्रमीं हे राशीनचे मामलेदार होते. नोकरीवर असतांना उद्‌बोधनाथांच्या कीर्तनास हे जात असत.

हे कवि असून यांची काव्यरचना फार आहे. यांनीं शक १६४६ मध्यें आळंदीस भोजलिंगाच्या समाधीपलीकडे समाधि घेतली. प्रख्यात मराठी कवि शिवदिन हा यांचा शिष्य होय (सं. सू.). याचा ग्रंथ सिद्धान्तसार. कांहीं पदेंहि आहेत. कृष्णार्णवाचाहि एक सिद्धान्तसार आहे.

**केसो कृष्ण दातार**—हा राजेबहादरांकडील जंबूसरचा मामलेदार होता. हा दादासाहेबांकडे मिळाला आणि खानदेशांत नंदुरबार, सुलतानपुर वगैरे मुलखास उपद्रव करून ठाणीं बसवूं लागला. याचे बंदोबस्तास हरिपंतानें गणेशपंत बेहेरे यास फौज, तोफा व गाडदी देऊन पाठविलें.

पुढें स. १७७९ मध्यें दादाचा पक्षपाती गुलजारखानावर नानानें पारिपत्य करण्याकरितां मोठें सैन्य पाठविलें. त्या वेळीं हा लासूरच्या गढींत होता. शेवटपर्यंत हा दादासाठीं जिवापाड खटपट करीत होता. स. १७७९ मध्यें हा नगरदेवळाच्या गढींत असतां याच्यावर केसो भिकाजी दातार यानें हल्ला केला, पण त्यांत यालाच यश आलें (म. रि. उत्तर वि. १. पृ. २३६, २३८).

**केसो त्रिमल पिंगळे**—मोरोपंत पिंगळ्याचा भाऊ. शिवाजीचा एक मुत्सद्दी. हरजीराजे महाडिक हा जिंजीकडे स्वतंत्रपणें कारभार पाहतो असा (११।२।१६८७) संभाजीस संशय आला. तेव्हां याला भरंवशाचा म्हणून तिकडे पाठविलें. मदतीस संताजी घोरपडे दिले. हरजी व केसोपंताचा विरोध पाहून औरंगजेबानें आपले सरदार तिकडे रवाना केले. तेव्हां हे दोघे एक झाले, पण संभाजी वारल्याची बातमी कळतांच हरजीनें याला कैद केलें (संभाजी ९२–९३).

**केसो भिकाजी दातार**—सवाई माधवराव यांचे कारकीर्दीत होळकर दरबारांत हे गृहस्थ पेशव्यांचे वकील होते. हे निस्पृह व स्पष्टवक्ते असून, यांचें अवलोकन सूक्ष्म व बारकाईचें होतें. गुप्त बातम्या काढण्यांत यांचा हातखंडा असे. यांनीं स. १७८२–१७९४ पर्यंत वकिलीचें काम केलें व पेशव्यांस वेळोवेळीं सरकारी व इतर बातमी दिली. यांनीं लिहिलेलीं २७६ पत्रें (महेश्वर दरबारचीं पत्रें भा. २) यांत प्रसिद्ध झालीं असून त्यांत तत्कालीन होळकरशाहीचा इतिहास पाहावयास सांपडतो.

स. १७७९ मध्यें यानें केसो कृष्ण दातार यांजवर नगरदेवळच्या गढींत हल्ला केला. पण त्यांत याला अपयश आलें. नंतर हा अहल्याबाईजवळ नानाचा विश्वासू कारकून म्हणून होता (म. रि. उत्तर वि. पृ. २३७-२३८; विठ्ठल शामराज पाहा).

**केम्पदेवराज**—(स. १६५९-७२) म्हैसूर संस्थानांतील मुप्पिनदेवाचा मुलगा.

वेदनूरच्या शिवाप्पा नायकानें याच्यावर केलेल्या स्वारींत यानें त्याचा पराभव केला; आणि मदुरेच्या नायक राजापासून एरोड घेतलें. याच्यानंतर याचा पुतण्या चिक्कराय हा गादीवर आला.

**कैकूवाद**—(स.१२८७–१२९०) घियासुद्दीन बल्बनचा नातू व बंगालचा सुभेदार बुघ्राखान याचा मुलगा. घियासुद्दीन बल्बन यास दोन मुलगे होते. त्यांपैकीं कान-मलिक मुहंमदखान या मुलासच आपल मागें तक्त मिळावें अशी त्याची इच्छा होती. परंतु मुलतानवरील मोगलांनीं केलेल्या स्वारींत तो मारला गेला. बुघ्राखान यास तक्तावर बसवावें म्हणून बंगालमधून दिल्लीस बोलावून घेतलें. दिल्लीस आल्यावर तेथील उदास वातावरणांत त्यास चैन पडेना म्हणून शिकारीस जाण्याचे मिषानें तो दिल्लीबाहेर पडला व थेट लखनावतीस गेला. त्यामुळें बल्बन संतापला व त्यानें मरतांना आपल्या विश्वासू सरदार मुहंमदखानाचा मुलगा कैखुस्रव यास गादीवर बसविण्यास सांगितलें. बल्बनच्या मृत्यूनंतर दिल्लींतील सरदारांनीं बल्बनची इच्छा अमान्य करून यास तक्तावर बसविलें.

आजोबाची कदर नाहींशी होऊन अल्पवयांत म्हणजे १७ वे वर्षीं दिल्लीचें राज्य प्राप्त झाल्यावर हा उच्छृंखल बनला. राजाच्या स्वैराचारामुळें लोकांतहि अमर्याद स्वैराचाराचें युग उगवलें. राज्यकारभारांत लक्ष देण्याचें कैकूबादनें सोडून दिलें, त्यामुळें निजामुद्दीन नांवाच्या कारस्थानी अधिकाऱ्यानें सर्व सत्ता आपले हातीं घेतली. त्या कालीं दिल्लीस मुसलमान सरदारांत 'नव मुसलमान' अथवा बाटग्या मुसलमान सरदारांचा एक पक्ष होता. मोगल लोकांनीं हिंदुस्थानावर स्वाऱ्या करून येथील मुसलमानी सत्ता उखडून काढण्याचे प्रयत्न सुरू केले होते. त्या यत्नास त्यांच्याच जातभाईंकडून आळा घालतां यावा अशा दूरदर्शी विचारानें बल्बननें बाटून मुसलमानी धर्म स्वीकारलेल्या मोगल लोकांचा आपल्या सैन्यांत व सरदारांत भरणा केला होता. या बाटग्या मुसलमानांचा येथील मूळचे अस्सल मुसलमान सरदार द्वेष करीत. त्यांस अधिकारावर ठेविल्यास इस्लामी धर्माचें पांघरूण फेंकून देऊन आपल्या जातभाईंची सत्ता प्रस्थापित करण्याचा बनाव ते करतील असेंहि त्यांस वाटे. याचे कारकीर्दींत पहिलेच वर्षी गझनीच्या तमरखानाचे सेनापतित्वाखालीं मोगलांनीं पंजाबावर स्वारी केली (स. १२८७). मलिक मुहंमद बबकनें दिल्लीचें सैन्य बरोबर घेऊन लाहोरजवळ मोगलांचा पुरा मोड केला. निजामुद्दीननें सुलतानाकडे अशी तक्रार केली कीं, दिल्लीचे बाटग्या मुसलमान मोगल सरदारांच्या फितुरीमुळें त्यांच्या जातभाईंना स्वाऱ्या करण्याचा मोह होतो. म्हणून त्यांनाच नाहींसें करावें हें उत्तम. मोगल सरदारांवरील हा आरोप सर्वस्वीं खरा नव्हता. इतकें खरें कीं, हें मोगल लोक बाटून जरी मुसलमान झाले होते तरी त्यांच्या जातभाईंशीं प्रसंगोपात्त पत्रव्यवहार करीत. त्यांच्यासंबधीं आलेला संशय कितपत खरा आहे याची चौकशी न करतां यानें त्यांचा वध करण्याचा हुकूम दिला आणि त्याची अंमलबजावणी झाली.

मात्र ज्यांना अस्सल मुसलमान स्त्रियांशीं लग्न करण्यास परवाने मिळून अशीं लग्नें झालीं होतीं त्यांस न मारतां तुरुंगांत ठेवण्यांत आलें. हे सरदार मारले गेल्यानें दिल्लींत मोगल व अफगाण असे दोन विरोधी पक्ष उत्पन्न झाले. हा दारूचे धुंदींत असतां निजामुद्दीननें कैखुस्रवला ठार मारण्याचा हुकूम मिळविला व रोहटक येथें त्याचा वध करविला. शिवाय ख्वातिरुद्दीन नांवाच्या विश्वासू अधिकाऱ्यावर खोटा आरोप करून त्याला अधिकारच्युत करून त्याची शहरांतून गाढवावरून धिंड काढण्यांत आली. मुलतानचा सुभेदार शाहक याचा वध करण्यांत आला. असल्या या अमानुष वर्तणुकीमुळें राजनिष्ठ सरदारांनीं राज्यकारभारांतील लक्ष काढलें. बुघ्राखानानें आपल्या मुलास पत्रें लिहून धोक्याची कल्पना करून देऊन सावध करण्याचा प्रयत्न केला. एकदां तर पितापुत्रांची भेट व्हावयाचें ठरलें, परंतु त्याच सुमारास मोगलांनीं पंजाबवर स्वारी केली. वर वर्णन केल्याप्रमाणें दरबारांतील मोगल सरदारांचा निःपात करण्यांत आला तेव्हां मात्र बुघ्राखानास स्वस्थ बसवेना. निजामुद्दीनचें पारिपत्य करून कैकूबादला ताळ्यावर आणण्याच्या उद्देशानें गोग्रानदीचे तीरीं छावणी देऊन त्यानें मुक्काम केला व भेटींत आपल्या मुलांकडून निजामुद्दीन यास अधिकारच्युत करण्याचें वचन घेऊन लखनावतीस प्रयाण केलें. त्यानें मुलतानला जावें असा यानें हुकूम काढला, पण पुढें त्यानें मुलतानला जाण्यास विलंब लावल्यामुळें हुकुमाचा अपमान झाल्याचा त्यावर आरोप ठेवून विष देवधून वध करविला.

निजामुद्दीनच्या मृत्यूमुळें राज्यकारभारांत गोंधळ माजला. दरबारचा वचक कमी झाला. पुन्हां वचक बसवावा म्हणून या राज्यांतील सर्वांत अधिक प्रबल सरदार जलालुद्दीन फीरूझ खल्जी यास दिल्लीस बोलावून घेतलें व त्याजकडे सैन्याचें अधिपत्य दिलें; व बराणची सरंजामी त्यास दिली. त्यास एकदम उच्च पदवीस चढविल्यामुळें दरबारांतील व बाहेरील तुर्की सरदारांस राग आला. पुढें लवकरच कैकूबादला अर्धांगवायु झाला. जलालुद्दीन फीरूजच्या विरुद्ध लोकांनीं कैकूबादच्या तीन वर्ष वयाच्या मुलास दिल्लीस नेऊन शमसुद्दीन क्यूमर्स हें नामाभिधान देऊन त्यास तक्तावर बसविलें.

जलालचे मुलगे दिल्लींत घुसले व त्यांनीं क्यूमर्सला पळविलें. अशा प्रकारें लोकांस अप्रिय असलेल्या पक्षाचा जय होण्याचीं चिन्हें दिसूं लागल्यामुळें लोकांनीं बंड केलें व जलाल यशस्वी झाला. यानें आपल्या बापास ठार मारल्यामुळें यावर सूड उगविण्याची इच्छा असलेल्या एका अधिकाऱ्यानें आसन्नमरण असलेल्या यास गादीवर गदगदां हलवून डोक्यावर लाथ मारून ठार केलें व याचें प्रेत यमुनेंत फेंकून दिलें ( स. १२९० ).

कैकूबादाच्या मृत्यूमुळें घियासुद्दीन बल्बनचे राजवंश स्थापन करण्याचे श्रम वायां गेले. त्याच्या मागें त्याच्या वंशांतील एकच पुरुष गादीवर बसून त्याचा असा वाईट शेवट झाल्यावर जलालुद्दीन तक्तनशीन झाला; व खल्जी राजवंशाचे राजवटीस सुरुवात झाली.

**कैखुस्रव गुलाम**—( स १२८७ सुमार ) मुहम्मद् गुलामचा पुत्र ( कैकूबाद पाहा ).

**कैय्यट**—( स. १००० नंतर ) काश्मीरी पंडित. बाप जय्यट. आडनांव उपाध्याय. गुरु महेश्वर. संस्कृत ग्रंथकार. पतंजलीच्या महाभाष्यावर याची सुप्रसिद्ध टीका आहे. त्या टीकेचें नांव प्रदीप असें असून प्रदीपावर नागोजीभट्टाचा उद्योत आहे. याचा प्रदीप भर्तृहरीच्या वाक्यपदीयाच्या आधारें लिहिला. काव्यप्रकाशकार मम्मट याचा भाऊ होता.

काशकृत्स्न व आपिशली यांचे हा उतारे घेतो. यानें केलेल्या प्रदीपावर पदमंजरी ग्रंथ उभारलेला आहे. स्वतंत्र ग्रंथकर्त्यांचा काळ संपून याच्यापासून टीकाकारांचा काळ सुरू होतो.

**कैसरखान फारुकी**—हा पहिल्या गज्नीखान फारुकीचा मुलगा. याचा मुलगा अहसनखान.

**कोक**—हा काश्मीरच्या राजाचा दिवाण होता. यानें संभोगशास्त्रावर ग्रंथ लिहिला असून त्यास कोकशास्त्र असें नांव आहे. त्यावरूनच इतर जीं संभोगशास्त्रावर पुस्तकें लिहिलीं गेलीं त्यांसहि कोकशास्त्र असें म्हणतात.

**कोकालिपा**—हा चौऱ्यांशी सिद्धांपैकीं एंशींवा सिद्ध होय. हा जातीनें राजकुमार असून चंपारण्यांत राहत असे. यानें आयुःपरीक्षा (तं. ४८।९४) हा ग्रंथ लिहिला आहे.

**कोकिल**—( गंगाधर कोकिल पाहा ).

**कोकिलि**—चोल घराण्यांतील हा एक राजा होय.

**कोक्कल कलचुरी**—( स. ८५० सुमार ) हा त्रिपुरीचा कलचुरी राजा. कनोजचा मिहिरभोज व राष्ट्रकूटांपैकीं वल्लभराज म्हणजे दुसरा कृष्ण हे याच्या वर्चस्वाखालीं होते. याची एक कन्या कृष्ण राष्ट्रकूटाला दिली असून ती पट्टराणी होती. कदाचित् वरील भोजास याची दुसरी एखादी कन्या दिलेली असावी. याचा स्वतःचा विवाह हर्ष चंदेल्लाच्या नट्टा नामक बहिणीबरोबर झाला होता. पण याच्या या महत्त्वाचें कारण शिलालेखांत लिहिल्याप्रमाणें अनुपम पराक्रम होता कीं वैभवशाली राजघराण्याशीं असलेला स्नेहाचा व सोयरिकीचा संबंध होता असा प्रश्न उत्पन्न झाल्यास पराक्रमाबद्दल पुरावा उपलब्ध नाहीं ( म. यु. भा. २. २२३ ). याच्या वेळीं हर्ष चंदेल्लानें याचा एकदां पराभव करून कालंजर किल्ला घेतला असावा ( म. यु. भा. २. २०६ ). कलचुरींविषयीं बिलहारी शिलालेख व बनारस ताम्रपट हे महत्त्वाचे आहेत ( एपि. इंडि. १. २६५; २. ३०५ ).

२. ( स. १००० ) हा दुसऱ्या युवराज कलचुरीचा मुलगा.

**कोक्किली**—( स. ७०९ सुमार ) हा पूर्व चालुक्य घराण्यापैकीं दुसऱ्या जयसिंहाचा धाकटा सावत्र भाऊ असून यानें सहा महिनेच राज्य केलें.

**कोचचडीयन रणदीरन**—( स. ६८० ) हा अरिकेसरी मारवर्मन्चा पुत्र. त्यानंतर गादीवर आला. हा एक शूर राजा होता. यानें तामील कर्नाटक वगैरे देश जिंकले होते.

**कोटा**—( स. १३३९ ) काश्मीरची शेवटली हिंदु राणी. हिच्यापासून पहिल्या शंसुद्दीननें राज्य घेतलें.

**कोट्स** ( डॉक्टर )— ( स. १७९७-१८१८ ) डॉ. कोट्स हा स. १७९७ पासून पुण्याच्या रेसिडेन्सींत नोकरीस होता. गोस्तन-देवीचा उपाय नुकताच डॉ. जेन्नर यानें इंग्लंडांत प्रसिद्ध केला त्याचा प्रसार यानें पुण्यांत पुष्कळ केला, आणि त्या कामांत पुणेकरांचा लोभ संपादिला. देवी काढून घेण्यास लोक धजेनात, तेव्हां

लोकांस उदाहरण घालून देण्याकरितां बाजीरावानें आपली बायको वाराणशीबाई इजला याच्याकडून मुद्दाम देवी काढून घेतल्या. पुण्याच्या रेसिडेंसींतला पहिला डॉ. टॉमस कूझो हा होय. त्याची बदली ता. ५-७-१७९४ रोजीं होऊन त्याचे जागीं जेम्स फिंडले आला; आणि फिंडलेच्या मागून स. १७९७ त कोट्सची नेमणूक झाली. हाच पेशवाईअखेर तेथें होता (म. रि. उ. ३, पृ. ४८६ ).

**(राणी) कोणदेवी**—ही प्रख्यात आदित्यसेन गुप्ताची पत्नी होय.

**कोणमंडळ घराणें**—कोणमंडळ प्रदेश गोदावरीच्या खोऱ्यांत आहे. या घराण्याचा उगम हैहय घराण्यांतील कार्तवीर्यापासून झाला. चवदावे शतकानंतर या घराण्याचा कोठेंहि उल्लेख नाहीं. याचें घराणें पुढीलप्रमाणें झालें:

१ मुम्मडि भीम ( बा. छद्दिदेवी. स. १०६३ )–२ राजपरेदु १ ला–३ मुम्मडिभीम दुसरा ( स. ११२८-३६ ) –४ लोकभूपालक ( स. ११५० ).

राजपरेदु पहिल्याचा दुसरा मुलगा राजेंद्रचोल ( स. ११२८ ). त्याचा बेट व मल्लीदेव ( स. ११५५–९५ ). बेटाचा सूर्य-राजपरेदु २ रा–वल्लभ-सत्य दुसरा ( स. ११९५–१२०७ ).

राजपरेदुचा तिसरा मुलगा सत्य किंवा सत्याश्रय ( स. ११३६ )–भीम ( स. ११५३ ). ( सिवेल आणि आयंगार; पृ. ३६१ ).

**कोन**—( स. १५८७ ) एक डच अधिकारी. याचा जन्म स. १५८७ मध्यें झाला असून याचें शिक्षण रोम येथें झालें. पुढें स. १६०७ त हा पूर्वेकडील डच वसाहतींत आला. स. १६१३ त बॅंटमचा प्रेसिडेंट होऊन १६१७ त गव्हर्नर जनरलची जागा व संपूर्ण अधिकार मिळाले. पोर्तुगीझांचा आल्बुकर्क, फ्रेंचांचा डुप्ले व डचांचा कोन हे त्या त्या राष्ट्रांचे पुरुष इकडील उद्योगांत प्रमुख समजले जातात. डच लोकांचें राज्य इकडे स्थापन करावें अशीच याची महत्त्वाकांक्षा असून यास कंपनीचें पाठबळ होतें ( ब्रि. रि. पूर्वार्ध, पृ. १७२ ).

**कोन्हेर त्रिंबक पटवर्धन**—हा पटवर्धनांच्या कुरुंदवाड शाखेतील होय. हा धाडसी होता. याला सुभेदार म्हणत. याच्या स्वारीमुळें हैदरावर बराच परिणाम घडला ( स. १७७१ ). पांडुरंगराव, कोन्हेरराव, रामचंद गणेश कानडे व पानशे हे चार सरदार कोल्हापुरकरांवर रवाना झाले होते. त्या वेळीं कित्तूरकराचा नकशा साफ व कायमचा उतरला, त्याचें श्रेय यालाच आहे.

करवीरच्या त्रासामुळें यास कित्तूरच्या पुढें जातां आलें नाहीं. उलट याला परत यावं लागल्यानें पलीकडे हैदराचा मार्ग निष्कंटक झाला. कित्तूरचा गुंता उरकून कोपळच्या रोखें सेनापति कळवितील तिकडे जावें असा याचा विचार होता ( स. ९-१-१७७६ ). पुढें यानें साहसानें एकदम बंकापुरावर जाऊन हैदराचा जम बसला होता तो हिंमतीनें उडवून द्यावा असा विचार ठरविला. हें वर्तमान हैदरचा सरदार कुमदान यास कळतांच ता. ८ जानेवारी १७७७ रोजीं बंकापुराहून निघून तो पटवर्धनावर छापा घालण्याचे उद्देशानें सायंकाळीं सावशीस येऊन राहिला. पटवर्धन मंडळी त्याच दिवशीं बाहेर पडून सावशीपासून दोन कोसांवर येऊन राहिली. ही वातमी कुमदान यास कळल्यामुळें तोहि रात्रीं बाहेर पडला नाहीं. उजाडल्यावर पटवर्धनांनीं कुमदानवर हल्ला करण्याचें ठरविलें. परंतु कुमदाननें जवळच्या शेतांत तोफखाना छपवून ठेविला होता तो यास माहीत नव्हता. मराठी फौज माऱ्याच्या तावडींत येतांच तिजवर कुमदाननें तोफांचा मारा सुरू केला. त्यामुळें लोक पटापट मरूं लागले. तेथें हा व्यवस्था करीत असतां ठार झाला ( स. १७७७ जानेवारी ९ ).

हा काळाच्या जबड्यांत उडी घेणारा मर्द शिपाई असून विचारापेक्षां धाडसाच्या जोरावर वागणारा होता.

एकदां परशुराम भाऊ पटवर्धनानें कोल्हापूर घेऊन लुटलें. त्या वेळीं शहरांतील सर्व लोक तेथील श्रीशंकराचार्यांच्या मठाचा आश्रय करून राहिले. त्यांस वाटलें कीं आचार्यांच्या मठाची अमर्यादा पटवर्धन सरदार करणार नाहींत.

पण यास हें कळतांच संपत्तीच्या आशेनें यानें मठावर हल्ला केला. तो आपण जातीनें नागवी तरवार हातीं घेऊन सर्वांच्यापुढें होऊन मठांत शिरूं लागला. त्या वेळीं त्या जगद्गुरूंच्या गादीवरील यतीश्वर धांवून येऊन मठाच्या दरवाज्यांत हात पसरून उभे राहिले. त्यांनीं यास सांगितलें कीं, " आमच्या आश्रयास आलेल्या ह्या लोकांस तुम्हीं त्रास देऊं नये. आमची आज्ञा मान्य करून ह्या गादीचा मान तुम्हीं रक्षावा." परंतु ह्या उन्मत्त पुरुषानें त्यांस उत्तर दिलें कीं, "जोगड्या ! तुला ह्याची पंचाईत कशाला ? बाजूस हो." असें म्हणून त्या सत्पुरुषाच्या छातींत धक्का मारून त्यास एकीकडे ढकलून दिलें, आणि आंत शिरला. याच्या पाठोपाठ याचे शिपाई आंत शिरले. त्यांस यानें मठ लुटण्यास हुकूम केला. मग त्या आडदांड लष्करी लोकांनीं खून, स्त्रियांची अब्रू घेणें, वगैरे अनेक दुष्कर्में त्या ठिकाणीं करून तें पवित्र स्थान भ्रष्ट केलें; व जातांना शेवटीं मठास आग लावून दिली. ह्याप्रमाणें त्या ब्राह्मणाधमानें आपल्या

गुरुस्वामींचा अपमान करून त्याच्या पवित्र मठास आग लावून स्वधर्म पायाखालीं तुडविला.

यतीश्वराचा असा अपमान झाल्यावर ते तेथून निघाले आणि परशुरामभाऊस ही गोष्ट कळवावी म्हणून त्याजकडे गेले. यतीश्वरानें त्यास याचें अनन्वित कृत्य सांगितलें, परंतु त्यानें त्या बोलण्याकडे मुळींच लक्ष न देतां कोन्हेरपंताचें करणेंच योग्य ठरविलें. तेव्हां त्या सत्पुरुषास अत्यंत राग येऊन अनावर क्रोधाच्या भरांत तो उभा राहिला आणि मोठ्यानें ओरडून बोलला कीं, "वैदिक धर्मसंस्थापक जो शिवछत्रपती यांच्या वंशाशीं शत्रुत्व करून त्याचा अपमान करणारे स्वामीद्रोही आणि वैदिकधर्मसंस्थापक जे श्रीमच्छंकराचार्य यांच्या सिंहासनाचा अपमान करणारे गुरुद्रोही असे जे तुम्ही दोघे त्या तुमचा निर्वंश होवो. तुम्ही दोघे अधम गतीस जाल." असें म्हणून जीभ हांसडून त्यानें आपला जीव दिला. ह्या साधुपुरुषाची समाधि वाळव्यानजीक कृष्णातीरीं शिरगांव येथ आहे. तो गांव पुढें पेशव्यांनीं त्या समाधीच्या पूजानैवेद्याकडे व वार्षिक उत्सवाकडे दिला. दरसाल तेथें पुण्यतिथि होते. ह्या वरील शापाप्रमाणें सर्व कांहीं घडलें आहे (भा. व. खं. ३, ऐ. गो. पृ. २६।२७).

**कोन्हेरराम रामाजीपंत कोल्हटकर**—(मृत्यु स. १७५२ सुमार) प. रघूजीचा दिवाण. पांडववाडी (वाईजवळ) येथें रामाजीपंत कोल्हटकर म्हणून एक रामभक्त होते. त्यांच्या वरदानानें रघूजीचा जन्म झाला, असें त्याचे आईबाप मानीत म्हणूनच त्याचें नांव रघूजी ठेवलें होतें. रामाजीपंतांचे पुत्र कान्हेरराम व भास्करराम हे त्या संबंधामुळेंच रघूजीकडे नागपुरास आले.

रघुनाथभट झिपरे सावकार रघूजीस जामीन राहण्यास तयार नव्हता. तो कोन्हेररामच्या मध्यस्तीमुळेंच जामीन राहिला. शाहूनें रघूजीस कान्होजीवर पाठविलें असतां त्याजबरोबर शाहूचे वतीनें कोन्हेरराम हाहि त्याचा दिवाण म्हणून गेला.

याचा मृत्यु स. १७५२ च्या सुमारास झाला. बंगाल्यांत जेव्हां भास्करराम मारला गेला तेव्हां रघूजीनें कोन्हेररामाचें सांत्वन करून त्यास वंशपरंपरा दरसाल पंचवीस हजारांची नेमणूक करून दिली मरणापूर्वी रघूजीनें कोन्हेररामास नागपुरास बोलावलें. दोघांचाहि फार ऋणानुबंध असून शेवटचे प्रसंगीं त्यानें जवळ असावें अशी रघूजीची फार इच्छा होती. परंतु वृद्धपणामुळें व भास्करपंतांच्या शोकामुळें तो नागपुराहून गेला तो परत आला नाहीं (नागपूर प्रांताचा इतिहास).

रत्नागिरीजवळील नेवरें गांवीं रामजी नारायणजी कोल्हटकर राहत असत. पुढें त्यांना पांडवगडचीं वतनें मिळालीं. पांडवगडाहून नेवऱ्यास जाण्याची वाट असून तीच वाट भैरवगडाहून चिपळूणास जाते. भैरवगडाखालीं भोसले बंधु राहत असत. त्यांचा व यांचा दाट परिचय झाला. एकदां हवशानें भैरवगडावर स्वारी करून यास (भोसले) कैद करून ठेविलें. तेव्हां पंतांनीं ३ हजार रु. दंड भरून त्यांची सुटका केली. त्यामुळें भोसल्यांनीं आपलें उपाध्येपण यांना बहाल केलें. यांच्यामार्फतच भोसले बंधू छत्रपतीकडे आले.

शाहूनीं ठोसरांची मुलगी सांभाळली होती. तिचा विवाह कोन्हेररामशीं लाविला. या कारणानें कोन्हेरवर महाराजांचा विशेष लोभ जडला. त्याचा भाऊ भास्करराव यास पुढें रघूजीची बक्षिगिरी देण्यांत आली. कोल्हटकर आणि भोसले यांचें चांगलें नसलें तरी भोसले होते तोंपर्यंत कोल्हटकरांचा उदो उदो होत असे. स. १७४६ त कर्नाटकच्या सुभेदारीच्या भानगडींत भोसले हे बाबूजी नाईकाच्या बाजूचे होते व कोन्हेर हे साताऱ्यास राहून त्या बाबतींत खटपट करीत होते. भास्करपंतांस अलिवर्दीखानानें दगा दिल्यामुळें कोन्हेरास दुःख वाटून त्यांनीं देशीं जाण्याचा हट्ट घेतला. तेव्हां भोसल्यांनीं त्याला २५ हजारांची जहागीर व इतर खर्च देईन, असें सांगितलें होतें. तरीहि पंतांची उदासीनता दूर होईना. तेव्हां त्यांच्या मुलांना मनसबदाऱ्या देऊन मोठ्या कष्टानें रघूजीनें त्यांना निरोप दिला. रघूजीनें खुद्द म्हटलें, "आमचाही वृद्धापकाळ व तुमचाही वृद्धापकाळ, अशा प्रसंगीं आपण विभक्त असावें हें ईश्वरास मानत नाहीं."

पुढें या दोघांची भेट झाली कीं नाहीं हें नक्की आढळत नाहीं. भोसल्यामुळें कोल्हटकर व पेशवे यांचें मात्र सूत नव्हतें. रघूजी व कोन्हेरपंत मेल्यावर नानासाहेबांनीं त्यांच्या मुलांमधील तंटे सोडविले. कोन्हेरांस ६ मुलगे होते. यांच्याच घरचा शागिर्द दिवाकरपंत चोरघोडे हा मोठा मुत्सद्दी म्हणून उदयास आला.

**कोन्हेरराव त्रिंबक एकबोटे**—(मृ. स. १७५६) पहिले फांकडे कोन्हेरराव त्रिंबक एकबोटे. यांच्या शौर्यामुळें बाळाजी बाजीराव पेशवे यांच्या कारकीर्दींत यांना शिलेदारी मिळाली. स. १७५१-५२ मध्यें जें मराठ्यांचें व मोगलाचें तुमुल युद्ध माजलें त्यांत यानें बरेच शौर्याचे पराक्रम करून दाखविल्यामुळें याची कीर्ति अजरामर झाली. मराठ्यांचें बुशीशीं जें मोठें युद्ध झालें त्याहि वेळीं हा त्या ठिकाणीं हजर होता. या वेळीं यानें आपल्या शौर्याची

सीमा केली. गनीमाकडून तोफेचे फ्रेंच गोळे सुटत होते तरी धैर्यानें हा त्यांना तोंड देत होता. त्याच-प्रमाणें इतरांच्या साह्यानें यानें मोंगलांची सोन्याची अंबारी लुटली.

यांनीं अनेक युद्धांमध्यें शत्रूंच्या फौजेवर चढाई करून फार मर्दुमकीचीं कामें केलीं. त्यामुळें यांचें शौर्य श्रीमंतांचे नजरेस आलें व यांस शिलेदारीचें स्वतंत्र पथक मिळालें. बुसीनें ज्या वेळेस पुण्यावर चाल करून पेशवाईचीं उपकरणां व देव पळविले त्या वेळेस मराठे सरदार न डगमगतां मोठ्या आवेशानें शत्रूशीं युद्ध करण्यास सिद्ध झाले, त्यांत हा एक होतकरू शिलेदार हजर होता. ह्याच वेळीं याच्या ह्या युद्धकलाकौशल्याची फार तारीफ होऊन यास 'फांकडे' असें कार्यदर्शक पद मिळालें. तेव्हांपासून याची कोन्हेर त्रिंबक फांकडे ह्या नांवानें प्रसिद्धि झाली; आणि यास पेशवे सरकारांतून मोठा बहुमान व इनाम मिळालें, व याच्या बहादुरीबद्दल याच्या घोड्याच्या पायांत चांदीचा वाळा घालण्याचा मान मिळाला. हा असा बहुमान फारच थोड्या सरदारांस पूर्वी मिळत असे. हा होळीहुनूरच्या लढाईमध्यें हजर होता. तेथें यानें शत्रूवर पराक्रमानें चालून जाऊन आपलें रणशौर्य चांगलें व्यक्त केलें. त्या लढाईत हा मोठ्या पराकाष्ठेनें बचावला. स. १७५६ त सदाशिवराव भाऊसाहेबांबरोबर हा सावनूरच्या स्वारीवर गेला, तेथें याच्या डोक्यावर बुसीच्या तोफखान्यांतील एक तोफेचा गोळा पडून त्यांत याचा अंत झाला. याबद्दल बाळाजी बाजीरावांस फार दुःख झालें. बाळाजीनें यांच्या वंशजांस चांगलें इनाम देऊन या शूर पुरुषाची निस्सीम स्वामिभक्ति आणि पराक्रमपटुत्व या गुणांचें योग्य चीज केलें ( इ. सं. पु. ४ अं. १०, पृ. १४३–४४ ). शिवा-पुरकर देशपांडे यांच्या शकावलीवरून हा स. १७६० मध्यें हयात होता असें दिसतें ( पु. द. ३. पा. १२० )

**कोरांग**— महाकुल महातिष्य राजाचा धाकटा भाऊ व दुराचरणी अनुलेचा पति होय. हा विषप्रयोग घडून तिच्याच हातून मरण पावला ( ग्या. इं. को. ).

**कोराड्री रामशास्त्रू**—( स. अठरावें शतक सुमार) हा एक तेलगू कवि. हा आंगाळें प्रांतांत राहत असे. यानें वसरादत्त काव्य रचिलें. ह्या काव्यांत राजा कंदार पल्लु ह्याचा विवाह वसरादत्त हिजबरोबर झालेला आहे (परशाक्त तेलगू वाङ्मय, पृ. ६४ ).

**कोर्टेन**—( स.१६३५–३९ ) हा एक इंग्रज व्यापारी असून फार धनसंपन्न होता. यानें पिंडर व पोर्टर या साथीदारांच्या साहाय्यानें ईस्ट इंडिया कंपनीचा व्यापार बुडविण्याची मसलत केली; आणि हिंदुस्थानशीं व्यापार करण्याकरितां नवीन एक कंपनी स्थापून तिला बादशाहाकडून सनदहि मिळविली ( स. १६३५ ). परंतु याच्या कंपनीनें फार दिवस टिकाव धरला नाहीं. डच लोकांकडून याच्या जहाजांस अतिशय जाच झाला. पुढें स. १६३९ त राजानें याच्या कंपनीच्या व्यापाराचा सर्व तपास करून हकीकत जाहीर करण्यासाठीं एक कमिटी नेमिली. तिनें तपास केल्यावर राजानें याची सनद काढून घेतली.

**कोलब्रूक** (हेन्री टॉमस)—( स. १७९९–१८३० ) ना. भोसल्यांशीं सबसीडियरी तह करण्यासाठीं वेलस्लीनें हेन्री टॉमस कोलब्रूक यास आपला वकील म्हणून नागपुरास पाठविलें. तो ता. १८–३–१७९९ रोजीं नागपुरास येऊन पोहोंचला.

कोलब्रूक याचें नांव प्रख्यात संस्कृत पंडित म्हणून हिंदुस्थानांत व युरोपांत प्रसिद्ध आहे. याचा जन्म स. १७६५ मध्यें झाला. याचें शिक्षण घरींच झालें. वयाचे १५ वे वर्षांच यानें ग्रीक, लॅटिन या भाषा व गणित या विषयांत प्राविण्य मिळविलें.

स. १७८२ सालीं हिंदुस्थानांत एका कारकुनाच्या जागेवर याची नेमणूक झाली. हिंदुस्थानांत आल्यावर ११ वर्षांनीं यानें संस्कृत भाषेचा अभ्यास केला. "डायजेस्ट ऑफ दि हिन्दू लॉ" चें अर्धें राहिलेलें भाषांतराचें काम याजकडे देण्यांत आलें होतें. स. १८०५ सालीं फोर्ट वुइल्यम येथील विद्यालयांत हिंदु कायदा व संस्कृत विद्येचा याला अध्यापक नेमिलें. याच सुमारास यानें संस्कृत व्याकरण, हिंदुधर्मसंस्कारांची माहिती व वेदांवर निबंध लिहिले.

असा हा विद्याव्यासंगी पंडित राजकारणाच्या डावपेंचांत निरुपयोगी ठरावयाचाच व हाच अनुभव पुढें आला. याच्या मनाचा स्वाभाविक कल अशा कामांत नव्हता. परंतु यास डिप्लोमॅटिक खात्यांत घालण्यांत आलें. याचा मुलगा सर टी. इ. कोलब्रूक यानें याचें चरित्र लिहिलें आहे, त्यांत त्यानेंहि ही गोष्ट कबूल केली आहे.

कोलब्रूकनें राजाजवळ व नागपूरचे मुत्सद्यांजवळ इंग्रजांशीं दोस्तीचा व सबसीडियरी सैन्य ठेवण्याबद्दलचा तह करण्याबद्दल गव्हर्नराची इच्छा कळवली. राजानें व मुत्सद्यांनीं अर्थात् राजकारणाच्या नेहमींच्या रीतीप्रमाणें स्पष्ट न सांगतां नुसत्या गोडगोड थापा देण्यास सुरुवात केली. साध्या मनाचा हा त्यास भुलला व यानें कलकत्त्यास ग. ज. यास त्याप्रमाणें कळवलें व नागपूरशीं सबसीडियरी तह होण्याची फार आशा आहे, असें वारंवार लिहिलें.

इकडे याची भेट घेऊन तहाच्या शर्ती ठरण्याची वेळ ठरावी व मध्येंच राजा कोठें शिकारीस जावा, कधीं दुसरीच कांहीं सबब निघावी, अशी लांबवालांबव चालली.

दोन वर्षेपर्यंत हा नागपुरांत राहिला. शेवटीं याचे डोळे उघडले, व यास स्पष्ट कळून आलें कीं राजा आपणास चाळवीत आहे. उलट इंग्रजांचा वकील त्याचे दरबारीं राहिल्यानें त्याची इभ्रतहि उगीच वाढली आहे. म्हणून ग. ज. यास कळवून नागपूर येथील वकिलात काढून आपणास परत बोलावण्याचा हुकूम पाठवावा, असें यानें कलकत्त्यास लिहिलें.

त्याप्रमाणें ग. ज.नें हुकूम पाठवून यास परत बोलावलें. त्याप्रमाणें हा १८–५–१८०१ रोजीं नागपुराहून निघून गेला. जातांनाहि रघूजीनें याच्या मार्फत ग. ज. यास अघळपघळ आश्वासनें देऊन दोस्तीचा निरोप पाठवला. पण राजाचा भाऊ व्यंकोजी हा याला जातांना पहिल्या मुक्कामींच भेटला व यास त्यानें सांगितलें कीं ही सर्व दरबारी भाषा आहे. यांतील एक अक्षरहि खरें नाहीं. तेव्हां यास मोठें आश्चर्य वाटलें.

यानें नागपूरच्या दरबारचें व रघूजीसंबंधाचें वर्णन आपल्या खाजगी टिपणांत लिहून ठेवलें आहे. हा म्हणतो, "राजाला नक्षीच्या बांधीव कामाची गोडी असून ती त्यानें स्वतःकरितां बांधलेल्या महालामध्यें दिसून येते. राजाला बगीच्याचीहि बरीच आवड आहे.

दरबारांत राजा वागतो तो राजाप्रमाणें न दिसतां एखाद्या साध्या खाजगी माणसाप्रमाणें दिसतो. तरीसुद्धां दरबारांत शोभा व भव्यपणा नसतो असें नाहीं. राजास वाघाचे शिकारीचा फार नाद आहे.......इ. राजा शिकारींत व चैनींत बराच वेळ घालवता. परंतु राज्यकारभाराकडे त्याचें दुर्लक्ष होतें असें नाहीं."

त्याचप्रमाणें यानें ३० ऑक्टोबर १७९९ रोजीं दसऱ्याचे स्वारीचें वर्णन केलं आहे.

हा १८१४ सालीं इंग्लंडला परत गेला. व १८ मार्च १८३० सालीं मरण पावला. मरणापूर्वी थोडे दिवस हा एशिआटिक सोसायटीचा डायरेक्टर होता (ना.प्रां.इ.).

**कोवूर किळार**—(स. १८०–२०० सुमार) एक तामीळ कवि. यानें कुतुंजीनकिळ्ळीवळवनरापळ्ळी चोल याची स्तुति गायली आहे. त्याचप्रमाणें चेर राजाबरोबरचा पराक्रमहि वर्णिला आहे.

**कोसलादेवी**—मगध देशाच्या बिंबिसारची पत्नी. हिच्या बापाचें नांव महाकोसल असें होतें.

हिच्यापासून बिंबिसार राजास कुणिक नांवाचा मुलगा झाला असें बौद्ध लोक समजतात. ही प्रख्यात जैन साधु महावीर याची अनुयायी होती.

**कोंगणी गंग**—हा गंग घराण्यांतील एक राजा. हा सिंहनंदीच्यानंतर गादीवर आला. यानें कुवलयपूर (कोलार) ही आपली राजधानी केली.

**कोंचेंगण चोल**—(सातव्या शतकापूर्वी) तोण्डमाणाच्या नंतर पल्लव अमदानींतील तीनशें वर्षांत चोलांचें फक्त नांव येतें. बाकीची माहिती आढळत नाहीं. या काळांत यानें एका चेर राजाचा पराभव केल्याचा निर्देश आढळतो. याला शैव व वैष्णव दोघेहि आपल्या बाजूचा म्हणतात. कारण यानें शिव व विष्णु यांचीं पुष्कळ देवळें बांधलीं आहेत. त्यांत शिवाचीं ७० आहेत.

तामीळ वाङ्मयांत याचा उल्लेख आहे. याच्या शिल्पांतील वैशिष्ट्य म्हणजे इमारतीच्या शिखरावर निजलेला हत्ती दाखवावयाचा. याच्या नांवाचा समावेश ६३ शैवांत आहे. याची मूर्ति प्रत्येक शिवालयांत आहे.

शैवसाधु ज्ञानसंबंध व अप्पार यांनीं यासंबंधीं 'दंतकथा' लिहिल्या आहेत. त्या अर्थी सातव्या शतकाच्या पूर्वी हा झाला असला पाहिजे.

**कोंड**—हा विजयनगरच्या रामरायाचा पुत्र. हा रामरायास कोंडम्मा राणीपासून झाला. हा आनेगुंदीचा सुभेदार होता. याची तिरुमलाम्बा ही बायको होय. हिच्यापासून याला राम नांवाचा मुलगा झाला.

**कोंडभट्ट**—वैय्याकरणभूषण नामक संस्कृत ग्रंथाचा कर्ता.

**कोंडम्मा**—ही विजयानगरच्या रामरायाची तिसरी बायको. ही पोचिराजु घराण्यांतील तिम्माची मुलगी.

हिच्यापासून रामरायास कोंद आणि तिम्म असे दोन मुलगे झाले. त्यांपैकीं कोंद हा आनेगुंदीचा सुभेदार होता.

**२.** (कोंडांबिका पाहा).

**कोंडविडू गाणदेव**—हा कोंडविड्डु देशाचा गाणदेव राजा स. १३७७ च्या सुमारास होऊन गेला. याचा आजा चंद्रदेव व बाप गुहिलदेवपाल हा होय. हुल्श यानें याला ओरिसाच्या कपिल गजपतीचा समकालीन मानला आहे. परंतु हा त्याचा समकालीन नसून त्याचा वंशज असावा असें म्हणतात (गणदेवाचा ताम्रपट).

**कोंडांबिका**—विजयनगरच्या आरविडू घराण्यांतील वेंकटपति दुसऱ्या त्याची ही तिसरी पत्नी होय. हिच्या पित्याचें नांव गोबुरीओव असें होतें. हिला कोंडम्मा असेंहि म्हणत. हिला एकहि मुलगा झाला नाहीं.

**कोंडू किंवा कुंडलीश**—हा साधु व ग्रंथकर्ता साताऱ्यास होता. यानें ' आत्मबोध ' नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे ( शके १७१३ फा. शु. ७ ). या ग्रंथावर दासबोधाची छाया पडलेली आहे. याचीं १८ प्रकरणें आहेत. दुसरा ' आत्मसुख ' या नांवाचा आणखी एक ग्रंथ यानें लिहिला आहे. याचीं ५ प्रकरणें आहेत.

' आत्मसुखा ' च्या सुमारें २०० ओंव्या व ' आत्मबोधा ' च्या ६१२ ओंव्या आहेत (मं. त्रै. ४·२ ले. ४३).

**कोंडुरी सितारामय्या**—एक तेलगू कवि. याचें शिवपारिजातम्, इलावतीचरित्र आणि कृष्णविलास इत्यादि ग्रंथ आहेत ( परशाकृत तेलगू वाङ्मय, पृ. ६६ ).

**काडिण्य**—( विष्णुगुप्त पाहा ).

२. बुद्धाच्या पंचवर्गी भिक्षूंपैकीं एक. याला बुद्धदेवानें वाराणसींत प्रथम उपदेश केला. कौंडिन्य हें याचें गोत्र व सुदत्त हें नांव असें जातक अट्ठकथाकाराचें म्हणणें आहे. बोधिसत्त्व जन्मल्यावर हा खात्रीनें बुद्ध होईल असें यानें भविष्य वर्तविलें. गौतमानें गृहत्याग केला तेव्हां हा खात्रानें बुद्ध होणार म्हणून आपल्या चौघां सहकाऱ्यांच्या पुत्रांसह यानें प्रव्रज्या घतली व हे पांच ' पंचवर्गीय भिक्षु ' या नांवानें प्रसिद्धीस आले. उरुवेला प्रदेशांत बोधिसत्त्वानें घोर तपस्या आरंभली. त्या वेळीं हें त्याची सेवा करीत असत. पण बोधिसत्त्वानें देहदंडनाची निष्फलता जाणून परिमित आहार ग्रहण करण्यास सुरवात केल्याबरोबर तो पतित झाला असें समजून यांनीं त्याला सोडलें, व हा व याचे मित्र काशीस गेले. बोधिसत्त्वाला ज्ञान झाल्यावर प्रथम या पंचवर्गीयांना उपदेश करण्याचें ठरविलें. बोधिसत्त्व यांच्याकडे आला असतां यांच्याकडून इच्छा नसतांहि त्याचा सहज सत्कार झाला. त्यानें प्रथम याला उपदेश केला व तो याला पटला. तेव्हां बुद्ध उद्गारला, ' कौंडिन्यानें जाणलें.' तेव्हांपासून याला त्रिपिटकांत ' अञ्ञा कोण्डञ्ञ ' ( अज्ञकौंडिन्य ) व ललितविराच्या आरंभीं ' ज्ञानकौंडिन्य ' म्हटलें आहे. याला ' अज्ञात कौंडिन्य ' असें नांव पडलें ( बौद्धसंघाचा परिचय, पा. १४५ ).

**क्रमादीश्वर**—याचा संक्षिप्तसार नांवाचा संस्कृत व्याकरणावर एक ग्रंथ आहे. पण हा ग्रंथ कोणत्या ग्रंथाचें सार आहे हें सांगतां येत नाहीं. प्रक्रियाकौमुदी व सिद्धान्तकौमुदी यांसारखाच पाणिनीचें व्याकरण सुलभ करण्याचा हा प्रयत्न असावा. यानें आपला ग्रंथ भर्तृहरीच्या महाभाष्यदीपिकेच्या नमुन्यावर लिहिला असून उदाहरणेंहि भट्टिकाव्यांतील घेतलीं आहेत. यानें विषयाची मांडणी निराळ्या पद्धतीनें केली असून कांहीं नियम अनवश्यक म्हणून काढून टाकले असून कांहीं नवीन बनवले आहेत. पण याचा हा प्रयत्न जरा ओबडधोबड आहे.

याच्या व्याकरणशाखेस जौमरशाखा नांव आहे. कारण जुमरनंदी नांवाच्या ग्रंथकारानें याचा विशेष पुरस्कार केला.

**क्लॅव्हरिंग**—( स. १७२२–७७ ) हा एक हेस्टिंग्सच्या कौंसिलांतील सभासद होय. याच्या बरोबर मॉन्सन व फिलिप फ्रॅन्सिस हे इंग्लंडहून आलेले होते.

हा व याचे दोघे साथीदार हे तिघेहि हेस्टिंग्सच्या विरुद्ध होते. ता. २५–९–१७७६ रोजीं मॉन्सन व ता. ३०–८–१७७७ रोजीं क्लॅव्हरिंग हे दोघेहि मरण पावले. तेव्हां हेस्टिंग्झचे दोन प्रतिस्पर्धी कमी झाले.

**क्लाइव्ह**—( स. १७२५–७४ ) रॉबर्ट क्लाइव्ह याचा जन्म श्रॉपशायर परगण्यांत स्टिचे येथें स. १७२५ त झाला. याचे वडील वकील असून आपला मुलगा विद्याभ्यासांत हुशार व्हावा म्हणून त्यास शिकवण्यास खूप प्रयत्न केला. परंतु क्लाइव्ह पडला हूड स्वभावी. त्याला त्या शिक्षणाचा कंटाळा येऊं लागला व त्यामुळें अभ्यासहि याचे हातून नीट होईना. तेव्हां नाइलाजास्तव कोठें तरी गुंतवावयाचें म्हणून क्लाइव्ह यास त्याच्या वडिलांनीं ईस्ट इंडिया कंपनींत कारकुनीची जागा दिली. परंतु याची खोडकर वृत्ति यास त्याहि जागेवर राहूं देईना व अखेर कंटाळून हा आत्महत्याहि करण्याचा प्रयत्न करूं लागला. याहिपलीकडील गोष्ट म्हणजे यानें स्वतः आपल्या अंगावर गोळ्या झाडून घेण्याचा प्रयत्न केला. पण यास त्या न लागतां बाजूनें गेल्यानें, आपल्याला जगविण्याचा परमेश्वराचा कांहींतरी हेतु असावा असें यास वाटूं लागलें व यानें आत्महत्येचा नाद पूर्णपणें सोडून दिला.

त्या नोकरीचा वीट येतांच यानें लष्करांत नोकरी धरण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें हा १७४३ त फ्रेंचांनीं मद्रास घेतलें त्या वेळीं होता. डेव्हिटच्या किल्ल्यावर जेव्हां फ्रेंचांनीं हल्ला चढविला त्या वेळीं यानें प्रथम हातांत शस्त्र घेतलें. नंतर तरवार गाजविण्याची वेळ म्हणजे पांडेचरीचा वेढा होय. त्रिचनापल्लीच्या वेढ्यांत यानें आपली मुत्सद्देगिरी, शौर्य व धैर्य दाखविल्यामुळें हा बराच मान्यतेस चढला. अर्काटच्या वेढ्यांत सुद्धां यानें हुशारी दाखविल्यामुळें फ्रेंचांना उतरती कळा लागली व इंग्रजांचें स्थान स्थिर होऊं लागलें.

याचें लग्न मास्कलिन नांवाच्या याच्या मित्राच्या बहिणीशीं झालें. पुढें प्रकृतिस्वास्थ्याकरितां हा इंग्लंडास गेला. परत येतेवेळीं क्लाइव्ह हा मद्रासचा गव्हर्नर होऊन आला. परंतु यास व वॉटसन यास बंगालमध्यें पाठविण्यांत आलें. बंगालमध्यें सिराजचा व याचा वारंवार तंटा होऊं लागला, पण तो मिटता घेण्याचें दूरच राहून याच्या चढेलपणाच्या उत्तरांनीं आगींत तेल मात्र ओतलें जात होतें. अखेर कलकत्त्यास उभय पक्षांची लढाई होऊन दोघांचेंहि बरेंच नुकसान झालें. अलीनगर येथें तह झाला (स. १७५७). क्लाइव्ह हा जरी धाडशी होता तरी याची प्रसंगीं तारंबळ उडत असे. यानें ऐन वेळीं स्वतःच्या हिंमतीनें मनाचा निश्चय करून पराक्रम गाजविला असें कधींच घडलें नाहीं. बऱ्याच ठिकाणीं फितुरी झाली म्हणूनच इंग्रज विजयी झाले असें कांहींचें म्हणणें आहे.

याचा स्वभाव सुद्धां विश्वासघातकी होता. उमीचंदास यानें मोठ्या सभ्यतेनें फसविलें. वास्तविक पाहतां त्यांत क्लाइव्हचा व्यक्तिशः अगर कंपनीचा असा कोणताच फायदा झाला नाहीं. त्याचप्रमाणें सिराजला पदच्युत करून मीरजाफरला व त्याला सिंहासनावरून ओढून मीरकासिमाला गादी देण्यांत प्रत्येक वेळीं यानें आपला स्वार्थ साधला.

दिल्लीकर व अयोध्येचा नबाब यांनीं इंग्रजांवर स्वारी केली, परंतु त्यांचा बक्सार मुक्कामीं पराभव झाल्यामुळें त्यांच्याकडून बंगाल, बहार व ओरिसा या तीन प्रांतांची दिवाणीची सनद बादशाहापासून यांनीं मिळविली. यानंतर कंपनीच्या अंतःकारभारांत बऱ्याच सुधारणा केल्या. नोकरांचे पगार काय ते ठरवून त्यांना लांच खाण्यापासून बंदी करण्यांत आली.

इंग्लंडमध्यें परत गेल्यावर फार पैसे खाल्ल्याचा याजवर आरोप करण्यांत आला व त्याप्रमाणें पार्लमेंटमध्यें याची चौकशी सुरू झाली. परंतु निकाल विरुद्ध बाजूनें न लागतां उलट 'यांची कामगिरी स्पृहणीय होती.' असें जाहीर करण्यांत आलें.

पुढें लवकरच यानें स. १७७४ मध्यें आत्महत्या केली. यांस अफूचें जबरदस्त व्यसन लागलें होतें.

**क्रोज** ( कर्नल )—हा स. १७७२ त फौजखात्यांत दाखल होऊन म्हैसूरकरांबरोबर झालेल्या सर्व युद्धांत हजर होता. याच्या पराक्रमाबद्दल स. १८०० त यास इंग्रज सरकाराकडून तीनशें गिनी मोलाची एक बहुमोल तलवार बक्षीस मिळाली; आणि याची नेमणूक म्हैसूरचे रेसिडेंट म्हणून झाली. टिपूच्या पश्चात् म्हैसूरची व्यवस्था यानें उत्तम लाविली. ती याची चलाखी पाहून वेल्स्लीनें यास स. १८०१ त पुण्याच्या वकिलातीवर नेमिलें. तें काम यानें स. १८१० पावेतों केलें. यास देशी भाषा उत्कृष्ट अवगत होत्या. दिसण्यांत हा अगदीं साधा व नेभळट दिसे, पण आणिबाणीची वेळ आली कीं, याची चलाखी व्यक्त होई. याच्या इतके व्यवहारज्ञ कामगार इंग्रजांकडे फार थोडे झाले. आपल्या घरांत यानें गोमांस वर्ज्य केलें होतें. हेतु हा कीं, आपण हिंदूंशीं एकजीव व्हावें. स. १८१० त निवृत्त होऊन हा परत इंग्लंडास गेला आणि २०-४-१८१३ त मरण पावला. इंग्रज मुत्सद्यांचा मुकुटमणि अशी पदवी यास इंग्रज मुत्सद्दी देतात. बाजीरावाशीं वसईचा तह हें याच्याच कर्तबगारीचें फळ होय (म. रि. उ. २, पृ. ३५४).

याच्याबद्दल एल्फिन्स्टननें खालील अभिप्राय व्यक्त केला आहेः 'क्रोजच्या एवढा गुणसमुच्चय सहसा एकत्र आढळत नाहीं. धिप्पाड व सुदृढ शरीर, शान्त डोकें, चलाख बुद्धि, अढळ धैर्य, अचल नीतिमत्ता, अप्रतिम कर्तव्यनिष्ठा आणि डामडौलाचा तिरस्कार इत्यादि गुणांत साध्या व सच्छील वर्तनाची भर पडलेली असा याच्यासारखा गृहस्थ अलीकडच्या काळांत क्वचितच आढळतो.' हडपसरची लढाई होऊन बाजीराव पुणें सोडून गेला तेव्हां क्रोज तेथें होता. यशवंतरावास लढाईंत जखमा झालेल्या ऐकून त्याचे समाचारास यानें माणसें पाठविलीं, आणि मोठ्या स्नेहभावानें त्यास मेजवानीचें आमंत्रण दिलें. यशवंतरावासहि इंग्रजांशीं स्नेहभाव ठेवण्याची इच्छा होतीच. तेव्हां क्रोजचें आमंत्रण स्वीकारून तो मेजवानीस गेला. त्या प्रसंगीं साहेबानें (क्रोजनें) त्याचा उत्तम पाहुणचार करून सर्वांस पोशाख व जिन्नस नजर करून आदरानें निरोप दिला (म. रि. उ. ३, पृ. २१०).

**क्लाव्हिगो**—(स. १४०३–६) हा एक स्पेन देशाच्या राजाचा वकील होय.

हा स्पेनहून वकील म्हणून तयमूरकडे समरकंदास आला होता. यानें आपल्या प्रवासाची व तयमूरची मनोरंजक हकीकत लिहून ठेविली आहे (मु. रि. भा. १ ला पृ. १७९).

# ख

**खड्गपा**—हा चौऱ्यांशी सिद्धांपैकीं पंधरावा सिद्ध होय. हा चर्पटचा शिष्य. जात शूद्र, देश मगध.

**खदीजा**—विजापूरच्या आदिलशाही घराण्यांतील तहमास्पाची मुलगी; व हुसेन निजामशाहाची पत्नी होय.

२. विजापूरच्या आदिलशाही घराण्यांतील युसुफ आदीलशाहची मुलगी व अलाउद्दीन इमादशहाची पत्नी.

**खना**—एक बंगाली कवियित्री. हिचा संबंध अनेक वेळां अनेक कथानकांमध्यें येतो.

ही मिहिरची बायको होती असें म्हणतात. पण हा मिहिर वराहमिहिर होता कां दुसरा कोणी होता, हें सांगणें मात्र कठीण आहे. त्या वेळेस शाक-द्वीपीय ब्राह्मणांची 'मिहिर' ही पदवी होती. त्यावरून ही वराहमिहिरची बायको नसून एका शाक-द्वीपीय ब्राह्मणाची स्त्री असावी. हिच्या बापाचें नांव अटनाचार्य होतें. तो ज्योतिषी होता.

ही चंद्रकेतु राजाच्या वेळीं आपल्या पतीसह चंद्रपुर नांवाच्या गांवीं बरेच दिवसपर्यंत राहत होती, असें म्हणतात. हिच्या कवितेची रचना स. नवव्या शतकांत झाली असें हिच्या भाषेचा अभ्यास केला असतां दिसून येतें.

हें वरील मत रावबहादुर दिनेशचंद्र यांचें होय. पण खना ही स्त्री होती याबद्दल साशंकता आहे. कारण खना (क्षणा) हा ओरिसा-भाषेमध्यें पुलिंगी शब्द आहे; आणि बंगाली भाषेमध्यें स्त्रीलिंगी आहे. तेव्हां असें संभवतें कीं, 'खना' नांवाचा पुरुष क्षणासंबंधीं म्हणजे ज्योतिषासंबंधीं बोलणारा व लिहिणारा असावा. अर्थात् तो ज्योतिषी असला पाहिजे (क. कौ. भा. ७).

**खरकसिंग**—हा एक गार्दी होय. राघोबादादास याचा चांगला पाठिंबा होता. वेळोवेळीं हा दादाला मदत करीत असे.

स. १७७७ च्या जानेवारींत हा दादाजवळ मुंबईस असतां आनंदीबाईनें यास मकरसंक्रमणाचे तीळ व पत्र पाठविलें होतें. पुढें तळेगांवच्या पराभवांत खरकसिंग ताब्यांत आला, तेव्हां यास नारायणरावाचे खुनांत सामील होता, म्हणून देहांत शिक्षा झाली.

**खरग्रह मैत्रक**—(स. ६१५) हा वलभीच्या मैत्रकवंशांतील धरसेनाचा पुत्र. हा आपला भाऊ शिलादित्य याच्या मागून गादीवर आला.

२. हा वलभीच्या मैत्रकवंशांतील तृतीय ध्रुवसेनाचा पुत्र.

**खरपट**— चौर्यशास्त्रकर्ता.

**खरोस्ट**—हा मथुरेच्या पहिल्या राजुल क्षत्रपाचा पुत्र. याच्या आईचें नांव नदसी अकसा. हा राजुलाचा युवराज होता. याचा शिक्का किंवा शिलालेख अद्यापि कांहींच सांपडलें नाहीं. त्यावरून हा राजुल जिवंत असतांच मेला असावा. म्हणूनच राजुलच्या मागून त्याचा दुसरा पुत्र सोंडास गादीवर बसलेला दिसतो (रा. इ.).

**खर्कू**—कठेरचा राजा. कठेरलाच पुढें रोहिलखंड म्हणूं लागले यानें स. १३७६-७७ चे सुमारास बुदौनचा सुभेदार सय्यद मुहमंद व त्याचे दोघे भाऊ यांस बोलवून विश्वासघातानें त्यांचा वध केला. या भयंकर गुन्ह्याची फीरूझला चीड आली व त्यानें यास योग्य शासन करण्याचें ठरविलें. स. १३८० मध्यें फीरूझशाहानें कठेरवर स्वारी केली व कठेरला पोहोंचल्यावर सर्व हिंदूंची सरसहा कत्तल करण्याचा आपल्या सैनिकांस हुकूम दिला. हा कुमाऊनला पळून गेला. या अपयशाचा सूड हि सुलतानानें हिंदु प्रजेवरच उगविला. सहस्रावधी हिंदु कापून काढले व २३००० तर पकडून गुलाम केले. या सर्वस्वसंहारक कत्तलीनेंहि त्याचें समाधान झालें नाहीं. त्यानें संभळ प्रांतावर एका अफगाण सरदारास सुभेदार नेमिलें; व कठेर शहराची दरसाल जाळपोळ करून धूळधाण करण्याचा त्यास हुकूम दिला. पुढें पांच वर्षेपर्यंत सुलतान स्वतः कठेरला जात असे व स्वतः कठेर शहरीं व प्रांतीं जाळपोळ व कत्तली करीत असे. त्यामुळें तो प्रांत निर्मनुष्य झाला (कें. हि.).

**खल्लाटक**—हा मौर्य बिंदुसाराचा प्रधान मंत्री. यानें बिंदुसाराचा ज्येष्ठ पुत्र सुसीम यास राज्य न मिळतां अशोकास राज्य मिळावें असा प्रयत्न केला.

**खवासखान**—शेरशहाचा सेनापति (दौलतखान पाहा).

२. विजापूरच्या आदिलशाही घराण्यांतील मुहंमदाचा हा एक प्रधान. याचें मूळ नांव दौलतखान. इब्राहीम वारला तेव्हां यानें मोठ्या युक्तीनें मुहंमदला राज्य मिळवून दिलें म्हणून यास 'खवासखान' असा किताब देण्यांत आला (शिवभारत प्रस्ता. ७५).

पुढें हा लवकरच गर्विष्ठ होऊन मुस्ताफखानाशीं वैमनस्य धरूं लागला. याच्या मनांत जेव्हां मुस्ताफखानास कैद करावयाचें आलें तेव्हां यानें त्याजला बेळगांवकडे पाठवून कैद करविलें आणि आपली मजबुती करूं लागला. मुहंमद पहिल्यापासूनच याच्या दुर्वर्तनास व गर्विष्ठ स्वभावास कंटाळला होता. आपल्याविषयीं लोकमत चांगलें नाहीं हें जेव्हां याला कळलें तेव्हां यानें दिल्लीच्या बादशाहाची मदत मागून त्याचे स्वाधीन विजापूर करण्याचें कबूल केलें. तेव्हां मुहंमदाच्या प्रेरणेनें सिदी रैहान यानें खवासखान याचे वाड्यांत शिरून यास ठार मारिलें.

३. विजापूरच्या आदिलशाही घराण्यांतील दुसऱ्या अलींचा सरदार.

जेव्हां शिवाजीनें विजापूरच्या अफझलखानाला ठार केलें तेव्हां विजापूरकरानें याला शिवाजीचें पारिपत्य करण्याकरितां पाठविलें होतें. त्याप्रमाणें यानें शिवाजीचा चांगलाच मोड केला. अलीच्या कारकीर्दीच्या शेवटीं हा अलीचा मुख्य वजीर होता.

खान मुहंमद मरण पावल्यावर हा वजीरीवर आला (स. १६५९). शिवाजीनें बाजी घोरपड्याला मारल्यावर (स. १६६४) याचाहि पराभव केला (प. सा. १०४१; मं. त्रै. ११ ले. १० पा. ४७). हा दक्षिणी पक्षाचा मुख्य होता. याच्या विरुद्धपक्षाचा बहालोलखान पठाण होता. औरंगजेबानें बहादुरखानाला विजापूरचें राज्य जिंकण्याचा तगादा लावला होता. ता. १९-१०-१६७५ रोजीं भीमेचे काठीं यानें बहादूरखानाची भेट घेतली; आणि त्याच्याशीं संगनमत करण्याचा प्रयत्न केला. ही गोष्ट बहलोलखान पठाणास बिलकुल पसंत पडली नाहीं. बहलोलखानानें आपल्याविरुद्ध चाललेलीं कारस्थानें लक्षांत घेऊन यास भोजनास बोलावून दारू पाजली आणि दारूच्या निशेंत असलेल्या याला कैद केलें (स. १९-११-१६७५). आणि यास बंकापूरच्या किल्ल्यांत अटकेंत ठेवून आपण वजीर झाला. पठाणांबद्दल लोकांमध्यें अनुकूलता नव्हती, त्यामुळें लवकरच अनेक गोंधळ सुरू झाले. तेव्हां ता. १८-१-१६७६ रोजीं बहलोलनें बंकापूर येथें यास ठार करून बंडखोरांवर चाल केली (शिवाजी पा. १७०-१७१).

**खंडदेवमिश्र**—हा पूर्वमीमांसाशास्त्रांत अत्यंत प्रसिद्ध असलेल्या भाट्टदीपिका नांवाच्या ग्रंथाचा कर्ता होय. हा स. च्या सतराव्या शतकाच्या उत्तरार्धांत झाला.

**खंडेराय**—गुरुपरंपरा–आत्माराम–गोपाळनाथ–खंडेराय. ग्रंथ–तुकाराम–नामदेव--एकनाथ--चरित्र (सं. सू.).

**खंडेराव गुजर**—हा प्रतापराव गुजराचा पुत्र. झुल्फिकारखानानें रायगड फितुरीनें घेतल्यानंतर शाहू व येसूबाई हीं उभयतां मोगलांच्या हातीं लागलीं. त्या वेळीं जी मंडळी पकडली गेली त्यांत हा होता. औरंगझेबाच्या धर्मलालसेला शाहूमहाराज बळी पडायचे, पण ते यावर निभावले. याच्यामुळें शाहूनें यास ६० गांवांची परळीनजीक पाटिलकी इनाम दिली.

याचे वंशज हल्लीं कासथी येथें राहत असून त्यांना याची सर्व माहिती आहे. खंडोजीस परत हिंदु करून घेण्याचे बरेच प्रयत्न झाले, परंतु याच्या विलक्षण आग्रहापुढें लोकांना हात टेकावे लागले. हा म्हणत असे कीं, 'मी ज्या मुसलमान स्त्रीशीं लग्न केलें तिलाहि हिंदु करून घ्या' (इ. सं. १. ४).

**खंडेराव त्रिंबक ओढेरकर**—पेशवाईतील हा एक सरदार होय. स. १७७५ त आनंदीबाई धारेस असतां तिनें फौज ठेवून भेलसा वगैरे महालांत दंगे फार केले, ते विसाजी गोविंद आठवले व खंडेराव त्रिंबक ओढेरकर यांनीं जाऊन मोडले; आणि अष्टनचा तह झाल्यावर बाईस पकडण्यासाठीं धारेस वेढा घातला; व शेवटीं धार हस्तगत करून बाईस आपल्या ताब्यांत घेतलें (म. रि. उ. १. ७८).

**खंडेराव दरेकर**—हा एक सरदार असून प्रथम राघोबाचे बाजूस होता. हरिपंतानें राघोबादादाचा पाठलाग सुरू केला. तेव्हां दादा नर्मदापार होऊन पळत सुटला. त्या वेळीं हा दादाबरोबर होता.

पण पुढें याच्या नादीं लागण्यांत आतां अर्थ नसून उलट हानि आहे अशी याची व दादाच्या पक्षपात्यांची खात्री झाली. तेव्हां यानें 'आपल्याच्यानें तुम्हांबरोबर पळवत नाहीं'-असें दादास सांगून, तोफा सामानासह हा नर्मदेवरून परत येऊन तापीतीरीं चांगदेवावर हरिपंतास मिळाला (म. रि. उ. वि. १ पृ ३).

**खंडेराव दाभाडे**—(स. १६९१–१७२९) दाभाडे घराण्याचा मूळ पुरुष येसाजी. त्याचा हा थोरला मुलगा होय. येसाजी शिवाजीमहाराजांचा हुजऱ्या होता. हे क्षत्रिय असून यांचें गोत्र शांडिल्य व देवक कळंबाचें आहे.

स. १६९१ च्या अखेर राजाराम छत्रपति हे जिंजीस जातांना हा त्यांच्या बरोबर होता. यानें महाराजांस पुष्कळ मदत केली.

स. १६९६ च्या सुमारास राजाराम हे चंजीस असतांना यास तळेगांवजवळील इंदुरी गांव इनाम मिळालें

व पुढें स. १६९८ त जुन्नर वगैरे प्रांतांची सरपाटीलकी मिळाली.

जिंजीहून परत आल्यावर छत्रपतीनें यास सेनाधुरंधर हें पद देऊन गुजराथ व बागलाणकडे मुलूखगिरीवर पाठविलें आणि वस्त्रें व पोशाख देऊन निशाण आणि जरीपटका हवालीं केला. शिवाय पुणें वगैरे प्रांतांची व अकोलें व जावळें या महालांची सरपाटीलकी व कांहीं प्रांतांची सरदेशमुखी दिली.

शाहू छत्रपति सुटून आल्यावर हा ताराबाईला सोडून त्यांना जाऊन मिळाला. मध्यंतरीं चंद्रसेनानें यास ताराबाईकडे ओढण्याचा प्रयत्न केला, पण तो निष्फळ ठरला.

शाहूनें ता. ११-१-१७१७ त यास सेनापतीचें पद दिलें. तें पुढें याच्या घराण्यांत कायम झालें. याच वेळीं दिल्लीच्या बादशहानें दख्खनचा सुभेदार सय्यद बंधूंपैकीं हुसेनअली याच्या विरुद्ध उठण्यास शाहूस कळविलें असतां, शाहूनें तें काम यावर सोंपविलें. यानें खानदेश-गुजराथवर स्वाऱ्या करून हुसेनचा रस्ता अडविला. तेव्हां हुसेननें फौज पाठविली, ती सुद्धां यानें अडचणींत गांठून कापून काढली.

पुढें हुसेननें परत मोठी फौज पाठविली म्हणून यानें निंबाळकर व सोमवंशी यांच्या मदतीनें मोगलांचा पुरता मोड केला ( २४-४-१७१७ ).

यानंतर शाहूनें यास गुजराथ व काठेवाडकडे मराठ्यांचा अंमल बसवावा असा हुकूम केला, व खालील आशयाचें एक पत्र पाठविलें: " दरमहा हुजूर खर्चास ऐवज देत जावा. फौज बाळगावी. थोरले महाराज धान्य व नक्त, श्रावणमासीं धर्मदाय देत असत. तो सेनापती यानीं आपल्या तालुकांपैकीं, होन चार लाख रुपये खर्च करून, कोटि लिंगें ब्राह्मणांकडून करवीत जावीं." ( शाहू. म. ब. )

बाळाजी विश्वनाथानें जी सरंजामी पद्धत निर्माण केली ( स. १७१९ ) तींत यास खानदेश देऊन गुजराथ काबीज केल्यास तीहि जहागिरी देऊन टाकूं म्हणून आश्वासन दिलें ( शाहू. म. ब. ).

सय्यदांचा हस्तक अमलअली व निजाम यांच्यांत स. १७२० त बाळापूरची जी लढाई झाली तींत सय्यदाच्या विनंतीवरून यास लढण्यासाठीं म्हणून शाहूनें पाठविलें होतें. त्यानंतर फत्तेसिंग भोसल्यांच्या आधिपत्याखालीं कर्नाटकांत ( स. १७२५-२६ ) झालेल्या स्वारींत हा हजर होता.

यानें वसई ते सुरतपर्यंतचें कोंकण काबीज केलें होतें. याच्याबद्दल शाहूनें पुढील उद्गार काढले " बडे सरदार मातबर, कामकरी हुषार होते." असा उल्लेख आहे ( शाहू. म. ब. ).

शाहूची मर्जी खंडेरावांवर पुष्कळ होती. कारण एकदां हा पोटशूळानें आजारी होता, तेव्हां महाराजांनीं जाऊन याचा समाचार मुद्दाम घेतला. थोरल्या बाजीरावाच्या वेळेस हा वयोवृद्ध झाला होता. अखेर स. १५।५।१७२९ मध्यें मुतखड्याच्या विकारानें हा मरण पावला. तळेगांवीं याची समाधि आहे.

इतिहासप्रसिद्ध उमाबाई दाभाडे ही याची बायको होय. याला त्रिंबकराव, यशवन्तराव व बाबूराव असे तीन पुत्र होते. त्रिंबकराव हा सुद्धां बापासारखा शूर होता.

मराठशाहीवरील आपत्प्रसंगीं जीं नररत्नें महाराष्ट्रांत चमकलीं त्यांत खंडेराव दाभाड्याची प्रामुख्यानें गणना करण्यास हरकत नाहीं. संताजी घोरपडे, धनाजी जाधव, रामचंद्रपंत, शंकराजी नारायण, परशराम त्र्यंबक यांच्यापेक्षां राजाराममहाराजांनीं खंडेरावास जास्त उत्पन्न दिलें. न जाणों या मर्दाची कामगिरी सर्वांपेक्षां जास्त किमतीची असेल. तीनशें पंचाण्णव गांवांची सरपाटीलकी म्हणजे जवळजवळ सातशें गांवांची देशमुखी खंडेरावास मिळाली असल्यामुळें हा सर्व वतनदारांचा मुकुटमणि ठरतो. भरीव कामगिरीवांचून असली भरीव देणगी मिळणें शक्य नाहीं ( मं. त्रै. व. ८ अं. ३ ले. १८ पृ. १२ ३).

**खंडेराव निंबाजी**--रघुनाथराव पेशवे यांच्या पक्षाचा मनुष्य. हा व विष्णु नरहर यांनीं नाना-बापूंना दगा करण्याची मसलत केली. ती उघडकीस येऊन यास बिड्या घालून सिंहगड व रुद्रमाळ या किल्ल्यांवर रवाना केलें; व याचीं घरेंदारें जप्त केलीं ( एप्रिल १७७६ ) ( म. रि. उ. १ पा. ११७ ).

**खंडेराव पवार**--( स. १७८३ मृत्यु ) हा यशवंतराव पवाराचा पुत्र होय. स. १७६८ त उत्तरेकडे मराठ्यांची स्वारी झाली, त्या वेळीं यास त्याच्या मातुश्रीनें स्वारींत पाठविलें नाहीं, याचे ऐवजीं याचा सावत्रभाऊ महिपतराव गेला; तेव्हांपासून याचें लक्ष माधवरावाकडे न राहतां, तें चुलता रघुनाथराव याजकडे लागलें, आणि नारायणरावाचे वधानंतर दादा पळून माळव्यांत गेला, तेव्हां तर यानें त्याचाच पक्ष उघड स्वीकारला. यानें आनंदीबाईस धारेस आणून तेथलि किल्ल्यांत तिच्या बाळंतपणाची सोय केली. पुढें बारभाईंच्या सांगण्यावरून ओढेरकरांनीं निराळी फौज जमवून धारेस वेढा दिला.

पुरंदरचा तह होऊन सरदार परत आले, तेव्हां खंडेराव पवारहि बारभाईंस येऊन मिळाला, आणि याचे जप्त झालेले महाल पुन्हां यास परत करण्यांत आले ( १७७७ च्या सुमारास ) ( म. रि. उत्तर वि. १ ला पृ. ७९ ). हा महादजी शिंद्याबरोबर मोहिमांवर असे. स. १७८३ मध्यें हा मरण पावला ( म. रि. उत्तर वि. २ रा, पृ. २३८ ).

**खंडेराव राजे शिर्के**—( स. १७७५-१८४८ ) हे भवानजी राजे शिर्के यांचे चिरंजीव होत. भवानजी राजे हे फार शूर व कर्तृत्ववान् होते. हे कोंकणांतील डेरवण गांवचे इनामदार असल्यामुळें यांची 'डेरवणकर शिर्के' या नांवानें फार प्रसिद्धी असे. यांची मुलगी दुसरे शाहू-महाराज यांस दिली होती, तिचें नांव आनंदीबाई. ह्याच राणीसाहेब सातारचे सुप्रसिद्ध छत्रपति श्री. प्रतापसिंह ऊर्फ बुवासाहेब महाराज, व श्रीमंत शहाजी ऊर्फ आपा-साहेब महाराज ह्यांच्या मातुश्री होत. अर्थातच खंडेराव हे या दोन छत्रपतींचे मातुल असल्यामुळें यांस मामा-साहेब शिर्के असें म्हणत असत.

हे फार बुद्धिमान् व शूर असून यांच्यावर शेवटच्या छत्रपतींची कृपादृष्टि विशेष होती. स. १८१८ मध्यें पेश-वाईचा शेवट झाल्यानंतर सातारचे छत्रपति बंधमुक्त होऊन सातारा येथें स्वतंत्र संस्थान निर्माण झालें, व तेथें नवीन राज्यकारभार चालू झाला. त्या वेळीं पूर्वींचीं अष्ट-प्रधानांचीं पदें जुन्या घराण्यांतील लोकांस देण्यांत आलीं. त्या प्रसंगीं खंडेराव राजे शिर्के यांस प्रतापसिंह महाराजांनीं 'सरलष्कर' असें पद दिलें. तें यांच्याकडे पुष्कळ वर्षें चालू होतें.

प्रतापसिंह राजे स. १८३९ मध्यें पदच्युत होऊन काशी येथें गेले, तेव्हां त्यांच्या मागें त्यांचे बंधु श्री. शहाजी राजे सातारच्या गादीचे अधिपति झाले. त्यांची शिर्क्यांवर विशेष मेहेरबानी होऊन, त्यांनीं यांस स. १८४२ मध्यें 'सेनापति' हें पद दिलें. तें यांच्याकडे सातारचें राज्य खालसा होईपर्यंत चालू होतें.

यांस क्षत्रिय मराठ्यांचा विशेष अभिमान असून, यांनीं श्री. प्रतापसिंह महाराज व श्री. शहाजी ऊर्फ आपासाहेब महाराज, यांच्या कारकीर्दींत, आपल्या वज-नाचा योग्य उपयोग करून, मराठ्यांची उन्नति करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. श्री. आपासाहेबांचे कारकीर्दींत सातारा येथील दरबारांत यांचें विशेष वजन असून, प्रत्येक राजकारणांत यांच्या संमतीवांचून पान हालत नसे. त्या-वरून खालील आर्या प्रसिद्ध झाली होती.

" हर्षे, आगटे, महाजनि, नृपमातुळ खंडेरावजी शिर्के ।
याविरहित दरबारीं अन्य जनांचा कधीं न पद शिरके ।। "

हे इंग्रज सरकारशीं राजनिष्ठेनें वागत असून, यांच्या-वर सातारचे रेसिडेंट कर्नल ओव्हान्स, सर रॉबर्ट फ्रियर वगैरेंची फार मेहेरबानी होती. हे प्रत्येक राजकारणांत छत्रपतींस योग्य सल्ला देऊन संस्थानचें संरक्षण करण्यांत फार दक्ष असत. त्यामुळें यांचें नांव सातारा येथें सर्वतो-मुखीं प्रसिद्ध होऊन, हे फार लोकप्रिय झाले होते. हे सातारा येथें ता. १३ जुलै स. १८४८ त मृत्यु पावले. त्या वेळीं यांचें वय ७३ वर्षांचें होतें.

यांच्या मृत्यूचें वर्तमान ऐकून सातारचे रेसिडेंट मि. फ्रियरसाहेब यांस फार वाईट वाटलें. यांच्या मृत्यूचें वृत्त त्यांनीं मुंबई सरकारचे चीफ सेक्रेटरी मे. ए. मॅलेटसाहेब यांस कळवितांना यांच्याबद्दल जो स्तुतिपर उल्लेख केला आहे तो फार वाचनीय आहे.

यांस छत्रपति आपासाहेबांनीं सातारा जिल्ह्यांत कामठी व ल्हासुर्णे हीं दोन गांवें व कांहीं बागा इनाम करून दिल्या होत्या. खंडेरावास अंबाजी व आनंदराव असे दोन औरस पुत्र होते.

अंबाजी राजे हे कांहीं दिवस लष्करचा कारभार उप-भोगीत असून त्यांस सातारचें राज्य खालसा झाल्यानंतर कांहीं नेमणूकहि मिळाली होती. परंतु स. १८५८ मध्यें त्यांच्यावर राजद्रोहाचा आरोप येऊन त्यांस जन्मठेप काळेपाण्याची शिक्षा झाली, व त्यांचें अर्धे वांटयाचें इनाम व वाडा वगैरे जप्त करण्यांत आला.

त्यांचे दुसरे बंधु आनंदराव यांचेकडे बाकीचें इनाम चालत आहे. सातारा येथें गुरुवार पेठेंत जो शिर्क्यांचा वाडा प्रसिद्ध आहे व जेथें पुष्कळ वर्षें मामलेदार कचेरी होती, तोच खंडेराव शिर्के सेनापति यांचा वाडा होय ( ऐ. स्फु. ले. पृ. ३८-४० ).

**खंडेराव विठ्ठल विंचुरकर**—( स. १७९४-९५ ) हा शिवजी विठ्ठलचा भाऊ. माधवराव पेशव्यानें यास शिवजी विठ्ठलनंतर सरदारीचीं वस्त्रें दिलीं. हा निजामाशीं झालेल्या खर्ड्यांच्या लढाईंत हजर होता, परंतु आजारी असल्यामुळें याची म्हणण्यासारखी कामगिरी त्या लढाईंत झाली नाहीं. खर्ड्यांच्या लढाईनंतर लौकरच हा मरण पावला ( मे १७९५ ).

याची बायको गंगाबाई. पुत्र नरसिंह. यानें विंचुरा-नजीक एका टेकडीवर कोणजाई देवीचें देवालय बांधलें. हा चिटणिसी व जमाखर्च लिहिण्यांत हुशार असून मुत्सद्दी होता. यास संस्कृत चांगलें येत होतें. हा गोरा असून

सुस्वरूप होता. याची अंगकाठी उंच असून याचा स्वभाव रागीट आणि खुनशी असे. तथापि याचे हातून कोणाचें कधींहि नुकसान झालें नाहीं ( विंचूरकर घराण्याचा इतिहास पा. १२०–१२७ ).

**खंडेराव हरि भालेराव**—( स. १७८०–९७ ) हरिपंताचे वडील रामाजी आणि आजे बाळाजी हे दोघे थोरल्या बाजीरावांचे वेळीं माळव्यांत कामावर होते.

हे शिंद्यांच्या प्रमुख सरदारांपैकीं एक होत. हे बोरसरकर भालेराव यांच्या घराण्यांतील हरबा नाना यांचे चिरंजीव होत. यांचें दुसरें नांव खंडेराव आपा असें होतें. या नांवावरून इंग्रज लेखकांनीं यांचा उल्लेख आपा खंडेराव असा केलेला आढळतो.

हे महादजी शिंद्यांच्या पदरीं केव्हां राहिले हें आढळत नाहीं. स. १७८० मध्यें इंग्रज, गोहदकर राणा व शिंदे यांचें जें युद्ध चालू होतें, त्यामध्यें हे शिंद्यांच्या बाजूनें लढत होते. या लढाईत गोहदकराची सरशी होऊन त्यानें ग्वाल्हेरचा किल्ला हस्तगत केला. तेव्हां हे प्रांत सोडून झांशी प्रांत त व कोंचकाल्पीकडे लूट करून पोट भरावयास गेले. वरील युद्धांत यांनीं पुष्कळ पराक्रम केला.

स. १७८५ मध्यें महादजी शिंदे यांनीं दिल्लीच्या बादशहास अंकित करून घेतलें. ह्या वेळीं यांनीं पाटीलबावांस चांगली मदत केली. याच वर्षी महादजीनें यास रायाजी पाटलाबरोबर आग्र्याचा किल्ला घेण्यास पाठविलें होतें. या वेळीं यांनीं चांगली मेहनत केली.

नंतर स. १७८६ मध्यें बुंदेलखंडांत रवाना झाले. यांनीं पर्न्यावर चाल करून बेणीहुजरी याजवळ खंडणी मागितली. प्रथम बेणीहुजरी यानें खंडणी देण्याचें कबूल केलें, परंतु पुढें तो अळंटळं करूं लागला. तेव्हां यानें त्याशीं लढाई देऊन त्याचा पाडाव केला व पर्न्याचा किल्ला काबीज केला. ही विजयवार्ता यानें महादजीस कळवतांच महादजीनें आपल्या रणशूर सरदाराच्या गौरवार्थ ही आनंददायक बातमी बादशहास एक हजार मोहरा देऊन सादर केली.

पर्न्याचा किल्ला हस्तगत केल्यावर यांनीं कलिंजरावर स्वारी केली, व तो किल्ला आपल्या ताब्यांत घेतला. कलिंजराहून कूच करून हे ओढशास आले व यांनीं तेथील राजापासून १॥ लाख रु. खंडणी घेतली. नंतर हे दतियास आले व तेथील राजाकडे खंडणीबद्दल जाबसाल लाविला. दोन लक्ष रुपये खंडणी द्यावी किंवा सेंवढा किल्ला खालीं करून द्यावा, अशी अट घातली. त्याप्रमाणें लवकरच राजानें कबूल केलें. ह्याप्रमाणें यांनीं बुंदेलखंडामध्यें महादजी शिंदे यांचा चांगला अंमल बसविला.

हे बुंदेलखंडांतील राजकारणांत गुंतले असतां स. १७८७ मध्यें जयपूरचा राजा प्रतापसिंग व महादजी शिंदे यांची लढाई सुरू झाली. तेव्हां पाटिलबावांनीं यांस १० हजार सैन्यानिशीं युद्धांत येण्याबद्दल आज्ञा केली. त्याप्रमाणें हे जाऊन हजर झाले. या युद्धांत यांनीं पराक्रमाची शर्थ केली.

स. १७८७ चे अखेरीस हे ग्वाल्हेर, गोहद, भिंड, भदावर, अटेर वगैरे प्रांतांचे कमाविसदार असून, यांनीं १० लक्ष रुपये मामलतीबद्दल पाटिलबावांस दिले होते, असा दाखला सांपडतो. ते दोन वर्षे ग्वाल्हेर प्रांतांत होते, परंतु पुढें सैन्याचा खर्च विशेष वाढून रसदेचा भरणा वेळेवर न करतां आल्यामुळें मध्यंतरीं यांचें पाटिलबावांशीं वितुष्ट आलें. परंतु यांनीं पैशाची व्यवस्था करून व सैन्याची जमवाजमव करून पाटिलबावांची मर्जी संपादन केली. स. १७८८-८९ मध्यें दिल्ली येथील गुलामकादर रोहिल्याचें बंड मोडून सर्व बादशाही प्रांत हस्तगत करण्याचे कामीं महादजी शिंदे यांस यांची चांगली मदत झाली. आग्र्याचा किल्ला घेण्याचे कामीं यांनीं चांगले परिश्रम केले. ह्या सर्व परिश्रमांबद्दल महादजी शिंदे यांनीं यांस रेवाडी प्रांतीं बावीस महालांची मामलत सांगितली व दिल्लीच्या किल्लेदारीचीं बादशहाकडून स. १७९० मध्यें वस्त्रें देवविलीं. ह्यांनीं दिल्लीच्या किल्ल्याचा बंदोबस्त करून तेथें आपल्या वतीनें भवानीकुंवर यास किल्लेदारीचें काम पाहण्यास ठेविलें.

स. १७९० पासून यांचे बहुतेक पराक्रम व राजकारणें दिल्ली प्रांतांतच घडून आलीं. बुद्धिचातुर्य व तरवार बहादुरी हे दोन्ही गुण याचे अंगीं होते.

स. १७९० च्या अखेरीस नजबकुलीखान मृत्यु पावल्यानंतर कानोडचा किल्ला यांनीं लढाईचा मुकाबला करून मोठ्या पराक्रमानें काबीज केला. हें ऐकून दिल्लीच्या बादशहानें खंडेराव हरि यांस " सापवें खिलत, जेगा, शिरपेंच, मोत्यांची माळ, तरवार, येणेंप्रमाणें इनायत करून हत्तीघोड्याची परवानगी दिली. " ह्यानंतर खंडेराव हरि यांनीं कानोड येथें इस्माईल बेग यास कैद करून ( स. १७९१ डिसें. ) कानोड येथें आपल्या जहागिरीचें मुख्य ठिकाण स्थापन करून तेथून पुढील सर्व राजकीय उलाढाली चालविल्या. ह्या सुमारास यांनीं युरोपियन लष्करी अंमलदार नेमून, त्यांच्या हाताखालीं

कवाइती फौज तयार केली. प्रसिद्ध डी बॉइन हा प्रथम यांचे पदरीं होता. स १७९३ चे सुमारास ह्यांनीं जॉर्ज टॉमस नांवाचा एक नामांकित युरोपियन नोकरीस ठेविला व त्याजकडून एक हजार लोकांचें कवाइती पलटण तयार करविलें.

स. १७९४ मध्यें महादजी पुणें प्रांतीं मृत्यु पावल्यावर दिल्लीकडील प्रांतांचा बंदोबस्त करण्याचें काम शिंद्यांचे मुख्य सरदार डी बॉइन, खंडेराव हरि, गोपाळराव भाऊ वगैरेंवर पडलें. या वेळीं जॉर्ज टॉमस याचा यांस चांगला उपयोग झाला. ह्यांनीं मेवाती प्रांताचा चांगला बंदोबस्त करून कानोड येथील आपली जहागीर भरभराटीला आणिली, आणि दिल्ली प्रांतांतील शिंद्यांची सत्ता कांहीं काल तरी सुरक्षित ठेविली.

पुढें दिवसेंदिवस टॉमस याचें प्राबल्य अधिक वाढून तो एक शिरजोर सरदार बनला, आणि त्यानें यांचें महत्त्व व वजन बरेंच कमी केलें. त्यामुळें व प्रकृतीच्या अस्वस्थतेमुळें यांनीं संन्यास घेतला व हे अत्यंत उदास होऊन यांनीं स. १७९७ मध्यें यमुनेंत जलसमाधि घेतली (आषाढ शु. १ शके १७१९ रविवार ता. २५।६। १७९७ ).

यांस औरस पुत्र होता असें दिसत नाहीं. यांनीं वामनराव ह्या नांवाचा आपला पुतण्या दत्तक घेऊन त्यास आपल्या जहागिरीचा मालक केलें (ऐ. च. पृ. १३५–१४१ ).

यांनीं समाधि घेतली त्याच ठिकाणीं म्हणजे दिल्लीस निगमोदाचे घाटावर यांची छत्री बांधली. तेथें नैवेद्य वगैरेची व्यवस्था यांचे दत्तक पुत्रानें—वामनराव यानें—केली. ती आजपावेतों चालत आहे (मं. श. १८३७ वा. इ. ले. २०० ).

**खंडेराव होळकर**—( स. १७२३–१७५४ ) हा अहल्याबाईचा पांत व मल्हाररावांचा पुत्र. आई गौतमाबाई. याचा जन्मकाल स. १७२३ असून हा युद्धकलेंत हुषार होता. स. १७५४ मध्यें अजमेरवर केलेल्या राघोबादादाच्या मोहिमेंत हा होता.

सुरजमल जाटाची खंडणी बरीच थकली होती. ती तो देईना म्हणून त्यावर स्वारी करण्यांत आली, त्या वेळीं हातास जोडगोळी लागल्यानें हा ठार झाला (स. १७५४). याला भालेराव व मुक्ताबाई अशीं दोन अपत्यें होतीं. याची मुद्रा—म्हाळसाकांतचरणीं तत्पर। मलारजीसुत खंडेराव होळकर.

**खंडो अनंत गंधे**—हा अंताजी माणकेश्वराचा पुत्र. स. १७७९ मध्यें याला व बाबूराव शंकर या दोघांना राघोबादादावरील स्वारींत जाण्याविषयीं नानानें आज्ञा केली ( म. रि. उ. वि. १, पा. २०९ ).

**खंडोजी ऊर्फ चिमणाबापू भोसले—नागपूरकर** (स. १७८९–९० मृत्यु)–हा नागपूरकर मुधोजी भोसल्याचा मुलगा व द्वु. रघूजीचा धाकटा भाऊ होय.

खंडोजीस रघूजीनें ता. २१–४–१७७९ रोजीं दारव्हे, गिरोली, महागांव, खर्डी, धामणी, माहूर, भाम, वगैरे परगणे खाजगीचे सरंजामास दिले होते ( ऐ. प. ले. १६०–६१ पाहा ).

मुधोजीनें नाना फडणीसाच्या समजुतीखातर व निवळ बतावणी करण्याकरितां यास बंगालवर पाठविलें होतें. परंतु हेस्टिंग्ज यानें यास फोडून व यास १६ लक्ष रुपये लुचपत देऊन व आणखी देण्याचें कबूल करून गप्प बसविलें.

मुधोजीनें यास पेशव्यांचे लष्कराबरोबर बदामीचे स्वारीस रवाना केलें. एप्रिल १७८६ मध्यें बदामीचे राज्यांत यानें पुष्कळ शौर्य गाजवलें.

१७६४ त जानोजीनें चिमणाबापूस ओरिसा प्रांतावर सुभेदार म्हणून धाडला. याजबरोबर त्यानें भवानी काळू यासहि पाठविलें होतें. त्यानें शिवभटाचा मोड करून त्यास कटक प्रांतांतून हाकून दिलें.

पहिल्या मराठा इंग्रज युद्धांत मुधोजी पेशवे, निजाम व हैदर यांस मिळाला व त्यानें खंडोजीस ता. ११–८ १७७९ रोजीं दसऱ्याचे सुमुहूर्तानें ४० हजार फौज घेऊन रवाना केलें. चिमणाबापूनें प्रथम बिहार प्रांतांत शिरावें व तिकडून बंगालमध्यें जावें असा क्रम सर्व दोस्तांच्या विचारानें ठरविला होता. या कामास फार तर दोन महिने लागायचे. परंतु मुधोजीचे कानमंत्राप्रमाणें यानें वाटेंत बरेच दिवस रेंगाळून दोस्तांचा विश्वासघात केला. हेस्टिंग्जनें बंगाल्यांतून क. पेली नांवाच्या सरदारास सैन्यासह कटक प्रांतांतून मद्रासेकडे हैदरावर रवाना केला. त्यास यानें सर्व प्रकारची मदत देऊन पुढें रवाना केलें. आपलें मुख्य काम सोडून जगन्नाथाचे यात्रेंतहि यानें एक महिना घालविला.

हा निवळ लढाऊ वीर होता. हा अतिशय धीट व शूर होता. मुधोजीचा भाऊ बिंबाजी यास पुत्र नसल्यामुळें त्यानें चिमणाबापूसच आपला पुत्र म्हणून मानलें होतें, व आपलें ठाणें जें रतनपुर तेथील कारभार आपले मागें चिमणाबापूनें करावा असें बिंबाजीनें ठरविलें

होतें. विंबाजी मेल्यावर त्याचे बायकोनेंहि हीच तजवीज मान्य केली. विंबाजीची बायको आनंदीबाई ही मेल्यावर यानें त्या सुभ्याचा कारभार पाहिला, परंतु हा रतनपुरास राहत नसे.

हा ता. १६-८-१७८९ रोजीं नागपुरास मरण पावला. हा शरीरानें धिप्पाड असून त्या वेळीं याच्या-इतका सशक्त मनुष्य क्वचितच असेल. हा अत्यंत धाडसी व शूर होता. हा सशक्त ऐन पंचविशीच्या वयांत असल्यामुळें व आजारी नसतांना एकदम मरण पावल्या-मुळें रघूजीनें यास जादूनें मारलें असा लोकप्रवाद त्या वेळीं उठला होता. हा रघूजीस आपली वांटणी मागत असे, व त्यामुळें उभयतांचें मन शुद्ध नव्हतें. या-वरून रघूजी व त्याचा विश्वासू कारभारी महादजी लष्करी यांनीं मूठ मारून यास मारलें अशी बातमी उठली.

औरंगाबादकर यांचे अप्रकाशित बखरींत चिमणा-बापूच्या मृत्यूची मिती अश्विन शुद्ध ८ संवत् १८४६ ( ता.१५-१०-१७९० ) अशी दिली आहे. यास पुत्रसंतति नव्हती ( नागपूरकर भोसल्यांचा इतिहास ).

**खंडोजी ( विन धर्माजी ) खोपडे**--हा तर्फ उत्रो-लीचा देशमुख. याचे आणि जेधे देशमुख यांचे देश-मुखीच्या वतनाबद्दल नेहमीं तंटे चालू होते. जेध्यांनीं तपे-शिरवळच्या देशमुखीच्या सनदा निजामशहाकडून आणिल्या त्या वेळीं खोपड्यांनीं मेडखिंडींत खेळोजी जेध्याची वाट रोखून दगा केला. खेळोजी मयत झाला, परंतु त्या गड-बडींत सनदा खोपड्यांच्या हातीं लागल्या नाहींत. या-प्रमाणें कधीं जेध्यांनीं तर कधीं खोपड्यांनीं आपापलीं माणसें जमवून एकमेकांवर चालून जावें, दहापांच लोक प्राणास मुकावेत आणि फिरून पांचदहा वर्षे दोघांनींहि स्तब्ध राहावें, असा या दोन घराण्यांचा क्रम कैक वर्षे चालू होता. प्रमुख सत्तेची ढिलाई तर होतीच, पण खोऱ्यांच्या आणि त्यांमधील किल्ल्यांच्या आश्रयानें अशा कटकटी त्या कालीं वारंवार होत. एकदां जेध्यांनींहि मौजे करनवडें येथें खोपड्यांचें वऱ्हाड निघालें असतां त्यावर छापा घालून सारें लग्नच उधळून दिलें. परंतु पुढें या दोघांसहि या कटकटीचा कंटाळा येऊन यांनीं शिरव-ळच्या हवालदाराकडे गाऱ्हाणें केलें. तेव्हां समस्त दिवाण व गोत यांनीं निकाल दिला कीं, " पातशहांनीं जेधियास देशमुखी दिल्ही हे गोष्टी; परंतु खोपडियांनीं जेध्यांचा मारा केला, व जेध्यांनीं खोपडियाचें वऱ्हाड मारिलें, त्यामुळें खूप दुतर्फा झाले आहेत. याकरितां देशमुखी दो जागा वांटावी " ( रा. खं. १५.३०२ ). या निकाला-प्रमाणें भोर तर्फेची जेध्यांस, उत्रोली तर्फेची खोपड्यांस अशी देशमुखीची फारकत करून मिळाली.

पुढें हा विजापूरकरांचे चाकरीस राहिला. शिवाजीनें साऱ्या मावळच्या देशमुखांस दस्त केलें, त्या वेळीं खंडो-जीनें शिवाजीची सत्ता कबूल केली. तरी विजापूरचे मनसबदार या नात्यानें तो आपणांस विजापूरचा नोकर म्हणवी. या ' दोन डगरींवरील ' धोरणाची कसोटी अफजलखानप्रकरणीं लागली. शिवाजीच्या पारिपत्या-साठीं अफजलखान विजापुराहून निघाला, तेव्हां त्यानें साऱ्या देशमुखांस व मनसबदारांस आपापल्या जमेति-निशीं येऊन मिळण्याचीं फर्मानें काढिलीं. त्या फर्मानां-प्रमाणें खंडोजी अफजलखानास जाऊन मिळाला. अफजल-खानाचे वधानंतर झालेल्या लढाईंत खंडोजीचा पाडाव झाला. कान्होजी जेध्यानें याबद्दल शिवाजीकडे रदबदली केली. शिवाजीनें याचें वतन कायम ठेविलें; पण बेइमानी-बद्दल खंडोजीचा " उजवा हात व डावा पाय कापविला ........ ज्या हातें तरवार धरिली तो हात कापिला " ( जे. क., शि. च. प्र. पृ. ४५ ).

यानें द्रव्याचे लालचीनें शत्रूस मिळून अफझलखानाचा वडील मुलगा फाजलखान व बायकामाणसें यांस आड-वाटेनें पळवून नेऊन कऱ्हाड येथें सुरक्षितपणें पोंचविलें हें वर्तमान शिवाजीस कळतांच त्यानें याचा वरीलप्रमाणें वध केला ( शिवाजी, पा. ७० ).

**खंडोजी घोरपडे**—बाजी घोरपड्याचा जोडीदार.

२. हा एक पेशवाईंतील सरदार होय. जेव्हां हैदरानें मराठ्यांच्या फौजेशीं लढून गुत्तीचा किल्ला काबीज केला, तेव्हां त्यानें यास बेडी घालून गुत्तींतच ठेविलें होतें ( स. १७७७ ).

**खंडोजी फर्जंद**—संभाजी महाराजांचा गुप्त हेर. यानें संभाजीशीं आपलें वैर आहे असा बाहणा करून सीदीकडे नोकरी पत्करली. पण हा याचा कावा एका दासीमार्फत सीदीस कळला. तेव्हां याला पकडून ठार करण्यांत आलें ( संभाजी पा. ४० ).

**खंडोजी माणकर**—हा मराठा सरदार खरबलींचा राहणारा असून स. १७३७-४७ पर्यंत मराठ्यांच्या ज्या लढाया झाल्या त्यांत एक मुख्य लढवय्या होता. मानाजी व संभाजी आंग्रे यांचें भांडण मिटविण्यासाठीं शंकराजी फडक्याबरोबर यास मानाजीच्या मदतीस पाठविलें होतें. पुढें साष्टीबेटावर स्वारी करतेवेळीं सुद्धां खंडोजीनें आपल्या शौर्याचें अपूर्व दिग्दर्शन केल्यामुळें ठाण्याची किल्लेदारी याजकडे सोंपविण्यांत आली. वसईच्या वेळीं सुद्धां यानें

मोठ्या धिटाईनें गुराख्याचा वेष करून सुगावा काढला. यांचे वंशज सध्यां खरवलीस आहेत. यानें वांद्रा, वेसावें, धारावी हीं स्थळें हस्तगत केलीं (म. रि. म. १ पृ.२९४-३००).

**खंडो बल्लाळ चिटणीस**—( जन्म स. १६६८-- मृत्यु १९-९-१७२६ ) हा शिवाजीमहाराजांच्या बाळाजी आवजी चिटणीसाचा वडील मुलगा. याच्या धाकट्या भावास निळोबा म्हणत असत. बाळाजी आवजीबरोबर त्याचा थोरला मुलगा आवजी यासहि संभाजीनें हत्तीच्या पायीं दिलें. बाळाजीस खंडोबा नांवाचा एक काका होता तो हबशाच्या रागास बळी पडला. त्याचेंच नांव बाळाजीनें आपल्या या मुलास ठेवलें.

कलुषानें संभाजीचा हुकूम घेऊन बाळाजी आवजी व त्याचा थोरला मुलगा आवजी यास मारविल्यावर खंडो व निळो या दोघां बंधूंना वाघाच्या तोंडीं देण्याचें त्यानें ठरविलें होतें. पण येसूबाईच्या दूरदृष्टीनें यांचा बचाव झाला. शेवटीं येसूबाईच्या सांगण्यावरून संभाजीच्या ध्यानांत आपली चूक आली आणि त्यानें याच्या घरावरची जप्ती उठवून चिटणिसीचें काम याच्याकडून घ्यावयाचें ठरविलें. त्या वेळीं येसूबाईच्या आश्रयानें हा तेराचवदा वर्षांचा खंडोबा चिटणिसाचें काम उरकीत असे.

संभाजीनें गोव्यावर स्वारी केली तेव्हां हा लेखणीप्रमाणें तलवारहि सफाईनें चालवितो हें सर्वांच्या ध्यानीं आलें.

एकदां संभाजीची स्वारी संगमेश्वरीं असतां त्याची पत्नी येसूबाई तिकडे जाण्यास निघाली. इतक्यांत मोगल सरदारांनीं छापा घालून त्यांना पकडण्याचा घाट घातला. पण यानें मोठ्या समयसूचकतेनें आपली मावसबहीण संतूबाई हीस येसूबाईच्या ऐवजीं पालखींत बसवून पालखी रवाना करण्याची तयारी केली. इतक्यांत मोगलांनीं हल्ला करून ते संतूबाईस येसूबाई समजून घेऊन गेले. पण संतूबाईनें हिरकणी खाऊन आपली अब्रू वांचवली.

संभाजीनंतर राजाराम जिंजीकडे निघाला, त्याच्या विश्वासू मंडळींत हा एक होता. विशाळगडावरून निघाल्यावर सर्वांनीं लिंगायत कापडकऱ्यांचा वेष घेतला. त्या वेळीं राजारामाबरोबर हा, निळो येसाजी, प्रल्हाद निराजी, संताजी घोरपडे, धनाजी जाधव, नेमाजी शिंदे, सेकजी गायकवाड व रंगाजी भोसले इतकीच निवडक मंडळी होती. पहाटेच उठून रस्ता चालावयास लागावें व रात्रीं ठरलेल्या ठिकाणीं एकत्र व्हावें असा संकेत ठरलेला असे. एकदां शौचाहून आल्यावर राजारामाच्या पायावर धनाजीनें पाणी घातलेलें पाहून यांच्या पाळतीवर असलेल्या मुसलमान अधिकाऱ्यास संशय आला. तेव्हां पकडण्यास येण्यापूर्वीच यानें निळो येसाजीखेरीज सर्वांना रवाना करून दिलें, आणि आपण संकटास तोंड देण्यास सज्ज झाला. अधिकाऱ्यांनीं सर्व गेलेले पाहिले तेव्हां याला पकडून चांगलाच मार दिला आणि पांच दिवस अन्नपाण्यावांचून अंधारकोठडींत ठेवलें. शेवटीं तर राखेचे तोबरेसुद्धां दिले, पण 'आम्ही जंगम कापडी आहोंत' हें म्हणणें यांनीं शेवटपर्यंत सोडलें नाहीं. तेव्हां हे जंगम कापडी आहेत अशा समजुतीनें यांना सोडून देण्यांत आलें. आणि हे चंजीस जाऊन राजारामास मिळाले. तेथें खाशा स्त्रियांसह यांची पत्नीहि आली, पण चंजीस आल्यावर याची पत्नी म्हाळसाबाई मृत्यु पावली. राजारामाची स्वारी जिंजीस गेल्यावर झुल्फिकारखानानें जिंजीस वेढा दिला. हा वेढा सात वर्षे होता. वेढा चालू असतांना साताऱ्यास रामचंद्रपंत अमात्याकडे कांहीं महत्त्वाच्या राजकारणासाठीं राजारामानें यास रवाना केलें. या वेळीं याच्याबरोबर याचा वडील मुलगा बहिरव खंडो हा होता. तेथून परत येतांना त्रिवेदी अरुणाचल परगण्यांत तारबियतखान नांवाच्या अंमलदारानें यास कैद केलें. शेवटीं पाहऱ्यावर असणाऱ्या हिंदूशीं संधान बांधून आपला मुलगा बहिरव यास बदली आणून बसविलें. बाहेर पडतांना तटावरून उडी टाकावी लागली, त्यांत पाय दुखावला व हा कायमचा लंगडा झाला. बहिरवाचें पुढें काय झालें याचा पत्ता नाहीं. कोणी म्हणतात मुसलमान होतांच त्यानें जीव दिला.

सात वर्षे चालवूनहि वेढा उठवला जात नाहीं असें पाहून राजारामानें जिंजीहून निघून जाण्याचा बेत ठरविला. ज्या बाजूला शिर्क्यांची चौकी होती तिकडूनच फक्त निघून जाणें शक्य आहे हें ओळखून शिर्के यांना फोडण्याकरितां याची योजना झाली. संभाजीच्या वेळेपासून शिर्के व भोसले यांचे संबंध शत्रुत्वाचे होते. शिर्के यांचे पूर्वज संभाजीनें मारल्यामुळें ते भोसल्यांचे कट्टे वैरी होऊन मोगलांना मिळाले. खंडो बल्लाळाचे पूर्वज संभाजीनें मारले होते तरी तो राजनिष्ठच होता, म्हणून याची नेमणूक शिर्क्यांना फितवण्याच्या कामीं करण्यांत आली. शिर्क्यांनें याचें खासगत दाभोळचें वतन लिहून घेतलें आणि राजारामाला वाट दिली. राजाराम निघून जातांच झुल्फिकारखानानें किल्ला ताब्यांत घेतला आणि याचीं तेथील बायकामुलें कैद केलीं. याला एक दीडदोन वर्षांची मुलगी होती, तिचा लळा झुल्फिकारखानाची पत्नी सरसबाईस लागला. शेवटीं तर मुलगी देत असाल तर तुमच्या मंडळींची मुक्तता

होईल असा खानानें निरोप धाडला व यानेंहि मुलीला देऊन बायकोची सुटका करून घेतली. पुढें राजाराम मेला व शाहू आला. शाहू व येसूबाई यांच्याकडे याचा स्वाभाविक ओढा होता. शाहूलाहि गादीवर बसविण्यास याचेच श्रम उपयोगी पडले. शाहूला हा 'गुप्तपणें भेटला आणि सरदारांना वळविलें' असें शाहूनें याच्या मुलास-जिवाजी खंडोस-दिलेल्या सनदेंत म्हटलें आहे. पुढें शाहू खेमसावंतांशीं लढत असतां उतरणीवरून घोड्यासह घसरला तेव्हां यानें प्रसंगावधान राखून घोड्याचा तोल राखला व शाहूला जिवावरच्या संकटांतून वांचविलें. पण याचें वतन शेवटीं आंग्र्यांचे ताब्यांत गेलें, त्यामुळें या मानी पण कर्तबगार पुरुषास शेवटचे दिवस आर्थिक अडचणींत काढावे लागले आणि शेवटीं स. १७२६ मध्यें मृत्यु आला. याची पहिली बायको म्हाळसाबाई चंदीस वारली. नंतर यानें दोन लग्नें केलीं. याची एक मुलगी मुरारबाजीच्या पुतण्यास दिली होती. त्या जावयास राजारामानें पोतनिशी दिली. याचे वंशज हल्लींचे पुण्याचे पोतनीस होत. यानेंच शिवदिग्विजय नांवाची शिवाजीची बखर लिहिली असें अन्तर्गत पुराव्यावरून दिसतें (वि. स वाकसकर यांनीं लिहिलेल्या चरित्रावरून).

**खाजा इनायतुल्ला**—विजापूरच्या अली आदिलशाहाचा गुरु. इब्राहीम आदिलशाहा शियापंथाविरुद्ध असल्यामुळें याला शियापंथाचा म्हणून देहांतशासन मिळालें.

**खाजा जहान**—(स. १३२५-५१) अहमद मलिक झादा असें याचें मूळ नांव. याचा पिता अयाझ. हा सरकारी इमारतींवर देखरेख करण्याचें काम करी. यास शिल्पकलेची चांगली माहिती होती. स. १३२५ मध्यें यानें मुहम्मद तुघ्लकाच्या सांगण्याप्रमाणें एक शामियाना दिल्लीपासून १०-१२ मैलांवर असलेल्या अफगाणपूर नांवाच्या गांवीं उभारला. घियासुद्दीन तुघ्लक बंगालहून परत येतांना तेथें उतरेल अशी व्यवस्था करण्यांत आली. शामियान्याची रचना लांकडी असून मजबूत दिसे, पण एका ठराविक ठिकाणीं धक्का देतांच सर्व घर कोसळून पडावें अशी योजना होती. त्याप्रमाणें घियासुद्दीन शामियाना कोसळून मारला गेल्यावर मुहम्मद बादशाहा झाला; आणि हा वजीर झाला. आणि याला खाजा जहान ही पदवी मिळाली.

स. १३२६ मध्यें गुर्शास्पचें बंड मोडून दक्षिणेंत शांतता स्थापण्याचें काम यानें केलें. बादशाहाच्या गैरहजेरींत राज्यपालक म्हणून याची नेमणूक नेहमीं होई. इब्नबतूता दिल्लीस आला तेव्हां हा राज्यपालक असून बादशाहा कनोजप्रांतांत होता. स. १३३५ मध्यें लाहोरच्या हुलागूचें बंड यानेंच मोडलें. स. १३४४-४५ च्या सुमारास दक्षिणेंत बंडाळी माजली तेव्हां याला राज्यपालक नेमून बादशाहा दक्षिणेंत गेला. तो सिंधमधील बंडखोर तघी व त्याला आश्रय देणारा जामसाहेब यांचें पारिपत्य करण्याकरितां जात असतां तद्वा शहराजवळ अगोदर येत असलेला ताप वाढून मृत्यु पावला (९ मार्च स. १३५१). गादीचा योग्य वारस फीरूझ सिंधमध्यें बापाजवळ होता. पण यानें तो येण्यापूर्वीच त्याचे धाकटे भावास घियासुद्दीन मुहम्मद असें नांव देऊन गादीवर बसविलें. पण ही गोष्ट इतरांस मान्य नव्हती. शेवटीं फीरूझ येऊन विनविरोध गादीवर बसला. हा फीरूझला शरण गेला तेव्हां त्यानेंहि याला माफी दिली. हा सामानला राहण्याकरितां जात असतां शेरखान नांवाच्या अधिकाऱ्यानें याचा खून केला (स. १३५१).

**खाजा बायशीद लोदी**—सुलतान लोदीचा पुत्र.

**खाजा मीर**—(दर्द पाहा).

**खाजा मुहम्मद नासिर**—हा ऊर्दू कवि अन्दलीब या नांवानें प्रसिद्ध आहे. याचा पुत्र दर्द कवि. याचा कवितासंग्रह 'नालए अन्दलीब' या नांवाचा आहे. याचा दुसरा मुलगा सय्यद मुहम्मद मीर हाहि कवि होता (क. कौ. भा. ४).

**खाजा हिसाम उद्दीन जुनैदी**—(स. १३४७ सुमार) फीरूजशहा तुघ्लक दिल्लीचा सुलतान झाला तेव्हां राज्याच्या वसुलीखात्यांत गोंधळ माजला होता. प्रजेवरील करांचें ओझें इतकें वाढलें कीं, कित्येक प्रांतांतील लोकांनीं शेतजमिनी पडित टाकून लूटमारीचा उद्योग आरंभिला. लिलांवांत भरमसाट रकमा वाढवून वसुलाचें काम पत्करलेल्या सरदारांस कबूल केलेल्या रकमा वसूल करतां न आल्यानें सर्व देशभर प्रांतोप्रांतीं बंडें झालीं. दक्षिणेंत तर जमाबंदी खात्याकडील लोकांच्या बंडांतूनच दख्खनचें स्वतंत्र स्वयंशासित राज्य स्थापण्याची कल्पना निघून ३ आगष्ट १३४७ ला तिकडे बहामनी राज्याची प्रतिष्ठापना झाली. तेव्हां वसुलीखात्याची बिघडलेली घडी पूर्ववत् नीट बसवून वसूल वाढविण्याचे कामावर फीरूझशहानें या कर्तृत्ववान् सरदाराची नेमणूक केली. याची कर्तव्यनिष्ठा श्रेष्ठ दर्जाची असल्यामुळें सहा वर्षे यानें सर्व राज्यांत हिंडून, जमिनी स्वतः पाहून, जमिनीची प्रतवारी केली व त्यांतील उत्पन्नाचें प्रमाण पूर्वापार काय आहे, याचा इतिहास समजावून घेऊन जमिनीवर बसवावयाच्या साऱ्याचें

प्रमाण ठरविलें! सहा वर्षांच्या या दीर्घ प्रयत्नानंतर हिस्सामनें आपला विस्तृत अहवाल सुलतानास सादर केला. फीरूझनेंहि साऱ्याचें प्रमाण कमी केलें. त्याचप्रमाणें पूर्वी नेमणुकीचे वेळीं व सालोसाल सुभेदारांनीं सुलतानास नजराणे देण्याची वहिवाट असे तीहि बंद केली. त्यामुळें शेती सोडून गेलेले लोक पुन्हां शेती करूं लागले. लागवडीचें प्रमाण वाढलें. ओसाड खेडीं पूर्ववत् संतुष्ट शेतकऱ्यांनीं गजबजलीं.

**खाजा हिरवी**—झैनखान कोकचा पिता. याची पत्नी पिच्छाजान.

**खाजा हैदरअली**—( आतिश पाहा ).

**खानखानान**—एक पदवी ( बहिरामखान, त्याचा मुलगा अबदुल रहिमखान, ४ असफखान पाहा ).

२. स. १६४८ विजापूरकराचा एक हबशी सेनापति. मुस्तफाखानानंतर याची नेमणूक झाली होती ( पत्रसारसं. ५४८ ).

**खान जहान**—( बहादुरखान पाहा ).

२. ( स. १३७३–८७ ) फीरूझशाह तुघ्लकाचा मुख्य वजीर. स. १३७३ मध्यें सुलतान फीरूझशाह तुघ्लकाचा विश्वासू वजीर मलिक मकबूल खानजहान वारला. त्याच्या मुलासच वजीराची जागा दिली व खानजहान हा किताबहि दिला. स. १३७४ सालीं सुलतानाचा लाडका मुलगा फत्तेखान वारला, त्यामुळें सुलतान इतका हतबुद्ध झाला कीं, त्याचा उत्साह तर नाहींसा झालाच पण बुद्धीहि मंद झाली, ह्यामुळें याचे हातांत राज्यकारभाराचीं सर्व सूत्रें आलीं; यानें आपल्या सत्तेचा दुरुपयोग केला. स. १३८७ मध्यें यानें फीरूझशहाची अशी समजूत करून दिली कीं, युवराज मुहंमदखानानें कांहीं सरदारांचे मदतीनें सुलतानपद हिरावून घेण्याचें कारस्थान केलें आहे. सुलतानानें चौकशी न करतां कारस्थानांत असल्याचा ज्यांवर आरोप होता, अशांपैकीं महोबाचा सुभेदार झाफरखान यास हिशेब तपासण्याचें निमित्त करून दिल्लीस बोलावून घेतलें व त्यास याचे घरीं अटकेंत ठेविलें. युवराजासहि दरबारांस हजर असतां पकडण्याचा बेत होता, परंतु त्यानें गुप्तपणें सुलतानाची गांठ घेतली; व राजघराण्यांतील कर्त्या पुरुषांचा निःपात करून स्वतः सुलतान होण्याची खानजहानची खटपट आहे, असेंहि त्यानें सुलतानास बजाविलें. तेव्हां सुलतानानें याला कैद करण्याचा हुकूम मुहंमदखानाचे हातीं दिला. मुहंमदखान ससैन्य येत असल्याची बातमी याला अगाऊच मिळाल्यामुळें यानें झाफरखानाचा तात्काळ वध केला. लढाई जुंपली तेव्हां आरंभींच यास वार लागून हा जखमी झाला. त्याबरोबर स्वतःचे घरांत शिरून एका चोरदरवाज्यानें हा निसटला व मेवाडमध्यें जाऊन तेथें चौहाणवंशीय कोकराजाकडे आश्रयास राहिला. फीरूझशहानें राज्यकारभाराचे सर्वाधिकार मुहंमदखानास दिले. त्यानें पहिली गोष्ट अशी केली कीं, घोडदळावरील मुख्य सेनापति सिकंदरखान यास गुजराथची सुभेदारी देण्याचें वचन देऊन याला पकडून आणण्याचे कामगिरीवर पाठविलें. सिकंदरखान मेवाडमध्यें येतांच कोकराजानें याला त्याचे हवालीं केलें, तेव्हां खानजहानचा शिरच्छेद करून सिकंदरखानानें त्याचें शिर दिल्लीस पाठविलें.

३. हुसेन कुली बेग नांवाच्या अकबराच्या सरदाराची पदवी. यानें बंडखोर दाऊदखानाचें डोकें कापून अकबराला आग्रा येथें नजर केलें. हा टंडा येथें मेला ( स. १५७८ ).

**खान जहान फारुकी**—खानदेशच्या फारुकी घराण्यांतील दाऊदखानाचा मुलगा.

**खान जहान बरीद**—( स. १६६२ सुमार ) हा बेदरच्या अमीर बरीदचा नातू. हा वऱ्हाडांत पळून गेला.

**खानजहान लोदी**—(मृ. १० जूनपूर्वी स.१६३१) अफगाण सरदार दौलतखान याचा हा मुलगा होय. याचें मूळ नांव पीरखान. जहांगीरच्या कारकीर्दीत यास खानजहान ही पदवी देण्यांत आली. पुढें चढत चढत हा ५००० च्या मनसबदारीपर्यंत चढला. पुढें जहांगीर मरण पावला तरी याची उन्नति व भरभराट होतच होती. शहाजहाननें तर यास माळव्याची सुभेदारी देण्यासाठीं दिल्ली मुक्कामीं बोलाविलें. पण त्या बोलावण्यांत यास कपटाचा वास आल्यामुळें यानें काढता पाय घेऊन शहाजीचा पक्ष स्वीकारला. पण यापुढें मात्र याच्या वैभवास उतरती कळा लागली. 'खानजहान लोदी' हा ग्रंथ हैबतखानानें लिहिला आहे. बऱ्हाणपूर याच्या जहागिरीचा भाग होता ( पत्रसारसंग्रह. २५६ ). हा गृहस्थ भव्य व देखणा होता. याचा स्वभाव उद्दाम व चैनी होता. हा सुनीपंथाचा असून हिंदूंचा भारी द्वेष करी. जहांगीरची कृपा असल्यामुळें हा दरबारांत प्रसिद्ध झाला. शहाजहान बंडखोरी करून पांचसहा वर्षे भटकत असतां हा पर्वीझबरोबर त्याचा पाठलाग करीत होता. त्यामुळेंच शहाजहानचें व याचें वैर होतें. पर्वीझ स. १६२६ च्या नवंबरांत मरण पावल्यावर याची नेमणूक दक्षिणच्या कारभारावर झाली. जहांगीरच्या शेवटच्या दोनतीन वर्षांत प्रांतिक अधिकाऱ्यांना निश्चित धोरण राखणें कठीण पडूं लागलें. यानें तीन लाख रुपये घेऊन बालाघाट प्रांत निजाम-

शाहाला परत दिला. यामुळें शहाजहानचा उद्योग व्यर्थ गेला. तथापि शहाजहान गादीवर आल्यावर दक्षिणचा सुभा याच्याकडेच कायम ठेवून गेलेला मुलूख परत घेण्याचा हुकूम केला. तो अमलांत येत नाहीं असें पाहून याला भेटीस बोलावलें व कांहीं सजा करणार तितक्यांत हा पळाला ( ५-१०-१६२९ ). याच्याशीं लढाई होऊन याचे दोन मुलगे व जांवई मारले गेले. पण मुर्तजा निजामानें यास हातार्शी धरून बीडचा परगणा जहागीर दिला. पण तो परगणा पाठलाग करणारांनीं घेतल्यावर हा हटत हटत कालिंजरपाशीं ( ता. १०।६।१६३१ ) बुंदीकर मधुसिंगाच्या हस्तें मारला गेला.

**खान मुहम्मद**—(मृ. स. १६५७) यालाच खान-खानाखान मुहम्मद असें म्हणत. हा अली आदिलशाहाचा सरदार. शहाजीला कैद केल्यावर हा जिंजीकडे गेला आणि रूपनायकापासून जिंजीचा किल्ला हस्तगत केला. हा वजीर मृदु वृत्तीचा व समेटानें कारभार उरकणारा होता. म्हणून शहाजीची विजापूरच्या बादशहाकडून यानें गौरवानें सुटका केली ( १६-५-१६४९ ).

यानें औरंगजेबाला चांगलें पेंचांत पकडलें असतां सोडलें म्हणून याला युद्धांतून परत बोलावण्यांत आलें. आणि मक्का दरवाजांतून विजापुरांत शिरत असतां ठार करण्यांत आलें. दिल्लीदरबारनें खंडणीचा पहिल्या वर्षाचा वसूल याच्या कबरीकरितां खर्च केला. औरंगजेब म्हणाला कीं, याचा लबाड मित्र मुल्ला अहमद नाटिया यानें विश्वास-घातानें यास ठार मारलें ( प. सा. ७३६ ).

**खाफीखान**—याचें खरें नांव मुहम्मद हशिमखान असून याचा बाप खाजा मीर हा एक इतिहासकारच होता. खाजा मीर खरा मुरादपक्षाचा फौजेंतील एक उच्च दर्जाचा अधिकारी. मुरादपक्षाच्या पश्चात् तो औरंजेबाच्या पदरीं नोकरीस राहिला. तेथेंच हा लहानाचा मोठा झाला. यानें सैन्यांत व दरबारांत अशी दोन्ही प्रकारें चांगली कामगिरी बजावली. औरंगजेबानंतर २६ वर्षांनीं यानें आपला इतिहास प्रसिद्ध केला. अद्यापि याच्या इतिहासाचें मराठी भाषांतर झालेलें नाहीं. यानें लिहिलेला इतिहास हा शियापंथी असल्यानें यानें औरंगजेबानंतर प्रसिद्ध केला असें म्हणतात.

० यानें केलेल्या ग्रंथाचा कांहीं भाग जुने ग्रंथ, वडील व मित्र यांच्या सांगण्यावरून रचिला आहे. स. १६७८–१७३१ पर्यंतचा भाग मात्र यानें लिहिला आहे. त्यामध्यें मुसलमानांची अवास्तव स्तुति व हिंदूंची निर्भर्त्सना केलेली आढळते. याचें लिखाण पक्षपाती दिसतें. ग्रंथाचें फार्सी नांव मुंतखबुल्लुबाव असें आहे.

**खारवेल**—( ख्रि. पू. १८३–१५२ ) हा कलिंग देशचा सुप्रसिद्ध राजा. हा ऐलवंशांतील होता. याच्या पित्याचें नांव जीवदेव. याची शकावलि पुढीलप्रमाणें आहे. ख्रि. पू. १९४ जन्म. ख्रि. पू. १६९ पश्चिमेकडे सैन्य पाठविलें. १६७ राष्ट्रीक व भोज जिंकले. वज्रराजकन्या धुसी हिच्याशीं लग्न. १६३ राज-गृहावर हल्ला. १५९ पुष्यमित्र शुंगाचा पाणउतारा. १५७ हाथीगुम्फालेख ( शंकर अय्यरकृत कलिंग–शकावली इंडि. अँटि. १९२०. ४३ ). याचे हाथिगुम्फेंतील शिला-लेख सांपडले आहेत. त्यामुळें अनेक ऐतिहासिक गोष्टी निश्चित झाल्या आहेत. अशोकानें कलिंग देशांतील युद्धांत भयंकर कत्तली केल्या, पण त्याच्या मृत्यूनंतर कलिंग-देशच्या चत्रराजानें स्वातंत्र्य जाहीर केलें; आणि त्याचा नातू खारवेल हा इतका बलिष्ठ झाला कीं, यानें ख्रि. पू. १६५ मध्यें मगधावर उलट पहिली स्वारी केली. हा त्यापूर्वी आठ वर्षे गादीवर आला होता. हा धर्मानें जैन होता.

याचें राज्य पूर्व घाटाचा पायथा आणि बंगालच्या उप-सागराच्या किनाऱ्यापासून तेलंगाणच्या उत्तरेपर्यंत पसरलें होतें. थोडक्यांत म्हणजे याचें राज्य ओरिसा आणि गंजम या ठिकाणीं होतें.

यानें हिंदुस्थानच्या पूर्व किनाऱ्यावर ख्रि. पू. १८३ पासून ख्रि. पूर्व १५२ पर्यंत राज्य केलें. ओरिसामध्यें जैनधर्माच्या प्रचारास सुरवात झाल्यापासून अवघ्या १०० वर्षांचे आंत जैनधर्म हा राजधर्म होऊन बसला, असा उल्लेख याच्या एका शिलालेखांत आला आहे. याची बायको वज्र घराण्यांतील असून तिचें नांव धुसीता किंवा गुसीता असें होतें. याच्या पट्टराणीनें जैन श्रमणाच्याकरितां एक देऊळ बांधलें, असा उल्लेख स्वर्गपुरीच्या शिलालेखांत केला आहे. हा नेहमीं आपल्या राणीबरोबर जैन देवालयांत जात असे. याची पट्टराणी ही लालाक राजाची मुलगी होती. लालाक राजा हा हस्तिसाहसाचा नातू होय.

आपल्या सिंधुदा राणीकरितां यानें एक राजवाडा बांधला. त्या राजवाड्याचे दगड उत्तम अशा खाणींतून आणले होते. हा सर्व दृष्टींनीं सर्वोत्कृष्ट राजवाडा होय. या राजवाड्यास एकूण ७५ लक्ष पण खर्च आला.

यानें जैनधर्माचीं तत्त्वें प्रथम नीट समजावून घेऊन व त्यांचें महत्त्व ध्यानांत घेऊन जैन साधूंना मदत केली.

याच्या पदरीं जैन साधु आणि जैन धर्मोपदेशक होते. यानें जैन धर्मास चांगलाच आश्रय दिला होता.

हा आपल्या कारकीर्दीच्या तेरा वर्षांपर्यंत किंवा आयुष्याच्या सदतीस वर्षांपर्यंत जैनधर्मीय होता व यानें त्या कालांत जैनधर्माचा चांगलाच उत्कर्ष केला, असें फ्लीट म्हणतो.

खारवेलच्या वेळीं कलिंग देशांत 'अपभ्रंशप्राकृत' भाषा होती. ही 'अपभ्रंशप्राकृत' भाषा पुढील अर्धमागधी या भाषेच्या पूर्व स्वरूपांत होती.

पंधरावे वर्षी हा युवराज झाला आणि पंचविसावे वर्षी यानें 'महाराज्याभिषेक' हा वैदिक राज्याभिषेक करून घेतला. या अभिषेकावरून असें दिसतें कीं, त्या वेळीं जैनधर्मियांनीं परंपरेनें चालत आलेल्या राजकीय धर्मामध्यें ढवळाढवळ केली नाहीं.

यानें चौदा वर्षेपर्यंत राजपुत्र या दशेंत काढिले; आणि पुष्कळशा कला संपादिल्या. हा चेदी घराण्यांतील होय. या घराण्यांतील राजे 'ऐल' ही पदवी धारण करीत. आपला देश स्वतंत्र आणि आपली सत्ता सर्वश्रेष्ठ व शेजारील राजांनीं आपल्या वचनास मान द्यावा, अशी याची महत्त्वाकांक्षा होती. यानें बरीच मोठी फौज शातकर्णि आंध्र राजावर पाठविली. यापुढें यानें आणखी दोन स्वाऱ्या दक्षिणेंतील आंध्र राजांच्या प्रदेशावर केल्या. यानें शातकर्णि आंध्र राजाचा पराभव केला.

शिपाईगिरीच्या कामांत याचा हातखंडा असल्यामुळें यानें त्या वेळच्या राजकारणांत बरीच मोठी दंगल माजविली होती. हा शौर्याचे आणि राजकारणाचे बाबतींत पुष्यमित्राच्या तोडीचा होता.

यानें कालवे आणि तनसुलीय किंवा तोसलीपासून कलिंग शहरापर्यंत रस्ते बांधिले.

यानें गादीवर आल्यापासून सुमारें आठ वर्षांनीं मगधचे राज्यावर स्वाऱ्या करण्यास सुरुवात केली. हा मौर्य घराण्यांतील अशोकाप्रमाणेंच सार्वभौम होता. त्याचप्रमाणें याची सहनशक्ति अप्रतिम होती. यानें राज्यकारभार उदार मनानें केला असावा असें दिसतें. हा आपणास 'सर्व प्रकारच्या लोकांचा पूजक' असें म्हणवीत असे. यानें 'महाविजय' नांवाचा राजवाडा बांधिला. या वाड्यास एकूण ३८ हजार नाणीं खर्च आला. शेवटीं शेवटीं याला सर्व धर्माविषयीं आदर वाटत असे. यानें आसपासच्या बहुतेक राजांना जिंकून मगधचे राजास आपल्या पायापाशीं प्रणाम करण्यास भाग पाडलें.

मगधच्या पुष्यमित्र शुंगाच्या व याच्या वरचेवर लढाया होत. या लढाया बहुतेक धर्मावरून होत. कारण पुष्यमित्र हा वैदिक( हिंदु )धर्मीय होता आणि खारवेल हा जैनधर्मीय होता. शेवटीं खारवेलनें पुष्यमित्र या शुंग राजाचा पराभव करून शुंगांचें राज्य जिंकलें. मगधचें राज्य जिंकल्यानंतर यानें दक्षिणेकडील शातकर्णी राजांचें राज्यहि आपल्या अमलाखालीं आणिलें. अशा प्रकारें याच्या शौर्याची वाहवा होऊन याची कीर्ति चोहोंकडे पसरली. एवढ्या उच्च पदास पोंचल्यावर पांड्य राजांनीं सुद्धां सहानुभूतिदायक मोठा नजराणा याच्याकडे पाठविला. अशा प्रकारें हा एक त्या वेळीं मोठा राजा होऊन गेला.

यासंबंधीं जर्नल ऑफ बिहार ओरिसा रॉयल एशियाटिक सोसायटीच्या तिसऱ्या व चवथ्या व्हॉल्युममध्यें विस्तृत माहिती आली आहे.

हा गादीवर आल्यानंतर दुसऱ्याच वर्षी कलिंगाच्या पश्चिम दिशेकडे शातकर्णीवर आपलें सैन्य पाठविलें, तेव्हां कृष्णावेण्णा नदीच्या कांठीं गेलेल्या याच्या सैन्यानें मूषिकनगर जाळून टाकलें, असें याच्या हाथिगुम्फेतील शिलालेखावरून दिसतें. हें मूषिकनगर कृष्णावेण्णेच्या कांठीं असून तेथें शातकर्णीचें राज्य होतें असें दिसतें. कृष्णानदीला त्या वेळीं कृष्णावेण्णा असें म्हणत असत ( विविधज्ञानविस्तार ५८. पा. ४५८ ).

हा खि. पू. ८० च्या सुमारास गादीवर आला, आणि यानें खि. पू. ७२ मध्यें राजगृहास वेढा घातला, असें रामप्रसाद चंदानें लिहिलें आहे. पण खि. पू. १८३ ते १५२ असा याचा काल आजपर्यंत ठरविलेला होता.

शुंग घराण्यावर लिहिणारे रॅप्सन, जयस्वाल, स्टेन वगैरेसारखे लोक खालीलप्रमाणें उल्लेख आपल्या लिखाणांत करितात.

'शुंग घराण्यांतील राजा पुष्यमित्र हा व कलिंग देशचा राजा खारवेल हे दोघे समकालीन होते. पुष्यमित्र राजगृह येथें असतां खारवेलनें राजगृहास वेढा घातला.'

वरील विधान एकंदर विचार करितां चुकीचें ठरतें. कारण पुष्यमित्राच्या वेळीं शुंग घराण्याची सत्ता कळसास पोंचली होती व आपण सर्वश्रेष्ठ आहोंत हें दर्शविण्यासाठीं पुष्यमित्रानें 'अश्वमेध' यज्ञ आरंभिला होता. अशा परिस्थितींत खारवेलच्या मगधवरील स्वाऱ्या आणि त्याचा राजगृह येथील वेढा या गोष्टी संभवतील असें वाटत नाहीं. तेव्हां हाथिगुंफा येथील शिलालेखांत उल्लेख केलेल्या याच्या मगधवरील स्वाऱ्या व राजगृह येथील वेढा, ह्या गोष्टी शुंग घराण्याच्या पडत्या काळांत झाल्या असल्या पाहिजेत.

खि. पू. पहिल्या शतकाच्या पूर्वार्धांत शुंग घराण्याची सत्ता मोडकळीस आली होती. यावरून खारवेलचा काल खि. पू. पहिल्या शतकाच्या पूर्वार्धात येतो. शुंग घराण्यांतील देवभूतीस वसुदेव कण्वानें ठार मारून आपण गादी बळकाविली. हा देवभूति शुंग घराण्यांतील शेवटचा राजा होय. त्याच्यावर खारवेलनें स्वाऱ्या करून शुंग घराण्याचा नाश केला. याच वेळीं आंध्र राजा शातकर्णी याच्या स्वाऱ्या शुंग घराण्यावर होत होत्या ( I. H. Q. Vol. 5, p. 587–613 ).

**खिजरखान**—( स. १५४० ) बंगालचा राजा.

**खिजरखान खल्जी**—( स. १३१२–१८ ) हा अलाउद्दीन खल्जीचा वडील मुलगा. यास स. १३१२ मध्यें युवराजपद देण्यांत येऊन राजछत्र वापरण्याचा मान देण्यांत आला. याच्या शिक्षणाकडे बिलकुल लक्ष दिलेलें नव्हतें. गुजराथच्या कर्णाची मुलगी देवलदेवीशीं याचें लग्न झालें ( स. १३०७ ). अमीर खुस्त्रव नांवाच्या कवीनें या दोघांच्या शृंगारविलासावर लिहिलेलें काव्य प्रसिद्ध आहे.

चितोड घेतल्यावर याला तेथील राजा केला, व चितोडचें नांव खिजराबाद ठेवलें. पण रजपुतांच्या विरोधामुळें हा तेथें सुखानें राहूं शकत नव्हता. तसेंच दिल्लीची बादशाही अलाउद्दीनाच्या कारकीर्दीत खिळखिळी झाली होती. मलिक काफूर हा कारस्थानी व जबरदस्त गृहस्थ बापलेकांचें वितुष्ट उत्पन्न करी. अशा स्थितींत याला कारस्थानें करावयास सांपडूं नयेत म्हणून चितोडचा किल्ला मालदेव सोनगरे चौहान जालोरकर याच्या ताब्यांत देऊन यास दिल्लीस यावें लागलें.

याचें व बापाच्या विश्वासांतील काफूरचें वांकडें होतें. शेवटीं त्या कारस्थानी पुरुषाला यश येऊन याला राज्याला मुकावें लागलें. अलाउद्दीन आजारी असतां यानें किंवा याच्या आईनें त्याच्या शुश्रूषेकडे लक्ष न देतां आपले ऐषआरामाचे कार्यक्रम अखंड चालू ठेवले होते. हा पोलो, नाचगाणें यांत गर्क असे. आणि आईस लग्नें जुळवून तीं समारंभानें पार पाडण्याचा नाद होता. तिनें अलफखानाच्या मुलींचें लग्न आपला मुलगा शादीखानाशीं ठरवून मंजुरी मागितली. याचा फायदा काफूरनें घेतला आणि राज्यक्रांतीचा कट आहे असें भासविलें. तात्काळ हा, शादीखान व आई यांना तुरुंग दाखविण्यांत आला आणि अलफखानाचा वध करण्यांत आला. काफूरनें उमरला गादीवर बसवून याचे डोळे काढले. पण काफूरचा खून करून मुबारक गादीवर आला. त्यानें याला ठार केलें.

**खिजरखान बहादूरशाह**—(स. १५५५) बंगालचा राजा.

**खिदरखान**—( हंबीरराव मोहिते पाहा ).

**खुदावंद झाद**—( स. १३५८ ) ही घियासुद्दीन तुघ्लकाची मुलगी. हिचा नवरा खुश्रव मलीक. घियासुद्दीन सिंधकडे वारला, तेव्हां हिनें आपला मुलगा दावर मलीक यास तक्तावर बसविण्याचें ठरविलें. आणि फीरूझ तुघ्लकला आपल्या घरीं जेवावयास बोलावून त्याचा खून करविण्याचा बेत केला. त्याप्रमाणें तो आला असतां दावर मलिकनें इषारा दिल्यावरून तो वांचला.

**खुम्माण गुहिलोत**—( स. ७५३–७७३ ) हा मेवाडचा राजा काळभोज ऊर्फ बाप्पा रावळ याचा पुत्र. हा त्याच्यानंतर गादीवर आला. याचें नांव अद्यापि राजपुतान्यांत प्रसिद्ध आहे. कर्नल टॉडनें याच्या वेळीं बगदादचा खलीफा अल्मामू यानें चितोडवर स्वारी केल्याचें लिहिलें आहे, पण ती चूक असून दुसऱ्या खुम्माणच्या वेळीं स्वारी झाली होती.

हा हिन्दी भाषेंतील कवि होता. याच्यावर दलपतविजय नांवाच्या कवीनें खुमानरासो नांवाचें काव्य लिहिलें. त्यांत यानें केलेल्या चोवीस युद्धांचें वर्णन आहे.

२. ( स. ८२८-५३ ) मेवाडच्या गादीवर हा सिंहानंतर आला. याच्या वेळीं बगदादच्या खलीपानें चितोडवर स्वारी केली होती त्यांत हा विजयी झाला, असें खुंमाणरासोवरून दिसतें. पण त्यांतील पुष्कळसें वर्णन काव्यमय आहे. कर्नल टॉडनें त्यावरून माहिती दिली आहे. बगदादचा अब्बासिया खानदानमधील अल्मामू हा याच्या वेळीं खलीपा होता ( स. ८१३–८३३ ). यापूर्वींच त्यांनीं सिंध जिंकला असून राजपुतान्यावर स्वाऱ्या होत होत्या. याच्यानंतर माहयक किंवा खुंमाण तिसरा हा गादीवर आला.

३. ( स. ८७८-९०३ ) मेवाडच्या गादीवर महायकानंतर आला. याच्यानंतर भर्तृभट गादीवर आला.

४. ( स. १८२२ ) एक हिंदी कवि होय. हा बंदीजन असून बुंदेलखंडचे महाराजा विक्रमसिंह यांच्या आश्रयास होता. यांनीं तयार केलेल्या ग्रंथांपैकीं खालील ग्रंथ उपलब्ध आहेतः

( १ ) अमरप्रकाश, ( २ ) अष्टजाम ( स. १८५२ ), (३) लक्ष्मणशतक, (४) हनुमान, (५) नखशिख वगैरे.

यांनीं 'खुमान' काव्यांत आपलें उपनांव 'मान' असें लिहिलें आहे.

**खुस्रव**—( स. ६२५ ) इराणचा राजा. पुलकेशी चालुक्यानें याच्याकडे इराणमध्यें वकील पाठविला होता, व यानेंहि पुलकेशीकडे वकील पाठविला होता. परराष्ट्रीय राजकारणाच्या दृष्टीनें ही गोष्ट महत्त्वाची आहे ( म. यु. भा. १.२. १८१ ).

**२.** ( स. ११५२–११६० ) हा बहराम गझनवीचा मुलगा. हा स. ११५२ मध्यें गझनीचा अमीर झाला. याचे कारकीर्दीत तुर्कमान लोकांपैकीं घुझ्झ नांवाच्या टोळीनें खुरासान प्रांतावर स्वारी करून संजरला पराभूत करून कैद केलें. तो त्यांच्या कैदेंत असतां स. ११५७मध्यें वारला. खुरासान प्रांतांतून तुर्कमान लोकांनीं गझनीकडे मोर्चा वळविला. तेव्हां भिऊन हा लाहोरला आला; तेथें स. ११६० मध्यें मरण पावला. सबक्तगिननें स्थापिलेल्या गझनवी राजवंशाच्या विस्तृत साम्राज्यांपैकीं स. ११५७ मध्यें खुस्रवच्या कारकीर्दींत फक्त पंजाबच काय तो गझनवी वंशाकडे शिल्लक राहिला. घुझ्झ तुर्कमान लोकांचे ताब्यांत गझनी पुढें १० वर्षेपर्यंत राहिली व नंतर गझनीचें राज्य घुरचे राजघराण्याचे ताब्यांत गेलें.

**३.** ( स. ११६०–११९२ ) हा खुस्रशाह गझनवीचा मुलगा, हा त्यानंतर गादीवर आला. खुस्रवशाहचे कारकीर्दींत गझनीचें राज्य याच्या सत्तेखालून जाऊन घुझ्झ तुर्कमानांच्या हातीं गेलें होतें; त्यामुळें हा गझनवी घराण्यांतील अमीर असूनहि याचे अमलाखालीं त्याच्या घराण्याच्या मोठ्या साम्राज्यापैकीं फक्त पंजाबच काय तो शिल्लक राहिला होता. राज्याचा एक एक प्रांत परक्यांच्या हातीं जाऊं लागला तरीहि हा सुखोपभोगमग्न राहिला. स. ११८१ मध्यें मुइझ्झुद्दिन मुहंमदानें लाहोरवर चालून येऊन लाहोरसमोर तळ दिला. तेव्हां हा त्यास शरण गेला. शरणागतत्वाचें प्रदर्शन करण्याकरितां आपला आवडता हत्ती व एक मुलगा ओलीस पाठवावा लागला. मुइझ्झुद्दिन मुहंमद पुढें अधिक त्रास न देतां सियालकोटला गेला व तेथें हल्लीं असलेला सुप्रसिद्ध किल्ला बांधिला. सियालकोट घेण्याचा यानें एकदां प्रयत्न केला पण तो अयशस्वी झाला. स. ११८६मध्यें मुइझ्झुद्दिन मुहंमदनें पुन्हां लाहोरवर स्वारी केली व याला विश्वासघातानें पकडलें. पुढें तो जलालुद्दीन मुहंमद याजवर स्वारी करण्यास निघाला तेव्हां त्यानें याची घातुक अडचण होईल म्हणून यास ठार केलें ( स. ११९२ ).

**४.** ( जन्म स. १२५३–मृ. स. १३२५ ) फार्सी कवी. यमीन उद्दीन मुहम्मद हसन ऊर्फ अमीर खुस्रव असें याचें नांव आहे.

हा ज्या हिंदी कवींनीं फार्सी भाषेंत काव्यरचना केली आहे अशा कवींपैकीं एक अतिश्रेष्ठ कवि आहे. याचें घराणें मूळचें तुर्की. याचा बाप तुर्कस्थानांतील काश शहरचा रहिवासी. तेराव्या शतकाच्या पूर्वार्धांत चंगीझखानाच्या मोगल स्वारांनीं तुर्कस्थानांत धुमाकूळ घातला तेव्हां जे तुर्क लोक आश्रयार्थ हिंदुस्थानांत आले त्यांत अमीर खुस्रवचा बाप होता. अमीर खुस्रव पतियाला येथें स. १२५३ मध्यें जन्मला. कविता लोकप्रिय होऊं लागल्यावर अलाउद्दीनाचे दरबारी राजकवीचे जाग्यावर यास राजाश्रय मिळाला. उतारवयांत यास उपरति होऊन यानें शेख निजामुद्दीन अवलियाचें शिष्यत्व पत्करिलें व सर्वसंगपरित्याग करून यानें कडक धर्माचरण अंगिकारिलें. तरी कविता करण्याचा मात्र त्याग केला नाहीं. याचा काव्यसंभार प्रचंड आहे. यानें स्वतः केलेल्या मोजदादीप्रमाणें लक्ष पंक्ती रचिल्या. आपल्या कवितांचे यानें चार वर्ग पाडिले आहेत, पहिल्यांत तारुण्यांतील स्वैरविलासी कवितांचा, दुसऱ्यांत मध्यम वयांतील काव्यांचा, तिसऱ्यांत पोरकटपणा टाकून धर्मविचारांकडे ओढा होऊं लागला अशा प्रौढ वयांतील कवितांचा व शेवटच्या वर्गांत बुद्धि स्थिर होऊन धर्मोपदेश करण्यास अनुकूल भूमिका प्राप्त झाल्यावर लिहिलेल्या कवितांचा यानें समावेश केला आहे. दुसऱ्या वर्गांतील कवितांमध्यें ज्यानें राजाश्रय देण्याचे उपकार केले त्या राजैश्वर्याच्या अभिमानी सुलतानास समाधान वाटेल अशा राजस्तुतिपर अनेक कविता आढळतात. याला कविश्रेष्ठ सादीसंबंधीं फार आदर वाटे. कविश्रेष्ठ सादी हिंदुस्थानांत आला तेव्हां यानें त्याचा मोठा सन्मान केला व सादीनेंहि याची अलाउद्दीनाकडे शिफारस केली. हा ३ एप्रिल १३२५ रोजीं वारला ( कें. हि. ). याची कबर जुन्या दिल्लींत आहे.

ज्या वेळेस अलाउद्दीननें दक्षिणेंत स्वारी केली तेव्हां हा त्याच्याबरोबर होता. हा संगीतामध्यें निष्णात होता. याला मुसलमानी व हिंदी असे दोनहि राग येत असत. यानेंच प्रथम ख्यालाचें गाणें काढलें. शूर सरदार, शहाणा मुत्सद्दी, लोकप्रिय कवि व गायनपटु असा याचा लौकिक होता. यानें निरनिराळ्या विषयांवर ७२ ग्रंथ केले. त्यांत कांहीं संगीतशास्त्रावरहि आहेत ( प्रतापरुद्र पाहा ).

यानें मोंगलांचें वर्णन चांगलें केलें आहे. " लोहमय शरीर, विस्तवासारखे चेहेरे, आंखूड मान, सुकलेले गाल, केसाळ व रुंद नाकपुड्या, अजगरी तोंडें, रांठ कांतडी, व दुर्गंधीयुक्त शरीर, ह्यांच्या योगानें कोण मनुष्य भिऊन गर्भगळित होणार नाहीं ! हीं भुतें पाहून

लोक दूर पळून जात आणि म्हणत, " देवानें हीं कशाचीं घडलीं आहेत कोण जाणे ! " याशिवाय यानें खल्जी घराण्यांतील खिजरखान व देवलदेवी यांच्या प्रणयलीलें-विषयीं फार्सी भाषेंत एक सुरेख कवन रचिलें आहे.

यानें काव्य व इतिहासविषयक ग्रंथ लिहिले. त्यांपैकीं 'आशिकी' अथवा 'दवलरानी व खिज्रखाँ' 'किरनुस्सादैन' 'खजायनुल् फुतूह' हे प्रसिद्ध आहेत.

५. (स. १५८७-१६२२) हा बादशहा जहांगिरचा सर्वांत वडील मुलगा. याची आई राजा मानसिंगची बहीण होय. याच्या जन्मानंतर तिला शहा बेगम ही पदवी मिळाली. हा दक्षिणेंत मरण पावला.

हा आपल्याविरुद्ध कारस्थानें करील म्हणून शहाजहाननें यास दक्षिणेंत बरोबर आणलें. आणि ता. २४-४-१६२२ च्या सुमारास यास बहुतेक त्यानेंच ठार केलें.

मरतेसमयीं याचें वय ३६ वर्षांचें होतें. याची आई व हा यांना नजिकनजिकच पुरण्यांत आलें. याच्या कबरीवर बऱ्याच करुणरसपर कविता लिहिल्या आहेत. 'माअसीर कुत्बशाही' नांवाच्या पुस्तकांत, शहाजहाननें रेझा नांवाच्या इसमाकडून यास मारविलें, असें म्हटलें आहे (बील).

६. (खुदावंद झाद पाहा).

७. (४ हसन पाहा).

**खुश्रुशेट मोदी**— (स. १७५५-१८१४) याचें नांव खुसरवानजी जमशेटजी मोदी असेंहि आढळतें. याचें मूळगांव खंबायत. हा जातीचा पारशी असून पेशव्यांच्या दरबारचा रेसिडेंट क. क्लोज याचा एजंट असे. प्रथम मॅलेटनें यास इकडे आणलें. पुढें हा सदाशिव माणकेश्वराच्या हाताखालीं राहून इंग्रजां-कडे पेशव्यांचे तर्फे काम करी. एल्फिन्स्टन पुणें कारभारा-वर येण्याच्या पूर्वीपासून पुढें सोळा वर्षे इंग्रजांचें काम याच्या तंत्रानें चाले. पेशव्यांनीं याला कर्नाटकांत नेमलें होतें. हा हुषार व लटपट्या असल्यामुळें दोघांना खूष ठेवून स्वतःचा फायदा साधण्याचें याचें धोरण होतें. याच्या हुषारीबद्दल यास श्रीमंतांनीं गुजराथेंतील रालेज वगैरे पांच हजारांची जहागिरी दिली होती. क. क्लोजचा याजवर विश्वास असल्यामुळें तो बहुतेक हिंदी कारभार याच्या मार्फतच करीत असे. इंग्रजांशीं संधान बांधण्याचें ठरवून माणकेश्वर व बयाजी नाईक हे मोदीशीं सलगी करूं लागले; परन्तु रावबाजींचा मोदीवरच जास्त विश्वास असल्यामुळें सदाशिव माणकेश्वर व बयाजी मोदीचा द्वेष करूं लागले. व द्वेषाचा परिणाम मोदीवर लांच खाल्याची फिर्याद ठोकण्यांत झाला. परंतु आपलीं बिंगें बाहेर पड-तील या भीतीनेंच श्रीमंतांनीं ती फिर्याद काढून टाकण्यास रसेलला सांगितलें. या श्रीमंतांच्या कृत्यानें मोदी खूष झाला. पुढें याच्याच ताब्यांत स. १८०५ ते १८२१ पर्यंत रेसि-डेन्सी होती असें म्हटलें असतां फारसें वावगें होणार नाहीं.

एल्फिन्स्टनला मोदीचा स्वभाव आवडत नसे. याचें मुख्य कारण असें कीं, स्वतः एल्फिन्स्टन पेशवाई उलथून पाडण्याचा नाना तऱ्हेचे प्रयत्न करीत होता व ते त्याचे प्रयत्न अगर हेतु कदाचित् मोदीच्या हातून श्रीमंतांस कळतील व आपला कार्यभाग साधला जाणार नाहीं असें त्यास वाटे. याकरितां मोदीस एल्फिन्स्टननें असा लेखी निरोप पाठविला कीं, 'आपण एक सुभेदारी तरी करा नाहीं तर एजन्ट म्हणून तरी रहा. दोन्ही कामें एकाच वेळीं करणें इष्ट नव्हे' त्यावर उत्तरादाखल सुभेदारी सोडल्याचें यानें कळविलें. त्याच वेळीं गंगाधरशास्त्री पटवर्धन हा गायक-वाडांचा तंटा तोडण्यास आला होता. त्यास मोदीचा फार राग येत असे. तेव्हां त्यानें मध्यस्थी करून याचें एजन्टाचें काम काढून घेतलें व याच्या कामगिरीबद्दल यास ५०० रु. पेन्शन देण्याचें ठरविलें.

तहानें पेशवे हतप्रभ झाले; पुन्हां ऊर्जितावस्थेंत आणावें या उद्देशानें मोदीनें बरीच खटपट चालविली. त्यावर फितुरीचा आरोप ठेवण्याची एल्फिन्स्टननें परा-काष्ठा केली, पण व्यर्थ. अखेर मोदीला आपल्या इनाम गांवीं जाण्याची सूचना देण्यांत आली; तरीहि तो बरेच दिवस पुणें मुक्कामींच होता. पुढें याचें गुजराथेंत जाण्याचें बहुतेक ठरलें होतें. पण जावयास निघणार तोंच एका रात्रीं एकाएकीं मरण पावला. याच्या मरणाविषयीं बऱ्याच आख्यायिका प्रसिद्ध आहेत (मं. अहवाल १७३८; दुसरे बाजीराव यांची राजनिशी).

हे पारशी असूनहि 'हे विनंती' बाळबोधींत लिहीत असत. यांचे वंशज सध्यां रालेज (जि. खेडा) येथें आहेत. स्वतःचे बेत माहीत असल्यानें पेशव्यांकडून याला काढून लावणें असाध्य झाल्यानें एल्फिन्स्टननें यांना विष-प्रयोग करून ठार केलें (माघ व. ५. १७३६). पुण्याचा मोदीचा गणपति यांचाच होय.

**खेता**—(क्षेत्रसिंह पाहा).

**खेमसावंत**—हा फोंड सावंताचा मुलगा होय. हाच सावंतवाडीचा राज्यसंस्थापक म्हणतां येईल. यानें स. १६२७ सालीं विजापूरकराकडून देशमुखी मिळवून तिचा १४ वर्षे उपभोग घेतला. याच्यानंतर याचा पुत्र लखम सावंत गादीवर आला.

२. ( स. १६७५–१७०९ ) हा शूर सावंतानंतर स. १६७५ सालीं गादीवर आला. हा शूर सावंताचा पुतण्या होय. याच्या पित्याचें नांव फोंडसावंत. यानें आपला फौजफाटा वाढवून त्याचा शिवाजीविरुद्ध उपयोग केला. पोर्तुगीजांच्या मागें संभाजी लागला तेव्हां त्यांनीं यास फोडून आपल्याकडे घेतल ( स. १६८५–८६ ). यानें मोठ्या पराक्रमानें पोर्तुगीजांना नामोहरम करून आपल्या राज्याचा विस्तार केला व कुडाळच्या प्रभूंना जिंकून स्वतंत्र झाला. यानें चराठें हें राजधानीचें ठिकाण करून तेथें मोठी वस्ती करविली. याच गांवाला पुढें सुंदरवाडी म्हणूं लागले. शाहूनें याची सरदेशमुखी कबूल केली व कुडाळ आणि पंचमहाल यास इनाम दिले. हा स. १७०९ मध्यें निवर्तला. याच्यामागून फोंड सावंत गादीवर आला.

३. ( स. १७५५–१८०३ ) हा रामचंद्र सावंताचा मुलगा. गादीवर आल्यानंतर यानें मागें झालेल्या अपजयाचा वचपा काढून पोर्तुगीजांपासून गेलेला मुलूख परत मिळविला ( स. १७९१ ). जिवबादादा बक्षी यानेंच या सावंताला हाताशीं धरून संस्थानाला ऊर्जितावस्था आणली. हा स. १८०३ मध्यें निपुत्रिक मरण पावला.

हा शिंद्यांचा नातेवाईक असून सखुबाई शिंदे हिचा जांवई होता. याचेकरितां महादजी शिंदे यांनीं दिल्लीच्या बादशाहकडून ‘ राजे बहादूर ’ हा किताब व मोर्चेलाचा अधिकार मागून घेतला. वस्तुतः सावंतवाडीकर हे पेशव्यांचे मांडलिक असल्यामुळें त्यांना कोणताहि बादशाही किताब पेशव्यांच्या परवानगीवांचून स्वीकारतां येत नसे. परंतु महादजी यांनीं मिळविलेला किताब सखुबाई शिंदे यांचे मार्फत परस्पर सावंतवाडीकर यांच्याकडे गेला, आणि यांनीं आनंदाच्या तोफा सोडून त्याचा स्वीकारहि केला. ही बातमी नाना फडणीसास कळली. त्यांना ही गोष्ट नापसंत पडून याचा राग आला, व त्यांनीं महादजी शिंद्यांकडे तक्रार केली. परंतु महादजीनें मोठ्या युक्तीनें उत्तर देऊन आपल्यावरील जबाबदारी टाळण्याचा प्रयत्न केला. परंतु नानांनीं याच्याकडून नजरेदाखल कांहीं रक्कम घेतल्यावांचून यास हा बादशाही मान उपभोगूं दिला नाहीं. यासंबंधाचें एक खाजगी पत्र शिंद्याकडील बातमीदारानें नानास लिहिलें आहे तें उपलब्ध आहे ( ऐ. टि. ४४ ).

**खेळोजी रुस्तुमजी भोसले**—हा नांदनजच्या ( बार्शी सोलापूर रस्त्यावर ) रुस्तुमजी भोंसल्याचा मुलगा होय. याला परसोजी नांवाचा एक धाकटा भाऊ होता. तो जिंतीकर भोसल्यांचे घराण्यांत दत्तक गेला होता.

हा नांदनज मुक्कामीं वडिलार्जित वतनदारीवर होता. शाहूमहाराज मोंगलाईतून परत येत असतां यास बरोबर घेऊन साताऱ्यास आले, व त्यांनीं यास आपले आप्त समजून नांदनज व भांबोरें येथील मोकासा अंमल देऊन राजपत्रें करून दिलीं. तेव्हांपासून हें घराणें स्वराज्याच्या अन्नोदकाचें ऋणी होऊन राहिलें आहे.

हा सातारा मुक्कामीं वारला असें म्हणतात. यास चार मुलगे होते. त्यांचीं नांवें अनुक्रमें-शाहाजी, कक्काजी, रुस्तुमजी व सुभानजी अशीं होतीं. या चौघांत वरील दोनहि गांवांची वतनदारी वांटली गेली आहे. म्हणजे दोन्ही ठिकाणीं या चार भावांचे चार वाडे, चार विहिरी, चार मळे अशी व्यवस्था केली गेली असून अद्यापि वरीलप्रमाणेंच वतन-बाबीचे किंवा मानपानाच्या हक्काचे प्रथमतः वरील चार घरांचे नांवानें चार हिस्से करण्याची वहिवाट कायम आहे ( मं. समग्र सं. वृ. श. १८४१ पृ. ६८ ).

**खेळोजी विठोजी भोसले**—( मृ. स. १६३९ ) शहाजीचा हा चुलत भाऊ असून विठोजीचा पुत्र होय. हा मालोजी भोसल्याचा सख्खा धाकटा भाऊ. हा वेरूळ मुक्कामीं आपल्या वतन-गांवीं राहत असे. यास निजामशाहींतून मनसबदारी मिळत असे. खंडागळे यांच्या हत्तीवरून झालेल्या लढाईंत हा व शहाजीराजे असे मिळून लुकजी जाधवाबरोबर लढले. त्यांत शहाजी जखमी झाला, खेळोजी पराभूत झाला व याचा भाऊ संभाजीला मारून आपल्या मुलाच्या म्हणजे दत्ताजी जाधवाच्या मृत्यूचा सूड त्यानें उगवला. पण मुर्तजा निजामशहानें खेळोजीची बाजू घेतली. त्यामुळें सुरक्षितपणाकरितां लुकजी जाधवराव मोंगलांच्या आश्रयास गेला ( स. १६२१ आक्टोबर ). खेळोजी व इतर मालोजी वगैरे भाऊ यांच्यांत विघाड होऊन वांटणी झाली ( स. १६२२ ). पुढें याचें शहाजीशीं भांडण होऊन शहाजीनें निजामशाही सोडली आणि हा शहाजहानला मिळाला. शहाजीप्रमाणेंच यानेंहि शहाजहानचाच पक्ष स्वीकारला ( स. १६२९ ). शहाजहाननें याला पंचहजारी केलें; परंतु लौकरच शहाजहानची नोकरी सोडून यानें आदिलशाहींत नोकरी धरली ( स. १६३३ ) व मोंगलांविरुद्ध लढूं लागला. त्या वेळीं याची बायको गोदावरीवर स्नान करीत असतां तिला मोंगलांनीं पळविलें. तेव्हां चार लाख रुपये दंड भरून तिला यानें सोडविलें. पुढें नोकरी सोडून खेळोजी आपल्या

जहागिरीच्या गांवीं जाऊन वेरूळच्या आसपास वाटेल तसा धुमाकूळ घालूं लागला. तेव्हां दख्खनचा सुभेदार औरंगजेबानें यास पकडून १६३९ आक्टोबरांत ठार मारलें.

याला आठ मुलगे व एक मुलगी अशीं नऊ अपत्यें होतीं. त्यांपैकीं वडील मुलगी अंबिकाबाई ही जाधवरावाचे घरीं दिली होती. संभाजी, खेळोजी, मालोजी, कवाजी, नागोजी, परसोजी, त्रिंबकजी व आठवा कक्काजी अशीं याच्या मुलांचीं नांवें होतीं ( मं. सप्तम सं. वृत्त. पृ. ६६ ). याशिवाय हिलाल नांवाचा याचा एक क्रीतपुत्र होता असें शिवभारतावरून दिसतें ( शिवभारत, १७.५३;२३.५५).

**खेंगार**—( ३ अभयदेव सूरि पाहा ).

**खैर्यत सिदी**—जंजिऱ्याचा सिदी. प्रथम राजपुरी येथें होता. नंतर हा जंजिऱ्यावरील अधिकारी झाला. स. १६७१ मध्यें शिवाजीचा पाडाव करणारांत हा होता.

**खोत्तिग राष्ट्रकूट**—( स. ९६५–६ राज्यारोहण ) मालखेडच्या राष्ट्रकूट घराण्यांतील तिसऱ्या अमोघवर्ष राष्ट्रकूटाचा पुत्र. हा आपला भाऊ तिसऱ्या राष्ट्रकूटानंतर गादीवर आला. याच्या कारकीर्दीत राष्ट्रकूट सत्तेच्या नाशास सुरवात झाली. राष्ट्रकूट सत्तेस पहिला धक्का उत्तरेकडून परमारांनीं दिला. याच्या कारकीर्दीत परमारराजा शीयक किंवा श्रीहर्ष यानें मान्यखेटावर चाल करून तें शहर लुटलें ( स. ९७१ ). या पराभवानंतर हा लवकरच स. ९७२ च्या सुमारास मरण पावला ( राष्ट्रकूट १२४–१२५ ).

**खोलेश्वर**—यादवकाळीं बऱ्याच ब्राह्मणांनीं तरवार उचलली होती. त्यांपैकीं खोलेश्वर ही एक प्रख्यात व्यक्ति होती. हा सिंघण यादवाचा सेनापति असून मुद्गलगोत्रीय ऋग्वेदी ब्राह्मण होता. यानें बऱ्याच स्वाऱ्या गुजराथेवर करून वाघेलांना जिंकलें. सिंघणाच्या ताब्यांतील मुलूख वाढविला. याचा काल स. १२०० ते १२५० येतो. यानें संघक्रोश ( अजिंठ्याच्या डोंगरालगतचा भाग ) जिंकून तेथें आपली वस्ती केली. यानें शेंदुर्णी येथें बांधिलेल्या महादेवाच्या देवळाचें नांवहि खोलेश्वरच ठेविलें.

खोलेश्वरास राम म्हणून एक मुलगा होता. तो वीरधवळ वाघेलाशीं लढत असतां मारला गेला. दुसरा विच्चण ( विज्जल ? ) होता. तोहि पराक्रमी होता.

---

## ग

**गजदृष्टि चेर**—हा शेंगुत्तुवन या चेर वंशांतील राजाचा पुत्र. हा आपल्या बापाच्या वेळीं तोंडी येथें राजप्रतिनिधि होता. यानेंहि बऱ्याच लढाया मारल्या होत्या. शेवटीं पाण्ड्य राजानें याचा तलैआलंगानम् येथील लढाईंत पराभव करून याला कैद केलें. नंतर चेरांच्या राज्याला उतरती कळा लागली. हा राजप्रतिनिधि असतां याच्या ताब्यांतील प्रदेश कोल्ली मलाईपासून तोंडीपर्यंत असून त्याच्या दोनहि बाजूंस चोल व पांड्य यांचीं राज्यें होतीं. चेरांचें राज्य म्हणजे हल्लींचा सर्व मलबार किनारा ( मलबार जिल्हा, त्रावणकोर व कोचीन संस्थानें ) होय. कन्याकुमारीपासून उत्तरेस मंगलोरपर्यंत व अरबी समुद्रापासून पूर्वेस सह्याद्रीपर्यंत हा प्रदेश होय.

**गजपतिघराणें**—१ कपिलेंद्र ( स. १४२९–३० ), २ पुरुषोत्तम, ३ प्रतापरुद्र ( स. १४९६–१५३९ ), ४ कथरुद्यदेव ( स. १५३९–४१ खून ).

हें घराणें ओरिसा ( कलिंग ) प्रांतांत राज्य करीत होतें. कपिलेंद्रानें चवथ्या भानुपासून राज्य घेतलें, व कटक राजधानी केली. या घराण्याला सूर्यवंश असेंहि म्हणत असत ( सिवेल आणि आयंगार, पृ. ३७३ ).

**गजपति प्रतापरुद्र**—( सुमार शालिवाहन १५ वें शतक ) याच्या पदरीं कदंब नांवाचा कवि होता. यानें न्यायशास्त्रावर ग्रंथ रचला ( क. च. ).

**गजराबाई**— ही गोविंदराव गायकवाडाची राख. हिचा पुत्र कान्होजी.

**गजराबाई बांडे**—ही थो. शाहूची मुलगी होती. शाहूनें रघूजी बांडे याच्या मल्हारराव नांवाच्या मुलास आपली ही मुलगी दिली.

मरतेसमयीं शाहूनें हीस एक सनद दिली ती "सौभाग्यादि संपन्न गजराबाई बांडे यांसी इनाम धारादत्त व वंशपरंपरेनें परगणा नंदुरबार व परगणे सुलतानपुर, सुभे खानदेश पैकीं गांवें आहेत " सनदेची ता. १२-८-१७४६.

**गझनवी वंश**–(एप्रिल ९७७ ते ११८६ अखेर) गझनीचा यामीनी राजवंश गझनवी राजवंश या नांवानें प्रसिद्ध आहे. या गझनवी राजवंशाचे साम्राज्यांत पंजाब प्रांत महमूद गझनवीचे कारकीर्दीपासून असल्यामुळें या राजवंशास हिंदुस्थानच्या इतिहासांत महत्त्वाचें स्थान मिळालें आहे.

दहाव्या शतकांत बाल्खच्या सामान नांवाच्या राजघराण्यांतील पुरुषांनीं आपल्या राज्याचा विस्तार करून

त्यांत ट्रॅन्सॉक्झियाना, इराण व अर्वाचीन अफगाणिस्थानांत मोडत असलेल्या बहुतेक सर्व मुलखाचा समावेश केला. बाल्खच्या सामान राजघराण्याचें हें साम्राज्य जसें लवकर वाढलें तसें लवकरच विस्कळित होऊन लयालाहि गेलें. सामान राजे आपल्या दिमतीला असलेल्या गुलामांस उच्च पदास चढवून साम्राज्यांतील प्रांतांचे राज्यकारभारावर त्यांच्या नेमणुका करीत. अशा गुलामगिरीच्या हलक्या दर्जातून सरदार, अमीर व उमरावांच्या दर्जास गेलेल्या या गुलाम अधिकाऱ्यांपैकीं कांहीं त्यांच्या ताब्यांतील साम्राज्याच्या भागाचे मालक झाले.

गुलामगिरींतून उदयाला आलेल्या अशा तुर्की अधिकाऱ्यांपैकीं अल्प्तगीन नांवाचा एक अधिकारी होता. त्यानें बंड करून गझनीस आपलें स्वतंत्र राज्य स्थापिलें. अल्प्तगीन व त्याचे वंशज पेंचांत सांपडले म्हणजे जरी कधीं कधीं, बुखाऱ्यास राजधानी करून राज्यकारभार करणाऱ्या सामानच्या राजवंशास, नोकरास किंवा मांडलिकास उचित असा मान देत तरी बहुशः स्वतःस स्वतंत्र राजे समजूनच राज्यकारभार चालवीत. स. ९६३ मध्यें अल्प्तगीन वारला व त्याचा मुलगा इशाक गझनीचा अमीर झाला. त्याच्यामागून स. ९६६ मध्यें बलक्तगीन गादीवर आला तो अल्प्तगीनचा गुलाम होता; व त्यानें बुखाऱ्याच्या सम्राटाकडून अधिकारसूत्रें मिळविलीं होतीं. स. ९७२ मध्यें पिराई गझनीच्या गादीवर आला. तो प्रजेस अप्रिय झाल्यामुळें पदच्युत झाला. त्याची गादी अल्प्तगिनानें आपल्या स्वतःच्या मुलीशीं लग्न करून देऊन उच्च पदवीला आणलेल्या सबक्तगिनास ९ एप्रिल ९७७ मध्यें दिली. यानेंहि बुखाऱ्याच्या सामानी सम्राटाकडून गझनीस सत्ताधिष्ठित होण्यास परवानगी मिळविली होती. परंतु पुढें त्यानें सम्राटास जुमानलें नाहीं व स्वतंत्रपणें राजसत्ता उपभोगिली.

सबक्तगीन हाच गझनीच्या यामीनी राजवंशाचा संस्थापक होय. त्यानें आपल्या अमदानींत हिंदुस्थानवर स्वाऱ्या करून पंजाबचा राजा महीपाल याजकडून काबूल प्रांत मिळविला व बुखाऱ्याचा सम्राट् नूर २ रा यास खुरासान प्रांतांत धुमाकूळ घालणाऱ्या इस्मायली नांवाच्या काफीर पंथाचा अध्वर्यु अबुअली सुंजूर याचा बंडावा मोडण्यास मदत करून खुरासान प्रांताचें राज्य मिळविलें व अशा प्रकारें राज्यविस्तार करून आपली सत्ता व दरारा सुप्रतिष्ठित केला. त्यामुळें व पुढें त्याचा मुलगा सुप्रसिद्ध सेनानी महमूद यानें आपल्या पराक्रमानें राज्यविस्तार करून सत्ता दृढमूल केल्यामुळें वंशपरंपरेनें गझनीचें राजपद त्यांच्या घराण्यांत कायम टिकविणें त्यांस शक्य झालें. म्हणूनच सबक्तगिनास नवीन राजवंश स्थापन केल्याचा मान मिळतो.

गझनवी राजवंशांत १७ राजे झाले व या घराण्याचें सुमारें २०० वर्षें साम्राज्य टिकलें. राज्यविस्तार करून परकीय राजांस भीति वाटेल अशी कारकीर्द फक्त महमूदची होय. झाला तो बहुतेक राज्यविस्तार महमूदनेंच केला. महमूदचे पश्चात् गझनीचे गादीचा दरारा कमी होऊन अंतस्थ व बाहेरील शत्रूंस गझनीचे राज्याविरुद्ध उघड उठाव करण्याचें धैर्य होऊं लागलें. महमूदचा मुलगा मसूद १ ला याच्या कारकीर्दीतच हिंदुस्थानांतील राजांनीं गझनवी साम्राज्याचें हिंदुस्थानांतील आसन डळमळीत करण्याचे प्रयत्न सुरू केले. राजपद मिळावयाचें तें मृत राजाच्या थोरल्या मुलास किंवा तसा मुलगा नसल्यास ठराविक अनुक्रमानें पण अबाधित नियमानें वारसा हक्क चालू राहण्याची रूढि इतरत्र आढळते तशी गझनवी राजवंशांत नसल्यानें राजघराण्यांतील राजपुरुषांचाच बंदोबस्त करण्यांत तख्तनशीन राजपुरुषाची शक्ति खर्च होई. गादीचा तंटा केव्हां उत्पन्न होईल याचा नियमच नसे. निर्वेध व दीर्घकाल राज्योपभोग ज्यास घ्यावयास सांपडला असे गझनवी राजवंशांत तीन राजे झाले. महमूद २८ वर्षें, इब्राहिम झहिरउद्दौला ४० वर्षें व बहराम ३४ वर्षें. पैकीं महमूदचा बहुतेक काल राज्यविस्तार करण्यांतच गेला. इब्राहिम झहिरउद्दौलाच्या कारकीर्दींत शांतता होती. तह करून युद्धाचे प्रसंग त्यानें कमी केले होते. बहरामची कारकीर्द दीर्घ असली तरी राजसत्तेचा दरारा नव्हता. परकी शत्रू स्वाऱ्या करीत. अटाउद्दीन हुसेन जहानसुदा अथवा ' जगजाळ्या ' यानें त्याच्याच कारकीर्दींत गझनी जाळून आसपासचा मुलूख उध्वस्त केला. सामान्यपणें असें म्हणतां येईल कीं, गझनवी साम्राज्याचा पाया सबक्तगिनानें घातला, महमूदनें त्याचा विस्तार करून दरारा वाढविला. मसूद १ ला यानें विस्तार व व्यवस्था बऱ्याच चांगल्या प्रकारें रक्षण केली. तरी त्याच्यामागें गादीच्या मालकीबद्दलच्या तंट्यामुळें व राजपदावरील राजपुरुषांचें अधिष्ठान नेहमींच डळमळींत राहूं लागल्यानें राजकुलाची इभ्रत व दरारा कमी होऊं लागला. बहरामच्या कारकीर्दीच्या अखेर निश्चितपणें ऱ्हासास सुरुवात झाली. खुस्त्रव मलिकचे कारकीर्दींत गझनवी वंश नामशेष झाला.

( १ ) सबक्तगीन ( स. ९७६ ), ( २ ) इस्माईल ( स. ९९७ ), ( ३ ) महमूद यमिनुद्दौला ( स. ९९८ )'

( ४ ) मुहम्मद ( स. १०३० ), ( ५ ) मसूद १ ला ( स. १०३० ), ( ६ ) मौदूद ( स. १०४० ), ( ७ ) मसूद २ रा ( स. १०४९ ), ( ८ ) अलीअबू अलहसन अली बहाउद्दौला ( स. १०४९ ), ( ९ ) इझ्झुद्दौला अब्दुर रशिद ( स. १०५२ ), तुघ्रील ( कृतघ्न ) ( स. १०५२ ), ( १० ) फरुखझाद जलालुद्दौला ( स. १०५३ ), ( ११ ) इब्राहिम झहिरउद्दौला ( स. १०५९ ), ( १२ ) मसूद ३ रा ( स. १०९९ ), ( १३ ) शिरझाद कमालुद्दौला ( स. १११५ ), ( १४ ) अर्सलानशहा सुलतानुद्दौला ( स. १११६ ), ( १५ ) बहरामशहा यमिनुद्दौला ( स. १११८ ), ( १६ ) खुस्रवशाह मुइझ्झुद्दौला ( स. ११५२ ), ( १७ ) खुस्रव मलिक ( स. ११६०–११८६ ).

**गझनीखान घोरी**—हा माळव्याच्या हूशंगशाहाचा मुलगा. याला मुहम्मदशाह असेंहि म्हणत. याचा वजीर महमूदखान खल्जी यानें यास ठार करून राज्य बळकावलें. तेव्हा माळव्यांत घोरीवंश संपून खल्जीवंश सुरू झाला ( स. १४३५ ). पण केंब्रिज हिस्टरीमध्यें दिलेल्या वंशावळींत याला मसूदखान नांवाचा मुलगा असून त्यानंतर मालवा येथें खल्जी घराणें राज्य करूं लागलें, असें दिलें आहे.

**गझनीखान फारुकी**—हा खानदेशच्या फारुकी घराण्यांतील हसन ( मलीक पहिला ) चा मुलगा. याला कैसरखान नांवाचा मुलगा होता ( कें. हि. ).

**२.** ( स. १५०८ ) खानदेशच्या फारुकी घारण्यांतील दाऊदखानाचा हा मुलगा. याला खानजहान नांवाचा एक भाऊ होता ( कें. हि. ).

**गणपतराव नारायण शौचे**—(मृ. स. १८४७ मे १२ ) हा यशवंतराव होळकरांचा दिवाण स्वतः फार खटपटी असून शूर होता. प्रत्येक मोहिमेत हा मदत करीत असे. यशवंतरावांचा सर्व पत्रव्यवहार हा करीत असे. यशवंतराव भरण पावल्यावर तुळसीबाईचा हा कारभारी झाला.

**गणपतराव भिकाजी रास्ते**—याची वडील कन्या गोपिकाबाई ही नानासाहेब पेशव्यास दिली होती. याला सहा भाऊ होते. यानें माळवा व कर्नाटकामध्यें अनेक लढाया मारिल्या. या घराण्यांतील मंडळींनीं वांई, सातारा, तालीकोट इत्यादि ठिकाणीं पेठ, घाट, वाडे, देवळें बांधिलीं. याचा वंशज सध्यां पुण्यांत आहे.

**गणपतराव शिवाजी विंचुरकर**—( मृ. स. १७८४ सप्टें. ९ ) हे विठ्ठल शिवदेवाचे नातू. हे महादजी शिंदे यांचे लष्करांत वारले. यांच्या मृत्यूचें वर्तमान सदाशिव दिनकर ह्यांनीं नाना फडणवीसास पुढें लिहिल्याप्रमाणें लिहिलें आहे:

“ राजश्री शिवाजी विठ्ठल बापू यांचे पुत्र गणपतराव, वय पंचवीस सत्तावीस वर्षांत असतां, धीर, उदार, सबूर, आर्जव मितभाषणी, देखणा, मोहकता, गुणज्ञ, असा संपन्न आणि सरदारीचा डौलाचा आटोपही केला होता. बापूस विश्रांति होती. ग्रहप्रतिकूलतेंकरून अडीच महिने दुखणें झालें. काल भाद्रपद वद्य १० गुरुवारीं माध्यान्हीं निधनत्व पाऊन स्वर्गगामी झाले ( सप्टें. स. १७८४ ). स्त्री त्याची सहगमन केली. बापूस मोठें दुःख झालें. ” ( ऐ. टि. ५, पृ. १–२ ).

**गणपति**—एक ज्योतिषी. पित्याचें नांव श्रीपति. भास्कराचार्यांच्या भावाचा हा मुलगा. हा यादवांच्या दरबारीं असावा.

**२.** ( स. १६८५ ) मुहूर्तगणपति ग्रंथाचा कर्ता. हा भरद्वाजगोत्री औदीच्या गुर्जर ब्राह्मण.

**गणपति काकतीय**—( स. ११९९-१२६० ) हा पहिल्या प्रतापरुद्र काकतीयानंतर गादीवर आला. याला छलमत्तीगंड अशी पदवी होती. सेनापति जयाच्या बहिणी नरसा व परमा यांच्याशीं यानें लग्न केलें.

जैतुगी यादवानें यास कांहीं अटींवर आंध्राचा राजा केलें होतें ( इंडि. अँटि. १४.३१६;२१.१९८).

याच्या मातेचें नांव बायमांबिका. याचा तिरुपुरांतक येथील शिलालेख शकें ११८२ मधला आहे. तो राजवर्ष ६२ मधील आहे. त्यावरून हा स. ११९९–१२६० पर्यंत राज्य करीत होता असें दिसतें ( एन्शन्ट डेक्कन, भा. २, पा. २८२ ). यानें चोल, कलिंग, सेउण, कर्नाटक, लाट, वेलनाडु येथील राजांबरोबर युद्धें केलीं. देवगिरीच्या यादवांबरोबर स. १२३५ मध्यें याची लढाई झाली असावी. राजराज चोल तिसरा हा जरी दुर्बल होता तरी त्याचा याला फायदा झाला व यानें आपलें राज्य वाढविलें. पण पांड्य राजापुढें मात्र याचा टिकाव लागला नाहीं. याची कारकीर्द भरभराटीची गेली. यानें कर माफ करून समुद्रावरील व्यापारास मोकळीक दिली. यानें शैवांना देणग्या दिल्या, देवळें बांधलीं. याला मुलगा नसल्यामुळें याच्या दोन मुलींपैकीं रुद्रम्मा याच्या मागाहून गादीवर बसली ( एन्शन्ट डेक्कन, भा. २,पा.२९० ).

**गणपति कोट**—( स. १२५८–६३ ) अमरावतीच्या कोटांपैकीं तिसऱ्या कोटाचा मुलगा.

**गणपति नगराज**—हा पद्मावतीचा राजा असून याला प्रख्यात समुद्रगुप्तानें आपल्या मुलूखगिरींत जिंकून

मांडलिक बनविलें होतें. त्या वेळीं पद्मावती हें शहर बरेंच मोठें व प्रसिद्ध होतें. हल्लीं शिंदेशाहीमधलि नरवर नांवाचें जें गांव आहे तेंच पद्मावती होय. कांहींच्या मतें समुद्रगुप्तानें याचें राज्य खालसाच केलें असें आहे ( स्मिथ-अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया ).

**गणपांबिका**— ही काकतीय घराण्यांतील गणपतीची मुलगी. अमरावतीच्या बेट्ट कोटाशीं हिचा विवाह झाला.

**गणासबंध**—हा तेलगू कवि, जातीचा द्रविड ब्राह्मण होता. चिदंबराजवळ शाली नामक गांवीं याचा जन्म झाला. हा लहानपणींच विद्या शिकून विद्वान् झाला होता. यानें जैन लोकांशीं जे वाद केले ते सर्व तेवरम् नामक ग्रंथांत लिहून ठेविले आहेत. ह्याच्या कालाविषयीं बरोबर शोध लागत नाहीं ( क. च. ).

**गणिकानंद**—हा मोठा गणिती होता. याचा जन्म शा. श. च्या १४ व्या शतकांत झाला. यानें ज्योतिषावर एक ग्रंथ लिहिला व त्यास आपलें नांव दिलें ( क. च. ).

**गणेश**—( स. १८५७ ग्रंथकाल ) एक हिंदी कवि. हे लालू कवीचे नातू असून गुलाब कवीचे पुत्र होत. यांनीं वाल्मीकिरामायणाचें केलेलें भाषांतर वाल्मीकिरामायणश्लोकार्थप्रकाश नांवानें प्रसिद्ध आहे. याची कविता रसभरित आहे.

२. ताजकभूषण ग्रंथाचा कर्ता.

३. जातकालंकार ग्रंथाचा कर्ता.

**गणेशदास**—मराठी भूपचंद्राख्यान काव्याचा कर्ता ( मं. इ. शके १८३७ ले. १४७ ).

**गणेश दैवज्ञ**—( स. १४९८–१५७८ नंतर मृत्यु ) मोठा नामांकित ज्योतिषी. याचेच ग्रहगणितग्रंथ हिंदुस्थानांत विशेष प्रचलित आहेत. पिता केशव, माता लक्ष्मी, गोत्र कौशिक, वसतिस्थान पश्चिम समुद्रतीरचें नांदगांव. याचे ग्रहलाघव, लघुतिथिचिंतामणि, बृहत्तिथिचिंतामणि, सिद्धान्तशिरोमणिटीका, लीलावतीटीका, विवाहवृंदावनटीका, मुहूर्ततंत्रटीका, श्राद्धनिर्णय, छंदोर्णवटीका, तर्जनीयंत्र, कृष्णाष्टमीनिर्णय, होलिकानिर्णय, लघुपापपात ( पातसारणी ), पर्वनिर्णय. याचा ग्रहलाघव हा ग्रंथ पहिला ( स. १५२० ) आणि विवाहवृंदावनटीका हा ग्रंथ शेवटचा असावा ( स. १५७८ ).

याचा पिता केशव दैवज्ञहि नामांकित ज्योतिषी होता. याच्या विद्वत्तेची अद्यापहि ग्रहकौतुक ग्रंथ साक्ष देत आहे. पण त्याचा हा मुलगा त्यापेक्षांहि सरस निघाला. आणि याच्या ग्रहलाघव ग्रंथानें सर्वांचे ग्रंथ मागें पाडले. पूर्वींच्या गणकांनीं ज्याचापावांचून क्वचित् गणित केलें, पण यानें तर सिद्धान्तोक्त सर्वच गणित ज्याचापावांचून करून दाखविलें. असा हा शोधक आणि कल्पक होता. पण यानें विनय न सोडतां पूर्वजांचा गौरव करून आपलाहि मोठेपणा ग्रहलाघवाच्या शेवटीं सांगितला आहे.

याचा पिता केशव यानें एक ग्रहण वर्तविलें, तें बरोबर मिळालें नाहीं. यामुळें त्याचा उपहास झाला, तेव्हां त्यानें नंदिग्रामाच्या गणेश मंदिरांत बसून तपश्चर्या आरंभिली. त्या वेळीं तो वृद्ध होता. त्याची ती निष्ठा पाहून गणपतीनें स्वप्नांत दृष्टान्त दिला कीं, 'आतां तुझ्या हातून ग्रह शोधण्याचें काम व्हावयाचें नाहीं. मीच तुझ्या पोटीं अवतार घेऊन तें कार्य करीन.' त्याप्रमाणें झालेल्या पुत्राचें नांव गणश ठेवलें. आजहि ज्योतिषी लोक गणेशदैवज्ञ हा ईश्वरी अवतार होता असें मानतात. ईश्वरानें अवतार घेऊन करावें इतक्या थोर योग्यतेचें याचें काम आहे यांत शंका नाहीं.

गणेश दैवज्ञाच्या पायास डोळे होते म्हणून त्यास चालतांना जमिनीकडे पाहावें लागत नव्हतें, आणि समुद्रकांठीं प्रचंड शिलाखंडावर बसून सारखा आकाशाकडे हा पाहत असे, या दोन्ही आख्यायिका याच्या गौरवपर असून याचें सतत आकाशाकडे लक्ष असे हें दाखविणाऱ्या आहेत. हा नुसता गणित करणारा नव्हता तर स्वतः वेध घेणाराहि होता. तसें यानें ग्रहलाघवांत म्हटलेंहि आहे. याचे ग्रंथ लवकरच लोकप्रिय झाले आणि गंगाधर मल्लारि, विश्वनाथ वगैरेंनीं ग्रहलाघवावर टीका केल्या आणि इतर ग्रंथावरहि टीका झाल्या. याचे इतर ग्रंथहि महत्त्वाचे आहेत ( भा. ज्यो. पा. २५९ ).

"यांनीं सोप्या युक्त्या बसवून गणित सुलभ केलें. परंतु त्या मानानें तें स्थूल होऊन पुढील चुकीचा पाया पडला. दुसरा परिणाम सिद्धान्त-ज्योतिष शिकण्याचा व वेध करण्याचा प्रचार नाहींसा होऊन शास्त्राच्या मूलसिद्धान्ताचें ज्ञान ज्योतिष्यास नाहींसें झालें." हे यावरील आक्षेप सामान्यतः खरे आहेत, पण जास्त विचार करतां बरोबर नाहींत असें ठरतें. अतिश्रमानें सिद्धांतावरून गणित करून जें फळ येणार तें थोड्या श्रमानें मिळेल तर कां घेऊं नये? युरोपांतल्या प्रमाणें आपल्या देशांत शोधकांची परंपरा लागली नाहीं, याचें कारण आपल्याकडील भिन्न स्थिति होय.

हें सर्व घराणेंच नामांकित विद्वान् असून त्यांची परंपरा पुष्कळ लांबपर्यंत टिकली असें दिसतें. गणेशाचा पुत्र

बल्लाळ, त्याचा पुत्र केशव. याचा भाऊ अनंत, पुतण्या नृसिंह इत्यादिकांचे ग्रंथ उपलब्ध आहेत. हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होता.

**गणेशनाथ**—मराठी कवि. भक्तमंजरी व महिपतीबुवा यांस समर्थकालीन लेखतात. शिवाजीमहाराजांची व याची गांठ पडली होती. गांव सारजी उज्जनि. शिष्य–विठ्ठलनाथ. पदें आहेत ( सं. सू. ).

**गणेशयोगी**—( स. १७८७ ) हे महागाणपत्य होते. यांचा शिष्यसंप्रदाय मोठा आहे. यांची समाधि मोरगांवीं आहे. यांनीं गणेशविजय नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथाचे अध्याय २२ असून एकंदर ओवीसंख्या ४५२२ आहे. यांनीं आपल्या गुरूचा नामोल्लेख व कालाचा उल्लेख कोठेंहि केला नाहीं.

यांनीं संस्कृतांत गणेशगीतेवर टीका लिहिलेली असून शिवाय प्राकृत समओंवी टीका केलेली आहे. याशिवाय गणेशगुह्यस्तोत्र, मयूरेशचरित्र, आणि ललिताचीं व इतर अनेक पदें, अभंग, श्लोक इत्यादि केलेलीं आहेत ( मं. त्रै. १२.४, ले. २५ ).

**गणेश विठ्ठल वाघमारे**—हा एक पेशव्यांचा सरदार असून नगरास किल्लेदार म्हणून होता.

स. १७७५ च्या सुमारास हा दादास मिळाला व पुढें महीवरील लढाईंत पाडाव होऊन हरिपंताचे हस्तगत झाला. हरिपंतानें यास बंधमुक्त करून आपले फौजेंत तैनात देऊन जवळ बाळगिलें; परंतु यानें बसल्या बसल्या हरिपंताचे फौजेंत इतका कांहीं फितूर केला कीं, हरिपंताचे खाजगी नौकरसुद्धां यानें फितविले. इतकें केल्यावर यानें दादास सुरतेंस पत्र पाठविलें कीं, 'वामनराव पटवर्धन देवाज्ञा पावले; आतां येथील सरदार आम्हीं मायेंत मेळविलें आहेत. मार्गशीर्ष शु॥ ८ स हरिपंतास दगा करतों, तुम्हीं चाल करून जलद यावें.' ही फितुरी प्रगट झाली. हरिपंतानें गणेश विठ्ठलास शृंखला घालून पद्दा किल्ल्यावर पाठविलें व इतरांचें पारिपत्य केलें.

हरि भिव्यार्शी इंग्रजांची वागणूक व गणेश विठ्ठलाशीं हरिपंताची वागणूक हा स्वभावविशेष ध्यानांत ठेवणें जरूर आहे ( म. रि. उ. भा. १, २१ ).

**गणेश विश्वनाथ बेहेरे**--( स. १७७७–८५ ) हा एक पेशव्यांचा सरदार होय.

फत्तेसिंग गायकवाड अहमदाबादेस मोर्चे लावून पेशव्यांचे महालांत उपद्रव करीत होता. तेव्हां हा व अंताजी नागेश हे गुजराथच्या बंदोबस्तास होते. ते फत्तेसिंगावर चालून गेले. पुढें पेशव्यांनीं फत्तेसिंगाच्या कराराची सनद देऊन अंताजी नागेश यास फत्तेसिंगाचा कारभार करण्यासाठीं पाठविलें. त्या वेळीं यानें व अंताजीनें फत्तेसिंगाचा रगडून कारभार करून त्यास नामशेष करून टाकलें ( स. १७७७ ).

जेव्हां केसो कृष्ण दातारानें राघोबादादांच्या तर्फेनें पेशव्यांचे मुलखांत उपद्रव केला, तेव्हां त्याचे बंदोबस्ताकरितां हरिपंतानें यास फौज, तोफा व गारदी देऊन पाठविलें ( १७७९ च्या सुमारास ).

स. १७८० मध्यें उत्तरेंत गॉडर्डशीं शिंदे-होळकर लढत असतां दक्षिणेकडून यानें इंग्रजांस दावण्याची चांगली कामगिरी केली. यानें सुरत अठ्ठाविशीचे महाल लुटून प्रत्यक्ष सुरतेसच शह दिला. तेव्हां याचे बंदोबस्तास गॉडर्डनें लेवेल्श यास पाठविलें. वेल्शनें पानेरा, बुगवडा व इंद्रगड हे तीन किल्ले हस्तगत केले. सोनगडाकडील इंग्रज पलटणीला यानें चांगलीच जरब बसविली. पुढें स. १७८५ मध्यें टिपूशीं युद्ध चालू असतां नानानें याजबरोबर पांच हजार फौज देऊन पटवर्धनांचे मदतीस पाठविलें ( म. रि. उ. १, पृ. १ ).

**गणेश वेदांती**—हा अयोध्येचा नबाब सुजा उद्दौला याच्या जवळ मराठ्यांच्या वतीनें वकिलीच्या कामावर होता. हा जातीचा महाराष्ट्र ब्राह्मण असून याचे पूर्वज वेदांतविषयांत निष्णात असल्यामुळें याचें वेदांती असें नांव प्रसिद्धीस आलें. यास पेशवेसरकारकडून बाराशें रुपयांची नेमणूक असे. हा मोठा परोपकारी व दयार्द्रबुद्धीचा होता. हा आपली सर्व नेमणूक गोरगरीबांस अन्नदान देण्यांत खर्च करीत असे. त्यामुळें सुजाउद्दौल्याच्या लष्करांत याची एखाद्या महान् साधूप्रमाणें प्रसिद्धी होती. स. १७६१ मध्यें पानिपत येथें मराठ्यांची व अबदालीची लढाई होऊन तींत श्रीमंत विश्वासराव वगैरे मारले गेले. त्या वेळीं त्यांची उत्तरक्रिया करण्याच्या कामीं या परोपकारी पुरुषानें अपार परिश्रम केले; व मोठमोठ्या मराठे वीरांच्या शवांस अग्नि देण्याचे कामीं काशीराज पंडितास फार मदत केली. श्रीमंत विश्वासराव पेशवे यांचें प्रेत शत्रूचे हस्तगत झालें असतांहि तें सुजाउद्दौल्याच्या मार्फत परत मिळवून, यानें चंदनादि काष्ठांनीं त्याचें विधिपूर्वक दहन केलें, आणि त्यांच्या अस्थि ब्राह्मणाबरोबर भागिरथीमध्यें टाकण्याकरितां पाठवून दिल्या.

तात्पर्य, मराठ्यांवर आलेल्या या अत्यंत दुर्धर व शोकप्रद प्रसंगीं काशीराज पंडित व गणेश वेदांती ह्या थोर

पुरुषांनीं अतिशय साहाय्य केलें. त्यामुळें यांचीं नांवें इतिहासांत अजरामर झालीं आहेत. गणेश वेदांती हा मुजाउद्दौल्याजवळ स. १७६३ पर्यंत असल्याचा दाखला सांपडतो. पुढें यानें सर्व संसार सोडून देऊन काशीवास केला ( जु. ऐ. गो. भा. ४ पृ. ३-४. )

**गणेशशेट**—शिवाजीचा गोव्यांतील वकील.

**गणेश संभाजी खांडेकर**—हा संभाजी तुकदेव खांडेकर यांचा मुलगा. हा कऱ्हाडा ब्राह्मण असून संगमेश्वर तालुक्यांतील बुरंबाड येथील राहणारा होता. हा प्रथम नानासाहेब पेशव्यांचे वेळेस उदयास आला; आणि पानिपतोत्तर काळीं याचा पराक्रम विशेष झळकला. प्रथम यास बुंदेलखंडांत झांशीची मामलत मिळाली. पानिपतचे पराभवानें तिकडील मराठ्यांचा अंमल ढासळूं लागला तेव्हां हा व याचा बंधु गोपाळ संभाजी ह्यांनीं तिकडे फार चांगला उद्योग केला. जानोजी भोसल्याचा कारभारी बाबूराव कान्हेरे ह्यानें गणेश संभाजीचा जम जानोजीकडे बसवून दिला. भाऊसाहेबांचा तोतया प्रथम हिंदुस्थानांत प्रगट झाला, त्यास गणेश संभाजीनें साह्य केलें, त्यावरून माधवराव पेशव्यांची याजवर मोठी गैरमर्जी झाली.

जानोजीनें ओरिसा प्रांताचा कारभार शिवभट साठ्याकडून काढून गणेश संभाजीस दिला ( स. १७६८ ). तें काम यानें सप्टेंबर १७७० पावेतों केल्याचें दिसतें. या अवधींत गणेश संभाजीचा इंग्रजांशीं पत्रव्यवहार झाला, तो पार्शीयन कॅलेंडर्सच्या तीन भागांत पाहावयास मिळतोः 'Madhavarav Peshava perfidiously broke the treaty with Bhosle', असें गणेश संभाजीनें पत्रांत इंग्रजांस कळविलेलें आढळतें. जानोजीचा गणेश संभाजीबद्दलचा आदर खालील शब्दांत व्यक्त होतीः

'A man of great knowledge and tried courage, and of perfectly polite manners.'

स्वतः गणेश संभाजी लिहितोः—

'I have been called from a remote country, to take possession of the Government of Orissa, considering the share I have had in many transactions with the English gentlemen in Hindusthan.'

यावरून माधवराव पेशवे विरुद्ध इंग्रजांशीं आपलें बस्तान हा चांगलें बसवून देईल अशी जानोजीची अपेक्षा होती, पण ती सिद्धीस मात्र गेली नाहीं. सन १७७९-८० त माळव्यांत नरसिंगगडानजिक बाळाजी गोविंद खेरानें गणेश संभाजीवर छापा घातला त्यांत हा मारला गेला. याचा मुलगा मल्हार गणेश हा पुढें महादजी शिंद्याकडे राहिला. ( म. रि. म. वि. भा. ४, १७२, ३०१; ना. प्रां. इ. पा. १९४ ).

**गणोजी शिर्के**—हा शिवाजीमहाराजांचा जांवई होता. महाराजांच्या मुलीचें नांव राजकुंवर असून ती यास दिली होती.

गणोजी हा ज्या वेळीं संभाजीनें सावत्र आई सोयराबाईमुळें शिर्के कुलाशींच विरोध आरंभला तेव्हां मराठ्यांना सोडून उघडपणें मोगलांना जाऊन मिळाला. जिंजीच्या वेढ्यांत गणोजी हजर होता. त्या वेळीं खंडो बल्लाळानें यास वतनाचें व जहागिरीचें आमिष दाखवून वश केलें व शिकारीच्या निमित्तानें राजाराममहाराजांस किल्ल्याबाहेर नेलें. थोडें अंतर चालून जातांच धनाजी आपलें सैन्य घेऊन तयार होताच, त्यांत नेऊन सोडलें. यापुढें गणोजी मराठ्यांना येऊन मिळाला. याचा मुलगा पिलाजी हाहि इतिहासप्रसिद्ध आहे.

**गदाधर प्रल्हाद नाशिककर**--( स. १७०८ ) जानेवारींत शाहूनें राज्याभिषेक केला त्या वेळेस प्रतिनिधिपद हें गदाधरभट्ट यांना दिलें. हा प्रल्हाद निराजीचा मुलगा. परंतु "गदाधर भट्टी कारभार, यथास्थित बंदोबस्त न होय" म्हणून शाहूनें याचें पद काढून स. १७११ त तें याचा भाऊ नारो प्रल्हाद यास दिलें. ता. ३०-११-१७१० रोजीं गदाधराचा शिक्का असून १-६-१७११ रोजीं नारो प्रल्हादचा प्रतिनिधिपदाचा शिक्का आहे.

हा शाहूला मिळाला. परशुरामपंत किन्हईकर ताराबाईला मिळाल्यामुळें प्रतिनिधिपद याच्याकडे आलें.

**गदाधरभट्ट**—( स. १६५० सुमार ) न्यायशास्त्रावरील सुप्रसिद्ध ग्रंथकार. याच्या बापाचें नांव जीवाचार्य असें असून याचा जन्म पूर्व बंगाल्यांत लक्ष्मीपस, बोग्र या जिल्ह्यांत झाला. हा वाडिआ येथें आला व हरिरास तर्कवागीशाचा शिष्य बनला. गुरूच्या मरणानंतर हा पाठशाळेचा मुख्य झाला. परंतु हा पंडितांच्या कुळांतील नसल्यामुळें तेथील विद्यार्थी याचा अधिकार मानिनात. तेव्हां यानें त्या पाठशाळेस रामराम ठोकला व दुसरी एक पाठशाळा काढली. आपल्या पाठशाळेभोंवतीं नवद्वीप येथील न्यायशास्त्राच्या अध्ययन व अध्यापनाची विशेष परंपरा यानें सुरू केली. यानें उत्तम बाग तयार केली. एखादा विद्यार्थी फुलें तोडण्यास आला कीं गदाधर बागेंत येऊन झाडांना उद्देशून तर्कशास्त्रावर प्रवचन देण्यास सुरुवात करी. तेव्हां याच्या विद्वत्तेनें मोहित होऊन पुष्कळ विद्यार्थ्यांनीं गुप्तपणें याच्या पाठशाळेंत नांवें नोंदली. लवकरच यानें रघुनाथ

शिरोमणीच्या दीधितीवर एक उत्कृष्ट टीका लिहिली. त्यामुळें याची कीर्ति होऊन याच्या वेळचा सर्वांत मोठा तर्कज्ञ म्हणून यास लोक मान देऊं लागले. याच्याच काळीं हिंदी तर्कज्ञान अत्युच्च शिखरास पोंचलें. यानें तर्कज्ञानावरील बऱ्याच ग्रंथांवर टीका लिहिल्या आहेत. त्या 'गदाधरी' या नांवानें प्रसिद्ध आहेत.

याच्या 'व्युत्पत्तिवाद' या ग्रंथाच्या हस्तलिखितावर स. १६२५ हें साल आहे तेव्हां हा त्यापूर्वी होऊन गेला असला पाहिजे. याच्या शक्तिवादावर जयरामाच्या एका शिष्यानें टीका लिहिली आहे.

यानें खालील ग्रंथ लिहिले आहेत. (१) तत्त्वचिंतामणिदीधितिप्रकाश. (२) तत्त्वचिंतामणिव्याख्या. (३) तत्त्वचिंतामण्यालोकटीका. (४) मुक्तावलीटीका. (५) रत्नकोशवादरहस्य. (६) अनुमानचिंतामणिदीधितिटीका. (७) आख्यातवाद. (८) कारकवाद. (९) नयवाद. (१०) प्रमाण्यवाददीधितिटीका. (११) बुद्धिवाद. (१२) मुक्तिवाद. (१३) विधिवाद. (१४) विशयन्तावाद. (१५) व्युत्पत्तिवाद. (१६) शक्तिवाद. (१७) स्मृतिसंस्कारवाद. (१८) शब्दप्रामाण्यवादरहस्य (हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक पा. ४८१).

२. (स. १७०० सुमार) हा 'रसिकजीवन' या ग्रंथाचा कर्ता होय. यानें आपल्या ग्रंथांत पुष्कळ ग्रंथकारांचा आणि ग्रंथांचा उल्लेख केला आहे. त्यांमध्यें जगन्नाथरायाच्या 'रसगंगाधर' या ग्रंथाचा उल्लेख असून त्यांतील कांहीं उतारेहि यानें घेतले आहेत. त्यावरून यानें 'रसिकजीवन' हा ग्रंथ जगन्नाथरायाच्या 'रसगंगाधर' या ग्रंथानंतर लिहिला असला पाहिजे. 'रसगंगाधरा'चा काल स. १६५० असा ठरविलेला आहे. तेव्हां यानें आपला 'रसिकजीवन' हा ग्रंथ स. १६५० नंतर किंवा स. १७ व्या शतकाच्या मध्यास लिहिला पाहिजे.

३. हिन्दी कवि. या दक्षिणी ब्राह्मणानें चैतन्य महाप्रभूंना भागवत सांगितलें. हा संस्कृत पंडित असल्यानें संस्कृतगर्भित हिंदी भाषेंत तुळशीदासारखी ग्रंथरचना यानें केली आहे.

**गन्नमरस गन्नम नायडू**—(स. १२६८) हा रुद्राम्बा काकतीय राणीचा सेनापति.

**गमाजी यमाजी मुतालिक**—(मृ. स. १७६४) याचें नांव सदाशिव यमाजी. पण व्यवहारांत हे गमाजीबावा मुतालिक या नांवानें प्रसिद्ध होते. गमाजी यमाजी हा यमाजी शिवदेवाचा मुलगा. हा शुक्ल-यजुर्वेदी ब्राह्मण असून माधवरावाचे पक्षाचा होता. हा प्रतिनिधीचा मुतालिक होता. निजामचा दिवाण विठ्ठल सुंदर व गमाजी हे व्याही होते.

स. १७६३-७२ या कालांत पेशव्यांचा प्रतिनिधीशीं वेबनाव झाला. स. १७५४ त जगजीवन परशुराम ऊर्फ दादोबा प्रतिनिधी वारल्यावर भवानराव ऊर्फ श्रीनिवास गंगाधर त्या पदावर दाखल झाले. साताऱ्यास जाऊन पेशवाईचीं अगर अन्य वस्त्रें द्यावयाचीं तीं प्रतिनिधींचे हातून द्यावयाचीं असा परिपाठ होता. अर्थात् वस्त्रें घेण्यासाठीं छत्रपती व प्रतिनिधी या दोन व्यक्तींना आपल्या लगामीं ठेवणें पेशव्यास भाग होतें. भवानरावास पेशव्यांनीं पुण्यास राहण्यास बोलविलें. तें त्यांनीं कबूल न केल्यामुळें दादास राग येऊन त्यानें याचें प्रतिनिधिपद काढून आपला अल्पवयी मुलगा भास्करराव यास दिलें, व तो वारल्यावर नारो शंकरास दिलें. भवानरावास या वेळेस हा जाऊन भेटला. गोपाळराव पटवर्धन निजामाला आधींच मिळाले होते; व तेथें त्यांचा सत्कारहि चांगल्या तऱ्हेनें झाला होता. हा व प्रतिनिधिहि त्यांत सामील झाले.

या कारस्थानाचें निरसन पेशव्यांनीं करून रुसून गेलेल्या मंडळींस परत आणून निजामास राक्षसभुवन येथें चोपलें. भवानराव व त्यांचा हा मुतालिक हे परत पेशव्याकडे आले. पुढें भवानरावास पेशव्यांनीं प्रतिनिधिपद देण्याचें ठरविल्यावर त्यानें मिटतें घेतलें. परंतु गमाजीनें मात्र दंगाच चालवला. तेव्हां पेशव्यांनीं गमाजीवर फौज पाठवून याचा पराभव केला.

गमाजी विठ्ठल सुंदराशीं संधान करून पेशव्याशीं लढण्यास आला असतां राक्षसभुवनचे लढाईंत मारला गेला. गमाजी स्वभावानें क्रूर असल्यामुळें 'यमाजीस (काळास) न भ्यालें तरी गमाजीस भ्यालें पाहिजे' अशी म्हण त्या वेळीं मराठी भाषेंत प्रचारांत आली होती.

**गयकर्णदेव कलचुरी**—(स. ११२४-५२) हा त्रिपुरीच्या कलचुरी घराण्यांतील यशःकर्णदेवाचा पुत्र. यानें मेवाडचा राणा विजयसिंह याची मुलगी आल्हणदेवी आपली राणी केली होती. तिचाच भेडाघाट येथील शिलालेख आहे. तिचा मुलगा नरसिंहदेव.

**गयदास**—सुश्रुत-टीकाकार डल्लन यानें निर्देश केलेला वैद्यकावरील ग्रंथकार.

**गयाधर**—हा अनेक सिद्धांपैकीं एक. जात कायस्थ. ग्रंथ ज्ञानोदयोदेश (तें. १३।६५). ग्रंथाची भाषा हिन्दी.

**गर्ग**—यानें 'शकुनावती' या नांवाचा एक ग्रंथ संस्कृतांत रचिला होता. ग्रंथाचे एकंदर १७८ श्लोक आहेत. तो

कान्हूर येथें सांपडला (मं. वा. इ. श. १८३७ ले. १२२).

२. मंखाच्या ग्रंथपरीक्षणार्थ नेमलेला एक.

**गर्दभिल्ल**—उज्जयनीच्या सुप्रसिद्ध विक्रमादित्याच्या हा बाप.

यानें जैन साधु कालिकाचार्य याचा अपमान केला. तेव्हां, कालिकाचार्य, याचा सूड उगविण्याकरितां, शक राजाकडे मदतीसाठीं गेला. त्या वेळीं 'राजांचा राजा' ही पदवी धारण करणारा शक राजा (साहानुसाहि) राज्य करीत होता. कालिकानें शक लोकांचीं मनें वळवून त्यांची मदत घेऊन उज्जयनीच्या गर्दभिल्ल राजावर स्वाऱ्या केल्या व उज्जयनीचें घराणें संपुष्टांत आणण्याचा घाट घातला. पण पुढें याचा मुलगा प्रख्यात विक्रमादित्य यानें गतवैभव परत मिळवून उज्जयनी येथें आपली सत्ता स्थिर केली.

याच्यानंतर याचा मुलगा विक्रमादित्य हा येथें राज्य करूं लागला. गर्दभिल्ल राजाचा पुराणांतरीं निर्देश आहे. या आख्यायिकेंत फारच थोडा अंश ऐतिहासिक दिसतो.

खि. श. तिसऱ्या शतकांत वायव्येकडून ज्या बाह्य लोकांच्या टोळ्या हिंदुस्थानांत आल्या व ज्यांनीं आंध्रांच्या साम्राज्याचा नाश झाल्यानंतर आपलीं राज्यें स्थापिलीं त्या आभीर, शक, यवन, बाल्हिक या लोकांबरोबरच याचें नांव सांपडतें.

यानें आपलें एक छोटेंसें राज्य स्थापन केलें होतें. वरील सर्व लोकांचीं राज्यें समकालीन असून ठिकठिकाणीं पसरलीं होतीं.

**गर्भश्रीकांत मिश्र**—'साकारसिद्धि' नांवाचा ग्रंथ यानें रचला. विष्णुस्वामीचा हा शिष्य होता.

**गहिनीनाथ**—(गैबीनाथ पाहा).

**गंग**—(स. १६२५ चे सुमारास) हा एक हिंदी कवि होता. हा ब्राह्मण असावा. संग्रहग्रंथांमध्यें याच्या पुष्कळ सुंदर कविता आढळतात. याला एका कवितेबद्दल अबदुलरहिम खानखानानें ३६ लाख रुपये दिले, अशी प्रसिद्धी आहे.

**गंगईकोंड चोल**—(स. १०१२–१०४३) याला मुदींकोंड, निगरिल्ली, उत्तम चोल व राजेन्द्र असेंहि म्हणत असत. हा पहिल्या राजराजाचा मुलगा. हा युवराज असतांनाच बापाबरोबर पुष्कळ मोहिमांवर गेला होता. इडैतु, रैंनाडु, दुर्गम वनवासी, आजिंक्य तटाचे कोळ्ळीप्पाकई, मण्णैक्कडगम हीं प्रसिद्ध तटबंदीचीं ठाणीं जिंकून नंतर यानें एळम् (सीलोन) वर स्वारी केली. तेव्हां तेथील राजाचा पराभव करून त्याचा, त्याच्या राणीचा, व सुंदर नांवाच्या त्याच्या पुत्राचा असे तीन रत्नखचित मुकुट व राजाचा बहुमोल कंठा खंडणीदाखल घेतला. केरळ प्रान्तावर स्वारी करून तेथील राजाचा सर्व खजिना, मुकुट व सूर्यमाला. नांवाचा कंठा मिळवला. पुढें यानें अनेक बेटें जिंकलीं (स. १०१५–१०२०). मुयंगी येथें जयसिंग चालुक्याचा पराभव करून शांदिमुत्तीचु, रट्टपाडी येथील कुबेराच्या नऊ निधींइतकी संपत्ति यानें मिळविली. विक्रमवीराचे चक्रकोट, मदुरमंडळ, नामनैक्कोणम्, पंचप्पळ्ळी, माशुणीदेश, आदिनगर (येथील धीररथाला जिंकून त्याचा सर्व खजिना घेतला), ओड्डविषय, कोसलैनाडु, दंडभुक्ती (येथें धर्मपाल राजा होता), दक्कनलाट (गोविन्दचन्द्राचा), वळंगदेश, निकोबार बेटें, शंगुक्कोट्टम (महिपालाचें) व गंगराजाची राजधानी इतके देश व शहरें यानें जिंकलीं (स. १०२०–२२). हीं नांवें तिरु व लंगाडु ताम्रपटांत येतात. कदाचित् हीं यादी अतिशयोक्तीची असेल. तथापि हा फार पराक्रमी होता ही गोष्ट खरी. नंतर यानें पाण्ड्य देश जिंकून त्यावर यानें आपल्या राजपुत्रास सुभेदार नेमलें. याच्या सेनापतीनें गंगातटाकापर्यंत मोहीम केली व ओरिसाच्या राजास आणि बंगालच्या महिपतीस मांडलिक बनविलें. यानें गंगैकोंड शोळापुरम् येथें एक मोठा तलाव बांधला; व त्यांत गंगेचें पाणी तो शुद्ध करण्यासाठीं आणून घेतलं. त्याचें नांव जयस्तंभतडाग होतें. याची एक बाजूची पाळ पंधरा मैल लांब होती. या तलावामुळें त्या प्रान्तापैकीं अर्ध्या प्रान्तास शेतीसाठीं पाणी पुरवण्यांत येई. यानें आपली मुलगी अम्मंगदेवी राजराज चालुक्यांस दिली होती. राजशेखरविलास नांवाच्या काव्यांत यानें केलेल्या मोहिमांचा इतिहास आलेला आहे. यानें स. १०३३ पर्यंत मुलूखगिरी केल्यानंतर मग आपलें सारें लक्ष प्रजेच्या सुखसोयीकडे लाविलें. या कामांत यानें बारा वर्षें घालविलीं. यानें गंगैकोंडशोळापुरम् येथें राजधानी स्थापून तेथें अनेक देवळें बांधलीं; व वर सांगितलेला तलाव बांधला. कांहीं वर्षांपूर्वी या तलावाच्या पाळीचे दगड काढून ते सध्यांचे कोलेरून येथील धरण बांधण्यास नेले. हल्लीं तो तलाव व देवळें नामशेष झालीं आहेत. एकोणिसाव्या शतकांत फेरोनें लिहिलेल्या गॅझेटियरमध्यें त्यांच्या सौंदर्याची व अजस्रपणाची फार प्रशंसा केली आहे. राजेन्द्रानें आपल्या राजाधिराज नांवाच्या मुलाला स्वतः सर्व राज्यकारभाराचें शिक्षण दिलें होतें. यानें एकतीस वर्षें राज्य करून प्रजेस सुख दिलें. हा स. १०४३ मध्यें वारला. याच्यामागून याचा दुसरा पुत्र राजाधिराज ऊर्फ जयमकोंड हा राजा झाला.

**गंग घराणें ( पूर्व कलिंग )**—यांचें मूळगांव गंगवाडींतील 'कोलाहल' हें होय. हे चंद्रवंशीय असून यांचें गोत्र आत्रेय आहे. १ वीरसिंह–२ कामार्णव पहिला ( याला दानार्णव, गुणार्णव पहिला, मारसिंह, वज्रहस्त १ ला असे भाऊ होते. याचें राज्य ३६ वर्षें )–३ दानार्णव ( दुसरा राजा कामार्णवाचा भाऊ. ४० वर्षें. )–४ कामार्णव दुसरा ( ५० वर्षें. )–५ गुणार्णव ( ५ वर्षें. )–६ वज्रहस्त ( स. ८६३–८७८. याच्यानंतर याचा भाऊ कामार्णव तिसरा गादीवर आला )–७ कामार्णव तिसरा ( स. ८७८–९७. यानें आपल्या घराण्याचा शक चालू केला ) –८ गुणार्णव दुसरा ( स. ८९७–९२४. याच्यानंतर याचा नातु व वज्रहस्त तिसऱ्याचा मुलगा जितांकुश गादीवर आला. )–९ जितांकुश ( स. ९२४–९३९. याच्यानंतर याचा पुतण्या व गुण्णमाचा मुलगा कलिगालांकुश हा गादीवर आला. )–१० कलिगालांकुश ( स. ९३९-५१. याच्यानंतर आठवा राजा जो गुणार्णव दुसरा त्याचा भाऊ गुंडम पहिला हा गादीवर आला. )–११ गुंडम पहिला ( स. ९५१–५८. याच्यानंतर नववा राजा जितांकुश याचा भाऊ कामार्णव ४ था हा गादीवर आला. )–१२ कामार्णव ४ था ( स. ९५८–८३ )–१३ वज्रहस्त ४ था ( स. ९८३–१०१७. अनियंक भीम. )–१४ कामार्णव ५ वा ( स. १०१७. याच्यानंतर याचा भाऊ गुंडम २ रा हा गादीवर आला )–१५ गुंडम दुसरा ( स.१०१७–१९. याच्यानंतर याचा भाऊ कामार्णव ६ वा हा गादीवर आला. )–१६ कामार्णव ६ वा ( मधुकामार्णव, स. १०१९–३८. बा. विनया. )–१७ वज्रहस्त ५ वा स. १०३८–७०. बा. अनंगा. )–१८ राजराज १ ला ( देवेंद्रवर्मन्, स. १०७०–७८. बा. कुलोत्तुंग चोल पहिल्याची मुलगी राजसुंदरी )–१९ अनंतवर्मन् चोदगंग ( स. १०७८–११४२ )–२० मधुकामार्णव ७ वा ( स. ११४२–११५२. याच्यानंतर याचा भाऊ राघव हा गादीवर आला. )–२१ राघव ( स. ११५२–६७. बा. चंद्रलेखा )–२२ राजराज दुसरा ( स. ११६७–९२; अनंतवर्मन्. याच्यानंतर याचा भाऊ अनियकभीम हा गादीवर आला. )–२३ अनियकभीम (स.११९२–१२०२. बा. बाघल्ला ? )–२४ राजराज तिसरा ( गुण किंवा सद्गुण. स. १२०२–१९१ )–२५ अनन्यभीम ( लाडदेव. स. १२१९–१२५३. बा. कस्तुरा )–२६ नरसिंह पहिला ( बा. सितादेवी ? स. १२५३–५६. याला चंद्रिका नांवाची एक बहिण होती. ती परमादी हैहयास दिली होती. )–२७ वीरभानूदेव पहिला ( बा. चालुक्यराजकन्या जाकल्ला. स १२५६–७५ )–२८ नरसिंह दुसरा ( प्रताप अनंतवर्मन्. स. १२७५–१३०६ )–२९ वीरभानू दुसरा ( वीराधिवीर; बा. लक्ष्मी. स. १३०६–२५ ) –३० नरसिंह तिसरा ( गणपति. स. १३२५–१३५० )–३१ वीरभानू ३ रा ( बा. तारा आणि हिरा. स. १३५०–७८ )–३२ नरसिंह ४ था ( बा. पार्वती. स. १३७८–१३९७ )–३३ वीरभानू ४ था ( या घराण्यांतील शेवटचा राजा ). ( सिवेल आणि आयंगार पृ.३५७ ).

**गंग घराणें ( पश्चिम )**—हें घराणें प्रथम अनन्तपूर जिल्हा आणि म्हैसूरमधील कोलार प्रांतांत राज्य करीत होतें. त्या वेळीं या घराण्याच्या राज्यास 'गंगवाडी' असें म्हणत. या घराण्यांतील राजे 'पर्मानदी' आणि 'कोंगुणीवर्मन्' या पदव्या लावीत असत. बनवासीचा कदंबराजा मृगेश्वरवर्मन् यानें सनाच्या पांचव्या शतकामध्यें या घराण्यास जिंकलें होतें. पण पुढें स. ७५३ त राष्ट्रकूटांनीं चालुक्यांना जिंकलें तेव्हां यांनीं आपली सत्ता परत मिळवून आपल्या राज्याचें संरक्षण केलें. शेजारच्या बलिष्ठ राजांचें हें घराणें नेहमीं मांडलीक असे. पुढील वंशावळींतल्या राजांचा दिलेला काल हा प्रमाण मानलेला असून तो फ्लीट, राइस वगैरेंनीं दिलेल्या कालाहून भिन्न आहे ( एस्. कृष्णस्वामी आयंगार यांचें कल्चर पृ. १८९; एपि. इंडि. १४. ३३७; एपि. क. ९ प्रस्तावना पृ. ६; एपि. इंडि. ५. १५३. ६. ५९ पाहा ).

१ हरिवर्मन् ( अय्यवर्मन् स. ४५० )–२ विष्णुगोप ( कांहीं लेखांत याचा उल्लेख नाहीं. )–३ माधव पहिला ( सिंहवर्मन्. स. ४७० च्या सुमारास. याला स्कंदवर्मन् पल्लवानें गादीवर बसविलें )–४ अविनीत–५ दुर्विनीत ( याचा भाऊ पृथ्वीपति यानें म्हैसूरमधील पुन्नाडराज हा आपल्या सासऱ्याचा प्रांत मिळविला. )–६ मुष्कर–७ श्रीविक्रम–८ भूविक्रम ( विलंद येथें पल्लवांचा पराजय केला. याच्यानंतर याचा भाऊ शिवमार हा गादीवर आला. ) –९ शिवराम पहिला ( स. ६६८ ? )–१० इरेयप्पा पहिला ( कांहीं ठिकाणीं यास गाळलें आहे. ) –११ श्रीपुरुष ( विलंदे येथें पल्लव राजास ठार मारिलें. बा. कांचैव्बी. )–१२ शिवमार २ रा ( स. ८०५-१० याच्यानंतर याचा भाऊ विजयादित्य गादीवर आला. )–१३ विजयादित्य ( स. ८१०-८४० )–१४ पृथ्वीपति पहिला ( बारावा राजा शिवमार २ रा. त्याचा हा मुलगा. याला मारसिंह पहिला या नांवाचा भाऊ होता. स. ८४० -७७ )–१५ मारसिंह दुसरा ( स. ८७८-९००. याला कुंदव्वै नांवाची बहीण होती. )–१६ पृथ्वीपति २ रा

( स. ९००-९४०. याला विक्रमादित्य नांवाचा मुलगा होता. तो धवल पल्लवाच्या भांडणांत मारला गेला. )-१७ बूतुग २ रा ( हा तेरावा राजा विक्रमादित्याचा वंशज होय. वंश येणेंप्रमाणें-१३ विक्रमादित्य-राजमल्ल पहिला-इरेयप्पा तिसरा-भूतुग पहिला-इरेयप्पा ४ था-१७ बूतुग दुसरा. याला दोन भाऊ व एक बहीण होती. स. ९३९-९५३. वा. रेवकन्निम्मडी व कल्लव्वरासी )-१८ मरुलदेव ( स. ९५३-६१. वा. विजब्बी. याच्यानंतर याचा भाऊ मारसिंह तिसरा हा गादीवर आला )-१९ मारसिंह तिसरा ( स. ९६१-७४. हा जैनधर्मीय होता.) राचमल्ल ( राज ४ था. स. ९७४-८४. अठवा राजा मरुलदेव त्याचा हा नातू. याच्या बापाचें नांव इंद्र. यास रक्कस गंग व अरुमोलिदेव असे भाऊ होते. हा या घराण्यांतील शेवटचा राजा. )

या घराण्यांतील सतरावा राजा बूतुग दुसरा याच्या पासूनच्या पुढील वंशावळींत कांहीं ठिकाणच्या लेखांवरून फरक आढळतो.

**गंग परमादि**—( चोल वीर राजेन्द्र पाहा ).

**गंगाजी आव्हाड**--हा नाना फडणिसाच्या विश्वासांतील असून महादजी शिंदे यांचेकडे असे. महादजी यांच्याशीं नेहमीं वाटाघाटी करी. स. १७८८ चे सुमारास याची अहल्याबाई होळकरणीकडे शिष्टाई चालू होती ( म. रि. उ. २ पृ. २५ ). हा नानास महत्त्वाची बातमी पुरवी ( ऐ. प. १८५ ). बातमी पुरविण्याची पद्धत अशी दिसतें कीं, यानें सर्व माहितीचीं पत्रें ब्र्हाणपुरासारख्या ठिकाणीं पाठवावयाचीं व तेथून तीं नानाकडे रवाना व्हावयाचीं. त्यासंबंधीं भा. ४. ४९; ऐ. स्फु. ले. ७. १४; खरे ले. २५१६ हे कागद मननीय आहेत.

**गंगाजी नाईक अणजूरकर**—हा वंश हल्लीं अणजूर, जि. ठाणें, येथें नांदत आहे. वसईच्या अपूर्व संग्रामांत हा विशेष चमकला. यानें त्या वेळीं पुष्कळ खटपट करून साष्टींतील लोकांस मराठ्यांचे बाजूस वळविलें. यांनीं पेशव्यांस माऱ्याच्या जागा व गुप्त वाटा दाखविल्या; व यांनीं पेशव्यांच्या तर्फेनें लढून मनोर येथें पोर्तुगिझांचा मोड केला. पुढें चिमणाजी आप्पानें याची रवानगी वसईकडे केली. तेथें किल्ल्यावर चढण्याचा यांनीं उद्योग केला. परंतु त्यांत फारसें यश आलें नाहीं व इतर मंडळींनीं मिळून अंताजी रघुनाथाच्या सूचनेवरून मध्यंतरीं उत्तरेस आगाशीजवळ वैतरणेच्या मुखाजवळ जो आरनाळ्याचा किल्ला आहे, तो घेतला. याच्या सर्व कामगिरीबद्दल बाळाजी बाजीरावानें यास पालखी दिली. हे साष्टीचे पाटील होते ( म. रि. म. १ पृ. २९२-९३ ).

हा जातीनें पाठारेप्रभू असून कल्याणावरील फिरंग्यांचा हल्ला परतविण्यांत प्रमुख होता.

**गंगादेवी**—बसवाची पत्नी आणि बलदेवाची कन्या. बलदेव हा विज्जल राजाचा प्रधान होता. हिला गंगाबा असेंहि कोणी म्हणतात.

**गंगाधर**—( स. १४३४ ) यानें 'चांद्रमान' नांवाचें तंत्र केलें आहे. श्रीशैलाच्या पश्चिमेस एकीकडे कृष्णवेणी व दुसरीकडे भागीरथी यांच्यामधील सगर नांवाच्या नगराचा हा रहिवासी. याचें गोत्र जामदग्न्य होतें. याच्या पित्याचें नांव चंद्रभट होय. याच्या वंशांतील श्रीचंदलवर विद्यापूरचा राजा प्रेम करीत असे. याचा मुलगा विश्वनाथ या नांवाचा होता. गंगाधराचें चंद्रमानतंत्र फार कठीण म्हणून तेंच त्यानें सुबोध पद्यांत लिहिलें. त्याचा काल उपलब्ध नाहीं ( भा. ज्यो. पा. ३१६ ).

२. 'निर्णयसिंधु' नंतर यांची ग्रंथरचना झालेली आहे. ग्रंथ-आशौचनिर्णय ( आशौचगंगाधरी ) ( सं. सू. ).

३. ( स.१५८६ )-यानें ग्रहलाघवावर शके १५०८ या वर्षी 'मनोरमा' नांवाची टीका लिहिली आहे. हा मुहूर्तमार्तंडकार नारायणाचा पुत्र. मुहूर्तमार्तंड ग्रंथ शके १४९३ मध्यें झालेला आहे. हा कौशिकगोत्री वाजसनेयी ब्राह्मण. हा देवगिरीच्या उत्तरेस जें प्रसिद्ध शिवालय ( घृष्णेश्वर ) आहे, त्यानजीकच्या टापर गांवचा रहिवासी होय. सध्यां ह्याचा मातुलवंश मात्र हयात असल्याचें शोधाअंतीं कळून आलें ( भा. ज्यो. पा. २७७ ).

**गंगाधर कोकीळ**—( स. १७७८ सुमार ) हा एक योगी होता. मुकुंदराजानें दृष्टांत झाल्यावरून याला आपला गुरु केलें.

यांच्या परंपरेवरून पाहतां हा सुमारें सवाशें वर्षांमागें होऊन गेला असें अनुमान निघतें व तें खरें आहे. याला महादेव आवा नांवाचा मुलगा होता. सायखेड्यास ( औरंगाबाद जिल्ह्यांतील गंगातटाकीं असलेलें ) याची समाधि आहे ( सं. अहवाल शके १८३४ ).

**गंगाधर तिमाजी हणमंते**—भोसल्याचे पिढीजाद नोकर. कोल्हापूरकर संभाजीच्या पदरीं हा सुमंतपदावर होता ( म. रि. म. १ पृ. ४२९ ).

**गंगाधरनंदन**—यानें मराठींत कुंडांकुश नांवाचा ओवीबद्ध ग्रंथ कुंडपद्धतीवर लिहिला आहे.

**गंगाधरपंडित**--या विद्वान् ब्राह्मणानें भास्कराचार्यांच्या लीलावती ग्रंथावर अमृतसागरा नांवाची टीका लिहिली आहे.

**गंगाधरपंत गोखले**—हा रास्ते (गोखले) घराण्याचा मूळ पुरुष असून वेळपेश्वरचा राहणारा होता. आदिलशाहींत हा वेळपेश्वरचा महाजन असून जाफराबाद महालांचा रसदभरणा दाभोळास करीत असे.

याच्यानंतर याचें काम याचा नातू हरि नारायण हा पाहत असे.

**गंगाधरबाबा**—(रामीरामदास पाहा).

**गंगाधरमहालक्ष्मी**-कोचीन देशाची ही पहिलीच राणी होय. हिनें पोर्तुगीजांच्या मदतीनें कोचीनची गादी बळकाविली.

**गंगाधर मोरेश्वर पिंगळे**--शिवाजीच्या वेळचा एक मुत्सद्दी. संभाजीच्या वेळींहि हा होता (स.१६८६).

**गंगाधर यशवंत ऊर्फ गंगोबातात्या चंद्रचूड**—(मृत्यु स. १४-२-१७७४) हा मूळचा निंबगांवचा. बाजीरावानें यास हिशेबी कामांत नोकरीवर घेऊन पेशव्यांचे तर्फेनें होळकरांचे फडणीस म्हणून नेमून दिलें. तेव्हांपासून पेशवे व होळकर यांच्यामधील कारभार हा पाहूं लागला. मल्हाररावाचा गंगाधर यशवंतावर पूर्ण विश्वास असून तहाच्या, हिशेबाच्या व मतलबाच्या वगैरे भानगडींत तो याचा सल्ला घेत असे. होळकराकडील हरएक बाबतींत याचें नांव येतें. याचें पत्रलेखन व भाषा चंद्रचूड दप्तर. ले. ३३ वरून कळून येईल. हा मल्हाररावाची दिवाणगिरी करीत असतां प्रसिद्धीस आला.

हा सैन्य घेऊन जाटाला मदत करण्याकरितां लढाईस गेल्याचा उल्लेख आहे (रा. खं. ३. १६३).

अबदालीची पाठ फिरतांच सुरजमल्ल जाटानें मोठ्या सैन्यानिशीं दिल्लीवर स्वारी केली. या वेळीं गंगाधरपंत चंद्रचूड दीड हजार फौजेनिशीं जाटाबरोबर होता (म. इ. सा. खं. १. ले. २८८).

शके १६८१(स.१७५९) मध्यें अबदालीनें दिल्ली घेतली, पण तो देशांत बंडाळी माजल्यामुळें परत गेला. तेव्हां इकडचे हिंदुस्थानांत कोणाची सत्ता चालणार याबद्दल लोक साशंक होते. पुढें पानपतमुळें विस्कटलेली घडी मल्हारराव व हा बसविण्याचा जोरानें प्रयत्न करीत होते.

यानें व मल्हाररावानें मोगल बुडवावा अशी सल्ला दिली व त्याकरितां दहा लक्षांची जहागीर द्यावी असें ठरलें (चं. द. १. ले. ५४).

(स. १७६३ जुलै) मोगलाचा भाऊ बसालतजंग यास फोडून मराठ्यांकडे आणण्याचें काम याकडे सोंपविण्यांत आलें. त्याप्रमाणें शके १६८३ च्या अधिक-आषाढांत गंगोबा बसालतजंगास घेऊन मराठ्यांच्या लष्करांत सामील झाला (चं. द. १ ले. ६८–७०).

माधवराव दादासाहेबांकडे सर्व व्यवस्था सोंपवून कर्नाटकच्या स्वारीस निघाले होते. त्यांनीं जानोजी भोसल्यास आपणाबरोबर येण्याविषयीं निकडीचे निरोप पाठविले. परंतु इंग्रजांनीं (ता.८ फेब्रु.१७६४) 'बंगाल्यांत कासमअलीचा पराभव केल्यामुळें पूर्वी ठरलेल्या तहान्वयें, या वेळीं मला कासमअलीच्या मदतीस गेलें पाहिजे; अर्थात् माधवरावांच्या स्वारीबरोबर आपणांस हजर राहतां येत नाहीं याबद्दल पेशवे विशाद मानतील तरी प्रसंगीं तुम्हीं (गंगोबा) आहां. कळेल त्याप्रकारें निराकरण करून मर्जी बहाल राहे ते गोष्ट करावी (चं. द. १ ले. ८८) असे त्यानें कळविलें.

(श. १६८५) फाल्गुन शुद्ध १४ हा आपली मुलगी मथुराबाई हिच्या लग्नाकरितां नाशिक येथें आला होता.

(स. १७६४) या वेळीं दरबारांत उपस्थित झालेला चौथाईच्या हिशेबाचीं प्रकरणें मिटविण्याकरितां मल्हाररावानें सांगितलें होतें. यामुळें रघुनाथराव व हा यांमध्यें मधून मधून खटके उडत (चं. द. १ ले. ८९).

हा फाल्गुन शु. ११ स तीनचार दिवस ज्वर येऊन निंबगांवीं मृत्यु पावला, असें याचा मुलगा यशवंत गंगाधरचें पत्र उपलब्ध आहे. पत्र १४-२-१७७४ चें आहे (पे. द. ५. २३).

राक्षसभुवनच्या लढाईच्या वेळीं निजामचा भाऊ सलाबतजंग याला फोडण्यापासून तो फायदेशीर तह घडवून आणीपर्यंत यानें उत्कृष्ट कामगिरी केली. तसाच इतर महत्त्वाच्या कामांत हा असे. पण घोडपच्या स्वारीनंतर (स. १७६६) हा सखारामबापूच्या मसलतीनें दादाला मिळाला. म्हणून याचा सर्व सरंजाम जप्त करून याला मुलांमाणसांसुद्धां कैद करण्यांत आलें. नंतर तीस लक्ष रुपये खंड घेऊन याला कैदेंतून मुक्त केलें व सरंजामहि परत देण्यांत आला. तीस लक्षांपैकीं चोवीस लक्ष रुपये यानें ताबडतोब भरले व बाकीचे सहा लक्ष माधवरावाच्या मृत्यूनंतर सखारामबापूच्या कारकीर्दींत माफ झाले (चं. द. १. १). हा दादाचा पक्षपाती असल्यामुळें जप्तीचे प्रसंग पूर्वींहि दिसतात (चं. द. १५४, ६०).

मराठेशाहींतील याच्या वेळच्या प्रत्येक महत्त्वाच्या गोष्टींत याचा हात असे. एखादी गोष्ट हमखास घडवून आणण्याच्या बाबतींत याची योजना होई. लेखणी, तलवार आणि डावपेच या सर्वच बाबतींत हा कुशल होता.

**गंगाधरशास्त्री पटवर्धन**—(मृ. स. १८१५ जुलै) हा मेणवलीचा राहणारा होता. यास वयाचे ८ वे वर्षीं पुण्यांत पेशव्यांचे वाड्यांत कर्नाटक स्वारीचे दप्तरांत कारकुनीचें काम मिळालें. हे पटवर्धन हरिपंत फडक्यांचे

उपाध्ये असल्यामुळें त्यांच्याकडे गंगाधरशास्त्रयांचें जाणें येणें होतें. हरिपंतानें गंगाधर कारकुनी करतो म्हणून याचें उपाध्येपण काढून घेतलें, त्यावरून यानें कृष्णातीरीं वाईस जाऊन वयाचे वीस वर्षापर्यंत शास्त्राध्ययन केलें.

सवाई माधवरावाच्या मृत्यूनंतर पेशवाईसंबंधानें ज्या घडामोडी उपस्थित झाल्या त्या गंगाधरशास्त्री यास माहीत होत्या. यानें बाळोजी कुंजराबरोबर पेशवे दरबारांत राहून बाजीरावाची मर्जी संपादिली. पुढें श्रीमंतांची शास्त्रयावर मर्जी बसली म्हणून नानांचें व याचें वितुष्ट आलें. दुसरें एक कारण असें झालें कीं, 'नाना फडणीसाचा सासरा दादा गद्रे याची एक रांड होती. तिची शास्त्रयावर मर्जी बसली. त्यामुळेंहि नाना फडणीस याचा द्वेष करूं लागला, आणि त्यानें शास्त्र्याचे वडिलांस कळविलें कीं, आमचेकडील बातमी हा बाजीरावास कळवितो.'

याचे वडिलांस नाना आपला सूड घेईल अशी धास्ती पडून तो कुटुंबासह बडोद्यास राहावयास गेला. तेथें त्या वेळचा दिवाण रावजी आपाजी यानें याचा चांगला परामर्श घेतला. त्याचा व याचे वडिलांचा स्नेह होता. त्यानें गोविंदराव गायकवाडास बडोद्याचें पद मिळवून देण्याचे का[illegible] हरिपंत व नाना फडणीस यांजकडे शिफारस करून स्वतः पैसे वगैरे देऊन पुष्कळ खटपट केली होती. आणि या खटपटीमुळेंच पुढें गोविंदरावाची दिवाणगिरी रावजी आपाजीस मिळाली.

रावजींचा मुलगा सिताराम व गंगाधरशास्त्री हे दोघेहि स्नेहभावानें एकत्र वाढले. गायकवाडींतून पटवर्धनास १२०० रु. वर्षासन करून देण्यांत आलें. रावजी आपाजी मरण पावल्यावर सीतारामबावास दिवाणगिरी देण्याची खटपट गंगाधरशास्त्रयानें केली. रेसिडेंट वॉकर याचा याजवर अत्यंत लोभ होता. त्यानें शास्त्र्यास गायकवाडाचे दरबारीं बोलणें करण्याच्या नाजूक कामां नेमिलें. त्या वेळीं 'हें काम मला नको, लोक आपणास विरुद्ध समजावतील आणि सितारामबावाचें व माझें वांकडें पडेल' असें यानें सांगितलें. तेव्हां साहेबानें आज्ञा केली कीं, 'तुम्हीं चोरी लाच न करतां उभय सरकारांचें काम निष्ठेनें करावें; म्हणजे तुमचा सांभाळ मी करीन.' पुढें, मी मगरूर, माझें बोलणें बहुत अमर्यादेचें पडतें, असें सितारामबावास वाटूं लागलें, आणि उत्तरोत्तर उभयतांचें वितुष्ट पडलें, असें हा शास्त्री आपल्या चरित्रांत लिहितो.

मेजर वॉकर व जेम्स कॉर्नक या दोघांचाहि हा मुख्य सल्लागार असून बडोद्यांत इंग्रजांचें बस्तान बसविण्यांत याचीच त्यांना चांगली मदत झाली.

ता. १५-१२-१८०८ चे पत्रांत वॉकरनें आनंदराव गायकवाडास खास पत्र लिहून याची प्रशंसा व शिफारस केलेली आढळते. इंग्रजांस आंत आणणारा मुख्य पुरुष दिवाण रावजी आपाजी. त्याला शास्त्रयाची भरपूर मदत होती. रावजी आपाजी ता. १८-७-१८०३ रोजीं मरण पावला. त्यापूर्वी थोडे दिवस म्हणजे ता. २।२।१८०२ रोजीं दरमहा शंभर रुपये पगारावर रेसिडेंटपाशीं गुप्त बोलणें करण्याचे कामीं याची नेमणूक प्रथम झाली. रावजीचे पश्चात् बाबाजी आपाजीशींहि शास्त्रयाचा स्नेह कायम राहिला, असें त्याच्या पत्रव्यवहारावरून स्पष्ट होतें.

स. १८१४ मध्यें यास पेशवे व गायकवाड यांच्यामधील देण्याघेण्याच्या व अहमदाबाद वगैरेचा गायकवाडाच्या नांवानें कायमचा इजारा करून घेण्याच्या निकालासाठीं पुण्यास पाठविण्यांत आलें. पुढें बाजीरावानें शास्त्री हा फडक्यांच्या पदरीं कारकून असतांना त्याचें आपल्याशीं उद्धटपणाचें वर्तन होतें अशी सबब सांगून याची भेट घेण्याचें नाकारलें. या वेळेच्या पूर्वीपासूनच बडोद्याचा कारभारी सिताराम रावजी यास शास्त्र्याविषयीं मत्सर वाटूं लागला होता. त्यानें शास्त्री हा सर्वस्वीं इंग्रजांच्या वतीचा मनुष्य आहे असें बाजीरावास सांगितलें. शास्त्र्यास पेशव्यांच्या दरबारीं वकील म्हणून पाठविण्याची सूचना यापूर्वी एकदां (स. १८११) पुढें आली होती. या वेळीं पुष्कळ दिवस राहूनहि शास्त्र्याचा उद्देश सफल न झाल्यामुळें यानें ब्रिटिश रेसिडेंटाचा सल्ला घेऊन असें ठरविलें कीं, गायकवाड व पेशवे यांच्यामधील वादग्रस्त प्रश्न तडजोडीनें सोडविण्याचें काम इंग्रजांकडे सोंपवून आपण स्वतः बडोद्यास परत जावें. शास्त्र्याचा हा विचार पेशवे व त्रिंबकजी डेंगळे यांस समजला तेव्हां शास्त्र्यानें आपलें जाणें लांबणीवर टाकावें म्हणून त्रिंबकजीनें यास वळविण्यास सुरुवात केली. तेव्हां पेशव्यांच्या मुख्य कारभाराची जागा हा मागूं लागला. बाजीरावानें आपली मेहुणी शास्त्र्याच्या मुलास देऊं केली, व यानें सुचविलेली मुलुखाच्या देण्याघेण्यासंबंधानें तडजोडहि त्यानें कबूल केली. परंतु शास्त्र्यानें आपल्या मागण्या पुऱ्या होईपर्यंत लग्न करण्याचें तहकूब केलें. या गोष्टीचा बाजीरावास राग आला.

पुढें कांहीं दिवसांनीं बाजीराव पंढरपुरास गेला. तेव्हां शास्त्री त्याच्याबरोबर गेला. जुलैच्या १४ व्या तारखेस रात्रीं कांहीं थोडींशीं चाकरमाणसें बरोबर घेऊन शास्त्री विठोबाच्या देवालयांत देवदर्शनास गेला. देवदर्शन केल्यावर पेशव्यांची गांठ घेऊन शास्त्री बाहेर पडला. पण तो थोडा दूर जातो न जातो तोंच कांहीं मारेकऱ्यांनीं

याच्यावर हल्ला करून याचे तुकडे तुकडे केले ( जुलै १८१५ ). डफ म्हणतो कीं, हें कृत्य बाजीरावानें डेंगळ्याच्या मदतीनें केलें. उलट कांहींचें म्हणणें कीं, सिताराम या दिवाणानें शास्त्र्यांचा खून करविला. या वेळीं सितारामानें धार येथें सैन्य जमविलें होतें. थोड्याच दिवसांत सितारामास इंग्रजांनीं अटकेंत ठेविलें. यावरून या म्हणण्यास पुष्टि मिळते. क. वॉलेस म्हणतो कीं, शास्त्र्याच्या खुनांत पेशव्याचा कांहीं फायदा नव्हता. कारण त्यामुळें गुजराथ हातची जात होती. म्हणून याला जिवंत ठेवण्यांतच त्यांचा फायदा होता.

यानें आपलें स्वतःचें लिहून ठेविलेलें चरित्र उपलब्ध असून तें भा. इ. स. मंडळाच्या त्रैमासिकांत प्रसिद्ध झालें आहे.

शास्त्र्याबद्दल एल्फिन्स्टनचा अभिप्राय मार्मिक आहे. तो असाः—

"गंगाधरशास्त्री हा मोठा धूर्त व बुद्धिमान् आहे. यानें बडोदें संस्थानची व्यवस्था उत्तम ठेविली आहे. येथें पुण्यास तो पुष्कळ खर्च करून मोठ्या मिजाशींत राहतो, व आपली स्वारी अशा झोकांत काढतो कीं सर्व शहर याच्याकडे पाहत राहतें! जुन्या पद्धतीचा शास्त्री असला तरी थेट इंग्रज असल्याप्रमाणें राहण्याची ऐट करतो. तुरतुर चालतो, तडतड बोलतो, वाटेल त्याला उलट उत्तर देतो, पेशवा व त्याचे कारभारी यांना 'मूर्ख' म्हणतो, 'डॅम रॅस्कल' हा शब्द याचे तोंडीं फार आहे. बोलतांना मधून मधून इंग्रजी शब्द खूप घुसडून देतो." ( विविधज्ञानवि. व. ६२, पृ. ३६५-६६ ).

हा ब्रिटिश सरकारच्या मध्यस्थीनें व त्यांची हमी घेऊन पुणें येथें आला होता. त्यामुळें याचा व रेसिडेंट मि. एल्फिन्स्टन याचा फार चांगला परिचय झाला होता. याला संस्कृत भाषेचें चांगलें ज्ञान होतें. त्याचप्रमाणें यानें इंग्रजी भाषेचीहि थोडी ओळख करून घेतली होती. राजकारणनिमित्तानें याचें व इंग्रज लोकांचें बरेंच दळणवळण झाल्यामुळें यास इंग्रज लोकांविषयीं अधिक आदरबुद्धि उत्पन्न झाली होती. हा नेहमीं त्यांचें अनुकरण करण्यास तत्पर असे. याच्याबद्दल मि. एल्फिन्स्टन ह्यांनीं एके ठिकाणीं उल्लेख केला आहे तो फार मौजेचा आहे.

शास्त्रीबुवांचें हिंदुस्थानीमिश्रित इंग्रजी भाषेचें ज्ञान "यशवंतराव होळकर बहोत ट्रिकवाला था, लेकिन् बडा अकलकंद, काकआय ( काकचक्षू ) था." ह्या वाक्यावरून दिसून येतें ( जु. ऐ. गो. पृ. ५० ).

**गंगाधरशास्त्री फडके**—आद्य मराठी व्याकरणकर्ते. यांनीं स. १८२२ सालीं मराठी व्याकरण लिहिलें. तें पुढें स. १८३६ सालीं छापलें जाईतोंपर्यंत हस्तलिखितावरूनच मुंबई सरकारनें प्रथम काढलेल्या मराठी शाळेंत शिकवीत. शास्त्रीबुवांनीं गुजराथेंत एज्युकेशनल इन्स्पेक्टरच्या जागीं असतांना मराठीप्रमाणेंच गुजराथी भाषेचींहि दोन, एक बाल व दुसरें प्रौढ, व्याकरणें लिहिलीं.

**गंगाधर सरस्वती**—( सरस्वती गंगाधर पाहा ).

**गंगानंद कवींद्र**—( स. १५२५ सुमार ) तिरहुतचा राहणारा मैथिल ब्राह्मण. हा बिकानेरचा राजा कर्ण याचा आश्रित होता. याच्या थोरल्या भावाचें नांव रघुदेवशर्मा. याचे पुढील संस्कृत ग्रंथ आढळतातः– ( १ ) कर्णभूषण, (२) काव्यडाकिनी, (३) मंदारमंजरी, (४) भृंगदूत. पहिला ग्रंथ काव्यमालेंत प्रकाशित झाला असून रसविषयक आहे. दुसऱ्या ग्रंथांत काव्यदोषांचें वर्णन असून तो काशीस्थ सरस्वतीभवन पुस्तकालयांत प्रसिद्ध झाला आहे. पुढले दोन ग्रंथ उल्लेखावरून अनुमानित होतात. ते अद्यापि प्रसिद्ध झाले नाहींत. कर्णाचा राज्यकाल स. १५०५–१५२७ पर्यंत होता. त्यावरून याचा काळ निश्चित होतो.

**गंगाबा**—बसवाची पत्नी.

**गंगाबाई पेशवे**—( मृत्यु स. १२-७-१७७७ ) ही साठ्यांच्या घराण्यांतील होय. ही नारायणराव पेशव्याची बायको. लग्न सिंहगडीं त्रिंबकराव मामानें लावलें. नारायणरावाचे वधानंतर गंगाबाई गर्भार असल्याचें आढळून आलें. तेव्हां दादाचे पक्षाकडून तीस मारण्याचे प्रयत्न सुरू झाले. तें पाहून कारभाऱ्यांचे कारस्थानास जोर आला.

नारायणरावास माधवरावानें आपले हातीं सोंपविलें असतां त्याचा बचाव आपल्याकडून झाला नाहीं, याबद्दल सखारामबापूस अगोदरच फार दुःख होत होतें; त्यांत जेव्हां गंगाबाईस मारण्याचे प्रयत्न सुरू झाले, तेव्हां आपण इतकी मंडळी पेशव्यांचें अन्न खाल्लेली जवळ असतां, गंगाबाईच्या असहाय स्थितींत तिचा आपल्या हातून नुसता बचाव सुद्धां होऊं नये, याजबद्दल कारभारी व सरदार यांचे मनांत लाज, खेद व त्वेष या भावना उत्पन्न झाल्या. अर्थात् त्यामुळें चाललेल्या कारस्थानास जोर आला.

शनिवारवाड्यांत गंगाबाईची अवस्था अत्यंत बिकट होती. तिची सुटका कशी करावी, हा एक मोठा प्रश्न कारभाऱ्यांपुढें उभा राहिला. शेवटीं बऱ्याच वाटाघाटी होऊन सखारामबापूनें नारो आप्पाजी तुळशीबागवाले यांचे साह्यानें बाईस शनिवारवाड्यांतून माहेरीं साठ्यांचे घरीं जाण्याचे निमित्तानें बाहेर काढून तेथें लगोलग पालखींत

बसवून बंदोबस्तानें पुरंदर किल्ल्यावर पोंचविलें. तेथें माघ शु. ५ म्हणजे ता. १७-१-१७७४ रोजीं गंगाबाईचे नांवानें कारभार सुरू झाला.

त्यानंतर ता. १८ एप्रिल रोजीं गंगाबाई प्रसूत होऊन पुत्र झाला. त्याचे नांवानें पेशवाईचीं वस्त्रें आणून तीं ता. २९ मे १७७४ रोजीं म्हणजे जन्मानंतर ४० वे दिवशीं पुरंदरावर स्वीकारण्यांत आलीं, तेव्हांपासून सवाई माधवरावाची कारकीर्द समजतात.

गंगाबाई सकेशा स्थितींतच ता. १२-७-१७७७ रोजीं मरण पावली ( म. रि. म. भा. ४, पा. ३५१ ).

**गंगाबाई शिंदे**—महादजी शिंद्याची पत्नी. ही पळबेकर जाधवांच्या घराण्यांतील होती.

**गंगाराम** ( महाराष्ट्र-पुराणाचा कर्ता )--एक बंगाली गृहस्थ. नागपूरकर भोसल्यांनीं बंगालवर ज्या मोहिमा केल्या त्यांचें तपशीलवार तत्कालीन वर्णन फारसें उपलब्ध नाहीं. मराठ्यांच्या स्वारीचें एक वर्णन "महाराष्ट्रपुराण" ह्या नांवानें गंगाराम नांवाच्या मनुष्यानें स. १७५१ मध्यें बंगाली भाषेंत लिहिलेलें हल्लीं प्रसिद्ध झालें आहे.

गंगाराम हा बंगालमधील मैमनसिंग येथील राहणारा असून तो या वर्णनाचे वेळीं बंगालची राजधानी मुर्शिदाबाद येथें हजर होता. यानें वर्णन केलेल्या बहुतेक गोष्टी कांहीं पाहिलेल्या व कांहीं विश्वसनीय रीतीनें ऐकिलेल्या अशा लिहिल्या आहेत.

या महाराष्ट्रपुराणाचा फक्त पहिला अध्याय उपलब्ध असून त्यांत भास्करपंताच्या खुनापर्यंत हकीकत आली आहे. त्यांत स. १७४३ मध्यें भास्करपंतानें बंगालवर केलेल्या स्वारीचें वर्णन दिलें आहे ( ना. प्रा. इ. पृ. १०७-१०८ ).

**गंगाराम जडी**—( ग्रंथकाल स. १७४२ ) यानें भानुदत्ताच्या 'रसतरंगिणी'वर 'नौका' नांवाची टीका लिहिली आहे.

भांडारकर ओ. रि. इं. मधील गव्हर्नमेंट मॅन्युस्क्रिप्ट लायब्ररींत 'नौका' टीकेची एक हस्तलिखित प्रत आहे. त्या प्रतींत 'ग्रहांकनगपृथ्व्यंके' हा शब्दप्रयोग कालनिदर्शनासाठीं केला आहे. त्या शब्दप्रयोगाचीं ग्रह, अंक, नग, आणि पृथ्वी, अशीं पदें पडतात; व त्यांचा अर्थ संवत् १७९९ ( स. १७४२ ) असा होतो.

यावरून यानें आपली 'नौका' नांवाची टीका स. १७३२ मध्यें लिहिली नसून स. १७४२ मध्यें लिहिली असें निश्चित ठरतें ( पी. के. गोडे ).

**गंगा विष्णु महेश्वर**—हा एक वैद्य होय. माधवराव पेशव्यांची आई गोपिकाबाई ही जेव्हां आजारी पडली, तेव्हां तिची प्रकृति दाखविण्याकरितां हिंदुस्थानांतून याला आणविलें होतें. हा फार नामांकित वैद्य होता.

**गंगू मंगाजी**—यास शिवाजीमहाराजांनीं आपली वाकनवीसी सांगितली.

**गंगय साहिनी**—( स. ११९९-१२६० ) हा म्हैसूरच्या कायस्थ घराण्याचा संस्थापक. हा गणपति काकतीयाचा सेनापति होता. यानें म्हैसूर व हैद्राबाद यांच्या आसपासचा प्रदेश सत्तेखालीं आणून स्वतंत्र राज्य स्थापन केलें ( म. रि. मध्य भा. ४ २३३, २३४ ).

**गंगेश**—( स. १३५६ सुमार ) हा जातीनें ब्राह्मण असून मिथिलेचा रहिवाशी होता. यास गंगेश अथवा गंगेश्वर असें म्हणत असून उपाध्याय हें याचें आडनांव होतें. यानें तत्त्वचिंतामणि नांवाचा एक अतिशय उत्तम ग्रंथ लिहिला आहे. दरभंग्यापासून १२ मैलांवर कमला नदीच्या तीरावर असलेल्या करियन या गांवीं याचा जन्म झाला. हा लहानपणीं अगदीं निरक्षर होता असें म्हणतात. आपल्या चुलत्याच्या घराशेजारील स्मशानांत जाऊन तेथें यानें कालीं देवीची प्रार्थना केली व तिला प्रसन्न करून घेऊन तिजकडून तर्कज्ञान संपादन करून घेतलें.

गंगेशानें सप्तदार्थी या ग्रंथाचा कर्ता शिवादित्यमिश्र ( तत्त्वचिंतामणि, प्रत्यक्षखंड पृ. ८३० ) याचा निर्देश केला आहे व तसेंच वैशेषिक तत्त्वज्ञानावरील ग्रंथ रत्नकोश यांतीलहि कांहीं उतारे घेतले आहेत. यानें निर्देशिलेल्या श्रीकर नांवाच्या गौड मीमांसकाबद्दल निश्चित माहिती उपलब्ध नाहीं. आनन्दसूरी व अमरचंद्रसूरी यांच्या मतांचा गंगेशानें निर्देश केला आहे. ते स. १०९३-११५० या वेळीं होऊन गेले. तेव्हां गंगेश १०९३-११५० च्या नंतर होऊन गेला असला पाहिजे. गंगेशानें श्रीहर्षाच्या 'खंडनखंडखाद्य' यावर टीका केली आहे, तेव्हां हा स ११८६ मध्यें राजा जयचंद्र याचे दरबारीं कनोज येथें होऊन गेलेल्या श्रीहर्षानंतर होऊन गेला असावा. गंगेशाचा मुलगा वर्धमान उपाध्याय हा स. च्या १३ व्या शतकांत होऊन गेला. तेव्हां गंगेश हा १२ व्या शतकाच्या शेवटीं होऊन गेला असावा. धनुखा शिलालेखावरून असें दिसतें कीं, महेश ठक्कर हा भगीरथ ठक्कराचा भाऊ होता. त्यानें तत्त्वचिंतामणीवर एक उत्तम उपटीका लिहिली आहे; व तो स. १५५६ त होऊन गेला. शिष्यांच्या मालिकेंत गंगेशानंतर भगीरथ हा ७ वा पुरुष होता. ३० वर्षांची एक पिढी समजल्यास गंगेश हा

भगीरथापूर्वी १८० वर्षे होऊन गेला असला पाहिजे. म्हणजे हा स. १३७६ च्या सुमारास होऊन गेला असावा ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ४०५-६ ).

**गंजन**—एक हिंदी कवि. हा गुजराथी ब्राह्मण काशी येथें राहत असे. यानें 'कमरुद्दीनखाँहुलास' नांवाचा शृंगाररसयुक्त ग्रंथ लिहिला. त्यांत भाव, रस व ऋतु यांचें वर्णन केलें आहे. त्यांत यानें आपल्या वंशजाचा परिचय दिला असून आपला पणजा चंदेल्ल मुकुटरायाची प्रशंसा केली आहे.

**गंड चंदेल्ल**—(स. १०००-१०२०) धंगानंतर त्याचा पुत्र गंड गादीवर आला. याला मुसलमान इतिहासकार नंद म्हणतात. गझनीच्या महमूदानें याच्यावर स्वारी करून याचा पराजय केला व पुष्कळ लूट केली ( स.१०२० ). पुन्हां महमूदानें लुटीच्या लोभानें स.१०२२ त स्वारी केली तेव्हां गंडानें युद्ध न करतां पुष्कळ नजराणा देऊन त्याला परत लावलें. यानंतर मुसलमानांनीं १७० वर्षेपर्यंत चंदेल्ल राज्यावर स्वारी केली नाहीं.

**गंडरादित्य चोल**—( स. ९६५ ) हा राजादित्याच्या मागाहून राजा झाला. हा त्याचा धाकटा भाऊ होय. याच्या वेळीं मान्यखेटच्या तिसऱ्या कृष्ण राष्ट्रकूटानें याचे बरेच प्रान्त, व कांची शहर काबीज केलें आणि तंजावराला वेढा दिला. पण यानें त्याला परत घालविलें. यानें आपल्या नांवानें एक शहर वसविलें. त्याचें नांव गांधारादित्यचतुर्वेदीमंगलम् ( हल्लींचें त्रिचनापल्ली प्रांतांतील कंदरादित्तम होय ). याच्या राणीनें याच्या पश्चात् कोनेरीराजपुरम् येथें एका देवळांत याचा पुतळा स्थापिला. तो अद्यापि तेथें आहे. हा भावाचा कारभार पुष्कळ वर्षे पाहत असला तरी यानें एक वर्ष राज्य केलें. याच्या मागें याचा मुलगा अज्ञान असल्यानें याचा धाकटा भाऊ अरिंजय अथवा अर्जुन मधुरकोंड राजकेसरी हा राजा झाला.

यास राजकेसरीवर्मन् ही पदवी होती. यास वीरनारणीयार व शेंबियन महादेवीयार या नांवांच्या दोन राण्या होत्या. याची श्रद्धावान् म्हणून ख्याति होती. यानें एक काव्य केलें आहे. त्याचें नांव 'तिरू विशैप्पा' हें होय. या काव्याच्या शेवटीं परांतक चोलाचा मुलगा असें यानें आपणास म्हणून घेतलें आहे. याच्या दुसऱ्या राणीचा उल्लेख प्रामुख्यानें आढळतो. हा मेला तेव्हां ती राणी तरुण होती.

**गंडरादित्य शिलाहार**—( स. १११०-३५ ) कोल्हापूरचा राजा.

**गागाभट्ट**—पैठणचें भट्ट घराणें काशीस जाऊन राहिलें आणि विद्वत्तेबद्दल काशी येथें भट्ट घराण्यांतील लोकांनीं अग्रमान मिळवला. त्या घराण्यांतील दिनकर ऊर्फ दिवाकरभट्टाचे हे पुत्र. यांचें मूळ नांव विश्वेश्वरभट्ट. वडिलांनीं यांचें नांव लाडानें गागाभट्ट असें ठेवलें. यांनीं अनेक शास्त्रांवर ग्रंथ लिहिले, पण यांचा मुख्य भर मीमांसा व धर्मशास्त्र यांवर होता. यांचे ग्रंथ–१ मीमांसाकुसुमांजलि ( पूर्वमीमांसावृत्ति), २ भाट्टचिंतामणि ( सिद्धान्तविवेचनात्मक), ३ राकागम अथवा सुधा ( जयदेवाच्या चंद्रालोकावर टीका ), ४ दिन करोद्योत ( हा धर्मशास्त्रावरील ग्रंथ याच्या पित्यानें सुरू केला आणि यानें पुरा केला ), ५ निरूढपशुबंधप्रयोग ( बौधायनसूत्रानुसारी ), ६ पिण्डपितृयज्ञप्रयोग, ७ कार्यस्थधर्मप्रदीप ( हा शिवाजीच्या राज्याभिषेकानंतर लिहिलेला ग्रंथ आहे), ९ सुज्ञानदुर्गोदय (सोळा संस्कारांवर), ९ शिवार्कोदय, १० समयनय, ११ आपस्तम्बपद्धति, १२ आशौचदीपिका, १३ तुलादानप्रयोग, १४ प्रयोगसार.

यानें 'शिवार्कोदय' नांवाचा ग्रंथ लिहिला होता. त्या ग्रंथाची हस्तलिखित प्रत अलवार संस्थानच्या महाराजांचे हस्तलिखित ग्रंथसंग्रहालयांत आहे, अशी माहिती मिळते ( C. C. ). हा ग्रंथ अद्यापि प्रसिद्ध झाला नसला तरी त्यांतील अखेरचे माहिती देणारे श्लोक शिवचरित्रप्रदीपांत कै. स. म. दिवेकर यांनीं प्रसिद्ध केले आहेत ( पा. २२३ ).

पूर्वमीमांसाशास्त्रावर जैमिनीचीं सूत्रें आहेत. त्यांवर शबरस्वामींचें गद्यात्मक भाष्य आहे. त्यावर कुमारिल भट्टाची श्लोकवार्तिक नांवाची श्लोकबद्ध टीका आहे, पण पहिल्या अध्यायाच्या पहिल्या पादावरच आहे. पुढें ते दिवंगत झाल्यानें ती टीका अपुरीच राहिली. ती शिवाजीमहाराजांच्या आग्रहावरून गागाभट्टानेंच पुरी केली, असें शिवार्कोदयाच्या अखेरच्या श्लोकावरून दिसतें. हा ग्रंथ यानें संन्यास घेतल्यावर लिहिला असेंहि तेथें म्हटलें आहे. तसेंच यानें 'समयनय' नांवाचा एक ग्रंथ छत्रपति संभाजी राजांकरितां तयार केला होता. तो शके १६०३ (स.१६८१) मध्यें लिहिला. हा ग्रंथ इटलींतील फ्लॉरेन्स येथील लेखसंग्रहांत आहे, असें विश्वेश्वर या नांवावर लिहिलें आहे त्यावरून दिसतें ( C. C. ). हा ग्रंथ आणवून प्रसिद्ध होणें जरूर आहे.

यांचा शिवाजीमहाराजांच्या राज्याभिषेकाशीं कसा संबंध आला यावद्दल बखरींत वेगळाल्या हकीगती आढळतात. शिवाजीमहाराजांनाच राज्याभिषेकाची

आवश्यकता वाटून त्यांनीं बाळाजी आवजीसारखीं कर्तबगार व या प्रश्नाचें महत्त्व जाणणारीं माणसें उदेपुरीं पाठवून तेथील वंशाशीं आपला संबंध व राज्याभिषेकपद्धति यांची माहिती करून घेतली आणि भालचंद्रभट पुरोहित व सोमनाथभट कात्रे यांस काशीस पाठवून यांस रायगडीं आणवलें. यांनीं शिवाजीच्या शेहेचाळीस-सत्तेचाळिसाव्या वर्षी प्रायश्चित्तपूर्वक गायत्रीमंत्रोपदेश केला आणि विवाहादि पुनः करून राज्याभिषेक केला. शिवाजीनींहि याला लाखांनीं मोजण्यासारखी दक्षणा दिली. या कामीं याला विरोधहि बराच असावा असें दिसतें ( निश्चलपुरी पाहा ). प्रतापरावाचा मृत्यु वगैरेसारखे अपशकुनहि झाले. पण शिवाजी व गागाभट्ट यांनीं मोठ्या धैर्यानें ही गोष्ट पार पाडली आणि या बाबतींत गागाभट्टासारख्यांनीं पुढाकार घेतला, ही मोठ्या कौतुकाची गोष्ट आहे.

**गाजीउद्दीनखान**—( स. १६८४ – १७१० ) याचें मूळ नांव मीर शहाबुद्दीन. याच्या हाताखालीं तुर्की मोगलांचें छोटें सैन्य असे. हा औरंगजेबाबरोबर दक्षिणेंत आला होता ( स. १६८४ ). रायगडाच्या खालीं निजामपुरी येथें यानें संभाजीचा पराजय केल्यानें यास औरंगजेबानें गाझीउद्दीन ही पदवी दिली ( स. १६८५ ).

विजापूरच्या वेढ्यांत यानें अजमशहास रसद पोंचवून त्याची उपासमार थांबविली; आणि शेवटीं याच्याच मार्फत विजापूर खालसा झालें. पुढें याला फिरूजजंग अशी पदवी मिळाली (स.१६८७).

यामुळें मराठ्यांनीं वऱ्हाडांत धूमाकूळ घातला तेव्हां याची वऱ्हाडचा सुभेदार म्हणून नेमणूक झाली (स. १७०५). याचाच मुलगा हैद्राबादच्या गादीचा संस्थापक निजामुल्मुल्क होय. बहादुरशाह मोगलाच्या कारकीर्दीत हा गुजराथचा सुभेदार झाला; व पुढें अहमदाबाद येथें स. १७१० मध्यें मृत्यु पावला.

**२.** ( मृ. २६ आक्टोबर स. १७५२ ) हा निजाम उल्मुल्काचा वडील मुलगा होय. याला निजामानें बादशाहाकडून अमीरुल् उमरा हें पद देऊन यास दिल्लींत ठेविलें. स. १७३९ च्या सुमारास कांहीं दिवस हा दिल्लीचा वजीर होता. निजामाच्या मरणसमयीं हा दिल्ली प्रांताच्या सुभेदारीवर होता ( स. १७४८ ). तेव्हां अर्थातच याचा धाकटा भाऊ नासिरजंग यानें गादी बळकावली.

वरील हकीकत यास समजल्यावर बादशाहाच्या परवानगीनें हा दक्षिणेंत येण्यास निघाला, परंतु वाटेंत औरंगाबादेस याच्या सावत्र आईनें मेजवानीस बोलाविलें व अन्नांत विष घालून याचा वध केला.

**३.** ( स. १७५२ मृ. स. १८०२ ? ) हा दुसऱ्या गाजीउद्दीनाचा मुलगा व निजामुल्मुल्कचा नातू होय. हा १७–१८ वर्षांचा असतांना दिल्लींत मीरबक्षीच्या कामावर होता. याजवर सफदरजंगाचें पुत्रवत् प्रेम होतें. गाजीउद्दीनाचा ( याचे बापाचा ) दक्षिणेंत खून झाला, ही बातमी दिल्लीस येतांच सफदरजंगानें बादशहाकडून यास बापाचे जागीं कायम करून त्यास गाजीउद्दीनखान, अमीरुल् उमरा, इमादउन्मुल्क असे किताब दिले. पुढें बादशहा व सफदरजंग यांचें वांकडें आलें असतां हा बादशहाचे बाजूस होता. त्यामुळें अर्थातच याचें आणि सफदरजंगाचें वांकडें आलें.

कुंभेरीचा वेढा चालू असतां यानें मल्हाररावाची भेट घेऊन भरतपुरास वेढा दिला. तेव्हां दिल्लीस बादशहा व वजीर खानखानान यांनीं याचे विरुद्ध खटपट चालवून आंतून जाठाशीं पत्रव्यवहार सुरू केला. हें यास कळतांच यानें दिल्लीच्या सभोंवार लुटालूट आरंभिली. मराठ्यांच्या प्रचंड फौजा उत्तरेंत आणण्याचें काम यानें केलें. हा जेव्हां बादशाही तोफखाना घेऊन डीग, भरतपूर, वगैरे किल्ल्यांस वेढे देऊन बसला, तेव्हां बादशहास पस्तावा होऊन त्यानें सफदरजंगास परत बोलावलें. खुद्द बादशहा वजीर खानखानास घेऊन, याचे मदतीचे मिषानें, पण वस्तुतः याचे विरुद्ध सिकंदऱ्यापर्यंत चालून आला. खुद्द बादशहाचेंच पत्र याचे हातीं पडलें तेव्हां यास बादशहाचें सर्व कपट कळून आलें; आणि लगेच हा व मल्हारराव होळकर बादशहाचा पाठलाग करीत दिल्लींत घुसले.

होळकर व याच्या फौजांनीं बादशहास दिल्लींत कोंडिलें. वजीर खानखानान बादशहास सोडून गेला. तेव्हां बादशहानें याची समजूत करण्यासाठीं दरवाजे उघडून यास आंत घेतलें. यानें वाड्यांत मोठा दरबार भरवून खालील भाषण केलें:

'बादशहास राज्य करण्याचें चातुर्य नाहीं. त्याच्या हातून मराठ्यांचा बंदोबस्त होत नाहीं. मित्राशीं त्यानें विश्वासघात केला आहे. तर त्याला पदच्युत करून तयमूरचा दुसरा लायक वंशज तख्तावर स्थापणें हेंच योग्य आहे.'

यानें हा बेत एकदम अमलांत आणिला व बादशाह ( अहमदशाह ) व ऊधमबाई यांचे डोळे काढून त्यांस यानें कैदेंत टाकिलें, आणि जाहांदरशहाचा मुलगा 'आजीजुद्दीन' यास आलमगीर असें नांव देऊन तख्तावर बसविलें ( ३ जून १७५४ ). याच वेळीं खानखानानाची वजिरी जाऊन ती यास मिळाली. नंतर पुढें यानें बादशहा आलमगीर व खानखानान या दोघांसहि ठार मारलें.

पंजाबचे कारभारावर नेमलेला मीरमन्नू मरण पावल्यावर अबदालीनें मीरमन्नूच्या अल्पवयी मुलाचे नांवानें लाहोर व मुलतान या दोन सुभ्यांचा अंमल नेमून कचा कारभार त्याच्या विधवा आईकडे सांगितला. परंतु तो अल्पवयी मुलगा मरण पावला व सर्वच गोंधळ माजला. पंजाब प्रांत जिंकण्यास ही चांगली संधि आहे असें पाहून यानें स. १७५६ च्या आरंभीं लाहोरकडे स्वारी केली. मीरमन्नूच्या मुलीशीं लग्न करण्याचें ठरवून त्या संबधांत यानें सासूशीं पत्रव्यवहार सुरू केला; व पुढें कपटानें मीरमन्नूची स्त्री व मुलगी यांस कैद केलें. पुढें अलीगौहरनें मध्यें पडून उभयतांची गोडी करून दिली.

अबदालीनें तिसऱ्या स्वारींत यास काढून नजीबखानास दिल्लींत प्रस्थापिलें. अबदाली गेल्यावर यास आपल्या शत्रूंचा सूड घेण्यास चांगलेंच फावलें. मराठ्यांच्या मदतीनें यानें नजिबखानास अधिकारावरून काढून स्वदेशीं घालवून दिलें; व आपला अंमल दिल्लींत बसविला. तेव्हां नजीबखानानें अबदालीस परत हिंदुस्थानांत बोलावलें.

स. १७५९ च्या हिवाळ्यांत अबदाली चवथ्यानें इकडे आला; व त्यानें एकामागून एक अशीं पंजाबांतील मराठ्यांचीं ठिकाणें घेण्यास सुरुवात केली. तेव्हां हा फारच घाबरला. स्वतःच्या बचावार्थ यानें बादशहास एका साधूच्या दर्शनास म्हणून बाहेर काढून ठार मारविलें.

पुढें दुसरा राजपुत्र सिंहासनावर स्थापून तो स्थिरस्थावर करणार इतक्यांत अबदाली येऊन पोंचला. तेव्हां हा पळून जाठांचे मुलखांत जाऊन राहिला. तेथून कांहीं दिवसांनीं हा दक्षिणेंत आला. परंतु निजामशाहींत यास थारा न मिळतां, मराठ्यांनीं याचे निर्वाहास काल्पी येथें जहागीर दिला. येथें हा १८०२ च्या मे महिन्यांत मरण पावला ( मु. रि. भा. २ पा. ४२० ). याचा मृत्युकाळ निश्चित नाहीं.

वजीर गाजीउद्दीन दत्ताजी पडल्यावर जाठांचे आश्र्यास गेला. परंतु तेथें निभाव न लागल्यामुळें दक्षिणेंत येऊन निजामशाहींत व इतर ठिकाणीं कैक वर्षे रानोमाळ गरीब स्थितींत भटकत राहून स. १७९० मध्यें सुरत येथें मरण पावला ( म. रि. म. ३, पा. १३२ ).

पानिपतप्रकरणीं प्रसिद्धीस आलेला निजामुल्मुल्कचा नातू वजीर गाजीउद्दीन यास दिल्लीस वजिरी मिळविण्याची फार उत्कंठा होती. पण आलमगीर बादशाहास मारल्यापासून मुसलमानांपैकीं त्याजवर कोणाचाच विश्वास नव्हता. हा लपूनछपून राहिला नसता तर अल्पावधींत बहुधा प्राणासहि मुकला असता. मराठ्यांनीं याचें पूर्वीचें सख्य स्मरून (माधवरावानें) याचा चांगला परामर्ष घेतला; आणि मृत्यूपूर्वी थोडे दिवस ता. ३०-१०-१७७२ रोजीं याला बुंदेलखंडांत दोन लक्षांची जहागीर नेमून दिली.

सैयरमुताखरीनचा कर्ता लिहितो—

" आलमगीरचा खून केल्यापासून शहाअलम किंवा दुसरा कोणी गाजीउद्दीनचे वाऱ्यास उभा राहत नसे. शेवटीं हा कंटाळून दक्षिणेंत आला. तेथेंहि यास थारा मिळेना, तेव्हां मक्केस जाण्याचा विचार करून हा सुरतेस गेला असतां सन १७७९ त यास इंग्रजांनीं आपल्या आश्र्यास ठेविलें " ( भाग ३. पृष्ठ ११५ ). ( म. रि. म. भा. ४ पा. ३०६ ). याची बायको गन्ना ही हिंदुस्तानी कवयित्री म्हणून प्रसिद्ध आहे. हाहि प्रख्यात फार्सी कवि व ग्रंथकार होता.

**गाझीउद्दीन हैदर**—( स. १८१४-२७ ) अयोध्येचा नबाब सादतअलीचा पुत्र. हा स. १८१४ त गादीवर आला. यानें पहिल्यानेंच आपल्या नांवाचें नाणें पाडलें. यानें इंग्रजांस नेपाळच्या लढाईच्या वेळीं कांहीं इंग्रजी मुलूख गहाण ठेवून घेऊन दोन कोट रुपये ६ टक्के दरानें व्याजानें दिले. स. १८१९ त दिल्लीचा बादशाहा इंग्रजांशीं अराजनिष्ठ आहे यावरून त्याची बादशाहत कमी करून नबाबास तें पद दिलें, परंतु ही गोष्ट मुसलमानांस आवडली नाहीं; व याला लोकांनीं जुमानलेंहि नाहीं. ब्रह्मदेशाच्या लढाईच्या वेळीं यानें इंग्रजांस आणखी १॥ कोट रुपये कर्जाऊ दिले. यानें इंग्रजांस पैशाची वेळोवेळीं मदत केल्यानें इंग्रजांची याच्यावर बहाल मर्जी होती. हा सन १८२७ त मरण पावला.

**गाझी फारुकी**—हा खानदेशच्या दाऊद फारुकीचा मुलगा.

**गाझी बेग**—जयसिंग मीर्झाचा सरदार. आग्र्यास जातांना शिवाजीबरोबर होता ( मु. रि. भाग २ रा, पृ. ४२० ).

**गॉडर्ड**—( मृ. स. १७८३ ) हा एक इंग्रज सेनापति असून आपल्या राष्ट्राची सेवा एकनिष्ठेनें करणारा होता ( स. १७५९ ). हा पुढें मद्रास ( १७५९-६१ ). व बंगाल ( १७६३ ) मध्यें होता. पुढें यानें मराठ्यांकडून भडोच घेतलें ( स. १७७२ ). पुढें हा मराठ्यांच्या विरुद्ध हालचाली करीत होता ( स. १७७८-८१ ).

वडगांवच्या तहांत अपमान व नुकसान असे दोन मुद्दे इंग्रजांचे अंतःकरणास झोंबले. त्यामुळें इंग्रजांना वडगांवचा तह रद्द करावा असें वाटूं लागलें. तशा परिस्थितींत दादा

पुन्हां इंग्रजांकडे पळाला व त्यास गॉडर्डनें आश्रय दिला. तेव्हां नवीन तह इंग्रजांशीं करावा, असें पुणें दरबारनें ठरविलें. या नवीन तहाची पहिली अट नानांनीं अशी घातली कीं, 'प्रथम साष्टी व दादा हे आमच्या हवालीं करा आणि मग तहाचें काय तें बोला.' ही अट गॉडर्ड यास पसंत न पडून यानें दादास नानाचे हवालीं करण्याचें नाकारलें. त्यामुळें युद्धास तोंड लागलें.

यानें प्रथम फत्तेसिंगास आपल्या बाजूस वळवून मराठ्यांची बाजू हलकी केली. त्यामुळें याला पुढें गुजराथेवर मोहिम करण्यास सोपें गेलें. ता. ११-१२-१७८० रोजीं चिमाजी आप्पाच्या पराक्रमाचें स्मारक जें वसई तें ठिकाण गॉडर्डनें अचानक काबीज केलें; व शेवटीं पुणें दरबारला तह करणें भाग पाडलें. त्याप्रमाणें तहाची वाटाघाट करण्याकरितां हेस्टिंग्जनें याचीच योजना केली. पण शिंद्यांच्या हालचालीमुळें हेस्टिंग्जचें वरील मत बदलून पुढें युद्ध चालू ठेवावें असें त्यानें ठरविलें. पण मद्रासच्या इंग्रज चौकड्यांनीं युद्ध थांबवून तह करण्याचें ठरविलें; व त्याकरितां त्यांनीं गॉडर्ड यास तहाची वाटाघाट करण्यास पाठविलें (१७८१).

**गार्ग्य नारायण**— आश्वलायन गृह्यसूत्रावर वृत्ति लिहिणारा.

**गालिब**—(स. १७९५-१८३८) एक उर्दू कवि. याचें नांव नजमुद्दौला दबीरूल्मुल्क मीर्जा असदुल्ला खाँ असें असून गालिब हें याचें उपनांव होतें. याच्या बापाचें नांव अबदुल्ला बेग.

उर्दूंतील सर्वश्रेष्ठ कवींत गालिबचें नांव पहिलें येतें. यानें प्रथम आपलें उपनांव 'असद' असें ठेविलें होतें. पण पुढें स. १८२७ मध्यें यानें आपलें नांव गालिब ठेवून कवितेंत असद नांवाचा हा उपयोग करी. हा स. १८२९ मध्यें कलकत्त्यास गेला. नंतर हा रामपूर येथें गेला. तेथील नवाबानें याचा सन्मान करून यास २०० रु. दरमहा वेतन दिलें. कारण तेथील नवाब याचा जुना शिष्य होता. पण याला दिल्लीशिवाय चैन न पडल्यामुळें हा थोड्याच दिवसांत दिल्लीस गेला.

हा विनोदप्रिय असून याचा विवाह नवाब इलाही बक्षखाँसाहेब यांच्या कन्येशीं झाला होता. पण यास बायकोपासून सुख लाभलें नाहीं. कारण बायकोचा स्वभाव फार कर्कश होता. याला एकंदर सात अपत्यें झालीं, पण तीं एक एक वर्षाचीं होऊन मेलीं.

हा व्यवस्थितपणाचे बाबतींत फार दक्ष असे. स. १८४१ मध्यें दिल्लीस एक कॉलेज उघडण्यांत आलें. त्यावेळीं तेथें एका फार्सी प्रोफेसरची अवश्यकता होती. गालिबची प्रसिद्धी ऐकून कॉलेजच्या टामसनसाहेबानें यास बोलाविलें. बोलवल्याप्रमाणें हा भेटीस गेला. पण साहेबाच्या दाराबाहेर जाऊन हा उभा राहिला. कांहीं दुसऱ्या कारणामुळें साहेब बाहेर आल्यामुळें त्यास हा बाहेर उभा असल्याचें दिसून आलें. तेव्हां साहेबानें यास बाहेर उभा राहण्याचें कारण विचारलें. 'साहेब माझ्या स्वागतार्थ बाहेर आले नाहींत म्हणून' असें यानें उत्तर दिलें. तेव्हां साहेबानें यास 'आपण नोकरीकरितां आलां आहांत, स्वागताकरितां नाहीं' असें सांगून त्या जागेवर दुसऱ्या इसमाची नेमणूक केली. यावरून याच्या स्वभावाची जाणीव होते.

वास्तविक हा एक फार्सींतील महाकवि होय. तरी पण हा उर्दूमध्येंहि कविता करीत असे. याचें उर्दूतील लिखाण फार थोडें आहे. याच्या काव्यांत अद्भुत आनंद असे. यानें आपली कविता सरळ आणि सर्वसाधारण लोकांना कळेल अशा व्यावहारिक भाषेंत लिहिली आहे. उर्दूमध्यें याचा एक दीवान आहे, परंतु फार्सीमध्यें याचीं बरींच पुस्तकें असून तीं लोकप्रिय आहेत. हा मोठा गुणी आणि उदार होता. याचें व जौकचें कधीं पटलें नाहीं. तरी पण यानें आपल्या कवितेंत जौकची प्रशंसा केली आहे. हा मीर(कवि)चा परम भक्त होता. यानें सौदाचीहि प्रशंसा केली आहे. याचे शिष्य पुष्कळ होते. यानें उर्दू कवितांचा प्रवाह बदलून त्यास आपल्या गुरुभक्तीचा परिचय चांगला करून दिला.

हा गद्यांतहि फार चांगलें लिहीत असे. याचें गद्यांतील लिखाण इतकें चांगलें आहे कीं त्यासारखें गद्य अद्याप उर्दूत कोणींच लिहिलें नाहीं. 'उर्दू-ए-मुअल्ला' हा याचा उर्दू-गद्यांतलि प्रसिद्ध ग्रंथ होय. या ग्रंथांत याच्या पत्रांचा संग्रह आहे. याशिवाय 'औद-ए-हिन्दी' हाहि याचा एक दुसरा ग्रंथ होय. उर्दू कवितेंतील याचा तात्त्विक भाग अद्वितीय आहे. यानें कोणाचेंहि अनुकरण न करितां स्वतंत्र रीतीनें कविता केल्या आहेत. याच्या कवितेंतील वर्णनें स्पष्ट असून हृदय-द्रावक आहेत. यानें आपल्या उर्दू 'दीवानां' तील पुष्कळ 'गजला' काढून टाकून तो लहान केला.

याच्या वंशाच्या परंपरेची माहिती इराणच्या बादशहाजवळ मिळते. इराणांतील सर्व कर्तृत्ववान् पुरुष नष्ट झाल्यावर याचे पूर्वज इराण सोडून दिल्लीस आले; व पुढें हिंदुस्थानांतच त्यांनीं आपलें वास्तव्य ठेविलें. म्हातार-

पणीं गालिब बहिरा झाला आणि स. १८६८ मध्यें मरण पावला ( क. कौ. भा. ४ था ).

**गावबा**—एकनाथाचा एक मंदबुद्धि शिष्य. गोदाकांठच्या एका ब्राह्मणाचा मुलगा. हा पुरणपोळीचा हट्ट घेई म्हणून आईनें याला एकनाथाच्या घरीं पाठविलें. तेथें याला नेहेमीं पुरणपोळी खावयास मिळे. पण याच्या जडपणामुळें एकनाथ या शब्दापलीकडे याचें अध्ययन नव्हतें. पण नाथाच्या घरीं यानें श्रवणभक्ति चांगली केली. त्यामुळें याला अधिकार प्राप्त होऊन युद्धकांडाच्या ४४ व्या अध्यायानंतर भावार्थरामायण पुरें करण्याचें काम नाथांनीं मरतेसमयीं याच्यावर सोंपविलें आणि तें काम यानें चांगल्या प्रकारें पुरें केलें आहे ( आजगांवकरकृत एकनाथचरित्र, पा. १०८–१०९ ).

**गाहडवाल घराणें**—यशोविग्रह, महिपाल. १ चंद्रदेव (स. १०८५–११००), २ मदनपाल ( स. ११००–१११४), ३ गोविंदचंद्र ( स. १११४–११५५ ), ४विजयचंद्र (राज्यपाल,अस्फोतचंद्र) (स.११५५–११७०) ५ जयचंद्र ( स. ११७०–११९३ ), हरिश्चंद्र ( स. ११९३ –१२०० ).

या घराण्याचे ताम्रपट व शिलालेख सांपडले आहेत. त्या सर्वांमध्यें या घराण्याचा संस्थापक यशोविग्रह असल्याची एकवाक्यता दिसते. सूर्यवंशांतील व चंद्रवंशांतील राजपुरुष नष्ट झाल्यावर कनोजच्या राज्यावर या घराण्याचें स्वामित्व प्रस्थापित झालें. गाहडवालांच्या पूर्वी जे सूर्यवंशी राजे कनोजला राज्य करीत होते ते गुर्जर प्रतिहार घराण्यांतील असले पाहिजेत (राठोड वंश पाहा).

कनोज येथें या घराण्यांतील चंद्रदेवानें राज्य स्थिर केलें. स. १०३६ मध्यें कनोजला गुर्जर प्रतिहार घराण्यांतील राजा यशपाल राज्यारूढ होता, असें कारा येथील शिलालेखावरून समजतें. या राजाचे मागून या घराण्यांतील जे राजे तख्तनशीन झाले त्यांची माहिती अनुपलब्ध आहे. कदाचित् याच सुमारास चेदीच्या कलचुरी हैहय घराण्यांतील कर्णराजानें कनोजला आपलें राज्य स्थापन केलें असावें व त्याचे मागें भोजराजा राज्यावर आला असावा. कारण बसाही येथील ताम्रपटावर असा मजकूर आहेः "भोजराजा देवस्त्रियांच्या नेत्रांचें अनुरंजन करूं लागला व कर्णराजा स्मृतिशेष झाला, तेव्हां पृथ्वीला शत्रूंचा त्रास झाला. पृथ्वीनें चंद्रदेवाला आपला भर्ता केलें." यावरून कर्ण व भोज राजांचे पश्चात् चंद्रदेव कनोजच्या गादीवर आला असें दिसतें. मात्र यांपैकीं भोज हा माळव्यांतील परमार घराण्यांतील भोज नव्हे. उपरिनिर्दिष्ट 'सूर्यवंशांतील राजघराण्यांतील राजपुरुष व चंद्रवंशांतील राजपुरुष नष्ट झाल्यावर कनोजच्या सिंहासनावर गाहडवाल घराण्यांतील चंद्रदेव विराजमान झाला' असा रहण येथील ताम्रपटांतील मजकुरावरून बोध होतो. गुर्जर प्रतिहार राजे आपली सूर्यवंशांत गणना करीत व कलचूरी हैहय राजे आपली चंद्रवंशांत गणना करीत व माळव्यांतील परमार घराण्यांतील राजे आपल्या वंशाची उत्पत्ति अग्निवंशापासून झाली असें समजतात. म्हणूनच चिंतामणराव वैद्य समजतात त्याप्रमाणें कनोजचा भोजराजा हा माळव्याच्या भोजराजाहून भिन्न असला पाहिजे.

गाहडवाल राजांच्या बहुतेक सर्व ताम्रपटांत करांच्या यादींत 'तुरुष्कदंड' नांवाच्या एका कराचा निर्देश असतो. या शब्दाचे अर्थ विद्वानांनीं अनेक केले आहेत. कोणी त्याचा अर्थ 'सुवासिक किंवा मसाल्याच्या कांड्यावरील कर' असा करतात, कोणी 'तुर्कांपासून संरक्षण करण्याकरितां बसविलेला कर' असा करतात. श्री. वैद्य कनोजच्या राजानें गझनीचे राजाला द्यावयाच्या करभाराकरितां कर असा अर्थ करतात. व्हिन्सेंट स्मिथच्या मतें 'तुर्क लोकांपासून संरक्षण करण्याकरितां हिंदूंकडून वसूल करावयाचा कर' असा या शब्दाचा अर्थ असावा. कोनावच्या मतें 'देशांत वास्तव्य करून राहिलेल्या मुसलमान प्रजेवरील कर' असा अर्थ करावा.

**गांगेयदेव विक्रमादित्य कलचुरी**—( स. १०१०–३८ ) त्रिपुरी येथील कलचुरी घराण्यांतील दुसऱ्या कोक्कल कलचुरीचा मुलगा.

जेजा-भुक्ति येथील चंदेल्ल घराण्यांतील विजयपाल राजाचा हा समकालीन होय. याचा निर्देश अल्बेरुनीनें 'डाहलचा राजा' असा केला आहे. हा मोठा पराक्रमी आणि महत्वाकांक्षी राजा होता.

**गिरमाजी खंडेराव**—प. रघूजी भोसल्याचा सरदार. मुधोजी व जानोजी यांच्या तंट्यांत हा जानोजीकडे होता ( ना. प्रां. इ. पा. १०६–११६ ).

**गिरिअम्मा**--( स. १७५० सुमार ) कानडी ब्राह्मण कवयित्री. हेळवनकट्टे या गांवच्या रंगनाथाची ही भक्त असल्यामुळें हिच्या नांवामागें या गांवाचें नांव जोडलेलें असतें. वास्तविक हिचें गांव हरीहराजवळील कोमारनहळ्ळी होय.

ग्रंथः—चंद्रहासकथा, सीताकल्याण, उद्दालककथा. शिवाय हिचीं पुष्कळ पद्यें प्रसिद्ध आहेत ( क. क. च. भा. ३ पा. ६९ ).

**गिरिजाबाई**—पैठणच्या एकनाथाची पत्नी.

**गिरिधर**—( जन्म स. १६५३–१७३९ ) हे शिष्य-परंपरेनें समर्थांपासून चवथे आहेत ( वेणाबाई, बहिणाबाई, गिरिधर). हा मूळचा मिरजतासगांवकडे राहणारा, परंतु पुढें गुर्वाज्ञेवरून हा बिडापासून सातआठ कोस असलेल्या ईटगांवीं जाऊन राहिला व तेथेंच याचा मुख्य मठ आहे. याचा जन्म शके १५७७ च्या सुमारास झाला असावा, असें अनुमान निघतें. यास पुत्रसंतान नव्हतें. मात्र एक कन्या होती. यानें काशीयात्रा केली होती. याचा समर्थ-चरित्रपर समर्थप्रताप नांवाचा ग्रंथ महत्त्वाचा आहे. यांत शकसंवत्सर हे आढळत नाहींत, तिथि क्वचित् आढळते; व कथाहि कालक्रमानें दिल्या नाहींत. तथापि श्रीसमर्थांनीं सांप्रदायद्वारां प्रचंड घटना निर्माण करून ती चालविण्याकरितां जे शिष्य प्रान्तोप्रान्तीं नेमिले, त्यांचीं नांवें, त्यांनीं जेथें आपले मठ स्थापिले त्या गांवांचीं किंवा प्रांतांचीं नांवें, त्या शिष्यांचे विशिष्ट गुण किंवा कामगिऱ्या इत्यादिकांविषयीं विश्वसनीय माहिती या ग्रंथांत आहे. आणि त्यांपैकीं बऱ्याच गोष्टी समकालीन कागदपत्रांच्या व ग्रंथांच्या पुराव्यानें खऱ्या ठरत असल्यामुळें व ग्रंथकारहि समकालीन असल्यानें हा ग्रंथ विश्वसनीय ठरला आहे. 'श्रीनिवृत्तिराम' व 'समर्थप्रताप' हे याचे दोन ग्रंथ छापून प्रसिद्ध आहेत. याचे एकंदर ४० ग्रंथ उपलब्ध आहेत. त्याशिवाय अभंग, पदें वगैरे फुटकळ कविता बरीच आहे.

यानें पुढीलप्रमाणें ग्रंथ लिहिलः—

१ श्रीग्रंथभावार्थ ( श्लोकः दासबोधाचा सारांश ), २ ग्रंथान्वय ( अभंगः यांत दासबोधाचे वीस दशक व दोनशें समास यांचीं नांवें आहेत ), ३ श्रीआत्मानुभव ( ओव्या ), ४ श्रीदासबोधग्रंथराज–भावार्थ ( श्लोक ), ५ गुरुमार्ग ( अभंग ), ६ शिष्यभावार्थ ( अभंग ), ७ श्रीगुरुआज्ञा ( अभंग ), ८ श्रीगुरुरूप ( अभंग ), ९ शिष्य-शासन (अभंग), १० श्रीगुरुदीक्षा (अभंग), ११ श्रीस्वामी-दर्शन (अभंग), १२ श्रीदेवदर्शन (अभंग), १३ श्रीरामरूप (अभंग), १४ श्रीसीतारूप (अभंग), १५ प्राणनाथ (अभंग), १६ योगीराज (अभंग), १७ दीक्षासंवाद (अभंग), १८ साधुसंवाद (अभंग), १९ श्रीगुरुदेवनमन ( ओवी ), २० देवसंवाद ( श्लोक ), २१ गुरुगीतार्थ ( अभंग ), २२ गुरुवाक्यमाला ( श्लोक ), २३ श्रीशिवरहस्य ( श्लोक ), २४ लोकस्वभाव (ओवी), २५ श्रीकृष्णकथातरंग (ओवी), २६ हरिलीला ( श्लोक ), २७ नानापंथ ( पदेंः कडवीं ), २८ हकिकतवाके ( कडवी ), २९ काशीयात्राकथन ( अभंग ), ३० काशीखंड ( अभंग ), ३१ श्रीसमर्थ-करुणा ( श्लोक ), ३२ श्रीकरुणाराम ( श्लोक ), ३३ श्रीकरुणारुद्र ( श्लोक ), ३४ अद्भुरामायण ( श्लोक ), ३५ मंगलरामायण ( श्लोक ), ३६ छंदोरामायण ( ओव्या ), ३७ सुंदररामायण ( ओव्या ), ३८ संकेतरामायण, ३९ निवृत्तिराम ( ओव्या ), ४० श्रीसमर्थप्रताप (ओव्या ), ४१ स्फुटकविता ( श्लोक, पदें वगैरे ).

२. ( स. १६९६ नंतर ) अभंग व पदें केलीं. गुरु दिगंबर श्रीपाद. परमहंसदीक्षा.

३. गुजराथी कवि. हा गुजराथींतील छंदोबद्ध रामायणाबद्दल प्रसिद्ध आहे. याशिवाय, तुळशीविवाह, राजसूययज्ञ, गोकुळलीला, राधाविरह, रणछोडजीनी गर्भो इत्यादि काव्यें वाचनीय असून उपलब्ध आहेत.

**गिरिधरकविराय**—(जन्म स. १७१२) हिंदी कवि. कुंडलिया नांवाचा एक छंद आहे, त्यामध्यें यानें कविता लिहिली आहे. 'गिरधरका कुंडलिया' नांवानें याचा कवितासंग्रह प्रसिद्ध आहे. 'साँई' शब्दानें ज्या कुंडलियेचा प्रारंभ आहे, ती याच्या बायकोची असें मानतात. हा अयोध्या प्रांतांतील होता. अडाणी लोकांच्या तोंडींहि याची कविता आहे. याच्या कवितेच्या लोकप्रियतेचें कारण साधी रचना व तत्त्वप्रतिपादन हें होय ( क. कौ. भा. १).

**गिरिधर बहादूर**—( स. १७१३–१७२८ ) उत्तर मोंगलशाहींत जे थोडे हिंदु कामदार स्वपराक्रमानें प्रसिद्धीस आले त्यांत याच्या कुटुंबाची गणना आहे. हे नागर ब्राह्मण अलाहाबादेकडे राहत होते. यांचे वडील दयाराम व चुलता छबिलाराम, हे दोघे शूर व मुत्सद्दी असून ते बहादूरशहाचा दुसरा मुलगा अजीमुश्शान याच्या पदरीं होते. याचे वडील स. १७१३ च्या सुमारास आपल्या धन्यासाठीं लढून समरांगणीं मरण पावले. अजीमुश्शान मारला गेल्यामुळें छबिलाराम जहांदरशहाचे पक्षास मिळाला. त्यानें यास व गिरिधरास कारामाणिकपूरचा फौजदार नेमलें. येथें यांनीं द्रव्यसंचय करून फौज वाढविली. नंतर हे दोघे फर्रुखसियरला मिळाले. परंतु सय्यदांनीं गिरिधरास दिल्लीस बोलाविलें. स. १७१९ मध्यें छबिलाराम अर्धांगवायूनें मरण पावला. त्या वेळीं चुलत्याच्या उत्तरक्रियेची सबब सांगून हा प्रयागास एक वर्ष राहिला. हा पराक्रमी, अनुभवी व शूर सरदार होता. पुढें याला आणण्याकरितां सय्यदांनीं आग्र्याहून रतनचंद नांवाच्या एका सरदारास पाठविलें. त्याची व याची खाजगी भेट झाली त्यांत गिरिधरानें तीस लाख रुपये व अयोध्येचा सुभा घ्यावा व अलाहाबादचें ठाणें सोडून द्यावें असा तह ठरला.

पुढें याची बदली माळव्यावर स. १७२१ च्या सुमारास झाली. स. १७२४ त माळव्याचा विभाग करण्यांत आला. मंडलोईच्या मार्फत मराठ्यांची फौज माळव्यांत येऊं लागली तेव्हां त्यांचा यांचा सामना जुंपला. त्यांत चिमाजी आपा व मल्हारराव होळकर होते. देवासच्या ईशान्येस सुमारें पन्नास मैलांवर सारंगपूर येथें याचें वास्तव्य होतें. चिमाजीआपानें याजवर अचानक हल्ला करून यास आमझरा येथें ठार मारिलें ( स. १७२८ अखेर ). उज्जनला एक तट आहे त्यास याच नांव आहे ( म. रि. म. १ ) ( दयाबहादुर पाहा ).

**गुजराथचे राजे**—सोलंकी (चालुक्य) राजे १ मूलराज (स. ९६१–९६)—२ चामुंड (स. ९९७–१००९ )—३ वल्लभ ( स. १०१० याचा भाऊ ),—४ दुर्लभ ( स. १०१०–१०२१ याचा भाऊ ) नागराज–५ भीम १ ला (वा. बकुला, स. १०२१–१०६३)—६ कर्ण (स.१०६३–९३)—७ जयसिंह सिद्धराज (वा. कांचनदेवी,स.१०९३–११४३ ),( पहिल्या भीमाला दोन पुत्र होते. एक कर्ण व दुसरा खेमराज ऊर्फ हरपाळ ) खेमराज ऊर्फ हरपाल–त्रिभुवनपाल—८ कुमारपाल (स.११४३–११७३, कुमारपलाला कीर्तिपाल व महीपाल नांवांचे दोन भाऊ होते. ) —९ अजयपाल (महीपालाचा पुत्र.स. ११७३–७६)—१० मूलराज दुसरा ( स. ११७६–७८ ),—११ भीम दुसरा ( दुसऱ्या मूळराजाचा भाऊ, स. ११७८–१२४१ ) १२ त्रिभुवनपाल. यानंतर गुजराथचें राज्य वघेल किंवा बाघेल वंशाकडे गेलें.

वघेलवंश–धवल–अर्णोराज ( आनाक किंवा आना ), —लवणप्रसाद—वीरधवल ( याला तीन पुत्र ), वीरम, वीसल व प्रतापमल्ल ( कुमारपाल सोलंकीच्या मुलीचा मुलगा )—अर्जुनदेव (स. १२६०–७३ याला पुत्र दोन), रामदेव ( स. १२७३ ) सारंगदेव ( स. १२७३–९५ ) —कर्ण (पत्नी कमलदेवी–मुलगी देवलदेवी–अलाउद्दीन खल्जीनें राज्य घेतलें स. १२९७ ).

मुसलमान राजे—१ मुजफ्फरशाह (स. १३९६) २ अहमदशाहा ( स. १४११ ) ३ मुहम्मद करीमशाह ( स. १४४२ ) ४ कुतुबुद्दीन ( स. १४५१ ) ५ दाऊदशाहा ( स. १४५९ ) ६ महमूदशाह ( बेगडा ) ( स. १४५९ ) ७ मुजफ्फरशाह ( स. १५११ ) ८ सिकंदरशाह ( स. १५२६ ) ९ ( नासिरखाँ ) महमूद ( दुसरा ) ( स. १५२६ ) १० वहादुरशहा ( स. १५२६ ) ( दुसरा ) ११ मीर मुहम्मदशाहा ( फारुकी ) ( स. १५३७ ) १२ महमूदशाहा ( तिसरा ) ( स. १५३७ ) १३ अहमदशहा ( दुसरा ) ( स. १५५४ ) १४ मुजफ्फरशाहा ( तिसरा ) ( स. १५६१ ),

**गुण कामदेव**—हा नेपाळच्या ठाकुरी वंशांतील एक राजा. हा विक्रमदेव याच्या मागून गादीवर बसला. यानें कान्तिपूर वसविलें. हेंच सांप्रतचें खाटमांडू होय. हें शहर स. ७२३ या वर्षी वाग्मती व विष्णुमती या नद्यांच्या संगमावर वसविलें. त्याचप्रमाणें थाबेल हें खेडेगांवहि ( या ठिकाणीं विक्रमाचा विहार व इतर पुष्कळ देवळें आहेत ) या शहरानजीकच वसलें आहे. यानें एकूण ५१ वर्षे राज्य केलें.

**गुणचंद्रगणि**—एक जैन लेखक. स. १०८२ मध्यें यानें महावीरचर्यम् नांवाचा एक प्राकृत ग्रंथ लिहिला ( विंटरनिट्झ––हिस्टरी ऑफ् संस्कृत लिटरेचर, भाग २ ).

**गुणधर्म**—( स. ८८६-९१३ ) कानडी कवि. हा महेंद्रांतक ही पदवी धारण करणाऱ्या गंग राजाच्या पदरीं होता. यानें हरिवंश किंवा नेमिनाथपुराण आणि शूद्रक या नांवांचे ग्रंथ लिहिले.

**गुणभद्र**—( स. ४२०–४७९ ) एक बौद्ध भाषांतरकार. यानें स. ४३५–४६८ च्या दरम्यान रत्नकरंडसूत्र याचें चिनी भाषेंत भाषांतर केलें. तसेंच 'सुखावती व्यूह' व 'लंकावतार' ( स. ४४३ ) या ग्रंथांचींहि चिनीमध्यें भाषान्तरें केलीं ( विंटरनिट्झ–हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर, भा. २ ).

२. ( स. ८१५ सुमार ) जैन लेखक. हा व याचा गुरु जिनसेन या दोघांनीं मिळून त्रिषष्ठिलक्षणमहापुराण अथवा महापुराण हा ग्रंथ लिहिला. यांत आदिपुराण व उत्तरपुराण असे दोन भाग असून त्यांपैकीं आदिपुराणांतील पांच प्रकरणें व संपूर्ण उत्तरपुराण गुणभद्रानें लिहिलें आहे. याशिवाय यानें 'आत्मानुशासन' या नांवाचें एक नीतिपर काव्यहि लिहिलें आहे ( विंटरनिट्झ–हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर, भा. २ ).

**गुणरत्न**—( ग्रंथकाल स. १४०९ ) हा जैनधर्मी श्वेतांवरपंथी असून तपगच्छ शाखेचा होता. यानें 'सद्दर्शनसमस्या' या ग्रंथावर 'सद्दर्शनसमुच्चयवृत्ती' अथवा ' तर्करहस्यदीपिका ' नांवाची टीका लिहिली आहे. या टीकेंत यानें ' न्याय ' व इतर पद्धतींचें सुंदर विवरण केलें आहे. यानें ' क्रियारत्नसमस्या ' नांवाचा आणखीहि एक ग्रंथ लिहिला आहे.

संवत् १४९६ म्हणजे स. १४३९ त रत्नशेखरसूरीनें आपल्या 'श्राद्धप्रतिक्रमणसूत्रवृत्ती' मध्यें याचा निर्देश केला आहे. हा देवसुदर्शनाचा शिष्य असून सं. १४२० म्हणजे स. १३६३ मध्यें अनहलिपट्टण येथें यास सूरी हें पद प्राप्त झालें. त्यावरून हा स. १३६३ ते १४३९ च्या दरम्यान होऊन गेला असला पाहिजे. गुणरत्नाचा गुरु देवसुंदर सूरी हा, सं. १४६६–स. १४०९ त होऊन गेलेल्या 'गुर्वावली' ग्रंथाचा कर्ता मुनिसुंदरसूरीचा समकालीन होता. 'क्रियारत्नसमस्या' हा ग्रंथ मीं सं. १४६६ म्हणजे स. १४०९ मध्यें लिहिला असें हा स्वतःच म्हणतो.

यानें आपल्या सद्दर्शनसमुच्चयांत शौद्धोदनि, धर्मोत्तराचार्य अर्चत, धर्मकीर्ति, यज्ञाकार, कमलशील, दिङ्नाग व इतर बुद्धतत्त्वज्ञानी तसेंच तर्कभाषा, हेतुबिंदु, अर्चततर्कटीका, प्रमाणवार्तिक, तत्त्वसंग्रह, न्यायबिंदु, न्यायप्रवेश, व इतर बुद्ध ग्रंथ यांचा उल्लेख केला आहे. त्याचप्रमाणें 'न्याय' या भागांत हिंदु तत्त्वज्ञानी अक्षपाद, वात्स्यायन, उद्योतकर, वाचस्पति, उदयन, श्रीकंठ, अभ्यतिलकोपध्याय, जयंत, व तसेंच न्यायसूत्र, न्यायभाष्य, न्यायवार्तिक, तात्पर्यटीका, तात्पर्यपरिशुद्धि, न्यायालंकार, न्यायालंकारवृत्ति इत्यादि ग्रंथांचा उल्लेख आला आहे. भासर्वज्ञाचें न्यायशास्त्र व त्यावरील न्यायभूषण, न्यायकलिका, न्यायकुसुमांजलि, इत्यादि १८ टीकांचाहि निर्देश यांत केलेला आहे ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ५२–५३ ).

**गुणवंताबाई भोसले**—ही इंगळे यांची कन्या व शिवाजीमहाराजांची आठवी पत्नी. हिचें लग्न शके १५७९ वैशाख शु. १२ ( ता. १५ एप्रिल १६५७ ) या दिवशीं झालें ( शिवाजी-निबंधावली, पा. २१०–२२५ ).

**गुणविजयगणि**—( हेमविजयगणि पाहा ).

**गुणविष्णु**—( स. ११०० नंतर सुमार ) यानें केलेलें छांदोग्यमन्त्रभाष्य प्रसिद्ध आहे. हा गौडाधिप बल्लाळसेन व लक्ष्मणसेन यांच्या समेंत होता. इंडिया ऑफिसमध्यें असलेल्या छांदोग्य मन्त्रभाष्याच्या पुस्तकांत हा भट्टदामुकाचा मुलगा असें लिहिलें आहे ( Vol. I, p. 47 ). सतराव्या शतकांतील वंग देशांतलि टीकाकारानें कांहीं मंत्रांवर विनियोगावद्दल अनिरुद्ध भट्टाचा व मंत्रभाष्यकार म्हणून गुणविष्णूचा निर्देश केलेला आढळतो. बल्लाळसेनाचा गुरु अनिरुद्धभट्ट व हा हे दोघे समकालीन होते. अनिरुद्धाची पितृदायिता व त्याचें भाष्य हें दोघांनीं एकमेकांच्या विचारानें लिहिलें आहे. स. च्या १२ व्या शतकांत हे दोघेहि बल्लाळसेनाच्या सभेंत होते ( छान्दोग्यमंत्रभाष्याची इंग्रजी प्रस्तावना पाहा ).

सामवेदाच्या नित्यकर्मसंस्कार वगैरेंत येणाऱ्या मंत्रांवर याचें थोडक्यांत भाष्य आहे. पाणिनीय व्याकरणाचा यानें आश्रय केला आहे. स. १६ व्या शतकांतील रघुनन्दभट्टानें आपल्या स्मृतितत्त्वांत याचा वारंवार उल्लेख केला आहे. सतराव्या शतकांत विद्यावाचस्पतीनें, 'षड्कर्मव्याख्यानचिंतामणि' करणाऱ्या नित्यानंदानें व शत्रुघ्नानें याचा उल्लेख केलेला आहे.

**गुणाकर पंडित**—याचें उपनांव काटे. गुणाकर अशी यास पदवी होती. थोरले शाहूमहाराजांची यावर फार कृपा होती. सिद्ध गुणाकरानें कपिलानिर्णय नांवाचा संस्कृत गद्यग्रंथ लिहिला तो याचाच असावा ( मं. श. १८३५ वा. इ. ले. ७९ ).

**गुणाढ्य**—( स. ख्रि. पूर्व चवथें शतक सुमार ) याची जन्मकथा ही एक मासलेवाईक कथा असून ती पुढील-प्रमाणें आहेः

" प्रतिष्ठान प्रांतांत सुप्रतिष्ठित म्हणून एक नगर आहे. तेथें सोमशर्मा नांवाचा कोणीएक उत्तम ब्राह्मण होता. त्यास वत्स व गुल्मक असे दोन पुत्र व श्रुतार्था नांवाची तिसरी कन्या, अशीं तीन अपत्यें होतीं. कांहीं कालानें भार्येसह तो ब्राह्मण मरण पावला. तेव्हां त्या दोघां पुत्रांनीं आपल्या भगिनीचें पालनपोषण केलें. पण एकाएकीं ती कन्या गर्भवती झाली. तेव्हां तेथें दुसरा कोणी पुरुष नसल्यामुळें त्या दोघां बंधूंस परस्परांविषयीं शंका आली. परंतु श्रुतार्था फार शहाणी होती. तिला आपल्या भावांची वृत्ति साशंक झाली आहे, असें समजलें व त्याबरोबर ती न विचारतांच त्यांस म्हणते–'तुम्ही मजविषयीं पापशंका करूं नका. मी तुम्हांस खरा प्रकार सांगतें. कुमार कीर्तिसेन या नांवाचा नागराज वासुकीचा पुतण्या आहे. मी स्नानाला गेलें असतां त्यानें मला एकदां पाहिलें व त्याचें चित्त कामासक्त झालें. त्यानें आपलें कुल व नांव सांगून गांधर्वविधीनें माझ्याशीं लग्न लाविलें.' पण भगिनीचें तें भाषण ऐकून, 'तूं सांगतेस तें खरें कशावरून' असें विचारलें, तेव्हां तिनें त्या नागकुमाराचें स्मरण केलें. त्याबरोबर तो प्रत्यक्ष पुढें आला आणि त्यांस म्हणाला " हिला मीं आपली भार्या केली आहे, व त्यामुळें ही सुरसुंदरी शापापासून मुक्त झाली आहे. हिला पुत्रच होईल व त्याचा जन्म होतांच तुम्ही दोघेहि शापापासून मुक्त व्हाल. ' असें सांगून तो गुप्त झाला. पुढें कांहीं दिवसांनीं श्रुतार्था प्रसूत झाली व तिला पुत्र

झाला. तोच मी आहें असें समज. मी जेव्हां जन्मास आलों तेव्हां, हा गुणवंतांचा अवतार झाला आहे, असें आकाशवाणीनें सांगितलें. तें ऐकून माझ्या बांधवांनीं माझें गुणाढ्य असें नांव ठेविलें. माझ्या उत्पत्तीनें माझ्या आईचा व मामांचा शाप क्षीण झाला व तीं दोघेंहि कांहीं कालानें मरण पावलीं. त्यामुळें मला फार दुःख झालें व माझें सर्व धैर्य गळालें." "पण प्रसंगच पडला म्हणजे सर्व प्राणी तो सहन करण्यास सिद्ध होतात या न्यायानें मीं आपल्या शोकाचा त्याग केला आणि मी जरी लहानच होतों, तरी ईश्वरावर सर्व विश्वास टाकून विद्या संपादन करण्याकरितां दक्षिण देशांत एकटाच गेलों. योग्य गुरूजवळ राहून सर्व विद्या शिकलों. त्यामुळें माझी प्रसिद्धी झाली. पण मित्रा, जन्मभूमीचें प्रेम कांहीं अवर्णनीय असतें. मला परदेशांत बरें वाटेना म्हणून मी आपल्या देशांत परत आलों. माझे गुण सर्वांच्या अनुभवास येऊं लागले. माझ्या विद्येवर लुब्ध होऊन पुष्कळ शिष्य मजबरोबर आले होते. त्यांच्यासहवर्तमान मी फार दिवसांनीं प्रतिष्ठानांत प्रवेश केला व तेथें मला अवर्णनीय शोभा दिसली."

हा शालिवाहन राजाचा एक मंत्री. यानें उदयनाच्या गोष्टी असलेलें पैशाची भाषेंत लिहिलेलें बृहत्कथा नांवाचें पुस्तक काणभुती नांवाच्या पिशाचाच्या सांगण्यावरून राजास अर्पण केलें. परंतु राजा असलें घाणेरडें पुस्तक घेईना, तेव्हां यानें त्यांपैकीं कांहीं भाग जाळून टाकले. नंतर कांहीं दिवसांनीं राजाला या पुस्तकाची महती कळल्यावर त्यानें याजजवळ मागितलें म्हणून यानें याच्याजवळ शिल्लक असलेला शेवटला भाग फक्त त्यास दिला. सध्यां पैशाची भाषेंतील बृहत्कथा उपलब्ध नाहीं. यानें राजाला संस्कृत व्याकरण ६ वर्षांत शिकवण्याचें कबूल केलें होतें (कथासरित्सागर २. ८). पुढें सोमदेवानें बृहत्कथेचें कथासरित्सागर नांवानें संस्कृतांत भाषान्तर केलें. तसेंच क्षेमेंद्रानें बृहत्कथामंजरी यावरूनच लिहिली. मूळ सोमदेवाच्या ग्रंथाचा काल स. चें दुसरें शतक होय. पैशाची ही त्या वेळच्या पर्शियन सम्राटाची भाषा होती. सध्यां देशभाषा सोडून इंग्रजी भाषेंत जसे ग्रंथ लिहितात तसें त्या वेळींहि झालेलें आहे.

**गुणानन्दविद्यावागीश**– (स. १५७० सुमार) जैनतर्कज्ञ यशोविजयगणि (स. १६०८-१६८८) यानें आपल्या 'न्यायखंडनखाद्य' या ग्रंथांत याजवर टीका केली आहे. स. १६२२ त याच्या एका ग्रंथाची नक्कल करण्यांत आली. यावरून हा स. १६२२ पूर्वी होऊन गेला असला पाहिजे. त्यानें रघुनाथशिरोमणीच्या ग्रंथावर टीका लिहिल्या असून तो त्याच्या बराच मागाहून होऊन गेला. हा स. १५७० च्या सुमारास होऊन गेला असावा. यानें खालील ग्रंथ लिहिले आहेतः—

(१) 'अनुमानदीधितिविवेक' (२) 'आत्मतत्त्वविवेकदीधितिटीका' (३) 'गुणविवृतिविवक' (४) 'न्यायकुसुमांजलीविवेक' (५) 'न्यायलीलावतीप्रकाशदीधितिविवेक' (६) 'शब्दालोकविवेक' (हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ४६८).

**गुणांक**—चालुक्यांपैकीं तिसऱ्या विजयादित्याचें नामान्तर.

**गुत्त**—(स. ११७५ पूर्वी) हा गुत्त घराण्यांतील महागुत्ताचा मुलगा होय. हा चालुक्यांचा मांडलीक राजा असावा. याचें म्हैसूर प्रांतांत राज्य होतें.

**२.** (स. ११८२ पूर्वी) हा गुत्तांपैकीं पहिल्या वीर विक्रमादित्याचा मुलगा. हा आपल्या भावानंतर गादीवर आला. बायको पद्मलादेवी.

**३.** (स. १२६२-६५) हा गुत्तांपैकीं तिसऱ्या विक्रमादित्याचा मुलगा. महादेव यादवाचा जहागीरदार.

**गुत्तघराणें**—१ महागुत्त, २ गुत्त १ ला, ३ मल्ल किंवा मल्लिदेव (स. ११७५ गोविंदराजाचा मांडलिक), ४ (वीर) विक्रमादित्य १ ला, ५ जोम्म किंवा जोयिदेव (स. ११८१, आहवमल्ल कलचुरीचा जहागिरदार), ६ गुत्त २ रा (बा. पद्मलादेवी), ७ विक्रमादित्य २ रा (आहवादित्य, बा. पत्तलादेवी स. ११८२-१२१३), ८ जोयिदेव २ रा (स. १२३८ सिंघण यादवाचा जहागिरदार), ९ विक्रमादित्य ३ रा (बा. मैलालदेवी), १० गुत्त ३ रा (स. १२६२-६५, महादेव यादवाचा जहागिरदार). हे माळव्यांतील गुप्तांचे वंशज असावेत. हें घराणें धारवाड जिल्ह्यांतील गुत्तव किंवा गुत्तवोळल येथें राज्य करीत होतें (सिवेल आणि आयंगार, पृ. ३५०).

## गुप्तघराणें (सम्राट् पाटलीपुत्र)






## २. गुप्त घराणें ( माळवा )




**गुमान मिश्र**—( काव्यकाल स. १७४३ ) हिंदी कवि. यानें अली अकबरखाच्या आज्ञेवरून नैषकाव्याचा हिंदींत अनेक छंदांत अनुवाद केला ( क. कौ. १ ).

**गुरदीन पांडे**—हिंदी कवि. यानें स. १८०२ मध्यें बागमनोहर नांवाचा ग्रंथ लिहिला. त्यांत अनेक छंद व साहित्यविषयक गोष्टींचें वर्णन केलें आहे.

**गुरवमिश्र**—दिनाजपुर येथील गरुडस्तंभावरच्या लेखांतील २५-२६ व्या ओळींत याला 'कलियुग वाल्मिकी' असें म्हटलें आहे. यानें वेदावर भाष्य लिहिल्याचाहि उल्लेख आहे. नारायणपाल देवाच्या ताम्रशासनांतहि याच्या वेदज्ञानाचा उल्लेख आहे ( गौडलेखमाला, पृ. ६२ ). हा स. च्या १० व्या शतकांत पाल वंशांतील नारायणपाल देवाचा प्रधान होता. याचा पणजा दर्भपाणि व बाप केदारमिश्र हे वेदवेत्ते असून क्रमानें देवपाल व शूरपाल यांचे प्रधान होते ( संस्कृतसाहित्य-परिषद, १५. १० ).

**गुरु गोविंदसिंह**—( स. १६६५–१७०७ ) हा शिखांचा दहावा गुरु होय. याच्या बापाचें नांव गुरु तेजबहादूर आणि आईचें नांव गूजरी असें होतें. याचें लग्न वयाचे ७ वे वर्षी लाहोरच्या हरिवंश खत्री यांच्या मुलीशीं झालें होतें.

विचारक्रांतीनें राज्यक्रांति घडवणारा थोर पुरुष म्हणून याची कीर्ति आहे.

एके काळीं हा हिंदुजातीचा ढालीप्रमाणें संरक्षक होता. यानें हिंदुजातीचें आणि धर्माचें संरक्षण करण्याकरितां वीर-जात निर्माण केली. हा विद्वानांचें आदरातिथ्य चांगल्या प्रकारें करी. हा स्वतः मेधावी, देशकालज्ञ, आणि रणनिपुण होता.

एक हिंदी कवि म्हणूनहि याला मोठा मान आहे. हा संस्कृत व फार्सी भाषेंत विद्वान् असून हिंदी कवि होता. यानें जाप, सुनीतिप्रकाश, ज्ञानप्रबोध, प्रेमसुमार्ग, बुद्धिसागर, विचित्रनाटक आणि ग्रंथसाहेबांतील कांहीं भाग असे ग्रंथ लिहिले ( क. कौ. भा. १ ला ).

सर्वलोहप्रकाश, चंडीचरित्र हे ग्रंथहि याचेच आहेत. हा सुंदर व्रजभाषा लिहीत असे. 'सप्तशती' नांवाचा सुप्रसिद्ध संस्कृत ग्रंथ यानें हिंदी भाषेमध्यें 'चंडीचरित्र' या नांवानें गुंफला आहे ( शब्दसागर–प्रस्तावना ).

हा धोरणी व चलाख असल्यामुळें याच्यापासून शीखपंथांत नवीन मन्वंतर सुरू झालें. यानें लष्करी शिस्तीचें महत्त्व समजावून देऊन एक नवीनच प्रजासत्ताक मंडळ स्थापिलें. केस, लोखंडी कडे, कंगवा, कच्छ (चोळणा) व कट्यार असे पंचकन आरंभणारे पांच पदार्थ धारण करावे असा शिखांना नियम घालून दिला. अनेक नियम तयार करून शिस्त राखण्याचा प्रयत्न केला. गोवध-बंदी करून हिंदूंचीहि सहानुभूति संपादन केली.

आदिग्रंथाचा 'दसम पादशाही' म्हणून जो विभाग आहे तो गुरु गोविंदसिंगाचा असून जहाल शीख त्याला मानतात. यानें 'खालसा' म्हणजे 'एकी' हा अर्थ लोकांना पटवून दिला. गुरुमता नांवाचें एक मंडळ स्थापिलें.

'दसम पादशहाका ग्रंथ' यामध्यें 'विचित्र नाटक' ही १४ भागांची पद्यरचना दिली आहे. हा ग्रंथ गुरु गोविंदसिंहानंतर २६ वर्षांनीं भाई मणिसिंह यांनीं प्रकाशित केला. जुन्या हिंदींत हा ग्रंथ असून त्यांत संस्कृत व फार्सी शब्द आले आहेत. यांत सोढी वंशाचा उगम रघुवंशापासून झाला असल्याचें दिलें आहे. लवानें लाहोर आणि कुशानें कसूर हीं शहरें स्थापिलीं. कुशवंशीय कालकेट हा बलवान् असल्यामुळें लववंशीय कालराय याला त्यानें हाकून दिलें. तो सानौंध देशांत गेला. तेथें त्यानें एका राजकन्येशीं लग्न केलें. त्याला सोधीराय हा मुलगा झाला. हाच सोढीवंशाचा मूळ पुरुष. याच वंशीय लोकांनीं पुढें पंजाब घेऊन कुशवंशीयांस हांकून दिलें; व ते बनारसला पळून गेले. तेथें ते वेदपारंगत झाले म्हणून त्यांस वेदिस् नांव मिळालें. ह्या गतगोष्टींनीं उत्पन्न झालेला रोष शमविण्यासाठीं पंजावच्या सोढी राजानें वेदिसला परत बोलाविलें. राजानें त्यांना वेद म्हणण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें त्यांनीं वेद म्हटले. त्यावर राजा खूष होऊन त्यानें आपलें सर्वस्व त्यास दिलें. ह्या वेळीं संतुष्ट होऊन वेदिसचा मुख्य त्या राजाला म्हणाला, "मी ज्या वेळीं नानक म्हणून कलियुगांत अवतार घेईन त्या वेळीं तुला जगन्मान्य करीन. आणि तूं त्या वेळीं लोकोत्तर होशील." ज्या वेळीं गुरु अमरदासानें रामदास सोढीला गुरुपद दिलें त्या वेळीं हें वचन सत्य झालें. तेथून पुढें गुरुपद वंशपरंपरा सोढी वंशांत राहिलें.

यानंतर गुरु गोविंदसिंहानें आपल्या कार्याचें दिग्दर्शन केलें आहे. पूर्वजन्मीं यांनीं हेमकूट पर्वतावर तपश्चर्या केली त्या वेळीं परमेश्वरानें यांस कलींत जन्म घेण्याची आज्ञा केली. तशी यांची इच्छा नसतांना केवळ ईशइच्छेनें यांस यावें लागलें. धर्मसंस्थापना करण्यासाठीं हा जन्म यांनीं घेतला. यांना नानकाचे शिष्य अगर बाबराचे वंशज यांचें अस्तित्व मान्य आहे. पहिल्याला धार्मिक व दुसऱ्याला राजकीय महत्त्व आहे.

या विचित्र नाटकामध्यें युद्धाच्या वेळीं आवेश आणणाऱ्या गोष्टींचा अंतर्भाव केलेला आहे. भागवताच्या १० व्या स्कंधांतील कृष्णाच्या शौर्याच्या कृत्यांचें वर्णनहि त्यांत दिलें आहे. चंडीचीहि त्यांत स्तुति दिलेली आहे.

भाई सुखासिंहाचें 'गुरुविलास' आणि भाई संतोखसिंहाचें 'सूरजप्रकाश' यांत गोविंदसिंहाचें चरित्र सांपडतें. आनंदपुरांत गोविंदसिंह बरेच दिवस राहिले होते.

गुरुबक्षसिंह हा एक यांचा पट्टशिष्य होता ( हि. का. १.५१-६१ ).

मुसलमान होईना म्हणून अत्यंत क्रूरपणें तेजबहादरचें शिर धडापासून वेगळें करण्यांत आलें. तेव्हां आपली शक्ति वाढविण्याचा यानें निश्चय केला. वीरवृत्तीचा उपदेश देण्यास सुरुवात केली, आणि तलवार, घोडे वगैरे युद्धसाहित्यच गुरूला भेट देण्याविषयीं सांगितलें. आणि स्वतःहि साधूचा वेष सोडून बादशाही थाटानें राहण्यास सुरुवात केली. गोवधबंदी करून धर्मरक्षक अशी पदवी धारण केली; आणि एकीचा सर्वांना उपदेश करून हिंदुमात्राचा विश्वास संपादन केला. राम, भरत, भीष्म, अर्जुन आणि भीम यांचा आदर्श डोळ्यापुढें ठेवण्याविषयीं हा उपदेश करी; चंडीची उपसना लोकांना करावयास सांगे आणि चंडीचा साक्षात्कार म्हणून आपल्या हातांतील नंगी तलवार दाखवी. दयाराम खत्री, धर्मा जाट, हिम्मत् कहार, साहेबा नापित आणि मोहकम धोबी हीं पांच माणसें देवलि बळी जाण्यास तयार झालीं. त्यांना यानें आपल्या बरोबरीचा अत्यंत मोठा मान दिला; आणि जातपात न मानतां धर्माकरितां मरण्याला लोकांना उत्तेजन देऊन लोक तयार केले.

यानें आपल्या संप्रदायाचें नांव खालसा म्हणजे एकी असें ठेवलें आणि प्रत्येकाला नांवाचे आणि खरोखरीचे सिंह बनवले. मुसलमानांशीं याचीं युद्धें सुरू झालीं तेव्हां अनेक प्रसंगांतून हा सुरक्षित पार पडला. पण याचीं दोन मुलें युद्ध करतांना पडलीं आणि शिखांचा सर्व संहार होण्याची वेळ आली तेव्हां हा मुसलमानी वेष पत्करून पळाला. वाटेंत एका ठिकाणीं मुसलमानांबरोबर जेवण करून याला आपले प्राण वांचवावे लागले. दुसरीं दोन मुलें चिणून ठार मारलीं गेलीं. त्या दुःखानें याची माता गुजरी हिनें तुरुंगाच्या खिडकींतून उडी टाकून प्राण दिला ( बंदा पाहा ). शेवटीं हे दक्षिणेंत नांदेड येथें शांततेनें दिवस घालवीत असतां मारले गेले.

एके दिवशीं रात्रीं अताउल्ला आणि त्याचा भाऊ गूल खाँ या दोघां पठाणांनीं मिळून, गुरु गोविंदसिंहाच्या पोटांत झोपला असतांना कट्यार भोंसकली. कारण गोविंदसिंहानें त्या पठाणाच्या बापास लढाईंत मारिलें होतें. कट्यार भोंसकल्यामुळें गोविंदसिंह जागा झाला, आणि तलवार घेऊन एका घावांत गुलखाँचे दोन तुकडे केले.

पण याला ( गोविंदसिंह ) झालेल्या जखमेंतून अधिक रक्त गेल्यामुळें याचाहि तेथेंच प्राण गेला. हा सर्व प्रकार गोदावरीच्या कांठीं अविचल गांवीं नांदेड-पाशीं झाला.

**गुरुदास**—हे शिवरामस्वामींचे गुरुबन्धु. यांचे गुरु पूर्णानन्द ( नारायण ). ग्रंथ-गुरुबोध, तारकबोध, श्रीकृष्ण-दर्शनविलास, श्रीनाथद्वादशमहावाक्यविलास ( सं. सू. ).

**गुर्जरभक्त**—हा नामदेवाचा गुजराथमधील तद्देशीय अनुयायी होय.

नामदेवानें आपल्या भक्तिज्ञानाच्या उपदेशाचा वर्षाव याच्यावर केला, त्यामुळें यानें कृतज्ञतेनें नामदेवाचीं स्तुतिस्तोत्रें गाऊन स्वतःस कृतार्थ मानून घेतलें. नामदेवाचे चमत्कार गुर्जर-वाङ्मयांत घुसले आहेत. गुर्जर-भक्त नरसीचे हृदयांत भक्तीची लागण करून पुनः जोपासनेची जोखीम उचलणारा महाभाग महाराष्ट्रांतील एक वारकरी भक्तच होता. गुर्जर नांवाचे दोन भाऊ होते. ते दोघेहि नामदेवाचे अनुयायी होते. त्यांपैकीं एक भक्त व दुसरा कवि होता ( मं. त्रै १८४७-४८ पृ. ८९९ ).

**गुर्जर शिव व्यास**—(स. १४०३ सुमार) एक महानुभाव. हे कवीश्वर आम्नायांतील अचळ मुरारीमल्लाचे शिष्य. यांचें पूर्वाश्रमींचें नांव शिवपाळ असून हे श्रीचक्रधर वंशांतील सहावे पुरुष होत. यांच्या पित्याचें नांव धर्मपाळ. हे गुजराथेंतून पैठण येथें आले. यांचा पुतण्या संगपाळ सोंगेराजव्यास या नांवानें प्रसिद्ध झाला.

यांनीं बरीच सांप्रदायिक व धार्मिक रचना केली. यांनीं धाराशिवकर ओंकारव्यास यांचे शिष्य सिद्धान्ते हरि व्यास यांच्या साहाय्यानें श्रीचक्रधराच्या मुखांतून निघालेल्या सूत्ररूप वाक्यांचा आधार घेऊन शके १३२५ च्या सुमारास तिन्हीं स्थळांची बांधणी केली. प्रथम सूत्र, त्यावर टाचण म्हणजे भाष्यलापिका अशी रचना आहे ( म. वा. इ. भा. २. २७४ ).

**गुलझारखान**—( स. १७७५-८४ ) याच्या बापाचें नांव मीरखान. थोरले बाजीरावाच्या हा फौजेंत सरदार होता. त्यास चोपडें परगण्यांत पन्नास हजारांचा सरंजाम फौजेकरितां दिलेला होता. त्याचा हा मुलगा होय. स. १७७५ च्या सुमारास यानें खानदेशांत केलेल्या बंडाळीची हकीकत वाचण्याजोगी आहे. हा रनाळ्याचा असून यानें कैंक दिवस दादांचे तर्फेनें दंगल माजवून दिली होती.

यानें राघोबादादास चांगलीच मदत केली. स. १७७९ मध्यें हा सातपुड्याचे जंगलांत मोठ्या जमावानिशीं होता. यानें पाटलाजवळून खंड घेऊन गांवें लुटलीं. एकदा चोपड्याचे गढीवर यानें छापा घालून कांहीं लोक ठार मारले. याप्रमाणें याची बंडाळी स. १७८२ त दादा ठिकाणीं बसेपर्यंत कमीजास्त प्रमाणांत चालली होती. याच्या पारिपत्याची मसलत नानानें लगोलग सुरू केली. विसाजीपंत आठवले, भगीरथराव शिंदे वगैरेसहि याजवर जाण्याचा हुकूम होता. त्याप्रमाणें त्यांनीं याजवर स्वारी करून याचा पराभव केला. तेव्हां हा पळून गेला. यानें पुष्कळ ब्राह्मणांस मारून कैद केलें. पुढें हा, धारकर खंडेराव पवार व चंद्रराव पवार असे दादाचे साहाय्यास सुरतेस गेले.

स. १७८० च्या सुमारास शिंदे-होळकर माळव्यांत गेल्यावर हा बीजागडच्या डोंगरांत भिल्लांचा जमाव करून राहिला. यानें अहिल्याबाईस पत्रें लिहिलीं कीं, 'श्रीमंतांनीं कृपा करून बापरोटी विभागून द्यावी, आणि मजला चाकरी सांगावी.' त्याप्रमाणें बाईनें पुण्यास लिहून पाठविलें. तें जुळलें नाहीं, तेव्हां अहल्याबाईनें याजवर फौज पाठविली. अहल्याबाईचे मदतीस पेशव्यांची फौज गेली होती. शेवटीं त्या लढाईत याचा पराभव झाला.

एक एक बंडखोर नाहींसे झाले तेव्हां हा उघडा पडला, त्यावरोबर यानें पुणेकर कारभाऱ्यांशीं सल्ला करून आपला बचाव केला. हा पुढें निजामशाहींत गेला. हा पुनः नोकरींत पेशव्यांकडे येण्याची खटपट स. १७८४ त करीत होता. त्यापुढें याचें नांव येत नाहीं (म. रि. उ. रि. १).

**गुलाबराम**—( स. १७९२-९३ ) पेशव्यांचा कलकत्त्याचा वकील. सेवकरामाचा दुसरा पुत्र.

**गुलाम मुस्तफा कुलीखाँ**—( यकरंग पाहा ).

**गुलाम हमदानी**—हा मसहफी या नांवानें प्रसिद्ध आहे.

**गुलाम अली हिंदू-शाह**—(स. १५८८ सुमार) प्रसिद्ध इतिहासकार फिरिस्ताचा बाप. याचें मूळ गांव कॅस्पिअन समुद्राच्या किनाऱ्यावर असणारें अस्त्राबाद होय.

हा फार विद्वान् होता. हा आपली मातृभूमि सोडून प्रवास करीत हिंदुस्थानांत आला. हिंदुस्थानांत आल्यावर अहमदनगरच्या पहिल्या मुर्तजा निजामशाहानें यास आपला मुलगा मिरान हुसेन याला फार्सी शिकविण्याकरितां ठेविलें. अशा प्रकारें याची चांगल्या जागेवर नेमणूक होऊन थोडे दिवस होतात न होतात तोंच हा मरण पावला. याच्या मृत्यूनंतर फिरिस्ता हा विजापूरच्या दिलावरखानाच्या आश्रयास गेला ( बील ).

**गुलाम कादिर**—( मृत्यु स. १७८९ मार्च ३ ) हा नजीबखान रोहिल्याचा नातू होय. याच्या पित्याचें नांव झबेताखान. हा दिल्लीच्या बादशहास वरचेवर त्रास देई. एका स्वारींत हा बादशहाच्या हातांत सांपडला असतां याचें पुरुषत्व नष्ट करण्यांत आलें होतें. त्याचा वचपा यानें पुढें काढला. शिंदे व हा यांमध्यें वैर असल्यामुळें शिंद्यांच्या सुस्थितीमध्यें हा स्वस्थ होता. स. १७८७ त महादजीचा जयपूरजवळ लालसोट येथें झालेला पराभव पाहतांच यानें दिल्लीच्या मराठ्यांच्या शिबंदीस हाकून लावलें; व इतरहि किल्ले काबीज करण्याचा सपाटा चालविला. पण शिंद्यानें शीख व जाट यांना याच्या मुलखांत पाठविलें तेव्हां आपल्या मुलखांत हा परत गेला. एकदां अशाच एका प्रसंगीं यानें शहाअलम बादशहावर स्वारी केली व त्याचा पराभव करून त्याच्या मुली व सुना यांची विटंबना करून अत्याचारहि फार केला. तेव्हां बंदोबस्तासाठीं मराठी फौज रवाना झाली. तेवढ्यांत यानें बेदरबख्तास गादीवर बसविलें. पण मराठ्यांच्या पाठलागामुळें हा बेदरबख्तासह पळून गेला. मिरतचा आश्रय घेऊन हा कांहीं दिवस तेथें होता. परंतु अन्नाच्या तुटवड्यामुळें याचे हाल झाले व शेवटीं निसटून पळून जात असतां वाटेंत घोड्यावरून पडून बेशुद्ध झाला; व मराठ्यांच्या हातांत सांपडला. मराठ्यांनीं याचे नाक कान छाटून यास ठार मारलें. याप्रमाणें नजीबखानाचा सूड मराठ्यांनीं त्याच्या नातवावर उगविला.

**गुलामघराणें**—१ कुत्बुद्दीन ऐबक ( स. १२०६–१० )–२ आरम ( आरामशाह, अल्लाउद्दीन, स. १२११)–३ शंसुद्दीन अल्तमश ( स. १२११–३६, हा कुत्बुद्दीन ऐबकच्या अल्तमश नांवाच्या मुलीचा नवरा )–४ रुक्नुद्दीन फीरूजशाह ( पदच्युत, वध स. १२३६ )–५ रझिया ( स. १२३६–४० पदच्युत )–६ मुइजुद्दीन बहराम ( स. १२४०–४२ वध )–७ अलाउद्दीन मसूद ( स. १२४५–४६ पदच्युत, रुक्नुद्दीनचा मुलगा )–८ नासिरुद्दीन महमूद (स. १२४७–६६)–९ मुलगी, घियासुद्दीन बल्बनची ( उलूघखानाची ) बायको ( स. १२६६–८६, याचा पुत्र बुघ्राखान आणि त्याचा पुत्र )–१०(मुइझ्झुद्दीन) कैकूबाद ( स. १२८६–९० ).

याशिवाय नासिरुद्दीन महमूद हा शंसुद्दीन अल्तमशचा मुलगा होता. आणि बल्बनची मुलगी त्याला दिली होती. बल्बनला मुहंमद नांवाचा मुलगा असून त्याला कैखुश्रव नांवाचा मुलगा होता. कैकूबादनंतर जलालुद्दीन खल्जीच्या ताब्यांत दिल्लीचें राज्य गेलें.

**गुलबदन बेगम**—ही बाबराची सर्वांत लहान मुलगी होय. हिचा जन्म स. १५२३त झाला. ही खिजरख्वाजा नांवाच्या सरदारास दिली होती. याच्यावरच पुढें सिकंदरशाहा चालून आला असतां त्याचा अकबरानें पराभव केला. हिनें हुमायूनची हकीकत लिहून ठेविली आहे.

**गुहदेव**--( स. ७०० सुमार ) देवराजयज्वानें आपल्या निघण्टुभाष्याच्या प्रस्तावनेंत गुहदेव हा वेदाचा भाष्यकार होता असें लिहिलें आहे. तसेंच 'रश्मयश्च देवा-गरगिर' या तैत्तिरीय आरण्यकांतील मंत्रावरील भाष्याचा उतारा दिला आहे. यावरून हा तैत्तिरीयसंहितेवरील भाष्यकार असावा. श्री. रामानुजाचार्यांनीं आपल्या वेदार्थ-संग्रहांत इतर भाष्यकारांबरोबर याचाहि निर्देश केला आहे. याचें भाष्य अध्यात्मपर असावें.

**गुहल्ल कदंब**—हा गावें येथील कदंब घराण्याचा आद्य पुरुष होय. याचें गोवा व हल्सी ( पलशिका ) येथें राज्य होतें. षष्ठदेव १ ला हा याचाच मुलगा होय.

हा पश्चिम चालुक्यांपैकीं सहाव्या विक्रमादित्याच्या वेळीं बनवासी येथें मांडलिक म्हणून राज्य करीत होता ( संपगांव तालुक्यांतील कादरोळी येथील शिलालेखावरून ). यानेंच गोव्याचें घराणें स्थापन केलें. याला गूवल असेंहि म्हणत.

**गुहसेन मैत्रक**—( स. ५३९–७० ) हा वलभीच्या धरपट्ट मैत्रकाचा पुत्र. याचे तीन ताम्रपट व एक शिलालेख सांपडलेले आहेत. या घराण्यांतील हाच गुप्तापासून स्वतंत्र झालेला पहिला राजा होय. म्हणून भट्टार्कानंतर याचेंच नांव यापुढील राजांनीं दानलेखांत दिलेलें आहे ( म. भा. १. २. १४६ ).

**गुहिल**—( स. ५५० सुमार ) उदेपूरच्या रजपूत राजांच्या इतिहासांतील हा पुरुष आहे असें समजण्यास हरकत नाहीं. ख्यात किंवा राजप्रशस्ति महाकाव्य यांच्यांतील माहितीपेक्षां शिलालेखांतील माहिती अधिक विश्वासार्ह आहे आणि उदेपूर राज्यांत सांपडलेल्या शिलालेखांत याच्यापासूनच वंशावळीला सुरुवात केली आहे. याचा शिलालेख मिळाला नसला तरी आगरा येथें जमिनींत गाडलेलीं याचीं दोन हजार चांदीचीं नाणीं सांपडलीं आहेत. तीं स. १८६९ मध्यें सांपडलीं असून त्यांवर श्रीगुहिल असा लेख आहे. ( कनिंगहॅमकृत आर्कि. सर्वे रि. भा. ४, पृ. ९५ ). नरवर येथें असेंच एक नाणें सांपडलें होतें. त्यावर श्रीगुहिलपति असें लिहिलेलें होतें ( BRAS 19. 122 ) या अक्षरांचें वळणहि आगरा येथें सांपडलेल्या शिक्क्यावरील अक्ष-

रांच्या वळणाशीं जुळतें आहे. कनिंगहॅमनें हीं नाणीं हूणांपैकीं तोरमाणाच्या नंतर झालेल्या कोणाचीं तरी असावींत असें म्हटलें आहे, पण तें बरोबर नाहीं. गुहिल-पति नांव नसून उपनांव आहे. त्याचा अर्थ गुहिल वंश-जांचा स्वामी किंवा अग्रणी असा आहे. म्हणून तें नाणें कोणा गुहिल वंशजाचें असावें. वरील दोन हजार नाणीं आकारांनीं लहान आहेत. त्यांचें वर्णन कार्लाइलनें आपल्या आर्क्यॉलॉजिकल सर्व्हे रिपोर्टांत सविस्तर केलें आहे. त्यावरून हा स्वतंत्र राजा होता असें समजतें. चाटसू नगरांत सांपडलेल्या शिलालेखांत याच्यापासून बालादित्यापर्यंत बारा पिढ्या दिल्या आहेत. चाटसूच्या आसपासच्या प्रदेशावर हे विक्रमसंवताच्या आठव्यापासून अकराव्या शतकापर्यंत राज्य करीत होते. चाटसू हें आगऱ्याच्या जंवळ आहे. या भागावर याचें राज्य असावें. कदाचित् याच्या पूर्वीपासून या घराण्यांत राज्य असावें. पण हा प्रतापी असल्यामुळें याच्यापासून वंशावळ दिली. मिहिरकुलानंतर याचींच नाणीं मिळतात. त्याअर्थीं वरील अनुमान बरोबर असावें. याच्यापासून पांचवा वंशज शिलादित्य याचा वि.सं. ७०३ (स. ६४६) मधील शिलालेख मिळाला आहे. आणि तो राजपुताना म्युझियममध्यें ठेवलेला आहे. त्यावरून याच्या कालाचा अदमास करितां येतो. हा वि. सं. ६२३ ( स. ५६६ ) मध्यें होता असें ठरतें. याच्यानंतर उदेपूरच्या गादीवर भोज आला ( रा. इ. ).

**गुंड**—हा मंत्रकूट देशाचा राजा होता. हा दुसऱ्या प्रोलाकडून पराभव पावून ठार मारला गेला. मरणापूर्वी याची हजामत केली; व याच्या छातीवर डुक्कर काढलें.

**गुंड नायक**—हा प्रतापरुद्राच्या गजसेनेचा मुख्य होता. यास स्वामीद्रोहरगंद ही पदवी होती. याचा स. १२९९ च्या शिलालेखांत निर्देश आढळतो.

**गुंडरिपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं पंचावन्नावा सिद्ध होय. यालाच गोरुहपा असेंहि म्हणतात. हा जातीनें चिडीमार असून डिसु नगरचा राहणारा होता. हा लीला-पाचा शिष्य. याचा शिष्य हालिपाद. याचा कोणताहि ग्रंथ उपलब्ध नाहीं. फक्त चर्यागीतिमध्यें याच्या कांहीं गीति सांपडतात. यावरून हा हिंदी कवि होता हें सिद्ध होतें.

**गूवल कदंब**—( गुहल्ल कदंब पाहा ).

**२.** ( स. १०९८ ) गोव्याच्या कदंबांपैकीं पहिल्या जयकेशिनचा मुलगा. गूहल व गुहल्ल हीं नांवें एक-मेकांबद्दल वापरीत.

**गृहवर्मा मौखरी**—( स. ६००–६०६ ) हा मौखरी वंशापैकीं अवंतिवर्मन्‌चा एक पुत्र व कनोजचा एक राजा होय. हा मौखरी वंशामध्यें शेवटचा राजा होऊन गेला. हा हर्षवर्धन सम्राट् याचा समकालीन होय. यानें हूणांशीं टक्कर देऊन आपलें राज्य बरेंच वाढविलें. याच्यावर देव-गुप्त मालवराजानें स्वारी केली व यास ठार केलें. या सुमारास मौखरी दुर्बल झाले होते. याचा काल स. ६०६ हा असावा, असें त्या वेळच्या सांपडलेल्या नाण्यांवरून समजतें. याचें लग्न प्रभाकरवर्धनची कन्या राज्यश्रीशीं झालें.

**गेब्रियल वाउटन**—हा ईस्ट इंडिया कंपनीचा एक शस्त्रवैद्य होता. स. १६४५ च्या जानेवारींत हा सुरतेस असतांना कंपनीचे वशिल्यानें असालतखानाच्या नोकरीस राहिला :आणि पुढें यानें कंपनीच्या हितसंबंधीं आपलें वजन पुष्कळ प्रसंगीं खर्ची घातलें. राजकुमारी जहानारा हिचें, कपडे पेट घेऊन अंग भाजलें. त्या वेळीं तिला यानें बरें केलें. त्यासाठीं मोगल बादशहानें कंपनीला खुल्या व्यापाराची सवलत दिली, असा इतिहासतज्ज्ञांचा अभि-प्राय होता. परंतु हें अरिष्ट राजकन्येवर स. १६४४ मध्यें गुदरलें व त्या सुमारास वाउटन हा होपवेल जहाजावर होता. असालतखान याजवर बादशहाची बहाल मर्जी होती खरी; परंतु वाउटन बादशहाच्या दरबारीं असल्याचा पुरावा मिळत नाहीं; आणि बादशहाच्या फर्मानाऐवजीं राजपुत्र शहासुजाच्या आज्ञापत्रानें खुद्द वाउटनला याच्या स्वतःसाठीं, कंपनीसाठीं नव्हे, खुल्या व्यापाराची सवलत मिळाली. नंतर कंपनीनें राजपुत्राजवळ ३००० रुपये भरून ही सवलत कंपनीसाठीं मिळविली ( वि. ज्ञा. ५८. २८७–८८ ).

**गैनीनाथ**—निवृत्तिनाथाचे गुरु. यांनाच गयिनीनाथ किंवा गहिनीनाथ असें म्हणतात. गैबीनाथ व हे भिन्न होत. याची व निवृत्तिनाथाची भेट त्रिंबकेश्वरीं तो वाघाच्या भीतीनें याच्या गुहेंत शिरल्यामुळें झाली.

**गैबीनाथ**—( स. १५२०–१५८० ) हा ज्ञानेश्वर-महाराजांच्या परंपरेंतील एक. याची परंपरा ज्ञानेश्वर-सत्यामलनाथ–गैबी अशी आहे. यापुढील शिष्यपरंपरा गुप्तनाथ-उद्बोधनाथ-केसरीनाथ-शिवदिनकेसरी. याचे ग्रंथ पंचीकृतविवेक, कांहीं अभंग व पदें ( सं. सू. ).

धुंडिराज नरहरी मालू या कवीनें आपल्या नवनाथ-भक्तिसार नामक प्राकृत ओवीबद्ध ग्रंथांत याचें चरित्र पुढीलप्रमाणें दिलें आहे. मच्छिंद्रनाथानें आपला शिष्य गोरखनाथ यास संजीवनीमंत्राची संथा देऊन त्यास मंत्र एकांतीं घोकण्यास सांगितला. त्याप्रमाणें तो मंत्र घोकीत असतां गांवचीं मुलें मातीचीं चित्रें तयार करून देण्या-

विषयीं त्यास म्हणालीं. पण चित्र तयार करतांना संजीवनमंत्र म्हटला गेल्यानें चित्र सजीव झालें. तोच गैबीनाथ किंवा गहिनीनाथ होय. याचें पोषण मधु ब्राह्मणाच्या स्त्रीनें केलें. पुढें यास मच्छिंद्रानें उपदेश दिला. याची समाधि गर्भागिरी नामक पर्वतावर असून हिंदुलोक यांना गैबीनाथ व मुसलमान गैबीपीर असें म्हणतात. यानेंच पुढें साक्षात्कारानें सोहिरोबा अंबिये यास अनुग्रह दिला.

**गोकुळ जाट**—(स. १६८० सुमार) औरंगझेबानें हिंदु जनतेस छळण्यास सुरुवात केल्यामुळें हिंदु चिडले, तेव्हां जाटांनीं, याच्या हाताखालीं बंड केलें. सदाबाद परगणा लुटला. तेव्हां औरंगझेबानें सर्व प्रकारें प्रयत्न करून पाहिला, पण कोणाचा टिकाव न लागल्यानें तो स्वतः यावर चालून आला. त्या वेळीं मात्र सैन्याच्या कमतरतेमुळें याचा पराभव झाला. याचे अत्यंत हाल केले. प्रत्येक अवयव वेगळा तोडून नंतर यास ठार मारलें.

**गोकुळनाथ शर्मा**—( स. १७०० सुमार ) मैथिल ब्राह्मण. पिता–पितांबरशर्मा. माता–उमादेवी. यानें अमृतोदय नांवाचें संस्कृत नाटक व इतरहि ग्रंथ केले आहेत.

**गोग्गिराज**—तैलपाचा सेनापति. बारपाचा सेनापति व लाट देशचा राजा. याची मुलगी नायलदेवी. तिचा विवाह देवगिरीच्या वेसुगी यादवाशीं झाला ( इंडि. अँटि. १२.१२० ).

**गोणराज चालुक्य**—हा चालुक्य राजपुत्र विजरस याचा भाऊ होता.

**गोणाई**—नामदेवाची माता.

**गोपा**—शुद्धोदनपुत्र बुद्धाची पत्नी. ही दण्डपाणि शाक्याची मुलगी.

**गोपादित्य**—(ख्रि. पू. ३७१) एक काश्मीरचा राजा. याच्या वेळीं कांहीं जातींमध्यें लसूण व कांदा खाणें हें निषिद्ध मानलें जात असे. त्यास अनुसरून यानेंहि कित्येक कांदे व लसूण खाणाऱ्या ब्राह्मणांना शिक्षा केल्या ( स्मिथ पृ. ३१४ फुट नोट ).

**गोपाळ**—(स.७८०–८००) पाल घराण्यांतील पहिला राजा होय. याच्या बापाचें नांव वप्यट असें होतें. हा गादीवर येण्यापूर्वी बंगालमध्यें सुयंत्रित सत्ता नसून जिकडे तिकडे अंदाधुंदी माजली होती. तेव्हां बंगालमध्यें सुराज्य व्हावें म्हणून बंगालच्या लोकांनीं याला गादीवर बसविलें. भद्र राजाची मुलगी दद्दादेवीशीं यानें लग्न लाविलें होतें ( एपि. इंडि. ४·२४३–५४ ).

निधंपूर येथील ताम्रपटांत भास्करवर्म्याचा गोपाळ नांवाचा एक सामंत होता. जर भास्करवर्मन् याच्या हाताखालीं असणारा ( सामंत ) गोपाळ व पाल घराण्याचा पहिला राजा गोपाळ हे एकच असले, तर मग भास्करवर्म्यानंतर हा गोपाळ लोकप्रियतेच्या जोरावर बंगालच्या गादीवर आला असावा किंवा बंगालच्या लोकांनीं याला गादीवर बसविलें असावें.

जर वरील दोन्ही व्यक्ति एकच असें मानलें तर पाल घराण्याच्या सुरुवातीचा काल निश्चितपणें ठरवितां येतो.

याला पश्चिमेकडील वत्सराजाशीं, कनोजच्या वर्म इंद्रायुधाशीं व राष्ट्रकूटांच्या तिसऱ्या गोविंदराजाशीं युद्ध करावें लागलें असावें ( म. यु. भा. २ पा. २३१ ). स. ७३०–४० चे दरम्यान हा बंगालचा राजा झाला. यानें आपलें राज्य मगधपर्यंत वाढवलेलें होतें. यानें ४५ वर्षे राज्य केलें. हा बुद्धधर्मीय असून याची राजधानी बिहार प्रांतांतील उदडंपूर होतें ( इंडि. अँटि. ११. १३६, १६०; १२. १६४ ).

२. ( स. ९२५–५० ) राज्यपाल पालाचा पुत्र. याच्या कारकीर्दीच्या पंधरा वर्षांनीं अष्टसाहस्त्रिकाप्रज्ञापारमिताची एक प्रत विक्रमशिला बिहारमध्यें लिहिली. नालंदमध्यें वागीश्वरीची व बुद्धगया येथें शंभुसेनानें बुद्धाची मूर्ति स्थापन केली.

३. कामधेनु या संस्कृत ग्रंथाचा कर्ता.

४. हा बंगाल्यांतील पाल घराण्यापैकीं कुमारपालाचा मुलगा व रामपालाचा नातू. हा रामपालानंतर गादीवर आला, पण लवकरच साप चावून अपमृत्यूनें मेला ( हि. का., मार्च १९२९ ).

हा स. ११४२ मध्यें गादीवर आला. याला स्वाभाविक मृत्यु आला. हा कांहीं महिने गादीवर होता ( मनहलीचा याचा लेख ).

५. हा मराठी कवि नेवासें येथें शके १६९० ( स. १७६८ ) च्या सुमारास होऊन गेला. संतसूचींत हा ओतूरचा असें लिहिलें आहे. यानें महाभारताचीं सर्व पर्वें मराठींत ओवीबद्ध केलीं होतीं. पण त्यांपैकीं पहिलीं चार व स्त्रीपर्व आणि सौप्तिकपर्व हीं फक्त मिळालीं. बाकीचीं तेरा पर्वें मिळालीं नाहींत. यांनीं आपलें शांतिपर्व खूप विस्तृत केलें असून त्याचे राजधर्म ( २८ अध्याय ), आपद्धर्म ( १५ अध्याय ) व मोक्षधर्म ( ३६ अध्याय ), असे भाग केले आहेत. उपलब्ध ग्रंथाच्या ओंव्या बेचाळीस हजार आहेत. याशिवाय याचे ग्रंथ–महालयामाहात्म्य अ. २०. मल्हारीमाहात्म्य अ. ८, व्यंकटेशमाहात्म्य अ. १०. शिवरात्रिकथा, तिथिसार. यानें मुक्तेश्वराला जातवेदा म्हटलें आहे.

मुक्तेश्वराचें महाभारत यानें वाचलें असावें. याची रचना त्याच्या खालोखाल आहे.

विष्णुसहस्रनामावरील गोपाळ कवीची टीका कैं. परशुरामपंत तात्यांच्या अवलोकनांत आली असती तर आपली ' नामार्थदीपिका ' रचण्याचा उद्योग त्यांनीं केला नसता असें वाटतें (म. क. च. भा. २ पा. १०२--१०८). यानें कर्णपर्वाच्या पहिल्या अध्यायाच्या शेवटीं गुरूचें नांव अनंत दिलें आहे.

**गोपाळचंद्रमिश्र**—( जन्म स. १६३२ ) एक हिंदी कवि. याच्या बापाचें नांव गंगाराम आणि मुलाचें नांव माखनचंद्र.

यानें ' रामप्रताप-काव्य ' हा ग्रंथ अर्धा लिहिला व उरलेला याचा मुलगा माखनचंद्र यानें पूर्ण केला. हैहय-वंशी राजा राजसिंह याच्या दरबारीं याला मान मिळत असे. राजसिंहानें याला आपला दिवाण केलें होतें असें म्हणतात. राजाच्या इच्छेवरून यानें ' खूबतमाशा ' ( स. १६८८ ) नांवाचा एक ग्रंथ लिहिला. याशिवाय याचे ग्रंथ—जैमिनिअश्वमेध, छदामाचरित्र, भक्तिचिंतामणि, रामप्रताप, छन्दविलास वगैरे.

**गोपाळदास ( कायस्थ )**—( स. १४५० सुमार ) यानें ' शब्दामृत ' नांवाची कालिदासाच्या कुमारसंभवावर टीका लिहिली. याच्या बापाचें नांव बलभद्र. यानें आपल्या ग्रंथांत केलेल्या ग्रंथकार व ग्रंथ यांच्या उल्लेखावरून हा मोठा विद्वान् असावा असें दिसतें.

याच्या ग्रंथांत सारस्वतव्याकरण आणि कालापव्याकरण यांचा उल्लेख आला असल्यामुळें याच्या वेळीं ग्रंथकार पाणिनीच्या व्याकरणाचा उपयोग करीत नसत असें दिसतें. पाणिनीच्या व्याकरणाचा फैलाव भट्टोजी दीक्षिताचे वेळीं फार जोरानें झाला. भट्टोजीचा काल स. १६३० असा आहे. तेव्हां गोपालदास हा स. १६३० च्या पुष्कळ पूर्वी होऊन गेला असला पाहिजे.

यानें आपल्या ग्रंथांत ' प्रक्रियाकौमुदी 'चा उल्लेख केला आहे. आणि ' प्रक्रियाकौमुदी ' हा ग्रंथ स. च्या १४ व्या शतकाच्या उत्तरार्धांत लिहिला असें रा. के. पी. त्रिवेदी यांनीं ठरविलें आहे. तेव्हां ' प्रक्रियाकौमुदी 'च्या रचनाकालानंतर कांहीं पिढयांनीं हा ( गोपालदास ) झाला असला पाहिजे.

वर उल्लेखिलेल्या ग्रंथाशिवाय यानें ' करटीकौतुक ' नांवाचा ग्रंथ लिहिला ( Catalogue of Mss. in the Berlin Library (1853), Part I, p. 292). हा ग्रंथ काव्यात्मक असून त्यामध्यें हत्तीच्या रोगांची माहिती दिलेली आहे. यानें आपला 'कुमारसंभवावरील टीका' हा ग्रंथ नामतीर्थाच्या आज्ञेवरून आणि सम्यक्तीर्थाच्या देखरेखीखालीं लिहिला असें त्याच टीकेंत म्हटलें आहे (B. O. R I. Ms. No. 678 of 1886–92—Folio–1). नामतीर्थानें वेदान्तावर ' उपदेशसहस्त्रकृतुव्याख्या ' हा ग्रंथ लिहिला ( C. C. ). परंतु गोपालदासानें उल्लेखिलेला नामतीर्थ व हे दोघे एकच होत, या म्हणण्यास भरपूर आधार नाहीं.

२. अनंत व गोपाळ ह्या दोघांनीं मिळून काव्यें केलीं आहेत. यांचे गुरु जयरामस्वामी वडगांवकर. ग्रंथ—कथाकल्पतरु, पदें, भगवद्गीताटीका ( पदबोधिनी ही भिन्न आहे ). र. श. १६१६–१७ ( स. १६९४ ) युवा, नाशिकक्षेत्रीं संपूर्ण ( सं. सू. ).

**गोपाळदास गौर**--( स. १६२२ नंतर ) हा अशेरीचा किल्लेदार होय. याचा भाऊ विठ्ठलदास हा शहाजहानचे दरबारीं होता. स. १६२२ त शहाजहान बापाविरुद्ध बंड करून दक्षिणेंत आला आणि गोपाळदासास आपला सारा सरंजाम सुपूर्द करून अशेरीच्या किल्ल्यावर ठेवून ( स. १६२३ ) स्वतः पर्वीझबरोबर लढण्यास निघून गेला. पर्वीझ जहांगीरच्या हुकुमावरून शहाजहानचें बंड मोडण्यास निघाला होता. शहाजहान निसटून गेला तेव्हां पर्वीझनें अशेरीस वेढा दिला. गोपाळदासानें दोन वर्षेपर्यंत किल्ला भांडविला. या कामगिरीबद्दल शहाजहाननें यास पांच हजाराची मनसब व ' मानधाता ' असा किताब दिला. याचेच पुत्र बळिराम व मनोहरदास हे होत ( B B R A S मार्च १९१५–डॉ. मोदी ). मनोहरदासाला माहुलीचा किल्लेदार नेमलें. यानें तेथील तीन तटांची दुरुस्ती केली व पुष्कळ वर्षे कारभार केला. अशेरी किल्ला माहीम तालुक्यांत आहे. याला राजा म्हणत.

**गोपाळ नाईक तांबवेकर**—हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण असून याच्या पित्याचें नांव विश्वनाथ. सातारा जिल्ह्यांत वाळवें तालुक्यांत कासेगांवाजवळ कृष्णातीरीं तांबवें म्हणून गांव आहे तेथील हा राहणारा. थोरल्या माधवराव पेशव्यांच्या कारकीर्दींत सराफीच्या धंद्यावर यानें लाखों रुपये मिळविले. थोरल्या बाजीरावांस लक्षावधि रुपये कर्ज देणारा जसा परशुराम नाईक अनगळ, तसा महादजी शिंदे यांस कर्ज देणारा हा गोपाळ नाईक तांबवेकर होय. यानें बत्तीस शिराळें येथील जहागीरदारीण पार्वतीबाई भोसले हिजकडून कृष्णातीरीं मालखेड म्हणून गांव आहे तो खरेदी करून घेऊन,

५४ ब्राह्मणांस अग्रहार दिला. हा गांव देतांना प्रत्येक ब्राह्मणास एक पांचखणी तिघई घर, पुढें आंगण, मागें परस व शौचकूप, पांच माणसांच्या प्रपंचास लागणारीं भांडीं व एक वर्ष पुरेल इतकी अन्नसामग्री, अशा प्रकारची तजवीज करून दिली. यानें कृष्णातीरीं एक घाट व विष्णुमंदिर बांधिलें. यानें त्या देवस्थानास लाखों रुपयांची संपत्ति अर्पण केली आहे (गोपाळराव गोविंद पटवर्धन पाहा).

स. १७७२ त यानें डाकोरचें मंदिर बांधिलें. याला कृष्णराव नांवाचा एक मुलगा होता. सध्या याचे वंशज डाकोर येथें आहेत (म. रि. उत्तर वि. ३ रा. पृ. ६२५).

एक पेशव्यांचा सरदार होय. याचा उल्लेख दादानें मोरोबास लिहिलेल्या पत्रांत आला असून, त्यामध्यें याला फौजेसुद्धां पाठविण्याबद्दल मोरोबास विचारलें आहे.

स. १७७८ मध्यें दादाच्या सरदारांनीं पुण्यावर केलेल्या स्वारींत हाहि होता. याला पेशव्यांची पोतदारी पाहिजे होती. तेव्हां दादास मदत करून दादाला पुण्याची गादी मिळवून नंतर त्याच्याकडून पोतदारी मिळवावी या खटपटींत हा होता (म. रि. उत्तर वि. १ ला).

**गोपाळनाथ**—(समाधि स. १७६६) हा औरंगाबादनजीक सलावतपूरचा राहणारा. याच्या वडिलांचें नांव गोविंद व आईचें नांव आनंदीबाई. हा शुक्लयजुर्वेदी, कौंडिण्यगोत्री होता. याचें उपनांव घोलप. हा ब्रह्मचारी होता. याचे गुरु वऱ्हाडांतील मारकी येथील रंगनाथ होत. हा नाथांच्या पंथाचा होता. यानें शके १६८८ श्रावण व. ३० रोजीं त्रिपुटी येथें समाधि घेतली. यानें तयार केलेले असे दोन ग्रंथ आहेत. पैकीं पहिला 'शिरोमणी' व दुसरा 'समाधिबोध'. याचीं पदें व अभंग इत्यादि कविता आहेत. शिरोमणी हा ग्रंथ शके १६६८ त रचिला. याचें एक चरित्र उपलब्ध आहे (भं. वा. इ. शके १८३७, ले. १०९).

२. समाधि माहुली येथें. शिष्य शाहूराजे. ग्रंथ–वेदांतरहस्य, सप्तशती (यांत गुरु आत्मारामाचा उल्लेख आहे). संतकविकाव्य-सूचिकारांच्या मतें हा ग्रंथ गोपाळ याज्ञवल्कीचा असावा (सं. सू.)

**गोपाळनाथ मळगांवकर**—(स. १७०० सुमार) मालवणाजवळील परुळें गांवचा साधु. हा जातीनें गौड ब्राह्मण. दुष्काळांत पिता मेल्यावर आईसह पंढरपुरास गेला असतां तेथें धामणगांवच्या बोधलेकरांच्या आश्रयानें राहिला व त्यांचाच अनुग्रह घेतला, व त्यांच्याच आज्ञेनें पुन्हां मळगांवीं येऊन राहिला. यांनीं अनेक चमत्कार केल्याची प्रसिद्धी आहे. खेमसावंतांची यांच्यावर श्रद्धा होती.

गोपाळनाथांनीं लिहिलेली अशी, स्कंदपुराणांतर्गत पांडुरंगमाहात्य, अध्याय ५ ओवीसंख्या सुमारें ६००; प्रकाशबोध या नांवाचा एक वेदांतपर ग्रंथ, ओवीसंख्या २०२, बालक्रीडा, ओवीसंख्या २५० व इतर पदें, अभंग, भूपाळ्या वगैरे फुटकळ कविता बरीच आहे. इतर जुन्या महाराष्ट्र कवींप्रमाणें यांची कविता पूर्ण प्रासादिक असून तींत फारसे कठीण शब्द नाहींत. ज्याप्रमाणें एकनाथांनीं आपल्या कवितेंत आपला व आपल्या गुरूंचा 'एकाजनार्दन' या नांवानें उल्लेख केला आहे, त्याचप्रमाणें गोपाळनाथांनीं 'गोपाळबोध' किंवा 'बोधगोपाळ' या नांवानें आपला व आपल्या गुरूंचा उल्लेख केला आहे. 'बोध' हें पद बोधलेबावांचें दर्शक होय हें वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल. हे पूर्ण अद्वैतमतवादी होते. खऱ्या देवासंबंधानें लिहितांना यांनीं आपल्या प्रकाशबोध ग्रंथांत ब्रह्मा-विष्णु-महेश यांच्याहि पलिकडे तो आहे असें स्पष्ट म्हटलें आहे (महाराष्ट्र–कविचरित्र भा. १ ला, पृ. २४९–२६१).

**गोपाळ पंडित**—(स. १३०० सुमार) एक महानुभाव. हा पैठणजवळील वरखेड वाडेगांव येथील मूळ रहिवासी होता. याच्या बापाचें नांव चक्रपाणी. गोपाळ सात महिन्यांचा उपजला. डोळे उघडेनात तेव्हां याच्या आईनें यास चक्रधराच्या स्वाधीन केलें. पुढें याचे डोळे उघडून यास दिसूं लागलें. यावरून चक्रधरानें याचें नांव पारमांडल्य असें ठेविलें. मोठेपणीं हा देवनगरास जाऊन राहिला. तेथें हा रामदेवराव जाधव यांची धाकटी राणी कामाइसा अथवा कामाई देवी हिचा पुराणिक व खजिनदार होता. याच्याच मार्फत पुढें राणीनें नागदेवाचार्याचा मंत्रोपदेश घेतला. यानें सहा ग्रंथ मराठींत लिहिले आहेत. त्यांपैकीं 'चौपद्या' व 'सुभाषितअंताक्षरी' हे दोन पद्यात्मक असून बाकी चार गद्य आहेत. सुभाषितअंताक्षरी निर्यमक श्लोकबद्ध आहे. पण या श्लोकांत जरा चमत्कृति आहे. श्लोकाच्या एका चरणाचें जें अंत्य अक्षर तेंच त्याच्या पुढल्या चरणाचें आदि अक्षर आहे.

**गोपाळपंत कुलकर्णी नाझरेकर**—संन्यासोत्तर यास निजानंद म्हणूं लागले.

**गोपाळपुरी**—(स. १७६८) इंग्रजांचा जानोजी भोंसले नागपूरकर यांचेकडे गेलेला वकील.

**गोपाळभट**—भवभूति कवीचा आजा व नीलकंठाचा बाप. हा उंबर नामक ब्राह्मणकुलोत्पन्न होता.

**गोपाळ (श्रीधर) महाबळेश्वरकर**—' हे भले थोर अनुष्ठाते, सूर्य-उपासनी, पद्महस्ती ' म्हणून शिवाजीमहाराज आणि जिजाबाई यांनीं यांच्याकडून मंत्रोपदेश घेतला. आणि यास शिवाजीनें आपल्या अभ्युदयार्थ सूर्याचें अनुष्ठान सांगितलें. आणि असें अनुष्ठान प्रतिवर्षी व्हावें म्हणून दरसाल शंभर पाच्छाई होन, आठ खंडी धान्य, आरक्त वस्त्रें दोन, पीतांबर एक, शाल एक व आसन एक इतकें देण्याची सनद देऊन व्यवस्था केली. आणि यांचा मंत्रोपदेश वंशपरंपरेनें घेतला जावा अशी सनद स. १६५३ फेब्रुवारी १८ (श. १५७४ फाल्गु. १) रोजीं करून दिली (प. सा. ६३१). यावरून शिवाजीमहाराजांची यांच्यावरील श्रद्धा व्यक्त होते.

**गोपाळ रघुनाथ**—यानें चंद्रावळी आख्यान मराठींत रचलें (मं. वा. इ. श. १८३७ ले. १९१).

**गोपाळ रघुनाथ चिटणीस**—हा दौलतराव शिंद्याचा चिटणीस होता. बायांचे युद्धांत व समेटांत हा होता. लाखेरच्या लढाईपासून हा तीन वर्षेपर्यंत नजरबंदींत होता. "साल गुदस्त (स. १७९७) कृष्णोबा चिटणीस यांनीं दहा लक्ष खंड देऊन चिटणीशी करून घेतली, त्यासमयीं गोपाळराव भाऊंस सोडविलें. ते सन १७९८ चे आरंभीं पुण्यास आले." हा बऱ्यापैकीं सेनानायक होता. शिंदे-होळकर युद्धांत यानें खानदेशांतील होळकरांचा मुलूख मारून काबीज केला. हा बऱ्हाणपूरचा सरदार होता. इंग्रज–शिंदे यांच्या युद्धांत यानें बराच पराक्रम केला. याचें दुसरें आडनांव कुलकर्णी असें होतें. हे निगडीचे राहणारे. म्हणून यांस निगडीकर असेंहि म्हणतात. आसईच्या लढाईंत हा प्रामुख्यानें चमकत होता (म. रि. उ. ३).

**गोपाळराम वादीन्द्र दर्यापूरकर**—(स. १५०० नंतर) एक महानुभाव. यांचा एक निष्कलंकाध्याय ब्रह्माण्डगोलक या नांवाचा ओवीबद्ध ग्रंथ आहे. त्यांत १११२ओव्या आहेत. वादीन्द्र गोपाळदासानें अनेक ग्रंथांचें संशोधन केल्याचा त्या त्या ग्रंथाच्या शेवटीं उल्लेख सांपडतो. या कवीचा काळ सोळाव्या शतकांतील आहे. वादीन्द्र गोपाळदास आणि गोपाळदास दर्यापूरकर एकच होय. याची भगवद्गीतेवरील टीका प्रकाशित झाली आहे.

यानें निष्कलंक ब्रह्मांडगोलकाची पूर्वपीठिका ग्रंथाच्या शेवटीं दिली आहे. मूळ निष्कलंकाध्याय ग्रंथ १२५ ओव्यांचा पुरुषोत्तम मुनीनें केला. पुढें देवदासानें त्यांत आणखी स्पष्टार्थ करणारी भर घालून ग्रंथ २७५ ओव्यांचा केला; आणि त्याचें नांव ब्रह्मांडगोलक असें ठेवलें. नंतर पुनः दोनशें ओव्यांची भर घातली. शेवटीं तर यानें त्याचा विस्तार १११२ ओव्यांचा केला (म. वा. इ. २. ७५३–५५)

**गोपाळराव गणेश बर्वे**—हा दादांचा मेहुणा होता. हा कोणाचाच हुकुम न ऐकतां मन मानेल तसेंच वर्तन करी. अशा रीतीनें अनेक इसम दादाचा आश्रय करून बंडखोरी करीत, त्यामुळें चुलते-पुतण्यांत वारंवार तेढ उत्पन्न होई. पानिपतच्या लढाईनें झालेली अपकीर्ति धुवून काढण्यासाठीं स. १७६९ त माधवरावानें ज्या कांहीं सरदारांस उत्तरेस पाठवलें त्यांपैकीं गणेश बर्वे हा एक होता. त्या वेळेस याजकडे स्वारीची सबनिसी होती (म. रि. म. ४ पा. २१०).

**गोपाळराव गोविंद पटवर्धन**—(स.१७२१-७१) पेशवाईंत जे साडेतीन राव होते त्यांपैकीं हे पहिले राव होत. मुरारराव घोरपडे, भवानराव प्रतिनिधी आणि अर्धाराव माधवराव पेशवे मिळून साडेतीन राव पेशवाईंत प्रसिद्ध होते. गोपाळ नाईक तांबवेकर नांवाच्या एका सरदारानें आपल्या नांवापुढें राव लावून घेतलें म्हणून भवानराव प्रतिनिधीनें शेपन्नास माणूस पाठवून गोपाळराव तांबवेकरास मारून टाकलें व त्याची पालखी मोडून टाकिली, अशी आख्यायिका हरिवंशाच्या बखरींत दिलेली आहे (पा. ३०).

याचा जन्म स. १७२१ च्या सुमारास झाला असावा. स. १७४० च्या सुमारास यास शिलेदारी मिळाली आणि दमाजी गायकवाडाबरोबर नाना पुरंदरे यांची जी लढाई झाली, तीस गेंड्याच्या माळाची लढाई असें म्हणतात. त्या लढाईंत यानें चांगला पराक्रम केला (पे. द. ६. १८५; २६. १७१), व दमाजीला पकडून नानासाहेबांपुढें आणून उभें केलें. त्याचप्रमाणें स. १७५१ सालीं पेशव्यांनीं गायकवाडावर स्वारी केली तींतहि यानें बराच पराक्रम गाजविला. परंतु याचें खरें कार्यक्षेत्र म्हणजे कर्नाटक होय. तिकडच्या बहुतेक स्वाऱ्यांमध्यें याचा संबंध येतो, आणि प्रत्येक वेळीं प्रामुख्य जरी याचेकडे नसे तरी सोंपविलेलें काम हा पार पाडण्याचा प्रयत्न करी. त्यामुळें याचें वर्चस्व सारखें वाढत चाललें. हैदरशीं यानें अनेक लढाया केल्या. पहिल्याच लढाईंत हैदरनें सारखे छापे घालून याला जेरीस आणलें, व लढाई कंटाळवाणी करून सोडली. शेवटीं ३२ लाख रुपयांवर तह झाला. त्यांपैकीं १६ लाख पदरांतहि टाकले. पण हा तह पेशव्यांना पसंत पडला नाहीं, व याच्यावर जरा दोषारोप आला. यापुढें उद्गीरची लढाई झाली (स. १७६०). त्या लढाईंत

यानें नरमपणाचें राजकारण धरलें. त्यामुळें दौलतावादचा किल्ला हातीं येणें कठीण होऊन बसलें. परंतु नानासाहेबानें तंबी भरतांच यानें हल्ला करून किल्ला हस्तगत केला. पण किल्लेदारास ३५ हजारांची जहागीर व १ लक्ष १५ हजार नगद देऊन किल्यावर पेशव्यांचें निशाण चढविलें. पण यामुळें नानासाहेबांची यावर इतराजी झाली व किल्लेदाराची भरपाईहि झाली नाहीं, त्यामुळें हा दरबारींहि बेतानेंच जाऊं लागला. याच्या त्या उदासीनतेबद्दल नानासाहेबांनीं यास बराच दोष दिला.

सदाशिवराव भाऊ पानपतावर गेल्यानंतर दक्षिणेंत निजामअल्ली फौज जमा करून दंगा करण्याचे बेतांत होता. त्यास जरबेंत ठेवण्याकरितां रघुनाथरावदादांची रवानगी झाली. त्यास मिळण्याबद्दल याला लिहिलें होतें. पण हा त्यांना जाऊन मिळाला नाहीं. याबद्दल नानासाहेब पेशव्यानें याला लिहिलेलें खरमरीत पत्र उपलब्ध आहे (ऐ. ले. सं. प. नं. २७). त्यांत नानासाहेबानें असें लिहिलें, 'शेवटपावेतों खाविंदाशीं ओढून व्यर्थ सरदारीं तोडतां इतका दुराग्रह तुम्हां लोकांस नसावा. लटकाच वसवसा सखारामाचा मानला. तिळमात्र तो तुम्हांसी आकस करणार नाहीं. चि. रघुनाथराव तर तुमच्यावर कृपाच करतील. व्यर्थ सरदारीं न तोडणें ''. इतकें लिहिल्यानंतरहि हा रघुनाथरावांना जाऊन मिळाला नाहीं. हा व वडील गोविंद हरी यांचें सखारामबापूपुढें कांहीं चालत नसल्यामुळें हे त्याचा अत्यंत द्वेष करीत. यामुळें मराठी राज्याची अत्यंत हानि झाली. आणि यालाच पटवर्धन घराण्यांतील लोकांनीं देशस्थ-कोंकणस्थ वादाचें स्वरूप दिल्यामुळें त्याचे अनिष्ट परिणाम दीर्घ कालपर्यंत टिकणारे झाले आहेत.

दक्षिणेकडच्या बंदोबस्तास कांहीं जिव्हाळ्याची मंडळी पाहिजेत असें पाहून नानासाहेबानें पटवर्धन मंडळीस मोठमोठ्या तैनाती देऊन वाढविलें. पटवर्धनांची कौटुंबिक जमियत मोठी असून शीलशौर्यादि गुणांनीं ते पेशव्यास व विशेषतः गोपिकाबाईस फार प्रिय झाले. " सखाराम बापू हुशारीनें वागतो तसें तुम्ही सुद्धां कारभारांत निपुण व्हा " असें नानासाहेब यास वारंवार सांगे.

पटवर्धनांचा ओढा सर्वस्वीं गोपिकाबाईकडे असून तिच्याच प्रोत्साहनानें हे वागत असत.

घोडनदीचे लढाईंत माधवरावाचा पराभव होऊन तो चुलत्याचे स्वाधीन झाल्यावर हा आपल्या पथकासह मिरजेस आला. दादाचे विरुद्ध बंड करण्याचा बऱ्याच सरदारांचा विचार होता. हा बंडाचा पुढाकार घेण्यास तयार नव्हता. परंतु लढण्याचे कामांत हाच प्रमुख असल्यामुळें दादास याचीच फार दहशत होती. तेव्हां आबा पुरंदऱ्यास दादानें यावर पाठविलें. जमखिंडीजवळ आबानें यावर एकदम हल्ला करून याचें सारें लष्कर लुटलें. तेव्हां हा निजामास जाऊन मिळाला. निजाम अशा फुटून येणाऱ्या लोकांचा डोळ्यांत भरेल असा सन्मान करी. पण कसें झालें तरी हे फितुर झालेले लोकच. स्वतःच्या घरांत ज्यांना महत्त्व मिळवितां आलें नाहीं त्यांना बाहेर तरी किती मोठेपण मिळणार?

घोडनदीचे युद्धानंतर चुलते-पुतण्यास सर्व इसम रुजू झाले तरी हा फुटून राहिल्यामुळें पटवर्धनांची पांच पंचवीस लाखांची नुकसानी झाली. मिरज वगैरे स्थळें हातचीं जाऊन कुटुंब देशोधडीस लागलें. आणि मोगलांचा आश्रय केल्याबद्दल गोपिकाबाई सुद्धां याजवर रागावली.

" आजपावेतों कायावाचामनें आपल्या राज्याचें अकल्याण इच्छिलें नाहीं. आमचे गुणाचे ग्राहक असते तर मोगलाईंत देखील यावयाचें प्रयोजन नव्हतें. आम्हीं तुम्हांकरितां सर्वस्वास बुडालों, हें चित्तांत किमपि न आणितां आमचे ठायीं दोषारोप ठेविले; यामुळें अतोभ्रष्ट ततोभ्रष्ट. कालमहिमाच तसा, त्यास आपला काय इलाज ! ''. शहाणपणाची परीक्षा कठिण प्रसंगांतच होते.

स. १७६३ मध्यें मोगलांनीं पुण्यावर स्वारी करून पुण्यापर्यंत मुलूख जाळला. ही गोष्ट याच्या माहितीनें झाली. निजामानें आपल्या सैन्याच्या आघाडीस राहण्यास फर्माविलें होतें. आणि त्याप्रमाणें गोपाळराव आघाडीवर होता. त्यामुळें 'गोपाळराव आगलावे' असाहि याच्या संबंधानें याच्याच ज्ञातिबांधवांनीं केलेला उल्लेख आढळतो. कदाचित् गोपाळरावांनीं मंदिरादि विध्वंसाच्या वेळीं आळा घालण्याचा प्रयत्न केला असेल, पण तो याला साधला नाहीं.

ता. २० ऑगस्ट १७६३ त राक्षसभुवनच्या लढाईनंतर हा पेशव्यास भेटून समाधान पावून पुनः पेशव्यांच्या पुढील उद्योगांत सामील झाला. याच्या हातून जो काय अपराध घडला असेल, त्याची सवाई भरपाई इतउत्तर जिवापाड राष्ट्रकार्य करून यानें धन्यास पोंचविली. पुढील आठ वर्षांत माधवरावाचा हा केवळ उजवा हात बनला.

एप्रिल १, १७६४–१७६५ दरम्यान हैदरशीं झालेल्या युद्धांत माधवरावाची मुख्य भिस्त यावर होती. पेशव्यांच्या जिव्हाळ्याचा इसम हा एकच होता. यास असें प्रोत्साहन मिळाल्यामुळें यानेंहि जिवाची पर्वा न

करितां स्वाऱ्यांत उत्कृष्ट कामगिरी केली. हा हैदरास शेरास सव्वाशेर भेटला.

सन १७६६ तील हैदरावरील तिसऱ्या स्वारींतहि यानें चांगली कामगिरी केली.

स. १७७० च्या जून महिन्यांत यानें चिक्कबालापुराजवळ हैदरच्या फौजेशीं गांठ घालून त्याचें बरेंच नुकसान केलें. पुढें ता. १९-१०-१७७० त यानें कोल्हार प्रांत सर्व काबीज करून हैदरचा सरदार चंद्रोजी जाधव व बाळाजी भीमराव यांचा पाडाव केला.

या सर्व कामगिरीमुळें यास अतिशय ताण बसून शरीर फार क्षीण झालें. त्यांतच यास जलोदराची व्यथा होऊन हा स्वारीवरून मिरजेस निघून गेला व ता. १०-१-१७७१ रोजीं मरण पावला.

कर्नाटकांतील स्वाऱ्यांत माधवरावाचा उद्योग तडकाफडकी यशस्वी होण्यास याची व इतर पटवर्धन मंडळींची मदत विशेष कारण झाली.

हा जसा शूर तसाच स्पष्टवक्ता व व्यवहारांत सणसणीत होता. हा शरीरानें सडपातळ व मध्यम उंचीचा होता. स्वभाव आनंदी व उत्साही असे. हा मानी, धाडशी व तल्लख असून कर्नाटकांतील संस्थानिकांस याचा मोठा दरारा वाटे.

'गोपाळरावासारखे पुण्यश्लोक कोणी नाहीं. आमची अदृष्टें खोटीं म्हणून ते नाहींसे झाले. डेरा थोरला मुदपाकाचा व संध्येची राहुटी, सारा वेळ मस्कऱ्या हें नजरेंत येतें. तेव्हां परम दुःख होतें; वहिनीस आकाशाची कुऱ्हाड पडली. सारें क्षणभंगुर.'

बाबुराव कोल्हटकरचे चिरंजीव रघुनाथराव यास यांच्या दुसऱ्या कुटुंबाची मुलगी कुसाताई ही दिली होती. याच्या दुसरे कुटुंबाचें नांव सरस्वतीबाई.

**गोपाळराव घाणवडकर**—( स. १८०० सुमार ) हा सातारा जिल्ह्यांतील खानपूर तालुक्यांत घाणवड म्हणून गांव आहे तेथचा कुलकर्णी. बापू गोखल्यांच्या हाताखालीं एक लहानसा सरदार होता. हा इतका क्रूर व दुष्ट मनुष्य होता कीं, ह्यास मनुष्याचा जीव घेण्याच्या कामीं कांहींच वाटत नसे.

कोल्हापूरकर व पेशवे यांच्या लढाया चालू होत्या तेव्हां सरहद्दीवरील कित्येक गांवचे लोक कोल्हापूरकरास मिळाले. तेव्हां तिकडील बंदोबस्ताच्या कामावर यास नेमला होता. त्या वेळीं ह्यानें पुरुष, स्त्री, किंवा मूल, तसेंच लबाड आणि सालस ह्यांतील भेदाभेद कांहीं न पाहतां ओळीनेंच माणसें बसवून मेखसूनें त्यांचीं डोकीं फडाफड फोडून टाकावीं; आणि तें क्रूर कर्म डोळ्यांनीं पाहून हंसत असावें. ह्याच्या घोड्यापुढें खांद्यावर मेखसू टाकलेले दोन मांग नेहमीं चालत असत. हा आला असें समजतांच गांवचे लोक गांव ओसाड टाकून पळून जात. ह्याच्या क्रौर्याच्या पुष्कळ गोष्टी वारणा नदीच्या कांठच्या गांवांतून जुने लोक सांगत असतात. कित्येक ठिकाणीं 'घाणवडकराचे मेकसू' हे शब्द चौदावें रत्न ह्या अर्थी लोक वापरतात. हा अत्यंत अधम होता ( भा. व. खं. ३ ऐ. गो. पृ. ३४-३५ ).

**गोपाळवर्मा उत्पल**—(स.९०३) काश्मीरच्या शंकरवर्म्याचा पुत्र. हा अल्पवयी असल्यामुळें याची माता सुगंधा ही विधवाबाई राज्यकारभार चालवी. हा अल्पवयीच मरण पावला ( सुगंधा पाहा ).

**गोपाळाचार्य कालगांवकर**—( स. १८९८ मृत्यु ) सातारचे राजे प्रतापसिंह महाराज यांच्या पदरीं अनेक गुणी माणसें होतीं. त्यांतच गोपाळाचार्य हे एक होते. हे नरसिंहाचार्यांचे नातू होत. हे उत्तम पौराणिक व कवि होते.

प्रख्यात शूर जो चतुरसिंग त्याचा पुत्र बाळासाहेब सेनापति यास ह्यांचें पुराण ऐकल्यावांचून एक दिवसहि करमत नसे. ह्यांनीं प्रतापसिंहोदय, नीतिमंजरी, राघवचंपू, राधाविलास, रासार्या, विठ्ठलार्या इत्यादि ग्रंथ केले आहेत.

प्रतापसिंह महाराजांनीं सर्व महाभारताचा तर्जुमा मराठींत करण्याचें काम ह्यास सांगितलें, तें पूर्ण झालें नाहीं. तथापि निम्म्याच्यावर झालें आहे. प्रतापसिंहामागून आप्पासाहेब महाराजांनींहि ह्यास आपल्या आश्रयास ठेवलें होतें. पुढें सातारचें राज्य खालसा झाल्यावर राजाच्या आश्रितास पेन्शनें करून दिलीं. त्याप्रमाणें ह्यासहि इंग्रज सरकाराकडून पेन्शन मिळत होतें. हा स. १८९८ मध्यें परलोकवासी झाला ( भा. व. खंड ३. ऐ. गो. पृ. १५-१६ ).

**गोपाळ संभाजी खांडेकर**—( मृत्यु स. २२-५-१७९३ पूर्वी ) खांडेकर हे गार्ग्यगोत्री कऱ्हाडे ब्राह्मण. बुरंबाडचे गणेश व गोपाळ संभाजी हे प्रथम स. १७५० चे पुढें नानासाहेब पेशव्यांचे वेळेस उदयास आले, आणि पानिपतोत्तर काळीं यांचा पराक्रम विशेष झळकला. प्रथम यास बुंदेलखंडांत झांशीची मामलत मिळाली. पानिपतचे पराभवानें तिकडील मराठ्यांचा अंमल ढासळूं लागला, तेव्हां या दोघां बंधूंनीं तिकडे चांगला उद्योग केला. हा भावासारखाच पराक्रमी असून उत्तर हिंदुस्थानांतील उद्योगांत सतत झटणारा होता. कांहीं दिवस याजकडे

धारची दिवाणगिरी असून माधवरावाचा याजवर लोभ होता. माधवरावानें यास पंथपिंपळोदची जहागीर दिली. गोपाळ संभाजीचे वंशज गणपतराव हे हल्लीं उज्जनीस राहतात. या घराण्याची एक शाखा फडणीस म्हणून साताऱ्यास आहे (ना. प्रां. इ. ५६५; म. रि. म. भा. ४, पा. ३०१).

**गोपिकाबाई पेशवे**—( स. १७२५–१७८८ ) भिकाजी रास्ते यांची ही कन्या. हिचा जन्म स. १७२५ च्या सुमारास झाला. भिकाजी हा मोठा सावकार होता. एकदां दिवाळींत भिकाजीनें शाहूस मेजवानी दिली. त्या वेळीं गोपिका शाहूच्या नजरेस पडली. तेव्हां शाहूंनीं हिचें लग्न स्वतःच ठरवून नानासाहेबाशीं विवाह लावला. स. १७३० च्या सुमारास ( १० जानेवारी ) वांईस लग्न झालें. ही नेहमीं नानासाहेबांबरोबर स्वारीशिकारीस जात असे. हिला राजकारण चांगलें कळत असून दरबारांतील कारभारहि ही पाहत असे. नानासाहेबांनीं प्रयाग सोडविण्यासाठीं उत्तरेंत जी मोठी स्वारी केली तींत ही होती. हिला त्या वेळीं दोनतीन महिने गेलेले दिसतांच हिची पुण्यास रवानगी करण्यांत आली. पुढें जुलईंत प्रसूत होऊन मुलगा झाला. तोच विश्वासराव होय.

हिनें कायद्यानें कन्याविक्रय बंद करावा असें पेशव्यांकडून घडवून आणण्याकरितां नाना फडणीसास विनंति केली. देश व समुद्रकिनारा या भागांत कन्याविक्रय जारीनें चालू असल्यामुळें अनाचार वाढला आहे असें हिचें म्हणणें आहे ( पे. द. ३२. २०६ ).

हिनें सवाई माधवरावांस केलेला उपदेश ( का. सं. प. या. ४५२ ) बोधपर आहे. हिला ३ मुलें झालीं होतीं, परंतु तीं सर्व हिच्या अगोदरच मृत्यु पावलीं. मुलांचीं नांवें अनुक्रमें विश्वासराव, माधवराव व नारायणराव अशीं होतीं.

सदाशिवराव भाऊची चढती कळा पाहून गोपिकाबाईस तिरस्कार वाटे व त्यास पानपतावर पाठविण्यास हीच कारणीभूत झाली, असें कांहीं लोकांचें म्हणणें आहे; परंतु अद्यापि त्याची शहानिशा झालेली नाहीं. उद्गीरच्या लढाईच्या प्रारंभीं भाऊसाहेबांवर मुजफरखानानें मारेकरी घातले होते. हिच्याच चिथावणीवरून हें कृत्य झालें होतें असाहि तत्कालीन तर्क आहे. त्यास बाईची प्रेरणा असावी असें डफ म्हणतो. स. १७६३ त निज़ामानें पुण्यावर चाल केली असतां गोपिकाबाई कुटुंबांतील माणसें व जवाहीर घेऊन पुरंदरावर गेली. नानासाहेबांच्या अंतकालीं बाई जवळच होती. नानासाहेबांनीं मृत्युपूर्वी सहाच महिने दुसरें लग्न केल्यामुळें ही त्यांजवर रुष्ट होती व मृत्यूनंतर कांहीं दिवस बाईचें, राघोबा दादाचें व दोघां कारभाऱ्यांचें एकचित्त झालें होतें. परंतु पुढें विघाड होत जाऊन ही गंगापुरास जाऊन राहिली.

हिला लिहितांवाचतां चांगलें येत असे; व मोठीं राजकारणेंहि करण्याचा ही आव आणी. राघोबावरहि हिचा वचक असे. इतर मराठे सरदारहि हिला वचकून असत. नानाफडणीसावर तिचा लोभ असे. गंगापुरास ही ३ ऑगस्ट स. १७८८ त वारली.

**गोपीनाथ**—वल्लभाचार्यांचा पुत्र. यास विठ्ठलनाथ नांवाचा धाकटा भाऊ होता. दोघांमध्यें गादीबद्दल तंटे लागले. तेव्हां हे दिल्ली येथें बादशहाजवळ होते. तेथें हा मरण पावला व धाकट्या भावास गादी मिळाली.

२. शिवदिनाचा शिष्य. नारळीप्रसाद या मराठी काव्याचा कर्ता ( मं. वा. इ. १८३७ लें. १४२ ).

**गोपीनाथ चक्रवर्तिन्**—कौतुकसर्वस्वम् नांवाच्या संस्कृत प्रहसनाचा कर्ता.

**गोपीनाथपंत बोकील**—यास पंताजी गोपीनाथ असेंहि म्हणतात. हा शहाजीच्या पदरीं नोकरीस होता. शहाजीच्या घरीं याचें केवळ जाणेंयेणेंच नसे तर जिजाबाईशीं सोंगट्या खेळण्यापर्यंत घरोबा होता. हा हिवरे गांवचा कुलकर्णी होता. अफजुलखानाकडे वकील म्हणून शिवाजीनें यांस पाठविलें होतें. मोठ्या शहाणपणानें यानें अफजुलचें मन वळवून दोन माणसांतच भेट व्हावी असें ठरविलें. याच्या या कामगिरीमुळें महाराजांनीं यास हिवरें गांव इनाम दिलें. याचें उपनांव बोकील असें असून याचाच वंशज प्रसिद्ध सखारामबापू बोकील होय.

**गोपीनाथभट्ट दीक्षित ओक**—( ग्रंथकाल स. १७७३ ) संस्काररत्नमाला नांवाच्या संस्कृत ग्रंथाचा कर्ता. हिरण्यकेशी शाखेचा चित्पावन ब्राह्मण. प्रथम काशीस राहत असे. नंतर पेशव्यांच्या आश्रयानें पुण्यास राहूं लागला. पुणें येथें नेने घाटावर साकुर्डीकर दीक्षित म्हणून याचें घराणें नांदत होतें.

**गोपीनाथ मौनि**—( स. १६५० सुमार ) हा महाराष्ट्रीय असून राजा जयसिंहाच्या कारकीर्दीत बनारस येथें होऊन गेला. हा स्वतःस तर्कशास्त्रांतील कमलेंद्र असें म्हणवितो. यानें खालील ग्रंथ लिहिले आहेतः—

१ शब्दालोकरहस्य, २ तर्कभाषाटीका, ३ पदार्थविवेकटीका ( हिस्टरी ऑफ इंडियन् लॉजिक, पा. ४८५ ).

**गोवुरी ओब**—विजयनगरच्या आरविदू घराण्यांतील वेंकटपतिदेवराय २ रा याचा हा सासरा होय. याची कोंडाम्बिका नांवाची मुलगी वेंकटराजास दिली होती. वेंकटराजाची दुसरी बायको रघवाम्बा हीहि याची मुलगी होती.

स. १६०६ पर्यंत याचें वेंकटराजाचे दरबारांत चांगल्या प्रकारचें वजन होतें. यानें दान पुष्कळ केलें असा उल्लेख शिलालेखांत आहे ( वेंकटराजाचा नरसिंगपुरम्‌चा शिलालेख ).

**गोमाजी नाईक पानसवळ**—लुखजी जाधवरावाच्या पदरचा मनुष्य. जिजाबाई माहेरून शहाजीकडे आली, त्या वेळीं तिच्याबरोबर विश्वासाचा व खात्रीचा मनुष्य म्हणून जाधवरावानें यास पाठविलें होतें. प्रतापराव गुजरापूर्वी हा कांहीं काळ शिवाजीचा सेनापति होता असें याच्या शिक्क्यावरून दिसतें. हा स. १६४६ मध्यें पुण्याचा हवालदार होता. याचा मुलगा खंडेराव नाईक राजारामाच्या वेळीं योग्यतेस चढला. याचे आडनांवाचा उच्चार पानसवळ आहे. सवर अनुस्वार नाहीं.

स. १६४८ च्या सुमारास विजापूरचे नोकरींतील पांचसातशें पठाण शिवाजीकडे राहण्यास आले. शिवाजीच्या मनांत त्यांना आपल्याकडे ठेवावयाचें नव्हतें. परंतु याचा सल्ला विचारतां बोलला कीं, ' तुमचा लौकिक ऐकून हे लोक आले आहेत. त्यांना विन्मुख जाऊं देणें योग्य नाहीं. हिंदूंचाच संग्रह करूं, इतरांची दरकार ठेवणार नाहीं अशी कल्पना धरिली, तर राज्य प्राप्त होणार नाहीं. ज्यास राज्य करणें त्यानें अठरा वर्ण, चाऱ्ही जाती आपआपले धर्माप्रमाणें चालवून संग्रह करणें ' ही सल्ला फार चांगली जाणून राघो बल्लाळ अत्रे याचे निसबतीस त्यांना ठेवून घेतलें ( म. रि. पूर्वार्ध, पा. १२१–२२ ).

**गोरक्षनाथ**—अयोध्येजवळ जयश्रीनामक एका नगरांत सद्बोध ब्राह्मणाची सद्वृत्ति नांवाची बायको होती. मत्स्येंद्रनाथ एकदां भिक्षानिमित्तानें तिच्या घरीं आले. सत्पुरुष जाणून तिनें मुलाची गोष्ट काढली. त्यांनीं तिला विभूति दिली, पण तिनें प्रसादबुद्धीनें ती विभूति न घेतां उकिरड्यावर टाकून दिली. बारा वर्षांनीं मत्स्येंद्रनाथ पुन्हां आले व 'मुलगा कोठें आहे ?' म्हणून विचारलें. तेव्हां तिनें खरी हकीकत सांगितली. तेव्हां उकिरड्यापाशीं जाऊन मत्स्येंद्रांनीं ' अलक्ष्य ' ( अलख ) म्हणून हांक मारिली. तेव्हां ' आदेश ' असें प्रत्युत्तर देत गोरखनाथांची बालमूर्ति बाहेर पडली ! यांना अयोनिसंभव म्हणतात त्याचें कारण हेंच. गोरखनाथ गुरूपाशीं सर्व विद्या शिकले. मत्स्येंद्रनाथ योगी व भोगीहि होते. परंतु गोरखनाथाचें वैराग्य अग्नीसारखें प्रखर होतें. हा योगी असून याच्या योगसिद्धीच्या अनेक गोष्टी प्रसिद्ध आहेत. सिंहलद्वीपच्या प्रमिला राणीच्या प्रेमपाशांतून गोरखानेंच मत्स्येंद्राची सुटका केली. हा योगी, शिवोपासक, अद्वैतमती व किमयागार म्हणून प्रसिद्ध आहे. याचें कर्तृत्व दांडगें होतें. याचे मठ बंगाल, नेपाळ, पंजाब, काठेवाड, महाराष्ट्र, सिंहलद्वीप वगैरे दक्षिणोत्तर सर्व दिशांकडे आहेत. मत्स्येंद्रनाथ व गोरक्षनाथ हे नेपाळांतल्या गुरखे लोकांचे देव आहेत. त्यांना गुरखे ही संज्ञा गोरखनाथापासूनच मिळाली आहे. नेपाळांत बौद्धांचा महायानपंथ होता त्याला गोरखनाथांनीं चांगलाच खो दिला; व सर्व लोकांस शिवाची उपासना दिली. गोरखाचा काल अजून अनिर्णित आहे.

**गोरक्षपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं एक सिद्ध. हा जातीनें मछुआ असून कामरूपदेशांतील राहणारा होता. याच्या वेळेस देवपाळ नांवाचा राजा होऊन गेला ( स. ८०९-४९ ). यानें ' वायुतत्त्वभावनोपदेश ' ( तं. ४८। ५१ ) हा ग्रंथ लिहिला.

**गोरा कुंभार**—( स. १२६७–१३१७ ) हा तेरढोकीचा राहणारा. या गांवीं याचें वतनी इनाम होतें. ह्याचा जन्म शके ११८९ मध्यें असल्यामुळें संतमंडळींत सर्वांत हा वडील होता; व सर्वजण याला गोरोबाकाका असें म्हणत. जसा वयानें तसाच वैराग्यानेंहि हा सर्वांत श्रेष्ठ होता. आवा घडण्याकरितां माती आणावी आणि ती मऊ करण्याकरितां तींत नाचतांना तोंडानें पंढरीनाथाचे भजनाचा सपाटा लावावा व प्रेमाच्या भरांत येऊन आनंदानें डुलत राहावें असा याचा नित्यक्रम असे. हा आपल्या अभंगांत नामदेवाचा मोठ्या प्रेमानें वारंवार उल्लेख करतो. "म्हणे गोराकुंभार अनुभवाचा ठेवा । प्रत्यक्ष नामदेवा भेटलासी ॥" ( महाराष्ट्र सारस्वत ). गोरोबांना संती व रामी अशा दोन स्त्रिया होत्या. गोरोबा चिखल तुडवीत असतां भजनानंदांत तल्लीन होऊन इतके नाचले कीं, रांगतें पोर पायाखालीं तुडवतांना मेलें याचीहि यांना शुद्धि नव्हती. ' माझ्या अगाला हात लावाल तर तुम्हांला विठोबाची शपथ ' असें संती सहज म्हणाली, तों यांनीं तिला स्पर्श करण्याचेंहि सोडून दिलें. मग आपल्या बहिणीपासून तरी मूल होऊन वंश चालो म्हणून संतीनें स्वखुषीनें याचें रामीशीं लग्न लावून दिलें. लग्नसमयीं 'दोघी बहिणींना समानतेनें वागवा' असा सासऱ्यानें उपदेश केला, तों यांनीं तिच्याहि

अंगाला हात लावायचा नाहीं असें ठरविलें. एके रात्रीं दोघी वहिणींनीं याचे दोन्ही हात आपल्या पोटावर घेतले तों आपले हात पापी समजून तोडून हा थोटा बनला. अशा याच्या करारीपणाच्या गोष्टी सांगतात. नामदेवांना डोक्यावर थापटणें मारून 'कच्चा घट' म्हणून यांनींच ठरविलें व मग कच्चेपणा घालविण्यासाठीं नामदेव विसोबा खेचरांना शरण गेले.

याचे सुमारें त्रेचाळीस अभंग प्रसिद्ध आहेत, पण ते बहुतेक याच्या नांवावर कोणीतरी मागाहून लिहिले असावेत. कारण यांपैकीं २१ अभंगांत गोरोबाचें चरित्र असून त्यांत याची फारच स्तुति केली आहे. सूरदास व कबीर या उत्तरकालीन संतांचे निर्देश याच्या अभंगांत आहेत. याचें देहावसान वयाच्या ५० व्या वर्षी शके १२३९ मध्यें झालें.

**गोराबादल**—हें एका व्यक्तीचें नांव आहे किंवा गोरा व बादल अशा दोन व्यक्ति आहेत याबद्दल संशय आहे. पूर्वीच्या लोकांनीं जरी हीं दोन व्यक्तींचीं नांवें आहेत असें मानलें आहे तरी श्री. ओझा यांना ती गोष्ट मान्य नाहीं. त्यांच्या मतें गोरा हें वंशसूचक नांव असून बादल हें व्यक्तीचें नांव आहे. राठोड दुर्गादास, सीसोदिया पत्ता इत्यादि नांवांप्रमाणें हें एका व्यक्तीचें नांव आहे. गोरावंश नष्ट झाल्यामुळें भ्रमानें दोन व्यक्ती मानण्याची चूक झाली आहे. कर्नल टॉडनें गोरा व बादल या दोन व्यक्ती मानून त्या सिंहल राजाच्या कुटुंबांतील मानल्या आहेत. तसेंच गोरा हा पद्मिनीचा काका व बादल हा पुतण्या होता असें म्हटलें आहे. पण हें चूक असून रत्नसिंहाच्या कारकीर्दीचा विचार करितां सिंहलद्वीप (लंका) येथील पद्मिनी असणें अशक्य असून चितोडपासून पूर्वेस चाळीस मैलांवर सिंगोली आहे तेथील राजाची पद्मिनी ही मुलगी असावी असें ओझाजींना वाटतें.

**गोवर्धन**—यानें 'तर्कभाषाप्रकाश' या नांवाची टीका केशव-मिश्राच्या 'तर्कभाषा' या ग्रंथावर लिहिली.

कीथनें याच्या टीकेचा काल स. १५७८ असा दिला आहे. परंतु तो काल ग्रंथाच्या नकलेचा असून ती नक्कल गोवर्धनाच्या भावानें केली. यावरून यानें आपली टीका स. १५७८ च्या पूर्वीं २५-३० वर्षे लिहिली असली पाहिजे. तेव्हां याच्या टीकेचा काल स. १५५० पर्यंत मागें ढकलला जातो.

२. पुराणसर्वस्व नांवाच्या संस्कृत भाषेंतील ग्रंथाचा कर्ता. हा बंगालच्या सत्यखानाचा आश्रित होता. महाभारत-टीकाकार अर्जुनमिश्र आणि हा समकालीन होते. (इंडियन कल्चर, जुलै १९३५ पा. १४:-४६).

**गोवर्धन मार्तंड**—त्रावणकोरचा राजा. याचें राज्य वेनाद नांवानें प्रसिद्ध होतें. सिलोनपर्यंत याचें राज्य पसरलें होतें. पांड्य याचे मांडलिक होते (हिस्टरी ऑफ केरळ).

**गोवर्धनाचार्य**—(स. १०७५-११२५) बंगालचा राजा लक्ष्मणसेन याच्या पदरीं हा कवि होता. याच्या बापाचें नांव नीलांबर असें असून याचे शिष्य उदयन व भाऊ बलभद्र हे होत. यानें आपल्या काव्यांत बहुतेक प्राचीन थोर थोर कवींचा उल्लेख केलेला आहे.

जयदेव कवीनें 'गीतगोविंदांत' याची स्तुति केलेली आहे. यावरून बाण, भवभूति व कालिदास यांच्या नंतर हा कवि झाला, हें उघड आहे. याचा आर्यासप्तशती नांवाचा एक ग्रंथ आहे. त्यांत एकंदर ७५६ आर्या आहेत. हा ग्रंथ शृंगाररसात्मक आहे (वि. वि. २१ अ. ९--१०).

**गोवळकोंड्याचें कुत्बशाहीघराणें**—१ सुलतान कुली (कुत्बुल्मुल्क, स. १५१२-१५४३ खून) – २ जमशीद (स. १५४३-५०, याचे भाऊ हैदरकुली, कुत्बुद्दीन व) ३ इब्राहीम (स. १५५०-८१, पत्नी बिबी जमाली निजामशाह)-४ मुहम्मद कुली (स. १५८१-१६१२ याचे बंधु अबदुल कादिर, हुसेन कुली, मुहम्मद अमीन) ५ मुहम्मद (मुहम्मद अमीनचा पुत्र. स. १६१२-३५)-६ अबदुल्ला, (स. १६३५-७२ याची मुलगी ताजमहाल अबुल हसनला दिली होती)-७ अबुल हसन (स. १६७२-८७ खालसा-मृ. १७००).

मुहम्मद बाहामनीच्या वेळीं सुलतान कुली हा तेलंगणचा सुभेदार होता. स. १५१२ मध्यें स्वातंत्र्य जाहीर केलें व गोवळकोंडा ही राजधानी केली.

**गोविंद**—नामदेवाच्या चार मुलांतील एक.

२. हा सुप्रसिद्ध सुतार मंडनचा पुत्र. यानें वास्तुशास्त्रावर उद्धारधोरणी, कलानिधि व द्वारदीपिका नांवांचे तीन ग्रंथ लिहिले. याला उदेपूरच्या कुंभ राण्याचा आश्रय होता.

**गोविंद कवि**—हा तंजावरच्या तेलगू राजाच्या वेळीं उदयास आला. हा चांगल्यापैकीं कवि असून याचें काव्य बरेंच प्रसिद्ध आहे. यानें गुजराथची कन्या इंदुमती हिच्यावर 'इंदुमती-परिणय' म्हणून एक काव्य लिहिलें आहे. याखेरीज द्रविड देशांतील पुष्कळ देवालयांचा वर्णनात्मक इतिहास यानें लिहिला आहे.

**गोविंद कृष्ण काळे**—( मृ. स. १८२३ ) काळे हे काशीचे राहणारे. यांच्या वडिलांचें नांव कृष्णराव बल्लाळ. वडिलांच्या हाताखालीं हा तयार झाला. आणि त्यांच्या मृत्यूनंतर स. १७८६ मध्यें यानें निजामाकडे पेशव्यांचा वकील म्हणून काम करण्यास सुरुवात केली. याचें सुव्यवस्थित ठेवलेलें दप्तर राजवाडे खंड ५.७ व २२ मध्यें प्रसिद्ध झालें आहे. खड्यांच्या लढाईनंतर झालेल्या तहांत याचा मुख्य हात होता, पण तो जोरदारपणें याला अमलांत आणतां आला नाहीं. सवाई माधवरावाच्या मृत्यूनें तर सर्वच पारडें फिरलें. पेशवे–दरबारनें व निजामानेंहि बराच मोठा सरंजाम दिला होता. रावबाजींना सल्ला-मसलत देणाऱ्या अमृतरावादि मंडळींत हा होता; व त्यामुळें हा नानासहि कैदेंत टाकण्यास तयार झाला. पुन्हां एकवार नानास कैदेंत टाकण्यास ह्याची तयारी झालेली पाहून उलट श्रीमंतांनींच यास कैदेंत टाकण्यास सांगितलें; व त्याप्रमाणें नानानें केलेंहि ( स. १७९९ ). या वेळीं याचा १। लक्षाचा सरंजाम जप्त करण्यांत आला. पुढें इंग्रजींत हा बारामतीस येऊन राहिला. या वेळीं कांहीं इनाम गांवें व पोलिटिकल पेन्शन म्हणून ३ हजार रुपये इंग्रजांकडून याला मिळत. हा स. १८२३ त वारला. इंग्रजांच्या विरुद्ध एक गुप्त कट रचण्याचा यानें प्रयत्न केला असें कांहींचें म्हणणें आहे, पण कटावर एल्फिन्स्टनचा विश्वास नाहीं.

**गोविंद गदाधर ( जुन्नरकर )**—यानें कुंडमार्तंड नांवाचा ग्रंथ स. १६१३ मध्यें केला.

**गोविंद गुप्त**—दुसऱ्या चंद्रगुप्ताचा मुलगा. हा गादीवर आला नव्हता.

**गोविंद गोपाळ कामतेकर**—हा सारस्वत ब्राह्मण असून फत्तेसिंग गायकवाडाचा दिवाण होता. याचा गोंदवा या नांवानेंहि उल्लेख करितात. याच्या वंशाची हल्लीं वस्ती बडोदें येथें आहे.

ज्या वेळीं गॉडर्डनें ( इंग्रज सेनापति ) गुजराथेवर स्वारी केली तेव्हां फत्तेसिंगानें 'पुण्याहून फौजा लवकरच न आल्यास गुजराथ हातचा जाणार' असें पुण्यास लिहून कळविलें, आणि अंतस्थपणें गॉडर्डशीं संधान चालू ठेविलें. हा खेळ या दिवाणाच्या सल्ल्यानें फत्तेसिंग खेळत होता. महादजीनें नानास लिहिलेल्या पत्रांत याच्याविषयीं खालील उल्लेख केला आहे.

'गोंदवा स्पष्ट सरकारचे नाशास प्रवर्तला हें त्यास कळत नाहीं. सांप्रत त्यानें धन्यास न विचारतां सिनोर, चांदोर, करनावळीच्या सनदा इंग्रजास दिल्या, आणि डभई किल्ला व परगणा आपले बायकोचे चोळीबद्दल घेतला. इंग्रज कूच करून जाताच डभईंत गोंदवानें आपला अंमल बसविला. चौघे गृहस्थ पुण्याहून आलेले गोंदबाजवळ आहेत. तेव्हां गोंदवास हरामखोर कीं हिंदु काय म्हणावे ! आम्ही इकडून राजकारण करतों, ते तिकडून करतात, तेव्हां आम्हास तोंडघशीं पाडावें हीच कीं नाहीं मसलत ! वगैरे--' त्याचप्रमाणें नानानें आपल्या पत्रांत याच्याविषयीं खालील उल्लेख केला आहे—

'गोंदवा सरकारचे नाशास प्रवर्तक असें कळल्यावर आम्हीं काय उणें केले ? रांडापोरें धरून किल्यावर कैदेंत घातलीं. चोळीबद्दल महाल घेतले, ही चोळी किल्यावर अडकविली आहे.' वगैरे ( म. रि. उत्तर वि. १ ला ).

**गोविंदचंद्र गाहडवाल**—( स. १११४–११५५ ) हा कनोजच्या मदनपाल गाहडवालाचा मुलगा. तत्कालीन लेखांत याचें वर्णन 'नवीन स्थापलेल्या राज्यास यानें आपल्या बाहूंनीं दोरखंडाप्रमाणें बांधून स्थिर केलें.' 'याचे लढाऊ हत्ती तिन्ही दिशांस सारखे फिरत होते' असें आढळतें. यानें 'नरपति-हयपति-गजपति-त्रैलोक्यविजेता' हें बिरुद प्रथमच धारण केलें. या तीन राज्यांचा खुलासा अद्यापि झालेला नाहीं. हयपतीचें राज्य कनोजच्या प्रतिहाराचें राज्य, गजपति म्हणजे बंगालचें राज्य, आणि नरपति म्हणजे चेदीचें राज्य असावें. नरपति म्हणजे कदाचित् तेलंगणाचें राज्य असेल तेलंगणाच्या राजानें याच्या पदकमलाचें चुंबन घेऊन याचें मांडलिकत्व कबूल केलें, असें याचें वर्णन आलें आहे. बनारस व त्याभोंवतालचा प्रदेश याच्या ताब्यांत होता. कारण त्या प्रान्तांतील बरींच गांवें यानें दान केलीं आहेत व त्याचीं दानपत्रें बनारस येथून प्रसिद्ध झालीं आहेत. यावरून याला व जयचंद्रास मुसलमानी लेखक बनारसचा राजा म्हणतात. पण याची ती दुसरी राजधानी दिसते.

हा युवराज असतांच यानें पूर्वेच्या गौडांचा आणि पश्चिमेकडील हंमीराचा पराभव केला; आणि आपल्या अश्वदळाच्या जोरावर मुसलमानांना पायबंद घातला असावा असें दिसतें.

हा माळव्याच्या भोजाप्रमाणें आपल्या दरबारांत विद्वानांस आश्रय देत असे. या बाबतींत याचें वर्णन 'विविधविचारविद्यावाचस्पति' या विशेषणानें गाहडवालांच्या लेखांत येतें. याचा युद्धखात्याचा प्रधान लक्ष्मीधर यानें 'व्यवहारकल्प' नांवाचा ग्रंथ धर्मशास्त्र व काम

चालविण्याची पद्धत या विषयांवर लिहिला आहे. यामुळें यास समुद्रगुप्त, हर्ष, भोज, शिवाजी, महमूद, व अकबर इत्यादि महान् विजेते व विद्वानांचे चहाते अशा राजांच्या मालिकेंत घालावयास हरकत नाहीं. यानें स. १११४ पासून स. ११५५ पर्यंत दीर्घ काळ राज्य केलें. स.११०४ पासून स. १११४ पर्यंतचीं आणखी दहा वर्षें गोविंदचंद्राच्या राज्यकालांत सर व्हि. स्मिथनें चुकीनें घातलीं आहेत. पंडित गौरीशंकर ओझा यांनीं याचा राज्यारंभकाल स. १११४ हाच दिला आहे स. ११०४-९ पर्यंत यानें युवराज म्हणूनच सही केली आहे. तसेंच इतर लेखांचें आहे ( इंडि. अँटि. २ पा. ३५८, १४. पा. १०३ ).

हा पुष्कळ वर्षें राज्य करीत होता. बनारसजवळ याचे एकवीस ताम्रलेख एकत्र सांपडले. ते ११५४ पर्यंतचे असून एपि. इंडि. मध्यें छापले आहेत. एकंदर आतांपर्यंत चाळीस लेख मिळाले आहेत. याच्यानंतर विजयचंद्र गादीवर आला.

याच्या राणीचें नांव कुमारदेवी. हिचा एक लेख सारनाथ येथें सांपडला आहे. त्यावरून पाल, राष्ट्रकूट व गाहडवाल यांचा शरीरसंबंध दिसून येतो. तसेंच तुरुष्कांनीं दूषित केलेली वाराणसी शुद्ध करण्याकरितां हरानें सांगितल्यावरून हरि गोविंदचंद्ररूपानें अवतरला असें त्यांत म्हटलें आहे. त्यावरून वाराणशीवर मुलसमानांचें आक्रमण, गोविंदचंद्रानें त्यांचा केलेला पराभव व वाराणशीशीं संबंध या गोष्टी स्पष्ट होतात ( एपि. इंडि. ९, पा.३१९ ). यानें जेतवनविहाराला पांच गांव दिले होते. याचें नांव कांहीं हस्तलिखित लेखांत अभयचंद असें दिलेलें आढळतें ( हिं. भा. अ. पा. ३४० ) व याच्या राणीनें म्हणजे कुमारदेवीनें सारनाथ येथें बांधलेल्या प्रचंड बुद्धमंदिराचीहि माहिती मिळते.

**गोविंदचंद्र हरिचंदन**—( मृत्यु स. १७६१ ) अतगड येथील बोधले घराण्यांतील हा २१ वा राजा होय. याच्या बापाचें नांव जगन्नाथ अथवा जगबन्धु हरिचंदन असें होतें. जगन्नाथ हा एका मुसलमान नवाबाचा गंजम प्रांतावरील सुभेदार होता. याच्या बापानंतर याचा थोरला भाऊ मधुसूदन हा गादीवर आला. मधुसूदनानें स. १७५८-१७६१ पर्यंत राज्य केलें. मधुसूदन निपुत्रिक मरण पावल्यामुळें गोविंदचंद्र हा गादीवर आला.

याच्याविषयींचे शिलालेख उपलब्ध असून त्यांवरून हा उत्तम राजा होऊन गेला असें सिद्ध होतें.

याच्यावर नबाब कुम्मील आनंदराज यानें स्वारी केली, पण त्यांत त्याचा पराभव झाला. यानें गुंसूर येथील राजा कृष्ण भुंज याचा पराभव केला. कृष्ण भुंजावर गेलेल्या सैन्याचा श्रीकरण पत्नैक हा सेनापति होता. यानें पुष्कळ राजांना मदत केली व आपला गेलेला प्रांत परत मिळविला.

हा स. १७६१ मध्यें गादीवर बसला. याच्या वेळचे बरेच शिलालेख उपलब्ध आहेत.

**गोविंद ठक्कुर**—ह्याच्या पित्याचें नांव केशव असें असून आई सोनादेवीबाई होय. याचा वडील व धाकटा असे दोघेहि बंधु कवि होते. यानें नारायण यास आपला गुरु केलें होतें. यानें मम्मटाच्या काव्यप्रकाशांतील कारिकांवर स्वतंत्रपणें टीका करून पुष्कळ नवीं उदाहरणें देऊन विवेचन केलें आहे. त्यामुळें याच्या ग्रंथास स्वतंत्र ग्रंथाचें महत्त्व आलें आहे. तो ग्रंथ काव्यप्रदीप या नांवानें प्रसिद्ध आहे व त्यावर नागेशानें उद्योत नांवाची टीका लिहिली आहे. यानें केलेल्या टीकेंत भास्कर भट्टाचार्य व चंडीदास भट्टाचार्य हीं नांवें आढळतात. दुसरी टीका म्हणजे काव्यप्रकाशांतील उदाहरणपद्यावर उदाहरणदीपिका नांवाची दीपिका यानें लिहिली. हा तर्कशास्त्रज्ञ होता ( वि. वि. पुस्तक २२ अंक १-२ ).

**गोविंददास**—( स. १६०० सुमार ) एक बंगाली कवि. हा मैथिली किंवा बंगाली ब्राह्मण. कदाचित् हा कायस्थ असेल. याचा जन्म चटगांव जिल्ह्यांतील देवग्राम गांवीं झाला. गोत्र अत्रि. याचा मुख्य ग्रंथ विद्यासुंदर. याचे विचार गंभीर व तात्त्विक आहेत. याचे ग्रंथ—१ प्रेमविलास, २ भक्तिरत्नाकर, ३ भक्तमाल. याच नांवाचे दोन कवि होऊन गेले, एक बंगाली व दुसरा मैथिल ( क. कौ. भा. ७ ).

**गोविंद दीक्षित**—हा एक कवि होय. तंजावरच्या अच्युतप्पा नायकाचा हा एक आश्रित होता. हा नुसता कवि नसून तत्त्वज्ञानीहि होता.

यानें 'हरिवंशसार-चरित्रम्' हा पद्यात्मक ग्रंथ ३ विभागांत संस्कृतमध्यें लिहिला आहे. या ग्रंथावर अप्पय्या दीक्षित यानें टीका लिहिली आहे. याशिवाय यानें कांहीं पदें लिहिलीं आहेत व त्या पदांच्या संग्रहास 'संगीतसुधानिधी' असें नांव दिलेलें आहे. हा एक तामीळ कवि असावा, कारण यानें संस्कृताचें भाषांतर तामीळमध्यें केलें आहे.

**२.** ( सनाचें सोळावें शतक ) ऋग्वेदी आश्वलायन कर्नाटकी ब्राह्मण. गांव पट्टेश्वरम् ( धेनुपुरम् ). हें गांव कावेरीच्या एका उपनदीवर आहे. याच्या बायकोचें नांव

नागंबा. याला आठ मुलगे व एक मुलगी होती. हे तंजावरच्या नायक राजांचे प्रधान होते. यांना राजा होण्याचा मान मिळत असूनहि हे प्रधान झाले. यांनीं अनेक अग्रहार दिले. त्यांपैकीं 'एकादशीअग्रहारम्' हा तंजावरमध्यें अद्यापि प्रसिद्ध आहे. यांना अद्वैतविद्याचार्य असें तंत्रशिखामणीमध्यें चूडामणीनें म्हटलें आहे. नायक राजे वैष्णव होते व हे शैव होते. यानें अनेक यज्ञ केले. तंजावर भागांत यांनीं बांधलेलीं अनेक स्थळें यांची अद्यापि आठवण देतात. यांचे वेदांत, धर्म, शिल्प व संगीत या शास्त्रांत ग्रंथ आहेत. यांच्यांत चमत्कार करण्याचीहि शक्ति होती. पट्टेश्वरम् येथें ज्ञानांबिकेच्या देवळानजीक यांनीं देह ठेवला. ज्ञानांबिकेच्या सन्निध यांची व यांच्या पत्नीची उभी मूर्ति आहे ) एन्. के. पंतलु-गोविंद दीक्षित चरित्रावरून ).

**गोविंद नीळकंठ ( खाजगीवाले ) लिमये**—हा गोविंद शिवराम यांचा नातू होय. यास स. १७९२ मध्यें श्रीमंतांकडून हत्ती मिळाला. हे खर्ड्योच्या लढाईत हजर होते. पुढें यांच्यावर स्वारी नाराज झाल्यामुळें यांचा अर्धा सरंजाम, साडेचोवीस हजारांची जहागिरी व साडेसहा हजारांची खाजगीची नेमणूक रद्द केली गेली. यांनीं पुण्याच्या शुक्रवार पेठेंत एक विष्णुचें देऊळ बांधिलें. यांच्या मुलाचें नांव नीळकंठ असें होतें. त्यावर स. १८३८ त बंडाचा आरोप आला होता. परंतु स. १८४०त तो निर्दोषी सुटला व स. १८५९ त वारला.

**गोविंद न्यायवागीश**—( स. १६५०. सुमार ) ह्याचा जन्म वासुदेव सार्वभौमाच्या कुलांत झाला असून ह्याच्या वेळीं हाच सर्वांत विद्वान् तर्कज्ञ म्हणून प्रसिद्ध होता. रेवी येथील राजा राघव याचा यास आश्रय होता. या रेवी गांवासच मागाहून कृष्णनगर असें म्हणूं लागले. या राजा राघवानें दिङ्नगर येथें स. १६९९ त एक तळें बांधलें. हा आपल्या बापाचें नांव न्यायवाचस्पति असें देतो. हा न्यायवाचस्पति म्हणजे रुद्रन्यायवाचस्पतीच होय. यानें खालील ग्रंथ लिहिले आहेत:

( १ ) न्यायसंक्षेप, ( २ ) पदार्थखण्डनव्याख्या, ( ३ ) समासवाद ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ४८० ).

**गोविंदपंत**—हे निवृत्तिनाथाचे आजे होत. हे मूळचे आपेगांवचे कुळकर्णी.

**गोविंदपंत गानू**—अहल्याबाई होळकर यांचे खासगी कारभारी.

**गोविंदपंत बुंदेले**—( मृत्यु स. २२-१२-१७६० ) याचें नांव गोविंद बल्लाळ खेर असें आहे. कऱ्हाडा ब्राह्मण. याचें मूळ गांव रत्नागिरी जिल्ह्यांतील नेवरें असून हा तेथील कुळकर्णी होता. ह्याचा बाप लहानपणींच वारल्यानें सर्व काम ह्याच्या अंगावर पडलें. द्वाड स्वभावामुळें काम नीट न होऊन भाऊबंदांचा त्रास अनिवार होऊं लागला. तेव्हां बर्व्यांचें उदाहरण पाहून हा देशावर आला व बाजीरावापाशीं राहिला. अंगच्या हुशारीनें व कर्तबगारीनें हा मोठेपणास चढला.

ज्या वेळीं बाजीराव छत्रसाल राजाच्या मदतीस निघाला त्या वेळीं हा लष्करावरोबर होता. बुंदेलखंडाकडे जात असतां मध्यें नदीवर लष्कराचा तळ पडला. तेथें या गोविंदपंतानें एक प्रेत जळत होतें त्यांतून विस्तव घेऊन पदरांत पीठ होतें त्याच्या दोन भाकऱ्या करून खाल्ल्या! तिकडे श्रीमंतांचें लक्ष होतेंच. तेव्हां यास विचारलें कीं, 'तूं कोठून आलास ?' तेव्हां यानें सांगितलें कीं, 'मी श्रीमंतांचे लष्करावरोबर दक्षिणेंतून आलों. परंतु आज दोन दिवस झालें, खावयास मिळालें नाहीं, म्हणून थोडें खाऊन घेतलें.' तेव्हां श्रीमंतांस वाटलें कीं हा मुलगा मोठा साहसी आहे. पुढें छत्रसाल राजाकडून झांशी, जालवण, गुलसराई, काल्पी व सागर हे प्रांत मिळाले. तेव्हां श्रीमंतांनीं स. १७३३ त गोविंदरावास सांगितलें कीं, तूं हे संभाळ.

फरुखाबादच्या लढाईत यानें रोहिल्यांचा जंगी पराभव केला आणि पेशव्याकडून शाबासकी मिळविली. त्यासंबंधीं याचें पुढील पत्र वाचण्यासारखें आहे ( स. १७५५ ).

"वकुल्लाखान पातशाहींत नामी सरदार होता. त्याजला परम संकटें परम उपायें जीवाकडे न पाहता बुडविला. मराठा सरदार हें कर्म करिता तर जमिनीवर न माता. आम्ही स्वामीचे ब्राह्मण, आमची शिफारस कोण करणार? आज दोन लाख रुपयाचा तोफखाना स्वामीस मेळवून दिल्हा" ( रा. खं. ३. १३७ ).

यावरून ब्राह्मण व मराठे या बाबतींतील पेशव्यांच्या वर्तणुकीबद्दल तर्क करतां येतो.

पानपतच्या युद्धापूर्वींपासून यानें वेळोवेळीं पेशव्यास वजावून सांगितलें कीं, हिंदुस्थानांत जय्यत अशी २० हजार फौज हवी; "रांगडे लोक हरामजादे फौज नसलिया वंदोबस्त रहाणार नाहीं."

वकुल्लाखानाचा पराभव झाल्यावर राघोबादादानें तो प्रांत बर्व्यांच्या हवालीं केला. तेव्हां बर्वे व पंत यांचें सूत जमेना. अंतर्वेदींत प्रवेश करून यानें इटावा येथें जबरदस्त लढाई देऊन अस्करअल्लीस ठार केलें; व पुष्कळ प्रांत मराठी राज्यास जोडून स्वदेशीं परत आला. देशीं

आल्यावर वांईजवळील वाकेश्वराचा उद्धार करून त्यास बावधन हें गांव इनाम दिलें.

यानें अब्दाली दुआवांत असतां इटाव्याच्या बाजूनें बराच परिणामकारक शह देण्याचा प्रयत्न केला ( रा. खं. ६. ५३२-५३८ ). हा शह उडविण्यासाठीं शिकारीचें निमित्त काढून शहावल्लीखानाचा पुतण्या आताईखान यास अब्दालीनें दहा हजार निवडक स्वारांनिशीं गुप्त रीतीनें याच्यावर रवाना केलें. तीनचार प्रहरांत वीसपंचवीस कोसांची दौड करून दिवस मावळण्याच्या सुमारास गाजुद्दीननगराजवळ आताईखानानें गोविंदपंतास गांठलें. बांड्या रंगाचें होळकरी निशाण पुढें करून हे स्वार याजवर आले, तेव्हां ते शत्रु असतील असें यास वाटलें नाहीं. जवळ येतांच त्यांनीं कापाकापी सुरू केली. शत्रू किती आहे याचा अंदाज न लागल्यानें पंतांची फौज कांहीं लढली व कांहीं पळाली. स्वतः पंत व त्यांचा मुलगा पळत असतां हा घोड्यावरून खालीं पडला. त्याबरोबर याचें शिर शत्रूनें कापलें व तें अब्दालीनें सदाशिवरावांकडे पाठवून दिलें ( मार्ग. शु. १५. २२ डिसें. १७६० ). सदाशिवरावानें याच्या मुलास समाधानाचें पत्र धाडून बुंदेलखंडाची व्यवस्था दक्षतेनें ठेवण्याविषयीं लिहिलें ( रा. खं. १. २७२ ). हा अब्दालीची रसद मारण्याचा प्रयत्न करीत असे, असें काशिरायाच्या बखरीवरून दिसतें. तथापि अब्दालीला मागें फिरावें लागेल असा निकराचा शह याला देतां आला नाहीं. सदाशिवराव रसद मारण्याविषयीं व ऐवज पाठविण्याविषयीं शेवटपर्यंत याला तगादा करतांना आढळतो. पण याच्याजवळ त्या कामाला पुरेल इतकें सैन्य नव्हतें. कांहीं वेळेला जमिनीचें उत्पन्न कमी करण्याचा आरोपहि याच्यावर केलेला आहे. पण त्या आरोपाचा पानपतच्या पराभवाशीं कांहीं संबंध नाहीं. राजवाडे यांचें याच्याविषयींचें लिखाण आग्रहीपणाचें आणि जातिद्वेषमूलक असल्यामुळें विचारार्ह नाहीं.

**गोविंदपाल**—( स. ११६१-१२०० ) हा बंगाल्यांतील पाल घराण्यापैकीं मदनपाल व चित्रमटिका यांचा पुत्र. हा स. ११६१ मध्यें गादीवर आला. याचा एक लेख विक्रमसंवत् १२३२ (स. ११७४) चा सांपडला आहे. तो याच्या राज्यारोहणापासून चौदा वर्षांनीं लिहिलेला आहे.

याच्या शासनकालाचा शिलालेख याच्या ३ऱ्या वर्षापासून लिहावयास सुरवात झाली; व हा शिलालेख गदाधरच्या गयेमधील मंदिरांत आहे. याच्या शासनकालाच्या १८ व्या वर्षांत 'अष्टसहस्रिकाप्रज्ञापारमिता' ची एक प्रत लिहिली गेली; व ती हल्लीं एशियाटिक सोसायटीच्या लायब्ररींत सुरक्षित आहे. चोविसाव्या वर्षामध्यें 'अमरकोष' लिहिला गेला. सदतिसाव्या वर्षामध्यें 'गुह्यवाली' ची एक प्रत व अडतिसाव्या वर्षी 'पंचकर' ची एक प्रत लिहिली गेली व एकोणचाळीस वर्षांमध्यें 'योगरत्नमाला' याची एक प्रत लिहिली गेली. हे सर्व प्राचीन ग्रंथ केंम्ब्रिज युनिव्हर्सिटीच्या लायब्ररींत आहेत.

याच्या कारकीर्दींत इख्तियार खल्जीची स्वारी झाली; व ३८ व्या वर्षी त्यानें गयेवर आपला अधिकार गाजविला. पण यानें पुन्हां गया आपल्या ताब्यांत घेतली. त्याला याच्या कारकीर्दीच्या शेवटल्या वर्षांत उद्दान्तपूर येथें घनघोर युद्ध करावें लागलें. त्यांत हा मारला गेला ( स. १२०० ).

याच्या हयातींत यानें आपल्या राज्याचें उत्तम प्रकारें संरक्षण केलें. याच्या मागून येणारे राजे प्रबल नसल्यामुळें पाल वंशाच्या राज्याची वाढ स. १२०० त खुंटली ती कायमचीच खुंटली. याच्या नंतर मुसलमान लोकांनीं वंग देशावर स्वारी करून तो देश आपल्या ताब्यांत घेतला ( गोपाळपालाचे पाषाण-शिलालेख ).

**गोविंदप्रभु**—(स. ११८८-१२८५ सुमार) यालाच गुंडप्रभु अगर गुंडोबा म्हणत असत. हा काण्वशाखीय ब्राह्मण वऱ्हाडांत ऋद्धिपूर येथें राहत असे. याचा जन्म ऋद्धिपूरजवळच्या काटसुरेंगव्हाण या खेड्यांत शके १११० ( स. ११८८ ) मध्यें झाला. याचा जन्मकाल कोणी शके १०८३ देतात; कोणी ११०० देतात.

याचे आईबाप लहानपणींच वारल्यामुळें मावशीनें ऋद्धिपूर येथें याचें पालनपोषण व विद्याभ्यास केला. हे महानुभाव पंथाचे संस्थापक होत. यांचा शिष्य चक्रधर कृष्ण. यांना परमार्थाचा छंद लागून हे कांहीं काळानंतर सिद्धकोटीला गेले. हे मोठे तपस्वी व प्रेमळ कृष्णभक्त होते. हे दीर्घायुषी होते. यांनीं आपल्या देखत आपल्या महानुभाव सांप्रदायाचा चक्रधर कृष्णानें केलेला प्रचार पाहिला आणि चक्रधरानंतर तेरा वर्षांनीं शके १२०७ ( स. १२८५ ) मध्यें आपला देह ठेविला ( म. वा. इ. १ ४१५-१६ ).

**गोविंद बाळकृष्ण दीक्षित गरुड**-( स. १७८३ ते १८५१ ) हे एक संस्कृत कवि, ज्योतिषी व धर्मप्रबंधकार होऊन गेले. यांच्या पुत्राचें नांव सिद्धेश्वर. यांनीं ( १ ) मंजूषा, ( २ ) तरंगिणी, ( ३ ) कालप्रबोधोदय व ( ४ ) एकादशिका-प्रकाश हे चार ग्रंथ केले. हे कऱ्हाडचे राहणारे. यांचा गुरु रामचंद्र दैवज्ञ. शिवाय यांनीं

ज्योतिषशास्त्रावर बरेच ग्रंथ रचिले. महाराष्ट्रांत अलिकडे जे संस्कृत ग्रंथकार होऊन गेले त्यांमध्यें यांची गणना प्रामुख्यानें होते. लहान लहान असे यांचे बरेच ग्रंथ आहेत ( मं. श. १८३६ वा. इ. ले. ६४ ).

**गोविंद भगवत् पूज्यपाद**—गौडपादाचार्यांचे शिष्य व आद्य शंकराचार्यांचे गुरु.

**गोविंद भगवंत पिंगळे**—(मृ. स. ३.१.१७९९) हे मूळचे राहणार इंदापूरचे. देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. गोत्र भारद्वाज. यांचा गोविंदराव काळे यांच्या वशिल्यानें पेशवे सरकाराच्या फडांत शिरकाव झाला. हे फडणिसाचे विश्वासपात्र कारकून होते. यांस आलेलीं पत्रें म. इ. सा. खंड ७ यांत आलेलीं आहेत. यांस पेशवे सरकारांतून सरंजाम मिळाला असून, निजामाकडून निंबगांव, सांगवी, व भाळवणी अशीं तीन गांवें स. १७८३ मध्यें जहागीर मिळाली. यांना तीन पुत्र असून त्यांचीं नांवें अनुक्रमें व्यंकटराव, शामराव व भगवंतराव अशीं होतीं. शके १७३६ चे वांटणीपत्रकांत हे स. १७९९ त दिवंगत झाल्याचा उल्लेख आढळतो (मं. श.१८३७वा.इ. ले.७२).

**गोविंदराज**—( स. १०५०-११०० सुमार ) मिताक्षरेमध्यें याचा उल्लेख आलेला नाहीं. पण हरलता यामध्यें आलेला आहे.

याची ‘ मनुस्मृती ’ वरील टीका फार प्रसिद्ध आहे. या टीकेचा कांहीं भाग रावसाहेब मंडलीक यांनीं छापलेला आहे; आणि कांहीं भाग डॉ. जॉली यांनीं प्रसिद्ध केला आहे. उग्र या शब्दाचें स्पष्टीकरण दोन ठिकाणीं निरनिराळें दिल्यामुळें याला कुल्लूकानें दोष दिला आहे.

याच्या ग्रंथांतून याच्या स्वतःविषयीं माहिती मिळते. हा भट्टमाधवाचा मुलगा होय, आणि नारायणाचा नातू होय. हा गंगेच्या तीरावर राहत असे. मनुस्मृतीचें अध्ययन झाल्यावर यानें मनूवरील प्राचीन टीकांचें अवलोकन केलें.

ज्ञान आणि कर्म यांच्या संयोगानें मोक्ष मिळतो, वगैरे मेधातिथीसारखीं याचीं मतें होतीं. कुल्लूकानें याचा वेळोवेळीं उल्लेख करून याचा उपहास केलेला आहे. मुलीच्या मुलाचा हक्क याविषयीं याचीं मतें दायभाग यामध्यें आलेलीं आहेत.

स्मृतिमंजरी हा एक याचा ग्रंथ होय. याची हस्तलिखित प्रत फार क्वचित् ठिकाणीं आढळते. यामध्यें धर्माविषयीं विवरण केलेलें आहे. धर्म, संस्कार, रोजची स्नानसंध्या, शिष्यावस्था, गृहस्थाश्रम व संन्यास यांतील कर्में वगैरेसारख्या सर्व गोष्टींची माहिती या स्मृतिमंजरींत दिलेली आहे. हा ग्रंथ धर्मशास्त्राच्या माहितीचें आगर आहे, अशी या ग्रंथाची ख्याति आहे.

**गोविंदराज मौर्य**—( स. १०७० सुमार ) हा नाशिककडील मौर्य घराण्यांतील एक राजा. याचा एक शिलालेख वाघली ( पूर्वखानदेश ) या गांवीं आहे. हा देवगिरीकर यादवांचा मांडलिक होता.

**गोविंदराज यादव**—( स. १२०० सुमार ) यादव घराण्यांतील एक राजा. मल्लुगी अमरगांगेयानंतर हा गादीवर आला.

**गोविंदराव खंडेराव चिटणीस**—( स. १७१६-८४ ) खंडो बल्लाळ चिटणिसाचा हा पुत्र.

खंडोबाच्या पश्चात् चिटणिसीचें काम याचा ज्येष्ठ भाऊ जिवाजी पाहत असे. त्याचेनंतर हा चिटणिसीचें काम पाहूं लागला. शाहूचा याच्यावर संपूर्ण विश्वास होता. शाहूची धाकटी राणी सगुणाबाई ही याला मुलाप्रमाणें वागवी. विरूबाईचीहि याच्यावर मर्जी होती. तिच्याच शिफारशीनें शाहूनें याला चिटणिशी दिली. बाळाजी विश्वनाथाची व याची मैत्री होती. शाहूच्या मृत्युसमयीं पेशव्यांनीं जी मसलत केली, तींत हाहि होता. हा अखेरपर्यंत साताऱ्यास राहिला. नानासाहेबांनीं याला लिहिलेलें एक पत्र फार महत्त्वाचें आहे ( भा. व. ऐ. या. ले. ५७ ). याला लक्ष्मण नांवाचा एक पुत्र होता. शिवाय आणखी २ मुलें होतीं. त्यांचीं नांवें बाबाजी व शिवराम. हा ता. १३-८-१७८४ रोजीं मेला. तेव्हां याचा पुत्र लक्ष्मण यास दुखवटा पाठविला, असा उल्लेख भा. व. शकावलीमध्यें आहे.

पेशव्यांनीं याच्याशीं संधान नेहमींच चांगलें राखिलें होतें. ज्या वेळेस शाहूनगरांत मोठी आग लागली होती तेव्हां त्यांत याच्या वाड्यासही ती लागून तो वाडा पार जळून गेला. ता. २०-३-१७५३ ( रा. खं. ६.पु. रो. पृ. १०३ ). यास पेशव्यांनीं लिहिलेलें दुसरें एक पत्र वाचण्यालायक आहे ( रा. खं. ६ ले. २४३ ) ( ता. ३-१-१७५१ ). ( म. रि. म. वि. २ पृ. १७० ).

**गोविंदराव गायकवाड**—( स.१७६८-१८०० ) हा दमाजीचा पुत्र.

ता. १८-८-१७६८ रोजीं दमाजी मृत्यु पावला, आणि त्याच्या मुलांत तंटे लागले, ते तोडून माधवरावानें गोविंदरावास सरदारीचीं वस्त्रें दिलीं.

दादास कुमक केल्याबद्दल दंड तेवीस लक्ष, वस्त्रें देण्याबद्दल नजराणा एकवीस लक्ष, व खंडणीची बाकी, मिळून पन्नास लक्ष रुपये देण्याचा व चार हजार फौज घेऊन

मुलूखगिरीस येण्याचा करार गोविंदरावानें पेशव्यांस लिहून दिला ( म. रि. म. भा. ४ पा. १५४ ).

याची व फत्तेसिंगाची लढाई होऊन फत्तेसिंगाचा जय झाला, त्यामुळें फत्तेसिंग गुजराथेंत कायम झाला. पण पुढें तो पुण्यास आला, तेव्हां तेथें रामशास्त्रीं यांचे मार्फत गोविंदराव व सयाजीराव यांच्या हक्काचा निवाडा करण्यांत आला. फत्तेसिंगानें नजराण्याची सर्व रकम देऊन वहिवाटीप्रमाणें चाकरी करण्याचें कबूल केल्यावरून माधवरावानें 'सनाखासखेल' पद व सरदारीचा मान त्याकडे कायम ठेविला, आणि यानें तीन लाखांची जहागीर घेऊन पुण्याजवळ दावडी येथें राहावें असें ठरलें. फत्तेसिंग याचा भाऊ होता.

हा दावडीस स्वस्थ होता; परंतु पूर्वींपासूनच याचा ओढा दादाकडे असल्यामुळें नारायणरावाचे मृत्यूनंतर दादास पेशवाई मिळाली, तेव्हां यानें पुनरपि उचल घेतली. सन १७७३ चे अखेरीस यास सेनाखासखेली देऊन फत्तेसिंगाशीं लढण्यास पाठविलें. पण त्या वेळीं फत्तेसिंगानें निकरानें सामना करून आपली बाजू राखिली. नंतर फत्तेसिंग इंग्रजांस मिळाला, म्हणून त्यास शह देण्याकरितां महादजीनें गोविंदरावास आपल्याजवळ आणिलें आणि बडोदें हस्तगत करण्याची युक्ति चालविली. महादजीनें याला हाताशीं धरून याची स्थापना पांचसहा हजार फौजेसह इंग्रजांस शह देण्याकडे केली. 'गोविंदरावावर श्रीमंतांची कृपा झाली, व फत्तेसिंगास गुजराथेंतील अंमल करूं देणार नाहींत' अशी हवाल गुजराथेंत चालून, तिकडे या गायकवाड-बंधूंचे खटके उडूं लागले ( आबा कृष्ण शेलूकर पाहा ).

**गोविंद राष्ट्रकूट**--इंद्राचा मुलगा.

**२.** ( स. ७७२-८३ ) हा पहिल्या कृष्ण राष्ट्रकूटाचा ज्येष्ठ पुत्र. बापाच्या मागून याला मालखेडचें राज्य मिळालें. फ्लीटच्या मतें याला राज्याधिकार कधींच प्राप्त झाला नव्हता. परंतु यानें कांहीं काल राज्य केलें असल्याचा पुरावा सांपडतो. स. ८१४ मधील कद्बु येथील शिलालेखांत याच्या राज्यारोहणसमारंभाचें विस्तृत वर्णन आहे. तसेंच दौलताबादच्या स. ७९३ सालच्या शिलालेखांत 'गोविंदराजास पदच्युत करून त्याचा धाकटा भाऊ ध्रुव गादीवर आला' असें वणन आढळतें. त्यावरून कांहीं कालपर्यंत कां होईना यानें मालखेडचें राज्य केलें, ही गोष्ट निर्विवाद आहे.

यानें पारिजात नांवाच्या राजाचा पाडाव करून गोवर्धन राजास साहाय्य केल्याचा उल्लेख आहे. पण पारिजात अगर गोवर्धन यांच्याबद्दल कसलीहि जास्त माहिती मिळत नाहीं.

राज्यपद प्राप्त झाल्यावर यानें आपला वेळ चैन व विलास यांमध्यें घालविण्यास सुरुवात केली. त्यामुळें याची कारकीर्द दिवसेंदिवस अप्रिय होत गेली. याचा धाकटा भाऊ ध्रुव हा या वेळीं खानदेश व नाशिक या प्रांतांचा सुभेदार होता. पण हा विलासी असल्यानें मालखेडचीं राज्यसूत्रेंहि मुख्यत्वेंकरून ध्रुवाच्याच हातांत होतीं. याची चैन उत्तरोत्तर वाढतच चालली हें पाहून त्याचें आयतेंच फावलें व त्यानें स्वतःच्या जबाबदारीवर व स्वतःच्याच नांवानें निरनिराळ्या सनदा देण्यास सुरुवात केली. यास लवकरच त्याचा कावा समजून आला; व यानें ध्रुवाकडून राज्यसूत्रें काढून घेऊन दुसऱ्यास प्रधान नेमिलें. याप्रमाणें अंतस्थ कलह वाढत चालला आहे हें पाहून मांडलिक राजेहि आज ध्रुवाचा पक्ष, तर उद्यां याचा, याप्रमाणें वेळ येईल तशी पगडी फिरवूं लागले. ध्रुवाला तरी हेंच पाहिजे होतें. त्यानें उघड उघड याशीं लढाई करण्याची तयारी दाखविली. 'आपल्या स्वतःच्या हितासाठीं आपण ही लढाई आरंभिली नसून याच्या विलासीपणामुळें सबंध राष्ट्रकूटघराणें नामशेष व्हावयाची वेळ आली आहे. तेव्हां कुलाची कीर्ति कायम राहावी म्हणूनच मीं ही लढाई आरंभिली आहे' असें तो इतरांस सांगत असे. यानें लवकरच कांची, गंगवाडी, वेंगी व माळवा येथील राजांची मदत घेऊन ध्रुवास तोंड देण्याचा प्रयत्न केला. पण त्यांत याला यश न घेऊन ध्रुवानें मालखेडचें राज्य मिळविलें. ही लढाई स. ७८० मध्यें झाली असावी.

या लढाइनंतर यासंबंधीं कांहींच माहिती मिळत नाहीं. कदाचित् हा लढाईंतच मरण पावला असावा अगर मरेपर्यंत ध्रुवाच्या कैदेंत असावा.

**३.** ( स. ७८३-८४ पर्यंत ) ध्रुव राष्ट्रकूटाचा हा मुलगा होय. स. ७९४ मध्यें हा आपल्या बापानंतर गादीवर आला. यानें स्तम्भ अथवा कम्बय्य (भाऊ ?) व बारा राजपुत्र असलेल्या एका संघाचा पराभव केला, आणि गुर्जरांची सत्ता कमी केली. याशिवाय यानें पूर्वचालुक्यांशीं युद्ध आरंभिलें.

स. ८१५ मध्यें याचा मुलगा अमोघवर्ष १ ला हा याच्यानंतर गादीवर आला ( B ). यानें स. ८०६ मध्यें लात व चापात्कट यांचा नाश करून त्यांच्या प्रांतांच्या सुभेदारीवर आपला भाऊ इंद्रराज यास नेमिलें.

मयूरखंडीस शक वर्ष ७३२ वैशाख शुद्ध पौर्णिमेस ऋग्वेदी महीधरभट्टास व यजुर्वेदी माध्यंदिनशाखेच्या व्यासभट्टास भूमि दिली असा एक ताम्रपट भा. इ. सं. मं. च्या संग्रहांत आहे. त्यावरून हा शक ७३२ मध्यें राज्य करीत होता हें ठरलें. आजपर्यंत यानें राज्य केल्याचें शेवटचें वर्ष शक ७३० हें ज्ञात होतें. आतां ७३२ पर्यंत याचेंच राज्य होतें, हे पुराव्यानें कळतें ( विविधज्ञानविस्तार वर्ष ५८ अं. ३ पा. ९५ य. रा. गुप्ते यांचा लेख ).

४. ( स. ९१९-३४ ) तिसऱ्या इंद्र राष्ट्रकूटाचा मुलगा. हा आपल्या थोरल्या भावाच्या नंतर गादीवर आला. यानें आपली सर्व कारकीर्द चैन व विलास यांत घालविली. त्यामुळें सर्व प्रधानमंडळ याच्या विरुद्ध होतें. यानें एकंदर १५ वर्षे राज्य केलें. याचा चुलता तिसऱ्या अमोघवर्षानें सर्व मांडलिक राजांच्या मदतीनें बंड पुकारून याचा पाडाव केला ( राष्ट्रकूट, पानें १०६-१०८ ).

**गोविंद शिवराम खाजगीवाले**—(मृ.स. १७७२) मूळचें उपनांव लिमये. हा एक अत्यंत हुशार व निःस्वार्थी गृहस्थ महत्त्वाच्या कारभारांत पेशव्यांजवळ असे. शत्रु व मित्र यास सारखाच मान देत; व आपल्या कार्यासाठीं गौरवून पत्रें लिहीत. याचा नांवलौकिक बराच वाढला होता. याला 'गोविंदराव तात्या' असेंहि लोक म्हणत असत. यानें वयाच्या १६ व्या वर्षींच खाजगीची माहिती मिळविल्यामुळें नानासाहेबांनीं यास इंग्रज, होळकर व निजाम यांजकडील वकिलीची कामगिरी दिली. याला स्वारीचा सरंजाम व तैनात मिळाली असून तीन गांवें इनाम मिळालीं. त्याचप्रमाणें पैठणचें कुलकर्णहि मिळालें.

स. १७५९ च्या सप्टेंबरांत इंग्रज वकील पुण्यास आले असतां त्याशीं बोलणें गोविंदपंताचे मार्फत झालें.

गोविंदरावानें पुण्यास रामेश्वराचें देऊळ बांधलें. याची पत्नी याच्याबरोबर सती गेली. याला नीळकंठ नांवाचा मुलगा होता.

माधवराव महत्त्वाचे व्यवहारांत याचे सल्ल्यानें वागे. विशेषतः दादाजवळ राहून त्याचें मन संभाळून माधवरावाचे हेतु पार पाडण्याचें नाजूक काम याकडे होतें. सर्व पक्षांशीं गोडीनें वागून कारभार पाहण्यांत हा प्रमुख होता, हें तत्कालीन पत्रव्यवहारावरून दिसतें. यास लिहिलेलीं पत्रें उपलब्ध आहेत. स. १७६७ च्या जानेवारींत माधवरावानें सोलापूरचा किल्ला नाइकाचे हातून काढून याचे ताब्यांत दिला.

हा ता. २९-४-१७७२ रोजीं काळपुळीचे विकारानें मरण पावला.

**गोविंदराव परांजपे**—दुसऱ्या बाजीरावाचा मावसभाऊ होय. याच्याविषयीं खालील उल्लेख आहे:

'बाजीरावाचा मावसभाऊ गोविंदराव परांजपे यास नव्या तोफा पाडण्याची आज्ञा झाली. त्यावरून परांजपे यांनीं पर्वतीखालीं रमण्यांत तोफा ढाळण्याचा मोठा कारखाना जारी केला आहे.' (म.रि. उत्तर वि. ३ पृ.१९६).

**गोविंदराव बुळे**—होळकरांचा एक सरदार. यानें यशवंतरावास बरेंच साहाय्य केलें ( म. रि. उ. ३ पृ. १७१ ).

**गोविंद विठ्ठल महाजनि**—( स. १८३६-? ) हा साताऱ्च्या प्रतापसिंहाचा दिवाण होय. ज्ञातिप्रकरणाचा तपास चालू असल्यामुळें स. १८३६ मध्यें हा व दुसरे दोन गृहस्थ यांस रेसिडेंटानें अटकेंत ठेवलें आणि त्यांची मदत प्रतापसिंहास होऊं दिली नाहीं. पुढें तपास संपल्यावर याला सोडण्याऐवजीं साताऱ्याहून उचलून पुण्यास व तेथून नगरास सक्त नजरकैदेंत ठेवण्यांत आलें. गुन्हा ( ज्ञातिप्रकरणविषयींचा ) कबूल करावा म्हणून तेथें याचे फार हाल करण्यांत आले. पण अखेरपर्यंत यानें आपलें वचन सोडलें नाहीं. स. १८४१ त याची नगराहून सुटका झाली, पण साताऱ्यास राहण्याची बंदी झाल्यामुळें हा आरंभीं पुणें व पुढें आळंदी येथें राहिला ( म. रि. उत्तर वि. ३ पृ. ६०४ ).

**गोविंदस्वामी**—( स. १५४२--६७ ) हिंदी कवि. हा विठ्ठलनाथाच्या अष्टछापमंडळांतील एक. याचा 'गोविंदस्वामी की कदंबखंडी' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. हा गवईहि होता.

**गोविंद हरी पटवर्धन**--( जन्म स. १६९८ सुमार-२१ नवं. १७५१ ) गोपाळ गोविंद पटवर्धनाचा बाप होय. हा नानासाहेब पेशव्यांचे तालमींत मुरलेला असून मोठा धूर्त व हिंमतवान् होता. कोणास. काय जबाब लिहावा, कोणाचा काय कावा आहे, हें सर्व हा नीट जाणत असे. यानें मिरज झुंजविण्यांत दाखविलेली चतुराई व राज्यकारभारासंबंधानें यानें दर्शविलेले विचार आहेत, ते याच्या पत्रांतच वाचले पाहिजेत.

मिरजच्या वेढ्यांत शेवट गोड झाला असें दर्शवून पराभूत झालेला हा यजमानास नमस्कार करून गेल्यावर लिहितो "आमची लज्जा श्रीनें रक्षिली. चार खंडांत झुंजाचा लौकिक झाला.

धन्यास यश आलें. दीड महिना लढाई दिवसेंदिवस अधिकच याप्रमाणें चालली. श्रीमंतांची सारी फौज आश्चर्य करून राहिली. पुढें परिणाम श्री लावील."

गोविंद हरी आवेशाच्या भरांत सखारामबापूवर एकसारखा उगीचच चरफडत असे. 'देशस्थ व कोंकणस्थ' हा तंटाहि गोविंद हरीच्या लिखाणांत प्रखर दिसतो.

**गोविंदाचार्य अष्टपुत्रे**--या सुप्रसिद्ध पंडिताचे गोपाळचार्य कऱ्हाडकर हे शिष्य होत. याचे व्याकरणशास्त्रावर ग्रंथ आहेत. याचे पुत्र काशीनाथशास्त्री. ते काशींत जाऊन राहिले.

**गोविंदानंद**—यासच गोविंद असेंहि म्हणतात. श्रीशंकराचार्यकृत शारीरकभाष्यावर रत्नप्रभा नांवाची याची टीका आहे. नमनांतील चवथ्या श्लोकावरून याच्या गुरुपरंपरेचा बोध होतो. श्रीगौरीनायक म्हणजे शिवराम, त्याचा शिष्य गोपाळ सरस्वती व त्याचा हा गोविंदानंद होय.

२. ( स. १५००-४० ) हा गणपतिभट्टाचा मुलगा होय. हा आपणास कवि कंकणाचार्य असें म्हणवीत असे. हा वैष्णव होता असें याच्या प्रस्तावनेवरून दिसतें. हा बंगालमधील बाग्री गांवचा राहणारा होय. यानें मदनपारिजात, रुद्रधर, वाचस्पति यांचा उल्लेख केल्यावरून हा स. १५०० च्या नंतर झाला असला पाहिजे. शिवाय याचा उल्लेख रघुनंदनानें आपल्या आह्निकतत्त्व या ग्रंथांत केला आहे. त्यावरून हा स. १५६० च्या अगोदर होऊन गेला असला पाहिजे. तेव्हां याचा काल स. १५००-१५४० असा ठरतो.

यानें पुष्कळ ग्रंथ लिहिले. त्यांपैकीं दानकौमुदी, शुद्धिकौमुदी, श्राद्धकौमुदी, वर्षक्रत्यकौमुदी असे चार ग्रंथ छापलेले आहेत. तिथिनिर्णय, व्रत, उत्सव, वगैरेंचें विवरण याच्या वर्षक्रत्यकौमुदीमध्यें आलेलें आहे. याशिवाय यानें 'अर्थकौमुदी' ही टीका 'शुद्धिदीपिका' यावर केलेली आहे, आणि 'तत्त्वार्थकौमुदी' टीका शूलपाणीच्या 'प्रायश्चित्तविवेक' यावर केलेली आहे.

**गोशाल मंखलीपुत्त**—( मृ. खि. पू. ४९६--४८३ सुमारें ) प्रख्यात जैन साधु जो महावीर त्याचा हा एक प्रमुख प्रतिस्पर्धी होय. याला पालीसूत्रांमध्यें, मंखली गोशालो असें म्हटलें आहे. हा एका गोसाव्याचा मुलगा असून याच्या बापाचें नांव मंख आणि आईचें नांव भद्दा असें होतें. याचा जन्म गाईचे गोठ्यांत झाल्यामुळें याला गोशाल असें म्हणतात.

यानें राजगृह येथें प्रथम महावीराची गांठ घेतली व लगेच हा महावीराचा शिष्य झाला. तथापि दोघांचे विचार अगदीं विरुद्ध होते. याचा जन्म एका गोसावी घराण्यांत झाला असल्याकारणानें यानें गोसाव्यांच्या करितां 'आजीविक' नांवाचा पंथ सुरू केला व त्याचा हा संस्थापक झाला.

अशा रीतीनें महावीराशीं वितुष्ट आल्यानंतर हा श्रावस्ती येथें येऊन एका कुंभारणीच्या घरीं राहिला. येथें यानें आपलें वजन चांगलेंच राखलें (आवश्यक सूत्र पा. २१४ ). यानें आपण जैन स्वामित्वाच्या उच्च पदाला पोंचलों असें जगजाहीर केलें. हें वर्तमान महावीरास कळतांच त्यानें तावडतोब श्रावस्ती येथें जाऊन याची भेट घेतली. त्या भेटींत महावीराला याच्यामध्यें पूर्वीपेक्षां कांहींच फरक दिसला नाहीं. तेव्हां याला आपण आपल्या गुरूच्या इच्छेविरुद्ध कृत्य केल्याबद्दल फार वाईट वाटलें व पश्चात्ताप झाला. कांहीं जैन लोक असें म्हणतात कीं, गोशालाला इतका पश्चात्ताप झाला कीं त्या पश्चात्तापानें हा नरकांत न जातां ( मेल्यानंतर ) देवलोकांत गेला. यानें महावीराचा अन्य तऱ्हेनें अपमान केला.

**गोष्ठा माहिल**—जैन महावीराचा हा प्रतिस्पर्धी. महावीराचे विरुद्ध जे सात पाखंडी होते त्यांमध्यें याची गणना होते.

**गोसावीनंदन** (वासुदेव गोस्वामी)—( स. १६५० --१७०० ) मराठी कवि. याचें नांव वासुदेव असून, बापाचें नांव गोस्वामी व आईचें नांव नांगाई होतें. हा तंजावरकडील राहणारा असून गोपाळाश्रम गजाननास यानें गुरु केलें होतें. 'ज्ञानमोदक' नांवाचा याचा ग्रंथ असून शिवाय सीतास्वयंवर, अभंग, पदें वगैरे स्फुट काव्यें बरींच आहे. याचीं अष्टकें लहान मुलांना शिकतां येतील इतकीं साधीं, सरळ, सोपीं आहेत ( महाराष्ट्र सारस्वत ).

**गोंदनाक महार**—हा महुब्याचा महार. यानें आपला जीव समजूनउमजून बळी दिला व पाटलास पळून जाण्यास वाट दिली ( महाराष्ट्र सारस्वत भा. १, पा. १९८ ).

**गोंदा**—नामदेवाच्या मुलांपैकीं एक. यानें नामदेवावर १६ अभंग केले आहेत. त्यांत विठ्ठलरखुमाई व नामदेव हे एकत्र जेवल्याचें पाल्हाळिक वर्णन आहे. यांत नामदेवानें महाद्वारीं समाधि घेतल्याचा निर्देश केला आहे.

**गोंसाळु मार्तिस**—(रामोजी शेणवी कोठारी पाहा).

**गौडपादाचार्य**—हा शुकाचा शिष्य व आद्य शंकराचार्यांचे गुरु जे गोविंदपादाचार्य त्यांचा गुरु. पण शुक कोणता हें समजत नाहीं. कृष्ण द्वैपायन व्यासाचा पुत्र शुक असणें कालदृष्ट्या संभवनीय नाहीं. कदाचित् व्यासपुत्र शुक व हे यांच्यामधील परंपरा चालविणारांचीं नांवें नष्ट

झाल्यामुळें शुकानंतर एकदम यांचें नांव येत असावें. गुरुपरंपरा म्हणतांना 'व्यासं शुकं गौडपादं महान्तम्' अशीच परंपरा म्हणतात ही गोष्ट खरी आहे. कदाचित् शुक व हे यांच्यामध्यें झालेलीं माणसें यांच्या तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें विशेष कर्तृत्ववान् नसल्यामुळें त्यांचीं नांवें गाळलीं असावींत.

उपनिषदांतील अद्वैतसिद्धांताचें प्रतिपादन करणाऱ्या प्राचीन आचार्यांत यांचेंच नांव मुख्यत्वेंकरून आढळतें. यांनें मांडुक्योपनिषदावर कारिकारूपानें व्याख्या केली आहे. हा व्याख्यारूप ग्रंथ अत्यंत लहान असूनहि त्याची कीर्ति मात्र फारच मोठी आहे. थोडक्यांत पण स्पष्टपणें या ग्रंथांत सिद्धांत मांडले आहेत. आपल्या प्रसादपूर्ण भाषेंत बौद्धांच्या पारिभाषिक शब्दांचाहि यानें मोठ्या कुशलतेनें उपयोग केला आहे. आणि निर्वाणापेक्षां शिवाशीं एकरूप होणाऱ्या जीवाचा मोक्ष कसा वेगळा आहे हें दाखविलें आहे. वेदांतांतील मायावाद प्रथम शंकराचार्यांनीं उत्पन्न केला अशी लोकांत प्रसिद्धी आहे, पण वास्तविक तो गौडपादाचार्यांनीं प्रथम प्रतिपादिला आहे. हें दिसणारें जग वास्तविक अभावरूप असूनहि मायेनें आहे असें वाटतें, हा सिद्धांत यानेंच प्रथम प्रतिपादिला. पण शंकराचार्यांनीं तो आपल्या अतुल प्रतिपादनशैलीनें असा लोकांपुढें मांडला कीं तो त्यांचाच सिद्धांत म्हणून लोकांत प्रसिद्ध झाला आणि तत्त्वज्ञानविचारांत त्याला कायमचें स्थान मिळालें.

यानें ब्रह्माशीं जीवाचा संबंध सांगतांना कल्पनावाद स्वीकारला आहे. पण पुढील ग्रंथकारांनीं आभासवाद, प्रतिबिंबवाद किंवा अवच्छेदवाद यांपैकीं कांहीं स्वीकारलें आहे.

याशिवाय याचे पुढील ग्रंथ आहेतः—१ अनुगीताभाष्य, २ उत्तरगीताभाष्य, ३ चिदानंदकेलिविलास ( देवीमाहात्म्यटीका ), ४ सांख्यकारिकाभाष्य.

याचा काल दासगुप्तांनीं स. ७८० च्या सुमारास धरला आहे.

**गौडब्रह्मानंद**—वाचस्पतिमिश्राच्या कल्पतरूवर गौडब्रह्मानंदी ही यांची टीका आहे.

**गौतम बुद्ध**—( जन्म ख्रि.पू. ५६३–४९० ) विहार प्रांतांत बस्ती जिल्ह्यांत कपिलवस्तु नांवाचें गांव आहे. तेथें इक्ष्वाकुवंशांतील शाक्य नांवाच्या शाखेंतील शुद्धोदन राजाचा हा पुत्र. कपिलवस्तु व देहदह यांच्यामध्यें असणाऱ्या लुंबिनीवनांत महामायेला सिद्धार्थ नांवाचा मुलगा झाला. तोच बौद्धधर्माचा संस्थापक गौतम बुद्ध होय.

याच्या जन्माबरोबर आणखी सहाजण उत्पन्न झाले ते याच्या पुढील कार्यांत साह्यकारी होतेः ( १ ) यशोधरा—याची पत्नी, ( २ ) छन्न—गौतमाचा सारथी, ( ३ ) काळुदायी—गौतमाचा बालमित्र, ( ४ ) कंथक—गौतमाचा आवडता घोडा, ( ५ ) बोधीवृक्ष—ज्याच्या खालीं तप करून गौतमाला ज्ञान झालें तें पिंपळाचें झाड आणि ( ६ ) ज्यांची लांबी १ ते ४ कोस होती अशा द्रव्यानें भरलेल्या चार पेट्या. याच्या पांचव्या दिवशीं यानें राज्य केलें तर हा चक्रवर्ति राजा व विरक्त झाला तर धर्मसंस्थापक होईल अशीं यासंबंधीं भविष्यें वर्तविण्यांत आलीं. सातव्या दिवशीं मायावती आजारी पडून वारली. मग या सात दिवसांच्या बालकाचें पालनपोषण गौतमीनें करण्याचें ठरविलें. गौतमी ही मायावतीची सवत असली तरी सख्खी बहीणच होती आणि तिलाहि मूल नव्हतें. गौतमीनें वाढविला म्हणून सिद्धार्थाला गौतम हें नांव पडलें. पुढें हा एकोणीस वर्षांचा झाल्यानंतर यशोधरेशीं याचा विवाह झाला. अत्यंत सुखांत वाढलेल्या याला जगांत दुःख असतें याची कल्पना सुद्धां नव्हती.

हा आपला सारथी छन्न याच्याबरोबर फिरावयास गेला असतां अनुक्रमानें म्हातारा, रोगी आणि प्रेत भेटलें आणि प्रत्येक प्राण्याला केव्हांतरी ही अवस्था प्राप्त होऊन दुःख भोगावें लागतें असें याला समजलें, तेव्हां याला अत्यंत वाईट वाटलें. असाच एकदां संन्यासी भेटला तेव्हां याला धर्माचरणानें निर्भयपणा प्राप्त होतो असें कळलें. तेव्हां निर्भयपणा प्राप्त होईल तें करण्याकडे याचा कल वाढत चालला; आणि यानें गृहत्याग करण्याचें ठरविलें. पुढें याला पुत्र झाला. तेव्हां हा 'राहु झाला, बंधन झालें,' असें उद्गारला. तेव्हां त्याचें नांवहि राहुल ठेवण्यांत आलें.

पुत्रजन्माचा राज्यांत उत्सव चालू असतां हा एकदां बाहेर हिंडावयास गेला, तेव्हां याच्या सुंदर रूपाकडे पाहून कृशागौतमी नांवाची एक स्त्री गच्चीवरून म्हणाली 'असा पुत्र ज्यांना आहे तीं मातापितरें धन्य होत. असा पति जिला आहे ती स्त्री धन्य होय.' रथांत बसून जाणाऱ्या याच्या कानावर हे शब्द आले. 'माझ्यामुळें मातापिता व पत्नी धन्य होत' असें ही म्हणते. 'जग धन्य' असें म्हणत नाहीं. मीं प्रव्रज्या घेतल्यावर ती तसेंहि म्हणेल. असा विचार करून यानें प्रव्रज्या घेण्याचें ठरविलें आणि गुरुदक्षिणा म्हणून कृशागौतमीकडे मोत्याचा कंठा फेकला; व रात्रीं सर्व झोपीं गेल्यावर छन्नाकडून कंथक घोडा आणविला; आणि झोपीं गेलेल्या यशोधरा व राहुल यांना, चुंबन घेतल्यास जागे होतील म्हणून दुरून पोटभर पाहून अरण्याचा

मार्ग पत्करिला. नंतर तीस योजनांवर अनोमा नदीच्या तीरावर आल्यावर अंगावरील अलंकार वगैरे छन्नाबरोबर देऊन त्याला परत धाडलें आणि आपल्या तलवारीनें लांब केस आखूड करून तपश्चर्येला आरंभ केला.

आळार कालाम, उद्रक रामपुत्र वगैरे प्रथम यानें गुरु केले, पण पुढें यानें स्वतःच विचार करून नियमपूर्वक विचाराला आरंभ केला. हा राजगृहांत भिक्षेला गेला असतां बिंबिसारानें गजसेनेवरील मुख्य जागा देऊं केली. पण यानें ती नाकारून आपला अभ्यास अधिक एकाग्रतेनें चालू ठेवला. लोकांचा त्रास होऊं नये म्हणून पांडव-पर्वतावरील जागा सोडून उरुवेला येथील अरण्यांत आला आणि फल्गूच्या तीरीं अत्यंत कडक तपश्चर्या केली. पाऊल उचलवेना अशी स्थिति झाली, तरी मनाचें समाधान होईना म्हणून आहार घेण्यास सुरुवात केली. याचा लोकांनीं तिरस्कार केला, लोभ उत्पन्न केले; आणि विकार उत्पन्न करण्याचा सुद्धां प्रयत्न झाला. पण सात वर्षेपर्यंत तपश्चर्या करीत असतां हा आपल्या विचारापासून केव्हांच ढळला नाहीं. जगांतील दुःख नाहींसें कसें होईल हा एकच प्रश्न याच्यापुढें होता. आणि त्याचें उत्तर बोधि-वृक्षाखालीं बसला असतां वैशाख शुद्ध पौर्णिमेच्या दिवशीं याला मिळालें. याला ज्ञानप्राप्ति झाली. जगांतील सर्व दुःखें आणि त्यांचें बीज यांचा नाश कशांत आहे, हें यास समजलें आणि हा गौतम बुद्ध झाला. धर्मप्रचाराचें काम जोरांत सुरू होऊन पोषाख व आचार यांसंबंधीं नियम करून संघाला व सांप्रदायाला व्यवस्थित रूप दिलें गेलें.

कपिलवस्तूहून याला सारखीं बोलावणीं येऊं लागलीं. पण बोलावणें पाठविलेला मनुष्य याचा उपदेश ऐकून याचा शिष्य व्हावा, अशी स्थिति नऊ वेळां झाली. तेव्हां याचा बालमित्र काळुदायी यास पाठविण्यांत आलें. तोहि याचा शिष्य झालाच, पण त्यानें याला कपिलवस्तूला आणलें. तेथें यानें न्यग्रोधवनांत वस्ती केली. भिक्षाहि स्वतःच मागे. यामुळें घरच्या मंडळींना अत्यंत दुःख झालें, पण त्यानें आपल्या निश्चयी पण मधुर उपदेशानें सर्वांना आपलें म्हणणें पटवून दिलें. राजवाड्यांतहि एक दिवस हा भोजनाला गेला. सर्वांनीं याचें दर्शन घेतलें. यशोधरा दर्शनाला आली नाहीं. तेव्हां हा आपल्या दोन शिष्यांसह तिच्या महालांत गेला आणि तिची भेट घेतली; आणि कुशल विचारलें. धर्मप्रसार करण्याचा तर याला ध्यासच लागला होता. अत्यंत कळकळीनें केलेल्या याच्या उपदेशाचा तात्काळ परिणाम होई. शुद्धोदन व गौतमी यांचा पुत्र नंद याला यानें यौवराज्याभिषेकाच्या दिवशीं भिक्षु बनवलें.

आपण भिक्षु व्हावें असें नंदालासुद्धां वाटत नव्हतें. पण याच्या उपदेशाच्या प्रवाहांत हा कोणालाहि आपल्या इच्छे-प्रमाणें वागावयास लावी. याप्रमाणें यानें आपल्या सातआठ वर्षांच्या राहुलाला बौद्ध भिक्षु बनवलें; आणि शाक्य-वंशाहि नाहींसा केला. यामुळें शुद्धोदनाला फारच दुःख झालें आणि आईबापांच्या संमतीशिवाय वीस वर्षांच्या आंतील कोणालाहि दीक्षा देऊं नये, असा नियम त्यानें गौतमाकडून मान्य करून घेतला. हा राजगृहाकडे परत फिरला. तेथें अनाथपिंडिक नांवाच्या अत्यंत धनाढ्य सावकारावर याच्या दान, शील, एकान्त वगैरेंच्या उपदेशाचा परिणाम होऊन जेतवन नांवाचें अत्यंत रम्य उद्यान जमिनीवर सोन्याचीं नाणीं पसरून जितकीं नाणीं लागतील तितकीं नाणीं देऊन राजपुत्राकडून विकत घेतलें आणि तेथें भव्य विहार तयार केला.

भोवतालच्या प्रदेशांत हिंडून लोकांना उपदेश करण्याचें काम सतत चाललेलेंच असे. वज्जीसारख्या आडदांड लोकां-नाहि यानें कांहीं नियम घालून दिले होते. हा पाटलि-ग्रामास आला असतां सुनीथ व वस्सकार हे तेथें नगर-रचनेचें काम करीत असल्याचें यास कळलें, तेव्हां हें श्रेष्ठ नगर होईल असें यानें सांगितलें. तेथून हा ज्या द्वारानें कोटिग्रामास गेला, त्याला गौतमद्वार आणि जेथें गंगा उतरला त्या स्थानास गौतमतीर्थ म्हणूं लागले. हा अलीकडच्या तीरावर अन्तर्धान पावून पैलतीरास प्रगट झाला. कोटिग्रामास 'चार सत्यें' या विषयावरील याचें भाषण फारच मननीय झालें. वैशाली व बेहूणग्राम येथें मुक्काम असतां याची प्रकृति बिघडली. पण भिक्षुसंघाला भेटण्या-करितां मानसिक उत्साहानें यानें आपलें दुखणें ताब्यांत ठेवलें. पण पावसाळा संपल्यावर चापाळचैत्यगांवीं याची प्रकृति पुनः बिघडली. तेव्हां वैशालीस आला आणि 'माझीं तत्त्वें हाच तुमचा गुरु. त्याप्रमाणें तुम्ही वागा' असा यानें भिक्षुसंघाला उपदेश केला. नंतर पाया नगरीस 'चुंद' नांवाच्या लोहाच्या आम्रवनांत असतां मोठा भोजनसमारंभ झाला. याला जवळच कुसिनारा येथील उपवनांत नेण्यांत आलें. शालवृक्षाखालीं याची शय्या घालण्यांत आली. शेवटीं 'भिक्षुहो, सर्व संस्कार व्ययधर्मी आहे. सावध-पणानें वागा' असा उपदेश करून यानें देह ठेवला. 'प्रिय वस्तूचा वियोग होणार' हा गौतमाचा उपदेश आठवून सर्वांनीं समाधान करून घेतलें. उटी, पुष्पमाला व वस्त्रें नेसवून गौतमाच्या शरिराला चंदनकाष्ठांत अग्नि देण्यांत आला. शेवटीं गौतमाच्या अस्थींची लोकांकडून मागणी

आली, तेव्हां अस्थींचे आठ भाग करून त्या आठ भागांवर आठ स्तूप उभारण्यांत आले.

याच्या वेळीं वैदिकधर्म हिंसाप्रधान यज्ञयागादिकांमुळें आणि व्यावहारिक सुखलोलुपतेमुळें विकृत झाला होता. त्यांतच शरीरदंडनानें मोक्ष मिळतो, अशा चमत्कारिक कल्पना लोकांत पसरल्या होत्या. नीतिप्रधान जीवनाचें महत्त्व नष्ट झालें होतें. हें सुधारण्याचा यानें प्रयत्न केला. यानें सांगितलेला 'मध्यमा-प्रतिपदा' किंवा 'आर्य अष्टांगिक मार्ग' पुढीलप्रमाणें आहेः

विचारानें चांगलें वाईट, खरेंखोटें कळतें म्हणून आपणाला सम्यग्दृष्टीची जरूर आहे. आपल्या मनांतील संकल्पहि विचारपूर्वक केलेले असले पाहिजेत (२ सम्यक् संकल्प). आपलें बोलणें किंवा वागणें हेंहि विवेक व सत्य यांना धरून पाहिजे (३ सम्यग्वाचा, ४ सम्यक्कर्म), आपली उपजीविकाहि चोरी, चहाडी वगैरे वाममार्गानें चालवितां उपयोगी नाहीं (५ सम्यग् आजीव), आपल्या अंगच्या वाईट खोडी आपण टाकल्या पाहिजेत आणि चांगल्या सवयीं लावून घेतल्या पाहिजेत (६ सम्यग् व्यायाम), तसेंच जगांतील आपल्या कर्तव्याची जाणीव ठेवली पाहिजे (सम्यक् स्मृति), हें सर्व करण्याकरितां चित्ताची शुद्धि करून एकाग्रता केली पाहिजे (सम्यक् समाधि).

याच्या धर्मांत विविध आचारांचा पसारा नसून तो सद्गुणसंवर्धनाचा किंवा आत्मशुद्धीचा साधा मार्ग आहे.

या धर्माचें आचरण करतांना पांच शीलें सांभाळावीं लागतातः १ हिंसा न करणें, २ चोरी न करणें, ३ खोटें न बोलणें, ४ ब्रह्मचर्य पाळणें, ५ मद्य न पिणें.

हा धर्म नवीन नसून यज्ञयागादि कर्माच्या पसाऱ्यापेक्षां सदाचाराकडे लक्ष वेधण्याचा प्रयत्न आहे. त्याचा थोडक्यांत सिद्धांत असाः सर्व जग दुःखमूलक आहे. त्या दुःखाचें कारण अज्ञान व लोभ आहे. अशा दुःखांतून सुटण्याकरितां वरील आचार पाळा.

आजहि गौतमाला चीन, जपान, तिबेट, सिलोन हे देश पूज्य मानतात. अशोक व कनिष्कासारखे सम्राट् गौतमाचे एकनिष्ठ उपासक होते. शेंकडों ग्रंथ आणि शिल्पें याचा गौरव जगभर सांगत आहेत. सर्व जगाला अहिंसा व समता शिकविण्याच्या व पटवून देण्याच्या मानावरहि याचा पहिला हक्क आहे. वैदिक धर्मांतहि याला अवतार मानण्यांत येतें.

**गौतमाबाई**—ही मल्हारराव होळकराची बायको होय. ही नवऱ्यापूर्वीच ता. २९ सप्टेंबर सन १७६१ रोजीं आपल्या वयाच्या ६६ व्या वर्षी वारली (म. रि. उत्तरवि. २ पृ. ४).

**गौतमी**—हिचा उल्लेख नाशिक येथील शिलालेखांत आला आहे. ही गौतमीपुत्र शातकर्णीची आई. जुन्नरच्या शिलालेखांत ही शामक नांवाच्या गोवर्धन प्रांताच्या सुभेदारास सांगते कीं, पूर्वी माझ्या मुलांनीं दिल्याप्रमाणें १०० निवर्तनांच्या किंमतीचें हें दुसरें शेत मी आज अर्पण करितें (Bhand. p. 27).

२. गौतमबुद्धाची सावत्र आई व मावशी. मायादेवीची वहीण. मायादेवीच्या पश्चात् सिद्धार्थास हिनेंच वाढविलें.

**गौतमीपुत्र आंध्र**—(स. ११९ सुमार) याच्या कारकीर्दीत आंध्र लोकांनीं इंडोपार्थियनांवर स्वारी केली होती (V. Smith, p. 220). हा स. ११९ च्या सुमारास नहपान क्षत्रपाला नष्ट करून गादीवर बसला. यानें गादीवर आल्यावर पूर्वीच्या जुन्या राजांचीं नाणीं पुन्हां पाडलीं व त्यांवर स्वतःच्या खुणा केल्या. याच्या ताब्यांत गोदावरी, बहार, माळवा, काठेवाड, गुजराथ आणि उत्तरकोंकण इ. मुलूख होते. यानें शक व पल्हव इ. जातिनष्ट लोकांची रूढि थांबवून जातिसंस्था पुन्हां सुरू केल्या. याला हिंदुधर्माचा अत्यंत अभिमान होता (V. Smith, p. 221). हा बुद्ध आणि हिंदुधर्माचा चहाता असल्यामुळें यानें दोघांनाहि देणग्या दिल्या होत्या. जुन्नरच्या २५ नं. च्या शिलालेखांत याचा धनकटकाधिप असा उल्लेख आढळतो. तेथें हा आपल्या विष्णुपालित नांवाच्या सेनापतीस सांगतो कीं, उषवदाताच्या (ऋषभदत्त) ताब्यांत असलेलें हें शेत मीं आजपासून बुद्धाला दिलें आहे (Bhandarkar, p. 27).

सातवाहन राजे शूद्र जातीचे होते, अशा अनेक दंतकथा प्रचलित आहेत. पण या दन्तकथा नाशिक येथील भद्रायणीय भिक्षुसंघाला गौतमीपुत्र सातकर्णीच्या आईनें केलेल्या दानाच्या शिलालेखांतील निर्देशावरून खोट्या ठरतात. तेथें गौतमीपुत्राला 'एक ब्राह्मण', 'क्षत्रियदर्पमानमर्दन', 'विनिवर्तित चातुर्वर्ण्यसंकर' अशीं विशेषणें लाविलीं आहेत. त्यावरून गौतमीपुत्र व सातवाहनकुल हें ब्राह्मण होतें असें ठरतें. यावरून हे शूद्र (राधामाधवविलासचंपू प्र.) किंवा कुमार होते वगैरे म्हणणें सर्वस्वीं चुकीचें ठरतें. शिवाजीमहाराजांनीं जें काम पुढें केलें तेंच काम यानें पूर्वी केलें होतें. यानें केवळ यवनांपासून राज्य घेतलें नाहीं, तर चातुर्वर्ण्याची पुनः स्थापना केली, असें याच्या वरील विशेषणांवरून वाटतें. याच्या आईचें नांव बालश्री व मुलाचें नांव पुळुमायि.

**गौतमीपुत्र वाकाटक**—हा पहिल्या प्रवरसेन वाकाटकाचा मुलगा. हा गादीवर आला नाहीं. याची आई भारशिव राजा भगवान्‌ची कन्या.

**गौरी**—विजयानगरच्या संगमवंशांतील पहिल्या बुक्करायाची पत्नी ( दुसरी ). हिचा पुत्र दुसरा हरिहर.

**गौरीकान्त सार्वभौम**—( स. १७२५ सुमार ) एक नैय्यायिक. याचा जन्म गौर प्रांताच्या उत्तरेस झाला. यानें पुष्कळ निबंध लिहिल्यामुळें याजवर तेथील राजाची मर्जी बसली. याच्या 'आनन्दलहरीतरी,' या ग्रंथाची स.१७१४ तील हस्तलिखित प्रत उपलब्ध आहे. यावरून हा १७१४ चे पूर्वी होऊन गेला असला पाहिजे. याच्या उपरिनिर्दिष्ट ग्रंथांत तांत्रिक पूर्णानंदाच्या श्यामरहस्याचा उल्लेख आला आहे. तेव्हां हा त्याच्या मागाहून होऊन गेला असला पाहिजे. या तांत्रिक पूर्णानंदानें स. १५७१ त शाक्तकर्म नांवाचा ग्रंथ लिहिला. तेव्हां गौरीकान्त १७ व्या शतकाच्या सुरवातीस होऊन गेला असला पाहिजे. यानें खालील ग्रंथ लिहिले आहेतः ( १ ) भावार्थदीपिका, केशवमिश्राच्या' ' तर्कभाषा या ग्रंथावरील टीका, ( २ ) सद्युक्तिमुक्तावली, ( ३ ) आनंदलहरीतरी, ( ४ ) विदग्धमुखमंडनटीका. शिवाय 'विवादार्णवभंजन' नांवाचा धर्मशास्त्रावर याचा ग्रंथ आहे ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ४७८ ).

**ग्रँट डफ**—( स. १७८९-१८५८ ) याचें नांव जेम्स कनिंगहॅम ग्रँट डफ.

याचा जन्म बॅन्फ येथें ता. ८-७-१७८९ रोजीं झाला. आईचें नांव मार्गरेट डफ. स. १८०५ त हा मुंबईस येऊन तेथील ग्रेनेडियर पलटणींत नोकर राहिला. स. १८०८ त गुजराथेंतील बंडावे मोडण्याची लष्करी कामगिरी यानें केली. फार्शी भाषा चांगली शिकला म्हणून यास फार्शी दुभाष्याची जागा मिळाली. पुढें याची ग्रेनडियर फलटण पुण्यास आली, तिजबरोबर हाहि तेथें एल्फिन्स्टनजवळ येऊन राहिला. तेथें पॉटिंजर, ब्रिग्ज वगैरे याचे सहकारी बनले. स. १८१८ त सातारा रेसिडेन्सीवर याची नेमणूक झाली. स. १८२२ त हा निवृत्त होऊन स्वदेशीं परत गेला. मराठ्यांच्या इतिहासाचें साहित्य येथें तयार करून इंग्लंडांत गेल्यावर यानें सर्व भाग व्यवस्थित लिहून पहिली आवृत्ति स. १८२८ त प्रसिद्ध केली. हा ता. २३-९-१८५८ रोजीं मरण पावला ( म. रि. उ. ३ पृ. ५३२ ). याच्या ग्रंथाच्या पहिल्या आवृत्तीचा छपाईखर्च अंगावर पडून याला १७०० पौंड कर्ज झालें. मग यानें प्रकाशकांच्या सूचनेप्रमाणें कांहीं मजकूर काढून दुसरी आवृत्ति काढली. सध्यां बरीच दुरुस्त केलेली तिसरी आवृत्ति एस्. एम्. एडवर्डस् यांच्या प्रस्तावनेसह प्रसिद्ध झाली आहे.

## ग्रीक राजांची वंशावळ

( हें सीरियन साम्राज्य होय ).

सेल्यूकस निकेटर ( मृत्यु ख्रि. पू. २८० ).
|
अँटिओकस सार्टर ( १९ वर्षे कारकीर्द. नंतर मृत्यु ख्रि. पू. २६१ ).
|
अँटिओकस थिओस.(याच्या वेळीं बॅक्ट्रिया व पार्थिया सीरियन साम्राज्यांतून बाहेर पडले ).
|
अँटिओकस दि ग्रेट (पार्थियाचा राजा).
|
अर्सेकस ( ख्रि. पू. २४८ मध्यें राज्यस्थापना ).

## बॅक्ट्रियाचा राजवंश

डायोडोटस् पहिला (२५० ख्रि. पू. राज्यस्थापना).
|
डायोडोटस् दुसरा ( ख्रि. पू. २४५ ).
|
यूथिडेमस् ( ख्रि. पू. २३२ ). (याच्यावर सीरियाचा राजा अँटिओकस् दि ग्रेट यानें स्वारी केली. ख्रि. पू. २०८ मध्यें हें युद्ध संपलें. बॅक्ट्रियाची स्वतंत्रता मान्य झाली).
|
अँटिओकस्

( यानें ख्रि. पू. २०६ मध्यें हिंदुस्थानांतील शालिशूकमौर्यांवर स्वारी करून जय मिळवला ).

**ग्वाल**—( स. १७९० ) एक हिंदी कवि. हा मथुरेचा राहणारा असून याच्या बापाचें नांव ब्रह्मभट्ट सेवारामा असें होतें. हा जगदम्बेचा उपासक असून शिवजीची आराधना करीत असे. वि. सं. १८७९ मध्यें यानें मथुरा येथें शिवमंदिर बांधलें. दयाल हा याचा गुरु होय. कांहीं कारणामुळें गुरूनें याला हाकलून दिलें, तेव्हां यमुना नदीच्या कांठीं एका तपस्व्याच्या कृपेनें याच्या बुद्धीचा अपूर्व विकास होऊन याची कवित्वशक्ति जागृत झाली.

याला दोन पुत्र होते. ते दोघेहि बापाबरोबर कविता करीत असत. यानें एकूण ६०-७० ग्रंथ लिहिले असें म्हणतात. त्यांपैकीं खालील ग्रंथ प्रकाशित आहेतः

१ रसरंग, २ भक्तभावन, ३ नेहनिबाहन, ४ कुब्जाष्टक, ५ कृष्णाष्टक, ६ रामाष्टक, ७ गणेशाष्टक, ८ गणेशाष्टक (दुसरा), ७ राधिकाष्टक, १० गोपीपचीसी, ११ हग-शतक, १२ श्रीकृष्णजी का नखशिख, १३ यमुनालहरी, १४ हमीरहठ, १५ कविहृदय विनोद. हे ग्रंथ प्रकाशित आहेत. याची कविता चमत्कारपूर्ण आहे (क. कौ. भा. १).

## घ

**घटखर्पर**—विक्रमाच्या नवरत्नांतील एक.

**घटोत्कच गुप्त**— गुप्त वंशाचा संस्थापक श्रीगुप्त होय. श्रीगुप्ताचा हा पुत्र. याच्या नांवामागें महाराज असें पद लावलेलें आढळतें. त्यावरून हा कोणाचा तरी मांडलिक असावा. याचा पुत्र सुप्रसिद्ध चंद्रगुप्त होय.

**२.** (स. ४३५ सुमार) हा कुमारगुप्ताचा मुलगा. त्याच्या हयातींत हा माळव्याचा सुभेदार होता, असें कुमारगुप्ताच्या तुमैनगांव (ग्वाल्हेर राज्यांतील) गुप्त-संवत् ११६ (स. ४३५) मधील शिलालेखावरून दिसून येतें. कुमारगुप्ताच्या मागाहून हा गादीवर न येतां स्कंदगुप्त गादीवर आला.

**घन आनंद**—हा कायस्थ जातीचा असून निंबार्क संप्रदायाचा वैष्णव होता. हा दिल्लीचा राहणारा.

हा नागरीदासजींचा समकालीन होता. यांची मैत्री वृंदावन येथें घडून आली.

हा मुहम्मदशाहचा मुंशी असतां. सुजान नामक वेश्ये-बरोबर नेहमा मग्न असे. एकदां बादशहानें याला ध्रुपद गावयास सांगितलें पण यानें नकार दिला. आणि जेव्हां सुजाननें म्हणावयास सांगितलें, तेव्हां मात्र बादशहाकडे पाठ करून आणि सुजानकडे तोंड करून म्हणावयास सुरुवात केली. गाणें ऐकून राजा खुष झाला, पण त्यास आपला झालेला अपमान सहन झाला नाहीं. म्हणून बादशाहानें यास दिल्लींतून हाकून दिलें. जातांना त्यानें सुजानला आपणाबरोबर येण्याविषयीं विनविलें, पण तिनें नकार दिला. तेव्हां विरहामुळें व्याकुळ होऊन हा वृंदावनास आला आणि तेथें राधाकृष्णाच्या नामामध्यें रंगून गेला.

याच्या पुष्कळ छंदांमध्यें सुजानचा उल्लेख आहे. याच्या सवैय्ये छंद फार मनोहर आहेत. सुजानसागर, रसकेलिवल्ली, कृपाकाण्ड, कोकसार, विरहलीला, वगैरे ग्रंथ यानें लिहिले. याच्या कवितेंत प्रेम व विरह यांचें वर्णन फार मनोहर आहे. याची भक्तिरसांतील कविता फार मनोहर आहे (कविताकौमुदी भा. १).

जेव्हां नादिरशहानें मथुरा लुटली तेव्हां नादिरशहाचे शिपायानें याला मारिलें.

याशिवाय कृष्णभक्तीसंबंधीं एक मोठा ग्रंथ छत्र-पूरच्या सरकारी संग्रहालयांत आहे. विरहलीला हा ग्रंथ जरी व्रजभाषेंत असला तरी फार्सी छंदांत आहे. व्रज-भाषेंतील रसपूर्ण वर्णन करणारा हा कवि आहे. याच्या कवितेंतील मोठा गुण म्हणजे मार्दव होय. शृंगारिक कवींत याच्याइतका चांगला कवि व्रजभाषेंत झाला नाहीं.

**घनश्याम चौंडाजीपंत**—यानें कुमारविजय नांवाचें एक नाटक संस्कृतांत लिहिलें आहे. तें पंचांकी आहे; व त्यांतील कथा तारक-दैत्यावर कुमारानें जो विजय मिळ-विला तेथपर्यंत आली आहे. हा घनश्याम अथवा आर्यक महादेव व काशी यांचा पुत्र असून मराठा राजा तुकोजी याचा मंत्री होता.

यानें इतरहि अनेक नाटकें लिहिलीं. उ. 'उमरूक', 'मदनसंजीवन', एक ३ अंकी 'नवग्रह-चरित' व एक अन्योक्तिरूप 'चंड राहूदय' नाटक.

**घनश्यामदास**—हा महाकवि गोविंद कविराजाचा नातू. गोविंद कविराज हे १६१३ मध्यें मरण पावले. त्यावरून याचा काल त्यानंतर ठरतो.

हा भक्तिरत्नाकराच्या कर्ता जो घनःश्यामदास त्याहून भिन्न होय. हाहि कविता करीत असे (क. कौ. भा. ७).

**२.** (स. १५५०–१६५० सुमार) एक बंगाली कवि. याचें मूळ नांव नरहरि चक्रवर्ति असून घनःश्यामदास हें याचें उपनांव होय. हा सुविख्यात विश्वनाथ चक्रवर्तीचा शिष्य होय. वैष्णवसंप्रदायामध्यें याची भगवद्गीतेची टीका प्रमाण मानली जाते.

जरी हा ब्राह्मण होता तरी एका शूद्राचा परम भक्त होता. यानें त्याचें (शूद्राचें) जीवन मोठ्या श्रद्धेनें लिहिलें आहे. हें याचें करणें त्या वेळच्या कट्टर समाजाला पसंत पडलें नसतें, पण त्या वेळीं जातीविषयींचीं बंधनें ढिलीं होत चाललीं असून लोक, चरित्राच्या आणि गुणांसंबंधींच्या मोठेपणाला, जास्त मान देत असत, असें अनुमान केलें जातें.

यांचे खालील प्रधान ग्रंथ होतः—

१ नरोत्तम-विलास —( यामध्यें, ज्या श्रीनरोत्तम-दासानें १६ व्या वर्षी संन्यास घेतला, त्या श्रीनरोत्तम-दासाचें विस्तृत चरित्र दिलें आहे ).

२ भक्तिरत्नाकर-हा मोठा ग्रंथ असून, हा १५ प्रकरणां-मध्यें विभागलेला आहे. यामध्यें मुख्य मुख्य वैष्णव लेखक, कवि आणि पर्व यांचें वर्णन आलें आहे. यामध्यें सुमारें ४० संस्कृत ग्रंथांचा उल्लेख आला आहे.

याशिवाय याची फुटकळ कवितांची रचना पुष्कळ आहे.

घनश्यामदास नांवाच्या दोन व्यक्ति होऊन गेल्या. एक भक्तिरत्नाकर ग्रंथाचा कर्ता घनश्यामदास ऊर्फ नरहरी चक्रवर्ति. आणि दुसरा महाकवि गोविन्द कविराज यांचा नातू घनश्यामदास कविराज होय. दोघेहि कवि होते ( क. कौ. भा. ७ वा ).

**घनार्णव चालुक्य**—दानार्णव चालुक्याचें नामांतर.

**घंटय्या कवि**—तेलंगणांतील एक कवि. घंटय्या हें कुलदेवतेचें नांव होय. भक्तीमुळें तेंच याचें नांव ठेविलें. यानें काशीखंडांतील सुराभांडेश्वराची कथा तेलंगी भाषेंत काव्यरूपानें वर्णिली आहे. या कथेचे पांच अध्याय आहेत. या कवीची स्वतंत्र ग्रंथरचना नाहीं. कांहीं संस्कृतभाषेंतील भाषांतरित ग्रंथ आहेत. काव्यमाधुर्यामुळें हा बराच लोकप्रिय आहे ( परशा, तेलगू वाङ्मय; जनार्दन राम-चंद्र--कविचरित्र ).

**घंटापा**—यालाच वज्र घंटाप्पा असेंहि म्हणतात. हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं बावन्नावा सिद्ध होय. हा जातीनें क्षत्रिय असून वारेन्द्राचा राहणारा होता. पण चतुर-शीतिसिद्धप्रवृत्ति ( तं. ८६।१ ) ग्रंथांत नालंदा लिहिलें आहे. याच्या वेळेस देवपाल ( स. ८०९--४९ ) राजा होता. यानें आलिकालिमंत्रज्ञान ( तं. ४८।७८ ) या नांवाचा ग्रंथ लिहिला आहे.

**घाघ**—( ज. स. १६९५ सुमार ) एक हिंदी कवि. हा कनोजचा राहणारा असून यानें लिहिलेला एकहि ग्रंथ अद्याप उपलब्ध नाहीं. याचे सामाजिक नीतिसंबंधीं छंद फार लोक-प्रिय आहेत. हा मोठा अनुभवी आणि प्रतिभावान् कवि होता ( क. कौ. भा. १ ला ).

**घालीबखान**—अदोनीचा किल्लेदार ( २ इब्राहीम आदिलशाह पाहा ).

**घासीराम कोतवाल**—( मृ. स. १७९१ ) हा गौडब्राह्मण असून ( कनोजी ब्राह्मण--ज्ञानकोश ) औरंगा-बादचा राहणारा. . याच्या बापाचें नांव शामळदास ( सामळदास ) असें होतें. नोकरी किंवा व्यापार करून आपलें नशीब काढण्याकरितां हा पुण्यास आला. गोड वर्तन आणि हुशारी यामुळें लौकरच याचा पुण्याच्या दर-बारांत प्रवेश होऊन यावर नाना फडणिसाची मर्जी बसली.

हा लवकरच बढतीला चढून स. १७८२ मध्यें पुणें शहराचा कोतवाल झाला. खरोखरच हा लायक व कार्य-दक्ष अधिकारी होता. यानें कोतवाली खातें सुधारून वाढ-विण्यांत अतिशय परिश्रम घेतले व नजरबाज ( गुप्त पोलीस) लोक पुण्यांत ठेवून फंदफितुरास पुष्कळच आळा घातला ( ज्ञानकोश ). नानास फितुराच्या, दादाच्या व इतर ठिकाणच्या बऱ्यावाईट बातम्या सारख्या पाहिजे असत, किंबहुना अशा बातम्यांवरच त्याचा मुख्य कारभार चाले. त्यासाठीं त्यास आनंदराव काशीसारखीं ( घासीरामाच्या अगोदरचा पुणें शहरचा कोतवाल ) दुष्ट माणसें हाताशीं धरावीं लागत, आणि त्यांजबद्दल कागाळ्या आल्या तरी तिकडे कानाडोळा करणें भाग पडे. घासीरामाकडे पुण्याच्या कोतवालीचा कारभार पंधरा वर्षे राहिला. तेणेंकरून शहरांत प्रळय होऊन घासीरामाचा जात्र कोणी घेईना. शिवाय घासीरामाची मुलगी ललिता-गौरी इच्या द्वारां घासीराम नानाची मर्जी संभाळतो असा बोभाटा झाला. यांत खरें तथ्य काय असेल तें असो. पुणें गॅझेटियर व मोरोबा कान्होबाचें पुस्तक ' घासीराम कोतवाल ' यांत ही गोष्ट खरी मानलेली आहे.

घासीराम सुस्वरूप, बुद्धिमान् व भाषणांत साखर पेर-णारा असल्यामुळें कोणाचेंहि मन तेव्हांच आकर्षण करून घेई. याच्या हातून कित्येक अन्याय झाले असले तरी शहरांत यानें पुष्कळ सुधारणा करून व्यवस्था राखिली यांत संशय नाहीं. यास सुप्रत केलेल्या कामांच्या यादीवरूनच हें निदर्शनास येईल. शहरांतील गुन्ह्यांची यादी आहे, त्यांत बेदफैली व स्त्रीविषयक गुन्हेच फार आहेत हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. याच्या जुलमाच्या अनेक गोष्टी प्रसिद्ध असून त्यांवरून मराठींत ' घासीरामी जुल्म ' ही म्हणच पडली आहे. गुन्ह्यांच्या यादीवरून असें वाटतें कीं, स्त्रीपुरुषविषयक अनीति त्या वेळीं फार माजली असावी. घासीरामाबद्दल लोकांत झालेल्या अप्रीतीचें हें एक कारण.असूं शकेल. त्यांतून कदाचित् नाना फडणिसांच्या बळावर हा जुलमी व उन्मत्त बनला असावा. त्यामुळें पुढें याचा फारच वाईट रीतीनें अंत झाला.

यानें सवाई माधवरावाच्या लग्नाच्या वेळीं पुण्याचा बंदोबस्त उत्कृष्ट ठेविला आणि शहरांत ' नजरबाज ' ( गुप्त पोलिस ) लोक ठेवून फंदफितुरी दाबांत ठेविली.

याबद्दल नानानें याची प्रशंसा करून यास व याच्या मुलांस वारंवार बक्षिसें दिल्याचे दाखले आहेत. त्यांत जीवनराम व सखाराम हीं दोन घासीरामाच्या मुलांचीं नांवें आढळतात (म. रि. उत्तर वि. २ रा पृ. ५०१-२).

याची अखेरची हकीकत त्या वेळच्या ऐकीव माहितीवरून अनेकांनीं अनेक तऱ्हांनीं दिलेली आज उपलब्ध आहे. परंतु अशा हकीकतींत काल्पनिक अंश व बाजारगप्पा बऱ्याच दिसतात. प्रत्यक्ष घडलेली हकीकत खालील पत्रांत उपलब्ध आहे. पत्र घासीरामाच्या मृत्यूनंतर दोन दिवसांनीं पुण्याहून बारामतीकर जोशांस लिहिलेलें आहे.

'पुण्याहून पस्तीस असामी तैलंग ब्राह्मण आपले देशास जाण्याकरितां निघोन घासीरामाचें तळयावर गेले आणि सायंकाळीं चार घटका दिवसास स्वयंपाक करावयास लागून अस्तमान दोन घटका रात्रीस भोजन केलें. नंतर चार घटका आटपाआटप करावयास लागली. तों इतक्यांत कोतवालचे प्यादे पांचसात जाऊन तितक्या ब्राह्मणांस भवानी पेठेंतलि चावडीस आणून खणाचें भुयार आहे त्यांत पस्तीस असामी कोंडले. त्यांत वारा जाण्यास जागा नाहीं. सबब कोंडमारा होऊन एकवीस असामी मृत्यु पावले. तिसरे दिवशीं रा. मानाजी फाकड्यानें भुयाराचे कुलूप तोडून पाहिले आणि ब्राह्मण मेल्याचे वर्तमान श्रीमंतांस सांगून पाठविलें. श्रीमंतानीं नानास घासीरामाची चौकशी करून पारिपत्य करण्यास सांगितलें. तेव्हां नानानें वे. भटजीतात्यास चौकशी करण्यास सांगीतलें. भटजीतात्यानीं घासीरामास ब्राह्मण कशाकरितां कोंडिलें व मारावयाचे कारण काय, जें खरें असेल तें सांग, असा प्रश्न केला. तेव्हां यानें उत्तर केलें जे चोर म्हणोन कोंडले, ते अफु खाऊन मेले. यांत माझें काहीं कृत्रिम नाहीं. इतकें होत आहे तों नानाचे वाड्यापाशीं हजार पंधराशें ब्राह्मण मिळोन नानाप्रकारच्या वल्गना करूं लागले. ब्राह्मणाच्या म्हणण्याप्रमाणें घासीरामास हत्तीच्या पायाशीं बांधून सर्व शहरभर फिरविलें. तरी पण ब्राह्मण नाखूष राहून ते पुन्हा नानाच्या वाड्याच्यापुढें जाऊन बहुतच गर्गशा करूं लागले आणि बोलत जे, त्यास जिवें मारल्याशिवाय आम्ही ऐकत नाहीं, व नानाचेंहि मत त्यास जिवे मारावयाचें. त्याजवरून बाळाजीपंत केळकर यानें याची बेडी तोडून उंटावर उलटे तोंड करून बांधून कोतवाल चावडीस आणला; आणि पांच पाट काढून शेंदूर डोकींत घालून पुनः उंटावर पूर्ववत्प्रमाणें घालून आठी पेठा फिरविला, आणि गारपिरावर नेऊन सोडला; आणि ब्राह्मणांस सांगितलें जे, तुम्हांस पाहिजे तर सोडा किंवा मारा, असें सांगून हवालीं केले. त्याजवर सायंकाळच्या दोन घटका दिवस राहतां ब्राह्मणांनीं धोंडे घालून मारिला, (३१-८-१७९१) याप्रमाणें वर्तमान जालें.'

'ब्राह्मणांनीं घासीरामच्या बागेंतलीं कांहीं कणसें परवानगीशिवाय तोडलीं, तेव्हां घासीरामानें २५ प्यादे पाठवून ब्राह्मणांना पकडून स्वतःच्या (भवानी पेठेंतील) वाड्यांत भुयारांत कोंडलें. हें मानाजी फाकड्यास कळल्यावर त्यानें कुलूप तोडून ब्राह्मणांची मुक्तता केली. त्यांत १८ ब्राह्मण मेले होते. हें वर्तमान मानाजीनें नानास कळविलें. नानानें याला ब्राह्मणाशीं तसें वर्तन करण्याचें कारण विचारलें. तेव्हां यानें ते कामटी चोर होते, असें उत्तर दिलें. घासीरामानें नानाकडून ब्राह्मणास जाळण्याची परवानगी मिळविली पण मानाजीनें त्यास मुडदे उचलूं दिले नाहींत. तेव्हां नानानें यास चौकींत बसवून चौकशी चालविली. इतक्यांत हजार तैलंगी ब्राह्मण नानांच्या वाड्यापुढें जाऊन दंगा करूं लागले. न्यायाधीश अय्याशास्त्री हे वाड्यांत जात असतां त्यांची शालजोडी व पागोटें ब्राह्मणांनीं फाडलें व मारामारी केली. शास्त्रीबुवांनीं चौकशी करून घासीरामास देहान्त शिक्षा केली. तेव्हां याची धिंड काढली व भवानी पेठेच्या पलीकडे याला नेऊन सोडला. तेथें ब्राह्मणांनीं 'दगड उचलून मस्तकावर घालून जीवें मारला.' मग ब्राह्मणांचीं प्रेतें जाळलीं. घासीरामाच्या प्रेतास अग्नी दिला नाहीं. याच्या हाताखालील लोकांस व दोघा मुलांस कैद करून त्यांची मालमत्ता जप्त केली.' (खरे, ऐ. ले. सं. भा. ९).

यावरून ब्राह्मणांबद्दल खरा प्रकार घासीराम यास शेवटपर्यंत माहीत नव्हता असें दिसतें. चार्लस् मॅलेटहि म्हणतो, हा भयंकर प्रकार उघडकीस येईपर्यंत घासीरामाला त्याची माहिती नव्हती असें दिसतें. अशा प्रकारानें घासीरामाचा अंत झाला. पण याच्या अंगी कितीहि दोष असले तरी यानें पुण्याच्या पोलिसांना चांगलें वळण लाविलें एवढें खरें. यानें नवापुरा नांवाची भवानी पेठेच्या पूर्वेस एक नवी पेठ वसविली, आणि हडपसर रस्त्यावर एक बाग व तलाव यानें बांधिला होता.

**घियासुद्दीन खल्जी**—(मृ. स. १५००) हा माळव्याचा सुलतान महमूदखान खल्जीचा पुत्र. याची कारकीर्द चांगली झाली.

**घियासुद्दीन जलालशाह**—(स. १५५१) बंगालचा राजा.

**घियासुद्दीन तुघ्लक**—(स. १३२०-२५) दिल्लीचा बादशहा. हा प्रथम पंजाबचा सुभेदार होता. स. १३०६ त यानें मोगलांच्या स्वारीचा धुव्वा उडविला

म्हणून यास मलिक गाझी अशी पदवी मिळाली. हा धर्मनिष्ठ असल्यानें मुबारकच्या स्वैर कारकीर्दीत दिल्लीस कधींच गेला नाहीं. खुस्रवखानानें मुबारकचा वध केल्यावर याच्या मुलास घोडदळावरील मुख्य नेमलें. पण त्याचा विशेष उपयोग झाला नाहीं. त्यानें धार्मिक मुसलमानांना चीड येण्यासारखीं अनेक कृत्यें केल्यानें यानें त्याला पदच्युत करण्याचें ठरविलें. हा आपल्या साहाय्यकांसह दिल्लीवर चालून आला. तेव्हां त्यानें जोरानें तोंड दिलें, पण निभाव न लागल्यानें खुस्रवखान पळून जात असतां त्यास ठार करण्यांत आलें व खल्जी घराण्यांतील योग्य पुरुष न आढळल्यानें आपण वरील नांवानें बादशाहा झाला. खुस्रवखानानें अनुकूलता मिळविण्याकरितां वांटलेलीं बक्षिसें परत घेतलीं. खल्जी घराण्यांतील स्त्रियांचीं योग्य प्रकारें लग्नें लावून दिलीं.

यानें राज्यकारभार शिस्तीचा व लोकोपकारक करण्याची व्यवस्था केली. जप्त केलेल्या खासगी जमिनी परत केल्या. किल्ले, रस्ते व धर्मशाळा बांधल्या. शेतीची सुधारणा करण्याकरितां उत्पन्नाच्या एक दशांश सारा वसूल करावा, असा नियम केला. प्रत्यक्ष पाहून सारा आकारण्याची व्यवस्था केली. जमिनीची लागण वाढवून उत्पन्न वाढलें पाहिजे, केवळ सारा जास्त आकारून उत्पन्न वाढतां उपयोगी नाहीं अशी सक्त ताकीद केली. त्यामुळें ओसाड गावें पुनः वसलीं आणि पडीक जमिनी लागवडीस आल्या. वसुलीच्या अधिकाऱ्यांचा लोकांना जाच होईनासा झाला. कारण त्यांना इनाम जमिनी देऊन त्यांच्या मुशाहिऱ्याची व्यवस्था करण्यांत आली.

हिंदूंच्या बाबतींत मात्र याचें धोरण जाचक होतें. हिंदु लोकांजवळ संपत्ति वाढल्यास त्यांच्यांत महत्त्वाकांक्षा उत्पन्न होईल आणि त्यामुळें मुसलमानी सत्तेस धोका येईल असें याला वाटे. त्यामुळें हिंदु दरिद्री राहावेत अशी यानें व्यवस्था केली. वरंगळचा प्रतापरुद्रदेव काकतीय खल्जी घराणें नष्ट झालें म्हणून खंडणी पाठविना. तेव्हां यानें आपला युवराज मुहंमद यास सैन्यासह रवाना केलें, पण प्रथम त्याच्याच चुकीनें त्याचा अपजय आला. तरी यानें पुनः स्वारी करून वरंगळचें राज्य जिंकलें व तेथील राजास कैद केलें. वरंगळचें नांव सुलतानपूर असें ठेवलें (स. १३२३). नंतर यानें ओरिसांतील उत्कलवर स्वारी करून खूप लूट मिळविली.

पुढें बंगालच्या सुभेदारीच्या वारसा हक्कासंबंधीं तंटे उपस्थित झाले. नासिरुद्दीननें घियासुद्दीन बहादूरविरुद्ध याच्याकडे मदत मागितली. यानेंहि बुघ्राखानाच्या वेळेपासून स्वतंत्र झालेला प्रांत ताब्यांत येतो असें पाहून त्याला मदत केली. तेथें जाऊन नासिरुद्दीनला बंगालचा सुभेदार नेमलें. त्याच्या विरुद्ध पक्षाला पकडून ताब्यांत घेतलें आणि पूर्व बंगाल प्रांत मात्र दिल्लीच्या राज्यांत समाविष्ट केला.

इकडे युवराज मुहम्मदनें खजिन्याच्या जोरावर सैन्य वाढविलें. निजामुद्दीन अवलियाकडून लवकरच युवराज बादशाहा होणार, असें भविष्य जाहीर झालें. याच्याकडून त्याला दम भरला गेल्यावर याच्याकडे ' जनाब देहली तो बहोत दूर है ' असा बंगालमध्यें प्रतिनिरोप रवाना झाला. शेवटीं याचे स्वागतार्थ यानें वसविलेलें तुघ्लकाबाद शहर सजविण्यांत आलें. तेथून पांच मैलांवर असणाऱ्या अफगाणपूर शहरीं एक लाकडी शामियाना उभारण्यांत आला. तो दिसण्यांत भक्कम पण एका ठिकाणीं बाहेर आलेल्या तुळईस धक्का लागतांच कोसळून पडेल असा केला. शेवटीं बंगालमधील आणलेल्या हत्तीची शर्यत लागली असतां हत्तीच्या धक्क्यानें शामियाना पडून हा तावडतीच मेला; आणि राज्यावर येण्याची उत्कंठा लागलेला मुहंमद तुघ्लक गादीवर आला.

राजवंश स्थापन करणाऱ्या इतर राजपुरुषांप्रमाणें यास दिल्लीचें सुलतानपद प्राप्त होतांच यानें जवळच ' तुघ्लकाबाद ' नांवाचें शहर वसविलें. हें शहर वसविण्यास व त्यांतील सरकारी इमारती बांधण्यास यानें स. १३२० मध्यें सुरुवात करून १३२३ चे आधीं थोडे दिवस म्हणजे तेलंगण प्रांत जिंकून साम्राज्यांत सामील करण्यापूर्वी थोडे दिवस तें पुरें केलें. तुघ्लकाबाद हें किल्लेवजा शहर आहे. त्यांत खजिना ठेवण्याच्या भव्य इमारती, राजवाडे, कचेऱ्या आहेत. बहुतेक राजवाडे सोनेरी मुलामा चढविलेल्यां विटांचे बांधले असल्यामुळें सूर्यप्रकाशांत इमारती तळपूं लागल्या म्हणजे त्यांजकडे पाहणारांचे डोळे दिपून जात. याच शहरांत त्यानें जें एक कारंजें बांधलें त्याच्या भोंवतालच्या पुष्करणींत वितळविलेल्या सोन्याचा इतका रस ओतला कीं, ती सर्व पुष्करिणी भरीव सोन्याचीच दिसूं लागली. तुघ्लकशहाचें थडगें असलेली भव्य इमारत तांबड्या कुरुंदाची व पांढऱ्या पाषाणाची शहराजवळच बांधलेली आहे व या इमारतीस जाण्याकरितां बांधलेला रस्ता कमानीच्या पुलावरून नेला आहे. तुघ्लकाबाद शहरांत हल्लीं वस्ती नाहीं. बहुतेक इमारती नष्ट झाल्या आहेत. भिंत व इमारतींचे अवशेष आहेत, त्यांवरून मात्र शहराच्या ऐश्वर्याची चांगली कल्पना येते.

२. ( स. १० मार्च १३५१–२५ आगस्ट १३५१ ) खाजाजहाननें दिल्लीच्या तक्तावर बसविलेला एक मुलगा.

३. ( स. १३८८–८९ ) हा दिल्लीच्या तुघ्लक घराण्यांतील फत्तेखानाचा पुत्र. हा आपला आजा फीरूजनंतर गादीवर आला. यानें पांच महिने राज्य केलें. याच्या भावानें यास ठार केलें.

**घियासुद्दीन दामघानी**—मदुरेचा राजा (१३४४). मदुरेस जलालुद्दीन अहसनशहानें स्वतंत्र राज्य स्थापिलें ( स. १३३५ ), त्याचा खून करून तें राज्य अल्लाउद्दीन उदौजी नांवाचे अधिकाऱ्यानें १३४० चे सुमारास बळकाविलें. परंतु उदौजी एक वर्षानें लढाईंत मारला गेला. त्याचे मागें त्याचा जांवई कुतुबुद्दीन फीरूझशहा मदुरेच्या गादीवर बसला. फीरूझनें ४० दिवस राज्य केल्यावर बंड उद्भवून त्यांत तो मारला गेला. तेव्हां घियासुद्दीन दामघानीनें हें लहानसें राज्य हस्तगत केलें. दामघानी मुहंमद-तुघ्लकाचे सैन्यांत साधा सैनिक होता. मिळविलेल्या राजपदावरील पूर्वीच्या घराण्याशीं संबंध जोडण्याकरितां घियासुद्दीन दामघानीनें मदुरेचा राज्यसंस्थापक अहसनशहा याचे मुलीशीं लग्न केलें. अहसनशहाची एक मुलगी इब्न बतूतास दिली असल्यामुळें इब्न बतूता आपल्या बायकोच्या बहिणीच्या नवऱ्याचे राज्यांत पाहुणचारास आला होता. त्यानें असें लिहिलं आहे कीं, दामघानी क्रूर व निष्ठुर होता त्याच्या बखरींत दामघानीनें केलेल्या हिंदूंच्या छळांच्या, कत्तलींच्या अनेक हकीगती लिहिल्या आहेत. त्याचप्रमाणें द्वारावतीपूरचा राजा तिसरा वीरबल्लाळ ८०. वर्षांचा असतां त्याजवर स्वारी करून त्याचा पराभव केल्याची व पराभव केल्यावर त्यास पकडून त्याचें कातडें काढून त्यांत कोंडा भरून तें कोंडा भरलेलें शव मदुरेच्या भिंतीवर टांगून ठेवल्याचीहि हकीगत लिहिली आहे. या स्वारीवरून परत आल्यावर पंधरा दिवसांचे आंत याचा एकुलता एक मुलगा कॉलऱ्यानें वारला; व हा स्वतःहि लागलींच वारला ( स. १३४४ ).

**घियासुद्दीन पूर्वी**—( स. १३६०–७४ ) बंगालच्या सिकंदराचा पुत्र. यास केंब्रिज हिस्टरीमधील वंशावळींत घियासुद्दीन अझमशाह असें म्हटलें आहे.

**घियासुद्दीन बल्बन गुलाम**—( बल्बन पाहा ).

**घियासुद्दीन बहादूर**—स. १३१० मध्यें हा पूर्व बंगालचा सुभेदार झाला आणि स. १३१९ मध्यें सर्व बंगालचा सुभेदार झाला. मध्यें कांहीं काल हा नव्हता. स. १३२५ मध्यें याची पुनः नेमणूक झाली असावी.

**घियासुद्दीन बाहमनी**—हा महमूद सुलतानाचा वडील पुत्र होय. हा आपल्या बापानंतर सुलतान झाला.

गादीवर बसला तेव्हां याचें वय १७ वर्षांचें होतें. पुढें सुमारें अडीच महिन्यांनीं तारीख १४ जून सन १३९७ मध्यें याच्या एका दुष्ट व महत्त्वाकांक्षी गुलामानें एका मेजवानीच्या प्रसंगीं दगा करून याचे डोळे काढले. तेव्हां याचा धाकटा भाऊ शम्सुद्दीन याला गादीवर बसविलें.

**घियासुद्दीन हुसेन**—( स. १२११ ) बंगालचा सुभेदार.

**घुसीता**—ही बंगाल्यांतील वज्र घराण्यांतील असून खारवेलची पत्नी.

---

## च

**चक्क घराणें**—हसनचक्क, १ गाझीशाह (स. १५६१), २ नासिरुद्दीन हुसेनशाह ( स. १५६३–६४ ), ३ अलीशाह (स. १५६९–७०), ४ युसुफशाह (स. १५७८–७९ ), ५ याकुबशाह ( स. १५८५ ). हें घराणें काश्मीरांत राज्य करीत होतें ( काश्मीरांतील राजघराणीं पाहा ).

**चक्रधर**—( स. ११९४–१२७३ ) श्रीचक्रधरस्वामी हे महानुभाव-पंथाचे आद्य संस्थापक होत. अनहिलवाड-( पट्टन )चा राजा भोला भीमदेव याच्या समकाळीं भडोच येथें मल्लदेव नांवाचा राजा राज्य करीत होता ( लीलाचरित्र ). त्यानें सिंधुराजचा बंधु सिंह ( वस्तुपालचरित्र ) यास दत्तक घेतलें होतें. हा सिंह ( सोहडि ) सिंघण–सेनापति खोलेश्वर याच्या हस्तें मारला गेला, असें आंबेगांवच्या श. ११५० च्या शिलालेखात लिहिलेलें आहे. सिंह लहान असतांच मल्लदेवराजा मरण पावला. त्यानें मरतेवेळीं दत्तक पुत्र सिंह आणि राज्यसूत्रें प्रधान विशालदेवाच्या हातीं सोंपवून दिलीं होतीं. विशालदव हा जातीनें सामवेदी लाड ब्राह्मण होता. त्यास बरेच दिवस पुत्रसंतान नव्हतें. पण पुढें श्रीदत्तात्रेय प्रभूंच्या वरप्रसादानें त्यास श. १११६ मध्यें हरिपालदेव नांवाचा एक पुत्र झाला. हा हरिपालदेव २२ वर्षांचा होता त्या वेळीं यादवराज सिंघ-

णानें श. ११३८ मध्यें भडोचवर स्वारी केली. या मोहिमेंत प्रधानपुत्र हरिपालदेवानें भाग घेऊन सिंघणास पराभूत केलें. शेवटीं तह होऊन परस्परांत शांति झाली. यानंतर श. ११४१ मध्यें सिंघणानें अनहिलवाडवर स्वारी केली. सिंघण आणि वीरधवल–लवणप्रसाद यांच्या उभय सैन्यांचा सामना भडोच येथें झाला. त्या वेळीं सुद्धां हरिपालदेवानें युद्धांत भाग घेतला होता. शेवटीं तहांत त्या युद्धाचें पर्यवसान झालें. सदरहू तहनामा 'लेखपद्धतिः' या ग्रंथांत नमूद आहे. या युद्धानंतर श. ११४३, वृषभ संवत्सर, भाद्रपद शुक्ल द्वितीया, शुक्रवार (ता. २०-८-१२२१ इ.) या दिवशीं हरिपालदेवाचें निधन झालें. त्याचें प्रेत स्मशानांत नेलें असतां श्रीचांगदेव ऊर्फ श्रीचक्रपाणि (महानुभावपंथाचे तिसरे अवतार) यांनीं द्वारकेंत कामाख्या नामक हठ्योगिनीच्या दुराग्रहामुळें देहत्याग करून हरिपालदेवाच्या मृतकायेंत प्रवेश केला (रत्नमाला, ३०). हरिपालदेव जिवंत झालेले पाहून सर्वांस आश्चर्य वाटलें. पुढें त्यांनीं श. ११४५ मध्यें रामयात्रेच्या मिषानें गृहत्याग करून ऋद्धिपूर (वऱ्हाड) येथें येऊन श्रीगोविंदप्रभु (महानुभावपंथाचे चौथे अवतार) यांच्याजवळून ज्ञानशक्तीचा स्वीकार केला. त्यांनीं 'चक्रधर' असें नांव ठेवलें. तेथून निघून श्रीचक्रधरांनीं सातपुडा पर्वतावर १२ वर्षें निवास केला. नंतर त्यांनीं सुमारें ३५ वर्षें महाराष्ट्रभर संचार करून तत्कालीन परिस्थितीची पाहणी केली. त्या वेळीं धर्माचें स्थान कर्मकांडानें बळकावलें होतें. हेमाद्रीच्या 'चतुर्वर्गचिंतामणि' ग्रंथांत सांगितलेलीं दर दिवसाला दर तिथीला दहा दहा पांच पांच व्रतें करावींत, अमुक देवता अमुक पक्वान्नांनीं प्रसन्न होते या मिषानें अनेक पक्वान्नें तयार करून ब्राह्मण-भोजनें घालावींत, स्वतः पक्वान्नें झोडावींत, व यानेंच मोक्ष मिळतो, अशी लोकांची समजूत झाल्यामुळें निःश्रेयसाला देणारी कर्मभूमि ही भोगभूमि बनली होती. "देवान् देवयजो यान्ति मद्भक्ता यान्ति मामपि, आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ।। मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते ।।" या भगवद्वचनानुसार देवतांच्या उपासनेनें मोक्षाचें दुर्गम शिखर गांठतां येणें शक्य नाहीं. अशा स्थितींत देवतांच्या उपासनेनें मोक्षाचें शिखर गांठूं इच्छीत असल्यामुळें दिशाभूल झालेल्या त्रैवर्णिक वर्गास मोक्षाच्या मार्गावर पोंचतें करण्याकरितां स्त्रीवर्ग व शूद्रवर्ग यांनाहि मोक्षाचा मार्ग खुला करण्याकरितां, आणि मोक्षप्राप्तीच्या साधनांत संसारप्रवर्तक देवतोपासनादि प्रवृत्त वैदिक कर्मांची अनुपयुक्तता व संसारनिवर्तक परमेश्वरोपासनादि निवृत्त वैदिक कर्मांची उपयुक्तता प्रतिपादन करण्याकरितां श्रीचक्रधरांनीं पैठण येथें श. ११९० त संन्यासदीक्षा घेऊन महानुभावपंथाची स्थापना केली. शेवटीं त्यांनीं श्रीनागदेव यांना आचार्यपदावर प्रतिष्ठित करून श. ११९४, अंगिरा संवत्सर, माघ वद्य ४, मंगळवार (ता. ७-२-१२७३) ला बद्रिकाश्रमीं प्रयाण केलें.

तत्त्वज्ञान—श्रीचक्रधरस्वामींनीं स्वतः कोणताच ग्रंथ लिहिलेला नाहीं. वेळोवेळीं प्रसंगानुसार त्यांनीं केलेल्या भाषणांतील उपदेशपर आणि तत्त्वज्ञानपर वचनांचा संग्रह म्हणून केशवराजसूरी यांनीं 'श्रीचक्रधरसिद्धांतसूत्रपाठ' या नांवाचा एक ग्रंथ लिहिलेला महानुभावपंथांत सध्यां विद्यमान आहे. त्यावरून श्रीचक्रधरस्वामींच्या तत्त्वज्ञानाचें आकलन स्थूलतः पुढीलप्रमाणें करितां येतें.

मोक्ष हें मानवजीविताचें अंतिम ध्येय ठरलेलें आहे. त्याचा दाता परमेश्वरच असल्यामुळें तो ज्या क्रियेनें प्रसन्न होईल ती क्रिया आचरून त्यास प्रसन्न करून घेतलें म्हणजे तो संसारसागरांत पडलेल्या जीवांची जन्ममरणपरंपरेंतून सुटका करतो, असा श्रीचक्रधरस्वामींचा मुख्य सिद्धान्त आहे. प्रवृत्तिमार्गांत राहून समाजसेवेसारखें परोपकारकार्य करून परमेश्वरास जर प्रसन्न करून घेतलें तर प्रवृत्तिमार्गीयांसहि मोक्ष मिळूं शकतो. नाहींपेक्षां

"सुखाभ्युदयिकं चैव नैःश्रेयसिकमेव च ।
प्रवृत्तं च निवृत्तं च द्विविधं कर्म वैदिकम् ।।
प्रवृत्तं कर्म संसेव्य देवानामेति साम्यताम् ।
निवृत्तं सेवमानस्तु भूतान्यत्येति पञ्च वै ।।" (अ.१२)

या मनुस्मृतिवचनानुसार मुमुक्षूनें निवृत्ति-संन्यासमार्गाचा अवलंब करून अर्थात् संसारप्रवर्तककर्मत्यागपूर्वक "सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज" या भगवदाज्ञेप्रमाणें परमेश्वरास शरण जाऊन मोक्षाची प्राप्ति करून घेतली पाहिजे. मोक्ष हा कांहीं विशिष्ट वर्गासाठीं नसून सर्वांच्या वांट्याचा असल्यामुळें तो साधण्यांत चातुर्वर्ण्याचा आणि स्त्रीपुरुषांचा भेदभाव आड येत नाहीं. चारहि वर्णांतील स्त्रीपुरुषांना संन्यास घेतां येतो. पण श्रीचक्रधरस्वामींनीं "रागःद्वेषःकामःक्रोधःमदःमत्सरः यांचा त्यागु याचि नांवे संन्यासु कीं बाइः" असें संन्यासाचें लक्षण प्रतिपादिलें आहे. जीव, देवता, प्रपंच आणि परमेश्वर या चारहि पदार्थांचें कार्य-कारण-स्वरूप-लक्षणात्मक यथातथ्य ज्ञान, परमेश्वरावतारांची कायिक-वाचिक-मानसिक-भक्ति, आणि इहामुत्रफलोपभोगविरागरूप वैराग्य हें साधनात्रितय पदरीं असल्याशिवाय मोक्षाचा बालेकिल्ला हस्तगत करतां येत नाहीं.

श्रीचक्रधरस्वामी हे द्वैतवादी असून त्यांच्या मतें जीव, देवता, प्रपंच आणि परमेश्वर हे चार पदार्थ स्वतःसिद्ध व अनादिकालापासून विद्यमान आहेत. त्यांपैकीं,

जीव—हे अनंत असून ते सर्व नित्य, केवल आणि अनाद्यविद्येनें युक्त आहेत. नित्य, केवल व अनादि असण्यामध्यें जीवाचें परमेश्वराशीं साम्य आहे खरें; पण या दोघांत मुख्य भेद हा आहे कीं, जीव हा प्रथमपासून अविद्यायुक्त आहे, तर परमेश्वर हा ज्ञानसंपन्न व मुक्त आहे. यामुळेंच जीवाला अविद्येचा नाश करवून घेण्यासाठीं परमेश्वराची भक्ति करून त्यास प्रसन्न करून घ्यावें लागतें.

देवता—प्रत्येक ब्रह्मांडांत ८१०१२५००९ देवता असून त्यांचे ८ वर्ग आहेत. प्रत्येक वर्गांतल्या देवतांची संख्या व स्वरूप पुढीलप्रमाणें आहे.

| देवतांचें नांव | देवतांची संख्या | प्रत्येक देवतेचें स्वरूप |
|---|---|---|
| (१) कर्मभूमींच्या देवता | १३००००००० | ५०० योजन |
| (२) अष्टदेवयोनि देवता | १३००००००० | ५००० ” |
| (३) अंतराळींच्या देवता | १३००००००० | ५०००० ” |
| (४) स्वर्गीच्या देवता | ३३००००००० | ५०००१० ” |
| (५) कैलास-वैकुंठ-सत्यलोकांच्या देवता | ९००००००० | ५०००००० ” |
| (६) क्षीराब्धीच्या देवता | १२५००० | ५००००००० |
| (७) अष्टभैरव देवता | ८ | ५००००००००० |
| (८) विश्वरूप देवता | १ | ५०००००००००० |
| | ८१०१२५००९ | |

सर्व ब्रह्मांडांतील देवतांवर ईश्वराची मुख्य शक्ति माया ही एवढीच अधिकारिणी आहे. ती अपरिमित असून अनंत ब्रह्मांड व्यापून उरलीच आहे. या सर्व देवता मूळ अव्यक्त आहेत. माया वगळून सर्व देवतांना सृष्टिचक्र चालविण्याकरितां परमेश्वराच्या आज्ञेनें मूर्तिधारी व्हावें लागतें. या मूर्तिधारी देवतांना ‘ब्रह्मांडस्थ देवता’ असें नांव असून जीवाला त्याच्या कर्मानुसार स्वर्ग-नरक देणाऱ्या देवता याच होत. या ब्रह्मांडस्थ देवतांच्या स्वरूपापासून थोडा थोडा अंश देहधारी जीवाच्या देहांत प्रवेश करितो. त्या अंशरूप देवतांना ‘पिंडस्थ देवता’ म्हणतात. त्या प्रत्येक मनुष्याच्या देहांत मेदमांसरूपानें वास करतात. देवतांचे उच्च देवता व नीच देवता असे दोन विभाग पडतात. उच्च देवता, नीच देवतेला पाहते, म्हणजे उच्च देवतेला नीच देवतेचें दर्शन व ज्ञान होतें आणि दुसरीला पहिलीच्या अस्तित्वाची जाणीव असते. उच्च देवता नीच देवतेला व्यापून राहते. देवतेची उच्चनीचता तिच्या स्वरूपाच्या परिमाणावरून ठरते. सदरहू तपशिलावरून माया ही सर्वांत श्रेष्ठ देवता असून कर्मभूमींच्या देवता या सर्वांत कनिष्ठ देवता आहेत. परमेश्वराच्या खालोखाल मायेचाच बडिवार असून जीवाचे सारे व्यापार मायेच्या अनुरोधानें होतात. या देवतांची उपासना केल्यानें उपासकास सालोक्य, सामीप्य, सारूप्य आणि सायुज्य हे चार प्रकारचे मोक्ष प्राप्त होतात. पण ते सर्व मोक्ष अशाश्वत आहेत ( देवानां चैव देहेषु ये मोक्षाः पुनरागताः—भविष्य पु. प्र. प. खं. ४, अ. ७, श्लो. २९ ). म्हणून मुमुक्षु असा महानुभाव पंथ हा देवतांची उपासना करीत नाहीं.

प्रपंच—श्रीचक्रधरस्वामींच्या मतें प्रपंच हा ‘परिणाम’ किंवा ‘विवर्त’ नसून तो एक स्वतंत्र पदार्थ आहे. तो कारणरूपानें अनादिसिद्ध असून अष्टभैरवदेवतास्वरूपस्थित आहे. प्रत्येक भैरवस्वरूपापासून आठ आठ भूतांचा समूह उत्पन्न होतो. ‘भूत’ म्हणजे ज्याला पुढें अवच्छेद जाऊं शकत नाहीं, असा प्रपंचाचा शेवटचा अंश. नैयायिकांचे परमाणु जसे विभाग पावूं शकत नाहींत, तद्वत्च हें भूतहि आहे. या आठ भूतांत पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश या पंचमहाभूतांचा आणि सत्त्व, रज व तम या तीन गुणांचा समावेश होतो. या आठ भूतांमध्यें एक ‘कारणभूत’ व सात ‘समलभूतें’ असतात. अष्टभैरवांपासून प्रत्येकीं आठ आठ अशीं एकंदर ६४ भूतें निर्माण होतात. या ६४ भूतांत सर्व मिळून ८ कारणभूतें व ५६ समलभूतें असतात. हीं कारणभूतें आधार असून, त्यांचीं समलभूतें हीं आधेय आहेत. प्रत्येक भैरवापासून निघणाऱ्या आठ भूतांच्या गटांत एक कारणभूत जरी नसलें, तरी त्याच्याशिवाय बाकीचीं सात समलभूतें निरुपयोगी होतात. असा कारणभूत व समलभूतें यांचा परस्पर संबंध आहे ( वि. ज्ञा. वि. वर्ष ६०, अं. १२ ).

परमेश्वर—परमेश्वर हा सच्चिदानंदस्वरूप असून तो जीव, देवता आणि प्रपंच यांहून वेगळा आहे. तो अच्युत,

अविक्रिय, अव्यक्त, अमूर्त, शुद्ध, बुद्ध, नित्यमुक्त, निरभिमान, पर, केवल, नित्य, सर्वव्यापक, सर्वात्मक, सर्वातीत, सर्वकर्ता, सर्वसाक्षी असून सौंदर्य, लावण्य, सौभाग्य, औदार्य, दया, माया, कृपा, करुणा आदिगुणांनीं युक्त आहे. निराकार व अव्यक्त परमेश्वराला जीवाचें कल्याण अकल्याण कांहींच करतां येत नसून जीवाला ज्ञान देण्याकरितां त्याला साकार व व्यक्तच व्हावें लागतें. साकार परमेश्वराच्या सन्निधानानें देहधारी जीव आत्मकल्याण करून घेतात. हें सन्निधान चार प्रकारचें आहेः दर्शन, अनुस्मरण, सेवा आणि संबंध. 'दर्शन' म्हणजे परमेश्वरावताराला पाहणें किंवा त्याच्या सन्निध असणें. 'अनुस्मरण' म्हणजे परमेश्वरावतार अविद्यमान असतां त्याचें स्मरण करणें. 'सेवा' म्हणजे परमेश्वरावताराची अगर त्याच्या संबंधित वस्तूंची सेवाचाकरी करणें. 'संबंध' म्हणजे परमेश्वरावताराचा संबंध झालेल्या माणसांचा व वस्तूंचा सहवास घडवून आणणें. या मार्गांनीं इष्ट हेतु साध्य करितां येतो.

ज्ञान—ज्ञानाचे शाब्द, सत्ता, सामान्य व विशेष असे चार प्रकार आहेत. हीं चारहि ज्ञानें अनुक्रमेंच परमेश्वर जीवास देतो. प्रथमतः जीवास शाब्दज्ञान प्राप्त होतें. त्यांत जीव, देवता, प्रपंच आणि परमेश्वर या चारहि पदार्थांचें कार्य, कारण, स्वरूप व लक्षण यांचें नुसतें शाब्दिक अस्तित्वच जीवाच्या प्रत्ययास येतें. हें शाब्दज्ञान चरितार्थ झाल्यानंतर सत्ताज्ञान मिळतें. त्या वेळीं जीवास स्वतःचें स्वरूप व देवता, प्रपंच आणि परमेश्वर या सर्व पदार्थांचीं स्वरूपें करतलामलकवत् प्रत्यक्ष दिसूं लागतात. नंतर सामान्यज्ञान प्राप्त होतें. त्यानें इंद्रचंद्रादिकांपासून तों कर्मभूमीच्या देवतांपर्यंतच्या पिंडस्थ देवता जीवाच्या शरीरापासून पृथक् होऊं लागतात व शेवटीं विशेषज्ञान मिळतें. त्यानें ब्रह्मादिकांपासून तों विश्वरूपदेवतेपर्यंतच्या पिंडस्थ देवता जीवाच्या शरीरापासून वेगळ्या होऊं शकतात, व तें शरीर मेदमांसादि सप्त धातूंपासून मुक्त होतें. याप्रमाणें जीवानें विशेष ज्ञानाची पायरी चढली म्हणजे परमेश्वर आपल्या कृपाशक्तीनें त्याच्या अनाद्यविद्येचा छेद करून त्यास आपल्या परमेश्वरस्वरूपीं लीन करितो. परमेश्वरस्वरूपीं लीन झाल्यानंतरहि जीवेश्वरद्वैत कायमच राहतें, असा श्रीचक्रधरस्वामींचा ठाम सिद्धांत आहे.

परमेश्वरावतार—श्रीचक्रधरस्वामी हे स्वतःला परमेश्वराचा अवतार म्हणवीत असून, शिवाय श्रीकृष्ण, श्रीदत्तात्रेय, द्वारावतीय श्रीचांगदेव ऊर्फ श्रीचक्रपाणी, आणि ऋद्धिपुरीय श्रीगोविंदप्रभु या चौघांनाहि परमेश्वराचेंच अवतार मानीत होते.

दत्तात्रेय—श्रीचक्रधरस्वामींकाळीं श्रीदत्तात्रेयाची अधुनिक, ब्रह्मा-विष्णु-महेश यांची एकवटलेली त्रिमुखी व षड्भुजा मूर्ति उदयास आलेली नव्हती. म्हणून शाण्डिल्योपनिषद् आणि श्रीजाबालदर्शनोपनिषद् यांत वर्णिलेल्या

भस्मोद्धूलितसर्वाङ्गं जटाजूटधरं विभुम्।
चतुर्बाहुमुदाराङ्गं प्रफुल्लकमलेक्षणम् ॥ (शांडि.उ.)
दत्तात्रेयो महायोगी भगवान् भूतभावनः।
चतुर्भुजो महाविष्णुर्योगसाम्राज्यदीक्षितः ॥
(श्रीजा. उ.)

या एकमुखी व चतुर्भुजी दत्तात्रेयाचीच उपासना करण्यास श्रीचक्रधरस्वामींनीं आपल्या अनुयायांना सांगितलें. यास्तव महानुभावपंथांत दत्तात्रेय हा एकमुखीच मानला जातो. भागवतकारांच्या मतें सुद्धां दत्तात्रेय हा ब्रह्मा-विष्णु-महेश यांचा एकवटलेला त्रिमुखी अवतार नसून तो विष्णूची अंशभूत अशी एकमुखी देवता आहे, हें

अत्रेः पत्न्यनसूया त्रीन् जज्ञे सुयशः सुतान्।
दत्तं दुर्वाससं सोममात्मेशब्रह्मसंभवान् ॥
(स्कं. ४, अ. १, श्लो. १४)
सोमोऽभूत्ब्रह्मणोऽशेन दत्तो विष्णोस्तु योगवित् ॥
(स्कं.४, अ. ११, श्लो. ३२)

या भागवतांतील श्लोकावरून स्पष्ट आहे.

आचार—श्रीचक्रधरस्वामींनीं संन्यासाश्रमीयांकरितां अतिशय कडक नियम घालून दिलेले आहेत. संन्याशानें पुत्र, मित्र, कलत्र, शिखा व सूत्र इत्यादिकांचा परित्याग करून निरालंबी होऊन अरण्यवास पत्करला पाहिजे. नित्य अटन करून खेडेगांवांत फक्त एक दिवस व शहरांत पांच दिवस निवास करावा. स्वतःकरितां पचनपाचन न करितां चातुर्वर्ण्यभिक्षा ग्रहण करावी. एकाच घरीं आहार घेतां कामा नये. नगर निर्धूम झाल्यानंतर तिसरा प्रहरीं भिक्षेस जावें. भिक्षेंत आलेलीं सरस-निरस अन्नें एकत्र कालवून गोडी न घेतां शरीरधारणमात्रार्थ सेवन करावीत. देहाची अनास्था ठेवून तें अस्थिशेष करावें. कोणाचाहि पुजा पुरस्कार न स्वीकारावा. स्नान करावयाचें असल्यास पाण्यांत बुडीमात्र घेऊन बाहेर निघावें. फुलें व फळें लटकलेल्या झाडाखालीं सुद्धां बसूं नये. चित्रित देखील स्त्री डोळ्यांनीं पाहूं नये. निद्रा घ्यावयाची ती गांवाबाहेर पडक्या देवळांत किंवा झाडाखालीं घ्यावी. रोज एकाच स्थानीं किंवा एकाच झाडाखालीं राहूं नये. निजतांना ऐटींत हातपाय न ताणतां श्वानकुंडली घालावी.

आंथरुण व पांघरुण हीं दोन निरनिराळीं घेऊं नयेत. एकाच वस्त्रांत निर्वाह करावा. वस्त्रहि लांबलचक नसून अंग झाकण्यापुरतेंच दोनचार हात असावें. सारांश, संन्याशानें जिवंतपणींच मेल्यासारखें राहून अहोरात्र परमेश्वराचें अखंड स्मरण करीत संपूर्ण आयुष्य परमेश्वर-चरणीं अर्पण करावें.

चातुर्वर्ण्य—श्रीचक्रधरस्वामींच्या अनुयायांत संन्यासाश्रमीय आणि गृहस्थाश्रमीय असे दोन वर्ग आहेत. "चातुर्वर्ण्य चरेद्भैक्ष्यम्ः या शास्त्रासि अनुसरीजेः" या श्रीचक्रधरस्वामींच्या सूत्रावरून त्यांना कै. भावे आदि मंडळी चातुर्वर्ण्यविरोधक समजतात, पण ही त्यांची सर्वथा चूक आहे. चातुर्वर्ण्य भिक्षासंबंधीं सूत्र संन्यासाश्रमीयांकरितांच विदित असून तें अगदीं शास्त्रशुद्ध आहे. संन्यासाश्रमीयानें चारहि वर्णांची भिक्षा ग्रहण केली पाहिजे, यासंबंधानें "चतुर्षु वर्णेषु भैक्षचर्यां चरेत्" (काठक ब्राह्मण); "चतुर्षु वर्णेषु भिक्षाचर्यां चरेत्" ( संन्यासोपनिषद् ); "अभिशस्तपतितवर्जं चातुर्वर्ण्यं भैक्षं चरन्तः" (पाराशर-स्मृति),"भिक्षां चतुर्षु वर्णेषु विगर्ह्यान्वर्जयंश्चरेत्" (भागवत) इत्यादि श्रुति-स्मृति-पुराणादि धर्मशास्त्रांची आज्ञाच आहे. गृहस्थाश्रमीय अनुगृहीतवर्ग हा चातुर्वर्ण्यान्तर्गत संस्कारादि वैदिककर्में, आणि रोटीबेटीव्यवहाराचे निर्बंध कडकपणें पाळीत असल्यामुळें श्रीचक्रधरस्वामी हे चातुर्वर्ण्यविरोधक ठरूं शकत नाहींत.

पंथीयेतरांच्या गैरसमजाचें कारण—श्रीचक्रधरस्वामींनीं स्थापन केलेला महानुभावपंथ हा सद्बीजसंभूत असल्यामुळें त्याची धर्मध्वजा महाराष्ट्रापासून तों थेट पेशावरपर्यंतच नव्हे तर अफगाणिस्तानसारख्या तामसी, क्रूर व हिंस्र देशांतसुद्धां अहिंसेचें तत्त्व शिकवून त्यांना मद्यमांसापासून निवृत्त करून 'ला इलहा इलाल्लाहु' च्या जागीं श्रीकृष्ण, श्रीदत्तात्रेय आणि श्रीचक्रधर यांचेंच भजन, पूजन व स्मरण करावयास लावलें! पण शोकाची गोष्ट ही कीं, श्रीचक्रधरस्वामींच्या पश्चात् ८०–९० वर्षांनीं महानुभावपंथीयांनीं सांकेतिक लिपी तयार करून आपलें वाङ्मय कडीकुलुपांत अडकवून ठेवल्यामुळें या पंथाची बरीच हानि झाली. पंथाच्या अस्सल स्वरूपाची जाणीव करून देणारा श्रीचक्रधरस्वामींचा उपदेश पंथीयेतरांच्या कानीं न पडूं शकल्यामुळें त्यांच्या मनांत पंथीयांचे, सनातनधर्मी म्हणूनहि देवताभक्तीचा निषेध करणें, देवतांच्या देवळांतसुद्धां न जाणें, काळीं वस्त्रेंच नेसणें इत्यादि बाह्याचार बोचूं लागून पंथीयांसंबंधानें भलत्याच गैरसमजुती रूढ होऊन बसल्या. गेल्या पंचवीस तीस वर्षांपासून जसजसें महानुभावी वाङ्मय उजेडांत येऊं लागलें तसतसें महानुभावपंथासंबंधानें विद्वानांचे गैरसमज नाहींसे होऊन सदरहू पंथ वैदिक पंथ असल्याबद्दल खात्री होऊं लागली आहे. महानुभावीय वाङ्मय प्रकाशन करण्याचें मुख्य श्रेय महंत श्रीदत्त–लक्षराज कवीश्वर महानुभाव यांनाच आहे. त्यांच्याच कृपाप्रसादानें महानुभावपंथाची जाणीव आज आपणांस होत आहे ( श्री. बाळकृष्ण-शास्त्री महानुभाव ).

२. ( दिनकर ज्योतिर्षी पाहा ).

**चक्रपाणि**—( स. १०५० सुमार ) सुश्रुतसंहितेचा टीकाकार. पालराजांपैकीं सहनपाल राजाचा याला आश्रय होता असें यानें टीकेंत लिहिलें आहे. शिवाय गौडाधिप नयपालाचा आश्रित हा चक्रपाणि होता, असें याच्या चिकित्सासंग्रहाच्या शेवटीं म्हटलें आहे.

२. हा कऱ्हाडचा ब्राह्मण. याचा जन्म पुण्यानजीक फलटण येथें झाला. पिता--राजनायक, माता–राजाईसे. हा वेदविद्येंत प्रवीण होता. याचें लग्न चाकण येथें कमळाईसेबरोबर झालें. २५ वर्षें फलटणला संसार केला. नंतर हे विरक्त स्थितीत द्वारकेस राहत असत. एलिचपूरच्या कामाख्येनें याला भ्रष्ट करण्याचा प्रयत्न केला तेव्हां यानें भ्रष्ट होण्यापेक्षां देहांत पत्करला (कामाख्या व १ चक्रधर पाहा ).

३. भानुदासाचा पुत्र. एकनाथाचे हे आजे होत. यास सूर्य नांवाचा मुलगा होता.

४. स. १०७५ ते ११०० च्या दरम्यान हा कवि उदयास आला. गंगाधर कवीच्या शके १०५९ ( स. ११३७ ) सालच्या शिलालेखांत त्याचा उल्लेख आला आहे, व श्रीधरदासाच्या सदुक्तिकर्णामृत ( स. १०२५) नांवाच्या पुस्तकांत, ज्या चक्रपाणीच्या कविता आल्या आहेत तो हाच चक्रपाणी असावा असें दिसतें

५. ( चांगदेव वटेश्वर पाहा ).

**चक्रपाणि दीक्षित**—दशकुमारचरितशेष नांवाच्या दशकुमारचरिताच्या शेवटल्या भागाचा कर्ता.

**चक्रपाणि व्यास वर्धनस्थ**--(स. १५८३--१६४३) मराठी महानुभाव कवि. यांचें पूर्वाश्रमींचें नांव चाल्हण पंडित. जात सारस्वत ब्राह्मण. हे मूळचे राजपुतान्यांतले. यांनीं उपाध्यायाम्नांतील संतराज वर्धनस्थ ( बीडकर ) यांच्यापासून शके १५०५ मध्यें महानुभावपंथाची दीक्षा घेतली, व चक्रपाणि व्यास हें नांव धारण केलें. यांनीं संस्कृत, हिंदी व मराठी भाषांत ग्रंथरचना केली. संस्कृतमध्यें समुदायसूत्रपाठ, तसेंच मराठींत पाठांच्या लापिका, सरवळे, दृष्टांतस्थळ, यांशिवाय नित्यदिनी लीलास्तोत्र व

इतर श्लोक व ओवींबद्ध कवित्व आहे. हे वऱ्हाडांत ऋद्धपूर येथें राहत असत व तेथेंच शके१५६५ मध्यें समाधिस्थ झाले.

**चक्रवर्मा**—( स. ९१८–९३९ ) हा काश्मीरचा राजा होय. सुगंधा राणी तंत्री सैन्याच्या धोरणानें राज्य करीत असतां तंत्री सैन्यानें याला गादीवर बसविलें. शेवटीं डामर लोकांच्या साहाय्यानें तंत्री सैन्याचें यानें उच्चाटन केलें. शेवटीं डामरावरहि यानें जुलूम केला आणि व्यसनांत दिवस घालविले.

**चक्राप्पा**—एक तेलगू कवि. नेलोर जिल्ह्यांत मानारपोलरनजीक तेट्टु गांवीं हा राहत असे. कलहस्ति येथील जमीनदार बंगारु याचम्मा नायडू याचा हा समकालीन होता. वय १६ वर्षांचें असतांच हा कविता करूं लागला. एकदां हा आपल्या गांवाहून दुसऱ्या एका खेड्यास चालला असतां बंगारूची व याची अकस्मात् गांठ पडली; व त्यानें यास अनेक प्रश्न केले. त्यांचीं उत्तरें यानें कविताबद्ध इतकीं सुंदर दिलीं कीं, तीं ऐकून तो जमीनदार फार संतुष्ट झाला. नंतर त्यानें यास सांगितलें कीं, आपण कृपा करून माझ्या दरबारीं यावें; आणि रामचंद्राच्या स्तुतिपर शंभर स्तोत्रें करावीं. त्याप्रमाणें यानें केलें. तेव्हां जमीनदार फार खूष झाला. याला विचारतां यानें फक्त एशीं शेर जोंधळे मागितले. पण जमीनदारानें याला वर्षासन करून देऊन याच्या गांवीं पोंचविलें. यानें बरेच लोकोपयोगी ग्रंथ केले आहेत. हा साठाव्या वर्षी मरण पावला. हा रामभक्त होता ( परशा–तेलगू वाङ्मय ).

**चक्रायुध**—( स. ८००–१६ ) कनोजच्या यशोवर्म्यानंतर याचा उल्लेख आढळतो ( स. ८०० ). याच्या बापाचें नांव इंद्रायुध असून त्याच्या वेळीं(स.७८३) कनोजचें राज्य बरेंच विस्तृत होतें. प्रयागच्या पश्चिमेकडील उत्तर हिंदुस्थानचा बहुतेक भाग या राज्यांत येई. यानंतर बंगालच्या राजांनीं वर्मराजांचा पराभव केला. याच्या मांडलिकांनींहि बंडें उभारलीं. अखेर राजपुतान्यांतील भीनपालचा गुर्जर प्रतिहार राजा नागभट्टानें वर्म घराण्याचा नाश केला.

**चच**—( स. ५९७–६३७ ) हा सिंध देशाचा ब्राह्मण राजा. याच्या वंशाचा इतिहास ज्या फार्सी बखरींत लिहिला आहे, तिला चचनामा असें म्हणतात. अरबांनीं आठव्या शतकांत सिंध जिंकला त्या वेळचीहि माहिती चचनाम्यांत आहे. त्यावरून हा स. ५९७ मध्यें गादीवर बसला; आणि त्यानंतर पस्तीस वर्षांनीं म्हणजे स. ६३२ मध्यें अरबांची पहिली स्वारी झाली. यानें एकंदर चाळीस वर्षें राज्य केल्यावर याचा भाऊ चंद्र हा गादीवर बसला. चचनाम्यांतील बरींच वर्णनें काल्पनिक व ऐकीव असल्यानें ऐतिहासिक दृष्ट्या त्यांचें महत्त्व फारसें नाहीं. चच हा शूर होता. यानें आपल्या राज्याची सरहद्द काश्मीरपर्यंत भिडविली होती. हा सिंधमधील आरोरगांवच्या शैलेज नांवाच्या अग्निहोत्री ब्राह्मणाचा मुलगा. हा प्रथम सिंधुराज साहसीच्या रामचंद्र नांवाच्या प्रधानाचा कारकून म्हणून राहिला आणि क्रमानें मुख्य प्रधान आणि शेवटीं राजा झाला आणि राणीशीं लग्न लावलें. याचाच मुलगा प्रख्यात दाहीर होय. यानें इस्कंदिया व बाबिया हीं मुसलमानी संस्थानेंहि जिंकलीं होतीं. सिविस्थानच्या व ब्राह्मणबादच्या ( अघद लुहाणा ) राजांना मांडलिक बनवून ( लुहाणा लढाईत ठार झाल्यानें ) लुहाणाच्या राणीशींच लग्न लावलें. लुहाणा हा बौद्धधर्मी होता. हा पक्का हिंदुधर्मी होता. त्यामुळें यानें ब्राह्मणबाद राज्यांतील बौद्धधर्मीय लोकांचा दर्जा कमी होईल असे करडे हुकूम सोडले होते.

**चचिग**—हेमाद्रीचा बाप.

**चट्ट**—( चट्टय पाहा ).

२. पहिल्या षष्ठदेव कदंबाचें नामांतर.

**चट्टल कदंब**—( षष्ठदेव कदंब पाहा ).

**चट्टलदेवी**—ही गोव्याच्या कदंबांपैकीं पहिल्या विजयादित्याची पत्नी. हिचा पुत्र जयकेशिन्.

**चट्टय कदंब**—हा हानगळ कदंबांपैकीं आदित्यवर्मन्चा पुत्र. याचे स. ९७२–७३, १०१२चे लेख प्रसिद्ध झाले आहेत ( एपि. कर्ना. ८ सोरब ४५४–५५ ).

२. ( षष्ठदेव कदंब पाहा ).

**चतुर कल्लिनाथ**—हा विद्वान् ब्राह्मण विजयनगरच्या प्रतापदेवरायाच्या पदरीं होता. या राजानें स. १४५६–७७ पर्यंत राज्य केलें. या राजाच्या आज्ञेनें यानें संगीतरत्नाकर ग्रंथावर संस्कृत भाषेंत टीका लिहिली. याच्या टीकेशिवाय तो ग्रंथ लागणें कठीण आहे. याचा संगीतावर एखादा स्वतंत्र ग्रंथ असावा.

**चतुर साबाजी**—या पुरुषाबद्दल खात्रीलायक माहिती मिळत नाहीं. कांहीं बखरींत हा निजामशाहींत तर कांहींत आदिलशाहींत झाला असें म्हटलें आहे. तसेंच याच्या कालाबद्दलहि नक्की माहिती नाहीं. शहाजीच्या वेळीं हा झाला व शहाजी व मुरार जगदेव यांच्या विरुद्ध पक्षास हा होता. याला शहाजीची भरभराट पाहवली नाहीं व हा त्यामुळें मोंगलांस मिळाला वगैरे गोष्टी बखरींतून आढळतात. यानें नांव साबाजी अनंत चतुर असें होतें. यानें जमिनीची मोजणी करून उत्कृष्ट धारबंदी अंमलांत

आणली. याची मोजणीची काठी सात हातांची होती. यानें ओसाड जमिनी कौल देऊन लागवडीस आणल्या. रयतेस तगाई, जनावरें दिलीं. बिरबलप्रमाणें याच्या चतुरपणाच्या अनेक गोष्टी प्रचलित आहेत. महाराष्ट्रसारस्वतांत तर याला पेशवाईअखेरचा म्हटलें असून यानें रावणगर्वपरिहार वगैरे काव्यें केल्याचें लिहिलें आहे ( शिवप्रताप, शिवदिग्विजय, मराठी रियासत, महाराष्ट्रसारस्वत ).

हा ब्राह्मण मूळचा विजापूरचा होता. हा अकबराच्या पदरीं असे. यास अकबरानें 'पांडवांचें जसें महाभारत तसें माझेंहि लिही' असें सांगितलें. तेव्हां हा होकार देऊन घरीं आला. पुढें सहा महिन्यांनीं अकबरास भेटला. त्यानें महाभारताबद्दल विचारतां यानें एकांतांत भेट मागितली. भेटींत यानें विचारलें कीं, महाभारतांत द्रौपदीस पांच नवरे आहेत, त्याप्रमाणें आपणहि पांच इसमांचीं नांवें सांगावींत. तेव्हां त्यानें यास निरोप देऊन महाभारत लिहूं नको म्हणून सांगितलें.

हा शेणवी ब्राह्मण होता, असें लोकहितवादींनीं आपल्या ऐतिहासिक गोष्टींत लिहिलें आहे (आवृत्ति ति. पा. १६९).

याची बुद्धिमत्ता व विद्वत्ता अलोट असल्यामुळें यास चतुर सावाजी असें टोपण नांव पडलें ( रा. मा. चं. पृ. ६७ ). शेवटीं याचा खून झाला.

**चतुरसिंग गोसावी**—चतुरसिंग भोसले कांगोरीच्या किल्ल्यावर कैदेंत असतां त्यास सोडविण्याचे कित्येक प्रयत्न झाले. ह्यानें कांहीं रामोशी जमा केले आणि चतुरसिंग भोसले कैदेंतून पळाला अशी बातमी उठवून हा मुलखांत दंगा करूं लागला; आणि प्रचितगड, वसंतगड वगैरे किल्ले हस्तगत करून असा घाट रचिला कीं, बाजीरावास काढून छत्रपतींचे नांवाखालीं मराठमंडळ जमवून पुनः राज्याची नवीन व्यवस्था करावी परंतु बापू गोखल्यानें हा बंडावा मोडला. नंतर इंग्रजांनीं याच्याकडून प्रचितगड किल्ला घेतला ( म. रि. उ. वि. ३ पृ. ५१९ ).

**चतुरसिंग भोसले**—( मृ. स. १५-४-१८१८). याच्या वडिलांचें नांव त्रिंबकजी असें होतें. याच्या पत्नीचें नांव बबईसाहेब असें असून ती नारायणजी मोहिते याची कन्या होय. शाहूनें हें याचें लग्न साताऱ्यास ता. २६-११-१७८९ रोजीं केलें. यास बळवंत नांवाचा एक मुलगा होता. यशवंतराव होळकर दक्षिणेंत आला तेव्हां हा कांहीं काळपर्यंत त्यास सामील झाला होता. त्या वेळीं हा माने ( फत्तेसिंग ) याच्या तुकडीबरोबर पेशव्यांच्या मुलखास उपद्रव देत फिरत होता. पुढें यानें हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत नोकरी केली. हा कांहीं दिवस नागपुरास रघूजी भोसल्याकडे होता. त्यानें यास दरमहा पंधरा हजार रुपयांची नेमणूक करून दिली होती.

परशुरामभाऊंच्या सैन्यानें साताराचा किल्ला ताब्यांत घेतला तेव्हां हा आपले लोक जमवून पाठलाग होत असतांहि कसावसा कोल्हापूरच्या राजाकडे निसटून गेला. त्याच्या पाठलागावर असणारी रास्त्यांची व परशुरामभाऊंची फौज वारणा नदीच्या तीरावर तळ देऊन राहिली होती. कोल्हापूरकरांच्या मदतीनें छापा घालून रास्त्यांच्या फौजेचा यानें पूर्ण नाश केला; व परशुरामभाऊंचीहि फौज उधळून लावली ( परशुरामभाऊ पटवर्धन पाहा ).

पुढें यानें लपतछपत साताऱ्याजवळ येऊन तेथें ठेवलेल्या रास्त्यांच्या फौजेवर पुन्हां हल्ला केला व तीहि फौज उधळून लावली. या याच्या धाडसामुळें याला बरेच अनुयायी मिळाले. रास्त्यांच्या फौजेनें वेढलें असतां त्यांची फळी फोडून हा बाहेर पडला. या प्रयत्नांत याचे अर्धे अधिक लोक कामास आले. याचें धाडस व संकटांतून पार होण्याची शिताफी वाखाणण्यासारखी होती. पुढें अमृतरावाच्या पुत्रास पेशवाईचीं वस्त्रें देण्याच्या कामीं यानें बरीच खटपट केली होती. असेंहि येथें झालेल्या इंग्रजांच्या विरुद्ध लढाईंत हा मोठ्या शौर्यानें लढला. पुढें यानें होळकर, अमीरखान रजपूत यांच्या सैन्यांत थोडेथोडे दिवस नोकरी केली. स. १८१२ त त्रिंबकजी डेंगळ्यानें याला विश्वासघातानें कैद करून कोंकणांत रायगडानजीक कांगोरीच्या किल्ल्यांत ठेवलें. तेथेंच हा मरण पावला ( खरे-ऐ. ले. सं. पु. १०, ११ ).

यानें राज्यासाठीं कष्ट मेहनत करून लढाया फार केल्या. मराठेशाहीच्या अखेरीस झालेल्या पराक्रमी पुरुषांपैकीं हा एक होय. हा मराठेशाहीकरितां एकनिष्ठपणें शेवटपर्यंत मोठ्या हिकमतीनें लढला.

**चतुराजी गुहिलोत**—(मृ. स. १६७३ जुलै ता. ७) हा राजपुतान्यांतील मंडोरचा राहणारा. हा कृषिविद्येंत निष्णात होता. हा जोधपूरच्या जसवंतसिंग (पहिला) याच्याबरोबर काबूल येथें होता. याच्या मदतीनेंच जसवंतसिंगानें काबुली डाळिंबाचें बेणें मारवाडांत आणलें व त्यापेक्षांहि मिठासपणा त्यांत उत्पन्न केला. आजहि ते प्रसिद्ध आहेत. हा त्रेचाळीस वर्षांचा असतांना काबूल येथेंच मेला.

**चतुर्धराचार्य**—( नीलकंठ चतुर्धर पाहा ).

**चतुर्भुजदास**—एक हिंदी कवि. हा विठ्ठलनाथाच्या अष्टछाप मंडळापैकीं एक कवि होय. याचे द्वादशयश,

भक्तिप्रताप आणि हितजूकोमंगल असे तीन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. याच्या फुटकळ पदांचा संग्रह मिळतो.

**चतुर्वेदपृथूदकस्वामी**—( स. १०४० पूर्वी ) यानें ब्रह्मगुप्ताच्या ब्रह्मसिद्धांतावर टीका लिहिली आहे. भास्कराचार्यानें याचें नांव बरेच वेळां सांगितलें आहे. खंडखाद्यावर वरुणकृत टीका आहे. ती सुमारें शके ९६२ या वर्षाची आहे. तींत पृथूदकस्वामीचें नांव आलेलें आहे. यावरून हा शके ९६२ च्या पूर्वी झाला असावा हें सिद्ध होतें. ब्रह्मसिद्धांतावरील टीकेंत एके ठिकाणीं 'कन्यकुब्जेस्वनतभागाः' असें म्हटलें आहे. यावरून हा कान्यकुब्ज देशांतला किंवा खुद्द कनोजचा राहणारा असावा, असें दिसतें.

खंडखाद्यावर याची टीका असावी व तिचा कांहीं भाग पद्यात्मक असावा असें वरुणटीकेवरून दिसून येतें. यानें आपणास पृथुस्वामी म्हटलें आहे; तेव्हां यानें टीका करिते समयीं चतुर्थाश्रम घेतला होता कीं काय याविषयीं शंका येते ( भा. ज्यो. ).

**चत्तरस सिंद**—( स. ११०६ राज्यारोहण ) बेलगुट्टीचा राजा.

**चन्नदेवी**—( चन्नमादेवी ) विजयनगरच्या आरविडु घराण्यांतील तिरुमल्लाची दुसरी बायको. तिरुमल्लाच्या राज्याभिषेकाच्या वेळीं हीच हजर होती.

**चन्नप्पा**—संगमवंशांतील चेन्नप्पाचें नामान्तर.

**चन्नबसव**—( स. ११६० नंतर ) लिंगायत धर्माचा संस्थापक प्रख्यात बसवाचा हा भाचा. बसवानें काढलेल्या वीरशैव धर्माची यानें पूर्णपणें स्थापना केली. या चन्नबसवाचेंहि एक पुराण आहे. त्यांत कैलासदर्शन, नारददर्शन, चन्नबसवजन्म, जन्मोत्सव वगैरे अनेक तऱ्हांची माहिती दिली आहे.

नागलंबिकेनें गुरूची पूजा केली व प्रसाद भक्षण करून ती बिछान्यावर पडली. इतक्यांत महेश्वर तिजपुढें आविर्भूत होऊन त्यांनीं तिच्या उदरांतून वीरशैव लिंगायत धर्माचा प्रस्थापक जन्मणार आहे असें सांगितलें. हा घडलेला प्रकार तिनें सर्व बसवप्रधानास सांगितला, तो जाहीर केला. तेव्हां लोक बसवप्रधानाविषयीं निंदा करूं लागले; व राजास देखील हें कळल्यावर त्यानें नागलंबिकेस समक्षच भेटण्याचा विचार केला. परंतु पोटांतून गर्भानें हुंकार देऊन तिच्या व स्वतःच्या दिव्यत्वाबद्दल खात्री दिली. परंतु एवढ्यानें त्याचें समाधान झालें नाहीं. तेव्हां नागलंबिकेनें उदर फाडून दाखविलें तेव्हां एक दिव्य व तापस वेषधारी कुमार बाहेर पडला. तेव्हां राजाची खात्री होऊन त्यानें त्या बालकाची स्तुति केली. नंतर पालखींतून या बालकाची मिरवणूक काढली; व त्यानें लिंगायत लोकांबरोबर भोजन वगैरे केलें. रात्रीं नागलंबिका झोंपीं गेली असतां महेश्वर व पार्वती यांनीं बालकाचें जातकर्म करून 'चन्नबसव' असें याचें नामाभिधान ठेवलें; व त्याच्याजवळ सुवर्णकलश व पाळणा ठेवून ते नाहींसे झाले.

चन्नबसवास सर्व शास्त्रें आपोआप प्राप्त झालीं. याचें दिव्य सामर्थ्य पाहून प्रधानानें याजकरितां दिव्य राजवाडा बांधला; व त्यांत चन्नबसव यास ठेविलें. बसवानें शिवतत्त्व जाणणारे सहा द्वाररक्षक सहा द्वारांवर ठेवून नित्य हजारों जंगमांचा यथास्थितपणें सत्कार केला. यानें अनेक वेळां राजास व प्रधानास संकटकाळीं योग्य सल्ला देऊन त्यांच्या संकटांचें निवारण केलें. तसेंच अनेक गरिबांचे यानें उत्तम आशीर्वाद घेतले. याच्या पुराणांतील १० प्रकरणें मुख्य आहेत ( रॉयल ए. सो. पु. ३ ).

**चन्नम्मा**—ही धारवाडच्या जवळ असणाऱ्या कित्तूर गांवची एक शूर स्त्री. ही कित्तूर-चन्नम्म या नांवानें प्रसिद्ध आहे. हिनें शिवाजीला पकडून नेलें होतें अशी कर्नाटकांत प्रसिद्धी आहे. हिचे पोवाडे तिकडे अद्यापि गातात. याचप्रमाणें कित्तूरची रुद्रम्म व बेळवडीची मल्लम्म याहि स्त्रिया कर्नाटकांत शूर म्हणून प्रसिद्ध आहेत.

**चमरिपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं चौदावा सिद्ध होय. हा जातीनें चर्मकार असून विष्णुनगर ( पूर्वदेश ) या देशांतील राहणारा होता. याच्या वेळेस महीपाल नांवाचा राजा होता ( स. ९७४–१०२६ ). हा जालंधरचा शिष्य. यानें प्रज्ञोपाय-विनिश्चय-समुदय हा ग्रंथ लिहिला.

**चरक**—चरक आणि पतंजलि एकच असें चक्रपाणि दत्त टीकेंत, योगवार्तिकांत विज्ञानभिक्षु, पातंजलसूत्रवृत्तीच्या प्रारम्भीं भोज, मञ्जुषेंतील आप्तलक्षणावर नागेशभट्ट, भावमिश्र, इत्यादि आधारांवरून गणनाथसेन प्रत्यक्षशारीराच्या उपोद्घातांत म्हणतात ( सुश्रुत पाहा ).

**चरणदास**—(स. १७०२-१७८१ ) एक हिंदी कवि व संप्रदायप्रवर्तक. हा राजपुतान्यांतील दोहरा गांवीं जन्मला. याचें मूळचें नांव रणजितसिंह असून याच्या पित्याचें नांव मुरलीधर आणि आईचें नांव कुंजो असें आहे. शुकदेव हा याचा गुरु. सात वर्षांचा असतांना यानें घर सोडलें व दिल्लीला येऊन आपल्या आजोबाच्या घरीं राहिला. एकोणिसाव्या वर्षी याला वैराग्य प्राप्त झालें. त्या वेळीं याचे बावन्न शिष्य होते; व अनुयायी तर हजारों

होते. याच्या शिष्यांमध्यें सहजोबाई आणि दयाबाई या दोघीजणी फार प्रेमळ होत्या. या दोघीजणी याची सेवा फार उत्तम तऱ्हेनें करीत असत. या दोघींनीं कविता केल्या असून ' बानी ' नांवानें त्या प्रसिद्ध आहेत. याचे ' ज्ञानस्वरोदय ' आणि ' चरनदासकी बानी ' या नांवांनीं दोन ग्रंथ उपलब्ध आहेत. हा वयाच्या ७९ व्या वर्षी दिल्ली येथें मरण पावला ( क. कौ. भा. १ ). हा विद्वान् गृहस्थ वैश्य होता. लोकांस उपदेश करूं लागल्यावरून याचा वैष्णवांत एक निराळाच पंथ झाला ( मु. रि भा. २, पृ. १५८ ).

**चरितवर्मा**—सिनचिउ नांवाच्या चिनी प्रवाशानें हिंदुस्थानांत धारण केलेलें नांव.

**चर्पटीनाथ**—गोरक्षनाथाचे शिष्य. याच्या पित्याचें नांव सुदर्शन व आईचें नांव लीलावती होय. हा जलक्रीडा करीत असतां पाण्यांत बुडाला असतां गोरक्षनाथानें यास वांचविलें. तेव्हां हा त्याचा शिष्य बनला; व पुढें मोठा योगी बनला.

**चर्पटीपा**—चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं एक. यालाच पचरिपा असेंहि म्हणतात. जात-कहार. चंपादेशचा राहणारा. हा मीनपा याचा गुरु होय. यानें चतुर्भूतभयाभिवासन क्रम ( तं. ४८।८५ ) हा ग्रंथ लिहिला आहे.

**चलीबी रुमीखान**—अहमदनगरच्या हुसेन निजामशहाच्या तोफखान्यावरील मुख्य. एक सरदार.

हा आशियामायनरांतील राहणारा असून, युरोपांतील लष्करी खात्यांत तोफखान्याचें काम शिकून निपुण झाला होता ( मु. रि. भा. १ पृ. २४४; ३०१; ३०२ ).

**चवरि**—यालाच जवरि किंवा अजपालिपा असें म्हणतात. हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं चौसष्टावा सिद्ध. हा जातीनें कृष्णघृतवणिक् होय. हा मगधदेशचा राहणारा. हा कण्हपाच्या तिसऱ्या पिढीपैकीं होय.

**चव्हाण**—उत्तरहिंदुस्थानांतल्या घराण्याबद्दल लिहितांना हा शब्द चौहान असा लिहिलेला असतो. त्यांची वंशावळ वेगळी उपलब्ध आहे ( पृथ्वीराज चाहौन पाहा ).

महाराष्ट्रांतील प्रसिद्ध चव्हाण घराणें:—

१ राणोजी, २ विठोजी ( हिंमतबहादूर ) ही पदवी शा.श. १६१० विभव स. १६८८ बेंगळूरच्या लढाईंत मृत्यु. उदाजी चव्हाण ( स. १६९६–१७६२ ); विठोजी व प्रतीराव हे सर्वच पुरुष महत्त्वाचे आहेत ( काव्येतिहाससंग्रह पत्रें, यादी वगैरे ले. ९ ).

**चष्टन क्षत्रप**—(स. १२५–१३०) ध्सामोतिक (जामोतिक) चा पुत्र. याचीं बरींच नाणीं मिळालीं आहेत व कांहीं नाण्यांवर याला महाक्षत्रपहि म्हटलें आहे. पण याच्या पूर्वी होऊन गेलेल्या नहपान क्षत्रपाशीं याचा काय संबंध होता हें सांगतां येत नाहीं. मात्र नहपानानें घालविलेला बहुतेक प्रांत यानें परत मिळविला. याचा पुत्र जयदामा हा याच्या हयातींतच मेला. त्यामुळें जयदामाचा पुत्र रुद्रदामा हा याच्यानंतर गादीवर आला.

**चंगीझखान**— ( जन्म स. ११६३;–मृत्यु स. १२२७ ) हा अत्यंत पराक्रमी निघाल्यामुळें मोगलांचा खरा इतिहास याचेपासूनच सुरू झाला आहे. याच्या जन्मापूर्वी म्हणजे सुमारें दहाव्या शतकापर्यंत मोगल हें नांव सुद्धां कोणास ठाऊक नव्हतें. तेव्हां हे लोक चीनची प्रजा म्हणून राहत असत. यांचा पहिला सरदार चीनपासून स्वतंत्र होऊन सन ११७५ मध्यें मरण पावला. त्या वेळीं त्याचा तेमुजिन नांवाचा मुलगा फक्त तेरा वर्षांचा होता. परंतु हाच मुलगा फार पराक्रमी निघाल्यावर त्यानें सन १२०६ मध्यें मोगलांची प्रचंड सभा भरवून चंगीझखान हें मोठें नांव धारण केलें. आरंभींआरंभीं यानें तार्तार लोकांच्या निरनिराळ्या टोळ्यांस जिंकून आपलें बळ वाढविलें, व मग फार मोठी फौज तयार करून तिला कवायत वगैरे शिकविली, आणि पुढें या फौजेच्या जोरावर हा भराभर देश जिंकीत चालला. सन १२१० पर्यंत पूर्वेस पूर्वसमुद्र, पश्चिमेस कास्पियन समुद्र व उत्तरेस व्होलगा नदी, इतका प्रदेश यानें सहज जिंकिला; आणि नंतर याची दृष्टि दक्षिणेकडे वळली व लागलीच बुखारा, काबूल, कंदाहार, खुरासान हे प्रांत यानें सर केले. यानंतर यानें आपला मोर्चा इराणाकडे वळविला व तो देशहि हस्तगत केला. त्या वेळीं याशीं टक्कर देण्याचें सामर्थ्य काय तें चीनलाच होतें. म्हणून एकदां चीनवर स्वारी करण्याचें मनांत आणून हा चीनची प्रचंड भिंत ओलांडून आपल्या फौजेसह चिनांत एकदम शिरला व यानें पेकीन राजधानी काबीज केली आणि चीनचा उत्तर भाग आपले राज्यास जोडून दिला. तिकडे यूरोपखंडांतहि जमिनीवर जितकें दूरपर्यंत जातां येईल तितकें दूरपर्यंत याचें सैन्य मुलूख काबीज करीत गेलें. अफगाणिस्तानांत खारिजम् प्रांतावर सेल्जुक सुलतान मुहंमद हा राज्य करीत होता. त्याच्या ताब्यांत अरबस्तान, तुर्कस्तान, इराण हे देश मोडत असत. तत्कालीन पद्धतीप्रमाणें याचें राज्य बरेंच सुधारलेलें असल्यामुळें चंगीझखानाच्या रानटी टोळधाडीचा आपणांस उपद्रव होण्याची त्यास मुळींच भीति वाटत नव्हती, व म्हणून त्यानें चंगीझखानाच्या लोकांस आपल्या राज्यांत [illegible] नाकारिलें.

यावरून यानें आपले वकील सेल्जुक सुलतान मुहंमदाकडे पाठविले व नुकसानभरपाईची मागणी केली. सेल्जुकनें उलट त्या वकिलांचाच शिरच्छेद केला व याशीं लढण्यास आपली फौज एक लाखपर्यंत वाढवून जय्यत तयारी ठेविली. ही बातमी समजतांच यानें सात मुलांस बरोबर घेऊन सात लाख फौजेसह सेल्जुकवर स्वारी केली, व त्याशीं भयंकर युद्ध करून त्याचा पूर्णपणें पराजय केला. हा अत्यंत शूर, धाडसी आणि महत्त्वाकांक्षी होता. याच्याइतका बलाढ्य, क्रूर व निर्दय मनुष्य कोणीच झाला नसेल. हा एक मूर्तिमंत राक्षसच होता, असें म्हटलें तरी चालेल. याच्या लष्कराएवढें मोठें लष्कर पृथ्वीवरील कोणाहि एका राजाच्या ताब्यांत आजपर्यंत नव्हतें. या लष्कराच्या जोरावर यानें जवळ जवळ सगळें जग जिंकिलें. याच्या राज्याची लांबी साडेपांच हजार मैल व रुंदी तीन हजार मैल होती. म्हणजे याच्या राज्यांत हिंदुस्थानासारखे पांच देश सहज सामावतील. हा इतका अडाणी होता कीं, विद्येचा व धर्माची चेष्टा करी. आशिया खंडांतील अत्युत्तम पुस्तकालयांतील पुस्तकांचा उपयोग यानें आपल्या घोड्यांकरितां मऊ बिछाने करण्याकडे केला. एकदां यानें बायबलांची होळी केली. बुखाऱ्याच्या मशिदींत कुराणहि यानें घोड्याकडून तुडविलें. 'अग्निप्रलय पुरवला, पण चंगीझखानाची धाड नको,' असें लोकांना झालें होतें. हिंदुस्थानावर मात्र यानें स्वारी केली नाहीं; कारण याला तशी सवडच मिळाली नाहीं.

हा स. १२२७त कास्पियन समुद्राचे कांठीं मरण पावला. हा मेल्यानंतर याच्या आत्म्याच्या सेवेला कोणीतरी पाहिजे म्हणून त्या वेळीं चाळीस कुमारिकांना बळी देण्यांत आलें! असें सांगतात कीं, आपल्या आयुष्याच्या शेवटच्या वीस वर्षांत यानें एकंदर एक कोटी चाळीस लक्ष माणसांची कत्तल केली. यानें मरणसमयीं आपलें राज्य ओक्ताईखान, तुलुईखान, जूजीखान आणि झगताईखान अशा आपल्या चारहि मुलांस वांटून दिलें. याच्या मृत्यूनंतर बरोबर तीनशें वर्षांनीं पानिपतच्या लढाईंत विजय होऊन हिंदुस्थानावर मोगलांचें राज्य स्थापन करणारा बाबर हा बापाकडून तैमूरलंगाचा व आईकडून याच चंगीझखानाचा वंशज होता, म्हणून त्याच्या राज्यास मोगली राज्य म्हणतात.

**चंडश्री शातकर्णि**—( स. २०८-११ ) आंध्रांपैकीं एक राजा. याला चंद्र असेंहि म्हणत ( Bhand. p. 50 ).

**चंडीदास**—हा साहित्यदर्पणकार विश्वनाथाच्या पितामहाचा म्हणजे नारायणाचा कनिष्ठ बंधु होता. यानें काव्यप्रकाशावर टीका लिहिली आहे.

२. एक बंगाली कवि. याचा जन्म बीरभूमि जिल्ह्यांतील छटना गांवीं झाला. हा आणि विद्यापति समकालीन होते. हा लहानपणींच नन्नुरा गांवीं जाऊन तेथें एका बाकुली देवीच्या मंदिरांत पुजारी राहिला. याचें घर पडक्या स्थितींत अद्यापपर्यंत आहे, पण मंदिर मात्र नवीन बांधलें गेलें आहे.

हे प्रेमाचे फार वेडे होते. पूर्व बंगाल्यांतील विलक्षण स्वभावाचे मनुष्यास 'चंडीदास' या नांवानें संबोधितात. यांचें प्रेम रामी नांवाच्या एक परटिणीवर बसलें. समाजाची आणि बांधवजनांची पर्वा न करितां यांनीं रामीवर आमरण प्रेम केलें. रामीवर यांचें निस्सीम प्रेम होतें.

हें याचें वागणें त्या वेळच्या कट्टर ब्राह्मणसमाजाला नापसंत वाटून त्यांनीं याला बहिष्कृत केलें. तेव्हां याचा भाऊ नकुल यानें याला पुन्हां आपल्या जातींत घेण्याचा प्रयत्न केला. त्या वेळीं मात्र रामीवर प्रेम न करण्याची व तें सोडण्याची याला प्रतिज्ञा करावी लागली. पण जेव्हां हें वर्तमान रामीस कळलें तेव्हां ती दुःखित होऊन व लोकलज्जा सोडून याच्या पुढें येऊन उभी राहिली. आपल्या हृदयेश्वरीला पाहिल्यावर याला आपल्या प्रतिज्ञेचा विसर पडून हा तिच्या आराधनेंत तल्लीन झाला. तिच्या रूपामध्यें चतुर्भुज कालीचें दर्शन पुष्कळ सज्जन लोकांना झालें असें म्हणतात.

चंडीदास ब्राह्मण होता आणि रामी परटीण होती. प्रेमाचे राज्यांत जातगोत, उच्चनीच, यांचा प्रश्नच उद्भवत नाहीं, असें हे म्हणत. यांचें प्रेम निःस्वार्थी आणि पवित्र होतें. यांचा मृत्यु फार शोकजनक झाला. घराची तुळई डोक्यावर पडून हे मृत्यु पावले.

यांच्या कवितेचा प्रधान विषय म्हटला म्हणजे राधाकृष्णाचें प्रेम हा होय. यामध्यें पूर्वराग, शयन, अभिसार, सम्भोग हे सर्व आले आहेत. या गाण्यांत यांच्या हृदयाचे खरे उद्गार आहेत ( क. कौ. भा. ७ ).

**चंडेश्वर**—( स. १३१४ सुमार ) ह्याचा 'स्मृतिरत्नाकर' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. या ग्रंथाचे कृत्य, दान, व्यवहार, शुद्धि, पूजा, विवाद आणि गृहस्थ असे सात विभाग केलेले आहेत. सध्यांच्या तिर्हुत प्रांतांत चंडेश्वराच्या व्यवहाररत्नाकर यास हिंदु कायद्याचे बाबतींत अग्रस्थान मिळालेलें आहे. 'कृत्य-रत्नाकर' मध्यें

धार्मिक माहिती आलेली आहे. ' गृहस्थरत्नाकर ' यामध्यें गृहस्थाश्रमाविषयीं सर्व माहिती दिलेली आहे. ' दानरत्नाकरामध्यें ' दान करण्याचीं साधनें, कोणत्या प्रकारें दान, महादान करावें वगैरे सर्व प्रकारचे दानांविषयीं वर्णन आलेलें आहे. ' व्यवहाररत्नाकर ' मध्यें दायभागाचें वर्णन केलेलें आहे. शिवाय यामध्यें न्यायाविषयींहि माहिती दिलेली आहे. आणि ' शुद्धिरत्नाकरा ' मध्यें आशौच ( जननाशौच, मृताशौच) याविषयीं माहिती आलेली आहे. कृत्यचिंतामणी हाहि याचाच ग्रंथ होय. ह्याशिवाय राजनीतिरत्नाकर, दानवाक्यावली, शिववाक्यावली आणि शैवमानसोल्लास असे ग्रंथ यानें लिहिलेले आहेत. ' राजनीतिरत्नाकर ' यामध्यें राजाची व्याख्या, राजाचे निरनिराळे अधिकार, न्यायाधीशाचे अधिकार, सैन्य, खजिना, सेनापति, किल्ले, शत्रू, राजधोरणें, हेर वगैरे सर्व गोष्टींचा उल्लेख केलेला आहे. यानें आपल्या ग्रंथामध्यें पुष्कळ ग्रंथकारांचा आणि त्यांच्या ग्रंथांचा उल्लेख केलेला आहे.

हा वीरेश्वराचा पुत्र होय. कर्मादित्य, देवादित्य, वीरेश्वर, चंडेश्वर असा याचा वंशक्रम आहे. हा आपल्या बापाप्रमाणें व आजोबाप्रमाणें हरिसिंहदेव राजाचा मंत्री होता. युद्धमंत्री असल्याकारणानें यानें नेपाळप्रांत जिंकला. यानें आपली सुवर्णतुला वाग्वती नदीच्या तीरावर केली. हा आपणास महाराजाधिराज असें म्हणवून घेत असे. हा युद्धमंत्री असून मुख्य न्यायाधीश होता. यानें बऱ्याच मुसलमानी सरदारांचा पराभव केला असावा. याचा वचक बंगाली ग्रंथकारांवर चांगलाच बसला होता. मिश्रमिश्र, वर्धमान, वाचस्पतिमिश्र, आणि रघुनन्दन ह्या सर्व बंगाली ग्रंथकारांनीं याचा वारंवार उल्लेख करून याच्या ग्रंथांतून कांहीं उतारे घेतले आहेत. वीरमित्रादय, रत्नाकर ग्रंथास पौरस्त्य-निबंध असें म्हणतो.

**चंदन**—( कविताकाल स. १७६२–९२ ) एक हिंदी कवि. हा एक बंदीजन असून नाहिलपुवायाँ ( जि. शहाजहाँपुर ) येथील राहणारा होय. हा गौड राजा जो केशरी त्याच्या पदरीं होता.

यानें ' शृंगारसागर ', ' काव्याभरण ', ' कल्लोलतरंगिणी ' असे तीन ग्रंथ लिहिले आहेत. यांशिवाय यानें केसरीप्रकाश, चंदनसतसई, पथिकबोध, नखशिख, नाममाला ( कोश ), पत्रिकाबोध, तत्त्वसंग्रह, शीतवसंत, ( कहानी ) कृष्णकाव्य, प्राज्ञ-विलास असे एकंदर दहा ग्रंथ लिहिले आहेत.

याच्या फुटकळ कवितासुद्धां याच्या ग्रंथाइतक्या प्रसिद्ध आहेत. हा फार्शी भाषेंतील एक उत्तम शाहीर होता. याचा फार्शी भाषेंतील ' दीवानेसंदल ' नांवाचा ग्रंथ कांहीं ठिकाणीं पाहावयास मिळतो.

**चंदनदास**—नंदराजाचा राक्षस नांवाचा प्रधान होता, त्याचा हा मित्र. एक सावकार (मुद्राराक्षस नाटक).

**चंदना**—ही महावीराची पहिली श्रमणा ( शिष्यीण ) होय. महावीराला केवलीज्ञान प्राप्त झाल्यावर ही त्याची सेविका झाली.

जेव्हां हिच्या बापाची आणि शतानीक राजाची लढाई चालू होती, तेव्हां कांहीं चोरांनीं हिला पळवून एका धनावह नांवाच्या सावकारास विकली. त्या सावकारानें हिचें पूर्वीचें नांव वसुमती होतें तें बदलून चंदना किंवा चंद्रबाला नांव ठेविलें. पुढें लवकरच सावकाराची बायको मूला ही चंदनाचा द्वेष करूं लागली. द्वेषाचें रूपांतर शेवटीं इतकें झालें कीं मूलानें हिचे केस कापले. तेव्हां तशा परिस्थितींत हिनें महावीराचे येथें स्वयंपाकिणीचें काम केलें व शेवटीं त्याची सेविका बनली.

**चंदरभान**—( मृत्यु स. १६६? ) पतियाला संस्थानांतील हा ब्राह्मण असून तेथलाच रहिवासी होता. दारा शुकोहच्या पदरीं हा मुन्शी म्हणून होता. यानें फार्शी भाषेंत बरीच ग्रंथरचना केली आहे. ' गुलदस्त ', 'तुहफत्-उल-अनवार', 'तुहफत्-उल-फस्-हा', 'जम्मा-उल-फक्रा,' हे याचे प्रमुख ग्रंथ होत. 'चारचमन' व ' मन्सात ब्राह्मण' या दोन पुस्तकांत यानें लिहिलेल्या पत्रांचा उल्लेख आहे. ' ब्राह्मण ' या टोपण नांवाखालीं यांनीं कित्येक वेळां काव्य रचिलें आहे.

बापाचें नांव रावणेन व गुरूचें नांव गुरुप्रसाद असें होतें. हा जालंदरी ( जालपा ) देवीचा उपासक होता. याला दोन बायका होत्या. एकीचें नांव कमला व २ री गौरी. याला २० मुलगे आणि एक मुलगी अशीं २१ अपत्यें होतीं. उपनांव राजोरा.

**चंदवरदाई**—हा एक हिंदी कवि होय. यानें ' पृथ्वीराजरासो ' नांवाचें महाकाव्य केलें.

हा हिंदु सम्राट् पृथ्वीराज चौहानाचा सामंत असून शिवाय राजकवि होता. हा ब्राह्मण ( भट्ट जातीचा ) असून याचें गोत्र जगात ( राव ) असें होतें. याचे पूर्वज पंजाबांत राहत असून याचा जन्म लाहोर येथें झाला. हा व महाराज पृथ्वीराज हे दोघे एकाच दिवशीं जन्मले व एकाच दिवशीं मेले, असें म्हणतात. हा षड्भाषा, व्याकरण, काव्य, साहित्य, छंदःशास्त्र, ज्योतिष, पुराण, नाटक, वैद्यक इत्यादि अनेक विद्यांत प्रवीण होतो. याचें व पृथ्वी-

राजाचें जीवन इतकें एक झालें होतें कीं हा युद्धामध्यें, सभेमध्यें, यात्रेमध्यें वगैरे सर्व ठिकाणीं महाराजांबरोबर असे.

याचा पृथ्वीराजरासो हा ग्रंथ २००० पानांचा असून त्याचे ६९ अध्याय आहेत. हा ग्रंथ याचा मुलगा जाल्हन यानें पुरा केला, असा उल्लेख त्याचा ग्रंथांत आलेला आहे. यानें प्राचीन प्रचलित असलेल्या सर्व छंदांमध्यें कविता केल्या आहेत. हा ग्रंथ ऐतिहासिक नसून काव्यग्रंथ आहे, आणि सनाच्या सोळाव्या शतकांत पुरा झाला, असें कांहीं विद्वान् लोक म्हणतात. या ग्रंथांत ऐतिहासिक वर्णन नसून भाटांच्या कल्पनांचें वर्णन आहे, असें रायबहादुर पंडित गौरिशंकर ओझा म्हणतात. या ग्रंथांत व्याकरणाकडे दुर्लक्ष केलेलं आहे.

यानें पृथ्वीराज राजाचें संपूर्ण चरित्र आपली बायको गौरी हिला सांगितलें. ज्याप्रमाणें तुलसीदास 'चौपाई'-विषयीं प्रसिद्ध आहे, त्याप्रमाणें हा 'छप्पय'विषयीं फार प्रसिद्ध आहे.

याच्या 'रासो' (पृथ्वीराजरासो) मधील काव्यरस-रूपी पुष्प इतकें मनोहर आहे कीं त्याचा वास घेतला असतां मन अगदीं तल्लीन होऊन जातें. या ग्रंथामध्यें वीर आणि शृंगार-रसयुक्त कविताहि पुष्कळ आहेत. याची भाषा समजण्यास सोपी असून ती ज्याला संस्कृत व राजपुतानी भाषेचें चांगलें ज्ञान आहे त्यालाच समजते.

शहाबुद्दीन घोरीशीं झालेल्या अखेरच्या लढाईंत पृथ्वीराज कैद केला जाऊन घोरीनें त्याला गझनीस नेलें, तेव्हां हाहि पृथ्वीराजाच्या बरोबर गझनीस गेला. शहाबुद्दीन घोरीच्या मरणानंतर दोघांनींहि आपापल्या हातांनीं आपआपला नाश केला असें इतिहास सांगतो.

याची एक दंतकथा सांगण्यांत येते ती अशीः—हा गझनीस गेला असतां एके दिवशीं शहाबुद्दीनास पृथ्वीराजाच्या शब्दवेधाची व निशाणबाजीची गोष्ट यानें सांगितली. शहाबुद्दीनानें एकावर एक सात तवे बांधून त्यांवर खडे मारले. पृथ्वीराजानें त्या आवाजाच्या अनुरोधानें सातहि तवे फोडले (कारण पृथ्वीराजाचे डोळे काढले होते). शेवटल्या तव्याच्या वेळीं शहाबुद्दीननें 'शाबास' असा शब्द उच्चारला. त्याबरोबर पृथ्वीराजानें त्या शब्दाच्या रोखानें बाण मारून शहाबुद्दीनाचें डोकें उडविलें. या वेळीं चंदानें प्रसंगावधान राखून पळून जाण्याचा विचार केला, परंतु तो न साधून शेवटीं परस्परांनीं परस्परांचा शिरच्छेद केला (बील).

**चंदासाहेब**—(मृत्यु स. १७५२ जून ३) याचें खरें नांव हुसेन दोस्तखान असें होतें. हा कर्नाटकच्या दोस्त अली नांवाच्या नबाबाचा जांवई होता. हा नबाबाची दिवाणगिरी पाहत असे. हा मूळचा गरीब, महत्त्वाकांक्षी, हुशार व धाडशी होता. याला शत्रू फार होते. म्हणून यानें आपलें संधान फ्रेंचांशीं अगोदरच बांधून ठेवलें होतें.

यानें त्रिचनापल्लीच्या राणीस मदत करण्याच्या मिषानें चिनाणापल्ली आपल्या ताब्यांत घेतली. रघूजीनें नबाबावर स्वारी करून त्यास लढाईंत ठार मारलें. या वेळीं हा सासऱ्याच्या मदतीस मुद्दामच गेला नाहीं. पुढें रघूजीस खंडणी देऊन दोस्तअलीचा मुलगा सफदरअली यानें तह केला. तो चंदासाहेबाचा द्वेषी नव्हता, पण चंदासाहेबानें आपल्या बापास मदत न केल्यामुळें त्याला याच्याविषयीं द्वेष वाटूं लागला. चंदाचा नाश करण्यास त्यानें रघूजीस सांगितलें. त्याप्रमाणें रघूजीनें त्रिचनापल्लीस वेढा दिला; व तीन महिन्यांनीं त्यानें चंदासाहेबास कैद केलें (२६ मार्च १७४१). व याच्या थोरल्या भावास लढाईंत ठार केलें. चंदासाहेब सात वर्षें कैदेंतच होता. पुढें डुप्लेनें सात लाख रु. दंड भरून चंदास सोडविलें; व अन्वरुद्दीनवर स्वारी करून अर्काटची गादी यास मिळवून दिली. याबद्दल डुप्लेस यानें पाँडेचरीजवळ ८१ गांवें दिलीं.

पुढें अन्वरुद्दीनाच्या दुसऱ्या मुलानें इंग्रजांची मदत घेऊन त्रिचनापल्ली काबीज केली. तेव्हां चंदानें त्रिचनापल्लीस वेढा दिला. परंतु हा वेढा उठविण्यासाठीं क्लाइव्हनें अर्काट येथें वेढा घालून तें घेतलें. तेव्हां यानें आपला मुलगा राजासाहेब यास अर्काट घेण्यास पाठविलें, परंतु त्याची डाळ शिजली नाहीं. पुढें मुहमंदअल्लीनें चंदास कोंडलें; तेव्हां चंदा आणि फ्रेंच यांचा पुरा पाडाव झाला. चंदा निसटून जात असतां मानाजी जगतापानें विश्वासघात करून यास ठार मारलें; व याचें शिर मुहमंदअल्लीकडे पाठवून दिलें (३ जून १७५२).

**चंदुक**—मंदोरच्या प्रतिहारवंशांतील यशोवर्धनाचा पुत्र. याचा पुत्र शीलुक.

**चंदुपंडित**—(स. १२९७) हा श्रीहर्षाच्या 'नैषधीयचरित' या ग्रंथाचा टीकाकार होय. यानें आपल्या टीकेंत आनंदबोधाच्या न्यायमकरन्द ग्रंथांतील कांहीं उतारे घेतले आहेत. यानें आपली टीका स. १२९७ मध्यें लिहिली.

**चंदुलाल**—(मृत्यु स. १८४५) निजामाचा दिवाण. जात कायस्थ खत्री. राजा किसनप्रसाद हे चंदुलालचे वंशज होत. याला गोविंदबक्ष नांवाचा एक भाऊ होता. हे दोघेहि सर्वथैव रेसिडेंटाच्या तंत्रानें चालत. स. १८०८ मध्यें दिवाण मीर आलम मरण पावला. तेव्हां मुनीरुल्मुल्क यास नांवाची दिवाणगिरी देऊन कच्चा कारभार

यानें करावा, असें ठरलें. यानें निजामशाहीचा कारभार स. १८०८ पासून १८४३ पर्यंत ३५ वर्षे केला. इंग्रज रेसिडेंटाच्या कलानें वागून यानें शक्य तितक्या सुधारणा केल्या. यानें ता. ६-९-१८४३ त राजीनामा दिला व त्यानंतर हा ता. १५-४-१८४५ रोजीं मरण पावला. याला दररोज १ हजार रुपये तनखा होता ( म. रि. उत्तर वि. ३, पृ. ३६६-६७ ).

याच्या पश्चात् याचा पुतण्या राजाराम बक्ष यानें निजामशाहीचा कारभार कांहीं दिवस केला.

**चंदेल्ल घराणें**—( नन्नुक चंदेल्ल पाहा ).

**चंद्र**—( स. ६३७-४४ ) सिंधचा राजा. आरोर शहराजवळील एका खेड्यांतील देवळांत राहणाऱ्या कर्मठ व दरिद्री ब्राह्मणाचा चंद्र हा मुलगा व सिंधुराजा साहसीच्या मृत्यूनंतर सिंधमध्यें ब्राह्मणी राजवंश स्थापन करणाऱ्या चचाचा भाऊ. चचानें सिंधचें राजपद मिळवून आपली सत्ता सिंधमध्यें प्रस्थापित केल्यावर राज्यविस्ताराचें हेतूनें दौऱ्या-वर जाण्याची तयारी केली व राजपालकत्वाच्या कामावर याची नेमणूक करण्याचें ठरविलें. चंद्र हा कर्मठ व विरक्त ब्राह्मण होता. याच्या पेशास अनुचित असें राजशासनाचें काम पत्करण्यास यानें तयार व्हावें म्हणून चचानें खालील पत्र लिहिलें: 'आपलें घराणें विरक्त संन्यासमार्गीयांचें आहे हें खरें. या घराण्याची अग्निहोत्रादि ब्रह्मकर्मनिष्ठाहि सुप्रसिद्ध आहे. पण नैष्कर्म्यव्रताचें आचरण करणाऱ्यास राजकुलांत जन्म येतो किंवा राजवैभव प्राप्त होतें. आपल्या कुलदैवतानें आपल्या वडिलांच्या पुण्याईमुळें आपणास राजपद दिलें आहे. आपण राजपालकाचें काम स्वीकारल्यास हें काम करीत असतां आपलीं धार्मिक कृत्यें, अनुष्ठानें, व्रतेंवैकल्यें पूर्ववत् करण्यास प्रत्यवाय येणार नाहीं.' चंद्रानें प्रथम नकारच दिला, तरी चचानें आग्रहपूर्वक अलोरला आणून यास राज्यपालक केलें.

चचाचे मृत्यूनंतर हाच राजा झाला. यानें ब्राह्मण-धर्मास प्रोत्साहन दिलें व हिंदु आचारविचारांस चांगलें वळण लाविलें. हा संन्याशी वृत्तीचा ब्राह्मण असल्या-मुळें राज्यकारभार चांगला चालविला तरी युद्धांत हा टिकाव धरूं शकणार नाहीं अशा समजुतीनें सिविस्थान व कनोजच्या राजांनीं सिंधवर स्वारी केली. देवधनुष किल्ल्याजवळ येऊन त्यांनीं तेथें तळ दिला व देवधनुष ताब्यांत घेऊन यास शरण येण्यास पत्र लिहिलें. पण यानें युद्धाची तयारी केली व दाहीर व दाहरसीय या दोघां पुतण्यांच्या मदतीनें शत्रूंचा पराभव केला. चंद्र स्वतः जातीनें लढला. चंद्रानें ७ वर्षें राज्य केलें.

२. एक व्याकरणकार ( चंद्रगोमिन् पाहा ).

३. हा आर्यरक्षिताचा समकालीन होता. दशप्पूर येथें राहाणारे पुरोहित सोमदेव व बृद्रसोमा यांचा हा पुत्र होय.

**चंद्रकीर्ति**—( चंद्रगोमिन् पाहा ).

२. हा जैन असून नागपूरच्या बृहद्गच्छापैकीं होय. कौटीक या जैन तीर्थी हा राहत असे. गच्छाच्या संस्था-पकापासून हा पंधरावा पुरुष. हर्षकीर्ति नांवाचा याचा एक शिष्य होता. हा सुबोधिका किंवा दीपिका या ग्रंथाचा कर्ता. याच्या ग्रंथावरून हा दिल्लीच्या इस्लामशाह सूर या सार्वभौम ( स. १५४५-१५५३ ) राजाच्या पदरीं होता.

**चंद्रगड कदंब**—हा बनवासीच्या क्षेत्रवर्मा कदंबाचा पुत्र. याचें त्रिनेत्र कदंब असें दुसरें नांव आहे.

**चंद्र गाहडवाल**—( स. १०८०-११०० ) मही-पाल गाहडवालाचा हा पुत्र. यानें आपल्या बाहुबलानें कान्यकुब्जाचें राज्य मिळविलें आणि देशास त्रासापासून मुक्त केलें. हीं याची स्तुति गाहडवालांच्या प्रत्येक लेखांत येते. यानें नरपति, गजपति व त्रिशंकुपति यांस जिंकून पांचाल राजास जिंकलें ( एपि. इंडि. १४ पा. १९२ ). पांचाल म्हणजे कनोज. या लेखांचा काळ स. १०९३-९९ पर्यंतचा आहे. याच्या मृत्यूनंतर एका लेखांत या-संबंधीं असें म्हटलें आहे कीं चेदींचा कर्ण मेल्यानंतर यानें पृथ्वीस संकटांतून मुक्त केलें ( एपि. इंडि. १४ पा. १०३ ). यानें स. १०८० नंतर कनोज जिंकलें, असें अनुमान निघतें, असें चिं. वि. वैद्य म्हणतात. याच्या शत्रूला लेखांत चपळ असें विशेषण लावलें आहे.

शिवाय यानें उत्तर हिंदुस्तानांतील क्षेत्रें काशी, कुशिक (कनोज), उत्तर कोशल (अयोध्या) व इंद्रस्थान (इंद्रप्रस्थ?) हीं आपल्या ताब्यांत घेतलीं असें वर्णिलेलें आहे. अर्थात् तुर्कांच्या स्वाऱ्यांपासून पवित्र क्षेत्रांचें रक्षण करणें हें हिंदु राजांचें कर्तव्य यानें बजावलें. ही चंद्राची स्तुति गाहडवालांच्या बहुतेक सर्व लेखांत दिलेली आढळते. यानें अनेक तुलादानें करून ब्राह्मणांस वांटलीं. हा धार्मिक व पराक्रमी असल्यानें यानें हिंदु भारताचें आयुष्य शंभर वर्षें वाढविलें. यानंतर याचा पुत्र मदनपाल गादीवर आला. याचा राज्यकाळ स. १०८० पासून ११०० पर्यंत आहे ( हिं. भा. अ. ३ पा. ३२७ ). याच्या पत्नीचें नांव राल्हदेवी.

हा वैदिकधर्माचा मोठा उद्धारक म्हणून याची प्रशंसा केलेली आढळते ( इंडि. अँटि. १८ पा. १५ ). कारण याला ब्रह्मदेवाचा अवतार म्हटलें आहे.

एका हस्तलिखितांत याचें नांव ब्रह्म असें दिलेलें आहे ( हिं. भा. अ. पा. ३४० ). याला चंद्रदेव असेंहि म्हणतात.

**चंद्रगुणा**—कुमारिलभट्टाची आई.

**चंद्रगुप्त**—( स. ३१९–३३५ ) गुप्त घराण्यांतील हा पहिला राजा होय. याचा लहानसा परगणा पाटली-पुत्राशेजारीं असून स. ३१९ मध्यें हा स्वतंत्र झाला. याच वर्षी यानें आपला गुप्त शक सुरू केला.

हा घटोत्कच याचा मुलगा व गुप्त अथवा श्रीगुप्त याचा नातू होय. याचें लग्न लिच्छवीराजकन्या कुमारदेवी हिच्याशीं झालें होतें.

यानें हळूहळू आपलें राज्य वाढवून त्या राज्यांत गंगा-नदीचें खोरें, मगध, अलाहाबाद, तिर्हुत, बिहार आणि अयोध्या वगैरे प्रांतांचा समावेश केला. अशा प्रकारें यानें आपल्या लहानशा राज्याचें रूपांतर साम्राज्यांत केलें. ३३५ मध्यें याच्यानंतर याचा मुलगा समुद्रगुप्त हा गादी-वर आला ( B. ).

२. ( स. ३८०–४१३ ) हा गुप्तवंशांतील समुद्र-गुप्ताचा पुत्र. हा या वंशांतील दुसरा चंद्रगुप्त होय. यानें विक्रमांक, विक्रमादित्य, श्रीविक्रम, अजितविक्रम, सिंह-विक्रम व महाराजाधिराज इत्यादि बरेच किताब धारण केले होते. बंगालपासून बलुचिस्थानापर्यंत यानें विजय मिळविले. तसेंच गुजराथ, काठेवाड, कच्छ, माळवा व राजपुताना इत्यादि भागांवर राज्य करणाऱ्या शक जातीच्या पश्चिमी क्षत्रपांचें राज्य घेऊन स. ३९३ च्या सुमारास क्षत्रपांचें राज्य यानें नाहींसें केलें. यानें आपल्या पित्यापेक्षां अधिक राज्य मिळविलें व आपल्या राज्यांतील पश्चिम भागाची राजधानी उज्जयनी निश्चित केली. हा विद्वानांचा आश्रयदाता व विष्णूचा परमभक्त होता. प्राचीन दिल्ली शहरांत कुतुबमिनारच्या शेजारीं एक लोखंडाचा स्तंभ उभा आहे. तो मूळ या चंद्रगुप्तानें विष्णुपद नांवाच्या डोंगरावर विष्णुमंदिरापुढें ध्वज लावण्याकरितां तयार केला. तो अनंगपाल तोमरानें तेथून काढून येथें आणून स्थापन केला अशी प्रसिद्धी आहे. याचीं सोनें, चांदी व तांबें यांचीं नाणीं सांपडलीं आहेत. त्यांत सोन्याचींच अधिक आहेत ( जा. ऐ. का. गु. डा. पृ. २४–६०. प्लेट ६–११ ). याच्या वेळचे जे शिलालेख मिळाले आहेत त्यांत गुप्तसंवत् ८२–९३ पर्यंतचे ( स. ४०१–४१२ ) तीन मिळाले आहेत.

याच्या दोन राण्यांचा पत्ता लागतो. एक कुबेरनागा. कुबेरनागेला प्रभावती नांवाची कन्या झाली. ती वाका-टकांतील दुसऱ्या रुद्रसेनाला दिली होती. दुसरी राणी ध्रुवदेवी. ध्रुवस्वामिनी असें क्वचित् आढळतें. ध्रुवदेवीला दोन पुत्र झाले. एक कुमारगुप्त आणि दुसरा गोविंदगुप्त. कुमारगुप्त याच्या मागून राजा झाला.

फाहियान नांवाचा चिनी प्रवासी याच्या वेळीं मध्य एशियांतून हिंदुस्थानांत आला होता. त्याचा उद्देश संस्कृत भाषेचें अध्ययन करणें आणि महायानपंथाचे विनयपिटक वगैरे ग्रंथांचा संग्रह करणें हा होता. हा सुमारें पांच वर्षे हिंदुस्थानांत होता. त्यांतील तीन वर्षे तो पाटलीपुत्र येथें राहिला. त्यानें याच्या राज्यांतील लोकांची स्थिति वर्णिली आहे. तो म्हणतो, 'लोक सुखी, संपन्न व स्वतंत्र आहेत. प्राणदंड कोणालाच दिला जात नाहीं. अनेक वेळां अपराध करणारांचा एक हात तोडला जातो. मद्य व मांस यांचा प्रचार नव्हता. मांस चांडाळ गांवाच्या बाहेर विकतात. धर्मशाळा व औषधालयें यांची व्यवस्था चांगली होती. तसेंच विद्येचा प्रचारहि चांगला होता.'

**चंद्रगुप्त मौर्य**—( ख्रि. पू. ३२१–२९६ ) महापद्म नंदास अनेक वर्णाच्या स्त्रिया होत्या; त्यांपैकीं एका न्हावी जातीच्या स्त्रीपासून त्यास मुलगा झाला, त्याचें नांव धना-नंद. या धनानंदानें आपल्या बदफैली आईच्या नवऱ्यास म्हणजे महापद्म नंदास ठार करून मगध देशचें राज्य बळ-कावलें. धनानंद जुलमी राजा होता. त्याच्या जुलमामुळें त्याच्या प्रजेंत असंतोष उत्पन्न झाला. धनानंदाच्या राज्यांतच चाणक्य या नांवाचा एक विद्वान्, चाणाक्ष व महत्त्वाकांक्षी ब्राह्मण होता. क्षत्रिय जातीच्या नसलेल्या स्त्रीपासून जन्म-लेल्या धनानंदानें क्षत्रियत्वाचा हक्क बळकावून मगधाचें राज्य चालवावें हें त्यास सहन झालें नाहीं. राजाकडे तो तिरस्कारानें पाही.

धनानंदापूर्वी महापद्मनंदाची कारकीर्द चालू असतां, नंद घराण्यापैकीं दुसऱ्या एका पुरुषास मुरा नामक स्त्रीपासून एक मुलगा झालेला होता. त्याचें नांव चंद्रगुप्त. मुरेपासून झाला म्हणून यास मौर्य असें म्हणत असत. कित्येकांच्या मतें धनानंदासच हिमालयांतील मुरा नामक स्त्रीपासून झालेला पुत्र हा चंद्रगुप्त होय. हा मौर्यवंशांतील पहिला राजा होय. मुद्राराक्षस नाटकांत अमात्य चाणक्य चंद्रगुप्तास 'वृषला' या विशेषणानें संबोधीत असतो. यावरून चंद्रगुप्त धनानंदासच मुरेपासून झालेला मुलगा असावा. कारण धनानंद स्वतः वृषल म्हणजे क्षत्र स्त्रीला निकृष्ट वर्गांतील पुरुषापासून झालेला होता. मुरा क्षत्रिय असो वा शूद्र असो, महापद्म स्वतः शूद्र स्त्रीचा मुलगा असून

याच्या क्षत्रियत्वाविषयीं संशयवृत्ति निदान महापद्मनंदास धरण्याचें कारण नव्हतें. तथापि त्यानें यास हद्दपार करण्याचा हुकूम सोडून राज्यांतून घालवून दिलें. यानें आपल्या मातृभूमीस नमस्कार करून वनवास स्वीकारला.

धनानंदानें एकदां दरबार भरविला असतां, महत्त्वाकांक्षी चाणक्य अनाहूतच भर दरबारांत शिरला आणि प्रमुख स्थळीं जाऊन बसला. धनानंद अत्यंत संतापला; आणि आपल्या प्रधानांचें न ऐकतां त्यानें त्या वृद्ध ब्राह्मणास आसनावरून खालीं ओढण्याची आज्ञा केली. राजाच्या सेवकांनीं चाणक्यास ओढून खालीं आणलें. तेव्हां त्यानें अशी घोर प्रतिज्ञा केली कीं, 'नंदाचा वंश समूळ उच्छेदून टाकीन, तरच मी चाणक्य! तोंपर्यंत मी शिखाबंध करणार नाहीं,' असें म्हणून तो मगध देशांतून निघून गेला.

चंद्रगुप्त हद्दपारीचे दिवस कंठित असतां, त्याची व चाणक्याची अकस्मात् गांठ पडली. या भेटींत चंद्रगुप्तानें चाणक्याच्या मसलतीप्रमाणें वागण्याचें वचन देऊन पुढील मार्ग धरला. उत्तर हिंदुस्थानांतील बऱ्याच मुलखांत प्रवास करून अखेरीस चंद्रगुप्त हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवरील पहाडी लोकांत येऊन राहिला. तेथें यानें पहाडी लोकांस कवाईत शिकवून त्यांचें सैन्य तयार केलें.

याच वेळीं युरोपांतील वैभवशाली अलेक्झांडर बादशहाची हिंदुस्थानवर स्वारी झाली. त्याच्याबरोबर पन्नास साठ हजार सैन्य होतें. ही गोष्ट ख्रि. पू. ३२७ मध्यें घडली. त्यानें प्रथम बॅक्ट्रिया म्हणजे काबूल, कंदाहार व हिरात प्रांत आपल्या ताब्यांत घेतला. वाटेंतील प्रांत एकामागून एक त्याच्या ताब्यांत येत गेले. तक्षशिला वगैरे प्रांताचे राजे त्यास शरण आले. अलेक्झांडरनें कित्येक पहाडी लोकांचा पाडाव केला, परंतु चंद्रगुप्ताच्या कवायतींत तयार झालेल्या पहाडी सैन्याचा पराक्रम पाहून तो थक्क झाला. त्यानें चंद्रगुप्तास आपल्या बरोबर यावयास सांगितलें, त्याप्रमाणें अलेक्झांडरच्या स्वारींत कांहीं दिवस राहून, चंद्रगुप्तानें युरोपियन सैन्यव्यवस्था कशी काय असते, हें निरीक्षून ठेविलें. अलेक्झांडरनें पंजाबचा बराच भाग काबीज करून तेथील लोकांची कत्तल उडविली. जिंकलेल्या मुलखावर सत्रप अथवा सुभेदार नेमले. शरण आलेल्या राजांना मात्र धक्का लावला नाहीं. पण पुढें तीन वर्षे सारखे स्वारींवर असल्यामुळें थकलेल्या सैन्यानें बियास नदी ओलांडण्याचें नाकारलें, तेव्हां तो परतला; व बाबिलोन येथें ख्रि. पू. ३२३ च्या जूनमध्यें मरण पावला.

अलेक्झांडरच्या मृत्यूची बातमी चंद्रगुप्त मौर्यास कळतांच हा आपलें पहाडी सैन्य जमवून परकीयांच्या ताब्यांत गेलेले मुलूख परत मिळविण्याच्या खटपटीस लागला. ख्रि. पूर्वी ३२२ त यानें अलेक्झांडरच्या ताब्यांत गेलेले सर्व प्रांत जिंकून आपल्या ताब्यांत घेतले. चंद्रगुप्त या वेळेस फार तर पंचवीस वर्षांचा असावा.

याप्रमाणें परकीय राजांच्या अंमलाखालीं गेलेले यच्चयावत् प्रांत काबीज केल्यानंतर चंद्रगुप्तानें आपली दृष्टि मगध देशाकडे वळविली. यानें आपल्याजवळ पहाडी लोकांचें अफाट सैन्य कवाईत शिकवून तयार ठेवलेलें होतेंच. महापद्मनंदानें चंद्रगुप्त हीन कुळांत जन्मला म्हणून, यास हद्दपार केलें होतें. ही गोष्ट चंद्रगुप्ताच्या मनांत निरंतर डाचत होती. आणि नंदराजास मगध राज्याच्या सिंहासनावरून कव्हां खालीं पाडीन असें यास झालें होतें. या वेळेस मगधाच्या राज्यावर धनानंद राजा होता. धनानंद अत्यंत जुलमी असल्यानें त्याचे प्रजाजन गांजून गेले होत. यानें आपल्याकडे प्रजाजनांचें लक्ष वेधण्यास या परिस्थितीचा फायदा घेतला. यानें धनानंदावर स्वारी करून त्याला ठार मारलें. याप्रमाणें चंद्रगुप्तानें नंदांचा उच्छेद करून मगधाचें राज्य मिळविलें. हा ख्रिस्तपूर्व ३२१ मध्यें गादीवर बसला. उत्तर हिंदुस्थानांतील बहुतेक राज्यें याच्या ताब्यांत आलीं होतीं. याच्याएवढें विस्तृत राज्य याच्या पूर्वींच्या कोणत्याच राजानें मिळविलें नव्हतें. बंगालच्या उपसागरापासून अरबीसमुद्रापर्यंत मुलूख याच्या ताब्यांत होता. तसेंच दक्षिणेकडेहि यानें मुलूख जिंकला होता.

या चंद्रगुप्ताच्या उत्कर्षास कौटिल्याच्या अन्तर्गत शक्तीची जोड होती. चंद्रगुप्ताची व चाणक्याची गांठ पडल्या दिवसापासून चाणक्य मगधदेशांतील लोकांत असंतोषाचें व राजद्रोहाचें बीज पसरीत चालला. इतकेंच काय पण प्रसंग पडल्यास चंद्रगुप्ताचा पक्ष घेऊन धनानंदास राज्यच्युत करावयास त्यानें लोकांना प्रोत्साहन दिलें. चंद्रगुप्ताच्या हद्दपारींत चाणक्याचाच सल्ला यास मिळत गेला. चाणक्याच्या साहाय्याशिवाय मौर्यचराणें राज्यारूढ झालें असतें किंवा नाहीं याची शंका आहे. म्हणून चंद्रगुप्त मगधाचा राजा झाल्यापासून चाणक्य मुख्य प्रधान होता.

अलेक्झांडरचा यवन सेनापति सेल्यूकस होय. सेल्यूकसच्या मुलीशीं चंद्रगुप्तानें विवाह केला होता. याचा मुलगा अशोक. अलेक्झांडर म्हणजे सिकंदर,

अलेक्झांडरनें जेव्हां पंजाब घेतला त्या वेळीं चंद्रगुप्त पंजाबमध्येंच होता. तक्षशिला हें चाणक्याचें राहण्याचें ठिकाण असून तेथेंच हे गुरुशिष्य राहत होते. सिकंदराशीं

याचें बोलणेंचालणेंहि झालें होतें. ग्रीक लेखक म्हणतो कीं, 'यानें सिकंदराशीं जरा धिटाईनें बोलणेंचालणें केलें. म्हणून सिकंदरनें याला मृत्यूची शिक्षा दिली, पण हा पळून गेला, म्हणून याचे प्राण वांचले.' प्लुटार्कनेंहि या दोघांची भेट झाल्याचें लिहिलें आहे. यावरून चंद्रगुप्त हा एक राजकारणी पुरुष म्हणून पश्चिमोत्तर सीमाप्रांतावर वावरत होता; आणि याला तेथील लढाऊ जातींचें साहाय्यहि होतें. सेल्यूकसनें त्या वेळीं याच्याशीं तह केल्याचेंहि जस्टिननें लिहिलें आहे. सिकंदर परत फिरल्यावर यानें तक्षशिला येथें बंडाचें निशाण उभारलें. तक्षशिलेजवळच्या पोरस आणि फिलिप्पोस या दोन क्षत्रपांचे खून झाले आणि बंडाला चांगला रंग आला. सिकंदरला ही बातमी कळल्यावर अत्यंत क्रोध आला व त्यानें सिंधूच्या तीरावरील आपल्या युडीमौस नांवाच्या सेनापतीला फिलिप्पोसचा उत्तराधिकारी नेमला नाहीं तोंपर्यंत त्याचें काम करण्याचा हुकूम केला. पण त्याला चंद्रगुप्ताच्या विरुद्ध कांहीं करितां आलें नाहीं. तिकडे सिकंदर मेल्यामुळें अँटिगोनस व सेल्यूकस या दोन सेनापतींमध्यें वारसासंबंधीं विरोध सुरू झाला. खि. पू. ३१७ मध्यें जवळ असलेल्या अल्पशा सैन्यासह यूडीमौस अँटिगोनसला साहाय्य करण्याकरितां सिंधूच्या पार निघून गेला. अशा पद्धतीनें हिंदुस्थानच्या पश्चिमोत्तर सीमेवर चंद्रगुप्ताचें आधिपत्य स्थापित झालें. आणि देशाला स्वतंत्र केल्यामुळें लोकांतहि याबद्दल आदर वाढला.

सीमा प्रांतांत चंद्रगुप्त यशस्वी झाल्यानें याचें बल आतां वाढलें होतें. यवन, किरात, कांबोज, पारसीक, बाल्हीक इत्यादि जातींची बलिष्ठ सेना याच्याजवळ तयार झाली होती. तिच्या जोरावर यानें दिग्विजयाला सुरुवात केली. पश्चिम भारतांतील पर्वतक नांवाचा एक राजाहि जिंकलेलें अर्धे राज्य देण्याच्या अटीवर यानें आपला साहाय्यक बनवला होता. क्रमानें पाटलीपुत्राला वेढा देऊन बरेच दिवस झाल्यावर पुत्रासहित नंद ठार होऊन चंद्रगुप्त विजयी झाला.

नंद ठार झाल्यावर त्याचा मुख्य प्रधान राक्षस यानें नंदाचा भाऊ सर्वार्थसिद्धि यास गादीवर बसवून कारभार सुरू केला. मगधाच्या प्रबल राज्यांत शक्ति भरपूर होती. त्यामुळें घोर युद्धाला प्रारंभ झाला. चंद्रगुप्ताचें सैन्य परप्रांतांतून पैशाकरितां आलेलें होतें; आणि नंदाचें सैन्य देश, धर्म व राजा यांकरितां लढत होतें. हें जाणून चाणक्यानें आपल्या नीतीचा प्रयोग सुरू केला. आपला मित्र विष्णुशर्मा याला जीवसिद्धि क्षपणकाचा वेष देऊन राजा सर्वार्थसिद्धि व राक्षस यांच्या विश्वासांतील बनवलें व तद्वारां सर्वार्थसिद्धीला विरक्त बनवून वनांत पाठवून दिलें. राक्षस त्याला आणण्याकरितां स्वतः निघाला, पण चाणक्यानें त्याला पूर्वींच ठार केलें.

राक्षसानें चंद्रगुप्त आणि पर्वतक यांच्यांत भेद पाडण्याच्या इच्छेनें पर्वतकाला सर्व राज्याचें आमिष दाखवून आपल्या बाजूला वळवलें. पण त्याला एका विषकन्येकडून चाणक्यानें ठार मारवलें. तेव्हां राक्षसानें पर्वतकाचा मुलगा मलयकेतु यास हाताशीं धरलें. पण तोहि राक्षसाच्या विरुद्ध वागूं लागल्यामुळें आपल्या चंदनदास नांवाच्या मित्राचें प्राण वांचविण्याकरितां राक्षस चंद्रगुप्ताचा प्रधान झाला असें मुद्राराक्षस नाटकांत चंद्रगुप्ताच्या राज्यारोहणासंबंधीं दिलें आहे.

मगधसाम्राज्य चंद्रगुप्ताला मिळालें, पण त्या कृत्यांत याला कोणाचें साहाय्य झालें हें कळत नाहीं. चंद्रगुप्ताबद्दल बरीच माहिती ग्रीक लेखकांच्या लिखाणावरून मिळते. पण या लेखकांनीं हिंदुस्थानांतील स्थळें, गांवें, नद्या व व्यक्ति यांचीं नांवें अशीं कांहीं अपभ्रष्ट स्वरूपांत लिहिलीं आहेत कीं, तीं नांवें कोणत्या व्यक्तींचीं आहेत हें समजणें अत्यंत दुर्घट झालें आहे. हिंदुस्थानांतील नांवांचा उच्चार आणि या लेखकांनीं लिहिलेला उच्चार यांमध्यें अत्यंत फरक पडल्यानें इतर पुराव्याच्या अभावीं त्यांचें एकत्व ठरवणें दुर्घट झालें आहे. हिंदुस्थानांत तसा प्रामाणिक पुरावा उपलब्ध नाहीं. चंद्रगुप्ताबद्दल विशाखदत्ताचें मुद्राराक्षस नाटक आहे, आणि तें ऐतिहासिक घटनेवर उभारलें आहे. त्या नाटकांत पुष्कळच ऐतिहासिक भाग असला तरी तो सर्वस्वीं इतिहास आहे, असें म्हणतां येत नाहीं. तथापि त्यांतील नांवांचा ग्रीक लेखकांनीं लिहिलेल्या नांवांशीं मेळ घालण्याचा कांहीं तज्ज्ञांनीं प्रयत्न केला आहे. एकानें पारसीकाधिराज मेघास म्हणजे मॅगस्थनीज असें ठरविलें आहे. दुसऱ्यानें सेल्यूकस म्हणजे शैलाक्ष असें ठरविलें आणि विशाखदत्तानें शैलाक्ष लिहिण्याऐवजीं मेघाक्ष लिहिलें असें म्हटलें आहे. वास्तविक विशाखदत्त हा चंद्रगुप्तानंतर कितीतरी शतकें मागाहून झाला आहे. त्याच्या हातून चुका होणें अपरिहार्य आहे.

चंद्रगुप्तानें फार मोठें साम्राज्य संपादन केलें, मॅगस्थनीजच्या म्हणण्याप्रमाणें याच्या सेनेंत ६ लक्ष पायदळ, ३० हजार घोडेस्वार, २००० हत्ती व कमींत कमी ४ हजार रथ होते. शिवाय यानें आरमार उभारलें. याच्या जोरावर हा मध्ययुगांतील पहिला सम्राट् झाला.

चंद्रगुप्ताला चाणक्याच्या साहाय्यानें व स्वतःच्या कुशलतेनें मगधसाम्राज्याचा लाभ झाला. पण त्यानंतर याला पूर्वीचा सिकंदराचा सेनापति, पण आतां स्वतंत्र राजा झालेल्या सेल्यूकस निकेटरशीं युद्ध खेळावें लागलें. सेल्यूकसनें आपला प्रतिस्पर्धी अँटिगोनोस याला पराजित करून शेवटीं ठार केलें, आणि आपण पश्चिम व मध्य आशियाचा राजा झाला. तेव्हां त्याला साहजिकच पंजाब व सिंध या प्रान्तांवर स्वारी करण्याची इच्छा झाली. सिकंदरच्या स्वारीच्या वेळीं याची व त्याची भेट झाली होतीच. या वेळींहि सिंधूच्या तीरावर दोघांचें घनघोर युद्ध होऊन यानें त्याला पळावयास लावलें, पण शेवटीं पुढील अटींवर तह झालाः

( १ ) चंद्रगुप्तानें सेल्यूकसला पांचशें हत्ती द्यावेत.

( २ ) सेल्यूकसनें पॅरोपॅनिसडेई ( काबूल ), एरिया ( हिरात ), अकोशिया (कंदाहार) व जिडोशिया ( मकरान ) हे प्रान्त चंद्रगुप्ताला द्यावेत.

शेवटीं त्यानें आपली मुलगी याला देऊन कायमचें नातें जोडलें. यावरून चंद्रगुप्ताच्या राज्याच्या विस्ताराची कल्पना येते. या तहाप्रमाणें याच्या राज्याची सीमा हिंदुकुश (काकेशस) पर्वतापर्यंत जाऊन भिडली. त्यालाच ग्रीक लेखक पॅरोपॅनिसस म्हणतात. तीच हिंदुस्थानची नैसर्गिक सीमा आहे. ती दोन हजार वर्षांपूर्वी फक्त एकदांच चंद्रगुप्तानें संपादली. मोंगल किंवा इंग्रज यांना ती गांठतां आलेली नाहीं. दक्षिण हिंदुस्थानांतील विजय मात्र चंद्रगुप्तानें केला कां याचा पुत्र बिंदुसार यानें केला, याबद्दल निश्चित पुरावा उपलब्ध नाहीं. अशोकानें धर्मविजय केल्याचा पुरावा दूरवरपर्यंत लेखादि रूपानें उपलब्ध आहे. पण त्यानें युद्धानें काश्मीर व कलिंग हेच फक्त देश जिंकले. त्यावरून दक्षिणहिंदुस्थान जिंकण्याचें काम मौर्यांपैकीं चंद्रगुप्तानें व बिंबिसारानेंच केलें असावें.

पाटलीपुत्र नगर अत्यंत सुंदर असून नऊ मैल लांब व दीड मैल रुंद होतें. त्याच्याभोंवतीं चारीहि बाजूला लांकडी तट होता. त्याला चौसष्ट दरवाजे व ५७० बुरुज होते. भोंवतीं दोनशें हात रुंद व तीस हात खोल खंदक होता, त्यांत पाणी खेळवलें होतें.

याच्या सेनेंत नऊ लक्ष शिपाई ( पायदळ ), तीस हजार स्वार, नऊ हजार हत्ती व हजारों रथ होते. राजा स्वतः राजसभेंत येऊन लोकांच्या फिर्यादी ऐकत असे. राज्याचीं कामें वेगळाल्या सभा स्थापन करून त्यांच्या द्वारें चालविलीं जात. कारागिरांचा अत्यंत सन्मान ठेवला जाई. यांचा कोणी हात, पाय तोडील किंवा डोळा फोडील तर त्याला प्राणदंड दिला जाई. प्रवासी लोकांच्या आरामाची व्यवस्था केली जाई. तसेंच रोग्यांची सेवाशुश्रूषा करण्याचीं औषधालयें स्थापून व्यवस्था केलेली असे. प्रवासी लोकांचा अंत्यसंस्कार करण्याची व्यवस्था असे; व त्याची संपत्ति वारसाकडे पोंचविली जाई. वर्षारंभाच्या दिवशीं विद्वानांच्या सभा भरत त्यांत जे लोक शेतकी, पशु व प्रजा यांच्या उत्कर्षाच्या चांगल्या सूचना करीत, त्यांना पुरस्कार देऊन सन्मान केला जाई. कालवे काढून शेतीची सोय केलेली असे. रस्त्यावर अंतर कळावें म्हणून कोसावर दगड रोंवलेले असत. चोरी अगदींच क्वचित् होई. प्रायः सर्व व्यवहार तडजोडीनें आपसांत चालत ( इंडि. अँटि. भा. ६, पृ. २३६–५०). मॅगॅस्थनीजनें आपल्या हिंदुस्थानविषयक इंडिका नांवाच्या पुस्तकांत वर दिल्याप्रमाणें पुष्कळच माहिती लिहून ठेवली होती. पण तो ग्रंथ सध्यां उपलब्ध नाहीं. पण त्यांतील उतारे स्ट्रेबो, आर्यन, प्लीनी इत्यादि ग्रंथकारांनीं आपल्या ग्रंथांत उद्धृत केले आहेत तेवढेच फक्त मिळतात. चंद्रगुप्तानें नीति व पराक्रम यांच्या जोरावर विस्तृत राज्य संपादन केलें.

त्या वेळीं संघराज्यें किंवा गणराज्येंहि बरींच होतीं. त्यांपैकीं लिच्छविक, वृजिक, मल्लक, मद्रक, कुकुर, कुरु, पांचाल इत्यादि राज्यें प्रमुख दिसतात (कौ.अर्थ.११.१). हीं यानें नष्ट न करितां आपल्याला अनुकूल करून घेतलीं असावींत. कारण संघराज्यें नष्ट करण्यापेक्षां आपल्याला अनुकूल करून घेणें उत्तम, असें कौटिल्यानें अर्थशास्त्रांत म्हटलें आहे.

चंद्रगुप्तानें लोकोपयोगी कामें पुष्कळच केलीं असावींत असें दिसतें. पाटलीपुत्रापासून गिरनारपर्वत सुमारें एक हजार मैल दूर आहे. पण इतक्या लांबच्या प्रदेशांत गिरनार नदीला धरण बांधून कालवे काढण्याची व्यवस्था केली. धरण बांधून तयार केलेल्या तलावाचें नांव सुदर्शन असें ठेवण्यांत आलें. यानें आपला त्या प्रांतांतील प्रतिनिधि पुष्पगुप्त याच्याकडून तलाव बांधण्याची व्यवस्था केली होती ( इंडि. अँटि. ७. २६० ). पुढें अशोकानें याचे कालवे काढले. अशोकाच्या वेळीं त्या प्रांताचा अधिपति तुषाश्व होता. हा बंधारा ख्रि. पू. १५० पर्यंत तेथें होता. कारण रुद्रदामननें त्याची डागडुजी केली होती. यासंबंधीं जुनागड येथें खडकावर अशोकाच्या लेखाशेजारींच रुद्रदामनचा लेख खोदलेला आहे. तो लेख शक संवत् ७२ ( वि. सं. २०७, स. १५० ) मधील आहे. वरील तलाव बांधण्याचें काम करवणारा पुष्यमित्र किंवा पुष्पगुप्त हा वैश्य असून त्याच्या मुलीशीं चंद्रगुप्तानें लग्न केलेलें होतें.

हा मौर्य वंशांतीलच नव्हे तर हिंदुस्थानांत आजपर्यंत झालेल्या सर्व सम्राटांतील अद्वितीय होय. पण याच्या जन्मादिकांविषयीं निश्चित अशी माहिती मिळत नाहीं. तथापि जी विशेष संभवनीय आणि मान्य आहे ती पुढें देतों.

महापद्मनंदाला (धननंद) सुनंदा नांवाची पत्नी होती. तिच्यापासून त्याला नऊ मुलें झालीं. तीं नवनन्द म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यालाच मुरा नांवाच्या शूद्र जातीच्या स्त्रीपासून चंद्रगुप्त झाला. विष्णुपुराणावरील श्रीधरस्वामीच्या टीकेंत असें लिहिलें आहे. पण 'मुद्राराक्षसाचा प्रसिद्ध टीकाकार ढुंढिराज यानें उपोद्धातांत नंदवंशांतील राजाचें नांव सर्वार्थसिद्धि असें दिलें आहे. त्याला नऊ पुत्र झाले. त्यांना राक्षसाच्या नेतृत्वाखालीं राज्य करावयास लावून मौर्याला सेनापत्य दिलें. मौर्याला शंभर मुलें होतीं. त्यांत चंद्रगुप्त वडील होता. नंद आणि मौर्य यांच्यांत विरोध सुरू झाला. नंदांनीं मौर्यांना मारण्याचा प्रयत्न केला. त्यांत सर्व मेले, पण चंद्रगुप्त वांचला. पुढें विष्णुगुप्त चाणक्याचेंहि याला साहाय्य मिळालें.

पण महावंश नांवाच्या बौद्धांच्या पालीभाषेंतील ग्रंथांत निराळी माहिती सांपडते. त्यांत म्हटलें आहे कीं, कालाशोकाला दहा मुलें होतीं.त्यांनीं बावीस वर्षें चांगलें राज्य केलें. त्याला आणखी नऊ मुलें झालीं. त्यांनींहि बावीस वर्षें राज्य केलें. यांतील शेवटला धननंद होता. या धननंदाचा चाणक्यानें नाश केला आणि मोरिय वंशांतील चंद्रगुप्ताला संपूर्ण जंबुद्वीपाचा राजा केला. ही कथा उत्तर विहारमध्यें प्रसिद्ध असलेल्या अट्ठ कथेंत सविस्तर लिहिली आहे, असें महावंशांत म्हटलें आहे. मुद्राराक्षस नाटकांतहि हा नंदवंशांतील होता असें स्पष्टच म्हटलें आहे. पण महावंश म्हणतो कीं, हा मोरिय किंवा मौर्यवंशांतील होता.

मौर्य कोण होते यासंबंधीं महावंशांत पुढीलप्रमाणें माहिती मिळते. 'बुद्ध भगवान् जीवंत होते, तेव्हां विडूडभ राजानें शाक्यांच्या राष्ट्रावर स्वारी केली. शाक्यांच्या घराण्यांपैकीं कांहीं लोक या त्रासानें आपला देश सोडून हिमालयांत जाऊन राहिले. तेथें त्यांना मोठें रमणीय व सुंदर स्थान राहण्यास मिळालें. घनदाट वृक्ष व सुंदर पाणी असल्यामुळें त्यांना तेथेंच राहण्याची इच्छा झाली. तेव्हां त्यांनीं एक नगर वसविलें, या नगरांतील घरांची मांडणी मोराच्या मानेसारखी झाली. येथें मोर पुष्कळ असल्यामुळें मोरांचा ध्वनीहि सारखा चाललेला असे. यामुळें या नगराचें नांव मयूरनगर असें पडलें, व त्यामुळेंच त्या नगरांतील लोक व त्यांचे वंशज यांना मौर्य म्हणूं लागले.' मातेच्या नांवाचा सन्मान करण्याकरितां यानें आपणास मौर्य म्हणवून घेतलें किंवा मौर्य नांवाचा एक जात होती याबद्दल अशीं दोन मतें आहेत. यांपैकीं विशाखदत्तानें अनुसरलेलें पहिलें मत सर्वत्र पसरलेलें आहे. पण दुसरें मतहि महावंशासारख्या मान्य ग्रंथकारांनीं अनुसरलें आहे.

यानें एकंदर चोवीस वर्षे राज्य केलें, असें वायु व ब्रह्मांडपुराणांत लिहिलें आहे. महावंशांतहि इतकींच वर्षे राज्य केल्याचें दिलें आहे (५.१६-१८). फक्त मत्स्य पुराणांत चवतीस वर्षे राज्य केलें असें लिहिलें आहे. सर्व ऐतिहासिक लोकांनीं चोवीस वर्षेच राज्य केल्याचें मान्य केलें आहे. श्रीनारायणशास्त्र्यांसारखीं कांहीं माणसें चवतीस वर्षांचाहि पुरस्कार करणारीं आहेत, पण त्यांना संमति मिळत नाहीं.

चंद्रगुप्ताच्या शेवटच्या कालाबद्दल निश्चित माहिती मिळत नाहीं. जैनधर्माप्रमाणें यानें आचार्य भद्रबाहु श्रुतकेवलीपासून जैनधर्माची दीक्षा घेतली व बारा वर्षे भयंकर दुष्काळ पडला म्हणून भद्रबाहूबरोबर दक्षिणेंत श्रवणबेलगोला (म्हैसूर) येथें जाऊन तेथें देह ठेवला. अनेक जैन ग्रंथांवरून असेंच ठरतें. डॉ. फ्लीट वगैरे कांहीं विद्वान् जैन ग्रंथांतील या कथांविषयीं संशय प्रदर्शित करतात. श्री. व्ही. ए. स्मिथनें आपल्या 'अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया' या पुस्तकाच्या दुसऱ्या आवृत्तींत जैनकथांचें खंडन केलें होतें, पण तिसऱ्या आवृत्तींत त्यांची सत्यता कबूल केली आहे. पण या गोष्टी सत्य असल्या तरी चंद्रगुप्तासंबंधीं नसून अशोकाचा नातू व कुनालाचा पुत्र संप्रति (दुसरा चंद्रगुप्त) याच्यासंबंधीं आहेत असें पुण्यश्रवणकथाकोष व राजावलिकथा या ग्रंथांतील माहितीवरून पं. सत्यकेतु विद्यालंकार यांनीं आपल्या ग्रंथांत लिहिलें आहे तें बरोबर दिसतें (मौर्य साम्राज्य का इतिहास, पा. ४२३-४२५). डॉ. फ्लीटला पडलेल्या अडचणीचा यामुळें चांगला खुलासा होतो. त्याचें म्हणणें होतें कीं जैनकथांत चंद्रगुप्त हें नांव चुकून पडलेलें दिसतें, वास्तविक तेथें संप्रति हें नांव पाहिजे (इंडियन अँटिकरी २१).

यानें प्रथम राजकीय आरमार बांधून त्यावर निरनिराळे अधिकारी नेमून आरमाराची उत्तम प्रकारें व्यवस्था होईल अशी सोय केली. यानें आपल्या आरमाराचे सहा विभाग पाडले होते, असें मॅगॅस्थनीज म्हणतो.

याचें आरमार अशोक राजाच्या कारकीर्दीच्या शेवटापर्यंत टिकलें व पुढें त्याचा लय झाला (I. H. Q. Vol. No. 4, p. 647–49).

२. ( संप्रति पाहा ).

**चंद्रगोमिन्‌**--( स. ६२२ नंतर ) हा बौद्धधर्मी होता. हा सिलोनहून परत येतांना यास पतंजलीचें व्याकरणमहाभाष्य प्रथम उपलब्ध झालें. यानें एक स्वतंत्र व्याकरण केलें आहे. तें चांद्रव्याकरण नांवानें प्रसिद्ध आहे. याचा प्रतिस्पर्धी चंद्रकीर्ति म्हणून होता. त्यानेंहि याचा सन्मान केला. काशिकावृत्तींत याचा निर्देश नाहीं व हेमचंद्रानें याचा निर्देश केला आहे. म्हणजे स. ६२२–११७२ च्या मध्यें हा झाला असला पाहिजे. याचीं लोकानंद व शिष्यलेखा नांवांचीं दोन संस्कृत नाटकें प्रसिद्ध आहेत. सिल्वन लेव्हीचें म्हणणें कीं, इत्सिंगनें निर्देश केलेला चंद्रदास व चंद्रगोमिन्‌ एकच. असें असल्यास याचा काल बराच मागें जातो. तिबेटी भाषेंत याचे भाषांतर केलेले आणखीहि कांहीं ग्रंथ आहेत.

२. ( स. ९२५ सुमार ) याचा जन्म बंगालमध्यें वारेंद्र ( राजशाही ) येथें झाला. स्थिरमतीनें यास सूत्रें व अभिधर्मपिटकाचें ज्ञान दिलें. आचार्य अशोकानें यास बुद्धधर्माची दीक्षा दिली. हा मोठा कर्मठ होता.

३. एक तर्कशास्त्रज्ञ. हा वरील दोघांपेक्षां वेगळा होता. यानें न्यायालोकसिद्धि किंवा न्यायसिध्यालोक नांवाचा ग्रंथ लिहिला. याचें फक्त तिबेटी भाषांतर उपलब्ध आहे ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ३३३–३९ ).

**चंद्रदेव**—(स.६४९) एका चिनी प्रवाश्यानें हिंदुस्थानांत हें नांव धारण केलें होतें. हा चीनमधील पिंगचाव येथील भिक्षु होता. हा स. ६४९ मध्यें भारतवर्षांत आला. बोधिसंघारामांत राहून नालंद येथें आला. तेथें कांहीं दिवस राहून हा राजसंघारामांत गेला. तेथें यानें अनेक ग्रंथांचें अध्ययन केलें. संस्कृत शिकून हा चीनला परत गेला होता.

**चंद्र प्रद्योत**—हा उज्जनीचा एक राजा होय. याला वैशालीच्या चेतक राजाची मुलगी शिवा ही दिली होती. हा चंद्र प्रद्योत महासेन या नांवानें प्रसिद्ध आहे. याच्याजवळ फार सैन्य होतें. याची मुलगी वासवदत्ता ही वत्सच्या उदयन राजास दिली होती.

कौसंबीच्या शतानीक राजाची बायको मृगावतीची मागणी यानें शतानीकापाशीं केली. पण ती मागणी शतानीकानें नाकारली म्हणून यानें त्याच्यावर स्वारी केली. पण मध्येंच शतानीक वारला. जेव्हां महावीर कौसंबीला आले तेव्हां त्यांनीं प्रद्योतला मृगावतीची इच्छा सोडून देण्यास सांगितलें व याचें मन वळविलें.

हा जैनधर्मानुयायी होता. याचा जैन-तत्त्वांवर चांगला विश्वास होता. कारण यानें आपल्या आठी राण्यांना जैनधर्माची दीक्षा घेण्यास परवानगी दिली. यानें स्वतः आपण जैनधर्मीय आहों, असें जाहीर केलें होतें.

**चंद्रवाला**—चंदनेचें नामांतर.

**चंद्रभट्ट**—हा जातीचा ब्राह्मण असून दौलताबाद येथें राहत असे. एकनाथानें जी चतुःश्लोकी भागवतावर टीका लिहिली ती याचेच घरीं बसून लिहिली. हेच पुढें चांद बोधला या नांवानें प्रसिद्धीस आले, असें महिपतीनें लिहिलें आहे. शेख मुहंमद हे याचे शिष्य. यांची समाधि देवगिरी येथें कबरीसारखी बांधिली आहे.

**चंद्रभान**—शहाजहान बादशहाचा वजीर सादुल्लाखान वारल्यावर हा त्याच्या फार्सी पत्रव्यवहाराचें काम पाहूं लागला. हा फार्सीत पत्रें लिहिण्यांत अत्यंत हुशार होता ( मु. रि. भा. २ पा. ३२२ ).

**चंद्रमहत्तरगणि**—( स. १२४३ पूर्वी ) देवेंद्रसूरीच्या कर्मग्रंथापैकीं ७० श्लोकांचा ६ वा भाग यानें लिहिलेला आहे. याशिवाय कर्माचें तत्त्वज्ञान सांगणारा 'पंचसंग्रह' हा ग्रंथहि यानें लिहिला. देवेंद्रसूरी हा याचा गुरु होता. देवेंद्रसूरी गुजराथचा राजा वीरधवल व त्याचा भाऊ तेजःपाल याच्या वेळीं होता. त्यामुळें याचा काल ठरतो.

**चंद्रराज**—या कवीनें संस्कृतभाषेंत मदनतिलक नांवाचें काव्य रचिलें आहे. यांतील ध्वनि व शब्द यांचे अनेक निरनिराळे प्रकार करून दाखवितां येतात.

याचा जन्म गुजराथेंत झाला व यानें पूर्णिमागच्छाची स्थापना केली ( स. ११०२ ). हा जयसिंहसूरीचा शिष्य असून धर्मघोषाचा गुरु होता.

ह्यानें 'दर्शनमुखशुद्धि' अथवा 'सम्यक्त्वप्रकरण' नांवाचा ग्रंथ लिहिला. 'प्रमेयरत्नकोश' व 'न्यायावतारवृत्ति' हे दोन ग्रंथहि याचेच असावेत. 'न्यायावतारवृत्ति' ही सिद्धसेनदिवाकराच्या न्यायावतारावरील एक सुंदर टीका आहे.

**चंद्रराव पवार**—हा उदाजी पवाराचा सर्वांत धाकटा मुलगा.

हा राघोबादादाच्या बाजूस असून दादाला वेळोवेळीं मदत करीत असे. स. १७८० च्या डिसेंबरांत रनाळें येथें गणेशपंत बेहेरे यांची व याची लढाई होऊन त्यांत हा ठार झाला. ( म. रि. उत्तर वि. १ ला २३८, २३९ ).

**चंद्रवर्मा कदंब**—हा बनवासीच्या मल्लिनाथ कदंबाचा पुत्र.

२. हा पहिला चंद्रवर्मा कदंबाचा पुत्र. याला पुरंदर नांवाचा दुसरा एक भाऊ होता.

**'चंद्रराव' मोरे**—मोरे हें घराणें आदिलशाहींत नोकरी करून उदयास आलें. त्यांना पराक्रमाबद्दल 'चंद्रराव' हा किताब व जावळीचें राज्य मिळालें. 'चंद्रराव' हें कोणाहि एका व्यक्तीचें नांव नाहीं. मोरे हे आपणांस विजापूरकरांचे एकनिष्ठ सरदार व 'जावळीचे राजे' म्हणवीत. जावळी ही सातारा जिल्ह्यांत, वायव्य दिशेचे टोंकास असून तेथून कोंकणांत उतरण्याचा मार्ग आहे. मोरे व शिवाजी यांमध्यें विरोध निरनिराळ्या कारणांनीं वाढत गेला. ज्या चंद्ररावाच्या (दौलतरावाच्या) गादीवर, एकदां शिवाजीच्या साहाय्यानेंच त्याचा दत्तकपुत्र अधिष्ठित झाला ( स. १६४८ ) तोच ( यशवंतराव मोरे ) चंद्रराव पुढें स्वतंत्र होऊन शिवाजीच्या विरोधकांत समाविष्ट झाला (प.सा.६९७; १०७; शिवदिग्विजय,पा.१३०-१३१; इतिहाससंग्रहांतील जावळीकर मोरे बखर, पा. २६).

चंद्रराव कृष्णाजीराव राजे यांस महाराज सांगून पाठवितात, 'तुम्ही मुस्तफद राजे म्हणवितां. राजे आम्ही. आम्हां श्रीशंभूनें राज्य दिधलें आहे. तर तुम्ही राजे न म्हणावें.' यावर चंद्ररावानें पुढील उत्तर दिलें. 'तुम्ही काल राजे जाहलां. तुम्हास राज्य कोणें दिधलें?...... तुम्हामध्यें पुरुषार्थ असला, तर उदईक याल, तर आजच यावें.' ( ऐ. स्फु. ले. जा. ब. पृ. २६ ).

मावळांतील मोरे शिवाजीच्या विरुद्ध वागूं लागले, आणि शिवाजीचीं माणसेंहि फोडण्याचा प्रयत्न करूं लागले, तेव्हां शिवाजीनें मोरे यांचा मामा सिलीमकर, बांदल व कान्होजी जेधे यांना त्यांवर रवाना केलें ( स. १६५५ अखेर ). पण त्यांचा पराजय झाला, तेव्हां रघुनाथ बल्लाळ कोरडे यानें हल्ला केला तेव्हां हणमंतराव मोरे मारला गेला; आणि प्रतापराव मोरे विजापुरास पळून गेला. त्यामुळें जावळीचें ठिकाण शिवाजीचे हस्तगत झालें ( ता. २७-१-१६५६ ). पुढें यशवंतराव मोरे रायगडावर बंदोबस्तानें राहिला. त्यावर स्वारी करून तीन दिवस लढावें लागलें. नंतर तह झाला. यशवंतराव व त्याचे पुत्र कृष्णाजी व बाजी गडाखालीं शिवाजीचे भेटीस आले. यशवंतराव मुख्य गुन्हेगार म्हणून व मुलांनीं फितुरी केली म्हणून सर्वांना ठार केलें. प्रतापराव मोरे शेवट-पर्यंत वैर करीत राहिला. मोऱ्यांच्या निःपातासंबंधीं 'मिळाली बारभाई, बुडाली चंदरराई' अशी म्हण प्रसिद्ध आहे.

**चंद्रलेखा**—कऱ्हाडच्या शिलाहार राजाची मुलगी. हिनें विक्रम उत्तरचालुक्यास वरिलें, असें बिल्हणानें वर्णिलें आहे. कल्हणानें असें लिहिलें आहे कीं, हिच्या विलक्षण सौंदर्याची कीर्ति ऐकून काश्मीरच्या हर्ष राजानें कर्नाटक जिंकून हिचें हरण करण्याचा निश्चय भर सभेंत केला ( राजतरंगिणी ७. ११२४ ). पण ही गोष्ट खरी नसावी, असें म्हणतात ( हिं. भा. अं. पा. ३८७ ). ही नरसिंह शिलाहाराची मुलगी असावी.

**चंद्रशेखर वाजपेयी**—( जन्म स. १७९८ ) एक हिंदी कवि. पिता माणिराम. जन्मस्थान मुअज्जमाबाद. हे जोधपूरच्या नरेंद्रसिंहाचे आश्रित होते. यांचे ग्रंथ— १ विवेकविलास, २ रसिकविनोद, ३ हरिभक्तिविलास, ४ नखशिख, ५ वृंदावनशतक, ६ गुह्यपंचाशिका, ७ ताजक-ज्योतिष, ८ माधवीवसंत. पण यांची कीर्ति हम्मीर-हठानें झाली आहे. यांचें हिंदी भाषेवरील प्रभुत्व अपूर्व आहे. अनुप्रास साधूनहि हे अर्थहानि होऊं देत नसत.

**चंद्रशेखर विद्यालंकार**—यानें गोविंदचंद्राच्या टीकेवर टीका लिहिली.

**चंद्रसूरि**—( बारावें शतक ) एक जैन लेखक. यानें आवश्यक सूत्रावर ( स. ११६५ ) व निर्यावलि सूत्रावर टीका लिहिल्या ( विंटरनिझ–हि. सं. पु. २ ).

**चंद्रसेन जाधव**—( मृत्यु स. १७५१ ) हा धनाजी जाधवाचा धाकटा मुलगा होता. धनाजीच्या पश्चात् शाहूनें सेनापतिपद याच्याकडे दिलें. हा विशेष कर्तृत्ववान् होता, परंतु पुढें याचा ओढा ताराबाईकडे असे. याची व बाळाजी विश्वनाथाची पुढें चुरस लागली. नंतर त्यांचा तंटा विकोपास जाऊन दोघांची लढाई झाली आणि शाहूनें बाळाजीस आश्रय दिला. बाळाजीस शाहूनें आश्रय दिला त्या वेळेस यानें शाहूस निरोप पाठविला कीं, "स्वामींनी बाळाजीस माझ्या स्वाधीन करावें त्यांस आश्रय दिल्यास आम्हांस महाराजांचे पाय सुटतील." यावरून याचें मन बाळाजीविषयीं किती विरुद्ध झालें तें दिसतें. चंद्रसेन पांडवगड सोडून निघाला. याची व हैबतरावाची गांठ आंदकींच्या घांटाखालीं जेऊर येथें पडून एक लढाई झाली ( स. १७११ मार्च ). तींत याचा पुरा मोड झाला. तेव्हां चंद्रसेन उघडपणें प्रथम ताराबाईस व नंतर निजामास जाऊन मिळाला. त्याच सालीं याचें सेनापतिपद काढून शाहूनें याचा थोरला सावत्र भाऊ संताजीस दिलें. स. १७११ त ताराबाईनें याच्या मदतीनें कारस्थान उभारलें. प्रथम याचें एक पत्र ताराबाईस गेलें, तें येणेंप्रमाणें, "आमची निष्ठा

स्वामींच्या चरणीं; स्वामींची सेवा करावी व यशकीर्ती संपादावी. राजश्री जाधवराव ( धनाजी ) स्वामींच्या पायां-व्यतिरिक्त दुसरें दैवत जाणत नव्हते. राज्यांत दुही निर्माण झाली ते प्रसंगीं त्यांनी प्रतिज्ञापुरःसर स्वामी-संनिध बोलोन स्वार झाले. यांचा ( धनाजीचा ) हेतु पुर्ण करावा हें अंतःकरणीं धरून आजपर्यंत याच मानीं राहून रा. आप्पा थोरात, दमाजी थोरात, संताजी पांढरे आदी-करून सामील करून घेऊन शाहूनीं केल्या लोभाची (दाखविलेल्या लालुचीची ) आस्था न धरितां, त्यासहि वैमनस्य दर्शविले. मग आम्ही कटांत सरदार घेऊन प्रतिनिधी यांस विचारांत घेतले. खुशाली केली. आणि आम्ही आपली व पंडीत मशारनिल्हेची पत्रें पाठविली आहेत." या पत्रांत हा असें म्हणतो कीं "मी शाहूच्या पक्षाचा कधीच अंगिकार केला नाहीं."

याच्या पत्रास ताराबाईनीं खालील जबाब पत्रानें पाठविला: "धनाजीचे पुत्र तुम्ही त्यांजसारखे कृतकर्म आहां. तुम्हां व्यतिरिक्त त्यांचा संकल्प आणखी कोण शेवटास नेवो. राज्याभिवृद्धीचा उपाय मायेचा सेवका-विना दुसऱ्याचे मनांत कसा येईल. तरी दुही निःशेष करून स्वामींचे शासन चालविण्याचा संकल्प सफल करावा. तुम्हांसारखे बुद्धि प्रगल्भ पराक्रमी पुत्र जाधव-रावांस होऊन स्वामींचे सेवेशीं तत्पर झाले. तुमच्या भरंवशानें स्वामी निश्चित आहेत. गडकिल्ले यांस तुम्हीं कांहीं पत्रें पाठविलीं ही गोष्ट उत्तम केली. पुढेंहि ज्यास लिहिणें ते लिहावें. तुम्हीं सांगितल्याप्रमाणें सर्वांनीं तुमच्या चित्ताचे ठायीं एकरूप होऊन महाकार्य संधादिलें. सर्व गोष्टींनीं मातोश्रीसाहेब ( ताराबाई ) व स्वामी बहुत संतोषी आहेत. तुम्ही जे कर्तव्य लिहिले ते निःशेष करून संतोषाचें वर्तमान लिहून पाठवावें." या पत्रावरून ताराबाईनें याच्या सल्ल्यानें भयंकर कारस्थान रचिलें असें दिसतें.

दमाजी थोरातानें शाहूशीं जो झगडा केला त्यांत त्यास चंद्रसेनाचें पाठबळ चांगलेंच होतें. शाहू व संभाजी यांच्या तंट्याचें बीज यानेंच पेरलें. चंद्रसेनाचे द्वारें संभाजीनें निजा-माशीं संधान बांधलें. हा अभिमानी, हट्टी, एकदां स्वीकार-लेली पद्धत कधींहि न सोडणारा व सेनापतित्वाच्या जोरा-वर शाहूस वाटेल तसा नाचविण्याची धमक बाळगणारा होता. हा माघार घेणारा नव्हता. संभाजी–पक्षहि निर्बल असल्यामुळें याच्या कर्तव्यास जागा राहिली नाहीं. अर्थात् आपला आग्रह तडीस नेण्याकरितां यास मुसलमानांकडे जावें लागलें. हा मुसलमानांस मिळालेला पाहून शाहूस कांहींच मार्ग उरला नाहीं. हा स. १७५१ मध्यें मरण पावला.

**चंद्रसेनसूरि**—( स. ११५० सुमार ) हा चंद्रसेन-सूरि जैनधर्मी असून प्रद्युम्नसूरीचा शिष्य होता. यानें स. ११५० त नेमिचंद्राचे मदतीनें 'उत्पादसिद्धिप्रकरण' या नांवाचा एक ग्रंथ लिहिला. त्या ग्रंथावर ह्यानें स्वतःच एक टीकाहि लिहिली आहे ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. २११ ).

**चंद्रात्मज कवि**—(स. १७६५ सुमार) हा मराठा कवि अजून अप्रकाशितच आहे. याचीं दोन प्रकरणें आपचंद मठांत मिळालीं, एक उद्योगपर्व व दुसरें गोकर्णमाहात्म्य. उद्योगपर्वाचे एकंदर बारा अध्याय असून ओंवीसंख्या सुमारें २००० आहे. गोकर्णमाहात्म्याचे एकंदर ६४ श्लोक आहेत. कवीचें गोत्र वशिष्ठ, वेद ऋग्वेद व शाखा आश्वलायन.

पिता-दुंदुभि. मुक्तेश्वर कवीला यानें नमन केलें आहे ( मं. श. १८३४ पु. ४. २ ले. ५३ ).

**चंद्रादित्य चालुक्य**—( स. ६५५–५९ ) बदामीच्या पश्चिम चालुक्य घराण्यांतील दुसऱ्या पुलकेशिन्चा पुत्र. कीलहॉर्नच्या मतें हा पुलकेशिन्चा सर्वांत वडील पुत्र होय. याच्या पत्नीचें नांव विजयमहादेवी होय.

**चंद्रापीड कर्कोटक**—( स. ६८७–६९५ ) काश्मीरचा राजा. याचा धाकटा भाऊ तारापीड यानें यास अभिचारानें म्हणजे मूठ मारून ठार केलें. यानें एकंदर ८ वर्षे ८ महिने राज्य केलें.

**चंद्रोबलब्बा**—ही अमोघवर्ष राष्ट्रकूटाची मुलगी. ही बुतुग गंगास दिली होती. हिलाच अब्बलब्बे म्हणत असावेत.

**चंपक**—राजतरंगिणीकार कल्हणाचा पिता.

**चंपकपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं साठावा सिद्ध होय. हा जातीनें कहार असून चम्पादेशचा राहणारा. मीनपा याचा गुरु. यानें आत्मपरिज्ञान दृष्ट्युपदेश ( तं. ४८–८६ ) हा ग्रंथ लिहिला.

**चंपतराय**—हा चंदेरीचा राजा रामचंद्रसा याचा चुलतभाऊ होय. हा महोबा येथें राज्य करीत होता. जहांगीर मरण पावल्यावर सर्व बुंदेले राजांनीं एकत्र होऊन दिल्लीपतीचें सार्वभौमत्व झुगारून देण्याचें ठरविलें. शहाजहाननें या वेळीं बाकीखान नामक सरदार याजवर पाठविला. परंतु चंपतरायानें अद्वितीय पराक्रम करून बादशाही फौजेस परतविलें. शेवटीं शहाजहाननें चिडून खानजहान लोदी, महाबदखान व अबदुल्ला अशा तिघांस यावर पाठविलें. तरीहि बुंदेल्यांनीं दाद न देतां मुसल-

मानी फौजेस जर्जर करून सोडलें. अखेर बादशहानें तहाचें बोलणें केलें. याच वेळीं यास कोंच परगणा जहागीर मिळाला; व उमरावांतहि जागा मिळाली. याच्याच पुढच्या पराक्रमानें औरंगजेब खूष होऊन त्यानें १२००० स्वारांची मनसबदारी यास बहाल केली, असें लाल कवि म्हणतो व पुढें लवकरच याचा त्यानें अपमान केला व आपल्याजवळून काढून टाकला. या अपमानाचा सूड घेण्यासाठीं यानें पुन्हां आपल्या सैन्याची जमवाजमव सुरू केली. परंतु बादशाही फौजेच्या अचानक हल्ल्यामुळें याचा नाइलाज होऊन हा धारातीर्थी मरण पावला. याचाच पुत्र छत्रसाल बुंदेला होय ( मु. रि. भा. २ रा पृ. २५० ).

**चंपादे**—एक हिंदी कवयित्री. बिकानेरचा राजा जो राजसिंह त्याचा भाऊ पृथ्वीराज त्याची हीं दुसरी बायको होय. ही जैसलमेरचा राजा राव लहर याची मुलगी. हिनें हिंदींत कविता केल्या आहेत.

**चाउही**--एक चिनी प्रवासी. हा तिबेटमार्गे भारतवर्षांत आला होता. येथें आल्यावर महाबोधि संघारामांत व नालंदच्या विश्वविद्यालयांत यानें पुष्कळ वर्षे संस्कृत भाषेचें अध्ययन केलें. तेथून महायान सूत्रांचें अध्ययन करून हा दाववनसंघारामांत गेला व तेथें विनयपिटक व व्याकरणशास्त्र यांचें अध्ययन केलें. तेथेंच यानें तेथचा इतिहास चिनी भाषेंत लिहिला. याचा परलोकवासहि याच देशांत झाला. यानें हिंदुस्थानांत असतां श्रीदेव असें नांव धारण केलें होतें.

**चाचा हितवृंदावनदास**—( जन्म स. १७०७ ) एक हिंदी कवि. हा जातीचा गौड ब्राह्मण असून पुष्कर येथील राहणारा होता. हे राधावल्लभीय गोस्वामी हितरूपजींचे शिष्य होत. हे बहादुरसिंहाच्या आश्रयास असत. परंतु राजकुलांत तंटे होऊं लागल्यामुळें हे कृष्णगड सोडून वृंदावनास आले; व अखेरपर्यंत तेथेंच राहिले. यांनीं एक लाखावर पद्यरचना केली असल्याचें प्रसिद्ध आहे, परंतु अद्यापपावेतों २०००० पदेंच फक्त उपलब्ध आहेत. त्यांत कांहीं छद्मलीलांचें वर्णन तर खरोखर अपूर्वच आहे. याची भाषारचनेवरील कसरत व अलंकाराचें तिला परिवेष्टण यांमुळें काव्य फारच चित्ताकर्षक वाटतें.

**चाणक्य**--( चंद्रगुप्त मौर्य पाहा ).

**चाफाजी टिळेकर**—नारायणराव पेशव्यांचा हुजऱ्या. नारायणराव पेशव्यांच्या खुनाचे वेळीं हा त्यांना वांचविण्याकरितां अंगावर पडल्यामुळें मारला गेला.

**चामरस**—( स. १४३० सुमार ) कानडी कवि. मूळ ब्राह्मण होता, मग लिंगायत झाला. कुमार व्यास व हा यांचीं स्पर्धा होती. आपल्या आश्रयदात्या प्रौढदेवरायाच्या विनंतीवरून या दोघांनीं कानडींत महाभारत लिहिलें. त्यांत याचें काव्य अत्यंत सरस ठरलें. तेव्हां कुमार व्यासानें आपल्या पत्नीच्या म्हणजे याच्या बहिणीच्या द्वारा मत्सरानें याचा ग्रंथ नष्ट करवला. याला याचें उपास्य दैवत शिव स्वप्नांत आला व याला अन्य देवाची उपासना न करण्याविषयीं दृष्टान्त झाला. तेव्हां हंपी येथें विरूपाक्षमंदिरांत यानें वीरशैव धर्माची दीक्षा घेतली. नंतर प्रभुलिंगलीला नांवाचें काव्य कानडींत लिहिलें ( अलंप्रभु पाहा ). या ग्रंथामुळें याचें वर्चस्व राजसभेंत कुमार व्यासापेक्षां अधिक वाढलें, आणि शेवटीं तर याच्याकडूनच प्रौढदेवरायांनीं लिंगायतधर्माची दीक्षा घेतली, असें लिंगायत ग्रंथकार म्हणतात. तथापि याचें काव्य अत्यंत सरस आहे यांत शंका नाहीं. या प्रभुलिंगलीला ग्रंथाचें भाषांतर तेलगू व तामीलमध्यें काव्यरूपानें झालें आहे ( क. क. च. भा. २ पा. ५९ ).

**चामराज ओडीयार**—( स. १६१७-३७ ) म्हैसूरच्या नरसराज ओडीयारचा हा पुत्र.

**चामलादेवी कदंब**—दुसऱ्या तैल कदंबाची पत्नी. हिचा पुत्र तैलम.

**चामुंडमहाराज**—( स. ११०० नंतर ) एक जैन आचार्य. जिनसेनाचा शिष्य. यानें ‘ चारित्रसार ’ हा दिगंबर जैनांच्या दृष्टीनें मुक्तीचा मार्ग वर्णन करणारा ग्रंथ लिहिला ( विंटरनिट्झ-हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर, भा. २ ).

२. ( ग्रंथकाल स. १४९० ) ज्वरतिमिरभास्कर या संस्कृत ग्रंथाचा कर्ता. यानें आपला ग्रंथ मेदपाठ ऊर्फ मेवाडच्या राजमल्ल गुहिलोताच्या आश्रयाखालीं लिहिला. याला कायस्थ चामुंड म्हणतात.

**चामुंडराज सोळंकी**—( स. ९९५-१००९ ) गुजराथच्या सोळंकी वंशांतील मूळराजाचा पुत्र. यानें माळव्याचा राजा सिंधुराज यास ठार मारलें आणि तेव्हांपासून या दोन घराण्यांत वैर सुरू होऊन त्यामुळें परस्परांचें फार नुकसान झालें. हा अत्यंत कामी होता म्हणून वाचिणीदेवी ( चाचिणीदेवी ) नांवाच्या बहिणीनें याला पदच्युत करून याचा ज्येष्ठ पुत्र वल्लभराज यास गुजराथच्या सिंहासनावर बसवलें. याला वल्लभराज, दुर्लभराज व नागराज असे तीन पुत्र होते.

गझनीच्या महमूदानें सोमनाथपट्टणावर स्वारी केली तेव्हां चामुंडरायाची त्याजबरोबर लढण्याची तयारी नसल्यानें राजधानी मुलाच्या हवालीं करून हा अरण्यांत निघून गेला (रासमाला).

२. हा पश्चिम चालुक्य चवथ्या विक्रमादित्याचा सेनापति. हा वीर राजेंद्र चोलाकडून वेंगीच्या लढाईंत मारला गेला.

**चारित्रवर्धन**—(ग्रंथकाल स. १३७२–८५ सुमार) हा विद्याधर अगर साहित्यविद्याधर या नांवांनींहि प्रसिद्ध आहे. याच्या बापाचें नांव रामचंद्र भिषज असें होतें. यानें कुमारसंभव, नैषध, रघुवंश, राघवपांडवीय आणि शिशुपालवध यांवर टीका लिहिलेल्या आहेत.

यानें आपल्या टीकेंत पुष्कळ ग्रंथांचा व ग्रंथकारांचा उल्लेख केला आहे. त्यामध्यें 'दुर्घटवृत्ती' चा उल्लेख व उतारा यानें आपल्या कुमारसंभवावरील टीकेंत घेतला आहे. तेव्हां याच्या कुमारसंभवावरील टीकेचा रचनाकाल दुर्घटवृत्तीनंतर कांहीं वर्षांनीं असला पाहिजे. शरणदेवानें आपला 'दुर्घटवृत्ति' हा ग्रंथ स. ११७२ मध्यें लिहिला. यावरून याच्या कुमारसंभवावरील टीकेचा काल स. ११७२ च्या नंतर ठरतो.

दिनकराची रघुवंशावरील टीका ही चारित्रवर्धनाच्या रघुवंशावरील टीकेचाच संक्षेप (सारग्रंथ) होय, असें रा. नंदर्गिकर यांनीं म्हटलें आहे. दिनकरानें आपला स्वतःचा काल स. १३८५ असा दिला आहे.

**चारित्रसुंदरगणि**—हा जैन कवि पंधराव्या शतकाच्या मध्यांत झाला असावा. यानें 'महीपालचरित्र' हें महाकाव्याच्या धर्तीवरील व शीलदूत हें मेघदूताच्या धर्तीवरील काव्य, अशीं दोन काव्यें लिहिलीं. शीलदूताच्या समाप्तीचा काल यानें काव्याच्या शेवटीं दिला आहे. त्यावरून स. १४२० ठरतो (विंटरनिट्झ-हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर, भा. २).

**चारुमती**—सम्राट् अशोकाची मुलगी. ही आपल्या बापाबरोबर नेपाळांत यात्रेला गेली होती. ती परत न येतां तेथेंच संन्यासिनी बनून मठांत राहूं लागली. तिनें नेपाळांत एक देवपटना नांवाचें शहर आपल्या नवऱ्याच्या स्मरणार्थ वसविलें. तिच्या नवऱ्याचें नांव देवपाल क्षत्रिय असें होतें (Sketches from Nepal, Oldfield II, 198, 246–52).

## (पूर्व) चालुक्य घराणें (वेंगीचें)—

१ (कुब्ज) विष्णुवर्धन १ ला (स. ६१५-६३३), २ जयसिंह १ ला वल्लभ (स. ६३३-६३), ३ इंदु भट्टारक (स. ६६३ सात दिवस राज्य केलें), ४ विष्णुवर्धन २ रा (स. ६६३-७२), ५ मंगी युवराज (स. ६७२-६९६), ६ जयसिंह २ रा (स. ६९६-७०९), ७ कोकिली (स. ७०९), ८ विष्णुवर्धन ३ रा (स. ७०९-७४६), ९ विजयादित्य १ ला (स. ७४६-६४), १० विष्णुवर्धन ४ था (स. ७६४-९९), ११ विजयादित्य २ रा (स. ७९९-८४३), १२ (कलि)विष्णुवर्धन ५ वा (स. ८४३-८४४), १३ (गुणक)—विजयादित्य ३ रा (स. ८४४-८८), १४ चालुक्यभीम १ ला (स. ८८८-९१८), १५ विजयादित्य ४ था (स. ९१८), १६ अम्म १ ला (स. ९१८-२५), १७ (बेट)--विजयादित्य (स. ९२५), १८ युद्धमल्ल १ ला (स. ९२५), १९ विक्रमादित्य २ रा (स. ९२५), २० भीम (स. २२६-२७), २१ युद्धमल्ल २ रा (स. ९२७-३४), २२ चालुक्यभीम २ रा (स. ९३४-४५), २३ अम्म २ रा (स. ९४५-७०), २४ दानार्णव (स. ९७०-७३), २५ शक्तिवर्मन् (स. ९९९-१०११), २६ विमलादित्य (स. १०११-२२), २७ राजराज कुलोत्तुंग १ ला (स. १०२२-६३), २८ राजेंद्र (स. १०६३-१११२), २९ विक्रमदेव (स. १११२-२७), ३० कुलोत्तुंग २ रा (स. ११३४).

## (पश्चिम) चालुक्य घराणें (बदामीचें)--






**चालुक्यभीम**—( स. ८८८–९१८ ) पूर्व चालुक्य घराण्यांतील पहिल्या विक्रमादित्याचा मुलगा. स. ८८८ मध्यें हा विजयादित्यानंतर गादीवर आला. याला द्रोहार्जुन अशी पदवी होती. यानें राष्ट्रकूट राजा दुसऱ्या कृष्णराजाचा पराभव करून राष्ट्रकूट राजाकडून वेंगी परत मिळविली. स. ९१८ मध्यें याचा मुलगा विजयादित्य ४ था हा याच्यानंतर गादीवर आला ( B. ).

२. (स. ९३४–४५ ) पूर्व चालुक्य घराण्यांतील चवथ्या विजयादित्याचा हा मुलगा. स. ९३४ मध्यें हा, युद्धमल्ल २ रा यास हाकून देऊन, गादीवर आला. हा आपणास गंदमहेंद्र व विष्णुवर्धन सातवा असें म्हणवी.

यानें राजमार्तंड यास मारिलें व कंठिक विजयादित्य यास हांकून दिलें. त्याचप्रमाणें यानें चवथ्या गोविंदराष्ट्रकूटाचा पराभव केला. इंद्रराज ३ रा याचा भाऊ अमोघवर्ष ३ रा हा याच्यानंतर गादीवर आला ( B. ).

**चाल्हण पंडित**—याला चाल्हेराज असेंहि म्हणत. हा फार विद्वान् असून याचा शिष्यसंप्रदाय फार मोठा होता. चक्रधर–नागदेव–भास्कराचार्य–नागांवा–कमळाकर–सीतांबा–चाल्हण–नृसिंह अशा याची परंपरा दिसते. याचे ‘ सत्त्वानुवाद, ’ ‘ ज्ञानप्रकाश ’ व ‘ शास्त्रसंबोधिनीटीका ’असे तीन ग्रंथ आहेत; हा चाल्हण पंडित स्वतःच्या ग्रंथरचनेपेक्षां आपला शिष्य जो नृसिंह त्याच्याच ग्रंथामुळें विशेष प्रसिद्ध आहे. या चाल्हणानें-किंवा चाल्हणाच्या नांवावर त्याच्या नृसिंह शिष्यानें-रचलेली एक श्रीमद्भगवद्गीताटीका आहे. हिला चाल्हणसंकेत किंवा ‘संकेतगीता’ असें म्हणतात. हिच्यांत महानुभाव पंथाबाहेरील इतर टीकांचाहि उल्लेख आहे. असा उल्लेख महानुभाव पंथांत बहुतेक करीत नाहींत. नृसिंहाचें रुक्मिणीस्वयंवर शके १३२५ ( स. १४०३ ) चैं. शु. १५ ला लिहिलें. त्यावरून याच्या कालाचा तर्क होतो ( म. वा. इ. २. ७४४ ).

२. ( चक्रपाणी व्यास वर्धनस्थ पाहा ).

**चावडा**—( वर्मलात पाहा ).

**चावुंडराज कदंब**—( स. १०४८–४९ ) हा कदंब राजा होय, असें फ्लीट म्हणतो ( इंडि. अँटि.१८७५ पा. १७१ ). सोमेश्वर प. चालुक्याचा मांडलिक म्हणून राज्य करीत होता.

**चावुंडराय**—( ग्रंथकाल स. ९७८ ) कानडी कवि. ब्रह्मक्षत्रियवंशांतील होता. हा गंगांपैकीं चवथ्या राजमल्लाचा ( स. ९७४–८४ ) मंत्री आणि सेनापति व अजितसेनाचार्याचा शिष्य. नेमिचंद्र ऊर्फ सिद्धांत चक्रवर्तिन्‌लाहि यानें गुरु केलें म्हणून उल्लेख केला आहे. श्रवणबेळगोळ येथें गोमटेश्वर नांवाचें यानें अपरिमित द्रव्यानें देऊळ बांधलें; व पुतळा उभारला. याला नागवर्मा नांवाचा भाऊ होता.

हा कवि होता, तसाच शूर होता. यानें गोविंदराजाचा पाठलाग केला व राचय्याला ठार केलें, अशी याची कीर्ति आहे. चामुंड शब्दाचा चावुंड हा कानडी उच्चार दिसतो.

ग्रंथ—चावुण्डरायपुराण ( स. ९७८ ). यानें स्वतःच आपल्या ग्रंथावर टीका लिहिली आहे. त्यामुळें राजमल्लानें यास राम अशी पदवी दिली. याला अण्ण असेंहि म्हणत.

याचें चावुण्डरायपुराण अथवा त्रिषष्टिलक्षणमहापुराण ग्रंथ प्रसिद्ध आहे. हें प्रायः गद्यरूप आहे. नृपतुंगाचे व त्यापूर्वीचे गद्य ग्रंथ कानडींत होते, पण त्यांपैकीं एकहि ग्रंथ उपलब्ध नाहीं. जुन्यांपैकीं उपलब्ध ग्रंथ चावुण्डाचाच होय. याच्या ग्रंथामुळें दहाव्या शतकांतील कानडी भाषा समजून येते ( क. क. च. भा. १ पा. ४६ ).

**चावुंडला कदंब**—ही पहिल्या तैल कदंबाची पत्नी.

**चाहमान**—( स. ७०० ) चव्हाणाचा मूळ पुरुष. याला अनहिल असेंहि म्हणतात.

**चांगदेव**—( शके ११२८–स. १२०६ ) सुप्रसिद्ध लीलावतीकर्त्या भास्कराचार्यांचा हा नातू. हा सिंघण यादवाच्या पदरीं ज्योतिषी होता. याचा एक शिलालेख चाळीसगांवजवळ पाटण येथील भवानीच्या देवळावर आहे. या शिलालेखाच्या एकंदर २६ ओळी असून पहिल्या वीस संस्कृतांत व पुढील सहा मराठींत आहेत. यांत यानें आपल्या पूर्वीच्या नऊ पिढ्यांची माहिती दिली आहे व चांगदेवाच्या मठास दिलेलें दान नमूद केलें आहे. हा लेख ज्ञानेश्वराच्या पूर्वी ८४ वर्षांचा आहे.

२. हेमचंद्राचें पहिलें नांव.

**चांगदेव ऊर्फ चांगा वटेश्वर**—( समाधि स. १३२५ ) हे तापीतीरचे रहिवासी. खानदेशांत एदलाबादेजवळ चांगदेव नांवाच्या गावीं यांचा जन्म झाला. तेथें चांगदेवाचें बांधलेलें देऊळ अद्यापि आढळतें. चांगदेव गांवाला पूर्वी सुंदरपूर म्हणत असें सांगतात. याचें पहिले गुरु वटेश्वर व दुसऱ्या ज्ञानेश्वर महाराजांच्या भगिनी मुक्ताबाई. हे महायोगी होते; व योगबळानें समाधिस्थ होऊन हे मृत्युकाळ टाळीत. अशा पद्धतीनें हे चवदाशें वर्षे जगले होते असें वर्णन आढळतें. यांना अनेक सिद्धी अनुकूल होत्या. ज्ञानेश्वरांनीं रेड्याकडून वेद बोलविल्याची लोकोत्तर वार्ता यांच्या कानावर जाऊन यांना कौतुक वाटलें; व त्यांना यांनीं पत्र लिहिण्याचें योजलें. पण मायना तीर्थरूप लिहावा कीं चिरंजीव लिहावा हें न ठरून यांनीं कोरेंच पत्र शिष्याबरोबर पाठविलें. मुक्ताबाई आपल्या बाळपणानुरूप तें पत्र हातीं घेऊन म्हणाल्या कीं, ' चौदाशें वर्षे वांचून चांगदेव कोराचा कोराच राहिला.' यानंतर चांगदेव वाघावर बसून व हातीं सापाचा आसूड घेऊन ज्ञानेश्वरांदिकास भेटण्यास आळंदीस आले. हीं भावंडें तेव्हां सहज भिंतीवर बसलीं होतीं. चांगदेव शिष्यांच्या जयघोषांत येतांच ज्ञानेश्वरांनीं भिंतीस ' चल बये ' म्हणून आज्ञा केली. तों ती भिंत चालूं लागली. हा चमत्कार पाहतांच चांगदेव हतगर्व झाले. योगबळानें व्याघ्रसर्पासारख्या सचेतन प्राण्यांवर ते सत्ता चालवीत. पण अचेतन जड पदार्थांवरहि ज्ञानेश्वरांची सत्ता चालते हें पाहून चांगदेव त्यांना शरण गेले. ज्ञानेश्वर योगी असून आत्मनिष्ठ होते. केवळ योगाची अद्वैतानुभवापुढें मात्रा चालत नाहीं हें जाणून यांचा अभिमान गळाला व हे ज्ञानेश्वरांस शरण गेले. ज्ञानेश्वरांनीं यास ' चांगदेवपासष्टी ' चा बोध केला तरी भक्तिमार्गांतील सद्गुरुपण मुक्ताबाईकडेच गेलें. मुक्ताबाईनीं यास उपदेश केल्यामुळें ती माता व हे पुत्र अशी भावना होती. दोघांच्याहि अभंगांत ही गोष्ट व्यक्त झाली आहे.

याचे कांहीं अभंग आतांपर्यंत उपलब्ध होते; पण आतां तत्त्वसार नांवाच्या ओवीबद्ध ग्रंथाचा कांहीं भाग उपलब्ध झाला आहे. ग्रंथरचना काल शके १२३४ (स. १३१२) दिला आहे. ग्रंथरचनेचें स्थल हरिश्चंद्रगड हें नगर जिल्ह्यांतील अकोलें तालुक्यांतील हरिश्चंद्राचा डोंगर असावा. तत्त्वसारांत व चांगदेवपासष्टींत यांना चक्रपाणि म्हटलें आहे. याच्या या ग्रंथांत सिद्धपंथांतल्या योगसिद्धांची नामावलि महत्त्वाची आहे. ती ज्ञानेश्वरीतील परंपरेशीं जुळते. खेड्यापाड्यांतील ग्रामदेवतेच्या उत्सवप्रसंगीं ' चांगा भला ' असा जयजयकार होत असतो. त्यांतील चांगा हा शब्द यांना उद्देशून आणि ' भला ' हा शब्द सरस्वतीदेवीचा याच्यावर झालेल्या अनुग्रहाचा निदर्शक आहे असें तत्त्वसारांतील शारदास्तवनावरून वाटतें. असें असेल तर हे त्या कालचे सर्वांच्या आदरास पात्र झालेले महापुरुष होते हें उघड दिसतें. याचा समाधिशक १२४७ ( स. १३२५ ) ज्येष्ठ शुद्ध ७ हा आहे. यांची समाधि पुणतांबें येथें गोदावरीच्या तीरीं आहे.

चांगा वटेश्वर, चांगा केशवदास आणि चांगा मरुद्गण हीं सर्व नांवें एकाच व्यक्तीचीं आहेत. चांगा वटेश्वर हें नांव गुरूच्या नांवाशीं संबद्ध आहे. चांगा केशवदास हें नांव वैष्णव झाल्यानंतरचें दिसतें. यानें स्थापन केलेल्या केशवराजाचें देऊळ अद्यापि पुणतांबें येथें आहे. तसेंच चांगा मरुद्गण हें नांव एका पौराणिक कथेशीं संबद्ध असल्याचें महीपतीनें आपल्या भक्तविजयांत दाखवलें

आहे; आणि ती कल्पना चांगदेवाचे वंशज म्हणविणारे पुणतांब्याचे लोक मरुद्गण हें आडनांव लावीत असल्यामुळं सुचली असावी. आजहि मरुद्गण आडनांव तेथें चालू आहे. चक्रपाणि असें नांव चांगदेवाला उद्देशून चांगदेव-पासष्टींत वापरल्यासारखें दिसतें, पण तें नांव याचें होतें किंवा नाहीं, हें समजण्यास निश्चित साधन नाहीं. चांगा मुधेश मात्र याच्यानंतर दोनशें वर्षांनीं झालेला निराळा पुरुष आहे.

हा दर शंभर वर्षांनीं योग-सामर्थ्यानें जुना देह टाकून नवा देह धारण करी. अशीं याचीं चौदा समाधिस्थळें व चवदा नांवें कांहीं ठिकाणीं आढळतात.

**चांगा मुधेश**—(स. १५०५) नारायणडोह येथील एक कुलकर्णी मुधोपंत यानें सहकुटुंब तापी नदीतीरीं चांगदेव असतांना त्यांची सेवा केली. पुढें त्यांना चांगदेवाच्या वर-प्रदानावरून पुत्र झाला. त्याचें नांव चांगदेव ठेवलें. हाहि चांगदेवाप्रमाणेंच मोठा सिद्धपुरुष निपजला. विधवा स्त्रीस 'पुत्रवती भव' असा आशीर्वाद दिल्यावरून त्यानें तिच्या मृतपतीच्या अस्थींवर सिंचन केलेलें पाणी तिला प्यावयास देऊन तिला पुत्रप्राप्ति करून दिली. एका मुसलमान राजानें पंढरपुरास विठ्ठलमंदिराजवळ मशीद बांधली. लवकरच त्याची राणी मेली. तेव्हां यानें तेथें जाऊन असें सांगितलें कीं, मशीद पाडून टाकल्यास राणी जिवंत होईल. त्याप्रमाणें सर्व प्रकार घडून आला.

**चांदखान**—गुजराथचा सुलतान जो दुसरा मुज्फर, त्याचा हा पुत्र होय.

**चांदबीबी**—(स. १५४७-१५९९) ही विजापूरच्या अली आदिलशाहाची पत्नी व अहमदनगरच्या हुसेन निजामशाहाची कन्या.

चांदबीबी व अली यांचा विवाह झाल्यापासून विजापूरच्या बादशाहीचा चांगला उत्कर्ष झाला. हिनें आपल्या पतीस राज्यकारभाराच्या कामीं फार साहाय्य केलें. ही मूळची कुशाग्र, सद्गुणी व राज्यव्यवहारदक्ष होती. ही युद्धकलेंत चांगली निष्णात असून प्रत्येक स्वारीमध्यें घोड्यावर बसून आपल्या पतीबरोबर जात असे. हिला फार्सी, अरबी इत्यादि भाषांचें ज्ञान असून कानडी, मराठी इत्यादि भाषाहि समजत असत. संगीतशास्त्र व चित्रकला यांचीहि हिला चांगली माहिती होती.

स. १५८० त हिचा पति निपुत्रिक मरण पावला. मृत्यूपूर्वीं त्यानें आपल्या बंधूचा मुलगा इब्राहीम यास गादीवर बसवून सर्व राज्यकारभार आपल्या पत्नीनें पाहावा अशी योजना केली होती. त्याप्रमाणें इब्राहीम यास गादीवर बसवून चांदबीबी सर्व कारभार हुशारीनें पाहूं लागली. पुढें हिच्या निरनिराळ्या प्रधानांनीं हिची मात्रा न चालूं देतां बंडें करण्याचा प्रयत्न केला; पण तो सर्व व्यर्थ गेला. एकदां प्रत्यक्ष विजापुरास हिच्या शत्रूंनीं वेढा दिला असतां तो हिनें आपल्या पराक्रमानें परतविला.

पुढें अहमदनगरच्या गादीविषयीं तेथें तंटे सुरू झाले. मूर्तजा निजामशाहा हा आपल्या पुत्राकडून मारला गेला. परंतु पुत्र मिरान याचाहि पुढें लवकरच शिरच्छेद झाला. तेव्हां ही विजापुराहून अहमदनगरास आली. परंतु येण्या-पूर्वीच मिया मंजू नामक एका वजनदार मुत्सद्यानें शाहा-जादा मुराद यास मदतीस बोलावलें. तेव्हां मोगलांस कांहींतरी संधि पाहिजेच होती. त्यांनीं एकदम अहमद-नगरवर चाल केली. परंतु हिनें प्रसंगावधान राखून शाहाजादा मुराद याची कांहींएक मात्रा चालूं दिली नाहीं. मुराद हिच्या शौर्याची तारीफ करून व 'चांद-सुलताना' असा किताब देऊन परत गेला.

पुढें हिनें बहादुरशाहाचा पक्ष घेऊन व विजापुराहून मदत मागवून त्यालाच गादीवर बसवून त्याच्या नांवानें द्वाही फिरविली. पुढें कांहीं दिवस राज्यांमध्यें शांतता झाली; आणि हिनें राज्यसुधारणेकडे लक्ष दिलें. पुढें अकबर बादशाह खुद्द मोठमोठ्या सरदारांसह नगरवर चालून आला. पण याहि खेपेस हिच्या प्रयत्नानें सर्व निजामशाही सरदार निकरानें लढले व मोगल सैन्याचा पराभव झाला. अबुल फज्ल यानें या घनघोर रणसंग्रामाचें विस्तृत वर्णन दिलें आहे.

स. १५९९ मध्यें दानियल हा प्रचंड सैन्यानिशीं पुन्हा नगरावर चालून आला. परंतु या खेपेस निजाम-शाही सरदारांत ऐक्य नांदत नव्हतें. त्यांनीं उलट चांद-बीबीवरच हल्ला केला. हमीदखान नामक पठाणानें हिचा राजवाड्यांत खून केला (स. १५९९). अर्थात् चांद-बीबीच्या मागें मोगलांस नगर जिंकून घेण्यास फारसा वेळ लागला नाहीं (ऐने-इ-अकबरी व बील).

**चांद बोधला**—(चंद्रभट व शेख मुहंमद पाहा).

**चांद सुलतान**—(स. १७०६-३८) देवगडचा प्रसिद्ध गोंड राजा स. १७०६ त वारल्यावर त्याचा मुलगा चांदसुलतान गादीवर बसला. याचे कारकीर्दीत नागपूर हें महत्त्वाचें ठाणें झालें. त्यामुळें नागपूर व आसपासचा

प्रदेश यांची एकदम सुधारणा झाली, व पुढें मराठ्यांच्या कारकीर्दीत तर नागपूर शहर फारच वाढलें. मोगल अंमल या वेळीं मोडकळीस आला होता. त्यामुळें यानें मोगलांचाहि प्रदेश आपल्या अमलाखालीं आणला. वर्धा जिल्ह्यांतील पवनार हें एक महत्त्वाचें ठाणें होतें. तें यानें घेऊन वीस वर्षें आपल्या ताब्यांत ठेवलें.

कान्होजीशीं बेबनाव झाल्यावर रघुजी शंभर स्वारांनिशीं चांदसुलतानाकडे गेला. यानें रघुजीस ठेवून घेतलें. चांदसुलतान स. १७३८ मध्यें मरण पावला. मागें त्याच्या मुलांत गादीबद्दल तंटे झाले तेव्हां ह्याची बायको रतनकुवर हिला रघुजीनें मदत केली ( ना. प्रां. इ. ३०-६९ ).

**चिक्कदेव**--( स. १६७२-१७०४ ) म्हैसूर संस्थानांतील कंपदेवराजाचा हा पुतण्या असून दोड्डदेवाचा मुलगा होय. माता-अमृतांबे.

हा स्वतः विद्वान् व शूर होता. यानें कानडी भाषेंत व संस्कृत भाषेंत अनेक ग्रंथ केले आहेत. हा संगीतज्ञहि होता. याच्या आश्रयास अनेक विद्वान् होते. तिरुमलार्य, सिंगरार्य, चिक्कुपाध्याय, होन्नम (स्त्री), शृंगारम्म (स्त्री), वेणु-गोपाळवरप्रसाद, तिम्मकवि, मल्लिकार्जुन, चितानंद कवि, मल्लरस हे सर्वच याचे आश्रित कानडींतील महत्त्वाचे ग्रंथकार आहेत.

यानें लिंगायतधर्म सोडून वैष्णवधर्म स्वीकारला. यानेंच तंजावरच्या एकोजी ( व्यंकोजी ) राजा भोंसले याच्यापासून बंगलोर विकत घेतलें; व आणिक मुलूख मिळवून राज्य वाढविलें. यानें जमीनमहसुलाची पद्धति सुधारली व टपालाची नवी पद्धत सुरू केली.

हा आपल्या चुलत्याच्या बंदीशाळेंत तेरा वर्षे होता. यानें ऐतिहासिक साधनांचा संग्रह करून ठेवला.

हा कानडी कविहि होता. हा मेलुगोटेच्या नारायण ( स्वामी )चा भक्त होता.

ग्रंथ—चिक्कदेवराजबिन्नप ( प्रार्थना ), गीतगोपाल, भागवत, शेषधर्म, भारत.

पहिला ग्रंथ गद्य आहे. त्यांत मेलुगोटेच्या नारायणापाशीं प्रार्थना आहे; व श्रीवैष्णवमताचें सार आहे. याची भागवतावर कानडीमध्यें गद्यरूप टीका आहे. भागवताच्या टीकेला चिक्कदेवराजसूक्तिविलास असेंहि नांव आहे. भारताच्या शांतिपर्वापासून पुढील ग्रंथावर याची कानडींत टीका आहे. शेषधर्म ग्रंथावर याचीच टीका आहे.

पहिला व गीतगोपाळ हा ग्रंथ तिरुमलार्यानें करून याच्या नांवावर प्रसिद्ध केला. असावा गीतगोपालांत याचा पदसंग्रह आहे ( क. क. च. भा. २ पा. ४५६ ).

**चिक्करस**—( स. १६८० सुमार ) कानडी कवि. जैन. पिता–गिरिअप्पा, माता–तिम्मम्म.

ग्रंथ—सोण्णबैरेगौड याचें चरित्र.

हा सौण्णबैरेगौडाचा आश्रित होता. वरील चरित्रांत आपल्या चरित्रनायकानें संभाजीला जिंकल्याचें यानें लिहिलें आहे. तो आवतिनाडचा राजा व देवणापूरचा राहणारा होता ( क. क. च. भा. २ पा. ५१३ ).

**चिक्कराय आरविडु**—( स. १६१४–१६१६ ) हा विजयनगरच्या दुसऱ्या वेंकटपति आरविडूचा मानलेला मुलगा. त्यानंतर कांहीं लोकांना यानें नोकरीवरून दूर केलें, तेव्हां जगरायानें बंड करून आपल्या भाच्याला गादीवर बसविलें आणि याला कैदेंत टाकलें. एकदां हा कैदेंतून पळून जात असतां हा पकडला गेला, तेव्हां जगरायानें याच्या वंशांतील लोकांची भयंकर कत्तल केली. त्यांत याचा मदतनीस एच्चम्मा नायक यानें एक वारस गुप्त रीतीनें सुरक्षित ठेवला आणि जगरायाचा पराजय केला. आणि सुरक्षित राजपुत्र रंगराय चवथा यास गादीवर बसविलें. यानें आत्महत्त्या केली ( स. १६१६ ).

हा एका ब्राह्मण बाईचा मुलगा होय. विजयनगरच्या आरविडु घराण्यांतील दुसऱ्या वेंकटपतीचा मुलगा नव्हता, तेव्हां वेंकटाम्बा राणीनें एका ब्राह्मण बाईचा मुलगा आपसांत तडजोड करून आणला व तो आपल्यालाच झाला अशी कंडी पिकविली. त्याप्रमाणें बारसें वगैरे होऊन त्याचें नांव चिक्कराय असें ठेविलें. पुढें वेंकटराजानें याचें लग्न केलें, पण याला राजा मुलाच्या नात्यानें वागवीत नसे, राजा याला कधीं राजवाड्याबाहेर मोकळेपणानें जाऊं देत नसे, व शेवटीं याला राज्यहि मिळालें नाहीं, असा याचा इतिहास सांगतात.

**चिक्कराय संगम**—( स. १४२५ सुमार ) विजयनगरच्या दुसऱ्या हरिहराचा हा ४ था मुलगा होय. याला बुक्क २ रा, विरूपाक्ष २ रा, देवराय १ ला, आणि जोम्मन असे चार भाऊ होते.

वरील चार भावांपैकीं बुक्क २ रा आणि देवराय १ ला हे दोघेच विजयनगरचे गादीवर आले.

**चिक्कसंकण्ण**—हा केलडीच्या सदाशिव नायकाचा मुलगा. याला दोड्डसंकण्ण नांवाचा एक भाऊ होता. पण तो सावत्र असावा.

हा आपला भाऊ दोड्ड संकण्ण याच्या नंतर गादीवर आला. यानें स. १६०३ पर्यंत राज्य केलें, असें सिवेल म्हणतो. यानें एकदां विजापूरचा सेनापति मझुलाखान

याचा पराभव केला, आणि आसपासच्या बऱ्याच राजांचा मोड केला होता.

**चिक्कुपाध्याय**—( स. १६७२ ) कानडी कवि. श्रीवैष्णव. गोत्र पौरुकुत्स. कृष्णयजुर्वेदी आपस्तंब शाखा. देवता-काञ्चीवरदराज. गांव-त्रिकदंबपूर ( तेरणकांबी ), पिता-रंगार्य, माता-नाचा, ग्रंथ-कमलाचलमाहात्म्य, हस्तिगिरीमाहात्म्य, कांचीमाहात्म्य इत्यादि यांनीं अठ्ठावीस ग्रंथ केले आहेत.

हें घराणेंच कवि आहे. याचें मूळ नांव लक्ष्मीपति. पण चिक्कुपाध्याय या नांवानें याची विशेष प्रसिद्धी आहे. हा म्हैसूरचा राजा चिक्कदेवाचा मंत्री होता. हा विद्वत्तेचा चाहता, विद्वान्, उदार आणि मोठा चतुर होता.

याच्या ग्रंथांपैकीं कांहीं गद्य, कांहीं पद्य व कांहीं चंपूरूप आहेत. याचीं तालबद्ध पदेंहि बरींच आहेत. जुन्या ग्रंथकारांत याच्याइतके ग्रंथ कोणींहि लिहिले नाहींत. शिवाय याचे ग्रंथ मोठेहि आहेत ( क. क. च. भा. २. पा. ४६८ ).

**चित्तखान**—यानें विजापूरच्या अली आदिलशाहातर्फे विजयनगरच्या पेणुकोंडा राजधानीस वेढा दिला होता. त्या वेळीं जगदेवानें पराकाष्ठा करून राजधानीचें संरक्षण केलें; व मुसलमानांना वेढा उठवणें भाग पडलें. या वेळ्यांत चित्तखान हा कैद झाला.

**चित्रभानु**—बाणभट्टाच्या पित्याचें नांव.

**चित्रमटिका**—बंगालच्या पालराजांपैकीं मदनपालाची पत्नी. हिनें महाभारत ऐकवलें म्हणून एका ब्राह्मणास गांव दान दिलें ( J. R. A. S. B. ६९. १.६६ ).

**चित्रवर्मा**—हा कुलूतदेशाचा अधिपति. हा मलयकेतूच्या बाजूस असतां चाणक्यानें याला द्रोही म्हणून मलयकेतूकडूनच ठार केलें. कुलूत देश म्हणजे दक्षिण हिंदुस्थानांतील ( मुद्राराक्षस नाटक ) चंद्रगुप्त मौर्याला मगधसाम्राज्य मिळवून देणाऱ्या साहाय्यकांपैकीं एक देश असावा.

**चित्रावघराणें**—( शिवरामभट चित्राव पाहा ).

**चिदंबरदास**—( राजाराम पाहा ).

**चिदंबर दीक्षित**—( जन्म स. १७५८ ) पेशवाईच्या अखेरीस कर्नाटकांत गुर्लहोसुर ( कानडी ' गुरु होस ऊरु ' गुरुग्रामचें नवें गांव ) येथें या नांवाचे सिद्ध पुरुष होऊन गेले. हे शुक्ल यजुर्वेदीय काण्वशाखेचे ब्राह्मण असून यांच्या बापाचें नांव मार्तंड व आईचें नांव लक्ष्मीबाई असें होतें. यांचा जन्म शके १६८० कार्तिक वद्य ६ या दिवशीं झाला.

लहानपणापासून यांनीं लोकांना चमत्कार दाखविण्यास सुरुवात केली. यांना सरस्वती व सावित्री नांवांच्या दोन बायका होत्या. सहा मुलगे व एक मुलगी अशीं सात अपत्यें झालीं. मुरगोड येथें मोठी पाठशाळा स्थापन करून कांहीं वर्षे घालविल्यावर तल्लरकर देसायाच्या कांहीं प्रकरणावरून, मुरगोड येथें एक ब्रह्महत्या झाल्यामुळें, तात्काळ मुरगोडचें ठाणें उठवून चिदंबर महाराज तेथून बारा मैलांवर मलप्रभेच्या कांठीं जाऊन राहिले. त्यासच गुर्लहोसुर म्हणतात. पेशवे, रास्ते, गोखले व इतर सरदार चिदंबर दीक्षितांच्या सेवेंत येऊन राहत असत. त्यांनीं आपणासाठीं बांधलेले मोठमोठे वाडे अद्यापि तेथें दिसतात. निपाणीकर, नरगुंदकर वगैरे संस्थानिकहि चिदंबर प्रभूचे एकनिष्ठ शिष्यभावानें वागणारे सेवक झाले ( महाराष्ट्रकविचरित्र भा. ५, पृ. १४८-१५१ ).

हे बापू गोखल्यांचे गुरु असून यांची समाधि गुर्लहोसूर येथें आहे. यांनीं निजात्मबोध नांवाचा ग्रंथ लिहिला व कांहीं पदें रचिलीं.

**चिदानंद**--हे पूर्णानंदशिष्य. गुरूंनीं यांच्या विनंतीवरून ' अवधूतगीता ' रचिली. यांचें पूर्वीचें नांव बल्लाळ. कुशक्षेत्रींचे राहणार. पितृपरंपरा अशीः गणेश-गोविंद-बल्लाळ ( चिदानंद ). पूर्णानंद पाहा ( सं. सू. ).

**चिदानंदस्वामी**—एक साधुकवि. सांवतवाडी संस्थानांतील तेंडुली गांवीं हे राहत असत. तेथें यांची समाधि आहे. हे कुडाळदेशस्थ गौड ब्राह्मण होते. यांची गुरुगीतेवर 'स्वानंदलहरी' नांवाची ओंवीबद्ध टीका आहे ( ले. काल श. १६७४ ). हे शके १६३० मध्यें जन्मले व ८० वर्षांचे होऊन वारले. यांनीं अनेक ग्रंथ केले पण ते सर्व जळाले. चिदानंदलहरी छापून प्रसिद्ध आहे ( महाराष्ट्रकविचरित्र, भा. ३, पा. १२७-१३६ ).

**चित्-सुखाचार्य**—हे श्रीमतशंकराचार्यांच्या शिष्यांतील एक होत. यांची ' चित्सुखी ' नांवाची टीका प्रसिद्ध आहे.

**चिद्धनस्वामी**—अचलबाबांचे शिष्य.

**चिद्विलास**--शंकराचार्यांचे एक शिष्य.

**चिन्नतिम्म**—हा विजयनगरच्या रामराय आरविदूचा मुलगा होय. हा रामरायास कोंडम्मा राणीपासून झाला. रायचूरच्या किल्ल्यांत यानें आपला जम चांगला बसविला

होता. याला कोंद नांवाचा एक भाऊ होता. तो अनेगोंदीचा सुभेदार होता. तिम्माचे कांहीं शिलालेख प्रसिद्ध आहेत. हा रायचूरचा सुभेदार होता.

**चिन्नदेवी**--विजयनगरचा पहिल्या कृष्णदेवरायाची ही बायको. व्यंकटाद्रीच्या राज्याभिषेकाच्या वेळीं कांहीं स्वतंत्र हक्क हिला पाहिजे होते. हिच्या पासून झालेल्या मुलीचें लग्न कृष्णदेवरायानें तिरुमलाशीं लाविलें होतें.

**चिन्नबोम्म नायक**—याच्या पित्याचें नांव चिन्नवीर. वेलोर येथील हा एक नायक होय. हा विजयनगरच्या आरविदु घराण्यांतील दुसऱ्या वेंकटपतिदेवरायाच्या कारकीर्दीपर्यंत जिवंत होता. यानें एक मोठा समारंभ करून अप्पय्य दीक्षितांना शिष्यवृत्ति दिली.

याचा मुलगा लिंगमा हा याच्यानंतर वेलोरच्या गादीवर आला. याच्या बापाचें नांव विरप्पा नायक असें होतें.

अप्पय्या दीक्षिताच्या शिवार्कमणिदीपिका ग्रंथाच्या शेवटीं चिन्नवीराचा पुत्र चिन्नबोम्म हा अप्पय्या दीक्षिताचा आश्रयदाता होता, असें सांगितलें आहे. याच्या शिलालेखाचे काल श. १४७१ व १४८८ आहेत ( इंडि. अँटि., व्हा. १३, पा. १५५; एपि. इंडि. ३. २३८ ).

**चिन्नभट्ट**—यानें केशवमिश्राच्या 'तर्कभाषा' या ग्रंथावर टीका लिहिली आहे.

यानें आपली वरील टीका, विजयनगर येथील पहिल्या बुक्कचा भाऊ हरिहर, त्या हरिहर राजाच्या कारकीर्दीत लिहिली. यावरून याच्या टीकेचा रचनाकाल स. १४ व्या शतकाच्या पूर्वार्धांत येतो.

**चिन्नविरन्ना**—हा एक तेलगू कवि होय. तेन्नाली येथील हा कवि कोंडवेडू येथील अन्नवेम्मारेडी राजाच्या वेळीं उदयास आला.

याचा वडील भाऊ पेद्दविरन्ना नांवाचा होता. हे दोघेहि बंधु प्रत्यहीं दरबारांत जात असत. एकदां राजानें अशा अवघड विषयावर कवित्व करण्यास सांगितलें कीं, तशा विषयावर त्यापूर्वी कोणाहि कवीनें कवित्व केलें नव्हतें. पेद्दविरन्नानें एकदम थोडक्या अवधींत कवित्व करण्याचें कबूल केलें. पुढें घरीं आल्यावर आपल्या बायकोकडून चिन्नाला ही हकीकत कळविली. चिन्नानें देवीची प्रार्थना केली. तिनें चिन्नविरन्नासाठीं पांच सर्गांचें उत्तम काव्य लिहिलें. शेवटच्या पांच ओळी बाकी राहिल्या. पुढें ते पांच श्लोक पेद्दविरन्नानें करून तें काव्य राजाला अर्पण केलें. त्या दिवसापासून चिन्नविरन्नाची कवित्वाविषयीं चोहोंकडे ख्याती झाली ( परशा–तेलगु वाङ्मय ).

**चिन्नवीर**--चिन्नपोम्माचा पिता.

**चिन्नव्यंकट**—( व्यंकट ३ रा ) विजयनगरच्या रामरायाजा हा नातू असून श्रीरंगरायाचा मुलगा होय. याला पेद्द व्यंकट नांवाचा एक भाऊ होता श्रीरंगरायाला हा लक्ष्मम्मा बायकोपासून झाला.

**चिन्नसंकण्ण नायक**--( स. १५६०-१५७० ) हा इक्केरीच्या केळडी घराण्यांतील सदाशिव नायकाचा मुलगा.

**चिप्पड जयापीड कर्कोटक(काश्मीर)**--ललितापीडाचा अल्पवयी मुलगा. याचा मामा उत्पल व मम्म हे याचा कारभार पाहत. यालाच बृहस्पती म्हणत असावेत. दोन प्रधानांचे विरोधांत हा पदच्युत झाला.

**चिमण कवि**--( स. १८१३-७२ ) अकुळनेरचा मराठी कवि. हंसपद्धति ग्रंथाचा कर्ता.

**चिमणलाल**—पेशव्यांचा कलकत्त्याचा वकील. सेवकरामाचा पुत्र.

**चिमणाजी कक्काजी भोसले**— हा कक्काजी भोसल्याचा ( भांबोरे येथील ) थोरला मुलगा होय. याला आप्पासाहेब या नांवाचा एक भाऊ होता.

हा मोठा कर्ता व स्वभावानें भोळा होता. हा कोंकणांत लेकीस भेटण्याकरितां गेला असतां तेथेंच वारला, असें सांगतात. याला राघोजी ऊर्फ रावसाहेब व आबासाहेब या नांवाचे दोन मुलगे होते ( मं. सप्तम सं. वृ. श. १८४१ पृ. ६९ ).

**चिमणाजी दामोदर मोघे**—( मृ. स. १७३१ सुमार ) हा कोंकणांतील हरिहरेश्वराचा राहणारा. याच्या घराण्यास रिंगणवांवकर जहागीरदार असें म्हणतात. ताराबाईच्या वेळेस हा उदयास आला. शाहूनें यास आपणाकडे घेऊन पंडित राजाज्ञा हें पद दिलें. शाहूला सोडण्यापूर्वीपासून याचा शाहूशीं संबंध असावा. याचा व बाळाजी विश्वनाथाचा विशेष घरोबा होता. पेशवे मोघ्यास चिरंजीव लिहितात. स. १७२४ मध्यें शाहूनें यास निजामावर पाठविलें. याच सालीं झालेल्या सारंगपूरच्या लढाईत हा हजर होता. पण पुढें शाहूशीं याचा बेबनाव होऊन हा कोल्हापूरच्या संभाजीस मिळाला व तेथें याला कांहीं काल मुख्य मंत्र्याचें पद मिळालें ( स. १७२९ ). डभईच्या लढाईत हा दाभाड्यातर्फे लढत असतां पाडाव झाला व याचा सरंजाम जप्त करण्यांत आला. तीन गांवें जहागिरीदाखल ठेवण्यांत आलीं. याचा पुत्र बळवंतराव; तोहि राजकारणांत वावरत होता ( म. रि. म. २ व ३ ).

**चिमणाजी नारायण पंतसचीव**—(स. १७३७–१७५७) यांचा जन्म स. १७१३ त झाला. हे शंकराजी नारायणाचे दत्तक पुत्राचे पुत्र होत. यांस नारोशंकरनें दत्तक घेतलें. यांचे स्वभावाबद्दल व योग्यतेबद्दल लोकमत फार चांगलें होतें. यांनीं संस्थानची गादी नेऱ्याहून वाडा जळाल्यामुळें भोरास स. १७४० मध्यें आणली. भोरचे पंतसचीव म्हणण्याची प्रथा या वेळेपासून पडली. यांची कारकीर्द सुखाची गेली. चिमणाजी नारायण हे भोर येथें स. १७५७ त निवर्तले.

**चिमणाजी बापूजी**—(बाबाजी बापूजी मुद्दल पाहा).

**चिमणाजी रखमांगद चिटणीस**—(मृ. स. १७८०) हा रखमाजी गणेश चिटणिसाचा मुलगा. या घराण्याचें मूळ आडनांव रणदिवे होतें. सर्व सुभ्यांवर चिटणिशीचे कामावर या घराण्यातर्फे कारकून जात असत.

हा जानोजी भोसल्याचे वेळेस चिटणिसीच्या कामावर होता. पेशव्यांनीं जानोजीवर स्वारी केली असतां जानोजीनें चिमणाजी रखमांगद यास पेशव्यांची समजूत करण्यासाठीं पुण्यास पाठवलें होतें.

हा देवाजीपंताचे पक्षाचा असल्यामुळें जानोजीचे कारकीर्दीचे अखेरीस जेव्हां देवाजीपंतावर जानोजीची गैरमर्जी झाली तेव्हां त्यानें ह्याला जबर दंड ठोठावला.

जेव्हां कांहीं पठाणांनीं मुधोजी भोसल्यावर पैशासाठीं हल्ला केला, तेव्हां चिमणाजी त्याजबरोबर होता. यानें पठाणांशीं झटापट केली.

स. १७८० त चिमणाजी रखमांगद मरण पावला; व त्याचे जागीं त्याचे मामाचा मुलगा कृष्णराव माधव हा चिटणीस झाला (ना. प्रां. इ.).

**चिमणाजी रघुनाथ पंतसचीव** ऊर्फ **धाकटे नानासाहेब**—(स. १८३६–१८७१) यांचा जन्म १८३३ मध्यें झाला. हे तिसऱ्या वर्षी गादीवर आले. यांचें पालनपोषण व राज्यकारभार यांच्या मातोश्री गंगाबाई यांनीं केला. सातारचें राज्य नष्ट झाल्यामुळें सचिव १८४८ त इंग्रजांचे प्रत्यक्ष मांडलिक झाले. शंकराजी नारायणानंतर यांचीच कारकीर्द संस्मरणीय झाली. रामबागेच्या ओढ्यास धरण व पाणीव्यवस्था, आगीच्या वेळीं मदत, जळालेल्या राजवाड्याचें बांधकाम, नदीघांट, रस्ते, सरकारी इमारती व चावड्या, मामलेदार, फौजदार व मुन्सफ यांची नेमणूक व मोठा दानधर्म यांमुळें यांची कारकीर्द फारच सुखावह गेली. याच वेळीं राणीचा जाहीरनामा प्रसिद्ध झाला. त्यामुळें संस्थानिकांस नवीन सनदा देऊन त्यांचे मुलुखावरील हक्क व दत्तक घेण्याचा हक्क मान्य करण्यांत आला. ३९ व्या वर्षी हे वारले. हे उदार, हौशी व करारी होते.

**चिमणाजी शंकरराव ऊर्फ नानासाहेब पंतसचीव**—(राज्यकाल स. १७९८–१८२७) यांचा जन्म १७९१ त झाला. हे भोरच्या गादीवर ८ व्या वर्षी आले. नजराणा बराच मोठा भरावा लागला. खजिना रिकामा असल्यामुळें यांस वाठारच्या निंबाळकराकडून कर्ज काढावें लागलें. यांत व मातोश्री ताईसाहेब यांत वैमनस्य होतें. फौजबंद निंबाळकरानें दुहीचा फायदा घेऊन सचिवांस कैद केलें व भोरास घाशीराम कोतवाली गाजविली. रावबाजीनें बापू गोखल्याकडून सचिवांची सुटका केली व निंबाळकरास हाकून लावलें. यांचे कारकीर्दींत इंग्रज व पेशवे यांच्या लढाया झाल्या. स. १८१८ त रावबाजी पुणें सोडून पळाले तेव्हां हेहि त्यांबरोबर होते. लवकरच हे इंग्रजांस मिळाले. यांस पुत्रसंतान नव्हतें. सापत्न बंधु वामनराव यांचा मुलगा दत्तक घेऊन त्याचें नांव रघुनाथ चिमणाजी ठेविलें. हे स. १८२७ त निवर्तले.

**चिमाजी आपा**—(जन्म स. ? मृत्यु स. १७४० डिसेंबर १७) हा बाळाजी विश्वनाथाचा दुसरा मुलगा. दमाजी थोराताच्या कैदेंत हा बापाबरोबर कांहीं दिवस होता (स. १७१३). बापाबरोबर हा दिल्लीस गेला होता (स. १७१८-१९). पेशवाई मिळाल्यानंतर थोरल्या बाजीरावानें मोगलांच्या विरुद्ध चढाईचें धोरण स्वीकारलें, तेव्हां हा माळवा प्रांतांत मुलुखगिरीवर होता. तेथें हा उदाजी पवाराचा दिवाण म्हणून कांहीं दिवस काम करीत असे. तेव्हांपासून हा मोहिमावर जातीनिशा जाऊं लागला. आजपर्यंत अशी समजूत होती कीं, यानें गिरिधरबहादूरला सारंगपूरच्या लढाईत मारलें, पण आतां असें ठरलें आहे कीं, त्याला स. १७२८ च्या डिसेंबरांत यानें आमझरा येथें मारिलें (पे. द. १३. १५–१६). आमझरा हें ठिकाण माळव्यांत मांडवगडाजवळ आहे. हीच याची पहिली लढाई होय.

यानें गुजराथ प्रांताची चौथाई कायम करून घेण्याकरितां स. १७२९ च्या पावसाळ्यानंतर स्वारी केली. यानें तडफेनें प्रांत काबीज करून खंडणी घेण्यास सुरुवात केली. आणि शेवटीं मराठ्यांच्या तडाख्यांतून सुटण्याकरितां सरबुलंदखानानें चौथाई सरदेशमुखीचे हक्क करार करून दिले. ही गोष्ट ता. १७–१०–१७२९ पूर्वी झाली.

नंतर माळव्याचा सुभेदार दयाबहादुरावर दोन स्वाऱ्या करून त्याला तिरलाच्या लढाईंत यानें ठार केलें आणि माळवा हस्तगत केला ( स. १७३०–३१ ).

यानंतर शाहूच्या आज्ञेनें सिद्दी सातावर कोंकणांत चालून गेला; आणि त्याला यानें ठार केलें ( स. १९–४–१७३६ ).

मराठ्यांचें निजामाशीं युद्ध सुरू असतां हा निजामाला पायबंद घालण्याकरितां तापीतीरावर फौजबंद होऊन सज्ज होता.

यापुढें वसईच्या युद्धांत हा प्रमुख होता. पोर्तुगीज व मराठे यांचा बेबनाव स. १७३१ पासून असला तरी स. १७३७ मध्यें हें प्रकरण अगदीं निकरावर आलें. पोर्तुगीजांचा धार्मिक जुलूम हें या लढाईचें मुख्य कारण आहे. शिवाय पोर्तुगीजांचें चढाचें धोरण हेंहि या युद्धाचें कारण होय. या युद्धाची उठावणी गंगाजी नाईक अणजूरकर व अंताजी रघुनाथ कावळे यांनीं केली. स. १७३७ मार्च २७ ला मराठ्यांनीं ठाण्याचा किल्ला घेतला. तेथील तोफांचा आवाज यानें बदलापुरावर ऐकला. पण भोपाळच्या लढाईमुळें इकडे पुनः दुर्लक्ष झालें. पण स. १७३७ च्या नवंबरांत पुनः जोराची मोहीम सुरू झाली. आणि माहीम काबीज झाल्यावर खानदेशांतून चिमाजी स्वतः येऊन लढाईंत सामील झाला. पोर्तुगीज सेनापति पेड्रोमेलो यानें ठाण्यावर अचानक हल्ला केला, पण त्यांत तो मारला गेला ( स. ६.१२.१७३८ ). या वेळीं मल्हारराव होळकरासुद्धां बहुतेक सरदार लढाईंत सामील झाले होते. एकापुढें एक ठाणीं घेत मराठ्यांनीं तारापूरचें ठाणें शर्थीनें लढून घेतलें. तेथें बाजी भिमराव रेटरेकर पडला ( ता. ८.१.३९ ). पुढें तीन महिने निकराची लढाई झाल्यावर वसईचा किल्ला ताब्यांत आला ( ता १३ मे १७३९ ).

शेवटीं यास क्षयाचें दुखणें लागलें. वसई ताब्यांत तर येईना. तेव्हां यानें सरदारांना बोलावून सांगितलें; ' वसई ताब्यांत येत नाहीं. माझा हेतु वसई घ्यावी असा आहे. तरी तोफ डागून माझें मेलेलें शरीर तरी वसईच्या किल्ल्यांत पडेल असें करा.' तेव्हां वीरश्रीनें सर्वांनीं किल्ल्याचे बुरुज उडविले आणि वसईच्या किल्ल्यावर मराठ्यांचें निशाण फडकलें ( काव्येतिहाससंग्रह प. या. ४९६ ).

या लढाईमुळें याचें नांव अजरामर झालें आहे. मराठ्यांच्या महत्त्वाच्या व अत्यंत जुटीनें केलेल्या लढाईपैकीं ही एक लढाई होय. यांत मराठ्यांना फिरंग्याचा ३४० गांवें असलेला पाऊणशें मैल लांबीचा पट्टा, २० किल्ले व २५ लाखांचा दारूगोळा वगैरे साहित्य मिळालें. इतक्यांत बाजीराव वारल्याची बातमी आल्यामुळें हा पुण्यास आला आणि बाजीरावाचा थोरला मुलगा साताऱ्यास नेऊन यानें त्याला पेशवाईचीं वस्त्रें देवविलीं. त्याच वेळीं वसई जिंकल्याबद्दल याचा सन्मान करण्यांत आला.

पुढें स. १७४० मध्यें यानें दीव व दमण यांमधील रेवदंडा नांवाचें ठिकाण ताब्यांत घेतलें आणि वसईचा सर्व किनारा ताब्यांत घेऊन फिरंग्यांना गोव्यांत फक्त ठेवलें. तेथून परत आल्यावर याची आधींच ढासळलेली प्रकृति वाऱ्यानें अधिकच ढांसळली आणि ता. १७-१२ १७४० रोजीं हा मृत्यु पावला.

याची पहिली बायको रखमाबाई. तिला ता. ३-८-१७३० रोजीं सदाशिवराव हा मुलगा झाला आणि ता. ३१-८-१७३० रोजीं पुणें येथें ती वारली. नंतर यानें दुसरें लग्न ता. ९-१२-१७३१ रोजीं केलें. तिचें नांव अन्नपूर्णाबाई. तिला बयाबाई नांवाची मुलगी झाली. ती गंगाधर नाईक ओंकारास दिली होती (ता. १४-४-१७४५ ). अन्नपर्णाबाई याच्याबरोबर सती गेली. तिचें वृंदावन पुणें येथें ओंकारेश्वराच्या दारासमोर आहे.

हा थोरल्या बाजीरावापेक्षांहि कांहीं बाबतींत श्रेष्ठ होता. बाजीरावास पेशवाई मिळाली तेव्हां यास त्याची मुतालिकी मिळाली होती. हा शूर, धोरणी, मनमिळाऊ व नीतिमान् होता. वसईच्या किल्ल्यांत सांपडलेल्या फिरंगी सरदाराच्या मुलीस यानें सन्मानानें परत पाठविलें ही गोष्ट प्रसिद्ध आहे. शाहू व इतर सरदार याच्या मध्यस्थीनें बाजीरावाकडील कामें उरकून घेत. बाजीरावानें उत्पन्न केलेल्या अनेक प्रकरणांचा हाच निकाल लावी. याला गुजराथी लोक चिमणराजा म्हणत असत.

२. (जन्म स. ३०-३-१७७४, मृत्यु स.९-६-१८३०) हा रघुनाथराव पेशव्यांचा औरस पुत्र. याला सवाई माधवरावाच्या विधवा बायकोच्या मांडीवर दत्तक देऊन पेशवाई चालविण्याचा नाना फडणीसाचा विचार होता. हें दत्तविधान म्हणजे सुनेच्या मांडीवर सासऱ्यानें दत्तक बसणें होतें. असें दत्तविधानहि आपटे वगैरे तत्कालीन शास्त्री लोकांची संमति मिळून झालें.पण हा पेशवा औट घटकेचाच झाला. याचें चरित्रहि हृदयद्रावक आहे ( म. रि. उ० ३, पा. ५६४–६६ ).

**चिमाबाई भोसले**—मुधोजी भोसल्यांची बायको. नानाशीं तह करण्याकरितां मुधोजीनें दिवाकरपंतास पुण्यास पाठविल्यावर त्यानें बिंबाजीची समजूत काढण्याकरितां आपली बायको चिमाबाई हिची रवानगी केली. हिनें रायपुरास जाऊन बिंबाजीची समजूत केली,

व त्यास थांबविलें. स. १७९८ त चिमाबाई ही आपला मुलगा व्यंकोजी याजबरोबर जगन्नाथाचे यात्रेकरितां कटक प्रांतांत गेली. एक वर्षभर त्यांनीं तेथेंच मुक्काम केला व त्या प्रांतांत अव्यवस्था झाली होती ती मोडून टाकली. स. १७९० त ही दु. रघुजीच्या बरोबर गोदावरीच्या यात्रेस गेली होती. व पुन्हां स. १८०१ सालीं ही त्याजबरोबर याच यात्रेस गेली होती. स. १८०७-८ चे सुमारास हिनें व्यंकोजीबरोबर नर्मदेच्या उगमाजवळ अमरकंटकची यात्रा केली. स. १८१०-११ मध्यें व्यंकोजी काशीयात्रेस गेला असतां त्याजबरोबर हीहि गेली होती, असें बखर पान १८१ मध्यें लिहिलें आहे; परंतु चिमाबाई ही अगोदरच मरण पावल्यामुळें हें विधान चुकीचें दिसतें.

हिला रघूजी, खंडोजी ऊर्फ चिमणाबापू व व्यंकोजी ऊर्फ मन्याबापू असे तीन मुलगे होते व बाळाबाई, ठकूबाई व झिंगराबाई अशा तीन मुली होत्या ( ना. प्रां. इ. ).

**चिंतामणराव पटवर्धन**—( मृत्यु स. १८५१ ) सांगली संस्थानांतील पांडुरंगरावाचा मुलगा.

हेच खरे सांगली संस्थानचे संस्थापक होत. खर्ड्यांच्या लढाईत हे हजर होते. याशिवाय यांनीं पुष्कळ कामगिऱ्या केल्या व आपलें नांव चांगलेंच प्रस्थापित केलें. यांच्याच वेळीं पटवर्धन घराण्यांत वांटण्या होऊन मिरज व सांगली हीं संस्थानें निर्माण झालीं.

**चिंतामणि**—पद्यसंग्रहावरून यांचे गुरु गोविंद होतेसें दिसतें. दैवत नरहरी. यांनीं मोरोपंतांस नमन केलें आहे. ग्रंथ—गोपीचंदाख्यान, सीतास्वयंवर, अभंग, पदें (सं.सू.).

**चिंतामणि त्रिपाठी**—( जन्म स. १६०८ ) हिंदी कवि. पिता रत्नाकर त्रिपाठी. हा भूषणचा भाऊ. यास बाबू रुद्रसाही, शहाजहान व जैनदी मुहंमद यांनीं आश्रय दिला. ग्रंथ—कविकल्पतरु, छंदविचार, काव्यविवेक, काव्यप्रकाश, रामायण. हा नागपूरच्या मकरंदशाहाचा आश्रित होता. याला मणिमाल म्हणत.

**चिंतामणि दीक्षित**—(स. १७३६-१८११ सुमार) हा ज्योतिषी पेशवाईत होऊन गेला. यास पेशवाईत १२५ रुपये दक्षिणा होती. याचें वसतिस्थान सातारा होय.

यानें सूर्यसिद्धांताची सारणी केली आहे आणि गोलानंद नांवाचा वेधयंत्राचा ग्रंथ शक १७१३ मध्यें केला आहे.

याचे वंशज सध्यां सातारा येथें आहेत. याचें गोत्र वत्स, पित्याचें नांव विनायक आणि पूर्वजांचें वसतिस्थान चिपळूण होतें ( भा. ज्यो. ).

**चिंतो अनंत देवस्थळे**—हा रघुनाथराव पेशवे यांचा एक मदतनीस होता.

माधवराव व जानोजी भोसले यांच्या तहाच्या अटी ठरवण्यासाठीं यास व चिंतोपंत रायरीकरास पाठवलें होतें ( ना. प्रां. इ. )

**चिंतो चिमणाजी**—एक बंडखोर ब्राह्मण. यानें सिकंदर आदिलशाहाच्या कारकीर्दीत बंड केलें.

**चिंतो विठ्ठल रायरीकर**—( मृत्यु स. १७८१ ) हें देशस्थ ऋ. ब्राह्मण घराणें. मुठें खोऱ्यांतील रायरीचे जोशी. सखारामबापूंचे वशिल्यानें मोरो विठ्ठल व चिंतो विठ्ठल या बंधूंचा प्रवेश दादाकडे होऊन त्यांच्याच पक्षाकडे हे सर्व काळ राहिले.

माधवरावास दादानें कैद केल्यावर चिंतो विठ्ठलास फडणिसी दिली, ती माधवरावानें राक्षसभुवनानंतर काढून पूर्ववत् भानूंकडे सोंपविली. तरी पण दादांचा कारभार चिंतो विठ्ठलच पाहत असे. घोडपच्या लढाईत मोरो विठ्ठल मारला गेला, व चिंतो विठ्ठलाचा पाडाव झाला. हा किल्ले नगर येथें अटकेंत होता ( मा. रो. २ पृष्ठ २४० ). नारायणरावाचे वधानंतर याची सुटका होऊन पुनः याचें माहात्म्य वाढलें. परंतु यास रघुनाथराव दादाची बाजू सावरतां आली नाहीं. इंग्रजांचा पराभव होऊन दादा ठिकाणीं बसल्यावर ता. १९-४-१७८० रोजीं महादजीनें चिंतोपंतास गुजराथेंत पकडून उज्जनीस रवाना केलें, तेव्हांपासून हा बहुधा मरेपर्यंत बंदींतच होता. याची जिंदगीहि सर्व जप्त झाली.

' चिंतोपंत पळून गेले होते ते उज्जनींत एका ब्राह्मणाचे घरीं लपून राहिले. शोध करतां सांपडले. त्यांस व आणखी तिघांस अलंकार भूषणें घालून पुण्यास रवाना करितों. त्यांची बायको व लोक विष खाऊन मेली. दोघे कारकुनास मार दिला, ते मेले. पाटिलबावांनीं त्यांचे पांच सहा बारगीर व एक कारकून मारिला. चिंतोपंतांचे पायीं बेड्या आहेत. अन्न खात नाहींत. ' ( १८-१०-१७८० ).

' चिंतो विठ्ठल कैदेंत असतां किल्ल्यावर संन्यासी वारले' असा उल्लेख शकावलींत स. १७८१ चा आहे. याच्या कुटुंबाची स्थिति जाणून दुसऱ्या बाजीरावानें त्रिंबक चिंतामण यांस पांच गांव इनाम दिले ( स. १७९९ ).

या घराण्याचे कागद राजवाडे खंड १२-१३ यांत छापलेले असून त्यांत दादाच्या वनवासाचें वर्णन भरपूर आहे. यांचें घराणें पुणें येथें ओंकारेश्वरापाशीं स्वतःच्या वाड्यांत नांदत आहे.

पेशवे व जानोजी भोसले यांचें युद्ध संपल्यावर तहाची वाटाघाट करण्यासाठीं यास व चिंतो अनंत देवस्थळे यांस

जानोजीकडे पाठवलें होतें ( ना. प्रां. इ. पा. १६४, म. रि. म. भा. ४, पा. २८२ ).

**चिरंजीव भट्टाचार्य**—( ग्रंथकाल स. १७०३ ) हा काश्यपगोत्री ब्राह्मण. याच्या घराण्याचा मूळ पुरुष दक्ष. दक्षाच्या वंशांत काशीनाथ नांवाचा पुरुष कुलदीपक झाला. तो सामुद्रिकविद्येंत निष्णात असल्यानें सामुद्रिकाचार्य या नांवानें विख्यात झाला. त्याला राजेन्द्र, राघवेन्द्र व महेन्द्र असे तीन पुत्र होते. त्यांपैकीं राघवेंद्राला भट्टाचार्य शतावधान अशी बहुमानदर्शक पदवी प्राप्त झाली. हे शीघ्र कवि होते. राघवेंद्राचे मंत्रार्थदीप व रामप्रकाश ( कालनिर्णयावर ) असे ग्रंथ आहेत. राघवेंद्राचा चिरंजीव भट्टाचार्य पुत्र होता. याचें वास्तविक नांव रामदेव किंवा यामदेव असें होतें. पण प्रेमाचें नांव चिरंजीव हेंच सर्वत्र रूढ झालें. सतीशचंद्र विद्याभूषण यांनीं आपल्या 'हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक' या पुस्तकांत ( पा. ४८१ ) याची नैय्यायिकांत गणना केली आहे. पण याचे साहित्यविषयक ग्रंथाशिवाय इतर ग्रंथांचा पत्ता लागत नाहीं. यानें आपला काव्यविलास ग्रंथ स. १७०३ मध्यें बनवला.

याचे ग्रंथ –१ काव्यविलास, २ विद्वन्मोदतरंगिणी, ३ माधवचंपू, ४ वृत्तरत्नावलि, ५ शृंगारतटिनी, ६ कल्पलता, ७ शिवस्तोम.

**चुखल**—अभिनवगुप्ताचा पिता व वराहगुप्ताचा मुलगा.

**चुल्लिकाभट्ट**—याच्या एका वृत्तीचा रायमुकुटानें उतारा घेतला आहे.

**चूडामण जाट**—( मृत्यु स. १७२३ ) हा भरतपूरच्या जाटांचा मूळ पुरुष जो बिज त्याचा मुलगा होय. बापाचे मृत्यूनंतर हा जाटांचा पुढारी बनला व हा जाट लोकांचें मोठें सैन्य जमवून बादशाही प्रांत कार्वाज करूं लागला. डींग, कुंभेर वगैरे बळकट जागा याच्या हस्तगत झाल्यामुळें हा दिल्लीच्या बादशहासहि अवजड झाला. तेव्हां दिल्लीचा बादशहा फर्रुखसियर यानें जाट लोकांस जहागीर देऊन, संतुष्ट करण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याला यश आलें नाहीं.

तेव्हां स. १७१८ मध्यें बादशहानें जयपूरचा राजा सवाई जयसिंग यास कांहीं सैन्य देऊन जाट लोकांवर पाठवलें. जाटांनीं थून व सिनसिनी हे दोन्ही किल्ले मोठ्या हिय्यानें लढवून जयसिंगाचें कांहीं चालूं दिलें नाहीं. पुढें सय्यदबंधूंनीं मत्सरबुद्धीनें जाटांशीं तह केल्यामुळें सवाई जयसिंगास वेढा उठवावा लागला. चूडामण यानें मुहम्मदशाहाविरुद्ध सय्यदबंधूंस चांगलें साहाय्य केलें.

स. १७२३ मध्यें याचें व याच्या मुलाचें भांडण होऊन यानें संतापाच्या भरांत आत्महत्या करून घेतली. यास बदनसिंग व मोहकमसिंग असे दोन पुत्र होते ( इ. सं. ऐ. च. भा. २ पृ. १–२ ).

**चूंडा**—(स. १४२० सुमार) मेवाडचा राजा लक्षसिंह ऊर्फ लाखा याचा पुत्र. राठोड रणमल्लाची बहिण हंसाबाई हिच्याकरितां याला विनंति करण्यांत आली. तेव्हां याचा पिता सहज म्हणाला, 'मला म्हाताऱ्याला कोण विचारतो.' त्या बोलण्यावरून याला वाटलें कीं, आपल्या पित्याला लग्न करण्याची इच्छा आहे. पण रणमल्ल आपली मुलगी त्याला देण्यास तयार नव्हता. कारण याला दिली असतां ती पट्टराणी होणार होती व तिचा मुलगा राजा होणार होता. पण म्हाताऱ्याला मुलगी देण्यांत कांहींच फायदा नव्हता. हें जाणून यानें त्याची समजूत घातली. आपला राज्यावरील हक्क सोडून तशी एकलिंगजीची शपथ घेतली व प्रतिज्ञापत्रकहि लिहून दिलें. त्यामुळें हंसाबाईच्या मुलाला राज्य मिळेल अशी व्यवस्था झाल्यावर तिचें लक्षसिंहाशीं लग्न झालें. तिला मोकल नांवाचा मुलगा झाला. त्याच्या संरक्षणाची जबाबदारी लक्षसिंहानें याच्याकडे सोंपविली. हाहि ती चांगली पार पाडीत असे. पण रणमल्लानें याच्या विरुद्ध कागाळ्या करून हा मोकलला ठार करून राज्य घेऊं इच्छितो असें भासविलें. तेव्हां हंसबाईच्या इच्छेवरून मेवाडचा यानें त्याग केला व आपल्या भावासह मांडूच्या सुलतानाकडे जाऊन राहिला. त्यानें याला सन्मानपूर्वक ठेवून घेतलें व कांहीं जहागीरहि दिली. यानें आपला राघवदेव नांवाचा भाऊ फक्त मोकलच्या जवळ रक्षणार्थ ठेवला. याच्या मरणानंतर छोटा पुत्र काना मंडोवरचा राजा झाला. असा या पितृभक्त चूंडाचा इतिहास आहे.

**चेतक**—वैशालीचा राजा. याची मुलगी चेल्लना, ती बिंबिसाराची पत्नी, घराणें लिच्छवी. महावीराची आई त्रिशला ती याची बहीण.

**चेतसिंग**—( स. १७७०–१८१० ) काशीचा राजा. इंग्रजांनीं स. १७७५ मध्यें याला लखनौच्या नबाबाच्या अंमलाखालून काढलें आणि स्वतंत्र केलें. हेस्टिंग्जनें याजकडून पिळून पैसा काढण्याचा प्रयत्न केला; व एकदां तर याला कैद केलें. तेव्हां हेस्टिंग्जच्या विरुद्ध काशीचे लोक झाले व त्याला पकडण्याकरितां त्याच्या वाड्याला वेढा दिला. पण हेस्टिंग्ज नागपूरकर भोसल्यांचे वकिलांच्या पालख्यांतून ब्राह्मणाचा वेष घेऊन पळाला. पुढें महादजी शिंद्यानें याला आश्रय दिला व पांच लक्षांची जहागीर

दिली. इंग्रजांनीं 'याला हुसकून द्या तर तहाला येतों' असा अँडर्सनबरोबर निरोप पाठविला, तेव्हां महादजीनेंहि 'पाहुण्याला काढून देणें बनणार नाहीं. वाटल्यास तहास येऊं नका' असा ठोक जबाब दिला. पुढें दौलतरावानेंहि याचा बचाव केला. याचा वंश अद्याप 'काशीनरेश' म्हणून शिंदेशाहींत लहानशी जहागीर भोगीत आहे. चेतसिंगानंतर हेस्टिंग्जनें महीपत नारायण नांवाचा पुरुष गादीवर बसविला. त्याचा वंश अद्यापि काशीजवळ गंगेच्या पलीकडे रामनगर येथें नांदत आहे.

**चेन्न**—विजयनगरच्या दुसऱ्या वेंकटदेवरायाचा सेनापति. यानें नेलोरच्या बंडखोर लिंगमानायकाचा पराजय केला.

**चेन्नप्प**—(स. १३९७) विजयनगरच्या मल्लिनाथ संगमचा पुत्र.

**चेरमाण पेरुमाल**—(मृ. स. ८३१) हा चेर वंशांतील एक राजा. हा राज्य करीत असतां अरबांनीं मलबार किनाऱ्यावर स्वाऱ्या केल्या. याचें राज्य पांड्य राजानें घेतल्यावर हा अरबांच्या बरोबर मक्केला गेला व तेथें यानें मुसलमानी धर्म स्वीकारला. व तेथेंच हा स. ८३१ मध्यें मेला. याच्या शिलालेखांत कोल्लम किंवा मलबार शक वापरीत. हा शक स. ८२४–८२५ सालीं सुरू झाला. कांहींचें म्हणणें हा शक यानें आपल्या राज्याभिषेकाच्या वेळीं सुरू केला; व कोल्लम अथवा क्विलान शहर त्या वेळीं स्थापिलें. याच्या नाण्यावर धनुष्यबाण व तरवार आढळते. यानें मृत्यूपूर्वीं एक मुसलमान मौलवी चिठ्ठी देऊन मलबारांत पाठविला. त्यानें राजाच्या मदतीनें मशिदी वगैरे बांधून मुसलमान धर्माचा प्रचार केला. याचें मुसलमान झाल्यावरचें नांव अबदुल रहिमान सोनिनी असें होतें. याचा परिणाम अद्यापीहि त्रावणकोरच्या घराण्यावर दिसतो. मलबारमधील मुसलमानांना आज हिंदु कायदा लागू आहे याचें कारणहि हेंच असावें.

**चेरुमा**—(पुलया पाहा).

**चेलप्परम्बु नम्बूतिरी**—हा एक प्रसिद्ध तामीळ कवि होय. कालिकत येथील हा राहणारा. कालिकतचा राजा झामोरीन याच्या पदरीं हा होता.

यानें पुष्कळ ग्रंथ लिहिले. शिवाय हा जन्मतःच कवि होता. याच्या कवित्वामुळें याला कोचीन, त्रावणकोर आणि झामोरीन या राजांकडून अगणित बक्षिसें मिळालीं.

**चेलुकपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं चोपन्नावा सिद्ध होय. हा जातीनें शूद्र गांव भंगळपूर. अवधूतिपाचा हा शिष्य. यानें षडङ्गयोगोपदेश (तं. ४।२१) हा ग्रंथ लिहिला.

**चेलुवाम्बे**—(स. १७२७ सुमार) कानडी कवयित्री. ग्रंथ—वरनन्दीकल्याण, व्यंकटाचलमाहात्म्यलालिपद, अलमेलूमंगेलालिपद, तुलाकावेरीमाहात्म्यटीका.

ही म्हैसूरच्या महाराज दोड्डकृष्णराज (स. १७१३–१७३१) याची पट्टराणी. कळिलेकान्तनृप हा सेनापति दोड्डेन्द्राचा मुलगा. त्याची ही मुलगी. पहिला ग्रंथ नवऱ्याच्या आज्ञेनें लिहिला. हा ग्रंथ तिरुपति व्यंकटाच्या कृपेनें लिहिला आहे (क. क. च. भा. ३ पा. २३).

**चेल्लना**—बिंबिसार राजाची पत्नी व चेतकाची मुलगी.

**चैच**—विजयनगरच्या संगमवंशांतील पहिल्या बुक्करायाचा मंत्री. याचा मुलगा इरुग हा दुसऱ्या हरिहराचा सेनापति झाला.

**चैतन्य**—(स. १४८५–१५२७) हा एक प्रसिद्ध साधु होय. याला बुद्धाचा द्वितीयावतार समजतात. हा वासुदेव सार्वभौमाचा शिष्य.

याचा जन्म नदिया येथें झाला. यानें बंगाल्यांत भक्तीचें माहात्म्य वाढविलें. याचा जन्महि बंगाल्यांतच झाला. याला पूर्वेकडील ल्यूथर मानतात. हा स. १५२७ मध्यें जगन्नाथपुरीनजीक मरण पावला. याचें लग्न वल्लभाचार्यांच्या मुलीशीं झालें.

यानें सर्व हिंदुस्थानभर प्रवास करून साधुसंतांच्या भेटी घेतल्या होत्या, असें चैतन्यचरित्रामृतांतील माहितीवरून दिसतें. यास बंगाली लोक गौरांगप्रभु असे म्हणतात. हा आपल्याकडील ज्ञानेश्वर–तुकारामांसारखा बंगाल्यांतील साधु व कवि होय.

**चैत्रराज**—कलिंग देशचा राजा. खारवेलच्या हाथिगुंफेंतील शिलालेखांवरून हा मौर्यवंशांतील दशरथाच्या वेळीं गादीवर होता. हा मौर्यसाम्राज्यांतून स्वतंत्र झाला. यानें मगधावर स्वारी करून जय मिळवला. खारवेल याच्यापासून तिसरा पुरुष होय.

**चोकिदेव कदंब**—(स. १०३० नंतर) हा हानगळच्या जयवर्मा कदंबाचा मुलगा. याला जोकि म्हणत असत.

**चोकराज चालुक्य**—(कविराक्षस पाहा).

**चोखामेळा**—(मृत्यु स. १३३८) मराठी कवि व साधु. जात महार. याच्यावर नामदेवांच्या प्रेमळ कीर्तनाचा परिणाम होऊन हा त्यांना गुरु मानूं लागला. याची पत्नी सोयरा. मुलगा 'कर्ममेळा'. याला एक निर्मळा नांवाची बहीण होती. तीहि याच्या जवळच राहून आपला संसार चालवी. बंका महार हा याच्या बायकोचा भाऊ होता. याच्या घरीं विठोबा जेवला, याच्या बायकोचें बाळंतपण केलें वगैरे अनेक गोष्टी प्रसिद्ध

आहेत. असें हें सर्वच कुटुंब हरिभक्त होतें. हा विठ्ठलाचा एकनिष्ठ भक्त असून पंढरीवर याची अत्यंत श्रद्धा होती. पंढरीची वारी हा चुकवीत नसे. पंढरीच्या वारकऱ्यांचें हा भक्तिभावानें दर्शन घेई. शेवटीं मंगळवेढ्याच्या कुसाचें काम चालू असतां तें ढासळून त्याखालीं सांपडून हा मेला. मग नामदेवानें याचें प्रेत शोधून काढलें आणि त्याला अग्नि दिला. आणि याच्या अस्थि भजन करीत मिरवत आणून विठोबाच्या देवळासमोर पुरल्या व त्यावर याची समाधि बांधली (शके १२६० वैशाख व. १३). वारकरी लोकांचा सांप्रदाय, याच्या समाधीचें दर्शन घेतल्यावर विठोबाचें दर्शन घ्यावें असा आहे. तोहि नामदेवानेंच घालून दिलेला असावा. याचें 'विवेकदर्पण' नांवाचें एक प्रकरण आहे व याच्या पत्नीचे कृष्णचरित्रांवर कांहीं अभंग आहेत. याशिवाय याचे कांहीं अभंग व पदें आहेत.

**चोडप्पा नायक**--(स. १४९९-१५१३) हा इक्कूरीच्या केलडी घराण्यापैकीं होलींबेल बसप्पाचा मुलगा. यानें स. १५११ मध्यें इक्केरीस राजवाडा बांधला.

**चोडसिंह**—(स. ११३८-४८) हा अरिसिंहानंतर मेवाडच्या गादीवर आला. याच्यानंतर विक्रमसिंह आला.

**चोरकवि**—जयदेवांनीं इतर कवींबरोबर याचा मार्मिकपणें उल्लेख केला आहे.

**चौरंगीपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं दहावा सिद्ध होय. हा जातीनें मछुआ असून कामरूप देशांत राहणारा होता. गोरक्षपा सिद्धाचा हा गुरुभाऊ होता. यानें 'वायुतत्त्वभाषानोपदेश' (तं. ४८।५२) हा ग्रंथ लिहिला.

**चोल घराणें**—१ पेरुनार किल्ली १ ला (स. १२५-५०), २ करिकाल चोल (स. १५०-८०), ३ नेडुमुंडू किल्ली (स. १८०-२००), ४ तोंडमान इलाम-तिरयण (स. २००), ५ पेरुनार किल्ली २ रा (स. २०० नंतर).

**२ चोल घराणें**—१ विजयालय (स. ८४६-८८०), २ आदित्य १ ला (स. ८८०-९०७), ३ परान्तक १ ला (स. ९०७-४७), ४ राजादित्य १ ला (स. ९४७-४९), ५ गंडरादित्य (स. ९४९-६५), ६ अरिंजय (स. ९६५), ७ परान्तक २ रा (स. ९६५), ८ आदित्य २ रा (स. ९६५-६९), ९ मदुरान्तक (स. ९६९-८५), १० राजराज १ ला (स. ९८५-१०१६), ११ राजेंद्र १ ला (स. १०१६-४३), १२ राजाधिराज १ ला (स. १०४३-५२), १३ राजेन्द्रदेव (स. १०५२-६३), १४ राजमहेन्द्र (स. १०६३), १५ वीरराजेन्द्र (स. १०६३-७०), १६ अधिराजेन्द्र (स. १०७० त मारला गेला), १७ (राजेंद्र २ रा) कुलोत्तुंग १ ला (स. १०६३-१११८), १८ विक्रमदेव (स. १११८-३३), १९ कुलोत्तुंग चोल २ रा (स. ११३३-४६), २० राजराज २ रा (स. ११४६-६३), यापुढील राजांच्या नात्याचा नीट संबंध लागत नाहीं. २१ राजाधिराज २ रा (स. ११६३-७८), २२ कुलोत्तुंग ३ रा (स. ११८६-१२१६), २३ राजराज ३ रा (स. १२१६-४६), २४ राजेंद्र ३ रा (स. १२४६-६७).

**चोद**—(स. ११८२) हा अमरावतीच्या कोट घराण्यापैकीं दुसऱ्या भीमाचा मुलगा. याला चोद असें म्हणत.

**चोलराव**—हा मुधोळ संस्थानच्या घोरपड्यांचा मूळ पुरुष होय. याचें मूळचें आडनांव भोसले होय. याच्या एका पूर्वजानें घोरपडीनें किल्ला सर केला त्यामुळें घोरपडे हें नांव त्यांना मिळालें.

हा आदिलशाहींत सरदार होता. आदिलशाहानें याला मुधोळची जहागीर, राजा किताब व मोरचेलाचा मान दिला. मुधोळकर हे सातकश वंशी होत. त्यांच्या एका पुरुषास २ बायका होत्या. एकीस ७ मुलगे झाले. तिच्या वंशाजास सातकस म्हणतात (बाजी घोरपडे पाहा).

**चोलादित्य**—हा कोलनू घराण्याचा संस्थापक होय.

**चोहिंग**—एक चिनी प्रवासी. हा सिनचिउ नांवाच्या चिनी प्रवाशाबरोबर हिंदुस्थानांत आला व पंजाबांत 'चिंची' विहारांत मेला.

**चौंभा**—(स. १३७८ सुमार) मराठी सरस कवि. रंगनाथस्वामी निगडीकर, शेखमुहम्मद वगैरे कवींनीं याला आपल्या संतमालिकेंत नमन केलें आहे. याचें 'उखाहरण' नांवाचें काव्य उपलब्ध आहे. पण तें त्रुटित आहे. याच्या ओंवीच्या पहिल्या, दुसऱ्या व चौथ्या चरणाच्या शेवटीं यमक असतें व दुसरा चरण प्रायः निर्यमक असतो.

**२.** (स. १६८६) समर्थांचा समकालीन मराठी कवि व संत. देवदासाचा मित्र (मं श. १८३५, वा. इ. ले. २०).

**चौडरस**—(स. १३०० सुमार) कानडी ब्राह्मण कवि. गोत्र भारद्वाज. गुरु-मनोहरप्रचुर. पिता-मधुसूदन. माता-मल्लव्वे, पत्नी-लक्ष्मी. सरसकवीश्वर या नांवानें याचा भाऊ यानें निर्देशिला आहे. हा पंढरीच्या विठ्ठलाचा भक्त. ग्रंथारंभीं हा सर्वांआधीं विठ्ठलाला नमन करतो.

ग्रंथ—अभिनवदशकुमारचरित. या ग्रंथाच्या चौदाव्या आश्वासांत पंढरी, तेथील विठोबा व भोंवतालचा प्रदेश यांचें तत्कालीन वर्णन केलें आहे; आणि कथानायकाकडून विठ्ठलाचें अष्टक म्हणविलें आहे. कदाचित् हा पंढरपूरचा असावा व याचें कुलदैवत विठ्ठल असावें.

याचा हा ग्रंथ दंडी कवीच्या संस्कृतमधील दशकुमारचरिताचें कानडींत चम्पूरूप भाषांतर आहे. याच्या ग्रंथाचे तेरा आश्वास पूर्ण व चवदावा अर्धवट उपलब्ध आहे. उरलेला भाग अद्यापि उपलब्ध नाहीं. प्रत्येक आश्वासाच्या शेवटीं कवीनें दिलेल्या अवतरणिकेंत विठ्ठलाचा निर्देश यानें अभंगविठ्ठल असा केला आहे. याचा ग्रंथ दंडीप्रमाणेंच ललित आहे (क. क. च. भा. १ पा. ४०३).

**चौरंगीनाथ**—हा रुद्रपूरच्या भुलेश्वर राजाच्या ज्येष्ठ स्त्रीचा पुत्र होय. याच्या सावत्र आईनें याची आई याच्याच वेळीं गरोदर असतांना, तिला नवऱ्याकडून अरण्यांत सोडविलें होतें. तेथें ती प्रसूत झाली असतां कांहीं दिवसांनीं त्या मुलाचे हातपाय तोडून भुलेश्वराच्या वेशीपाशीं याला चौरंगावर बांधून ठेविलें.

पुढें कांहीं दिवसांनीं मत्स्येंद्रनाथ तेथें आले व त्यांच्या कृपेनें याचे हातपाय याला परत मिळाले. त्या वेळेंपासून हा त्यांचा शिष्य बनला; व पुढें याचें चौरंगीनाथ असें नांव ठेवण्यांत आलें ( नाथ ली. अ. ६ ). याच्या या कथेचा निर्देश ज्ञानेश्वरी ( १८. १७५३ ) व चांगदेवाच्या तत्त्वसार ( ८६८ ओवी ) ग्रंथांत आहे.

---

## छ

**छट्य कदंब**—( २ शिवचित्तदेव कदंब व षष्ठदेव पाहा ).

**छत्रपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं तेविसावा सिद्ध. जातीचा शूद्र व भगुनगरचा राहणारा. यानें शून्यताकरणदृष्टि ( तं. ४८।४७ ) या नांवाचा ग्रंथ लिहिला.

**छत्रसाल राठोड**—( स. १७५८ नंतर ) रतलाम संस्थानचा मूळ संस्थापक. रतनसिंहाचा हा पुत्र. याच्या कारकीर्दीत संस्थानचे तीन भाग पडून याचा वडील मुलगा केसरीसिंग यास रतलामचा भाग मिळाला.

**छत्रसाल बुंदेला**—( ज. स. १६५०–मृ. स. १७३३ ) याचा जन्म स. १६५० मध्यें झाला. वयाच्या चौदापंधराव्या वर्षीच आईबापांचा वियोग व राज्याची वाताहात झाल्यामुळें छत्रसाल मोठ्या असहाय स्थितींत सांपडला. कोठें तरी मोठ्या ठिकाणीं जाऊन उद्योग करावा असें यास वाटूं लागलें. त्या काळीं मोगल दरबारांत प्रवेश करून घेणें व कांहीं तरी अंगचा गुण दाखवून प्रसिद्धीस येणें एवढेंच काय तें ध्येय तरुणांपुढें असे. छत्रसालानें मोगल दरबाराकडे धांव घेतली व तो मीर्मा जयसिंगाचे पदरीं राहूं लागला. मीर्मा जयसिंगानें याच्या अंगची तरतरी व धडाडी पाहून यास आपल्याबरोबर घ्यावें किंवा इतर सरदारांबरोबर लढाया करण्याकरितां पाठवावें. एकदां नागपुराकडील देवगड किल्ला सर करण्याकरितां बहादुरखान नामक सरदाराबरोबर याची नेमणूक झाली. यानें देवगडच्या युद्धांत आपण स्वतः घायाळ होऊन किल्ला बहादुरखानास सर करून दिला. आपण जिवाची पर्वा न बाळगतां किल्ला जिंकून दिला याबद्दल बहादुरखान दरबाराकडे आपली शिफारस करील व लौकरच आपण मोठ्या पदवीला चढूं अशी छत्रसालास मोठी आशा वाटत होती. परंतु यास जेव्हां समजलें कीं, बहादुरखानानें आपण स्वतः किल्ला सर केला असें बादशहास कळविलें, व बादशहानें संतुष्ट होऊन त्या खानाची मनसब वाढविली व आपला नामनिर्देश देखील कोणीं केला नाहीं तेव्हां मात्र या मानी छत्रसालास फार वाईट वाटलें. हाच प्रसंग यास मोगल सेवेपासून निवृत्त करण्यास कारणीभूत झाला.

या वेळीं छत्रसालानें शिवाजीराजांची कीर्ति ऐकिली. शिवाजी नुकताच दिल्लीहून सुटून आला होता.

तेव्हां हा मोगल सरदाराबरोबर दक्षिणेंत आला व शिकारीचें निमित्त करून यानें शिवरायाची भेट घेतली. शिवाजीनें याची तेजस्विता पाहून दूरदृष्टीनें उत्तरेकडील आपला गमावलेला मुलूख काबीज करण्यास यास प्रवृत्त केलें. लाल कवीनें छत्रप्रकाश नांवाचें काव्य हिंदींत लिहिलें आहे, त्यांत हा प्रसंग सुरस वर्णिला आहे. त्याचा परिणाम छत्रसालावर फार झाला. या प्रसंगीं शिवाजीनें यास एक तरवार अर्पण केली.

छत्रसालानें लढायांवर लढाया करून मुलूख हस्तगत करण्यास सुरुवात केली. तहवरखाँ, अनवरखाँ, सदरुद्दीन, हमीदखांसारख्या शूर सरदारांचा पाडाव केला. बहलोलखानें तर लाजून आत्महत्त्या करून घेतली. मुरादखां, दलेलखां, सैद अफगाण, शाहकुली इत्यादि सरदारांस पराजित करून यमुना आणि चंबळा नद्यांच्या दक्षिण प्रांताचा म्हणजे सर्व बुंदेलखंडाचा हा मालक झाला.

स. १७०७ मध्यें बहादुरशहानें छत्रसाल बुंदेलखंडाचा अधिपति असल्याचें मान्य केल्यावरून छत्रसालानें त्यास लोहगड नांवाचा किल्ला जिंकून दिला.

स. १७३२ मध्यें अहमदशहा बंगश यानें छत्रसालावर स्वारी केली. त्या वेळीं छत्रसालाचें वय ८२ वर्षांचें होतें. स्वतःचे ठिकाणीं अवसान न राहिल्यानें व मुलांमध्यें तितका पराक्रमी कोणी नसल्यामुळें आपण संपादिलेला मुलूख यवनांचे तावडींत सांपडतो असें पाहून या वृद्धानें प्रसंगावधान राखून मोठी नामी युक्ति योजिली. यानें त्या वेळीं बाजीराव पेशव्याचें साहाय्य मागितलें. त्यासंबंधीं पत्रांत लिहिलेला दोहा पुढीलप्रमाणें प्रसिद्ध आहे.

जो गति ग्राह गजेंद्र की सो गति जानहु आज ।
बाजी जात बुन्देल की राखी बाजी लाज ॥

बाजीरावानें बंगशाचा पूर्ण पराभव केला. तेव्हां छत्रसालानें बाजीरावास आपल्या राज्याचा तिसरा हिस्सा दिला. याच्या दरबारीं भूषण गेला तेव्हां यानें त्या कवीचा सन्मान स्वतः त्याच्या पालखीला खांदा देऊन केला.

चंपतराय
छत्रसाल (मृ. स. १७३३)
हिरदेसा — जगतराज (मृ. डिसेंबर १७५८)
सभासिंह (मृ. १७५३) पृथ्वीराज
दिवाण सेनापति कीरतसिंह पहाडसिंह वीरसिंह (मृ. १७६६)




**छत्रसिंह कायस्थ**—( स. १६९९ ) एक हिंदी कवि. हे अटेर गांवचे राहणारे असून श्रीवास्तव कायस्थ होते. अमरावतीचा कल्याणसिंहाचा यास आश्रय होता.

**छबिलाराम**—(मृत्यु स. १७१९) हा नागर ब्राह्मण मुत्सद्दी होता. अजीमुश्शान मारला गेल्यावर हा जहांदरशहाच्या पक्षाला मिळाला; व नंतर फर्रुखसियरला मिळाला. यानें चूडामण जाटास वठणीवर आणलें. याचा मुलगा दयाबहादुर.

**छलुए**—महावीराचा प्रतिस्पर्धा.

**छंदक**—हा शुद्धोदन राजाचा पुत्र. हा गौतमबुद्धाचा सारथी होता.

**छित्तराज शिलाहार**—( स. १०२८ ) हा ठाण्याच्या शिलाहारांपैकीं वज्जडाचा मुलगा. हा आपला चुलता अरिकेसरीनंतर गादीवर आला. याचा एक स. १०२८ मधला लेख सांपडला आहे. तोच भांडुपचा शिलालेख या नांवानें प्रसिद्ध आहे ( इंडि. अँटि. ५ वा, २७७ ). हा शब्द चित्तराजाचा अपभ्रंश दिसतो.

## ज

**जगजीवन**—( स. १७१५ सुमार ) मराठी कवि. गांव राजपूर ( औरंगाबाद ). ग्रंथ—विक्रमबत्तिशी, रामायण, ज्ञानमूळ ( सं. सू. )

**जगजीवनदास**—( स. १६८२-१७६१ ) हा चंदेल ठाकूर जातीचा गृहस्थ 'सत्नामी' नामक हिंदु पंथाचा आद्यप्रवर्तक होय. उत्तर हिंदुस्थानांत 'सत्नामी' या नांवानें ओळखिले जाणारे कमींत कमी तीन पंथ आहेत. त्यांपैकीं एका पंथाचा संस्थापक हा होय.

हा स. १६८२ सालीं लखनौपासून ४० मैलांवर असलेल्या सरदह गांवीं जन्मला. हा मूळ कबीर पंथाचा होता असें म्हणतात; व यानें काढलेला पंथहि त्याच पंथाप्रमाणें व्यापक आहे. यानें आपल्या पंथाचा 'अघविनाश' नांवाचा पवित्र ग्रंथ पद्यात्मक रचला आहे. याशिवाय यानें ज्ञानप्रकाश, महाप्रलय व प्रथम-ग्रंथ इत्यादि पुस्तकें लिहिलीं. मरणापूर्वी सुमारें दहा वर्षें यानें सरदह गांव सोडलें व तेथून पांच मैलांवर असलेल्या

कोटवा गांवीं जाऊन राहिला. त्या ठिकाणीं हा स. १७६१ सालीं मरण पावला.

याचे निरनिराळ्या जातींचे चार मुख्य शिष्य असून इतर चौदा शिष्य होते. या पंथाचे नुसत्या संयुक्त प्रांतांत सुमारें ७५,००० लोक आढळून येतात.

**जगजीवन बाळकृष्ण हणमन्ते**—हा भोसल्यांचा पिढीजाद नोकर.

**जगजीवनराव**—( स. १६३५-५८ सुमार ) याच्या घराण्यास राजे उदाराम अशी पदवी होती. हा दे. ऋ. ब्रा. होता. याच्या वडिलांचें नांव उद्धवराव असें होतें. याची बायको रायवागन फार शूर होती. हा वाशीम येथें राहत असे ( मं. त्रै. व. २. १ ते ४ ले. ४ ). तंजावरचे शिलालेखांत याचा मृत्यु स. १६५८ हा दिला आहे ( मं. त्रै. व ४. पृ. ४९-५० ).

**जगजीवनस्वामी**—अहमदाबादेजवळच्या रायपूरचा संन्यासी. हा शांकर शुद्धाद्वैतमताचा असे. यानें ज्ञानमूळ, ज्ञानगीता आणि नरबोध असे तीन ग्रंथ गुजराथी भाषेत लिहिले ( का. दो. ).

**जगज्जीवनराव परशुरामपंत प्रतिनिधि**—( स. १७४६-५४ ) यांचें पूर्वीचें आडनांव कुलकर्णी असें होतें. हा श्रीपतराव ऊर्फ श्रीनिवासराव यांचा भाऊ होय. याचें दुसरें नांव दादोबा. याच्या भावानंतर शाहूनें यास प्रतिनिधीचीं वस्त्रें दिलीं ( ता. १७-१२-१७४६ ). परंतु शाहू वारल्यामुळें यांचें व पेशवे यांचें न जमल्यामुळें पेशव्यांनीं यास किन्हईस कैदेंत टाकलें. पुढें दोन वर्षांनीं याला सोडण्यांत आलें. स. १७५१ मध्यें पेशव्यांनीं ताराबाईकडून याची मदत घेतली होती. कारण त्या वेळीं निजाम पुण्यावर चालून आला होता. स. १७५४ च्या भाद्रपदांत, २० आगष्ट रोजीं हा किन्हई येथें वारला. तेव्हां हा निपुत्रिक असल्यामुळें कृष्णाजी परशुरामाच्या नातवास-भवानरावास-प्रतिनिधि केलें ( म. रि. म. वि. २ ).

**जगज्ज्योतिर्मल्ल**—( स. १६१७-३३ ) यानें संस्कृतांत हरगौरी नाटक केलें.

**जगत्तुंग राष्ट्रकूट**—तिसऱ्या गोविंद राष्ट्रकूटाचें नामांतर.

**२.** अकालवर्ष राष्ट्रकूटाचा मुलगा. हा गादीवर येण्यापूर्वींच मेला असावा, असें यांचें नांव कांहीं ठिकाणीं गाळलें आहे त्यावरून दिसतें.

**जगत्शेट**—( स. १७३९ सुमार ) याचें मूळ नांव फत्तेचंद असें होतें. हा मारवाडी बनीया. मुर्शीदकुलीखानाचा जांवई सुजाउद्दीनाचा हा सल्लागार होता.

अलीवर्दीखान बिहार प्रांताचा वसूल फत्तेचंद यांचे दुकानाचे मार्फत दिल्लीस रवाना करीत असे. त्यामुळें याच्या दुकानाचें महत्त्व वाढून याच्या दुकानाच्या शाखा सर्व बंगालभर व दिल्लीपर्यंत पसरल्या व यास जगत्शेट असा किताब मिळाला. याची पेढी बंगाल्यांत फार प्रसिद्ध होऊन मराठयांच्या स्वारींत त्या पेढीवर मराठयांनां अडीच कोट रुपयांची लूट पुढें मिळाली. अद्यापहि जगत्शेटचें दुकान बंगालमध्यें प्रसिद्ध आहे. अलीवर्दीखानास यानें मदत केली ( ना. प्रां. इ ).

**जगत्सिंह गुहिलोत**—( जन्म स. १६०७-मृत्यु स. १६५२ ) उदेपूरचा महाराणा. कर्णसिंहाचा मुलगा. राज्याभिषेक मार्च स. १६२८ मध्यें झाला. जहांगिरच्या स्वारीच्या वेळीं यानें पराक्रमानें राज्य राखलें. शहाजहानला यानें नजराणा देऊन खूष केलें. यानें चितोडची दुरुस्ती करून दोन महाल बांधले. याचे पुष्कळ शिलालेख उपलब्ध आहेत. जगन्नाथपंडितानें 'जगदाभरण' नांवाचें संस्कृत पन्नास श्लोकांचें काव्य यावर केलें व याला स. १६२७ च्या सुमारास अर्पण केलें. याला भारी किमतीचे घोडे बाळगण्याचा नाद होता. हा उदार व दूरदर्शी होता. मृत्यु १० आक्टोबर १६५२.

**२.** ( जन्म डिसें. १७ स. १७०९-५. जून स. १७५१ ) उदेपूरचा महाराणा. हा संग्रामसिंहाचा मुलगा. याच्या वेळीं रजपूत व मोगल कमजोर झाल्यानें मराठयांचा वर्चष्मा वाढूं लागला. याला त्यांना तोंड देण्यांत यश आलें नाहीं. नेकराम कवीनें 'जगद्विलास' काव्यांत याचें वर्णन केलें आहे. हा विलासी होता.

**जगदीश तर्कालंकार**—( स. १६२५ सुमार ) प्रसिद्ध चैतन्याचा सासरा जो सनातनमिश्र त्याच्यापासून चौथ्या पिढींतील हा होय.

हा भवानंदसिद्धांतवागीशाच्या पाठशाळेंत गेला व तेथें यानें तर्कशास्त्राचा अभ्यास केला. आपण सार्वभौमाचे शिष्य आहोंत असें हा म्हणतो. हा सार्वभौम रामभद्र सार्वभौम होय. कारण न्यायरहस्याचा निर्देश करतांना हा आपल्या गुरूचा ग्रंथ आहे असें हा म्हणतो. यानें खालील ग्रंथ लिहिले आहेतः

( १ ) 'तत्त्वचिंतामणिदीधितिप्रकाशिका,' हा ग्रंथ जागदीशी या नांवानें प्रसिद्ध आहे. ( २ ) 'तत्त्वचिंता-

मणिमयूख ' गंगेशाच्या तत्त्वचिंतामणीवरील टीका. या टीकेचा कांहीं भागच तेवढा उपलब्ध आहे. ( ३ ) 'न्यायादर्श' अथवा 'न्यायसारावली'. ( ४ ) 'शब्दशक्तिप्रकाशिका'. ( ५ ) 'तर्कामृत'. ( ६ ) 'द्रव्यभाष्यटीका' अथवा 'पदार्थतत्त्वनिर्णय'. ( ७ ) 'न्यायलीलावतीदीधितिव्याख्या'. ( ८ ) 'काव्यप्रकाश-रहस्य' (हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा.४६९-७०).

**जगदीश्वर**--हास्यार्णव नांवाच्या संस्कृत प्रहसनाचा कवी.

**जगदेकमल्ल चालुक्य**—(स.११३८-५०) तिसऱ्या सोमेश्वर पश्चिम चालुक्याचा पुत्र. याचा दुसऱ्या प्रोलानें पराभव केला. याच्यावर म्हैसूरच्या होयसलांनीं स्वाऱ्या केल्या. यानें बेलापूर जिंकलें.

**जगदेव**—बसवाचा मशालजी व बिज्जलास मारणारा.

**जगद्धर**—(स.१३५०सुमार) भवभूतीच्या मालती-माधवावरील टीकाकार. देवीमाहात्म्यटीका, भगवद्गीता-प्रदीप, रसदीपिका, मेघदूतटीका, तत्त्वदीपिनी, वासवदत्ता-टीका व वेणीसंहार यांवर याची टीका आहे. जगद्धराचा नातू विद्याधर हा प्रतापरुद्र काकतीयाचा समकालीन होता. यावरून जगद्धराचा काल निश्चित होतो.

**२.** बालबोधिनी, स्तुतिकुसुमांजलि व अपशब्द-निराकरण या तीन ग्रंथांचा कर्ता.

**जगदेवराय**—( स. १५६५ ) विजयनगरचा श्रीरंग ( तिरुमल्लाचा मुलगा ) राजाचा हा दुसरा जांवई. यानें रामरायाचा भाऊ वेंकटाद्रीच्या मदतीनें मुसलमानांवर स्वारी केली होती. रामरायाचे वेळीं हा बंडखोरांचा एक पुढारी होता. जेव्हां अली आदिलशाहानें पेणुकोंडा राजधानीवर चाल केली त्या वेळीं यानें पुढारी-पण स्वीकारून राजधानीचें संरक्षण केलें. पुढें यानें मुसलमानांच्या स्वारीच्या वेळीं बराच पराक्रम गाजविला.

**जगदेवराव**—( स. १५५८ सुमार ) कुत्बशाहींतील एक मोठा सरदार. जमशीद कुत्बशाहा मेल्यानंतर त्याच्या बेगमेनें आपला अल्पवयी मुलगा सुभान यास गादीवर बसविलें; आणि सैफखान ऐनउल्मुलकास परत बोलावून त्याच्याकडे कारभार दिला. पण जगदेवरावानें जमशीदचा धाकटा भाऊ दौलतखान यास तख्तावर बसविण्याचा बेत ठरविला. भोंगिरास जाऊन यानें त्याची मुक्तता केली. इतक्यांत सैफखान गोवळकोंडयास आला; व त्यानें कारभार आपणाकडे घेऊन जगदेवरावावर स्वारी केली. यानें वऱ्हाडच्या तोफलखानाची मदत मागितली. पण सैफखानानें सिंग्राम येथें तोफलखानाचा पराजय केला. हा दौलतखानास घेऊन भोंगीरच्या किल्ल्यांत जाऊन बसला. बरेच दिवसांनीं सैफखानानें तो किल्ला घेतला. दौलतखानास पुनः तेथेंच कैदेंत ठेवलें व जगदेवरावास गोवळकोंड्यास आणलें. पण पुढें रामराजाच्या मदतीनें इब्राहीम गोवळकोंड्याच्या गादीवर येण्याच्या खटपटीला लागला. त्यानें फितुरी करून यास मुक्त केलें व यानें त्यास गोवळकोंड्याच्या गादीवर बसविलें ( स. १५५० जुलै २७ ).

याचे उपकार स्मरून इब्राहीमनें यास मुख्य वजीर केलें. पण हा व याचा सहकारी रामराव यांच्या मनांतून वेडया दौलतखानास तख्तावर आणावयाचें होतें. म्हणून इब्राहीमनें रामरावाला ठार केलें. तेव्हां हा आपल्या भावासह मुलूख उध्वस्त करीत एलगुंडलवरून वऱ्हाडांत गेला, व इमादशहाच्या नोकरीस राहिला. तेथें यानें खानदेश वगैरे प्रदेश इमादशहास मिळवून दिले. पण तेथेंहि याचें न जमल्यानें तेथून स. १५५८ च्या सुमारास निघाला व जाळपोळ करीत एलगुंडलला आला. हें ऐकून कुत्बशाहानें याच्यावर मुस्तफाखानास पाठविलें. तेव्हां याचा पूर्ण पराजय होऊन हा विजयनगराकडे पळून गेला. हा मुरारिपंडिताचा पिता असावा.

शेवटीं रामरायाचा भाऊ व्यंकटाद्री व हा एक होऊन कुत्बशाहा व निजामशाहा यांचा यानें पराभव केला ( मु. रि. भा. १, २८१-८३ ).

**जगदेवराव जाधव**—( स. १६२९ ) लखुजी जाधवाचा भाऊ. हा स. १६२९ च्या सुमारास मोंगलांतर्फे शहाजीशीं लढत होता. जेव्हां शहाजहाननें जिजाबाईस कैद केलें, त्या वेळीं यानें बादशहाकडून तिची सुटका करविली.

**जगदेव परमार**—(स.१०८० नंतर) हा उदयादित्य परमाराचा धाकटा मुलगा. हा अत्यंत शूर होता. चालुक्यांच्या आश्रयास असतां यानें गुजराथेंत, माळव्यांत व इतर देशांत अनेक पराक्रम केले ( हि. भा. अ. ३, २६५ ).

**जगदेव संभाजी पवार ( धार )**—( स. १७३१ सुमार ) उदाजीचा भाऊ, मराठी लष्करांत एक सरदार होता. तिरला येथील लढाईंत यानें पराक्रम गाजविला ( स. १७३१ ). हा भावाबरोबर नेहमीं लढाईवर जाई. याला दोन पुत्र असून त्यांचीं नांवें अनुक्रमें गोविंद व हरकोजी. पवारांचें हें घराणें महाराष्ट्रांत फार पुरातन, अतिविस्तृत व विख्यात आहे. हे मूळचे सुपें पेठ्यांतील कित्येक गांवचे पाटील शहाजीच्या जहागिरींत नांदत

असतां शिवाजीजवळ काम करून उदयास आले. हा शाहूच्या पदरीं राहून उदयास आला.

**जगनिक**—( स. १३०० सुमार ) हा कालिंजरच्या परमार राजाचा भाट. याचा ग्रंथ उपलब्ध नसला तरी याचीं वीररसात्मक गीतें अजूनहि लोकप्रिय आहेत. आल्हा व ऊदा यांच्यावर याची कविता आहे.

**जगन्नाथ**—( ग्रंथरचनाकाल स. १६८५–१७७२ सुमार ) मराठी कवि. श्रीधराचा रामविजय वाचून याला काव्याची स्फूर्ति झाली. हे पालकवाडी (जि.वर्धा)चे राहणारे. जात कोष्टी. यानें शशिसेनाकाव्य स्वतंत्र पद्धतीनें रचलें. याचें महाभारत लावणींमध्यें आहे. शिवाय मारुतिजन्मवर्णन, भारत, रामायण इ. याचे ग्रंथ आहेत.

२. यांना बाबा म्हणत. हे ऋषीश्वर स्वामीचे शिष्य. शंकराचार्यकृत वाक्यसुधेवर यांची मराठींत ओवीबद्ध टीका आहे. शिवाय ग्रंथ-बोधवैभव, गीताटीका, पंचदशी-व्याख्यान, तत्त्वविवेक, श्रुत्युपदेश, ज्ञानबत्तिशी, दृक्-दृश्यबोध ( सं. सू. ).

३. ( स. १७३१ ) सिद्धांतसम्राट् ग्रंथाचा कर्ता ( भा. ज्यो. ).

४. सारप्रदीप ग्रंथाचा कर्ता.

५. एक तेलंगी कवि ( क. च. ).

**जगन्नाथ तर्कपंचानन**—( मृ. स. १८०६ ) विवादभंगार्णव या ग्रंथाचा हा कर्ता होय. हा गंगेच्या तीरावरील त्रिवेणी गांवचा राहणारा होय. याच्या बापाचें नांव रुद्रतर्कवागीश असें होतें. या ग्रंथाचा हिंदु कायद्याबाबत कोर्टांत उपयोग करीत असत. कर्जफेड, भागीदारी, मजूर व मालक, नवराबायकोंचीं कर्तव्यें, वांटणी, वारसा वगैरेविषयींचें स्पष्टीकरण वरील ग्रंथांत आलेलें आहे.

**जगन्नाथदास**—तुळशीदासाचा गुरु.

**जगन्नाथ पंडित**—( स. १६२०–५० उत्कर्षकाल ) एक महापंडित व कवि. पिता पेरुभट्ट, माता लक्ष्मी. हा तेलंगणांतील मुंगुंज ( जि. गोदावरी ) येथील राहणारा. याचें अध्ययन पित्यापाशीं झालें. वीरेश्वर शेषापाशींहि याचें कांहीं अध्ययन झालें होतें. गोत्र कौंडिण्य. देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण.

हा अध्ययन झाल्यावर तरुणपणींच दिल्लीस शहाजहान बादशहाकडे गेला. त्याचे दरबारांत याचा सन्मान होऊन याला पंडितराज अशी पदवी मिळाली. शहाजहानचा आवडता खानखानन हाच बहुधा आसफविलासांतील आसफ असून यानें आसफविलासांत त्याच्या मृत्यूबद्दल दुःख प्रदर्शित केलें आहे. हा आसफ स. १६४३ मध्यें मरण पावला. जगदाभरणांत दाराशिकोह ऊर्फ दारा याची यानें स्तुति केली आहे.

अकबर, जहांगीर यांच्या दरबारांत याचा संबंध होता अशा आख्यायिका आहेत, पण त्या पुराव्यांनीं सिद्ध होत नाहींत. याचा अनेक राजांशीं संबंध होता असें याच्या ग्रंथांवरून दिसतें.

हा मोठा वादविवादकुशल असून यानें हिंदु व मुसलमान पंडितांना वादांत जिंकलें होतें. तसेंच यानें एका यवनकन्येशीं दुसरा विवाह केला होता आणि तिच्यासह काशीचे ब्राह्मण याला पावन करून घेईनात, तेव्हां यानें गंगालहरी हें प्रासादिक स्तोत्र केल्यावर गंगेनें यास पावन करून घेतलें अशी आख्यायिका आहे.

गंगालहरीमुळें धार्मिक लोकांत, भामिनीविलासामुळें रसिक लोकांत आणि रसगंगाधरामुळें पंडित लोकांत हा अग्रगण्य समजला जातो. याचा कोटिक्रम निर्भीड व विनतोड असतो व त्यांत क्वचित् मर्यादातिक्रमहि होतो.

याचे ग्रंथ–१ सुधालहरी ( ३० श्लोक. सूर्यमहिमा वर्णन करणारें स्रग्धरावृत्तांतील संस्कृत काव्य ); २ अमृतलहरी ( १० श्लोक. यमुनास्तुति ), ३ करुणालहरी किंवा विष्णुलहरी (६०श्लोक.विष्णुस्तुति), ४ लक्ष्मीलहरी (४१श्लोक. वृत्त शिखरिणी. लक्ष्मीस्तुति ), ५ पीयूषलहरी किंवा गंगालहरी ( ५२ श्लोक. ५३ वा श्लोक क्वचित् आढळतो. हें काव्य फार प्रसिद्ध आहे ), ६ यमुनावर्णनचंपू ( काव्यमालेंत प्रसिद्ध ), ७ रसगंगाधर ( सुप्रसिद्ध साहित्यग्रंथ ), ८ मनोरमाकुचमर्दन ( भट्टोजीप्रणीत मनोरमेचें खंडन ), ९ अश्वधाटी ( २६ श्लोक. राम नांवाच्या नातवाकरितां लिहिलेलें स्वतंत्र वृत्तांतील काव्य ), १० प्राणाभरण काव्य ( कुचविहारच्या प्राणनारायण राजावरील काव्य. ५० श्लोक ), ११ जगदाभरण (उदेपूरच्या जगत्सिंहाची स्तुति), १२ असफविलास ( यामीनुद्दौला आसफखानस्तुति ), १३भामिनीविलास ( स्फुटश्लोकसंग्रह ), १४ चित्रमीमांसाखंडन ( अप्पय्यादीक्षितप्रणीत चित्रमीमांसेचेंखंडन ) १५ पंडितराजशतक ( अनुपलब्ध ), १६ अल्लोपनिषद्.

**जगन्मित्रानंद**—( मित्रयोगी ) हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं असून प्रसिद्ध जयचंद गाहडवालाचा गुरु होय.

**जगपाळराव निंबाळकर**—( मृत्यु स. १६३० ) मालोजी निंबाळकरास हा व दीपाबाई अशीं दोन अपत्यें होतीं. दीपाबाई मालोजी भोसले यास दिली असल्यामुळें याचा व मालोजीचा घरोबा दिसतो. या घरोब्यामुळें भोसल्यानें आपला उदय करून घेतला. याच्या कोल्हापूरच्या स्वारींत मालोजी हजर असून

त्यानें चांगला पराक्रम गाजवला. जिजाबाईच्या लग्नाबावत जाधवांनीं भोसल्यास चिडविल्यामुळें यानें भोसल्यांचा चांगलाच पाठपुरावा केला. हा भातवडीच्या युद्धांत हजर असून यानें चांगलाच पराक्रम केला. त्यांत आदिलशहाचा पाडाव झाला तरी यास २५ लक्ष रुपये इनाम मिळाल्याचा कैफीयतींत उल्लेख आहे. हा स. १६३० मध्यें मेला. याला वणंगोजी असेंहि म्हणत.

**जगमित्र नागा**—( स. १३३० समाधिकाल ) जगमित्र हें उपनांव व नागेश हें याचें नांव होय. मराठी कवि व साधु. याचीं कांहीं पदें व अभंग आहेत. याची समाधि जोगाईच्या आंब्याजवळ परळी येथें आहे. भक्तविजयांतहि याची एक गोष्ट दिली आहे ( अ. १९ ).

**जगराय**—( स. १६१४–१६ ) हा विजयनगरच्या तिसऱ्या रंगराय आरविडूचा सरदार. याची कन्या वय्यम्मा ही वेंकटराय आरविडूला दिली होती.

वेंकटराय मरण पावल्यावर तिसरा रंगराय किंवा चिक्कराय हा विजयनगरचे गादीवर आला. तेव्हां यानें कट करून रंगरायाला कैद केलें व आपला भाचा गादीवर बसविला. पण एच्चम्मा नायकानें चिक्करायाचा पक्ष स्वीकारला व त्याच्या पुत्राचें म्हणजे चवथ्या रंगरायाचें संरक्षण करून याला देशोधडीस लावलें.

**जटाधर**—यानें 'फत्तेशाहप्रकाश' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. त्या वेळीं याचें वय ४८ वर्षांचें होतें व ग्रंथाचें आरंभवर्ष शक १६२६ हें होतें. याच्या पित्याचें नांव वनमाली व आजाचें नांव दुर्गमिश्र. याचें गोत्र गर्ग. हा सरहिंद प्रांतांतील राहणारा होता ( भा. ज्यो. ).

**जतवर्म**—( स. १०५० सुमार ) हा बंगालच्या वर्मन् घराण्यांतील असून वर्मन् घराण्याचा संस्थापक. याची बायको कलचुरी घराण्यांतील कर्ण राजाची मुलगी वीरश्री होय.

याचा पुत्र सामलवर्म. सामलवर्माचा मुलगा भोज. त्याचे बेलव येथील शिलालेख प्रसिद्ध असून ते सध्यां डाक्का म्युझिअममध्यें आहेत ( हरिवर्मा पाहा ).

**जतिल पांड्य**—हा पांड्य घराण्यापैकीं पहिल्या राजसिंहाचा पुत्र. याला परांतक, श्रीवर, नेदुंज दैयन, तेन्नव–वानवन या पदव्या लावलेल्या आढळतात. हा आपला बाप राजसिंह पहिला यानंतर गादीवर आला.

मद्रास म्युझिअम व कै. रायबहादूर व्यंकय्या यांच्या मताप्रमाणें अन्नमलई लेखांमध्यें याचे पुष्कळ लेख आहेत ( स. ७६९-७० ). यानें पेन्नागदम येथें कदंबाचा पराभव केला. म्हैसूर संस्थानांत कांहीं कानडी शिलालेख आढळतात. त्यांत पल्लवांना कदंब म्हटलेलें असतें. यानें कांगू राजास कावेरीच्या उत्तरेस पळावयास लावलें. यानें कांचीनदीवर वेरूरमध्यें विष्णूचें एक देऊळ बांधलें. तें पर्वतासारखें उंच होतें असें वर्णन आहे. पण या मंदिराचा सध्यां मागमूसहि नाहीं. राजसिंह २ रा याच्या मागून गादीवर आला.

**जनकोजी शिंदे**—राणोजी शिंद्याचा बाप.

**२.** ( मृ. स. १७६१ ) हा जयाप्पा शिंद्याचा मुलगा. ह्याचे आईचें नांव सखूबाई व बायको काशीबाई. ही निजामशाहींतील व्यंकटराव निंबाळकराची बहीण होय. ह्यानें स. १७५५ त मेडतें सर केलें. हा ज्या दिवशीं स्वारीवर गेला त्या दिवशींच ह्याच्या बापाचा खून झाला. उत्तरहिंदुस्थानचा कारभार शिंदे–होळकरांवर सोंपविला असतां रघुनाथराव येऊन धालमील करतो म्हणून मल्हारराव नजीबास कायम ठेवून कारस्थान करीत होता. त्यांत दत्ताजीमुळें हाहि सामील झाला.

ता. २२–११–१७५० रोजीं जनकोजीची अब्दालीशीं फार मोठी लढाई झाली व तींत यानें त्याचा पराभव करून त्याच्या सामानाचा फारच नाश केला.

शेवटीं हा पानपतच्या लढाईत शौर्यानें लढला व मेला. त्या वेळीं याचें वय १७ वर्षांचें होतें.

**जनजसवंत**—( समाधि स. १६१७ ) शक १५३० मध्यें बागलाणचा सुभा प्रतापशा म्हणून होता. त्याचा पुरोहित जनार्दन. त्यांचे पुत्र जसवंत ( यशवंत ), राहणार मुल्हेर. यांचा छल होऊन यांची मोट बांधून प्रवाहांत टाकली असतां श्रीरामांनीं यांस तारिलें. निर्जल प्रदेशांत जल उत्पन्न केल्यामुळें यांना जळ जसवंत असेंहि म्हणतात. हीच कथा भक्तिविजयांत दिली आहे ( अ. ३६ ). नंतर बोरठें ( खानदेश ) गांवीं वास. गुरु तुलसीदास. समाधिकाल शके १५७८ फाल्गुन शुद्ध ८ तापीतीर. यांचें चरित्र 'रघुनाथदास' यांनीं लिहिलें आहे. ग्रंथ–पदें, दोहरे वगैरे ( सं. सू. ). यांना तुळशीदासांनीं दिलेली मारुतिमूर्ति तळोदें तालुक्यांतील कुकुरमुंडेंगांवीं आहे. यांचें कवित्व सत्कार्योत्तेजक सभेच्या संग्रहीं आहे. तें सर्व हिंदी आहे ( मे. अहवाल शके १८३४ ). यांचे अनेक चमत्कार प्रसिद्ध आहेत. हे माध्यंदिन शाखेचे यजुर्वेदी ब्राह्मण होते.

**जनाजी आबाजी प्रभु**—( आबाजी विश्वनाथ प्रभू पाहा ).

**जनाबाई**—( समाधि स. १३५० ) नामदेवाची दासी. नामदेवाच्या सहवासानें हीहि अभंग करी. हिचे अभंग फारच प्रेमळ आहेत. ही कोणत्याहि देवाचा धांवा कर-

तांना रंगून जाते. शेवटीं तर झाडलोट, दळणकांडण करण्यास विठोबा आपणास मदत करतो अशीहि हिची समजूत असे. हरिश्चंद्राख्यान, प्रल्हादचरित्र, कृष्णजन्म, बाळक्रीडा वगैरे हिचीं उपलब्ध प्रकरणें साधीं पण अत्यंत रसाळ आहेत.

गोदातीरीं गंगाखेड येथें दमा नांवाचा शूद्राच्या पोटीं हिचा जन्म झाला. आईचें नांव करुंड. आई मेल्यावर त्यानें हिला नामदेवांचे वडील दामा शेटजींना दिलें. ही तेथें असतां नामदेव जन्मास आले. त्यांना हिनें अंगाखांद्यावर खेळविलें, व शेवटीं तेच हिचे गुरु झाले. ही आपला उल्लेख 'नामयाची जनी' असा करिते. जुन्या ग्रंथांत हिचा समाधिकाल आषाढ व. १३, शके १२७२ असा दिला आहे. हिनें कांहीं कवित्व केलें, पण तें निर्मळ स्वरूपांत उपलब्ध नाहीं. कारण त्यांत एकनाथादि उत्तरकालीन संतांचीं नांवें आढळतात.

**जनार्दन**—( स. १२५० सुमार ) हा विजयानंदाचा शिष्य. रघुवंश व मेघदूत यांवरील एक टीकाकार. यानें 'तत्त्वालोक' नांवाचा वेदांतावर ग्रंथ लिहिला आहे. याचा हा तत्त्वालोक म्हणजे शारीरकभाष्याचा स्पष्टार्थ सांगणारा ग्रंथ होय. याचें नांव आनंदगिरि किंवा आनंदज्ञान असेंहि होतें. न्यायभूषण व तर्कसंग्रह नांवांचे याचे ग्रंथ आहेत. तर्कसंग्रह बडोदा ओ. सीरीजमध्यें प्रसिद्ध झालेला आहे. न्यायरत्नदीपालीवरील टीकेंत यानें नरसिंहदेव राजाचा निर्देश केला आहे. तो कलिंगाचा राजा ( स. १२४५–६५ ) दिसतो. काव्यावरील टीकाकार व तत्त्वज्ञानावरील ग्रंथकार भिन्नहि असतील ( कलकत्ता ओरि. जर्नल १, २०१–२०४ ).

**जनार्दनपंत हणमन्ते**—( मृत्यु स. १६८३ ) पिता नारायण. हा रघुनाथपंताचा भाऊ. शिवाजीनें याला सुमंताची जागा देऊन याची अष्टप्रधानांमध्यें योजना केली. शिवाजीच्या वेळचा शूर शिपाई व मुत्सद्दी. शिवाजीच्या महत्त्वाच्या घडामोडींत याचा संबंध आहे. शिवाजीशीं राज्यसंपादक म्हणून वागण्याचें हणमन्ते घराण्याचें नातें होतें. विजापूरच्या सीदी मसूदनें कर्नाटकांत बराच मुलूख शिवाजीस देऊन मोगलांशीं लढण्याकरितां त्याची मदत घेतली. त्या मुलखाची व्यवस्था त्यानें याच्याकडे सोंपविली. विजापूरच्या सर्जाखानास घेऊन दिलीरखान जेव्हां कर्नाटकांतील कोप्पळगडचा प्रदेश हस्तगत करण्यास गेला तेव्हां यानें त्याचा खरपूस समाचार घेतला ( स. १६८० ).

हा विरुद्ध वागतो म्हणून संभाजीनें शिवाजी मेल्यावर दहाबारा दिवसांत यास कैद केलें. पण पुढें याला सोडलें. हा रघुनाथपंत वारल्यावर एक महिन्यानें वारला ( ता. २८-६-१६८३ ).

**जनार्दन बाजीराव पेशवे**—(जन्म ता. १०–७–१७३५–मृत्यु ता. २१–९–१७५० ) हा बाळाजी विश्वनाथाचा नातू व नानासाहेब पेशव्याचा भाऊ. याची मुंज ता. २६–३–१७४० व लग्न भिडे यांच्या मुलीशीं ता. २०-४-१७४४ रोजी झालें. पत्नीचें नांव सगुणा. इतक्या अल्पवयांतहि यानें कांहीं महत्त्वाच्या कामांत भाग घेतलेला दिसतो.

**जनार्दन शिवराम**—(स. १७८०–९१) मद्रासच्या इंग्रजांकडील मराठ्यांचा वकील. दुसऱ्या माधवराव पेशव्यानें याची नेमणूक वकिलीचे कामावर केली. हा महाराष्ट्रीय ब्राह्मण असून याच्या बापाचें नांव शिवराम व आजाचें नांव कृष्णाजी होतें.

यानें स. १७८० ते १७९१ पर्यंतच्या काळांत मद्रासेहून पाठविलेलीं पत्रें साताराच्या म्यूझियममध्यें ठेवलेलीं आहेत. याचीं पत्रें फार उपयोगी असून त्यांमध्यें अगदीं बारीक गोष्टींचाहि उल्लेख आहे. हैदर, टिपू, निजाम, आर्काटचा नबाब, वेंकटगिरीचे नायक, व दक्षिण हिंदुस्थानांतील फ्रेंच व इंग्रज वगैरेंच्या राजकारणाविषयींची न मिळणारी माहिती यानें आपल्या कांहीं पत्रांत लिहून कळविली आहे. मद्रासचा गव्हर्नर लॉर्ड मार्कटने ( Macartney ) यास यानें इंग्रजीमध्यें लिहिलेलीं स. १७८५ सालचीं दोन पत्रें सांपडलीं आहेत ( Journ. Ind. Hist., Vol. XI, 234; श्री. डी. बी. डिस्कळकर ).

**जनार्दनसुत**—एक मराठी कवि. पदें केलीं ( सं. वा. इ. श. १८३७ ले. १६४ ).

**जनार्दनस्वामी**—( स. १५०४–१५७५ ) एक महाराष्ट्र संतकवि. हे ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. खानदेशांतील चाळीसगांवचा देशपांडे. यांचा जन्म चाळीसगांवीं शके १४२६ मध्यें झाला. हे देवगडच्या मुसलमान किल्लेदाराचे कारभारी होते. हे गाणगापूरच्या नृसिंहसरस्वतीचे शिष्य. यांना दत्ताचा साक्षात्कार होता. यांनीं केलेली नृसिंहसरस्वतीची आरती प्रत्यहीं गाणगापुरीं म्हटली जाते. यांचीं पदें व अभंग उपलब्ध आहेत. हे शके १४९७-च्या सुमारास समाधिस्थ झाले. यांचे एका जनार्दन ( एकनाथस्वामी ) हे शिष्य होत. रामा, जनार्दन आणि जनीजनार्दन यांचा यांच्याशीं प्रत्यक्ष संबंध नाहीं. पंचीकरण नांवाचें एक कविताबद्ध प्रकरण

यांचें असावें ( मं. त्रै. १२.२ ). याशिवाय श्रीदत्तस्तुति, उपदेश, समाधिप्रकरण हे ग्रंथ यांचे होत ( सं. सू. ).

**जनाश्रय पुलकेशी वल्लभ**—( स. ७३९ ) गुजराथेंतील तिसऱ्या चालुक्य घराण्यापैकीं मंगळराजाचा भाऊ. ताजीक ( अरब ) लोकांनीं या सुमारास सिंध, काठेवाड वगैरे देशांत स्वाऱ्या केल्या. त्यानंतर ते नवसरी-( गुजराथ )वर स्वारी करून गेले. त्या वेळीं या पुलकेशीनें त्यांचा पराभव करून त्यांना हाकलून दिलें ( माबेल डफ ).

**जनीजनार्दन**--( समाधि स. १८०१ ) मराठी कवि व साधु. उपनांव गोसावी. माध्यंदिनशाखा. मूळगांव बीड. तेथें वंशज आहेत. हे विजापूरकरांच्या पदरीं असतां दुष्काळांत लोकांना धान्याचीं कोठारें लुटूं दिल्यामुळें नोकरी गेली. उपास्य गणपति. पैठणाजवळ गंगामसले येथें यांनीं गणपतीची स्थापना केली. यांचीं कांहीं वेदान्तपर, रामचरित्र व कृष्णचरित्रपर पदें उपलब्ध आहेत. कांहीं पदें हिंदी भाषेंतहि आहेत. यांचा निर्विकल्पग्रंथ यांनीं एका दिवसांत पुरा केला. ग्रंथ ओवीबद्ध असून कृष्ण व उद्धव यांच्या संवादात्मक आहे. याशिवाय महावाक्यविवरण व सीतास्वयंवर हे यांचे ग्रंथ होत. यांच्या मृत्युस्थानीं म्हणजे सरदाराचे भूमगांवीं व दुसरी बीडगांवीं शिष्यांनीं अस्थि नेऊन समाधि बांधली आहे.

**जन्न**—( स. १२०९ ) जैनधर्मी कानडी कवि. हा कम्मेवंशांतील होता. गोत्र काश्यप. गुरु गंडविमुक्त रामचंद्र देवमुनि. याचा पिता शंकर, हा होयसळ नारसिंहाचा कटकोपाध्याय होता. शंकराला सुमनोबाण अशी पदवी होती. आई-गंगादेवी. पत्नी-लकुमादेवी. मुलगा-रेचय. ग्रंथ-यशोधरचरित-अनंतनाथपुराण, शिवाय 'स्मरतंत्र' नांवाचा ग्रंथ लिहिला असावा असें मोहानुभवमुकुर ( स. १४०० ) या ग्रंथावरून दिसतें. नरसिंह चोलाचा हा आस्थान कवि होता. शिवाय हा त्याचा सेनापति ( दंडाधीश ) व मंत्री होता. जन्न हा शब्द जनार्दन या शब्दाचा कानडी संक्षेप आहे. हा आपणास देशप्रभू ( नाळप्रभु ) जनार्दनदेव असें म्हणवून घेतो. यानें, जैनमंदिरें बांधलीं आहेत; आणि हा मोठा उदार होता. याला होयसळांपैकीं वीरबल्लाळानें ( स. ११७३-१२२० ) कविचक्रवर्ति अशी पदवी दिली होती व वीर नरसिंहाच्या वेळीं ( स. १२२०-१२३५ ) यानें अनंतनाथपुराण लिहिलें ( स. १२३० ). स. ११९१ मधील चन्नरायपट्टणचा १७९ नंबरचा शिलालेख स. ११९७ मधील तरीकेरेचा ४५ नंबरचा शिलालेख यानें लिहिला आहे, असें त्या लेखावरून समजतें. याची कविता मधुर, गंभीर व सफाईदार आहे (क. क. च भा. १ पा. ३२९).

**जन्नीकदेव**—हा स. १२६९ पर्यंत गणपतीच्या व रुद्रम्बाच्या कारकीर्दीत मंत्री होता. याचा उल्लेख रुद्रदेवाच्या शिलालेखांत कृष्णा प्रांतांत गोपीनाथस्वामींच्या देवळांत शक ११९१ चा आढळतो.

२. ( स. १२५९ ) हा म्हैसूरच्या कायस्थ घराण्यांतील गंगेयसाहिनीचा मुलगा. हा त्याचा मुलगाच होता किंवा काय याबद्दल संशय आहे.

**जमशीद**—काश्मीरचा राजा. शहामीरचा हा मुलगा. हा व याचा भाऊ शेरअली यांच्यामध्यें कलह होऊन याचा पाडाव झाला व शेरअलीस राज्य मिळालें.

**जमशीद कुत्बशाहा**—( स. १५४३-१५५० ) गोवळकोंड्याच्या कुली कुत्बशाहाचा हा मुलगा.

विजापूरवर स्वारी करण्यासाठीं यानें बुर्‍हाण निजामास मदत केली. पण विजापूरचा सेनापति आसदखान यानें याचा पूर्ण पराभव केला. लहानमोठे पुष्कळ हिंदु राजे यानें आपल्या ताब्याखालीं आणिले. शेवटीं हा एकसारखा नाना प्रकारच्या विलासांत निमग्न राहूं लागला; आणि कांहीं भयंकर दुखणें येऊन स. १५५० त मरण पावला.

**जमशीद बाहामनी**—हुमायून बाहामनीचा पुत्र.

**जमशेटजी बमनजी**—मुंबई येथें जहाजें बांधण्याचें काम करणारा धाडसी पारसी गृहस्थ (ऐ. च. पा. ११९).

**जमालखान**—(मृत्यु स. १७९८) मद्रासचा बॅरिस्टर जेम्स हालची पत्नी. पण ही संस्थानिकाजवळ राहून स्त्रियांचीं लष्करी पथकें तयार करी व स्वतःहि लष्करी थाटांत राही. म्हणून जमालखान नांवानें प्रसिद्ध झाली. ही प्रथम निजामाकडे होती. तेथून स. १७८८ च्या सुमारास पुण्यास आली; व एक पलटण उभारली. पण एका ब्राह्मण नोकरास फार मारल्यामुळें हिला लोहगडावर तुरुंगांत ठेवली. सात वर्षांनीं पेशव्यानें हिला सोडवलें ( इ. सं. ३. २ ).

**जमालशा**—मूळ नांव विश्वनाथ. मनाचें समाधान होईना म्हणून गंगेंत जीव देऊं लागला असतां श्रीदत्तांनीं मलंगवेषानें तारिलें. तेव्हांपासून वेष फकीराचा. नांव बदलून जमालशा घेतलें. ग्रंथ-पदें. शिष्य-जनभट ( सं. सू. ).

**जयकर्ण चालुक्य**—( स. ११०२-११२१ ) कल्याणीच्या सहाव्या विक्रमादित्य चालुक्याचा हा मुलगा. हा आपणास 'त्रैलोक्यमल्ल' ही पदवी लावीत असे. याचा अल्पवयींच मृत्यु झाला.

**जयकामदेव**—हा नेपाळच्या ठाकुरी घराण्यांपैकीं लक्ष्मीकामदेवाच्या मागून गादीवर आला. त्याला मुलगा नसल्यामुळें नवाकोटच्या ठाकुरी घराण्यांतील हा पुरुष त्याच्या नंतर गादीवर आला.

**जयकृष्ण**—हा मौनी घराण्यांतील रघुनाथभट्टाचा मुलगा व गोवर्धनभट्टाचा नातू. यानें लघुसिद्धान्तकौमुदीवर एक टीका लिहिली (सिस्टिम ऑफ संस्कृत ग्रामर, पा. ५१).

**जयकेशिन् कदंब**—(स. १०५२) हा गोव्याच्या पहिल्या षष्ठदेव कदंबाचा मुलगा. स १०५२ मध्यें हा आपल्या बापानंतर गादीवर आला.

हा पश्चिम चालुक्य राजांचा प्रतिस्पर्धी होता. यानें अलुप आणि चोल यांना जिंकून कामदेवाची सत्ता झुगारून देऊन त्या ठिकाणीं चालुक्य-राज्य सुरू केलें. याच्यानंतर याचा मुलगा पहिला विजयादित्य हा गादीवर आला.

याची मुलगी गुजराथच्या कर्ण सोळंकीला दिली होती. तिचें नांव मयणल्लदेवी (मीनल किंवा मैनल). याचें सोमेश्वर चालुक्याशीं वैर होतें. हा चालुक्यांचा मांडलिक होता.

**२.** (मृत्यु स. ११४७) गोव्याच्या पहिल्या विजयादित्य कदंबाचा हा मुलगा.

कल्याणीच्या पश्चिम चालुक्य राजांचा हा प्रतिस्पर्धी होता. यानें पश्चिम चालुक्य राजा विक्रमादित्य ६ वा याच्या मुलीशीं लग्न लाविलें होतें. हा कोंकण, कवदिद्वीप, हय्य वगैरे देशांवर राज्य करीत होता. सिंद राजे आच २ रा व पेर्मादि १ ला यांनीं याचा पराभव केला.

स. ११४७ मध्यें हा मरण पावला. याच्यानंतर याचा मुलगा—शिवचित्त पेर्मादि (परमर्दिन्) हा गादीवर आला (B.). एके काळीं विष्णुवर्धन होयसळानें याचा पराभव केला होता (स. १११०).

**३.** (स. ११८७--१२१७) हा दुसऱ्या विजयादित्य कदंबाचा पुत्र. याची पत्नी महादेवी.

**जयचंद्र गाहडवाल**—(स. ११७०-११९३) हा कनोजच्या सम्राटापैकीं शेवटचा राजा. याच्या पित्याचें नांव विजयचंद्र. विजयचंद्राच्या वेळींच सम्राटाचा मान अजमेरच्यूर व लाल्लस्कट्टेण येश होता.

**पृथ्वीदेवमिश्र**—हा स्पर्धा राक..ल य.. पृथ्वीराजापुढें याचेंब्दावलोकराजा स. म्हणून शहाबुद्दीन ग्रेरीची यानें मदत्हर. कांहीं मुसलमानी सत्ता हिंदुस्थानांत पे..ली, असा याच्यावर आरोप आहे. शेवटीं त्यानें पृथ्वीराजाचा व याचाहि सर्वस्वीं नाश केला.

याची संयोगिता नांवाची रूपवती मुलगी स्वयंवर करण्यास सिद्ध झाली असतां यानें पृथ्वीराजाखेरीज सर्व राजांना स्वयंवराला बोलविलें; व पृथ्वीराजाचा एक पुतळा दारावर द्वारपाळ म्हणून करून ठेवला. पण संयोगितेनें त्या पुतळ्याच्या गळ्यांत माळ घालून पृथ्वीराजाला वरिलें; आणि पृथ्वीराजाहि सर्व राजांच्या संघांतून पराक्रमानें हिला घेऊन गेला, अशी प्रणयकथा लोकप्रिय आहे.

यानें राजसूय यज्ञ केला होता; व पृथ्वीराजानें त्याला हरकत केली होती. नैषधकाव्याचा कर्ता श्रीहर्ष याचा आश्रित होता. नयचंद्रसूरीनें रंभामंजरी नांवाची नाटिका केली आहे. तींत हा नायक आहे.

या घराण्याची दुसरी राजधानी बनारस होती. तीहि याच्या वेळीं लुटली व कत्तल केली गेली.

शेवटीं हा मुहम्मद घोरीशीं लढत असतां याचा हत्ती गंगेंत शिरला व हा बुडून मेला. जोधपूरचें सध्याचें राजघराणें आपणास याचे वंशज म्हणवितें.

**जयतीर्थ**—हे मध्वाचार्यांच्या वैष्णव सांप्रदायांतील एक प्रमुख आचार्य व विद्वान् ग्रंथकार. हे पंढरपूरजवळ मंगळवेढ्याचे देशपांडे होत. यांचें सगळें नांव धोंडो रघुनाथ देशपांडे असें आहे. यांच्या मातेचें नांव रखमाबाई. तेराव्या वर्षी यांचा विवाह झाला असून यांच्या पत्नीचें नांव भीमाबाई असें होतें.

हे सैन्यावरचे अधिकारी असतांना पंढरपूर येथें आले. तेथेंच मध्वाचार्यांचे चवथे शिष्य अक्षोभ्यतीर्थ यांचा मुक्काम होता. तेथेंच ऐन तारुण्यांत यांनीं अक्षोभ्यतीर्थापासून संन्यासदीक्षा घेतली; आणि यांना जयतीर्थ असें आश्रमनाम प्राप्त झालें. तरुण वयांत सर्व ऐश्वर्यें अनुकूल असतां यांनीं संन्यास घेतला, तेव्हां पत्नी, वडील वगैरे लोकांनीं यांना संन्यासापासून पुनः गृहस्थाश्रमांत आणण्याचा प्रयत्न केला; पण त्याचा कांहींएक उपयोग न होतां यांनीं आपलें कार्य सुरू केलें.

यांचे ग्रंथ पाहतां त्यांवरून अगाध विद्वत्ता दिसून येते. पण यांनीं अध्ययन कोठें केलें वगैरे माहिती मिळत नाहीं. बाळपण व तारुण्याचा प्रारंभ सैन्यांत गेला असल्यामुळें लहानपणीं अध्ययन विशेष झालेलें नव्हतें. संन्यास घेतल्यानंतर यांनीं शास्त्रादिकांचें अध्ययन केलें असावें. यांनीं आपल्या तरल बुद्धीनें शास्त्रांचें सूक्ष्म अध्ययन केलें होतें यांत शंका नाहीं.

गुरूंच्या आज्ञेनें यांनीं संप्रदायवृद्ध्यर्थ देशोदेशीं संचार केला; आणि असंख्य जयपत्रें मिळवलीं. पुढें भीमानदीच्या तीरावर सरस्वतीची उपासना करून लेखणी व मध्वाचार्यांच्या ग्रंथावर टीका करण्याचा सरस्वतीदेवीचा आदेश यांना प्राप्त झाला. नंतर ककुर्विणी नदीच्या तीरावर गुरूंनीं समाधि घेतली, तेथें वृंदावन बांधून हे मरगोळास आले. आणि तेथील डोंगरावर बसून यांनीं आयुष्याच्या अखेरपर्यंत आपलें ग्रंथलेखनाचें काम केलें. आणि त्या ग्रंथामुळेंच यांचें नांव अजरामर झालें आहे.

यांनीं मध्वाचार्यांच्या बहुतेक ग्रंथांवर टीका लिहिली आहे. भगवद्गुणगान करणारीं स्तोत्रें मात्र वगळलेलीं आहेत. दशोपनिषद्भाष्यावरहि यांची टीका आहे. या टीकाग्रंथामुळें टीकाचार्य असेंहि यांना लोक म्हणतात. या टीकांशिवाय प्रमाणपद्धति वगैरे द्वैतमताचे आधारभूत असेहि कांहीं सुंदर ग्रंथ यांनीं निर्माण केले आहेत. ही सर्व ग्रंथरचना अक्षोभ्यतीर्थ समाधिस्थ झाल्यावर झाली. यरगोळच्या डोंगरावरील गुहेंत राहून यांनीं ही ग्रंथरचना केली. हे ग्रंथरचना चालू असतां यदृच्छाप्राप्त भिक्षान्न सेवन करीत असत. शेवटीं जवळच नदीचे कांठीं मालखेड येथें यांनीं देह ठेवला. मालखेड हें गांव जी. आय. पी. च्या वाडी-स्टेशनजवळ आहे. तेथें यांची पुण्यतिथि दरसाल आषाढ वद्य ५ स होते.

यांच्या चरित्रासंबंधीं बरीच वेगळाली माहिती मिळत असली तरी जयतीर्थविजय हा पंचसर्गात्मक काव्यग्रंथ बराच विश्वासार्ह दिसतो. त्यांत विद्यारण्याचे हे समकालीन होते असें म्हटलें आहे. मध्वाचार्यांनंतर ४९ वर्षांनीं हे पीठाधिपति झाले व यांनीं २२ वर्षे पीठाधिपत्य केलें. म्हणजे यांच्या पीठाधिपत्याचा काल भांडारकरांच्या मतें स. १३३५–१३४७ अगर मध्वाचार्यांचे इंग्रजी चरित्रकार पद्मनाभाचार्यांच्या मतें स. १३६६–१३८९ असा आहे.

वर निर्देश केलेल्या शिवाय यांच्या कांहीं प्रसिद्ध ग्रंथांचीं नांवें:—

( १ ) तत्त्वप्रकाशिका, ( २ ) सुधा ( द्वैतवेदांतावरील अत्यंत मान्य असा हा ग्रंथ आहे ).

**जयतुगिदेव परमार**—( मृ. स. १२५६ ) माळव्याच्या परामारांपैकीं देवपालाचा ज्येष्ठ पुत्र. याचे दोन शिलालेख मिळाले आहेत त्यांपैकीं राहतगड येथें वि. सं. १३१२ मधील ( इंडि. अँटि. २०.८४ ) व दुसरा वि. सं १४ म्हणजे १३१४ मधील मिळाला आहे. दुसऱ्या लेखांत १३ हा आंकडा सोडलेला आहे. तो कोटा राज्यांतील अट्रु येथें सांपडला ( भारतीय प्राचीनलिपिमाला, पृ. १८२ वरील ६ ). मेवाडांतील गुहिलवंशी राजा जैत्रसिंह याच्याशीं बांसवाडा राज्यांतील अर्थूणा येथें लढला होता.

**जगत्पाळ**--( जैत्रपाळ पाहा ).

**जयदामा क्षत्रप**--( स. १२५ ) चष्टनचा पुत्र. हा चष्टन जिवंत असतांनाच मेला. याचा पुत्र रुद्रदामा.

**जयदेव**—( स. ९५० सुमार ) यानें छंदःशास्त्र लिहिलें. अभिनवगुप्तानें याचा उल्लेख आपल्या ग्रंथांत केलेला आहे. यावरून अभिनवगुप्ताचे पूर्वी म्हणजे स. ९५० च्या सुमारास जयदेवाचा काल असला पाहिजे. तेराव्या शतकांतील गीतगोविंदाचा कर्ता जयदेव व पीयूषवर्ष किंवा पक्षधरमिश्र जयदेवाहून हा भिन्न होय.

हर्षटानें याच्या छंदःशास्त्रावर टीका लिहिलेली आहे. त्या टीकेची आणि जयदेवाच्या छंदःशास्त्राची नक्कल एकाच वेळीं म्हणजे स. ११३३ मध्यें झाली असावी. कारण वरील दोन्ही प्रती एकाच ठिकाणीं किलहॉर्न यास सांपडल्या ( The Poona Orientalist, Vol. I, No. I, pages 33–37 ).

२. ( स. १२०० नंतर ) संस्कृत भाषेंतील सुप्रसिद्ध कवि. हा जगन्नाथपुरी प्रांतांत बिंदुबिल्व (जि. बीरभूम) या गांवीं जन्मला. याच्या पित्याचें नांव श्रीभोजदेव, मातेचें नांव राधादेवी किंवा रमादेवी होतें आणि पत्नीचें नांव पद्मावती होय. हा परम कृष्णभक्त असून याचें 'गीतगोविंद' नांवाचें काव्य सुप्रसिद्ध आहे. चंद्रदत्तकृत भक्तमालेंत ३९-४१ सर्गांमध्यें याची माहिती आलेली आहे. पण ऐतिहासिक दृष्ट्या ती कितपत बरोबर आहे याबद्दल शंका आहे. वंगदेशाचा राजा लक्ष्मणसेन याच्या सभाद्वारावर एक शिलालेख आहे. त्यांत हा त्याच्या पदरीं होता असा निर्देश आहे. त्यावरून हा लक्ष्मणसेनाच्या काळीं होता असें ठरतें. म्हणजे याचा काळ अकराव्या शतकांत ठरतो.

याचे गीतगोविंद नांवाचे काव्यांत कृष्ण व गोपगोपी यांच्या लीला मनोवेधक रीतीनें वर्णिल्या आहेत. शिवाय याच्या काव्यांतील विशेष म्हणजे त्या रागदारीनें गातां येतात हें होय. याच्या अष्टपद्या गवयांकडून पुष्कळ ठिकाणीं ऐकावयास मिळतात.

गीतगोविंदावर कुंभरा[illegible]( स[illegible] १०२–पा शंकर-मिश्राची रसिक[illegible]च्या विक्रमादित्य चालुक्याचा हा देशी व परदेशी अ[illegible] 'त्रैलोक्यमल्ल' [illegible] असे. या[illegible] [illegible]वयींच मृत्यु झाला [illegible] प्रियां [illegible] भाषांत भाषांत[illegible]त. याचीं [illegible] नामदेवाचा हा एक पंजाबांत[illegible]त. [illegible] ी होय.

**जयदेव परचक्रकाम**—लिच्छवी घराण्यांतील दुसऱ्या शिवदेवाचा मुलगा. स. ७५८ मध्यें हा आपल्या बापानंतर पूर्व नेपाळच्या गादीवर आला. यानें गौड, ओरिसा, कलिंग आणि कोसल या देशांचा राजा जो हर्षदेव त्याच्या मुलीशीं लग्न लाविलें ( B ).

**जयदेव पीयूषवर्ष**--( स. १२००–१३०० सुमार ) याच्या पित्याचें नांव महादेव व आईचें नांव सुमित्रा. प्रसन्नराघव नाटकाच्या प्रारंभीं व चंद्रालोकांत तसा स्पष्ट उल्लेख आहे ( १. १४–१६५ ). हा न्यायशास्त्रांतहि निष्णात होता. गीतगोविंदकार जयदेवाहून हा निराळा आहे. याला अमृत वर्षाव करणारा अशा अर्थाचें पीयूषवर्ष हें उपपद होतें. चंद्रालोकावर गागाभट्टाची राकागम नांवाची टीका असून तींत पीयूषवर्ष हें जयदेवाचेंच दुसरें नांव होतें असें स्पष्ट म्हटलें आहे (मद्रास सरकारची हस्तलिखित ग्रंथावली, स. १९१८, पा. ८६५३ क्रमांक, १२८७७). केशवमिश्रकृत अलंकारशेखरांत ( पान १७ ) कोणा जयदेवपंडिताचा उल्लेख असून त्यानें उत्कल देशाच्या राजाच्या सभेंतील पंडितांना आपल्या कुशल तर्कपद्धतीनें जिंकिलें असें म्हटलें आहे. हा उल्लेख वरील चंद्रालोककार जयदेवाचाच बहुधा असला पाहिजे. कारण हा तर्कवादकुशल असल्याचा प्रसन्नराघवांत निर्देश आहेच. शिंगभूपालाच्या रसार्णवसुधाकर या ग्रंथांत ( पा. २५८, २७७ ) प्रसन्नराघवाचा नांवानें निर्देश आलेला आहे. तो ग्रंथ स. १३३० च्या सुमाराचा आहे. पीयूषवर्ष जयदेवालाचा पक्षधर म्हणत. हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिकमध्यें याची पुढील अधिक माहिती दिली आहे याचा जन्म दरभंग्याचे पूर्वेस १६ मैलांवर कमला नदीचे तीरावर असलेल्या सैसवगांवीं झाला. चुलता हरिमिश्रच याचा गुरु होता, असें तत्त्वचिंतामण्यालोकाच्या प्रारंभीं लिहिलेल्या ओळीवरून दिसतें. याचे न्यायशास्त्रांतील ग्रंथ–१ तत्त्वचिंतामण्यालोक, २ द्रव्यपदार्थ ( द्रव्यकिरणावलिप्रकाशावरील ), ३ लीलावतीविवेक ( लीलावतीप्रकाशावरील ). याचे दोन शिष्य–१ वासुदेवमिश्र ( जयदेवाचा पुतण्या ), २ रुचिदत्तमिश्र.

**जयदेवमल्ल**—हा नेपाळच्या ठाकुरी घराण्यांतील अभयमल्लाच्या मागून गादीवर आला. यानें शाखावालच्या मदतीनें नेवारा शक स. ८७९ मध्यें सुरू केला. हा कांतिपूर व ललितपट्टण येथें राज्य करीत असे.

**जयदेवमिश्र**—हा काश्मीराकडील कवि होता. यानें 'शब्दावलोक' नांवाचा व्याकरण विषयावर ग्रंथ रचिला ( बुल्हर. का. शो. ).

**जयद्रथ**—एक काश्मीरी कवि. महामहेश्वराचार्य व राजन् अशीं दोन नांवें यास होतीं. हा जयरथ कवीचा भाऊ असून कल्हणच्या मागून झाला. यानें 'हरचरितचिंतामणि' नांवाचा ग्रंथ संस्कृतांत लिहिला.

**जयपाल**—( स. ९६०–१००१ ) पंजाबचा राजा. हा काबूलच्या शाही घराण्यांतील भीमदेवाचा मुलगा. हा जातीनें ब्राह्मण होता. याचें राजधानीचें शहर सिंधूच्या पश्चिम किनाऱ्यावरील वहिंडा हें होतें. याच्या राजधानीच्या गांवाविषयीं निरनिराळीं मतें आहेत. परंतु आमच्या मतें त्याची राजधानी वहिंडा हीच होती. हा मोगलांपैकीं दत्तकुलांतील असून ह्याचें गोत्र भारद्वाज होतें.

ह्याची आणि सबक्तगिनाची स. ९८० चे सुमारास लढाई झाली. तींत याचा पक्ष जोरदार असल्यामुळें याच्या पुढें सबक्तगिनाचें कांहीं चालूं शकलें नाहीं. पण त्यानें पुनः याच्या मुलखावर स्वारी केली व त्या स्वारींत लोकांची कत्तल, जाळपोळ, देवळें पाडून मशिदी उभारणें इत्यादि गोष्टी केल्या.

पुढें स. १००१ मध्यें महमूद गझनीनें स्वारी केली. तेव्हां याचा पूर्ण पराभव झाला; व महमूदानें पुष्कळ सरदार व खुद्द जयपाल यास कैद केलें.

पुढें यानें आपलीं दोन मुलें ओलीस म्हणून महमूदाकडे ठेवलीं व स्वतःची सुटका करून घेतली. ह्याला झालेल्या पराभवाबद्दल फार वाईट वाटून ह्यानें अग्निकाष्ठें भक्षण करून प्राणत्याग केला. पुढें महमुदानें याचा मुलगा आनंदपाळ यास सोडून दिलें; व तो गादीवर बसला.

**जयभट**—( २ इंद्र राष्ट्रकूट पाहा ).

**जयमगोंड**—यानें कलिंगत्तुपरणी हें तेलगू काव्य केलें असून तें विक्रम चोलाला अर्पण केलें आहे.

२. राजाधिराज चोलाचें-नामांतर.

**जयमल्ल राठोड**—( २ उदयसिंग व टॉड पाहा ).

**जयरथ शृंगार**—काश्मीर प्रांतांतील तत्त्ववेत्ता. हा स. १२०० च्या सुमारास उदयास आला. अभिनवगुप्ताच्या तंत्रालोक नांवाच्या ग्रंथावर यानें 'तंत्रालोकविवेक' नांवाची टीका लिहिली. याचा भाऊ जयद्रथ यानें रुय्यकाच्या अलंकारसर्वस्वावर अलंकारविमर्शिणी नांवाची टीका लिहिली.

**जयराम**—रमल ज्योतिषी. रमलामृत ग्रंथाचा कर्ता. ग्रंथकाल-शके १६६९. औदिच्य ब्राह्मण (भा.ज्यो.४८९).

२. कादंबरीनीतिसाराचा टीकाकार.

**जयराम घाटगे**—दुसऱ्या रघूजी भोसल्याचे वेळेस त्याचा हा जबलपूरचा सुभेदार होता. हा सुभेदारीवर

असतां पेंढाऱ्यांनीं जवलपूरवर हल्ला करून याची मोठी दुर्दशा केली ( ना. प्रां. इ. पृ. ३७१ ).

**जयराम तर्कालंकार**—( स. १७०३ ) याचा जन्म पूर्वबंगाल्यांत पवन जिल्ह्यांत झाला. याचा बाप पुतिआ हा दरबारचा पंडित होता. हा गदाधराचा शिष्य असून यानें स. १७०३ मध्यें शक्तिवादावर टीका लिहिली ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ४८३ ).

**जयरामजजांकित**—( स. १८०६ ) या मराठी कवीचे 'साधुलक्षण,' 'पतिव्रता-स्तुति', 'सीतेचा व द्रौपदीचा धांवा',–'साधुमाहात्म्य', 'हॉरि–फाग' वगैरे लहान लहान ग्रंथ आहेत. या कवीचें भाषाप्रभुत्व नामांकित आहे. यानें केलेल्या काव्यांत शेवटच्या बाजीरावाबद्दल स्तुतिस्तोत्रें आहेत. हा कवि स.१८०६च्या सुमारास होता असें दिसतें. या कवीचीं कांहीं हिंदी कवनेंहि आहेत ( मं. त्रै. ३·१ ).

**जयराम न्यायपंचानन**—( स. १७०० सुमार ) हा रामभद्र सार्वभौमाचा शिष्य होता. यास न्यायपंचाननाचे ऐवजीं कधीं कधीं नुसतें पंचानन असेंहि म्हणतात. जोधपूरच्या अजितसिंहाच्या कारकीर्दींत स. १७१२ त भीमसेन दीक्षितानें लिहिलेल्या 'अलंकारसारस्थिति' व 'एकषष्ठियअलंकारप्रकाश' या ग्रंथांत जयराम व देवनाथ तर्कपंचानन हे दोघे तर्कशास्त्रांतील प्रमाण होते असें म्हटलें आहे.

ज्याला नडिया येथील पंडितांकडून 'नवद्वीपाधिपति' अशी वंशपरंपरा चालणारी पदवी मिळाली होती त्या कृष्णनगर येथील राजा रामकृष्णाच्या आश्रयास जयराम असे. याचे ग्रंथ–( १ ) तत्त्वचिंतामणि–दीधिति–गूढार्थ–विद्योतन. शिरोमणीच्या दीधितीवरील उपटीका. ( २ ) तत्त्वचिंतामण्यालोकविवेक. जयदेवाच्या आलोकावरील उपटीका. ( ३ ) न्यायसिद्धांतमाला ( गोतमाच्या न्यायसूत्रांतील सूत्रें ४ ते ७ वरील टीका ). ( ४ ) शब्दार्थमाला.

वैशेषिक तत्त्वज्ञानावर यानें खालील ग्रंथ लिहिले आहेतः— (५) गुण–दीधिति–विवृति. उदयनाचार्याच्या किरणावलीवरील टीकेवरील उपटीकेवरील उपटीका. ( ६ ) न्याय–कुसुमांजलि–कारिका–व्याख्या ( उदयनाचार्याच्या कारिकेवरील टीका ). ( ७ ) पदार्थ–मणि–माला,अथवा पदार्थमाला–( हा जयरामाचा सर्वांत उत्तम ग्रंथ आहे. यावर जनार्दनव्यास व लौगाक्षिभास्कर यांनीं टीका लिहिल्या आहेत ). ( ८ ) मम्मटाच्या काव्य प्रकाशावर यानें काव्यप्रकाश–तिलक नांवाची टीका लिहिली ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ४७७–७८ ).

**जयरामस्वामी**—( स.१५९९–१६७२ ) कृष्णाप्पास्वामींचे शिष्य. गांव–कात्राबाज मांडवगण. उपनांव–कसरे. पिता–भिकाजी. माता–कृष्णाबाई. ग्रंथरचनास्थळ–वडगांव. हे मोठे सरस कवि होते.

ग्रंथ–दशमस्कंधटीका, रुक्मिणीस्वयंवर, सीतास्वयंवर, अपरोक्षानुभव, शांतिपंचीकरण, ज्ञानीभक्तसंवाद, शिवाय पदें वगैरे. यांचे अनेक शिष्य आहेत.

२. हे पुणें प्रांताचे राहणारे होते. यांच्या उपलब्ध असलेल्या ग्रंथावरून हे व वरील रामदासी जयरामस्वामी असे एकच असावे अशी शंका येते.

ग्रंथ–जयबोध ( दासबोधाची टीका ) ( सं. सू. ).

**जयरामात्मज**—( स. १७०० नंतर ) एक महाराष्ट्र संतकवि. हा गोसावीनंदनाच्या मागाहून होऊन गेला. यानें कोकिळगंगाधर, राघवचिद्घन, श्रीधर, अनंत यांचा आपले संतमालिकेंत उल्लेख केला आहे. याचे संतमालिका, द्रौपदीचा धांवा, घडियाळें, अंबेची आरती, रासमंडळ वगैरे ग्रंथ आहेत.

**जयवर्मा कदंब**—बनवासीच्या विजयवर्मा कदंबाचा पुत्र.

२. बनवासीच्या चटु कदंबाचा पुत्र.

३. एक अज्ञातवंशांतील राजा. विक्रमसंवत् ४६१ ( स. ४०४ ) मधील मंदोसर येथें मिळालेल्या शिलालेखांत यास नरेंद्र ( राजा ) म्हटलें आहे.

**जयवर्मा परमार**—माळव्याच्या परमारांपैकीं यशोवर्म्याचा पुत्र. हा नांवाचा राजा होता. हा गुजराथच्या राजाच्या ताब्यांत होता. याचें नांव कांहीं ताम्रपत्रांत गाळलें आहे.

२. माळव्याच्या देवपाल परमाराचा दुसरा मुलगा. याचा एक शिलालेख वि. सं. १३१४ माघ वद्य १ मधील व एक दानपत्र वि. सं. १३१७ ज्येष्ठ शुद्ध ११ मधील मंडपदुर्ग म्हणजे मांडू येथून दिलेलें मिळालें आहे. त्यांत याच्या सांधिविग्रहिकाचें नांव मालाधर पंडित व महाप्रधानाचें नांव राजा अजयदेव असें दिलें आहे.

**जयसिंह**—( स. ७१७–७२४ ) सिंधच्या दाहीर राजाचा मुलगा. दाहीर मारला गे[illegible]ल्यावर यानें मुहम्मदास तोंड देण्याचा प्रयत्न [illegible]ला. बहामनाबादेहून हा चित्तूरकडे हटला तेव्हां [illegible]च्या आईनें म्हणजे राणीबाईनें जोहार केला. [illegible]च्या आईनें मुहम्मदाशीं निका [illegible]वयांपैकी दुसऱ्या लाडी नांवाच्या आईनें मुहम्मदाशीं निका [illegible]वला. मुहम्मदच्या जागेवर आलेल्या उमरनें याला

मुसलमान बनविलें. यानें खलीपाची मनधरणी केली असतांहि उमरच्या पुढला सुभेदार जुनैदनें स्वारी करून यास ठार केलें. याचा भाऊ छंच यानें जुनैदच्या विश्वासघाताबद्दल तक्रार चालविली असें दिसतांच त्यालाहि जुनैदनें ठार केलें.

२. ( स. १७६३-१८३३ ) एक हिंदी कवि. रींवाचा राजा. अठरा ग्रंथ केले. रचना सरस. मोठा भगवद्भक्त वैष्णव.

ग्रंथ—कृष्णतरंगिणी, हरेचरितामृत, निर्णयसिद्धांत, गंगालहरी, हरिचरित्रचंद्रिका.

**जयसिंह ( मीर्झा ) कच्छवाह**— ( स. १६२१–१६६७ ) मानसिंगाच्या वंशांतील हा प्रसिद्ध राजा असून अंबेर ( अंबर ) येथें राज्य करीत होता. मारवाडचा जसवंतसिंह व राजसिंह या तिघांचा त्या वेळीं एक विचार होता. मानसिंहाचा भाऊ जगत्‌सिंह याचा हा नातू होय. शहाजहान व औरंगझेब यांच्या पदरीं याचें वजन चांगलें होतें. शिवाजीस दिल्लीस नेण्याचें काम यानें युक्तीनें बजाविलें; व पुढें विजापूरच्या मोहिमेंत अपयश आल्यावरून बादशहानें याचा अपमान केला. तेव्हां दक्षिणेंतून परत येत असतां हा रस्त्यांत ब्न्हाणपुर येथें १२–७–१६६७ त मरण पावला.

**जयसिंह ( सवाई ) कच्छवाह**--( स. १६६९–१७४३ ) हा अंबरचा महासिंह कच्छवाहचा मुलगा. हा फार विद्वान् होता. यानें चव्वेचाळीस वर्षें राज्य केलें. चोहोंकडे बेबंदशाही सुरू असतां यास युद्धप्रसंग करून रजपुतांचें शौर्य दाखविण्यास पुष्कळ जागा होती. तरी शांततेनें व शहाणपणानें लोकांच्या कल्याणार्थ झटण्यामध्येंच याचें कर्तृत्व व्यक्त झालें. यानें राज्यास सुव्यवस्था लावून दिली, चांगले कायदे केले, शास्त्राध्ययनास उत्तेजन दिलें. यानेंच जयपूरच्या शहराची हल्लींची बांधणी स. १७२८ त तयार केली. याच्यापाशीं विद्याधर नांवाचा एक हुशार व विद्वान् बंगाली गृहस्थ होता. त्याच्या साहाय्यानें हा राज्यांतील सर्व सुधारणेच्या गोष्टी करीत असे. दिल्ली, उज्जनी, जयपूर, बनारस, मथुरा वगैरे ठिकाणीं यानें वेधशाळा व ज्योतिषशाळा स्थापिल्या. ग्रहांचे शोध लावण्याचीं नवीन यंत्रें यानें बनविलीं. बिनचूक वेध घेऊन यानें एक नवीन पंचांग चालू केलें. शास्त्रीय शोधांशिवाय रस्ते, धर्मशाळा वगैरे अनेक कामें प्रजेच्या हिताकरितां यानें केलीं. हा लोकोत्तर राजा झाला असें म्हटल्याशिवाय राहवत नाहीं. काशींतील भट्टकुलापैकीं रत्नाकरभट्टानें जयसिंहाच्या आज्ञेवरून जयसिंहकल्पद्रुम हा ग्रंथ लिहिला.

हा स. १७४३ त मरण पावला. हा दिल्लीकराचा सेनापति असून आंतून थोरल्या बाजीरावास साहाय्य करीत असे ( पे. द. १४; अमीरखान पाहा ). याचा थोरल्या शाहूशीं घरोब्याचा संबंध होता. हा स.१७०९त माळव्याचा नाझीम होता. ईश्वरसिंग याचा पुत्र होय.

सिद्धान्तसम्राट् या याच्या ग्रंथांत यास मत्स्यदेशाधिपति म्हटलेलें आहे. भारतीय मुसलमानी आणि युरोपियन ज्योतिषग्रंथांप्रमाणें दृक्प्रत्यय येत नाहीं म्हणून यानें नव्या वेधशाळा स्थापना केल्या आणि नवीं वेधयंत्रें करून वेध घेण्याचें यानें ठरविलें. त्याप्रमाणें जयपूर, इंद्रप्रस्थ, उज्जयनी, काशी, मथुरा येथें वेधशाळा स्थापिल्या. धातूंचीं यंत्रें लहान असतात व तीं झिजतात, वगैरे कारणांनीं यानें वेधोपयोगी अशीं पाषाणाचीं आणि चुन्याचीं मोठमोठीं बळकट यंत्रें तयार केलीं. त्यांत जयप्रकाश, यंत्रसम्राट्, भीत्तीयंत्र, वृत्तषष्टांश, इत्यादि कांहीं यंत्रें नवीं कल्पिलीं. त्यावर ७–८ वर्षें उत्तम ज्योतिष्यांकडून वेध घेऊन सिद्धान्तसम्राट् हा ग्रंथ संस्कृत भाषेंत आणि झिजमुहम्मद हा ग्रंथ अरबी भाषेंत लिहिला. त्या वेळीं दिल्लीचा बादशाह मुहम्मदशाह मोगल होता. त्याचें नांव वरील अरबी ग्रंथास दिलेलें आहे. तो ग्रंथ शा. श. १६५० मध्यें लिहिला. नंतर सिद्धान्तसम्राट् हा ग्रंथ जगन्नाथ नांवाच्या पंडिताकडून लिहून घेतला ( स. १७३१ ). झिजमुहम्मदाला मिजस्ती असें म्हटलें आहे. त्यांत१३ अध्याय व १४१ प्रकरणें आहेत; व १९६ क्षेत्रांचा त्यांत विचार केलेला आहे. उलुखबेग इत्यादिकांचे कांहीं प्राचीन वेध घेऊन त्यांच्या व स्वतःच्या वेधांच्या तुलनेनें ग्रहगत्यादिक यानें काढलेलीं आहेत. हा ग्रंथ संपूर्ण स्वरूपांत शं. बा. दीक्षितांना मिळालेला नव्हता. याच्या वेधशाळा, वेध आणि ग्रंथ व त्यांतल्या अपूर्व गोष्टी यांचें सविस्तर वर्णन केलें तर एक ग्रंथच लिहावा लागेल. येथें इतकें सांगणें पुरे कीं, त्या वेळीं युरोपखंडांत ग्रहगतिस्थितीविषयीं जितकी सूक्ष्मता काढतां येत होती तीपेक्षांहि यानें अधिक सूक्ष्मता साधली होती, ही गोष्ट आपल्यास अत्यंत अभिमानास्पद आहे. याच्या पदरीं जरी अनेक पंडित होते व त्यांना परदेशीं पाठवूनहि हा माहिती आणीत असे, तथापि हा स्वतःहि वेधकुशल, गणितज्ञ, ज्योतिषज्ञ, आणि नवीन शोध करण्यांत कुशल असा होता. यानें आपल्या सिद्धान्तसम्राट् ग्रंथांत प्राचीन संस्कृत ग्रंथांचा निर्देश केलेला आहे. त्याचप्रमाणें

तैमूरलंगाचा नातू उलुघबेग याचा ग्रंथ ( श. १३५९ ), बुत्तनस्सर याचा ग्रंथ, रोमकसिद्धान्त आणि बतलमजूस व अवरखस या यवनाचार्यांचाहि उल्लेख आहे.

युक्लिडच्या भूमितीच्या पुस्तकांचा संस्कृत ग्रंथ याच्या आज्ञेनें जगन्नाथानें केला ( श. १६४१ ). रेखागणित असें त्याचें नांव आहे. कटर या नांवाचा आणखी एक ग्रंथ यानें नयनसुखोपाध्यायाकडून करविला आहे. तो युक्लिडच्या ग्रंथासारखाच, परंतु स्वतंत्र आहे. हा ग्रंथ अर्बीमधून संस्कृतांत केलेला आहे (भा.ज्यो. २९२–९५).

याचे ग्रंथ आतां कोणी अभ्यासीत नाहींत, पण वेधशाळा उपयोग करण्यासारख्या स्थितींत ठेवल्या आहेत.

**जयसिंह कदंब**—जयवर्मा कदंबाचें नामांतर.

**जयसिंह कलचुरी**—( स. ११७०–८० ) हा गयकर्णाचा पुत्र. याची राणी गोसलदेवी.

**जयसिंह चालुक्य**—( स. ५०० ) हा चालुक्यांचा मूळपुरुष. या घराण्याची पहिली राजधानी इंदुकांती. याच्या वंशापैकीं दुसऱ्या पुलकेशीनें वदामी येथें राजधानी करून पश्चिमचालुक्य घराणें सुरू केलें; आणि त्याचा भाऊ कुब्ज विष्णुवर्धनानें वेंगी येथें पूर्वचालुक्य घराणें सुरू केलें. आणि जयसिंह नांवाच्या भावानें गुजराथमध्यें राज्य सुरू केलें.

२. ( स. ६७१–९२ ) हा पहिल्या कीर्तिवर्मा चालुक्याचा पुत्र. यानें गुजराथमध्यें राज्य मिळवून चालुक्यांची शाखा सुरू केली. याला धराश्रय म्हणत. याचा पुत्र बुद्धवर्मा ( विजयराज सोळंकी पाहा ). यालाच कांहीं ठिकाणीं दुसऱ्या पुलकेशीचा पुत्र म्हटलें आहे. याला जगदेकमल्ल असेंहि म्हणतात. याच्या बायकोचें नांव सुग्गलादेवी होतें. यानें माळवा ( भोजराज ) व सप्तकोंकण घेतल्याचा उल्लेख आढळतो.

**जयसिंह (पूर्व) चालुक्य**—( स. ६३३–६६३ ) हा कुब्ज विष्णुवर्धनाचा पुत्र. याला सर्वसिद्धि व वल्लभ वगैरे पदव्या होत्या.

२. ( स. ६९६–७०९ ) हा मंगींचा वडील मुलगा.

**जयसिंह (पश्चिम) चालुक्य**—(स. १०१८–१०४३) याच्या बापाचें नांव दशवर्मा ( यशोवर्मा ) आणि आईचें नांव भाग्यवती असें होतें. कल्याणीच्या पश्चिम चालुक्य घराण्यांतील जो विक्रमादित्य ५ वा अथवा अय्यण २ रा त्याचा हा भाऊ होय. स. १०१८ मध्यें हा आपल्या भावानंतर गादीवर आला.

यानें चोल राजा राजेंद्र चोल १ ला व चेर यांचा पराभव केला आणि परमार राजा भोज-देव याच्यावर स्वारी केली. कदम्ब घराण्यांतील याची बहिण अक्कादेवी हिचा मुलगा तोयिम-देव, आणि जयकेशिन्, इरिविबेडंग मारसिंह हे जयसिंहाचे प्रतिस्पर्धी होत. यानें स. १०४० पर्यंत राज्य केलें. यादव घराण्यांतील ( सेऊणदेश येथील ) जो भिल्लम २ रा त्याचें व याचें स. १०२५ च्या सुमारास भांडण होतें.

स. १०४४ मध्यें याचा मुलगा सोमेश्वर १ ला हा आपल्या बापानंतर राज्य करीत होता ( B ).

७. ( स. १०७९–१०८१ ) कल्याणीच्या पश्चिम चालुक्यांपैकीं पहिल्या सोमेश्वराचा मुलगा. बनवासीचा प्रतिनिधि म्हणून प्रसिद्ध आहे.

**जयसिंह चौहान**—जालोरच्या मालदेव सोनगरे चौहानाचा हा मुलगा. राणा हंमीरानें याच्यापासून चितोडचें राज्य घेतलें. याला जेसा म्हणत.

२. सीसोदें येथील राणाशाखेपैकीं हा भीमसिंहाचा पुत्र. याचा पुत्र लक्ष्मसिंह.

**जयसिंह परमार**—( स. १०५५–१०५९ ) माळव्याच्या परमारांपैकीं भोजाचा उत्तराधिकारी. भोजाच्या मृत्युसमयीं धारानगरी शत्रूंच्या ताब्यांत होती. पण ते परत गेल्यावर हा माळव्याचा राजा झाला. याचें एक दानपत्र वि. सं. १११२ ( स. १०५५ ) मधील मिळालें आहे ( एपि. इंडि. भा. ३ पृ. ४८–५० ). तसेंच याचा एक शिलालेख वि. सं. १११६ मधील बांसवाडा राज्यांत पाणहेडगांवीं मंडलीश्वराच्या मंदिरावर लावलेला आहे. त्यांत याच्या शौर्याबरोबर याचा सामंत बागडचा परमार मंडलिक ( मंडन ) याबद्दल लिहिलें आहे कीं, त्यानें अत्यंत समर्थ सेनापति कन्ह याला पकडून त्याचे हत्तीघोडे यासह याला सुपूर्त केले ( शिलालेख अप्रसिद्ध ). कन्ह कोणाचा सेनापति होता, हें अद्यापि समजलें नाहीं. वि. सं. १११६ च्या नंतर फार वर्षे यानें राज्य केलें नसावें.

२. ( जयतुगिदेव पाहा ).

३. ( स. १२६८ ) हा माळव्याच्या परमारांपैकीं दुसऱ्या जयवर्म्याचा उत्तराधिकारी. वि. सं. १३४५ मधील कोटा राज्यांत कवाळजीच्या कुंडावर एक शिलालेख आहे. तो रणथंभोरचा हंमीर चौहानच्या वेळचा आहे. त्यांत लिहिलें आहे कीं, हंमीरच्या पिता जैत्रसिंह यानें ( मंडप ) मांडूच्या जयसिंहाला खूप त्रास दिला. माळव्याच्या या राजाच्या योद्धयांना झपायताच्या घाटांत पराभूत केलें; आणि रणथंभोर येथें कैदेंत ठेवलें. याच्या वेळचा एक शिलालेख वि. सं. १३२६ वैशाख शुद्ध

सप्तमीचा मिळाला आहे ( एपि. इंडि. ५. परिशिष्ट ले. २३२ ).

४. ( स. १३०८–१३४२ सुमार ) माळव्याच्या परमारांपैकीं दुसऱ्या भोजाचा उत्तराधिकारी. याच्या वेळचा एक शिलालेख ग्वाल्हेर राज्यांत उदयपुर येथें मिळाला आहे. तो वि. सं. १३६६ श्रावण वद्य १२ चा आहे ( इंडि. अँटि. २०.८४ ). याच्या शेवटच्या दिवसांत सारा माळवा मुसलमानांच्या ताब्यांत गेला. त्यामुळें हिंदु राजांची स्थिति सरदारांसारखी झाली. क्वचित् वर डोकें काढीत.

जलालुद्दीन फीरूजशाह खल्जीनें वि. सं. १३४८ मध्यें उज्जयनी जिंकली व मंदिरें फोडलीं ( ब्रिग, फिरस्ता १.३०१; इलियट ३ १४७ ). नंतर पुनः दोन वर्षांनीं माळवा लुटला. त्याचा पुतण्या अलाउद्दीननें भेलसा सर करून माळव्याचा पूर्वेकडील भाग जिंकला. अनुमानतः मुहम्मद तुघ्लकच्या वेळीं माळव्याचें परमारराज्य संपलें. 'मिराते सिकंदरी' वरून समजतें कीं, मुहम्मद तुघ्लकानें वि. सं. १४०० च्या सुमारास माळवा जिंकला व अजीज हिमारच्या ताब्यांत दिला. तो प्रथम कंधारचा हाकिम ( अधिकारी ) होता.

**जयसिंहराव**—ही धनाजी जाधवाची पदवी (डफ्).

**जयसिंह लोहर**—( स. ११२८–५१ ) काश्मीरचा राजा. हा सुस्सलाचा मुलगा. याच्याच वेळीं कल्हणानें राजतरंगिणी लिहिली. त्यामुळें याच्या कारकीर्दीचीं फारच विस्तृत वर्णनें कल्हणानें केलीं आहेत. सिल्हण आणि अलंकार हे याचे सुप्रसिद्ध मंत्री होते. यानें भिक्षु किंवा भिक्षाचर यांचा पराभव केला. याच्या कारकीर्दीच्या शेवटीं काश्मीरचें राजघराणें विलयाला गेलें.

**जयसिंह ( सिद्धराज ) सोळंकी**—( स. १०९३–११४२ ) याच्या आईचें नांव मयणल्लदेवी. ही याच्या लहानपणीं राज्यकारभार पाही. हा गुजराथच्या सोळंकी वंशांतील पहिल्या कर्णाचा पुत्र. यानें सिद्धराज अशी पदवी धारण केली होती. हा सिद्धराज जयसिंग या नांवानेंच विशेष ओळखला जातो. हा सोमनाथाच्या यात्रेला गेला असतां माळव्याच्या नरवर्मा परमारानें गुजराथेवर स्वारी केली. त्यामुळें परत आल्यावर यानें माळव्यावर स्वारी केली आणि बारा वर्षें लढत राहिला. या लढाईंत नरवर्मा मृत्यु पावला व त्याचा पुत्र यशोवर्मा गादीवर आला. त्याला यानें जिंकलें व कैद केलें. यामुळें माळवा गुजराथच्या राज्यांत सामील झाला ( एपि. इंडि. भा. १०. पृ. १९६-९७ ). याबरोबरच चितोडचा किल्ला व त्याच्या आसपासचा प्रदेश, तसेंच बागड यांवरहि याचा अधिकार सुरू झाला ( ना. प्र. प. भा. ३ पृ. वर टीप २ ), तो कुमारपालानंतर अजयपालापर्यंत चालू होता. आबूचे परमार व नाडौलचे चौहान हे पूर्वीपासून गुजराथच्या राजाच्या ताब्यांत होते. यानें महोबाच्या मदनवर्मा चंदेल्ल राजावरहि स्वारी केली होती. पण त्यांत याला जय मिळाला किंवा नाहीं हें संशयास्पद आहे. यानें सोरठवर स्वारी करून गिरनारच्या खंगार ( दुसरा ) यादव ( चूडासमा ) याला कैद केलें. बर्बर वगैरे जंगली जातींना अधीन करून घेतलें; व अजमेरच्या आना ( अर्णोराज, आनाक, आनल्लदेव ) चौहानावर विजय मिळवला. पण शेवटीं सलोखा होऊन आपली कन्या कांचनदेवी हिचें लग्न आनाबरोबर करून दिलें. कांचनदेवीचा पुत्र सोमेश्वर होय. सोमेश्वराला यानें लहानपणींच आपल्या घरीं आणलें व याचा देहान्त झाला तेव्हां त्याचें पालनपोषण याच्यानंतर गादीवर आलेल्या कुमारपालानें केलें. प्रसिद्ध जैन हेमचंद्राचार्याचा हा अत्यंत सन्मान करीत असे. याच्या दरबारांत 'वैरोचनपराजय'चा कर्ता श्रीपाल, कविशिक्षेचा कर्ता जयमंगळ ( वाग्भट ), गणरत्नमहोदधीचा कर्ता वर्धमान, तसेंच सागरचंद्र वगैरे विद्वान् लोक होते. श्रीपाल याच्या दरबारांतील मुख्य कवि होता. कुमारपालाच्या वेळींहि तें स्थान त्याच्याकडेसच राहिलें. वर्धमानानें सिद्धराजवर्णन नांवाचा ग्रंथ लिहिला होता ( ना. प्र. प. भा. ३, पृ. ८ टीप्पण २ ). सागरचंद्रानेंहि सिद्धराजाची प्रशंसा करणारें काव्य लिहिलें असावें असें त्यांतील श्लोक गणरत्नमहोदधींत उद्धृत केले आहेत त्यावरून दिसतें ( ना. प्र. प. ३. ९ वरील टीप ). वि. सं. ११५०–११९९, स. १०९३-११४२ पर्यंत यानें राज्य केलें. याला पुत्र नव्हता. म्हणून याच्यामागें कर्णाचा वडील भाऊ क्षेमराज नांवाचा होता, त्याचा पुत्र देवप्रसाद, व देवप्रसादाचा नातू त्या त्रिभुवनपालचा पुत्र कुमारपाल गुजराथच्या सिंहासनावर आला. याला अनेक पुत्र असल्याच्या भाटांच्या वर्णनांतील गोष्टी हेमचंद्राच्या द्व्याश्रय काव्यावरून खोट्या ठरतात. याला चालुक्यवंशप्रदीप व गुजराथचें भूषण मानतात.

**जयसिंहसूरि**—( स. १२२९ ) एक जैन पंडित. वीरसूरीचा शिष्य व भडोचच्या मुनिसुव्रत देवालयाचा जीर्णोद्धार करविणारे आचार्य. 'हम्मीरमदमर्दन' नांवाच्या संस्कृत नाटकाचा कर्ता. वस्तुपालानें मुसलमानांपासून गुजराथचें रक्षण केल्याचें वृत्त त्यांत आहे.

**जयंत**—( स. १००० सुमार ) तर्कशास्त्रज्ञ. चंद्राचा पुत्र. वृत्तिकार म्हणून याची प्रसिद्धी आहे. वादांत हा नेहमीं अजिंक्य असे. बौद्ध व ब्राह्मण पंडितांशीं यानें अनेक वेळां वाद केले. न्यायसूत्रावर न्यायमंजरी नांवाची याची टीका आहे. वाचस्पतिमिश्र व माघ यांचा यानें निर्देश केला आहे. तत्त्वचंद्र नामक व्याकरणांतील प्रक्रिया-कौमुदीवरील टीका ग्रंथाचा कर्ता. काव्यप्रकाशावरील टीकाकार. न्यायकणिका हा याचाच ग्रंथ होय.

**जयादित्य**—( स. ६६१–६६२ ) यानें पाणिनीच्या सूत्रावर काशिकावृत्ति नांवाची सुप्रसिद्ध वृत्ति लिहिली. पण अपुरी राहिली होती ती वामनानें पुरी केली. चिनी प्रवासी इत्सिंग यानें आपल्यापूर्वी ३० वर्षें हा मेला असें लिहिलें आहे. त्यावरून याचा काल स. ६६१–६६२ हा ठरला.

काशिकावृत्तीपैकीं ३।४।७८ या अध्यायांतील काशिका-वृत्ति यानें लिहिली, असें बहुल्यार्थात् (पा. सू.५-४-४२) या सूत्रावरील शब्दरत्नांत म्हटलें आहे.

**जयापीड कर्कोटक**—(स. ७७९–८०८ ) काश्मीर येथील वज्रादित्याचा हा मुलगा होय. स. ७७९ मध्यें हा काश्मीरच्या गादीवर आला.

गादीवर आल्यावर लवकरच हा हिंदुस्थानावरील ( दक्षिण अथवा पूर्व हिंदुस्थान असावें ) स्वारींत गुंतला. त्या संधीचा फायदा घेऊन याचा मेव्हणा जज्ज यानें कांहीं काळ काश्मीरची गादी बळकाविली. पण पुढें यानें जज्ज यास ठार मारून आपण गादीवर आला. त्याचप्रमाणें यानें कनोजचा राजा वज्रायुध यास पदच्युत केलें (B).

हा स. ८०८ मध्यें मरण पावला. याच्या नंतर याचा मुलगा ललितापीड हा काश्मीरच्या गादीवर आला (B). बंगाल्यांतील जयंत राजाच्या कमलादेवी नांवाच्या मुलीशीं लग्न केलें; व परत जातांना कनोजचें बहुमोल सिंहासन काश्मीरास आणलें. पतंजलीच्या महाभाष्याच्या अभ्यासाला उत्तेजन दिलें; आणि अमरकोशाचा प्रसिद्ध टीकाकार क्षीरस्वामी याला आपल्या दरबारांतील व्याकरण-शास्त्राचा पंडित नेमलें. याच्या दरबारांतील पंडितांचा मुख्य उद्भटालंकार नांवाच्या साहित्यशास्त्रावरील ग्रंथाचा कर्ता उद्भट हा होता. त्याला हा दररोज १ लक्ष दिनार देत असे. ही निव्वळ अतिशयोक्ति दिसते. शिवाय याच्या दरबारांत मनोरथ, शंखदत्त, चटक आणि संधिमान हे कवि; व्याकरण व साहित्यशास्त्रावरील ग्रंथकार वामन, कुट्टनीमताचा कर्ता दामोधरगुप्त आणि थक्कीय हे होते. चोहोंकडचे विद्वान् यानें काश्मीरांत गोळा केले होते. हा अनेक राजांचा जेता असूनहि यानें सुशिक्षणाचा सूर्य अशा अर्थाचें विनयादित्य हें बिरुद धारण केलें होतें. याच्या साहाय्यकांत तुराणच्या मुम्मुनीचेंहि नांव आढळतें, हेंहि ध्यानांत घेण्यासारखें आहे. याच्या स्वाऱ्यांपैकीं नेपाळच्या स्वारींत याला हार खावी लागली; व तेथील अरमुंडी नामक राजाच्या हातीं सांपडून हा बंदींत पडला. पण ह्याच्या प्रधानानें याची सुटका केली. तेव्हां यानें नेपाला-धिपतींचा पराभव केला आणि मोठ्या विजयोत्साहानें काश्मीरांत परत आला. पण या कामीं प्रसिद्ध मंत्री मित्रशर्मा याचा पुत्र आणि स्वतःचा विश्वासू मंत्री देवशर्मा हे मेल्यामुळें याचें फार नुकसान झालें. पण शेवटीं मात्र हा मोठा जुलमी आणि ब्राह्मणांचा छळ करणारा झाला. एका नागानें याला सोन्याचा डोंगर दाखविण्याचें कबूल करून तांब्याचा डोंगर दाखविला. त्याचे ९९ कोटी दिनार पाडले तरी याची आर्थिक हलाखी दूर झाली नाहीं. शेवटीं तंबूचा सोन्याचा खांब डोक्यावर पडून हा मेला ( स. ७८२ ). यानें एकूण ३१ वर्षें राज्यकारभार केला ( म. भा. १.२.९५-९७ ).

**जयाप्पा शिंदे**—( मृ. स. १७५५ ) हा राणोजी शिंद्याचा ज्येष्ठ पुत्र होय. ह्याच्या बायकोचें नांव सखूबाई. यास चार मुली व एक मुलगा जनकोजी अशीं मुलें होतीं. ह्याला बाप मेल्यानंतर ६५॥ लक्षांचें उत्पन्न मिळालें. ह्यानें स. १७५० त बादशहाला पेशव्यांचे तर्फेनें मराठ्यांची मदत देतांना एक महत्त्वाचा करार केला. त्यांत मराठ्यांनीं बादशहास मदत द्यावी असें होतें. पण हें मराठ्यांचें वर्चस्व सहन न होणारा पक्ष दरबारांत उत्पन्न होऊन पानपतच्या युद्धाचा प्रसंग निर्माण झाला.

ह्यानें स. १७५१ त फर्रुखाबादची लढाई करून रोहि-ल्यांचा मोड केला. ज्या वेळीं सुरजमल्लानें तेजराम यास जयाप्पा शिंद्याकडे पाठवून आपला बचाव मल्हारराव पासून करण्याविषयीं विनविलें, तेव्हां ह्यानें त्यांस आश्वासन दिलें. पण त्यामुळें ह्याचें व होळकराचें वैमनस्य वाढलें. पण पुढें ह्यानेंच सुरजमल्लाकडून ६० लक्ष रुपये होळकरास देवविले व तह घडवून आणला.

पुढें हा जोधपूरच्या रामसिंगास भावाविरुद्ध मदत कर-ण्यास गेला असतां त्याचा भाऊ बिजेसिंग यानें मारेकऱ्यां-कडून याचा खून केला. ( स. ३०-६-१७५५ ). या वेळेस ह्याचा मुलगा जनकोजी हा मेडतें सर करण्यास स्वारीवर गेला होता.

**जलालुद्दीन फीरूज खल्जी**—( स. १२९०-१२९६ ) कैकूबादच्या वेळीं हा सामानचा सुभेदार होता.

पण निजामुद्दीनच्या वधानंतर याला सेनापति करण्यांत आलें. खल्जी घराणें मूळचें तुर्क असलें तरी तें फार दिवस अफगाणिस्थानांत राहत असल्यामुळें पठाण समजलें जाई; व तुर्क लोक त्याचा द्वेष करीत. त्यामुळें याचें वर्चस्व हाणून पाडण्याकरितां त्यांनीं अनेक कारस्थानें केलीं. पण शेवटीं कैकूबादचा खून करवून व त्याचा गादीवर बसलेला अल्पवयी मुलगा कयूमार्सला पळवून नेऊन यानें दिल्लीचें राज्य बळकावलें; आणि फीरूज असें नांव धारण केलें. त्या वेळीं हा सत्तर वर्षांचा होता. मुसलमानांचें रक्त सांडूं नये म्हणून यानें अनेक बंडखोरांना केवळ हद्दपार केलें ( झझ्झूखान, उलूघखान पाहा ). मुसलमानांचा क्षय होईल अशी भीति वाटली म्हणून रणथंभोरच्या स्वारी-वरून न लढतां अपकीर्ति पत्करून हा परत फिरला ( स. १२९१ ). याच्या उदार धोरणामुळें राज्यकारभारांत तुर्कांबरोबर पठाणांचाहि प्रवेश झाला. याला जुन्या मुसलमान राजघराण्याबद्दल आदर वाटे. असें होतें तरी सरदारांमध्यें याला पदच्युत करण्याच्या गोष्टी चालत. अशा गोष्टी करणाऱ्या लोकांना बोलवून यानें आव्हान देऊन 'छाती असेल तर खून करा' म्हणून आपली तलवार त्यांचे अंगावर फेंकली. पण सिद्दी मौलाला खलिपा करण्याचे प्रयत्नास मात्र यानें त्याला ठार करून विरोध केला. स. १२९२ मध्यें यानें मोगलांचा पराभव केला व राहिलेल्या मोगलांना मुसलमान बनवलें. ते नव मुसलमान याला कांहीं प्रकरणांत उपयोगी पडले. पुढें याचा पुतण्या अलाउद्दीननें माळव्यांतील भेलसा शहर घेतलें; आणि याला न कळवतां दक्षिण जिंकून अमूप लूट घेऊन आला. त्याचा सन्मान करण्याकरितां त्याच्यावर विश्वास ठेवून निःशस्त्र स्थितींत हा त्याला भेटण्याकरितां गेला असतां त्यानें याला ठार केलें.

**जलालुद्दीन मसूदजानी**—(स. १२५८) बंगालचा सुभेदार.

**जलालुद्दीन मुहम्मद खल्जी**—( स. १२०७–७३ ) हा जातीनें कुफिक मुसलमान होता. लहानपणीं हा बापासह बल्ख सोडून निशापुरास आला. तेथून ते दोघे तुर्कस्थानांत गेले. त्या वेळीं अलाउद्दीन राजा होता. याचा तो शिष्य बनला. जलालचा गुरु शम्सुद्दीन होता. जलालचा पट्टशिष्य हिसाम म्हणून होता. जलालनें दर-वेशांचा एक पंथ स्थापिला. या पंथाला याचेंच नांव असून तो पंथ तुर्कस्थानांत आहे. जलालनंतर हिसाम ह्या पंथाच्या गादीवर आला. जलाल हा कवि होता. याच्या काव्यग्रंथाचें नांव मनस्वी असून त्यांत कथा, पौराणिक गोष्टी, कुराणांतील प्रवचनें वगैरे निरनिराळे विषय होते. हा ग्रंथ सहा अध्यायांचा होता. याचा दुसरा ग्रंथ दीवाण आहे. मृत्यूच्या वेळीं त्यानें आपल्या शिष्यांस खालील गोष्टी सांगितल्याः 'ईश्वराची भीति बाळगा, ईश्वराची प्रार्थना करा, सत्समागम मिळवून जातीच्या उपयोगी पडा.' याचा मुलगा सुलतान हा कवि होता. हा स. १२७३ त मेला ( इंडियन अँटिक्वरी, पु. ४ ).

**जलालुद्दीन मुहम्मदशाह**—(स. १४१४) बंगालचा राजा. याला जितमल्ल उर्फ जदृ असें म्हणत ( जितमल्ल पाहा ).

**जलालुद्दीन याकूत**—( स. १२३६ ) आफ्रिकन मुसलमान. रझियेशीं याचा प्रेमसंबंध असल्याच्या संशयावरून अनेक मुसलमानांनीं बंडें केलीं. शेवटीं भतिंदाच्या लढाईंत हा कैद झाला व हा मारला गेला.

**जलालुद्दीन सयुती**—( स. १५५० सुमार ) हा ईजिप्तचा रहिवासी होता. यानें सुमारें ४०० ग्रंथ लिहिले होते. त्यांत लुब्ब-उल्-लुबाब हा ग्रंथ नांवाजण्यासारखा आहे. त्यांत अरबी ग्रंथकारांना ज्या लोकांनीं आश्रय दिला त्यांचीं चरित्रें आहेत. हें पुस्तक म्हणजे एक प्रकारचा ग्रंथकार-कोश आहे. कशफुस सलसल-उल्-वसफुझ-झलझल या नांवाचा ग्रंथ यानें केला आहे त्यांत स. ७१३ ते १५०० पर्यंतच्या भूकंपांची माहिती आहे ( बील ).

**जल्हण**—हा कृष्णदेव यादवाचा मंत्री. हा लक्ष्मी-देवानंतर मंत्री झाला.

**जवानबख्त**—(स. १७४९-१७८८) हा शहाअलमचा वडील पुत्र. याला अहमदशाहा अबदालीनें मोगल साम्रा-ज्याचा राजप्रतिनिधि निवडलें होतें ( स. १७६१ ). यानें हा कारभार स. १७७१ पर्यंत चालविला. याचें दुसरें नांव जहांदरशहा असें होतें. पुढें बापाशीं न पटल्यानें हा लखनौकडे पळाला. हेस्टिंग्जनें पांच लाखांची नेमणूक करून दिली; व हा बनारस येथें राहूं लागला. याचा वंश तेथें आहे. हा वयाच्या ३९ व्या वर्षीं मेला. याचा 'बयाझ इना-यात मुर्शिदझादा' हा ग्रंथ ब्रिटिश म्यूझियममध्यें आहे.

२. हा दिल्लीचा शेवटचा बादशहा. बहादुरशहाचा धाकटा मुलगा. याला रंगून येथें बापाबरोबर राजकीय कैदी म्हणून धाडलें होतें. हा मरेपर्यंत तेथेंच होता (बील).

**जवानसिंह गुहिलोत**—( स. १८००–३८ ) उदेपूरचा राणा. हा भीमसिंहाचा मुलगा. मराठे व इंग्रज यांच्याशीं यानें लढाया केल्या. हा खर्चिक होता. हा डोकेंदुखीनें मेला.

**जवाहीरमल्ल जाठ**—( मृत्यु स. १७६८ ).
हा भरतपूरच्या सुरजमल्ल जाठाचा मुलगा. याचें दुसरें नांव जवाहीरसिंग असें होतें असें दिसतें. हा कर्तृत्ववान् असून लढाईत व राज्यकारभारांत कसलला होता. यास पुढें भरतपूरची गादी मिळाली, आणि त्याजबरोबरच मराठ्यांचे हर्षामर्षाचे प्रसंग उद्भवले.

स्थिरस्थावर झाल्यावर जवाहीरमल्लानें नजीबखानावर चढाई करून दिल्लींत त्यास कोंडिलें. नोव्हेंबर १७६४ पासून फेब्रुआरी १७६५ पावेतों अनेक लढाया मारून नजीबखानाचा संहार केला. आपल्या बापाच्या मरणाचा सूड घेतला.

स. १७६३ त नजीबखानानें सुरजमल्लावर हल्ला करून त्यास ठार मारलें होतें. या मोहिमेंत यानें मल्हाररावाचें साह्य घेतलें होतें; नजीबखान मल्हाररावाचा मानसपुत्र असल्यामुळें त्याच्याच मध्यस्थीनें नजीबखानाचा बचाव झाला; आणि नजीबाला ठेचण्याचा हा प्रसंग वांया गेला.

पुढें जवाहीरमल्लानें सभोंवार अनेक युद्धप्रसंग करून आपलें राज्य व बल अतोनात वाढविलें. हिंदुस्थानांत मराठ्यांच्या ठाण्यास उपद्रव करून नर्मदेपावेतों यावें असा याचा बेत होता. हा जयपूरच्या माधवसिंगास सामील करूं पाहत होता. परंतु माधवसिंगच याजवर चालून गेला.

ही लढाई मावंदा येथें जयपूरहद्दींत ता. १४-१२-१७६३ रोजीं झाली. दोन्ही पक्षांचा पुष्कळच संहार झाला. पण शेवटीं जाठास जय मिळाला.

जवाहीरमल्ल लढाईंत मारला गेला नाहीं, याचा पुढें १७६८ त खून झाला, असें कानुंगोच्या जाठ इतिहासांत सांगितलें आहे ( पृ. २०७–२१८ ).

**जसकरण**-- सीसोदें येथील राणाशाखेंतील दिनकराचा पुत्र. याला यशःकरण, जसकर्ण असेंहि म्हणत. याचा पुत्र नागपाल.

**जसवंत**--कोंकणांतील पालिचा राजा व आदिलशाहीचा मांडलीक.

**जसवंतसिंग राठोड**—( स. १६३८--१६७८ ) हा मारवाडचा राजा गजसिंहाचा कनिष्ठ पुत्र होय. याचा वडील भाऊ अमरसिंह याला गजसिंहानें राज्य करण्यास अयोग्य ठरविलें होतें म्हणून पूर्वी ठरावल्याप्रमाणें हा गादीवर आला. याचा जन्म वि. सं. १६८३ माघ वद्य ४ मंगळवार ( स. १६२७ जानेवारी ६ ) रोजीं बुरहानपुर येथें झाला. गादीवर आला तेव्हां हा अज्ञान होता. तेव्हां शहाजहान बादशहानें राजसिंह कूंपावत याला याचा मुख्य प्रधान व शिक्षक नेमलें. एकदां याला भ्रम झाला तेव्हां लोकांत अशी प्रसिद्धी झाली कीं, 'राजाला भूत लागलें असून एखाद्या सरदारानें आपलें शिर कापून दिल्याशिवाय तें शांत होणार नाहीं.' तेव्हां राजसिंहानें आपलें मस्तक कापून दिलें, अशी प्रसिद्धी आहे. म्हणून आजहि त्याच्या स्मारकभवनांत शेंकडों लोक दर्शनाला जातात. यानंतर महेशदास राठोड याचा दिवाण झाला.

याला काबूलवर स्वारी करण्यास पाठविलें. तेथून आल्यावर गोंडवाड्याकडे पाठविलें. तेव्हां याच्याबरोबर औरंगजेब होता. तेथें यानें चांगलाच पराक्रम दाखवला म्हणून बादशहानें याला अद्यापपर्यंत कोणालाहि न दिलेली महाराजा ही पदवी दिली.

पुढें बादशाही मिळविण्याकरितां शहाजहानच्या मुलांत जेव्हां तंटे लागले तेव्हां औरंगजेब व मुराद यांना तोंड देण्याकरितां याला माळव्याकडे रवाना केलें. उज्जयनीपासून पंधरा मैल दक्षिणेकडे असलेल्या बिल्लोचपुर ( फतिहाबाद ) गांवाजवळ वि. सं. १७१५ वैशाख व. ८ ( स. १६५८ एप्रिल २५ ) रोजीं घोर युद्ध झालें. त्यांत याचे साथीदार कासिमखां वगैरे औरंगजेबाला मिळाले. त्यामुळें पराजय पावून आपल्या आठ हजारांपैकीं शिल्लक राहिलेल्या सहाशें रजपुतांसह याला जोधपूरला परत फिरावें लागलें. पण हा पराजय पावून आला आहे, असें समजतांच याच्या राणीनें जोधपूरच्या किल्याचे दरवाजे लावून घेतले आणि याला निरोप धाडला कीं, 'पराजित होऊन आलेल्या नवऱ्याचें मी तोंड पाहूं इच्छीत नाहीं.' तेव्हां याच्या अंगांत वीरश्रीनें संचार केला आणि नवी सेना जमवून यानें युद्धांत जय मिळविला. पहिल्या लढाईंतून याला परत येण्याचें कारण मुसलमान फितूर झाले व याचा घोडा जखमी झाला हें होय.

पुढें लवकरच औरंगजेब बादशहा झाला ( स. १६५८ जुलै ता. २३ ). औरंगजेबानें आपल्या विरोधी लोकांना नष्ट करण्याचा सपाटा चालविला. पण मीर्झा राजा जयसिंगाच्या द्वारां याला दिल्लीस बोलावून याच्याशीं सलोखा केला. हा अहमदाबाद, बऱ्हाणपूर, औरंगाबाद व काबूल येथील सुभेदार होता. पण याचें औरंगजेबाशीं नीट जमत नसे. शेवटीं याला दूर करण्याच्या उद्देशानें काबूलचा सुभेदार नेमलें होतें. तेथेंहि यानें आपला दरारा चांगला बसविला होता. शेवटीं याला जमरुद येथें देवाज्ञा झाली ( स. १६७८ डिसेंबर ७ ). याला औरंगजेबानें विष घालून मारलें असेंहि म्हणतात ( दुर्गादास राठोड पाहा ).

हा वीर होता तसाच साहित्यप्रेमीहि होता. यानें पुष्कळ ग्रंथ लिहिले आहेतः—

१ आनंदविलास, २ अनुभवप्रकाश, ३ अपरोक्षसिद्धांत, ४ सिद्धांतबोध, ५ सिद्धांतसार, ६ भाषाभूषण.

भाषाभूषण हा एक हिंदींतील अलंकारशास्त्रावरचा ग्रंथ आहे. पहिले पांच वेदांतपंचक या नांवानें जोधपूरराज्याकडून प्रसिद्ध झाले आहेत.

हा कविहि उत्तम होता. याचा दिवाण मुहणोत नैणसी हा होता. त्याचा 'मूता नेणसी ख्यात' प्रसिद्ध आहे. शेवटीं तो याच्या मर्जीतून उतरला व कैद केला गेला. त्यानें कैदेंत असतां आत्महत्या केली.

यानें आपल्याजवळ गुहिलोत चतुराजी हा कृषिविद्याविशारद ठेवला होता. त्याच्या संमतीनें यानें काबूलचे डाळिंब मारवाडांत लागवडीस आणले व ते आजहि प्रसिद्ध आहेत.

हा हिंदी साहित्यांतील मुख्य आचार्य मानला जातो. याचा 'भाषाभूषण' ग्रंथ अलंकारयुक्त असून प्रचलित पाठ्य ग्रंथ होय. हा ग्रंथ चंद्रालोक या ग्रंथाची छाया असून 'संक्षिप्तप्रणाली' या ग्रंथाचें अनुकरण आहे. हा ग्रंथ फार लहान आहे.

याच्या भाषाभूषण ग्रंथावर एकंदर तीन टीका आहेत. त्यांपैकीं एक अलंकाररत्नाकर व दुसरी गुलाब कवीची होय. भूषणचंद्रिका ही तिसरी टीका प्रतापसाहीची होय.

**२.** एक हिंदी कवि. हा वाघेल (बघेल) क्षत्रिय होय. तेरवां (कनोजचे जवळ) येथील एक राजा असून मोठा विद्याप्रेमी होता.

यानें 'सालिहोत्र' आणि 'शृंगारशिरोमणी' असे दोन ग्रंथ लिहिले. याचा दुसरा ग्रंथ शृंगाररसाविषयीं प्रसिद्ध आहे.

**जयानंत**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं अठ्ठावन्नावा सिद्ध होय. हा जातीनें ब्राह्मण असून भंगलपूरचा राहणारा. यालाच जयनंदी असें म्हणतात. याची गुरुशिष्यविषयक माहिती कळत नाहीं. याचे दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत; १ तर्कमुद्गरकारिका (तं. २४-६), मध्यमकावतारटीका. चर्यागीतिमधील याच्या कवितांवरून हा हिंदी भाषेंतील कवि होता असें दिसतें.

**जहाज फिरंगी**—(स. १७८२) हा युरोपियन माणूस असून याचें खरें नांव जॉर्ज थॉमस असें होतें. मराठे लोक याला जहाज फिरंगी म्हणत. हा हिंदुस्थानाच्या किनाऱ्यावर उतरल्यानंतर खलाशीपणा सोडून देऊन यानें महादजी शिंदे याच्या पदरीं सैनिकाची नौकरी पत्करली (स. १७८२). पुढें हा शिंद्यांची नौकरी सोडून देऊन सारधान येथील बेगम सुमरूच्या पदरीं राहिला. थोड्या दिवसांनीं लुटालूट करून कांहीं प्रांत बळकाविला. यानें आपलें मुख्य ठाणें हंसी येथें करून तेथें एक किल्ला बांधिला. मराठ्यांनीं त्रास दिल्यानंतर अनुप शहरीं असलेल्या एका इंग्रज तुकडीच्या आश्रयास गेला. तेथून पुढें हा युरोपास जाण्यास निघाला असतां गंगेच्या कांठीं मरण पावला. याचें चरित्र फ्रँकलिन नांवाच्या एका इंग्रजानें लिहिलें आहे (बील).

**जहानआरा**—(स. १६१४-८१) ही शहाजहानची थोरली मुलगी होय. ही मुमताजमहालची मुलगी. ही विनोदी, उदार, विद्वान् आणि सुंदर होती. हिनें स.१६४८ मध्यें आग्र्यास एक लाल दगडाची मशीद बांधली. जहानआरा या शब्दाचा अर्थ जगाला भूषविणारी. ही शेवटपर्यंत अविवाहित होती. ही बाई सुस्वरूप व आनंदी वृत्तीची असे. बादशहाची हिजवर बहाल मर्जी असे. त्याच्या खान्याचे पदार्थ हिच्या देखरेखीखालीं तयार होत. बादशहा दरबारांतील प्रत्येक उलाढालांत हिचें मत घेत असे, व त्यामुळें हिचें दरबारमध्यें बरेंच वजन असे. सरदारांकडून वरचेवर देणग्या मिळाल्यानें हिजपाशीं अपार संपत्ति साठली होती.

दाराची हिजवर फार भिस्त असे. आपणांस बादशाही मिळाल्यावर आपण तुझें लग्न करून देऊं असें तो म्हणत असे.

हिच्या भव्य धर्मशाळा दिल्लींत आहेत व लाहोर शहराबाहेर एका साधूच्या कबरेनजीक तिची कबर आहे. ती हिच्या म्हणण्याप्रमाणें अगदीं साधी बांधली आहे (मु. रि. भा. २, पृ. २१८).

**जहांगीर**—(स.१६०५-२६) अकबराच्या मरणानंतर त्याचा पुत्र सेलीम हा जहांगीर हें नांव धारण करून गादीवर बसला. हा विषयासक्त, स्वच्छंदी व स्वार्थसाधु होता. अकबराच्या वेळच्या अनुभविक कामगारांस यानें कायम ठेविलें. जकातीच्या नियमांत उपयुक्त फेरफार केले. अर्जदारांची दाद लागावी म्हणून यानें सांठ सोन्याच्या घंटा जिला अडकविल्या होत्या अशी सांखळी राजवाड्याबाहेर सोडली. जहांगीरला चार मुलगे होते. खुश्रू, पर्वीझ, खुर्रम् (शहाजहान) व शहर्यार. हे सर्व सावत्र बंधू होते. खुश्रू व याचें कधीं पटलें नाहीं. जहांगीरची पहिली बायको जोधपूरच्या राजाची मुलगी होती. तिचें नांव जोधबाई. तिला खुश्रू व एक मुलगी झाली. दुसरी बायको बिकानेरच्या रामसिंग राजाची मुलगी. तिसरी राजा माल-देवाचा मुलगा उदयसिंग याची बाल्मती;

हिचाच मुलगा शहाजहान. चवथी परविझची आई. पांचवी राठोडची मुलगी व सहावी नूरजहान. हा गादीवर बसल्यावर याच्या वडील मुलानें याच्याविरुद्ध बंड उभारलें. परंतु यानें त्यास कैदेंत टाकलें. नूरजहान व तिचा भाऊ यांच्या मनांतून जहांगीरच्या पश्चात् खुर्रम् यास राज्यपद मिळावें असें होतें; म्हणून त्यांनीं खुश्रूचा नाश करण्याची खटपट चालविली. आसफखानाची मुलगी मुम्ताजमहाल ही खुर्रम् यास दिली होती. आपलें पहिल्या नवऱ्यापासून झालेली मुलगी शेवटीं तिनें शहर्यार यास देण्याचें ठरविलें. नूरजहान नांवाच्या एका व्यापाऱ्याच्या मुलीचा पहिला नवरा ठार करून यानें तिला आपल्याशीं लग्न लावण्यास भाग पाडलें. पण तिनें याच्या स्वैर वर्तनास आळा घालून राज्यांत शिस्त उत्पन्न केली. एकदां तर युद्धांत भाग घेऊन तिनें मोहबतखानाच्या तडाख्यांतून यास सोडविलें. जहांगीरनें कॅ. हॉकिन्स यास सुरत येथें वखार काढण्यास परवानगी दिली. जहांगीरच्या राज्याचा वसूल ५० कोटी रुपये होता. जहांगीरचे शेवटचे दिवस फारच कष्टप्रद गेले. जहांगीर ता. २८ ऑक्टोबर १६२६ त मरण पावला. याच्या अंगीं कांहीं सद्गुण होते. हा शिकारींत व युद्धकलेंत प्रवीण होता. याला डामडौल फारच आवडे. आरंभीं याचा स्वभाव क्रूर होता. हा मद्यपी असून अफूचें सेवन करी. हा नियम मोडणारांस कडक शिक्षा देई. शिल्पकला व सृष्टिसौंदर्य यांची यास आवड होती. हा बेफिकीर होता. फलज्योतिषावर याचा विश्वास होता. याला तुर्की भाषा चांगली येत होती.

ह्यानें आपलें आत्मचरित्र लिहून ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. यानें १२ वर्षांची हकीकत लिहिली आहे. पुढें याची प्रकृति नादुरुस्त झाल्यामुळें व याजवर मानसिक शांतताभंग करणारे दुःखाचे प्रसंग आल्यामुळें, यानें पुढील कारकीर्दीची हकीकत लिहिण्याचें सोडून दिलें. हें आत्मचरित्र 'तुझुक-इ-जहांगीरी' ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. ह्याच्या फार्सी भाषेंतील उत्कृष्ट प्रती लंडन येथें इंडिया ऑफिसमध्यें व ब्रिटिश म्यूझिअममध्यें आहेत. त्याचीं भाषांतरें विद्वान् आंग्ल पंडितांनीं केलीं आहेत. त्यावरून असें दिसून येतें कीं जहांगीर हा बाबर किंवा अकबर यांच्याप्रमाणें विद्वान् अगर लोकोत्तर पुरुष होता असें नाहीं. उलट याच्या अंगीं पुष्कळ दोष होते. परंतु यानें जें आत्मचरित्र लिहिलें आहे त्यांत यानें आपल्या कारकीर्दीचें खरें चित्र रेखाटल्यामुळें तें फार मूल्यवान् झालें आहे.

त्यांत विशेषेंकरून यानें आपल्या बापासंबंधानें जो वृत्तांत लिहिला आहे तो फारच महत्त्वाचा आहे. जहांगीर बादशहाचें चरित्र अगदीं सत्य व यथातथ्य वर्णिलें असल्यामुळें त्यास एक प्रकारचें मोहकत्व आलें आहे.

हा स्वतः मद्यपी होता, परंतु मद्य हें अनर्थकारक आहे, सबब तें आपल्या प्रजेनें घेऊं नये म्हणून यानें निर्बंधहि केला होता. हा सृष्टिसौंदर्याचा भोक्ता होता. याच्या अंगीं न्यायप्रियता हा सर्वांत उत्तम गुण होता. एकंदरींत याचें आत्मचरित्र फार महत्त्वाचें असून सतराव्या शतकाच्या प्रारंभीं हिंदुस्थानची कशी स्थिति होती हें त्यावरून चांगलें नजरेस येतें.

याच्या कारकीर्दीचा पुढील इतिहास मुतामदखान ह्यानें लिहिला आहे. त्याचें नांव 'इकबालनामा' असें आहे. खेरीज मुहंमद हादी ह्यानें याच्या कारकीर्दीची बरीच माहिती लिहिली आहे; व कामगार हुसेनी ह्यानें 'मआसिर-इ-जहांगीरी' ह्या नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. ह्या सर्व ग्रंथांच्या योगानें जहांगीर बादशहाचें संपूर्ण चारित्र अवगत होण्यासारखें आहे. ह्या सर्व ग्रंथांमध्यें याच्या आत्मचरित्राची योग्यता फारच अधिक आहे (ऐ. गो. पा. २९।३०). अलीकडे जहांगीरचें चरित्र श्री. बेणीप्रसाद यांनीं इंग्रजींत प्रसिद्ध केलें आहे तें महत्त्वाचें आहे.

**जहांदारशाह मोगल**—(स. १६६३-१७१३) मुहम्मद मुइझुद्दीन हें याचें नांव असून हा बहादुरशाहाचा वडील मुलगा व औरंगजेबाचा नातू होय. याचा जन्म १६६३त झाला. बहादुरशहा १७१२ त वारल्यावर त्याच्या मुलांत यादवी माजली. हा १७१२ त लाहोर येथें गादीवर बसला. हा दुर्बल, क्रूर, चैनी व उद्धट होता. यानें भावाच्या व चुलत्याच्या सर्व मुलांसा ठार मारलें. यानें एकदां लालकुंवर नांवाच्या नर्तकीला सारें राज्य अर्पण केलें होतें. यानें ९ महिने राज्य केलें. याला याचे पुतण्यानें लढाईंत कैद केलें व स. १७१३ त याचा खून झाला (बील).

**जंगीझखान**—(स.१५८६सुमार) हा मुर्तजा निजामशाहाचा एक दिवाण होय. यानें व मुर्तजा निजामशहानें तोफलखान व इमादशहाचा वंशज ह्यांस जिंकून ठार मारलें; आणि वऱ्हाडचें राज्य अहमदनगरच्या निजामशाहीस जोडिलें. बेदरचें राज्य जिंकण्याचें याच्या मनांत फार होतें. तेव्हां बेदरच्या शहानें जंगीझखानास लांच वगैरे देऊन वश करण्याकरितां आपला वकील पाठविला. पण जंगीझखान पक्का राजनिष्ठ असल्यामुळें तो त्या लांचलुचपतीनें वश झाला नाहीं. तेव्हां बेदरच्या वकीलानें हरयुक्ति करून

मुर्तजा निजामशहाचे मनांत याचेविषयीं वाईट भरविलें. तेव्हां मूर्तजानें विषप्रयोग करून या वजीरास ठार मारिलें ( मु. रि. भा. १ ).

**जंबूस्वामी**—( समाधि ख्रि. पू. ४६३ ) याचा राजगृहांत जन्म झाला. गोत्र काश्यप. याच्या पित्याचें नांव श्रेष्ठी वृषभदत्त असें असून आईचें नांव धारिणी असें होतें. महावीरानंतर हा ६४ वर्षांनीं वयाच्या ८० व्या वर्षी निर्याणाप्रत गेला. हा शेवटचा केवलिन् होता. हा एक जैन धर्माधिकारी होय. हा सुधर्मन् याच्यानंतर जैन धर्माधिकाऱ्याच्या गादीवर बसला. जे कांहीं महावीराचे प्रमुख शिष्य होते त्यांच्यापैकीं हा एक होय.

यानें एकंदर चव्वेचाळीस वर्षेंपर्यंत जैनधर्मरक्षणाचें व प्रसाराचें काम केलें. यानें चंपानगरीस भेट दिली होती. याच्यानंतर प्रभव नांवाचा जैनधर्माधिकारी झाला.

**जाकलदेवी**— ही कक्क राष्ट्रकूटाची मुलगी व दुसऱ्या तैल चालुक्याची पत्नी.

**जाजलि**—( उज्वलदत्त पाहा ).

**जाजल्ल कलचुरी**—( स. १११४-६८ ? ) रत्नपुरच्या पहिल्या पृथ्वीदेव कलचुरीचा मुलगा. स. १११४ मध्यें हा आपल्या बापानंतर गादीवर आला.

यानें सुवर्ण-पुरच्या भुज-बलाचा पराभव केला. याच्यानंतर याचा मुलगा दुसरा रत्न-राज ( रत्न-देव ) हा गादीवर आला.

**जात चोड**--याचा उल्लेख तेलगू चोलराजांच्या शिलालेखांत सांपडतो. हा चोलांपैकीं पूर्वकालीन सम्राट् होता. यास करिकालाचा पुत्र असें म्हणत.

**जातुकर्णी**—भवभूति कवीची माता.

**जानकीनाथ शर्मा**—( स. १५५० ) यानें ' न्यायसिद्धांतमंजरी ' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. हा ग्रंथ बहुधा स. १५५० त लिहिला असावा. त्यांत शिवादित्यमिश्र, मुरारिमिश्र व चिंतामणि यांच्याविषयीं उल्लेख आला आहे. जानकीनाथावर १२ लेखकांनीं टीका लिहिल्या आहेत. यास भट्टाचार्य चूडामणि अथवा न्यायचूडामणि असेंहि म्हणत असत ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ४६६ ).

**जान फेथफूल फ्लीट**—( फ्लीट पाहा ).

**जान आलबर्टड मंडेल्स्लो**—( स. १६३८-४० ) एक हिंदुस्थानांत आलेला युरोपियन प्रवासी.

**जान ओव्हिंग्टन**—( स. १६५३-१७३१ ) हिंदुस्थानांत आलेला युरोपियन प्रवासी.

**जान फ्रायर ( एम्. डी. कैंब्रिज )**—एक युरोपियन प्रवासी. हा स. १६७३ मध्यें हिंदुस्थानांत आला. त्या वेळीं इंग्रज व डच यांचें युद्ध सुरू झाल्यामुळें इंग्रजांचीं दहा जहाजें लढाईचें सामान घेऊन मद्रासेस आलीं. त्या वेळीं कंपनीचा डॉक्टर म्हणून हा हिंदुस्थानांत आला. प्रथम मच्छलीपट्टण येथें उतरला. मच्छलीपट्टण येथें इंग्रजांच्या वखारी होत्या तरी तें नगर गोवळकोंड्याच्या कुत्बशाहाच्या ताब्यांत होतें. किनाऱ्यावर अनेक ठिकाणीं परकीय लोकांना एतद्देशीय राजांनीं वसाहत करण्यास उत्तेजन दिलें. कारण येथील राजांच्या जवळ आरमार नसे असें याचें म्हणणें आहे. परदेशी लोकांशीं स्नेह ठेवल्यानें किनाऱ्याचें संरक्षण व आरमाराची मदत असे दोनहि हेतु साध्य होत. सुरतेस मुसलमान फकीरांचें असह्य वर्तन कसें असे याचेंहि यानें वर्णन केलें आहे. हा सुरतेहून मुंबईस, मुंबईहून जुन्नर, कारवार, गोकर्ण मार्गानें इराणांत गेला. तेथून १६८१ इसवींत हा युरोपमध्यें गेला. राज्याभिषेकाच्या वेळीं रायगडावर जें डेप्युटेशन गेलें होतें त्याबद्दलच्या कांहीं आठवणी डॉ. फ्रायर यानें नमूद करून ठेवल्या आहेत. रायगडावर राजवाड्याच्या द्वाराशीं दोन हत्ती होते. हत्तीसारखा अवजड प्राणी रायगडासारख्या कठीण किल्ल्यावर कसा चढवला असेल ? असा याला प्रश्न पडला. इंग्रज लोक रायगडावर शिवाजीकडे गेले तेव्हां त्यांचे खाण्याचे फार हाल होऊं लागले. गडावर मांस खाणारे कांहीं लोक होते. पण ते तोंडीलावण्यासारखें थोडें मांस खात. तेव्हां डेप्युटेशनमधल्या इंग्रजांनीं आपली तक्रार शिवाजीच्या कानावर घातली. तेव्हां शिवाजीनें तिघां इंग्रज प्रवाश्यांकरितां रोजीं अर्धा बोकड देण्याचा खाटकास हुकूम केला. किल्ल्याच्या खालीं राहणाऱ्या खाटकास जेव्हां ही हकीगत कळली तेव्हां रोजीं अर्धा बोकड उडवणाऱ्या या पाहुण्यांना पाहण्याकरितां म्हातारा खाटीक मुद्दाम कौतुकानें काठी टेकीत किल्ला चढून वर आला होता ( बापूजी मार्तंड आंबेकर, रत्नाकर १९२७ वरून ).

**जान बॅप्टिस्टा टॅव्हर्नियर**—( स. १६४१-६८ ) हिंदुस्थानांत फिरणारा परदेशी जव्हेरी.

**जानराव गुजर**—नागपूरच्या पहिल्या रघूजी भोसल्याच्या प्रमुख मराठी सरदारांपैकीं एक ( ना. प्रां. इ. पा. १०६ ).

**जानीबेग तर्खन मीर्झा**—( स. १५८४-९९ ) हा ठठ्ठाचा नबाब स. १५८४ मध्यें झाला. हा आपल्या भेटीस येईल असें अकबरास वाटत होतें. तो न आल्यामुळें

अकबरानें अबदुल रहीम यास पाठविलें. पुढें जानीबेग अकबरास जाऊन भेटला. तेव्हां अकबरानें यास अमीरी दिली ( बील ).

**जानी बेगम**—ही दाराशुकोहची मुलगी व औरंगजेबाचा पुत्र अजमशाहाची पत्नी. धारूर येथें जनानखाना ठेवून अजम विजापुराकडे गेला. एकाएकीं संभाजीच्या सैन्यानें जनानखान्यावर हल्ला केला. तेव्हा हिनें गोषा टाकून मराठ्यांशीं निकरानें सामना केला, व मराठ्यांचा हल्ला परतावला. हिच्या संरक्षणार्थ अनिरुद्धसिंग हा होता. त्यानेंहि अपूर्व पराक्रम केला. त्याला हिनें मौल्यवान् कंठा देऊन गौरव केला ( मार्च स. १६८३ ).

**जानू भिंताडा**—( मृत्यु स. १७६३ पूर्वी ) हा पेशव्यांचा खिजमतगार. गांव भिवडी ( ता. पुरंदरे ). पानपतावर विश्वासराव पडला तेव्हां पार्वतीबाईवर जीवरक्षणार्थ सैरावैरां पळण्याचा प्रसंग आला. तेव्हां यानें तिचा जीव व अब्रू यांचें रक्षण केलें. याचें घराणें वरील ठिकाणीं असून मोकाशी आडनांवानें शेती करून असतें ( मं. त्रै. ७. १८ ).

**जानोजी(राव) ढमढेरे**—तळेगांवचे पाटील. पेशव्यांच्या घराण्याशीं या घराण्याचें फार सख्य होतें. याची श्रीब्रह्मेंद्रस्वामींवर फार भक्ति होती. पेशव्यांबरोबर हे युद्धावरहि जात असत. राक्षसभुवनच्या वेळीं या घराण्यांत एक पंधरा वर्षांचा मुलगा होता. त्याच्या आईनें कोणीच नाहीं म्हणून, सर्व नको म्हणत असतां, रघुनाथरावदादाबरोबर त्याला पाठविलें. शेवटीं तो मुलगा युद्धांत पडला. श्री. माधवराव बाईच्या समाचारास गेले असतां बाई म्हणाल्या, 'स्वराज्याच्या कार्यी मूल पडला उत्तम झालें.' असें हें घराणें होतें. हें घराणें शिवाजीमहाराजांपासून तळेगांवचे पाटील होते. यांचा वंश तळेगांव ढमढेरें येथें आहे. यांचें हस्ताक्षर प्रसिद्ध झालें आहे (लेखनालंकार).

**जानोजी(राव) धुळप**—( स.१७६३ ) याचें मूळचें नांव मोरे असें होतें. हा हरजीरावाचा मुलगा. यानें आरमाराची उत्कृष्ट कामगिरी करून पेशव्यांकडून वेळोवेळीं बक्षिसें मिळविलीं. थोरले माधवराव पेशवे यांनीं यास दक्षिणेंत स्वारीस पाठविलें होतें. प्रथम याला नंदीगडावर नेमलें, नंतर बाळापुरास नेमलें. याला हरबाजी नांवाचा एक मुलगा होता. स. १७६३ त हैदरावरील स्वारींत यांनीं मोठें आरमार व फौज नेऊन होनावर बंदरांतून सोंध्यावर चाल केली. याचा जमिनीवरील युद्धांत मोठा उपयोग झाला. याच्यावर माधवरावांचा मोठा भरंवसा होता ( खरे लें. ९९५ ).

२. (स. १७८३) हा हरबाजीचा मुलगा. वडलांप्रमाणें हा अतिशय शूर होता. याची नेमणूक सुभा आरमारावरच पूर्वीप्रमाणें झाली. याचें मूळचें नांव मोरे असें होतें. इंग्रजांशीं झालेल्या दर्यायुद्धांत ( १७८३ एप्रिल ) यानें फारच पराक्रम केला त्याबद्दल पुष्कळ बक्षिसें यास मिळालीं. याला एक मुलगा झाला. त्याचें नांव हरबाजी होतें ( म. रि. म. १ पृ. २७५ ).

**जानोजी निंबाळकर**—( स. १६९३–१७४८ ) हा फलटणच्या वणगोजीरावाचा मुलगा. हा पेशव्यांशीं मिळून-मिसळून वागे. याच्या मार्फत निजामाचा व पेशव्यांचा करार झाला. तो स. २३ मार्च १७५१ च्या पत्रांत दिला आहे (लें.५३४). पहिल्यांदा नानासाहेबांचें याच्याविषयींचें मत बरें होतें, परंतु पुढें त्यांचें मत याच्यासंबंधीं पुष्कळच फिरलें होतें. पुढें हा नबाबास मिळून स. २२-१०-१७५७ मध्यें औरंगाबादेस होणाऱ्या मोहिमेंत हजर होता. याला एक पुत्र असून त्याचें नांव मुधोजीराव.

२. ( मृ. स. १७६३ ) हा निंबाळकर घराण्याचा मूळ पुरुष. याच्या बापाचें नांव सुलतानजी. हा पेशव्यांच्या बाजूचा होता. मोंगलाई आपल्या ताब्यांत येण्याकरितां यानें नानासाहेबांस मदत करून प्रयत्न केला. जानोजी नेहमीं करमाळें येथें राहत असे. पेशव्यांनीं निजामावर जी स्वारी केली तींत जानोजी निजामाच्या बाजूनें होता ( राजवाडे खंड १, ३ ).

जानोजी ता. ६–८–१७६३ रोजीं मरण पावला. याची स्त्री सती गेली. याचा पुत्र दाजी हाहि लवकरच बीड येथें मरण पावला.

**जानोजी भोसले**—( मृत्यु स. १७७२ ) रघूजी भोसल्यास चार पुत्र होते. जानोजी, मुधोजी, बिंबाजी व साबाजी. जानोजी व साबाजी हे धाकटे स्त्रीचे असून जानोजी हा चौघांत वडील होता. मुधोजी व बिंबाजी हे वडील स्त्रीचे होते. रघूजीनें मरणापूर्वी, वडील पुत्र जानोजी यानें सेनासाहेबसुभ्याचा मुख्य अधिकार चालवावा व बाकीच्या तिन्ही पुत्रांनाहि राज्यांत वाटणी देऊन त्यांचा परामर्ष घ्यावा असें सांगितलें होतें.

"आम्ही वडील मातोश्रीचे. तेव्हां कनिष्ठ तुम्ही. दौलतीची मालकी आम्हाकडेस. तुम्ही आमचे आज्ञेंत वागावें." असें मुधोजीनें जानोजीस कळविलें. त्यांस कांहीं सरदारहि मिळाले.

तंटा चालू असतां त्याच्या मुधोजीशीं दोनतीन चकमकीहि झाल्या. शेवटीं नानासाहेब पेशव्यानें दोघांसहि पुण्यास बोलावून सेनासाहेब पद जानोजीकडेच ठेवून

चंद्रपूर व छत्तीसगड मुधोजीस देऊन सेनाधुरंधर असा किताब दिला. यानें स. १७५६ मध्यें सावनूरच्या लढाईंत चांगली कामगिरी केली.

जानोजीनें सलाबतजंगाची बाजू घेतल्यामुळें स. १७५७–१७५८ पर्यंत त्याचें निजामअल्लीशीं युद्ध झालें व १७५८ त त्या दोघांत एलिचपूर येथें तह होऊन वऱ्हाडांतील उत्पन्नापैकीं शेंकडा ४५ भोंसल्यांनीं घ्यावें व शेंकडा ५५ निजामानें घ्यावें असें ठरलें.

दोघां भावांचा तंटा पेशव्यांनीं वांटणी करूनहि पूर्णपणें मिटला नाहीं. दोघेहि आपआपल्या पक्षास मजबुती आणण्यासाठीं झटूं लागले. पुढें नांदगांवरहाटगांवच्या लढाईंत मुधोजीचा मोड केला. नंतर त्यांच्यामध्यें तह होऊन मुधोजीनें सर्व कारभार करावा, रघूजी कारंडे, निंबकजी राजे व पिराजी निंबाळकर या तिघांनीं दोघां भावांचे दरम्यान राहून पुढें तंटा होऊं न द्यावा, असें ठरलें. उदगीर येथें लवकरच तह झाल्यामुळें यांच्या सैन्याचा पेशव्यांना उपयोग झाला नाहीं.

स. १७६० त यास फार कर्ज झाल्यामुळें हा सदाशिवरावाबरोबर पानिपतचे मोहिमेवर गेला नाहीं. स. १७६१ त सदाशिवरावाच्या पानिपत येथील पराभवाची बातमी कळण्यापूर्वींच जानोजी नानासाहेब पेशव्यांबरोबर सदाशिवरावास मदत करण्यास उत्तरेस गेला होता. परंतु मध्यंच भिलसा येथें पानिपतच्या पराभवाची बातमी नानासाहेबास कळून तो आजारी पडल्यामुळें जानोजीस पुढें जाण्याचें कारण उरलें नाहीं. नंतर हा बुंदेलखंडांत सागर, हट्टा या बाजूस राहिला होता, व तेथें यानें हिंदुपंत बुंदेले वगैरे संस्थानिकांना काबूंत आणलें.

नानासाहेबानें जानोजी व मुधोजी यांचीं भांडणें जरी मिटविलीं होतीं तरी सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें जानोजीस मिळालीं नव्हतीं. माधवरावास पेशवाईचीं वस्त्रें देववितांना राघोबादादानें ताराबाईस विनंति करून जानोजीसहि सेनासाहेब सुभ्याची (ता. ६-८-१७८१ रोजीं) सनद देवविली (ऐ. प. ले. ४४३).

पुढें हा पेशव्यांविरुद्ध निजामाचे कटांत सामील झाला होता, व बाह्यात्कारीं पेशव्यांशींहि सूत दाखवीत होता. ही धरसोडीची वर्तणूक यानें ह्यापुढेंहि कायम ठेवून कधीं निजामाकडे तर कधीं पेशव्याकडे वेळोवेळीं मिळून आपली पूर्ण फजीती करून घेतली.

पुढें पेशव्यांनीं होळकराकडून सामदामाचा, शिंद्याकडून दंडाचा व मुधोजीकडून भेदनीतीचा प्रयोग करून यास निजामाकडून फोडलें.

हा निजामास मिळाल्यामुळें माधवरावाचा याजवर रोष होता व हा आपल्या विरुद्ध आतां राघोबादादास मिळेल अशी त्यास भीति वाटत होती. तेव्हां राघोबा, हैदर व जानोजी यांचे विरुद्ध त्यांस निजामाचे मदतीची जरूर होती. त्यानें मोंगलांचा नवीन दिवाण सय्यद लष्कर ऊर्फ रुकनुद्दौला याचे मार्फत निजामाशीं कायमच्या दोस्तीचा तह केला.

मोरो धोंडाजी हा मोंगलांचा सरदार वऱ्हाडांत होता. त्यावर भोसल्यांचे फौजेनें छापा घालून त्यास लुटलें. तेव्हां मोगल चिडून जाऊन त्यानें जानोजीविरुद्ध पेशव्यांकडे मदत मागितली. पेशव्यांसहि जानोजीचा काटा काढावयाचा होता. तेव्हां माधवरावानें रुकनुद्दौल्यासह यावर स्वारी केली (स. १७६५–६६).

पेशवे व मोगल यांच्या प्रचंड सेनेपुढें आपला निभाव लागणार नाहीं हें पाहून यानें त्यांच्याशीं तह करण्याची खटपट चालविली; व ता. १७–१–१७६६ रोजीं माधवरावाची व त्याचे दुसरे दिवशीं राघोबाची गांठ घेऊन त्यांच्याशीं दर्यापूरचे पूर्वेस खोलापूर येथें तह केला.

वरील मोहिमेंत रघूजी कारंड्याचा पुत्र राणोजी हा पेशव्यांस मिळाला होता. म्हणून लढाई आटोपतांच यानें त्यास कैद केलें. परंतु पुढें माधवरावानें त्यास याचे हातून सोडविलें.

स. १७६८ त माधवराव व राघोबा यांजमध्यें भांडण सुरू होतांच यानें राघोबास मदत करण्याचें कबूल करून सैन्य उभारलें. परंतु याचें सैन्य येण्याचे आंतच माधवरावानें राघोबाचा मोड करून त्यास कैद केलें; व भोसल्यावर स्वारी करण्याचा निश्चय केला. ही स्वारी स. १७६९ जानेवारी ते १७६९ जूनपर्यंत चालली. व ता. २३–६–१७६९ त माधवराव व हा यांचा ब्रह्मेश्वरनजीक कनकापूर येथें तह झाला. हा तहनामा ना. भों. का. प. ले. १९ व २८ (ऐ. प. ले. ११७–११८) मध्यें पूर्ण छापला आहे व ले. २५–२६ मध्यें मुधोजीनें पुढें त्यांत कांहीं फेरफार केला आहे. पण अशा प्रकरणानें कर्ज वाढून सैन्यावरचा दाब कमी होई.

यापुढें मात्र स. १७७० त पेशव्यांनीं हैदरवर स्वारी केली त्या वेळीं यानें बाबाजीस ५००० सैन्यासह कराराप्रमाणें पेशव्यांबरोबर पाठवलें. स. १७७३ मध्यें थेऊर येथें माधवराव आजारी असतां हा त्यास जाऊन भेटला.

बंगाल वगैरे प्रांताची चौथाई रघूजीचे वेळेपासून भोसल्यास मिळत होती. पुढें बंगाल प्रांत इंग्रजांनीं

घेतल्यावर चौथाईचा भरणा बंद पडला. तेव्हां यानें इंग्रजांकडे चौथाई देण्याबद्दल वकिलांची व पत्रांची सारखी झोड उठवली. परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. शिवभट साठे यासंबंधानें जोर दाखवी, म्हणून त्यास इंग्रजांनीं हलकेंव याच्या मार्फत ओरिसाचे सुभेदारीवरून काढून टाकून त्यास धमकावण्या देऊन गप्प बसवलें.

मद्रास व बंगाल हे प्रांत इंग्रजांचे ताब्यांत आले. परंतु ते तुटक असून त्यांच्या दरम्यान उत्तर सरकार व ओढ्या हे प्रांत होते. ते ताब्यांत आल्यास सर्व पूर्व किनारा इंग्रजांचे ताब्यांत आला असता. ओढ्या हा नागपूरकर भोसल्यांच्या क्षेत्रांतील भाग असल्यामुळें क्लाइव्हनें आपला वकील टॉमस मॉट यास त्या भागाची मागणी करण्यासाठीं स. १७६६ त नागपुरास पाठवलें. परंतु त्याचा बेत सिद्धीस गेला नाहीं.

पुढें शिवभट साठे ओढ्याचा कारभार पाहत असतां त्याचें व याचें वांकडें आलें. तेव्हां इंग्रजांनीं याचे मदतीस फौज पाठवली. या निमित्तानें त्याचा वकील उदेपुरी गोसावी इंग्रजांकडे राहूं लागला. परंतु स. १७६९ त कनकापूरचा तह होऊन हा पुन्हां मराठमंडळांत सामील झाल्यामुळें यास फोडण्याचा इंग्रजांचा डाव फसला.

खरें म्हटलें तर याचे व्यवहार पुण्याच्या दरबारशीं झाले, त्यापेक्षां खुद्द नागपुराकडे व बंगाल बहारओरिसांसंबंधानें पूर्वेच्या बाजूस मुर्शिदाबादच्या सुभ्यांकडे व इंग्रजांच्याकडे विशेष झाले. हें कळून येण्यासाठीं पार्शियन कॅलेंडर्सचे तीनहि भाग काळजीपूर्वक वाचावे. त्यांत स. १७५९ पासून १७७२ पर्यंतचे कागद आहेत.

यास मुलगा नसल्यामुळें यानें मुधोजीचा वडील पुत्र यास दत्तक घेण्याचें ठरवलें होतें; व त्यासच आपल्यामागें से. सा. सुभ्याचें पद द्यावें असें माधवरावास सांगितलें होतें. हा १६ मे १७७२ रोजीं पोटशूळाच्या व्यथेनें मौजे येरळ प्र. नळदुर्ग येथें मरण पावला. पहिल्या रघूजीचा शिक्काच याचे वेळेसहि सांपडतो ( नागपूर प्रांताचा इतिहास, पृ. ११४–१८१ ).

**२.** हा रघूजीचा पुत्र नाहीं असें ठरवून नागपूरचें राज्य खालसा केलें व याला स. १८६७ च्या सुमारास ९० हजाराचें पेन्शन दिलें.

**जानो विश्वनाथ ( जनार्दन विश्वनाथ )**—बाळाजी विश्वनाथ पेशवे यांचे बंधु. हा शक १६२८ ( स. १७०६ ) पर्यंत हयात होता ( सप्तम सं. वृ. श. १८४१ पृ. १२७–२८ ).

**जाफरखान**—( स. १२९६–९९ ) अलाउद्दीन खल्जीच्या वेळीं पराक्रमी म्हणून उदयास आलेला त्याचा सेनापति. यानें मोंगलांचा अनेक वेळां पराजय केला, पण हा फार बलिष्ठ झाला; व अलाउद्दीननें उपेक्षा केल्यामुळें मोंगलांकडून मारला गेला.

**२.** ( मृत्यु स. १६७० ) हा सादिकखानाचा पुत्र. शहाजहानचा मीरबक्षी व औरंगजेबाचा मुख्य वजीर (स. १६६२). हल्लीं आग्र्यास याचें थडगें आहे (बील). हा शाहिस्तेखानाचा मेव्हणा. शिवाजीनें याचे मार्फत आपल्या सुटकेचा प्रयत्न केला.

**३.** ( हसन गंगू पाहा ).

**४.** ( मृत्यु स. १६६२ ) शहाजहाननामा नांवाच्या बखरीचा कर्ता.

**५.** ( मुर्शिदकुलीखान पाहा ).

**जाम अफ्रा**—( मृत्यु स. १३३९ ) सिंधचा राजा. हा सुमेरवंशांतील रजपूत होता. स. १३३६ मध्यें दिल्लीचा ताबा झुगारून हा स्वतंत्र झाला.

**जाम अलीशेर**—( स. १३९३–१४०९ ) सिंधचा राजा.

**जाम उनर**—जाम अफ्राचें नामांतर.

**जाम करान**—( स. १३८८ ) सिंधचा राजा.

**जाम चोभान**—( स. १३३९–१३५३ मृत्यु ) सिंधचा राजा. बंडखोर तघी चांभारला आश्रय दिल्यामुळें मुहम्मद तुघ्लक यावर चालून येत असतां ठठ्ठाजवळ मृत्यु पावला.

**जाम जूत**—जाम चोभानचें नामांतर.

**जाम तिमाजी**—( स. १३६७–१३८० ) सिंधचा राजा. याच्या पुढच्या राजानें मुसलमानी धर्म स्वीकारला तेव्हांपासून हें घराणें मुसलमान झालें. यांची नांवाशिवाय अधिक माहिती मिळत नाहीं.

**जाम तुघ्लक**—सिंधचा राजा.

**जाम निजामुद्दीन**—( स. १३९१–९३ ) सिंधचा राजा.

**२.** ( स. १४५० गादीवर आला ) सिंधचा राजा. हा नंद नांवानें फार प्रसिद्ध आहे. याच्या वेळीं सिंधचा उत्तरभाग व भक्करचा किल्ला तुर्कांनीं जिंकला.

**जाम फत्तेखान**—( स. १४०९–२३ ) सिंधचा राजा.

**जाम फीरूज**—सिंधचा राजा. जाम निजामुद्दीननंतर हा गादीवर आला. स. १५२० मध्यें मुलतानच्या

शहाबेग अर्घूननें याजपासून सिंध प्रांत जिंकून आपल्या ताब्यांत घेतला. तेव्हां हा गुजराथच्या बहादुरशहाच्या आश्रयास गेला व जाम वंश संपला.

**जाम बनी**—( स. १३५३-६७ ) सिंधचा राजा. याला जाम बंहतीय असें केंब्रिज हिस्टरीमध्यें म्हटलें आहे. खंडणी देण्याचें नाकारल्यावरून यास फीरूझ तुघ्लकनें पकडून दिल्लीस नेलें, पण सन्मानानें वागवून सोडून दिलें.

**जाम बंहतीय**—( जाम बनी पाहा ).

**जाम सलातीन**—( स. १३८०-९१ ) सिंधचा राजा. यानें मुसलमानी धर्म स्वीकारला. याला सलाउद्दीन म्हणतात.

**जाम सलाउद्दीन**—( जाम सलातीन पाहा ).

**जाम संजर**—( स. १४२८ सुमार ) सिंधचा राजा. हा राधन नांवानें प्रसिद्ध आहे.

**जाम सिकंदर**—( स. १४२७ ) सिंधचा राजा.

**जामोतिक**—घ्सामोतिकबद्दल असा पाठ वाचला जातो. घ्सामोतिक असेंहि कांहीं वाचतात. ब्राम्ही लिपींत घ व य यांच्यांत फार साम्य आहे. पण गौ. हि. ओझा यांच्या मतें घ्सामोतिक असें वाचावयास पाहिजे.

**जाय**—गणपतीचा मेव्हणा, सेनापति व प्रधान.

**जार्ज थामस**--( जहाज फिरंगी पाहा ).

**जालंदरपा**--यालाच जालंधारक असें म्हणतात. हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं शेहेचाळिसावा सिद्ध होय. हा जातीनें ब्राह्मण. कण्हपा व मत्स्येंद्र याचे शिष्य होत. याचे प्राचीन मागधीभाषेंत सात ग्रंथ आहेत. याच्या कांहीं हिंदी कविता प्रसिद्ध आहेत.

**जालंदरनाथ**--कानीफनाथ व मैनावती यांचा गुरु.

**जालोरचे परमार**--( धरणीवराह पाहा ).

**जालौक मौर्य**--( खि. पू. २३२ ) मौर्य वंशांतील सम्राट् अशोकाचा मुलगा. अशोकाच्या शेवटल्या दिवसांत ग्रीकांच्या हिंदुस्थानांत स्वाऱ्या सुरू झाल्या. त्यांचा बंदोबस्त करण्याकरितां अशोकानें याची नेमणूक केली. यानें त्यांना जिंकून हाकलून दिलें ( राजतरंगिणी १. १०७-११५ ). अशोकाच्या मृत्यूनंतर यानें काश्मीरांत स्वतंत्र राज्य स्थापन केलें. हा मोठा रणधुरंधर होता. यानें कान्यकुब्जापर्यंत विजय मिळवले होते ( राजरङ्गिणी १. ११७ ). शालिशूकाच्या वेळीं ( खि. पू. २०७-२०६ ) हा काश्मीरच्या गादीवर बसला. त्याला सव्वीस वर्षे झालीं होतीं.

**जाल्हीन**--पंजाबमध्यें नामदेवाचे जे कांहीं अनुयायी होते त्यांपैकीं हा एक होय.

नामदेवाच्या मतांचा पुरस्कार करण्यांत यानें पुढारीपण घेतलें होतें. हा पंजाबमधील रहिवासी असल्यामुळें नामदेवानें याला पंजाबांतून पंढरपुरास आणलें. त्या वेळीं नामदेवानें याला भक्त मंडळींत भजनांत हिंडविलें, याबद्दल नामदेवानें स्वतः उल्लेख केला आहे (नाम.९३६.).

नंतर भक्तीच्या विद्यापीठांत प्रेमवृत्तीचें जिवंत शिक्षण देऊन यास परत पंजाबांत, त्याची पेरणी करण्याकरितां पाठविलें ( मं. त्रै. ६. पृ. ८ ).

**जिऊबाई**—नानाफडणीसाची बायको.

**जिऊ महाला**—शिवाजी व अफजल यांच्या भेटीच्या वेळीं हा शिवाजीचा अंगरक्षक होता. सय्यदबंदा जेव्हां शिवाजीवर चाल करून आला तेव्हां यानें बंदा यास ठार केलें. जिऊबा हा कोंडवली येथील रहिवासी. याचें आडनांव सकपाळ. महाला म्हणजे न्हावी. जिऊबा हा जातीनें न्हावी होता. याचा मुलगा सीताराम. अफजलखानावर वाघनखें चालवून व बिचव्याचा वार करून मुंढी आसडून, चौथऱ्याखालीं उडी घालून शिवाजी राजे निघून गेले. तोंच सय्यदबंदानें शिवाजीजवळ येऊन शिवाजीवर चार वार केले. पण ते चारहि वार शिवाजीनें कातर करून चुकविले. पांचवा वार शिवाजीस मर्मभेदक होणार, इतक्यांत जिऊ महाला यानें फिरंगेनें खांद्यावर सय्यदबंद्यावर वार केला आणि हात हत्यारासह तोडला म्हणून, 'होता जिवा म्हणून वांचला शिवा' अशी म्हण वरील प्रसंगावरून पडली आहे. हुकुमाची अमर्यादा केल्यामुळें शिवाजीनें यास कामावरून दूर केलें ( मंडळ-पंचम संमेलनवृत्त, पृ. १६-१९ ).

**जिजाजी भोसले उमरावतीकर**—हा राणोजी भोसले उमरावतीकर याचा मुलगा. हा १७७३ कुंभारीच्या लढाईंत मारला गेला ( ना. प्रां. इ. १९७ ).

**जिजाबाई**—( स. १५९५-१६७४ ) लखुजी जाधवाची मुलगी व मराठी राज्याचा संस्थापक शिवाजी ह्याची आई. हिच्या आईचें नांव म्हाळसाबाई. ही चार वर्षांची असतांना जिजाबाईचें व शहाजीचें लग्न लावावें असें लखुजी जाधव म्हणाले. पुढें तें लग्न झालें. तिला संभाजी नांवाचा एक पुत्र होता. संभाजीच्या लग्नाच्या नंतर शिवाजीचा जन्म झाला ( स. १६३० ). या सालीं शहाजीनें तुकाबाईशीं लग्न केलें. तेव्हांपासून हिचें नवऱ्याशीं बरें नव्हतें. पुढें जिजाबाईस हिचा चुलता जगदेव यानें घरीं नेलें. मध्यंतरीं

मोंगलांनीं हिला पकडून पन्हाळ्यावर कैदेंत ठेवलें. पण पुढें जगदेवच्या सांगण्यावरून सोडिलें. या वेळीं शिवाजी गुप्तपणें शिवापुरीं होता ( म्हालदारखान पाहा ). राजकारणाचें शिक्षण हिला शहाजीकडून प्राप्त झालें होतें. महाबळेश्वरास ता. ६ जानेवारी १६६५ रोजीं जिजाबाईची तुळा झाली होती. हिनें गोपाळ श्रीधर महाबळेश्वरकर यांचा उपदेश घेतला होता ( प. सा. ६३१ ). ही मानी, निश्चयी, धाडसी व स्वतंत्र वृत्तीची होती. शहाजीच्या सल्ल्यावरून ती शिवाजीसह पुणें येथें येऊन राहिली. हिनें शिवाजीस राजास आवश्यक असें शिक्षण दिलें. हिनें शिवाजीच्या मनांत राज्य स्थापविण्याची कल्पना बिंबविली. धार्मिक गोष्टीकडे हिनें त्याचें चित्त लावलें. ही स्वतः शूर असून हिला लिहितांवाचतां येत होतें. शहाजी कर्नाटकांत असतां ही पुण्याच्या जहागिरीची व्यवस्था पाहत असे. हिनें न्यायनिवाडेहि केले होते. बजाजी निंबाळकर मुसलमान झाला होता त्याला शुद्ध करवून हिनें त्याचा मुलगा महादजी यास शिवाजीची मुलगी सखूबाई दिली. आपण मनांत धरलेल्या स्वराज्य-स्थापनेचा हेतु जिजाबाईनें शिवाजीकडून पार पाडला. यामुळें शहाजीस आनंद झाला. पुढें थोडक्याच दिवसांत शहाजी वारला. जिजाबाई सती जाण्यास निघाली, पण शिवाजीनें आग्रहानें हीस थांबविलें. शिवाजीनें हिच्या तैनातीसाठीं एक स्वतंत्र खातें ठेविलें होतें. प्रजेचा परामर्ष शिवाजीपेक्षांहि ही जास्त घेत असे. ही स. १६७४ त पांचाड गांवीं ( १७ जून ) दिवंगत झाली.

२. ( मृ. स. १७७३ ) ही कोल्हापूरकर पहिल्या संभाजीची बायको व ताराबाईची सून. या सासवासुनांचें वांकडें होतें. ही बाई फार हुशार व राजकारणी होती. संभाजी हिच्याच सल्ल्यानें वागे. हिनें भगवंतराव अमात्यास राजकारणविषयक लिहिलेलीं पत्रें प्रसिद्ध आहेत. ही स्वभावानें क्रूर, कडक शिक्षा करणारी, फार धोरणी, व संशयी अशी होती. कोल्हापूरचें राज्य स्थापण्याचें बरेंच श्रेय हिला आहे. ही हट्टी नसून प्रसंगीं तडजोड करून कार्य साधणारी होती. हिचें माहेर तोरगलकर शिंदे घराण्यांतील होतें. संभाजी निपुत्रिक मेल्यामुळें हिनें शिवाजी नांवाचा पुत्र दत्तक घेऊन राज्यकारभार आपल्या हातीं घेतला. ही पन्हाळ्याच्या देवीला जिवंत माणसाचा बळी देत असे.

कोल्हापूर व सातारा या दोन गाद्या एकत्र करून घरांतील कलह कायमचा तोडावा असें पेशव्यांच्या मनांत फार दिवस होतें. ता. २०-१२-१७६० रोजीं कोल्हापूरकर संभाजी वारल्यावर दुसरा कोणीहि वारस नसल्यामुळें नानासाहेब पेशव्यानें संस्थान खालसा करण्यासाठीं फौज पाठविली. तेव्हां हिनें संभाजीची धाकटी राणी कुसाबाई गरोदर असल्याचें कळवलें.

पुढें "कुसाबाई वैशाख वद्य ७ इंदुवारी पांच तास रात्रीस ता. २५-५-१७६१ रोजीं प्रसूत झाली. राजकुवर जन्मास आले. तुम्हां कारणे साखर पाठविली आहे. स्वीकार करणे." असें लिहिलें. वास्तविक पुत्र झाला नव्हता, कन्या जन्मास आली. तरी जिजाबाईनें हें लटकेंच कारस्थान केलें.

पुढें जिजाबाईनें दत्तक घेण्याचा फार हट्ट धरला; व अडचणींत असलेल्या माधवरावाकडून परवानगी घेतली.

तेव्हां तिनें शहाजीराजे खानवटकर यांचा मुलगा माणकोजी यास दत्तक घेऊन त्याचें नांव शिवाजी असें ठेवलें व त्यास सिंहासनारूढ केलें ( २७-९-१७६२ ).

मनोळी व चिकोडी या दोन कोल्हापूर संस्थानांतील तालुक्यांतील पुष्कळशीं गांवें पुंडांनीं लुटून बळकावलीं. स. १७६४ त माधवरावानें खर्चाबद्दल घेऊन दोन्ही तालुक्यांचा अंमल सुरळीत करून दिला. परंतु बाईजवळ पैसे नसल्यामुळें पुण्याचे सावकारांचें कर्ज काढून व त्यास दोन तालुके पेशव्यांचे जामिनगिरीनें तारण लावून देऊन रकमेची भरती केली.

पुढें पैशांची फेड वेळेवर न झाल्यामुळें व सावकारांचा तगादा लागल्यामुळें त्यांची फेड करण्याचें काम पेशव्यांनीं पटवर्धनास सांगितलें. त्यामुळें पटवर्धनांचा व जिजाबाईचा कलह झाला.

करवीरच्या शंकराचार्यांशींहि हिचा झगडा झाला. स्वामींच्या मठाशेजारीं हिनें संभाजीचें दहन जबरदस्तीनें करून त्या जागेवर मंदिर बांधलें.

'यवनांपेक्षां ब्राह्मण जातीचा द्वेष अतिशय. मातुश्रीस विपरीत काळासारखी बुद्धी निर्माण झाली आहे.' असें पटवर्धन लिहितात.

जिजाबाई ता. १७-१२-१७७३ रोजीं मरण पावली ( म. रि. म. ४ पा. १३१-३७ ).

**जिजावा घाटगे**—( स. १८०९ सुमार ) नागपूरकर भोसल्यांचा जबलपूरचा सुभेदार. स. १८०९ मध्यें यास अमीरखान पेंढाऱ्यानें स्वारी करून लुटलें तेव्हां हा पळाला ( ना. प्रां. इ. ).

**जितमल्ल**--( स. १३९२-१४०९ ) बंगालच्या कंसाचा मुलगा.

यानें मुसलमानी धर्म स्वीकारला आणि जलालुद्दीन असें नांव धारण करून राज्य करूं लागला. याच्यानंतर याचा मुलगा अहमद हा गादीवर आला.

याला केंब्रिज हिस्टरीमधील वशांवळींत 'जदु उर्फ जलालुद्दीन मुहम्मद शाहा' असें म्हटलें आहे ( मु. रि. भा. १ ला, पृ. ३२० ).

**जितेंद्रिय**—( स. १०००-५० ) याचा उल्लेख रघुनंदनाच्या दायतत्त्वामध्यें आलेला आहे.

याचें धर्माविषयींचें पुष्कळ लिखाण प्रसिद्ध आहे. यानें कालावरती एक पुस्तक लिहिलें आहे. जीमूतवाहनाच्या दायभागामध्यें याचा वारंवार उल्लेख आलेला आहे. विधवेला, नवरा नातलगापासून वेगळा राहिला किंवा न राहिला तरी त्याची मिळकत मिळते ह्या दायभागांतील उताऱ्याचें विवरण यानें केलें आहे.

**जिन**—( स. ९४० सुमार ) यानें 'प्रमाण-वार्तिका-लंकारटीका' या नांवाचा ग्रंथ लिहिला. तिबेटी भाषांतराचें काम विक्रमशिला येथील पंडित दीपंकर व तिबेटी भाषांतरकार या दोघांनीं मिळून केलें.

हा व स.९४०च्या सुमारास झालेल्या वागीश्वरकीर्तीचा समकालीन कोंकण येथील जिनश्रम हे दोघेहि बहुधा एकच होत ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ३३८ ).

**जिनकीर्ति**—( स. १४५० सुमार ) एक जैन ग्रंथकार. सोमसुंदरच्या पांच शिष्यांपैकीं एक. यानें 'चंपक-श्रेष्ठिकथानक' नांवाचें पुस्तक लिहिलें आहे. 'धन्यशालि-चरित्राचा' कर्ता जिनकीर्तिच होय. जिनकीर्तीनें 'दानकल्पद्रुम' हें नीतिपर काव्य व 'श्रीपालकथा' हें दोन ग्रंथ लिहिले ( विंटरनिट्झ–हि. सं. लि. भा. २ ).

**जिनचंद्रगणिन्**—स. १०१५ मध्यें यानें 'नवपय-प्रकरण' प्राकृतमध्यें लिहून त्यावर संस्कृतमध्यें टीका लिहिली. याशिवाय नवतत्त्वप्रकरणाचाहि हा लेखक आहे. हा स्वतःला 'देवगुप्त' असें म्हणवीत असे (विंटरनिट्झ).

**जिनदत्तसूरि**—(जन्म स. १०७४–मृ. स.११५३) जैन ग्रंथकार. हरिवल्लभसूरीचा शिष्य व हेमचंद्राचा समकालीन कवि. 'उपदेशरसायनरस' व 'कालस्वरूपकूलम्' हीं दोन उपदेशपर काव्यें व यानें एक चर्चरी अपभ्रंशभाषेंत लिहिलीं ( विंटरनिट्झ–हि. सं. लि. भा. २ ).

याच्या पित्याचें नांव वाच्छिगमंत्री व आईचें नांव बाहडदेवी. हा द्रवडगोत्री होता. याचें मूळ नांव सोमचंद्र. संदेहदोलावली व इतर पुष्कळ ग्रंथ यानें तयार केले. हा अजमेर येथें मरण पावला.

**जिनदास**—(स. १४५० नंतर सुमार ) जैन लेखक. हा व याचा गुरु सकलकीर्ति यांनीं ३९ सर्गांचा एक हरिवंश लिहिला आहे. त्यांपैकीं पहिले १४ सर्ग सकल-कीर्तीनें लिहिले आणि बाकीचे यानें लिहिले.

**जिनप्रबोध**—( जन्म स. १२२७–१२८३ ) दुर्ग-प्रबोध व्याख्येचा कर्ता. साहश्रीचंद्र व सिरयादेवी यांचा हा पुत्र. मूळ नांव पर्वत.

**जिनप्रभसूरि**—(स.१३०० सुमार) जैन लेखक. यानें चतुर्विंशतिजिनस्तुति व इतर पुष्कळ काव्यें लिहिलीं. मानतुंगानें लिहिलेल्या भक्तामरस्तोत्रावर यानें टीका लिहिली. तीर्थकाम अथवा तीर्थप्रदीप हा ऐतिहासिक ग्रंथ लिहिला. फीरूझ ( स. १२२०-१२९६ ) व हा मित्र होते अशी आख्यायिका आहे.

हा रुद्रपल्लीय गच्छांपैकीं होता. संघतिलकाचा हा विद्यागुरु होता. यानें 'सम्यक्त्वसत्यटीका' ग्रंथावर टीका केली आहे. यानें शाहि मुहंमदास जैन बनविलें.

जिनप्रभसूरीनें तीर्थकल्प लिहिला आहे. हा उदयपूरच्या समरसिंहाचा समकालीन होता ( स. १२७३-१३०२ ).

**जिनभद्रगणि क्षमाश्रमण**—( स. ४८४-५८८ ) एक जैन तर्कज्ञ. यानें 'आवश्यक' या ग्रंथावर 'विशेषावश्यकभाष्य' या नांवाची टीका लिहिली. याचा जन्म स. ४८४ त झाला. हा क्षमाश्रमण या नांवानें विशेष प्रसिद्ध आहे. यानें स. ५२८ ते ५८८ पर्यंत मुख्य धर्माधिकाऱ्याचें काम केलें ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. १८१ ).

**जिनमंडनोपाध्याय**—यानें 'कुमारपालप्रबंध' नांवाचा ग्रंथ लिहिला.

**जिनमित्र**—( स. १०२५ सुमार ) बुद्ध तर्कज्ञ. हा काश्मीरचा रहिवाशी होता; व सर्वज्ञदेव, दानशील, इत्यादि विद्वानांबरोबर हा तिबेटांत तेथील लोकांस संस्कृत ग्रंथांचें तिबेटी भाषेंत भाषांतर करण्यास मदत करण्यासाठीं गेला होता. हा स. १०२५ च्या सुमारास बंगालचा राजा महीपाल याच्या कारकीर्दीत होऊन गेला.

यानें तर्कज्ञानावर 'न्यायबिंदुपिंडार्थ' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथांत जिनमित्रानें धर्मकीर्तीच्या न्यायबिंदूचें विवरण केलें आहे. या ग्रंथाची मूळ संस्कृत प्रत उपलब्ध नाहीं. परंतु त्याचें तिबेटी भाषांतर मात्र उपलब्ध आहे. तिबेटी भाषांतर सुरेंद्रबोधी व ज्ञुचेन येथील तिबेटी भाषांतरकार या दोघांनीं मिळून केलें ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ३४० ).

**जिनराज**—( जन्म स. १५८९–मृ. स. १६४१ ) बोदिथ्य गोत्राचा, साह धर्मसी व धारलदेवी यांचा पुत्र.

हा ग्रंथकार म्हणून प्रसिद्ध आहे. यानें जैनराजी नांवाची नैषधीय काव्यावर एक वृत्ति लिहिली आहे.

**जिनवल्लभ**—( मृ. स. १२०९ ) हा जिनेश्वरसूरीचा पहिला शिष्य होय. यानें अभयदेवास गुरु करून पिंडविशुद्धिप्रकरण, गणधरसार्धशतक, षडशीति वगैरे ग्रंथ लिहिले.

बाराव्या शतकाच्या सुरुवातीस हा एक लेखक होऊन गेला. यानें 'उल्लासिक्कमभय ?' महावीरस्तोत्र, प्रश्नशत व इतर कित्येक विद्वत्तापूर्ण ग्रंथ लिहिले. याच्या पंथांतील चरित्रें लिहिणारा जिनपतिसूरि याच्या मतानें यानें पाणिनीचें व्याकरण, महाकाव्यें, अलंकारशास्त्र वगैरेंचा अभ्यास केला होता ( विंटरनिट्झ ). हा चितोडमध्यें असे.

**जिनसमुद्रसूरि**—( जन्म स. १४५०-मृ. १४९९ ) कुमारसंभवावरील टीकाकार. यानें स. १४६५ ते १४९९ च्या मधील कालांत आपली कुमारसंभवावरील टीका लिहिली. गोत्र-पारष. पिता देकोसाह. माता देवलदेवी.

**जिनसेन**—( स. ८१५ सुमार ) यानें जैनधर्मीयांचा 'हरिवंश' नांवाचा ग्रंथ लिहिला. याचा शिष्य गुणभद्र.

२. पहिल्या अमोघवर्ष ( स. ८१५-७७ ) राष्ट्रकूटाचा मित्र. जैनआदिपुराणाचा लेखक. यानें पार्श्वाभ्युदय नांवाचें काव्य मेघदूतांतल्या पुष्कळशा ओळी घेऊन केलें आहे ( विंटरनिट्झ ).

३. स. ७८३ मध्यें यानें महाभारताचें जैन रूपांतर केलें ( विंटरनिट्झ ).

**जिनेन्द्रबुद्धि**—( स. ६०० सुमार ) जैनेंद्र व्याकरणाचा कर्ता ( पूज्यपाद पाहा ).

२. ( स. ६९१-७५० ) यानें काशिकावृत्तीवर टीका लिहिली ती न्यास या नांवानें प्रसिद्ध आहे. चिनी प्रवासी इत्सिंग यानें आपल्या प्रवासवर्णनांत हिंदुस्थानांतील पठनपाठनाची माहिती देतांना जयादित्यकृत काशिकावृत्तींची माहिती दिली आहे आणि जयादित्याचा मृत्यू तीस वर्षांपूर्वी झाला असें म्हटलें आहे. पण न्यासाचा मात्र उल्लेख केला नाहीं. यावरून न्यास हा ग्रंथ स. ६९१ च्या नंतर व स. ७५० च्या पूर्वी केव्हां तरी झाला असावा.

यानें 'विशालामलयवतीनामप्रमाणसमुच्चयटीका' या नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथाचें तिबेटी भाषांतर झालें आहे असें हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिकमध्यें म्हटलें आहे ( पा. ३४३ ).

**जिवबादादा बक्षी**—( मृत्यु स. १७९६ ) हा जातीचा शेणवी असून याचें आडनांव केरीकर असें होतें. हा महादजी शिंद्यांचा सेनापति व मुत्सद्दी. महादजीच्या सर्व प्रकरणांत हा प्रमुख असे.

हा दौलतराव शिंद्यांचा सेनापति असून स. १७९५ मध्यें दौलतराव शिंद्यांबरोबर खर्ड्याच्या लढाईंत होता. शिंद्यांच्या कारभारी मंडळांत हा प्रमुख असून दौलतराव याच्याच अनुरोधानें चालत असे. सवाई माधवरावाच्या मृत्यूनंतर यशोदाबाईच्या मांडीवर दत्तक देण्याविषयीं यानें सल्ला दिला होता. पण बाळाजी विश्वनाथाचा औरस वंशज हयात असतां आपण दिलेला सल्ला चुकीचा आहे असें वाटल्यावरून यानें मरतेसमयीं दौलतरावास जवळ बोलावून त्यास 'आपण दत्तक घेण्याविषयीं दिलेला सल्ला चुकीचा आहे' असें सांगितलें असें डफ म्हणतो. याचें विस्तृत चरित्र मराठींत प्रसिद्ध आहे.

**जिवाऊ शिंदे**—ही नेमाजी शिंदे याची बायको असून मोठी राजकारणी होती. ही मोठी कर्ती बाई असून हिला थोरले बाजीरावसाहेब यांनीं लिहिलेलें एक पत्र उपलब्ध आहे. त्यावरून ह्या बाईची योग्यता कळण्यासारखी आहे ( जु. ऐ. गो. ४६ ).

**जिवाजी खंडो चिटणीस**—( मृत्यु स. ६-१-१७४३ ) हा खंडेरावाचा मुलगा. खंडेराव वारल्यावर शाहूनें यास कोंकणांतील जिंकिलेल्या मुलखाची चिटणीसी, जमेनिसी व कारखानविशी करून दिली ( भा. व. प. या. लें. ६६, ७०, ७१ ). चिमाजीनें सिद्दीचा पाडाव केल्यामुळें ( स. १९-४-१७३६ ) शाहू वगैरे मंडळींनीं याचें अभिनंदन केलें. हा ता. ६-१-१७४३ मध्यें मरण पावला ( शा. म. च. ). याला दोन पुत्र होते; एकाचें नांव रामराव व दुसऱ्याचें नांव देवराव होतें.

**जिवाजी पवार**—हा काळोजीचा पुत्र. हा देवासच्या एका पातीचा संस्थापक ( तुकोजी पवार पाहा ).

**जिवाजी विश्राम**—सावंतवाडीकरांचे कारभारी जिवाजी विश्राम व बंधु विठ्ठल विश्राम हे कोल्हापूरकर जिजाबाईस रांगण्याकडे सारखा त्रास देत असत. माधवरावानें यांचा बंदोबस्त केला. विठ्ठल विश्रामास कोप्पल किल्ल्यावर अटकेंत ठेवलें; आणि यास कोणी आश्रय दिल्यास त्याचा नाश केला जाईल अशी सर्वत्रांस धमकी दिली ( म. रि. भा. ४, पा. १३६-३७ ).

**जिवाशिवा**—मराठी कवि. याच्या वडिलाचें नांव शिवराय असून आईचें नांव उमा असें होतें. याचें गोत्र काश्यप. हा आपल्यापुढें आपल्या गुरूचें नांव जें शिवा तें नेहमीं लावीत असे. पंढरपूरच्या जवळ असलेल्या क्षेमावती गांवांत हा राहत असे. यांनीं मराठींत महाभारताचीं कांहीं पर्वें लिहिलीं होतीं. हा कवि-मुक्तेश्वर-गोपाळ-श्रीधरांच्या ( कवि ) नंतरचा होता. यानें केलेल्या महाभारताचीं १२ पर्वें आहेत ( मं. त्रै. व. ११. पा. २१ ले. ५ ).

**जीमूतवाहन**—( स. ११०० नंतर ) संस्कृत भाषेंत धर्मशास्त्रावर ग्रंथ लिहिणारा एक पंडित. हा बंगाली होता. यानें कालविवेक, व्यवहारमातृका (न्यायमातृका) आणि दायभाग असे तीन ग्रंथ लिहिले. याच्या दायविभागावर रघुनंदनाची प्रख्यात टीका आहे.

याचा जन्म पारिभद्र घराण्यांत झाला. हा बंगालचा राजा विश्वक्सेनाच्या पदरीं न्यायाधीश होता. याचें गांव राधा. यानें ज्योतिषशास्त्राबद्दलहि बरीच माहिती दिली आहे. याच्या पूर्वी चौदा पिढ्या याच्या जातीचा दर्जा कमी झाला असल्यामुळें यानें आपल्या पोटजातीचा उल्लेख केला नाहीं.

**जीवक**—बिंबिसारास अंबपाली वेश्येपासून हा झाला. वैद्य व बुद्धाचा भक्त. यानें भिक्षूंकरितां चिकित्सालय स्थापन केलें होतें.

**जीवदामा क्षत्रप**—( स. १९७–१९८ ) हा दामघ्सद किंवा दामजदश्री याचा धाकटा पुत्र. याचीं नाणीं शा. श. ११९ आणि १२० चीं मिळालीं आहेत. याच्या नंतर याचा चुलता रुद्रसिंहाचा ज्येष्ठ पुत्र रुद्रसेन हा गादीवर आला. याला महाक्षत्रप असें लिहिलेलें आढळतें. हा रुद्रसिंह क्षत्रपाचा उत्तराधिकारी झाला.

**जीवदेव**—( स. १६५० नंतर ) आपदेवाचा पुत्र; व अनंतदेवाचा धाकटा भाऊ. यानें आशौचनिर्णय व गोत्रप्रवरनिर्णय असे दोन ग्रंथ केले आहेत.

**जीवन**—गुजराथी कवि. पदें व शिक्षा ग्रंथाचा कर्ता.

**जीवनपुरी गोसावी**—( स. १७५० ) हा उदेपुरीचा चेला. हा नागपूरचे मठावर होता. एका वेश्येच्या खुनावरून दुसऱ्या रघूजी भोसल्यानें याचा मठ लुटला व स्वतःचे साडेतीन लाखांचे रोखीह लुटले. शेवटीं साताऱ्यावरून ताकीद गेल्यावर यास बंधमुक्त केलें ( ना. प्रां. इ. पा. २३० ).

**जीवन्मुक्त**--एक महाराष्ट्रीय संतकवि. निझामराज्यांत येकेहळ्ळीजवळील अन्वार गांवीं यांचा मठ आहे. यांस तिकडे मुक्तेश्वर म्हणतात. हे ज्ञानेश्वरसंप्रदायी होते. ज्ञानेश्वरांनंतर यांचेंच नांव तिकडे घेतात.

जीवन्मुक्ति, गीताप्रभाकर व जीवन्मुक्तिवाक्य वगैरे ग्रंथ यांनीं केले आहेत ( सं. सू. ).

**जीवविबुध**--यानें संस्कृत भाषेंत नलानंद नांवाचें सप्तांकी नाटक लिहिलें आहे. स. १६६५ सालीं लिहिलेली याची एक हस्तलिखित प्रत हल्लीं उपलब्ध आहे.

**जीवशर्मा**--एक ज्योतिषी. वराहमिहिरानें याचा जातकांत उल्लेख केला आहे.

**जीवितगुप्त**—शेवटल्या अकरा गुप्त राजांपैकीं हा शेवटचा राजा होय. हा आठव्या शतकांतील पहिल्या भागांत राज्य करीत होता.

**जुझर**--बुंदेलखंडचा राजा.

**जुमरनंदी**--( स.१३२५ सुमार ) क्रमादीश्वरानें सुरु केलेल्या व्याकरणशाखेचा पुरस्कर्ता. याच्यामुळें त्या शाखेला जौमरशाखा असें नांव पडलें.

**जुनैद**—( स. ७२४–७४३ ) खलिफा हिसामनें याला सिंधचा सुभेदार नेमिलें. इस्लामी धर्माची दीक्षा घेऊन व खलिफाचें मांडलिकत्व पत्करून निश्चित झालेल्या जयसिंहावर यानें स्वारी केली. स्वारींत जयसिंह मारला गेल्यावर त्याच्या भावास यानें सामोपचारानें विश्वासांत घेऊन भेटींत ठार मारलें.

**जुरअत**--( मृत्यु स. १८०८ ) एक उर्दू कवि. याचें नांव शेख कलंदर बक्ष किंवा यहिया अमान असें होतें. हा मीरचें अनुकरण करी. याचा एक दीवान प्रसिद्ध आहे.

**जेज्जट**—सुश्रुतटीकाकार डल्हन यानें उल्लेख केलेला वैद्यकावरील ग्रंथकार.

**जेतारि**—( स. ९४०-८० ) बौद्ध तर्कज्ञ. याचा पिता गर्भपाद. हा मगधांतील पाल राजाचा मित्र सनातन याच्या दरबारीं वारेंद्र येथें राहत असे. आईबापांनीं हाकून दिल्यामुळें बौद्ध बनला आणि विक्रमशिला विद्यालयाची पंडित ही पदवी संपादन केली. दीपंकर व श्रीज्ञान अतिश यांनीं याच्याजवळ पांच शास्त्रांचा अभ्यास केला. याचे ग्रंथः—

१ हेतुतत्त्वोपदेश, २ धर्मधर्मिविनिश्चय, ३ बालावतारतर्क. या ग्रंथांचीं फक्त तिबेटी भाषांतरें उपलब्ध आहेत (हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ३३७-३८).

**जेसा**—( जयसिंग पाहा ).

**जेंकिन्स रिचर्ड**—( स. १८०७–२७ ) नागपूरचा रेसिडेंट. यानें सुमारें वीस वर्षें नागपूरचा कारभार केला. रघूजी होता तोंपर्यंत याचें कांहीं चाललें नाहीं; पण अप्पासाहेबाच्या वेळीं नागपूरचें राज्य पूर्णपणें इंग्रजांच्या ताब्यांत गेलें. ता. २८-५-१८१६ रोजीं तैनाती फौजेचा तह झाला. बाजीराव हा इंग्रजांचा शत्रु असल्यामुळें तिकडून आलेली सेनासाहेबसुभ्याचीं वस्त्रें घेण्यासहि यानें बंदी केली; पण लढाईपर्यंत येऊन शेवटीं तह करणें भाग पडलें.

**जैत**—( इच्छनीकुमारी व भीमदेव बघेल पाहा ).

**जैतुगी यादव**—( जैत्रपाळ यादव पाहा ). जैत्रपाळ शब्दाचा जैतुगी हा उच्चार प्रांतिक दिसतो.

**जैत्रकर्ण**—हा ईडरच्या रणमल्लाचा पिता व लूणकरणाचा पुत्र. याला मेवाडच्या हंमीर गुहिलोतानें जिंकलें होतें. याला जैत्रेश्वर, जितकर्ण व जैतकरण असें म्हणत ( एकलिंगमाहात्म्य व एकलिंगजीच्या दक्षिणद्वारावरील प्रशस्ति. रा. इ. पा. ५५० ).

**जैत्रपाळ**—विक्रमादित्याचा मुलगा.

**जैत्रपाळ यादव**—( स. ११९१-१२१० ) पांचव्या भिल्लम यादवाचा मुलगा. हा आपल्या बापानंतर गादीवर बसला. हाहि पराक्रमी होता. यानेंहि 'समस्त भुवनाश्रय महाराधिराज' हीं बिरुदें आपल्यास लाविलीं होतीं. याला वेद, मीमांसा व तर्कशास्त्र यांचें चांगलें ज्ञान होतें. प्रसिद्ध मराठी आद्यकवि मुकुंदराज हा याच्याच पदरीं होता. कोणी म्हणतात कीं, मुकुंदराजाचा उल्लेखित जैत्रपाळ हा चांद्याच्या बाजूचा दुसरा कोणी जयपाळ असावा. प्रसिद्ध ज्योतिषी भास्कराचार्य याचा पुत्र लक्ष्मीधर हा याचा मुख्य पंडित होता. सेनापती शंकर नांवाचा ब्राह्मण होता. हें नांव जयत्पाळ किंवा जैतुगी असें लिहिलेलें आढळतें.

यानें पहिल्या प्रतापरुद्र काकतीयाच्या कारकीर्दीत सुरू झालेली लढाई पुढें महादेव काकतीयाशीं सुरू केली; व महादेवास ठार मारलें. गणपतीला कैदेंत ठेवलें. काकतीय लेखांमध्यें महादेव व यादव यांमधील युद्धाचा उल्लेख आढळत नाहीं. कारण, त्याचा शेवट दोघांना फार हानिकारक होता. शेवटीं यानें कांहीं अटींवर गणपति काकतीयास आंध्रदेशाच्या गादीवर बसविलें ( सिवेल व आयंगार ).

२. दुसऱ्या सिंघण यादवाचा पुत्र ( कृष्णदेव यादव पाहा ).

**जैत्रसिंह गुहिलोत**—( स. १२१२-१२५१ ) हा पद्मसिंहानंतर मेवाडच्या गादीवर आला. याबद्दल जयतल, जयसल, जयसिंह, जयंतसिंह किंवा जितसिंह असें लिहिलेलें आढळतें. हा मोठा योद्धा होता. तसेंच आसपासचे राजे व मुसलमान यांच्याशीं यानें अनेक लढाया करून विजय मिळविला होता असें चीरवा येथील शिलालेखावरून दिसतें. त्याच लेखांत नागदत्राचा तलारक्ष योगराज व त्याचे चार पुत्र यांची माहिती दिली आहे, चार पुत्रांचीं नांवें पमराज, महेन्द्र, चंपक आणि क्षेम अशीं होतीं. यांपैकीं महेन्द्राचा पुत्र बालाक हा कोट्टडक ( कोटडा ) घेत असतां राणक ( राणा ) त्रिभुवनशीं लढतांना जैत्रसिंगाच्यापुढें मारला गेला व त्याची स्त्री भोली त्याच्यासह सती गेली. त्रिभुवन हा गुजराथच्या दुसऱ्या भीमाचा उत्तराधिकारी होता. त्रिभुवनाची अत्यंत थोडी कारकीर्द असल्यामुळें ही लढाई वि. सं. १२९९ ( स. १२४२-४३ ) च्या सुमारास झाली असली पाहिजे.

नाडौलच्या कीतू चौहानानें मेवाडचें राज्य कांहीं दिवस घेतलें होतें. त्याकरितां यानें नाडौलवर स्वारी केली. नाडौलचा याच्या वेळचा राजा कीतू चौहानाचा नातू उदयसिंग होता. त्याचा यानें जोराचा पराभव केला असें रावळ समरसिंहाच्या आबूच्या शिलालेखांत आहे. पण उदयसिंहाची नात व चाचिगदेवाची मुलगी रूपादेवी हिचा विवाह जैत्रसिंहाचा पुत्र तेजसिंहाशीं करण्यांत आला. जुनें वैर मिटविण्याकरितां हा प्रयत्न असावा.

शिवाय यानें माळव्याच्या परमारांशीं आणि मुसलमानांशीं लढाया केलेल्या दिसतात. नागद्याचा तलारक्ष योगराजाचा थोरला पुत्र पमराज नागदा पडल्यावर भूतालाच्या लढाईत सुलतानाकडून मारला गेल्याचा चिरव्याच्या शिलालेखांत निर्देश आहे. हा सुलतान म्हणजे शम्सुद्दीन अल्तमश असावा. हंमीरमदमर्दन नांवाच्या संस्कृत नाटकांत मीलच्छीकार असें संस्कृत शैलीचें नांव दिलें आहे. कुतुबुद्दीन ऐबक या दिल्लीच्या बादशहानें गुलाम अल्तमश याला अमीर-शिकार अशी पदवी सेनापति असतांना दिली होती. अमीरशिकार या शब्दाचें कवीनें संस्कृतीकरण केलेलें दिसतें. यानें त्याचा पराभव केला. ही लढाई टाडच्या म्हणण्याप्रमाणें नागोर येथें झाली नसून नागद्याजवळ झाली होती.

सिंध प्रांतांतल्या लोकांशीं याचें युद्ध झाल्याचा समरसिंहाच्या आबू येथील शिलालेखांत निर्देश आहे. पण ही लढाई नक्की कोणती हें समजत नाहीं. कदाचित् जलालुद्दीनानें अनहिलवाडा लुटला त्या वेळीं यानें त्याच्याशीं सामना दिला असावा. ती गोष्ट स. १२२३ मध्यें झाली.

दिल्लीचा सुलतान नासिरुद्दीन महमूदानें कनोजहून आपला पुत्र जलालुद्दीन यास दिल्ली येथें बोलावलें तेव्हां तो भीतीनें चितोडच्या डोंगराळ प्रदेशांत पळाला. सुलतानानें त्याचा पाठलाग केला, पण आठ महिने झाले तरी तो हातीं लागेना. तेव्हां त्याची सेना दिल्लीस परतली, असें तारीख फिरिश्ता ग्रंथांत लिहिलें आहे ( ब्रिग्ज, फिरिश्ता १.२३८ ). त्या वेळीं मेवाडचा राजा हा होता. यानें त्याला मदत केली असावी. त्या वेळीं मेवाडांत सर्वांत प्रतापी हाच राजा होता. याची शत्रुपक्षानें प्रशंसा केली आहे. शम्सुद्दीन अल्तमशनें नागदा उध्वस्त केलें तेव्हां मेवाडची राजधानी चितोड झाली. त्यापूर्वी नागदा व आहाड अशा दोन ठिकाणीं राजधानी होती.

याच्या वेळचे दोन शिलालेख व दोन हस्तलिखित ग्रंथ उपलब्ध झाले आहेत. पहिला वि. सं १२७० ( स. १२१३ ) मधील एकलिंगमंदिराच्या चौकांत आहे ( भावनगर इन्स्क्रिप्शन्, पृ. ९३ टिप्पण). दुसरा शिलालेख वि. सं. १२७९ ( स. १२२२ ) वै. शु. १३ चा नादेसमा गांवीं सूर्यमंदिरावर आहे ( अप्रकाशित ). त्यांत याची राजधानी नागदा व श्रींकरण अधिकाऱ्याचें नांव डूंगरसिंह लिहिलें आहे. याच्या वेळीं वि. सं. १२८४ ( स. १२२८ ) फा. व ३० ला ओघनिर्युक्ति नांवाचें जैन पुस्तक ताडपत्रांवर आघाटपुरीं लिहिलें. तें सध्यां खंबायत शांतिनाथ मंदिरांत आहे. त्यांत याच्या महामात्याचें नांव जगत्सिंह लिहिलें आहे ( पीटर्सनचा तिसरा रिपोर्ट, पृ. ५२ ). रावळ जयतसिंह ( जैत्रसिंह ) आणि त्याचा आश्रित जयसिंह याच्या वेळीं ठाकूर वयजलनें वि. सं. १३०९ ( स. १२५३ ) माघ व. १४ रोजीं पाक्षिकवृत्ति नांवाचें पुस्तक आघाट येथें लिहिलें त्यांत जयसिंह ( जैत्रसिंह ) चा दक्षिण व उत्तर यांमधील राजांचा मानमर्दक म्हणून निर्देश आहे. त्यांत याचा श्रीकरणाधिकारी तल्हण दिला आहे ( पीटर्सन, तिसरा रिपोर्ट, पृ. १३० ). यावरून वि. सं. १२७०-१३०९ पर्यंत हा मेवाडचा राजा होता असें ठरतें. याचा पुत्र तेजसिहाच्या वेळचा म्हणजे वि. सं. १३१७ ( स. १२६१ ) मधील श्रावकप्रतिक्रमणसूत्रचूर्णि नांवाचा ग्रंथ मिळतो त्यावरून वि. सं. १३०९-१७ पर्यंत याचा देहान्त ठरतो.

**जैनावादी**—औरंगजेबाची रखेली ( हिराबाई पाहा ).

**जैय्यट**--कैय्यटाचा बाप.

**जोकीदेव कदंब**—( चोकिदेव पाहा ).

**जोगम कलचरी**-- हा कल्याणीच्या कलचुरीघराण्यांपैकीं राजलचा मुलगा.

**जोगा परमानंद**—( समाधि स. १३३८ ) याचें नांव जोगा. गुरूचें नांव परमानंद. जात शूद्र. तेली असाहि निर्देश आहे. गांव बार्शी. तेथील भगवंताच्या दर्शनास जातांना हा गीतेचा एकेक श्लोक म्हणून साष्टांग नमस्कार घालीत जात असे. एकदां यास एक पीतांबर मिळाला. पीतांबर मळेल म्हणून हा जपून नमस्कार घालूं लागला त्यामुळें उशीर झाला. तेव्हां पीतांबराच्या लोभाबद्दल यानें कडक देहदंड घेतला.

याच्या ग्रंथाचें लेखन विसोबा खेचर करीत असे. म्हणजे हा नामदेव-समकालीन ठरतो. नवलक्ष साळ्या असें याचें टोपण नांव असावें. याची समाधि बार्शी येथें असून मार्गशीर्ष व. ४ स याचा उत्सव करतात. याचीं पदें, आरत्या व अभंग उपलब्ध आहेत. याची गुड्गुडी नांवाची कविता फार प्रसिद्ध आहे ( म. सा. पू. पा. १६८ ).

**जोगिपा**—चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं त्रेपन्नावा सिद्ध. हा शबरीपाचा शिष्य. जात डोम. गांव उदंतपूर.

**जोत्याजी केसरकर**—हा संभाजीचा एक स्वामिभक्त सेवक कोल्हापूर प्रांतांतील पुंजाळ गांवचा पाटील. नेहमीं संभाजीजवळ असे. संभाजीच्या मृत्यूनंतर हा येसुबाईजवळ होता. तिचा पत्रव्यवहार हा करीत असे. शाहूचें लग्न करण्यांत ह्यानेंच पुढाकार घेतला होता. शाहूनें यास सरदेशमुखीच्या कारभारावर मुख्य अधिकारी नेमिलें.

**जोधबाई**—( लग्न स. १५८५ ) अकबराची एक रजपूत राणी. ही जोधपूरच्या मालदेवाची मुलगी. उदयसिंहानें ही अकबरास दिली. हिचें माहेरचें नांव जगत्घोषिणी ऊर्फ बालमती. अकबराचें हिच्यावर प्रेम होतें. अकबराच्या मरणानंतर हिनें विष खाऊन प्राण सोडला. शहाजहान बादशहा हा हिचाच मुलगा ( बील ).

**जोधराज**—( ग्रंथकाल स. १८१७ ) एक हिंदी कवि. गौड ब्राह्मण. पिता बाळकृष्ण. याचें 'हम्मीररासो' काव्य फार ओजस्वी असून प्रसिद्ध आहे.

**जोधसिंह**—( स. १७६९ पूर्वी ) हा सालूंबरच्या जैतसिंहाचा मुलगा. यानें स्वामिभक्तीनें महाराण्याकरितां शांतपणें विषप्राशन करून देह ठेवला. हा महाराण्याविरुद्ध सरदारांना मिळाला होता, असा याच्यावर आरोप होता. महाराण्यानें 'तूं नाहींतर मी विष प्यालें पाहिजे' असें सांगतांच हा विष प्याला. तसेंच याचा पुत्र पहाडसिंग या गोष्टीबद्दल कांहींएक मनांत न आणतां महाराण्याच्या सेवेला हजर राहला ( उदयपुर राज्यका इतिहास, पा. ११९५ ).

**जोनराज**--( ग्रंथकाल स. १७३० ) संस्कृत ग्रंथकार. यानें 'किरातार्जुनीयम्' ( स. १३७० ), 'पृथ्वीराजविजय' व 'श्रीकंठचरित' यांवर टीका लिहिल्या आहेत. याच्या पित्याचें नांव नोनराज व आजाचें लौलराज.

यानें कल्हणाच्या नंतरचा राजतरंगिणीचा भाग लिहिला. स. १४१२ पर्यंत तो भाग आला आहे. हा कल्हणच्या मागून सुमारें दोनशें वर्षांनीं झाला.

**जोना ऊर्फ उलुघबेग**—( मुहंमद तुघ्लक पाहा ).

**जोयिदेव गुप्त**--( जोम गुप्ताचें नामांतर ).

२. ( जोविदेव गुप्त पाहा ).

३. हा तिसऱ्या विक्रमादित्य गुप्तांचा मुलगा.

**जोविदेव गुप्त**-- ( स. १२३८ ) हा आहवादित्य वीरगुप्ताचा मुलगा.

**जोम्म गुत्त**--(स.११८१ सुमार) हा गुत्त घराण्यांतील पहिल्या वीर विक्रमादित्याचा मुलगा.

**जोम्मन संगम**—( स.१३७५ ) हा विजयनगरच्या संगम घराण्यांतील दुसऱ्या हरिहराचा मुलगा. बुक्क दुसरा व देवराय पहिला हे याचे बंधु गादीवर आले होते.

**जोम्मा**--( स. १३५५-७९ ) पहिल्या बुक्कराय संगमाची पत्नी.

**जौक**—( स. १७८५–१८५२ ) एक ऊर्दू कवि. याचें नांव शेख मुहम्मद इब्राहीम जौक असें आहे. याचा गुरु गुलाम रसूल. 'खाकानी हिंद' ही याची पदवी ( क. कौं. ४ ).

**जौहर**—यानें हुमायूनची हकीगत लिहून ठेवली आहे. हा त्याचा नोकर होता ( गुल्बदन पाहा ).

**ज्योतिपंत महाभागवत**—( समाधि स. १७८८ ) अथर्ववेदी देशस्थ ब्राह्मण. हे खटाव प्रांतांतील बुध मलवडी कर्यातीचे देशपांडे. वडिलांचें नांव गोपाळराव देशपांडे.

हे चांगले विद्वान् असून झांशी संस्थानचे दिवाण होते. पण एकदां एका ब्राह्मणाला शिक्षा करण्याचे कामीं मतभेद होऊन यांनी नोकरी सोडली. आणि आपली लाखों रुपयांची संपत्ति व आयुष्य काशीपासून रामेश्वरापर्यंत विठ्ठलाचीं मंदिरें बांधून भागवतधर्माच्या प्रचारांत आयुष्य खर्ची घातलें. यांनीं विठ्ठलाचीं हजार देवालयें बांधलीं आणि त्यांची मालकी स्वतःच्या घराण्याकडे न ठेवतां लोकांकडे दिली. पुण्याच्या लकडीपुलाजवळील व मुंबईच्या विठ्ठलवाडींतील मंदिर त्यांपैकींच होय.

शिवाय समग्र भागवतावर एक अभंगात्मक व दुसरी ओवीबद्ध अशा दोन टीका लिहिल्या. शिवाय प्रवृत्ति-निवृत्ति-ऐक्यता-रत्नावली नांवाचा गद्य ग्रंथ लिहिला. यांना वेदव्यासांनीं ब्राह्मणरूपानें येऊन महाभागवत ग्रंथ दिला व तो चिंचणेर मठांत आहे अशी आख्यायिका आहे. समाधिशक, शके १७१० मार्गशीर्ष कृ. १३.

**ज्योतिरीश्वर कविशेखर**--(स. १४८७-१५०५). धूर्तसमागम नांवाच्या संस्कृत प्रहसनाचा कर्ता. तें विजयनगरच्या नरसिंहाच्या कारकीर्दीत लिहिलें.

---

## झ

**झझ्झूखान**--( स. १२८७–१२९१ ) हा इझ्झुद्दीन बल्बनचा मुलगा. कैकूबादच्या वेळीं हा सामानचा सुभेदार होता. खल्जीवंशाची सत्ता सुरू झाली तेव्हां राजकारणांत तुर्कांचें वर्चस्व कमी होऊन पठाणांचें वर्चस्व सुरू झालें, ही गोष्ट तुर्कांना सहन न होऊन त्यानीं याच्या नेतृत्वाखालीं बंड केलें ( स. १२९१ ). पण बुदौनजवळ याचा पराभव होऊन याला पकडून हाल करीत फीरूजशाहापुढें आणलें. त्यानें याच्या गुन्ह्याकडे दुर्लक्ष करून यास सोडून दिलें. राजकारणाच्या दृष्टीनें या चुकीच्या वर्तनाबद्दल सरदारांनीं दोष देतांच 'अशाश्वत राज्यपदाकरितां शाश्वताकडे दुर्लक्ष करण्यास माझी तयारी नाहीं' असें त्यानें उत्तर दिलें.

**झफरखान तुघ्लक**--दिल्लीच्या फीरूझ तुघ्लकचा हा मुलगा. याला फत्तेखान व मुहंमद असे दोन भाऊ होते.

याचा मुलगा अबु बकर स. १३८९ त दिल्लीच्या गादीवर आला. पण थोड्याच दिवसांत त्याला पदच्युत करण्यांत आलें.

**झबेताखान रोहिला**—( मृत्यु स. १७८५ ) हा नजीबखान रोहिल्याचा मुलगा. नजीबखानच्या मृत्यूनंतर यानें बादशहाकडून मीरबक्षीगिरी मिळवून मराठ्यांशीं लढाई करण्याची खटपट चालवली. नजीबखानाचे घराण्याचा सूड घेण्याचा महादजीचा संकल्प होता. त्यास अनुसरून त्यानें स. १७७२ त रोहिल्यांवर स्वारी केली. या युद्धाचा सर्व मारा यावर झाला. हा शुक्रतालच्या किल्ल्यांत राहिला असतां याजवर शिंद्यानें तोफांचा मारा केला तेव्हां याची दाणादाण उडाली. हा स्वतः काळोख्या रात्रीं निसटून गंगेपलीकडे बिजनोर प्रांतात गेला. याचे पाठोपाठ मराठ्यांनीं जाऊन सर्व प्रांत लुटून उध्वस्त केला. पुढें हा नजीबगडास गेला. तेंहि ठिकाण मराठ्यांनीं हस्तगत केलें. याचीं बायकामुलें मराठ्यांचे हातीं लागलीं.

पुढें हा घोसगडास असतां नजफखानानें तो किल्ला काबीज करून यास कैद करून आग्र्याचे किल्ल्यांत ठेवलें. मल्हारराव होळकरापासून रोहिले हे होळकरांचे मानसपुत्र होते. तेव्हां यानें अहिल्याबाईकडे संधान बांधलें. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. याचा मुलगा गुलाम कादर याचें व बापाचें बरें नव्हतें. बापानें मुलाची जहागीरसुद्धां जप्त केली होती. हा घोसगड येथें ता. २१-१-१७८५ त मरण पावला. तत्कालीन पत्रांतून यास जाबेतखान म्हटलें आहे ( मं. त्रै. वर्ष ८, अं. ३, ले. २२, पृ. १४० ).

**झमानशाह**—( मृत्यु स. १७९६ नंतर ) हा अहमदशाह अब्दालीचा नातू व तैमूरशाहाचा मुलगा. हा काबूल कंदाहारचा राजा होता. हा स. १७९६ त हिंदुस्थानावर स्वारी करण्यास निघाला. परंतु यास काबूलकडे आपल्या भावांनीं बंड केल्याची बातमी समजल्यामुळें हा परत गेला. पुढें याच्या भावानें याचे डोळे काढून यास मारिलें. इंग्रजांनीं शहासुजास गादीवर बसविलें तेव्हां अफगाणांनीं याच्या नांवाची द्वाही फिरविली होती.

**झामसिंग**—हा गाविलगडचा पहिला रजपूत किल्लेदार. हा मूळचा बंगालचा रहिवासी. रघूजी भोसल्यानें याचें शूरत्व व इमानीपणा पाहून यास किल्लेदारांवर अधिकारी नेमिलें. याच्यानंतर याचा पुतण्या प्रमोदसिंग हा गाविलगडचा किल्लेदार झाला. वेलस्लीनें गाविलगड जेव्हां घेतला त्या वेळीं वेर्णासिंग हा किल्लेदार होता.

**झामोरिन**—हा 'सामुद्रिक' शब्दाचा इंग्रजी उच्चारामुळें झालेला अपभ्रंश.

**झालिमसिंग**—हा कोट्याचा रिजंट होता. शिंद्याबरोबर झालेल्या एका लढाईंत हा जखमी होऊन त्रिंबकजी इंगळ्याच्या हातीं लागला. त्रिंबकजीनें यास एका दूरच्या किल्ल्यांत ठेवून याच्या जखमांस औषधोपचार करून यास बरें केलें. यामुळें हा इंगळ्याचा मरेपर्यंत ऋणी राहिला. इंगळे घराण्याचा भाईचारा कोटा दरबार अद्यापपावेतों मानीत आहे.

मेवाड दरबारला बंडखोरांनीं व फितुरी सरदारांनीं अगदीं भंडावून सोडलें होतें. त्यापासून दरबारची सुटका करण्याची याची इच्छा होती. म्हणून यानें महादजी शिंद्याला आपल्या मदतीस बोलाविलें. महादजीनें झालिमसिंगाची मागणी कबूल करून अंबाजी इंगळ्याबरोबर मोठी फौज देऊन त्यास याबरोबर रवाना केलें, व आपण त्याच्या मागोमाग मारवाडची खंडणी वसूल करण्यासाठीं निघाला. याच्याबरोबर अंबाजी इंगळे चितोडला गेला व मेवाड दरबारांतील विरुद्ध असलेल्या सरदारांचा त्यानें मोड केला ( रत्नाकर, ऑगस्ट १९३०, अं. ८, पृ. ६३७ ).

**झियाउद्दीन बर्नी**—बरन शहरीं जन्मास आला म्हणून यास बर्नी असें म्हणतात. मुहम्मद व फीरूझ तुघ्लकच्या कारकीर्दींत हा पुढें आला. यानें 'तारीख-इ-फीरूझशाही' हा ग्रंथ केला आहे. त्यांत बल्बन ते फीरुज तुघ्लकापर्यंत माहिती आली आहे ( बील ).

**झुगताईखान**—जातीनें मोंगल. याच्याच वंशांत मूनिसखान नांवाचा सरदार होता. त्याची मुलगी ही बाबराची आई होय.

**झुब्तुन्निसा**—जन्म स. १६६० ही औरंगजेबाची चौथी मुलगी. हिच्या आईचें नांव नबाबबाई.

**झुल्फीकारखान**—( स. १६५७–१७१२ ) याचें मूळचें नांव ईतिकदकाहखान असें होतें. औरंगझेबाचा वजीर असदखान त्याचा हा मुलगा. औरंगझेबाच्या कारकीर्दींत यानें अनेक कामगिऱ्या केल्या. स. १६८९ त हा कोंकणच्या स्वारींत होता. रायगड फितुरीनें घेऊन बालशाहू व येसूबाई यांना धरून यानें औरंगझेबाच्या स्वाधीन केलें ( स. १६९० च्या सुमारास ). याबद्दल औरंगझेबानें याला झुल्फीकार ही पदवी दिली. नंतर हा राजारामास धरण्यासाठीं जिंजीला सहासात वर्षे वेढा घालून बसला ( स. १६९१–९७ ). परंतु शेवटीं याच्या हातून राजाराम निसटला. तंजावर व त्रिचनापल्ली यांवर यानें स्वाऱ्या केल्या होत्या. यास अमीरउलउमरा नसरतजंग असा किताब होता.

पुढें याला मराठ्यांच्या बंदोबस्तासाठीं माळव्यांत पाठविण्यांत आलें ( स. १७०५ ). तेथें याची व नेमाजी शिंद्याची झटापट उडाली. तिकडून याला वाघीनगिऱ्यावर पाठविलें असतांना यानें तें सर केलें ( स. १७०६ ).

औरंगझेब मेल्यावर हा अजमशाहास येऊन मिळाला व नेमाजी शिंद्याच्या मदतीनें कामबक्षावर स्वारी करून त्याला लढाईंत ठार केलें ( स. १७०८ ). परंतु पुढें अजमशहाचा बहादूरशहानें पराभव केल्यामुळें हा दक्षिणेंत पळून आला. पण बहादूरशहानें याला क्षमा केली व याला पदवी देऊन दक्षिणचा सुभेदार नेमला. स. १७१२ मध्यें याला फर्रुखसियर बादशहानें फांशी दिलें.

**झुंझारराव कडू**—बाजी पासलकरांचा साहाय्यक. यांना जाधव असेंहि म्हणतात.

**झुंजारराव घाटगे**—हा मराठा सरदार प्रथम पहिल्या रघूजी भोसल्याचे वेळेस पुढें आला. नंतर मुधोजी व साबाजी यांचे भांडणांत हा प्रथम साबाजीचे पक्षास मिळाला होता. परंतु पुढें मुधोजीनें यास साबाजीचे पक्षाकडून फोडून आपणांकडे वळवलें. स. १७७३ त कुंभारीचे लढाईंत हा मुधोजीकडून होता ( ना. प्रां. इ. १०६; १९६ ).

**झेबुन्निसा**—( स. १६३८–१७०२ ) हिचा जन्म दौलताबादेस ता. १५ फेब्रुवारी स. १६३८ रोजीं झाला. ही औरंगजेबाची सर्वांत वडील मुलगी होय. लहानपणीं हिला हाफीजा मरियम नामक विदुषीचे हाताखालीं शिक्षणसंपादनार्थ ठेवण्यांत आलें होतें. हिची बुद्धिमत्ता दांडगी

असल्यामुळें हिनें कुराण ग्रंथ लहानपणींच मुखोद्गत केला होता. याबद्दल हिला औरंगजेबानें तीस हजार होन बक्षीस दिले. फार्सी व अरबी या भाषांतील अक्षरें काढण्यांत ही पटाईत होती. पुस्तकांचा हिचा संग्रहहि दांडगा असून, हस्तलेखांचा व जुन्या नव्या पुस्तकांचा संग्रह करण्याकरितां हिनें मोठमोठ्या पंडितांची योजना केली होती. ही उत्तम कवयित्री होती.

'दिवाण-ई-मकफी'—मकफी म्हणजे गुप्त असें हिचें फार्सी कवितेंतील नांव आहे—हा ग्रंथ हिनें लिहिला. औरंगजेबाचा मुलगा अकबर यानें आपल्या बापाच्या विरुद्ध बंड उभारिलें, या कामीं हिचें अंग असल्यानें, हिला जानेवारी स.१६८१त औरंगजेबानें सेलीमगडांत कैदेंत ठेविलें. पुढें हिचा अकबराशीं झालेला पत्रव्यवहार उघडकीस आल्यामुळें, हिचा चार लाखांचा तनखा बंद करण्यांत आला. हिची सर्व मालमत्ता जप्त करण्यांत आली. बंदीवासांत असतांना हिचे फार हाल झाले.

हिचा शंभू छत्रपतींशीं प्रेमसंबंध होता. हिनें त्यास मनानें वरल्यामुळें त्याव्यतिरिक्त दुसऱ्याशीं लग्न करणें अधर्म्य होय, अशी हिची समजूत झाल्यामुळें ही जन्मभर अविवाहित राहिली, व शंभू छत्रपतींचा मुलगा शाहू यास हिनें वात्सल्यप्रेमानें संभाळिलें. इतकेंच नव्हे, तर शाहूच्या सुटकेस हीच कारणीभूत झाली. हिनें संभाजीस वांचविण्यांत यावें अशाबद्दलचा हट्ट धरिला होता. ही संभाजीचे वधाचे वेळीं दक्षिणेंत आली नव्हती, वगैरे आख्यायिका आहेत.

ही दिल्ली येथेंच ता. २६ मे १७०२ रोजीं दिवंगत झाली. तेथेंच काबुली दरवाजाबाहेर जहानरहा बागेंत हिला पुरण्यांत आलें. नंतर हिची कबर व तीवरील शिलालेख हीं शिकंदरा येथें ठेवण्यांत आलीं. अद्यापहि ही कबर दाखविण्यांत येते (मं. बा. इ. श. १८३७ लें. ७३).

ही उत्कृष्ट कवयित्री असून हिच्या फार्सी कवितांचा संग्रह ईश्वरीप्रसाद माथुर यांनीं संपादून प्रसिद्ध केला आहे. हिनें दिल्लींत कुमारी मशीद बांधली. हिचा विवाह दारा शुकोहचा मुलगा सुलेमान शुकोहशीं ठरला होता. पण तो राजकीय अडचणीमुळें झाला नाहीं. शिवाजीमहाराजांशीं हिचा प्रेमसंबंध होता अशी आख्यायिका आहे; असें म्हणतात.

**झैनखान कोक**—(मृ. स. १६००) अकबराचा दूधभाऊ. पिता खाजा हिरवी. आई पिच्छाजान. याची चुलतबहीण जहांगीरला दिली होती. स. १५८८ मध्यें हा काबूलचा सुभेदार होता. हा कुशल तंतुवाद्य वाजविणारा होता. हा व अझीझ कोका एक असावेत.

**झैनुल आबिदीन**—(स. १४२३–७४) काश्मीरचा राजा सिकंदरचा मुलगा. आपला भाऊ अलीशहाचा पराभव करून हा गादीवर बसला.

२. (शादीखान पाहा).

**झोट प्रतिहार**—मंदोरच्या प्रतिहार वंशांतील शीलुकाचा पुत्र. यानें राज्यसुख भोगून शेवटीं गंगेंत मुक्ति घेतली. याचा पुत्र भिल्लादित्य.

## ट

**टॅव्हर्नियर**—(जान बॅप्टिस्टा टॅव्हर्नियर पाहा).

**टॉमस रो (सर)**—(ज. स. १५८० मृ स. १६४४ नवं.) हा सुप्रसिद्ध इंग्लिश वकील. ज्या थोर इंग्रज पुरुषांनीं अंगच्या अनेक गुणांवर हिंदुस्थानांत इंग्रजी राज्याची इमारत उभारली, त्यांपैकीं हा पहिला होय.

**टिक्कण**—तेलगू कवि. यानें तेलगू भाषेंत महाभारत लिहिलें आहे. वारंगळच्या गणपतिमंदिरासमोर याचा व जैन पंडितांचा वाद झाला. त्यांत यानें जैनांचा पराजय केला.

**टिपू सुलतान**—(जन्म स. १७५३–मृत्यु स. १७९९ मे ४) म्हैसूरचा राजा. हा म्हैसूरच्या हैदरअल्लीचा वडील मुलगा. टिपू स. १७५३ मध्यें देवनहळ्ळी येथें जन्मला. याची आई ही मीर मोईनुद्दीन नामक एका प्रतिष्ठित सरदाराची मुलगी असून, तिचें नांव फकिरुन्निसा असें होतें.

गादीवर येण्यापूर्वीच हा लढाईंत भाग घेत असे. मराठ्यांनीं हैदरवर केलेल्या सन १७७१ च्या मोहिमेंत यानें त्यांना तोंड दिलें होतें. पुढें हैदरनें याला मराठ्यांनीं घेतलेला मुलूख परत मिळविण्यासाठीं पाठविलें होतें (स.१७७३). त्याप्रमाणें यानें गुरमकोंडा व त्याच्या आसपासचा थोडासा प्रांत परत मिळविला (स. १७७४).

स. १७८० त हैदरावर इंग्रज चालून आले, त्या वेळीं इंग्रज सेनापति बेली याच्यावर टिपूनें कांचीं येथें एकाएकीं हल्ला करून बेलीचा पराभव केला; व त्याला त्याच्या साऱ्या फौजेसह बंदिवान केलें. इतक्यांत कर्नल ब्रेथवेट हा दुसरा इंग्रज सेनापति टिपूवर चालून आला; पण तंजावर येथें त्याचाहि पराभव करून, टिपूनें त्याला त्याच्या सैन्यासह कैद केलें.

हैदर वारल्यावर ( १७८२ डिसें. ) टिपू गादीवर आला. याचें व फ्रेंचांचें सूत असल्यानें जेंव्हां अमेरिकेच्या स्वातंत्र्ययुद्धांत फ्रेंच लोकांनीं अमेरिकेस मदत केली, तेंव्हां टिपूनेंहि फ्रेंचांना पाठिंबा दिला होता व फ्रेंचहि यास मदत करीत. इंग्रजांचा सेनापति आयर कूट हा टिपूवर आला असतां फ्रेंच सरदार बुसी हा टिपूच्या मदतीस आला होता. सालबाईचा तह आपणास मान्य आहे असें टिपू म्हणे, परंतु त्या तहांत हैदरानें इंग्रजांपासून घेतलेला मुलूख परत करावा ही अट मात्र हा मान्य करीना. त्यामुळें इंग्रजांनीं जलमार्गानें येऊन टिपूचा बेदनूर प्रांत घेतला. तेव्हां यानें एकदम त्यांच्यावर हल्ला करून व मंगलोर शहरास नऊ महिने वेढा घालून तें काबीज केलें व इंग्रज अधिकारी कैदेंत टाकिले.

अखेर इंग्रजांनीं तह करण्याकरितां आपले वकील टिपूकडे पाठविले. यानें प्रथम वकिलांचा उपमर्द करून मग ( ११ मार्च १७८४ ) त्यांच्याशीं मंगलोर येथें तह केला. या तहानें परस्परांनीं परस्परांचा घेतलेला प्रांत परस्परांस परत देण्याचें ठरलें. यानंतर मराठे व निजाम यांनां आपले मुलूख परत घेण्याचें ठरविलें.

याचें धोरण नेहमीं आक्रमण करण्याचें असे. लढाई अंगलट येते असें दिसल्यास हा तह करी, पण हा तह कधींच पाळीत नसे. शत्रूची पाठ फिरतांच याच्या आक्रमणास सुरुवात होई. शिवाय नरगुंदकराची मुलगी जनानखान्यांत दाखल करणें, लोकांना सक्तीनें मुसलमान करणें वगैरे प्रकारहि हा करी. युद्ध करण्यांतहि हा लांबच्या दौडी करणें, रात्री अचानक छापा घालणें वगैरे प्रकार करी. त्यामुळें उत्पाती स्वभावाचा म्हणून याची प्रसिद्धी होती.

यामुळें कॉर्नवालीसनें निजाम व मराठे यांच्याशीं स्नेह वाढविला. तेव्हां यानें त्रावणकोरच्या तटबंदीवर हल्ला केला. त्यांत याला यश आलें नाहीं, पण त्यामुळें वरील तिघांची जूट अपरिहार्य झाली. लढाईस सुरुवात होऊन मेडोजनें बहुतेक मलबार घेतला आणि कॉर्नवालीस सेनापति झाला ( स. १७९१ ). निजाम आणि मराठे ( भाऊ व फडके ) ठाणीं घेत त्यास येऊन मिळाले व श्रीरंगपट्टणकडे कूच झालें, पण युद्धाला जोर लागलेला पाहून यानें तह केला ( २३ फेब्रु. १७९२ ); व दोस्तहि पदरांत पडलेला फायदा वांटून घेऊन परत फिरले.

पण यानें प्रयत्न सोडला नव्हता. नेपोलियनच्या मनांत हिंदुस्थानावर स्वारी करण्याचें आलें होतें; पण त्याला इकडची माहिती चांगली नव्हती. टिपूनें या बाबतींत त्याला पत्रें पाठविलीं होतीं व मदत देण्याचेंहि कबूल केलें होतें ( स. १७९८ ). तसेंच यानें इराण, तुर्कस्थान वगैरे देशांतहि वकील पाठवून आपणास अनुकूल राजकारण करण्याचा अयशस्वी प्रयत्न केला.

मात्र फ्रेंचांशीं टिपूनें दोस्तीचा तह करून व त्यांचीं पलटणें चाकरीस ठेवून इंग्रजांना हाकलून लावण्याचा उद्योग आरंभिला ( जून १७९८ ). तेंव्हां वेलस्लीनें याबद्दल खुलासा मागितला असतां टिपूनें त्याला धुडकावून लाविलें, त्यामुळें वेलस्लीनें टिपूशीं युद्ध पुकारलें ( २२ फेब्रु. १७९९ ); व इंग्रज सैन्यानें टिपूच्या सैन्याचा एक दोन ठिकाणीं पराभव केला. नंतर इंग्रजी सैन्यानें श्रीरंगपट्टणावर दौड करून त्यास वेढा घातला. वेढा उठविण्यासाठीं टिपू शेवटपर्यंत मोठ्या शौर्यानें लढला. अखेर पट्टणाच्या वेशींत इंग्रजांना अडवीत असतां डोकींत गोळा लागून ठार झाला ( ४ मे १७९९ ). तेथील प्रेतांच्या खचांतून याचें प्रेत ओळखून काढून तें हैदरच्या कबरस्थानाजवळच लालबागेंत दुसऱ्या दिवशीं पुरण्यांत आलें. त्या वेळीं इंग्रजांनीं याला योग्य राजकीय मान दिला.

टिपूच्या मरणसमयीं याचें राज्य ३०,४०,००० होनांचें ( १ कोटि ६ लक्ष रुपये ) होतें. तें इंग्रज, मराठे व निजाम यांनीं आपसांत वांटून घेतलें व थोडेंसें म्हैसूरच्या पूर्वीच्या राजाच्या चामराज नांवाच्या वंशजाच्या स्वाधीन केलें. पट्टण घेतल्यावर इंग्रजांनीं टिपूच्या कुटुंबास आपल्या ताब्यांत घेऊन त्याच्या खर्चास २,४०,००० होनांचा मुलूख लावून दिला व त्यांना वेलोर येथें ठेवण्यांत आलें. पुढें वेलोर येथील शिपायांनीं इंग्रजांविरुद्ध बंड केलें ( १० जुलै १८०६ ) त्यांत टिपूच्या मुलांचा हात असावा असें ठरवून इंग्रजांनीं त्यांची जहागीर जप्त केली आणि त्यांना कलकत्ता येथें नेऊन ठेविलें. विल्सन म्हणतो कीं, मुलें दंग्यांत सामील असल्याबद्दलचा पुरावा मुळींच मिळत नाहीं.

टिपूनें १७ वर्षें कारभार केला. याचा स्वभाव चंचल, लोभी, अविश्वासी, क्रूर व धर्मवेडा असा होता. बापानें तर याला वेडा ठरविलें होतें. याची हिंदु प्रजा यास कंटाळली होती. कारण यानें पुष्कळ हिंदूंस हालहाल करून

बाटविलें व जे बाटेनात त्यांना ठार केलें. एक नवीन धर्म स्थापन करून आपण त्याचा पैगंबर व्हावें अशी याची मनीषा होती. यानें नवीन कालगणना ( वर्षाच्या महि-न्यांचीं नांवें व आठवडा वगैरे ) सुरू केली; त्याचप्रमाणें मापें, वजनें व नाणींहि नवीनच पाडलीं. हा स्वतःस फार शहाणा समजे. मात्र यानें आपला राज्यकारभार शिस्तवार चालविला व लष्करी आणि मुलकी सुधारणाहि केल्या. हा आपले हुकूम स्वतः लिहून काढी. फार्सी, कानडी व ऊर्दू या भाषा याला चांगल्याच अवगत होत्या. हा धर्मवेडा होता तरी पण संकटसमयीं ब्राह्मणांना अनुष्ठानें बसविण्यास व देवाची प्रार्थना करण्यास सांगे. हा आपल्या कैद्यांना फार क्रूरपणें वागवी. कलाकौशल्याचा व वाङ्मयाचा हा शोकी होता. यानें आपल्या राजवाड्यांत फार मोठा ग्रंथसंग्रह जमविला होता. त्यांत १० व्या शतकापासूनचे बरेचसे संस्कृत हस्तलिखित ग्रंथ होते. तसेंच कुराणाचीं भाषांतरें, मोंगल इतिहासाच्या बखरी, हिंदुस्थानच्या इतिहासाच्या तवारीखा वगैरे ग्रंथहि होते. हा सर्व संग्रह कलकत्ता येथें नेऊन ठेवला असून त्याची यादी कॅप्टन स्टुअर्ट यानें केलेली छापली आहे. टिपूनें स्वतः दोन ग्रंथ तयार केले होते. त्यांत पत्रांचाच भरणा पुष्कळ आहे. एकाचें नांव फर्मान–बनाम–अलीराज असून दुसऱ्यास फतह–उल्–मजाहिदीन म्हणतात. पैकीं दुसऱ्या ग्रंथाचा कांहीं भाग भाषांतरित करून मि० स्क्रिप्स यानें छापिला आहे. टिपूचें खरें नांव फत्तेअलीखान असून याला बारा मुलें झालीं होतीं. त्यांपैकीं मुहंमद सुलतान ( गुलाम महमूद ) स. १८७७ त मरण पावला व मुहम्मद यासीन सुलतान हा सन १८४९ मध्यें मेला. बाकीचीं लहान-पणींच वारलीं.

यानें स. १७८६ मध्यें आपणास 'पादशहा' असें पद धारण करून आपल्या म्हैसूरच्या राज्यास 'खुदादाद सरकार' असें नांव ठेविलें; आणि प्रांताप्रांतांचीं नांवें बदलून यानें स्वतःचें निराळें पंचांग केलें. एवढेंच नव्हे, तर यानें प्रत्येक मशिदीमध्यें मोंगल पादशाहाच्या नांवाचा खुतबा पढण्याची चाल होती ती मोडून, आपल्या नांवानें खुतबा पढण्याची चाल सुरू केली. टिपूचें सिंहासन फार मौल्यवान् व शोभिवंत होतें. तें अष्टकोनाकृति असून आठहि बाजूंस वाघांचीं तोंडें बसविलेलें व वाघाप्रमाणें पाय असलेलें होतें. तें सर्व सोन्याचें असून वाघाचे दांत व डोळे रत्नांचे होते. टिपूस वाघ हें जनावर फार आवडे व तेंच याचें राजचिन्ह असे. "विजयी पुरुष हा ईश्वराचा वाघ आहे," असें वाक्य याच्या सर्व वस्तूंवर वाघाच्या तोंडासह कोरलेलें असे. समारंभपूर्वक हा या सिंहासनावर बसला नाहीं असें म्हणतात. लढाईनंतर हें सिंहासन व पुढें दिलेल्या वस्तु विलायतेस ई. इं. कंपनीच्या अजबखान्यांत ठेविल्या. या सिंहासनावर मोत्याच्या झालरी, छत व त्यावर एक रत्नजडित हुम्मा पक्षी होता. तो खबुतराएवढा असून त्याच्या छातींत राजकीय शिक्का व कुराणांतील दोन वाक्यें कोरलेलीं आहेत. टिपूची रत्नजडित तलवारहि हल्लीं विंडसर कॅसल-मध्येंच आहे. तिच्या मुठीवर वाघाचीं तोंडें असून तिच्या पात्यावर दोहोंकडे कुराणांतील वाक्यें कोरलेलीं आहेत. याशिवाय टिपूची बंदुक, शिरस्त्राण, निशाण वगैरे वस्तूहि वरील अजबखान्यांत आहेत. पट्टण येथील टिपूच्या कबरस्थानास पुढें डलहौसीनें हस्तिदंताची नकशी काढलेले शिसवी दरवाजे नजर केले. लालबाग व किल्ला यांच्या दरम्यान कावेरीतीरीं टिपूचा राजवाडा दर्यादौलतबाग नांवाचा आहे. येथें कांहीं दिवस वेलस्ली राहिला होता. हा संगमरवरी महाल फार सुंदर असून त्याच्या भिंतीवर नक्षी कोरलेली आहे. पूर्वी या नक्षींत सोनें भरलेलें होतें. भिंतीवर रंगीत चित्रें असून तीं बहुधा टिपूनें केलेल्या इंग्रजांच्या पराभवाचीं निदर्शक आहेत. त्यांतल्या त्यांत बेली हा टिपूला ससैन्य शरण आल्याचें चित्र उत्कृष्ट आहे. त्याची डागडुजी दोन वेळ झाली आहे.

टिपूकडील मराठ्यांच्या एका जासुदाचे बातमीपत्रांत खालील उल्लेख केला आहे—

टिपू खासा फौजेंत आहे. मी आपले दृष्टीनें चाळीस पन्नास हाताचे तफावतीनें पाहिला. रंग गोरा मध्यम आहे. निळ्या घोड्यावर बसला होता. पागोटें चक्रिदार छिटी व अंगरखा पिवळा ताप्त्या व जुबा मोठ्या पटीचे मश्रूचा व पिवळी शालजोडी. येणें प्रमाणें पोशाख होता. मिशा मध्यम गालांवर. कानाला केंसाच्या. येणें प्रमाणें पाहिला ( इ. सं. ३ पृ. ५० ).

**टेकचंद मुनशी**—एक फार्सी कवि. याचें कवितें-तील नांव बहार. हा जातीनें खत्री होता. यानें 'बहार-अजम' आणि 'नवादीर-उल-मसादीर' हे दोन ग्रंथ लिहिले. पहिला फार्सी भाषेंतील म्हणीचा कोश आहे. तो यानें स. १७३९ मध्यें लिहिला.

**टेरी**—( स. १६१५–१८ ) एक प्रॉटेस्टंट इंग्रजी पाद्री. हा सर टामस रो याच्या वकिलातीबरोबर हिंदु-स्थानांत होता. हिंदुस्थानांत विविध प्रकारचे भोज्य पदार्थ अत्यंत स्वस्त व विपुल आहेत हें पाहून या सशक्त व भोजनभाऊ गृहस्थास फारच आश्चर्य वाटलें.

**टेलर**—मुंबईकर इंग्रजांचा एक सेनापति.

# ठ

**ठकाबाई गुजर**—ही दुसऱ्या रघूजी भोसल्यांची बहीण होय. ही नागपुरास नवलोजी गुजर यांस दिली होती. हिचा मुलगा गुजाबादादा गुजर हा मोठा कर्तबगार निघाला ( ना. प्रां. इ. पृ. ३९५ ).

**ठाकुरदासबुवा**—( मृत्यु स. १८३० ) साधु व मराठी कवि. कनोजी ब्राह्मण. नांव बालाप्रसाद. पिता नीळकंठ. उपनांव त्रिवेदी. गोत्र काश्यप. गांव-भागीरथीच्या कांठीं गुसाईजीचें शिवराजपूर. पंढरपुरास कीर्तन ऐकून बापू गोखले यांचा शिष्य बनला व यांना साताऱ्याकडील तारगांवची मोकासपणाची वृत्ति पेशव्यांकडून देवविली. यांना पहिल्या बायकोपासून एकनाथ व जगन्नाथ, दुसऱ्या बायकोपासून कृष्णनाथ व रामनाथ असे पुत्र झाले. यांचे ग्रंथ-सहजबोध, भगवद्गीतेवर अभंग, भागवत-द्वितीयस्कंधावर ओवीबद्ध टीका, शंकराचार्यकृत सप्तश्लोकीवर अभंग, यांशिवाय किरकोळ पदें व अभंग पुष्कळ आहेत. हे तारगांवीं राहत. मातृभाषा हिंदी ( म. क. च. भा. ६ पृ. २१३-२२ ).

**ठाकोरसिंग**—जनरल गार्डर्ड यानें पुण्यास पाठविलेला बातमीदार. याला पुण्याचा कोतवाल घाशीराम यानें पकडल्यामुळें याच्याकडून अहमदाबादेकडे इंग्रज व दादासाहेब यांची पुण्यावर स्वारी करण्याची कशी तयारी चालली आहे व त्यांत हैदरनाईक वगैरे कशी मदत करीत आहेत हें कळून आलें ( इतिहाससंग्रह ३. ३, ऐतिहासिक टिपणें पा. ३ ).

# ड

**डलहौसी, लॉर्ड**—( स. १८१२-१८६० ) इंग्लंडांतील एक मुत्सद्दी व हिंदुस्थानचा एक ग. जनरल. यानें इंग्रजांचें राज्य हिंदुस्थानांत अढळ केलें. संस्थानें खालसा करणें, आगगाडी व तारायंत्र सुरू करणें वगैरे गोष्टी यानें केल्या.

**डल्लण**—सुश्रुतसंहितेवरील अकराव्या शतकांतील एक टीकाकार. याचा पिता भरत.

**डंबरसिंह परमार**—हा माळव्याच्या परमारांपैकीं कृष्णराजाचा पुत्र. याचा थोरला भाऊ वैरिसिंह गादीवर बसला. याला बांसवाडा राज्यांतील बागड इलाखा जहागीर होता.

**डाक**—( स. ५००-६०० सुमार ) बंगाली कवि. याचा जन्म आसामच्या बावसी परगण्यांत झाला. गांवाचें नांव लोह. या नांवाची कोणी व्यक्ति होती किंवा नाहीं याबद्दल संशय आहे. डाक म्हणजे कविता करणारा असा अर्थ असेल. आसाम, बंगाल व ओरिसा यांमध्यें याचीं वचनें फार प्रसिद्ध आहे. भाषा अपभ्रंशासारखी आहे ( क. कौ. ७ ).

**डॉन डा आल्मिडो**—हा पोर्तुगीजांचा गोव्याचा गव्हर्नर होय. स. १४९७ त पोर्तुगीज लोक व्यापाराच्या उद्देशानें हिंदुस्थानांत कालिकोट येथें वास्को डि गामा या सरदाराच्या बरोबर आले. गोवें येथील गव्हर्नर डॉन डा आल्मिडो याचा मुलगा लोरेन्झो आल्मिडो यानें दीव येथें गुर्जर नृपतीच्या सत्तेचा नाश केला. स. १५२७ मध्यें वांद्रें येथें हल्ला केला व मुसलमान अधिकाऱ्याचा नाश केला. स. १५२९ मध्यें उत्तर कोंकणांतील प्रसिद्ध ठिकाणें ठाणें, वांद्रा, करंजा व साष्टी हीं पोर्तुगीजांनीं घेतलीं. स. १५३३ मध्यें गुजराथच्या बहादुरशाहापासून वसई घेतली. तारापूर हस्तगत केलें. स. १५३३ मध्यें साष्टी व वसई प्रांत हस्तगत झाल्यावर त्यांनीं वसई, असेरी, तारापुर, माहीम, दवण व चौल येथें विशेष मजबूत किल्ले बांधले. स. १५५६ मध्यें अशेरी व मनोर घेऊन दमण व तारापूर यांमधील सुपीक प्रांत बळकावला. वसईचा किल्ला सोळाव्या शतकाच्या अखेरीस त्यांनीं बांधला.

**डायोनीसियस**—हा फिलाडैलफस टाल्मी या नांवाच्या इजिप्त( मिस्र )च्या राजाचा हिंदुस्थानांतील बिंदुसार मौर्याच्या दरबारांतील वकील होता. फिलाडैलफस टाल्मीचा राज्यकाल ख्रि. पू. २८५-२८७ पर्यंत आहे. यानें हिंदुस्थानांत असतां हिंदुस्थानविषयक वर्णन लिहिलें होतें व तें स. ऱ्या पहिल्या शतकापर्यंत उपलब्ध होतें. प्लिनीनें आपल्या लेखांत त्यांतील उतारे घेतले आहेत, पण सध्यां तें उपलब्ध नाहीं.

**डुप्ले**--( स.१६९७-१७५४ ) ह्याचा जन्म१६९७त झाला. त्याचा बाप जकातदार होता. पुढें ईस्ट इंडिया कंपनीच्या तंबाखूच्या व्यापाराचा मक्तेदार बनला. हा १८ व्या वर्षी हिंदुस्थानांत येऊन गेला. याला पुढें पाँडेचरीच्या कौन्सिलांत वरिष्ठ अधिकाऱ्याची जागा मिळाली. हिंदुस्थानांतील देशी राजकारणाचा अभ्यास करण्यांत यानें बराच वेळ घालविला. फ्रेंचांचा बंगालमधील व्यापार मंदावला होता. त्याकरितां यास चंद्रनगरच्या वखारीवर नेमलें. यानें व्यापार वाढवून पाटणा व कासिमबाजार येथें वखारी उघडल्या. स्वतः खाजगी व्यापार करून बराच पैसा मिळविला. याची राहणी साधी होती. यानें लांच देऊन पदवी मिळविण्याची खटपट केली, पण ती व्यर्थ गेली. पुढें याला गव्हर्नर नेमिलें. हा पाँडेचरीचा गव्हर्नर स. १७४२ ते १७५४ पर्यंत होता. चंदासाहेबानें पाँडेचरीच्या आसपासचीं ८० गांवें फ्रेंचांना देऊन खास डुप्ले यास जहागीर दिली. अंबूरच्या लढाईंत डुप्लेचा विजय झाला. त्यामुळें इंग्रजांचें धाबें दणाणलें. डुप्लेला हिंदुस्थानांत फ्रेंच राज्य स्थापण्याची कल्पना परत देशीं जाण्यापूर्वी दोन महिने सुचली. यानें इंग्रजांवर १७५४ त शेवटचा विजय मिळविला ( म. रि. म. वि. २ पृ. ३६० ).

**डेमेट्रियस**—( ख्रि. पू. २००-१९० ) हा ग्रीक राजांपैकीं यूथिडीमासाचा पुत्र. यानें ख्रि. पू. २०० मध्यें हिंदुस्थानावर स्वारी केली. त्या वेळीं हिंदुस्थानांत देववर्मा मौर्य पाटलीपुत्र येथें राज्य करीत होता. देववर्म्याचा पुत्र शतधनुषच्या वेळीं याचें राज्य हिंदुस्थानांत चांगलें विस्तृत असून स्थिर झालें होतें. हा अत्यंत प्रतापी राजा होता. यानें अफगाणिस्थानांत व हिंदुस्थानांत आपल्या नांवाचीं अनेक नगरें स्थापन केलीं. जुन्या अर्कोशिया प्रांतांत डेमेट्रियस पोलिस नांवाचें एक शहर होतें ( राय चौधरीकृत पोलिटिकल हिस्टरी ऑफ एन्शन्ट इंडिया, पा. २०५). पतंजलिभाष्यांत लिहिलें आहे कीं, सौवीर देशांत दात्तामित्रि नांवाचें शहर होतें. दात्तामित्रि हें नांव याच्या नांवावरून पडलें असावें. पतंजलि हा पुष्यमित्र शुंगाचा समकालीन होता. याचा हिंदुस्थानांतील विजय शतधनुष मौर्याच्या वेळीं झालेला दिसतो.

हा बॅक्ट्रियाचा राजा होता. बॅक्ट्रिया म्हणजे सध्यांचा बाल्ख. यानें अफगाणिस्थान व पंजाबवर ख्रि. पू. १९० चे सुमारास राज्य मिळवलें.

**डेंगिपा**--हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं एकतिसावा सिद्ध होय. हा जातीनें ब्राह्मण असून उडीसा प्रांतांत राहणारा होय. लुहिपाचा हा शिष्य होय.

**डोम लुईज डा ऑटेड**—( स. १५४२-७० सुमार ) हा गोव्याचा पोर्तुगीज गव्हर्नर. यानें गिरसप्पाच्या भैरदेवीवर स्वारी करून होनावर शहर उध्वस्त केलें ( स. १५६९ ). यानें टोलर व गंगोली देशच्या राजांचा पराभव करून त्यांना अधिक खंडणी देण्यास भाग पाडलें.

**डोम डयुअर्ट डा मेनिझीस**—(स. १५८४ पर्यंत) डोम लुईज नंतर हा गोव्याचा गव्हर्नर झाला. यानें सांगुइसरच्या नाइकाकडून गेलेला मुलूख परत मिळवला ( स. १५८४ ).

**डोम्भिपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं चौथा सिद्ध. देश मगध. जात क्षत्रिय. वीणापा व विरूपा हे दोघेहि याचे गुरु. कर्णरपा याचा शिष्य. याचे तंजूरमध्यें २१ ग्रंथ सांपडतात. त्यांत कांहीं हिंदी आहेत.

**डयुड्रनेक**—( स. १७७४-१८०३ ) फ्रेंच लष्करी अंमलदार. हा शिंदे होळकर यांच्याकडे वरील कालांत होता. शेवटीं इंग्रजांस मिळाला.

---

## ढ

---

**ढुंढिराज**—( स. १५२५ सुमार ) पार्थपूर-( दौलताबाद )चा ज्योतिषी. पिता–नृसिंह. याचे ग्रंथ–सुधारसटीका, ग्रहलाघवोदाहरण, ग्रहफलोत्पत्ति, पंचांगफल, कुंडकल्पना. जातकाभरण कर्ता व हा एकच असावा ( भा. ज्यो. २७३-७४ ).

# त

**तघी चांभार**—( स. १३४७–१३५० ) हा गुजराथेंतील एक चांभार. यानें स. १३४७ चे सुमारास अनेक बंडखोर लोक वश करून बंडखोरांचा एक संघ स्थापन केला. या साहसी व चतुर गृहस्थानें मुहम्मद तुघ्लकाला अगदीं जेरीस आणलें. यानें गुजराथच्या पूर्वेकडील डोंगरी मुलखांतील राजेरजवाड्यांच्या साहाय्यानें पाटणवर स्वारी केली. पाटण जिंकल्यावर खंबायत लुटलें आणि यानें भडोचला वेढा दिला. मुहम्मद तुघ्लक भडोचकडे निघाला तेव्हां हा खंबायतकडे वळला. पाठीवर येणाऱ्या मुहंमद युसफ बुघ्रा या बादशाही सरदाराचा सहज पराभव केला आणि मुहंमद तुघ्लकाच्या सैन्यावर हल्ला चढविला. मुहंमद अगदीं जेरीस आला. याला शेवटीं ज़ामचा आश्रय मिळाला आणि तिकडे जात असतां मुहंमद तुघ्लक तट्टा शहराच्या अलीकडे तीस मैलांवर मृत्यु पावला (स. १३५१ मार्च २० ) आणि पुढें हाहि लवकरच मरण पावला.

**तरुण वाचस्पति**—दंडीच्या काव्यादर्शावरील एक जुना टीकाकार.

**तहमास्प आदिलशाहा**—इब्राहीम आदिलशाहाचा मुलगा ( १ अली आदिलशाह पाहा ).

**तळुवलदेवी**—आहवादित्य वीर गुत्ताची मुलगी.

**तंगुखान**—( अमीर उमर पाहा ).

**तंमय मंत्री**—हा विजयनगरच्या आरविडु घराण्यांतील श्रीरंग राजाचा मंत्री. श्रीरंग राजानंतर हा वेंकटपतिदेवरायाचा मंत्री झाला.

**तंतिपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं तेरावा सिद्ध. हा ब्राह्मण होता. हा उज्जयनीस राहत असे. त्या वेळीं महीपाल नांवाचा राजा होता ( स. ९७४–१०२६ ). हा जालंधराचा शिष्य. याच्या फक्त कांहीं कविता उपलब्ध आहेत.

**तंधेपा**—यालाच तंतेपा म्हणत. हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं तेहेतिसावा सिद्ध. जात शूद्र. कौशांबीला राहत असे.

**ताई तेलीण**—ही एका तेल्याची बायको. पण प्रतिनिधि घराण्यांतील परशुराम श्रीनिवास यांजपाशीं राख राहिली. पुढें गोखल्यानें प्रतिनिधीस कैद करून मसूर येथें ठेवलें. तेव्हां हिनें मसूरवर हल्ला करून प्रतिनिधीस मुक्त केलें. त्यास पुन्हां पुणें येथें कैदेंत टाकलें. पुढें मराठ्यांनीं त्याचे सर्व किल्ले घेतले. वासोट्याचा किल्ला ताई तेलीण हिनें ८ महिने झुंजविला. धान्याच्या कोठारास आग लागल्यामुळें हिला शत्रूस शरण जाणें भाग पडलें. त्या वेळीं बापू गोखले हा हिच्या विरुद्ध पक्षाचा सेनापति होता. हिचें खरें नांव रमा. हिच्यासंबंधीं पुढील आर्या प्रसिद्ध आहेः

श्रीमंत पंतप्रतिनिधी यांचा किल्ला आजिंक्य वासोटा।
तेलिण मारिल सोटा बापू गोखल्या संभाळ कासोटा॥

**ताईबाई कोल्हटकर**—ही भास्करराम कोल्हटकराची बायको. भास्करपंत बंगालमध्यें ज्या वेळेस मारला गेला त्या वेळेस ही त्याचेजवळ होती. ही त्या गडबडींत पळून कांहीं लोक बरोबर घेऊन काशीस गेली. एका पठाणाच्या बायकोनें हिला डोलींत घालून काशीस पोंचविलें, अशीहि आख्यायिका आहे. ही त्या वेळीं गरोदर होती. हिला काशीसच एक पुत्र झाला. म्हणून त्याचें नांव काशिराव असें ठेवलें. तो पुढें मोठा होऊन प्रसिद्धीस आला ( ना. प्रां. इ. पृ. ९६ ).

भास्करपंताचे मृत्यूनंतर रघुजी भोसल्यानें ताईबाईच्या नांवानें वऱ्हाडच्या सुभ्याचा कारभार करून दिला व हिच्यातर्फे कृष्णाजी गोविंद यास कारभारी नेमिलें.

**ताउफांग**—एक चिनी प्रवासी. हा पिंगचाल येथें राहणारा होता. हा चीनमधून नेपाळांत व तेथून भारतवर्षांत आला. येथें अनेक तीर्थक्षेत्रांत हिंडून हा त्याच मार्गानें परत गेला.

**ताजखान करराणी**—( स. १५६४–७२ ) बंगालचा सुभेदार.

**ताजखान रोहिला**—हा एक सरदार होय. स. १७७५ मध्यें हरिपंतानें इसफावर सैन्य रवाना केलें. पण मराठी सैन्याशीं लढण्याची आपली ताकद नाहीं असें वाटून इसफ गढेमंडळाकडे पळून गेला, आणि तेथून माघारा शिवणीकडे येत असतां वाटेंत ताजखान व इसफ यांची गांठ पडली. इसफानें घोड्यावरून उडी टाकून, 'आतां माझी अब्रू वांचीव,' म्हणून ताजखानाचे पाय धरले. तेव्हां त्यास कैद करून ताजखानानें मुधोजीस लिहून पाठविलें ( म. रि. उत्तर वि. १ ला, पृ. २०–२१ ).

यानें इसफ यास कैद करण्यास मदत केल्यामुळें नाना फडणीसानें याला एक हजार रुपयांचा गांव ता. २१. ५. १७७६ रोजीं इनाम दिला ( स. मा. रो. १. ७१ ).

**ताजमहल**—अबुल हसन कुत्बशाहाची पट्टराणी.

**ताजुल्मुल्क**—गुजराथच्या पहिल्या सुलतान अहमदशहाच्या पदरीं हा एक धर्माधिकारी होता.

स. १४१४ मध्यें याच्याकडे हिंदूंच्या देवालयांचा व मूर्तींचा दरोबस्त नाश करण्याचें काम सोंपविलें होतें.

**तात**—मंदोरच्या प्रतिहारवंशापैकीं नागभटाचा ज्येष्ठ पुत्र. यानें जीवित अशाश्वत आहे, असें जाणून आपलें राज्य आपला धाकटा भाऊ भोज यास दिलें व आपण मांडव्याश्रमांत धर्माचरण करीत राहिला.

**तातय्या**—व्यंकटगिरीचा कुमार तातय्या यानें 'पारिजात' नांवाचें संस्कृत नाटक लिहिलें आहे, हें नाटक सत्यभामाविषयक असून त्यांत पांच अंक आहेत.

**ताताचार्य**—या कवीचा जन्म कांची येथें झाला. याचा उदय १५ व्या शतकांत झाला. 'सात्विकब्रह्मविद्याविलास' यानें केलेला आहे. याची बायको पतिव्रता असून याच्या मरणाच्या खोट्या वार्तेनें ती मृत्यु पावली. पुढें ताताचार्यहि मरण पावले.

२. ( स.१६३०नंतर ) विजयनगरच्या दुसऱ्या वेंकटदेवराय आरविदूचा मंत्री व गुरु. पिता-श्रीनिवास. यानें 'पंचमतभंजन' नांवाचा ग्रंथ केला आहे.

**तातार**—सिंधुनदीवरील नीलबप्रांतांतील गुरुवर लोकांचा पुढारी. हा बाबरचा समकालीन होता. याचा चुलतभाऊ हाती. हातीनें याला ठार करून याचें राज्य घेतलें.

**तातारखान**—( स. १३९६ सुमार ) गुजराथच्या पहिल्या मुज्फरशाहाचा पुत्र.

हा पराक्रमी होता. यानें राज्यवृद्धि करण्याच्या कामीं आपल्या बापास पुष्कळ कुमक केली. एकदां तर ह्या बापलेकांचें पटेनासें होऊन यानें बापास कैद करून स्वतः राज्य बळकाविलें. पण हा लवकरच मरण पावला आणि मुज्फरशाहा पुनः कारभार करूं लागला. याला अहमद नांवाचा एक मुलगा होता.

२. ( स. १२६१-१२७५ ) बंगालचा सुभेदार. याला मुहम्मद तातारखान म्हणत.

३. तुघ्लकशाहाचा दत्तक पुत्र. मुहमदशाह तुघ्लकाचा प्रधान. हा तफ्सीर-इ-तातारखानी नामक कुराणावरील टीकेचा कर्ता असून फतावी-इ-तातारखानी नांवाचा ग्रंथ यानें रचला.

**तात्या जोग आळेकर**—हा यशवंतराव होळकराचा कारभारी होता. यास मैनाबाईनें ( यशवंतरावाच्या बायकोनें ) स. १८१५ त दौलतराव सिंद्यांचे भेटीस पाठविलें, आणि चढावाचा व बचावाचा असा गुप्त तह घडवून आणिला. पुढें मैनाबाई व हा यांच्या हातांतील कारभार तुळसाबाई व बाळारामशेट यांनीं हिसकून घेतला ( म. रि. उ. वि. ३ पृ० ३९५ ).

**तानकांग**—एक चिनी प्रवासी. हा आराकानपर्यंत आला. पुढें काय झालें याचा पत्ता नाहीं.

**तानतरंग**—तानसेनाचा मुलगा.

**तानपाठक**—एक साधु. यानें जालनापूरच्या स्वारींत शिवाजीला आशीर्वाद दिला. तेव्हां शिवाजीनें यास एक गांव इनाम दिलें (स. १६७९ ).

**तानसेन**—( स. १५६० सुमार ) हा जातीचा गौड ब्राह्मण. याच्या बापाचें नांव मकरंद पांडे. हा ग्वालेरचा राहणारा. याच्या बापानें प्रसिद्ध अवलिया मुहम्मद घोषास पुत्र होण्यासाठीं नवस केला होता; व त्याच्या कृपाप्रसादानें हा झाला. याचें पूर्वीचें नांव तन्नामित्र असें होतें. ह्याची अनुकरण करण्याची शक्ति फार विलक्षण होती. हा कोणत्याहि प्राण्याचा आवाज हुबेहूब काढीत असे. एकदां हरिदास बाबा नांवाचे साधु याचे बागेंत आले असतां, ह्याची अनुकरण करण्याची शक्ति पाहून, त्यानें याच्या बापाजवळ याची मागणी केली व त्यांनीं सांगितलें कीं, 'मी याला उत्तम गाणें शिकवीन.' तेव्हां याचे बापानें यास त्यांचेजवळ दिलें. पुढें हा हरिदास बाबाजवळ पूर्ण गायनकला शिकला व परत ग्वालेरास आला.

पुढें याची कीर्ति अकबर बादशहास समजली, तेव्हां त्यानें यास आपल्या दरबारीं आणून, यास नवरत्नांत बसविलें व याचा अतिशय गौरव केला.

यानें अनेक रागांत अनेक ध्रुपदें व नवीन रागहि रचिले आहेत. यानें कांहीं ध्रुपदांत आपल्या आश्रयदात्या अकबराचें नांव घातलें आहे. हा वयाच्या ६३ व्या वर्षीं मरण पावला. मियाचा मल्हार, मियाची तोडी, मियाचा सारंग इत्यादि राग यानें शोधलेले होत.

एकदां हा व अकबर बादशहा यांच्या गुरूचें गाणें ऐकावयास गेले असतां, अकबरानें यांस विचारलें कीं, 'तुझ्या व तुझ्या गुरूच्या गाण्यांत फरक कां ?' तेव्हां यानें उत्तर दिले कीं, 'बाबा हे आपल्या लहरीप्रमाणें गातात, पण मला मात्र आपल्या आज्ञेप्रमाणें गावें लागतें.'

**तानाजी मालुसरे**—( मृत्यु स. ४-२-१६७० ) हा जातीनें मराठा असून शिवाजीचा परम विश्वासू बाळमित्र होता. उमराठें हें याचें राहण्याचें गांव. लहानपणापासून शिवाजीबरोबर हा अनेक संकटांच्या प्रसंगांत होता. तानाजी हा १२ हजार पायदळाचा सुभेदार होता. जिजाईच्या मनांत कोंडाणा घेण्याचें होतें. त्यासाठीं

शिवाजीनें यास पाठविलें. तेथील सुभेदार उदेभानू हा फार शूर होता. तरी यानें दरवाजावरील लोकांस फितूर केलें. मागें एक सरळ कडा होता त्या बाजूनें घोरपड लावून बरेच लोक चढले. या लढाईंत हा मेला. एक हात मोडला असतांना यानें उदयभानूस मारलें. आपल्या मुलाचें रायबाचें लग्न टाकून हा कोंडाणा घेण्यासाठीं गेला, यावरून याची स्वामिनिष्ठा दिसून येते.

**तानाशाह**--( अबुल हसन पाहा ).

**तानीबीबी**—पहिल्या इब्राहीम आदिलशाहाची मुलगी व आली बरीदची पत्नी.

**तापीदास तवाहीदास**--फ्रेंच कप्तानाच्या हाताखालील दलाल. पेठ रायबागचा राहणारा. यानें फ्रेंचांच्या तर्फे शिवाजीकडे व्यापारास सवलती मागितल्या होत्या, त्यावरून शिवाजीनें सौदागरी करून सर्फराज ( श्रीमंत ) होणें, म्हणून दाभोळ बंदरींहि व्यापार करण्यास यास परवानगी दिली. सुरत व राजापूर येथें फ्रेंचांच्या वखारी होत्याच ( रा. खं. ८. ८ ).

**तावाँ**—एक ऊर्दू कवि. हा मजहूरचा समकालीन होता. याचा दीवान प्रसिद्ध आहे ( क. कौ. ४ ).

**तारादेवी**— ही टोडाच्या सुरताण सोलंकीची कन्या. सुरताणचें राज्य लल्लाखा पठाणानें घेतल्यावर तो चितोडच्या रायमल्लाकडे आश्रयास येऊन राहिला. रायमल्लाचा पुत्र जयमल्ल यानें हिला मागणी घातली. पण त्या बाबतींत विरोध होईल असें वाटल्यावरून त्यानें चितोडचा आश्रय सोडून तो रातोरात परत जाऊं लागला. जयमल्लानें पाठलाग केला व हातघाईवर प्रकरण येऊन त्यांत जयमल्ल मारला गेला. पुढें हिचें लग्न जयमल्लाचा धाकटा भाऊ पृथ्वीराज याच्याशीं झालें. शेवटीं त्याच्याबरोबर ही सती गेली.

**तारानाथ**—हा तिबेटी लामा होता. यानें स. १६०८ मध्यें हिंदुस्थानांतील बुद्धधर्माचा इतिहास लिहिला आहे. त्यांत अनेक महत्त्वाच्या गोष्टींचा निर्देश सांपडतो. वारेन्द्राधिपति देवपाल व धर्मपाल यांचे वेळीं धीमन् व त्याचा मुलगा बिठपाल हे उत्तम शिल्पकलाभिज्ञ, चित्रकार व ओतारी असल्याची माहिती यानें दिली आहे ( हि. क्रा. १.७३ ).

**तारापीड कर्कोटक**—( स. ६९०-९९ ) हा चंद्रापीड कर्कोटकानंतर गादीवर आला.

**ताराबाई भोसले**—( जन्म स. १६७५-मृत्यु स. १७६१ डिसेंबर ) छत्रपति राजारामाची बायको. हिच्या वडिलांचें नांव हंबीरराव मोहिते असून ही राजारामाची दुसरी बायको होती. हिचें लग्न स. १६८९ च्या सुमारास झालें. हिचें सासरचें नांव सीताबाई होतें, परंतु तें लोपून ताराबाई हेंच नांव प्रख्यात झालें. हिला विशाळगडीं स. १६९१ त शिवाजी या नांवाचा पुत्र झाला. पुढें राजाराम मरण पावला. त्या वेळेस शिवाजी हा दहा वर्षांचा होता. तेव्हां त्याला रामचंद्रपंत अमात्य, शंकराजी नारायण सचीव, धनाजी जाधव सेनापति यांच्या मदतीनें हिनें गादीवर बसवून राज्यसूत्रें आपल्या हातीं घेतलीं व राजसबाई ( सवत ) व तिचा मुलगा संभाजी या दोघांस कैदेंत टाकलें. त्यामुळें गृहकलह वाढला; व त्याचा परिणाम होऊन सरदारांत फाटाफूट झाली.

हिनें परशुराम त्रिंबकास प्रतिनिधी करून त्याच्याकडे सर्व किल्ल्यांच्या बंदोबस्ताचें काम सोंपवून दिलें, व स्वतः कोणत्याहि किल्ल्यांत न राहतां वेळ पडेल त्याप्रमाणें जागा बदलण्याचें ठरविलें. याच वेळीं धनाजी, निंबाळकर, भोंसले, दाभाडे, चव्हाण वगैरे सरदारांनीं मोंगलांच्या मुलुखांत शिरून सर्व ठिकाणांहून चौथाई, सरदेशमुखी व घासदाणा या नांवाखालीं पैसा गोळा करण्याचा क्रम आरंभला ( स. १७०० ).

इकडे शाहूनें हिला कळविलें होतें कीं, मी बादशहापासून निघून स्वदेशीं परत येतोंच. परंतु त्याला न जुमानतां हिनें आपल्या मुलास गादीवर बसविलें व शाहूशीं विरोध सुरू केला. शाहूनें बादशहा मरण पावल्यावर बहादुरशाहाकडून आपली सुटका करून घेतली (स.१७०७). त्या वेळेस शाहूस परसोजी भोसले, हैबतराव निंबाळकर व नेमाजी शिंदे वगैरे सरदार मिळाले. शाहूनें ताराबाईस कळविलें तरीसुद्धां ही आपल्या हातची सत्ता सोडण्यास बिलकुल तयार नव्हती. म्हणूनच ती शाहू हा कोणीतरी तोतया आहे असें म्हणूं लागली; व हिनें रामचंद्रपंत निळोपंत, धनाजी, परशुराम त्रिंबक, आंग्रे यांच्याजवळून स्वामिभक्तीची शपथ घेववून शाहूस तोंड देण्याचें ठरविलें. धनाजी, खंडो बल्लाळ व परशुराम त्रिंबक यांची शाहूवर रवानगी झाली. परंतु शाहूनें खंडो बल्लाळ व धनाजीस आपल्याकडे वळवून घेतलें व पुण्याच्या उत्तरेस बावीस मैलांवर खेडकडूस येथें दोन्ही पक्षांतील चकमकींत पराभव पावून परशुराम त्रिंबक साताऱ्यास गेला ( स. १७०८ ). पुढें धनाजीच्या मदतीनें शाहूनें २।३ किल्ले घेतले. त्यांत साताऱ्यास जाऊन स्वतःस राज्याभिषेक करून घेतला. तेव्हां ताराबाई साताऱ्याहून पन्हाळ्याकडे पळून गेली. परंतु शाहूनें तो पण किल्ला घेतला, म्हणून ही मालवणास पळून

गेली. शाहूनें बरेच किल्ले व मुलूख घेतले, त्यामुळें ताराबाईचा पक्ष निर्माल्यवत् झाला ( स. १७१२ ).

पुढें परत पन्हाळ्याच्या किल्लेदारानें तो किल्ला हिच्या स्वाधीन केला. हिनें वाडीकर सावंताच्या मदतीनें आणखी कांहीं किल्ले परत घेतले. हिनें पन्हाळा व कोल्हापूर हीं दोन राहण्याचीं ठिकाणें कायमचीं केलीं. या वेळीं मात्र हिच्या पक्षानें परत जोर धरला. धनाजी मारला गेला व चंद्रसेन जाधवहि शाहूकडून ताराबाईस येऊन मिळाला. शिवाय थोरात, चव्हाण, निंबाळकर, अमात्य, प्रतिनिधी, पांढरे, आंग्रे ही सर्व मंडळी हिच्या पक्षाकडे होती. परंतु पुढें परत हिची सर्वच बाजू एकदम ढांसळली. कारण, शाहूनें सैन्य जमवून हीस तोंड दिलें व हिच्याकडच्या कांहीं सरदारांना फितवलें. हिचा मुलगा शिवाजी यास तर वेडा ठरविलें. त्यामुळें शाहूचा पक्ष परत बळकटच झाला. इतक्यांत स. १७१२ त हिचा मुलगा दैवानें मरण पावला. त्यामुळें कोल्हापुरास बरीच क्रांति झाली. रामचंद्रपंतानें हिच्या सवतीच्या मुलास–संभाजीस–गादीवर बसवून हिला व हिच्या सुनेला कैदेंत टाकलें.

शाहूला मुलगा नसल्यामुळें पुढें त्यानें दत्तक घेण्याचें ठरविलें. ही बातमी हीस कळली तेव्हां ‘तें दत्तविधान मी होऊं देणार नाहीं’ असें ही म्हणूं लागली; व नंतर शिवाजीचा मुलगा रामराजा हा जिवंत असल्यामुळें त्यासच दत्तक घ्या म्हणून हिनें शाहूस आग्रह केला. तेव्हां शाहूनें तें कबूल केलें. मध्यंतरीं संभाजीचें आणि शाहूचें न पटल्यामुळें शाहूनें त्याच्याशीं लढाई करून त्याचा पराभव केला व सगळ्यांस कैदेंत टाकलें ( स. १७३० ).

रामराजास गादीवर बसवून सुद्धां ज्या वेळेस हिच्याकडे कारभार आला नाहीं तेव्हां हिनें रामराजा हा माझा नातू नव्हेच असें चोहोंकडे पसरविलें. परंतु या कामीं हिला फारसें यश आलें नाहीं.

ही पुढें भलतीं कारस्थानें करूं लागली. रामराजा गादीवर असतांना हिनें कारस्थानांचा तर अगदीं कळसच केला. हिनें त्यास शेवटीं कैद केलें. तो शेवटपर्यंत म्हणजे हिच्या मरणापर्यंत कैदेंतच होता. ही स. १७६१ च्या डिसेंबर महिन्यांत मरण पावली. त्या वेळीं हिचें वय ८६ वर्षांचें होतें. हिच्या चरित्राकडे अद्यापि योग्य दृष्टीनें पाहिलें जात नाहीं. नवऱ्याच्या मागें औरंगजेबाला तोंड देण्याचें कार्य हिनें अधिकच तडफेनें पार पाडलें. मोगली मुलखावर हल्ले चढवून मराठ्यांचा आर्थिक प्रश्न सोडविण्याचें काम हिच्याच कारकीर्दींत सुरू झालें. मराठेशाहींतील अव्वल दर्जाच्या मुत्सद्यांची जूट हिनें शेवटपर्यंत टिकविली होती. आणि पराक्रमांत हिनें केव्हांच हार खाल्ली नाहीं. पण औरंगजेब मेल्यावर शाहूला स्वराज्याची सनद देऊन सोडण्यांत आल्यामुळें चार पिढ्या खर्चीं घालून वाढविलेलें स्वातंत्र्याचें रोपटें दुहीच्या किडीनें जमीनदोस्त झालें. या वेळीं मराठ्यांचें साम्राज्य नष्ट होऊन दिल्लीच्या मांडलिकाचें राज्य सुरू झालें. या दृष्टीनें हिच्या व हिच्या भोंवतालच्या थोर पुरुषांच्या वर्तनाकडे पाहिलें असतां त्यांत हीनतेपेक्षां उज्ज्वलताच परिणामकारक रीतीनें दिसते. शेवटीं हिचें कांहींच चालेना तेव्हां हिनें शाहू व पेशवे यांच्यावर राज्यहिताच्या दृष्टीनें विश्वास दर्शविला होता ( पे. द. ३०. २२७ ). हेंहि ध्यानांत घेण्यासारखें आहे.

**तारिगोप्पुल दत्त मंत्री**—हा मातला अनंत याचा भाऊ व विजयनगरच्या आरविडु घराण्यांतील दुसऱ्या वेंकटपतिदेवरायाचा मंत्री. याचा भाऊ मातला अनंत हाहि वेंकटपतिदेवरायाचा सरदार व मंत्री होता.

यानें ‘चंद्रभानुचरित्रम्’ हा ग्रंथ लिहिला. यामध्यें यानें आपल्या भावाचा उल्लेख केला आहे.

**तालप चालुक्य**—( स. ९२५ ) हा चालुक्यांपैकीं पहिल्या भीमाचा चुलता जो युद्धमल्ल पहिला त्याचा पुत्र. याच्या नांवाचा उल्लेख तारप, तालप, ( तैलप्प ) असा निरनिराळ्या ठिकाणीं आहे. हा पांचव्या विजयादित्याला गादीवरून काढून गादीवर आला. याला विक्रमादित्य दुसरा यानें गादीवरून काढलें. यानें एक महिनाच कारभार केला. तालप व विक्रमादित्य ( दुसरा ) यांच्या झटापटींत तालप ठार झाला, असें एके ठिकाणीं म्हटलें आहे ( ९२५ ).

**तावयुंग**—हिंदुस्थानाकडे आलेला एक चिनी प्रवासी. याच्या प्रवासवृत्तावरून सुंगयुन व हु-एन्-त्संग यांच्या प्रवासवृत्ताच्या संकलनकारानें योग्य स्थलीं टीपा दिल्या आहेत व मतभेद दाखवला आहे. त्यावरून याचा पत्ता लागतो. हा फाहियाननंतर आला होता. पण नक्की केव्हां आला याचा पत्ता लागत नाहीं. हा पेशावरच्या पुढें आला नव्हता.

**तावलिन**—एक चिनी प्रवासी. हा किंगचाव येथें राहणारा होता. हा समुद्रमार्गें कलिंगांत ( ओरिसांत ) आला, व तेथून ताम्रलिप्त ( आसाम ) येथें गेला. तेथून वज्रासन व बोधिवृक्ष ( गया ) यांचें दर्शन घेतलें. पुढें हा गयेहून नालंद येथें आला. नालंद येथें दोन वर्षें राहून हा दक्षिणेकडे गेला. भारतवर्षांत असतां यानें शीलप्रथ असें नांव घेतलें होतें.

**तिक्क चोंड चोल**--( स.१२३३ ) हा तेलंगणांतील चोल घराण्यांतील एक पुरुष. यानें सोमेश्वर होयसलाचा चंपापुरी येथें पराभव केला. शंबूराजास यानें जेरीस आणलें, कांची जिंकली व चोलांना राज्य मिळवून दिलें. याचा हा निर्देश कांजीवरच्या शिलालेखांत आढळतो.

**तिक्कन सोमयाजी**--( स. १२५० सुमार ) तेलगू-भाषेंतील हा महाकवि आहे. नन्नयभट्टानंतर झालेल्या कवींत हा श्रेष्ठ होता. यास 'कविब्रह्म' अशी पदवी आहे. याची वर्णनशैली फारच अप्रतिम आहे. युद्ध-वर्णनांत हा फारच वाकबगार होता. हा तेराव्या शतकाच्या मध्यकालीं होता. यानें यज्ञ केल्यामुळें यास सोयमाजी हें नांव प्राप्त झालें. याचीं दोन काव्यें उपलब्ध आहेत. उत्तररामायण व विराटपर्वापासून स्वर्गारोहणपर्यंत भारतांतीं पंधरा पर्वें. याला तेलगू व संस्कृत भाषा चांगल्या येत होत्या. तेलंगी भाषेंतील शब्दप्रयोगाविषयीं हा अत्यंत प्रमाण मानला जातो. हा कवि, मंत्री व सेनापति होता. हा नेलूर येथील सूर्यवंशी मनुमासिद्धि नांवाच्या राजाचा मंत्री होता. या राजाचा व कवीचा कालनिर्णय कै. रावबहादूर कंपकूरिवीरेशलिंग यांनीं आपल्या 'आंध्रकवुलचरित्रम्' या ग्रंथांत केला आहे.

**तिप्परमा**--विजयनगरच्या तुलुव घराण्यांतील नरसिंहरायाची ही एक पत्नी. हिच्यापासून नरसिंहरायास वीर नरसिंह नांवाचा मुलगा झाला.

**तिमय्या साती**--एक तेलंगी कवि. याच्या पित्याचें नांव चिमासींसाती व आजाचें बक्कल्लगोरय्या. कन्यकापुराण नांवाचा एक करुणरसभरित ग्रंथ यानें तेलंगी भाषेंत लिहिला आहे ( कविचरित्र ).

**तिमाजी ऊर्फ त्रिमल्ल हणमंते**--हा हणमंते घराण्याचा मूळ पुरुष. शूर व पराक्रमी. याला दोन पुत्र होते. एक बाळकृष्ण व दुसरा नारायण ( म. रि. म. १ पृ. ४२० ).

२. याच्या पित्याचें नांव रघुनाथ. यानें अशौचनिर्णय नांवाचा एक संस्कृतांत ग्रंथ रचिला. हा कोल्हापूरकर संभाजीचा प्रधान होता ( स. १७२३ ). याला दोन पुत्र असून त्यांचीं नांवें अनुक्रमें गंगाधर व रघुनाथ अशीं होतीं. याला त्रिमल्ल म्हणत ( म. रि. म. १ पृ. ४२८ ).

**तिमाप्पा वडार**—पेशवाईच्या अखेरीच्या सुमारास वडार लोकांत हा मनुष्य प्रसिद्धीस आला होता. वडार लोकांची यानें एक टोळी बनविली होती. हा प्रथम सांगलीकराच्या सैन्यांत शिलेदारी करीत असे. त्रिंबकजी डेंगळ्यानें इंग्रजांच्या कैदेंतून पळून जाऊन जेव्हां बंड उभारलें तेव्हां त्यास जे लोक मिळाले त्यांत हा होता. पुढें त्रिंबकजीचा बंदोबस्त झाल्यावर चिंतामणराव सांगलीकराच्या मध्यस्थीनें यास माफी मिळाली.

**तिम्म**—( चिन्नतिम्म व त्रिम्मप्प पाहा ).

**तिम्मण नायक**—हा कर्नाटकांतील चित्रदुर्ग संस्थानचा राजा. हा कृष्णदेवराय तुलुवाचे वेळीं होता. कृष्णदेवरायानें विजयनगर राज्याच्या दक्षिणभागांतील मुसलमानांचें वर्चस्व याच्या मदतीनें नाहींसें करण्याचा प्रयत्न केला. हा शूर होता.

**तिम्म नायडू**—विजयनगरच्या राज्यांतील उदरिपींकोंड संस्थानचा पहिला राजा.

**तिम्मय मंत्री**—विजयनगरच्या आरविदु घराण्यांतील श्रीरंग राजाचा हा प्रधान होता. सरकारी सर्व खात्यांचा हा मुख्य होता.

**तिम्मरस**—( स. १६५० सुमार ) कानडी ब्राह्मण कवि. गोत्र-भारद्वाज. ऋग्वेदी आश्वलायन. बाप-बुल्लुरप्प, गांव—पालकुरिके.

ग्रंथ-मार्कंडेयरामायण. हा ग्रंथ यदुगिरीच्या नारायणदेवाच्या देवळांत बसून लिहिला आहे.

याची लेखनशैली, यमक, अनुप्रास वगैरेंनीं युक्त आहे ( क. क. च. भा. २ पा. ४०८ ).

**तिम्मराज**—( स. १४५८--७८ ) हा म्हैसूरच्या राजांपैकीं हिरेबेट्टादचा मुलगा. याला आरनेरल चामराज ( आर्बेरल चाम २ रा-सिवेल ) नांवाचा पुत्र होता ( ज्ञा. को. ).

**तिम्मार्य**--हा साहली गांवचा राहणारा. हा बालकवि होता. यानें आनंदरामायण लिहिलें.

**तिम्मांबा**-- ही रंगराजाची पत्नी व विजयनगरच्या सदाशिवराय तुलुवाची माता.

**तिरुनावुक्करशु**--एक शैव साधु. याचा पहिल्या महेंद्रवर्मन् पल्लवानें खून केला.

**तिरुपतिमल्ला नायक**—( अय्या दीक्षित पाहा ).

**तिरुमल्ल आरविदु**—( राज्यारोहण स. १५७०—मृत्यु स. १५७८ ) हा श्रीरंग व तिरुमल्लाम्बा यांचा मुलगा. तालीकोटच्या लढाईंत मेलेला रामराय व व्यंकटाद्रि हे याचे भाऊ होत. याची पत्नी व्यंगलाम्बा (वेंगला) ही कृष्णदेवराय तुलुवाची मुलगी.

व्यंकटाद्रि तुलुवाचा प्रधान सलाकमच्या विरुद्ध हा व रामराय या दोघां भावांनीं कारस्थानें सुरू केलीं. सलाकमनें यांना कैद करण्याचें ठरविलें तेव्हां हे पळाले. सैन्य जमवून विजयनगरवर स्वारी करून सलाकमला ठार केलें;

आणि सदाशिवराय तुळुवाला गादीवर बसवून रामराय मुख्य प्रधान झाला.

हे तिघेहि भाऊ राज्यसंरक्षणाकरितां व वाढविण्याकरितां अत्यंत झटत, तरी सदाशिवरायाला वागविण्याबद्दल त्यांच्यांत मतभेद असे. सदाशिवरायाला तुरुंगांत टाकल्याबद्दल एकदां तर दोघां भावांनीं रामरायाविरुद्ध बंड केलें होतें.

राक्षसतागडीच्या लढाईंत रामराय मारला गेला तेव्हां हा सदाशिवरायाचा प्रधान झाला. पण रामरायापेक्षांहि यानें सदाशिवरायाला वाईट रीतीनें वागविलें. त्याला चंद्रगिरि येथें तुरुंगांत टाकलें. विजयनगर ही राजधानी बदलून पेणुकोंडा ही राजधानी केली (स. १५६७ सुमार) आणि शेवटीं तर यानें किंवा याच्या मुलानें सदाशिवरायाचा खून केला. सदाशिवरायाचा खून याचा मुलगा व्यंकटपतिदेवरायानें केला असावा आणि याची त्याला अनुकूलता असावी असें दिसतें.

नंतर हा स्वतः गादीवर बसला. तेव्हां याचें वय नव्वद वर्षांचें असावें. तेव्हां यानें आपल्या राज्याचे कर्नाटक, तामील आणि तेलगू असे तीन सुभे केले आणि आपल्या तीन मुलांना त्या प्रांतांवरील सुभेदार नेमलें. मुसलमानांच्या स्वाऱ्यांना तोंड देण्याचें काम याला सारखें करावें लागे. हा स. १५७८ मध्यें मृत्यु पावला.

याच्या वेळीं तुळुव घराण्यांतील सदाशिवरायाचा खून होऊन आरविदु घराणें उदयास आलें. आरविदु घराण्यांतील हा पहिला राजा होय.

**२.** (स. १६००--१४ सुमार) हा विजयनगरच्या पहिल्या तिरुमल्ल आरविदूचा नातू व पहिल्या रामाचा मुलगा. याच्या आईचें नांव नरसिंगम्मा. याचा भाऊ श्रीरंग. तो विजयनगरचा राजा होता. हा श्रीरंगपट्टणचा कारभार पाहत असे.

स. १६०० च्या सुमारास म्हैसूरच्या राजाधिराज ओडीयारनें याला खंडणी देण्याचें बंद केलें; आणि याला जिंकून बायकोसह तालक्कड येथें जाणें भाग पाडलें. आणि श्रीरंगपट्टणचें राज्य म्हैसूरच्या राज्यांत समाविष्ट झालें.

याला अलमेलम्मा आणि रंगाम्मा अशा दोन बायका होत्या. पुत्र नव्हता. हा स. १६१४ पर्यंत जिवंत असावा.

**तिरुमल्ल नायक**—(स. १६२३--१६५९) यानें त्रिचनापल्ली सोडून मदुरेस ठाणें दिलें. हा मदुरेच्या मुक्त कृष्णप्प नायकाचा पुत्र. याच्यावर विजयनगरच्या राजानें स्वारी केली, तेव्हां यानें कुत्बशाहशीं तह करून त्याच्या मदतीनें त्याचा पराभव केला. परंतु त्याच वर्षी हा मरण पावला. नायक घराण्यांतील हा सर्वांत मोठा राजा होता. हा देशद्रोही असल्यामुळें याच्या राज्यांत व दक्षिणेंत मुसलमानांची सत्ता स्थापन झाली.

**तिरुमल्लादेवी**—विजयनगरच्या कृष्णदेवरायाची पत्नी. हिची मुलगी सदाशिवरायाचा प्रधान रामरायास दिली होती. तिचें नांव तिरुमल्लांबिका. हिचे पुत्र कृष्णप्प व पेद्दतिम्म.

**तिरुमल्लार्य**--(स. १६४५--१७०६) कानडी कवि. हा श्रीवैष्णव. कौशिक गोत्र. पिता अळसिंगरार्य. माता सिंगम्मा. ग्रंथ-अप्रतिमवीरचरित, चिक्कदेवरायविजय, चिक्कदेवराजवंशावलि, चिक्कदेवराजशतक. शिवाय चिक्कदेवराजाच्या नांवावर असणारे चिक्कदेवराजविज्ञप व गीतगोपाळ याचेच दिसतात. याचें शतक उपलब्ध नाहीं.

याचा जन्म श्रीरंगपट्टण येथें झाला (स. १६४५). हा चिक्कदेवराजाचा मंत्री होता. मदुरेच्या नायकाची पत्नी मंगम्मा तिचाहि हा बरेच दिवस मंत्री होता. याला तिरुमल्ल अयंगार असेंहि म्हणतात. याचा भाऊ सिंगरार्य हाहि कानडी कवि होता.

अप्रतिमवीरचरित हा अलंकारग्रंथ आहे (क. क. च. भा २. पा. ४६२).

**तिरुमल्लांबिका**—ही श्रीरंगाची बायको असून विजयनगरच्या रामरायाची आई होय. श्रीरंगास हिच्यापासून रामराय, तिरुमल्ल आणि व्यंकटाद्रि असे तीन मुलगे झाले. त्यांपैकीं रामराय हा पुढें विजयनगरचा मंत्री झाला; व त्याच्या पश्चात् तिरुमल्ल यानें त्याची जागा घेतली; व शेवटीं तो राजा झाला.

(रामरायाच्या बायकोचेंहि नांव तिरुमल्लांबिका होतें. पण ती सदाशिवराय राजाची चुलतबहीण होती. तेव्हां ही तिच्याहून अगदीं भिन्न होय.)

**२.** विजयनगरच्या रामरायाची पत्नी; व सदाशिवरायाची चुलत बहीण.

**३.** विजयनगरच्या रामरायाचा पुत्र कोंद त्याची पत्नी.

**तिरुमंगई आलवार**--(स. ८००--५० सुमार) तेलगू कवि. याला शेवटचा आलवार म्हणतात. याचा जन्म तंजावर जिल्ह्यांतील कुरूगूर येथें झाला. जात कलार. यानें एकदां ब्राह्मणाचें वऱ्हाड लुटलें, पण पश्चात्ताप पावून त्या ब्राह्मणापासून नारायणमंत्राचा उपदेश घेतला. यानें श्रीरंगम् येथील देवळाचा जीर्णोद्धार केला. अकराव्या शतकांत चोलकेरल राजांनीं याच्या

काव्याचें पठण करण्याची व्यवस्था केलेली आढळते. याच्या काव्यांत कोच्छेगत नांवाचा चोलराजा व कांचीचा राजा परमेश्वर विण्णगर ( पल्लव ) यांचें वर्णन आहे. हा राजा दुसरा परमेश्वरवर्मन् पल्लव असावा. हा दंतिवर्मन् पल्लवाचा समकालीन असावा. याचा ज्ञानसंबंदर या शैवाबरोवर वाद झाल्याची दंतकथा आहे.

**तिरुव्हयन श्रीकंतन**—हा तिसऱ्या कृष्ण राष्ट्रकूटाचा मांडलिक ( ग्रामम् शिलालेख ).

**तिलक**—( स. १०३५ ) हा पंजाबांतील न्हाव्याचा मुलगा. देखणा व कर्तबगार असून यास हिंदी व फार्सायन या दोन्हीं भाषा चांगल्या येत. प्रथमतः यानें मसूद १ ला याचे कारकीर्दीत पंजाबचा सुभेदार अरियारुक याच्या राज्यकारभारांतील दुष्कृत्यांची चौकशी करावयास मसूदनें पाठविलेल्या अबुल हसन याजकडे नोकरी पत्करली व पुढें चढत चढत हा प्रधानमंडळांतील एक प्रधान झाला. मसूदनें पंजाबचे सुभेदारीवर अहमद नियल्तिगिनची नेमणूक केली होती. अहमद नियल्तिगिननें स्वतंत्र गादी स्थापण्याची महत्त्वाकांक्षा धरून आपण गझनीच्या महमूदचे वंशज आहोंत असें सांगून बंड उभारलें, पण तें यानें मोडलें.

**तिलकाचार्य**--( स. ११८०--१२४० सुमार ) तर्कशास्त्रावर ग्रंथ करणारा एक जैन आचार्य. हा श्वेतांबरपंथी चंद्रगच्छशाखेचा होता. हा चंद्रप्रभसूरीच्या मालिकेंत धर्मघोष, चक्रेश्वर, व शिवप्रभ यांच्या मागून होऊन गेला. यानें पुष्कळ ग्रंथ लिहिले आहेत. आवश्यकलघुवृत्ति ( स. १२३९ ), प्रत्येकबुद्धचरित ( स.१२०४ ) हे याचेच ग्रंथ होत ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. २१२ ).

**तिलोपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं बाविसावा सिद्ध होय. जात ब्राह्मण. भगुनगर गांव. हा नारोपाचा गुरु. तंजूरमध्यें याचे अनेक ग्रंथ सांपडतात. त्यांत कांहीं मागधी हिंदींत आहेत.

**तिष्य**—हा कोरांग राजाचा पुत्र. याच्या आईनें यास विष घालून मारलें. आईचें नांव दुराचरणी.

**तिष्यरक्षिता**—मौर्यवंशांतील सम्राट् अशोकाची पत्नी.

**तिस मोग्गलि पुत्त**—( मोग्गलीपुत्त पाहा ).

**तीर गौंड वेंकम्मा**—ही एक ब्राह्मण कवयित्री. ही लहानपणींच विधवा झाली. हिचे दोन ग्रंथ उपलब्ध आहेत. वेंकटाचलमाहात्म्य व राजयोगसार.

**तीर्थंकर**—जैनांचे चोवीस तीर्थंकर पुढीलप्रमाणें आहेत. त्यांच्या मूर्तीवर ओळखीकरितां घातल्या जाणाऱ्या खुणा पुढें कंसांत दिल्या आहेत. १ ऋषभदेव ( वृषभ ), २ अजितनाथ ( गज ), ३ संभवनाथ ( तुरग ), ४ अभिनंदन ( वानर ), ५ सुमतिनाथ ( क्रौञ्चपक्षी ), ६ पद्मप्रभु ( कमल ), ७ सुपार्श्वनाथ ( स्वस्तिक ), ८ चंद्रप्रभ ( चंद्र ), ९ सुविधिनाथ (मकर), १० शीतलनाथ ( श्रीवत्स ), ११ श्रेयांसनाथ ( गेंडा ), १२ वासुपूज्य ( महिष ), १३ विमलनाथ ( वराह ), १४ अनंतनाथ ( ससाणा ), १५ धर्मनाथ ( वज्र ), १६ शांतिनाथ ( हरिण ), १७ कुंथुनाथ ( बकरा ), १८ अरनाथ ( नन्द्यावर्त ), १९ मल्लिनाथ ( कलश ), २० मुनिसुव्रत ( कांसव ), २१ नमीनाथ ( नीलोत्पल ), २२ अरिष्टनेमि ( शंख ), २३ पार्श्वनाथ ( सर्प ), २४ महावीर ( सिंह ).

यांच्यापैकीं शेवटले दोन ऐतिहासिक पुरुष होते, हें आतां पुराव्यांनीं सिद्ध झालें आहे. त्यांचीं चरित्रें त्यांच्या नांवांवर दिलीं आहेत. बाकीच्या तीर्थंकरांचीं चरित्रें प्रायः सारखींच असल्यामुळें दिलीं नाहींत.

**तीवर**—अशोक मौर्याला कारुवाकीचे ठिकाणीं झालेला पुत्र.

**तीसगुत्त**—जैनांच्या महावीर तीर्थंकराविरुद्ध असणारा एक पाखंडी. शेवटीं तर महावीरावर यानें हल्ला केला ( जैनिझम् इन् नॉर्थ इंडिया ).

**तुका नागेश**—याची परंपरा–गोविंद–शंकर–विश्वरूपघनाचार्य–ज्ञानघनाचार्य–ज्ञानोत्तमशिव-ज्ञानगिरी–सिंहगिरी–ईश्वरतीर्थ–नृसिंहतीर्थ–विद्यातीर्थ-भारतीतीर्थ-विद्यारण्य–महदानंद–देवतीर्थसरस्वति–नृसिंहसरस्वति-ब्रह्मानंदसरस्वति–नागेशात्मज तुका.

ग्रंथ—विश्वकर्ममाहात्म्य.

**तुकाबाई भोसले**—ही शहाजी राजांची द्वितीय पत्नी. हिचा मुलगा एकोजी. हीं मूळ मोहित्यांच्या घराण्यांतील. हिचा भाऊ सुप्याचा संभाजी मोहिते. मोहिते घराणें शिवाजीच्या विरोधकांत होतें. ही शहाजीची आवडती होती ( वार्षिक इति. शके १८३६ क्र. ७ ).

**तुकाराम**—( जन्म स. १६०८–वैकुंठवास स. १६४९ ) हा महाराष्ट्रीय संत व कवि देहू येथें स. १६०८ म्हणजे शके १५३० मध्यें जन्मला. तुकारामाचें उपनांव मोरे असून आंबीले किंवा आंबले असेंहि आडनांव लावतात ( मं. श. १८३५ वा. इ. ले. ८९ ). याचें आजोळ लोहगांवीं मोझे यांच्याकडे होतें. पुण्याशेजारीं लोहगांवीं तुकोबाचें देऊळहि आहे ( मं. तृतीय

संमे. पा. १४१–१४३ ). याचे पूर्वज देहूचे राहणारे. जातीनें कुणबी असून वाण्याचा धंदा करीत. याच्या वडिलांचें नांव बोल्होबा असें होतें. बोल्होबाच्या आठव्या पिढींतील मागील पुरुष विश्वंभर म्हणून होता. त्यानें देहूस विठ्ठलाचें देऊळ बांधलें होतें. याच्या आईचें नांव कनकाई. याला एक धाकटा व एक थोरला असे दोन भाऊ होते. तुकारामानें दुकानाचें कामकाज व एकंदर संसार उत्तम रीतीनें केला.

याचा सुखानें चाललेला प्रवृत्तिपर आयुष्यक्रम निवृत्तिपर होण्यास तशींच कारणें घडून आलीं. हा १७ वर्षांचा झाला तेव्हां याचे आईबाप निवर्तले. वडील बंधूच्या पत्नीचाहि याच वेळीं अंत झाला. यामुळें मूळांतच विरक्त असलेला वडील बंधु अधिक विरक्त होऊन तीर्थयात्रेस निघून गेला; व त्याच्या कुटुंबाचा भार यावर पडला. याच सुमारास भयंकर दुष्काळ पडून चारपांच रुपयांस शेर धारण झाली ( स. १६३०–३२ ). तुकारामाचीं गुरेंढोरें अन्नावांचून पटापट मरण पावलीं. तुकारामाच्या पहिल्या बायकोनें अन्न अन्न म्हणून प्राण सोडला. याचा मुलगाहि याच सुमारास वारला. नंतर याचें दुसरें लग्न झालें. याची दुसरी बायको जिजाबाई व्यावहारिक बुद्धीची असल्यामुळें तुकारामाला तिजपासून सुख मिळेना. याचा परिणाम तुकारामाचें प्रपंचांतून पूर्ण लक्ष उडण्यांत झाला. जगाची नश्वरता व कष्टमय स्थिति याची त्याला जाणीव होऊन सहजच त्याची परमार्थाकडे दृष्टि वळली.

तुकारामानें आपल्या विठोबाच्या मंदिराचा जीर्णोद्धार केला व तो आपला सर्व काळ भागवतधर्मीय ग्रंथांच्या अध्ययनांत, भजनांत, कवित्व करण्यांत व ध्यानधारणेंत घालवूं लागला. भंडाऱ्या डोंगरावर तुकारामानें एकनाथी भागवताचीं १००० पारायणें केलीं. एकनाथी भागवत व तुकारामाचे अभंग यांत कित्येक ठिकाणीं समान विचार व शब्दरचना आढळून येण्याइतकें त्या ग्रंथावर याचें प्रभुत्व होतें. याची बायको कर्कशा होती तरी ती याला तेथें भाकरी पोहोंचविण्याची स्वतः व्यवस्था करी. भजनांत व अध्ययनांत काळ घालवीत असतां साक्षात्काराचा अनुभवहि याला येऊं लागला. भंडाऱ्यापेक्षांहि निवांत असलेल्या भामचंद्राचे डोंगरावर उपाधि टळावी म्हणून हा गेला असतां तेथें याची निर्गुण समाधि लागून याला ईश्वरी साक्षात्कार झाला. निर्गुण ब्रह्म हा विठ्ठलाचा किंवा जगज्जीवन प्रभूचा आत्माच वश झाल्यावर सगुण-साक्षात्काराला तरी अवकाश कोठला ? नामदेवानें पांडुरंगासहित येऊन तुकारामाला दर्शन दिलें व कवित्व करण्याचा मार्ग दाखविला.

केशव चैतन्य हा तुकारामाचा मोक्षदाता सद्गुरु होय. पण त्यानेंहि यास नामदेवाप्रमाणें स्वप्नांतच साक्षात्कार दिला.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं भागवतधर्माचा पाया घातला व तुकाराममहाराजांनीं त्यावर कळस चढवून भागवतधर्माची इमारत पूर्णत्वास नेली. वेदाप्रमाणें भागवतधर्माचें वाङ्मयहि ज्ञानपूर्ण आहे.

अत्यंजापासून तों थेट ब्राह्मणापर्यंत सर्वांना समान लेखून भेदाभेदाच्या असंगळ भ्रमाचा विटाळ होऊं न देतां " तुका म्हणे एका देहाचे अवयव " या वचनाप्रमाणें सर्व जगताला एकच विराट पुरुष मानणारीं वेदवचनें भागवतधर्मानें प्रत्यक्ष कृतींत उतरविलीं. भक्तीसारख्या सुलभ आत्मशुद्धीच्या व नाम सर्वमुखीं करून मन एकाग्र करण्याच्या साधनाचा व " मुखीं नाम हातीं मोक्ष " अशी स्वतः ग्वाही देऊन भक्तिरसाचा इतका पूर वाहविला कीं, तुकारामानें या कार्याचा कळस करून अखिल महाराष्ट्र समाज व ॲबटसारखे पाश्चिमात्य जिज्ञासूहि भक्तीच्या चंद्रभागेंत न्हावविले. त्यांत त्या काळीं रामेश्वरभट्ट वाघोलीकरासारखे वैदिक कर्ममार्गी सच्चे कर्मठ प्रामाणिक ब्राह्मणहि होते व सालोमालोसारखे तोतये पोटभरू साधूहि होते. रामेश्वरभटाला वेदगुपित अंत्यजापर्यंत नेऊन पोहोंचविणें खरोखरच अब्रह्मण्य वाटलें. परंतु तुकारामाच्या विश्वव्यापक भागवतधर्माच्या झेंड्यापुढें त्याची समजूत पडतांच त्यानें मानच तुकविली. पण हें काम नुसत्या तोंडच्या उपदेशानें पार पडलें नाहीं. रामेश्वरभटानें अभंगांच्या पोथ्या तुकारामास इंद्रायणींत बुडविण्यास सांगितलें. तुकारामानें ब्राह्मणाला ईश्वरमूर्ति समजून रामेश्वरभटांची आज्ञा शिरोधार्य केली व स्वहस्तें अभंगांच्या बाडांना इंद्रायणींत बुडवून स्वतः १३ दिवस तेथें निर्वाण मांडलें व प्रत्यक्ष पांडुरंगानें वर येऊन स्वतः वह्या वर धरून परत तुकारामास दिल्या. याबद्दल तुकारामाचे अभंग असल्यामुळें शंकेला जागा नाहीं. बिचारा रामेश्वरभट लीन होऊन तुकारामचरणीं नम्र झाला.

सालोमालो हा तुकारामाचे अभंग चोरी व शेवटच्या चरणांतील " तुका म्हणे " च्या ऐवजीं " सालो म्हणे " असें करून स्वतःच्या नांवावर कीर्तनांत म्हणून लोकांस फसवी. हा सदेह वैकुंठाला गेला, अशी जुन्या काळापासून समजूत आहे.

याचे अभंग सुमारें सहा ते आठ हजार उपलब्ध आहेत. यांशिवाय श्लोक, पदें व ओव्याहि आहेत. बालक्रीडा नांवाचें

एक प्रकरण आहे. याचे अभंग साध्या मराठींत असून त्यांत भक्तीची परमोच्च स्थिति दृष्टीस पडते. याशिवाय प्रचलित सामाजिक दोषांवरहि यानें तडाखे ओढले आहेत. त्यामुळें याच्या अभंगांचा प्रचार आबालवृद्धांच्या तोंडीं झाला आहे.

फुटो हें मस्तक, तुटो हें शरीर । नामाचा गजर, सोडूं नये ॥
अशा याच्या निश्चयी चारित्र्याचा व अभंगांतील शिकवणुकीचा महाराष्ट्रांतील सामान्य जनतेवर फार परिणाम झाला आहे. महाराष्ट्रांतील स्त्री, शूद्र व अस्पृश्य समाजधर्माच्या एका निश्चित व अचल भूमिकेवर आहे याचें श्रेय याला आहे.

**तुकारामबाबा वर्दे**—( स. १५७१ ) मराठी कवि. सारस्वत ब्राह्मण. पिता अमृतराव, गांव जुवा ( गोवें ). पत्नी दुर्गाबाई. यांनीं भर्तृहरीच्या तीनहि शतकांचे दशकांना वेगळालीं नांवें देऊन समश्लोकी भाषांतर केलें आहे. शतकत्रयास सुभाषितरत्नावली असें जुनें नांवहि यांनीं कायम ठेवलें आहे. वामनपंडित व हे समकालीन होते, पण यांची कविता त्यापूर्वीची असावी ( महाराष्ट्रकविचरित्र, भा. १, पा. २२७-३५ ).

**तुका ब्रह्मानंद**—( स. १६५० ) श्रीशिवाजीमहाराजांच्या कारकीर्दीत विश्वब्राह्मण ( सुवर्णकार ) कुलामध्यें तुका ब्रह्मानंद या नांवाचा एक मोठा विद्वान् योगी होऊन गेला. हा सातारा येथें राहत असे. याच्या वडिलांचें नांव नागनाथ असून उपनांव कर्मार होतें. म्हणून पूर्व वयांत याला तुका नागनाथ कर्मार असें म्हणत. याचा उपनयनविधि होतांच लहानपणीं याच्या वडिलांनीं याच्याकडून वेदाध्ययन, संस्कृत व्याकरणशास्त्र व अलंकारशास्त्र यांचा अभ्यास करविला. नंतर देवशिल्पांत ( देवमूर्तीसंबंधीं शिल्प ) हा निपुण झाला.

वडिलांच्या पश्चात् याच्याकडे सरकार-कचेरींतील पोतदाराचें म्हणजे खजिनदाराचें काम आलें. पुढें शिवाजीमहाराजांची अनुज्ञा मिळतांच श्रीब्रह्मानंदस्वामींच्या अनुग्रहानें यानें सुमुहूर्तावर संन्यासदीक्षा धारण केली. ब्रह्मानंदांनीं यास 'तुका ब्रह्मानंद' हें नांव दिलें. त्या आश्रमांत यानें हठयोगाचें परिपूर्ण अध्ययन करून प्रस्थानत्रयादि वेदान्तग्रंथांचें परिशीलन केलें.

हा उत्तम कवि होता. यानें भर्तृहरिकृत शतकत्रयावर समश्लोकी टीका केली आहे. याचें शतकत्रयांचें भाषांतर तुकारामबाबा वर्दे यांच्याप्रमाणें दशकवार विभाग पाडून केलें आहे. शांकरभाष्यटीका, वेदांतरहस्य, शतकत्रयसमश्लोकी, सप्तशतीची टीका, प्रणवाष्टक, नाटकरामायण, गीतगोविंद समश्लोकी, व विश्वकर्ममाहात्म्य वगैरे अनेक ग्रंथ यानें लिहिले आहेत. वरीलपैकीं प्रणवाष्टक व गीतगोविंद हे दोन ग्रंथ छापून प्रसिद्ध झालेले आहेत. अंतकाळीं तुकाब्रह्मानंद यानें साताऱ्यानजीक माहुली येथें कृष्णा-वेण्णा-संगमावर आपला देह ठेविला. त्या ठिकाणीं महाराजांनीं याची समाधि, घाट व देवालयहि बांधलें आहे ( महाराष्ट्रकविचरित्र भा. ५, पृ. ७०-८१ ).

**तुका विप्र**—( स. १७८८ नंतर मृत्यु ) मराठी कवि व सत्पुरुष. देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. सातारा जिल्ह्यांतील रहिमतपूरचे जोशी कुलकर्णी. गुरु विप्रनाथस्वामी. सकाळीं कृष्णातीरीं स्नानसंध्या व दुपारीं भागवतपुराण असा यांचा कार्यक्रम असे. यांच्या घराण्यांत अनेक विद्वान् व अधिकारी पुरुष होऊन गेले. यांच्या घराण्यास मोगलाईत अंजनावती नांवाचा गांव इनाम आहे. होळकरांचे फत्तेसिंग माने यांच्या शिष्यांपैकीं होत. यांना रंगनाथस्वामी निगडीकरांची कविता विशेष आवडे. यांचें देहावसान अंजनावतीस झालें. यांचा प्रयाणशक राजवाडे यांनीं १६९० ठरविला असला तरी ज्योतिपंतदादा महाभागवतांच्या मृत्यूचा उल्लेख करणारे हे शके १७१० नंतर मृत झाला असले पाहिजेत ( मं. अह. शके १८३४ पृ. ७९-८० ). यांनीं तुकारामाचा सव्वा लक्ष अभंग करण्याचा संकल्प पुरा केला असें म्हणतात. यांचे कांहीं अभंग तुकारामाच्या अभंगांत मिसळून गेले आहेत.

यांचे ग्रंथ-आत्मसिंधु, सुदामचरित्र, भानुदासचरित्र, कालियामर्दन, आरती कीर्तनरंगाची ( सं. सू. ). यांनीं शके १७०१ मध्यें मुरुड येथें कीर्तन केल्याचा निर्देश सांपडला आहे ( मं. त्रै. १२. ले. २८ ).

**तुका सुंदरदास**—( ग्रंथकाल स. १६७७ ) मराठी कवि. यानें ' नासिकेतोपाख्यान ' नांवाची एक पोथी लिहिलेली आहे. तिचे २१ अध्याय आहेत या·या गुरूचें नांव श्यामसुंदर भारती असें होतें ( मं. त्रै. व. १२.८ ले. ३३ ). याचे कांहीं अभंग आहेत ( सं. सू. ).

**तुकोजी राजे**—( तंजावरचे ) ( स. १७२८-१७३५ ) सरफोजी राजे वारल्यानंतर त्यांचे कनिष्ठ बंधु तुकोजी हे तंजावरच्या गादीवर बसले.

तुकोजी राजे हे सरफोजी राजापेक्षांहि अधिक राजकारणपटु व कुशाग्रबुद्धि असून मोठे विद्याभिलाषी होते. यांना संस्कृत, तामील, मराठी व फार्सी इत्यादि भाषा अवगत होत्या. त्यामुळें दूरदूरचे विद्वान् पंडित व फकीर

लोक यांच्या भेटीसाठीं येत असत. अद्यापि तंजावर येथें अशी एक दंतकथा प्रसिद्ध आहे कीं, कोणी फकीर अरबस्थानांतून तुकोजी राजांचे भेटीस आला, आणि त्यानें आपला प्रसाद म्हणून, यास 'नागिणी,' आणि 'पद्मिणी' अशा दोन तरवारी नजर केल्या. त्या तरवारी मद्रास येथील सरकारी पदार्थसंग्रहालयामध्यें पुष्कळ वर्षे होत्या. यास एकंदर सहा स्त्रिया होत्या.

यांस चार औरस पुत्र व एक दासीपुत्र होता. यांच्यानंतर यांचा मुलगा बाबासाहेब, व्यंकोजी ऊर्फ एकोजी हें नांव धारण करून गादीवर बसला ( तं. रा. च. पृ. ५६-५७ ).

**तुकोजीराव पवार**—हे धारच्या आनंदराव पवाराचे चुलतबंधु असून देवासकर म्हणून प्रसिद्ध आहेत. यांच्या पित्याचें नांव काळोजी पवार. तुकोजीरावांना जिवाजी म्हणून आणखी एक बंधु होते. माळव्याच्या मुलुखाची वांटणी झाली तेव्हां या दोघांस देवासचें राज्य मिळालें ( २२ जुलै १७३२ ). त्यावरून यांच्या कामगिरीची कल्पना येते.

**तुकोजी सकपाळ**—( स. १६५८–१६९० ) कुलाब्याच्या आंगऱ्यांचा हा पहिला प्रसिद्ध पुरुष होय. हा स. १६५८ मध्यें शिवाजीकडे बारगिरी करून होता.

**तुकोजी होळकर**—( जन्म स. १७२५; मृत्यु स. १७९७ ) हा होळकरांच्या वंशांतील जानोजीचा मुलगा. हा मल्हारराव होळकरांचा दत्तक पुत्र असें आपणास शिक्क्यांत व कागदपत्रांतहि म्हणवतो; आणि या गोष्टीस इतर लोकहि संमति दर्शवितात. पण प्रत्यक्ष दत्तविधान झालेलें नव्हतें.

अहल्याबाईनें होळकरांच्या राज्याचा बंदोबस्त पाहावा; आणि यानें सेनापति होऊन मराठी राज्याची कामगिरी पार पाडावी, अशी कामाची विभागणी होती. पण यामुळें घोड्यावर बसणारा एक आणि लगाम धरणारा दुसरा असें होई. ही स्थिति पेशव्यांना व यांना पुष्कळ जाणवे, पण अहल्याबाईनें आपल्या हातांतील सत्ता केव्हांहि सोडली नाहीं.

पण यामुळें याला स्वतंत्रपणें केव्हांहि कारभार करितां आला नाहीं. इकडे नानाचा आणि तिकडे बाईच्या कर्ड्या अमलांतून केवळ मुलूखगिरीवर सैन्याचा खर्च भागविण्याचे दिवस आतां राहिले नव्हते. त्यामुळें हा नेहमीं ओढगस्त स्थितींत असे.

बाई आणि हा यांचे यामुळें बरेच खटके उडाले. पेशव्यांचीहि तुकोजीच्या हातांत एकमुखी कारभार असावा अशी इच्छा होती. पण अहल्याबाईची दूरदृष्टि या बाबतींत यशस्वी झालेली दिसते.

याला स्वतंत्रपणें कारभार कधींच करतां आला नाहीं. कारभाऱ्यांच्या हा आहारीं जात असे. नारो गणेशाची यानें केलेली विटंबना केव्हांहि समर्थनीय ठरत नाहीं. हा दारूहि अत्यंत पीत असे. तसेंच राजकारणासारख्या बाबतींतहि क्षुद्र रखेल्यांच्या मर्जीप्रमाणें वागण्याची याची वृत्ति अगदींच अक्षम्य होती.

याची पत्नी रखमाबाई. तिचें व अहल्याबाईचें जमत नसे.

स. १७६९ पासून महादजी शिंद्याबरोबर हा पांच वर्षे दिल्लीकडे होता. पण यानें नजीबखानास पाठिंबा दिल्यामुळें शिंद्याचा सर्व बेत फसला. तसेंच पुढें स. १७७१ मध्यें नजीबाचा पुत्र झबेताखान मराठ्यांच्या अटकेंत असतां त्यास यानें सोडलें. स. १७७४ मध्यें हा दक्षिणेंत आला. हा पहिल्यापासून राघोबादादाच्या पक्षांत असे. त्याप्रमाणें बारभाईच्या कारस्थानाच्या वेळींहि राघोबाकडे मिळाला, पण पुढें फुटला. स. १७७७–७८ च्या सुमारास याला हरिपंत फडक्याच्या मदतीस कर्नाटकांत जाण्यास सांगितलें. पण तें यानें नाकारलें व मोरोबाचा पक्ष प्रबळ केला. पण याला महादजीच्या द्वारा नानानें आपणाकडे वळविलें. स. १७७८ मध्यें हा महादजी व हरिपंत यांच्याबरोबर इंग्रजांशीं लढण्यास गेला होता. स. १७८० मध्यें हा महादजीबरोबर गुजराथेंत इंग्रजांशीं लढण्याकरितां गेला होता. स. १७८१ सालच्या बोरघाटांतील इंग्रजांशीं झालेल्या लढाईंत सैन्याचें आधिपत्य हरिपंत व याकडे होतें. स. १७८६ मधील टिपूवरील लढाईंत यानें चांगला पराक्रम केला. स. १७८७ सालीं हा उत्तरेकडे महादजीच्या मदतीस म्हणून गेला, पण यानें त्याच्या कामांत सारख्या अडचणी उत्पन्न केल्या. स. १७९० मध्यें इस्माईलबेगचीं गांवें यानें लुटल्यानें महादजीचें व त्याचें वांकडें आलें.

डी बायन शिंद्याचा सेनापति होता. तेव्हां यानें शिंद्यावर वरचष्मा करण्याकरितां ड्यूड्रेनेक या फ्रेंच अधिकाऱ्यास ठेवून कवाईती फौज तयार करण्यास आरंभ केला ( स. १७९२ ). शिंदे–होळकरांची ही तेढ विकोपाला जाऊन दोन्ही फौजांची स. १७९२ सालीं कोट्याच्या उत्तरेस लाखेरीवर मोठी लढाई झाली व याच्या सैन्यास हार खावी लागली आणि मराठेशाहीचा आब उघडपणें नाहींसा झाला. तेव्हां यानें चिडून शिंद्यांचें उज्जयनी शहर लुटलें. पुढल्या वर्षी याला अर्धांगवायु झाला

( स. १७९३ ). तथापि हा खर्ड्याच्या लढाईत पेशव्यांनीं मुद्दाम बोलावल्यावरून हजर होता ( १७९४ ). पुढें अहल्याबाई वारली व हा ता. १५-८-१७९७ रोजीं पुणें येथें वारला.

याचा वडील मुलगा काशीराव हा जन्मतांच हातापायानें लुळा होता व धाकटा मल्हारराव व्रात्य होता. काशीराव नांवाचा पुतण्या मात्र तल्लख होता. यशवंतराव व विठूजी हे याचे दासीपुत्र होत.

**तुघ्रलबेग**—( स. १०३७-६३ ) हा सेल्जुक तुर्क होय. हा व याचा भाऊ चारग बेग ह्यांनीं गझनींच्या ताब्यांतील तुर्कस्थानचा प्रदेश जिंकून तेथें आपलें स्वतंत्र राज्य स्थापिलें. स. १०५५ त यानें बगदाद शहरांत प्रवेश करून तेथें आपण सुलतान झाला. पुढें दुसऱ्या अनेक तुर्क टोळ्या यास सामील झाल्या, आणि स. १०५७ त यानें विस्तृत सेल्जुक राज्याची स्थापना केली (मु. रि. १. ४१).

**तुघ्रील**—( स. १०५२ ) महमूद गझनवीचा गुलाम. महमूदचा मुलगा इझ्झुद्दौलानें यास सीस्थानचा सुभेदार नेमिलें. पण यानें तयारी करून इझ्झुद्दौल्यावर स्वारी करून व राजघराण्यांतील दहा माणसांसह त्यास ठार मारून गादी बळकावली. पण ४० दिवस राज्य केल्यावर याचा खून झाला.

२. ( स.१२७५ ) बंगालचा सुभेदार ( बल्बन पाहा ).

**तुतातित**—( कुमारिलभट्ट व तौत पाहा ).

**तुलसीदास**—( जन्म स. १५३१–मृत्यु स. १६२३ ) हिंदी भाषेंतील महाकवि. यांचा जन्म राजापूर येथें झाला. यांच्या पित्याचें नांव आत्माराम दुबे व आईचें नांव हुलसी. यांचें पहिलें नांव रामबोला असें होतें. हे जातीनें सरयुपारीण ब्राह्मण होते. लाला सिताराम म्हणतात, हे सनाढ्य ब्राह्मण होते. यांचा जन्म एका अत्यंत गरीब स्थितींतल्या कुटुंबांत झाला, हें यांच्या ज्यायोकुलमंगल, इत्यादि कवितावलींतील लिहिण्यावरून समजतें. यांच्या गुरूचें नांव नरहरिदासजी होय. रामायणाच्या आरंभीं तसा यांनीं उल्लेख केला आहे असें वाटतें. वाटतें म्हणण्याचें कारण तेथें 'बंदऊँ गुरूपद, कृपासिन्धु नररूप हरि' असे शब्द आहेत.

यांच्या जन्मवेळीं मूळ नक्षत्र असल्यामुळें आणि यांना जन्मतःच दांत वगैरे असल्यामुळें आईबापांनीं यांचें पालनपोषण न करतां सोडून दिलें होतें. पण ईश्वरेच्छेनें यांचें पालनपोषण झालें, आणि शेवटीं नरहरिदासासारखा गुरुहि भेटला, असें यांच्या कवितावली, विनयपत्रिका वगैरेंत आलेल्या उल्लेखावरून दिसतें. यांना विशेष प्रकारचें शिक्षण कोणीं दिलें होतें असें दिसत नाहीं. नरहरिदासाबरोबर हे काशीस आले. आणि तेथें स्वामी रामानंदजींच्या मठामध्यें राहूं लागले. रामानंदजीनें रामोपासनेचा सांप्रदाय पूर्वींच सुरू करून ठेविला होता आणि त्याची या वेळेला भरभराट होती. पंचगंगा घांटावरील स्वामी रामानंदजींच्या मठांत हे राहत असतां शेष–सनातनजी नांवाच्या महापंडितांची व यांची गांठ पडली. आणि त्यांच्यापासूनच वेदवेदांगदर्शन, पुराण, इतिहास वगैरेंचें ज्ञान यांना प्राप्त झालें. आणि नंतरच यांचें लग्न वगैरे झालें असावें.

यांचा विवाह दीनबंधु पाठक यांची कन्या रत्नावली हिच्याशीं झाला. रत्नावलीवर यांचें अत्यंत प्रेम होतें. रत्नावली माहेरीं गेली असतां हेहि वियोग सहन न होऊन तिच्या घरीं गेले. पतीची आसक्ति पाहून तिला लाज वाटली. तिनें यांना सांगितलें—

लाज न लागत आपु को, दौरे आयहु साथ ।
धिक् धिक् ऐसे प्रेमको, कहा कहौं मैं नाथ ॥
अस्थि चरम मय देह मम, तामें जैसी प्रीति ।
तैसी जो श्रीराम महँ, होति न तौ भवभीति ॥

या बोलण्याचा तुलसीदासजींवर अत्यंत परिणाम झाला आणि हे एकदम तेथून थेट काशीस गेले आणि विरक्त होऊन राहिले. बिचाऱ्या रत्नावलीला काय माहीत कीं आपल्या बोलण्याचा असा परिणाम होईल! पण यामुळें तुलसीदासजींच्या प्रेमाचा प्रवाह दुसरीकडे वळला आणि त्यांचें नांव अजरामर झालें.

स्त्रीच्या बोलण्यावरून विरक्त झाल्यावर हे काशीस कांहीं दिवस राहिले. नंतर अयोध्येंत बराच मुक्काम केला व नंतर सर्व हिंदुस्थानभरच्या तीर्थयात्रा केल्या. सुमारें २० वर्षें हे तीर्थयात्रा करीत होते असें म्हणतात. यानंतर हे चित्रकूटावर येऊन पुष्कळ दिवस राहिले. तेथून यांची कीर्ति चहूंकडे पसरली आणि अनेक संतमहंत यांच्या दर्शनास येऊं लागले. याच वेळीं यांची ग्रंथरचनाहि सुरू झाली. अनेक विद्वान् लोक यांच्याशीं चर्चा करण्याकरितां येत असत. त्या वेळीं सर्वांत श्रेष्ठ भक्त व महात्मा असें यांना लोक मानीत. अशी प्रसिद्धी आहे कीं, सुप्रसिद्ध पंडित मधुसूदनसरस्वतीहि यांच्याशीं चर्चा करण्याकरितां आले होते व त्यांनीं शेवटीं प्रसन्नतेनें पुढील उद्गार काढले:

आनंदकानने कश्चिज्जङ्गमस्तुलसीतरुः ।
कविता-मंजरी यस्य रामभ्रमरभूषिता ॥

याच्या मित्रमंडळींत नवाब अबदुल रहिम खानखाना, महाराज मानसिंग, नाभाजी आणि मधुसूदनसरस्वती इत्यादि मोठे लोक असत. रहिम आणि हे यांच्यामध्यें बराच सहवास असे. परस्परांच्या दोहोंऱ्यांवरून आजहि हें दिसून येतें. काशींतील तोडरमल्ल नांवाच्या जमीनदाराशीं यांचा विशेष स्नेह होता. तो मेल्यानंतर यांनीं कांहीं दोहोरे केलेले आहेत. त्यावरून तुलसीदासांचा त्याच्याबद्दल विशेष अनुराग दिसून येतो. व्रजभाषेंतील सुप्रसिद्ध कवि नंददासजी तुलसीदासांचे सख्खे भाऊ होते असें म्हणतात. सूरदासजी, नाभाजी व केशवदासजी या तिघांच्याहि भेटी तुलसीदासांशीं झाल्या होत्या. यांनीं केलले ग्रंथ पुढील-प्रमाणें उपलब्ध आहेत.

१ रामचरितमानस ( तुळशीदासरामायण ), २ कवित्त रामायण, ३ दोहावली, ४ रामगीतावली, ५ रामाज्ञा, ६ विनयपत्रिका, ७ बरवै रामायण, ८ रामलला नहछु, ९ वैराग्यसंदीपनी, १० कृष्ण-गीतावली, ११ पार्वती-मङ्गल, १२रामसतसई,१३ हनुमदबाहुक,१४जानकीमङ्गल. यांपैकीं रामचरित हा ग्रंथ सर्वांत मोठा असून अत्यंत लोकप्रिय आहे. याच्या कोव्यवधि प्रती आजपर्यंत खपल्या आहेत. हा इतका लोकप्रिय ग्रंथ आहे कीं, गरीबाच्या झोंपडीपासून ते राजाच्या महालापर्यंत या ग्रंथाचें पठणश्रवण केलें जातें. या ग्रंथानें तुलसीदासांना अमर केलें आहे. रामचरितमानसासारखा हिंदुस्थानांत दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथाचा प्रचार नाहीं. यांचा देहांत वि. सं. १६८० ( स. १६२२ ) श्रावण शु॥ ७ ला असी आणि गंगा यांच्या संगमावर झाला. सर्वमान्य झालेले जन्ममरणाचे संवत आम्हीं दिलेले आहेत.

यांच्या रामचरितमानस या ग्रंथाचा मराठींत व इंग्रजीमध्येंहि अनुवाद झालेला आहे ( क कौं. १; शब्द-सागर प्रस्ता. ).

अर्वाचीन कालांतील साधु व तत्त्वज्ञानी रामतीर्थ हे खास यांच्याच वंशांतील होत.

२. मराठी शाहीर. यानें आपल्या कवितेनें तानाजी मालुसरे यास अमरपद दिलें. हा पोवाडा सरस असून समकालीन असावा.

**तुषास्प**—हा यवन होता. अशोक मौर्याच्या वेळीं हा सुराष्ट्राचा-काठेवाडचा प्रांताधिकारी होता. प्रांताधिकाऱ्यांना राजा हें पद लावीत असें जुनागड येथें सांपडलेल्या रुद्रदामनूच्या लेखावरून ठरतें.

**तुळजाजी भासले**—( स. १८०७ सुमार ) अक्कलकोटच्या भोसले घराण्यांतील शहाजीचा हा दुसरा मुलगा. याचा भाऊ फत्तेसिंह हा अक्कलकोटच्या गादीवर आला. तेव्हां याचें व फत्तेसिंगाचें भांडण होऊन फत्तेसिंगानें यास अटकेंत ठेविलें. पुढें लवकरच हा पेशव्यांकडे पळून गेला व यानें आपल्या भावाविरुद्ध पुण्याच्या दरबारीं तक्रार केली. थोड्याच दिवसांनीं सदाशिवरावभाऊ व माणकेश्वर यांच्या मध्यस्थीनें भावाभावांत सलोखा होऊन यानें सातारा जिल्ह्याच्या खटाव तालुक्यांतील कुर्ला वगैरे ८१०० रुपये उत्पन्नाचीं गांवें घेऊन १८०७ सालीं स्वस्थ बसण्याचें कबूल केलें.

**तुळजो राम**—हा ब्राह्मण रघूजीचा प्रख्यात सरदार होता. हा यमाजी शिवदेवाच्या कुटुंबांपैकीं असावा. शाहूनें याला रघूजीजवळ नेमला होता. रघूजीनें यास देवगडप्रांतीं फौजेचे बंदोबस्तासाठीं नेमला होता ( म. रि. म. वि. २, पृ. ७९ ).

रघूजीनें पवनी हें ठाणें घेतल्यावर तेथें तुळजोरामपंतास नेमलें. स. १७४८ ते १७५१ या वेळेस रघूजीनें ओरिसा प्रांतावर स्वारी केली तेव्हां त्याजबरोबर तुळजोराम हा हजर होता. ह्यानें बंगाल कर्नाटकपर्यंत स्वाऱ्या केल्या. रघूजीच्या सर्व स्वाऱ्यांत हा रघूजी करांड्याप्रमाणें प्रमुख सरदार होता ( ना. प्रां. इ. ).

**तुळशी**—( स. १५५६ सुमार ) सारस्वत ब्राह्मण. जुनागडनजीक कुतलपूरचा राहणारा. यानें गुजराथींत ध्रुवाख्यान केलें.

**तुळसीबाई**—( खून ता. २०-१२-१८१७ ) ही यशवंतराव होळकराची एक आवडती राख होती. दुसऱ्यास माहे पाडण्याचा गुण हिच्या अंगीं होता. हिनें होळकरशाहीचा कारभार १० वर्षे केला. ही कारभार पाहूं लागल्यावर सरकारसारा नीट वसूल होईना. राज्यव्यवस्था नीट चालेना. हिचा पुढें खून झाला.

ही राख नव्हती, असें ही घरांतल्या माणसांवर सत्ता चालवीत असे व सहीशिक्का वापरीत असे, वगैरे कारणांवरून सिद्ध करण्याचा प्रयत्न केलेला आढळतो ( होळकरशाहींतील ऐ. स्त्रियांचा पत्रव्यवहारमधील टीपा पाहा, पा. १२३ ).

**तुळाजी ऊर्फ तुळजा राजे**—(स.१७६३-१७८७) तंजावरचा राजा. याचे बापाचें नांव प्रतापसिंह. याला इंग्रज, हैदर व अर्काटचा नवाब असे तीन प्रमुख शत्रु होते. याचा व अर्काटचा नवाब मुहम्मदअलीचा मेलूरच्या कालव्याच्या दुरुस्तीविषयीं तंटा लागला असतां, इंग्रजांच्या मध्यस्थीनें तो मिटला ( स.१७६४ ). हैदरानें याच्याशीं स.१७६९ त लढाई केली असतां, यानें हैदरास चार लाख रुपये व

चार हत्ती दिले. हें पाहून मुहम्मदअल्लीनें स. १७७१-त इंग्रजांच्या मदतीनें याच्यावर चाल केली, परंतु यानें मुहम्मदअल्लीशीं तह करून त्यांत इंग्रजांचें नांव सुद्धां घेतलें नाहीं. यामुळें इंग्रजांना राग येऊन त्यांनीं जनरल स्मिथ यास १७ सप्टेंबर १७७३ रोजीं याजवर पाठविलें व यास कैद करून, तंजावर संस्थान खालसा केलें. परंतु ही गोष्ट कोर्ट ऑफ डायरेक्टर्स यांना नापसंत पडून, त्यांनीं यास फिरून ११ एप्रिल १७७६ रोजीं सन्मानानें गादीवर बसविलें. पुढें यानें स. १७८७ पर्यंत इंग्रजांच्या मदतीनें राज्यकारभार करून, हा निपुत्रिक राजा स. १७८७ मध्यें मरण पावला. यानें भोंसल्यांच्या वंशांतील एक मुलगा दत्तक घेऊन त्याचें नांव शरफोजी असें ठेविलें. यानें मोहनाबाई, राजसबाई व राजकुंवरबाई अशा तीन बायका केल्या; नंतर मुलाकरितां सुलक्षणाई व मोहनाबाई अशा आणखी दोन बायका केल्या. पण एकीपासूनहि यास मुलगा झाला नाहीं ( तं. रा. घ. प. ८५--९५ ).

**तुळाजी आंग्रे**—( मृत्यु स. १७८७ ) हा कान्होजी आंग्रे यांचा रक्षापुत्र. याच्या आईचें नांव गाहिनीबाई. स. १७३५ मध्यें याचे सावत्रबंधु संभाजी व मानाजी यांच्यांत यादवी सुरू झाल्यामुळें हा कुलाब्यास न येतां सुवर्णदुर्गास राहिला. सुवर्णदुर्ग याच्या ताब्यांत आणि विजयदुर्ग त्याच्या ताब्यांत अशी व्यवस्था दिसते.

संभाजी आंग्रे दौलतीवर असतां हा त्याचा कारभारी होता. स. १७३४ मध्यें हा संभाजीबरोबर हबशापासून अंजनवेल घेण्याकरितां गेला होता. पेशवे व आंग्रे यांचें वैर जुनेंच दिसतें. वसईच्या लढाईंत आंग्र्यांचा भाग दिसत नाहीं. तेव्हां पोर्तुगीज नष्ट झाले, पण इंग्रज घरांत शिरले. स. १७४० मध्यें हिराकोटाजवळ संभाजी आंग्र्यांच्या व पेशव्यांच्या लोकांत जी झटापट झाली, तींत हा जखमी होऊन पेशव्यांच्या हातीं सांपडला व पुढें संभाजी मेल्यावर ( स. १७४१ डिसें. ) याचें व पेशव्यांचें सडकून वैर जुंपलें. स. १७४२ मध्यें यानें अंजनवेलचा किल्ला घेतला. त्यानंतर शाहूनें यास सरखेल ही पदवी दिली.

आरमाराच्या जोरावर इंग्रजांचें एकहि जहाज सुरक्षित न जाऊं देणाऱ्या आणि पेशव्यांची सत्ता न जुमानणाऱ्या तुळाजीविरुद्ध दोनहि सत्ता एक झाल्या. पेशव्यांनीं याच्याकडे रत्नागिरी व सुवर्णदुर्ग हे दोन किल्ले मागितले. पण 'यानें सुईच्या अग्राइतकी जमीन देणार नाहीं' असें उत्तर दिलें. स. १७५५ च्या मार्चांत दोघांनीं याचे कांहीं किल्ले घेतले व याचें आरमार पळवून लावलें. हा ठराविक खंडणी देत असे. ती आली नाहीं म्हणून वकील पाठविला, त्याची यानें नाककान कापून विटंबना केली. त्यानंतर स. १७५६ फेब्रुवारींत लढाई होऊन याचें आरमार जळून खाक झालें. सर्व किल्ले पेशव्यांनीं घेतले. आणि याला पेशव्यांच्या स्वाधीन व्हावें लागलें ( रामाजी महादेव पाहा ).

तुरुंगांत असतांहि पेशव्यांना यानें फंदफितुरी करून अत्यंत त्रास दिला. एकदां यानें चंदनवंदनच्या तुरुंगांतून नानासाहेबांच्या मृत्यूनंतर पुणें लुटण्याचा अयशस्वी प्रयत्न केला ( रा. खं. १. २८६ ). वंदन, सोलापूर, राजमाची, विसापूर, नगर, चाकण, दौलताबाद वगैरे किल्ल्यांत याला ठेवलं होतें. अखेर हा सोलापूरच्या किल्ल्यांत मेला ( भा.व. श.पृ.७७). याचीं बायकामुलें तुरुंगांत याच्याजवळच असत.

'हा निमगोरा, उंच, भव्य, देखणा व अत्यंत दबाबदार असे. याला पाहिल्याबरोबर मूर्तिमंत धैर्याची कल्पना मनांत येते. याची कृतीहि रूपास साजेशी होती. कोणतेंहि जहाज याच्या तावडींतून सुटत नसे. इंग्रज याला थरथर कापत. हा अत्यंत संपन्न आणि कुशल होता.' असें याचें एका इंग्रजानें वर्णन केलें आहे.

याला नष्ट केल्यानें शिवाजीमहाराजांपासून वाढत आलेलें मराठ्यांचें आरमार नष्ट झालें. समुद्राच्या बाजूनें इंग्रजांचा वर्चष्मा कायमचा बसला, आणि मराठी राज्याचा मृत्यु जवळ आला. यानंतर मराठ्यांची आरमारी बाजू आनंदराव धुळपांनीं राखण्याचा प्रयत्न केला. खंडोजी माणकरहि याच्या प्रतिस्पर्ध्यांपैकीं एक होय. याच्या सहा स्त्रियांपैकीं एक सती गेली. संतति नाहीं.

**तुळ्या पवार**—( मृत्यु स. १७८० ) रघुनाथरावाचा हुजऱ्या. नारायणरावाच्या खुनांतील मुख्य. हा प्रथम हैदरकडे पळाला. त्याशीं तह झाला तेव्हां गोव्याकडे पळाला. पण पोर्तुगीजांनीं यास पेशव्यांच्या ताब्यांत दिलें. तेव्हां यास देहांत शासन झालें.

**तेजकंठ**—( स. ११५० सुमार ) काश्मीरचा राजा जयसिंह लोहरच्या वेळीं काश्मीरांत हा वकील होता. याला कोंकणच्या राजा अपरादित्यानें आपला वकील म्हणून पाठविलें होतें. यावरून हा ११ व्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत व नंतरहि होता. हा वकील उत्कृष्ट विद्वान् असल्यामुळें मंख कविकृत श्रीकंठचरित्र हें कसें उतरलें आहे, ह्याची परीक्षा करण्यास ग्रंथकर्त्याचा भाऊ जो अलंकार त्यानें जमा केलेल्या तीस पंडितांत हा एक परीक्षक होता ( श्रीकंठचरित सर्ग २५, श्लो. १०९–१११ ).

**तेजपाल**—मंत्री आशराजाला कुमारदेवी नांवाच्या विधवेपासून झालेला मुलगा. वस्तुपाल नांवाचा याला एक भाऊ होता ( वस्तुपाल पाहा ). महीतट ( महीकांठा ) देशचा राजा घुघूळ नांवाचा होता. घुघूळाची राजधानी गोध्रा होती. घुघूळ गुजराथमधून जाणाऱ्या येणाऱ्या व्यापाऱ्यांचा माल लुटीत असे. राणा वीरधवलानें सांगतलें असतांहि ऐकेना. उलट त्यानें वीरधवलाकडे काजळाची डबी व लुगडें पाठवून दिलें. त्यामुळें वीरधवलानें तेजपालाला त्याच्यावर सैन्यासह पाठविलें. घुघूळानें जोरानें तोंड दिलें, पण शेवटीं यानें त्याला पकडून वीरधवलाकडे आणिलें. वीरधवलानें काजळाची डबी घुघूळाच्या गळ्यांत बांधली आणि पूर्वी पाठविलेली साडी त्याला नेसविली. तेव्हां लज्जेनें चूर होऊन घुघूळ जीभ चावून मरण पावला.

**तेजबहादूर**—( स. १६६५ ) शिखांचा नववा गुरु. यांना मुसलमानांनीं अत्यंत हाल करून ठार मारल्यामुळें शिखांत नवचैतन्य निर्माण झालें. बलिदानतिथि वि. सं. १७२२ मार्ग. शु. ५.

**तेजसिंह गुहिलोत**—( स. १२६१-६५ सुमार ) जैत्रसिंहानंतर मेवाडच्या गादीवर हा आला. यानें परमभट्टारक, महाराजाधिराज, परमेश्वर अशीं बिरुदें धारण केलीं होतीं.

धोलक्याचा राणा वीरधवल बघेल मेल्यानंतर त्याचा धाकटा मुलगा वीसलदेव यास वस्तुपाल मंत्र्यानें गादीवर बसविलें. त्यानें वि. सं. १३०० ( स. १२४३–४४ ) च्या सुमारास त्रिभुवनपालापासून गुजराथचें राज्य घेतलें. त्याच्या वि. सं. १३१७ ( स. १२६०–६१ ) मधील दानपत्रांत मेवाडच्या राजावर स्वारी केल्याचा निर्देश आहे ( इंडि. अँटि. ६. २१० ). चीरव्याच्या शिलालेखांत जैत्रसिंहानें नेमलेल्या चितोडचा तलारक्ष श्रीभिमसिंह प्रधानासह चितोडच्या पायथ्याशीं झालेल्या युद्धांत कामीं आल्याचा निर्देश आहे. तें वीसलदेव व तेजसिंह यांचें युद्ध असावें.

याची राणी जयतल्लदेवीनें चितोडवर शामपार्श्वनाथाचें मंदिर बांधलें. हिचा पुत्र समरसिंह. तेजसिंहाची दुसरी राणी रूपादेवी असावी. हिचा बुडतऱ्याच्या विहिरीवर शिलालेख आहे. ही जालोरचा चाचिकदेव चौहान व लक्ष्मीदेवी यांची मुलगी होती. ही क्षेत्रसिंहाची माता ( एपि. इंडि. ४. ३१३–१४ ).

याच्या वेळीं वि. सं. १३१७ ( स. १२६१ ) माघ शु. ४ ला श्रावक प्रतिक्रमणसूत्रचूर्णि नांवाचें पुस्तक आघाटदुर्ग ( आहाड ) येथें ताडपत्रावर लिहिलें गेलें. तें आज अनहिलवाडा येथें सुरक्षित आहे. त्यांत याच्या महामात्याचें नांव समुद्धर असें दिलें आहे.

याच्या वेळचे दोन शिलालेख मिळाले आहेत. पहिला चितोडजवळ घाघसा गांवच्या बावडीवर आहे. तो वि. सं. १३२२ ( स. १२६५ ) कार्तिक शु. १ रविवारचा आहे. त्यांत पद्मसिंहापासून तेजसिंहापर्यंत वंशावळ आहे. तसेंच बावडी बांधणाऱ्या डिड्ड जातीच्या रत्नाच्या पूर्वजांचें वर्णन आहे. ही प्रशस्ति भुवनचंद्राचा शिष्य रत्नप्रभसूरीनें केली आहे. दुसरा शिलालेख गंभीरीनदीच्या पुलावर आहे. त्यांत चैत्रगच्छचे आचार्य रत्नप्रभसूरि यांच्या उपदेशावरून याच्या वेळीं याचा राजपुत्र कांगाच्या पुत्रानें तो बांधिल्याचें लिहिलें आहे ( बंगा. ए. सो. ज. ५५. १. ४६–४७ ).

तेजसिंह हा वि. सं. १३२४-३० ( स. १२६६–७३ ) च्या दरम्यान वारला.

**तेन्नालि रामलिंग**—( जन्म स. १४६२ ) तेलगू कवि. जन्मस्थळ तेन्नालि. पिता-रामय्या. माता-लक्षम्मा. यानें आपल्या आश्रयदात्याकरितां वैष्णवपंथ स्वीकारला. तेव्हांपासून याला रामकृष्ण म्हणूं लागले. वैष्णव होण्यापूर्वी यानें लिंगपुराण लिहिलें आहे. हा विजयनगरच्या कृष्णदेवरायापासून वेंकटतुलुवापर्यंत आश्रित होता. त्याच्या आश्रयास असतां यानें पांडुरंगमाहात्म्य नांवाचें रसाळ काव्य लिहिलें आहे. याचा स्वभाव अत्यंत थट्टेखोर होता. त्यासंबंधीं याच्या अनेक आख्यायिका आहेत ( क. च. ).

**तेरु वेल्लुवर**—हा प्रख्यात कवयित्री अव्हैयरचा भाऊ. हा उत्तम कवि होता. मैलापूरच्या वेल्लुवर नामक पुरुषानें यास वाढविलें. तेथें हा चांगला विद्वान् झाला. पुढें वयांत आल्यावर मधुरा शहरांत गेला. तेथें वेदशेखर राजाच्या दरबारांतील एकूणपन्नास पंडितांस यानें जिंकलें. सनेकर म्हणून मुख्य पंडितसुद्धां याच्यापुढें पराभूत झाला. हा जरी नीच जातीचा होता तरी यास तामीळ विद्यालयांत परवानगी मिळून याचा फार सत्कार झाला. प्रसिद्ध व्यालूवर नामक याच्या ग्रंथांत यानें माणसाच्या आयुष्यांतील निरनिराळ्या स्थितींचें वर्णन श्लोकबद्ध केलें आहे. हा ग्रंथ सबंध दक्षिण हिंदुस्थानांत प्रसिद्ध आहे. एलिससाहेबानें याचें इंग्रजींत भाषांतर केलें आहे. वेल्लुवर यानें ह्याचें संगोपन केलें म्हणून आपल्या नांवापुढें यानें वेल्लुवर हें नांव जोडलें. यानें नीतिपर कविता पुष्कळ केल्या. हा त्याच्या इतर भावंडांप्रमाणें अविवाहित होता ( क. च. ).

**तैमूरलंग**—( जन्म स. १३३६–मृत्यु स. १४०५ ) हा जातीनें तुर्क होता. याच्या बापाकडे कुश प्रांताचा कारभार होता. कांहीं लोक म्हणतात कीं हा चंगीझ-खानाचा वंशज होता. याच्या आईचें नांव तकीना खातून. हा धाडसी व तीव्र बुद्धीचा होता. हा २५ व्या वर्षी तुर्कस्थानचा राजा झाला. संकटसमयीं धैर्य खचूं न देतां हातीं घेतलेलें काम पुरें करणें हा याचा मोठा गुण होय. पुढें शत्रूचा पाडाव करून यानें समरकंदचें राज्य मिळविलें. हिंदुस्थानावर स्वारी करून तेथील हिंदु लोकांस बाटवून त्यांचीं देवळें उध्वस्त करण्याचा याचा बेत होता. यानें स. १३९८ त दिल्लीचें बादशाहीपद स्वीकारिलें. हा डिसें. १० ला दिल्लीजवळ आला आणि मार्च १९ ला सिंधुनदी ओलांडून यानें हिंदुस्थानला कायमचा रामराम ठोकला. लुटालूट केली. बगदाद प्रांतांतील बंडाळी मोड-ण्यासाठीं हा निघून गेला. जातांना यानें लोकांची कत्तल करून अगणित द्रव्य मिळविलें. हा एका लढाईत लंगडा झाल्यामुळें यास लंग हें नांव पडलें. मनुष्यजातीचा शत्रु म्हणून याची प्रसिद्धी आहे. हा जन्मापासून संकटांत वाढलेला असल्यामुळें सोशिक व कावेबाज होता. हिंदु-स्थानांत मोंगलबादशाहीस यानें सुरुवात केली. याची टापटीप, व्यवस्था, काम करण्याची शैली उत्तम होती.

**तैमूरशाह अब्दाली**—हा तिसऱ्या पानिपतच्या युद्धांतील प्रसिद्ध अहमदशाहा अब्दालीचा मुलगा. हाहि बापासारखाच उद्योगी होता. गादीवर येतांच यानें वजीर शहावलीखान यास ठार मारलें. अंत मद्यप्राशनानें विकार होऊन हा ता. १८–५–१७९३ मध्यें मरण पावला. याचा पुत्र जमानशाहा ( म. रि. म. ३ पा. २१० ).

**तैलणसिंह**—( २ कीर्तिवर्मा कदंब पाहा ).

**तैल ( तैलप ) कदंब**—( स. १०५० सुमार ) हा बनवासीच्या जयवर्मा कदंबाचा पुत्र. यानें चावुंडला-देवीशीं लग्न केलें आणि तिच्यापासून याला कीर्तिदेव हा पहिला मुलगा झाला.

**२.** (स. ११४७–११६०) हा बनवासीच्या कदंबांपैकीं दुसऱ्या तैलाचा मुलगा. हा चामलदेवीपासून झाला. याचें तैलण किंवा साउली तैलण असेंहि नांव आढळतें.

**तैल (पश्चिम) चालुक्य**—हा तिसऱ्या कीर्तिवर्मा पश्चिम चालुक्याचा मुलगा होय. याला विक्रमादित्य ३ रा या नांवाचा एक मुलगा होता.

**२.** ( स. ९७३–९९७ ) हा चवथ्या विक्रमादित्य ( प ) चालुक्याचा मुलगा. यानें कक्क राष्ट्रकूटापासून पुनः आपलें राज्य मिळविल्यामुळें पश्चिम चालुक्यांची सत्ता पुनः साधारणतः दोनशें वर्षांनीं स्थापित झाली. यालाहि विक्रमादित्य पदवी होती. तसेंच याला पहिला आहवमल्ल म्हणत. याला कल्याणीच्या शाखेचा पहिला पुरुष असें फ्लीट म्हणतो व याची कारकीर्द स. ९७३–९९७ अशी तो देतो. यानें माळव्याच्या मुंज राजाला ठार मारलें. यानें कक्क राष्ट्रकूटाची मुलगी जाकलदेवी हिच्याशीं लग्न लावलें व कल्याणी येथें पुनः आपलें राज्य स्थापिलें ( शके८९६ श्रीमुखनामसंवत्सरें ). या वेळीं याच्या हाता-खालीं चेदी, चोल, हानगळ, वेळगोळ, कुंतल वगैरे प्रांत होते. हा 'नुर्मदीतैल' अथवा 'त्रैलोक्यमल्ल' या नांवानेंहि संबोधिला जातो.

यानें राष्ट्रकूट दुसरा कक्क किंवा चवथ्या अमोघ वर्षाला जिंकलें आणि रणस्तंभ ( रण–कम्भ ) यास कैद केलें. नंतर यानें परमार घराण्यांतील मुंज ( वाक्-पति-राज २ रा ) यास ठार मारलें आणि पश्चिम गंग राजा पंचल-देव याचा जीव घेतला. त्याचप्रमाणें यानें चोलांवरती हल्ले केले. कुंतल देशाचा कांहीं प्रांत जिंकला आणि अशा रीतीनें हा सर्व राष्ट्रकूट राज्याचा गुजराथ खेरीज करून मालक झाला.

स. ९९७ मध्यें याचा मुलगा सत्याश्रय ( सत्तिग, इरि–विभुजंग ) हा याच्यानंतर गादीवर आला ( B. ).

**३.** ( स. ११५०–११६२ ) कल्याणीच्या पश्चिम चालुक्य घराण्यांतील ( दुसऱ्या ) जगदेकमल्ल चालुक्याचा हा भाऊ होय. स. ११५० मध्यें हा आपल्या भावाच्या-नंतर गादीवर आला.

कलचुरी राजा बिज्जल, कदम्ब ( गोव्याचे ) राजा शिवचित्त पेरमादि, विजय, पांड्य, सिंदव चावुंड २ रा वगैरे राजे याचे प्रतिस्पर्धी होते. कलचुरि राजा बिज्जल यानें याचा बराच प्रांत बळकाविला होता. याचा पराभव काकतीय प्रोल राजानें केला होता. स. ११६२ मध्यें हा मरण पावला. याच्यानंतर याचा मुलगा सोमेश्वर ४ था हा गादीवर आला ( B. ).

हा प. चालुक्य घराण्यांतील ( कल्याणीचे ) तिसऱ्या सोमेश्वराचा मुलगा होय. याला त्रैलोक्यमल्ल तिसरा असें म्हणत. याचा सेनापति बिज्जण ( बिज्जल ) कलचुरी यानें याला स. ११५७ पर्यंत कैदेंत ठेवलें होतें. त्यानें कल्याणी सोडून अण्णेगिरी ही राजधानी केली व स. ११६२ मध्यें कलचुरींची स्वतंत्र सार्वभौम सत्ता स्थापिली.

**तोटकाचार्य**—आद्य शंकराचार्यांचा शिष्य. यानें लिहिलेले ग्रंथः—१ शंकरदेशिकाष्टक, २ श्रुतिसारसमुद्ध-रणम् सटीकम् ( १७९ श्लोकांचा ग्रंथ ).

**तोडरमल्ल**—( स. १५३५-१५८९ ) हा अकबर-बादशहाच्या दरबारांतील एक सुप्रसिद्ध दिवाण. कांहींच्या मतें हा टंडण नामक क्षत्रिय कुलांत जन्मला. हा प्रथम अकबर बादशहाच्या दरबारांत एक कारकून म्हणून होता; परंतु आपल्या अंगच्या गुणा-मुळें हा प्रसिद्धीस आला. याला अकबरानें स. १५६७ मध्यें अयोध्येचा शिकंदरशहावर पाठविलें असतां, यानें त्याचा पूर्ण पराभव केला. ह्या विजयाबद्दल याला अकबरानें दिवाणाची पदवी दिली. हिंदी कवि म्हणून तोडर, संस्कृत लेखक म्हणून टोडर व राजकारणी पुरुष म्हणून तोडरमल्ल अशा निरनिराळ्या नांवांनीं हा संबोधिला जातो. यानें गुजराथमध्यें जमिनीची मापणी करून तिचें वर्गीकरण केलें व जमीनमहसुलाची पद्धत घालून दिली. यानें राज्यांत, मुलकीखात्यांत हिंदी भाषेच्या ऐवजीं फार्सी भाषेचा उपयोग केला. यानें वसुलाची पद्धत घालून दिली तिला 'अस्सल-इ-जमा-इ-तुमारे' असें नांव आहे.

यास अकबरबादशहानें 'वकील-उस-सलतनत,' आणि 'मुश्रीक-इ-दिवान' असे दोन मोठे अधिकार दिले. हा कट्टा हिंदुधर्माभिमानी होता. याला धारू नांवाचा एक मुलगा होता. हा वयाचें ५४ व्या वर्षी लाहोर येथें मरण पावला.

हा तोडरानंद ग्रंथाचा कर्ता. टोडरानंद या ग्रंथांत निर-निराळीं प्रकरणें पाडून त्यांत श्राद्ध, व्यवहार, प्रायश्चित्त व विवाह वगैरे गोष्टींची चर्चा केली आहे आणि त्यांनाच श्राद्ध-सौख्य, व्यवहारसौख्य अशीं शेवटीं 'सौख्य' शब्द जोडून नांवें दिलीं आहेत. यानें 'श्राद्धसौख्य व विवाहसौख्य' हें ग्रंथ लिहिले. यानें हिंदी भाषेंतहि पुष्कळ कविता केल्या.

**तोतारंबी**—अप्पय दीक्षिताची ब्राम्हणेतर पत्नी. हिच्या पित्याचें नांव श्रीरंगराजाचार्य. पुत्र-रंगराजाध्वरी.

**तोयिमदेव कदंब** —( स. १०४० सुमार ) हा कदंब घराण्यांतील एक राजा. हा वनवासी व पानुंगळ जिल्ह्यांत राज्य करीत होता.

**तोयिंग**—एक चिनी यात्रेकरू. हा वीई देशाचा राहणारा होता. इसवी सनाच्या पांचव्या शतकांत हा हिंदुस्थानाकडे निघाला होता व गांधारापर्यंत येऊन परत गेला. याचा निर्देश सुंगयुन या चिनी प्रवाशानें शेनशी किंवा सुदान पर्वताच्या वर्णनाच्या वेळीं व पोकीन विहा-राच्या वर्णनांत केला आहे. त्यावरून याचा पत्ता लागतो.

**तोरमाण**—(स. ४९९-५१६) हूण वंशांतील अत्यंत प्रतापी राजा. मध्य आशियामध्यें राहणाऱ्या एका आर्य जातीचें नांव हूण असें आहे. लाहोरच्या अजबखान्यांत याचा एक लेख आहे. त्यांत याला 'महाराजाधिराज, षाही जऊव्ल' असें म्हटलें आहे ( एपिग्राफिका इंडिका, भाग ११, पा. २३९ ). जऊव्ल हें याच्या कुलाचें नांव असावें. महाराजाधिराज हा संस्कृत भाषेंतील किताब आहे. षाही हा मध्य आशियांतील भाषेमधील किताब आहे. कुशानवंशांतील राजांच्या नांवांमागेंहि षाही हा किताब लावलेला आढळतो. यावरून कुशानवंशाचीच हूण ही एक शाखा आहे असें कांहीं विद्वानांचें अनुमान आहे. अल-बेरुनीचें म्हणणेंहि वरील अनुमानाला पोषक असेंच आहे. अल्बेरुनी आपल्या 'तहकीके हिंद' या ग्रंथांत काबूल-( उदभांडपुर )च्या शाही नांवाच्या हिंदु राजाच्या वर्णनांत लिहितो-शाहीवंशाचा मूळ पुरुष बर्हतकीन नांवाचा होता. याच वंशांत कनिक ( कनिष्क ) नांवाचा राजा झाला. त्यानें पुरुषावर ( पुरुषपुर, पेशावर ) येथें एक विहार ( बौद्धमठ ) बांधला. त्याला लोक कनिकचैत्य म्हणतात. या वंशांत साठ राजे झाले. शेवटला राजा लगतोरमाण ( लघु तोरमाण ) त्याला मारून त्याचा वजीर ब्राह्मण (?) कल्लर लल्लिय यानें त्याचें राज्य घेतलें. हा कल्लर लल्लिय ब्राह्मण नसून तंवर रजपूत असावा, असें पं. गौ. हि. ओझा म्हणतात. अल्बेरुनी शाहिवंशी राजांना तुर्क म्हणजे तुर्कस्थानांतील मूळ रहिवाशी मानतो; व त्यांची उत्पत्ति तिबेटांत झाली असें समजतो. भूतानमधील लोक आजहि तिबेटी लोकांना 'हूणिया' या नांवानें संबोधितात. यावरून कुशान व हूण हे एकच होत. तसेंच मध्य आशिया-मधून हिंदुस्थानांत आले असले तरी मूळचे तिबेटांतील होत असें दिसतें. हूणांपैकीं तोरमाण हा पंजाबांतून दक्षिण-कडे आपल्या राज्याचा विस्तार करीत असतां गुप्तांपैकीं कुमारगुप्ताशीं याचें युद्ध झालें. त्यांत कुमारगुप्त मारला गेला. पण कुमारगुप्ताचा पुत्र स्कंदगुप्त यानें मोठ्या शौर्यानें लढून याचा पराजय केला. पण बुधगुप्ताच्या वेळीं स. ४९९ च्या नंतर तोरमाणानें गुजराथ, काठेवाड, राज-पुताना, माळवा वगैरे जिंकून आपल्या राज्यांत सामील केला. याचें राज्य गांधार, पंजाब व काश्मीर वगैरे भागांवर आधींच होतें. नंतर थोड्याच दिवसांत याचा देहान्त होऊन याचा पुत्र मिहिरकुल ( मिहिरगुप्त ) गादीवर आला. हा स. ५१० मध्यें मरण पावला.

तोरमाण आणि मिहिरकुल या दोन हूण राजांची माहिती मिळते. याशिवाय आणखीहि हूण राजे पंजाब वगैरे भागांत होऊन गेले असले पाहिजेत. पण त्यांची नीट माहिती मिळत नाहीं. मोघम युद्ध वगैरे झाल्याचे निर्देश आढळतात. स्थानेश्वरचे आणि कनोजचे बैसवंशी राजे प्रभाकरवर्धन व राजवर्धन हूणांशीं लढले होते ( एपि.

इंडि. भा. १, पृ. ६९ ). तसेंच माळव्याचा परमार राजा हर्षदेव ( सीयक ) ( एपि. इंडि. भा. १, पृ. २२५ ), हैहय ( कलचुरि ) वंशज राजा कर्ण ( एपि. इंडि. भा. २, पृ. ९ ), परमार राजा सिंधुराज ( एपि. इंडि. भा. १, पृ. २२८ ), राष्ट्रकूट ( राठोड ) राजा कक्कल ( कर्कराज ) ( इंडि. अँटि. भा. १२, पृ. २६८ ) यांनीं हूणांशीं युद्ध केल्याची माहिती त्यांच्या शिलालेखांवरून मिळते. सध्यां हूणांच्या राज्याचा अवशेष नाहीं. राजपुताना व गुजराथ येथील कुणबी लोक हूण जातीचे आहेत असें अनुमान करतात. ते उत्तम शेतकरी आहेत हें प्रसिद्ध आहे.

हूण हिंदुस्थानांत येण्यापूर्वी त्यांनीं इराणचा खजिना लुटला, व तो ते इकडे घेऊन आले. त्यामुळें इराणांतील ससान वंशांतील राजांचीं नाणीं राजपुताना वगैरे भागांत अनेक जागीं जमिनींत गाडलेलीं आढळतात. मिहिरकुलानेंहि बहुतेक तशींच आपलीं नाणीं पाडलीं. हूणांचें राज्य नष्ट झालें तरी विक्रमाच्या बाराव्या शतकापर्यंत तशींच नाणीं इतर राजांनीं पाडलीं. पण त्यांचा आकार कमी होत गेला व त्यांवरील राजाचा चेहरा ओळखूं येईनासा झाला. लोक त्यांवरील आकृतीला गाढवाचा खूर मानून त्याला गधिया म्हणूं लागले. वास्तविक त्याचा गाढवाशीं कांहीं संबंध नाहीं. वरील दोन राजांच्या नांवांशिवाय इतर हूण राजांचीं नांवें व माहिती मिळत नसली तरी ते येथें मांडलिक म्हणून नांदत असावेत असें म्हणावें लागतें. त्यांच्याशीं पुढील लोकांचीं झालेलीं युद्धें, नाणीं यांवरून संबंध दाखवितां येतो, हें वर आलेंच आहे. विवाहसंबंधावरूनहि वरील म्हणण्याला पुष्टि मिळते.

मेवाडचा गुहिलवंशी राजा अल्लट ( स. ९५३ ) याची राणी हरियदेवी हूण वंशांतील होती ( इंडि. अँटि. भा. ३९, पृ. १९१ ). तसेंच चेदीचा कलचुरी वंशज राजा गांगेयदेवाचा पुत्र कर्ण( स. १०४२ )चा विवाह हूणकुमारी आवल्लदेवीशीं झाला होता ( एपि. इंडि. भा. २, पृ. ४ ). कुमारपालप्रबंध व भाटांचीं पुस्तकें यांत हूणांची गणना ३६ वंशांत केली आहे.

याचा हरिगुप्त नांवाचा एक जैन आचार्य गुरु होता. हरिगुप्तानें जैनधर्माचा फैलाव याच्या राज्यांत केला. यानें जैनधर्मी गुरु केला होता त्याअर्थी हा जैनधर्म स्वीकारलेला किंवा जैनांबद्दल सहानुभूति बाळगणारा असला पाहिजे. हा स. ५१६ मध्यें मरण पावला. हें नांव तोहराय असेंहि आढळतें ( जैनिझम इन नॉर्थ इंडिया ).

**२.** कमलुक लल्लीयपुत्र ( रा. त. ५. २३३ ).

**तोरराय**—( तोरमाण पाहा ).

**तोष**—एक हिंदी कवि. तोषनिधि असें याचें नांव आहे. हा चतुर्भुज शुक्लाचा पुत्र. हा अलाहाबाद जिल्ह्यांतील सिंगरौर येथील राहणारा. यानें नायिकाभेदावर 'सुधानिधि' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे ( स. १७३३ ). विनयशतक व नखशिख असेहि याचे ग्रंथ ऐकूं येतात.

**तोषनिधि**—( तोष पाहा ).

**तोंडमाण इळनीरयन**—नेडूचा पुत्र. हा त्याला एका नागकन्येपासून झाला होता. हा पुढें कांचीचा प्रसिद्ध सम्राट् झाला. याची प्रशस्ति पेरुंबाणारीप्पदाई काव्यांत वर्णिलेली आहे. याच्या वेळीं कावेरापट्टन व उरैयूर राजधान्या समुद्राच्या वाढीनें वाहून गेल्या. शेंणुत्तवन चेर राजानें याच्यावर स्वारी करून याचा पराभव केला व याचें बहुतेक राज्य काबीज केलें. पुढें पांड्य व पल्लव यांचें प्राबल्य वाढल्यानें चोल घराणें हतप्रभ झालें. याची हकीगत आढळत नाहीं.

**तौत**—हा काश्मीरी पंडित अभिनवगुप्ताचा अलंकारशास्त्रांतील गुरु होता. काव्यकौतुक वगैरे याचे ग्रंथ आहेत. "इति तौताः" असें म्हणून कुमारिलभट्टसांप्रदायाच्या मताचा निर्देश करण्याची पद्धति आहे. तुतातिक म्हणून कुमारिलाचा निर्देश श्रीकंठचरित्रांत आढळतो ( २५. ६५-६६ ).

**तौतुक**—इंदुराज कवीचा आजा.

**तौसनी**—एक कवि. मनोहरदासाचें हें कवितेंतील नांव आहे. हा हिंदु होता तरी यास मुहम्मद मनोहर किंवा मीर्झा मनोहर असें म्हणत. याचा पिता लोणकरण ( मिठाचा व्यापारी ). हा सांबरचा राजा होता. हा अकबराच्या वेळीं होता.

**त्यागवल्ली**—कुलोत्तुंग चोलाची तिसरी पत्नी व पट्टराणी. हिला लोकमहादेवी मधुरान्तकी असेंहि म्हणत असत.

**त्रिअंपारा**—( स. १६०५ चा सुमार ) कोचीनचा राजा. यानें पोर्तुगीज लोकांस प्रथम आश्रय दिला; व त्यांच्या आश्रयानें कालिकतच्या झामोरिनचा पराजय केला.

**त्रिकमदास**—( स. १७३४ ) गुजराथी कवि. नागर ब्राह्मण. रुक्मिणीविवाह व डाकोरनाथ या विषयांवर यानें बरीचशी काव्यरचना केली.

**त्रिनयन पल्लव**—( सहावें शतक ) करिकालाचोलाचा समकालीन. यानें कांची सुवर्णानें मढविली.

**त्रिनेत्र कदंब**—( चंद्रगड पाहा ).

**त्रिपुरारि साहिनी**—( स. १२७२-७३ ) हा म्हैसूरच्या कायस्थ घराण्यापैकीं जन्नीगदेवाचा मुलगा. याचा धाकटा अंबदेव.

**त्रिभुवनपाल सोळंकी**—अनहिलवाडच्या सिद्धराज जयसिंहाचा चुलतभाऊ. याचाच मुलगा कुमारपाल हा सिद्धराजानंतर राजा झाला.

२. हा अनहिलवाडच्या दुसऱ्या भीमदेव सोळंकीचा पुत्र. यानें दोन वर्षें राज्य केलें. हा दुर्बल असल्यानें वीसलदेव वाघेलानें याचें राज्य स.१२४३मध्यें घेतलें. यानें मेवाडच्या जैत्रसिंह राजाबरोबर कोट्टडवु ( कोटडा )च्या जवळ लढाई केली ( ना. प्र. प. ३, पृ. २ टिपण ).

**त्रिभुवनमल्ल कदंब**—हा गोव्यांतील कदंबांपैकीं तिसऱ्या जयकेशिन् कदंबाचा मुलगा. याची पत्नी माणिक्यदेवी व पुत्र शिवचित्तदेव.

**त्रिभुवनमल्ल चालुक्य**—पश्चिम चालुक्यांपैकीं विभुविक्रमाचें नामान्तर.

**त्रिभुवनमल्ल होयसल**—( विनयादित्य होयसल पाहा ).

२. ( विट्टिदेव होयसल पाहा ).

**त्रिभुवन वीरदेव चोल**—हा चोलांपैकीं तिसऱ्या राजेन्द्राचा पुत्र. हा शेवटचा चोल राजा होय. यानें स. १३३२ पर्यंत राज्य केलें.

**त्रिम्मप्पा**—याला वय्याम्वा या बायकोपासून सेव्वाप्पा हा मुलगा झाला. हा तंजावरचा राजा होता. याचें तिम्म असें नांव आहे.

**त्रिलोचनपाल चालुक्य**—हा लाट देशांतील चालुक्य घराण्यांतील राजा. हा स. १०५१ मध्यें हयात होता.

**त्रिलोचनपाल प्रतिहार**—रघुवंशी प्रतिहारांपैकीं राज्यपालाचा उत्तराधिकारी. याच्या वेळचें एक दानपत्र मिळालें आहे तें वि. सं. १०८४ ( स. १०२७ ) मधील आहे ( इंडि. अँटि. भा. २, पृ. २३७ ).

**त्रिलोचनपाल शाही**—( स. १००९–२१ ) पंजाबांतील शाही घराण्यांपैकीं जयपालाचा दुसरा मुलगा. स. १००९ मध्यें गादीवर आला. यानें गझनीच्या महमूदाविरुद्ध लढण्याकरितां काश्मीरच्या संग्रामराज लोहरची मदत मागितली, त्याप्रमाणें त्यानें तुंग नांवाचा आपला प्रधान मदतीस पाठविला. पण त्यानें गनिमी कावा सोडून तुर्कांना उघड तोंड दिल्यामुळें पराजय पावून यास पळून जावें लागलें; आणि गांधार मुसलमान झाल्यामुळें शाही घराण्याचें नांवहि नष्ट झालें. रुद्रपाल वगैरे याचे मुलगे काश्मीरच्या राजाच्या आश्रयास होते, असें राजतरंगिणीवरून दिसतें ( म. यु. भा. १, २. ६७ ).

इलियटनें तर्क केल्याप्रमाणें तौशीच्या लढाईंत काश्मीरच्या सरहद्दीवर पराभव झाल्यानंतर त्रिलोचनपाल हा कनोजचा राजा राज्यपाल याच्या आश्रयास येणें शक्य आहे. अल्बेरुनीनें त्रिलोचनपाल स. १०२१ ( हि. ४१२ ) मध्यें मरण पावला, असें म्हटलें आहे. राहिब नदीवरील लढाई त्या सालीं झाली असावी आणि त्रिलोचनपाल हा त्या लढाईत शौर्यानें लढून पडला असावा ( मध्ययुगीन भारत ३. ११९ ).

**त्रिलोचनपाल सोळंकी**—हा लाट देशाच्या सोळंकीवंशांपैकीं वत्सराजाचा पुत्र. याचें एक ताम्रपत्र शा. श. ९७२ ( स. १०५१ ) पौष कृष्ण अमावास्येचें मिळालें आहे.

**त्रिविक्रम**—नलचंपू व मदालसाचंपू यांचा कर्ता.

**त्रिशला**—( महावीर पाहा ).

**त्रिंबक अनंत ऊर्फ दादा नाईक भिडे**—( मृ. स. १८५२ ) एक मराठी कवि. हा चित्पावन नित्युंदिन गोत्री ब्राह्मण. याचें मूळ गांव रत्नागिरी जिल्ह्यांतील गणपतीचें पुळें होय. हा प्रथम पुणें येथें व नंतर ग्वालेर येथें राहूं लागला. याला स्वप्नांत दीक्षा मिळाल्यामुळें हा एकनाथास गुरु मानूं लागला. याचीं कांहीं पदें प्रसिद्ध आहेत. त्यांवरून हा एक सरस कवि दिसतो. हा पंढरपुरास मरण पावला.

**त्रिंबकजी गव्हाणे**—पहिल्या रघूजी भोसल्याचा प्रमुख सरदार.

**त्रिंबकजी डेंगळे**—( मृत्यु स. १८२९ ) हा दुसऱ्या बाजीरावाच्या पदरीं हेर म्हणून होता. पुढें यास बाजीरावानें खूष होऊन खास तैनातींतील जागा दिली. हा इंग्रज-द्वेष्टा व मराठी राज्य वांचविण्यासाठीं धडपडणारा पुरुष होता. ह्यास एकंदर १२ बायका होत्या. त्रिंबकजी ठाण्याहून इंग्रजांच्या कैदेंतून निसटला व यानें बंड केलें. तेव्हां इंग्रजानें यास पकडून देणारास दोन लक्षांचें बक्षीस व हजाराचें गांव इनाम देऊं केलें. ह्याचें मूळ ठिकाण संगमनेर तालुक्यांत निंबगांव जाळी हें असून तेथें अद्यापि ह्याचा वंश नांदत आहे. ह्यास गणपतराव नांवाचा एकच मुलगा होता. शेवटीं हा ता. १६ आक्टोबर १८२९ रोजी सकाळीं ८ वाजतां चुनारगड किल्ल्यांत इंग्रजांच्या कैदेंतच मृत्यु पावला. त्रिंबकजी हा लहानसा, ठेंगू व चिडखोर गृहस्थ होता ( गो. स. सरदेसायांची माहिती; गंगाधरशास्त्री पटवर्धन पाहा ).

त्रिंबकजीच्या साथीदारांचा उल्लेख पुढीलप्रमाणें आहे: १ बापु गायकवाड सेटफलकर, २ भोगाजी, ३ रविराव

शिंदे केणीकर, ४ तिमापा वोतुरी, ५ माहादजीपंत नातेपोतेकर, ६ गोंधार्जी डेंगळे, ७ सयाजी मुळे, ८ आप्पाजी कुरवावीकर, ९ निंबाजी जाधव फलटणकर, १० महिपतराव डेंगळा, ११ बापु बरडकर, १२ दार्जी उघले ( मं. अहवाल श. १७३४ ).

**त्रिंबक भास्कर**—हा शिवाजीमहाराजांचा पुरंदर किल्ल्यावरील सुभेदार होता. शिवाजीनें तासकरी नेमण्याकरितां याच्याकडे दोन ब्राह्मण पाठविले व त्यांना दरमहा तीस लारी ( एक नाणें ) देण्याविषयीं दंडवतपूर्वक लिहिलें आहे ( स. १६७० एप्रिल १३; श. १५९२ वैशाख शु. ४ ) असें प. सा. सं. १३०३ वरून दिसतें. सिद्दी जोहारानें पन्हाळ्यास वेढा दिला असतां नेताजी पालकरानें पन्हाळ्यांत मदत पोंचविण्याचा प्रयत्न केला. तो फसला तेव्हां याला तेथील मुख्य सेनापति नेमून याच्यावर लढण्याची जबाबदारी सोंपविली व शिवाजीमहाराज खुबीनें निघून गेले ( शि. भा. २६. ५४–५५ ). पुढें पन्हाळा यानें शिवाजीच्या आज्ञेनें त्याच्या ताब्यांत दिला आणि त्याला भेटून त्याशीं मैत्री जोडण्याचा प्रयत्न केला ( शि. भा. १८. ५७ ). नंतर हा राजगडास निघून आला. पुढें यानें शृंगारपुरच्या स्वारींत चांगला पराक्रम केला (श. १५८३ वैशा. ). म्हणून याला प्रभावळी प्रांताचा अधिकारी नेमलें. हा कुशल योद्धा होता ( शि. भा. ३२. २ ).

**त्रिंबकराव अमृतराव कदम ( बांडे )**—याची मुलगी पहिले सयाजीराव गायकवाड यांस दिली होती.

**त्रिंबकराव दाभाडे**—( मृत्यु स.१७२९ एप्रिल १ ) हा सेनापति खंडेराव दाभाड्यांचा मुलगा. स. १७२९ त सरबुलंदखानाकडून मराठ्यांस गुजराथची चौथाई व सरदेशमुखी मिळाली. त्याचा मोकासा दाभाड्यास दिला. पुढें बाजीरावानें त्याच्या प्रांतांत ढवळाढवळ केल्यामुळें व शाहूचें त्याजविषयींचें मन, निजामास सामील आहे म्हणून, कलुषित केल्यामुळें बाजीरावाशीं त्याचें वितुष्ट आलें. शेवटीं डभईस ह्या दोघांची लढाई होऊन तींत त्रिंबकराव मारला गेला. स. १७५० त नानासाहेबानें गायकवाडाशीं संगनमत करून गुजराथ वांटून घेतला व दाभाड्यास निर्माल्यवत् केलें ( वि. वि. ज्ञा. वि. व. ६२ अं. ११ पृ. ४२४–२५ ). त्रिंबकरावाचा मृत्यु हा पेशव्यांच्यावरील एक कलंक आहे. या बाबतींत पुढील उतारे पाहावेत. “ लढाई शिकस्त झाली नंतर भावशिंगराव टोके याचे बारगिरानें दगा करून जोडगोळया मारिल्या त्या मस्तकीं राहिल्या. त्यायोगें मृत्यु रणीं हत्तीवर पावले ” ( रा. खं. ३. १६६ ). मानाजी जाधव लिहितात “ चिमाजी आपा म्हणतात त्रिंबकराव दाभाडे मारला. महाराजांनीं काय केलें ” ( पे. द. १७. ३० ).

**२.** ( मृत्यु स. १७६६ ) हा दाभाड्यांचे घराण्यांतील यशवंतरावाचा मुलगा. हा पेशव्यावर व गायकवाडावर रुष्ट होऊन औरंगाबाद येथें निजामाच्या आश्रयास जाऊन राहिला. त्यावरून याचीं वतनें व इनाम पेशव्यांनीं जप्त केलें. पुढें राक्षसभुवनावर निजामाचा पाडाव झाला. तेव्हां दाभाड्यांचीं वतनें व सेनाखासखेली पेशव्यांनीं दमाजी गायकवाडास दिलीं; आणि दाभाड्यांच्या कुटुंबाचा परामर्षही गायकवाडांनीं करावा असें ठरलें ( ता. २४–९ १७६३ ). यावरून हा जास्तच रुष्ट होऊन मुलखांत धामधूम करूं लागला; आणि पुढें वैताग करून औरंगाबादेजवळ घृष्णेश्वराचे मंदिरांत जाऊन राहिला. तेथेंच हा स. १७६६ त मरण पावला.

**त्रिंबकराव पटवर्धन**—( स. १७३६–७२ ) कुरुंदवाडच्या गादीचे संस्थापक. हरभटांचे तिसरे पुत्र. प्रथम कापशीकर राणोजी घोरपड्यांकडून कुरुंदवाडगांव यांचेकडे कर्जांत आला.

**२.** ( स. १८०० ) कुरुंदवाडपैकीं रघुनाथरावाचा मुलगा.

**त्रिंबकराव (मामा) पेठे**—(मृत्यु स. १७७४ एप्रिल) हा विसाजी कृष्ण पेठे यांचा मुलगा. बाळाजी विश्वनाथाचा जांवई व्यंकटराव घोरपडे याची मुलगी वेणूताई त्रिंबकरावास दिली होती. शाहुछत्रपतीच्या मृत्यूनंतर पेशव्यांच्या कारभारांत हा त्यांचा मुख्य हस्तक होता. याची बहीण रखमाबाई चिमाजीआप्पास दिली होती. मामांचे वडील नागपूरकरांच्या पदरीं होते.

माधवराव व रघुनाथराव यांच्या भांडणांत मामा माधवरावाचे बाजूस होते. दादाचे पक्षास मिळून सखारामबापू कारभार नीट करीना तेव्हां माधवरावानें तो त्याजवळून काढून त्रिंबकराव मामास दिला ( ता. १२.२. १७५१ ). पण तो यास कांहीं महिनेंहि संभाळतां आला नाहीं.

कर्नाटकांतील हैदरवरील स्वारींत माधवरावानें याकडे मुख्य कारभार सोंपविला होता ( १७७०–७२ जून ). त्याच्या दोन वर्षांच्या कारभारांत रणशौर्याचे, धाडसाचे, व अनेक अणीबाणीचे प्रसंग उद्भवले. हा अनुभवी व राज्यहिताविषयीं अत्यंत दक्ष होता. परंतु याचा स्वभाव तुसडा असल्यामुळें लोक याजवर नाराज असत. गोड बोलून सर्वांवर छाप बसविण्याची कला यास नव्हती. ‘गुर्रमकोंडा सर केल्यापासून लवकरच गर्व होऊन मनुष्य तृणप्राय

समजतात. हरभरी झाले आहेत. कोणी माणूस खातेरेंत येत नाहीं ' असें याजबद्दल वर्णन आहे. परंतु माधवरावाचें मत याजविषयीं चांगलें होतें. ' मामांनीं फार संभाळिलें. याच्या एक दोन गोष्टी फार चांगल्या आहेत. पुढेंहि काम यांवरच आहे. ' असें माधवराव लिहितो. दोन वर्षे शिकस्त करून मामानें माधवरावाचे संकल्प पूर्ण करून मरणसमयीं त्याचें मन निश्चित केलें.

दादासाहेबांच्या कारकीर्दींत बारभाईच्या कारस्थानांत मामा प्रमुख होते. हेच त्या वेळीं सेनापति होते. मामाला भोसल्यावर दादानें पाठविलें होतें. हे तिकडे न जातां दादावर स्वारी करण्याची वाट पाहत बसले ( स. १७७४ डिसेंबर ). पुढें कारभाऱ्यांनीं भोसले, फडके व मामा यांना दादावर पाठवलें. त्यांची गांठ पंढरपुराजवळ कासेगांव येथें पडली. मामानें घाई व उतावीळ करून दादावर हल्ला केला. त्यांत मामा फार जखमी होऊन पाडाव झाला ( २६ मार्च १७७४ ). पुढें ८ वे दिवशीं जखमा असाध्य होऊन खडकतचे मुक्कामीं मामा मरण पावले. आनंदीबाईनें पकडल्यावर याची फार निंदा केली. तेव्हांचें मामांचें सडेतोड उत्तर प्रसिद्ध आहे. मामांचा मुलगा विश्वासराव हा पुढें पेठयांच्या पथकाचा मुख्य झाला.

**त्रिंबकराव रेटरेकर**—हा भिमराव रेटरेकराचा वंशज असून नेहमीं दुसऱ्या बाजीरावाबरोबर असे. बाळाजीपंत नातूंनीं यांना पुष्कळ आमिष दाखविलें, परंतु हा इंग्रजांना मिळाला नाहीं. पेशवाई बुडाल्यानंतर याची जहागिरी गेली, परंतु याची बाणेदार वर्तणूक लक्षांत घेऊन एल्फिन्स्टनसाहेबांनीं याला कांहीं गांवांची जहागीर देऊन त्यास तिसऱ्या प्रतीचे सरदार केलें ( इ. सं. १.११ जु. ऐ. गो. २३ ).

**त्रिंबक विनायक**—(स. १७७४ सुमार) पेशव्यांचा प्रमुख सरदार. कोकणचा कारभार पाही. साष्टीवर इंग्रजांशीं लढण्यास गेला.

**त्रिंबक रघुनाथ हणमन्ते**—हा रघुनाथराव हणमंत्यांचा पुत्र. यानें 'आशौचनिर्णय' नांवाचा ग्रंथ संस्कृतभाषेंत लिहिला. तो त्र्यंबकी नांवानें लोकांत प्रसिद्ध आहे. हा ग्रंथ संभाजीच्या कारकीर्दींत लिहिला असावा ( मं. वार्षिक वृत्त १८३६, क्र. १५ ).

**त्रिंबक सोनदेव डबीर**—हा सोनोपंत डबीराचा मुलगा. हा शिवाजीबरोबर आग्र्यास गेला होता. शिवाजी तेथून आल्यानंतर त्याच्या मागून याची सुटका झाली ( स. ३. ४. १६६९ ). याचा पुत्र रामचंद्र हा राज्याभिषेकाच्या वेळीं शिवाजीचा सुमंत होता. हा शिवाजीच्या अत्यंत विश्वासांतला होता. सोनोपंताची स. १६६५ सालीं तुला झाली आणि याचा मुलगा रामचंद्र हा राज्याभिषेकाच्या वेळीं सुमंत होता. यावरून याच्या राज्यकारभारांतील कारकीर्दीची कल्पना येते.

**त्रिंबकशास्त्री**—( मृत्यु स. १८२२ ) भाष्यभानुप्रभा ग्रंथाचा कर्ता.

**त्रिंबक सदाशिव ओढेकर**—यानें राक्षसभुवनच्या लढाईत चांगला पराक्रम गाजविला. हे मूळच्या चांदवड जवळच्या रोहडयाचे राहणारे.

**त्रिंबक सदाशिव (नाना) पुरंदरे**—हा बहुधा साताऱ्चे कारभारावर असून स. १७६४ त माधवरावाचे स्वारीबरोबर कर्नाटकांत गेला होता. हा अंबाजी पुरंदऱ्याचा पुतण्या होता. हा साताऱ्यास राहून पेशव्यांची चांगली कामगिरी बजावीत असे. हा नेहमीं स्वारीवर जात असे ( म. रि. म. ४ पा. १६७; म. रि. म. २ पा. २५६ ).

**त्र्यंबकराज**—( ग्रंथकाल स. १५७२–१५८० ) हे सिद्धेश्वर सांप्रदायाचे मूळपुरुष होते. हे एकनाथाच्या कालीं होऊन गेले. यांच्या बालबोध ग्रंथास बालावबोध असेंहि नांव आहे. कृष्णदेव-भैरव-त्र्यंबकराज असा यांचा वंशक्रम आहे. हे देवीचे उपासक असत. यांनीं सप्तशृंगीच्या डोंगरावर जाऊन देवीस प्रसन्न करून घेतल्यावर श्रीसिद्धेश्वर यांनीं यास पंचवचनात्मक उपदेश केला. या पांच वचनांच्या आधारें यानें बालबोध किंवा बालावबोध नांवाचा ग्रंथ रचला. हा ग्रंथ लिहिण्यास शके १४९४ मध्यें प्रारंभ करून तो शके १५०२ मध्यें संपविला. हाच ग्रंथ या त्र्यंबकराजापासून सातवा पुरुष बापजी पंडित यानें निरंजनमाधवास शिकवला. या ग्रंथाची निरंजनमाधवानें शके १७८४ मध्यें केलेली प्रत रा. ल. रा. पांगारकर यांस मिळाली आहे. या ग्रंथाचें तीन खंड असून ओवीसंख्या ५२४० आहे. यांत ४५ कथनें आहेत. हा ग्रंथ मोठा प्रौढ असून त्यांत वेदान्तादि शास्त्रांचा फार खुलासा केला आहे. शिवपूर्वकालीन लोकस्थितीचें ज्ञान होण्यास हा ग्रंथ उपयुक्त आहे ( म. क. च. १ पा. ३२७ टीप ). हल्लीं प्रसिद्ध असलेला त्र्यंबकी हा वैद्यशास्त्रावरील व धर्मशास्त्रावरील ग्रंथ याचाच असावा.

## थ

**थगनपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं एकोणिसावा सिद्ध. जात शूद्र. हा शांतिप्पाचा गुरु. ग्रंथ-दोषकोष-तत्त्वदीपिका ( तं. ४८।६ ).

**थानकवि**—( ग्रंथकाल स. १७९० ) हिंदी कवि. याचें नांव थानराय निहाळराय. यानें ' दलेलप्रकाश ' नांवाचा रीतिग्रंथ ( बसवाडा ) राजा दलेलासहाच्या नांवानें लिहिला.

**थिवेनाट**—( स. १६६६ ) युरोपियन प्रवासी. हिंदुस्थानांत आला होता. यानें औरंगजेबाचा जुलूम वर्णिला आहे.

**थॉमस स्टीफन**—( स. १५४९-१६१९ ) मराठी ख्रिस्तपुराणाचा कर्ता.

**थोटेपंत**—( परशुराम भवानराव पाहा ).

---

## द

**दत्त**—याच्या कविता चांगल्या आहेत. त्यांत साळोत्रावर कांहीं श्लोक, श्लोकबद्ध चिलयाचरित्र व कांहीं शृंगारिक श्लोक आहेत ( मं. त्रै. ४. २ ले. ४४ ).

२. पद, अभंग करणारा मराठी कवि ( मं. वा. इ. श. १८३७ ले. १२५ ).

३. ( कवीचा काळ स. १७७२ सुमार ) एक हिंदी कवि. हा माडी येथील ब्राह्मण असून चरखारीच्या खुमानसिंह राजाच्या दरबारीं होता. यानें ' लालित्यलता ' नांवाचें एक अलंकारयुक्त पुस्तक लिहिलें आहे. त्यांत अनेक कवींचा उल्लेख आहे.

**दत्त उपाध्याय**—( स. १२७५-१३१० सुमार ) धर्मशास्त्रावरील संस्कृत ग्रंथकार.

याचा ' आचारादर्श ' हा ग्रंथ बनारस व मुंबई येथें प्रसिद्ध झालेला आहे. छन्दोगाह्निक, पितृभक्ति, शुद्धिनिर्णय, श्राद्धकल्प, समयप्रदीप, व्रतसार, वगैरे ग्रंथ यानें लिहिले. ' छन्दोगाह्निक ' हा ग्रंथ सामवेदीय लोकांकरितां लिहिला आहे. यामध्यें दररोजच्या कर्तव्यकर्माविषयीं माहिती दिलेली आहे. ' पितृभक्ति ' हा ग्रंथ यजुर्वेदीय लोकांकरितां लिहिला आहे. या ग्रंथांतील उतारे रुद्रधरानें वारंवार घेतलेले आहेत. 'श्राद्धकल्प' हा ग्रंथ त्यानें सामवेदीय लोकांकरितां लिहिला आहे. गोविंदनंदनानें आपल्या श्राद्धक्रियाकौमुदीमध्यें याच्या ग्रंथांतून वारंवार उतारे घेतलेले आहेत.

**दत्तदेवी**—गुप्तवंशांतील समुद्रगुप्ताची पत्नी. हिचा पुत्र दुसरा चंद्रगुप्त.

**दत्तभाऊ ऊर्फ दत्तनाथ**—( जन्म स. १७१३ मृत्यु स. १८४९ ) मराठी कवि. हा राक्षसभुवनचा राहणारा. याच्या बापाचें नांव नारायण असून हा माध्यंदिन शाखेचा यजुर्वेदी ब्राह्मण. याचें गोत्र भारद्वाज. याच्या आईचें नांव लक्ष्मीबाई होतें. याच्या गुरूचें नांव अनंतनाथ. यानें योगविद्येंत बरेंच प्राविण्य मिळविलें होतें. हा महादजी शिंद्याबरोबर पाथरगडच्या लढाईंत हजर होता. पुढें यानें उज्जयिनी येथें एक मठ स्थापन केला. याच्या मठाच्या खर्चाकरितां ४०० रु. चें वार्षिक उत्पन्न हल्लीं शिंद्यांच्या राज्यांतून चालू आहे. याला ज्योतिषहि समजत असल्यामुळें, हा महादजीस मोहिमेवर जातांना भविष्य सांगत असे. याचे गुरु समाधिस्थ झाल्यावर, यानें तीर्थाटन करण्यास सुरुवात केली. हा शेवटीं वयाच्या १३६ व्या वर्षी शके १७७१ त मरण पावला ( म. क. च. भा. ६ पा. २२३-३५ ).

**दत्तमिश्र**—( सनाचें चौदावें शतक ) हा नेपाळचा राजा देवसिंहाच्या कारकीर्दींत होऊन गेला. याच्या बापाचें नांव नागेश्वर मित्र असें होतें. यानें ' एकाग्निदानपद्धति ' नांवाचा ग्रंथ लिहिला. यानें शिवाय आणखी एक दोन ग्रंथ लिहिले असावेत असें वाटतें.

**दत्ताजी त्रिमल**—हा शिवाजीमहाराजांबरोबर आग्र्यास गेला होता. हा त्यांच्या विश्वासांतील एक अधिकारी. हा प्रथम पागेकडे होता. हा मोहिमांवरहि जात असे. रोज जी कांहीं हकीगत खास शिवाजीविषयीं घडून येई ती लिहून ठेवण्याचें व खाजगी खात्यावर देखरेख

करण्याचें काम याच्याकडे होतें. यानें समर्थांचा गुरूपदेश घेतला होता (रा. खं. ६; हणमंतस्वामीची बखर). हा मंत्रिपदावर शाहूच्या आगमनापर्यंत होता. शिवाजी जेव्हां हैदराबादला गेला त्या वेळीं त्याच्यावरोवर हा गेला होता.

**दत्ताजी शिवदेव सोमण (राजाज्ञा)**—(मृत्यु स. १७३१) स. १७०८ मध्यें शाहून याला मुतालिक नेमलें व पुढें राजाज्ञा केलें (म. रि. म. १ पृ. १०३).

**दत्ताजी शिंदे**—(मृत्यु स. १७६० जानेवारी १०) पानिपतच्या ज्या पहिल्या लढाया झाल्या त्यांतील हा एक प्रमुख वीर होय. हा राणोजी शिंद्यांचा मुलगा. यानें लाहोरचा बंदोबस्त केल्यावर मराठ्यांचें वर्चस्व दिल्लींत कायमचें बसणार असें नजीवखानास वाटून त्यानें दत्ताजीस गंगेवर पूल बांधण्याचें आमिष दाखविलें व दुसरीकडे अहमदशाह अब्दालीस हिंदुस्थानांत येण्याची निकड लाविली. नजीवखानानें ह्याच्या मदतीनें सुजावर स्वारी करण्याचें ठरविलें. तेव्हां जनकोजीला हें आवडलें नाहीं. परंतु गोविंदपंत बुंदेल्यानें मात्र दुजोरा दिला. शेवटीं हा स्वस्थ आहे असें पाहून नजीबानें मुसलमानांची जूट केली व नोव्हेंबरांत अब्दालीस दत्ताजीवर आणून ह्यास कैचींत पकडलें, तेव्हां नजीबाचें कपट ध्यानांत येऊन ह्या दोघांची लढाई शुक्रतालच्या पुलावर सुरू झाली. प्रथम शिवाजी शिंदे व त्याचा मुलगा हणमंतराव पडला. नंतर अब्दाली कुरुक्षेत्रावर आला. तेव्हां २२ डिसेंबरला अब्दालीशीं याची झटापट सुरू झाली. ह्याला त्या वेळेस जयपुरास निघून जातां आलें असतें, पण ह्यास तें भ्याडपणाचें वाटलें. यानें पाठविलेल्या भोईटे, बुंदेले व अंताजीपंत यांना अब्दालीनें उलट खाऊन यमुनेच्या अडचणींत लोटलें व त्यांचें सैन्य कापून काढलें. या भयंकर कत्तलीमुळें याचें देहभान सुटलें आणि पुढील लढाईचा प्रसंग अवेळीं उद्भवला. शुक्रतालवर अब्दाली, अहंमदखान बंगश, सुजा व नजीबखान एकत्र झाले. परंतु मल्हारबा जयपूरच्या हद्दींत होता, व ऐनवेळींहि तो ह्यास येऊन मिळाला नाहीं. भागीरथीबाईनें यास युद्धापासून निवृत्त करण्याचा किंवा दमानें घेण्याचा सल्ला पुष्कळांकरवीं देऊन पाहिला, पण उपयोग झाला नाहीं. यमुनेवर १०-१-१७६० रोजीं तीन घटका दिवस आला तेव्हां संक्रांतीचा तिळगूळ वांटून यानें अब्दालीवर चाल केली, व शेवटीं बदाऊच्या घाटावर घनघोर संग्राम झाला. त्यांत ह्यास बरगडींत गोळी लागून हा ठार झाला. हा मरतांना कुत्बशाहानें विचारलें कीं, 'पटेल लढेंगे क्या' तेव्हां यानें उत्तर दिलें 'बचेंगे तो और भी लढेंगे' ह्या आख्यायिकेवरून ह्याच्या शूरत्वाची कल्पना येईल. ह्या लढाईंत सातआठ हजार मनुष्य जाया झालें. ह्याचा नोकर राजाराम चोपदार यानें यमुनेच्या कांठीं दत्ताजीचें शव दहन केलें. पानपतच्या प्रचंड संहारानें दत्ताजीचें हें अचाट कृत्य लोपून गेलें आहे. गनिमी कावा सोडला व जनानखाना बरोबर बाळगला, ह्यामुळें हा शत्रूच्या तडाख्यांत जाऊन पडला. पहिल्या लढाईस शुक्रतालची लढाई व दुसऱ्या दोन्ही लढायांस बदाऊच्या घाटावरील लढाई असें म्हणतात.

**दत्तात्रय गोसावी**—हे समर्थ रामदासांचे शिष्य व कल्याणस्वामींचे बंधु. यांचा मठ सातारा जिल्ह्यांत शिरगांवीं होता.

**दत्तात्रयभट्ट**—पद्यरूपानें मराठी भाषेंत अमृतार्णव नामक ग्रंथाचा कर्ता.

**दत्तोपाध्याय**—हा काश्मीराकडील कवि. समयप्रदीप नांवाच्या संस्कृत ग्रंथाचा कर्ता.

**दबीर**—(स. १७८१-१८५३) एक उर्दू कवि. याच्या बापाचें नांव गुलामहुसेन. हा मीरजमीरचा शिष्य. हा अनीस कवीचा समकालीन होता. हा अंध झाला असतां, याचे डोळे दुरुस्त झाले (क. कौ. भा. ४).

**दमाजी गायकवाड**—(मृ. स. १७२०) हा गायकवाड घराण्याचा मूळ पुरुष होय. याचें राहण्याचें गांव पुणें जिल्ह्यांत धावडी हें असून हा दाभाड्याच्या सैन्यांतील एक सरदार होता. स. १७२० त बाळापूर येथें झालेल्या लढाईंत विशेष पराक्रम केल्यामुळें यास शाहूमहाराजांनीं 'समशेरबहाद्दर' ही पदवी बहाल केली. त्याचप्रमाणें सेनापतीच्या मुतालिकीच्या कामावर याची नेमणूक केली.

**२.** (मृत्यु स. १८-८-१७६८) पिलाजीच्या मरणानंतर यानें जोधपूरपर्यंत स्वाऱ्या केल्या. यानें कंठाजी कदम यास गुजराथ सोडावयास लाविलें. यानें अबदुल अझीझ व फकीरउद्दौला हे गुजराथचे सुभेदार म्हणून आले असतांना त्यांचा पराभव केला. कारण मोमीनखान सुभेदार असतांना यास आपले हक्क गाजवतां येत होते. रघूजी भोसले व बाळाजी बाजीराव यांच्या तडजोडीमध्यें दमाजीनें माळव्याच्या वसुलीचा हिशेब द्यावा असें ठरलें. पुढें हा ताराबाईस मिळून स. १७५१ त नींब येथें पेशव्यांविरुद्ध लढून त्यांचा पराभव केला, तेव्हां नानासाहेबांनीं अचानक हल्ला करून ह्याचा पराभव केला; व यास पुण्यास आणून ठेविलें, व पुढें सोडून दिलें. पानपतच्या लढाईंत हा भाऊसाहेबास मिळाला. तांदुळज्याच्या

लढाईंत हा हजर होता. हा मूळ दाभाड्याचा हस्तक असल्यामुळें दाभाडे व पेशवे यांच्या वादांत ह्याची स्थिति कांहीं दिवस मोठी चमत्कारिक झाली होती.

**दमाजी थोरात**—( स. १७१०-१८ ) शाहूच्या वेळेस हा एक बंडखोर होता. उदाजी चव्हाणाचा व ह्याचा शाहूस फार त्रास झाला. स. १७१२-१३ त शाहूच्याविरुद्ध संभाजीच्या बाजूनें हा लढल्यामुळें बाळाजीस याच्या बंदोबस्तास जावें लागलें, परंतु विश्वासघात करून दमाजीनें त्यास पकडलें व नंतर त्याच्या स्त्रीस व पुत्रास ओलीस ठेवून त्यास सोडून दिलें. शेवटीं शाहूनें दंड भरून मंडळी सोडवली. दमाजीस सामोपचारानें वश करावें अशी शाहूची फार इच्छा होती, परंतु याच्या उद्दामपणामुळें यश आलें नाहीं. पुढें बाळाजीनें याजवर स्वारी करून यास कैद करून पुरंदरला ठेविलें, पण शाहूच्या इच्छेवरून सोडून दिलें. परंतु यानें पुन्हां बंड केल्यामुळें यास परळी येथें ठेविलें व शेवटीं तेथेंच हा मरण पावला ( भा. व. श. पृ. ४,७ ). थोरातास शाहूच्या विरुद्ध झगडण्यांत चंद्रसेनाचें पाठबळ होतें ( रा. खं. २ पृ. ३६ ).

**दयाबहादुर**—( मृत्यु स. १७१३ ) उत्तर मोंगलशाहींत जे थोडे हिंदु कामगार स्वपराक्रमानें प्रसिद्धीस आले त्यांत याच्या कुटुंबाची गणना होते. हे ब्राह्मण असून अलाहाबादेकडे राहत होते. यांचें दुसरें नांव दयाराम होतें. हा व याचा भाऊ छबिलाराम हे बहादुरशहाचा दुसरा मुलगा अजीमुश्शान याच्या पदरीं होते. याला एक मुलगा असून त्याचें नांव राजा गिरधर होतें. बहादुरशाह मेल्यावर ( स. १७१२ ) त्याच्या मुलांत गादीविषयीं तंटा लागला. त्यांत अजीमचा पक्ष घेऊन हा लढत असतां लढाईंत ठार झाला. हा माळव्याचा एक सुभेदार होता.

२. ( मृत्यु ता. १२-१२-१७३१ ) हा राजा गिरधराचा चुलतभाऊ होता. हा पुष्कळ दिवस माळव्याचा सुभेदार होता. हा मराठ्यांच्या विरुद्ध वागे व जयपूरकर जयसिंगाचा फार द्वेष करी.

पेशव्यांनीं निजामाशीं तंटा चालविल्यानें त्यांना माळव्याकडे लक्ष देण्यास सवड झाली नाहीं. या वेळीं यानें इंदुरकर, नंदलाल मंडलोई वगैरे सरदार मराठ्यांच्या विरुद्ध फोडण्याचा प्रयत्न केला होता, परंतु जयसिंग व होळकर यांनीं याचा प्रयत्न हाणून पाडला.

मालकम म्हणतो कीं, यानें रयतेस इतकें पिळून काढलें कीं, रयतेनें व ठाकुर जमीनदार यांनीं थेट बादशहाकडे अनेकदां दाद मागितली, परंतु त्याचा उपयोग होईना. म्हणून जयसिंगामार्फत ते सर्व मराठ्यांस मिळाले.

पेशवे बऱ्हाणपुरास होते, तेथून बेत ठरल्याप्रमाणें नंदलालनें मल्हाररावास बारा हजार फौजेनिशीं अकबरपुरास नर्मदा उतरवून माळव्यांत आणलें. हें याला समजतांच यानें तांडाघाट दाबला, परंतु नंदलालनें आगाऊ इशारत दिल्यानें मल्हारराव मांडवगडच्या भैरव घाटानें वर आला व एकाएकीं ( धारनजीक ) तिरला गांवीं याच्यावर छापा घातला. या लढाईंत हा ठार झाला.

**दयाबाई**—( स. १७६० ) हिंदी कवयित्री. चरणदासाची शिष्यीण व सहजोबाईची गुरुबहीण. या दोघांची कविता वाणी नांवानें प्रसिद्ध आहे. शिवाय हिचा दयाबोध नांवाचा ग्रंथ आहे ( क. कौ. १ ).

**दयाराम**—( स. १८२३ ) गुजराथी कवि. हा डभईचा साठोदरी ब्राह्मण. यानें राधाविलास, दानलीला, रासलीला, गीतामाहात्म्य, भक्तिपोषण व संतसरमा हे ग्रंथ केले. काव्याचें परमोच्च स्वरूप नरसी मेथा व प्रेमानंद यांच्याप्रमाणें याच्याहि काव्यांत पाहावयास मिळतें. मूळ नांव दयाशंकर, परंतु वल्लभाचार्यांच्या संप्रदायाची दीक्षा घेतल्यानंतर दयाराम हें नांव यांस प्राप्त झालें. हा मोठेंपणीं कृष्णभक्त झाला. हा वयाच्या ४० व्या वर्षापर्यंत फार चैनी होता. हा देखणा असून बाईलवेडाहि असे. हा गायकहि होता. याच्या काव्याचे (१) धार्मिक, (२) नैतिक व (३) शृंगारिक असे तीन विभाग पडतात. याच्या काव्यामुळें एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत गुजराथी काव्याला नवीन वळण लागलें असें म्हटलें असतां चूक होणार नाहीं.

२. दयाराम ( गवळी )—फर्दखिसयरच्या कारकीर्दींतील एक सुप्रसिद्ध योद्धा (बंगाल ॲन्युअल स. १८३३).

**दयाळनाथ**—( जन्म स. १७८८-समाधि स. १८३६ ) एक मराठी कवि. हा मूर्तिजापूरचा रहिवासी. याचें मूळ नांव हरि. देवनाथाचा हा शिष्य. याची कविता मराठी व उर्दू भाषेंत आहे. हा मौतसगोत्री व यजुर्वेदी ब्राह्मण. याच्या बापाची सर्व संतति अल्पायुषी मरूं लागली, तेव्हां यानें आपलें शेवटलें अपत्य हरि नांवाचा मुलगा पांच वर्षांचा होतांच देवनाथ महाराजांच्या चरणीं वाहिला. याच मुलास देवनाथ 'दयाळ्या' या नांवानें संबोधूं लागले. याच्या बायकोचें नांव राधाबाई असें होतें ( म. क. च. भा. ५ ).

हा एकनाथसांप्रदायी असून नाथांपासून १४ वा पुरुष होय. याची गुरुपरंपरा-गोपाळनाथ-गोविंदनाथ-देवनाथ-दयाळनाथ अशी आहे. यानें 'राधाविलास' या नांवाचा ग्रंथ लिहिला ( सं. सू. ).

**दयितविष्णु**—हा बंगालच्या पालवंशीय राजांपैकीं पहिला पुरुष होय.

**दर्द**—( स. १७१५-१७८३ ) एक ऊर्दू कवि. याचें नांव ख्वाजा मीर, याच्या गुरूचें नांव शाहगुलशान. हा जानजानाँ मजहर याचा समकालीन होता. हा गायन-विद्येंत चांगला प्रवीण होता. हा शिष्टाचाराविषयीं फार दक्ष असे. यानें खालील पुस्तकें लिहिलीं-१ दीवान ( उर्दू-मध्यें गजलें, तरजी अवन्द आणि रुबाईया ), २ दीवान फार्सा, ३ रिसाला इसरारुस्सलवत, ४ वारदातें दर्द, ५ इल्मुल्किताब, ६ वाकयानें दर्द इत्यादि ग्रंथ लिहिले ( क. कौ. ४ ).

**दर्या इमादशाह**—( स. १५२९-१५६० ) वऱ्हाडच्या इमादशाही घराण्यांतील अलाउद्दीन इमादशाहाचा ज्येष्ठ पुत्र.

**दर्याखान रोहिला**—( मृ. स. १६३१ ) मोगलांचा बंडखोर सरदार. हा सिरोजजवळ मारला गेला ( क. कौ. भा. ४ था ).

**दर्याबाई निंबाळकर**—दुसऱ्या शिवाजीची मुलगी व रामराजाची बहीण. पेशव्यांनीं हिला आपल्याकडे वळवून घेतलें. शाहूनेंहि हिचा उदारपणें परामर्श घेत-ल्याचा निर्देश आहे ( पे. द. ८. ३६ ).

ही बरीच कारस्थानी बाई असून रामराजाला पेशव्या-विरुद्ध सल्ला देण्याचें काम ही परिणामकारक करूं लागल्या-मुळें हिला सक्तीनें साताऱ्याहून पेशव्यांनीं घालवून दिलें ( पे. द. ६. ९४ ).

**दर्याबाई भोसले**--ही नागपूरकर जानोजी भोस-ल्याची स्त्री. ही फार कारस्थानी होती. मुधोजी व साबाजी यांच्या भांडणांत दर्याबाई कधीं कधीं दोन्हींकडेहि मिळे. हिच्यामुळें भोसल्यांच्या घरांत गृहकलह शिरला.

हिनें मुधोजीचा मुलगा रघूजी यास दत्तक घेतलें होतें. जानोजीचे पश्चात् ही रघूजीसह अकोटास राही. हिनें रघूजीस गादी मिळूं नये म्हणून आपण गरोदर असल्या-चेंहि खूळ पिकविलें होतें.

बाराभाईचें कारस्थानांत दर्याबाई व रघूजी यांनीं भाग घेतला होता. त्या वेळीं रुक्नुद्दौला यानें बाई पुण्याकडे जात असतां वाटेंत ब्रह्हाणपूर येथें हिला लुटलें.

**दर्वेश आदिलशाह**—विजापूरच्या आदिलशाही घराण्यांतील दुसऱ्या इब्राहीमचा मुलगा. हाच वडील मुलगा असून यालाच विजापूरचें राज्य वास्तविक मिळा-वयाचें. पण मुत्सद्यांनीं याचा हक्क नष्ट करून याला आंधळा केलें व मुहम्मदला गादी दिली. याची मजेदार हकीगत बुसातिनेसलातिनवरून शिवभारताच्या प्रस्तावनेंत दिली आहे ( पा. ७५ ).

**दर्शक**—मगधच्या बिंबिसाराचा पुत्र. हा आपल्या बापाच्या हयातींतच राज्यकारभार पाहत असे.

**दलपत**—गुजराथी कवि. नागर ब्राह्मण. यानें देवीचें वर्णन गुजराथींत लिहिलें आहे ( संवत् १८८७ ).

२. यानें खुमानरासो या हिंदी ग्रंथांत चितोडच्या महाराणा प्रतापसिंहापर्यंत माहिती दिली आहे. पण शिवसिंहसरोजानुसार या ग्रंथाचा कर्ता कोणी भाट असून हा त्याच्या फक्त परिशिष्टाचा कर्ता आहे.

**दलपति**—नृसिंहप्रसादतीर्थसार नांवाच्या संस्कृत भाषेंतील ग्रंथाचा कर्ता.

**दलपतिराज**—( सं. १४९०-१५१२ सुमार ) संस्कृत भाषेंतील ग्रंथकार.

याचा 'नृसिंहप्रसाद' हा धर्मशास्त्रावरील ग्रंथ प्रसिद्ध आहे. या ग्रंथाचे संस्कार, आह्निक, श्राद्ध, काल, व्यवहार, प्रायश्चित्त, कर्मविपाक, व्रत, दान, शान्ति, तीर्थ आणि प्रतिष्ठा असे १२ भाग केलेले आहेत. वरील प्रत्येक भागाच्या सुरुवातीस नृसिंहाचें नामोच्चारण केलेलें आहे. यानें आपल्या ग्रंथामध्यें दुसऱ्या पुष्कळ ग्रंथांचा आणि ग्रंथकारांचा उल्लेख केलेला आहे. यानें संवत्सर आणि कालदीप याविषयीं माहिती संस्कारसार यांमध्यें दिलेली आहे. आह्निकामध्यें दिनचर्येविषयीं विवेचन केलेलें आहे. तीर्थक्षेत्रांविषयीं माहिती याच्या तीर्थसारांमध्यें आलेली आहे.

याच्या बापाचें नांव वल्लभ असें होतें. याचें दुसरें नांव दलपति असून हा भारद्वाजगोत्री होता. हा सूर्यपंडित याचा शिष्य असून यवनांचा राजा जो अहमद किंवा पहिला बुर्हाण निजामशाहाचा मुख्य प्रधान होता. हा आपणास महाराजाधिराज असें म्हणवून घेत असे ( काणे ).

**दलपतिराय**—( स. १५७६ ) हा 'पत्रप्रशस्ति' 'यावनपरिपाटी-अनुक्रम' या ग्रंथाचा कर्ता होय.

**२.** ( स. १७३५ ) एक हिंदी कवि. अहमदाबादचा राहणारा. बंसीधराच्या साहाय्यानें यानें 'अलंकार-रत्नाकर' नांवाचा ग्रंथ लिहिला.

**दशरथ मौर्य**—( खि. पू. २२५-२२६ ) मौर्य-वंशापैकीं कुनालाचा पुत्र. ब्रह्मांड व वायु पुराणांत कुनालाचा पुत्र बंधुपालित दिला आहे. बंधुपालित हीं याची पदवी दिसते. याच्या वेळीं याचा भाऊ संप्रति याच्या हातांत सर्व सत्ता होती. म्हणूनहि याला बंधु-पालित म्हणत असावेत. याच्या वेळीं कलिंगदेश पुनः स्वतंत्र झाला असें हाथिगुम्फेंतील खारवेलच्या शिलालेखा-वरून कळतें. हा स्वतंत्रता मिळवणारा कलिंगदेशचा राजा चैत्रराज होय. चैत्रराजापासून खारवेल तिसरा पुरुष होय. खारवेलचा काल हाथिगुम्फेंतील लेखावरून निश्चित आहे. तो खि. पू. १७३ वर्षीं गादीवर आला. त्यापूर्वीं दोन पिढ्यांकरितां पन्नास वर्षें धरल्यास याच्याच कार-कीर्दीत चैत्रराज स्वतंत्र झाला असला पाहिजे. पण त्याबद्दल इतर पुरावा उपलब्ध नाहीं. यानें कोरलेल्या गुहा दान केल्याबद्दल तीन लेख गयेजवळ नागार्जुन डोंगरावर आढळतात.

**दशवर्मा चालुक्य**—हा पश्चिम चालुक्यांपैकीं दुसऱ्या तैलाचा मुलगा. याची पत्नी भागवती. याला विक्रमादित्य पांचवा, अय्यण दुसरा, अक्कादेवी व जयसिंह तिसरा हीं मुलें होतीं.

**दक्षमित्रा**—नहपान क्षत्रपाची कन्या व उषवदाताची पत्नी.

**दंडिन्**—( स. ६४०-६४५ सुमार ) कथासाराचा कर्ता. या ग्रंथांत यासंबंधीं पुढील माहिती आढळते. वायव्येकडील प्रांतांत आनंदपुरांत एक कौशिक ब्राह्मणाचें कुटुंब राहत होतें. तें मूळदेवानें स्थापिलेल्या नासिक्य देशांतील अकालपुरांत आलें. तेथें नारायणस्वामीला दामोदर या नांवाचा मुलगा झाला. या दामोदराला तीन मुलें झालीं. त्यांतील दुसरा जो मनोरथ त्याला चार मुलें झालीं. पैकीं वीरदत्तानें गौरीशीं लग्न केलें. याच जोडप्यास दंडिन् झाला. हा लहानपणींच पोरका झाल्यामुळें श्रुत आणि सरस्वती यांनीं त्याचें संगोपन केलें. काव्य, स्थापत्य-कला यांचेंहि त्यास ज्ञान दिलें. अशा तऱ्हेनें कथा व कथासार यांवरून अवंतीसुंदरीचा लेखक दंडिन् याचा वंशवृक्ष खालीलप्रमाणें होतोः

नारायण–दामोदर ( भारवि ), मनोरथ, वीरदत्त–गौरी, दंडिन् ( हि. क्का. १.३२ ).

यानें दशकुमारचरित, काव्यादर्श व छन्दोविचिति असे तीन ग्रंथ केले आहेत. हा स. ६००-६५० च्या सुमारास झाला असें मानण्याविरुद्ध अवन्तिसुन्दरीकथे-शिवाय कांहीं नाहीं ( पा. ७८ ).

**दंतदेव**—शीलभद्राचें मूळचें नांव.

**दंतिदुर्ग राष्ट्रकूट**—( स. ७४५-७५८ सुमार ) मालखेडच्या राष्ट्रकूट वंशांतील पहिल्या इन्द्राचा पुत्र. हा स. ७४५ सुमारास गादीवर आला असावा. यानें राज्यावर आल्याबरोबर कांची, कलिंग, श्रीशैल, कोसल, मालव, लाट, टंक व सिंध येथील राजांचा भराभर पाडाव करून टाकला ( एपि. इंडि. ९. २४ ). पहिल्या इंद्राच्या वेळेस सर्वांत बलिष्ठ असलेलें जे दक्षिणेंतील चालुक्य राज्य त्याच्या मुळावर घाव घालून त्याला खिळखिळें करण्यास यानें सुरुवात केली. चालुक्याचा पूर्ण पाडाव करण्याचें श्रेय कांहीं शिलालेखांत याला दिलेलें आहे; तरी कांहीं-मध्यें तें श्रेय याच्यामागून गादीवर आलेल्या याच्या चुल-त्याला म्हणजे पहिल्या कृष्णाला दिलें आहे. पण कांहीं असलें तरी चालुक्य सत्तेवर पहिला जोराचा आघात दंतिदुर्ग यानेंच केला हें निर्विवाद आहे.

दंतिदुर्गानें राज्यावर आल्यावर प्रथम कोसल राजाचा पाडाव करून आपलें राज्य वाढविण्यास सुरुवात केली. त्यापैकीं याच्या हातून प्रारंभींच पराभूत झालेले राजे म्हणजे सिरपूरचा उदयन व श्रीवर्धनचा जयवर्धन हे होत. या वेळीं दंतिदुर्गानें नंदीवर्मा पल्लवाचें साहाय्य घेतलें होतें.

याप्रमाणें पूर्वदिशेला विजय संपादन करून स्थिर-स्थावरता मिळाल्यानंतर याचें लक्ष भडोच व गुर्जर चालुक्य या राजांकडे वळलें. हीं दोन्ही राज्यें आधींच मुसलमानी स्वाऱ्यांमुळें कमजोर झालीं होतीं. त्यामुळें यानें अनायासें हीं दोन्ही राज्यें खालसा करून आपल्या राज्यास जोडलीं. गुजराथच्या राज्यावर दंतिदुर्गानें दुसऱ्या कर्क नांवाच्या आपल्या नातलगास सुभेदार नेमलें.

एकंदरींत पाहतां याची कारकीर्द अत्यंत धामधुमीची झाली. त्यांतहि विशेष हें कीं प्रत्येक लढाईंत याला जयच मिळत गेला. हें याच्या पराक्रमाचें व त्याच-प्रमाणें मुत्सद्देगिरीचेंहि द्योतक आहे. यानें ‘ नुसती भुवई उचलून चालुक्य राजा कीर्तिवर्मा याचा पराभव केला ’ असें एके ठिकाणीं म्हटलें आहे ( इंडि. अँटि. ९. ३ ). पराक्रम व मुत्सद्देगिरी यांबरोबरच कालाची अनुकूलताहि याच्या जोडीला असल्यानें दिग्विजयाचें काम याला फार सोपें झालें होतें.

याचीं धार्मिक मतें अत्यंत कर्मठ व जहाल होतीं. उज्जयिनीस असतांना यानें स्वर्गप्राप्त्यर्थ हिरण्यगर्भ महा-दानाचा समारंभ मोठ्या थाटानें साजरा केला. तसेंच स. ७५४ या वर्षी त्यानें रथसप्तमीला सुवर्णतुलेचें दान

केलें होतें. तसेंच हा अत्यंत मातृभक्तिपरायण होता. आईच्या स्मरणार्थ यानें बरीच जमीन ब्राह्मणांस दान केली होती.

याचा मरणकाल नक्की सांगतां येत नाहीं. परंतु याच्यानंतरचा राजा पहिला कृष्ण स. ७५८ मध्यें राज्य करीत असल्याचा उल्लेख आहे. त्यावरून हा स. ७५४ ते ७५८ या कालाच्या दरम्यान केव्हां तरी मरण पावला असावा असें दिसतें. मरणसमयीं याचें वय जास्तींत जास्ती तीस वर्षांचें असावें. एवढ्या लहान वयांत यानें जी अतुल कीर्ति संपादन केली तीवरून याच्या कर्तबगारीची बरोबर कल्पना येते. याच्यामागून याला पुत्रसंतान नसल्यानें याचा चुलता पहिला कृष्ण गादीवर आला.

'दंतिदुर्गाची कारकीर्द जुलमी होती; व त्याला पदच्युत करून त्याचा चुलता पहिला कृष्ण गादीवर आला' असें कांहींचें मत आहे, पण तें चुकीचें दिसतें. या चुकीचें कारण पुढीलप्रमाणें दिसतें. दुसऱ्या कृष्णा बेगम्रा येथील शिलालेखांत 'तास्मिन् दिवं प्रयाते वल्लभराजेऽकृत-प्रजाबाधे। श्रीकर्कराजसूनुर्महीपतिः कृष्णराजोऽभूत्॥' असा एक उल्लेख आहे. दौलताबादच्या शिलालेखांत 'अकृतप्रजाबाधे' याऐवजीं 'कृतप्रजाबाधे' असा दंतिदुर्गा-संबंधीं पाठ आहे, व याच पाठावरून वरील चुकीचें मत झालें असावें असें वाटतें. कारण हा पाठ चुकीचा आहे, हें पैठण अगर तळेगांव येथील शिलालेखांवरून चटकन ध्यानांत येण्यासारखें आहे.

**दाऊदखान करराणी**—(स. १५७२–७६) बंगालचा राजा.

**दाऊदखान कुरेशी**—हा अरब सरदार होता. जयसिंग व दिलेरखानाबरोबर दक्षिणेंत आलेला मातबर मोगल सरदार. जयसिंग दक्षिणेंत आल्यावर दिलेरखानास पुरंदरच्या वेढ्याचें काम दिलें व त्याच्या हाताखालीं हा होता. पण दिलेरखानाच्या हाताखालीं काम करण्यांत हा कुचराई करूं लागल्यामुळें यास सिंहगड, रायगड, रोहिडा वगैरे किल्ले घेण्याच्या कामगिरीवर पाठविलें. आणि ते किल्ले घेऊन हा यशस्वी झाला आणि ता. १९ मे १६६५ रोजीं पुण्यास आला. पुढें स. १६७० त शिवाजीची मोहीम सुरू होतांच हा आपल्या ७००० सैन्यासह निघाला. २८ मार्च १६७० ला अहमदनगरला आला; आणि शिवाजीनें काबीज केलेलीं पारनेर, जुन्नर हीं ठाणीं परत घेतलीं. याबद्दल याची तारीफ होऊन यास वऱ्हाणपूरचा सुभेदार नेमण्यांत आलें (सरकार-शिवाजी १९१). दिंडोरीच्या लढाईंत शिवाजीनें याचा पराभव केला (१०.१६७०).

**दाऊदखान पन्नी**—(मृ. स. १७१५) औरंगजेबाचा नोकर. हा बहादूरशहाच्या कारकीर्दींत दक्षिण प्रांताचा सुभेदार होता. फर्रूखसियरच्या कारकीर्दींत, याची व अलीशहाची बऱ्हाणपुरास लढाई होऊन त्यांत हा मारला गेला.

**दाऊदखान फारुकी**—(स. १५०३–१५१०) हा खानदेशांतील राजा. निजामशाहानें याच्यावर स्वारी करून याला पकडून ठेविलें. यानें खंडणी देण्याचें कबूल केल्यावर यानें याला सोडून दिलें.

**२.** हा गुजराथच्या कुत्बशहाचा चुलता. त्याच्यानंतर राज्यकारभार पाहूं लागला. पण नालायक ठरून, याचा सावत्र भाऊ तक्तनशीन झाला.

**दाऊद बाहमनी**—बाहमनी वंशांतील पहिल्या अहमदशाहाचा पुत्र.

**२.** (मृ. स. १३७८ मे) एक बहामनी राजा. हा मुजाहिदशाहाचा चुलता. हा आपल्या पुतण्याला ठार मारून गादीवर बसला. पुढें हा गुलबुर्गा येथें जुम्मा-मशिदींमध्यें नमाज पढण्यास जात असतां याचा खून झाला.

**दाग**—एक उर्दू कवि. हा सोजचा मुलगा. हा स्वतः सुंदर असून सौंदर्योपासक होता. तरी कामवासनेमुळें वांया गेला (क. कौ. ४ पा. २२१).

**दाजीबा जोशीराव**—(स. १८००–१८६५ सुमार) हा जातीनें ब्राह्मण. हा मोठा संस्कृतज्ञ व ज्योतिःशास्त्रज्ञ होता. हा कोल्हापूरचा राहणारा. याच्या बापाचें नांव बाळजोशी. यानें पुढील ग्रंथ लिहिलेः—संस्कृत ग्रंथ—१ चित्तविनोद (स. १८२३), २ चित्तानंद (स. १८२६), ३ रामेश्वरयात्रा (स. १८२८), ४ लक्ष्यालंकार (स. १८२९), ५ लक्ष्मीवर्णन (स. १८३०), ६ कार्तिकस्वामीयात्रा (स. १८३०), ७ गणपतीवर एक सं. ग्रंथ (स. १८३२), ८ संस्कृत भाषेवर एक ग्रंथ (स. १८२५), ९ ज्योतिर्लिंगयात्रा (स. १८३९), १० विश्वगुणादर्शटीका (स. १८४२) ११ गोकर्णयात्रा (स. १८४२), १२ अष्टविनायकयात्रा (स. १८४०), १३ करवीरमाहात्म्यटीका (स. १८५०). यांशिवाय लहानलहान स्तोत्ररूप ८ संस्कृत ग्रंथ आहेत.

यानें केलेले प्राकृत ग्रंथ—१ करवीरमाहात्म्य, २ मल्हारीमाहात्म्य, ३ कार्तिकमाहात्म्य, ४ गालवाख्यान, ५ ईशस्तोत्र, ६ वीरभद्रमाहात्म्य, ७ सीताजन्म, ८

एकादशीमाहात्म्य, ९ सुलोचनाख्यान, १० शिवपार्वतीविवाह, ११ मारुतीबलरामयुद्ध ( आर्या ), १२ वीरभद्रमाहात्म्य ( ओवी ), १३ रामअंजनीभेट ( आर्या ), १४ चोपडाईजोतीबा, १५ कृष्णदान ( आर्या ), १६ अहिमह्याख्यान, १७ वत्सला, १८ मयूरध्वजाख्यान, १९ श्रियाळाख्यान, २० चंद्रहासचरित्र, २१ अंबाबाईवर ( आर्या ), २२ अद्भुतरामायण ( आर्या ), २३ मारुतिस्तुति, २४ लहुकुशाख्यान ( आर्या ), २५ केदारमाहात्म्य ( आर्या ). याचे हे ग्रंथ त्यांच्या संग्रहालयांत असून अप्रसिद्ध आहेत ( महाराष्ट्र कविचरित्र भाग १, पा. ४५१ ).

**दाजीबा लिमये**—हा परशुरामभाऊ पटवर्धनांच्या विश्वासांतला वकील. नानाफडणवीसाच्या कारकीर्दीत याला मोठमोठ्या अधिकाराच्या जागा मिळाल्या होत्या. डफनें याला त्या वेळच्या परिस्थितीचा इतिहास लिहिण्यास सांगितल्यावरून यानें त्याप्रमाणें इतिहास लिहून ठेवला आहे. याच्या इतिहासाचा डफला फार उपयोग झाला असें डफनें म्हटलें आहे ( डफ भा. २ पा. ३०० फुटनोट ).

**दाजीराव देशपांडे**—( नारायणस्वामी पाहा ).

**दादंभट बिन पिलंभट भट**—शिवाजीनें स. १६६४ मध्यें याला मालवणच्या सिंधुदुर्ग किल्ल्याचा उपाध्या केला. पुढें याच्या प्राप्तीचा अर्धा वांटा मागण्यासाठीं कृष्णंभट नांवाचा कोणी वंशज आला. पण सिंधुदुर्गाचा मुख्य अधिकारी चंद्रोजी घाटगे, यानें याच्या तर्फेनें निवाडा दिला, ता. २ मे स. १७२१ ( का. सं. प. या. ४२१ जुनीप्रत ).

**दादंभट माधवगांवकर**—( ग्रंथकाल स. १७१९ ) हा चित्पावन ब्राह्मण. यानें ' किरणावली ' नांवाची सूर्यसिद्धांतावर टीका लिहिली ( भा. ज्यो. पा. ).

**दादाजी**—( स. १७३४ ) याला संभाजीनें तुंगभद्रा वगैरे प्रदेशांवर सुभेदार नेमलें. हा रामदुर्ग संस्थानच्या रामराव दादाजीचा पुतण्या. रामरावाचा पुत्र योगीराजानें यास मारलें.

**दादाजी कृष्ण लोहोकरे**—कान्होजी जेध्याचा कारभारी. हा तळेगांव ढमढेरे येथील राहणारा. शिवाजीचा कल्याणचा सुभेदार. हा शहाजीबरोबर मुस्तफाच्या कैदेंत होता.

**दादाजी नरस प्रभु**—कान्होजी जेध्याचा कुलकर्णी.

**दादाजी बापूजी रांझेकर**—हा शामराज नीळकंठ रांझेकराचा चुलत भाऊ. यानें कल्याण जिंकलें ( ता. २४-१०-१६४७ ).

**दादू दयाल**—( स. १५४३–१६०२ ) एक हिंदी कवि. हा अहमदाबादचा राहणारा. यानें एक निराळा पंथ स्थापन करून, त्या पंथास दादूपंथ असें नांव दिलें. याचा गुरु कबीर असावा. हा नराना येथें मरण पावला. यानें पुष्कळ पदें गुजराथी, हिंदी व पंजाबी भाषेंत केलीं आहेत. दरवर्षी याची यात्रा फाल्गुन शु॥ ४ पासून ते १२ पर्यंत भरते. याच्या पंथांत दोन प्रकारचे लोक असत. या पंथाचे लोक एकमेकांस भेटले, तर ते ' सत्तराय ' असें म्हणत.

**दादू नरसू काळे**—मोगलांचा एक मुत्सद्दी. हा दुर्गादेवीच्या दुष्काळांत लोकांच्या फार उपयोगी पडला.

**दादोजी कोंडदेव**—( स. १५७७–१६४७ ) शिवाजीचा शिक्षक व मलठणचा कुलकर्णी. यानें शिवाजीस मर्दुमकीचें व जमीनमहसुलाचा हिशेब वगैरेचें शिक्षण दिलें. हा वर्तनानें अत्यंत पवित्र, पापभीरु व त्याचप्रमाणें निश्चयीहि होता. यानें शहाजीच्या पुण्याच्या जहागिरीची व्यवस्था पाहिली. यानें तेथील जमिनीची मोजणी केली व बंदोबस्तासाठीं लष्कर ठेविलें. यानेंच शिवाजीचें लग्न निंबाळकरांच्या सईबाईशीं केलें. शिवाजीस शिक्षण दिल्यामुळें ह्यास ७०० होनांची बढती मिळाली. ह्याचा मुलगा कृष्णाजी ह्यावर विजापूर दरबारकडून बंडखोरीचा गुन्हा लागू करण्यांत आला. ह्यानेंच शिवाजीच्या स्वतंत्र राज्यस्थापनेच्या कल्पनेस पुष्टि दिली असें दिसतें ( मं. वार्षिक १८३७ ले. १७२ ). पुढील पिढींत उदयास आलेले ब्राह्मण मुत्सद्दी याच्या हाताखालीं तयार झालेले होते, असें न्या. रानडे यांनीं आपल्या मराठी सत्तेच्या उत्कर्षांत म्हटलें आहे.

**दादो जोगदेव बर्वे**—हा जोगदेवभटांचा वडील मुलगा. याचा वंश पुणें, नाशिक व सातारा जिल्ह्यांत आहे. याला दोन मुलगे व एक मुलगी होती. मुलांचीं नांवें अनुक्रमें मल्हारपंत व त्रिंबकपंत होतीं. मुलीचें नांव राधाबाई असून ती बाळाजी विश्वनाथास दिलेली होती ( म. रि. म. १, पृ. ४२८ ).

**दानशील**—( जन्म स. १०२५ सुमार ) बुद्ध तर्कज्ञ. दानशील अथवा दानश्रील याचा जन्म स. १०२५ च्या सुमारास बंगालचा राजा महीपाल दुसरा हा राज्य करीत असतां झाला. हा परहितभद्र, जिनमित्र, सर्वज्ञदेव व तिलोपा यांचा समकालीन होता. हा तिबेटांत गेला होता व यानें संस्कृत ग्रंथांचें तिबेटी भाषांतर करण्यास मदत केली.

यानें तर्कज्ञानावर 'पुस्तकपागोपाय' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथाची मूळ संस्कृत प्रत उपलब्ध नाहीं. परंतु त्याचें तिबेटी भाषांतर मात्र उपलब्ध आहे ( हि. इं. लॉ., पा. ३४०–४१ ).

**दानार्णव चालुक्य**—हा चालुक्यांपैकीं दुसऱ्या अम्माचा वडील सावत्र भाऊ होता. याला घनार्णव असेंहि म्हणत. कांहीं लेखांत यानें तीस वर्षें राज्य केलें असें आहे ( स. ९७३–१००३ ). परंतु पुष्कळ लेखांत यानें तीनच वर्षे राज्य केलें व बाकीचीं सत्तावीस वर्षें चोलराजांच्या स्वाऱ्यांच्या अंदाधुंदींत गेलीं व त्या वेळीं वेंगी देशावर कोणीहि राजा नव्हता असें आहे. तसेंच कांहीं लेखांवरून असें अनुमान निघतें कीं, सदर अवधींत चोल राजांनीं हा मुलूख जिंकला असावा ( स. ९७०–९७३ ).

**दानियल मीर्झा**—( जन्म स. १५७२ ) अकबर बादशहाचा तिसरा मुलगा. याचा जन्म शीख जातीच्या दानियल नामक एका दरवेशाच्या घरीं स.१५७२त झाला. त्यामुळें यास हें नांव मिळालें. हा फार दारुबाज होता. याची आई राजा विहारीमल्ल कच्छवाहाची मुलगी. निजामशाही जिंकण्याकरितां अकबरानें यास पाठविलें. अहमदनगर मोंगलांनीं घेतलें. पण लवकरच बऱ्हाणपुर मुक्कामीं हा वारला. अकबराचें याच्यावर फारच प्रेम होतें. याला दुसऱ्या इब्राहीम आदिलशाहाची एक मुलगी दिली होती.

**दानिश्मदखान**—याचें मूळ नांव मुल्ला शफी. हा इराणी व्यापारी होता. हा स. १५४६ मध्यें सुरतेस आला. शहाजहान बादशाहानें यास आपल्या पदरीं ठेवलें. औरंगजेबाच्या कारकीर्दीत यास पांच हजारांची मनसब देण्यांत आली ( बील ).

**दामघ्सद क्षत्रप**—हा रुद्रदामनूचा ज्येष्ठ पुत्र. याला दामजदश्री असेंहि म्हणत. याला सत्यदामा व जीवदामा असे दोन पुत्र होते.

**दामजदश्री क्षत्रप**—हा रुद्रसेन महाक्षत्रपाचा दुसरा मुलगा. हा महाक्षत्रप झाला नाहीं.

२. हा दामसेन महाक्षत्रपाचा चवथा मुलगा. हा महाक्षत्रप होता. याचीं नाणीं शा. श. १७२–१७६ पर्यंतचीं मिळालीं आहेत.

३. ( दामघ्सद क्षत्रप पाहा ).

**दामलवाड**—( मृत्यु स. १६४७ मार्च ) हा शिवापा विदनूरकर याचा सरदार. धारवाडच्या ठाण्याचा अमलदार. खवासखानाचें आदिलशाहीशीं बिनसलें तेव्हां तो फौजबंद निघून धारवाडास आश्रयार्थ आला. पण यानें त्यास आंत घेतलें नाहीं ( अ. घ. इ. ). स. १६४६–४७ च्या विजापूरकरांच्या स्वारींत हा शिवापा नाईकातर्फे लढत होता. यानें मुस्तफाखानाचें 'लष्कर फोडून भग्न केलें' व आसदखानास जखमी केलें. परंतु सिद्दी रैहानच्या पिछाडीच्या हल्ल्यांत हा ठार झाला ( रा. मा. चंपू. ८४–८५ ). हा श्रीरंगरायाचा सेनापति होता. वेलोरच्या लढाईंत हा पडला ( शहाजी ६९ ).

**दामसेन क्षत्रप**—हा रुद्रसिंहाचा तिसरा मुलगा. याचीं चांदीचीं नाणीं शा. श. १४५–१५८ पर्यंतचीं मिळालीं आहेत. हा महाक्षत्रप होता. याला चार पुत्र होते. त्यांचीं नांवें अनुक्रमें पुढीलप्रमाणें आहेतः १ वीरदामा, २ यशोदामा, ३ विजयसेन, ४ दामजदश्री दुसरा. याचा उत्तराधिकारी यशोदामा झाला. त्यावरून वीरदामा अल्पवयी मेला असावा असें दिसतें.

**दामाजीपंत**—हा पंढरपुराजवळील वेदरच्या बादशहाच्या अंमलाखालीं असलेल्या मंगळवेढ्यास २० वर्षें ठाणेदार होता. हा मोठा विठोबाभक्त होता. एकदां दुष्काळांत ब्राह्मणांस सरकारी धान्य दिल्यामुळें ह्यास पकडून वेदरास आणण्याचा हुकूम बादशहानें केला. परंतु वाटेंत ह्यास गीतेंत धान्याच्या पैशाची पावती मिळाली व एकदम सोडून देण्याचा बादशहाचाहि हुकूम त्याच वेळेस आला. पुढें हा नोकरीचा राजीनामा देऊन बायकामुलांसह पंढरीस येऊन राहिला ( भक्ति वि. अ.४० ). वरील गोष्टीसंबंधींचें थोडेंसें काव्य प्रसिद्ध आहे ( मं. चतुर्थ सं. वृत्त ). दामाजीपंताच्या गोष्टीस ऐतिहासिक पुरावा आहे ( विठ्या महार पाहा ).

**दामाजी माणकेश्वर सुपेकर देशपांडे**—यास आम्भी ( मोरगांवाजवळ ) येथें शके १६५८ अधिक ज्येष्ठ वद्य ६ बुधवारीं देवाज्ञा झाली. हा बाळाजी विश्वनाथापासून पेशव्यांच्या पदरीं असलेला सरंजामी सरदार, दमाजी थोरातापासून सुटका करण्याच्या कामीं उपयोगीं पडला होता. यासच आपाजी माणकेश्वर म्हणत.

**दामो कवि**—( कविताकाल स. १४५८ ) एक हिंदी कवि होय. यानें लक्ष्मणसेनपद्मावती यांची कथा लिहिली आहे.

**दामोदर**—( स. १४१७ ) एक ज्योतिषी. याचा 'भटतुल्य' नामक ग्रंथ आहे. त्यांत आरंभवर्ष शके १३३९ आहे. याच्या पित्याचें नांव पद्मनाभ.

यानें त्रिप्रश्नाध्यायांत बराच विस्तार केला आहे. याचीं ८० पद्यें आहेत. त्यांत कांहीं प्रश्नहि आहेत. प्रश्नांत ५ पलभा बरेच वेळां आली आहे. प्रथमार्थ-सिद्धांतांत नक्षत्र-

योग नाहींत यावरून या बाबतींत याचा स्वतंत्र शोध दिसून येतो ( भा. ज्यो. ).

२. काश्मीराकडील एक सरकारी कामदार. मंख कवीच्या काव्याचा परीक्षक. हा कंसवध नाटकाचा कर्ता.

३. ( स. १२७८ ) हा महानुभावांपैकीं असून यानें वत्सहरण नांवाचें काव्य केलें.

४. काकतीयांच्या प्रतिस्पर्ध्यांपैकीं एक पराक्रमी राजा ( एन्शन्ट डेक्कन व्हा. १, पा. २८७ ).

५. ( हनुमान् पाहा ).

**दामोदरगुप्त**—( स. ५६४–६०० ) मगध येथील दुसऱ्या गुप्त घराण्यांतील दुसऱ्या कुमारगुप्ताचा हा मुलगा. हा आपल्या बापानंतर गादीवर आला.

स. ५६४ मध्यें याच्या बापानें मौखरी घराण्यांतील ईशान्वर्मन्वर केलेली मोहीम तशीच पुढें यानें चालू ठेविली. पण त्या लढाईंत हा मारला गेला.

याच्यानंतर याचा मुलगा महासेनगुप्त हा मगधाच्या गादीवर स. ६०० मध्यें आला (B.).

**दामोदरपंडित**—( स. १२७२ पंथस्वीकार ) हा महानुभावपंथांतील एक विद्वान् व गायनपटु गृहस्थ होता. ह्याची स्त्री हिरावा हीहि विदुषी होती. वृद्धपणीं दोघेंहि संन्यास घेऊन नागदेवाचार्याजवळ राहिलीं. यानें 'वत्सहरण' कथेवर एक ग्रंथ लिहिला. त्याचप्रमाणें याचे आणखी पांचसहा मराठी, हिंदीमिश्रित, हिंदी व संस्कृत ग्रंथ आहेत.

**दामोदर भारवि**—( स. ६०५–५० ) नारायणस्वामीचा मुलगा. हा गंगवंशांतील राजपुत्र दुर्विनीत याजबरोबर राहत असे. यानें पल्लव राजा सिंहविष्णु याजकडे एक आर्या पाठविली त्यामुळें सिंहविष्णूनें यास आपले दरबारीं बोलविलें व पुढें हा तेथेंच राहिला. हा विष्णुवर्धनाचा स्नेही होता. यास तीन मुलें होतीं, पैकीं मनोरथ हा एक होता ( हि. का. १. ३२–३३ ).

हा नासिक प्रांतांतून निघाल्यावर दुर्विनीताजवळ कांहीं दिवस राहिला. दक्षिण गंगकुलांत या नांवाचा एकच राजा होऊन गेला. गंगकुलांत किंवा अन्य कुलांत हें नांव पुनः आढळत नाहीं. म्हणून भारवीस आश्रय देणारा दुर्विनीत हाच असावा. हा स. ६०५ पासून ६५० पर्यंत राज्यावर होता ( Dubreuil's Deccan, p. 107 ). शिवाय यानें आपल्या शिलालेखांत 'किरातार्जुनीयपञ्चदशसर्गटीकाकारः' असें विशेषण लावून घेतलें आहे. त्यावरून 'किरातार्जुनीययुद्धम्' या भारवीच्या काव्यावर पंधरा सर्गांपर्यंत यानें टीका लिहिली असें दिसतें ( म्हैसोर आर्कालॉजिकल रिपोर्ट १९१९, पा. ३६. इंडि. अँटि. व्हा. ५, पा. २३७; व्हा. ७, पा. १७४ ). भारवीचा आश्रयदाता त्याच्या काव्यावर टीका करतो म्हणजे भारवीचा आशय त्या टीकेंत चांगलाच व्यक्त झाला असेल. शिवाय यावरून काव्याची महतीहि ध्यानांत येते. राजशेखरानेंहि उज्जयनींत याची परीक्षा होऊन याचा मोठा सन्मान केला असें लिहिलें आहे ( काव्यमीमांसा १ ). स. ६३४ व्या सालीं जाहीर झालेल्या पुलकेशीच्या ऐहोळ शिलाशासनांत कालिदास–भारवीची एका कवीस उपमा दिली आहे. त्यावरून हा तत्पूर्वी चांगला प्रसिद्ध होऊन शिलालेखांत उपमा देण्याच्या योग्यतेस पोंचला होता. दुर्विनीतापासून हा कांचीचा पल्लव सिंहविष्णु याजजवळ गेला. नंतर हा चालुक्यांपैकीं द्वितीय पुलकेशीचा धाकटा भाऊ ( कुब्ज ) विष्णुवर्धन याचा आश्रित होता. साधारणतः हा कवि स. ६१० च्या सुमारास महाराष्ट्रांत चालुक्याच्या दरबारीं, ६२० मध्यें कर्नाटकांत गंगाच्या पदरीं व ६२५ च्या आसपास तामिळ देशांत पल्लवांच्या पदरीं होता. शेवटीं कांचीच यानें आपलें निवासस्थान केलें ( वि. वि. लक्ष्मणरावांचा लेख स. १९२३ ).

**दामोदर महादेव हिंगणे**—याचें दुसरें नांव दादासाहेब. हा व याचे सर्व बंधू फार पराक्रमी होते. यांनीं आपल्या कर्तबगारीनें दिल्लीची वकिलात भरभराटींत आणली. स. १७५० ते १७६० पावेतों हे सर्वजण बंधू दिल्लीकडील सर्व उलाढालींत अग्रेसर होते. रोहिले, जाट, रजपूत, नबाव व वजीर यांच्यावर यांची चांगलीच छाप होती. अंताजी माणकेश्वर पेशव्याचे तर्फे फौज घेऊन होता तेव्हां त्याचें व यांचें पटत नाहीं म्हणून रघुनाथरावाचें व यांचें वांकडें आलें ( रा. खं. १. १, ३. २३३; खं. ६. १९८. ४९७–४९९ ). रघुनाथरावाचें एक खरमरीत रागाचें पत्र सुद्धां आहे ( ले. ३८३ ). भेलशाच्या स्वारीसंबंधानें उल्लेख याच्या एका पत्रांत आहे. हें पत्र २३ जून स. १७४५ त भेलशाच्या लष्करांतून लिहिलें आहे ( रा. खं. ६ ले. १७४ ).

हा रामराजाचे राज्यरोहण-प्रसंगीं निजामाकडील कांहीं कारस्थानासंबंधानें साताऱ्यास आलेला असून त्या प्रसंगास हजर होता.

**दामोदरमिश्र**—( हनुमान् पाहा ).

**दामोदरसेन**—( २ प्रवरसेन पाहा ).

**दार्यव्यास कवीश्वर**— एक महानुभाव. यांनीं १२५ ओव्यांचें एक स्तोत्र लिहिलें आहे,

त्यास निर्वेदस्तोत्र असें म्हणतात. तें लाहोर येथें जयंतराज यांनीं छापून प्रसिद्ध केलें आहे. हें निर्वेदस्तोत्र महानुभावांच्या नेहमीं प्रचारांत आहे ( म. वा. इ. २. ७३८ ).

**दायीम रट्ट**—हा सौंदत्तीच्या रट्ट घराण्यापैकीं पहिल्या कार्तवीर्याचा पुत्र. याच्याबद्दल दावरी असाहि पाठ आहे.

**दारा शुकोह**—( जन्म स. १६१५–मृत्यु स. १६५९ ) शहाजहान पादशाहाचा वडील व आवडता पुत्र. मुम्ताजमहाल ही दाराची आई. याला लढाईंतील डावपेंच माहिती नव्हते. हा सर्व धर्म सारखे लेखी. यानें औरंगजेबाशीं प्रथम लढाईंत विजय मिळविला, पण पुढें याचें सैन्य फितूर झाल्यामुळें यास पळून जावें लागलें. आणि शेवटीं देशद्रोही व धर्मद्रोही म्हणून यास औरंगजेबानें क्रूरपणें ठार मारलें ( औरंगजेब पाहा ). हा विद्वान् होता. यानें मुहम्मद पैगंबराचें 'सफीनत-उल-औलिया' नांवाचें चरित्र लिहिलें आहे. हा कविहि होता.

हा रूपानें देखणा व मोठा हौशी होता. जहांगीर शहाजहानवर नाखूष झाला होता. तेव्हां हा व औरंगजेब यांना त्यानें आपणाकडे ओलीस ठेवलें होतें. जहांगीर मेल्यानंतर या दोघांची मुम्ताज बेगमशीं भेट झाली. हा मोठा विद्याप्रेमी होता. यानें मुसलमानी धर्माचें शिक्षण सरमद नांवाच्या मुसल्मान फकीरापासून मिळवलें होतें. तसेंच हिंदूंच्या वेदांताचा अभ्यास लालदास नांवाच्या एका हिंदु योग्यापाशीं केला होता. बायबलच्या नव्या व जुन्या करारांचेंहि यानें अध्ययन केलें होतें. याला मुसलमान व हिंदु अशा दोनहि धर्मांत सत्यांश दिसत असे. हें याच्या 'मजमूअह-इ-बाहरियान' या नांवाच्या ग्रंथांत लिहिलें आहे. यानें पंडितांच्या साहाय्यानें अनेक उपनिषदांचें फार्सीत भाषांतर केलें होतें. यानें केलेल्या पंचवीस उपनिषदांच्या भाषांतराचें नांव 'सिर्र-उल-असरार' असें होतें. बाबा लालदासाशीं याच्या ज्ञानविषयक गोष्टी होत. त्या 'बाबा लालसे बातचीत' या नांवानें प्रकाशित झाल्या आहेत. मुसलमान संतांच्या चरित्रसंग्रहाला 'सफीनत-उल-औलिया' असें नांव असून दाराचा धर्मगुरु मियामीर याचें जीवनचरित्र 'सफीनत-उल-औलिया' या नांवानें प्रसिद्ध आहे. अशा याच्या व्यापक क्षेत्रावरून हा धार्मिकदृष्ट्या अकबराचा शिष्य होता असें दिसतें.

**दारिकपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं सत्याहत्तरावा सिद्ध होय. हा ओरिसाचा राजा. हा लूहिपाचा शिष्य. यानें आपल्या गुरूच्या सांगण्यावरून गणिका-दारिका ( वेश्येची कन्या ) हिची सेवा केली. यानें केलेले ग्रंथ—१ ओड्डियान-विनिर्गत-महागुह्यतत्त्वोपदेश ( तं. ४६-६ ), २ तथतादृष्टि ( ४८-४८ ), ३ सप्तमसिद्धांत. याच्या कांहीं हिंदी कविताहि आहेत.

**दावर बख्श**—( मृ. स. १६२८ ) हा दिल्लीच्या मोगल घराण्यांतील खुस्रवचा मुलगा. हा शहाजहान बादशहाकडून मारला गेला. याचें दुसरें नांव बुलकी.

**दावर मलिक**—( स. १३५१–५८ ) घियासुद्दीनाचा नातू. याच्या आईचें नांव खुदावंद झादा. हिनें घियासुद्दीन तुघ्लक वारल्यावर आपल्या मुलास गादी मिळावी म्हणून सरदार लोकांचें मन वळविण्याचे प्रयत्न करून पाहिले. पण त्याचा कांहीं उपयोग न होऊन फीरूझशहास गादीवर बसविलें. तेव्हां हिनें त्यास घरीं मेजवानीस बोलावून ठार मारण्याचा कट केला व त्यास घरीं जेवावयास बोलाविलें. पण यास आपल्या आईचें कृत्य पसंत न पडून यानें तो कट उघडकीस आणून दिला. अशा प्रकारें याला गादीवर बसविण्याची खटपट यानेंच वांया घालविली.

**दावरी**—( दायीम पाहा ).

**दावलजी सोमवंशी**—हा शाहूच्या कारकीर्दींत प्रसिद्धीस आला. शाहूनें यास स. १७२७ चे सुमारास सरलष्करपद दिलें. स. १७१७ मध्यें दाभाड्यानें मोंगलांचा पूर्ण पराभव केला त्या वेळीं हा दाभाड्यांचा मदतनीस होता ( रा. खं. २ पृ. २८ ). माळवाप्रांत जिंकण्याच्या कामांत यानें बाजीरावास पुष्कळ मदत केली.

**दास ( भिकारीदास )**—( काव्यकाल स. १७२७–४९ ) एक हिंदी कवि. हा योंगा (जि. प्रतापगड) गांवचा राहणारा असून हा श्रीवास्तव कायस्थ होय. याच्या बापाचें नांव कृपालदास असें होतें. यानें केलेले ग्रंथ—१ रससारांश, २ छंदार्णव पिंगल, ३ काव्यनिर्णय, ४ शृंगारनिर्णय, ५ नामप्रकाश ( कोश ), ६ विष्णुपुराणभाषा, ७ छंदप्रकाश, ८ शतरंज, ९ शतिका आणि अमरप्रकाश (संस्कृत अमरकोशाचें हिंदी पद्यामध्यें भाषांतर ). हा प्रतापगडचा सोमवंशी राजा पतिसिंहाचा आश्रित होता. याचा काव्यनिर्णय हा ग्रंथ फारच प्रसिद्ध आहे; व त्यांत यानें पतिसिंहाचा उल्लेख केलेला आहे ( क. कौ. ५ ).

२. हा मराठी कवि होता. यानें 'गुरुगीता' नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे. त्या ग्रंथांत १५१ ओव्या आहेत. ग्रंथांत लिहिलेल्या भाषेवरून शके १६८० नंतर हा ग्रंथकार होऊन गेलेला असावा. हा ग्रंथ कऱ्हाडास मिळाला ( मं. श. १८३६ वा. इ. ले. ७० ).

**दासबाळा**—ओवीबद्ध ' कबीर ' आख्यान करणारा मराठी कवि. ओव्या ५९ ( मं. श. १८३७ वा. इ. ले. १२० ).

**दासोदिगंबर**—उद्धवचिद्धनाप्रमाणें यानेंहि भक्तचरित्रें गायिलीं आहेत. याच्या त्या ग्रंथाचें नांव 'संतविजय' असें आहे. या ग्रंथाचीं ३४ प्रकरणें असून त्यांत अनेक संतांची माहिती सांगितली आहे. त्यांत कवीनें नाभाजीच्या ग्रंथाचा उल्लेख केला असून त्याच्या ग्रंथाचा उपयोगहि पुष्कळ करून घेतला आहे. यानें आपली कोणतीहि माहिती किंवा आपला ग्रंथरचनेचा काळहि आपले ग्रंथांत दिला नाहीं. मात्र महिपतिबावांनीं हा ग्रंथ लिहिला असावा असें वाटतें.

**दासोपंत देशपांडे**—( स. १५५१–१६१५ ) एक मराठी कवि. हा गाल्वगोत्री देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. वेदरच्या बाहामनी पातशाहींतील नारायणगांवचा राहणारा. याच्या बापाचें नांव दिगंबरपंत; आईचें नांव पार्वतीबाई. हा दिगंबरदत्तोपासक व नाथसांप्रदायी होता. यानें पुष्कळ प्राकृत व संस्कृत ग्रंथ केले आहेत. त्यांपैकीं कांहीं खालील आहेतः १ गीतार्णव ( अध्याय १८ ), २ गीतार्थबोध, ३ अवधूतराज, ४ ग्रंथराज, ५ प्रबोधोदय ( पूर्वार्ध ), ६ प्रबोधोदय (उत्तरार्ध), ७ स्थूलगीता, ८ वाक्यवृत्ति (गद्य), ९ पंचीकरण ( अडीच हात पासोडीवर लिहिलेलें ), १० पदार्णव, ११ दत्तात्रयमाहात्म्य, १२ गीताभाष्य (अ. १८), १३ सार्थगीता, १४ अवधूतगीता, १५ अनुगीता, १६ दत्तात्रेयसहस्रनामस्तोत्र, १७ दत्तात्रेयदशनामस्तोत्र, १८ दत्तात्रेयद्वादशनामस्तोत्र, १९ दत्तात्रेयषोडशनामस्तोत्र २० दत्तात्रेयशतनामस्तोत्र, २१ नामामृतस्तोत्र, २२ गीतास्तोत्र, २३ प्रबंधस्तोत्र, २४ गीतप्रबंधस्तोत्र, २५ सिद्धदत्तात्रेयस्तोत्र २६ शिवस्तोत्र, २७ गुरुस्तोत्र, २८ षोडशस्तोत्र, २९ शीतज्वरनिवारणस्तोत्र, ३० भक्तिराजकवच, ३१ वज्रपंजरकवच ३२ सहस्रनामटीका, ३३ दत्तात्रेयनामावळी, ३४ दश, द्वादश व शतनामावली, ३५ मंगलमूर्ति, ३६ वाचिकोपूजा, ३७ महापूजा, ३८ मानसिकपूजा, ३९ वेदोक्तपूजा, ४० वैदिकपूजा, ४१ यंत्रपूजा, ४२ सिद्धमालामंत्रस्तोत्र, ४३ उषःकालस्तोत्र, ४४ षोडशअवतारस्तोत्र, ४५ वेदपादाख्य, ४६ षड्गुरुयंत्र, ४७ षोडशदलयंत्र, ४८ अत्रिपंचकप्रधानयंत्र. यांपैकीं कांहीं ग्रंथ प्राकृत व कांहीं संस्कृत आहेत ( महाराष्ट्रकविचरित्र, भा. १, पृ. १३–३४ ). हा एकच सत्पुरुष असा दिसतो कीं ज्यानें संस्कृत व प्राकृत या दोहींमध्यें सारखीच व पुष्कळ ग्रंथरचना केली. याची प्रसिद्धी एकनाथाच्या खालोखाल आहे. यानें शके १५३७ मध्यें माघ व. ६ स समाधि घेतली. या वेळेस याचें वय ६४ वर्षांचें होतें. याची समाधि जोगाईच्या आंब्यास आहे.

**दाहरसीय**—( स. ६४६–५६ सुमार ) हा सिंधच्या राजा चचाचा मुलगा. चचाच्या मागें त्याचा भाऊ चंद्र सात वर्षें गादीवर होता. चंद्र वारल्यावर चचाचा एक मुलगा अरोरास गादीवर बसला. चंद्राचा मुलगा धुराज ब्राह्मणाबादेस गादीवर आला. पण तो एक वर्षांतच मेल्यानंतर हा त्याच्या गादीवर बसला. याची एक बाई नांवाची बहीण होती. तिचें लग्न ज्याच्याशीं होईल तो सिंधचा राजा होईल असें भविष्य असल्यामुळें दाहरनें आपल्या बहिणीशीं कृतक लग्न लावलें, पण तें याला पसंत नव्हतें. नंतर हा देवीनें मेला.

**दाहिर**—( स. ६४५–७१२ ) सिंधचा हिंदु राजा. हा चचाचा मुलगा. जात ब्राह्मण. याचा उच्चार दाहर असाहि केलेला आढळतो. सिंध प्रांताला लागून असणाऱ्या खिलापत प्रांताचा सुभेदार हज्जाजशीं झालेल्या तक्रारींत यानें त्याला अनेक वेळां पराभूत केलें होतें. तेव्हां इमाद उद्दीन मुहम्मद नांवाच्या सतरा वर्षें वयाच्या सेनापतीस याच्यावर तयारीनिशीं रवाना करण्यांत आलें. तो शिराझ मक्रान मार्गें येऊन देवाळ बंदरापाशीं लढाईच्या तयारीनें राहिला. यानेंहि जोरानें तोंड देण्याचा प्रयत्न केला. पण रावरजवळच्या लढाईंत एक जळता बाण याच्या हत्तीवर टाकल्यानें हत्ती बिथरला व तळ्यांत शिरला. हत्ती बिथरूं लागल्यामुळें हा घोड्यावर बसत असतां एका अरबाच्या तलवारीला हा बळी पडला; व धारातीर्थीं पडल्यावर हिंदूंच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें सर्वांनीं पळ काढला. आणि हिंदुस्थानांत मुसलमानांचा प्रवेश होऊन जाळपोळ, लुटालूट, रक्तपात आणि जबरीनें मुसलमान करण्याचें युग सुरू झालें. अनेक हिंदु स्त्रियांस दमास्कसला पाठविलें आणि याची राणी लाडी हिच्याशीं मुहम्मदानें निक्का लावला.

**दिद्दा**—काश्मीरच्या दिवीर घराण्यांतील एक राणी.

**दिनकर**—( स. १३८५ ) हा एक रघुवंशावरील टीकाकार होय. याची वरील टीका ही चरित्रवर्धनाच्या रघुवंशावरील टीकेचाच संक्षेप ( सारग्रंथ ) होय, असें रा. नंदर्गिकर यांनीं म्हटलें आहे.

२. ( स. १८१८ ) यानें गूढप्रकाशिका नांवाची टीका मुकुंद दैवज्ञाच्या ' उपचारसार ' या नांवावर केली आहे.

३. ( स. १७५८ ) ' शिवरात्रि ' वगैरे लिहिणारा मराठी कवि ( मं. श. १८३६ वा. इ. ले. ८२ ).

४. दिनकर व श्री. माधवराव पेंडसे यांनीं लिहिलेले बरेचसे ग्रंथ पुणें येथील आनंदाश्रमांत आहेत. हा

पुण्याचाच रहिवासी होता. याच्या पित्याचें नांव अनंत व गोत्र शांडिल्य होय. यानें ग्रहविज्ञानसारणी, मासप्रवेशसारणी, ग्रहणांकजाल वगैरे ९ ग्रंथ लिहिले आहेत ( भा. ज्यो. ).

५. याचे खेटकसिद्धि आणि चंद्राकीं असे दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. या ग्रंथांतून ग्रहांचें स्पष्टीकरण केलेलें आहे. चंद्राकीं ग्रंथाचे एकंदर श्लोक ३३ आहेत. तींत फक्त चंद्रसूर्यस्पष्टीकरणार्थ फळसारण्या ग्रंथासमावेत असाव्या असें दिसतें. यानें 'गुर्जरप्रदेशबीज' असें म्हणून एक बीजसंस्कार दोन्ही ग्रंथांत दिला आहे. त्यासच कोठें कोठें रामबीज म्हटलेलें आढळतें ( भा. ज्यो. पा. २७७ ).

**दिनकर गोसावी**—यांना बहिणाजी असेंहि म्हणत. यांच्या पित्याचें नांव नरहर गोसावी. नगरजवळ भिंगार येथील पाठक उपनांवाच्या शुक्लयजुर्वेदी ब्राह्मणाच्या कुळांत यांचा जन्म झाला. पाठक आतां 'मुळे' असें आडनांव लावतात. यांचे पूर्वज भगवद्भक्त असून नरहर पाठक हे चांगले वेदशास्त्रसंपन्न असून गणपतीचे उपासक होते. यांच्या मातेचें नांव द्वारकाबाई. पुढें यांनीं भिंगारच्या पूर्वेस १३-१४ कोसांवर डोंगरांत वृद्धेश्वर ( म्हातारदेव ) देवाचें स्थान आहे, तेथें बारा वर्षे तपश्चर्या केली. तेथें शके १५७५ च्या फाल्गुनी पौर्णिमेस यांना समर्थ रामदासांचा साक्षात्कार झाला; व पुढें एक वर्षानें भातवडी येथें समर्थांनीं अनुग्रह दिला; व सीतायुक्त राममूर्ति दिली. ती तीसगांवीं स्थापिली आहे. हे समर्थांच्या चौदा महंतांपैकीं एक होता. यांचा ग्रंथ स्वानुभव-दिनकर ( समाप्तिकाल स. १६९४ ). हा यांचा ग्रंथ सत्कार्योत्तेजकसभेनें प्रसिद्ध केला आहे ( ओवीसंख्या ६७५० ). याशिवाय अभंग व पदें ७५० आहेत. यांची हिंदींतहि कांहीं कविता आहे. यांनीं भागवतग्रंथ केल्याचा निर्देश सांपडतो. यांचा पुत्र रामचंद्र. शके १६१७ पर्यंत दिनकरांचा उल्लेख सांपडतो. पुढें रामचंद्राचा उल्लेख येतो ( म. क. च. भा. ३, पा. ८०-१०० ).

**दिनचिंतामणि**—कुलोत्तुंग चोलाची पत्नी.

**दिलशाद आगा**—( इस्माईल आदिलशाह पाहा ).

**दिलावरअली**—( मृत्यु स. १९-६-१७२० ) माळव्याचा सुभेदार. हा खांडवा येथें निजामाशीं लढत असतां पडला ( मु. रि. भा. २, पृ. ३९९ ).

**दिलावरखान**—( २ इब्राहीम आदिलशाह पाहा ). २. ( अमीशाह व हूशंगशाह पाहा ).

**दिलेरखान**—आदिलशाही बुडाल्यावर हा औरंगझेबाकडे आला. हा मराठ्यांविरुद्ध पुष्कळ वेळां लढला. यानेंच शिवाजीस फसवून दिल्लीस नेलें. ही याची पदवी आहे. याचें नांव अबदुल.

## दिल्लीचे बादशाह

### तुर्कवंश

१ शहाबुद्दीन घोरी ( स. ११९२ ).

### गुलामवंश

१ कुतुबुद्दीन ऐबक ( १२०६ ), २ आरामशाह ( आरम ) ( १२१० ), ३ शम्सुद्दीन अल्तमश (१२१०), ४ रुक्नुद्दीन फीरूजशाह ( १२३६ ), ५ रझिया (बेगम) ( १२३६ ), ६ मुइजुद्दीन बहरामशाह ( १२४० ), ७ अलाउद्दीन मसूदशाह ( १२४२ ), ८ नासिरुद्दीन महमूदशाह ( १२४६ ), ९ घियासुद्दीन बल्बन ( १२६६ ), १० मुइजुद्दीन कैकूबाद ( १२८७ ).

### खल्जीवंश

१ जलालुद्दीन फीरूजशाह ( १२९० ), २ रुक्नुद्दीन इब्राहीमशाह ( १२९६ ), ३ अलाउद्दीन मुहम्मदशाह ( १२९६ ), ४ शहाबुद्दीन उमरशाह ( १३१६ ), ५ कुतुबुद्दीन मुबारकशाह ( १३१६ ), ६ नासिरुद्दीन खुसरोशाह ( १३२० ).

### तुघ्लकवंश

१ घियासुद्दीन तुघ्लकशाह पहिला ( १३२० ), २ मुहम्मद ( १३२५ ), ३ फीरूजशाह ( १३५१ ), ४ घियासुद्दीन तुघ्लकशाह ( दुसरा ) ( १३८८ ), ५ अबूबक्रशाह ( १३८९ ), ६ मुहम्मदशाह ( १३८९ ), ७ सिकंदरशाह ( १३९४ ), ८ महमूदशाह ( १३९४ ), ९ नसतरशाह ( १३९५ ), १० महमूदशाह ( दुसऱ्यांदा ) ( १३९९ ), ११ दौलतखां लोदी ( १४१२ ).

### सैयदवंश

१ खिजरखां ( १४१४ ), २ मुइजुद्दीन मुबारकशाह ( १४२१ ), ३ मुहम्मदशाह ( १४३४ ), ४ आलिमशाह अलाउद्दीन ( १४४३ ).

### लोदीवंश

१ बहलोल लोदी ( १४५१ ), २ सिकंदर लोदी ( १४८६ ), ३ इब्राहिम लोदी ( १५१७ ).

### मोगलवंश

१ बाबर ( १५२६ ), २ हुमायून ( १५३० ).

### सूरवंश

१ शेरशहा ( १५३९ ), २ इस्लामशाह ( १५४५ ), ३ मुहम्मद आदिलशाह ( १५५२ ), ४ इब्राहीम सूर ( १५५३ ), ५ सिकंदरशाह ( १५५५ ).

**मोगलवंश ( दुसऱ्यांदा )**

१ हुमायून ( दुसऱ्यांदा ) ( १५५५ ), २ अकबर ( १५५६ ), ३ जहांगीर ( १६०५ ), ४ शाहजहान ( १६२८ ), ५ औरंगजेब ( आलमगीर ) ( १६५८ ), ६ बहादूरशाह ( शाहअलम पहिला ) ( १७०७ ), ७ जहांदरशाह ( १७१२ ), ८ फर्रुखसियर ( १७१३ ), ९ रफिउद्दरजत (१७१९), १० रफिउद्दौला (१७१९), ११ मुहम्मदशाह ( १७१९ ), १२ अहमदशाह ( १७४८ ), १३ आलमगीर ( दुसरा ) ( १७५४ ), १४ शाहजहान ( दुसरा ) ( १७५९ ), १५ शाहआलम ( दुसरा ) ( १७५९ ), १६ अकबर ( दुसरा ) ( १८०६ ), १७ बहादुरशहा ( दुसरा ) ( १८३७ ).

**दिवाकर**—( जन्म स. १६०६ ) हा गोलग्राममध्यें राहणाऱ्या नृसिंहाचा पुत्र. याचें बहुतेक अध्ययन याचा चुलता शिव याजपाशीं झालें.

वयाच्या १९ व्या वर्षी यानें 'जातकमार्गपद्म' नांवाचा जातक ग्रंथ केला. केशवी जातकपद्धतीवर ह्यानें प्रौढमनोरमा नांवाची टीका शके १५४८ मध्यें केली. त्यानंतर जातकपद्धतीवर 'गणिततत्त्वचिंतामणि' नांवाची टीका लिहिली. त्याचप्रमाणें पंचांग-साधक मकरंद ग्रंथावर याची 'मकरंदविवरण' नांवाची सोदाहरण टीका आहे. व्याकरण, काव्य, साहित्य इत्यादिमध्यें हा प्रवीण होता ( भा. ज्यो. ).

२. भास्कर कवीचा पिता. आचारार्क ग्रंथाचा कर्ता.

**दिवाकर पुरुषोत्तम ऊर्फ देवाजीपंत चोरघोडे**—( स. १७०१–१७८१ ) हा महाराष्ट्रांतील साडेतीन शहाण्यांपैकीं एक. हा ऋ. दे. ब्राह्मण असून नागपूर प्रांतांतील नरखेडचा राहणारा.

हा प्रथम कोन्हेरराम कोल्हटकराकडे असून अंगहुशारीनें भोसल्यांच्या कारभारांत उदयास आला. चिमुरला यांनीं बांधलेलीं कांहीं देवालयें आहेत. पण हा नरखेडचाच राहणारा होय. भोसले हे नेहमीं पैशाच्या अडचणींत असत. यांनीं अनेक सावकार आपल्या लगामी ठेवून भोसलेशाहीचा सर्व कारभार मोठ्या चातुर्यानें आपल्या ताब्यांत ठेवला होता.

हा जानोजी भोसल्याचा मुख्य कारभारी. हा जानोजी भोसल्यास रघुनाथदादाशीं व निजामाशीं कारस्थानें करण्याचा सल्ला देतो म्हणून हा जानोजी भोसल्याचे तर्फेनें पेशव्याशीं बोलणें करण्यासाठीं आला, तेव्हां याला पेशव्यांनीं पकडून कैदेंत ठेविलें. पण तेथेंहि जानोजी पुण्यावर चाल करणार असा खोटा पत्रव्यवहार माधवरावाच्या हातीं पडेल असा तयार करून यानें आपली सुटका करून घेतली ( स. १७६९ ). इंग्रज नेहमीं यास जाळ्यांत पकडण्यास पाहत असत. पण हा कसलेला मुत्सद्दी त्यांच्या जाळ्यांत सांपडला नाहीं असें दिसून येतें. पुढें हा मुधोजीचा कांहीं दिवस कारभारी झाला. हा वयाचे ८० व्या वर्षी मरण पावला. मरतेसमयीं यास मूल नव्हतें ( ना. प्रां. इ. ).

**दिवाकरसेन वाकाटक**—( स. ३९५–४०५ ) हा दुसऱ्या रुद्रसेन वाकाटकानंतर गादीवर आला. हा प्रभावती गुप्ताचा हस्तक होता.

**दिंडिक**—( स. ८४०–७८ ) गंग-बाण घराण्यांतील दुसऱ्या शिव-माराचा मुलगा. जेरिंग आणि नाग-दंत या राजपुत्रांचें राष्ट्रकूट घराण्यांतील पहिल्या अमोघवर्षाच्या हल्लयापासून यानें संरक्षण केलें. पुढें स. ८७८ मध्यें पांड्य घराण्यांतील वर-गुण याचा पराभव केला. याच्यानंतर याचा मुलगा मारसिंह १ ला हा गादीवर आला ( B. ).

**दिं(दिङ्)नाग**—( स. ५०० सुमार ) एक नैयायिक. दक्षिण हिंदुस्थानांत कांचीनगरीजवळ सिंहवक्र नांवाच्या गांवीं याचा जन्म झाला. हा ब्राह्मण असून यानें बौद्धधर्माची दीक्षा घेतली आणि हा नागदत्त नांवाच्या बौद्धाचा शिष्य झाला. नागदत्त हा वात्सीपुत्रीय नांवाच्या हीनयान सांप्रदायांपैकीं होता. यानें या सांप्रदायाचें चांगलें अध्ययन करून हा महायान सांप्रदायांत शिरला; व आचार्य वसुबंधूचा शिष्य झाला. वसुबंधूजवळ यानें सर्व महायान सांप्रदायाच्या ग्रंथांचें अध्ययन केलें. महायानविद्येची अधिष्ठात्री देवता मंजुश्री याला प्रसन्न झाली आणि तिच्या कृपनें हा त्या विद्येंतील असामान्य पंडित झाला. याची कीर्ति ऐकून याला नालंदा येथें बोलावलें गेलें व तेथें यानें सुदुर्जय नांवाच्या ब्राह्मण पंडिताचा पराजय केला. अशाच अनेक पंडितांचा पराजय केला म्हणून यास तर्कपुंगव अशी पदवी मिळाली. ओरिसा व महाराष्ट्रांत हिंडून यानें अनेकांच्या मतांचें खंडन केलें. महाराष्ट्रांत हा ज्या विहारांत राहत असे त्याला आचार्यविहार असें म्हणत. ओरिसा प्रांतांत भाद्रपालित नांवाच्या राजमंत्र्याला यानें बौद्धधर्माची दीक्षा दिली. हा विद्वान्, बुद्धिमान् आणि मोठा आचारशील होता नालंदाच्या विद्यालयांत यानें सर्वांचा पराजय केला म्हणून यास पंडितोष्णीष नांवाचें एक अपूर्व शिरोभूषण मिळालें होतें.

याचा सुप्रसिद्ध ग्रंथ 'प्रमाणसमुच्चय' हा होय. आंध्र देशांत वेंगीच्या जवळ असणाऱ्या निर्जन पर्वतावर हा ग्रंथ

यानें लिहिला. 'प्रमाणसमुच्चय' हा ग्रंथ म्हणजे यानें वेळोवेळीं शास्त्रविषयक केलेल्या श्लोकांचा संग्रह होय. सर्व श्लोक अनुष्टुप् वृत्तांत आहेत.

या ग्रंथाचें तिबेटी भाषांतर झालेलें आहे, त्यावरूनच याचा पत्ता लागतो. हेमवर्मा नांवाचा एक भारतीय बौद्ध पंडित होता. त्यानें या ग्रंथाचें तिबेटी भाषेंत भाषांतर केलें. प्रमाणसमुच्चयाचे खालील परिच्छेद आहेत:

१ प्रत्यक्ष, २ स्वार्थानुमान, ३ परार्थानुमान, ४ त्रिरूपहेतु, ५ प्रत्यक्ष, उपमान व शब्दखंड, ६ जात्युत्तरविचार.

ईश्वरकृष्ण आणि दिङ्नाग यांच्यांत तीव्र विरोध होता. यासंबंधीं पुढील आख्यायिका आहे. दिङ्नागानें प्रमाणसमुच्चयाला पहिला श्लोक लिहिला तो त्याच्या गैरहजरींत ईश्वरकृष्णानें अनेक वेळां फाडून टाकला. तेव्हां यानें श्लोक लिहून श्लोक फाडणाराला वादाचें आव्हान लिहून ठेवलें. तेव्हां ईश्वरकृष्णाशीं वाद होऊन त्यांत त्याचा पराभव झाला. शर्तींत ठरल्याप्रमाणें त्यानें बौद्धधर्माचा स्वीकार न करितां याच्या मठाला आग लावून दिली. त्यामुळें दिङ्नागालाहि पश्चात्ताप झाला. एका माणसाला आपल्या मताकडे आपणास वळवतां आलें नाहीं, मग जगावर आपण काय परिणाम करणार ? असा विचार मनांत येऊन यानें 'प्रमाणसमुच्चय' ग्रंथ लिहिण्याचें सोडलें. पण मंजुश्रीनें प्रेरणा दिल्यावरून यानें तो ग्रंथ पुरा केला.

ब्राह्मण नैयायिक उद्योतकरानें न्यायवार्तिकाच्या प्रारंभीं यास कुतार्किक म्हटलें आहे. वाचस्पतिमिश्रानें याला 'भ्रांत भदंत' म्हटलें आहे. मल्लिनाथानें याला 'अद्रिकल्प' असें विशेषण दिलें आहे. कुमारिलभट्ट, पार्थसारथी, सुरेश्वराचार्य तसेंच प्रभाचंद्र व विद्यानंद या जैनांनीं याच्याविरुद्ध लिहिलें आहे. अशा आघातामुळें याचे ग्रंथ भारतांतून नष्ट झाले तरी तिबेटांत सुरक्षित आहेत.

हा स. ५०० च्या सुमारास ह्यात असावा. याचे गुरु आचार्य वसुबंधु स. ४८० मध्यें जिवंत होते. याच्या दोन ग्रंथांचा अनुवाद स. ५५७–५६९ मध्यें चिनी भाषेंत झाला. हा आंध्र देशांत जन्मास आला तेव्हां दक्षिणेंत पल्लवांचें आधिपत्य होतें. पल्लव राजे बहुतेक बौद्ध होते.

कालिदासानें मेघदूताच्या चौदाव्या श्लोकांत ( दिङ्नागानां पथि परिहरन् स्थूलहस्तावलेपान् ) दिङ्नागाचा निर्देश केला आहे, असें दक्षिणावर्त व मल्लिनाथ यांनीं म्हटलें असलें तरी तसें वाटत नाहीं. सतीशचंद्र विद्याभूषण व प्रो. मिराशी यांचेंहि असेंच मत आहे ( वंगीयसाहित्यपरिषद्पत्रिका, ऑगष्ट १९१५ ).

डॉ. कीथ, प्रो. मक्डोनेल वगैरेंच्या मतें दिङ्नाग स. ४०० च्या सुमारास होऊन गेला.

याचे ग्रंथ—१ प्रमाणसमुच्चय, २ न्यायप्रवेश, ३ हेतुचक्रहमरु ( ? ), ४ प्रमाणसमुच्चयवृत्ति, ५ प्रमाणशास्त्रप्रवेश, ६ आलंबनपरीक्षा, ७ आलंबनपरीक्षावृत्ती, ८ त्रिकालपरीक्षा, ९ कुन्दमाला ( नाटक ).

पण हे सर्व ग्रंथ तिबेटी भाषांतरावरून संस्कृत भाषेंत होते असें ठरतें ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ७८-८० ). संस्कृत कुन्दमाला नाटक मात्र मद्रास येथें प्रसिद्ध झालें आहे. भवभूतीचें उत्तररामचरित्र याच्याच नाटकावरून लिहिलें आहे असें कांहीं लोक म्हणतात.

**दीन कवि**—(स. १७०० सुमार) मराठी कवि. याचें 'पंचीकरण' नांवाचें एक काव्य आहे. या ग्रंथाचीं १८ प्रकरणें आहेत. हा कवि तुकारामबोवांच्या अनुग्रहीत बहिणाबाईंचा शिष्य होता (मं. वा. इ. शके १८३७ ले. १४९).

**दीनकृष्णदास**—ओरिसा प्रांतांत राहणारा व रसकल्लोल ग्रंथाचा कर्ता.

**दीनदयाळगिरि**—( मृत्यु स. १८६५ ) एक हिंदी कवि. संस्कृत पंडित, स्थल बनारस. ग्रंथ-कल्पद्रुम, बागबहार, अनुरागबाग, दृष्टान्ततरंगिणी, वैराग्यदिनेश, अन्योक्तिकल्पद्रुम ( क. कौ. १ ).

**दीप**—हिंदुस्थानांत आलेल्या चिनी प्रवाश्यानें हें नांव धारण केलें होतें. हा चीनमधून ब्रह्मदेशांत गेला. तेथें प्रव्रज्या घेऊन यानें दीप असें नांव धारण केलें. ब्रह्मदेशांतून हा लंकेला गेला व तेथून ताम्रलिप्त येथें आला. येथें यानें बारा वर्षें संस्कृत विद्येचें अध्ययन केलें. नंतर हा कुशनगरच्या परिनिर्वाणस्तूपाच्या दर्शनाला गेला असतां तिकडेच मेला.

**दीपंकर श्रीज्ञान**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं होय. हा वैशालीचा ( बसाढ, जि. मुजफरपूर ). हा कांहीं वर्षे भूतानमध्यें होता. यानें भूतानी भाषेंत कांहीं ग्रंथ लिहिले आहेत. त्यामुळें याला पुष्कळ द्रव्य मिळालें. यानें चर्यागीति ( तं. १३।४४ ), धर्मगीतिका ( तं. ४८।३४ ) व धर्मधातुदर्शनगीति ( तं. ४७।४७ ), वज्रासनवज्रगीति वगैरे ग्रंथ लिहिले आहेत. हा बंगाली ब्राह्मण होता. हा हिमालयावरून तिबेटांत गेला. यानें तेथें बौद्धधर्माचा प्रसार केला.

**दीपाबाई भोसले**—तंजावरच्या थोरल्या व्यंकोजीची राणी. व्यंकोजी जेव्हां वडिलार्जित जहागिरीचा वांटा शिवाजीस देईना तेव्हां हिनें रघुनाथपंत हणमंते यांच्या मध्यस्थीनें सर्व प्रकरणाचा समाधानकारक निकाल लाविला. शिवाजीनें हिची स्तुति केली आहे. ही इंगळ्यांची मुलगी. हिच्या पोटीं शहाजी, सरफोजी व तुकोजी हे पुत्र झाले.

**२.** ( १ उमाबाई भोसले पाहा ).

**दुर्गसिंह**—( स. १००० सुमार ) निरुक्तावरील टीकाकार.

**२.** ( स. ११४५ ) हा जैन नव्हता. हा सय्यदी गांवचा स्मार्त ब्राह्मण. यानें गुणाढ्याला अनुसरून चंपूमध्यें पंचतंत्र लिहिलें आहे.

**दुर्गादत्तमिश्र**—( स. १५१५ सुमार) तत्त्वज्ञानाच्या न्याय व वैशेषिक विभागावर यानें न्यायबोधिनी नांवाचा ग्रंथ लिहिला.

**दुर्गादास**—वोपदेवाच्या व्याकरणविषयक काव्यकल्पद्रुमावर यानें धातुदीपिका नांवाची संस्कृतमध्यें टीका लिहिली.

**दुर्गादास राठोड**—( स. १६३८–१७२१ ) हा जोधपूरच्या जसवंतसिंहाचा दिवाण अजकर्ण ह्याचा मुलगा. हा अत्यंत थोर मुत्सद्दी, सदाचारी व शूर होता. औरंगजेबानें जसवंतसिंहाच्या मृत्यूनंतर त्याचा पुत्र अजितसिंह ह्यास हस्तगत करण्याचा प्रयत्न केला तेव्हां यानें तो प्रयत्न निष्फळ केला, व अजितसिंहास मारवाडची गादी मिळवून देण्याचें काम अंगावर घेतलें. औरंगजेबाचा पुत्र अकबर यानें मारवाडवर स्वारी केली असतां त्याचें मन वळवून त्यास बादशहाविरुद्ध बंड करावयाला लावण्यास हाच कारणीभूत झाला. पण तो प्रयत्न अयशस्वी झाला. तेव्हां रजपूत नाहींतर मराठ्यांच्या साहाय्यानें औरंगजेबाच्या सत्तेला शह देण्याचा यानें व्यूह रचला, पण त्यांतहि याला म्हणावें तसें यश आलें नाहीं व अकबराला हिंदुस्थान सोडावें लागलें (संभाजी पाहा). अकबराचीं दोन मुलें, एक मुलगा व एक मुलगी, ह्याच्या ताब्यांत होतीं त्याबद्दल बादशहास फ़ार खंत वाटे. ह्यानें दोन्ही मुलांस उत्तम प्रकारें शिक्षण दिलें होतें. पुढें बादशहाची व दुर्गादासची तडजोड होऊन जोधपूरचें राज्य त्याबद्दल बादशहानें अजितसिंहाचे हवालीं करावें व दुर्गादासनें दोन्ही मुलें बादशहाचे हवालीं करावीं असें ठरलें होतें. परंतु दोन्ही मुलें ताब्यांत आल्यावर बादशहानें ह्यास मेडत्याची जहागीर, नक्त नेमणूक, तीन हजारी मनसब व एक लाख रुपये देऊन राज्य देण्याचें नाकारलें; तेव्हां ह्यानें व अजितसिंहानें बादशहाशीं झगडा करून स्वपराक्रमानें राज्य परत मिळविलें. दुर्गादासाबद्दल खालील वचन रजपुतांत अद्यापि सर्वांमुखीं रूढ आहे: “ए माता पूत एसा जिन, जैसा दुर्गादास.”

**दुर्गाबाई नाईक बारामतीकर**—(लग्न स. १७७३) ही राघोबादादा पेशव्याला जानकीबाई नांवाच्या पहिल्या बायकोपासून झालेली कन्या. ही बाबूजी नाईक बारामतीकर यांच्या पांडुरंग नांवाच्या मुलास दिली होती. आपल्या आईबापांनीं नारायणरावाला मारलें हें हिला आवडलें नाहीं. ही बारभाईच्या पक्षाची होती. हिचें लग्न स. ७-१२-१७७३ रोजीं झालें. ज्ञा. को. वि. ७ मध्यें ही आनंदीबाईची मुलगी म्हटलें आहे तें चूक आहे ( पेशव्यांची बखर ).

**दुर्गाबाई भोसले**—ही शरीफजी भोसल्यांची बायको. ही विजयराज विश्वासराव नांवाच्या जुन्नरच्या मराठे सरदाराची मुलगी.

**२.** कोल्हापूरच्या छत्रपति संभाजीची ही बायको होय. संभाजी मृत्यु पावल्यावर त्याची दुसरी बायको जिजाबाई हिनें स. १७६२ त दत्तक घेऊन कोल्हापूरचे गादीवर बसविलेला शिवाजी केवळ पांच वर्षांचा होता. ता. १७–२–१७७३ रोजीं. जिजाबाई वारली. तोंपर्यंत तेथील कारभार तीच करीत होती.

जिजाबाईच्या मरणसमयीं शिवाजी जरी पंधरा वर्षांचा झाला होता तरी राज्याचें काम पालक नात्यानें जिजाबाईची सवत दुर्गाबाई ही पाहूं लागली होती, व हिच्या हुकमतीखालीं कच्चा कारभार येसाजी कुसाजी शिंदे पाहत होता. स. १७७७ मध्यें महादजीनें कोल्हापूरकरांचे राज्यावर स्वारी केली. महाराणी दुर्गाबाई कोल्हापुरांत राहून महादजीशीं टक्कर देण्याची कसून मेहेनत करीत होती.

ही मरण पावली तेव्हां शिवाजीमहाराजाचें वय २१ वर्षांचें असून, पुढें त्यानेंच सर्व कारभार आपल्या हातीं घेतला ( म. रि. उत्तर वि. १ ला, पृ. ४५६, ४६४ ).

**दुर्गावती राणी**—( स. १५६४ ) चंदेल्ल रजपूतवंशीय महोबाचा राजा सालवाहन याची ही कन्या. ही फार सुंदर होती. गढामंडळ येथील रजपूत कच्छवाहशाखीय दलपत या राजास ही दिली होती. हा लग्नानंतर ४–५ वर्षांनीं मेला. हिनें नारायण नांवाच्या आपल्या मुलाच्या नांवानें राज्य चालविलें. अकबरानें निष्कारण हिच्यावर आसफखानास सैन्य देऊन पाठविलें. ही हत्तीवरून लढत होती. लढाईंत आपला निभाव लागत नाहीं असें पाहून हिनें खंजीर खुपसून आपला प्राणत्याग केला ( मु. रि. भा. २ रा, पृ. ६७ ).

**दुर्जय काकतीय**—हा करिकाल काकतीयाचा पुत्र.

**दुर्लभदेवी**—ही पश्चिम चालुक्यांपैकीं पुलकेशीची पत्नी.

२. ( दुर्लभराज सोळंकी पाहा ).

**दुर्लभराज सोळंकी**—(राज्यकाल स.१००९–२१) गुजराथच्या चामुंडराज सोळंकीचा हा पुत्र. हा आपला थोरला भाऊ वारल्यानंतर गादीवर आला. याचें लग्न नाडौलचा राजा महेंद्र चौहान याच्या दुर्लभदेवी नांवाच्या बहिणीशीं झालें होतें. गझनीच्या महमूदानें भीमदेवाचा पराभव करून याला अनहिलवाड्याच्या गादीवर बसविलें. यानें लाट देशावर स्वारी केली. हा साधुवृत्तीनें राहत असे. याचा उत्तराधिकारी याचा धाकटा भाऊ नागराज याचा पुत्र भीमदेव झाला.

**दुर्लभवर्धन कर्कोटक**—( स. ६०२–६७ ) काश्मीरचा राजा. हा राज्य करीत असतां ह्युएनत्संग काश्मीरांत आला.

**दुर्विनीत गंग**—( सनाचें पांचवें शतक ) दक्षिण गंगकुलांतील एक राजा. याच्या शिलाशासनांत याला 'शब्दावतार' नांवाचा व्याकरणग्रंथ लिहिणारा, पैशाची भाषेंतील बृहत्कथेचें संस्कृतांत भाषांतर करणारा व भारवीच्या किरातार्जुनीय काव्याच्या पंधरा सर्गांवर टीका लिहिणारा अशीं विशेषणें लाविलीं आहेत ( म्हैसूर आर्कीऑलॉजिकल रिपोर्ट, १९१९, पा. ३६, इंडि. अँटि. ५.२३७; ७.१७४). देवनंदीचा शिष्य.

**दुलह**—(जन्म स. १७०३; काव्यकाल स. १७४२) एक हिंदी कवि. हा कालिदास त्रिवेदीचा नातू व उदयनाथाचा पुत्र. याचा ' कविकुलकंठाभरण ' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. अलंकाराविषयीं हा प्रमाण मानला जातो. हा मार्मिक होता.

**दूला रहिमानशाहा**—( ईल पाहा ).

**दृढप्रहार यादव**—( स. ८८० प्रारंभ ) सेऊणदेश येथील यादव घराण्याचा संस्थापक.

यानें द्वारवतीहून येऊन चंद्रादित्यपूर ( चांदूर ) स्थापन केलें, असें म्हणतात. याच्यानंतर याचा मुलगा सेऊणचंद्र हा गादीवर आला ( B. ).

याच्या पित्याचें नांव सुबाहु दिसतें. यानें प्रथम महाराष्ट्रांत प्रवेश केला. हा प्रथम गिरनार येथें होता. सेऊण देश म्हणजे खानदेश होय. यांच्यापैकीं भिल्लमानें देवगिरीस साम्राज्य स्थापन केलें. नाशिकजवळचें श्रीनगर ऊर्फ सिन्नर ही यांची राजधानी. पण दुसरें मत चंद्रादित्यपूर ही राजधानी होय.

**दृढबल**—अग्निवेशतंत्रावर चरकानें संस्कार केला व चरकसंहितेवर यानें संस्कार केला, असें सध्यांच्या चरकसंहितेंत लिहिलें आहे.

**दृष्टिज्ञान**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं एक. यानें गीतिका ( तं. ४८.१९ ), वज्रगीतिका ( तं. ४८-१८ ) वगैरे ग्रंथ लिहिले.

**देल्हण**—आबूच्या परमारांपैकीं प्रतापसिंहाचा मंत्री. यानें स. (वि. सं.१३४४) मध्यें पाटनारायणाच्या मंदिराचा जीर्णोद्धार केला; व त्यावर ध्वजादंड चढवला ( रा. इ. ).

**देव**—काशींतील देव घराण्यापैकीं वैद्यनाथ पायगुंड्याचा हा जांवई होता.

२. खरतरगच्छांतील विसावा पुरुष.

३. यानें सुविप्रदीप्तपक्षगच्छाची स्थापना केली.

४. ( स. १२०० ) यानें ' कुसुमावली ' नांवाची एक सुंदर कादंबरी ( चंपू ? ) लिहिली आहे.

५. दाक्षिणेंतील महापंडित असें ह्युएनत्संग म्हणतो.

६. ( जन्म स. १६७२ ) हिंदी कवि. हा इटाव्याचा सनाढ्य ब्राह्मण. ग्रंथ-- १ भावविलास, २ अष्टयाम, ३ भवानीविलास ( भवानीदत्त वैश्याच्या नांवावर ), ४ कुशलविलास, ५ देवचरित्र, ६ संस्कृतधर्मशास्त्रसार, ७ क्षेमचंद्रिका, ८ जातिविलास, ९ रसविलास, १० सुखसागर, ११ पालर्सविलास वगैरे ग्रंथ यानें लिहिले. याच्या ७२ ग्रंथांपैकीं एवढेच उपलब्ध आहेत. हा मोठा कवि आहे.

**देवकीनंदन**—( ग्रंथकाल स. १७८३–९९ सुमार ) एक हिंदी कवि. हा कनोजजवळच्या मकरंदनगर गांवचा राहणारा. याच्या बापाचें नांव सबली शुक्ल असें होतें.

यानें वि. सं. १८४१ (स.१७८४) मध्यें 'शृंगारचरित्र' आणि वि. सं. १८५७ ( स. १८०० ) मध्यें ' अवधूतभूषण ' असे ग्रंथ लिहिले. याशिवाय यानें ' सरफराजचंद्रिका ' हा ग्रंथ लिहिला. रुद्दामऊ ( जि. हरदहि ) चा राजा जो अवधूतसिंह त्याच्या पदरीं असतांना यानें ' अवधूतभूषण ' हा ग्रंथ केला. ' शृंगारचरित्र ' यामध्यें रसभाव, नायिकाभेद आणि अलंकारहि आलेले आहेत.

**देवगुप्त**—तोरमाण ( हूणांचा राजा ) याचा जो गुरु जैन आचार्य हरिगुप्त, त्या हरिगुप्ताचा हा एक शिष्य होय.

हा मोठा विद्वान् आणि कवि होता. हा एक गुप्त राजघराण्यांतील होय. हर्षचरित्रांत असें आहे कीं हा देवगुप्त आणि माळव्याचा राजा हे दोघे एकच होत, कारण माळव्याच्या राजाचें नांव देवगुप्त असेंच होतें, पण याविषयीं निश्चितता नाहीं. कारण हा देवगुप्त जैनधर्मानुयायी असून जैन आचार्य हरिगुप्ताचा शिष्य होता.

२. ( स. ६९९ सुमार ) माळव्याच्या गुप्तांपैकीं हा माधवगुप्ताचा नातू. हा हर्षवर्धनाचा मित्र होता. याचा वध काश्मीरच्या ललितादित्यानें केला, ही गोष्ट वाक्पतीनें आपल्या ' गौडवहो ' या काव्यांत वर्णिली आहे. प्रथम हा शरण गेला असतां परिहासपूरनामक परिहासकेशवाच्या मंदिरांत शपथपूर्वक अभयवचन दिलें होतें, पण शेवटीं वध केलाच. पण त्याच्या स्वामिभक्त सेवकांनीं शारदा-दर्शनाच्या मिषानें काश्मीरांत प्रवेश करून ललितादित्य तेथें नसल्यानें परिहासकेशव समजून रामस्वामीच्या रौप्यमूर्तीचे कणाएवढे तुकडे केले.

**देवणभट्ट**--( स. ११२५-१२२५ सुमार ) याचा ' स्मृतिचंद्रिका ' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. हा ग्रंथ धर्म-शास्त्रावर लिहिला आहे. यामध्यें संस्कार, व्यवहार, श्राद्ध, आशौच, वगैरेविषयीं माहिती दिलेली आहे. यानें प्रायश्चित्तावरहि बरेंच लिहिलें आहे. यानें स्मृतिचंद्रिके-मध्यें बहुतेक सर्व स्मृतिकारांचा उल्लेख केला आहे. विज्ञा-नेश्वराचाहि मोठ्या आदरपूर्वक उल्लेख केला आहे. कांहीं ठिकाणीं स्मृतिचंद्रिका व मिताक्षरा यांमध्यें भेद आहे. यानें स्मृतिचंद्रिकेमध्यें पुष्कळ ग्रंथांची व ग्रंथकारांची चिकित्सा करून त्यांच्या तत्त्वांचा नीट विचार करून नंतर आपलीं मतें दिलेलीं आहेत.

हा एक दक्षिणेकडील ग्रंथकार होता. दक्षिणेंत याच्या ग्रंथाला न्यायखात्यामध्यें फार मान दिला जातो. जरी याच्या ग्रंथाला दक्षिणेंत अग्रस्थान मिळालेलें असलें तरी याचा दर्जा, खुद्द मद्रास इलाख्यांतसुद्धां, मिताक्षरेहून कमी ठरतो. मुलाच्या पश्चात् आईबाप वारस ठरतात हें मिताक्षरेंतील मत यास पसंत नसून त्यावर यानें चिकित्सा केली आहे.

**देवदत्त**--एक शाक्यकुमार. हा आनंदादिकांबरोबर बुद्धदेवाकडे जाऊन त्यांचा शिष्य झाला होता. यानें भिक्षु लोकांच्याकरितां कठिण नियम केले, ते भिक्षूंवर लादून हा त्यांचा प्रमुख होऊं इच्छीत होता. पण बुद्धानें ते नियम मान्य केले नाहींत व याला प्रमुखत्वहि प्राप्त झालें नाहीं. त्यामुळें यानें आपला वेगळा संप्रदाय स्थापन केला आणि हा बुद्धापासून वेगळा झाला. यानें राजा अजातशत्रूला आपल्या कब्जांत घेतलें होतें आणि त्याचा पिता बिंबिसार याला त्याच्याकडून तुरुंगांत टाकलें. बिंबिसार हा बुद्धाचा भक्त होता. यानें बुद्धालाहि मारण्याचा प्रयत्न केला होता. हा आपल्या नखांत विष भरून बुद्धाला मारण्याकरितां गेला होता व वाटेंतच श्रावस्तीच्या तलावांत बुडून मेला. पालीग्रंथाप्रमाणें हा बुद्धाकडे क्षमा मागण्यास जात होता. याचे अनुयायी फाहियान याला आढळले होते. ते शाक्यसिंहाखेरीज सर्व बुद्धांना मानीत.

**देवदत्ता**—( महावीर पाहा ).

**देवदास ( दादेगांवकर )**—( स. १६०८-१६४८ सुमार ) एक मराठी कवि. हा दादेगांव मठाचा मूळ संस्थापक. हा चैतन्यशिष्य देवदासाहून भिन्न होय. ' समर्थांची कविता, खंड १ ला ' या ग्रंथाच्या प्रस्ता-वनेंत धुळ्याचे रा. शंकरराव देव यांनीं व्यंकटेशस्तोत्राचा कर्ता देवदास व दादेगांव मठाचा संस्थापक देवदास हे दोघे भिन्न आहेत असें सिद्ध केलें आहे. रा. पांगारकर यांस ज्या पांचशें हिंदुस्थानी कविता मिळाल्या आहेत, त्यांवरून देखील हा चैतन्यशिष्य देवदासाहून निराळा आहे असें सिद्ध झालें आहे.

**२. ( चैतन्यशिष्य )**—( स. १६५८-१६९८ सुमार ) हा रामदास स्वामींचा शिष्य. हा व देवदास दादेगांवकर हे दोघे भिन्न होत. यानें १ ' व्यंक-टेशस्तोत्र ', २ ' संतमालिका ' (स्तोत्र) अथवा ' करुणा-मृत ' ( स्तोत्र ), ३ 'गजेंद्रमोक्ष' इत्यादि काव्यें लिहिलीं. याचें कुलदैवत गिरीचा व्यंकोबा. याचें व्यंकटेशस्तोत्र अत्यंत प्रासादिक असून महाराष्ट्रांत लोकप्रिय आहे. प्रख्यात संतचरित्रकार उद्धवचिद्घन हा याचा समकालीन होता. याचे मुसलमानांसंबंधीं त्वेषाचे उद्गार वाचण्या-सारखे आहेत ( महाराष्ट्रकविचरित्र, भा. १ ला, पृ. २६२-६९ ). याला देवीदासहि म्हणत.

३. एक मराठी कवि. यानें भगवद्गीतेवर सुमारें अडीच हजार ओव्यांची टीका लिहिली आहे. या ग्रंथाची भाषा सुगम व सरळ आहे ( मं. वा. इ. श. १८३७ ल. १६२ ).

**देवनंदी**—( पूज्यपाद पाहा ).

**देवनाथ**—( स. १७५४-१८२१ ) एक मराठी कवि व महासाधु. वऱ्हाडांत शाहणूर नांवाच्या नदीतीरीं सुर्जी अंजनगांवीं स. १७५४ च्या सुमारास यांचा जन्म झाला. हे ऋग्वेदी वसिष्ठ गोत्री ब्राह्मण. यांना व्यंकटराव नांवाचा वडील भाऊ व सुंदरपंत नांवाचा धाकटा भाऊ होता. प्रथम वयांत यांना मल्लविद्येचा नाद असून यांनीं विवाह केला होता किंवा नाहीं याविषयीं मतभेद आहे. हे मारुतीचे उपासक असत. गोविंदनाथ नांवाच्या नाथपंथी सत्पुरुषानें यांना अनुग्रह दिला. हे सहज काव्य निर्माण करीत. हे कीर्तनास उभे राहिले म्हणजे पदें, अभंग, लावण्या जें काय सुचेल तें म्हणत. मुद्दाम कविता रचावयास हे कधींहि बसले नाहींत.

यांची सगळी कविता प्रासंगिक आहे. एकदां म्हटलेली कविता पुनः म्हणण्याचा प्रसंग यांना कधींच आला नाहीं. हे बडोद्यास असतां यांच्या आश्रयास चार ब्राह्मण राहिले. त्यांपैकीं दोघांनीं हे कीर्तन करीत असतां रचलेल्या कविता लिहून ठेवण्याचा प्रघात सुरू केला. त्यामुळें यांची कांहीं कविता उपलब्ध आहे. श्री. सवाई माधवराव पेशव्यांच्या मातोश्री गंगाबाई यांनीं यांचा अनुग्रह घेतला होता. यांनीं हिंदुस्थानांत बराच प्रवास केला होता. कीर्तनकार, वेदांती आणि साक्षात्कारी असा यांनीं लौकिक संपादला होता. शेवटीं यांनीं ग्वाल्हेर येथें कीर्तन करीत असतां मंडपाला आग लागली. तेव्हां निर्भयपणें न गडबडतां कीर्तन पुरें केलें. इतक्यांत एका कुत्सित गृहस्थानें यांना म्हटलें 'नैनं दहति पावकः' तेव्हां यानें त्या गृहस्थाचा हात धरून 'पाहूं या अनुभव' असें म्हटलें. पण ब्राह्मण गयावया करूं लागल्यामुळें त्याला सोडून आपण 'तुज काय म्हणावें आम्ही । दयाळू नाथ जगाचा तूं स्वामी ।' हें पद म्हणून तेथेंच देह ठेवला ( स. १८२१ ).

यांची बहुतेक कविता कटाव व पदें या स्वरूपांत असून यांतील थोडी काव्यसंग्रहांत प्रसिद्ध झाली आहे. बाकीची सुर्जी येथील मठांत आहे. यांची कविता हिंदी व मराठी भाषांत असून अत्यंत रसाळ आहे. श्रावणाख्यान व कृष्णजन्म अशीं दोनच प्रकरणें आहेत. बाकी सर्व पदें व कटाव असें आहे. यांचें 'अमोल काया जाइल वाया' हें पद प्रसिद्ध आहे.

रंगनाथ व गोपाळनाथ या यांच्या दोन शिष्यांची कविता बरीच आहे ( म. क. च. भा. १पा. ४०९-४३९ ).

**देवनाथ ठक्कर**— ( स. १५६२ ) जयदेवानें गंगेशाच्या तत्त्वचिंतामणीवर लिहिलेल्या आलोकांतील उणेपणा भरून काढण्यासाठीं यानें 'तत्त्वचिंतामण्यालोकपरिशिष्ट' या नांवाचा ग्रंथ लिहिला ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ४६०–४६१ ).

**देवपाल**—( स. ८२५–५० सुमार ) बंगाल्यांतील पालांपैकीं धर्मपालाचा पुतण्या. हा त्यानंतर गादीवर आला ( म. यु. भा. २, २३२ ).

हा पाल घराण्यांतील तिसरा राजा. हा सर्व पाल राजांत अतिशय बलिष्ठ होता. याचा सेनापति लवसेन यानें आसाम व कलिंग यांवर स्वारी करून ते देश जिंकले. हा बुद्धधर्माचा उपासक होता. यानें ४८ वर्षें राज्य केलें ( J. A. S. B. Vol. I. XIII Part I, 1894 p. 41; Schiefer's Taranath p. 208–14 ). याचसुमारास जेजाकभुक्तीचा राजा यशोवर्मा चंदेल्ल यानें याचें मांडलिकत्व झुगारून दिलें. यानें ओरिसा जिंकला.

लोकेश्वरशतकाचा लेखक वज्रदत्त हा याचा आश्रित होता. आणि तारानाथाच्या मतें पंचक्रमतंत्राच्या तिसऱ्या भागाचा लेखक शाक्यमित्र हा याचा समकालीन होता ( विंटरनिट्झ–हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर, भा. २ ).

याचा प्रधान धर्मपाणि. याच्या वेळीं वीरदेव नांवाच्या बौद्धभिक्षूनें एक इंद्रशिला पर्वतावर व दुसरें वज्रासन पर्वतावर अशीं मोठीं मंदिरें बांधलीं. यानें स. ८९० पर्यंत म्हणजे सुमारें ४० वर्षें राज्य केलें ( मुंगेरचा ताम्रपट ).

**देवपाल परमार**—( स. १२१८-४३ सुमार ) माळव्याच्या परमारांपैकीं अर्जुनवर्म्याला पुत्र नव्हता म्हणून धाकट्या घराण्यांतील महाकुमार हरिश्चंद्रवर्म्याचा दुसरा पुत्र देवपाल हा माळव्याचा राजा झाला. यानें साहसमल्ल अशी पदवी धारण केली. याच्या वेळचे तीन शिलालेख आणि एक दानपत्र मिळालें आहे. याचा पहिला शिलालेख वि. सं. १२७५ होशंगाबाद जिल्ह्यांत हरसोडा गांवीं मिळाला आहे (इंडि. अँटि. २०. ३११). ग्वाल्हेर राज्यांतील उदयपुर येथें दोन मिळाले आहेत. ते अनुक्रमें वि. सं. १२८६ व १२८९ मधील आहेत ( इंडि. अँटि. २०. ८३ ). याचें एक दानपत्र मांधाता येथें मिळालें आहे तें वि. सं. १२९८ भाद्रपद शुद्ध १५ चें आहे ( एपि. इंडि. ९. १०८–१३ ). याच्या वेळीं वि. सं. १२८८–८९ मध्यें दिल्लीचा सुलतान शम्सुद्दीन अल्तमश यानें माळव्यावर स्वारी करून वर्षभर लढाई केली व ग्वाल्हेर येथें जय मिळवला, भेलसा व उज्जयनी घेतली व उज्जयनीचें मंदिर फोडलें. पण माळवा सुलतानाच्या ताब्यांत आला नाहीं. लूट करून सुलतान गेल्यावर माळव्याचा राजा देवपालच राहिला ( ब्रिग्ज, फिरिश्ता, पृ. १२०–२३ ). याच्या वेळीं वि. सं. १२८५ मध्यें नलकच्छपुर, धारपासून वीस मैलांवर असणारा नालकच्छगांव येथें 'जिनयज्ञकल्प' ग्रंथ, तसेंच वि. सं. १२९२ मध्यें 'त्रिषष्टिस्मृति' ग्रंथ यांची रचना केली व वि. सं. १३०० मध्यें सटीक धर्मामृतशास्त्र या ग्रंथाची रचना केली. तेव्हां धारचा राजा हा नसून जयतुगिदेव होता असें त्या ग्रंथाच्या शेवटच्या प्रशस्तींत म्हटलें आहे ( श्लोक २८-३१ ). यावरून वि.सं. १२९८–१३०० पर्यंत याचा मृत्यु झालेला दिसतो. याला जयतुगिदेव व जयवर्मा असे दोन पुत्र होते ते क्रमानें राजे झाले ( रा. इ. ).

**देवपाल प्रतिहार**— ( स. ९४८ ) कनोजच्या रघुवंशी प्रतिहारांपैकीं महीपालाचा पुत्र. याच्या वेळचा

म्हणजे वि. सं. १००५ (स. ९४८) चा एक शिलालेख मिळाला आहे. त्यांत यास परमभट्टारक, महाराजाधिराज व परमेश्वर असें म्हटलें आहे. याला क्षितिपालदेवाचा उत्तराधिकारी म्हटलें आहे. जर हा महीपालदेवाचा पुत्र असेल तर हा लहान असतां याचा चुलता विनायकपालानें राज्य लाटलें तें महेंद्रपालानंतर यास मिळालें.

**देवप्रभसूरि**—हा १२०० च्या सुमारास यानें 'पांडवचरित्र' नांवाचा ग्रंथ लिहिला. यांत संपूर्ण महाभारताची गोष्ट थोडक्यांत आणली आहे व कांहीं बदल केला आहे. त्यांत जैन अरिष्टनेमीची गोष्टहि घातली आहे (विंटरनिट्झ).

**देवबोध**—यानें महाभारताच्या काश्मीरी प्रतीवर टीका केली.

**देवभद्र**—(स. ११५० चा सुमार) हा जैन तर्कज्ञ हेमचंद्रसूरि व श्रीचंद्रसूरि या दोघांचा शिष्य होता. यानें 'न्यायावताराच्या' वृत्तीवर 'न्यायावतरटिप्पण' नांवाची टीका लिहिली आहे. याच्या या टीकाग्रंथांत 'विंध्यवासिन्' धर्मकीर्ति, धर्मोत्तर, ज्ञानश्रीमित्र, इत्यादिकांचे उतारे आले आहेत (हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. २११).

**देवभूति शुंग**—शुंग घराण्यांतील शेवटचा राजा. हा अतिशय कमकुवत असल्यामुळें याचा वसुदेव कण्व नांवाच्या ब्राह्मण प्रधानानें वध करून शुंग घराण्याची समाप्ति केली.

**देवरनाथ नींगरू**—हा मचयसाहिनीचा पुत्र. यानें ओरिसाच्या गणपती राजापासून काकतीय वंशाचा बचाव केला. स. १३१४ मध्यें गणपतीनें वारंगळाला मोठ्या सैन्यासह वेढा दिला तेव्हां यानें त्याचा योग्य रीतीनें बचाव केला (एन्शन्ट डेक्कन, भा. १, पा. ३०३).

**देवराज**—रघुवंशी प्रतिहारांपैकीं नागभटाच्या बहिणीचा दुसरा मुलगा व ककुस्थाचा धाकटा भाऊ. हा परम वैष्णव होता. याच्या राणी भूमिकादेवीपासून वत्सराजाचा जन्म झाला.

२. बुंदी संस्थानचा राजा. याचें मूळ राज्य नाडोल येथें होतें. पण स. १३४२ च्या सुमारास यानें बुंदी शहर घेतलें. तेव्हांपासून याचा वंश तेथें राज्य करीत आहे.

**देवराय संगम**—(स. १४०६-१४२२) हा विजयनगरच्या दुसऱ्या हरिहर संगमाचा मुलगा व त्याच घराण्यांतील दुसऱ्या बुक्करायाचा भाऊ. याला एकंदर चार भाऊ होते. हा आपला भाऊ दुसऱ्या बुक्करायाच्या मागाहून विजयनगरच्या गादीवर आला. याला 'हेमाम्बिका' आणि 'मल्लयव्वी' अशा दोन बायका होत्या.

यानें एकदां शेतकऱ्याच्या रूपवती मुलीच्या प्राप्तीसाठीं सुलतानाशीं लढाई केली, असें फेरिस्तानें वर्णन केलें आहे. वरील लढाईंत यास हार खावी लागून मोठा अपमानास्पद तह करणें भाग पडलें. तहाप्रमाणें राजानें आपली मुलगी सुलतानास दिली असें फेरिस्ता म्हणतो. याच्यानंतर याचा मुलगा वीरविजय हा विजयनगरचे गादीवर आला.

२. (स. १४२२-४६) हा विजयनगरच्या वीरविजय संगमाचा पुत्र. याला सिद्धला व पोन्नला अशा दोन बायका होत्या.

याच्या कारकीर्दीत फार लढाया झाल्या. हा गादीवर आल्यावर फीरुझ बाहमनीबरोबर स. १४१९ मध्यें युद्ध सुरू झालें. सुलतानानें पानगळ किल्ल्यावर हल्ला करून लढाईस सुरुवात केली. शेवटीं हिंदु-मुसलमानांची लढाई होऊन तींत मुसलमानांचा पूर्ण पराभव झाला. पण यापुढील मुसलमानांच्या लढाईंत याला हार खावी लागून याला दिल्लीच्या सुलतानास मोठा नजराणा पाठवावा लागला.

नंतर यानें एक विद्वान् लोकांची सभा बोलावून त्या (सभेंत) 'आपणास वेळोवेळीं मुसलमानांचें थोडें सैन्य असतांहि हार खावी लागते.' हा विषय चर्चेकरितां घेतला. तेव्हां सर्व लोकांचें मत असें पडलें कीं, मुसलमानांचे घोडे मजबूत व बळकट असतात आणि त्यांच्या सैन्यांत तिरंदाज लोक आहेत, व त्याच्या उलट आपली परिस्थिति आहे. हें मत ऐकल्यावर यानें आपल्या सैन्यांत मुसलमान तिरंदाज घेण्याचा हुकूम फर्माविला व आपल्या सैन्यास तिरंदाजीचें शिक्षण देण्याचे प्रयत्न सुरू केले. याची सबंध कारकीर्द मुसलमानांशीं लढण्यांत गेली.

हा अल्पवयींच गादीवर बसला. याला महाराजाधिराज राजपरमेश्वर अशीं पूर्ण सम्राट्पदद्योतक बिरुदें लाविलेलीं कांहीं शिलालेखांत सांपडतात. याचा नागण्णा नांवाचा महाअमात्यांपैकीं एक अमात्य होता.

**देवराव महादेव हिंगणे**—(मृत्यु स. १८०७ जून) महादेवभट हिंगण्याचा स. १७४४ त खून झाल्यावर त्याचे चार मुलगे, दामोदर, बापूजी, पुरुषोत्तम व देवराव दिल्ली व इतर ठिकाणीं वकिलातीच्या कामावर होते. रघुनाथरावच्या दिल्लीवरील स्वारींत त्याचा हिंगण्यांशीं वेबनाव झाला, त्याचें कारण समजत नाहीं. हिंगण्यांनीं रघुनाथरावास मेजवानी दिली, त्या वेळीं "दादासाहेब कोणते?" असें विचारीत ते पंक्तींतून फिरले, म्हणजे त्यांच्या डोळ्यावर द्रव्याचा धूर आला

होता, अशी आख्यायिका आहे. यावरून यांच्या द्रव्यावर रघुनाथरावचा डोळा असावा असें अनुमान होतें. तीस वर्षांच्या पिढीजाद अनुभवानें हिंगण्यांची इभ्रत व ऐपत दिल्लींत फार मोठी असून, शत्रुमित्रावर छाप बसवून मराठशाहीचा पुरस्कार करण्यांत ते फार दक्ष होते. राजधानींतील पक्ष, घडामोडी, निरनिराळ्या व्यक्तींचे स्वभावविशेष व कावे इत्यादिकांचा योग्य विचार करून चौकसपणानें ते आपला मार्ग ठरवीत असत. फौजेच्या खर्चास अंताजीपंत पैसा मागूं लागला, तो हिंगण्यांनीं दिला नाहीं. तेव्हां अंताजीनें रघुनाथरावाचें मन बिघडविलें असावें. हिंगण्यांचीं कित्येक पत्रें मोठीं त्वेषाचीं आहेत ( रा. खं. ६.५४५ ). होळकर—हिंगण्यांच्या हिशेबाचे कागद स.१७५२ ऑक्टोबरचे आहेत (रा. खं. ६.२५८, २६९ व २७३ ). हिंगण्यांचे सवालजबाब एकत्र पाहावयास मिळत नाहींत. परंतु लेखांक ४९९ आर्जवाचाच असून त्यांत हिंगण्यांची मागणी दाखल आहे. ले. ३८३ चें पत्र जरी स. १७५८ सालचें आहे, तरी त्यावरून रघुनाथरावचा हिंगण्यावरील राग चांगला व्यक्त होतो. हिंगण्याबरोबरील तंट्यास मूळ कारण अंताजी माणकेश्वर असून, पैशावरून अंताजीशीं हिंगण्याचा तंटा स.१७५० पासूनच वाढत गेला.

महादेवभटाचे चारहि मुलगे मोठे पराक्रमी निघाले. रघुनाथरावाशीं त्यांचें वांकडें आल्यामुळें त्यांची बरीच वाताहत झाली ( रा. खं. १.१; ३.२३३; ६.१९८; ४९७, ४९९ ). तथापि हिंगण्यांशिवाय पेशव्यांचें चालणारें नव्हतें आणि माधवरावानें पुरुषोत्तम व देवराव यांस पुनः स. १७६९ त दिल्लीच्या वकिलातीवर स्थापिलें. पुरुषोत्तम महादेवानें हें काम चांगलें करून नाना फडणिसाची मर्जी संपादिली. तो स. १७८२ त दिल्ली येथें मृत्यु पावला (का. सं. प. या.२९३ जु. प्र.). यानंतर महादजी शिंद्यानें स्वतः दिल्लीचा कारभार हातीं घेतल्यावर हिंगण्यांचे वकिलीची जरूर राहिली नाहीं, आणि त्यांचे घराण्यास उतरती कळा लागली. तींतून ते सावरले नाहींत. पुरुषोत्तम मध्यंतरीं दादास सामील झाल्यामुळें माधवरावाचे रोषास पात्र झाला.

उत्तरकालीन दिल्लीच्या कारभाराचीं म्हणजे स. १७८० –९५ पर्यंतचीं हिंगण्यांनीं नाना फडणिसास लिहिलेलीं पत्रें इ. सं. त छापिलीं आहेत तीं वाचण्यालायक आहेत. इंग्रजांच्या हालचालीचा व दिल्लींतील बादशाहीच्या स्थितीचा त्यांवरून चांगला बोध होतो.

कनिष्ठ बंधु देवराव महादेव, अहिल्याबाई व तुकोजी होळकर यांचा तंटा मिटविण्याकरितां नानांचे सांगण्यावरून महेश्वरास गेला होता. त्या वेळीं यानें केलेल्या कामाचीं पत्रें ‘ होळकर दरबारांतील हिंगण्याची वकिली ’ या नांवानें इ. सं. त प्रसिद्ध झालीं आहेत. मराठ्यांचा वकील या नात्यानें देवराव स. १७६९ च्या सप्टेंबरांत बादशहासंबंधीं बोलणें करण्याकरितां सुजाउद्दौल्याकडे गेला होता.

पेशवे व हा यांत विरोध आल्यानें हा चंद्रचूडाकडे निंबगांवीं येऊन राहिला; व तेथेंच समाधिस्थ झाला. तेथें याची समाधि आहे. समाधीचा दिवस स. १८०७ जून २७ ( श. १७२९ ज्येष्ठ व. ७ शनवार ) असा एका विश्वसनीय टांचणावरून ठरतो.

याचे वंशज नाशिक जिल्ह्यांत चांदोरी येथें आहेत. पेशवाईंतील साडेतीन शहाण्यांत नागपूरकर देवाजीपंत चोरघोडे याची गणना नसून तो हा देवराव हिंगणेच होय, असें कांहीं संशोधकांचें म्हणणें आहे ( मं. इ. वृ. १८३५ ले. ४४ ).

**देवराव मेघश्याम लपाटे**—हा राजज्ञाचा मुतालीक होता. हा दे. ऋ. ब्रा. होता. शाहूच्या अखेरीस हा राज्यकारभारांत होता. हा आनंदराव सुमंताचा व्याही होता. हा पेशव्यांचा विरोधी असून शाहूच्या अंतरंगांतला मुख्य इसम होता.

**देवर्धि ( क्षमाश्रमण ) गणि**—( सनाचें पांचवें शतक सुमार ) एक मोठा जैनधर्मोपदेशक. हा वलभीच्या पहिल्या ध्रुवसेन मैत्रकाचा समकालीन होता. नंदीसूत्र, अनुयोगद्वारसूत्र यांसारख्या सिद्धान्तग्रंथांचा याला कर्ता म्हणण्यापेक्षां संग्राहक म्हणणें जास्त योग्य होईल ( जैनिझम इन् नॉर्थ इंडिया ). पांचव्या किंवा सहाव्या शतकांत वलभी येथें भरलेल्या जैनपरिषदेचा हा अध्यक्ष होता. त्या वेळीं नष्ट होऊं पाहणाऱ्या जैन-आगमांच्या पुनरुज्जीवनार्थ यानें फार श्रम केले. तेथें यानें लोकांच्या तोंडीं होते ते ग्रंथ ‘ एकादशांग ’ या नांवानें लिहून काढले. याच्या नंदीसूत्रांत चोवीस तीर्थंकर व अकरा गणधर यांची व एका थेरावलीची माहिती आहे. त्यांत दूसगणि हा याचा गुरु होता असें सांगितलें आहे.

**देवलदेवी**—( स. १३१८–२२ ) खिजरखानाची पत्नी असतां हिला राजपत्नीत्वाचा मान मिळाला नाहीं. पण त्यानंतर गादीवर आलेल्या मुबारिक खुस्रवानें गादीवर येतांच हिच्याशीं निका लाविला. पण घियासुद्दीन तुघ्लकनें मात्र हिला हालांतून सोडवून खुस्रवला निका लावण्याच्या कामीं मदत करणारास शिक्षा केल्या ( कर्ण बघेल, खिजरखान खल्जी व अलफखान पाहा ).

२. गुजराथच्या सोळंकीपैकीं त्रिभुवनपालाची मुलगी; व कुमारपालाची बहीण. हिला अजमीरच्या अर्णवराज चौहानाला दिली होती.

**देववर्मा कदंब**—याचें व याच्या पित्याचें नांव देवगिरीच्या शिलालेखांत आढळतें. हा मानवगोत्री व जैनधर्मी होता.

**देववर्मा चंदेल्ल**—हा विजयपालाचा पुत्र; त्याच्या मागून गादीवर आला.

**देववर्मा मौर्य**—( ख्रि. पू. २०६-१९९ ) मौर्यवंशांतील शालिशूकानंतर हा मगधदेशाच्या गादीवर आला. भागवत व विष्णु या पुराणांत याचें नांव सोमशर्मा असें दिलें असून याला शालिशूकाचा पुत्र म्हटलें आहे. पण वायु व ब्रह्माण्डपुराणांत यास इंद्रपालिताचा पुत्र म्हटलें आहे.

याच्या वेळीं ग्रीकांच्या स्वाऱ्या हिंदुस्थानावर चालू होत्या. ख्रि. पू. २०० मध्यें बॅक्ट्रियाचा राजा डेमेट्रियस ( यूथिमासचा पुत्र ) यानें हिंदुस्थानावर स्वारी केली होती व त्यानें हिंदुस्थानच्या पश्चिमोत्तर भागावर सत्ता स्थापन केली.

**देवशर्मा**—हा अवंती नगरच्या सुमंत ब्राह्मणाचा पिता. यानें छत्तीस वर्षेंपर्यंत देवीचें आराधन केलें असतांहि ती प्रसन्न झाली नाहीं. मग तिची प्रसन्नता विक्रमादित्यानें करून दिली ( नाथलीला ).

**देवसूरि**—(स.१०८६-११६९) हा देवसूरि जैनधर्मी श्वेतांबरपंथी असून मुनिचंद्रसूरीचा शिष्य होता. यानें तर्कज्ञानावर ‘ प्रमाणनयतत्त्वालोकालंकार ’ नांवाचा ग्रंथ लिहून त्यावर स्वतःच ‘ स्याद्वाद-रत्नाकर ’ नांवाची टीका लिहिली. गुजराथेंत अनहिलपुरपट्टण येथें जयसिंहदेवाच्या दरबारीं याचा व दिगंबरपंथी कुमुदाचार्य यांचा बायकांना निर्वाणपद मिळवितां येतें कीं नाहीं यावर वादविवाद होऊन त्यांत ह्यानें कुमुदाचार्याचा पराभव केला; व स्त्रियांनाहि निर्वाण मिळवितां येतें असें सिद्ध केलें ( उपदेशमालाटीका ). स. ११४७ मध्यें यानें एक मंदिर ( चैत्य ) बांधून ( फलवर्धिग्राम ) तेथें मूर्ति स्थापन केली व अरसाणा येथें नेमिनाथाची मूर्ति बसविली. ह्याच्या ग्रंथाची मांडणी माणिक्यनंदीच्या ‘परीक्षामुखसूत्र’ व ‘प्रमेयकमल मार्तंडा ’ या ग्रंथांप्रमाणें आहे ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक बॉल ).

**देवसेन भट्टारक**—( स. ८९४-९५० ) हा जैन तर्कज्ञ रामसेनाचा शिष्य असून यानें ‘न्यायचक्र’, ‘ दर्शनसार ’ इ. ग्रंथ लिहिले..

**देवसेन वाकाटक**—( स. ४८५-९० ) हा वाकाटकांपैकीं नरेंद्रसेनाचा पुत्र.

**देवस्वामि**—( स. १०००-१०५० सुमार ) गार्ग्यनारायणाच्या टीकेचा उतारा हेमाद्रीनें घेतला आहे. या गार्ग्यनारायणानें देवस्वामिन्‌च्या भाष्याचें अनुकरण केलें आहे.

यानें आश्वलायन श्रौतसूत्रावर भाष्य लिहिलें. भट्टोजीच्या चतुर्विंशतिमत यावरील टीकेंत याच्या मताचा उल्लेख केलेला आहे. स्मृतिचंद्रिकेमध्यें व्यवहार आणि अशौच यांविषयींचे याचे उतारे घेतलेले आहेत. याच्या मताप्रमाणें कुमारी मुलगी मेल्यास तिचें दहा दिवस सुतक पाळावें लागत असे. श्राद्धावरील याचीं मतें स्मृतिचंद्रिकेमध्यें आलेलीं आहेत.

यानें पूर्वमीमांसेच्या १२ अध्यायांवर थोडक्यांत टीका केलेली आहे. आणि संकर्शकाण्ड यामधील चार अध्यायांवर थोडक्यांत भाष्य लिहिलें आहे.

**देवानंद**—( स. १८४७ सुमार ) काठेवाडांतील मुळी गांवचा गुजराथी कवि शिक्षा वगैरे ग्रंथाचा कर्ता.

**देवानांप्रियतिष्य**—हा सिंहलद्वीपचा राजा. हा प्रथम वैदिक होता. नंतर बौद्ध झाला. हा स. पूर्वी ३०७ वर्षें होता. याच्याच वेळीं महेंद्र व संघमित्रा हीं सिलोनमध्यें बौद्धधर्माचा प्रसार करण्यास गेलीं. दीपवंश व महावंश या दोन महाकाव्यांत या प्रसंगाचें वर्णन व सिलोनच्या राजांचा इतिहास दिला आहे ( विंटरनिट्झ ).

**देवीदास**—यानें राजनीति ग्रंथ संस्कृतांत लिहिला. हा काश्मीरी होता.

२. गुजराथी कवि. हा सोजंत्रा गांवीं राहत असे. यानें गोकुळ, मथुरा-वृंदावन इत्यादि ठिकाणची कृष्णलीला गुजराथींत वर्णिली आहे ( काव्यदो. ).

३. ( देवदास पाहा ).

**देहनागादेवी**-रघुवंशी प्रतिहारांपैकीं भोजाची माता.

**देवेंद्रगणि**—स. अकराव्या शतकांतील एक जैन टीकाकार. महाभारताचें जैन रूपांतर; उत्तराध्ययनावरील टीका ( स. १०७३ ) व भववैराग्यशतक हे याचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत ( विंटरनिट्झ ).

**देवेन्द्रबोधि**—( स. ६५० सुमार ) यानें ‘ वार्तिकपंजिका ’ नांवाची धर्मकीर्तीला अनुसरून टीका लिहिली ( धर्मकीर्ति पाहा ).

**दोखंधिपा**—यालाच द्विखंडि असें म्हणतात. हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं पंचविसावा सिद्ध होय. जात ब्राह्मण

असून मणिधर ( बघेलखंडांतील मैहरा ) येथील राहणारा होय. हा सरहपा याच्या तिसऱ्या पिढींतील होय. यानें चतुरक्षरोपदेश ( तं. ४२।१७ ) व महायानावतार ( तं. ४८।६० ) हे दोन ग्रंथ लिहिले.

**दोड्डकृष्णराज ओडियार**--( स. १७१४-३१ ) म्हैसूर संस्थानांतील कंठीरवराजाचा हा पुत्र होय.

**दोड्ड संकण्ण**—( स. १५६० सुमार ) हा केलडीचा सदाशिव नायकाचा मुलगा. याला चिक्कसंकण्ण या नांवाचा एक भाऊ होता. पण तो सावत्र असावा.

सदाशिव नायकाचा भाऊ जो भद्रप्पा नायक त्याच्यानंतर हा इक्केरीच्या गादीवर आला. याची कारकीर्द फार लहान आहे. याला, एका जंगम पुरोहितास मारल्याच्या आरोपावरून विजयनगरच्या रामरायानें पदच्युत केलें. त्यानंतर हा तीर्थयात्रा करण्यास गेला.

**दोरब्बे आरसी**—ही पिरीयचत्तरसाची पत्नी, व जोगरसाची आई. ही कलाभिज्ञ होती ( एन्शन्ट डेक्कन ).

**दोवागर**—( १ इब्राहीम आदिलशाह पाहा ).

**दोस्तअली**—( स. १७३२ त नवाब पद ) हा सादतखानाचा पुतण्या व कर्नाटकाचा नवाब होय. स. १७४० मध्यें मराठ्यांनीं कर्नाटकवर स्वारी करून दामुलचेरी घाटाजवळ याचा पराभव करून यास ठार मारिलें. यास सफदरअली नांवाचा एक मुलगा होता. याची मुलगी चंदासाहेबास दिली होती.

**दोस्त मुहम्मदखान**—(मृत्यु स. १७४० चा सुमार) हा तिऱ्हा अफगाण मुसलमान असून भोपाळ संस्थानचा संस्थापक होय. हा प्रथम औरंगजेबाचा नोकर होता, परंतु पुढें यास माळव्याची सुभेदारी व भैरसिया आणि नाशिराबाद येथील सरंजामी मिळाली. याच्या मागून याच्या मुहंमद नांवाच्या अज्ञान औरस पुत्रास पदच्युत करून याच्या यार-मुहंमद नांवाच्या दासीपुत्रानें गादी बळकाविली.

**२.** ( स. १८०७-२१ ) पेंढाऱ्यांचा नायक.

**दौलतखान**—( २ खवासखान पाहा ).

**२.** ( इब्राहीम लोदी पाहा ).

**दौलतखान लोदी**—( स. १४१३-१४ ) दिल्लीचा बादशाहा.

**दौलत बाबुराव**—हा सखाराम हरीचा पुतण्या. राघोबादादाचा हा एक हस्तक असून नारो शंकरानें फत्तेसिंगाचे मदतीस गुजराथेंत फौज पाठविली, तिला दादाच्या तर्फेनें यानें अडथळा केला ( का. सं. प. या. ले. ५२ ).

**दौलतराव शिंदे**—( स. १७८०-१८२७ ) हा तुकोजीचा नातू व आनंदरावाचा मुलगा. महादजी शिंदे मेल्यावर याचें दत्तविधान करून पेशव्यांनीं यास शिंद्याचे गादीवर बसविलें ( स. १७९४ ). याचा मुख्य कारभारी जिउबादादा बक्षी व तो मेल्यावर बाळोबा पागनीस. यानें दुसऱ्या बाजीरावाला गादीवर बसविण्याविषयीं त्याच्याशीं करार केला होता व त्याबद्दल सव्वा कोट रुपये घेण्याचें ठरलें होतें. पुढें हा पुण्यास आल्यावर यानें बाजीरावाचे सांगण्यावरून नानास कैद केलें ( स. १७९७ ). पुढें ठरलेली रकम बाजीरावाकडून यास न मिळाल्यामुळें यानें पुण्यांतील लोकांचा अनन्वित छळ केला; व पैसे वसूल केले. याचें व बायांचें म्हणजे महादजी शिंद्यांच्या बायकांचें न पटल्यामुळें याचें त्यांच्याशीं युद्ध झालें व तींत याचा पराभव झाला, व शेवटीं यानें तह केला. याचें व यशवंतराव होळकराचें वितुष्ट होतें. तेव्हां याची व यशवंतरावाची नर्मदा नदीजवळ लढाई होऊन, तींत याचा पराभव झाला ( स. १८०१ ). लॉर्ड वेलस्लीनें याच्याशीं तैनाती फौजेची पद्धत स्वीकारण्याबद्दल पुष्कळ वाटाघाटी केल्या, पण शेवटीं स. १८०३ मध्यें लढाई होऊन अहमदनगर येथें याचा पराभव झाला. पुढें याचा इंग्रजांशीं तैनाती फौजेचा तह होऊन त्यांच्या सर्व अटी यानें नाखुषीनें कबूल केल्या. पुढें यानें यशवंतराव होळकराची भरतपुरास जाऊन गांठ घेतली व समेट घडवून आणिला.

स. १८१४ मध्यें यानें व यशवंतराव होळकरानें मिळून भोपाळवर चाल केली; पण इंग्रजांचा विरोध होऊन यांचा पराभव झाला.

यानें व परशुरामभाऊंनीं मिळून निजामवर चौथाईच्या वसुलीकरितां स्वारी केली, व त्यांत यास पेशव्याकडून पाऊण कोट रुपये मिळाले. यास बायजाबाई नांवाची बायको होती. ती फार सुंदर होती. यास नाच, गाणें, वाघाची शिकार व कुस्त्या वगैरे गोष्टींचा फार नाद असे. यास पतंग उडविण्याचाहि फार नाद असे.

एकंदरींत हा शूर व प्रबळ असून देखील याच्या गैरवर्तनानें याच्या शूरपणाचा व सैन्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. अठराव्या शतकाचे अखेरीस मराठेशाहीचें राज्य एकदम कोसळलें, त्यास दुसरीं कांहींहि कारणें असलीं तरी पेशवा बाजीराव व फौजबंद दौलतराव शिंदे या दोन उल्लू व्यक्तींचा सहा वर्षांतील बेबंदशाही कारभार हाच मुख्यतः कारण होय.

**दौलतशाह**—(स.१६३१सुमार )वऱ्हाडाच्या इमादशाही घराण्यांतील दर्या इमादशाहाची ही मुलगी. अहमदनगरच्या पहिल्या हुसेन निजामशाहाला ही दिली होती.

**द्यानतराव**—( स. १६२४-५७ ) हा मुहम्मद व दुसरा अली आदिलशाहाच्या वेळीं मुख्य प्रधान होता. हा अत्यंत थोर मुत्सद्दी. हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण असून कऱ्हाडच्या देशपांड्यांचा पूर्वज होय.

**द्रोणसिंह मैत्रक**—( स.५२६ पूर्वी ) हा वल्लभीच्या मैत्रकवंशांतील भट्टार्काचा मुलगा. हा आपल्या भावानंतर गादीवर बसला. याला महाराज व चक्रवर्तीनें सिंहासनाधिष्ठित केलेला अशीं विशेषणें लावलीं आहेत.

**द्रोहार्जुन चालुक्य**—( भीम चालुक्य पाहा ).

**द्विजदेव ( मानसिंहमहाराज )**—एक हिंदी कवि. हे अयोध्येचे महाराज असून उत्तम कविताकार होते. यांनीं केलेलें ऋतूंचें वर्णन फारच बहारीचें आहे.

**द्विवेद गंग**--बृहदारण्यकाच्या माध्यंदिनप्रतीवर यानें 'मुख्यार्थप्रकाशिका' नांवाची टीका लिहिली आहे. वेबरनें आपल्या शतपथब्राह्मणाच्या शेवटीं तें संक्षेपानें छापलें आहे.

---

# ध

**धडफळे घराणें**—पद्मो विश्वनाथ-कृष्णाजी-बाबाजी-( बापूजी ) रंगो ( यानें पिंपळे गुरव येथील वतन व पाटीलकी संपादन केली. हा स. १६२९ मध्यें पुण्याचा ठाणेदार होता ) -कृष्ण-( यांना पुत्र दोन ). ( १ ) राघो, ( २ ) नारो. ( १ ) राघोकृष्ण-गोविंद-मल्हार-राघो-मुद्गल ऊर्फ दादोपंत-त्रिंबक-( यांना पुत्र दोन ) (१) भैरव,(२) गोविंद. (१) भैरव-रामचंद्र-याचे पुत्र चार. त्रिंबक, दत्तात्रय, रघुनाथ व महादेव हे हयात आहेत. (२) गोविंद त्रिंबकचे वामन-याचे तीन पुत्र बाळासाहेब, भालचंद्र ( बी. ई. ) व जगन्नाथ हयात आहेत.

( २ ) नारो कृष्ण-( यांना पुत्र दोन )-( १ ) विनायक नारायण, ( २ ) गणेश नारायण.

( १ ) विनायक नारायण ( मृत्यु शके १६४८ ज्येष्ठ शु. ३ पराभवसं. )-राघो-बहिरो-बाजीराव-( यांना पुत्र तीनः )-(१) बाळकृष्ण,(२) माधव,(३) केशव.(१) बाळकृष्ण-गणेश-बाळकृष्ण (काशीस), (२) माधव-बळवंत-कृष्णराव हयात आहेत. (३) केशव-कोंडो-( यांना पुत्र दोन ) १ बाजीराव, २ गणपति हयात आहेत.

( २ ) गणेश नारायण ( मृत्यु शके १६४८ आश्विन शु. २ पराभवसं. ). ( यांना पुत्र तीन )-( १ ) अंताजी ( मृत्यु शके १६५२ श्रावण ब ९ रविवार ), ( २ ) नीळो ( मृत्यु शके १६४३ भाद्र. व. ४ प्लव. ), ( ३ ) चिंतो ( मृत्यु शके १६५० आश्विन शु. २ कीलक. सोमवार ).

( १ ) अंताजी-जगन्नाथ-(यांना पुत्र तीन)-१ नरसिंग, २ विठ्ठल, ३ अमृत.

१ नरसिंग— ०

२ विठ्ठल-नारो-( यांना पुत्र तीन )-१ माधव, विठ्ठल, ३ सखाराम ( इंदुरास गेला ).

३ अमृत-गणेश-( यांना पुत्र दोन )-१ सखाराम, २ बाळाजी (मृत्यु स.१९०८)-गणेश ( नथोबा ) हयात आहे.

( २ ) निळो गणेश-कल्याण-( यांना पुत्र दोन )-१ रामचंद्र ( नाशिक ). २ काशिनाथ-मोरो-( यांना पुत्र दोन )-१ काशिनाथ, २ गंगाधर ( मृत्यु स. १९०९ )-( यांना पुत्र तीन )-१ गणेश ( मृत्यु स. १९०६ सुमार ). २ नरहरि ( हयात ), ३ रामचंद्र ( मृत्यु स.१९१४सुमार ).

( ३ ) चिंतो गणेश-( मृत्यु शके १६५० आश्विन शु. २ कीलक सोमवार )-लक्ष्मण-( यांना पुत्र दोन )-१ सखाराम, २ बाबाजी.

१ सखाराम-( यांना पुत्र चार )-१ अमृत, २ निळो, ३ रंगो, ४ सदाशिव.-निळो-(मृत्यु स. १८६१ सुमार)-( यांना पुत्र दोन )-१ रामचंद्र, २ नारायण ( नारायण रघुनाथ चित्राव (अमृतेश्वर) यांना दत्तक. दत्तक घरचें नांव विष्णु नारायण चित्राव. मृत्यु स. १९०४ डिसें. ४ ).

१ रामचंद्र-वामन—( मृत्यु स. १८७८ )-रंगो-( मृत्यु स. १९१८ ऋषिपंचमी. यांचे दोन बंधु-लक्ष्मणराव व सखारामपंत हयात आहेत. )-१ दत्तात्रेय ( विष्णु नारायण चित्राव (अमृतेश्वर) यांना दत्तक. दत्तकविधानानंतरचें नांव सिद्धेश्वर विष्णु चित्राव ) २ गणेश ( हयात ), ३ रामचंद्र ( हयात ).

यांचा मूळ पुरुष औरंगाबादेकडून प्रथम पुण्यास आला. कांहींच्या मतें तो पिंपळे गुरव येथें आला असें आहे. यांच्या घराण्यांत रंगो बाबाजी हा एक प्रमुख असून मलिकंबराच्या वेळीं पुण्याचा ठाणेदार होता. स.१६२९च्या

मोठ्या दुष्काळानंतर पुण्याची वस्ती वाढवून व पेठा स्थापून जमाबंदी वगैरे काम यानेंच केलें ( धडफळे यादी मं.वा.इ. १८३५, पृ. ३७५ ). याच घराण्यांतील नारो कृष्ण हा शितोळ्याकडून कांहीं पैशासंबंधीं महत्त्वाच्या कामाकरितां शिवाजीमहाराजांकडे गेला असल्यासंबंधींचें पत्र प्रसिद्ध असून त्यावरून शिवाजीच्या हस्ताक्षराचा शोध लागला आहे ( लेखनालंकार ). पुढें पेशव्यांच्या वेळीं पुणें शहरची पुनर्रचना करण्यांत रंगोपंताच्या वंशजाचें प्रमुख अंग होतें. थोरल्या बाजीरावाच्या वेळीं विनायक नारायण व गणेश नारायण व मल्हार गोविंद धडफळे प्रमुख होते ( रा. खं. ३ ले. १६६ ). बाळाजी विश्वनाथ पेशवे यांस थोरातानें हिंगणगांवच्या गढींत कैदेंत ठेविलें असतां, मोरो विश्वनाथ व गणेश नारायण धडफळे यांनीं जामीन-गिरी पत्करून त्यांना सोडविलें. थोरल्या बाजीरावांना पुण्यांतील धडफळ्यांचें घर स्वतःचेंच घर वाटे. पुढें बाजीराव पुण्यास आल्यावर प्रथम धडफळ्यांच्या वाड्यांत राहत असे. नंतर शनिवारवाडा बांधण्यांत आला व त्याचें कामहि धडफळ्यांकडेच दिलेलें होतें. या घराण्यांतील मंडळींनीं पुण्याजवळ पाषाण व पिंपळें गुरव येथील पाटिलक्या व इनामें मिळविलेलीं आहेत व तीं आजहि त्यांज-कडे चालू आहेत. पुण्यांतील त्यांचे वाडे अजून पूर्वीच्या ठिकाणीं शितोळे यांच्या वाड्यालाच लागून आहेत. धड-फळे यांची रोजनिशी लिहिण्याची पद्धत जुनी दिसते. पेशवे व पुरंदरे यांच्या रोजनिश्या हीं वास्तविक धडफळे यांच्या रोजनिशीचीच पुनरावृत्ति असल्याचें आतां सिद्ध झालें आहे. या घराण्यांत शिवभक्ति विशेष दिसून येत असून पाषाण येथें लक्ष्मण चिंतामण यांनीं बांधलेलें एक वाकेश्वर नांवाचें सुंदर शिवालय व घाट आहे. त्यास थोरले शाहू महाराज यांनीं पूजेअर्चेकरितां धडफळे यांच्या मूळ जमिनीवरील पट्टी माफ करून त्या इनाम करून दिल्याच्या सनदा आहेत. त्याचप्रमाणें पिंपळे गुरव येथेंहि एक देऊळ आहे. या घराण्यांत इतिहासलेखनाचा व्यवसाय पिढ्यान्‌पिढ्या चालत असल्याचें धडफळे यादी-वरून दिसून येतें. हें काम केवळ स्वयंस्फूर्तीनें चाले. शितोळे देशमुखाचा या घराण्याशीं अनेक पिढ्या निकट संबंध असून यांच्याशिवाय त्या घराण्यांतील पानहि हालत नसे. यांचा व शितोळ्यांचा संबंध दर्शवणारा पत्रव्यवहार प्रसिद्ध आहे ( रा. खं. १५।१६।१७।१८ ). राजाश्रय किंवा लोकाश्रय नसतांना देशाच्या इतिहासाची काळजी वाहून तो लेखनिविष्ट करण्याची तत्परता फक्त याच घराण्यांतील लोकांनीं अनेक पिढ्या चालू ठेवलेली दिसते. हें घराणें गणपतिभक्तहि असून चिंचवडच्या देवांचें अनुग्रहीत आहे.

**धनपति**--माधवकृत शंकरविजयाचा टीकाकार.

**धननंद**—नवनंदांपैकीं शेवटला.

**धनपाल**—( ग्रंथकाल स. ९७३ ) उज्जयिनी नगरींत सर्वदेव नांवाचा काश्यपगोत्री ब्राह्मण राहत असे. त्याला धनपाल व शोभन या नांवांचे दोन पुत्र असून सुंदरी नामक एक कन्या होती. त्या काळीं माळवा प्रांतावर मुंज राजाचें आधिपत्य असे. धनपाल कांहीं कारणामुळें धारा नगरींत ( धार ) राहूं लागला. सर्वदेवाचा आचार्य महेंद्रसूरींशीं परिचय झाला, व आचार्यांनीं त्याच्यावर केलेल्या उपकारांची फेड म्हणून सर्वदेवानें आपला पुत्र शोभन याला आचार्यांच्या स्वाधीन केलें व शोभनानें जैनधर्माची दीक्षा घेतली. ही गोष्ट धनपालास आवडली नाहीं. इतकेंच नव्हे तर जैनसांप्रदायी साधूंचे विहार माळव्यांत न होतील अशी यानें खटपट केली. परंतु पुढें शोभनाच्या प्रभावानें धनपालानेंहि जैनधर्माचा स्वीकार केला. हा सर्व शास्त्रांत निष्णात होता. यानें लिहिलेले ग्रंथ उपलब्ध आहेत तेः—( १ ) प्राकृतलक्ष्मीनाममाला; ( २ ) तिलकमंजरी; ( ३ ) ऋषभपंचाशिका. यांपैकीं प्राकृतलक्ष्मीनाममाला म्हणजे पाइअलच्छीनाममाला होय. हा कोश लिहिला तेव्हां हा जैनधर्मीय नव्हता. कारण या कोशांत प्रारंभीं ब्रह्मदेवाची स्तुति केली असून श्रीजिनाच्या तीन नांवांशिवाय कोणताहि जैनसांप्रदायाचा शब्द कोशांत आलेला नाहीं ( तित्थाहिवई, जिणो, अरहा–हीं तीन नांवें होत ). तिलकमंजरी लिहिली तेव्हां यानें जैनधर्माचा स्वीकार केला असावा; कारण या ग्रंथांत प्रारंभीं श्रीजिनाचें स्मरण केलें आहे. हेमचंद्राला याच्या विद्वत्तेबद्दल फार आदर वाटत असे. हेमचंद्रानें एकवार कुमारपालासमक्ष याची स्तुति केली असून शिवाय आपल्या कोशांच्या टीकेंत " व्युत्पत्तिर्धनपालतः " असा आदरयुक्त निर्देश केला आहे. महेंद्रसूरि, वादिवेताल, शांतिसूरि व श्रीमेरुतुंगसूरि यांच्या प्रबंधांवरून याची विशेष माहिती मिळेल असें वाटतें.

पाइअलच्छीनाममाला हा कोश गाथावृत्तांत रचलेला आहे. हा कोश सर्व प्राकृत शब्दांचा नसून बहुशः कवि काव्यांमध्यें ज्या शब्दांचा उपयोग करितात ते शब्द या कोशांत संग्रहित केले आहेत. अर्थात् या शब्दांत तद्भव, तत्सम व देशी असे तिन्ही प्रकारचे शब्द आहेत. देशी शब्द निराळे दिलेले नाहींत. सर्व शब्द प्रथमान्त ( एक किंवा अनेकवचनी ) असल्यामुळें शब्दांचें लिंग सहजीं

समजतें. कोशांत अव्ययांचाहि अंतर्भाव केलेला आहे, शब्द अमरकोशाप्रमाणें वर्गवारीनें किंवा अकारविल्ह्यानें दिलेले नाहींत. कांहीं समानार्थक शब्द कोशांत एकत्र दिले आहेत तर कांहीं गाथार्धांत व गाथाचरणांत दिले आहेत व तशा सूचनाहि योग्य ठिकाणीं केल्या आहेत. या ग्रंथाचा रचनाकाल वि. सं. १०२९ ( स. ९७३ ) दिला आहे.

धनपाल हा महाकवि विक्रमसंवत् १००० च्या सुमारास होऊन गेला. हेमचंद्राच्या देशीनाममालेइतकेंच महत्त्व धनपालानें रचिलेल्या पाइअलच्छीनाममाला या कोशाचें आहे. या कोशानंतर सुमारें १५० वर्षांनीं देशीनाममाला लिहिलेली आहे ( विविधज्ञानविस्तार, व. ६१, अं. ९–१०, पृ. २५१–५२ ).

हा कोश यानें आपली बहिण सुंदरी हिच्याकरितां केला ( बी. बीं. आणि मंडळी, भावनगर, यांनीं प्रसिद्ध केलेल्या या कोशाच्या प्रस्तावनेवरून ).

**धनंजय**—( स. ९९७ सुमार ) विष्णूचा पुत्र. हा मुंजाच्या सभेंतील एक सभासद होता. याच्या दशरूपक नांवाच्या ग्रंथावर अवलोक नांवाची टीका करणारा धनिक याचा भाऊ होता. मुंजाचा वध चालुक्य तैलपदेव यानें स. ९९७ च्या सुमारास केला ( इंडियन अँटि. १२, २·१० ). रूपक म्हणजे नाटक. याच्या दहा प्रकारांचें विवेचन दशरूपकांत चांगलें आढळतें.

२. हा तिसऱ्या हलायुधाचा बाप होय. याचा उल्लेख बंगालचा राजा लक्ष्मणसेन याच्या कारकीर्दींत आला आहे. हा लक्ष्मणसेनाचा धर्माध्यक्ष व न्यायाधीश होता.

३. या काश्मीरी पंडितानें 'नाममाला' नांवाचा संस्कृत कोश केला आहे.

**धना जाट**—भरतपूरच्या राजाचा भाट व कवि.

**धनाजी जाधव**—( जन्म स. १६५०–मृत्यु स. १७१० ) शंभुसिंगाचा मुलगा धनाजी. हा लखुजी जाधवाच्या वंशांतला होता. याचा जन्म १६५० त झाला. हा उंबराणीच्या लढाईत पुढें आला (स.१६७३). हा हंबीरराव मोहिते यांच्या हाताखालीं होता. धनाजीच्या सैन्यांत उत्तम शिस्त नव्हती. पण हा आपल्या लोकांना प्रिय होता. धनाजीस मोंगलांचें सैन्य घाबरे. हा कुशल सेनापति होता. हीं माणसें प्रतिसृष्टि निर्माण करतील असा शिवाजीनें यांचा गौरव केला होता ( सावनूर युद्ध ). हा अखेरपर्यंत कोल्हापूरच्या विरुद्ध होता. शाहूनें राज्यपद स्वीकारल्यावर वसुलाच्या खात्याची सर्व देखरेख याच्याकडे सोंपविली. ती यानें बाळाजी विश्वनाथ व अंबाजीपंत पुरंदरे यांना नेमून पार पडली.

स. १७१० मध्यें रांगण्याच्या मोहिमेवरून परत येत असतां वारणातीरीं वडगांव येथें हा वृद्ध व अनुभवी सेनापति मृत्यु पावला. याचे पायास जखमेचा व्रण होता. तें दुखणें अधिक होऊन वरील स्वारींत याचा अंत झाला. याला संताजी, चंद्रसेन व शंभुसिंग असे तीन पुत्र होते. प्रथम चंद्रसेन, नंतर संताजी व त्यानंतर शंभुसिंग हे मराठ्यांचे सेनापति झाले होते.

हा शिवाजीच्या तालमींत तयार झाला असून शूर व एकनिष्ठ होता. याचे वंशज सध्यां माळेगांवीं ( बारामती ) येथें आहेत. लढाईच्या कामाशिवाय इतर बाबतींत विशेष मन घालण्याचा याचा स्वभाव नव्हता.

धनाजी जाधवाच्या कर्तबगारीविषयीं ताराबाईचा अभिप्राय 'जाधवराव कैलासवासी स्वामींचे संपूर्ण कृपेस पात्र झाले ते आपल्या कर्तृत्वावरी व हुकूमबारदारी एकनिष्ठेवरी झाले, राज्याभिवृद्धीविषयीं त्यांहीं कांहीं सामान्य कसाला, श्रमसाहस केला नाहीं. जीविताची तमा न धरितां स्वामिकार्याचे तत्पर राहून, कैलासवासी स्वामींनीं जे समयीं हुकूम केला, ते समयीं कर्नाटकांत फौजानीं धाऊन जाऊन, स्वामीस प्राप्त झालीं संकटें निरसन करून, स्वामिगौरवाचें सुख त्याहींच अनुभविलें व सेवाधर्मेंकरून त्याहींच कैलासवासी स्वामींस संतुष्टविलें. तेव्हां स्वामीस मशारनिल्हेविना दुसरे प्रिय कीं प्राण ( कोणी ) होते असें नाहीं. सर्व प्रकारें कार्यास येतील हा भरंवसा दृढ मनीं मानिला होता. औरंगजेबासारखा शत्रु पराभव पावल्याचें यश मशारनिल्हेस प्राप्त झालें' ( भारतवर्ष, द्वितीयावृत्ति, पत्रयादी, अं. ५० ).

**धनिक**—( स. ९९७ नंतर ) विष्णूचा पुत्र. हा दशरूपककार धनंजयाचा भाऊ असावा. यानें दशरूपकावर अवलोक नांवाची टीका केली आहे. टीका धनंजयाच्या मागून बऱ्याच वर्षांनीं केलेली असावी. कारण यांत धनंजयाचा आश्रयदाता मुंज राजा मारला गेल्यावर गादीवर आलेल्या सिंधुराजावर लिहिलेल्या नवसाहसांक चरित्रांतील उतारे आले आहेत. याच्या काव्यनिर्णय नांवाच्या ग्रंथाचा निर्देश याच्या टीकेंत आला आहे. याचा पुत्र वसंताचार्य.

**धनेश्वरदेवेंद्र**—हा भास्कराचार्यांच्या लीलावती ग्रंथावर लीलावतीभूषण नामक टीकेचा कर्ता.

**धरणीधर काशीनाथ**—वैय्याकरणसर्वस्व नामक संस्कृतमधील ग्रंथाचा कर्ता.

**धरणीवराह परमार**—(स. ९९७ सुमार) आबूच्या परमारांपैकीं कृष्णराजाचा पुत्र. कनोजच्या रघुवंशी प्रति-

हाराचें राज्य निर्बळ होत चालल्यामुळें सामंत स्वतंत्र होऊं लागले. मूलराज सोलंकीनें आपला मामा चावडावंशी सामंतसिंह (भूयड) याला मारून त्याचें राज्य घेतलें. आणि आपण गुजराथच्या राजधानी पाटण (अनहिलवाड) येथील गादीवर बसला. मूलराजानें याच्यावरहि स्वारी केली होती. तेव्हां हा जोधपूर राज्यांतील हस्तिकुंडी (हथुंडी) येथील राष्ट्रकूट राजा धवल यास शरण गेला असें वि. सं. १०५३ (स. ९९७) मधील धवलाच्या लेखावरून दिसतें (एपि. इंडि. भा. १०.२१). मूलराजानें वि. सं. १०१७–१०५२ पर्यंत राज्य केलें. अर्थात् याच्यामध्यें केव्हां तरी त्याची स्वारी याच्यावर झाली असावी. राजपुतान्यांत अशी प्रसिद्धि आहे कीं याला नऊ भाऊ होते, आणि त्यांत यानें आपलें राज्य वांटलें होतें. म्हणून नऊ राजधान्यांना नऊ कोटी मारवाड म्हणत असत. याविषयीं एक छप्पयहि प्रसिद्ध आहे. पण त्यांत सत्यता दिसत नाहीं.

२. (स. १०८७ सुमार) आबूच्या परमार घराण्यापैकीं एक राजा. जोधपूर राज्यांत जालोर येथें वि. सं. ११४४ (स. १०८७) मधील एक शिलालेख मिळाला आहे. त्यांत १ वाक्पतिराज, २ चंदन, ३ देवराज, ४ अपराजित, ५ विज्जल, ६ धारावर्ष, ७ वीसल. वीसलची राणी मेरळदेवी हिनें सिंधुराजेश्वराच्या मंदिरावर सुवर्णकळस चढवला अशी माहिती मिळते. ही शाखा कोणत्या राजापासून निघाली हें सांगतां येत नाहीं. पण काळाच्या दृष्टीनें जालोरची शाखा धरणीवराहापासून निघाली असावी (राजपूतानेका इतिहास, पा. १८२).

**धरपट्ट मैत्रक**—(स. ५३५-३९) हा वल्लभीच्या मैत्रक वंशांतील भट्टार्काचा मुलगा. हा आपला भाऊ ध्रुवसेन याच्यामागून गादीवर बसला.

**धरसेन मैत्रक**—(स. ५०० सुमार) भट्टार्कानंतरचा वल्लभीचा राजा.

२. (स. ५६९–५८९) हा गुहसेनाचा पुत्र. हा आपल्या बापाच्या मागून गादीवर आला. याचे पांच दानलेख सांपडले आहेत. त्यांपैकीं दोहोंत याला महासामन्त अशी पदवी आहे.

३. (स. ६२० अखेर) हा खरग्रहाचा पुत्र.

४. (स. ६४५–६४९) वल्लभीच्या मैत्रक घराण्यांतील जो ध्रुवसेन दुसरा त्याचा हा मुलगा होय. स. ६४५ मध्यें हा आपल्या बापानंतर वल्लभीच्या गादीवर आला.

स. ६४७ मध्यें यानें गुजराथची राजधानी भृगुकच्छ (भडोच) ही आपल्या ताब्यांत घेतली. याच्यानंतर डेरभट याचा मुलगा ध्रुवसेन ३ रा हा स. ६४९ त गादीवर आला (B.). हा सर्व वल्लभी राजांत बलिष्ठ होता असें दिसतें. गुप्तशक ३३० (स. ६४९) मधील याच्या एका ताम्रपटांत महाराजाधिराज व चक्रवर्ति अशा याला पदव्या लावल्या आहेत. पण याचे वंशज महाराजाधिराज म्हणवीत. याच्या कारकीर्दींत भट्टिकवीनें सुप्रसिद्ध भट्टिकाव्य लिहिलें.

**धराजयसिंहवर्मन् (पश्चिम) चालुक्य**—(स. ६५५–६६९) पहिल्या विक्रमादित्याचा हा धाकटा भाऊ होय.

स. ६५५ च्या सुमारास हा गुजराथमध्यें आपल्या भावाचा प्रतिस्पर्धी म्हणून राज्य करीत होता. याला आणखी कांहीं भाऊ होते तेहि असेच ठिकठिकाणीं राज्यें करीत होते. ह्याचा मुलगा श्रयाश्रय शिलादित्य हा स. ६६९ त आपल्या बापानंतर गुजराथच्या गादीवर आला (B.).

**धर्मकाल**—तिबेटी ग्रंथावरून असें दिसतें कीं हा ख्रि. शकाच्या दुसऱ्या शतकांत बौद्ध धर्माच्या प्रचाराकरितां चीन देशांत गेला होता.

**धर्मकीर्ति आचार्य**—(स. ६३५ चा सुमार) हा जातीनें ब्राह्मण. याच्या बापाचें नांव परिव्राजक कोरुनंद. हा 'मित्रलय' येथें जन्मला. यानें वयाच्या सोळाव्या वर्षापर्यंत तत्त्वज्ञानाचा गाढ अभ्यास केला व पुढें हा बुद्ध साधूंच्या प्रवचनास जाऊं लागला. पुढें यास त्यांच्या धर्माची शिकवण पसंत पडून यानें बुद्धधर्म स्वीकारला व बुद्धधर्माचें ज्ञान प्राप्त करून घेतलें. तीर्थसंप्रदायाच्या सर्व खोल तत्त्वांचा अभ्यास करण्यासाठीं, हा दक्षिणेंतील ब्राह्मण कुमारिल याजकडे गेला; व सर्व तत्त्वें शिकून तेथून हा निघाला. परत येतेवेळीं कणादपंथाच्या लोकांना व तीर्थसांप्रदायी लोकांना वादामध्यें जिंकून, कित्येकांस बुद्धधर्म स्वीकारण्यास भाग पाडिलें. याच्या तैलबुद्धीचें एक उदाहरण द्यावयाचें झाल्यास, हा एकदां ईश्वरसेनाच्या घरीं गेला असतां, यानें 'प्रमाणसमुच्चय' ग्रंथ ऐकला. तेव्हां हा ईश्वरसेनाइतका तरबेज झाला व ज्या वेळेस दुसऱ्यांदा ऐकला त्या वेळेस याला त्या ग्रंथांतील दोष कळून आले. म्हणजे ईश्वरसेन हा ह्या ग्रंथाचा खोल अभ्यास केलेला मनुष्य पण त्याला देखील या ग्रंथांतील दोष कळत नसत, ते याला कळूं लागले.

यानें केलेले तर्कज्ञानावरील संस्कृत ग्रंथ–१ प्रमाणवार्तिककारिका (प्रमाणसमुच्चयावर टीका), २ प्रमाणवार्तिकवृत्ती (प्रमाण-वार्तिक-कारिकेवर उपटीका), ३ प्रमाणविनिश्चय, ४ हेतु-बिंदु-विवरण, ५ तर्कन्याप अथवा

वादन्याय, ६ संतानांतरासिद्धि, ७ समबंधपरीक्षा, ८ समबंधपरीक्षावृत्ति ( समबंधपरीक्षावर टीका ), ९ न्याय-बिंदु–वाद करण्याची पद्धत वगैरे ग्रंथ लिहिले. ह्या सर्व ग्रंथांच्या मूळ संस्कृत प्रती उपलब्ध नाहींत; पण प्रत्येक ग्रंथाचें तिबेटी भाषांतर उपलब्ध आहे (उद्योतकर पाहा); ( हिस्टरी ऑफ इंडियन् लॉजिक, पा. १०३–११८ ).

**२.** वासवदत्तेचा टीकाकार शिवराम यानें याचा अलंकार नांवाचा ग्रंथ असल्याचें म्हटलें आहे. पण त्याला दुजोरा मिळत नाहीं. या नांवाचा एक बौद्ध ग्रंथकार होऊन गेला. त्याचे श्लोक शार्ङ्गधरपद्धति व सुभाषितावलि या ग्रंथांत आले आहेत. त्यांत त्याचें नांव भदन्त धर्मकीर्ति असें आलें आहे. पण वरील व हा एक होता असें मानण्यास प्रमाण नाहीं. याच्या अलंकारावरील ग्रंथाचे नांव 'बौद्धसंगति' असें आहे.

**३.** (स. ६९५) बौद्ध आचार्य, शंकराचार्यांचा शिष्य सुरेश्वराचार्य हा याचें नांव घेऊन एक मत उल्लेखित करतो. चिनी प्रवासी फाहियान हा धर्मकीर्ति आपला समकालीन असल्याचें लिहितो ( म. भा. २. ३१० ).

**धर्मकुवर**—( अमीरखान पाहा ).

**धर्मघोषसूरि**—( स. ११५०–१२१० ) जैन पंडित. शतपदी व षट्पदिका ग्रंथाचा कर्ता.

**धर्मदास**—( स. १५१७ ) एक हिंदी कवि. कबीराचा हा मुख्य शिष्य. हा कबीर वारल्यावर वरील सनांत त्याच्या गादीवर बसला. ग्रंथ अमरसुखनिधान. हा अत्यंत त्यागी होता.

**धर्मदासगणि**—हा महावीर या जैन साधूचा समकालीन होय. यानें 'उपदेशमाला' हा जैनवाङ्मयांतील ग्रंथ लिहिला. त्यामध्यें नीतिविषयक चर्चा केली आहे.

**धर्मनाथ**—जैनांचा पंधरावा तीर्थंकर (तीर्थंकर पाहा).

**धर्मपा**—चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं छत्तिसावा सिद्ध. जात ब्राह्मण. देश विक्रमशिला. हा कण्हपा व जालंधर यांचा शिष्य. यानें कलिभावनामार्ग ( तं. ४८।७९ ), सुगत-दृष्टिगीतिका ( तं. ४८।९ ) व हुंकारचित्तबिंदुभावनाक्रम ( तं. ४७।७४ ) हे ग्रंथ लिहिले.

**धर्मपाल**—( स. ६००–६३५ सुमार ) ह्या तर्कज्ञाचा जन्म मद्रास इलाख्यांत द्रवीड प्रांतांतील कांचीपुरम् म्हणजे हल्लींचें कंजीवरम् येथें झाला. ह्याला आठ भाऊ असून त्यांमध्यें हा वडील होय. हा नालंदा विश्वविद्यालयांत शिकला व तेथेंच स. ६३५ पर्यंत मुख्य होता. धर्मपाल व भर्तृहरि यांनीं पाणिनीच्या व्याकरणावर वेदवृत्ति नांवाची एक वृत्ति लिहिली. याचे ग्रंथ–( १ ) आलंबनप्रत्यय-ध्यानशास्त्रव्याख्या, ( २ ) विद्यामात्रसिद्धि-शास्त्र-व्याख्या, ( ३ ) शतशास्त्रवैपुल्यव्याख्या. शेवटच्या ग्रंथाचें भाषांतर स. ६५० त चिनी भाषेंत झालें. यानें कोशांबी येथें पाखंडी लोकांचें खंडन केलें.

**२.** ( स. ७८६–८५० ) बंगाल्यांतील पालराजांपैकीं हा गोपालाचा मुलगा. खालिमपूर व भागलपूर दानपत्रांवरून असें दिसतें कीं, यानें कनोजचा सम्राट् इंद्रराजाचा पाडाव करून कनोजच्या राज्यपदावर चक्रायुधाची स्थापना केली. यावरून असें ठरतें कीं याची कारकीर्द स. ८००–८२५ पर्यंत असावी. पण पुढें वत्सराजाचा मुलगा नागभट यानें चक्रायुधाबरोबर याचाहि पराजय करून कनोज घेतलेलें दिसतें. पण याच्याकरितां राष्ट्रकूटांपैकीं तिसऱ्या गोविंदराजानें नागभटाचा पराभव केला. पण कनोज मात्र त्याच्याकडेसच राहिलें. गोविंदराज ( तिसरा ) हा याचा सासरा होता. भागलपूरलेखावरून असें दिसतें कीं याची पत्नी रणदेवी ही राष्ट्रकूटांपैकीं परबल राजाची मुलगी होय. परबल म्हणजे गोविंदराज, असें कीलहॉर्ननें सिद्ध केलें आहे ( इंडि. अँटि. २१. २५० ). गोविंदराजानें पराजय केल्यानें नागभटानें याच्यावर स्वारी केली नाहीं ( म. यु. भा. २. २३२ ).

कनोजच्या आमराजानें धर्मपालाच्या बप्पभट्टि नांवाच्या राजपंडिताला आपल्या दरबारांत घेतलेलें पाहून त्यास राग आला, व वादामध्यें ज्याचा पंडित हरेल त्याचें राज्य दुसऱ्यानें घ्यावें अशी दोघांची पैज लागली. धर्मपालाचा पंडित हरला, परंतु आमराजानें ह्याचें राज्य परत दिलें. धर्मपालानें पुढें गौड व बंगाल प्रांत जिंकले.

**धर्मप्रभसूरि**—(स. १२७३–१३३५) जैन आचार्य. कालिकाचार्यकथेचा कर्ता.

**धर्मरक्ष**—( खि. पू. १०० सुमार ) हा काश्यप मतंगाबरोबरच चीन देशांत गेला असावा, असें दिसतें. हा एका राजाच्या आश्रयाला होता. त्याच्या मर्जीविरुद्ध गुप्तपणें हा चीनमध्यें गेला. यानें तिकडे अतिशय चांगला प्रचार करून बुद्धधर्माला चीनमध्यें स्थिर केलें; व इकडून सारखे धर्मप्रचारक तिकडे जाऊं लागले. ही परंपरा सम्राट् हर्षाच्या निधनकालापर्यंत चालू होती असें दिसतें.

**धर्मराजाध्वरि**—( स. १५५० सुमार ) हा तेलंग ब्राह्मण असून, मंथनकालीचा राहणारा होता. शंकराचार्यांनुसारी वेदांतपरिभाषा हा संस्कृत ग्रंथ यानें केलेला आहे.

**२.** हा कंदार माणिक्कचा राहणारा. यानें रुचिदत्ताच्या

तत्त्वचिंतामणिप्रकाशावर टीका लिहिली आहे ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ४८५ ).

**धर्मरिपा**—यालाच धर्वरिपा असें म्हणतात. हा जातीनें ब्राह्मण होता. हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं अठ्ठेचाळिसावा सिद्ध होय. हा कामरूपदेशांत राही. विरूपाच्या ( ३ ) चौथ्या पिढींतील हा होय.

**धर्मोत्तराचार्य**—(स.८४७ सुमार) बौद्ध तर्कशास्त्रज्ञ. हा कल्याणरक्षित व काश्मीरच्या धर्माकरदत्ताचा शिष्य. याचे ग्रंथ-१ कर्मकीर्तींच्या न्यायबिंदूवर न्यायबिंदुटीका, २ प्रमाणपरीक्षा, ३ अपोहनामप्रकरण, ४ परलोकसिद्धि, ५ क्षणभंगसिद्धि, ६ प्रमाणविनिश्चयटीका, इत्यादि.

**धवल**—( स. ९३९ सुमार ) राजपुतान्यांतील हाथुंडीच्या राठोड राजा मंमटाचा हा मुलगा. मुंजानें मेवाडवर स्वारी केली तेव्हां हा मेवाडच्या बाजूनें युद्धांत होता ( एपि. इंडि. भा. १०. २० ).

**धहुलि**—यालाच धहुरि असें म्हणतात. हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं सत्तरावा सिद्ध होय. हा जातीनें शूर असून धेकरदेशचा राहणारा होय. यानें शोकदृष्टि हा ग्रंथ लिहिला ( तं. ४०।४४ ).

**धंग चंदेल्ल**—( स. ९५४-१००२ ) यशोवर्म्याच्या (स.९२५ ते ९५०) नंतर चंदेल्लांचा अतिपराक्रमी पुरुष धंग राजा राज्य करूं लागला. खजूराहो लेखांत या राजाच्या राज्यविस्ताराच्या मर्यादा दिलेल्या आहेत. धंग राजाच्या कारकीर्दींतील बरेच लेख सांपडले आहेत. स. ९९८ च्या लेखांत याची तुलना हम्मीराबरोबर केलेली आहे. सबक्त-गिनाबरोबर झालेल्या संग्रामांत यानें विशेष पराक्रम गाजविला असें दिसतें. फेरिस्त्यानेंहि याला दुजोरा दिला आहे. तो म्हणतोः-' लाहोरच्या जयपाळाच्या मदतीस कालंजर राजा मोठ्या सैन्यानिशीं व खजिन्यासह धांवून गेला.' या लेखावरून हिंदूंचा जय झालेला दिसतो. याचे बरेच लेख सांपडले आहेत. याची कारकीर्द फार मोठी असून हा दीर्घायुषी होता. यानें गंगायमुनेच्या प्रवाहांत जिवंत जलसमाधि घेतली ( एपि. इंडि. १. १४६ ). सारांश, धंग हा चंदेल्ल वंशांत विख्यात वीर पुरुष होऊन गेला यांत शंका नाहीं.

हा मोठा शिवभक्त होता. याच्या दानपत्राच्या आरंभीं ' ॐनमः शिवाय ' अशीं अक्षरें सांपडतात.

**धंधुक परमार**—( स. १०४२ पूर्वीं ) आबूच्या परमारांपैकीं महीपालाचा पुत्र. यानें गुजराथच्या पहिल्या भीमदेव सोलंकीचें मांडलिकत्व स्वीकारलें नाहीं, म्हणून त्यानें याच्यावर स्वारी केली. तेव्हां हा आबू सोडून धारच्या भोजाच्या आश्रयाला गेला. भोज त्या वेळीं चितोडला राहत होता. त्या वेळीं आबूचा दंडपति प्राग्वाट-वंशी ( पोरवाड ) महाजन विमलला नेमलें. त्यानें याला चितोडहून बोलावून त्याचा भीमदेवाशीं समेट करून दिला, आणि त्याच्या आज्ञेनें आबूवर देलवाडा येथें विमलवसती ( विमलवसही ) नांवाचें क्रोडो रुपये खर्चून आदिनाथाचें मंदिर बांधलें. हें वि. सं. १०८८ ( स. १०३१ ) मध्यें बांधलें असें जिनप्रभसूरिविरचित तीर्थकल्पांतील अर्बुद-कल्पावरून समजतें. कारागिरीच्या बाबतींत याच्या तोडीचें मंदिर हिंदुस्थानांत नाहीं. धंधुकच्या राणीचें नांव अमृतदेवी. यास तिच्यापासून पूर्णपाल नांवाचा पुत्र व लाहिनी नांवाची कन्या झाली होती. यास कृष्णराज नांवाचा आणखी एक पुत्र होता. त्याच्या मातेचें नांव उप-लब्ध नाहीं. लाहिनीचें लग्न चचपुत्र विसहराजाशीं झालें.

**धम्मपाल**—सुमंगलविलासिनी या दीघनिकायाच्या अठ्ठकथेवर लीनत्थवण्णना नांवाची टीका आहे. तिच्या कर्त्याचें नांव शेवटीं धम्मपाळ असें दिलें आहे. परंतु हा कोण व याचा काळ कोणता यासंबंधीं कांहींच पत्ता लागत नाहीं. परमत्थदीपनी वगैरे टीकांचा कर्ता धम्मपाळ व हा धम्मपाळ हे एकच असल्यास याचा काळ इसवी सनाच्या सहाव्या शतकांत पडतो. हें खरें असल्यास हा बुद्धघोषाचार्याच्या मागाहून लवकरच झाला असें दिसतें. याला ब्राह्मणांच्या ग्रंथांचें बरेंच ज्ञान असावेंसें वाटतें. तथापि अठ्ठकथेचा अर्थ समजण्यास याची टीका उपयुक्त असली तरी मूळ दीघनिकायाचा अर्थ लावण्यास याची फारशी मदत होत नाहीं ( दीघनिकायाचें मराठी भाषांतर, कै. चिं. वै. राजवाडेकृत प्रस्तावना ).

**धाडियप्पा यादव**—( स. ८०० सुमार ) हा यादव घराण्यांतील सेऊणचंद्राचा मुलगा होय. हा आपल्या बापानंतर गादीवर बसला.

२. ( स. ८४० सुमार ) हा यादव घराण्यांपैकीं बद्दिग किंवा बड्डिग याचा मुलगा.

**धानुष्कयज्वा** किंवा **धन्वयज्वा**—वेदाचार्यांच्या सुदर्शनमीमांसेंत पृष्ठ ५१७।५६ वर अशा नांवानें तीनहि वेदांवरील भाष्यकार असणाऱ्या व्यक्तींचा निर्देश आहे. हा वैष्णवसांप्रदायाचा आचार्य आहे.

**धामग**—हा वृद्ध ब्राह्मण सुंदरेश्वर नामक महादेवाचा भक्त होता. यास त्याचा साक्षात्कार असे. चंपकमार राजानें आपल्या स्त्रीच्या केसास असणारा सुगंध ' स्वाभा-विक किंवा कृत्रिम ' असें पुसलें असतां सेतेकरास सांगतां न

आलेलें उत्तर यानें सांगितलें, त्यावरून राजानें लावलेलें बाक्षिस यास मिळालें ( कविच. ).

**धारवार प्रभु कळंबेकर**—पूर्वी हा चंद्रसेनाच्या फौजेंत होता. पुढें हा शाहूस मिळाला. स. १७२० च्या अखेरीस चंद्रसेन जाधवानें शाहूचे प्रदेशावर स्वारी केली असतां यानें पुष्कळ पराक्रम करून त्याचा पराभव केला. हा मरण पावला तेव्हां याची सरदारी शाहूनें याच्या बंधूस दिली ( शा. च. पृ. ४२ ).

**धारावर्ष परमार**—( स. ११६२-१२१८ ) आबूच्या परमारांपैकीं यशोधवलाचा वडील पुत्र. हा अत्यंत पराक्रमी राजा होता. गुजराथचा राजा कुमारपाल यानें उत्तरकोंकणचा राजा मल्लिकार्जुन शिलाहारावर दोन स्वाऱ्या करून त्याला ठार केलें. त्याबरोबर हाहि होता व यानें आपला पराक्रम तेथें दाखवला ( एपि. इंडि. भा. ८, पृ. २११ ). 'ताजुल मआसिर' नांवाच्या फारसी तवारिखेवरून समजतें कीं, वि. सं. १२५३ पौष किंवा माघ ( स. ११९६ ) महिन्यांत कुतुबुद्दीन ऐबकनें अनहिलवाड्यावर स्वारी केली. त्या वेळीं आबूच्या खालीं कायद्रागांवाजवळ मोठी लढाई झाली. त्या वेळीं हा गुजराथच्या दोन सेनांपैकीं एकीचा सेनापति होता. या लढाईंत गुजराथची सेना पराजित झाली. पण त्याच जागीं त्याच्यापूर्वी जी लढाई झाली होती तींत शहाबुद्दीन घोरी जखमी होऊन पडला होता ( इलियट-हिस्टरी ऑफ इंडिया, भा. २, पृ. २२९-३० ). हा त्या लढाईंतहि होता. याच्या वेळीं गुजराथेवर कुमारपाल, अजयपाल, मूलराज ( दुसरा ) आणि भीमदेव ( दुसरा ) हे चार सोळंकी राजे झाले. राजा भीमदेव दुसरा हा लहान असतां त्याचे मंत्री आणि सरदार यांनीं त्याचें राज्य बळकावलें ( कीर्तिकौमुदी २. ६१ ), आणि स्वतंत्र झाले, तेव्हां हाहि स्वतंत्र झाला. पण गुजराथवर दक्षिणचा यादवराजा सिंघण आणि दिल्लीचा सुलतान शम्सुद्दीन अल्तमश यांनीं स्वारी केली, तेव्हां धोलक्याचा बघेल सामंत वीरधवल आणि त्याचा मंत्री पोरवाड महाजन वस्तुपाल आणि तेजपाल यांच्या आग्रहावरून मारवाडच्या इतर राजांबरोबर हाहि गुजराथच्या राजाला साहाय्य देण्यास तयार झाला ( नागरी प्र. प. ३, पृ. १२३-१२४ व तेथील टीपा ). पाटनारायण येथील मंदिरावर वि. सं. १३४४ ( स. १२८७ ) मधील एक शिलालेख आहे त्यांत लिहिलें आहे कीं, हा एका बाणानें तीन म्हशी मारीत होता. याची साक्ष आबूवर अचलेश्वराच्या मंदिराबाहेर मंदाकिनीच्या मोठ्या कुंडावर याची धनुष्यासहित दगडी मूर्ति उभी आहे. तिच्या पुढें तीन म्हशी असून त्यांच्यांत समान रेषेंत आरपार छिद्र आहे. याच्या राण्यांपैकीं दोन राण्या नाडोळच्या केल्हण चौहानाच्या मुली होत्या. एकीचें नांव शृंगारदेवी आणि दुसरीचें नांव गीगादेवी. त्यांपैकीं गीगादेवी याची पट्टराणी होती. याच्या वेळचें एक दानपत्र व कांहीं शिलालेख आहेत. त्यांचा काळ वि. सं. १२२०-१२७६ पर्यंत आहे. त्यावरून यानें ५७ वर्षे राज्य केलें असें दिसतें.

पृथ्वीराजरासो या ग्रंथांत लिहिलें आहे कीं, आबूचा परमार राजा सलख याची कन्या इच्छनी नांवाची होती. तिच्याशीं गुजराथच्या दुसऱ्या भीमदेवानें लग्न करण्याची इच्छा केली. पण सलख व त्याचा पुत्र जैतराव यानें तसें न करितां तिचें लग्न पृथ्वीराज चौहानाशीं करून दिलें. तेव्हां भीमानें आबूवर स्वारी करून सलखला ठार मारलें. पण पृथ्वीराजानें जैतरावास राज्य मिळवून दिलें. पण ही सर्व कथा कल्पित आहे, कारण आबूवर सलख किंवा जैतराव हे राजे कधींच झालेले नाहींत.

**धारिणी**—मालविकंस आधार देणारी एक राणी ( अग्निमित्र पाहा ).

**धावक**—एक संस्कृत कवि. रत्नावली, नागानंद व प्रियदर्शीका हीं श्रीहर्षाच्या नांवावर असणारीं नाटकें यानें लिहिलीं असें राजशेखरानें लिहिलें आहे. मम्मटाच्या काव्यप्रकाशांतील दुसऱ्या उल्लासांत 'श्रीहर्षादेर्धावकादीनामिव धनम्' असें वाक्य आहे. याचा आश्रयदाता श्रीहर्ष म्हणजे कनोज व ठाणेश्वर येथील सम्राट् हर्षवर्धन असल्यास तो सातव्या शतकांतील आहे. उज्जयनीचा हर्षविक्रम हा याचा आश्रयदाता असण्याचा फार संभव आहे. भास व धावक हेहि एकच होत, असें राजशेखरानें लिहिलें आहे. पण वास्तविक हे भिन्न असून हा गैरसमज दिसतो ( वि. वि. ५७. ७, पा. २८७-२८८ ).

**धीमन**—धर्मपालाच्या कारकीर्दींतील एक प्रसिद्ध कारागीर. हा दगड, धातु वगैरेवर चित्रें काढी. याच्या वेळचें कांहीं काम अद्यापि उपलब्ध आहे असें म्हणतात ( His. of Fine Art in India, p. 305-7 ). याच्या मुलाचें नांव वीटपाल. हाहि कारागीर होता.

**धीरा भगत**—( स. १८२६ सुमार ) हा गुजराथी कवि भाटजातीचा होता. याचीं गुजराथींत पदें वगैरे पुष्कळ आहेत ( काव्यदोहन ).

**धुंडिराज बाजी पेशवे**—( जन्म स. १८२४-मृत्यु ता. ६-१०-१८५८ नेपाळांत ) यास नानासाहेब असेंहि म्हणत. इंग्रजांनीं स. १८५७ सालच्या बंडांत भाग

घेण्याच्या संशयावरून याच्या भावाला आपल्या स्वाधीन करण्याविषयीं लिहिलें, पण यानें तसें करण्याचें साफ नाकारलें. हाच सुप्रसिद्ध शेवटला नानासाहेब पेशवे होय. शेवटीं हा बंडांत सामील झाला व याला ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत राज्याभिषेकहि झाला होता.

**धुंडिराज लक्ष्मण व्यास**—राजव्यवहारकोशाचा कर्ता.

**धेतन**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं एक. यानें विजरत्नदीप्ति ग्रंथ लिहिला.

**धोकरिपा**—हा जातीनें शूद्र. हा सालीपूरचा असून चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं एकोणपन्नासावा. यानें 'प्रकृतिसिद्धि' ग्रंथ लिहिला ( तं. ४८।७५ ).

**धोभिपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं अडतिसावा सिद्ध. जातीचा धोबी. सालीपूरचा राहणारा.

**धोयी**—हा संस्कृतज्ञ पंडित बंगालचा राजा लक्ष्मणसेनाचा आश्रित होता. पवनदूत या संस्कृत काव्याचा कर्ता.

**धोंडजी वाघ**—( मृत्यु स. १८०० सप्टें. ) एक बंडखोर. मूळ हिंदु. मागाहून मुसलमान झाला होता ( धोंडोपंत वाघ पाहा ).

**धोंडो अनंत** ऊर्फ **रुस्तुमराव वाकनीस**—हा शाहूच्या अखेर रामराजा गादीवर बसण्याच्या सुमारास होता. यानें मध्यंतरीं रामराजास लपविण्याच्या कामीं पुष्कळच मदत केली. तसेंच त्याला गादीवर बसण्याकरितां पानगांवाहून नीट संभाळून आणण्याच्या बाबतींतहि खूप मदत केली ( म. रि. म. २, पृ. १४५-६२ ).

**धोंडोपंत गोखले**—( मृत्यु स. १८०० जून ) हा बापू गोखल्याचा चुलता. हा कर्नाटकाचा सर सुभेदार होता. यास धोंडजी वाघानें ठार मारलें. याच्या बायकोचें नांव लक्ष्मीबाई. वाघाचा सूड घेतल्याशिवाय याची क्रिया करण्यास लक्ष्मीबाईनें हरकत घेतली, तेव्हां बापूनें वाघाचें मुंडकें भावजयीस नजर केलें.

**ध्रुवदास**—( स. १६२० सुमार ) एक हिंदी कवि. हा हितहरिवंशजीचा शिष्य होय. हा वृंदावन येथें राहत असे. यानें एकूण ४० ग्रंथ लिहिले आहेत. त्यांपैकीं कांहींचीं नांवें खालीलप्रमाणें—१ वृंदावनसत, २ सिंगारसत, ३ रसरत्नावली, ४ नेहमंजरी, ५ रहस्यमंजरी, ६ सुखमंजरी, ७ रतिमंजरी, ८ वन-विहार, ९ रंग-विहार, १० रस-विहार, ११ आनंद-हास्य-विनोद, १२ रंग-विनोद, १३ नृत्य-विलास, १४ रंग-विलास वगैरे ग्रंथ याचे आहेत. यानें नाभाजीच्या भक्तमालिकेचें अनुकरण करून 'भक्तनामावली' हा ग्रंथ लिहिला.

**ध्रुवदेवी**—गुप्तवंशांतील दुसऱ्या चंद्रगुप्ताची पत्नी. हिचे पुत्र कुमारगुप्त व गोविंदगुप्त.

**ध्रुवभट परमार**—( स. ११०० सुमार ) आबूच्या परमारांपैकीं एक. हा कृष्णानंतर व रामापूर्वी झाला असावा.

२. सातव्या शिलादित्य मैत्रकाचें नामांतर.

३. दुसऱ्या ध्रुवसेन मैत्रकाचें नामांतर.

**ध्रुवराज राष्ट्रकूट**—( स. ८६७-८८८ ) राष्ट्रकूट घराण्यांतील गुजराथचा सुभेदार जो अकाल-वर्ष त्याचा हा मुलगा होय. स. ८६७ मध्यें हा आपल्या बापानंतर गुजराथच्या गादीवर आला.

यानें मिहिर ( प्रतिहार घराण्यांतील भोजदेव राजा ) याचा पराभव केला. याच वेळीं याचा भाऊ दन्तिवर्मन् अपरिमित-वर्ष हा स. ८८८ मध्यें गुजराथच्या सुभेदारीवर होता. कृष्णराज हा बहुतेक दन्तिवर्मनाचा मुलगा होय ( B. ).

**ध्रुवसेन मैत्रक**—( स. ५२६ ) हा वल्लभीच्या भट्टार्क मैत्रकाचा तिसरा मुलगा, या वेळीं जैनधर्माचा विशेष प्रचार होता. हूणांचा मांडलिक.

२. ( स. ६२९-४५ ) हा खरग्रह मैत्रकाचा पुत्र. ( बालादित्य ) वल्लभीच्या घराण्यांतील तिसऱ्या धरसेन मैत्रकाचा भाऊ. स. ६२९ मध्यें हा आपल्या भावानंतर गादीवर आला.

स. ६३५ मध्यें ठाणेश्वरच्या हर्षवर्धनानें याचा पराभव केला, तेव्हांपासून हा हर्षवर्धनाचा प्रतिस्पर्धी बनला. त्याच वेळीं यानें हर्षवर्धनाच्या मुलीशीं लग्न लाविलें. स. ६४५ मध्यें याचा मुलगा धरसेन ४ था हा याच्यानंतर गादीवर आला ( B. ).

३. ( स. ६५०-५६ ) चौथ्या धरसेन मैत्रकाला संतति नसल्यानें त्याचा एक नातलग तिसरा ध्रुवसेन म्हणून गादीवर बसला.

**ध्रोंडो मल्हार पुरंदरे**—( आपा पुरंदरे पाहा ).

# न

**नखीबाबा**—( स. १८१९ ) हा माळव्यांतील तपस्वी ब्राह्मण. हा राजकारणांत भाग घेई. मालकम-साहेबांनीं याला हयातीपर्यंत ३०० रु. पेन्शन करून दिलें होतें ( मं. त्रै. व. ११. २ ).

**नजफखान**—( मीर्झा नजफखान पाहा ).

**नजमुद्दौला दबीरुल्मुल्क मीर्झा असदुल्लाखा**—( गालिब पाहा ).

**नजीबखान रोहिला**—(मृत्यु स. ३१-१०-१७७०) हा दुआबांतील सहारणपूरचा जहागीरदार असून हाच स. १७६० च्या पावसाळ्यांत मराठ्यांच्या फौजा उत्तरेंत नाहींतसें पाहून अबदालीस हिंदुस्थानांत आणण्यांत प्रमुख होता. गाजीउद्दीनाचा विश्वासघात करून हा अबदालीस मिळाला. मीरशहाबुद्दीनानें रघुनाथराव पेशवे व होळकर यांची मदत घेऊन हा दिल्लींत प्रबळ झाला होता म्हणून ह्याचा पाडाव केला. हा कारस्थानी होता म्हणून रघुनाथ-राव याला मारणार होता, परंतु मल्हाररावानें मध्यस्थी करून वांचविलें ( भा. सा. ब. पृ. ३५ ). पेशवे प्रबळ होऊं नयेत म्हणून जनकोजी शिंद्यासहि होळकरानें नजीबास वांचविण्याचा कानमंत्र दिला. यानें गंगेवर पूल बांधण्याचें आमिष दत्ताजीस दाखविलें, व अबदालीस निकडीनें हिंदुस्थानांत आणलें; व दत्ताजीला होळकरादिकांपासून वेगळा गांठून ठार केलें. पानिपतच्या युद्धानंतर मराठ्यांचें लक्ष उत्तरेकडे नसतांना जाठ व नजीबखान ह्यांनीं उचल खाल्ली. स. १७६३ त यानें दिल्लीजवळ सुरजमल्ल जाठाचा पराभव करून त्यास ठार मारिलें. सुरजमल्लाचा मुलगा जवाहीरमल्ल यानें ह्याच्याशीं अनेक लढाया करून याच्या सैन्याचा संहार केला. ह्या वेळेस नजीबास होळकरानें साहाय्य केलें. स. १७७० त मराठ्यांनीं नवलसिंगाचा पराभव केलेला पाहून यास मोठी धास्ती पडली व हा पुन्हां कारस्थानें करूं लागला. शेवटीं ह्यानें पानिपतपूर्वी दुआबां-तील जितका मुलूख मराठ्यांचे ताब्यांत होता तेवढ्याच्या सनदा शहाजाद्याकडून मराठ्यांस आणून दिल्या व हा मराठ्यांचे लष्करांत, स्वतःचा मुलगा झबेताखान यासह तुकोजी होळकराचे विचारानें येऊन राहिला. पुढें हा नजीबगडास जातांना वाटेंत मरण पावला.

**नजीर**—( स. १७३८-१८१९ ) एक ऊर्दू कवि. हा मोठ्या लोकांना शिकवून उपजीविका करी. मुलांना हा छोट्या कविता करून देई. मुसलमान झाल्यावरहि हा आपल्या कवितेंत हिंदु देवतांची स्तुति करी. हा इतर ऊर्दू कवींपेक्षां वेगळा आहे. हा गरीबांबद्दल सहानुभूति दाखवी. याला लोक साधु मानीत. याचीं पुस्तकें-आदमीनामा, रोटीनामा, हंसनामा, जोगीनामा ( क. कौं. ४ ).

**नजीरुद्दीन कबाचा**—( स. १२१० सुमार ) शहा-बुद्दीन घोरीचा तुर्की गुलाम. मुलतानचा सुभेदार. कुतुबुद्दीन ऐबकचा जांवई. यानें सिंधचा बराच भाग जिंकला होता. पण शम्सुद्दीननें स्वारी केली तेव्हां हा पळाला ( बील ).

**नट्टा चंदेल्ल**—ही हर्ष चंदेल्लाची बहीण व कोक्कल कलचुरीची पत्नी.

**नदसी अकसा**—ही मथुरेच्या राजुल क्षत्रपाची पट्ट-राणी. हिनें मथुरेंत एक बौद्धस्तूप व मठ बांधला. त्यावर एक प्राकृत लेख आहे. त्यावरून हिच्या बापाचें नांव ‘ अधसिअ कुसुमअ ’ आणि मातेचें नांव ‘ अबुहोला ’. नदसीचा पुत्र खरोस्ट.

**नन्न रट्ट**—हा सौंदत्तीच्या रट्ट घराण्याचा मूळ पुरुष. याला कंठेय भारद व नन्नपय अशा पदव्या होत्या.

**नन्नदेव पांड्य**—इंद्रबळ पांड्यानंतरचा राजा.

**नन्नदेव राष्ट्रकूट**—हा कर्क राष्ट्रकूटाचा मुलगा. याचा मुलगा संगरगण.

**नन्नयभट्ट**—एक तेलगू ब्राह्मण कवि. हा स. ११ व्या शतकांत होऊन गेला. यानें प्रथमतः लहानपणीं वेदा-ध्ययन करून नंतर शास्त्राभ्यास केला. हा याज्ञिक क्रियेंत चांगला निष्णात असे. यानें स्वतः सोमादि यज्ञहि केले होते. यानें एक तेलंगी भाषेचें जें व्याकरण केलें आहे त्यास ‘ आंध्रकौमुदी ;’ असें नांव आहे. यानें नारायण-भट्ट नामक एका तैलंग ब्राह्मणाच्या साहाय्यानें महा-भारताच्या पहिल्या दोन पर्वांचें तेलंगांत जें भाषांतर केलें तें फारच उत्कृष्ट झालेलें आहे. तिसऱ्या पर्वास सुरवात केल्यावर हा वारला. नंतर तें बालसरस्वतीनें पुरें केलें. याला पूर्व चालुक्याचा आश्रय होता. हा शैव होता. याच्यामुळें शैव मताचा जोर वाढला. राजमहेंद्रीच्या नरेंद्र राजाचा याला आश्रय होता.

**नन्नुक चंदेल्ल**—याचा राज्यारोहणकाल स. ८३१ असा ठरला आहे. त्या काळीं हर्ष-शक चालू होता. हाच या घराण्याचा मूळ पुरुष होय. स. ८३१ मध्यें पडत्या सम्राटाशीं एखादी लढाई होऊन त्यांत नन्नुकास विजय

मिळाला असावा व त्यानें परिहारास हुसकावून देऊन बुंदेलखंडांत चंदेल्लांची राज्यस्थापना केली.

## चंदेल्ल ( महोबा ) घराणें—

१ नन्नुक ( स. ८३१ ), २ वाक्पति ( स. ८४५ ), ३ जयशक्ति ( स. ८६० ), ४ विजयशक्ति ( स.८८० ), ५ राहिल ( स. ९०० ), ६ हर्ष ( स. ९१० ), ७ यशोवर्मन् ( स. ९३० ), ८ धंग ( स. ९५० ), ९ गंड ( स. १००० ), १० विद्याधर ( स. १०२० ), ११ विजयपाल ( स. १०३० ), १२ देववर्मन् ( स.१०४० ), १३ कीर्तिवर्मन् (स. १०६०), १४ सल्लक्षण(स.११००), १५ जयवर्मन् ( स. १११० ), १६ पृथ्वीवर्मन् ( स. ११२० ), १७ मदनवर्मन् ( स. ११२५ ), १८ परमर्दिदेव ( स. ११६५ ), १९ त्रैलोक्यवर्मन् ( स. १२०३ ), २० वीरवर्मन्–राणी–कल्याणदेवी ( स. १२४५ ), २१ भोजवर्मन् ( स. १२८७ ).

यापुढें चंदेल्ल घराण्याचा थांग लागत नाहीं. पण कीरतसेनानें शीरशहास विरोध केला आणि प्रसिद्ध पराक्रमी राणी दुर्गावती हिनें अकबराच्या सेनापतींशीं लढाई देऊन रणांगणावर देह ठेविला. या दोन हकीगती मिळतात. हल्लीं चंदेल्लांचे वंशज बंगाल्यांतील प्रसिद्ध गिधोरचे महाराज होत.

**नमिसाधु**—हा धर्मानें श्वेतांबर जैन असून शालिभद्र नांवाच्या गुरूचा शिष्य होता. यानें रुद्रटाच्या काव्यालंकारावर स. १०६८–६९ मध्यें टीका लिहिली. याची टीका थोडक्यांत पण मुद्देसूद असून तींत अनेक ग्रंथांतील अवतरणें आहेत.

**नम्मालवार**—याची जात वेल्लाळ. याचा जन्म ताम्रपर्णी नदीच्या कांठीं तिनेवेल्ली जिल्ह्यांत झाला.

**नयचंद्रसूरि**—यानें रंभामंजरीं नांवाची नाटिका महाराष्ट्रींत लिहिली असून तींतील नायक जयचंद्र गाहडवाल आहे. त्याच्या स्तुतिपर वैतालिकाच्या तोंडीं एक पद्य मराठींत आहे. त्यावरून हा महाराष्ट्रीय कवि असावा.

**नयपाल**—( स. १०३८–५९ सुमार ) हा बंगाल्यांतील पाल घराण्यापैकीं पहिल्या महीपालाचा मुलगा. अतिश नांवाचा बौद्धधर्माचा प्रचारक याच्या कारकीर्दींत स. १०४२ मध्यें तिबेटास गेला ( हि. भा. अ. पा. ३४४ ). पण दुसरीकडे याचा काल स. १०६९–८४ असा आढळतो.

**नयसेन**—( स. १११२ ) हा १२ व्या शतकांत होऊन गेलेला कानडी कवि. यानें 'धर्मामृत' नांवाचा ग्रंथ स. १११२ त मुलुगंद ( जि. विजापूर ? ) येथें लिहिला. गुरु–गुणचंद्र. यानें एक व्याकरण लिहिलें असावें असें नागवर्मा याच्या म्हणण्यावरून दिसतें, पण तें उपलब्ध नाहीं. धर्मामृत (काव्यरत्न) या नीतिग्रंथांत चौदा प्रकरणें असून त्यांत धैर्य, सत्य, न्याय वगैरे सद्गुणांबद्दल उत्तम भाषेंत विवेचन केलें आहे. धर्मामृताशिवाय या जैन कवीचा कोणताहि ग्रंथ उपलब्ध नाहीं ( क. क. च. भा. १, पा. ११७ ).

कानडी ग्रंथलेखनाला सुरुवात करून संस्कृत शब्दांचा मुक्तहस्तानें उपयोग करणाऱ्या ग्रंथकारांना कवि कोण म्हणेल ? कानडींत संस्कृत शब्द मिसळणें म्हणजे तुपांत तेल मिसळणें होय, असें यानें म्हटलें आहे.

**नरपति**—सीसोदें येथील राणाशाखेंतील माहपाचा पुत्र. याचा हरसू व नरु या नांवांनींहि उल्लेख येतो. याचा पुत्र दिनकर ( रा. इ. ).

**नरभट**—मंदोरच्या प्रतिहारांपैकीं रज्जिलाचा पुत्र. हा अत्यंत शूर असल्यामुळें यास पेल्लापेल्लि असें म्हणत ( रा. इ. ).

**नरवर्धन**—हा बैसवंशी रजपूत पुष्यभूतीचा पुत्र. याच्या पत्नीचें नांव वज्रिणीदेवी. पुत्र राज्यवर्धन.

**नरवर्मा**—अज्ञातवंशज सिंहवर्म्याचा पुत्र. याच्या वेळच्या एका शिलालेखांत याला महाराज म्हटलें आहे. त्यावरून हा मांडलिक असावा. याचा नातू गुप्तवंशी कुमारगुप्ताचा मांडलिक होता. त्यावरून हा दुसऱ्या चंद्रगुप्ताचा मांडलिक असणें शक्य आहे ( एपि. इंडि. भा. १२, पृ. ३२०–३२२ ).

२. मेवाडच्या गादीवर हा शुचिवर्म्यानंतर आला. याच्यानंतर कीर्तिवर्मा आला.

**नरवर्मा परमार**—( मृ. स. ११३४ ) माळव्याच्या परमारांपैकीं उदयादित्याचा दुसरा मुलगा. हा आपला भाऊ लक्ष्मदेवानंतर गादीवर आला. प्रबंधचिंतामणिमध्यें याला यशोवर्मा असें म्हटलें आहे तें चूक आहे (सिद्धराज). जयसिंह हा आपल्या मातेसह सोमनाथाच्या यात्रेला गेला होता. तेव्हां यानें गुजराथवर स्वारी केली. तेव्हां जयसिंहाचा मंत्री सांतु तेथील कारभार पाहत होता. त्यानें याला 'कोणत्या अटीवर परत जातां ?' म्हणून विचारलें असतां यानें राजाच्या यात्रेचें पुण्य मिळत असल्यास परत जाण्याचें कबूल केलें. सांतूनें तें मान्य केलें व हा परत आला. पण ही गोष्ट जयसिंहाला आवडली नाहीं व तो याच्यावर चालून आला; व यानें राज्य दडपीत धारानगरीपर्यंत येऊन पोंचला. बांसवाडा राज्यांत तळवाडा गांवांत

एका देवळांत गणपतीच्या आसनावर जयसिंहाच्या वेळचा एक लेख कोरला आहे. त्यांत भमि, कर्ण व जयसिंह अशी वंशावळ आहे व जयसिंहानें नरवर्म्याला पराभूत केल्याचें लिहिलें आहे ( राजपुताना म्युझियम्, अजमेर, स. १९१४–१५ चा वृत्तांत, पृ. २, ले. ४ ). ही स्वारी बारा वर्षे चालली होती. अशांत वि. सं. ११९० कार्तिक शुद्ध ८ ला हा परलोकवासी झाला. याचा पुत्र यशोवर्मा गादीवर आला व त्यानें युद्ध पुढें चालविलें.

नरवर्मा विद्वान् होता. त्याच्या वेळची वि. सं. ११६१ ( स. ११०४ ) मधील नागपूरची प्रशस्ति यानें स्वतः केली आहे. उदयादित्याचा वर्ण व नाम आणि धातु यांच्या प्रत्ययाचा नागबंध यानें वरील ठिकाणीं कोरला आहे. जैन व वेदमतावलंबी यांच्यांत याच्या वेळीं शास्त्रार्थ होत. जैन पंडित समुद्रघोष व वल्लभसूरि यांचा यानें सन्मान केला होता. याच्या वेळचे दोन शिलालेख मिळाले आहेत ( वि. सं. ११६१ मधील नागपूरचा ( एपि. इंडि. भा. २, पृ. १८२–८८ ) व ११६४ मधील मधुकरगड येथील ( एपि. इंडि. भा. ५ चें परिशिष्ट ले. सं. ८२ ).

**नरवाहन गुहिलोत**—( स. ९७१–७७ ) हा मेवाडच्या गादीवर अल्लटानंतर आला. हा अल्लटाचा पुत्र होता. शक्तिकुमाराच्या वि. सं. १०३४ ( स. ९७७ ) च्या शिलालेखांत 'कलांचा आधार, विजयाचें निवासस्थान, क्षात्रयांचें उत्पत्तिस्थान, वैभवाचें घर आणि विद्येची वेदी' असें याचें वर्णन आहे. याची राणी जेजय चौहानाची मुलगी होती (इंडि. अँटि. भा. ३९, पृ. १९१). मयूराचा पुत्र श्रीपति हा याचा अक्षपटलाधीश होता ( आहाडचा अप्रकाशित शिलालेख ). याच्या वेळची वि. सं. १०२८ ( स. ९७१ ) ची एक प्रशस्ति मिळाली आहे. तींत याच्या वीरतेची प्रशंसा आहे ( मुंबई ए. सो. ज. भा.२२, पृ. १६६–६७; ना. प्र. प. १, २५६–५९ ).

**नरसा नायक तुलुव**— ( स. १४९८–१५०५ ) हा विजयनगरच्या साळुव घराण्यांतील नरसिंहरायाचा महामंत्री होय. नरसिंहरायाचे दोन पुत्र अल्पवयी असल्याकारणानें त्यानें याला आपल्या पश्चात् राज्यकारभार पाहण्यास सांगितलें. पुढें ते दोघेहि राजपुत्र मारिले गेले. तेव्हां यानें राजपद बळकाविलें. हा स. १४९८ च्या सुमारास गादीवर बसला व सुमारें पांच वर्षे राज्य केलें. याच्यानंतर याचा पुत्र वीरनरसिंह गादीवर बसला.

याच्या बायका तिप्पाजी, नागला आणि ओबाम्बिका. कृष्णदेवराय तुलुव याच्या दुसऱ्या बायकोचा पुत्र होय.

**नरसा नायडू**—( स. १६०० सुमार ) विजयनगरच्या राज्यांतील उदिरिपिकोंड संस्थानच्या तिम्म नायडूचा मुलगा. यानें किल्ल्याची दुरुस्ती करून त्याभोंवतीं तट बांधले आणि आपली राजधानी वसवून आपला राजवाडा बांधला, वगैरे सुधारणा केल्या.

**नरसिंगमा**—विजयनगरच्या तिरुमल्ल आरविडूची पत्नी.

**नरसिंगराव धायगुडे**—पेशवाईतील हा एक सरदार असून प्रथम राघोबादादाचे बाजूस होता. पण जेव्हां हरिपंतानें राघोबादादाचा पाठलाग सुरू केला, तेव्हां यानें दादाचा पक्ष सोडला. त्यामुळें दादाचें लष्कर फारच घाबरें झालें. याचा महाल अंबे निजामाकडे गेला म्हणून हा रुसून निघून जाणार होता. तेव्हां हरिपंतानें याची समजूत केली. तरीपण हा स्वस्थ न बसतां पेशव्यांच्या मुलुखांत उपद्रव करूं लागला, तेव्हां नानानें याची जहागिरी जप्त करून याला कैद केलें ( स. १७८८ च्या सुमारास ). हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होता.

**नरसिंगराव वेरुळकर**—हे हैदराच्या दरबारीं पेशव्यांचे वकील होते. हे फार्सी भाषेत मोठे निपुण होते. यांचे चिरंजीव आनंदराव नरसी. नरसिंगराव हे टिपूच्या वेळींहि श्रीरंगपट्टण येथें होते ( ऐतिहासिक टिपणें पा. ५ ). यांच्या मृत्यूची बातमी असलेलें पत्र वरील ठिकाणीं छापलें आहे, पण त्यावर साल नाहीं.

**नरसिंह**—एकनाथाचा समकालीन व सामुद्रिकग्रंथाचा कर्ता.

**नरसिंह कलचुरी**—हा गयकर्ण व मुल्हणदेवी यांचा पुत्र.

**नरसिंह कवि**— 'शिवनारायणमंजमहोदयं' नाटिकेचा कर्ता. यानें आपला आश्रयदाता जो केओन्झरचा मंजराजा शिवनारायण याचें वैभव वर्णिलें आहे.

**नरसिंह गंग**—( स. १२५३-१२५६ ). हा पूर्व गंग घराण्यांतील अनंगभीमाचा मुलगा. याच्या बायकोचें नांव सितादेवी असावें. याच्यानंतर याचा मुलगा वीरभानू १ ला हा गंगाच्या गादीवर आला.

२. ( स. १२७५–१३०६ ) कलिंगच्या गंग घराण्यांतील पहिल्या वीरभानूचा मुलगा. हा आपणास 'प्रताप अनन्तवर्मन्' असें म्हणवीत असे. याच्यानंतर याचा मुलगा दुसरा वीरभानू हा गादीवर आला.

३. ( स. १३२५–५० मधून ) मधून कलिंगच्या गंग घराण्यांतील दुसऱ्या वीरभानूचा मुलगा. हा आपणास 'गजपति' असें म्हणवीत असे. याच्यानंतर

याचा मुलगा वीरभानू ३ रा हा गादीवर आला. याचा राज्याभिषेककाल स. १३२२-३ असा आहे.

४. ( स. १३७८-१३९७ ) त्रिकलिंगच्या प्राच्य गंगांपैकीं शेवटला राजा. याचा स. १३८५ मधला लेख उपलब्ध आहे. तिसऱ्या वीरभानूचा मुलगा. बायकोचें नांव पार्वती व मुलाचें नांव वीरभानु चौथा.

**नरसिंह गुप्त**—( स. ४६८-७२ ) हा मगध येथील राजा होय. याचा पिता पुरगुप्त, पण हा स्कंदगुप्तानंतर गादीवर आला. स. ४७२ पासून पुढील काल राज्यक्रांतीचा दिसतो.

यानें स. ५२८ मध्यें मध्यप्रांताचा राजा यशो-वर्मन् ( स. ५३३-३४ ) याच्या साहाय्यानें मिहिरकुलाचा पराभव केला व त्याला कैद करून हिंदुस्थानाबाहेर हाकून दिलें. पण मिहिरकुलानें काश्मीरच्या राजाशीं मैत्री करून याला पुढें गादीवरून पदच्युत केलें. इतक्या उलाढाली केल्यावर मिहिरकुल मरण पावला. याच्यानंतर याचा मुलगा दुसरा कुमारगुप्त हा स. ५३० मध्यें गादीवर आला ( B. ). यालाच बालादित्य म्हणत.

**नरसिंह ठक्कुर**—यानें मम्मटाच्या काव्यप्रकाशावर ' नरसिंह-मनीषा ' नामक टीका लिहिली आहे. याच्या टीकेंत चंडीदास, लाटभास्करमिश्र, सुबुद्धिमिश्र, मधुमतीकार ( रविभट्टाचार्य ), कौमुदीकार इत्यादि पूर्वींच्या काव्यप्रकाश-टीकाकारांचीं नांवें आढळतात. हा मोठा नैयायिक होता.

**नरसिंह(वर्मा) पल्लव**—(स. ६३०-६६८) हा जरी दुसऱ्या पुलकेशी प. चालुक्याचा मांडलिक होता तरी स. ६४२ मध्यें यानें त्याचा पराभव करून वातापी शहर लुटलें. पण त्याचा पुत्र विक्रमादित्यानें कांचीवर स्वारी करून चालुक्यांचा दरारा पुनः बसवला.

२. ( स. ६९०-७१५ ) हा पहिल्या परमेश्वर पोतवर्मन्चा पुत्र.

**नरसिंह(देव) बुंदेला**—( मृत्यु स. १६२६ ) हा मधुकरशाहा बुंदेल्याचा मुलगा. हा अकबराचे कारकीर्दींत जहांगीरचा नोकर होता. यानें अकबराच्या आज्ञेनें अबुल फज्ल यास ठार मारलें. जहांगीरनें यास चार हजारी मनसबदार केलें.

**नरसिंह(राय) साळुव**—( स. १४८६-१४९२ ) हा विजयनगरच्या तिसऱ्या विरूपाक्ष संगमाचा सेनापति. यानें त्याला पदच्युत करून राज्य बळकावलें.

२. ( स.१४९२-१५०५ ) याचें नातें उपलब्ध नाहीं. शेवटीं याला पुत्र नसल्यानें यानें आपला महामंत्री नरसा नायकाकडे मरतेसमयीं राज्य सोंपविलें. याचें घराणें शाल्व ऊर्फ साळुव. या तेलगू शब्दाचा अर्थ ससागा असा आहे. याच्या नांवामागें इम्मडी ( दुप्पट ) व वीर हे सन्मानाचे शब्द लावलेले असतात. यानें रायचूर व मुद्गल हे बळकट किल्ले आदिलशाहापासून घेतले. हा फार शूर व लोकप्रिय होता.

**नरसिंह होयसल**—( स. ११४१-७३ ) हा ( विष्णुवर्धन ) बिट्टिदेवाचा पुत्र. याच्या नांवामागें वीर किंवा विजय हे शब्द लावलेले असतात. याची पदवी जगदेकमल्ल. याची पत्नी एचलादेवी.

२. ( स. ११७३-१२२० ) हा वीरबल्लाळ होयसळचा मुलगा. यानें देवगिरीच्या यादवांना जिंकलें होतें. याला दोन बायका: काळला व पद्मला. जांवई तिसऱ्या राजराज चोलास यानें पल्लवाकडून बंधमुक्त केलें. याचा आश्रित कानडी जन्न कवि. जन्नानें अनंतनाथपुराण याचे वेळीं लिहिलें. जन्नाला कविचक्रवर्ति ही पदवी बल्लाळानें दिली.

३. ( स. १२५४-९१ ) हा सोमेश्वर होयसल व विजलादेवी यांचा पुत्र. यानें देवगिरीच्या यादवांना हाकून लावलें.

**नरसिंहाचार्य कालगांवकर**—( स. १७७० नंतर ) हा विद्वान् शिरोमणि कृष्णाचार्याचा नातू. हा त्यागी, विद्याव्यासंगी होता ( भा. व. खं. ३, ऐ. गो. १४-१५ ).

**नरसी मेथा**—( स. १४१५-८१ ) मीराबाईच्या समकालीन पण तिच्यापेक्षां हा श्रेष्ठ कवि होय. हा जुनागड येथील नागर ब्राह्मण. लहानपणांच याचे आईबाप वारल्यामुळें याचा प्रतिपाल याच्या चुलतभावानेंच केला. हा शिवोपासक असून बालपणापासून याचा कृष्णभक्तीकडे ओढा फार असे. साधूंच्या संगतींत भजन करण्यांत याचा वेळ जात असे. कांहीं वेळां हा स्वतः स्त्रियांच्या वेषांत गर्भ्याचा नाच करीत असे. ही गोष्ट याच्या आप्तांना आवडली नाहीं. इतकेंच काय पण त्याचा परिणाम इतका झाला कीं, नरसीच्या या कृत्यांची वार्ता ऐकून त्याला देऊं केलेली आपली मुलगी सुद्धां एकानें देण्याचें नाकारलें. यानें कृष्णभक्ति हें आपलें अंतिम ध्येय ठरविलें होतें व त्यांत हा सदा चूर होता. याची कविता रसाळ असून त्याचे दोन भाग पडतात: ( १ ) शृंगारपर, ( २ ) भक्तिपर.

**नरसो गोविंद बोधले**—पंढरपूरनजीक भटउंबऱ्याचे राहणार. ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. रामराजापासून पेशवाईअखेर यांचे पुरुष मराठेशाहींत पराक्रम

करीत होते. यांचे अस्सल कागद मं. तृ. सं. वृ. पृष्ठ २८ व ५७ येथें छापलेले पाहावे. यानें बारभाईविरुद्ध दादास कसून साह्य केलें ( खरे ले. २१२४-५० ).

**नरहर बल्लाळ रिसबूड**—( मृत्यु स. १६-२-१७६९ ) हा नागपूरचा सुभेदार असून प्रसिद्ध विठ्ठल बल्लाळ सुभेदार याचा मामा होता. जानोजी व मुधोजी यांचे भांडणांत इतर प्रसिद्ध सरदारांबरोबर हा जानोजीस मिळाला. पेशव्यांनीं जानोजीवर स्वारी केली असतां जानोजींची कुटुंबांतील मंडळी गाविलगडास असल्यामुळें त्यांचे रक्षणाकरितां जानोजीनें यास त्या बाजूस पांच हजार सैन्यानिशीं ठेवलें. पंचगव्हाण येथें याचा मुक्काम असतां पेशव्यांचे फौजेनें याजवर छापा घातला. त्या लढाईंत हा मारला गेला ( पे. द. २०. २२४ ).

**नरहरि**—मराठी कवि. ग्रंथ—शकुनवंती ( ले. का. १६९५ ), गंगारत्नमाला.

२. मराठी कवि. ग्रंथ—शतकत्रय.

३. ( जन्म स. १५०५ ) एक हिंदी कवि.

एकदां एक कसाई गाईला घेऊन जात असतां, गाय कसायाच्या हातून सुटून याच्या घरीं येऊन लपली. तेव्हां यानें ती गाय कसायास परत देण्याचें नाकारलें व एक कविता करून ती गाय अकबरापुढें नेली. तेव्हां त्यानें आपल्या राज्यामध्यें गोवध बंद केला. यानें 'नीतिविषयक' दोन ग्रंथ लिहिले आहेत ( क. कौ. भा. १ ला ).

**नरहरि चक्रवर्ति**—( घनश्यामदास पाहा ).

**नरहरितनय**—मराठी कवि. ग्रंथ-मार्कंडेयचरित्र, ध्रुवचरित्र ( सं. सू. ).

**नरहरितीर्थ**—( समाधि स. १२९२ ) माध्वसांप्रदायाच्या पीठावरील एक आचार्य. यांचें पूर्वाश्रमांतील नांव शामशास्त्री. यांचे वडील कलिंगदेशच्या राजाच्या मुख्य मंत्र्याचें काम करीत होते. पुढें यांनीं कलिंगदेशचा कारभार हांकला ( शके ११८६ ). यांचे गुरु आनंदतीर्थ (मध्वाचार्य) बदरिकाश्रमीं कायमचें वास्तव्य करण्याकरितां निघून गेल्यावर ( शके ११९७ ) पद्मनाभतीर्थ त्यांच्या गादीवर होते व पद्मनाभतीर्थांच्या समाधीनंतर ९ वर्षेपर्यंत त्या गादीचें काम यांनीं पाहून श्रीमुख संवत्सरीं दशममासीं शुद्ध सप्तमीस हे समाधिस्थ झाले.

**नरहरिदास**—मराठी व रामदासी कवि. हा कोरेगांव व संगम माहुली येथें राहत असे. यानें ' अभंगरामायण ' नांवाचा एक ग्रंथ लिहिला. हा कोरेगांवच्या बोकिलांपैकीं असावा ( मं. षां. वृ. शं. १८३४, ले. ४२ ).

गुरुपरंपरा—समर्थ-अनंत—मेरु- श्वेतगोविंद —नागेश—राजाराम—महादेव—हरिदास—नरहरि.

**नरहरि धुंडिराज मालु**—याचे कांहीं अभंग व पदें असून 'मालुतारण' व 'भक्तिकथामृत' असे दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. याचा ग्रंथ दिसावयास उत्तम असला तरी प्रसिद्ध माहितीखेरीज अधिक दिलेली माहिती कल्पित म्हणजे खोटी आहे ( मं. तृतीय सं. श. १८३७, पा. १२० ).

हे जातीचे सोनार. गुरुपरंपरा—मालो—नरहरि—महिपति ( ताराबादकराहून भिन्न ). भक्तिकथामृत ग्रंथाऐवजीं सं. सू. कारानें भक्तिकथासार असा ग्रंथ दिला आहे.

**नरहरि महीपति**—( समाधि स. १८२३ ) ह्या संतकवीनें मराठी भाषाद्वारें तत्त्वज्ञानाची अपूर्व कामगिरी बजाविली. ह्याचें आडनांव केरसुणे असून हा देशस्थ ऋग्वेदी विश्वामित्रगोत्री ब्राह्मण होय. याचे वडील पेशव्यांचे कारकून होते. यांचें मूळचें नांव सखाराम असून पुढें नाथपंथाची दीक्षा घेतल्यावर ह्यांना महीपतिनाथ हें नांव प्राप्त झालें. बालपणींच आईबाप वारल्यानें वडील बंधूनें ह्यांचें पालन व १२ व्या वर्षी लग्न केलें. हें कुटुंब लवकरच वारलें. पुढें लवकरच ह्यांना वैराग्य प्राप्त होऊन हे आळंदीस गेले. ह्यांचे गुरु शिवदिन—केसरी—शिष्य—नरहरी हे होत. हे ' ढोलीबुवा ' संप्रदायाचे संस्थापक होत. ह्यांच्या कीर्तनाची छाप बरीच पडत असे, त्यामुळें यशवंतराव होळकरांनीं दोन गांवें, यशवंतरावची मुलगी भीमाबाईनें एक गांव व पेशव्यांनीं कांहीं द्रव्य यांस दिलें. परंतु यांनीं द्रव्याचा स्वीकार केला नाहीं. दौलतराव शिंद्यांनीं यांना गुरु केलें. ह्यांची अप्रसिद्ध कविता मठांत आहे. ह्यांचें अभंगात्मक विस्तृत भक्तचरित्रहि उपलब्ध आहे. ह्यांनीं ग्वाल्हेरला समाधि घेतली ( महाराष्ट्र कविचरित्र भाग ६, पृ. १८३—२१२).

**नरहरि मोरेश्वर**—( स. १७२८—१७७८ ) याच्या वडिलांचें नांव मोरोजी नरहरी असून यानें रामदास-संप्रदायी भीमस्वामी यांजपासून गुरूपदेश घेतला. हा निजामशाहींतील बालाघाटाजवळ बीड परगण्यांतील (वीट) ईट गांवचा राहणारा. तुळापुरची भवानी ही याची कुलदेवता. ह्यास बजाजी असेंहि म्हणत. ह्यांचीं उद्योग, भीष्म, द्रोण व कर्ण हीं भारताचीं चार पर्वें उपलब्ध असून, त्यांपैकीं द्रोणपर्व मात्र प्रसिद्ध झालें आहे. ह्यानें मुक्तेश्वराचें बरेंचसें अनुकरण केलेलें दिसतें ( म. क. च. भा. २ रा, पृ. २६—३५ ).

उद्योगपर्वांत यांची थोडी माहितीहि आढळते. त्यावरून उद्योगपर्वाचा रचनाकाल शके १६८१ प्रमाथीनाम संवत्सरे

कार्तिक शु. २ ( यमद्वितीया ) असा येतो. त्या दिवशीं हें पर्व संपलें ( मं. वार्षिक १८३७ पा. १८६-८८ ). यांची भाषा चांगली आहे.

हेच नरहरि रामदासी असावेत. परंपरा—समर्थ-भीमस्वामी-नरहरि ( श. १६५०-१७०० ). रामदासी नसल्यास भक्तविजयांत मोरेश्वर तांबवेकर ( श. १६०० ) यांचा निर्देश आहे त्यांचे हे शिष्य काय ?

ग्रंथ-आर्याटीका, रामजन्म ( १६९० ), शतमुखरावणवध, भारत ( उद्योग, भीष्म, द्रोण, कर्ण पर्वे, अभंग वगैरे ), ( सं. सू. ).

**नरहरि ( राघवात्मज )**—मराठी कवि. सौंदळ प्रांत गोत्र अत्रि. उपनाम नाफडे, माता जानकी, पिता राघव, गुरु व सांप्रदाय-श्रीमहालक्ष्मी. ग्रंथ-समश्लोकीगीता ( सं. सू. पुर. ).

**नरहरि रामदासी**—मराठी कवि. वामनाच्या धर्तीवर कविता करणारा. ग्रंथ—गंगावर्णन, कात्यायनीव्रत, नौकानयन, दानव्रत ( सं. सू. ).

**नरहरि रुद्र**—शिवाजीनें दक्षिण दिग्विजय करतांना पन्नास हजार लांच घेऊन अबदुल्लाखानें वेलोर शिवाजीच्या ताब्यांत दिला ( सरकार-शिवाजी-३४८ ). वेलोरजवळ दोन टेकड्या होत्या; तेथें किल्ले बांधून त्यांचीं नांवें साजिरा व गोजिरा अशीं ठेवलीं व नरहरि रुद्रास हवालदार नेमलें. हा पुढें राजारामाच्या कारकीर्दींत महत्त्वास चढून यास सेनाकर्तें हें पद मिळालें ( स. प. पृ. १८२ ).

**नरहरिसुत**—मराठी कवि. एकनाथचरित्रकार मुकुंदराजाचें चरित्र करणारा ( सं. सू. ).

**नरहरि सोनार**—( समाधि स. १३१४-माघ कृ. १ शके १२३५ ) प्रथम हा देवगिरीस व नंतर पंढरीस राहिला. वडिलांचें नांव दिनानाथ. प्रथम कट्टा शैव पण पुढें विष्णुदास होऊन भागवत धर्माची दीक्षा घेतली. हा ज्ञानेश्वराचा समकालीन असून त्याजवर याचा फार भाव होता. ह्याच्या नांवावर ३०-४० अभंग आहेत. हा लिंगायत होता, असें भक्तविजयांत म्हटलें आहे ( अ. २० ). ह्याची समाधि पंढरीस आहे ( म. सा. १. १६६-६७ ).

**नरेंद्रकवि**—(स. १२८८) हा महानुभाव सांप्रदायापैकीं असून यानें रुक्मिणीस्वयंवर नांवाचा काव्यग्रंथ लिहिला आहे ( शके १२१० ). यानें तो रामदेवराव जाधव यास वाचून दाखविला होता.

**नरेंद्रगुप्त**—एक बंगालचा राजा. याला शशांक असेंहि म्हणत. यानें राज्यवर्धनाला आपल्या महालांत नेऊन विश्वासघातानें ठार मारलें. पुढें हर्षवर्धनाच्या भंडी नांवाच्या मंत्र्यानें याचा सूड घेऊन याला ठार केलें ( हर्षचरितम् ).

**नरेंद्रदेव**—( स. ७०० ) हा नेपाळच्या ठाकूरी वंशांतील राजा. हा चंद्रकेतुदेवाच्या मागून गादीवर बसला. हा बौद्धधर्माचा अभिमानी होता.

**नरेंद्रसेन वाकाटक**—( स. ४३५-७० ) हा दिवाकरसेन वाकाटकाच्या मागून गादीवर बसला. प्रवरसेन ऊर्फ दामोदरसेन हा याचा पिता होय.

**नरेंद्रादित्य**—( स. ३००-४०० ) काश्मीरचा राजा. यानें अमरावतीचें सुंदर देवालय बांधलें.

**नरोत्तमदास**—( ज. स. १४९२-मृ. स. १५४४ ) एक हिंदी कवि. सितापूर जिल्ह्यांतील वाडीचा राहणारा. ग्रंथ-१ सुदामचरित्र, २ ध्रुवचरित्र ( अप्रसिद्ध ).

**नऱ्होजी जाचक**—हा पहिल्या रघूजीच्या प्रमुख मराठे सरदारांपैकीं एक होय. रघूजीच्या मृत्यूनंतर त्याचे मुलगे जानोजी व मुधोजी यांच्यांत भांडणें सुरू झालीं. तेव्हां हा जानोजीचे बाजूस होता. स. १७५७ ते ५८ त जानोजीच्या निजामअलीशीं झालेल्या युद्धांत हा जानोजीकडून हजर होता.

हा मूळचा वर्धा जिल्ह्यांतील राहणारा. हा बारभाटीच्या किल्ल्यावर पहिला किल्लेदार होता. याचे वंशज वर्धा जिल्ह्यांत आर्वी तहसलींत सोरठा वगैरे गांवचे मालगुजार आहेत ( ना. प्रां. इ. ).

**नलिनपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं चाळिसावा सिद्ध. जात क्षत्रिय. राहण्याचें ठिकाण सालीपुत्र. यानें धातुपाद नांवाचा ग्रंथ लिहिला ( तं. ४८-६८ ).

**नल्लकवि**—कौशिकगोत्री छंदोग बालचंद्र मखींद्रपुत्र. याचा जन्म कुंभकोणमूच्या जवळ कंडरमाणिक्य अग्रहारांत झाला होता, व तो रामनाथमखींद्र व सदाशिवब्रह्मेंद्र यांचा शिष्य होता. यानें ‘ सुभद्रापरिणय ’ नाटक व ‘ शृंगारसर्वस्व ’ भाग लिहिला.

**नल्लसिंहभट्ट**—( स. १३०० ) विजयपाल राजाच्या लढाईचें वर्णन केलेला ‘ विजयपालरासो ’ नांवाच्या ग्रंथाचा कर्ता असून एक हिंदी कवि म्हणून हा प्रसिद्ध आहे. ह्यानें लिहिलेल्या हम्मीरपर्यंतच्या वीररसप्रधान काव्याचा इतिहासाला फार उपयोग होतो.

**नवलक्ष साळ्या**—जोगा परमानंदाचें नामांतर.

**नवलसिंह**—हा हिंदी कवि. झांशीचा राहणारा व समभर नरेश हिंदुपति याचा आश्रित होता. याचा कल भक्ति व ज्ञान यांकडे विशेष होता. ह्याचे ग्रंथ-रासपंचा-

ध्यायी, रामचंद्रविलास, नामचिंतामणि, अध्यात्मरामायण, सीतास्वयंवर, पूर्व शृंगारकांड, जन्मखंड.

**नवलोजी गुजर**—दुसऱ्या रघूजी भोसल्याची बहीण ठकाबाई यास दिली होती. याचा पुत्र गुजाबा.

**नसीब पूर्वी**—( राज्यारोहण स. १५२३ ) बंगालचा सुलतान. अलाउद्दीन पूर्वीचा पुत्र.

**नसीम**—( स. १८१०–१८४२ ) एक ऊर्दू कवि. याचें नांव पंडित दयाशंकर कौल. गांव लखनौ. याचें 'गुलजार नसीम' हें काव्य प्रसिद्ध आहे. शिवाय एक दीवाणहि आहे ( क. कौ. ४ ).

**नसीरखान**—गुजराथचा सुलतान जो मुज्फर २ रा त्याचा हा एक मुलगा होय.

**नहपान क्षत्रप**—याचें राज्य दक्षिणेंत नाशिक, पुणें, गुजराथ, काठेवाड, माळवा व राजपुतान्यांत पुष्करच्या उत्तरेच्या भागापर्यंत होतें. याला शा. शक ४१–४५ पर्यंत शिलालेखांत क्षत्रप असें लिहिलें आहे ( एपि. इंडि. भा. १०, ले. ११३३–३४). पण याचा मंत्री अयम (अर्यमन्) याच्या शा. शक ४६ च्या लेखांत यास महाक्षत्रप म्हटलें आहे ( एपि. इंडि. भा. १०, परिशिष्ट ले. ११७४ ). याची कन्या दक्षमित्रा ही दीनीकपुत्र उषवदाताला दिली होती. उषवदात याचा सेनापति होता. शेवटीं आंध्र राजापैकीं गौतमीपुत्र शतकर्णीनें याला ठार करून याचें बहुतेक राज्य घेतलें असें दिसतें ( रा. इ. ). याची राजधानी जुन्नर येथें होती ( इंडि. अँटि. ऑगस्ट १९३६ ).

**नंद**—बुद्धदेवाचा सावत्र भाऊ. याला बुद्धदेवानें आपला शिष्य केला होता. हा लहान होता तेव्हां हा बुद्धदेवाशीं खेळत असे. लिच्छवीच्या राजानें शाक्यांच्या राजधानींत एक हत्ती भेट म्हणून धाडला होता. त्याला ठोसा मारून देवदत्तानें ठार केलें, तो रस्त्यांत पडला असतां यानें त्याला बाजूला ओढून टाकला. गौतमबुद्धानें त्याचें शेपूट धरून त्यास नगराबाहेर फेंकलें. त्या वेळीं नंद व बुद्ध यांचें वय दहा वर्षांचें होतें.

**२.** ( दुसरा जाम निझामुद्दीन पाहा ).

**नंदकुमार**—एक बंगाली ब्राह्मण. वीरभूम जिल्ह्यांत स. १७२० त जन्मला. सुजाउद्दौलाच्या हाताखालीं हा नोकर होता. हा नबाबाचा नोकर असून इंग्रजांस आंतून फितुर असे. नंदकुमाराच्या मनांत त्याची वझिरी आपणास मिळावी असें होतें. हेस्टिंग्ज नंदकुमार यास कामापुरता हातीं घेई. त्यानें ( नंदकुमारानें ) हेस्टिंग्जवर बेगमांकडून लांच खाल्ल्याची फिर्याद आणली. सभासदांनीं हेस्टिंग्ज यास लांचाची रक्कम परत करण्यास हुकूम दिला. त्यामुळें तो नंदकुमारावर चिडला. त्यानें यावर आपल्याविरुद्ध कट केल्याची फिर्याद आणली. त्यांत तो निर्दोषी सुटला. यावर त्यानें ६ वर्षांपूर्वी खोटा दस्तऐवज केल्याची फिर्याद आणली. त्यांत यास फांशीची शिक्षा देण्यांत आली.

**नंददास**—हा सुरदासजीचा समकालीन होता. एक हिंदी कवि. याचें लक्ष सिंधुनद गांवांतील एका रूपवती कन्येवर बसलें होतें, पण गोसावी विठ्ठलनाथाच्या सदुपदेशानें याचा तो मोह सुटला. पुढें यानें त्यांना गुरु केलें. यानें लिहिलेलीं पुस्तकें–१ रास-पंचाध्यायी, २ अनेकार्थमाला ३ रुक्मिणी-मंगल, ४ हितोपदेश, ५ दशमस्कंध, ६ भागवत, ७ दानलीला, ८ मानलीला, ९ ज्ञान-मंजरी, १० अनेकार्थमंजरी, ११ रूप-मंजरी, १२ नाम-मंजरी, १३ नामचिंतामणि, १४ मालारस-मंजरी, १५ विरह-मंजरी, १६ नाममाला, १७ नासकेतु–पुराण ( गद्य ) आणि १८ शामसगाई, १९ भ्रमरगीत.

**नंदन**—मंख कवीच्या श्रीकंठचरित्राच्या परीक्षणार्थ काश्मीर येथें जमलेल्या तीस पंडितांपैकीं एक.

**नंद पंडित**—( स. १५९५–१६३० ) संस्कृतमधील धर्मशास्त्रकार. याचे ग्रंथ–१ विद्वन्मनोहर ( पराशरस्मृतिटीका ), २ प्रमिताक्षरा किंवा प्रतीताक्षरा ( मिताक्षराटीका ), ३ श्राद्धकल्पलता, ४ स्मृतिसिंधु ( महेंद्र घराण्यांतील हरिवंशवर्मन्‌च्या सांगण्यावरून ), ५ तत्त्वमुक्तावलि, ६ केशववैजयन्ती किंवा वैजयन्ती ( यांत कर्नाटकांतील विजयपूरच्या ब्राह्मणराजवंशांची माहिती आहे. कोंडप नायकाचा पुत्र केशव नायकाच्या नांवानें हा ग्रंथ आहे ), ७ दत्तकमीमांसा, ८ नवरात्रप्रदीप, ९ हरिवंशविलास, १० काशीप्रकाश, ११ तीर्थकल्पकता, १२ शुद्धिचंद्रिका, १३ कालनिर्णयकौतुक, १४ ज्योतिःसारसमुच्चय, १५ स्मार्तसमुच्चय.

याचा पूर्वज लक्ष्मीधर हा विदरचा राहणारा. तेथून तो काशीस गेला. लक्ष्मीधरापासून हा सहावा पुरुष. हा विनायक पंडित या नांवानेंहि प्रसिद्ध आहे. याच्या पित्याचें नांव रामपंडित ( काणे ).

**नंदराज**—( स. १७५७–६० ) म्हैसूरचा दिवाण.

**नंदलाल मंडलोई**—( मृत्यु स. १७३१ ) इंदूरचा मोठा जमीनदार. मूळ गांव कंपेल ( इंदूरजवळ ). पिता चुडामण. गौड ब्राह्मण. गोत्र भारद्वाज. याच्या मदतीनें मराठ्यांचा माळव्यांत प्रवेश झाला. याचा व जयसिंगाचा स्नेह होता. याचा पुत्र तेजकर्ण. याच्या मागें राव असें गौरवार्थ लावतात.

**नंदीवर्धन**—महावीर जैनाचा भाऊ. पत्नी चेतक-कन्या ज्येष्ठा.

**नंदीवर्मन् पल्लव**—( स. ४२५–५० ) एक राजा.

२. ( स. ७१७–७७९ ) कोंजिवर्मन् येथील पल्लव घराण्यांतील हिरण्याचा हा मुलगा. हा स. ७१० च्या सुमारास राज्य करीत असून त्या वेळीं याची भरभराट होती. यानें पूर्व चालुक्य घराण्यांतील तिसऱ्या विष्णुवर्धनाचा प्रांत जिंकला. याशिवाय यानें पल्लव राजा चित्र-माय यास ठार मारिलें आणि सावर उदयन व निषाद पृथ्वीव्याघ्र यांचा पराभव केला. यानें एकंदर ५० वर्षें राज्य केलें ( B. ). पश्चिम चालुक्य राजा विक्रमादित्य २ रा यानें याचा पराभव करून, कोंजेवरम् शहरांत शिरून भयंकर जुलूम केला ( B. ). ( उदयचंद्र पाहा. २ रा परमेश्वर-वर्मन् पाहा ).

३. ( स. ८३०–५४ ) दंतिवर्मन् पल्लवाचा मुलगा. पत्नी शंखद. अमोघवर्ष राष्ट्रकूटाला याची मुलगी दिली होती.

**नाग**—मंख कवीचे परीक्षक जे तीस पंडित त्यांतील एक वैय्याकरण व अलंकारशास्त्रज्ञ.

**नाग गुहिलोत**—( स. ६२६–८८ ) उदेपूरच्या गादीवरील महेंद्रानंतर गादीवर आला. ख्यातांत याला नागादित्य म्हटलें आहे. नागदानगर यानें वसविलें अशी लोकप्रसिद्धि आहे. शिलालेखांत नागद्याला नागऱ्हद किंवा नागद्रह लिहिलेलें आढळतें. कदाचित् त्यापूर्वींच्या नागांचा संबंध नागद्याशीं असेल.

**नागण्णा**—विजयनगरच्या दुसऱ्या देवराय संगमाचा महामात्य. याला धन्नायक किंवा धननायक अशी पदवी होती.

**नागचंद्र**—( स. ११०० ) हा कानडी कवि अभिनवपंप या नांवानेंहि प्रसिद्ध आहे. गुरु बाळचंद्रमुनि. हा जैन होता. द्वारसमुद्राच्या पहिल्या बल्लाळ राजाच्या पदरीं कांति नांवाची विदुषी होती तिच्या व याच्या संवादाच्या कविता व समस्या उपलब्ध आहेत. त्यावरून याचा वरील काल ठरतो.

ग्रंथ—१ रामचंद्रचरित्रपुराण ( पंपरामायण ), २ मल्लिनाथपुराण, शिवाय जिनमुनितनय, जिनाक्षरमाले इत्यादि अनेक ग्रंथ यानें केले असें देवचंद्रा (स.१८३८)नें आपल्या राजावलिकथेंत लिहिलें आहे. परंतु प्रसिद्ध झालेल्या 'जिनमुनितनय' या ग्रंथाचें वरील दोन्ही ग्रंथांशीं बिलकुल साम्य नाहीं. त्यामुळें कोणीतरी याच नांवाच्या आधुनिकानें तो ग्रंथ केलेला दिसतो. हस्तलिखितांत अभिनव नागचंद्र असें नांव आहे. उपलब्ध जिनाक्षरमाले हा ग्रंथ पोन्नाचा असावा. शिवाय याचाहि एखादा असेल.

मल्लिनाथपुराण विजापूरला मल्लिनाथमंदिरांत लिहिलें ( क. क. च. भा. १, पा. १०१ ).

**नागरिदास**—( कविताकाल स. १७२२–१७६१, मृत्यु स. १७६४ ) हा कृष्णगड( राजपुताना )चा राजा व एक हिंदी कवि. ह्याच्या बापाचें नांव राजसिंह असून हा राठोड क्षत्रिय होता. ह्याचें मूळचें नांव सावंतसिंह. हा कवि असूनहि शूर होता. ह्यानें मराठ्यांच्या मदतीनें भावापासून गादी मिळविली. पण गृहकलहामुळें ह्याला पुढें वैराग्य आलें, व हा वृंदावनास गेला. ह्याचे ग्रंथ—शृंगार-सार, गोपीप्रेमप्रकाश, पदप्रसंगमाला, व्रजवैकुंठतुला इत्यादि. पुष्कळ लहान लहान भक्तिप्रधान काव्यें यानें केलीं आहेत ( क. कौ. १ ).

**नागदेवाचार्य**—( स. १२३६–१३०२ ) हा चक्रधर कृष्णाचा शिष्य. हा महानुभावपंथाचा संघटनाचतुर प्रचारक होता ( चक्रधर पाहा ).

**नागपाल**—सीसोदें येथील राणाशाखेंतील हा जसकरणाचा पुत्र. याचा पुत्र पूर्णपाल.

**नागबोधिपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं शहात्तरावा सिद्ध. हा जातीनें ब्राह्मण असून नागार्जुनाचा शिष्य होता. यानें आदियोग भावना नांवाचा ग्रंथ लिहिला.

**नागभट प्रतिहार**—( स. ७२५–४० ) रघुवंशी प्रतिहारांपैकीं हा पहिला पुरुष आहे. याच्यापासून या वंशाची वंशावळ मिळते. याला नागावलोक असेंहि म्हणतात. भडोच जिल्ह्यांतील अंकलेश्वर तालुक्यांतील हांसोट येथें दुसऱ्या भर्तृवठ्ठ ( भर्तृवृद्ध ) चौहानाचें दानपत्र वि. सं. ८१३ ( स. ७५६ ) मधील मिळालें आहे. त्यावरून तो नागावलोकाचा सामंत होता असें दिसतें. त्या दानपत्रांतील नागावलोक व हा नागभट एकच असावा ( एपि. इंडि. भा. १२, पा. २०२–३ ). यावरून असें दिसतें कीं याचें राज्य मारवाडपासून भडोचपर्यंत होतें. याच्यावर मुसलमान बलुची लोकांनीं स्वारी केली होती, पण तींत मुसलमान बलच ( बलुची ) पराभूत झाले. ही स्वारी सिंधाकडून झाली होती ( प्रतिहार राजा भोजदेवाची ग्वाल्हेर प्रशस्ति, आर्किऑलॉजिकल सर्वे ऑफ इंडिया, १९०३–४ चा रिपोर्ट, पृ. २८० ).

याची राजधानी मंडोर ( जोधपुराजवळील ) होय. स्मिथच्या मतें याची राजधानी भिन( ल )माल ही होय. अरबांनीं सिंध घेतल्यावर त्यांनीं मारवाडवर मोर्चा

वळविला, त्या वेळीं नागभटानेंच त्यांची लाट थोपवून बाप्पा रावळाप्रमाणें कीर्ति मिळविली.

२. ( स. ८१५–३२ ) रघुवंशी प्रतिहारांपैकीं वत्सराजाचा पुत्र. याला नागावलोक असेंहि म्हणत. यानें चक्रायुधाचा पराजय करून कनोजचें राज्य घेतलें. याच्या वेळेपासूनच यांची राजधानी कनोज असावी. आंध्र, सैंधव, विदर्भ ( वऱ्हाड ), कलिंग व बंगाल येथील राजांना यानें जिंकलें. तसेंच आनर्त, मालव, किरात, तुरुष्क, वत्स आणि मत्स्य इत्यादि राजांचे डोंगरी किल्ले यानें घेतले, असें ग्वाल्हेरच्या प्रशस्तींत लिहिलें आहे ( आर्कि. सर्वे ऑफ इंडिया, १९०३–४ रिपोर्ट, पा. २८० ). राजपुतान्यांत ज्याची विशेष प्रसिद्धि आहे व ज्यानें पुष्करचे घाट तयार केले अशी प्रसिद्धि आहे तो नाहडराव म्हणजे हाच नागभट असावा. याच नांवाचा मंदोरचा प्रतिहार तो नव्हे. याच्या वेळचा एक शिलालेख वि. सं. ८७२ (स. ८१५) चा जोधपूर राज्यांतील कचकला येथें मिळाला आहे ( एपि. इंडि. भा. ९, पृ. १९९–२०० ). हा भगवतीदेवीचा परम भक्त होता. याला ईसरादेवी नांवाच्या राणीपासून रामभद्र नांवाचा पुत्र झाला वि. सं. ८९० भाद्रपद शुद्ध ५ ला हा मेला, असें जैन चंद्रप्रभसूरीनें आपल्या प्रभावकचरितांत लिहिलें आहे.

३. मंदोरच्या प्रतिहारवंशापैकीं नरभटाचा पुत्र. याला नाहड असेंहि म्हणत. यानें जोधपूर राज्यांतील मेडंतकपुर ( मेडता ) ही आपली राजधानी केली. याची राणी जज्जिकादेवी. तिच्यापासून यास तात व भोज असे दोन पुत्र झाले.

**नागराज**— ( ग्रंथलेखनकाल स. १३३१ ) यानें 'पुण्यश्रवांस' नांवानें पौराणिक पुरुषांच्या ५२ कथा लिहिल्या आहेत.

**नागरीदास**—वल्लभाचार्यांचा शिष्य.

२. स्वामी हरिदासाच्या शिष्यपरंपरेंतील एक.

३. हा गोस्वामी हितहरिवंशाच्या श्रीकृष्णचैतन्य महाप्रभूच्या संप्रदायांतील एक.

**नागलंबिका**—लिंगायत धर्मसंस्थापक बसवाची दुसरी बहीण. चन्नबसवाची आई.

**नागला**—विजयनगरच्या नरसिंहराय तुळुवाची दुसरी बायको.

२. ही पश्चिम चालुक्य सहावा विक्रमादित्य याचा सेनापति चामुंडराजाची मुलगी व इरूगाई याची पत्नी होय. वेंगीच्या लढाईंत वीर राजेन्द्र चोलांनीं हिचें नाक कापलें.

**नागवर्धन**—हा जयसिंह पश्चिम चालुक्याचा पुत्र. हा गुजराथच्या शाखेचा संस्थापक. हा आपणास 'जयाश्रय–त्रिभुवनाश्रय' वगैरे पदव्या लावी.

**नागवर्मा**—( स. ९८४ सुमार ) कानडी कवि व छंदःशास्त्रकार. हा जैन होता. गांव–वेंगीप्रांतांतील वेंगीपळु, गोत्र–कौंडिण्य, पिता–वेण्णमय्य, माता–पोळकव्वे. गुरु–अजितसेनदेव. वेण्णमय्य–दाममय्य–वेण्णमय्य–पोळकव्वे–नागवर्मा.

हा योद्धाहि असावा. याला राचमल्लाचा भाऊ रक्कसगंग ( स. ९८४ ) याच्या वेळीं चावुंडरायाचा आश्रय होता.

यानें 'छंदोंबुधि' हा छंदःशास्त्रावरील ग्रंथ बायकोला सांगितलेला आहे. बाणाच्या कादंबरीचा 'कर्नाटक कादंबरी' हा चंपूरूप संक्षिप्त अनुवाद यानें केला आहे.

२. (स.११४५ सुमार) कानडी कवि. पिता-दामोदर. जैन होता. याला जगदेवमल्ल चालुक्याचा आश्रय होता. याच्या वृद्धावस्थेंत हा जन्नाचा गुरु होता. ग्रंथ–काव्यावलोचन ( अलंकारशास्त्र ), वस्तुकोश ( संस्कृत कर्नाटक निघण्टु ), कर्नाटकभाषाभूषण ( व्याकरण ). जन्नाच्या लिहिण्यावरून असें दिसतें कीं यानें एक जिनेंद्रपुराण लिहिलें असावें. नाकिग असेंहि याचें नांव होतें.

३. ( स. १०७० ) कानडी कवि, ब्राह्मण व अद्वैती पंडित. ग्रंथ–चंद्रचूडामणिशतक. दुसरा सोमेश्वर ( प ) ( भुवनैकमल्ल ) चालुक्याचा उदयादित्य नांवाचा मांडलिक होता. त्याचा हा सांधिविग्रहिक होता. आदिपंपाला हा गुरु म्हणतो ( शिकारपूर नं. १२९ या शासनावरून ). यानें बलिपूर येथें घाट व देवळें बांधलीं आहेत.

**नागार्जुन**—( खि. पू. ३३–स. ३०० सुमार ) हा दक्षिण हिंदुस्थानांतील एक ब्राह्मण. नंतर हा बौद्ध झाला. हा रसायन, वैद्यक, वेदान्त आणि मंत्रविद्या यांत अत्यंत निष्णात होता. हा प्रथम जैन होता, नंतर बौद्ध झाला असें म्हणतात. हा पश्चिम हिंदुस्थानांतील मोठा पंडित होता, असें हु-एन्-त्संग म्हणतो. सुश्रुतसंहितेचा प्रतिसंस्कर्ता हाच होय असें डल्लन आपल्या टीकेंत म्हणतो. बौद्ध पंडित आर्यदेवाची व याची मुलाखत झाली होती. याला अदृश्य होण्याची विद्या येत होती. याचा चरित्रकार कुमारजीव म्हणतो, याला ज्योतिष व अनेक मौल्यवान् वस्तु तयार करतां येत होत्या.

बौद्धांच्या महायान पंथांतील माध्यमिक तत्त्वज्ञानाचा हा संस्थापक होता. याचा जन्म आंध्रराजा सद्वाह याच्या कारकीर्दींत विदर्भ देशांत महाकोसल येथें झाला. यानें आपल्या आयुष्याचीं बरींच वर्षें कृष्णानदीचे बाजूस

असलेल्या श्रीपर्वतावरील एका गुहेंत विचारांत घालविलीं. यानें राजा भोजदेवास बुद्धधर्माची दीक्षा दिली असें म्हणतात. हा ख्रि. पू. ३३ या वर्षीं होऊन गेला असें म्हणतात. पण तारानाथांचें म्हणणें हा स. ३०० मध्यें झाला असावा. कुमारजीवानें स. ४०१ मध्यें याच्या चरित्राचें चिनींत भाषांतर केलें आहे.

माध्यामिक तत्त्वज्ञानावरील याचे ग्रंथ—१ माध्यमिककारिका, २ युक्तिषष्टिकारिका, ३ विग्रहव्यवरात्निकाटिका, ४ विग्रहव्यवहृतिवृत्ति ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक ). यानें कानडींत व संस्कृतांत रसविद्येवर अनेक ग्रंथ केले आहेत. यानें माध्यमिक कारिकेवर 'अकुतोभया' नांवाची संस्कृतांत टीका लिहिली होती, पण ती सध्यां उपलब्ध नाहीं. याशिवाय मुक्तिषष्टिका, शून्यतासप्तति, प्रतीत्यसमुत्पादहृदय, महायानविंशक, धर्मसंग्रह, सुहृल्लेख इत्यादि अनेक ग्रंथ याचे नांवावर मोडतात. सुहृल्लेखांतील सुहृत म्हणजे सातवाहन असें चिनी प्रवासी इत्सिंग म्हणतो. हा सातवाहन म्हणजे गौतमीपुत्र यज्ञश्री ( स. १६६–१९६ ) हा होय. प्रज्ञापारमितासूत्रशास्त्र, दशभूमिविभाषाशास्त्र, एकश्लोकशास्त्र या टीका निःसंशय नागार्जुनाच्याच होत. परंतु तिबेटी भाषेंतील 'प्रज्ञादंड' ही याचीच असेल असें सांगतां येत नाहीं ( विंटरनिट्झ-हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर, भा. २ ).

नृपतुंग (स. ८१४–७७) नांवाच्या कानडी भाषेंतील कवीच्या (कविराजमार्ग) नांवाच्या छंदःशास्त्रावरील ग्रंथांत कानडींतील प्राचीन गद्य ग्रंथकारांचीं नांवें सांगतांना याचें नांव दिलें आहे. त्यावरून यानें कानडींत गद्यग्रंथ लिहिला असावा असें दिसतें ( क. क. च. भा. १, पा. ११ ).

हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं सोळावा सिद्ध होय. हा जातीनें ब्राह्मण असून कांची प्रांतांतील राहणारा होता. हा सरहाचा शिष्य ( सिद्धांची माहिती ).

यानें आपल्या जागीं आर्यदेवाची नेमणूक केली. शेवटीं याचा वादांत पराजित झालेल्या प्रतिस्पर्ध्यानें खून केला. नागपूरजवळ रामटेकपाशीं याची एक गुहा आहे.

**नागावलोक**—नागभटाचें नामांतर.

**नागी**—नामदेवाची दासी. हिचा निर्देश गोंदाच्या अभंगांत आहे.

**नागेश**—( स. १६७८ सुमार ) मराठी कवि. याचें समग्र नांव नागेश मोरेश्वर मुळे जोशी. हा वत्सगोत्री माध्यंदिन शाखेचा यजुर्वेदी ब्राह्मण. याचें आराध्यदैवत श्रीभांडेश्वर. गांव भिंगार. याचा बाप पंचांग वर्तवणारा चांगला ज्योतिषी होता. आई जानकी. याची रचना वामनासारखी यमकबद्ध आहे. याचे ग्रंथ—सीतास्वयंवर, चंद्रावळ, रुक्मिणीस्वयंवर, रसमंजरी, शारदाविनोद ( मं. शके १८३४ चा अहवाल, पा. ५८–५९ ).

**नागेशभट्ट वैंकटेशभट्ट**—(स. १७४१-८२) एक विद्वान् सारस्वत ब्राह्मण. यांचे पूर्वज मारुतीचे उपासक होते. त्यांत यांनीं व्यंकटेशाच्या उपासनेची भर घातली. यांनीं धर्मशास्त्र व ज्योतिष यांवर पांचसहा मोठाले ग्रंथ लिहिले असें म्हणतात. त्यांपैकीं 'स्मृत्यर्थमुक्तावलि, तांत्रिकमुक्तावलि, आगमग्रंथ' हे तीन ग्रंथ धर्मशास्त्रविषयक असून 'आर्यातंत्र, आर्याकौतुक, महाबळसिद्धांत' हे तीन ग्रंथ गणितविषयक आहेत. यांपैकीं शेवटले दोनतीन ग्रंथ उपलब्ध नाहींत ( सारस्वत-रत्नमाला भाग पहिला, पा. २४-२९ ).

**नागोजी घाटगे**—( मृ. स. १६३३ ) स. १६२६ मध्यें इब्राहीम आदिलशहानें यास सरदेशमुखी व झुंजारराव हा किताब दिला.

**नागोजीभट्ट**—(स. १७००--५० सुमार) काशींतील एक महापंडित महाराष्ट्रीय ब्राह्मण. हा शिवभट्टाचा मुलगा होय. याचीं काळे व उपाध्याय अशीं दोन उपनामें आढळतात. यानें आपल्या पन्नासाव्या वर्षी सप्तशतीवर टीका लिहिली. हा वयाच्या ६२ व्या वर्षी काशीस वारला.

यानें रसमंजरी नांवाची टीका स. १७१३ त लिहिली असा उल्लेख आलेला आहे.

यानें व्याकरण, साहित्य, धर्म, योग, इत्यादि शास्त्रांवर ग्रंथ लिहिले आहेत. आचारेंदुशेखर, तिथींदुशेखर, तीर्थेंदुशेखर, प्रायश्चित्तेंदुशेखर, श्राद्धेंदुशेखर वगैरे ग्रंथ धर्मशास्त्रावर लिहिले आहेत.

महाभाष्यप्रदीपोद्योत, शब्देंदुशेखर ( लघु व बृहत् ), परिभाषेंदुशेखर, वैयाकरणसिद्धांतमंजूषा वगैरे ग्रंथ व्याकरणावर लिहिले आहेत. याशिवाय यानें अशौचनिर्णय, कुण्डपद्धति, गोत्रप्रवरनिर्णय, चंडीप्रयोग, सापिंडीमंजरी आणि काव्यप्रदीपोद्योत इत्यादि अनेक शास्त्रांत अनेक ग्रंथ लिहिले आहेत.

हा शृंगवेरपूरच्या बिसेन घराण्यांतील रामराजाचा आश्रित होता. हा हरि दीक्षितांचा शिष्य. त्याचप्रमाणें हा शंकरभट्टाचाहि शिष्य होता, असा उल्लेख आलेला आहे. यानें आपला शब्दरत्न नांवाचा व्याकरण विषयावरील एक ग्रंथ आपल्या गुरूस ( हरि दीक्षित ) अर्पण केल्याचा उल्लेख आला आहे. शब्दरत्न हा ग्रंथ भट्टोजी दीक्षिताच्या प्रौढ मनोरमेवरील टीका होय.

**नागोजी रताजी माने**—( स. १६९०-९७ ) हा म्हसवडचा. विजापूरकरांचा नामांकित सरदार. पुढें औरंगजेबास मिळाला. हा राजारामास येऊन मिळाला व यानें संताजीचा खून केला त्याबद्दल औरंगजेबानें यास इनाम दिलें ( जेधे शकावली ).

**नाचनसोम**—( स. १३००-१४०० ) तेलगू कवि. उत्तरहरिवंश काव्याचा कर्ता. यास 'सर्वज्ञ' म्हणतात. उत्तम कवीचे गुण याच्या काव्यांत आहेत ( तेलगू वाङ्मय, पा. १९ ).

**नाची**—इलेश्वरोपाध्याय नांवाच्या तेलगू पंडिताची ही मधली मुलगी. ही बालविधवा होती. हिनें संस्कृतांत एक नाटक रचिलें. त्यांत हिनें आपल्या जन्मापासून ते वैधव्य प्राप्त होईपर्यंतची हकिकत दिली आहे. ही शास्त्रांतील अनेक विषयांत पारंगत होती. संस्कृत नाटकांतील वीररसप्रधानवर्णन वाचून हिच्या बापानें त्या नाटकास 'नाची' हें नांव दिलें.

**नाचीराज**—( स. १४०० सुमार ) या कानडी ग्रंथकारानें अमरकोशावर कानडी भाषेंत टीका लिहिली. ती टीका नाचीराजीय या नांवानें प्रसिद्ध आहे ( क. क. च. भा. २, पा. ४०६ ).

**नाजी**—(ग्रंथकाल स. १७४०) ऊर्दू कवि. याचें नांव सय्यद मुहम्मद शाकिर. नाजी उपनांव होय. याच्या दीवानांतील निंदात्मक कविता चांगल्या आहेत. नादिरशाहानें दिल्लीवर स्वारी करून मुहम्मद मोगलाच्या सैन्याची केलेली धुळधाण यानें चांगली वर्णिली आहे ( क. कौ. भा. ४ ).

**नाझुकशाह**—( स. १५३९ सुमार ) काश्मीरचा राजा फत्तेशाहचा मुलगा.

**नाथ ( हरिनाथ )**—( काव्यकाल स. १७६८ ) एक हिंदी कवि. हा गुजराथी ब्राह्मण काशीस राही. यानें 'अलंकारदर्पण' नांवाचा एक छोटासा ग्रंथ लिहिला.

**नाथदास**—( स. १६८० सुमार ) एक मराठी कवि. 'मनश्चंद्रबोध' या ओवीबद्ध ग्रंथाचा कर्ता. 'रामचंद्र नाहीं घरीं काय मी करूं' या प्रसिद्ध पदाचे कर्ते. 'विक्रमरास' हा हरिदास कवीचा ग्रंथ आहे. हरिदास व नाथदास कदाचित् एक असतील ( म. क. च. भा. ३, पा. ५५-५८ ).

**नादिरशाहा**—( जन्म स. १६८७-१७४७ ) याचें दुसरें नांव तहमास्पकुली ऊर्फ नादिरकुलिखान. याचा जन्म स. १६८७ त खोरासानांत झाला. याचा बाप धनगर होता. लहानपणापासून याचें आयुष्य साहसांत गेलें. याचा स्वभाव क्रूर, विध्वंसक, परहितविषयीं निष्ठुर व मानवी संस्कृतीला विरोधी असे. हा १७ व्या वर्षी उझबेगाच्या कैदेंत होता. यानें अनेक लढाया करून इराणची हद्द वाढविली. तसेंच तुर्कांपासून आपले प्रांत परत घेतले. यानें पुढें अफगाणिस्थान काबीज केला. हा सुनीपंथी होता. यानें इराणामधील सर्व शिया लोकांस आपला पंथ स्वीकारण्यास भाग पाडलें. नादिरशहानें दिल्लींतील लोकांची कत्तल करण्याचा हुकूम आपल्या लोकांस सोडला. त्यांत २ लाख लोक मेले. दोन महिनेपर्यंत यानें दिल्लींत साडेचौदा कोटी रुपयांची लुटालूट केली. उत्तरोत्तर हा लोकांस अधिक छळत असे. यानें शियापंथी मुसलमानांस कोठेंच थारा दिला नाहीं. अफगाण लोक याच्या छळास फारच कंटाळले होते. याचा पुतण्या अलीकुलीखानानेंच याचा खून केला. याचा जन्म गरीब कुळांत झाला असून यास विद्या येत नव्हती; तरी हा आपल्या अक्कलेच्या जोरावर पुढें आला व अनेक राज्यांची यानें उलथापालथ केली ( बील ). हा जातीचा इराणी नसून तुर्क होता.

**नाथा**—हा सुप्रसिद्ध सुतार मंडन याचा भाऊ. यानें वास्तुशास्त्रावर 'वास्तुमंजरी' नांवाचा ग्रंथ लिहिला.

**नानक ( गुरु )**—(ज. स. १४६९-मृ. स. १५३८) हा शीखपंथाचा आद्य संस्थापक होय. हा पंजाबमधील तलवंडी येथील राहणारा. याच्या बापाचें नांव काळू व आईचें नांव तृप्ता. याच्या बायकोचें नांव सुलक्षणी असून तिला श्रीचंद व जयचंद असे दोन पुत्र झाले. हा जातीनें क्षत्रिय होता. ह्याची लहानपणापासूनची वागणूक अगदीं विरक्त माणसासारखी होती. याला शाळेंत जरी घातला होता तरी याचें शाळेंत मुळींच लक्ष नसे. हा नेहमीं तत्त्वज्ञानाच्या गोष्टी लोकांना सांगत असे. हा नेहमीं ( वयानें लहान होता तरी ) तत्त्वविचारांनीं परिपूर्ण अशीं काव्यें करी. त्यामुळें याच्याशीं कोणी वाद करण्यास तयार नसे. याचे व्रतबंधाचे वेळीं यानें उपाध्यायाला जानवें घालूं दिलें नाहीं. याच्या बापानें याला व्यापार करण्यास पैसे दिले असतां यानें ते सर्व गोरगरिबांस वांटून टाकले. हें पाहून याचे बापानें याला हाकलून दिलें; तेव्हां यानें दौलतखान नांवाच्या सुभेदाराजवळ पंडित या नात्यानें नोकरी धरली. याच वेळेस मर्दाना नांवाचा खाजगी नोकर याचेजवळ होता; व पुढें तो नानकाचा पट्टशिष्य बनला.

नानकानें आपल्या तेजस्वी वाणीनें व निरनिराळ्या चमत्कारांनीं दौलतखानास शिष्य बनविलें. पुढें यानें त्याची नोकरी सोडून देऊन, आपल्या मताच्या प्रसारार्थ निरनिराळ्या गांवीं पर्यटन करण्यास सुरवात केली. एकदां हा हरिद्वारास असतांना यानें तेथील ब्राह्मण नदींतून ओंजळी भरून पाणी पूर्वेकडे टाकीत आहेत असें पाहिलें. तेव्हां

यानें पश्चिमेकडे पाणी टाकण्यास सुरवात केली. तेव्हां यास 'हें तूं काय करतोस?' असें ब्राह्मणांनीं यास विचारले तेव्हां यानें ब्राह्मणांना उलट तोच प्रश्न केला. तेव्हां ते म्हणाले, 'आम्ही पूर्वजांस पाणी देतों.' तेव्हां हाहि म्हणाला, मी माझ्या शेंदोनशें कोस दूर असलेल्या शेताला पाणी देतों. तेव्हां सर्व ब्राह्मण हंसले. तेव्हां हा म्हणाला, माझें पाणी जर शेतावर जात नाहीं तर तुमचें पाणी तरी तुमच्या पूर्वजांना कसें पोहोंचेल? अशा प्रकारें अनेक युक्तिवाद करून यानें लोकांना आपले शिष्य केलें. यानें हिंदुस्थान, सिलोन, अफगाणिस्थान वगैरे देशांतून पायीं प्रवास केला.

यानें आपला मरणकाळ लोकांना अगोदरच सांगून ठेवला होता. त्यामुळें याच्या मरणकाळीं पुष्कळ हिंदु व मुसलमान जमले होत; व त्यांनीं याचे सांगण्याप्रमाणें याच्या शवाचा अंत्यविधि दोघांच्या पद्धतीप्रमाणें केला. याची समाधि अमृतसर येथें आहे.

याच्या धर्माचीं मुख्य तत्त्वें (१) जातिभेद असूं नये, (२) मूर्तिपूजा करूं नये, अशा प्रकारचीं होतीं. याच्या पंथाला शीख असें म्हणतात. याच्या पंथाचें वैशिष्ट्य असें आहे कीं हिंदु व मुसलमान जातीनें दोन नाहींत, प्रत्येकानें हातांत कडें, डोक्यांत कंगवा व जवळ कट्यार ठेवावी. याच्या पंथाचा प्रसार मुख्यतः पंजाबमध्यें विशेष आहे.

याच्या नांवावर प्रसिद्ध असलेला 'ग्रंथसाहेब' हा ग्रंथ शिखांचा धर्मग्रंथ आहे. या ग्रंथाचा कांहीं भाग पंजाबी (गुरुमुखी) भाषेंत व कांहीं भाग हिंदी भाषेंत आहे. हा ग्रंथ अनेक गोष्टींच्या संग्रहासारखा आहे. त्यांत याचीं फार्सी पदें व नामदेवाचे अभंग वगैरे आढळतात.

शिखांच्या दहा गुरूंचीं नांवें—

१ नानक, २ अंगद, ३ अमरदास, ४ रामदास, ५ अर्जुन, ६ हरगोविंद, ७ हररायदेव, ८ हरकिशनदेव, ९ तेगबहादुर, १० गुरु गोविंदसिंग.

**नाना करांडे**—(मृत्यु स. १७७५) हा रघूजी करांड्याचा दिवाण होता. याजवर साबाजी भोंसल्याचा फार लोभ होता. स. १७७५ त पांचगांवचे लढाईंत हा साबाजीकडून हजर होता. त्या वेळेस याला महिपतिराव सुभेदारानें भाल्यानें भोसकून ठार मारलें. हा साबाजीकडे चिटणीसाचें काम करीत असे (ना. प्रां. इ. पृ. २०६–२०७).

**नाना पाठक**—या गुर्जर पंडितानें नागोजीभट्टाच्या ग्रंथाचें खंडण केलें आहे. नागोजीखंडणकार म्हणून याची प्रसिद्धि आहे, पण याचे ग्रंथ शोधावयास पाहिजेत.

**नाना पुरंदरे**—(त्रिंबक सदाशिव पुरंदरे पाहा).

**नाना फडणीस**—(जन्म स. १७४२ फेब्रु. १२–मृत्यु स. १८००) मराठेशाहीच्या अखेरच्या कालांतील एक थोर मुत्सद्दी. याचें नांव बाळाजी जनार्दन भानु. हा नाना फडणीस या नांवानें सर्वत्र प्रसिद्ध आहे. याची माता रखमाबाई. ती मेहेंदळ्याच्या घरांतील. याचा जन्म साताऱ्यास झाला. याला १४ व्या वर्षी घराण्यांत चालू असलेल्या फडणिशीचीं वस्त्रें मिळालीं (स. १७५६ नवं. २९).

हा त्याच सालीं हैदरवरच्या स्वारींत गेला. पुढें तीन वर्षे पुण्यास राहून तीर्थक्षेत्रें पाहण्याच्या उद्देशानें पानपतच्या स्वारीवर गेला. पण पळापळ झाल्यावर 'शुद्ध लंगोटी लावून' 'गवतांत लपून' व 'बोरीचा पाला खाऊन' प्रवास करीत असतां वेष पालटून आलेली याची स्त्री यशोदाबाई ही भेटली. आई नाहींशी झाली. तिच्या शोधार्थ हिंगण्यास लिहिलेल्या पत्रांत 'ती शुद्ध असल्यास तिला पाठवावी, बाटली असल्यास परभारें गंगेस देह अर्पण करण्यास पाठवावी,' असें वाक्य आहे. शेवटीं चवदा महिन्यांनीं हा पुण्यास आला (१७६१ जुलै).

नारायणरावाच्या खुनापर्यंत मालक जागेवर असल्यानें कारभाऱ्यांना पूर्ण स्वातंत्र्य नव्हतें. पण नारायणरावाचा खून झाल्यामुळें कारभारी लोकांची जबाबदारी वाढली. माधवरावानें मरतेवेळीं केलेली व्यवस्था मोडून नारायणरावाचा खून करण्यांत आला; आणि रघुनाथराव पेशवा झाला. पण ही गोष्ट सखाराम बापूसारख्या कारभारी म्हणून प्रमुखपणें वावरणाराला सहज मान्य करणें शक्य नव्हतें. त्यानें रघुनाथरावाचा कारभारीपणा नाकारला आणि रघुनाथरावाला पदच्युत करून माधवरावाच्या वंशाला गादीवर आणण्याचें 'बारभाईचें कारस्थान' उभारलें. निजामावरील स्वारीच्या निमित्तानें रघुनाथरावाला सैन्यासुद्धां पुण्याबाहेर काढण्यांत आलें; आणि प्रथम गंगाबाईच्या नांवें आणि नंतर माधवरावाच्या नांवानें राज्यकारभार सुरू करून रघुनाथरावाचा पेशवाईवरील हक्क नष्ट केला. अशा प्रकारें बारभाईचें कारस्थान यशस्वी झालें आणि नाना प्रमुखपणें कारभार करूं लागले.

पण या राज्यक्रांतीचा फायदा दादाच्या साहाय्यानें इंग्रजांनीं घेण्याचें ठरविलें. त्यांनीं मराठ्यांचा सव्वीस लक्षांचा मुलूख काबीज केला. तेव्हां साष्टी, भडोच वगैरे सहा लक्षांचा मुलूख इंग्रजाला दिला आणि दादाला आपल्या ताब्यांत घेण्याचा पुरंदरचा तह घडवून आणला (स. १७७६). तसेंच हरिपंताकडून हैदर आणि महादजीकडून कोल्हापूरकरांचा बंदोबस्त केला (स. १७७७).

पण घरांत व बाहेर व्यवस्था लावल्यानें नानाला मिळालेला मोठेपणा कोणालाच सहन झाला नाहीं आणि नानाचा घरांतला प्रतिस्पर्धी मोरोबा फडणीसानें दादाला पेशवाईवर आणून नानाला व बाल पेशव्याला कैद करण्याचें ठरविलें; आणि त्यांत बहुतेक मुत्सद्दी व सेनापति सामील झाले. इंग्रज व निजाम यांचीं माणसें अशा संधीचा फायदा घेण्यास नेहमीं सज्ज असत. पण नाना मोठ्या शिताफीनें कटवाल्यांनीं कैद करण्याच्या वेळेला पुणें सोडून पुरंदरला निघून गेला. मोरोबानें पार्वतीबाईकडून कारभाऱ्याचीं वस्त्रें घेतलीं, इंग्रजांच्या वकिलाकडून आनंदाची बातमी म्हणून मुंबईस रवाना झाली. पण बापूच्या मध्यस्थीनें नानांनींहि कारभारीपणावरून दूर होण्याचें ठरविलें आणि आपल्या हातीं बाल पेशवा व पुरंदर हें ठेवलें. पण शिंदे, फडके वगैरे मंडळी सैन्यासह जवळ येतांच होळकराला फितूर करून मोरोबाला कैद करण्यांत आलें व नाना पुनः मुख्य कारभारी झाले ( स. १७७८ जुलै ११ ). या वेळीं इंग्रजांनीं उचल केली तेव्हां तळेगांवीं त्यांचा पूर्ण पराभव केला. पण दादा हातांत घेतल्याशिवाय इंग्रज स्वस्थ बसणारा नव्हता. शेवटीं नानाच्या मुत्सद्दीपणानें चहूंकडून तंबी बसतांच सालबाईचा तह होऊन साष्टीखेरीज मराठ्यांचा सर्व मुलूख व दादासाहेब यांना इंग्रजांनीं मराठ्यांच्या ताब्यांत दिलें व सहा वर्षे चाललेलें युद्ध संपून नाना स्थिर झाला ( स. १७८२ ).

यापुढील नानाचा कारभार मोठ्या डौलाचा झाला. सर्वत्र समतोलपणा राखण्याच्या कामीं नानांनीं अपूर्व यश संपादन केलें. सालबाईचा तह झाल्यानें महादजीचा उत्तरेकडील उद्योग निर्वेध सुरू झाला आणि इंग्रजांवर मात करून दिल्लीची बादशाही महादजीनें पूर्ण ताब्यांत घेतली. बादशहाला महिना ६५ हजारांचा तनखा घेणारा करून वकील मुतलकीच्या आणि मीरबक्षीगिरीच्या सनदा घेतल्या ( ता. ८-१२-१७८४ ). बादशहींत हा मान पूर्वी एकदां फक्त निजामुल्मुकला लाभला होता. याच सनदा पुढें संगमावर मोठा दरबार भरून तोफांच्या सलामींत पेशव्यांना अर्पण केल्या ( ता. २२-६-१७९२ ). अशा प्रकारें दिल्लीच्या राजकारणांत अपूर्व यश लाभल्यावर दक्षिणेंत खर्ड्याची लढाई झाली आणि पूर्वी कधीं मिळाला नव्हता एवढा मराठ्यांना निजामावर जय मिळाला ( स. १७९५ मार्च ). मराठ्यांच्या सत्तेला आजपर्यंत कधींहि न लाभलेला हा परमोच्च बिंदु होय.

पण येथून पुढें मात्र नानाच्या नशीबानें उलट खाल्ली आणि मराठी राज्याचे ग्रह फिरले. महादजी शिंदे व हरिपंत फडके हे नानाचे डावे उजवे हात आणि मराठेशाहीचे आधारस्तंभ कालाच्या तडाख्यांत सांपडले. सवाई माधवरावाच्या आत्महत्येमुळें मराठेशाहीवर मृत्युयोग ओढवला ( स. १७९५ ). आणि नानाचा वीस वर्षांचा उद्योग जमीनदोस्त होऊन पुनः पहिल्यापासून आरंभ करण्याची वेळ आली.

बाजीराव रघुनाथाशीं असलेला विरुद्ध संबंध लक्षांत घेऊन यानें त्याचा धाकटा भाऊ चिमाजी यास यशोदाबाईचे मांडीवर दत्तक देऊन आपण कारभार करण्याचें ठरविलें. पण शिंद्याच्या मदतीनें रावबाजीनें पेशवाई मिळविण्याचा प्रयत्न केला. बाळोबा पागनीस हा शिंद्याचा प्रमुख कारभारी होता. त्यानें परशुरामभाऊ पटवर्धन या नानाच्या एका विश्वासांतील सेनापतीसच नानाच्या विरुद्ध उभें केलें. तेव्हां नाना साताऱ्यास गेला आणि तेथून वाई व पुढें महाडाकडे रवाना झाला ( स. १७९६ मार्च २१ ). इकडे रावबाजी आपल्या ताब्यांत राहणार नाहीं असें वाटल्यावरून त्याला अटक करून भाऊच्या नेतृत्वाखालीं चिमाजीला यशोदाबाईच्या मांडीवर दत्तक देऊन पेशवाईचा कारभार सुरू झाला. परशुरामभाऊ महाडाकडेहि नानाला पकडण्याकरितां जाता, पण पावसाळ्यामुळें त्याचा निरुपाय झाला. पण तेवढ्या अवधींत नानानें स्वकीयांचें साहाय्य व परकीयांची मदत घेण्याची खटपट सुरू केली. शिंद्यांपैकीं एक पक्ष नानास सामील झाला; आणि दोन कोट रुपये व सव्वीस लक्षांची जहागीर कबूल करून नानानें शिंद्याला फोडलें. खर्ड्याच्या लढाईतील यश मातीमोल करून निजामाला आपल्या ताब्यांत घेतलें आणि इंग्रजालाहि नानानें वळवलें होतेंच. अशा पद्धतीनें पैशाच्या व बुद्धीच्या जोरावर नानानें महाडचें कारस्थान उभारलें आणि दौलतराव शिंद्याकडून नूतन पेशवा चिमाजी आणि बाळोबा पागनीस यांस कैद केलें. बाजीराव रघुनाथाला पेशवा केलें आणि आपण पुनः कारभारी झाला ( स. १७९६ डिसें. ). पण पैसा हातांत येत नाहीं असें पाहून वानवडीस मेजवानीस बोलावून दौलतरावानें यास कैद केलें ( स. १७९७ डिसें. ३१ ). पुढें नगर किल्ल्यांत पाठविलें ( स. १७९८ एप्रिल ६ ). पण दोन कोट रुपये घेऊन याला मुक्त केलें ( स. १७९८ जुलै १८ ). पण या सर्व ध्येयशून्य स्वार्थी कारवायांचा परिणाम याच्यामागें दोन वर्षांत वसईच्या तहानें मराठ्यांचें स्वातंत्र्य नष्ट होण्यांत झाला. शेवटीं शके १७२१ च्या माघ वद्यांत ज्वर येऊं

लागून फाल्गुन वद्य तृतीयेस गुरुवारीं मध्यरात्रीं नानाचें देहावसान झालें (स. १८०० मार्च १३). यानें नऊ लग्नें केलीं, पण याला मरतेसमयीं संतति नव्हती. याची नऊ वर्षांची नववी पत्नी जिऊबाई मागें होती. शेवटीं तिला उदरनिर्वाहाकरितां आणि स्वसंरक्षणाकरितां इंग्रजांचा आश्रय करावा लागला आणि दत्तक घेऊन नानाचा वंश चालू झाला. नानानें घाट, देवालयें वगैरे अनेक बांधली त्यांपैकीं पुण्यांतील बेलबाग विशेष प्रसिद्ध आहे.

नाना रंगानें काळसर आणि अशक्त प्रकृतीचा होता. याच्या तोंडावर खिन्नतेची छाया होती आणि त्याचा शेवटहि निराश स्थितींत झाला. यानें आपलें आत्मचरित्र माधवरावाला पेशवाईचीं वस्त्रें मिळेपर्यंत लिहिलें असून त्यांत कामुकपणाचा दोष स्पष्टपणें लिहिला आहे (काव्येति. १९२ नवी प्रत).

**नानासाहेब पेशवे**—(बाळाजी बाजीराव व धुंडिराज बाजी पाहा).

**नान्यदेव**—(मृत्यु स. ११५४ चा सुमार) हा एक कर्तबगार राज्यसंस्थापक कर्नाटकांत कर्णाट घराण्यांत होऊन गेला. यानें मिथिला (उत्तर बिहार) व नेपाळ येथें राज्य स्थापलें. हा अनेक पदव्यांनीं विभूषित होता. यानें माळवा, सौवीर, गौड व वंग येथील राजांचा पराभव केला, परंतु विजयसेनानें याचा पराभव यास करून कैद केलें. याचा श्रीधर नांवाचा युद्धकौशल्यनिपुण व शांतताप्रिय प्रधान होता (I. H. Q., vol. VII, No. 4, p. 679–689). हा नेवार लोकांसमवेत नेपाळांत येऊन यानें भाटगांव येथें ५० वर्षे राज्य केलें. नेवार शक ता. २० आक्टोबर ८७९ मध्यें सुरू झाला.

**नाभाजी**—(ग्रंथकाल स. १६४२) याला हिंदी ग्रंथकार नाभादासजी असें म्हणतात. जात नागर ब्राह्मण. पण कांहींनीं याला डोम व कांहींनीं क्षत्रिय म्हटलें आहे (कविताकौमुदी, हिंदीशब्दसागरप्रस्तावना). हा मूळ रामभद्राचलाजवळ राहणारा. लहानपणींच याला घेऊन याचे आईबाप व्यवहारधंद्यानिमित्त ग्वाल्हेर प्रांतीं गेले. थोडेच दिवसांत याचा बाप वारला. दुष्काळांत आईनें यास सोडलें. तेव्हां कीळदास व अग्रदास नांवांच्या दोन साधु पुरुषांनीं कमंडलूंतील पाणी पाजून याला आपले मठांत नेलें. तेथें याचें पोषण केलें. हा दोनहि डोळ्यांनीं आंधळा होता. पुढें याला अग्रदासांनीं उपदेश दिला व नांव 'नारायणदास' असें ठेविलें. परंतु नाभाजी या नांवानेंच याची प्रसिद्धि झाली. यानें 'भक्तमाला' या नांवाचा एक ग्रंथ मूळ ग्वाल्हेरी भाषेंत रचला (स. १६४२). यांत संतांची विशेष माहिती न देतां नामावली दिली आहे. मूळ भक्तमाला ग्रंथाच्या १९७ छप्पा आहेत. या छप्पांवर म्हणजे मूळ भक्तमाला ग्रंथावर याच्या प्रियदास नांवाच्या शिष्यानें भक्तिरसबोधिनी नांवाची टीका लिहिली. ही टीका संवत् १७६९ (श. १६३५) मध्यें लिहिली. या प्रियदासाचे टीकेवर मराठींत श्रीमार्तंड-बुवांनीं 'भक्तिप्रेमामृत' नांवाची टीका लिहिली. या ग्रंथाला सामान्यत्वें 'भक्तमाला' म्हणतात. हा शके १६०० च्या सुमारास होऊन गेला. यापूर्वीच्या संतांचा याच्या ग्रंथांत उल्लेख आहे. याच्या रामचरित्रावरील पद्य-संग्रह नुकताच सांपडला आहे. यानें दिलेल्या शेंकडों संतांपैकीं ज्ञानदेव, नामदेव, सेना न्हावी व आणखी एखाद-दुसऱ्या संताखेरीज बाकीचे सर्व महाराष्ट्राबाहेरचे आहेत. एकनाथ, रामदास, तुकाराम यांच्यासारख्या महाराष्ट्रांतील अत्यंत प्रसिद्ध संतांचाहि याच्या ग्रंथांत निर्देश नाहीं. असें असूनहि मराठी ग्रंथकारांनीं याच्या भक्तमालेंतून शेंकडों संतांचीं नांवें व चरित्रें घेतलीं आहेत. ज्ञानदेव, नामदेव वगैरे महाराष्ट्रीय संतांचीं चरित्रेंहि याला किंवा प्रियदासाला अगदीं बेताचींच माहीत होतीं असें दिसतें. याच्यापासून ऐतिहासिक माहिती बिलकुल मिळण्यासारखी नाहीं. तथापि महाराष्ट्रांतील संतचरित्रकारानें याचें नांव गौरवार्थ घेतल्यासारखें दिसतें (सं. तृतीयसंमेलन १८३७, पा. १०८–११०).

**नामदारखा**—एलिचपुरचा नवाब. स. १८०३ मध्यें आडगांवचे लढाईत याचें लष्कर इंग्रजांचे बाजूनें सलाबतखानाचे हाताखालीं हजर होतें (ना. प्रां. इ. ३३४).

**नामदेव**—(जन्म स. १२७०–मृत्यु स. १३५०) महाराष्ट्रांतील सगुणोपासना-प्रधान भागवतधर्माचा आद्य-प्रवर्तक संत, प्रचारक व कवि. याच्या पूर्वजांचें मूळ ठिकाण श्रीक्षेत्र कऱ्हाडनजीक कृष्णातीरीं असलेलें नरसी ब्राह्मणी हें गांव होय. यास हल्लीं कोळें अथवा बहे नर-सिंगपूर असें म्हणतात. मोंगलाईंतील परभणी जिल्ह्यांतील नरसी ब्राह्मणी ही नव्हे व तेथें असलेली नामदेवाची समाधि दुसऱ्या नामदेव नांवाच्या व्यक्तीची समजणें भाग आहे (पं. ना. पाटसकरकृत बालभक्त नामदेव महाराज). याचे पूर्वज जातीनें शिंपी होते व ते शिंप्याचा अगर कापड विकण्याचा धंदा करीत. दामा-शेटीस गोणाबाईचे पोटीं हें पुत्ररत्न स. १२७० (प्रभव-नाम संवत्सरे कार्तिक शुद्ध ११ स) रविवारीं सूर्योदयसमयीं पंढरपूर मुक्कामीं झालें. याच्या घरांत विठ्ठलभक्ति मूळ-चीच होती व तीमुळें याचीं मातापितरें पंढरपुरास

राहत होती. यास लहानपणापासूनच विठ्ठलभक्तीचा छंद लागत चालला. याचें बालपण पंढरपुरांत गेल्यामुळें याच्या मनोवृत्तीस आयतीच योग्य परिस्थिति मिळून हा विठ्ठलाचा निस्सीम व एकनिष्ठ उपासक बनला. योगांतील मानसिक एकाग्रतेची अवस्था व तदंगभूत यौगिक सामर्थ्य याला याच्या या एकनिष्ठ उपासनेनेंच प्राप्त झालें. याच्या सात वर्षांच्या वयाच्या सुमारास दामाशेटीला परगांवीं जावें लागलें असतां यानें याच सामर्थ्यानें नुसता डोळे मिटून विठ्ठलास नैवेद्य न दाखवितां प्रत्यक्ष देवाला जेवूं घालण्याचा चमत्कार करून दाखविला व तेव्हांपासून पंढरपूरची विठ्ठलमूर्ति याची जड उपासनामूर्ति न राहतां प्रत्यक्ष जीवाभावाचा त्याचा जिवलग सखा बनली व याचें प्रत्यंतर याच्या अभंगांत सर्वत्र ओतप्रोत संचरलेलें दिसून येतें.

वयाच्या बाराव्या वर्षाचे सुमारास गोविंदशेट सौदागरकर यांची मुलगी राजाई हिच्याबरोबर याचा विवाह झाला. वयाचे १७ व्या वर्षाचे सुमारास याला नारायण नांवाचा पुत्र झाला. त्यानंतर सुमारें दोनदोन वर्षांचे अंतरानें विठा, महादा, गोंदा अशीं याला मुलें झालीं.

स. १२९१ मध्यें म्हणजे वयाच्या २१ व्या वर्षी ज्ञानेश्वरादि भावंडांची कीर्ति याच्या कानावर येऊन हा आळंदीस आला. आळंदीस संतमंडळींचा परिचय होऊन सर्वानुमतें गुरूपदेशाकरितां विसोबा खेचर चाटी (यजुर्वेदी ब्राह्मण) याजकडे याची रवानगी झाली. केवळ सगुण उपासनेनें एकांगी अतएव कच्चा असलेला हा घट्ट अध्यात्मज्ञान देऊन विसोबांनीं याला पक्का करून परत ज्ञानेश्वरमंडळाकडे पाठवून दिला. नंतर संतमंडळासह ज्ञानेश्वरासमवेत हा तीर्थयात्रेस निघाला. त्या वेळीं याचें वय २२ वर्षांचें होतें.

यात्रा करीत असतां ठिकठिकाणीं यानें वसाहती स्थापन करण्याचें अद्‌भुत कार्य केलें. हें साधण्याकरितां तद्देशीय भाषांत हा कवनें करी व त्यांच्या आधारें कीर्तननिरूपण करी. प्रवासांत कीर्तन करण्याचें काम याजकडे होतें. अद्‌भुत प्रेमानें व रसाळ वाणीनें याचीं कीर्तनें परिणामकारक होत. अनुकूल परिस्थिति दिसून येतांच भागवतधर्माचें बीजारोपण करून एका लहानशा वसाहतीचा हा तेथें पाया घाली.

वसाहतीबरोबरच तद्देशीयांना आपले अनुयायी बनविण्याचें कार्यहि याला सहजसाध्य झालेलें होतें. ज्ञानेश्वरमंडळ, विसोबा खेचर, परिसाभागवत इत्यादि संतमहंतांसमवेत यानें प्रभास, द्वारका, मेवाड व काशी करून तापीतीरावरून भागवतधर्माचा झेंडा यशस्वी रीतीनें नाचवून परत पंढरपुरास आणला. तेथें या भक्तमंडळींनीं यात्रेचें माउंदें घातलें. इतकें हिंडून पंढरपुरासारखी बहार कोठेंहि नाहीं, हा याचा निश्चय दृढ झाला. नंतर ही सर्व मंडळी आळंदीस आली. आतां ज्ञानेश्वराचा निर्वाण-सोहळा नजीक आला होता. ज्ञानेश्वरादि संतांच्या समागमांतील हीं सहा वर्षे हा नामदेवाच्या चरित्रांतील अपूर्व भाग होय. या सहा वर्षांत पंढरपूर, नेवासें, आळंदी, पैठण, त्र्यंबकेश्वर, सासवड, मंगळवेढें, अरण, तापीतीर असा हा अफाट महाराष्ट्र प्रदेश संतांच्या अपूर्व अध्यात्मगंगेच्या महापुरानें प्रतिगंगातीर बनला होता. भक्तगणांच्या समुदायांत नामदेव-ज्ञानेश्वराची भक्त व ज्ञानी ही जोडी हरिहरांप्रमाणें शोभत होती. या वैभवाग्रावर असतांनाच ज्ञानेश्वरांनीं समाधि घेऊन वैकुंठपुरीं पताका लावण्याचा पहिला मान मिळविला. त्या वेळचे याचे अभंग हृदयस्पर्शी आहेत.

पंजाबांत बहोरदास, जयदेव, जाल्हौन व लद्धा यांनीं याच्या मतांचा पुरस्कार करण्यांत पुढारीपण घेतलें. जाल्हौन नामदेवाबरोबर महाराष्ट्रांत आला, तर उलट तारापुरचा केशव या महाराष्ट्रीय वारकऱ्याला पंजाबांत कार्य करण्यास नामदेवानें रवाना केलें. नामदेवाचें नांव व काव्यें आजहि पंजाबांत दृढमूल आहेत. शिखांच्या ग्रंथसाहेबांत नामदेवाचीं सुमारें ५० पदें ठिकठिकाणीं गुंफलेलीं आढळतात. शिवाय नामदेवी कवितांचा संग्रह घोमान (पंजाबांत) येथील हस्तलिखित जुन्या बाडांत सांपडतो. तेथें हा संग्रह "मुखवाक" अगर "नामदेवकी मुखबानी" या नांवानें प्रसिद्ध आहे. गुरुमुखींत लिहिलेलें "नामदेवकी जन्मसाखी" या नांवाचें सुमारें चारशें पानांचें एक प्राचीन चोपडें देवस्थानच्या भक्तवर्गांत मान्य झालेलें आहे. पंजाबांतील वारकरी वैष्णव, (बाबा नामदेवाची) वसंतपंचमी ही नामदेवाची जन्मतिथि व माघ शुद्ध द्वितीया ही याची पुण्यतिथि म्हणून पाळतात व तत्प्रीत्यर्थ मोठाले उत्सव करितात.

याच्या सहवासानें याच्या घरांतील मंडळीस सगुणभक्तीचें वळण लागून तींहि भक्तिप्रेमानें रंगलेलीं असत. त्यांपैकीं कित्येकांचे अभंग उपलब्ध आहेत. महाराष्ट्रांतील भागवतधर्माच्या ज्ञानमंदिरांत उषःकालीं नामदेवाच्या चौघड्याबरोबर जनाबाईनें सुंदर सनईची साथ करून घरच्या माणसांनीं त्याला सूर धरल्याचें मनोहर दृश्य दिसून येतें. गोरोबा कुंभार, चांगा केशवदास, चोखामेळा याच्या भक्तिनादानें मुग्ध झालेले आहेत. तुकोबासारख्या महाभागवतास नामदेवांच्या अभंगवाणीनें स्फूर्ति मिळाली. याच्या भागवतधर्माच्या शीतल छायेचा

आस्वाद घेऊन नानक व नरसी मेहता ह्यांसारखे सत्पुरुषहि स्वतःस धन्य समजून याचे चरणीं लीन झाले आहेत. नरसी मेहत्याचा काळ स. १४१५–८१ निश्चित झाला आहे, व नामदेव हे समकालीन ठरविणें निराधार ठरलें आहे ( इच्छाराम देसाईकृत नरसी मेहता-काव्यसंग्रह ). पंढरपूरच्या महाद्वाराची १ ली पायरी नामदेवपायरी म्हणून दाखवितात, ती नामदेवाच्या समाधीची जागा होय.

नामदेव मूळचा सगुण उपासक. ज्ञानेश्वरांसारख्या संतांच्या संगतींत याच्या सगुण भक्तीला ज्ञानाची जोड मिळून हा ज्ञानोत्तर भक्तिमार्गीय संत बनला. "संतसंगें मज पालट हा झाला" असे याचे उद्गार आहेत. 'ब्रह्म अविनाश आनंदघन । याहूनि चरण गोड तुझे ।। परात्पर वस्तु जे का अपरंपार । तियेचा साक्षात्कार पाय तुझे ।।.' अपरोक्ष साक्षात्कार नामदेवाला पंढरीच्या विठोबाचें सांवळें कृष्णरूप ध्यानीं ध्याऊन म्हणजे ध्यानयोगाच्या मार्गानें प्राप्त झाला, ही गोष्ट याच्या ईश्वरी साक्षात्कारांतील विशेष होय व हा मार्गच महाराष्ट्रीय भागवतधर्माचा राजमार्ग होऊन बसला आहे.

याची वाणी मृदु व कोमल आहे. लोकांना अधिकारी वाणीनें उपदेशामृत पाजण्याच्या अभिनिवेशाचें प्रखर तेज तींत नसून प्रेमळ अंतर्मुख वृत्तीच्या शीतल चांदण्याची बहार याच्या अभंगांत दृग्गोचर झालेली आहे. तुकोबांचा सडेतोडपणा त्यांत न आढळतां हळुवार कान-उघाडणीच्या प्रेमळ अमृताचे मधुतुषार त्यांत अनुभवाला येतात. याचें वाङ्मय आकर्षक व अंतर्भेदी झालेलें आहे. प्रेमळ भक्तिरूपी मृदु मखमालीच्या पार्श्वभूमीवर "देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं माझा भावो" हें तीव्र स्वरूपाचें ब्रीदवाक्य जरतारी कामाप्रमाणें उठावदार व मोहक दिसतें.

**नामा पाठक**—( स. १३७८ सुमार ) ज्ञानेश्वर-समकालीन प्रसिद्ध कान्हो पाठक यांचा हा नातू होय. यानें 'नामरत्नमाला' नांवाचें प्राकृत ओवीबद्ध एक प्रकरण लिहिलेलें आहे त्यांत ९९ ओव्या आहेत ( मं. श. १८३६ वा. इ. ले. ५१ ).

याशिवाय भरतभेट, अश्वमेध ( ९५ प्रसंगांचा मोठा ग्रंथ ) हे ग्रंथ आहेत. एकनाथानें केलेल्या संतमालेंत याचा निर्देश आहे.

**नामा विष्णुदास**—( ग्रंथकाल स. १५९५ ) नामदेव याच नांवाचे अनेक ग्रंथकार मराठींत होऊन गेले. त्यांपैकीं नामा विष्णुदास याचीं लहानसहान अनेक प्रकरणें असून सबंध अठरा पर्वें महाभारत आहे. मराठी भाषेंत अठरा पर्वें महाभारत लिहिणारा हा पहिलाच ग्रंथकार दिसतो. हा एकनाथाच्या जरा पूर्वीं होऊन गेला असेल किंवा त्याचा समकालीन असेल. याच्या ग्रंथाच्या प्रती शके १५३० पासून व नंतरच्या केलेल्या आढळतात. हा मुक्तेश्वराच्या पूर्वीं होऊन गेला व याचें महाभारत मुक्तेश्वरानें पाहिलें होतें असें खास दिसतें. बुधवावनी व कपोताख्यान हीं प्रकरणें याचीं नसावींत.

नामदेव व विष्णुदास नामा हे दोन भिन्न कवि आहेत, असें शुकाख्यानाच्या शेवटच्या ओव्यांवरून दिसतें ( मं. श. १८३३ चा अहवाल, पा. १२२ ). शुकाख्यान विष्णुदासानें श. १५१७ मध्यें संपविलें आहे. नामदेवाचा गुरु विसोबा खेचर होता आणि विष्णुदासानें कपोताख्यानाच्या प्रारंभीं आपल्या गुरूचें नांव रायभारती असें दिलें आहे. त्याअर्थी हे दोघे भिन्न आहेत हें निश्चित ( मं. पाण्मासिक वृत्त, श. १८३४, ले. ५५ ).

**नायक बक्षु**—( स. १४८२–१५३६ ) हा 'मान-कुतूहल' ग्रंथ लिहिणाऱ्या मानराज तुवराच्या ( स. १४८६–१५१६ ) पदरीं होता. मानराजाच्या मृत्यूनंतर हा कालिंजर येथें गेला. तेथून पुढें गुजराथच्या बहादुरशाहाच्या ( स. १५२६–३६ ) दरबारीं होता. तेथें 'तोडी' रागाचा नवा प्रकार तयार करून त्यास आपल्या आश्रयदात्याचें यानें नांव दिलें. तोच राग सध्यां 'बहादुर-तोडी' नांवानें प्रसिद्ध आहे.

**नायिनप्प नायक**—कृष्णप्पा नायकाचा पुत्र. यानें जमिनीची सुधारणा करून विहिरी, तळीं व तलाव बांधले. हा विजयनगरच्या दुसऱ्या वेंकटपति देवरायाचा समकालीन होता.

**नारायण**—(स. १३०० सुमार) यानें शाकटायनाच्या 'उणादिसूत्रावर' प्रक्रियासर्वस्व नांवाची टीका लिहिली आहे. आणि ती मद्रास विश्वविद्यालयाच्या संस्कृत ग्रंथावलींत प्रसिद्ध झाली आहे. ती बरीच विस्तृत असून भोजाच्या म्हणण्याचा त्यांत बराच उपयोग केला आहे.

**२. ( भट्ट, मृगराजलक्षण )**—( स. ७५० सुमार ) हा सुप्रसिद्ध वेणीसंहार नाटकाचा कर्ता व आद्य बंगाली गौड ब्राह्मण घराण्याचा संस्थापक होय. हा बंगालच्या तत्कालीन राजाच्या कृपाछत्राखालीं होता. हा स. ७ व्या शतकानंतर होऊन गेला असावा. हा भागवत किंवा पंचरात्र पंथाचा असावा. बंगालच्या राजास बुद्धधर्माच्याविरुद्ध ब्राह्मणधर्माचा प्रसार करण्यास यानें मदत केली. काव्यालंकारसूत्रवृत्तीचा वामन व आनंदवर्धन हे आपल्या लिखाणांत वेणीसंहारांतील

उताऱ्याचा उपयोग करून याजविषयीं आदर दाखवितात. हा भवभूतीचा समकालीन होता ( वेणीसंहार by K. N. Dravid ).

३. हा नामदेवाच्या चौघां मुलांतील एक. हा आपला ' नामयाचा नारा ' असा अभंगाच्या शेवटीं निर्देश करतो.

४. तुकारामाच्या तिघां मुलांतील धाकटा. तुकाराम वैकुंठाला गेल्यावर याचा जन्म झाला. तुकारामाच्या मुलांपैकीं हाच पुढें नामांकित होऊन योग्यतेस चढला.

५. एक मराठी कवि. याला 'नवरस नारायण' म्हणतात. याचा ग्रंथ शैल्यपर्व. हा महानुभाव असावा ( मं. १८३६ वा. इ. ले. ४४ ).

६. ( कुमार व्यास पाहा ).

**नारायण काण्व**—हा काण्व घराण्यांतील तिसरा राजा होय. हा भागवत व विष्णु यांच्या मतें भूमिकाचा, वायुमतें भूतिमित्राचा, ब्रह्मांड व मत्स्य यांच्या मतें भूमिमित्राचा पुत्र होय. याच्यासंबंधीं पुराणाशिवाय ऐतिहासिक पुरावा उपलब्ध नाहीं. यानें १२ वर्षे राज्य केलें

**नारायण गोविंद टकले**—( कायगांवकर, दीक्षित पाटणकर पाहा ).

**नारायण ( ऊर्फ नानाजी ) कृष्ण जोशी ( बारामतीकर )**—हा नागपुरास भोंसल्यांचा सरदार रघूजी करांडे याचा कारभारी होता. जानोजी व मुधोजी यांचे भांडणांत करांडे हा मुधोजीच्या पक्षास गेल्यामुळें हाहि मुधोजीच्या पक्षास गेला. त्यामुळें जानोजीचा याजवर रोष होता ( पे. द. २०, पा. ९०,९५,९६पाहा).

नंतर मुधोजी व साबाजी यांच्या भांडणांत हा साबाजीच्या पक्षास मिळाला. पांचगांवचे लढाईंत ( ता. २६-१-१७७५ ) हा साबाजीचे पक्षास होता. हा एका स्वतंत्र अंबारींत असतांना मुधोजीनें बंदुकीची गोळी मारून यास ठार केलें. याचे वंशज साताऱ्यास आहेत ( ना. भो. बखर, पा. ११६ ).

**नारायण त्रिमल हणमंते**—( मृत्यु स. १६५३ ) हा प्रथम मलिकंबरच्या हाताखालीं तयार झाला. नंतर लुखजी जाधवाच्या पदरीं होता. शिवाजीनें यास मुजुमदार केला. शिवाजीमहाराज व त्यांचे वडील शहाजी राजे ह्यांच्या पदरीं जे अत्यंत स्वामिनिष्ठ, राजकारणचतुर, निःस्पृह आणि सत्यप्रिय असे मुत्सद्दी उदयास आले, व ज्यांनीं वंशपरंपरेनें मराठ्यांच्या गादीची इमानेंइतबारें सेवा केली, त्यांमध्यें याची गणना फार उच्चस्थानीं केली पाहिजे. यांनीं शहाजी राजे यांची एकनिष्ठेनें नोकरी केली. शहाजी राजे यांनीं यास कर्नाटकांतील जहागिरीचा कारभार सांगितला. ग्रँट डफ् साहेबांनीं "नारोपंत हनुमंते" म्हणून ज्याचा नामोल्लेख आपल्या इतिहासांत केला आहे, तेच हे नारोपंत हणमंते होत. यास शहाजीमहाराजांनीं स. १६४९।५० मध्यें दिलेली सनद उपलब्ध झाली आहे. हा स. १६३७ त शहाजीराजाबरोबर कर्नाटक प्रान्तीं गेला असून तेथें हा बंगलूर येथें राहत होता. रघुनाथ व जनार्दन हे याचे दोन पुत्र ( ऐ. च. पृ. १०३ ).

**नारायणदेव**—( स. १५०० सुमार ) एक बंगाली कवि. हा विजयगुप्ताचा समकालीन होता. हा मैमनसिंह जिल्ह्यांतील किशोरगंज प्रांतांतील बोरा गांवचा राहणारा होय. याच्या बापाचें नांव नरसिंहदेव असून हा जातीनें कायस्थ होता. याचे पूर्वज प्रथम मगधचे राहणारे होत. त्यांच्या पश्चात् हा राढ देशांत आला व तेथून यानें मैमनसिंह प्रांत गांठला. याचे वंशज अद्यापपावेतों बोरा गांवीं आहेत. याचा ' मनसा-मंगल ' हा ग्रंथ प्रधान असून फार लोकप्रिय आहे. याची कविता सरस आणि मधुरवाणीयुक्त आहे ( क. कौ. भा. ७ ).

२. ( स. १३९६ सुमार ) हरिश्चंद्रपुराण नांवाच्या हिंदी काव्याचा कर्ता.

**नारायणपाल**—( स. ८७५–९०० ) हा बंगाल्यांतील पालघराण्यापैकीं पहिल्या विग्रहपालाचा मुलगा. याच्याच कारकीर्दींत भागलपूर येथील दानलेख लिहिला गेला. पण या लेखावरून याचा काल ठरवितां येत नाहीं. कारण त्यांतील कालमानपद्धति शकावर अवलंबून नसून त्या घराण्यांतील राजांच्या कारकीर्दींच्या वर्षसंख्येप्रमाणें दिली आहे. तथापि याचा राज्यकाल सुमारें स. ८७५–९०० असावा ( म. यु. भा. २, पा. २३३ ). स. ९०२–९५६ असा याचा काल भागलपूर व गरुडस्तंभावरील याच्या शिलालेखावरून निघतो.

**नारायण बहाळे**—( नारो व्यास पाहा ).

**नारायणबावा**—ज्ञानसागर, शांतिसागर इत्यादि सात ग्रंथांचे कर्ते. विष्णुबोवा ब्रह्मचारींचे परमगुरु.

**नारायणभट्ट**—( जन्म स. १५१३–१५७० नंतर ) हा रामेश्वरभट्टाचा मुलगा होय. रामेश्वरभट्ट हा पैठणाहून काशीस जात असतां स. १५१३ ( श. १४३५ चैत्र ) मध्यें याचा जन्म झाला. याचा लौकिक काशींत मोठा आहे. यानें काशींत महाराष्ट्रीयांची वसाहत स्थापन केली. यानेंच काशींतील विश्वेश्वराचें मंदिर बांधिलें. हा काशीस असतां दुष्काळ पडला तेव्हां यानें भागीरथींत अनुष्ठान

करून पाऊस पाडविला, त्यामुळें मुसलमान अधिकाऱ्यानें याचा हा प्रभाव पाहून विश्वेश्वराचें पाडलेलें मंदिर पुन्हां बांधण्याची परवानगी दिली, असें म्हणतात. विद्वत्तेमुळें व दयाळूपणामुळें याला 'जगद्गुरु' अशी पदवी होती. सर्व हिंदुस्थानांतील विद्वान् याला आपला पुढारी मानीत. हा मोठा मीमांसक होता. याचे बारा ग्रंथ मार्तंड या नांवानें प्रसिद्ध असून त्यांतील 'मुहूर्तमार्तंड' हा स. १५७१ त लिहिला. यानें बंगाल व बहार येथील पंडितांना जिंकलें. तीर्थविधि कसा करावा याबद्दलचा 'त्रिस्थलीसेतु' नांवाचा ग्रंथ यानें लिहिला. याचा व राजा तोडरमल्ल याचा चांगला स्नेह होता. यानें वेदान्त विषयांत अनेक संन्याशांशीं वाद करून त्यांना जिंकलें. अकबराच्या दरबारीं याची मोठी प्रतिष्ठा होती. याच्या प्रयोगरत्नासच नारायणभट्टी नांव आहे. यानें वृत्तरत्नाकरावर उत्कृष्ट टीका लिहिली (स. १५४५). याचे मुलगे रामकृष्णभट्ट व शंकरभट्ट असे होते. ते दोघेहि विद्वान् असून त्यांचे ग्रंथ सर्वमान्य आहेत.

याच्या शिष्यांपैकीं ब्रह्मेन्द्रसरस्वती व नारायणसरस्वती ही जोडी प्रसिद्ध आहे.

यांचें घराणें भट्ट या नांवानें काशींत प्रसिद्ध असून या घराण्यांत एकापेक्षां एक असे विद्वान् लोक सारखे उत्पन्न झाले. त्यामुळें अद्यापहि भट्ट घराण्यास काशी येथें मान आहे.

याचा भरभराटीचा काल स. १५४० पासून स. १५७० पर्यंत होता.

यानें धर्मशास्त्रावर उत्कृष्ट ग्रंथ लिहिले आहेत. अयननिर्णय, आरामोत्सर्गपद्धति, आतुरसंन्यासविधि, जीवच्छ्राद्धप्रयोग, आहिताग्निमरणदाहादिपद्धति, महारुद्रपद्धति, किंवा रुद्रपद्धति, काशीमरणमुक्तिविवेक, गोत्रप्रवरनिर्णय, तिथिनिर्णय, तुलापुरुषदानप्रयोग, दिव्यानुष्ठानपद्धति, मांसमीमांसा, कालनिर्णयकारिकाव्याख्या, वृषोत्सर्गपद्धति, लक्षहोमपद्धति, आणि विष्णुश्राद्धपद्धति हे ग्रंथ याचे होत. हे महाराष्ट्रांतील देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणांचें घराणें होय.

**नारायणभट्टतिरी**—(जन्म स. १६ व्या शतकाचा मध्य) केरल प्रांतांतील महान् संस्कृत कवि व व्याकरणकार. मलबारांत तिरुनावयजवळ नील नदीच्या कांठीं हा मेप्पुत्तूर घराण्यांतील मातृदत्त या मीमांसकाचा मुलगा. हा संस्कृत वाङ्मयाच्या ज्ञानामुळें लोकप्रिय झाला. रविवर्मा आणि वीरकेरलवर्म या कोचीन नरेशांच्या दरबारीं हा होता. ह्याचे ग्रंथ—राजसूय, दूतवाक्य, सुभद्राहरण, पांचालीस्वयंवर, निरनुनासिक, स्वाहासुधाकर, नृगमोक्ष, दक्षयाग, कौंतेयाष्टक, वामनावतार, रासविलासकाव्यम्, नारायणीयम् आणि श्रीपादसप्तती (इंडि. हिस्टॉरिकल क्वॉ., मार्च १९३३, पृ. २२–२९).

**नारायणराज चोल**—(स. १३३७–१३५६) विजयनगरच्या इतिहासांत याचा निर्देश येतो.

**नारायणराव घोरपडे**—(मृत्यु स. १७७०) इचलकरंजीच्या व्यंकटराव राजाचा मुलगा. यानें संस्थानची अतिशय भरभराट केली. नानासाहेब व भाऊसाहेब पेशव्यांना मुलूखगिरी करतांना ह्यानें मदत केली तेव्हां ह्यास धारवाडची सुभेदारी मिळाली. ह्याच्या मुलाचें नांव व्यंकटराव.

२. (मृत्यु स. १८२७) हा इचलकरंजीच्या व्यंकटराव घोरपड्यांचा दत्तक पुत्र. यानें संस्थानची भरभराट केली. करवीरकरांशीं ब्रिटिशांच्या मध्यस्थीनें तह घडवून आणला. यानें खर्ड्याच्या लढाईंत पेशव्यांना मदत केली.

**नारायणराव पारसनीस** (पुणें)—कृष्णरावाचा मुलगा. यानें पेशवाईअखेरपर्यंत पारसनीसाचें काम केलें.

**नारायणराव बल्लाळ पेशवे**—(स. १७५५–१७७३) हा पांचवा पेशवा व नानासाहेबाचा धाकटा पुत्र होय. याचा जन्म ता. १०-८-१७५५ रोजीं झाला. याच्या पत्नीचें नांव गंगाबाई असून हा कृष्णाजी हरी साठ्यांचा जांवई होता. माधवरावाचे मृत्यूनंतर नारायणराव व राघोबादादांनीं एकविचारानें चालण्याचें ठरविलें होतें. याची बापूवर मर्जी नव्हती. हा हलक्या लोकांच्या आहारीं गेला होता. याचा कारभारी बाबाजी बर्वे होय. याच्या कारकीर्दींत कृष्णाजी धुळपानें फिरंग्यांचा पराभव केला (स. १७७३). दादा व आनंदीबाई यांच्या मसलती आपल्या विरुद्ध आहेत असें कळतांच यानें पुरी चौकशी न करतां दादास सहकुटुंब कैद केलें. पुढें दादानें हैदराच्या वकिलाच्या मदतीनें सुटकेचा अयशस्वी प्रयत्न केला. याच सुमारास चांद्रसेनीय कायस्थांचें एक प्रकरण उपस्थित झालें (ऐ. ले. संग्रह भा. ४, पृ. १९५६–६०). त्यांत कायस्थांचे विरुद्ध यानें निकाल दिला. तेव्हां कायस्थांनीं खवळून नारायणरावास कैदेंत टाकायचें व राघोबास गादीवर बसवावयाचें असा कट केला. ह्या कटांत लक्ष्मण काशी, व्यंकट काशी, सखाराम हरी, सखाराम बापू, भवानराव प्रतिनिधी, सदाशिव रामचंद्र शेणवी व विठ्ठल रायरीकर हे प्रमुख होते. परंतु पुढें आनंदीबाईच्या संमतीनें नारायणरावास ठार मारावयाचें असा पोटकट झाला. त्याची माहिती राघोबास नव्हती. पुढें आनंदीबाईनें 'ध' चा 'मा' करून सुमेरसिंग, खरकसिंग, व मुहंमद इसब या तीन गारद्यांकरवीं यास ठार मारलें. गारद्यास या कामा-

साठीं साष्टी, नगर व पुरंदर हे तीन किल्ले व पांच लक्ष रुपये देऊं केले होते. ह्याचा विश्वासू खिदमतगार चाफाजी टिळेकर हाहि नारायणरावास वांचवीत असतां मारला गेला. याचा स्वभाव तापट, उद्दाम व स्नानसंध्याशील असून पौरवयामुळें याला भारदस्तपणा व सारासार विचार कमी होता. आईच्या देखरेखीखालीं याचा संस्कृत, व्याकरण, काव्य वगैरेचा अभ्यास झाला ( म. रि. स. वि. ४ ).

**नारायणराव बक्षी**—दौलतराव शिंद्यांचा कारभारी. याला सर्जेराव घाटग्यानें अंगाला बाण बांधून ठार मारलें.

**नारायणराव रामराव भावे**—( मृ. स. १८२७ ) रामदुर्ग संस्थानचा अधिपति. पत्नी राधाबाई.

**नारायणस्वामी**—( स. १७५९ ) यांचें दुसरें नांव दाजीराव देशपांडे ( कोळेवाडीकर ). पिता–रामचंद्र. पत्नी–धोंडूबाई. जन्मभूमि–कऱ्हाड ( मं. १८३७ वा. इ. ले. १४० ).

**नारायणाचार्य**—हा ' संकल्पसूर्योदय ' नाटकाचा टीकाकार.

**नारायणाचार्य गजेंद्रगडकर**—हे राघवाचार्यांचे चिरंजीव होत. यांचे वेदान्त व न्याय या विषयांवर फार मार्मिक ग्रंथ आहेत. यांचे महावाक्यर्थखंडन व ब्रह्मानंदीखंडन हे ग्रंथ फार मोठया योग्यतेचे आहेत.

**नारो आनंदराव**—हा पेशव्यांचा एक सरदार होय. स. १७७४ मध्यें रघुनाथराव पळून इंग्रजांकडे गेला. तेव्हां फत्तेसिंगाशीं लढून गोविंदराव गुजराथेंत अंमल बसवीत होता आणि फत्तेसिंगाचा पाठपुरावा बारभाई करीत होते. पुढें नारो आनंदराव याचे हाताखालीं बारभाईनीं फत्तेसिंगाचे मदतीस आणखी फौज पाठविली, पण ती पोहोंचण्यापूर्वीच खुद्द दादांची स्वारी माळव्यांतून जानेवारी स. १७७५ त बडोद्यापाशीं येऊन पोहोंचली ( रा. खं. १०. १५५; म. रि. उत्तर वि. १ ला, पृ. ३४ ).

**नारो आप्पाजी तुळशीबागवाले**—(मृ.स.१७७५) तुळशीबाग संस्थानचे मूळ संस्थापक व पुणें प्रांताचे सरसुभेदार. हे मूळचे पाडळी गांवचे कुलकर्णी. यांचें उपनांव खिरे. हे खाजगीवाल्यांच्या पदरीं राहिले. तुळशीबागेच्या ठिकाणीं त्या वेळीं खरोखरीचा ' तुळशी ' बाग होता व हा खाजगीवाल्यांकडे होता. नारायणाकडे तेथील तुळशी आणण्याचें काम होतें. यांवर खाजगीवाल्यांची मर्जी बसून हा यांस बहाल केला. नारोपंतानें मग रामाची स्थापना केली. तुळशीबाग संस्थानास पेशवे यांची पहिली देणगी शके १६८५ त मिळाली ( मं. इतिवृत्त १८३७ ).

स. १७६३ त माधवराव पेशव्यानें वडू गांव इनाम दिला. यानें जमा-बंदीचे कामांत नवीनच क्रांति घडवून आणली. मलिकंबराचे तोडीचाच पेशवाईंत या कामांत नारो आपाजीचा लौकिक झाला. निजामानें पुणें जाळल्यावर त्याची फिरून रचना माधवरावानें नारोपंताकडूनच करविली. याचा राजकीय व्यवहारांत ठिकठिकाणीं संबंध आला आहे. हा ता. ६–३–१७७५ रोजीं मरण पावला ( म. रि. मध्य वि. ४, पृ. २८०–८१ ).

**नारो गणेश शौचे**—( मृत्यु स. १७९२–९३ सुमार ) प्रथम अहल्याबाई होळकराचा कारभारी. नंतर पुढें बाईशीं बेबनाव होऊन तुकोजीचा कारभारी झाला. पण त्याच्याशींहि ह्याचें पटलें नाहीं. हा रांझ्याचा राहणारा व देशस्थ ब्राह्मण. ह्याच्या वडिलांचें नांव गणेश बापूजी व चिरंजीवाचें नांव गणपतराव. खानदेशांत यानें स. १७७६ सालीं कोळ्यांचा दंगा चालू असतांना स्वारी केली, पण ती अयशस्वी झाली. ह्याचें होळकर घराण्यांतील बायकांवर फार वजन होतें व त्यामुळें याजजवळ बराच पैसा सांचला होता. त्याचा लोभ तुकोजीस सुटून त्यानें नारोजीचा भयंकर छळ केला व शेवटीं ठार मारिलें. याच्या बायकोचें नांव महेश्वरी. मल्हाररावाच्या वेळेपासून ३० वर्षें हा गृहस्थ उत्तरेंतील राजकारणांत मुरलेला असून धनलोभी असला तरी होळकरशाहीच्या हितास जपणारा होता ( म. रि. उ. वि. २, पृ. २२–२४ ).

**नारो गंगाधर मुजुमदार**—शाहूच्या सांगण्यावरून हा धनाजी जाधव याचे फौजेंत गेला. तेथें बाळाजीस भेटला व शाहूचा निरोप सांगितला. नंतर शाहूबरोबर साताऱ्यास आला. तेथें शाहूला मदत केली. पुढें शाहूनें शके १६३५ मध्यें माघमासांत, यास मुजमूचें पद व वस्त्रें दिलीं.

**नारोपंत हणमंते**—(नारायण त्रिमल हणमंते पाहा).

**नारोपा**—( मृत्यु स. १०३९ ) हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं विसावा सिद्ध होय. हा जातीनें ब्राह्मण असून मगध देशांत राहणारा होता. याच्या वेळेस महीपाल नांवाचा राजा होता (स.९७४–१०२६). यानें भिक्षु होऊन नालंदा येथें शिक्षण घेतलें व विक्रमशिला विहारमध्यें पूर्वद्वारचा महापंडित झाला. हा शांतिपाचा गुरु होता. तंजूरमध्यें याचे २३ ग्रंथ आहेत, त्यांपैकीं खालील कांहीं मागधी हिंदीमध्यें आहेतः ( १ ) नाडपंडितगीतिका, ( २ ) वज्रगीति. हा एक उत्कृष्ट हिंदी कविहि होता.

**नारो महादेव**—( सतराव्या शतकाचा उत्तरार्ध ) इचलकरंजी संस्थानचा संस्थापक. हा मूळचा रत्नागिरी

जिल्ह्यांतील वरवडेकर जोशांच्या घराण्यांतील असून याचे वडील महादेवपंत सावंतवाडी संस्थानांतील म्हापणचे कुलकर्णी. वडील बालपणींच निवर्तल्यामुळें आईसमवेत हा बांहेरेवाडीस आला. येथें संताजीनें यास ठेवून घेऊन याच्या शिक्षणाची व्यवस्था केली. राजारामाच्या कारकीर्दींत यानें संताजीस फार मदत केली. त्याच्यावरील भक्तीमुळें ह्यानें घोरपडे आडनांव धारण केलें. संताजीनें ह्यास मिरजेची सरदेशमुखी व इचलकरंजी आणि आजरें हीं गांवें इनाम दिलीं. याचा मुलगा व्यंकटराव हा बाळाजी विश्वनाथाचा जांवई होता.

**नारो बाबाजी अभ्यंकर**—हा एक जुना भरंवशाचा हरकामी गृहस्थ असून दौलताबादचा किल्लेदार होता. स.१७७५ च्या नोव्हेंबरांत हा मरण पावला (म. रि. उत्तर वि. १ ला, पृ. ५५ ).

**नारो राम मंत्री**—हा कोचरें गांवचा कुलकर्णी. सारस्वत ब्राह्मण होता. स. १७०७ च्या सुमारास हा धनाजीजवळ येऊन राहिला. स. १७१३ त शाहूनें यास मंत्रिपदाचा अधिकार दिला. हा विशेष कर्तृत्ववान् नव्हता. हा स. १७४८ त वारला ( अष्टप्रधानांचा इतिहास; शाहूमहाराज रोजनिशी; राजवाडे खं. ६ ).

यास नारबा मंत्री असें म्हणत. हा आपल्या बंधूसह सातारा जिल्ह्यांत मागणी येथें राहत असे. अद्यापि हा गांव त्या घराण्याकडे इनाम चालतो. हा सुस्वभावाचा असून पेशव्याशीं उघड विरोध करीत नसे. हा मरण पावल्यावर यानें आपल्या भावाचा मुलगा घनश्याम यास दत्तक देऊन त्याचे नांवानें शाहूनें मंत्रिपद चालविलें ( म. रि. म. वि. ३, पृ. ३१३ ).

**नारो व्यास**—( ग्रंथकाल स. १३६३ ) एक महानुभाव. यांना वहाळे नारो व्यास असेंहि म्हणत. यांचा श्रीऋद्धिपूरवर्णन हा ओवीबद्ध उत्कृष्ट काव्यग्रंथ शके १२८५ ( स. १३६३ ) मध्यें पूर्ण झाला. हा ग्रंथ सटीप संपादन करून प्रसिद्ध झाला आहे. यांचा हा ग्रंथ महानुभावांच्या प्रसिद्ध सात ग्रंथांपैकीं एक आहे. हें काव्य प्रसिद्ध संस्कृत काव्यांच्या तुलनेस उतरतें. याचें विस्तृत विवेचन म. वा. इ. भाग पहिला यांत पांगारकरांनीं केलें आहे.

**नारो शिवदेव पोंक्षे**—नाना फडणिसाचा महादजीकडे असणारा हस्तक ( म. रि. उ. वि. १, पृ. १०२ ).

**नारो शंकर सचिव**—( स. १७०८–१७३६ ) हे अज्ञान असतांच यांना सचिवपद मिळालें. दमाजी थोराताची पुंडाई मोडण्यास यांना पाठविलें असतां हे कैद झाले. तेव्हां बाळाजी विश्वनाथानें यांस सोडविलें. पुरंदर किल्ल्याजवळ असलेल्या बेलसर गांवच्या कुलकर्ण्याकडून दृष्टांतानुसार श्रीरामाच्या मूर्ति यांना मिळाल्या. तेव्हांपासून सचिवांचें कुलदैवत 'श्रीराम' झालें. रामनवमीचा उत्सव तेव्हांपासून चालू आहे. यांचा मृत्यु पे. द. २२. ३३३ मध्यें शके १६५८ ज्येष्ठ व. ११ बुधवार दिला आहे; व स्थल भोर सांगितलें आहे.

**नारो शंकर दाणी राजेबहाद्दर**—( मृत्यु स. १७७५ ) हा शूर, पराक्रमी व तलवारबहाद्दर होता. हा प्रथम उदाजी पवाराच्या हाताखालीं शिलेदार होता. माळव्यांत मराठ्यांनीं जी प्रथम हालचाल सुरू केली, त्या वेळीं ( स. १७२० ) याचा उल्लेख उदाजीबरोबरच आढळतो. नंतरचा ( स. १७३० त ) याचा उल्लेख मल्हारराव होळकराच्या पदरीं असल्याबद्दलचा सांपडतो. मल्हाररावानें याला इंदूरचा सुभेदार नेमलें होतें.

स. १७४२ त यानें ओर्च्छा हें ठिकाण घेतलें, तेव्हां यालाच त्या प्रांताचा सुभेदार नेमण्यांत आलें. यानें झांशीस राहून हा कारभार १४ वर्षे केला. या वेळीं यास जरीपटका, साहेबी नौबत व १५ लाखांचा सरंजाम मिळाला होता. पुढें याच्याबद्दल कागाळ्या आल्यावरून यास पेशव्यांनीं परत बोलाविलें ( स. १७५७ ). नंतर यानें गुजराथच्या व सावनूरच्या लढायांत पराक्रम गाजविल्यानें व पुढें दत्ताजी शिंद्यांच्या मध्यस्थीनें पेशव्यांची गैरमर्जी नाहींशी होऊन हा पुन्हां उत्तरेकडे गेला ( स. १७५७ ).

राघोबादादानें आपल्याकडे पेशवाईचा कारभार घेतला तेव्हां भवानराव प्रतिनिधींवर पेशव्यांची इतराजी झाल्यानें कांहीं दिवस प्रतिनिधीचें काम स. १७६२ त यास देण्यांत आलें होतें. हा बहुतेक दादांचा पक्षपाती असे.

याच्या ताब्यांत दिल्ली असतांना याला बादशहानें राजेबहाद्दर हा किताब दिला. कारण यानें बादशाहाचें रक्षण केलें होतें. शिवाय बादशाहानें यास मालेगांव हा गांव जहागीर देऊन इतर गांवेंहि सरंजामादाखल दिलीं होतीं. स. १७४० त मालेगांवांत यानें एक किल्ला बांधला. स. १७४७ मध्यें यानें नाशिक येथील रामेश्वराचें देऊळ बांधलें. येथें एक प्रचंड घंटा आहे त्यास नारोशंकरी असें म्हणतात. याच्याकडे शिंद्यांची दिवाणगिरी होती ( स. १७६६ ). पण ती रघुनाथरावाच्यामुळें गेल्यानें हा अगदीं उद्विग्न झाला याला दोन पुत्र होते. पैकीं एकाचें नांव राघोपंत असून दुसऱ्याचें नांव त्रिंबकराव. निजामाशीं

लढतांना माधवराव पेशव्याचे वेळेस यांनीं केलेलें काम स्वतःच विस्तारानें लिहून ठेविलें आहे (भा. व. १ प. या. १. २). शिवाय याची एक बखर रा. राजवाड्यांनीं छापली आहे (खं. १ पृ. ३१०). हा स. १७७५ मध्यें मरण पावला.

**नार्मद**—(स. १३७८सुमार) सांप्रतच्या सूर्यसिद्धांतावर टीका किंवा त्याच्या आधारें रचलेला ग्रंथ नार्मदाचा असावा असें सूर्यसिद्धांतविचारांत लिहिलें आहे. या नार्मदाचा काल शके १३०० असावा.

**नासिख**—(मृत्यु स. १८३६) एक ऊर्दू कवि. याचें नांव इमामबक्ष नासिख असें आहे. याच्या पित्याचें नांव खुदाबक्ष असून याचा जन्म लखनौ येथें झाला. यास अरबी व फार्सी भाषांचें ज्ञान उत्तम होतें. याचे एकंदर तीन दीवाण (कवितासंग्रह) आहेत. त्यांचीं नांवें—१ दफ्तरे परेशान, २ नज्म सिराज, ३ मौलूद शरीफ (क. कौ. ४).

**नासिरजंग**—(स. १७३७–५०) हा निजामुल्मुक असफजहाचा मुलगा. याची व याच्या बापाची लढाई झाली, तींत याचा पूर्ण पराभव झाला. हा मुजफरजंगाचा पराभव करून गादीवर आला. ता. ५-१२-१७५० मध्यें फ्रेंचांशीं लढत असतां हा दग्यानें मारला गेला.

**नासिरशाह**—(स. १४२७-२९) बंगालचा राजा. हा बंगालचा सुलतान जो अहमद त्याचा मुलगा. याला कें. हि. मध्यें 'नासिरुद्दीन महमूदशाह' म्हणतात.

**नासिरसाह**—(स. १५००-१५१० सुमार) हा बीलवी वंशांतील असून माळव्यांतील घियासशहा खल्जीचा मुलगा, असें यानें लिहिलेल्या 'नासिरसाही कड्काली' या ग्रंथांत लिहिलें आहे. हा ग्रंथ हिंदीमध्यें आहे. तेव्हां हा ग्रंथ यानें किंवा याच्या आश्रयाखालीं असलेल्या एखाद्या पंडितानें लिहिला असावा.

**नासिरुद्दीन**—(स. १३१८ सुमार) बंगालचा सुभेदार. बुघ्राखानानें आपला मुलगा कैकूबाद दिल्लीचा सुलतान झाल्यावर आपण स्वतंत्र असल्याचें जाहीर केलें, व तीच परंपरा रुक्नुद्दीन कैकोस, शम्सुद्दीन फीरूज व त्याचा युवराज शिहाबुद्दीन बुघ्रापर्यंत चालली. पण शिहाबुद्दीन बुघ्रा व त्याचा धाकटा भाऊ घियासुद्दीन बहादूर यांच्यामध्यें बंगालच्या गादीबद्दल तंटे सुरू झाले. बुघ्रा मारला गेला, तेव्हां त्याचा धाकटा भाऊ नासिरुद्दीननें दिल्लीच्या घियासुद्दीन तुघ्लकाची मदत मागितली. त्यानें स्वतः बंगालमध्यें येऊन याच्या प्रतिस्पर्ध्याला पकडून याला सुभेदार म्हणून कायम केलें. मुहम्मद तुघ्लक गादीवर आल्यावर त्यानें याच्या जागीं मलिक बिदार कादरखानची नेमणूक केली.

**२.** बंड करून दौलताबादचा सुलतान झाल्यावर इस्माईलनें धारण केलेला किताब.

**३.** हा मुबारक खल्जीचा वजीर. हाच पुढें दिल्लीचा बादशहा झाला.

**नासिरुद्दीन कबाचा**—(स. १२०५–१२२८) शहाबुद्दीन घोरीचा मुलतानचा सुभेदार व कुत्बुद्दीन ऐबकाचा जांवई. हाहि स्वतंत्र झाला होता.

**नासिरुद्दीन खल्जी**—(स. १५००-मृ. स. १५१२) घियासुद्दीन खल्जीचा पुत्र. माळव्याचा सुलतान.

**नासिरुद्दीन खुसरोशाह खल्जी**—(स. १३२०) दिल्लीचा बादशाह. याला घियासुद्दीन तुघ्लकनें ठार करून राज्य बळकावलें.

**नासिरुद्दीन दामघानी**—(स. १३४४–५६) हा घियासुद्दीन दामघानीचा पुतण्या. त्याच्या वेळीं हा दिल्लीकडे हलक्या नोकरीवर होता. मदुरेच्या गादीवर येतांना महमूद गाझी दामघानी असें नांव घेतलें. यानें विरुद्ध जाण्याचा संभव असलेल्या सर्वांचा वध केला. इब्न बतूताहि याचे राज्यांतून निघून गेला.

**नासिरुद्दीन नुसतशाह**—(स. १५१८) बंगालचा राजा.

**नासिरुद्दीन महमूदशाह**—(नासिरशाह पाहा).

**नासिरुद्दीन महमूदशाह गुलाम**—(१० जून १२४६–१२६६) दिल्लीचा बादशहा. शम्सुद्दीन अल्तमशाचा मुलगा. ४० तुर्की सरदारांनीं आपला संघ स्थापून त्या द्वारां दिल्लीचें राज्यपद तुर्कांना अनुकूल ठेवण्याचा प्रयत्न चालविला. रझियाला पदच्युत करून याला तुरुंगांतून मुक्त करून गादीवर बसविण्यापर्यंत उलाढाली यांनींच केल्या. याच्या कारस्थानी आईनें याला राज्यावर बसविण्याकरितां बोलावणें आलें तेव्हां विरोध टाळण्याकरितां आजारी म्हणून औषध देण्याकरितां दिल्लीस आणलें, व गादीवर बसविलें. हा बल्बनचा जांवई होता. तोच याच्यानंतर गादीवर आला. याच्या एकपत्नीव्रतासंबंधीं बखरकारांनीं लिहिलेल्या गोष्टी खऱ्या नाहींत, तथापि इतरांच्या तुलनेनें हा जरा धार्मिक होता.

**नासिरुद्दीन महमूदशाह तुघ्लक**—(स.१३९४-१४१३) दिल्लीचा बादशाहा. हा सुलतान मुहम्मदाचा मुलगा. याला दिल्लींतील प्रमुख लोकांनीं गादीवर बसविलें. हा एकंदर १० वर्षे राज्यावर होता, पण खरी

सत्ता याच्या हातांत न येतां याला नेहमीं आपल्या वजीराचे तंत्रानें चालावें लागत असे. याचे वेळीं याच्या दोघां सरदारांचें ( सादतखान व मुखबरखान ) न पटल्यामुळें राज्यांत नेहमीं भांडण होत असे. याचेच कारकीर्दींत तैमूरलंगानें दिल्लीवर स्वारी केली होती ( स. १३९८ ). हा स. १४१३ त कैथल येथें मरण पावला.

**नासिरुद्दीन मुहम्मदशाह**—( स. १४४२ ) बंगालचा राजा.

**नासिरुद्दीन हैदर**—( स. १८२७–३७ ) अयोध्येचा नबाब. हा विषप्रयोगानें मेला.

**नासिरुद्दौला निजाम**—( स. १८२९–१८५७ ) हा हैद्राबादचा राजा. हा मीर्झा शिकंदरशाह निजामाचा मुलगा. याचें दुसरें नांव फर्खुंद अलीखान.

**नाहडराव**—( २ नागभट प्रतिहार पाहा ).

**निकितीन**—( स. १४०० नंतर ) हिंदुस्थानांत आलेला रशियन प्रवासी.

**निचुल**—एक आचार्य. कालिदासानें आपल्या मेघदूत काव्याच्या चौदाव्या श्लोकांत श्लेषानें याचा निर्देश केला आहे, असें दक्षिणावर्त व मल्लिनाथ यांनीं आपल्या टीकेंत म्हटलें आहे. हा रामगिरीच्या जवळ राहत असून कालिदासाचा सहाध्यायी होता. हा कालिदासाच्या काव्यावरील आक्षेप दूर करीत असे. पण श्लेषानें असा उल्लेख केला नसावा, असें पुष्कळांचें मत आहे.

**निजामअली निजाम**—( स. १७६१–१८०२ ) हा निजामुल्मुल्क असफजाहचा चवथा मुलगा. यानें सलाबतची सत्ता बळकावून त्याचा खून केला. यानें पेशव्यांशीं राक्षसभुवन येथें लढाई केली, पण तींत याचा पूर्ण पराभव झाला. यानें बारभाईंच्या कारस्थानांत १३ लाखांची जहागिरी मिळविली. मराठ्यांनीं आपल्या चौथाईच्या २ कोट रुपयांची मागणी निजामाकडे केली, पण यानें ती मागणी नाकारली, त्यामुळें मराठ्यांनीं याचा खर्ड्याच्या लढाईंत पूर्ण पराभव केला. इंग्रजांनीं यास टिपूच्याविरुद्ध मदत केल्याबद्दल ५३०००० रु. चा प्रांत दिला. यानें हेस्टिंग्ज़ला एक पत्र ता. २३–७–१७७८ रोजीं पाठविलें, त्यांत यानें 'राघोबाच्यावर विश्वास न ठेवतां, पेशव्यांशीं तह केला हें चांगलें केलें' असें लिहिलें आहे. यानें इंग्रजांशीं तैनाती फौजेचा तह केला आणि हा पूर्णपणें इंग्रजांचा अंकित झाला ( स. १८०० ).

**निजामखान**—गुजराथच्या सुलतान घराण्यांतील शकरखानाचा मुलगा.

२. हा गुजराथच्या मोमिनखानाचे मागून गादीवर आला, पण याचा त्याच्या मुलानें खून केला.

३. माळव्याच्या घोरी घराण्यांतील उस्मानखानाचा हा मुलगा ( कें. हि. मधील वंशावळीवरून ).

**निजामखान लोदी**—( स. १४८६–१५१७ ) लोदी घराण्यांतील बहलोलचा मुलगा गादीवर आला त्या वेळेस यानें शिकंदरशाहा हें नांव धारण केलें.

**निजामशाह बाहामनी**—( स. १४६१–६३ ) बाहामनी राजवंशांतील हुमायूनशाहाचा पुत्र.

हा बापाचा खून झाल्यावर गादीवर आला. ह्या वेळीं याचें वय ८ वर्षांचें होतें. याच्या कारकीर्दींत माळव्याच्या सुलतानानें बेदरवर स्वारी केली. हा आपल्या लग्नाच्या दिवशीं मरण पावला.

**निजामशाही घराणें (अहमदनगर व परांडा)**—निजामुल्मुल्क बहिरी ( स. १४६०–८९ ), १ 'मलिक' अहमद-निजामशाहा ( स. १४८९–१५०८ ), २ बुर्हाण १ ला ( स. १५०८–१५५४, बायको-मर्युम, विजापूरच्या युसुफ अदिलशाहाची मुलगी ), ३ हुसेन ( स. १५५४–१५६५, याचे भाऊ १ शहाताहिर, २ अवदुलकादिर, ३ अवदुलकादर, ४ हसन, ५ शाहअली, याचा मुलगा १० वा मुर्तझा २ रा ), ४ मुर्तझा १ ला ( स. १५६५-१५८८, याचा मुलानें खून केला. याचे भाऊ-१ बुर्हाण २ रा, शहाकासिम, बहिणी बीबी जमाली, इब्राहीम कुत्बशाहाची पत्नी व चांदबीबी विजापूरच्या अली आदिलशाहाची बायको ), ५ मिरान हुसेन ( स. १५८८–१५८९ ), ६ इस्माईल ( स. १५८९–१५९० ), ७ बुर्हाण २ रा ( स. १५९०–९५ ), ८ इब्राहिम ( स. १५९५ ), ९ बहादूर ( स. १५९५–१६०० ), १० मुर्तझा २ रा ( स. १६०१–७ ), ११ बुर्हाण ३ रा ( १६०७–३० ), १२ हुसेन २ रा. ( स. १६३०–३३ ), १३ मुर्तझा ३ रा ( स. १६३३–३७ ).

स. १६३७ नंतर अहमदनगरचें राज्य दिल्लीच्या साम्राज्यांत सामील झालें.

निजामुल्मुल्क बहिरीनें तिसऱ्या मुहम्मद बहामनीकडून महमूद गवानास ठार मारविलें व बहामनी राज्याचीं पांच छकलें झालीं; आणि त्याच्या अहमद निजामशाहा नांवाच्या मुलानें बहामनी राज्याचा पराभव करून अहमदनगर येथें स्वतंत्र राज्य स्थापून निजामशाहीची

राजधानी केली. बहादूरशाहानंतर या घराण्याची राजधानी परांडा झाली.

**निजामशाही घराणें**—(औरंगाबाद व हैदराबाद).

१ निजामुल्मुल्क (स. १६७१-१७४८), २ नासीरजंग (स. १७४८-५०), ३ मुजफरजंग (स. १७५०-५१), ४ सलाबतजंग (स. १७५१-६१), ५ निजामअली (स. १७६१-१८०३), ६ मीर्झा शिकंदरजाह (स. १८०३-१८२९), ७ नासिरुद्दौला (स. १८२९-१८५७), ८ अफझुलुद्दौला (स. १८५७-१८६९), ९ मीर माहबूबअलीखान (स. १८६९-१९१२), सर उस्मानअलीखान बहादुर फत्तेजंग (स. १९१२).

**निजामुद्दीन**—(कैकूबाद पाहा).

**निजामुद्दीन अवलिया शेख**—(स. १३२५ सुमार) खुस्रवखानाचा धर्मगुरु. ज्या वेळेस घियासुद्दीन तुघ्लकनें खुस्रवला पदच्युत करून आपण गादीवर बसला, त्या वेळेस त्यांनीं याजपाशीं खुस्रवखानानें दिलेली देणगी मागितली, तेव्हां यानें ती नाकारली. त्यामुळें तो याच्यावर रागावला. यानें घियासुद्दीन तुघ्लकाचा मुलगा उलुघखानास आपला शिष्य केलें व त्यास घियासुद्दीन तुघ्लक स्वारीवर गेला आहे, असें पाहून एक पोकळ लांकडी घर बांधण्यास सांगितलें, व घियासुद्दीन स्वारीवरून आल्यावर त्या घरांत येईल असा बेत केला. ठरल्याप्रमाणें घियासुद्दीन त्या घरांत गेला व त्यांत चिरडून मेला.

**निजामुल्मुल्क**—(स. १२४२ त खून) इल्तत्मशचे कारकीर्दींत जो ४० सरदारांचा संघ होता, त्यांतील हा एक प्रमुख सरदार. हा बहरामचे कारकीर्दींत पुढारी होता. यानेंच बहरामाकडून बद्रुद्दीन संकर नामक प्रमुख सरदाराचा खून करविला. पुढें याचें व बहरामचें न पटल्यामुळें हा बहरामचा खून करण्यास पाहत होता. मोंगल लोकांनीं ज्या वेळेस हिंदुस्थानावर स्वारी केली, त्या वेळेस बहरामाचे तुर्की सरदार मोंगलावर चालून गेले, पण यानें बहरामाला असा गुप्त निरोप पाठविला कीं, सर्व तुर्की सरदार असंतुष्ट असून राजाला पदच्युत करण्याच्या विचारांत आहेत. तेव्हां बहरामानें अदूरदृष्टीनें याला सर्व तुर्की सरदारांचा वध करण्यास हुकूम दिला. तो यानें सर्व तुर्की सरदारांस दाखविला. तेव्हां सर्व तुर्की सरदार दिल्लीस परत गेले व बहरामचा १० मे १२४२ त खून केला. अशा तऱ्हेनें यानें बहरामाचा सूड घेतला. पण पुढें याचें कारस्थान उघडकीस येऊन याचा सर्व सरदारांनीं ता. २८ आक्टोबर १२४२ त खून केला.

२. (ऊर्फ सुलतान अलाउद्दीन)—(स. १३३४) काराचा सुभेदार. सुलतान मुहम्मदानें यास कारा प्रांतावर सुभेदार नेमलें. पण पुढें यास आपण ठरविलेली वसुलाची रक्कम देतां न आल्यामुळें, यानें सुलतानाविरुद्ध बंड केलें; व कारास राज्य स्थापन केल्याचें जाहीर केलें. पण औंध प्रांताचा सुभेदार ऐन-उल्मुल्कानें याचा वध करून याचें कातडें सुलतानाकड पाठविलें (कें. हि.).

३. (स. १६७१-१७४८) याचें मूळ नांव कमरुद्दीन, यास औरंगजेबानें चिनकुलीचखान ही पदवी दिली. हा झुल्फीकारखानाच्या मृत्यूनंतर दख्खनचा सुभेदार झाला. हा फर्रुख्सियरच्या कारकीर्दींत स. १७२३ त प्रथम औरंगाबादेस व नंतर हैद्राबादेस स्वतंत्रतेनें कारभार पाहूं लागला. हा थोर मुत्सद्दी ७७ वर्षांचा होऊन मरण पावला (मुबारिझखान पाहा).

**निजामुल्मुल्क (मलिक नाईब) बहिरी**—(स. १४६०-१४८९) अहमदनगरच्या निजामशाही घराण्यांतील अहमद निजामशाहाचा हा बाप होय.

तिमाप्पा नामक एका ब्राह्मणाचा हा पुत्र होय. अहमदशहाचे फौजेनें विजयनगरच्या राजाबरोबर लढाई करून याला कैद करून आणलें, तेव्हां पुढें हा मुसलमान झाला. याचा मुलगा अहमद यानें अहमदनगरच्या निजामशाहीची स्थापना केली (मु. रि. भा. १ ला, पृ. २४२).

हा बहामनी राज्यांतील एक सरदार होता. यानें तिसऱ्या मुहम्मद बाहमनीकडून महम्मूद गवानाचा खून करविला; आणि त्यामुळेंच बहामनी राज्याचीं पांच छकलें झालीं (अहमद निजामशाह बहिरी पाहा).

**निजानंद**—याचा 'ज्ञानाब्धितरंग' नांवाचा ग्रंथ उपलब्ध आहे. तो शक १६३० सर्वधारी संवत्सरीं मार्गशीर्ष वद्य दशमीस मुक्तावली (माहुली ?) येथें संपविला. यानें निजानंद-श्रीकृष्ण-एकनाथ अशी खूप मोठी शंकरापर्यंत गुरुपरंपरा दिली आहे (मं. वार्षिकवृत्त श. १८३६ क्र. ११).

**निजानंदस्वामी**—प्रसिद्ध रंगनाथ स्वामींचे वडील जे गोपाळपंत त्यांचें संन्यास घेतल्यानंतरचें नांव. हे पूर्णानंद स्वामींचे शिष्य व शिवरामस्वामींचे गुरुबंधु. हे पुढें रंगनाथस्वामींचे गुरुहि झाले.

**नित्यानंद**—(ग्रंथकाल स. १६२५ सुमार) एक बंगाली कवि. वैष्णवसंप्रदायांत 'पतितपावन' नांवानें प्रसिद्ध. हे वैद्य जातीचे असून ह्यांचा जन्म श्रीखंड गांवीं झाला. वडिलांचें नांव आत्मारामदास. ह्यांचे ग्रंथ-

महाभारताचा अनुवाद, शीतलामंगल व प्रेमविलास (क. कौ. भा. ७ वा).

२. (ग्रंथकाल स. १६३९) एक ज्योतिषी. याचा पिता-देवदत्त व आजा नारायण. गोत्र मुद्गल. कुरुक्षेत्रानजीक इंद्रपुरीचा राहणारा. ग्रंथ-सिद्धांतराज.

**निरंजन**—(ग्रंथकाल स. १५५४) पंढरपूरचा राहणारा. यानें 'गणेशगीते'वर टीका लिहिली. यानें आपली परंपरा पुढीलप्रमाणें दिली आहेः शंकराचार्य-हस्तामलक-भास्कर-लयानंद-सिद्धानंद-आनंदानंद-परमानंद-काशीराज-निरंजन (म. सा.).

**निरंजनबुवा**—(समाधि स. १८५५) हा परळी वैजनाथाच्या पूर्वेस कळंत्र गांवचा राहणारा. याच्या बापाचें नांव श्रीधरपंत श्रोत्री, व आईचें नांव लक्ष्मी. याचें पूर्वीचें नांव अवधूत होतें. हा नोकरी सोडून रघुनाथ भाजी नांवाच्या साधूचें दर्शन घेण्यास नाशिक येथें गेला व त्यांनाच गुरु केलें. यास रामकृष्ण, योगीराज, विष्णु, वासुदेव असे चार पुत्र होते. यानें केलेले कांहीं ग्रंथ—'अमृतानुभवावर गद्य टीका'. याचीं 'पतिव्रताख्यान', 'गोंधळी', 'केशवचैतन्यकथाकल्पतरु', हीं प्रकरणें काव्यसंग्रहांत प्रसिद्ध आहेत (म. क. चरित्र भा. ५, पृ. १७८-८५).

**निरंजनमाधव**—(ग्रंथकाल स. १७५८-१७७३) एक सुप्रसिद्ध मराठी कवि. याचें मूळ नांव बनाजी माधव असें होतें व हा राजकारणांत याच नांवानें प्रसिद्ध आहे. हा गोदावरीनदीवरील रामडोहोचा राहणारा. हा दे. ऋ. ब्राह्मण असून याचें गोत्र विश्वामित्र. याच्या बापाचें नांव महादो बनाजी व आईचें नांव भागीरथी. याच्या बायकोचें नांव गंगाबाई व गुरूचें नांव लक्ष्मीधर बरवे. नानासाहेब पेशव्यांनीं याला तंजावर, श्रीरंगपट्टण वगैरे संस्थानांत मोठीं हुद्याचीं कामें सांगितलीं, त्यामुळें हा फार व्यवहारचतुर व राजकारणनिपुण झाला. संस्कृत, मराठी, कानडी व हिंदुस्थानी या चार भाषांचें यास उत्तम ज्ञान होतें. याचे गुरु लक्ष्मीधर हे वैकुंठवासी झाले, हें कळल्यावर यानें सात दिवस पाणी देखील तोंडांत टाकिलें नाहीं. पुढें यास स्वप्नांत दृष्टांत देऊन 'तुला माझी भेट होईल' असें सांगितलें. पुढें नानासाहेब पेशव्यानें याच्या मदतीस गणेशसुत बापजी पंडितास नेमिलें. पुढें दृष्टांताप्रमाणें हाच याचा गुरु झाला. यानें आपल्या ग्रंथाच्या आरंभीं या दोन्ही गुरूंस वंदन केलें आहे. याच्या हातून पुष्कळ मोठमोठीं राजकारणें झालीं, पण याचा मुख्य विषय अध्यात्मचिंतन होय.

मराठींत जे उत्तम कवि होऊन गेले त्यांतील निरंजनमाधव हा एक होय. तथापि इतर कवींप्रमाणें याची कविता फारशी प्रसिद्ध नाहीं. याच्या रचनेचा मुख्य काल शके १६८०-१६९५ हा होय. यानें १ ज्ञानेश्वरीविजय (अ. ५, श्लोक २१८) नामक ग्रंथांत ज्ञानेश्वरांचें चरित्र दिलें आहे. २ ज्ञानेश्वरसमाधि (अ. १२, श्लोक ७६३) हा ग्रंथ नामदेवांच्या अभंगांच्या आधारें शके १६८७ पार्थिव संवत्सरांत केला. ३ चिद्बोधरामायण (श्लोक ४२२ बालकांड), ४ रामकर्णामृत (१११), ५ निरोष्ठ रामायण (श्लोक ४५) व ६ मंत्ररासचरित्र (श्लो. १५) हे याचे ग्रंथ रामवर्णनपर आहेत. याचे छंदःशास्त्रावर पुढील तीन ग्रंथ आहेतः—७ वृत्तमुक्तावली (श्लो. १५०), ८ वृत्तवनमाला (श्लो. १११) व वृत्तावतंस (श्लो. २५१) हे अनुक्रमें शके १६८३, १६८९, व १६९४ या सालांत रचिलेले आहेत. याचा सुभद्राचम्पू (मराठी सुंदर काव्य, सर्ग ७, श्लो. ३८०) हा शके १६९० मध्यें रचिलेला आहे. ११ सांप्रदायपरिमळ (उद्गार ५ ओंवी १००० आहे). १२ अद्वैतामृत, १३ बोधभानु. ह्या दोन टीका स्वात्मानंदप्रकाश ग्रंथावर आहे. हा शके १६८५ मध्यें रचिला. याशिवाय याचीं कांहीं स्फुट प्रकरणें, स्तोत्रें व पदें आहेत. वामनपंडितांच्या धर्तीवर यानें बहुतेक काव्यरचना भिन्नभिन्न वृत्तात्मक श्लोकांत केली आहे. शुद्धाशुद्धतेकडे याचें फारसें लक्ष नाहीं, तरी याच्या काव्यांत प्रसाद चांगला असून याच्या वाणीचा ओघ अगदीं अस्खलित आहे. हा मोठा वेदांती व योगी असून परम भक्त होता. साहित्यशास्त्र यानें चांगलेंच पाहिलेलें दिसतें. वृत्तावतंस ग्रंथ तर यानें नथ्थभट नामक नागर ब्राह्मणाच्या मतानुसारें केला आहे (म. क. च. भा. १ ला, पृ. ३२२-४४).

प्रो. पोतदार यांनीं १९२८सालीं साहित्यपत्रिकेंत 'सांप्रदायपरिमळ ग्रंथ' 'निरंजनमाधवाचा नसावा, तो त्याचा शिष्य निरंजनदास याचा असावा' अशी शंका अभ्यासी जनांपुढें ठेविली. पण रा. पांगारकरांनीं हा ग्रंथ निरंजन माधवाचाच आहे असें आपलें ठाम मत कारणांसह दिलें आहे. यांचें घराणें सध्यां पुणें येथें शनवार पेठेंत अमृतेश्वराजवळ पारसनीस या नांवानें प्रसिद्ध आहे.

**निरंजनस्वामी**—(स. १५५९-१६४९) हे समर्थ रामदासस्वामींचे शिष्य. हे कऱ्हाडचे राहणारे. यांची गणेशगीता प्रसिद्ध आहे.

**निरुपम राष्ट्रकूट**—मालखेडच्या राष्ट्रकूटांपैकीं तिसऱ्या अमोघवर्षाचा धाकटा मुलगा. हा गादीवर आला

नव्हता. याचा मुलगा कोक्कल किंवा कर्क दुसरा हा खोत्तिगानंतर गादीवर आला.

**निर्गुणपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं सत्तावनावा सिद्ध होय. जात शूद्र. देश पूर्व. शरीरनाडिकाबिंदुसमता ( तं. ४८।४ ) हा याचा ग्रंथ.

**निराजी रावजी**—याचा मुलगा प्रल्हाद निराजी होय. निराजी हा शिवाजीमहाराज आग्रा येथून निसटून आले त्या वेळीं हजर होता. हाच गोवळकोंड्यास तानाशा कुत्बशाह व महाराज यांचा तह झाला तेव्हां महाराजांतर्फे तहावर सही करणारा होता. निराजी हा विष्णुवर्धन गोत्री देशस्थ ऋ. ब्राह्मण. जुन्नरचे देशपांडे घराण्याशीं याची सोयरीक होती. याला शिवाजीनें न्यायखात्याचें मुख्य नेमलें होतें.

**निर्ग्रंथ**—याला नातपुत्र असेंहि म्हणतात. हा एका शेतकऱ्याचा पुत्र होता. जैन लोक पार्श्वनाथाच्या अनुयायाला नातपुत्र म्हणतात. यानें विषमिश्रित भात खाण्याकरितां बुद्धदेवास बोलावलें होतें असें फाहियान म्हणतो.

**निर्भयराम**—पिटकन गांवचा चतुर्वेदी ब्राह्मण. यानें नरसी मेहेत्याच्या मुलीचें लग्न गुजराथींत कवितावद्ध लिहिलें आहे ( का. दो. ).

**निर्मळ पाठक**—( स. १४०० सुमार ) वडवाळ सिद्ध नागेशाचा शिष्य. याचें ओवीबद्ध पंचतंत्र उपलब्ध आहे ( म. सा. ).

**निलंबिका**—बसवाची बहीण पद्मावती, तिचा हा पुत्र.

**निवृत्ति अवधूत**—'दशनामविधान' या ओवीबद्ध ग्रंथाचा कर्ता ( मं. श. १८३६ वा. इ. ले. ८५ ).

**निवृत्तिनाथ**—( जन्म स. १३५१-समाधि स. १३७७ त्र्यंबकेश्वरीं ) ज्ञानेश्वरमहाराजांचे वडील बंधु व गुरु.

**निश्चलपुरी**—यानें गागाभट्टकृत शिवराज्याभिषेकविधींतील कांहीं दोष दाखवून तांत्रिक पद्धतीनें ललिता पंचमी( आश्विन शु. ५ )स केलेल्या दुसऱ्या राज्याभिषेकाची माहिती असलेला असा 'श्रीशिवाजीराज्याभिषेक-कल्पतरु' या नांवाचा एक ग्रंथ लिहिला. याचा उल्लेख बखरींत असून 'तारीख-इ-शिवाजी' मध्यें याचें नांव अचलपुरी असें लिहिलें आहे.

प्रतापरावाचा मृत्यु, काशीबाई नांवाच्या राजपत्नीचा मृत्यु, सप्तकोटेश्वराच्या देवालयाचा जीर्णोद्धार वगैरे बारकाव्याची माहिती यांत आहे. राज्याभिषेकाच्या वेळीं मंत्रोक्त विवाह झाले ते पूर्वीच्याच बायकांशीं झाले असें या ग्रंथांत सांगितलें आहे. यावरून बाकीचे जे ग्रंथकार म्हणतात कीं, महाराजांनीं उतार वयांत अनेक नवीं लग्नें केलीं हें त्यांचें म्हणणें अगदीं चुकीचें आहे. ग्रंथांत आलेला कालोल्लेख गणितदृष्ट्या बिनचूक आहे. हा ग्रंथ संस्कृत भाषेंत आहे ( मं. त्रै. व. ११. १, ले. ६ ).

**निष्कलंक वज्र**—चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं एक. यानें भारतीय ग्रंथाचें भूतानी व लिच्छवी भाषांत अनुवाद केले आहेत. याचेबरोबर जगन्मित्र नंद हे होते. यानें बंधविमुक्तिशास्त्र ( तं. ४८।१२३ ) या नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे.

**निष्कुळानंद**—( स. १८५७ ) काठेवाडांत गढडा गांवचा राहणारा कवि. भक्तचिंतामणि, यमदंड, वचनविधि, कल्याणनिर्णय, शिक्षापत्री, अर्जी विनय, हरिस्मृति, हरिचरण, स्नेहगीता, हृदयप्रकाश, चिन्हचिंतामणि, मनगंजन, चौसष्टपदी, सारसिद्धि, हरिबाळगीता, पुरुषोत्तमप्रकाश, चातुर्यगुणग्राहक, धीरज आख्यान आणि भक्तिविधि, इतके यांचे ग्रंथ गुजराथी भाषेंत आहेत.

**निळो बल्लाळ चिटणीस**—खंडो बल्लाळाचा धाकटा भाऊ. याला शाहूनें पेशव्यांची चिटणिशी दिली होती.

**निळोबा**—(स.१६५८सुमार) मराठी साधु कवि.देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. नगर जिल्ह्यांतील पिंपळनेरचा कुलकर्णी. पिंपळनेर गांव यानें वसविलें, असें महीपतीनें म्हटलें आहे. हा तुकोबाच्या चौदा टाळकऱ्यांपैकीं एक होता. याची कविता बरीच आहे. हा शके १५८० च्या सुमारास विद्यमान होता. हा फाल्गुन शुद्ध प्रतिपदेस पिंपळनेर येथें समाधिस्थ झाला. त्या दिवशीं पिंपळनेर येथें मोठा उत्सव होतो. तुकाराममहाराजांनीं वैकुंठवासी झाल्यावर यांनीं त्यांच्या विरहानें बेचाळीस दिवस उपवास केला. तेव्हां त्यांच्याकडून साक्षात्कार होऊन यांना अनुग्रह मिळाला. तुकारामानंतर प्रमुख शिष्य म्हणून गादीचा मान यांच्याकडे आला. निळोबाचे शंकरस्वामी शिरुरकर आणि शंकरस्वामीचे मल्लाप्पा आप्पा वाशीचे लिंगायत वाणी. वाशीकरच सध्यां तुकारामाची गादी चालवणारे आहेत. भक्तविजयाच्या ५६ व्या अध्यायांत यांच्या एकनिष्ठतेची कथा दिली आहे. यानें तुकारामाचें चरित्र अभंग वृत्तांत गायिलें आहे आणि पांडुरंगवर्णन, पंढरीमाहात्म्य वगैरे प्रकरणें अभंगात्मक केलीं आहेत ( म. क. च. भा., ३, पा. ६८-८० ).

**निळो मोरेश्वर**—( नीलकंठ मोरेश्वर पिंगळे पाहा ).

**निळो राम अत्रे**—हा दे. ऋ. ब्रा. होता. हा शिवाजी-महाराजांपाशीं मोठ्या प्रतिष्ठेनें वावरत असे. ' निळोराम अत्रे पूर्वी हिंदुराव सरलष्कर याजकडे सबनीस असतां स्वामीकार्यावरी चीज जाले. सबब याचा मुलगा गणेश निळकंठ याच्या कुटुंबाचा योगक्षेम चालला पाहिजे. याजकरितां कैलासवासी राजश्री राजाराम साहेब चंदीचे मुक्कामी कृपाळू होऊन मौजे गराडे येथील एक चाहूर जमीन कुलबाब कुलकानू इनाम देते झाले.' निळोराम कोणत्या लढाईंत स्वामींकार्यी चीज झाले, हें माहीत नाहीं ( मं. त्रै. व. ५. १-४. ले. २ ).

**निळो सोनदेव बहुतकर**—( मृत्यु स. १६७२ ) हा आपला वडील बंधु आबाजी सोनदेवापेक्षां लिहिण्याच्या वगैरे कामांत फार हुशार असे. यानें कोंकणची उत्तम व्यवस्था लावली. यानें सिद्दीच्या लढ्यांत प्रमुख भाग घेतला. शिवाजीनें याच्याकडे भोर किल्ल्याची सबनिशी दिली. राज्याभिषेकाच्या पूर्वी याच्याकडे मुज्मूचें काम होतें. शिवाजी दिल्लीस गेला तेव्हां ज्या तिघांवर राज्याची जबाबदारी सोंपविली होती त्यांपैकीं हा एक होता. हा स. १६७२ मध्यें मरण पावला.

**निहाल**—मुद्गल शहरीं एका सोनाराची निहाल नांवाची एक रूपवती मुलगी होती. विजयनगरच्या राजानें हिच्या बापाकडे हिची मागणी केली. पण ही गोष्ट मुलीस पसंत पडली नाहीं. तेव्हां राजानें मुलीस पकडण्यासाठीं फौज घेऊन मुद्गल शहरावर हल्ला केला. पण निहाल पळून गेली. तो मुलूख बहामनी राजा फीरूजशाहाचा असल्यामुळें त्यास मोठा राग आला; आणि त्यानें विजयनगरच्या देवराय राजाशीं लढाई करून त्याचा पूर्ण पराभव केला व देवराय राजाच्या मुलीशीं आपण लग्न लावलें. त्या वेळीं फीरूजशहानें हिचें लग्न शहाजादा हसनखान याजबरोबर लाविलें ( मु. रि. भा. १ ला ).

**निंबराज बाबा**—( लिंबराज पाहा ).

**निंबार्क**—( स. ११५० सुमार ) नीमावत पंथाचा संस्थापक व एक वैष्णवधर्मप्रसारक होय. कोणी प्रख्यात गणिती व ज्योतिषी जो भास्कराचार्य तो हाच असें म्हणतात. एके दिवशीं संध्याकाळीं सूर्यास्तानंतर अन्नग्रहण न करणारा एक अतिथि याचे घरीं आला. तेव्हां यानें अतिथीसाठीं सूर्याला निंबाच्या झाडांत अडकवून ठेविलें. म्हणून याला निंबार्क ( निंब-अर्क ) म्हणूं लागले.

हा जातीनें तैलंगी ब्राह्मण असून बल्लारी जिल्ह्यांतील निम्ब ( सांप्रतचें निम्बापूर ) गांवीं राहत असे. याच्या बापाचें नांव जगन्नाथ असून आईचें नांव सरस्वती होतें.

ब्रह्मसूत्रांवर एक लहानसें भाष्य म्हणून ' वेदान्तपारिजातसौरभ ' नांवाचा ग्रंथ व ' सिद्धान्तरत्न ' किंवा ' दशश्लोकी ' नांवाचा एक छोटासा ग्रंथ असे दोन ग्रंथ यानें लिहिले. याच्या संप्रदायाचे लोक सर्व हिंदुस्थानभर पसरलेले असून मथुरेच्या आसपासचा मुलूख व बंगाल यांमध्यें तर या लोकांची संख्या मोठी आहे. याचीं मतें रामानुज-पंथाच्या टेंकलई पीठाच्या मतांच्या जवळजवळ येतात.

**निंबाळकर घराणें ( फलटण )**—१ जगदेवराव ऊर्फ निंबराज पवार ( स. १२४४-१३२७ ), २ निंबराज नाईक दुसरें ( स. १३२७-४९ ), ३ वणंग भूपाळ ( स. १३४९-१३७४ ), ४ वणंगपाळ (स. १३७४-१४००), ५ वणगोजीराव १ ला (स. १४००-३०), ६ मालोजीराव १ ला ( स. १४३०-३५ ), ७ बाजीसाहेब ( स. १४३५-६५ ), ८ पोवारराव नाईक ( स. १४६५-८० ), ९ बाजी नाईक ( स. १४८०-१५१२ ), १० मुधोजी नाईक १ ला ( स. १५१२-५२७ ), ११ बाजी धारराव ( स. १५२७-६० ), १२ मालोजी नाईक २ रा ( स. १५६०-७० ), १३ वणगोजीराव २ रा ( स. १५७०-१६३० ), याची बहीण दीपाबाई, हिचें लग्न मालोजी भोसल्याशीं झालें. १४ मुधोजी नाईक २ रा (स. १६३०-४४ ), १५ बजाजीराव ( स. १६४४-७५ ), यास तीन अपत्यें:—१ जगदेवराव, २ साबाजी, ३ सईबाई. हिचें शिवाजीशीं लग्न झालें. १६ वणगोजी ३ रा (स. १६७६-९३ ), याला दोन अपत्यें:—मुधोजीराव, महादाजीराव, ( यास शिवाजीनें मुलगी दिली ). १७ जानोजीराव ( स. १६९३-१७४८ ), १८ मुधोजीराव ३ रा ( स. १७४८-६५ ), १९ बजाजी ( स. १७६५-७४ ), २० मालोजीराव ३ रा ( स. १७७४-७७ ), २१ सगुणाबाई ( स. १७७७-९१ ), २२ जानराव ( १७९१-१८२५ ), २३ साहेबजीबाई ( स. १८२५-५३ ), २४ मुधोजीराव बापूसाहेब ( स. १८६० ), २५ मालोजीराव नानासाहेब ( चालू ).

याशिवाय निजामशाहींतील रावरंभा निंबाळकरांचें घराणें निराळें आहे ( भूम व वाशी, जि. बीड ).

**नील**—( ख्रि. पू. ११८२ ) ' नीलमतपुराण ' या ऐतिहासिक ग्रंथाचा कर्ता. राजतरंगिणींत आधार म्हणून याच्या ग्रंथाचा निर्देश आहे. हा काश्मिरी होता.

**नीलकंठ**—( स. १५८७ ) एक ज्योतिषी. याच्या आईचें नांव पद्मा. याचा ' तोडरानंद ' म्हणून एक ग्रंथ

आहे त्याचें वर्णन इतर ग्रंथांत आलें आहे. त्या ग्रंथांतील उपलब्ध भागांतील श्लोकसंख्या १००० असून त्यांत यात्राप्रकरण मात्र आहे. अकबराचा प्रधान तोडरमल्ल यावरून हें नांव दिलें असावें असें वाटतें. तोडरमल्लानें धर्मशास्त्रावर लिहिलेला तोडरानंद हा ग्रंथ वेगळा दिसतो.

नीलकंठानें तिथिरत्नमाला, प्रश्नकौमुदी अथवा ज्योतिषकौमुदी या नांवाचा प्रश्नग्रंथ आणि दैवज्ञवल्लभा हे ज्योतिषग्रंथ केले आहेत व जैमिनीसूत्रटीका केली आहे. यानें अशा बऱ्याच टीका लिहिल्या आहेत.

२. मृच्छकटिकाच्या दहाव्या अंकाचा कर्ता.

३. (नीळकंठ चतुर्धर) यानें समग्र महाभारतावर टीका लिहिली आहे. याचें नांव नीळकंठ चतुर्धर (चौधरी) असें आहे. हा सतराव्या शतकांत होऊन गेला. हा महाराष्ट्रीय होता. यानें अनेक कोशादि ग्रंथांच्या साहाय्यानें आपली टीका लिहिली. हा पुणतांब्याचा राहणारा (कोपरगांव). हल्लीं याचे वंशज काशीस आहेत.

यानें सप्तशतीवर 'सुबोधिनी' नांवाची टीका लिहिली. त्या टीकेंत यानें आपणास चतुर्धरमिश्र असें म्हणवून घेतलें आहे. तसेंच आपल्या टीकेस भाष्य म्हटलें आहे.

४. भवभूति कवीचा बाप.

५. शंकरमंदिरसौरभ ग्रंथाचा कर्ता.

६. (लेखनकाल स. १६५६) चिमनीचरित्र या संस्कृत ग्रंथाचा कर्ता.

७. चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं एक. यानें अद्वयनाडिकाभावनाक्रम (तं. ४८।६) या नांवाचा ग्रंथ लिहिला.

**नीलकंठ दीक्षित**—(ग्रंथकाल स. १६३६ सुमार) भारद्वाजगोत्री नारायण दिक्षित व भूमिदेवी यांचा पुत्र. कलिविडंबन, गंगावतरण वगैरे यानें लिहिलीं आहेत. हा आपल्या बुद्धिप्रभावामुळें मदुरेच्या राजाचा प्रधान झाला. यानें नीलकंठ नांवाचा एक चंपु लिहिला असून त्यांत नाना तऱ्हेच्या देशांचें वर्णन आहे (स. १६३६). हा अप्पय्या दिक्षिताच्या भावाचा नातू होय. यानें 'नलचरित' नांवाचें संस्कृत नाटक लिहिलें असून त्याच्या प्रास्ताविक भागावरून अप्पय्या दिक्षित वगैरेंची माहिती मिळते.

**नीलकंठ धर्मपूरकर**—(ग्रंथकाल स. १५८७) प्रसिद्ध ज्योतिषी. याच्या पित्यानें कामधेनु टीका लिहिली. 'ताजिकनीलकंठी' हा याचा ग्रंथ. त्यांत फार्सी व अरबी शब्दांचा भरणा आहे (भा. ज्यो.).

**नीलकंठभट्ट**—(स. १६१०–४५ सुमार) हा नारायणभट्टाचा नातू होय. याच्या बापाचें नांव शंकरभट्ट असें होतें. भरेह येथील राजा भगवंतदेवानें याला आश्रय दिला होता. त्याच्या आश्रयास राहिल्यावर यानें 'भगवंतभास्कर' नांवाचा ग्रंथ लिहिला. हा कमलाकर भट्टाचा चुलत भाऊ होय. त्याची व याची नेहमीं स्पर्धा चाले. दोघांचीं मतें पुष्कळ ठिकाणीं विरुद्ध आहेत.

याचा 'भगवंतभास्कर' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. या ग्रंथाचे १२ विभाग केलेले आहेत. संस्कार, आचार, काल, श्राद्ध, नीति, व्यवहार, दान, उत्सर्ग, प्रतिष्ठा, प्रायश्चित्त, शुद्धि, शान्ति, असे ते विभाग होत. हे सर्व मयूख नांवानें प्रसिद्ध आहेत.

याशिवाय यानें व्यवहारतत्त्व आणि कुंडोद्द्योत असे ग्रंथ लिहिले आहेत.

याची लेखनशैली फार चांगली आहे. ह्यानें मीमांसेचा अभ्यास केला होता. याची बरोबरी करणारे संस्कृत लेखक फार थोडे होऊन गेले.

**नीलकंठराव पटवर्धन**—(स. १७७१ सुमार) हा कुरुंदवाडच्या त्रिंबकराव आप्पाचा पुत्र. स. १७७१ मधील हैदरावरील स्वारींत हा प्रसिद्धीस आला.

**नीलकंठ महादेव**—(आबा पुरंदरे पाहा).

**नीलकंठ मोरेश्वर पिंगळे**—(मृत्यु स. १७०८ जाने.). हा मोरोपंत पिंगळे पेशवे यांचा पुत्र. संभाजीनें यास कैदेंत ठेविलें होतें. संभाजीस असें वाटलें कीं, हा राजारामास गादीवर बसविण्याच्या खटपटींत आहे. मोरोपंत वारल्यावर यास सोडून पेशवा केलें. यानें राजारामास जिंजीस चांगली मदत केली.

जिंजीमुळें मराठी राज्याचा बचाव झाला, व जिंजी प्रांत राखण्याचें जबरदस्त काम यानें चांगलेंच बजावलें म्हणून राजारामानें पेशवाईपद यास दिलें. स. १७०७ च्या सुमारास शाहू व ताराबाईचा झगडा सुरू होता, तेव्हां हा ताराबाईचा प्रधान होता. शाहूनें याचा भाऊ बहिरोपंत पिंगळे यास पेशवाई दिली.

**नीलकंठ येसाजी महाडकर**—हा प्रभु जातीचा असून शिवाजीमहाराजांचा पारसनीस होता. हा शिवाजीबरोबर आग्रा येथें असतां शिवाजीच्या फार उपयोगी पडला. याचीं मुलें बाबाजी व गोविंदराव होत (म. रि. मध्य. १, पा. ४३३).

**नीलकंठशास्त्री विनायकभट्ट थत्ते**—(स. १८१८–३१ सुमार) पेशवाईच्या अखेरच्या कालांतील प्रसिद्ध पंडित. यांचें पुणें येथें अध्ययन झाल्यावर रामशास्त्री प्रभुणे यांनीं यांची खर्चाची व्यवस्था करून यांना काशीस पाठविलें. यांनीं बाळंभट्ट पायगुंडे यांच्यापाशीं व्याकरणावरील शेखर ग्रंथाचें अध्ययन करून शेखराची

परंपरा महाराष्ट्रांत आणली. यांची परंपरा महाराष्ट्रांत आजहि गजेंद्रगडकर व अभ्यंकर या घराण्यांनीं चालविली आहे ( थत्ते घराण्याचा इतिहास, पा. १२२ ).

**नीलग्रीव**—( स. १७५९ पूर्वी ) यानें ' वेताळ-पंचविशी ' नांवाचा एक मराठी अपूर्ण ग्रंथ लिहिला. भाषा अतिशय जुनी दिसते ( मं. श. १८३६ वा. इ. ले. ८७).

**नीलम्मा**—ही बसवाची बायको होय. हिनें लिंगायत-मताचा प्रसार करण्याकरितां बरीच खटपट केली.

**नीलांबरशर्मा**–( जन्म स. १८२३–मृत्यु स. १८८३ ) हा गंगा–गंडकी संगमापासून दोन कोसांवर पाटणा येथें राहणारा मैथिल ब्राह्मण होय. याच्या बापाचें नांव शंभुनाथ ( शर्मा ) असून यानें काशीच्या पाठ-शाळेंत अध्ययन केलें. अलवारचा राजा शिव याच्या सभेंत हा मुख्य ज्योतिषी होता. याचा वडील बंधु जीवनाथ. याचा ' गोलप्रकाश ' नांवाचा पांच अध्या-यांचा ग्रंथ संस्कृतांत आहे. तो शके १७९३ मध्यें काशी येथें बापूदेव यानें छापला. भास्करीय कांहीं ग्रंथांवरहि यानें टीका केल्या आहेत ( भा. ज्यो. ).

**नुनिज फेरनाओ**—( स. १३४२ सुमार ) हा एक कालगणनात्मक अभ्यास करणारा पोर्तुगीज इतिहासकार. यानें विजयनगरच्या राज्याचा बराच इतिहास लिहून ठेविला आहे. याच्या मतें देवराय राजानें विजयनगर राजधानीची स्थापना केली. परंतु देवराय व होयसळ राजा बल्लाळ ३ रा हे एकच होत, असें रे. एच्. हेरास यांनीं आपलें मत दिलें आहे.

**नुस्तीगीन**—( स. १०५२ ) पंजाबचा सुभेदार. यानें मसूदचा १ ला मुलगा फर्रुखशाह यास गझनीच्या गादीवर बसविलें व जेव्हां वघरबेग दाऊदनें गझनीवर स्वारी केली, त्या वेळेस यानें त्याचा पराभव केला.

**नुस्रतखान**—( स. १३५० सुमार) हा गुजराथच्या सुलतानांचा मूळ पुरुष, वजीह-उल्-मुल्कचा तिसरा मुलगा.

२. ( स. १२९४-१३०० ) अलाउद्दीन खल्जीचा एक सरदार. जेव्हां बाटग्या मोगल लोकांनीं अला-उद्दीनाचे सैन्यांत बंड केलें, त्या वेळेस यानें त्या बंडाचा मोड केला. पुढें यानें हम्मीरदेवाच्या रथंमभोर किल्ल्यावर हल्ला केला असतां त्या लढाईंत हा मरण पावला व याच्या सैन्याचा पराभव झाला.

**नुस्रतशाह तुघ्लक**—( स. १३९५-९८ ) हा फत्तेखान तुघ्लकाचा पुत्र.

**नुस्रती**—एक मुसलमान कवि. हा विजापूरच्या आदिलशाहींतील दुसऱ्या अलीच्या कारकीर्दींत कवि होता. यानें ' गुल्शने इश्क ' व ' अलीनामा ' असे दोन ग्रंथ लिहिले. तारीख-इ-अली या ग्रंथापेक्षां अलीनाम्यांत मोंगलांशीं झालेल्या संग्रामाचें वर्णन विस्तृत आहे.

' तारीख-इ-सिकंदरी ' या याच्या काव्याचा ' बुसातिनुस्सलातीन ' मध्यें निर्देश आहे, पण तें अद्यापि अनुपलब्ध आहे.

**नुस्रुद्दीन**—( मसूद खल्जीचें नामांतर ).

**नूरजहान**—( जन्म स. १५७३–मृत्यु स. १६४५ ) ( जहांगीर व मोहबतखान पाहा ).

**नूर मुहम्मद**—( काव्यकाल स. १७२४ ) हिंदी कवि. गांव सवरहद. दिल्लीच्या मुहम्मदशाहाचा समकालीन. काव्य इंद्रावती.

**नूरुद्दीन इस्मायली**—( स. १२३७ ) काफीर पंथाचा तुर्की इसम. हा इस्मायली पंथाचा पुढारी. यानें आपल्या वक्तृत्वानें सर्व लोकांस मुसलमान धर्माविरुद्ध बिथरविलें व यानें स्वतःच्या पुढारीपणाखालीं मशिदींमधील पुष्कळ मुसलमानांची कत्तल केली.

**नृवर्मा प्रतिहार**— ( स. १२४७ सुमार ) हा विग्रहपुत्र मलयवर्म्याचा भाऊ. याचें ग्वाल्हेर राज्यांत कुरेठा येथें एक दानपत्र सांपडलें आहे. तें वि. सं. १३०४ चैत्र शु. १ चें आहे. याच्या मागें यज्वपालचे वंशज जजपेल्लवंशी परमादि राजाचा पुत्र चाहडदेव यानें प्रति-हारापासून नलगिरी ( नरवर ) आदि घेतलें. आतां रघुवंशी प्रतिहारांपैकीं बुंदेलखंडांतील नागौदचें राज्य, अलिपुरा, तसेंच कांहीं किरकोळ जहागिरी राहिल्या आहेत. नागौदच्या राजाची भाटाकडून मिळणारी वंशावळ पाहतां त्यांतील पहिलीं नांवें कृत्रिम धरलेलीं आहेत.

**नृसिंह**--( चाल्हण पंडित पाहा ).

२. ( जन्म स. १५८६ ) एक ज्योतिषी. हा गोल-ग्रामांतील दिवाकराचा नातू होय. याचें अध्ययन बहुतेक याच्या विष्णु आणि मल्लारि या चुलत्यांपाशीं झालें. यानें ' सौरभाष्य ' नांवाची सूर्यसिद्धांतावर टीका लिहिली आहे.

सिद्धांतशिरोमणीवरहि यानें टीका लिहिली आहे. तिची ग्रंथसंख्या ५५०० आहे. ह्या दोन्ही ग्रंथांवरून हा चांगला ज्योतिषज्ञ असावा असें दिसतें. हा मोठा मीमां-सक होता, असें याचा पुत्र दिवाकर यानें लिहिलें आहे ( भा. ज्यो. ).

३. हा कानडी कवि. ' कर्णरसायन ' नामक मांधातृ-चरित्राचा कर्ता.

**नृसिंहतीर्थ**--ईश्वरतीर्थाचे शिष्य. यांचे शिष्य विद्यातीर्थ.

**नृसिंहदेव**--वीरवल्लाळ राजाचा बाप.

२. वीरवल्लाळ-पुत्र. जयपाळाचें नामान्तर.

**नृसिंहदेव रायलू**--( स १५०८ ) हा कृष्णदेवाचा पिता ( अलसानी पेदन्न पाहा ).

**नृसिंह दैवज्ञ**—भास्कराचार्यकृत गणिताध्याय व गोलाध्याय यांवरील टीकाकार.

**नृसिंह पंचानन**—( स. १६७५ सुमार ) यानें जानकीनाथाच्या भूषा ग्रंथावर ' न्यायसिद्धांतमंजरीभूषा ' नांवाचा ग्रंथ केला. यानें गोविंदाची स्तुति केली आहे. हा गोविंद रुद्राचा पुत्र असावा.

**नृसिंहसरस्वती**—( समाधि श. १३८० स. १४५८ ) गुरुचरित्रांत ज्यांचें चरित्र वर्णिलें आहे ते हे स्वामी. अध्याय ११ ते ५१ पर्यंत यांचें चरित्र वर्णिलें आहे. यांचा जन्म करंजनगर ( कारंजा–वऱ्हाड ) येथें झाला. हे वाजसनेय शाखेचे होते. जन्मनाम–शालिग्राम. माता–अंबाभवानी, पिता–माधव. यांनीं बाराव्या वर्षी संन्यास घेतला व काशीक्षेत्रांत कृष्णसरस्वती यांस गुरु केलें. यांनीं सर्व भरतखंडभर तीर्थयात्रा केली असें वर्णन आहे. पुढें कृष्णाकांठीं वास्तव्य झालें. शिरोळ ( औदुंबर ) येथें यांनीं ब्राह्मणाचा मृत पुत्र उठवला. यापुढें यांचें वास्तव्य भीमेच्या कांठीं गाणगापूर येथें झालें. तेथेंच हे निजधामास जाईपर्यंत होते. तेथें असतां यांनीं मृत ब्राह्मण जिवंत केला व बादशहाचा स्फोट ( फोड ) बरा केला, असें वर्णन आहे. ब्राह्मणांचा कर्मठपणाचा आचार यांनीं टिकवण्याचा प्रयत्न केला. हे श. १३८० ( स. १४५८ ) माघ कृ. प्रतिपदा शुक्रवारीं निजधामीं गेले. गुरुचरित्रांत बेदरच्या बादशहाच्या–हा अलाउद्दीनशाहा बाहमनी ठरतो–पायाचा फोड बरा केल्यानें यांची बेदरांत थाटानें मिरवणूक काढल्याची गोष्ट आहे. यांस मरणापूर्वी दोन वर्षांपासून पायास फोड झाला होता, तो हकीमास बरा करितां येईना, असें वर्णन फेरिस्ता करतो. शेवटीं त्यांतच स. १४५७ मध्यें त्यांचा अंत झाला. दोघांच्या कालांत मेळ आहे, पण हिंदूंच्या धर्माला मुसलमानानें मान दिला हें फेरिस्त्यानें लिहिलें नाहीं. कदाचित् दुसऱ्या एखाद्या तवारिखेंत हें सांपडावें ( मं. वार्षिक. १८३७ पा. १२३-१२४ ).

**नृसिंहाश्रममुनि**—( ग्रंथकाल स. १५०० ) हा शंकराचार्यांच्या वेदान्तावरील विवरणभावप्रकाशिका या ग्रंथाचा कर्ता होय.

**नेकुसियर मोगल**—( मृ. स. १७१९ ) औरंगजेबाचा नातू व अकबराचा मुलगा.

**नेडुमुंडुकिल्ली चोल**—( स. १८०-२०० ) हा चोल सम्राट् करिकालाचा पुत्र किंवा नातू असून त्याच्या मागून राजा झाला. करिकाल वारल्यानंतर चेरपांड्यांनीं चोल राज्यावर स्वारी केली, परंतु यानें त्यांचा कारियारू येथें पराभव केला. या वेळीं कांची हें चोल साम्राज्याचें उत्तर प्रांतांतील मुख्य ठिकाण होतें.

**नेताजी पालकर**—( स. १६३३–७६ ) माणकोजी दहातोंड्यांच्या मृत्यूनंतर स. १६३३ मध्यें शिवाजीनें नेताजी पालकर यास सरनोबतीची जागा दिली ( प. सा. ९५४ ). याचें ठिकठिकाणच्या शिलेदार लोकांवर चांगलें वजन होतें. एकदां मोगलांनीं पाठलाग केल्यामुळें यास रोजीं ५० मैल मजल मारावी लागली ( प. सा. ९२३ ).

हा सातारा जिल्ह्यांतील खंडोबाच्या पालीचा राहणारा होता. स. १६५९ मध्यें अफझुलखानाच्या लोकांवर तुटून पडून यानें त्यांची सरसहा कत्तल केली. हा शत्रूशीं गनिमी काव्यानें लढत असे. यानें दक्षिणेंतील मुसलमानी मुलुखांत बंडाळी करून पुष्कळ खंडणी वसूल केली. हा मोगलांच्या मुलुखांत यशस्वीपणें लुटालूट करून प्रत्येक पावसाळ्याच्या आरंभीं अगदीं नियमितपणें परत येत असे. एके प्रसंगीं सैन्याच्या पिछाडीचें संरक्षण करण्याच्या कामगिरीवर असतां, यानें बराच नांवलौकिक संपादिला. काफीखान म्हणतो कीं, जयसिंग दक्षिणच्या मोहिमेंत असतांना ( स. १६६५–१६६७ ) त्यानें नेताजी पालकरास कैदेंतून औरंगझेबाकडे दिल्लीस पाठविलें ( प. सा. ११२६ ). तेथें यास बाटविण्यांत येऊन याला मुर्शिद हा किताब देण्यांत आला व याचें नांव मुहंमद ठेविलें ( १६६६ एप्रिल ). परंतु पुढें हा शिवाजीकडे परत आला. नऊ वर्षे मुसलमान राहून यानें प्रायश्चित्त घेतलें, आणि पुन्हां हा हिंदुधर्मांत ( प. सा. १८६३ ) दाखल झाला ( ता. १९–६–१६७६ ). येसाजी कंकास या सुमारास सरनोबती मिळाली होती.

शिवाजीचे पश्चात् यानें संभाजीची नोकरी केली. हा स. १६८१ मध्यें बागलाणांत लढत असल्याचा उल्लेख सांपडतो. त्यानंतर हा वृद्ध होऊन मेला असावा. याची न्यायनिवाडे करण्याच्या बाबतींत ख्याति होती असें दिसतें ( शिवाजी पा. १७२ ).

**नेडुंजेलियन पांड्य**—(स. १७३–१९१) हा पांड्य घराण्यांतील पहिला राजा होय. हा दुसऱ्या शतकांत झाला. त्यामुळें तो नेडुमुंडुकिल्ली चोल ( करिकाल चोलाचा नातू ) राज व चेंकुत्तुवन चेरराज, आणि सिंहलद्वीपचा पहिला

गजबाहु यांचा समकालीन होता. गजबाहु याचा काल स. १७३–१९१ बहुतेक ठरला आहे.

२. ( स. २०० ) हा पांड्य घराण्यांतील वेरि-वेर-शेलियन याचा मुलगा होय. स. २०० मध्यें हा आपल्या बापानंतर गादीवर आला.

याच्या कारकीर्दीच्या सुरवातीसच, परंपरेनुसार, किल्लि-वलवन यानें याच्या राज्यावर स्वारी केली. यानें चेर व चोल यांच्याविरुद्ध हल्ला चढवून त्यांची आलंगानम् येथें धुळधाण उडविली. याच्यानंतर उग्र-पेरू-वलुडि हा गादीवर आला ( B. ).

**नेमाजी शिंदे**—( स. १६९०–१७१० ) एक मराठा सरदार. संभाजीला कंटाळून हा औरंगजेबास जाऊन मिळाला होता. पुढें जिंजीस राजाराम असतांना हा राजारामास परत येऊन मिळाला ( स. १६९० ). महाराष्ट्रांत औरंगजेबाच्या फौजांचा पराभव करण्याकडे जी मंडळी गुंतली होती, तींत हा एक प्रमुख होता. मोहिमेवरून परत येतांना प्रत्येक प्रांतांत आपल्या एकेक सरदाराची नेमणूक ( खंडणी वसुली व बंदोबस्तासाठीं ) राजारामानें केली. त्यांत नेमाजीकडे खानदेश आला होता. पुढें शाहूची सुटका होईपर्यंत हा बहुधा खानदेशांतच सुभेदार असावा.

शाहू दक्षिणेंत आला त्या वेळीं त्याला पहिल्यानें मिळालेल्या मंडळींत हाहि होता ( स. १७०७ ). पुढील सालीं बहादुरशहानें कामबक्षावरील स्वारींत शाहूची मदत मागितली असतां त्यानें यासच पाठविलें. नेमाजीनें हैद्राबादनजीक लढाई करून कामबक्षाचा शेवट केला (स. १७०८). हुसेन अली दख्खनचा सुभेदार होण्यास आला असतां बऱ्हाणपुरास दाऊदखान पन्नीची व हुसेनची लढाई झाली. त्या वेळीं नेमाजी हा जवळच राहून लढाईचा परिणाम पाहत होता. कारण बादशहानें व हुसेननें दोघांनींहि मराठ्यांकडे मदतीचा संदर्भ लावून ठेविला होता व शाहूनें त्यासाठींच नेमाजीची नमणूक खानदेशांत केली होती ( राजारामाची बखर ).

**नेमिचंद्र कवि**—( स. ११५० सुमार ) न्यायशास्त्रज्ञ. हा जैन असून याचा जन्म गुजराथेंत झाला. हा वैरस्वामीचा शिष्य व सागरचंद्राचा गुरु. सागरचंद्राचा दुसरा शिष्य माणिक्यचंद्र.

२. ( स. ११७० ) कानडी भाषेंतील आद्य कादंबरीकार. यानें लीलावती कादंबरी चंपूपद्धतीनें लिहिली. यानें नेमिनाथपुराण लिहिलें.

**नेमिदत्त**—या ब्रह्मचारी गृहस्थानें 'आराधनाकथा-कोष' नांवाचा ग्रंथ केलेला आहे. तो ऐतिहासिक दृष्ट्या फार महत्त्वाचा आहे. हा ऐतिहासिक ग्रंथ जैनधर्मीयांचा असून संस्कृत भाषेंत आहे.

**नेवाज**—( ग्रंथकाल स. १६७९ ) एक हिंदी कवि. जात ब्राह्मण. अंतर्वेदीचा राहणारा. हा अजमशाहाच्या पदरीं होता. यानें गद्यपद्यमय शाकुंतल नाटक लिहिलें. हा शृंगारी कवि होता.

२. हा हिंदी कवि बिलग्रामचा जुलाह होता. हा शाकुंतल नाटकाचा कर्ता जो नेवाज त्याच्याहून भिन्न होय.

३. हा हिंदी कवि गाजीपूरच्या भगवंतराय खीचीं याच्या पदरीं होता.

**नोघन किंवा नयघनी**—( स. ११०० सुमार ) हा सुराष्ट्राचा अहीर राजा. राजधानी जुनागड. यास सिद्धराजानें मारलें असें प्रबंधचिंतामणींत म्हटलें आहे.

**नोबिली रॉबर्ट**—( ज. स. १५७७ ) जेसुईट मिशनरी. यानें उच्चवर्णीय हिंदूंची राहणी स्वीकारून त्यांना बाटविण्याचा प्रयत्न केला.

**नोहलादेवी**—केयूरवर्ष कलचुरीची पत्नी. हिनें नोहलेश्वर नांवाचें देऊळ बांधलें. त्यावरील लेखावरून बौद्ध भिक्षूप्रमाणें लकुलीश मताचे संन्यासीहि देवळांतून राहत, असें दिसतें ( म. यु. भा. २, २२४ ).

**न्यार्कस**—( ख्रि. पू. ३२७ ) सिकंदरचा एक सेनापति. सिकंदर हिंदुस्थानांतून परत जात असतां त्यानें आपल्या सैन्याचे दोन भाग केले. एका भागावर याला मुख्य नेमून जलमार्गानें याला इराणकडे रवाना केलें.

**न्यायव्यास ब्राईदेकर**—( ग्रंथकाल स. १३५३ ) एक महानुभाव. हे उपाध्य आम्नायांतील होत. श्रीचक्रधरापासून यांची सहावी पिढी येते. जनोपाध्ये यांची प्रसिद्ध शिष्यीण आणि उपाध्य आम्नायप्रवर्तक कमळाउसेचा हा शिष्य होय. यांनीं शके १२७५ च्या सुमारास लीलाचरित्र या ग्रंथावर हेतुस्थळ या नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. त्यामध्यें श्रीचक्रधरांनीं निरनिराळीं सूत्रें कोणत्या प्रसंगीं व काय हेतूनें सांगितलीं याचें विवरण आहे, म्हणून या ग्रंथास हेतुस्थळ म्हणतात. हा ग्रंथ गद्यांत आहे. याच्या नांवावर अनेक संस्कृत व मराठी ग्रंथ आहेत. त्यांत स्मृतिवृद्धाचार, लीलाप्रयुक्ति, सिद्धांतस्थळ इत्यादि प्रमुख आहेत. यानें वज्रलिपी आणि सुंदरीलिपी या दोन लिपी तयार करून प्रचारांत आणल्या. सगळलिपीच्या खालोखाल सुंदरीलिपीमध्यें लिहिलेले बरेच ग्रंथ आढळतात (म. वा. इ. २. ७३१ ),

# प

**पट्ट**—मंख कवीच्या काव्याचा परीक्षक काश्मीरी पंडित.

**पडिहार**—राजपुतान्यांत प्रतिहाराबद्दल पडिहार असा शब्द उच्चारितात.

**पजनेस**—( जन्म स. १८१४ ) एक हिंदी कवि. ' पजनेसप्रकाश ' नांवाचा एक याचा कवितासंग्रह प्रसिद्ध आहे ( क. कौ. भा. १ ).

**पडदुल्लाखान**—( स. १७१८ ) हा एक मोगलांकडचा अंमलदार होता. स. १७१७ त यानें कऱ्हाड येथें थोराताचा बंडावा चालू असतांना, मोगलांची बाजू चांगलीच संभाळली. स. १७१८ त तह झाल्यावरसुद्धां हा निघून जात नव्हता. शेवटीं शाहूनें बाळाजीस घेऊन कऱ्हाडवर स्वारी केली, आणि कऱ्हाड व इसलामपूर काबीज करून यास घालवून दिलें.

**पद्मगुप्त ( परिमल )**—हा माळव्याच्या मुंज परमाराच्या दरबारीं कवि होता. यानें ' नवसाहसांकचरित्र ' नांवाचें काव्य संस्कृतांत लिहिलें. याला परिमल कालिदास असेंहि म्हणत. धनिक व मम्मट यांनीं याचे उतारे घेतले आहेत.

**पद्माकर**—( जन्म स. १७५२–मृ. स. १८३२ ) एक हिंदी कवि. पिता–मोहनलालभट्ट. तेलंगी ब्राह्मण. हा जयपूरच्या जगत्सिंगाच्या पदरीं होता. याचे ग्रंथ–जगद्विनोद, गंगालहरी, हिम्मतबहादूरबिरदावली, पद्माभरण, आलिजाप्रकाश, भाषाहितोपदेश, प्रबोधपचासा, रामरसायन ( क. कौ. भा. १ ).

**पद्मणांक**—( स. १३८५ ) कानडी कवि. हा केरेय पद्मरसाचा वंशज होता. याचा ग्रंथ पद्मराजपुराण.

**पद्मनाभ**—( स. १३९८ ) नार्मदाचा पुत्र. याचा ग्रंथ यंत्ररत्नावली. या ग्रंथाचा दुसरा अध्याय ध्रुवभ्रमयंत्र म्हणून प्रसिद्ध आहे. यावर याचीच टीका आहे.

२. काश्मीराकडील कवि. भुवनेश्वरी स्तोत्राचा कर्ता.

३. कबीराचा शिष्य. हा रामभक्त होता. यानें नामस्मरणबलानें कित्येक लोकांच्या व्याधि दूर केल्याच्या गोष्टी भक्तविजयाच्या चोविसाव्या अध्यायांत आहेत. हा काशींत राहत असे.

**पद्मपादाचार्य**—यानें पद्मपादिका नांवाचा शंकराचार्यांच्या मताला पुष्टि देणारा ग्रंथ केला (शा. श. ८५०). ही टीका फक्त चतुःसूत्रीपुरतीच आहे. हा शंकराचार्यांचा एक प्रमुख शिष्य. यानें शंकराचार्यांना अनेक प्रसंगांतून वांचविलें. याचे इतर ग्रंथ—आत्मानात्मविवेक, प्रपंचसार.

**पद्मप्रभु**—( तीर्थंकर पाहा ).

**पद्मसिंह गुहिलोत**—( राज्यकाल स. १२११–१३ ) मेवाडच्या गादीवर हा मथनसिंहानंतर आला. यानें टांटेड जातीच्या उद्धरणाच्या आठ पुत्रांपैकीं वडील मुलगा योगराजाला नागद्याची तलारता ( कोतवाली ) दिली. याच्यानंतर याचा पुत्र जैत्रसिंह मेवाडचा राजा झाला.

**पद्मावती**—बुद्धाची माता.

२. गीतगोविंदकर्त्या जयदेवाची पत्नी.

३. बिज्जल कलचुरीची पत्नी.

४. लिंगायतधर्मसंस्थापक बसवाची पत्नी.

**पद्माकर गुप्त**—( स. ९४० सुमार ) हा बुद्धतर्कज्ञ भट्टीपालाच्या वेळीं होऊन गेला. ह्याचे ग्रंथ—धर्मकीर्तीच्या ' प्रमाणवार्तिका ' वरील 'प्रमाणवार्तिकालंकार' नांवाची टीका व सहावलंव–निश्चय ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पानें ३३६–३३७ ).

**पद्माक्षी**—( भर्तृहरि पाहा ).

**पद्मिनी**—( स. १३०३ ) मलिक मुहंमद जायसीनें पद्मावत नांवाचें अत्यंत सुंदर काव्य अवघी हिंदींत लिहिलें आहे. त्याला आधार म्हणून घेतलेलें कथानक ऐतिहासिक असलें तरी कवीनें त्यावर आपल्या कविकल्पनांचाहि पूर्ण अंमल बसविला आहे. त्यामुळें त्यांतील नेमका ऐतिहासिक भाग वेगळा काढणें कठीण झालें आहे. पद्मावत काव्याचें कथानक पुढीलप्रमाणें आहे. सिंहलद्वीपांत गंधर्वसेन नांवाचा राजा होता. त्याला आपल्या चंपावती नांवाच्या पट्टराणीपासून पद्मावती ( पद्मिनी ) नांवाची अत्यंत रूपवती कन्या झाली. तिच्यापाशीं हीरामन नांवाचा चतुर पोपट होता. तो पिंजऱ्यांतून सुटला व एका शिकाऱ्याच्या हातांत सांपडला. त्यानें एका ब्राह्मणाला विकला व ब्राह्मणानें एक लाख रुपयाला मेवाडचा राजा रत्नसिंह याला विकला. रत्नसिंहाची राणी नागमती हिनें एक दिवस शृंगार केला आणि 'माझ्यापेक्षां सुंदर कोणी जगामध्यें आहे ?' असा पोपटाला प्रश्न केला. तेव्हां पोपट म्हणाला, 'हंस नसले म्हणजे बगळे आपणच हंस

आहों असें मानतात.' रत्नसिंहाला या पोपटाच्या तोंडानें पद्मिनीच्या रूपगुणाची माहिती मिळाली. तेव्हां योग्याचें रूप घेऊन रत्नसिंह या पोपटाबरोबर सिंहलद्वीपाला गेला. तेथें गेल्यावर पोपटानें तिच्या कानावर रत्नसिंहाचे रूपगुण घालून 'हाच पति तुला योग्य आहे' असें सांगितलें. प्रसंगानें मंदिरांत दृष्टिभेट होतांच दोघांचें प्रेम बसलें व गंधर्वसेनानेंहि सर्व समजून उभयतांचा विवाह करून दिला. असे कांहीं दिवस तेथेंच गेल्यावर विरही नागमतीनें पक्षिद्वारां संदेश पाठविला. रत्नसिंहहि तुफान वगैरे आपत्तींतून मेवाडला सुरक्षित परत आला. राघवचेतन नांवाच्या ब्राह्मणानें दिल्ली येथें अलाउद्दीनपुढें पद्मिनीच्या रूपाची तारीफ केली. तेव्हां तो चितोडवर चालून आला. त्यांत गोरा, बादल वगैरे सामंतांसह रत्नसिंह मारला गेला व पद्मिनी सती गेली. गोरा व बादल या दोन व्यक्ती पद्मिनीचे चुलता व पुतण्या होते, असें ख्यातावरून कर्नल टॉड वगैरे म्हणतात. पण या दोन व्यक्ती नसून एकाच व्यक्तीचें हें नांव आहे, असें ओझाजी मानतात. सिंहलद्वीपाशीं जायसीनें चुकीनें संबंध जोडला आहे. वास्तविक ही चितोडच्या पूर्वेस सिंहोली नांवाचें गांव आहे तेथील राजाची मुलगी पद्मिनी असण्याचा फार संभव आहे, असेंहि ते म्हणतात. नागरीप्रचारिणी सभेनें प्रसिद्ध केलेल्या जायसी ग्रंथावलीच्या प्रस्तावनेंत पंडित रामचंद्र शुक्लानेंहि असेंच लिहिलें आहे. रत्नसिंहाची कारकीर्द एक वर्षाची आहे, त्यांत सहा महिने युद्धांत गेले, हें सर्व लक्षांत घेतां सिंहलद्वीपाशीं संबंध बरोबर दिसत नाहीं.

हिच्या अभिलाषानें दिल्लीचा सुलतान अलाउद्दीन यानें चितोडवर स्वारी केली, पण अलाउद्दीनास हिची प्राप्ति झाली नाहीं. शेवटीं अलाउद्दीनानें हिचें प्रतिबिंब आरशांत पाहण्याचें कबूल केलें. त्याप्रमाणें करून अलाउद्दीन वेढा उठवून परत गेला. परंतु पुन्हां त्यानें दुसरे वर्षी चितोडवर स्वारी केली त्या वेळीं पद्मिनी सती गेली.

**पनहपा**—ह्यालाच उपानहपा असें म्हणतात. हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं एक. जात-चमार. यानें चर्यादृष्ट अनुत्पन्नतत्त्वभावना ( तं. ४८।९३ ) हा ग्रंथ केला.

**पन्ना दाई**—महाराणा सांगा याचा पुत्र उदयसिंह याला हिनें आपला पुत्र बळि देऊन वांचविलें. सांगाचा पुत्र पृथ्वीराज, याला रखेलीपासून वणवीर नांवाचा पुत्र झाला. त्यानें राज्य मिळविण्याकरितां विक्रमादित्यास ठार केलें, हें कळतांच त्याचा धाकटा भाऊ उदयसिंह यास हिनें महालाबाहेर घालविलें आणि आपला मुलगा उदयसिंगाच्या पलंगावर निजविला. वणवीरानें येऊन विचारतांच हिनें पलंगावर उदयसिंग असल्याचें दर्शविलें. त्यानें तात्काळ त्यावर तलवार चालविली. पन्ना उदयसिंहाला घेऊन सुरक्षित स्थलीं निघून गेली ( २ उदयसिंह पाहा ).

**परकेसरीवर्मन् मधुरान्तक उत्तम**—( स. ९६९-८५ ) हा दुसऱ्या आदित्य चोलाचा चुलत चुलता होय.

**परगद बेट**—हा त्रिभुवनमल्लाचा पुत्र. बेटानें यास आपला प्रधान केलें. हा पुढें प्रोलाच्या सुद्धां कारकीर्दींत होता.

**परगल**—हा लखनौचा राहणारा असून नृत्य व भाव यांत वाकबगार होता.

**परबल राष्ट्रकूट**—( स. ८६१ ) हा कर्कराष्ट्रकूटाचा मुलगा होय. स. ८६१ मध्यें हा मध्य हिंदुस्थानांत राज्य करीत होता. याची मुलगी रण्णा-देवी ही बंगालच्या धर्मपाल राजास दिली होती ( B. ).

**परमगुप्त**—नेपाळच्या गोपाळ घराण्यांतील जयगुप्ताचा मुलगा.

**परमर्दि कलचुरी**—( स. ११२८ सुमार ) हा जोगम कलचुरीचा पुत्र. हा तर्दवाडी प्रांताचा राजा. हा तिसऱ्या सोमेश्वर चालुक्याचा मांडलिक होता.

**परमर्दि कदंब**—( स. ११४७-८२ ) याला शिवचित्त असें म्हणत. हा गोव्याच्या जयकेशिन् कदंबाचा पुत्र. कलचुरीचा मांडलिक चंडुगिदेवानें याच्यावर हल्ला केला असावा असें दिसतें. याची पत्नी कामदेवाची मुलगी कमलालया.

**परमर्दि चंदेल्ल**—( स. ११६७-१२०३ ) याच्या वेळीं पृथ्वीराज चौहाणानें चंदेल्लांचा पराभव केला व महोबा घेतलें. कुतुबुद्दीननें याजवर स्वारी करून कालंजरला वेढा दिला तेव्हां यानें तह केला, पण खंडणी देण्यापूर्वीच हा मेला. तेव्हां प्रधानानें कालंजर कुतुबुद्दीनच्या ताब्यांत दिला. याच्यानंतर स. १२०३ मध्यें चंदेल्लघराणें बहुतेक संपलें. याला मुसलमान लेखक परमार म्हणतात.

या नांवाचे दोन राजे होते. एक कुन्तल देशचा आणि दुसरा बुंदेलखंडच्या चंदेल्लांपैकीं होता. पृथ्वीराज चौहाणानें परमर्दि चंदेल्लाचा पराभव केला होता ( वि. सं. १२३९-स. ११८२ ). प्रबंधचिंतामणिकारानें हे दोघे एकच मानले आहेत तें चूक आहे.

परमर्दि ( पेर्माडि, पेर्मादि किंवा पर्माडि ) हें नांव किंवा उपनाम धारण करणारे दक्षिणेंत बरेच राजे होऊन गेले. परंतु सिद्धराज जयसिंहाचा समकालीन कुन्तल देशचा परमर्दि राजा म्हणजे कल्याणचा सहावा राजा

विक्रमादित्य सोलंकी असला पाहिजे. जिनमंडनोपाध्यायाच्या कुमारपालप्रबंधांत जयसिंहानें योगिनींच्या समोर जी तलवार चावली होती ती कल्याण कटकच्या म्हणजे कल्याणच्या पेर्माडि ( परमर्दि ) कडून आल्याचें लिहिलें आहे ( नागरीप्रचारिणीपत्रिका ६·३ सोलंकी राजा जयसिंह सिद्धराज या लेखांतील टीपांवरून पा. ३०१ ).

**परमस्वामी ( नृसिंह )**—( मृत्यु स. १११७ ) चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं एक सिद्ध. याला भारतीय सिद्ध पंडित असें म्हणत. हा स. १०९१ मध्यें भूतान, स. ११०० मध्यें चीन व स. १११२ मध्यें पुनः भूतानमध्यें परत आला. भूतानमध्यें याला फा-दम्-पा ( =सत्पिता ) असें म्हणत. याचा देहान्त स. १११७ मध्यें झाला. याचे दोहाचितृगुह्य ( तं. ४८।७३ ), महामुद्रारत्नाभिगीत्युपदेश ( तं. ४८।१०५ ), वज्रडाकिनीगीति ( तं. ४८।१० ), सकलसिद्धवज्रगीति ( तं. ४८।११३ ) इतके ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

**परमानडी गंग**—( स. १०७५ सुमार ) हा या घराण्यांतील राचमल्ल याचे मागून गादीवर आल्याचा उल्लेख आहे. याचा उल्लेख १०२१ च्या बेलूरच्या शिलालेखांत आलेला आहे. पण त्यामध्यें याच्या कारकीर्दीविषयीं माहिती आलेली नाहीं. हा पश्चिम चालुक्य दुसऱ्या सोमेश्वराचा मांडलिक होता, व वनवासी, सातळीग व मणदळी या प्रांतांवर राज्य करीत होता.

**परमानंद गोविंद निधिवासकर (नेवासकर)**—( ग्रंथकाल स. १६६१ नंतर ) संस्कृत कवि. यानें शिवभारत नांवाचा ग्रंथ संस्कृतमध्यें केला आहे. तो शिवाजीच्या समकालीन असून त्यावरून शिवाजीच्या चरित्रावर बराच प्रकाश पडतो. त्याचें भाषांतर प्रथम पारसनीस यांनीं केलें; पण तें छापून झालें नव्हतें. पुढें दिवेकर यांनीं भाषांतर करवून छापून प्रसिद्ध केलें.

**परमानंद चक्रवर्ति**—( स. १४०० सुमार ) परमानंद चक्रवर्ति भट्टाचार्य हा बंगाल्यांत राहणारा असून यानें मम्मटाच्या काव्यप्रकाशावर ‘ विस्तारिका ’ नामक टीका लिहिली आहे. या टीकेंत सुबुद्धिमित्र, दीपिकाकर्ता जयंतभट्ट, दर्पणकर्ता विश्वनाथ यांचीं नांवें आढळतात. प्रतापरुद्र ग्रंथाचा कर्ता वैद्यनाथ याचेंहि नांव टीकेंत आढळतें. हा नैयायिक होता.

**परमानंददास**—( स. १५४८ सुमार ) एक हिंदी कवि. कान्यकुब्ज ब्राह्मण. ग्रंथ–ध्रुवचरित, दानलीला. वल्लभाचार्यांच्या अष्टछापमंडळांतील अत्यंत लोकप्रिय कवि.

**परमानंददास कवि कर्णपूर**—( लेखनकाल स. १५४३) हा वैद्य शिवानंदसेनाचा पुत्र असून ह्यानें ‘चैतन्यचंद्रोदय ’ हें प्रख्यात अन्योक्तिरूप नाटक लिहिलें. हा चैतन्याचा शिष्य होता. ह्याच्या नाटकाचा प्रयोग ओरिसा प्रांताचा राजा प्रतापरुद्र ( स. १४९६–१५३९ ) ह्याच्या आज्ञेनें करण्यांत आला.

**परमार्थ**—एक बौद्ध भिक्षु. ज्या वेळीं चीनच्या एका बौद्धधर्मी राजानें एक धार्मिक मंडळ महायान पंथाच्या ग्रंथप्राप्तीसाठीं हिंदुस्थानांत पाठविलें होतें त्या वेळीं गुप्त राजानें या परमार्थास चीनमध्यें पाठविलें.

**परमारघराणें ( आबू )**—१ सिंधुराज ( धूमराजाचा वंशज ), २ उत्पलराज, ३ आरण्यराज, ४ कृष्णराज, ५ धरणीवराह, ६ महीपाल ( देवराज, स. ९९९ ), ७ धंधुक, ८ पूर्णपाल ( स. १०४२–१०४५ ), ९ कृष्णराज दुसरा ( स. १०६०–१०६६ ), १० ध्रुवभट, ११ रामदेव, १२ विक्रमसिंह ( स. ११४४ ), १३ यशोधवल ( स. ११४५ ), १४ धारावर्ष ( स. ११६३–१९; याचा भाऊ प्रल्हादन ), १५ सोमसिंह ( स. १२३०–३६ ), १६ कृष्णराज तिसरा, १७ प्रतापसिंह ( स. १२८७ ), १८ विक्रमसिंह ( स. १२९९ ).

**२. ( माळवा आणि वागड )** १ कृष्णराज (उपेंद्र), २ वैरिसिंह, ३ सीयक, ४ वाक्पतिराज, ५ वैरिसिंह ( दुसरा ), ६ श्रीहर्ष ( सीयक दुसरा; स. ९४२–७२ ), ७ मुंज ( स. ९७४–९३ ), ८ नवसाहसांक, ९ भोज ( स. १०१९–४२ ), १० जयसिंह ( स. १०५५–५९ ), ११ उदयादित्य ( स. १०५९–८६ ), १२ लक्ष्मदेव, १३ नरवर्मा ( स. ११०४–३३), १४ यशोवर्मा ( स. ११३४–३५ ), १५ जयवर्मा, १६ अजयवर्मा, १७ विंध्यवर्मा, १८ सुभटवर्मा, १९ अर्जुनवर्मा ( स. १२१०–१५ ), २० देवपाल, २१ जयतुमिदेव जैत्रमल्ल, २२ जयवर्मा ( दुसरा; स. १२५७–६० ), २३ जयसिंह ( तिसरा; स. १२६९), २४ अर्जुनवर्मा ( दुसरा ), २५ भोज ( दुसरा ), २६ जयसिंह ( चौथा; स. १३०९ ).

**परमेश्वरवर्मन् पल्लव**—( स. ६७०–९० ) याला नंदीवर्मन् असेंहि म्हणतात. याचें राज्य तामील देशावर होतें. हा दुसऱ्या महेंद्रवर्मन् पल्लवाचा मुलगा. यानें विक्रमादित्य पश्चिम चालुक्याचा पराभव केला.

**२.** ( स. ७१५–१७ ) याच्यानंतर पल्लवाच्या दुसऱ्या शाखेकडे राज्य गेलें. हा दुसऱ्या नरसिंहवर्मन् पल्लवाचा मुलगा. याचें राज्य पल्लवांपैकीं दुसऱ्या शाखेंतील नंदवर्मन्नें घेतलें.

**परम्मदेव सिंहराज यादव**—( स. १०६९–११०० सुमार ) हा यादव घराण्यांतील एक राजा. हा दुसऱ्या सेउणचंद्रानंतर गादीवर आला.

**परशुराम**—( स. १८१८ सुमार ) हा महाराष्ट्रीय शाहीर. हा जातीचा शिंपी; नाशिक जिल्ह्यापैकीं सिन्नर तालुक्यांतील बावीचा राहणारा. याच्या कवनावर जुन्या कवींची छाप दिसते. पौराणिक आख्यानें, मल्हारराव होळकर, खंडेराव होळकर, गायकवाड वगैरे ऐतिहासिक व्यक्तींवर व मुंबईकर इंग्रजांवरहि एक याच्या लावण्या व पोवाडे आहेत. याशिवाय याच्या शृंगारिक व बैठकीच्याहि लावण्या आहेत. याचा स्वतःचा तमाशा असे. तो घेऊन हा हिंडे व त्यांत स्वकृत कवनेंच म्हणे. पैशाची यानें फारशी पर्वा केली नाहीं. एकदां कोपरगांवीं रावबाजींचा मुक्काम असतां, त्रिंबकजी डेंगळ्यानें याची हजिरी श्रीमंतांपुढें लाविली. तेव्हां त्यांनीं खूष होऊन यास इनाम देण्याचें ठरविलें, परंतु ' माझ्या सुईदोऱ्याला हयाती असो ' असें म्हणून यानें तें घेण्याचें नाकारलें. बाबा देवपूरकर हा याचा मोक्षगुरु होता. त्याच्यापुढें मात्र हा लावणी म्हणत नसे. ' उदईक आम्हीं मरणार तरी आमच्यापुढें ( नाच्या ) पोऱ्यावर साज घालून चालावें ' असें यानें सांगितलें. त्याप्रमाणें हा दुसऱ्या दिवशीं मेल्यावर याची ही इच्छा तृप्त करण्यांत आली ( महा. सारस्वत ).

**परशुराम त्रिंबक पंतप्रतिनिधि**—( जन्म स. १६६०–मृत्यु स. १७१८ ) हा सातारा जिल्ह्यांतील वर्धनगडाखालील किन्हई गांवचा कुलकर्णी होय. हा त्र्यंबकपंत व स्त्री लक्ष्मीबाई यांच्या पोटीं स. १६६० मध्यें जन्मला. हा औंध संस्थानचा मूळ संस्थापक होय.

यानें वयाच्या १४ वे वर्षी कुलकर्ण सोडून विशाळगडीं जाऊन निळो सोनदेव अमात्य यांच्या पदरीं नोकरी पत्करली. पुढें राजाराम महाराज जेव्हां जिंजीकडे गेले तेव्हां पंतांना अमात्यांच्या पदरीं सरदारी देऊन ठेविलें ( स. १६९० ). जिंजीस असतांना महाराजांनीं पंतांना " समशेरबहाद्दरजंग " पदवी दिली. मोगलांशीं तोंड देण्यासाठीं यांचीहि योजना झाली होती. यानें पन्हाळा मोठ्या शर्थीनें मोगलांपासून घेतला ( स. १६९२ ) आणि मिरज ते रांगण्यापर्यंतचा सारा मुलूख सोडविला. हा जसा शूर तसा भगवद्भक्तहि होता. हा संस्कृतव्युत्पन्न असून कीर्तन करी व स्वतः काव्यहि करी. राजाराम महाराजांनीं यास प्रतिनिधिपद तात्पुरतें ( स. १६९९ त ) दिलें. मध्यंतरीं पंतांचें प्रतिनिधिपद काढून तिमाजीपंत हणमंते यास तें देऊन पंतांना पेशव्याचें पद दिलें. नंतर शाहूमहाराजांनीं पंतांस प्रतिनिधिपद " एकनिष्ठपणाची सीमा केली, महत्कार्य करून राज्यरक्षण केलें, म्हणून वंशपरंपरेनें वतनी करून दिलें. " ताराबाईनें शाहूच्या विरुद्ध राजनिष्ठ राहण्याबद्दल ज्यांच्याकडून शपथा घेतल्या होत्या त्यांपैकीं हा होय. शेवटीं त्याकरितां यास तुरुंगवासहि पत्करावा लागला.

पण खटावकरांच्यावर केलेल्या स्वारींत याचा दुसरा मुलगा श्रीपाद यानें चांगली तरवार गाजविल्यानें महाराजांनीं पंताला कैदेंतून सोडवून वंशपरंपरेनें प्रतिनिधिपद पुनः दिलें ( स. १७१४ ). यापुढें पंतांवर महाराजांची मर्जी सतत बसली व पंतांनींहि राज्याची सेवा इमानानें केली, त्यामुळें महाराजांनीं याला वेळोवेळीं इनामें दिलीं.

यांचा मृत्यु सातारा येथें शके १६४० मध्यें झाला. यांचें व यांच्या पत्नीचें वृंदावन संगममाहुलीस आहे. यांना पांच मुलगे व दोन मुली होत्या.

परशुराम त्रिंबक प्रतिनिधि यांचे चिरंजीवांनीं कोल्हापुरकरांचा पक्ष घेतल्यामुळें प्रतिनिधींवर शाहूमहाराजांची इतराजी झाली. शाहूच्या हुकुमावरून त्यास ठार करणार इतक्यांत खंडोबल्लाळ चिटणीस तेथें आले, व त्यांनीं खटपट करून प्रतिनिधींचा जीव वांचविला. या वेळेपासून प्रतिनिधींच्या घराण्यांत श्राद्ध होई त्या वेळीं इतर ब्राह्मणांबरोबर खंडोबल्लाळ चिटणीसाच्या घराण्यांतील एका प्रसिद्ध मनुष्यास आमंत्रण होत असे. ही गोष्ट मल्हार रामराव चिटणीसकृत शाहूचरित्राच्या प्रकाशकांनीं टीपेंत दिली आहे. ही चाल औंध येथें प्रतिनिधीकडे अद्यापि चालू आहे असें कळतें.

**परशुराम भवानराव ऊर्फ थोटे पंत**—( जन्म स. १७७७–मृत्यु स. १८४८ ) औंधचे श्रीनिवास ऊर्फ भवानराव यांना हा काशीबाईपासून झालेला मुलगा.

हा अल्पवयी असल्यामुळें नाना फडणिसानें याचा कारभारी म्हणून कृष्णराव सातारकर यास नेमिलें. हा खर्ड्याच्या लढाईत होता. यानें रामोशी चाकरीस ठेवून मुलुखांत दंगाधोपा आरंभला. मादक पदार्थांचें व्यसन याला जडलें असून हा माणसांच्या कानांत व नाकांत दारू घालून त्यांचा छळ करीत असे. तमासगिरांचा याला छंद लागला. " रमा ( ताई ) तेलीण " म्हणून यानें एक नाटकशाळा बाळगली होती. ती फार शूर होती. पुढें पेशव्यांनीं बापू गोखले यास याच्यावर पाठवून याला कैद

केलें ( स. १८०७ ). पुढें स. १८१२ मध्यें याला कैदमुक्त करून २ लक्षांची जहागीर दिली. परंतु याची वृत्ति पालटली नाहीं. पेशवाई गेल्यानंतर पंतांना सातारकर छत्रपतींच्या निसबतीस नेमून दिलें. तेव्हां मात्र याची वृत्ति स्थिर झाली. अखेर हा स. १८४८ त वारला. याला औरस संतति नसल्यानें भाऊबंदांपैकीं एक मुलगा दत्तक घेऊन त्याला गादीवर बसविलें व शेवटचे छत्रपति शहाजी राजे यांनीं त्याला पदाचीं वस्त्रें दिलीं.

याची रक्षा ताई तेलीण फार धाडसी व शूर होती. बापू गोखल्यानें याचें बंड शांत करून पुण्याकडे पाठ फिरविली नाहीं तोंच ताई तेलणीनें फौज जमवून वासोटा किल्ला घेतला आणि काशीताईच्या मदतीनें मसूरच्या गढींत अडकून पडलेल्या याला सोडविलें. याचें म्हणणें असें कीं, ‘आम्हीं छत्रपतींचे नोकर आहोंत. बाजीरावाची आज्ञा आम्ही मानणार नाहीं. छत्रपतीस सुद्धां बाजीराव अन्यायानें वागवीत आहेत. सबब त्यासच गाडून टाकलें पाहिजे.’ असा पुकारा करून वारणा आणि निरा नद्यांच्या दरम्यान पंतानें उपद्रव आरंभला. याच्या या विचारसरणीमुळें व कर्तबगारीमुळें त्या बाजूचे पुष्कळ साहसी लोक याचे साह्यकारी झाले.

अशा स्थितींत बापू गोखल्याला बाजीरावानें याच्यावर पुन्हां रवाना केलें. तेव्हां वसंतगडाखालीं या साहसी गृहस्थानें बापू गोखल्यावर उघड हल्ला चढविला. कोणेगांवच्या रानांत ता. २७-३-१८०६ रोजीं उभयतांची लढाई होऊन चौदा जखमा झाल्या, आणि याचा उजवा हात तुटून यास गोखल्यानें पकडून नेलें. त्या वेळेपासून यास ‘थोटे पंत’ असें नांव पडलें. याला लक्ष्मीबाई व रमाबाई या नांवांच्या दोन बायका होत्या ( म. रि. उ. ३, पा. ३६१-६४ ).

**परशुरामभाऊ पटवर्धन**—( जन्म स. १७३९–मृत्यु स. १७९९ ) हा सवाई माधवराव पेशवे यांच्या कारकीर्दींतील मराठी सेनापति होता. याचें मूळचें गांव रत्नागिरी जिल्ह्यांतील कोतवडें. मूळ पुरुष हरभट. हे घाटावर आल्यावर इचलकरंजीकरांचे उपाध्याय बनले. हरभटांचा सहावा पुत्र रामचंद्रपंत व त्याचे पुत्र परशुरामभाऊ होत. रामचंद्रपंत हे पुण्यास पेशव्यांजवळ असत. पुढें त्यांना वसई किल्ल्याची फडणविशी मिळाली, व स. १७४३ मध्यें भागीरथीकांठीं शिवपुरास ते वारले. परशुरामभाऊंचा जन्म स. १७३९ मध्यें झाला. बाप वारल्यानंतर मग भाऊंची मुंज झाली. बापाचें पथक भाऊकडे आलें. सावनूर ( स. १७५५–५६ )च्या मोहिमेंत भाऊ प्रथम लढाईवर गेले. मुख्य सरदारी गोपाळराव पटवर्धन करीत असत. मरणापूर्वी त्यांनीं भाऊस ‘माझें नांव तूंच रक्षण कर’ असें सांगितलें होतें. थोड्याच दिवसांनीं गोपाळराव पटवर्धन वारले. त्यानंतर भाऊंस सरकारचाकरी करण्यासाठीं नेहमीं पुण्यास राहावें लागे व मोहिमेवर जावें लागे. हैदरावरील एका स्वारींत भाऊंची एकामागून एक तीन घोडीं मेलीं, तरीहि भाऊंनीं शौर्य गाजवून हैदराचा पराभव केला. त्यामुळें पेशव्यांनीं यांना वीस हजारांची तैनात दिली. पटवर्धनी फौजेवर भाऊंची मुख्य सरदारी स. १७७७ सालीं सुरू झाली. स. १७८१ सालच्या आरंभीं इंग्रज सेनापति गॉडर्ड यानें बोरघाट काबीज करून मुख्य सैन्यास खंडाळा येथें पाठविलें व तो स्वतः खोपवली येथें राहिला. तेव्हां भाऊंनीं कोंकणांत उतरून गॉडर्डच्या सैन्यास अतिशय त्रास देऊन व त्याचें मुंबईशीं असलेलें दळणवळण बंद पाडून त्याचा पुरा पराभव केला, व त्यास पिटाळून लावलें. खर्ड्याच्या लढाईत हा मुख्य सेनापति होता ( स. १७९५ ).

स. १७९६ मध्यें यांचें व नानांचें वितुष्ट आलें. कारण शिंदे व बाजीराव यांच्या स. १७९६ च्या करारास हे जामीन झाले. पुढें यांनीं नानास बराच त्रास दिला. पण नानानें यांस कैद करविलें ( स. १७९६ ). नंतर स. १७९८ मध्यें याची सुटका होऊन हा पट्टणकुडीच्या लढाईवर गेला, व त्याच लढाईत लढत असतां मरण पावला ( स. १७९९ ). शेवटीं नारो हरि करंदीकर यानें याला मंत्राग्नि देण्याचा प्रयत्न केला, पण शेजारच्या खेड्यांतील ब्राह्मण मंत्रशत्रु असल्यानें तो सिद्धीस गेला नाहीं.

मराठेशाहींत व विशेषतः पेशव्यांच्या कारभाराचें ह्न्नत ओळखून आत्मिक भावनेनें तिचा पुरस्कार करणारा भाऊसारखा दुसरा इसम झाला नाहीं. तथापि शेवटीं अधिकारलालसेनें हा नानाच्या विरुद्ध झाला आणि इंग्रजांशीं सर्वांआधीं संधान ठेवून यानें तह केला.

मरणसमयीं यांचें वय साठीच्या अंदाजांत असावें. म्हणजे नाना व भाऊ जवळ जवळ समवयस्क होते. ता. १५–४–१७९९ च्या पत्रांत ‘भाऊनें चहा, बुंद व चहादाणी मागविली व चहाचा प्याला आणि बुंद पाठविलें ते पावलें’ असा उल्लेख आहे. त्यावरून चहाकॉफीचा प्रघात पटवर्धन मंडळीस टिपूच्या स्वारीपासून इंग्रजांच्या सहवासानें लागलेला दिसतो. याची बयाबाई नांवाची मुलगी होती ( म. रि. उत्तर वि. ३, पृ. २१–२३–८५–९१ ).

हा कांहींसा ठेंगणा, सावळ्या वर्णाचा व पुष्ट होता. शौर्याबद्दल याची ख्याति विशेष होती. याचे काळेभोर डोळे व उत्साहपूर्ण चर्या पाहतांच याच्या शौर्यादि गुणांची ओळख एकदम पटत असे. कारस्थाना-पेक्षां लढवय्या म्हणवून घेण्याची याला अधिक हौस असे. टिपूच्या युद्धांत मराठ्यांच्या बाजूनें यानें बरीच कामगिरी केली. परशुरामभाऊ व हरिपंत हे दोघे वाटेल त्या संकटांत नानाकडे धांवत येऊन त्याची कामगिरी जिवास जीव देऊन ताबडतोब उठवीत, म्हणूनच नानाचा कारभार उरके.

अनंतफंदी या कवीनें माधवग्रंथ नांवाचें एक ऐतिहासिक काव्य लिहिलें आहे. याचीं अस्सल साधनें बाजीराव रघुनाथानें कवीला पुरविलीं होतीं. त्यांत यानें बाजीराव रघुनाथाला फसवून शिंद्याच्या लष्करांत कसें पाठवून दिलें, चिमाजीअप्पास त्याचे इच्छेविरुद्ध जबरदस्तीनें नेऊन त्याचा उपमर्द कसा केला व यशोदाबाईची अवहेलना करतांना भाऊच्या मनास यत्किंचित् दिक्कत कशी वाटली नाहीं इत्यादि गोष्टींचें वर्णन दिलें आहे. तें अंगावर शहारे आणणारें आहे. फंदीनें वर्णिलेल्या या गोष्टी ऐतिहासिक साधनांच्या द्वारें सिद्ध होत असल्यामुळें राजकारण किंवा नीति या दृष्टीनें बिलकुल समर्थनीय नाहींत (महाराष्ट्र कविचरित्र, भा. २, पा १३६; अनंतफंदी पाहा).

**परशुराममिश्र**— एक काश्मीरी पंडित. मथुरा-चंपूचा कर्ता.

**परसा भागवत**—याला परिसा भागवत असेंहि म्हणतात. हा जातीचा ब्राह्मण असून पंढरपूरचा राहणारा होता. हा मोठा भगवद्भक्त असे. परसा भागवताचें नाम-देवाच्या ठिकाणीं फार प्रेम होतें. यानेंहि कांहीं पदें केलीं आहेत. याचे जवळ परीस असल्याची गोष्ट भक्तविजयांत दिली आहे.

**परसोजी भोसले**—(नागपूरकर, मृत्युस.१७०९) पहिला सेनासाहेब सुभा. हा मुधोजी भोसल्याचा मुलगा होय. हा प्रथम शिवाजीचे सैन्यांत नोकरी करूं लागला व पुढें हळुहळू बराच प्रसिद्धीस आला.

प्रतापराव गुजराप्रमाणें ह्यानें वऱ्हाड व गोंडवण प्रांतांत स्वाऱ्या करून तिकडे मराठ्यांचा अंमल बसविण्याचा प्रयत्न केला. राजारामास यानें फार मदत केली, व वऱ्हाड गोंडवणांत आपला अंमल बसवला. त्यामुळें राजारामानें स. १६९९ त त्यास 'सेनासाहेब सुभा' हा किताब व सरंजाम देऊन वरील प्रांतांतील चौथाई व सरदेशमुखी वसुलीचें काम देऊन तशी सनद दिली. परसोजीनंतर हा वऱ्हाडांत भाम येथें येऊन राहिला.

स. १७०७ मध्यें शाहू मोगलांचे कैदेंतून सुटून आल्या-वर त्यास जे मराठे सरदार मिळाले त्यांत परसोजी हा प्रथम मिळाला. परसोजीचा भाऊ बापूजी यास ताराबाईनें आपणाकडे वळवून घेऊन परसोजीसहि वळविण्यासाठीं त्यास शाहूकडे पाठवलें. शेवटीं शाहू खरा असें ठरल्यावर परसोजी व बापूजी त्यांस एका ताटांत घेऊन जेवले, तेव्हां कोणासच शंका न राहून सर्व मराठे सरदार शाहूस मिळून त्याचें काम सुकर झालें.

शाहूस परसोजीनें फार मदत केली म्हणून तो यशस्वी झाल्यावर स. १७०७ मध्यें त्यानें परसोजीस "सेना-साहेब सुभा" हें पद व वऱ्हाड, गोंडवण प्रांतांचा अंमल कायम करून त्यास वंशपरंपरेची नवीन सनद दिली.

वरील सनदेप्रमाणें वऱ्हाडांत येऊन परसोजीनें कारभार केला. तो त्यानंतर साताऱ्यास गेला व तेथून परत येत असतां कृष्णा व वेण्णा यांचे संगमावर माहुलीजवळ स. १७०९ मध्यें मरण पावला. तेथें याची समाधि आहे, व तिचे पूजेअर्चेकरितां कान्होजीनें शाहूपासून इनाम जमीन देवविली आहे.

परसोजीचा शिक्का—श्रीमछिव प्रसन्न परसोजी (गोल शिक्का रा. खं. १५, पा. १०२, नागपूर प्रांताचा इतिहास).

२. (मृत्यु स. १८१७) हा दुसऱ्या रघूजीचा एकु-लता एक मुलगा. याचें लग्न काशीबाई मोहिते हिच्याशीं झालें होतें.

परसोजी ऊर्फ बाळासाहेब हा शरिरानें व मनानें पंगू व भ्रमिष्ट होता, त्यामुळें रघूजीच्या मृत्यूनंतर पुढील परिस्थितीबद्दल काळजी वाटूं लागली. व्यंकोजीचा मुलगा अप्पासाहेब गादी बळकावण्यासाठीं टपलेला होता. अशा परिस्थितींत मुख्य गादी परसोजीकडे असावी व कारभार पूर्वीप्रमाणें मुत्सद्यांनीं करावा असें ठरलें.

परसोजी इतका वेडा होता कीं, रघूजीचे मृत्यूनंतर क्षौर केल्यावर कैक दिवस तो 'माझ्या मिशा काय झाल्या' म्हणून विचारीत होता असें म्हणतात.

परसोजीस बाळासाहेब व क्वचित् बाबासाहेबहि म्हणत असत. बाप मेला तेव्हां याचें वय ३८ वर्षांचें होतें. यास राज्यकारभाराचा बिलकुल अनुभव नव्हता. लहाणपणीं याचें शरीर चांगलें होतें. परंतु तरुणपणीं अनेक व्यसनां-मुळें याचें शरीर दुर्बल झालें होतें. निरनिराळ्या रोगांवर केलेल्या उपचारामुळें याचे शरीरावर कायमचा परिणाम झाला. अर्धांगवायूमुळें कमरेखालचा भाग पंगू झाला होता, व डोळ्यांनींहि हा आंधळा झाला होता. हा पूर्णपणें वेडा नसला तरी 'खानापीना और चैन करना'

यापलीकडे याला राज्यकारभारांत कांहींच कळत नव्हतें. रघूजीनें यास राज्यकारभाराचें ज्ञान यावें म्हणून बराच प्रयत्न केला होता. स्वारीवर अगर फिरतीवर असतां तो यास बरोबर नेत असे. मुत्सद्यांबरोबर खलबत करतांना, व निरनिराळ्या प्रांतांचे हिशेब समजून घेतांना तो यास जवळ बसवीत असे. ही माहिती रघूजीजवळ असलेल्या माधवरावाच्या दोन वकिलांनीं त्यास लिहिलेल्या पत्रावरून कळते ( मंडळांतील अप्रकाशित पत्र ). परसोजी ता. १–२–१८१७ रोजीं मरण पावला. त्यास त्याचा चुलत-भाऊ आप्पासाहेब यानें आपल्या हस्तकांकडून गळा दावून मारलें, अशी अफवा होती ( नागपूर प्रांताचा इतिहास ). परसोजीचे मृत्यूनंतर काशीबाई सती गेली.

३. रुस्तमजी भोसल्याचा धाकटा मुलगा. परसोजी हा स्वभावानें जरा भोळसर होता. यासच पुढें सातारचे थोरले शाहू महाराज यांची चुलत आजी म्हणजे शहाजी-राजे यांचे वडील चिरंजीव संभाजीराजे यांची बायको मकाऊसाहेब जिंजीकरीण यांनीं आपणास मूल नाहीं म्हणून वंशवृद्धि होण्याकरितां दत्तक घेतलें. जिंजीच्या घराण्यांतील भोसले हे याच पुरुषाचे वंशज होत. याला खेलोजी नांवाचा एक वडील भाऊ होता ( मं. सप्तम सं. वृ. पृ. ६८ ).

४. हा विठोजी भोसल्याचा मुलगा व शहाजीचा चुलत-भाऊ असून नांदनज व भांबोरें या दोन गांवीं राहत असलेल्या भोसल्यांचा मूळ पुरुष होय.

निजामशाहीचे अखेरीस जेव्हां शहाजी अहमदनगर सोडून विजापुराकडे जावयास निघाला तेव्हां त्यानें आपला चुलता विठूजी याच्या सहा मुलांची जागजागीं व्यवस्था लाविली. त्यांतून परसोजी यास त्यानें निजामशाहींतील मालोरी हा गांव दौलताबादकराकडून दिला. त्यामुळें पर-सोजी हा निजामशाहींतच राहून मोठमोठालीं जिम्मेदारीचीं व पराक्रमाचीं कामें करून चांगलाच नांवलौकिकास चढला.

त्या वेळेस वऱ्हाडांत व खानदेशांत बंडखोर लोकांच्या टोळ्या जागोजाग रयतेस त्रास देत होत्या. त्या लोकांचा बींमोड करण्याकरितां सरकारांतून याची योजना करण्यांत आली. वऱ्हाड व खानदेशांत जाऊन त्या ठिकाणचीं बंडें मोडून नर्मदा ओलांडून हा काशी–बनारसपर्यंत गेल्याचा उल्लेख आहे. याच कामगिरीबद्दल याला वऱ्हाडांतील जळगांव–जामोद या गांवची देशमुखीची सनद मिळाली.

यानें ठिकठिकाणीं वसाहती केल्या व औरंगाबादेस एक पुरा वसविला. तो अद्याप याचे नांवावर परसुपुरा म्हणून चालत आहे. याला सयाजी नांवाचा एक मुलगा होता. तो आपल्या बापाप्रमाणेंच कर्तृत्ववान् होता ( मं. सप्तम सं. वृ. पृ. ६६–६७ ).

**पराक्रम पांड्य**—( १ कुलशेखर पांड्य पाहा ).

**पराक्रम बाहु**—( रामचंद्र कवि भारती पाहा ).

**२.** ( स. ११९५ ) हा सिंहलदेशचा राजा. यानें सिंहली सैन्यासह पांड्य राजावर स्वारी केली होती.

**पराक्रमराज**—( ३ सुंदर पाहा ).

**परान्तक चोल**—( स. ९०७–५३ ) हा पहिल्या आदित्य चोलाचा मुलगा होय. याला परकेसरीवर्मा व वीर-नारायण वगैरे पदव्या होत्या. यानें आपला राज्यविस्तार बराच केला. यानें केरळराजकन्येशीं विवाह केला. यानें पांड्यराज, बाणराज व वैडुंबराज यांचा पराभव केला. ही गोष्ट स. ९१० च्या सुमारास झाली. याच्या कारकीर्दींत सर्वत्र शांतता नांदत असल्यानें धार्मिक चळवळीस बराच जोर आला. कालमुख व पाशुपतादि शैवपंथांना व वैष्णवपंथांना राजदरबारीं मान्यता मिळाली. हा स्वतः शैव असल्यानें यानें चिदंबरच्या शंकराच्या देवळाची सर्व पटई सोन्यानें मढवली होती, असें सांग-तात. यानें आपल्या वयाच्या सदतिसाव्या वर्षीं सिलोन-वर स्वारी केली. याला पांच पुत्र होते, त्यांपैकीं तिघांनीं राज्य केलें. राजकेसरीवर्मन् ऊर्फ राजादित्य हा याचा ज्येष्ठ पुत्र. गंडरादित्तन, अरिंजय अथवा अर्जुन मधुरकोंड, उत्तमशीली, अरिकुलकेसरिन् हे याचे दुसरे पुत्र होत.

स. ९४४ च्या पूर्वीं यानें तिसऱ्या कृष्ण राष्ट्रकूटाशीं लढाई करून त्यांत राष्ट्रकूट राजाचा पराभव केला. वरील लढाईत विजयी झाल्यावर यानें ' वीरचोल ' ही पदवी धारण केली. स. ९५३ पर्यंत याचे उल्लेख शिला-लेखांत सांपडतात, त्यावरून स. ९५३ हाच याच्या कार-कीर्दीचा शेवटचा सन ठरतो ( एपि. इंडि. १९-८१-८७ ). याच्या पत्नीचें नांव कोक्किलानडी ( २ पृथ्वीपति गंग पाहा ).

**२.** ( स. ९६५ ). हा अरिंजयाचा पुत्र. याला सुंदर परकेसरी म्हणत. याच्या वेळीं वीर पांड्यानें उचल केली, परंतु यानें त्याचा चेव्रूर येथें पराभव केला. याच्या-नंतर याचा मुलगा आदित्य दुसरा ऊर्फ करिकाल राज-केसरी हा राजा झाला.

**परान्तक वीरनारायण पांड्य**—( स. ८६२-९०० ) श्रीमार पांड्याचा पुत्र व वरगुणवर्मन्‌चा धाकटा भाऊ. याला मारंजदयन अशी पदवी होती. यानें उग्राला जिंकलें. याचा पुत्र राजसिंह.

**२.** ( स. १४२२ ) हा कुलशेखर पांड्याचा पुत्र.

**परिचेहेरा**—( परि-चेहेरा ) ही सोनगडच्या राजाची कन्या होय. ही फार सुंदर होती. सोनगडचा राजा दिलावरखानास शरण आला, तेव्हां खानानें राजाकडून हिला दुसऱ्या ( बेदरचा ) अलाउद्दीनशहाकरितां नजर म्हणून आणलें. हिच्यावर शहाची अत्यंत मर्जी बसली, आणि हिला त्यानें परिचेहेरा (परीप्रमाणें चेहेरा असलेली) असें नांव दिलें ( मु. रि. १, २२६ ).

**परिमल**—( पद्मगुप्त पाहा ).

**परिमलदेवी**—( स. ७१३ सुमार ) सिंधमधील दाहीर राजाची कन्या. दाहीर स.७१३ चे सुमारास लढाईंत पडल्यावर त्याच्या कुटुंबांतील ज्या दोन मुलींस मुहंमदानें विजयाचा अहेर म्हणून खलिफा वलीद याजकडे पाठविलें त्यांपैकीं धाकटी बहीण. या बहिणीच्या रोमांचकारक हकीगतीकरितां ‘ सूर्यदेवी ’ पाहा.

**पर्वतक**—हा भारताच्या पश्चिमेकडील भागाचा एक प्रबळ राजा होता. चंद्रगुप्तानें मगधाचें राज्य जिंकण्याकरितां याचें साहाय्य घेतलें होतें व याला जिंकलेल्या राज्यापैकीं अर्धा भाग देण्याचें कबूल केलें होतें. पण राक्षसानें चंद्रगुप्ताकरितां केलेल्या विषकन्येच्या प्रयोगानें हा मरण पावला. हा पोरस किंवा त्याचा पुत्र असावा.

**पर्वीझ मोगल**—( जन्म स. १५८९-१६२५ ) जहांगीर मोगल बादशहाचा मुलगा.

**पलंत पांड्य**—हा उच्चंगीच्या पांड्य घराण्यापैकीं चेदि किंवा चेतराजाचा मुलगा.

**पल्लव घराणें**—१ बप्पा ( स. २२५-२५० ), २ शिवस्कंदवर्मन् १ ला ( स. २५०-७५ ), ३ बुद्धवर्मन् ( स. २७५-३०० ), ४ बुध्यन्कुर ( स. ३००-२५ ), ५ विष्णुगोप १ ला ( ३२५-३५० ), ६ स्कंदवर्मन् २ रा ( स. ३५०-७५ ), ७ कुमारविष्णु १ ला ( स. ३७५-४०० ), ८ बुद्धवर्मन् २ रा ( स. ४००-२५ ), ९ कुमारविष्णु २ रा ( स. ४२५-५० ), १० स्कंदवर्मन् ३ रा, ११ वीरवर्मन्, १२ विजयस्कंदवर्मन् ४ था ( स. ४५०-४७५ ), १३ सिंहवर्मन् १ ला ( स. ४७५-५०० ), १४ स्कंदवर्मन् ५ वा (स.५००-२५ ), १५ नंदिवर्मन् १ ला ( स. ५२५-५० ), १६ सिंहवर्मन् ३ रा ( स. ५५०-७५ ), १७ सिंहविष्णु ( स. ५७५-६०० ), १८ महेंद्रवर्मन् १ ला (स.६००-३० ), १९ नरसिंहवर्मन् १ ला ( स. ६३०-६८ ), २० महेंद्रवर्मन् २ रा ( स. ६६८-७० ), २१ परमेश्वर पोतवर्मन् १ ला ( ६७०-६९० ), २२ नरसिंहवर्मन् २ रा ( स. ६९०-७१५ ), २३ परमेश्वर-पोतवर्मन् २ रा ( स. ७१५-१७ ), २४ नन्दीवर्मन् २ रा ( स. ७१७-७७९ ), २५ दन्तिवर्मन् ( स. ७७९-८३० ), २६ नन्दीवर्मन् ३ रा ( स. ८३०-८५४ ), २७ नृपतुंग ( स. ८५४-८८० ), २८ अपराजित ( स. ८८०-८९८ ). यांचें राज्य कृष्णेच्या दक्षिणेस आणि कांचीच्या दक्षिण भागांत होतें. हे क्षत्रिय होते.

महाराष्ट्रांतील महारमांगांप्रमाणें तामीळ देशांत आज परैय्या व पल्ल अशा जाती आहेत. पल्ल हे मांगांसारखे आहेत. कर्नाटकाच्या खालीं दक्षिणेंत सर्वत्र खालच्या वर्गांत बलगै ( उजव्या हाताकडचे ) आणि यडगै ( डाव्या हाताकडचे ) असा भेद आढळतो. हा ग्रामसंस्थेंतील दर्जाचा मान दिसतो. पल्लवांचा व त्यांचा कांहीं संबंध नाहीं.

**२. ( नोलंदवाडी )**—१ मंगल ( स. ७०० ), २ सिंहपोत ( स. ८१० ), ३ चारुपान्नेर ( स. ८३० सुमार ), ४ पोरल्चोर जोलम्ब १ ला ( स. ८४०-५३ ), ५ महेन्द्र १ ला ( स. ८५३-८९७ ), ६ अय्यपदेवनल्गि ( स. ८९७-९२० ), ७ अन्निग ( स.९३१-९३६ ), ८ दिलीपय्य ( स.९४२-९६६ ), ९ नन्नीनोलंब ( स.१०००सुमार ), १० पोरलचोर २ रा ( स. १००० सुमार ), ११ वीरमहेन्द्र २ रा.

**पवार घराणें ( धार )**—१ संभाजी, २ उदाजी, ३ आनंदराव ( स. १७२९-३६ ), ४ यशवंतराव ( स. १७३६-६१ ), ५ खंडेराव ( स. १७६१-८० ), ६ आनंदराव २ रा ( स. १७८०-१८०५ ), ७ रामचंद्रराव ( स. १८०५-१८०८ ), ८ रामचंद्रराव २ रा द. ( स. १८०८-३३ ), ९ यशवंतराव २ रा द. ( स. १८३३-५७ ), १० आनंदराव ३ रे द. ( १८५७-९८ ), ११ उदाजीराव द. (स.१८९८-९), १२ आनंदराव (चालू).

**२.** ( देवास )—काळोजी-१ तुकोजी ( स. १७२८-५३ ), २ कृष्णाजी द. ( स. १७५३-८९ ), ३ तुकोजी दुसरा ( स. १७८९-१८२७ ), ४ रुक्मांगद (स. १८२७-६० ), ५ कृष्णाजी (स. १८६९-९९), ६ तुकोजी तिसरा (स. १८९९-१९३५), ७ विक्रमसिंह(चालू).

**३.** ( देवास ) काळोजी—१ जिवाजी ( स. १७२८-७५ ), २ सदाशिव ( स. १७७५-९० ), ३ रुक्मांगद

( स. १७९०-१८१७ ), ४ आनंदराव ( स. १८१७-४० ), ५ हैबतराव ( स. १८४०-६४ ), ६ नारायण ( १८६४-९२ ), ७ मल्हारराव द. ( स. १८९२-१९३४ ), ८ सदाशिवराव खासेसाहेब पवार ( चालू ).

**पशुपति**—' कारकपरीक्षा ' नामक संस्कृत ग्रंथाचा कर्ता. हा काश्मीराकडील होता.

२. ( स. ११५० सुमार ) हा तिसऱ्या हलायुधाचा भाऊ होय. यानें ' श्राद्धकृत्यपद्धति ' आणि ' पाकयज्ञ-पद्धति ' असे दोन ग्रंथ संस्कृतांत लिहिले आहेत. हाहि आपल्या भावाप्रमाणें आपल्याला आवसथिक ही पदवी लावीत असे.

**पंकजपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं एकावन्नावा सिद्ध होय. हा नागार्जुनाचा शिष्य. जात ब्राह्मण. गांव लाखपुत्र. याचे कांहीं ग्रंथ आहेत.

**पंडित राघवोपाध्ये**—( खळो व्यास पाहा ).

**पंडितराव**—संभाजीस पन्हाळा किल्ल्यावर अटकेंत ठेविलें होतें. परंतु तो अटकेंतून बाहेर पडला, व आपण सिंहासनावर बसला. तेव्हां पूर्वीचें अष्टप्रधानमंडळ मोडून नवीन एक मंडळ स्थापन केलें. त्यांत ह्यास त्यानें प्रधान केलें. हा मोठा मुत्सद्दी होता. यास धर्मादाय इनामांच्या देणग्या देण्याचा अधिकार संभाजीच्या कारकीर्दीत होता ( मं. श. १८३७ वा. इ. ले. ५१ ).

**पंताजी गोपीनाथ बोकिल**—दे. ऋ. ब्रा. जमदग्नि गोत्र. शिवाजीकडून अफजलखानाकडे हेजिबीस गेलेल्या वकिलाचें नांव. मराठ्यांची बखर करणाऱ्या ग्रँड डफनें यास अफजलखानाचा वकील बनवून, यानें आपल्या धन्याशीं बेइमान दाखविलें, त्याबद्दल शिवाजीनें यास हिवरे गांव इनाम दिला असें लिहिलें आहे ( व्हा. १ पा. १३८-१४१ आर. चेम्बर अँड को.ची प्रत १९१२ ). पण ही माहिती अगदीं चूक असून हा अफजल प्रकरणाच्या पुष्कळ पूर्वीपासून शिवाजीचा चिटणीस होता व हिवरे गांवचें वतनहि पूर्वीच याच्या एका घराण्याकडे होतें, असें उपलब्ध कागदांवरून दिसतें ( मं. सप्तम सं. १-६ पत्र पा. ५९ ). बखरींत हा जिजाबाईबरोबर सोंगट्या खेळत असे, असें घरोब्याचें वर्णन आहे. पोवाड्यांत 'पंताजी तो काका' असें म्हटलें आहे. वरील कामगिरीबद्दल याला भोळी व मांडकी या गांवीं एक एक चावर जमीन व मांडकी येथें सेटेपणाचें वतन दिलें. शिवाजीनें दिलेल्या देणगीचे कागदपत्र पुनः शाहूनें यास करून दिले आहेत. याच्या घराण्यापैकीं सखारामबापू हा मोठा मुत्सद्दी म्हणून पुढें प्रसिद्धीस आला.

**पंप**—( ग्रंथकाल स. ९४१ ) हा दिगंबर जैनपंथी असून मूळचा वेंगी प्रांतांत राहणारा होता. यानें आपला आश्रयदाता जो दुसरा अरिकेसरिन् चालुक्य याच्या सांगण्यावरून ' भारत ' किंवा ' विक्रमार्जुनविजय ' हा चंपूरूप ग्रंथ लिहिला. हा ग्रंथ लिहिल्याबद्दल यास दुसऱ्या अरिकेसरिन्नें बचेसहस्र या देशविभागांतील धर्मऊरु हें गांव बक्षिस दिलें. यानें आपल्या ग्रंथांत दुसऱ्या अरिकेस-रिन्पर्यंतच्या पुरुषांची माहिती दिली आहे. आदिपुराण हा ग्रंथ श. ८६३ ( स. ९४१ ) मध्यें पुलिगेरे-हल्लींचें लक्ष्मेश्वर येथें सुंदर कानडींत रचला. याच्या या भारताच्या, राइसनें संपादलेली व कर्नाटक साहित्यपरिषदेनें संपादलेली अशा दोन प्रती आढळतात ( द. म. इ. सा. खं. २, पा. ३६ टीप ). यानें आदिपुराण नांवाचा चम्पूरूप ग्रंथ लिहिला असून त्यांत पहिल्या तीर्थंकराचें चरित्र लिहिलें आहे. हा वेंगी येथील ब्राह्मण घराण्यांत जन्मला आणि प्रथम याच्या पित्यानें जैनधर्म स्वीकारला.

पंपानें आदिपुराण हा आपला ग्रंथ प्रथम लिहिला आणि तो कानडी भाषेच्या दृष्टीनें सर्वोत्कृष्ट समजला जातो. यानें लिहिलेलें भारत आदिपुराणानंतर लिहिलेलें आहे. आणि तें काव्यहि उत्कृष्ट असलें तरी आदिपुराणाइतकें तें सरस नाहीं, असा रसिकांचा अभिप्राय आहे. याच्या या काव्या-मुळें याच्या पूर्वीच्या इतर कवींचीं काव्यें मागें पडलीं असें केशिराज व नागवर्मा या प्रसिद्ध कानडी ग्रंथकारांनीं म्हटलें आहे. हा नुसता कवि नसून अरिकेसरिन्चा सेना-पतीहि असावा. याच्या भारतांत यानें अर्जुन हा नायक मानला आहे. अर्जुन व अरिकेसरिन् यांची तुलनाहि केली आहे. हा आदिपंप म्हणून कर्नाटकांतील लोकांच्या ओळखीचा आहे ( क. क. च. १ ).

**पंपा**—विजयनगरच्या दुसऱ्या हरिहर संगमाची पत्नी.

**पान-चा-ओ**—( ख्रि. पू. १०२-७३ ) हा चिनी सेनापति अतिशय शूर व मुत्सद्दी होता. यानें स. पूर्वी ७३-१०२ चे दरम्यान चिनी साम्राज्याची हद्द रोमन साम्राज्यापर्यंत नेऊन भिडविली. यानें खोतान ते कास्पि-यन समुद्रापर्यंत मुलूख जिंकले. दुसऱ्या कदफिसेसनें पाठविलेल्या शी सेनापतीचा यानें पराभव करून हिंदु-स्थानांतूनहि खंडणी वसूल केली ( २ कदफिसेस पाहा ). याच्या मृत्यूनंतर कनिष्कानें चीनवर स्वारी केली ( V. Smith, pp. 268-6, 278, 294 ).

**पाफम**—( स. १७८१ ) हा एक इंग्रज सेनापति होय. स. १७८१ मध्यें हेस्टिंग्सनें महादजीस पायबंद घालण्याकरितां माळव्यांत इंग्रज सैन्य पाठविलें. तेव्हां

हाहि बंगालची अडीच हजार फौज व थोड्या तोफा घेऊन फेब्रुवारींत काल्पीवर यमुना उतरून गोहदच्या राण्याचे मदतीस आला. तेथें यानें लाहरचें ठाणें घेऊन लगोलग ग्वाल्हेरवर चाल करून तोहि किल्ला फितुरीच्या साधनानें घेतला.

**पाराशर दादाजी वाघ**—( मृत्यु ता. १८-११-१८०२ ) हा एक होळकरांचा कारभारी होय.

होळकरांचा पूर्वीचा कारभारी नारो गणेश हा गेल्यानंतर राज्याचा कारभार हा पाहत असे. याच्याविषयीं उल्लेख हिंगण्यानें आपल्या ता० २४-१-१७९४ च्या पत्रांत खुलासेवार केला आहे ( महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें ). स. १७६१ मध्यें हा पानिपतच्या लढाईंत हजर होता ( म. रि. मध्य वि. ३, पृ. १८३ ). भवानी शंकर म्हणतो—'पाराशर दादाजी वकिलीच्या कामांत लायक, सुज्ञ आणि उत्तम भाषण करणारा होता. होळकर दरबारांत हा वागलेला असून त्यानें पेशव्यापाशीं आपली कामगिरी चातुर्यानें व लीनतेनें केली. परंतु बाजीरावानें याचा उपयोग करून घेतला नाहीं.'

याचें उपनांव गोहलकर असून हा साकुरें येथील राहणारा होय. याच्या मुलाचें नांव दादो पाराशर असून याचे वंशज इंदुरास आहेत. नारो गणेशच्या हाताखालीं रावजी महादेव फडणीस होता. त्याचे मार्फत हा होळकरांचे नोकरींत आला. लाखेरी व पाटण येथील लढायांत हा तुकोजीबरोबर हजर होता. याचें व दुसऱ्या मल्हाररावाचें वांकडें होतें. अर्थात् हा काशीराव होळकराचे तर्फेनें पुण्यांस राहत असे. मल्हारावाचे मृत्यूनंतर हा यशवंतरावाकडे आला. याचा बाप दादाजी महादेव हा चिमाजी आपाबरोबर वसईच्या स्वारींत होता. याला दोन स्त्रिया होत्या. त्यांनीं दोन निराळे पुत्र दत्तक घेतले. पैकीं एक साकुरीकर इनामदार व दुसरे वाघ असे दोन वंश आज इंदुरांत नांदत आहेत. पानिपतावरील मोहिमेंत खजिना घेऊन चुकून अब्दालीच्या छावणींत जाणारा पाराजीपंत तो हाच असावा (म. रि. उत्तर वि. ३ पृ. २०९). हा पुण्यास यशवंतराव होळकरातर्फे बाजीरावाशीं बोलणें करण्यास आला असतां ज्वर येऊन कार्तिक व. ८ गुरुवार ( ता. १८-११-१८०२ ) रोजीं मरण पावला.

**पार्थ उत्पल**—हा काश्मीरच्या उत्पल घराण्यामध्यें जे दुर्बल व जुलमी राजे निघाले त्यांपैकीं एक होय. याच्या कारकीर्दीत स. ९१७–१८ सालीं काश्मीरांत इतका भयंकर दुष्काळ पडला कीं, "वितस्ता ( झेलम ) नदी प्रेतांनीं भरून गेली, व जमीन हाडांनीं आच्छादून गेल्यामुळें सर्वत्र स्मशानभूमीसारखा देखावा दिसूं लागला.' असें एक ब्राह्मण बखरकार म्हणतो.

**पार्वतीबाई शिंदे**—ही नरसिंग घाटगे यांची मुलगी व महादजी शिंदे यांची बायको. हिची मुलगी शितोळ्यांकडे दिलेली बाळाबाई.

**पार्वतीबाई पेशवे**—( मृत्यु स. १७८३ ) सदाशिवरावभाऊ पेशवे यांची पत्नी. ही बाई स. १७८३ मध्यें मृत्यु पावली. ही सरळ व सुस्वभावी असून, सवाई माधवरावांच्या बाळपणांत हिनें त्याची चांगली काळजी घेतली होती. ही मृत्यु पावल्याचें वृत्त नानांनीं महादजीस लिहिलें. तेव्हां महादजीनें हिच्यासंबंधीं काढलेले उद्गार वाचण्यासारखे आहेतः 'मातुश्री होती तोपर्यंत श्रीमंत राजश्री रावसाहेब याजविषयीं, घरांतील बंदोबस्ताविषयीं खातरजमा होती. सांप्रत बंदोबस्तास खातरजमेचे कोणी दिसत नाहीं' ( ऐतिहासिक टिपणें ३७ ).

ही पानपताच्या पळांतून सुरक्षित आली. सदाशिवरावभाऊ जिवंत आहे अशा समजुतीनें ही शेवटपर्यंत सौभाग्यचिन्हें धारण करीत असे. सदाशिवराव भाऊंचा तोतया हिला दाखवून ठार करण्यांत आला.

**पार्श्वदेवगणि**—( स. ११३३ ) ह्या जैन तर्कज्ञानें 'न्यायप्रवेशा'वर 'न्यायपंजिका' नांवाची टीका लिहिली. यानें अमरदेवसूरीस नेमिचंद्राचा 'आख्यानमणिकोश' या ग्रंथावर टीका लिहिण्यास मदत केली ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पान २१० ).

**पार्श्वनाथ**—( ख्रि. पू. ७५० सुमार ) हा जैनांचा तेविसावा तीर्थंकर होय. हा ऐतिहासिक पुरुष असून एकूण शंभर वर्षें जगला.

यांनीं जैनधर्म उन्नत केला आणि त्या धर्माचें अस्तित्व स्थिर करण्याचें आणि चोहोंकडे फैलाव करण्याचें काम महावीरानें आणि त्यांच्या शिष्यांनीं केलें.

बनारसचा राजा जो अश्वसेन त्याला वामा राणीपासून पार्श्वनाथ हा मुलगा झाला. तोच पार्श्वनाथ तेविसावा जैन तीर्थंकर होय. याचें आयुष्य शंभर वर्षें होतें. त्यापैकीं सत्तर वर्षें यानें निर्वाणाच्या शोधार्थ घालविलीं. महावीराचे आईबाप याचे पूजक आणि श्रमणांचे अनुयायी होते.

हा इक्ष्वाकु घराण्यांतील होता. याची बायकोसुद्धां एक राजकन्या होती. त्यामुळें याचा दोन्हीकडूनहि राजघराण्यांशीं संबंध येतो. कुशस्थल येथील प्रसेनजित् राजाची मुलगी प्रभावती याची बायको होय. महावीराचे वेळीं मगधचे आसपास बहुतेक सर्व लोक याचे अनुयायी

होते. महावीराचे आईबापसुद्धां याचेच अनुयायी होते. गुहेच्या प्रत्येक कमानीवर दोन सर्पांचीं डोकीं खोदणें, ही पार्श्वनाथाची खूण होय. नागाच्या फणेमुळें (या खुणेमुळें) पार्श्वनाथ मूर्ति अति सुलभ रीतीनें ओळखिली जाते.

एकदां हा शिकारीस गेला असतां अरण्यांत कलिंग देशाचा राजा प्रभावती नांवाच्या कन्येस पळवून नेत होता. त्या वेळीं यानें प्रभावतीची कलिंग ( यवन ) राजापासून सुटका केली व नंतर तिच्याशीं लग्न लावलें. यावरून हा शिपाईगिरी बाण्याचा पुरुष होता असें दिसतें.

हा महावीराचे पूर्वी २०० वर्षे होऊन गेला किंवा ख्रि. पू. ७५० च्या सुमारास झाला. शेवटीं यानें समेत शिखरावर देह ठेवला.

**पालक प्रद्योत**—एक राजा.

**पालकुरिकेसोम**—( स. ११९५ ) याचा जन्म गोदावरी जिल्ह्यांत पालकुरिक येथें झाला. यानें संस्कृत, तेलगू व कानडी भाषांत लेखन केलें. याचें कानडींत सोमेश्वरशतक आहे.

**पाल घराणें ( बंगाल )**—१ गोपाल ( स. ७८०–८०० ), २ धर्मपाल ( स. ८००–२५ ), ३ देवपाल द. पुतण्या ( स. ८२५–५० ), ४ विग्रहपाल दत्तक पुतण्या ( स. ८५०–७५ ), ५ नारायणपाल (स. ८७५–९००), ६ राज्यपाल ( स. ९००–९२५ ), ७ गोपाल २ रा ( स. ९२५–९५० ), ८ विग्रहपाल २ रा ( स. ९५०–९७६ ), ९ महीपाल १ ला ( स. ९८०–१०२६ ), १० नयपाल ( स. १०३२–१०३६ ), ११ विग्रहपाल ३ रा ( स. १०३६–१०८० ), १२ महीपाल २ रा ( स. १०८०–१०८२ ), १३ शूरपाल (स. १०८२–१०८४), १४ रामपाल ( स. १०८४–११३० ), १५ कुमारपाल ( स. ११३०–११३६ ), १६ राज्यपाल, गोपाल ३ रा ( स. ११३६–११४० ), १७ मदनपाल ( स. ११४०–११६४ ), १८ गोविंदपाल ( स. ११६४–११८० ), १९ महेंद्रपाल ( स. ११८० ). यांची राजधानी मोंघीर व नंतर पौंड्रवर्धन होती. जात क्षत्रिय ( हि. क्वा. मार्च स. १९२९, हिस्टरी ऑफ पाल; गंगामासिकांतील लेख, सारनाथाचा शिलालेख ).

**पांडुदास**—काश्मीरकडील एक कवि. श्रीधर नांवाचा कवि याच्या आश्रयास होता.

**पांडुरंग केशव दाढी**—( ग्रंथकाल स. १८२५ ) एक महाराष्ट्र कवि. हा १०० वर्षांपूर्वी नागपुरास होऊन गेला. याचा ‘ अद्भुतरामायण ’ हा एकच ग्रंथ उपलब्ध आहे. त्यांत ओव्या व दिंड्या असे दोन छंद आहेत. याची कविता सामान्य प्रतीची आहे. वरील ग्रंथ श. १७४७ श्रावणमास भृगुवारीं एकादशीस समाप्त झाला ( महाराष्ट्रकविचरित्र, भा. २, पा. २०२ ).

**पांडुरंग गणेश काळू**—हा प्रसिद्ध भवानी काळो यांचा पुतण्या होय. याजकडे भोसल्यांच्या सैन्याची बक्षीगिरी होती, व ती याचेच घराण्यांत पुढें चालली. बक्षिगिरी म्हणजे पैशाची व्यवस्था ठेवण्याचें काम होय ( ना. प्रां. इ. ).

**पांडुरंगराव पटवर्धन ( सांगली )**—( मृत्यु स. १७७८ ) हा सांगलीच्या पटवर्धन घराण्यांतील हरभटचा नातू व गोविंद हरीचा तिसरा मुलगा होय.

याला पेशव्यांनीं कैदेंत टाकलें, तेव्हां याची जहागीर याचा मुलगा हरिहरराव याजकडे चालू ठेविली ( स. १७७८ ).

याचा सावशीचे लढाईंत पाडाव झाल्यामुळें हा बंकापूर येथें हैदराचे कैदेंतच जखमांनीं मरण पावला ( म. रि. उत्तर वि. १ ला, पृ. ४४८ ).

**पांड्य घराणें**—१ नेंदुजेलियन १ ला ( स.१५० ), २ वेर्रि –वेर–शैलियन ( स. १९० ), ३ नेदुंजेलियन २ रा ( स. २०० ), ४ उग्रपेरुवलुदी (स. ३०० सुमार), ५ नन–मारण ( स. ४०० सुमार ), ६ कडुंगण ( स. ५७५ ), ७ मारवर्मन् ( स. ६०० ), ८ जयंतवर्मन् ( स. ६२५ ), ९ मारवर्मन् २ रा ( स. ६५० ), १० कोच्चदैयण ( स. ६७५ ), ११ राजसिंह १ ला ( स. ७०० ), १२ जटिल परांतक ( स. ७७० ), १३ राजसिंह २ रा ( स. ८०० सुमार ), १४ वरगुण १ ला ( स. ८२५ ), १५ श्रीमार ( स. ८३० ), १६ वरगुण २ रा ( स. ८६२ ), १७ परांतक ( स. ९०० सुमार ), १८ राजसिंह ३ रा ( स. ९०७–१६ ).

यांशिवाय पांड्य नांव धारण करणारे पुष्कळ राजांचा उल्लेख आढळतो. पण त्यांची वंशावळ जुळवतां येत नाहीं. उच्चंगी, नोलंबवाडी व कांची वगैरे ठिकाणीं यांचीं राज्यें होतीं.

**पांड्याधिराज**—( कुलशेखर पाहा ).

**पिच्छाजान**—( झैनखान कोक पाहा ).

**पिट्टुग रट्ट**—हा सौंदत्तीच्या पृथ्वीरामानंतर गादीवर आला.

**पिठोरा**—पृथ्वीराज चौहानाचें नामांतर.

**पितामह**—( ख्रि. पू. ४०० सुमार ) सिद्धांतग्रंथ रचणाऱ्यांत पितामह हा सर्वांत प्राचीन आहे. यानें वेदांगज्योतिषाप्रमाणें सूर्य व चंद्र यांचें गणित करण्याची रीत

दिली होती असें वराहमिहिरकृत पंचसिद्धांतिकेवरून दिसतें; त्याचप्रमाणें याच्या ग्रंथांत मंगळ, बुध वगैरे ग्रहांचेंहि गणित करण्याची रीत होती, असें ब्रह्मगुप्ताच्या एका वाक्यावरून दिसतें. त्याअर्थी सूर्यचंद्राच्या गणिताच्या पुढें ग्रहगणिताचा पाया पितामहाच्या वेळीं पडला होता. याचा ग्रंथ सध्यां उपलब्ध नाहीं. वराहमिहिरानें याचे फक्त दोनच श्लोक दिले आहेत.

ग्रीक ज्योतिषी हिपार्कस याच्या पूर्वी हिंदुस्थानांत ज्योतिर्गणित अस्तित्वांत होतें हें म्हणण्यास पितामहाच्या ग्रंथाचा आधार उपयोगीं पडण्याजोगा आहे. मात्र पितामहानंतर ग्रीस देशांत होऊन गेलेल्या ज्योतिष्यांची माहिती रोमक व पौलिश सिद्धांताच्या स्वरूपानें भारतीय गणित्यांना होती ( माटेकृत विज्ञानबोध-चरित्र खंड, पृ. ४३-४४ ).

**पिनवोबमाम्ब**—विजयनगरच्या दुसऱ्या वेंकटपति देवरायाची पत्नी.

**पिरली**—या तामिळी ब्राह्मणानें अज्ञानतः एका अंत्यज मुलीशीं लग्न लाविलें होतें; पुढें तिला टाकून हा बरींच वर्षे यात्रा करीत फिरला. पण पुन्हां तिची गांठ पडून तिच्या सद्वर्तनाची व पावित्र्याची याला प्रचीति आली. शेवटीं हा तिजसमवेत राहूं लागला, पण मुलें मात्र सांभाळीत नसे. अव्हैय्यर, अपग्गा, कपिलर इत्यादि याचीं मुलें होत. यांपैकीं बहुतेक मुलें तामिळी वाङ्मयांत ग्रंथकार व कवि म्हणून प्रसिद्ध आहेत.

**पिरिय नायक**—( स. १६८७ पूर्वी ) अबुल हसन पदच्युत झाल्यावर दक्षिणेंत राज्य स्थापण्याचा यानें थोडा प्रयत्न केला. अबुल हसनलाहि यानें मदत केली होती. पण त्यानंतर याचा किल्ला ता. २८ नवंबर १६८७ रोजीं मोगलांच्या हातीं जातांच यालाहि मोगली चाकर व्हावें लागलें.

**पिलाजी गायकवाड**—(स. १७२१--१७३२ खून) हा जनकोजीचा पुत्र व दमाजीचा पुतण्या होय. दमाजी मरण पावल्यावर स. १७२१ त याची दमाजीच्या जागींच नेमणूक झाली. हा खानदेशांत नवापूर येथें राहत होता. परंतु पवारानें हरकत घेतल्यामुळें यानें सोनगड येथें किल्ला बांधून ठाणें दिलें. हें ठिकाण बरेच दिवस गायकवाडांची राजधानी होतें.

यानें प्रथम सुरत प्रांतावर स्वारी केली, चौथाई मिळविली व तेथें आपला गुमास्ता ठेविला. स. १७२५ त सरबुलंदचा पराभव केला. सरबुलंद यानें गुजराथची सरदेशमुखी व चौथाई थो. बाजीरावास दिली. डभईच्या लढाईंत याचा एक मुलगा मारला गेला व हाहि जखमी झाला. पुढें यशवंतराव दाभाड्यास सेनापतीचीं वस्त्रें देण्यांत आलीं व याची मुतालिकीची जागा कायम करून 'समशेरबहाद्दर' हा किताब दिला. अभयसिंगाचें व पिलाजीचें सख्य नसल्यामुळें वारंवार झटापटी होत. त्यांत अभयसिंगानें मराठ्यांचा बडोद्याचा किल्ला काबीज केला. परंतु पिलाजीनें इतरत्र बरेच जय मिळविले. तेव्हां कायमचे करारमदार करून टाकण्यासाठीं याच्याकडे अभयसिंगानें आपले वकील पाठविले व विश्वासघातानें कपटव्यूह रचून एका मारवाड्याचे मदतीनें डाकोर येथें पिलाजीचा खून केला ( स. १७३२ ). हा शूर, धोरणी, व बाणेदार होता आणि याचेंच उदाहरण पुढें याचे घराण्यास प्रोत्साहक झालें.

**पिलाजी जाधव**—(स. १७०७-मृत्यु स. १७५१) याच्या वडिलांचें नांव चांगोजी असून आईचें नांव हंसाई होतें. संपूर्ण अर्ध शतकापावेतों हरएक महत्त्वाच्या प्रसंगीं मराठी राज्याची सेवा केलेला आणि छत्रपति शाहूची समग्र कारकीर्द पाहिलेला असा हा फक्त एकच प्रमुख सरदार त्या वेळचा दिसतो. यांच्या घराण्यास वाघोली व वाडी हीं गांवें इनाम असल्यामुळें हल्लीं त्यांचीं वाघोलीकर व वाडीकर अशीं दोन कुटुंबें आहेत. देवगिरीच्या जाधवांशीं यांचा कांहीं संबंध असला पाहिजे, परंतु त्या वेळची वंशावळ उपलब्ध नाहीं.

स. १७०७ मध्यें शाहू दक्षिणेंत आला तेव्हां त्यास जी मंडळी सामील झाली तींत हा होता. चंद्रसेन जाधव बाळाजी विश्वनाथाचे पाठीस लागला, तेव्हां यानें व यमाजी धुमाळानें चंद्रसेनाशीं लढून बाळाजीची सुटका केली. दमाजी थोरातानें दंगा चालविला, तेव्हां त्याचा पराभव करून यानेंच त्यास पकडून सातान्यास शाहूपुढें आणला. यावरून यास शाहूनें दिवे व नांदेड येथील इनाम दिलें. या वेळेपासून हा सरंजामी सरदार बनला. हा बाळाजी विश्वनाथाबरोबर दिल्लीस गेला होता आणि तेथून पुढें प्रत्येक महत्त्वाच्या मोहिमेंत हा हजर असे. स. १७२४ त निजामाच्या औरंगाबादेकडील प्रदेशावर यानें मराठ्यांचा अंमल बसविला. निजामुल्मुकाशींहि यानें राजकारण बांधलें होतें, आणि निजामाकडून यास इनाम गांवेंहि मिळालीं आहेत. नानासाहेब पेशव्यांनीं तर यास बहुतेक निजामावर देखरेख ठेवण्याचीच कामगिरी दिली होती.

स. १७२८ त माळव्यावर चिमाजीआप्पानें स्वारी केली तेव्हां त्यांच्याबरोबर हा होता आणि तेव्हांपासून दयाबहाद्दर व मुहंमद बंगष यांजबरोबर युद्धांत व बाजी-

रावानें छत्रसालास मदत करण्याकरितां बुंदेलखंडावर स्वारी केली तींत हा हजर होताच. बाजीरावास झांशी प्रांत मिळाला तेव्हां यासहि तिकडे पांच गावें इनाम मिळालीं. पुढें कांहीं दिवस बाजीरावाशीं याचा बेबनाव झाला होता ( रा. खं. ६. ४९ व शकावली ). बाजीरावाचे व याचे खटके वारंवार उडत. रा. खं. ६ ले. १९ त बाजीरावानें याची माफीच मागितली असें लिहिलेलें आढळतें. बाजीरावानें याचा सरंजामहि जप्त केला होता, पण शाहूमहाराजांनीं परत देवविला.

स. १७३५ त शाहूनें यास कोंकणांत पाठविलें. यांनीं बाणकोट काबीज करून गोवळकोट व अंजनवेल हस्तगत करावीं अशी शाहूची आज्ञा होती, असें हा ता. १७-४-१७३५ च्या एका पत्रांत लिहितो ( भा. व. श. पृ. १०; ब्र. च. ले. २७८; इ. सं. ३.२ ऐ. च. ७ ).

भोपाळच्या लढाईंत यानें फारच महत्त्वाची कामगिरी केली ( स. १७३८ ). जंजिरा, दिल्ली व वसई वगैरे मोहिमांत हा हजर होता. यानें वसईची लिहिलेली हकीकत वाचण्यालायक आहे. तसेंच याचीं अनेक पत्रें वाचनीय आहेत.

वसईची मोहीम जरी स. १७३९ त झाली तरी तिकडील प्रदेशांत बंदोबस्त व व्यवस्था करण्याकरितां ५-७ वर्षे हा वसईकडे असून जव्हार वगैरे उत्तर कोंकणांतील प्रदेश जिंकण्याचें काम करीत होता.

स. १७४४–४५ त यानें उत्तरेकडे स्वारी करून ता. २२ मार्चला भेलसा हस्तगत करून भोपाळच्या फैज महंमदखान याजबरोबर तह केला.

पेशव्यांचा याच्याशीं केवढा घरोबा होता, हें तीं सर्व पत्रें वाचलीं असतां चांगलें कळून येतें. प्रथम चिमाजीचा व पुढें नानासाहेबांचा याच्याशीं मोठा लोभ असून नानासाहेब यास काका म्हणे. यास पोटशूळाची व्यथा असून त्याच कारणानें हा वाघोलीस ता. ३-७-१७५, मध्यें मरण पावला. यास एक मुलगा असून त्याचें नांव सटवोजी असें होतें. याच्या मरणसमयीं नानासाहेब पेशवे याच्या सामोपचारासाठीं वाघोलीस गेले होते. हा शिंदे–होळकरांहून जुना व पेशव्यांच्या विरुद्ध पक्षांत कधीं सामील झाला नव्हता, तरीसुद्धां इतरांच्या मानानें हा इतका मागें कां पडला तें समजत नाहीं. याचा मुलगा व पुतण्या सुभानजी यांच्यासारखेच पराक्रमी निघाले होते. याच्या घराण्यांतील एक मुलगी बडोद्याचे माजी महाराज गणपतराव गायकवाड यांस स. १८५० सालीं देण्यांत आली. त्यासंबंधानें याचे वंशज बडोद्यास आले. त्यांस हल्लीं तेथें नेमणूक आहे.

**पिलाजी नीळकंठ**—( स. १६६१ ) शिवाजीचा सेनापति. शिवभारतांत नीळकंठाला राजा असें पद लावलें आहे. सूर्यराव सुर्वे यांनीं संगमेश्वर येथें मराठी सैन्यावर मध्यरात्रीं अचानक हल्ला केला तेव्हां हा पळत होता, पण तानाजी मालुसरे यांनीं याला दगडाला बांधून ठेवलें आणि आपण उजाडण्याच्या आंत शत्रूचा फडशा पाडला.

**पिलाजी शिर्के**—शृंगारपूरच्या सुर्व्यांचा हा कारभारी होय. ठिकठिकाणचे पाळेगार दस्त करतांना सुर्व्यांवरहि शिवाजीनें शस्त्र धरिलें. तेव्हां हा शिवाजीकडे वकिलीस आला. परंतु उभयतांचे करारमदार बनले नाहींत. म्हणून शिवाजीनें सुर्व्यांस बुडविलें. त्या वेळीं ही शिर्के मंडळी हबसाणांत पळून गेली ( चि. ७१ ); परंतु शिवाजीनें यास अभयपत्र देऊन आपणापाशीं ठेविलें. ता. २९ एप्रिल स. १६६१ रोजीं शिवाजीनें शृंगारपूर घेतलें. याच पिलाजी शिर्क्याची कन्या येसूबाई ही संभाजीची बायको होय.

**पिंगला**—( भर्तृहरि पाहा ).

**पिंगलीसुरण**—हा गंदीकोटच्या राजाचा आश्रित कवि. याचे ग्रंथ–' कलपूर्णोदयमु ', ' राघवपांडवीय ', ' गरुडपुराण '.

**पीट्रो डि ला व्हेल**—( स. १६२३–२४ ) हिंदुस्थानांत आलेला इटालियन प्रवासी.

**पुण्यकुमार**—( स. ६५० सुमार ) हा रेनांडु येथील चोल घराण्यांतील महेंद्रविक्रमाचा पुत्र. याचें राज्य कडाप्पा जिल्ह्यांत व नेलोरच्या कांहीं भागावर होतें.

**पुण्यराज**—भर्तृहरीचा वाक्यपदीय ग्रंथावरील टीकाकार.

**पुतळाबाई**—ही शिवाजीमहाराजांची चौथी पत्नी. हिचा विवाह शके १५७५ ( स. १६५३ ) मध्यें रायगडास झाला. ही पालकरांची कन्या ( शि. नि. ).

**पुत्तुलिपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं अठ्याहत्तरावा सिद्ध होय.

**पुनर्वसु आत्रेय**—( खि. पू. ५५० ) हा हिमालयाच्या पायथ्याशीं राहणारा साधु होता. यानें खि. पू. ५५० च्या सुमारास बौद्ध वैद्य जीवक यास आयुर्विद्या शिकविली. हा मूळचा तक्षशिला ( पंजाब ) येथें राहणारा असून यानें चरकसंहिता हा ग्रंथ लिहिला. ह्या ग्रंथाचें मूळ नांव आयुर्वेद असें होतें. याच्या संहितेचे आठ भाग

असून त्याला स्थान नांव आहे ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पृ. ११-१२ ).

**पुरगुप्त**—(स. ६४८) स्कंधगुप्तानंतर गादीचा वारसा पुरगुप्ताकडे आला. याचीं नाणीं उत्कृष्ट असून त्यांवर प्रकाशादित्य असें नांव आढळतें. याच्या राणीचें नांव वत्सदेवी होय.

गुप्तवंशांतील कुमारगुप्ताला अनंतदेवीपासून झालेला मुलगा.

**पुरमन**—भरतपूर संस्थानच्या ब्रिजाचा ७ वा मुलगा होय. यानें सिनसिनीच्या व थूनच्या जाटांचें धुरीणत्व स्वीकारून तेथें किल्ले बांधिले, व नंतर बंडाळी करण्यास सुरुवात केली. स. १७१४ सालीं फर्रुखसियरनें याची बंडाळी बंद करण्याचा प्रयत्न केला. याच्या नंतर याचा मुलगा मोखमसिंह हा गादीवर आला.

**पुरंदर कदंब**—हा बनवासीच्या चंद्रवर्मा कदंबाचा पुत्र.

**पुरंदरदास**—( मृत्यु स. १५६४ ) कानडी कवि. ब्राह्मण. याचें गांव सासवडजवळचा पुरंदरगड होय. माध्वसांप्रदायी. गुरु—व्यासराय. उपदेशकाल स. १५२५. ग्रंथ-‘ पुरंदरदासाचें कीर्तन ’ या नांवानें याचा पदसंग्रह प्रसिद्ध आहे. याच्या पदांत विष्णुस्तुति व तत्त्वज्ञान असतें. हा गाणाराहि होता.

हा प्रथम सराफीचा धंदा करीत असे. पुढें कृष्णाच्या साक्षात्कारानें विरक्त झाला; आणि आपली सर्व संपत्ति दान दिली. यापुढील आयुष्य विठ्ठलनामसंकीर्तन करीत व त्यावर स्वतः पदें रचून तीं पदें गात घालविलें. विरक्त झाल्यानंतर हा पुष्कळ वर्षें पंढरीसच भिक्षा मागून राहत असे. हा प्रथम स्मार्त असून नंतर माध्व झाला असें सांगतात. यानें आपल्या पुष्कळ पद्यांत अद्वैताचें खंडण केलें आहे. हा स. १५३८ मध्यें विजयनगर येथें होता, आणि स. १५६४ मध्यें वैकुंठवासी झाला, असें मि. किटेल यानें लिहिलें आहे; आणि कर्नाटक कविचरित्रकार आर्. नरसिंहाचार्य यानेंहि याच्या विरुद्ध लिहिलें नाहीं ( क. क. च. भा. २, पा. २३२ ).

याच्या पदाच्या शेवटीं पुरंदर विठ्ठल असें असतें. हा कर्नाटकाचा तुकाराम आहे. शिक्षित किंवा अशिक्षित कानडी लोकांना याचें एखादें तरी पद येत असतें. शिवाय एकनाथाचेहि कांहीं गुण यांत होते.

**पुरीबाई**—डाकुराजवळ उमरेट नांवाच्या गांवची बाई. या गुजराथी स्त्रीनें केलेलें ‘ सीतास्वरूपवर्णन ’ नांवाचें काव्य प्रसिद्ध आहे.

**पुरुकेशिन्**—यानें स. ५९-८० पर्यंत राज्य केलें.

**पुरुहूत**—पांड्यांपैकीं वंशप्रदीपाचा पुत्र.

**पुरुषोत्तम**—यानें वाल्लभ मताला अनुसरून ‘ प्रकाशितामृततरंगिणी ’ नांवाची गीतेवर टीका लिहिली आहे. गुजराथी प्रिंटिंग प्रेसनें छापलेल्या गीतेवरील अनेक टीकांत ही टीका छापली आहे.

२. ‘ निजगुजसप्तक ’ नांवाच्या मराठी ग्रंथाचा कर्ता. गुरु-नारायण ( मं. त्रै. १२. ४. ले. ३० ).

३. अकबर बादशहाचा सल्लागार. याच्यामुळें अकबरानें फार्सीबद्दल संस्कृत शब्द प्रचारांत आणले ( मु. रि. २. ९८ ).

४. कलिंगाचा राजा. हारावली, त्रिकांडशेष व एकाक्षरी असे तीन कोश यानें केले.

**पुरुषोत्तम दाजी पटवर्धन**—( जन्म स. १७२९ सुमार-मृत्यु स. १७७६ ) हा एक पेशवाईतील प्रसिद्ध पुरुष होय. कृष्णंभट पटवर्धनाचा द्वितीय पुत्र.

हा सदैव आपल्या कामांत दक्ष व निभींड असे. जेव्हां गंगाबाई ही माधवरावासह पुरंदरास होती तेव्हां त्यांचेजवळ याला ठेवण्यांत आलें होतें. तेथें हा दारांत ढालतलवार घेऊन दिवसा सदा पडून असे व रात्रीं चौकीपहारे करीत सारी रात्र फिरत असे.

पेशव्यांनीं केलेल्या बहुतेक लढायांत हा हजर होता. लढाईंत पेशव्यांना याचा फार उपयोग होत असे. कारण सांगितलेलें काम हा उत्तम रीतीनें पार पाडीत असे.

याची दृष्टि मोठी चाणाक्ष, धूर्त व चौकस असे. हा तापट आणि मानी होता. हा बराच विनोदी व थट्टेखोर असून कित्येक वेळां याच्या थट्टेचा अतिरेकहि होत असे. यास अंबें हा गांव श्रीमंत बाळाजी बाजीराव पेशवे यांनीं इनाम दिला होता. यास दोन स्त्रिया असून पहिलीपासून एक कन्या झाली; व दुसऱ्या कुटुंबापासून हरिहरराव, कृष्णराव, विठ्ठलराव, रामराव व सदाशिव असे पांच पुत्र व पांच कन्या झाल्या ( रा. अ. लागू कृत पुरुषोत्तम दाजी पटवर्धन अंबेकर चरित्र ).

**पुरुषोत्तम महादेव हिंगणे**—( देवराव महादेव हिंगणे पाहा ).

**पुलकेशी ( पश्चिम ) चालुक्य**—( स. ५५०-५६६ ) हा पश्चिम चालुक्यांच्या घराण्यापैकीं रणरागाचा पुत्र. पुलकेशी हा शब्द पुलिकेशी असाहि लिहिलेला आढळतो. यास वल्लभ अशी पदवी होती. हाच खरोखर या( बदामी )च्या पश्चिम चालुक्य घराण्याचा संस्थापक होय. याला सत्याश्रय व रणविक्रम असेंहि म्हणत. याच्या राणीचें नांव दुर्लभदेवी असें होतें.

कदंबवंशांतील एका शाखेची राजधानी बनवासी ही यानें जिंकल्याबद्दल ऐहोळ येथील शिलालेखांत निर्देश आहे. यानेंच बदामी ( वातापी ) काबीज केली. यानें अश्वमेध केला होता.

**२.** ( स. ६१०–५५ ) पश्चिम चालुक्य घराण्यांतील पहिल्या कीर्तिवर्मन्‌चा हा मुलगा होय. स. ६१० मध्यें हा आपला चुलता मंगलीश याच्यानंतर गादीवर आला. याचें नांव सत्याश्रय पुलकेशी.

यानें गंग, आलुप, मौर्य ( कोंकण ), लात ( दक्षिण गुजराथ ), गुजर ( उत्तर गुजराथ ), कलिंग, कोसल, पल्लव ( काँजिवरमचे ) वगैरे राजांचा पराभव केला. याशिवाय यानें ठाणेश्वरच्या हर्षवर्धनाचा मोठा पराभव केला. हर्षाच्या पराजयाचें साल प्लीट स. ६१२ आणि स्मिथ व वैद्य स. ६२० मानतात. पण लाहणेर ताम्रपटावरून तो स. ६३०–३४ मध्यें झाला असावा ( मं. त्रै. १३ पृ. १२-१३ ). परंतु शेवटीं पल्लव घराण्यांतील नरसिंहवर्मन् १ ला यानें वातापी घेऊन (स. ६४२) पुष्कळ वेळां पुलकेशीचा पराभव केला व याला ठार केलें.

स. ६५५ मध्यें याचा मुलगा पहिला विक्रमादित्य हा याच्यानंतर गादीवर आला ( B. ).

**३.** ( स. ७३८ सुमार ) लाट देशांतील जहागिरदार जयसिंहवर्म्याचा तिसरा पुत्र. हा मंगळराजानंतर गादीवर आला. हें घराणें बदामीच्या सोलंकींपैकीं होतें. हा गादीवर आल्यावर यानें अवनिजनाश्रय असें बिरुद धारण केलें. हा राजा असलेल्या कालांतील एक ताम्रपट कलचुरि संवत् ४८० ( वि. सं. ७८६–स. ७३८ ) मधील मिळाला आहे. त्यांत पुढील माहिती मिळते. ताजिकांनीं ( अरबांनीं ) तलवारीच्या जोरावर सैंधव ( सिंध ), कच्छेल्ल ( कच्छ ), सौराष्ट्र ( दक्षिण काठेवाड ), चावोकट ( चावडे ), मौर्य, गुर्जर आदि राज्यें नष्ट करून दक्षिणमध्यें जात असतां प्रथम नवसरीवर स्वारी केली. त्या लढाईत भयंकर लढाई होऊन ताजिकांवर जय मिळाला. त्यांच्या शौर्यावर खूष होऊन शौर्यप्रेमी वल्लभानें ( बदामीचा सोलंकी राजा विजयादित्य किंवा विक्रमादित्य दुसरा यानें ) त्यांना ‘ दाक्षिणापथसाधार ’, ‘ चलुक्किकुलालंकार ’, ‘ पृथ्वीवल्लभ ’ व ‘ अनिवर्तकनिवर्तयितृ ’ अशीं चार बिरुदें अर्पण केलीं.

अरबांची ही लढाई खलीफा हेशामच्या वेळीं सिंधचा अधिकारी हाकीम जुनैदच्या सेनेनें केलेली असली पाहिजे. कारण खलीफा हेशामचा काळहि हि. १०५–१२५ (वि. सं. ७८०–७८८, स. ७२४–७४३) पर्यंतचा आहे. पुलकेशीला वि. सं. ७८८–७९६ ( स. ७३१-७३८ ) यांच्या मध्यें राज्य मिळालें. ‘ फुतूहुल् बुल्दान् ’ नांवाच्या अरबी तवारिखेंत लिहिलें आहे कीं, जुनैदनें आपलें सैन्य मरवाड ( मारवाड ), मंडळ ( काठेवाड ), दामलज ( कामलेज जि. सुरत असावें ), बरूस (भडोच), उज्जेन, मालिबा, बहरिमद ( ? ), अलबेलमान ( भीनपाल ), जज्र ( गुर्जर देश ) यांवर पाठविलें होतें ( इलियट हिस्टरी ऑफ इंडिया १. ४४१–४२ ). पुलकेशीनंतर राठोडांनीं लाट देश सोलंकीपासून जिंकला आणि ही शाखा संपली.

**पुलिन** किंवा **पुलिंद्**—महाकवि बाणभट्टाचा पुत्र आणि कादंबरीच्या उत्तरार्धाचा कर्ता. ( डॉक्टर स्टेनस् मॅन्युस्क्रिप्टस्, पृ. २९९; श्रीधर रा. भांडारकर यांचा दुसऱ्या दौऱ्याचा रिपोर्ट, पृ. ३९ ). पहिल्या ठिकाणीं पुलिन असें नांव असून दुसऱ्या ठिकाणीं पुलिन्द असें नांव आहे. नाथद्वारला एका हस्तलिखितावर पुलिंद असें पं. गौरीशंकर हि. ओझांना सांपडलें होतें ( ना. प्र. स. १. २३६ ).

**पुलोमायी आंध्र**—( स. १०० सुमार ) एक राजा.

**२.** ( स. १२३–१५६ ) हा गौतमीपुत्र आंध्राचा मुलगा. कान्हेरी, नाशिक, कार्लें व उमरावती येथें याचे शिलालेख आहेत. त्यांत ‘राज वासिष्ठपुत्र श्रीपुलोमायी’ असें म्हटलें आहे. कान्हेरीच्या लेखांत यास ‘ श्रीवासिष्ठीपुत्र श्रीशातकर्णी ’ असें म्हटलें आहे. नाण्यावरहि प्रायः असाच निर्देश आहे. पहिल्या रुद्रदामन् क्षत्रपानें याचा दोनदां पराभव केला. त्याचा हा जांवई झाला होता.

**३.** ( स. १५६–१६३ ) याला शिवश्री पुलोमायी म्हणत. याचीं नाणीं व शिलालेख उपलब्ध आहेत. नाण्यांवर ‘वासिष्ठीपुत्र शिवश्री शातकर्णी’ असें यास म्हटलें आहे.

**४.** ( स. २०१–२११ ) याचीं कांहीं नाणीं आहेत.

**पुष्कराक्ष**—हा काश्मीर देशाचा राजा. हा मलयकेतूच्या बाजूला असतां द्रोही म्हणून त्यानें याला ठार केलें, असें मुद्राराक्षसावरून कळतें. चंद्रगुप्ताला मगधसाम्राज्य मिळवून देणाऱ्या साहाय्यकांपैकीं हा एक असावा.

**पुष्पगुप्त वैश्य**—चंद्रगुप्ताच्या वेळचा सुराष्ट्र (काठेवाड)-चा अधिकारी. यानें तेथें सुदर्शन तलाव बांधला. याच्या मुलीशीं चंद्रगुप्त मौर्याचें लग्न झालें होतें ( इंडि. अँटि. भा. ७, पृ. २६०–६२ ).

**पुष्पदंत**—जैनांचा नववा तीर्थंकर ( तीर्थंकर पाहा ).

**पुष्यभूति**—हा श्रीकंठ प्रदेशाचा (ठाणेश्वरचा) राजा.

हा शिवभक्त होता. याचा पुत्र नरवर्धन ( हर्षचरित निर्णयसागर प्रत, पृ.९४–९६). हा बैसवंशी रजपूत होता.

**पुष्यमित्र शुंग**—( ख्रि. पू. १८३–१४८ ) ख्रि. पूर्वी १८५ चे सुमारास मौर्य घराण्यांतील शेवटला राजा बृहद्रथ याचा यानें वध करून शुंग घराण्याची स्थापना केली. हा मौर्यांचा सेनापति होता. याचा पुष्पमित्र असाहि उल्लेख आढळतो, परंतु पुष्यमित्र हाच उच्चार बरोबर असावा. या घराण्यांतील बऱ्याच राजांनीं आपल्या नांवापुढें मित्र असा शब्द जोडलेला आढळतो. याचें कारण म. म. हरप्रसादशास्त्री असें देतात कीं, शुंग घराणें पारसिक असून सूर्याचें उपासक असावें. परंतु हें घराणें सामवेदाचें उपासक असून यज्ञ करीत असे. एवढेंच नव्हे, तर यांनीं बुद्धधर्माच्या विरुद्ध ब्राह्मणधर्म पुन्हां स्थापण्याचा प्रयत्न केला. पुष्यमित्र हा ब्राह्मण असून राजगुरूच्या घराण्यांतील होता; आणि मौर्य घराण्यांतील शेवटचे राजे कमकुवत असल्यामुळें परकीय लोकांनीं राज्य घेऊं नये म्हणून यानें शेवटच्या राजाचा वध करून राज्याची स्थापना केली. कलिंगच्या खारवेल राजांनीं याच्यावर दोनदां स्वारी करून याचा पूर्ण पराभव केला व राजधानींतून ऋषभदेवाची मूर्ति नेली.

यानें एक अश्वमेध यज्ञ करून अश्वाच्या रक्षणार्थ आपला नातू वसुमित्र यास पाठविलें होतें; आणि तेव्हां यानें सिंधूच्या बाजूस यवनांस जिंकलें ( मालविकाग्निमित्र, अंक ५ ). यानें दोन अश्वमेध केले होते, यास अयोध्येच्या शिलालेखाचा पुरावा उपलब्ध झाला आहे. अश्वमेध केल्यावरहि हा सेनापति शब्द लावी ( एपि. इंडि., २०. ५४ ).

यानें मगधापासून जालंदरपर्यंत बुद्धांचे सर्व विहार जाळून टाकले व बौद्धांना ठार केलें. तेव्हां कांहीं बौद्ध भिक्षू पळून दुसऱ्या राजांच्या हद्दींत राहावयास गेले ( खारवेल पाहा ).

याच्या मृत्यूनंतर याचा पुत्र अग्निमित्र गादीवर बसला. यानें बृहद्रथ मौर्याला ठार करून राज्य मिळवलें, असें सर्वत्र लिहिलेलें आढळतें. पण त्याचा तपशील बाणाच्या हर्षचरितांत स्कंदगुप्तानें हर्षाला केलेल्या उपदेशांत पुढीलप्रमाणें आढळतोः "सैन्याची पाहणी करण्याच्या मिषानें मूर्ख बृहद्रथ राजाला बोलावून सेनापति पुष्यमित्रानें त्यास ठार केलें."

याच्याच कारकीर्दींत पतंजलीनें आपला व्याकरणभाष्य नांवाचा ग्रंथ लिहिला आणि याच्या हातून यज्ञ करवला, असें महाभाष्यांतील निर्देशावरून दिसतें.

**पुहकर**—(काव्यकाल स.१६१५) हिंदी कवि. प्रतापपुऱ्याच्या मोहनदास कायस्थाचा मुलगा. काव्यरसरतन. याच्या सरस काव्यरचनेमुळें जहांगीरनें याला बंधमुक्त केलें.

**पुंडरीक विठ्ठल**—( ग्रंथकाल स. १५७६ ) 'रागमाला' या संस्कृत ग्रंथाचा कर्ता. पिता–धर्म व माता–नागांबा. अकबराच्या वेळच्या मानसिंहाचा भाऊ माधवसिंह राजाचा यास आश्रय होता. रागमालेशिवाय यानें नर्तननिर्णय, रागमंजरी, शीघ्रबोधिनी, नाममाला व षड्रागचंद्रोदय हे ग्रंथ लिहिले. 'यावनपरिपाटीअनुक्रम'चा कर्ता दलपतिराय यासहि याचा आश्रय होता.

**पूज्यपाद**—(स. ६०० सुमार) जैनांचा प्राचीन गुरु व कानडी ग्रंथकारांनीं पूज्य मानलेला प्राचीन आचार्य. चामुण्डरायानें याच्यासंबंधीं कवि, तार्किक, व्याकरणकार, गगनगमनसामर्थ्यवान् व पूज्य आचार्य असा उल्लेख केला आहे. पण कानडी वाङ्मयांत याचा एकहि ग्रंथ आज उपलब्ध नाहीं. श्रवणबेळगोळच्या शासनावरून (क्र.६४) असें दिसून येतें कीं याला प्रथम देवनंदी असें म्हणत. नंतर याच्या बुद्धिमाहात्म्यामुळें यास जिनेंद्रबुद्धि असें म्हणूं लागले. नंतर याच्या अत्यंत पूज्यतेमुळें पूज्यपाद असें म्हणूं लागले ( श्रवणबेळगोळा २५४ ). हा वैद्यशास्त्रांतहि प्रवीण होता ( श्रवणबेळगोळ २५८ ). हा पूर्वविदेहांत जाऊन परलोकवासी झाला. जैनेंद्रव्याकरण आणि पाणिनीच्या सूत्रावरील जिनेंद्रबुद्धीचा न्यास-ग्रंथ यानेंच केला आहे, असें राजवली कथाकार देवचंद्र चुकीनें म्हणतो. जिनसेनानें हरिवंशाच्या प्रारंभीं जिनेंद्रव्याकरणाचा उल्लेख केला आहे. जिनसेनाचा काळ स. ७८३ निश्चित झालेला आहे. अकलंकदेव ( स. ७५० ). जयादित्यवामनानें ( स. ७०० सुमार ) काशिकेंत जैनेंद्रसूत्रें उद्धृत केलीं आहेत. यावरून पूज्यपादाचा काळ स. ६०० असावा ( क. क. च. भा. १, पा. ५). याशिवाय याचें समाधिशतक ( संस्कृत ) व कल्याणकारक (संस्कृत) हे ग्रंथ दिसतात. पहिल्या ग्रंथावर मेघचंद्राचें ( स. ११४८ ) कानडी व्याख्यान उपलब्ध आहे, व दुसरा वैद्यकाचा ग्रंथ असून त्याचें जगद्दळ सोमनाथकृत कानडींत भाषान्तर असून त्याचें नांव कर्नाटककल्याणकारक असें आहे. जगद्दळ सोमनाथानें पूज्यपादाच्या कल्याणकारक नांवाच्या संस्कृत ग्रंथाविषयीं असें म्हटलें आहे कीं, बाहर, सिद्धसार, चरक इत्यादि वैद्यकग्रंथांपेक्षांहि पूज्यपादाचा कल्याणकारक ग्रंथ चांगला आहे. यांतील औषधयोजना मद्य, मांस व मधु ( मध ) यांनीं वर्जित आहे ( क. क. च. भा. १, पा. १५९, १६५ ).

**पूर्णदास ऊर्फ बावा उसपकर (राजाध्यक्ष)**—( स. १७८८ सुमार– स. १८७० ) हा कौंडिण्यगोत्री सारस्वत ब्राह्मण असून वयाच्या ५० व्या वर्षी ह्यानें सावंतवाडी संस्थानांतील उसप तर्फा, तेथील बंडामुळें सोडला व हा वक्षीच्या आश्रयास केरी येथें येऊन राहिला. येथें केरीकरांनीं याच्या चरितार्थाची सोय करून दिली. हा सात्त्विक वृत्तीचा व मनमिळाऊ असून ह्याचा प्रपंचापेक्षां परमार्थाकडेच ओढा होता. याला दत्तसंप्रदायांतील एका सत्पुरुषाचा उपदेश झाला व तेव्हांपासून याच्या अंगीं कवित्वशक्तिहि वास करूं लागली. ह्यानें 'ज्ञानधन', 'स्वात्मानुभव' व 'पूर्णसार' हे ओवीबद्ध ग्रंथ लिहिले ( म. क. च. भा. १, पृ. ४६३ ).

**पूर्णपाल**—सिसोदें येथील राणाशाखेपैकीं हा नागपालाचा पुत्र. याला पुण्यपाल, पुणपाल व कर्णपाल असेंहि म्हणत. याचा पुत्र पृथ्वीमल्ल.

**पूर्णपाल परमार**—( स. १०४२–४५ ) आबूच्या परमार घराण्यापैकीं धंधुकाचा पुत्र. याच्या वेळचे तीन शिलालेख मिळाले आहेत. त्यांपैकीं दोन वि. सं. १०९९ ( स. १०४२ ) मधील आणि तिसरा वि. सं. ११०२ ( स. १०४५ ) मधील आहे. उत्पलराजापासून पूर्णपालापर्यंतची वंशावळ वि. सं. १०९९ मधील शिलालेखांत दिली आहे. याचा उत्तराधिकारी धाकटा भाऊ कृष्णराज झाला.

**पूर्णप्रज्ञ**—मध्वाचार्यांचें नांव.

**पूर्णब्रह्म**—( ग्रंथकाल स. १७८९ ) मराठींत श्लोकबद्ध 'रसप्रकरण' हें सोनें तयार करण्याचें प्रकरण यानें लिहिलें ( मं. शके १८३६ वा. इ. ले. ५३ ).

**पूर्णय्या**—( स. १७३५ सुमार– स. १८१५ ) हा माध्वसंप्रदायी वैष्णव ब्राह्मण असून ह्याचा जन्म मद्रास इलाख्यांत झाला. ह्याचे आईबाप प्रथम शैव होते, परंतु माध्वसंप्रदायी पूर्णस्वामीवर त्यांची भक्ति जडल्यावर ते वैष्णव झाले. हैदरअल्लीच्या सैन्यांत हा प्रथम नोकर होता, परंतु पुढें हा हैदरचा एक प्रमुख मुत्सद्दी झाला. ह्यास तामील, कानडी, मराठी व हिंदुस्थानी भाषा येत. हैदरानें ह्यास खजिन्याचा व सैन्यास सामान पुरविणाऱ्या खात्याचा मुख्य अधिकारी नेमून मरुहळ्ळी हें गांव इनाम दिलें. हैदरच्या प्रत्येक स्वारींत हा असे. हैदरच्या मृत्यूनंतर त्याच्या मृत्यूची बातमी ह्यानें सैन्यांत गडबड होऊं नये म्हणून गुप्त ठेविली, व टिपू आल्यानंतर ती बातमी बाहेर प्रसिद्ध केली. टिपूची ह्याजवर फार मर्जी होती, परंतु ह्यास मुसलमान करण्याची टिपूची इच्छा दिसतांच हा तेथून युक्तीनें निसटला. स. १७९२ त कॉर्नवालीसच्या श्रीरंगपट्टणच्या स्वारींत ह्यानेंच टिपूचा खजिना वांचविला. पुढें हा इंग्रजांचा दोस्त झाला. म्हैसूरचें राज्य पूर्वीच्या हिंदु राजघराण्याकडे देण्यांत आल्यावर तेथें ह्यासच दिवाण नेमलें. तेथें ११ वर्षांत ह्यानें २॥ कोटी रु. शिल्लक टाकले. ह्याचा मुलगा सर कृष्णमूर्ति हाहि म्हैसूरचा दिवाण होता.

**पूर्णवर्मन् मौखरी**—( स. ६१२–६२८ ) मौखरी वंशांतील अवंतिवर्मन्चा हा पुत्र होय. याला गृहवर्मन् नांवाचा एक भाऊ होता. त्याच्यानंतर हा गादीवर आला.

यानें आपल्या पदरीं बौद्ध लोकांना आश्रय दिला होता. बौद्ध धर्माविषयीं याला आदर वाटत असे. याच्या वेळीं मौखरींच्या सत्तेस उतरती कळा लागून याच्यानंतर मगध येथें माधवगुप्त हा राज्य करूं लागला ( मौखरी by E. A. Pires, p. 129–133 ).

**पूर्णानंद**—( स. १५७८–१६२८ सुमार ) सहजानंदांचा शिष्य ( पूर्वाश्रमींचा नारायण ). यानें अवधूतगीतेवर एक टीका लिहिली आहे. ही टीका आपला एक शिष्य चिदानंद ( बळवंत गोविंद बुळबुळे ) याचेसाठीं लिहिली, असें कवि म्हणतो. याचा 'शिवपार्वतीपरिणय' या नांवाचा एक ग्रंथ आहे. त्या टीकेचे एकंदर सात अध्याय आहेत ( मं. श. १८३५ वा. इ. ले. २७ व १८३६ वार्षिक इ. ले. २६ ). हा कऱ्हाडचा असावा.

**पृथाबाई**—अजमेरच्या दुसऱ्या पृथ्वीराजाची ही कन्या. दिल्लीच्या पृथ्वीराज चौहानाची नव्हे. हिचा विवाह मेवाडचें राज्य घालविणाऱ्या डुंगरपूरच्या सामंतसिंहाशीं झालें. सामंतसिंहास समतसी म्हणत.

**पृथिवीसेन क्षत्रप**—हा रुद्रसेन महाक्षत्रपाचा ज्येष्ठ पुत्र. हा महाक्षत्रप झाला नाहीं. क्षत्रपच राहिला. यांच्यांत क्रमानें भावाला राज्याचा वारसा मिळण्याची पद्धत होती. त्यामुळें मुलाला राज्याधिकार न मिळतां भावाला मिळे. भाऊ नसला तर मुलाला मिळे.

**पृथुयशस् गंग**—हा पश्चिम गंग घराण्यांतील शिवमाराचा पुत्र. याचा आश्रय अमोघवर्ष दिंडिकोजेरिगनें घेतला. यानें वरगुण पांड्याचा श्रीपूर येथें पराभव केला.

**पृथ्वीधर**—याला पेथडकुमार असेंहि म्हणत. हा जैनधर्मी असून धारच्या शेवटल्या जयसिंह परमाराचा मंत्री होता. रत्नमंडनगणीनें केलेल्या 'सुकृतसागर' नांवाच्या ग्रंथांत याच्या अनेक सत्कृत्यांचें वर्णन केलें आहे. याच्या पित्याचें नांव दोदाशाहा असें असून हा श्वेतांबरी जैन होता. हा नांदुरी येथील राहणारा होय. हें नांदुरी म्हणजे खान-

देशांतील नंदुरबार असावें. हा दारिद्र्याला कंटाळून नेमाड-मधून माळव्यांतील मांडवगडीं आला व तेथें मीठमिर-चीच्या दुकानदारीपासून वाढत जाऊन शेवटीं जयसिंह पर-माराचा दिवाण झाला. याचा गुरु धर्मघोषमुनि यानें दारिद्र्यावस्थेंत याच्याकडून शपथ घेवविली होती कीं, श्रीमंती आल्यास मी आपल्या संपत्तीचा विनियोग धर्म-कृत्यांत करीन. त्याप्रमाणें यानें शेंकडों जैनमंदिरें बांधलीं. खुद्द मांडव येथें सातशें मंदिरें बांधलीं व तीनशें मंदिरांवर सोन्याचे कळस चढवले. मांडव येथें अनेक मोठाल्या मशिदी पाहिल्या म्हणजे या गोष्टीची आजहि खात्री पटते.

याच्या मनांत आलें कीं, रामचंद्रराव जाधवाच्या राज-धानींत देवगिरींत एक जैन मंदिर बांधावें. पण राजा व त्याचा प्रधान हेमाद्रि हे वैदिक असल्यामुळें ही गोष्ट शक्य नव्हती. पण यानें ओंकारमांधाता येथें हेमाद्रीच्या नांवानें ब्राह्मणभोजनें घातलीं आणि त्या जोरावर देवगिरीस जाऊन राजाकडून परवानगी मिळवली. हेमाद्रीनें हरकती केल्या असतां युक्तीनें त्यांचा परिहार केला, अशा अनेक गोष्टी सुकृतसागरांत आढळतात (मं. त्रै.६ पा.१९–२२).

**पृथ्वीपति गंग**—पश्चिमगंगांपैकीं अविनीताचा पुत्र.

२. ( स. ८४०–८७८ ) हा पश्चिम गंग घराण्यांतील दुसऱ्या शिवरामाचा पुत्र. यास दिंडिक असें म्हणत. हा पहिला अमोघवर्ष राष्ट्रकूट व अपराजित पल्लव यांचा सम-कालीन होता. हा वरगुण पांड्याशीं लढतांना मृत्यु पावला.

३. ( स. ९००–४० ) हा पश्चिम गंगांपैकीं दुसऱ्या मारसिंहाचा पुत्र. याला शेंबियन मावलि वाणराय अशी पदवी पहिल्या परांतक चोलानें दिली व बराचसा देश बहाल केला.

**पृथ्वीमल्ल**—हा सीसोदें येथील राणाशाखेपैकीं पूर्ण-पालाचा पुत्र. याला पेथड, फेखर, व पृथ्वीपाल असेंहि म्हणत. याचा पुत्र भुवनसिंह.

**पृथ्वीराज**—हा मेवाडच्या महाराणा रायमलचा पुत्र. याची पत्नी तारादेवी. पृथ्वीराजाबरोबर ही तोड येथें जाऊन पठाणांशीं झालेल्या युद्धांत हिनें जातीनें भाग घेतला ( रा. इ. पा. ७७ ).

२. ( स. १५०० सुमार ) एक हिंदी कवि. बिका-नेरचा राजा राजसिंहाचा भाऊ. याची पत्नी किरणमयी. यानें अकबराच्या संमतीनें प्रतापसिंहास लिहिलेल्या पत्रां-तील कांहीं दोहे अद्यापि प्रसिद्ध आहेत (क. कौ. १).

**पृथ्वीराज गुहिलोत**—( स. १५०९ सुमार ) मेवा-डचा राणा रायमल्लाचा पुत्र. यानें संग्रामसिंह नांवाच्या आपल्या भावावर हत्यार उपसल्यामुळें रायमल्लचा यावर कोप होता. म्हणून हा कुंभलगड येथें राहत असे.

याचा भाऊ राजमल्ल टोडाच्या सुरताणचा पाठलाग करीत असतां मारला गेला. नंतर त्यानें आपली मुलगी तारादेवी याला दिली; व याच्या साहाय्यानें लल्लाखां पठाणाला ठार करून टोडाचें राज्य सुरताणला परत दिलें. अजमेरचा सुभेदार मल्लखा चालून आला त्यालाहि यानें ठार केलें; व त्याचा किल्ला गढबीठली ताब्यांत घेतला व मग कुंभलगडला आला.

सारंगदेवानें केलेली कामगिरी पाहून महाराण्यानें त्याला कित्येक लाखांची जहागीर दिली होती. त्याबद्दल यानें पित्याकडे तक्रार केली. पित्यानें 'तुला पसंत नसेल तर तुझें तूं पाहा' असें कळविलें, तेव्हां यानें सारंगदेवाच्या भैंसरोडगडावर स्वारी केली. तेव्हां तो तेथून पळाला आणि सूरजमलचा साहाय्यक झाला. ते दोघे मांडूच्या सुलतान नासिरुद्दीनकडे मदत घेण्याकरितां गेले. गंगारामकृत हरिभूषण महाकाव्यांत म्हटलें आहे कीं, 'महाराणा राय-मल्लनें दरबारांत सांगितलें कीं, सूर्यमल्लच्यामुळें फार दुःख होतें. तो जिवंत आहे तोंपर्यंत मला राज्यहि सुखदायक होऊं शकत नाहीं.' तेव्हां यानें त्याला मारण्याचा विडा उचलला. सुरजमल व सारंगदेव यांनीं सुलतानाच्या साहाय्यानें चितोडवर स्वारी केली. त्या युद्धांत अगदीं यानें शेवटीं येऊन लढाईचा रंग पाटलविला. दुसऱ्या दिवशीं पुनः युद्ध होऊन याचा जय झाला. सुरजमल सादडीला गेला; आणि सारंगदेव बाठरडे येथें राहण्यास गेला. पुढें सुरजमलनें कांठल येथें जाऊन नवें राज्य स्थापन केलें. तें प्रतापगड या नांवानें सध्यां प्रसिद्ध आहे. महाराण्यानें सारंग-देवाचा पुत्र जोगा यास बाठरडा आदि जहागीर देऊन संतुष्ट केलें. पृथ्वीराजाला आनंदाबाई नांवाची एक बहीण होती. ती सिरोहीचा राव जगमाल यास दिली होती. तो तिला त्रास देई. यानें तेथें जाऊन त्याची समजूत घातली. या वीरपुरुषाचा तेथें सन्मानहि चांगला झाला. पण परत निघतांना याला तीन गोळ्या दिल्या, आणि त्यांची फार प्रशंसा केली. सरळहृदय पृथ्वीराजानें कुंभलगड जवळ आल्यावर त्या तोंडांत टाकल्या. पण त्या गोळ्या विषारी असल्यामुळें याचा देहान्त झाला. याच्याबरोबर याच्या सोळा स्त्रिया सती गेल्या.

**पृथ्वीराज चौहान**—( स. १०७८–९३ ) हा विग्रहराज ऊर्फ तिसऱ्या बीसलचा मुलगा. याच्या आईचें नांव राजदेवी.

२. ( स. ११६३–सुमार ) हा जगदेवाचा पुत्र. जगदेव हा सोमेश्वराचा थोरला भाऊ होता. याच्यानंतर सोमेश्वर गादीवर आला. वीसलदेवाचा मुलगा अपरगांगेय हा अज्ञान असल्यामुळें हा गादीवर आला.

३. ( ११६८–९२ ) राय पिठोरा असें याचें दुसरें नांव होतें. याचें चरित्र चंदभाटाच्या रासामध्यें विस्तृतपणें दिलें आहे. पण तें ऐतिहासिक दृष्ट्या संशयित आहे. दुसरें एका काश्मीरी पंडितानें लिहिलेलें 'पृथ्वीराजविजय' नांवाचें संस्कृत काव्य आहे, पण त्यांत याची शेवटपर्यंत हकीकत आलेली नाहीं. तें पृथ्वीराजाच्या दरबारांतीलच एका पंडितानें लिहिलेलें दिसतें, त्यामुळें त्यांतील कांहीं भाग विश्वसनीय वाटतो. याशिवाय हंमीर नांवाचें एक काव्य प्रसिद्ध झालें आहे. त्यांत पृथ्वीराजाच्या एका हंमीर नांवाच्या वंशजाची हकीगत वर्णिली आहे. यांशिवाय कांहीं समकालीन लेखहि आढळतात. दिल्लीच्या अनंगपाळाची मुलगी याची रासाप्रमाणें माता होती. पण वरील दोन्ही काव्यांत याची माता हैहय राजपुत्री कर्पूरदेवी दिली आहे. हा लहानपणीं अज्ञान होता, त्या वेळीं याची आई राज्यकारभार पाहत असे. गौरीशंकर ओझांनीं याचा जन्म स. ११६८ मानला आहे. याचा जन्म अनहिलवाड येथें झाला ( पृथ्वीराजविजय ). याची पहिली राणी इच्छिनी व शेवटली राणी संयोगिता. रासाप्रमाणें हें शेवटलें लग्न स. ११८१ त झालें. याच्या शूर सेनापतींचें नांव कैमास व भुवनैकमल्ल. यानें भीम चालुक्य, परमर्दिदेव चंदेल्ल ( स. ११८२ ) व जयचंद गाहडवाल यांचा पराभव केला. अजमेर आणि दिल्ली अशीं याच्या राजधानीचीं ठिकाणें होतीं.

याच्या वेळीं स. ११७५ मध्यें शिहाबुद्दीन घोरीनें हिंदुस्थानावर स्वाऱ्या करण्यास सुरुवात केली. प्रथम त्यानें मुलतान व उच्छ जिंकलें. स. ११७८ मध्यें अनहिलवाडच्या भीम बघेलानें धर्मवेडानें लढणाऱ्या याचा चांगलाच पराभव केला. तरी त्यानें स. ११७९ मध्यें पुनः पेशावरवर स्वारी करून खुस्त्रव मलीकच्या सुभेदारापासून तें शहर जिंकून घेतलें; व स. ११८१–८५ पर्यंत लाहोरपर्यंतचा मुलूख ताब्यांत घेऊन आपली सत्ता स्थिर केली. स. ११९०–९१ त दिल्लीच्या पृथ्वीराज चौहानाचें भातिंदा नांवाचें ठाणें घेतलें. पण पृथ्वीराजानें मोठ्या सैन्यानिशीं येऊन कर्नूलजवळील तरौरी येथें शिहाबुद्दीन घोरीचा पराभव केला आणि त्याला याचा भाऊ गोविंदरायानें जखमी करून पळावयास लावलें; व तेरा महिने भातिंद्यास वेढा देऊन तें ठाणें परत घेतलें. पण स. ११९२ मध्यें शिहाबुद्दीननें याला पुनः तरौरीजवळ गांठलें; आणि बाजूवर व पिछाडीस हल्ले करून पळाचें ढोंग करून याच्या सैन्यास संध्याकाळीं चार वाजेपर्यंत दमविलें. हिंदु थकल्यावर ताज्या दमाच्या सैन्याकडून याचा पराभव केला. पृथ्वीराजहि हत्तीवरून उतरून घोड्यावरून पळत असतां सरस्वती नदीजवळ मुसलमानांचे हातीं लागून मारला गेला.

तेव्हां दिल्लीपर्यंतचा मुलूख मुसलमानांच्या ताब्यांत गेला. अजमेर फक्त करभार घेऊन याच्या मुलाच्या ताब्यांत दिलें. हिंदूंचा शेवटला पराक्रमी सम्राट् म्हणून याचें नांव पूज्य मानलें जातें.

चौहानाची वंशावळ—१ दुर्लभ ( स. ९७७ ), २ गोविंद ( स. ९८८ ), ३ वाक्पति ( स. १००३ ), ४ वीर्यराम, ५ श्रीचंद्र अथवा चामुंड ( स. १०३३ ), ६ गोपेंद्र, ७ विग्रहराज ऊर्फ वीसल ३ रा (स. १०६३), ८ पृथ्वीराज १ ला ( स. १०७८ ), ९ अजयदेव ( स. १०९३ ), १० अर्णोराज अथवा आना, ११ विग्रहपाल अथवा वीसल ४ था, १२ पृथ्वीराज २ रा, १३ सोमेश्वर १४ पृथ्वीराज ३ रा ( स. ११६९–९२ ).

इतके दिवस मुसलमानांचा हिंदुस्थानांत कायमचा प्रवेश होईल कीं नाहीं, याची शंका होती, तिचें निराकरण या प्रसंगानें झालें व हिंदूंचें साम्राज्य नाहींसें झालें ( चंदवरदाई पाहा ).

**पृथ्वी-राम रट्ट**—( स. ९४० ) रट्ट घराण्यांतील मेरडाचा हा मुलगा. स. ९४० च्या सुमारास हा सौंदत्ती येथें राष्ट्रकूटांचा प्रतिस्पर्धी म्हणून राज्य करीत होता.

यानें सौंदत्तीच्या रट्ट घराण्याची स्थापना केली. याच्यानंतर याचा मुलगा पित्तुग हा गादीवर आला (B.).

हा मैळापतीर्थ साधूच्या करीयपंथाचा एक उपदेशक होता.

**पृथ्वीव्याघ्र**—हा निषादांपैकीं मुख्य होता. यास पूर्व चालुक्य राजा विष्णुवर्धन ( स.७०९–७४६ ) याच्या राज्यांतून उदयचंद्र पल्लवसेनापति यानें पराभूत करून हाकून दिलें ( नंदीवर्मन् पल्लवमल्ल पाहा ).

**पृथ्वीषेण वाकाटक**—( स. ३४०–३९० ) हा वाकाटकवंशांपैकीं पहिल्या रुद्रसेनाचा पुत्र. यानें प्रथम कुन्तलदेश जिंकला ( अजिंठा शिलालेख ). हा गुप्तांपैकीं समुद्रगुप्ताचा समकालीन होता.

२. ( स. ४४५–६५ ) हा वाकाटकवंशांतील दुसरा पृथ्वीसेन होय. हा नरेन्द्रसेनाचा पुत्र.

**पृथ्वीसिंग**—( स. १७४७–८६ ) हा बांसडा

संस्थानांतील एक राजा होय. हा कुशलसिंहाच्यानंतर होऊन गेला.

यानें सुंठचें संस्थान लुटून नैर्ऋत्येकडील चिलकारी किंवा शेरगड हा जिल्हा घेतला. अठराव्या शतकाच्या शेवटीं हें संस्थान मराठयांच्या ताब्यांत असून धारच्या राजाला खंडणी देत होतें. हा सुद्धां प्रसिद्ध राजा होऊन गेला.

२. ( रसनिधि पाहा ).

**पेदोबमाम्बा**—विजयनगरच्या दुसऱ्या वेंकटपतिदेवाची ही बायको होय. हिच्या बापाचें नांव जिलेल्ला रंगराजा असें होतें.

**पेद्द तिम्म आरविदु**—( स. १५६५ सुमार ) हा विजयनगरच्या रामराय आरविदूचा मुलगा. निजामशाहाचे विरुद्ध लढतांना हा प्रसिद्धीस आला.

**पेद्दयार्य**—मल्लिनाथ कोलाचलाचा थोरला मुलगा. याचा धाकटा भाऊ कुमारस्वामिन्. कुमारस्वामिन्नें आपल्या प्रतापरुद्रयशोभूषणावरील रत्नापण टीकेच्या शेवटीं याच्या विद्वत्तेची फार प्रशंसा केली आहे. याला पेद्दिभट्ट असेंहि म्हणत.

**पेद्द व्यंकट आरविदु**—( स. १६३०–४२ ) हा विजयनगरच्या रामराय आरविदूचा नातू व श्रीरंगरायाचा मुलगा. हा दुसऱ्या राम आरविदूनंतर गादीवर आला. पत्नी बंगारा.

**पेम्मासनी पेद्द तिम्मराज**—विजयनगरच्या श्रीरंगरायाचा व दुसऱ्या व्यंकटाद्रीचा मंत्री.

**पेरमादि सिंद**—( स. ११४४ ) हा सिंद घराण्यांतील दुसऱ्या आचुगीचा मुलगा.

यानें दुसऱ्या जयकेशी कदंबाचा पाठलाग केला व त्यास पळवून लाविलें; आणि होयसळांचें राज्य घेतलें. यानें होयसळ बल्लाळ राजा बिट्टिग आणि विष्णुवर्धन यांचा पराभव करून त्यांची राजधानी द्वारसमुद्र ही घेतली असावी.

**पेरॉन**—( स. १७५५–१८३४ ) हा फ्रेंच मनुष्य शिंद्यांच्या लष्करांत डीबाईनचा दुय्यम अधिकारी होता. याचें मूळ नांव पीअरे कुईलीअर. हा एक फ्रेंच व्यापारी होता. ह्याचें गलबत मलबार किनाऱ्यावर फुटल्यामुळें हा तेथून उत्तरेस गेला व ग्वाल्हेरच्या राज्यांत सैन्यांत शिपाई राहिला.

पुढें ( स. १७९० ) डीबाईनच्या हाताखालीं गेला. नंतर याला कानूंदच्या किल्ल्यावर पाठविलें. तेथें डीबाईनच्या कुमकेस आलेल्या इस्मायल बेगचा यानें पराभव केला व स. १७९२ त तो किल्ला आपल्या हातीं घेतला. यानंतर याची बढती झाली व स. १७९६ त याला सर्व सैन्याचा सेनापति केलें. नंतर हा स्वदेशीं जाऊन आला.

शिंद्यांच्या मनांत स. १८०२ सालीं याच्याबद्दल संशय आला. हा दौलतरावाच्या विरुद्ध इंग्रजांशीं अलीगडच्या लढाईपासूनच फितुरी करूं लागला ( स. १८०३ ) व लढण्याऐवजीं मागें मागें हटूं लागला. त्यामुळें शिंद्यानें याची सेनापतीची जागा व जहागीर जप्त केली, व अंबाजी इंगळ्यास दिली. याचा व पेरॉनचा द्वेष होता. अखेर पेरॉन आपणच इंग्रजांना मिळाला व आपली सर्व मालमत्ता घेऊन इंग्रजी मुलुखांतून लखनौस गेला. शिंद्यांच्या इंग्रजांबरोबरील या वेळच्या सर्व लढायांत पेरॉननेंच फितुरी करून शिंद्यांचा नाश केला. यानें एकदां उज्जैनच्या लढाईंत दौलतरावानें बोलाविलें असतां सैन्यच धाडलें नाहीं. हा पुष्कळ पैसा घेऊन फ्रान्समध्यें परत गेला व स. १८३४ सालीं मेला.

**पेरुनर किल्ली चोल**—( स. १२५–५० ) हा चोलांचा पूर्वज. यानें राजसूय यज्ञ केला. यानें पहिल्या आदन चेराशीं युद्ध केलें. त्यांत हा मारला गेला.

२. ( स. १२०० सुमार ) हा चोलांपैकीं एक राजा. यानें सेय चेराशीं युद्ध केलें. राजसूय यानें केला असावा.

**पेरुभट्ट**—हा जगन्नाथ पंडिताचा पिता व गुरु. हा ज्ञानेंद्र भिक्षूपासून वेदान्त, महेंद्रापासून न्यायवैशेषिक, खंडदेवापासून मीमांसा, व वीरेश्वर शेषापासून महाभाष्य शिकला होता ( रसगंगाधर उपो. ).

**पेरु मानडी**—गंगमंडळांतील एक राजा. याचा राजाधिराज चोलानें पराभव केला व तेथील जैनमंदिरें लुटलीं.

**पेरुंजिंग पल्लव**—( स. १२४४–६४ ) एक पल्लव राजा. यानें तिसऱ्या रामराजा चोलाविरुद्ध बंड करून त्यास पकडलें. परंतु म्हैसूरच्या दुसऱ्या नरसिंह होयसळनें आपल्या जांवयाला म्हणजे रामराज चोलाला सोडवलें.

**पेर्मादि कलचुरी**—( स. ११२८ ) हा कल्याणीच्या कलचुरि घराण्यापैकीं जोगमचा पुत्र. हा तिसऱ्या सोमेश्वर पश्चिम चालुक्याचा मांडलिक होता.

**पेर्मादि ( पेम्म ) सिंद**—( स. ११४४–६३ ) येलबुर्ग येथील सिंद घराण्यांतील दुसऱ्या आचचा मुलगा. स. ११४४ मध्यें हा आपल्या बापानंतर गादीवर आला.

यानें कुल-शेखर, चट्ट, गोव्यांचा दुसरा जयकेशिन् कदंब, विष्णु-वर्धन वगैरेंचा पराभव केला. स. ११६३

मध्यें याचा धाकटा भाऊ चावुंड २ रा हा गादीवर आला ( B. ).

**पेर्मादि शिवचित्त कदंब**—( स. ११४७–४८ ) हा गोव्याच्या कदंब घराण्यांतील दुसऱ्या जयकेशिन्‌चा पुत्र. कामभूपाची मुलगी कामलादेवी ही याची पत्नी होती.

**पेशवे घराणीं**—( छत्रपतींचीं ).

१. रांझेकर—१ शामराज नीळकंठ रांझेकर ( स. १६५६–५९ ).

२. नरहरि आनंदराव ( स. १६६१ आगष्ट–१६६२ एप्रिल ).

३. पिंगळे—मोरो त्रिमल पिंगळे ( स. १६६२–८२ ), २ नीळकंठ मोरेश्वर पिंगळे ( स. १६८२–१७०८ ), ३ बहिरव मोरेश्वर पिंगळे ( स. १७०८–१३ ).

४. भट–१ बाळाजी विश्वनाथ ( स. १७१४–२० ), २ बाजीराव बल्लाळ ( स. १७२०–४० ), ३ बाळाजी बाजीराव ( स. १७४०–६१ ), ४ माधवराव बल्लाळ ( स. १७६१–७२ ), ५ नारायण बल्लाळ ( स. १७७२–१७७३ आगष्ट खून ), ६ रघुनाथराव बाजीराव ( स. १७७३ आगष्ट–सुमार वर्ष ), ७ गंगाबाई नारायणराव ( स. १७७४ ), ८ सवाई माधवराव नारायणराव ( स. १७७४–९५ आक्टोबर २७ ), ९ चिमाजी माधवराव ( रघुनाथरावाचा दुसरा मुलगा. दत्तक स. १७९६ मे–आगष्ट ), १० बाजीराव रघुनाथ ( स. १७९६–१८१८ पलायन. मृ. १८५१ ), ११ धुंडिराज बाजी ऊर्फ नानासाहेब ( स. १८५७ ).

**पोचीराजु**—तिसऱ्या प्रतापरुद्र काकतीयाचा मुख्य प्रधान.

**पोटय्या**—( ग्रंथकाल स. १४६६ ) एक संस्कृत कवि. हा जातीचा ब्राह्मण होता. गोदावरीच्या तीरीं राजमहेंद्री प्रांतांत कादंबरी म्हणून गांव आहे, तेथें हा राहत असे. स. १४६८ मध्यें यानें एक मोठा ग्रंथ लिहिला. त्याचें नांव ‘ प्रसंगरत्नावली ’ असें आहे, व त्यांत ८३ प्रकरणें आहेत. कविचरित्रांत या सर्व प्रकरणांचीं नांवें लिहिलीं आहेत.

**पोन्न**—( स. ९५० ) कानडी कवि. हा जैन होता. पोन्न, पोन्निग, पोन्नमय्य, सवण, कुरुळ-गळ सवण अशा नांवांनीं याला संबोधितात. याचा गुरु–इंद्रनंदी. कृष्णराज राष्ट्रकूटानें यास उभयचक्रवर्ति अशी पदवी दिली होती. ग्रंथ–शांतिपुराण, जिनाक्षरमाले.

शांतिपुराणांतल्या एका उल्लेखावरून असें दिसतें कीं, याचा ‘ रामकथा ’ अथवा ‘ भुवनैकरामाभ्युदय ’ नांवाचा एक चौदा आश्वासांचा ग्रंथ असावा. पण तो उपलब्ध नाहीं. याचा आश्रयदाता कृष्णराज हा राष्ट्रकूटांपैकीं तिसरा असावा. कानडींतील पम्म, पोन्न व रन्न यांना रत्नत्रय असें म्हणतात.

शांतिपुराणांत जैन तीर्थंकर सोळावा शांतिनाथ याचें चरित्र चंपूच्या पद्धतीनें वर्णिलें आहे. जिनाक्षरमाले हें वर्णक्रमानें कपासून ळपर्यंत वर्ण प्रारंभीं व अंतीं येतील अशा पद्धतीनें केलें आहे ( क. क. च. भा. १, पा. ४० ).

**पोरस**—( ख्रि. पू. ३२७ ) हा मध्य पंजाबचा राजा होता. सिकंदरची हिंदुस्थानावर स्वारी आली तेव्हां हा राज्य करीत होता. तक्षशिलेचा आम्भी ऊर्फ आम्फिस व इतर क्षुद्र राजे सिकंदरच्या आपण होऊन स्वाधीन झाले. पण हा तसा राजा नव्हता. सिकंदर झेलम उतरून आल्यावर त्यानें याला नजराणा घेऊन येण्याचा निरोप धाडला. पण यानें ‘ सेना घेऊन येतों ’ म्हणून उलट कळवलें. याची सेनाहि मोठी व व्यवस्थित होती. याच्या सैन्याचे मोर्चे झेलमच्या किनाऱ्यावर लागले. सिकंदरनें सर्व धोरण पाहून नीतीचा अवलंब केला. एका अंधाऱ्या रात्रीं पाऊस पडत असतां आपल्या छावणीपासून १६ मैलांवर झेलम ओलांडली. रात्रीची वेळ असल्यामुळें पोरसचें सैन्य गैरसावध होतें. तरी याला बातमी कळतांच यानें आपल्या मुलाला दोन हजार सैन्यासह सिकंदरला अडविण्यास पाठविलें, पण सिकंदरच्या सैन्यानें त्याचा सहज पराभव केला. पांचशें ठार झाले व बाकीचे पळाले. पोरसला हें कळतांच हा आपल्या विशाल सैन्यासह पुढें झाला व तुंबळ युद्ध झालें. पण शेवटीं सिकंदरचा जय झाला व हजारों लोकांसह याला कैद करण्यांत आलें. कैद केलेल्या याला जेव्हां सिकंदरच्या पुढें उभें केलें, तेव्हां सिकंदर म्हणाला, ‘ तुझ्याशीं आम्हीं कसें वागावें ? ’ पोरसनें निर्भयपणें उत्तर दिलें, ‘ राजे राजाशीं वागतात तसें. ’ या उत्तरानें सिकंदराचा पोरसाबद्दल अत्यंत अनुकूल ग्रह झाला. सिकंदरनें यालाच पुनः जिंकलेल्या राज्याचा अधिकारी नेमलें व इतरहि भोंवतालचीं राज्यें याच्या अधिकारांत दिलीं. यामुळें या दोघां पुरुषांची मैत्री दृढ झाली व सिकंदरला एक मोठा साहाय्यक मिळाला. सिकंदर हिंदुस्थानांतून परत जातांना त्यानें यास व्यास नदीपासून झेलम नदीपर्यंतच्या प्रदेशाचा क्षत्रप नेमलें. हा मोठा लोकप्रिय होता. याचा पुढें खून झाला. त्यामुळें भारतीय लोकांत मोठा असंतोष पसरला.

**पोल काकतीय**—( प्रोल काकतीयाचें नामांतर ).

**प्रकाशमति**—( सुयेनचिउ पाहा ).

**प्रकाशवर्ष**—( स. १००० सुमार ) हा 'रसार्णवालंकार' ग्रंथाचा कर्ता होय. हा भामह, दंडिन् व बहुतेक आनंदवर्धनानंतर झाला.

'सुभाषितरत्नभांडागारम्' मध्यें याचे अनेक श्लोक आढळतात. शिशुपालवध काव्यावर वल्लभदेवाची टीका आहे. त्या टीकेच्या ४ थ्या सर्गाच्या शेवटीं त्यानें असें म्हटलें आहे कीं 'मीं प्रकाशवर्षापासून अर्थ समजावून घेतला व त्याप्रमाणें अर्थ लिहिला.'

**प्रकाशात्ममुनि**—( ग्रंथकाल स. १२७८ ) यानें पद्मपादाचार्यानें केलेल्या पद्मपादिका ग्रंथावर विवरण नांवाची टीका लिहिली.

**प्रकाशात्मन्**—( स. १२०० ) 'शाब्दनिर्णयदीपिका' ग्रंथाचा कर्ता.

**प्रकाशेंद्र**—हा क्षेमेंद्राचा पिता.

**प्रजयभट्ट**—हा राजतरंगिणी ग्रंथाच्या चौथ्या भागाचा कर्ता पंडित. यांत अकबर बादशहाच्या कारकीर्दीपर्यंत वर्णन आलें आहे.

**प्रतापमल्ल बघेल**—( स. १२६० पूर्वी ) गुजराथच्या वीरधवल बघेलचा पुत्र. हा कुमारपाल सोळंकीच्या मुलीचा मुलगा ( अजयपाल पाहा ).

**प्रतापराजा**—( ग्रंथकाल स. १२०० ) 'संगीत चूडामणि' या संस्कृत ग्रंथाचा कर्ता, असें नैषधाच्या टीकेंतील उताऱ्यावरून ठरतें.

**प्रतापराव गुजर**—( मृत्यु स. १६७४ फेब्रु. २४ ) विजापूरकराचा बहलोलखान शिवाजीवर निघाला तेव्हां शिवाजीनें त्यावर याला रवाना केलें. उंबराणी येथें उभय पक्षांची गांठ पडली. उंबराणी मिरज व विजापूर यांच्या दरम्यान आहे. लढाई सूर्योदयापासून अस्तमानपर्यंत झाली. दोहींकडील लष्कर बहुत जाया झालें. नबाब (बहलोलखान) याची शिकस्त होऊन तिकोव्यास राहिले ( का. स. प. या. ४३८ ). पाण्यावांचून तर बहलोलचा जीव टेंकीस आला. म्हणून यास शिवाजीच्या मुलखास हात लावणार नाहीं असें वचन देऊन तो तिकोव्यास परत गेला. तेथें त्यास विजापूरकडून ताज्या दमाचें कांहीं सैन्य मिळालें. तेव्हां तो प्रतापरावावर पुनः चालून आला आणि नेसरी येथें लढाई होऊन तीमध्यें हा पडला ( ता. २४ फेब्रुवारी १६७४ ). एका खिंडींत सहा घोडेस्वारांनिशीं लढत असतां हा मारला गेला ( प. सा. १६२५ ). कदाचित् कचाट्यांत सांपडलेल्या बहलोलला सोडलें म्हणून शिवाजीनें याला दोष दिला असेल व त्यामुळें हा बेहोष होऊन लढला असेल. याला प्रथम कडतोजी असें म्हणत ( प. सा. १४२१ ). पण हा मोठ्या योग्यतेस चढल्यानंतर प्रतापराव नांव प्राप्त झालें असावें. यांचा एक हिंदु व दुसरा मुसलमान असे दोन वंश आहेत. रायगडच्या युद्धाच्या वेळीं याचा एक वंश बाटलेला दिसतो. याचें वतनगांव भोसरी ( ज्ञु. ऐ. गो. ).

**प्रतापरुद्र काकतीय**—( स. ११६३–९९ ) हा काकतीयांपैकीं दुसऱ्या प्रोलाला मुप्पलादेवीपासून झाला. याची पत्नी पद्मादेवी. यानें मल्लुगी यादवाचा पराजय केला. चोदोद शहर जाळलें.

**२.** ( स. १२९१–१३३० ) याचा पिता महादेव व माता मुम्मुडि किंवा मुम्मुदाम्बा. हा रुद्राम्बानंतर गादीवर आला. यानें यादव घराण्यांतील सेवण राजाचा मोड केला असें वर्णन आहे. हा सेवण म्हणजे स. १२७१ पासून १३०९ पर्यंत देवगिरीच्या सिंहासनावर असलेला रामदेव राजा होय. याला स. १२९१–९३ पर्यंत कुमार रुद्रदेव महाराज म्हणत. याला नवलक्ष धनुर्धरस्वामी असेंहि म्हणत असत.

प्रतापरुद्रयशोभूषणावर मल्लिनाथाचा पुत्र कुमारस्वामिन्ची रत्नापण नांवाची टीका आहे. विद्यानाथानें याच्याच नांवानें प्रतापरुद्रीय किंवा प्रतापरुद्रयशोभूषण हा अलंकारशास्त्रावरील ग्रंथ केला. मध्य प्रांतांतील बस्तर संस्थानचे राजे आपणांस याचे वंशज म्हणवितात.

स. १३०८ मध्यें दिल्लीच्या अलाउद्दीन मुहम्मद खल्जी बादशहानें युवराजामार्फत याजवर स्वारी केली. पण त्यांत यश आलें नाहीं. तेव्हां स. १३०९ मध्यें मलिक काफूरला यावर रवाना करण्यांत आलें. तेव्हां प्रयत्न करूनहि याला यश आलें नाहीं. तेव्हां यानें पुष्कळ संपत्ति देऊन तह केला. 'वरंगळच्या भिंती चिखलाच्या होत्या तरी त्यावर भाले परत फिरत' असें वर्णन आहे. या वेळीं मुसलमानांनीं देवळें वगैरे पाडून फार नुकसान केलें. पण स. १३२१ मध्यें यानें खंडणी देण्याची नाकारली तेव्हां घियासुद्दीननें आपला मुलगा मुहम्मद तुघ्लकास पाठविलें व मोठी लढाई होऊन याला पकडून दिल्लीस आणलें. स. १३२३ मध्यें याचें राज्य संपलें.

**प्रतापरुद्रदेव गजपति**—( स. १४९७-१५३९ ) हा संस्कृत धर्मशास्त्रकार व कटक येथील राजा.

यानें 'सरस्वतीविलास' हा ग्रंथ लिहिला असा उल्लेख आलेला आहे. यानें कांहीं पंडितांना बोलावून त्यांच्याकडून सामाजिक व धार्मिक कायद्यांविषयीं ग्रंथ तयार करून घेतला. कवि स्वतः सुद्धां आपण लिहिलेल्या ग्रंथाचा टीकाकार असूं शकतो, असें याचें मत होतें.

याशिवाय यानें व्यवहारकांड आणि आचारकांड हे ग्रंथ लिहिले. न्यायदानाची पद्धति, कोर्टे, दस्तऐवज, दायविभाग, साहस, वगैरेंचें विवरण याच्या व्यवहारकांडामध्यें आलेलें आहे. यानें कांहीं ठिकाणीं विज्ञानेश्वरांचीं मतें स्वीकारलीं आहेत व कांहीं ठिकाणीं त्यांची चिकित्सा केली आहे. हिंदु कायद्याच्या बाबतींत याच्या 'सरस्वतीविलास' ग्रंथाचा दक्षिणेंत उपयोग केला जातो. शिवाय यानें प्रतापमार्तंड किंवा प्रौढप्रतापमार्तंड, निर्णयसागर आणि कौतुकचिंतामणि हे ग्रंथ लिहिले. याचा 'कौतुकचिंतामणि' हा ग्रंथ धर्मशास्त्रावर लिहिलेला नाहीं.

**प्रतापसिंह**—( स. १७६१ सुमार ) अलवार संस्थानचा राजा. हा पराक्रमी होता. मराठ्यांनीं रणथंभोरच्या किल्ल्याला वेढा दिला असतां, यानें तो उठविला. यानें दुसऱ्या शहाआलम बादशहास मदत केली असतां, त्यानें याला माचेरीची सनद दिली.

**प्रतापसिंह कच्छवाह**—( स. १७७९–१८०३ ) जयपूरचा राजा. हा कलाकौशल्याचा अभिरुची जाणणारा होता. यानें भागवताचा ग्रंथ सचित्र तयार करवून घेतला. नाना फडणविसानें शिंद्यांचे दिवाण आपाजीराम दाभोलकरास हा ग्रंथ शोधून इकडे पाठविण्यास सांगितलें होतें ( १५ ऐ. टि. २४ ).

**प्रतापसिंह गुहिलोत**—( जन्म स. १५४०,राज्यारोहण स. १५७२, मृत्यु स. १५९७ ) हा महाराणा प्रतापसिंह किंवा राणा प्रतापसिंह या नांवानें प्रसिद्ध आहे. हा मेवाडचा महाराणा दुसरा उदयसिंह याचा पुत्र. याचा जन्म वि. सं. १५९७ ज्येष्ठ शुद्ध ३ रविवार ( ता. ९ मे स. १५४० ) रोजीं सूर्योदयानंतर घ. ४७ प. १३ नें झाला (चंडूचा जन्मपत्रिकासंग्रह). उदयसिंहाचें भटियाणी राणीवर विशेष प्रेम असल्यामुळें याचा हक्क बाजूला ठेवून त्यानें तिचा मुलगा जगमाल यास आपल्यामागें राज्याधिकारी नेमलें होतें, पण ही गोष्ट अयोग्य व सर्वांना असंमत असल्यामुळें यालाच राज्याभिषेक करण्यांत आला. त्यामुळें जगमाल नाखूष होऊन अकबराला जाऊन मिळाला. त्यानेंहि जहाजपूरचा परगणा जहागीर देऊन त्याला ठेवून घेतलें.

या वेळीं सिरोहीचा राजा देवडा सुरताण व त्याच्या कुटुंबांतील देवडा बीजा यांच्यांत भांडणें चाललीं होतीं. एकदां बिकानेरचा राजा रायसिंह सिरोहीला आला असतां त्याला हें सर्व कळलें. त्यानें अर्धे राज्य अकबराला देत असल्यास देवडा बीजाला येथून घालवून देऊं असें सांगितलें. त्याप्रमाणें केल्यावर सिरोहीचें मिळालेलें अर्धें राज्य अकबरानें मेवाडच्या गादीवर हक्क सांगणाऱ्या जगमालला दिलें. दोघे एकत्र राहणें अशक्य असल्यामुळें तंटा सुरू झाला. जगमालनें बादशाही मदत आणविली, पण त्या युद्धांत जगमाल मारला गेला व देवडा सुरताण विजयी झाला.

गुजराथ जिंकल्यावर मीर्झा मुहम्मद हुसेन व सरदार इख्तियार उल्मुल्क यांनीं तेथेंच केलेलें बंड मोडून बादशहा अकबर परत आल्यावर मानसिंहाबरोबर सैन्य देऊन त्याला दिग्विजयाकरितां पाठविलें. त्याला प्रथम डुंगरपुर व उदयपुर इकडे पाठविण्यांत आलें होतें व त्याला असें सांगण्यांत आलें होतें कीं, जो आमची सत्ता स्वीकारील त्याचा सन्मान करावा व जो स्वीकारणार नाहीं त्याला शिक्षा द्यावी. प्रथम तो डुंगरपुर येथें आला व त्यानें तें जिंकलें. येथील राजा रावळ आसकरण डोंगरांत निघून गेला. पुढें तो उदयपुरास येऊन त्यानें महाराण्यास बादशाही सेवा स्वीकारण्याविषयीं पुष्कळ सांगून पाहिलें. पण त्याचा उपयोग झाला नाहीं. एकदां त्याला यानें उदयसागरवर मेजवानी दिली. तेथें महाराणा स्वतः न येतां त्यानें आपला पुत्र अमरसिंहास पाठविलें. अमरसिंहानें महाराण्याच्या पोटांत दुखत असल्यामुळें आपण भोजन करावें असें सांगितलें. पण यामुळें मानसिंहाला राग आला; व तो म्हणाला कीं, या पोटांतल्या दुखण्यावर माझ्यापाशीं चांगलें औषध आहे. आतांपर्यंत मीं चांगुलपणा दाखविला पण यापुढें सावध राहा. स्वाभिमानी महाराण्यानेंहि त्याला योग्य उत्तर दिलें. यामुळें मानसिंग रागावून तेथून निघून गेला. महाराण्यानें अन्न यवनसंपर्कानें दूषित झालें असें समजून तलावांत फेंकून दिलें आणि जमीन नवी करून गंगाजलानें शुद्ध केली. हें सर्व अकबराला कळतांच त्यानें मानसिंगालाच पाठवून याचा गर्वपरिहार करून आपल्या अधीन करून घेण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें मानसिंह सैन्यासह आला व त्यानें मांडवगड, मोही, खमणोर अशा मार्गानें बनास नदीच्या किनाऱ्यावर आपला तळ टाकला. महाराण्यानेंहि डोंगराच्या आश्रयानेंच युद्ध करण्याचें ठरविलें. एक दिवस मानसिंह शिकारीला गेल्याची बातमी महाराण्याला देऊन दगा करण्याचा एकानें सल्ला दिला. पण यानें कपटानें किंवा धोक्यानें शत्रूला मारणें हें सच्चा क्षत्रियाचें काम नव्हे, असें सांगितलें.

हल्दीघाटीहून जवळच खमणोर येथें दोनहि सैन्यांचें मोठें युद्ध झालें ( स. १५७६ जून ). गोगून्दा येथून सात कोसांवर डोंगराच्या घाटापाशीं हें स्थळ आहे.

राण्यानें आपल्या सैन्याचे दोन भाग केले होते. एकीचा सूर अफगाण हा मुख्य होता व दुसरीचा स्वतः राणा हा मुख्य होता. यानें जोराचा हल्ला करतांच मानसिंहाचें सैन्य पळूं लागलें. शेवटीं बादशाही सैन्याला बादशहा आला अशी बातमी उठवून कसें तरी सैन्य एकत्र करावें लागलें. महाराण्याचा घोडा चेटक जखमी झाला म्हणून तोहि परत फिरला. पण बादशाही सैन्याला त्याचा पाठलाग करण्याची छाती झाली नाहीं. उलट डोंगराआड राणा दबा धरून बसला आहे, अशा बातमीनें बादशाही सैन्य घाबरलेलें होतें. मुक्कामावर आल्यावर सुद्धां राण्याचा केव्हां हल्ला होईल याचा नेम नसल्यानें व खंदकाची व्यवस्था केल्याशिवाय त्यांना स्वस्थपणा येईना. पण यानें त्यांची रसद मारण्याचा सारखा सपाटा चालवला, त्यामुळें अन्नावांचून लोक तडफडून मरूं लागले. आंबे खाण्यास मिळत, पण त्यामुळें आजार वाढे. शेवटीं अशा स्थितींत चार महिने राहून बादशहानें परत बोलावलें, म्हणून हें सर्व सैन्य परत गेलें. दोनहि पक्षांच्या लोकांनीं या युद्धांत आपला जय झाला असें म्हटलें आहे. पण महाराण्यासारख्या छोट्या मुलुखाच्या राजाला व विशेष धन व माणसें अनुकूल नसलेल्या राजाला हा फारच मोठा जय होता असें म्हणण्यास कांहींच हरकत नाहीं. पण यामुळें बादशहा अधिकच क्रुद्ध झाला.

इकडे राण्यानें रजपुताना अधिक संघटित करून गुजराथ वगैरे बादशाही मुलूख लुटण्यास सुरवात केली. बादशहानें त्यावर सरदार पाठविले, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. खुद्द बादशहा शिकारीच्या मिषानें मेवाडांत आला, पण बादशहा येतांच हा डोंगरांत निघून गेला; व बादशहानें पाठलाग करण्यास पाठविलेल्या सरदारांचा जोराचा पराभव केला. बासवाड्याला बादशहा सहा महिने राहिला, पण यानें त्याची पर्वा केली नाहीं. पुनः बादशहानें मेवाडवर सेना पाठविली, पण राणा त्यांना दाद देईना. एकदां याच्या सैन्यानें बादशाही सेनेवर हल्ला केला, त्यांत अमरसिंहानें बैरामखानाचा पुत्र मिर्झाखा याच्या स्त्रिया पकडल्या, पण यानें त्यांचा बहिणीप्रमाणें सन्मान करून त्यांस परत पाठविलें. यामुळें याच्याबद्दल मिर्झाखा याच्या मनांत व सर्व लोकांवर याचा फारच वचक बसला. यानें मेवाडांतून आग्र्याकडे जाणारा बादशहाचा लष्करी रस्ता बंद केला; व बादशाही सर्व ठाणीं काबीज केलीं. यानंतर शहाबाजखानच्या सेनापतित्वाखालीं स्वारी करण्यांत आली. राजा भगवानदास व मानसिंग यांना रजपूत म्हणून परत पाठविण्यांत आलें. पुढें येऊन केळवाडा घेतला. कुंभळगडावर हल्ला केला असतां याच्या सैनिकांनीं बादशाही सैन्यांतील चार हत्ती जिंकले. पण किल्ल्याची नाकेबंदी झाल्यास किल्ल्यावर अडकून पडावें लागेल हें जाणून यानें अक्षयराजाचा पुत्र भाण यास किल्लेदार नेमून आपण सैन्यासह बाहेर पडला; आणि राणपुरला गेला. किल्ल्यांतील तोफ अकस्मात् फुटल्यामुळें युद्धसाहित्य जळालें; व आंतील लोकांना दरवाजा उघडून बाहेर यावें लागलें. त्यांत भाण वगैरे पराक्रमी लोक लढतलढत मेले. व शत्रूंनीं किल्ला घेतला. महाराण्याचा पाठलाग केला, पण जय न आल्यामुळें राय सुरजन हाडा याचा मुलगा दूदा याला पकडून शत्रु परत फिरला. महाराण्यानें छप्पन्न प्रांतांकडे मोर्चा वळवला. लुणा राठोडापासून तो प्रान्त घेतला व तेथें आपलें वसतिस्थान केलें. तेथें त्या वेळीं बांधलेला महाल व चांमुडेचें मंदिर अद्यापि आहे.

या वेळीं भामशाहानें माळव्यावर स्वारी करून राण्याला आर्थिक मदत केली. दिवेर हें बादशाही ठाणें यानें ताब्यांत घेतलें व कुंभलगडहि परत घेतला. याप्रमाणें बादशहाच्या ताब्यांत गेलेलीं डुंगरपूर व बांसवाडा हीं राज्यें महाराण्याकडे परत आलीं.

अकबर बादशहाला महाराण्याच्या चढाईची बातमी कळतांच त्यानें पुनः शहाबाजखाला पाठविलें; व त्याला बजावलें कीं, महाराण्याला जिंकल्याशिवाय आल्यास तुझें डोकें उडवलें जाईल. तो मेवाडमध्यें येतांच महाराणा डोंगरांत निघून गेला. तीन महिने तो मेवाडमध्यें हिंडत होता, पण शेवटीं अत्यंत त्रस्त होऊन त्याला परत फिरावें लागलें. जागोजाग त्यानें आपले अधिकारी नियुक्त केले होते.

या वेळीं महाराण्यानें शेतकऱ्याला सपाट जमिनीवर शेती न करण्याचा हुकूम जारी केला; व फक्त पहाडावरील योग्य ठिकाणीं शेती करण्याविषयीं फर्माविलें व याविरुद्ध वर्तन करणाराला प्राणदंडाची शिक्षा ठेवली. याचा परिणाम असा झाला कीं मोगलांनीं नियुक्त केलेल्या अधिकाऱ्यांना चारादाण्यासुद्धां सर्व पदार्थ अजमेरकडून आणावे लागत आणि ते योग्य बंदोबस्त न ठेवतां आणण्याचा प्रयत्न केल्यास रजपूत लुटून फस्त करीत. एका शेतकऱ्यानें हा हुकूम न मानल्यामुळें त्याचें डोकें उडवण्यांत आलें. यामुळें शेतकरी लोकांनीं देशत्याग केला व ते परप्रांतांत जाऊन राहिले.

यामुळें जेथें धान्य उगवत होतें तेथें गवत वाढलें. मुख्य रस्त्यावर कांटेरी बाभळी वाढल्या. माणसांच्या वस्तीच्या जागीं रानटी जनावरांच्या आरोळ्या ऐकूं येऊं लागल्या. तसेंच दक्षिणेंतून उत्तरेकडे जाणारा रस्ता

धोक्याचा झाल्यामुळें व्यापार अजिबात बसला. या परिस्थितीचा महाराण्यावर पुष्कळच परिणाम झाला असला पाहिजे. पण याचा निश्चय बिलकुल ढळला नाहीं. म्हणूनच महाराणा आणि रजपूत यांची कीर्ति अजरामर झाली आहे.

वि. सं. १६४० श्रावण शु. १२ (स. १५८३ ता. २१ जुलै ) रोजीं महाराण्याचा पुत्र अमरसिंह याला कर्णसिंह नांवाचा मुलगा झाला. याबद्दल उत्सव करण्यांत आला.

महाराण्यानें आपला बादशहाकडे गेलेला मुलूख स्वारी करणाऱ्या सरदारांच्या पाठोपाठ परत घेण्याचा क्रम ठेवला होता. पण यानें लांबच्याहि मुलुखावर आक्रमण करण्यास सुरवात केली, तेव्हां बादशहानें वि. सं. १६४१ मार्गशीर्ष शुद्ध १४ ( स. १५८४ ता. ६ डिसेंबर ) रोजीं जगन्नाथ कछवाह याला चांगलें सैन्य देऊन पाठविलें. त्यानें प्रथम मांडवगड, मोही वगैरे ठाणीं घेतलीं, पण तीं राण्यानें ताबडतोब परत घेतलीं. जगन्नाथ सुमारें दोन वर्षे मेवाडांत फिरत होता. एकदां तर तो राण्याच्या निकट पोहोंचला होता, पण कांहीं करूं शकला नाहीं. शेवटीं निराश होऊन वि. सं. १६४३ ( स. १५८६ ) मध्यें तो काश्मीरकडे निघून गेला.

अशा प्रकारें यावर खुद्द अकबर एकदां व इतर सरदार यांनीं अनेक वेळां स्वाऱ्या केल्या, पण त्या सर्व निष्फळ झाल्या. पण येथून पुढें महाराण्याचा देहांत होईतों अकरा वर्षेपर्यंत स्वारी झाली नाहीं; याचें कारण अकबराला पंजाबकडे सारख्या लढाया खेळाव्या लागत होत्या. महाराण्यानें चितोड व मांडल खेरीज सर्व मेवाड एकाच वर्षात परत घेतला. मानसिंह व जगन्नाथ यांच्या स्वाऱ्यांचा बदला घेण्याच्या इराद्यानें आंबेर भागावर स्वारी केली व तेथील संपन्न मालपुरें हें नगर लुटलें. येथून पुढलें याचें आयुष्य सुखानें गेलें. त्यांत आपला मुलूख यानें आबाद केला, व बरोबर राहिलेल्या व मदत केलेल्या सरदारांना उच्च पदवीला चढवून त्यांचा गौरव केला.

महाराण्यावर प्रबळ बादशाहीशीं युद्ध सुरू केल्यामुळें अरण्यवास पत्करण्याची वेळ आली. त्यांत याला अनेक कष्ट सहन करण्याचे प्रसंग आले असतील, याबद्दल शंका नाहीं. लोकांत त्यासंबंधीं अनेक आख्यायिका प्रसिद्ध आहेत. रानांत खाण्याकरितां केलेली भाकरी मांजरानें नेल्यामुळें याची मुलगी आकांत करूं लागली. अनेक लढायांनीं व हालअपेष्टांनीं ज्याचें मन द्रवलें नाहीं त्याचें मन मुलीच्या रडण्यानें द्रवलें व त्यानें बादशहाशीं तह करण्याविषयीं पत्र लिहिलें. बादशहाला तें पत्र मिळतांच त्यानें जय झाला म्हणून मोठा उत्सव केला. पण राण्यानें पुढें तह केला नाहीं वगैरे प्रसिद्ध असलेल्या गोष्टींना ऐतिहासिक आधार किंवा महत्त्व नाहीं. तथापि त्यांमुळें राण्याच्या परिस्थितीचें चित्र डोळ्यापुढें स्पष्ट उभें राहतें. पण वरच्या आख्यायिकेंत रंगवल्याप्रमाणें राण्याची स्थिति केव्हांच केविलवाणी नव्हती.

शेवटीं महाराण्यानें आपल्या सर्व विश्वासू लोकांकडून मेवाडच्या गादीची प्रतिष्ठा कायम ठेवण्याविषयींच्या शपथा घेतल्यावर आपला प्राण सुखानें सोडला. चावंड येथें यानें देह ठेवल्यावर याचा अग्निसंस्कार तेथून दीड मैलांवर बंडोलीच्या एका ओढ्याच्या कांठीं झाला. तेथें पांढऱ्या दगडाची बांधलेली छत्री सध्यां जीर्ण दशेंत आढळते ( वि. सं. १६५३ माघ शु. ११ ).

अकबरलाहि हीं बातमी कळतांच अत्यंत दुःख झालें. सर्व भरतखंडांत या देशाभिमानी व स्वातंत्र्यप्रिय राजाला अत्यंत पूज्य मानतात. याला अकरा राण्या व सतरा मुलगे होतेः अमरसिंह, भगवानदास, सहसा (सहसमल), गोपाल, कचरा, सांवळदास, दुर्जनसिंह, कल्याणदास, चांदा ( चंद्रसिंह ), शेखा, पूरणमल ( पूरा ), हाथी, रामसिंह, जसवन्तसिंह, माना, नाथा व रायभाण.

**२.** ( जन्म स. १७२४–मृत्यु स. १७५४ ) उदेपूरचा राजा. हा जगत्सिंहाचा पुत्र. याला राजसिंह नांवाचा एकच पुत्र होता. हा बापाच्या मरणाच्या पूर्वी घरांतील कांहीं भानगडीमुळें कैदेंत होता व बाप मेल्यावर याला जैतसिंहानें सोडवून ता. ५ जून स. १७५१ त गादीवर बसविलें. याचें मराठ्यांचे फौजेपुढें कांहीं चालत नसे. हा स्वभावानें चांगला होता.

**प्रतापसिंह भोसले**— ( स. १७४०–१७६३ ) तंजावरचा राजा. तंजावरचा राजा तुकोजी याचा हा दासीपुत्र. याला तुळाजी व अमरसिंग अशीं दोन मुलें होतीं. तंजावरचे दरबारांत सय्यदखान व सय्यद कासीम हे दोघे सरदार प्रबल होते व ते याच्या विरुद्ध सारखीं कारस्थानें करीत. त्यांना असें वाटूं लागलें कीं, ही राजसत्ता आपल्या हातांत असावी. म्हणून यानें सय्यद कासीमच्या मदतीनें सय्यदखानास ठार मारलें. हें चंदासाहेबांस समजतांच त्यानें याजवर चाल केली. पण साताऱ्याच्या शाहूच्या मदतीनें यानें चंदासाहेबाचा पूर्ण मोड केला ( स. १७४० ). याची व अर्काटचा सुभेदार अन्वरुद्दिन याची खंडणीविषयीं लढाई होऊन त्यांत त्याचा पराभव झाला.

पुढें इंग्रजांच्या मदतीनें सयाजी ऊर्फ शहाजी नांवाच्या इसमानें गादीवर आपला हक्क सांगितला. तेव्हां यानें

त्यास देवीकोटचा किल्ला व ३१५००० रु. उत्पन्नाचा मुलूख दिला ( स. १७४९ ). गुत्तीकर मुरारराव घोरपडे यानें मुद्दाम कुरापत काढून तंजावरवर स्वारी केली. पुढें मुहम्मद अलीच्या मध्यस्थीनें यानें त्यास ३ लक्ष रुपयांची खंडणी देऊं केली. याची व फ्रेंचांची लढाई झाली तींत फ्रेंचांनीं याचें कावेरीचें धरण उध्वस्त केलें, तें परत यानें दुरुस्त केलें. पुढें इंग्रजांची मदत घेऊन यानें फ्रेंचांशीं लढाई करून त्यांचा पराभव केला व त्यांच्या मदतीनें मुहम्मद अलीचें सख्यत्व जोडलें. एकंदरींत याची कारकीर्द धामधुमीची व उलाढालीची गेली ( तं. रा. घ. पृ. ८५ ).

**प्रतापसिंह (छत्रपति) भोसले**—( स. १७९२–१८४७ ) हा साताऱ्याच्या छत्रपति घराण्यांतील धाकट्या शाहूचा वडील पुत्र; चतुरसिंग भोसले यानें पेशव्यांच्या ताब्यांतून प्रतापसिंहास सोडविण्याची इंग्रजांकडे खटपट केल्यानें चतुरसिंगास त्रिंबकजीकडून रावबाजीनें पकडून कांगोरिस कैदेंत ठेवलें ( स. १८११ ). तेथें तो स. १८१६ त वारला. पुढें प्रतापसिंहानें व त्याच्या आईनें गुप्त कारस्थानें करून इंग्रजांची मदत मागितली व ती एल्फिन्स्टननें आनंदानें देण्याचें आश्वासन दिलें. या सुमारास रावबाजी व इंग्रज यांच्यांत उघड उघड बेबनाव झाला होता व खडकीच्या लढाईची पूर्वतयारी चालली होती. शेवटीं अष्टी येथें इंग्रजांची व पेशव्यांची लढाई होऊन, बापू गोखले पडले; व पेशवे पुढें निसटले. या प्रसंगीं अगाऊ सांकेतिक सूचना असल्यानें प्रतापसिंह हा मुद्दामच मराठ्यांच्या लष्करांच्या मागें राहिला होता. पेशवे गेल्यावर स्मिथ यानें याला आपल्या ताब्यांत घेतलें व बोलेसर येथें एल्फिन्स्टनकडे रवानगी करून दिली. त्यानें प्रतापसिंहास आणलें. तत्पूर्वीच ८ दिवस इंग्रजांनीं सातारा घेतला. मग पुढील आशयाचा जाहीरनामा काढला: "बाजीराव राज्याचे उपयोगी नाहींत. थोडके दिवसांत त्यांचा ठिकाणा नाहीं असें होऊन छत्रपति सातारकर बाजीरावसाहेब यांचे कैदेंत आहेत. त्यांस सोडवून त्यांचें राज्य त्यांजकडे चालेल. ते दौलतीचे खावंद मुखत्यार आहेत. जो मुलूख महाराजांकडे होईल त्यांत न्यायइनसाफ, हुकमत व अंमल करतील. गेलें तें राज्य पेशव्यांचें, महाराजांचें राज्य अबाधितच आहे." याप्रमाणें इंग्रजांनीं सर्व मराठी राज्य स्वतःच्या ताब्यांत घेऊन राज्याच्या मालकास फक्त १२ लक्षांचा मुलूख दिला व १४ पेठ्यांचा एक जहागिरदार बनविलें. ग्रँड डफ याला साताऱ्यास रेसिडेंट म्हणून याच सुमारास नेमण्यांत आलें. प्रतापसिंहानें साताऱ्यास स. १८२२ त एक नवीन राजवाडा बांधला व युवतेश्वराहून नळ आणून शहरांत ठिकठिकाणीं पाणी खेळविलें ( स. १८२७ ) आणि जलमंदिर राजवाडाहि बांधला ( स. १८२९ ).

पुढें इंग्रज आपल्याला निर्माल्यवत् मानतात व आपल्यावर निरनिराळ्या अपमानकारक नवीन अटी लादतात, हें प्रतापसिंहाच्या लक्षांत येऊन यानें त्यांच्याविरुद्ध खटपट सुरू केली. पुढें मुंबईचा गव्हर्नर कारनॅक यानें कांहीं अटी सांगून त्या कबूल करण्यास व माफी मागण्यास सांगितलें, परंतु ते प्रतापसिंहानें ऐकलें नाहीं. त्यामुळें इंग्रजी पलटणें पुण्याहून निघून साताऱ्यास आलीं (आगष्ट १८३९ ). त्या वेळीं बळवंतराव सेनापती यानें इंग्रजांशीं लढण्याची तयारी केली; परंतु प्रतापसिंहानें त्यास मनाई केली. अखेरीस प्रतापसिंहास पदच्युत करून ( सप्टेंबर ) निंवास नेऊन ठेवलें. स. १८५७ च्या बंडांत याचा संशय घेऊन याला कराचीस नेऊन ठेवलें. प्रतापसिंहानें आपलें राज्य परत मिळविण्याची पुष्कळ खटपट केली. विलायतेस माणसें पाठविलीं, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. अखेर हालअपेष्टेंत मराठ्यांच्या शेवटल्या छत्रपतीला मृत्यु आला ( मं. अहवाल १८३८ ).

**प्रतापसिंह परमार**—( स. १२८७ ) आबूच्या परमारांपैकीं तिसऱ्या कृष्णराजाचा पुत्र. याच्याबद्दलचा पाटनारायणच्या मंदिरावर वि. सं. १३४४ चा शिलालेख मिळाला आहे. त्यांत म्हटलें आहे कीं, यानें जैत्रकर्णाचा पराभव केला. आणि दुसऱ्या वंशांत गेलेल्या चंद्रावतीचा उद्धार केला. यावरून अबूवर परमारांची राजधानी चंद्रावती नांवाची होती व ती जैत्रकर्णानें जिंकली होती पण ती यानें परत घेतली असें दिसतें. हा जैत्रकर्ण म्हणजे मेवाडचा जैत्रसिंह असावा. याचा मंत्री देल्हण नांवाचा ब्राह्मण होता.

**प्रतापादित्य कर्कोटक**—( स. ६३७–८७ ) हा दुर्लभवर्धनानंतर काश्मीरच्या गादीवर आला. याच्या न्यायप्रियतेच्या व प्रजाहिततत्परतेच्या पुष्कळ गोष्टी कल्हणानें राजतरंगिणींत सांगितल्या आहेत.

**प्रतिहार इंदुराज**—हा जयापीड राजाचा सेनापति. हा भट्टोद्भटाच्या ग्रंथावरील टीकाकार होता, असें राजतरंगिणीमध्यें कल्हणानें लिहिलें आहे.

**प्रद्युम्नसूरि**—( स. ९८० सुमार ) हा जैनधर्मी असून श्वेतांबरपंथाच्या राजगच्छ शाखेचा होता. ह्याचा तर्कशास्त्रावरील वादविवादांत हातखंडा असे. यानें वेणकपट्टणच्या राजासमोर दिगंबरपंथीयांचा पराभव केला. यानें

८४ वेळां वादविवादांत जय मिळविला. 'पार्श्वनाथ' ग्रंथाचा कर्ता जो माणिक्यचंद्रसूरि याचा हा ११ वा पूर्वज व अभयदेवसूरीचा गुरु (हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पान ३५-३६ ).

**प्रद्योतनपद्मनाभमिश्र**—( ग्रंथकाल स. १५७८ सुमार ) वाघेल घराण्यांतील जो वीरभद्र ( स. १५९२-१५९३ ) राजा त्याच्या दरबारीं असलेला एक प्रसिद्ध कवि. गोवर्धनमिश्र व विश्वनाथ यांचा भाऊ जो बलभद्र त्याचा हा मुलगा.

यानें वीरचम्पू किंवा वीरभद्रचम्पू हा ग्रंथ स. १५७८ मध्यें लिहिला. १ किरणावलीभास्कर ( बनारसच्या सरस्वतिभवनामध्यें प्रसिद्ध झाला ), २ तत्त्वचिंतामणि-परीक्षा, ३ तत्त्वप्रकाशिकाटीका, ४ राद्धान्तमुक्ताहार आणि याचेवरील काणादरहस्य, ५ वर्धमानाच्या न्यायनिबंध-प्रकाशावरील वर्धमानेन्दु ही टीका. शरदागम ग्रंथाचा कर्ता प्रद्योतनभट्टाचार्य आणि हा हे एकच आहेत, असें डॉ. विद्यासुधाकर हरदत्त शर्मा यांचें मत आहे ( Dr. S. Krishnaswami Aiyangar Commemoration Volume 1936, 51 ). शरदागम हें चंद्रालोकावरील एका टीकेचें नांव आहे. याचीच कामसूत्रावर एक टीका असून ती स. १५७७ मध्यें लिहिलेली आहे.

**प्रभाकर**—( स. १७५४-१८४३ ) या मराठी शाहीर कवीचें समग्र नांव प्रभाकर जनार्दन दातार. हा चित्पावन ब्राह्मण. मूळ गांव मुरुड ( जि. रत्नागिरी ). पुण्यांत फडांत कारकून. हा पुण्यांतील गंगू-हैबतीच्या फडांत सामील झाला. याला पेशव्यांचा आश्रय दिसतो. हा चांगला कवि होता.

पोवाडे—१ रंगाचा पोवाडा, खर्ड्याची लढाई, सवाई-माधवरावाचा मृत्यु, शिवाय बाजीरावावर ३ पोवाडे, लावण्या—बाजीरावविलास ( ३५-३६ ) ( ऐ. पो. प्रस्ता. ८९-९७ ).

**प्रभाकरभट्ट**—( स. ५००-६०० सुमार ) हा केरळ प्रांतांतील एक कवि व सुप्रसिद्ध तत्त्वज्ञानी. हा वेदनात्तू येथील कीत्तोलीमान घराण्यांत जन्मास आला. हा जरी पुष्कळ हुशार व अभ्यासू होता, तरी याच्या गुरूनें यास कधींहि शाबासकी दिली नाहीं. त्यामुळें हा चिडून, गुरूचा खून करण्यासाठीं त्याच्या घरांत लपून राहिला. पण जेव्हां आपल्या गुरूकडून स्वतःची गुणप्रशंसा त्याच्या बायकोशीं करतांना यानें ऐकली, तेव्हां यानें पुढें येऊन गुरूचे पाय धरले; व ठरलेल्या विचाराची क्षमा मागून प्रायश्चित्त मागितलें. गुरूनें यास 'अग्नींत दहन करून घेणें' हें प्रायश्चित्त सांगितलें. ठरल्याप्रमाणें यानें गुरूच्या सांगण्यावरून श्रीकृष्णाचें नांव घेत उडी टाकली; व जशाचा तसा बाहेर आला. यानें 'भूतिधारणखंडनम्' हा ग्रंथ लिहिला (I. H. Q. Vol: V. No. 4. 678-80).

२. 'रसप्रदीप' या संस्कृत ग्रंथाचा कर्ता.

३. ( स. ४३२ सुमार ) सेतुबंध काव्याचा कर्ता. हा काश्मीरचा राजा होता. बाणभट्टानें हर्षचरिताच्या प्रारंभीं याच्या सेतुबंध काव्याचा निर्देश केला आहे. दंडीनेंहि याच्या काव्याचा उपयोग केला होता ( मातृ-गुप्त पाहा ).

४. ( जन्म स. १५६४ ) प्रसिद्ध मीमांसक. पिता—माधवभट्ट. ग्रंथ—शास्त्रदीपिका. आजा—रामेश्वरभट्ट. भाऊ—विश्वनाथ व रघुनाथ.

**प्रभाकरवर्धन**—( स. ५८०-६०५ ) बैसवंशी रज-पुतांपैकीं आदित्यवर्धनाला महासेनगुप्तेचे ठिकाणीं झालेला पुत्र. याला प्रतापशिव असेंहि म्हणत. याची राजधानी ठाणेश्वर. याच्या पूर्वीच्या लोकांना महाराज म्हटलेलें आढ-ळतें (एपि. इंडि. भा. ४ ५, पृ. २१० ). त्यावरून ते गुप्ताचे मांडलिक असावेत. पण याला परमभट्टारक व महा-राजाधिराज असें म्हटलेलें आहे ( एपि. इंडि. भा. ४, पृ. २१० ). त्यावरून हा स्वतंत्र राजा झाला होता, असें दिसतें. हर्षाच्या ताम्रपत्रांत याला अनेक राजांना नमव-णारा व हर्षचरित्रांत हूण, गांधार, सिंधु, गुर्जर व लाट या देशांस जिंकणारा, असें म्हटलें आहे ( हर्ष-चरित पृ. १२० ). हा सूर्याचा परम भक्त होता व दररोज आदित्यहृदयाचा पाठ करीत असे.

याच्या राणीचें नांव यशोमती. याला तिच्यापासून राज्यवर्धन व हर्षवर्धन असे दोन पुत्र आणि राज्यश्री नांवाची एक मुलगी झाली. याचा जांवई म्हणजे राज्य-श्रीचा पति मोखरीवंशांतील अवन्तिवर्म्याचा पुत्र ग्रह-वर्मा होय. ग्रहवर्म्याला ठार करून राज्यश्रीला माळव्याच्या राजानें बेड्या घालून तुरुंगांत टाकलें असतां आणि थोरला मुलगा राज्यवर्धन उत्तर हूणांशीं लढण्याकरितां गेला असतां प्रभाकरवर्धन मरण पावला. याच्यानंतर राज्य-वर्धन गादीवर आला.

**प्रभाचंद्र**—( स. ८२५ सुमार ) हा एक जैनधर्मी कवि होता. यानें माणिक्यनंदीच्या 'परीक्षामुखसूत्रा'वर 'प्रमेयकमलमार्तंड' व अकलंकाच्या लघीयशास्त्रावर 'न्यायकुमुदचंद्रोदय' नांवाच्या टीका लिहिल्या. हा माणिक्यनंदीचा शिष्य होता. निर्णयसागर मुद्रणालयांतून प्रसिद्ध झालेल्या प्रमेयकमलमार्तंडाच्या प्रस्तावनेंत

पं. वशीधर यानें याचा काळ स. ११९५असा दिला आहे, पण तो बरोबर नाहीं.

**प्रभावती**—वीतभयच्या उदयनची पत्नी. लिच्छवी राजकन्या. पार्श्वनाथ तीर्थंकराची पत्नी.

**प्रभावती गुप्ता**—( विवाहकाल स. ३९५ ). गुप्तांपैकीं दुसऱ्या चंद्रगुप्ताला कुबेरनागा नांवाच्या स्त्रीपासून झालेली ही मुलगी. ही वाकाटकवंशांतील दुसऱ्या रुद्रसेनाला दिली होती. हिचे पुत्र दिवाकरसेन व दामोदरसेन. आणखी एक तिसरा पुत्र असावा. हिच्या पुत्रांपैकीं एकाला तो अल्पवयी असतां प्रवरसेन दुसरा असें नांव देऊन गादीवर बसविलें. सर्व कारभार मात्र हीच पाहत असे. दरबारांत गुप्त अधिकाऱ्यांचें वर्चस्व असून हिलाहि आपल्या माहेरच्या घराचा अभिमान होता. हिच्या ताम्रलेखांत आपल्या पूर्वीचे वाकाटकांचीं नांवें न देतां गुप्तांचीं दिलेलीं आढळतात.

प्रो. पाठक व रा. ब. का. ना. दीक्षित यांनीं छापलेल्या ताम्रपत्रांत दिवाकरसेनाचें नांव असून तो प्रभावती गुप्तेचे पदरीं असल्याचा उल्लेख आहे. भा. इ. सं. मंडळांत प्रसिद्ध झालेल्या हिच्या लेखांत ही दामोदरसेन व प्रवरसेन यांची जननी असल्याचा दाखला असून तो प्रवरसेनाच्या १९ व्या वर्षी दिलेला आहे. हीं विधानें महत्त्वाचीं आहेत. प्रवरसेनाचे राज्याचे अठरावे वर्षी त्याचे सांगण्यावरून सिबानीची देणगी दिलेली आहे, असें फ्लीटच्या गुप्तांच्या शिलालेखाच्या पुस्तकांत लिहिलें आहे (पा.२४३-२४९). प्रो. पाठक व दीक्षित यांना उपलब्ध झालेलें शासन तेरावे वर्षी देण्यांत आलें. हें वर्ष दुसऱ्या रुद्रसेनाच्या राज्याचें असावें किंवा दिवाकरसेनाच्या कारकीर्दीचें असावें यावद्दल त्यांस संशय आहे ( एपि. इंडि. व्हा. १५, पा. ४१ ). दुसऱ्या लेखांतील देणगी प्रवरसेनाच्या राज्याच्या १९ व्या वर्षी हिनेंच दिलेली आहे. तेथें दिवाकरसेनाचें नांव नाहीं ( मं. ३.२-४ पा. ९२ ).

**प्रभुनंदन**—( काव्यकाल स. १७४१ ) मराठी १०१ श्लोकांमध्यें श्रीखंड्याचें चरित्र लिहिणारा कवि ( मं. त्रै. ४. २ ले. ५१ ).

**प्रभुलिंग**—( अलंप्रभु पाहा ).

**प्रयागजी अनंत फणसे पनवेलकर**—( स. १६४९-१७०८ ) हा प्रभु गृहस्थ स. १६४९ पासून शिवाजीपाशीं होता, व तेव्हांपासून सातारा व परळी या दोन परगण्यांची सुभेदारी याजकडे होती. साताऱ्याचे किल्ल्यांत युवतेश्वर महादेव म्हणून सोमेश्वराची मूर्ति आहे, तिची स्थापना प्रथमतः प्रयागजीनें केली. युवत म्हणजे कळकीचें झाड. प्रयागजीस दृष्टांत होऊन युवताच्या झाडांत सोमेश्वर प्रगट झाला. म्हणून युवतेश्वर असें नांव पडलें. सातारा शहर राजधानी झाल्यापासून प्रयागजीचें महत्त्व विशेष वाढलें, व याच्या अंगचे गुण निदर्शनास आले. स. १६९९ मध्यें ब्रह्मपुरी सोडून औरंगजेब वीस दिवसांनीं वसंतगडापाशीं येऊन तो किल्ला तीन दिवसांत घेऊन मिरजेवरून पन्हाळा सोडून साताऱ्याकडे वळला. तिकडे औरंगजेब वळेल अशी कल्पना नसल्यामुळें बंदोबस्त व धान्य जुजबी होतें. बादशहा उत्तरेस करंजेगांवीं, अजमशहा पश्चिमेस शहापुराजवळ आणि दुसऱ्या दोन बाजूंस तर्बियतखान व सर्जेखान हे मोर्चे लावून बसले होते. अशी नाकेबंदी असतांनाहि या वीरानें किल्ला मोठ्या चतुराईनें लढवला. किल्ल्यावरून दगड लोटून, गोळ्यांचा वर्षाव करून आणि साप, विंचू वगैरे भरलेले रांजण खालीं फेकून यानें मुसलमानांना त्रस्त केलें. किल्ल्यांतून हा लढत असतां बाहेरच्या मराठे सैन्यांनीं भोंवतालचा मुलूख बेचिराख करून भोंवतालचा वीस कोसपर्यंत मुलूख निरुपयोगी करून टाकला. त्यांतूनहि जें येई तें लुटण्याचा क्रम चालूच होता. असे तीनचार महिने गेले. आंतल्या लोकांना परशुराम त्रिंबक परळीच्या बाजूनें थोडासा धान्याचा पुरवठा करी. पुढें तर्बियतखानानें ईशान्येच्या मंगळाईच्या बुरुजाखालीं दोन मोठे सुरंग तयार केले. ते कसे उडतात हें पाहण्याकरितां बुरुजावर लोक येऊन उभे राहिले. प्रथमतः सुरंगास बत्ती दिल्याबरोबर भयंकर कल्लोळ होऊन, डोंगराचा एक मोठा खडपा वरील बुरुजासह एकदम जोरानें वर आकाशांत उसळून किल्ल्यांत पडला. त्याबरोबर मराठ्यांचे शेंकडों लोक प्राणास मुकले, आणि आंत घुसण्याकरितां मुसलमान पुढें झाले. तों त्यांच्यावर दुसऱ्या सुरुंगानें उडालेला भाग पडला. त्यामुळें त्यांचे दोन हजार लोक मेले. प्रयागजीचे खूप लोक मेले, पण तो मातीच्या ढिगाऱ्याखालीं सांपडूनहि सुखरूप वांचला; आणि हुरूप येऊन मराठे वीरश्रीनें लढूं लागले. बादशहानें स्वतः धीर दिल्यानें मुसलमान लढत होते. पण किल्ल्यांतील सामग्री संपली, राजाराम वारला. तेव्हां परशुराम त्रिंबकनें आपण होऊन अजमशाहाच्या ताब्यांत किल्ला दिला. अजमशाहाच्या मार्फत किल्ला सर झाल्यामुळें किल्ल्याचें नांव अजमतारा ठेवण्यांत आलें. तें अद्यापि चालू आहे. हा प्रकार राजारामाचे मृत्यूनंतर एक महिन्यानें स. १७०० च्या एप्रिल महिन्यांत घडला. पण पुनः किल्ला मराठ्यांच्या ताब्यांत

आला तेव्हां याचीच तेथें नेमणूक झाली. शाहू परत आल्यावर हा त्यास मिळाला आणि लवकरच मृत्यु पावला. याचा पुत्र जोतिबा ऊर्फ अप्पाजी. त्याचे मुलगे दोन रावजी व बाबाजी. हे वडोदें राज्यांत प्रसिद्धीस आले.

**प्रल्हादनदेव परमार**—(स.१२२५सुमार) आबूच्या परमारांपैकीं यशोधवलाचा पुत्र. याच्या विद्वत्तेची व शौर्याची प्रशंसा सोमेश्वर कवीच्या कीर्तिकौमुदी काव्यांत आढळते. तसेंच वस्तुपालानें बांधलेल्या लूणवसही नांवाच्या अबूवर देलवाडा गांवच्या नेमिनाथमंदिरावरील वि. सं. १२८७ मधील प्रशस्तींतहि याचें वर्णन आहे. तसेंच मेवाडचा सामंतसिंह गुहिल व गुजराथचा अजयपाळ सोलंकी यांच्या युद्धांत यानें मोठ्या शौर्यानें अजयपालाला मदत केली (इंडि. अँटि. भा.५३पृ.१००–१०२). या लढाईंत अजयपाल जखमी झाला होता. यानें लिहिलेलें 'पार्थपराक्रमव्यायोग' नांवाचें संस्कृत नाटक मिळालें आहे. व्यायोग हा नाटकाचा एक प्रकार असून त्यांत एखादी प्रसिद्ध घटना व युद्ध असतें. तें नाटक 'गायकवाड ओरिएंटल सीरीज' मध्यें छापलें आहे. यानें आपल्या नांवानें वसविलेलें प्रल्हादनपुर हें पालनपुर या नांवानें गुजराथेंत प्रसिद्ध आहे.

**प्रल्हाद शिवाजी वडवे**—( समाधि स. १७१८ ) हा मराठी कवि पंढरपुरास राहत असे. याच्या गुरूचें नांव राघव. हे स्वतः उत्तम कीर्तन करीत; आणि यांचे शिष्य गोपाळ व सदाशिव हे दोघे मागें राहून आलाप काढीत. शिवाजीमहाराजांनंतर औरंगजेबानें महाराष्ट्रांत कहर केला तेव्हां पंढरपूरच्या विठोबाचा उच्छेद करण्याची त्यास बुद्धि झाली. अशा वेळीं प्रल्हादबुवांनीं पांडुरंगाला आपल्या बळदांत लपवून ठेवलें व आलेला प्रसंग टाळून आपलें नांव तत्कालीन संतमंडळांत दाखल केलें. हे मोठे प्रेमळ होते आणि पांडुरंग यांच्याशीं बोलत असे असें सांगतात. पुढें औरंगजेब वारल्यावर स. १७०९ मध्यें पुनः मंदिरांत पांडुरंगाची स्थापना झाली ती अद्यापपर्यंत अढळ आहे. यापूर्वींहि एकदां असा मूर्ति हलविण्याचा प्रसंग आला होता ( भानुदास पाहा ). हे मोठे साधु होते, तसेंच कविहि होते. यांनीं ज्ञानेश्वराच्या अमृतानुभवाचें संस्कृतमध्यें भाषांतर केलें, यावरून यांचें संस्कृतभाषेवरील प्रभुत्वहि ध्यानीं येतें. या संस्कृत ग्रंथाशिवाय मराठी भाषेंत यांचीं पुढील प्रकरणें उपलब्ध आहेतः १ अहल्योद्धार ( ओंव्या ४६ ), २ सीतास्वयंवर ( ओंव्या ७६ ), पांडुरंगमाहात्म्य ( ओंव्या १७९ ), यांशिवाय २५ पदें व दोन आरत्या आहेत. यांचें काव्य प्रासादिक आहे. हे शके १६४० माघ कृष्ण एकादशीला स्वर्गवासी झाले. यांची समाधि विठोबाच्या देवळांत आहे. मोरोपंतानें आपल्या सन्मणिमालेंत यांना स्थान दिलें असून बाबापाध्यांच्या सारखे विद्वान् यांच्या समाधीचें नित्य दर्शन घेत असत ( म. क. च. १, पा. ३०७–३१४ ).

**प्रवरसेन वाकाटक**--( स. २८४–३४४ ) वाकाटकवंशापैकीं विंध्यशक्तीचा मुलगा. विंध्य मगधाच्या महाराजगुप्ताचा समकालीन असावा. यानें अग्निष्टोम, आप्तोर्याम इत्यादि श्रौत याग केलेले होते. हा भारद्वाजगोत्री ब्राह्मण होता. याची राजधानी बुंदेलखंडांतील अजगढाजवळील चनकापूरी ( सध्यां नाचना ) होय. हा वाकाट गांवचा राहणारा म्हणून वाकाटक नांव पडलें. यानें आपलें राज्यचिन्ह गंगा मानलें आहे. याच्या नाण्यावर गंगायमुनाद्वार अंकित आहे. झेंड्यावरहि गंगा होती. हा समुद्रगुप्तापेक्षांहि मोठा होता. याला सम्राट् म्हणत. याचें वर्णन कल्किअवतारासारखें आहे.

२. ( स. ३९५–४२० ) हा वाकाटकवंशांतील दुसऱ्या रुद्रसेनाला गुप्तवंशांतील चंद्रगुप्ताची कन्या प्रभावती हिच्यापासून झाला. याच्याच दरबारांत कालिदास कवि चंद्रगुप्ताचा वकील म्हणून आला होता. यालाच कुंतलेश म्हटलें आहे. आणि यानेंच कालिदासाच्या साहाय्यानें सेतुबंध ( दहमुहबहोदशमुखवध ) नांवाचें प्राकृत काव्य केलें. या काव्याचे पंधरा अध्याय आहेत. हा शिवोपासक होता.

**प्रविलसेन**—पुरुषभीरूचें नामान्तर.

**प्रवीणराय**--ही एक हिंदी कवयित्री व ओछेडच्या इंद्रजित सिंहाची वेश्या होय. ही केशवदासाची शिष्या असून त्यानें हिच्यावर 'कविप्रिया' हें पुस्तक लिहिलें. ही गायनवादन व काव्यरचनेंत निपुण असून स्वतःला पतिव्रता म्हणत असे. हिला अकबरानें बोलाविलें होतें, परंतु इंद्रजित सिंहाकडे हीस परत पाठविलें. हिच्या छंदयुक्त कविता आहेत.

**प्रशस्तपाद**—हा कणादाच्या वैशेषिक सूत्रावरील प्रशस्तभाष्य या ग्रंथाचा कर्ता.

**प्रसाधनादेवी**—रघुवंशी प्रतिहारांपैकीं विनायकपालाची पत्नी. दुसऱ्या महेंद्रपालाची माता.

**प्रसेनजित्**--कुशस्थलच्या नरवर्मन्चा मुलगा (पार्श्वनाथ, अजातशत्रु व बिंबिसार पाहा ).

**प्रज्ञावर्ग**--हुईलुन या चिनी प्रवाशानें भारतवर्षांत असतां हें नांव धारण केलें होतें.

**प्राज्यभट्ट**--'राजावलीपताका' नांवाच्या ग्रंथाचा कर्ता. प्रजयभट्ट व हा एकच किंवा काय तें कळत नाहीं. अक-

बरानें काश्मीर जिंकलें तेथपर्यंतचा इतिहास यांत आला आहे. श्रीवदानंतर काश्मीरचा इतिहास यानें लिहिला.

**प्राणचंद चौहान**—( स. १६११ चा सुमार ) एक हिंदी कवि. संवादात्मक रामायण नाटकाचा कर्ता.

**प्राणनाथ**—(स. १७००सुमार) याला श्रीप्राणनाथप्रभु असेंहि म्हणत. हा क्षत्रिय जातीचा साधु औरंगजेबाच्या उत्तर आयुष्यांत उदयास आला. यानें हिंदुमुसलमानांचें ऐक्य करण्याची खटपट करून नवीन पंथ स्थापिला. बुंदेलखंडाचा राजा छत्रसाल हा याचा शिष्य होता. यानें वारंवार प्रोत्साहन देऊन व आशीर्वचनें पाठवून मोगलांशीं लढतांना बुंदेल्याच्या मनांत त्वेष उत्पन्न केला. छत्रसाल व हा म्हणजे बुंदेलखंडाचे रामदास व शिवाजीच होत ( पारसनीसकृत बुंदेलखंड व प्रो. सरकारकृत औरंगजेब, भा. ३, पृ. ६९०).

**प्राणमंजरी**—ही प्रेमनिधीची तिसरी पत्नी होय.

**प्रियादास**—( नाभाजी पाहा ).

**प्रीतमदास**—( जन्म स. १७३० ) गुजराथी कवि. जात भाट. ग्रंथ–सारसगीता, ज्ञानकक्को, गुरुमहिमा. साध्या भाषेमुळें याचीं पदें लोकप्रिय आहेत ( का. दो. ).

**प्रेमचंद**—( स.१७९६ ) हिंदी कवि. ग्रंथ–चंद्रकला.

**प्रेमदास**—हा मराठी ग्रंथकार एकनाथाच्या वेळीं होता. याचा गद्यपद्यात्मक मूळस्तंभ ग्रंथ प्रसिद्ध आहे.

**प्रेमनिधिपंथ**—( ग्रंथकाल स. १५९१ ) याच्या पित्याचें नांव उमापति व आईचें नांव उद्योतमती. हा काशीचा राहणारा. हा मलयवर्माच्या आश्रयास होता. याच्या गुरूचें नांव दिनकर. यानें केलेले ग्रंथ. १ अन्तर्यागरत्न, २ काव्यदीपदानपद्धति, ३ घृतदानपद्धति, ४ दीपदानपद्धति, ५ दीपप्रकाश, व त्याची टीका शब्दप्रकाश, ६ प्रयोगरत्न, ७ प्रयोगरत्नक्रोड, ८ प्रयोगरत्नसंस्कार, ९ प्रयोगरत्नाकर, १० बहिर्यागरत्न, ११ भक्तव्रातसंतोषक, १२ भक्ततरंगिणी, १३ मूळप्रकाश, १४ लवणदानरत्न, १५ शक्तिसंगमतंत्रटीका, १६ मल्लादर्श ( शिवतांडवटीका ), १७ शब्दार्थचिंतामणि, १८ सुदर्शन ( तंत्रराजटीका ) ( नागरीप्रचारिणी पत्रिका ).

**प्रेमानंद**— ( स. १६७६ ) हा गुजराथी जातीचा चातुर्वेद मोढ ब्राह्मण. हा बडोदें येथील राहणारा. यानें केलेले गुजराथींतील ग्रंथः १ भागवत–दशमस्कंध–संपूर्ण, २ उखाहरण, ३ सुधन्वाआख्यान, ४ नलोपाख्यान, ५ सुदामचरित्र, ६ नरसी मेहताची हुंडी, ७ श्राद्धविधि, ८ रणयज्ञरामायण, ९ मामेरू ( काव्यदो. ).

२. ( स. १६३६–१७३४ ) एक गुजराथी कवि. यानें गुजराथी भाषेची किंमत लोकांस पटवून दिली. याचीं ३२।३३ काव्यें उपलब्ध आहेत. याचीं बरींचशीं काव्यें रोज गायिलीं जातात.

**प्रेमानंदस्वामी**—( ज. स. १७७९–१८४५ ) हा काठेवाडांतील गधडा गांवचा रहिवासी. यानें कृष्णलीलांचें वर्णन काव्यांत केलें. याची ‘ थल ’ नांवाची कविता फारच प्रसिद्ध आहे. याच्या काव्यांत विशेष हें आहे कीं, यानें स्वतःला राधा समजून कृष्णाला आपला वल्लभ मानलें आहे.

**प्रेमाबाई**—( स. १६५८ सुमार ) हिचीं कांहीं मराठी पदें व अभंग पुष्कळ लोकप्रिय आहेत. हिचें चरित्र ‘ भक्तलीलामृतां’त वर्णिलें आहे ( अ. ४२ ). ही अत्यंत कृष्णभक्त होती. ‘ माझा भरत देखिला काय ’ हें पद हिचें आहे ( म. क. च. भा. ३, पा. ५९–६० ).

**प्लिनी**—सनाच्या पहिल्या शतकांतील इतिहासलेखक.

**प्रोवी**—( रुद्रदेव पाहा. )

**प्रोल काकतीय**—( स. १०७५ सुमार ) हा दुर्जय काकतीयाचा मुलगा.

२. ( स. १११७–६३ ) हा बेट्ट काकतीयाचा पुत्र. यानें अनमकोंडा ही राजधानी बदलून वारंगळ ही राजधानी केली. याला पोल, प्रोलराज, प्रोल्लराज किंवा प्रोदराज असेंहि म्हणत. याला जगतीकेसरिन् अशी पदवी होती. पत्नीचें नांव मुप्पलादेवी.

हा या घराण्यांतील पहिला स्वतंत्र राजा होय. यानें तिसरा तैलप पश्चिम चालुक्य ( स. ११५१–६३ ), दुसरा जगदेकमल्ल पश्चिम चालुक्य, सहावा विक्रमादित्य चालुक्य यांना जिंकलें. पहिला बल्लाळ होयसल व विष्णुवर्धन बिट्टी यांना धुडकावून लावलें व त्यांचे प्रांत काबीज केले. मंत्रकूट देशाचा राजा गुंडाचा पराभव केला व त्याला ठार केलें. मंत्रकूट देश म्हणजे गोदावरी प्रांतांतील मंतेन भाग होय.

ओरिसाच्या गणपति राजानें वारंगळवर स्वारी केली तेव्हां आपल्या मुलाकडून हा चुकून मारला गेला. याच्यामागून याचा थोरला मुलगा पहिला प्रतापरुद्र गादीवर आला ( एन्शंट डेक्कन, पा. २७७ ).

# फ

**फकीरुद्दीन**—( कदरखान पाहा ).

**फत्ते अलीखान**—हें टिपु सुलतानाचें मूळ नांव.

**फत्तेउल्लाह इमादशाह**—( मृ. स. १४८४ ) वऱ्हाडचा सुभेदार. हा मूळचा ब्राह्मण असून, विजयनगरांत राहत असे. याला तेथून धरून आणून मुसलमान केलें व इमादउल्मुल्क हा किताब व वऱ्हाडची सुभेदारी दिली. हा स. १४८४ त इमादशाहा असें नांव धारण करून, स्वतंत्र कारभार पाहूं लागला; व त्याच वर्षी मरण पावला.

**फत्तेखान**—( स. १६२९ ) निजामशाहींतील मलिकंबराचा पुत्र. हा बापाप्रमाणें शहाणा नसल्यामुळें याचा बाप मेल्यानंतर मुर्तजा निजामशाहानें यास जुन्नर येथें कैदेंत टाकिलें ( स. १६२९ ). पण परत यास सोडून आणल्यावर, निजामशाहानें यास कारभार चालविण्याचा अधिकार दिला. पण यानें मुर्तजा निजामास कैद करून त्याच्या हुसेन नांवाच्या मुलास तक्तावर बसविलें. पुढें मोगलांचा सरदार महाबतखानानें फत्तेखान व हुसेन या दोघांस पकडून नेलें, पण शहाजहानकडून यास उत्तरहिंदुस्थानांत नेमणूक मिळाली ( मु. रि. १, २५७–५८ ).

२. ( मृ. स. १५०७ ) हा काश्मीरच्या आदमखानाचा मुलगा. यानें आपल्या घराण्यांतील मुहम्मद नांवाच्या राजास कैद करून गादीवर बसला. पण त्यानें सिकंदर लोदीची मदत घेऊन याचा पराभव केला; तेव्हां हा हिंदुस्थानांत पळून गेला व तिकडेच मरण पावला.

३. हा गुजराथचा सुलतान मुजफरशाहाचा मुलगा.

**फत्तेखान घोरी**—माळव्याच्या घोरी घराण्यांतील हुशंगशाहाचा मुलगा.

**फत्तेखान तुघ्लक**—हा दिल्लीच्या फीरूझ तुघ्लकचा मुलगा. याला घियासुद्दीन व नस्रतशाहा अशीं दोन मुलें होतीं. त्यांपैकीं घियासुद्दीन दिल्लीच्या तक्तावर बसला ( स. १३८८ ).

**फत्तेखान बाहामनी**—हा पहिल्या मुहम्मद बाहमनीचा मुलगा व मुजाहिदाचा भाऊ.

**फत्तेखान लोदी**—हा बहलोल लोदीचा मुलगा. याला निजामखान, मुबारक, आलम, याकूत, मूसा व जलालखान असे सहा भाऊ होते. त्यांपैकीं निजामखान गादीवर आला.

**फत्तेसिंग गायकवाड**—( स. १७७१–९० ) हा दमाजीचा मुलगा व गोविंदराव गायकवाडाचा भाऊ होय ( गोविंदराव गायकवाड पाहा ).

स. १७७१ त माधवरावानें ( पेशवा ) यास 'सेनाकर्ते' पद देऊन वडील बंधु सयाजी यास याचा मुतालीक म्हणून बडोद्याच्या सरदारीवर बसविलें. यानें कर्नाटकच्या स्वारींत चांगलें काम करून माधवरावाची शाबासकी मिळविली होती.

हा गुजराथेंत दादाचे विरुद्ध लढत होता. पण स. १७८० मध्यें इंग्रज सेनापति गॉडर्ड यानें यास अडचणींत गांठून याजकडून डभईजवळ कुंदेला गांवीं तह करून घेतला. इतकेंच नाहीं तर वर दक्षिणा म्हणून सिनोर व भडोच हे गांव फुकटांत मिळविले.

पुढें दादाच्या चिथावणीनें यानें गोविंदरावाशीं लढाई सुरू करून बारभाईशींहि विरोध आरंभिला. स. १७७७ चे आरंभीं उभय बंधूंत लढाई होऊन गोविंदरावाचा मोड झाला.

**फत्तेसिंग भोसले अक्कलकोटकर**—(स.१७०७–६० ) श्रीछत्रपति शाहूमहाराज हे स. १७०७ मध्यें मोगलांच्या कैदेंतून मुक्त होऊन ज्या वेळीं दक्षिणेंत आले, त्या वेळीं त्यांच्या प्रवासामध्यें, पारद, परगणे शिवणें ( शिवरी, जि. औरंगाबाद ) येथील सयाजी लोखंडे नामक पाटलानें, सुरळीतपणें शाहूमहाराजांस रूजू न होतां, मोगलाई तर्फेनें गांव भांडविला. त्याची व शाहूमहाराजांची चांगली चकमक उडाली. ह्या लढाईंत लोखंडे पाटील रणांगणीं पडले. त्या प्रसंगीं सयाजी पाटलांची स्त्री आपलें राणोजी नांवाचें लहान अर्भक घेऊन गर्दीमध्यें शाहूमहाराजांच्या पालखीजवळ गेली, व आपलें बालक त्यांच्या पायांवर घालून महाराजांस म्हणाली कीं, 'या बालकास वांचवावें. अन्यायी होते ते मारले गेले. हें मूल आपणांस वाहिलें आहे.'

शाहूमहाराजांस दया येऊन त्यांनीं याचा स्वीकार केला. झुंजामध्यें फत्ते झाली म्हणून ह्या बालकाचें नांव त्यांनीं फत्तेसिंग ठेविलें, याचें पालन शाहूमहाराजांची आवडती राख विरूबाई हिनें केलें. विरूबाई मेल्यावर तिची क्रिया यानें केली. तिची जिंदगी व तिच्या खर्चाकरितां तोडून दिलेला अक्कलकोटचा परगण्याचा भाग तिच्यानंतर याला मिळाला. शाहूमहाराजांच्या सर्व कागदपत्रांमध्यें फत्तेसिंग भोसले यास 'चिरंजीव' असेंच

अपत्यवाचक विशेषण लाविलें आहे. हे फत्तेसिंग भोसले मराठ्यांच्या इतिहासांत फार प्रसिद्ध आहेत. शाहू-महाराजांनीं फत्तेसिंग भोसले यांच्या भावास पारद हा गांव स. १७१५ चे सुमारास इनाम करून दिला.

याची कारकीर्द बरीच मोठी झाली. यानें बाळाजी विश्वनाथ, बाजीराव व बाळाजी बाजीराव ह्या तिन्ही पेशव्यांच्या कारकीर्दी पाहिल्या, व स्वतंत्रपणें व त्यांच्याबरोबर अनेक मोहिमांमध्यें आपलें शौर्य व्यक्त केलें. कोल्हापूर, कर्नाटक, बुंदेलखंड, भागानगर, त्रिचनापल्ली वगैरे प्रांतांवर यानें स्वाऱ्या केल्या व मराठ्यांची सत्ता प्रस्थापित करण्याचे कामीं उत्कृष्ट साहाय्य केलें. शाहूमहाराज वारल्यावर उदास होऊन हे अक्कलकोटासच राहिले. ह्यांचा व नानासाहेबांचा पुढें बेबनाव झाला होता असें दिसतें. हे स. १७६० मध्यें मृत्यु पावले (ऐ. गो. पृ. ५–७).

२. (मृत्यु स. १८२२) हा अक्कलकोटच्या शहाजी भोसल्याचा मुलगा होय.

शहाजीस तुळजाजी नांवाचा आणखी एक मुलगा होता. त्याचें व फत्तेसिंगाचें भांडण होऊन तुळजाजीस यानें अटकेंत ठेविलें. पण त्यानें कैदेंतून पळून जाऊन पुण्याच्या दरबारीं तक्रार केली. थोड्याच दिवसांनीं सदाशिवराव भाऊ माणकेश्वर यांच्या मध्यस्तीनें भावाभावांत सलोखा होऊन तुळजाजीनें सातारा जि., खटाव तालुक्यांतील कुर्ली वगैरे ८१०० रुपये उत्पन्नाचा मुलूख घेऊन स.१८०७ सालीं स्वस्थ बसण्याचें कबूल केलें.

**फरनालूब**—हा एक फिरंगी उत्तम वैद्य होता. जेव्हां विजापूरच्या आदिलशाही घराण्यांतील इब्राहीम दुसरा हा स. १६२० मध्यें भगेंद्र रोगानें आजारी होता, तेव्हां फरनालूब या उत्तम वैद्याचें वर्तमान राजास समजलें. राजानें त्यास बोलावून औषधोपचार सुरू केले, पण त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. शेवटी स. १६२७ मध्यें इब्राहीम वारला. तेव्हां खवासखानानें फिरंगी वैद्याचें नाक व खालचा ओंठ कापून टाकून यास हद्दपार केलें. नंतर हा हुषार वैद्य आपल्या नोकराचें नाक व ओंठ कापून आपल्या नाका-ओंठावर चिकटवून विजापुरांत येऊन बरेच दिवस राहिला होता.

**फरीदखान**—(शेरशाहा सूर पाहा).

**फर्खुंद अलीखान**—(नासिरुद्दौला निजाम पाहा).

**फर्ग्युसन जेम्स**—(स. १८०८–१८८६) शिल्पकलेवरील स्कॉटिश ग्रंथकार. स.१८३५–१८४२ सालच्या दरम्यानच्या काळांत यानें प्रसिद्ध प्राचीन शिल्पावशेषांबद्दल सुप्रसिद्ध अशा हिंदुस्थानांतील अनेक स्थळीं प्रवास करून पुढें प्रसिद्ध होणाऱ्या आपल्या शिल्पविषयक ग्रंथाकरितां पुष्कळ साहित्य जमविलें. यानें इंग्लंडमधील लोकांच्या मनांत भारतीय शिल्पकलेबद्दल पुष्कळ आवड उत्पन्न केली. स. १८४३ सालीं यानें 'दक्षिण हिंदुस्थानांतील खडकांत खोदलेलीं देवालयें' हा निबंध वाचला. त्यामुळें प्राचीन हिंदु देवालयांतील जुन्या शिल्पकामाची खरी कल्पना व किंमत शिल्पसंशोधकांस कळूं लागली. याचाच परिणाम म्हणून ईस्ट इंडिया कंपनीनें निरनिराळ्या प्रांतांच्या मुख्याधिकाऱ्यांना आपल्या प्रांतांतील अवशेषांची पाहणी, मोजणी वगैरे करण्याकरितां लायक व हुषार माणसें नेमण्याबद्दल शिफारस केली.

प्रवासांत सूक्ष्म निरीक्षण करून जमविलेल्या साहित्याचा 'भारतीय व पौरस्त्य शिल्पकलेचा इतिहास' हा सर्वमान्य ग्रंथ लिहितांना फर्ग्युसन यानें पुष्कळ उपयोग केला. यानें स.१८४८ त 'हिंदुस्थानांतील प्राचीन बौद्धशिल्प' हा लेख प्रसिद्ध केला; व लगेच 'हिंदु प्रिन्सिपल्स ऑफ ब्युटी इन् आर्ट'.हा ग्रंथ प्रसिद्ध केला. पुढें यानें 'दि हँड-बुक ऑफ आर्किटेक्चर' हा सुप्रसिद्ध ग्रंथ हातांत घेतला. फर्ग्युसन यास केवळ भारतीय नव्हे तर पूर्व किंवा पश्चिम या दोन्हीं दिशांकडील देशांमध्यें जो प्राचीन कलेचा स्मारकावशिष्ट भाग दृष्टीस पडे त्याकडे याचें लक्ष आकर्षिलें जात असे. याचा 'वनस्पती व सर्प यांची उपासना' हा सर्वमान्य ग्रंथ हिंदुस्थानच्या स्टेट सेक्रेटरीच्या अखत्यारींत तयार झाला असून तो इंडिया ऑफिसनें स.१८६८ सालीं प्रकाशित केला. १८६९ सालीं फर्ग्युसन यानें 'सेक्रेटरी ऑफ वर्क्स अँड बिल्डिंग्ज' ही जागा पत्करूनहि त्यानें आपलें लेखनकार्य शेवटपर्यंत चालू ठेविलें होतें.

**फर्नांडिस**—(स, १५९६) हा जेजुईट धर्मोपदेशक स. १५९६ त मदुरा येथें आला व तेथील राजा कुमार कृष्णप्पा नायक दुसरा याच्या परवानगीनें तेथें यानें जेजुईट पंथाचें देऊळ बांधलें. यानें तेथें मोफत हॉस्पिटल सुरू करून धर्मप्रसारास सुरुवात केली, पण यास यश आलें नाहीं. तेव्हां हें काम यशस्वी होण्याकरितां रॉबर्ट डी नोबीली हा आला व तेव्हांपासून धर्मोपदेशकांचें प्रस्थ दक्षिण हिंदुस्थानांत माजलें.

**फर्रुखझाद गझनवी**—(स. १०५३–५९) हा पहिल्या फर्रुखझाद गझनवीचा मुलगा.

**फर्रुखसियर मोगल**—(स. १७१३–१९) हा बहादुरशहाचा नातू व अजी-मुश्शानचा मुलगा होय.

बहादुरशहाचा मुलगा जहांदर हा क्रूर व दुर्व्यसनी असल्यानें यानें ( जहांदरचा पुतण्या ) त्याचा खून करून गादी बळकाविली.

याची कारकीर्द 'सय्यद बंधूंचीं कारस्थानें' या नांवानें प्रसिद्ध आहे. पुढें सय्यद बंधूंनीं याला ठार करून लागोपाठ दोन इसम गादीवर बसविले, म्हणून त्यांना 'किंग-मेकर्स' ( राजा बनविणारे ) असें म्हणतात.

**फाजिलखान**—( स. १६६० ) हा अफजुलखानाचा मुलगा व दुसरा अली आदिलशाहाचा सेनापति असून यानें पन्हाळगडांतून शिवाजी सुटल्यावर त्याचा पाठलाग केला.

**फाजिलशाह**—( स. १८५० ) एक हिंदी कवि. हा करीमचा नातू व शाह करीमचा पुत्र होय. हा छत्रपूरनरेश प्रतापसिंहाचा आश्रित होता. यानें प्रेमरतन नांवाची कथा लिहिली आहे. त्यांत नूरशाहचें कथानक आहे. ही कथा सुफी कवींच्या पद्धतीनुसार नाहीं.

**फातिमखानुम ऊर्फ मासाहेबा**— कुत्बशाही घराण्यांतील अबदुल्ला कुत्बशाहाची मुलगी. हिचें लग्न मीर्झा निजामउद्दीन अहमदाशीं झालें.

**फातिमा सुलतान ऊर्फ बादशहासाहेबा**— ( लग्न स. १६०५ ) ही दुसऱ्या इब्राहीम आदिलशहाची मुलगी. हिचें लग्न सतराव्या वर्षी शहा हबीबुल्ला बिन शाह यदुल्ला हुसेनी या श्रेष्ठ कुलांतील पुरुषाशीं झालें.

**फारुकी घराणें**—( खानदेश ) ऐनुद्दीन मुहम्मद खाजाजहान–१ मलिकराज ( स. १३८२ ),–२ (मलीक) नसीरखान ( स. १३९९ ),–३ ( मिरन ) आदिलखान पहिला ( स. १४३७ ),–४ मुबारकखान पहिला ( स. १४४१ ),–५ आदिलखान २ रा ( स. १४५७ ); याचा भाऊ) ६ दाऊदखान ( स.१५०१ )–७ गज्नीखान ( स. १५०८ ),–८ हसनखान ( स. १५०८ ), हा पहिल्या मुबारकखानाचा मुलगा.–९ आलमखान ( स. १५०८ ), १० आदिलखान ३ रा ( आलमखान. स. १५०९ ), ११ ( मिरान ) मुहम्मदशाह १ ला ( स. १५२० गुजराथचा सुद्धां राजा ).–१२ अहमदशाह ( स. १५३७ ), १३ मुबारकशाह २ रा ( स. १५३७ )–१४ मुहम्मदशाह २ रा ( स. १५६६ ), १५ हसनशाह (स. १५७६–७७ ), १६ आदिलशाह ४ था ( स. १५७७–७८ ), १७ बहादुरशाह ( कादरखान ); ( स. १५९७–१६०१ ) ( केंब्रिज हिस्टरी ).

**फाहियान**—( स. ३९९–४१३ ) गुप्त घराण्यांतील दुसऱ्या चंद्रगुप्ताच्या वेळीं हिंदुस्थानांत आलेला चिनी प्रवासी. हा मध्य आशियांतून आला व ताम्रलिप्तीच्या भागांतून परत गेला. संस्कृत भाषेचें अध्ययन करणें व विनयपिटकादि महायान पंथाच्या ग्रंथांचा संग्रह करणें हा याच्या यात्रेचा उद्देश होता. हा स्वान, गांधार, तक्षशिला, पेशावर, मथुरा, कनोज, श्रावस्ती, कपिलवस्तु, कुशीनगर, वैशाली आदि फिरत पाटलिपुत्राला आला. तेथें अशोकानें तयार केलेला महाल पाहून याला असे महाल मनुष्य बनवूं शकत नाहींत, हे असुरानें केले असले पाहिजेत, असें वाटलें. तीन वर्षे पाटलिपुत्रांत राहून यानें संस्कृताचें अध्ययन केलें. नंतर फिरत ताम्रलिप्ती येथें आला. तेथें दोन वर्षे राहिला. यात्रेंत पुस्तकें, ग्रंथ यांचा संग्रह करून समुद्रमार्गानें चीनला गेला.

हा चीन देशांत शानन्सी नांवाच्या प्रदेशांत उंयाङ्ग येथें जन्मास आला. हा तीन वर्षांचा असतांच याला बौद्धधर्माची दीक्षा देण्यांत आली व त्या वेळच्या पद्धतीप्रमाणें यास शाक्यपुत्र फाहियान म्हणूं लागले.

चवदा वर्षे हा भारतांत हिंडत होता. यानें लिहिलेल्या प्रवासवृत्ताचें महत्त्व ऐतिहासिक दृष्ट्या फार आहे. त्याचें हिन्दी, इंग्रजी, फ्रेंच वगैरे भाषान्तर झालें आहे. हिन्दी भाषान्तर जगन्मोहनवर्मा यांनीं केलें आहे.

**फार्मर**—( स. १७७९ ) तळेगांवच्या लढाईनंतर तह करण्याकरितां आलेला इंग्रज वकील.

**फालुदखाद ऊर्फ पोलादखान**—आग्रा येथें शिवाजी कैदेंत असतां त्यावर तीन महिने तोफखान्यासह पाहरा करणारा अधिकारी.

**फिर्दोसी**—( स. ९९८–१०३० सुमार ) हा एक प्रसिद्ध कवि होय. गझनीचा जो महमूद त्याच्या पदरीं हा होता व त्याच्याच आश्रयाखालीं हा प्रसिद्धीस आला. हा शाहानामा नांवाच्या इराणच्या प्राचीन राजवंशाचा काव्यमय इतिहासग्रंथाचा महाकवि. याचा जन्म खोरासानमधील तूस शहरीं झाला. याचा ग्रंथ फार्सी भाषेंत आहे, आणि तो आपल्या इकडील महाभारताप्रमाणें लोकप्रिय आहे. याच्या शाहानामा ग्रंथांत साठ हजार कविता आहेत. शेवटीं मात्र ठरल्याप्रमाणें साठ हजार सुवर्णमुद्रा देण्याचे ऐवजीं साठ हजार रौप्यमुद्रा देऊन महमूदानें याचा हिरमोड केला. त्या वेळीं यानें त्याच्या नीच कुलामुळें फिरलेल्या बुद्धीबद्दल तीव्र टीका करण्याकरितां लिहिलेल्या कवितेमुळें तर शाहानामा आणि महमूद यांचे संबंध कायमचे व अविस्मार्य झालेले आहेत. हल्लीं ही कविता शाहानाम्याच्या सर्व आवृत्तींवर प्रामुख्यानें छापलेली असते.

**फिलाडैलफस टाल्मी**—( राज्यकाल ख्रि. पू. २८५–२४७ ) मिस्र म्हणजे इजिप्त देशाचा राजा. याचा सरदार डायोनीसियस हा बिंदुसार मौर्याच्या दरबारांतील वकील होता.

**फिलिप्पोस**—हा शिकंदरचा एक सेनापति होता. याला त्यानें परत जातांना सिन्धूच्या पश्चिमेकडील भागाचा क्षत्रप नेमलें होतें. पण याचा पुढें खून झाला.

**फीरूज पूर्वी**—( स. १४६१ ) हा बंगालचा सुलतान. याची राजधानी गौंड.

**फीरूझखान**—( स. १४११ ) हा गुजराथचा सुलतान पहिला मुज्फरशाहाचा मुलगा. याला तातारखान, हैबतखान, सादतखान, शेरखान व फत्तेखान असे पांच भाऊ होते.

**फीरूझ लोदी**—( स. १४८६ सुमार ) हा लोदी घराण्यांतील मलिक बहरामचा मुलगा. याला सुलतानशाह, काला, मुहम्मद व मलिकख्वाजा असे चार भाऊ व शाहिनखान नांवाचा एक पुत्र होता.

**फीरूझशाह तुघ्लक**—( ज. स. १३०९ ) हा दिल्लीचा बादशाहा. हा तुघ्लक घराण्यांतील राज बसिपाहसालारचा मुलगा. याची आई रजपूत होती. यानें राज्यांत पुष्कळ सुधारणा केल्या. यानें राज्यांत शेतसारा ठरवून वसूल वाढविला. हा हिंदुधर्माचा फार द्वेष्टा होता. याला प्रथम घियासुद्दीनानें लहानाचा मोठा केला व नंतर मुहम्मद तुघ्लकानें यास चांगलें शिक्षण दिलें. यानें बंगालवर दोन स्वाऱ्या केल्या, व यमुनेचा कालवा बांधला. याचेकडे नजराणा पाठविणारा प्रत्येक प्रांतिक कामगार दहापासून शंभरांपर्यंत देखणे व धष्टपुष्ट गुलाम पाठवीत. हा गुलामांस शिक्षण देऊन त्यांना कामावर नेमी.

**फीरूझशाहा बाहमनी**—( मृ. स. १४२२ ) हा एक बाहमनी राजा. हा दाऊदखानाचा चुलतभाऊ शम्सुद्दीनास पदच्युत करून गादीवर बसला (स.१३९७). याच्या व हिंदु राजांच्या वरचेवर लढाया होत. यानें विजयनगरच्या देवरायाचा पराभव करून, त्यास अपमानास्पद तह करावयास भाग पाडलें, व त्याच्या मुलीशीं लग्न केलें. याचें परधर्मीयांशीं वर्तन कठोरपणाचें होतें. हा उदार होता. याचा शिक्षक मीर-फैज-उल्ला अंजू यास यानें वजीर केलें. यानें भीमेच्या काठीं फीरूजबाद नांवाचें शहर वसविलें. याच्यानंतर याचा भाऊ अहमदशाहखान खानान गादीवर बसला.

**फुफी**—( स. ७१२ ) दाहीरचा मुलगा. दाहीर मारला गेल्यावर यानें आरोरास राहून मुहंमदास तोंड देण्याची तयारी ठेविली होती. याची अशी समजूत होती कीं, दाहीर मेला नसून पुन्हां प्रयत्न करून पाहण्याकरितां तो कोठेंतरी अज्ञातवासांत असावा. मुहंमदानें याची खात्री करण्याकरितां दाहीरची राणी लादी, जिनें मुहंमदाशीं निका लावला होता, तीस याकडे पाठविलें. परंतु तिनें इस्लामी धर्म स्वीकारून पतीच्या शत्रूशीं लग्न लाविल्याबद्दल यानें तिची निर्भर्त्सना केली. पुढें फुफीची खात्री झाली कीं दाहीर खरोखरच युद्धांत कामीं आला. अशी खात्री झाल्यावर रात्रीचाच आरोरहून यानें पळ काढला.

**फुगाे**—( स. १७७० ) ऊर्दू कवि. ह्याचें मूळ नांव अशरकअलीखां असें असून हा अहंमदशाह बादशहाच्या पदरीं होता. परंतु अहमदशाहा अब्दालीच्या स्वारीनंतर यानें दिल्ली सोडली.

हा नदींबाचा शिष्य असून कांहीं दिवस सुजाउद्दौल्याजवळ होता. पण त्याच्याशीं याचें पटलें नाहीं. ह्यानें शेवटचें आयुष्य आजीमाबादेस घालविलें. यानें ऊर्दूचें श्रेष्ठत्व वाढवून एक दीवान लिहिला. हा हजरजबाबी असून मोठा बाणेदार होता ( क. कौ. भा. ४ था ).

**फेरिश्ता**—( स. १५७०–१६१४ ) याचें नांव मुहम्मद कासीम असें होतें. हा 'तारीख-इ-फेरिश्ता' या इतिहासाचा कर्ता होय. याचा जन्म कॅस्पिअन समुद्रकिनाऱ्यावर असणाऱ्या आस्त्रबाद गांवीं स.१५०० किंवा १५५० मध्यें झाला.

याच्या बापाचें नांव 'गुलाम अली हिंदु शाह' असें असून तो फार विद्वान् होता. गुलाम अलीनें हा अल्पवयी असतांना आपली मातृभूमि सोडली आणि प्रवास करीत करीत हिंदुस्थानांत आला. हिंदुस्थानांत आल्यावर अहमदनगरच्या मुर्तझा निजामशाहा १ ला यानें गुलामला आपला मुलगा मिरान हुसेन याला फार्सी शिकविण्याकरितां ठेविलें. पण लवकरच गुलाम मरण पावला आणि याचा आधार गेला.

स. १५८९ मध्यें मुर्तझा निजामशाहा १ ला मरण पावल्यावर हा ( फेरिश्ता ) विजापूरच्या दिलावरखानाकडे ( इब्राहिम आदिलशहा २ ऱ्याचा प्रधान ) गेला. दिलावरखानानें याचा स्वीकार करून याला आपल्या पदरीं ठेविलें. ज्या इतिहासामुळें याची प्रसिद्धि झाली, तो इतिहास यानें दिलावरखान याचे सांगण्यावरून स. १६१४ मध्यें लिहिला.

याच्या मृत्यूचा काळ अनिश्चित आहे. यानें आपल्या

ग्रंथाला ‘ गुल्शन-इ-इब्राहिमी ’ किंवा ‘ नौरसनामा ’ असें नांव दिलें आहे. ‘ गुल्शन-इ-इब्राहिमी ’ हें नांव ग्रंथ अर्पण केलेल्या राजाचें होय. पुढें ‘ गुल्शन-इ-इब्राहिमी ’ या ग्रंथाचा ‘ तारीख-इब्राहिमी ’ या नांवानें उल्लेख होऊं लागला.

याला इब्राहीम आदिलशाह व विजयनगरचे इतर राजे यांच्याकडून ऐतिहासिक साधनें पुरवलीं जात.

**फैज मुहम्मद**—भोपाळ संस्थानांतील जो यारमुहंमद त्याचा हा पुत्र होय. याचा वजीर हिंदु होता. हा विरक्त असल्यामुळें याचा दिवाण बाजीराम कारभार करीत असे. ह्याला पुत्रसंतान नव्हतें.

**फ्रान्सिस बर्नियर**—( स. १६५५-६७ ) युरोपियन प्रवासी. हा हिंदुस्थानांत आला त्या वेळेस दिल्लीस शहाजहान बादशहा राज्य करीत होता. हा स. १६५५ पासून ते स. १६६७ पर्यंत हिंदुस्थानांत होता, याची औरंगजेबाचा वजीर फज्लखानाशीं फार मैत्री होती, व यानें त्यास अनेक सुंदर लॅटिन ग्रंथांचीं भाषांतरें करून दिलीं. औरंगजेबानें राज्यप्राप्तीकरितां जीं कारस्थानें केलीं, त्या कारस्थानांचीं वर्णनें यानें युरोपांत गेल्यावर लिहून ठेविलीं ( मु. रि. भा. २, पान ३६९ ).

**फोंड सावंत**—( स. १६१५ सुमार ) हा मांग सावंताचा मुलगा होय. सावंतवाडीचा राज्यसंस्थापक जो खेम सावंत पहिला तो या फोंड सावंताचा मुलगा होय.

२. ( स. १६६५-७५ ) हा खेम सावंताचा पुत्र व लखम सावंतानंतर गादीवर आला.

३. (राज्यकाल स. १७०९-३७) हा दुसऱ्या खेमसावंतानंतर गादीवर आला. याला कोल्हापूरकर, आंग्रे व पोर्तुगीज यांच्याशीं लढावें लागलें म्हणून यानें इंग्रजांशीं तह केला ( स. १७३० ).

४. ( राज्यकाल स. १८०८-१८१२ ) यास तिसऱ्या खेम सावंताच्या दुर्गाबाई नांवाच्या पत्नीनें दत्तक घेतलें.

**फौलादखान**—( राज्यप्राप्ति स. १७७८-१८०७ सुमार ) हा भोपाळच्या हयात मुहम्मदाचा शिष्य. हा मूळ गोंड मागाहून मुसलमान झाला. यानें इंग्रजांशीं दोस्तीचा तह केला.

**फ्रँसिस**—कलकत्ता येथील वॉरन हेस्टिंग्सच्या कौन्सिलांतील एक कौन्सिलर. हा हेस्टिंग्सच्या विरुद्ध असे.

**फोंटबोना**—( मृ. स. १६२६ ) एक युरोपियन चित्रकार. हा विजयनगरच्या आरविदु घराण्यांतील दुसऱ्या वेंकटराय आरविदूच्या दरबारीं होता. यानें राजाचा स्वतःचा फोटो काढून देऊन, त्यावरोबरच येशूचें चित्र राजास नजर केलें. त्यामुळें राजा खूष होऊन त्यानें यास जरीचे कपडे बहाल केले.

---

## ब

**बक्काराय**—हा विजयानगरच्या हरिहरराय राजाचा भाऊ होय.

**बखतराम**—पेशवाईंतील उत्तम मूर्तिकार. पुण्यांतील खुन्या मुरलीधर, बेलबागेंतील विष्णूची मूर्ति, कुसंदवाडची मूर्ति इत्यादि प्रसिद्ध मूर्ती यानें केल्या.

**बखतबुलंद**—( मृ. स. १७०६ सुमार ) देवगडचा राजा. देवगडच्या गोंडराजांचा मूळ पुरुष जातवा, त्याचा मुलगा कोकशहा व त्याचा हा बखतबुलंद होय. कोकशहानंतर हा गादीवर बसला. याचें मूळचें नांव बखतशाहा. याचे भावांनीं याचे विरुद्ध बंड करून यास देवगडाहून हाकून दिलें. तेव्हां हा पळून औरंगजेबाकडे गेला. “ तूं मुसलमान होशील तर मी तुला मदत करतों, ” असें औरंगजेबानें सांगितलें. बखतबुलंद यानें निरुपायानें ती गोष्ट कबूल केली; पण पुढील अटी घातल्याः “ मुसलमान झाल्यावर मुसलमानांशीं रोटीव्यवहार करीन पण बेटीव्यवहार करणार नाहीं. गोंडांच्याच मुली करीन.” याप्रमाणें करार ठरल्यावर हा मुसलमान झाला व मदत घेऊन परत आला व आपलें राज्य परत मिळवलें.

हल्लीं नागपुरास बखतबुलंद याचा वंश आहे व आतांपर्यंत गोंडांशींच त्यांचे लग्नसंबंध होतात. लग्नविधि हिंदु व गोंडी पद्धतीनें होऊन नंतर मुसलमानी विधि करतात.

बखतबुलंद पराक्रमी निघाला. यानें उत्तरेकडून व पूर्वेकडून वऱ्हाडच्या सरहद्दीपर्यंत आपलें राज्य वाढविलें. नागपूर हें शहर ह्यानेंच वसविलें. राजापूर बारसा नांवाच्या बारा वाड्या होत्या त्या एकत्र करून रस्ते पाडून पेठा वसविल्या व तट बांधला. नागपूर हें नांव सुद्धां ह्यानेंच दिलें.

गव्याच्या नादीरशहावर दोघां पठाणांनीं आणलेलें संकट यानें मदत देऊन टाळलें. याचे नंतर याचा मुलगा चांदसुलतान गादीवर बसला ( ना. प्रां. इ. पा. २९ ).

**बखतावरसिंग**—( अलवार ) ( मृ. स. १८१५ ) अलवारचा राजा जो प्रतापसिंह त्याच्यानंतर हा अलवाऱ्च्या गादीवर आला. यानें आपला मुलूख जास्त वाढविला. मराठ्यांशीं झालेल्या लढाईत हा इंग्लिशांच्या बाजूनें लासवारीच्या लढाईत हजर होता.

**बच्याजी रघुनाथ मेहेंदळे**—( स. १७९१ सुमार ) हे बहिरो रघुनाथ मेहेंदळे म्हणून जे इंग्रज रेसिडेंट सर चार्लस मालेट ह्यांजकडे पेशव्यांच्यातर्फे वकील होते, त्यांचे धाकटे बंधु होते. हे पेशव्यांच्या वतीनें लॉर्ड कॉर्नवालीस ह्यांच्यावरोबर ( स. १७९१ सालीं ) टिपूच्या मोहिमेवर गेले होते. यांनीं ह्या मोहिमेसंबंधाचीं पुष्कळ बातमीपत्रें लिहिलीं असलीं पाहिजेत.

**बजाजी निंबाळकर**—( स. १६३९–१७०५ ) हा जगपाळाचा नातू आणि मुधोजीचा कनिष्ठ पुत्र होय. विजापूरचा इब्राहिम आदिलशाहा मृत्यु पावल्यानंतर निंबाळकरांनीं इतरांप्रमाणें दरबारचें सेवावृत्तीचें जूं बाजूस सारून मुलुखांत आवाडाव सुरू केली. परंतु विजापूरच्या लष्करानें मुधोजीचा पाडाव करून त्यास साताऱ्च्या किल्ल्यांत कैदेंत ठेविलें. त्या वेळीं बजाजी हा आपल्या बापाबरोबर दहा वर्षें अटकेंत होता. शहाजीच्या साह्यानें या बापलेकांची सुटका झाली, आणि यास पूर्ववत् फलटणची जहागीर मिळाली ( स. १६३९ ). बजाजीची बहीण सईबाई हिचें लग्न शिवाजीशीं ता. १६ मे १६४० रोजीं झालें.

मुधोजीनें फलटण संस्थान एकट्या बजाजीच्या नांवानें करून त्याप्रमाणें बादशाही सनदाहि आणविल्या ( स. १६४१ ). पुढें विजापूरकरांना निंबाळकरांपासून त्रास होऊं लागला, तेव्हां विजापूरकरांनीं निंबाळकरावर सैन्य पाठवून युद्ध सुरू केलें. त्यामध्यें मुधोजी मारला जाऊन बजाजीचा पाडाव झाला, आणि यास विजापुरीं नेण्यांत आलें ( स. १६४४ ). तेथें बादशहानें याला मारण्याचा हुकूम सोडला. पण मुसलमानी धर्म स्वीकारण्याचें कबूल केल्यावर याला जीवदान मिळालें. बादशहानें आपली मुलगी यास देऊन याची फलटणची जहागीर यास पुनः परत दिली. हा फलटणास परत आल्यावर ( स. १६५१ ) जिजाबाईनें यास आपल्या दर्शनास बोलाविलें व यास शुद्ध करून स्वधर्मांत घेतलें. याची मुसलमान बायको विजापुरीं मृत्यु पावली. परंतु कैद होऊन विजापुरीं जाण्यापूर्वीं याची धर्मपत्नी सावित्रीबाई म्हणून होती तिच्यापासून याला महादजी नांवाचा एक मुलगा झाला होता. सावित्रीबाई हा विजापुरीं असतांच मरण पावली म्हणून यानें फिरून दोन लग्नें केलीं. त्यांपासून यास गोरखोजी, वणगोजी व मुधोजी असे तीन मुलगे झाले. बजाजीनें शिवाजीस गुप्तरूपें पुष्कळ साह्य केलें. शिवाजीनें आपली मुलगी सखूबाई ही महादजीस दिली; आणि अशा रीतीनें बजाजीच्या धर्मांतराविषयीं कांहीं लोकांच्या मनांत जी मळमळ होती, ती नष्ट झाली. अफझलखान शिवाजीवर येतांना ( स. १६५९ ) त्यानें याला पकडलें आणि हत्तीच्या पायाखालीं देणार तों नाईकजी राजे पांढरे यांच्या मध्यस्थीनें ६० हजार होन देऊन मोकळें केलें ( प. सा. ७९६; १७९७ ).

बजाजीनें आपणास मिळावें म्हणून औरंगजेबानें स. १६६९ त यास पत्र लिहिलें, पण हा त्यास सामील झाला नाहीं. फलटणास याच्या नांवाचा एक घुमट आहे त्यास 'लांडेबजाजीचा घुमट' असें म्हणतात. बजाजी स. १७०५ पर्यंत जिवंत असल्याचें नमूद आहे ( रा. खं. ८.५३ ).

**बजावा पुरंदरे**—( स. १६६२– ) हा एक पेशवाईतील कर्तबगार पुरुष होय. याचा महिपत त्रिंबक या नांवानें उल्लेख करितात. स. १६६२ मध्यें जी व्यवस्था ठरविण्यांत आली होती, त्या व्यवस्थेप्रमाणें याला पेशव्यांचा मुतालीक नेमण्यांत आलें होतें ( म. रि. मध्यवि. ४. पृ. ३३ ). जेव्हां नानानें मोरोबास कैद केलें त्या वेळेस बजावा पुरंदरे त्याच्याच जोडीस कैदेंत गेला. पुढें यानें दादास चिथवण्याचें काम जोरांत चालविलें. हा एकदां म्हणाला कीं, "आम्ही मरून जाऊं, पण दीनवाणी होऊन नानापुढें करुणा भाकणार नाहीं." ( म. रि. उत्तर वि. १ ला, पृ. ११७, १३९ ).

**वज्र**—( स. १००४ ) उछचा राजा. उछला दहाव्या शतकांत भातिया म्हणत. महमूद गझनीनें जयपाळाविरुद्ध यास लढण्यास बोलावलें असतां हा गेला नाहीं, म्हणून त्यानें याच्यावर स्वारी केली. यानें जोराचा प्रतिकार केला, पण शेवटीं पळून जाऊन आत्महत्या केली. याचें शिर मुसलमानांचे हातीं पडलें. याच्या सैन्याची सरसहा कत्तल करण्यांत आली.

**बडीग चालुक्य**—( अरिकेसरिन् पाहा ).

**बदनसिंग जाट**—( मृत्यु स १७७५ ) याचा पुत्र सुरजमल्ल जाट. चूडामण जाट मृत्यु पावल्यावर याचा भाऊ मोहकमसिंहानें याला तुरुंगांत टाकलें व गादी

बळकाविली. पण यानें सवाई जयसिंगाच्या मदतीनें दीगचा किल्ला घेतला व 'दीगचा राजा' हा किताब मिळवला. याच्यामुळें गंगनगर येथें जोधपूरच्या अभयसिंगाशीं लढतांना जयसिंगाला यश मिळालें ( स. १७३९ ). हा फार शूर व कर्तबगार होता.

**बदाऊनी**—( अबदुल कादिर बदाऊनी पाहा ).

**बद्दिग राष्ट्रकूट**—( स. ९३७–३८ ) तिसऱ्या वर्षाचें नामांतर.

**बद्रद्दीन सुंकर**—( स. १२४०–१२४१ ) सुलतान मुइझुद्दीन बहराम यानें ऐतिगिनचा खून करवून बद्रुद्दीन सुंकर यास त्याची मुख्य वाकनिसाची जागा दिली. पुढें हा चढेलपणें वागूं लागला व शेवटीं यानें सुलतानाचा खून करण्याचा कट केला. परंतु मुख्य वजीर निजामुल्मुल्कनें ही खबर बहरामास दिली. तेव्हां बहरामानें यास प्रथम बडतर्फ केलें व नंतर तुर्की सरदारांत याचें वजन फार आहे म्हणून यास बुदौनचा सुभेदार नेमिलें. स. १२४१ मध्यें हा परवानगी न घेतां दिल्लीस आला. तेव्हां सुलतानानें बेशिस्त वर्तनाबद्दल ह्यास ठार मारिलें.

**बनबारी**—( स. १६३३–४३ ) एक हिंदी कवि. यानें जसवंतसिंगाचा वडील भाऊ अमरसिंह याची कथा फारच तेजस्वी भाषेंत वर्णिली आहे.

**बनसीपुरी गोसावी**—उदेपुरी गोसाव्याचा गुरु. याचा मठ साताऱ्यास होता ( ना. प्रां. इ. ).

**बनाजी माधव**—( निरंजन माधव पाहा ).

**बनारसीदास**—( जन्म स. १५८६ ) हा हिंदी कवि व जैन जव्हारी जौनपूरचा राहणारा असून याच्या बापाचें नांव खड्गसेन असें होतें. हा तरुणपणीं रंगेल व दुर्वर्तनी होता. परंतु उत्तर आयुष्यांत सुधारला. बनारसी-विलास, नाटक-समयसार, नाममाला अर्द्ध कथानक, बनारसी पद्धति, मोक्षपदी ध्रुव-वंदना, कल्याण मंदीर भाषा, वेदनिर्णय-पंचाशिका, मारगनविद्या वगैरे याचे ग्रंथ उपलब्ध आहेत. याची रचनाशैली भरदार आहे.

२. जहांगीर बादशहाच्या दरबारांतील एक मुत्सद्दी.

**बनुबाई गुजर**—ही दुसऱ्या रघूजी भोसल्याची मुलगी होय. हिला नाना गुजर यास दिली होती. हिचा मुलगा बाजीबा ऊर्फ बाजीराव यास बांकाबाईचे सल्ल्यानें ता. २५–६–१८१८ रोजीं परसोजी भोसल्याची बायको दुर्गाबाई हिच्या मांडीवर देऊन त्याचें नांव तिसरा रघूजी ठेवलें, व त्यास २६-६-१८१८ रोजीं गादीवर बसविलें ( ना. प्रां. इ., पा. ४८३ ).

**बप्पन कवि**—तेलंगी कवि. आंध्रप्रयोगरत्नाकर ग्रंथाचा कर्ता ( क. च. ).

**बप्पभट्टि**—( स. ७५१ ) कनोजच्या चक्रायुधाच्या दरबारांतील पंडित. यानें धर्मपालाचा पंडित वर्धनकुंजरचा पराभव केला.

**बयाबाई आपटे**—( जन्म स. १८४७ ) ही दुसऱ्या बाजीरावाची कन्या असून हिचा जन्म ब्रह्मावर्तास झाला. हिचें लग्न स. १८५५ सालीं ग्वाल्हेर येथील सरदार बाबासाहेब आपटे यांचे चिरंजीव रावसाहेब आपटे याच्याबरोबर झालें. परंतु रावसाहेब स. १८८३ मध्यें निवर्तले व यांना वैधव्यदशा आली. शेवटचें आयुष्य यांनीं परमेश्वरभक्तींत काशीला दुर्गाघाटावरील आपल्या वाड्यांत घालविलें. इंदूर दरबाराकडून यांस नेमणूक मिळत असे.

**बयाबाई भोसले**— ही पहिल्या रघूजीची आजी म्हणजे बापूजी भोसल्याची बायको होय. हिच्यापासून बापूजीस बिंबाजी, संताजी व राणोजी ऊर्फ सवाई संताजी असे तीन मुलगे झाले.

**बयाबाई रामदासी**—( स. १७०० सुमार ) रामदासस्वामींची शिष्यीण. हिंदी व मराठी कवयित्री. हिनें कांहीं आर्याहि केल्या आहेत. हिची हिंदी भाषा मराठीपेक्षांहि ठसकेदार आहे.

**बरीदशाही घराणें ( बेदर व अहमदाबाद )**—१ कासीम बरीद १ ला ( स. १४९२ ), २ अमीर अली बरीद ( स. १५४२ ), ३ अली बरीद ( स. १५४९ ), ४ इब्राहीम बरीद ( स. १५७९ ), ५ कासीम बरीद २ रा ( स. १५८६ ), ६ अमीर बरीद ( स. १५८९ ), ७ मीर्झा अली बरीद २ रा ( स. १६०१ ), ८ अली बरीद २ रा ( स. १६०९–१९ ).

**बर्क**—( स. १७२९–९७ ) हा एक इंग्रजांचा कर्तबगार पुरुष होय. हा इंग्लंडमध्यें राहत असे. दादानें याच्याकडे लष्करी मदत मागण्यासाठीं आपल्या हणमंतराव व मणियार पारशी या दोन वकिलांना इंग्लंडमध्यें पाठविलें होतें. बर्कनें त्यांची बरदास्त ठेवून, इकडून फौजेची मदत मिळणें शक्य नाहीं ( स. १७७९ ) अशा जबाबानिशीं त्यांस परत पाठविलें. त्यासंबंधाचें बर्कचें दादास आलेलें पत्र प्रसिद्ध आहे ( रा. खं. १२.–२२९–२३४ )

**बलदेव**—(स. ११६० सुमार) हा विज्जल कलचुरीचा

प्रधान. हा ब्राह्मणजातीचा होता. हा बसवाचा मामा असून यानें आपली मुलगी बसवाला दिली होती.

**बलभद्र**—अद्वैतसिद्धिकार मधुसूदनसरस्वती यांचा एक शिष्य. याच्या विनंतीवरून त्यानें श्रीशंकराचार्यांच्या दहा श्लोकांवर सिद्धान्तबिन्दु नांवाची टीका लिहिली, असें टीकेच्या शेवटीं लिहिलें आहे.

२. ( स. ९६६ ) एक ज्योतिषी. पृथूदकाच्या ब्रह्मसिद्धांतावरील टीकेंत याचें नांव आढळतें. भट्टोत्पलकृत बृहत्संहिताटीकेंतहि बलभद्राच्या नांवावर कांहीं श्लोक दिसतात. याचा स्वतंत्र ग्रंथ उपलब्ध नाहीं.

**बलभद्रमिश्र**—( जन्म स. १६००. कविताकाल स. १६४० ) एक हिंदी कवि. जात सनाढ्य ब्राह्मण. गांव ओर्च्छा. पिता काशीनाथ पंडित. हा प्रसिद्ध केशवदासाचा भाऊ. याचे ग्रंथ—नखशिखशृंगार, बलभद्रीव्याकरण, हनूमन्नाटक, दूषणविचार, भागवतभाष्य वगैरे. याची रचना प्रौढ व परिमार्जित आहे.

**बलवर्मा सोलंकी**—( स. ८९४-९९ ) हा सोरठच्या सोलंकींपैकीं अवनिवर्म्याचा पुत्र. यानें विषढाला जिंकलें आणि जज्जप वगैरे राजांना ठार मारून पृथ्वीवरून हूणवंश नाहींसा केला. यानें वलभी संवत् ५७४ ( वि. सं. ८५०, स. ८९४ ) माघ शु. ६ ला स्वतः पराक्रमानें संपादक केलेले ८४ गांव असलेल्या नक्षिसपुर ( सोरठ—काठेवाडांत ) प्रदेशांतील जयपुर गांव तरुणादित्य नांवाच्या सूर्यमंदिराला अर्पण केलें. हा कनोजच्या पडिहार राजा भोजदेवाचा पुत्र महेन्द्रायुध ( महेन्द्रपाल ) देवाचा सामंत आणि सौराष्ट्रांतील एका भागाचा राजा होता. याचा पुत्र अवनिवर्मा दुसरा होय.

**बलीभद्र शुक्ल**—( स. १६२३ ) कुंडतत्त्वप्रदीप या १५९ श्लोकांच्या ग्रंथाचा कर्ता. स्तंभसुतीर्थपत्तनचा राहणारा.

**बल्बन गुलाम**—( स. १२६६-८६ ) शम्सुद्दीन अल्तमशनें याला गुलाम म्हणून विकत घेतलें आणि वाढत जाऊन शेवटीं हा दिल्लीचा बादशहा झाला. याचें नांव बहाउद्दीन बल्बन किंवा घियासुद्दीन बल्बन किंवा उलुघखान. हा नासिरुद्दीन महमूदशाहानंतर त्याच्या इच्छेवरून तक्तनशीन झाला. घियासुद्दीन हें गादीवर बसतांना धारण केलेलें नांव होय.

अलाउद्दीन मसूदच्या वेळेपासून हा सारखा यशस्वी होत गेला. यानें गेलेला मुलूख परत मिळविल्यामुळें नासिरुद्दीन महमूदशाहानें याला आपली मुलगी देऊन जांवई केलें ( स. १२४९ ); आणि शेवटीं तर मुलगा नसल्यामुळें यालाच आपल्या गादीचें वारस बनवलें. मधल्या काळांत अनेक बरेवाईट प्रसंग येऊन हा पराक्रमानें निभावला होता. याला तुर्क व हिंदु यांच्याशीं सारखें झगडावें लागलें. दिल्लीच्या आसपास जंगल असल्यानें त्यांत राहून मिओ लोक दिल्ली शहरांत धुमाकूळ घालीत. त्याकरितां जंगल तोडून यानें मिओच्या कत्तली केल्या, आणि दिल्ली ते बंगालपर्यंत सर्व व्यवहार सुरळीत चालेल अशी व्यवस्था केली. शेरखान संकरला ठार केलें, बंगालच्या तुघ्रीलचें बंड स्वतः मोडलें आणि भयंकर कत्तल करून दहशत बसविली. रस्त्यानें व बाजारांत दोनहि बाजूंस शूळ उभारून लोकांना ठार केलें.

हा मोठा क्रूर होता. शरीरानें ठेंगू व कुरूप असे. भपकेबाज दरबार भरवून वजन पाडण्याची याची पद्धत असे. यानें लाखावर लोक कत्तल करून मारले. यानें जवळ पुष्कळ विद्वान् बाळगले होते. यानें शेतीची सुधारणा केली.

**बल्लाळ यादव**—( स. १२०० सुमार ) हा यादवांपैकीं अमरमल्लुगीचा पुत्र. याचा पुत्र जैतुगि किंवा जैत्रपाळ पहिला होय.

**बल्लाळ शिलाहार**—( स. १०७५ सुमार ) हा कोल्हापूर येथें राज्य करीत असलेल्या तिसऱ्या शिलाहार घराण्यांपैकीं मारसिंहाचा पुत्र व पहिल्या भोजाचा भाऊ. यानें पहिल्या भोजानंतर राज्य केलें.

**बल्लाळ सेन**—( स. ११५८-११७० ) हा सेन घराण्यापैकीं तिसरा राजा होय. हा पाल राजांचा द्वेष करी. हा स्वतः हुषार असून याच्या पदरीं संस्कृत पंडित होते. हा विजयसेनाच्यानंतर गादीवर आला. यानें चातुर्वर्ण्याची पुनर्घटना केली. यानेंच बंगालचे चार भाग पाडले असें म्हणतात. यानें मिथिला जिंकून आपल्या राज्याला जोडली.

यानें 'आचारसागर' आणि 'प्रतिष्ठासागर' असे दोन ग्रंथ लिहिले आहेत. यांशिवाय यानें 'दानसागर' हाहि एक ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथामध्यें दानाविषयीं सर्व माहिती आलेली आहे. शिवाय 'दानसागर' यामध्यें महाभारताविषयीं व पुराणांविषयीं अतिशय महत्त्वाची माहिती आलेली आहे. यानें पुराणांतील पुष्कळ उतारे घेतलेले आहेत. याचा 'अद्भुतसागर' हा अपूर्ण राहिलेला ग्रंथ याचा मुलगा लक्ष्मणसेन यानें पूर्ण केला. या ग्रंथाचा उल्लेख निर्णयसिंधु यामध्यें आलेला आहे.

रघुनंदन म्हणतो कीं, 'दानसागर' हा ग्रंथ याचा

( बल्लाळसेन ) नसून तो अनिरुद्धाचा होय. हा ग्रंथ बल्लाळानें आपल्या गुरूच्या ( अनिरुद्ध ) लक्ष्यानें लिहिला आहे, असा उल्लेख दानसागर याच ग्रंथांत आलेला आहे.

**बल्लाळ होयसळ**—( स. ११००-११०६ ) म्हैसूर प्रांतांतील द्वारसमुद्र येथें राज्य करणाऱ्या यादव घराण्यांतील विनयादित्याचा नातू व विष्णुवर्धनाचा थोरला भाऊ. हा ऐरेयंग याचा मुलगा. याचा दुसऱ्या प्रोलानें पराभव केला.

**२.** ( स. ११७३-१२२० ) होयसळ घराण्यांतील जो नरसिंह १ ला त्याचा हा मुलगा होय. हा स.११७३ मध्यें आपल्या बापानंतर 'महामंडलेश्वर' म्हणून राज्य करूं लागला.

स. ११८१ मध्यें यानें उच्छंगीस वेढा दिला आणि पांड्य राजा काम-देव यास पराजित केलें. पुढें स. ११९२ मध्यें यानें पश्चिम चालुक्याचा सेनापति बम्म ( बर्म-रस ) याचा पराभव केला. यानें स. १२२० पर्यंत राज्य केलें. यानें 'महाराजाधिराज' ही पदवी घेतली. याला वीर बल्लाळ असें म्हणतात ( B. ).

होयसळ घराण्यांतील एक राजा. याचा देवगिरीच्या यादव घराण्यांतील जैत्रपाल सिंघणानें पराभव केला.

**३.** ( स. १२९२-१३४२ ) हा होयसळ घराण्यांतील तिसऱ्या नरसिंहाचा पुत्र तिसरा बल्लाळ याला स. १२९२ मध्यें राज्याभिषेक झाला. मदुरेच्या घियासुद्दीन दामघानीनें यास त्रिचनापल्ली येथें ठार मारलें.

हा होयसळ घराण्यांतील बहुतेक शेवटचाच पण मुसलमानांच्या आक्रमणाचें संकट ओळखणारा आणि त्याला यशस्वीपणें तोंड देणारा राजा होय. कारण याच्यानंतर गादीवर आलेला राजा बल्लाळ ४ था हा नुसता नामधारीच राजा असून तो सुद्धां कांहीं दिवस गादीवर नव्हता.

याच्या वेळीं दिल्ली येथें खल्जी घराणें राज्य करीत होतें. स. १३१० मध्यें अलाउद्दीन खल्जीचा सेनापति मलिक काफूरनें याच्यावर स्वारी करून याची द्वारसमुद्र ही राजधानी काबीज केली आणि याला कैद करून दिल्लीस नेलें. पुढें तीन वर्षांनीं याची सुटका होऊन हा परत दक्षिणेंत आला. नंतर स. १३१६ मध्यें आपली राजधानी परत मिळविली. पुनः स. १३२६ त दिल्लीच्या मुसलमानांनीं दक्षिणेंत स्वारी केली. तेव्हां मुसलमानांच्या स्वाऱ्यांपासून आपला बचाव व्हावा म्हणून यानें आपल्या राज्याची उत्तरेकडील सरहद्द मजबूत करण्याचें ठरविलें. त्याकरितां स्वतःचें वास्तव्य उत्तरेकडे पाहिजे म्हणून राजधानीस योग्य असें स्थळ पाहण्याच्या उद्योगास हा लागला. पुढें कांहीं दिवसांनंतर हा एकदां तुंगभद्रेच्या तीरावरून चालला असतां एके ठिकाणीं ससा कुत्र्याचे मागें लागल्याचें दृश्य याच्या नजरेस पडलें. तेव्हां त्या जागेंत कांहींतरी विशेष असलें पाहिजे असें यास वाटल्यावरून यानें त्या ठिकाणीं आपली राजधानी स्थापन करण्याकरितां तेथें नवीन शहर वसविलें. उपलब्ध असलेल्या सर्व माहितीवरून असें दिसतें कीं, या नवीन वसविलेल्या शहराचे ठिकाणीं पूर्वीचें जुनें शहर अगर एखादें गांव नव्हतें. पण तेथें कदाचित् विरूपाक्षाचें देऊळ असण्याचा संभव आहे. या नवीन वसविलेल्या शहरास यानें आपल्या मुलाचें 'श्रीवीरविजयविरूपाक्षरूप' हें नांव ठेवलें. परंतु याच्या मुलाचें खरें नांव विजय असल्यामुळें त्यामध्यें नगर या शब्दाची भर पडून तें शहर 'विजयनगर' या नांवानें सर्वश्रुत झालें. स. १३३९ मध्यें हा विजयनगर येथें असल्याचा उल्लेख आला आहे.

याच्यावर एकसारख्या मुसलमानांच्या स्वाऱ्या होत होत्या, त्यामुळें याला आपली राजधानी सारखी बदलावी लागे. स. १२९९ मध्यें याची द्वारसमुद्र ही राजधानी होती. ती स. १३१८ त अरुणसमुद्र येथें नेली व लगेच पुनः स. १३१९ त द्वारसमुद्र येथें आणावी लागली. यानें पुढीलप्रमाणें आपल्या राजधान्या बदलल्या:

स. १३२८ मध्यें द्वारसमुद्र ( Ep. Carm. XII, Tm, 55 ). स. १३३० मध्यें विरूपाक्षपट्टण ( Ep. Carn. V, Ak, 66 ). स. १३३३ मध्यें होसवेट ( Ep. Carn. IX Ni, 9 ). स. १३३४ मध्यें द्वारसमुद्र ( Ep. Carn. IX Cn, 7 ). स. १३३९ मध्यें विजयविरूपाक्षरूप ( Ep. Carn. IX Ht. 43 ). स. १३४० मध्यें होसनाड ( Ep. Carn. IX DB, 13 ). स. १३४२ मध्यें उण्णामलेपट्टण ( Ep. Carn. IX Bn, 121 ). स. १३४२ मध्यें विरूपाक्षपाद ( Ep. Carn. IX Dv, 21 ). स. १३४३ मध्यें उण्णामलेपट्टण ( Ep. Carn. IX Bn, 41 ).

अशा प्रकारें याला मुसलमानांकडून त्रास झाल्यामुळें यानें उत्तर सरहद्दीवर मुसलमानांचे हल्ले परतविण्यासाठीं संगम घराण्यांतील पहिल्या हरिहराची नेमणूक केली व त्याला महामण्डलेश्वर ही पदवी बहाल केली. स. १३४२ मध्यें हरिहरानें उत्तरेकडे एकी करून मुसलमानांचे हल्ले परतविले. त्यामुळें याला समाधान वाटून यानें यापुढें निर्भयपणानें राज्य केलें. यानंतर यानें दक्षिणेकडील व पूर्वेकडील शत्रूंकडे आपला मोर्चा वळविला. परंतु स. १३४२ मध्यें हा मरण पावल्यामुळें याला त्यांचें

पारिपत्य करतां आलें नाहीं. नंतर याचा प्रधान हरिहर १ ला प्रबळ झाल्यामुळें विजयनगरच्या गादीवर आला. परंतु त्याच्यापूर्वी याचा मुलगा बल्लाळ ४ था हा स. १३४२ पासून १३४६ पर्यंत गादीवर होता. पण तो नुसता नामधारीच राजा होता. हरिहर १ ला हा संगम घराण्यांतील असल्यामुळें याच्यानंतर विजयनगर येथें संगम घराणें राज्य करूं लागलें.

याचा भाचा व मंत्री वल्लप्पास हरिहरानें आपली मुलगी दिली होती. याशिवाय इतर आधारांच्या साह्यानें होयसळ व संगम हीं घराणीं एकाच यादव घराण्याच्या शाखा आहेत, असें सिद्ध झालें आहे ( The Beginnings of Vijayanagara History by Rev. H. Heras S. J.; M. A. ).

तिसऱ्या बल्लाळानें ( होयसळ ) बसविलेल्या नवीन शहरांचा पुढीलप्रमाणें उल्लेख केलेला आढळतो.

विद्यानगर, कुञ्जरकोण, हस्तिनी, होसपट्टण, विजयनगर, हस्तिनीवति, विजय, विजयाचें नगर, विजयनगरी, हस्तिनपूर, हस्तिनति, विद्यानगरी, विजयानगरी, अनेगोंडी, हंपं-हस्ति-नावति, हम्पे, हम्पेंतील विद्यानगरी.

वरील नांवांनीं विजयनगरचा उल्लेख आराविदू घराण्याच्या शेवटच्या राजापर्यंतच्या लोकांनीं केलेला आहे ( The Beginnings of Vijayanagar History ).

संगम घराण्यांतील मूळ पुरुष जो संगम तो यादव घराण्यांतील होता ( Ep. Carn; III Ml, 121 ). संगमाचे पूर्वज केशवदंडनाथाच्या वंशांतले होते. यादववंशांतील कांहीं पुरुष यादवांचे मुख्य प्रतिनिधि म्हणून दक्षिणेंत राज्यकारभार करीत. पुढें याच प्रतिनिधींपैकीं सळ नांवाच्या वीरपुरुषानें एक वाघ मारल्यानें तो आपणास होयसळ असें म्हणवूं लागला. याच्याच वंशास पुढें होयसळ वंश असें नांव मिळालें. या सळ राजाचा प्रधान कशवदंडनाथ हा यादववंशांतील .होता असाहि उल्लेख होयसळांच्या लेखांत आला आहे. ज्या वेळीं होयसळ वंश सुरू झाला त्या वेळींच केशिराजाचा वंश सुरू झाला, असा निर्देश एका लेखांत आहेत ( Ep. Carn., V Cn, 244). यावरून यादवांच्या ज्या कांहीं शाखा दक्षिणेंत आहेत त्या सळ राजाच्या वंशज होत असें दिसतें. केशिराजाचे वंशज सुद्धां आपणाला होयसळ म्हणवीत असत. होयसळ घराण्यांतील शेवटचा राजा जो बल्लाळ ३ रा त्याच्या भाचाला संगम घराण्यांतील पहिल्या हरिहरची मुलगी दिली होती. हें लग्न तिसऱ्या बल्लाळ राजाच्या हयातींतच झालें. अशा प्रकारें होयसळांचे अन्तापर्यंत होयसळांचे व संगम घराण्याचे संबंध घडत असत ( The Beginnings of Vijayanagar History, pp. 78–93 ).

४. ( स. १३४२–४६ ) हा कर्नाटकचा राजा होता. स. १३४४ मध्यें कृष्णनायकानें ( प्रतापरुद्राचा मुलगा ) यास मुसलमानांविरुद्ध बंड करण्यास बोलाविलें. यास तें कबूल होऊन, यानें तावडतोब तट बांधून एक नवीन शहर वसविलें व त्यास 'विजयनगर' ( जयाचा देश ) हें नांव दिलें. नंतर मोठें सैन्य घेऊन वारंगळ येथें जाऊन तेथील मुख्य इमुदुल्मुल्क यास दौलताबाद येथें परत जाण्यास भाग पडलें. पुष्कळ हिंदु राजे यास मिळून, दक्षिण हिंदुस्थानांतून सर्व मुसलमान लोकांना पळवून लाविलें.

**बसव**—( स. ११६० सुमार ) कानडी कवि, व लिंगायत धर्माचा प्रचारक. हा कर्नाटकांतील इंगळेश्वराजवळील बागेवाडीस जन्म पावला. हिंगभट-संडिगेमादिराज हे याचे अनुक्रमें आजा व वडील होत. आई-मदांबिके. बहीण–नागांबिका. नागांबिकेचा पुत्र–चन्नबसव. याच्या मामाचें नांव बलदेव. हा आराध्य ब्राह्मण होता.

ग्रंथ—षट्स्थलवचन, शिखारत्नवचन, मंत्रगौप्य व कालज्ञानवचन.

याचा मामा बलदेव हा बिजलाचा ( स. ११५६–११६७ ) प्रधान होता. बलदेवाची मुलगी गंगांबिके ही बसवाची पत्नी होय. याला नीललोचने म्हणजे नीलम्म नांवाची दुसरी एक पत्नी दिसते. नीलम्मचेंहि कानडींत 'प्रसादसंपादन' व 'कालज्ञान' या नांवाचे दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. बलदेवाचा भाऊ सिद्दणमंत्री त्याची ही मुलगी होय. याचा पुत्र बालसंगय्य. हा जिवंत असतांच बालसंगय्य मृत्यु पावला. याला नंदीश्वराचा अवतार वीरशैव ग्रंथांत म्हणतात. बलदेवानंतर हाच बिज्जलचा मंत्री झाला व त्या जोरावर कर्नाटक व आंध्र देशभर वीरशैवमताचा प्रचार केला. याचा शेवटला ग्रंथ पदसंग्रहासारखा आहे ( क. क. च. भा. १, पा. १७४ ).

हा बिज्जल राजाचे वेळीं होता. परंतु बिज्जल राजा जैन मतांचा असल्यामुळें यानें बिज्जलाकडे आपल्या साथीदारास जैनाचा वेष देऊन पाठविलें. त्या साथीदारावरोबर यानें राजास विषारी फळें दिलीं होतीं. राजानें त्या फळांचा वास घेतांक्षणींच तो बेशुद्ध पडला. परंतु थोड्या वेळानें पुनः सावध झाला. सावध झाल्यावर त्यानें याला पकडून आणण्याची आज्ञा केली. तेव्हां राजाच्या भीतीनें हा पळून जाऊन यानें एका विहिरींत जीव दिला. याच्या

पश्चात् याचे बायकोनें विष ग्रहण केलें ( भांडारकर भा. ३, पृ. १३१ ).

**वसवलिंग**—( स. १६११ ) वीरशैव कवि. गुरु–चेन्नमल्लेश. ग्रंथ–शिवाधिक्यपुराण.

**वसवलिंग कवि**—( स. १६७९ ) कानडी कवि. पिता–गुरु नामधेय. गुरु–मलेय शांतेश्वर. षडक्षरदेव कवीचा समकालीन. ग्रंथ–कोट्टूरु वसवेश्वरपुराण, या ग्रंथांत कोट्टूरुच्या बसवेश्वर नांवाच्या शिवभक्ताचें चरित्र आहे ( कै. क. च. भा. २, पा. ५०० ).

**बहरामखान**—काश्मीरच्या मुसलमानी वंशांतील शाहीखानाचा हा मुलगा होय.

**बहराम गझनवी**—( स. १११८–११५२ ) हा गझनीचा सुलतान तिसऱ्या अलाउद्दौलाचा मुलगा. यानें संजराचे मदतीनें स. १११८ त अर्सलानचा पराभव गझनी येथें करून आपण तक्तावर बसला. याला गझनीच्या तक्तावरून दोनदां पळून जावें लागलें. शेवटीं हा गझनी येथें मरण पावला.

**बहरामशाह**—( स. १३३० ) बंगालचा सुभेदार.

**बहलूलखान**—( मृ. स. १६७३ ) विजापूरकरांचा सरदार. यानें प्रतापराव गुजराला ठार केलें. पण हंबीरराव मोहिते यांनीं याचा पराभव केला (अबदुल करीम पाहा). याला मु. रियासतींत बुहलूल असें म्हटलें आहे.

**बहलूल लोदी**—( राज्यकाल स. १४५१–८६ ) हा लोदी घराण्यांतील होय.

स. १४४१ मध्यें हा लाहोरचा सुभेदार होता. यानें प्रथम पंजाबप्रांत बळकावून मग स. १४५१ त दिल्लीचें तख्त मिळविलें. यानें त्यासाठीं तीन वेळीं दिल्लीवर स्वाऱ्या केल्या होत्या. पैकीं दोहींत याचा पराभव झाला. यानें आपल्या राज्याची मर्यादा वाढविली. याचा आजा मुलतानचा सुभेदार होता. यानें प्रथम सर्व पंजाबप्रांत हाताखालीं घातला. हा प्रांत मिळाल्यामुळें याच्या राज्याची मर्यादा वाढली. हा शूर व उदार होता.

**बहादुरशाह फारुकी**—( स. १५९७–१६०१ ) हा खानदेशच्या फारुकी राजा आदिलखानाचा किंवा अलीचा पुत्र. यानें बहादुरपूर नांवाचें नवीन शहर स्थापन करून, तेथें राज्य स्थापन केलें. अकबरानें याच्यावर स्वारी करून, यास कैद केलें व खानदेशचें राज्य खालसा केलें.

**बहादुरशाहा**—( स. १५२६–१५३६ ) हा मुज्फरशाहाचा दुसरा मुलगा. गुजराथचा सुलतान. हा उदार व दयाळु होता. यानें अहमदनगर लुटलें. यानें माळव्यांतील सुलतान मुहम्मद खल्जीस पकडून अहमदाबादेस आणलें ( स. १५२९ ). यानें चितोड जिंकला होता ( कर्णावती पाहा ). यानें पोर्तुगीजांवर फौज पाठवून त्यांचा पराभव केला. यास फिरंग्यांनीं भेटीस बोलाविलें असतां त्यांनीं समुद्रांत लोटून दिलें ( नायक वख्तु पाहा ).

२. ( खानजहान कोकलताश पाहा ).

३. ( मृत्यु स. १६९७ ) याचें खरें नांव मीर मलिक हुसेन असें असून हा औरंगजेबाचा दूधभाऊ होता. याला प्रथम बहादूरशहा ही पदवी बहाल करण्यांत आली. पुढें सात हजारीच्या पदावर असतांना खानजहान बहादुर कोकलताश झफरजंग हा किताब यास मिळाला. शिवाजीनें अहमदनगरापर्यंत स्वारी केली त्या वेळीं याची नेमणूक बादशहातर्फे दक्षिणेंत करण्यांत आली. परंतु दक्षिणेंत यश येईनासें दिसतांच त्याच्या बदलीं शहाजाद्यास पाठवून यास परत बोलावण्यांत आलें. पुढें कांहीं दिवसांनंतर पुन्हां याची दक्षिणेंतील सुभेदारी कायम करून सत्तर हजार फौजेनिशीं दक्षिणेंत पाठविण्यांत आलें. तरीहि महाराजांच्या फौजेपुढें टिकाव लागला नाहीं. तेव्हां गुप्त तह करून दोघांनीं विजापूरकरावर स्वारी करून त्यांचा पराभव केला. हा पुन्हां उत्तरेस जाऊन आला व मराठ्यांच्या मागें लागला. या वेळीं संभाजी गादीवर होता. याचा पराभव होऊन मराठ्यांचा नाद सोडणें यास भाग पडलें. पुढील ४० वर्षे बहादूरगडावर काढून स. १६७५ मध्यें यानें हैदराबाद शहर लुटलें. हा तारीख-ई–आसाम ही बखर लिहून १६९७ त मेला.

**बहादुरशाहा निजाम**—( स. १५९५–१६०० ) हा इब्राहीम निजामाचा पुत्र. चांदबीबीनें यास अहमदनगरच्या गादीवर बसविलें. मोगलांनीं याचा पराभव करून अहमदनगर जिंकलें व याला कैद केलें.

**बहादुरशाहा मोगल**—( स. १७०७-१२ ) हा दिल्लीचा बादशहा. हा औरंगजेबाचा वडील मुलगा. याचें मूळ नांव मुअज्जम ऊर्फ शहाअलम असें होतें. याच्या कारकीर्दीत शीखांनीं मोगलांविरुद्ध फारच उचल खाल्ली होती, व यानें त्यांचा योग्य बंदोबस्त केला. यानें कामबक्षावर स्वारी करून जय मिळविला ( स. १७०८ ). हा गादीवर येण्यापूर्वीं संभाजीवर चालून गेला होता पण पराभूत होऊन, हा परत अहमदनगरास गेला ( स. १६८४ ). औरंगजेबानें याला ' गोवळकोंड्यावर पाठविलें असतां, यानें तेथील राजास तुझा बचाव करीन ' असें वचन दिलें. हें औरंगजेबास कळल्यावर, त्यानें यास व याचे पुत्रास भेटीस बोलावून कैदेंत टाकिलें. पुढें हा कैदेंतून सुटल्यावर अफगाणिस्थानच्या सुभेदारीवर याची

नेमणूक झाली. याचे जवळ निकोलो मनूची हा व्हेनिसचा प्रवासी डॉक्टर होता.

**बहिणाबाई**—( समाधि स. १७०० ) हिचें माहेर वेरूळच्या पश्चिमेस देवगांवीं होतें. हिच्या पित्याचें नांव आऊदेव कुलकर्णी. माता जानकी. पित्याचें गोत्र मौनस. हिचा नवरा शिवापूरचा ज्योतिषी. त्याचें गोत्र गौतम. पाहिली बायको मेल्यावर तिसाव्या वर्षी हिच्याशीं त्याचें लग्न झालें. पण त्याला पुढें घर सोडून हिच्यासह भिक्षा मागत हिंडावें लागलें. पंढरपूर, शिंगणापूर, रहिमतपूर व कोल्हापूर असा यानें प्रवास केला. प्रवासांत जयराम गोसावी यांचीं कीर्तनें ऐकत राहत होते. तिथें हिला तुकोबांचे अभंग ऐकून तुकोबांच्या दर्शनाचा ध्यास लागला. पण तुकोबा-सारख्या शूद्राचा ध्यास हिच्या नवऱ्याला आवडेना. हिला सोडून जाण्याचेंहि त्यानें ठरविलें, पण ती गोष्ट घडून आली नाहीं. पुढें देहूस जाऊन तुकोबाचें यानें दर्शन घेतलें. तुकोबाचा अनुग्रह हिला पूर्वीच स्वप्नांत मिळाला होता. मंबाजी नांवाचा साधु देहूस राहत असे. त्याला शूद्र तुकारामाचें वाढत चाललेलें महत्त्व बिलकुल आवडत नसे. तो आपला द्वेष बऱ्यावाईट मार्गानें प्रगट करीत असे. त्याचा अनुभव हिलाहि आला. हिनें ७२ व्या वर्षी शिवपुर येथें आपला देह ठेवला ( श. १६२२ अश्विन शु. १ ). हिचा पुत्र विठोबा. यापूर्वीच्या बारा जन्मांची हकीगतहि हिनें आपल्या स्वतः अभंगरूपानें लिहिलेल्या आत्मचरित्रांत दिली आहे, आणि तेरावा जन्म बहिणा-बाई या नांवानें झाला. त्याचीहि देह ठेवीपर्यंतची माहिती हिनें आपल्या अभंगरूप चरित्रांत दिली आहे. त्यावरून असें वाटतें कीं हे हिचे आत्मचरित्ररूप अभंग हिच्या सांगण्यावरून किंवा आपल्या स्वतःच्या माहिती-प्रमाणें कोणीं तरी लिहिले असावेत. वर दिलेला समाधिशक हिचा पुत्र विठोबा यानें केलेल्या बहिणाबाईच्या आरतींत आढळतो. तुकारामबोवाचे नातू यांनीं लिहिलेल्या तुका-रामचरित्रांत बहिणाबाईची तुकारामावरील निष्ठा व स्वप्नांत अनुग्रह झाल्यापासून प्रत्यक्ष दर्शन झाल्याशिवाय अन्न न घेण्याची हिची प्रतिज्ञा, आणि हिनें अठरा दिवस उपवास करून एकोणिसावे दिवशीं देहू येथें दर्शन घेऊन पारणें केलें, इत्यादि हकीगत आढळते. बाईची गुरुपरंपरा अशी—आदिनाथशंकर—मत्स्येंद्रनाथ—गोरक्षनाथ—गहिनी-नाथ—निवृत्तिनाथ-ज्ञानेश्वर-सच्चिदानंदबावा-विश्वंभर-राघव-चैतन्य-केशवचैतन्य—बाबाजीचैतन्य—तुकाराम—बहिणाबाई. यांच्या उपलब्ध कविता श्री. उमखाने यांनीं पुस्तक-रूपानें प्रसिद्ध केल्या आहेत. यांचा 'ज्ञानप्रकाश' नांवाचा ग्रंथ आहे ( म. क. च. ६, पा. ९८–१६२ ).

**बहिरजी जाधव नाईक**—हा बहिरजी नाईक या नांवानें प्रसिद्ध असणारा शिवाजीचा सुप्रसिद्ध हेर. याच्या बातमीवरून शिवाजीनें ४ आक्टोबर स. १६७० रोजीं सुरत लुटली. ४५ कोटी होन व चार हजार घोडीं शिवाजीस मिळालीं ( सभा ६४ ).

**बहिरंभट**—( अहमदशाह निजाम बहिरी पाहा ).

**बहिरोपंत मोरेश्वर पिंगळे**—( स. १७०८–१७१३ ) हा नीळकंठाचा भाऊ होय. स. १७०८ मध्यें शाहूनें याला पेशवाईपद दिलें. कारण याचा भाऊ नीळकंठ हा स. १७०८ जानेवारीमध्यें वारला. हा स. १७१४ पर्यंत पेशवा होता. शाहु-ताराबाईच्या झगड्यांत अर्थात् हा शाहू-कडून होता. आंग्रे हे ताराबाईचे साथीदार होते. शाहूनें स. १७१३ च्या सुमारास यास फौज देऊन बंदोबस्ता-साठीं कोंकणांत पाठविलें, परंतु आंग्रे, यांनीं याचा पराभव करून यास कैदेंत ठेविलें. पुढें याची सुटका बाळाजी विश्वनाथानें केली. त्याच वेळीं पेशवाईपद याच्याकडून काढून शाहूनें बाळाजीस दिलें.

**बहीरनाक सेननाक**—पुरंदर किल्ल्याचें काम शेव-टास जाईना, म्हणून एक दिवस बादशहास दृष्टांत झाला कीं, आपली ज्येष्ठ सून व पुत्र या बुरुजांत बळी देऊं, तेव्हां याचें काम तडीस जाईल. तेव्हां बहीरनाक यानें आपला पुत्र नाथनाक व सून देवकाई यांस त्या किल्ल्याच्या बुरुजांत गाडलें, तेव्हां काम तडीस गेलें.

पुढें बहीरनाक यास त्याच किल्ल्याचा किल्लेदार नेमून त्यास दोनशें पांच होन दिले व दोन गांवें दिलीं.

बहीरनाक महाराच्या या अविचारानें त्याच्या घरा-ण्यास 'अविचारे' असें आडनांव पडलें. हल्लीं हें घराणें सासवड तालुक्यांत भिवंडी गांवीं बादशाही उत्पन्न खात आहे. अविचारे याचा मराठी उच्चार अवचरे असा सध्यां आढळतो.

**बहोरदास**—पंजाबामध्यें जे नामदेवाचे अनुयायी होते त्यांपैकीं हा एक होय. नामदेव प्रथम पंजाबांत गेला असतां तेंथें त्याच्या मतांचा पुरस्कार करण्यांत पुढारीपण यानें घेतलें होतें. पंजाबमधील नामदेवाच्या समाधीची पूजा व उत्सव हीं सर्व कृत्यें बहोरदासच स्वतः पुढाकार घेऊन करीत असे. हें विधान पंजाबमधील 'जन्मसाखी' ( एक जुनें चोपडें ) मध्यें केलें आहे ( मं. त्रै. ६, १–४. पृ. ९ ).

**बळवंत गणपत मेहेंदळे**—( मृत्यु, स. १७६० ) नानासाहेबांच्या विरुद्ध ताराबाई व दमाजी गायकवाड वगैरे असतांना ज्या मंडळींनीं दमाजीचा गेंड्याच्या माळावर पराभव केला त्यांत हा एक प्रमुख होता ( स. १७५१ ). यास स. १७५७ सालच्या स्वारींत पेशव्यानें मागें ठेवून दिलें तेव्हां यानें तिकडे स्वतंत्र उद्योग केला. कर्नाटकांतील भागावर स्वारी करून, होसकोटें, मुळबागल व कडपनाथ हीं ठाणीं काबीज केलीं. यानें अर्काटच्या नबाबाशीं ता. २४-९-१७५७ मध्यें युद्ध करून त्याचा पराभव केला व त्याचें कडपें शहर लुटलें. पुढें यानें म्हैसूरच्या स्वारींत बरीच मदत केली.

पानपतच्या घनघोर संग्रामांत हा सदाशिवराव भाऊच्या पक्षास होता. यानें पुष्कळ पराक्रम करून शेवटीं हा लढाईत ता. ७-१२-१७६० रोजीं गोळी लागून मरण पावला.

त्या वेळच्या परिस्थितीचें एक पत्र नाना फडणिसानें लिहिलेलें होतें. त्यांत नानानें याच्याविषयीं खालील उल्लेख केलेला आढळतोः

"ता. ७-१२-१७६० रोजीं बळवंतराव गणपत यास छातींत गोळी लागली. तसेच घोड्याखालीं पडले. तों त्यांजकडील माणसें धांवलीं. त्यांतील एकानें तोंडावर तरवारीचा वार केला. दुसऱ्यानें गळा कापून शीर नेऊं लागले, तों पांच सात राऊत धांवून सोडविलें. अर्धा गळा कापला होता, तसेंच आणून दहन केलें. समागमें स्त्रीनें अग्निप्रवेश केला."

**बळवंत माणकेश्वर चाफळकर**—( स. १८०२ सुमार ) हा रामदासी पंथाचा असावा असें दिसतें. यानें वटपूर येथें एक मराठी 'योगवासिष्ठसार' नांवाचा ग्रंथ लिहिला होता. हा वटपूरचा राहणारा असावा. ग्रंथांत तीन प्रकरणें असून एकंदर १०१ ओव्या आहेत ( मं. श. १८३६ वा. इ. ले. ५५ ).

**बळवंतराव धोंडदेव**—( मृत्यु स. १७८५ ) महादजी शिंद्यांचे सरदार. महादजी शिंद्यांच्या सरदारांपैकीं बळवंतराव हे एक प्रसिद्ध सरदार होते. ह्यांवर पाटीलबावांची मेहेरबानी असे. ह्यांचें नांव शिंद्यांकडील पत्रव्यवहारांत अनेक वेळां आढळून येतें. यानें स. १७८२ मध्यें चंदेरी घेतली. हे मथुरा मुक्कामीं ११ जुलै १७८५ रोजीं मृत्यु पावले. ह्यांस पुत्र नव्हता. सबब महादजी शिंदे यांनीं यांस दत्तक पुत्र दिला. त्याचें नांव रघुनाथराव ठेविलें ( ऐ. टि. भा. ४, पृ. ५४ ).

**बळवंतराव भवानी काळो**—हा भवानी काळोचा दुसरा मुलगा होय. हा बापाप्रमाणें शूर होता. यास दुसऱ्या रघूजीनें टिपूवरील दुसऱ्या मोहिमेंत पाठविलें होतें.

**बळवंतसिंग**—( मृत्यु स. १७७० ) बनारसच्या चेतसिंग राजाचा हा पिता होय. याच्या बापाचें नांव मनसाराम असें होतें. मनसारामानें बनारस येथें आपलें बस्तान बसविल्यावर स. १७३८ मध्यें जोनपुर, चुनार, व बनारस या परगण्यांची जहागीर मुलगा बळवंतसिंग याचे नांवानें बादशहापासून संपादन केली. त्याच वेळीं बळवंतसिंगास राजाबहादूर हा किताब मिळाला. स. १७३९ त बाप मरण पावल्यावर यानें बनारसजवळ गंगापुर येथें आपलें ठाणें केलें, आणि भागीरथीच्या दक्षिण कांठावर ठिकठिकाणीं किल्ले व गढ्या बांधून आपली मजबुती केली. अशा रीतीनें स. १७५४ मध्यें बनारसची जहागीर याचे नांवानें स्वतंत्र झाली; त्या वेळीं तिचें उत्पन्न ३५ लाख होतें. स. १७६३ त बादशहा व सुजाउद्दौला यांनीं बंगाल प्रांतावर स्वारी केली, तींत बळवंतसिंग त्यांस सामील झाला. परंतु 'बक्सार'चे लढाईंत बादशहाचा पराभव झाल्यावर बळवंतसिंगानें इंग्रजांचा आश्रय करून त्यांजकडून जहागिरीची सनद घेतली. पुढें बळवंतसिंग स. १७७० त मरण पावला आणि त्याचा मुलगा चेतसिंग जहागिरीचा कारभार पाहूं लागला ( म. रि. उत्तर वि. १ ला, पृ. ३५३ ).

**बहिरा पिसा**—प्रथम याचा गुरु चिंतामणि असून मुसलमानाचा पुनः हिंदु झाला तेव्हां याचा गुरु वडवानळचा नागनाथ झाला असें दिसतें ( मं. अहवाल शके १८३४ पा. ६६–७० ). हाच बहिरंभट जातवेद असावा. याची कुलस्वामिनी म्हाळसा. गोत्र कौंडिण्य. यानें केलेली भागवताच्या दशमस्कंधावरील टीका अर्धवट उपलब्ध आहे. ही टीका श्रीधराच्या आधारें केली आहे. हा मुसलमानाचा हिंदु झाला. वगैरे गोष्ट भक्तविजयांत दिली आहे (अ.४४). हा ज्ञानेश्वराचा समकालीन असावा.

**बंकेय**—( १ अमोघवर्ष पाहा ).

**बंदा**—( मृत्यु स. १७१६ ) शीखधर्मगुरु गोविंदसिंगाचा तोतया. गोविंदसिंगाच्या मृत्यूनंतर सुमारें दोन वर्षांनीं एक तोतया उत्पन्न होऊन आपण गोविंदसिंगच आहोंत असें प्रतिपादूं लागला व तोच तोतया 'बंदा' या नांवानें इतिहासांत प्रसिद्ध झाला. या वेळीं दिल्लीस बहादुरशाहा राज्य करीत होता. हा तोतया मूळचा कोण होता हें शेवटपर्यंत कोणासहि समजलें नाहीं. यानें प्रथम आपण गोविंदसिंगच आहों असें सांगून, एक पत्रक प्रसिद्ध केलें व त्यांत 'गुरु गोविंद-

सिंग जंबियाचे वारानें मृत्यु पावले; परंतु मरतांना त्यांनीं असें सांगितलें कीं लवकरच मी पुन्हां जिवंत होऊन शिखांचें राज्य प्रस्थापित करतों. म्हणून मी जिवंत होऊन स्वातंत्र्याचा झेंडा उभारतांच, सर्व शीख लोकांनीं या झेंड्याखालीं जमावें व परलोकीं मुक्ति प्राप्त करून घ्यावी.' व हें आज्ञापत्र सर्व शिखांत पसरविलें. तें आज्ञापत्र पाहतांच, सर्वत्र धर्मजागृति होऊन, याच्या झेंड्याखालीं दिल्लीपासून तीस मैल असलेल्या खरखोडा गांवीं पांचशें अनुयायी जमले, व नंतर अनुयायांची संख्या वाढत जाऊन, हा चाळीस हजार शीखांसह सरहिंदवर चालून गेला व तेथील सरदार वझीरखान मारला जाऊन, शिखांच्या ताब्यांत सरहिंद आलें. पूर्वी सरहिंद येथें मुसलमानांनीं मुसलमानेतरांवर जितके अत्याचार केले होते तितक्यांची बंद्याच्या शीख शिष्यांनीं सव्याज फेड केली. पण यांत विशेष हा होता कीं, मुसलमानांच्या मशिदी शिखांकडून न पाडतां मुसलमानांकडूनच पाडविल्या. या वेळीं मुसलमान लोक इतके घाबरून गेले होते कीं, त्यांनीं आपला धर्म सोडून नांवें बदलून शीख धर्माचीहि दीक्षा घेतली होती. पुढें यास कांहीं लढायांत अपयश आलें तरीहि, यानें चिकाटीनें आपला उपक्रम चालू ठेवला व मुखसिलसपूर येथें किल्ला बांधून त्यास लोहगड असें नांव दिलें व तेथें स्वतःस राज्याभिषेक करवून घेऊन 'सच्चा पादशहा' हें नांव धारण केलें. पण पुढें याचा हा धुमाकूळ फार दिवस न चालून शेवटीं स. १७१६ मध्यें अबदुस्समदखानानें याला पकडून ठेविलें व यास बजाविलें कीं, 'जर तूं मुसलमान होत असलास तर तुला जीवदान मिळेल, नाहींतर तुझा प्राण घेतला जाईल.' तेव्हां यानें मुसलमान होण्याचें नाकारून आपण मरणास तयार आहोंत असें सांगितलें. शेवटीं त्यानें याचा अत्यंत क्रूरपणानें वध केला.

**वंदी सुलतान**—(स.१७००सुमार) अबुल हसन कुतबशाहाचा मुलगा. हा औरंगजेबाच्या गोटांत राहत असे. दक्षिणी सरदार याला बादशहासारखा मुजरा करीत; म्हणून याला दरबार बंद करण्यांत आला होता.

**वंधनकवि**—तेलगू कवि. पालीगर राजांचा आश्रित कवि. याचा राजनीतीवरील ग्रंथ प्रसिद्ध आहे (क. च).

**वंधुपालित**—(दशरथ मौर्य पाहा).

**वंधुवर्मा**--(स.४३६) अज्ञात वंशीय विश्ववर्म्याचा पुत्र. याच्या वेळचा एक शिलालेख वि. सं. ४९३ (स. ४३६) चा मंदोसर येथें मिळाला आहे. त्यावरून हा पहिल्या कुमारगुप्ताचा सामंत असल्याचें दिसतें. याच्यामागें या वंशाची माहिती मिळाली नाहीं (फ्लीट गु. इं. पृ. ७४–७६).

२. एक वैश्य. हरिवंशाभ्युदय व नीतिवैराग्यपर दुसऱ्या एका ग्रंथाचा कर्ता.

**वंसीधर**—(काव्यकाल स. १७३५) एक हिंदी कवि. अहमदाबादचा एक ब्राह्मण. यानें 'अलंकाररत्नाकर' हा ग्रंथ दलपतिरायाच्या साहाय्यानें लिहिला.

**बाउक प्रतिहार**—(स. ८३७) मंदोरच्या प्रतिहारवंशांतील कक्काचा भट्टिवंशांतील महाराणी पद्मिनीपासून झालेला पुत्र. जेव्हां शत्रूचें अतुल सैन्य नंदावल्लाला ठार करून भूअकूप येथें आलें आणि आपल्या पक्षांतील द्विजनृपकुलांतील प्रतिहार राजे निघून गेले, तसेंच मंत्री आणि धाकटा भाऊ यांनींहि सोडलें, तेव्हां एकट्या बाउकानें घोड्यावरून उतरून तलवार हातांत घेतली आणि नवमंडलांतील सर्व समुदाय उधळून लावला, मयूर राजाला ठार केलें, त्याच्या लोकांना ठार केलें आणि मग आपली तरवार म्यान केली. ही वि. सं. ८९४ मधील जोधपूर-प्रशस्ति यांनींच खोदविली. ही लढाई कोणची?

**बांकाबाई**—(स. १७८१–१८५८) ही दुसऱ्या रघूजी भोसल्याची चवथी बायको. ही फार कारस्थानी असून आप्पासाहेबांचे वेळेस व नंतर प्रसिद्धीस आली. रघूजी भोसल्यानंतर त्याचा मुलगा परसोजी नागपूरच्या गादीवर बसला. तो वेडसर असल्यामुळें नागपूर संस्थानचा कारभार हिनें चालवावा कीं रघूजीचा पुतण्या आप्पासाहेबांनीं चालवावा याबद्दल तंटा सुरू झाला. प्रथम इंग्रज आप्पासाहेबांचे बाजूनें होते. तेव्हां हिनें स. १८१७ त सितावर्डी येथें त्यांच्याशीं लढाई केली. पुढें इंग्रजांनीं आपल्या भेदनीतीमुळें व रेसिडेंटाच्या गोड गोड भाषणांमुळें हिला पूर्णपणें आपल्या कह्यांत आणून नागपूरचें राज्य खालसा केलें. हिनें तें परत मिळविण्याची पुष्कळ खटपट केली, पण तिचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. पुढें इंग्रजांनीं जानोजीचा दत्तक मान्य करून त्याला व हिला कांहीं उत्पन्न चालू केलें. ही वयाचे ७७ व्या वर्षीं मरण पावली.

**बाचलादेवी**—ही पांड्य राजकन्या असून दुसऱ्या तैल कदंबाची पत्नी.

**बाजी कदम**—(स. १७०७) हा संभाजी निंबाळकराचा हस्तक होता. त्यानें यास मुद्दाम पुण्यास ठेवून दिलें. "शके १६२९ च्या वैशाख मासीं (मे १७०७) बाजी कदम व गुंडाबा नाईक सेखदार हे नबाब आसफजाकडील सरदार रंभाजी निंबाळकर यांजकडून

आले. त्यांनीं पुण्यांत अंमल बसवून ठाणें घेतलें. आठ वर्षे अंमल पुण्यास होता. " पुढें हा पेशव्यांच्या पक्षास मिळाला ( रा. खं. २ रा, पृ. २६ ).

**बाजी गंगाधर**—( बाजीपंत अण्णा जोशी ) हा पेशव्यांचा सरदार. कोंकणांत बेलापुराकडे होता.

**बाजी नाईक जेधे**—( जन्म स. १६२८–१७०० ) याचा जन्म शके १५५० कार्तिक व. ५ स झाला. हा कान्होजी नाईकांचा मुलगा. याच्या आईचें नांव सावित्रीबाई असें होतें. ही जन्माची तारीख ( जे. ) शकावलींत दिलेली आहे ( मं. त्रै. व. १०, १. ले. ४ ). याला शिवाजीनें सर्जेराव अशी पदवी दिली होती. हा शिवाजीबरोबर दिल्लीस गेला होता.

**बाजी पासलकर**—( स. १६४०–१७१७ ) हा पुणें जिल्ह्यांतील मुसें खोऱ्याचा देशमुख. मावळांतील देशमुखांचे वतनी तंटे मोडण्यांत हा प्रमुख असे. फलटणचा वणगोजी नाईक निंबाळकर माळव्यांतील ह्या देशमुखाची मर्जी संभाळून असे. देशमुखांस कर्जाबद्दल किंवा चांगल्या वर्तणुकीबद्दल जामीन राहून त्यांच्या उपयोगी पडत असे. अशा इभ्रतीचा बाजी पासलकर हा मावळा देशमुख शिवाजीस आढळतांच त्यास त्यानें हाताशीं धरलें. ज्या प्रमुख मंडळीचें शिवाजीस चांगलें पाठबळ होतें त्यांपैकीं बाजी हा एक होय. शिवाजीचें विजापूरकरांशीं युद्ध सुरू असतां शिवाजीनें एके समयीं ( स. १६६० ) बाजी पासलकर यास वाडीच्या सावंताचा बंदोबस्त करावयास सांगितलें होतें. तेथें यानें बराच पराक्रम केला. याचें नांव स. १६४०–१७१७ पर्यंत आढळतें. त्यानंतर तुळाजी व रामाजी यांचीं नांवें येतात. हे बहुधा त्याचे पुत्र असावेत.

**बाजी प्रभु देशपांडे**—( मृत्यु स. १६६० ) बाजीचा बाप पिलाजी. हा हिरडस मावळचा देशकुलकर्णी व कृष्णाजी नाईक बांदल हा देशमुख होता. या दोघांनीं मावळांत जबरदस्ती करून इतर देशमुखांकडून दाईते घेतले. बाजी हा नांवाजलेला वीर व दांडपट्टा वगैरेंत निष्णात होता.

कृष्णाजीच्या मागें त्याची बायको दीपाई हिनें देशपांडे घराण्याचा पूर्वापार घरोबा विशेषतः बाजीचा भाऊपणा जाणून आपला सर्व कारभार बाजीकडेच सोंपविला.

दादाजीच्या मृत्यूनंतर लगेच बाजीनें खास शिवाजीची भेट घेतली, व शिवाजीनेंहि आपल्या नूतन आरंभिलेल्या कार्यास या पुंड देशमुखांची सेना उपयोगांत आणण्याचें मानस धरून इनामाची व्यवस्था करून देऊन बाजीस व त्याच्या हाताखालील बांदलाच्या १०,००० सैन्यास मिळवून घेऊन आपल्या तैनातीस खास फौज म्हणून ठेविलें. कृष्णाजीनंतर बाजी हाच माणूस मावळांत जबरदस्त कर्ता समजला गेला व त्या प्रांतांत याचें चांगलें वजन वाढलें.

यानें शिवाजीच्या पडत्या काळांत अतिशय मदत केली. स. १६६० त मोगल, आदिल, सिद्दी, सावंत वगैरेंनीं शिवाजीला चोहों बाजूंनीं कोंडून टाकण्याचा व त्याचें महाराष्ट्रांतून उच्चाटन करण्याचा बेत केला व त्याच्यावर सर्व बाजूंनीं चढ केली. त्या वेळीं ह्यानें आपल्याकडून शिकस्त करून शिवाजीस बराचसा धीर दिला, व शेवटीं यानें छत्रपति शिवाजीसाठीं घोडखिंडीमध्यें शत्रूंशीं लढतांना आपला प्राण सोडला ( १३ जुलै स. १६६०–शके १५८२ ). राहिलेल्या मावळे लोकांनीं मोठ्या आनंदानें शत्रूच्या अफाट सैन्याला धीरानें व निकरानें तोंड देत देत याचें शव रांगण्यावर नेलें.

**बाजी भिवराव रेटरेकर**—( मृत्यु स. १७३९ जाने. ८ ) हें देशस्थ घराणें पेशव्यांचें ऋणानुबंधी होतें. भिवराव रेटरेकर व बाळाजी विश्वनाथ यांचा स्नेह होता. बाजी हा पेशव्यांचे सैन्यांत एक पथकी होता. याचा पुत्र बापूजी बाजी नानासाहेबांच्या वेळीं अनेक कामगिरींवर होता. नानासाहेबांच्या विरुद्ध ताराबाई व दमाजी गायकवाड वगैरे असतां ज्या मंडळींनीं दमाजीचा गेंड्याच्या माळावर पराभव केला त्यांत तो प्रमुख होता (स. १७५१).

पौष वद्य ११ रोजीं हा तारापूरच्या हल्ल्यांत मारला गेला ( रा. खं. ३ अ. १६७ ).

**बाजी महादेव प्रभु देशपांडे**—( स. १७०९–९९ सुमार ) हा अठराव्या शतकांतील एक प्रमुख वीर असून महादजी रघुनाथ देशपांडे तर्फ मुठें खोरें यांचा पुत्र होय. याच्या आईचें नांव यशोदाबाई असून ह्याचा जन्म उरवडें गांवीं झाला. हा त्या वेळच्या युद्धविद्येमध्यें चांगला निपुण असून ह्याचें अक्षरहि फार चांगलें होतें. ह्याचा बाणेदारपणा पाहून पेशव्यांनीं प्रथम ह्यास १० स्वारांची व नंतर २५ स्वारांची शिलेदारी दिली.

स. १७५२ मधील बाळाजी बाजीरावाच्या औरंगाबादेवरील मोहिमेंत, स. १७५३ मधील नानासाहेबांच्या कर्नाटकावरील स्वारींत, स. १७५८ च्या अटकेवरील स्वारींत, स. १७६३ मध्यें थोरले माधवराव ह्यांनीं निजामावर केलेल्या स्वारींत, व स. १७७५ सालीं मुधोजी भोंसल्यावर मोगलांनीं स्वारी केली असतां मोगलांविरुद्ध केलेल्या लढाईंत ह्यानें फार पराक्रम करून दाखविला. नंतर नारायणरावाचे खुनानंतर पेशवाईंत राहणें बरें न

वाटून यानें बडोद्याचे गायकवाडाचे पदरीं नोकरी धरली. गोविंदराव गायकवाडास गादी मिळवून देण्याचे कामीं यानें मदत केली होती, तेव्हां त्यानें कृतउपकार स्मरून ह्यास फौजेंत सरदारी दिली.

पुढें स. १७९३ सालीं मानाजी गायकवाड मृत्यु पावले व गोविंदराव पुण्यास गेले. ही संधि पाहून गोविंदरावाचा पुत्र कान्होजी ह्यानें गादी बळकावली व कडींच्या मल्हाररावाच्या मदतीनें ६० हजार फौज जमवली. ह्या कठीण प्रसंगीं युक्तीनें बाजी प्रभू ह्यांनीं मल्हारराव व कान्होजी यांजमध्येंच भांडण लावून दिलें. तेव्हां कान्होजी सातपुड्याकडे पळाला व आपला निभाव लागत नाहीं हें पाहून मल्हाररावानें गोविंदरावाशीं तह केला. अशा तऱ्हेनें बाजी प्रभूंनीं आपली मुत्सद्देगिरी लढवून मोठ्या युक्तीनें लढाईचा प्रसंग टाळला. अशा रीतीनें गायकवाडी राज्यामध्येंहि आपलें शहाणपण व बुद्धिचातुर्य व्यक्त करून, बाजी प्रभू यांनीं बडोदें येथें चांगला लौकिक मिळविला.

**बाजी मोरेश्वर**—हा देशस्थ ब्राह्मण, उपनांव वाघ कीं कोकणस्थ भावे, रामशास्त्र्याचा शिरस्तेदार मोरेश्वर हरि याचा मुलगा हें समजत नाहीं. स. १७९१ मध्यें रघुनाथ चिमणाजी सचीव वारला आणि त्याचा पुत्र शंकराजी हा गादीवर बसला. त्याच्या सावत्र आईच्या सांगण्यावरून नानानें यास कारभारी नेमून पाठविलें. हरिपंत फडक्यांनीं व सचीवांनीं याजविषयीं नापसंती दाखविली, पण नानानें तिकडे लक्ष दिलें नाहीं, आणि सचीवाचे जुने सर्व लोक बदलून आपले मार्फतीचे लोक ठेविले. नंतर सचीव जेजुरीस असतांना त्यांजवर नानानें गारदी वगैरे सरंजाम देऊन ह्यास रवाना केलें. तेथें दोघांची लढाई होऊन सचीवास व सखाराम बापूच्या कन्येस जखमा झाल्या आणि त्यांचें सर्व वित्त लुटून नेलें. नानास ही गोष्ट कळतांच त्यानें तिकडे कानाडोळा केला. परंतु महादजीनें चौकशी करून हा अपराधी असल्याचें सिद्ध केलें व यानंतर बाजी मोरेश्वर व त्याचे साथीदार यांस कडक शिक्षा झाल्या. नानाचा लांचखाऊपणाहि या प्रकरणामुळें सिद्ध झाला ( म. रि. उ. वि. भा. २, पृ. ३९५–४०२ ).

**बाजीराजे घोरपडे**—( जन्म स. १६०५–१६६४ ) बाजी घोरपडे व शिवाजी भोसले हे मूळ एकाच कुळांतील भाऊबंद असून अस्सल रजपूत होत. भोसले व घोरपडे घराण्यांचा मूळ पुरुष जो सज्जनसिंह हा राज्यलाभ न झाल्यामुळें नाखुष होऊन दक्षिणेंत आला ( स. १३३४ च्या सुमारास). सज्जनसिंहाच्या वंशांतील भैरवजी नांवाचा कोणीएक मनुष्य होऊन गेला (१३९७ सुमारास). या भैरवजीसच भोसाजी म्हणत आणि त्यावरूनच भोसले नांव रूढ झालें असावें. सन १४६० पर्यंत या भोसले कुळांतले कर्णसिंह व शुभकृष्ण हे भाऊ एकत्र होते. पण ते फुटून स. १४६९ च्या सुमारास कर्णसिंहानें आपल्या भीमसिंह नामक मुलासह कोंकणांतील एक असाध्य पहाडी किल्ला 'घोरपड' लावण्याची युक्ति लढवून जिंकला व 'राजे घोरपडे बहाद्दर' हा किताब मिळविला, म्हणून तेथपासून त्यांचें व त्यांच्या वंशजांचें आडनांवच घोरपडे पडलें. शुभकृष्णाचे वंशज भोसलेच राहिले. तेव्हां शुभकृष्ण हा शिवाजीमहाराजांच्या भोसले कुळाचा मूळ पुरुष होय.

याचा जन्म स. १६०५ मध्यें झाला असून हा विजापूरच्या आदिलशाहीचा नोकर होता. याच वेळीं भोसले घराण्यांतील शहाजी हा निजामशाहीचा नोकर होता. आणि निजामशाही व आदिलशाही यांच्यांत वितुष्ट असल्यामुळें बाजी घोरपडे व शहाजी यांची समरांगणांत खणाखणी झाली. पुढें जिंजीचा वेढा चालू असतां या बाजी घोरपड्यानें शहाजीस कैद केलें. पुढें अफजलखानाबरोबर आलेल्या विजापुरी सरदारांत घोरपडे होताच. अखेर स. १६६४ सालीं शिवाजीचें कोंकणांत खवासखानाशीं युद्ध चालू होणार होतें, तेव्हां बाजी घोरपडे रसद व फौज घेऊन खवासखानाच्या मदतीस जाण्याच्या तयारींत असतां, शिवाजीनें याच्यावर ( बाजी घोरपड्यावर ) अचानक हल्ला केला. तेव्हां फार मोठें रण होऊन त्यांत बाजी घोरपडे मारला गेला.

याचा मृत्यु सन १६६४ असून मृत्युसमयीं हा ५९ वर्षांचा होता. हा पुरुष आपल्या इतर पूर्वजांप्रमाणेंच विलक्षण शौर्यशाली व एकनिष्ठ सेवक होता ( चित्रमय शिवाजी, भाग १ ला, पृ. ६८ ).

**बाजीराव गुजर**—( ३ रघूजी भोसले पाहा ).

**बाजीराव गोविंद बर्वे**—हा राघोबादादाचा मेहुणा होय. स. १७५७ त हैदराजवळ जी मंडळी ( मराठे सरदार ) होती त्यांत हाहि होता. हा दादाचा कट्टा अभिमानी होता. पुढें नानानें हैदराशीं तह केला, तेव्हां बाजीरावास हैदरानें स. १७८० च्या मे महिन्यांत आपल्याजवळून काढून लाविलें, तेव्हां हा पुनरपि दादाजवळ सुरतेस गेला. तेथून स. १७८१ चे आरंभीं दादानें यास महेश्वर येथें अहल्याबाईचे आश्रयास पाठविलें. महेश्वरीं आल्यावर बाईनें यास कांहीं दिवस सन्मानानें वागविलें. परंतु तेथें याचीं घोडीं, जवाहीर वगैरे

जळून वाताहत झाली. त्यामुळें फौज बाळगण्याची सोय राहिली नाहीं. बर्वे महेश्वरास आल्याचें नानास समजतांच त्यानें बाईकडे माणसें पाठवून बर्व्यास पुण्यास पाठविण्याबद्दल तगादा लाविला. तेव्हां बर्व्यानें बाईस विनंति केली कीं, 'आम्हांस पुण्यास पाठवूं नका. एक वर्षभर आमची निष्ठा पाहून मग आपल्या विद्यमानें पक्का बंदोबस्त पुणेंकरांशीं करून विदा करावें.' प्रथम बाईनें यास बरेंच ताणलें, पण मागाहून तो गयांवयां करूं लागल्यावर एक दोन वर्षे तिनें यास आपणाजवळ बंदोबस्तानें ठेविलें. एक वेळ बाईनें यास पुण्यास जाण्याची निकड केली, परंतु हा ऐकेना. 'आपण पुण्यास जिवंत जाणार नाहीं, प्रेत रवेपार करावें.' असें यानें उत्तर केलें. अहल्याबाईनें नानाकडे मध्यस्थी करून तीनचार हजार रुपयांचा गांव द्यावयाचा करार ठरवून यास आदरानें निरोप देऊन पुण्यास पाठविलें. पुढें आणखी खटपट किंवा दंगे करण्याची बर्व्याची उमेद होती. महेश्वर दरबारच्या वातमीपत्रांतील भाग २ चे अं. २७–३५ वगैरे कित्येक लेख बाजीराव बर्व्याचा स्वभाव दाखविण्याजोगे आहेत. हा स. १८०८ मध्यें मरण पावला (म. रि. उत्तर वि. ३).

**बाजीराव बल्लाळ पेशवे**—(जन्म स. १७०० आगष्ट १८, कारभारकाल स. १७२०–४०) हा बाळाजी विश्वनाथ पेशव्यांचा वडील पुत्र. याचें दुसरें नांव विसाजी असें होतें. याचा जन्माचा सन पटवर्धनसंग्रहांतून दिला आहे (मं. त्रै. १६. ३). याचें लग्न स. १७१३ चे सुमारास चासकर महादजी कृष्ण जोशी यांची मुलगी काशीबाईशीं झालें.

स. १७१३ त दमाजी थोरातानें बाळाजीस अडकवून ठेविलें होतें. त्या वेळीं हाहि त्याजबरोबर होता. सय्यदांचे मदतीस दिल्लीस गेला असतांहि हा त्याजबरोबर होता (स. १७१८–१९). तेथून परत आल्यावर याची रवानगी खानदेशांत सय्यदांचे मदतीस झाली. बाळाजीच्या हयातींतच याची हुषारी शाहूनें पाहिल्यामुळें, कोणाचेहि विरोधास न जुमानतां यास बाळाजीचे मृत्यूनंतर लौकरच पेशवाईचीं वस्त्रें दिलीं (ता. १७ एप्रिल १७२०).

याचे कारकीर्दीचे, पहिला ११ वर्षांचा व दुसरा ९ वर्षांचा असे दोन खंड पडतात. बाळाजीनें आरंभिलेला उद्योग यानें पुढें चालविला. परंतु त्यांत याला दरबारी मंडळीचा व खुद्द शाहूचाहि अडथळा होऊं लागला. निजाम, मराठी राज्यांतील सरदारांत दुही वाढवूं लागला. त्यामुळें प्रथम त्याची खोड मोडणें यास भाग पडलें. या कामीं याचीं पहिलीं ११ वर्षे गेलीं व त्यांत यानें कर्तबगारी दाखवून शाहूचा विश्वास संपादन केला (स. १७३१). निजामाबरोबरच यानें कोल्हापूरकर संभाजी, चंद्रसेन जाधव, त्रिंबकराव दाभाडे यांचाहि बंदोबस्त केला. नंतर पुढील नऊ वर्षांत यानें चौथाई व सरदेशमुखीच्या नांवाखालीं माळवा व गुजराथ हाताखालीं घातला. नादिरशाहाची स्वारी व स्वतःचें अल्पायुष्य ह्या दोन गोष्टी नसत्या तर दिल्लीस बाजीरावाच्या हयातींतच मराठ्यांचें वर्चस्व प्रस्थापित झालें असतें.

निजाम बाळापूरच्या लढाईंत जय पावल्यानें दक्षिणेंत सुभेदार होऊन आला (स. १७२० ऑगष्ट). परंतु सय्यदास मदत करायची ठरल्यामुळें पेशव्यांनीं त्यास अडविण्याचा प्रयत्न केला. नंतर शाहूच्या सल्ल्यानें यानें साखर्ड्यास निजामाची भेट घेतली. ह्या भेटीपासून कांहींहि फलप्राप्ति न झाल्यामुळें यानें त्याच्या मुलुखांत उपद्रव सुरू केला. भडवुंज्या मोगल वगैरे मंडळींचा यानें याच वेळीं पराभव केला (स. १७२०–२१). नंतर बऱ्हाणपूरच्या सुभेदारावर माळव्यांतून आलेल्या दाऊदखानाचाहि यानें मोड केला. याच लढाईंत मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे पुढें आले.

नंतर स. १७२१–२४ या तीन सालांत यानें पवार, शिंदे व होळकर यांच्या करवीं माळवा, बागलाण व खानदेश हे प्रांत थोडे थोडे हस्तगत केले. माळव्यावर तर याच्या तीन स्वाऱ्या झाल्या होत्या. माळव्याचा मोगली नायब सुभेदार राजा गिरिधर होता, आणि त्याच्यावर सवाई जयसिंग सुभेदार होता. परंतु गिरिधर जयसिंगाचे विरुद्ध वागे म्हणून जयसिंगानें नंदलाल मंडलोई याचेमार्फत मराठ्यांस माळव्यांत आणलें. चिमाजीआपानें प्रथम गिरधर बहाद्दरास आणि नंतर एक महिन्याच्या आंत दयाबहाद्दरास आमझरा येथें ठार करून माळवा हस्तगत केला (डिसेंबर स. १७२८; पे. द. १३. १५-१६). बाजीरावानें राज्याची व्यवस्था (वसुलाची व फौजेची) बाळाजीनें घालून दिल्याप्रमाणें कडकपणें अमलांत आणिली, व जुनी बचावाची पद्धत सोडून चढाईचें धोरण स्वीकारलें. यामुळें माळव्यांत यास आपल्या कार्यक्रमाची जागा करावी लागली. या वेळीं मोगल बादशाही दुर्बल असल्यामुळें एकदम चढाई करून तेथें मराठ्यांचें वर्चस्व स्थापावें व तसें केल्यानें घरची भांडणें आपोआप मिटतील असें याचें स्फूर्तिदायक मत होतें. परंतु प्रतिनिधि वगैरे दुसऱ्या पक्षाचें म्हणणें याचे विरुद्ध होतें. अखेर बाजीरावाचेंच म्हणणें शाहूला कबूल करणें भाग पडलें.

कर्नाटकांत फत्तेसिंग व प्रतिनिधि यांस शाहूनें खंडणी वसूल करण्यासाठीं धाडलें असतां बाजीरावहि त्यांचेबरोबर होता. परंतु हा त्या वेळेस फत्तेसिंगाच्या हाताखालीं होता ( स.१७२५–२७ ). यापुढें विरोधी पक्षाचे त्रासानें कर्नाटकांत लक्ष न घालतां यानें आपलें लक्ष उत्तरेकडे वळविलें; पण यामुळें इकडे निजामानें फारच बंडाळी आरंभिली. तो चौथाई देईना व कोल्हापूरकर संभाजीस शाहूविरुद्ध उठवून, 'तुम्हीं आपसांतील तंटा मोडा, मग खऱ्या मालकास चौथाई देईन' असें त्यानें शाहूस कळविलें. तेव्हां शाहूनें बाजीरावास निजामावर पाठवलें. या वेळीं गनिमी काव्यानें न चालल्यानें उघड लढाई देऊन अखेर निजामाचा पालखेड येथें यानें पराभव केला (स.१७२७ दसऱ्यानंतर ). निजाम जेरीस येऊन त्यानें मुंगी येथें तह केला ( ता.१०–३–१७२८ ). औरंगजेबाच्या हाताखालीं तयार झालेल्या निजामासारख्या कसलेल्या सेनापतीचा बाजीरावानें पराभव केल्यामुळें याचा बराच लौकिक झाला. पुढें संभाजीतर्फे शाहूचे राज्यांत बंडाळी करणाऱ्या उदाजी चव्हाणाचाहि यानें बंदोबस्त केला.

स. १७२९ च्या मार्च महिन्यांत बाजीराव बुंदेलखंडांत छत्रसालच्या मदतीस गेला व ता. ३० मार्च रोजीं यानें मुहम्मदखान बंगश याचा जैतपुरी येथें पराभव केला व ४ मे रोजीं कायमखा बंगष याचा पराभव करून हा जुलैस साताऱ्यास परत आला. येथून पुढें बाजीरावाकडे सर्व हिंदुस्थानचें लक्ष वेधूं लागलें.

कांहीं दिवस पुणें सुपें येथें राहून ( आगष्ट–फेब्रु. ) यानें उंब्रेज येथें कोल्हापूरकरांशीं लढाई दिली ( स. १७३० फेब्रु. ).

गुजराथेंतील चौथाईवसुलीचें काम प्रथम दाभाड्यांचें होतें. तें बाजीरावानें आपल्याकडे घेतल्यानें त्रिंबकराव दाभाडे नाराज झाला, व तो संभाजीस आणि निजामास मिळाला. अखेर बडोद्याजवळ डभईस दोघांचें युद्ध होऊन त्रिंबकराव मारला गेला ( स. १७३१ एप्रिल ). यानंतर बाजीराव व निजाम यांची सुरतजवळ दमण येथें लढाई होऊन तींत निजामाचा पराभव झाला ( लेटर मोगल्स, भा. २, पा. २५०–५२; पे. द. १०. ३४ ).

श्रीपतराव प्रतिनिधीनें मोगलांकडून रायगड जिंकल्यामुळें शाहूनें त्याकडे अंजनवेल जिंकण्याचें काम सोंपविलें ( पु. द. १. १०२ ), पण यानें त्याचा वर्चष्मा होतो असें पाहून त्याचा मुद्दाम भेद करून पाडाव केला ( पे. द. ३. १०, १२, १९, ३७, ४५ ).

या वेळीं जंजिरा घेण्याची आलेली संधि फुकट गेली. यानंतर बाजीराव या सिद्दीप्रकरणांत स. १७३५ पर्यंत कोंकणांत होता. पुढील वर्षी हा माळव्यांत गेला व तिकडेच वर्षभर होता ( स. १७३७ ).

मध्यंतरीं आंग्रे ( मानाजी व संभाजी ) बंधूंत भांडणें सुरू झालीं तीं बाजीरावानें साधारण मिटवलीं, त्यामुळें संभाजी आंग्रे हा बाजीरावाचे विरुद्ध पक्षास मिळाला. या कलहांत पेशव्यांनीं भर घातल्यामुळें आंग्र्यांचें आरमारी बळ कमी दर्जाचें झालें.

या सुमारास इंग्रजांनीं शाहू व बाजीराव यांच्यांत फूट पाडण्याचा प्रयत्न केला पण तो फुकट गेला व गॉर्डनें स्वच्छ सांगितलें कीं शाहूवर पेशव्यांचा दाब विशेष आहे.

मध्यंतरीं स. १७३६ च्या नवंबरांत हा उत्तरेच्या स्वारीवर निघाला. हा अटेरव भदावर लुटून यमुनेपर्यंत गेला. तेथें स. १७३७ त सादतखान, मुहंमद बंगष वगैरे सरदारांनीं पुष्कळ फौज घेऊन याला अडविण्याचा प्रयत्न केला, पण यानें थेट दिल्लीपर्यंत जाऊन आपला शह बसविला. पुढें राजपुतान्यांतून हा स. १७३७ च्या जूनमध्यें पुण्यास आला.

बाजीरावाचें हें आक्रमण बंद पाडण्यासाठीं दिल्लीच्या मुत्सद्यांनीं निजामास बोलावून याचा बंदोबस्त करण्याचें काम त्याच्याकडे सोंपविलें. त्याप्रमाणें निजाम दिल्लीकडून परत येत असतां बाजीराव निजामावर चालून गेला. दोघांची लढाई भोपाळजवळ १५ डिसें. १७३७ रोजीं होऊन तींत पराभव झाल्यानें निजाम शरण आला. त्यामुळें नर्मदा–चंबळा–दुआब मराठ्यांना मिळाला. नंतर बाजीराव पुण्यास परत आला ( १७३८ जुलै ). या वेळीं हा हिंदुस्थानांत अजिंक्य झाला आणि उत्कर्षाच्या शिखराला पोंचला; आणि मराठ्यांकडून सर्व हिंदुस्थानचीं सूत्रें हालूं लागलीं.

यानंतर नादिरशहानें दिल्लीवर स्वारी केली. मराठ्यांची इच्छा बादशहास मदत करण्याची होती. त्याप्रमाणें वसई जवळजवळ फत्ते झाल्यावर बाजीराव उत्तरेस निघाला. पण नादिरशहा अगोदरच निघून गेला होता. बादशहानें यास पूर्वीचे करार कबूल केल्यावरून हा परत साताऱ्यास आला ( स. १७३९ जुलै ).

इकडे निजाम नासिरजंगानें ठरलेली जहागीर देण्याची टाळाटाळ चालविल्यामुळें बाजीरावानें त्याच्यावर आपला मोर्चा फिरवला ( स. १७३९ डिसेंबर ) व त्याचा औरंगाबादेजवळ पराभव करून पूर्वीची व आणखी जहागीर मिळविली ( स. १७४० फेब्रुवारी ). यानंतर हा उत्तरेकडे जात असतां नर्मदाकांठीं खरगोण जिल्ह्यांतील रावेरखेडी

येथें ताप येऊन व तापांतच नर्मदेंत पोहल्यामुळें मृत्यु पावला.

बाजीरावाविरुद्ध फत्तेसिंग भोसले, प्रतिनिधी व रघूजी भोसले वगैरे मंडळी सतत २० वर्षे शाहूजवळ कागाळ्या करीत, त्यामुळें बाजीरावास फार त्रास होई. परंतु हा त्यांतून स्वतःच्या पराक्रमामुळेंच बाहेर पडे.

याची भूमिका पेशव्याची नसून सेनापतीची होती; आणि सैन्याच्या जोरावरच याच्या ताब्यांत सर्व सत्ता आली. छत्रपति सोडून दिल्लीच्या बादशहाचेंहि सेनापतित्व स्वीकारून मराठ्यांना विरोध करण्याची याची इच्छा दिसते ( पे. द. १५.८६ ).

बाजीरावाच्या कारकीर्दींत तेजस्वी सरदारांची एक मालिकाच निघाली. शिंदे, होळकर, बुंदेले, पवार, गायकवाड, हिंगणे, कोल्हटकर वगैरे अनेक ब्राह्मण व मराठे सरदार पुढें येऊन त्यांनीं वऱ्हाड, माळवा, बुंदेलखंड, दिल्ली वगैरे उत्तरेकडील प्रांतांत मराठ्यांचें वर्चस्व स्थापिलें.

स्वारीच्या खर्चामुळें बाजीरावास कर्ज फार झालें. त्याबद्दलचीं याचीं पत्रें याचे गुरु ब्रह्मेंद्रस्वामी यांना लिहिलेलीं वाचण्यासारखीं आहेत. खुद्द ब्रह्मेंद्रस्वामीहि आपल्या कर्जाचा पेशव्यांना तगादा लावीत.

बाळाजी, रामचंद्र, जनार्दन, रघुनाथराव असे याला चार पुत्र व समशेरबहाद्दर हा मस्तानीचा पुत्र होय.

प्रत्यक्ष शाहू व पेशव्यांच्या कुटुंबांतील मंडळी चिमाजी आपाच्याच मार्फत याच्याकडून कामें करून घेत. बाजीरावाचा स्वभाव शिपाईबाण्याचा असे. मनमिळाऊ नसे. मस्तानीशीं जास्त संघटन झाल्यानें राज्यकारभाराकडे याचें दुर्लक्ष होऊं लागलें. तिच्या सहवासानें याला मद्यमांसाचाहि नाद लागला होता; आणि घरांतल्या मंडळीपुढें हा एक प्रश्न पडला होता ( पे. द. ९. ३०–३४ ).

बाजीरावानें पुण्यास शनवारवाडा बांधण्यास प्रारंभ करून ( स. १७३० जाने. ) एक वर्षांत ( स. १७३१ ) तो पुरा केला. त्यास १६११० रु. खर्च आला.

**बाजीराव रघुनाथ पेशवे**—( जन्म ता. १७–१–१७७५–मृत्यु ता. १४–१–१८५१ ) हा रघुनाथरावदादा व आनंदीबाई यांचा मुलगा. जन्मस्थळ धार. नानाफडणीस होता तोंपर्यंत याचें आयुष्य कोपरगांव येथें कैदेंतच गेलें. पण तेथूनहि सवाई माधवरावाशीं पत्रव्यवहार करून आपल्याबद्दल सहानुभूति व नानाबद्दल तिरस्कार यानें त्याच्या मनांत बिंबविलीं, आणि शेवटीं त्यानें आत्महत्या केल्यावर प्रथम दत्तकाचा केलेला विचार बाजूस सारून नानानें याच्याशीं संगनमत केलें. आणि शेवटीं महाडचें कारस्थान करून चिमणाजी माधवाला दूर सारून याला पेशवा बनवलें.

पण पुढें नानाचें महत्त्व कमी होत जाऊन हा सैन्यासहित असणाऱ्या शिंद्याच्या पूर्ण छापेंत गेला. पुढें नाना वारला ( स. १८०० ) आणि शिंदाहि यशवंतराव होळकराच्या वाढत्या जोराचा बंदोबस्त करण्याकरितां पुणें सोडून निघाला. शिंद्याचें सैन्य पुणें प्रांतांतून बाहेर पडतांच यशवंतराव होळकराचा जोर पाहून पुण्याहून काशीराव होळकर त्यास जाऊन मिळाला, आणि विठोजीनें बंड सुरू केलें. तेव्हां यानें होळकरांचा सरंजाम जप्त करून विठोजीला अविचारानें क्रूरपणें हत्तीच्या पायीं देऊन ठार मारलें ( स. १६–४–१८०१ ). त्यामुळें संतापून यशवंतराव होळकरानें पुण्यावर चाल करून याचा पराभव केला ( हडपसर ता. २५–१०–१८०२ ). तेव्हां हा घाबरून महाडाहून वसईस गेला आणि तेथें यानें उतावळेपणानें कोणासहि न विचारतां इंग्रजांशीं तैनाती फौजेचा तह केला ( ता. ३१-१२-१८०२ ). इंग्रजांचें संरक्षण मिळाल्यानें याला स्वस्थता लाभली. तेव्हां यानें सरदारांच्या तैनाती जप्त करून उत्पन्न वाढविण्यास सुरुवात केली. याचवेळीं रे. क्लोज जाऊन एल्फिन्स्टन आला (स.१८१०जून) आणि त्यानें तैनातदार सरदारांचा व बाजीरावाचा संबंध तोडला ( स. १८१२ जुलै ७ ). पुढें गंगाधरशास्त्र्याच्या खुनानें हा इंग्रजांच्या डोळ्यावर आला. तेव्हां शिंदे, होळकर, गायकवाड, भोसले वगैरे मोठ्या सरदारांवरील बाजीरावाचें स्वामित्व एल्फिन्स्टननें साफ नष्ट केलें व त्याच्याशीं दळणवळण ठेवण्यासहि बंदी केली ( ता. १३–६–१८१७ ). पण याविरुद्ध वर्तन घडतांच युद्धावर प्रसंग आला. युरोपमध्यें नेपोलियनसारखा प्रतिस्पर्धी चीत केल्यामुळें इंग्रजहि आतां हिंदुस्थानांत आपली सत्ता वाढविण्यास सज्जच होता. इंग्रजांशीं दोन हात करण्याच्या बाबतींत बापू गोखल्याशिवाय याला कोणाचीच अनुकूलता नव्हती, तथापि ब्रह्मदेशच्या बादशहाचेंहि साह्य मिळविण्याचा यानें प्रयत्न केलेला दिसतो. पण खडकी व एरवड्याची लढाई होऊन पराजय झाल्यामुळें बाहेरच्या लोकांचें साहाय्य मिळवून इंग्रजांना तोंड देतां येईल तर पाहावें अशा बुद्धीनें यानें पलायनास सुरुवात केली. कोरेगांव व अष्टी येथें पराजय झाला व बापू गोखलेहि पडला तेव्हां गुप्त रीतीनें बेत ठरवून हा नागपूरच्या बाजूला गेला, पण तिकडे उपयोग होईना. शिवणी येथें पराभवच पदरीं आला. शेवटीं बरोबरचे लोक सोडून जाऊं लागले. शिंद्यांच्या मुलुखांत पोंचण्याचा संभव दिसेना, तेव्हां

बऱ्हाणपूरचे बाजूस अशीरगडचे उत्तरेस धूळकोट येथें गेला; आणि तेथें इंग्रजांनीं याला पूर्णपणें घेरलें; आणि शेवटीं यानें माल्कमला राज्याची सोडचिठ्ठी लिहून दिली व कोठें तरी क्षेत्रांत राहण्याचें कबूल केलें (ता. २-६-१८१८). आणि यानंतर हा ब्रह्मावर्तास (बिठूर) येथें राहिला.

यानें एकंदर अकरा लग्नें केलीं, त्यांपैकीं सहा दक्षिणेंत पेशवाईवर असतां आणि पांच राज्यच्युतीनंतर बिठूर येथें. यांशिवाय लाला परदेशी यांचे लेकीशीं कथ्यारीबरोबर लग्न केल्याचा निर्देश आहे. यांशिवाय याच्या मर्जीतल्या अनेक स्त्रिया होत्या. संतति झाली, पण ती फार दिवस जगली नाहीं. तेव्हां यानें माधव नारायण भटाचा मुलगा धोंडू यास ता. ७-६-१८२७ रोजीं दत्तक घेतलें. याशिवाय त्याचेच भाऊ सदाशिव, गंगाधर व पांडुरंग यांना दत्तक घेतलें. धोंडू हाच पुढें नानासाहेब पेशवे नांवानें स. १८५७ सालच्या बंडांत प्रसिद्धीस आला. यांपैकीं शेवटला पांडुरंग ऊर्फ रावसाहेब हा लक्ष्मीबाईस सामील झाला म्हणून त्यास ब्रह्मावर्त येथें फाशीं दिलें. यांच्यापैकीं तात्या टोपे या येवल्याच्या देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणास बंडवाला म्हणून शिप्री येथें फाशीं दिलें ( स.१८५९ एप्रिल १८ ). झांशीच्या लक्ष्मीबाईनें रणांत देह ठेवला. बाकीचीं माणसें नेपाळांत गेलीं.

यानें नऊ वर्षांपुढें कोणतीहि मुलगी अविवाहित राहूं देऊं नये, असा सक्त हुकूम काढला होता ( पेशव्यांच्या रोजनाम्यांतील थोडी माहिती, पा. २१४ ). नैतिकदृष्ट्या या वेळीं मराठ्यांचा व विशेषतः ब्राह्मणांचा कमालीचा अधःपात झाला होता.

**बाझ बहादुर**—( राज्यकाल स. १५५४-१५६४ ) हा पठाण माळव्याचा शेवटचा बादशहा असून हा फार विलासी, मृगयाकुशल, व संगीतलोलुप होता. ह्याची राजधानी मांडवगड उर्फ मंडू येथें असून ह्याच्या राणीचें नांव रूपमती असें होतें. ह्या दोघांची प्रणयी जोडपें म्हणून प्रसिद्धि आहे. याचें राज्य मोगलांनीं जिंकल्यामुळें ह्यांचा प्रेमसंबंधाचा दुःखपर्यवसायी शेवट झाला. ह्यानें रूपमतीच्या सांगण्यावरून नर्मदेचा प्रवाह, १२०० फूट उंच असलेल्या मांडवगडावर अफाट पैसा खर्च करून आणला व तेथें एक रेवाकुंड बांधलें. हीं दोघेंहि कवि होतीं. जनानखाना शत्रूच्या हातांत जाण्याचा प्रसंग आला असतां यानें राण्यांचा वध केला ( रूपमती पाहा; जु. ऐ. गो. भा. २, पृ. २१-२४ ).

**बाणभट्ट**—(स. ६४८ सुमार) संस्कृत महाकवि. हा वात्स्यायनगोत्री ब्राह्मण. कुबेर-पाशुपत-अर्थपति-चित्रभानु-बाण असा याचा वंशक्रम आहे. याच्या मातेचें नांव राज्यदेवी. याच्या चवदाव्या वर्षाच्या आंत याचे आईबाप वारले. नंतर ठाणेश्वरच्या हर्षवर्धनाचा (स.६०६-६४८) यास आश्रय मिळाला, असें यानें आपल्या हर्षचरित्रांत लिहिलें आहे.

याचे ग्रंथ-कादंबरी ( पूर्वार्ध ), हर्षचरित. पुढील ग्रंथ याचेच आहेत किंवा नाहीं याबद्दल मतभेद आहे.

पार्वतीपरिणयनाटक, नागानंदनाटक ( याचें नसून धावकाचें असावें असें म्हणतात. ) चंडिकास्तोत्र. याच्या मुकुटताडितक नाटकाचा निर्देश गुणविनयगणीनें आपल्या नलचंपूच्या टीकेंत केलेला आहे. क्षेमेंद्रानें आपल्या औचित्यविचारचर्चेत कांहीं पद्यांचा विचार बाणाच्या नांवावर घेतलेला आहे. त्यावरून बाणानें एक पद्यमय कादंबरीहि लिहिली होती असें कळतें, पण ती आज उपलब्ध नाहीं.

**बाणाजी शेट्या**—कृष्णाजी शेट्यानंतर दौलतराव शिंदे यांनीं यास आपला कारभारी केला.

**बाणेश्वर शर्मा**—( स. १००० सुमार ) रामदेव तर्कवादी भट्टाचार्य याचा पुत्र व विष्णुसिद्धांत भट्टाचार्य याचा पौत्र. बाणेश्वर शर्मा यानें 'नंदघराण्याचा अधःपात' या विषयावर ' चंद्राभिषेक ' म्हणून एक नाटक संस्कृतांत लिहिलें आहे.

**बादर्स्टन**—( स. १७७८-८२ ) एक इंग्रज वकील. जेव्हां हेस्टिंग्जनें सातारची गादी मुधोजी भोंसल्यास मिळवून देण्याची खटपट चालविली तेव्हां गॉडर्डनें याला मुधोजीकडे नागपुरास पाठविलें ( स. १७७८ डिसें. ). स. १७८२ मध्यें गॉडर्डनें यास पुण्यास वाटाघाटींकरितां पाठविलें, परंतु अंडरसन महादजीजवळ तेंच काम करीत असल्यामुळें ह्यानें १२ मार्च १७८२ रोजीं पुणें सोडलें. जातांना नानानें ह्यास शिफारसपत्र दिलें होतें. हा फार्सी भाषाभिज्ञ होता.

**बादशाहा बीबी**—ही दुसऱ्या अली आदिलशाहाची मुलगी.

**बापू कान्हो फडणीस सातारकर**—हा सातारकर छत्रपतीच्या पदरीं असून चतुरसिंग भोंसल्याचा उजवा हात होता. माल्कमसाहेबाच्या सांगण्यावरून बापू कान्हो यानें स. १८१८ मध्यें त्या वेळचा इतिहास माल्कमसाहेबास लिहून दिला (ना. प्रां. इ. पा.१९३).

**बापू गोखले**—(जन्म स. १७७७, मृत्यु स. १८१८) बापूंचें मूळ गांव तळेखाजण हें होय. यांनीं जवळच पिरंदवण गांवीं मल्लिकार्जुनाचें देऊळ बांधलेलें आहे. तळेखाजणास बापूंच्या वाड्याचा चौथरा फक्त शिल्लक आहे.

बापूंचें नांव नरहर गणेश. यांच्या धोंडोपंत नांवाच्या चुलत्यास प्रथम परशुरामभाऊ पटवर्धन यांचे हाताखालीं सरंजाम मिळाला. आपल्या पराक्रमानें तें बदामींच्या लढाईंत विशेष प्रसिद्धीस आले, तेव्हां स्वतंत्र सरंजाम देऊन श्रीमंतांनीं धारवाडच्या सुभ्यावर पाठविलें. धोंडजी वाघाच्या हातून त्यांचा ( चुलता ) पाडाव झाल्यावर त्यांची सरदारी याला मिळाली. धोंडजी वाघाचा वेलस्लीनें पराभव केल्यानें मराठ्यांचे राज्यांत धुमाकूळ घालण्यास त्यानें सुरवात केली.

मराठी राज्याचे हे अखेरचे सेनापति होते. यांना एक भाऊ होता, परंतु तोहि वरील लढाईंत मरण पावला. बापूंना दोन पुत्र होते. पैकीं एक लहानपणींच वारला व दुसरा अष्ट्यावरील इंग्रजांच्या मोहिमेंत कामास आला. पुढें यानें बऱ्याच मोठमोठ्या लढायांत प्रामुख्यानें भाग घेतला. त्यांपैकीं हालिदाळच्या लढाईंत याला बऱ्याच जखमा झाल्या. शेवटीं यानें इंग्रजांच्या मदतीनें धोंडी वाघास ठार मारलें. बारभाईंचें व बावनपागे यांचीं बंडें बापूंनींच हाणून पाडलीं. नंतर प्रतिनिधी व ताई तेलीण ह्यांचा पराभव करून बापू पुण्यास गेले. तेथें पेशव्यांना त्यांच्याबद्दलची कोणीं चहाडी सांगितल्यावरून बापूंना सरंजामी प्रांताच्या सोडचिठ्ठ्या मागण्यांत आल्या. त्या विलंब न लावतां बापूंनीं दिल्यामुळें पेशवे खूष झाले व त्यांनीं १२ लाखांचा सरंजाम देऊन लढाईचें झालेलें १६ लाखांचें कर्ज फेडण्याचें आपल्या अंगावर घेतलें. पुढें चतुरसिंगाच्या बंडाचा मोड करण्याचेंहि बापूंवरच सोंपविलें व तें काम यांनीं यशस्वी रीतीनें पार पाडलेंहि.

बापू हे स्वामिनिष्ठ सेनापति होते. त्यांनीं लढाईंतून कधींच पाय काढला नाहीं. गणेश-खिंडीच्या लढाईंत यांचा घोडा ठार झाला तरी हे पायउतार होऊन लढत होते. अखेर पेशव्यास सासवडास जाण्यास सांगून त्यांची पिछाडी संभाळीत यांनीं इंग्रजांस तोंड दिलें. ब्राह्मणवाडीजवळ बापूंचा मुलगा बाबासाहेब वारला. त्या वेळीं त्याची १२ वर्षांची स्त्री सती गेली. पुढें कोरेगांव मुक्कामींहि इंग्रजांशीं बापूंनीं सामना दिला.

२० फेब्रुवारी स. १८१८ रोजीं श्रीमंत भोजनास बसले असतां स्मिथ चालून आल्याचें बापूंनीं कळविलें. पण पेशवे न उठतां उलट यांनाच बोलल्यामुळें बापूंनीं "जय झाल्यास परत येऊं नाहीं तर हें शेवटचेंच दर्शन" असें म्हणून अवघ्या ५० असामींसह स्मिथवर निकराचा हल्ला केला. त्यांतच बापूंचा अंत झाला. पाच्छापुरकर बखरींत "बापूंचा शेवट काय झाला याचा पत्ता लागत नाहीं" असें आहे. बापूंचा जन्म स. १७७७ त झाला होता; व वयाच्या ४० व्या वर्षी वरीलप्रमाणें त्यांचा शेवट झाला ( खरे खं. ११, डफ पु. ३; आपटे-गोखले घराण्याचा इतिहास).

**बापूजी खंडोजी चिटणीस**—साताऱ्च्या छत्रपतीचा चिटणीस खंडो बल्लाळ याचा हा एक पुत्र.

**बापूजी नाईक**—स. १७७५ चे पूर्वी थोडे दिवस बापूजी नाईक हा ओरिसाच्या सुभेदारींवर होता असें दिसतें. परंतु याची सुभेदारी एक दोन महिन्यांपेक्षां जास्त दिवस राहिली नाहीं. याचा पिता अनंत असावा ( ना. प्रां. इ० पा० ३५३ ).

**बापूजी प्रभु**—( बापूजी सोमाजी दिघे पाहा ).

**बापूजी भीमराव पारसनीस**—(मृत्यु स. १७३६) पुणें येथील पारसनीस घराण्यांतील भीमरावजीचा हा मुलगा.

थोरले बाजीराव पेशवे यांनीं याला साताऱ्याहून पुण्यास आणून ठेविलें. मृत्यु श. १६५८ आश्विन शुद्ध १२ च्या सुमारास ( पे. द. २२. ३२५ ).

**बापूजी बाजी रेठरेकर**—( बाजी भिवराव रेटरेकर पाहा ).

**बापूजी महादेव हिंगणे**—( मृत्यु स. १७६१ ) यानें स. १७४९ त पेशव्यांच्या तर्फेनें नासिरजंगाची भेट घेतली. त्या वेळेचें वर्णन ता. ७।२।१७४९ च्या पत्रांत आहे ( रा. खं. ६ ले. १९२ ). याला एक पुत्र असून त्याचें नांव माधव असें होतें.

**बापूजी मुद्गल**—खेडेबारेचा देशपांडे. पुणें प्रांताचा हवालदार. यानें कोंडाणा घेण्याच्या कामीं शिवाजीस मदत केली. याचेच पुत्र बाबाजी व चिमणाजी शाहिस्तेखानाच्या वेळीं प्रसिद्ध झाले.

**बापूजी मुधोजी भोसले नागपूरकर**—( मृत्यु स. १७१७–२२ सुमार) भोसल्यांचा मूळ पुरुष मुधोजीचा हा वडील मुलगा होय. परसोजीप्रमाणें हाहि शिवाजीचे सैन्यांत नोकरीस होता ( १ परसोजी भोसले पाहा ).

ह्याच्या पूर्वचरित्रापैकीं कांहीं अज्ञात भागावर धावडशीकर ब्रह्मेंद्रस्वामींचे पत्रव्यवहारावरून प्रकाश पडतो. बापूजी यास जंजिऱ्याचे सिद्यानें पकडून कैद केलें होतें असें दिसतें. ब्रह्मेंद्रस्वामींचें वजन व पत्रव्यवहार सर्वत्र होता. त्यांनीं मध्यस्थी करून बापूजीस सोडविलें ( ब्र. च. २९५ ).

**बापूजी विठ्ठल चाफेकर**—दुसऱ्या बाजीराव पेशव्याच्या प्रभावळींतील एक गृहस्थ. हा प्रथम नाना पुरंदऱ्यांच्या लष्करांत कारकून होता. नंतर स्वतंत्र

पाग्या झाला. बाजीराव वसईकडे गेल्यावर हा साताऱ्याकडे फौज धरून राहिला होता. हा पुढें वेलस्ली तहान्वयें बाजीरावाच्या मदतीस आला व त्याच्या सैन्यांत जाऊन दाखल झाला.

**बापूजी श्रीपत चित्राव**—( मृत्यु स. १७३९ ) काण्व ब्राह्मण. थोरल्या बाजीरावाच्या वेळचा पुणें प्रांताचा सुभेदार. नंतर पुरंदरचा सबनीस. याचा मुलगा श्रीपत बापूजी. फुटक्या बुरुजाजवळ याचा वाडा होता. यानें आपला भाचा शामराव अंबाजी किरकोळे याचा मुलगा श. १६५७ सालीं दत्तक घेऊन त्याचें नांव श्रीपतराव असें ठेवलें. जेजुरीच्या पेशव्यांच्या तलावाचें काम याच्या देखरेखीखालीं झालें. हा शके १६६१ च्या आश्विन वद्य नवमीस पुण्यास वारला. याची धाकटी बायको गऊबाई सती गेली ( रा. खं. ६ पृ. १२७ ). स. १७३७ च्या उन्हाळ्यांत ठाण्याची मोहीम करावी असें चिमणाजीनें याच्या व मोरशेट, वासुदेव जोशी यांच्या सल्ल्यानें ठरविलें ( म. रि. म. १ पृ. २९४ ). बाजीरावाच्या पदरच्या प्रख्यात लोकांत याची गणना असे. हा प्रथम शंकराजी नारायण सचीवाचा पुरंदरचा अधिकारी असे. बाळाजी विश्वनाथाकडे आल्यावर त्यानेंहि यास त्या जागीं ठेविलें ( सोहनीकृत पेशवे बखर, रा. खं. ६, पुरंदरे भा. ३ ). तत्कालीन कागदपत्रांत बापूजीपंत नाना किंवा नुसते नाना असा यांचा उल्लेख येतो.

**बापूजी सोनाजी दिघे**—हा रोहिड खोऱ्यांतील सुभेदार. राजारामाचे वेळेपासून शंकराजी नारायण सचीवाचे बरोबर मोगलांशीं लढत असून यास 'पदाती सेनासाहस्री' हा किताब मिळाला. यास परसोजी भोसल्यानें राजारामहाराजांपासून आपल्या जमेनिशीचे कामावर नेमून घेतलें होतें. यानें शाहू खानदेशांत येतांच त्याचा पक्ष स्वीकारण्याविषयीं परसोजीचें मन वळविलें व इतरहि पुष्कळांना शाहूस अनुकूल केलें. याचें दुसरें नांव बाबूजी प्रभु. हा भोसल्यांच्या दरबारीं पुष्कळ वर्षे प्रमुख होता. ह्यानेंच हैबतराव निंबाळकर व नेमाजी शिंदे वगैरे सरदार शाहूस अनुकूल करून दिले. पुढें शाहूनें वचन दिल्याप्रमाणें यास स. १७०८ मध्यें दोन गांव इनाम करून दिले ( ऐ. गो. पृ. १९ ).

**बाप्पा रावळ**—( स. ७१३-७३ ) बाप्पा हा चितोडच्या मोरी राजाचा मांडलिक होता. रावळ म्हणजे लहानसा राजा. उदेपूरच्या उत्तरेस नागदा म्हणजे नागऱ्हद नामक जें लहानसें गांव आहे तेथें बाप्पा राज्य करीत होता. मूळच्या वल्लभी राजघराण्याची एक शाखा प्राचीन कालीं ईदर येथें प्रस्थापित झाली. व तिच्या कित्येक उपशाखा पसरल्या. त्यांपैकीं बाप्पा रावळाची उपशाखा होय. बाप्पा रावळ हा अत्यंत स्वधर्माभिमानी होता, व यास गोहिंसक अरबांचा अत्यंत संताप येत असे. यानें प्रथम अरबांचे हल्ले परतविले. या विजयानें बाप्पा रावळ अत्यंत विख्यात झाला, आणि होतां होतां यास चितोडचें सार्वभौमपद प्राप्त झालें.

गुहिलोत घराण्याची स्थापना, राजपुतान्यांत बाप्पानें केली. बाप्पा रावळ हा दीर्घायुषी होता. यानें अनेक भार्या वरिल्या होत्या व यास संततीहि बरीच झाली. हा इतका दीर्घकाल जगला कीं, राज्यकारभारास कंटाळून यानें युवराजाच्या स्वाधीन सर्व अधिकार केले व आपण शिवोपासक यति झाला. दंतकथादिकांचा विचार करतां बाप्पा रावळाची कारकीर्द स. ७१३ पासून ७७३ पर्यंत केव्हां तरी सुरू झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. याचीं नाणीं उपलब्ध आहेत.

याच्या वेळीं मेवाडांत परमार राजे राज्य करीत होते.

**बाप्पुक**—एक राजा. तिसऱ्या अमोघवर्ष राष्ट्रकूटाचा पुत्र. कृष्णानें यास आज्ञाभंगाबद्दल ठार केलें ( भांडार. पा. १०३-४ ).

**बाप्यट पाल**—( स. ७८० पूर्वी ) हा पालवंशीय द्वितीय पुरुष होय.

**बाबर**—( स. १४८३-१५३० ) दिल्लीचा पहिला मोगल बादशाहा. हा बापाकडून तैमूरलंगाचा व आईकडून चेंगीजखान मोगलाचा वंशज होता. तैमूरच्या काबूल या राजधानींत यास राज्याभिषेक झाला; आणि त्या ठिकाणीं आपला नीट बंदोबस्त करण्याच्या उद्योगास हा लागला. स. १५१९ त बाबरानें हिंदुस्थानावर पहिली स्वारी केली.

दौलतखान लोदी यानें स. १५२४ त बाबराची मदत मागितली. बाबरास हेंच पाहिजे होतें. हा तात्काळ हिंदुस्थानांत आला, व इब्राहिमखानाच्या फौजेबरोबर लढून यानें पंजाब प्रांत घेतला. पुढें बाबरानें जसजशी संधि सांपडेल तसतशा स्वाऱ्या करून हिंदुस्थान काबीज केला.

बाबरासारख्या बलिष्ठ माणसास आपल्या देशांत राहूं देऊं नये म्हणून संगराण्यानें युद्धाची तयारी केली. बाबरहि सैन्यानिशीं तयारींतच होता. शिक्री येथें लढाई होऊन संगराण्याचा पराभव झाला ( १६ मार्च सन १५२८ ).

बाबर हा हिंदुस्थान व आशिया यांस जोडणाऱ्या साखळींतील मध्यवर्ती दुवा होय. बारा वर्षांचा असतांना बाप वारला तेव्हांपासून मरेपर्यंत बाबरानें एकंदर छत्तीस वर्षे

राज्य केलें. यानें आपलें चरित्र इत्थंभूत आणि उत्कृष्ट लिहून ठेवलें आहे. हा २६ डिसेंबर स. १५३० रोजीं मरण पावला. याचा उच्चार बाबुर, हा शुद्ध समजतात.

**बाबाजी**—( केशवचैतन्य पाहा ).

**बाबाजी घाटगे झुंजारराव**—रघूजीच्या प्रमुख सरदारांपैकीं एक ( ना. प्रां. इ. पा. १०६ ).

**बाबाजी नाईक पुंडे**—( मृत्यु स. १६७५ ) हा श्रीगोंद्याचा शेषोबा नाईकाचा नातू. शेषोबा नाईक 'परम भले द्रव्यवान् होते. मालोजी भोसल्यास देवीचा दृष्टांत होऊन भूमिगत द्रव्य सापडलें. तें त्यानें शेषोबाच्या घरीं ठेवलें. शेषोबानें द्रव्य ठेवून घेतलें आणि सांगितलें कीं, 'तुम्हास दौलत राज्य प्राप्त झालियावर तुमची पोतदारी वतनी आम्हास परंपरागत करून द्यावी' ( चि. २० ). पुढें हा बाबाजी नाईक शिवाजीतर्फे विजापूर दरबारीं वकील होता. स. १६७२ मध्यें विजापूरकरांशीं झालेला तह मोडल्यामुळें हा परत आला. हा स. १६७५ मध्यें वारला.

**बाबाजी नीळकंठ महाडकर**—( स. १७३१ सुमार ) हा प्रभु जातीचा असून कोल्हापूरचे सुमंताचा मुतालिक होता. यानेंच जिजाबाईचे सल्ल्यानें स. १७३१ मध्यें संभाजी व शाहू यांचा तह घडवून आणला. याचा मुलगा रामचंद्र हा कोल्हापूरचा सुमंत झाला. तेव्हां भाऊ गोविंदराव नीळकंठ याजकडे पारसनिसी राहिली ( म. रि. म. १, पा. ४३३ ). रामचंद्राला हल्ल्याळ परगणा इनाम करून दिला. त्याच्या सनदेंत बाबाजी व गोविंदराव यांबद्दल पुढील मजकूर आहेः 'हे ( दोघे ) पुरातन राज्यांतील प्रमुख सेवक. थोरले महाराजापासून मातबर स्वामिकार्यें करून कृपा संपादित आले. संस्कृत, फार्सी, हिंदी व कानडी विद्येमध्यें निपुण. त्यांचे पुत्र तुम्हीं त्याजप्रमाणें सर्वविद्यानिपुण. नबाब निजामुल्मुल्क यांची व स्वामींची भेट झाली ते समयीं उभयपक्षींचे मध्यस्तींत फार्सी विद्येचें निपुणतेनें व बुद्धिकौशल्यें करून निजामाशीं संतोषी केलें. ( सनद ता. ११–१०–१७३८, का. प्र. इ. साधनें पृ. ८७–९० ). यालाच बाबाजी प्रभु किंवा बुवाजी ( बोवाजी ) नीळकंठ प्रभु पारसनीस असें म्हणत.

**बाबाजी बापूजी मुद्गल**—हा खेडेबाऱ्याचा देशपांडे. याला चिमणाजी बापूजी नांवाचा एक भाऊ होता. या दोघांनीं शास्तेखानाच्या माळ्याला वश करून शिवाजीचा लालमहालापर्यंत प्रवेश करून दिला. शिवाजीच्या लोकांना 'चौकी पाहऱ्याकरितां गेलेले लोक' अशी बतावणी करून पहाऱ्यांतून आंत घेतलें. यांनीं गडबड करणाऱ्या कांहीं खोजांना ठार केलें. खानाचीं बोटें तुटल्यावर गडबड झाली, तेव्हां खुणेच्या कर्ण्यानें सर्वांनीं दंगल केली आणि आंबील ओढ्यांतून सर्व निघून गेले. या कामगिरीबद्दल यांना पालख्या देऊन सन्मान झाला. हा छाप्याचा प्रसंग ५ एप्रिल १६६३ रोजीं घडला ( सभा. ३३ ).

**बाबाजी राम होनप**—( स. १६७८ सुमार ) हा मोरो तानदेवाचा चुलता. याला देशकुलकर्ण ३६ गांवचें असल्यानें आपाजी नामदेव व नामाजी कृष्ण हे पितापुत्र गुमास्ते नेमले. पण मालकाचें लक्ष राजकारणांत असल्यानें हे मालक होऊं लागले. स. १६७७ मध्यें हा दिलीरखानास बऱ्हाणपुरास जाऊन मिळाला. दुसऱ्या वर्षी संभाजीहि पेडगांव येथें दिलीरखानाकडे दाखल झाला. तेव्हां शत्रूस मिळण्याच्या या वृत्तीस आळा घालण्याकरितां याला पुरंदर येथें बोलावून देशपांडेपण दिलें ( स. १६७८ ).

**बाबाजी सटवोजी डफळे**—( स. १७०० ) सटवोजीनें साताऱ्याच्या मंगळाईच्या बुरुजावर औरंगजेबाचें निशाण लावलें म्हणून यास जत व करजतीची जहागीर मिळाली. त्या सटवोजीचा हा मुलगा.

**बाबा दीनदयाल**—( स. १८०२–५८ ) हा एक गोसावी असून हिंदी कवि होता. हा प्रथम महंत कुशागिरीच्या व नंतर दिल्लीच्या विनायकाच्या आश्रयास होता. ह्याचें हिंदी व संस्कृत भाषेवर चांगलें प्रभुत्व होतें. याचा विशेष भर अन्योक्तीवर असून याच्या यमकास धरून श्लेषमय कविताहि बऱ्याच आहेत. याच्या प्रसिद्ध पुस्तकांपैकीं पुढील उपलब्ध आहेतः अन्योक्तिकल्पद्रुम, अनुरागबाग, वैराग्यदिनेश, विश्वनाथनवरत्न, दृष्टांततरंगिणी.

**बाबाराव गोविंद करमाळेकर**—( स. १७८४–९१ ) सालबाईच्या तहानें इंग्रजांशीं महादजीचें वजन सिद्ध झाल्यावर हा निजामानें महादजीकडे ठेवलेला वकील.

**बाबासाहेब आपटे**—( मृत्यु स. १८८१ ) हे शिंद्यांचे सुप्रसिद्ध सरदार व दुसऱ्या बाजीरावाचे व्याही होत. स. १८५७ मध्यें हे माळव्यांत शिंद्यांच्या वतीनें सुभेदार होते. सर रॉबर्ट हॅमिल्टन यांनीं याविषयीं सरकारी रिपोर्टांत प्रशंसोद्गार काढले आहेत. हे घोड्यावर बसण्यांत फार निष्णात असून जयाजीराव शिंद्यांची यांजवर फार मेहेरबानी होती.

**बाबासाहेब भोसले**—( मृत्यु स. १७३७ ) तंजावरच्या एकोजीनंतर त्याचा मुलगा बाबासाहेब हा व्यंकोजी ऊर्फ एकोजी हें नांव धारण करून गादीवर बसला, परंतु एका वर्षांतच तो मरण पावला. हा जात्या संशयी वृत्तीचा

होता. तशांत यास पदच्युत करण्याचीं कारस्थानें भावांनीं केल्यामुळें ह्याची संशयी वृत्ति बळावून हा जवळजवळ वेडा झाला होता. ह्याच्या संशयी वृत्तीचें वर्णन 'भोसले-वंशचरित्र' शिलालेखांत केलें आहे. ह्याच्या अशा वृत्ती-मुळें राज्यकारभार विस्कळित झाला व दरबारांत स्वार्थपटु आणि मतलबी लोकांचें प्राबल्य वाढलें. ही संधि साधून चंदासाहेबानें स्वारी केली, परंतु जुन्या सरदारांच्या शौर्या-पुढें त्याचा निभाव न लागून तो कांहीं खंडणी घेण्याचें मान्य करून निघून गेला. पुढें हा भ्रमिष्ट होऊनच मरण पावला. ह्यास अपत्य नसल्यामुळें ह्याच्यामागून याची बायको सुजनाबाई हीच गादीवर बसली (तं. रा. घ. पृ. ५८).

**बाबूजी नाईक जोशी बारामतीकर**—(जन्म स. १६९५–मृत्यु स. १७७७) केळशी, जि. रत्नागिरी येथील केशव रुद्र जोशी यांचे नातू. जन्म काशीस, पण वडिलांबरोबर पैठण, औरंगाबाद वगैरे ठिकाणच्या पेढ्यां-वर कामकाज करीत. बाळाजी विश्वनाथ सेनाकर्ते यांची कन्या भिऊबाई यांचे कनिष्ठ बंधु आबाजी यांस दिली होती. (स. १७१२). दिल्ली दरबारांत 'स्वराज्याच्या' सनदा आणण्याकरितां गेलेल्या मंडळांत हे होते (स. १७१९). निजामाकडे पेशव्यांच्यातर्फे वकील असतां (स. १७२७) छत्रसालाकडून बाजीरावास मदतीस आणण्याचे कामीं यांनीं फार महत्त्वाची कामगिरी केल्यामुळें पुढें यांना माळव्याची सुभेदारी मिळाली आणि याच सुमारास (१७३१–३२) शिंदेहोळकरांकडील हुजुरपोतदारीचा दरक मिळाला. पुण्यास आल्यावेळीं यांना शनिवार, कसबा, सोमवार या पेठांची चौधरकी अर्पण करण्यांत आली (स. १७३३). राधाबाई पेशवे यांच्याबरोबर हे काशीयात्रेस गेले होते (स. १७३५–३७). या काळांत राजपुतान्यांतील सर्व रजपुतांना एकत्र करून त्यांच्या सहा-य्यानें दिल्लीची चकत्यांची पाच्छाईच समूळ उखडून टाकून तेथें हिंदुपदपातशाही स्थापन करण्याचें एक प्रचंड राजकारण यांनीं शिजविलें. परंतु शाहूच्या मोगलाई-बद्दलच्या आपुलकीच्या धोरणामुळें तें सर्व फुकट गेलें; तथापि या वेळेपासून शाहूचा लोभ बाबुजीवर त्यांच्या मुत्सद्दीपणामुळें व शौर्यामुळें पहिल्यापेक्षां अधिक जडला; मात्र पेशव्यांचें व त्यांचें बिघडत चाललें (स. १७३८–३९).

पेशव्यांच्या विरोधी खटपटीस कंटाळून बाबुजींनीं शाहूकडून कर्नाटकमामलत मागून घेतली, पण ती यशस्वी होऊं नये अशी अंतस्थ खटपट पेशव्यांनीं केली; हेंच धोरण त्यांनीं स. १७४७ पर्यंत, बाबूजींच्या कर्नाटकांतील सर्व मोहिमांत चालू ठेविलें. मध्यंतरीं बाजीराव वारल्या-नंतर, पेशवाईसारखीं महत्त्वाचीं पदें वंशपरंपरागत एकाच घराण्यांत कायम ठेवण्याची त्या वेळीं प्रवृत्ति नसल्यामुळें आणि आपण ज्या आपत्तींच्या चक्रव्यूहांत सांपडलों आहों त्याचा भेद करावयाचा असेल तर पेशवेपद मिळविणें हा एक उपाय आहे अशी स्वतःच्या मनाची समजूत झाल्या-मुळें, बाबूजी हे कर्नाटकांतून सातार्‍यास परतले. तथापि हें राजकारण सिद्ध न होतां पेशव्यांचा विरोध मात्र जास्त वाढला.

तथापि शाहूचें प्रेम व भरंवसा बाबूजींवर असल्यानें दमाजी गायकवाडाच्या खुळांत, त्यांना गुजराथकडे पाठविलें (स. १७४३). त्या वेळीं यांनीं सोनगड घेऊन, अमूप पैका दरबारीं दाखल केला. तेव्हां प्रसन्न होऊन शाहूनें यांना बारामती महालाची (हा महाल खास छत्रपतींचा होता) जहागीर देऊन पुन्हां कर्नाटकावर पाठविलें. तथापि पूर्वीप्रमाणेंच या खेपेसहि पेशव्यांनीं बाबूजींनीं या चार (१७४३–४७) वर्षांत केलेली सर्व देशाक्रम-णाची योजना अनेक सूक्तासूक्त मार्गांनीं हाणून पाडली (पे. द. २८. ७३; २९. २). ही बाबूजींची योजना त्यांच्या मागील रजपूत मराठे एक करण्याच्या योजनेप्रमाणेंच होती. म्हणजे कर्नाटकांतील सर्व हिंदूंना एकत्र मिळवून तिकडील मुसलमानांना नामशेष करण्याची होती. पण पेशव्यानें मुसलमानांपैकींच निजामास आपल्याकडे मिळ-वून घेऊन त्याचेकडून बाबूजींच्या मोहिमेंत अनेक प्रकारें अडथळे उत्पन्न करविले; एवढेंच नव्हे तर आपल्या सरदारांना 'नाईकांचे पाय मागें ओढावे' असे संदेश पाठवून, पुण्याहून त्यांना सैन्य-रसद इ० ची मदतहि धाडली नाहीं. या कृत्यानें पेशव्यांनीं 'मोगलाई मसलत' करून मूळ ध्येयालाच विसरल्यासारखें केलें.

तथापि तें मनांत न ठेवतां बाबूजींनीं सचिवाकडून सिंहगड पेशव्यांना मिळवून दिला. शाहूप्रमाणें राम-राजासहि बाबूजींची स्वामिनिष्ठा पसंत पडल्यामुळें त्यानें बाबूजींना आणखी मोठी सोलापूरचा किल्ला व प्रांत आणि सांगोले इ० मुलुखाची जहागीर दिली (स. १७५३). याच वर्षी सुप्रसिद्ध मोरोपंत कवि यांच्या पदरीं येऊन राहिले.

पेशव्यानें बाबूजींविरुद्ध अस्तनींत ठेवलेल्या निजामानें पेशव्यासच त्रास देण्यास सुरवात केल्यामुळें त्याचेशीं युद्धाचा प्रसंग येऊन त्या कामीं अखेर पेशव्यांना बाबूजीं-चीच नेमणूक करावी लागली आणि त्यांनीं नळदुर्गा-सारखा बिकट किल्ला घेऊन मोहीम लाभदायक करून

दिली (स.१७५८). तथापि ही मोहीम पुढें चालूच राहिली आणि तिचा शेवट उदगीरच्या लढाईंत झाला: याहि लढाईंत मराठ्यांच्या सैन्याची एक बगल बाबूजींच्याकडे होतीच ( स. १७६० ). पुढें राक्षसभुवनापर्यंतच्या प्रत्येक प्रकरणांत यांचा प्रमुख भाग होता ( स. १७६३ ).

पुढें पेशव्यांनीं कर्नाटकावर स्वारी केली, त्या वेळीं बाबूजी त्यांचेबरोबर होते. त्या वेळीं बाबूजींच्या प्रतिस्पर्ध्याचें म्हणणें ऐकून पेशव्यानें त्यांचेवर हैदराशीं फितूर झाल्याचा आरोप करून, त्यांचेकडील सोलापूर किल्ला काढून घेतला ( स. १७६७ ). पण पुढें आपली चूक कळून आल्यावर पेशव्यानें बाबूजींशीं टोकें येथें जाऊन समेट केला.

माधवरावांच्या मृत्यूनंतर थोड्याच काळानें राघोबादादांची मुलगी दुर्गाबाई हिचें लग्न बाबूजींचे चिरंजीव पांडुरंगराव यांचेशीं झालें ( स. १७७३ ).

यानंतर वृद्धपणामुळें बाबूजींनीं व्याप आटोपून बारामतीस निरंतरचें वास्तव्य केलें. त्यांचा अंत तेथेंच शके १६९९ आश्विन शुद्ध ५ (ता. ६।१०।१७७७) रोजीं झाला. यांचा वंश सध्यां पुणें येथें बावडेकर या नांवानें शनवार पेठेंत नांदत आहे ( मा. ग. बावडेकर ).

**बाबूराव आंग्रे**—( मृत्यु स. १८१३ ) हा दौलतराव शिंद्याचा मामा. कुलाब्यास रघूजीचा मुलगा मानाजी व त्याचा चुलता यांचा तंटा लागून त्यांत हा दौलतराव शिंद्याचा मातुल असल्यामुळें याचे साह्यार्थ शिंद्यांचीं पलटणें मानाजीवर चालून गेलीं. ता. ५-२-१७९७ रोजीं बाजीरावानें कोंकणच्या मामलेदारांस हुकूम पाठविले कीं यास दारूगोळ्याचा पुरवठा करून मानाजीची जप्ती करावी. यास इंग्रजांनीं हरकत केली. तेव्हां ता. १९-५-१७९७ रोजीं पेशव्यानें यास साह्य करण्याविषयीं त्यांसहि पत्रें लिहिलीं. शिंद्यांच्या फौजेनें कुलाबा हस्तगत केला आणि मानाजीस पकडून याचे हवालीं केलें. यानें त्यास कैदेंत ठेविलें. पुढें दसऱ्याचे मुहूर्तावर (ता. २०-९-१७९७) बाजीरावानें यास सरखेलीचीं वस्त्रें दिलीं. हा पुढें दौलतरावाजवळ सरदारी करून असे. बायांचे युद्धांत व समेटांत हाच प्रमुख होता. इंग्रजांचें युद्ध झाल्यावर कांहीं काळ यानें दौलतरावाचा कारभार केला. हा पुढें हिंदुस्थानांतून देशीं येत असतां ता. १-९-१८१३ रोजीं जांबगांव येथें मरण पावला. ब्राउटनच्या लेखांत याचें वर्णन पुष्कळ आहे ( म. रि. उ. वि. ३ ).

**बाबूराव काशी**—हा गोविंदराव गायकवाडाचा एक हस्तक होय.

**बाबूराव केशव ठाकूर**—हा पेशवाईंतील एक प्रसिद्ध मुत्सद्दी, अनेक नाजुक कामगिरींवर पाठविला जात असे. कोल्हापुरांत कात्यायनीचा नळ बाबुरावानें आणिला व अनेक धर्मकृत्यें केलीं. याचा वाडा साताऱ्यानजीक लिंब येथें आहे. हा मूळ करोळी गांवचा कुलकर्णी असून देशावर येऊन प्रसिद्धीस आला. राजापुरप्रांतांत ठाकूर देसाई राहतात ते याच घराण्यांपैकीं होत. याला लक्ष्मण नांवाचा एक भाऊ होता ( खरे पृ. ४०९६; ४४९० ).

**बाबूराव कोन्हेर कोल्हटकर**—( स. १७५५ ) पहिल्या रघूजीच्या मृत्युसमयीं हा नागपुरास आला. जानोजी भोसले व मुधोजी भोसले यांचे तंट्यांत हा जानोजीचे बाजूस होता. तथापि दोघांत मध्यस्थीहि करी. जानोजीनें त्रिंबकजी भोसले यास व बाबुराव कोन्हेर यास सेनासाहेबसुभ्याचीं वस्त्रें आणण्याकरितां पुण्यास पेशव्यांकडे पाठविलें होतें. हा जानोजी भोसल्याची दिवाणगिरी करीत असे.

हा झाशी येथें राहिला होता. गणेश संभाजी खांडेकर या गृहस्थानें पुढें झांशीची मामलत याजकडून घेतल्याचा दाखला आहे. याचेच मार्फत गणेश संभाजीचा जानोजी भोसल्याकडे प्रवेश झाला ( ना. प्रां. इ. ).

**बाबूराव दाभाडे**—( मृत्यु ता. ५-१२-१७३६ ) हा यशवंतराव दाभाड्याचा भाऊ होय. याला सवाई बाबुराव असें म्हटलें आहे.

याला सेनाखासखेलचें पद दिल्याचा निर्देश आहे ( रा. खं. ३. १६७ ).

हा फार पराक्रमी असून यानें अनेक पराक्रमाचीं कामें करून मोठा लौकिक संपादन केला. याला शाहूनें सुरतच्या मोहिमेवर पाठविलें होतें. यानें एकूण पुष्कळ लढाया केल्या, त्यांपैकीं अहमदाबादेवरील स्वारी ही याच्या आयुष्यांतील शेवटची होय. 'बाबुराव दाभाडे सेनाखासखेल यांस समाधान वाटत नव्हतें. याजकरितां सोनगडीहून पुढें लोहनेरास रवाना केलें. औषध उपाय व दैवी उपाय बहूतच जाले. ईश्वरें कोणासच यश न दिलें. मार्गशीर्ष शुद्ध त्रयोदशी मंदवारीं देहावसान झालें.' असें याचा भाऊ यशवंतराव दाभाडे यांनीं चिमाजी आपास कळविलें आहे ( पे. द. १२. ९३ ).

**बाबूराव पाटणकर**—पेशवाईतील राघोबाच्या पक्षाचा सरदार.

**बाबूराव मल्हार बर्वे**—( अंताजी मल्हार बर्वे पाहा ).

**बाबूराव विश्वनाथ वैद्य**—( स. १७७५ सुमार ) हा पेशव्यांचा नागपूरकर भोसल्यांकडील वकील. याचा पुत्र नारायण.

**बाबूराव हरि गुप्ते**—( स. १७६३ ) पेशवाईतील हा एक सरदार असून सखाराम हरीचा बंधु होय. अंबेगांवचे कुलकर्णी.

यानें राक्षसभुवनच्या लढाईंत शौर्यानें लढून आपल्या आंगची शिपाईगिरी प्रगट केली. त्या वेळीं याला पुष्कळ जखमा झाल्या होत्या ( स. १७६३ ). जेव्हां निजामानें बसालतजंगावर स्वारी केली त्या वेळीं माधवरावानें निजामाच्या मदतीस यास फौज देऊन पाठविलें होतें ( म. रि. मध्य वि. ४ ). पुढें यानें दादाचा पक्ष स्वीकारला.

**बायजाबाई शिंदे**—( स. १७८४–१८६३ ) ही सर्जेराव घाटग्याची मुलगी व दौलतराव शिंद्याची बायको. ही रूपानें फार सुंदर होती म्हणून हिला 'सौंदर्यलतिका' असें म्हणत. दौलतराव शिंद्यानें सर्जेराव घाटग्यास पुष्कळ पैसा व अधिकार दिल्यामुळें त्यास हिला शिंद्यास देणें भाग पडलें; व शिवाय दौलतराव तरुण, ऐश्वर्यवान् व रंगेल असल्यामुळें हिनें त्यालाच वरिलें. दौलतराव मरण पावल्यावर हिनें जनकोजी नांवाच्या मुलास दत्तक घेतला पण त्याचें व हिचें न पटून ही ग्वाल्हेर सोडून आग्र्यास जाऊन राहिली. हिनें आपल्या वडिलांची एक छत्री पुष्कर गांवांत बांधली आहे.

**बायझीदखान कर्राणी**—( स.१५७२ ) बंगालचा सुभेदार.

**बॉयड**—( स. १७९५–९७ ) प्रथम निजाम व नंतर पेशव्याकडे नोकर.

**बारप**—( स. ९७५ ) सोलंकीवंशांतील निंबार्काचा पुत्र. हें नांव बारप किंवा बारप्प लिहिलेलें आढळतें. प्रबंधचिंतामणीमध्यें लिहिलें आहे कीं मूळराज सोलंकीवर सपादलक्षीय सांभरचा विग्रहराज चौहान दुसरा यानें स्वारी केली, याच वेळीं तेलंगणचा राजा तैलप याचा सेनापति बारपनेंहि मूळराजावर स्वारी केली. त्यांत हा मारला गेला व दहा हजार घोडे व अठरा हत्ती मूलराजाच्या हातीं लागले. द्व्याश्रयकाव्यांत लाटेश्वर द्वारपालाला मूलराजपुत्र चामुंड राजानें मारल्याचें लिहिलें आहे ( सर्ग ६, श्लो. ३९–९५ ). कीर्तिकौमुदींत लिहिलें आहे कीं, मूलराजानें लाटेश्वराचा सेनापति बारपाला मारून त्याचे हत्ती घेतले ( २. ३. ). तैलप सोलंकीनें राठोडांचें राज्य घेतलें. त्यांत लाट देशहि घेतला. तो सेनापति बारपाला त्यानें दिला असेल. त्यामुळें याला सेनापति किंवा राजा म्हणणें योग्य होईल. पण सुकृतसंकीर्तनमध्यें लिहिलें आहे कीं, मूलराजानें कनोजच्या राजाच्या सेनापति बारपच्या मार्फत हत्ती घेतले (२. ५.).

यावरून हा सेनापति तैलपाचा कां कनोजच्या राजाचा ? पण हा तैलपाचा सेनापति असावा. एक तर हें नांव दक्षिणेकडील आहे व याचा वंशज त्रिलोनपाल याच्या ताम्रपत्रांत याला लाट देशाचें राज्य मिळाल्याचें लिहिलें आहे. याचा पुत्र गोग्गिराज.

यानें राष्ट्रकूटांशीं सोयरीक केली होती. यानें मूळराज सोलंकी याच्यावर स्वारी करून त्याचा पराभव केला. तेव्हां मूळराज हा कंथकोटकडे पळून गेला. पण त्यानें मोठ्या सैन्यानिशीं कांहीं दिवसांनीं बारप्पावर स्वारी केली. या लढाईंत बारप्प हा ठार झाला. याच्यानंतर गोंगीराज, कीर्तिराज, वत्सराज व त्रिलोचनपाल हे राजे लाट देशावर राज्य करीत होते.

**बारसिंग**—( स. १३७५ ) अलवार संस्थानाधिपति चवदाव्या शतकाच्या उत्तरार्धांत अंबर येथें उदयकरण नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याचा वडील मुलगा बारसिंग हा अलवार घराण्याचा मूळ पुरुष मानला जातो.

हा आपल्या बापाशीं भांडून राज्यावरचा हक्क सोडून जयपूर संस्थानांत नोकरीस राहिला. तेथें यानें व याच्या वंशजांनीं सुमारें ३०० वर्षे नोकरी केली. कल्याणसिंगाला कामगिरीबद्दल जयसिंगाकडून माचेरीची जहागीर मिळाली. चार पांच पिढ्यांनंतर प्रतापसिंह यानें अलवार संस्थान मिळविलें. वयाच्या सतराव्या वर्षीं जयपूर संस्थानांत सैन्यांत नोकरी धरून उनिगारा येथील उपद्रवी नरूक लोकांना धाकांत आणून यानें नांवलौकिक मिळविला.

**बारिया अरब**—( स. १२४६ ) या नांवाचा पठाण स. १२४६ मध्यें पुण्यावर चालून आला. कुंभारी व कासारी हीं दोन गांवें नदीकांठीं होतीं, आणि यासच त्या वेळीं पुणें म्हणत. या गांवांत पुणेश्वर ऊर्फ केदारेश्वर आणि नारायणेश्वर हीं दोन देवळें होतीं. कदाचित् पुणेश्वरावरून पुणें नांव अस्तित्वांत आलें असावें. यानें हीं देवळें पाडून मशिदी उभारल्या, व देवळाचीं उत्पन्नें मशिदीस लावून दिलीं. त्या मशिदी थोरला शेकसल्ला व धाकटा शेकसल्ला या नांवांनीं प्रसिद्ध आहेत. पुढें मराठेशाहींत या नारायणेश्वराची स्थापना पुरंदरच्या पायथ्याशीं नारायणपेठ वसवून झाली. यानें पुण्यास कोट बांधला ( स. १२९० ). कुंभारवेशीजवळ त्याच्या खाणाखुणा दिसतात. निजामशहाकडे पुणें असतां मुरार जगदेवानें पुण्यावर स्वारी करून पुणें जाळलें, गड उध्वस्त केला

( स. १६२२–२३ ). स. १६३६ नंतर दादाजी कोंडदेवानें येथें वस्ती करविली आणि शिवाजीसाठीं लालमहाल वाडा बांधला.

**वार्बकशाह लोदी**—हा सुलतानशाह लोदीच्या मुलीचा मुलगा. याला ख्वाजा बायझीद या नांवाचा एक भाऊ होता.

२. ( स. १४६० ) ( रुक्नुद्दीन वार्बकशाहा पाहा ).

**बार्लो, सर जॉर्ज**—( स. १७६२–१८४७ ) हिंदुस्थानचा एक गव्हर्नर जनरल.

ह्याच्या वेळीं झालेली विशेष गोष्ट म्हणजे वेलोर येथील शिपायांचा दंगा ( १० जुलै स. १८०६ ) होय. या वेलोरच्या बंडामुळें यास गव्हर्नर जनरलच्या जागेवरून कमी करून याच्या जागीं लॉर्ड मिंटोची नेमणूक झाली. पुढें कांहीं दिवस हा मद्रासचा गव्हर्नर होता. स. १८१२ सालीं याचा कारभार पसंत न पडल्यामुळें यास विलायतेस बोलाविण्यांत आलें.

**बाल**—( स. ११०० पूर्वीं ) एक संस्कृत धर्मशास्त्रकार. याच्या ग्रंथाचें नांव बालरूप असावें. व्यवहार व काळ यांवर याचा ग्रंथ असावा.

**बालकृष्ण**—याचें एक तैत्तिरीय संहिताभाष्य आहे. स. १८३८ मध्यें कलकत्ता येथें सूचिपत्र प्रसिद्ध झालें. त्यांत फोर्ट विलियम वगैरे ठिकाणच्या संस्कृत पुस्तकांची यादी छापली आहे. त्यांत पृष्ठ ५६ वर याच्या भाष्याचा निर्देश आहे.

**बालकृष्ण तिमाजी हणमंते**—हे भोसल्यांचे पिढीजाद नोकर होते. जिजाबाईचे गरोदरपणीं हे तिच्याजवळ शुश्रूषेसाठीं शिवनेरीवर होते.

**बालकृष्ण वासुदेव हणमन्ते**—याचें दुसरें नांव अबूराव. हा शहूचा अमात्य होता. याचा पुत्र जगजीवन.

**बालचंद्रसूरि**—( १४ वें शतक ) हा गुजराथेंतील मोंधेरक गांवचा राहणारा असून याचें मूळ नांव मुंजाल असें होतें. यानें हरीभद्रसूरीकडून धर्मोपदेश व जैनधर्माची दीक्षा घेतली. याच्या बापाचें नांव धरादेव व आईचें नांव विद्युत् असें होतें. हा हरिभद्रसूरीच्या मागून त्याच्या गादीवर बसला. याच्या गुरूचें नांव पद्मादित्य असून यानें करुणवज्रायुध, वसंत विलास व असदाच्या विवेकमंजरी आणि उपदेशकंदलीवरील टीका हे ग्रंथ लिहिले.

**बालमती**—( उदयसिंह राठोड पाहा ).

**बालसरस्वती**—( स. १०५० नंतर ) हा नन्नयाचा शिष्य व राजेंद्राचा पुत्र. एक तेलगू कवि. जात ब्राह्मण. यानें आंध्रकौमुदीवर आंध्रसभा नांवाची उत्तम टीका लिहिली आहे.

**बालहर्ष कलचुरि**—( स. ९१० सुमार ) एक राजा. हा मुग्धतुंगाच्यानंतर गादीवर आला.

**बालीलखान**—( स. १६०० सुमार ) विजापूरच्या दुसऱ्या इब्राहीम आदिलशाहाचा सेनापति.

**बालेचुरो**—हा आंध्रभृत्य घराण्यांतील पुळुमायीचा सुभेदार. हा पुळुमायीनें जिंकलेल्या दक्षिण प्रदेशावर राज्य करीत असे. यालाच विलीवायकुर नांवानें उल्लेखिलेलें आहे ( भांडारकर, पा. ३७ ).

**बाहड**—( स. ११४२ सुमार ) हा अनहिलपट्टणच्या सोळंखी घराण्यांतील सिद्धराज जयसिंहाचा दत्तक पुत्र. सिद्धराजाचा जांवई सपादलक्षाचा म्हणजे अजमीरचा अर्णवराज यानें याला गादीवर बसविण्याची खटपट केली. परंतु पुढें झालेल्या लढाईंत अर्णवाचा पराभव झाला असावा. कारण पुढें दोघांत संधि होऊन हा अर्णवाच्या आश्रयास गेला. विजयी झालेल्या कुमारपालानें अर्णवाला आपली देवलदेवी नांवाची बहीण दिली.

स्तंबतीर्थाचा ( खंबायत ) सरदार उदयन याचा हा मुलगा. याचा वाग्भट नांवाचा एक भाऊ होता. वाग्भट हा कुमारपालाचा मंत्री होता; पण हा मात्र त्याच्या विरुद्ध असे.

२. 'वाग्भटालंकार' कर्त्या वाग्भटाचें प्राकृतांतील नांव.

**बाहमनी घराणें**—( राजधानी गुलबर्गा. आठव्यापासून बेदर. ) १ अलाउद्दीन–हसन ( गंगू बहामनी ) ( स. १३४७–५८ ), २ मुहंमद १ ला ( २ फेब्रुवारी १३५८–२१ एप्रिल १३७५ ), ३ मुजहीद ( २१ एप्रिल १३७५–१६ एप्रिल १३७८ ), ४ दाऊद ( स. १३७८ मारला गेला ), ५ महमूद १ ला ( स. १३७८–१३९७ ), ६ घियासुद्दीन ( स. १३९७ खून ), ७ शम्सुद्दीन ( स. १३९७ पदच्युत ), ८ फीरूज ( स. १३९७–१४२२ ), ९ अहमद १ ला ( स. १४२२–३५ ), १० अलाउद्दीन २ रा ( स. १४३५–१४५८ ), ११ हूमायून ( स. १४५८–६१ ), १२ निजाम ( स. १४६१–६३ ), १३ मुहमद २ रा ( स. १४६३–१४८२ ), १४ महमूद २ रा ( स. १४८२–१५१८), १५ अहमद २ रा (स. १५१८–२१), १६ अलाउद्दीन ३ रा ( स. १५२१–२३ खून ), १७ वली-उल्ला ( स. १५२३–१५२५ ), १८ कलीमुल्ला ( स. १५२५–१५२७ ).

**बाहुक धवल**—( स. ८७५ सुमार ) सोरठ येथें राज्य करणाऱ्या सोलंकी घराण्यांपैकीं राजेन्द्राचा पुत्र. यानें धर्म नांवाच्या राजाचा नाश केला. हा पालवंशांतील धर्मपाल असावा. राजाधिराज व परमेश्वर अशीं उपपदें धारण करणाऱ्यांना यानें जिंकलें. तसेंच कर्नाटकच्या सैन्याचा पराजय केला. त्या वेळीं कर्नाटकावर राठोडांचें राज्य होतें. याचा पुत्र अवनिवर्मा.

**बाहुबली**—प्रथमतीर्थंकर ऋषभनाथाचा हा पुत्र. याचाच प्रचंड पुतळा चामुंडरायानें श्रवणबेळगोळा येथें गोमटेश्वर या नांवानें बसविला.

**बाळंभट्ट पायगुंडे**—( स. १७३०–१८२० ) बालकृष्ण हा वैद्यनाथ आणि लक्ष्मीबाई यांचा मुलगा होय. याचा उपाकृतितत्त्व, हाहि ग्रंथ प्रसिद्ध आहे. याशिवाय यानें धर्मशास्त्रसंग्रह, जीवत्पितृकर्तव्यनिर्णय असे ग्रंथ लिहिले आहेत. बालकृष्णानेंच बालम्भट्टी ही मिताक्षरेवरील टीका लिहिली आणि आपल्या आईचें शांतवन करण्याकरितां त्यानें ती आपल्या आईच्या नांवानें प्रसिद्ध केली असा उल्लेख आलेला आहे.

**बाळा बहिरु**—( स. १७६१–१७८५ ) सुप्रसिद्ध साताप्पा शिलारखान्याचा हा दुसरा मुलगा होय. याचें मूळ नांव बाळा असून बाळा बहिरु असें जोड नांव पडण्याचें कारण बहिरु रंगारी, बाळाच्या बैठकीला नेहमींचा जिगर दोस्त असे. बाळानें लावणी करावी व ती बहिरूनें म्हणावी किंवा बहिरूची लावणी बाळानें म्हणावी अशा या दोघांच्या दाट स्नेहामुळें त्यांच्या तमाशाचें नांव बाळा-बहिरूचा तमाशा असेंच पडलें म्हणून हे स्वतःच तसें जोड-नांव लावूं लागले. बाळाबहिरूचा स्वतंत्र असा लावण्यांचा संग्रह प्रसिद्ध नाहीं. परंतु साताप्पाप्रमाणेंच बाळाबहिरु-च्याहि कांहीं लावण्या होनाजीच्या नांवावर शालिग्रामांनीं छापल्या आहेत. ‘ आस्त्री प्रलयंगता तुझी ग बुध नाहीं कामाची ’ ही सुप्रसिद्ध उत्कृष्ट लावणी बाळाबहिरू-चीच आहे. त्या लावणींत वर्णिलेल्या कर्नाटकच्या स्वारीच्या प्रसंगावरून थोरल्या माधवरावाच्या कारकीर्दीपासून बाळाबहिरूचा फड पुण्यांत गाजत असावासा दिसतो. याच्या फडाचे व सगनभाऊच्या फडाचे सामने त्या वेळींहि होत असावेसें दिसतें. एका लावणीच्या शेवटीं सगनभाऊ म्हणतो कीं, ‘ फोडिलें रंगाऱ्याचें मडकें ’ तें बहुधा या बहिरु रंगाऱ्यास अनुलक्षून असावें.

बाळाबहिरूचा पोवाडा असा एकच उपलब्ध आहे व तो नानाफडणिसाचा होय. आजतागायत गोंधळ्यांच्या तोंडांत जे पोवाडे शिल्लक राहिले आहेत त्यांपैकीं हमखास नेहमीं म्हटल्या जाणाऱ्यांपैकीं तो आहे. त्या पोवाड्या-वरून उघड असें दिसतें कीं, सवाईमाधवरावाची जवळजवळ सर्व कारकीर्द बाळाबहिरूनें पाहिली होती व तेथपर्यंत कवनें करण्याचा याचा उद्योग सुरू असावा ( ऐतिहासिक पोवाडे, य. न. केळकर कृत, प्रस्तावना, पृ. ८०–८१ ). याची समाधि सासवड येथें आहे.

**बाळाजी अंबाजी**—( ग्रंथकाल स. १७६७ ) यानें ‘ विवेकसार ’ नांवाच्या एका संस्कृत ग्रंथाचें मराठींत भाषान्तर केलेलें आहे. संस्कृत ग्रंथाचा मूळ कर्ता श्री. वासुदेव यतींद्र हा होता. या ग्रंथाचें तैलंग भाषेंत भाषांतर केलेलें आहे ( मं. त्रै. व. ११.२ ले. १९ ).

**बाळाजी आवजी चिटणवीस**—( स. १६४८–१६८१ ) याचे वडील आवाजी हरी मुजुमदार, उपनांव चित्रे. याच्या वडिलांस पोत्यांत घालून समुद्रांत फेंकून दिलें, व ह्याला लहानपणीं गुलाम म्हणून विकावा अशी आज्ञा करण्यांत आली. पण मामांनीं ह्याचें पालनपोषण केलें.

पुढें वयांत आल्यानंतर त्यांना अज्ञातवासाचा कंटाळा वाटूं लागला. याच सुमारास ( स. १६४८ ) शिवाजीनें राजापुराकडे मोहीम करण्याचें ठरविलें. तें ऐकून तेथील कसबेदारांनीं जीं कांहीं सामोपचाराचीं पत्रें पाठविलीं त्यांतच बाळाजींनीं शिवाजीला एक गौरवपर पत्र लिहून आपला मनोदय कळविला. याचें लेखनकौशल्य पाहून शिवाजी यास घेऊन गेला, व पुढें ता. १६ आगष्ट स. १६६२ रोजीं यास चिटणीशी दिली.

बाळाजीवर जशी मुख्य राजकीय दप्तराची जबाबदारी होती तसेंच याच्यावर नेहमीं नाजूक वकिलातीचींहि कामें करण्याची विशेष प्रसंगीं जबाबदारी येई व तीं हा नेहमींच सफाईनें पार पाडी.

बाळाजीला १३ आक्टोबर १६७३ रोजीं पालखीचा सन्मान मिळाला. बाळाजीची लेखनशैली इतकी साधी, स्पष्ट व पूर्ण असे कीं त्यामुळें राजकीय हुकुमांत कधींहि घोटाळा उडत नसे. हा दूरदर्शी व चाणाक्ष होता. पण पुढें याला कलुशा दादजी रघुनाथ यांनीं खोडसाळ-पणानें गुंतवून संभाजीस खोटेंच सांगून याला मारण्याची अर्धवट आज्ञा घेतली. व बाळाजी याचा भाऊ चिमणाजी यास परळीखालीं स. १६८१ च्या आगष्टांत ठार मारलें. बाळाजीची स्मृति फारच तीव्र होती. हा राजकारणांत फारच दक्ष असे.

**बाळाजी गोविंद खेर**—( स. १७७८ सुमार ) हा एक पेशवाईंतील सरदार होय. बुंदेलखंडांतील गोविंद-

पंत बुंदेल्याचा मुलगा असून याला गंगाधर नांवाचा एक भाऊ होता. हा व याचा भाऊ गंगाधर हे आपापसांत भांडत असल्यामुळें बुंदेले राजे चढेल झाले; त्यांस विसाजी कृष्णानें नरम करून ताळ्यावर आणलें. यानें स. १७७८ मध्यें इंग्रजी फौज पुण्यावर चाल करून येत असतां ती फौज काल्पीवरच अडवून धरिली, व काल्पीसुद्धां आपला सर्व प्रदेश हस्तगत केला.

**बाळाजी जनार्दन जामगांवकर (जांबगांवकर)**—हा महादजीचा एक कारकून होय. जेव्हां महादजीनें नवीन ताज्या दमाची कांहीं फौज जामगांवाहून तयार करून मागितली, तेव्हां यानें मोठी शिताफी करून फौज जमा करून तावडतोब रवाना केली (स. १७८८च्या आरंभीं).

**बाळाजी नाईक भिडे**—(स. १७८० सुमार) पेशवाईतील हा पुण्यांतला प्रसिद्ध सावकार होय. फत्तेसिंग गायकवाडास जेव्हां पेशव्यांचें देणें फार झालें तेव्हां हा पेशव्यांकडे फत्तेसिंगास जामीन राहून एक प्रकारें त्याच्या वकिलाचेंहि काम पुण्यास करी.

**बाळाजीपंत ठोसर**—(मृत्यु स. १७९०) हा नाना फडणविसाचे विश्वासांतला असून सवाई माधवराव पेशव्यांचे पदरीं होता.

**बाळाजीपंत दामले**—हा पेशव्यांचा एक सरदार होय.

**बाळाजीपंत महादेव भानु**—(मृत्यु स. १७१९) हा बाळाजी विश्वनाथाबरोबर देशावर आला. बाळाजीस पेशवेपद मिळाल्यावर त्यानें यास शाहूकडून फडणीसी देवविली (स. १७१३). दिल्लीस जाण्याच्या कारस्थानांत बाळाजीनें यास आपल्याबरोबर घेतलें.

दिल्लींत ता. २८-२-१७१९ रोजीं अमीनखानाशीं मराठ्यांची मारामारी झाली तींत १५०० मराठे कापले गेले, त्यांत संताजी भोसले व हा हे दोघेजण मृत्यु पावले. याच्या कुटुंबास इनामें दिलीं. याचा पुत्र जनार्दन व नातू नाना फडणीस होय.

हा चौथाईच्या सनदा घेऊन पेशव्याचे पालखींत बसून जात असतां दिल्लीतील लोकांनीं याला मारलें, ही आख्यायिका खरी नाहीं. मात्र मराठे सनदा घेऊन जातात हा प्रकार त्या लोकांस आवडला नाहीं ही गोष्ट खरी.

**बाळाजी बाजीराव (ऊर्फ नानासाहेब) पेशवे**—(जन्म स. १७२१ डिसें. ८, पेशवेवस्त्र स. १७४० जून २५, मृ. स. १७६१ जून २३) हा थोरल्या बाजीरावाचा पुत्र होय. याचा जन्म स्थल मौजे सातें (नाणेंमावळ) येथें झाला, व मुंज स. १७२८ च्या जानेवारींत झाली, आणि स. १७३० च्या जानेवारींत गोपिकाबाईशीं लग्न झालें.

स. १७३९ त शाहूनें मिरजेवर स्वारी केली, तींत हा होता. ही याची पहिलीच खेप असावी. तेथून पुण्यास परत आल्यावर मस्तानीचें प्रकरण विकोपास गेलें, व चुलत्या (आपा) पुतण्यांनीं बाजीराव–मस्तानीची ताटातूट केली. बापलेकांचें पटत नसे. शेवटीं बाजीराव उत्तरेस गेला व तिकडेच वारला (स. १७४० एप्रिल). तेव्हां नानासाहेब कुलाब्यास मानाजी आंग्र्याच्या मदतीस आपासह गेला होता. हा तेथें क्रिया वगैरे करून, पुण्यास आला व आपासह साताऱ्यास गेला (जून); तेथें याला १२ दिवसांनीं पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं (२५ जून १७४०). पुढें लवकरच चिमाजी आपा वारला (डिसेंबर १७४०). याच सुमारास शाहूच्या पश्चात् कोल्हापूरकर संभाजीस साताऱ्याच्या गादीवर बसविण्याचा करार संभाजी व नानासाहेब यांच्यांत झाला होता, पण तो सिद्धीस गेला नाहीं.

यानें २१ वर्षें कारभार केला, त्यांत शाहूच्या मृत्यूपर्यंतच्या काळांत (स.१७४९) पेशवे केवळ छत्रपतींचे हस्तक होते, मात्र पुढील काळांत सर्वतोपरी राज्याचे मुखत्यार झाले. त्यांत पहिलीं तीन वर्षें (स.१७५०–५२) रामराजाशीं मिळतें घेण्यांत गेलीं, परंतु तें जमलें नाहीं म्हणून पुढील ९ वर्षें सर्व भार पेशव्यानें आपल्यावर घेतला. शाहूच्या हयातीपर्यंत यानें सुरंजभेलसें (स.१७४०-४१), माळवा, प्रयाग, बंगाल (स. १७४२–४३), भेलसें (स. १७४४–४५), कर्नाटक पहिली लढाई (स. १७४६–४७), नेवाई (स. १७४७–४८) इतक्या स्वाऱ्या केल्या.

हा कारभार होण्यापूर्वी बाबूजी नाईक हा कर्नाटकाच्या सुभेदारीहून अपेशी ठरून आल्यानें व तो, रघूजी भोसले, शाहूची थोरली राणी, मुतालिक, दाभाडे, गायकवाड वगैरे मंडळी याच्याविरुद्ध मसलती करीत असल्यानें, पेशव्यानें त्या मसलती वारून, नाईकाची समजूत पाडून व कर्नाटकावर सदाशिवरावभाऊ यांस पाठवून तिकडील सर्व बंदोबस्त केला व पोर्तुगीजांनीं वसई ते गोवें या दरम्यान ज्या किरकोळ घालमेली केल्या त्यांचाहि बंदोबस्त केला (स. १७४७). याच सालच्या पहिल्या दोनतीन महिन्यांत वर सांगितलेल्या विरुद्ध पक्षाच्या कारवाईनें व स्वतःच्या कर्जाच्या चिंतेनें शाहूनें नानासाहेबांस पेशवाईपदावरून दूर केलें होतें, परंतु विरुद्ध पक्षांतील याच्याइतका कर्तबगारीचा एकहि माणूस पुढें न आल्यानें पुन्हां नानासाहेबांना पेशवाईचीं वस्त्रें दिलीं

( एप्रिल स. १७४७ ). याच सुमारास भाऊसाहेब कर्नाटकच्या स्वारींतून परत आला. नंतर थोड्याच दिवसांनीं शाहूची प्रकृति बिघडल्यानें मोठी फौज घेऊन हा साताऱ्यास आला ( आगस्ट स. १७४९ ) व शाहूचा अंत होऊन रामराजास गादीवर बसवून मग परत पुण्यास आला ( एप्रिल स. १७५० ). शाहूनें यास लिहिलेल्या २ याद्या म्हणजे मराठी साम्राज्याच्या सूत्रचालकत्वाच्या सनदाच होत.

रामराजाच्या राज्यारोहणापासून पानपतापर्यंत (स. १७५०–६१) अकरा वर्षांत मराठी राज्याचें चालकत्व पेशव्यांकडे होतें. ब्राह्मण व मराठे सरदारांनीं याच मुदतींत निकराचा उद्योग केला. तंजावर ते दिल्ली व अटक ते कलकत्ता पावेतों सर्व हिंदुस्थानाला मराठ्यांनीं याच कालांत आटोप घातला. नानासाहेबानें प्रथम दोनतीन वर्षांत आपल्या विरोधी पक्षाचा बंदोबस्त करून, नंतर राज्यकारभाराचें मुख्य ठिकाण पुण्यास केलें.

शाहूच्या मृत्यूनंतर थोड्याच दिवसांत ताराबाई पेशव्यावर रुसून सिंहगडास गेली व खटपटी करूं लागली, परंतु पेशव्यानें तिची समजूत काढली व सिंहगड सचिवांकडून स्वतःकडे घेतला ( जुलै १७५० ). आणि रघुजी प्रतिनिधी वगैरे सरदारांची व त्यांच्या प्रांताची स्वतंत्र व्यवस्था करून दिली. प्रतिनिधीनें सांगोल्यास पेशव्यांविरुद्ध लढाई दिली होती, पण तींत त्याचाच पराभव झाला ( आक्टोबर ). सांगोल्यास सदाशिवराव भाऊनें रामराजापासून राज्यव्यवस्थेची जी योजना करून घेतली, तीमुळें नानासाहेबांच्या मनांत भाऊबद्दल विकल्प आला व त्यास रामचंद्र बाबानें भर दिली. परंतु नानासाहेबांनीं पडतें घेऊन व भाऊस कारभारी नेमून हें घरभांडण मिटविलें.

इकडे ताराबाईनें पेशव्यांविरुद्ध मोठें कारस्थान उभारलें व प्रतिनिधी, नाईक वगैरेंकडून राज्यांत बखेडा माजविला. दमाजी गायकवाडानें तर पुण्यापर्यंत चालून येऊन ( पुणें सोडून ) साताऱ्यास कूच केलें. तेथें मात्र नाना पुरंदऱ्यानें गेंड्याच्या माळावर त्याचा पराभव केला. पुढें पेशव्यानें त्याला कैदेंत ठेवून त्याच्याकडून निम्मी गुजराथ आपल्या नांवाची करून व त्यानें आपल्या हाताखालीं वागण्याचें कबूल केल्यावर त्याला सोडलें ( स. १७५२ ).

स. १७५१ मध्यें यानें निजामाचा कुकडीवर ( घोडनदी येथें ) पराभव केला. याच वेळीं गाजिउद्दीनास मदत करून त्याच्या मोबदल्यांत तापी–गोदा–दुआब पेशव्यानें मिळविला, परंतु त्याच वेळीं गाजीचा खून झाल्यानें सर्व निजामशाही स्वतःच्या आटोक्यांत आणण्याची पेशव्याची संधि फुकट गेली (आक्टोबर १७५२). तरी पण सलाबतजंगाकडून वरील दुआब आपल्याकडे लिहून घेतला. या तहास भालकीचा तह म्हणतात. याच प्रसंगीं नानासाहेबानें "आम्हीं गनीम लोक शिवाजीमहाराजांचे शिष्य आहों." असे बाणेदार उद्गार काढले आहेत. पुढें ४।५ वर्षे निजामाचा व पेशव्यांचा सलोखा हो-ा. याच वेळीं दिल्लीचा बादशहा दुसरा आलमगीर यानें, मुखत्यारीनें आपलें व बादशाहीचें संरक्षण करावें आणि त्याकरितां सैन्य ठेवावें व खर्चास चौथाई घ्यावी असा मराठ्यांशीं करार केला (स. १७५४ आक्टो. १४). पण ही गोष्ट यापूर्वी दोन वर्षे झाली असें आतां ठरलें आहे ( स. १७५२ मे ).

सावनूरच्या लढाईंत निजामानें पेशव्यांस मदत केली होती, पण पुढें त्याचें याच्याशीं फाटत चाललें. पेशव्यानें शिवनेरी काबीज केली ( १७५७ मे ). हा किल्ला पुष्कळ वर्षे मोगलांच्या ताब्यांत होता व तो मिळविण्याची खटपट बाळाजी विश्वनाथापासून चालली होती. तत्पूर्वी निजामानें पेशव्यांस कबूल केलेली २५ लक्षांची जहागीर न दिल्यानें सिंदखेडास उभयतांत लढाई झाली ( १७५७ आगष्ट १७५८ जाने. ). या लढाईंत १६ वर्षांचा विश्वासराव हा मुख्य होता, व त्याला संभाळण्यास दत्ताजी शिंदे होता; आणि मागून खुद्द नानासाहेब व भाऊ हे पाठपुरावा करीत होते. दक्षिण मोकळी करणें हें एक धोरण नानासाहेबाचें होतें. त्यामुळेंच ही लढाई मुख्यत्वें झाली. लढाईंत निजामाचा पराभव होऊन २५ लक्षांची जहागीर व नळदुर्ग मराठ्यांस मिळाला. सिंदखेडच्या लढाईंत इब्राहिमखान गारद्याचा पराक्रम पेशव्यानें पाहिल्यामुळें त्याला आपल्या पदरीं ठेविलें (स. १७५९).

पुढें इंग्रजांचा जम कर्नाटकांत बसूं लागलेला पाहून निजामानें प्रथम फ्रेंचांशीं व नंतर इंग्रजांशीं सख्य जोडलें, हें पेशव्यांस खपलें नाहीं; निजाम हा आपल्या हातांतील बाहुलें बनावा अशी त्यांची इच्छा होती. त्यामुळें त्याला कायमचा गाडण्यास पेशव्यानें स. १७५९ त प्रारंभ केला. याच वेळीं नगर व दौलताबाद हे किल्ले यानें मसलतीनें मिळविले. कबूल केलेली दहा लाखांची जहागीर व नगरपरांडा किल्ले देत नाहीं म्हणून निजामावर ही स्वारी आहे असें प्रसिद्ध केलें. निजामाची लढाईची तयारी चांगली नव्हती, उलट पेशव्यांची उत्कृष्ट होती. शिवाय इब्राहीमखानाचीं पलटणें नुकतींच पदरीं ठेवलीं होतीं. दादा, भाऊ व विश्वासराव या तिघांनीं या लढाईंत भाग घेऊन निजामाचा पराभव करून साठ लक्षांचा प्रांत व अशीर-

गड वगैरे किल्ले घेतले आणि निजामास बहुतेक संपुष्टांत आणलें ( जाने. मार्च १७६० उदगीर ). वास्तविक यानें उत्तरेपेक्षां दक्षिणेकडेच जास्त लक्ष घातलें होतें. त्यामुळें कांहीं लेखक याला दोषहि देतात.

भालकीच्या ( स. १७५२ ) तहानंतर हा धारवाड, रायचूर, श्रीरंगपट्टण इकडे गेला व खंडण्या वसूल करून परत फिरला ( १७५३ जून ). यानंतर यानें बहुतेक दरवर्षी स्वाऱ्या केल्या. दुसरी स्वारी बागलकोट ते हरिहर ( १७५४ जून ), तिसरी बेदनूरची ( १७५५ एप्रिल ), चवथी सावनूरची ( १७५६ जुलै ), पांचवी श्रीरंगपट्टणची ( १७५७ जून ), सहावी मेहेंदळ्याची ( १७५८ ), सातवी पटवर्धन–रास्त्यांची ( १७५९ ) व आठवी पटवर्धन–विनिवाल्यांची (१७६०). पहिल्या ५ स्वाऱ्यांत स्वतः नानासाहेब हजर होता.

यामुळें मराठी राज्याची हद्द कृष्णेपासून तुंगभद्रेपर्यंत पुढें सरकली. रघूजी भोसला बंगाल सर करीत असतां यानें बादशाहाच्या वतीनें त्याच्याशीं युद्ध पुकारून आपसांत दुही उभी केली.

नंतर मानाजी व तुळाजी आंग्रे-प्रकरणांत इंग्रजांस घरांत घेण्याची याची अक्षम्य चूक झाली (स.१७५५–५६).

स. १७५८–'५९ च्या सुमारास पेशव्यांची सत्ता कळसास पोहोंचून ते आतां हिंदुस्थानांत सार्वभौम सत्ता स्थापणार असें दिसतांच याच्याशीं गोडी राखण्याकरितां इंग्रजांनीं आपला वकील पुण्यास पाठविला होता.

भाऊसाहेब पानपतकडे गेल्यानंतर दसरा झाल्यावर नानासाहेब निजामावर नजर ठेवण्यासाठीं नगरच्या बाजूस आले ( डिसेंबर स. १७६० ). भाऊसाहेबांचें शेवटचें पत्र (१४ नाव्हेंबरचें ) पेशव्यास मिळालें. एका पत्रांत विश्वासरावानें ४० हजार फौज व १ कोटी रु. पैका तावडताव मागतला, तेव्हां महादोबा पुरंदऱ्यानें पेशव्याला तावडतोब निघण्यास सांगितलें. पण पानपतसारख्या प्रकरणाकडे याला लक्ष द्यावेंसें वाटलें नाहीं (पे.द.२.१३३).या सुमारास यानें पैठणच्या वाखरे या देशस्थ सावकाराच्या मुलीशीं लग्न लावलें (डिसेंबर), आणि हा उत्तरेकडे निघाला. पानपतच्या पराभवाची बातमी आल्यावरहि आणखी लग्न करण्याचा याचा विचार होता ( रा. खं. ३. २१२ ). भेलद्यास यास पानपतच्या पराजयाची बातमी कळली ( २४ जाने. १७६१ ) व पुढें जास्त जास्त हकीकत समजत गेली; त्यामुळें याचा धीर खचला शेवटीं मल्हारजी होळकर भेटला व खरें वर्तमान समजलें. जर नानासाहेब पुढें जाता, तर अब्दालीचा पराभव झाला असता, पण हा परत फिरला ( २२ मार्च ).

यानें भाऊचा फार ध्यास घेतल्यानें मधून मधून याला भ्रमाचे झटके येऊं लागले. जूनच्या आरंभीं हा पुण्यास आला. शिंदे, होळकर, पवार वगैरेंनीं युद्धांत कुचराई केली, म्हणून त्यांचे महाल जप्त करून त्यांस ठपकाहि दिला ( पे. द. २. १४३ ). याची प्रकृति दिवसेंदिवस क्षीण झाली, पुत्रशोक व बंधुशोक जबर झाला. हवा–फेरासाठीं स्वारी पर्वतीस गेली ( १८ जून ), परंतु उतार न पडतां २३ तारखेस दीड प्रहर रात्रीं याचें देहावसान झालें. लकडीपुलाजवळ सार्थक केलें व तेथें वृंदावन बांधलें.

व्यापार, धंदे वगैरे धनोत्पादनाच्या बाबीकडे या पेशव्याचें लक्ष नव्हतें. यानें पर्वतीवर देवदेवेश्वराचें देऊळ बांधलें. तसेंच पर्वतीचें तळें बांधलें व पुणें शहराच्या नवीन पेठा वगैरे वसवून वस्ती वाढविली. सारांश, पेशवाईचा माध्यान्हकाळ म्हणजे नानासाहेबाची कारकीर्द होय. हा उत्तम संस्कृतज्ञ, कलमबहाद्दर, धोरणी व अत्यंत हिशेबी होता. हा कोठेंहि असला तरी सर्व ठिकाणचे व्यवहार स्वतः उलगडीत असे. श्रीरंगपट्टणास राहून दिल्लीचा, तर बुंदेलखंडांतून कर्नाटकाचा हा कारभार करी. बापाच्या वेळेच्या अर्धवट कामांची तड लावण्यांत याचीं पहिलीं ३।४ वर्षें गेलीं. उत्तरेकडील आपलें वर्चस्व हलूं नये म्हणून यानें तिकडे लागोपाठ तीन स्वाऱ्या केल्या व शत्रुमित्रांवर छाप बसविली. याचा मुक्काम ३।४ दिवसांवर कोठेंच होत नसे, इतकी याची तडफ होती. स्वभावतः याचा कल तडजोडीचा असे, परंतु प्रसंगीं कडकपणाहि हा धरी. बाबूजी नाईक, रामचंद्र बाबा शेणवी, महादोबा पुरंदरे, रघुजी भोसले, दमाजी गायकवाड वगैरे बरेच लोक चुरशीनें अथवा घमेंडीनें याशीं विरोध करीत, परंतु यानें सर्वांना ताब्यांत आणलें होतें. याचे विरोधी शाहूजवळ याच्या चहाड्या सांगत, शाहूच्या राज्यांत कलह चाले, या सर्व गोष्टींकडेहि याला लक्ष देऊन उपाय करावे लागत. त्यासाठीं यानें भाऊसाहेब व दादासाहेब यांना साताऱ्यास ठेविलें होतें.

**बाळाजी विश्वनाथ पेशवे**—( जन्म स. १६६०- मृत्यु स. १७२० एप्रिल ) याचा बाप विश्वनाथ व आजा शिवाजी ऊर्फ परशुराम हे दोघे शिवछत्रपतींचे नोकर असल्याचें उपलब्ध झालें आहे. श्रीवर्धनवर हबशांचा अंमल होता. भटांवर हबशांचा कांहीं कारणामुळें क्रोध झाल्यानें स. १६७० च्या सुमारास त्यांची देशमुखी जप्त झाली.

तेव्हां हा तेथून निघून दाभोळ, चिपळूणकडे गेला. तिकडेच याचें पहिलें लग्न झालें.

स. १६७९ मध्यें बाळाजी आपल्या राधाबाई नामक पत्नीसह देशावर आला. राधाबाई याची दुसरी बायको होय. ही डुबेरकर बर्वे घराण्यांतील असून तिला बाजीराव, चिमाजी व अनुबाई अशीं तीन अपत्यें झालीं.

बाळाजीचा थोरला भाऊ जानोजी याला जंजिऱ्याच्या सिद्द्यानें गोणत्यांत बांधून समुद्रांत बुडविल्यामुळें भीतीनें गांगरून जाऊन बाळाजी घाटावर पळून आला ही आख्यायिका आतां जानोजीच्या उपलब्ध झालेल्या स. १७०६ सालच्या हस्तलेखानें खोटी ठरली आहे.

बाळाजी प्रथम वरघाटीं सासवडास अंबाजी पुरंदऱ्याकडे आला. तेथून साताऱ्यास येऊन महादजी कृष्ण जोश्याच्या मार्फत शंकराजीपंत सचिवांकडे नोकरीस राहिला. पुढें याची हुशारी पाहून सेनापति धनाजीनें यास आपल्याकडे घेतलें. वाढत वाढत जाऊन पुणें प्रांताचा हा सरसुभेदार झाला ( स. १६९९–१७०२ ) व नंतर दौलताबाद प्रांताचाहि सरसुभेदार झाला ( १७०७ पर्यंत ). भीमाकाठीं औरंगजेबाची छावणी असतां यानें बादशहाच्या कैदेंत असलेल्या शाहूची व्यवस्था बादशहाच्या मुलीकडून उत्तम ठेवविली ( १६९५–९९ ). यावरून शाहू व बाळाजी यांचा संबंध बराच जुना होता. बहुतेक याच वेळीं शाहूची व याची शपथक्रिया होऊन पुढील गोष्टींचें सूतोवाच झालें असावें.

ब्रह्मेंद्रस्वामीनें बाळाजीस शाहूस मिळण्याचा सल्ला दिला व बाळाजीनें मागाहून धनाजीस शाहूकडे ओढलें. खेडच्या लढाईंत धनाजी जर नसता तर शाहूचें राजकारण टिकलें नसतें; त्यामुळें शाहूची मर्जी यावर बसली.

शाहूच्या राज्याभिषेकापासून धनाजीच्या मृत्यूपर्यंत ( स. १७१० ) यानें फारशा उलाढाली केल्या नाहींत; या काळांत हा वसुली काम पाहत असावा. धनाजीचे मृत्यूनंतर त्याचा मुलगा चंद्रसेनाची व याची चुरस होऊन चंद्रसेन ताराबाईचे पक्षास जाऊन मिळाला ( ऑगस्ट १७११ ). या वेळीं शाहूनें चंद्रसेनाविरुद्ध बाळाजीचा पक्ष घेतला.

या सुमारास बाळाजीजवळ सारी दोन हजार फौज होती; ती अपुरी जाणून यानें जास्त फौज वाढवून राज्याचा बंदोबस्त चालविला; त्याबद्दल शाहूनें यास सेनाकर्ते ही पदवी दिली ( ऑगस्ट स. १७११ ) व २५ लक्षांचा सरंजाम दिला.

पुढें यानें ताराबाईस हतप्रभ करण्यासाठीं धाकट्या शिवाजीस वेडा ठरवून धाकट्या संभाजीकडून ताराबाई व शिवाजीस कैदेंत टाकविलें. यामुळें ताराबाईचें महत्त्व व कारस्थानें लटकीं पडलीं व शाहूचें आसन स्थिर झालें ( स. १७१२ ). स. १७१३ त बाळाजीनें कृष्णराव खटावकरानें ताराबाईचे वतीनें चालविलेली बंडाळी मोडली व शाहूजवळ रदवदली करून परशुरामपंतास कैदेंतून काढून पुन्हां प्रतिनिधीपद देवविलें.

हिंगणगांवच्या दमाजी थोरातानें धामधूम चालवल्यामुळें बाळाजी त्याजवर चालून गेला. परंतु दमाजीनें यास पकडून कैदेंत ठेवून फार छळलें. अखेर दंड भरून याची सुटका झाली ( स. १७१३ ). नंतर यानें सय्यदाची मदत घेऊन ४ वर्षांनीं दमाजीचा सपशेल पराभव केला ( स. १७१८ ); आणि सचीवास त्याचे कैदेंतून सोडविलें व त्याबद्दल त्याजकडून स्वतःसाठीं पुरंदर किल्ला मागून घेतला.

ताराबाईचा पक्ष घेऊन बंडाळी करणाऱ्या कान्होजी आंग्र्यावर शाहूनें पेशवा बहिरोपंत पिंगळे यास पाठवलें. परंतु कान्होजीनें त्याचा पराभव करून त्यास कैदेंत ठेविलें. तेव्हां बाळाजीस आंग्र्यावर धाडण्यांत आलें. यानें सामोपचारानें कान्होजीची समजूत घालून त्यास शाहूकडे वळविलें, पेशव्याची सुटका केली व लोहोगड आपल्यास मागून घेतला ( स. १७१३ ऑक्टोबर ). तेव्हां शाहूनें बहिरोपंतास पेशवाईचे पदावरून काढून मांजरीगांवीं बाळाजीस पेशवाईचीं वस्त्रें दिलीं ( १६ नवं. स. १७१३ ).

ताराबाईच्या वेळीं बादशाही मुलखांत आक्रमण करण्याचें जें धोरण सुरू झालें होतें तेंच आतां यानें पुढें चालू केलें. कारण त्याशिवाय नवीन पुढें येणाऱ्या पराक्रमी लोकांस कामाला लावणें शक्य नव्हतें.

उत्तरेंत फर्रुखसियर बादशाहा व सय्यदबंधू यांच्यांत भांडणें चालू होतीं. तेव्हां बादशहानें सय्यदांविरुद्ध मराठ्यांची मदत मागितली, तेव्हां बाळाजीच्या सांगण्यावरून दाभाडे, सोमवंशी व निंबाळकर वगैरे सरदारांनीं खानदेश–गुजराथेंत धुमाकूळ माजविला. तेव्हां नाइलाजानें हुसेनअलीनें मराठ्यांशीं तह करून बादशहाविरुद्ध कारस्थानें चालविलीं ( स. १७१८ ). या तहानें शिवाजीच्या स्वराज्याखेरीज आतांपर्यंत जिंकलेला सर्व मुलूख मराठ्यांस मिळाला, आणि चौथाई–सरदेशमुखी सर्व दक्षिणेंत वसूल करण्यास सांपडली. त्यामुळें शाहूचा जम चांगला बसला. यानेंहि राज्यव्यवस्था सुरळीत लाविली. मराठ्यांचें लक्ष गृहकलहांतून काढून बाहेरच्या उद्योगांत लाविलें. बादशहाचें १५ हजार फौजेनिशीं रक्षण कर-

ण्याचें काम पेशव्यांनीं आपल्याकडे घेऊन त्याला आपल्या हातीं आणिलें. इंग्रजांची तैनाती फौज व ही योजना एकच होय. एकंदरींत या तहानें मराठी राज्यास नवें क्षेत्र व कामगिरी मिळाली.

पुढें सय्यदांचा व बादशहाचा तंटा विकोपास जाऊन त्यांनीं मराठ्यांची मदत मागितली. यानें साताऱ्याचा तह पुरा करून घेण्याचे करारावर दिल्लीस प्रयाण केलें (स. १७१८ नवंबर). बादशहा घाबरून जाऊन, हुसेन व मराठे माळव्यांत असतांनाच त्यांच्या मागण्या कबूल केल्या. परंतु तहांत कबूल केल्याप्रमाणें शाहूचीं बायकामाणसें परत मिळाल्याशिवाय मराठे मागें जाईनात. अखेर हुसेन व मराठे हे दिल्लीस गेले (स. १७१९ फेब्रु.). सय्यदांनीं मराठ्यांचे मदतीनें बादशहा फर्रुखसियर यास पदच्युत करून रफिउद्दरजत याला तख्तावर बसवलें (२८ फेब्रु.). यानंतर शाहूची मातुश्री व बायकामुलें यांना पेशव्यांच्या हवालीं केलें. तसेंच ठरल्याप्रमाणें चौथाईसरदेशमुखी व स्वराज्य यांच्या सनदाहि बादशाही शिक्कामोर्तब करून हवालीं केल्या (मार्च). यानंतर हा साताऱ्यास परत आला (जुलै). दिल्लीच्या चकमकींत नागपूरकर संताजी भोसले व बाळाजीपंत भानू हे दोघे ठार झाले, त्याबद्दल यानें नुकसानभरपाई घेतली. सय्यदांपासून रोज ५० हजार रुपये खर्चास मिळत. त्यांपैकीं निम्मे शिल्लक टाकून बाळाजीनें ती सर्व शिल्लक सरकारी खजिन्यांत टाकली, व फौजेच्या देण्याचा बोभाटाहि राहूं दिला नाहीं. याप्रमाणें या दिल्लीच्या पहिल्या स्वारीपासून मराठ्यांस पुष्कळ फायदा झाला. विशेषतः दिल्लीच्या बादशाहीसहि मदत करूं शकेल अशी एक प्रबळ सत्ता दक्षिणेंत असल्याचें जाहीर झालें, आणि प्रत्येक महत्त्वाच्या राजकारणांत मराठ्यांचा प्रवेश झाला.

यानंतर बाळाजीनें राज्यकारभाराची सर्व व्यवस्था उत्तम प्रकारें लावून दिली. चौथाईवसुलीच्या मुलूखगिरीसाठीं निरनिराळे प्रदेश सरदारांना वांटून देण्यांत आले. एकानें दुसऱ्याच्या प्रांतांत जाऊं नये असें ठरविलें. साहोत्रा, नाडगौडा वगैरे बाबी निरनिराळ्या म्हणजे प्रत्येक सरदाराच्या प्रांतांत येत असल्यानें एकमेकांवर एकमेकांचा दाब राही, परंतु पुढें या पद्धतीस सरंजामी व पिढीजात स्वरूप येऊन तिचा मध्यवर्ती सत्तेवर वाईट परिणाम झाला. मात्र या पद्धतीनें मराठ्यांच्या राज्याचा सर्वत्र झपाट्यानें प्रसार झाला. उलट पेशव्यांच्या या व्यवस्थेनें शिवाजीची अष्टप्रधानांची राज्यपद्धति नष्ट होऊन तिला एकमुखी स्वरूप आलें. ही एकमुखी पद्धति तिच्या कर्त्याच्या गुणदोषांप्रमाणें चांगली–वाईट असूं शकते. राष्ट्र वर्धिष्णु व्हावयास लागलें म्हणजे जी एक प्रकारची धडाडीची व जोराची उचल करावयाची असते, तीच या पद्धतीनें बाळाजीनें व पुढील पेशव्यांनीं केली होती, आणि तीस मोगलपक्षपाती लोकांचा विरोध होऊं नये म्हणून बादशाही परवानगी मिळविली होती.

बाळाजीनें राज्यकारभाराची शिस्त बसविल्यावर एकदां इस्लामपुराकडे स्वारी केली (नोव्हेंबर). पुढल्या सालीं थोरल्या बाजीरावाचें लग्न केल्यावर (मार्च स. १७२०) एकाएकीं याचें सासवड येथें देहावसान झालें (१ एप्रिल). हल्लीं तेथें याचें वृंदावन आहे.

**बाळाजी हरि (मज्यालसी) मेंडजोगी**—शहाजीनें शिवाजीबरोबर दिलेल्या विश्वासूक माणसांपैकीं एक. हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. गोत्र कौशिक. हा चांदवड (जि. नाशिक) येथील आपल्या वतनी चिटणिशीवर गुमास्ता ठेवून रोजगारानिमित्त शहाजीबरोबर कर्नाटकांत गेला; आणि तेथें शहाजीचा विश्वास संपादून शिवाजीबरोबर पुण्यास आला. जेधे करिन्यांत यास मज्यालसी म्हटलें आहे. इकडे आल्यावर यानें पुणें प्रांतांतील वडगांव, नेवरज, कोंढीत, चांदखेड, पिरंगुट इत्यादि अकरा गांवचें कुलकर्ण संपादिलें. पुणें शहरांतील पेठ मलकापूर ऊर्फ रविवारचें कुलकर्णहि यानें मिळविलें. पुण्यांत कासारविहिरीजवळ याचे वाडे होते. याच्या हयातींतच याचा मुलगा रघुनाथ बल्लाळ हा पायदळाचा सबनीस झाला होता. याचा दुसरा मुलगा नरहरपंत याजकडे शिवाजीमहाराजांनीं स्वाराची बक्षीगिरी सांगितली ती त्याच्या वंशजाकडे साताऱ्याचें राज्य जाईतों कायम होती (म. मं. बखर). याचा वंशवृक्ष दिलेला आहे (मं. त्रै. ८. १-२, पृ. १००–१०१).

**बाळाबाई शितोळे**—(लग्न स. १७७६) ही प्रसिद्ध महादजी शिंदे यांची मुलगी होय. हिच्या आईचें नांव पार्वतीबाई असून ही लाडोजी देशमुख ऊर्फ नरसिंहराव शितोळे याची बायको होती. हें लग्न स. १७७६ त झालें. हिला दोन मुलगे असून त्यांचीं नांवें अनुक्रमें सिधोजी व लक्ष्मण अशीं होतीं. शिवाय हिला तीन मुली होत्या. महादजीच्या पश्चात् हिच्या घरांत भाईबंदीचे तंटे सुरू झाले. त्याच्या निरसनासाठीं हिनें नानास पितृतुल्य भावनेनें लिहिलेलीं पत्रें उपलब्ध आहेत.

**बाळाराम कौशारामशेट आगरवाले**—(खून स. १८१५) हा यशवंतराव होळकराचा मदतनीस असून त्यास प्रत्येक मोहिमेंत हा मदत करीत असे. हा शूर व

धाडशी होता. हा यशवंतरावाच्या मरणसमयीं त्याच्याजवळ होता. पुढें यशवंतराव मरण पावल्यावर कांहीं दिवसांनीं मैनाबाई व तात्या आळेकर यांच्या हातांतील कारभार यानें व तुळसाबाईनीं हिसकून घतला. स. १८०५ त यशवंतरावाचा व इंग्रजांचा तह यानें घडवून आणला. तेव्हांपासून यशवंतरावाची मर्जी याजवर फार बसली. यानें हातांत घेतलेला कारभार सुरळीत चालविला. हा सर्व पक्षांना प्रिय होता. पुढें तुळसाबाईनेंच स. १८०५ त याचा खून करविला ( म. रि. उ. वि. ३, पृ. ३९५-४०७ ).

**बाळाराव गोविंद**—( स. १७०० नंतर ) महादजी शिंद्याचा हा एक कारभारी होता. भाऊसाहेबांच्या ( सदाशिवरावभाऊ ) तोतयाचें पारिपत्य करण्याकरितां याला महादजीनें फौज बरोबर देऊन कोंकणांत पाठविलें होतें. पुढें महादजी शिंद्यावर कारभाऱ्यांची इतराजी झाली होती, सबब त्यांची समजूत करण्याकरितां त्यानें आपला वकील बाळाराव गोविंद यास पुण्यास पाठविलें ( म. रि. उ. वि. १ ला, पृ. १३ ). नंतर हा तुकोजीच्या व अहिल्याबाईच्या समजुतीसाठीं इंदुरास स. १७८० च्या सप्टेंबरांत गेला. तुकोजीस भेटून पुढें महेश्वरास बाईजवळ दीड महिना राहून परत उज्जनीस गेला.

बाळाराव गोविंद हा पुष्कळ दिवस महादजीचा कारभारी व सल्लागार असून मोठ्या नेकीनें काम करणारा हुशार असा गणला जात असे. याचें नांव मराठी कागदांत ठिकठिकाणीं आलें आहे, यास प्रचारांत रावजी असें म्हणत. प्रथम याचा वडील बंधु चिमणाजी गोविंद यास पेशव्यांनीं पाटण ( राजपुताना ) येथें कमाविसदार नेमलें; त्याच वेळीं लालाजी बल्लाळास कोट्यास नेमिलें. बाळाजी जनार्दन म्हणून जांवगांवास महादजीचा कारभारी होता, त्यास हा बाळाराव गोविंद 'चिरं. बाळोबा' असें लिहितो, अर्थात् तो याचा आप्त असावा. त्याची वडील बहीण बाळाराव गोविंदास दिलेली असावी, असें पत्रव्यवहारांत नजरेस येतें ( म. रि. उत्तर वि. २, पृ. १४, ४४४ ).

**बाळीबाई ऊर्फ दीपाबाई**—ही शिवाजीची मुलगी होती. हिच्या आईचें नांव सोयराबाई असें होतें. ही विसाजीराव नांवाच्या एका सरदाराला दिली होती ( शिवाजी-निबंधावली १, पृ. २२५ ).

**बाळोजी तात्या पागनीस**—( मृत्यु स. १८०० ) हा सारस्वत ब्राह्मण मुत्सद्दी दौलतराव शिंद्याचा कारभारी होता. दुसऱ्या बाजीरावास पेशवाईवर बसविण्याकरितां यानें बरेच प्रयत्न केले. नानांचा विचार दुसरा दत्तक घेण्याचा होता, त्यास यानें अगदा विरोध केला. जिउबादादा बक्षीनंतर शिंदे यांचा मुख्य कारभारी हाच झाला. बाजीराव गादीवर बसल्यावर तो पुनः नानाकडे संधान बांधूं लागला व दौलतरावास कबूल केलेला पैसा देईना म्हणून यानें परशुरामभाऊंस नानांच्या विरुद्ध फोडून बाजीरावास कैद केलें, व चिमाजीस गादीवर बसविलें. पुढें नानांनीं कारस्थान करून बाजीराव व दौलतराव यांस याच्या विरुद्ध आपल्याकडे वळवून घेतलें. परशुरामभाऊंच्या साह्यामुळेंच यास पुण्यांत महत्त्व प्राप्त झालें. दौलतरावाचें याच्याविषयीं मन कलुषित होऊन त्यानें यास कैदेंत टाकलें शिंद्यांच्या बाया त्रास द्यायला लागल्या तेव्हां दौलतरावानें याची पुन्हां ता. २२-४-१७९९ त सुटका केली. यानें पत्र पाठवून बायांस पुण्यास बोलाविलें. यानें बायांचें ते प्रकरण तात्पुरतें मिटविलें. पुढें कांहीं दिवसांनीं दौलतरावानें यास अटक केली. बाजीरावानें सर्जेराव व बाबाजी पाटणकर यांजबरोबर दौलतरावांस सांगून पाठविलें कीं, "बाळोबा पागनीस तुम्हांस व आम्हांस दगा करून दोहींकडे दत्तक द्यावयाचें करीत आहेत, याजकरितां सदरहूची चौकशी न करतां त्यांस कैद करा. हे तुम्ही न कराल तर आम्ही प्राण देतों." त्यावरूनच दौलतरावास संकट पडून वरील अटक करावी लागली. यास नगरच्या किल्ल्यांत नेऊन ठेविलें. नगरास निघतांना याच्या कुटुंबाचे दौलतरावांनीं अत्यंत हाल केले, तेव्हां "याच्या बायकोनें कपाळ फोडून घेतलें. दोन घटका तिचा प्राण कासावीस झाला."

नगरास हा ता. १-११-१८०० रोजीं मरण पावला. हा हुशार असून धाडसी पुरुष होता ( म. रि. उ. वि. ३, पृ. १५ ).

**बाळोजी सुभानजी कुंजीर**—( मृत्यु स. १८१७ ) हा सासवडपासून चारपांच कोसावर असणाऱ्या वाघापूरचा पाटील. वाघापूर हा गांव बाळाजी विश्वनाथापासून अंबाजी पुरंदऱ्याच्या घराण्याकडे इनाम आहे. हा पुरंदऱ्याच्या गांवचा पाटील असल्यामुळें याचा त्याजकडे नौकरसंबंध जडला. त्र्यंबक सदाशिव पुरंदऱ्याच्या कारकुनाच्या यादींत याचें नांव आढळतें. हा कांहीं दिवस पुरंदऱ्याच्या खानदेशांतील गांवचा कमावीसदार होता. पुरंदऱ्यांच्या पदरीं राहिल्यामुळें याला पेशवेदरबार परिचित होण्यास चांगलाच अवसर सांपडला. हा पुरंदऱ्यांच्या एका शाखेचा कांहीं दिवस कारभारीहि होता. शिंद्यांच्या कैदेंतील बाजीरावाच्या चिठ्याचपाट्या महाडास नाना फडणीसास

पोंचवून त्याची बाजू रंगविण्याची महत्त्वाची कामगिरी केल्यामुळें हा रावबाजीचा नानाच्या मृत्यूनंतर मुख्य दिवाण झाला. पेशव्यांची दिवाणगिरी मराठा जातीच्या गृहस्थाकडे गेली ती याच्याकडेसच. वसईचा तह ठरत असतां बाजीरावानें याला शिंद्याकडे पाठविलें.

यानें मागील कारकीर्दीतील सर्व लोकांचा नाश करून व कित्येकांचा सूड उगवून हजारों जप्तीच्या सनदा दिल्या. एकंदरींत याचा अनियंत्रित असा अंमल होता ( मं. त्रै. वर्ष ११. १ ले. ४८ ). हा स. १८१७ च्या एप्रिल महिन्याच्या सुमारास पंढरपुरास वारला.

**विजरस**—एक चालुक्य राजपुत्र (कामवीररस पाहा).

**विजेसिंग**—( जयाप्पा शिंदे पाहा ).

**विज्जल**—( स. १२५० सुमार ) हा सेनापति खोलेश्वराचा मुलगा असून सिंघणाचा दुसरा सेनापति जो राम त्याचा हा भाऊ होता. हाहि आपल्या बापाप्रमाणें व भावाप्रमाणें सिंघणाचा सेनापति होता. यानें कोंकण व दक्षिण महाराष्ट्र देश जिंकले. त्या देशांचा कारभार हाच पाहत असे.

**विज्जल कलचुरी**—( स. ११५६–११६८ ) हा कलचुरीचा पुत्र. यानें तर चालुक्य सार्वभौमसत्तेसहि हात घातला होता. परंतु चवथ्या सोमेश्वर चालुक्यानें ( स. ११८३ ) पुन्हां आपली सत्ता स्थापिली आणि त्यानंतर मात्र या कलचुरींचा मागमूस लागत नाहीं. कारण पुढें होयसळ बल्लाळ यादव यानें कल्याणीचें सर्व राज्यच पादाक्रांत केलें ( स. ११८४ ). हा तैल तिसरा (चालुक्य) याचा सेनापति होता. पण तैलाला एकीकडे ठेवून यानें महाराजाधिराज अशी पदवी धारण केली ( स. ११५९ ). नंतर कल्याणी राजधानी झाली. याची पहिली राजधानी आण्णीगिरी होती.

हा जैन होता, आणि या वेळीं कर्नाटकांत बौद्ध व जैन धर्मांविरुद्ध लागलीच वीरशैवधर्माची एक लाट उसळली होती. त्याचा फायदा घेऊन एका बसव नांवाच्या ब्राह्मण प्रधानानें हल्लेमग व मधुवरम् या दोघां साधूंचे डोळे काढल्याचा याच्यावर आरोप ठेवून याचा वध केला ( स. ११६७ ). याचा मुलगा सोविदेव ( सोमेश्वर अगर रायमुरारी ) याच्यासाठीं यानें राज्यत्याग केला, अशी एक गोष्ट आढळते ( वेळगांव शिला. ) व ती बहुधा खरी असावी. तसें असल्यास याच्या वधाची मागील गोष्ट खोटी ठरते. याचें विज्जल असेंहि नांव आहे.

**विट्टीग**—( बिट्टिदेव पाहा ).

**बिट्टिदेव होयसळ**—(स. ११०६–४१) हा एरेयंग होयसळचा मुलगा होय. हा या घराण्यांतील पहिला प्रसिद्ध राजा होऊन गेला. यानें द्वारसमुद्र शहर स्थापून तेथें स. ११०६ पासून ११४१ पावेतों राज्य केलें. आरंभीं या राजाचा आश्रय जैनधर्मास होता आणि याचा प्रधान गंगराज यानें पुष्कळ जैन मंदिरें बांधिलीं. परंतु रामानुजानें ( स. १०१७–११३७ ) सुरू केलेल्या भक्तिमार्गाचा याच्यावर परिणाम बिट्टिदेवावर होऊन हा वैष्णवधर्माचा उपासक बनला. यानें स्वतः आपलें नांवहि विष्णुवर्धन असें धारण केलें. यानें व याच्या अनुयायांनीं होयसळ यादवांची सत्ता पुष्कळच वाढविली. ह्याला विष्णुवर्धन, उदयादित्य, विट्टीग, त्रिभुवनमल्ल २ रा, भुजबलगंग, वीरगंग आणि विक्रमगंग असें देखील म्हणत.

**बिलासखां**—तानसेनाचा पुत्र व उत्तम गायक. बिलासखानी तोडीचा उत्पादक.

**बिल्हण**—( स. १०३०–११०० सुमार ) हा काश्मीरांतील प्रवरपूर शहराजवळच्या खोनमुख गांवचा राहणारा असून पातंजल महाभाष्यावर टीका लिहिणारा जो ज्येष्ठकलश त्याचा पुत्र होय. हा प्रथम मथुरा, वृंदावन, काशी, सोमनाथपट्टण, सेतुबंध इत्यादि ठिकाणें पाहून व तेथें सन्मान मिळवून नंतर चालुक्यांची राजधानी कल्याणी येथें गेला. तेथील राजा कुंतलेंदु त्रैलोक्यमल्ल ( सहावा विक्रमादित्य पश्चिम चालुक्य ) व त्याचा पुत्र विक्रमांकदेव यांनीं यास पुष्कळ द्रव्य व विद्याधिपति ही पदवी दिली. तेथें यानें 'विक्रमांकदेवचरित' हें महाकाव्य रचिलें. गुर्जर देशचा राजा वीरसिंह याची मुलगी 'शशिलेखा' हिजवर याचें प्रेम जडलें होतें तें राजास न आवडून त्यानें यास सुळावर चढविण्याचा हुकूम दिला. सुळावर चढविण्यापूर्वींहि यानें शशिलेखेचें स्मरण केलें. तें पाहून राजानें याची शिक्षा माफ करून शशिलेखेशीं याचें लग्न केलें. पुढें दोघांनीं आपला काळ सुखांत घालविला ( विठ्ठलकविकृत बिल्हणचरित्र ). यानें चौरीसुरतपंचाशिका हें खंडकाव्य, कर्णसुंदरी नामक नाटिका व रामचरित्र किंवा रामस्तुति हें काव्य लिहिलें.

**बिरसकूट ( कर्नल )**—( स. १७८८ सुमार ) इंग्रज प्रवासी. यानें आग्रा व दिल्ली हीं ठिकाणें पाहून तेथील नकाशे उतरून घेतले. याची व महादजी शिंद्यांची भेट झाली होती.

**बिल्वमंगल**—हा द्रविड असून विष्णुस्वामीच्या गादीवरील शेवटचा पुरुष. पुढें वल्लभाचार्यांनीं याच्या सांप्रदायाचा जीर्णोद्धार केला ( विष्णुस्वामी पाहा ).

**बिहारीदास पांचोली**—उदेपूरच्या संग्रामसिंह गुहिलोतचा दिवाण.

**बिहारीमल्ल कच्छवाह**—(दानियल मीर्झा पाहा).

**बिहारीलाल**—( स. १६०३-१६६३ ) ह्या प्रख्यात हिंदी कवीचा जन्म ग्वाल्हेरजवळील वसुवा गोविंदपुर गांवीं झाला असून यानें आपलें बालपण बीती ( बुंदेलखंड ) येथें व तरुणपण मथुरा येथें घालविलें. हा जयपूरच्या जयसिंह राजाच्या दरबारीं होता. याच्या बिहारीसतसई या श्रृंगाररसयुक्त ग्रंथास अद्याप फार मान असून त्यावर आतांपावेतों अनेक टीका लिहिल्या गेल्या आहेत. याचा एक एक दोहा हिंदी साहित्यांतील रत्न समजलें जातें.

**बिन्दुसार मौर्य**—( ख्रि. पू. २९८-२७२ ) मौर्य-वंशांतील चंद्रगुप्ताचा पुत्र. याला विष्णुपुराणांत बिंदुसार म्हटलें आहे, पण भागवतांत वारिसार म्हटलें आहे. पण वायु व ब्रह्मांड यांत यास भद्रसार म्हटलें आहे. कलियुगराजवृत्तांत, दीपवंश व महावंश यांत यास बिंदुसार असेंच म्हटलें आहे. ग्रीक लेखकांनीं याचें नांव एमित्रोचेटस असें लिहिलें आहे. डॉ. फ्लीटच्या मतानें याचें संस्कृत रूप अमित्रघात किंवा अमित्रखाद असें होतें. हें याचें दुसरें नांव असावें.

याच्यासंबंधीं पुढीलप्रमाणें परिशिष्टपर्वांत माहिती दिली आहे. चंद्रगुप्तावर विषप्रयोग झाल्यास त्याला विष-बाधा होऊं नये म्हणून त्याच्याकडून चाणक्यानें विषमिश्रित अन्न खाण्याची संवय करवली होती. पण एकदां चंद्रगुप्ताची पत्नी विषमिश्रित अन्न खावयास बसली असतां तिच्यावर परिणाम होऊन ती मृत्युमुखीं पडली. पण ती गरोदर असल्यामुळें पोट फाडून मूल बाहेर काढावें लागलें. मूल बाहेर काढल्यावर असें आढळून आलें कीं त्याच्या डोक्या-वर विषाचा एक बिंदु लागला आहे. म्हणून चाणक्यानें याचें नांव बिंदुसार ठेवलें (परिशिष्टपर्व ८·४३६-४४५).

सोळाव्या शतकांतील तिबेटी लेखक तारानाथ यानें असें लिहिलें आहे कीं यानें चाणक्याच्या साहाय्यानें सोळा राजांना जिंकलें. पण हे सोळा राजे कोणते हें सांगतां येत नाहीं. दक्षिणेवर नंदांची सत्ता होती. त्यांचें राज्य चंद्र-गुप्तानें घेतल्यामुळें चंद्रगुप्ताची सुद्धां दक्षिणेवर सत्ता असावी. पण कदाचित् दक्षिणेंतील आंध्रराजांनीं वर्चस्व स्थापण्यास सुरुवात केली असेल व त्यांना यानें जिंकलें असेल. अशोकाचें दक्षिणेवर वर्चस्व होतें, त्याचा प्रारंभ बिंदुसारानें असा केलेला दिसतो.

याचा प्रधान चाणक्य होता, ही गोष्ट तारानाथानें लिहिली आहेच. शिवाय जैनग्रंथांतीह ही गोष्ट आली आहे. पण परिशिष्टपर्वांत असें लिहिलें आहे कीं, चंद्रगुप्त मेल्यावर चाणक्यानें याला सांगून सुबंधु नांवाचा प्रधान केला. सुबंधु मनांतून चाणक्याचा द्वेष करीत होता. त्यानें याला चाणक्याच्या विरुद्ध कांहीं गोष्टी सांगितल्या. पण शेवटीं त्या खोट्या ठरल्या, तेव्हां सुबंधूनें राजाची व चाणक्याची क्षमा मागितली. पण चाणक्याला मात्र या गोष्टीचें वाईट वाटून तो वनांत तपश्चर्येला निघून गेला.

याच्या कारकीर्दींत दोन वेळां तक्षशिलेला बंडें झालीं. पहिलें बंड मोडण्याकरितां यानें अशोकाला धाडलें. अशोक तेथें गेला असतां लोकांनीं त्याचा सत्कार केला. लोक म्हणाले, 'आम्ही राजा किंवा राजपुत्र यांच्या विरुद्ध नाहीं, पण अमात्य आम्हाला त्रास देतात' (दिव्यावदान पृ. ३७१).

दुसऱ्या बंडाच्या वेळीं यानें आपला दुसरा पुत्र सुषिमा याला पाठविलें. बहुतेक या वेळीं अशोक उज्जयनीस असावा. या बंडाच्या गोष्टी ऐतिहासिक दिसतात.

**बिंबाजी भोसले**—( स. १६२५ सुमार ) हा नाग-पूरच्या मुधोजीचा बाप व पहिल्या परसोजीचा आजा.

**२.** ( स. १७०० सुमार ) पहिल्या रघूजीचा बाप-पत्नी काशीबाई.

**३.** ( मृत्यु स. १७८७ ) हा पहिल्या रघूजीच्या वडील स्त्रीचा धाकटा मुलगा होय. मुधोजी व जानोजी यांची पेशव्यांनीं तडजोड केल्यावर यास छत्तीसगड मिळाला. कटक प्रांताचा सुभेदार शिवभट साठे हा तिकडील खजिना घेऊन छत्तीसगडावरून जात असतां त्यास यानें अडकवलें. ताराबाई व पेशवे यांच्या भांडणांत याचें अंग होतें.

स. १७७९ त मुधोजीचा पुणें दरबारशीं बेबनाव झाल्या-वर नानानें यास त्याच्याविरुद्ध चिथावणी देऊन गृहकलह उभा केला. नानानें यास ३२ लक्षांचा मुलूख व बऱ्हाण-पूरचा किल्ला द्यावा असें कबूल केलें. बिंबाजी हा छत्तीस-गडांत रतनपुरास राहत असे. हा १७-१२-१७८७ रोजीं मरण पावला. यास पुत्र नव्हता. याच्या २ स्त्रियांपैकीं उमाबाई ही सती गेली.

**बिंबाजी वंजाळ**—पहिल्या रघूजीचा प्रमुख सरदार.

**बिंबिसार ( श्रेणिक ) शिशुनाग**—( ख्रि. पू. ५२८-५०० ) मगध येथील शैशुनाग घराण्यांतील हा एक राजा असून ख्रि. पू. ५२८ मध्यें हा मगधच्या गादीवर आला.

यानें अंग ( भागलपूर आणि मोंघीर जिल्हे ) देश काबीज करून आपलें वर्चस्व वैशाली येथील लिच्छवी घराण्यांतील व कोसल येथील राजघराण्यांतील राजकन्येशीं लग्न करून वाढविलें असें म्हणतात. याला लिच्छवी घराण्यांतील राजकन्येपासून अजातशत्रु ( कूनिक ) नांवाचा मुलगा झाला.

पुढें खि. पू. ५०९ मध्यें याचा मुलगा अजातशत्रु यानें याला ठार मारिलें ( B. ). याला श्रेण्य किंवा हर्यणक म्हटलेलें आढळतें. यावरून हा शिशुनागवंशांतील नसावा ( हि. का. १. ८६-८७ ). याला श्रेणिक असेंहि म्हणत. हा जैनधर्माचा पुरस्कार करी, असें जैनग्रंथ म्हणतात.

**बीका**—हा राठोड रजपूत मारवाडच्या राव जोधाचा सहावा पुत्र असून विकानेर संस्थानचा मूळ पुरुष होय.

**बीर**—( काव्यकाल स. १७२१ ) एक हिंदी कवि. हा दिल्लीचा श्रीवास्तव कायस्थ. ग्रंथ-कृष्णचंद्रिका, नायिकाभेद. शिवाय कांहीं वीररसात्मक कविता आहेत.

**बीरबल**—( स. १५२८-१५८३ ) हा अकबराच्या दरबारांतील कविराय व मंत्री होता. औदार्याबद्दल तसेंच गानकौशल्य व काव्यनैपुण्य यांबद्दल हा फार प्रसिद्ध आहे. धार्मिक मुसलमानांकडून याचा द्वेष केला जात असे. याचें कारण त्यांच्या मतें इस्लामाविषयीं अकबराचें मत दूषित करण्याचा यानें प्रयत्न केला.

याचें मूळचें नांव महेशदास असून हा काल्पीचा कनोजी ब्राह्मण होता. अकबराच्या दरबारीं प्रथम गरिबीनें राहत असे, पण हा चलाख व तीव्र बुद्धीचा म्हणून प्रसिद्ध होता. अकबरानें याला कविराय ही पदवी दिली. आपल्या खास देखरेखीखालचें काम याचेकडे सोंपविलें. स. १५८३ सालीं युसुफझायी लोकांच्या विरुद्ध झैनखान कोका याला मदत करण्यासाठीं अकबरानें याला पाठविलें. पण हा तेथें ठार मारला गेला. अकबराला याच्या मृत्यूबद्दल अतोनात दुःख झालें.

यानें अकबरपूर नांवाचें एक शहर वसविलें होतें व हा तेथेंच राहत असे. 'बीरबलनामा' नांवाचा ग्रंथ यानें लिहिला. त्यांत अकबर व बीरबल यांच्याविषयीं अनेक विनोदी गोष्टी आढळून येतात.

**बीसलदेव**—( स. ११५५ ) हा एक हिंदी कवि असून नरपति नाल्ह ह्या कवीचा समकालीन होय. यानें बीसलदेवरासो नांवाचा वीरगीतानें भरलेला एक ग्रंथ लिहिला आहे. याचें लग्न परमार घराण्यांतील भोज राजाच्या मुलीशीं झालें होतें. याच्या भाषेंत परकी शब्द वरेच आढळतात.

**बुक्क संगम**—( राज्यकाल स. १३५५-७७ ) यदुकुळांतील संगमाच्या पांच पुत्रांपैकीं एक हरिहर ऊर्फ हरियप, कंप, कंपण्ण ऊर्फ शंकर, बुक्क ऊर्फ बुक्कण, मारप व मुद्दप हे ते पांच बंधु होत. या प्रत्येकाला युवराज म्हणून वेगळाल्या प्रांतांवर नेमून त्यांच्या साहाय्यानें हरिहर राज्य करीत असे. बुक्काची युवराज म्हणून नेमणूक होयसण देशावर झाली होती. होयसणमधील होसपट्टण येथें यानें आपली राजधानी केली होती ( एपि. कर्ना. व्हा. ११ ले. २ पा. २-३ ). हा होयसण देश म्हणजे द्वारसमुद्राच्या प्रतापचक्रवर्ति होयसळ राजांच्या सत्तेखालील प्रदेश होय. हे राजे आपल्या बिरुदावलींत 'होयसण भुजबळ श्रीवीर' अशीहि भाषा वापरीत असत ( एपि. कर्ना. व्हा. ६ नं. १०५ पा. १२२ ). होयसण हा शब्द होसण असाहि लिहिलेला आढळतो ( एपि. कर्ना. ५ नं. २५६ पा. ५२१ ). म्हैसूर संस्थानांतील सांप्रतचा हसन जिल्हा हाच तो प्रदेश असून हसन हे होसण शब्दाचें अपभ्रष्ट रूप असावें. होयसळ राजांची मूळची राजधानी जी वेलापुरी किंवा बेलापूर ( बेलूर ) ती याच जिल्ह्यांत असून त्यानंतरची सुप्रसिद्ध राजधानी द्वारसमुद्र ( हळेबीडु ) हीहि बेलापुरापासून अवघ्या दहा मैलांच्या अंतरावर आहे ( बाँबे गझे. व्हा. १, पा. ४९१ ). विजयनगरचें साम्राज्य स्थापण्यापूर्वी हरिहरादि बंधु होयसळ राजांचे मांडलिक होते (एपि. इंडि. व्हा. ३, पा. ११५). होयसळ साम्राज्याच्या अवशेषावरच यांचें विजयनगरचें साम्राज्य उभारलें गेलें.

हरिहरानें सगळ्याच भावांना एका एका प्रांताचें युवराज नेमलें होतें. त्यांत यालाहि युवराज नेमलें होतें. पण इतरांपेक्षां त्याची मदार याच्यावर विशेष असे ( एपि. कर्ना. व्हा. ५, पा. ५२० ). आणि शेवटीं तर हरिहर वृद्ध झाल्यामुळें हाच सर्व कारभार पाही, आणि लोकहि बुक्कानें चालविलेलें राज्य असेंच म्हणत ( एपि. कर्ना. व्हा. ९, पा. १५५, पा. १७२ ).

बुक्काचें नांव एवढें गाजण्याला आणखीहि एक कारण होतें. तें म्हणजे पांचहि बंधूंमध्यें हा फार पराक्रमी असून हिंदुधर्माचा मोठा अभिमानी व पुरस्कर्ता होता. त्या काळच्या बऱ्याच लेखांत इतर बंधूंपेक्षां बुक्काच्या शौर्याची फारच वाखाणणी केलेली आढळते. पांच पांडवांमध्यें जसा अर्जुन तसा संगमाच्या पांच पुत्रांमध्यें बुक्कराय असें म्हणण्याचा त्या वेळीं प्रघात पडला होता ( एपि. कर्ना.

व्हा. ६, पा. १७२ ). याची तरवार रणांगणांत नाचूं लागली म्हणजे मुसलमानांचीं तोंडें वाळून निस्तेज होत असें म्हटलें आहे ( एपि. कर्ना. व्हा. ६, पा. १७६ ). हा तलवार चालवूं लागला म्हणजे सर्व दिक्चक्र हालत असे. शत्रु-राजांना हा वज्राच्या तडाख्याप्रमाणें भासे. याच्या भीतीनें राजे दडून राहत किंवा कांपत कांपत याला प्रणाम करून अभिमानाचा तोरा सोडून देत. याला विरोध करण्यास कोणीच समर्थ नव्हता ( एपि. कर्ना. व्हा. ११, पा. २ ). यानें द्वारसमुद्रादि शेंकडों राजधान्या शत्रूच्या दाढेंतून सोडवून राज्य निष्कंटक केलें व सात अंगांनीं परिपूर्ण अशा साम्राज्यावर हा सत्ता चालवूं लागला (एपि. कर्ना. व्हा. ४, पा. ९८). या वर्णनावरून हाच साम्राज्य-संस्थापक असावा असें वाटतें. स. १३५५ च्या फेब्रुवारीच्या सुमारास हरिहर निपुत्रिक मरण पावल्यामुळें वडीलपणाच्या अनुक्रमानें साम्राज्याचा अधिकार कंपरायाच्या हातांत यावयाचा, परंतु तो तसा आलेला दिसत नाहीं. याचें कारण बहुधा तो आसन्नमरण असावा. बिट्टुगुंटच्या ताम्रपटांत म्हटलें आहे कीं, हरिहरच्या मागून कंपनानें चिरकाल पृथ्वीचें राज्य केलें (एपि. इंडि. व्हा. ३, पा. २५ ), परंतु त्यांत सत्यांश नाहीं. तो हरिहरामागून अवघ्या तीनचार महिन्यांच्या अवधींत म्हणजे स.१३५५ च्या मे महिन्यांत मरण पावला. त्याच्या पश्चात् साम्राज्याचीं सूत्रें कंपाच्या मुलाच्या हातांत जावयास पाहिजे होतीं, पण तसें न होतां तीं बुक्काच्या ताब्यांत आलीं.

साम्राज्याचा मुख्यत्वें उदय मुसलमानांच्या दक्षिणेंतील आक्रमणाला पायबंद घालून प्राचीन हिंदु संस्कृति व परंपरा कायम राखण्यासाठींच झाला असल्यामुळें मुसलमानांच्या वाढत्या सत्तेला टक्कर देण्याचें काम महत्त्वाचें होतें. तें काम बुक्कासारख्या अनुभवी व शूर माणसाखेरीज होणें शक्य नव्हतें.

स. १३५५–१३७७ पर्यंत सुमारें २२ वर्षे बुक्कानें राज्य केलें. या अवधींत यानें अनेक लढाया मारल्या, शत्रूंना दहशत बसविली व राज्यकारभाराची व्यवस्था उत्तम लावून साम्राज्याला मजबुती आणली. पण या सर्वांपेक्षां याचें महत्त्वाचें काम म्हणजे वेदभाष्य होय. बुक्करायानें हें काम केलें. यावद्दल सर्व हिंदु लोक आणि वेदाभ्यासक याचे ऋणी आहेत. विजयनगरचें साम्राज्य नष्ट झालें, पण त्यानें वेदविषयक केलेली कामगिरी आजहि ताजी असून तिचा फायदा सर्वांना होत आहे. आणि वेद आहेत तोंपर्यंत याच्या भाष्याचें महत्त्व कमी होण्यासारखें नाहीं. यामुळें चवदाव्या शतकांतील बऱ्याच लेखांत याला 'वैदिकमार्गप्रवर्तक' ही पदवी लावली आहे, आणि ती योग्य आहे. धर्मग्रंथांच्या पुनरुज्जीवनांत बुक्काला माधवाचार्यांची पुष्कळ मदत झाली. तो स्वतःला बुक्करायाचा कुलगुरु म्हणवतो. यानें चीन देशांत आपला वकील पाठविला होता.

२. ( स. १४०४–१४०६ ) हा विजयनगरच्या दुसऱ्या हरिहर संगमाचा पुत्र. त्याच्यानंतर हा गादीवर आला.

दुसऱ्या हरिहरानंतर गादीवर बसलेल्या या राजानें विजयनगर शहराची पुष्कळच सुधारणा केली. नवे कोट व बुरुज बांधविले. कोट व शहर पुष्कळच वाढविलें, आणि ते कोट दूरवर पोहोंचविले. शिवाय सर्वांत प्रमुख काम म्हणजे, यानें तुंगभद्रेला एक भला मोठा बांध ( धरण ) बांधला आणि तेथून पांच कोस पक्के पाट बांधून, शहरांत पाण्याची समृद्धि करून दिली, असें नूनीजनें वर्णन केलें आहे.

मुसलमानांशीं याच्या लढाया झाल्या त्यांचा तपशील दिलेला नाहीं. मात्र यानें गोवें, चौल, आणि दाभोळ काबीज केलें, आणि कारोमांडल किनाऱ्यावरील प्रदेश पूर्ण ताब्यांत आणले.

**बुघ्राखान बिन बल्बन**—( स. १२८२–९२ ) हा घियासुद्दीन बल्बनचा मुलगा. हा फार चैनी व रंगेल होता. याचा बाप आजारी पडला असतांना हा दिल्लीस गेला. तेव्हां याला तेथें कडक शिस्तींत राहण्याचा कंटाळा आल्यामुळें, हा शिकारीचें निमित्त काढून निघून गेला. तेव्हां बल्बननें याचा गादीवरील वारसा हक्क काढून कैखुस्रवला गादीवर बसविण्यास सरदारांस सांगितलें. पुढें यानें आपल्या हक्काचें समर्थन न करतां, यानें बंगालमध्यें 'नासिरुद्दीन महमूद बुघ्राशाह' असा किताब धारण करून नवीन राज्य स्थापिलें. या वेळेस याचा मुलगा कैकुबाद दिल्लीच्या गादीवर होता. कैकुबाद स्वैराचारानें राज्य चालवूं लागल्यामुळें, त्याची कानउघाडणी करण्यासाठीं, हा सैन्यासह स्वारी करण्याचे हेतूनें दिल्लीवर चालून आला. पुढें याची व मुलाची भेट होऊन, यानें त्यास सावधगिरीनें राज्य चालविण्यास सांगून हा परत बंगालला गेला. याला मु. रियासतीमधील वंशावळींत 'बोगराखान' असें म्हटलें आहे ( १ नासिरउद्दीन पाहा ).

**बुधगुप्त**—( स. ४७६–४९९ ) गुप्तवंशांतील दुसऱ्या कुमारगुप्ताचा उत्तराधिकारी. याच्या वेळचा एक शिलालेख

सारनाथ येथें मिळालेल्या एका मूर्तीच्या आसनावर कोरलेला आहे. तो गुप्त सं. १५७ ( स. ४७६ ) मधला आहे ( भारतीय प्राचीन लिपिमाला, पृ. १७४ टि. २ ). त्याचा सारांश 'बुधगुप्ताच्या वेळीं म्हणजे महाराज सुरश्मिचंद्र कालिंदी व नर्मदा यांच्या मधल्या प्रदेशावर राज्य करीत होता, तेव्हां गुप्त सं. १६५ ( स. ४८५ ) आषाढ शुद्ध १२ रोजीं महाराज मातृविष्णु आणि त्याचा धाकटा भाऊ धन्यविष्णु यांनीं येथें विष्णूचा ध्वजस्तंभ तयार केला. या राजाचीं चांदीचीं नाणीं मिळालीं आहेत त्यांवर गुप्त सं. १७४; १७५ आणि १८० ( स. ४९३; ४९४; ४९९ ) हे आंकडे आहेत. याच्या कारकीर्दीच्या शेवटल्या दिवसांत गुप्तांच्या राज्याच्या पश्चिमेकडील भागावर हूणांचें राज्य झालें व पूर्वेकडील भाग गुप्तांच्या अधिकाराखालीं राहिला. एरणगांवच्या शिलालेखावरून पुढील माहिती कळते. महाराजाधिराज तोरमाण राजाच्या पहिल्या वर्षाच्या फाल्गुन मासाच्या दहाव्या दिवशीं मृत महाराज मातृविष्णूचा धाकटा भाऊ धन्यविष्णु यानें आपल्या राज्यांतील एरिकेण ( एरण ) येथें भगवान् वराहाचें मंदिर बांधलें. वर आलेंच आहे कीं, गुप्त संवत् १६५ ( स. ४८४ ) मध्यें मातृविष्णु व धन्यविष्णु जिवंत होते व बुधगुप्ताच्या आश्रितांपैकीं होते. हा गुप्त सं. १८० ( स. ४९९ ) पर्यंत राज्य करीत होता असें याच्या नाण्यांवरून कळून येतें त्यानंतर हूणांपैकीं तोरमाणानें गुप्तांचा प्रदेश जिंकला आणि धन्यविष्णूला तोरमाणाचें मांडलिक होणें भाग पडल. अशा रीतीनें स. ४९९–५१० मधल्या काळांत राजपुताना, गुजराथ, माळवा व मध्यप्रदेश यांवर गुप्तांचें राज्य जाऊन हूणांचें राज्य झालें. बुधगुप्ताच्या अवशिष्ट राज्याचा उत्तराधिकारी भानुगुप्त झाला.

**बुद्धघोषाचार्य**—विसुद्धिमग्ग व अठ्ठकथा ( मनोरथपूर्णी ) या ग्रंथाचा कर्ता. ही अठ्ठकथा मूळाचा अर्थ समजण्यास अत्यंत उपयुक्त आहे. तथापि यांनाहि कांहीं ठिकाणीं अनेक अर्थ द्यावे लागले आहेत. महावंस व बुद्धघोषसुप्पत्तिमध्यें यांची माहिती आली आहे.

**बुद्धधर्म**—एक प्रवासी. हा तुषार देशचा राहणारा होता. हा चीनमध्यें अनेक ठिकाणीं हिंडून भारतवर्षांत आला. ईत्सिंग या चिनी प्रवाशाची व याची भेट नालंद येथें झाली होती. नालंदला पुष्कळ दिवस राहून हा चीन देशाला परत गेला होता.

**बुद्धमित्र**—( स. १००० सुमार ) यानें 'वीरशोळीयम्' नांवाचें तामीळ भाषेचें व्याकरण केलें. याला वीर राजेन्द्र चोल याचा आश्रय होता.

**बुद्धवर्मा ( प. ) चालुक्य**—( स. ५७२ ) पश्चिम चालुक्यांच्या घराण्यांतील जयसिंहाचा मुलगा हा गुजराथशाखेचा संस्थापक. याचा पुत्र विजयराज ( विजयवर्मा ). हा स. ५७२ च्या सुमारास हयात होता. याच्या वंशाची माहिती मिळत नाहीं.

**बुद्धिसागर**—भोजाचा मित्र.

**बुद्धिसेन**—बोधाचें नांव.

**बुबुजीखानूम**—( स. १५१० सुमार ) ही एका हिंदूची मुलगी. अली आदिलशहानें हिचा भाऊ मुकुंदराव ह्याचा पराभव करून, हिला पळवून आणिलें व हिला 'बुबूजी खान' किताब देऊन हिच्याशीं लग्न केलें. हिला इस्माईल नांवाचा मुलगा झाला. बुबूजीखानूम हें बुबूजीखान शब्दाचें स्त्रीलिंग आहे ( इस्माईल आदिलशाह पाहा ).

**बुर्बक**—( स. १४२९–४५ ) बंगालचा राजा.

**बुर्हाण इमादशाह**—( स. १५७२ ) हा वऱ्हाडच्या दर्या इमादशाहाचा मुलगा. हा लहान वयांतच वऱ्हाडच्या गादीवर बसला. याच्याच काळांत मूर्तझा निजामशाहानें वऱ्हाडवर स्वारी करून याला व याचे वंशजाला ठार करून वऱ्हाडचें राज्य अहमदनगरच्या राज्यास जोडलें व इमादशाहीचा शेवट केला.

**बुर्हाण उल्मुल्क बाबी**—गुजराथचा सुलतान. यानें तिसऱ्या महमूदाचा खून करून, आपण गादीवर बसला. पण शेरखान नांवाच्या अमीरानें यास ठार मारलें ( मु. रि. १, पा. २१ ).

**बुऱ्हाण निजामशाह**—( स. १५०८–१५५४ ) हा अहमदनगरचा निजाम. यानें विजापूरच्या इस्माईल आदिलशाहाच्या मर्युम नांवाच्या मुलीशीं विवाह केला. हा अहमद निजामाचा मुलगा. हा फार हुशार होता. कंवरसेन नांवाचा ब्राह्मण याचा प्रधान होता. शाहा ताहीर नांवाचा एक विद्वान् याच्या पदरीं होता. यानें आपल्या राज्यांत शियापंथाचा प्रसार केला.

२. ( स. १५९०–९५ ) हा अहमदनगरच्या हुसेनचा पुत्र. अकबरच्या मदतीनें आपला मुलगा इस्माईल याला कैद करून हा गादीवर बसला.

३. (स. १६०७–३०) मलिकंबरानें मुर्तझास पदच्युत करून, यास गादीवर बसविलें. हा हुशार नसल्यामुळें राज्यांत गोंधळ माजून राज्य बुडण्याची वेळ आली होती, पण शहाजीनें निजामशाही वांचविली.

**बुवाजी पवार ( धार )**—( स. १६९० ) हा

कृष्णाजी पवाराचा मुलगा. याला राजारामानें विश्वासराव अशी पदवी दिली.

२. ( स. १७३० सुमार ) दुसऱ्या कृष्णाजी पवाराचा मुलगा. हा थोरल्या बाजीरावाबरोबर माळव्यांत होता.

३. ( स. १७५० सुमार ) राणोजी पवाराचा मुलगा.

**बुसी**—( स. १७१८–१७८५ ) फ्रेंच सेनापति. याचा जन्म फ्रान्समध्यें झाला. हा डुप्लेच्या हाताखालीं होता. यानें सावनूरच्या लढाईंत पेशव्यास मदत केली ( स. १७५५ ). हा पांदीचरीस मेला.

**बृहद्रथ मौर्य**—( ख्रि. पू. १८४ ) हा मौर्य चंद्रगुप्ताच्या वंशांतील देववर्म्याचा दुसरा पुत्र. याचा शुंगवंशांतील पुष्यमित्र हा सेनापति होता. त्यानें याला ठार करून याचें राज्य बळकाविलें. पुराणांत यासंबंधीं निर्देश आहे त्यावरून पुढीलप्रमाणें माहिती मिळते. पुराणांत याला शतधन्वन्चा पुत्र असें म्हटलं आहे. त्याचा अर्थ हा शतधन्वन्नंतर गादीवर आला असा आहे. शतधन्वन् हा याचा थोरला भाऊ होय. याला कसें मारलें त्याचा निर्देश हर्षचरित्रांत आला आहे. त्यावरून, यास सैन्य दाखविण्यास म्हणून नेलें आणि ठार केलें असें दिसतें. यानें सात वर्षं राज्य केलें असें दिसतें.

**बेगम सुमरु**—(मृ. स. १८३६) ही एका मुसलमान उमरावाची मुलगी असून वाल्टर रेनहार्ट नांवाच्या युरोपियन सैन्याधिकाऱ्याची पत्नी होती. ही शूर असून मोठी राजकारणी स्त्री होती. हिचा नवरा मेल्यानंतर हिच्या ताब्यांत नवऱ्याच्या सारधाना संस्थानचा कारभार व सैन्याची मालकी आली. हिनें आपल्या सैन्यांत ४१ फ्रेंच व युरोपियन लोक ठेवून सैन्याची चांगल्या तऱ्हेनें सुधारणा केली. गुलाम कादरनें दिल्लीस बंड केलें असतां, हिनें दिल्लीचा बादशहा शहाआलमास मदत करून, त्यास संकटांतून सोडविलें. तेव्हां बादशाहानें हिला मिरत प्रांतांतील बरींच गांवें जहागीर दिलीं. हिनें आसई येथील लढायांत शिंद्यास मदत केली. शेवटीं स. १८०३ मध्यें इंग्रज सेनापति लेकनें दिल्ली घेतल्यावर ही इंग्रजांस मिळाली व शेवटपर्यंत इंग्रजांस राजनिष्ठ राहिली. शेवटीं हिनें ख्रिस्ती धर्म स्वीकारला होता.

**बेटावर्धन**—द्वारसमुद्र शहराचा राजा. हा रामानुजाचार्यांच्या वेळेस तेथें होता.

**बेट्ट काकतीय**—( सन ११०० सुमार ) हा काकतीय वंशापैकीं पहिल्या प्रोलाचा मुलगा. हा आपणास त्रिभुवनमल्ल म्हणवीत असे. हा पश्चिम चालुक्यांपैकीं सहाव्या विक्रमादित्याचा मांडलिक होता. हा तेलंगणांत कांहीं काळ स्वतंत्रपणें राज्य करीत असे. याची राजधानी अनमकोंडा. याचा मुलगा दुसरा प्रोल होय.

**बेट्ट चालुक्य**—चालुक्यांपैकीं पांचव्या विजयादित्याचें नामांतर.

**बेट्टद ओडीयार**—( स. १५१३–५२ ) म्हैसूरचा राजा. पिता हिरे किंवा आरबेरळु यामराज.

२. ( स. १५७६–७८ ) म्हैसूरचा राजा. पिता दोड्ड चामराज. हा हेरिचामराजानंतर गादीवर आला. हा शूर पण अविचारी असल्यानें यास आप्तांनीं पदच्युत केलें.

**बेनी**—( स. १६४३ सुमार ) हा हिंदी कवि असनीचा भाट होय. याच्या फुटकळ कवितांवरून यानें 'नखशिख' व 'षड्ऋतु' हे ग्रंथ लिहिले असावे. हा थट्टामस्करीच्या कविता करण्यांत कुशल होता.

**बेनी प्रवीन**—( स. १८०० सुमार ) हा हिंदी कवि लखनौच्या गाजीउद्दीन हैदराचा दिवाण दयाकृष्ण कायस्थाचा पुत्र नवलकृष्ण ऊर्फ लालनजीचा आश्रित होता. यानें नवरसतरंग, शृंगारभूषण व पुढें नानाराव राजाच्या पदरीं असतांना 'नानारावप्रकाश' हे अप्रकाशित ग्रंथ व कांहीं फुटकळ कविता लिहिल्या. याचें वादकौशल्य पाहून बेनी बंदीजाननें यास 'प्रवीण' ही पदवी दिली. पुढें रोगानें पछाडल्यामुळें हा अबूस गेला व तेथेंच मेला. याचा पहिला ग्रंथ सुंदर असून त्यांत नायिकाभेद, रसभेद व भावभेद यांचें संक्षिप्त निरूपण आहे.

**बेनी बंदीजन**—( ग्रंथकाल स. १७९२–१८२३ ) हा हिंदी कवि बैंती( जि. रायबरेली )चा राहणारा व अयोध्येचा वजीर टिकैतरायचा आश्रित होय. यानें टिकैतराय प्रकाश, रसविलास, भँडौवा-संग्रह वगैरे ग्रंथ लिहिले. शेवटचा ग्रंथ हा हास्यरसपूर्ण आहे.

**बेली**—( स. १७८० ) एक इंग्रज सेनापति. याचा हैदरनें मद्रासपाशीं पराभव केला.

**बेंटिंग, लॉर्ड विलियम**—( स. १७७४–१८३९ ) हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल व पोर्टलंडच्या तिसऱ्या ड्यूकचा मुलगा. हा लष्करांत लेफ्टेनंट्-कर्नलच्या हुद्यापर्यंत गेला. यानें हिंदुस्थानांत अनेक महत्त्वाच्या सुधारणा घडवून आणल्या.

**बैरीसाल**—( ग्रंथकाल स. १७६८ ) हा हिंदी कवि ब्रह्मभट्ट असून असनीचा राहणारा होय. तेथें अद्याप याचे वंशज आहेत. यानें एक दोहाबद्ध 'भाषाभरण' हा

ग्रंथ लिहिला. यांत अलंकारांचीं दिलेलीं उदाहरणें फार सुंदर आहेत.

**बोधगिरी**—विश्वरूपाचार्यांचा शिष्य व ज्ञानगिरीचा गुरु.

**बोधलेबुवा**—( माणकोजी बोधला पाहा ).

**बैजु बावरे**—अकबराचे कारकीर्दीत साधुवृत्तीनें राहणारा परंतु मानी असा एक प्रसिद्ध गवई.

**बेताल**—( जन्म स. १६७७ ) हा हिंदी कवि विक्रमशाहाचे दरबारीं असून यानें कांहीं स्फुट छंद व 'विक्रमसतसई' हा ग्रंथ लिहिला.

**बैसवंश**—हें घराणें सूर्यवंशी मानलें जातें. त्याचा वंशवेल पुढीलप्रमाणें आहे. राजधानी ठाणेश्वर.

पुष्यभूति
|
नरवर्धन = वज्रिणीदेवी.
|
राज्यवर्धन = अप्सरादेवी.
|
आदित्यवर्धन = महासेनगुप्ता.
|
१ प्रभाकरवर्धन = यशोमती.
( स. ५८०–६०५ )

| | | |
|---|---|---|
| २ राज्यवर्धन (मृत्यु स. ६०६) | राजश्री (कन्या) ( मौखरी वंशांतील ग्रहवर्म्याशीं विवाह ). | ३ हर्षवर्धन (मृत्यु स. ६४८) |

या घराण्यांत शेवटले तीन पुरुष स्वतंत्र राजे झाले. हर्षवर्धन तर मोठाच सम्राट् होता. बैस या वंशाच्या नांवावरून हे वैश्य होते, असा कांहींनीं तर्क बसविला आहे, पण तो चुकीचा दिसतो.

हर्षानें आपल्या राज्याभिषेकाच्या वेळीं श्रीहर्षशक सुरू केला ( स. ६०६ आक्टो. ). हर्षाच्या मृत्यूनंतर त्याचें राज्य त्याच्या अर्जुन नांवाच्या प्रधानानें काबीज केलें, पण त्याला चिनी व तिबेटांतील लोकांनीं कैद करून नेलें.

**बोधा**—( कविताकाल स. १८३०–१८६० ) एक हिंदी कवि. राजापूरचा राहणारा. हा सरवरिया ब्राह्मण असून याचें मूळ नांव बुद्धिसेन होतें. हा पन्नाच्या राजाजवळ होता. परंतु दरबारांतील सुभान नामक वेश्येवर हा आसक्त झाल्यामुळें यास हाकून देण्यांत आलें. पुढें यानें 'विरहवारीश' हा ग्रंथ राजास अर्पण केला. तो राजास फार आवडून याच्या इच्छेवरून सुभानेला त्यानें यास अर्पण केलें. नंतर यानें 'इश्कनामा' हा ग्रंथ लिहून त्यांत तिची प्रशंसा केली. पन्ना येथेंच हा मरण पावला ( क. कौ. भा. १ ).

२. हा हिंदी कवि फिरोजाबाद( जि. आग्रा. )चा राहणारा. तेथें अद्याप याचे वंशज आहेत. सध्यां दुर्मिळ असलेला 'बागविलास' नामक काव्यग्रंथ यानें लिहिला ( क. कौ. भा. १ ).

**बोमणदेव**—बिज्जल राजास मारणारा. बसवाच्या तीन मशालजींतील एक.

**बोम्मण पोतराजू**—मल्लज कवीचा बाप. तेलंगी ब्राह्मण.

**बोपदेव**—(स. १२६०–१३२५) हा हेमाद्रीचा परमस्नेही होता. हे दोघे देवगिरीच्या रामराव यादवाचे वेळीं होऊन गेले. बोपदेवानें व्याकरणावर दहा प्रबंध, वैद्यकावर नऊ, तिथिनिर्णयावर एक, साहित्यावर तीन व भागवततत्त्वोक्तीवर तीन यांप्रमाणें ग्रंथ लिहिले आहेत. कित्येक लोक हाच वैष्णव भागवताचा कर्ता मानतात, ही त्यांची अगदीं चुकीची समजूत आहे. कारण भागवतांतील रहस्य सांगण्यासाठीं यानें हरिलीला, मुक्ताफल व परमहंसप्रिया हे तीन प्रबंध लिहून. यांशिवाय या सर्वांवर 'मुकुट' नांवाचा ग्रंथ लिहिला. यावरून यानें वैष्णवभागवत लिहिलें नाहीं. याच्या बापाचें नांव केशव, यानें 'सिद्धमंत्र' नांवाचा निघंटु लिहिला असून त्यावर ह्यानें सिद्धमंत्रप्रकाश नांवाची टीका लिहिली आहे. हा वरदानदीच्या कांठच्या वेदपदाख्य गांवच्या धनेश नांवाच्या वैद्याचा शिष्य होता.

ह्यानें केलेले ग्रंथ—( १ ) कविकल्पद्रुम, ( २ ) कविकामधेन्वाख्या ( कविकल्पद्रुमव्याख्या ), ( ३ ) त्रिशत्श्लोकी, ( ४ ) रामव्याकरण, ( ५ ) शार्ङ्गधरसंहिता-गूढार्थदीपिका, ( ६ ) सिद्धमंत्र प्रकाश, ( ७ ) धातुकोश, ( ८ ) परशुरामप्रतापटीका, ( ९ ) मुग्धबोधव्याकरण, ( १० ) हृदयदीप-निघंटु, ( ११ ) पदार्थादर्श, ( १२ ) हरिलीला, ( १३ ) मुक्ताफल, ( १४ ) परमहंसप्रिया, ( १५ ) मुकुट. महाराष्ट्रांत बोपदेव दोन होऊन गेले असें म्हणतात.

**बोल्होबा**—तुकारामाचा पिता.

**ब्रजवासीदास**—( जन्म स. १७४३ ) हा हिंदी कवि वल्लभसांप्रदायी असून यानें 'ब्रजविलास' ग्रंथ लिहिला. त्यांत सोरठा, चौपाई, हरिगीतिका वगैरे छंद आहेत. यानें प्रबोधचंद्रोदयाचा अनेक छंदांमध्यें अनुवाद केला ( क. कौ. भा. १ ).

**ब्रह्मगुप्त**—( स. ५९८–६६५ ) अबूपर्वताजवळील भिनमाळ नांवाच्या गांवीं स. ५९८ मध्यें हा जन्मला.

यानें आपल्या तिसाव्या वर्षी चाप वंशांतील व्याघ्रमुख राजाच्या कारकीर्दीत 'ब्रह्म-स्फुट-सिद्धांत' हा ग्रंथ लिहिला, आणि त्यानंतर ३७ वर्षांनीं 'खंडखाद्य' नांवाचा दुसरा ग्रंथ रचला. यानें आर्यभट्टास अनेक ठिकाणीं दूषणें देऊन मंगळादि ग्रहांचें गणित आर्यभट्टाच्या ग्रंथावरून चुकतें व माझ्या ग्रंथावरून बरोबर जुळतें असें म्हटलें आहे. तथापि आपल्या शेवटल्या म्हणजे 'खंडखाद्य' नांवाच्या ग्रंथांत यानें आर्यभट्टाचे मूलांक घेऊन त्यांत फक्त दृक्प्रत्यय येण्याजोगा फेरफार मान्य केला असें म्हटलें आहे. एकंदरींत या वेळेपासून वेधावरून येणाऱ्या आंकड्यांनुसार मूलांक बदलण्याची प्रवृत्ति कमी झाली व आमच्या ज्योतिष्यांचें लक्ष आंकडेमोडीकडे व बीजगणिताची वाढ करण्याकडे लागलें. नऊ आंकड्यांच्या भरतीस 'शून्य' हा आंकडा लिहिण्याची कल्पना ब्रह्मगुप्ताच्या सुमारास भारतीय ज्योतिष्यांना सुचली; आणि त्यामुळें दशमान पद्धतीनें संख्यालेखन व बेरीज-वजावाकी वगैरे कृत्यें लेखी पद्धतीनें झपाट्यानें व बिनचूक पद्धतीनें करणें शक्य झालें. या शून्यलेखनाच्या एका शोधानें अंकगणिताची प्रगति हिंदुस्थानांत शेंदोनशें वर्षांत फारच वेगानें झाली. ती इतकी कीं येथील गणितज्ञांची कीर्ति परदेशांत पोंचून तेथून हिंदी पंडितांना आदरपूर्वक निमंत्रणें आलीं. अशाच प्रकारचें निमंत्रण बगदादच्या अलमनसूर नांवाच्या खलीफाकडून हिंदी ज्योतिष्याकडे आलें व त्याप्रमाणें एका ज्योतिष्यानें तेथें आपला ग्रंथ नेऊन त्याचा प्रसार केला. खलीफानें त्या ग्रंथाचें भाषांतर स. ७७३ मध्यें आरबी भाषेंत करविलें व हा ग्रंथ सिदहिंद नांवानें तिकडे रूढ झाला. अरबांचें इटालींतील लोकांशीं व्यापारी दळणवळण असल्यामुळें हिंदी अंकगणितपद्धतीचा परिचय इटालियनांना आरबांमार्फत झाला; व याच अंकगणितपद्धतीच्या आधारानें न्यूटनसारख्या कल्पक मनुष्यास युरोपांत ज्योतिषशास्त्राची वाढ करतां आली ( विज्ञानबोध-चरित्रखंड, पृ. ४५ ).

**ब्रह्मदत्त**—( ग्रंथकाल स. १८०२ ) एक हिंदी कवि. ग्रंथ-विद्वद्विलास व दीपप्रकाश.

**ब्रह्मदेव**—डल्लणनें निर्देश केलेला सुश्रुतटीकाकार.

**ब्रह्मशिव**—( स. ११२५ ) कानडी ग्रंथकार. यानें 'समयपरीक्षा' नांवाचा ग्रंथ लिहिला. त्यांत यानें इतर धर्मांतील दोष दाखवून जैनधर्माची स्तुति केली आहे.

**ब्रह्मानंद**—यानें ईशावास्य उपनिषदावर श्लोकबद्ध टीका लिहली आहे. तिचें नांव 'ईशावास्यरहस्य' हें होय.

२. प्राकृतकवि श्रीधराचा पिता.

३. अबूच्या पहाडावर राहणारा भाट. यानें गुजराथी भाषेंत कृष्णवर्णन लिहिलें आहे.

४. हे सहजानंदाचे शिष्य ( अच्युताश्रम पाहा ). यांचे ग्रंथ—ब्रह्मबोध, प्रणयविवरण, ब्रह्मानंदविवरण, वैरागर ( व्याकरण )-हा ग्रंथ यांचा नसून अच्युताश्रमाचा आहे असें सूचिकारांचें मत आहे ( सं. सू. ).

५. एकनाथचरित्रकार मुकुंदाचें चतुर्थाश्रमांतील नांव.

६. मूळ नांव गणेश. गांव-म्हसवड, गोत्र-विश्वामित्र. राजाराम प्रासादीची व यांची भेट झाली होती. समाधि ब्रह्मनाळ येथें आहे. यांचीं पदें आहेत ( सं. सू. ).

**ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर**—( स. १६४९-समाधि स. १७३८ ) छत्रपति शाहू व थोरले बाजीराव पेशवे यांचे गुरु. यांचें जन्मस्थान वऱ्हाडांतील गणपतीचे राजुरीनजीक दुधेवाडी. पिता-महादेवभट. माता-उमाबाई. देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. यांचें नांव विष्णु. बाराव्या वर्षी आईबाप वारल्यानें हा विरक्त झाला आणि यानें राजुरीच्या गणपतीची आराधना केली. तेव्हां यास विष्णुबावा असें लोक म्हणूं लागले. पुढें हे काशीस जाऊन ज्ञानेंद्रसरस्वतीपासून परमहंस दीक्षा घेऊन हे ब्रह्मेंद्रस्वामी या नांवानें वावरूं लागले. तीर्थयात्रा करून स. १६९० मध्यें हे कृष्णातीरीं आले. पण तेथील राज्यक्रांतीनें खवळलेलें वातावरण पाहून हे कोंकणांत चिपळूणाजवळील पेढें गांवीं आले. तेथेंच आवजी बल्लाळ व बाळाजी विश्वनाथ यांची यांच्यावर श्रद्धा बसली. पुढें स. १६९८ मध्यें हे परशुरामक्षेत्रीं येऊन राहिले व तेथील मंदिराचा यांनीं जीर्णोद्धार केला ( स. १७०७ ). शाहूचीहि यांच्यावर श्रद्धा बसली. याकूबखान सिद्दी ऊर्फ बडेखान यानें यांना बोलावून दोन गांवें देऊन यांचा गौरव केला. आतां मात्र स्वामींच्या जवळ परिवार जमूं लागला. मोठाल्या लोकांशीं त्यांचा निकट संबंध यऊं लागला. कोंकणांत व देशावर मिळून दहा गांवचे हे जहागीरदार बनले. स. १७२६ मध्यें हबशी सिद्दी सात व स्वामी यांच्यांत हत्तीच्या कारणावरून तंटा होऊन स्वामी धावडशीस येऊन राहिले ( कान्होजी आंगरे पाहा ).

स्वामींचा संबंध सर्व प्रमुख व्यक्तींशीं असल्यामुळें आणि त्यांचा सल्लाहि घेतला जात असल्यामुळें यांना सर्व दृष्टींनीं महत्त्व आलें होतें. चहूंकडून द्रव्यसंग्रह करण्याचाहि स्वामींचा स्वभाव होता आणि त्यावर हे किफायतशीर सावकारीहि करीत. त्यामुळें स्वामींचा खजिना संपन्न असे. पण त्याचा उपयोगहि हे लोकोपयोगी कामांतच करीत.

जीर्णोद्धार, नवीं देवळें, तलाव, धर्मशाळा, समाधि, घाट, रस्ते, पूल व अन्नसंतर्पण हे यांचे खर्च असत.

प्रत्येक राजकारणांत लक्ष ठेवून योग्य सल्ला देण्याचें काम सतत चालू असे. नवीं माणसें पारखून त्यांना उत्तेजन देण्याचें कामहि यांनीं केलें आहे. घरगुती तंटेहि यांनीं तोडले आहेत. असे हे त्या कालांत मोठे प्रभावशाली व थोर पुरुष होऊन गेले. शेवटीं रामनामाचा उच्चार करीत यांनीं देह ठेवला. पुढें स. १७५८ मध्यें छत्रपति शाहूनें सुरू केलेलें यांच्या समाधीचें काम पुरें झालें. रा. ब. पारसनीस यांनीं यांचें चरित्र व पत्रव्यवहारहि प्रसिद्ध केला आहे. त्यावरील कै. राजवाडे यांची टीका लक्षांत घेण्यासारखी नाहीं.

**ब्रिज**—( १८ व्या शतकाचा प्रारंभ ) भरतपूरच्या जाटाचा मूळ पुरुष. औरंगजेबाचे कारकीर्दीत यानें प्रथम पुंडावे करून व नंतर सिनसिनी येथें राज्य स्थापून बादशाही मुलखास उपद्रव दिला. तेव्हां याची व बादशाही सैन्याची लढाई होऊन तींत हा मारला गेला. याच्या मागून याचा मुलगा चूडामण जाटांचा पुढारी झाला ( ऐ. च. भा. २ ).

## भ

**भगवानदास कच्छवाह**—( मृत्यु स. १५८९ ) अंबरचा राजा व बिहारीमलाचा पुत्र होय. याची मुलगी मानबाई अकबराची सून असून त्याची याजवर फार मर्जी होती. पंजाबची सुभेदारी याजकडे होती. यानें मानसिंहास दत्तक घेतलें. हा शूर व बुद्धिमान् राजा लाहोरास मरण पावला. याच्या मृत्यूनें अकबरास फार दुःख झालें ( मु. रि. मा. १, पृ. ३४८–४९ ).

**भगवत् रसिक**—(स. १७०८ सुमार) हा हिंदी कवि टट्टी संप्रदायी स्वामी ललित मोहनीदासचा शिष्य असून यानें गुरूची गादी न स्वीकारतां आपला काळ ईश्वरभजनांत घालविला. यानें भक्तिपर पद्यें रचिलीं आहेत.

**भगवंतराय**—'राघवाभ्युदय' या संस्कृत नाटकाचा कर्ता.

**भगवंतराय खीची**—( लेखनकाल स. १८१७ ) हा फत्तेपूर( असोथर )चा राजा असून हिंदी कविहि होता. शिवसिंहसरोज ग्रंथांत यानें संपूर्ण रामायणाचें काव्य केल्याचा उल्लेख आहे.

**भगवंतराव पिंगळे**—यांचा पुत्र गोविंदराव हा पुण्याच्या पिंगळे घराण्याचा संस्थापक.

**भगवंतराव रामचंद्रराव अमात्य**—( जन्म स. १६७६–मृत्यु स. १७५५ ) हा रामचंद्रपंताचा थोरला मुलगा. यासुद्धां चार मुलें रामचंद्रपंताच्या उतार वयांत झालीं. याचा जन्म माघ शु. १५ शके १५९८ मध्यें झाला ( इ. सं. पे. द. मा. पृ. १ ). रामचंद्रपंत वारला तेव्हां हा चाळीस वर्षांचा होता. हा कोल्हापूर राज्याचा अमात्य झाला. परंतु या घराण्यावर संभाजी व शाहू या दोघांची इतराजी असल्यामुळें याला देशाच्या राजकारणांत स्थान नव्हतें. हा तेजस्वी व बाणेदार होता. कोल्हापूरकर जिजाबाई लिहिते, "तुम्हासहि रामचंद्रपंतांनीं सकलकलाविद्यासंपन्न केलें. त्यामागें आपण प्रतिदिनीं पुराणश्रवण करून देवब्राह्मणांचे ठायीं भक्ति धरली. धर्मशास्त्र इत्यादि सर्वहि नीति तुम्हास करतलामल" ( रा. खं. ८. ९९ ). यानें शाहूला वैतागून लिहिलें आहे "सेवकाचे चित्ताला हेतु ऐसा आहे जे, साहेबांची सेवा करावी, कालवैपरीत्यें वडिलांचे हातून सेवेसी अंतर पडलें. अलीकडे वडिलाप्रमाणें यथाकालानुसार सेवकानें या राज्यांत सेवा केली. परंतु सार्थक नाहीं. दरबारीं क्षुद्र माणसांचा पर्वकाळ झाला आहे. यास्तव सेवकाचें मन उद्विग्न आहे. साहेबीं दयान्तकरणें स्वाभिमानपुरःसर बहुमानपूर्वक सेवकाचे हातून सेवा घेतली तरी हजीर आहे." ( भा. व. प. या. ५४ ). परंतु शाहूनें याजवर लोभ केला नाहीं. उदाजी चव्हाणास हाताशीं धरून संभाजीच्या तर्फेनें लढण्याची यानें शिकस्त केली, पण यास यश आलें नाहीं. आपल्या विरुद्ध हा खटपट करतो असें वाटून संभाजीनें याचीं गांवें जप्त केलीं. यासंबंधांत जिजाबाईशीं याचा पत्रव्यवहार पाहण्यालायक आहे ( रा. खं. ८. ९२–१३५ ). विशेषतः द्वारकोजी यादवाचें पत्र भाषा, भावना व कारस्थान या दृष्टीनें वाचण्यासारखें आहे. आंगरे व

सावंत यांच्या दरम्यान अमात्याचा प्रदेश असल्यानें त्यांच्याशीं याचे युद्धप्रसंग वारंवार होत ( रा. खं. ८. १५१ ). वारणेच्या तहाच्या प्रसंगीं आपली व्यवस्था लावण्याकरितां हा साताऱ्यास गेला होता, पण याची दाद लागली नाहीं. पुनः स. १७४० मध्यें हा संभाजीबरोबर साताऱ्यास गेला तेथें शाहूनें दोघांची गोडी करून दिली व अमात्यांची नीट व्यवस्था लावण्याबद्दल संभाजीकडून शाहूनें शपथ घेवविली. पण पराक्रमाला वाव नसल्यानें हा निजामाकडे जाण्याच्या बेतांत होता ( रा. खं. ८. १७२–१८२ ). इतक्यांत अंतकाळीं रामराजास आणण्याकरितां शाहूस भगवंतरावाची जरूरी लागली आणि रामराजा गादीवर आल्यावर साताऱ्चें अमात्यपद यास मिळालें. तथापि पेशव्यानें सर्व आटोप केल्यामुळें भगवंतरावाचा उत्कर्ष झाला नाहीं. हा स. १७५५ मध्यें पुण्यास मरण पावला. याची पत्नी व्यंकूबाई ही निळोपंत पिंगळ्याची मुलगी असून मोठी कर्ती होती. याचा पुत्र कृष्णराव यास स. १७५० मध्यें कोल्हापूरचें अमात्यपद मिळालें ( म. रि. मध्य. ३. २९१ ).

**भगीरथ**—याच्या पित्याचें नांव हर्षदेव. हर्षदेव हा जगच्चंद्राचा पुरोहित होता. जगच्चंद्र हा कूर्माचलाधिराजा ज्ञानचंद्राचा पुत्र होय.

**भगीरथ** अथवा **मेघठक्कर**—( स. १४०० सुमार ) महेश ठक्करच्या तीन मुलांपैकीं हा दुसरा होय. यानें वर्धमानाच्या कुसुमांजलिप्रकाशावर 'जलद' नांवाची टीका लिहिली आहे. तीस कुसुमांजलि–प्रकाश–प्रकाशिका असेंहि म्हणतात. याशिवाय वर्धमानाच्या आणखी दोन ग्रंथांवर यानें टीका लिहिल्या आहेत, ( १ ) किरणावली–प्रकाश–प्रकाशिका व ( २ ) ( न्याय ) लीलावती-प्रकाशव्याख्या.

**भगीरथ कदंब**—( स. ३८५–४१० ) हा बनवासीच्या कंगवर्मा कदंबाचा पुत्र.

**भगीरथराव शिंदे**—( स. १७७९ सुमार ) हा व पराशर दादाजी गोहलकर हे दोघेजण जमावानिशीं गुलजारखानाचें पारिपत्य करीत होते असा उल्लेख ता. ६–१०–१७७९ चे महादजीनें फत्तेसिंगास लिहिलेल्या पत्रांत आला आहे (म. रि. उत्तर वि. १ ला, पृ. २४५).

**भट्टकल्लट**—( स. ८५० सुमार ) मुकुल कवीचा पिता. हा वसुगुप्ताचा शिष्य होता. हा अवंतीवर्मनूच्या वेळेस म्हणजे स. नवव्या शतकांत होता. रत्नाकरपंडित व हा समकालीन होय.

**भट्टकेदार**—( स. १५०० सुमार ) एक हिंदी कवि. दयालदासकृत 'राठौडॉरी' मध्यें निर्देशिलेल्या 'जयचंद-प्रकाश' या अनुपलब्ध महाकाव्याचा कर्ता. 'पृथ्वीराजारासो' या ग्रंथांत याचा निर्देश आहे.

**२.** ( केदारभट्ट पाहा ).

**भट्टजयंत**—( अभिनंद पाहा ).

**भट्टतौत** किंवा **तोत**—( स. ९६०–९० सुमार ) हा लोचनकार अभिनवगुप्ताच्या गुरूंपैकीं एक. यानें 'काव्यकौतुक' नांवाचा ग्रंथ लिहिल्याचा लोचनांत निर्देश आहे. तसेंच अभिनवभारतींतहि याच्या अनेक मतांचा उल्लेख आला आहे. शान्तरस हा मोक्षकारक असल्यानें सर्व रसांत श्रेष्ठ आहे. दुसरा नायक, त्याचा कर्ता व रसिक यांना एकच अनुभव येतो. तिसरा तो विषय प्रत्यक्ष पुढें असल्याची संवेदना झाली म्हणजे रसोद्गम होतो. अभिनवभारतींत याचा उताराहि आढळतो. हेमचन्द्रानें काव्यानुशासनांत याचीं तीन पद्यें दिलीं आहेत. यानें शंकराचें खंडण केलें आहे. याचा काव्यकौतुक हा महत्त्वाचा ग्रंथ अद्यापि अप्रसिद्धच आहे.

**भट्टनायक**—( स. ९००–१००० सुमार ) याचा हृदयदर्पण नांवाचा ग्रंथ छापलेला नाहीं आणि त्याची हस्तलिखित प्रतहि उपलब्ध नाहीं. इतर ग्रंथांतील त्याच्या उल्लेखावरून त्याचें अस्तित्व दिसून येतें. मम्मट व हेमचंद्र वगैरेंनीं त्याचा निर्देश केला आहे. लोचनकारानें यासंबंधीं कटु शब्दांची योजना केली आहे त्यावरून हा लोचनाकराचा समकालीन असावा.

**भट्टनारायण**—हा काश्मीराकडील कवि होय. 'स्तवचिंतामणि' या संस्कृत ग्रंथाचा कर्ता. उत्पलभट्ट व हा हे दोघे समकालीन होत. क्षेमराज हा याच्या मागला होय. कारण याच्या ग्रंथावर त्याची टीका आहे.

**२.** ( नारायणभट्ट पाहा ).

**भट्टभास्कर**—एक मोठा मीमांसक.

**२.** यानें वेदांवर भाष्यें लिहिलीं आहेत. सायणानें ऋग्वेद भाष्यांत याच्या मताचा निर्देश केला आहे. तैत्तिरीयसंहिता व ब्राह्मण यांवरील याचीं भाष्यें छापूनहि झालीं आहे ( म्हैसूर ऑार. सीरीज ). याच्या रुद्रावरील भाष्याचें कै. का. वा. लेले यांनीं मराठींत भाषांतर केलें आहे. यानें चारांहि वेदांवर भाष्यें लिहिलीं असावींत.

**भट्टभट्टात्मज शिवराम अकोलकर**—( स. १७५६ सुमार ) यानें प्राकृतांत वेगवेगळ्या वृत्तांत श्लोकबद्ध असा 'चैतन्यचंद्रिका' ( श्लोक ६४ ) नांवाचा एक ग्रंथ रचिला ( मं. श. १८३६, वा. इ. ले. ५७ ).

**भट्टमूर्ति**—( काव्यकाल स. १५६० ) हा तेलंगी ब्राह्मण. पेनुमंडळ सुभ्यांतील एका खेड्यांत जन्मला असें कविचरित्रांत म्हटलें आहे. हा विजयनगरच्या रामरायाच्या आश्रित कवींतील मुख्य. याला 'रामराजभूषण' अशी पदवी होती. यानें 'वसुचरित्रम्' व 'नरसभूपालीयम्' असे दोन ग्रंथ लिहिले. यानें स. १५६० मध्यें लिहावयास सुरवात केली आणि सहा वर्षांत अपूर्व कीर्ति संपादन केली. हा रामरायानंतर तिरुमल्लाचाहि आश्रित होता. याचा अलंकारशास्त्रावरील 'नरसभूपालीय' हा ग्रंथ म्हणजे संस्कृत ग्रंथाचें तेलगू भाषांतर होय. याशिवाय यानें 'हरिश्चंद्र, नलोपाख्यान' हा ग्रंथ दुसऱ्या वेंकट राजाचे कारकीर्दीत लिहिला. याचा छंदःशास्त्रावरहि ग्रंथ आहे.

**भट्टवामुख**—हा रुद्रकाचा पिता.

**भट्टस्वामी**--( भट्टि पाहा ).

**भट्टाकलंकदेव**—कानडी भाषेचा जैनधर्मी कवि. गुरु–अकलंकदेव. हा विजयनगरच्या श्रीरंगाचा आश्रित होता ( स. १५७३–१५८४ ). पेनगुंडीच्या व्यंकटपतिरायाचा याला आश्रय होता ( स. १५८६–१६१५ ). ग्रंथ–कर्नाटकशब्दानुशासन ( ले. का. स. १६०४ ).

हा संस्कृत, प्राकृत, मागधी, कानडी इत्यादि सहा भाषांत निष्णात होता. कर्नाटकशब्दानुशासन हा कानडी भाषेचा व्याकरणग्रंथ असला तरी तो संस्कृतमध्यें लिहिला आहे. त्यावरील स्वकृत वृत्ति व व्याख्याहि संस्कृतमध्येंच लिहिली आहे. उदाहरणें मात्र प्रसिद्ध कानडी ग्रंथांतून घेतलीं आहेत, त्यामुळें केवळ कानडी भाषा जाणणारांत याच्या ग्रंथाचा विशेष प्रचार झाला नाहीं. हा ग्रंथकार कानडी भाषेचा, ती भाषा शास्त्रोपयोगी आहे म्हणून, अभिमान बाळगतो ( क. क. च. भा. २, पा. ३४८ ).

**भट्टाचार्य**—जैनग्रंथांत कुमारिलभट्टाचा या नांवानें निर्देश आहे.

**भट्टार्क मैत्रक**—( स.४९०–५२६ ) हा वलभीच्या मैत्रक घराण्याचा संस्थापक होय. यानें मैत्रक घराण्याची स्थापना स. ४९० मध्यें केली. याला चार मुलगे होते. याचा ध्रुवसेन नांवाचा मुलगा फार प्रसिद्ध राजा होऊन गेला. ध्रुवसेन स. ५२६ च्या सुमारास गादीवर आला. ध्रुवसेनाचे कारकीर्दीत जैन लोकांनीं याचे राज्यांत शिरकाव करून धर्माचा फैलाव केला. यास सेनापति म्हटलेलें आहे. हा गुप्त सम्राटांच्या सैन्यांतील एक सरदार होता. पुढें जेव्हां गुप्त साम्राज्य नाममात्र राहिलें, तेव्हां हा वलभीच्या जहागिरीचा स्वतंत्र राजा बनला. आणि पूर्वीपासून चालत आलेलें सेनापति हें नांव यानें बहुमानास्पद म्हणून कायम ठेवलें.

**भट्टि**—( स. ५००–६५० सुमार ) सुप्रसिद्ध भट्टि काव्याचा कर्ता. भट्टि काव्याचे बावीस सर्ग असून व्याकरणाच्या नियमांनीं सिद्ध झालेल्या रूपांचे प्रयोग करून दाखविण्याच्या प्रधान हेतूनेंच यानें हें काव्य रचलें आहे. त्याचीं प्रकीर्णकाण्ड ( सर्ग १-५ ), अधिकारकाण्ड ( सर्ग ६-९ ), प्रसन्नकाण्ड ( सर्ग १०-१३ ) व तिङन्तकाण्ड ( सर्ग १४-२२ ) अशीं चार काण्डें आहेत.

भट्टीच्या काळाचें विवेचन व निर्णय कै. प्रो. कमळाशंकर प्राणशंकर त्रिवेदी यांनीं मुंबई सरकारच्या संस्कृतग्रंथमालेंत छापलेल्या भट्टिकाव्याच्या प्रस्तावनेंत केला आहे. आपल्या ग्रंथाच्या अंतिम श्लोकांत भट्टीनें स्वतःच सांगितलें आहे कीं, 'काव्यमिदं विहितं मया वलभ्यां श्रीधरसेननरेन्द्रपालितायाम्।' म्हणजे श्रीधरसेन मैत्रक राजाच्या संरक्षणाखालीं असलेल्या वलभी नगरीमध्यें मीं हें काव्य लिहिलें. जयमंगला टीकेंत 'श्रीधरसूनु नरेन्द्र' असा पाठ आहे. धरसेन नांवाचे राजे वलभीमध्यें होऊन गेले. त्यांपैकीं पहिल्या धरसेनाचें राज्य केव्हां चालू झालें हें नीट समजत नाहीं. दुसऱ्या धरसेनाच्या अगदीं पहिल्या पत्रावर वलभी शकाचें २५२ हें वर्ष आहे. तसेंच चवथ्या धरसेनाचें शेवटचें दानपत्र वलभी शक ३३२ या वर्षांतील आहे. वलभी शक स. ३१९ च्या सुमारास चालू झाला. म्हणजे वरील दोन वर्षें स. ५७१ व ६५१ हीं येतात. पहिल्या धरसेनाच्या मागून राज्यावर आलेल्या द्रोणसिंहाच्या राजवटींतील वलभी शक १८३ म्हणजे स. ५०२ हें वर्ष एका ठिकाणीं नमूद केलेलें असल्यामुळें त्यापूर्वी कांहीं वर्षें पहिला धरसेन सिंहासनावर आलेला असला पाहिजे. म्हणजे भट्टीचा काल स. ५०० पासून ६५० पर्यंत कोणता तरी असला पाहिजे.

भट्टिकाव्याच्या हस्तलिखित प्रतींत भट्टीचें नांव अनेकवार भट्टस्वामी किंवा भर्तृस्वामी असें दिलें असून याच्या पित्याचें नांव जयमंगला नामक टीकेंत श्रीस्वामी व विद्याविनोद नामक टीकाकारानें श्रीधरस्वामी असें दिलें आहे. कित्येक पंडितांच्या मतें भट्टिकाव्याचा कर्ता भट्टि, व वलभी शक ३४४ म्हणजे स. ६६३ या वर्षी चवथ्या धरसेनाचा पुत्र तिसरा ध्रुवसेन यानें ज्याच्या नांवानें दानपत्र करून दिलें आहे तो बप्पपुत्र भट्टिभट्ट एकच होत. पण डॉ. हुल्टश यानें या मतावर एपिग्राफिका

इंडिका, ग्रंथ १ मध्यें आक्षेप काढले आहेत (पान ५२). मंदोसरच्या सूर्यमंदिरांतील शिलालेखांत जो एक वत्सभट्टि म्हणून सांगितला आहे तोच भट्टिकाव्याचा कर्ता होय, असें बाँबे रॉयल एशियाटिक सोसायटीच्या स. १९०४ च्या जर्नलमध्यें श्री. मुजुमदार यांनीं प्रतिपादिलें आहे. हा मंदोसर–शिलालेख स. ४७३ या वर्षीचा असून डॉ. फ्लीटनें प्रसिद्ध केलेल्या गुप्तांच्या कोरीव लेखसंग्रहांत क्रमांक १८ मध्यें छापला आहे. श्री. मुजुमदारांचें मत त्या लेखांतील श्लोक व भट्टिकाव्यांतील दुसऱ्या सर्गांतील शरद्वर्णनाचे श्लोक यांच्या साम्यावरून झालेलें आहे. तें मान्य केल्यास भट्टि हा पहिल्या धरसेनाच्या राजवटींत होऊन गेला असें म्हणावें लागतें. पण प्रो. कीथ यांनीं त्या मताला सर्वथैव अग्राह्य म्हटलें आहे. अशा रीतीनें भट्टीच्या निश्चित कालाविषयीं कीथ व मुजुमदार यांमध्यें वाद असला तरी भट्टि हा भारवि व दंडी यांच्यापूर्वीं होऊन गेला, व भट्टिकाव्य वाक्यपदीयाचा कर्ता भर्तृहरि यानें रचलेलें नव्हे याविषयीं उभयतांचें एकमतच आहे. भट्टिकाव्यावरील अनेक टीकांची माहिती आफ्रेज्‌च्या सूचीवरून मिळते.

**भट्टिभट्ट**—बप्पाचा मुलगा ( भट्टि पाहा ).

**भट्टेन्दुराज**—( स. ९९० सुमार ) हा सौचुकाचा नातू आणि भूतिराजाचा पुत्र. याचें गोत्र कात्यायन. हा अभिनवगुप्ताचा गुरु होता.

**भट्टोजी दीक्षित**—( स.१६३० सुमार ) एक वैय्याकरणी कृष्णयजुर्वेदी तैत्तिरीय ब्राह्मण. स. १६३० च्या सुमारास हा हयात होता. याच्या बापाचें नांव लक्ष्मीधर. भट्टोजीचा गुरु शेषकृष्ण होता. ह्यांनीं पाणिनीच्या व्याकरणावर सिद्धांतकौमुदी ही प्रख्यात टीका लिहिली आहे. ही इतकी लोकप्रिय झाली आहे कीं, तिच्यामुळें पाणिनीचें व्याकरण व इतर व्याकरणकारहि मागें पडले आहेत.

भट्टोजीच्या नांवावर प्रौढमनोरमा ( सिद्धांतकौमुदीवरील टीका ), वैय्याकरणभूषण, संध्यामंत्रव्याख्यान, शब्दकौस्तुभ अपूर्ण ( अष्टाध्यायावरील टीका, या ग्रंथावर उपटीका झाल्या आहेत ), अशौचनिर्णय इत्यादि बरेच ग्रंथ आढळतात. हा काशीस वारला. याला मनाजोगा विद्यार्थी न मिळाल्यानें हा राक्षस झाला व पुढें यानें एका विद्यार्थ्यास व्याकरण शिकवून त्याच्याकडून गति घेतली अशी दंतकथा आहे ( बेलवलकर–सि. सं. ग्रामर ).

**भट्टोत्पल**—( स. ९६६ ) हा एक मोठा टीकाकार होऊन गेला. यानें खंडखाद्यावरील टीका पूर्ण केली. तसेंच वराहाच्या 'यात्रा' या ग्रंथावरहि टीका बृहत्संहिता टीकेच्या पूर्वी केली असें तींतील उल्लेखावरून दिसतें. लघुजातकावरहि याची टीका आहे. म्हणजे यात्रा, बृहज्जातक, लघुजातक आणि बृहत्संहिता इतक्या ग्रंथांवरील टीका भट्टोत्पलानें केल्या. पैकीं 'यात्रा' वरील टीका प्रस्तुत उपलब्ध नाहीं. खंडखाद्यावरील दुसरी टीका विशेष प्रसिद्ध आहे. यावरून हा काश्मीरांतील राहणारा असावा असें अनुमान काढतां येईल. यानें वराहमिहिराच्या बृहज्जातकावर स. ९६६ मध्यें जगच्चंद्रिका नांवाची टीका लिहिली. याचा गणितस्कंधावर स्वतंत्र ग्रंथ असावा असें वाटतें व दुसरा 'प्रश्नज्ञान' या नांवाचा ७२ आर्यांचा ग्रंथहि यानेंच केला आहे. हा प्राचीन ग्रंथाचा शोधक होता. याचें वाचनहि बरेंच असल्याचें यानें घेतलेल्या जुन्या आधारावरून दिसतें. हें नांव भटोत्पल असें भा. ज्यो. कारांनीं लिहिलें आहे.

**भद्र नारायण**—बाणभट्टकवीचा मित्र.

**भद्रपा**—हा चौऱ्यांशी सिद्धांपैकीं चोविसावा सिद्ध होय. जात ब्राह्मण.

**भद्रबाहु**—( मृत्यु ख्रि. पू. २९७ ) हा जैन आचार्य मौर्य सम्राट् सम्प्रतीचा गुरु होता. भद्रबाहुचरित्र नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्यांत याच्या चरित्राबरोबर मौर्य साम्राज्यविषयक अनेक महत्त्वाच्या गोष्टींचा निर्देश आला आहे. त्यांत पुढील माहिती आढळते. अवंति देशांत चंद्रगुप्ति नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याची राजधानी उज्जयनी होती. एकदां चंद्रगुप्ति निजला असतां भावी अरिष्टसूचक सोळा स्वप्नें पडलीं. सकाळीं उठतांच भद्रबाहुस्वामी आल्याची त्याला बातमी मिळाली. उज्जयनीमधील एका सुंदर बागेंत याचा मुक्काम होता. राजाहि मुनिसमुदायासह भद्रबाहूच्या दर्शनार्थ गेला आणि आपल्या स्वप्नाचें फळ याला विचारलें. स्वप्नाचें फळ समजावून घेतल्यावर त्यानें याच्यापासून जैनधर्माची दीक्षा घेतली, व तो याच्या सेवेंत तत्पर झाला. कांहीं दिवसांनंतर हा शेठ जिनदासाच्या घरीं आला. तेथें पाळण्यांत निजलेल्या एका साठ दिवसांच्या मुलानें याला पाहून 'जा जा' असें म्हणण्यास सुरुवात केली. हें ऐकतांच याच्या ध्यानांत आलें कीं लवकरच बारा वर्षांचा भयंकर दुष्काळ पडावयाचा आहे. मग यानें आपल्या पांचशें मुनींसह दक्षिणेकडे जाण्याचा निश्चय केला. दक्षिणेंत पोंचल्यावर याच्या ध्यानांत आलें कीं आपलें आयुष्य थोडें राहिलें आहे. म्हणून यानें आपल्या जागीं विशाखाचार्यांची योजना करून स्वतः एकांतांत मृत्यूची वाट पाहत राहू

लागला. चंद्रगुप्ति तेथें याच्याजवळ राहत असे. यानें त्याला जवळ न राहण्याविषयीं पुष्कळ सांगितलें, पण उपयोग झाला नाहीं. भद्रबाहूनें लवकरच देह ठेविला व जैनधर्माची दीक्षा घेऊन याच्याबरोबर नेहमीं राहणाऱ्या मौर्य सम्प्रतीनेंहि तेथेंच देह ठेवला. हें ठिकाण म्हणजे श्रवणबेलगोला ( म्हैसूर ) हें होय. तेथील स्थानिक शिलालेख व आख्यायिका यांचाहि या गोष्टीस दुजोरा आहे. वादग्रस्त प्रश्न फक्त हा चंद्रगुप्ति म्हणजे चंद्रगुप्त मौर्य किंवा संप्रति मौर्य, हा आहे. संप्रति मौर्य असावा.

भद्रबाहु नांवाचे दोन आचार्य झाले. एक ख्रि. पू. ४३३–३५७ व दुसरा ख्रि. पू. १२ या वर्षी झाला. पण यांसंबंधीं अधिक निर्णय करतां येत नाहीं. प्रारंभीं दिलेला निर्वाणकाल संप्रति मौर्याच्या कालानुसार दिला आहे.

याचे ग्रंथ १ श्रीमंडलप्रकरणवृत्ति ( ज्योतिष ), २ चतुर्विंशतिप्रबंध, ३ दशवैकालिकानिर्युक्ति, ४ आवश्यकसूत्रनिर्युक्ति, ५ उत्तराध्ययनसूत्रनिर्युक्ति, ६ आचारांगसूत्रनिर्युक्ति, ७ सूत्रकृतांगसूत्रनिर्युक्ति, ८ दशश्रुतस्कंधसूत्र, ९ कल्पसूत्र, १० व्यवहारसूत्र, ११ सूर्यप्रज्ञप्तिसूत्र, १२ श्रीभाषितसूत्र.

यानें ज्ञानाची एक स्वतंत्र शाखा सुरू केली.

**भद्रापा नायक**—(स. १५६५ सुमार) हा केलडीच्या सदाशिव नायकाचा भाऊ होय. जेव्हां सदाशिव म्हातारा झाला आणि कारभार पाहण्यास असमर्थ झाला तेव्हां त्यानें याला 'इम्मडी सदाशिव नायक' ही पदवी देऊन केलडीच्या गादीवर बसविलें. गादीवर आल्यावर यानें आपली केलडी राजधानी बदलून इक्केरीस नेली. याची कारकीर्द फार थोडी होती. याला विजयनगरच्या रामरायानें पदच्युत केलें.

**भद्रापा विदनूरकर**—( स.१६६२–६३ ) शिवापा विदनूरकराचा मुलगा. त्यानंतर हा विदनूरकराच्या गादीवर आला. याच्या मागून सोमा शंकर किंवा सोमशेखर हा त्याच्या गादीवर आला.

**भरद्वाज**—या कवीचें 'कालीयकुतूहलम्' नांवाचें संस्कृत काव्य प्रसिद्ध आहे.

**भर्तृदामा क्षत्रप**—( स. २८४–२८९ ) हा दुसऱ्या रुद्रसेन क्षत्रपाचा पुत्र. याचीं नाणीं शा. श. २०६–२१८ पर्यंतचीं मिळालीं आहेत. हा महाक्षत्रप होता. याचा पुत्र विश्वसेन.

**भर्तृप्रपंच**—( स. ५०० सुमार ) एक आचार्य. यानें बृहदारण्यकोपनिषदावर विस्तृत भाष्य लिहिलें होतें. श्री आद्यशंकराचार्यांनीं तें भाष्य पाहिलें असावें असें त्यांच्या 'तस्या इयमल्पग्रन्था वृत्तिरारभ्यते' या लिहिण्यावरून दिसतें. आनन्दगिरीनें आपल्या भाष्यांत स्पष्टीकरणहि तसें केलेलें आहे ( बृह. उ. १. १. १ ). आनंदगिरीच्या भाष्यामधून याचे सर्व उतारे शोधून काढून प्रो. हिरियाना यानें एक लेख लिहिला आहे. आणि तो मद्रासच्या तिसऱ्या ओरिएंटल कॉन्फरन्सच्या प्रोसिडिंगमध्यें छापला आहे ( स. १९२४, पृ. ४३०–४५० ).

**भर्तृभट्ट गुहिलोत**—(स. ९०३) मेवाडच्या गादीवर हा मत्तटानंतर आला. याला भर्तृभट असेंहि म्हणतात. याला सिंह व ईशानभट असे दोन पुत्र होते. त्यांपैकीं सिंह याच्यानंतर गादीवर आला व ईशानभट चारसुच्या ( जयपूर राज्यांत ) आसपासच्या प्रदेशावर राजा झाला.

**२.** ( स. ९४२–४३ ) हा मेवाडच्या गादीवर तिसऱ्या खुंमाणानंतर आला. हा तिसऱ्या खुंमाणाचा पुत्र होय. याच्या पत्नीचें नांव महालक्ष्मी होय. ती राष्ट्रकूट घराण्यांतील होती. तिचा पुत्र अल्लट होय. ही महालक्ष्मी हथूंडी ( हस्तिकुंडी ) च्या राठोड राजा मंमटाची मुलगी असावी. कदाचित् बहीण असेल. तो याचा समकालीन व संबंधी होता. याच्या वेळचे दोन शिलालेख आतांपर्यंत मिळाले आहेत. एक वि. सं. ९९९ ( स. ९४२ ) श्रावण शु. १ चा प्रतापगड येथें मिळाला आहे. खोंमाणचा पुत्र महाराजाधिराज श्रीभर्तृभट्टानें घोंटावर्षी ( प्रतापगडापासून सात मैलांवरील घोंटासीं ) गांवच्या इंद्रराजादित्यदेव नांवाच्या सूर्यमंदिराला पलासकूपिका ( परासिया मंदोसरपासून १५ मैल दक्षिणेस ) गांवचें बंबूलिका शेत दिलें ( एपि. इंडि. १०.२४ ), असें एका लेखांत आहे. दुसरा वि. सं. १००० ( स. ९४३ ) ज्येष्ठ शु. ५ चा फुटका आहे. तो आहाड येथें मिळाला. त्यांत भर्तृनृपाच्या वेळीं आदिवराह नांवाच्या मनुष्याच्या द्वारें गंगोद्भेद ( आहाडांतील गंगोभेद ) तीर्थावर आदिवराहाचें मंदिर बांधल्याचा निर्देश आहे ( राजपूताना म्युझियम् ( अजमेर ) चा १९१३-१४ चा रिपोर्ट, पा. २ ). मेवाडांतील भर्तृपुर ( भटेवर गांव ), व जैनांचे भर्तृपूरीयगच्छ हे यांच्या नांवानें बसविलेले आहेत असें मानितात. याचा मुलगा अल्लट हा वि. सं. १००८ ( स. ९५१ ) मध्यें राजा होता त्या अर्थी याचा मृत्यु वि. सं. १०००–१००८ ( स. ९४३–९५१ ) च्या मध्यें केव्हांतरी झाला असावा.

**भर्तृयज्ञ**—( स. ८०० पूर्वी ) एक प्राचीन टीकाकार. यानें कात्यायनश्रौतसूत्र, पारस्करगृह्यसूत्र व गौतमधर्मसूत्रांवर टीका लिहिल्या होत्या असें उताऱ्यांवरून दिसतें.

**भर्तृस्वामी**—( भट्टि पाहा ).

**भर्तृहरि**—( मृत्यु स. ६५० ) एक व्याकरणकार. याचा वाक्यपदीय ग्रंथ प्रसिद्ध होता. आगम, वाक्य, प्रकीर्ण (पद) अशा तीन कांडांत यानें त्रिपादीची व्याख्या केली. ती सध्यां उपलब्ध आहे. व्याडीचा संग्रहग्रंथ नष्ट झाला आणि अध्ययनपरंपरा नष्ट झाल्यामुळें महाभाष्यहि दक्षिणेंत केवळ ग्रंथरूपानें शिल्लक राहिलें. तेव्हां हा थोडक्यांत सर्व समजून घेऊं इच्छिणाऱ्याकरितां वाक्यपदीय ग्रंथ लिहिला, असें वाक्यपदीयाच्या दुसऱ्या कांडाच्या अंतीं लिहिलेलें आहे. चिनी प्रवासी इत्सिंग आपल्या प्रवासवृत्तांत, हा स. ६५० मध्यें मरण पावल्याचें लिहितो. याचें एक वाक्य कुमारिलानें उद्धृत केलें आहे.

२. शतकत्रयकर्ता भर्तृहरि यापेक्षां वेगळा मानतात.

**भलहपा**—यालाच भवपा असें म्हणतात. हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं एकोणचाळिसावा सिद्ध होय. हा जातीनें क्षत्रिय होता.

**भलिपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं बासष्टावा सिद्ध होय. हा जातीनें कृष्णघृतवणिक असून राहणारा इगतपुरीचा होय.

२. हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं चौऱ्यांशीवा सिद्ध होय. यालाच व्यालिपा असें म्हणतात. हा जातीनें ब्राह्मण होता.

**भल्लट**—भल्लटशतक नांवाच्या संस्कृत ग्रंथाचा कर्ता. अभिनवगुप्तानें ध्वन्यालोकलोचनांत याचा निर्देश केला आहे. भल्लटशतक काव्यमालेंत छापलें आहे. 'रत्नत्रये भल्लटशतकम् समाप्तम्' असें शेवटीं म्हटलें असल्यामुळें भल्लटशतकाशिवाय आणखी याचे दोन ग्रंथ असावेत.

**भवदेवभट्ट**—( स. १००० सुमार ) बंगाल्यांतील वर्म घराण्यांतील हरिवर्म राजाचा मंत्री. यानें ओरिसांतील भुवनेश्वराचें देऊळ बांधलें. तेथें याच्या घराण्याची माहिती शिलालेखांकित आहे. याचे ग्रंथ–१ व्यवहारतिलक, ( अप्रसिद्ध ), २ प्रायश्चित्तविवरण, ३ तौतातिकमततिलक.

याचा पिता गोवर्धन. माता सांगोका. यानें 'बालवलभीभुजंग' अशी पदवी धारण केली होती.

**भवनंदी**—(स. १२०० सुमार) यानें तिसऱ्या कुलोत्तुंग चोलाच्या वेळीं नन्नुल हें तामीळ व्याकरण लिहिलें.

**भवभूति**—( स. ७००–५० ) संस्कृत भाषेंतील महाकवि. याचे ग्रंथः–१ महावीरचरित, २ मालतीमाधव, ३ उत्तररामचरित, ४ गुणरत्न ( १३ श्लोक अपूर्ण ). पहिलीं तीनहि नाटकें आहेत. पहिलें अर्धें राहिलेलें दुसऱ्यानें पुरें केलें आहे. दुसरें नाटक दहा अंकी असून कल्पित कथेवर रचलेलें दिसतें. पहिलें व तिसरें मिळून समग्र रामचरित्र गायिलेलें दिसतें. याचें उत्तररामचरित हें नाटक करुणरसाबद्दल विशेष प्रसिद्ध आहे.

हा विदर्भांतील पद्मपूरचा राहणारा. कुलनाम उदुंबर. काश्यपगोत्री तैत्तिरियशाखी ब्राह्मण. भट्टगोपाल-नीलकंठ-श्रीकंठ (भवभूति) असा याचा वंश आहे. माता जातुकर्णी. गुरूचें नांव ज्ञाननिधि. याचें पद्मपूर चांद्याजवळील नसून मंदोसरजवळचें असावें, असें कांहीं लोक म्हणतात. हा कनोजच्या यशोवर्मन्च्या पदरीं होता, असें राजतरंगिणींत म्हटलें आहे. या यशोवर्म्याच्या पदरीं वाक्पतिराज नांवाचा कवि होता आणि त्यानें यशोवर्म्याचें गुणवर्णन करणारें 'गौडवहो' नांवाचें काव्य लिहिलें त्यांत याचा निर्देश आहे. कुमारिलभट्टाचा भवभूति शिष्य होता, व मीमांसवार्तिकावर टीका लिहिणारा अंबेक व हा एकच होय, असें डॉ. भांडारकर 'मालतीमाधव'च्या प्रस्तावनेंत म्हणतात.

**भवानभगत**—हा खंबायत परगण्यांत राहणारा कानफाट्या गोसावी होता. यानें 'आत्मज्ञान' नांवाचा ग्रंथ गुजराथींत केला.

**( श्रीनिवास ऊर्फ ) भवानराव प्रतिनिधी**—(मृत्यु स.१७७७) औंधचे श्रीपतराव हे निपुत्रिक वारल्यामुळें त्यांच्या चुलत नातवास तें पद मिळालें. मध्यंतरीं दादासाहेब पेशव्यांनीं एक वर्ष हें पद नारो शंकर यास दिलें होतें. तेव्हां हा पेशव्यांविरुद्ध उठून निजामासहि जाऊन मिळाला होता. स. १७६८ त याचें व पेशव्यांचें सख्य होऊन याला पुन्हां पद मिळालें. हा बारभाईंतील असून नानांच्या मर्जींतील होता. हा स. १७७७ मध्यें वारला. त्या वेळीं याच्या काशीबाई व यमुनाबाई नांवांच्या दोन बायका होत्या.

**भवानंद सिद्धांत वागीश**—( स. १६२५ सुमार ) हा राघवेंद्राचा गुरु. याचे ग्रंथ–१ तत्त्वचिंतामणिदीधितिप्रकाशिका, २ प्रत्येकालोकसारमंजरी, ३ तत्त्वचिंतामणिटीका, ४ कारकविवेचन ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ४७९ ).

**भवानी काळो-कू**—(स. १७६४–१८०३ सुमार) हा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण असून वऱ्हाडांतील मंगरूळ तालुक्यांतील खडीधामणी वगैरे गांवांचा वतनदार पटवारी होता. पुढें हा साबाजी भोसल्याचा दिवाण झाला. साबाजी जानोजीविरुद्ध माधवरावाचे पक्षास मिळण्याचे बेतांत असतांना ह्यानें त्याची समजूत घातली, आणि जानोजीचें व साबाजीचें सख्य करून दिलें. नंतर हा जानोजीच्या पदरीं राहून भोसल्यांच्या फौजेचा मुख्य झाला. हा देवाजीपंताचे पक्षाचा असून ह्यानेंच वाशीम

येथील प्रसिद्ध बालाजीचे मूर्तीची स्थापना केली व देवालय बांधलें. पुढें साबाजी-मुधोजी लढ्यांत हा कांहीं दिवस मुधोजीच्या पक्षांत असावा ( ना. भों. व. प्र. २). चिमणाजी बापूच्या बंगालवरील स्वारींत हा त्याजबरोबर होता. कटक प्रांताचा सुभेदार शिवभट साठे यानें बंड केलें असतां ह्यास त्याची जागा देण्यांत आली ( स. १७६१ एप्रिल ). दिवाकरपंताचे मागून हा दिवाणाचेंहि काम पाहूं लागला. हा चिमणाजी बापूचे पक्षाचा असल्यामुळें रघूजीची यावर गैरमर्जी झाली. ह्याच्या वाडिलाचें नांव काळोजी होतें. त्यावरून या घराण्याचें आडनांव काळो-ळू असेंच पडलें ( ना. प्रां. इ. ).

**भवानीपंत मुनशी**—( मृत्यु ता. १९. २. १७९०) भवानी नागनाथ हा जानोजीचा सल्लागार होता. जानोजीचे कारकीर्दीचे अखेरीस दिवाकरपंत हा मागें पडून भवानीपंत मुनशी व भवानी काळो हे पुढें आले. देवाजीपंताविषयीं पेशवे व जानोजी या दोघांचींहि मनें कलुषित झालीं होतीं.

भवानीपंत हा एलिचपूरकडील राहणारा असून प्रथम एलिचपूरच्या नवाबाचे पदरीं होता. हा फार्सी लिहिणेंवाचणें उत्तम जाणत असे. हा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण होता. याचे वंशज नागपुरास आहेत. त्यांचा वाडा व देवळें प्रसिद्ध आहेत.

हा एलिचपुराहून पहिल्या रघूजीचे वेळीं नागपुरास आला व देवगडकर गोंडराजे बुर्हाणशहा याजकडे फार्सी पढविण्याकरितां राहिला. स. १७५१ मध्यें रघूजी भोंसले व बंगालचा नवाब अलीवर्दीखान यांजमध्यें तह झाला त्या वेळीं याचे फार्सी मसुदे फार पसंत पडल्यामुळें रघूजीनें यास आपल्या पदरीं ठेविलें.

स. १७६३ चे निजाम व पेशवे यांच्या मोहिमेंत भवानीपंत मुनशी हा दिवाकरपंताबरोबर हजर होता. दिवाकरपंतावर इतराजी झाल्यानंतर मुनशी हा पुढें आला, व जानोजीचा दिवाण बनला. हा देवाजीपंताच्या विरुद्ध पक्षाचा मुख्य होता.

**भवानीबाई महाडीक**—(स. १६७९–१७२८) ही संभाजीची मुलगी म्हणजे थो. शिवाजीची नात होय. हिचा जन्म ता. २९ जाने.१६७९ रोजीं शृंगारपूर येथें झाला. ही आपली आई येसूबाई, व बंधु शाहू यांबरोबर औरंगजेबाच्या कैदेंत होती. हिचें लग्न औरंगजेबाच्या छावणींत हरजीराजे महाडीक यांचा पुत्र शंकरजी राजे याजबरोबर झालें. शंकरजी हा औरंगजेबाचे नोकरींत कर्नाटकांत असतांच शाहूचे सुटकेपूर्वी दक्षिणेंत आला. त्या वेळीं भवानीबाईहि आली. राज्यावर बसतांच शाहूनें हिला वडिलार्जित तारळें महालाच्या देशमुखीच्या सनदा करून दिल्या ( स. १७०९). धामधुमींत वाताहत झालेल्या तारळ्याची १ जुलै १७१० रोजीं तारळेकरास बोलावून हिनें पुन: वसाहत केली. शाहूची हिच्यावर माया होती. हिचे पुत्र दुर्गाजी व अंबाजी. स. १७२८ च्या सुमारास शंकरजी वारला आणि हिनें सहगमन केलें.

**भवानीबाई शिंदे**—ही सिधोजी घाटगे याची मुलगी व महादजी शिंदे यांची बायको.

**२.** संगमनेरकर देशमुखांची मुलगी व महादजीची दुसरी बायको. हिचें लग्न ता. २३।१२।१७१७ रोजीं झालें ( खरे ले. १९५३ ).

**भवानीबावा**—अनंतफंदीचा बाप.

**भवानीराम** ऊर्फ **चिमणाबहादुर**—हा राजा गिरिधराचा मुलगा. बापानंतर हा माळव्याचा सुभेदार होता.

**भवानी शंकरदास**—( कविताकाल स. १६५० ) बंगाली कवि. हा पश्चिम बंगाल्यांतील होय ( क. कौ. भा. ७ ).

**भवानी शिवराम**—हा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण साबाजी भोंसल्याचा दिवाण होता. पांचगांवचे लढाईंत साबाजी पडल्यावर हा उमरावतीकर शिवाजी भोंसल्यास जाऊन मिळाला. यानंतर यानें निजामाकडे माणसें पाठवून त्याची मदत मागितली. बाराभाईकडील व निजामाकडील मदत यास मिळाली असती तर शिवाजी भोंसल्याचें बंड चांगलेंच रंगांत आलें असतें. परंतु ती न मिळाल्यामुळें हें बंड लवकरच मोडलें.

भवानी शिवराम हा यानंतर निजामाकडे व तेथून पुण्यास पेशव्याकडे गेला; पुन्हां नागपुरास आला नाहीं ( अप्र. का. ).

**भंगप्पदेव चोल**—चोल घराण्यापैकीं विजयनगरच्या इतिहासांत येणारें नांव.

**भंडि**—या नांवाचा हर्षाचा एक मामा होता, असें हर्षचरित्रांत बाणभट्टानें लिहिलें आहे. वत्सराजानें भंडिकुल राजाचा पाडाव करून स्वतःकडे साम्राज्य घेतलें, असें भोजाच्या सागरतालच्या शिलालेखांत म्हटलें आहे. हा भंडिकुलांतील राजा इंद्रराज किंवा इंद्रायुध असावा. हा भंडि मौखरी कुलांतील असावा (म. भा. २ पा. १७९).

**भागावती**—( स. १६०० सुमार ) ही मुहम्मदकुली कुत्बशाहा याची आवडती पत्नी. या गोवळकोंड्याच्या सुलतानानें हिच्या नांवानें भागानगर ऊर्फ हैद्राबाद

हें नगर वसविलें. हिचा मुलगा हैदर म्हणून त्या शहरास पुढें हैद्राबाद म्हणूं लागले.

**भागीरथीबाई शिंदे**—( मृत्यु स. १७९९ ) ही कर्डेकरांची कन्या व महादजीची पत्नी. ही महादजीच्या मृत्यूनंतर हयात होती. दौलतरावाच्या लक्षांत होती ती ही असावी. ही नगर येथें कैदेंत असतां १५-६-१७९९ मध्यें ऑगस्टांत वारली ( म. रि. उ. २, पा. ४११ ). हिच्यामुळेंच बाया व दौलतराव यांच्यांत तेढ वाढत गेली.

**भागीरथीबाई होळकर**—हरिराव होळकराची बायको.

**भागोदास**—एक कबीरसांप्रदायी. विजक ग्रंथाचा कर्ता.

**भाग्यवती**—ही पश्चिम चालुक्यांपैकीं दशवर्म्याची पत्नी.

**२.** राष्ट्रकूट राजा जगत्तुंगाची कन्या व पालांपैकीं राज्यपालाची पत्नी.

**भादेपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं बत्तिसावा सिद्ध होय. हा जातीनें ब्राह्मण असून श्रावस्ती प्रांतांत राहणारा होय. हा कण्हपाचा शिष्य. याचा एकहि ग्रंथ उपलब्ध नाहीं. चर्यागीतीमध्यें याच्या कांहीं कविता प्रसिद्ध आहेत. त्यांवरून हा हिंदी कवि होता.

**भानदास**—याचा जन्म स. १७२१ मध्यें झाला. शंकराचार्य व हस्तामलकाचार्य यांचा संवाद यानें रचला, आणि तो वाचनीय झाला आहे. त्यांत हस्तामलकाचार्यांनीं द्वैताद्वैताचें चांगलें विवेचन केलें आहे.

**भानुकर** किंवा **भानुदत्त**—( स. १५५० सुमार ) वाघेल घराण्यांतील जो वीरभानू (स. १५४०–१५५५) त्याची यानें आपल्या ग्रंथांत स्तुति केलेली आहे. भानुकर आणि भानुदत्त एकच असून तो वाघेल घराण्यांतील वीरभानूच्या पदरीं होता.

हा गणेश्वराचा पुत्र आणि विदेह देशांत गंगातीरावर राहणारा होता ( रसमंजरींतील शेवटचा श्लोक ). विद-र्भभू असाहि पाठभेद सांपडतो, पण तो गंगेच्या तीराशीं जमत नाहीं. भानुदत्त हा मैथिल होता, असें बर्नेलकृत तंजावरच्या ग्रंथनामावलींत स्पष्ट म्हटलें आहे. कोणी गोपाळानें रसमंजरीवर स. १४३७ त टीका लिहिलेली आहे. भानुदत्ताचा लेखनकाल तेराव्या शतकाच्या शेवटीं किंवा चवदाव्याच्या आरंभीं असा कांहींतरी असावा. याचे रसतरंगिणी व रसमंजरी असे दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. पहिल्या ग्रंथाचे आठ तरंग असून त्यांत भाव, विभाव, स्थायिभाव, अनुभाव, सात्विकभाव, व्यभिचारभाव यांचें वर्णन आहे. दुसऱ्या ग्रंथांत नायिकांचे प्रकार, नायक वगैरेंचे प्रकार सांगितले आहेत.

यानें अलंकारतिलक, रसमंजरी, रसतरंगिणी, शृंगार-दीपिका, गीतगौरीपति आणि कुमारभार्गवीय असे ग्रंथ संस्कृतांत लिहिले.

**भानुगुप्त**—( स. ४९९ ) गुप्तवंशांतील बुधगुप्ताचा उत्तराधिकारी. यानें गेलेला पश्चिमेकडील प्रांत हूणराजा-कडून परत घेण्याचा प्रयत्न केला, पण त्यांत याला सफलता प्राप्त झालेली दिसत नाहीं. एरण येथील शिलालेखावरून सूचित होतें कीं गुप्त सं. १९१ ( स. ५१० ) मध्यें 'अर्जुनासारखा पराक्रमी श्रीभानुगुप्ताबरोबर राजा गोपराज एरण येथें आला व पराक्रमानें लढून मेला. त्याची स्त्री तेथें सती गेली' ( फ्लीट, गु. इं. ले. ३६ ). हें युद्ध तोरमाणाशीं झालें असावें. तोरमाण व त्याचा पुत्र मिहिरकुल यांनीं गुप्तांचें राहिलेलें राज्य घेतलें, व गुप्तघराणें नामशेष झालें.

**भानुचंद्र**—( अकबर पाहा ).

**भानुदत्त**—( भानुकर पाहा ).

**भानुदास**—( स. १३७८–१५१३ ) हा एक महा-राष्ट्रीय संत असून एकनाथाचा पणजा होय. हा सूर्य-प्रसादानें झाला म्हणून याचें नांव भानुदास पडलें. हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण असून प्रथम कापड विकण्याचा धंदा करीत असे. परंतु पुढें एक महान् भगवद्भक्त झाला. अनागोंदीच्या किरीटी रामराजानें पंढरीहून नेलेली पांडु-रंगाची मूर्ति यानें परत आणली, ह्याबद्दल ह्याची फार प्रसिद्धि आहे. ह्याचे सर्व अभंग प्रकाशित नाहींत. ह्यासच चक्रपाणी नांवाचा एक मुलगा होता.

**भानु दीक्षित**—( स. १६३०–४१ ) हा अमर-कोशावरील एक टीकाकार होय. रामाश्रम या नांवानेंहि हा प्रसिद्ध आहे. याच्या बापाचें नांव भट्टोजी दीक्षित होतें. याचा सत्वराज नांवाचा एक शिष्य होता. 'देवसेना' या टीकेचा कर्ता जो हरिचरणदास त्यानें याचा उल्लेख केला आहे.

**भानुभट्ट**—( स. ९७८ ) एक भारतीय ज्योतिषी व तत्त्वज्ञानी. याचा रासायनतंत्र नांवाचा तंत्रग्रंथ आणि 'करणपटतिलक' नांवाचा करणग्रंथ प्रसिद्ध आहे. खंड-खाद्याच्या वरुणकृत टीकेंत भानुभट्ट याच्या ग्रंथांतले कांहीं अनुष्टुप श्लोक घेतले आहेत. खंडखाद्याची वरुणकृतटीका शके ९६२ मधील आहे.

**२.** ( हरिकवि पाहा ).

**भामह**—( स. ६५० सुमार ) हा रक्रिलगोमिन्चा पुत्र. गोमिन् यावरून हा बौद्ध होता, असें प्रो. एम्. टी. नरसिंह अय्यंगार यांनीं प्रतिपादिलें आहे. ब्रि. रॉयल

एशियाटिक सोसायटीच्या जर्नलमध्यें यासंबंधीं उलटसुलट चर्चा आली आहे ( १९०५ पा. ५३५-५४५; १९०८ पा. ५४३ ). प्रो. पाठक यांनीं म्हटलें आहे कीं, गोमिन् हें गोस्वामिन् शब्दाचें संक्षिप्त रूप नसून तो पूज्य किंवा मान्य अशा अर्थाचा शब्द आहे. रक्रिल हा बौद्ध होता. 'गोमिन् पूज्ये' ( चांद्र व्याकरण सू. ४. २. १४४ ) गोमान् अन्यः, या सूत्रांना अनुसरून प्रो. पाठक यांनीं आपलें विधान केलें आहे. पण नांवावरून केवळ निर्णय करणें धोक्याचें आहे.

भामहाच्या काव्यालंकारांत सध्यां न आढळणारीं अशीं कित्येक पद्यें वाणीविलासग्रंथमालेंत प्रसिद्ध झालेल्या वामनकाव्यालंकारसूत्रवृत्तीची जी कामधेनु टीका आहे तींत भामहाची म्हणून दिलीं असून त्यांत सूत्र, वृत्ति यांच्या व्याख्या व साहित्यशास्त्रविषयक गोष्टी आल्या आहेत. वृत्तरत्नाकर नांवाच्या ग्रंथावरील एक टीकाकार नारायण यानें भामहाच्या ग्रंथांतून लांबलचक अवतरणें दिलीं आहेत. त्यावरून भामहानें छंदःशास्त्रावरहि ग्रंथ लिहिला असावा असें दिसतें. वररुचीच्या प्राकृत व्याकरणावर टीका लिहिणारा भामह नांवाचाच आहे. पण तो व काव्यालंकार करणारी व्यक्ति एकच कीं भिन्न, याचा निर्णय करितां येण्यासारखा नाहीं. भामहाचा व दंडीचा काळ एकच आहे.

**भामिनी**—कानीफनाथाची आई व सुरथ राजाची बायको.

**भारतीचंद**—( मृत्यु स. १५७४ ) हा राजा रुद्रप्रताप बुंदेले यांचा मुलगा ( मु. रि. भा. २, पृ. २६८ ).

**भारतचंद्र**—( स. १७२२-१७६० ) हा बंगाली कवि ब्राह्मण असून नरेन्द्रनारायणाचा पुत्र होय. हा हुगळी जिल्ह्यांतील राहणारा असून ह्याचा जन्म वसन्तपूरच्या एका जमीनदार घराण्यांत झाला. जमिनविरून यास वर्द्धानच्या महाराजांबरोबर झगडावें लागल्यानें याची सर्व मालमत्ता जप्त झाली. ताजपूरच्या संस्कृत शाळेंत याचें अध्ययन झालें. यानें आईबापांच्या इच्छेविरुद्ध हलक्या जातीच्या ब्राह्मण मुलीशीं लग्न लावलें. त्यामुळें बापानें यास घरांत घेतलें नाहीं. हा प्रथम कृष्णचन्द्र मुनशी व नंतर फरास दंगचा इंद्र नारायण चौधरी यांचा आश्रित होता. याची प्रतिभा पाहून यास नवद्वीपचा राजा श्रीकृष्णचंद्र यानें द. मा. ४० रु. वेतन, व सिवा राजानें १०५ रु. जहागीर व 'रायगुणाकार' ही पदवी दिली. स. १७५२ मध्यें यानें 'अन्नदामंगल' ग्रंथ लिहिला. हा ग्रंथ बंगालमध्यें फार लोकप्रिय आहे. याशिवाय यानें रसमंजरी, चण्डीनाटक व गानसंग्रह हीं पुस्तकें लिहिलीं ( क. कौ. भा. ७ ).

**भारतीतीर्थ**—वेदांताधिकरणमालाकार. काश्मीरकडील कवि.

**२.** हा विद्यारण्यांना पंचदशी रचूं लागणारा साहाय्यक. पंचदशीचा टीकाकार जो रामकृष्ण पंडित त्यानें याप्रमाणें म्हटलें आहेः "नत्वा श्रीभारतीतीर्थविद्यारण्यमुनीश्वरौ!" सांख्यसारांत एका पाश्चिमात्य पंडितानें विज्ञानभिक्षूच्या ग्रंथाचें भाषांतर इंग्रजींत लिहितांना हा विद्यारण्याचा गुरु असें म्हटलें आहे तें चुकीचें आहे ( विद्यारण्य पाहा ).

**भारती विश्वनाथ**—हा जातीनें न्हावी असावा. यानें नाभिकपुराण नांवाचा ओवीबद्ध ग्रंथ मराठींत लिहिला आहे. त्यांत न्हावीजातीसंबंधीं माहिती दिली आहे. ग्रंथसमाप्तीचा काल श. १४६० दिला आहे. पण तो चुकीचा असून ग्रंथ गेल्या शतकांतील असावा ( म. कविचरित्र भा. २, पा. १०८-११६ ).

**भारद्वाज**—हें महाराष्ट्रांतील देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण घराणें सोळाव्या शतकाच्या प्रारंभीं काशीस जाऊन राहिलें. यापैकीं मूळ पुरुष महादेवभट्ट हा नारायणभट्टाच्या वंशाचा जांवई होता. यानेंच सिद्धांतमुक्तेवरील दिनकरी नांवाची टीका लिहिली. या घराण्यांतील महामहोपाध्याय दामोदरशास्त्री हे बनारस कॉलेजांत व म. म. गोविंदशास्त्री हे कलकत्ता येथें गेल्या पिढींत अध्यापक होते.

**भारवि**—( स. ५७५ ) अविनीत हा भारवीचा टीकाकार वर दिलेल्या सनाच्या सुमारास होता. हा राजनीतिशास्त्रांत निपुण होता, असें काव्यांतील निर्देशांवरून दिसतें. हा एखाद्या राजाचा राजकीय सल्लागार असावा. हा शैव होता, असें काव्यांतील शिवविषयक निर्देशांवरून वाटतें. याला छत्रभारवि असें म्हणतात. कारण याच्या काव्यांत ( कि. ५. ३९ ) तसा निर्देश आहे ( ओरिएंटल कॉन्फरस, सहावा रिपोर्ट ). माघाला घंटामाघ असें म्हणत, असें त्याच निबंधांत दाखविलें आहे ( माघ ४. २०; सिंहविष्णु पल्लव पाहा ).

हा धारानगरीचा रहिवासी. याच्या बापाचें नांव श्रीधर व आईचें नांव सुशिला. याचें लग्न भडोचच्या चंद्रकीर्ति नांवाच्या गृहस्थाच्या रसिका नांवाच्या मुलीबरोबर झालें होतें. याचा बाप विद्वान् होता, पण त्यालाहि यानें आपल्या विद्वत्तेनें मागें टाकलें. पण हा गर्विष्ठ असल्यानें याची प्रगति खुंटली होती. तेव्हां त्यानें गर्वपरिहार होण्याकरितां

याला सहा महिने सासुरवाडीस राहावयास पाठविलें. तेथें चार दिवस सन्मान झाल्यावर याच्याकडे गाई रानांत नेण्याचें काम आलें. हा रानांत गेल्यावर गुरें चरावयास लावून झाडाच्या पानांवर काव्यानें श्लोक लिहिण्याचें काम करी. ते श्लोक म्हणजे किरातार्जुनीय काव्य होय.

किरातार्जुनीय काव्यांतील 'सहसा विदधीत न क्रियामविवेकः परमापदां पदम्' (२. ३०) हा श्लोक गहाण ठेवून याच्या बायकोनें पैसे आणल्याची एक आख्यायिका आहे. तसेंच तो श्लोक वाचल्यानें अनेक अनर्थ टळल्याच्याहि आख्यायिका आहेत.

याचा उल्लेख स. ६३४ मधील अय्याहोळे येथील शिलालेखांत आहे. तेथें याला प्रसिद्ध कवि म्हटलें आहे.

**भारुचि**—(स. १०५० पूर्वी) संस्कृत धर्मशास्त्रकार. विष्णुधर्मसूत्रावरील टीकाकार.

**भालुकी**—याचे वैद्यकापैकीं शल्यतंत्रावर कांहीं ग्रंथ असावेत असें चक्रपाणीच्या टीकेंत आलेल्या याच्या शास्त्रविषयक उताऱ्यावरून दिसतें (सुश्रुत सूत्र. ८).

**भावमिश्र**—(स. १५५० नंतर) हा 'भावप्रकाश' ग्रंथाचा कर्ता होय. याच्या ग्रंथाचा उल्लेख माधवानें आपल्या 'आयुर्वेदप्रकाश' या ग्रंथांत केला आहे. हा कान्यकुब्ज असावा. हा वैद्यशास्त्रावरील ग्रंथकार शार्ङ्गधर व वङ्गसेन यांच्यापेक्षां अलीकडचा होय. यानें फिरंगरोगाचा निर्देश केला आहे.

**भावसिंगराव टोके**—(स. १७३१) हा त्रिंबकराव दाभाड्याचा मावसभाऊ. यानें फितुर होऊन त्रिंबकराव दाभाड्यास बाजीरावाकरितां ठार केलें.

**भावसिंह कच्छवाह**—(मृत्यु स. १६२१) मानसिंहाचा पुत्र. मानसिंह हा अकबराचा सेनापति होता.

**भावसिंह वाघेल**—(स. १६६०–१६९०). रेवा येथील एक वाघेल राजा. हा स. १६६० मध्यें गादीवर आला.

हा विद्वान् लोकांचा फार भोक्ता होता. यानें काश्मीरमधून सोमदेवाच्या 'कथासरित्सागरा'ची एक प्रत आणली व दरबारच्या पंडितांकडून तपासून घेतली. त्या प्रतीच्या भाषांतराचें काम रूपणिमिश्राकडे दिलें. रूपणिमिश्रानें त्यांत ९९ कवितांची भर घालून त्यांत भावसिंहाविषयींची, त्याच्या दरबारची वगैरे माहिती दिली असून भावसिंहाच्या घराण्याची वंशावळहि दिलेली आहे. याचे दरबारीं बालकृष्ण, किशोरा, गोवर्धनवाजपेयिन्, लालमणि, चवि आणि कमलनयन हे विद्वान् पंडित होते. याशिवाय हौत्र-कल्प-द्रुमाचा कर्ता लक्ष्मणभट्ट हाहि याचेच दरबारीं होता (Dr. S. Krishnaswami Aiyangar Commemoration Volume, 1936, 52).

**भावा गणेश**—हा विश्वनाथ दीक्षिताचा पुत्र. याच्या गुरूचें नांव विज्ञानभिक्षु. हा योगसूत्रवृत्ति ग्रंथाचा कर्ता.

**भावेव्यास**—हा महानुभाव सांप्रदायांतील ग्रंथकार होय.

**भास**—(ख्रि. पू. ४५०–३७०) संस्कृत भाषेंतील अत्यंत जुना नाटककार.

याचीं एकंदर १३ नाटकें आहेत. तीं प्रथम १९०९–१० सालीं उपलब्ध झालीं. तीं येणेंप्रमाणें–(१) मध्यमव्यायोग, (२) पंचरात्र, (४) दूतवाक्य, (४) दूतघटोत्कच, (५) कर्णभार, (६) ऊरुभंग, (७) प्रतिमा, (८) अभिषेक, (९) बालचरित, (१०) प्रतिज्ञायौगंधरायण, (११) स्वप्नवासवदत्त, (१२) अविमारक आणि (१३) चारुदत्त.

यांपैकीं पहिलीं सहा महाभारतावर रचलेलीं आहेत. प्रतिमा व अभिषेक हीं रामायणावर रचलेलीं आहेत. बालचरित हें हरिवंशावर रचलेलें आहे. प्रतिज्ञायौगंधरायण व स्वप्नवासवदत्त हीं वत्सराज व वासवदत्ता यांच्या ऐतिहासिक गोष्टींवर रचलेलीं आहेत. त्यांतील उदयन, प्रद्योत, दर्शक हे ऐतिहासिक आहेत. अविमारक व चारुदत्त हीं कशावर रचलेलीं आहेत हें निश्चितपणें सांगतां येणार नाहीं. उपलब्ध असलेल्या कोठल्याहि हस्तलेखांत नाटककाराचें नांव आढळत नाहीं. परंतु ह्या नाटकांचा खोल अभ्यास केल्यावर असें दिसून येतें कीं, तीं सर्व एकाच माणसानें व महामहोपाध्याय गणपतीशास्त्री यांचे म्हणण्याप्रमाणें, महाकवि कालिदास याच्या स्तुतीस पात्र झालेल्या भासानेंच लिहिलीं आहेत.

भासाची नाट्यलेखनपद्धति सामान्य नाटकांत दिसून येणाऱ्या पद्धतीहून कांहीं बाबतींत निराळी असल्याचें दिसून येतें. बाणभट्टानें म्हटल्याप्रमाणें याच्या सर्व नाटकांत सूत्रधार अगदीं पहिल्या प्रथम प्रवेश करतो. याच्या मध्यमव्यायोग या नाटकांत तर नांदीचाहि पत्ता नाहीं. याचें अपूर्ण स्थितींत राहिलेलें चारुदत्त नाटक खेरीज करून याच्या इतर सर्व नाटकांत "नांद्यन्ते ततः प्रविशति सूत्रधारः" हें वाक्य दृष्टीस पडतें. ग्रंथकाराच्या नांवाचा कोठेंहि उल्लेख केलेला नाहीं. नाटकाचा शेवट ठराविक पद्धतीनें केलेला आहे. "तुम्हांला संतुष्ट करण्यास मीं आणखी काय करावें?" हा नेहमींचाच ठराविक मंत्र बहुतेक सर्वत्र शेवटीं आढळतो. बहुतेक सर्व नाटकांचें

भरतवाक्य 'इमामपि महीं कृत्स्नां राजसिंहः प्रशास्तु नः।' असेंच किंचित् फरक करून आहे. नाटकांत आर्षप्रयोग बऱ्याच ठिकाणीं आढळतात. नाटकांत 'प्रस्तावना' ऐवजीं 'स्थापना' हा शब्द आढळतो.

भासानें आपलें स्वप्नवासवदत्ता हें नाटक अग्नींत टाकलें असतांहि जळलें नाहीं, अशा तऱ्हेची आख्यायिका राजशेखर कवीनें आपल्या एका पद्यांत दिली आहे. गौडवहो (पद्य ८००) यांत भासाला 'जलणमित्त' असें जें म्हटलें आहे तें या आख्यायिकेवरूनच म्हटलें असावें.

हा मगधदेशांतील असून विष्णूचा उपासक होता.

**भास्कर**—कल्लटाच्या शिष्यपरंपरेंतील चौथ्या पिढीचा पुरुष. मीमांसासंग्रह–कौमुदी आणि पद्यामृत–सोपान हे दोन ग्रंथ याचे आहेत. याच्या बापाचें नांव दिवाकर होतें. हा काश्मीरकडे राहत असे.

२. (स. १५३८–१५७८) यानें भागवताचा दशमस्कंध ओवीबद्ध लिहिला तो अर्धवट उपलब्ध आहे (मं. वार्षिक १८३६, ले. ३१).

३. 'उन्मत्तराघव' नांवाचें एकअंकी नाटक लिहिणारा कवि.

४. (स. १३७५ सुमार) विजयनगरच्या पहिल्या बुक्कराय संगमाचा एक पुत्र. हा उदयगिरि येथें असे.

**भास्कर ऊर्फ भानुभट बोरीकर**—(स. १२७३ सुमार) मराठी महानुभाव कवि. शिशुपालवध नांवाचें काव्य यानें मराठींत केलें आहे. भागवताचा एकादशस्कंधहि पुढें यानेंच केला.

**भास्कर नारायण**—सवाई माधवरावाच्या वेळचा एक राजकीय कैदी. पायांत जड बेड्या घालून याला पंधरासोळा वर्षे कैदेंत ठेविलें होतें (ऐ. टि. १५).

**भास्करमिश्र सोमयाजी**—(स. १००० सुमार) याचा एक 'आपस्तंबध्वनितार्थकारिका' नांवाचा प्रबंध आहे. याच्या पित्याचें नांव 'वादिमुद्गरकुठारकुमारस्वामिसूरि' असें आहे. ग्रंथकाराची पत्नी 'त्रिकांडमंडन' अशी आहे आणि त्यामुळें ग्रंथहि 'त्रिकांडमंडन' या नांवानें प्रसिद्ध आहे. यांत श्रौतसत्राधारें सोमयागविषयक कांहीं गोष्टींचा विचार आहे. कांहीं ग्रंथांतल्या कारिकाहि उद्धृत आहेत. त्यांवरून हा हेमाद्रीच्याहि पूर्वी दोनशें वर्षे झाला होता असें दिसतें (रा. गो. भांडारकर रिपोर्ट, स. १८८३–८४, पृ. २७–२८).

**भास्करराज**—हा भासुरानन्द, भास्करानंदनाथ अगर भास्करराय इत्यादि नांवांनीं प्रसिद्ध आहे. हा १७ व्या शतकांत उदयास आला. यानें कठ, केन, जाबाल, त्रिपुर, महामुंडक इत्यादि उपनिषदांवर भाष्यें लिहिलीं आहेत. यांशिवाय अभिनववृत्तिरत्नाकर, अवधूतगीताव्याख्या, अष्टावक्रगीताव्याख्या, आत्मबोधव्याख्या, वृत्तचंद्रोदय इत्यादि १५–२० ग्रंथ लिहिले आहेत.

**भास्कर राम कोल्हटकर**—(मृ. स. १७४४) चित्पावन ब्राह्मण. हा रत्नागिरी जिल्ह्यांतील नेवारच्या रामाजीपंत कोल्हटकराचा मुलगा व प्रसिद्ध कोन्हेररामाचा भाऊ होय. हा व कोन्हेरराम प्रथम नागपुरास रघूजीकडे आले.

रघूजी कर्नाटकाचे स्वारीवर गेला असतां त्यानें यास नागपुरास अधिकारावर ठेवलें होतें. याच वेळेस मीर हबीब ह्याचेकडे अलाविर्दीखानाविरुद्ध मदत मागण्यास आला. पण रघूजीच्या परवानगीशिवाय एवढी मोहीम स्वतःचे जबाबदारीवर घेण्यास हा तयार नव्हता. रघूजी नागपुरास आल्यावर ह्यानें त्याजपासून परवानगी घेऊन स. १७४२ सालीं बंगालवर पहिली स्वारी केली. ह्या वेळीं त्यानें हुगळी शहर काबीज केलें व कटवा, मिदनापूर वगैरे सर्व भागांत आपला अम्मल बसवला.

अलाविर्दीखानानें पुढें नानासाहेब पेशव्याची मदत घेतली व बालसोरजवळ स. १७४२ चे दसऱ्याचे सुमारास याचा मोड केला. यानें बंगाल्यांतूनच रघूजीस मदतीसाठीं पत्रें लिहिलीं होतीं व त्याप्रमाणें रघूजीहि सैन्य जमवून निघाला होता, परंतु तितक्यांत याचा मोड होऊन हा नागपुरास परत आला.

स. १७४३ त रघूजीबरोबर भास्करपंत बंगालचे दुसरे स्वारीचे वेळेस हजर होता. परंतु रघूजीचा नानासाहेब पेशव्यानें मोड केल्यामुळें हा नागपुरास परत आला.

स. १७४४ त रघूजीनें भास्करपंताबरोबर २० हजार फौजें देऊन यास बंगालवर पाठवलें. ह्या खेपेस अलाविर्दीखानानें विश्वासघात करून भास्कर राम व त्याजबरोबरील २० सरदारांस ठार मारलें. भास्करपंत मानकुरा येथें मारला गेला. ह्या वेळेस ह्याची बायको ताईबाई ह्याजबरोबर होती ती या गडबडींत पळून काशीस गेली. एका पठाणाच्या बायकोनें तिला डोलींत घालून काशीस पोंचविलें, अशीहि आख्यायिका आहे. या वेळेस ती गरोदर होती. ती काशीसच बाळंत होऊन तिला पुत्र झाला, त्याचें नांव काशीराव असें ठेवलें.

भास्कर रामाचे खुनानंतर याचा भाऊ कोन्हेर राम यास त्याचें शांतवन करण्यासाठीं रघूजीनें दरसाल २५ हजारांची नेमणूक करून दिली, व भास्करपंताची स्त्री

ताईबाई हिचे नांवानें वऱ्हाडचे सुभ्याचा कारभार करून दिला व तिच्यातर्फे कृष्णाजी गोविंद यांस कारभारी नेमलें.

यास नागपूरच्या भोंसल्यांच्या पदरीं सरंजाम मिळाला होता. यानें उत्तरेस व पूर्वेस मराठ्यांचा दरारा चांगलाच बसविला. यास शाहूनें भोंसल्यांच्या पदरीं लावून दिलें. हा पेशव्यांच्या विरुद्ध जाऊन भोंसल्यास मदत करीत असे. हा मुत्सद्दी नसून केवळ शिपाईगडी होता. त्यामुळें याचा नाश झाला. हा स्वतः उत्कृष्ट सेनापति असल्यानें हा आपल्या फौजेची व्यवस्था अशी लावी कीं याची थोडी जरी सेना असली तरी ती शत्रूला फार मोठी वाटे.

**भास्करराय**—चंद्रसेन जाधवाचा गुरु.

**भास्करराय गंभीरराय भारती**—(स. १६२९) यानें सप्तशतीवर विस्तृत अशी गुप्तवती नांवाची टीका लिहिलेली आहे. हा आपणास पदवाक्यप्रमाणपारावारीण-धुरीण व सर्वतंत्रस्वतंत्र अशीं विशेषणें लावून घेतो. हा दीक्षित असून महाग्निचित् होता. याच्या गुरूचें नांव जगन्नाथ दिसतें. हा वर्ध्यास राहत असे. याशिवाय याचे ग्रंथ-(१) ललितासहस्रनामभाष्य, (२) रुद्राध्यायभाष्य, (३) सौभाग्यभास्कर, (४) नित्यषोडशी नामक तंत्रशास्त्र ग्रंथावर सेतुबंध नांवाची टीका लिहिली. वरील ग्रंथ वामकेश तंत्राचा एक भाग आहे. या ग्रंथांत मुख्यत्वें-करून श्रीदेवी व देवी-उपासना वर्णिली आहे.

**भास्करराव**—हा एक यशवंतराव होळकरांचा खास वकील होय. बाजीराव (दुसरा) महाडास असतां त्यानें त्याच्याकडे यास पाठविलें होतें.

२. रामदुर्ग संस्थानच्या दादाजीचा पुत्र.

**भास्करराव रघुनाथ पेशवे**—(जन्म स. १७६२) हा रघुनाथरावाचा सर्वांत वडील मुलगा होता. याचा जन्म संवत् १८२० चे सुमारास म्हणजे शके १६८४ त झाला. हा तरुण असतांनाच यास दादांनीं प्रारंभींच प्रतिनिधिपद देऊन राजेबहादूर याचा मुतालिक केलें. परंतु याच सुमारास उपजत वैराग्य असलेल्या अशा ह्या पुरुषानें पुण्यांतून पोबारा केला. पुढें हा भटकत भटकत हाथरस या गांवीं आला. तेथें यास गुरूपदेश झाला. तपश्चर्येच्या शेवटीं यानें हाथरस येथेंच आपलें मुख्य राहण्याचें ठिकाण मुक्रर केलें; व शेवटीं तेथेंच वयाच्या ८० वे वर्षी यानें आपली इहलोकींची यात्रा संपविली.

यानें हिंदी भाषेंत बरींच काव्यें केलीं आहेत. यानें 'घटनारामायण' या नांवाचा एक संपूर्ण ग्रंथ व 'पद्य-सागर' नांवाचा एक अपूर्ण ग्रंथ, असे दोन ग्रंथ लिहिले. यानें आपल्या आत्मचरित्रांत असें सांगितलें आहे कीं, तुळसीदासाचें अर्धवट राहिलेलें काम पुरें करण्याकरितांच आपला जन्म झाला आहे. म्हणूनच यानें सवाई तुळसीदास स्वतःस म्हणवून तुळसीदासाचे मागील ग्रंथ पूर्ण लिहिण्याचें महत्त्वाचें कार्य पुरें केलें (विविधज्ञानविस्तार, व. ६२, अं. ६, पृ. २०१-२).

**भास्करवर्मन्**—(कुमारराज पाहा).

**भास्कराचार्य**—(जन्म स. १११४) विख्यात ज्योतिषी. पिता व गुरु महेश्वर. गांव-सह्यपर्वताजवळील विज्जलविड. बेदरपेक्षां हें बीडच असण्याचा संभव दिसतो.

ग्रंथ-सिद्धांतशिरोमणि (लेखनकाल स. ११५०), २ करणकुतूहल (ले. का. ११८३), ३ वासनाभाष्य (सिद्धांतशिरोमणीच्या ग्रहगणित व गोलाध्याय यांवरील स्वकृत टीका, ले. का. स. ११८३).

खानदेशांत चाळिसगांवच्या नैर्ऋत्येस १० मैलांवर पाटण म्हणून खेडें आहे. त्यांत भवानीच्या देवळावर एक शिलालेख आहे. भास्कराचार्यांचा नातू चंगदेव हा देवगिरीच्या सिंघण यादवाचा ज्योतिषी होता. चंगदेवानें भास्कराचार्यांच्या व वंशांतील इतर लोकांच्या ग्रंथांच्या अध्ययनाकरितां पाटण येथें मठस्थापना केली. त्याला सिंघणाचा मांडलिक सोइदेव निकुंभ व त्याचा भाऊ हेमाडी यांनीं नेमणूक दिली. नंतर चंगदेवानें वरील शिलालेख लिहिला. त्यांत भास्कराचार्यांचा वंश पुढील-प्रमाणें दिला आहे:—त्रिविक्रम-भास्करभट्ट-गोविंद-प्रभाकर—मनोरथ—महेश्वर—भास्कर—लक्ष्मीधर-चंगदेव. भास्कराचार्यांपासून पूर्वीचा सहावा पुरुष भास्कर हा भोजराजाचा विद्यापति होता. लक्ष्मीधर हा जैत्रपाल यादवाचा ज्योतिषी होता (स. १०४२).

सिद्धांतशिरोमणीचे लीलावती, बीजगणित, ग्रहगणित व गोल असे चार भाग असून प्रत्येक भाग म्हणजे गणिताच्या शाखेवरचा एक स्वतंत्र ग्रंथच आहे. लीलावतींत अंकगणित आहे, बीजगणितांत वर्गसमीकरणापर्यंतचा विषय आहे, ग्रहगणितांत पंचांग करण्यास लागणारें गणित आहे, आणि गोलाध्यायांत गोलीय त्रिकोणमितीचें विवेचन आहे. याच्या ग्रंथांत सर्व विवेचन इतकें पद्धतशीर आहे कीं, त्याच्या अध्ययनानें गणिताच्या चारहि शाखांतलीं उदाहरणें सोडविण्याची सोय त्या वेळच्या विद्यार्थ्यांची झाली. यामुळें भास्कराचार्यांच्या या ग्रंथांचा प्रसार सर्व हिंदुस्थानभर झाला व इतर ग्रंथ मागें पडले. ब्रह्मगुप्तास भास्कराचार्य आपला गुरु मानतो. पण सिद्धांतशिरोमणीच्या सोइस्कर पद्धतीनें ब्रह्मसिद्धांताचें देखील अध्ययन लोकांना

नकोसें झालें. भास्कराचार्यांच्या ग्रंथांत सोप्या रीती व कांहीं नवीन शोध आहेत.

**भिऊबाई बारामतीकर**—( मृत्यु स. १७४७ ) ही बाळाजी विश्वनाथाची मुलगी होती. स. १७१२ मध्यें हिचें लग्न आबूजी नाईक बारामतीकर जोशी यांच्याशीं झालें. ही ता. ७.६.१७४७ मध्यें वारली. पुणें पेठ शनवार येथील अमृतेश्वराचें देऊळ यांनीं बांधिलें.

**भिकाजीपंत रास्ते**—याचा पिता शामजी. यांची मुलगी गोपिकाबाई बाळाजी बाजीराव पेशव्यास दिली होती.

**भिकार**—याचें दुसरें नांव भिक्षु. हा भिक्षुमुनि मानभाव होता. याच्या गुरूचें नांव आत्माराम. यानें अभंग, पदें व ( १ ) प्राणबोध आणि ( २ ) प्रार्थनास्तोत्र अशीं दोन प्रकरणें रचलेलीं आहेत. हा आपला सांप्रदाय 'दत्तसांप्रदाय निरंजनपंथ परमहंस' याप्रमाणें सांगतो. याचें काव्य मराठी व हिंदी भाषेंत आहे. याची काव्यप्रतिभा स्वयंभू नसून बहुतेक तुकाराम, रामदास, कबीर इत्यादिकांवरच विशेष दिसते ( मं. श. १८३७ वा. इ. ले. १५९ ).

**भिकारीदास**—( दास पाहा ).

**भिखनपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं एकसष्टावा सिद्ध. जात शूद्र, शालिपुत्र येथील राहणारा.

**भिमराव तिमाजी पारसनीस**—( स. १६३०-१७१४ ) हा पुणें पारसनीसांचा मूळ संपादक. हा शाहूच्या दरबारीं होता. याचा वंशक्रम–बनाजी–माधवजी–तिमाजी–भिमाजी–बापूजी–कृष्ण.

**भिल्लम यादव**—( स. ८२५ सुमार ) हा यादव घराण्यांतील पहिला धाडियप्पा याचा मुलगा होय.

२. ( स. १००० ) सेऊण-देश येथील यादव घराण्यांतील जो वद्दिग त्याचा हा मुलगा होय. स. १००० मध्यें हा आपल्या बापानंतर गादीवर आला.

पश्चिम चालुक्य राजा दुसऱ्या तैलाकरितां यानें परमार राजाचा पराभव केला. याच्या नंतर याचा मुलगा वेसूगि हा गादीवर आला ( B. ).

३. ( स. १०४० सुमार ) हा यादव घराण्यांतील एक राजा होय. हा कोणाचा मुलगा याचा उल्लेख आलेला नाहीं. तरीपण हा या घराण्यांतील अर्जुन राजा याच्या मागून गादीवर आला, हा मात्र उल्लेख आलेला आहे. यानें चालुक्यवंशीय जयसिंहाच्या मुलीशीं लग्न लाविलें होतें.

४. हा यादवांपैकीं दुसऱ्या वेसुगीचा मुलगा. याचा मुलगा दुसरा सेऊणचंद्र.

५. ( स. ११८७-९१ ) देवगिरीच्या यादव घराण्यांतील मल्लुगीचा मुलगा होय.

यानें होयसळ राजपुत्रास ठार मारिलें आणि कल्याणी घेतली, असें म्हणतात. यानें आपली राजधानी देवगिरी ( दौलताबाद ) ही केली. होयसळ राजा बल्लाळ २ रा यानें याचा सोरतूर येथें पराभव केला. या पराभवानंतर थोड्याच दिवसांनीं हा मरण पावला. नादोलच्या केल्हण राजानें सुद्धां याचा पराभव केला होता. याच्यानंतर याचा मुलगा जैतुगी १ ला हा गादीवर आला ( B. ). यानें सोमेश्वर चालुक्याचें मांडलिकत्व झुगारून दिलें. यानें प्रतापचक्रवर्ति व महाराजाधिराज हीं बिरुदें धारण केलीं.

**भिल्लादित्य प्रतिहार**—हा मंदोसरच्या प्रतिहारवंशांतील झोटाचा पुत्र. यानें तारुण्यांत राज्य केलें. पुढें आपला पुत्र कक्क याच्यावर राज्यभार सोंपवून हरिद्वारला गेला. तेथें अठरा वर्षे राहून शेवटीं यानें अनशनव्रतानें देह ठेवला.

**भिवा सुतार**—(स. १७८० सुमार) उत्तम मूर्तिकार. प्रतिनिधींचें 'रामपंचायतन', पुण्यांतील रास्त्यांचा राम, वाईचा मुरलीधर वगैरे प्रसिद्ध मूर्ति याच्या हातच्या आहेत.

**भिक्षु**—( भिकार पाहा ).

**भीम**—हा एक गुजराथी वाङ्मयांतील प्रसिद्ध लेखक. याचें राहण्याचें गांव सिद्धपूर. हा मोढ जातीचा ब्राह्मण. यानें भागवत गुजराथी भाषेंत केलें.

**भीमगुप्त**—नेपाळच्या गोपाळ घराण्यांतील हर्षगुप्ताचा मुलगा.

**भीम ( पश्चिम ) चालुक्य**—(स. ७३३ सुमार) हा पश्चिम चालुक्य घराण्यांतील विजयादित्याचा मुलगा. हा दुसऱ्या कीर्तिवर्म्यानंतर गादीवर आला, व याच्यानंतर याचा मुलगा कीर्तिवर्मा तिसरा गादीवर आला.

**भीम ( पूर्व ) चालुक्य**—हा पहिल्या विक्रमादित्याचा मुलगा. यानें आपल्या भावाकडून गेलेला वेंगी देश परत मिळवला; व कृष्ण राष्ट्रकूटाचा पराभव केला. याचें दुसरें नांव द्रोहार्जुन असें होतें.

२. ( स. ९२६-२७ ) हा पूर्व चालुक्यांपैकीं पहिल्या अम्माचा मुलगा. तैलपाचा मुलगा दुसऱ्या युद्धमल्लानें याची कत्तल करून याचें राज्य घेतलें.

३. ( स. ९३४-४५ ) हा पूर्व चालुक्यांपैकीं चवथ्या विजयादित्याचा मुलगा. याच्या राणीचें नांव लोकमहादेवी. यानें राष्ट्रकूटांतील पांचव्या गोविंदाचा पराभव केला. यालाच सातवा विष्णुवर्धन म्हणतात.

**भीमजी पारख**—( स.१६७१ ) या नांवाच्या कंपनीच्या दलालानें कांहीं ब्राह्मणी लिखाण छापण्याकरितां इंग्लंडांतून एक छापणारा बोलावून त्याचा पगार देण्याचें कबूल केलें ( प. सा.१३७४ ). 'याच्या इच्छेप्रमाणें आलेला मुद्रक याच्या भाषेचे नवे टाईप पाडूं शकत नाहीं तरी दुसरा तज्ज्ञ इसम पाठवावा. एकंदरींत पाहतां देशी भाषेंत छपाई करणें अशक्य वाटत नाहीं' असें स. १६७७ मधील पत्र आहे ( पत्र सा. १९०९ ). याच्या मागणीप्रमाणें सर्व साहित्य मुंबईस ३ वर्षांनीं आलें व मुद्रकाचा पगार सालाचा पन्नास पौंड ठरला ( प. सा. १६२४ ).

**भीमट चंदेल्ल**—याला कलिंजरपति ( चंदेल्ल ) भीमट असें म्हणत. यानें पांच नाटकें संस्कृतांत लिहिलीं. त्यांत 'स्वप्नदशानन' हें सर्वोत्कृष्ट आहे.

**भीमदेव सोळंकी**—( स. १०२१-६३ ) हा अनहिलवाडच्या सोळंकी घराण्यांतील वल्लभसेनाचा मुलगा. हा गादीवर आल्यावर याचा गझनीच्या महमूदानें पराभव केला व यास पदच्युत केलें. परत याचा चुलता दुर्लभरायाच्या मृत्यूनंतर हा गादीवर आला. याच्या राणीचें नांव उदयमती. यानें आबूच्या पहाडावर प्रख्यात जैनमंदिरें, पालीठाणा व चंदावती येथील देवालयें बांधलीं. यानें आपल्या पहिल्या कर्ण नांवाच्या मुलास राज्य देऊन आपण वानप्रस्थाश्रम स्वीकारला, व सरस्वतीतटावर मंडूकेश्वर नांवाच्या तीर्थावर जाऊन तपश्चर्या करीत राहिला.

२. (स.११७८-१२४१) हा अनहिलवाडच्या सोळंकी घराण्यापैकीं अजयपाळाचा पुत्र. याला भोळा असें उपपद होतें. याचें व पृथ्वीराज चौहानाचें फार वांकडें होतें. याच्या पदरीं अमरकोशकार अमरसिंह नांवाचा विद्वान् होता. याच्या मुलाचें नांव त्रिभुवनपाल. यानें व पृथ्वीराज चौहाणानें अबूचा राजा जैस परमाराच्या इच्छिनीकुमारी नांवाच्या मुलीला मागणी घातली असतां या दोघांचें भांडण होऊन पृथ्वीराज चौहानानें याचा पराभव केला. पुढें हा मेल्यानंतर याचा मुलगा गादीवर बसला. याच्याजवळ पुष्कळ जहाजें होतीं.

**भीमपाळ शाही**—पंजाबांतील शाही घराण्यापैकीं त्रिलोचनपालाचा मुलगा.

**भीमभट्ट**—रावणार्जुनीय काव्याचा कर्ता. काश्मीरी कवि.

**भीमसिंह**—हा सिसोदें येथील राणा शाखेपैकीं त्रिभुवनसिहाचा पुत्र. याच्या बायकोचें नांव पद्मिणी. याचा पुत्र जयसिंह.

२. ( स. १४६९-मृत्यु स. १४८९ ) हा चितोडच्या सुजनसिंहाच्या वंशांतील कर्णसिंहाचा पुत्र. कोंकणांतील स्वारींत या बापलेकांनीं सर्व कुंठित झाले असतां घोरपडीच्या साहाय्यानें किल्ला सर केला. त्यांत कर्णसिंह पडला. या अतुल पराक्रमाबद्दल चौऱ्यांशीं खेड्यांसह मुधोळ व रायबाग आणि वाईकडील किल्ले आणि राणा या पदवीच्या ऐवजीं राजा घोरपडेबहादूर हा किताब आणि घोरपडीच्या चिन्हाचा झेंडा देण्यांत आला. तेव्हांपासून घोरपडे हें नांव प्रचारांत आहे. तेच मुधोळचे घोरपडे होत.

**भीमसिंह गुहिलोत**—( स. १७६८-१८२८ ) हा उदेपूरचा राणा व अरिसिंहाचा पुत्र होय. रत्नसिंहास वराच विरोध असल्यामुळें यास स. १७७८ त गादी मिळाली. यानें गादीवर आल्याबरोबर सेनापति व मंत्री यांच्या साहाय्यानें राज्यकारभार करण्याचें ठरविलें. पुढें यानें मल्हारराव होळकराच्या मदतीनें चितोडवर स्वारी केली. या लढाईंत अंबूजी इंगळे व सेनापति मोहकमसिंह यांची फार मदत झाली. पुढें यानें इंग्रजांची मदत घेतली, त्यामुळें व्यापाराचें निमित्त करून इंग्रजांनीं हळुहळू सर्व राज्यकारभार आपले हातांत घेतला. याच्या सतरा राण्यांपैकीं पद्मकुंवर ही याची आवडती राणी होती. हा दयाळू व न्यायी होता. हा कवि असून ह्यानें 'भीमविलास' हा ग्रंथ लिहिला. शेवटीं कृष्णा-कुमारीचें आत्मबलिदान व एकुलत्या एक पुत्राचें निधन यांमुळें हा मरण पावला.

**भीमसेन दिक्षित**—( ग्रंथकाल स. १७२२ ) हा शांडिल्यगोत्री असून कान्यकुब्ज देशांतील राहणारा. यानें मम्मटाच्या काव्यप्रकाशावर 'सुधासागर' नांवाची टीका लिहिली. हा मोठा वैय्याकरणी होता.

**भीमसेन बऱ्हाणपुरी**— यानें औरंगजेबाच्या कारकीर्दीचा इतिहास फार्शी भाषेंत लिहिला ( मु. रि. भा. २, पृ. ३२० ).

**भीमस्वामी**—( मृत्यु स. १६६३ ) हे सतीबाई शहापूरकर यांचे भाचे. यांना भिकाजीबुवा ऊर्फ भिमाजीबाबा किंवा भीमस्वामी म्हणत. यांना शके १५६७ मध्यें मसर मुक्कामीं समर्थांनीं अनुग्रह दिला. शके १५७७ चे कार्तिकांत समर्थांनीं व्यंकोजीराजे यांस अनुग्रह दिला व तंजावर

येथें मठ स्थापन केला व तेथें यांना ठेविलें. यांचा मुक्काम सज्जनगडास शके १६०३ चे माघ-फाल्गुनांत होता. समर्थनिर्याणप्रसंगीं यांनीं केलेल्या पन्नास ओव्या श्री. सां. वि. विषय खंड १ क्रमांक २५ मध्यें प्रसिद्ध झाल्या आहेत. या ओव्या सांपडण्यापूर्वी याच भीमस्वामीनें लिहिलेलें पण अपूर्ण सांपडलेलें असें दुसरें एक समर्थचरित्र रामदासी ग्रंथाच्या दुसऱ्या भागांत प्रसिद्ध झालें आहे. या अपूर्ण चरित्रांत समर्थांनीं सावधान शब्द ऐकून उड्डाण केल्याची व सतीबाईची कथा प्रामुख्यानें वर्णिली आहे. याला शके १५६४ मध्यें शहापूरच्या मठाचें महंतपण मिळालें.

२. ( समाधि स. १७७१ ) हा नरहरी मोरेश्वराचा गुरु होता. याच्या थोरल्या भावाचें नांव गिरिधर. याचा मठ बीड येथें हल्लीं आहे. यानें समाधि शके १६९२-९३ च्या सुमारास घेतली. यास बीडकर भीमस्वामी असेंहि म्हणतात. याचें दुसरें नांव भिवाजीबावा असें होतें ( मं. श. १८३७ वा. इ. ले. १९८ ).

३. ( ग्रंथकाल स. १७९७ ) यांना भिमाजीबुवा असेंहि म्हणत. हे रामदासस्वामींच्या शिष्यपरंपरेंपैकीं एक असून शिरगांव ( चाफळजवळ ) मठाचे अधिपति होते. दत्तात्रय-राघव-यशवंत-भिमाजी असा वंशवेल आहे. यानें आपला भक्तलीलामृत हा ग्रंथ श. १७१९ मध्यें लिहिला. प्रथम यांत समर्थचरित्र गायिलें असून पुढें वेगळाल्या सदतीस भक्तांचीं चरित्रें आहेत. भक्तांची निवड केलेली नाहीं. रामदासपंचायतनांतील प्रमुख साधुपुरुष किंवा रामदासपंथांतील मुख्य मुख्य शिष्य यांचाहि समावेश या ग्रंथांत नाहीं. कथाहि चोकसपणानें लिहिल्या नाहींत. हा ग्रंथ ओवीबद्ध नसून अभंगमय आहे ( मं. तृतीय सं. पा. ११६-११७ ). यानें अवंति येथें समर्थचरित्रात्मक १२१ अभंग पुरे केले, असें आंतील लेखावरून वाटतें.

**भीमाबाई बुळे**—(मृत्यु स. १८५८) ही यशवंतराव होळकराची मुलगी होय. हिला इंग्रजांनीं बुंदेलखंडांतील कुचचा जिल्हा जहागीर म्हणून दिला. स. १८०९ च्या फाल्गुनांत हिचें लग्न गोविंदराव बुळे यांजबरोबर झालें होतें. ही पुढें नोव्हेंबर स. १८५८ त मरण पावली.

**भीमेश्वरवर्मन् पल्लव**—हा सिंहविष्णु पल्लवाचा धाकटा भाऊ.

**भीवराव पानसे**—( मृत्यु स. १७७९ मार्च ) पेशवाईंतील एक सरदार होय.

सदाशिवरावाचा तोतया जेव्हां कोंकणांत बंडाळी करूं लागला, तेव्हां हा व शिंदे भिन्न घाटांनीं तोतयावर उतरले. पानशांनीं बोरघाटांत तीन चार लढाया चांगल्या मारिल्या. ता. ८ मार्च १७७९ रोजीं इष्टर फांकड्यास मारून तळेगांवावर इंग्रजास जेर करणारा शूर पुरुष हाच होय. हा तोफखान्याचा कामदार थोडा ताप येऊन एकाएकीं मरण पावला ( शके १७०० फाल्गुन व. ६ सोम. ). याच्याविषयीं खालील उल्लेख आढळतो:

'भीवराव कर्ता माणूस. इंग्रजांचे लढाईंत यंदां फारच मेहनत केली. तसा मनुष्य होणें दुस्तर. भीवराव बहुत थोर, शहाणे, कर्ते, एकनिष्ठ, सालमजकूर व तोतयाचे मसलतींत बहुत मेहनत करून नानाचे उपयोगीं पडले. आयुष्यमर्यादा सरली त्यास इलाज नाहीं. मोठी धुराच या काळांत गेली. तोफखान्याचा बंदोबस्त चांगला राखीत होते. पुत्र राजाबाचें सांत्वन केलें. स्त्रीनें सहगमन केलें.' ( ऐ. ले. सं. २४८९ ).

**भीष्माचार्य**--( स. १३५३ सुमार ) एक महानुभाव. हा रामदेवराव यादवाच्या दरबारांतील बोपदेवाचा शिष्य. उपाध्य आम्नायांतील हेतुस्थळकर्ते न्यायव्यास हे यांचे दीक्षागुरु होत. यांनीं संस्कृत व मराठी अनेक ग्रंथ केले आहेत. दिनकरप्रबंध ( अध्याय २४ ) आणि ब्रह्मोपनिषदावरील धाराबिम्बसंज्ञिक भाष्य हे यांचे प्रमुख संस्कृत ग्रंथ होत. दिनकरप्रबंध हा ग्रंथ कवीश्वराम्नाय जयकृष्णसूरि यांचे वचनावरून आणि दत्तात्रयप्रबंध हा जंबूकोपाभिध कमळाकर विख्यात योगी यांचे वचनावरून लिहिल्याचा उल्लेख आहे. कै. भावेकृत कविकाव्यसूचीमध्यें अनेक मराठी ग्रंथ यांचे नांवावर नमूद आहेत. त्यांत पदार्थदीपिका, मार्गप्रभाकर, धनंजयकोशावरील टीका, पंचवार्तिक, मुक्तामाला, नामविभक्ति, सिद्धांतस्थळ इत्यादि प्रमुख होत. यांची गीतगोविंदावर 'महाराष्ट्रसुबोधिनी' नांवाची टीका प्रसिद्ध आहे. नामविभक्ति हा ग्रंथ व्याकरणशास्त्रावर असून पंचवार्तिक हा भाषाशास्त्रावरील ग्रंथ आहे. पंचवार्तिक हा ग्रंथ श्री. मोने यांनीं 'मराठी भाषेचे व्याकरणकार' या ग्रंथांत प्रसिद्ध केला आहे ( म. वा. इ. २. ७३३ ).

**भीष्माचार्य लासुरकर**—( ग्रंथकाल स. १३९८ ) एक महानुभाव. यांना भिवबा लासुरकर म्हणत. हे पारमांडल्य आम्नायांतील नागनाथाचे शिष्य. यांनीं शके १३२०च्या सुमारास आनेराज व्यासकृत, सुभाषिताक्षरीवर मराठीमध्यें टीप लिहिली आहे. तसेंच हयग्रीव व्यासकृत दशमस्कंधावर गद्यराज म्हणून श्लोकबद्ध निर्यमक काव्य आहे त्यावरहि टीप लिहिली आहे (म. वा. इ. २. ७३८).

**भुजबळ**--( कायविररस पाहा ).

**'भुजवलराय' 'बसवराय'**—(स. १५०३-९) विजयनगरच्या नरसिंहराय साळुवाचा महामंत्री नरसा नायक तुळुवाचा हा मुलगा.

**भुजबळ गंग**—विट्टिदेव होयसळाचें नामांतर.

**भुला**—(स. १७८१) हा गार्ग्यगोत्री ब्राह्मण नर्मदेच्या संगमाच्या पूर्वेस ६ मैलांवर दधीचि येथील राहणारा होय. यानें शके १७०३ मध्यें 'ब्रह्मसिद्धांतसार' नांवाचा ग्रंथ लिहिला. त्यांत १२ अधिकार आहेत. पैकीं पहिल्या अधिकारांतील १२४ श्लोकांत सिद्धांतशिरोमणि मध्यमाधिकाराचा संक्षेप आहे. यांतील कांहीं पद्धति ग्रहलाघवासारखी आहे.

**भुवनचंद्र**—(स. १२६५) चैद्रगच्छाचे जैन आचार्य. यांचा शिष्य रत्नप्रभसूरि. हा तेजसिंहाच्या वेळीं मेवाडांत होता.

**भुवनसिंह**—हा सीसोदें येथील राणाशाखेपैकीं पृथ्वीमल्लाचा पुत्र. वि. सं. १४९६ मधील राणपुर येथील शिलालेखांत कीतू चौहान व अलाउद्दीन खल्जी याला जिंकणारा असें याला म्हटलें आहे, पण तें बरोबर नाहीं. कारण कीतू हा सामंतसिंह व कुमारसिंह यांचा समकालीन होता व अलाउद्दीनचा समकालीन रत्नसिंह होता. याचा पुत्र भीमसिंह.

**भुवनैकमल्ल चालुक्य**—पश्चिम चालुक्यांपैकीं दुसऱ्या सोमेश्वराचें नामांतर.

**भूखण**—हा कवि वेहेकळ गांवचा राहणारा. गुजराथी जातीचा रायकवाड ब्राह्मण. भविष्यविषयाष्टक हा याचा ग्रंथ गुजराथींत आहे.

**भूदकवि**—मंखकवीच्या श्रीकंठचरिताचा परीक्षक.

**भूतुग गंग**—स. ७२७ त किग्गटनाड (कूर्गप्रांत) येथील शिलालेखावरून स. ८८७ मध्यें गंग घराण्यांत सत्यवाक्य कोंगुणीवर्मन् परमानडी नांवाचा राजा होऊन गेला असें दिसतें. आप्कुरा शिलालेखावरून दिसतें कीं हा राष्ट्रकूट कृष्णराजा (तिसरा) चा मांडलिक असून यानें इरेयप्पाचा मुलगा ठार मारून गंगवाडी प्रांत हस्तगत केला.

**२.** (स. ८७०) पश्चिम गंगांपैकीं हा तिसऱ्या इरेयप्पाचा मुलगा.

**३.** (स. ९३९-९५३) हा पश्चिम गंग घराण्यांतील दुसरा भूतुग होय. हा चवथ्या इरेयप्पाचा मुलगा. याला नन्नीयगंग व जयदुत्तरंग अशा पदव्या होत्या. याचें तिसऱ्या कृष्ण राष्ट्रकूटाशीं सख्य होतें. यानें राजादित्य चोल पहिला यास नक्कोलम येथील लढाईंत ठार केलें. यानें आपला भाऊ राचमल्ल याचा खून केला. याच्या बायकारेवकन्नीम्मड्डी (चंद्रोबेलब्बे) ही तिसऱ्या राष्ट्रकूट कृष्णाची बहीण होती; शिवाय कल्लब्बरासी ही एक दुसरी बायको होती.

लग्नाच्या वेळीं याला पुलीगर, बेळवोल, किस्सुकाड आणि बागेनाड हे परगणे हुंड्यामध्यें मिळाले, असें ठरतें. पुढें तिसरा कृष्णराज राष्ट्रकूटानें यानें राजादित्य चोलास मारल्याबद्दल बनवासी नांवाचा आणखी एक परगणा यास जहागीर दिला. यानें महेंद्र १ ला या पल्लवराजाचा सामीय येथें पराभव केला होता.

**भूदेव शुक्ल**—(स. १५००-५० सुमार) याचा पिता शुक्रदेव. यानें धर्मविजय नांवाचें पांचअंकी अन्योक्तिरूप संस्कृत भाषेत नाटक लिहिलें आहे.

**२.** (ग्रंथकाल स. १५५०) हा 'रसविलास' या संस्कृत ग्रंथाचा कर्ता होय.

यानें आपल्या ग्रंथांत 'श्रीवत्सलांछन' याच्या संस्कृत ग्रंथांतील कांहीं उतारे घेतले आहेत.

**भूधर दैवज्ञ**—भास्कराचार्यकृत गणिताध्याय व गोलाध्याय यांवरील तिसरा टीकाकार.

**भूपति**—(स. १७३३) एक हिंदी कवि. हा अमेठीचा राजा गुरुदत्तसिंह होय. याची शृंगारिक सतसई प्रसिद्ध आहे. उदयनाथ कवींद्र याचा आश्रित होता.

**भूमक क्षत्रप**—(स. ७८ सुमार) क्षहरातवंशांतील एक क्षत्रप राजा. याचीं राजपुतान्याच्या पुष्कर वगैरे भागांत तांब्याचीं पुष्कळ नाणीं सांपडलीं आहेत. त्यांवर याला क्षहरात क्षत्रप असें म्हटलें आहे. याच्या नाण्यांवर काळ दाखविणारे संवत् वगैरे कांहीं नाहीं. तसेंच हा कधीं महाक्षत्रप झाला होता किंवा नाहीं हेंहि आढळत नाहीं. याच्यानंतर नहपान क्षत्रप झाला असावा.

**भूमंडली**—कृष्णदेव रायलूच्या राणीची दासी. तेनाल रामलिंग हिच्याच आश्रयानें त्या राजाच्या दरबारांत लागला होता.

**भूमिमित्र**—(भूमित्र पाहा).

**भूयिकादेवी**—ही रघुवंशी प्रतिहार देवराजाची पत्नी. हिचा मुलगा वत्सराज.

**भूविक्रम गंग**—(स. ६०० सुमार) पश्चिमगंगांपैकीं श्रीविक्रमाचा पुत्र. यास भीमकोण किंवा श्रीवल्लभ असेंहि म्हणत. यानें विलंद येथें पल्लवांचा पराभव केला.

**भूषण**—(स. १६१४-१७१६) याचा पिता रत्नाकर. हा काश्यपगोत्री असून कान्यकुब्ज ब्राह्मण होता. याचें

गांव यमुनेच्या उत्तर तीरावरील त्रिविक्रमपूर (तिक्मनपूर) होय. मतिराम व चिंतामणि असे याला दोन भाऊ होते. शिवसिंहसरोजमध्यें जटाशंकर नांवाचा तिसरा भाऊ दिला आहे. यांच्या क्रमाबद्दल मतभेद आहे. भूषणाचा जन्म वि. सं. १७३८ (जन्म स. १६८१) मध्यें झाला. वि. सं. १७९७ पर्यंत हा हयात असल्याचा पुरावा मिळतो. याचें आडनांव त्रिपाठी असून त्याचा अपभ्रंश तिवारी असा आहे. याला एकंदर बारा तेरा आश्रयदाते होते. ते पुढीलप्रमाणें– (१) चित्रकूटचा सोलंकी रुद्रसाहि हृदयराम (हृदयशाहि किंवा हरिहरशाह), (२) रेवानरेश अवधूतसिंह, (३) छत्रपति शाहू, सातारा, (४) कमाऊँ नरेश ज्ञानचंद्र, (५) बाजीराव पेशवा, (६) (चिंतामणि) चिमणाजीआप्पा पेशवे, (७) महाराज छत्रसाल बुंदेला, (८) रावराजा बुधसिंह बुंदीनरेश, (९) जयपूरनरेश सवाई जयसिंह, (१०) जहांदरशाहा दिल्लीनरेश, (११) भगवंतसिंह खीची असोथरनरेश, (१२) अनिरुद्धसिंह पौरचनरेश, (१३) फतहशाहि.

या सर्वांचा काळ निश्चित आहे. बाराव्याचा काळ अज्ञात आहे. यांपैकीं एकहि छत्रपति शिवाजीच्या वेळचा नसून सर्व नंतरचे आहेत. शिवाजीमहाराज स्वर्गवासी झाले तेव्हां यांपैकीं फक्त छत्रसाल तीस वर्षांचा हयात होता. यावरून हा सुप्रसिद्ध कवि शिवाजीच्या वेळीं नव्हता ही गोष्ट उघड होते. यांनीं लिहिलेली शिवबावनी, शिवाजीच्या नंतर शिवाजीचें हिंदुधर्माच्या उद्धाराचें कार्य पाहून आदरानें लिहिली आहे. बावनींत बाजीरावच्या वेळच्या सिरोजप्रकरणाचा निर्देशहि आहे (४६). (नागरीप्रचारिणी सभा त्रैमा. ६.१, पंडित भागीरथीप्रसाद दीक्षित काशी यांच्या लेखावरून). चित्रकूटच्या सोलंकी राजानें यास कविभूषण अशी पदवी दिली.

शिवाजीचे पराजय अथवा गैर कृत्यें यांचेंहि यानें वर्णन केलें आहे (शि. भू. छं. ६३; ९९; २१२; २१३; २५२).

शिवाजी देवीभक्त होता तसाच शिवभक्तहि होता (शि. भू. छं. १४; १५८; २३६; ३२६). याचें भूषण काव्य स. १६७४ मध्यें संपलें, असें शिवचरित्रप्रदीपांत लिहिलें तें बरोबर आहे, असें रा. सा. सरदेसाई म्हणतात व याची हयात १०२ वर्षांची देतात (स. १६१४–१७१६).

याचे ग्रंथ–शिवराजभूषण, भूषणहजारा, भूषणउल्हास, दूषणउल्हास. हिंदी साहित्यसंमेलनानें भूषणग्रंथावलींत याचें सर्व वाङ्मय प्रसिद्ध केलें आहे. प्रसिद्ध दोहाकार वृंद व शीतल कवि याचे वंशधर म्हणवितात.

**भूषणभट्ट**—बाणभट्टाचा पुत्र. बाणाच्या कादंबरीचा उत्तरार्ध यानें पुरा केला. याचें अध्ययन बापाजवळ झालें होतें. पुलिन व हा एकच असावेत.

**भूसुकुपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं एकेचाळिसावा सिद्ध होय. हा राजकुमार जातीचा होता. हा नालंदा प्रांतांतील राहणारा होय. याच्या वेळेस देवपाल नांवाचा राजा होता (स.८०९–८४९). याचें नांव शांतिदेव असेंहि होतें. हा राहणारा बंगालचा असावा, असें डॉ. भट्टाचार्य यांनीं लिहिलें आहे.

याचे एकंदर सहा ग्रंथ आहेत, आणि तंत्रावर तीन आहेत. भुसुके या नांवावर दोन ग्रंथ आहेत. त्यांत चक्रसंवरतंत्राची टीका आहे. आणि सहजगीति (तं. ४८।१) हा ग्रंथ हिंदीमध्यें आहेत. हा ग्रंथ भूतानी भाषेमध्येंहि लिहिला आहे. याच्या कांहीं हिंदी कविताहि आहेत.

**भैरव अवधूत ज्ञानसागर**—(समाधि स.१८४३) हा विश्वामित्रगोत्री आश्वलायनशाखेचा देशस्थ ब्राह्मण असून याला एक सुंदर, अप्रतिम वक्ता व गवयी असा दिगंबर नामक मुलगा होता. सातारा जिल्ह्यांत खानापूर तालुक्यांतील विटें येथें हा सत्पुरुष व कवि होऊन गेला. हा उद्धवचिद्धन स्वामींचे गुरु जे चिद्धनस्वामी त्यांच्या भगिनीच्या वंशांत जन्मला असून यास आपाजीबुवा असेंहि म्हणत. याच्या वडिलांचें नांव ज्योतिपंत व आईचें नांव यमुना असें होतें. याच्या भक्तीमुळें पैठणची दत्तमूर्ति विट्यास आली (शके १७३३ आषाढ शु. ७). तेथें प्रतिवर्षीं दत्तजयंतीचा उत्सव होतो. यानें शिवाजी चैतन्याकडून गुरूपदेश घेतला होता. यानें स. १८४० त संन्यासदीक्षा घेतली. याची एकंदर कविता हजाराच्या आंत असून यानें ज्ञानसागर हा अध्यात्मपर ग्रंथ लिहिला आहे. याची समाधि विटें येथें असून तेथें यानें बांधलेल्या दत्तमंदिरास खर्चासाठीं द. सा. १५० रु. देवासचे पवार यांजकडून मिळतात (म. क. च. भा. २, पृ. १८०–१९६).

**भैरवजी घोरपडे**—(मृत्यु स. १८०७) (बाजी घोरपडे पाहा).

**भैरवमिश्र**—हा नागोजीभट्टाचा शिष्य व काशींतील सुप्रसिद्ध पंडित. यानें परिभाषेन्दुशेखरावर लिहिलेली टीका भैरवी नांवानें प्रसिद्ध आहे.

**भोगनाथ**—(स. १३००–१४००) हा माधवाचार्याचा धाकटा भाऊ होय.

याच्या आईबापाचें नांव मायण आणि श्रीमती असें होतें. हा भारद्वाजगोत्री होता. हा विजयनगरच्या पहिल्या बुक्क संगम राजाच्या पदरीं असून हा त्याचा ' नर्मसचिव ' होता, त्याचप्रमाणें राजकविहि होता असें यानेंच बिट्र-गुंटच्या ताम्रपटांत म्हटलें आहे ( एपि. कर्ना. व्हा. ३ पा. ३०–३१ ).

**भोगवर्मन् मौखरी**—( स. ६८५–७१५ ) हा एक मौखरी वंशांतील राजपुत्र होय. मगध येथील आदित्यसेनाचा हा समकालीन असून त्याच्या मुलीशीं यानें लग्न केलें होतें. त्यावरून त्या वेळीं याचें वजन चांगलें असावें असें दिसतें. परंतु मगधचे राजे याचे शत्रु होत. यानें आपली मुलगी वत्सदेवी ही नेपाळच्या दुसरा शिवदेव लिच्छवी राजास देऊन त्याच्याशीं मैत्री संपादन केली. याच्या नंतर यशोवर्मन् हा गादीवर आला ( मौखरी by E. A. Pires, p. 134–135 ).

**भोजदेव**—याचा शृंगारप्रकाशिका नांवाचा एक अश्रुतपूर्व अलंकारग्रंथ आहे. हा ग्रंथ मल्याळ देशांत सांपडला. याची प्रत मद्रासच्या गव्हर्नमेंट ग्रंथसंग्रहालयांत आहे. अलंकारशास्त्रावर एवढा मोठा ग्रंथ दुसरा संस्कृतांत नाहीं. यांत सुमारें ३०००० श्लोक असतील. ' प्रकाश ' नामक प्रकरणें ३६ आहेत. आतांपर्यंत आपणांस माहीत नसलेल्या पुष्कळ ग्रंथकारांच्या ग्रंथांतून उतारे यांत दिले आहेत. सर्गांतीं ' आनंद ' शब्द असला म्हणजे तें काव्य ' पंचशिख'नामक कवीचें असें जाणावें म्हणून भोज आपल्या शृंगार प्रकाशिकेंत सांगतो. श्रीहर्षाच्या नैषधीय चरिताच्या प्रत्येक सर्गाच्या शेवटल्या श्लोकांत आनंद शब्द आलेला आहे. यावरून भोजाचें म्हणणें कोणत्या अर्थाचें आहे हें सांगतां येत नाहीं (वि. वि. लक्ष्मणरायाचा लेख, स. १९२३ ).

**भोज परमार**—( स. १०४९–१०४२ ) माळ-व्याच्या परमारांपैकीं सिंधुराजाचा पुत्र आणि मुंज राजाचा दत्तक. हा आपणास त्रिभुवननारायण अशी पदवी लावून घेत असे. हा मोठा दाता, योद्धा आणि विद्वान् होता. ग्वाल्हेर राज्यांतील उदयपूर येथें सांपडलेल्या शिलालेखांत म्हटलें आहे कीं, कैलासापासून दक्षिणेंतील मलयपर्वतापर्यंत याचें राज्य होतें ( एपि. इंडि. भा. १, पृ. २३५ श्लोक १७ ). यांत कदाचित् थोडी अतिशयोक्ति असेल. यानें चेदि देशाच्या राजाला, इंद्ररथ, तोग्गळ, भीम वगैरेंना, कर्नाटक, लाट आणि गुजराथ येथील राजांना, तसेंच तुर्कांना जिंकलें होतें. याला कविराज म्हणत. यानें केदार, रामेश्वर, सोमनाथ, सुंडीर (?), काळ ( महाकाळ ), अनळ व रुद्र यांचीं मंदिरें बांधलीं ( एपि. इंडि. भा. १, पा. २३५–३६ ). वरील राजांपैकीं चेदि देशाचा राजा गांगेयदेव याचा यानें पराभव केल्याची माहिती मिळते. गुजराथचा पहिला भीमदेव सोळंकीचा पराभव याचा सेनापति कुलचंद्र यानें केल्याची माहिती प्रबंधचिंतामणीमध्यें मिळते. इंद्ररथ व तोग्गळ यांची कांहींच माहिती अद्यापि मिळाली नाहीं. मुंजाला तैलपानें ठार केलें याचा सूड सिंधुराज घेऊं शकला नाहीं. पण यानें त्याचा नातू जयसिंह याच्यावर स्वारी करून त्याला पराजित केलें.

अवंतीचा राजा भोज यानें सांभरचा चौहान राजा वीर्यराम यास मारलें होतें, असें पृथ्वीराजविजय महा-काव्यांत लिहिलें आहे ( सर्ग ५. ६७ ). याच्या अखेरीस गुजराथच्या पहिला भीमदेव सोळंकी व चेदीचा राजा गांगेयदेवाचा पुत्र कर्ण यांनीं धारानगरीवर स्वारी केली, तेव्हां युद्धांत याचा देहान्त झाला आणि राज्यांत अव्यवस्था माजली. पण उदयादित्य परमारानें या कृत्याचा सूड घेतला व गेलेला सर्व मुलूख परत मिळवला.

हा प्रसिद्ध विद्वान् होता. यानें साहित्यशास्त्रावर 'सर-स्वतीकंठाभरण', योगशास्त्रावर 'राजमार्तंड', ज्योतिषावर 'राजमृगांक' व 'विद्वज्जनमंडन', शिल्पावर 'समरांगण', व्याकरणावर एक व 'शृंगारमंजरी' वगैरे ग्रंथ संस्कृतांत लिहिले आहेत. यानें 'कूर्मशतक' नांवाचे दोन काव्यग्रंथ प्राकृतांत केले आहेत. तेहि दगडावर खोदलेले मिळाले आहेत. यानें धारा नगरींत सरस्वतीकंठाभरण ( सरस्वतीसदन ) नांवाची पाठशाळा बांधली होती. तिच्यांत कूर्मशतक व भर्तृहरीच्या कारिका दगडावर खोदून ठेवल्या होत्या. भोजाच्या नंतर उदयादित्य,अर्जुनवर्मा वगैरेंनीं कांहीं पुस्तकें खोदून तेथें ठेवलीं होतीं, पण मुसलमानांच्या स्वारीनंतर तें विद्यामंदिर पाडून तेथें मशीद झाली. ती तेथें आज कमाल-मौला नांवानें प्रसिद्ध आहे. तेथील ग्रंथ कोरलेले दगड साफ करून त्यांची फरशी केली. कांहीं ग्रंथ कोरलेले दगड उलटे टाकले होते ते आतां तेथून काढले आहेत. त्यांवरून प्राकृतांतील दोन्ही कूर्मशतकें व पारिजातमंजरी नांवाची नाटिका प्राप्त झाली आहे ( कूर्मशतक एपि. इंडि., भा. ८, पृ. २३३–६०; पारिजातमंजरी एपि. इंडि. भा. ८, पृ. १०१–२२ ).

हा राजा गुणग्राहक असून एक एक श्लोकाला लाख लाख रुपये देण्याबद्दलची याची प्रसिद्धि अद्यापि लोकांच्या तोंडीं आहे. भोजप्रबंधकर्ता बल्लाळ आणि प्रबंधचिंतामणि-कर्ता मेरुतुंग यांनीं, कालिदासादि कवींनीं याच्यापासून

सन्मान मिळविला होता असें लिहिलें आहे, पण तें कालदृष्ट्या चुकीचें असल्यामुळें विश्वासार्ह नाहीं. याच्या वेळीं धनपाल जिवंत होता व त्यानें याच्या वेळीं तिलकमंजरी लिहिली.

हा चितोड येथें मधूनमधून राहत असे. तेथें यानें त्रिभुवननारायण नांवाचें विशाल शिवमंदिर बांधिलें ( ना. प्र. प. भा. ३, पृ. १–१८ ), त्याचा जीर्णोद्धार महाराणा मोकलनें वि. सं. १४८५ ( स. १४२८ ) मध्यें केला. सध्यां त्याला अदबदजी ( अद्भुतजी ) किंवा मोकलजीचें मंदिर असेंहि म्हणतात. कल्हणाच्या राजतरंगिणीमध्यें पुढील माहिती मिळते. 'काश्मीरच्या अनंतदेव नांवाच्या राजाच्या मर्जींतील एक पद्मराज नांवाचा पानें विकणारा होता. त्यानें माळव्याचा राजा भोज याच्याकडे कांहीं सोनें पाठविलें. त्या सोन्यानें भोजानें काश्मीरांत कपटेश्वर येथें एक कुंड बांधलें. त्या कुंडाचें नांव पापसूदन होय. भोजाचा असा नियम होता कीं, त्यांतील पाण्यानें रोज तोंड धुवावयाचें. पद्मराजानें हा नियम पाळण्याकरितां कांचेच्या कुप्यांतून पाणी पाठवून हा याचा नियम चालवण्यास मदत केली' ( राजतरंगिणी ७. १९०–९३ ). भोजपूर( भोपाळ )ची विस्तृत झीलहि यानें बांधली. ती पुढें माळव्याचा ( मांडूचा ) सुलतान हुशंगशाहानें पाडली ( इंडि. अँटि. १७, पृ. ३५०–५२, तिचा नकाशा पा. ३४८ ).

भोजाच्या वेळचीं आतांपर्यंत दोन दानपत्रें मिळालीं आहेत. त्यांपैकीं बांसवाड्याचें वि. सं. १०७६ ( स. १०१९ ) व दुसरें वि. सं. १०७८ ( स. १०२१ ) मधील आहे ( एपि. इंडि. भा. ११, पृ. १८२–८३. इंडि. अँटि. भा. ६, पृ. ५३–५४ ). शा. श. ९६४ ( वि. सं. १०९९ ) मध्यें यानें राजमृगांककरण नांवाचा ग्रंथ लिहिला ( एपि. इंडि. भा. १, पृ. २३२–३३ ). याच्यानंतर जयसिंह गादीवर आला. त्याचा पहिला लेख दानपत्र वि.सं. १११२ मधील आहे, त्याअर्थीं याचा देहांत वि.सं. १०९९–१११२ पर्यंत केव्हां तरी झाला असावा.

**२.** (स.१२९०–१३०८ सुमार) माळव्याच्या परमारांपैकीं तिसऱ्या जयसिंहाचा उत्तराधिकारी. हंमीरमहाकाव्यांत हंमीराच्या विजययात्रेंत लिहिलें आहे कीं, मंडलदुर्ग म्हणजे मांडूचा किल्ला घेऊन हा त्वरेनें धारला पोंचला व परमार भोजाला नमवलें. जर हें खरें असेल तर हें कवाळजीच्या कुंडावरील लेख ( वि. सं. १३४५ ) आणि हंमीराचा मृत्यु ( वि. सं. १३५८ ) यांच्या मध्यें कधींतरी झालें असावें. धार येथें अब्दुल्लाशाह चंगालच्या कबरीच्या दरवाज्यांत एक फार्सी शिलालेख लावलेला आहे. त्यांत चंगालच्या प्रशंसेबरोबर वरचा घुमुट अलाउद्दीन घोरीनें बनवला आणि त्याची महमूदशाह खल्जीनें दुरुस्ती केली असें म्हटलें आहे. ही कबर वि. सं. १५१० मध्यें बांधली. येथें हेंहि लिहिलें आहे कीं, चंगालची करामत पाहून राजा भोज मुसलमान झाला ( बॉबे ए. सो. ज. स. १९०५ चा एक्स्ट्रा नंबर पृ. ३५२ ). पहिल्या भोजाच्या वेळीं मुसलमानांचा कांहीं अंमल नव्हता. दुसऱ्या भोजाबद्दलहि ही गोष्ट कालदृष्ट्या जुळत नाहीं. याच्यानंतर चौथा जयसिंह गादीवर आला.

**भोज(देव) प्रतिहार**—( स. ८४४–८२ ) रघुवंशी प्रतिहारांपैकीं रामभद्राचा पुत्र. याच्या मातेचें नांव अप्पादेवी. याला मिहिर किंवा आदिवराहहि म्हणत. हा आपल्याजवळच्या राठोड राजा ध्रुवराज दुसऱ्याशीं लढला त्यांत राठोडांच्या म्हणण्याप्रमाणें याचा पराभव झाला. याच्या वेळचे पांच शिलालेखहि वि. सं. ९०० ते ९३८ ( स. ८४३–८८१ ) पर्यंतचे मिळाले आहत ( एपि. इंडि. भा. ५, पृ. २११ दौलतपूरचें दानपत्र, एपि. इंडि. भा. १, पृ. १८६–८८ पेहेवाचा शिलालेख). तसेंच चांदीचे व तांब्याचे शिक्के मिळाले आहेत. त्याच्या एका बाजूला 'श्रीमदादिवराह' असा लेख व दुसऱ्या बाजूला वराहा- ( नरवराहा )ची मूर्ति आहे ( स्मि. कॅ. का. इं. म्यु. पृ. २४१–४२ प्लेट २५, सं. १८ ). हा भगवतीदेवीचा भक्त होता. याची राणी चंद्रभट्टारिकादेवी होती. तिच्यापासून यास महेन्द्रपाल झाला. याचा युवराज नागभट नांवाचा होता अशी माहिती मिळते. पण महेन्द्रपाल व विनायकपाल यांनीं दिलेल्या वंशांत त्याचें नांव नाहीं. त्याअर्थीं तो हयात असतांच हा मेला असावा. याच्यानंतर महेन्द्रपाल गादीवर आला.

दौलतपुरा ( जोधपूर राज्य ) येथें मिळालेलें दानपत्र वि. सं. ९०० फाल्गु. शु. १३ चें दानपत्र आहे ( राजपुताना म्युझियम ). शेवटला शिलालेख वि. सं. ९३८ मधला आहे. यावरून हा साधारणपणें अडतीस वर्षें कनोजच्या गादीवर होता असें ठरतें. कदाचित् थोडा अधिकहि असेल. हा महीपालाचा दादा आणि महेंद्रपालाचा पिता होय. यानें 'आदिवराह' शिक्याचीं बरींच नाणीं पाडलीं असावीं. कारण स. १०२० च्या 'सियाडोनी' येथील लेखांतून आदिवराह–द्रम्याचा ( रुपयांचा ) उल्लेख आहे ( एपि. इंडि. भा. १, १७४ ). हें नाणें पुढें शंभर वर्षें प्रचारांत होतें. यानें अल्ल नांवाचा एक गुजराथेंतील आनंदपूरचा नागर ब्राह्मण ग्वाल्हेरला किल्लेदार नेमला होता ( एपि. इंडि. भा. १, पा. ९५७ ).

२. ( स. ९३१ सुमार ) हा महेंद्रपाल प्रतिहाराचा पुत्र. याच्या मातेचें नांव देहनागादेवी. महीपाल वडील किंवा भोज वडील हें अद्यापि समजलें नाहीं.

**भोज भगत**—( स. १७८५–१८५० ) गुजराथी कवि व साधु. याचे फटके प्रसिद्ध आहेत.

**भोजमल्ल**—( स. १३६६ ) विजयनगरचा सेनापति. मुहंमद बहामनीनें याला जखमी केलें, तेव्हां हा पळाला. तेव्हां तोफा वापरल्या होत्या ( मु. रि. भा. १, पृ. ७३ ).

**भोजराज मिनेगार**—हा मिन्याचें काम करण्यांत कुशल होता. याला पुण्यास बोलावून याच्याकडून आपल्या लोकांना मिन्याचें काम शिकवावें असें नानाफडणीसाच्या मनांत होतें. पण पुढें याला महादजीनें लष्करांस नेलें. तेथून हा जयपुरास गेला. पण तेथें गेल्यावर राजकारणाच्या संशयामुळें याला त्रास झाला, व बाहेर पुणें येथें जाण्यास प्रतिबंध झाला. राजकीय परिस्थितीमुळें कलाकौशल्याचा प्रसार होण्यास कसा प्रतिबंध होई हें यावरून दिसून येतें ( इ. सं. १. ५ ऐ. टि. २५ ).

**भोजराज गुहिलोत**—( स. ५८६–६०६ ) उदेपूरच्या गादीवर गुहिलानंतर आला. यांच्यामागून महेंद्र गादीवर आला.

**भोजवर्मा**—( स. १०७९ सुमार ) हा बंगालच्या वर्म घराण्यांतील सामलवर्माचा मुलगा.

याचे बेलव येथील शिलालेख प्रसिद्ध असून ते सध्यां डाक्का येथील म्युझियममध्यें आहेत. त्या शिलालेखांवरून याच्या घराण्याची माहिती बरीच मिळते ( मॉडर्न रिव्ह्यू, नवं. १९३२, पा. ५३० ).

**भोज शिलाहार**—( स. ११७८–१२०७ ) हा कोल्हापूरच्या शिलाहार घराण्यांतील एक राजा. हा विजयार्क शिलाहाराच्या मागून गादीवर बसला असावा. खलिगल म्हणजे खेळणा ऊर्फ विशाळगड हा किल्ला यानें स. १२०० त बांधला, असा उल्लेख आहे. हा 'श्रीमहालक्ष्मीलब्धवरप्रसाद' ही पदवी आपल्या नांवास जोडीत असे.

**भोसले ( घोरपडे व मुधोळ ) घराणें**—लक्ष्मणजी ( मेवाडचा महाराणा ), अजयसिंह (स. १३०१), १ सुजनसिंह ( मृ. स. १३५९ ), २ दिलीपसिंह ( मृ. स. १३६५ ), ३ सिद्धजी ( मृ. स. १३९७ ), ४ भैरवजी ऊर्फ भोसाजी ( मृ. स. १४०७ ), ५ देवराज ( मृ. स. १४२२ ), ६ उग्रसेन ( मृ. स. १४५५, भाऊ प्रतापसिंह ), ७ कर्णसिंह १ ला (मृ. स. १४६९), ८ भीमसिंह ( स. १४४३–८९ ), ९ खेलोजी ( मृ. स. १५१४ ), १० मालोजी १ ला ( मृ. स. १५३२ ), ११ अखैजी ( मृ. स. १५४८ ), १२ कर्णसिंह २ रा ( मृ. स. १५६५, याचा भाऊ भीमसिंह ), १३ चोलराज ( मृ. स. १५७८ ), १४ पिलाजी ( मृ. स. १५९६, भाऊ कानोजी, वल्लभसिंह ), १५ प्रतापराव ( मृ. स. १५९६, भाऊ हणमंतराव ), १६ बाजीराजे ( मृ. स. १६४५ ), १७ मालोजी दुसरा ( मृ. स. १६६४, भाऊ शंकराजी ), १८ अखैजी २ रा ( स. १६७५ सुमार), १९ पिराजी ( स. १७०० सुमार, भाऊ बाजी व जयसिंह ), २० मालोजी ३ रा ( स.१७१६–१८०५, भाऊ संकोजी व राणोजी ), २१ गोविंदराव ( मृ. स. १७७०, भाऊ केदारराव, पर्वतराव, मल्हारराव व बाजी ), २२ नारायणराव ( राज्यकाल स. १८०५–१५ ), २३ गोविंदराव ( मृ. स. १८१८ भाऊ व्यंकटराव व लक्ष्मण ), २४ बळवंतराव ( मृ. स. १८६२ ) व्यंकटरावाचा मुलगा ), २५ वेंकटराव ( मृ. स. १९०० ), २६ रामचंद्रराव ( भाऊ मालोजी ४ था व लक्ष्मण ), सध्यां सर मालोजीराव चौथे हे मुधोळच्या गादीवर आहेत, २७ गोविंदराव ( मृ. स. १९२० ) भाऊ जयसिंह ( मृ. स. १९३१ ) व भैरवसिंह. नांवांमागील आंकडे पिढ्यांचे दर्शक आहेत.

**भोसले घराणें ( साताराचें )**—उग्रसेन (इंद्रसेन), शुभकृष्ण ( स. १४५० सुमार ), रूपसिंह ( स. १४७० सुमार ), धोपजी ( स. १४९० सुमार ), खेळकर्ण ( स. १५०० सुमार ), जयकर्ण ( स. १५२० सुमार ) संभाजी ( स. १५४० सुमार ).

१ बाबाजी भोसले, २ मालोजी भोसले, ३ शहाजी भोसले ( स. १५९४–१६६४ ), ४ शिवाजी १ ला ( स. १६७४–८० ), ५ राजाराम (ता.२१.४.१६८०–१६.१. १६८१ ), ६ संभाजी १ ला ( स. १६८१–१६८९ ), ७ राजाराम ( दुसऱ्यांदा स. १६८९–१७०० ), ८ शिवाजी २ रा (स.१७००–७), ९ शाहू १ ला (स.१७०७–१७४९ ), १० रामराजा द. (स. १७४९–१७७७), ११ शाहू २ रा द. ( १७७७–१८०८ ), १२ प्रतापसिंह (स.१८०८–१८३९ ), १३ शहाजी २ रा ( स. १८३९–१८४८ ). निपुत्रिक मरण पावल्यावर ब्रिटिश सरकारनें राज्य खालसा केलें. दत्तकवंश साताऱ्यास आहे.

**२. ( कोल्हापूरचें )**—१ ताराबाई ( साताराच्या राजारामाची बायको ), २ संभाजी २ रा ( स. १७३०–

१७६० ), ३ शिवाजी ३ रा द. ( स. १७६०–१८१२ ) ४ संभाजी ३ रा ( स. १८१२–१८२२ खून झाला ), ५ शाहजी ( स. १८२२–१८३७ ), ६ शिवाजी ४ था द. ( स. १८३७–१८६६ ), ७ राजाराम द. ( स. १८६६–१८७० ), ८ शिवाजी ५ वा द. ( स. १८७०-१८७३ ), ९ जसवंतराव द. ( स. १८७३–८३ ), १० शाहू ( मृत्यु स. १९२२ ), ११ राजाराम ( प्रस्तुत ).

३. ( **तंजावरचें** )—शहाजी भोसले ( व्यंकोजीचा बाप ), १ व्यंकोजी ( स. १६७४-८५ ), २ शहाजी ( स. १६८५–१७११ ), ३ सर्फोजी ( स. १७११-२७ ) ४ तुकाजी (स १७२७–३५), ५ बाबाजी ( स.१७३५–३८ ), ६ शाहुजी ( स. १७३८–४१ ), ७ प्रतापसिंह (स. १७४१–४९), ८ शाहुजी पुन्हां (स. १७४९–६५) ९ तुळजाजी ( स.१७६५–८७ ), १० अमरसिंह ( स. १७८७–९७ ), ११ सर्फोजी ( स. १७९७–१८२४ ), १२ शिवाजी ( स. १८२४–५५ ). ह्या घराण्यांतील आद्य संस्थापक शहाजी भोसल्याचा मुलगा व्यंकोजी होय. यानें स. १६७४ मध्यें तंजावरचा राजा सिंगमल्लदासाकडून राज्य बळकाविलें.

४. ( **नागपूरचें** )—१ परसोजी, २ कान्होजी, ३ रघूजीबाबा ( मृ. स. १४–२–१७५५ ), जानोजी ( मृ. स. १७७१ ), ५ रघूजी २ रा ( मृ. स. १८१६ ), ६ परसोजी ( १८१७ खून ), ७ मुधोजी ( स. १८१७–४० ), ८ रघूजी द. ( स. १८१८–५३ ), जानोजी द. ( मृ. स. १८८१ ), १० रघूजीराव विद्यमान ( बंधु राजे लक्ष्मणराव मृ. स. १९३२ ).

---

# म

**मकरंद**—( ग्रंथकाल स. १४७८ ) एक भारतीय ज्योतिषी. यानें पंचांगसाधन फार सुलभ रीतीनें करतां येण्यासारखा ' मकरंद ' नांवाचा सारणी–ग्रंथ रचला. वरील ग्रंथ सूर्यसिद्धांतानुसार आहे. मकरंद ज्योतिषी काशी येथें राहणारा होता. या ग्रंथावर टीका दिवाकर या विद्वानानें केली असून तिचें नांव ' मकरंदविवरण ' असें आहे. काशी व ग्वाल्हेर.येथें या ग्रंथावरून पंचांगें तयार करतात. हा ग्रंथ सांप्रत उत्तरहिंदुस्थानांत काशी येथें छापिला आहे. शके १६८८ मध्यें गोकुळनाथ दैवज्ञानें यांतील सारण्यांची उपपत्ति लिहिली आहे. तीहि छापिली आहे ( भा. ज्यो. ).

**मॅकार्टने**—( स. १७८१ ) हा प्रथम रशियांत इंग्रजांचा वकील व पुढें हिंदुस्थानांत मद्रासचा गव्हर्नर होता.

**मच्कुंद**—( ग्रंथकाल स. १६७८ ) याचा श्रीभार्गवचरित्र नांवाचा ओवीबद्ध अपुरा ग्रंथ धुळयाच्या शंकर श्रीकृष्ण देवांना उपलब्ध झाला आहे ( मं. वार्षिक शके १८३६ ते १९ ).

**मजमून**—ऊर्दू कवि. याचें नांव शेख शर्फुद्दीन मजमून. गांव अकराबाद ( जाजमऊ ). ग्रंथ–मजमून ( क. कौ. ४ ).

**मजहर**—( स. १६९६–१७७८ ) ऊर्दू कवि. याचें नांव मीर्झा जानजाना. याचा एक फार्सी व दुसरा ऊर्दू कवितासंग्रह आहे ( क. कौ. ४ ).

**मज्झन्तिक**—अशोकाच्या प्रेरणेनें भरलेल्या तिसऱ्या बौद्धमहासभेंत याला काश्मीर व गांधार या देशांतील मुख्य प्रचारक नेमिलें होतें. हा काश्मीरांत गेला तेव्हां तेथें ' आखाल ' नांवाचा नाग राजा राज्य करीत होता. तो अत्यंत प्रभावी होता, तरी यानें आपला प्रभाव त्याच्यावर पाडून तेथें बौद्धधर्माचा प्रचार केला, असें महावंशांत म्हटलें आहे; व दीपवंशांतहि तशीच माहिती सांपडते. तिबेटी ग्रंथ दुल्व यांत या माहितीला दुजोरा मिळतो ( मौर्य–साम्राज्यका इतिहास, पा. ५४८ ).

**मज्झिम**—अशोकाच्या प्रेरणेनें भरलेल्या तिसऱ्या बौद्धमहासभेंत यास हिमालय प्रदेशाचा मुख्य प्रचारक नेमण्यांत आलें. सांची येथें सांपडलेल्या अवशेषांत याचें नांव असलेला एक अवशेष सांपडला आहे. दुसऱ्या एका अवशेषावर ' मज्जिम कश्यपगोत हिमवताचार्य ' असेंहि लिहिलेलें आढळलें. त्यावरून महावंश व दीपवंश या आख्यायिकात्मक ग्रंथांत मिळालेल्या माहितीस ऐतिहासिकत्व प्राप्त झालें आहे.

**मज्हर अलीखान**—यानें तुहफत-इ-अकबरशाही याच्या पहिल्या भागाचें उर्दूंत भाषांतर केलें ( कार्नवालीसची कारकीर्द ) व त्याला तारीख-इ-शेरशाही असें नांव दिलें ( बील ).

**मझुलाखान**—( स. १६०२ ) विजापूरकरांचा एक सेनापति. याचा चिक्क संकण्णानें स. १६०२ मध्यें पराभव केला.

**माणिक**—( स. १३०० सुमार ) या नेपाळी गृहस्थानें 'अभिनवराघवानंद' व 'सत्यमंगलरत्नखेट' हीं दोन नाटकें लिहिलीं.

**मणिदेव**—एक हिंदी कवि ( गोकुळनाथ पाहा ).

**मणिभद्रा ( योगिनी )**—ही चौऱ्यांयशीं सिद्धांपैकीं पासष्टावी सिद्धीण होय. ही जातीनें गृहदासी. ही कुकुरिपा याची शिष्या होय.

**मणियार पारशी**—( स. १७८१-८२ ) रघुनाथराव पेशवे यांचा इंग्लंडला गेलेला वकील.

**मणिराम**—( ग्रंथकाल स. १७७४ ) एक ज्योतिषी. याचें गोत्र भारद्वाज होतें; व हा यजुर्वेदी ब्राह्मण होता. याच्या पित्याचें नांव लालमणि असें होतें. याचा गुरु काश्यपगोत्राचा असून त्याचें नांव वत्सराज असें होतें. मणिरामला कोणीं नुसतें 'राम' असेंहि म्हटलें आहे. याचा 'ग्रहगणितचिंतामणि' ग्रंथ प्रसिद्ध आहे ( भा. ज्यो. ).

**मतिराम**—( जन्म स. १६१७ ) हा रीतिकालांतील एक प्रमुख हिंदी कवि होय. याचे चिंतामणि व भूषण हे बंधु होत. हा बुंदीच्या भावसिंहाच्या आश्रयास असून यानें ललित-ललाम, छंदसार, रसराज, साहित्यसार, लक्षणशृंगार व मतिरामसतसई हे ग्रंथ लिहिले. याला अनुप्रास फार चांगले साधले आहेत.

**मतिसिंह**—उंगपो या चिनी प्रवाशानें हिंदुस्थानांत धारण केलेलें नांव.

**मत्तट गुहिलोत**—( स. ७७३-९३ ) खुम्माणानंतर मेवाडच्या गादीवर आला. याच्यानंतर भर्तृभट्ट गादीवर बसला.

**मत्स्येंद्रनाथ**—( समाधि स. १२१० सुमार ) हा आदिनाथसांप्रदायाचा प्रवर्तक असून हा विष्णूचा अवतार समजला जातो. गोरक्षनाथ याचाच शिष्य होय. हा विक्रम शकापूर्वी सुमारें चारशें वर्षें होऊन गेला. याचा जन्म मत्स्यीच्या पोटीं झाला असून यास बद्रिकाश्रमीं दत्तानें योगमार्गाचा उपदेश केला. यानें सातारा जिल्ह्यांत मत्स्येंद्रगड येथें चैत्र वद्य ५ ला समाधि घेतली. यानें योगमार्गावर 'मत्स्येंद्रसंहिता' नामक ग्रंथ लिहून हठयोग व शाबरी मंत्रतंत्रविद्येचा प्रसार केला. याचा नेपाळांत यात्रोत्सव सात दिवस साजरा होतो ( नाथलीलामृत २, भक्तविजय २९ ). कृष्णाकांठीं शाळूस मत्सिंटरी जोंधळा म्हणतात. नाथांच्या बाह्य वेषाचें वर्णन पुढीलप्रमाणें आहे:

> शैली शृंगी कंथा झोली विभूत लगाया तनमो
> कोटि चंद्रका तेज झुलत है चली आपने गतमो ।
> ( म. वा. इ. भा. १ ).

**मथनसिंह गुहिलोत**—( स. ११९१-१२११ ). मेवाडच्या गादीवर कुमारसिंहानंतर त्याचा पुत्र मथनसिंह आला. कुंभलगडच्या शिलालेखांत याचें नांव महणसिंह असें दिलें आहे. रावळ समरसिंहाच्या वेळचा वि. सं. १३३० ( स. १२७३ ) मधील उदयपूरच्या जवळ चीखागांवच्या शिलालेखांत लिहिलें आहे कीं यानें टांटरड ( टांटेड ) जातीच्या उद्धरण नांवाच्या माणसाला नागऱ्हद नगराचा तलारक्ष ( कोतवाल, नगररक्षक ) नेमला. टांटेड जात सध्यां नष्ट झाली आहे.

**मथुरादास**—'वृषभानुजा' या संस्कृत नाटिकेचा कर्ता. गांव-गंगा व यमुना यांच्या कांठीं सुवर्णशेखर.

**मथुरानाथ**—( ग्रंथकाल स. १७८२ ) हा मालवीय ब्राह्मण काशी येथील संस्कृत पाठशाळेंत पुस्तकालयाच्या कामाकडे स. १८१३ पासून स. १८१८ पर्यंत होता. यास ज्योतिषाचें ज्ञान चांगल्यापैकीं असे. इतकेंच नव्हे, तर यास फार्सी भाषाहि येत असे. यानें 'यंत्रराजघटना' नांवाचा ग्रंथ केला. त्याची ग्रंथसंख्या सुमारें १००० आहे.

**मथुरानाथ तर्कवागीश**—( स. १५७० सुमार ) याच्या वडिलांचें नांव श्रीराम तर्कालंकार असें असून हा आपले वडील व त्यांचे गुरु रघुनाथशिरोमणि ह्या दोघांचाहि शिष्य होय. तर्कशास्त्रावरील टीका यानें 'माधुरी' या नांवानें लिहिल्या. याचे ग्रंथः (१) तत्त्वचिंतामणिरहस्य, ( २ ) तत्त्वचिंतामण्यालोकरहस्य', जयदेवाच्या आलोकावरील उपटीका, ( ३ ) 'दीधितिरहस्य', ( ४ ) 'सिद्धांतरहस्य', ( ५ ) 'किरणावलिप्रकाशरहस्य', वर्धमानाच्या ग्रंथावरील उपटीका, ( ६ ) 'न्यायलीलावतीप्रकाशरहस्य', ( ७ ) 'न्यायलीलावतीप्रकाशदीधितिरहस्य', ( ८ ) 'बुद्धधिकाररहस्य', ( ९ ) 'अयुर्दायभावना', ( १० ) 'आदिक्रियाविवेक'.

मथुरानाथानें निर्देशिलेल्या सुंदर उपाध्याय व हरिनाथ उपाध्याय यांच्याविषयीं कांहीं माहिती उपलब्ध नाहीं.

**मथुराबाई आंगरे**—( स. १७३० सुमार ) ही कान्होजी आंगरे यांची पत्नी व बाकाजी महाडिकाची

कन्या. ही फार कर्तृत्ववान् व मराठी राज्याची अभिमानी होती. हिचा व ब्रह्मेंद्रस्वामींचा पत्रव्यवहार वाचण्यासारखा आहे. हबशाच्या युद्धांत हिनेंच आंग्र्यांच्या तर्फे पुढाकार घेतला होता. ब्रह्मेंद्रस्वामींच्या इच्छेवरून अंजनवेल व गोवळकोट वगैरे कावीज करण्याकरितां हिनें बाकाजी नाईकास पाठविलें. त्या वेळच्या त्यांच्या पराक्रमाचीं हिनें लिहिलेलीं वर्णनें वाचण्यासारखीं आहेत (रा. खं. ३.३०.५६.८५). हिचे पुत्र सेखोजी व संभाजी.

**मदन**—( स. १२१२–१५ ) हा मूळचा बंगाली असून पुढें धारच्या अर्जुनवर्मा परमाराचा हा अध्यापक झाला. याचें दुसरें नांव बालसरस्वती असून यानेंच 'पारिजातमंजरी' ही प्रसिद्ध नाटिका लिहिली. बिल्हणाच्या कर्णसुंदरीप्रमाणेंच हिच्यांतहि तत्कालीन गोष्टींचा उल्लेख सांपडतो. वरील सालांतील यानें लिहिलेले ताम्रपट उपलब्ध आहेत.

**मदनपंत**—मादण्णाचें नामांतर.

**मदनपाल**—( स. ११४२–६१ ) हा बंगाल्यांतील पाल घराण्यापैकीं रामपालाचा मुलगा. याच्या पत्नीचें नांव चित्रमटिका. हा बौद्ध होता तरी याच्या पत्नीनें महाभारत ऐकलें म्हणून एक गांव ब्राह्मणास दिलें ( JRASB ६९,१·६६ ). याच्या वेळेस पालांच्या राज्यास उतरती कळा लागली ( हिं. भा. अ. पा. ३५० ). रामपालाचा नातू गोपाळ हा राज्यावर येऊन अपमृत्यूनें मेल्यामुळें हा गादीवर आला. हा गोपाळचा चुलता होय. रामपालानें स्थापन केलेल्या रामावती या राजधानींत हा राहत असे ( हि. का. मार्च १९२९ ).

**२**. ( ग्रंथकाल स. १३६०–९० ) संस्कृत भाषेंतील धर्मशास्त्रकार. हा टाक कुळांतील राजा. यमुनेच्या तीरावर काष्ठा येथें याचें राज्य होतें. याच्या पित्याचें नांव साधारण, थोरल्या भावाचें नांव सहजपाळ, व आजा हरिश्चंद्र. त्यापूर्वीचीं नांवें अनुक्रमें भवपाळ व रत्नपाळ अशीं आहेत. याचे ग्रंथ–१ आनंदसंजीवन, २ तिथिनिर्णयसार, ३ यंत्रप्रकाश, ४ शूद्रधर्मबोधिनी, ५ सिद्धान्तगर्भ, ६ स्मृतिकौमुदी, ७ मदनपालनिघंटु, ८ वैद्यक. हे सर्व ग्रंथ यानें विश्वेश्वरभट्टाच्या साहाय्यानें लिहिले. मदनपारिजात व मदनमहार्णव ग्रंथ याचेच होत.

**मदनपाल गाहडवाल**—( स. ११०० ) हा चंद्र गाहडवालाचा मुलगा. याची लेखांत मिळणारी माहिती विशेष नवीन कांहीं सांगत नाहीं. याचा पुत्र गोविंदचंद्र. याच्या पत्नीचें नांव पृथ्वीश्रीका असें होतें. हिच्या संमतीनें दिलेल्या दानाचा लेख उपलब्ध झाला आहे.

**मदनवर्मा चंदेल**—( स. ११२८–६५ ) हा पृथ्वीवर्मनूचा पुत्र. यानें सिद्धराज जयसिंह या गुर्जर राजाचा पराभव केला. यानें मदनसागर नांवाचा तलाव बांधला. यानें चेदीच्या राजाचा पराभव केला, माळव्याच्या राजाची कत्तल केली व काशीच्या राजाचा स्नेह संपादन केला. याचा पुत्र वारल्यामुळें याचा नातू परमर्दी गादीवर आला.

**मदनसिंग**—हा छत्रपति संभाजीचा दासीपुत्र. हा दिल्लीच्या बादशहाच्या कैदेंत तीस वर्षें होता.

बाळाजी विश्वनाथ व सय्यद यांची भेट ज्या वेळेस झाली त्या वेळेस हा सुटला ( ता. २३–२–१७१९ ).

**मदनसिंह**—( स. १४२५–५० सुमार ) संस्कृत धर्मशास्त्रकार. यानें 'मदनरत्न' हा ग्रंथ गोपीनाथ, विश्वनाथ, गंगाधरभट्ट व रत्नाकर यांच्या साहाय्यानें लिहिला. या ग्रंथाचे सात उद्योत आहेत व त्यांत आचार, व्यवहार वगैरे विषय आहेत. हा आपणास महाराजाधिराज म्हणवतो. याचा वंश महीपालदेव-दामोदर-देवीदास-सूर्यदास-शक्तिसिंह-मदनसिंह असा आहे.

**मदलंबिका**—बसवाची माता.

**मदारी मेहेतर फरास**—या मुसलमान गृहस्थानें शिवाजीची आग्र्याहून सुटका करण्यास मदत केली. हा शिवाजीचा एकनिष्ठ सेवक होता. ह्याच्या स्वामिनिष्ठेबद्दल शिवाजीनें यास पोशाख, सोन्याचीं कडीं, एक वंशपरंपरा हक्क व राज्याभिषेकाच्या वेळची नरसिंहाची पूजा दिली. याच्या मुलाचें नांव सादुल्ला फरास होय ( मं. त्रै. व. ४ अं. १–४ पृ. ३६–३७ ).

**मदुरान्तकी**—कुलोत्तुंगाची पत्नी.

**मधुकरसा**—(मृत्यु स. १५९३) बुंदेलखंडाचा राजा भारतीचंदाचा भाऊ. भारतीचंद मरण पावल्यावर हा गादीवर बसला. अकबरास हा प्रांत मिळवावयाचा असल्यामुळें स. १५७८ त सादतखान नामक सरदारास ओर्च्छावर पाठविलें. पुढें उभयतांच्या अनेक चकमकी झडून हा अकबरास शरण गेला. तेव्हां बादशहानें याचें राज्य परत दिलें.

**मधुकामार्णव गंग**—( स. १०१९–१०३८ ) हा त्रिकलिंगाच्या प्राच्य गंगांपैकीं पहिल्या वज्रहस्ताचा मुलगा. याची वैदुंबराजकन्या विनया ही पत्नी होय.

**मधुकेश्वर कदंब**—बनवासीच्या कदंबघराण्याचा मूळ पुरुष.

**मधुर**—( स. १३८५ ) विजयनगरच्या दुसऱ्या हरिहर संगमाच्या दरबारीं हा कवि होता. यानें 'धर्मनाथपुराण' नांवाचा ग्रंथ लिहिला

**मधुरवाणी**—( स. १६१४ सुमार ) एक संस्कृत कवयित्री. ही तंजावरच्या रघुनाथ नायक नांवाच्या राजाच्या दरबारांत होती. यज्ञनारायण दीक्षिताच्या साहित्यरत्नाकर-काव्यावरून आणि राजचूडामणीच्या रुक्मिणीपरिणय काव्यावरून रघुनाथ नायक हा स. १६१४–१६६२ पर्यंत राज्य करीत होता, असें दिसतें. याच्या तेलंगी भाषेंतील रामायणाचा हिनें संस्कृतमध्यें अनुवाद केला. या काव्यांत १४ सर्ग व १५०० श्लोक आहेत.

हिचें मूळचें नांव वेगळें असून हिच्या कवित्वामुळें मधुरवाणी असें हिला नांव प्राप्त झालें. ही वीणा वाजविण्यांत कुशल होती. संस्कृत व तेलंगी भाषेंत हिची कवित्वशक्ति अद्‌भुत असून ही शीघ्रकवि होती. तसेंच ही अष्टावधानी असे. नैषधकाव्य व कुमारसंभव यांचे छायानुवाद हिनें केले आहेत. तसेंच हिनें कांहीं चंपूहि लिहिले आहेत. ही अद्वैतमताची होती. हिनें आपल्या आश्रयदात्याची पुष्कळ स्तुति केली असली तरी आपले मातापिता किंवा वंश याबद्दल एक अक्षरहि लिहिलें नाहीं. हिचीं पुस्तकें तैलंगी लिपींत म्हैसूर प्रांतांत सांपडतात ( प्राचीन पंडित और कवि, पा. ७० ).

**मधुरान्तक पोरप्पि चोल**—( स. १२८६–१३१० ) चोल घराण्यापैकीं एक राजा. याला मुसलमानांनीं पदच्युत केलें.

**मधुवैज**—हा लिंगायत असून बसवाचा अनुयायी होता. म्हणून विज्जल राजानें कमरेस दोऱ्या बांधून यास रस्त्यांतून फरपटत ओढून ठार मारलें.

**मधुसूदन**—विद्वद्‌भूषणनामक संस्कृत ग्रंथाचा कर्ता.

**२.** ( हनुमान् पाहा ).

**मधुसूदन ठक्कर**—(स. १५७५) पक्षधरानें आपल्या आलोकांत गंगेशाच्या ग्रंथावर केलेल्या खोडसाळ टीकेचें खंडन करण्यासाठीं यानें 'तत्त्वचिंतामण्यालोककंटकोद्धार' व धाकट्या वाचस्पतिमिश्राच्या 'द्वैतनिर्णया'वर 'कंटकोद्धार' नांवांचे ग्रंथ लिहिले.

**मधुसूदनदास**—या हिंदी कवीचा रामाश्वमेध ग्रंथ प्रसिद्ध आहे.

**मधुसूदन सरस्वती**—(स. १६५० सुमार) विश्वेश्वर व श्रीधर सरस्वतीचा शिष्य आणि पुरुषोत्तम सरस्वतीचा गुरु. यानें अद्वैतसिद्धि, अद्वैतरत्नरक्षण, प्रस्थानभेद, सिद्धांततत्त्वबिंदु वगैरे अनेक ग्रंथ केले. यानें द्वैतवाद्यांच्या भक्तीचा स्वीकार करून द्वैताचें खंडन केलें आणि अद्वैतमताची प्रतिष्ठा वाढविली.

**मध्वनाथ**—या मराठी कवीनें ५४ ओव्यांचें असें एक 'श्रीकृष्णजन्म' या नांवाचें चटकदार प्रकरण लिहिलें आहे. काव्य अत्यंत चटका लावणारें आहे ( मं. वा. इ. श. १८३७ ले. १४५ ).

**२.** एक मराठी कवि. यानें 'गुरुचरित्र' नांवाचा एक ग्रंथ लिहिला. त्या चरित्रांत यानें 'एका जनार्दना'चा गुरु म्हणून उल्लेख केला आहे (मं. वा. इ. शके १८३७, ले. २८).

**मध्वमंदिर**—या कवीनें महाभारततात्पर्य ग्रंथ लिहिला. हा मध्वाचार्यांच्या पूर्वी होऊन गेला.

**मध्वमुनीश्वर**—( समाधि स. १७३१ ) हा प्रसिद्ध सत्पुरुष व कवि देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण असून नाशिक येथें राहत असे. याचें घराणें कट्टर वैष्णव असून ह्याचे गुरु काशीचे अद्वैतानंद हे होत. याच्या संबंधानें निरनिराळ्या ग्रंथकारांनीं परस्परविरोधी माहिती दिली आहे. त्यापैकीं महिपतीची भक्तलीलामृतांतील माहिती विश्वसनीय वाटते. हा महाराष्ट्र कवि अमृतराय याचा शिष्य असावा. याच्या चमत्काराच्या बऱ्याच आख्यायिका प्रसिद्ध आहेत. याचे 'धनेश्वराचें अभंगबद्ध चरित्र', 'सखूचें चरित्र', 'गणेशाष्टक' व कांहीं पदें आणि अभंग प्रसिद्ध आहेत. याच्या त्र्यंबक नामक शिष्यानें आपल्या 'प्रल्हादचरित्र' ग्रंथांत याचा स्पष्ट उल्लेख केला आहे. कान्होजी आंग्र्याचा पंडित भास्करराव याचा यानें वादांत पराभव केला. याचे वंशज अद्याप पैठण व औरंगाबाद या बाजूस आहेत ( म. क. च. भा. १ ला, पृ. ३४४–३५१ ). याची समग्र कविता प्रसिद्ध आहे ( म. पुरस्कृत ग्रं. ३० ). याचें नांव त्रिंबक, वडिल नारायणाचार्य, माता द्वारावतीबाई.

**मध्वाचार्य**—( जन्म स. ११९९–बद्रिकाश्रमप्रयाण स. १२७८ ) द्वैतमताचे प्रख्यात आचार्य. यांचा पिता–मध्यगेह व माता–वेदवती. जन्मस्थळ–उडुपी जवळ (पाजकक्षेत्र). सध्यां तें स्थळ बेल्ली या नांवानें प्रसिद्ध आहे. यांचे गुरु अच्युतप्रेक्षाचार्य होत. यांनीं अध्ययन संपविल्यावर गृहस्थाश्रम न स्वीकारतां एकदमच संन्यास घेतलेला दिसतो. यांनीं हिंदुस्थानांत अनेक वेळां प्रवास करून आपल्या वैष्णवमताचा प्रचार केला.

मध्व असा स्वतंत्र शब्द संस्कृतांत नाहीं. पण यांच्या नांवामुळेंच त्याला संस्कृतांत स्थान प्राप्त झालें आहे ( मं. इ. वृ. १८३५ ). जयसिंह चालुक्या( कल्याणी )नें यांचा सन्मान केल्याचा निर्देश आहे.

याच्या मतें स्वतंत्र व अस्वतंत्र अशीं दोन तत्त्वें आहेत. भगवान् विष्णु हा स्वतंत्र असून तो सर्व सद्गुणांनीं मंडित व दोषरहित आहे; तदितर सर्व अस्वतंत्र आहेत. जीवेश्वरभेद, जडेश्वरभेद, जीवजीवभेद, जीवजडभेद, जडाजडभेद, असे

पांच प्रकारचे भेद यानें मानले आहेत. सच्चिदानंदस्वरूपी परमात्मा हा या सर्व जगाचें मूळ कारण असून तो अंतर्यामी स्वरूपानें सर्व वस्तूंमध्यें राहतो. तो केवळ सुखाचाच तेवढा उपभोग घेतो, दुःखाचा त्याला स्पर्श देखील होत नाहीं. परमात्मा व जीव यांमध्यें मोक्षावस्थेंत देखील कधींच अभेद होत नाहीं. जो दिसतो तो केवळ भ्रम होय. मोक्षावस्थेमध्यें जीवाला मुळींच दुःख होत नाहीं. या अवस्थेमध्यें त्याला क्रीडादि अनेक प्रकारचीं सुखें उपभोगितां येतात. पण परमात्म्याची जी लक्ष्मी, श्रीवत्स व जगदुत्पादकशक्ति हीं तीन वैभवें तीं मात्र जीवाला प्राप्त करून घेतां येत नाहींत. सर्व जीवांना सारखीच मुक्तावस्था मिळत नाहीं. जीव हा ज्ञाता आहे तरी त्याचें ज्ञान मर्यादित आहे. मोक्षप्राप्तीसाठीं जीवानें परमात्म्याची अंकन ( विष्णुचिन्हें अंगावर डागून घेणें ), नामकरण व भजन या तीन प्रकारांनीं सेवा केली पाहिजे. श्रीविष्णूच्या ज्ञानाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि साधनानें मोक्षाची प्राप्ति होत नाहीं. जीव हा सांश व निरंश आहे. या जगाची उत्पत्ति नित्य परमाणूपासून होते. सर्व गुणांनीं युक्त अशा विष्णूच्या ज्ञानानें आपलीं सांसारिक दुःखें नाहींशीं करून जीवानें श्रीविष्णूच्या समीप आनंदानें वास करणें हाच मोक्ष होय. जग हें पारमार्थिक दृष्ट्या सत्य आहे, असें याचें मत होतें.

भक्तिमार्गाच्या चार ( विष्णु—लक्ष्मी—ब्रह्म—वायु ) संप्रदायांपैकीं हा एक संप्रदाय आहे. या पंथांत विष्णूच्या खालोखाल वायूला फार महत्त्व आहे. रामाचा जसा हनुमान् तसा कृष्णाचा वायुपुत्र भीम ( अर्जुन नव्हे ) हा सखा होय. मध्वांच्या धर्मग्रंथांतून महाभारतांत भीमाचीं वर्णिलेलीं अनेक अचाट कृत्यें सोडून त्यानें मणिमत् राक्षसाला मारिलें ( वनपर्व ) हें एवढेंच त्याचें कृत्य महत्त्वाचें गणिलें आहे. यांचे ग्रंथ—

१ गीताभाष्य, २ ब्रह्मसूत्रभाष्य, ३ अणुभाष्य, ४ अनुव्याख्यान, ५ प्रमाणलक्षण, ६ कथालक्षण, ७ उपाधिखंडन, ८ मायावादखंडन, ९ प्रपंचमिथ्यात्वानुमानखंडन, १० तत्त्वसंख्यान, ११ तत्त्वविवेक, १२ तत्वोद्योत, १३ कर्मनिर्णय, १४ विष्णुतत्त्वनिर्णय, १५ ऋग्भाष्य ( पहिल्या चार अध्यायांवर ), १६ दशोपनिषद् भाष्य, १७ गीतातात्पर्यनिर्णय, १८ भारततात्पर्यनिर्णय, १९ भागवततात्पर्यनिर्णय, २० संन्यायविवृत्ति, २१ नरसिंहनखस्तोत्र, २२ द्वादशस्तोत्र, २३ कृष्णामृतमहार्णवम्, २४ सदाचारस्मृति, २५ तंत्रसार, २६ यतिप्रणवकल्प, २७ जयंतीनिर्णय, २८ यमकभारत. हे सर्व ग्रंथ संस्कृतांत आहेत.

**मनभट जोशी उपाध्ये**—( स. १८१८ सुमार ) कृष्णंभट उपाध्यायाचा पुतण्या. आप्पासाहेब भोसल्यानें ह्याच्याचकरवीं परसोजी भोसल्याचा खून करविला, असा त्या वेळीं प्रवाद होता. इंग्रजांचें व आप्पासाहेबांचें सीताबर्डी येथें युद्ध चालू असतां अरब सैन्याचा मुख्य हा होता व यानें त्या लढाईंत शौर्य गाजवलें. आप्पासाहेब याच्या मताविरुद्ध इंग्रजांस शरण गेला तेव्हां यानें इंग्रजांच्या ताब्यांत शहर देण्याचें नाकारलें, परंतु अरब फितुर झाल्यामुळें यास इंग्रजांच्या स्वाधीन व्हावें लागलें, व शेवटीं हा त्यांच्या कैदेंतच मरण पावला. मनभटानेंच नागपूरचें राज्य बुडविलें असा आरोप याजवर केला जातो. परंतु त्यांत फारसें तथ्य नाहीं ( ना. प्रां. इ. ). याच्या घराण्यास आचवळ ऊर्फ रहाळकर असेंहि म्हणतात. या घराण्याचा मूळ पुरुष दादंभट ( रा. पांडववाडी ) हा होय.

**मनरो**—(स. १७६१—१८२७) इंग्रजी राज्याची घडी आरंभीं बसवून देणारा एक इंग्रज सेनापति. धारवाड, सोंडूर, सोलापूर, बदामी इत्यादि ठिकाणच्या संग्रामांत यानें पराक्रम केला. शेवटीं अंगच्या हुषारीमुळें हा मद्रासचा गव्हर्नर झाला. परंतु लवकरच गुत्तीजवळ महामारीच्या उपद्रवानें मरण पावला. हा लेखक असून यानें वेलस्ली, हेस्टिंग्ज इत्यादिकांच्या जयिष्णु कारभाराचा निषेध केला आहे.

**मनसाराम**—( मृत्यु स. १७३९ ) बनारसच्या चेतसिंग राजाचा हा आजोबा व बळवंतसिंगाचा बाप होय. रुस्तुमअली नांवाचा सादतखानाचा हस्तक बनारसचे कारभारावर होता, त्याचे वशील्यानें मनसारामानें बनारस येथ आपला जम बसविला; आणि सन १७३८ त जोनपुर, चुनार व बनारस या परगण्यांची जहागीर मुलगा बळवंतसिंग याचे नांवानें बादशहापासून संपादन केली. त्याच वेळीं बळवंतसिंगास राजाबहादूर हा किताब मिळाला.

**मनाक्ष**—हा नेपाळांतील सोमवंशी राजा. हा निमिषामागून गादीवर बसला.

**मनियारसिंह**—(ग्रंथकाल स. १७८४) एक हिंदी कवि. ग्रंथ—महिम्नभाषा, सौंदर्यलहरी, हनुमतछबीसी, सुंदरकांड.

**मनीराममिश्र**—(स. १७७२) हिंदी कवि. कनोजच्या इच्छाराममिश्राचा पुत्र. ग्रंथ—छंदछप्पनी, आनंदसंगल.

**मनु**—याचा काल बराच अनिश्चित आहे. यानें बृहन्मानसकरण नांवाचा ग्रंथ लिहिला आहे व त्यावर उत्पलकृत टीकाहि आहे. याचा संक्षेप करून मुंजालानें लघुमानस केलें, असें अल्बेरुणी लिहितो. लघुमानस शक ८५४ चें आहे, यावरून बृहन्मानस शके ८०० चें असावें व मनु हा त्याच कालांतील असावा असें वाटतें.

**मनुमासिद्ध**—( स. १२५० ) नेल्लूर येथील सूर्यवंशी राजा. तिक्कन सोमयाजी याचा दिवाण होता.

**मनूची**—( स. १६३९-१७१७ ) एक इटालियन प्रवासी. याचें निकोलो मनूची असें नांव होतें. हा स. १६५६ ते १७१७ पावेतों हिंदुस्थानांत फिरत होता. शिवाजीची व जयसिंगाची भेट झाली तेव्हां हा जयसिंहाजवळ तोफखाना-कामगार होता. संभाजी पोर्तुगिजांशीं लढत असतां हा त्यांचा वकील म्हणून संभाजीकडे गेला होता. हा लोकांत मिसळणारा असून याचें बहुतेक आयुष्य मोगलांच्या दरबारीं गेलें. औरंगजेबाचा वडील पुत्र शहाआलम ( मुअज्जम ) याजपाशीं मनूची डॉक्टर म्हणून पुष्कळ वर्षें राहिला. हा मद्रास येथें मरण पावला, तेव्हां याजपाशीं दीड लाखाची संपत्ति होती. यानें मोगल बादशाहीचा तत्कालीन वृत्तान्त विस्तृत व खुलासेवार लिहिला आहे. त्याचें भाषान्तर विल्यम आयर्व्हिन यानें चार भागांत प्रसिद्ध केलें आहे. संभाजीसंबंधानें यानें शेंपन्नास पानें मजकूर लिहिला आहे. त्यावरून संभाजीच्या पराक्रमाविषयीं आदर वाटूं लागतो. आणि पोर्तुगीज, इंग्रज व मोगल बादशहा यांना त्याची केवढी दहशत पडली होती, हें स्पष्ट कळून येतें. मनूची सर्व मराठ्यांना शिवाजी हेंच नांव देतो.

**मनोरथ**—दामोदराच्या तीन मुलांपैकीं दुसरा मुलगा. याला चार मुलें झालीं ( हि. का. १. ३२-३३ ).

**२.** मंख कवीचा आजा व विश्ववर्ताचा बाप.

**३.** हा आनंदवर्धनाच्या वेळेस होता.

**४.** ( कविताकाल स. १५६३ ) हिंदी कवि. अकबराच्या दरबारांत असे. ग्रंथ-शतप्रश्नोत्तरी.

**मनोहर गुप्त**—काश्मीरी पंडित.अभिनवगुप्ताचा भाऊ.

**मनोहरदास गौर**—अशेरीचा किल्लेदार राजा गोपाळदासचा मुलगा; व राजा विठ्ठलदासचा पुतण्या. स. १६५२ मध्यें यास अशेरी( माहीमजवळ )ची किल्लेदारी मिळाली. पुढें यास स. १६६५ मध्यें माहुली किल्ल्याची (जि. ठाणें) हवलदारी सांगितली. यानें माहुलीच्या किल्ल्याची चांगली तटबंदी केली. उत्तरभागीं पलासगड, मध्यभागीं माहुली, व दक्षिणभागीं भंडारगड मिळून माहुलीचा बळकट किल्ला बनतो. हा किल्ला पुरंदरच्या तहाप्रमाणें (स.१६६५)औरंगजेबाकडे आला. स.१६७० मध्यें तह मोडल्यावर हा किल्ला घेण्याचा प्रयत्न केला, पण याच्या सावधगिरीमुळें शिवाजीला या किल्ल्याचा नाद सोडावा लागला. पण यानें न झेपणारी शिवाजीशीं विरोध करण्याची कामगिरी सोडली व अलावर्दीखान किल्लेदार झाला ( सरकार-शिवाजी पृ. १९०). शिवाजीनें पुढें हा किल्ला घेतला (१६ जून १६७०). ता. ८।२।१६६८ चा एक फार्सी शिलालेख सांपडला आहे. या लेखाचा दगड कांहीं वर्षांपूर्वी रा. के. आ. पाध्ये वकील, ठाणें, यांना तेथील कोर्टाच्या इमारतींत सांपडला. याचें वर्णन डॉ. मोदी यांनीं केलें आहे ( JRASBB, १९१५ ).

**ममता**—तुळसीदासाची माता.

**ममलकत मदारखान मुहम्मद**—( स. १५५७ सुमार ) विजापूरच्या दुसऱ्या अली आदिलशाहाचा दिवाण. यानेंच अलीस गादीवर बसविलें, पण हा लवकरच मेला.

**मम्मट**—( स. ११०० सुमार ) हा महाभाष्यप्रदीपकार कैयट व ऋक्प्रातिशाख्यभाष्यकार उवट यांचा वडील बंधु असून याच्या पित्याचें नांव जैयट असें होतें, असें सुधासागर ग्रंथांत भीमसेनानें म्हटलें असल्याचें डॉ. पिटरसननें लिहिलें आहे ( पिटरसनकृत पहिलें ग्रंथवृत्त, पा. ९४ ). मम्मटाचा जन्म काश्मीरांत झाला, पण अध्ययन काशी येथें झालें व यानेंच आपल्या दोन्ही बंधूंना शिकविलें असेंहि त्या ग्रंथांत म्हटलें आहे. पण भीमदेव हा मम्मटानंतर सुमारें सहाशें वर्षांनीं झालेला असल्यामुळें त्याचें विधान कल्पनेवरच उभारलेलें दिसतें. मम्मट, कैयट, उवट या नांवांतील ध्वनिसाम्यावरून ते भाऊ होत अशी कल्पना त्यानें लढविली असावी. उवटाच्या ऋक्प्रातिशाख्यभाष्यावरून त्याच्या पित्याचें नांव वज्रट असें होतें. तो आनंदपुरवासी असून भोजराजा राज्य करीत असतां त्यानें वाजसनेयसंहिताभाष्य लिहिलें. हा उवटाचा बंधु मानल्यास कैयटाचा बंधु मानतां येणार नाहीं. कारण कैयटाचा पिता जैयट होता व उवटाचा वज्रट होता. नैषधीय चरिताचा कर्ता जो श्रीहर्ष त्याचा मम्मट हा मातुल होता, अशी काश्मीरी पंडितांत प्रसिद्धि आहे ( बुल्हरकृत काश्मीरग्रंथवृत्त, पा. ६८ ).

मम्मट हा मोठा पढिक विद्वान् असून याचें वाचनहि फार विस्तृत होतें असें दिसतें. याचा व्याकरणशास्त्राचा गहन व्यासंग होता. महाभाष्य व वाक्यपदीय या ग्रंथांतील वचनें यानें उद्धृत केलीं असून यानें उपमेचे विभाग व्याकरणशास्त्राच्या दृष्टीनें केले आहेत. विभावनेच्या व्याख्येंत क्रिया शब्द हेतु या अर्थानें योजिला आहे. शब्दांच्या जात्यादि संकेतासंबंधानें विवेचन करतांना वैयाकरणांच्या मतांचा अनुवाद केला आहे व वैयाकरण म्हणजेच पंडित असें समीकरण ठरविलें आहे. ‘ शब्दव्यापारविचार ’ नांवाचा याचा दुसरा एक ग्रंथ असून तो निर्णयसागरांत अभिधा-

वृत्तिमातृकेबरोबर छापला आहे. या ग्रंथांत काव्यप्रकाशाच्या दुसऱ्या उल्लासांतील अभिधा व लक्षण या शब्दवृत्तींचा विचार अधिक सविस्तर केलेला आहे. सन्मानदर्शक राजानक हें विशेषण याच्या नांवामागें लावण्यांत येतें. हा सगळ्या भारतवर्षांत अत्यंत लोकप्रिय असा साहित्यग्रंथकार झालेला आहे, ही गोष्ट काव्यप्रकाशावरील टीकांच्या प्रचंड संख्येवरून दिसून येते. आजवर काव्यप्रकाशावरील सुमारें सत्तर टीका उपलब्ध झाल्या आहेत (पां. वा. काणे यांचा साहित्यशास्त्राचा इतिहास).

मम्मटाच्या हातून काव्यप्रकाश पुरा झाला नाहीं. यानें परिकरालंकारापर्यंतच काव्यप्रकाश रचलेला असून पुढील काव्यप्रकाश अल्लट नांवाच्या कवीनें रचला आहे, असें काव्यप्रकाशावरील माणिक्यचंद्र, सरस्वतीतीर्थ, सोमेश्वर, इत्यादि टीकाकारांचें म्हणणें आहे. त्यांत आनंद कवींनीं आपल्या निदर्शना नांवाच्या टीकेंत पुढीलप्रमाणें म्हटलें आहे: " कृतः श्रीमम्मटाचार्यवर्यैः परिकरावधिः। प्रबन्धः पूरितः शेषो विधायाल्लटसूरिणा।" यावरून काव्यप्रकाश हा ग्रंथ यानें आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धांत रचण्यास प्रारंभ केला असावा.

**मयणल्लदेवी**— ही अनहिलवाडच्या पहिल्या कर्ण राजाची पत्नी. सिद्धराज जयसिंह हा हिचाच पुत्र होय. सिद्धराजाच्या लहानपणीं हीच कारभार पाहत असे.

**मयूर**—( स. ६४८ सुमार ) एक प्रसिद्ध संस्कृत कवि. याच्या बालपणाविषयीं व जन्मस्थानाविषयीं कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. याचा धंदा सर्पवैद्याचा असावा असें, याला विशेषण लावण्यांत येतें त्यावरून दिसतें. हा हर्षाच्या पदरीं होता. यानें मयूराष्टक, सूर्यशतक व इतर बऱ्याच कविता लिहिल्या. ह्याचें सूर्यशतक हें गौडी भाषापद्धतींत लिहिलें असून तें फार नांवाजलेलें आहे. मयूर हा बाणाच्या बायकोचा भाऊ असून तिच्या शापानें कुष्ठरोगी बनला. यानें आपला रोग सूर्याच्या शंभर श्लोकांत प्रार्थना करून घालविला, अशी दंतकथा आहे.

**मयूरवर्मन् कदंब**—( स. ३४०–६० ) हा एकंदर कदंबवंशाचा मूळपुरुष दिसतो. हा मानव्यगोत्री ब्राह्मण होता. याच्या पूर्वी बनवासी येथें चुटुशातकर्णी घराण्यापैकीं हारितीपुत्र, शिवस्कंद वगैरे राजे राज्य करीत होते. हा चालुक्य राजांप्रमाणें आपण हारितीचे वंशज आहों असें म्हणवितो. यानें कांचीच्या पल्लवावर स्वारी करून बनवासीचें राज्य स्वतंत्र केलें.

२. उत्तरेकडील कदंब घराण्यांतील एक राजा. यानें दक्षिणेकडील पुलयांचें राज्य सहाव्या शतकांत नष्ट केलें. यानें स. च्या ६।७ व्या शतकांत ' नवीन कदंब ' वंशाची गादी गोव्याकडे स्थापली. हा वैष्णवपंथी होता. यानें राजपुतान्याकडून सुमारें दोन हजार ब्राह्मण आणविले, अशी दंतकथा आहे. सारा कोंकण प्रांत परशुरामानें समुद्र हटवून निर्माण केला व तो त्यानें ब्राह्मणांस दान दिला. हे ब्राह्मण त्यानें कोंकणांतल्या कोळ्यांपासून निर्माण केले. त्यांचीं जाळीं तोडून त्यांच्यासाठीं जानवीं केलीं. पण ते आचारभ्रष्ट व कृतघ्न झाल्यानें दुसरे ब्राह्मण आणविले, इत्यादि पौराणिक कथांचें तात्पर्य दक्षिण कानडा जिल्ह्याच्या गॅझेटियरमध्यें वर्णिलें आहे. हे दुसरे ब्राह्मण कदाचित् मयूरवर्म्यानेंच आणिले असावेत व ते काठेवाडांतील सारस्वत असावेत. ही ब्राह्मणांची कथा मूळ सह्याद्रिखंडांत आहे.

३. ( स. ११३१ ) हानगलच्या कदंब घराण्यापैकीं तैलाचा पुत्र. हा तैल राजास बाचलादेवीपासून झाला. हा आपल्या बापाबरोबर कारभार करीत होता. पश्चिम चालुक्य तिसऱ्या सोमेश्वराचा हा मांडलिक होता.

**मरळसिद्ध**—हा मुक्तेश्वराचा शिष्य. हा मुक्तेश्वर एकनाथाचा नातू असावा. याचा ' निरंजनभेदु ' नांवाचा दशदेहाचें विवरण करणारा ओवीबद्ध ग्रंथ उपलब्ध आहे ( मं. त्रार्षिक १८३६, क. २५ ).

**मरुलदेव गंग**—( स. ९५३–६१ ) पश्चिम गंगांपैकीं दुसऱ्या भूतुगाचा पुत्र. याची पत्नी बिजब्बे ही राष्ट्रकूटांपैकीं तिसऱ्या कृष्णाची मुलगी.

**मरुसुंदर पांड्य**—ह्याचा सोमशेखरनंतर उल्लेख केलेला आहे. यानें चोल–चेर यांना जिंकलें.

**मर्यमकानी**—( हमीदाबानू पाहा ).

**मर्युम**—विजापूरच्या युसुफ आदिलशहाची मुलगी व पहिल्या बुर्हाण निजामशहाची पत्नी होय.

**मलक्या महार साधु**—( स. १७३० सुमार ) दारव्ह्याजवळ अंजनी येथें मलक्या या नांवाचा एक महार साधु होता. त्याजविषयीं एक पोवाडा त्याचे घराण्यांत उपलब्ध आहे. त्यांत म्हटलें आहे कीं, कान्होजी भोसल्यानें त्या साधूस त्रास दिल्यावरून त्यानें त्यास शाप दिला कीं, तुझें राज्य जाऊन तुझा निर्वंश होईल. त्याप्रमाणें कान्होजीचा अधिकार जाऊन तो कैद झाला. नंतर त्याचा मुलगा रायाजी यानें त्या साधूची फार विनवणी केली, व रायाजीची स्थिति थोडी सुधारली. परंतु

" होयाचं तें झालं तुझ्या कुळीमध्यें अंधार। बोलला सबद माग परतून नाहीं येणार. " असें मलक्यानें सांगितलें व रायाजी निपुत्रिक मरण पावला.

यांतील शाप झाल्याचें कारण जरी सोडून दिलें तरी रायाजी निपुत्रिक मरण पावला ही गोष्ट मात्र त्यानें सिद्ध होते.

**मलमंगलम् नम्बूतिरी**—कालीकत येथील जो झामोरीन राजा त्याच्या दरबारीं हा एक विद्वान् होता. कोचीन संस्थानांतील पेरुमाणम् गांवचा हा राहणारा होय. संस्कृत व मल्याळी भाषेंत यानें ग्रंथ लिहिले.

यानें 'भाषानैषधचम्पु' या नांवाचा ग्रंथ लिहिला. 'शृंगारकवि' म्हणून याची कीर्ति चोहोंकडे पसरली होती. कल्पना, भाषालंकार, खोल विचार वगैरे बाबतींत याच्या वेळीं याला मागें टाकणारा दुसरा कोणी कवि नव्हता. वरीलशिवाय यानें 'आशौचप्रायश्चित्तविधि', 'मलमंगलम्भानम्' आणि 'कोटिविरहम्' हे ग्रंथ लिहिले असें म्हणतात.

**मलयध्वज पांड्य**—कुलशेखर पांड्याचा मुलगा.

**मलयवर्म प्रतिहार**—(स. १२२३-१२३३) ग्वाल्हेर राज्यांत कुरेब येथें याचें एक दानपत्र मिळालें आहे. तें वि. सं. १२७७ मधील आहे. त्यांत हा विग्रहाचा पुत्र म्हणून दिला असून त्याच्या मागील पुरुष प्रतापसिंह व नटुळ असे क्रमानें दिले आहेत. याची माता लाल्हणदेवी होय. लाल्हणदेवीच्या पित्याचें नांव केल्हणदेव असें आहे. याच्या भावाचें नांव नृवर्मा (नरवर्मा). याचीं नाणीं मिळालीं आहेत तीं वि.सं. १२८०-१२९० पर्यंतचीं आहेत. याच्यानंतर याचा भाऊ नृवर्माचें दानपत्र मिळालें आहे.

**मलय्या**—तेलंगी कवि. हा प्रथम ब्राह्मण होता, नंतर लिंगायत झाला. यानें राजशेखर राजाचें चरित्र लिहिलें. तें नंदाल अपय्यास अर्पण केलें (क. च.).

**मलीक अली मुबारिक**—(स. १३४४-१३४६) बंगालचा राजा जो फकिरुद्दीन त्याला यानें ठार मारून तें राज्य आपण घेतलें. हा एक सरदार होता. पण पुढें दोन वर्षांतच हाहि मारला गेला. याच्यानंतर हाजीं-इल्यास ऊर्फ शम्सुद्दीन पूर्वी हा बंगालच्या गादीवर आला. यालाच कें. हिस्टरीमध्यें अलीशाहा असें म्हटलें आहे.

**मलीक अहमद**—(अहमद निजामशाह पाहा).

**मलीक अहमदखान फारुकी**—(स. १३८२-९९) खानदेशांतील राज्याचा संस्थापक. बहामनी राज्याविरुद्ध बंड पुकारणाऱ्या बहरामखान माझंदराणीस मदत करणाऱ्या सरदारांपैकीं मलीक अहमदखान हा एक होता. यास दक्षिणेंतून पळ काढावा लागला तेव्हां तापी नदीचे कांठीं थळनेर गांवीं येऊन यानें ठाणें दिलें. स. १३८२ पर्यंत त्यानें थळनेर भोंवतालचा बराच प्रदेश आपल्या ताब्यांत घेतला. हा या प्रदेशावर स्वतंत्रपणें राज्य करी. यास मलीकराजा किंवा राजा अहमद असें म्हणत. यानें राजसत्तानिदर्शक असें नांव धारण केलें नाहीं. खान म्हणवून घेण्यांतच यास संतोष वाटे. हा आपल्यास खान म्हणवीत असल्यामुळेंच याच्या राज्यास 'खानाचा देश' अथवा खानदेश हें नांव मिळून तें देशनाम कायमचें प्रचारांत आलें.

खानदेशच्या फारुकी राजांचा संस्थापक जो मलीक व हा हे दोघेहि एकच होत.

**मलीक इब्न दिनार**—चेरमाण पेरुमाल राजानें मुसलमान झाल्यावर अरबस्थानांतून हिंदुस्थानांत पाठविलेला मौलवी.

**मलीक उत्तुजार**—(स. १४५३ सुमार) अलाउद्दीन बहामनीचा सरदार. स. १४५३ त यानें कोंकणांतील शिर्क्यांचा पराभव केला. नंतर ज्या वेळेस यानें शिर्क्यास मुसलमान होण्याचा आग्रह केला तेव्हां शिर्क्यांनीं स्वतःच्या सुटकेकरितां यास कोंकणांतील खेळणा परगण्यावर पाठविलें, व तेथील राजानें याचा पराभव करून यास ठार मारलें व मुसलमानांची कत्तल केली. हा मूळचा इराणी तुर्क होय (मु. रि. भा. १, पृ. २२६-२७).

**मलीक करणफुल अथवा मुबारकशाह**—(स. १३९९-१४०२) हा जौनपुरचा राजा असून मलीक सखरच्या मागून गादीवर आला. त्याचा हा दत्तक होय. ह्याच्या राज्यांत जौनपूर, अयोध्या, बिहार, तिरहुत व गंगेच्या दुआबांतील काइलपर्यंतचा प्रदेश मोडत होता. स. १४०१ मध्यें हा कनोजला असतांना मुहम्मदशहा व मल्लूखान वजीर यांनीं जौनपूर घेण्याकरितां स्वारी केली होती, परंतु शेवटीं तह झाला. ह्याच्यानंतर याचा भाऊ शम्सुद्दीन इब्राहीमशाहा गादीवर बसला.

**मलीक कुत्बुल्मुल्क कुत्बशाह**—महमूदशाहानें सुलतान कुलीस स्वतःचा जीव वांचवला म्हणून दिलेली पदवी.

**मलीक खल्जी**—समर प्रांताचा सुभेदार व खल्जीचा मूळ पुरुष. हा प्रथम बल्बनच्या पदरीं होता. याचाच मुलगा जलालुद्दीन फीरूज होय.

**मलीक खाजा लोदी**—मलीक बहरामाचा पुत्र.

**मलीक खुस्रव**—( मृत्यु स. १३२१ ) हा आपला धनी मुबारक खल्जी यास ठार मारून नासिरुद्दीन हें नांव धारण करून दिल्लीचा सुलतान बनला. हा मूळचा परिया म्हणजे अंत्यज असून पुढें मुसलमान झाला. सुलतान झाल्यावर दिल्ली येथें हिंदुपदपादशाही स्थापन करण्याची याची इच्छा होती, असें मुसलमान ग्रंथकार म्हणतात. यानें प्रथम फौजेस वश करून घेतलें होतें. यानें देवलदेवीशीं लग्न केलें व स्वतःच्या नांवाचीं नाणीं पाडलीं. यानें खल्जी घराण्यांतील पुरुषांची कत्तल करून सर्व मशिदींत मूर्ति स्थापिल्या. शेवटीं पंजाबचा सुभेदार गाजी बेग तुघ्लक यानें यास ठार मारलें व तो स्वतः घियासुद्दीन हें नांव धारण करून गादीवर बसला ( मु. रि. भा. १ ला, पृ. १४६–४७ ).

**मलीक (नायब) काफूर ( हजार दिनारी )**—(स. १२९७–मृत्यु स. १३१६) स. १२९७ मध्यें सुलतान अलाउद्दीनाचा सरदार नुस्रतखान यास खंबायत लुटतांना हा तृतीयप्रकृती गुलाम मिळाला. अंगच्या हुषारीमुळें ह्यानें सुलतानाची मर्जी संपादन केली व पुढें हा सेनापति झाला. गुजराथचा राजा कर्ण याची मुलगी देवलदेवी ही देवगिरीस होती. तिला पकडून आणण्याकरितां व ठरलेला करभार देवगिरीहून न आल्यामुळें सुलतानानें तेथील राजा रामदेवराव यादवावर ह्यास पाठविलें. शेवटीं तो शरण आल्यावर तेथें वसुलाकरितां मुसलमान कारभारी नेमून हा परत गेला. तेलंगणच्या तिसऱ्या प्रतापरुद्रदेव काकतीयाचा पराभव करून त्यास मांडलिक केल्यावर ह्यानें दुसऱ्या वल्लाळ होयसलाच्या द्वारसमुद्रावर स्वारी करून व पांड्यांचें मदुरा शहर लुटून अफाट संपत्ति दिल्लीस नेली. ह्यानेंच अला उद्दीनाचें त्याच्या बायकोविषयीं व मुलांविषयीं मन कलुषित करून त्यांना कैद करावयास लावलें. अलाउद्दीनाच्या मागून ह्यानें शिहाबुद्दीन उमर नांवाच्या एका मुलाला गादीवर बसविलें आणि खिजरखान व शादीखान ह्या राजकुमारांचे डोळे काढून त्यांस आंधळें केलें. नपुंसक असतांहि अला उद्दीनाचे बायकोशीं लग्न लावून तिचे दागिने, जवाहीर व खाजगी दौलत बळकाविली व नंतर तिला पुन्हां कैदेंत ठेविलें. पुढें राजवाड्यावरील संरक्षक सैनिकांपैकीं कांहींस मुबारक नांवाच्या तिसऱ्या युवराजाचे डोळे काढावयास पाठविलें. मुबारकनें सैनिकांस राजनिष्ठेच्या कर्तव्याची आठवण दिली. त्यांना जवाहीर देऊन खूष केलें व मलीक नायबचा खून करण्याचे कामगिरीवर त्यानेंच पाठविलेल्या सैनिकांस परत पाठविलें. त्यांनीं आपली कामगिरी पार पाडिली. ७ फेब्रुवारी १३१६ रोजीं सैनिकांनीं मलीक नायब काफूर हजारदिनारीचा वध केला.

**मलीक नासिर फारुकी**—(स. १३९९–१४३७) हा खानदेशांतील फारुकी राजांचा मूळ पुरुष मलीकाचा पुत्र होय. गादीवर आला तेव्हां याच्या ताब्यांत थळनेरचा किल्लाच फक्त होता. परंतु पुढें विश्वासघात करून यानें अशीरगड मिळविला. याचा गुरु झैनुद्दीन याच्या स्मरणार्थ यानें तापीच्या पूर्व थडीवर झैनाबाद व बुऱ्हाणउद्दीन या अवलियाच्या स्मरणार्थ बुऱ्हाणपुर हीं गांवें वसविलीं. अहमद बहामनीच्या मदतीनें यानें गुजराथेवर केलेल्या स्वारींत याचा पराभव झाला व हा लळींगच्या किल्ल्यांत कोंडला जाऊन तेथेंच मरण पावला. यास मिरान नांवाचा मुलगा होता.

**मलीक नीकपाई**—( स. १३३७–३८ ) सुलतान मुहम्मद तुघ्लकानें केलेल्या तिबेटवरील स्वारींत हा मुख्य सेनापति होता. याजबरोबर १ लक्ष घोडेस्वार व तितकेंच पायदळ देण्यांत आलें. हें सैन्य हिमालयाच्या पायथ्याशीं आल्यावर तेथील झोडपाऊस व दमट हवा सहन न झाल्यामुळें परत फिरलें असतांना त्यावर डोंगरी टोळ्यांनीं हल्ला केल्यामुळें हा, दोन अधिकारी व १० घोडेस्वार यांच्याशिवाय बाकीचें सर्व सैन्य गारद केलें. त्या मोहिमेमुळें सुलतानाची तिजोरी रिकामी होऊन त्याचा दराराहि नाहींसा झाला व त्यामुळें शेवटीं तो मूर्ख ठरला.

**मलीक बहराम लोदी**—दिल्लीच्या लोदी घराण्याचा मूळ पुरुष.

**मलीक मकबूल**—( मृत्यु स. १३७३ ) हा मूळचा तेलंगी ब्राह्मण असून पुढें मुसलमान झाला. दिल्लीचा बादशहा मुहम्मद तुघ्लकच्या दक्षिणेवरील स्वारींत हा त्याजबरोबर असतांना ह्यानेंच त्याच्या हुकमावरून भडोच भागांतील वसूलखात्यावरील सर्व अधिकारी लोकांची कत्तल केली. पुढें तो वारल्यावर खोजा जहान नामक सरदारानें घियासुद्दीन मुहम्मद २ रा यास गादीवर बसविलें, हें यास पसंत पडलें नाहीं. शेवटीं फीरुझशाहानें याच्या मदतीनें त्यास पदच्युत करून स्वतः गादीवर बसला व यास आपला वजीर केलें. सुलतान स्वारीवर असतां राज्यांत फार गोंधळ होऊन बंडें होत तेव्हां हा त्यांतून युक्तीनें मार्ग काढीत असे. याच्या मरणानंतर सुलतानानें याच्यावरील प्रेमामुळें याच्या मुलासच याची जागा व किताब दिला.

**मलीक मुघीस खानजहान खल्जी**—( स.

१४३६ ) हा अलीशेरचा पुत्र असून याचा मुलगा महमूदानेंच माळवा प्रांत घोरी राजाचा खून करून बळकाविला.

**मलीक मुहम्मद ज्यायसी**—(स. १५४० सुमार) या हिंदी कवीचा जन्म गाझीपूरला झाला असावा. हा शेख मोहिदीचा शिष्य असून रायबरेली जिल्ह्यामधील जायसचा राहणारा होय. हा कुरूप असून अमेठीच्या राजघराण्यांत याला फार मान मिळत असे. यानें 'पद्मावत' व 'अखरावट' हे ग्रंथ लिहिले. यानें ईश्वर, सृष्टि, जीव वगैरेंचें विवरण लहान लहान पुस्तकांतून केलें आहे. याचा शिष्यगण मोठा असून ते याचें बारोमास काव्य गात असत. अमेठीच्या राजास याच्याच प्रसादानें पुत्रप्राप्ति झाली. स्वतंत्र विषयावर गौडी ( अवधी ) भाषेंत पद्यमय असा 'पद्मावत' हा पहिलाच ग्रंथ होय. यानें हें आपलें काव्य अन्योक्तिपर आहे असें म्हटलें आहे. रत्नावली नाटकाचा याच्यावर परिणाम झाला आहे. नायकाचे भीमसिंहाच्या ऐवजीं रत्नसिंह असें यानें नांव चुकीनें घेतलेलें दिसतें.

**मलीकशाह लोदी**—( स. १३४० ) अफगाण उमराव. यानें मुहम्मद तुघ्लकाचे कारकीर्दीत मुलतानला बंड करून तेथील सुभेदार मलीक बिरझादचा वध केला व मुलतान काबीज केलें. परंतु स्वतः सुलतान याचें पारिपत्य करण्यास निघाला तेव्हां हा व याचे अनुयायी अफगाणिस्थानचे डोंगरांत पळून गेले.

**मलीक सखर खोजा जहान**—( स. १३९३–१३९९) जौनपूरच्या राज्याचा संस्थापक. हा तृतीयप्रकृति मनुष्य प्रथम दिल्लीच्या सुलतानाचे पदरीं असून पुढें वजीर झाला. यानेंच महमूदशहा तुघ्लकास गादीवर बसविलें. यानें गंगेच्या दुआबांतील व अयोध्या परगण्यांतील बंडें मोडल्यावर जौनपुर येथें स्वतंत्र राज्य स्थापलें. नंतर यानें तिरहूत व बिहारमध्यें आपली सत्ता स्थापून बंगालचे सुभेदारास आपला मांडलिक बनविलें. यानें तैमूरलंगाचे स्वारीचे वेळीं दिल्लीच्या बादशहास मदत केली नाहीं. याच्या मागून याचा मुलगा मलीक करमफूल गादीवर आला.

**मलीकंबर**—( स. १५४६–१६२६ ) अहमदनगरच्या निजामशाहींतील प्रसिद्ध दिवाण. हा हबशी गुलाम असून, याला मीर कासीमनें विकत घेतलें. पुढें हा अहमदनगर येथील चंगीझखानाजवळ गुलाम म्हणून राहिला. हा आपल्या धन्यास नेहमीं खूष ठेवून स्वतः थोडक्यांत समाधान मानीत असे. पुढें हा इब्राहीम आदिलशहाचे नोकरीस राहिला. पण यानें त्याच्या हाताखालीं गुलामगिरीची वृत्ति सोडून हा राजकारणांत भाग घेऊं लागला व नंतर हा निजामशाहींत गेला. तेथें यानें चांगली कामगिरी केल्यामुळें याला २५० घोड्यांवरील अधिकाऱ्याची जागा मिळाली. पुढें ज्या वेळेस मोगलांनीं अहमदनगरचें राज्य बुडविण्यासाठीं अहमदनगरवर स्वारी केली, त्या वेळेस यानें आपल्या शौर्याच्या व अकलेच्या जोरावर मोगल सरदारांस पळवून लाविलें. अशा प्रकारें हा विजयी झाल्यानंतर सर्व सरदार यास येऊन मिळाले. या वेळीं याच्या जवळ ७००० सैन्य चांगल्या प्रकारचें होतें. पुढें यानें राज्यावर राजा पाहिजे म्हणून बुऱ्हाणशाहाचा नातू शाह-अली यास आणून गादीवर बसविलें. दुसऱ्या इब्राहीम आदिलशाहाशीं दोस्ती राखण्यासाठीं आपल्या मुलाचें ( फत्तेखान ) लग्न याकूब नांवाच्या त्याच्या गुलामाच्या मुलीशीं केलें. स. १६१४ त जहांगीराचा सरदार खान-खानानें अहमदनगरच्या सैन्याचा पराभव केला, तेव्हां यानें त्याच्याशीं तह केला. पण पुढें यानें आपला गेलेला मुलूख परत मिळविला. यानें मोगल सैन्यावर शहाजी भोसल्याच्या मदतीनें भातवडी येथें फार मोठा जय मिळविला ( स. १६२४ ). त्यामुळें याची कीर्ति चोहोंकडे पसरली गेली; व ह्यामुळेंच याचें वाढतें वर्चस्व सहन न होऊन दुसऱ्या इब्राहीम आदिलशाहाशीं याचा विरोध आला. पण यानें कशाचीहि पर्वा न करतां आपला राज्य वाढविण्याचा उद्योग जारीनें सुरू केला. पुढें हा लवकरच मरण पावला ( स. १६२६ ). याच्याच हाताखालीं लुखजी जाधव व शहाजी भोसले उदयास आले (H. Q., Vol. IX, 624–644 ).

**मलीका जहाज**—( २ इब्राहीम आदिलशाह पाहा ).

**मलूकदास**—(जन्म स. १५७४–मृत्यु स. १६८२) हिंदी कवि. गांव कडा ( जि. अलाहाबाद ). धंदा घोंगडी विणण्याचा. गुरु-विठ्ठलदास. हा गृहस्थाश्रमी होता. याच्या पंथाचे लोक तिकडे आढळतात. हा एकशेंआठ वर्षे जगला. ग्रंथ—रत्नखान व ज्ञानबोध. याचीं वचनें मनोहर आहेत.

**मॅलेट**—( स. १७५२–१७९८ प्रयाण ) हा प्रथम ई. इं. कंपनींत कारकून होता. नंतर मुंबईच्या गव्हर्नरचा सेक्रेटरी व शेवटीं पुणें दरबारीं रेसिडेंट झाला. महीवरील लढाईंत दादाचा पराभव झाला असतांना ह्यानें मदत करून त्यास सुरतेस पोंचविलें. पेशव्यांच्या गादीबद्दल बाळोबा तात्या व शिंदे यांच्या लढ्याचा निकाल लावण्यास यानें मदत केली. महादजी वरचढ होतो असें दिसतांच यानें नानाची कास धरली. मराठ्यांचें सार्वभौमत्व नाहींसें करून त्या ठिकाणीं इंग्रजांचें सार्वभौमत्व

स्थापणाऱ्या मुत्सद्यांत याची गणना होते. यानें सर्व हिंदुस्थानभर प्रवास केला असून पुण्यांत पाश्चात्य औषधांचा पुष्कळ प्रसार केला होता. सर्व मराठामंडळाची मर्जी सांभाळून इंग्रज सरकारचें हित पाहण्याची हुषारी दाखविल्यामुळें ह्यास 'सर' ही बहुमानाची पदवी मिळाली. ह्याचें दुसऱ्या बाजीरावावर फार वजन होतें (म. रि. उ. वि. ३).

**मल्ल**—(स. ९०० सुमार) वेल्लनांडू घराण्याचा संस्थापक. कृष्णानदीच्या दक्षिणेस राज्य करणारें घराणें. यास पिडुवरादित्य असेंहि म्हणत.

**२.** वेल्लनांडू घराण्यांतील पहिल्या एरियाचा मुलगा. हा पूर्वचालुक्य भीम २ रा याचा मांडलिक. याची पत्नी कोल्लपांबा.

**३.** वेल्लनांडू घराण्यांतील दुसऱ्या एरियाचा मुलगा.

**४.** वेल्लनांडू घराण्यांतील नन्नाचा मुलगा. हा गादीवर आला नाहीं.

**मल्ल कदंब**—(स. १२१८) हा हानगलच्या कदंब घराण्यापैकीं कामदेवाचा मुलगा.

**मल्लगुप्त**—(स. ११७५) हा गुप्त घराण्यांतील पहिल्या गुप्ताचा मुलगा. हा आपल्या बापानंतर गादीवर बसला. यालाच मल्लिदेव म्हणत. हा स. १११५ त गोविंदराजाचा मांडलिक होता.

**मल्लज**—तेलगू कवि. बोम्मन पोतराजु नामक राजाचा पुत्र. हा ब्राह्मण होता. रुक्मांगदाचा विंध्यावलीशीं झालेला विवाह यानें वर्णिला आहे. हें वीररसप्रधान काव्य आहे (क. च.).

**मल्लण** किंवा **मल्लप संगम**—(स. १४१२–२१) हा विजयनगरच्या संगम घराण्यांतील पहिल्या देवरायाचा मुलगा. हा गादीवर आला नव्हता.

**मल्लदेव**—(स. १५५१–६९) 'मल्लप्रकाश' ग्रंथाचा कर्ता. ग्रंथ कायस्थ लोकनाथानें याच्या नांवानें लिहिलेला दिसतो. याचा पिता गांग राठोड. जोधपूरचा मालदेव व हा एकच होत.

**मल्लनार्य**—(स. १३७०) कानडी कवि. गुब्बीच्या मल्लनार्यानें 'वीरशैवामृत', 'शिवभक्तपुराण', 'भावचिंतारत्न' यांसारखे पुष्कळ ग्रंथ रचले.

**मल्लपदेव चालुक्य**—(स. १२०२) पिठापुरम् येथील चालुक्य घराण्यापैकीं एक प्रमुख शूर राजा.

**मल्लयव्वी संगम**—विजयनगरच्या संगम घराण्यापैकीं देवरायाची दुसरी बायको.

**मल्लवादिन्**—(स. ८२७ सुमार) एक श्वेतांबर जैन. यानें बौद्धतर्कशास्त्रावरील न्यायबिंदुटीका या ग्रंथावर 'धर्मोत्तराटिप्पणक' नांवाची टीका लिहिली. हा शिलादित्य राजाच्या बहिणीचा मुलगा होता. यानें जैनधर्माची पुनर्घटना करून शत्रुंजयावरील आदिनाथाच्या मूर्तीस पूर्ववैभव प्राप्त करून दिलें (हिस्टरी ऑफ इंडियन् लॉजिक).

**मल्लादेवी संगम**—विजयनगरच्या संगमवंशांतील दुसऱ्या हरिहराची पट्टराणी. ही देवगिरीच्या रामदेवरावाच्या वंशांतील होती. हिला मल्लांबिका असेंहि म्हणत.

**मल्लापा वासकर**—हा वारकरी पंथांतील विख्यात भक्त. जातीचा लिंगायतवाणी होता. एकदां महादजी शिंदे पंढरपुरास आले असतां मल्लापाच्या दर्शनास गेले. महादजीस विद्येचाहि बराच संस्कार होता. त्यानें पुष्कळ अभंग केले होते व भगवद्गीतेवर माधवदासी या नांवाची ओवीबद्ध टीका थोडक्यांत केली होती. तीं दोनहि पुस्तकें त्यानें मल्लापापुढें ठेवलीं व आपणहि एकदां अवलोकनांत आणावींत अशी यास विनंति केली. तुकारामाचे अभंग व ज्ञानेश्वरीसारखी भगवद्गीतेची रसाळ टीका वाचणाऱ्या या भाविक वारकऱ्यानें महादजीदेखतच त्याची कविता वाचली. तों अभंगांत तुकारामाचीं वाक्यें जशींच्या तशींच उतरून घेतलेलीं यास आढळलीं. तेव्हां 'उष्ट्या पत्रावळी करोनिया गोळा। दाखविती कळा कवित्वाची॥' ही तुकारामाची कविता म्हणून या स्पष्टवक्त्या पुरुषानें त्याची थट्टा केली व माधवदासींतील कित्येक ओव्या वाचून हंसून म्हणाला कीं, 'ही दासी खरीच, ज्ञानेश्वरीसारखी आई नव्हे. त्या आईचें दुग्धपान करायचें सोडून ह्या दासीच्या नादीं कोणीं लागूं नये!'

पूर्वी महादजीनें कित्येकांस आपली कविता दाखविली होती. तेव्हां तोंडपुजेपणा करून सर्वांनीं माना डोलविल्या. परंतु मल्लापाच्या भेटीच्या वेळीं महादजीस आपली खरी योग्यता समजली. पुढें त्यानें त्याचा उपदेश घेतला. तेव्हां वासकरानें त्याच्या गळ्यांत तुळशीची माळ घातली. फावल्या वेळीं हीच माळ हातांत घेऊन पाटीलबाबा भगवन्नामाचा जप करीत असे (भा. व. खं. ३ ऐ. गो. पृ. २२) याचाच फड वारकरी लोकांत सध्यां प्रमुख समजला जातो.

**मल्लारि**—(स. १६०२) याचा जन्म विष्णूच्याच कुळांत झाला. यानें ग्रहलाघवावर टीका लिहिली आहे. पण तींतील टीकाकाल मात्र चमत्कारिक रीतीनें दिला आहे. टीकेचा काल शके १५२४ असावा असें दिसतें.

मल्लारीचे टीकेंत ग्रहलाघवाची उपपत्ति लिहिली आहे. ग्रहलाघवासारख्या ग्रंथाची उपपत्ति लावणें हें सिद्धांताच्या उपपत्तीपेक्षां कठीण आहे, तरीसुद्धां यानें आपल्या विद्वत्तेनें तें काम तडीस नेलें ( भा. ज्यो. ).

**मल्लांबिका**—( मल्लादेवी संगम पाहा ).

**मल्लिकार्जुन**—( स. १२४५ ) कानडी भाषेंतील ग्रंथकार. 'शब्दमणीदर्पणा'चा कर्ता जो काशिराज, त्याचा हा पिता. हा वीरसोमेश्वराच्या (स.१२३४–१२५४) वेळीं होऊन गेला. यानें 'काव्यसार' नांवाचा ग्रंथ लिहिला. त्यांत यानें पूर्वी झालेल्या सर्व कवींच्या कवितांचा १८ विषयांखालीं मोठा उपयुक्त संग्रह करून ठेविला आहे.

**मल्लिकार्जुन कदंब**—( स. ११३२–४४ ) हा हानगलच्या दुसऱ्या तैलप कदंबाचा पुत्र. याला त्रिभुवनमल्लरस म्हणत. हा स. ११३२–३५ पर्यंत तिसऱ्या सोमेश्वराचा आणि स. ११४४ मध्यें दुसऱ्या जगदेकमल्लाचा जहागीरदार होता. हा आपल्या बापाबरोबर कारभार करीत असे.

**मल्लिकार्जुन रट्ट**—( स. १२०४ ) हा कार्तवीर्य रट्टाच्यानंतर गादीवर आला.

**मल्लिकार्जुन शिलाहार**—( स. ११५५–७५ ) हा ठाण्याच्या शिलाहारांपैकीं हरपालाचा मुलगा. यानें राजपितामह ही पदवी धारण केल्यामुळें गुजराथच्या कुमारपाल चालुक्यानें कोंकण जिंकण्याकरितां आपला सेनापति अंबड यास पाठविलें. बलसाडजवळ लढाई होऊन अंबडाचा पराभव झाला. पण अंबड पुनः तयारी करून आला व त्यानें याचा पराभव केला. इतकेंच नव्हे, तर जगदेव परमारानें याला ठार मारलें. याचे दोन लेख स. ११५६ व ११६० ( चिपळूण व वसई ) चे मिळाल्याचें गॅझेटियरमध्यें लिहिलेलें आहे. परंतु त्यांचा पत्ता तेथें दिलेला नाहीं ( हिं. भा. अ. पा. ३६६–६७ ).

**मल्लिकार्जुन संगम**—( स. १४४६–६५ ) हा विजयनगरच्या दुसऱ्या देवरायाचा पुत्र. याचा भाऊ विरूपाक्ष. याला 'प्रौढप्रताप', 'इम्मडि', 'विजय', वगैरे पदव्या होत्या. याचे पुत्र राजशेखर व विरूपाक्ष. याच्यानंतर याचा भाऊ विरूपाक्ष गादीवर आला.

**मल्लिनाथ**—एकोणिसावे तीर्थंकर ( तीर्थंकर पाहा ).

**२.** ( स. १४५० सुमार ) हा सुप्रसिद्ध टीकाकार पंधराव्या शतकांत झाला असावा. याची टीका खालील ग्रंथांवर आढळतेः–रघुवंश, किरात, माघ, नैषधीयचरित, मेघदूत, विद्याधरप्रणीत एकावली ( टीकानाम तरल ). वरदराजकृत तार्किकरक्षेवर मल्लिनाथाची टीका आहे.

याला पुत्र दोन. पेद्दयार्य व कुमारस्वामिन् सोमपीथी. कुमारस्वामिन्‌ची प्रतापरुद्रीयावर रत्नापण नांवाची टीका आहे ( पेद्दयार्य पाहा ).

**मल्लिनाथ संगम**—( स. १३६२ ) विजयनगरच्या संगमवंशांतील पहिल्या बुक्करायाचा हा पांचवा मुलगा. याला हरिहर २ रा, कप्पन ३ रा, विरूपाक्ष व भास्कर असे चार भाऊ होते. याला चेन्नप्पा किंवा वान्नप्पा या नांवाचा एक मुलगा होता.

**मल्लिसेनसूरि**—( स. १२९२ ) उदयप्रभसूरीचा शिष्य व नागेंद्रगच्छशाखेचा जैन. याची हेमचंद्राच्या 'वीतरागस्तुति' (अन्ययोगव्यवच्छेदिका) अथवा द्वात्रिंशिका या ग्रंथावर 'स्याद्वादमंजरी' नांवाची टीका आहे.

**मल्लुगि यादव**—हा यादवांपैकीं पहिल्या सिंघणाचा पुत्र. याच्यानंतर पांचव्या भिल्लमापर्यंत या वंशाची नीट माहिती मिळत नाहीं.

**मल्लू आदिलशाह**—( राज्यकाल स. १५३४ ) हा विजापूरच्या आदिलशाही घराण्यांतील इस्माईलचा थोरला मुलगा. याच्या बापाच्या म्हणण्याप्रमाणें याला असदखान नांवाच्या सरदारानें गादीवर बसविलें. हा गादीवर आल्यावर याची वर्तणूक असदखानास पसंत न पडल्यामुळें, त्यानें जागेचा राजीनामा दिला. याचे राज्यांत फारच अंदाधुंदी होती. यानें लोकांचा नानाप्रकारानें छळ केला. हा दारू, नृत्यगायनादि अनेक दुष्ट व्यसनांत निमग्न होता. शेवटीं याचें वर्तन अगदींच बेफामपणाचें झाल्यामुळें याच्या आजीनें एका सरदाराच्या हातून यास पकडून, याचे डोळे काढविले; व याच्यानंतर याचा भाऊ इब्राहीम यास राज्यावर बसविलें. यानें एकंदर सहा महिने राज्य केलें.

**मल्लूखान**—( स. १२ नोव्हेंबर १४०५ वध ) हा महमूदशाह तुघ्लकच्या कारकीर्दींत एक उपद्व्यापी सरदार होता. यानें दिल्लीचा कारभार आपल्याकडे राहण्यासाठीं नानातऱ्हेनें खटपट केली. स. १३९८ त तैमूरलंगाचे सैन्यास तोंड देण्याकरितां हा बादशाहासह निघाला, पण याचा पराभव होऊन हा पळून गेला. शेवटीं खिजतरखान नांवाच्या मुसलमानानें याजवर हल्ला करून दिपालपूरजवळ याचा वध केला.

**मल्हार दादो बर्वे**—( मृत्यु स. १७४८ ) हा बाळाजी विश्वनाथाचा साहाय्यक होता. यानें शाहूला चांगली मदत केली. हा पंढरीच्या विठोबाचा भक्त होता.

याची मुलगी मनुबाई ही कृष्णराव महादेव जोशास दिली होती.

**मल्हारभट देऊळगांवकर**—( स. १६४८ ) हा देऊळगांवचा कुलकर्णी व ग्रामजोशी. हा पुढें शहाजीच्या पदरीं राहून त्याजवरोबर कर्नाटकांत गेला. स. १६४८ मध्यें शहाजीबरोबर हाहि विजापूरकरांच्या तुरुंगांत होता. हा सुटका व्हावी म्हणून शंकराच्या अनुष्ठानास हातांत जीभ धरून बसला होता ( मराठी दप्तर रु. १ ). सुटका झाल्यावर यास शिंगणापुर येथें राहावयास सांगून तेथील उत्पन्न दिलें. यास विनोदानें शंभूभट म्हणत. याचा मुलगा मुद्गलभट. याच घराण्याकडे पुढें छत्रपतिघराण्याचें उपाध्येपण आलें. सध्यां हें घराणें राजोपाध्ये व पंडितराव या नांवानें सातान्यास प्रसिद्ध आहे.

**मल्हारराव पानसे**—( स. १७७६ ) पेशवाईंतील एक सैन्याधिकारी. स. १७७६ मध्यें यास हरिपंतानें गोविंदराव गायकवाडावर पाठविलें होतें.

**मल्हारराव रघुजी कदम ( बांडे )**—यास छत्रपति शाहूनें आपली मुलगी गजराबाई दिली होती ( शा. रो. ९२ ).

**मल्हारराव रामराव चिटणीस**—( ग्रंथकाल स. १८१० ) हा प्रतापसिंह छत्रपतीचा चिटणीस होता. हा सखाराम हरीचा जांवई होता. यानें मराठी राजांच्या बखरी लिहिल्या. यानें लिहिलेलें सप्तप्रकरणात्मक शिवचरित्र परिश्रमपूर्वक लिहिलें आहे. त्याचा लेखनकाल स.१८१० आहे.

**मल्हारराव होळकर**—( जन्म स. १६९३ एप्रिल ५-मृत्यु स. १७६६ मे २० ) इंदूर राज्याचा संस्थापक. हा जातीनें धनगर असून पुणें जिल्ह्यांतील होळगांवचा ( नीरेच्या कांठीं ) राहणारा. लहानपणीं बाप वारल्यावर हा आपल्या खानदेशांतील तळोदें या मामाच्या गांवीं राहिला. याची पत्नी गौतमा ही याची मामेबहीण होती.

हा प्रथम बढवाणीकराकडे चाकरीस होता. नंतर बांड्यांचे लष्करांत मामा बारगळांच्या वतीनें काम करी. तेथून बाजीरावानें यास आपणाकडे घेतलें.

हा बाजीराव पेशव्याकडे साधारण शिपाई म्हणून लागला आणि पुढें वाढत जाऊन ( स. १७२५ ) माळव्यांतील चौथाई व सरदेशमुखी गोळा करण्याचें काम पवार व शिंदे यांच्याबरोबर याचेकडे सोपविण्यांत आलें. मोकासा बाबतींत थोडीशी रक्कम तोडून देण्यांत आली ( स. १७२८ ).

शिंदे होळकरांची चुरस राणोजीच्या वेळेपासूनच होती. ' मल्हारराव व राणबा एके जागा राहत नाहींत ' असा उल्लेख स. १७४५ पूर्वीच्या कागदांत आहे ( पु. द. १·१५९ ). ईश्वरसिंग व माधोसिंग यांच्या प्रकरणांत ती उघड झाली ( स. १७४६ ). पेशव्यांचीहि सत्ता यावर चालत नसे. यानंतर यानें जोधपूरच्या रामसिंगाचें प्रकरण मिटवलें ( पु. द. १·१५७ ).

दिल्लीच्या सफदरजंग वजीरानें बोलावल्यावरून हा, शिंदे व बादशाही सैन्य यांनीं अन्तर्वेदींत बहादुरखान रोहिल्याचा पूर्ण पराभव केला ( २० मार्च ). अहमदखान बंगष प्रयागाकडे पळाला होता. तो फर्रुखाबादेकडे आला. त्यालाहि यानें पिटाळून लावलें (स.१७५१ एप्रिल १९).

त्याबद्दल वजीरानें यास तीन कोट रुपये व पंचवीस लक्षांचा मुलुख अंतर्वेदींत देऊं केला ( रा. खं.३·३८३ ). रोहिल्यावर मिळविलेल्या ह्या अपूर्व जयानें मराठ्यांची इभ्रत वाढली व दिल्लींत मराठ्यांचा वचक बसला. तथापि रोहिल्यांचा पुरा मोड झाला नव्हता. पावसाळा संपल्यानंतर पुन्हां लढाईस सुरुवात झाली. व मार्चमध्यें तह झाला ( को. द. १,९३,९६ ). ९ मार्चास रोहिल्यांपासून साठ लाख रुपये घेऊन त्यांचा निम्मा मुलुख मराठ्यांस देण्यांत आला. व काशीची सनदहि वजीरानें दिली ( रा. खं. ३,४७१ ). भालकीच्या तहाचे वेळीं हा हजर होता ( १७५३ जानेवारी ). कुंभेरीला वेढा पडून त्यांत याचा पुत्र खंडेराव मारला गेला. त्यामुळें हा चिडून इरेला पेटला तेव्हां सर्वांनाच त्रास झाला. ' सुरजमल्लाचा शिरच्छेद करीन व कुंभेरीची माती यमुनेंत टाकीन नाहीं तर प्राणत्याग करीन ' अशी यानें प्रतिज्ञा केली होती असें भाऊसाहेबाचा बखरकार म्हणतो. मीर शहाबुद्दीनविरुद्ध बादशहा व वजीर हे जाटास मदत करतात असें समजतांच यानें अहमदशाहास कैदेंत टाकून दुसऱ्या आलमगिरास गादीवर बसविलें ( ता. ३ जून १७५४ ).

या वेळीं उत्तर हिंदुस्थानांतील प्रमुख राजकारणें याच्या तंत्रानें चालत असत.

यानें गाजीच्या मीर शहाबुद्दीन नांवाच्या मुलास जाटाविरुद्ध मदत करून जाटाच्या मदतीस आलेल्या दिल्लीच्या बादशहाचा पराभव केला ( स. १७५४ ). यानें राघोबादादास साहाय्य केलेलें दिसतें. तथापि पेशव्यांनीं उत्तर हिंदुस्थानच्या कारभारांत ढवळाढवळ करणें यास पसंत नव्हतें. त्यामुळें पेशव्याविरुद्ध नजीबासारखीं माणसें राखण्याचा यानें प्रयत्न केला. दत्ताजी शिंदे अब्दालीशीं लढत असतां यानें येण्यास उशीर केला ( पे. द. २·११७ ), त्यामुळें दत्ताजी पडला. पुढें यानें

गंगाधर यशवंत चंद्रचूडाच्या प्रमुखत्वाखालीं अब्दालीशीं धावपळीचें युद्ध करण्याचा प्रयत्न केला. पण याला त्यांत यश आलें नाहीं. खुद्द पानपतच्या युद्धाच्या वेळीं भाऊसाहेबांशीं पटत नव्हतें तरी हा त्यांना साहाय्य करीत होता. शेवटीं पळांत हा निघून आला आणि त्यामुळें पुष्कळ लोक वांचले. सदाशिवरावानें बायकामुलें सुरक्षित घेऊन जाण्याचें काम याच्यावर सोंपविलें होतें असें 'होळकरांची थैली' या सवाई माधवरावाच्या वेळीं लिहिलेल्या बखरींत म्हटलें आहे ( रा. खं. ३·१७२ ).

यानंतर राक्षसभुवनच्या लढाईत ( स. १७६३ ) जाटानें दिल्लीस घातलेल्या वेढ्यांत (स.१७६४) हा होता. सुजाउद्दौल्याच्या मदतीस इंग्रजांविरुद्ध गेला होता तेव्हां याचा मोड झाला ( स. १७६५ मे २० ), ही गोष्ट यास फार लागली होती. राघोबाच्या उत्तरेकडील मोहिमेंत ( स. १७६६ ) यानें भाग घेतला होता.

हा व उदाजी यांची बाजीरावावर फारच छाप होती. बाजीराव चिमाजीलाहि यांची मर्जी सांभाळण्याविषयीं लिही (पे. द. १३·३०,३३). पण बाजीरावानंतर पेशव्यांचें लक्ष आक्रमणापेक्षां सत्तेचें केंद्रीकरण करण्याकडे लागलें. तेव्हां मल्हाररावासारखीं स्वतःच्या कर्तबगारीवर पुढें आलेलीं माणसें त्यांना जुमानीनात. आणि त्याचें स्वतः सुरक्षित राहण्याचें धोरण त्यांना स्वार्थीपणाचें दिसू लागलें. वास्तविक मुख्य सत्तेबद्दल आदर ठेवून स्वतःचेंहि आसन स्थिर ठेवण्याचें याचें धोरण होतें.

हा जाटाच्या पारिपत्याकरितां अलमपुरास ( दतिया ) आला आणि तेथें यानें वैशाख शु. ११ मंगळवारीं दोन प्रहरीं देह ठेवला (ता.२०-५-१७६६). मृत्युसमयीं याचें वय ७३ वर्षांचें होतें. हरकूबाई मागें राहिली. गौतमाबाई आधींच वारली होती. द्वारकाबाई व बजाबाई यांनीं सहगमन केलें. क्रियेस दीड दोन लक्ष रुपये खर्च व्हावयाचा होता असा निर्देश आहे. यास गौतमाबाईपासून खंडेराव नांवाचा एक मुलगा झाला, तो कुंभेरीच्या वेढ्यांत ता. १७-३-१७५४ रोजीं गोळी लागून मरण पावला. उदाबाई व सीताबाई अशा दोघी मुली मल्हाररावास असून उदाबाईचें सासर वाघमारे यांजकडे होतें. तुकोजी होळकर याचा नातलग होता. त्यास यानें हाताखालीं ठेवून वाढविलें. हा तुकोजीच अहल्याबाईच्या वेळच्या मुलुखगिरींत प्रमुख होता.

**२.** ( मृत्यु स. १७९७ ) तुकोजीचा पुत्र. पुणें येथें मारामारींत मेला.

**मसहफी**—( जन्म स. १६४३—मृत्यु स. १८२३ ) एक उर्दू कवि. याचें नांव गुलाम हमदानी. याला सुलेमान शुकोहचा आश्रय होता. याचे सहा दीवान आहेत. याची कबर लखनौंत आहे ( क. कौ. ४ ). याच्या चांगल्या कविता विकल्या गेल्यामुळें वाईट कविता शिल्लक राहिल्या.

**मसूद**—( स. १६८६ ) हा विजापूरच्या शेवटल्या सिकंदर आदिलशाहाचा वजीर. सिदीजोहार ऊर्फ सलाबतखानाचा जांवई. याच्याच वेळीं स. १६८६ मध्यें औरंगजेबानें विजापूरचें राज्य खालसा केलें.

**मसूद खल्जी**—( स. १२५० सुमार ) हा मलीक खल्जीचा पुत्र. याला शिहाबुद्दीन किंवा नस्त्रुद्दीन म्हणत. याला अलाउद्दीन व अल्मस बेग अशीं दोन मुलें होतीं.

**मसूद गझनवी**—( अलाउद्दौला मसूद ऊर्फ अल्करीम गझनवी पाहा ).

**२.** ( स. १०४९ डिसें. २२ ) मौदूद गझनवीनंतर त्याच्या या तीन वर्षांच्या मुलास गादीवर बसविलें. पण गझनीच्या उमरावानें २९ डिसेंबरला याला पदच्युत करून याचा चुलता अली अबू अल् हसनला अमीर केलें.

**३.** ( स.१०१०–४० ) हा हिंदुस्थानावर बारा स्वाऱ्या करणाऱ्या महमूद गझनवीचा पुत्र. यानें आपला भाऊ मुहम्मदकडून राज्य घेतलें व त्याला आंधळा केलें (अरियारुक व तिलक पाहा ). तथापि याच्या सैन्यानें मुहम्मदला पुनः राज्य दिलें; व याला तुरुंगांत टाकलें. नंतर त्याचा मुलगा अहमद गादीवर बसला, व त्यानें याचा वध केला.

**मसूदखान घोरी**—( स. १४३५ ) माळव्याचा सुलतान गझनीखान घोरी याचा हा मुलगा. हा आपल्या बापानंतर गादीवर आला. याच्यानंतर माळव्यांत खल्जी घराणें राज्य करूं लागलें.

**मसीती**—युसफ आदिलशहाची मुलगी व अहमद बाहमनीची पत्नी.

**मस्तानी**—(मृ. स.१७४०) ही बाजीराव पेशव्याची रक्षा असून हिचा वंश बांदा संस्थानांत राज्य करीत आहे. हिच्या मुलाचें नांव समशेरबहाद्दर असें होतें. बाजीरावाला ही छत्रसालाकडून किंवा निजामाकडून मिळाली अशा आख्यायिका आहेत. पण ही बाजीरावानें नादीं लावून आणलेली घरगुती स्त्री असून हिच्या आप्तांनीं तक्रार केल्याचें एक पत्र उपलब्ध आहे ( पे. द. ९. ३६ ). बाजीराव हिच्या नादीं लागलेला पाहून चिमाजीआपा व राधाबाई यांना वाईट वाटे. त्यांनीं बाजीरावाला हिला सोडण्यासाठीं नानातऱ्हेनें समजावून सांगितलें, पण त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. बाजीरावानें हिला राहण्यासाठीं शनवारवाड्यांत स्वतंत्र जागा बांधली व त्या दरवाजाला

'मस्तानी दरवाजा' असें नांव दिलें. एकदां तर चिमाजीआपानें हिला कैदेंत ठेविलें होतें; परंतु ही तेथून बाजीरावाकडे पळून गेली. हिला पावळ, केंदूर हीं गांवें इनाम होतीं. ही बाजीरावानंतर लवकरच मेली असें दिसतें. हिची कबर पावळ येथें आहे.

हिला मद्यप्राशनाचा नाद असल्यामुळें तो नाद बाजीरावास लागला होता, व ही फार रूपवान् असल्यामुळें बाजीराव प्रेमांध व विलासी बनला. ही नृत्य व संगीत यांत कुशल होती.

बाजीराव फार प्रेमांध व विलासी होऊन मस्तानीच्या आधीन झाला, त्या वेळीं नानासाहेबांनीं गुप्त कारस्थानें करून मस्तानीस वश करून घेण्याचा प्रथम प्रयत्न केला, हें बाबुराव गणेश याच्या ता. १९ ऑगस्ट १७३९ च्या नानासाहेबास लिहिलेल्या पत्रावरून दिसून येतें (इतिहाससंग्रह पु. १ ले, अंक ८ वा, पृ. १० ऐतिहासिक चर्चा).

ह्या पत्रांत नानासाहेबाचें व मस्तानीचें विशेष मित्रत्व जडल्याचा उल्लेख आहे. परंतु मस्तानीस त्याचा खरा हेतु समजतांच पुढें तें मित्रत्व टिकलें नाहीं.

**मस्तानीचा वंश**

बाजीराव (मस्तानी)
|
समशेरबहादूर (स. १७३४ ते ६१)
|
अलीबहादूर (स. १७५८-१८०२)
|
- समशेरबहादूर (स. १७८४-१८२३)
- झुल्फिकार अली (मृ. १८२३)
  |
  अलीबहादूर (मृ. स. १८७३)

**महमवानी शिलाहार**—(स. १०४०-७०) हा ठाण्याच्या शिलाहारांपैकीं अरिकेसरीचा तिसरा मुलगा. हा आपला भाऊ नागार्जुनाच्या नंतर गादीवर आला. याचा कल्याणपासून सहा मैलांवर असणाऱ्या अंबरनाथ स्टेशनाजवळ आम्रनाथाच्या मंदिरावर एक शिलालेख सांपडला आहे. तो स. १०६० चा असून त्यांत याच्या नांवाचा महमवानी असा उच्चार आहे. हें नांव दुसरीकडे मामवानी किंवा मुम्मुनी असें आढळतें. या लेखांत असें म्हटलें आहे कीं, जुन्या कच्च्या देवळाऐवजीं दगडाचें देऊळ राजगुरूनें बांधलें. देवळाजवळ त्याच सालचा आणखी एक शिलालेख इमारत बांधल्याबद्दल सांपडला आहे. या वेळीं परमार हतप्रभ झाले होते व कदंब प्रबळ होते.

**महल्ल सोलंकी**—सोरठचा राजा. याचा थोरला भाऊ कल्ल.

**महमूद**—(स. १५०२-१५२८) मुलतानचा राजा. हा पहिल्या हुसेनशाहाचा मुलगा. हा मेल्यावर याचा मुलगा (दुसरा) हुसेनशाहा गादीवर आला.

२. (स. १५३३-३८) बंगालचा राजा.

**महमूद खल्जी**—(स. १४३५-७५) माळव्याचा राजा. हा माळव्यांतील खल्जी घराण्याचा संस्थापक. यानें माळव्याच्या घोरी घराण्यांतील गज्नीखानास ठार मारून माळव्याचें राज्यपद बळकावलें. याच्या बापाचें नांव मलीक मुघीस खानजहान खल्जी. हा फार शूर व चतुर होता. हुशंगशाहानें सुरू केलेली मशीद यानें पुरी केली. यानें राज्यांत हिंदूंना त्रास दिला नाहीं. याच्यानंतर याचा मुलगा घियासुद्दीन गादीवर बसला (कुंभकर्ण गुहिलोत पाहा).

२. (स. १५११-१५२६) माळव्याचा राजा. हा नासिरुद्दीन खल्जीचा मुलगा. याचा मुख्य कारभारी मेदिनीराय नांवाचा रजपूत सरदार होता. पुढें याचें व मेदिनीरायाचें, नोकरींत हिंदूंचा भरणा केल्यामुळें वांकडें येऊन हा गुजराथच्या मुज्फरशाहाची मदत मिळविण्यासाठीं पळून गेला. पण शेवटीं याचा खून झाला (स. १५२६); व मेदिनीरायाचा पराभव होऊन माळवा प्रांत गुजराथच्या राज्यास जोडला गेला.

**महमूद गझनवी**—(स. ९६७-१०३०) हा गझनवीचा सुलतान. हा सबक्तगीनाचा दासीपुत्र होता. यानें 'सुलतान' ही पदवी स. ९९८ त घेतली. हा शरीरानें बळकट असून, मोठा महत्त्वाकांक्षी होता. यानें हिंदुस्थानावर एकंदर अकरा स्वाऱ्या करूत, सबंध पंजाब प्रांत हस्तगत केला. याची स. १०२४ मधील सोरटी सोमनाथावरची स्वारी फार प्रसिद्ध आहे. ह्या स्वारींत याला अगणित द्रव्यलाभ झाला. यानें इराणवर स्वारी केली. नंतर याला मधुमेहाचा विकार जडून, त्याच विकारानें वयाच्या त्रेसष्ठाव्या वर्षी ता. ३० एप्रिल सन १०३० रोजीं हा मरण पावला. हा पैशाचा अतिशय लोभी होता. मरतेसमयीं हा आपल्या संपत्तीचें शेवटचें दर्शन घेत असतां यास रडूं कोसळलें. हिंदुस्थानावर स्वाऱ्या करण्याचा जो यानें एकसारखा पंचवीस वर्षे उद्योग केला, त्यामुळें हिंदुस्थानांत येण्याची वाट मुसलमानांना परिचयाची झाली, व त्यांना आपणास हिंदुस्थान जिंकतां येईल असा

आत्मविश्वास वाटूं लागला. हा विद्वानांचा आश्रयदाता होता. यानें गझनवी येथें एक पाठशाळा स्थापून तिच्यांत पुस्तकालय, पदार्थसंग्रहालय, व विद्वान् शिक्षक वगैरेंची उत्तम तरतूद केली. यानें दरसाल विद्वान् मंडळींच्या उत्तेजनार्थ तीस लाख रुपयांची नेमणूक केली होती.

महमूदच्या स्वारीचे वेळची हिंदुस्थानची राजकीय परिस्थितिः विंध्यपर्वताचे उत्तरकडील प्रदेश—

( १ ) हिंदू 'शाहीय' राजवंशाचें राज्य. सिंधु नदीचे कांठीं असलेलें 'ऊंद' राजधानी. लल्लीय ब्राह्मणानें हा राजवंश स्थापन केला. स. ९९० चे सुमारास महमूदानें या राजवंशाचा उच्छेद केला. ( २ ) पंजाबः राजधानी 'भातिंद'. राजे जयपाल १, आनंदपाल, जयपाल २, भीमपाल. स. १०२१ मध्यें भीमपाल अजमीरला पळून गेल्यावर प्रांत महमूदाचे राज्यांत दाखल झाला. ( ३ ) सांभर अथवा अजमीरः चौहाण घराण्याचें राज्य. ( ४ ) दिल्ली, तोमर राजघराणें. (५) चितोडः गुहिलोत घराणें. ( ६ ) कनोजः गुर्जरप्रतिहार घराणें. हर्षाचे वंशज. ( ७ ) जिहोती ( आधुनिक बुंदेलखंड ): चंदेल्ल राजघराणें. चंदेल्ल गोंड लोकांपैकीं गोंड लोकांनीं उत्तरेकडे राज्यविस्तार सरकवीत नेऊन कनोजचे सरहद्दीपर्यंत आपली सरहद्द नेऊन भिडविली होती. यमुनेस ते आपली सरहद्द समजत. (८) गुजराथः चालुक्य घराणें अथवा सोळंकी घराणें. चावर घराण्यास पदच्युत करून सोळंकींनीं हें राज्य मिळविलें. (९) जाट लोकः वस्ती सिंधूचे कांठीं, मुलतान व सुलेमान पर्वतांचे ओळीमधील प्रदेश. ( १० ) चेदीः जिहोतीचे दक्षिणेकडील प्रदेश. कलचुरी अथवा हैहय घराणें. गोंडलोकांपैकीं. ( ११ ) माळवाः परमार घराणें स. ९०० चे सुमारास स्थापना. ( १२ ) बंगालः पाल घराणें ( गोपालानें आठव्या शतकांत हा राजवंश स्थापिला. ) राजधानी ओदंतपुरी ( विहार ). ( १३ ) कामरूप अथवा असामः कोच राजघराणें. तिबेटी—चिनी वंशापैकीं पूर्णपणें हिंदु झालेलें. (१४) काश्मीरः कर्कोटक राजघराणें. (१५) ग्वाल्हेरः कच्छवाह रजपूत घराणें. बहुधा जिहोतीचे मांडलिक ( केंब्रिज हिस्टरी व्हा. ३, पा. ५०५ ).

**महमूद गवान**—( स. १४०३–८१ ) हा बेदरच्या बाहामनी राज्यांतील प्रसिद्ध इराणी प्रधान. हा मूळ इराणांतील राजघराण्यांतील होता. यानेंच विजापूरचें राज्य स्थापणारा युसुफ आदिलशाहास एका व्यापाऱ्याकडून विकत घेतलें, व त्याला याच्या मृत्यूनंतर बाहामनी राजानें विजापूरचा सुभेदार नेमलें. हा वयाच्या चाळिसाव्या वर्षी हिंदुस्थानांत आला. याच्या अंगचे गुण पाहून यास हुमायूनशाहाचे कारकीर्दींत 'मलीक-उत्-तुजार' हा किताब मिळाला; व बाहामनी राजा मुहम्मदशाहानें याला 'ख्वाजेखान' असा किताब दिला होता. हा कवि होता. याच्या कवितांपैकीं 'रोझन–उल्–इनशा' ही कविता प्रसिद्ध आहे. शेवटीं याला मुहम्मदशाहा बाहामनीच्या हुकमानें जोहर नांवाच्या हबशी गुलामानें ठार केलें. यानें मरणापूर्वी अहमदाबाद बेदर येथें एक पाठशाळा बांधली होती.

याची योग्यता त्या वेळीं सर्व लोकांत फार होती. तत्कालीन मुसलमानांमध्यें इतका शहाणा व थोर मनुष्य निपजला नाहीं, असें समजतात. हा निःस्वार्थी व एकनिष्ठ होता. औदार्यानें व निःपक्षपातानें यानें केलेल्या सुधारणा, युद्धकलेंत दिसून आलेलें याचें चातुर्य व धीटपणा, याची अप्रतिम न्यायबुद्धि आणि खाजगी व सरकारी संबंधांत परोपकार करण्याची इच्छा इत्यादि अनेक गुणांनीं इतिहासांत याचें नांव अजरामर झालें आहे. याच्यापाशीं अगणित संपत्ति होती. तिचा व्यय हा गोरगरिबांना दानधर्म करण्यांत करी. एकदां तर राजानें आपला झगा याचे आंगांत घातला होता ( मु. रि. भा. १ ला, पा. २३३-३४ ).

**महमूद ( गुजराथ ) बेगडा**—( स. १४५९–१५११ ) गुजराथचा सुलतान. हा फार जुलमी व पराक्रमी होता. याला बेगडा हें टोपणनांव होतें. यानें स.१४६८त काठेवाडवर स्वारी करून, तो देश काबीज केला. पुढें यानें स. १४८३ मध्यें चांपानेरच्या जयसिंगावर स्वारी करून, त्यास ठार मारलें. स. १५१० त यानें पाटणवर स्वारी केली. व नंतर हा मरण पावला. हा तापट होता.

**२.** ( स. १५२६ ) गुजराथचा सुलतान. हा दुसऱ्या मुजफ्फरशहाचा मुलगा.

**३.** ( स. १५३७–५४ ) गुजराथचा सुलतान. हा तिसऱ्या लतीफखानाचा मुलगा. हा राज्यकारभारांत निष्णात होता. वजीर बुर्हाण-उल्मुल्क बाबीनें याचा खून केला.

**महमूद गुलाम**—( मृत्यु स. १२८५ ) हा गुलाम वंशांतील बल्बनचा मुलगा. याला याच्या बापानें तैमूरशाहाच्या फौजेशीं लढाई करण्यासाठीं पाठविलें. यानें मोगलांचा पूर्ण मोड करून गेलेला प्रदेश मिळविला ( स. १२८३ ). स. १२८५ मध्यें हा परत मोगलांवर चालून गेला व लांबपर्यंत त्यांचा यानें पाटलाग केला, पण मोगल सैन्य उलटून त्यांनीं याला ठार मारलें.

**महमूद तुघ्लक**—(नासिरुद्दीन महमूद तुघ्लक पाहा).

**महमूद बाहामनी**—( स. १३५७–७४ ) हा बाहामनी वंशांतील अलाउद्दीन हसन कांगोचा पुत्र. याला मुहम्मद म्हटलेलें आढळतें.

२. ( स. १३७८–९६ ) बाहामनी राजा. हा अलाउद्दीनाचा मुलगा. हा विद्वान्, दयाळू व सद्गुणी होता. यानें विद्येस उत्तेजन दिलें. याच्या वेळीं दुर्गादेवीचा दुष्काळ पडला होता.

३. ( स. १४८२–१५१८ ) दुसऱ्या मुहंमदशाहा बाहामनीचा हा मुलगा. याच्या कारकीर्दीत शिया व सुनी या दोन पंथांचे तंटे विकोपास जाऊन त्यांतच बाहामनी राज्याची अखेर झाली. हा चैनबाजींत नेहमीं निमग्न असे; याचा अधिकार कोणी जुमानीत नसे.

**महमूद लोदी**—( स. १५१७ सुमार ) हा लोदी घराण्यांतील निजामखानाचा मुलगा. याला इब्राहीम, इस्माईल व हुसेन असे तीन भाऊ होते. यांपैकीं इब्राहीम दिल्लीच्या गादीवर आला.

**महमूदशाहा शर्की**—( स. १४३६–१४५७ ) जोनपूरचा राजा. हा शम्सुद्दीन इब्राहीमशहाचा मुलगा. यानें माळव्याचा सुभेदार नासिरशाहा याच्यावर त्याच्या दुर्वर्तनाबद्दल स्वारी केली; व तह केला ( स.१४१४ ); व माळव्याच्या राजाच्या सांगण्यावरून राधनची सुभेदारी दिली. पुढें यानें बहलोल लोदीचा पराभव करण्यासाठीं दिल्लीवर चाल केली, पण त्यांत याच्या सैन्याचा पराभव होऊन हा परत आला. परत बहलोल लोदी जोनपुरावर चालून आला असतां, या दोघांत मित्रत्वाचा तह झाला व राज्याच्या सीमा ठरविण्यांत आल्या. परत यानें बहलोलवर स्वारी केली. कारण त्यानें राज करण नांवाच्या एका हिंदूची नेमणूक सुभेदारीवर केल्यामुळें याला राग आला. पण युद्धाचा शेवट होण्याचे अगोदरच हा मरण पावला.

**महाकश्यप**—बुद्धदेवाच्या एका प्रमुख शिष्याचें हें नांव आहे. हा महातीर्थ या गांवचा राहणारा होता. याच्या पित्याचें नांव कपिल. याचें नांव प्रथम पिप्पल असें होतें. बुद्धदेवानें आपल्या तिसऱ्या चातुर्मास्यांत याला प्रव्रज्या दिली. बुद्धदेवाच्या निर्वाणानंतर शतपर्णी गुंफेंत यानें पांचशें भिक्षूंसहित अधिनायकाचें आसन स्वीकारून अभिधर्म नांवाच्या त्रिपिटिकावर प्रवचन केलें, त्या वेळीं याला महास्थविर अशी उपाधि दिली.

**महाकुलतिष्य**—( सनाचें पहिलें शतक ) सिंहलद्वीपचा राजा. कोरांग राजाचा वडील भाऊ (ग्या. इं. को.).

**महागुत्त**—( मागुत्त पाहा ).

**महादजी कृष्ण जोशी**—( स. १७०२ ) साताऱ्यास याचा व भानूचा परिचय होता म्हणून हा भानूस जाऊन भेटला व त्याचे मार्फत भोरास शंकराजी नारायण सचीव यांजकडे नोकरीस राहिला. बाळाजीची स्थापना ताराबाईच्या हातानें यानें रांगणें मुक्कामीं केली, असाहि उल्लेख आहे ( पं. सं. ब्र. ले. १-२ ). बाजीरावाची बायको काशीबाई ही याची मुलगी होती.

**महादजी गदाधर**—( स. १७३४ ) हा गदाधर प्रल्हादाचा मुलगा. हा वरील शकांत अमात्यपदावर होता. याचा शरीरसंबंध अत्रे घराण्याशीं दिसतो. नाशिक जिल्ह्यांत चांदवडकडचे हे असावेत. दे. ऋ. ब्रा. ( मं. त्रै. व. ७; पे. द. ४४ ).

**महादजी गायकवाड**—(स. १७३२) हा पहिल्या पिलाजी गायकवाडाचा भाऊ. यानें बडोदा जिंकून राजधानी केली.

**महादजी गोमाजी पानसवळ ऊर्फ खंडेराव**—( स. १६८७ ) पन्हाळगडीं यास सेनापति नेमलें. हा मेल्यावर संताजी घोरपडे सेनापति झाले.

**महादजीपंत पुरंदरे**—( मृत्यु स. १७६० ) हा अंबाजीपंताचा दुसरा मुलगा.

हा पेशव्यांचा मुतालिक होता ( स. १७४०–५० ). हा नानासाहेबांच्या बरोबर नेहमीं पुण्यास व स्वारींत असे. स. १७५० हा मध्यें सखाराम बापूच्या मसलतीनें पेशव्यांवर रुसून घरीं बसला ( रा. खं. ६, पृ. ६० ). परंतु पुढें लवकरच याची समजूत झाली ( रा. खं. ६ पृ. ७१ व ८१ ). यानें निजामावरील स्वारींत पराक्रम केल्यामुळें यास नानासाहेबांनीं फौजेंत सरदारी दिली. याला एक पुत्र असून त्याचें नांव नीळकंठ असें होतें. याचा पेशव्यांशीं झालेला पत्रव्यवहार बराच उपलब्ध आहे.

२. (मृत्यु स.१७९१) हा नीळकंठ महादजीचा मुलगा.

**महादजी बल्लाळ लष्करी**—( स. १७८९ सुमार ) हा वणीचा राहणारा होता. जात ऋ. देशस्थ ब्राह्मण. मुधोजी भोसल्यानें काशीराव लक्ष्मण प्रभू यास आपल्या खाजगी कामाकडील कारभारी म्हणून नेमिलें व त्याचे जोडीस यास दिलें.

हा पुढें प्रसिद्धीस आला. स. १७८९ मध्यें चिमणाजी बापू यास रघूजी व त्याचा विश्वासू कारभारी यांनीं मूठ घालून मारलें अशी बातमी उठली होती.

फार्स्टरनें केलेल्या नागपूरच्या वर्णनांत तो म्हणतो—

" रघूजीची मर्जी भवानी काळूवर मुळींच नसून तो त्याला कामावरून काढण्याच्या खटपटींत आहे. रघूजीच्या मनांत यास दिवाणगिरीवर नेमावयाचें आहे.

कारण महादजी हा कोणाजवळ द्रव्य आहे ह्या गुप्त बातम्या रघूजीस देतो व त्यांचेकडून पैसे उकळण्याच्या युक्त्या रघूजीस सांगतो; त्यामुळें याचेवर रघूजीची मर्जी आहे. " ( ना. प्रां. इ. ).

**महादजी भोसले**—बिंबाजी भोसल्याची बायको आनंदीबाई हिचा हा कारभारी होता (ना.प्रां.इ.पा.२१४).

**महादजी राम पारसनीस**—याला दोन मुलगे होते, त्यांचीं नांवें अनुक्रमें विठ्ठल व त्रिंबक अशीं होतीं. हा व याचे मुलगे आंग्र्याविरुद्ध मानाजीस मिळाले होते. त्यासंबंधांत यास मानाजीनें पत्र लिहिलेलें प्रसिद्ध आहे ( ३० मे १९०५ केसरी ).

**महादजी शामराज**—( स. १६५७ ) हा शिवाजी-महाराजांचा सुरनीस होता ( पत्रसारसंग्रह ७२२ ).

**महादजी शिंदे**—( जन्म स. १७२७–मृत्यु स. १७९४ फेब्रु. १२ ) प्रसिद्ध मराठा वीर व मुत्सद्दी. हा राणोजीला चिमाबाई नांवाच्या रजपूत बाईच्या पोटीं झालेला मुलगा. राणोजीच्या पश्चात् हा पेशव्यांच्या खासगी पागेंत असल्यामुळें आणि स्वाऱ्यांवरहि जात असल्यामुळें युद्धकलेचें व मुत्सद्दीपणाचें यास शिक्षण मिळालें होतें.

यानें प्रथम तळेगांव–उंबरीच्या लढाईंत शौर्य गाजवून नांव मिळविलें. यानंतर औरंगाबाद ( स. १७५१ ), साखर खर्डा (स. १७५६) व पंजाबकडील (स. १७५९) मोहिमांत हा हजर होता. निजामाला मिळालेल्या जानोजी भोसल्यास शह देऊन यानें परत आणलें. सदाशिवरावाबरोबर हा पानपतावर गेला होता, पण शेवटीं पळांतून हा सुरक्षित आला. वाटेंत एका पठाणानें डाव्या पायावर वार करून यास कायमचें लंगडें केलें, पण राणाखान नांवाच्या शिपायानें याला शेवटपर्यंत निभावून आणलें ( स. १७६१ ).

गोहदच्या जाटावर राघोबानें स्वारी केली. तींत प्रथम शिंद्यांच्या दौलतीतर्फे मुख्य म्हणून यानें प्रथम भाग घेतला ( स. १७६६–६७; ईश्वरसिंग पाहा ). नंतर याला सरदारीचीं वस्त्रें मिळालीं ( ता. १८-११-१७६८ ).

केदारजी व मानाजी फाकडे शिंद्याची सरदारी आपणांस मिळावी असा प्रयत्न करीत होते.

विसाजी कृष्णानंतर दिल्लीकडे पुनः लक्ष देण्याची नाना-महादजींच्या मनांत कल्पना आली आणि त्यांना बंगाल-कडे मोर्चा वळवावा असेंहि वाटलें ( स. १७७९ ), पण सालबाइच्या तहानंतर ( १७८२ मे १७ ) इंग्रजांविरुद्ध आपणहून कुरापत काढणें याला बरें वाटेना. यापूर्वी यानें स्वतंत्रपणें इंग्रजांशीं तह केला होताच ( स. १७८१ आक्टो. १३ ). दिल्लीच्या बादशाहीवर इंग्रज, मराठे व जाठ हे लक्ष ठेवून होते. दिल्लींत इंग्रजांना योग्य तऱ्हेचा पाठिंबा नव्हता. मीर्झा नजबखान मेल्यावर अधिकारासाठीं भांडणाऱ्या हमदानी व मीर्झा शफीनीं यास समक्ष भेटून याला बादशाहीची व्यवस्था लावण्याविषयीं सांगितलें ( स. १७८२ जुलै ९, चमेलीतीर; रणजितसिंग जाट पाहा ).

पण मीर्झा शफीचा ( नजबखानाचा पुतण्या ) मुहम्मद बेग हमदानीनें ( आग्र्याचा सुभेदार ) खून केला ( स. १७८३ सप्टें. २३ ). तसेंच अफरासियाबखान ( नजबखानाचा मुलगा ) हा मराठ्यांची मदत घेतो म्हणून हमदानीचा भाऊ जैनुल आबिदीनखानानें त्याचाहि खून केला. सारांश, मराठ्यांची मदत घेणाऱ्याचा विरुद्ध पक्षांनीं खून करण्याचा सपाटा सुरू केला.

यांनींहि डिभाईच्या हाताखालीं सैन्याची तयारी सुरू करून आग्र्यास बादशहाची भेट घेतली ( स. १७८४ जुलै ). बादशहांनीं पेशव्यांना वकील मुतलकी आणि याला मीरबक्षीगिरी दिली ( स. १७८४ ). नंतर यानें जयपूरचा प्रतापसिंह कच्छवाह व रणजितसिंह जाट यांचा हळुहळू बंदोबस्त केला. पुढें यास दरबार भरवून मीरबक्षीगिरीचीं वस्त्रें देण्याचा समारंभ झाला (स.१७८५ मे १ ). यानंतर शीख व मुसलमान एक झाले आणि त्यांना शहाजादा जवानबख्त सामील झाला. पाटीलबावा-जवळ सैन्य पुरेसें नव्हतें. मराठी अधिकारी मिजासींत राहतात म्हणून यानें सर्व अधिकारी हिंदुस्थानी नेमले. जुना कारभारी माधव गंगाधरला कारभारांतून काढलें आणि जिवबादादा बक्षीलाहि तुरुंग दाखविला. नौबतराय बक्षीला सैन्याची बक्षिगिरी दिली; आणि जयपूर-जोधपूरकरावर खंडणीकरितां स्वारी केली. तेव्हां याच्याविरुद्ध एकंदर लोकमत होऊन सैन्यहि फितुर झालें.

लालसोट येथें जयपूर–जोधपूरवाले आणि मुसलमान हे एकत्र होऊन यास विरोध करण्याकरितां उभे राहिले. खंडेराव हरी, अंबाजी इंगळे, शिवाजी विठ्ठल व धारराव शिंदे वगैरेंनीं जोरानें तोंड दिलें. हमदानी मेला, पण याचे हिंदुस्थानी अधिकारी फितुर झाल्यामुळें लढाईंत अपयश आलें ( स. १७८७ ). याच वेळीं दिल्ली व बादशहा ताब्यांत घेऊन गुलामकादरनें कहर केला. दिल्लीस बादशहाच्या संरक्षणाकरितां ठेवलेला लाडोजी देशमुख भयानें बादशहास न विचारतां रातोरात पळाला. महादजीला वेळेवर मदत कोणाकडूनहि झाली नाहीं ( अलीबहादर व तुकोजी होळकर पाहा ). यानें उज्जयनीच्या स्वतःच्या वाड्यांतील रुपें काढून सात लक्ष रुपये उभे केले आणि

संकटकाल वारला. हलुहलूं यानें मथुरावृंदावन ताब्यांत घेतलें व शेवटीं लखबादादांनीं गुलामकादरचाहि पूर्ण समाचार घेतला ( १७८८ मे ).

रजपुतांनीं शेवटपर्यंत याला विरोध करण्याची कमाल केली. त्यांनीं शहाजादा अहसनवख्त यास. दिल्लीच्या गादीवर बसवून यास विरोध करण्याचें ठरविलें, आणि दोन्ही सैन्यांच्या पाटणजवळ दोन लढाया झाल्या. पहिल्या लढाईत निकाल लागला नाहीं म्हणून दुसरी लढाई झाली. या लढाईमध्यें मराठ्यांचा चांगलाच जय झाला. त्यामुळें रजपूत पूर्ण ताब्यांत आले आणि इस्माईल-बेगचाहि निकाल लागला, तेव्हां हा निर्वेध झाला. याच्या या कृत्यांनीं मराठ्यांचें राज्य यानें परमोच्च बिंदूला नेऊन पोचविलें.

मथुरा शहर याचें फार आवडतें होतें. उत्तरेंतील सात वर्षांचा याचा काल बहुतेक मथुरेच्या छावणींत गेला. मथुरावृंदावनच्या सनदा बादशहानें यास दिल्या (स.१७९० ऑगष्ट). सर्व हिंदुस्थानांत गोवधबंदीचें फर्मानहि बादशहाकडून यापूर्वीच यानें मिळविले होतें ( ता. ४।९। १७८९ ). काशी व काशीविश्वेश्वर मंदिर यांची व्यवस्था मात्र याला करतां आली नाहीं. नंतर हा दक्षिणेकडे परत फिरला. बीड येथें मनसुरशाहा गुरूचें दर्शन घेऊन ५ मेला तुळजापुरास आला. तेथें भोपे कदमाच्या मुलीशीं लग्न केलें आणि ११ जून रोजीं पुण्यास संगमावर दाखल झाला. ता. ११ जून १७९२ पासून ता. १२।२।१७९४ पर्यंत २० महिने पुण्यास मुक्काम झाला. पैकीं पहिलें एक वर्ष काय तें कामांत गेलें व पुढें ८ महिने आजारी-पणांत गेले. दिल्लीच्या कारभाराप्रमाणें पुण्याचा कारभारहि आपल्या ताब्यांत असावा अशी याची इच्छा असणें स्वाभाविक होतें. पण त्याकरितां हीन दर्जाचें कारस्थान करण्याचा किंवा लष्करी सामर्थ्याचा उपयोग करण्याचा यानें कधीं प्रयत्न केला नाहीं. द्रव्यबळाचाहि उपयोग करण्याची याची इच्छा नव्हती. आपली महत्त्वाकांक्षा राज्यहिताच्या आड हा केव्हांहि येऊं देत नसे. आपणच फक्त राज्यहित करणारे आणि इतरांच्याजवळ ती भावना नाहीं अशी प्रौढीची वागणूकहि हा करीत नसे. त्यामुळें पुण्याच्या दरबारांत याचें सारखें वजन वाढत चाललें. पण मराठी राज्याच्या दुर्दैवानें हा लवकरच नवज्वरानें वानवडी येथें मृत्यु पावला. मृत्युसमयीं याचें वय ६७ वर्षांचें होतें.

यास अकरा लग्नें करूनहि पुत्रसंतति नव्हती. फक्त लाडोजी शितोळे यांस दिलेली बाळाबाई ही एकच मुलगी होती. याची बीडचा मुसलमान साधु मनसूर व उज्जयनीच्या दत्तनाथ या दोन साधूंवर श्रद्धा असे.

हा मध्यम उंचीचा काळासावळा गृहस्थ असून कृष्णभक्त होता. याचे कांहीं अभंग, पदें व ज्ञानेश्वरीदासी नांवाचा ग्रंथ आहे ( मल्लापा वासकर पाहा ). याच्या वेळीं उज्जयनी ही शिंद्यांची राजधानी होती. ग्वाल्हेर येथें लष्कर असे.

**महादजी सदाशिव गोडसे**—हा रघुनाथराव पेशव्यांच्या अत्यंत विश्वासांतील असून गंगाबाई पेशवे हिला पुरंदरावर पोंचविण्याचें काम यानें केलें ( मं. त्रै. ९. ४. पा. ५ ).

**महादेव**—अशोकाच्या प्रेरणेनें भरलेल्या तिसऱ्या बौद्ध महासभेंत याला महीशमंडलांतील मुख्य प्रचारक नेमलें होतें. महीशमंडल म्हणजे म्हैसूर प्रान्त असें स्मिथ म्हणतो ( अशोक, पा.४४ ). यानें तेथें 'देवदत्तसुत्तन्त'चा उपदेश केला ( महावंश ).

२. नामदेवाचा वडील मुलगा.

३. ( स. १३५७ ) 'कामधेनुकरणाचा ' कर्ता. गोदाव-रीच्या कांठचे त्र्यंबकेश्वरीं राज्यसभेंत कौंडिण्यगोत्री बोपदेव नांवाचा एक सामान्य ब्राह्मण होता, त्याचा हा पुत्र होय. यानें केलेल्या ग्रंथांत ३५ श्लोक आहेत व २२ कोष्टकांच्या पटांत तिथिसिद्धि होते असें म्हटलें आहे ( भा. ज्यो. ).

४. ( स.१६६२,६८,७३ ) महादेव (मतिमत् प्रधान) रांझेकर हा कांहीं दिवस शिवाजीमहाराजांचा पेशवा होता. हा शामराज नीळकंठानंतर पेशवा झाला ( शि. च. सा. २.२१९-२२०; २५३-५६ ).

५. याच्या पित्याचें नांव कान्हजित द्वाडप. याला रैवत राजाचा आश्रय होता. याचा कुंडप्रदीप नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध आहे.

६. ( स.१६९३ ) कृष्णसूर्याचा पुत्र. गोत्र कौंडिण्य. याचें 'अद्भुतदर्पण' नांवाचें नाटक आहे. हा तंजावर प्रांतांत पाळमाखेरीचा राहणारा. याला तंजावरच्या शहाजीचा आश्रय होता. याचा गुरु बाळकृष्ण. उन्मत्तराघवकर्ता महादेवशास्त्री व हा एकच कीं काय हें सांगतां येत नाहीं.

७. तुकारामाचा वडील मुलगा.

८. यानें चक्रेश्वरानें अर्धवट लिहिलेला ग्रंथ पुरा केला. परशुराम व पद्मनाथ याचे पिता व पितामह होत. गांव रासिण ( गोदाकांठ ). हा गुजराथी असावा.

**महापात्र नरहरि बंदीजन**—( स. १५०५-१६१० ) हिंदी कवि. अकबरानें यास महापात्र ही पदवी दिली. याचे 'रुक्मिणीमंगल', 'छप्पय्यनीति' व 'कवितासंग्रह' हे तीन ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

**महादेव काकतीय**—( स. ११९१–९९ ) हा पहिल्या प्रतापरुद्र काकतीयाचा धाकटा भाऊ. याच्या मातेचें नांव मुप्पलादेवी. याचा मुलगा गणपति हा प्रतापरुद्रानंतर गादीवर आला. तेव्हां हा कारभार पाही. जैतुगी यादवाच्या लढाईंत हा मारला गेला.

**महादेव दीक्षित**—सत्याषाढ श्रौतसूत्रावरील वैजयन्ती नांवाची टीका करणारा. ही वैजयन्ती टीका पहिल्या सहा प्रश्नांवर आहे व शेवटल्या अठ्ठावीस, एकोणतीस प्रश्नांवरहि वैजयन्ती नांवाची टीका आहे आणि तिचाहि महादेवशास्त्री कर्ता आहे. पण हे दोघे टीका करणारे भिन्न असावेत.

२. दुसऱ्या एका महादेव दीक्षिताची सत्याषाढ श्रौतसूत्राच्या सव्वीस व सत्ताविसाव्या प्रश्नांवर उज्ज्वला नांवाची टीका आहे.

**महादेव पुणतांबेकर**—( स. १७०० सुमार ) महाराष्ट्रीय तर्कशास्त्रज्ञ. यानें भवानंदी टीकाग्रंथावर टीका लिहिली ( हिस्टरी ऑफ संस्कृत लॉजिक, पा. ४८६ ).

**महादेवभट्ट गोविंदराव हिंगणे**—( मृत्यु स. १७४४ ) हे पेशव्यांचे नाशिक येथील तीर्थोपाध्ये देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. हा शंकराजी मल्हार सचीवाबरोबर प्रथम बाळाजी विश्वनाथाचे स्वारींत दिल्लीस गेला. आणि पुढें पंचवीस वर्षेपर्यंत दिल्लींत मराठी सत्तेचा जम बसविण्याची यानें विलक्षण खटपट केली. हा पिशाचलिपि व फार्सी भाषा जाणत होता. वक्तृत्व व बहुश्रुतपणा याच्या जोरावर यानें आपली छाप सर्वत्र बसविली. हा स. १७३० पासून दिल्लीचे मराठी वकिलातीवर असल्याचा दाखला मिळतो. दिल्लीस माळवा वगैरे प्रान्तांच्या सनदा मिळविण्यास यानें मोठी खटपट केली (रा. खं. ६. ९५-९७). या कामगिरीबद्दल संतोष दर्शवून बाजीरावानें यास वर्षासन ठरवून दिलें (रा. खं. ६·१२३). सवाई जयसिंगाकडून पैसे मिळवून कर्जमुक्त होण्याची खटपट नानासाहेबानें ( पेशव्यानें ) याचेमार्फत सिद्धीस नेली. हळुहळूं यानें सावकारीचा धंदा आरंभिला आणि सर्व उत्तर हिंदुस्थानांत प्रतिष्ठा मिळविली. ‘ मनसूर अलीखान व अमीरखान दिल्लीस आले आहेत. सांप्रत यांनीं सवाई जयसिंग मेल्यावर त्याची वकिली आपणाकडे घेतली आहे. हा मनसूर अलीखान यांच्या दरबारीं गेला. बरोबर सवाईकडील जमादार व प्यादे होते. तेथें हक्काबद्दल कांहीं बोलणीं झालीं. तेव्हां यानें शिवी दिली आणि आपले लोकांस त्यांना धरण्याविषयीं हुकूम केला. त्या लटपटींत हा जखमी झाला व घरीं आल्यावर त्या मध्यरात्रीं मृत्यु पावला. ’ ( पुरंदरे दप्तर १.१५४ ). हें पत्र २५ मोहोरममध्यें लिहिलें आहे. जयसिंग स. १७४३ मध्यें मरण पावला. नंतर मोहोरम स. १७४४ फेब्रुवारींत येतो. स. १७४५ च्या पुढें महादेवभटाचें नांव येत नाहीं. त्यावरून हा स. १७४४–४५ सालीं वारला असावा. बादशाही उमरावास तोंडावर शिवी देऊन हा धरा म्हणतो यावरून तेव्हां मराठ्यांचा जोर किती वाढला होता याची कल्पना येते ( म. रि. मध्य. ३.२९३-९४ ). महादजी शिंद्याचें दिल्लीस वर्चस्व होईपर्यंत या घराण्याचें तेथें वर्चस्व होतें. याचे पुत्र बापू, दामोदर, पुरुषोत्तम व देवराव.

**महादेव यादव**—( स. १२६७-७१ ) सिंघणपुत्र जैतुगी ऊर्फ जैत्रपालाचा दुसरा मुलगा व कृष्णदेवाचा हा भाऊ होय. याच्या कारकीर्दीचें वर्णन हेमाद्रीनें दिलें आहे. हा शिशु, शरणागत व स्त्रियांवर कधींहि शस्त्र चालवीत नसे. म्हणून हा राज्य करीत असतां आंध्रानें आपल्या गादीवर एक स्त्री बसविली व मालवेश्वरानें एक अर्भक बसविलें.

यानेंहि तैलंगण, गुजराथ व कोंकणांत स्वाऱ्या केल्या. यानें ठाणें येथील सोमेश्वर शिलाहार राजास मारून उत्तर कोंकण आपल्या राज्यास जोडलें. या वेळची लढाई दर्यावर झाली. तींत सोमेश्वराचीं बहुतेक गलबतें बुडालीं. महादेवानें आपणास ‘ चक्रवर्ती ’ म्हणविलें. हेमाडपंत हा महादेवाच्या कारकीर्दींत यादवसाम्राज्याचा श्रीकरणाधिप झाला.

**महादेवराव शिवदेव ओढेकर**—हा पवारांचा दिवाण होता. याला शिवराम व रंगराव असे दोन पुत्र होते.

**महादेवशास्त्री फोंडेकर**—( स. १७७५ ) हा कोल्हापुरचा वकील असून पुणें दरबारीं होता.

**महादेवी**—ही दुसऱ्या कुमारगुप्ताची पत्नी होय.

२. ही उच्चंगीच्या इरुक्कपाळ पांड्याची मुलगी. ही एरेयंग होयसलला दिली होती.

**महादेवी अक्का**—( स. ११६० सुमार ) कानडी कवयित्री, व वचनकर्त्री, वीरशैव. हिचा उडुतडी गांवांत जन्म झाला. ग्रंथ—वचन, योगांगत्रिविधि, सृष्टिवचन. हिनें तेथील राजाशीं विवाह करण्याचें नाकारून ही विरक्त होऊन कल्याण येथें बसव वगैरे राहत होते तेथें गेली. ही लिंगायत लोकांत विशेष प्रसिद्ध असल्यामुळें ‘ महादेवी अक्काचें ’ पुराण नांवाचा ग्रंथ हिच्यावर झाला आहे. हिच्या प्रत्येक वचनाच्या शेवटीं चन्नमल्लिकार्जुन हा शब्द येतो. हिचीं वचनें आजहि प्रसिद्ध आहेत. दुसरा ग्रंथ

पद्यरूप व तिसरा गद्यरूप आहे (क. क. च. भा. १, पा. १८८).

**महादेवी मलयवती**--हिचा उल्लेख वात्स्यायनाच्या कामसूत्रांत आढळतो. हिनें कुंतला शातकर्णी याचा कात्रीनें खून केला. ही कुंतला शातकर्णीची बायको नसून गणिका असावी. पण ज्याअर्थी हिचा उल्लेख महादेवी असा केला आहे, त्याअर्थी ही मुख्य राणी असावी.

**महाधर्मरक्खित**--अशोकाच्या प्रेरणेनें भरलेल्या तिसऱ्या बौद्धमहासभेंत याला महारठ्ठ देशांत मुख्य प्रचारक नेमलें होतें. महारठ्ठ म्हणजे महाराष्ट्र होय. तेथें यानें महानारदकस्सपह्लजातकाचा उपदेश केला.

**महानंदिन् शिशुनाग**--(ख्रि. पू. ४०० सुमार) शिशुनागवंशांतील हा शेवटला राजा. यास औरस संतति नव्हती. महापद्म नांवाचा एक दासीपुत्र होता. येथें क्षत्रियवंश संपून शूद्रवंश सुरू झाला.

**महापद्मनंद**--(ख्रि. पू. ३७१) हा महानंदिन् यास एका शूद्र स्त्रीपासून झाला. यानें ख्रि. पू. ३७१ मध्यें मगधचें राज्य बळकावून नंद घराण्याची स्थापना केली.

**महाप्रजावती**—ही गौतम बुद्धाची सावत्र आई होती. हिला प्रजावती किंवा प्रजापती असेंहि म्हणत. ही महामायेची बहीण होय. हिनें बुद्धदेवाचें पालनपोषण केलें होतें. महाराज शुद्धोदनाचा देहांत झाल्यावर हिनें बुद्धदेवाकडून प्रव्रज्या देण्याविषयीं मागणी केली. पण त्यानें स्त्रियांना दीक्षा देण्यास नकार दिला, पण आनंद वगैरेंच्या विनंतीवरून पुढें दीक्षा दिली. हिचा पुत्र नंद होय.

**महावतखान**—(मृत्यु स. १६७२) चितोडचा राणा प्रतापाचा भाऊ संगराजित. तो प्रथमपासूनच मोगलांस जाऊन मिळाला होता. त्या संगराजितचा हा मुलगा. यानें जहांगीर,शहाजहान व औरंगजेब या तिघांच्या कारकीर्दींत मोगल बादशाहीचीं अनेक कामें केलीं. स. १६११ पासून हा मुसलमान होऊन मोगल दरबारीं वागत होता. स. १६३२ मध्यें यानें दौलताबादचा किल्ला घेतला. त्यानंतर सं. १६७१ मध्यें हा फिरून दक्षिणेंत आला. आणि अहिवंत व मार्कंडा वगैरे किल्ले यानें घेतले. तसेंच औंढा व पट्टा हे दोन किल्ले काबीज केले, तेव्हां दिलेरखानानें चाकण व सालेरच्या किल्ल्याला वेढा दिला. तेव्हां प्रथम भ्यालों असें दाखवून नंतर प्रतापराव गुजर व मोरोपंत पिंगळे यांनीं उलटून निकराची लढाई दिली, आणि मोगलांचा पुरा मोड करून अद्भुत पराक्रम गाजवला. तेव्हा याला बादशहानें परत बोलावून घेतलें आणि अफगाणिस्थानावर पाठविलें. तिकडेच हा ८० वर्षांचा वृद्ध सेनानायक स. १६७२ मध्यें मेला.

**महावळ**—तिबेटी ग्रंथावरून असें दिसतें कीं, हा ख्रि. शकाच्या दुसऱ्या शतकांत बौद्धधर्माच्या प्रचारार्थ चीन देशांत गेला होता.

**महामौद्गलायन**—हा राजगृह नगराच्या जवळ असलेल्या कोलित गांवच्या सुजात ब्राह्मणाचा पुत्र. हा राजगृह येथें सारिपुत्रासह बुद्धदेवाचा शिष्य झाला होता. प्रथम संजय नांवाच्या संन्याश्याचा हा शिष्य होता. हा शतपणीच्या धर्मसंघांत महाकश्यपाबरोबर त्रिपिटकांचा संग्रह करणाऱ्यांतील एक होता.

**महायक**—(स. ८५३-७८) मेवाडच्या गादीवर दुसऱ्या खुंमाणनंतर हा आला. याच्यानंतर तिसरा खुंमाण गादीवर आला.

**महारक्खित**—अशोकाच्या प्रेरणेनें भरलेल्या तिसऱ्या बौद्धमहासभेंत यास योन देशांतील मुख्य प्रचारक नेमिलें होतें. योन म्हणजे हिंदुस्थानचा उत्तरपश्चिम सरहद्दप्रांत होय. पण सध्यांच्या उत्तरपश्चिम सीमेपेक्षां अशोकाच्या वेळीं ही मर्यादा पुष्कळच पलीकडे होती.

**महाराजगुप्त**—हा गुप्तराज्याचा मूळ संस्थापक होय. याच्या वेळीं गुप्तांचें लहान राज्य असावें. हा व याचा पुत्र याच्या वेळीं गुप्तांचें राज्य पाटलीपुत्रापासून अयोध्येपर्यंत गंगेच्या कांठानें पसरलें होतें. पण याचा नातू पहिला चंद्रगुप्त यानें आपलें राज्य वाढविण्यास सुरुवात केली.

**महालक्ष्मी**—भर्तृभट्ट गुहिलोताची पत्नी. ही हथुंडीच्या राठोडांपैकीं होती.

**महालिंगदास**—(स. १५४४ सुमार) यांनीं रचलेला 'सिंहासनबत्तिशी' हा ग्रंथ बराच प्रसिद्ध व लोकप्रिय आहे. तो बराच जुनाहि असावा असें वाटतें. पूर्व खानदेशांत गिरणा नदीच्या कांठीं वाडें हें गांव आहे. तेथें हा ग्रंथ लिहिला. त्यावरून तेथीलच हे असावे असें दिसतें. हे संस्कृतज्ञ होते. शके १४८७ च्या सुमारास यांचें वास्तव्य वाडें गांवांत होतें. यांनीं बरेच मोठाले ग्रंथ वाचिले होते. यांनीं लिहिलेल्या ग्रंथावरून यांची योग्यता ताबडतोब कळून येते (मं. श. १८३५ वा. इ. ले. ३०).

यांचे ग्रंथ-शालिहोत्र (अश्वचिकित्साशास्त्र), २ पंचोपाख्यान, ३ सिंहासनबत्तिशी, ४ वेताळपंचविशी. हे तीन ग्रंथ मनोरंजनार्थ लिहिलेले आहेत आणि ते गद्यावरून पद्यमय केलेले दिसतात. ५ याची एक चाणक्यनीतीवर टीकाहि उपलब्ध आहे.

**महावीर**—( ख्रि. पू. ५२६ निर्वाण ) हा जैनांचा चोविसावा तीर्थंकर होय. सध्यां प्रचलित असणाऱ्या जैनधर्माचा हा उद्दीपक होय. याच्यापूर्वीं अडीचशें वर्षें तेविसावे तीर्थंकर पार्श्वनाथ हे होऊन गेले. याच्या पित्याचें नांव सिद्धार्थ असून ते ज्ञात नांवाच्या क्षत्रियकुलांतील होते. म्हणून यांना ज्ञातपुत्र म्हणत. प्रथम याचा गर्भ ऋषभदत्त नांवाच्या ब्राह्मणाच्या देवानंदा नांवाच्या स्त्रीच्या पोटीं होता, पण तो नंतर सिद्धार्थाच्या त्रिशला नांवाच्या राणीच्या पोटीं आला, अशी जैन दंतकथा आहे. त्रिशला ही क्षत्रियकन्या होती. याचे आईबाप पार्श्वनाथाचे अनुयायी होते.

हा राजपुत्र होता तरी पहिल्यापासूनच अत्यंत विरक्त असे. यानें बारा वर्षे प्रवास करून इंद्रियें ताब्यांत आणलीं. अंगावरील वस्त्राचेंहि यास भान नसे. नंतर याच्या या कडक तपश्चर्येमुळें यास केवलज्ञान झालें. त्या वेळीं याचें वय ४२ वर्षांचें होतें. बाकीचीं तीस वर्षे यानें धर्मोपदेश करण्यांत व तपश्चर्येचे नियम लोकांना समजावून देण्यांत घालविलीं. अश्विन वद्य अमावास्येच्या मध्यरात्रीं हा निर्वाणाला गेला. म्हणजे कार्तिक शुद्ध प्रतिपदेपासून वीर संवतला सुरवात होते. त्याचें आज ( स. १९३६, नवं. १५ रोजीं ) २४६३ वें वर्ष सुरू आहे. मगधच्या बिंबिसार राजानें यांच्यापासून जैनधर्म स्वीकारला होता. याच्यानंतर सुधर्मन् हा याच्या गादीवर आला. याच्या नांवावर असलेलीं मागधी भाषेंतील बारा सूत्रें याच्या तत्त्वज्ञानाचा संग्रह करून मागाहून ग्रथित केलीं आहेत. तीं पुढील होतः

१ आचारांग, २ सूत्रकृतांग, ३ स्थानांग, ४ समवायांग, ५ भगवती, ६ अंतकृद्दशांग, ७ अनुत्तरोपपातिकदशांग, ८ विपाक, ९ उपासकदशांग, १० प्रश्नव्याकरण, ११ ज्ञाताधर्मकथा, १२ दृष्टिवाद ( अनुपलब्ध ).

**२.** ( स. ८५३ सुमार ) एक ज्योतिषी. याचा सारसंग्रह नांवाचा एक ग्रंथ व्यक्तगणितावर आहे. त्यांत अंकगणित आणि क्षेत्रगणित हे विषय आहेत. हा जैनधर्मी होता, आणि जैनधर्मी राजा पहिला अमोघवर्ष राष्ट्रकूटाचा याला आश्रय होता. सारसंग्रह ग्रंथ भास्कराचार्यांच्या लीलावतीसारखा आहे; परंतु तिजपेक्षां तो विस्तृत स्वरूपाचा आहे. सारसंग्रहांत श्रीधराचार्य नामक ग्रंथकाराच्या ग्रंथांतील मिश्रक व्यवहारांतील कांहीं वाक्यें आलीं आहेत.

**महासिंह कच्छवाह**—अकबराचा प्रमुख सरदार जो मानसिंह त्याचा हा नातू व भावसिंहाचा मुलगा होय. हा पराक्रमी नसल्यामुळें मोगलांच्या दरबारीं जयपूरचें वजन ओसरून जोधपूरचें वाढलें. पुढें मानसिंहाचा भाऊ जगत्‌सिंह याचा नातू जयसिंह याची जहांगीरनें आपली राणी जोधाबाई हिच्या सल्ल्यानें अंबरच्या गादीवर स्थापना केली. हा जयसिंह पुढें मीर्झा राजा या नांवानें प्रसिद्धीस आला.

**महासुखतावज्र ( शांतिगुप्त )**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं होय. याच्या ग्रंथांचा अनुवाद गुजराथचा पंडित पूर्णवज्र आणि लामा तारानाथ यांनीं मिळून केला. ग्रंथकर्ता शांतिगुप्त हुमायून अथवा अकबर यांचा समकालीन असावा. याचा जन्म दक्षिणेंत जयमंडल देशामध्यें झाला. याचे महासुखतागीतिका ( तं. ४८।३१ ) व योगगीता ( तं. ८६।८९ ) वगैरे ग्रंथ होत.

**महासेन गुप्त**—( स. ६०० सुमार ) हा दामोदर गुप्ताचा मुलगा. हा एक माळव्याचा राजा होय. कनोजच्या मौखरीवंशांतील जो सुस्थितवर्मन् त्याचा हा समकालीन होता. यानें लौहित्य ( ब्रह्मपुत्रा ) नदीच्या तीरापर्यंत स्वाऱ्या करून त्या भागामधील राजास आपलें वर्चस्व स्वीकारणें भाग पाडलें. पुढें यानें अवंतिवर्मनाच्या कारकीर्दींत कामरूप येथील राजाचा पराभव केला. त्या प्रसंगीं मौखरी राजानें द्रव्य व सैन्य या रूपानें बरीच मदत केली. याला देवगुप्त नांवाचा पुत्र होता. हें गुप्त घराणें माळव्यावर प्राचीन काळीं राज्य करीत होतें.

**महासेनगुप्तदेवी**—ही माळव्याच्या गुप्त घराण्यापैकीं जीवितगुप्ताची मुलगी. ही आदित्यवर्धनाची पत्नी.

**महाक्षपणक**—( स. ३५०–३९५ सुमार) एक जैन. अनेकार्थध्वनिमंजरी व एकाक्षरकोश या ग्रंथाचा कर्ता. यानें उणादिसूत्रावर टीका लिहिली असावी.

**महिमहंसगणि**—मेघदूतावरील टीकाकार.

**महीदवीदेवी**—रघुवंशी प्रतिहारांपैकीं ही विनायकपालाची माता.

**महीधर**—याचें शुक्लयजुर्वेदाच्या वाजसनेय शाखेवरील भाष्य निर्णयसागर मुद्रणालयाकडून छापून प्रसिद्ध झालें आहे. याचें हें भाष्य उवट व माधव यांचें भाष्य पाहून नंतर लिहिलें आहे.

**महीपत त्रिंबक**—( मृ. स. १७८५, बजाबा पुरंदरे पाहा ).

**महीपतराव**—हा भोसल्याचा रामपूरचा सुभेदार होता. जातीनें ब्राह्मण ( ना. प्रां. इ. पृ. २९४ ).

**महीपतराव ऊर्फ काकाजी फणसे**—याच्या वडिलांचें नांव अंताजी प्रयाग असें होतें. हा गायकवाडांच्या फौजेचा मुख्य अंमलदार होता. स. १८०४ मध्यें होळकरांशीं इंग्रजांचें युद्ध सुरू झालें त्यांत गायकवाडाची फौज इंग्रजांकडील जरी होती तरी हा व सखाराम हे त्यांच्याविरुद्ध वागूं लागले.

**महीपतराव दिनकर प्रभू ( गुप्ते )**—(स. १७६९) हा दिनकर विनायक गुप्ते याचा पुत्र होय. जानोजी भोसले व मुधोजी भोसले यांच्या भांडणांत हा मुधोजीकडे असून त्याच्या विश्वासास पात्र झाला होता. मुधोजीचा दिवाण सदाशिव हरी हा जानोजीचे पक्षास मिळाल्यावर मुधोजीनें यास आपला मुख्य कारभारी नेमलें. यानें दोघां भावांमध्यें सख्य घडवून आणण्यासाठीं मुधोजीस बरीच मदत केली.

मुधोजीचें ठाणें चंद्रपुर यास माधवराव पेशव्यांनीं वेढा घातला असतां त्याचे संरक्षणार्थ मुधोजीनें यास पाठवलें. परंतु याचे आप्त पेशव्यांच्या सैन्यांत असल्यामुळें जानोजीस याची खात्री येईना. परंतु मुधोजीनें याची खात्री दिली व त्याप्रमाणें हा इमानानें वागला. पेशव्यांनीं यास फितुर करण्याचा बराच प्रयत्न केला, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

हा मोठा कावेबाज होता. पेशव्यांच्या फौजेपुढें आपला टिकाव लागणार नाहीं हें पाहून दिवाकरपंताच्या सांगण्यावरून, त्यास पत्रें अशा रीतीनें पाठवावयाचीं कीं, तीं पेशव्यांचे लष्करांत धरलीं जाऊन ते घाबरून जावेत. ती युक्ति सफळ होऊन वेढा उठला ( स. १७६९ फेब्रु. ) पण पुढें दिवाकरपंत दिवाण होऊन हा मागें पडला.

**महीपति**—( स. ८७९ ) हा धर्माधिकारी घराण्यांतील होय. सर्वांआधीं काशीक्षेत्रीं कोण महाराष्ट्रीय गेले हें आज ठामपणें सांगतां येणें कठीण असलें तरी संवत् ९३६ च्या सुमारास महाराजा यशपाल याच्या वेळीं पंचगंगा येथें राहणार हे व यांचेच बनकटे पुराणिक यांचें अशीं दोन घराणीं तेथें होतीं. महाराज यशपाल राजानें याला षोडश संस्कारांचा संपूर्ण अधिकार दिला होता. हा विद्वान्, तपस्वी, तेजस्वी व धर्मशास्त्रकोविद असल्यानें याला षोडश संस्कारांचे सर्वाधिकार दिले ( केसरी, ता. ६ ऑक्टोबर १९३६ ).

**२.** निळोबाचा मुलगा. नानासाहेब पेशव्यांचा हा चिटणीस होता.

**३.** यानें हिंदी भाषेंत गोपीचंदाख्यान रचिलेलें आहे ( मं. श. १८३७ वा. इ. ले. १६० ).

**महीपति ऊर्फ ढोलीबुवा ( उज्जनीकर )**—( समाधि स. १८२२ ) हा कवि पैठण येथील राहणारा असून जनार्दनस्वामीचा वंशज होता. हा पैठणहून काशीयात्रेच्या निमित्तानें उत्तर हिंदुस्थानांत जाण्यास निघाला. वाटेंत यशवंतराव होळकरांनीं याजपासून गुरुमंत्र घेतला. तेथून हा तडक काशीस जाण्यास निघाला. तोंच रस्त्यांत भोपाळनजीक यास उज्जनीस असलेल्या दत्तात्रय भाऊ नांवाच्या एका संताविषयीं कोणीं माहिती सांगितली. तेव्हां हा उज्जनीस गेला. तेथें याला आश्रय मिळाला. दत्तभाऊंच्या मठांत याची अद्यापि बरीच अप्रकाशित हिंदी व मराठी कविता व ( ग्रंथ ) पुस्तकें आहेत. पुढें हा ग्वाल्हेरीस गेला. तेथें याचें माहात्म्य फार वाढलें; परंतु पुढें लवकरच तेथें यानें शके १७४४ त पौष शु. १३ स समाधि घेतली. याचा उज्जनी व ग्वाल्हेर येथें बराच मोठा शिष्यसंघ आहे. याच्या गुरूचें गांव नरहरी असें होतें. याची गादी अद्याप ग्वाल्हेरांत चालू आहे. वरील तिथीस तेथें याचा मोठा भंडारा दर वर्षी होत असतो. ग्वाल्हेर संस्थानाकडून याच्या संस्थानास मोठें उत्पन्नहि चालू आहे ( मं. श. १८३७ वा. इ. ले. १९९ ).

**महीपतिबोवा ताराबादकर**—(स. १७१५–९०) हे मराठी भाषेंतील कवि व साधुपुरुष होत. हे नगर जिल्ह्यांत राहुरी तालुक्यांत ताराबाद म्हणून एक गांव आहे, तेथले राहणारे. देशस्थ ऋग्वेदी वसिष्ठगोत्री ब्राह्मण. उपनांव कांबळे. यांच्या वडिलांचें नांव दादोपंत व आईचें नांव गंगाबाई. वयाची साठी उलटल्यावर त्यांस शके १६३८ मध्यें एक पुत्र झाला, तो हा होय. हा लहानपणीं जरा खोडकर होता. पण वयाचे सोळाव्या वर्षी वडील निवर्तल्यामुळें संसाराचा भार याचेवर पडला. वडील ह्यात असतांच हा पंढरीची वारी करूं लागला होता. लहानपणापासून धर्माचे व विद्येचे बाबतींत यास शिक्षा मोरोबा तांभेरकर नांवाच्या एका गृहस्थाश्रमी सत्पुरुषाची असे. तांभेर हें गांव ताराबादेपासून सहा मैलांवर आहे. यानें त्यासच गुरु म्हटलें आहे. याचें हस्ताक्षर मात्र उत्तम आहे.

दादोपंत वारल्यानंतर गांवची कुलकर्णीपणाची वृत्ति करून हे संसार संभाळून असत. यांनीं सरकारी अधिकाऱ्यांशीं झालेल्या कुरबुरीनें कानांतील लेखणी विठ्ठलाच्या पायावर ठेवली व 'गांवकृत्याचें लिहिणें लिहिणार नाहीं' अशी शपथ घेतली. ही प्रतिज्ञा अद्यापहि यांच्या घराण्यांत पाळणारे कांहीं आहेत.

भजनादि कार्यक्रम चालू असतां ग्रंथरचना करण्याचें बुवांच्या मनांत आलें. यांना तुकोबांनींहि स्वप्नांत येऊन सांगितलें कीं 'नामदेवाची शतकोटी अभंग करण्याची प्रतिज्ञा राहिली होती ती मीं पुरी केली. आतां संतचरित्रें वर्णन करण्याचें काम त्वां करावें.' हाच दृष्टान्त

तुकोबाचा गुरूपदेश मानून बुवा संतवर्णनाचे कार्यास लागले. या वेळीं बुवा पन्नाशीच्या घरांत गेले होते.

संतचरित्रें वर्णन करावयाचीं तीं आपले पूर्वी होऊन गेलेल्या नाभाजी व उद्धवचिद्धन यांच्या ग्रंथाधारें वर्णन करावीं, असा संकल्प करून हे ग्रंथरचनेस लागले, असें भक्तविजयाच्या प्रारंभावरून दिसतें. प्रारंभींचीं चरित्रें वरील ग्रंथकारांच्या बरहुकूम यांनीं उठविलीं. पण नामदेव, ज्ञानेश्वरादिकांच्या चरित्रापर्यंत आल्यावर नाभाजीपेक्षां या प्रान्तांत अधिक व भिन्न माहिती प्रचलित आहे असें पाहून यानें नाभाजीचा ग्रंथ सोडून इकडील ग्रंथाच्या आधारें हीं चरित्रें लिहिण्याचें ठरविलें. १२–१५ हे अध्याय नामदेवाच्या तीर्थावळीवरून रचले. सच्चिदानंदबाबाच्या 'ज्ञानेश्वरविजय' ग्रंथाचा उल्लेख यानें कोठेंहि केलेला नाहीं. तीर्थावळींतील संत संपल्यावर हा पुनः नाभाजीच्या ग्रंथाकडे वळला. पुढील सोळा-सत्रा हे अध्याय भक्तमालेच्या आधारें रचिले. एकोणिसाव्या अध्यायानंतर दामाजी, भानुदास वगैरेंचीं चरित्रें सांगितलीं. भानुदासाचें चरित्र सांगतांना याच्यासारख्या वारकऱ्यास त्याच्या वंशजाकडून अधिक माहिती मिळाली, व तिचा यानें ग्रंथांत उपयोग केला. पुढें बहिरंभटाचें चरित्र लिहिल्यानंतर हा तुकारामाच्या चरित्रावर आला. तुकारामाची माहिती यानें स्वतःमिळवली व फारच सुंदर रंगविली. नंतर बोधलेबुवा, गणेशनाथ, संतोबा पवार व उद्धवचिद्धन व विसोबा सराफाचें चरित्र लिहून भक्तविजय पुरा केला. ग्रंथसमाप्ति शके १६८४ चित्राभानु संवत्सर वैशाख व. २ स केली.

यानंतर कार्तिकव्रत, माघमाहात्म्य, वैशाखव्रत, एकादशीमाहात्म्य व त्यासंबंधीं पौराणिक कथा सांगणारा कथासारामृत नांवाचा ग्रंथ श. १६८७ श्रावण शु. ५ स पुरा केला. नंतर शंकरपार्वतीसंवादरूपानें पांडुरंगमाहात्म्य लिहिलें आणि त्यांत पुंडलिकाची कथा गायिली (शके १६८८ भाद्रपदमासीं).

एकंदरींत पौराणिक कथाभागापेक्षां चरित्रात्मक ग्रंथ सांगतांना यांच्या वाणीला भरतें येतें असें दिसतें. नंतर स्वतः माहिती मिळवून भक्तविजयांत न आलेलीं चरित्रें संतलीलामृतांत यांनीं वर्णिलीं (श. १६८९).

यानंतर तुलसीमाहात्म्य, गणेशपुराण, दत्तात्रयचरित्र, यांसारखीं लहान चरित्रें, मुक्ताभरण, ऋषिपंचमी, अनंतचतुर्दशी इत्यादि व्रतकथा लिहून संतविषयक तिसरा ग्रंथ भक्तलीलामृत लिहिला. यांत पहिल्या दहा अध्यायांत चांगदेवाचें चरित्र लिहिलें. तें त्याचा वंशज शामजी याच्या ग्रंथाधारें लिहिलें असें म्हटलें आहे. पुढें नानक, रोहिदास यांचीं चरित्रें लिहून अकरा अध्यायांत एकनाथाचें चरित्र व सोळा अध्याय तुकारामचरित्र लिहिलें आहे. पण चाळीस अध्यायांत सहाच चरित्रें आलीं असें पाहून पुढील दहा अध्यायांत सुमारें पन्नास चरित्रें कोंबलीं आणि तो भाग तितका सरसहि झाला नाहीं. हा ५१ अध्यायांचा ग्रंथ शके १६९६ मध्यें पुरा केला.

यानंतर संतविजय नांवाचा ग्रंथ यांनीं आरंभिला, पण तो अपुरा असून त्यांत रामदासस्वामींचें व बाबाजी अरणगांवकर गोसाव्याचें अशीं दोनच चरित्रें आहेत. संतविजयाचा सत्ताविसावा अध्याय उपलब्ध झाला असून मुद्रित आहे (मं. त्रै. ८ १-२ पा. ३–१४).

महीपतीबोवा जशी माहिती मिळेल तसें एकेक चरित्र पुरें करीत व मागाहून ग्रंथरूपानें जुळवीत. संतविजय ग्रंथांत नमन, उपसंहार वगैरे कांहीं नाहीं, यावरून वृद्धपणामुळें हा ग्रंथ अपुराच राहिला असें दिसतें. यांचें एक अपराधनिवेदनस्तोत्र आहे, पण त्यांत आत्मचरित्रापेक्षां भक्तिभाव आहे. तुकारामाप्रमाणें यांनीं एक विठोबाला पत्रहि लिहिलेलें आहे. त्यांत हे वारीला निघाले असतां घोड्यावरून पडल्यामुळें यांस परत यावें लागलें, असें लिहिलें आहे, व विठोबाच्या पायाचा आश्रय मागितला आहे. प्रसिद्ध शनिमाहात्म्य यांचेंच होय.

हे आपल्या वयाचे ७५ वे वर्षी शके १७१२ (स. १७९०) मध्यें श्रावण वद्य १२ ला मरण पावले. यांच्या मागें विठोबा व नारायण असे दोन पुत्र होते (मं. तृतीय सं. शके १८३७, पा. ११२–११८).

ओवीवृत्ताप्रमाणें पुढील चरित्रें यांनीं अभंगवृत्तांतहि गायिलीं आहेत. श्रीनामदेवचरित्र अभंग ६२, हरपाळचरित्र अभंग ५८, कमालचरित्र अभंग ६७, नरसिंहमेहताचरित्र अभंग ५२, राकाकुंभारचरित्र अभंग ४७, जगमित्रनागाचरित्र अभंग ६२, माणकोजी बोधले चरित्र अभंग ६३, संतोबा पवारचरित्र १०२, चोखामेळाचरित्र अभंग ४७.

**महीपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं सदतिसावा सिद्ध होय. यालाच महीलपा असेंहि म्हणत. हा मगध देशांतील शूद्र होता. हा कण्हपाचा शिष्य. तंजूरमध्यें याचा एक ग्रंथ उपलब्ध आहे. त्याचें नांव वायुतत्त्वदोहागीतिका (तं. ८४।१०) होय. हा मगधभाषेंत आहे. याच्या कांहीं कवितांवरून हा हिंदी भाषेचा कवि होता असें दिसतें.

**महीपाल**—(स. १०४४) दिल्लीचा राजा. यानें महमूद गझनवी वारल्यावर त्याचा मुलगा व नातू यांचे कारकीर्दीत मुसलमानांची हिंदुस्थानांतील सत्ता

कमजोर झाली होती, त्या संधीचा फायदा घेऊन हाँसी, ठाणेश्वर व कांग्रा हीं ठाणीं काबीज केलीं. पंजाबांतील लोकांमध्यें मुसलमानांची सत्ता उखडून टाकण्याची महत्त्वाकांक्षा उत्पन्न करण्याचे यानें प्रयत्न केले. महमूदनें फोडलेल्या कांग्र्याच्या प्रसिद्ध देवालयांतील जी मूर्ति नेली होती त्या मूर्तीसारखी दुसरी मूर्ति तयार करवून यानें लोकांत अशी वदंता पसरविली कीं, महमूदनें नेलेली मूर्ति परत आली आहे व म्हणूनच मुसलमानांची सत्ता झुगारून देण्याची वेळ आली आहे. मुसलमानांचीं तीन ठाणीं जिंकण्यांत आलेल्या यशानें उत्तेजन मिळाल्यामुळें हा लाहोरवर चालून गेला. परंतु आपसांतील भांडणांत प्रतिकार करण्याची उपेक्षा केलेले लाहोरचे उमराव जागे होऊन त्यांनीं यास एकोप्यानें तोंड दिल्यामुळें यास यश आलें नाहीं.

२. ( स. १०१३–१०६५ सुमार ) हा बंगालच्या पालांपैकीं दुसऱ्या विग्रहपालाचा मुलगा. ‘ अनधिकृत लोकांनीं बळकाविलेलें आपलें पैतृक राज्य यानें पुनः मिळवलें ’ असें सारनाथ येथील लेखांत म्हटलें आहे. या सारनाथलेखावर वि. सं. १०८३ ( स. १०२६ ) दिलेला आहे ( इंडि. अँटि. १४. १३९ ). सर स्मिथनें स. १९०९ च्या इंडि. अँटि. मध्यें पालांच्या उपलब्ध सर्व लेखांची यादी विस्तृत माहितीसह दिली आहे व त्यांची राज्यारोहणाच्या संभवनीय काळासह वंशावळ दिली आहे. त्याप्रमाणें याचा राज्यारोहणकाल स. ९८० आहे, पण वर दिलेला कालहि आढळतो. यानें ५२ वर्षे राज्य केलें. याचें राज्य मुसलमानांच्या स्वाऱ्यांमुळें पांगलेल्या क्षत्रियांपैकीं कोणीं घेतलें किंवा कांबोज राज्यापैकीं कोणीं घेतलें हें निश्चित समजत नाहीं. बंगाल्यांत अद्यापहि याचीं गाणीं ऐकूं येतात. याच्या वेळीं सहजच बौद्धांचा उत्कर्ष होऊन धर्मपाल वगैरे साधु स. १०१३ मध्यें तिबेटांत गेले (हिं. भा. अ. पा. ३४४).

३. ( स. १०८० ) हा बंगाल्यांतील तिसऱ्या विग्रहपालाचा पहिला मुलगा. हा स. १०८० च्या सुमारास आपल्या भावास कैदेंत टाकून गादीवर आला. या वेळीं बरेंद्र म्हणजे उत्तर बंगाल्यांत दिव्योकाच्या नेतृत्वाखालीं कैवर्तांनीं बंड केलें त्यांत हा मारला गेला. या वेळीं पालांच्या राज्याला उतरती कळा लागली (हिं. भा. अ. पा. ३४५).

**महीपाल गाहडवाल**—( स. १०५० सुमार ) कनोजच्या गाहडवालांपैकीं यशोविग्रहाचा पुत्र. कनोजचें राज्य संपादन करणारा चंद्र किंवा चंद्रदेव याचा पुत्र होय.

**महीपाल परमार**—( स. १००२ सुमार ) आबूच्या परमारांपैकीं धरणीवराहाचा पुत्र. याला देवराज असेंहि नांव होतें. याचें एक दानपत्र वि. सं. १०५९ ( स. १००२ ) मधील मिळालें आहे तें अद्यापि प्रकाशित झालें नाहीं.

**महीपाल प्रतिहार**—( स. ९१०–४० ) रघुवंशी प्रतिहारांपैकीं हा महेंद्रपालाचा पुत्र. याला क्षितिपालहि म्हणत. याच्या वेळीं काव्यमीमांसादि ग्रंथांचा कर्ता राजशेखर कनोज येथें होता. त्याच्या प्रचंडपांडव व बालभारत या नाटकांत याचा निर्देश आहे. तो याला आर्यावर्ताचा महाराजाधिराज, तसेंच मुरल, मेकल, कलिंग, केरल, कुलूत, कुंतल व रमठ या देशांच्या राजांना पराजित करणारा असें म्हणतो. हा दक्षिणेंतील राष्ट्रकूटांपैकीं तिसरा इंद्रराज किंवा नित्यवर्ष याच्याशींहि लढला होता. त्यांत राष्ट्रकूटांच्या म्हणण्याप्रमाणें याचा पराजय झाला. याच्या वेळचें काठेवाडांतील हड्डाला येथें शा. श. ८३६ ( स. ९१४ ) मधील दानपत्र मिळालें आहे. यावरून वढवाण येथें याचा सामंत चावडावंशी धरणीवराह राज्य करीत होता. याचा आणखी एक शिलालेख वि. सं. ९७४ ( स. ९१७ ) मधील मिळाला आहे.

राजशेखरच्या बालभारत नाटकाचा प्रयोग कान्यकुब्ज प्रांतांत महोदय येथें झाला, त्या वेळीं हा त्या प्रांताचा राजा होता. बुल्हरनें कांहीं कारण न दाखवितां यास चूडासमा आभीर राजांत ( गिरनारजुनागडच्या ) मानलें आहे ( इंडि. अँटि. १२.१९०–९५ ).

**महींद्रव्यास**—यानें लीलाचरित्र नांवाचा एक ग्रंथ लिहिला असून त्यांत चक्रधर कृष्णाच्या पंधराशें लीलांचा संग्रह केलेला आहे. यालाच महींभट्ट असेंहि म्हणत.

**महेश**—( ग्रंथकाल स. १७०० ) ‘ युक्तिविवाद ’ या संस्कृत ग्रंथाचा कर्ता.

**महेशाक**—‘ सदाचारचंद्रोदय ’ नांवाच्या संस्कृत ग्रंथाचा कर्ता.

**महेश ठक्कर**—( स. १६०० सुमार ) याचा जन्म दरभंग्याच्या नैऋत्येस १७ मैलांवर कमलानदीच्या तीरावर वसलेल्या भाऊर या गांवीं झाला. हा धीरा व चंद्रपति यांचा पुत्र होय. महादेव, भगीरथ व दामोदर यांचा हा धाकटा भाऊ होय. याचा जन्म खंडवाल कुटुंबांत झाला. पक्षधरमिश्रानें गंगेशाच्या ग्रंथावर लिहिलेल्या आलोकावर यानें ‘ दर्पण ’ नांवाची एक टीका लिहिली. ह्या ग्रंथांतील वरील भागच फक्त हल्लीं उपलब्ध आहे. यानें इतरहि बरेच ग्रंथ लिहिले आहेत. उ. तीर्थचिंतामणी इ.

शंकरमिश्रानें आपल्या 'त्रिसूत्रिनिबंधव्याख्या' या ग्रंथांत याच्या 'दर्पणा'चा तर्कज्ञानावरील 'आधारभूत ग्रंथ' म्हणून निर्देश केला आहे.

याच्या शिष्यांपैकीं रघुनंदनदास राय हा तर्कज्ञानांत प्रवीण असून अकबराच्या सांगण्यावरून तो चारी दिशांस वादविवादासाठीं गेला होता. अकबरानें त्याजवर खूष होऊन त्यास मिथिलेचा भाग बहाल केला. परंतु त्यानें तो आपल्या या गुरूस गुरुदक्षिणा म्हणून देऊन टाकला. अशा रीतीनें महेश ठक्कर हा दरभंग्याच्या राजघराण्याचा संस्थापक बनला (हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ४५७–५८).

यानें अकबर बादशहाचें एक संस्कृत चरित्र लिहिलें आहे, तें इंडिया ऑफिसांत आहे. हा महेश दर्भंग्याच्या महाराजांचा पूर्वज होय.

याचीच काव्यप्रकाशावर टीका आहे. 'तत्त्वचिंतामण्यालोकदर्पण' या संस्कृत ग्रंथाचा कर्ता हाच होय. हा रामेश्वरभट्टाचा शिष्य होता.

**महेश्वर**--(जन्म स. ११४८) हा भास्कराचार्यांचा पिता होय. याचा जन्म शक १०७० च्या सुमारास झाला असावा.

शेखर नांवाचा करणग्रंथ, लघुजातक–टीका, एक फलग्रंथ आणि 'प्रतिष्ठाविधिवृत्तशत' या नांवाचा आणखी एक ग्रंथ यानें लिहिलेला आहे (भा. ज्यो.).

२. (स. ११११) विश्वप्रकाशकोशाचा कर्ता. याचा वंशक्रम पुढीलप्रमाणें आहेः—

हरिश्चंद्र–श्रीकृष्ण– मल्हण–केशव –श्रीकृष्ण– महेश्वर. हा हरिश्चंद्रचरित्रावरील टीकाकार होता.

३. यानें भारतांतील सभापर्वावरील कथाभागावर सभानाटक लिहिलें आहे.

**महेश्वरभट्ट रामचंद्रभट्ट सुखटणकर**—(स. १७१८–१८१६) एक विद्वान् सारस्वत ब्राह्मण. गोमांतकांतील कुंभारजुव्यानजीक महाशाळ गांवचे राहणारे. हे ऋग्वेदी, आश्वलायन, कौशिकगोत्री होत. यांच्या मातेचें नांव जानकीबाई. श्रीमद्भागवतावरील श्रीधरी टीकेची पूरणिका यांनीं केली आहे. वेदांतग्रंथांपैकीं स्वात्मनिरूपण नांवाच्या ग्रंथावर यांनीं स्वात्मदीपिका नांवाची टीका लिहिली आहे. याशिवाय भगवद्गीता, अद्वैतमकरंद, वाक्यसुधा, सिद्धांतचंद्रिका इत्यादि ग्रंथांवर यांनीं मराठींत अनुवादात्मक टीका केली आहे. तसेंच वाक्यसुधेवर पानपात्र नांवाची समश्लोकी टीका, गीतगोविंदाचा पद्यात्मक मराठींत अनुवाद इ. संस्कृत ग्रंथ मराठींत आणले. तसेंच मोरोपंताच्या मराठी मंत्रभागवतावर संतोषिणी नांवाची टीका संस्कृतांत लिहिली. याशिवाय भानुशतककाव्य, गद्यसुधांशु, मांगिरीशाष्टक (सटीक), यांशिवाय अनेक टीका लिहिल्या. धर्मशास्त्रावर त्रिंशत्श्लोकी, चतुर्दशश्लोकी, निर्णयसिंधूंतील सापिंड्यकन्यकानिर्णयाविषयीं अतिशय दुर्बोध अशा पद्यपंचकावर टीका, ज्योतिषापैकीं मुहूर्तमालेवर सौंदर्यबोधिनी नांवाची सुरस टीका केली. याशिवाय न्याय वगैरे शास्त्रांवरील ग्रंथावरहि यांचे टीकाग्रंथ असावेत (सारस्वतरत्नमाला, पा. १०–२२).

**महेश्वरोपाध्याय**—हा धर्माब्धि नामक ग्रंथाचा कर्ता. हा पंढरपूरच्या काशिनाथोपाध्यायाच्या पूर्वीचा ग्रंथकार दिसतो.

**महेंद्र**—(कुमारगुप्त पाहा).

२. हा पिठापुरच्या राजा. अलाहाबादच्या शिलालेखावरून असें दिसतें कीं समुद्रगुप्तानें अश्वमेधाच्या वेळीं याचा पराभव केला होता.

**महेंद्र गुहिलोत**—(स. ६०६–२६) मेवाडच्या उदेपूर येथील रजपुतांच्या राज्यांत हा भोजानंतर गादीवर आला. याच्यानंतर नाग गादीवर आला.

२. (स. ६८८–७३४) नागानंतरचा मेवाडचा राजा. याच्यानंतर कालभोज गादीवर आला.

**महेंद्रपाल**—(स. ११९३) बंगाल्यांतील पालांपैकीं शेवटचा राजा इंद्रद्युम्न व हा एकच असावा.

**महेंद्रपाल प्रतिहार**—(स. ८९३–९०७) रघुवंशी प्रतिहारांपैकीं भोजदेवाचा पुत्र. याच्या आईचें नांव चंद्रभट्टारिकादेवी. याला महेन्द्रायुध, महिंदपाल, निर्भयराज व निर्भयनरेन्द्र असेंहि म्हणत. याच्या वेळचे दोन शिलालेख आणि तीन ताम्रपत्र मिळाले आहेत. ते वि. सं. ९५०–९६४ (स, ८९३–९०७) पर्यंतचे आहेत. त्यांत एक वलभी संवत् ५७४ (वि. सं. ९५०) मधील जुनागड राज्यांतील उना येथील दानपत्र आहे (एपि. इंडि. भा. ९, पृ. ४–६). तसेंच दुसरा वि. सं. ९६४ (स. ९०७) मधील सीयडोनीचा शिलालेख आहे (एपि.इंडि. भा. १, पृ. १७३). तीन ताम्रपत्रांपैकीं दोन काठेवाडांत मिळाले आहेत. त्यांवरून काठेवाडच्या दक्षिण भागावरहि याचें राज्य असल्याचें समजतें. तेथें याचा सोळंकी सामंत राज्य करीत होता. याचा प्रतिनिधी तेथें धीइक होता, असें ताम्रपत्रावरून कळतें. काव्यमीमांसादि ग्रंथांचा कर्ता राजशेखर याचा गुरु होता. हा भवानीचा उपासक होता. याच्या महीपाल, भोज व विनायकपाल या तीन

पुत्रांचा पत्ता लागला आहे. भोजाच्या मातेचें नांव देहनागादेवी व विनायकपालाच्या मातेचें नांव महीदेवी-देवी होतें.

२. ( स. ९४६ ) रघुवंशी प्रतिहारांपैकीं विनायकपालाला प्रसाधनादेवीपासून झालेला पुत्र. याच्या वेळचा एक शिलालेख प्रतापगड येथें मिळाला आहे. तो वि. सं. १००३ ( स. ९४६ ) मधील आहे. त्यावरून घोटावर्षिका( घोटार्सी–प्रतापगडापासून सहा मैल )चा इंद्रराज चौहाण याचा सामंत होता. त्या वेळीं मंडपिका ( मांडू ) येथें सेनापति कोक्कटानें नेमलेला श्रीशर्मा राहत होता. तसेंच माळव्याचा तंत्रपाल ( शासक ) महासामंत, महादंडनायक माधव ( दामोदराचा पुत्र ) उज्जैन येथें राहत होता. इंद्रराज चौहानानें बांधलेले घोटावर्षिका (घोटार्सी)-चे इंद्रराजादित्यदेव नांवाचे सूर्यमंदिराला खर्परपद्रक नांवाचें गांव दुसऱ्या महेन्द्रपालानें भेट दिलें होतें. त्यावर वरील माधवाचें हस्ताक्षर आहे ( एपि. इंडि. भा. १४, पृ. १८२–८४ ).

**महेंद्र मौर्य**—( खि. पू. २३२ ) हा लंका येथें पाठविलेल्या बौद्धधर्माच्या प्रचारकांचा मुख्य होता.याच्याबरोबर आणखी चार भिक्षु होते. यानें लंकेंत बुद्धधर्माचा कसा प्रचार केला याची माहिती महावंश, दीपवंश, दिव्यावदान,अशोकावदान व ह्यूएनत्संगच्या प्रवासवृत्तांत आढळते.

हा अशोकाचा पुत्र होता, असें महावंश व दीपवंश यांत लिहिलें आहे. पण दिव्यावदान ग्रंथांत हा अशोकाचा भाऊ होता असें म्हटलें आहे. ह्यूएनत्संगनेंहि भाऊ होता असेंच म्हटलें आहे. स्मिथनेंहि भाऊ होता, या म्हणण्याला संमति दिली आहे.

हा एकदम मध्यें न थांबतां लंकेंत गेला, असें महावंश वगैरे ग्रंथांत म्हटलें आहे, पण लंकेंतील माहिती याच्याविरुद्ध आहे. महेंद्र दाक्षिण भागांत प्रचार करीत कावेरीच्या तीरावर पोंहोचला, व तेथें यानें एक विहार बांधला. सनाच्या सातव्या शतकांत ह्यूएनत्संग यानें हा विहार भग्नावस्थेंत पाहिला होता. तो लिहितो, 'या शहराच्या ( मालकूट ) पूर्वेस बऱ्याच दूर एक संघाराम आहे. याचें मुख्य भवन व अंगण यांवर रानटी गवत उगवलें आहे. फक्त भिंती उभ्या आहेत. हा अशोकाचा भाऊ महेंद्र यानें बांधला होता.' (बुद्धिस्ट रेकार्ड टू दि वेस्टर्न वर्ल्ड २, पा. २३१ ). हा दक्षिणेंत संचार करीत लंकेंत गेला असेंच प्रो. ओल्डनबर्गचें मत आहे (विनयपिटकाची प्रस्तावना).

याचा लंकाधिपति तिस्स यानें अत्यंत सन्मान केला. याच्याकरितां एक विहार बांधला व त्याचें नांव महाविहार असें ठेवण्यांत आलें. पुढें संघमित्रा हीहि लंकेंत येऊन राहिली. तिच्याकरितां एक स्त्रीविहार बांधण्यांत आला. हा तेथें नव्वद वर्षांचा होऊन मृत्यु पावला. त्या वेळीं लंकेंत तिस्सपुत्र उत्तिम हा राज्य करीत होता.

यानें आपलें सर्व आयुष्य सिलोनमध्येंच काढलें. याच्या नांवाचा एक स्तूप मिहींताले येथें आहे. तेथेंच याला शेवटीं जाळला ( V. Smith, p. 195 ). बुद्धधर्म इतर देशांतून जास्त भरभराटीस येण्याचें कारण म्हणजे हाच होय.

**महेंद्रवर्मा पल्लव**—( स. ६००–६३० ) हा कांचीच्या सिंहविष्णु पल्लवाचा मुलगा. यानें मत्तविलास नांवाचें एक प्रहसन लिहिलें आहे. हें प्रहसन त्रिवेंद्रम-संस्कृत सीरीजमध्यें प्रसिद्ध झालें असून त्याच्या प्रस्तावनेंत याच्या वंशादिकांची माहिती मिळते. यानेंच महेंद्रवाडी, मामेंदूर, त्रिचनापल्ली, पल्लीवरम् येथें पर्वतांत देवमंदिरें ( खोदून ) निर्माण करवलीं. बहुतेक यानेंच कुडुमियमलै येथील संगीतशास्त्रांसंबंधीं शिलाशासन तयार केलें. हा रुद्राचार्याचा शिष्य होता, असें त्या शासनावरून दिसतें ( एपि. इंडि. व्हा. १२, पा. २३१ ). याच्या वडिलानें सुप्रसिद्ध भारवि कवीस आश्रय दिला असल्यामुळें याचा व त्याचाहि संबंध आला असावा.

मामल्लपुर किंवा मावलिपुर किंवा महाबलिपुर हें लहानसें खेडें मद्रासच्या दक्षिणेस तीस मैलांवर समुद्रास लागून आहे. तेथें पर्वतांत कोरलेलीं अजिंठ्याप्रमाणें मोठालीं लेणीं आहेत. हीं पल्लवांच्या वेळीं झालीं. हीं शिल्पकलेबद्दल प्रसिद्ध असून तेथें सिंहविष्णु व त्याचा मुलगा महेंद्रवर्मा यांच्या मूर्ति सांपडल्या आहेत. तेथें सात देवळें असून त्यांना सात रथ असें म्हणतात ( इंपीरियल गॅझेटियर, सेव्हन पॅगोडाज़्, बाय् मेसर्स डब्ल्यू. एम्. चेंबर्स ).

याला पुष्कळ बिरुदें आहेत. यानें पुळ्ळलूर येथें दुसऱ्या पुलकेशिन् पश्चिम चालुक्याचा पराभव केला. हें कांजीवरम् हद्दींत आहे. पुलकेशिन्चा सुरुवातीचा काल व याचा शेवटचा काल एक आहे.

हा शैवसाधु तिरुनावुक्करशु याचा द्वेष्टा होता. त्याचा यानें खून केला. परंतु यानें त्याचींच मतें स्वीकारलीं.

याची प्रसिद्धि महाबलिपुरम् येथील भव्य व शिल्पदृष्टीनें महत्त्वाच्या लेण्यांमुळें विशेष झाली. पुढील कालांत याच्या शिल्पाचें अनुकरण दिसतें.

महाबलिपुराचें पहिलें नांव 'कडळमलाइतळशयनम्' असें होतें.

येथें आदिवराहाचें देऊळ महत्त्वाचें आहे. त्यांत सिंहविष्णु व महेंद्रवर्मन् या दोन पल्लव पितापुत्रांच्या प्रतिमा आहेत ( हिरास–स्टडीज् इन् पल्लव हिस्टरी ).

२. ( स. ६६८–७० ) एक राजा.

**मंख कवि**—( स. ११२०–११७० ) काश्मीरच्या राजाचा दिवाण अलंकार त्याचा हा भाऊ. श्रीकंठचरितम् नांवाचा याचा ग्रंथ प्रसिद्ध आहे व त्यांत यानें त्रिपुरवधवर्णन केलेलें आहे. ह्याच्या वेळेस जयसिंह ( स. ११२७–४९ ) काश्मीरांत राजा होता. मंखाच्या बापाचें नांव विश्ववर्त व आजाचें नांव मनोरथ असें होतें. हे एकंदर चौघे भाऊ होतेः १ शृंगार, २ भंग, ३ अलंकार आणि चौथा हा. यास क्वचित् लंक अथवा मंखक असेंहि म्हणत. यानें रुय्यक नांवाच्या पंडिताजवळ अध्ययन केलें. त्याजवळच मंडन हा याच्या पूर्वीचा अध्ययन करणारा होता. मंखानें केलेला एक कोशहि आहे.

**मंखली**—गोशालचा पिता.

**मंखलीपुत्त**—गोशालचें नामांतर.

**मंगय्य पांड्य**—हा उच्चंगीचा पांड्य होय. याला आदित्यसेन असेंहि म्हणत.

**मंगराज**—( स. १३६० सुमार ) कानडी जैन कवि. हा होयसळ राज्यांतील देवळगी देशांतील मुगुळियपूरचा अधिपति होता आणि पूज्यपादाचा शिष्य. पत्नी कामलता. ग्रंथ–खगेंद्रमणिदर्पण ( विषवैद्य ग्रंथ ).

यानें विजयनगरच्या हरिहराच्या ( स. १३३६–५३ ) कारकीर्दीचा उल्लेख केला आहे ( क. क. च. भा. १, पा. ४१७ ).

२. ( ग्रंथकाल स. १५०८ ) होयसळ देशांतील होसवृत्ती देशांतील कल्लहल्लीचा अधिपति. हा चंगाल्वांच्या प्रधानांपैकीं होता.

ग्रंथ—सम्यक्त्वकौमुदी ( स. १५०८), जयनृपकाव्या, नेमिजिनेशसंगति, पाकशास्त्र, प्रभंजनचरित, श्रीपालचरित इत्यादि. याच्या पित्याचें नांव विजयेंद्र ( क. क. च. भा. १, पा. ४१७).

**मंगलभवदेव**—( स. ११९६–१२३२ ) परिहार रजपूत घराण्यांतील मालदेव राजाचा मुलगा. ग्वाल्हेरचा राजा. स. ११९६ मध्यें शिहाबुद्दीन मुहंमद घोरीनें ग्वाल्हेरवर स्वारी करून तेथील राजाकडून करभार देण्याचें कबूल करवून घेऊन वेढा उठविला. कुतुबुद्दीन ऐबकनें ह्या किल्ल्याची जहागीर शम्सुद्दीन अल्तमशला दिली होती. त्यानें दिल्लीचा सुलतान झाल्यावर स. १२३२ मध्यें त्यानें आपली पहिली जहागीर हिंदु राजांनीं बळकाविली होती ती परत मिळविण्याकरितां ग्वाल्हेरवर फेब्रुवारींत स्वारी केली. किल्ल्यास वेढा दिला तो फेब्रुवारी ते डिसेंबरपर्यंत चालू राहिला. १२ डिसेंबरला राजा किल्ल्यांतून निसटला. राजा निसटल्यामुळें चिडून त्यानें ७०० हिंदूंची कत्तल केली.

**मंगलराज ( पश्चिम ) चालुक्य**—( स. ७३१ ) लाट देशाचा जहागीरदार जयसिंहवर्म्याचा दुसरा पुत्र. हा राज्यावर असतांनाचें एक दानपत्र मिळालें आहे ( इंडि. अँटि. १३. ७५ ). तें शा. श. ६५३ ( वि. सं. ७८८; स. ७३१ ) मधील आहे. त्यांत याचीं बिरुदें विनयादित्य, युद्धमल्ल व जयाश्रय अशीं आहेत. शीलादित्य युवराज असतांच मेला असावा म्हणून हा जयसिंहानंतर राजा झाला असावा. याच्या मागून याचा धाकटा भाऊ पुलकेशी गादीवर आला. हें घराणें बदामीच्या सोलंकींपैकीं होतें.

**मंगलीश ( पश्चिम ) चालुक्य**—( स. ५९७–६१० ) पश्चिम चालुक्यांच्या घराण्यांपैकीं हा पुलकेशीचा धाकटा मुलगा. हा पहिल्या कीर्तिवर्म्यानंतर गादीवर आला. यानें ऐहोल येथील शिलालेखांत कलचुरीस जिंकल्याचा निर्देश आहे. याचा मुलगा इंद्रवर्मा. यानें इंद्रवर्म्यास गादी मिळवून देण्याचा प्रयत्न केला, त्यांत हा मारला गेला. यानें खेतीद्वीप, कोंकणचा कांहीं भाग, मातंगलोक व चेट्टीचा शंकरगण याचा पुत्र बुद्ध इत्यादिकांस जिंकलें. यास मंगलेश्वर, मंगलराज व रणविक्रांत अशीं नांवें होतीं. याच्यामागून पहिला सत्याश्रय पुलकेशी गादीवर आला.

फ्लीटच्या मतें याला सत्याश्रय-ध्रुवराज–इंद्रवर्मन् नांवाचा एक मुलगा होता. पण त्याविषयीं फ्लीटसुद्धां साशंक आहे.

**मंगि युवराज**—( स. ६७२–६९६ ) हा दुसऱ्या विष्णुवर्धनाचा मुलगा होता. याला युवराज ही पदवी होती. यालाहि सर्वलोकाश्रय हें उपपद व विजयसिद्धी हें बिरुद होतें. याचा एक शिलालेख सांपडला आहे. यानें २४ वर्षेंपर्यंत राज्य केलें.

**मंचन**—बिज्जल राजाचा कारभारी. बसवाचा बोभाटा हा राजास कळवीत असे.

**मंचनामात्य**—तैलंगी ब्राह्मण. यानें सामुद्रिक विद्येचा ग्रंथ संस्कृतांत लिहिला आहे.

**मंचित**—( स. १७८० सुमार ) हिंदी कवि. गांव मदु. याची भाषा अवधी नसून व्रज आहे. ग्रंथ–१ सुरभीदानलीला, २ कृष्णायन.

**मंडन**—हा मेवाडांतील सुप्रसिद्ध सुतार होय. यानें देवतामूर्तिप्रकरण, प्रासादमण्डन, राजवल्लभ, रूपमण्डन, वास्तुमण्डन, वास्तुशास्त्र, वास्तुसार व रूपावतार असे वास्तुशास्त्रावर ग्रंथ केले. याला उदेपूरच्या कुंभ राण्याचा आश्रय होता.

२. मंख कवीचा गुरुबंधु. पिता श्रीगर्भ. हा सर्व शास्त्रांत प्रवीण होता.

३. (स. १६६० सुमार) हिंदी कवि. हा बुंदेलखंडांतील मंगदसिंहाच्या दरबारीं होता. याच्यां रसरत्नावली वगैरे पांच ग्रंथांचीं फक्त नांवें आढळतात. फक्त फुटकळ कविता प्रसिद्ध आहेत.

**मंडनमिश्र**—(सुरेश्वराचार्य पाहा).

**मंडलिक यादव**—(मृत्यु स. १४७२) हा गिरनार (सोरठ-काठेवाड दक्षिण) चा यादव (चूडासमा) राजा होय. याला राणा कुंभाची मुलगी रमाबाई दिली होती.

पृथ्वीराजानें याला प्राणभिक्षा देणें किंवा रामस्वामीच्या मंदिरप्रतिष्ठेच्या वेळीं याला बोलावणें या गोष्टी भाटांनीं कल्पिलेल्या आहेत. कारण महमूद बेगड्यानें पराभव केल्यावर स. १४७१ नंतर हा मुसलमान झाला होता. तसेंच राणा रायमल यास राज्य मिळण्यापूर्वी हा मेलाहि होता (स. १४७२). हा मेल्यावर किंवा मुसलमान झाल्यावर रमाबाई मेवाडांत आली असावी.

**मंमट**—(स. ९०३ सुमार) राजपुतान्यांतील हथुंडीचा राठोड राजा. हा मेवाडच्या दुसऱ्या भर्तृभटाचा समकालीन होता. याचा पुत्र धवल. महालक्ष्मी ही याची बहीण किंवा मुलगी भर्तृभटाची पत्नी होती.

**माऊली-देव कदंब**—हानगळ येथील कादंब घराण्यांतील दुसऱ्या जयवर्मा कदंबाचा मुलगा.

**माऊली तैल कदंब**—(तैल कदंब पाहा).

**मागुत्त**—हा गुत्त घराण्यांतील आद्य पुरुष होय. हा चंद्रगुप्ताचा समकालीन होता.

**माघ**—(स. ६२५ सुमार) सुप्रभदेवाचा पुत्र दत्तक आणि दत्तकाचा पुत्र माघ. हा श्रीमाल जातीचा गुजराथी ब्राह्मण होता. सुप्रभदेव हा गुजराथच्या भीनमाल (श्रीमाल) येथील वर्मलात राजाचा मंत्री होता. दत्तकाला सर्व लोक सर्वाश्रय असें त्याच्या गुणावरून म्हणत असत. यानें 'शिशुपालवध' नांवाचें महाकाव्य संस्कृत भाषेंत केलें (माघ काव्यांतील वंशवर्णन). तें उपमा, अर्थगौरव आणि पदलालित्य यांमुळें प्रसिद्ध आहे.

वर्मलाताचा एक शिलालेख सांपडला आहे. अबू पर्वताच्या जवळ असलेल्या वसंतपूरचा हा राजा होता (एपिग्राफिका इंडिका, ९·१९१-१९२). या लेखांत वर्मलाताच्या सामंत वज्रभटानें क्षेमार्येचें मंदिर बांधल्याचा उल्लेख आहे. हा लेख वि. सं. ६८२ (स. ६२५) मधला आहे. याचा मंत्री सुप्रभदेव असावा. भीनपाळहि अबूपासून जवळच आहे. यावरून स. सातव्या शतकाच्या सुमारास हा झालेला असला पाहिजे हें उघड आहे.

चंद्रप्रभसूरीच्या प्रभावकचरित्रांत याचा चुलता शुभंकर श्रेष्ठी होता आणि त्याचा मुलगा सिद्ध यानें उपमितिभवप्रपंचाकथा लिहिली ही माहिती आणि मेरुतुंगाच्या प्रबंधचिंतामणींत दिलेली माघाची माहिती यांत मेळ नाहीं. भोजनप्रबंधांतील माहिती ऐतिहासिक दृष्ट्या अगदींच चुकीची आहे.

माघाच्या शिशुपालवधांत- 'अनुत्सूत्रपदन्यासा सद्वृत्तिः सन्निबंधना । शब्दविद्येव नो भाति राजनीतिरपस्पशा ॥' (२·११२) या श्लोकांत आलेल्या न्यास व वृत्ति यांच्या उल्लेखावरून आठव्या शतकाच्या उत्तरार्धांत माघाचा काळ ओढण्याचा जो प्रयत्न झाला आहे तोहि बरोबर नाहीं. कारण न्यास व वृत्ति अनेक असल्यामुळें त्याच्यावरून कालनिर्णय करणें बरोबर नाहीं (इंडि. अँटि. १.४६).

**माचयनायमींगारू**—(स.१३०३–३१) यास इम्मडी निःशंकवीर अशी पदवी होती. हा दुसऱ्या प्रतापरुद्राचा लष्करी अधिकारी होता.

**माणकजी**—(मृ. स. १७९२) हा प्रसिद्ध जहाजें बांधणारा लौजी नसरवाजीचा वडील मुलगा. याचा बाप मरण पावल्यावर, जहाजें बांधण्याचें काम यानें सुरू केलें. कोर्ट ऑफ डायरेक्टर्सनीं याला याच्या चांगल्या कामाबद्दल एक चांदीचा रूळ व मूल्यवान् शाल नजर पाठविली. यानें व याच्या बापानें ईस्ट इंडिया कंपनीच्या उपयोगाकरितां ९०० टन वजनाचीं दोन नवीन जहाजें तयार केलीं; व हीं जहाजें युरोपखंडांतील कोणत्याहि बंदरांत तयार केलेल्या जहाजांशीं बरोबरी करण्यासारखीं होतीं (ऐ. च. पृ. १२६–२७).

**माणकोजी बोधला**—(स. १६२५ सुमार) हा एक मराठी संत. हा सोलापूर जिल्ह्यांतील धामणगांवचा पाटील. याचें उपनांव जगताप असून, हा जातीनें मराठा होता. याच्या बायकोचें नांव ममताई व मुलाचें नांव यमाजी. याच्या संबंधीं कित्येक गोष्टी, चमत्कार वगैरे भक्तविजयाच्या ५३ व्या अध्यायांत वर्णिलीं आहेत.

याचें चरित्र याच्या जोतिराम नांवाच्या शिष्यानें अकरा अध्यायांत वर्णिलें आहे (मं.वा.इ. १८३७ ले.४).

**माणकोजी दहातोंडे**—( स. १६३७-४३ ) हा शिवाजीचा प्रारंभींचा सेनापति. स. १६३७ मध्यें शहाजी बंगळूरास राहूं लागला त्याच सालीं 'शहाजीनें आपले तर्फे दादाजी कोंडदेव मलठणकर यास सुभा सांगोन पुण्यास ठाणें घेतलें' (मराठी दप्तर, रुमाल ३ रा). तेथील बंदोबस्तासाठीं व व्यवस्थेसाठीं शहाजीनें शामराजपंत रांझेकर, बाळाजी हरि व हा यास शिवाजीसमवेत स. १६४१ च्या हिंवाळ्यांत बंगळूरहून पुण्यास रवाना केलें. शिवाजीनें मावळे जमविले आणि यास स. १६४३ मध्यें पागेची सरनोबती दिली, आणि लोहगड विसापुरावर पाठविलें. तेथील ठाणेदार सीदी हिलाल हवशी सामोपचारानें किल्ला देईना. तेंव्हां त्यास माणकोजीनें शहाजीकडे पाठवून दिलें व विसापूरचा तावा घेतला ( सीदी हिलाल पाहा ).

**माणिक्य**—( अरिमर्दन पाहा. )

**माणिक्यचंद्र**—याची मम्मटाच्या काव्यप्रकाशावर टीका आहे ( २ केशवमिश्र पाहा ).

**माणिक्यदेव**—दिल्लीचा राजा. यानें 'उणादिसूत्रवृत्ति' हा ग्रंथ लिहिला. अलंकारशेखर करणारा माणिक्यचंद्र यापेक्षां वेगळा आहे.

**माणिक्यदेवी**—ही गोवें येथील कदंब घराण्यांतील त्रिभुवनमल्लाची बायको. हिला शिवचित्तदेव २ रा नांवाचा मुलगा होता.

**माणिक्यनंदी**—( स. ८०० सुमार ) हा जैनधर्मी दिगंबरपंथी होता. यानें परीक्षामुखशास्त्र किंवा परीक्षामुखसूत्र नांवाचा जैन तत्त्वज्ञानावर ग्रंथ लिहिला.

**मातब्बरखान सय्यद**—( स. १६८८-१७०४ ) हा एक अरब सरदार कल्याणास वसती करून राहिलेल्या एका कुटुंबांतला होता. हा प्रथम नाशिक जिल्ह्यांत ठाणेदार असून मावळे, कोळी, भिल्ल इत्यादि लोकांत मिसळणारा होता व डोंगराळ प्रदेशाची याला माहिती होती. हरजी जाखरे नांवाचा एक हुशार मराठा याच्या हाताखालीं होता. स. १६८८-८९ या सालांत संभाजीचा अंमल ढिला पडल्यानें भराभर यानें अनेक किल्ले सर केले. पुढें कल्याणचा सुभेदार म्हणून हा नेमला गेला. औरंगजेबाच्या विश्वासांतील हा एक होता. हा स. १७०४ च्या मार्चांत मृत्यु पावला. यानें बांधलेल्या मशिदी वगैरेंचे अवशेष अद्याप कल्याण येथें आढळतात ( संभाजी पा. ८९-९० ).

**मातला ( मात्ला ) अनंत**—विजयनगरच्या दुसऱ्या वेंकटपतिदेवराय आरविडूचा हा एक सेनापति होता. त्याचप्रमाणें हा कविहि पण होता. याला विजयनगरच्या राज्याचा उजवा हात समजत असत.

यानें 'काकुत्स्थविजयम्' हा पद्यात्मक ग्रंथ तेलगूमध्यें लिहिला आहे. शिवाय यानें पुष्कळ लिखाण लिहिलें असून तें विद्वानांना मान्य आहे. तसाच हा मोठा शूर व लढवय्या होता. याचा तारिगोप्पुलदत्त मंत्री हा दुसऱ्या वेंकटपतिदेवराय आरविडूचाहि एक मंत्री होता.

**मातंग** किंवा **मातंगदिवाकर**—हा संस्कृत कवि. चांडाल जातीचा असूनहि हर्षवर्धनाच्या दरबारांत बाण व मयूर यांच्या जोडीनें बसत असे.

**मातृगुप्त**—( स. ५२८ सुमार ) हा कवि काश्मीरचा राजा झाला होता. आणि तें राज्यपद याला उज्जयनीच्या हर्ष विक्रमादित्यानें दिलें होतें ( रा. त. ३. १२९-१८९ ). हा हर्ष विक्रमादित्य म्हणजे मंदोसरचा यशोवर्मा विष्णुवर्धन असावा. पुढें प्रवरसेनानें आपलें काश्मीरचें राज्य मातृगुप्तापासून घेतलें.

यानें नाट्यशास्त्रावर वार्तिकासारखा कांहीं ग्रंथ केलेला होता असें राघवभट्टाच्या शाकुंतलटीकेवरून दिसतें ( साहित्यशास्त्राचा इतिहास, पा. २५ ).

**मातृदत्त**—हा सत्याषाढश्रौतसूत्रांतील एकोणीस व वीस या प्रश्नांवरील टीकाकार आहे. वरील दोन प्रश्न गृह्यकर्मांचे आहेत.

**मादण्णा**—(स. १६७७-खून स. १६८६) मादण्णा यास शिवाजीनें महादण्णा असें म्हटलें आहे ( इतिहासमंजरी, पृ. ९७ ). पण फर्मानांत मादा किंवा मादो ( मं. त्रै. व १३. अं. ४, पृ. ७२ ) असें म्हटलेलें आढळतें. याचें आडनांव पिंगळी असें होतें.

हा जातीचा ब्राह्मण होता. याच्या पित्याचें नांव भानुपंत. भानुपंत वारंगळ प्रांतांत हनुमकोंडा गांवीं राहत असे. तो तेथें मुलकी कारभार व करवसुलीचें काम पाहत असे. भागम्मा ही त्याची पत्नी होय. भानुपंत व भागम्मा यांस पुढीलप्रमाणें संतति झाली: १ अकण्णा, २ मादण्णा, ३ विसण्णा, ४ मृत्युंजय. यास एक मुलगीहि होती. तिचीं मुलें यंगण्णा ऊर्फ रुस्तुमराव, आणि गोपण्णा ऊर्फ रामदास. ही मोठी शूर व कर्तबगार होती. मादण्णाचा पुतण्या पोडल लिंगाप्पा हाहि कर्नाटकाच्या सुभेदारीपर्यंत चढला. मादण्णाला एक मुलगा होता त्याची मुंज ता. ४ जानेवारी १६८२ रोजीं झाली व लग्न १२ आक्टोबर १६८२ रोजीं झालें. शेवटीं त्यास त्याच्या दाईनें अकण्णाचा एक हसन नांवाचा मित्र होता त्याच्या आश्रयास नेऊन वांचविलें.

याला हिंदी, फार्सी वगैरे भाषांचें चांगलें ज्ञान होतें. हा वयांत येतांच व व्यवहाराची चांगली माहिती झाल्यावर मोठ्या नोकरीच्या शोधार्थ हैद्राबादेस स. १६६० पूर्वीच आला. स. १६६० च्या सुमारास हा मीर जुम्लाकडे पोतदारीच्या कामाकडे असावा. अबुल हसन याचें अबदुल्ला कुत्बशहाच्या मुलीशीं लग्न घडवून आणण्यांत याच पोतदाराची मीरजुम्लानें नेमणूक केलीसें दिसतें. त्यामुळें अबुल हसनची व याची प्रथमपासूनच मैत्री जडली होती. यानें या वेळीं अबुल हसनवर मोठेच उपकार केले होते.

नंतर वाढत वाढत स.१६७२च्या सुरुवातीस हा सय्यद मुझावरखानाचा मुख्य पेशकार झाला. अबुल हसन २१ एप्रिल १६७२ रोजीं तख्तावर आला. त्या वेळीं मुझावरखानाबरोबर या पेशकारांनींहि बरीच मेहनत घेतली होती. स. १६७३ च्या जून महिन्यांत मुझावरखानाकडील मीर जुम्लतीचा कारभार दूर झाला व सरखेलीचें काम अबुल हसन स्वतःच पाहूं लागला. तेव्हां फर्मानें वगैरे काढणें तीं मादो भानजी 'परवानगीनें' काढूं लागला. स. १६७५ च्या अखेरीस मुझावरखानासहि दिवाणीवरून दूर केलें. त्या वेळीं याच्याकडे सर्व कारभार आला व 'सूर्यप्रकाशराव' असा याला किताब मिळाला. मादण्णा व अकण्णांनीं हैद्राबादेंत स. १६७६ च्या सुरुवातीस मोठा वाडा बांधला. १६ जानेवारी स. १६७६ रोजीं वाड्याचा मुहूर्त केला व तीन महिन्यांनीं घाईनें १० एप्रिल १६७६ रोजीं पूर्ण केला. मुसाखान व मुझावरखानाच्या स्पर्धेत कर्नाटकाचा वसूल थकला व तिकडे बंडहि उठलें. प्रथम मादण्णानें त्याची व्यवस्था लावली. त्यांत आपले खात्रीचे व नातलग कारभारावर नेमले. धाकटा भाऊ विसण्णा यास सेनेची बक्षीगिरी दिली. मृत्युंजयाला आपला कारभारी अगर पेशवा केलें. एका भाच्यास-यंगण्णास रुस्तुमराव असा किताब देववून दुय्यम सेनापति केलें. दुसरा भाचा गोपण्णा ऊर्फ रामदास यास भद्राचलमची तर्फदारी देवविली. पुतण्या पोडला लिंगाप्पा यास निरनिराळीं कामें देऊन शेवटीं कर्नाटकाची सुभेदारी दिली. स. १६७५–७६ मध्यें राज्यांत जिकडे तिकडे चांगली व्यवस्था व स्थिरस्थावर केल्यावर राज्याबाहेरच्या गोष्टीकडे हा लक्ष देऊं लागला.

या वेळीं आदिलशाहींत व कुत्बशाहींत पठाणांचें वर्चस्व होतें आणि त्यांचा ओढा मोगलाकडे होता. अशा वेळीं मोगलाच्या तडाख्यांतून दक्षिणी राज्यें वांचविण्याची मोठीच चिंता उत्पन्न झाली होती. मादण्णानें कुत्बशाहास पुढें करून शिवाजीच्या साहाय्यानें आदिलशाहींतील पठाणांचें प्राबल्य कमी केलें. या वेळीं खुद्द शिवाजी हैद्राबादेस आला होता. त्याला यानें मेजवानीस बोलावून साहाय्याचा करार केला होता (स. १६६७). पठाणांच्या जागा मराठ्यांना देऊन पठाण विरुद्ध दक्षिणी असा डाव उभा केला. आणि मोगलांविरुद्ध तीनचार वर्षे यशस्वीपणें तोंड दिलें. मादण्णा व अकण्णा यांच्या मसलती चालू आहेत तोंपर्यंत औरंगजेबाला दक्षिणेंत यशाची आशा दिसेना.

इकडे कुत्बशाहींतहि याचें वाढतें वर्चस्व सहन न होणारीं माणसें होतींच. अबुल हसनची बाजू घेतल्यानें मुलीचें व तिच्या नवऱ्याचें पारिपत्य करतांना तिची आई यांची कायमची शत्रु बनली. दुसरी बायको अबुल हसनच्या धनगरीण बायकांमुळें क्षुब्ध झाली होती. पठाणांना दूर केल्यानें तेहि नाखूष होते. सर्व दक्षिणी राज्यांचा गट केल्यानें मोगलांना याचें फक्त शिर पाहिजे होतें. पुढें कुत्बशाहानें शहाअलमशीं तह करतांच मोगलांनीं याच्याविरुद्ध गुप्त कट केला. मोगलांचा हस्तक यल्लमतराय व अबुल हसनच्या बायका जानी बेगम, सरूमादि बाया व इतर पठाण यांनीं कट केला. मादण्णाला कट समजला. मिनहाज नांवाचा कटवाल्यांचा पुढारी होता. परंतु मोगलांच्या सान्निध्यामुळें त्याचा याला नीट बंदोबस्त करितां आला नाहीं. यानें आपल्या जहागिरीचे कोलकुंडा, हसनाबाद व राजगोपाळपेठ हे तीन तर्फ आपल्या भावादिकांस दिले. जवळील संपत्तीहि दूर केली. अशा तऱ्हेनें कांहीं दिवस गेल्यावर एक दिवशीं हा राजवाड्यांतून काम आटोपून बाहेर पडत असतां दुपारीं अकराबाराच्या सुमारास ठार केला गेला. अबूल हसनला फार विषाद वाटला. कटवाल्यांनीं मादण्णा व अकण्णाचीं प्रेतें रस्त्यांतून फरफटत नेलीं. याच्या बायकामुलांस ठार केलें, घर जाळलें. मादण्णाचें शिर शहाअलमकडे पाठविलें, व शहाअलमनें तें १६ मार्च १६८६ इ. रोजीं औरंगजेबाकडे पाठविलें. याचा पुतण्या रुस्तुमराव यासहि ठार केलें. प्रथम जमशीदनें हल्ला केला. यानें संभाजीला व संभाजीनें याला मदत पाठविली होती.

याच्या नोकरीची सुरुवात वार्षिक शंभर होनांपासून झाली. शेवटीं वीस हजार सैन्य व तैनात ७५ हजार होनांपर्यंत चढली. त्याप्रमाणें यानें दानधर्म केला. काशीपासून रामेश्वरापर्यंत सदावर्तें व देवळें बांधलीं. तिरुपतीच्या यात्रेस सवडीनें जात असेच. हैद्राबादेस एक तळें व त्याच्या कांठावर विश्वेश्वराचें देऊळ बांधलें. तेथें हा रोज दोनदां दर्शनार्थ जात असे. औरंगजेबाला वाटत असलेल्या महत्त्वावरून याची योग्यता दिसून येते.

**मादयगारी मल्लन्ना**—( स. १६०० सुमार ) भाषा तेलगू. याच्या काव्यांतील सर्वच भाग उत्तम आहे. याच्या काव्याचें नांव राजशेखरचरित्र. या कवीचीं कथानकें म्हणजे पुराणांतील राजे, राजकन्या, यक्ष वगैरे लोकांच्या कथा होत.

**मादिराज**—बसवपिता महादेवभट्टाचें नामान्तर.

**माधव**—( स. १६२५ सुमार ) हरिहराचा भाऊ व मंडलेश्वरभट्ट आणि इंदुमती यांचा पुत्र. यानें एक सुभद्राहरण नांवाचें श्रीगदित लिहिलें आहे. यानें आपल्या ग्रंथास श्रीगदित म्हणण्याचीं जीं कारणें दिलीं आहेत तींच कारणें साहित्यदर्पणांत श्रीगदिताची व्याख्या करतांना दिलीं आहेत.

सुभद्राहरणांत जी एक वर्णनात्मक कविता आहे ( ५. १५ ) तिच्यावरून या नाटकाच्या प्रकारांत व छायानाटकांत बरेंच साम्य दिसून येतें. या नाटकांत अर्जुन सुभद्रेचें हरण करतो. अर्जुन यतीचा वेष घेऊन बलरामाच्या घरांत येतो, तेथें त्याची व सुभद्रेची गांठ पडते, आणि वसंतोत्सवाच्या वेळीं दोघेंहि घरांतून पलायन करतात. त्यांना मदत करण्यास कृष्ण आपला रथ पाठविता. त्यास अटकाव करण्याची पहारेकऱ्यांची छाती होत नाहीं. आणि शेवटीं झाली ही गोष्ट वावगी झाली नाहीं अशी कृष्णहि सारवासारव करतो, त्यामुळें बलदेव व उग्रसेन हेहि त्यांच्या विवाहास अनुमति देतात. यावरून मराठी सौभद्राची कल्पना घतली असावी.

२. ( स. १६५० सुमार ) 'आयुर्वेदप्रकाश' या वैद्यक ग्रंथाचा कर्ता. हा सौराष्ट्र ( काठेवाड ) देशांतील सारस्वत होता. यानें फिरंगरोग व भावमिश्राच्या भावप्रकाशाचा निर्देश केला आहे.

३. ( स. १७०३ सुमार ) रामदासी कवि. याचा मठ तंजावराकडे चिन्नवंदूर म्हणजे त्रिवेंद्रम येथें आहे. हा राघवाचा शिष्य. समग्र महाभारत, रामायण, योगवासिष्ठ, गणेशपुराण इत्यादि याचे प्रचंड ग्रंथ आहेत ( मं. शके १८३६ वा. इ. ले. ५६ ).

**माधव ऊर्फ माधवमंत्री**—( स. १३४७-८९ ) माधवामात्य, मादरस, माधवाचार्य, माधवांक, माधवराय, माधवनरपति इत्यादि नांवांनींहि याचा निर्देश शिलालेख व ताम्रपट यांत आढळतो. चौदाव्या शतकांतील हा एक उत्तम संस्कृत पंडित, रणधुरंधर व मुत्सद्दी होऊन गेला.

हरिहर राजा आपल्या बंधूंसह हस्तिनी नगरीचें ( आनेगुंदीचें ) राज्य चालवीत असतां, त्या बंधूंपैकीं युवराज मारप यानें पश्चिम दिशेस राज्य संपादून चंद्रगुप्ती येथें तो राज्य करीत होता. हा माधव त्याचा मंत्री होता. मारपाच्या राज्याचा हा कर्णधार होता. बुद्धिसामर्थ्यांत यानें बृहस्पतीलाहि मागें टाकलें होतें. याच्या गुरूचें नांव काशीविलास क्रियाशक्ति असें स. १३४७ च्या कातवल्ली गांवच्या ताम्रपटांत म्हटलें आहे ( एपि. कर्ना. व्हा. ८, सोरब तालुका लेख नं. ३७५, पा. १३६-१३७ ). याच्या पित्याचें नांव चाउंड, मातेचें नांव माचांबिका. आणि गुरूचें नांव काशीविलास क्रियाशक्ति. गोत्र आंगिरस. मारपरायाचा वडील भाऊ महाराजाधिराजपरमेश्वर व पूर्व-दक्षिण-पश्चिम समुद्राचा अधिपति पहिला बुक्क हा विजयनगरच्या मोठ्या सिंहासनावर अधिष्ठित असतां मारपाचा दिवाण असणारा हा माधव पहिल्या बुक्काचा मंत्री झाला. हा मोठा शैव होता. यानें मोठ्या त्वरेनें कोंकणांतील कित्येक प्रान्त जिंकले. याची उपनिषन्मार्गप्रतिष्ठागुरुः म्हणून लोकांनीं वाहवा केली. यानें बुक्करायाच्या आज्ञेनें पश्चिम समुद्रापर्यंतच्या राज्याचा कारभार आपल्या शिरावर घेतला. गुरूच्या आज्ञेनें इष्टदेव जो त्र्यंबकनाथ त्याची शुद्ध शैवाम्नाय पद्धतीनें वर्षभर आराधना करून शा. श. १२९० कीळक संवत्सरांत कार्तिक कृ. ८ स व्रताचें उद्यापन केलें ( नवंबर ). या कृत्याकरितां यानें आपला देश काश्मीर येथून सत्पात्र ब्राह्मण आणवून त्यांना कर्नाटकांतील नागरखंडान्तर्गत कांहीं जमीन विद्येश्वरपुर असें नांव ठेवून दिली. असें स. १३६८ मधील हारोमुचडी गांवच्या शिलालेखावरून कळतें ( एपि. कर्ना. व्हा. ७, शिकारपुर तालुक, लेख नं. २८१, पा. २५६-२५७ ). यावरून हा काश्मीरी सारस्वत ब्राह्मण होता असें ठरतें.

यानें कोंकणांतील कांहीं भाग जिंकल्याचा वर निर्देश आला आहे. हा विजय स. १३६६ च्या अखेरीस झाला असें ठरतें. यानें गोवा नांवाची कोंकणाची राजधानी घेऊन तेथून तुर्क ( बाहामनी सुलतान पहिला मुहम्मदशाहा याचा बुक्करायानें पराजय करून ) लोकांना पिटाळून लावलें व तेथील सप्तनाथादि देव पुनः आपआपल्या जागीं स्थापिले असें आणखी एका ताम्रपटांत आलें आहे तेंहि वरील प्रसंगास उद्देशून आहे ( JBBRAS व्हा. ४, पा. ११५ ). हारोमुचडी येथें श. १२९० कीळक, कार्तिक शु. १ चा आणखी एक शिलालेख सांपडला आहे. त्यांत यानें काश्मीरी ब्राह्मणाला दान देण्यासाठीं खरेदी केलेल्या भूमीचें क्रयपत्र आहे. त्यांत याचें नांव श्रीमन्महाप्रधान मादरस ओडियर असें दिलें आहे. मादरस म्हणजे माद राजा. माधवराज याचें हें कानडी रूप आहे ( एपि. कर्ना. व्हा. ७, शिकार-

पूर तालुका लेख नं. २८२, पा. २५७). स. १३६८ मध्यें (श. १२९०) वीर बुक्कराय हस्तिनावतीपुरांत (आनेगुंदींत) राज्य चालवीत असतां त्याचा महाप्रधान माधवांक १२००० बनवासेचा कारभार करीत होता (JBBRAS व्हा. १२, पा. ३४०). तसेंच बाळेहुन्नरच्या स. १३६९ च्या (श. १२९० माघ) शिलालेखांत मादरस वोडेयर आरग वगैरे तालुके असलेल्या प्रांताचा कारभार करीत होता (एपि. कर्ना. व्हा. ६, कोप्प तालुके शि. ले. नं. ६, पा. १६७). तेथेंच वीरभद्राच्या देवळांत मादरस प्रधानाला दान दिल्याचा लेख आहे (Annual Report of the Mysore Arch. Dep., १९१६, पा. ५६). स. १३७७ च्या बेचिराख सादगळ्ळे गांवच्या शिलालेखांत दुसरा हरिहरराय राज्य चालवीत असतां प्रधान मादरस ओडेयर आरग, गुत्ती व मळेदेशांतील इतर प्रांतांचा कारभार करीत होता (एपि. कर्ना. व्हा. ७, शिकारपूर तालुक लेख नं. ३५, पा. ९२). स. १३८० (श. १३०२ वैशाख) उद्धरे (उद्रि) गांवच्या शिलालेखांत पुढील माहिती आढळते. दुसरा हरिहरराय राज्य चालवीत असतां त्याचा सेवक माधवराय, किंवा माधव नरपति कोंकण देशचा कारभार करीत होता. हा जल्लांवे गांवांत राहत होता. या वेळीं कोंकणांतील कांहीं लोक याच्याविरुद्ध उठले. तेव्हां युद्ध झालें. त्या लढाईंत १२००० बनवासींतील उद्धरे गांवचा शूर योद्धा बैचप्प कोंकणी लोकांशीं निकरानें लढून त्यानें पुष्कळ लोकांचा संहार केला व शेवटीं तो स्वर्गास गेला (एपि. कर्ना. व्हा. ८, सोरब तालुक लेख नं. १५२, पा. ५२).

स. १३८४ च्या भोगार कोप्प गांवच्या शिलालेखांत (श. १३०७ श्रावण) दुसऱ्या हरिहररायाचा महाप्रधान माधवमंत्री यानें कांहीं ब्राह्मणांस भूमिदान दिलें (एपि. कर्ना. व्हा. ८, तीर्थहळ्ळि तालुक लेख नं. १४७, पा. ३४५). तसेंच स. १३८९ च्या हिरे आवली गांवच्या शिलालेखांत (श. १३११ कार्तिक) दुसऱ्या हरिहररायाच्या कारकीर्दीत महाप्रधान मंत्री शिरोमणि मादरस ओडेयरच्या काळीं हिरियचंदप्प नांवाच्या जैनानें संन्यसनविधीनें प्राण सोडून स्वर्ग जोडला (एपि. कर्ना. व्हा. ८, सोरब तालुके लेख नं. ११६, पा. ३०).

वरील माहितीवरून हा स. १३४७–१३८९ पर्यंत ४२ वर्षे विजयनगरच्या दरबारांत मारप पहिला, बुक्क व दुसरा हरिहर यांचा महाप्रधान होता हें स्पष्ट होतें. यावरून याचा विजयनगरशीं संबंध यापूर्वीच आला असावा. स. १३८९ च्या नवंबरानंतर याचा विश्वसनीय उल्लेख सांपडत नाहीं. यावरून बहुधा त्या वर्षाच्या अखेरीस हा मृत्यु पावला असावा. असें असतां स. १३९१ (श. १३१३) मधील तीन ताम्रपट याच्या नांवावर आढळतात. त्यांचीं नांवें कुचर, मांचलापूर व चौंडलापूर अशीं गांवांवरून ठेवतां येतील, पण त्यांतील मिति व मजकूर चुकीचा असल्यानें ते बनावट आहेत असें ठरतें.

मारपरायाचें प्रधानपण चालवीत असतांनाच यानें सूतसंहितेवर तात्पर्यदीपिका नांवाची टीका रचली असावी. या टीकेंत यानें आपलें नांव माधवमंत्री व माधवार्य, इष्टदेवाचें नांव त्र्यंबक व गुरूचें नांव काशीविलास क्रियाशक्ति असें देऊन स्वतःला वेदशास्त्रप्रतिष्ठाता व उपनिषन्मार्गप्रवर्तक या पदव्या लावल्या आहेत (सोर्सेस ऑफ दि विजयनगर हिस्टरी, पा. ५१–५२); (वि. वि. ६३–४ पा. १४१–१५४).

**माधवकर**—हा निदानकार इंदुकाराचा मुलगा. हा बंगाली होता. याचा 'रुग्विनिश्चय' नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध आहे.

**माधव गंग**—(स. ४७०) हा विष्णुगोप पश्चिम गंगाचा पुत्र. यास सिंहवर्मन् असें म्हणत. स्कंदवर्मन् पल्लवानें यास गादीवर बसविलें. याला बनवासीच्या सिंहवर्मा कदंबाची मुलगी दिली होती.

**माधव गुप्त**—(स. ६२८–५५) हा माळव्याच्या गुप्त घराण्यांतील महासेन गुप्ताचा मुलगा.

**माधवदास**—हा वासिष्ठ ग्रंथाचा टीकाकार.

२. (जन्म स. १७२१) यानें भागवताचा दशमस्कंध व रुक्मिणीहरण या विषयावर मराठी कविता लिहिली आहे. याची कविता मध्यम आहे.

**माधवनंदन**—(स. १८२७–३९) हा मराठी कवि. रघुनाथ चिंतामणपंत सचीवाचा हा आश्रित होता. याचें दशरथकौसल्याविवाहावर एक मराठी काव्य आहे (मं. वा. इ. १८३७ ले. १३३).

**माधवभट्ट**—(स. १६०६ सुमार) केशवमिश्राच्या तर्कभाषेवरील 'तर्कभाषाविवरण' नांवाच्या टीकेचा कर्ता.

**माधवराय**—'चंद्रिकापरिणय' नांवाच्या संस्कृत नाटकाचा कर्ता. हा तेलंगी ब्राह्मण आनेगोंदीच्या राजाचा मंत्री होता.

**माधवराव आनंदराव रास्ते**—(मृत्यु स. १८२६) रास्ते घराण्यांतील आनंदरावाचा हा दत्तक पुत्र होय. हा खर्ड्याच्या लढाईंत होता. हा परशुरामभाऊस सामील आहे या संशयावरून बाजीरावानें याला स. १८०० त कैदेंत ठेवलें व सरंजाम जप्त केला. पण पुढें स. १८०२ त

जप्ती मोकळी करून यांस सोडलें. पुढें हा इंग्रजांचा पक्षपाती म्हणून पेशव्यांनीं याचा सर्व फौज सरंजाम जप्त केला (स. १८१४). परंतु एल्फिन्स्टननें स.१८१७त जप्ती खुली केली.

**माधवराव जाधवराव**—हा दे. ऋ. ब्राह्मण नानाचा वकील असून पुण्यास इंग्रजांकडे होता. सखारामबापू, कृष्णराव बल्लाळ व माधवराव जाधवराव यांनीं दादातर्फे मध्यस्थी करून नाना व दादा यांनीं एकविचारें कारभार करावा असें ठरविलें.

**माधवराव नगरकर**—हा नगरचा किल्लेदार होय. जेव्हां मोरोबानें नगर येथें फितुरी चालविली तेव्हां यानें चारदोघांचा डोकीं फोडून लगोलग बंदोबस्त केला.

**माधवराव पेशवे**—( जन्म स. १७४५ फेब्रु. १६,–मृत्यु स. १७७२ नवं. १८ ) हा बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे व गोपिकाबाई यांचा दुसरा मुलगा. याचा थोरला भाऊ विश्वासराव हा पानपतच्या लढाईत मारला गेला. हा सावनूर येथें जन्मला. सोळाव्या वर्षी यास पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं ( ता. २०-७-१७६१ ). याच वेळेस नीळकंठ महादेव ऊर्फ आबा पुरंदरे यास दिवाणगिरीचीं व मुतालिकीचीं वस्त्रें देण्यांत आलीं.

उदगीरच्या लढाईत निजामाचा पराभव झाला, त्यांत ४५ लक्षांचा सरंजाम पेशव्यांना मिळाला आणि तह झाला ( प. द. २५.२७४ ). पण पानपताच्या पराभवामुळें निजामानें पुनः वर डोकें काढलें. राघोबा मेदकच्या स्वारीस निघून निजामाच्या मुलखांत फेरफटका करून आल्यावर नानासाहेब वारले आणि निजामानें मराठ्यांच्या मुलखावर चाल केली. अत्याचार करीत निजाम उरुळीपर्यंत आला. इतक्यांत चांभारगोंद्याच्या जवळ त्याचे एकदोन पराभव झाले. रामचंद्र जाधव व निजामाचा भाऊ मीरमोगल हे मराठ्यांना सामील झाले. उरुळीजवळ तो कोंडला जातांच फक्त वरील दोघांच्या जहागिरीचा चाळीस लक्षांचा मुलूख ताब्यांत घेऊन बापू व दादा यांनीं तह केला ( रा. खं. १०.२ ). पण असा तह केल्यामुळें सखारामबापूस कारभारांतून अंग काढून घ्यावें लागलें आणि राघोबा व माधवराव यांत विरोध वाढला. दोघांची घोडनदीस लढाई होऊन बापूच्या कुशलतेमुळें याला राघोबाच्या स्वाधीन व्हावें लागलें ( स. १७६२ नवं. ). या वेळीं निजामानें मदत केली म्हणून उदगीरच्या वेळीं घेतलेली ४५ लक्षांची व उरुळीच्या तहाच्या वेळची चाळीस लक्षांची मिळून ८५ लक्षांची जहागीर निजामाला परत देण्यांत आली ( पु. द. ३.१७ ).

पण यामुळें निजामाला जोर आला, आणि गोपाळराव पटवर्धन वगैरेंच्या उत्तेजनानें त्यानें पुण्यासकट पुष्कळसा मुलूख जाळला व लूटहि मिळवली. पण त्यामुळें राघोबा व माधवराव यांची पुनः जूट होऊन यांनींहि हैद्राबादेपर्यंत मुलूख जाळला व लूट केली. शेवटीं राक्षसभुवन येथें लढाई होऊन निजामाचा पूर्ण पराभव झाला, आणि त्यांत त्याचा दिवाण विठ्ठल सुंदर मारला गेला आणि ८२ लाखांच्या मुलुखावर पैठण येथें तह झाला ( स. १७६३ आगष्ट ). यानंतर निजामानें खर्ड्याच्या लढाईपर्यंत विशेष गडबड केली नाहीं. यामुळें याला पुढें कर्नाटकाच्या मोहिमेकडे निर्वेध लक्ष देतां आलें.

यानें कर्नाटकांत एकंदर पांच स्वाऱ्या केल्या. पहिल्या स्वारींत धारवाडपासून तुंगभद्रेपावेतों खंडण्या घेऊन हा परत आला ( स. १७६२ जान. जून ). दुसऱ्या स्वारींत यानें तुंगभद्रेपर्यंत प्रदेश काबीज केला. सावनूर, धारवाड, रट्टेहळ्ळी, हावेरी व अनवडी येथें प्रचंड लढाया दिल्या. शेवटीं अनंतपूरचा तह होऊन हा परत आला ( स. १७६४ जाने.–स. १७६५ जून ). तिसऱ्या स्वारींत तुंगभद्रेचें दक्षिणतीर काबीज केलें, तसेंच शिरे, होसकोटे, बाळापूर वगैरे जुनीं स्वराज्याचा स्थळें काबीज केलीं ( स. १७६६ नवं.–स. १७६७ जून ). चवथ्या स्वारींत तुंगभद्रेचें दक्षिणतीर काबीज केलें. भैरवदुर्ग व निजगळ येथील निकराचे प्रसंग झाले. पटवर्धनांचें शौर्य व मुरारराव घोरपड्याचा बचाव या गोष्टी घडल्या ( स. १७६९ नवं.–स. १७७० जून ). पांचव्या स्वारींत हा हजर नव्हता. ती स्वारी त्र्यंबकराव पेठ्यांनीं चालविली. तेव्हां गोपाळराव पटवर्धनांचा मृत्यु, गुर्रमकोंडा, कोलार, मोतीतलाव येथील भयंकर लढाया व श्रीरंगपट्टणचा कायमचा तह या गोष्टी झाल्या (स.१७७० जून–स. १७७२ जून ). यांपैकीं पहिल्या चार स्वाऱ्यांत हा स्वतः हजर होता. पानपतानंतर हैदर उदयास आला, आणि त्याला तडफेनें याला तोंड द्यावें लागलें. राज्याची आर्थिक सुस्थिति या दक्षिणेकडील मुलखावरच अवलंबून होती.

निजाम व कर्नाटक यांची व्यवस्था लावीत असतांच घरांतल्या रघुनाथरावाची आणि जानोजी भोसल्यासारख्या शत्रूशीं संगनमत करणाऱ्या माणसांचीहि याला व्यवस्था लावावी लागली. प्रथम खोलेश्वराचा आणि नंतर कनकेश्वराचा तह ( स. १७६९ ) करून यानें जानोजीला पूर्ण

लगामीं लावलें ( १ जानोजी भोसले पाहा ). याप्रमाणें जरूर तेथें युद्ध करून किंवा प्रांतांची देवघेव करून सर्व दक्षिण निर्वेध करण्याचा यानें यशस्वी प्रयत्न केला. सरदारांतील फुटीच्या धोरणास आळा घातला आणि वसूलखंडण्या वेळच्यावेळीं वसूल करून आर्थिक स्थिति खंबीर केली.

हिंदुस्थानांत सत्ता गाजवावयाची असल्यास दिल्लीवर नजर ठेवावी लागत. पूर्वी पानपतावर मराठ्यांची नाचक्की झाली होती ती नाहींशी करण्याची जबाबदारी याच्यावर होती. तीहि पार पाडण्याकरितां रामचंद्र गणेश कानडे व विसाजी कृष्ण बिनीवाले या दोन सेनानायकांची यानें योजना केली; आणि त्यांनींहि पराक्रमानें दिल्ली काबीज करून दिल्लीच्या किल्ल्यावर मराठ्यांचें निशाण चढविलें (फेब्रु.), व इंग्रजांच्या आश्रयास असणाऱ्या दुसऱ्या शहाआलम बादशहास दिल्लीच्या तक्तावर बसविलें (स. १७७१ डिसें. ); आणि बादशहाची गिल्लीकच्यार मराठ्यांच्या ताब्यांत आली. महादजी शिंदेहि या स्वारींत होता.

दहा वर्षांच्या आंत मराठ्यांचें वर्चस्व दिल्लींत पुनः प्रस्थापित झालें. यांनीं पाठावलेल्या सेनापतींच्या पराक्रमांचीं वर्णनें ऐकून याला इतका आनंद झाला कीं यानें त्यांना सोन्यारुप्याचीं फुलें उधळीत पुण्यांत आणावें अशी आज्ञा केली होती.

असा हा पराक्रमी व कर्तबगार पेशवा क्षयाचे विकारानें थेऊर येथें वारला ( शके १६९४ कार्तिक व. ८ ). रमाबाई सती गेल्या.

निजामानें पुणें जाळलें तेव्हां यानेंच पुण्याची पुनः मुहूर्तपूर्वक रचना केली ( स. १७६९ ); आणि पेठा वगैरे वसविल्या. सरदारांवर चौथाई कर्जफेडीकरितां बसविली.

रघुनाथराव याला सारखा त्रास देई. घोडनदीच्या लढाईनंतर धोडपच्या लढाईंत त्यास पकडून यानें कैदेंत टाकलें ( स. १७६८ जून ). तथापि तो अर्धे राज्य मागून सारखा उपद्रव देई. हाहि खुबीनें त्याला व त्याच्या सल्लागारांना ताब्यांत ठेवी (रघुनाथराव पेशवे व सखारामबापू पाहा ). तथापि या अल्पवयी पेशव्याला अयोग्य उपायांचीहि योजना करावी लागली. कांहीं अपमानकारक शब्द उच्चारल्यानें गंगाधर यशवंत चंद्रचूडाला यानें भर दरबारांत चाळीस कमच्या मारल्या, असें बखरींत लिहिलें आहे. दिनकर महादेवाच्या बाबतींतहि यानें असेंच पोरकर व बेइज्जतीचें वर्तन केलें होतें. पुरंदरे यांचा पुरंदरचा किल्ला घेण्याकरितां यानें केलेलें कारस्थान पाहिलें म्हणजे याच्या अंतःकरणाची कल्पना येते (पु.द.३प्रस्ता.). यामुळें याचें कोणाशीं खरें रहस्य नसे.

याच्या वेळीं राजकारणांत वावरणारी एक नवी पिढी उत्पन्न झाली. त्यामध्यें सर्व जातींच्या लोकांचा भरणा दिसतो. तथापि दूरदृष्टि नसलेल्या पटवर्धन व रास्ते यांची यावर विशेष छाप होती. देशस्थ-कोंकणस्थ वादासारखे घातक वाद याच्या वेळीं उघडपणें वावरूं लागलेले दिसतात. या वेळीं तयार झालेल्या लोकांत उच्च दर्जाचा राजकारणी किंवा ध्येयवादी कोणीहि झाला नाहीं. जीं दोनतीन माणसें पुढें वावरत होतीं तींहि जुन्या पिढींतीलच होत. यानें दारुगोळा तयार करण्याचा प्रयत्न केला, तरी शास्त्रीय ज्ञानाच्या अभावामुळें परावलंबीपणा नष्ट झाला नाहीं.

२. ( सवाई ) ( स. १७७४-१७९५ ) नारायणराव पेशवा मारला गेल्यावर त्याची गरोदर पत्नी गंगाबाई हिला राघोबा व आनंदीबाई यांच्या भीतीमुळें बारभाईंनीं पुरंदर किल्ल्यावर बंदोबस्तांत ठेविलें होतें. तेथेंच सवाई माधवरावाचा जन्म झाला ( १८ एप्रिल ); व नंतर ४० दिवसांनीं याला पेशवाईचीं वस्त्रें मिळाला.

सवाई माधवराव व गंगाबाई हे खासे आणि नाना व बापू कारभारी या चौघांना कैद करण्याचा कट राघोबाच्या पक्षानें केला, पण तो फसला. तेव्हां इंग्रजांच्या मदतीनें राघोबानें पेशव्यांशीं भांडण सुरू केलें, आणि मराठी साम्राज्यांत दुसऱ्या अनेकांनीं बंडाळी केली, पण त्या सर्व संकटांचा परिहार नानांनीं केला.

सवाई माधवराव सव्वातीन वर्षांचा असतां गंगाबाई वारली (जुलै स.१७७७). यापुढें याचें संगोपन सदाशिवरावभाऊची बायको पार्वतीबाई हिनें केलें. १७७९ सालीं सवाई माधवरावाची मुंज पुणें येथें पर्वतीवरच मोठ्या थाटानें करण्यांत आली. पुढें स.१७८३ च्या फेब्रुआरींत याचें लग्न टोकेकर थत्ते यांच्या कन्येशीं होऊन तिचें नांव रमाबाई ठेवण्यांत आलें. पेशव्यास लेखन व वाङ्मयाच्या शिक्षणासाठीं महादजीपंत गुरुजीस ठेवण्यांत आलें. पेशव्यासाठीं पौराणिक व ऐतिहासिक बखरी रचण्यांत आल्या होत्या, व भौगोलिक माहिती शिकविण्यासाठीं एक युरोपीय शिक्षकहि ठेवण्यांत आला होता. नानातऱ्हेचे खेळ खेळण्याची व्यवस्था नानांनीं केली. खबुतरें, पोपट, मैना, चंडोलपक्षी, बदकें, पाणकोंबडीं, मोर वगैरे पक्षी; ससे, हरणें, काळवीट, चित्ते, वाघ, गेंडे, एडके वगैरे पशु; आणि कुस्त्या खेळणारे पहिलवान, वज्रमुष्टी, मल्ल, दांडपट्टा व तिरंदाजी खेळणारे इसम बाळगण्यांत आले. घोड्यावर

बसणें, हत्ती चालविणें, बोथाटी व लेजीम खेळणें, तिरंदाजी करणें, वगैरे गोष्टी पेशव्यास शिकविण्यांत आल्या.

गंगापुर येथें नानासाहेब पेशव्यांची बायको गोपिकाबाई राहत होती. तिचा वृद्धापकाळ झाल्यामुळें तिच्या भेटीस सवाई माधवराव स. १७८८ च्या मार्चमध्यें गेला. यापुढें राज्यकारभारांत हा थोडथोडें लक्ष घालूं लागला. घाशीराम कोतवालाची गोष्ट, ब्राह्मणांस कोंडून ठेवल्यामुळें घाशीरामास देहांत शिक्षा झाल्याची घडून आली. स.१७९१ सालीं कन्यागत असल्यामुळें पेशवे वाईस जाऊन नंतर साताऱ्यास छत्रपति महाराजांच्या भेटीस गेले. उत्तरहिंदुस्थान पूर्णपणें ताब्यांत घेतल्यावर स. १७९२ सालीं महादजी शिंदे यांनीं पुण्यास येऊन नानाकडे असलेलें कारभारीपण स्वतःस मिळण्याची अप्रत्यक्षपणें खटपट पेशव्याजवळ केली. स. १७९४ सालीं पहिली बायको वारल्यानें याचें दुसरें लग्न गणेशपंत गोखले यांच्या मुलीशीं झालें. तिचें नांव यशोदाबाई ठेवण्यांत आलें. याच सुमारास शनवार वाड्यांतील कोठी व सातमजली बंगला जळाला.

राघोबाचा मुलगा बाजीराव जुन्नर येथें बंदींत होता. त्यानें पेशव्याशीं गुप्त पत्रव्यवहार सुरू केला. हें नानाफडणीसास समजतांच त्यानें याचा निषेध केला. या व इतर प्रकरणांत याचें नानाशीं जमत नाहींसें झालें. त्याचा परिणाम मनावर होऊन हा ज्वर व वात यांनीं आजारी पडला. स. १५ आक्टोबर १७९५ रोजीं वाताचा झटका होऊन त्या भरांत शनवारवाड्यांतील गणपतीच्या दिवाणखान्याच्या पूर्वेकडील खिडकींतून यानें खालीं उडी टाकली; ती हौदांतील कारंज्यावर पडून दोन दिवसांनीं याचा अंत झाला.

खर्ड्याच्या लढाईंतील जय हीच काय ती याच्या कारकीर्दींतील महत्त्वाची गोष्ट होय.

**माधवर्मन्**—( स. ५५० सुमार ) यानें बोलस्वामिन् व केशवस्वामिन् या दोन सनातनधर्माप्रमाणें चालणाऱ्या व सामवेदी ब्राह्मणांना कृष्णावेण्णेच्या पूर्व-दक्षिणेस असलेलें 'रेट्टरक' ( रेटरें बुद्रुक, जि. सातारा ) हें गांव दान दिलें ( वैशाख शु. १५ ). दानपत्र लिहिणारा श्रीपाल कायस्थ. हें दानपत्र उपलब्ध असून स.च्या सहाव्या शतकांतील असावें ( मं. त्रै. ८.३, पा. १६३–१६५ ).

**माधव शुक्ल**—( ग्रंथकाल स.१६५५ ) याचा 'कुंडकल्पद्रुम' नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. हा ग्रंथ संस्कृतमध्यें असून यांत १३५ श्लोक आहेत. हा काश्यपगोत्री औदिच्य ब्राह्मण होता. याचा वंश यानें पुढीलप्रमाणें दिला आहेः गोविंद–व्यासनारायण–कूक–माधव.

**माधव सरस्वती**–गंगाधरसरस्वतीच्या सात शिष्यांपैकीं एक.

२. हा 'तत्त्वानुसंधान' ग्रंथाचा कर्ता.

**माधवसिंहराज कच्छप**—( स. १६०५ सुमार ) हा भगवानदास कच्छपाचा मुलगा. याला मानसिंग नांवाचा भाऊ होता. रागमालेचा कर्ता पुंडरीक विठ्ठल व पत्रप्रशस्तीचा कर्ता दलपतिराय हे याचे आश्रित होते. हा संगीताचा भोक्ता असून अकबराच्या मर्जींतील होता.

**माधवसुत**—यानें भागवताचा दशमस्कंध मराठींत लिहिला.

२. रुक्मिणीस्वयंवर या मराठी ओवीबद्ध ग्रंथाचा कर्ता ( मं. त्रै. १२. २, ले. २० ).

**माधवसेन सेन**—बंगाल्यांतील लक्ष्मणसेनाचा पुत्र. याच्या वेळीं सेन घराण्याचें महत्त्व नष्ट झालें.

**माधोसिंग**—( ईश्वरसिंग पाहा ).

**माधवाचार्य**—( माधव ऊर्फ माधवमंत्री पाहा ).

२. ( मृत्यु स. १३७२ सुमार ) याला माधवाचार्य, माधवामात्य व मादरस असेंहि म्हटलेलें आढळतें. हा जाडा संस्कृत-पंडित व धार्मिक बाबतींत पुढाकार घेणारा वजनदार माणूस होता. यानें बरेच संस्कृत ग्रंथ रचल्याची आख्यायिका आहे. त्यांत पराशरस्मृतिव्याख्या ( पराशरमाधव ), व्यवहारमाधव, जीवन्मुक्तिविवेक, कालमाधव व जैमिनीय न्यायमालाविस्तार हे प्रमुख होत.

कालमाधवाच्या व पराशरमाधवाच्या प्रारंभीं याची पुढील माहिती आढळतेः 'याचें नांव माधव, माधवार्य किंवा माधवामात्य होय. आईचें नांव श्रीमती व बापाचें नांव मायण होय. सायण व भोगनाथ हे याचे धाकटे भाऊ होत. भारतीतीर्थ व विद्यातीर्थ हे याचे गुरु होत. श्रीकंठ हा याचा तिसरा गुरु दिसतो. याचा धाकटा भाऊ भोगनाथ याचाहि गुरु श्रीकंठ असून महागणपतिस्तव नांवाच्या स्तोत्रांत त्यानें त्याची पुष्कळ स्तुति केली आहे. श्रीकंठश्च गुरुः परेऽपि गुरवो लोकत्रये त्वद्भुतम् ( इंडि. अँटि. भा. ४५, पा. ३ ). भोगनाथाचा यजमान दुसरा संगम याचाहि गुरु श्रीकंठनाथ होता, असें बिट्रगुंटच्या स. १३४६ च्या ताम्रपटावरून दिसतें ( एपि. इंडि. भा. ३, पा. २६ ). श्रीकंठ शब्दाचा शंकर असाहि अर्थ होतो. हा कृष्णयजुर्वेदापैकीं बौधायनसूत्राचा भारद्वाजगोत्री ब्राह्मण होता. तसेंच बुक्कराजाच्या साम्राज्याचा भार वाहणारा अमात्य होता. यानें बुक्काखेरीज कोणाचाहि

आश्रयदाता म्हणून उल्लेख केलेला नाहीं. बुक्काच्या हातांत पूर्ण सत्ता त्याचा वडील भाऊ पहिला हरिहर मरण पावल्यानंतर आली. त्या वेळीं म्हणजे स. १३५५ च्या सुमारास यानें पराशरमाधव लिहिला असावा, व प्रायः विस्तृत माहिती दिली असल्यामुळें याचा तो पहिला ग्रंथ असावा.

व्यवहारमाधव, जीवन्मुक्तिविवेक, व कालमाधव हे तीन ग्रंथ पराशरमाधवाला पुरवणीसारखे आहेत असें म्हटलें असतां चालेल. विद्यारण्य व हा एकच अशा कल्पनेनें जीवन्मुक्तिविवेक ग्रंथाच्या कांहीं हस्तलिखित व मुद्रित प्रतींत विद्यारण्यस्वामिकृत असे किंवा अशा अर्थाचे शब्द पडले आहेत, ते लेखकांच्या गैरसमजुतीनें चुकीनें पडले आहेत असें दिसतें. कालमाधव ग्रंथांत अधिक मासाची माहिती दिली आहे, त्यावरून हा ग्रंथ श. १२८१ ज्येष्ठ ( स. १३५९ ) नंतर लवकरच लिहिला असावा असें दिसतें.

पराशरमाधव व त्याला पुरवणीदाखल असणारे वरील ग्रंथ लिहून झाल्यावर स्मार्त ग्रंथ सोडून श्रौताकडे यानें आपली नजर फिरविली आणि जैमिनीय न्यायमालाविस्तार हा ग्रंथ लिहिला, असें यानें न्यायमालाविस्ताराच्या प्रस्तावनेंत लिहिलें आहे. तेथेंच यानें भारतीतीर्थ यतींची कृपा असल्यामुळें हा ग्रंथ आपण रचला. बुक्कहि विद्यातीर्थ मुनींच्या कृपेनें सर्वज्ञ झाला. आपण बुक्काचे कुलगुरु व मंत्री आहोंत; आपण 'सर्वशास्त्रविशारद' आहोंत, तसेंच आपण प्रतिवर्षी वसंतऋतूंत सोमयाग करतों, असें यानें लिहिलें आहे. हा ग्रंथ स. १३६० मध्यें लिहून झाला असावा. संक्षेपशंकरजय या नांवाचा माधव नांवाच्या कवीचा ग्रंथ शंकरदिग्विजय या नांवानें आनंदाश्रमांत छापला आहे. पण तो माधवाचार्य किंवा विद्यारण्य यांपैकीं कोणाचाहि नाहीं.

सायण याचा सख्खा भाऊ असून त्यानें आपल्या सुभाषितसुधानिधि ग्रंथांत याला कल्पतरूची उपमा दिली आहे.

सायणानें लिहिलेल्या धातुवृत्तीला माधवीया असें विशेषण याचा सन्मान करण्याकरितां लावलेलें दिसतें.

बुक्करायानें याला वेदार्थ सांगण्याविषयीं आज्ञा केली. तेव्हां सायण त्या कामांत निपुण असल्यामुळें त्यालाच तें काम देण्यासाठीं माधवाचार्यानें विनंति केली. त्याप्रमाणें सायणाकडे तें काम सोंपविण्यांत आलें ( कृष्णयजुःसंहिताभाष्य-प्रस्तावना ). स्वतः माधवाचार्यानें वेदभाष्याचा कांहीं भाग रचला असावा. निदान प्रारंभ यानें केला असावा. कदाचित् सायणाकडून पुरुषार्थसुधानिधि लिहून पुरा होण्यास थोडा अवकाश असल्यामुळें, वेदार्थ समजाऊन घेण्याची बुक्करायाची उत्कण्ठा पाहून यानें वेदभाष्याचा आरंभ व नामकरण केलें असावें. याचा पुरावा कृष्णयजुःसंहिताभाष्याच्या उपोद्घातांतील व पहिल्या काण्डाच्या कांहीं प्रपाठकांतील समाप्तीचीं वाक्यें पाहिलीं असतां मिळतो. पूर्वोत्तर मीमांसेचें व्याख्यान केल्यावर वेदांचा अर्थ सांगण्यास माधवाचार्य प्रवृत्त झाला, असें उपोद्घातांत सांगून 'माधवाचार्यानें रचलेला वेदार्थप्रकाश' असें समाप्तींत म्हटलें आहे ( कृ. य. सं. भा. प्र. ). यांतील पूर्वोत्तर मीमांसेचा संबंध यानें रचलेल्या जैमिनीय न्यायमालाविस्ताराशीं बराच पाहोंचत असल्यामुळें वेदभाष्यास प्रारंभ यानेंच केला, या मुद्यास बळकटी येते. पुढें सायणानें तें काम हातां घेतल्यावर सायणानें उपोद्घातांत आपलें नांव घातलं ( कृपालुः सायणाचार्यो वेदार्थं वक्तुमुद्यतः । तै. आ. प्र. ). पण असें म्हणण्यानें जैमिनीयन्यायमालाविस्ताराचें कर्तृत्व त्याच्याकडे जाऊं शकत नाहीं. कृष्णयजुःसंहिताभाष्याच्या पहिल्या कांडाचे पांच प्रपाठक पूर्ण होण्याच्या सुमारास पुरुषार्थसुधानिधीचें काम पुरें करून सायण मोकळा झाला व त्यानें वेदार्थाचें काम अंगावर घतलें, हें लक्षांत घेतलें असतां या नांवाचा घोटाळा होणार नाहीं. वेदभाष्याचें नांव वेदार्थप्रकाश व तो माधवानें प्रारंभ केल्यामुळें त्याला माधवीय असें विशेषण लावलें, पण पहिला थोडा भाग सोडला असतां सर्व भाष्य सायणानेंच केलें आहे.

चारहि वेदांत ऋग्वेदाचा अनुक्रमांक पहिला असला तरी माधवाचार्यानें वेदभाष्याचा प्रारंभ यजुर्वेदानें करण्याचें कारण ऋक्संहिता व सामसंहिता यांच्या भाष्यांत आलें आहे. यज्ञांत अध्वर्यूच्या कार्याला प्राधान्य असल्यामुळें प्रथम यजुर्वेदाचें व्याख्यान करून नंतर होत्याच्या कार्यासाठीं ऋग्वेदाचें भाष्य आरंभिलें ( ऋग्वेदभाष्य प्रस्ता. ५ ). शिवाय माधवाचार्याचा कृष्णयजुर्वेद असल्यानें तिकडे याचें प्रथम लक्ष जाणें स्वाभाविक आहे. वेदभाष्यास स्वतः आरंभ केल्यामुळें माधवीय वेदार्थप्रकाश असें त्याचें नांव ठेवलें आणि तेंच सायणानें शेवटपर्यंत पुढें चालविलें. कृष्णयजुर्वेद व ऋग्वेद, यानंतर त्यानें सामवेदसंहितेचें भाष्य केलें. येथें 'आदिशत् सायणाचार्यं वेदार्थस्य प्रकाशने' असा माधवाचार्यांच्या नांवाचे स्थलीं सायणाचार्याचें नांव घालून बदल केलेला दिसतो. त्यावरून हा त्या वेळीं जिवंत नसावा.

हा केव्हां मृत्यु पावला हें नक्की समजत नाहीं. पण बुक्कराय जिवंत असतांनाच हा मृत्यु पावला असावा. बुक्कराय स. १३७७ च्या फेब्रुवारी महिन्यांत २४ तारखेस मरण पावला ( श. १२९८ नळ, फाल्गुन व. १ मंगळवार, एपि. कर्ना. व्हा. ४. येडतोरे तालुक ले. नं. ४६पा. ९९). वेदभाष्याच्या कामास प्रारंभ स. १३६० च्या अखेरीस झाला. नंतर सतरा वर्षांत यजु, ऋक् यांचीं भाष्यें पुरीं झालीं आणि माधवाचार्य मेल्यामुळें सायणाला वेदभाष्याचें काम करण्याची बुक्कानें आज्ञा केली. म्हणजे हा स. १३७२ च्या सुमारास परलोकवासी झाला असावा. बुक्कराय मेल्यावर त्याला मुक्ति मिळण्याकरितां हरिहरानें कांहीं ब्राह्मणांना इम्मडिबुक्कराजपुर नांवाचा गांव दान दिला. या ब्राह्मणांमध्यें पहिलें नांव सायणाचें असून दुसरें नांव त्याचा पुत्र सिंगण याचें आहे ( रिपोर्ट ऑन दि वर्किंग ऑफ अर्कालॉजिकल रिसर्चेस् इन् म्हैसोर, १९१४–१९१५, पा. ४२ ). माधवाचार्य जिवंत असता तर त्याचें नांव या दानाच्या यादींत आलें असतें. सायणानें दुसऱ्या हरिहराच्या कारकीर्दींत यज्ञतंत्रसुधानिधि ( स. १३८१ ) नांवाचा ग्रंथ लिहिला त्यांत याची थोडी माहिती दिली आहे. त्यांत याचा भूतकाळांत निर्देश असून संन्यास घेतल्याचा निर्देश नाहीं. याचे स. १३६० पासून पुढले दिवस वेदभाष्याच्या कामावर देखरेख ठेवण्यांत खर्ची पडले असावेत.

यावरून यानें कधीं लढाया केल्या असें दिसत नाहीं. तसेंच संन्यास घेऊन विद्यारण्य नांव धारण केलें हींहि कल्पनाच आहे ( श्री. रामराव, बी. ए., म्हैसूर, यांचा विद्यारण्य व माधवाचार्य व वि. वि. वि. ६३०९ विजयनगरच्या दरबारीं गाजलेले अनेक माधव वरून ).

याची धाकटी बहीण सिंगले हिचा विवाह ज्या रामरस नांवाच्या गृहस्थाशीं झाला होता तो कन्नडिग कुलांतील ( कानडी ) होता, असें हंपीजवळच्या स. १४११ च्या शिलालेखांत म्हटलें आहे ( साउथ इंडियन न्यू इंपिरियल सीरीज, व्हा. ४, पा. ६० ).

**३.** ( स. १३८७ सुमार ) हा तिसरा माधव 'सर्वदर्शनसंग्रह' या नांवाच्या ग्रंथाचा कर्ता होय. हा ग्रंथहि आजपर्यंत थोरल्या माधवाचार्यांच्या नांवानेंच मोडत होता. परंतु आतां सर्व शंका दूर झाली आहे. 'सर्वदर्शनसंग्रह' सायणाचार्यांचे ज्येष्ठ बंधु माधवाचार्य यांचा नसून सायणाचार्यांचा पुत्र माधव याचा आहे. अर्थात् हा तिसरा माधव विद्यारण्याचा पुतण्या होय. सदर ग्रंथांतील प्रत्येक दर्शनाचे शेवटीं 'अथ श्री सायणमाधवीय' असें प्रतीक आहे. बापाचें नांव अगोदर लिहिण्याची प्राचीन परंपरा पाहिली तर ग्रंथकर्ता सायणाचा पुत्र होता हें उघड आहे. 'सायणमाधव' म्हणजे सायणाचा पुत्र माधव असा मध्यमपदलोपी समास आहे. हल्लींहि मारवाडी वगैरे लोकांत ही चाल आहे. शिवलाल मोतिलाल वगैरे नांवें अशींच आहेत. ग्रंथांच्या मंगलाचरणांत सर्वत्र हा विष्णु नांवाच्या गुरूस वंदन करून "श्रीमत्सायणदुग्धाब्धिकौस्तुभेन महौजसा" म्हणजे सायण नांवाच्या क्षीरसमुद्रापासून उत्पन्न झालेला कौस्तुभमणि असें कर्त्यानें आपलें वर्णन केलें आहे. यावरून हा सायणाचा पुत्र होता हें स्पष्ट होतें. ग्रंथांच्या प्राचीन प्रतींत वेदांतदर्शन नसून त्याचें कारण, "इतःपरं सर्वदर्शनशिरोमणीभूतं शांकरदर्शनमन्यत्र निरूपितमित्यत्रोपेक्षितम्" असा शेरा आहे, आणि वेदांतदर्शनाच्या प्रतींत 'सायणाचार्यविरचित' असें उपपद आहे. यावरून वेदांतदर्शनाचें निरूपण अगोदरच सायणानें लिहिलें होतें, म्हणून मुलानें गाळलें असें ठरतें. याचा गुरु सर्वज्ञ विष्णु दुसऱ्या हरिहररायाच्या कालीं होता. तर्कभाषा-व्याख्येचा कर्ता चेन्नुभट्ट सर्वज्ञ विष्णूचा पुत्र होता. त्यानें सदर व्याख्येच्या शेवटीं "इति श्रीहरिरायपालितेन सहजसर्वज्ञविष्णुदेवाराध्यतनूजेन सर्वज्ञानुजेन चेन्नुभट्टेन विरचिताया" अशी समाप्ति आहे ( Indian Antiquary, Vol. XIV, p. 20 ).

**मानतुंग**—एक जैन कवि. 'भक्तामर' व 'भयहर' स्तोत्रांमुळें हा फार प्रसिद्ध आहे.

**मानबाई**—( मृत्यु स. १६०४ ) ही अंबरचा राजा भगवानदास याची मुलगी होय. हिचें व जहांगीरचें स. १५८५ मध्यें लग्न झालें. हिला पहिली मुलगी सुलतान उन्निसा बेगम ही झाली ( ता. २४-६-१५८६ ). दुसरा मुलगा खुस्रव, याचा जन्म लाहोर येथें स. ६.८. १५८७ रोजीं झाला. हा जन्मास आला, त्या वेळीं मानबाईस शहाबेगम हें मोठया मानाचें नांव मिळालें. या बाईनें ता. १६-५-१६०४ रोजीं अफू खाऊन आत्महत्या केली.

**मान विक्रमराज**—( स. १६२५ सुमार ) हा शक्तन तंपुरान या नांवानें प्रसिद्ध आहे. हा कालीकत येथील एक राजा होय.

**मानसिंह**—(स. १४९३ सुमार) हा ग्वाल्हेरच्या तोमर वंशांतील राजा. तोमरवंश राजपुतान्यांत तंवर या नांवानें प्रसिद्ध आहे. हा संगीतशास्त्रांत मोठा प्रवीण होता. हा संकीर्ण ( मिश्र ) रागांना फार महत्त्व देत असे. यानें

आपल्या गूजरी राणी( मृगनयनी )च्या नांवानें गूजरी, बहुल गूजरी, मालगूजरी व मंगळगूजरी हे राग तयार केले ( कनिंगहॅमकृत आर्किऑलॉजिक सर्वे रिपोर्ट, भा. २, पृ. ६३–६४ ). यानें रचलेला 'मानकुतूहल' नांवाचा संगीत-शास्त्रावरील ग्रंथ रामपूरच्या सरकारी पुस्तकालयांत सुरक्षित आहे. याच्या वेळीं ध्रुपद गाण्याची पद्धत सुरू होऊन चहूंकडे पसरली.

**मानसिंग कच्छवाह**—(मृत्यु स. १६१४) अकबर बादशहाचा सरदार. बंगाल, बहार व ओढ्या ह्या प्रांतांचा अधिकारी. हा उत्तम कारभारी व मुत्सद्दी होता. यास 'राजा' हा किताब होता.

बडोद्यानजीक सारसा येथें अकबरास एक जिवावरचें संकट आलें होतें, त्यांतून स्वतःची शिकस्त करून यानें अकबरास वांचविलें. यामुळें अकबर खुष होऊन यास त्यानें सप्तहजारी व पुढें ( मीर्झा ) राजा ही पदवी बहाल केली. यापुढें अकबराच्या बहुतेक लढायांत जय मिळण्याचें कारण हाच होता.

हा दक्षिणच्या स्वारीवर असतां स. १६१४ त मरण पावला. त्या प्रसंगीं याच्या १५०० बायकांपैकीं ६० बायका सती गेल्या. याचा भावसिंह नांवाचा मुलगा पराक्रमी होता.

**मानसिंग मोरे**—( स. १७०९–१६ ) हा राजारामाच्या वेळेपासून राज्यांत खपणारा असून पुढेंहि शाहूपाशीं होता. शाहूनें याला स. १७०९ च्या वेळीं सेनापति पद दिलें होतें परंतु तें याजकडून पुढें स. १७१६ त काढून घेतलें. याचें कारण बहुधा याचें दुखणें असावें. हा फार आजारी होता, त्यामुळें याचा शाहूला फारसा उपयोग झाला नाहीं. थोरात, आंग्रे यांजवरील स्वारींत हा नव्हता. ता. २०–११–१७१६ रोजीं शाहूनें याला औषधोपचार करण्याविषयीं लिहिलें आहे ( शा. रो. १५५–१५८ ). या ठिकाणीं शिवाजीपासून झालेल्या सर्व सेनापतींचीं नांवें दिलीं आहेत.

**मानसिंगराव मोहिते**—( स. १७७१ सुमार ) यास जानोजी भोसल्याची बहीण बाकाबाई ही दिली होती. लग्न देऊरास रघूजीच्या वेळेस झालें. रघूजीनें यास सरदारी देऊन नागपुरास आणलें. याचें घराणें नागपुरास आहे. भोसल्याच्या सोयरिकीच्या सात कुळांपैकीं मोहिते हे एक आहेत ( ब. पा. ४८ ).

वऱ्हाडच्या सुभ्याचें काम भास्करराम कोल्हटकराची स्त्री ताई व तिचा पुत्र काशीराव यांचे तर्फे कृष्णाजी गोविंद हा करीत होता. त्यास जानोजीनें काढून वऱ्हाडच्या सुभ्याचें काम यास दिलें व याचेतर्फे त्रिंबकराव कोन्हेर प्रभु यास वहिवाटीस नेमलें ( ना. प्रां. इ. पृ. १२३, १२४ ).

**मानाजी आंग्रे**—( मृ. स. १७५८ ) हा कान्होजीचा पुत्र. याची व संभाजी आंग्र्याची लढाई होऊन यास पळून जावें लागलें. तेव्हां हा बाजीरावाच्या आश्रयास गेला. बाजीरावानें यास 'वजारतमाव' असा किताब देऊन याची कुलाब्यास स्थापना केली ( स. १७३३ ). शेवटीं हा स. १७५८ त कुलाब्यास मरण पावला. याच्या पश्चात् याचा पुत्र रघुजीस 'वजारतमाव' व 'सरखेल' किताब व वस्त्रें मिळालीं ( नानासाहेब पेशवे पाहा ).

**२.** ( मृ. स. १८१७ ) हा रघुजीचा मुलगा. हा अल्पवयी असतांना जयसिंग नांवाचा सरदार याचा कारभारी होता. पुढें दौलतराव शिंद्याचा सरदार बाबुरावानें या दोघांस कैद करून अलीबाग बळकाविलें. पण तो स. १८१३ त मरण पावला. नंतर यानें पेशव्यास दहा हजारांचा मुलूख व खांदेरी बेट देऊन अलीबाग परत मिळविलें.

**मानाजी फांकडे**—( मृ. स. १८०० ) एक मराठा सरदार. हा कन्हेरखेडच्या शिंद्यांपैकीं एक असून राघोबादादाच्या पक्षाचा होता. हा शूर, धाडसी व कोणास न दबणारा असे. राघोबादादानें महादजी शिंद्यास सरदारी न देतां ती यास मिळावी म्हणून पुष्कळ खटपट करून पाहिली, पण शेवटीं व्यर्थ झाली. यानें घाशीरामाचा अन्याय उघडकीस आणला. यानें दौलतरावाचे सांगण्यावरून सर्जेराव घाटग्यास ठार मारलें. राज्यानें कांहीं कां होईना, आपला मतलब साधला म्हणजे झालें, अशा प्रकारची याची वृत्ति होती. बाजीरावास पेशवाई मिळवून देण्यासाठीं यानें पुष्कळ खटपट केली. हा रघुनाथरावाच्या प्रत्येक कारस्थानांत प्रमुख असे. रघुनाथदादाच्या पक्षास अखेरपर्यंत चिकटून राहणाऱ्या थोड्या इसमांपैकीं हा एक होता. याच्या शौर्यामुळें याला 'फाकडे' ही पदवी मिळाली. याला आनंदराव शिंदे नांवाचा एक मुलगा होता.

हा नेहमीं उघडा असे. पेशवाईंत तीन फाकडे होते. ते पुढीलप्रमाणें:–इष्टूर फाकडा, कोन्हेर त्रिंबक फाकडा व हा तिसरा होय. यांचें घराणें सध्यां बडोद्यास नांदत आहे.

**मानाभरण पांड्य**—( स. १०४६ ) याचा राजाधिराज चोलानें शिरच्छेद केला. मानाभरण चतुर्वेदी मंगलम् नांवाचें खेडें तिनेवेल्ली प्रांतांत अंबासमुद्रम्‌जवळ आहे.

**मानिक्क वाशगर**—एक ब्राह्मण. हा मदुरेपाशीं वाथवुर नांवाच्या गांवीं जन्मास आला. हा एका पांड्य राजाचा प्रधान होता. राजानें याला एकदां घोडे खरेदी करण्यास पाठविलें असतां हा विरक्त झाला. पुढें राजानें याला पकडून आणण्याचा प्रयत्न केला, पण शेवटीं याच्या सामर्थ्यापुढें राजाला हात टेकावे लागले. यानें तामिल प्रांतांत भक्ति-मार्गाचा प्रचार केला. शेवटीं चिदम्बर येथें येऊन राहिला. तेथें व्याघ्रपाद नांवाचा महात्मा राहत असे. याची एक सुंदर मूर्ति आज दक्षिणेंत तिरोचेनगोड्डच्या मंदिरांत आहे.

**मॉन्सन**—(स.१८०४–५) हेस्टिंग्सच्या कौन्सिलांतील हा एक सभासद होय. हा हेस्टिंग्सच्या विरुद्ध होता. स. १८०४ मध्यें यानें होळकरावर स्वारी केली, पण यशवंतराव होळकरानें आपलें युद्धकौशल्य दाखवून याचा चांगलाच पराभव केला. हा पराभव इंग्रजांचे इभ्रतीस मोठा लांच्छनास्पद समजला जातो. पुढें लगेच याला भरतपूरचा किल्ला हस्तगत करण्याकरितां पाठविलें. पण त्याहि स्वारींत याचा पूर्ण मोड झाला ( स.१८०५ ).

**मामाजी**—ही विजापुरच्या रणदूलाखान वजीराची दाई. हिचा वंश रहिमतपुरास आहे. रणदूलाखानाच्या दर्ग्याची व्यवस्थाहि याच्याकडेच आहे ( मं. त्रै. ७-१-४, ले. ९ ).

**मामिडी व्यंकय्या**—हा तैलंग भाषेचा कोशकार. हा कविहि होता.

**मायण**—हा माधवाचार्य, सायणाचार्य व भोगनाथ यांचा पिता. याच्या पत्नीचें नांव श्रीमती.

**मायादेवी**—शुद्धोदनाची पत्नी व बुद्धाची माता.

**मायुराज कलचुरी**—( स. ७५०-८०० ) ‘उत्तरराघव’ या संस्कृत नाटकाचा कर्ता. हा कलचुरि राजा होता.

**मायो**—सिद्धराज जयसिंहाच्या वेळीं तळ्यांत पाणी राहण्याकरितां हा बळी जाण्यास तयार झाला. तेव्हां याच्या तिरस्कृत जातीस गांवाजवळ राहण्याची परवानगी देण्यांत आली ( काठेवाड डि. गॅ. ८, पा. १५७ ).

**मारकीनाथ**—एक संत. चंद्रभागेतीरीं दर्यापूर म्हणून गांव आहे तेथील कण्वशाखेच्या व वैश्यवृत्तीनें उपजीविका करणाऱ्या बाबाजी नांवाच्या गृहस्थाचा वृद्धपणीं झालेला हा पुत्र. यास उपरती होऊन तो स्थूल ग्रामाजवळ खेडमाटकी येथें आला आणि १२ वर्षे मौन धारण करून यानें तप केलें. हें पूर्वीचें याचें गुरुग्राम होय. याचीं कांहीं पदें उपलब्ध आहेत.

**मारप्पा संगम**—हा विजयनगरच्या संगमाचा पुत्र व पहिल्या बुक्कराय संगमाचा भाऊ.

**मारवर्मन् पांड्य**—(स.६००) हा कडुंगण पांड्याचा पुत्र. यास अवनिचूडामणि असें म्हणत.

२. ( स. ६५० ) हा जयंतवर्मन् पांड्याचा पुत्र. याला अरिकेसरी म्हणत. यानें उरय्यूर नांवाचें चोलाचें शहर जिंकलें.

३. ( राज्यारोहण स. ११३२ फेब्रु. १ ) मारवर्मन् श्रीवल्लभ पांड्य १ ला असा याचा निर्देश आहे. याचा स. ११६८-६९ चा लेख अंबासमुद्रम् मध्यें सांपडला आहे.

४. ( स. ११६०-६१ ) पांड्य राजा. याचा पुत्र कुलशेखर. हा केरळांतील वीर रविवर्म्याचा जहागिरदार होता.

**मारसिंह गंग**—( स. ७९७ ) दुसऱ्या शिवमार पश्चिम गंगाचा मुलगा. याला लोकत्रिनेत्र व युवराज अशीं विरुदें होतीं.

२. ( स. ८७८-९०० ) पृथ्वीपति पश्चिम गंगाचा मुलगा.

३. ( स. ९६१-७४ ) हा भूतुग पश्चिम गंगाचा पुत्र. हा आपल्या सावत्रभावानंतर गादीवर बसला. यानें गंगवाडी, पुलीनगर, बेळवाल, बनवासी, नोलंबवाडी व सांतळीग या प्रांतांवर राज्य केलें. यानें गुजराथेवर स्वारी केली होती. यानें नोलंबवाडीच्या पल्लवास जिंकून मान्यखेट, गोनूर येथें मोठे विजय संपादन केले ( श्रवणबेळगोळा लेख ). हा जैन होता. याचा पुतळा याचा पुत्र राचमल्ल याच्या वेळीं श्रवणबेळगोळा येथें चामुंडरायानें उभारला. तो गोमटेश्वर या नांवानें प्रसिद्ध आहे. याच्याच पुतळ्याखालीं ‘चामुंडरायें करविलें’ हें मराठी वाक्य कोरलेलें आढळतें. तो पुतळा बाहुबलीचा नसावा.

**मार्को पोलो**—( स. १२५६-१३२३ ) प्रख्यात व्हेनिशियन प्रवासी. यानें चीन, हिंदुस्थान व इतर पौर्वात्य देश यांमध्यें प्रवास करून त्यांसंबंधानें युरोपियन लोकांस अद्भुत वाटणारी अशी माहिती पुस्तकरूपानें प्रसिद्ध केली. त्या वेळीं ती त्यांस फारशी खरी वाटली नाहीं, पण पुढें त्यांना तिचा खरेपणा पटला ( ब्रि. रिया. ).

**मालदेव राठोड**—( जन्म स. १५११-मृत्यु स. १६६२ ) हा जोधपूरच्या गांगाजी राठोडचा मुलगा. याजवर शेरशहानें स्वारी केली. शेरशहाची फौज बरीच असल्यामुळें याचें त्यापुढें चालणें अशक्य होतें. तरी पण हा टिकाव धरून होता. शेरशहानें मध्यंतरीं कपट केलें,

व एक बनावट पत्र मालदेवाच्या हातीं पडेल असें केलें. तें पत्र खरें समजून इतरांचें म्हणणें न जुमानतां हा रणांगण सोडून गेला ( मल्लदेव पाहा ).

पण शेरशाहा मरतांच या शूर राजास लोकांनीं मोठ्या सन्मानानें बोलावून राज्य स्वीकारण्याची विनंति केली.

**मालदेव चौहान**—( मृत्यु स. १३२१ ) हा जालोरच्या चौहानांपैकीं होता. जालोरचा किल्ला सोनगरे कान्हडदेवापासून अलाउद्दीनखल्जीनें स. १३११ मध्यें घेतला. कान्हडदेव या लढाईत मारला गेला. मालदेव हा त्याचा भाऊ होता. पण वंशरक्षणार्थ त्यानें याला आधींच किल्ल्यावरून हाकून दिलें होतें. यानें देशांत फार त्रास दिल्यामुळें बादशहाची सेना याच्या मागें लागली होती. पण हा दिल्लीस जाऊन बादशहास मिळाला. बादशहानें यास चितोडचा किल्ला दिला. सात वर्षें चितोडवर राज्य केल्यावर हा मृत्यु पावला. वि. सं. १३७८ ( स. १३२१ )च्या सुमारास मृत्यु झाला असावा. त्या वेळीं दिल्लीस घियासुद्दीन तुघ्लक हा बादशहा होता.

याच्या वेळीं सीसोद्याचा राणा हंमीर उदयास येत होता. दिल्लीस गडबड असल्यामुळें तिकडून याला साहाय्य होण्याचा संभव नव्हता. अशा वेळीं यानें आपली मुलगी व मेवाडचे आठ जिल्हे देकार म्हणून हंमीरला देण्याचें ठरविलें. कर्नल टॉडनें विधवा मुलीशीं विवाह केल्याचें लिहिलें. तें सर्वस्वीं चूक आहे. अद्यापिहि यांच्यांत असे विवाह झाले नाहींत व होत नाहींत. शेवटीं याचा देहान्त झाल्यावर ह्याचा पुत्र जयसिंह गादीवर आला. पण त्याच्यापासून प्रेमानें किंवा सक्तीनें हंमीरानें चितोडचें राज्य पुनः घेतलें, तें अद्यापि त्याच्या घराण्यांत चालू आहे. मेवाडवर आज मधलीं सताराआठरा वर्षें सोडल्यास साडेतेराशें वर्षें गुहिल वंशाचें राज्य आहे.

**मालविका**—विदर्भराजाची मुलगी व अग्निमित्राची पत्नी ( अग्निमित्र पाहा ).

**मालाधर पंडित**—हा माळव्याच्या परमारांपैकीं दुसऱ्या जयवर्म्याचा सांधिविग्रहिक होता.

**मालाधर वसु**—( ग्रंथकाल स. १४७७ ) बंगाली कवि. यानें प्रथम भागवतपुराणाचा बंगालींत दोन अध्याय अनुवाद केला, त्याबद्दल हुसेनशाहानें यास गुणराजखाँ ही पदवी दिली. याचा मुख्य ग्रंथ 'श्रीकृष्णविजय' होय ( क. कौ. ७ ). राधेच्या प्रेमवर्णनांत याच्या काव्यप्रतिभेचा परिचय होतो.

**मालेराव होळकर**—( अहल्याबाई पाहा ).

**मालोजी निंबाळकर**—( स. १४३०–३५ ) हा फलटणच्या पहिल्या वणगोजीचा पुत्र.

२. ( स. १५६०–७० ) याचा जन्म स. १५३० मध्यें झाला व स. १५६० त आपल्या बापाच्या मृत्यूनंतर वयाच्या तिसाव्या वर्षी हा सरदारी करूं लागला. याचा पिता बाजी धारराव.

आदिलशाहीच्या वतीनें मालोजी राक्षसतागडीच्या ( तालीकोट ) लढाईंत हजर राहून यानें चांगली तलवार गाजविली. तेव्हां दरबारांतून याची मानमान्यता विशेष झाली. यास वणगोजी ऊर्फ जगपाळराव व दीपाबाई अशीं दोन अपत्यें झालीं. हीच दीपाबाई मालोजी भोसल्यास दिली.

महाराष्ट्रांतील शिरके, मोहिते, माने वगैरे अत्यंत जुन्या मराठी घराण्यांप्रमाणेंच निंबाळकरांचें घराणेंहि अभिजात आहे. यांचें मूळ नांव पवार. हे आपली पीठिका सूर्यवंशी परमार कुळापर्यंत लावतात.

३. ( स.१७७४–७७ ) हा तिसऱ्या मुधोजीचा मुलगा.

**मालोजी घोरपडे**—( स. १६६१ ) हा मुधोळ संस्थानांतील बाजीचा पुत्र होय. पुढें हा आदिलशहास जाऊन मिळाला तेव्हां शिवाजीनें यास एक महत्त्वाचें पत्र लिहून आदिलशहास सोडून आपल्याकडे येण्यास व आपल्या कार्यास मदत करण्यास, आणि बाजीचा घेतलेला सूड विसरून जाण्यास लिहिलें ( सरस्वती-मंदिर वर्ष ५, अं. ५ ). परंतु हा शिवाजीस जाऊन मिळाला नाहीं. नंतर हा औरंगजेबाचा नोकर बनला. याला अकोजी नांवाचा पुत्र होता. अकोजीचा पुत्र पिराजी व त्याचा पुत्र मालोजी वगैरे लोक याच्या मागून गादीवर आले.

२. ( स. १७१६–१८०५ ) हा पिराजीचा पुत्र. हा पेशवाईमध्यें फार जुना व रणशूर योद्धा होता. यानें कोणत्याहि लढाईंत शत्रूस पाठ दाखविली नाहीं. याच्या उजव्या बाजूस एकंदर ९६ जखमा झाल्या होत्या. हा प्रथम रघुनाथरावाचेकडे होता. पण पुरंदरचे तहानंतर हा बारभाईंस मिळाला. हा बारभाईंच्या पक्षास मिळाल्यानंतर लौकरच इंग्रजांशीं सामना सुरू झाला ( स. १७७९ तळेगांव लढाई ). तीनचारशें इंग्रज व गारदी मिळोन जिवेंच मारिलें. तीनचारशें जखमी झाले. यानें शिपाईगिरीची शर्थ केली. याचे बंधु राणोजी घोरपडे हेहि सामन्यांत ठार झाले. स्वतः यास पांच जखमा झाल्या. त्या बऱ्या होण्याकरितां यास दोन महिने विश्रांति घेणें भाग

पडलें. हा व मुलगा गोविंदराव यांचें वांकडें होतें, व बापलेक खड्र्याच्या लढाईंत परस्पर विरुद्ध लढले ( स. १७९५ ).

स. १७७८ ते १७८१ पर्यंतच्या पत्रव्यवहारावरून असें दिसतें कीं, हैदरानें मुधोळकडे दंगा केला; आणि इंडी, तांबे व अलमेले ( जि. विजापूर ) हे परगणे, हा १ लक्ष ७३ हजार ९ शें रुपयांचा सरंजाम १०० स्वारांच्या फौजेनिशीं याला देण्यांत आला. हा यांजकडे याच्या हयातीपर्यंत चालला. त्याचप्रमाणें यांच्या फौजेच्या गोटासाठीं शहर पुणें येथें जागा देण्यांत आली; व तेथें यांनीं घोरपडे पेठ स. १७८२।३ मध्यें वसविली. याला चार बायका होत्या. एक पोल संस्थानांतली व दुसरी काठेवाडांतील रजपूत होती. बाकीच्या दोघी दक्षिणेंतील पवार व सोलंकी या घराण्यांतील होत्या. पहिल्या बायकोपासून गोविंदराव व महाराव हे दोन मुलगे झाले. दुसऱ्या बायकोचा मुलगा बाजीराव हा बडोदें राज्यांत राहिला. तिसरीचा मुलगा रागोजी हा इंग्रजांशीं झालेल्या युद्धांत मरण पावला.

**मालोजी भोसले**—( स. १५५०–१६२० ) हा शिवाजीचा आजा. याचा बाप बाबाजी भोसले. त्याला राजा ही पदवी होती. मालोजीचा जन्म स. १५५० त वेरूळ येथें झाला. हा निजामशाही सरदार लुखजी जाधवराव यांच्या दिमतीखालीं नेमला गेला ( स. १५७७ ). हा तोलदार सरदार असल्यानें याला जगपाळराव निंबाळकरानें आपली बहीण दिपाबाई दिली होती. तिचें सासरचें नांव उमाव्वा किंवा उमाबाई असें दिसतें.

मुर्तजानें जेव्हां इमादशाही व खानदेशची फरुकशाही डबघाईस आणली त्या वेळीं यानें बराच पराक्रम गाजविला असावा. याच्या मेहुण्यावर आदिलशाही फौज आली असतां यानें मोठा पराक्रम करून तिचा पराभव केला. त्यामुळें निजामशहानें याचा गौरव करून याला जास्त मनसब दिली. यामुळें हा लुखजीच्या तोलदारीचा झाला. अर्थात् बरोबरीचें घराणें मिळाल्यानें लुखजीनें जिजाई शहाजीस दिली. या लग्नानंतर १५-१६ वर्षांनीं हा वारला. पण मागीलप्रमाणें हाहि त्याचा काळ उपलब्ध नाहीं.

याचा मुलगा शहाजी ( जिजाबाई व शरीफजी पाहा ).

**२.** ( स. १८२२–२८ ) हा अक्कलकोटच्या दुसऱ्या फत्तेसिंग भोसल्याचा मुलगा.

**मालोपंत**—( स. १६८६ सुमार ) 'संतचरित्र' नांवाच्या मराठी ग्रंथाचा कर्ता. हा गृहस्थ इंदूर बोधले येथें राहत असे. हा अक्कण्णा व मादण्णा यांच्या हाताखालीं विजापूरला होता. याचे गुरु नरहर. 'मालोतारण' नांवाचा अप्रसिद्ध ग्रंथ संतसूचिकारानें धुंडिकुमार मालोच्या नांवावर दिला आहे. तो व हा एक किंवा भिन्न समजण्यास मार्ग नाहीं.

**माहजूर सेठी बिन नागनाक महार**—( स. १७०० सुमार ) छत्रपति राजाराम महाराजांचे वेळीं वाई प्रांतांतील नागेवाडी गांवचा हा पाटील होता. नागेवाडीची मूळची पाटीलकी महाराची होय. यानें नागेवाडी येथील नागवडासिद्ध ह्या देवाची पूजा करून राहण्याकरितां धांडेघर व गौंडाली येथील मोरोजी व चितामणी ह्या दोन गुरवांना आणलें.

हे गुरव येऊन राहिल्यानंतर त्यांनीं पाटीलकी बळकाविली. तेव्हां यानें गुरवांविरुद्ध परशुरामपंताकडे फिर्याद केली. प्रतिनिधीनें गुरवास बोलाविलें, पण ते आले नाहींत. तेव्हां प्रतिनिधीनें सिवधडे यास ( म्ह. नागेवाडीजवळील मोकदमास) विचारिलें. त्यानें पाटीलकीचें वतन महाराचेंच आहे असें सांगितलें. यावरून 'गुरवांनीं देव पुजून असावें, पाटीलकीशीं त्यांचा अर्थाअर्थी संबंध नाहीं' असा महार पाटलाच्या बाजूचा निकाल दिला. हा आपल्याविरुद्ध झालेला निकाल ऐकून मोरोजी व चितामणी या उभयतां गुरवांनीं पुनः छत्रपतीकडे फिर्याद केली. या वेळीं छत्रपती रांगण्यास होते. तेव्हां ही पाटिलकीची फिर्याद पुनः आलेली पाहून राजारामानें महारांस धारादिव्य करण्यास सांगितलें. म्हणजे 'मोगलांनीं घेतलेला वैराटगड स्वराज्यास जोडून द्यावा व पाटिलकीचें वतन अनुभवावें असा निकाल दिला.'

वरीलप्रमाणें राजारामानें निकाल दिल्यावर वैराटगड हा नागेवाडीच्या महारांनीं मोगलांशीं लढून घेतला व पाटिलकीचें वतन मिळविलें. ह्या पाटिलकीच्या वतनाबद्दल नागेवाडीच्या गुरवां–महारांमध्यें तीन वेळां फिर्यादी झाल्या. तिनहि वेळां महारांचेंच वतन ठरलें. शेवटची फिर्याद शके १६७४ म्ह. स. १७५३ तील आहे ( मं. सप्तम सं. वृत्त श. १८४१, पृ. ५५ ).

**माहप गुहिलोत**—मेवाडच्या राजघराण्यापैकीं हा रणसिंहाचा पुत्र. रणसिंहालाच कर्णसिंहहि म्हणत. वडील भाऊ क्षेमसिंह हा उदेपूरचा राजा झाल्यावर हा व याचा धाकटा भाऊ राहप हे सीसोदें येथें राहूं लागले. म्हणजे

हा ससोदें येथील राणाशाखेचा पहिला पुरुष होय. याला पुत्र नसल्यानें याचा भाऊ राहप हा याच्यामागून याच्या जहागिरीचा मालक झाला.

**माळव्याचे ( मांडूचे ) सुलतान—**

घोरीवंश—(१) दिलावरखान (अमीशाह) स. १३७३, (२) हुशंग (अल्पखान) स. १४०५, (३) मुहम्मद ( गजनीखान ) स. १४३४, (४) मसूदखान स. १४३६.

खल्जीवंश—(१) महमूदशाह स. १४३६, (२) घियासशाह स. १४७५, (३) नासिरशाह स. १५००, (४) महमूदशाह ( दुसरा ) स. १५११–३०.

**मांग सावंत**—( मृत्यु स. १५८० ) सावंतवाडी संस्थानचा संस्थापक. हा उदेपूरच्या सिसोदिया घराण्यापैकीं होता. याचें उपनांव भोसले. याला सात बायका होत्या. त्यांपैकीं सहा सती गेल्या व सातवी गरोदर होती. तिला ' फोंड ' नांवाचा पुत्र झाला.

**मांधाचीवर्मन् कदंब**—( स.४८८–५०० ) हा बनवासीच्या कदंब घराण्यापैकीं शांतिवर्मन्चा पुत्र.

**मिकर तिरुम**—( स.१५८० सुमार ) विजयनगरच्या दुसऱ्या श्रीरंग आरविडूचा जांवई. यानें अलीखान लूरीच्या मदतीनें मुहम्मद कुली कुत्बशाहाचा पराभव केला.

**मित्रमिश्र**—( स. १६१०–४० सुमार ) याचा पिता परशुराम पंडित व आजा हंस पंडित होय. याची ' वीरमित्रोदय ' नांवाची याज्ञवल्क्यस्मृतीवरील टीका फार प्रसिद्ध आहे. तिचे प्रकाश नांवाचे विभाग आहेत. लक्षणप्रकाशांत स्त्रीपुरुषांची चांगलींवाईट लक्षणें वगैरेंचें विवेचन केलें आहे. त्याचप्रमाणें व्यवहारप्रकाश, संस्कारप्रकाश, पूजाप्रकाश वगैरे भागांत त्या विषयाचें अत्यंत बारीक व विस्तृत विवेचन आहे. राजनीतिप्रकाशांत तर राजा, मंत्री, सेनापति, युद्ध, किल्ले व राजधानी यांचेंहि विवेचन आहे. याचा हा ग्रंथ वाचल्यास दुसरा कोणताहि त्या विषयावरील ग्रंथ वाचण्याची जरूरी नाहीं, असें यानें म्हटलें आहे तें यथार्थ आहे.

**मिनेंदर**—( मिलिंद पाहा ).

**मिया शौरी**—( स. १७७६ १७९७ ) याचें मूळ नांव गुलाम नबी. याच्या पित्याचें नांव गुलाम रसूल. हा लखनौचा राहणारा. याच्या वेळीं आसफ उद्दौला लखनौचा नबाब होता. हा आपल्या बापाजवळ ख्याल-गायन शिकला. पण याचा आवाज फार पातळ असल्यानें ख्यालांतील तानबाजीनें याची तृप्ति होईना. म्हणून यानें नवीन टप्प्याचें गाणें काढलें. टप्प्यास पंजाबी भाषा सोयीची म्हणून यानें त्या भाषेचा अभ्यास केला व त्या भाषेंत टप्पे रचले. टप्पे ठराविक अशा थोड्याच रागांत असतात.

हा साधुवृत्तीनें राहत असे. एकदां आसफउद्दौला रस्त्यांतून जात असतां शौरीची व त्याची गांठ पडली. सरदारांनीं याच्या गुणाची माहिती देतांच नबाबानें यास राजवाड्यांत येण्यास फर्माविलें. पण या सत्पुरुषानें झटदिशीं उत्तर दिलें 'मला तुझें मकाण ठाऊक नाहीं.' तेव्हां हंसून नबाबसाहेबानें 'विचारीत या' म्हणून उत्तर दिलें. ठरल्याप्रमाणें हा राजवाड्यांत गेला आणि तेथें याचें गाणें अप्रतिम झालें. नबाबानें यास बक्षिस म्हणून दिलेली रक्कम यानें फकीरांस वांटून टाकली. याला मूलबाळ नव्हतें. गम्मू नांवाचा याचा एक पट्टशिष्य होता ( सं. शा. क. इ. पा. १२२ ).

**मिरान हुसेन निजाम**—( स. १५८८–८९ ) हा अहमदनगरच्या मूर्तजा निजामाचा पुत्र. याच्या दरबारांत दक्षिणी व परदेशी असे दोन पक्ष होते. दक्षिणी पक्षाच्या लोकांनीं याची कत्तल करून इस्माईलला नादीवर बसविलें.

**मिलिंद**—( ख्रि. पू. १५० ) हा एक उत्तरहिंदुस्थानाच्या कांहीं भागावर राज्य करणारा ग्रीक राजा होता. हा अत्यंत पराक्रमी होता व याचें राज्य दूरवर पसरलें होतें. याचें राज्य राजपुतान्यावरहि होतें असें दिसतें. पतंजलीनें आपल्या महाभाष्यांत यवन राजानें माध्यमिका नगरावर स्वारी केल्याचें लिहिलें आहे. ही माध्यमिका नगरी म्हणजे चितोडच्या उत्तरेस सात मैलांवर असलेली सध्यांची नगरी होय. प्राचीन विशाल नगरीचे अवशेष अद्यापहि तेथें विखुरलेले आहेत. कालिदासाच्या मालविकाग्निमित्र नाटकांत, शुंगवंशसंस्थापक पुष्यमित्राच्या अश्वमेधाचा घोडा सिंधूच्या दक्षिण तीरावर यवनांच्या सैन्यानें पकडला होता; मग तो वसुमित्रानें लढून सोडवला अशी हकीगत आहे ( ही सिंधु म्हणजे राजपुतान्यांतील कालीसिंध दिसते ). वरील दोनहि गोष्टी या मिलिंदाच्या वेळीं झाल्या असाव्यात असें अनुमान आहे ( राजपूतानेका इतिहास, पा. ९८ ). याचीं दोन नाणीं महामहोपाध्याय गौरीशंकर हि. ओझा यांना नगरी ( माध्यमिका ) येथें मिळालीं, त्यांवरून या अनुमानास पुष्टि येते. तसेंच काठेवाड व गुजराथ येथें याचीं नाणीं आढळतात. त्यावरूनहि वरील म्हणणें खरें दिसतें. याविषयीं स्ट्रेबोनें लिहिलें आहे कीं, ' यानें पातालन् ( सिंध ), सुराट्रस ( सोरठ, दक्षिणी काठेवाड ),

आणि सागरडिस ( सागरद्वीप हें कच्छ असावें ) जिंकलें ' ( बॅांबे ग्याझिटियर, भा. १, पृ. १६ ).

हा स्थविर नागसेनाच्या उपदेशानें बौद्ध झाला होता. मिलिन्दपन्हो ( मिलिंदप्रश्न ) नांवाच्या पाली ग्रंथांत हा व नागसेन यांचीं निर्वाणासंबंधीं प्रश्नोत्तरें आहेत. या ग्रंथावरून समजून येतें कीं हा यवन ( ग्रीक ) होता.

याचा जन्म अलसंद येथें झाला. अलसंद हें नगर हिन्दुकुश पर्वताजवळ अलेक्झांड्रिया येथें आहे.

याची राजधानी पंजाबमधील शाकल ही समृद्ध नगरी होती ( सेक्रेड बुक्स ऑफ् दि ईस्ट, भा. ३५-३६ ). प्लुटार्कनें लिहिलें आहे कीं, हा इतका न्यायी व लोकप्रिय राजा होता कीं याचा देहान्त झाल्यावर याची राख लोकांनीं आपसांत वांटून घेतली आणि आपल्या ठिकाणीं नेल्यावर त्यावर स्तूप बांधले ( 'न्युमिस्मॅटिक क्रानिकल' स. १८६९, पृ. २२९ ). यावरूनहि हा बौद्ध होता ही गोष्ट निश्चित ठरते. याचें नांव याच्या नाण्यावर मेनन्द्र असें आढळतें; व ग्रीक मिनेंदर असा उच्चार करतात. याचा काळ ख्रि. पू. १५० ( वि. सं. पूर्व ९३ ) च्या सुमारास अनुमानानें धरतात. ग्रीक राजांपैकीं याचाच संबंध राजपुतान्याशीं मानतात. पेरिपूसचा कर्ता म्हणतो कीं, ऍपोलोडॉटस् व हा यांचीं नाणीं अजूनपर्यंत ( स. २४० ) बरुगज (भृगुकच्छ-भडोच) येथें चालतात. यावरून गुजराथ व राजपुतान्याशीं याचा संबंध असावा.

**मिसरुक**—न्यायदीपकेचा कर्ता.

**मिसरुमिश्र**—( स. १५००-७५ ) मैथिल पंडित. हा 'विवादचंद्र' व 'पदार्थचंद्र' या ग्रंथांबद्दल प्रसिद्ध आहे. तिर्हुत घराण्यांतील चंद्रसिंहाच्या लाछमादेवी राणीच्या सांगण्यावरून यानें वरील ग्रंथ लिहिले. पहिला ग्रंथ व्यवहारावर असून दुसरा वैशेषिक तत्त्वज्ञानावर आहे. न्यायदीपिकेचा कर्ता मिसरुक व हा भिन्न होत.

**मिहिरकुल**—( स. ५१०-४० ) हूणवंशांतील तोरमाणाचा पुत्र. याची माहिती हुएन्त्संगाचें प्रवासवर्णन, राजतरंगिणी, शिलालेख व नाणीं यांवरून मिळते. याची राजधानी पंजाबांतील शाकलनगर होती. हा अत्यंत शूर होता. सिंध वगैरे देश जिंकून यानें आपल्या ताब्यांत घेतले होते. हा प्रथम बौद्धधर्मावर प्रेम करीत होता. पण मागाहून हा त्या धर्माच्या अगदीं विरुद्ध झाला. उपदेशकांना ठार करण्याचे व बौद्धधर्म नष्ट करण्याचे यानें हुकूम दिले होते. गांधार देशांतील १६०० स्तूप व मठ यानें पाडून नष्ट केले व कितीतरी लाख लोक कापून काढले. निर्दयपणाची यानें कमाल केली. हा शिवाचा परम भक्त होता. याच्या नाण्यावर एका बाजूस 'जयतु वृषध्वज ' असें लिहिलेलें आढळतें. कांहींवर 'जयतु वृष' असेंहि लिहिलेलें आढळतें. याशिवाय त्रिशूल, वृष (नंदी), व छत्र हीं चिन्हेंहि आढळतात. त्यावरून हा शैव होता हें स्पष्ट होतें. याच्या नाण्यांत इराणी लोकांच्या ससानियन् शैलीचें अनुकरण आढळतें. हा शिवाशिवाय कोणाहिपुढें आपलें मस्तक नमवीत नसे. पण माळव्याचा राजा यशोधर्म ( विष्णुवर्धन ), या प्रतापी राजानें स. ५३२ च्या सुमारास याला जिंकलें. तसेंच मगधाच्या बाजूनें गुप्तवंशांतील नरसिंहगुप्तानें याला पराजित केलें. त्यामुळें राजपुताना, माळवा वगैरे प्रदेश याच्या राज्यांतून कमी झाले. पण काश्मीर, गांधार यांवर याचा अधिकार कायमच होता. याचा एक शिलालेख ग्वालेर येथें मिळाला आहे. तो याच्या राज्याच्या पंधराव्या वर्षांतील आहे ( फ्लीट गुप्तइन्क्रिप्शन्स, ले. ३७ ).

**मिहिर भोज प्रतिहार**—( भोज(देव) प्रतिहार पाहा ).

**मिंगटी**—( ख्रि. पू. ६१ सुमार ) हा चीनदेशाचा राजा होय. एकदां स्वप्नांत याला उंच, धिप्पाड व तेजस्वी असा पुरुष आकाशमार्गानें आपल्याच प्रासादांत शिरत आहे असें दिसलें. प्रधानानें याचा खुलासा असा केला कीं, भारतवर्षांत फो नांवाचा एक सिद्ध पुरुष जन्मास आला आहे. त्याचें दर्शन आपणांस झालें असावें. हें ऐकून राजाला बुद्धाविषयीं मोठी जिज्ञासा उत्पन्न झाली आणि त्यानें बौद्धधर्माचा अभ्यास करण्याकरितां बरेच पंडित रवाना केले. या चीन देशांतल्या पंडितांच्या विनंतीवरूनच चीन देशांत भारतवर्षांतून बौद्ध प्रचारक जाण्यास सुरवात झाली. ही हकीगत अशाच स्वरूपांत निरनिराळ्या तेरा चिनी ग्रंथांत आढळते, असें तज्ज्ञांनीं लिहिलें आहे. याच्या विनंतीवरून गेलेला पहिला बौद्ध प्रचारक काश्यप मातंग हा होय. त्याच्याबरोबर धर्मरक्ष हाहि गेलेला होता ( Edkines-Chinese Buddhism, p. 88 ).

**मिंग-यु-एन**—एक चिनी प्रवासी. हा ईचान येथील राहणारा होता. भारतवर्षांत आल्यावर कलिंगाहून लंका व तेथून चीनला गेला.

**मिंटो लॉर्ड**—(स. १८०७-१३) एक गव्हर्नर जनरल.

**मीनपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं आठवा सिद्ध. हा जातीनें मछुआ असून कामरूप देशामध्यें राहत असे. हा जालंदरपाचा शिष्य व गोरक्षपाचा पिता व गुरु. याच्या वेळेस देवपाल ( स. ८०९-४९ ) राजा होता.

**मीनाक्षी**—( स. १७३१–१७३६ ) ही मदुरेच्या शेवटच्या राजाची राणी. विजयरंग चोक्कनाथ याच्या विधवा राणीनें तिरुमल यास दत्तक घेतलें. तो स्वतः राज्यकारभार पाहूं लागला व त्यानें राणीस मारण्याचा बेत केला. तिरुमल यानें सफदरअलीच्या मदतीनें आपण राजा असल्याचें जाहीर केलें. तेव्हां हिनें चंदासाहेबाच्या मदतीनें मदुरा व दिंदिगल्ल घेतलें. तेव्हां तिरुमल पळून गेला. चंदासाहेबानें मदुरेचें राज्य बळकाविलें व मीनाक्षीनें आत्महत्या केली. याप्रमाणें मदुरा येथील हिंदु राज्याचा शेवट झाला.

**मीनाक्षी पांड्य**—( स. १२०० सुमार ) पहिल्या सुंदर पांड्याची पत्नी. पांड्यांच्या प्रदेशांत हिची अद्यापि देवासारखी पूजा होते.

**मीर**—( जन्म स. १७११–मृत्यु स. १८०८ ) ऊर्दू कवि. याचें नांव मुहम्मद तकी मीर असें होतें. याचा पिता अबदुल्ला मीर. दिल्लीचा बादशहा शहाअलमनें याचा सन्मान केला. नंतर हा लखनौस गेला. तेथें असफुद्दौला व सादतअली यांनीं याचा सत्कार केला.

हा आपल्या काव्यामुळें फार प्रसिद्ध व लोकप्रिय होता. याचे शिकारनामा, अजगरनामा व निकातुश्शुअरा हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. पहिल्यांत असफुद्दौल्याच्या शिकारीचें वर्णन आहे; आणि शेवटल्यांत जुन्या ऊर्दू कवितांची चर्चा आहे ( क. कौ. ४ ).

**मीर अबु तुर्व इब्न अल सय्यद अहमद अरिदावी**—' इदिकत-अल-अलम ' हा फार्सी ग्रंथ यानें लिहिला असावा ( मीर अलम पाहा ).

**मीर अलम**—( मृत्यु स.१८१३ ) हा दुसरा निजाम अली असफझाचा वजीर होता. यानें 'हदिकत-अल-अलम' नांवाचा निजामशाही व कुत्बशाही याची माहिती देणारा बखरवजा इतिहास फार्सीमध्यें लिहिला. हा ग्रंथ स. १८०३–४ पूर्वी पुरा केला. इंडिया ऑफिसमधील २४४० नंबरच्या हस्तलिखित प्रतीवर हा ग्रंथ कोणा एका मीर अबु तुर्व इब्न अब सय्यद अहमद अरिदाबी यानें मीर अलमच्या सांगण्यावरून स. १८०६ मध्यें रचला, असें म्हटलें आहे व त्यांत मीर अलमचें थोडक्यांत चरित्रहि दिलें आहे ( इंडिया ऑफिसांतील फार्सी हस्तलिखिताची यादि-एथेक्रत, पृ. १७९ ). हें बरोबर असण्याचा संभव आहे.

**मीर असीद**—( स. १७४० ) कर्नाटकचा नवाब जो दोस्तअली त्याचा हा दिवाण होय. स. १७४० मध्यें मराठ्यांनीं कर्नाटकावर स्वारी केली असतां याला मराठ्यांनीं कैद केलें.

**मीर कासीम**—( स. १७६१–६४ ) बंगालचा नवाब. यानें मोंघीर शहर राजधानी करून इंग्रजांशीं युद्ध केलें. तोफा व बंदुका तयार करण्याचे कारखाने काढले. स. १७६४ मध्यें इंग्रजांनीं याचा पराभव करून बंगाल घेतला.

**मीर खलील**—बुऱ्हाणपूरचा अधिकारी व औरंगजेब बादशहाच्या मावशीचा मुलगा.

**मीरखान अलीशाह**—(अमीरखान अलीशाह पाहा).

**मीर गुलाम हसन**—( हसन पाहा ).

**मीर जाफर**—( मृत्यु स. १७६५ ) बंगालचा एक नवाब. हा सिराजुद्दौला सेनापति होता. सिराजुद्दौल्याशीं फितुर होऊन प्लासीच्या लढाईंत हा इंग्रजांस मिळाला; आणि त्याबद्दल इंग्रजांनीं याला सिराजुद्दौलाच्या गादीवर बसविलें. यापासून क्लाइव्हनें सव्वा दोन कोटी रुपये उकळिले. पुढें याला इंग्रजांनीं पदच्युत केलें ( स. १७६० ), व मीर कासीम यास नवाब बनविलें. नंतर इंग्रजांनीं ह्याचाहि पराभव करून पुन्हां म्हाताऱ्या मीर जाफरास नवाब बनविलें. यानंतर जाफर हा दोन वर्षांनीं मेला. याची कबर मुर्शिदाबादेस आहे.

**मीर जामरासियःखान**—दुसऱ्या अली आदिलशाहाच्या दरबारांतील एक ऊर्दू कवि.

**मीर जाहक**—सौदाचा समकालीन ऊर्दू कवि.

**मीर जुम्ला**—( स. १६३०–६३ ) हा इराणांतील इसफाहन येथील एका तेल्याचा मुलगा. याचें मूळ नांव मुहम्मद सय्यद ( सैद ). हा स. १६३० मध्यें गोवळकोंड्यास आला आणि जव्हेरी म्हणून प्रसिद्ध झाला. हा आपल्या कर्तबगारीनें अबदुल कुत्बशहाचा दिवाण झाला. याच्या पदरीं युरोपियन सैन्य असे. त्या जोरावर व आपल्या हुषारीनें यानें कडप्पा, गंडीकोटाकिल्ला वगैरे बराचसा भाग मिळविला व हिऱ्याच्या खाणी याच्या मालकीच्या झाल्या. हा एखाद्या राजासारखा होता.

यामुळें कुत्बशहाला वैषम्य वाटून त्यानें याच्याशीं विरोध सुरू केला, तेव्हां हा औरंगजेबाच्या मध्यस्थीनें शहाजहानकडे नोकरीस राहिला ( स. १६५५ ). याची बायकामुलें कुत्बशहानें अडकविलीं, तेव्हां औरंगजेबानें युद्ध करून त्याचा बराच भाग काबीज केला आणि हा दिल्लीस गेला ( स. १६५६ जुलै ).. नंतर यास औरंगजेबाच्या मदतीस विजापूरच्या स्वारीवर पाठविलें ( स. १६५७ ). शहाजहान आजारी पडला तेव्हां हा दिल्लीस निघाला. तेव्हां औरंगजेबानें यास आपल्याकडे घेतलें व याच्या सैन्यानें आपली शक्ति वाढविली. औरंगजेबानें बादशाहा

झाल्यावर याला बंगालचा सुभेदार नेमलें (स. १६६०). नंतर कुचविहार काबीज केला ( स. १६६१ ). पुढें याच्याकडून आसाम काबीज केला. पण तेथून परत येत असतां हा वाटेंत मेला. हा मोठा दूरदर्शी होता. याचें सैन्य उत्कृष्ट असे.

**मीर बबरअली**—( अनीस पाहा ).

**मीर मन्नु**—( मृत्यु स. १७५४ ) वजीर कमरुद्दीन-खानाचा मुलगा. लाहोरचा सुभेदार ( अहमदशाह-अबदाली पाहा ).

**मीर शहाबुद्दीन**—( १ गाजीउद्दीन पाहा ).

**मीर हबीब**—( स. १७४८-५१ ) इराणी मुसलमान. हा दुसऱ्या मुर्शीदकुलीखानाजवळ होता. मराठ्यांच्या बंगालवरील स्वाऱ्यांत हा प्रसिद्धीस आला. अलीवर्दीखानानें मुर्शीदकुलीखानास ओरिसांतून हाकून दिलें तेव्हां यानें मराठ्यांस साहाय्य करून त्याची खोड मोडली. रघूजीनें यास ओरिसाचा सुभेदार नेमलें. पण जानोजीस याच्या मदतीस जावें लागलें तेव्हां हा मारला गेला.

**मीराबाई**—( मृत्यु स. १५४६ ) एक हिंदी कवयित्री. ही मेढत्याच्या राठोड रत्नसिंहाची मुलगी. हिचा जन्म स. १४९८ च्या सुमारास झाला. हिचें लग्न उदेपूरच्या भोजराज गुहिलोताशीं झालें ( स. १५१६ ) पण थोडक्या दिवसांतच हिचा नवरा वारला (स.१५१८सुमार). कर्नल टॉडच्या लेखांत ही महाराणा कुंभाची पत्नी असें आहे, पण तें सर्वस्वीं चूक आहे.

हिला लहानपणापासून भगवद्भक्तीची गोडी लागलेली होती. त्यामुळें ह्या दुःखकारक प्रसंगीं भगवद्भजनाकडे हिचें मन ओढलें जाणें स्वाभाविक आहे. भगवद्भक्तीची देणगी हिला हिच्या पितृकुलाकडून मिळाली होती. महाराणा संग मरण पावल्यावर त्याचा पुत्र रत्नसिंह गादीवर बसला; आणि तोहि स. १५३१ त मरण पावला व नंतर त्याला पुत्र नसल्यामुळें त्याचा भाऊ विक्रमादित्य गादीवर बसला. या वेळीं हिची भक्ति आणि भावपूर्ण भजनें यांची ख्याति हिंदुस्थानभर पसरली होती. ही गोष्ट विक्रमादित्याला आवडत नसे.

ही निःसंकोचपणें आपलीं पदें गात देवापुढें नाचत असे. राजकुलांतल्या स्त्रियांनीं चारचौघांत असें भजन करीत राहणें विक्रमादित्याला पसंत नव्हतें. म्हणून तो हिला अनेक प्रकारें त्रास देई. त्यानें हिला विष देऊन पाहिलें, हिच्याकडे पेटाऱ्यांत नाग घालून पाठविला, पण त्याचा कांहींएक परिणाम न होऊन तें सर्व हिच्या भक्तिप्रभावानें निष्फल झालें. हिची अशी स्थिति विरमदेवाला कळल्यावर, त्यानें हिला मेढत्याला बोलावून नेलें. नंतर ही द्वारकेस येऊन राहिली.

हिनें तयार केलेल्या पदांचा हिंदुस्थानभर प्रचार झालेला आहे आणि तीं जागोजाग गाइलीं जातात. हिनें गीत-गोविंदाच्या धर्तीवर ' राग-गोविंद ' नांवाचा ग्रंथ लिहिला. हिनें जयदेवाच्या गीतगोविंद काव्यावर टीका लिहिलेली आहे. हिचीं पदें राजपुतानीमिश्रित हिंदीमध्यें व गुजराथी-मध्यें आहेत. हिचा मल्हारराग विशेष लोकप्रिय आहे.

हिनें आपल्या पदांत रैदास गुरु असल्याचा निर्देश केला आहे. ही द्वारकेस असतां राण्यानें हिला परत आणण्यासाठीं कांहीं ब्राह्मण पाठविले होते. ही वृंदावन येथें जीवगोस्वामींच्या दर्शनास गेली असतां, त्यांनीं हिला कळविलें कीं ' मी स्त्रियांना दर्शन देत नाहीं. ' तेव्हां हिनें उलट निरोप पाठविला कीं ' गिरधरलालाशिवाय दुसरा कोणी पुरुष आहे असें मला वाटत नाहीं. ' हें कळल्यावर त्यांनीं हिला दर्शन दिलें. हिच्या पदाच्या शेवटीं ' मीराके प्रभु ' असें असतें ( रा. इ. पा. ६७१-७२; क. कौ. १. २११; हिं. श. सागर प्रस्तावना, पा. १११ ).

**मीर्झा अबदुल फत्ते कुत्बशाह**—( जन्म स. १५६८ ) गोवळकोंड्याच्या इब्राहीमचा चवथा मुलगा.

**मीर्झा अमानी**—( असफुद्दौला पाहा ).

**मीर्झा अली बरीद**—( स. १५७२-१६०९ ) हा बेदरच्या दुसऱ्या कासीमचा पुत्र असून त्याच्या नंतर गादीवर आला. शेवटीं औरंगजेबानें हें राज्य घेऊन या वंशाचा शेवट केला.

**मीर्झा अस्करी**—( अस्करी पाहा ).

**मीर्झा मास्लिहुद्दीन**—( स. १७५५ ) रघूजीनें अलीवर्दीखानाच्या संमतीनें यांस मीर हबीबानंतर ओरिसा-प्रांताचा सुभेदार नेमलें. याच्या कारकीर्दीत पूर्वीपेक्षांहि वसूल कमी झाला. तेव्हां स. १७५५ त ह्यास सुभेदारी सोडावी लागली ( ना. प्रां. इ. ).

**मीर्झा मुहम्मद अमीन**—मुस्तफाखान ह्या नांवानेंहि हा प्रसिद्ध आहे.

**मीर्झा मुहम्मद ईसा अर्घून तर्खान**—( स. १५५६ सुमार ) या घराण्यांतील हा पहिला राजा.

**मीर्झा मुहम्मद बकी तर्खान**—( स. १५६० ) सिंधच्या अर्घून तर्खान राजांपैकीं दुसरा.

**मीर्झा मुहम्मद हकीम मोगल**—(मृत्यु स.१५८६) हा काबूलचा सुभेदार असून हुमायूनचा मुलगा होय.

**मीर्झा जानी बेग तर्खान**—( स. १५८५-९१ ) सिंधच्या अर्घून तर्खान राजांपैकीं तिसरा व शेवटचा राजा.

**मीर्झा नजफखान**—( स. १७३३-१७८२ ) हा मूळचा इराणच्या राजवंशांतील असून पुढें आपली बहीण खदीजा सुलतानाबरोबर हिंदुस्थानांत आला. हा सुजा-उद्दौला, मीरकासीम व शेवटीं शहाअलमच्या पदरीं होता. ह्यानें मराठ्यांशीं सख्य ठेवून बुडत्या बादशाहीस बरा च हात दिला. बादशहानें ह्यास दोन लाखांची नेमणूक देऊन अमीरुल उमराव केलें. ह्याचा मोठेपणा अबदुल अहदर-खानास सहन झाला नाहीं.

**मीर्झा शफी**—हा मीर्झा नजीबखानाचा पुतण्या. याचा मुहम्मद बेग हमदानीनें खून केला ( स. २३-९-१७८३ ).

**मीर्झा शाहबेग अर्घून**—मुलतानचा सुलतान.

**मीर्झा सिकंदर जाह निजाम**—( स. १८०३-१८२९ ) हैद्राबादचा निजाम. हा निजामअलीचा पुत्र होय. ह्याचा मुलगा नासिरुद्दौला.

**मीर्झा हुसेन अर्घून**—( शाहा हुसेन अर्घून पाहा ).

**मुअज्जम**—( बहादुरशाह मोगल पाहा ).

**मुइझ्झुद्दीन मुबारक सय्यद**—( मुबारक सय्यद पाहा ).

**मुकरबखान**—( शेख निजाम पाहा ).

**मुकुलभट्ट**—( स. ९२५ सुमार ) हा भट्टकल्लटाचा पुत्र. हा प्रतिहारेंदु राजाचा गुरु होता. माणिक्यचंद्रानें ‘काव्यप्रकाशसंकेत’ नांवाच्या आपल्या काव्यप्रकाशा-वरील टीकेंत याच्या ‘अभिधावृत्तिमातृकें’तून बरींच अव-तरणें घेतलीं आहेत.

**मुकुंद ( दीन )**—( स. १६०८-२३ ) नेमाडांतील खांडव्यास याचा जन्म झाला. पिता—नारायण व माता—साखरबाई. हा यजुर्वेदी वाजसनेयी होता. हा पित्याच्या मरणानंतर बागलाणांत जैतापुरीं आला. स. १६०८ सालीं स्वप्नांत सद्गुरुदर्शन झालें. स. १६२३ सालीं प्रत्यक्ष सद्गुरूपदेश मिळाला. नंतर यानें तीर्थयात्रा केली. याचे ग्रंथ—रामायण-सुंदरकांड, दानलीला, यशोदा—गौळण—संवाद, छंदोरत्नाकर, गुरुस्तुति, वेदांत.

**मुकुंद दैवज्ञ**—हा ‘उपचारसार’ या ग्रंथाचा कर्ता होय. यानें आपला ग्रंथ वैद्यकशास्त्रावर लिहिला आहे. याच्या ग्रंथावर दिनकरानें ‘गूढप्रकाशिका’ नांवाची टीका स. १८१८ मध्यें लिहिली.

**मुकुंदमुनि**—याच्या नांवावर पुढील संस्कृत ग्रंथ दिलेले आढळतात. पण ते एकाचेच आहेत असें मानतां येत नाहीं: १ अद्वैतज्ञानसर्वस्व, २ अष्टावक्रगीताभाष्य, ३ आत्मबोध, ४ पंचीकरण, ५ परमामृत, ६ विवेकसारसिंधु, ७ विवेकसिंधु ( C. C. ).

**मुकुंदराज**—( स. ११२८-९६ सुमार ) मराठी भाषेंतील आद्य कवि व साधु. याचे ग्रंथ—१ विवेकसिंधु, २ परमामृत, ३ पंचीकरण, ४ मूलस्तंभ, ५ दशोप-निषदांवरील महाभाष्य ( संस्कृत ). याचें पूर्वार्धांत नांव परमार्थतत्त्वप्रबोध असून उत्तरार्धांत महाभाष्य आहे ( मं. श. १८३५ वा. इ. ले. २५). शिवाय कांहीं अभंग व पदें आहेत. विवेकसिंधु हा ग्रंथ जोगाईच्या आंब्याचा राजा जयंतपाळ याच्यासाठीं रचला, असं त्या ग्रंथांतच ‘नृसिंहाचा बल्लाळ। तयाचा कुमर जयंतपाळ । तेणें करविला गदारोळ। ग्रंथरचनेचा ।’ या शब्दांत म्हटलें आहे. जयंतपाळ, जैत्रपाळ, जैतपाळ अशींहि नांवें लिहिलेलीं आढळतात. पण या नांवाचा राजा प्रसिद्ध नाहीं. हा साधुसज्जनांस बोलावून ‘ तुम्हांला साक्षात्कार झाला आहे काय ?’ असा प्रश्न विचारी, व ‘ नाहीं ’ असें उत्तर आलें कीं त्यांना कैदेंत टाकी. पण मुकुंदरायानें त्याला साक्षात्काराचा अनुभव दिला, अशी आख्यायिका आहे. विवेकसिंधूच्या कांहीं प्रतींत शारंगधर राजा राज्य करीत असतां शके १११० साधारण संवत्सरीं द्विजोत्तम मुकुंदानें ग्रंथ केला असें म्हटलें आहे. शके १११० ला कीलक संवत्सर असून बाराला साधारण संवत्सर येतो. त्या वेळीं हे वृद्ध होते ( प्रक. ७, ओवी ५४ ). त्या वेळीं हे साठ वर्षांचे असावेत.

आदिनाथ—हरिनाथ—रघुनाथ—मुकुंदराज अशी यांनीं आपली गुरुपरंपरा दिली आहे. मध्यप्रांतांत भंडाऱ्याजवळ वैनगंगा नदीच्या कांठीं अंभोर म्हणून तीर्थ आहे तेथें हरिनाथाची समाधि आहे. रघुनाथाची समाधि जवळच छिंदवाड्यास आहे. मुकुंदराजाची समाधिहि बैतुलजवळ खेडलें नांवाच्या गांवीं जुन्या पडक्या किल्ल्यांत आहे. यावरून ही त्रयी नागपूरकडील आहे असें ठरतें. जोगा-ईच्या आंब्यास मुकुंदराजाची समाधि दाखवितात पण त्या यांच्या पादुका आहेत. हे सर्व शैव होते.

पवनविजय हा संस्कृत स्वरोदयाचें भाषांतर असणारा शेख महमद कवीचा ग्रंथ मुकुंदराजाच्या नांवावर कांहीं चुकीमुळें दाखल झाला आहे. अनंत बडवे यानें याच्या मूळ मराठींत लिहिलेल्या विवेकसिंधूचें संस्कृत भाषेंत भाषांतर केलें.

**२.** ( समाधि स. १७७५ ) एका बाडांत नृहरिसुत-कृत ‘श्रीमुकुंदराजचरित्र’ दिलेलें आहे. या मुकुंदराजाचे

गुरु कोकीळ होत. यानें देवाची आराधना केली, तेव्हां याला गंगाधर कोकीळ गुरु करण्याविषयीं दृष्टांत झाला.

यानें शेवटीं चतुर्थाश्रम घेतला होता व त्या आश्रमीं याचें नांव ब्रह्मानंद होतें. ब्रह्मानंदांनीं पैठणास शके १६९७ त वैशाख व. १ स. भौमवासरें जलसमाधि घेतली, व यांचें चरित्र नृहरिसुतांनीं त्याच शकाच्या ज्येष्ठांत वर्णिलें असल्यामुळें तें अत्यंत विश्वसनीय मानण्यास हरकत नाहीं. यानें आपला देह गुरुसेवेंत फार कष्टविला. हा ब्रह्मचारी होता ( मं. अहवाल १८३४ ).

३. एक रामदासी. भीमस्वामींचे शिष्य जे गोविंदबावा त्यांचे हे पुतणे. यांचे ग्रंथः देवभक्तानुवाद, रामकृष्ण विलास, गुरुबोधपंचक वगैरे होत. यांचीं कांहीं पदेंहि प्रसिद्ध आहेत सं. सू. १.

**मुकुंदराम**—( कविकंकण मुकुंदराय पाहा ).

**मुकुंदराव**—मराठा सरदार (बुबुजीखानूम पाहा).

**मुकुंदसुत**—( जन्म स. १७९ ) याचें मूळ नांव कमलाकर. गोत्र नांदेड. हा सरदेशपांडे यांच्या घरांत दत्तक आला. गुरु शुकानंदानें स्वप्नांत अनुग्रह दिला. मराठी, फार्सी, ऊर्दू, संस्कृत वगैरे भाषा चांगल्या येत असत यांनीं शेवटीं संन्यास घेऊन ' नित्यानंदस्वामी ' असें नांव घेतलें. यांनीं आपल्या वंशाची हकीगत स्वतःपर्यंत ओवीबद्ध ग्रंथ रचून स्वतः लिहिली आहे. पुढील हकीगत दासगणूंनीं लिहिली आहे ( म. क. च. भा. ६०, पृ. २४७-६० ).

**मुक्कुतिमण्णा**—हा जातीनें नियोगी तैलंगी ब्राह्मण असून कवि होता. हा कृष्णदेव रायलूच्या पदरीं असे. याचें 'पारिजातहरण' नांवाचें काव्य तेलंगी भाषेंत आहे.

**मुक्ताकुंभ**—( स. ९०० नंतर ) बुद्ध तर्कज्ञ. यानें धर्मोत्तराचार्याच्या 'क्षणभंगसिद्धी'वर क्षणभंगसिद्धीव्याख्या नांवाची टीका लिहिली आहे. तिबेटी भाषांतर फक्त उपलब्ध आहे.

**मुक्तानंद**—( स. १८०७ सुमार ) हा गुजराथी कवि काठेवाडांतील गढडा येथील राहणारा होय. उद्धवगीता, धर्माख्यान, सतीगीता, रुक्मिणीविवाह, कृष्णप्रसाद व धर्मामृत इतके ग्रंथ यानें लिहिले. यांशिवाय याचीं कित्येक पदें आहेत.

**मुक्तापीड**—ललितादित्याचें नामान्तर

**मुक्ताबाई**—(जन्म स. १२७९–समाधि स.१२९७) जुनी मराठी कवयित्री. ही ज्ञानेश्वराची बहीण होय. हिचा जन्म आपेगांवीं स. १२७९ मध्यें झाला. नंतर पैठण गांवीं गेली. तेथून नेवाशाच्या रस्त्यानें आळंदीस येऊन वास्तव्य केलें. हिचे गुरु निवृत्ति व शिष्य चांगदेव. ज्ञानेश्वर व सोपान यांच्या समाधीनंतर एदलाबादेजवळ माणगांवीं हिनें जलसमाधि घेतली. हिचे ग्रंथ–कल्याणपत्रिका, नमन, हरिपाठ हे होत. ही अविवाहित होती. हिच्या नांवावर असलेले ताटीचे अभंग फार प्रसिद्ध आहेत.

हिचे ताटीचे अभंग विशेष गोड आहेत. एके दिवस ज्ञानेश्वरास पाहून एका टवाळानें, या संन्याशाच्या पोराचें दर्शन घडलें, मोठा अपशकुन झाला, असें म्हटलें. तें ऐकून ज्ञानेश्वर खिन्न झाले आणि खोलींत बसून खोलीचें दार ( म्हणजे ताटी ) लावून घेतलें. मुक्ताबाईसहि ताटी उघडीनात. तेव्हां हिनें ताटी उघडण्याविषयीं विनंति केली ते हे अभंग होत.

हिची 'निवृत्तिप्रसादें मुक्ताबाई' ही अभंगरूपी कविता अद्यापि अप्रसिद्ध आहे ( मं. त्रै. १२-४, ले. ३५ ).

हिची समाधि खानदेशांत तापीतीरावर असलेल्या मेहुण या गांवांत आहे. एदलाबाद या गांवांत हिची समाधि नसून हिचें मंदिर आहे.

**मुक्तेश्वर**—(जन्म स. १५९९-मृत्यु स. १६४९सुमार) पैठण येथील प्रसिद्ध एकनाथस्वामींचा हा नातू होय. एकनाथांना गोदूबाई नांवाची एक कन्या असून ती कुरुंदवाडजवळ राहणाऱ्या आत्रिगोत्री गृहस्थाला दिली होती. गोदूबाईचें सासरचें नांव गंगाबाई आणि तिच्या पतीचें नांव चिंतामणी ऊर्फ विश्वंभरबावा. मुक्तेश्वराच्या वंशजास कोल्हापूर सरकारांतून जी सनद मिळाली आहे तीवरून मुक्तेश्वर हे एकनाथाच्या गंगाबाई नांवाच्या कन्येचे पुत्र यांत शंका नाहीं. राजवाडे, पांगारकर व कविचरित्रकार म्हणतात कीं हिलाच नाथ कौतुकानें लीला म्हणत व हाहि 'लीला विश्वंभर' असा आपल्या मातापितरांचा निर्देश करतो. याचें आडनांव मुद्गल. देशस्थ ऋग्वेदी आश्वलायन ब्राह्मण. याचा जन्म शके १५२१ मध्यें झाला व मृत्यु शक १५७१ पूर्वी तेरवाड येथें झाला. तेथें याची समाधि आहे. हा दत्तभक्त होता. हा मराठींतील अत्यंत श्रेष्ठ दर्जाचा कवि आहे. याचे ग्रंथ—१ महाभारत ( पर्वें– आदि, सभा, वन, विराट, सौप्तिक, शांति ( अप्रसिद्ध ), बाकीचीं बारा पर्वें अनुपलब्ध ). १ नाटक-रामायण ऊर्फ कौतुहल–रामायण, २ भागवत, ३ अग्निपुराणांतील हरिश्चंद्राख्यान, ४ फुटकळ पदें, ५ आरत्या, ६ भविष्योत्तरपुराणावर ओवीबद्ध ग्रंथ.

**मुगुटराव**—( स. १८४२ ) नागपूरच्या आपासाहेब भोसल्याचा दुसरा तोतया मुगुटराव म्हणून शिंद्यांचे राज्यांत निघाला. बळवंतराव व नाना कोतवाल म्हणून त्याचे हस्तक होते ( ना. प्रां. इ. पृ. ४६७ ).

**मुग्धतुंग कलचुरी**—( स. ९०० ) कोक्कलदेव कलचुरीचा पुत्र. याला प्रसिद्ध धवलहि म्हणत.

**मुघिसुद्दीन तुघ्रील**—पहिल्या तुघ्रीलचें संपूर्ण नांव.

**मुजफर**—( स. १३९१–१४११ ) गुजराथचा सुलतान. हा मूळचा हिंदु असून पुढें मुसलमान झाला. हा गुजराथच्या रास्तीनखानास मारून आपण स्वतंत्र झाला. हा हिंदुधर्माचा फार द्वेष करीत असे. याला तातारखान नांवाचा एक मुलगा होता. पुढें याचें व त्याचें न पटून त्यानें यास कैद केलें व तो गादीवर बसला. पण तो लवकरच मरण पावल्यामुळें हा फिरून गादीवर बसला ( स. १३९६ ). पण पुढें याचा नातू अहमदखान विशेष पराक्रमी निघाल्यामुळें त्यानें यास विषाचा प्याला पाठवून तो पेला यास पिण्यास भाग पाडलें.

२. ( स. १५११–१५२६ ) गुजराथचा सुलतान. हा महम्मूद बेगडाचा मुलगा. यानें मेवाडच्या संग राण्याचा पराभव केला होता. याचा मुलगा बहादूरशहा याजवर रुसून गेल्यामुळें, हा मरण पावला.

३. ( स. १५६१–७२ ) गुजराथचा सुलतान. हा तिसऱ्या महमूदाचा मुलगा. हा राज्य चालविण्यास अगदीं नालायक असल्यामुळें, याच्या राज्यांत फारच अंदाधुंदी माजून गेली होती. अशा प्रसंगीं इतिमादखान नामक एका उमरावानें अकबरास पाचारण करून याजवर स्वारी करण्यास सांगितलें. तेव्हां अकबरानें स. १५७२ त अहमदाबादेवर स्वारी करून यास पळून लाविलें व अकबरानें गुजराथचें राज्य आपल्या ताब्यांत घेतलें.

**मुजफरखान गारदी**—(फांशी स. १७५९) बुसीनें आपल्या तालमींत जीं माणसें तयार केलीं त्यांपैकींच मुजफरखान हा एक होता. हा प्रथम बुसीजवळ होता, पण पुढें याचें व त्याचें वांकडें येऊन हा तेथून निघाला हा कवायती फौजेंत तज्ज्ञ होता म्हणून नानासाहेब पेशव्यांनीं यास कवायती फौजेवर ठेविलें. पण पुढें याचें व महादजी पुरंदऱ्याचें भांडण होऊन हा पेशव्यांपासून निघाला, व सावनूरच्या नवाबाच्या नोकरींत शिरला. हा परत पेशव्यांकडे नोकरीसाठीं आला व सदाशिवराव भाऊनें याला घेण्याचें नाकारलें असतांना देखील नानासाहेबानें याला नोकरांत ठेविलें. शेवटीं यानें सदाशिवरावभाऊचा खून करण्याचा प्रयत्न केला असतां तो फसला. तेव्हां नानासाहेब पेशव्यानें याचा शिरच्छेद केला. याला कोणाचेंहि वर्चस्व खपत नसे म्हणून हा कोठेंहि एका ठिकाणीं न राहतां सारखा नोकरीच्या शोधांत असे, पण प्रत्येकाला याचा फार वचक असे.

**मुजफरजंग**—( खून स. १७५१ ) हैदराबादच्या निजामुल्मुल्काचा नातू. यानें स. १७४८ त कर्नाटकावर स्वारी करून चंदासाहेबास अर्काटच्या गादीवर बसांवलें. फ्रेंच गव्हर्नर डुप्लेच्या साह्यानें हा हैदराबादचा नवाब झाला. हा हैदराबादेस जात असतां. वाटेंत याचा खून झाला.

**मुजहीदशाहा बाहामनी**—( स. १३६५–खून स. १३७८ ) हा मुहम्मदशाहा बाहमनीचा मुलगा. यानें विजयनगरच्या बुक्करायाशीं युद्ध पुकारून त्याचा पराभव केला. याचा सरदार दाऊदखानानें याचा खून करून, आपण गादीवर बसला.

**मुत्तु कृष्णापा नायक**—( स. १५६४–७३ ) मदुरेचा राजा. पत्नी लक्ष्मी.

२. ( स. १६०१–९ ) मदुरेचा राजा. यानें प्रथम राजा ही पदवी धारण केली. तिसऱ्या विश्व नायकाचा मुलगा. याचे विजयनगरच्या दुसऱ्या वेंकटाशीं संबंध चांगले होते.

**मुत्त लिंग नायक**—(स.१६७८) मदुरेचा राजा. यानें कांहीं महिने राज्य केलें. पुढें म्हैसूरकर व मराठे यांनीं याचें राज्य घेतलें.

**मुत्तु वीरापा नायक**—( स. १६०९–२३ ) मदुरेचा राजा. तंजावरच्या राजाशीं याचें युद्ध झालें.

२. ( स. १६५९ ) मदुरेचा राजा.

३. ( १६८२–८९ ) मदुरेचा राजा.

**मुद्गल**—( स. १४१३–१९ ) हा एक ऋग्वेदावरील भाष्यकार आहे. याच्या भाष्याचा संशोधनाकरितां मॅक्समुल्लरनें उपयोग केला होता. म्हैसूर, इंडिया ऑफिस किंवा लाहोर येथील पं. भगवद्दत्त यांच्याकडे असलेल्या प्रती अपुऱ्या आहेत. हा सायणभाष्याचा संक्षेप करतो. इंडिया ऑफिसच्या प्रतीवर संवत् १४७– असा अर्धवट लिहिला आहे. पं. भगवद्दत्ताच्या मतें हा काळ स.१४१३-१४१९ सुमाराचा असावा.

**मुद्गल जोशी**—( स. १८०० सुमार ) हा सोलापूरच्या जगन्नाथ जोशाचा वडील मुलगा आणि राम जोशाचा वडील भाऊ. याचें मराठी व संस्कृत भाषेंतील कवित्वहि उपलब्ध आहे. याचा मराठींतील स्फुट सुभाषितांचा संग्रह श्री. शंकरराव जोशी यांना मिळाला आहे. पण याची संस्कृत भाषेंतील प्राविण्याबद्दल विशेष ख्याति होती. यानें 'यदुवंश' नामक रघुवंश महाकाव्याच्या धर्तीवर १९ सर्गांचें विस्तृत संस्कृत महाकाव्य रचलें आहे पण तें अद्यापि अनुपलब्ध दिसतें ( ऐतिहासिक पोवाड्याची प्रस्तावना, पा. ५९ ).

**मुद्गलभट्ट**—तेलगू भाषेंतील रामावरील मुद्गलशतकाचा कर्ता.

**मुद्दप्पा संगम**—( स. १३५५–१४०० सुमार ) विजयनगरच्या संगम घराण्यांतील पहिल्या बुक्करायाचा भाऊ. याच्या पदरीं मोठी सेना असे.

**मुधोजी निंबाळकर**—( स. १५१२–२७ ) हा बाजीनंतर फलटणच्या गादीवर आला.

२. ( स. १६३०–४४ ) हा वणगोजी ऊर्फ जगपाळरावाचा मुलगा ( बजाजी निंबाळकर व सईबाई भोसले पाहा ).

३. ( स. १७४८–६५ ) हा जानोजीचा मुलगा. हा पेशव्यांच्या तंत्रानें वागे. याची भक्ति ब्रह्मेंद्रस्वामीवर होती. याची पत्नी सगुणाबाई. पतीच्या पश्चात् तिनेंहि पुष्कळ वर्षे राज्य केलें.

**मुधोजी भोसले**—( स. १६५० सुमार ) हा नागपूरकर भोसल्यांचा मूळपुरुष प्रसिद्ध परसाजी भोसल्याचा बाप. मुधोजी व त्याचा भाऊ रूपाजी यांच्या पूर्वजांनीं पुणें प्रांतांतील हिंगणीनजीक बेरडी हा गांव वैराण होता, तो त्या वेळच्या सरकारांतून वसविण्याकरितां घेतला व तेथील पाटीलकी संपादन करून वसविला. शेती वगैरे लावून गव्हाची लागवण केली. त्यामुळें 'हिंगणीकर भोसले' हें नांव पडलें. मुधोजी व रूपाजी हे शिपाईगिरीचाहि धंदा करीत. ते शहाजी भोसल्याचे समकालीन असून प्रथम निजामशाहींत नोकर होते.

हे दोघे धार्मिक व श्रीमंत होते. त्यांनीं खंडेरायाची व देवीची अशा दोन मूर्ती सोन्याच्या प्रत्येकीं सव्वापांच मणांच्या केल्या होत्या अशी आख्यायिका आहे.

मुधोजीस तीन पुत्र होते. वडील बापूजी, दुसरा परसोजी व तिसरा साबाजी ( बखर पान ६ ).

२. ( मृ. स. १७८८ ) हा पहिल्या रघुजी भोसल्याचा मुलगा. याचा बाप मरतांच यानें आपल्या जानोजी नांवाच्या भावास कळविलें कीं, मी वडील असल्यामुळें दौलतीची मालकी मजकडे द्यावी. पण या दौलतीच्या मालकीमुळें याचें व याच्या भावाचें भांडण होऊं लागलें म्हणून नानासाहेब पेशव्यानें यास सेनाधुरंधर असा किताब देऊन, चंद्रपूर व छत्तीसगड हीं शहरें दिलीं. परंतु याचा व जानोजीचा तंटा न मिटतां, त्यांची लढाई झाली व तींत याचा मोड होऊन ह्या दोघांत तह ठरला व त्यांत यानें सर्व कारभार पाहावा असें ठरलें. जानोजीच्या मृत्यूनंतर याचा मुलगा रघूजीस से. सा. सुभ्याचीं वस्त्रें द्यावा असें त्यानें सांगून ठेविलें होतें.

परंतु याबद्दल याचें व साबाजीचें भांडण होऊन दोघांची लढाई झाली, तींत दोघांचा तह होऊन यानें व साबाजीनें मिळून कारभार पाहावा असें ठरलें.

साबाजीस जानोजीची बायको दुर्गाबाई हिचें साह्य होतें. परंतु पुढें ती यास जाऊन मिळाल्यामुळें पुन्हां भांडणास सुरवात झाली. त्याला नारायणराव पेशव्यांचें साह्य मिळालें होतें, व याला रघुनाथरावदादांचें साह्य मिळालें होतें. पुढें नारायणरावाचा खून झाल्यानंतर दादानें यास आपल्या मदतीस बोलाविलें व याचा मुलगा रघुजीस वस्त्रें देण्याचें कबूल केलें (स. १७७३). स. १७७५ मध्यें याची व साबाजीची लढाई होऊन साबाजी मारला गेला. स. १७७७ मध्यें छत्रपति रामराजा निपुत्रिक मरण पावला. तेव्हां हेस्टिंग्जनें नानाचा पाडाव करण्यासाठीं यास नेऊन सातार्‍यास छत्रपति करावें अशी सिद्धता केली. पण नानांच्या पुढें याचें कांहीं चालूं शकलें नाहीं. उलट नानानें तंबी देऊन यास घाबरविलें. तेव्हां स. १७८१ त यानें हेस्टिंग्जला आपले हातून पुणें दरबारशीं मध्यस्थी होणार नाहीं असें कळविलें. स. १७८५ त बदामीच्या वेढ्यांत हा व याचा पुत्र खंडोजी हे दोघेहि हजर होते. हा स. १७८१ पर्यंत दिवाकर पंडित नांवाच्या दिवाणाच्या सल्ल्यानें वागत असे. याला दोन बायका व रघूजी, खंडोजी व व्यंकोजी असे तीन मुलगे होते. यानें आपल्या नांवाचा शिक्का काढून त्यांत पुढील श्लोक घातला होताः शाहूप्रसादेन रघूजी सुयशोधरः । तत्सूनास्तु मुधोनाम्नस्तस्य मुद्रा विराजते ॥ " ( ना. प्रां. इं. ).

३. (स. १७९६–१८४०) हा व्यंकोजी ऊर्फ मन्याबापू भोसल्याचा मुलगा. दुसऱ्या रघूजीचा मुलगा परसोजी हा वेडसर निघाल्यामुळें राज्याचा कारभार कोणीं करावा हा प्रश्न उभा राहिला व रघूजीची कारस्थानी बायको बांकाबाई हिचा एक पक्ष व अप्पासाहेबाचा दुसरा पक्ष असे दोन पक्ष निर्माण होऊन कारभारांत भांडण उत्पन्न झालें. यानें इंग्रज रेसिडेंटाशीं संधान बांधून, त्याच्यापासून मदत मिळवून बांकाबाईच्या सैन्याचा पराभव केला, व परसोजीस गादीवर बसवून, त्याजकडून आपणास राज्याचे मुखत्यार नेमल्याचें जाहीर केलें, व इंग्रजांशीं स. १८१६ त तैनाती फौजेचा तह केला. ता. २१-४-१८१७ त परसोजी मरण पावला व याच्या घराण्यांत याच्याशिवाय दुसरा पुरुषच न उरल्यामुळें हा गादीवर बसला. गादीवर बसल्यानंतर सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें आणण्यासाठीं इंग्रज रेसिडेंट नको म्हणत असतां यानें आपला वकील पुण्यास पाठविला. परंतु हें करणें रेसिडेंटास पसंत न

पडून त्यानें याच्याशीं लढाई करून याचा पराभव केला. तेव्हां यानें इंग्रजांशीं तह करून हा इंग्रजांच्या स्वाधीन झाला.

परंतु याला इंग्रजांच्या हातांतलें बाहुलें बनण्याचा कंटाळा येऊन हा त्यांच्याविरुद्ध धडपड करूं लागला. तेव्हां याला इंग्रजांनीं पकडून प्रयाग येथें नेऊन ठेविलें. परंतु तेथून यानें फितुरी करून आपली सुटका केली. परंतु यास कोणीहि इंग्रजांच्या भीतीनें थारा देईना, तेव्हां हा तसाच दडून हिंडत असतां स. १८२९ त जोधपूरच्या राजानें यास पकडलें. पण इंग्रजांच्या ताब्यांत न देतां त्यानें आपल्या नजरकैदेंत ठेविलें, व शेंवटीं हा नजरकैदेंतच असतां स. १८४० त मरण पावला. याला उमाबाई व सावित्रीबाई अशा दोन बायका होत्या.

**मुनिचंद्र**—( स. १२२९ ) कानडी जैन कवि. याचा को ताहि ग्रंथ उपलब्ध नाहीं. याचा शिष्य गुणवर्ण दुसरा हा कार्तवीर्य रट्टाचा गुरु होता ( बॉं. ब्र. रा. ए. सो. १०, पा. २६० ). कार्तवीर्याचा मुलगा लक्ष्मीदेव यास हा शस्त्रविद्या व शास्त्र शिकवीत असे. तसेंच हा रट्ट राजाचा सचीवहि होता. यानें अत्यंत पराक्रम गाजवले, शत्रूंना नाहींसें केलें आणि रट्टराज्यप्रतिरक्षणाचार्य अशी पदवी घेतली ( क. क. च. भा. १, पा. ३४६ ).

**मुनिव्यास**—(ग्रंथकाल स. १३५३) एक महानुभाव. याला कुमाराम्नाय कोठी असेंहि म्हणत. यानें शके १२७५ ( स. १३५३ ) मध्यें स्थानपोथी नांवाचा महत्त्वाचा गद्यग्रंथ लिहिला. महानुभावपंथास पूज्य असलेल्या अवतारी विभूती श्रीदत्त, श्रीकृष्ण, श्रीचक्रपाणी, श्रीगोविंदप्रभु आणि श्रीचक्रधर यांच्या लीलांनीं पवित्र झालेलीं स्थानें सर्व महाराष्ट्रभर व महाराष्ट्राबाहेरहि पसरलेलीं होतीं. त्यांपैकीं कित्येक स्थानांवर झालेल्या लीला तर कित्येकांच्या आठवणींतहि होत्या. पुढील पिढीस त्या समजाव्या म्हणून त्या स्थानांवर स्मृतिचिन्हें राहावीं आणि तीं एकत्रित अशीं एखाद्या ग्रंथांत वाचावयास मिळावीं म्हणून यानें वरील ग्रंथ लिहिला आणि त्या स्थळीं ओटे बांधविले. हें काम यानें अत्यंत भक्तीनें, चिकित्सेनें आणि परिश्रमपूर्वक केलें आहे. मोजमाप, चतुःसीमा वगैरे व्यवस्थित दिलेल्या आहेत. रिद्धिपूर, फलटण, सिन्नर, पैठण, नाशिक, मेहकर इत्यादि शहरांतील अनेक महत्त्वाच्या स्थलांचा याच्या ग्रंथांत निर्देश आहे ( म. वा. इ. भा. २. ७ २९–३१ ).

**मुनिसुव्रत**—हा जैनांचा विसावा तीर्थंकर ( तीर्थंकर पाहा ).

**मुनीश्वर**—( जन्म स. १६०३-१६५० ) हा रंगनाथाचा ( गूढार्थप्रकाशिकाकार ) पुत्र होय. त्या टीकेचा जो काल ( शके १५२५ ) तो याचा जन्मकाल होय. यानें भास्कराचार्यांच्या लीलावतीवर निसृति टीका लिहिली आहे. शिरोमणीच्या दोन अध्यायांवर मरीची टीका व सिद्धांतसार्वभौम हा स्वतंत्र सिद्धांतग्रंथ असे याचे तीन ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

सिद्धांतसार्वभौम श. १५६० मध्यें समाप्त झाला, आणि त्यावर मुनीश्वराचीच टीका आहे, ती शके १५७२ त समाप्त झाली, असें सुधाकर लिहितात.

मुनीश्वरालाच कोणीं विश्वरूप या नांवानें संबोधीत असत. याचा गुरु नारायण होता, असें हा स्वतः लिहितो.

**मुप्पादो नायक**—दुसऱ्या प्रतापरुद्र काकतीयांचा सेनापति.

**मुप्पितदेव ओडियार**—( स. १५७६–७८ ) म्हैसूरचा राजा. हिरे चामराजाचा मुलगा.

**मुबारक**—(कविताकाल स. १६१३) एक हिंदी कवि. याचे ग्रंथ अलकशतक व तिलकशतक.

२. ( स. १४२१ ) सिंधच्या जामराजांचा दिवाण.

**मुबारक खल्जी**—( स. १३१६–२० ) हा अलाउद्दीनाचा मुलगा होय. मलीक काफूरचा खून होतांक्षणींच शहबुद्दीनास पदच्युत करून यानें स्वतः गादी बळकावली. गुजराथेमध्यें याच वेळीं बंड झालें होत, तें मोडून तेथें शाफरखान नांवाच्या आपल्या सासऱ्यास नेमलें. देवगिरीच्या हरपाळदेवानें उठाव करतांच यानें त्याजवर स्वारी करून त्याचा पराभव केला.

हा दुर्व्यसनी व चैनी होता. हलक्या लोकांना मोठया जागा देण्यांत आल्यामुळें दरबारीं मुत्सद्दीमंडळांचा मान राहीनासा झाला. हसन नांवाच्या आपल्या आवडत्या माणसास यानें वजीर नेमिलें. यानें मलबारवर स्वारी करून बरीच लूट मिळविली. हा बराच आळशी व व्यसनी होता, त्यामुळें राज्यांत दारूचीं दुकानें वाढलीं. सर्वत्र महागाई झाली. देशांत बंडें उद्भवलीं. त्याचा परिणाम असा झाला कीं, दडपशाहीनें ती दडपून टाकण्यांत आली. परंतु अखेर ज्याला हात दिला त्या हसननें विश्वासघातानें यास ठार मारलें व अशा रीतीनें या घराण्याचा शेवट झाला. नासिरुद्दीन खुसरोशाह ही पदवी धारण करून हसन गादीवर बसला. पण त्यालाहि ठार करून घियासुद्दीन तुघ्लक बादशाहा झाला ( मलीक नायब काफूर हजारदिनारी पाहा ).

**मुबारकखान**—( मृत्यु स. १७२४ सप्टें. ९ ) निजामानें याला साकरखर्ड्याच्या लढाईंत ठार केलें ( अमानतखान, कंवरजखान व मुहम्मदशाह सूर पाहा ).

**मुबारक फारुकी**—( स. १५३५–६६ ) हा तिसऱ्या आदिल फारुकीचा मुलगा व मिरान मुहम्मदाचा भाऊ. यानें गुजराथच्या सरदारांच्या विनंतीवरून बहादूरच्या पुतण्यास तेथलें राज्य देऊन त्या मोबदल्यांत सुलतानपूर व नंदुरबार हे परगणे घेतले.

**मुबारकखान बाहमनी**—( स. १४२२ सुमार ) हा फीरूजशाह बाहमनीचा दुसरा मुलगा. याला हसनखान नांवाचा भाऊ होता.

**मुबारक लोदी**—( स. १४५१ सुमार ) हा बहलोल लोदीचा पुत्र. याचा भाऊ निजामखान सिकंदर नांवानें दिल्लीच्या गादीवर आला.

**मुबारक सय्यद**—( स. १४२१–३४ ) हा खिजखान सय्यदाचा मुलगा. याचें नांव मुइझुद्दीन मुबारकशाह असें होतें. याचा पुत्र मुहम्मद. याचा सरूर उल्मुल्क या प्रधानानें खून केला.

**मुभट**—( स. १२४३ ) 'दूतांगद' या संस्कृत नाटकाचा कर्ता.

**मुराद मोगल**—( मृत्यु स. १५९९ ) दिल्लीच्या मोगल घराण्यांतील जो अकबर बादशाहा त्याचा हा मुलगा होय. याला जहांगीर व दानियाल असे दोन भाऊ होते. हा स. १५९९ मध्यें मरण पावला. हा गुजराथचा सुभेदार होता. मोगलांचें अहनदनगरच्या निजामशाहीशीं युद्ध चालू असतां यानें अहमदनगरच्या किल्ल्यास वेढा दिला, पण यास किल्ला सर करतां आला नाहीं. शेवटीं वऱ्हाड प्रांत घेऊन हा परत निघून आला (स.१५९४).

२. ( खून स. १६६१ ) दिल्लीच्या शाहजहान बादशाहाचा मुलगा. याचा स. १६६१ मध्यें औरंगजेबानें खून केला.

**मुरग्गा**—ही आंध्र कवयित्री अव्हेयरची बहीण. हिचा जन्म कावेरीपट्टण येथें झाला. ही एका भंडाऱ्याच्या घरीं वाढली. तामीळभाषेंत हिची कविता आहे.

**मुन्यिमखान**—( मृत्यु स. १७११ ) हा औरंगजेब बादशहाचा वजीर. याचें व झुल्फिकारखानाचें पटत नव्हतें. मराठ्यांना सनदा पाहिजे होत्या त्यांत ह्यानें ताराबाईच्या मागणीस पुष्टि दिली. याच्या मार्फतच पुढें ताराबाईशीं लढून आपला हक्क स्थापन करावा असा जबाब शाहूस मिळाला.

**मुरार जगदेव**—( खून स. १६३५ ) हा ब्राह्मण गृहस्थ आदिलशाहींत मुख्य वजीराचा कारभारी होता. दौलतखान मुख्य वजीर झाल्यावर त्यास खवासखान अशी पदवी देण्यांत आली आणि त्याचा कारभारी यास नेमण्यांत आलें ( स. १६२९ ). या वेळीं शहाजहान दक्षिणेकडील एक एक राज्य जिंकीत होता आणि दक्षिणेकडील शाह्या मोगली संकटाकडे लक्ष न देतां आपसांत भांडत होत्या. शहाजी निजामशाही मोगलांविरुद्ध लढवीत असतां आदिलशाही शहाजहानला सामील झाली. हा व रणदुल्लाखान कान्होजी जेध्याला घेऊन पुणें प्रांतावर आले आणि यानें ' पुणें कसबा वसती जाळून तेथें गाढवाचा नांगर फिरविला, पुण्याचा कोट पाडून शहाजीचे वाडे जाळले व लूट केली आणि भुलेश्वरावर ' दौलतमंगल ' किल्ला बांधून तेथून पुणें प्रांतावर आदिलशाही अंमल सुरू केला ' ( स. १६३० ).

कुत्बशाहाच्या लोकांनीं आदिलशाहींतील मुलूख बेचिराख केला होता. तो वसविण्यास लागणारा खर्च मिळेना तेव्हां कौलसला वेढा दिला व देशांतहि लुटालूट आरंभली. त्याच वेळीं आदिलशाही सरदार बाबाजी काटे याच्या मदतीस आला होता. तो फितुर होऊन कुत्बशाहास मिळाला. शेवटीं शहाजहानला तोंड देण्याच्या मुद्यावर तह झाला आणि दीड लाख रुपये खंडणी मिळाली ( स. १६३१ ). शहाजहाननें परिंड्यावर स्वारी केली तेव्हां याला सरलष्कर करून पाठविण्यांत आलें. तेव्हां यानें परिंडा घेतला व मुलूखमैदान तोफ विजापुरी नेली ( स. १६३२ ). अबदुल्ला कुत्बशाहाच्या बहिणीचें लग्न मुहम्मद आदिलशाहाशीं झालें त्यांत हा प्रमुख होता ( स. १६३३ ). वधू व वऱ्हाडी मंडळी विजापूरजवळ येतात तोंच याला दौलताबादच्या वेढ्याच्या मदतीस रवाना केलें. परंतु याचें व फत्तेखानाचें न पटल्यामुळें आदिलशाही सरदारांत फूट झाल्यानें याला तेथें फारशी कामगिरी करितां आली नाहीं ( ता. १७–६–१६३३ ). याच वेळीं भीमगड ( पेमगिरी ) येथून तिसऱ्या मूर्तझा निजामाच्या नांवानें निजामशाही कारभार करण्यास शहाजीनें सुरुवात केली व हा त्याला मान्यता देण्यास विजापूरकरांच्या सैन्यासह हजर होता ( स. १६३३ सप्टें. ). तेथें अंबरखान नांवाच्या सरदारास ५।६ हजार स्वारांनिशीं विजापूरकरांतर्फे शहाजीच्या मदतीस ठेवून हा विजापूरकडे निघाला.

वाटेंत भीमा व इंद्रायणी यांच्या संगमावर भाद्र. व. अमावास्येस सूर्यग्रहणप्रसंगीं ( ता. २३–९–१६३३ ) यानें आपली सुवर्णतुला केली, नागरगांव हें नांव बदलून

तुळापूर ठेवलें, ३०० होनांची जमीन १६ ब्राह्मणांना अग्रहार दिली.

याच्या अंगावर कुष्ट झालें. तेथें नागरगांवच्या रुद्रनाथ नांवाच्या साधूच्या दर्शनानें व संगमावर स्नान केल्यानें गेलें म्हणून यानें तेथें संगमेश्वराचें देऊळ बांधलें. तें अद्यापि तुळापुरीं विद्यमान आहे.

खवासखान व हा यांचें वर्चस्व असह्य झालें, तेव्हां दोघांना वेगळें करण्याकरितां यादगिरीच्या इमामखानें बंड केलें होतें, तें मोडण्याकरिता यास पाठविण्यांत आलें. पण तेथें याचा मोड झाला आणि इकडे मुहम्मदशाहानें डोईजड झालेल्या खवासखानास सिद्दी रेहानकडून ठार मारलें आणि यालाहि पकडून कैद करून आणलें. शेवटीं निराश झाल्यामुळें हा अद्वातद्वा बोलल्यानें याची जीभ कापून, गाढवावरून धिंड काढण्यांत आली आणि याचे तुकडे करून यास ठार करण्यांत आलें ( स. १६३५ ). खवासखानानंतर एक महिन्याच्या आंत यास ठार केलें.

याच्या तर्फे जे हुकूम सुटत त्यांत यास 'महाराज–राजाधिराज मुरारीपंडित साहेब' असा मायना असे ( शि. च. प्र. ले ८, पा. ९२ ). आणि दानपत्रांत 'धर्मावतारो राजाधिराजः महाराजः राजश्रीः पंडितः मुरारिः जगदेकप्रभुः सार्वभौमप्रतिनिधीः' हे शब्द आहेत. त्यावरून याचा त्या वेळचा दर्जा लक्षांत येतो.

इब्राहीम कुत्बशाहाच्या पदरचा मुरारिपंडित हाच असावा(स.१५८०). तसेंच दौलतखानास गोवळकोंड्याच्या गादीवर आणणारा जगदेवराव याचा पिता असावा.

हा मूळ वाईजवळच्या धोमचा राहणारा होता असें म्हणतात.

**मुरार परब्रह्म**—( स. १६३० सुमार ) एक साधु. पिता ब्रह्माजीपंत. आनंदतनय अरणीकर हे याचे शिष्य होत.

**मुरारराव घोरपडे**—(स. १७०४–१७७७ सुमार) मराठा सरदार. हा संताजी घोरपड्याच्या पुतण्याचा मुलगा. याच्या बापाचें नांव शिदोजीराव. याचा बाप मेल्यानंतर याच्या सगुणाबाई निंबाळकर नांवाच्या बहिणीनें यास साताऱ्यास नेलें व यास शाहूच्या पायांवर घातलें. हा पेशवाईच्या काळांत तीस वर्षे स्वतंत्रपणें वागून हैदर, इंग्रज व अर्काटचा नबाब वगैरे लोकांना एकमेकांविरुद्ध मदत करून आपला फायदा करून घेत असे. याच्याजवळ सतत आठ हजार उत्तम घोडदळ असे. हा पेशव्यांना मदत करीत असे. याला पेशव्यांनीं 'सेनापति' असा किताब दिला होता. हा मराठ्यांच्या अग्रणी सरदारांपैकीं एक बनला. यानें आपल्या शौर्याच्या जोरावर सबंध कर्नाटक जिंकून गुत्ती येथें आपली राजधानी केली. म्हणून यास गुत्तीकर घोरपडे असें नांव पडलें. यानें पेशव्यांच्यातर्फे स. १७४१ मध्यें त्रिचनापल्लीस झालेल्या चंदासाहेब व मराठे यांच्या घनघोर संग्रामांत जय मिळविला. तेव्हां ह्या कामगिरीबद्दल शाहूनें यास कर्नाटकाच्या सरदेशमुखीचें वतन व त्रिचनापल्ली किल्ल्याची सुभेदारी दिली. शेवटीं हा गुत्तीचा किल्ला सर करीत असतां हैदरच्या ताब्यांत सांपडला व त्यानें यास चांदीची बेडी घालून कपालदुर्गाच्या किल्ल्यांत ठेवलें, व शेवटीं या शूर सरदाराचा अंत तेथेंच झाला.

**मुरारराव जाधव**—( स. १७८० सुमार ) भुईंज ( जि० सातारा ), वाघोली ( जि० पुणें ) आणि गांडापूर ( इलाखा मोगलाई) ह्या तीन ठिकाणीं जाधवांचीं घराणीं होतीं. यथील जाधव परस्परांचे भाऊबंद होत. यांत भुईंज व गांडापूर हें घराणें एकच. ह्या घराण्यांत शूर, अभिमानी आणि हांजी हांजी न करणारा असा एक सरदार सवाई माधवरावाच्या कारकीर्दीत होता.

नाना फडणीस इंग्रजप्रिय व महादजी दासीपुत्र त्यामुळें हा दोघांशींहि बांकून वागे. हा त्यांना त्रासून बोलला कीं, "नानाची संगत व महादजीची पंगत या दोहोंचीहि मला गरज नाहीं. मी परमेश्वराची भक्ति करीन व तो माझ्या सर्व इच्छा पूर्ण करील." असें म्हणून हा निघून गेला. याचा पुन्हा पत्ता लागला नाहीं. पुढें याचा तोतया उत्पन्न झाला होता ( भा. व. खं. ३, ऐ. गो. पृ. ३६ .

**मुरारि**—( स. १०५०–११३० ) संस्कृत कवि. अनर्घराघव नाटकाचा कर्ता. ह्याचें गोत्र मौद्गल्य होतें व हा भट्टश्रीवर्धमान आाण तंतुमती यांचा पुत्र. यानें स्वतःस महाकवि असें म्हटलें आहे. इतकेंच नव्हे, तर हा आपल्याला 'बालवाल्मिकी' असा किताब लावून घेतो. याच्या नाटकाच्या पहिल्या अंकांतील सहा व सात या दोन पद्यांमध्यें जो गद्य भाग आहे त्यांत यानें उत्तररामचरित्र या नाटकांतील उतारा दिला आहे ( ६, ३०, ३१ ). आणि याच्या मागून झालेल्या ग्रंथकारांनीं याचा व भवभूतीचा अशा रीतीनें उल्लेख केला आहे कीं, त्यावरून हा भवभूतीच्या मागून झाला असावा असें वाटतें. मंखानें श्रीकंठचरित्रांत याचा निर्देश केला आहे (श्रीकंठ.२५.७४).

नाटकांतील वर्णनावरून माहिष्मती येथें राज्य करणाऱ्या एका कलचुरी राजाच्या पदरचा हा मुरारि कवि असावा असें आपणांस अनुमान करतां येण्यासारखें आहे. माहिष्मती म्हणजे नर्मदा प्रांतांतील हल्लींचें मांधाता नांवाचें ठिकाण होय.

'अनर्घराघव' हें सात अंकी नाटक आहे. यांत राम विश्वामित्राकडे गेल्यापासून रावणाचा पराभव करून अयोध्येस परत येईपर्यंतचा कथाभाग आहे. या ग्रंथकाराची नाटकरचनाशैली भवभूतीच्या नाटकाप्रमाणेंच आहे. वस्तुस्थितीच्या मजकुरापेक्षां वर्णनानें बराच मोठा भाग व्यापिलेला असतो. टीकेच्या साह्यावांचून ग्रंथ कळण्यास बराच कठीण जातो.

२. (स. १७५४ सुमार) एक मराठी कवि. हा कोल्हापूर येथें होऊन गेला याच्या पित्याचें नांव कृष्ण व मातेचें नांव राधा. हा शांडिल्यगोत्री ऋग्वेदी ब्राह्मण होता. यानें ओवीबद्ध भीष्मपर्व लिहिलें आहे. यानें इतर पर्वें केलीं नाहींत असें यानेंच शेवटीं लिहिलें आहे. भीष्मपर्व श. १६७६ भावसंवत्सर, माघ शुद्ध सप्तमीला पुरा केला आहे. हा ग्रंथ अप्रसिद्ध आहे. श्री. ल. रा. पांगारकर यांच्याकडे आहे (म. क. च. भा. २, पा. ७३–७७).

**मूर्तझा निजाम**—(स. १६६५–८८) हा अहमदनगरच्या हुसेन निजामचा पुत्र. हा लहानपणीं गादीवर आला, तेव्हां याची आई कारभार पाही. तिनें वशिल्याचे लोक कारभारांत नेमले, म्हणून लोकांनीं कट केला. तो फोडून तिनें कटवाल्यांना शिक्षा केल्या. यानें विजापूरवर स्वारी करून दुसऱ्या अली आदिलशाहास तह करण्यास भाग पाडलें. यानें इमादशहास ठार मारून इमादशाही आपल्या राज्यास जोडली. याला याचा मुलगा मिरानहुसेन यानें ठार केलें.

२. (स. १६०१–०७) हा अहमदनगरच्या निजामशाही घराण्यांतील शहाअलीचा पुत्र. यानें निजामशाही पुनः वाढीस लावली. दिल्लीचा अकबर मेल्यानें मलिकंबरनें बराच भाग काबीज केला. पुढें त्याचें व याचें जमेना.

३. (स. १६३३–३७) अहमदनगरच्या निजामशाही घराण्यांतील राजा. शहाजीनें हुसेननंतर यास गादीवर बसविलें. मुहम्मद आदिलशाहाच्या मदतीनें शहाजीनें अनेक ठिकाणीं मोगलांचा समाचार घेतला. पण पुढें शहाजहाननें निजामशाही घेतली व दीडशें वर्षें राज्य करून अहमदनगरची निजामशाही नष्ट झाली.

**मुर्शीदकुलीखान**—(मृत्यु स. १७२५) हा मूळचा दक्षिणेंतील एका ब्राह्मणाचा मुलगा. यास एका इराणी व्यापाऱ्यानें मुसलमान केलें. यास लहानपणीं मुहम्मद हाडी म्हणत. याची हुषारी पाहून औरंगजेबानें यास कुर्तुलखान अशी पदवी दिली. यानें बंगालची व्यवस्था उत्तम ठेवल्यानें यास मुर्शीदकुलीखान अशी पदवी मिळाली. त्यानंतर हा स्वतंत्र झाला. यालाच जाफरखान ही पदवी दिसते. याची मुलगी सुजाउद्दीनला दिली होती. यानें आपली सुभेदारी आपल्या मागें आपला नातू सुजाउद्दीनचा मुलगा सरफराजखान यास दिली होती, पण हा मरतांच ती सुजाउद्दीननें आपणाकडे घेतली. याच्याच नांवानें मुर्शिदाबाद हें शहर वसविण्यांत आलें.

२. (स. १७४० सुमार) बंगालचा सुभेदार व सुजाउद्दीनचा जांवई.

**मुल्ला दोपियाझा**—(मृत्यु स. १६००) अकबराच्या दरबारांतील नवरत्नांपैकीं एक. याचा जन्म अरबस्थानांतील तैफ गांवीं झाला. हा बापाच्या शोधार्थ इराणाहून हिंदुस्थानांत आला. पुढें हा कुराण वाचून पोट भरी म्हणून यास मुल्ला म्हणत. हा अत्यंत विनोदी होता. वरील नांवहि याला एका खाण्याच्या पदार्थावरून थट्टेनें देण्यांत आलें आहे. दक्षिणच्या स्वारींत हा बादशहाबरोबर होता. हा नर्मदातीरीं हंडिया येथें मेला. तेथें याची कबर आहे.

**मुल्ला अबदुल लतीफ**—(स. १६०० सुमार) विजापूरच्या अली आदिलशाहच्या वेळचा एक कवि.

**मुल्ला फत्तेउल्ला शिराजी**—(स. १६०० सुमार) हा विजापूरच्या अली आदिलशाहाचा दुसरा गुरु. खाजा इनायतुल्ला या शियापंथी गुरूस काढून यास ठेवलें.

**मुल्ला मुहम्मद**—(मृत्यु स. १६२४) विजापूरकरांचा प्रसिद्ध सेनापति. याचा जांवई मुस्तफाखान. हा भातवडीचे लढाईंत मेला.

**मुल्ला हैदर**—(स. १६७२–१७०६) शिवाजीचा दुभाष्या फार्शी पंडित. स. १६७२ मध्यें यास बहादुरखानाकडे पाठविलें. संभाजीचें आणि याचें पटलें नाहीं म्हणून हा स. १६८३ त औरंगजेबाकडे गेला. तेथें याला अजीमुश्शानच्या शिक्षकाचें काम मिळालें. नंतर हा काजी (स. १७०६) व पुढें सरन्यायाधीश झाला.

**मुशो दुरो** ऊर्फ **मुशे डुरो**—सुरतेच्या फ्रेंच वखारीचा मुख्य एजंट. फ्रेंच लोक शिवाजीशीं स्नेहानें वागत असून त्यांजमध्यें सलोखा होता. स. १६७० च्या सुरतेच्या स्वारीच्या प्रसंगीं शिवाजीनें फ्रेंच वखारीस यत्किंचित्‌हि उपसर्ग दिला नाहीं. फ्रेंचांच्या वखारी सुरत व राजापूर येथें होत्या (रा. खं. ८.८).

**मुस्तफाखान**—(स. १७४४) एक अफगाण सरदार. भास्करराम कोल्हटकराच्या खुनाच्या कटांत हा होता. यानें केलेल्या आनंदोत्सवाची माहिती प्रसिद्ध आहे (रा. खं. २.१०१).

२. ( मृत्यु स. १७४८ नवं. ८ ) याचें नांव मीर्झा-मुहम्मद अमीन. मुहम्मद आदिलशाहास गादीवर बसविलें म्हणून ही पदवी मिळाली ( शिवभारत प्र. ७५ ). हा मलिकंबरचा जांवई होता. तसाच मुल्ला मुहम्मदाचाहि जांवई होता. शहाजी कैद झाल्यावर जिंजीचा वेढा चालू असतां हा मृत्यु पावला.

**मुहकमसिंग**—हा हुसेन अलीचा दिवाण होता. हुसेन अलीनें २६-१२-१७१८ त उज्जयनी सोडली तेव्हां रस्त्यांत त्याला हा सरदार येऊन मिळाला. हा बुंदेला सरदार सय्यदांचा साह्यकर्ता असून औरंगजेबाचे वेळेपासून बादशाही फौजेंत नोकर होता.

" जाजवच्या लढाईंत रामसिंग बांडे यांनीं तलवार चालविली त्यांत कित्येक लोक मेले व जखमी झाले. ते समयीं मुहकमसिंग यांनीं बांड्यावर वार केले, तेणेंकरून शीर उडालें. धड राहिलें तें सवंध कांहीं वेळ नाचूं लागलें, लोकांस आश्चर्य जालें. " ( भा. गोविंद खंडोक्त शा. म. ब. ४२ रा. खं. २, पृ. ३५ ). हुसेन अलीचा खून झाला तेव्हां हा त्याजजवळ होता. सय्यदाचे (हुसेनअली) पश्चात् हा वजीर अमीनखानास शरण गेल्यामुळें यास त्यानें सहाहजारी मनसब दिली, आणि निजामाकडे मदतीस दक्षिणेंत पाठविलें. तेव्हां हा व चंद्रसेन यांनीं शाहूच्या प्रदेशावर चाल केली असतां शाहूनें यांचा पराभव केला ( १७२० ).

**मुहणोत नैणसी**—( जन्म स. १६१०–मृत्यु स. १६७० ) हा मारवाडचा राजा पहिल्या जसवंतसिंगाचा दिवाण. हा मोठा विद्याप्रेमी होता. यानें राजपुतान्यांतील रजपुतांच्या राज्याचा इतिहास मारवाडी भाषेंत लिहिला आहे. तो राजपुतान्यांत 'मूता नैणसी की ख्यात' या नांवानें प्रसिद्ध आहे. यानें आपल्या या इतिहासांत पुष्कळ ठिकाणीं आपल्याला असलेली माहिती कोठून मिळाली हें लिहिलें आहे.

हा शूर होता. प्रारंभीं हा जोधपूरच्या राज्यांत नोकर होता, पण मागाहून जसवंतसिंगाचा दिवाण झाला ( स. १६५७ ). जसवंतसिंगाचा मुक्काम औरंगाबादेस होता. तेव्हां त्याच्याबरोबर हा व याचा भाऊ सुंदरदास असे दोघेहि होते. तेथें जसवंतसिंग या दोघांवर कांहीं कारणानें अप्रसन्न झाला, व यांना कैद करण्यांत आलें. पुढें लाख रुपये दंडावर सोडण्यांत आलें, पण यांनीं दंड देण्याचें नाकारलें, म्हणून पुनः कैद करण्यांत आलें. कैद करून यांना जोधपूरला रवाना केलें. वाटेंत दंड वसूल करण्याकरितां यांच्यावर सक्ती सुरू झाली. तेव्हां या दोघां भावांनीं पाटांत कट्यार खुपसून घेऊन आत्महत्या केली. असा या ऐतिहासिक पुरुषाचा अन्त झाला.

**मुहम्मद**—( मृत्यु स. १५३५ ) काश्मीरचा राजा. हा हसनचा मुलगा. हा अल्पवयी असल्यानें याला कैद करून फत्तेखानानें राज्य बळकावलें, पण पुढें यानें सिकंदर लोदीची मदत घेऊन फत्तेखानाचा पराभव केला व राज्य मिळविलें.

२. (स.१७४१सुमार) भोपाळच्या दोस्त मुहम्मदाचा औरस पुत्र.

**मुहम्मद अमीनशाह**—(स.१७००सुमार) काबूलचा सुभेदार. हा मीरजुम्लाचा मुलगा. यास औरंगजेबानें मीरबक्षीगिरी दिली होती.

**मुहम्मदअली**—( स. १७४९–९५ ) अर्काटचा नबाब. यानें फ्रेंचांविरुद्ध इंग्रजांस मदत केली. फ्रेंचांनीं याचा पराभव करून त्रिचनापल्लीस वेढा दिला, तेव्हां यानें इंग्रजांकडे मदत मागितली. इंग्रजांनाहि पुणें दरबारशीं तह करण्याकरितां कोणी मनुष्य पाहिजेच होता. त्यांनीं याला मदत करून वेढा उठविला.

**मुहम्मद अलीशाह**—( स. १८३७–४२ ) हा अयोध्येचा राजा. याचें मूळ नांव नासिरुद्दौला असें होतें. पण याला इंग्रजांनीं 'मुहम्मद अलीशाह' असा किताब देऊन गादीवर बसविलें. हा नासिरुद्दीनचा पुतण्या.

**मुहम्मद आदिलशाह**—( स. १६२६–५६ ) हा विजापूरच्या दुसऱ्या इब्राहीम आदिलशाहाचा मुलगा. यानें गादीवर येतांच शाहाजादा दर्वीशचे डोळे काढून,सुलेमानास कैदेंत ठेवलें. निजामशाहानें याच्यावर दोन वेळां स्वाऱ्या केल्या, पण त्याचा दोन्हींहि वेळां पराभव झाला. यानें शहाजी भोसल्यावर मुरार नांवाचा सरदार पाठवून आदिलशाहीचा गेलेला मुलूख परत मिळविला. याची व निजामशाहीचा कारभारी फत्तेखानाची लढाई झाली, तींत त्याचा पराभव झाला. शहाजहान बादशहानें यास मांडलिकत्व पत्करण्यासाठीं पत्र लिहिलें असतां,यानें उलट मोठ्या खुबीनें त्याला पत्र लिहून मित्रत्वाचें नातें मानण्यास लावलें. विजापूरचा प्रसिद्ध गोल घुमट याच्या हुकुमानें बांधला व त्यांत याचें प्रेत दफन केलें. यानें मुल्ला नहुर बिन मुल्ला नहुरी नांवाच्या मुसलमानास आपल्या कारकीर्दीचा तारीखवार ग्रंथ लिहिण्यास सांगितलें व त्यास 'मुहम्मदनामा' असें नांव दिलें. हा जरी विलासी व रंगेल मनुष्य होता तरी प्रजासंरक्षणाकडे याचें सर्वोत्तम लक्ष असे.

याची कारकीर्द भरभराटीची झाली. कारण याच्या राज्यांत यानें पुष्कळ सुधारणा करून राज्य वाढविलें. यानें जीं युद्धें केलीं त्यांत यास यश आलें. एकंदरींत हा विजापूरच्या आदिलशाही घराण्यांतील एक कर्तबगार राजा झाला.

**मुहम्मद आदिल सूर**—( राज्यकाल स. १५५२-५३ ) दिल्लीचा बादशहा. याचा कारभार हिमू नांवाचा हिंदु प्रधान पाहत होता. हा राज्यास नालायक असल्यानें इब्राहीम सूरनें गादी बळकाविली.

**मुहम्मद करीमशाह**—( राज्यकाल स. १४४२-५१ ) गुजराथचा राजा. अहमदशाहाचा मुलगा. ईडरच्या राजानें यास मुलगी देऊन तंटा मिटविला. चांपानेरच्या गंगादासाचा यानें पराभव केला ( स. १४४९ ). याला विष घालून दरबारी लोकांनीं ठार केलें.

**मुहम्मद कुत्बशाह**—( स.१६१२-३५ ) मुहम्मद अमीन कुत्बशाहाचा पुत्र. यानें गोवळकोंड्याच्या किल्ल्याचा तट बांधला व कांहीं कावताहि केल्या आहेत.

**२.** (स.१५८१सुमार) हा इब्राहीम कुत्बशाहाचा पुत्र.

**मुहम्मद कुली कुत्बशाह**—(स. १५८१-१६१२) हा गोवळकोंड्याच्या इब्राहीम कुत्बशाहाचा पुत्र. यानें विजयनगरच्या दुसऱ्या वेंकटराय आरविदूवर स्वारी केली, पण याला अपयश आलें. यानें पुनः पेणुकोंड्यावर स्वारी केली, पण तेव्हांहि याला अपयश आलें. यानें गोवळकोंड्याच्या नदीस धरण बांधून शहरभर पाणी खेळविलें. याच्या वेळीं ७८ लाख होन लोकोपयोगी कामांत खर्ची पडले. याची पत्नी भागावती, तिच्या नांवानें शहर वसविलें, त्यास भागानगर असें म्हणत. तिच्या हैदर नांवाच्या मुलाच्या नांवावरून त्यास पुढें हैद्राबाद म्हणूं लागले.

**मुहम्मद खल्जी**—(स. १२०६) बंगालचा सुभेदार. यास इझ्झुद्दीन व मुहम्मद शीरान खल्जी अशीं दुसरीं नांवें आहेत.

**मुहम्मदखान**—( स. १४५८ सुमार ) हा दुसऱ्या अलाउद्दीन बाहामनीचा भाऊ. यानें विजयनगरच्या राजाचा पराभव केला.

**मुहम्मदखान सूर**—( स. १५४५-५५ ) बंगालचा राजा.

**मुहम्मद गझनवी**—( स. १०३०-१०४२ ) हा याचा बाप मरण पावल्यावर गझनीच्या गादीवर बसला. पुढें याचा भाऊ मसूद हा याच्यापेक्षां अधिक कर्तबगार असल्यामुळें गझनीवर चालून आला; तेव्हां दरबारांतील लोकांनीं यास मसूदचे स्वाधीन केलें, व नंतर त्यानें याचे डोळे काढून बाल्ख येथें नजरकैदेंत ठेवलें. पुढें मसूदची सल्जुक लोकांबरोबर लढाई होऊन, तींत मसूदचा पराभव झाला ( स. १०४० ). तेव्हां तो आपल्या खजिन्यासह यास घेऊन लाहोरास पळून गेला. तेव्हां याच्या सैन्यांतील लोकांनीं मसूदचा खजिना लुटून, त्यास याच्या पुढें उभें केलें. मसूदला याचे पुढें उभें केलें असतां यानें औदार्यानें त्यास जीवदान दिलें. पुढें मसूदच्या मुलानें याच्यावर स्वारी करून यास व याच्या मुलास ठार केलें ( स. १०४२ ).

**मुहम्मद गुलाम**—( स. १२८५ ) मुलतानचा सुभेदार. हा गुलाम घराण्यांतील घियासुद्दीन बल्बनचा मुलगा. हा स्वभावानें फार शांत व धैर्यशील होता. याला कलेची फार आवड असे. हा बल्बनचा फार आवडता मुलगा होता व त्यास असें वाटे कीं आपल्या पाठीमागें दिल्लीच्या गादीवर यानें बसावें, पण त्याची इच्छा पुरी झाली नाहीं. स. १२८५ मध्यें मोगल सरदार तमारखानानें मुलतानवर स्वारी केली, तेव्हां यानें त्याचा पराभव केला. परंतु कांहीं दडून बसलेल्या मोगल सरदारांनीं याजवर हल्ला हल्ला करून यास ठार मारलें. या वेळीं बल्बनला फार पुत्रशोक झाला. तरी पण तो राज्याचीं कामें फार शांतपणें चालवी.

**मुहम्मद घोरी**—(स.१४३४-३६) हा माळव्याच्या गजनीखान घोरीचा मुलगा.

**२.** ( शिहाबुद्दीन घोरी पाहा ).

**मुहम्मद तकी**—( स. १७४० सुमार ) ओरिसा प्रांताचा सुभेदार. हा पहिल्या मुर्शीदकुलीखानाच्या जांवयाचा मुलगा.

**२.** ( मीर पाहा ).

**मुहम्मद तातारखान**—( स. १२६१-७५ ) बंगालचा सुभेदार.

**मुहम्मद तुघ्लक**—(स. १३२५-१३५१) दिल्लीचा बादशहा. हा घियासुद्दीन तुघ्लकाचा वडील मुलगा. याच्या बापानें यास 'उलूघखान' असा किताब दिला. यानें बाप जिवंत असतांच गादी मिळण्याबद्दल स. १३२० त प्रयत्न केला; पण तो फसला ( प्रतापरुद्र काकतीय पाहा ). पण पुढें याचा बाप बंगालच्या मोहिमेवरून येत असतां यानें निजामुद्दीन अवलियाच्या संमतीनें बापाचा खून केला ( स. १३०१ ) ( निजामुद्दीन अवलिया पाहा ).

यानें गादीवर आल्याबरोबर आपल्या भावास, तो देखणा असून फार लोकप्रिय होता म्हणून ठार मारलें.

स. १३२६ मध्यें याच्या बहिणीचा मुलगा बहाउद्दीन गुरुशास्पानें सागरकडे बंड केलें. तें याच्या सरदारानें मोडून, त्यास पकडून याच्या पुढें उभें केलें. यानें त्याचा उपहास करून त्याच्या अंगाचें कातडें काढून, त्याचें मांस त्याच्या बायकामुलांकडे पाठवून दिलें.

गुरुशास्पाच्या दक्षिणेकडील बंडामुळें राज्याच्या मध्या-वर राजधानी असल्यास सर्व राज्याचें संरक्षण करण्यास सोपें जाईल असें याच्या लक्षांत आलें. लागलींच स. १३२७ मध्यें देवगिरी शहरास दौलताबाद असें नांव देऊन तें शहर राजधानी केल्याचें यानें जाहीर केलें व बळजबरीनें सर्व लोकांस तेथें राहण्यास नेलें. याचे कार-कीर्दीत स. १३२८ मध्यें मुलतानचा सुभेदार मलीक ऐबा किश्लूखानानें बंड केलें; पण यानें तें बंड मोठ्या युक्तीनें मोडलें व त्यास ठार मारलें.

मोगलांनीं स. १३२९ मध्यें लाहोरवर हल्ला केला असतां, यानें त्यांना पळवून लाविलें. अयोध्येच्या सुभेदारानें बंड केलें असतां तें यानें मोडलें व परत मोठ्या औदार्यानें त्यास अयोध्येचा सुभेदार नेमलें ( ऐनुन्मुल्क पाहा ) व तेथेंच दुष्काळनिवारणार्थ स्वर्गपूर नांवाचें शहर वसविलें. यानें खजिन्यांतील पैशाचा तुटवडा भरून काढण्यासाठीं सोन्याच्याच्या ऐवजीं तांब्याचीं नाणीं पाडलीं, पण त्यामुळें फायदा न होतां, खजिन्यांत तांब्याचे डोंगर सांठले व परदेशांत त्याला मुळींच किंमत नसल्या-मुळें याच्या राज्यांत फारच अंदाधुंदी झाली.

याच्या कारकीर्दीत एक भयंकर दुष्काळ पडला होता, व त्यामुळें याच्या राज्यांत लोक अन्नावांचून मरूं लागले, तेव्हां यानें दुष्काळनिवारणार्थ एक योजना आंखून त्यावर एक अधिकारी नेमला व त्या अधिकाऱ्यास ‘अमीर-ई-कुही’ असें नामाभिधान दिलें. ती योजना मुख्यतः शेतकी सुधारणेसंबंधीं होती. ती योजना अशीः सर्व राज्याचे १८०० चौरस मैलांचा एक असे विभाग पाडून, त्यांत एक वीतभरहि जागा नापेर न राहील अशी व्यवस्था अमीर-ई-कुहीचे खात्यांतील अंमलदारांनीं सक्तीनें अथवा जमेल तेथें लोकांची समजूत करून करा-वयाची. जमिनीची लागवण करतांना शेतकऱ्यांना सालो-साल एकच पीक करूं द्यावयाचें नाहीं. दरसाल पीक नवीन काढलेंच पाहिजे. हुकुमाच्या अंमलबजावणीकरितां मुकदम वगैरे लोक देखरेखीकरितां ठेविले. इतकी सर्व व्यवस्था केली तरी या खात्याला कांहींहि करितां आलें नाहीं. याच वेळेस हा मरण पावला म्हणून बरें झालें, नाहींतर सर्व कामगारांस यानें यमसदनास पाठविलें असतें.

यानें चीन देशावर स्वारी करण्याकरितां एक लाख सैन्य पाठविलें, पण थंडीमुळें त्या सैन्यांतील फक्त दहा लोक परत आले.

शेवटीं हा सिंधच्या स्वारीवर जात असतां ठठ्ठा येथें मरण पावला.

एकंदरींत याची कारकीर्द लोकांस फारच तापदायक झाली. यानें राज्यांत सुधारणा करण्याचे फारच प्रयत्न केले, पण राज्यांत सुधारणा न होतां बजबजपुरी माजून गेली. यानें कोणतीहि नवीन योजना आंखली व ती तावडतोब अमलांत आली नाहीं तर हा लोकांचे फार हाल करीत असे. याच्या अर्धवट ज्ञानानें यास कांहींच करतां आलें नाहीं. म्हणून यास ‘वेडा मुहम्मद’ किंवा ‘अचाट कल्पनांचा पुरुष’ असें म्हणतात.

**२.** ( राज्यकाल स. १३८९–९४ ) दिल्लीचा बादशाहा. याच्या पित्याचें नांव फीरूज तुघ्लक.

**मुहम्मद फारुकी**—( स. १५२०–३५ ) हा तिसऱ्या आदिल फारुकीचा पुत्र. इमादशाहाच्या वतीनें बुर्हाण निजामावर स्वारी केली असतां याचा पराभव झाला ( स. १५२६ ). हा दीव येथें मरण पावला. हा गुजराथचा सुद्धां राजा होता.

**२.** (स. १५६६–७६) हा मुबारक फारुकीचा मुलगा. याचा गुजराथच्या स्वारींत पराभव झाला. अकबरशाहाच्या मीर्झा नांवाच्या भावानें खानदेशांत शिरून खूप लुटालूट केली. पुढें मुर्तझा निजामानें अशीरगडास वेढा दिला व बुर्हाणपुरावरून खानदेश लुटला. तेव्हां यानें त्यास चार लक्ष रुपये दिले (स.१५७४). पुढें दोन वर्षांनीं हा मेला.

**मुहम्मद बकीर निजाम**—अहमदनगरच्या पहिल्या बुर्हाण निजामचा पुत्र.

**मुहम्मद बंगश**—( स. १७२९ सुमार ) बुंदेलखंड वगैरे भागाचा मोगलांचा सुभेदार. हा एक अफगाण सरदार असून, यानें फर्रुखसियर बादशाहाच्या नांवानें फर्रुखाबाद शहर वसवून तेथें बंगशांचें राज्य स्थापिलें. स. १७३१ त माळव्याचा कारभार दिला. हा चार पांच हजार अफगाण सैन्य नेहमीं जवळ ठेवून स्वतंत्र राहत असे व जरूर त्या पक्षास मदत करीत असे. याचें सबंध नांव गझन फर्जंग असें होतें ( १ बाजीराव पेशवे पाहा ).

**मुहम्मद बाहमनी**—( स.१३५८–७५ ) बाहमनी राजा हसन गंगू ऊर्फ अलाउद्दीन शाहाचा मुलगा. याच्या कारकीर्दीत विजयनगर व तेलंगण येथील राजे एकत्र होऊन याच्यावर चालून आले. पण त्यांना यश आलें नाहीं. यानें आपल्या राज्यांतील बंडें मोडलीं. हा फार

प्रजाहितदक्ष होता. यानें आपल्या राज्याचे चार सुभे करून प्रत्येक सुभ्यावर एक सुभेदार नेमला. यानें राज्यांत प्रधानांच्या नेमणुका केल्या.

२. पहिल्या अहमदशाहा बहामनीचा मुलगा. हा गादीवर आला नाहीं.

३. ( स. १४६३–८२ ) हा हुमायून बाहमनीचा मुलगा. याला उत्तम शिक्षण मिळाल्यामुळें हा विद्वान् झाला. याच्याच कारकीर्दीत महमूद गवान नांवाचा हुशार कारभारी होऊन गेला. त्याच्याच सल्ल्यानें यानें आपल्या राज्याचा कारभार केला. पण कांहीं लोकांनां महमूद गवानाच्या विरुद्ध याचें मन वळवून, त्याचा याच्याकडून खून करविला. शेवटीं याला केलेल्या गोष्टींचा पश्चात्ताप झाला. यानेंच विजापूरची आदिलशाही स्थापणाऱ्या युसुफची कर्तबगारी पाहून, त्यास विजापूरची सुभेदारी दिली.

**मुहम्मद बिन कासिम**—( स. ७११ सिंधवर स्वारी ) सिंध प्रांत काबीज करून खिलाफत राज्यास जोडणारा मुसलमान सेनापति. वलीद खलीफा बगदाद येथें खिलाफतीवर असतां, त्याची हद्द सिंध प्रांतास पोंचून हिंदूंशीं त्याच्या कलागती चालू झाल्या. या वेळीं सिंधच्या उत्तर भागावर दाहर नामक रजपूत राजा होता. तेव्हां त्याजवर चालून जाण्यासाठीं याची नेमणूक त्या फौजेवर झाली. यानें प्रथम देवल येथील देवालय काबीज करून, सर्वांस सर्व लोकांची कत्तल केली. पुढें यानें दाहरवर स्वारी करून, त्याचा देश काबीज केला. दाहरशीं झालेल्या लढाईंत त्याच्या दोन मुली पकडून यानें खलीफा वलीदास नजर पाठविल्या. यानें जाट लोकांचा पराभव करून त्यांचा किल्ला हस्तगत केला, व तो खिलाफतच्या साम्राज्यांत समाविष्ट केला. परंतु यास ह्या विजयाबद्दल मानसन्मान मिळण्याऐवजीं भयंकर मृत्यूचा योग आला. सिंधच्या विजयाबद्दल अहेर म्हणून यानें दाहीर राजाच्या सूर्यदेवी व परमलदेवी ह्या दोन सुंदर मुलींना खलीफाकडे पाठविलें. खलीफानें सूर्यदेवीजवळ निका लावण्याची इच्छा प्रगट केली, तेव्हां तिनें त्यास असें खोटेंच सांगितलें कीं, मुहम्मदानें आपणास भ्रष्ट केलें असल्यामुळें आम्ही दोघीहि ह्या मोठ्या मानास अयोग्य आहोंत. त्यामुळें खलीफा रागावून त्यानें यास मरणाची शिक्षा सांगितली, व ती यानें अक्षरशः पाळली. शेवटीं खलीफास त्या मुलींची लबाडी कळून आल्यावर त्यांना ठार मारण्यांत आलें. अशा प्रकारें त्या मुलींनीं आपल्या बापाचा सूड घेण्यासाठीं व आपलें शील राखण्यासाठीं खलीफास खोटेंच सांगितलें. अशी याच्या मृत्यूची हकीगत बखरींत सांपडत आहे.

**मुहम्मद मुईज्जुद्दीन**—( जहांदरशाहा पाहा ).

**मुहम्मद ( अजम ) मोगल**—(मृत्यु स. १६७६) औरंगजेबाचा थोरला मुलगा. यावर विषप्रयोग होऊन हा ठार झाला.

२. ( मृत्यु स. १७०७ ) औरंगजेबाचा दुसरा मुलगा.

३. ( राज्यकाल स. १७१९–१७४८ ) बहादूर व रोशनआरा यांचा पुत्र. हा फर्रुक्सियरानंतर गादीवर आला. हा कर्तव्यशून्य होता. स. १७३९ मध्यें नादरशाहानें दिल्लीवर चाल करून यास अठ्ठावन्न दिवस कैदेंत ठेवलें. याच्या वेळीं बहुतेक प्रांत स्वतंत्र झाले.

**मुहम्मद युसुफ गारदी**—( मृत्यु स. १७७५ ) रघुनाथराव पेशवे यांचा एक साथीदार.

**मुहम्मद लोदी**—( स. १४५१ सुमार ) हा मलीक बहराम लोदीचा मुलगा.

**मुहम्मद सय्यद**—( राज्यकाल स. १४३४–४३ ) दिल्लीचा बादशहा.

**मुहम्मद संजर बाहमनी**—( स. १३९६ सुमार ) दाऊदखान बाहमनीचा मुलगा.

**मुंज परमार**—( स. ९७४–९३ ) माळव्याच्या परमारांपैकीं श्रीहर्षाचा पुत्र. यानें वाक्पतिराज, अमोघवर्ष, उत्पलराज, पृथिवीवल्लभ, श्रीवल्लभ अशीं बिरुदें धारण केललीं आढळतात. यानें कर्नाटक, लाट, केरळ, व चोल राजांना जिंकलें होतें (एपि. इंडि. भा. १ पृ. २२७). यानें चेदिदेशचा कलचुरि ( हैहय ) राजा युवराजदेव दुसरा याला जिंकून त्याच्या सेनापतीला ठार केलें आणि त्याची राजधानी त्रिपुरी लुटली. तसेंच राजा शक्तिकुमार गुहिलोतच्या वेळीं मेवाडवर स्वारी करून आघाटपूर ( आहाड ) लुटलें आणि चितोडगड आणि माळवा यांना जोडून असणारा प्रदेश आपल्या राज्याला जोडला ( ना. प्र. प. ३. ५ ). तसेंच कर्नाटकच्या दुसऱ्या तैलप चालुक्यावर स्वारी केली, पण तेथें हा कैद झाला व तेथेंच मारला गेला ( सोलंकियों का प्राचीन इतिहास, प्रथम भाग, पृ. ७५–७७ ).

मेरुतुंगानें आपल्या प्रबंधचिंतामणी नांवाच्या ग्रंथांत लिहिलें आहे कीं, 'मुंजानें आपल्या आज्ञेच्या विरुद्ध वागतो म्हणून सिंधुराजाला राज्यांतून घालवून दिलें होतें, व गुजराथमध्यें कासहद येथें राहत होता. कांहीं दिवसांनीं

तो माळव्यांत आला असतां मुंजानें त्याचे डोळे काढले आणि पिंजऱ्यांत कैद करून ठेवलें व त्याचा पुत्र भोज यास त्याला मारण्याची आज्ञा दिली. ' इत्यादि ( प्रबंध-चिंतामणी, पृ. ५५–५८ ). ही कथा कल्पित दिसते. मुंज आणि सिंधुराज यांच्या वेळीं हयात असणारे कवि पद्मगुप्त ( परिमल ) रचित नवसाहसांकचरित आणि धनपालरचित तिलकमंजरी या पुस्तकांवरून कळतें कीं, मुंजाची आपल्या भावाचा मुलगा भोज याच्यावर अत्यंत प्रीति होती. तो योग्य झाल्यावर यानें त्याला दत्तक घेऊन गादीवर बसविलें. हा जेव्हां तैलपावर चालून गेला तेव्हां यानें आपल्या राज्याचा भार सिंधुराजावरच सोंपविला होता. पुढें हा त्या लढाईंत मारला गेला आणि भोज बालक असल्यामुळें सिंधुराज राजा झाला.

हा विद्वान् आणि विद्वानांना आश्रय देणारा होता. याच्या दरबारांत धनपाल, नवसाहसांकचरितकर्ता पद्मगुप्त ( परिमल ), दशरूपकाचा कर्ता धनंजय, दशरूपकावर दशरूपालोक नांवाची टीका करणारा धनंजयाचा भाऊ धनिक, पिंगलसूत्रावर मृतसंजीवनी नांवाची टीका करणारा हलायुध आणि ' सुभाषितरत्नसंदोह ' या ग्रंथाचा कर्ता अमितगति इत्यादि प्रसिद्ध विद्वान् होते. मुंजानें केलेला असा ग्रंथ अद्यापि मिळालेला नाहीं, पण यानें केलेले श्लोक सुभाषितसंग्रहांत आढळतात.

याच्या वेळचीं दोन दानपत्रें वि. सं. १०३१ व १०३६ ( स. ९७४ व ९७९ ) मधील मिळालीं आहेत ( इंडि. अँटि. भा. ६, पृ. ५१–५२. भा. १४, पृ. १६० ). वि. सं. १०५० मध्यें अमितगतीनें सुभाषितरत्नसंदोहाची रचना केली. त्या वेळीं हा राज्यावर होता.

वि. सं. १०५०-१०५४ ( स. ९९३–९९७ ) मध्यें हा तैलपाकडून मारला गेला. याच्या मुख्य प्रधानाचें नांव रुद्रादित्य होतें.

**मुंजाल**—( स. ९३२ ) एक भारतीय ज्योतिषी. गोत्र भारद्वाज. बृहन्मानसाचा संक्षेप लघुमानस यानें केला. हा दाक्षिणात्य होता.

**मुम्मदंवा**—ही रुद्रम्मा काकतीयाची मुलगी व महादेवाची पत्नी. हिचा पुत्र रुद्र.

**मूलदेव**—चौर्यशास्त्राचा कर्ता.

**मूलघटिककेतन**—( स. १२५० सुमार ) यानें दंडीच्या संस्कृत भाषेंतील दशकुमारचरित्राचें तेलगू भाषेंत भाषान्तर केलें, म्हणून याची ' अभिनवदंडी ' अशी प्रसिद्धि झाली. हें तेलगू भाषान्तर तिक्कन सोमयाजी या आंध्रमहाकवीच्या सांगण्यावरून यानें केलें, आणि तसें त्यांत लिहिलें.

**मूलराज सोलंकी**—( स. ९६०-९९५ ) गुजराथमध्यें सोलंकीचें राज्य स्थापन करणारा पुरुष. याच्या पित्याचें नांव राजि असें होतें. चावडावंशांतील शेवटला राजा अनहिलवाड ( पाटण ) येथें गुजराथेंत राज्य करीत होता, त्याचें नांव सामंतसिंह. तो सामंतसिंह याचा मामा होता. यानें त्याला ठार करून त्याचें राज्य घेतलें. ही गोष्ट स. ९६० मध्यें झाली (ना. प्र. प. १ पृ. २१४-१५). यानें गुजराथच्या उत्तरेस आपला अधिकार वाढविण्यास सुरुवात केली आणि आबूच्या धरणीवराह परमारावर स्वारी केली. त्या वेळीं हथुंडीच्या ( जोधपूर राज्यांतील ) राष्ट्रकूट ( राठोड ) धवल राजानें याला आश्रय दिला होता. मूलराजाचे वि. सं. १०५१ ( स. ९९४ ) मधील दानपत्रावरून समजतें कीं, यानें जोधपूर राज्यांतील सत्यपूर ( साचोर ) जिल्ह्यांतील करणक गांव दान दिलें होतें. परमाराच्या राज्यांतील यानें दान दिलें आहे त्यावरून परमारांचें राज्य यानें वरील शकांत ताब्यांत घेतलें होतें असें दिसतें. पण हें पाहून सांभरचा दुसरा विग्रहराज ( वीसळदेव ) चौहान यानें याच्यावर स्वारी केली, तेव्हां हा आपली राजधानी सोडून कच्छांतील कंथादुर्ग(कंथकोट) येथें पळून गेला. विग्रहराज वर्षभर गुजराथेंत राहिला व याला त्रस्त करून परत फिरला. याच वेळीं कल्याणचा तैलप सोलंकीच्या बारप नांवाच्या सेनापतीनें याच्यावर स्वारी केली, पण या युद्धांत बारप मारला गेला. तैलपानें या बारपाला लाटदेश जहागीर दिला होता. यानें काठेवाडांतील सोरठच्या चूडासमा ( यादव ) ग्रहरिपु राजावरहि स्वारी केली. ग्रहरिपूच्या मदतीला त्याचा मित्र कच्छचा जाडेजा ( जाडेचा यादव ) राजा लाखा फुलाणी ( फुलाचा मुलगा ) आला होता. ग्रहरिपु कैद झाला व लाखा मारला गेला (बॉबे. गॅ. व्हा. १ भा. १, पृ. १५६–६० ). या लढाईंत आबूचा राजा याच्या सेनेंत राहून मोठ्या शौर्यानें लढला, असें हेमचंद्रानें द्व्याश्रय काव्यांत लिहिलें आहे. तो धरणीवराह असावा. यानें सिद्धपूर येथें रुद्रमहालय नांवाचें विशाळ शिवालय बांधलें. आणि त्याची प्रतिष्ठा करण्याकरितां कनोज ठाणेश्वर येथून ब्राह्मण बोलावले. आणि गांवें वगैरे उपजीविकेकरितां देऊन त्यांना तेथेंच राहून घेतलें. हे ब्राह्मण उत्तरेकडून आल्यामुळें त्यांना औदीच्य म्हणूं लागले; आणि गुजराथेंत राहिल्यामुळें मूळ गौड असूनहि द्रविडांत यांची गणना झाली. या वेळपर्यंत ब्राह्मणजाति एकच असून त्यांच्यांत

गौंड व द्रविड असा भेद पडला नव्हता. हा भेद याच्या पुष्कळ पुढें झाला. मूलराजानें स. ९६०–९९५ पर्यंत राज्य केलें. याच्या वेळचीं तीन दानपत्रें मिळालीं आहेत. तीं वि. सं. १०३० ते १०५१ पर्यंतचीं आहेत ( व्हिएन्ना ओरिएँटल जर्नल, भा. ५, पृ. ३००; एपि. इंडि., भा. १०, पृ. ७८–७९ ).

याच्या पूर्वीची कांहीं माहिती मिळत नाहीं. यानें वि. सं. १०४३ ( स. ९८७ ) माघ वद्य अमावास्येच्या दानपत्रांत आपणास महाराजाधिराज श्रीराज याचा पुत्र असें म्हटलें आहे ( इंडि. अँटि. ६, पृ. १९१ ). प्रबंधचिंतामणि व कुमारपालप्रबंध या ग्रंथांत निराळी माहिती आढळते. छत्तीस लाख गांव असलेल्या कान्यकुब्ज देशांत कल्याणकटकनगरचा राजा भूदेवा( भूयगडदेवा )चा वंशज मुंजाळदेव यास तीन पुत्र होते. त्यांचीं नांवें:— १ राज, २ बीज, ३ दंडक. हे सोमनाथाच्या यात्रेहून परत येत असतां, चावडावंशांतील शेवटला राजा भूयडदेव ( सामंतसिंह ) राजाची अश्वविद्यानिपुणता पाहून आपली बहीण लीलादेवीचें त्याच्याशीं लग्न करून दिलें. लीलादेवी अकालीं मेल्यामुळें तिचें पोट चिरून मूल बाहेर काढलें. मुलाचा मूळ नक्षत्रावर व अप्राक्रांतक जन्म झाल्यानें मूळराज असें नांव ठेवलें (गुजराथचे राजे पाहा).

२. ( स. ११७६–७८ ) गुजराथच्या सोलंकींपैकीं अजयपालाचा पुत्र. हा बालपणीं राजा झाल्यामुळें यास बाल मूळराजाहि म्हणतात. याच्या वेळीं शहाबुद्दीन घोरीनें गुजराथवर स्वारी केली. याच्याशीं लढाई आबूच्या खालीं कायद्रा गांवीं झाली. या लढाईंत शहाबुद्दीन जखमी झाला व पराजित होऊन परत गेला ( ना. प्र. प. १. १७६ ). फार्सी इतिहासलेखक ही लढाई भीमदेवाच्या वेळीं झाली असें लिहितात. पण संस्कृत ग्रंथकारांनीं मूळराजाच्या वेळीं झाली असें लिहिलें आहे. याचें कारण हा मृत्यु पावून याच वेळीं भीमदेव गादीवर आला होता हें होय. स. ११७६–७८ पर्यंत यानें गुजराथेवर राज्य केलें. याची आई नैकीदेवी याचा कारभार पाही. हा दोन वर्षांतच मेला. नंतर याचा धाकटा भाऊ भीमदेव गादीवर आला.

**मूसा**—( मृत्यु स. ८३६ ) सिंधचा सुभेदार. याच्या नंतर याचा मुलगा सुभेदार नेमला गेला.

**मूसा मूतीन**—( स. १७७८–८८ ) हा एक फ्रेंच वकील होय. स. १७७८ त फ्रेंच वकील सेंट ल्यूबीन पुण्याहून निघून गेल्यावर मूसा मूतीन नांवाचा दुसरा वकील पुण्यास कांहीं वर्षें येऊन राहिला.

**मूसा नारज**—हा व सिनोर नरोना एकच असावेत. हा कार्ल्याच्या लढाईंत होता. हा भीमराव पानसे यांच्या हाताखालीं असे.

**मूसा लोदी**—बहलोल लोदीचा एक पुत्र.

**मूसीकेनो**—(ख्रि. पू. स. ३२७ सुमार) सिंध प्रांतांतील अरोर येथें राज्य करणारा राजा. हा मोठा पराक्रमी व शक्तिशाली राजा होता; म्हणूनच सिकंदर झेलममधून जलमार्गानें सिंधमध्यें आला असतां यानें त्याच्याशीं युद्ध केलें, पण त्यांत याचा पराजय झाला ( मौर्य साम्राज्यका इतिहास, पा. ११७ ).

**मूंजा**—( हंमीर, अजयसिंह पाहा ).

**मृगावती**—कौसंबीच्या शतानिकाची पत्नी.

**मृगेशवर्मन् कदंब**—( स. ४७१–७८ ) हा शांतिवर्मन् कदंबाचा पुत्र. याला विजयशिव असें म्हणत. याच्या पत्नीचें नांव कैकेय प्रभावती. हा कदाचित् स. ४७१ मध्यें गादीवर आला असावा. कारण याच्या कारकीर्दीच्या तिसऱ्या वर्षांतील लेखाचा काल स. ४७३ असा आहे ( इंडि. अँटि. १८७८, पृ. ३५ ). यानें गंग व पल्लव यांना जिंकलें. हा जैन होता. याच्या कारकीर्दीच्या तिसऱ्या वर्षास पौष व आठव्यास वैशाख म्हटलें आहे.

२. हा बनवासीच्या विष्णुवर्मा कदंबानंतरचा राजा.

**मृत्युंजय ब्राह्मणी**—( स. १५२८–१५५८ ) याचे ‘ प्रकाशदीप ’ व ‘ स्वरूपसिद्धि ’ हे दोन ग्रंथ किंवा प्रकरणें महाराष्ट्र कवींतून प्रसिद्ध झालीं आहेत.

भक्तविजयाच्या ४१ व्या अध्यायांत शांत ब्राह्मणी नामक बेदरच्या बादशहाचें चरित्र वर्णिलें आहे. या नांवाचा किंवा वर्णनाचा कोणीच यवन राजा बेदरास किंवा दुसऱ्या कोणत्याहि दक्षिणेकडील जुन्या मुसलमानी राजांत आढळत नाहीं. महिपती लिहितो—उपरति होऊन तो पंढरपुरास आला. तेथें कल्याणच्या सहजानंदाकडून उपदेश घेण्याचा त्यास स्वप्नांत दृष्टांत झाला. तेव्हां शांतब्राह्मणी सहजानंदास भेटला, तेव्हां त्यानें यास उपदेश केला आणि शांतब्राह्मणीचें नांव मृत्युंजय असें ठेवलें. कल्याणापासून एक कोसावर असणाऱ्या नारायणपुरास हा जाऊन राहिला. सहजानंदावरून याचा वरील काल ठरतो. हा कदाचित् बेदरचा आश्रित असेल. भक्तलीलामृतांत याला मृत्युंजय सहायोगी असें म्हटलें आहे ( मं. बा. इ. १८३४ ले. ६८ ).

याला ‘ मुंताजी ’ असें म्हटलेलें आढळतें. ग्रंथ—१ अनुभवसार, २ गुरुलीला, ३ अमृतसार, ४ अद्वैतप्रकाश,

५ सीताबोध, ६ पंचीकरण, ७ स्वरूपसमाधान व ८ सिद्धांतसंकेतप्रबंध वगैरे.

**मेकोपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं त्रेचाळिसावा सिद्ध होय. हा जातीनें वणिक् असून मंगलदेशचा ( भागलपूर जिल्हा ) राहणारा होय. याचा चित्तचैतन्यशमनोपाय ( तं. ४८।६९ ) हा ग्रंथ प्रसिद्ध आहे.

**मेखलपा ( योगिनी )**—ही चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं सहासष्टावी सिद्ध होय. ही जातीनें गृहपतिकन्या ही कण्हपाची शिष्या होय.

**मेगोती तिम्म नायडू**—विजयनगरच्या आरविडु घराण्यांतील श्रीरंगाचा प्रधान.

**मेगॅस्थनीस**—( ख्रि. पू. ३२७ सुमार ) सीरियाचा राजा सेल्यूकस निकेटर याचा पाटलिपुत्र येथें चंद्रगुप्त मौर्याच्या दरबारीं असणारा वकील. हा प्रथम सिकंदरच्याबरोबर हिंदुस्थानांत आला. हा पुष्कळ वर्षे पाटलिपुत्र येथें राहिला. हा येथें असतां आपला रिकामा वेळ या देशाचें भौगोलिक वर्णन, पीक, संस्था यांच्या वर्णनांत घालवी. ज्या गोष्टी यानें स्वतः पाहून लिहिल्या आहेत, त्या प्रामाणिक आहेत. याचा ग्रंथ मूळ ग्रीक भाषेंत होता, पण तो सध्यां उपलब्ध नाहीं. त्या ग्रंथाचें नांव इंडिका असें होतें. त्यापैकीं स्ट्रेबो, आर्यन, प्लीनी आदि ग्रंथकारांनीं उद्धृत केलेले उतारे तेवढे सध्यां मिळतात. त्यावरून यानें स्वतः पाहून लिहिलेला भाग प्रामाणिक दिसतो ( मेघाक्ष पाहा ).

**मेघचंद्र**—( स. १६७८ ) 'यक्षदेवगृद्धान्वय' ग्रंथ लिहिणारा महानुभाव ( मं. त्रै. १२. २. ले. ६ ).

**मेघाक्ष**—हा पारसीक देशाचा राजा. चंद्रगुप्ताच्या विरुद्ध हा मलयकेतूच्या बाजूला होता. पण मलयकेतूनें द्रोही म्हणून याला ठार केलें, असें मुद्राराक्षस नाटकावरून समजतें. हा चंद्रगुप्ताला मगधसाम्राज्य मिळवून देणारांपैकीं असावा. हा मेघाक्ष म्हणजे कांहींच्या मतें नामसाम्यावरून मेगॅस्थनीस असावा. पण दुसऱ्या कांहींच्या मतें हें नांव शैलाक्ष म्हणजे सेल्यूकस असून विशाखदत्तानें चुकीनें मेघाक्ष लिहिलें आहे. पण हे सर्व तर्क आहेत.

**मेदिनीपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं पन्नासावा होय. जात शूद्र. ग्रंथ सहजाम्नाय.

**मेदिनीराय**—( २ महमूद खल्जी पाहा ).

**मेटकाफ, सर चार्लस**—( स. १८०९-३६ ) हा एक हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल होता. हा प्रथम ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकरींत शिरला. लॉर्ड मिंटोनें रणजितसिंगाशीं जो पहिला तह केला (स. १८०९) तो याच्याच मार्फत केला. पुढें बेंटिंकच्या वेळीं हा वायव्य सरहद्दीवरील प्रांताचा ले. गव्हर्नर झाला. बेंटिंकनंतर हा एक वर्ष ( स. १८३५-३६ ) हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल झाला. बेंटिंकनें छापखान्याचा कायदा करून ( प्रेस ॲक्ट ) मुद्रणस्वातंत्र्य दडपून टाकलें होतें, तें यानें तो कायदा रद्द करून खुलें केलें. हें याचें कृत्य कंपनीच्या डायरेक्टरांना सहन झालें नाहीं. त्यांनीं याच्या विरुद्ध ठराव केले. तेव्हां यानें राजीनामा दिला. यानंतर यास जमेकाचा गव्हर्नर व पुढें कानडाचा गव्हर्नर जनरल नेमण्यांत आलें होतें. हा स. १८४६ मध्यें मेला.

**( जनरल ) मेडोज**—स. १७९१-९२ सालीं इंग्रज व निजाम यांनीं टिपूवर स्वारी केली तेव्हांचा इंग्रजांचा प्रमुख सेनापति. तसेंच हा मुंबईस स. १७८८ पासून स. १७९० पर्यंत गव्हर्नरच्या अधिकारावर होता. श्रीरंगपट्टणवर ६ फेब्रुवारी १७९२ रोजीं इंग्रजांनीं रात्रीं हल्ला केला. त्यांत वाट चुकून याची तुकडी भलतीकडे गेली, त्यामुळें यावर थोडा दोष आला. परंतु लॉर्ड कॉर्नवॉलिस यानें सावधपणानें बाजू राखली. पण याला ही गोष्ट फार लागली, व यानें मनांत पुढें होणाऱ्या हल्ल्यांत निकराचा हल्ला करून विजयी होण्याचें, नाहींतर युद्धांत मरून जाण्याचें ठरविलें. पण पुढें २८ फेब्रुवारी १७९२ रोजा तह ठरून टिपूचीं दोन मुलें ओलीस आलीं. तेव्हां याचें डाके फिरून यानें पिस्तुलानें आत्महत्या करण्याचा प्रयत्न केला. पण त्यांतून हा वांचला. गोविंदराव काळे याचें नांव मेडूस असें लिहितात, व याचें वय या वेळीं पासष्ट अधिकच असें लिहितात ( इतिहाससंग्रह. ३.२ ). हरिपंत फडक्यानें आपल्या पत्रांत ही माहिती दिली आहे ( इतिहाससंग्रह २. १२. ले. १३. ऐ. कि. प्र. पा. ९६ ).

**मेधातिथि**—(स. ८२५-९०० सुमार) एक ग्रंथकार. यानें मनुस्मृतीवर फार मोठी टीका ( भाष्य ) केली आहे. याच्या भाष्याचें इंग्रजींत भाषांतर झालेलें आहे. याच्या बापाचें नांव वीरस्वामिन्. हा दक्षिणेंत किंवा उत्तरेकडील भागांत होऊन गेला याबद्दल मतभेद आहे. यानें 'स्मृतिविवेक' नांवाचें पुस्तक लिहिलें आहे, व धर्मावर पुष्कळ गोष्टी श्लोकबद्ध लिहिल्या आहेत.

**मेधाविन् किंवा मेधाविरुद्र**—( स. ६०० सुमार ) हा अलंकारशास्त्रावरील ग्रंथकार आहे, पण याचा ग्रंथ प्रत्यक्ष उपलब्ध नाहीं. भामहानें लिहिलेल्या काव्यालंकारांत उपमालंकारांतील सात दोष दाखविणाऱ्या याचा दोन वेळ उल्लेख आहे ( काव्या. २.४० ). रुद्रटाच्या काव्यालंकार ग्रंथावर टीका लिहिणारा नमिसाधु देखील

मेधावीचा उल्लेख करतो. कांहीं ठिकाणीं मेधाविरुद्र असा शब्द येतो. तेथें मेधावि व रुद्र असे दोन ग्रंथकार मानावयाचे कां एक मानावयाचा, याचा बोध होत नाहीं. नमिसाधूच्या उताऱ्यावरून त्याच्यापुढें मेधाविरुद्राचा एखादा ग्रंथ असावा असें दिसतें. त्रिकांडशेषांत मधारुद्र व कालिदास हीं नांवें समानार्थक म्हणून दिलीं आहेत. काव्यमीमांसाकार राजशेखरानें मेधाविरुद्र कवि जन्मांध होता अशी माहिती दिली आहे (श्री. पां. वा. काणेकृत साहित्यशास्त्राचा इतिहास ).

**मेनन्द्र**—( मिलिंद पाहा ).

**मेप्पतूर नारायण भट्टतीरी**—( नारायणभट्टतीरी पाहा ).

**मेरुकवि**—शके १५३५ च्या सुमारास यानें अवधूतगीतेवरील टीका लिहिली.

**मेरुतुंगाचार्य**—( जन्म स. १३४६ ) प्रबंधचिंतामणि ग्रंथाचा कर्ता. यानेंच नाभिवंशसंभवकाव्य, यदुवंशसंभवकाव्य व नेमिदूतकाव्य हीं रचिलीं. महापुरुषचरितम्, थेरावली ( स्थविरावली ) व षड्दर्शनविचार हे याचे ग्रंथ होत. प्रबंधचिंतामणि व थेरावली करणारा कवि एकच होय.

**मेरुशास्त्री गोडबोले**—याच्या पित्याचें नांव अनंतशास्त्री. मोठे नैयायिक. वाक्यवृत्ति ग्रंथाचे कर्ते.

**मेलांबा**—ही चवथ्या विजयादित्य चालुक्याची पत्नी.

**मेवक क्षत्रप**—हा मथुरेच्या शकमित्र क्षत्रपाचा पुत्र. याचीं कांहीं नाणीं सांपडलीं आहेत.

## मेवाडचे राजे ( गुहिलोत )—

गुहिल (स. ५६६), भोज (स. ५८६), महेंद्र पहिला (स. ६०६), नाग ( ६२६ ), महेंद्र दुसरा ( ६८८ ), कालभोज बापा ( ७३४ ), खुम्माण ( ७५३ ), मत्तट ( ७७३ ), भर्तृभट [ भर्तृपट्ट ] ( ७९३ ), सिंह ( ८१३ ), खुम्माण दुसरा ( ८२८ ), महायक ( ८५३ ), खुम्माण तिसरा ( ८७८ ), भर्तृभट दुसरा ( ९०३ ), अल्लट (९५१-५७), नरवाहन ( ९७१ ), शक्तिकुमार (९७७), अंबाप्रसाद ( ९९३ ), शुचिवर्मा ( १००७ ), नरवर्मा (१०२१), कीर्तिवर्मा ( १०३५ ), योगराज ( १०५१ ), वैराट ( १०६८ ), हंसपाल ( १०८८ ), वैरिसिंह (११०३), विजयसिंह ( ११०७ ), अरिसिंह (११२७), चोडसिंह ( ११३८ ), विक्रमसिंह ( ११४८ ), रावल रणसिंह [ कर्णसिंह ] (११५८), क्षेमसिंह ( ११६८ ), सामन्तसिंह ( ११७२ ), कुमारसिंह ( ११७९ ), मथनसिंह ( ११९१ ), पद्मसिंह ( १२११ ), जैत्रसिंह ( १२१३ ), तेजसिंह ( १२६१ ), रावल तेजसिंह (१२६५), समरसिंह (१२७३), [उलघखां (१२९९),] रावल समरसिंह ( १३०२ ), रत्नसिंह ( १३०३ ), [अलाउद्दीन ( १३०३ ),] हंमीरसिंह (१३२६), क्षेत्रसिंह (१३३६), लक्षसिंह ( १३८२ ), मोकल ( १४२१ ), कुंभकर्ण [कुंभा] (१४३३-६८),उदयसिंह(१४६८ ७३), रायमल ( १४७३-१५०९ ), संग्रामसिंह (१५०९-२७), रत्नसिंह दुसरा ( १५२८-३१ ), विक्रमसिंह (१५३१-३६ ), उदयसिंह दुसरा ( १५३७-७२ ), प्रतापसिंह (१५७२-९७), कर्णसिंह (१५९७-१६२७), जगत्सिंह ( १६२८-५२ ), राजसिंह ( १६५२-८० ), जयसिंह ( १६८०-९८ ), अमरसिंह दुसरा ( १६९८-१७१० ), संग्रामसिंह दुसरा ( १७१०-३४ ), जगतसिंह दुसरा (१७३४-५१),प्रतापसिंह दुसरा (१७५१-५३), राजसिंह दुसरा ( १७५४-६१ ), अरिसिंह दुसरा (१७६१-७३), हम्मीरसिंह दुसरा ( १७७३-१७७८ ), भीमसिंह (१७७९-२८), जवानसिंह (१८२८-३८), सरदारसिंह ( १८३८-४२ ), सरूपसिंह ( १८४२-६१ ), शुंभसिंह ( १८६१-७४ ), सज्जनसिंह ( १८७४-८४ ), फत्तेसिंह ( १८८४-१९३० ), सर भूपालसिंह [ विद्यमान ] ( १९३०-३१ ) ( राजपुतानेका इतिहास, पा. १४४९ ).

**मेल्लादेवी**—सहाव्या विक्रमादित्य पश्चिम चालुक्याची मुलगी. ही गोव्याच्या दुसऱ्या जयकदंबाला दिली होती. हिला मैललदेवी असेंहि म्हणत.

**मेहेरजीराणा**—या नवसरीच्या पारशी गृहस्थापासून अकबरानें पारशी धर्माची माहिती घेतली.

**मैंठक**—( स.५३०सुमार ) हा हयग्रीववधं नाटकाचा कर्ता. राजतरंगिणींत हा काश्मीरच्या मातृगुप्तानंतर होता असें म्हटलें आहे ( ३.२०७ ). विक्रमादित्य व हा यांनीं हें नाटक लिहिलें असावें. राजशेखरानें आपल्या बालरामायणांत म्हटलें आहे कीं, वाल्मिकी हा भर्तृमेंठ झाला, नंतर भवभूति व आतां राजशेखर झाला आहे. याचा रामायणावरील ग्रंथ आतां उपलब्ध नाहीं. मेंठ शब्दाचा अर्थ महान् असावा.

**मैत्रेय**—( स. ४०० सुमार ) एक बुद्ध तत्त्वज्ञ. याच्या दोन ग्रंथांचें चिनी भाषांतर उपलब्ध आहे.

**मैत्रेयरक्षित**—धातुपाठप्रदीप ग्रंथाचा कर्ता.

**मैनाबाई आंगरे**—येसाजी आंगऱ्याची मुलगी व दौलतराव शिंद्याची माता.

**मैनाबाई पवार**—धारच्या आनंदराव पवाराची पत्नी. ही बडोद्याच्या गायकवाड घराण्यांतील होती. हिला तारुण्यांतच वैधव्य प्राप्त झालें. हिच्या चरित्रावर

मैनाचरित्र नांवाचा काव्यग्रंथ श्री. नारायण गणेश शिरसाळकर यांनीं केला आहे. तसेंच माळव्याच्या तवारिखेंत मुंशी करीमअलीनें बरीच माहिती दिली आहे. तसेंच मुंशी देवीप्रसादनें ना. प्र. सभेच्या त्रैमासिकांत हिचें चरित्र दिलें आहे (४. ५९-७३).

**मैनाबाई भोसले**—(मृत्यु स. १८१६) ही व्यंकोजी ऊर्फ मन्याबापू भोसल याची कन्या व आपासाहेब भोसल्याची पत्नी.

**मैनाबाई होळकर**—(स. १८१५) यशवंतराव होळकराची पत्नी.

**मैनावती**—कांचनपूरच्या त्रैलोक्यचंद्र राजाची पत्नी व गोपीचंद राजाची माता. ही भर्तृहरि व विक्रमादित्य राजा याची धाकटी बहीण. जालंधरनाथास हिनें गुरु केलें. ही मोठी विचारवान् व ज्ञानी होती.

**मोइझ्झुद्दीन कैकूबाद गुलाम**—(कैकूबाद पाहा).

**मोइझ्झुद्दीन बहराम गुलाम**—(स. १२४०-४२) दिल्लीचा बादशाह. याचा इखत्यार उद्दीन नांवाच्या दिवाणानें खून केला.

**मोकल गुहिलोत**—(स.१४२१-३३) हा मेवाडचा राणा लक्षसिंह ऊर्फ लाखा याचा हंसाबाईपासून झालेला मुलगा. लक्षसिंहाचा पहिल्या संबंधाचा वडील मुलगा चूंडा याच्या परम स्वार्थत्यागामुळें व पितृभक्तीमुळें हंसाबाईचें लक्षसिंहाशीं लग्न झालें आणि हा मेवाडचा राणा झाला. भारतांतील भीष्माच्या तोडीचें हें इतिहासांतील उदाहरण आहे. लाखा स्वर्गवासी झाल्यावर हंसाबाई सती जाण्यास तयार झाली व तिनें चूंडास विचारलें कीं, 'आतां मोकलला कोणती जहागीर देणार?' तेव्हां पितृभक्त चूंडानें उत्तर दिलें, 'आई, मोकल मेवाडचा मालक आहे. त्याला जहागीर कोण देणार? मीं त्याचा नोकर आहें.' तेव्हां हंसाबाईनें त्याची खूप प्रशंसा केली. चूंडानेंहि तिला सती जाण्यापासून निवृत्त केलें. मोकल हा अल्पवयी होता. त्याला सिंहासनावर बसवून चूंडानें त्याला सर्वांच्या आधीं नजराणा दिला. राजमातेनेंहि राज्याचा सर्व भार चूंडावर सोंपविला. चूंडा न्यायी व प्रजावत्सल असल्यानें त्यावर सर्वांचें प्रेम होतें. पण मोकलचा मामा व हंसाबाईचा भाऊ रणमल्ल याला राज्यांत हात घालतां येत नसल्यामुळें समाधान नव्हतें. त्यानें हंसाबाईचे कान भरून मोकलच्या प्राणाला धोका आहे असें भासविलें. तेव्हां चूंडाला मेवाड सोडण्यास सांगितलें. त्याप्रमाणें तो मांडूच्या सुलतानाकडे जाऊन राहिला. तेव्हां रणमल्लाचा हात राज्यकारभारांत शिरला व त्यानें राठोड जवळ करण्यास सुरवात केली.

या वेळीं शम्सखां नांवाचा नागोरचा जहागिरदार होता. तो मेल्यावर फीरोजखां नागोरच्या गादीवर आला. त्याच्यावर मोकलनें स्वारी करून त्याला सहज जिंकलें, असें चितोडच्या शिलालेखांत म्हटलें आहे (एपि. इंडि. २ पृ. ४१७). फार्शी तवारिखांत याचा पराजय झाला असें लिहिलें आहे तें समकालीन लेखकांनीं लिहिलेलें नसल्यामुळें शिलालेखाइतपत विश्वासार्ह नाहीं.

यानें सपादलक्ष देश उध्वस्त केला. सपादलक्ष देश म्हणजे सांभरचा प्रदेश. तसेंच जालंदरवाल्यांना कंपित केलें. जालंदर म्हणजे त्रिगर्त (कांगडा पंजाब), पण येथें जालोरचा भाग हा अर्थ दिसतो. यानें गुजराथचा सुलतान पहिला अहमदशाह याचाहि पराभव केला होता. शृंगीऋषी येथील शिलालेखांत हा उल्लेख बरोबर आहे, पण कुंभलगडच्या प्रशस्तींत अहमदच्या जागीं चुकीनें महम्मद लिहिलें आहे. तसाच जहाजपुरच्या युद्धांत जय मिळवला होता. जहाजपुरचा किल्ला बम्बावदाच्या हाडांच्या ताब्यांत होता. तो यानें घेतला.

यानें चितोडवर जलाशय व द्वारिकानाथ (विष्णु) यांचें मंदिर बांधलें, समिद्धेश्वराचा जीर्णोद्धार केला, व त्याला धनपूर गांव दिला. समिद्धेश्वर म्हणजे समाधीश्वर होय. एकलिंगजीच्या मंदिराभोंवतीं चौफेर तीन दारें असलेला कोट बांधला. बाघेला वंशांतील आपली राणी गौरांबिका स्वर्गवासी झाली म्हणून शृंगीऋषीच्या जागीं कुण्ड बांधलें, व आपला बंधु बाघसिंह याच्याकरितां बाघेला तलाव तयार केला. विष्णुमंदिराला सोन्याचा गरूड व देवीमंदिराला सर्व धातूंचा सिंह भेट दिला. यानें सोनें व चांदी यांच्या पंचवीस तुला केल्या. त्यांतील एक सुवर्णतुला पुष्करच्या आदिवराहमंदिरांत केली. यानें बांधनवाडा (अजमेर जिल्हा) व रामागांव (एकलिंगजीच्या जवळचा) एकलिंगजीला दिला. शेतकरी झालेल्या ब्राह्मणांच्या शिक्षणाची व्यवस्था म्हणून सांग वेद शिकण्याची व्यवस्था केली.

स. १४३३ मध्यें अहमदाबादचा सुलतान पहिला अहमदशहा डुंगरपूर राज्यांतून जीलवाड्याकडे चालून आला व तेथील मंदिरें फोडूं लागला. ही बातमी ऐकतांच हा तिकडे निघाला. बरोबर महाराणा खेताच्या उपपत्नीचे पुत्र चाचा व मेरा हेहि होते. एक दिवस यानें सहज त्यांना एका झाडाचें नांव विचारलें. त्या वेळीं आपल्या वंशाच्या हीनपणामुळें उपरोधिकपणें हा विचारतो असें वाटून त्यांनीं याला ठार मारलें.

याचे पुत्र कुंभा, खींवा ( क्षेमकर्ण ), शिवा ( सुत्रा ), सत्ता, नाथसिंह, वीरमदेव आणि राजधर होत. यानंतर कुंभा गादीवर आला.

**मोखसिंग**—भरतपूर संस्थानचा जो पुरामन त्याचा हा मुलगा होय. पण याच्या चुलत भावानें सवाई जयसिंगाच्या मदतीनें यास पदच्युत केलें व आपण डीगचा राजा झाला ( बदनसिंग पाहा ).

**मोग्गलान थेर**—एक सिंहलद्वीपनिवासी बौद्ध भिक्षू. पराक्रमबाहु नांवाच्या राजाच्या कारकीर्दीत होता ( स. ११५३ ). हा तेथें पोलोन्नरुवा नांवाच्या नगरांत जेतवनविहारांत राहत असे. यानें अभिधानप्पदीपिका नांवाचा पाली भाषेचा अमरकोशासारखा कोश लिहिला. हा कोश गुजराथ पुरातत्त्वमंदिरनें मुनि जिनविजयजींच्या संपादकत्वाखालीं प्रसिद्ध केला आहे.

**मोग्गलीपुत्र तिष्य**—मौर्यसम्राट् अशोकाचा गुरु. हा अशोकानें भरविलेल्या तिसऱ्या बौद्धमहासभेचा अध्यक्ष होता. त्या सभेंत यानें केलेला 'कथावत्थु' हा ग्रंथ प्रामाणिक म्हणून मान्य करण्यांत आला. सांची येथें एक प्राचीन अवशेष सांपडला आहे त्यावर 'मोगलिपुत्र' असे शब्द लिहिलेले आहेत ते यालाच उद्देशून असावेत. अशोकाच्या वेळीं तिसरी बौद्धसभा भरून धर्मप्रसाराकरितां जें अद्भुत संघटन व योजना करण्यांत आली त्याचें श्रेय अशोकापेक्षां यालाच अधिक आहे. हा भगवान् बुद्धाच्या तीन प्रधान शिष्यांपैकीं एक होय. हा मूळ मगध देशांतील ब्राह्मण होय.

**मोप्पमा**—काकतीय प्रोवी राजाची पत्नी (हनुमत्कुंडा येथील प्राचीन सहस्रस्तंभमंदिरांतील शिलालेखावरून ).

**मोरया गोसावी**—( स. १३७५-६१ ) महाराष्ट्रांतील एक प्रसिद्ध सत्पुरुष. यांच्या पित्याचें नांव वामनभट्ट व मातेचें नांव पार्वतीबाई. हे देशस्थ ऋग्वेदी हरितसगोत्री ब्राह्मण. हे कर्नाटकांत शाली गांवचे राहणारे. त्यामुळें यांचें उपनांव शालिग्राम होय. पुढें या घराण्यांत अनेक सिद्धपुरुष उत्पन्न झाल्यानें देव या नांवानें हें घराणें ओळखलें जाऊं लागलें.

वामनभट्ट गणेशोपासक होते. त्यांना वयाचीं पन्नास वर्षे झालीं तरी पुत्रसंतति नव्हती. तेव्हां त्यांनीं पुत्रप्राप्तीकरितां मोरगांवीं तपश्चर्या केली. श्रीच्या कृपेनें पुत्ररत्न झालें, तेच मोरया गोसावी होत. यांचा जन्मदिन शके १२९७ माघ शु. ४ हा होय. पुढें वामनभट्ट वयाच्या एकशेंतिसाव्या वर्षी मृत्यु पावले ( शके १३३२ ).

यांचें आठव्या वर्षी उपनयन झाल्यावर यांनीं जटाघनापर्यंत साग्र वेदाचें अध्ययन केलें. नंतर योगिराज नांवाच्या सिद्धाचा गुरूपदेश घेतला आणि थेऊर येथें घोर तपश्चर्या केली, व मंगलमूर्तीचा अनुग्रह संपादन केला. येथून पुढें हे चिंचवड येथें राहूं लागले.

तेथें राहत असतां गोविंदराव कुलकर्णी यांची मुलगी उमाबाईशीं यांचें लग्न झालें आणि शके १४०३ माघ व. ४ स यांना मुलगा झाला. त्याचें नांव चिंतामणी असें ठेवण्यांत आलें.

प्रथम हे दर चतुर्थीस मोरगांवीं वारी करीत, पण पुढें यांना साक्षात्कार झाला. कऱ्हा नदींत स्नान करीत असतां हातांत एक गणपतीची मूर्ति ( तांदळा ) आली. तेव्हां यांनीं तेथें नदीकाठीं त्याची पूजा करून सर्वशाखभाजी व पोळी याचा नैवेद्य दाखविला. ज्या जागेवर पूजन करून नैवेद्य दाखविला ती जागा तेथें (पोळी) या नांवानें प्रसिद्ध आहे. तेथें त्या दिवसापासून आजपर्यंत ब्राह्मणापासून चांडाळापर्यंत सर्वांना प्रसाद वांटण्यांत येतो.

नंतर यांनीं ती मूर्ति चिंचवड येथें नेऊन ठेवली व आजहि वाड्यांत ती पाहावयास मिळते.

पुढें यांची कीर्ति फार वाढली व लोकांपासून दूर राहण्याची यांना इच्छा झाली. म्हणून यांनीं जिवंत समाधि घेतली ( शके १४८३ मार्गशीर्ष वद्य ६ ). हे महायोगी असल्यानें यांचा हा १८६ वर्षांचा आयुष्यक्रम अशक्य नाहीं. यांची पुण्यतिथि चिंचवड येथें मोठ्या समारंभानें होत असते.

यांचीं गणपतीवर केलेलीं पदें फार प्रसिद्ध आहेत. तीं चिंचवड, कसबा गणपति, रांजणगांव गणपति वगैरे ठिकाणीं ऐकावयास मिळतात. प्रत्येक पदांत श्रीमोरयाला निस्सीम भक्तीनें व घरगुती नात्यानें आळविलें आहे. यांनीं केलेल्या पदांपैकीं 'सासूर', 'माहेर' व 'कामधेनू' हीं पदें आकर्षक वाटतात.

तुकाराम, रामदास यांसारख्या संतांत यांची गणना आहे. प्रथम यांचें घराणें अगदीं विरक्त स्थितींत राही, पण पुढें यांच्या वंशजांस आदिलशाह, संभाजी, राजाराम, शाहू वगैरेंनीं अनेक इनामें दिलीं. या घराण्याचा मराठेशाहींत अत्यंत सन्मान ठेवण्यांत येत असे (पु. द. ३, पा. ११२). यांच्या घराण्यांतील लोकांनींहि सदाचारानें राहून धर्मसंरक्षण केलेलें दिसतें. यांचा वंश-१वामनभट्ट,मृ.स.१४१०, २ श्रीमोरया गोसावी, ३ थोरले श्रीचिंतामणमहाराज, ४ श्रीनारायणमहाराज, ( यांना भाऊ तीन—विनायक, दिगंबर व मोरोबा ), ५ धाकटे श्रीचिंतामणमहाराज

( यांना भाऊ–विश्वेश्वर, गजानन, विश्वनाथ व बावाजी ), ६ श्रीधरणीधरमहाराज, ७ धाकटे श्रीनारायणमहाराज ( यांचे भाऊ–गणपतदेव–सिद्धटेकघराणें, मोरोबादेव–रांजणगांवघराणें, बाप्पाजीदेव–ओझरघराणें ), ८ श्रीचिंतामणमहाराज तिसरे, ९ श्रीधरणीधरमहाराज, १० श्रीगणपतदेव.

**मोरेश्वरभट्ट**—अहमदनगरामध्यें हा ब्राह्मण राहत असे. हा चांगला विद्वान् वैद्य होता. याच्या बापाचें नांव माणिकभक्त होतें. यानें वैद्यकावर शके १६०३ मध्यें वैद्यामृत नांवाचा ग्रंथ लिहिला. हल्लीं तो ग्रंथ मराठींत अर्थ लिहून मूळासहित छापला आहे ( क. च. ).

**मोरेश्वरसुत काशी**—चंद्राची आरती लिहिणारा मराठी कवि ( सं. श. १८३७ वार्षिक ले. १५१ ).

**मोरो गिरमाजी**—हा पेशव्यांचा कारकून असून इंदुरास होळकरांकडे होता. इंदुरास असतां सरदारांच्या दादाशीं ज्या वाटाघाटी झाल्या, त्यांची हकीगत ता. १३-६-१७७४ च्या पत्रांत यानें हरिपंत फडक्यांस लिहिली ती वाचण्यासारखी आहे ( म. रि. उ. १, पा. ११ ).

**मोरो त्रिमल पिंगळे**—(मृत्यु स. १६८० आक्टो.) थो. शिवाजीचा एक प्रमुख मदतगार व मुख्य प्रधान. देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. याचे शिक्क्यांत नांव पुढीलप्रमाणें आढळतें: 'श्रीशिवचरणीं तत्पर त्र्यंबकसुत मोरेश्वर'. याचा बाप कर्नाटकांत शहाजीकडे होता. पुढें हा शिवाजीकडे राहिला ( स. १६५३ ). प्रथम हा पुरंदरचा कारभारी होता. पुढें यानें प्रतापगड बांधला. यानें अफ़जलखानाच्या स्वारीच्या वेळीं त्याचें पार येथील सैन्य पराभूत केलें ( स. १६६२ ). सिद्दी जोहरच्या स्वारीच्या वेळीं यानें मुलखाचें संरक्षण केलें.

शिवाजी आग्र्यास निघाला तेव्हां तिघांवर राज्यभार सोंपविला होता त्यांत हा मुख्य होता. तिकडे शिवाजीस पकडलें असें कळतांच इकडे यानें मोहीम सुरू केली आणि पुरंदरच्या तहानें गेलेले किल्ले परत घेतले व जयसिंगानें नादुरुस्त केलेले किल्ले पुनः दुरुस्त केले ( स. १६६७ ).

यानें त्रिंबकचा किल्ला घेतला ( स. १६७० आक्टो. २५ ); औंढा, पट्टा, रावळाजावळा वगैरे कावीज केले. मराठ्यांच्या साल्हेर किल्ल्यास दिलीर व महाबत यांनीं वेढा दिला. यानें वीस हजार फौजेनिशीं हल्ला करून पराक्रमाची शर्थ केली व त्यांस वेढा उठवून जाणें भाग पाडलें ( स. १६७२ फेब्रु. ).

साल्हेरच्या नंतर यानें लगेच मुल्हेर घेतलें; आणि तेथील व्यवस्था करून खालीं कोंकणांत उतरला. जव्हारच्या विक्रमशाहाचा पाडाव करून ( स. १६७२ जून ६ ) रामनगरच्या सोमशाहाचा पराभव केला ( ता. १९ ). साल्हेर-मुल्हेर असलेला बागलाण प्रांत व त्याखालील सुरतेच्या वाटेवरील कोंकणभाग जिंकण्याचें सर्व श्रेय याला आहे. जगदेवराव जाधव व सिद्दी हिलाल हे नाशिकत्र्यंबक व वणी-दिंडोरीचे ठाणेदार पराभूत झाल्यावर शिवाजीला मिळाले ( जुलै ). पुढें शिवाजी कर्नाटकांत गेला तेव्हां त्यानें आपल्या पश्चात् यास राज्याची कुलमुखत्यारी दिली व अण्णाजी दत्तोस याच्या हाताखालीं सचीव नेमिलें ( स. १६७७ ). यामुळें या दोघांत विरोध उत्पन्न झाला. जालना लुटून आल्यावर पट्टा किल्ल्याच्या आसपासच्या २७ किल्ल्यांपैकीं शक्य तेवढे घेण्याकडे याची योजना होतांच यानें ते सर्व घेऊन सर्व खानदेश जिंकला. शिवाजीच्या मृत्यूनंतर हा सोयराबाईच्या पक्षास मिळाला म्हणून संभाजीनें यास कैद केलें, पण लवकरच बंधमुक्त करून पेशवाईवर कायम केलें. पण शिवाजीनंतर सहा महिन्यांच्या आंत हा मेला. मोगलांशीं लढण्यांत यानें अजब पराक्रम गाजविला. शिवाजीचें धोरण व हेतु यांशीं हा तन्मय झाला होता.

याचा व शामराज रांझेकराचा नातेसंबंध असावा. युद्ध व नीति यांत हा पुरा निष्णात होता. यानें मराठी राज्याची पहिली जमीनधारापद्धति अमलांत आणली. कायदे यानेंच तयार केले. याचा बंधु केशव व मुलगा निळोपंत.

वर दिलेल्या याच्या शिक्क्याशिवाय खालील दोन आणखी आढळतात: 'श्रीशिवराजेंद्र हर्षनिधान, त्र्यंबकसुत मोरेश्वर मुख्य प्रधान', 'श्रीशिवराजेंद्र मुख्यामात्यस्य सत्यधृक् । मुद्रा मोरेश्वरस्यास्तां भद्रा सद्रागदायिनी '.

**मोरो तानदेव होनप**—पुण्याचे देशपांडे. कर्यात मावळांतील ३६ गांवचें देशकुलकर्ण याजकडे होतें. मलीकअंबरच्या मृत्यूनंतर निजामशाही सत्ता ढिली पडल्यामुळें पुणें भागांत उत्पन्न झालेला एक बंडखोर. यानें चाकणचा किल्ला बळकावला आणि स्वार व शिपाई ठेविले. 'सोड आऊत आणि हो मोरोबाचा राउत' अशी त्या वेळीं म्हण तोंडीं होण्याइतकी मोठी याची दंगल होती. स. १६३० मध्यें याचें बंड मोडण्याकरितां आदिलशाहीतर्फे मुरार जगदेवानें याच्यावर स्वारी केली. याचा वाडा पाडून टाकून त्यास आग लावून दिली. चाकणचाहि कोट पाडला आणि रायाराव यास शिरवळ परगण्याचा अधिकारी नेमिलें. सबंध प्रांतावर अंमल चालवितां यावा म्हणून

जेजुरीजवळ भुलेश्वराच्या डोंगरावर सुभानमंगळ नांवाचा किल्ला बांधला. या गडबडींत हा दडून बसला. तेव्हां यास मोठ्या मेहनतीनें पकडलें. 'नखीं सुया टोचून मार देऊन कैदेंत होते.' पुढें हा कैदेंतून सुटला व कांहीं दिवस गडबड न करितां स्वस्थ होता. स. १६३८ मध्यें वरील प्रदेश पूर्णपणें शहाजीच्या ताब्यांत आला. आणि शहाजीचा कारभारी दादोजी कोंडदेव कारभार पाहूं लागला. स. १६३१मध्यें दुष्काळानें मुलूख वैराण झाला होता. त्यामुळें लोकांशीं वागतांना दादाजीस कधीं धाकानें तर कधीं प्रेमानें वसती करवावी लागे. बोलावलें तरी हा न येणारा होता. त्यामुळें दादाजीनें यावर शस्त्र धरलें. तेव्हां हा रंगभट मळेकराच्या येथें लपून बसला. रंगभटाची आई फुलाई हिनें सहा महिनेपर्यंत याची खबर लागूं दिली नाहीं. तिचा नातू अनाजी रंगनाथ हा शिवाजीच्या पदरीं राहिला होता. त्यानें मोरोपंत तानदेवास शिवाजीच्या पायावर घातलें. शिवाजीनें यास क्षमा करून देशपांडेपण दिलें.

**मोरो धोंडाजी**—( स. १७६५ ) निजामाचा एक सरदार.

**मोरो बापूजी**—( स. १७७४ ) पेशव्यांचा एक सरदार. हा बाणकोटास असतां इंग्रजांस तोंड दिलें.

**मोरोपंत**—( स. १७२९–१७९४ ) हा एक प्रसिद्ध महाराष्ट्रीय कवि. पराडकर घराण्यांत मोरोपंत जन्मास आला. या घराण्याचें मूळ ठिकाण रत्नागिरी जिल्ह्यांत राजापूरप्रांतीं सौंदल हें होय. मराठेशाहींत कोंकणांतील पुष्कळ घराणीं देशावर आलीं त्याचप्रमाणें हें घराणें पन्हाळ्यास आलें. या ठिकाणींच मोरोपंताचा जन्म झाला. याचें तत्कालीन शिक्षण याच्या वडिलांनीं पूर्ण करून घेतलें होतें. गणेश पाध्ये यांचेजवळ पंतांनीं संस्कृत शिकण्यास सुरुवात केली व थोड्याच काळांत संस्कृत काव्यें, नाटकें व अलंकारशास्त्र यांचें अध्ययन केलें. यांनीं निरनिराळे ४० संस्कृत ग्रंथ लिहून काढले.

मोरोपंत आपला अभ्यासक्रम आटोपून बारामतीस आपल्या वडिलांबरोबर गेले. मोरोपंतांची विद्वत्ता दृष्टीस पडून बाबूजी नाईकांनीं यांना वाड्यांत पुराण सांगण्यास नेमलें. येथें असतांनाच यांचा विवाह झाला. लक्ष्मीबाई व आनंदीबाई अशा दोन बायका यांस होत्या. ते प्रथम शिवभक्त होते, परंतु पुढें प्रसिद्ध रामभक्त बनले. नाईकांच्या आश्रयावर संतुष्ट राहून यांनीं आपला सर्व काळ कविता रचण्यांत घालविला व शके १७१६ मध्यें चैत्र शु॥ १५ स देह ठेविला.

मोरोपंतांची काव्यरचना—पंतांची काव्यरचना महाराष्ट्रभाषेंतील इतर कवींच्यापेक्षां संख्येनें फारच मोठी आहे. ती अजमासें पाऊणलाख आहे. त्यांपैकीं ६०००० कविता उपलब्ध आहेत.

महाभारत, रामायणें, हरिवंश, कृष्णविजय ऊर्फ बृहद्दशम, मंत्रभागवत इत्यादि यांचीं मोठीं काव्यें होत. शिवाय काशीप्रकरणें, संतप्रकरणें, भागवती प्रकरणें, गीतार्थ, गाणीं, स्तोत्रें, संशयरत्नावली, केकावली इत्यादि अनेक छोटीं काव्यें पंतांनीं लिहिलीं आहेत. निरनिराळ्या वृत्तांमध्यें यांनीं फारच चतुराईनें काव्यें रचिलीं आहेत. मराठी भाषेवरील यांचें प्रभुत्व अलौकिक होतें. 'मराठी भाषा शब्दचमत्कार, अनुप्रास, श्लेष इत्यादि साधण्याला पात्र नाहीं' या आक्षेपाला मोरोपंतांचें काव्य हें उत्कृष्ट उत्तर आहे यांत शंका नाहीं. पंतांच्या भाषेंतील प्रमुख विशेष म्हटला म्हणजे यमकप्राचुर्य हा होय. पंतांच्या काव्याचें अध्ययन वाढविण्याकरितां पुण्यास 'मयूरमंडळ' स्थापन झालें आहे.

शिवाय श्री. ल. रा. पांगारकर व प्रो. श्री. ना. बनहट्टी यांचे ग्रंथ, यांच्या काव्याचा दीर्घ काळ व्यासंग करून लिहिलेले आहेत.

**मोरोबादादा फडणीस**—(जन्म स. १७४०–मृत्यु स. १८०३ ) याचा पिता बाबूराव फडणीस. हा नाना फडणीसाचा चुलत भाऊ.

पहिल्या माधवरावानें याला फडणींशी दिल्यावर ( स. १७६३ आक्टो. ) नाना पुण्यांत व हा स्वारीवर अशी व्यवस्था असे. पण याचा अर्थ यानें भलताच घेतला, आणि फारच घमेंडखोर झाला. पण माधवरावानें मरतेसमयीं याला न विचारतां नाना व बापू यांवर राज्याचा भार सोंपविला, तेव्हां याचा भ्रम दूर झाला व हा नानाचा हेवा करूं लागला. बारभाईंच्या कारस्थानांत नाना व बापू प्रमुख झाले आणि हा बाजूला पडला. शेवटीं दादास पेशवा करून नानास कैद करण्याचें यानें भयंकर कारस्थान रचलें आणि नानाची सोडचिठ्ठी घेऊन तें यशस्वीहि करीत आणलें. या बाबतींत इंग्रज वकील मॉस्टीन हाच याला पुढें करून कामें करी असें दिसतें. पण शेवटीं यालाच नाना व महादजी यांनीं कैद केलें ( नाना फडणीस पाहा ). पुढें पंचवीस वर्षें याचें आयुष्य कैदेंत गेलें. नगरच्या किल्ल्यांत कैदेंत असतां यानें फितुरीहि केली. पण माधवराव नगरकरानें याचा बंदोबस्त केला. नाना मेल्यावर दुसऱ्या बाजीरावानें यास समारंभानें पुण्यास आणून कारभारांत घेतलें. पण बाजीरावाला पदच्युत करण्याचे कारस्थानांत

हा असल्याचें ठरल्यानें याला पुनः धनगड येथें कैदेंत ठेवण्यांत आलें ( स. १८०२ ). पुनः यशवंतराव होळकरानें यास कारभार सांगितला, पण हा ता. २८-८-१८०३ रोजीं मेला.

याची पत्नी चिमाबाई. याचा पुत्र नाना. त्यानें पुढें इंग्रजी अमलांत बंड केलें.

**मोरो रघुनाथ फडणीस**—( स. १७६० सुमार ) मुधोजी भोसल्याचा फडणीस. मुधोजीनें चंद्रपूरवर हल्ला केला असतां हा जखमी होऊन मेला.

**मोरो व्यंकटेश**—राघोबादादाचा हा एक कारकून असून स. १७७४ मध्यें दादानें महादजीस एक पत्र लिहून तें याच्यावरोबर महादजीस पाठविलें होतें ( म. रि. उत्तर वि. १ ला, पृ. ५ ).

**मोहनांगी**—ही कृष्णदेव रायल्लूची कन्या. ही विद्वान् असून हिनें 'मरीचिपरिणय' नांवाचें नाटक लिहिलें आहे. हिचा नवरा ऐन तारुण्यांत मरण पावल्यामुळें हिनें सहगमन केलें.

**मोहनदास**—हनूमान् नाटकाचा टीकाकार.

**मोहकमसिंग**—चूडामण जाटाचा मुलगा ( बदनसिंग पाहा ).

**मोक्षाकर गुप्त**—( स. ११०० सुमार ) बौद्ध तर्कज्ञ. ग्रंथ—तर्कभाषा ( संस्कृत. अनुपलब्ध ).

**मौखरीवंश**—

क्षत्रवर्मन् ( स. २६०-२८३ )
⋮
सुंदरवर्मन् ( स. २८३-३१९ )
|
कल्याणवर्मन् (स.३२६)—पत्नी कीर्तिमती.

बल मौखरि महासेनापति.
|
बलसिंह | बलवर्धन् | सोमदेव

( टीप—या तिघांनीं कृत म्हणजे विक्रमसंवत् २९५ ( स. २३९ ) च्या फाल्गुन शुद्ध ५ स त्रिरात्र नांवाचा यज्ञ कोटा संस्थानांतील बडवा गांवीं केला, असें तेथील डॉ. अ. स. आळतेकर यांना उपलब्ध झालेल्या शिलालेखांवरून दिसतें ). ( मं. त्रै. १७. १. पा. १७ ).

यज्ञवर्मन् ( स. ४००-४२५ ).
|
शार्दूलवर्मन् ( स. ४२५-४५० ).
|
अनंतवर्मन् ( स. ४५०-४७५ ).

हरिवर्मन् ( स. ४७५-५०० )-पत्नी-जयस्वामिनी.
|
आदित्यवर्मन् ( स. ५००-५२५ )-पत्नी हर्षगुप्ता.
|
ईश्वरवर्मन् ( स. ५२५-५५० )-पत्नी उपगुप्ता.
|
ईशानवर्मन् ( स. ५५०-५७६ )-पत्नी लक्ष्मीवती.
|
सूर्यवर्मन् | शर्ववर्मन् ( स. ५७६-५७९ ).
⋮
अवंतिवर्मन् (स.५७९-६००).
|
२ पूर्णवर्मन्(स.६१२-६२८). | १ गृहवर्मन् (स.६००-६०६). ( याचें लग्न प्रभाकरवर्धनची कन्या राज्यश्रीशीं झालें होतें ).
⋮
भोगवर्मन् (स.६८५-७१५).
|
वत्सदेवी ( हिचें लग्न नेपाळच्या शिवदेवाशीं झालें ). | यशोवर्मन् (स.७२९-७५३).
|
जयदेव

( मौखरी By E. A. Pires, M. A., वरून ).

यास आधार—कौमुदीमहोत्सव नांवाचें संस्कृत नाटक कल्याणवर्मन्‌चे कारकीर्दींत लिहिलें गेलें तें व थोडे उपलब्ध शिलालेख यांचे आधारें या घराण्याची माहिती मिळते.

**मौदूद गझनवी**—( स. १०४१-४९ ) हा मसूदचा मुलगा व महमूदचा नातू ( महीपाल व मुहम्मद गझनवी पाहा ).

**मौनि**—या उपनांवाचें काशींत एक महाराष्ट्रीय पंडित घराणें होतें.

**मौनीबावा**—(समाधि स. १६८६) एक मराठी साधु. हे रांगणा ऊर्फ प्रसिद्धगड किल्ल्यापासून चार मैलांचे अंतरावर असलेल्या पाटगांवचे राहाणारे. शिवाजी महाराजांची यांच्यावर फार भक्ति होती. हे मूळचे कोण, याचा पत्ता लागत नाहीं. यांची समाधि पाटगांव येथें आहे. तेथें दरसाल रथसप्तमीपासून सहा दिवस बावांच्या पुण्यतिथीचा समारंभ होत असतो. सिंधुदुर्ग किल्ल्यांतील मंदिरांत शिवाजीमहाराजांची मूर्ति असून गाभाऱ्याचे

बाहेर यांची मूर्ती बसविली आहे. शिवाजीनें यांची भेट स. १६७६ त घेतली होती. शिवाजी दक्षिण-दिग्विजयास निघाला तेव्हां त्यानें सात तास उभें राहून यांचा आशीर्वाद मिळविला. यांच्या शिष्याचें नांव तुरुगिरी. यांच्या शिष्यांचीं नांवें 'गिरी' संज्ञक आहेत. यांचे शिष्य मूळ मराठा जातींत जन्मलेले पण पुढें संन्यास ग्रहण करून गोसावी झाले. हे समाधिस्थ झाल्यावर संभाजीनें यांचा शिष्य तुरुगिरीस यांचे पदावर बसविलें ( मं. त्रै. १३. ४. ले. १९ ). सध्यांचे क्षात्रजगद्गुरु यांचे विद्यमान शिष्य आहेत.

## मौर्यवंशवृक्ष—




( मौर्य साम्राज्यका इतिहास, पा. ६६१ ).

**मौर्य**—

चित्रांग ( चित्रांगद ), मान ( चितोडजवळील मानससरोवराचा निर्माता ).

माहेश्वर
|
भीम
|
भोज
|
मान

( वि. सं. ७७०–स. ७१३ ) शिलालेख टॉडला मिळाला होता.

या मानापासूनच गुहिलवंशी बापा ( काळभोज ) यानें चितोड घेतला.

राजा धवल ( वि. सं. ७९५–स. ७३८ ).

पूर्णवर्मा मौर्याचें वर्णन हु–एन–त्संगानें केलें आहे.

कोंकणांतील आठव्या शतकांतील मौर्य मोरे होत.

**मौल्ली**—कृष्णदेवराय तुलुवाच्या दरबारांतील एक प्रसिद्ध तेलगू कवयित्री.

**म्हालरदारखान**—( स. १६३३–३४ ) त्रिंबकचा निजामशाही किल्लेदार. हा मोगलास मिळाला होता. शहाजीनें मोगलांविरुद्ध लढाई सुरू केली तेव्हां यानें बढती मिळविण्याकरितां भेटण्याकरितां जाऊन जिजाबाईस जुन्नर येथें कैद केलें. तिनें प्रसंग जाणून शिवाजीस आधींच गुप्तपणें शिवापुरास धाडलें होतें. हिला कोंडाण्यास ठेवलें असतां जगदेवराव जाधवानें हिला सोडविलें व गांडापुरांत ठेवलें.

**म्हाळोजी घोरपडे**—संभाजी बंडखोरी करून स. १६७८ मध्यें पेडगांव येथें दिलीरखानास मिळाला. त्यास पकडून आणून पन्हाळ्यावर बंदोबस्तानें ठेवलें. आणि म्हाळोजीस किल्ल्याची सरनोबती दिली. संभाजीच्या वेळींहि हा तेथला सरनोबत होता. २८।१२।८८ रोजीं संभाजीला पकडतांना झालेल्या चकमकींत हा कामास आला. यास संताजी, बहिरजी व मालोजी असे तीन पुत्र होते.

# य

**यकरंग**—याचें सगळें नांव गुलाम मुस्तफा कुलीखान यकरंग असें आहे. हा दिल्लीचा प्रसिद्ध कवि होय. हा मोठा मिजासखोर होता. याला गायनवादनाचा शोक असे. रंगेल म्हणून याची ख्याति होती. याचा दीवाण ( कवितासंग्रह ) प्रसिद्ध आहे ( क. कौ. भा. ४ ).

**यघ्रुशाखान खल्जी**—( फांशी स. १३१८ ) हा मलीक खल्जीचा मुलगा. हा जलालुद्दीनचा भाऊ होय. यास असदूउद्दीन नांवाचा मुलगा होता.

**यजकेशिन् कदंब**—( स. १०५२ ) हा गोव्याच्या कदंबांपैकीं षष्ठदेवाचा पुत्र. हा पश्चिम चालुक्यांचा मांडलिक होता. यानें कापर्दिकद्वीपाच्या राजाला ठार मारलें असें म्हणतात.

**यमाजी शिवदेव मुतालिक**—(मृत्यु स. १७६३) हा सातारा जिल्ह्यांतील जावळी तालुक्यांत बामणोली गांवांत राहत असे. राजारामाचे कारकीर्दींत परशुराम त्रिंबक प्रतिनिधीचे हाताखालीं हा कारकुनी करूं लागला. पुढें याला प्रतिनिधीची मुतालिकी मिळाली ( स.१७४२–४३ ). हा मुत्सद्दी असून शिपाईहि होता. शाहूच्या पूर्वीच्या अमदानींत उदयास आलेल्या लोकांना छत्रपति सोडून पेशव्यांचा अंमल मानणें जिवावर येई. पण सैन्याच्या जोरावर पेशवे अशा लोकांची खोड मोडीत. हा कैदेंतहि होता ( स. १७५१–पु. रो. ६१ ). प्रतिनिधीचा विरोध शमला तरी याचा विरोध चालूच होता. पानपतावर वाताहात झाली आणि नानासाहेब वारले. तेव्हां यानें आपला व्याही विठ्ठलसुंदर याच्या द्वारां निजामाकडून पेशव्यांवर चढाई केली. पण हा विठ्ठलसुंदरसुद्धां त्या लढाईंत पडला.

**ययातिकेसरी**—( स. ४७४ सुमार ) ओरिसाच्या केसरी घराण्यापैकीं एक प्रमुख राजा. यानें यवनांना ओरिसांतून हाकलून दिलें ( रक्तबाहु पाहा ).

**यमारि**—( स. १०५० सुमार ) बुद्ध तर्कज्ञ. हा व्याकरणज्ञहि होता. याला एका योग्याच्या कृपेनें विक्रमशिला येथील विद्यापीठांत बहुमानाची पदवी मिळाली. पद्माकरगुप्ताच्या प्रमाणवार्तिकालंकारावर यानें टीका लिहिली. त्याचें फक्त तिबेटी भाषांतर उपलब्ध आहे ( हि. आ. इ. लॉजिक, पा. ३४३–४४ ).

**यमीनउद्दीन मुहम्मद हसन** ऊर्फ **अमीर खुस्रव**—( खुस्रव पाहा ).

**यमुनाबाई शिंदे**—( मृत्यु स. १८१४ ) ही रामसिंग राऊळ दंवडाईकर यांची बहीण व महादजी शिंदे यांची पत्नी. ही महादजीच्या मृत्यूनंतर हयात होती. दौलतरावास विरोध करणाऱ्या शिंदे बायांपैकीं ही एक होय ( दौलतराव शिंदे पाहा ). सर्जेरावाकडून हिचा मारेकऱ्यामार्फत खून करण्याचा प्रयत्न झाला, पण त्यांत ही फक्त जखमी झाली ( १४-१-१८०० ). हिचा मृत्यु १-२-१८१४ रोजीं झाला.

**यशवंत गंगाधर चंद्रचूड** ऊर्फ **दादाजी**—( स. १७६३ सुमार ) हा गंगाधर यशवंत चंद्रचूडास पार्वतीबाई ऊर्फ काकू नांवाच्या दुसऱ्या बायकोपासून झालेला पुत्र. याला माधवराव ऊर्फ रावसाहेब नांवाचा दुसरा एक पुत्र होता. राक्षसभुवनच्या लढाईनंतर गंगोबा मुलीचें लग्न आटोपून उत्तरेस गेला तेव्हां त्यानें सर्वांत धाकट्या मुलास म्हणजे माधवरावास बरोबर नेलें, व याला अहल्याबाईकडे दरबारी काम संभाळण्यास ठेवलें. हा चांगला व्युत्पन्न व बुद्धिमान् पुरुष होता. सावत्रपणाच्या नात्यामुळें उत्पन्न झालेल्या घरगुती तंट्याचा निकाल लावण्याचें काम याच्याकडे असे ( चंद्रचूडदप्तर ले. १५५ ). हा विद्वान् व व्यवहारज्ञ होता. दादासाहेबांनीं उत्तर हिंदुस्थानांतून परत आल्यावर माधवरावाशीं तंटा सुरू केला तेव्हां गंगोबानें माधवरावाचा पक्ष सोडून दादासाहेबांचा पक्ष स्वीकारला. हें करणें चुकीचें आहे, शेवटीं माधवरावाचाच पक्ष विजयी होणार, हें यानें स्पष्टपणें वडिलांस कळविलें होतें. यामुळेंच धोडपच्या युद्धानंतर अडचणींतून यानें आपलें घराणें ऊर्जित दशेस आणलें ( चंद्रचूडदप्तर १ प्रस्तावना १५–१६ ).

**यशवंत महादेव पोतनीस**—( स. १७२२–३२ सुमार ) हा महाडचा प्रभु देशपांडे मुसेखोरेकर. हा भोरप येथें राहत असे. हा शाहूमहाराजांच्या वेळीं उदयास आला आणि शेवटीं त्यांच्या अत्यंत विश्वासांतल्या मंडळींत होता. याची खासनीस म्हणून ( स. १७२२ ) सही आहे ( रा. खं. २०.४४ ). उदाजी चव्हाणावर हा गेला असतां याला दंड भरून सोडवावें लागलें ( स. १७३२ ). रायगड घेण्यास याचा उपयोग झाला म्हणून याला तेथील सुभेदार नेमलें. पुण्याच्या पोतनीसांचे हे पूर्वज होत.

**यशवंतराव पवार**—( स. १७३६–६१ ) धारच्या आनंदराव पवाराचा हा पुत्र. माळव्याबाहेरील मराठी

राज्याचा विस्तार करणाऱ्या मल्हारजी होळकर, राणोजी शिंदे, पिलाजी जाधव, यांमध्येंच हाहि होता. स. १७३४–३५ च्या माळव्याच्या मोहिमेंत हा होता. या वेळीं पठारी, लालगड इकडील बंदोबस्त यानें केला. हल्लीच्या धार संस्थानांतील निमनपूर परगणा म्हणजे लालगड होय. पुढल्या सालीं चिमाजी आपाबरोबर हा कोंकणांत गेला ( स. १७३६ ). बाप वारल्यामुळें याला पुण्याचीं सरदारीचीं वस्त्रें मिळालीं (ऑगस्ट स.१७३६) व नियमाप्रमाणें परमुलखांतली शेंकडा १६ रक्कम यास मिळूं लागली. झीलतलावावरील लढाई ( नवंबर स. १७३६ ), वसईची मोहीम ( स. १७३९ ), भोपाळची लढाई ( डिसेंबर स.१७३७ ) या प्रसंगीं यानें चांगलाच पराक्रम दाखविला.

स. १७४४–४६ सालीं पेशव्यांनीं बुंदेलखंडावर स्वाऱ्या केल्या यांत हा होता. पुढील सालीं याची व सदाशिवराव भाऊसाहेबांची कांहीं बोलाचाली होऊन यानें त्याच्या डेऱ्यावर तोफा डागल्या. त्यामुळें याच्या सर्व सरंजामाची जप्ती झाली ( स. १७४७ ) व ती स. १७५१ मध्यें मोकळी झाली. पण मध्यंतरीं याला फार कर्ज झालें म्हणून यानें निजामाकडे संधान बांधलें. परंतु पुढें याचा व पेशव्यांचा समेट झाला. श्रीरंगपट्टण ( स. १७५७ ), शिंदखेड, उदगीर ( स. १७६० ) वगैरे लढायांतहि यानें चांगलाच पराक्रम दाखविला. त्या वेळच्या लुटींत पेशव्यांनीं याला एक जरीपटका, राजराजेश्वराची एक मूर्ति, चौघडा व २५ शें स्वारांचे पथक दिलें. याच्या वंशांत राजा हें पद प्रथम यासच मिळालें. शेवटीं पानपतांत हा गारद झाला ( स. १७६१ ). यानें २७ वर्षें कारभार केला. हा शूर, दयाळू, व साहसी होता. शरिरानें हा काटकुळा व उंच असून डोळे मोठे होते, मुद्रा क्रूर व शिपाईबाण्याची होती. याला अपमान बिलकुल सहन होत नव्हता.

**यशवंतराव भवानीशंकर काळो**—( स. १८०१ सुमार ) हा भवानी काळो याचा ज्येष्ठ पुत्र होय. दु. रघूजीनें बिंबाजीची बायको आनंदीबाईकडून छत्तिसगडचा ताबा घेण्यासाठीं, यास सैन्यासह पाठविलें होतें. परंतु बाईचे कारभारी महिपतराव काशी व कृष्णंभट यांनीं तिची व याची सफाई करून दिली; व यास रघूजीबरोबर पुण्यास जाणें असल्यामुळें रघूजीनें महिपतराव दिनकर यांस आपले तर्फेनें छत्तिसगडास रवाना करून यास परत आणलें. पुढें यानें बंडखोर गाजीखानाचा बंदोबस्त केला ( स. १८०१ ) व जामोदचा किल्ला घेतला.

**यशवंतराव भाऊ**—( स.१८१०सुमार ) हा दौलतराव शिंद्याचा एक पराक्रमी सरदार. शेवटीं दौलतरावाची यावर इतराजी झाल्यामुळें यानें आत्महत्या केली ( म. रि. उ. ३, पृ. ३९५ ).

**यशवंतराव डफळे**—जत संस्थानच्या सटवोजीचा हा नातू. सटवोजीची सून व याची चुलती येसूबाईनंतर हा जतच्या गादीवर आला. स. १७४४ मध्यें शाहूनें याला गादीचा वारस कायम केलें. यानें पेशव्यांकडून बहिणाबाईची तजवीज केली. कारण ती याच्या जहागिरींत गडबड करीत असे. याच्या मागून याचा पुत्र अमृतराव गादीवर आला.

**यशवंतराव दाभाडे**—( मृत्यु स. १७५४ मे १८ ) हा खंडेरावाचा मुलगा. त्रिंबकरावानंतर यास सेनापतिपद मिळालें. प्रथम हा अल्पवयी असल्यानें याची आई उमाबाई कारभार पाही. सुरत व अहमदाबादेस यानें जय मिळविले. हा कर्नाटकच्या स्वारीहून परत येत असतां मिरजेजवळ दगदगीनें वारला ( उमाबाई दाभाडे पाहा ).

**यशवंतराव माने**—( स. १७७८ सुमार ) म्हसवडकर मान्यांच्या घराण्यांतील यशवंतराव हा पेशव्याकडे लहानसा सरदार होता. हा मल्लविद्येंत फार पटाईत होता. हा कांहीं दिवस सवाई माधवरावास तालीम शिकविण्यास होता. एक दिवस यानें नाना फडणीसाला मुजरा केला नाहीं. म्हणून एका अजिंक्य ठरणाऱ्या पहिलवानाच्या आखाड्यांत कुस्ती करावयास सांगून नानांनीं याचा अपमान केला आणि हा अपमानाचा सूड घेईल म्हणून यास दुसऱ्या दिवशीं दग्यानें ठार केलें ( भा. व. खं. ३, ऐ. गो. पा. ४७ ).

पण हैदरवरील स्वारींत मानाजी फाकड्याच्या फितुरींत सांपडल्यानें यास तोफेच्या तोंडीं दिलें, असा दुसरीकडे निर्देश आहे ( म. रि. उ. १, पृ. १०१ ).

**यशवंतराव शिंदे कोल्हापूरकर**—( येसाजी कुसाजी पाहा ).

**यशवंतराव होळकर**—( मृत्यु स. १८११ ऑक्टो. २८ ) हा तुकोजीचा दासीपुत्र. याची माता यमुनाबाई ही स. १८०८ पर्यंत जिवंत होती. यास तिघे भाऊ होते. त्यांचीं नांवें- काशीराव, मल्हारराव, विठोजी. यांपैकीं पहिले दोघे औरस असून तिसरा दासीपुत्र होता. तुकोजी मेल्यावर या भावांत गादीकरितां तंटे सुरू झाले. तेव्हां काशीराव यानें पेशव्यांचा आश्रय केला आणि मल्हाररावानें सर्जेरावाचा आश्रय केला. चिमाजीच्या दत्तकप्रकरणांत यानें परशुरामभाऊचा जुन्नरजवळ पराजय केला

(स. १७९६ ऑक्टो.). शिंद्याकडून पुणें येथें मल्हारराव भांबुर्ड्यास ठार मारला गेल्यावर (स. १७९७ सप्टें.१४) हा व विठोजी हे मात्र पळून गेले. हा नागपुरास आला असतां भोसल्यांनीं शिंद्याच्या सांगण्यावरून यास कैद केलें. परंतु तेथून हा युक्तीनें निसटला. पुढें कांहीं दिवस एका भिल्लाकडे राहून धारच्या पवाराकडे गेला. तेथील दिवाण ओढेकर दौलतराव शिंद्याचा पक्षपाती असल्यानें याचा जम तेथें बसला नाहीं. नंतर यानें आपला भाऊ काशीरावाबरोबर युद्ध पुकारलें. याच सुमारास बडगोदा गांवीं शिकार करीत असतां याचा बंदुकीच्या गोळीनें उजवा डोळा गेला. नंतर महेश्वरास येऊन तेथील अहल्याबाईचें द्रव्य लुटलें व विठ्ठल महादेव ऊर्फ तात्या जोगास फडणीस नेमिलें. जाटाचा एक किल्ला घेतला व तेथील द्रव्य लुटलें (स. १८०० मार्च २२). याला दौलतरावाच्या आया सामील होत्या व यानें शिंद्यांचा मुलूख घेण्यास सुरुवात केली.

तेव्हां दौलतरावाचा व याचा नर्मदेवर उघड सामना सुरू झाला (स. १८०१ जून). रघूजी भोसले दौलतरावाच्या मदतीस होता. प्रथम यानें शिंद्यांचे पुष्कळ लोक कापले, पण इंदूर येथें याचा पराभव झाला. तथापि यानें फितुरी करून त्याचा पराभव केला. अशा अनेक लढाया झाल्या.

याच वेळीं दक्षिणेंत विठोजीनेंहि बंड सुरू करून जागोजाग अमृतराव पेशव्याच्या नांवानें खंडणी वसूल करण्यास सुरुवात केली. त्याला बाळकृष्ण गंगाधर बावनपागे याचें साहाय्य होतें. शेवटीं त्यास बापू गोखल्यानें पकडून आणलें, खूप मार दिला आणि हत्तीच्या पायीं दिलें (स. १८०१ एप्रिल १६). पण या भयंकर कृत्यानें याच्या तळपायाची आग मस्तकापर्यंत गेली आणि हा पुण्यावर चालून येऊन यानें पुणें बेचिराख केलें आणि हडपसरावर बाजीरावाचा पराभव केला. तेव्हां बाजीराव घाबरून वसईस गेला आणि त्यानें इंग्रजांशीं तह केला. त्यामुळें मराठेशाही नाममात्र शिल्लक राहिली (स. १८०२). यानें वानवडीस शिंद्यांचे वाड्यांत मुक्काम ठेवून शिंद्यांचे लोक पळून जाऊं नयेत म्हणून पुण्याची नाकेबंदी केली. बरीचशी लूट करून अमृतरावाला पुण्यास आणलें. अमृतरावानें याला एक कोट रुपये देऊं केले होते. त्यांपैकीं पन्नास लक्ष पुण्यांतील लोकांकडून उकळून त्यानें याची भर केली. याच सुमारास याचा शूर सरदार पराशर दादाजी वाघ वारला (१८०२ नवं. १८). पुढें से. वेलस्लीच्या हालचालीमुळें याला पुणें सोडणें भाग पडलें. यानें औरंगाबादेहून अकरा लक्ष खंडणी वसूल केली व पैठण आणि जालना हीं शहरें लुटून जाळलीं (स. १८०३ मे). नंतर चांदवड, नंदुरबार, सुलतानपुराकडे गेला. दौलतराव व बाजीराव याच्याशीं तह करण्यास राजी नव्हत. त्यामुळें शिंद्याचा दिल्लीकडे पाडाव होत असतां हा मजा पाहत स्वस्थ राहिला. शेवटीं सुरजी अंजनगांवला शिंदे भोसल्यांशीं तैनाती फौजेचा तह करून इंग्रजांनीं त्यांचे बाह्य संबंध बंद पाडले. नंतर हा एकटा पडला. याच्या जवळ सैन्य व धमक असल्यानें हा इंग्रजांविरुद्ध उठावणीची भाषा बोले. हा तह करण्यास तयार होता. पण तो मान्य झाला नाहीं. तेव्हां यानें गव्हर्नर जनरलला पुढीलप्रमाणें धमकावणीचें पत्र लिहिलें: 'तुमच्या तोफखान्यापुढें समरांगणावर जरी माझा इलाज नसला तरी शेंकडों मैलांच्या दौडी मारून अल्पावकाशांत दूरदूरचे प्रदेश जाळून लुटून टाकण्याचें सामर्थ्य मला आहे. तुम्हांस एक क्षणाचीहि विश्रांति मी घेऊन देणार नाहीं. एकदां आमच्या समुद्रलाटेप्रमाणें फौजा पसरल्या म्हणजे लाखों माणसें मरतील. मग त्याजला विरोध करण्याची छाती कोणासहि होणार नाहीं.'

शिंदे-भोसल्यांची रिकामी झालेली फौज यानें नोकरीस ठेवली. इंग्रजांनाहि तहाची इच्छा असून युद्ध जाहीर करावें लागलें (स. १८०४ एप्रिल १६). यानेंहि इंग्रजांशीं युद्ध करण्याचें नाकारणाऱ्या आपल्याकडील इंग्रजांचीं डोकीं उडविलीं व दिल्लीच्या बादशहाकडून 'महाराजाधिराज राजराजेश्वर अलिजाबहाद्दर' अशी पदवी मिळविली; आणि यानें अफगाणिस्थानापर्यंत सर्व राजेरजवाड्यांना पत्रें धाडून इंग्रजांविरुद्ध उठावणी केली. या हालचाली पाहून इंग्रजांनीं यास कळविलें कीं, 'काशीराव हा दौलतीचा खरा मालक आहे. होळकरांचे दौलतीवर तुमचा हक्क नाहीं.' तेव्हां हा फारच चिडला. या दीड वर्षाच्या युद्धांत इंग्रज अगदीं टेकीस आले. मुकुंदरा खिंडींत धावपळीचें युद्ध करून यानें मान्सनला अगदीं जेरीस आणलें; आणि त्याची सर्वस्वी वाताहत होऊन तो कसातरी जीव बचावून आग्र्यास पोंचला (स. १८०४ ऑग.). यामुळें याचा लौकिक वाढला व जाठ वगैरे लोक यास सामील झाले. नंतर यानें मथुरा, दिल्ली व नंतर डीगपर्यंत लेकशीं असाच धांवपळीचा सामना केला. डीग येथें रणजितसिंग जाठ यास सामील झाला. भरतपूरच्या किल्ल्यावर लेकनें अठरा हल्ले केले. अठराहि हल्ले आंतून जाठ व बाहेरून हा यांनीं मारून काढले. इंग्रज फलटणांचा नुसता शेणसडा झाला. होळकराकडील सोमाजी लांबहाते केवळ कलींतला अर्जुन मारला गेला

(स. १८०५). यानंतर इंग्रजांनीं जाठाला फोडलें व त्याच्याशीं तह केला, पण शिंदे वगैरे लोक याला सामील होऊन मराठ्यांची जूट होण्याचा संभव उत्पन्न झाला. पण या वेळीं युरोपांत नेपोलियनच्या चढाईनें वातावरण बदललें आणि वेलस्लीच्या ऐवजीं कार्नवालिस येऊन त्यानें सामोपचाराचें धोरण स्वीकारून युद्धास पायबंद घालण्याचें ठरविलें.

नंतर इंग्रज होळकरांकडे वळले. सप्टेंबरांत यानें पंजाबकडे कूच केलें. कारण शीख व अफगाण यांच्या साह्यानें इंग्रजांशीं सामना करण्याचा याचा तिकडे उद्देश होता. शेखावटींतून माचेडीकराचे मुलुखांस ओलांडून कित्येक संस्थानिकांस सामील करून हा पत्याळा येथें गेला. मागून लेकनें रेवाडी व नार्नाल येथें आपलीं ठाणीं बसवून याचा पाठलाग चालविला.

शेवटीं याचा व त्यांचा तह ठरला. युद्धारंभीं याच्याकडे फौज सत्तर हजार असून शिवाय १०० तोफा होत्या, पण शेवटीं पंधरा हजार फौज व २० तोफा एवढी काय ती शिल्लक राहिली. हा तह व्यास नदीच्या कांठीं राजपूरघाट येथें (ता. २४-१२-१८०५) रोजीं कायम झाला. तहाच्या कलमांवरून याचा पूर्वीचा सर्व प्रदेश याजकडे कायम राहिला. याच्या मुलीस भीमाबाईस बुंदेलखंडांतील कुंचचा जिल्हा जहागीर म्हणून देण्यांत आला.

काशीरावाला यानें खानदेशांत बीजगड येथें बंदोबस्ताकरितां पाठविलें. तेथें तो दंगलींत मारला गेला (स. १८०८). शेवटीं अतिश्रमामुळें याला दारूचें व्यसन लागलें होतें. स्वतःच्या नांवाचा रुपया यानें पाडला होता. मराठी व फार्सी लेखनवाचन यास येत असे. हा रंगानें काळा असून ठेंगू होता. शेवटीं शेवटीं यास वेड लागलें.

याच्या पत्रांत धर्माभिमान व्यक्त केलेला दिसतो. उत्कृष्ट सेनापति म्हणून याचें नांव चिरकाल टिकेल. स्वभावानें विनोदी असून सैन्याला हा आपलासा वाटे. इंग्रजांची खोड जिरविण्याची याची मनीषा अपुरीच राहिली. त्यामुळें व पैशाच्या अडचणींमुळें हा लहरी व उतावळा झाला. यानें तोफा ओतण्याचा कारखाना सुरू केला होता. होळकरांची दौलत टिकविण्याचें श्रेय सर्वस्वी याला आहे. मराठ्यांच्या लढाऊ वृत्तीचें असामान्य प्रदर्शन यानें शेवटीं शेवटीं पुनः एकदां जगाला दाखविलें. शेवटीं भानपूर येथें हा मृत्यु पावला (ता. २८-१०-१८११).

**यशवंतसिंग**—(अजितसिंग पाहा).

**यशःकर्णदेव कलचुरी**—(स. १०८०-११२४) हा कर्णदेव कलचुरीचा पुत्र. याचे कांहीं प्रांत कनोजच्या गोविंदचंद्रानें घेतले (जबलपूर ताम्र.). तसेंच लक्ष्मणदेव परमारानें खुद्द त्रिपुरीवर मोहीम केली (नागपूर प्र.). यानेंहि आंध्रराजाचा पराभव करून चंपारण्य उध्वस्त केलें होतें (भेडाघाट शिला.). याचा पुत्र गयःकर्ण.

**यशःपाल प्रतिहार**—(स. १०३६ सुमार) रघुवंशी प्रतिहारांपैकीं एक राजा. याच्या वेळचा एक शिलालेख वि. सं. १०९३ (स. १०३६) मधील मिळाला आहे. याच्यानंतर वि. सं. ११३५ (स. १०७८) च्या सुमारास गाहडवाल महीचंद्राचा पुत्र चंद्रदेवानें कनोजच्या प्रतिहाराचें राज्य घेतलें. हा अखेरचा प्रतिहार होय. याच्यानंतरहि कांहीं प्रतिहार आढळतात, पण ते स्वतंत्र राजे नसून जहागिरदार असावेत.

**यशोदानंदन**—(जन्म स. १७७१) 'बरवैनायिकाभेद' या हिंदी काव्याचा कर्ता.

**यशोदामन् क्षत्रप**—(स. २३९) हा दामसेन क्षत्रपाचा मुलगा. याचीं शा. श. १६१ मधील चांदीचीं नाणीं मिळालीं आहेत.

**२.** (स. ३१७-३२) दुसऱ्या रुद्रसिंहाच्या नंतर पश्चिम क्षत्रप म्हणून हा स. ३१७ मध्यें गादीवर आला. यानें स. ३३२ पर्यंत राज्य केलें. याच्यानंतर याच घराण्यांतील दुसऱ्या रुद्रसेनापर्यंत (म्हणजे ३४८ पर्यंत) या क्षत्रप घराण्यास उतरती कळा लागली.

**यशोधवल परमार**—(स. ११४५) आबूच्या परमारांपैकीं विक्रमसिंहाच्या बहिणीचा मुलगा. यानें कुमारपालाचा शत्रु जो माळव्याचा राजा बल्लाळ त्याला ठार मारलें (एपि इंडि. भा. ८, पृ. २१०-११). पण या बल्लाळाचें नांव माळव्यांतील परमारांच्या शिलालेखांत मिळत नाहीं. कदाचित् हा त्या वंशापैकीं कोणीतरी असावा. सोलंकीनें घेतलेलें आपलें राज्य त्यानें परत घेण्याचा प्रयत्न केला, त्यांत तो मारला गेला, किंवा बल्लाळ हें कोणाचें उपनाम आहे, हें अद्यापि समजलें नाहीं. याला धारावर्ष व प्रल्हादनदेव असे दोन पुत्र होते.

**यशोवर्धन प्रतिहार**—हा भोज प्रतिहाराचा पुत्र. याचा पुत्र चंदुक.

**यशोवर्मा**—(स. ५३३-३४) याला विष्णुवर्धन व हर्ष विक्रमादित्य असेंहि म्हणत असत. हा अत्यंत पराक्रमी राजा होता. पण याचा वंश किंवा मातापिता यांची अद्यापि माहिती उपलब्ध झालेली नाहीं. याचे शिलालेख मंदोसर व तेथून दोन मैलांवर असलेल्या सौंदणी गांवीं मिळाले आहेत. त्यावरून याची राजधानी

मंदोसर असावें असें अनुमान निघतें. सौंदणी येथें दोन विजयस्तंभ यानें उभारले, ते खूप विशाल आहेत, पण सध्यां पडलेले आहेत. त्यावर एकच लेख खोदलेला होता. एकावरचा अर्धवट मिळतो, पण दुसऱ्यावरचा संपूर्ण उपलब्ध आहे. त्याचा सारांश—' जे देश गुप्त राजे व हूण राजे यांच्या अधिकाराखालीं आले नव्हते तेहि यानें आपल्या ताब्यांत आणले. लौहित्य (ब्रह्मपुत्रा) नदीपासून महेन्द्रपर्वतापर्यंत व हिमालयापासून पश्चिम समुद्रापर्यंतच्या राजांना यानें आपले सामंत केलें. तसेंच शिवाशिवाय कोणापुढें मस्तक न झुकविणाऱ्या राजा मिहिरकुलानें याच्यापुढें आपलें मस्तक नमविलें. ' विजयस्तंभावरच्या दोनहि लेखांवर संवत् नाहीं. तथापि मंदोसरचा याचा लेख वि. सं. ५८९ ( स. ५३२ ) चा आहे ( फ्लीट गु. इं. पृ. १५२–५४ ). मंदोसरच्या लेखांत पूर्वपश्चिम अनेक राजांना जिंकल्याचा निर्देश आहे, पण मिहिरकुलाला जिंकण्यापूर्वी तो जयस्तंभ उभा केला असावा ( गौरीशंकर हिराचंद ओझाकृत उदेपूर राज्यका इतिहास ) यावरून हा व मिहिरकुल यांच्यांत झालेल्या युद्धाचा काल स. ५३३–५३४ हा ठरतो. निदान तें युद्ध स. ५३२ नंतर झालें एवढें तरी नक्की ठरतें. हें युद्ध मुलतानजवळ कोरूर येथें झालें.

याचें मूळचें नांव यशोधर्मन् असून यास विष्णुवर्धन असेंहि म्हणत. यशोधर्मदेव असाहि याचा निर्देश येतो.

पुराणांत यालाच विष्णुयशस् असें म्हटलें आहे असें दिसतें. ' वर्धन ' ही एक पूर्वकालीन वीरत्वज्ञापक पदवी असून, प्रायः ती सम्राटाच्या नांवाला जोडण्याचा प्रघात असे. केवळ विष्णु अशीं अक्षरें कोरलेलीं नाणीं सांपडलीं आहेत. तीं याचींच असावींत. स्टेननें आपल्या राजतरंगिणीच्या भाषांतरांत कल्हणाच्या ' हर्ष विक्रमादित्या' चा काल सनाचे सहाव्या शतकाचा प्रथमार्ध निश्चित केला आहे व तोच याचा काल होय.

वायु, मत्स्य, ब्रह्माण्ड व कल्कि हीं चार पुराणें, वंगकवि चंडिदास याची कृष्णकीर्तनपोथी, केशवकृत ' कल्किशरीर अष्टपदी ' व जितसेनविरचित 'जैनहरिवंश' यांत वर्णिलेला कल्किराजा हाच होय. नेमिचंद्राच्या मतानुसार याचा जन्मकाल स. ४७२ हा असून जिनसेनाच्या जैनहरिवंशावरून याचा अन्तकाल सुमारें स. ५३८ असावा असें दिसतें. जिनसेनाचा शिष्य गुणभद्र यानें याचें आयुष्य सत्तर वर्षांचें दिलें आहे. वरील सनाप्रमाणें याचें आयुष्य ६६ वर्षांचें येतें. याचा जन्म संभलग्रामीं ( शाकंभरी-राजपुताना ) व मृत्यु गंगायमुनांच्या दुआबांत.

याचा जन्म पराशरगोत्री ब्राह्मणकुलांत झाला होता, असें पुराणावरून दिसतें. मंदोसरच्या शिलालेखावरूनहि हा क्षत्रियकुलांतील होता असें दिसत नाहीं ( फ्लीट, कार्पस इन्स्क्र. इंडि., भा. ३, पा. १५५–१५६). याच्या घराण्याचा संस्थापक शशिदत्त हा एक नृपभृत्य होता. बौद्ध व्याकरणकार चंद्रगोमिन्नें आपल्या चांद्रव्याकरणांत हा जातीनें जरट होता असें म्हटलें आहे. कीलहॉर्ननें त्या शब्दाचा अर्थ जाट असा केला आहे. ' औलिकर ' हें याच्या वंशाचें चिन्ह होतें. याच्या मुलाचें नांव जिनसेनानें अजितंजय दिलें आहे. पण कल्हण व ह्यू-एन्-त्संग यांनीं शिलादित्य दिलें आहे. प्रतापशील असेंहि त्याचें एक नांव होतें ( प्रोथेरोकृत प्री-मुसलमान पीरियड ऑफ इंडि. हिस्टरी, पा. ११० ).

हा स्वतः पराक्रमानें उदयास आलेला दिसतो. कांहीं काळ हा गुप्तांचा मांडलिक मात्र दिसतो. याच्या उपलब्ध तीनहि शिलालेखांचें स्थान मंदोसरच्या आसपास असल्यामुळें याची राजधानी मंदोसर असावी असें ठरतें. मंदोसर हें गांव मूळ दशरथानें आपलें नांव देऊन वसविलें, त्याचा अपभ्रंश रजपुतांच्या वेळीं दसोर असा झाला व आतां त्याला मंदोसर असें म्हणूं लागले. मंदोसर किल्ल्यांतील लेखांत याचा दशपूर असा निर्देश आहे. संस्कृत कवींनींहि याचा दशपूर असाच निर्देश केला आहे.

यानें एकंदर ४२ वर्षें राज्य केलें, असें जिनसेन म्हणतो. मिहिरकुलासंबंधीं वर आलेला उल्लेख जरा काव्यमय म्हणजे अतिशयोक्तिपूर्ण आहे, असें पुष्कळांचें म्हणणें आहे ( वि. वि. ५७. ३. पा. १२५–१३०; नरसिंहगुप्त पाहा ).

**यशोवर्मा (लक्षवर्मन्)चंदेल्ल**–(स.९३०–५४)जेजाभुक्ति येथील चंदेल्ल घराण्यांतील जो हर्ष त्याचा हा मुलगा होय. स. ९४८ मध्यें यानें गौड, खश, कोसल, काश्मीर, मिथिला, माळवा व गुर्जर वगैरेंवर स्वाऱ्या करून जय मिळविला. त्याचप्रमाणें यानें चेदी येथील कलचुरी घराण्यांतील राजांचा पराभव केला, आणि कालंजर काबीज केलें.

याचा मुलगा धंग हा याच्यानंतर गादीवर आला. याचें लक्षवर्मन् असें दुसरें नांव मावेल डफनें दिलें आहे. यानें चेदीच्या राजाचा पाडाव केला. यानें कनोजच्या सम्राटाचा पराभव केला व त्यापासून वैकुंठाची म्हणजे विष्णूची मूर्ति मिळविली. याच्या राणीचें नांव पुष्पा असें होतें. यालाहि बापाप्रमाणेंच परमभट्टारक व परमेश्वर अशीं विशेषणें लावलेलीं आहेत.

**यशोवर्मा परमार**—( स. ११३४–३५ ) माळव्याच्या परमारांपैकीं नरवर्म्याचा पुत्र ( सिद्धराज ). जयसिंहाशीं सुरू असलेली लढाई यानें पुढें चालविली. पण जयसिंहानें हत्तीकडून दक्षिण दरवाजा पाडून धारा नगरांत प्रवेश केला; आणि याला याच्या राणीसह कैद केलें व हा बारा वर्षांनीं आपल्या राजधानीस परत गेला. या युद्धांत विजय मिळाल्यावर जयसिंहानें अवन्तिनाथ असें बिरुद धारण केलें. हा विजय वि. सं. ११९२ त ११९५ च्या मध्यें केव्हांतरी झाला असावा. कारण वि. सं. ११९२ मार्गशीर्ष वद्य ३ चें याचें एक दानपत्र मिळालें आहे (इंड. अँटि., भा.१९, पृ.३४९). तसेंच ( सिद्धराज ) जयसिंहाचा एक शिलालेख उज्जयनीच्या म्युनिसिपालिटींत आहे. तो पूर्वी एका दरवाजाशीं उलटा बसविला होता. तो दरवाजा पडल्यावर लेख उजेडांत आला. वि. सं. ११९५ ज्येष्ठ वद्य १४ चा तो लेख आहे. त्यांत जयसिंहानें यशावर्म्याला जिंकलें, तसेंच अवन्तिमंडलाचा शासक नागर जातीचा महादेव झाल्याचें लिहिलें आहे ( शिलालेख अप्रकाशित ). याचीं दोन दानपत्रें मिळालीं आहत. एक वि. सं. ११९१ (इंडि. अँटि. भा. १९, पृ. ३५३) व दुसरें वि. सं.११९२ मधील ( इंडि. अँटि. भा. १९, पृ. ३४९ ). याला तीन पुत्र होते- १ जयवर्मा, २ अजयवर्मा व ३ लक्ष्मीवर्मा.

**यशोवर्मा मौखरी**—( स. ७२९–५३ ) कान्यकुब्जचा राजा व भवभूतीचा आश्रयदाता. यानें रामकथेवर प्रतिकूल टीका लिहून 'रामाभ्युदय' नांवाचें नाटक लिहिलें. आनंदवर्धन यानें आपल्या ध्वन्यालोकांत, धनिकानें आपल्या दशरूपकांत ( १. ४२ ) आणि साहित्यदर्पणांत ( ६. १४२ ) या नाटकाचा उल्लेख केलेला आहे. परंतु त्याची हस्तलिखित प्रत अद्याप उपलब्ध झाली नाहीं.

काश्मीरचा राजा ललितादित्य यानें याचा पराभव केला होता, असें राजतरंगिणीवरून दिसतें. याच्या दरबारांत वाक्पतिराज नांवाचा कवि होता. यानें यशोवर्मपूर नांवाचें शहर वसविलें ( इंडि. अँटि. १७, ३०७ ); व तेंच आपलें राजधानीचें शहर केलें. हा वाङ्मयप्रिय लोकांचा भोक्ता होता. याच्या कारकीर्दींत कनोजच्या राजानें चीनच्या राजाकडे आपला वकील स. ७३१ च्या सुमारास पाठविला होता. दक्षिणेकडील चालुक्य राजांनीं याच्यावर स्वाऱ्या केल्या होत्या. याला सारखीं युद्धें करावीं लागल्यामुळें याची कारकीर्द सुखावह व शांततेची अशी झाली नाहीं. यानें गौड राजाचा पराभव केल्याचा बऱ्याच ठिकाणीं उल्लेख आला आहे. हर्षाप्रमाणें सर्व उत्तर हिंदुस्थानांत आपलें वर्चस्व असावें असें यास वाटून व त्याप्रमाणें निश्चय करून यानें शेजारील राजांवर स्वाऱ्या करण्यास सुरुवात केली. पण त्यांत याला यश न येऊन याच्या मरणानंतर याच्या घराण्याचा नाश झाला.

हा मौखरी घराण्यांतील भोगवर्मनचा मुलगा होय. याच्यानंतर वज्रायुध या नांवाचा दुसऱ्या एका घराण्यांतील राजा कनोजच्या गादीवर आला. याच्या मरणानंतर कनोज येथील मौखरी वंश नष्ट झाला. E. A. Pires यानें याचा काल स. ७२९–७५३ असा दिला आहे ( मौखरी by E. A. Pires; p. 136-146 ).

**यशोविग्रह गाहडवाल**—कनोजच्या गाहडवाल घराण्यापैकीं पहिला उपलब्ध पुरुष.

**यशोविजयगणि**—( स. १६८० ) एक श्वेतांबरपंथी जैन. याचे ग्रंथ–न्यायप्रदीप, तर्कभाषा, न्यायरहस्य, न्यायामृततरंगिणी, न्यायखंडनखाद्य, अनेकांतजैनमतव्यवस्था. यानें दिगंबरपंथी अष्टसहस्री ग्रंथावर वृत्ति लिहिली आहे. हा डभई येथें परलोकवासी झाला. याची जैनयशोविजयग्रंथमाला बनारसहून प्रसिद्ध होत असे ती आतां भावनगरहून प्रसिद्ध होते. जैनांच्या नव्यन्याय शास्त्रज्ञांतील हा एक प्रमुख आचार्य होय.

**यक्षदास**—( २ अवनिवर्मन् पाहा ).

**यक्षगुप्त**—हा नेपाळच्या गोपाल घराण्यांतील विष्णुगुप्ताचा मुलगा. हा निपुत्रिक वारल्यानंतर अहीर घराणें सुरू झालें.

**यज्ञवर्मन् मौखरी**—( स. ४००–४२५ ) मौखरी वंशांतील कल्याणवर्मनानंतरचा हा राजा होय. कल्याणवर्मनानंतर मौखरींच्या सत्तेचा नाश झाला होता. ती सत्ता पुनः यानें प्रस्थापित केली, व मगध येथें फिरून मौखरी वंश राज्य करूं लागला. याच्यानंतर याचा मुलगा शार्दूलवर्मन् हा गादीवर आला.

**यज्ञश्री शातकर्णि**—( स. १६६–२०२ ) याला गौतमीपुत्र यज्ञश्री असें म्हटलेलें आहे. यानें स. १६६ पासून २९ वर्षें राज्य केलें. यानें युद्धें करून दुसऱ्या पुलुमायीनें घालविलेले सर्व प्रदेश पुन्हां मिळविले व जिंकलेल्या प्रदेशाची राज्यव्यवस्था केली. याच्या नाण्यांवर जहाजाचें चित्र खोदलेलें असे, यावरून याच्या ताब्यांत समुद्रावरील मुलूख असावेत असें वाटतें ( V. Smith, p. 223 ).

कोल्हापूर येथील एका जुन्या बुद्ध-स्तूपांत कांहीं तांब्यांचीं व शिशांचीं नाणीं सांपडलीं आहेत. त्यांवर या राजाचें नांव गौतमीपुतसा धीलीवायकुरसा असें लिहिलें आहे. यानें महाराष्ट्रांत पैठण येथें स. १७२ पर्यंत राज्य केलें व हा पुढें तेलंगणांत राज्य करून स. २०२ मध्यें मरण पावला ( Bhandarkar, p. 49 ). जुनागडच्या शिलालेखांत रुद्रदामनानें याचा दक्षिणाधिपति असा उल्लेख केला आहे ( Bhandarkar, p. 37 ).

विलियाकुर हा शब्द पुरीकसेनादि चार राजे व यज्ञश्री यांच्या वेळच्या नाण्यांवर येतो. तो शब्द तेलगू किंवा तामील सारख्या प्रांतिक भाषेंतला असावा व प्रांताधिकाऱ्याला लावीत असावेत (भांडारकर, पा. ४१२–१४). याची राजधानी धनकटक ( जि. गंतूर ). त्याला सध्या धरणीकोट म्हणतात.

**यज्ञसेन शातकर्णि**—( अग्निमित्र पाहा ).

**यज्ञेश्वरभट्ट**—कुमारिलभट्टाचा बाप.

**याकंबे**—ही बेट त्रिभुवनमल्लाची पत्नी. हिचाच मुलगा परगंद बेट हा होता.

**याकूब लोदी**—बहलोल लोदीचा पिता.

**याचप्पा नाईक**—( खून स. १६९४ सप्टें. ) एक रजपूत. प्रथम कुत्बशाहींत नोकर. नंतर मराठ्यांकडे. पुढें झुल्फिकारखानानें ठार केला.

**याचम्मा नायडू**—कालाहस्ती येथील चक्राप्पा कवि याचा आश्रित होता.

**याकूब बिन तारिख**—एक ज्योतिषी. याचे ग्रंथ अल्बेरुनीपाशीं होते. यानेंहि ज्योतिषशास्त्रावर बरेच ग्रंथ लिहिले आहेत.

**याकूब-इ-लोस**—( स. ९१२ ) एक तांब्यापितळेचें काम करणारा कासार. बुखाऱ्याच्या सईद राजाच्या कारकीर्दीत हा उदयास आला. ह्या धाडसी व उपद्व्यापी वीरानें उनाड लोकांची टोळी जमवून हिंदुस्थानावर स्वारी केली. यानें प्रथम हिरात घेतलें (स.९१२). झाबूल व काबूलहि घेतलें. तेव्हां जो काबूलचा किल्ला मुसलमानांचे ताब्यांत गेला तो अद्यापपर्यंत आहे. यानें गझनी शहराचा पाया घातला आणि जवळच एक किल्ला बांधिला. अफगाणिस्थान म्हणजे मूळचा रजपुतांचा देश होय. यानें तेथील रजपुतांना हिंदुस्थानांत हाकून दिलें. परंतु हा धुमकेतूप्रमाणें लवकरच नाहींसा झाला ( हिं.भा. अं. पृ. १६ ).

**यातकादखान**—( झुल्फीकारखान पाहा. )

**यादवराव मुनशी**—( स. १७१९ ) शाहूचा सय्यदांकडे गेलेला एक वकील. याचें नांव यादवराव बाजीप्रभु पारसनोस.

**यादो गोपाळ खटावकर**—( स. १७३० सुमार ) शाहूनें ताराबाईस कैद केल्यावर तिच्या कारभारावर यास नेमलें. याच्याकडे खालशाच्या उत्पन्नाची बाब असल्यानें खालशे असेंहि याचें नांव पडलें. साताऱ्यास याच्या नांवची एक पेठ आहे.

**यामा**—( पार्श्वनाथ पाहा ).

**यामुनमुनि**—यानें गीतेच्या प्रत्येक अध्यायाचें तात्पर्य एका श्लोकांत सांगितलें आहे. ते श्लोक बरेच लोकप्रिय आहेत. हा रामानुजसांप्रदायी असून यानें आपल्या मताप्रमाणें गीतेचें तात्पर्य भक्तिपर दाखविलें आहे. गुजराथ प्रिंटिंग प्रेसनें अनेक टीकांसह छापलेल्या गीतेंत याचा तात्पर्य-श्लोक दिला आहे.

**यार मुहम्मद**—( स. १७५० सुमार ) भोपाळराज्यसंस्थापक दोस्त मुहम्मदाचा दासीपुत्र. दोस्त मुहम्मदाच्या मुहम्मद नांवाच्या मुलास पदच्युत करून हा गादीवर आला.

**युद्धमल्ल ( पूर्व ) चालुक्य**—( स. ९२५ ) हा पांचव्या विष्णुवर्धनाचा पुत्र. याला ताल म्हणत.

**२.** ( स. ९२७–३४ ) हा पहिल्या युद्धमल्लाचा पुत्र. यानें दुसऱ्या भीमाला पदच्युत करून राज्य घेतलें.

**युद्धमल्ल ( पश्चिम ) चालुक्य**—( १ विनयादित्य ( पश्चिम ) चालुक्य पाहा ).

**युवराज**—'रससदन' भाणाचा कर्ता. हा केरळमधील कोटिलिंग गांवचा राहणारा.

**युवराज कलचुरि**—( केयूरवर्ष कलचुरि, महीपाल व राजशेखर पाहा ).

**२.** ( स. ९८०–१००० ) लक्ष्मणदेवाचा पुत्र. याचा मुंजानें पराभव केला.

**युसुफअलीखान**—( मृ. स. १५१० ) दौलताबादचा अधिकारी. यानें विजयनगरच्या राजाशीं लढाई करून त्याचा पराभव केला. हा शियापंथी होता. यानें कांहीं दिवस विजापुरास राज्य केलें.

**युसुफखान**—हा काश्मीरच्या मुसलमानी वंशांतील बहरामखानाचा मुलगा.

**युसुफ तुर्क**—हा विजापूरच्या इस्माईलचा पालक. यानें कमालखान नांवाच्या सरदाराचा खून केला, व त्याचा खून करीत असतां हा स्वतः मारला गेला.

**युसुफ आदिलशाहा**—( स. १४३५–१५१० ) विजापूरच्या आदिलशाही घराण्याचा संस्थापक. हा

आघामोवाडा नांवाच्या टर्कीच्या एका सुलतानाचा पुत्र. यांची आई यासह याच्या थोरल्या भावाच्या भीतीनें तुर्कस्थानांतून पळून हिंदुस्थानांत आली. या वेळीं याचें रूप, प्रौढत्व व शहाणपण पाहून खाजा मुहम्मद गुरजीस्तानीया नांवाच्या व्यापाऱ्यानें याला बेदर शहरीं नेलें व तेथें मुहम्मद गवाननें यास त्याजपासून विकत घेतलें.

हा आपल्या अंगच्या गुणांच्या जोरावर वाढत जाऊन प्रथम विजापूरचा अधिकारी व शेवटीं विजापूरचा स्वतंत्र राजा झाला व यानें अहमद निजामशहाच्या सल्ल्यानें 'शाहा' ही पदवी धारण केली ( स. १४८९ ). याच्या मृत्यूनंतर याचा मुलगा इस्माईल विजापूरच्या गादीवर आला ( स. १५१० ). हा शिया पंथाचा होता. याची पत्नी बुबूजीखानूम ही मूळची हिंदु होती.

**युसुफशाह**—( राज्यकाल स. १४६०–७४ ) बंगालचा सुलतान. रुक्नुद्दीन बार्बक फीरूजनंतर बंगालच्या गादीवर आला.

**यूडीमोस**—(खि. पू. ३१७) सिकंदर परत गेला तेव्हां त्यानें याच्या नेतृत्वाखालीं सिंधूनदीच्या तीरावर एक सैन्याची छावणी ठेवली होती. फिलिप्पोस या क्षत्रपाचा खून झाल्याची बातमी ऐकून सिकंदरानें याला त्याचें काम करण्याबद्दल लिहिलें होतें. पण चंद्रगुप्त मौर्य व चाणक्य यांचें बळ सारखें वाढत असल्यामुळें व याच्याजवळ सैन्य बेताचेंच असल्यामुळें याला फक्त निरीक्षकाचें काम करावें लागलें. पुढें सिकंदर पुसा येथें मृत्यु पावला. ॲंटिगोनस व सैल्यूकस या दोघां सेनापतींत वारसासंबंधीं तंटा लागला. तेव्हां हा ॲंटिगोनसला साहाय्य करण्याकरितां निघून गेला.

**येसाजी कुसाजी ऊर्फ यशवंतराव शिंदे कोल्हापूरकर**—( मृत्यु स. १७८३ मे १ ) कोल्हापूरच्या छत्रपति संभाजीची राणी जिजाबाई इच्या माहेरचा हा असून संभाजीच्या मृत्यूनंतर कोल्हापूरचा कच्चा कारभार पाहत असे.

नारायणरावाचे वधानंतर पेशवे व कोल्हापूरकर यांचे जे व्यवहार घडले त्यांत या येसाजीचाच भाग आहे. याला 'सेनासाहेब सुभेदार' असा हुद्दा होता. हा वारल्यावर रत्नाकरपंत आपा यास 'राजाज्ञा' पद मिळून तो सर्व कारभार पाहूं लागला (म. रि. उ. वि. १ ला, पृ. ४५६).

**येसाजी कंक**—(मृत्यु स. १६८९ नंतर) शिवाजीचा एक विश्वासूक मित्र व सरनोबत ( स. १६७३ ). हा शिवाजीबरोबर कर्नाटकच्या स्वारीवर गेला होता ( कृष्णाजी कंक पाहा ). राजारामाच्या वेळींहि हा होता.

**येसाजी मल्हार**—ता. २७।१०।१६६७ रोजीं झालेल्या तहान्वयें औरंगजेबानें खानदेश व वऱ्हाड हे प्रांत शिवाजीस दिले. प्रतापराव गुजर सरनोबत व त्याचा कारभारी हा यांस तिकडे पाठविलें.

**येसूबाई डफळे**—( मृत्यु स. १७५७ ) ही जतच्या बाबाजीची पत्नी व सटवोजीची सून. हिचा नवरा आधींच वारला व सासरा मागाहून वारला. तेव्हां मुलें अज्ञान असल्यानें ही कारभार स्वतः पाही. हिला सच्छील म्हणून फार मान आहे. हिला संतति नव्हती. पुतण्या यशवंतराव गादीवर आल्यावर हिनें देह ठेवला. ही शाहूच्या आश्रयानें असे.

**येसूबाई भोसले**—( जन्म स. १६५७–मृत्यु स. १७२० नंतर ) संभाजीची पत्नी. ही पिलाजी शिर्के यांची मुलगी. संभाजी दिल्लीहून परत आल्यावर त्याच्याशीं हिचें लग्न झालें ( स. १६६७ ) आणि पुढें हिला मुलगा झाला ( स. १६८० डिसें. ). त्याचें नांव जरी शिवाजी असलें तरी पुढें तो शाहू नांवानें प्रसिद्ध झाला. हिचें दुसरें नांव जिऊबाई असें होतें. लग्नाच्या वेळीं हिचें वय दहा वर्षांचें होतें ( रा. खं. ३, पृ. १५४ ).

नवरा असल्यापासूनच हिला राजकारणांत लक्ष घालावें लागलें. बाळाजी आवजीला संभाजीनें हत्तीच्या पायीं दिल्यावर खंडोबल्लाळाला हिनेंच वांचवून विश्वासांत घेतलें. कलुषा व संभाजी शिक्क्याचा दुरुपयोग करतील म्हणून तो हिनें ताब्यांत ठेवला होता. त्यामुळें प्रत्येक आज्ञापत्र हिनें पाहिल्याशिवाय सुटत नसे असें दिसतें. संभाजी मारला गेल्यावर रायगडला वेढा पडला तेव्हां हिनें रायगड लढविण्यास सुरुवात केली. आठ महिने किल्ला लढविल्यावर सूर्याजी पिसाळाच्या फितुरीमुळें हिला शेवटीं शाहूसह कैद व्हावें लागलें ( स. १६८० ). औरंगजेब यांना सारखें बरोबर वागवीत असल्यामुळें हिचे हालहि बरेच झालेले दिसतात ( मं. वा. इ. श. १८३७, पृ. २९८ ). तथापि हिनें तेथें आपले दिवस मोठ्या चातुर्यानें काढले; आणि जोत्याजी केसरकर वगैरे विश्वासूक लोकांकडून पत्रव्यवहार करून राजकारणाचा संदर्भ ठेवला.

शाहू सुटला ( स. १७०७ ) तरी ही व इतर माणसें बाळाजी विश्वनाथ पेशवे दिल्लीस गेला तेव्हां त्यानें सोडवून आणलीं ( स. १७१९ ). शाहूला सोडून हीं महत्त्वाचीं माणसें गुंतवून ठेवण्याचा उद्देश शाहूनें बादशाहीविरुद्ध गडबड केल्यास त्याला शह देण्याचा दिसतो.

हिची मान्यता मोठी होती. संभाजी व शाहू हिला अत्यंत सन्मानानें वागवीत. संभाजीसारखा संतापी पुरुष

हिच्या पूर्ण ताब्यांत होता. नानाप्रकारचीं संकटें भोगून शाहूस शेवटीं सुखाचे दिवस लाभले याचें श्रेय हिला आहे.

हिच्यावरील कांहीं प्रसंगांचीं वर्णनें आजहि अंगावर शहारे उत्पन्न करतात. त्या प्रसंगांना तोंड देऊन हिनें मराठा स्त्रियांच्या पुढें वीरपत्नी व वीरमाता कशा असतात यांचा आदर्श उत्पन्न केला आहे ( खंडो बल्लाळ चिटणीस पाहा ).

**योग**—( २ अवनिवर्मन् पाहा ).

**योगराज गुहिलोत**—( स. १०५१ ) मेवाडच्या गादीवर हा कीर्तिवर्म्यानंतर आला. कुंभलगडच्या शिलालेखावरून दिसून येतें कीं, हा जिवंत असतांच याचें राज्य अल्लटाच्या संततीपैकीं वैरटानें घेतलें.

**योगानंद**—( समाधि स. १८६६ ) हा सोनपेठचा देशस्थ ब्राह्मण. यानें पंचदशीवर मराठी ओवीबद्ध टीका लिहिली आहे.

**योग्लोक**—( स. ९५०–१०५० ) संस्कृत धर्मशास्त्रकार. यानें बृहद्योग्लोक व लघुयोग्लोक असे दोन ग्रंथ लिहिले. यानें काळ व व्यवहार यांवर विशेष लिहिलें. जीमूतवाहन व रघुनंदन यांनीं याचा विशेषतः खंडनार्थ निर्देश केला आहे. हा श्रीकराच्यानंतर झाला.

**योनक धम्मरक्खित**—अशोकाच्या प्रेरणेनें भरलेल्या तिसऱ्या बौद्धमहासभेंत याला अपरांत भागांत मुख्य प्रचारक नेमलें होतें. अपरांत म्हणजे दक्षिण हिंदुस्थानांतील कोंकणप्रांत होय. यानें तेथें 'अग्गिक्खन्धोपमसुत्त' या ग्रंथाचा उपदेश केला. हा धर्म व अधर्म चांगल्या प्रकारें जाणत असे.

**यौवनश्री**—( स. १०५० सुमार ) ही विहारच्या तिसऱ्या विग्रहपालाची पत्नी. ही कर्ण कलचुरीची मुलगी. हिची बहीण वीरश्री ही जतवर्माला दिली होती.

## र

**रक्तबाहु**—( स. ३१० सुमार ) ओरिसा प्रान्तांत बौद्धधर्माचा पाडाव करणारा राजा. याचा वंश स. ४७४ पर्यंत ओरिसांत नांदत होता. हा यवन ( ग्रीक ) होता. तथापि याच्यावर बौद्धधर्माचें वर्चस्व होतें. या परदेशी घराण्याचा ययातिकेसरी नांवाच्या राजानें पाडाव करून केसरी घराण्याची स्थापना केली ( म. यु. भा. १, पा. २४३ ).

**रखुमाबाई**—निवृत्तिज्ञानदेवादिकांची माता.

**रखुमाबाई पेशवे**—त्रिंबकराव पेठे यांची कन्या, व चिमाजी आप्पा पेशवे यांची पत्नी.

**रघवाम्बा**—विजयनगरच्या दुसऱ्या वेंकटपतिदेवराय आरविडूची पत्नी.

**रघु कदंब**—( स. ४१०-२५ ) हा बनवासीच्या भगीरथ कदंबाचा पुत्र.

**रघुनाथ**—( स. १५६२ ) एक ज्योतिषी. याचा 'सुबोधमंजरी' नांवाचा एक ग्रंथ ब्रह्मपक्षाचा आहे. त्यांत ग्रहसाधन अहर्गणावरून आहे.

२. ( स. १५६५ ) सोमभट्टात्मज रघुनाथ याचा 'मार्गप्रदीप' या नांवाचा करणग्रथ आहे. 'भास्करकृत सर्व ग्रंथ पाहून सूर्यमतानें ग्रहसंक्षेपानें सांगतों' असें यानें म्हटलें आहे. ह्या ग्रंथांत विशेष कांहीं नाहीं, असें सुधाकर कृत गणतरंगिणीमध्यें लिहिलें आहे.

३. प्रख्यात जो मुकुंदराज त्याचा हा गुरु.

४. एक रजपूत संस्कृत कवि. 'लौकिकन्यायसंग्रह' ग्रंथाचा कर्ता.

५. ( स. १७३३–५३ ) एक हिंदी कवि. हा काशिराज बरिवंडसिंहाच्या दरबारीं होता. याचे ग्रंथ-काव्यकलाधर, रसिकमोहन, इष्कमहोत्सव. याची बिहारी सत्सईवर एक टीका आहे. याला काशीराजानें चौरा नांवाचें गांव दिलें.

**रघुनाथ आरविडु**—( स. १५६१ सुमार ) हा विजयनगरच्या तिरुमल व व्यंगलम्बा यांचा पुत्र. यानें राक्षसतागडीच्या लढाईंत फार पराक्रम केला.

**रघुनाथ चिमणाजी सचीव**—(स. १७८७–९१) सदाशिव चिमणाजीस संतति नसल्यानें हा गादीवर आला. याचा जन्म स. १७३७ झाला. याला सचीव पदाचीं वस्त्रें मिळण्याकरितां एक लाख नजराणा भरावा लागला.

२. ( स. १८२७–३६ ) जन्म स. १८०७. याच्या सावत्र भावाचा मुलगा बळवंतराव यास दत्तक घेऊन चिमणाजी रघुनाथ असें नांव ठेविलें. बंड, दत्तकपरवानगी

वगैरेमुळें खजिना रिकामा झाला. स. १८३० मध्यें मोबदल्याचा तह होऊन सुधागड तालुका मिळाला व तुटक प्रांतावरील अंमल बंद झाला.

**रघुनाथ तिमाजी हणमंते**—हा तिमाजीचा मुलगा. भोसल्यांचा पिढीजाद नोकर.

**रघुनाथदास**—( स. १७७९ ) गुजराथी कवि. अहमदाबादेजवळ गोमतीपूरचा राहणारा. जात लेवा कुळंबी. श्रीमद्भागवत, रामायण, ध्रुवाख्यान, अभिमन्यु-विवाह, चक्रव्यूहवर्णन, छप्पा इत्यादि याची कविता आहे ( का. दो. ).

**रघुनाथ नायक**—( स. १६३० सुमार ) हा तंजावरच्या अच्युत नायकाचा पुत्र. यानें दुसऱ्या वेंकटपति-देवराय आरविदूला फार साहाय्य केलें. हा मोठा रामोपासक होता. यानें श्रीरंगम्, विजयराघवपुरम् व कुंभकोणम् येथील प्रसिद्ध राममंदिरें बांधलीं. यानें तेलंगी व संस्कृत भाषेंत अनेक ग्रंथ केले: १ पारिजातहरण, २ नलाभ्युदय, ३ अच्युताभ्युदय, ४ रामायणसारसंग्रह, ५ महाभारतसारसंग्रह. शिवाय तेलंगी रामायण आहे.

**रघुनाथ नारायण राजेबहादर**—( स. १७७५ सुमार ) हा नारो शंकराचा मुलगा होय. याचा बाप वारल्यावर यास ता. २०-४-१७७५ रोजीं जहागिरीची सनद देण्यांत आली. पण भावांत तंटे उपस्थित होऊन भयंकर बखेडे माजले. त्याचे कागद पुष्कळ छापलेले आहेत. हा दादाचे बाजूचा असून त्याच्यासाठीं भयंकर खटपट करीत होता ( म. रि. उत्तर वि. १ ला, पृ. ४७-२०७ ).

**रघुनाथ नारायण हणमंते**—(स. १६५३-१६८३) याच्या बायकोचें नांव सिताबाई असें होतें. हा एक शहाजी व शिवाजी यांच्या समकालीन स्वामिनिष्ठ मुत्सद्दी. हणमंते हे भोसल्यांचे पिढीजाद नोकर होते. रघुनाथ नारायण यांस शहाजीनें आपल्या कर्नाटकांतील जहागिरीचा स. १६५३ मध्यें दिवाण केलें. हें काम यानें आपल्या मरणकालपर्यंत केलें. व्यंकोजीच्या जुलमास कंटाळून शेवटीं शिवाजीस कर्नाटकावर स्वारी करण्यास यानेंच प्रवृत्त केलें. व या स्वारींत शिवाजीला याचें अप्रतिम साहाय्य झालें. त्यामुळें खूष होऊन शिवाजीनें जिंकलेल्या प्रांताचा यालाच कारभारी केलें; आणि याचा भाऊ जनार्दनपंत यास पंत सुमंत हा अधिकार दिला. शिवाजीमहाराज कर्नाटकांतून महाराष्ट्रांत परत आल्यानंतर स. १६७७-८१ पर्यंत तिकडील राज्यकारभार व मुलकी वसुलाची व्यवस्था यानें फार दक्षतेनें केली.

यानें 'राज्यव्यवहार' कोश शिवाजीच्या सांगण्यावरून तयार करविला. शिवाजीनंतर संभाजीच्या वेळींहि यानें आपल्या प्रांतापुरता उत्तम बंदोबस्त ठेवून खजिन्यांत बराच पैसा शिल्लक ठेविला होता. संभाजीच्या गैरवर्तनामुळें हा त्यास उपदेश करण्याकरितां रायगडीं गेला. याच्या उपदेशाचा संभाजीच्या मनावर थोडातरी परिणाम होऊन जुन्या प्रधानमंडळास त्यानें मोकळें केलें; व त्याप्रमाणें बंधु जनार्दनपंत हणमंते व पेशवे मोरोपंत पिंगळे यांना ताबडतोब सोडून दिलें.

यास दोन पुत्र असून त्यांचीं नांवें अनुक्रमें नारोबा व त्रिमल अशीं होतीं.

हा संभाजीचा निरोप घेऊन कर्नाटकांत जाण्यास निघाला, परंतु वाटेंतच वलण मुक्कामीं याचा अंत झाला ( स. १६८३ ). रघुनाथपंताचा भाऊ जनार्दनपंत याजकडे राजारामाचे कारकीर्दीत अमात्यपद होतें. यांचे वंशज तंजावरकडे असावेत. रघुनाथपंत यांच्या शहाणपणाचा लौकिक कर्नाटकप्रांतीं अद्यापि सुद्धां ऐकूं येतो.

**रघुनाथ गणेश नवहस्त**—रामदासांचा शिष्य. तंजावराकडे राहत असे. याचे ग्रंथ-दर्शपूर्णमासप्रायश्चित्त, प्रयोगरत्नभूषा, प्रायश्चितकुतूहल ( कांहीं प्रकरणें ) व नरकवर्णन ( मराठी ).

**रघुनाथपंडित**—( स. १६६६-९० सुमार ) हा प्रसिद्ध मराठी कवि. चंदावरचा राहणारा. हा शिवाजीजवळ होता. आणि जयसिंगाकडे शिवाजीतर्फे बोलणें करण्यास रघुनाथ कोरडे गेला नसून विद्वान् संस्कृतज्ञ म्हणून यास पाठविलें असावें. हा अरणीकर आनंदतनयाचा व्याही होता. याचा पुत्र मोरेश्वर मुख्य दानाध्यक्ष होता. हे दोघेहि पुढें चंदावरास कायम राहूं लागले, तेव्हां श्रीकराचार्य यास राजारामानें पंडितराव पद सांगितलें. याचे ग्रंथ—दमयंतीस्वयंवर, रामदासवर्णन, गजेंद्रमोक्ष.

**रघुनाथ बल्लाळ कोरडे**—(स. १६४०-७४ सुमार) शहाजीनें शिवाजीच्या बरोबर दिलेल्या विश्वासूक लोकांपैकीं एक. पुढें सैन्याची सबनिशी याच्याकडे आली. वकील म्हणूनहि हा मोगलाकडे गेला होता ( स. १६५७). जयसिंगाकडे शिवाजीतर्फे बोलणें करण्याचें काम याच्याकडे असावें ( स. १६६५ ). तसेंच शिवाजीबरोबर दिल्लीस गेलेल्या मंडळींत हा होता. शिवाजी आग्र्याहून गेल्यानंतर याला कैद करून याचे हालहि करण्यांत आले. शिवाजीशीं एकरूप होऊन काम करणाऱ्या माणसांपैकीं हा एक हाता.

**रघुनाथ बल्लाळ मेंडजोगी**—( स. १६५६ सुमार ) हा शिवाजीचा पायदळाचा सबनीस. यानें चंद्राव

मोरे प्रकरणांत विशेष कामगिरी केली ( बाळाजी हरी मेंडजोगी पाहा ).

**रघुनाथभट क्षिपरे ( पटवर्धन )**—( स. १७५० सुमार ) पहिला रघूजी भोसले नागपूरकर याचा एक मुत्सद्दी.

**रघुनाथ यादव चित्रगुप्त**—( स. १७०८-६० ) याची शिवाजीच्या कालाची बखर प्रसिद्ध आहे. परंतु ती स्वतंत्र नसून कृष्णाजी अनंत सभासदांच्या बखरीचा अनुवाद आहे. सभासदी बखरीचें मूळ घेऊन त्यांत यानें स्वतः रचलेल्या कविता अधूनमधून घुसडून दिल्या आहेत. सभासदी बखरींतील एका वाक्याच्या ऐवजीं त्याच अर्थाचीं तीनचार वाक्यें यानें बनविलीं आहेत. याचा चुलत आजा काकाजी प्रभु होय. काकाजी प्रभु म्हणजे बाळाजी आवजी चिटणीस ऊर्फ चित्रे हा होय. बाळाजी आवजीस संभाजीनें विनापराध ठार मारलें हें प्रसिद्ध आहे. त्याच्या चिमणाजी व शामजी या दोन भावांपैकीं हा कोणाचा वंशज हें सांगतां येत नाहीं. यमाच्या दरबारीं जसा चित्रगुप्त तसें आपण कोल्हापूरकरांचे दरबारीं, असें सुचविण्याकरितां यानें चित्रे या आडनांवाचे ऐवजीं चित्रगुप्त असें आडनांव लावलें. छत्रपति राजाराम व जिजाबाई यांचा संभाजी याच्या कोल्हापूरच्या दरबारीं यानें चाळीस वर्षे चिटणिसी केली.

हा शके १६३० च्या सुमारास जन्मला असून यानें १६४२ च्या सुमारास चिटणिसी करण्यास सुरुवात केली असावी. स. १६८२ त संभाजी राजे वारले, आणि याची चिटणिसीहि गेली. शेवटीं चिकोडीस मनोळी या तालुक्यांत राहून शाहूच्या प्रांतांत दंगा करणाऱ्या यशवंतराव शिंद्याचा आश्रय याला मिळाला, व तेथें यानें ही बखर लिहिली. याला ऐकीव माहिती सपाटून असून हा कथानक रंगवून लिहितो. कांहीं व्यक्तींचीं नवीं नांवें व आडनांवेंहि याचे बखरींत उपलब्ध होतात. ही बखर शके १६८२ ते १६९२ च्या दरम्यान केव्हांतरी लिहिली असावी ( राजवाडे प्रस्तावना, पा. २१६ ).

**रघुनाथ रणचोड**—( स. १७८५-१७९७ ) हा रणचोड कृष्णाचा मुलगा असून मुंबईच्या संझगिरी घराण्यांतील सारस्वत ब्राह्मण होय.

हा फक्त सैन्याच्या हालचालींविषयींच माहिती देत नसून इंग्रजांच्या मुंबई येथें असलेल्या खजिन्याची आर्थिक परिस्थिति काय होती, मुंबई येथें येणाऱ्या निरनिराळ्या गव्हर्नरांचे व्यक्तिशः स्वभाव कसे होते वगैरेंचा फार बारकाईनें खुलासा करी. नाना फडणिसाला विलायती ( युरोपियन ) माल घेण्याची फार हौस होती, असाहि उल्लेख याच्या एका पत्रांत आला आहे.

याच्या पदरीं असलेल्या कांहीं लष्करी शिपायांच्या खर्चासुद्धां याला सरकारांतून सालीना ५४२ रु. चें वेतन मिळे. हा स. १७९७ पर्यंत वकिलीचे कामावर होता. याच्यानंतर दुसऱ्या बाजीरावानें रामचंद्र कृष्णाची नेमणूक याचे जागीं केली.

**रघुनाथराव गुजर**—( स. १८२९ सुमार ) प्रतापराव गुजराचा वंशज. हा चतुरसिंग भोसल्यास मदत करी. प्रतापसिंगानें आपली मुलगी याच्या मुलास दिली होती. याला उपळणें गांव इनाम होतें.

**रघुनाथराव बाजी घाटगे**—( स. १७९५-९९ ) हा लढाऊ मराठा प्रथम जानोजीचे कारकीर्दींत पुढें आला.

नर्मदेच्या दक्षिण व उत्तर कांठांवर पेंढाऱ्यांचा बंदोबस्त करण्याकरितां दुसऱ्या रघूजीनें विठ्ठल बल्लाळ सुभेदार, वेनिसिंग जमादार, रघुनाथराव बाजी घाटगे व महमद अमीनखान शिवणी छपरेवाले यांना नर्मदेच्या उत्तरेस पाठवलें ( स. १७९९ ). अमीरखान पेंढारी हा सागरावर चाल करून आला, तेव्हां यानें बाळाजी खेराशीं संगनमत करून त्याचा बचाव केला.

**रघुनाथराव बाजीराव ऊर्फ दादासाहेब पेशवे**—(जन्म स. १७२९-मृत्यु स. १७८३ डिसें. ११) थोरल्या बाजीरावाचा तिसरा मुलगा. नानासाहेबानें यास लिहिलें कीं ' नुसती घोडी न फिरवितां रघुवंश, विदुरनीति, चाणक्यनीति, यांचीं नेमपूर्वक चिंतानिका करून थोडेबहुत शास्त्री याजवळ म्हणत जावे. जेवणास भाऊच्या पंक्तीस असावे ! '

हा स. १७५० नवंबरांत एकदां उत्तरेकडे गेलेला दिसतो व गुजराथेवर यानें दोन स्वाऱ्या केल्या. पहिली स्वारी स. १७५१ आक्टोबर ते स. १७५२ जुलैपर्यंत व दुसरी अहमदाबाद काबीज केलें ती होय ( स. १८५३ एप्रिल ).

सुरजमल्ल जाटानें दिल्ली लुटली म्हणून बादशहाकरितां व ईश्वरसिंगाला मदत करतों म्हणून मल्हाररावाकरितां यानें कुंभेरीला वेढा दिला आणि शेवटीं तीस लक्ष रुपये घेऊन तह केला ( स. १७५४ मे १७ ). सुरजमल्लाला मदत करण्याकरितां गाजीउद्दीनास विरोध करण्याच्या उद्देशानें बादशहा व वजीर ( खानाखाना ) निघाले तेव्हां यानें त्यांचा पराभव केला, अहमदशाहास कैद केलें, आजुजुद्दीनला ( आलमगीर दुसरा ) बादशहा केलें, गाजीउद्दीनचे पुत्रास वजिरी दिली आणि साडे-

ब्यायर्शी लक्ष खंडणी मिळवली ( पे. द. २१. ६० ). नंतर हा पुण्यास आला. त्या वेळीं याची पहिली बायको मरून दुसरें आनंदीबाईशीं लग्न झालें.

दुसऱ्या स्वारींत (स. १७५६ नवं.–१७५८ आक्टो.) यानें उठत चाललेला आपला अंमल आपल्या सखाराम-बापूसारख्या लोकांच्या मार्फत पुनः बसविण्याचा क्रम सुरू केला. अबदालीच्या पाठोपाठ यानें दिल्ली काबीज केली. नजीबाचा फितुर नाहींसा केला. मथुरा, वृंदावन, गया, कुरुक्षेत्र वगैरे घेतलें. पंजाबांत जाऊन अबदालीचे लोक हाकलून देऊन व कांहीं पकडून अटकेपार झेंडे लावले ( पे. द. २. ८४ ). पण नानासाहेबांचें घाईचें बोलावणें आल्यामुळें याला लवकर परत यावें लागलें. हा डोइजड होईल म्हणून यास परत बोलावलें असावें. या दोन्ही स्वाऱ्यांच्या वेळीं कारभारी म्हणून सखारामबापू सर्व व्यवहार पाहत असे.

पुढें हा उदगीरच्या लढाईत हजर होता (स.१७६०). तेथें याला मुद्दाम मागें ठेवून सदाशिवरावाला पानपतावर पाठविण्यांत आलें. हा मेदकच्या स्वारीहून आल्यावर पुणें येथें नानासाहेब वारले आणि निजामाशीं केलेल्या तहावरून हा व माधवराव यांचें बिघडून घोडनदीस लढाई होऊन माधवराव याच्या स्वाधीन झाला. पण राक्षसभुवनच्या लढाईत निजामाचा पराभव झाला आणि माधवरावाचा जम बसत चालला. तेव्हां यानें अर्धे राज्य मागितलें, पण माधवरावानें सर्वच तुमचें म्हणून याला स्वस्थ बसविलें. पण याचें समाधान नव्हतें. शेवटीं घोडपच्या लढाईत याला कैद करून माधवरावानें यास शेवटपर्यंत कैदेंत ठेवलें ( स. १७७२ ). आणि मरते-समयीं नारायणरावाला संभाळण्याविषयीं यास सांगून नाना व बापू यांवर सर्व भार सोंपविला. पण नारायण-रावानें याला कैदेंत ठेवल्यानें यानें त्याला धरण्याचा कट केला. पण शेवटीं नारायणराव मारला गेला आणि चौकशींत याचेवर आरोप सिद्ध झाला. तेव्हां निजामवर स्वारी करण्याच्या निमित्तानें याला पुण्याबाहेर काढून प्रथम नारायणरावाची पत्नी व नंतर तिचा मुलगा सवाई माधवराव यांच्या नांवानें राज्यकारभार सुरू केला.

हा कर्नाटकांत असतां पुण्यास बारभाईंचें कारस्थान झालें ( स. १७७४ फेब्रु. ). हें याला कळतांच हा हैदरशीं कल्याणदुर्गचा तह करून परत फिरला. त्यांत यानें माधवरावानें तीन स्वाऱ्या करून कमावलेला ५० लक्ष उत्पन्नाचा कर्नाटकाचा मुलूख जुजबी नजराण्याच्या मोबदल्यांत हैदरला देऊन त्याचा लोभ संभाळण्याचा यत्न केला. तसेंच स्वराज्यापैकीं कृष्णा व तुंगभद्रा या नद्यांमधला सुमारें पाऊणकोट रुपये उत्पन्नाचा मुलूख फक्त दरसाल सहा लक्ष खंडणी देण्याच्या करारावर यानें शत्रूंस कायमचा देऊन टाकला. यांत पेशवे, सावनूरकर नबाब, नरगुंदकर भावे, गजेन्द्रगडकर घोरपडे व मनोळी-कर शिंदे व विशेषतः याला विरोध करणारे पटवर्धन व रास्ते यांचा मुलूख होता.

यानें जमखिंडी, मिरज घेण्याचा इरादा केला. पण सैन्य मागें आहे असें पाहून हा विजापूरकडे वळला. पण कासेगांवापाशीं लगट होऊन त्रिंबकराव पेठे पडला ( स. १७७४ एप्रिल ४ ). पण हा पुण्याकडे वळला नाहीं. हा सांगोला, तुळजापूर, अजंठा, बऱ्हाणपूर, इंदुर असा पुढें व हरिपंत फडके मागें असा पळ सुरू झाला. इंदुरास राहून बोलण्यास सोयीचें पडत नाहीं म्हणून बऱ्हाणपुरास उभयतांनीं येण्याचें ठरलें. पण दादा कैदेच्या भीतीनें मालेगांवाहून पळाला व धारला आनंदीबाईस ठेवून बडोद्याहून अहमदाबादेस इंग्रजांच्या आश्रयाला गेला. आणि तेथून सुरतेस येऊन इंग्रजांशीं तह केला. तहांत २५०० स्वारांनिशीं यास मदत करून पुण्याची गादी मिळवून देण्याचें आश्वासन मुख्य होतें. शिवाय साष्टी, सुरत, भडोच वगैरे भाग इंग्रजांस दिला होता. पण थोड्या युद्धानंतर पुरंधरचा तह झाला ( स. १७७६ मार्च १ ).

पुरंधरच्या तहांत 'राघोबानें एक महिन्यांत सैन्यास रजा द्यावी, २५ हजार रुपये पेन्शन, १ हजार स्वार व कांहीं नोकर यांसह गोदावरीतीरीं राहावें. इंग्रजांनीं दादा किंवा त्यांच्यातर्फे कोणीं बंड केल्यास त्यास मदत करूं नये. साष्टी किंवा ३ लक्ष रुपये, भडोच शहराजवळचा मुलूख व १२ लक्ष रुपये लढाईखर्च इंग्रजांस द्यावा,' हा भाग होता. पण हा तह आपणास न विचारतां झाला म्हणून यानें तक्रार केली आणि त्याचा परिणाम सुरतेच्या तहास महत्त्व देऊन याला इंग्रजानें मुंबईस पुनः आश्रय दिला.

यानंतर मास्टीनच्या साहाय्यानें मोरोबा फडणीसानें कारस्थान उभारून याला पेशवा करून स्वतःकडे कारभार घेण्याचें ठरविलें. हा त्याकरितां निरोपाची वाट पाहत राहिला. पण नानानें तें सर्व मोरोबाचें कारस्थान धिमे-पणानें हाणून पाडलें ( स. १७७८ ).

इंग्रजांचा तळेगांवावर पराजय केल्यानंतर ( स. १७७९ ) या इंग्रजमराठे युद्धाची कायमची तहकुबी महादजी शिंद्यांच्या जामिनगिरीनें झालेल्या सालबाईच्या

तहामुळें झाली आणि याचा इंग्रजांचा आश्रय पूर्णपणें सुटला ( स. १७८३ ).

सालबाईचा तह झाल्यानंतर यानें कोणाकडे जावें हा प्रश्न उपस्थित झाला. नानाचें म्हणणें कीं, याला इंग्रजानें आपल्या ताब्यांत द्यावें. पण इंग्रजानें कोणाच्याहि ताब्यांत याला देण्याचें नाकारलें. तसेंच हा स्वेच्छेनें कुठेंहि गेल्यास आम्हीं हरकत करणार नाहीं असें कळवलें. शिंद्याचें म्हणणें, हा पुण्यास जात नसेल तर यानें आपल्याकडे यावें. हा तह झाल्यानंतर हा सुरतेस होता. इंग्रजानें याला नेमणूक देण्याचें नाकारलें व पुणें दरबारशीं कसातरी समेट करून आपले राज्यांत जाऊन राहण्याचा यास सल्ला दिला. तेव्हां निरुपाय होऊन यानें गोदावरीतीरीं राहण्याचें ठरविलें. केवळ नानावर न विसंबतां परशुरामभाऊ पटवर्धन, हरीपंत फडके, तुकोजी होळकर यांच्याकडून पृथक्पणें, इमानपत्रें, बेलभंडार घेऊन हा खानदेशांत आला ( जुलै ). होळकर, फडके, रास्ते सामोरे गेले होते. दरमहा पंचवीस हजारांची नेमणूक घेऊन कोपरगांवीं राहण्याचें ठरलें. पुढें आजारी पडून तेथेंच डिसेंबर ११।१७८३ रोजीं हा वारला. तेव्हां याचें वय ५४ वर्षांचें होतें ( ऐ. ले. सं., पा. ३६० ).

याच्या आयुष्याचे तीन भाग पडतात. नानासाहेबानें याचे गुणदोष ओळखून याला जरूर तेवढा वाव देऊन खूष ठेवलें होतें. त्यामुळें पानपतच्या लढाईपर्यंत यानें मराठ्यांचा दरारा वाढविण्याचेंच काम चोखपणें केलें. पण माधवरावाला याला ताब्यांत ठेवतां आलें नाहीं. केवळ त्याच्या याच्याशीं झालेल्या वर्तनामुळेंच हा त्याचा व राज्याचा सर्वनाशक पापग्रह झाला. तेंच धोरण आंतबाहेर सुरू झाल्यानें नारायणरावाचा खून झाला आणि बेहोष झालेल्या याला इंग्रजांचा आश्रय करणें भाग पडलें.

यानें बर्कला लिहिलेल्या पत्रांत पुढील वाक्यें आढळतातः 'इंग्रजांची फौज लढाई देण्यास लायक आहे हें मला कबूल आहे. पण मराठ्यांच्या सैन्याची व शत्रूला नामोहरम करण्याच्या मराठ्यांच्या युक्त्यांची इंग्रजी फौजेला माहिती नसल्यामुळें इंग्रजी फौजेंत तितका कमीपणा आहे. जरूर त्या युद्धविषयक सूचना मीं इंग्रजास दिल्या. पण माझ्या सूचनांकडे दुर्लक्ष केलें' ( वि. वि. ५८. ५ पा. १९१ ). नारायणरावाचा वध यानें करवला आणि शेवटीं त्याचा स्पष्ट उच्चार करून प्रायश्चित्तहि घेतलें ( स. १७८३ आगष्ट ६ ). पण त्यामुळेंच हा हत्यारी स्वकीयांत जवळ करण्याच्या लायकीचा राहिला नाहीं. मग हलक्या दर्जाच्या लोकांशिवाय याच्या भोंवतीं कोण असणार ? ( अमृतराव पेशवे, आनंदीबाई पेशवे, अहल्याबाई होळकर, गोपिकाबाई पेशवे, तुळ्या पवार, रामशास्त्री प्रभुणे पाहा ).

याची पहिली पत्नी बवें घराण्यांतील जानकीबाई व दुसरी आनंदीबाई. आनंदीबाईला बाजीराव व चिमाजी असे दोन मुलगे व गोदूबाई व दुर्गाबाई अशा दोन मुली झाल्या. याला भास्करराव नांवाचा आणखी एक मुलगा होता. तो अल्पवयीं वारला असें मराठी लेखक लिहितात, पण तो विरक्त होऊन हिंदी कवि म्हणून प्रसिद्ध झाला अशी माहिती आहे (भास्करराव रघुनाथ पेशवे पाहा). तो लेकावळा असावा. शिवाय याच्या अनेक रखेल्या होत्या.

हा थोरल्या बाजीरावाचा पुत्र व अनेक मनसुबे करण्याचा हिय्या करणारा असल्यामुळें याच्या कच्छपीं लहानमोठे सर्व लोक होते. अनेक प्रसंगीं लोकांत मिसळून यानें कामें केलीं आणि लोकांनाहि वागवून घेतलें. त्यामुळें तत्कालीन व्यक्तिप्रधान राजकारणांत याच्या भोंवतीं अनेक प्रकारचे लोक एकत्र झाले होते. त्यांपैकीं कांहीं प्रसंग पाहून सुटले. पण चिंतो विठ्ठल रायरीकर, गंगाधर यशवंत चंद्रचूड यांना भरपूर अद्दल घडली. कित्येक जमीनदोस्त झाले. आबाजी महादेव ( ब्राह्मण ), सदाशिव रामचंद्र शेणवी (सारस्वत), सखाराम हरि गुप्ते ( प्रभु ), आणि मानाजी फाकडे ( मराठा ), हे चार इसम मात्र शेवटपर्यंत दादाला चिकटून राहिले. हाहि चंचल असला तरी कोणत्याहि संकटांतून मार्ग काढण्यास किंवा पेशवाई मिळविण्याकरितां प्रयत्न करण्यास कधींच मागें सरला नाहीं. शिंदे–होळकरांप्रमाणें याला स्वतंत्र केला असता तर कदाचित् इतिहास वेगळा झाला असता.

**रघुनाथशास्त्री पर्वते**—( मृत्यु स. १८२० सुमार ) पेशवाई बुडाल्यावर जी जुनी विद्वान् मंडळी महाराष्ट्रांत होती त्यांपैकीं हा एक होता. हा कोणास न जुमानणारा होता. पुणें येथील धर्मासंबंधीं व खाजगी जीं जीं खटलीं उत्पन्न होत त्यांत हा कोणत्यातरी एका पक्षाचा अभिमानी पुरस्कर्ता असावयाचाच. एके वेळीं शास्त्री लोकांत देशस्थ, कोंकणस्थ व कऱ्हाडे ह्या पोटजातींतून शरीरसंबंध व्हावे किंवा नाहीं असा वाद निघाला. तेव्हां ते होऊं नयेत असें कित्येकांचें मत होतें. याचें मत होतें कीं तसें झाल्यास हरकत नाहीं.

यानें आपल्या मताप्रमाणें लागलीच देशस्थ व कऱ्हाडे यांच्या मुली पाहून आपण स्वतःच त्यांशीं लग्नें केलीं.

पुण्यांत हसबनिसांच्या घराण्यांत एक मोठा तंटा त्या वेळीं चालू होता; पण दोहों पक्षांत दांडगाई होऊन यावर फौजदारी खटला झाला. हा मोठा विद्वान् गृहस्थ म्हणून ह्यास साध्या कैदेची कित्येक वर्षांची शिक्षा झाली. मग ह्या चंचल वृत्तीच्या पुरुषास निवांत वेळ मिळाला. तो वेळ यास कंटाळवाणा वाटूं लागला. त्या वेळांत कांहीं करमणूक व्हावी म्हणून यानें भगवद्गीतेवर 'शंकरपादभूषण' या नांवाची सुंदर टीका लिहिली (भा. व., खं. ३, जु. गे. गो. पृ. १९). 'शंकरपादभूषण' आतां पुण्यांतील आनंदाश्रम संस्थेनें प्रसिद्ध केला आहे.

यानें 'गदाधरीपंचवाद' या ग्रंथावर टीका लिहिली. यानें 'न्यायरत्न' नांवाचा ग्रंथ लिहिला. हा प्रसिद्ध राघवाचार्यांचा शिष्य होता.

**रघुनाथ शिरोमणि**—(स. १४७७–१५४७) प्रसिद्ध न्यायशास्त्रज्ञ तत्त्वचिंतामणिदीधितीचा कर्ता. याचा जन्म नडिया येथें झाला. याच्या गुरूचें नांव वासुदेव सार्वभौम होतें. हा घरचा अतिशय गरीब असल्यामुळें व लहानपणींच बाप मरण पावल्यामुळें याच्या आईनें यास मोठ्या प्रयासानें लहानाचा मोठा केला. परंतु याची हुषारी पाहून याच्या गुरूनें याचा सांभाळ करण्यासाठीं आपणाजवळ ठेवून घेतला व यास व्याकरण, शब्दकोश वगैरे अभ्यास शिकवला. पुढें हा त्यांच्याजवळ तर्कशास्त्राचा अभ्यास करूं लागला. हा आपल्या गुरूच्या सांगण्यावरून मिथिला येथें गेला व आपल्या तर्कशास्त्राच्या अभ्यासावर तेथें सर्व विद्यार्थ्यांवर मात केली व प्रत्यक्ष तेथील शिक्षक पक्षधराचा वादांत पराभव केला. त्यामुळें त्यानें चिडून जाऊन याच्या तोंडांत मारली. त्यामुळें हाहि चिडून जाऊन झालेल्या अपमानाचा सूड घेण्याच्या निमित्तानें रात्रीं पक्षधराच्या घरीं हातांत तलवार घेऊन गेला, पण तेथें त्यानें याची स्तुति त्याच्या बायकोजवळ केलेली ऐकून एकदम पुढें जाऊन यानें त्याची क्षमा मागितली; व अशा प्रकारें नडिया विद्यापीठाला पदव्या देण्याचा जो अधिकार नव्हता तो यानें मिळवून आणिला. हा एका डोळ्यानें आंधळा होता. याचे ग्रंथः—

(१) तत्त्वचिंतामणिदीधिती ही गंगेशाच्या तत्त्वचिंतामणीवरील टीका, (२) बुद्धधिकारशिरोमणि. उदयनाचार्याच्या आत्मतत्त्वविवेकावरील टीका, (३) पदार्थतत्त्वनिरूपण अथवा पदार्थखण्ड, (४) किरणावलीप्रकाशदीधिती, (५) न्यायलीलावतीप्रकाशदीधिती अथवा विस्तारिका, (६) अवच्छेदकत्वनिरुक्ति, (७) नयवाद, (८) आख्यातवाद, (९) खण्डनखण्डखाद्यदीधिती (हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ४६३–६५).

**रघुनाथ हरि नेवाळकर**—(स. १७७०–९४) हा कऱ्हाडा ब्राह्मण झांशीचा सुभेदार होता. हा कान्होजी आंग्र्याचे हाताखालीं तयार झाला. यानें कांहीं विद्युत्यंत्रें तयार केलीं होतीं.

**रघुपति महाराज**—(स. १७५८–१८४४) हा पुणतांब्याचा ब्राह्मण. बाप हरिशास्त्री व माता रुक्मिणी. कोल्हापूरच्या नारायणमहाराजांचा शिष्य. हा बडोद्याच्या फत्तेसिंगराव गायकवाडाची पत्नी आनंदीबाईस भागवत सांगे, उत्तम कविता करी व कीर्तनांत म्हणे (म. क. च. भा. ४ पा. ११९–३८).

**रघूजी आंग्रे**—(जन्म स. १७५८ सप्टें. –स. १७९३ मार्च २७) मानाजीचा दासीपुत्र. यानें उंदेरी बेट शिद्यांकडून घेऊन पेशव्यांना दिलें. सदाशिवरावाचा तोतया वेलापुराहून मुंबईस इंग्रजांच्या आश्रयास जात असतां यानें पकडला (ता. ४–११–१७७६). याला शिद्याचें पाठबळ असे.

२. (मृत्यु स. १८३८) मानाजीचा मुलगा. राज्य खालसा.

**रघूजी करांडे**—(स. १७५७–६३) हा प. रघूजीचा मराठा सरदार होता. यानें रघूजीस राज्यविस्ताराचे कामांत फार मदत केली. हा मुत्सद्दी व लढवय्या होता. हा कांहीं दिवस मुधोजीसहि मिळाला होता. हा भोसल्यांच्या प्रत्येक हालचालींत प्रमुख असे.

जानोजीनें पुण्यावर चाल केली असतां रघूजी करांड्यानें सिंहगड व पुरंदर या किल्ल्यांभोंवतालचा सर्व मुलूख लुटला व पुरंदर किल्ल्याच्या पायथ्याशीं असलेल्या सासवड या गांवीं पेशव्यांचा जामदारखाना व इतर कारखाने होते तेहि लुटले. शिवाय महत्त्वाचे सर्व कागदपत्र तेथें नेले होते तेहि जाळून टाकले (स. १७६३).

**रघूजी थोरात**—(स. १७६३) हा जनकोजी शिंदे यांचा तोतया म्हणून सैन्य जमवून गडबड करूं लागला. सखारामबापूचे चुलतबंधु गिरमाजी याचे कारभारी होते.

**रघूजी भोसले**—(मृत्यु स. १७५५) हा नागपूरच्या बिंबाजी भोसल्याचा मुलगा. हा पहिला रघूजी होय. हा पांडववाडीच्या राजाजीपंत कोल्हटकरांच्या वरानें झाला अशी समजूत होती. बाप लवकरच वारल्यानें हा आपली आई काशीबाईपाशीं वाईजवळ पांडववाडी येथें राही.

नंतर हा आपली चुलती सावाजीची बायको रमाऊकडे राहण्यास गेला. नंतर राणोजी नांवाच्या चुलत्याच्या लष्करांत राहिला. नंतर कान्होजींकडे व तेथून चांद सुलतानाकडे गेला. तेथूनहि एलिचपूरच्या नवाब इस्माईलखानाकडे गेला, व तेथून शाहूकडे आला. कर्नाटकच्या स्वारींत फत्तेसिंग भोसल्याबरोबर यानें उत्तम काम केलें. नंतर यानें कान्होजीजवळून सरंजामाची वांटणी घेतली (स. १७२७).

शाहूनें यास सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें व बंगालपर्यंत चौथाईचे हक्क वाढविण्याचा निर्देश करून सनद दिली. नंतर कान्होजीस पकडून शाहूकडे पाठविलें (स. १७३०); व शाहूच्या नांवें चौथाईच्या वसुलीस सुरुवात केली. हा चिमाजी पेशव्याबरोबर माळव्याच्या स्वारींत होता (स. १७२८).

नंतर यानें देवगडच्या रतनकुवर राणीस वलीशाहाविरुद्ध मदत करून त्याचा पराभव केला. पवनी, भंडारा घेऊन देवगडावर स्वारी केली. वलीशाहास कैद करून रतनकुवरचे मुलास गादीवर बसविलें. तिनें यास राज्याचा तिसरा हिस्सा व खर्चाबद्दल १० लक्ष रुपये दिले (स. १७३७). नंतर यानें आपलें ठाणें नागपूर येथें ठेवलें. पण देवगडच्या गोंडांच्या राज्यांत बंडाळी झाल्यामुळें यानें तें गोंडांचें राज्य आपणाकडे घेतलें.

यानंतर शाहूनें यास पुढील सुभ्यांवर मराठयांचा अंमल स्थापण्याचा अधिकार दिलाः लखनौ, बेदर, बंगाल, बुंदेलखंड, अलाहाबाद, पाटणा वगैरे (स. १७३८).

भोपाळच्या लढाईंत बाजीराव पेशव्यास यानें मदत केली नाहीं, तेव्हां त्यानें आवजी कवडे नांवाच्या सरदारास पाठविलें. पण यानें शाहूकडे तक्रार करतांच त्यानें पेशव्यांना याच्या मुलुखांत सरदार न पाठविण्याविषयीं सांगितलें.

हा कर्नाटकच्या स्वारींत अर्काटच्या दोस्तअलीचा पाडाव करण्यास हजर होता (स. १७४१). याबद्दल यास कान्होजीच्या वेळचा सर्व सरंजाम वगैरे देण्यांत आला.

यानें बंगालवर एकंदर चार स्वाऱ्या केल्या (स. १७४२–५१). बादशाही मुलुखावर स्वाऱ्या झाल्यामुळें नानासाहेब पेशवे बादशहातर्फे याच्याशीं लढले. पुढें देवगड व चंद्रपूर हीं संस्थानें घेतल्यावर हा पोटदुखीनें मेला (स. १७५५ डिसें. १४). तेव्हां याच्या सहा स्त्रिया सती गेल्या.

रघूजी हा त्या वेळच्या मराठे सरदारांत अत्यंत शूर होता. नागपूरकर भोसल्यांचे घराण्यांत ह्याच्याइतका कर्तृत्ववान् पुरुष दुसरा झाला नाहीं. शिपाईगिरी हा याचा मुख्य गुण होता, व त्याच मानानें हा मोकळ्या मनाचा व दिलदार मनुष्य होता. याच्या स्वभावांत मानीपणा व स्वतंत्र वागण्याची प्रवृत्ति जास्त होती.

छत्रपतींस हा ठरलेली खंडणी केव्हांहि पाठवीत नसे. यास दारू पिण्याची संवय होती. परंतु ती याच्या कर्तृत्वाच्या आड आली नाहीं.

शाहूनेंहि एका रागाचे प्रसंगीं "दारूपायीं राज्य बुडविलें" असे उद्गार याचेसंबंधीं काढले आहेत (खरे ३२९२). हा धार्मिक असून रामभक्त होता. रामटेकचें राममंदिर व घाट यानें बांधला.

रघूजीचा शिक्का रघुनाथभटाच्या बायकोच्या हातांतील पाटल्यांचा केला होता, अशी आख्यायिका आहे. तो खालीं लिहिल्याप्रमाणें होताः—

शाहुराजपदांभोजभ्रमरायितचेतसः ।
बिंबात्मजस्य मुद्रैषा राघवस्य विराजते ॥

परंतु सेनासाहेब सुभा हें पद मिळण्यापूर्वीं याचा शिक्का खालीलप्रमाणें होताः—

पार्वतीकांतविश्रांतमनसोतियशस्विनः ।
बिंबात्मजस्य मुद्रैषा राघवस्य विराजते ॥

रघूजीस जानोजी, मुधोजी, साबाजी व बिंबाजी असे चार पुत्र होते (नागपूर प्रांताचा इतिहास, पा. ५०-१०५).

अलिकडे कांहीं वर्षांपासून नागपूर येथें पहिला रघूजी ऊर्फ बाबासाहेब भोसले यांचा स्मृतिदिन मोठ्या हौसेनें व उत्साहानें पाळण्यांत येतो.

रघूजीनें 'झाडीच्या' प्रांताला सुव्यवस्थित राज्यव्यवस्था प्राप्त करून दिली, इतकेंच नव्हे, तर भंडाऱ्यापासून रायपूरपर्यंत अनेक तलाव व कालवे बांधून शेतकीच्या धंद्यास ऊर्जितावस्थेस आणलें; चंद्रपूर व नागपूर अशा ठिकाणीं संस्कृत विद्येला उत्तेजन दिलें. त्यामुळें या प्रांतांत पंडितांची एक परंपरा उत्पन्न झाली. कापडाच्या धंद्याला उमरखेड, नागपूर, एलिचपूर, बाळापूर वगैरे ठिकाणीं उत्तेजन मिळून तो धंदा ऊर्जितावस्थेस आला.

बाळाजी बाजीराव पेशवे व रघूजी भोसले यांच्या भांडणाची कटकट प्रत्यक्ष बंगालमध्यें झाली नसती तर खुद्द बहार व बंगाल प्रांतांत महाराष्ट्रराज्य स्थापन झालें असतें.

**२.** (जन्म स. १७५७–मृत्यु स. १८१६) हा नागपुरकर मुधोजी भोसल्याचा मुलगा. जानोजी भोसल्यास मुलगा नसल्यामुळें त्यानें यास दत्तक घेतलें होतें. जानोजीची बायको दर्याबाई हिनें ह्या दत्तकपुत्रास गादी न देतां ती स्वतः कारभार पाहूं लागली. नंतर ती दीर साबाजीच्या

पक्षास मिळाली व तिनें त्याचें नांवानें माधवराव पेशव्याकडून वस्त्रें आणिलीं. शेवटीं स. १७७३ त कुंभारीच्या लढाईनंतर साबाजा व मुधोजी यांचा समेट होऊन रघूजीस गादी प्राप्त झाली. रघूजीच्या लहानपणीं मुधोजी व साबाजी हेच कारभार पाहत असल्यामुळें याचें कांहींच तेज पडलें नाहीं. पुढें सवाई माधवरावाचे कारकीर्दींत याच्या नांवें सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें व नेमणूक ता. २४-६-१७७५ रोजीं रीतसर होऊन आली व रघूजी कायदेशीर रीतीनें सेनासाहेब सुभा झाला.

यास खंडोजी (चिमणाबापू) व व्यंकोजी नाना (मन्याबापू) असे धाकटे भाऊ होते.

हा व याचा भाऊ खंडोजी यांचें कधींच पटलें नाहीं, याचा फायदा घेऊन हेस्टिंग्जनें खंडूजीस वश करून घेतलें. या कलहानें दौलतीचें नुकसान होऊं नये म्हणून मुधोजीनें या दोघां मुलांकडून शपथक्रियेचीं करारपत्रें ता. २९।१०।१७७९ रोजीं लिहून घेतलीं.

यानें पेशव्यांची मर्जी संपादून व्यंकोजीस सनाधुरधरीचीं वस्त्रें मिळविलीं (स. १७८९). पुढील वर्षी खंडोजी एकाएका वारला. त्या वेळीं छत्तीसगडाकडे जमीनदारांनीं बंड उभारलें तें यानें मोडलें, व टिपूवरील मोहिमेंत हरिपंत फडक्याबरोबर आपलें सैन्य पाठवलें.

रघूजीच्या कारकीर्दीचें सर्व धोरण आपण कोणत्याहि लढ्यांत न पडतां आपल्या स्वार्थावर टपून असावें असें होतें.

सवाइ माधवरावाच्या मृत्यूनंतरहि यानें नाना फडणीसास मदत केली, यामुळें नानानें याशीं नवीन करार करून पंधरा लक्ष रुपये नगदी देवविले व गढामंडला प्रांताचा ताबा दिला.

इंग्रजांशीं लढतांना गाविलगड येथें लढाया होऊन तेथेंहि भोसल्यांचा पराभव झाला. गड व त्यांतील भोसल्यांची सारी दौलत इंग्रजांच्या हातीं लागली.

स. १७९५ त खर्ड्याचे लढाईंत हा स्वतः हजर होता.

ता. १७-१२-१८०३ रोजीं इंग्रज व भोसले यांचा तह झाला. या तहानें ओरिसाप्रांत इंग्रजांस कायमचा दिला गेला व छत्तीसगड भोसल्यास परत मिळाला.

पुढें २४ ऑगस्ट १८०६ रोजीं रघूजीनें सर जॉन शोअरशीं निराळा तहनामा केला; त्यांत पाटणा व संबळपूर हीं संस्थानें यास परत मिळालीं. पण एकंदर भानगडींमुळें हा फार कर्जबाजारी झाला व खंडण्या बंद होऊन याची सर्व सत्ता संपुष्टांत आली.

रघूजी ता. २२-३-१८१६ त मरण पावला. त्या वेळेस याचे अंथरुणाखालचे गालिचास एक यंत्र बांधलेलें सांपडलें. त्यावरून यास व्यंकोजीचा मुलगा अप्पासाहेब यानें मारविलें असाहि प्रवाद त्या वेळीं निघाला होता. रघूजीस परसोजी ऊर्फ बाळासाहेब नांवाचा मुलगा होता. त्यास पुढें से. सा. सु. चीं वस्त्रें मिळाला.

याचा बांधा ठेंगणा असून हा जरा लठ्ठ होता. आपल्या मुलींवर व पुतण्यावर हा अतिशय प्रेम करी. हा अत्यंत मातृभक्त होता. काम करण्यांत हा अतिशय वाकबगार असून मेहनती होता. प्रत्येक गोष्टींत हा स्वतः लक्ष घालीत असे. तासांचे तास हा हिशेबांचे आंकडे मोडण्यांत घालवी. हा अत्यंत धार्मिक असून हिंदुधर्माचा नित्य कृत्यें फार काळजीनें करी. हा कांहींसा लोकप्रिय होता व एखादी गोष्ट घडवून आणण्याचे कामीं चतुर होता; परंतु पैशाचा संबंध आला म्हणजे याचें वर्तन कृपण असे. यानें चिन्नूर येथें 'सोमयाग' केला होता.

**रझिया गुलाम**—(स. १२३६-३९) ही दिल्लीचा बादशहा शम्सुद्दीन अल्तमशची मुलगी. हिच्या बापानें हिला गादीवर बसविण्याविषयीं सरदारांस सांगितलें होतें, पण स्त्रीस गादीवर बसविणें अपमानास्पद आहे असें ठरवून त्यांनीं फीरूझ नांवाच्या मुलास तख्तावर बसविलें. पण पुढें त्याचा खून होऊन हिला गादी मिळाली. ही लोकप्रिय असल्यामुळें प्रथम सरदारांनीं गादीवर बसण्याची संमति दिली. पण पुढें स्त्रीचें आधिपत्य दुःसह वाटूं लागलें व हिच्याविरुद्ध कट होऊं लागले. हिनें जलालुद्दीन याकूब नांवाच्या एका आफ्रिकेंतून आलेल्या गृहस्थास घोडदळावरील मुख्य सेनापति नेमिलें. परंतु सरदारांना हिनें नेमलेल्या आफ्रिकन मनुष्याची बढती झालेली न खपून, त्यांनीं दिल्लीच्या सिंहासनास यापुढें आपण राजनिष्ठ राहणार नाहीं असें जाहीर केलें. सरदारांना पुढें असें वाटलें कीं हिचा व याकूबचा कांहींतरी नाजूक प्रेमसंबंध असावा. म्हणून अल्तूनियस नांवाच्या सरदारानें हिच्याविरुद्ध बंड केलें व हिला कैद करून याकूबचा खून केला, व शम्सुद्दीन अल्तमशचा तिसरा मुलगा मुइझ्झुद्दीन बहरामास गादीवर बसविलें. पण पुढें मुलतानचा सुभेदार अल्तूनियास मानसन्मानाची जागा दिल्लीच्या राजकारणांत न मिळाल्यामुळें त्यानें हिच्याशीं लग्न करून, मोठें सैन्य जमा केलें व आपल्या नूतन बायकोस दिल्लीचे तख्तावर पुन्हां बसविण्याचे उद्देशानें दिल्लीवर स्वारी केली. पण तींत त्याचा मोड होऊन तो मारला जाऊन हिचा खून झाला. ही पुरुषी वेष घालून दरबारांत राजकारणाचें काम पुरुषांत बसून करीत असे.

**रणचोड कृष्ण**—( स. १७५८–८४ ) मराठ्यांचा वकील म्हणून हा मुंबईच्या इंग्रजांकडे होता. जातीनें सारस्वत ब्राह्मण असून मुंबईच्या संझगिरी घराण्यांतील होय. हा शिवाजी रणचोडाचा पुतण्या असावा.

याची पत्रव्यवहाराची पद्धत फार निराळी होती. आपला पत्रव्यवहार जर यदाकदाचित् दुसऱ्याचे हातीं पडला, तर त्याला त्या पत्राचा खरा अर्थबोध होऊं नये, म्हणून यानें कांहीं गोष्टींना संक्षिप्त नांवें दिलेलीं होतीं. डेव्हिड स्कॉट, थॉमस गॉडर्ड, जनरल ड्रेपर व मुंबईचा गव्हर्नर हॉर्नबी यांना ओळखण्याकरितां अनुक्रमें शुक्र, शनि, राहु आणि केतु या ग्रहांचा हा उपयोग करी. तसेंच हा राशी व तिथि यांचा उपयोग करीत असे. उदाहरणार्थ, सिंह, कन्या, तूळ आणि कुंभ म्हणजे पुणें, मद्रास, सुरत आणि इंग्लंड. त्याचप्रमाणें सप्तमी म्हणजे फत्तेसिंग गायकवाड होय. तसेंच यानें मुंबई, डच व घोडेस्वार यांचा अर्थबोध होण्यासाठीं अनुक्रमें शोणितपूर, वज्रयोग आणि मृत्युयोग यांसारखे नवीन शब्द शोधून काढले. याच्यानंतर याचा मुलगा रघुनाथ हा इंग्रजांकडील वकिलीचें काम करूं लागला.

**रणछोडजी दिवाण**—( जन्म स. १७६८–मृत्यु स. १८४१ ) हा कवि काठेवाडमध्यें फार प्रसिद्ध आहे. हा मूळचा जरी नागर ब्राह्मण होता तरीं ह्यास युद्धकलेविषयीं बरीच माहिती असल्याचें दिसतें. कर्नल वॉकरनें ज्या वेळीं काठेवाडांतील बंडाळी मोडली, त्या वेळीं यानें आपल्या शिपाईगिरीचा राजीनामा देऊन लेखणी हातीं धरली. हा बुद्धिवान् व विद्वान् यांचा आधार होता. यानें 'तारीख-इ-सोरठ' व 'रुकात-इ-गुणागुण' नांवाचे दोन ग्रंथ लिहिले. शिवरहस्याचें यानें व्रजभाषेंत भाषांतर केलें आहे. यांखेरीज याचीं 'चंडीपाथना गर्भा', 'शिवगीता' इत्यादि काव्यें प्रसिद्ध आहेत.

**रणछोड भगत**—एक गुजराथी कवि. गुजराथेंतील तोरणा गांवचा राहणारा. जात गूढवार्णी. यानें गुजराथींत सीता–मारुतीसंवाद व रावणमंदोदरीसंवाद लिहिला आहे ( का. दो. ).

**रणजितसिंग**—(जन्म स. १७८०–मृत्यु स. १८३९) पंजाबांतील शीख लोकांचा राजा. स. १७८० च्या सुमारास याचा जन्म झाला. अहमदशाहा अबदालीनंतर पंजाब प्रांत पुन्हां शिखांच्या ताब्यांत आला. परंतु त्यांचीं लहान लहान राज्यें निर्माण होऊन त्यांत नेहमीं मारामाऱ्या व तंटे लागत.

महासिंगानंतर त्याचा मुलगा रणजितसिंग हा वयाच्या १३ व्या वर्षी गादीवर आला. यानें आपल्या शौर्यानें आपल्या वयाच्या १९ व्या वर्षी सर्व शीख राजांचें आधिपत्य आपणाकडे घेतलें. यानें स्वतःस राजा ही पदवी मिळविली. स. १८०२ सालीं अमृतसर जिंकलें. यमुनेपर्यंत आपला राज्यविस्तार व्हावा या इच्छेनें यानें स. १८०६ सालीं लुधियाना घेतलें. नाभा व पतियाळा या दोन संस्थानांमधील भांडणाचा फायदा घेऊन यानें सतलज ओलांडून सरहिंद प्रांतीं खंडणी गोळा केली. इंग्रजांसहि याची भीति वाटत होती. तेव्हां मेट्काफ यास पाठवून त्यांनीं रणजितसिंगाशीं तह केला. या तहानें त्यांची हद्द सतलज नदी ठरली; व इंग्रजांचें लुधियानास लष्कर राहिलें. यानें हा तह शेवटपर्यंत पाळला. म्हणून इंग्रज याला आपला जिवलग दोस्त म्हणत. यानें स. १८२३ त पेशावर प्रांत जिंकला. परंतु हा प्रांत परत देण्याबद्दल दोस्तमुहंमदानें इंग्रजांजवळ मागणी केली. परंतु इंग्रज यास भीत असल्यामुळें त्यांनीं यास तो प्रांत देण्याबद्दल आग्रह केला नाहीं. यानंतर या दोघांनीं दोस्त मुहंमदावर स्वारी करून शहासुजास काबूलच्या गादीवर बसविलें. यानंतर दोन वर्षांनीं हा वारला (स. १८३९). यानें ४० वर्षे अव्याहत श्रम करून शिखांत लष्करी सामर्थ्य उत्पन्न केलें व त्यांचें राष्ट्र उत्तम भरभराटीस आणलें. हा वारला असतां इंग्रजांच्या दिल्ली, आग्रा, अलाहाबाद व इतर मुख्य छावण्यांतून याच्या वयाच्या संख्येइतक्या ( ५९ ) तोफा याच्या सन्मानार्थ सोडण्यांत आल्या. याच्या राण्यांपैकीं चौघीजणी व सात नाटकशाळा या सती गेल्या. याला शेवटीं अर्धांगवायूचा झटका झाला. याच्या शेवटच्या मरणाच्या वर्षांत पूर्वीसारखा दरारा राज्यांत राहिला नाहीं. हा फार शूर, मुत्सद्दी व युद्धशास्त्रांतील जाणता होता. सर लॉवेल ग्रिफीन म्हणतो, "रणजितनें आपलें राज्य लष्करी दराऱ्यावर व शिस्तीवर स्थापन केलें; याचा राज्यकारभार व्यवस्थित होता. परंतु याच्यामागें हे गुण कोणाच्याच अंगीं नसल्यानें, याचा एकट्याचा पाठिंबा गेल्याबरोबर, सहा वर्षांत शिखांचें राज्य ढांसळून पडलें." यानें या शिखखालसा (सैनिक)मध्यें उत्तम पायदळ, सुव्यवस्थित घोडदळ व चांगला तोफखाना यांची भर घातली. याचे बहुतेक सर्व लष्करी अम्मलदार इटालियन अथवा फ्रेंच असत. वेंचुरा, अलार्ड व ॲव्हिटेबिलो हे तीन सेनापति तर प्रसिद्ध नेपोलियनच्या हाताखालीं शिक्षण घेतलेले होते. स. १८४५ मध्यें ८८६६२ शीख सैन्य असून त्यांत ४८४ तोफा व ३०८ उंटांवरील जेजाला होत्या.

हा आपले अधिकारी कोणच्याहि जातींतून निवडी. केवळ लायकी हेंच याच्याकडे नोकरी मिळण्याचें साधन असे.

याची जमाबंदी, मुलकी व्यवस्था, जकात किंवा इतर राजकीय व्यवस्था तात्त्विक पद्धतीवर उभारलेली नव्हती. केवळ लष्करी बळावर याचें राज्य चाललें होतें.

रणजितसिंगमहाराज हे अटक नदी उतरून पलीकडे जाऊं लागले तेव्हां त्यांचा गुरु येऊन म्हणूं लागला कीं, 'अटकेपर्यंत मात्र हिंदूंस जाण्याची मर्यादा आहे.' तेव्हां यानें उत्तर दिलें कीं,

सब भूमि है गोपालकी, इसमें अटक कहा।
जिसके मनमें खटक रही, वोही अटक रहा ॥

सारांश–'सर्व पृथ्वी देवाची असून तिच्यांत कोठेंहि जाण्यास हरकत नाहीं. ज्याच्या मनांत संशय आहे तोच थांबून राहिला आहे.' असा जबाब यानें दिला आणि सर्व अफगाणिस्थान जिंकलें ( लोकहितवादी २९४ ).

२. ( चरणदास पाहा ).

**रणदुल्लाखान**—(मृत्यु स. १६४३) हा विजापूरच्या आदिलशाही घराण्यांतील मुहम्मद आदिलशाहाचा प्रसिद्ध सरदार. याच्या पित्याचें नांव फरादखान ( शि. भा. ९. ३२). हा कर्नाटकाचा सुभेदार होता. यानें बंगलोरच्या वीरभद्र राजाचा पराभव केला व त्या जहागिरीची व्यवस्था शहाजीकडे सोंपविली ( वीरभद्र पाहा ). याच्या हाताखालीं शहाजीनें पुष्कळ पराक्रम करून बंगलोर प्रांत विजापूरच्या बादशहाकडून जहागीर मिळविला ( स. १६३७–३९ ). रहिमतपूर येथें कबरीवर याच्या मृत्यूचें सालहि आहे ( प. सा. ४८८ ). याच्या मुलास धाकटा रणदुल्ला किंवा रुस्तुमजमा असें म्हणत.

२. ( रुस्तुमजमा पाहा ).

**रणदेवी**—परबल राष्ट्रकूटाची मुलगी व धर्मपालाची पत्नी.

**रणधरसिंह**—(स.१८२०–१८९४) एक हिंदी कवि. हा संग्रामसिंहाचा नातू असून गजराजसिंहाचा पुत्र होय. स.१८५७सालच्या बंडांत यानें इंग्रजांना मदत केली म्हणून याला राजाबहादूर किताब मिळाला. हा धाडसी, उदार आणि प्रजाहितैषी होता. यानें पांच ग्रंथ केले. नामार्णव, काव्यरत्नाकर, सालीहोत्र, भूषणकौमुदी व राममाला हे ते पांच ग्रंथ होत. याच्या भूषणकौमुदी आणि काव्यरत्नाकर या दोन ग्रंथांची विशेष प्रशंसा आहे. हा अयोध्या येथें मरण पावला ( क. कौ. भा. १ ).

**रणराग ( पश्चिम ) चालुक्य**—(स. ५२५ सुमार) पश्चिम चालुक्यांपैकीं पहिल्या जयसिंहाचा धाकटा पुत्र. याचा पुत्र पुलकेशी किंवा पुलिकेशी. हा पुलकेशी बदामीच्या चालुक्य घराण्याचा संस्थापक होय.

**रणसिंह गुहिलोत**—( स. ११५८–६८ ) हा विक्रमसिंहानंतर मेवाडच्या गादीवर आला. याला कर्णसिंह किंवा कर्ण असेंहि म्हणत. आबूच्या शिलालेखांत याचें नांव सोडलें आहे. पण राणपूर व कुंभलगड येथील शिलालेखांत याचें नांव रणसिंह असें मिळतें. राणा कुंभकर्णाच्या वेळीं एकलिंगमाहात्म्य तयार झालें. त्यांत याचें नांव कर्ण असें दिलें आहे. आणि पुढें म्हटलें आहे कीं याच्यापासून रावळ व राणा अशा दोन शाखा सुरू झाल्या. रावळशाखेंत जितसिंह ( जैत्रसिंह ), तेजसिंह, समरसिंह व रत्नसिंह, तसेंच राणाशाखेंत माहप व राहप आदि झाले. रावळशाखेचे लोक मेवाडचे राजे झाले व राणाशाखेचे लोक सीसोदें येथील जहागिरदार झाले. ते सीसोदें येथें राहत होते म्हणून सीसोदीये असें म्हणूं लागले. रावळशाखेची समाप्ति अलाउद्दीन खल्जीनें वि. सं. १३६० ( स. १३०३ ) मध्यें रत्नसिंहापासून चितोड घेतल्यावर झाली. याच्यानंतर बऱ्याच वर्षांनीं सीसोदियांपैकीं राणा हंमीरानें चितोड घेऊन मेवाडमध्यें आपलें राज्य स्थापन केलें.

एकलिंगमाहात्म्यांत यानें आहोरच्या पर्वतावर एक किल्ला बांधल्याचें लिहिलें आहे. याच्यामागून क्षेमसिंह गादीवर आला.

**रतन कवि**—( जन्म स. १७४१–कविताकाल स. १७७३ ) हा हिंदी कवि श्रीनगर (गढवाल) फत्तेशाहाच्या पदरीं होता. फत्तेभूषण व अलंकारदर्पण हे याचे साहित्यावरील ग्रंथ होत.

**रतनकुंवर**—(स. १६३७) देवगडच्या चांद सुलतान नांवाच्या गोंड राजाची पत्नी. हिनें रघूजी भोसल्याच्या मदतीनें दासीपुत्र वलीउल्लास पदच्युत करून आपला मुलगा बुर्हाणशाहास गादीवर बसविलें.

**रतनचंद**—( खून स. १७२० नवं. २३ ) सय्यद बंधूंपैकीं अबदुल्ला सय्यदाचा साहाय्यक मुत्सद्दी.

**रतनसिंग**—( मृत्यु स. १६५८ ) हा रतलाम या संस्थानचा संस्थापक होय. हा उदेसिंगाचा पणतू होय. यानें एकदां दिल्लीच्या रस्त्यांत नुसत्या एका कट्यारीनें एक मस्त हत्ती मारला. तेव्हांपासून शहाजहान बादशहाची याच्यावर फार मर्जी बसली, व बादशहानें यास ५२ लक्षांची जहागीर दिली. याच वेळेस रतनसिंगास मुख्य सेनापति करून महाराजा ही पदवी दिली. पुढें हा

स. १६५८ त धरमतपूर ( फत्तेहाबाद ) येथील लढाईंत मारला गेला.

२. ( स. १६२४ ) बुंदी संस्थानचा राजा. शहाजहाननें बंड केलें तेव्हां यानें जहांगीरला मदत केली.

**रत्नकंठ**—( स. १६८० सुमार ) युधिष्ठिरविजय-टीका व स्तुतिकुसुमांजलिटीका यांचा कर्ता.

**रत्नकीर्ति**—( स. ९४०–१००० सुमार ) हा विक्रमशिला विश्वविद्यालयांत अध्यापक होता. हा रत्नाकर-शांतीचा गुरु. विमलचंद्र राजाचा आश्रित असलेला रत्न-कीर्ति याहून भिन्न होय ( स. ६६० ). ग्रंथ–अपोहसिद्धि, क्षणभंगसिद्धि, स्थिरसिद्धिदूषण, चित्ताद्वैतासिद्धि.

**रत्नचंद्र**—( स. १६१२–२७ ) शांतिचंद्राचा शिष्य. रघुवंश व नैषध या काव्यांवरील टीकाकार. याचे ग्रंथ–नैषधीयनिवृत्ति ( रचनाकाल स. १६१२ ), रघुवंशटीका ( स. १६१२–२७ ), हितोपदेश ( स. १६२१ ), भक्तामरस्तोत्र ( स. १६२७ च्या पूर्वी ), अध्यात्मकल्पद्रुमवृत्ति ( स. १६१८ ).

**रत्नधर**—काशीमाहात्म्य ग्रंथाचा कर्ता.

**रत्नप्रभसूरि**—( स. ११८१ ) जैन श्वेतांबर तत्त्वज्ञ. यानें 'प्रमाणनयतत्त्वालोकालंकार' या ग्रंथावर 'स्याद्वाद-रत्नावतारिका' टीका लिहिली. शिवाय 'उपदेशमालावृत्ति' नांवाचा ग्रंथ लिहिला. १ मुनिचंद्रसूरि, २ देवसूरि, ३ भद्रेश्वरसूरि व ४ रत्नप्रभसूरि अशी गुरुपरंपरा यानें दिली आहे ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ५० ).

**रत्नवज्र**—(स. ९७९–१०००) बुद्धतर्कज्ञ. काश्मीरी ब्राह्मण. पिता–हरिभद्र. विक्रमशिला येथें विद्वान् म्हणून याचा बहुमान झाला. ग्रंथ–युक्तिप्रयोग, फक्त तिबेटी भाषांतर उपलब्ध आहे ( हि. इं. लॉ. पा. ३३९–४० ).

**रत्नमंडनगणि**—( मृत्यु स. १४६० ) एक जैन यति. यानें 'सुकृतसागर' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. त्यांत धारचा शेवटला जयसिंह परमाराचा प्रधान पृथ्वीधर किंवा पेथडकुमार या जैन गृहस्थाच्या सत्कृत्याचें वर्णन केलें आहे.

**रत्नसिंह गुहिलोत**—( स. १३०३ ) समरसिंहानंतर त्याचा पुत्र रत्नसिंह गादीवर आला. हा गादीवर येऊन सहा महिने होतात तों अलाउद्दीन खल्जीनें चितोडवर स्वारी केली. सहा महिने लढल्यानंतर अन्नसामग्री संपल्यामुळें चितोड शत्रूच्या हातीं लागला. याची स्त्री सुप्रसिद्ध पद्मिणी होय.

( ता. २८ जानेवारी स. १३०३ ) रोजीं अलाउद्दीन निघाला आणि ( ता. २६ ऑगस्ट स. १३०३ ) किल्ला सर झाला. राजा पळाला पण मागाहून शरण आला, म्हणून वांचला, असें तारिख–इ–अलाईचा कर्ता अमीर खुसरो लिहितो. तो स्वतः लढाईंत होता.

पद्मिणीचा महाल व तलाव अद्यापि दाखविण्यांत येतात. पण तिच्या संबंधींच्या कथा ऐतिहासिक स्वरूपापेक्षां काव्यस्वरूपांत विशेष आल्या आहेत.

हा लढत असतां धान्य संपल्यामुळें याला किल्ला खाली करण्याची वेळ आली. या गडबडींत हा मारला गेला. तेव्हां पद्मिणी वगैरे कांहीं स्त्रियांनीं पावित्र्यरक्षणार्थ आपला देह अग्नीला अर्पण केला.

पण काव्य, ख्यात किंवा ऐतिहासिक म्हणून समजल्या जाणाऱ्या ग्रंथांत पद्मिणीचें सौंदर्य, अलाउद्दीनाची तिच्याबद्दलची अभिलाषा, रत्नसिंहाचा तुरुंगवास व त्यांतून सोडविण्याकरितां पद्मिणीचा त्याग व चातुर्य यांसंबंधीं अनेक कथा आढळतात. त्याबद्दल ऐतिहासिक पुरावा विश्वास बसेल असा उपलब्ध नाहीं.

अलाउद्दीनानें चितोड घेतल्यानंतर तो आपला थोरला मुलगा खिजरखां यास देऊन किल्ल्याचें नांव खिजराबाद असें ठेविलें. तेथें खिजरखां एक वर्षपर्यंत होता, असें फिरिश्ताच्या लिहिण्यावरून दिसतें. पण इतर पुराव्यावरून सुमारें दहा वर्षे चितोडला तो राहिला आणि नंतर जालोरच्या मालदेवाच्या ताब्यांत चितोड देऊन तो दिल्लीला निघून गेला. ही गोष्ट स. १३१३–१६ पर्यंत झाली असावी.

२. ( स. १५२८–३१ ) मेवाडच्या सांगा राण्याचा पुत्र. हा त्याच्या मृत्यूनंतर गादीवर आला ( स. १५२८ फेब्रु. ५ ). याची आई (हाडी) कर्मवती ही आपला पुत्र विक्रमादित्य यास राज्यावर आणूं इच्छीत होती. उलट राणा सांगानें त्याला रणथम्भोरचा किल्ला व पन्नाससाठ लाखांची जहागिरी दिली. याबद्दल याच्या मनांत आढी होती. म्हणून यानें राज्यावर आल्यावर त्यांना चितोडला बोलावलें. पण त्यांनीं चितोडला येण्याचें नाकारलें व दहशत बसण्याकरितां बाबरशीं वाटाघाटी सुरू केल्या. पण याचा परिणाम विरोध वाढण्यांत झाला.

याच वेळीं गुजराथच्या बहादुरशहानें मांडूवर स्वारी करून महमूदला कैद केलें व माळव्याचें राज्य आपल्या राज्यांत सामील केलें. याला आधींच नजराणा देऊन त्यानें गप्प बसविलें होतें. याच्या वेळीं याचा प्रधान कर्मसिंह ( कर्मराज ) यानें शत्रुंजयाचा सातवा उद्धार केला. तसेंच पुंडरीकाच्या मंदिराचा उद्धार करून त्यांत आदिनाथाच्या मूर्तीची स्थापना केली. याच्या तांब्याच्या नाण्यावर

'राणा श्रीरतनसिंह' असा लेख आहे. याला हाडी कर्मवतीचा भाऊ सुरजमल्ल यानें दग्यानें मारलें असें मुहणोत नैणसी म्हणतो.

**रत्नाकर**—काव्यालोचन ग्रंथाचा कर्ता.

**२.** ( स. ८०० सुमार ) काश्मीरच्या चिप्पड जयापीडाचा आश्रित. पिता अमृतभानु. यास बालबृहस्पति म्हणत. अवन्तिवर्म्याच्या वेळीं याची विशेष प्रसिद्धि झाली. याचे ग्रंथ-रामचरित, कादंबरीकथासार, ध्वनिशास्त्र-टीका व हरविजयकाव्य. हरविजयावर अलकाची संस्कृत टीका आहे.

**३.** बत्तीस-लक्षण-टीकेचा कर्ता. एक महानुभाव.

या बत्तीस-लक्षण-टीका ग्रंथांत, सूत्रपाठांतील व वेदांतावरील बत्तीस सूत्रांचा संग्रह केला आहे. मूळ चक्रधरांचें सूत्र, त्यावर भीष्माचार्यांचें भाष्य आणि त्यानंतर रत्नाकराची टीका, अशी या ग्रंथांची संगती आहे ( मं. त्रैमासिक, श. १८४२, अ. २।३, पृ. २३ ).

**रत्नाकरपंत राजाज्ञा**—( स. १७८३-१८१२ ) हा एक कोल्हापूरकर छत्रपतींचा कारभारी होय. याच्या पूर्वीचा कारभारी येसाजी कुसाजी. तो स. १७८३ मध्यें मरण पावल्यावर कोल्हापूरचा कारभार हा पाहूं लागला.

हा रामाजीपंताचा मुलगा. याचें उपनांव सरवळे असून मूळ ठिकाण वाळवें तालुक्यांतील ( जि. सातारा ) ऐतवडें गांव होय. हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण असून भारद्वाजगोत्री होता. याचा वंश कोल्हापुरांत विद्यमान आहे.

याला 'राजाज्ञा' पद मिळून हा सर्व कारभार पाहूं लागला. ता. २४-४-१८१२ रोजीं कोल्हापूरचा छत्रपति शिवाजीमहाराज वारला, तोंपर्यंत हा कारभारावर होता. अनेक अडचणींतून कोल्हापूर राज्याचा निभाव लागल्याबद्दल याची वाहवा झाली आहे. हा निरिच्छ व स्वामिहितदक्ष असून यजमान इनाम देत होते तें सुद्धां यानें घेतलें नाहीं. याबद्दल रामशास्त्र्याप्रमाणें याचा लौकिक कोल्हापूरांत गाजतो. असले बाणेदार पुरुषच कोणत्याहि राष्ट्राचे आधारस्तंभ होत. रत्नाकरपंत कोल्हापूरकर तिसरे शिवाजीमहाराजांचे पदरीं उदयास आला.

**रत्नाकरशान्ति**—( स. १०४० सुमार ) बुद्ध तर्कज्ञ. याचें दुसरें नांव कलिकालसर्वज्ञ. हा ओदन्तपूर व विक्रमशिला येथील शाळांवर शिक्षक व व्यवस्थापक म्हणून होता. यानें जेतारि व रत्नकीर्ति यांच्यापासून सूत्रांचें व तंत्रांचें अध्ययन केलें. सिलोनमध्येंहि यानें धर्मप्रसार केला. याचे ग्रंथ-छंदोरत्नाकर, विज्ञप्तिभागसिद्धी व अंतर्व्याप्ति ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ३४२-४३ ).

**रत्नाकरस्वामी**—( समाधि स. १७१९ ) 'दीपरत्नाकर' ग्रंथाचा कर्ता. याचें उपनांव सदाव्रते असून गोत्र भार्गव. याच्या बायकोचें नांव सावित्रीबाई. हा चंडीपूरचा राहणारा. हा प्रथम अविंधाच्या नोकरीस राहिला होता. परंतु याला रामानंदाच्या सांप्रदायाचा अनुग्रह झाल्यामुळें यानें ती नोकरी सोडून हा संन्यस्त झाला; व पुढें यानें पानखेड या गांवीं आपल्या गुरूच्या सन्निध समाधि घेतली. याच्या गुरूचें नांव सिद्धानंद. नाशिक जिल्ह्यांतील कळवण येथें याच्या परंपरेचा एक मठ आहे.

स्वामींनीं रचिलेल्या ग्रंथांपैकीं कांहीं खालील होतः

१ सिद्धान्तरत्नाकर, २ वैराग्यरत्नाकर, ३ उपदेशरत्नाकर, ४ प्रकाशरत्नाकर, ५ निश्चयरत्नाकर, ६ निःसंदेहरत्नाकर, ७ भिक्षुगीत, ८ विश्वरूपनमन, ९ ब्रह्मानुभावस्तोत्र, १० सद्गुरु-अष्टक, ११ संगमचरित्र, १२ ॐकारवर्णन, १३ रत्नाकरउपदेश (मं. अहवाल शके १८३४).

**रन्न**—( जन्म स. ९४९-१००० सुमार ) कानडी कवि. जैनधर्मी होता. बेळगुरी देशांतील मृदु वोळल हें याचें गांव होय. जन्म स. ९४९. हा बांगड्या विकणारा कासार ( वैश्य ) होता. आई-अब्बलब्बे, पिता-जिनवल्लभेंद्र, गुरु-अजितसेनाचार्य, आश्रय-चामुंडराय. यास दुसऱ्या तैलपाश्रिम चालुक्यानें (स.९७३-९९७) कविचक्रवर्ति अशी पदवी दिली होती. याला तैल-पुत्र सत्याश्रयाकडून आश्रय होता (स. ९९७-१००९). ग्रंथ-अजितपुराण, साहसभीमविजय, रन्नकंद (कोश) (स.९९३). परशुरामचरित, चक्रेश्वरचरित, असेहि दोन ग्रंथ यानें लिहिले, असें अजितपुराणाच्या शेवटल्या भागावरून दिसतें. साहसभीमविजयामधील एका निर्देशावरून चक्रेश्वरचरित हा ग्रंथ गंगाचा सेनापति चामुंडराय याचा याला आश्रय असावा व त्याला उद्देशूनच तें काव्य यानें केलें असावें. पण शेवटले दोनहि ग्रंथ उपलब्ध नाहींत ( क. क. च. भा. १, पा. ६२ ). याची कविता मधुर व प्रवाही आहे. साहसभीमविजय हें काव्य चंपूरूप आहे. यांत भीमानें दुर्योधनाशीं केलेल्या गदायुद्धाचें वर्णन आहे. यानें सत्याश्रयाचें भीमाशीं साम्य वर्णिलें आहे. हा कवि वीररसाबद्दल प्रसिद्ध आहे.

**रफीउश्शान मोगल**—( मृत्यु स. १७१२ ) दिल्लीच्या बहादुरशहाचा हा मुलगा होय. याला जहानदारशाहा अझीमुउश्शान व जवानबख्त असे भाऊ होते.

**रफी-उद्-दर्जत मोगल**—( मृत्यु स. १७१९ ) दिल्लीच्या पहिल्या बहादुरशहाचा नातू व रफीउश्शानचा मुलगा. याला रफिउद्दौला व मुहम्मद इब्राहिम असे दोन भाऊ होते.

**रफीउद्दौला**—( रफी-उद-दर्जते पाहा ).

**रमाऊ**—( मृत्यु स. १७५७ ) सावाजी भोसल्याची बायको. हिला रघूजीचा लळा होता.

**रमाबाई**—( स. १४९७ सुमार ) मेवाडच्या कुंभराण्याची मुलगी व सोरठच्या मंडलिक यादवाची पत्नी.

**रमावल्लभदास**—( जन्म स. १६१० ) हा दौलताबादच्या अंबाजीपंत ऊर्फ ममाजीपंत राळेरासकराचा पुत्र असून ह्याचें प्रथम तुकोपंत हें नांव होतें. पुढें विरक्त होऊन लक्ष्मीधराचा अनुग्रह घेतल्यावर वरील नांव यास प्राप्त झालें. याचे ग्रंथ-दशकनिर्धार, शंकराचार्यांच्या बृहद्वाक्यवृत्तीवर 'वाक्यवृत्ति' व गीतेवर 'चमत्कारी' नांवाच्या टीका ( स. १६३३ ते ३६ ). श्रीकृष्णजयन्तीव्रतकथा. यांशिवाय वैष्णवगीत वगैरे कांहीं अभंग व पदें आहेत. याचा संप्रदाय गोमांतकांत फार आहे. याची प्रमुख शिष्या आवडाबाई उभयकर. याचा मठ व परंपरा कारवार जिल्ह्यांत मौजे चंदावर येथें अजून आहे (महाराष्ट्रसारस्वत, भा. १, पा. ३०९-१०). याचे प्रसिद्ध तीन शिष्य-लक्ष्मीदास, कृष्णदास व कान्हायी.

**२.** मराठी साधु व कवि. रामजोशांचा पूर्वज व सोलापूरच्या रायरासकरांचा मूळ पुरुष. हा मोठा सावकार व कृष्णभक्त होता.

**रवळोव्यास**—( स. १३३२ ) हा महानुभावपंथी असून हिरांबा या विदुषीचा पट्टशिष्य होता. यानें सह्याद्रिवर्णन हा ग्रंथ लिहून तिला अर्पण केला. या ग्रंथांत श्रीदत्तात्रेयचरित्र, व सह्याद्रींतील कांहीं स्थलांचें धार्मिक माहात्म्य वर्णिलें आहे.

**रविकीर्ति**—( स. ६३४ ) एक जैन कवि. हा दुसऱ्या पुलकेशीच्या पदरीं होता. यानें त्याचा ऐहोळ शिलालेख लिहिला. हा आपणांस कालिदास व भारवि यांच्या बरोबरीचा मानतो. ऐहोळ याचा कानडी उच्चार 'अय्यावोळे' असा आहे. हें स्थळ बदामीपासून ईशान्येस पंधरा मैलांवर आहे. येथील शिलालेख एका जैनमंदिरावरील शिलाखंडावर स. ६३४ मध्यें कोरलेला आहे.

**रविगुप्त**—( स. ७२५ सुमार ) या बुद्ध तर्कज्ञाचा व कवीचा जन्म काश्मीरांत झाला. तंत्रशास्त्र यास उत्तम अवगत होतें. यानें काश्मीरांत व मगधांत एकंदर १२ पाठशाळा स्थापन केल्या. वारेंद्र येथील हर्ष राजाचा हा समकालीन असून न्यायमंजरीचा कर्ता जयंताच्या पूर्वी होऊन गेला. याचा शिष्य सर्वज्ञमित्र होय. स. ७५४ मधील वसंतसेनाच्या शिलालेखांत यास सर्वदण्डनायक व महाप्रतिहार असें म्हटलें आहे. यानें 'प्रमाणवार्तिकवृत्ति' नांवाचा तर्कशास्त्रावर एक ग्रंथ लिहिला. या ग्रंथाची मूळ संस्कृत प्रत उपलब्ध नाहीं. परंतु तिबेटी भाषांतर मात्र उपलब्ध आहे ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पृ. ३२२-२३ ).

**रविवर्मा कदंब**—( स. ५००-५३७ ) मृगेश कदंबाचा पुत्र. हा बापानंतर गादीवर आला. यानें कांचीच्या चण्डदण्ड पल्लवाला हांकून देऊन पचाशिका येथें घराण्याची पुन्हां स्थापना केली.

**रविवर्मा कुलशेखर**—(स. १२७५-१३१० सुमार) केरळ प्रांतांतील एक राजा व जयसिंह यदूचा पुत्र. गादीवर आल्यावर कुलशेखर पांड्यानें याचा जिंकलेला मुलूख यानें परत मिळविला ( हिस्टरी ऑफ केरल ).

**२.** मलीक काफूरच्या स्वारीचा फायदा घेऊन यानें पांडयांचा पराभव केला व कांजीवरम घेतलें. पुढें स. १३१६ त यास प्रतापरुद्र काकतीयानें तेथून हाकून दिलें व तेथें मानवीर यास ठेविलें.

**रविसूनु**—'त्रिपुरदहन' या संस्कृत काव्याचा कर्ता.

**रसखान**—(स. १५८३-१६२८) दिल्लीचा पठाण सरदार व हिंदी कवि. हा कृष्णभक्त असून गोस्वामी विठ्ठलनाथाचा शिष्य होय. याचे ग्रंथ-'प्रेमवाटिका' व 'सुजानरसखान.' याच्या सुंदर कवित्वामुळें हिंदी भाषेंत उत्तम कविता या अर्थानें रसखान हा शब्द रूढ आहे.

**रसनिधि**—( स. १६६० सुमार ) दतिया येथील जमीनदार व एक हिंदी कवि. मूळ नांव-पृथ्वीसिंह. यानें शृंगारप्रधान 'रतनहजारा' हा ग्रंथ लिहिला. यांत 'बिहारी सत्सई'चें अनुकरण केलेलें दिसतें.

**रसभनान्दि**—( स. ८५० सुमार ) दिगंबरपंथी जैन तर्कज्ञ. यानें बुद्ध तर्कज्ञ धर्मकीर्तिच्या 'समबंधपरीक्षा' या ग्रंथावर 'समबंधोद्योत' या नांवाची एक टीका लिहिली आहे ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पृ. १९४ ).

**रसलीन**—( जन्म स. १६८९ ) बाबरचा पुत्र व विलग्राम ( जि. हरदोई ) येथील हिंदी कवि. मूळ नांव

सैयद गुलाम नबी. याचे ग्रंथ-'अंगदर्पण' (स. १७३७) व 'रसप्रबोध' (स. १७४१). शिवाय यानें व्रजभाषेंत सुंदर कविता केली आहे.

**रसिक गोविंद**—हिंदी कवि व कृष्णभक्त. याचे ग्रंथ-जुगलम्, माधुरी, अष्टदेशभाषा, गोविंदानंदघन, कलियुगरासो, पिंगल, समयप्रबंध व श्रीरामायण-सूचनिका.

**रसिक मुरार**—सायन (प्रांत मथुरा) येथील ब्राह्मण साधु व दयार्णव वैराग्याचा शिष्य (भ. वि. अ. ३७).

**रसिकसुमति**—(स. १७२८ सुमार) ईश्वरदासाचा पुत्र व एक हिंदी कवि. ग्रंथ-अलंकारचंद्रोदय.

**रहिम (अबदुलरहीमखान खाना)**—(स.१५५३-१६२५) अकबराचा सरदार बहरामखानाचा पुत्र व एक हिंदी कवि. हा अकबराचा मुख्य सेनापति, मंत्री व त्याच्या नवरत्नांपैकीं एक होय. जहांगीरानें याची मालमत्ता जप्त करून यास कैद केलें होतें. हा तुलसीदासाचा मित्र होय. हा कृष्णभक्त असून यानें रहिमदोहावलि किंवा सतसई, बरवें, नायिकाभेद, शृंगारसोरठ, मदनाष्टक, रासपंचाध्यायि, बगरशोभा, रहिम काव्य व रहिमरत्नावली हे ग्रंथ केले. यांशिवाय यानें ज्योतिषावर संस्कृतमध्यें 'खेट-कौतुकम्' हा ग्रंथ व 'वाकयात बाबरी' या तुर्की ग्रंथाचें भाषांतर केलें.

**रक्षित**—अशोकाच्या प्रेरणेनें भरलेल्या तिसऱ्या बौद्ध महासभेंत याला बनवासी प्रांतांतील मुख्य प्रचारक नेमिलें होतें. बनवासी म्हणजे उत्तर कानडा होय. यानें तेथें 'अनमतग्ग' या उपदेशाचा प्रचार केला (महावंश).

**रंग तुलुव**—(स. १५२५ सुमार) नरसा नायक तुलुवाचा मुलगा. याचा पुत्र सदाशिव. याची पत्नी तिम्मांबा. कृष्णदेवराय तुलुव याचा सावत्र भाऊ होता.

**रंगराजाध्वरि**—अपय्य दीक्षिताचा पिता व गुरु. हा तोतारम्बी नांवाच्या ब्राह्मणेतर स्त्रीपासून झालेला विद्वान् मुलगा. यानें अद्वैतविद्यामुकुर, विवरण, दर्पण वगैरे अनेक प्रबंध केले.

**रंगम्मा**—तिरुमल्ल आरविडूची पत्नी.

२. वेंकटाद्रि आरविडूची पत्नी.

**रंबोल्ड**—(स. १७८०) मद्रासचा गव्हर्नर.

**रंगनाथ**—(स. १६७५ सुमार) कानडी कवि. ब्राह्मण असावा. पिता-सहवासी वंशांतील महालिंगदेव, गुरु-सहजानंद. ग्रंथ-अनुभवामृत. याला रंगावधूत, श्रीरंग अशींहि नांवें आहेत. यानें आपले ग्रंथ श्रीगिरीचा मल्लिकार्जुन देवापाशीं लिहिले. याचा ग्रंथ नीतिप्रधान असून कानडींत लोकप्रिय आहे. त्यांत 'तत्त्वमसि' या वाक्याचा अर्थ दिला असून इतरहि तत्त्वज्ञान चांगलें सांगितलें आहे. याच्याच ग्रंथाच्या धोरणावर चिदानंदावधूत (स. १७५० सुमार) यानें आपला ज्ञानसिंधु नांवाचा ग्रंथ लिहिला आहे (क. क. च. भा. २, पा. ४९१).

२. (जन्म स. १६१२ सुमार) हा गोलग्रामचा ज्योतिषी. यानें सिद्धांतशिरोमणीवर मितभाषिणी नांवाची टीका लिहिली. सिद्धांतचूडामणी हाहि ग्रंथ याचाच होय.

३. (ग्रंथकाल स. १६०३) यानें काशीक्षेत्रांत सूर्य-सिद्धांतावर गूढार्थप्रकाशिका नांवाची टीका लिहिली.

४. (मुनीश्वर पाहा).

५. (स. १७६५) हा 'विचारसुधाकर' नांवाच्या ग्रंथाचा कर्ता. हा पुणें जिल्ह्यांतील जुन्नरचा. यानें आपला ग्रंथ रघुनाथराव पेशव्यांच्या सांगण्यावरून लिहिलेला दिसतो.

**रंगनाथ मोगरेकर**—(ग्रंथकाल स. १६०८) हा गोदावरी कांठीं राहणारा असून अनंताचा पौत्र व अपेराज ऊर्फ आप्पारावाचा पुत्र होय. गोत्र कपि. गुरु-परंपरा-सिद्धानंद ऊर्फ वासुदेवानंद-परमानंद-वैकुंठानंद-कृष्णानंद. याचे ग्रंथ-चित्सदानंदलहरी (गीतेवरील टीका), योगवासिष्ठ, पंचरत्न. हे आणि निगडीकर यांचा घोटाळा योगवासिष्ठाच्या शेवटीं घातलेल्या कांहीं ओव्यांमुळें झाला, पण त्या ओव्या मागाहूनच्या आहेत. याचा पुत्र किंवा शिष्य काशिराज (म. सा. १, पा. २७९-८०).

**रंगनाथस्वामी निगडीकर**—(जन्म स. १६१२-१६८४) रामदास पंचकापैकीं एक साधु. याच्या पितृ-परंपरेंतील मूळ पुरुष राघोपंत. उपनांव खडके व पुढें घोडके. हा बापाजीपंतांचा पुत्र असून मोगलाईंतील चौसाळ प्रान्तांतील खडकीचा राहणारा. यास शिपाई-गिरीची हौस फार असे. यानें बद्रिकाश्रमास जाऊन अनेक विद्या संपादन केल्या. याच्या वडिलांनीं पुढें संन्यास घेऊन निजानंद हें नांव धारण केलें. त्यांचाच यानें उपदेश घेतला. याचा सर्व थाट ऐश्वर्याचा असून याच्याबरोबर लंगोटबंद शिष्यसमुदाय आणि भागम्मा व चंद्रम्मा या शिष्यिणी नेहमीं असत. याच्या घोड्याचें नांव मनोहर. त्याचा रंग निळा होता. रामदास याला रंगाबा म्हणत असत.

१ बृहद्वाक्यवृत्ति, २ निजानंदसाधन, ३ श्लोकपंचक, ४ रंगाष्टक, ५ मार्तंडाष्टक, ६ करुणाष्टक, ७ रामजन्म, ८ भगवद्गीता, ९ निजानंदसाधन, १० मिथ्यामायास्वरूप, ११ एकाखर्डी, १२ बद्धमोक्षविवरण, १३ गरुडसत्यभामागर्वपरिहार, १४ संतमालिका (?). यांखेरीज गुरुगीता, सुदामचरित्र, शुकरंभासंवाद, पंचीकरण, भानुदासचरित्र वगैरे अनेक ग्रंथ लिहिले आहे. यांच्या वंशजांचें कुलदैवत सध्यां दत्त आहे. नाझरेकरांच्या घरांत विठ्ठल आहे. निगडीच्या मठांत कृष्ण आहे.

या ग्रंथांशिवाय यांचीं शेंकडों उत्कृष्ट पदें म्हटलेलीं ऐकूं येतात. यांची बरीच कृती पूर्वी निगडी येथील मठ जळाला तेव्हां अग्निमुखीं पडली असें यांचे वंशज सांगतात. हे आपले वयाचे बहात्तरावे वर्षी शके १६०६ रक्ताक्षी संवत्सरीं मार्गशीर्ष वद्य १० स समाधिस्थ झाले.

**रंगो बापूजी**—(शेवट स. १८५७) साताराच्या प्रतापसिंहाच्या कारकीर्दीत ब्राह्मण व प्रभू यांमध्यें ग्रामण्यासंबंधीं वाद उपस्थित झाला असतां प्रतापसिंहांनीं प्रभूची बाजू घेतली होती. परंतु शेवटीं त्यांना पदच्युत व्हावें लागलें. तेव्हां त्यांचें म्हणणें ब्रिटिश पार्लमेंटपुढें मांडण्याकरितां जे लोक विलायतेंत गेले होते त्यांतील हा प्रमुख होय. हा तेथें चौदा वर्षे होता. प्रथम यास इंग्रजी मुळींच येत नव्हतें. परंतु यानें आपलें सर्व काम एका मध्यस्थामार्फत केलें. यानें विलायतेंतील सर्व हकीकत मोडी लिपींत २२५ पानी पुस्तक लिहून तेथेंच प्रसिद्ध केली (स. १८४७). या पुस्तकांत यानें प्रतापसिंहाचें सर्व चरित्र दिलें आहे (प्रतापसिंह छत्रपति भोसले पाहा). लंडनला गेल्यावर याला पुष्कळ दिवस तक्रारीची दाद लागण्याची आशा दिसेना, तेव्हां याच्याबरोबरचे लोक परत आले; परंतु हा मात्र तेथेंच राहिला. यानें तेथें सुमारें २५ सभा भरवून तेथील लोकांना प्रतापसिंहावर कसा जुलूम होतो हें समजावून सांगितलें, त्यामुळें तेथें फार खळबळ उडाली. परंतु यास फारसें यश आलें नाहीं. ह्याचें संबंध नांव 'रंगोजी बापूजी रोहिडखोरेकर गुप्ते देशपांडे' असें होतें. शेवटीं स. १८५७ सालच्या बंडाच्या वेळीं याच्यावर कटाचा आरोप येऊन हा परागंदा झाला व याचा पुत्र सिताराम फांसी गेला. याच्या पूर्वजांनीं शिवाजीला स्वराज्यस्थापनेस फार मदत केली होती. राजारामाच्या कारकीर्दींत याचें वतन सचिवांनीं बळकावलें होतें तें परत मिळण्याकरितां यानें व याच्या चार पूर्वजांनीं पराकाष्ठा केली, पण यश आलें नाहीं. याच्या घराण्यांतील दोन पुरुष पानपतावर गेले होते. शेवटीं शेवटीं याला अन्नान्नदशा प्राप्त झाली.

**राजसुंदरी**—ही राजेन्द्र चोलाची मुलगी व राजराज गंगाची पत्नी.

**राजा अली फारुकी**—(स. १५७६-९६) हा दुसऱ्या मिरान मुहम्मद फारुकीचा भाऊ. हा अकबरास मिळाला, व मुरादच्या निजामावरील स्वारींत सोनपतच्या लढाईत मेला.

**राका कुंभार**—(स. १५०० सुमार) एक मराठी संत. हा जातीनें परदेशी कुंभार. याच्या बायकोचें नांव बाका अथवा बंका असें होतें. याला देऊबाई नांवाची एक कन्या होती. हा गोरोबा कुंभाराप्रमाणें कुंभार मंडळींत वैष्णव म्हणून प्रसिद्ध होता.

**राघव आपापंत खांडेकर**—(ग्रंथकाल स. १८१०-१८) हा तापी-तटाकीं पारोळें येथील रहिवाशी. हा पुढें गोदातीरीं पुणतांबें येथें राहत असे. याचे खेटकृति, पंचागार्क आणि पद्धतिचंद्रिका वगैरे ग्रंथ प्रसिद्ध व उपलब्ध आहेत (भा. ज्यो.).

**राघव गंग**—(स. ११५२-६७) हा त्रिकलिंगाच्या प्राच्य गंगांपैकीं अनंतवर्मन् ऊर्फ चोलगंगाचा पुत्र. हा आपल्या कामार्णव नांवाच्या सावत्रभावानंतर गादीवर आला. याचा पराभव बंगालच्या विजयसेनानें केला. हा विजयसेनाचा काल निश्चित असल्यामुळें ही कटक गॅझेटियरमधील माहिती बरोबर आहे याविषयीं शंका नाहीं.

**राघवचैतन्य**—(स. १५५० सुमार) केशव चैतन्याचे गुरु. यांचें पूर्वीचें नांव रंगनाथ. हे गिरनार पर्वताच्या पायथ्याशीं राहत असत. पुढें जसजसा उत्तरेकडील प्रदेश यवनांनीं पादाक्रांत केला, तसतसे त्यांच्या जुलमी अमलाला त्रासलेले व अत्याचाराला भिऊन गेलेले शेंकडों हिंदु खालीं दक्षिणेंत उतरूं लागले. त्यांच्या तोंडून हिंदुधर्मीयांच्या हालअपेष्टांचीं करुण वर्णनें ऐकून यांना यवनांबद्दल अत्यंत चीड आली. तेव्हां यांनीं आपल्या बापास यवनाची चाकरी सोडून देण्यास सांगितली; पण त्यानें न ऐकल्यामुळें हे घरांतून बाहेर पडले, व हिंदुधर्मावरील हें संकट नाहींसें करण्यासाठीं यांनीं गिरनार पर्वतावर घोर तपश्चर्या केली. व नंतर जुन्नरजवळील अंकुशधार पर्वतावर तपश्चर्या केली; त्या वेळेस व्यासांनीं प्रत्यक्ष दर्शन देऊन यांना उपदेश केला.

यांनीं एकंदर नऊ ग्रंथ लिहिले ते पुढीलप्रमाणें:—

१ ब्रह्मस्वरूप, २ मायाविचार, ३ योगनिद्रा, ४ सनातनधर्मविचार, ५ बुद्धिविकास, ६ इंद्रियदमन, ७ त्रिगुणलीला, ८ निराकारमन, ९ जितेपणीं मरण. हे सर्व ग्रंथ प्राकृत आहेत. हे विरक्त झाल्यावर दक्षिणेंत येऊन गुलबर्ग्यास कांहीं दिवस राहिले, व त्यामुळें चैतन्य नामक परंपरेचें कलम महाराष्ट्रीय भक्ति-संप्रदायाच्या परंपरेंत दाखल झालें असें अनुमान निघतें. यांची समाधि मोंगलाईत गुलबर्ग्यानजीक दीड योजनावर 'आळंद गुंजोटी' या गांवीं असल्याचें निरंजन नामक कवीनें शके १७०९ या वर्षी लिहिलेल्या 'केशवचैतन्य-चरित्र' या नांवाच्या ग्रंथांत लिहिलें आहे.

**राघवांक**—(स. ११६५ सुमार) कानडी कवि. तुंगभद्रेच्या कांठीं पंपापुरीं याचा जन्म झाला. पिता—महादेवभट्ट, माता—रुद्राणी. ग्रंथ—हरिश्चंद्रकाव्य, सोमनाथचरित, सिद्धरामपुराण, वीरेश्वरचरित, शरभचरित्र, हरिहरमहत्त्व. यांपैकीं फक्त पहिलीं तीन मिळालीं आहेत.

याचा गुरु हरीश्वर. हाच याचा मामाहि होता. मामानें हरिश्चंद्रकाव्य करून आपल्या भाच्यानें मनुष्याची स्तुति केली म्हणून याच्या तोंडांत मारली. त्यामुळें याचे पांच दात पडले. पण पुढील शिवस्तुतिपर चार काव्यें केल्यावर याचे पांच दांत पुनः आले, अशी आख्यायिका पद्मणांकाच्या पद्मराजपुराणांत दिली आहे. सिद्धनंजेशन नांवाच्या कानडी कवीनें याचें चरित्र कानडींत काव्यमय लिहून ठेवलें आहे. त्याचा लेखनकाल स. १६५० आहे. पंपापूरच्या देवराज राजाच्या दरबारांत याच्या हरिश्चंद्र काव्याबद्दल वाहवा झाली होती. पण ही गोष्ट मामा व गुरु यांना सहन झाली नाहीं हें वर आलेंच आहे.

नंतर हा नरसिंह बल्लाळाचा मंत्री कैरेय पद्मरस-दीक्षा बोधे या कानडी ग्रंथाचा कर्ता, याला भेटण्याकरितां होयसळनगरला म्हणजे द्वारसमुद्राला गेला. ओरुगल्लच्या प्रतापरुद्र राजाच्या सभेंतील कवींनाहि यानें हरविलें होतें, असें शांतिलिंगदेशिककृत भैरवेश्वर काव्यावरील कथासूत्र रत्नाकरांत लिहिलें आहे. कथासूत्ररत्नाकराचा लेखनकाल स. १६७२ आहे. वाङ्मयदृष्ट्या हा कवि प्रसिद्ध आहे. षट्पदी वृत्त यानें कानडींत प्रथम सुरू केलें असें कांहीं म्हणतात. हा बेलुरु येथें मृत्यु पावला. हा हंपीच्या विरूपाक्षाचा भक्त होता.

**राघवेंद्राचार्य गजेंद्रगडकर**—(स. १७७० सुमार) सातारच्या गजेंद्रगडकर घराण्याचे पूर्वज. नामांकित पंडित. हे माधवराव पेशव्यांच्या वेळीं होते. यांनीं केलेले ग्रंथ—१ परिभाषेंदुशेखरावर 'त्रिपथगा' नांवाची टीका, २ लघुशब्देंदुशेखरावर विषमी नांवाची टीका, ३ मनोरमाशब्दरत्नावर 'चंद्रिका' नांवाची टीका, ४ पिष्टपशुमीमांसा, ५ विष्णुसहस्रनामटीका, ६ गीताभाष्य, ७ उपनिषद्भाष्य. महाभाष्यावर कैयटाच्या मंडनार्थ व नागोजी भट्टाच्या खंडनार्थ प्रदीपोद्योतप्रभा नांवाचा ग्रंथ करण्याचें यांच्या मनांत होतें (शब्दरत्नावरील टीकेंत तसें म्हटलें आहे). परंतु यांचे कनिष्ठ पुत्र वामनाचार्य एकाएकीं वारल्यामुळें तो ग्रंथ झाला नाहीं.

**राघो बल्लाळ अत्रे**—(स. १६७०-८०) हा व याचे चुलतभाऊ विठ्ठल शिवदेव व निळोराम हे शिवाजीच्या पदरी होते. हा पुणें, पन्हाळा, राजापूर, कल्याण वगैरे प्रांतांचा सुभेदार होता. यानें सीद्द्याच्या लढायांत लौकिक मिळविला. चंद्रराव मोऱ्याचा पराभव करण्यांत हाच प्रमुख होता. याचें शौर्य पाहून आपल्या पठाण पलटणीच्या आधिपत्याचा पहिला मान यास शिवाजीनें दिला. शिवाजीनंतरहि हा हयात होता.

**राजकेसरीवर्मन्** ऊर्फ **राजादित्य चोल**—(स. ९४७-४९) हा पहिल्या परांतकाचा पुत्र. यानें उत्तरेकडे राष्ट्रकूटाच्या प्रांतावर स्वाऱ्या केल्या. तेव्हां तिसऱ्या कृष्ण राष्ट्रकूटाच्या मेव्हणा बुतूग गंगानें याच्यावर चढाई करून तक्कोलम येथें याला ठार केलें. याच्या मागून याचा धाकटा भाऊ गंडरादित्तन हा राजा झाला.

**राघो भारती**—(स. १८४८) आपासाहेब भोसले नागपूरकरांचा तोतया.

**राज-अच्युतमणि मखिन्**—(स. १६३०) हा तंजावरच्या रघुनाथ नायकाचा प्रधान. यानें स. १६३० मध्यें 'तत्त्वचिंतामणिदर्पण' नांवाचा तर्कशास्त्रावर ग्रंथ लिहिला.

**राजकुवर** ऊर्फ **नानीबाई**—ही शिवाजीची मुलगी होती. हिच्या आईचें नांव सगुणाबाई असें होतें. ही गणोजी राजे शिर्के मळेकर यांस दिली होती (शि. नि. १, पृ. २२५).

हिच्या नवऱ्यास शिवाजीनें दाभोळची देशमुखी देऊं केली होती (रा. खं. ३ रा, प्रस्तावना, पा. १).

**राजगंभीर पांड्य**—(स. १२०० सुमार) हा राजेश पांड्याचा मुलगा.

**राजगी यादव**—(स. १५० सुमार) हा पहिल्या भिल्लम यादवाच्यानंतर गादीवर आला. याला श्रीराज म्हणत.

**राजचूडामणि**—( जन्म स. १५५० नंतर ) हा रत्नखेट श्रीनिवास दीक्षिताचा पुत्र. हा मद्रासकडील अर्काट जिल्ह्यांतील राहणारा. रत्नखेट अपय्य दीक्षिताचा जांवई, याचा थोरला भाऊ अर्धनारीश्वर. ग्रंथ–कमलिनीकलहंस (नाटक), तंत्रशिखामणि, युद्धकांड चंपू ( हि. का. ६, ६२९–३० ). यांशिवाय आनंदराघ नाटक व शृंगारसर्वस्वभाण यानें लिहिला.

**राजनरेंद्र**—( स. ४०० ) शार्ङ्गधर पंडिताचा पिता. राजमहेंद्रीचा राजा ( नन्नयभट्ट पाहा ).

२. ( कविराक्षस पाहा ).

**राजपाल**—( स. ९५६–९८० ) हा बंगालच्या नारायणपालाचा मुलगा. यानें जगत्तुंग राष्ट्रकूटाच्या मुलीशीं लग्न केलें.

**राजब तुघ्लक**—( स. १३२५ सुमार ) हा घियासुद्दीनचा भाऊ. यास सिपाहसालार अशी पदवी होती. याचा पुत्र फीरूज हा दिल्लीचा बादशहा झाला.

**राजमल्ल ( पश्चिम ) गंग**—( स. ९७४–८४ ) हा मरुलदेवाचा नातू व इंद्राचा पुत्र. हा तिसऱ्या मारसिंहानंतर गादीवर आला. या घराण्यांत हा चवथा राजमल्ल होय, पण पहिले तीन गादीवर आले नव्हते. याचाच प्रधान चामुंडराय होय. प्रांतभेदानें राजमल्लचा उच्चार राचमल्ल असा करतात ( चामुंडराय व मारसिंह पाहा ).

**राजमहेन्द्र चोल**—( स. १०६३ ) राजेन्द्र नांवाच्या चोलाचा पुत्र. हा अतिशय न्यायी असून यानें श्रीरंगम् येथील देवास वर्षासन नेमून दिलें होतें. यानें राजमहेन्द्री हें शहर वसविलें. मल्ल चालुक्यानें याचा पुष्कळ प्रांत काबीज केला. कारण या वेळीं चोलांच्या राज्यांत बंडाळी झाली होती, व राजघराण्यांत सिंहासनावर कोणीं बसावें याबद्दल यादवी सुरू झाली होती. चोल राजघराण्यांत या वेळीं बरेचसे राजपुत्र व राजसंबंधी लोक आपला हक्क प्रस्थापित करूं पाहत होते. याच्या मागें याचा चुलता वीरराजेन्द्र हा राजा झाला.

**राजराज गंग**—(स.१०७०–७८) हा त्रिकलिंगाच्या प्राच्य गंगांपैकीं वज्रहस्तानंतरचा राजा. त्याची राणी प्रसिद्ध राजेंद्र चोलाची मुलगी रूपसुंदरी होय. याला जयवर्मन् ( अवंतिवर्मन् ) व अनंतवर्मन् असे दोन पुत्र होते. अवंतिवर्मन् यानें केलेले पराक्रम याच्याच कारकीर्दीतील होत ( अवंतिवर्मन् पाहा ).

२. ( स. ११६७–९२ ) हा राघवानंतरचा राजा. चोड गंगाचा पुत्र.

३. (स.१२०२–१९) हा अनियंक भीमानंतरचा राजा.

**राजराज (पूर्व) चालुक्य**—( स. १०२२–६३ ) हा विमलादित्याचा मुलगा.

**राजराज चोल**—( स. ९८५–१०१६ ) हा दुसऱ्या आदित्याचा धाकटा भाऊ होता. या वेळीं चालुक्य व गंग यांची यादवी जुंपल्यामुळें यानें त्याचा फायदा घेऊन आपलें राज्य वाढविलें. हा सर्व चोल राजांमध्यें श्रेष्ठ झाला. यानें प्रथम आपल्या राज्याची अन्तःस्थिति सुधारली व मग मुलूखगिरीस प्रारंभ केला. यानें प्रथम चेर आरमारावर स्वारी करून कांडलूरजवळ त्याचा पराभव केला ( स. ९९५ ). नंतर गंगप्पाडी, नुळंबप्पाडी, तळिगैवळी व वेंगैनाडु हे प्रान्त स. ९९७ पर्यंत काबीज केले, व विमलादित्य चालुक्य राजास कुंदव्वा ही आपली मुलगी दिली. याच सुमारास ( स. ९९७ ) यानें पांड्यांचाहि पराभव करून कोलूम व कलिंग देश जिंकले. ईळम( सिलोन )वर स्वारी करून तेथें आपली सत्ता स्थापली ( स. १००३ ). यानंतर तीनचार वर्षांत यानें साडेसात लाख वसुलाचा रट्टपाडी प्रदेश जिंकून सत्याश्रय चालुक्याचा पराजय केला ( स. १००७ ). तंजावर येथील देवळांत राजराजानें आपण, आपल्या राण्या व बहीण यांनीं दिलेल्या एकंदर धर्मादाय देणग्यांची यादी शिलालेखानें खोदून ठेविली ( स. १०१० ), व तंजावर शहर पुनः वसविलें. कारण मध्यंतरीं चालुक्यांनीं त्या शहराचा नाश केला होता. आयुष्याच्या शेवटीं यानें समुद्रांतील बारा हजार बेटें जिंकल्याचा उल्लेख आढळतो ( स. १०१२ ). याप्रमाणें आपलें साम्राज्य वाढवून हा चोल सम्राट् बनला. यानें आपली सरहद्द कावेरीच्या उगमाजवळील येडतोरेनाड गांवापासून थेट कृष्णेच्या मुखापर्यंत भिडविली. तसेंच याची दर्यावरील सत्ता रामनादपासून विजगापट्टमपर्यंत होती. याला राजाश्रम, अरुमोळीदेव, मुम्मूडीचोल, जयंमगोंडा वगैरे पदव्या होत्या. याच्यामागून त्याच्याचसारखा याचा पराक्रमी पुत्र गंगईकोंड ऊर्फ मुडिगोंड निगरिली उत्तम चोल राजेन्द्र हा राजा झाला.

२. ( स. ११४६–६३ ). हा दुसऱ्या कुलोत्तुंग चोलाचा मुलगा.

३. ( स. १२१६–४६ ) हा चोलांपैकीं तिसऱ्या कुलोत्तुंगाचा पुत्र. याला त्रिभुवनचक्रवर्ति व राजकेसरीवर्मा या पदव्या होत्या. पांड्यराजा याच्यावर चालून आला असतां नरसिंह होयसळानें याला मदत देऊन पांड्यांचा पराभव केला ( स. १२२३ ). पुढें काडव पल्लव यानें राजराजास पकडलें असतां पुनः नरसिंहानें याला सोडविलें,

व याच्या राज्यांतील बंडाळी मोडली ( स.१२३२ ). परंतु पुढें सर्वत्र बंडें उद्भवलीं. तेलगूचोल हा नेलोरहून, सुंदरपांड्य हा दक्षिणेकडून व काडव पल्लव हाहि दक्षिणेकडून चालून आला; आणि याचें राज्य काबीज केलें. शेवटीं याच्या नंतर याचा पुत्र तिसरा राजेन्द्र राजा झाला.

**राजशेखर**—( स. ९१७ सुमार ) हा संस्कृत पंडित महाराष्ट्रांतील रहिवासी होता, असें दिसतें. बालरामायण नांवाच्या नाटकांत यानें अकालजलद नांवाच्या पुरुषापासून आपण चवथे पुरुष आहों असें सांगितलें असून त्या अकालजलदाला महाराष्ट्रचूडामणि म्हटलें आहे. याच्या पित्याचें नांव दुर्दुक व मातेचें नांव शीलवती असें होतें. आपल्याला यायावर असें हा विशेषण लावून घेतो. यायावर हें याचें कुलनाम असावें. हा जातीचा ब्राह्मण असून याची एक पत्नी अवन्तिसुंदरी ही चव्हाण कुलांतील होती. यावरून याच्या वेळेपर्यंत अनुलोम विवाह उघडपणें चालू होते असें दिसतें. अवन्तिसुंदरीच्या इच्छेवरूनच याचें 'कर्पूरमंजरी' हें नाटक रंगभूमीवर आलें ( १. ११ ).

आपल्या अंगीं असलेल्या काव्यशक्तीविषयीं याला पूर्ण विश्वास होता म्हणून हा आपणास वाल्मीकीचा अवतार म्हणवून घेतो. कर्पूरमंजरींत यास बालकवि व कविराज असेंहि म्हटलेलें आहे. 'काव्यमीमांसा' हा याचा अलंकारशास्त्रावरील ग्रंथ सुप्रसिद्ध आहे. 'कर्पूरमंजरी', 'विद्धशालभंजिका', 'बालरामायण' व 'बालभारत', किंवा 'प्रचंडपांडव' हीं याचीं नाटकें प्रसिद्ध झालीं आहेत. याशिवाय 'हरविलास' ( महाकाव्य ) नांवाचाहि याचा एक ग्रंथ असल्याचा उल्लेख यानें स्वतः ( बा. रा. १·१२ ) व हेमचंद्राचार्यानें आपल्या:काव्यानुशासनांत केला आहे आणि त्यांतील दोन श्लोक उद्धृतहि केलेले आहेत ( पान ३३५ ). तसेंच उज्वलदत्तानें अर्धा श्लोक हरविलासांतून उद्धृत केला आहे. पण हरविलास अद्यापि प्रसिद्ध नाहीं, व कुठें उपलब्ध असल्याचेंहि दिसत नाहीं. याशिवाय आठवा यानें 'भुवनकोश' नांवाचा भूवर्णनात्मक ग्रंथ केला असल्याचा काव्यमीमांसेंत निर्देश आहे.

हा महामंत्रिपुत्र व रघुकुलांतील निर्भय किंवा महेंद्रपाल प्रतिहार राजाचा उपाध्याय अथवा गुरु असेंहि याचें वर्णन आढळतें ( बा. रा. १. ५; १. १८; कर्पूरमंजरी १. ५; १. ९ ). अवन्तिसुंदरी ही क्षत्रियकुमारी याची पत्नी असून तिच्या मताचा काव्यमीमांसेंत यानें निर्देश केला आहे. त्यावरून तिच्या अधिकाराची कल्पना येते.

प्रचंडपांडव किंवा बालभारत या नाटकांत राजशेखरानें महेंद्रपालाचा पुत्र महीपाल प्रतिहार या राजाचा उल्लेख केला आहे. तो किंवा याचे पूर्वज मूळ स्थान सोडून कनोज येथें गेले असावेत असें दिसतें. कारण बालभारताचा प्रयोग महोदय येथें म्हणजे कान्यकुब्ज देशांत झाल्याचें वर्णन आहे. दिशा सांगावयाच्या त्या कनोजला उद्देशून सांगाव्या, असें काव्यमीमांसेंत यानें म्हटलें आहे. हा शेवटीं पुनः प्रतिहाराकडे गेला. कारण याच्या शेवटच्या अपुऱ्या नाटकांत त्याचा उल्लेख आहे. पण तसेंच याच्या विद्धशालभंजिकेचा प्रयोग युवराज केयूरवर्ष कलचुरीच्या आज्ञेवरून झाला आहे. त्यावरून हा त्रिपुरीच्या राजाच्या आश्रयासहि होता असें दिसतें.

२. ( ग्रंथसमाप्तिकाल स.१३४८ ) हा व कर्पूरमंजरी वगैरे नाटकांचा कर्ता राजशेखर भिन्न होत. हा जैनधर्मी होता. याचा 'चतुर्विंशतिप्रबंध' नांवाचा एक ग्रंथ आहे. त्याच्या शेवटीं यानें आपल्या ग्रंथसमाप्तीचा काल दिला आहे.

जैन राजशेखर अभयदेवसूरीच्या ( मलधारी ) शिष्यपरंपरेंतील तिलकसूरीचा शिष्य होता. यानें दिल्लीस राहून शाह महणसिंहाच्या प्रेरणेनें वरील चतुर्विंशतिप्रबंध केला. शाह महणसिंह हा जगत्सिंहाचा पुत्र होय.

याची प्रमाणन्यायतत्त्वालोकावर रत्नावतारिकापंजिका नांवाची उपटीका, स्याद्वादकलिका व श्रीधराच्या न्यायकंदलीवर पंजिका हे न्यायशास्त्रावर ग्रंथ केले.

**राजशेखर पांड्य**—पांड्य घराण्यांतील विक्रमाचा पुत्र. हा राजा विद्वान् होता.

**राजशेखर संगम**—विजयानगरच्या संगमवंशांतील मल्लिकार्जुनाचा पुत्र. हा गादीवर बसला नाहीं.

**राजसबाई भोसले**—( स. १७१४ ) राजारामाची पत्नी. हिचा पुत्र संभाजी हा गादीवर आला. दुसरा शिवाजी वेडसर होता. त्याला व ताराबाईला हिनें तुरुंगांत ठेवलें.

**राजसिंह गुहिलोत**—( राज्यकाल स. १६५२–८० ) मेवाडचा राजा. हा जगतसिंहाचा मुलगा. जन्म स. १६२९. यानें प्रथम औरंगजेबाशीं मिळतें घेतलें होतें, पण औरंगजेबाचा धर्माभिमान पाहून यानें त्यास छळण्यास सुरवात केली व त्यास जर्जर करून सोडलें. शेवटीं याला ता. २२ ऑक्टोबर १६८० रोजीं विषप्रयोगानें मृत्यु आला. याला एकूण नऊ मुलगे व एक मुलगी इतकीं अपत्यें होतीं.

२. ( स. १७४३–६१ ) मेवाडचा राजा. हा दुसऱ्या प्रतापसिंहाचा मुलगा. याच्या कारकीर्दींत मराठ्यांनीं स्वारी करून याचा पराभव केला. हा निपुत्रिक मरण पावला.

**राजसिंह पांड्य**—( स. ७१०–४० ) हा पांड्यांपैकीं कोच्चदंयन याचा पुत्र होय. हा अरिकेसरी, परान्तक,

नेदुजदैयण, टेर-मरन, नेदुमारण, परांकुश अशा पदव्या धारण करीत असे. चेर व चोल यांच्यावर याला वर्चस्व मिळालें, आणि यानें कुडाळ (मदुरा), वंजी, कोली (उरैपूर) या गांवांना तट बांधले.

यानें पुष्कळ तुला, गोसहस्र व सुवर्णदानें केल्याचा निर्देश आहे. यानें माळव्याच्या राजकन्येशीं विवाह केला होता आणि तीपासून यास जटिल नांवाचा मुलगा झाला होता. याची पत्नी सुंदरी.

याच्या पित्यानें गंग व कांगू राजांशीं युद्धें सुरू केलीं होतीं. तीं यानें पुढें चालविलीं व त्यांचा अनेक ठिकाणीं पराजय केला. शिवाय यांचे मुख्य शत्रू पल्लव यांना त्यानें अगदीं समुद्राच्या तीरापर्यंत पिटाळून लावलें. याच्या मागून जटिल हा गादीवर आला.

२. कुलभूषण पांड्याचा पुत्र.

**राजा ओडियर**—(स. १५७८–१६१७) म्हैसूरचा राजा. हा दोड्ड चामराजाचा मुलगा. हा आपला भाऊ बेत्तदानंतर गादीवर बसला. वास्तविक हाच या घराण्याचा संस्थापक होय. यानें लहान संस्थानें व श्रीरंगपट्टणच्या राम आरविडूस जिंकून राज्य वाढविलें.

**राजादित्य चोल**—(स. ९४७–४९) एक चोल.

२. (२ आदित्य चोल पाहा).

**राजाधिराज चोल**—(स. १०४३–५२) हा राजेंद्रचोलानंतर गादीवर आला.

यानें दक्षिणेकडील मानाभरण, वीर-केरल, सुंदरपांड्य, पश्चिम चालुक्य राजा सोमेश्वर १ ला आणि त्याचे सुभेदार, विक्रमादित्य ६ वा आणि विष्णुवर्धन विजयादित्य, या सर्व राजांचा पराभव केला. कंपिली येथील चालुक्यांच्या ठाण्याचा यानें नाश केला. यानें चालुक्य, चेर, पांड्य, गंग, पल्लव, सिलोन आणि कनोज वगैरे राज्यांवर आपले सुभेदार नेमले व अशा रीतीनें आपण राज्य करूं लागला. स. १०५२ मध्यें पश्चिम चालुक्य राजा सोमेश्वर १ ला याचा यानें पराभव कोप्पम येथें केला. कोप्पम येथील पश्चिमचालुक्य राजाशीं झालेल्या लढाईंत हा मारला गेला, तरी पण याचा भाऊ राजेंद्रदेव यानें ती लढाई जिंकली.

स. १०५२ मध्यें याचा भाऊ राजेंद्रदेव हा याच्या नंतर गादीवर आला.

हा शैव असल्यामुळें, यानें श्रीरामानुजास आपल्या राज्याच्या हद्दपार केलें. याला तीन राण्या होत्याः १ दीनचिंतामणी, २ इळीशैवल्लभी, ३ महादेवी.

यानें मानाभरण पांड्याला ठार मारलें.

२. (स. ११६३–७८) हा चोलांपैकीं दुसऱ्या राजराजाचा मुलगा. याच्या व याच्या मागच्या तीन राजांच्या कारकीर्दीत शांतता असल्यानें वाङ्मय बरेंच वाढलें. शेक्कीलार, कंबन, ओट्टक्कुटन, पुगळेंदी वगैरे अनेक वाङ्मयभक्त या वेळीं झाले. याच्या कारकीर्दीत पाण्ड्य राजघराण्यांत यादवी माजली. एका पाण्ड्य-राजपुत्राला याची व एकाला सिलोनच्या पराक्रमबाहु राजाची मदत होती. त्यामुळें पराक्रमबाहु व चोल यांच्यांत युद्ध उपस्थित झालें. पराक्रमबाहूनें रामेश्वर लुटून कुलशेखर (चोलमित्र) पांड्याचाहि पराभव केला, परंतु यानें शौर्यानें त्याचा पराभव करून मदुरेवर स्वारी केली. पराक्रमबाहूचा मित्र असणाऱ्या वीर पांड्याला यानें कुटुंबासह ठार करून तेथें एक विजयस्तंभ उभारला; व आपला मांडलिक तेथें स्थापिला. याच्या मागून याचा पुत्र कुलोत्तुंग तिसरा गादीवर आला (स. ११८६).

**राजानक गोपाल**— प्रद्युम्नशिखरपीठाष्टक व शिवमाला या दोन ग्रंथांचा कर्ता.

**राजानक महिमभट्ट**—(स. १०२०–६०) याच्या पित्याचें नांव श्रीधैर्य आणि गुरूचें नांव श्यामल. याचा पुत्र भीम. या भीमाच्या मुलाकरितां यानें 'व्यक्तिविवेक' नांवाचा ग्रंथ लिहिला. मुलांचीं नांवें बहुधा योग, क्षेम आणि भाज अशीं असावींत. याशिवाय 'तत्त्वोक्तिकोश' नांवाचाहि याचा साहित्य-शास्त्रावर ग्रंथ असावा असें व्यक्तिविवेकांतील दुसऱ्या विमर्शांतील एका श्लोकावरून दिसतें. याच्या राजानक या पदवीवरून हा काश्मीरी असावा. हा 'बृहती' नांवाचा ग्रंथ लिहिणार असल्याबद्दल यानें लिहिलें आहे. व्यक्तिविवेकांतील मतांचें सार रुय्यकानें अलंकारसर्वस्वांत दिलेलें असल्यामुळें महिमभट्ट स. ११०० च्या पूर्वी होऊन गेलेला असला पाहिजे व हा स्वतः बालरामायणांतील उतारे घेणारा व वक्रोक्तिजीवित आणि लोचन यांच्यावर टीका करणारा असल्यामुळें स. १००० नंतरचा असला पाहिजे, असें उघड होतें. मम्मटानें पांचव्या उल्लासांतील चर्चेत महिमभट्टाचें नांव घेतलें नसलें तरी याच्या व्यक्तिविवेकांतील सिद्धान्ताचेंच खंडन केलें आहे, असें सरस्वतीतीर्थादि काव्यप्रकाशावरील टीकाकारांचें मत आहे; आणि याच्या उपलब्ध प्रतीशीं ताडून पाहतां तें शब्दसाम्यानें जुळतें. काव्यप्रकाशांतील दोषविवेचन व्यक्तिविवेकाला धरून केलें असावें असें वाटतें.

**राजाराम (छत्रपति)**—(जन्म ता. २४. २. १६७० –मृत्यु ता. २. ३. १७००) थोरल्या शिवाजीमहाराजांस शिर्के घराण्यांतील सोयराबाईपासून झालेला हा मुलगा होय. याचा जन्म राजगडावर झाला. प्रतापराव गुजराच्या मुलीशीं याचें लग्न शिवाजीच्या निधनापूर्वी तीन वार झालें. तिचें नांव जानकीबाई. ती पुढें लवकरच मेली. पुढें संभाजीनें याचीं दोन लग्नें केलीं. सोयराबाईच्या बाजूच्या मंडळींनीं याला शिवाजीनंतर १८ व्या दिवशीं गादीवर बसविलें. परंतु दोन महिन्यांनीं संभाजीनें याला नजरकैदेंत टाकून राज्यसूत्रें हातांत घेतलीं. संभाजीच्या वधापर्यंत हा नजरकैदेंतच होता. पुढें येसूबाइच्या सल्ल्यानें संभाजीचा मुलगा शाहू हा वयांत येईपर्यंत यानें कारभार पाहावा असें ठरलें; व त्याप्रमाणें याचें दुसरें मंचकारोहण ता. ९।२।१६८९ रोजीं झालें. या वेळीं मराठी राज्याची फार शोचनीय स्थिति झाली होती. खजिना रिकामा होता. सैन्यांत शिस्त नव्हती. अशा प्रसंगीं प्रल्हाद निराजी वगैरे मंडळींच्या सल्ल्यानें यानें आपलें आसन रायगडीं स्थिर न ठेवतां रायगड ते विशाळगडापर्यंत कोणत्याहि किल्ल्यांत ठेवावें व मराठी फौजेनें याच्यापासून जवळच असावें, असें ठरलें.

प्रल्हाद निराजीच्या सांगण्यावरून यानें निळोपंत पिंगळ्यास पेशवाई देऊन जिंजीचा किल्ला आपल्या बाजूचा करून घेतला. नंतर हा, प्रल्हाद निराजी, धनाजी जाधव, संताजी घोरपडे वगैरे २५ मंडळींसह कापडी व गोसावी वेषांत सोंध्यावरून जिंजीकडे जावयास निघाला. परंतु वाटेंत याचे पाय धुतांना पाहून मोगलांकडील एका हेरास यांचा संशय आला. हें बरोबरच्या मंडळींच्या ध्यानांत येतांच हा, संताजी व धनाजी ताबडतोब तेथून निघाले. लवकरच मोगलांनीं राहिलेल्या मंडळीस पकडलें व त्यांचा फार छळ केला.

पुढें पानसबळ मरण पावला तेव्हां संताजीस मुख्य सेनापति नेमलें. आणि प्रतिनिधीची एक जागा निर्माण करण्यांत येऊन त्या जागेस प्रल्हाद निराजीच योग्य आहे असें सर्वानुमतें ठरलें; व त्याप्रमाणें ती जागा त्यास देण्यांत आली; आणि जिंजीस यास राजा करण्यांत आलें. पण शाहूचा प्रतिनिधी म्हणून हा राज्य करीत असल्यानें राज्याभिषेक झाला नाहीं (रामचंद्र नीळकंठ अमात्य, शंकराजी नारायण सचीव, संताजी घोरपडे, धनाजी जाधव, खंडो बल्लाळ चिटणीस पाहा).

जिंजीचा वेढा ७ वर्षें मधून मधून चालू होता. शेवटीं हा मोगलांच्या हातांत तुरी देऊन प्रथम वेलोरास व नंतर विशाळगडास आला. पुढें यानें पुष्कळ सैन्य घेऊन वऱ्हाड खानदेशांत चौथाई व सरदेशमुखी उकळण्यास प्रारंभ केला. जालना शहरची खंडणी वसूल करीत असतां झुल्फिकारखान अचानक याच्यावर चालून आला. त्यानें मोठ्या नेटानें याचा पाठलाग केला. परंतु हा कसा तरी सिंहगडास येऊन पोंहचला. पुढें नवज्वराचा विकार होऊन हा स. १७०० मध्यें सिंहगडावर वारला. याचा स्वभाव शांत असून याच्या अंगीं कोणताहि दुर्गुण नव्हता. हा धाडसी होता. यास याच्या अधिकाराची जाणीव होती. हा हें राज्य स्वतःचें न समजतां शाहूचेंच आहे असें समजत होता, व त्याप्रमाणें हा वागला. याच्या या स्वार्थत्यागी वृत्तीचा परिणाम भोंवतालच्या लोकांवर फार झाला. यानंतर याचा पुत्र दुसरा शिवाजी गादीवर आला.

मोगलांशीं युद्ध चालू असल्यामुळें याच्या वेळीं प्रसंग बिकट होता अशा वेळीं वतन मागणारास जसें जमलें तसे कागद करून दिले. त्यांत परस्परविरुद्ध कागदहि कांहीं दिले गेले. तेव्हां दिलेलीं वतनपत्रें एखाद्याच्या वतनास बाध आणणारीं असतील किंवा दुसऱ्या कांहीं भानगडी असतील असें वाटल्यावरून यानें पुढीलप्रमाणें हुकूम काढला—(१९ फेब्रु. १६९९) “तरि चंदीच्या प्रसंगें व मसलतेच्या प्रसंगें व समजाविशी निमित्यें वतनाचे कागद ज्यानें जसे मागितले त्यास तसे दिल्हे. कांहीं प्रमाण नाहीं...नूतन वतन एकंदर कोणाकडे न चालविणें. कैलासवासी स्वामीचे वेळेस ज्याचें वतन चाललें असेल त्यास विनाकुसूर चालविणें” (रा. खं. ३.१४४).

**राजाराम (चिदंबरदास)**—हा चिदंबर दीक्षित नामक एका महान् सिद्ध पुरुषाचा शिष्य. याचा जन्म गोदावरीतीरीं बाभुळगांवीं एका रघुवंशीय रजपूत क्षत्रियकुलांत झाला. बालपणीं द्वारकादास वैरागी, पुढें बाळेश्वर व शेवटीं चिदंबर दीक्षित असे तीन गुरु यानें केले. यानें लिहिलेल्या सहस्त्रावधि अभंगांशिवाय निजात्मबोध, ब्रह्मानंदलहरी, महानुभाव, ज्ञानगर्भ, ब्रह्मानुभव, सद्गुरूपदेश, गुरुगम्यठेव, अद्वैतसार हे याचे ग्रंथ बेळगांव येथील ‘रामतत्त्वप्रकाश’ छापखान्याच्या मालकांनीं प्रकाशित केले आहेत (महाराष्ट्रकविचरित्र, भा. ५, पृ. १४५–१५९).

**राजाराम गोविंद**—(स. १७५५) रघुनाथराव पेशव्यांचा हस्तक.

**राजाराम दुंढीराजभट्ट**—याची सप्तशतीवर दंशोद्धार नांवाची टीका आहे. यानें अनेक गद्यपद्यात्मक ग्रंथ केले आहेत, असें याला लावलेल्या विशेषणावरून दिसतें.

**राजाराम पंडित**—(स. १७७७–८१) हा चिमणाबापू भोसल्याचा कारभारी व ओरिसाचा कारभारी.

**राजाराम प्रासादी**—(ग्रंथकाल स. १८३४) हा रामदासी पंथांतील सिद्धेश्वरमहाराजांचा शिष्य. यानें महीपतीनंतरच्या शंभर वर्षांत महाराष्ट्रांत जे सत्पुरुष व कवि होऊन गेले त्यांचीं चरित्रें महीपतीच्या धर्तीवर लिहिलीं आहेत. याच्या या ग्रंथाचें नांव 'भक्तमंजरीमाला' असें असून याचे १०९ अध्याय व १३००० ओव्या आहेत (मं. चतुर्थ सं. १८३८, पा. ८१). यांतील माहिती जरी प्रयासानें मिळवलेली दिसते तथापि ती जपून चौकशीपूर्वक स्वीकारली पाहिजे असें बारीक तपासणीवरून मत होतें (मं. तृतीय सं. श. १८३७, पा. ११९). याचीं पदें प्रसिद्ध आहेत व तीं चांगलींहि आहेत.

**राजुल क्षत्रप**—(खि. पू. १०० सुमार) राजुल हें नांव रजुबुल, राजुबुल, किंवा राजुवुल असें लिहिलेलें आढळतें. क्षत्रप हा शब्द संस्कृतोद्भव असल्यासारखा दिसत असला तरी तो मूळचा तसा नाहीं. क्षत्रप हा शब्द इराणी आहे; आणि त्याचा अर्थ देशाचा स्वामी किंवा जिल्ह्याचा अधिकारी असा आहे. पण हे अधिकारी पुढें स्वतंत्र झाले. तेव्हां हा शब्द त्यांचा वंशवाचक बनला. प्रथम क्षत्रपांचें राज्य पंजाब व मथुरा या प्रांतांवर होतें. पण पुढें राजपुताना, गुजराथ, काठेवाड, कच्छ व दक्षिण हिंदुस्थानांतील अनेक भागांवर पसरलें. क्षत्रपांपैकीं पहिल्या दोघांना उत्तरेकडचे क्षत्रप व बाकीच्यांना पश्चिमेकडील क्षत्रप असें म्हणत असत.

राजुल क्षत्रप हा उत्तरेकडील क्षत्रपांपैकीं पहिला असून याचें मथुरेवर राज्य होतें आणि दुसरा सोडास होय. हा प्रथम शक राजाचा अधिकारी म्हणून या प्रांतावर असावा. याच्या नाण्यांवर महाक्षत्रप अशी पदवी धारण केलेली आढळते. याच्या अग्रमहिषीचें नांव 'नदसी अकसा'. हिनें मथुरेंत एक बौद्ध स्तूप व मठ बांधला होता. त्यावरील लेखांत हिच्यासंबंधीं अधिक माहिती मिळते. स्तूपाच्या उत्सवाच्या वेळीं राजा व राणी यांचे अनेक संबंधी लोक उपस्थित होते. त्यांचीं नांवें तेथें सिंहाकृती चिऱ्यावर कोरलेलीं आढळतात. तेथेंच एक 'साऱ्या शकस्थानाच्या सन्मानाकरितां' असें लिहिलेला लेख आढळतो. त्यावरून हे शक होते असें ठरतें (रा. इ. पा. १००).

**राजेंद्र चोल**—(स. १०१६–४३) हा पहिल्या राजराज चोलाचा मुलगा. याच्या वेळीं चोल साम्राज्य वैभवाच्या शिखरास पोंचलें. यानें इंदिरदन (इंद्र-रथ), धर्मपाल, रणशूर (लात राजा), गोविंदचंद्र (बंगालचा), महीपाल (पाल घराण्यांतील महीपाल १ ला ?) वगैरे राजांशीं लढाया केल्या. यानें बनवासी, मण्णै व सिलोन वगैरे प्रांत जिंकले.

यानें गंगाकिनाऱ्यापर्यंत मुलूख जिंकून गंगैकोंड ही पदवी कारण केली; आणि त्रिचनापल्लीजवळ 'गंगैकोंडचोलपुरम्' नांवाचें शहर वसविलें. यानें त्रिचनापल्लीजवळ सोळा फूट उंचीचा बंधारा घालून 'जयस्तंभतडाग' बांधला. यास पंडित चोल म्हणत.

२. (कुलोत्तुंग (चोल) चालुक्य पाहा).

३. (स. १२४६–६७) हा चोलांपैकीं तिसऱ्या राजराजाचा पुत्र. याच्या वेळीं एक तोतया उत्पन्न होऊन त्यानें दंगल माजविली, तेव्हां सोमेश्वर होयसळानें यास मदत करून थोडी शान्तता स्थापन केली. परंतु चोल साम्राज्याचे तुकडे व्हावयाचे थांबले नाहींत. अनेक मांडलिक स्वतंत्र बनले. शेवटीं वरंगळच्या गणपति काकतीय राजानें याचें सर्व राज्य जिंकून घेतलें. त्यामुळें पेन्नार नदीच्या उत्तरेकडील सर्व चोल साम्राज्य नामशेष झालें. याच्यानंतर त्रिभुवन वीरदेव राजा झाला.

**राजेंद्रदेव चोल**—(स. १०५२–६३) हा पहिल्या राजाधिराज चोलाचा धाकटा भाऊ. हा त्यानंतर गादीवर आला. याची मुलगी मदुरान्तकी. याला परकेसरीवर्मन् ही पदवी होती.

**राजोपाध्ये घराणें**—हे भोसल्यांचे कुलोपाध्ये होत. हे देशस्थ ऋग्वेदी शाकल्यगोत्री ब्राह्मण. यांचें मूळ गांव आर्वी (ता. श्रीगोंदे, जि. नगर). भोसल्यांचा वंश जेथें आहे, तेथें यांच्या शाखा दिसतात. शिवाजी महाराजांच्या घराण्याशीं संबंध असलेल्या पुरुषांचा वंशक्रम पुढीलप्रमाणें आहे. १ मल्हारभट–लक्ष्मणभट–मल्हारभट (स. १६७४–८९ सुमार)–मुद्गलभट (जन्म स. १६३१–मृत्यु स. १७३०)–रघुनाथराव (मृत्यु स. १७५९)–रामचंद्रराव (स. १८०८ सुमार)–रघुनाथराव–रामचंद्रराव. वरील लक्ष्मणाचा धाकटा मुलगा शामभट ऊर्फ सामराजापासून कोल्हापूरची शाखा सुरू झाली (सामराज पाहा).

२. रामेश्वरभट बिन नारायणभट–प्रभाकरभट (मृत्यु स. १६७२ सुमार)–बाळंभट (स. १६८७–१६९०)–रामेश्वरभट (स. १६८७–१७०९)–रघुनाथभट–धोंडभट ऊर्फ गोपाळभट–हैबतराव (स. १७६५ सुमार)–अमृतराव ऊर्फ दाजीबा (स. १८०८) कृष्णराव (प्रतापसिंहाबरोबर काशीस गेला).

३. रघुनाथराव (पंडितराव, स. १६७४–९०)-मोरेश्वर (पंडितराव स. १६८१) हे तंजावरपैकीं होत.

**राजिल प्रतिहार**—हा मंदोरच्या हरिश्चंद्राचा पुत्र.

**राज्जिल**—(स. ६२५) हा वज्रभटा(सत्याश्रया)-चा पुत्र. याचें राज्य अर्बुद देशावर म्हणजे अबूच्या पहाडाच्या आसपासच्या प्रदेशावर होतें. हा भीनपालच्या वर्मलात राजाचा सामंत होता. ही माहिती सिरोही राज्यांतील वसंतगडच्या शिलालेखावरून मिळते. हा शिलालेख वि. सं. ६८२ (स. ६२५) मधील आहे (एपि. इंडि. भा. ९, पृ. १९१–९२).

**राज्यदेवी**—बाणभट्टाची माता.

**राज्यपाल**—(स. ९००–२५सुमार) हा बंगाल्यांतील पालघराण्यांपैकीं नारायणपालाचा उत्तराधिकारी. याचा विवाह राष्ट्रकूटांपैकीं तुंग किंवा जगत्तुंग राजाची कन्या भाग्यवती नांवाच्या कन्येशीं झाला होता (म. यु. भा. २, पा. २१३).

२. (११०० सुमार) पालांच्या घराण्यांत रामपालाला या नांवाचा एक मुलगा होता. हा त्याच्या हयातींत राज्यकारभार पाहत असे. पण हा रामपालाच्या हयातींतच मेला (हिं का. मार्च १९२९).

**राज्यपाल गाहडवाल**—(स. ११७० सुमार) हा गोविंदचंद्र गाहडवालाचा पुत्र.

**राज्यपाल प्रतिहार**—(मृत्यु स.१०२०) हा रघुवंशी प्रतिहारांपैकीं विजयपालाचा पुत्र. गझनीच्या महमूदानें कनोजवर स्वारी केली. उत्बीनें आपल्या 'तारीख यामीनी' मध्यें पुढीलप्रमाणें लिहिलें आहे. 'मथुरा घेतल्यावर महमूद कनोजकडे वळला (स. १०१८). तेथील राजा जेपाल (राज्यपाल) याच्याजवळ अगदीं थोडी सेना होती. म्हणून हा गंगापार पळून गेला. महमूदानें सातहि किल्ले फोडले आणि जे लोक पळून गेले नव्हते त्यांची कत्तल केली (इलियट हिस्टरी ऑफ इंडिया, भा. २, पृ. ४५).

फिरिश्ता लिहितो—स. १०१८ मध्यें महमूद १०००० चुनंदा स्वार व वीस हजार पायदळासह कनोजवर आला. तेथील राजा कुंवरराय (हें नांव चूक आहे, राज्यपाल असें पाहिजे) मोठें राज्य आणि संपत्ति यांचा स्वामी होता. पण एकाएकीं स्वारी झाल्यामुळें सामना देणें किंवा सैन्य एकत्र करणें त्याला शक्य झालें नाहीं. त्यानें शत्रूच्या अफाट सैन्याला भिऊन तह केला व महमूदाचें स्वामित्व स्वीकारलें. महमूद तीन दिवस तेथें राहून मेरठकडे निघून गेला. स. १०२१ मध्यें महमूदाला खबर आली कीं मुसलमानांशीं तह केला व त्यांची सत्ता स्वीकारली म्हणून भोंवतालच्या राजांनीं याच्यावर हल्ला केला आहे. महमूद तावडतोब निघाला, पण तो पोंचण्यापूर्वीच कालिंजरचा राजा नंदराय (गंड चंदेल्ल) यानें कनोजच्या राजाला ठार केलें.' फिरश्ता कनोजच्या राजाचें नांव कुंवरराय लिहितो, पण त्याच्या पूर्वी सहाशें वर्षे उत्बी राय जैपाल असें राज्यपाल शब्दाचें अपभ्रष्ट रूप लिहितो. राज्यपालाला मारण्यांत विद्याधरावरोबर दुबकुंड येथील कच्छपघात (कच्छवाहा) सामंत अर्जुनहि होता. दुबकुंडाहून मिळालेल्या कच्छपघात (कच्छवाहा) वंशी सामंत विक्रमसिंहाच्या वेळीं वि. सं. ११४५ (स. १०८८) च्या शिलालेखांत त्याचा प्रपितामह अर्जुनच्या वर्णनांत लिहिलें आहे कीं, त्यानें विद्याधरदेवाच्या सेवेंत राहून मोठ्या युद्धांत राज्यपालाला ठार मारलें (इंडि. अँटि. भा. २, पृ. २३७).

**राज्यवर्धन**—(स. ६०५–खून स. ६०६) बैसवंशांतील रजपुतांपैकीं प्रभाकरवर्धनाला यशोमतीचें ठिकाणीं झालेला पुत्र. हा प्रभाकरवर्धन मेला तेव्हां उत्तरेकडे हूणाशीं लढण्याकरितां गेला होता. हा त्या युद्धांत घायाळ झाला पण तशाहि स्थितींत विजय मिळवून परत आला. पण प्रेमळ पित्याच्या मृत्यूमुळें यास इतका खेद झाला कीं यानें सिंहासन स्वीकारण्याचें नाकारून भदन्त (बौद्ध साधु) होण्याचा विचार केला व आपला धाकटा भाऊ हर्षवर्धन याला राज्यावर बसविण्याचें मनांत आणलें. हर्षानेंहि भदंत होण्याची इच्छा प्रगट केली व राज्य स्वीकारण्याची अनिच्छा प्रदर्शित केली. याच वेळीं माळव्याच्या राजानें राज्यश्रीच्या नवऱ्याला म्हणजे ग्रहवर्म्याला ठार करून राज्यश्रीला शृंखलाबद्ध करून तुरुंगांत टाकल्याची बातमी याच्या कानावर आली. त्याबरोबर यानें भदन्त होण्याचा विचार सोडून देऊन दहा हजार स्वारांसह माळव्याच्या राजावर स्वारी केली. लढाईत विजय मिळवून त्याचे पुष्कळ हत्ती, घोडे, रत्न, अलंकार, छत्र, चामर, सिंहासन वगैरे राज्यचिन्हें लुटून आणलीं. तसेंच अन्तःपुरांतल्या अनेक सुंदर स्त्रिया, तसेंच माळव्यांतले अनेक राजे यांना कैद केलें. पण परत येतांना बंगालच्या नरेंद्रगुप्ता(शशांका)नें आपल्या महालांत नेऊन विश्वासघातानें यास ठार मारलें (हर्षचरित, उच्छ्वास ६, पृ. १८६). याचप्रमाणें हर्षवर्धनाच्या दानपत्रांत राज्यवर्धनाचें बौद्ध होणें, देवगुप्त वगैरे राजांचा पराभव करणें, तसेंच विश्वासघातानें मृत्यु वगैरे गोष्टी आलेल्या आहेत

( एपि. इंडि. भा. ४, पृ. २१९ ). याच्या नंतर याचा धाकटा भाऊ हर्षवर्धन हा गादीवर आला.

२. बैसवंशांत आणखी एक राज्यवर्धन झाला आहे, पण त्याची विशेष माहिती नाहीं ( बैसवंश पाहा ).

**राणूबाई जाधव**— ही शिवाजीची मुलगी होती. हिच्या आईचें नांव सईबाई असून तिची ही दुसरी मुलगी. हीस जाधवांचे घरीं दिलें ( शि. नि. पा.२२४).

**राणूबाई ठोसर**—श्रीसमर्थ रामदासांची माता.

**राणेखान भाई**—( मृत्यु स. १७९१ ) पानपतच्या युद्धांत पळ झाल्यावर जखमी झालेल्या महादजी शिंदे यांना यानें वांचविलें, व सुरक्षित दक्षिणेंत आणलें. हा भिस्ती होता. याचा हा उपकार महादजी जन्मभर विसरला नाहीं. याला तो भाई म्हणे आणि हाहि त्याला योग्य सल्लामसलत देई. नाना फडणीसासारखे महादजीपुढें कुंठित झाले म्हणजे याला मध्यस्थी घालीत. याचा पुत्र हसनखानानें योद्धा म्हणून नांव मिळविलें. याचें घराणें शिंदेशाहींत नांदत आहे.

**राणोजी करांडे**—( स. १७६५-६६ ) हा रघूजी करांड्याचा पुतण्या. हा माधवराव पेशवे यांचे बाजूचा होता म्हणून यास जानोजी भोसल्यानें कैद केलें होतें.

**राणोजी घोरपडे**—( स. १६९९ ) हा संताजीचा पुत्र. हा धनाजी जाधव, वगैरेंप्रमाणें मोंगलांना जेरीस आणणारा एक होता. याची पत्नी संतूबाई. याचा चुलत भाऊ हिंदुराव यानें साताऱ्यावाहेर इखलासखान व त्याचा पुत्र यांना ठार केलें.

२. ( स. १७२३-८३ ) संताजीचा पुत्र पिराजी. त्या पिराजी कापशीकराचा हा पुत्र ( मं. वा. इ. १८३६, पृ. ६० ).

हा पेशव्यांच्या हुकमावरून कोल्हापूरकर संभाजीच्या मुलुखांत शिरला असतां शाहूनें ( स. १७३० चे सुमारास ) चिमाजी आपाला लिहिलें, ' संभाजी राजांची अमर्यादा केली. त्यांच्या मुलखांत राऊत पाठविले. ही गोष्ट बिलकूल उपयोगी नाहीं. पत्रदर्शनीं फौज माघारी आणणें. नाहीं तर आम्हीं त्यांचें साह्य करूं ' ( ऐ. टि. १. २२ ).

**राणोजी भोसले**—( मृत्यु स. १७७३ सुमार ) हा उमरावतीच्या बापूजी भोसल्याचा मुलगा. हा बाळाजी विश्वनाथाबरोबर दिल्लीस गेला असतां याचा भाऊ संताजी मारला गेला. तेव्हां यास सवाई संताजी अशी पदवी देण्यांत आली.

२. जिजाजी भोसले उमरावतीकराचा हा मुलगा.

**राणोजी लोखंडे**—( फत्तेसिंग भोसले पाहा ).

**राणोजी शिंदे**—( मृत्यु स. १७४५ ) हा साताऱ्याजवळील कन्हेरखेडचा राहणारा. हा बाळाजी विश्वनाथाच्या पदरीं साधा शिपाई म्हणून होता. बाजीरावाच्या बऱ्हाणपुरच्या सुभेदाराशीं व माळव्यांतील दाऊदखानाशीं झालेल्या लढायांत यानें नांव कमावलें ( स. १७२४ ). फौजेच्या खर्चासाठीं यास माळव्याची अर्धा मोदासा तोडून मिळाली व चौथाईवसुलीचे कामावर यास नेमलें. हा भोपाळच्या लढाईंत होता ( स. १७३८ ). हा शूर, कर्तबगार व स्पष्टवक्ता होता ( ऐ. टि. २. ३५ ).

**राधाबाई पेशवे**—( मृ. स. १७५३ ) बाळाजी विश्वनाथाची पत्नी. हिला बाजीराव व चिमाजी असे दोन मुलगे व भिऊबाई आणि अनुबाई अशा दोन मुली होत्या. हीं राजकारणांतहि लक्ष घाली. हिचें वजन दरबारांतील सरदारांवर बरेंच होतें. हिला परराष्ट्रीय दरबारांत बराच मान होता, हें ही काशीयात्रेस जात असतां उदेपुरास हिचा जो आदरसत्कार झाला त्यावरून दिसून येतें ( पे. द. ९. १३ ).

स. १७५१ त नानासाहेब पेशव्यांनीं हिची तुला रुपये घालून केली होती. ही स. १७५३ त मरण पावली.

**राधाबाई भावे**—ही रामदुर्गसंस्थानांतील नारायणरावाची बायको. स.१८२७ त हिचा नवरा मेल्यानंतर हिनें इंग्रजांच्या आग्रहास्तव नरगुंदकर 'हरिहर' नांवाच्या मुलास दत्तक घेतलें ( स. १८५७ ).

**राधाबाई माने**—( स. १६९७ ) म्हसवडकर नागोजी मान्याची बायको. आपल्या भावास संताजीनें ठार केलें म्हणून सूड घेण्याच्या भावनेनें कारखाळ्याच्या रानांत हिनें संताजीशीं मारामारी केली व संताजी ठार झाला.

**राधाबाई शिंदे**—ही पद्मसिंग राऊळाची बहीण व महादजी शिंद्याची बायको.

**राम**—( खोलेश्वर पाहा ).

२. ( कविताकाल स. १६७४ ) एक हिंदी कवि. शृंगारसौरभ व हनुमन्नाटकाचा कर्ता.

**राम आरविदु**—( स. १५७७ सुमार ) हा विजयनगरच्या तिरुमल्ल आरविदूचा तिसरा मुलगा. याचे पहिला श्रीरंग व दुसरा व्यंकट हे दोनहि भाऊ गादीवर बसले. हा कर्नाटकचा सुभेदार असे. पण बंडामुळें याची सत्ता दुबळी होती. यानें एकदां निजामशाहाचा पराभव केला होता, असें रामराजीयम्‌मध्यें म्हटलें आहे. याची पत्नी नरसिंगमा. याचे पुत्र दोन. दुसरा तिरुमल्ल व दुसरा श्रीरंग.

पण ते अल्पवयी असल्यामुळें याचा भाऊ व्यंकट कर्नाटकची व्यवस्था पाहूं लागला. हा स. १५७७ पर्यंत जिवंत होता (राजा ओडियर पाहा).

२. (स. १६१४–३०) विजयनगरच्या राजघराण्यापैकीं तालिकोट-युद्धानंतर पहिल्या व्यंकटपतीच्या मागून गादीवर आलेला राजा. हा आरविडु घराण्यांतील पहिल्या श्रीरंगाचा पुत्र. याच्या मातेचें नांव कृष्णमा. याला रंगप्पा नांवाचा एक भाऊ होता.

**रामकृष्ण**—विद्यारण्याच्या पंचदशीवरील टीकाकार.

२. (ग्रंथकाल स. १६८८ सुमार) एक ज्योतिषज्ञ. यानें गणितामृतलहरी व बीजप्रबोध हे दोन ग्रंथ व बीजप्रबोधावर टीका लिहिली. पिता लक्ष्मण. गुरु सोमनाथ. गांव पश्चिम घाटावरील जळपूर.

**रामकृष्णभट्ट**—(स. १६००) हा काशीच्या भट्ट घराण्यापैकीं नारायणभट्टाचा पुत्र. ग्रंथः—जीवत्पितृककर्तव्यनिर्णय, कोटिहोमादिपद्धति, अनंतव्रतोद्यापनप्रयोग, उत्सर्जनोपाकर्मप्रयोग, तत्त्वविचार, ज्योतिष्टोमपद्धति, मासिकश्राद्धनिर्णय, वास्तुशांतिप्रयोग, शिवलिंगप्रतिष्ठाविधि. निर्णयसिंधूकार कमलाकरभट्ट हे याचे पुत्र होत. याचा भाऊ शंकरभट्ट.

**रामकृष्णभट्टाचार्य चक्रवर्ति**—(स. १५६० सुमार) हा रघुनाथशिरोमणीचा शिष्य व पुत्र. ग्रंथः—गुणशिरोमणिप्रकाश, न्यायदीपिका.

**रामकृष्णसूरि**—संस्कृत भाषेंतील प्रभावतीप्रद्युम्न नाटकाचा कर्ता.

**रामगुप्त**—(स. ३८०) समुद्रगुप्ताचा मुलगा. चंद्रगुप्तापूर्वी हा गादीवर आला होता. कुशानावर यानें स्वारी केली असतां पराभूत होऊन शत्रूच्या अंतःपुरांत राणी पाठविण्याच्या अटीवर यास आपली सुटका करून घ्यावी लागली. चंद्रगुप्तहि बरोबर होताच. शेवटीं चंद्रगुप्तच स्त्रीवेषानें गेला आणि शत्रूचा फडशा पाडला. या रामगुप्ताचा शोध नवीन लावला आहे (जे. बी. ओ. आर. एस्. १. १४, पा. २२३).

**रामचंद्र अनंत बडवे**—(स. ८०० सुमार) हे मल्हाद शिवाजी बडवे यांचे पणतू होत. 'सुश्लोक वामनाचा, अभंगवाणी प्रसिद्ध तुकयाची। ओवी ज्ञानेशाची किंवा आर्या मयूरपंताची॥' ही आर्या याची होय. यानें आपल्या चोवीस आर्यांत पंताच्या काव्याची पारख फार नामी केली आहे. हा विठोबादादा चातुर्मासे यांचा शिष्य असून त्यांजवरहि याचे दहा–बारा श्लोक आहेत. विठोबादादा चातुर्मासे हे मोरोपंताचे समवयस्क होते.

**रामचंद्र कविभारती**—(स. १०४५ सुमार) एक बंगाली ब्राह्मण. हा सिलोनच्या पराक्रमबाहूच्या आश्रयाला गेला, व तेथें हा बौद्ध झाला. यानें 'भक्तिशतक' काव्य संस्कृतांत लिहिलें. त्यांत यानें रामकृष्ण देवाप्रमाणें गौतमबुद्धाची भक्तिपूर्वक प्रार्थना केली आहे.

**रामचंद्र गणेश कानडे**—(मृत्यु स. १७८०) उत्तर पेशवाईंत हा एक प्रसिद्ध सेनापति व मुत्सद्दी होता. शाहूनें याला इनाम दिलें होतें. यानें हिंदुस्थानच्या सर्व भागांत मोहिमा केल्या होत्या. याचें लढाईचें शिक्षण सदाशिवभाऊच्या हाताखालीं झालें होतें. जानोजीच्या वरील थोरल्या माधवरावांच्या स्वारींत याच्यावर श्रीमंतांचा मुख्य भरंवसा होता. त्यानंतर उत्तरेच्या स्वारीचा सर्व अखत्यार याजकडेच दिला होता. रोहिले, रजपूत, जाठ वगैरेंची खोड यानें शिंदे होळकरांच्या मदतीनें चांगली मोडली.

इंग्रज व सुजा यांच्या तडाख्यांतून शहाअलम बादशाहास सोडवून दिल्लीची पातशाही पेशव्यांच्या हाताखालीं घालण्याचें काम यानेंच केलें. बिनीवाले व कानडे यांच्यांत तंटा झाला तेव्हां श्रीमंतांनीं पंतास दक्षिणेंत परत बोलाविलें. परंतु हा अपमान यास सहन न होऊन यानें संन्यास धारण करण्याचा बेत केला, परंतु श्रीमंतांनीं याची समजूत घातली, (विसाजी कृष्ण बिनीवाले पाहा).

यानंतर बारभाईच्या कामांत यानें बरींच वर्षे कामगिरी केली. शेवटीं खंडाळ्याच्या लढाईंत इंग्रजांशीं लढत असतां पंतांनीं धारातीर्थी देह ठेविला (१२।१२।१७८०). यांचा पुत्र माधवराव यानेंहि मराठेशाहींत बरीच कामगिरी केली. पंताचा वाडा पुण्यास शनवारवाड्याच्या उत्तरेस नदीच्या काठीं होता. या वाड्याचें नक्षीकाम फारच सुंदर होतें. स. १९२४ सालीं शनवारवाड्यापुढें नवा पूल झाला तेव्हां हा वाडा पाडण्यांत आला.

हा कोंकणस्थ ब्राह्मण. गोत्र शांडिल्य. याचे वडील शाहू छत्रपतीचे वेळीं उदयास आले. यांचेकडे जरीपटका संभाळण्याचें काम असे. याचे वडील गणेश केशव यांस श्रीशाहूनें राज्याभिषेक शक ५१ क्रोधीसंवत्सरे फाल्गुन शु. ६ रोजीं सोनोरी येथें ६० बिघे जमीन दिली. पुढें यांनीं सातवणें खुर्द, ब्रह्मवाकडी (ता. पाथ्री, जि. परभणी) व भिलवडा (ता. पाटोदे, जि. बीड) हीं तीन गांवें जहागीर मिळवलीं व शिवाय पंढरपूर तालुक्यांतील गोपाळपूर येथील जमिनी, जमखिंडी संस्थानापैकीं मौजे मुढवी येथील इनाम जमीन १०० एकर व नेवासें जि. नगरपैकीं माळवडगांव येथील पाटिलकी येणेंप्रमाणें वतन

संपादन केलें. याचे चिरंजीव माधवराव यांनींहि चांगला लौकिक मिळवला. सध्यां याचे वंशज सातवणें, सवंदगांव (जि. औरंगाबाद) इकडे राहतात (मं. वार्षिक श. १८३७, पा. १४१).

**रामचंद्र जाधव**--(खून स. १७६९) चंद्रसेन जाधवाचा पुत्र. स. १७६१ मधल्या स्वारींत निजामानें देवळें जाळलीं, तेव्हां हा पेशव्यास मिळाला. तेव्हां सेनापतिपद व गुजराथ यास देऊं केली. पण ती न दिल्यानें यानें रघुनाथरावावर मारेकरी घातले. तेव्हां यास दौलताबादच्या किल्ल्यावर ठेवलें. तेथून सुटल्यावर हा मोगलांकडे गेला. शेवटीं हा निजामाकडून मारला गेला.

**रामचंद्र दैवज्ञ**—(स. १८२७) छंदोमंजरीचा कर्ता (मं. वा. इ, १८३६ ले. ६६).

**रामचंद्र नाईक परांजपे**--(स. १७७६) रत्नागिरीचा किल्लेदार व भाऊसाहेबांच्या तोतयाचा पुरस्कर्ता.

**रामचंद्र नीळकंठ अमात्य**—(जन्म स. १६५० –मृत्यु स. १७३३ सुमार) हा निळो सोनदेव बहुतकराचा मुलगा व शिवाजीचे मुख्य प्रधान मोरोपंत पिंगळे यांचा जांवई.

निळो सोनदेव शिवाजीचा अमात्य असतां स. १६७२ मध्यें मृत्यु पावला आणि त्याचे जागीं याची नेमणूक झाली. तेव्हांपासून हा राजकारणांत वावरूं लागला. अण्णाजी दत्तोनंतर सचीवपद याच्याकडे आल्याचाहि निर्देश आहे (स. प. पृ. १८६).

यावरून हा शिवाजीच्या हाताखालीं तयार झालेल्या मंडळींपैकीं होय. संभाजीच्या मृत्यूमुळें उत्पन्न झालेल्या बिकट परिस्थितींत याचें कर्तृत्व प्रगट झालें आणि याच्या कर्तबगारीनेंच मराठी राज्याला पुनः जोरदारपणा प्राप्त झाला.

संभाजी मारला गेला, फितुरीमुळें रायगड, येसूबाई आणि बाल शाहू, यांसुद्धां शत्रूच्या ताब्यांत गेला, राजारामालाहि सुरक्षितपणाकरितां महाराष्ट्र सोडून कर्नाटकांत जिंजीस जावें लागलें, तेव्हां औरंगजेबासारख्या बादशहापासून मराठेशाहीचें संरक्षण करण्याचें काम या पुरुषानें यशस्वीपणें पार पाडलें. महाराष्ट्रांत सैन्य उभारून बादशाहाला यशस्वीपणें तोंड दिलेंच. शिवाय जिंजीस सात वर्षे वेढा पडला असतां इकडून सैन्य पाठवून आणि त्यांची रसद तोडण्याचा प्रयत्न करून आणि शेवटीं तर राजारामास वेढ्यांतून सुरक्षित बाहेर पळवून यानें मोगलांवर मात केली. राजा व खजिना हे दोन्ही जागेवर नसतां महाराष्ट्र व कर्नाटक या दोन प्रांतांत सारखी युद्धाची धुमश्चक्री चालू ठेवून आपला लष्करी पत्रव्यवहार बिनचूक चालवणें केवढ्या चातुर्याचें काम आहे !

राजाराम जिंजीस पोंचल्यावर अष्टप्रधानांच्या नेमणुका झाल्या; त्यांत हणमंत्याला त्याच्या विशेष कामगिरीमुळें अमात्यपद द्यावें लागलें. तेव्हां याला वैषम्य वाटूं नये म्हणून सर्वाधिकारी अशा अर्थाचें हुकमतपन्हा हें पद निर्माण करून त्याचीं वस्त्रें जिंजीहून विशाळगडावर याच्याकडे पाठविण्यांत आलीं (स. १६९१). पुढें हणमंते वारला, तेव्हां दोनहि पदें याच्याकडे आलीं (स. १६९७).

यानें आपल्या अधिकाराचा नेकीनें उपयोग करून लोक राजी राखले, खजिन्यांत तूट पडूं दिली नाहीं आणि मोगलांना त्रस्त करून सोडलें. केसो त्रिमल पिंगळ्यासारखीं कर्तबगार माणसें कर्नाटकांतून एक लाख होन व फौज महाराष्ट्राला पुरवीत होते आणि इकडूनहि तिकडे लाखों सैनिक दाखल झाले (रा. खं. ३४७–३४८). असा राष्ट्रीयदृष्ट्या मोठ्या वैभवाचा काळ या वेळीं यानें निर्माण केला (स. १६९०).

संभाजीच्या वधानें लोक चिडले होते, शाहूच्या कैदेनें लोकांना चेव आला होता; आणि संताजी-धनाजीच्या पराक्रमानें लोकांत आत्मविश्वास उत्पन्न झाला होता. त्यांतच यानें वतनाचें आमिष लोकांच्या पुढें केलें. तव्हां मराठा खडबडून रोज नवा पराक्रम करूं लागला आणि जिंजीहून वतनेंहि सुटूं लागलीं. तेव्हां 'सनदेंत किंवा फर्मानांत असेल त्याच्या निमे हिश्शानें द्यावें' (स. १७००). असा निर्णय करावा लागला (रा. खं. ८. ५२). राजारामाच्या मृत्यूमुळें उत्पन्न झालेल्या अडचणींसहि यानें मोठ्या धिमेपणानें तोंड दिलें.

राजारामानें वास्तविक संभाजी–पुत्र शाहू राज्याचा मालक म्हणून स्वतःला राज्याभिषेक करून घेतला नव्हता. तसेंच पुढें चालवावें, असें याचें मत होतें. पण ताराबाईचा आग्रह आणि दुहीची भीति यांमुळें यानें ताराबाईचा पुत्र शिवाजी याची मुंज करून त्याला राज्याभिषेक करविला.

पण असे मताविरुद्ध कांहीं प्रकार घडले कीं, विरुद्ध वागावयास सुरुवात करण्याचा याचा स्वभाव नव्हता. प्रत्यक्ष औरंगजेबानें कपटविद्येचे प्रयोग करूनहि आपसांत भांडणें लावण्याचा प्रयत्न केला. पण हे सर्व डाव या राजकारणी पुरुषाच्या परिचित होतें.

राजारामाच्या मृत्यूची हकीगत यानें शाहूस कळविली तेव्हां त्यानें यास लिहिलें कीं, 'राजारामाचे ठिकाणीं आम्हांस तुम्ही आहां. त्यांनीं राज्य रक्षिलें तें आपण रक्षावें.'

औरंगजेबाच्या मृत्यूनंतर शाहू आला तेव्हां त्याचें राज्य त्यास द्यावें व दुहीचा प्रादुर्भाव होऊं देऊं नये असें याचें मत दिसतें. पण युद्धाचाच प्रसंग आला तेव्हां यानें ताराबाईचा पक्ष सोडला नाहीं. पण इतरांनीं ताराबाईला सोडल्यामुळें शाहूची सत्ता महाराष्ट्रांत स्थापन झाली. आणि ताराबाई व हा बाजूला पडले. पुढें ताराबाईची सवत राजसबाईनें आपला मुलगा संभाजीला गादीवर बसवून ताराबाई व शिवाजी यांस अटकेंत ठेवलें (स. १७१४). तेव्हां संभाजीचा हा तावेदार झाला. याचें शेवटलें राजकारणी काम संभाजीला उद्देशून लिहिलेलें राजनीतीचें आज्ञापत्र होय (स. १७१६ नवं. १९). यानंतर मात्र हा राजकारणांतून निवृत्त होऊन संन्यास घेऊन अलीबागेच्या उत्तरेस श्रीकनकेश्वर येथें शेवटपर्यंत राहिला. तेथें कान्होजी आंगरे याची व्यवस्था करीत असे (रा. खं. ८. १५२). हे स. १७३०-३३ च्या दरम्यान मृत्यु पावले असें दिसतें. यांना भगवंतराव, मोरेश्वर व शिवराम असे तीन पुत्र होते (अमात्यांची वंशावळ पाहा).

हे एक दोन वेळांखेरीज प्रत्यक्ष युद्धावर गेल्याचें दिसत नाहीं. यांचा 'राजनीति' किंवा 'आज्ञापत्र' हा ग्रंथ यांच्या राजनीतिनैपुण्याची व दूरदर्शीपणाची आठवण चिरकाल टिकविल.

**रामचंद्र पंडित**—(स. १८१७) यानें माध्यंदिन शाखेच्या ईशावास्य उपनिषदावर 'ईशावास्य रहस्यविवृत्ति' नांवाची टीका लिहिली आहे. हा कृष्णात्रेय गोत्रांतील असून याच्या बापाचें नांव सिद्धराज (सिद्धेश्वर). वरील टीका यानें शके १७३९ मध्यें लिहिली.

**२.** (स. १८२४) 'वृत्ताभिराम' नांवाच्या संस्कृत ग्रंथाचा कर्ता. याचें नांव बाबामहाराज. गांव नरसिंगपूर.

**रामचंद्रपंत भानु**—श्रीमंत बाळाजी विश्वनाथ पेशवे यांचा फडणीस.

**रामचंद्र बाबाजी महाडकर**—हा प्रभु जातीचा असून कोल्हापूरचा सुमंत होता. शंभु छत्रपतीनें यास हल्याळ परगणा इनाम करून दिला (म. रि. म. १, पा. ४३३).

**रामचंद्रबाबा शेणवी**—(मृत्यु स. १७५४ ऑक्टो. ४) याच्या वडिलांचें नांव मल्हारराव असून, हा सावंतवाडी संस्थानांतील आखली गांवचा कुलकर्णी होता. एकदां गांवच्या वसुलाचा सरकारांत भरणा न झाल्यानें हा घर सोडून साताऱ्यास पळून आला. तेथें यानें राजगुरु कवेश्वर औतूरकर यांचे येथें नोकरी धरली. पुढें त्यांच्या शिफारसीवरून पेशव्यांनीं याला आपल्या पदरीं ठेविलें.

पुढें हा या जागीं उत्तम मुत्सद्दी म्हणून लवकरच प्रसिद्धीस आला. राज्यव्यवस्था ठरविल्यानंतर थोरल्या बाजीरावास याचा फार उपयोग झाला. यानें पेशवे, शिंदे, होळकर व पवार यांमध्यें माळव्याची वांटणी मोठ्या कुशलतेनें केली. याच्याजवळच नानासाहेब व भाऊसाहेब यांचें राज्यकारभाराचें शिक्षण झालें. पेशव्यांनीं याला पुढें राणोजी शिंद्यांच्या दिवाणगिरीची जागा दिली. तेथें बाबानें "आपली तुंबडी चांगलीच भरून घेतली. राणोजीस अखेर पावेतो पैशाची जी टंचाई भासत होती ती कांहीं अंशीं याच कारणानें" (डफ). परंतु पुढें जयाप्पाच्या कारकीर्दीतहि दिवाणगिरी आपणांसच द्यावी असें यानें पेशव्यास कळविलें. परंतु जयपुरच्या गादीसंबंधींच्या तंट्यांत याचें वर्तन जयाप्पास पसंत न पडल्यामुळें जयाप्पा व हा यांचें बरें नव्हतें; व जयाप्पाचा ओढा मल्हाररावाकडे होता म्हणून त्यानें याला काढलें. तेव्हां हा पुढें पेशव्यांचा द्वेष करूं लागला. भाऊसाहेबानें ३६ लाख रुपये घेऊन यास आपला दिवाण नेमिलें. स. १७५० त रामराजा व पेशवे यांच्यांतील सांगोल्याचा करार याच्या मार्फतच ठरला.

बाबानें जमीनमहसूल व दप्तर या खात्यांत बऱ्याच सुधारणा केल्या होत्या. याला मराठी राज्याच्या हिशोबाचें ज्ञान उत्कृष्ट होतें. नानासाहेब नेहमीं बाबाच्याच सल्ल्यानें अनेक बाबतींत निकाल देत असत.

सावंतवाडी संस्थानचा तंटा याच्याच वतीनें पेशव्यांनीं मोडला. पेशव्यांचें कर्ज वारण्याची युक्ति म्हणून मोठमोठ्या सरदारांवर पट्टी बसविण्याची सूचना बाबाचीच होय. हा स्वभावानें फार तापट होता. नवज्वर होऊन ता. ४-१०-१७५४ रोजीं हा पुण्यास वारला. याची स्त्री द्वारकाबाई सती गेली. मरणसमयीं याच्याजवळ पुष्कळ संपत्ति होती. यानें पुष्कळ दानधर्म केला. यास सदाशिव नामक दत्तकपुत्र होता.

**रामचंद्र बाळकृष्ण बेकार**—(स. १६४५) प्रदोषव्रतमाहात्म्य ग्रंथाचा कर्ता. कपिलगोत्री ब्राह्मण.

**रामचंद्रभट्ट**—(स. १५००-१५४०) हा रेवाच्या

वीरसिंह देवाचा समकालीन. ग्रंथ—राधाचरित्र, रोमावलीशतक व रसिकरंजन.

२. कृत्यारत्नावली नांवाच्या संस्कृत नाटकाचा कर्ता.

**रामचंद्र महादेव जोशी चासकर**—हा थो. बाजीराव पेशव्याचा मेहुणा.

**रामचंद्र मुमुक्षु**—यानें 'पुण्यश्रवणकथाकोष' नांवाचा ऐतिहासिक दृष्ट्या फार महत्त्वाचा ग्रंथ केला आहे. या ग्रंथाचें श्रीनाथूराम प्रेमी यांनीं हिंदींत भाषांतर केलें आहे. हा ग्रंथ जैनधर्मीयांचा आहे.

**रामचंद्र वाघ**—( स. १८०३–२९ ) हा प्रथम दुसऱ्या रघूजी भोंसल्याचे कारकीर्दींत पुढें आला. स. १८०३ सालीं दुसऱ्या इंग्रज-मराठा युद्धांत रघूजीतर्फे हा हजर होता. रामचंद्र वाघाचें अप्पासाहेबांशीं बरेंच मेतकूट होतें व त्यांचीं कारस्थानें नेहमीं चालत. रघूजीसहि ही गोष्ट माहित होती, पण तो बाहेरून कांहीं दिसूं देत नसे.

हा अप्पासाहेबांच्या मुख्य सल्लागारांपैकीं एक होता. पुढें अप्पासाहेबांचे इंग्रजांशीं झालेल्या युद्धांत हा अप्पासाहेबांकडून हजर होता, त्याचप्रमाणें १८१७ सालीं सक्करदऱ्याचे लढाईंतहि हा हजर होता.

स. १८१८ त इंग्रजांनीं अप्पासाहेबांस कैद केल्यावर त्यांनीं यासहि कैद केलें व प्रयागास पाठवलें. परंतु यानें रेसिडेंटास पत्र लिहून अप्पासाहेबांचे कटांत आपला कांहीं संबंध नाहीं असें कळविलें. यास यानंतर (१८२४ नंतर) सोडून दिलें असावें असें दिसतें. कारण स. १८२९ मध्यें हा जबलपुरास राहत असतांना यास नर्मदा–विभागांतून बाहेर काढून दिल्याबद्दल पत्रव्यवहार आढळतो.

सक्करदऱ्याचे लढाईंत रामचंद्र वाघ मनापासून लढला व शेवटपर्यंत इंग्रजांस शरण न जातां यानें आपणांवर संकट ओढून घेतलें. परंतु सीताबर्डीचे लढाईंत यानें कुचराई केली. हा मनापासून लढला असता तर सीताबर्डीचा परिणाम कदाचित् तात्पुरता तरी निराळाच झाला असता.

**रामचंद्र वाघेल**—( स. १५५५–९२ ) हा वीरभानु वाघेलाचा पुत्र. याच्या पदरीं फार विद्वान् होते. प्रथम तानसेन गवई याच्याच दरबारीं होता. याला रामनृपति असेंहि म्हणतात.

**रामचंद्र संगम**—( स. १४०७–१६ ) पहिल्या देवराय संगमाचा पुत्र. राजधानी उदयगिरी.

**रामचंद्र सावंत**—( स. १७३७–५५ ) हा फोंड सावंताचा नातू होय.

याचा सर्व कारभार याचा महापराक्रमी व कर्तबगार चुलता जयराम हा पाहत असे. पण पुढें चुलत्यापुतण्यांत भांडणें लागलीं. त्याचा फायदा पोर्तुगीजांनीं घेतला. याच्यानंतर याचा पुत्र खेम सावंत गादीवर आला.

२. ( स. १८०३–८ ) हा तिसऱ्या खेमसावंताचा पुत्र.

**रामचंद्राचार्य**—प्रक्रियाकौमुदीचा कर्ता.

**रामजी पाटील**—( स. १७८२–१८०० ) महादजी व दौलतराव शिंदे यांचा एक वकील. पुढें हा नानास फितुर झाला.

**रामजोशी**—( स. १७६२–१८१२ ) पेशवाईच्या शेवटच्या कालांतील पोवाडे व लावण्या करणारा प्रसिद्ध शाहीर. हा यजुर्वेदी ब्राह्मण असून सोलापूरचा राहणारा. याच्या वडील भावाचें नांव मुद्गल होतें, व तो नांवाजलेला शास्त्री व पुराणिक होता. याच्या बापाचें नांव जगन्नाथ. याचें उपनांव तासे. गोत्र वत्स, सूत्र कात्यायन, शाखा वाजसेनेय. हा प्रथम पंढरपुरांतील धर्मसिंधुकार काशीनाथ बाबा पाध्ये या गृहस्थांकडे संस्कृत शिकण्यास गेला; परंतु याला लावण्या व तमाशे पाहण्याचा फार नाद आहे, असें कळल्यावर त्यांचें व याचें न पटून हा तेथून निघाला व कर्नाटक प्रांतीं गेला. तेथें यानें कानडी भाषेचा अभ्यास केला, व संस्कृतहि शिकला, व फिरून पहिल्या गुरूकडे आला. तेथें यानें गुरूशीं संस्कृतांत वाद करून आपली ओळख करून दिली. तेव्हां गुरूनें याची पाठ थोपटली. पुढें हा सोलापुरास येऊन कांहीं दिवस पुराण सांगत असे. तेथें हा आपल्या विद्वत्तेनें सर्व लोकांत प्रसिद्ध झाला. याच्या घरापुढें एक मठ होता. तेथील मठाधिकारी शुभराय महाराज याचा फार तिरस्कार करी. तेव्हां एकदां हा मठापुढें कीर्तन करीत असतां यानें त्याच जागेवर 'भला जन्म हा तुला लाधला। हट्टातटानें पटा रंगवुनि जटा धरिशे कां शिरीं । मठाची उठाठेव कां तरी ।। ' ही प्रसिद्ध लावणी ताबडतोब रचून म्हटली; व तेथील मठाधिकाऱ्याला लाजावयास लाविलें. याला कीर्तन करण्याचा व पोवाडे व लावण्या रचण्याचा नाद असे. कविवर्य मोरोपंत व हा या दोघांचा फार स्नेह होता. मोरोपंत याला आपल्या आर्या दाखवीत असत व हा त्यांच्या आर्या कीर्तनांत उपयोगांत आणी, व त्यामुळेंच त्या सर्वतोमुखीं आहेत. हा लावण्या रचीत व तमाशे करीत असे म्हणून याला वाळींत टाकण्याचा कांहीं लोकांनीं प्रयत्न केला; व याच्यावर हा संध्या करीत नाहीं व चिमा नांवाच्या नायकिणीशीं उघड व्यवहार ठेवितो असे

आरोप केले होते. मरण्याच्या अगोदर यानें महाराष्ट्रभर कथाकीर्तनें केलीं, व शेवटीं, पुण्यास येऊन राहिला. यानें पंढरपूरवर्णन, तुळजापूरवर्णन, गिरीच्या व्यंकटेशाचें वर्णन, पुणेंवर्णन, व शनवारवाड्याचें वर्णन वगैरे लावण्या रचिल्या.

तमासगीर व कीर्तनकार या दोनहि नात्यांनीं पेशवाईंत गाजलेल्या शाहीरांत याची गणना होते. याचें मूळ उपनांव तासे होतें, परंतु याला मिळालेल्या वृत्तीवरून जोशी हें पडलें. हा फार उधळेपणानें वागे, म्हणून यास नेहमीं पैशाची याचना करण्याचा प्रसंग येई. हा मद्यहि पीत असे. याच्या लावण्या कथेकऱ्यांनीं म्हणण्याची पद्धत ठेवल्यानें व सरसहि असल्यानें याची ख्याति अद्यापिहि टिकून आहे. हा पुण्यास मरण पावला.

**रामदास**—( स. १६०८–८२ ) महाराष्ट्रांत नवें युग उत्पन्न करणारे सत्पुरुष. यांचा जन्म शके १५३० मध्यें रामनवमीस रामजन्माच्या वेळींच झाला. हे निजाम-हद्दींतील जांबगांवीं कुलकर्ण करणाऱ्या सूर्याजीपंत ठोसरांचे चिरंजीव. यांचें नांव नारायण. मातेचें नांव राणूबाई. यांना गंगाधरपंत नांवाचे एक वडील बंधु होते. तेच श्रेष्ठ किंवा रामीरामदास या नांवानें प्रसिद्ध आहेत. वडील सातव्या वर्षीं वारल्यानें यांचें उपनयन श्रेष्ठांनींच केलें. हे माध्वसांप्रदायसंबद्ध देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण असल्यानें कर्मठपणा आणि करारीपणा उपजतच यांच्या अंगीं बाणलेला होता.

बाराव्या वर्षीं भाचीशीं लग्न ठरलें, पण 'सुमूर्तें सावधान' म्हणतांच लग्नमंडपांतून यांनीं पलायन केलें. श्रेष्ठांना यांनीं मंत्र मागितला असतां त्यांनीं तो देण्याचें नाकारलें म्हणून हे नाशिकजवळ टाकळीस निघून गेले, अशी दुसरी एक आख्यायिका आहे. टाकळीस यांनीं बारा वर्षें तीव्र तपश्चर्या केली. दुपारपर्यंत गायत्रीपुरश्चरण व रामनामजप करावा, दुपारीं मधुकरी सेवन करावी आणि सायंकाळीं कथापुराण श्रवण करावें, असा क्रम ठेवून यांनीं साक्षात्कार संपादन केला. श्रीराम हेच यांचे गुरु होत. पुढील बारा वर्षें तीर्थयात्रेंत घालवून सर्व भरतखंड अवलोकन केलें. याचें थोडें वर्णन यांच्या 'तीर्थावळी' या प्रकरणांत यांनींच लिहिलेलें मिळतें (विविधविषय खं. २).

पुढें पैठणास आले असतां वृद्ध मातोश्रींची अवस्था कळली तेव्हां हे तिच्या दर्शनास गेले. गोदावरीतीरापेक्षां कृष्णातीर राहण्यास यांनीं पसंत केला. आणि आपल्या धर्मप्रचाराच्या व लोकजागृतीच्या कार्यास यांनीं सुरुवात केली.

प्रथम मसूरला मारुतीची स्थापना करून उत्सवास सुरुवात केली आणि आंगापूरच्या डोहांत सांपडलेल्या श्रीरामाची चाफळास स्थापना केली. आप्तइष्टांचीं बुद्धिमान् मुलें जवळ करून त्यांना युक्तिबुद्धीच्या गोष्टी सांगून समुदाय वाढविण्यास प्रारंभ झाला. 'श्रीराम जयराम जयजय राम' या तेरा अक्षरी मंत्राचा उपदेश करून जागोजाग शिष्य पेरण्यास सुरुवात केली. या मंत्राचा तेरा कोटी जप केल्यास देवाचें दर्शन होईल असें यांनी अभिवचन दिलें आहे. याच वेळीं चाफळनजीक शिंगण-गांवीं यांनीं शिवाजीला अनुग्रह दिला ( स. १६४९ ). हीच शिवाजीमहाराजांची व यांची पहिली भेट होय. पण पहिली भेट पुढें स. १६७२ ( श. १५९४ ) साली झाली असें म्हणणारा एक पक्ष आहे.

याच वेळीं यांचा शिष्यसमुदाय विशेष वाढलेला दिसतो. यांच्या राजकारणी शिष्यांत श्रीशिवराय, बाळाजी आवजी चिटणीस, प्रल्हाद निराजी, नीळो सोनदेव, रामचंद्र नीळकंठ इत्यादि शिष्य प्रमुख होत. धर्मकारणी शिष्यांत उद्धव, कल्याण, दिवाकर, वासुदेव, स्वानुभव-दिनकरकर्ते दिनकर, भीम, वेणु व अक्का या प्रमुख होत. यांनीं गुप्तरूपें अगणित शिष्य केले होते, असें कल्याण समर्थप्रतापांत म्हणतात.

शिवाजीनें रामदासांना करून दिलेली एक सनद उपलब्ध आहे ( स. १६७८ ). त्या सनदेंत चाफळास श्रीरामाची स्थापना केल्यापासूनचा वृत्तांत थोडक्यांत दिला आहे. त्याचा सारांश–१ चाफळची स्थापना, २ राजकारण व धर्मस्थापनेचा उपदेश, ३ संपादलेल्या राज्याचें रामदासचरणीं समर्पण, ४ राजकारणाचा पुनः उपदेश, ५ साम्राज्यप्राप्तीनंतर चाफळास इनाम. यावरून या दोघांचा संबंध पुष्कळ जुना ठरतो. आणि राजकारणाशीं यांचा असणारा प्रत्यक्ष संबंध नाकारतां येत नाहीं.

प्रतापगडच्या तुळजा भवानीची स्थापना यांच्या हस्तें झाली ( स. १६६१-शके १५८३ ). पुढें हे सज्जनगडावर राहूं लागले आणि शिवाजी व संभाजी हे यांच्या सान्निध्यांत तेथेंच येऊन राहिले होते. शेवटीं हे तेथेंच समाधिस्थ झाले. सज्जनगडावरील यांची समाधि यांच्या दहनस्थानीं बांधली आहे. यांच्या अस्थि पुढें काशीस पाठविण्यांत आल्या.

हे अत्यंत विरक्त होते आणि कडक वैराग्याचा यांनीं उपदेश केला आहे. तथापि यांचें वाङ्मय अत्यंत स्फूर्तिप्रद आहे. परमार्थ व व्यवहार यांची सांगड यांच्यापाशीं उत्कृष्ट दिसते. सामाजिक दोषांवर यांनीं केलेली झणझणीत

टीका आजहि ताजी आहे. व्यक्ति किंवा समाज यांचा उद्धार करण्याकरितां अशाच थोर व्यक्ति निर्माण व्हाव्या लागतात. श्रीरामचंद्राचें आदर्श चारित्र्य आणि मारुतीची उदात्त तत्त्वनिष्ठा यांचा निष्ठेनें प्रचार करून यांनीं नव-राष्ट्र निर्माण केलें आणि अव्वल मराठेशाहींत महाराष्ट्रांत सत्ययुगाचा भास उत्पन्न केला.

यांच्या वाङ्मयांत दासबोधाला अग्रस्थान आहे. रामदासाच्या वेळेसच या ग्रंथाच्या तीन वाढविलेल्या आवृत्त्या निघाल्या असाव्या असें वाटतें. एकवीस समासी जुना दासबोध आपणांस पाहावयास मिळतो. नंतर सत्तर समासांत दासबोध वाढविण्याची कल्पना सुचलेली दिसते. नंतर वाढवीत वाढवीत हल्लींचा दासबोध झाला. देव व पांगारकर यांनीं कल्याणस्वामी व त्यांचे बंधु दत्तात्रेय ( शिरगांवमठ ) यांनीं लिहिलेल्या प्रती शोधून काढल्या आहेत. श्री. शंकर श्रीकृष्ण देवांनीं तर सर्व जन्म समर्थ-सेवेंत खर्च करून त्यांचें वाङ्मय धुळें येथें समर्थ वाग्देवता-मंदिर उभारून लोकांपुढें ठेवलें आहे व जांब येथें समर्थ-मंदिर उभारलें आहे. मनाचे श्लोक, पंचसमासी, मानपंचक, निर्गुणध्यान, जनस्वभावगोसावी, करुणाष्टकें, दासबोधाचा सोलींव अर्थ, यांशिवाय यांचीं अनेक स्फुट प्रकरणें आहेत. त्यांत मनाचे श्लोक, भीमरूपी स्तोत्र व 'सुखकर्ता दुःखहर्ता' ही आरती हीं घरोघर म्हटलीं जातात.

२. (स.१५८१) नानकाच्या गादीवरील अमरदासाचा शिष्य. यानें आपल्या बायकोच्या ( बिबीभानी ) नांवें असलेल्या जमिनींत एक मोठा तलाव खोदून त्यास अमृतसर हें नांव दिलें. याजवर बादशहाची (अकबराची) विशेष मर्जी होती. हा शीखांचा चौथा गुरु होय.

३. 'रामसेतुप्रदीप' या संस्कृत काव्याचा कर्ता.

४. 'स्वरोदय' ग्रंथाचा कर्ता (मं. १८३६ वा.इ.५२).

**रामदासपंत**—( मृत्यु ता. ७.४.१७५२ ) शाहूच्या पश्चात् नानासाहेब पेशव्यानें निजामशाही नाहींशी करण्याचें ठरविलें. या वेळेस हा विलक्षण मनुष्य निजामशाहींत कारभारावर होता. नानासाहेबासारख्या चाणाक्ष व राजकारणकुशल मुत्सद्यालासुद्धां यानें कित्येक दिवस नुसत्या थापांवर झुलविलें. यावरूनच याच्या धूर्ततेची परीक्षा होते. हा शिकाकोलचा ब्राह्मण असून प्रथम नासिरजंगाजवळ होता. झुल्फेच्या नासिरजंगाला नाहींसें करण्याच्या कटांत हा सामील होऊन यानें त्याचा विश्वासघात केला. नंतर हा मुजफरजंगाचा दिवाण झाला. तेव्हां यास 'राजा रघुनाथदास' ही पदवीहि मिळाली. मुजफरजंगाच्या मृत्यूनंतर यानें व फ्रेंचांच्या बुसीनें मिळून सलाबतजंगास निजामी दिली. याच वेळेस नानासाहेब पेशव्यांनीं निजामावर स्वारी करण्याचें ठरविलें. तेव्हां यानें पेशव्यांच्या वकिलामार्फत आपल्या-विषयीं त्यांचा ग्रह चांगला करून दिला व नानासाहेबांस त्याचें सर्व कर्ज निवारण्याचें आश्वासन दिलें. या सर्व गोष्टींमुळें याची नानासाहेबांवर चांगलीच छाप पडली व त्यानें याच्या विश्वासांतल्या जानोजी निंबाळकरास काय-मचें पुण्यास ठेवून घेतलें. ताराबाईच्या वतीनें दमाजी गायकवाडानें नानासाहेबांवर स्वारी केली असतां यानें फौज देऊन पेशव्यास मदत केली होती. यामुळेंहि नानासाहेबांस याजविषयीं भरंवसा वाटे. उत्तरेकडून पेशव्यांचा ५ लक्षांचा खजिना पुण्यास येत असतां वाटेंत यानें बुसीच्या पलटणीच्या साहाय्यानें तो खजिना लुटला. आपण ह्या प्रकरणापासून अलिप्त आहोंत असें पेशव्यास भासविलें व आपण नुकसानभरपाई करून देऊं असें त्यास आश्वासन दिलें. परंतु पुढें याच्या थापा पेश-व्यांच्या लक्षांत येऊन, पेशवे व निजाम यांचें युद्ध ता. २१-११-१७५१ रोजीं कुकडी नदीवर (जि. नगर) झालें. लढाई चालू असतां चंद्रग्रहण आलें तेव्हां पेशव्यां-कडील मंडळी नदीवर गेली असतांना यानें त्यांच्यावर ही संधि साधून मारा केल्यामुळें पेशव्यांचा पराभव झाला. शेवटीं तह झाला, पण त्यांत याचाच वरचष्मा राहिला. तेव्हां नानासाहेबानें शिंदे-होळकरांच्या मदतीनें याचा पूर्ण मोड करण्याचें ठरविलें. परंतु याचा शेवटीं खून झाला. यास उत्तमराव व अच्युतराव नांवांचे दोन पुत्र होते ( वाकसकरकृत अप्रसिद्ध ऐ. चरित्रें ).

**रामदेव**—( चिरंजीव भट्टाचार्य पाहा ).

२. ( स. १४२२ सुमार ) यालाच व्यास श्रीरामदेव म्हणत. सुभद्रापरिणय, पांडवाभ्युदय हीं याचीं नाटकें आहेत.

**रामदेव चिरंजीव**—( स. १७०० सुमार ) या तर्कज्ञाचे ग्रंथ—१ विद्वन्मोदतरंगिणी, २ काव्यविलास, ३ माधवचंपू, ४ वृत्तरत्नावली. हा चिरंजीव नांवानें ओळ-खला जातो ( हि. सं. लॉ. पा. ४८३ ).

**रामदेव परमार**—आबूच्या परमारांपैकीं एक राजा. याचा पूर्णपाल किंवा कृष्णराज याच्याशीं काय संबंध होता हें सांगतां येत नाहीं.

**रामदेवराव यादव**—( स. १२७१-१३०९ ) हा कृष्ण यादवाचा मुलगा. हा महाराष्ट्रांतील एक वैभव-शाली सम्राट् होय. हा देवगिरी ( सध्यां दौलताबाद ) येथें राज्य करीत होता. अलाउद्दीन खल्जीनें प्रवासी

म्हणून याच्या राज्यांतून प्रवास केला आणि एकंदर पाहणी करून याचा मुलगा सैन्यासुद्धां परप्रांतांत असतां देवगिरीला वेढा दिला. अनेक प्रयत्न करूनहि किल्ला सर होईना. पण यास असें आढळून आलें कीं किल्ल्यांत धान्य म्हणून मिठाचीं पोतीं भरलेलीं आहेत. तेव्हां धान्याच्या अभावीं युद्ध करणें अशक्य आहे, शिवाय फितुरीचाहि संशय आल्यानें यानें घाईनें अलाउद्दीनशीं पुष्कळ द्रव्य देऊन तह केला. इतक्यांत सैन्यासह पर प्रान्तांत असलेला याचा शूर मुलगा शंकरदेव आला आणि यानें केलेल्या तहास न जुमानतां त्यानें मोठ्या जोमानें युद्धास सुरुवात केली. मुसलमानांचा अगदीं समूळ नाश होण्याची वेळ आली होती. पण मुसलमानांना दिल्लीहून कुमक आली अशी अफवा उठली. आणि त्यामुळें यांच्या सैन्याची पांगापांग होऊन मुसलमानांना जय मिळाला, आणि याला सर्वस्व देऊन आपला कसाबसा बचाव करावा लागला ( स. १२९४ फेब्रु. ५ ).

खंडणी घेण्याकरितां स. १३०६ मध्यें मलीक काफूर पुनः दक्षिणेकडे आला. तेव्हां हा लढाई न करितां त्याच्या स्वाधीन झाला आणि त्याबरोबर दिल्लीस गेला. तेथें अलाउद्दीननें यास सन्मानानें वागविलें. एक छत्र, राजाधिराज किताब आणि एक लाख रुपये देऊन यास प्रतिष्ठेनें स्वदेशीं रवाना केलें. यानंतर यानें दिल्लीच्या बादशहाशीं विरोध केला नाहीं. उलट त्यांना मदत केली. आणि त्यामुळें काफूरच्या दक्षिणेकडच्या स्वाऱ्या यशस्वी झाल्या. हा स. १३०९ मध्यें मृत्यु पावला. स. १३१२ मध्यें काफूर देवगडास आला तेव्हां हा मरण पावला होता ( शंकरदेव यादव पाहा ).

याच्या वेळीं ज्ञानेश्वर नामदेवादिकांनीं महाराष्ट्रांत धर्माची पताका उभारली आणि प्रचार सुरू केला. ज्ञानेश्वरानें आपल्या ज्ञानेश्वरींत यास ‘ सकळकलानिवास ’ व ‘न्यायानें पृथ्वी पालन करणारा’ असें म्हटलें आहे.

महानुभाव पंथाचा चक्रधर कृष्ण व हेमाद्रिसारखे धुरंधर पंडित हे याच्याच राज्यांत होते. खोलेश्वरासारखे ब्राह्मण सेनापति आणि भास्कराचार्यासारखे जागतिक पंडित याच सुमारास महाराष्ट्रांत उदयास आले. यावरून तत्कालीन महाराष्ट्राचा सांस्कृतिक श्रेष्ठ दर्जा दिसून येतो.

अलाउद्दीन खल्जीनें याचा पराभव करीपर्यंतचे शिलालेख उपलब्ध आहेत. त्यानंतरचे नाहींत. या कालांतील बहुतेक शिलालेख कानडींत व संस्कृतांत आहेत. उनकेश्वर ( तहसील किनवट, निजाम ) येथील शिलालेख मराठींत आहे. पंढरपूरच्या देवळाच्या जीर्णोद्धारासहि यानें व हेमाद्रि यानें देणगी दिल्याचा निर्देश तेथील चौऱ्यांशीच्या लेखांत आहे.

**रामदेव वाघेल**—( स. १२७५ सुमार ) हा बघेल वंशांतील अर्जुनदेवाचा पुत्र. यानें थोडे दिवस राज्य केल्यानें कोणी याचा निर्देश करीत नाहीं.

**रामनाथ विद्यावाचस्पति**—( स. १६२२ ) याचे ग्रंथः—संस्कारपद्धतिरहस्य, स्मृतिरत्नावली, काव्यप्रकाशरहस्य, त्रिकांडविवेक, अभिज्ञानशाकुंतलविवृत्तिः, लिंगादिसंग्रहटिप्पणी, लीलावतीरहस्य, धार्मिककर्मरहस्य, सामगमंत्रव्याख्यान. यांशिवाय धार्मिककर्मरहस्यामध्यें परिभाषाविधान, समयरहस्यविधान या दोन स्वतःच्या ग्रंथांचा निर्देश केलेला आहे. तसेंच त्रिकांडविवेकांत वर्णविवेकधातुचिंतामणिटीकेचा निर्देश आहे. यानें सुमारें शंभरपेक्षां कमीच मंत्रांचें भाष्य लिहिलें आहे. त्यांत गुणविष्णु, हलायुध व सायण इत्यादिकांच्या भाष्यांचें खंडण आढळतें. संस्कारपद्धतिरहस्याच्या शेवटीं त्या ग्रंथसमाप्तीचा काल दिलेला आहे. तसेंच धार्मिककर्मरहस्याच्या प्रारंभीं राजा गंधर्वरायाच्या सांगण्यावरून ग्रंथ लिहिला असें म्हटलें आहे.

**रामपाल**—( स. १०९८–११४० ) हा बंगाल्यांतील पाल घराण्यापैकीं तिसऱ्या विग्रहपालाचा मुलगा. महीपाल गादीवर आल्यावर त्यानें यास तुरुंगांत टाकलें, पण बंड होऊन तो मारला गेला व हा राजा झाला. मागील राजांना ज्यांचा विशेष त्रास झाला होता त्या वरेंद्रांतील म्हणजे उत्तर बंगालमधील कैवर्तांचा पुढारी दिव्योकपुत्र भीमाला यानें ठार केलें आणि तेथें आपली सत्ता स्थापन केली. ही माहिती संध्याकरनंदीच्या एका द्व्यर्थी काव्यावरून मिळते ( JRASB १९०० पा. ७३ ). याचा उत्कर्ष याचा मामा मथन ( अंगदेशचा राजा ) यानें पीथीचा ( वेंगीदेशांतील पीठापूरचा ) राजा देवरक्षित याचा पराभव करून केला. देवरक्षित हा राष्ट्रकूट (राठोड) होता ( हिं. भा. अ. ३४६–३४७ ). याच्या हयातींतच कुमारपाल व राज्यपाल वारले म्हणून नातू गोपाल याला राज्य मिळालें. पण तो लवकरच साप चावून मेला. मग याचा तिसरा मुलगा मदनपाल हा गादीवर आला ( हि. क्का. मार्च १९२९ ).

मथनच्या मृत्यूमुळें हा अत्यंत दुःखी होऊन यानें गंगेंत देह समर्पण केला ( हि. क्का. मार्च १९२८ ).

**रामप्रसाद**—( जन्म स. १७१८ ) एक धार्मिक बंगाली कवि. हा वैद्य जातीचा असून रायरामाचा पुत्र होय. जन्मस्थळ–कुमारह्वा. प्रथम हा मुन्शीचें काम करीत असे. परंतु याची काव्यशक्ति पाहून मालकानें यास

३० रु. दरमहा पेन्शन देऊन परत पाठविलें. नंतर स. १७२८ मध्यें कृष्णचंद्रराजानें यास २० रु. मासिक वेतन व १०० विघे जमीन देऊन याचा गौरव केला. ह्याची कविता फार मधुर व चित्ताकर्षक आहे.

**रामभट**—( स. १५९० ) नीळकंठ ज्योतिष्यांचा हा भाऊ होय. यास अकबराचा प्रधान रामदासाचा आश्रय होता. यानें 'रामविनोद' म्हणून एक करणग्रंथ लिहिला आहे. ह्याचा दुसरा ग्रंथ म्हणजे मुहूर्तचिंतामणि. तो बराच प्रख्यात आहे. हा ग्रंथ काशीक्षेत्रीं तयार केला व तेथें त्यावर 'प्रमिताक्षरा' नांवाची टीकाहि यानेंच लिहिली आहे. शिवाय याचा पुतण्या गोविंदानें 'पीयूषधारा' नांवाची टीका लिहिली आहे. ह्या दोन्हींहि छापून प्रसिद्ध झाल्या आहेत ( भा. ज्यो. पा. २७८ ).

**रामभद्र दीक्षित**—( स. १६९३ ) महादेवाचा समकालीन व कौंडिण्यगोत्री यज्ञरामाचा पुत्र. जन्मस्थळ–कंडरमाणिक्य ( कुंभकोणमूनजीक ). शहाजी राजानें शहाजीराजपुराचा कांहीं भाग यास दिला होता. हा नीलकंठमखिन्‌पासून काव्यशास्त्र, चोक्कनाथापासून व्याकरण व महादेवाचा गुरु बाळकृष्णापासून भक्तिज्ञान शिकला. हा चोक्कनाथाचा जांवई असून यानें शृंगारतिलकभाण, जानकीपरिणय इत्यादि नाटकें, व्याकरण, शब्दकोश व रामगुणवर्णनपर अनेक काव्यें लिहिलीं.

**रामभद्र प्रतिहार**—( स. ८३० सुमार ) रघुवंशी प्रतिहारांपैकीं दुसऱ्या नागभटाचा पुत्र. याच्या आईचें नांव ईसटादेवी. याला राम किंवा रामदेव असेंहि म्हणत. यानें फारच थोडे दिवस राज्य केलें. हा सूर्याचा भक्त होता. याला आपादेवी नांवाच्या राणीपासून भोज नांवाचा पुत्र झाला.

**रामभद्र सार्वभौम**—( स. १६०० पूर्व ) हा भवनाथ व भवानीचा पुत्र असून याला बापाविषयीं फार आदर वाटे. याच्या शिष्यशाखेंत जयराम न्यायपंचानन व जगदीश तर्कालंकार हे विद्वान् तर्कज्ञ उदयास आले. याचे ग्रंथः—( १ ) 'दीधितिटीका', ( २ ) 'न्यायरहस्य', ( ३ ) 'गुणरहस्य', ( ४ ) 'न्यायकुसुमांजलीकारिकाव्याख्या', ( ५ ) 'पदार्थविवेकप्रकाश'–रघुनाथशिरोमणीच्या पदार्थखंडनावरील टीका, ( ६ ) 'सत्चक्रवर्मदीपिका' ( हि. इं. लॉ., पा. ४०८ ).

**रामभद्र सिद्धांतवागीश**—( स. १६६० सुमार ) हा जगदीश तर्कालंकाराचा नातू असून यानें जगदीशाच्या 'शब्दशक्तिप्रकाशिका' या ग्रंथावर 'सुबोधिनी' नांवाची टीका लिहिली. हा स्वतःस नवद्वीपीय असें म्हणतो ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पृ. ४८० ).

**रामभारती अक्कलकोटकर**—(समाधि स. १८७८) अक्कलकोटचे प्रख्यात स्वामी. यांचा मूळ मठ कर्नाटकांत आहे. यांना चंचळभारती असेंहि म्हणत. हे पुष्कळ वर्षे मोहळास होते. यांची अंगकाठी उंच, भव्य व तेजःपुंज होती. हे लोकांच्या मनांतील गोष्टी सहज सांगत. यांनीं चैत्र वद्य १३ मंगळवार शके १८०० मध्यें अक्कलकोटासच समाधि घेतली.

**राममाणिक कविराज**—यानें माधव व सुलोचना यांची कथा संस्कृतांत आपल्या 'कृतार्थमाधव' नाटकांत वर्णिली आहे.

**रामराज**—( स. १८२५ सुमार ) हा तंजावरचा एक प्रसिद्ध पंडित होता. यानें शिल्पशास्त्रावर निबंध लिहिला आहे. त्यांत अगस्त्यकृत मानसार, मयमत, काश्यप, वैखानस, सकलाधिकार, विश्वकर्मा, सनत्कुमार, सारस्वत्य, वगैरेंचा समावेश केलेला आहे ( हि. का. १०७१ ).

२. केलडीच्या सदाशिव नायकाचा हा नातू. हा दोड्ड संकन्न आणि चिक्क संकन्न या दोघांपैकीं कोणाचा तरी मुलगा असावा.

**रामराजभूषण**—हा जातीचा भाट. याचे प्रख्यात ग्रंथः—वसुचरित्र, नरसभूपालीय, वगैरे होत. काव्य श्लेषप्रधान असून आल्हादकारक आहे. हा विजयनगरच्या दरबारांत होता.

**रामराजा**—हा शृंगवेरपूरचा राजा. शेखरकार नागेश भट्टाचा यजमान.

**रामराजा भोसले**—( स. १७४९–१७७७ ) हा साताऱ्याच्या शिवछत्रपतीच्या घराण्यांतील दुसऱ्या शिवाजीचा मुलगा. याच्या आईचें नांव भवानीबाई. हा बापाच्या मरणापूर्वी थोडे दिवस जन्मास आला ( स. १७१२ ). याचा चुलता दुसरा संभाजी व चुलती जिजाबाई. संभाजी व जिजाबाई हीं दोघें याला ठार मारण्याचा प्रयत्न करीत म्हणून याला गुप्तपणें पळवून बावड्याजवळ पानगांव येथें गुप्तपणें ठेवण्यांत आलें. तेथें पंत अमात्यांच्या देखरेखीखालीं यानें पंधरासोळा वर्षे काढलीं. शाहूच्या पश्चात् याचें अस्तित्व लक्षांत घेऊन ताराबाईनें याला गादीवर बसविण्याबद्दल विनंति केली आणि शाहूनें याला गादीवर बसविण्याबद्दल नानासाहेब पेशव्याला सांगितले तेव्हां त्यानें हरप्रयत्नानें याला गादीवर बसविलें (ता. ४–१–१७५०). शाहूनें दिलेल्या मुखत्यारपत्राप्रमाणें येथून पुढें पेशवे पुण्यास राहण्यास गेले आणि स्वतंत्रपणें राज्यकारभार करूं लागले.

तथापि हा कर्तबगार असता तर राज्यकारभारांत उघडपणें याला दूर सारण्याचें धाडस पेशव्याला झालें नसतें. रघूजी भोसले, दर्याबाई निंबाळकर व ताराबाई ही प्रमुख मंडळी व त्यांच्या भोंवतीं असणारे इतर लोक छत्रपतींचें महत्त्व टिकविण्याचा प्रयत्न करीत होते. त्यांना पेशव्याच्या हातांत गेलेली सत्ता बिलकुल पसंत नव्हती. पण रघूजी भोसले पेशव्याला मिळाला आणि ताराबाईशींहि याचें जमेना, तेव्हां तिनें सातारा सोडला. फक्त याची बहीण दर्याबाई निंबाळकर याला सल्लामसलत देत राहिली, पण तिलाहि पेशव्यानें सक्तीनें साताऱ्यांतून बाहेर काढिलें (पे. द. ६. ६४–६५).

शाहूनें पेशव्याला फक्त सर्वाधिकार दिले होते. राज्यावरील मालकी आपणाकडेच ठेवली होती. पण सदाशिवराव भाऊ व रामचंद्रबावा, प्रतिनिधींचें बंड मोडण्याकरितां यासह सांगोल्यास आले आणि तेथें सर्व सत्ताहि याच्याकडून त्यांनीं लिहून घेतली. आतां छत्रपति केवळ पासष्ट लाखांच्या नेमणुकीचा व साताऱ्याचा धनी होऊन राहिला, ही गोष्ट ताराबाईस बिलकूल आवडली नाहीं. याला वळविण्याच्या बाबतींत जेव्हां तिला अपयश आलें तेव्हां तिनें याला सातारच्या किल्ल्यांत भेटीस बोलावून कैद केलें. ती मरेपर्यंत हा तिच्या कैदेंतच होता (ता. २३. १०. १७५०–२८. ३. १७६३).

ताराबाई वारल्यावर याला मोकळेपणा मिळाला. पण याचें उमेदीचें आयुष्य वांया गेलें होतें. याला देवदर्शनाला सुद्धां परवानगी मिळण्यास त्रास होई. अशा स्थितींत हा काय करूं शकणार ?

याला दुर्गाबाई व सगुणाबाई अशा दोन बायका होत्या. त्यांना प्रत्येकीं आठ आठ हजारांची नेमणूक असे. याच्या तीन मुलींनाहि अशाच नेमणुका असत.

याचें काम म्हणजे नजरकैदेंतल्याप्रमाणें राहणें आणि निरनिराळ्या पेशव्यांना वस्त्रें देणें.

हा वारल्यावर याची राणी सगुणाबाई हिच्या मांडीवर वावीकर भोसल्यांपैकीं दत्तक देण्यांत आला आणि त्याचें नांव शाहू असें ठेवण्यांत आलें. तो धाकटा शाहू या नांवानें प्रसिद्ध आहे.

याचें व पेशव्याचें बिलकुल जमत नसे. हा वेडा होता हेंहि म्हणणें बरोबर नाहीं. पण पैसा व सत्ता यांच्या अभावीं हा वेड्यासारखा झाला होता. 'ब्राह्मणानें माझ्या राज्याचा खेळ केला आहे' असें हा वारंवार म्हणे (पे. द. ६. ५०).

राजा होईपर्यंत याचें आयुष्य अज्ञातवासांत गेलें, आणि तेंहि प्रथम देवडीवाल्या पुरभय्याच्या घरीं. नंतर पानगांवीं दर्याबाई निंबाळकरणीच्या घरीं आणि शेवटीं तुळजापुरच्या भोप्याच्या घरीं. शाहूच्या हयातींत सकवारबाई व कोल्हापूरची राजसबाई व जिजाबाई यांच्या भीतीनें ताराबाईनें अज्ञातवासांत हें मूल वाढविलें. हा प्रथम राजा होण्यासच तयार नव्हता. पण कसेंतरी आणून कांहीतरी दत्तविधान केलें. पण शेवटीं ताराबाईनेंच याला कैद दाखविली. आणि हा माझा नातू नव्हे असें ती म्हणूं लागली. अशा स्थितींत छत्रपतीचा वचक नाहींसा होऊन पेशव्यानें पराक्रमानें आपल्याकडे सर्वांचें लक्ष वेधून घेतलें.

**रामराय आरविदु**—(मृत्यु स. १५६५) हा विजयनगरचा सम्राट् कृष्णदेवराय तुलुवाचा जांवई व त्याच्या मागून गादीवर आलेल्या सदाशिवरायाचा सर्वाधिकारी मुख्य प्रधान होय. हा श्रीरंग व तिरुमल्लांबा यांचा पुत्र. याला तिरुमल्ल व वेंकटाद्रि असे दोन भाऊ होते.

कृष्णदेवराय तुलुवाच्या वेळेपासून हा राज्यकारभारांत होता. कृष्णदेवरायानंतर पहिला अच्युतराय गादीवर आला. प्रथम तो कारभारांत लक्ष घाली, पण पुढें त्याचे दोघे मेहुणे सकलम् (सलाकम) तिम्मराजु याच नांवाचे होते ते कारभार पाहत. तो कारभार आपल्या हातीं यावा म्हणून यानें कारस्थानें केलीं तेव्हां याला भावांसह विजयनगर सोडावें लागलें. पण यानें सैन्य जमवून त्यावर स्वारी केली. तो जुलमी कारभारामुळें अप्रिय झाला होता. त्याच्या सैन्यांत फितुरी होऊन तो मारला गेला आणि हा मुख्य प्रधान झाला. यानें अल्पवयी सदाशिवरायाला गादीवर बसविलें. सदाशिवराय वयांत आला तरी हाच मुखत्यारीनें राज्यकारभार पाही. सदाशिवरायाचें दर्शनसुद्धां प्रजाजनांना वर्षांतून एकदांच घडे !

हुसेन निजामशाहाविरुद्ध मदत मागण्याकरितां विजापूरचा अलीआदिलशाह विजयनगर येथें गेला होता. तेव्हां अलीची व्यवस्था यानें फार उत्तम ठेविली. हाहि सरहद्दीला लागून असणाऱ्या विजापूर, अहमदनगर व गोवळकोंडा येथील आपसांत भांडणाऱ्या राजांना मदत करी. पण शेवटीं हाहि चढेल झाला. पण याचा वाढत चाललेला वरचढपणा मुसलमानांना असह्य होऊन हुसेन निजामशाहाच्या नेतृत्वाखालीं मुसलमानांचा संघ तयार झाला; आणि तालिकोटच्या लढाईंत हा व याचा भाऊ व्यंकट मारला जाऊन विजयनगरची सहा महिने लूट झाली. तेव्हांपासून विजयनगरच्या राज्याला उतरती कळा लागली.

. याला चार बायका व पांच मुलगे होते. तिरुमलांबा, अप्पलंबा, कोंडम्मा व लक्ष्मम्मा या याच्या चार बायका होत. कृष्ण, पेद्द, तिम्म, कोंद व तिम्मराज हीं याच्या मुलांचीं नावें होत.

स. १५४२–६५ पर्यंत राज्यकारभार सर्वस्वीं याच्या तंत्रानें चाले. तरी हा प्रधान म्हणूनच कारभार पाही. त्या वेळचीं जीं आज्ञापत्रें किंवा सनदा उपलब्ध आहेत त्यांत सदाशिवरायाचें नांव राजा म्हणून आहे. पण पुढें मात्र याचा भाऊ तिरुमल्ल हा आरविदु घराण्याचा पहिला राजा झाला.

**रामराव जिवाजी चिटणीस**—(स.१७४३–७९) खंडो बल्लाळ चिटणीसाचा नातू. याचा पुत्र मल्हारराव.

**रामराव दादाजी भावे**—(मृत्यु स. १७४०) रामदुर्ग संस्थानचा मूळपुरुष. यानें नरगुंद व रामदुर्ग हे दोन किल्ले मोठ्या युक्तीनें मोगलांपासून हस्तगत केले. ते छत्रपतीनें याच्या दिमतीस दिले. पुढें कोल्हापूरकर संभाजीनें याला पंतसचीव केलें.

**रामरुद्र तर्कवागीश**—(स. १७०० सुमार) हा भवानंद सिद्धांतवागीशाचा नातू असून श्रीराम अथवा रामेश्वर याचा पुत्र होता. तसेंच हा मधुसूदनाचा शिष्य होता. यानें खालील ग्रंथ लिहिले आहेतः—

(१) तत्त्वचिंतामणि–दीधिति–टीका, (२) व्युत्पत्ति-वादव्याख्या, (३) कारकाद्यर्थनिर्णयटीका, (४) दिन-कर्यप्रकाशतरंगिणी, (५) तत्त्वसंग्रहदीपिकाटिप्पणी, (६) सिद्धांतमुक्तावलीटीका.

**रामवर्मन्**—(मृत्यु स. १७९८) त्रावणकोरचा राजा. हा मार्तंडवर्मानंतर गादीवर आला. यानें इंग्रजांशीं तैनाती फौजेचा तह केला.

२. (स. १७३५–१७८५) 'रुक्मिणीपरिणय' नाटकाचा कर्ता. कर्पूरमंजरीशीं या नाटकाचें फार साम्य आहे. हा कांची (त्रावणकोर संस्थानांतील कुरुर)-चा राजा रामवर्मन्च्या बहिणीचा मुलगा. यानें 'शृंगार-सुधाकरभाण' नांवाचें दुसरें एक नाटक लिहिलें आहे.

**राम वाजपेयि**—हा भारद्वाजगोत्री ऋग्वेदी ब्राह्मण होता. हा माळव्यांतून नैमिषांत म्हणजे पंजाबांत आला. यानें कुंड रामवाजपेयी नांवाचा कुंडावर संस्कृतमध्यें ग्रंथ लिहिलेला आहे. यानें हा ग्रंथ (स. १४४९) मध्यें लिहिला. याला गल्लपुराधिपाचा आश्रय होता.

**रामसहायदास**—एक हिंदी कवि. याच्या पित्याचें नांव भवानीदास. यानें शृंगारसतसई नांवाचा ग्रंथ लिहिला. या ग्रंथाची स. १८३५ (सं. १८९२) मधील हस्त-लिखित प्रत उपलब्ध आहे. याचा काल स. १८०० (सं. १५७७) असा मानला जातो. याशिवाय यानें वृत्ततरंगिणी, ककहरा, रामसप्तशतिका आणि वाणीभूषण या नांवांचे ग्रंथ लिहिले. शृंगारसतसई यामध्यें ७०० दोहे असून हा ग्रंथ बिहारीसतसईच्या तोडीचा आहे (क. कौ. १).

**रामशास्त्री प्रभुणे**—(स. १७२०–१७८९) पेशवाईतील एक प्रख्यात न्यायाधीश. हा माहुलीचा राहणारा असून देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होय. सुमारें २० वर्षांपर्यंत हा निरक्षर होता. प्रथम हा साताऱ्याच्या अनगळ सावकाराकडे शागीर्द होता, परंतु तेथें एक दिवस सावकाराने मर्मभेदक शब्दानें याची हजेरी घेतल्यामुळें यानें विद्याभ्यास करण्याचा निश्चय केला. याची इच्छा पाहून सावकारानेंहि याची काशीस रवानगी केली. तेथें यानें आपलें शिक्षण बाळंभट पायगुंडे यांच्या पाठशाळेंत घेण्यास सुरुवात केली. बाळंभटाचा जांवई अनंतभट्ट यानेंहि अपमान झाल्यामुळें याच वेळेस शिक्षण घेण्यास सुरुवात केली होती. हा व अनंतभट्ट दोघेहि समवयस्क असल्यामुळें लवकरच त्यांची गट्टी जमली. पुढें हा ज्याप्रमाणें धर्मशास्त्री म्हणून प्रसिद्धीस आला तसा अनंत-भट्टहि वेदान्ती म्हणून प्रसिद्धीस आला. रामशास्त्र्यानें स. १७५१ मध्यें पेशव्यांचे दरबारीं प्रथम धर्मखात्यांत नोकरी धरली, व नंतर स. १७५९ मध्यें हा मुख्य न्यायाधीश झाला. हा अत्यंत निःस्पृह असून याची न्यायदानांत फार प्रसिद्धि आहे. थोरले माधवराव याच्याच तंत्रानें वागत. माधवराव ब्रह्मकर्मांत फार वेळ घालवीत असत, त्यापासून यानेंच त्यांना परावृत्त केलें. नारायणरावाच्या खुनाबद्दल राघोबास यानेंच निर्भयपणें देहान्तप्रायश्चित्त घेण्यास सांगितलें, व नोकरी सोडून हा तावडतोब माहुलीस निघून गेला. पुढें सवाई माधवरावाच्या जन्मानंतर हा पुन्हां न्यायाधीश झाला. परशुरामभाऊ पटवर्धनाच्या मुलीचा पुनर्विवाह करण्यास यानें संमति दिली होती, अशी दंत-कथा आहे. तसेंच प्रभूंच्या ग्रामण्याच्या बाबतींत यानें प्रभूंच्यातर्फे निकाल दिला, या गोष्टी याच्या निर्भय-पणाची साक्ष देतात. जोशी व पाध्ये वादांतील यानें जोश्यांच्या बाजूनें दिलेलें निवाडपत्र प्रसिद्ध आहे. यास दरमहा सुमारें १२० रु. पगार मिळे. याच्या चाळीस वर्षांच्या नोकरींत अनेक बाबती मिळून ५५९६८ रु. याच्या नांवावर खर्च पाडल्याचें पेशवे दप्तरांत नमूद आहे. यानें सुमारें साठाव्या वर्षी दुसरें लग्न केलें. हा ता. २५ आक्टो. स. १७८९ रोजीं मरण पावला.

याचा मुलगा गोपाळशास्त्री विशेष विद्वान् नव्हता. याची मुलगी भोरचे सचीव शंकरराव रघुनाथ यांस दिलेली होती. याचे वंशज सांप्रत पुणें जिल्ह्यांत जेजुरीजवळ राखी म्हणून गांव आहे तेथें राहतात.

हे ३ : नाना फडणीसाच्या कारकीर्दीत नानाच्या विनंतीवरून न्यायाधीश म्हणून काम करूं लागले ( ४·७·१७७४ ). तेव्हां बहुतेक नाना, बापू, हरिबा आणि परशुरामभाऊ यांच्याकडून वजन पाडून मनाप्रमाणें काम करण्यास व्यत्यय येऊं लागला. तेव्हां नाना व बापू यांनीं शपथपूर्वक पत्र लिहून ' आमची व दरबारांत चार मातब्बर आहेत त्यांची भीड न धरितां न्याय करण्याविषयीं ' लिहिलें आहे ( पे. द. ५·५५–५८ ). यावरून या निःस्पृह गृहस्थानें पुनः जागा सोडून जाऊं नये, म्हणून हा प्रयत्न असावा.

**रामसिंग**—( ग्रंथकाल स. १८३९–१८६० ) एक हिंदी कवि व नरवळगडचा राजा. याचे ग्रंथ–अलंकारदर्पण, रसनिवास व रसविनोद.

**रामसिंग कच्छवाह**—( स. १६६८–९९ ) जयसिंगाचा मुलगा. हा दिल्लीसच होता, दक्षिणेंत आला नव्हता. औरंगजेबाच्या दरबारीं २५०० चा मनसबदार होता. यासच जयसिंग ' शिवाजींच्या केसास धक्का न लागूं देण्याची ' खबरदारी घेण्यास वरचेवर लिही. शिवाजी निसटून गेल्यानंतर औरंगजेबानें रामसिंगावर वहीम घेऊन त्याची मनसब जप्त केली. या प्रसंगानंतर ११ महिन्यांनीं जयसिंग मेला. तेव्हां औरंगजेबानें जप्ती उठवून रामसिंगास चार हजारी नेमिलें. तदनंतर त्याची आसामच्या स्वारीवर नेमणूक झाली आणि तेथेंच हा हालअपेष्टेंत मेला ( सरकार–शिवाजी ).

२. औरंगजेब दारा शुकोहवर गेला तेव्हां मुराद व रामसिंग यांची गांठ पडली. हा दाराच्या बाजूनें लढत होता. त्या युद्धांत हा मारला गेला ( मु. रि. भा. १, पृ. २३२ ).

**रामसिंग बांडे**—( मुहकमसिंग पाहा ).

**रामसिंग मालम**—( स. १७५० ) कच्छ संस्थानची राजधानी भूज येथील एक कल्पक कारागीर. तेथील राजा राव लाखाजीनें यास कल्याणपूर नांवाचा गांव जहागीर दिला. यानें तेथें बंदुका, रेशीम, कांच, घड्याळें, पुतळे, वगैरेंचे कारखाने काढले. भूज येथें यानें बांधलेला राजवाडा प्रसिद्ध आहे. त्यास ३०,००,००० रु. खर्च आला. हा हॉलंडला जाऊन आला होता ( इ. सं. १.६ जु. ऐ. गो. १३ ).

**रामाई पंडित**—( स. ९७५–१०२५ सुमार ) एक बंगाली कवि. हा राढ प्रांतांतील द्वारका गांवीं राहत असे. याच्या बापाचें नांव विश्वनाथ. यानें वयाचे ८० व्या वर्षी केशवती नांवाच्या स्त्रीशीं विवाह केला. यानें ' शून्यपुराण ' नांवाचा ग्रंथ लिहिला. हा ग्रंथ बंगाली-साहित्य-परिषदेनें प्रकाशित केला आहे.

**रामाचरण**—हा रामानुजाच्या गळता येथील गादीवरील अधिकारी. यानें केलेल्या नवीन व्यवस्थेंत निरंजन व रामस्नेही असे हल्लीं दोन पंथ झाले आहेत.

**रामाचार्य राघवेंद्राचार्य गजेंद्रगडकर**—एक सुप्रसिद्ध पंडित. यांनीं पुण्याच्या विष्णुशास्त्री भटांनीं लिहिलेल्या राघवेंद्राचार्यांच्या ' त्रिपथगा ' परिभाषेन्दुशेखरावरील टीकेवर सुंदर टीका लिहिली.

**रामाजनार्दन**—याची अनंतभुजाची व ज्ञानेश्वराची आरती प्रसिद्ध आहे.

**रामाजी कामत**—( मृत्यु स. १७२८ ) मुंबई शहरांतील एक प्रसिद्ध व्यापारी. हा शेणवी गृहस्थ होता. हा अंतःकरणानें उदार असून धार्मिक होता. यानें मुंबई शहरांत पुष्कळ देवळें बांधलीं. त्यांपैकीं वाळकेश्वराचें देवालय अद्यापि प्रसिद्ध आहे. यानें तंबाखूची लागवड करून तंबाखूचा व्यापार प्रामाणिकपणें केला. याच्यासंबंधीं इंग्रजी अधिकाऱ्यांचें मत प्रथम अनुकूल होतें. व यास सैन्याचें आधिपत्य दिलें होतें. पण पुढें जेव्हां कान्होजी आंग्र्याचें व इंग्रजांचें वांकडें आलें, त्या वेळेस इंग्रजांनीं हा आंग्र्यांच्या बाजूचा आहे असा पुराव्याशिवाय संशय घेऊन राजद्रोहाचा आरोप ठेवून याची चौकशी केली. अखेर यास दोषी ठरवून जन्मठेपेची शिक्षा होऊन हा आठ वर्षांनीं मरण पावला. याच्यावर जो खटला भरण्यांत आला तो बनावट होता, असें उघडकीस आलें.

**रामाजी केशव तिखे**—दे. ऋ. ब्राह्मण. हा मूळ पुण्याकडील राहणारा. यास मुधोजी भोसल्यानें महिपतराव दिनकर याचेमार्फत गायकवाडाकडून आणलें, व चंद्रपुरास दिवाण केलें.

**रामाजी नाईक**—( स. १७४२ ) अंतोबा नाईक भिडे यांचा मुलगा.

**रामाजी महादेव बिवलकर**—(मृत्यु स. १७७२) हा तुळाजी आंग्रे यांचा कारभारी असून पेशव्यांना फितुर झाला. नंतर हा पेशव्यांचा कोंकणांतील सुभेदार असून, नानासाहेबांच्या अत्यंत विश्वासांतला होता. आपसांत याच्यामार्फत फितुरी करवून किल्ला ( स. १७५६ )

घेतल्याबद्दल अनेकांनीं नानासाहेब पेशव्यांना दोष दिला आहे. याच्या ताब्यांत साष्टी, वसई, ठाणें व कुलाबा हे प्रांत असून याचें वास्तव्य कल्याणास होतें. ठाणें येथील कौपीनेश्वराचें देऊळ यानेंच बांधिलें. हल्लींचें ठाण्याचें जज्जकोर्ट हाहि याचाच वाडा होता. तुळाजीच्या विरुद्ध इंग्रजांचें कारस्थान घडवून आणणारा हाच होता. पेशव्यांनीं यास पाठवून शके १६७७ त (स. १७५५) आंग्र्यांपासून अंजनवेल घेतली. पेशव्यांनीं यास हबशावर स्वारी करण्यासाठीं सांगितलें म्हणून यानें जलमार्गानें जाऊन राजापुरी लुटून जंजिऱ्याजवळ मोर्चा वळविला. हा स. १७७२ ऑगस्ट मध्यें मरण पावला.

चिमाजी आपानें ठाणें–साष्टीवर मोहिमा केल्या, त्यांत हा खंडोजी माणकरावरोबर कल्याण येथें फौजेंत होता.

**रामानंद**—(जन्म स. १३००–समाधि स.१४११) याच्या मातेचें नांव सुशीला. रामानंदाचें पहिलें नांव रामदत्त असें होतें. हा बुद्धीचा अत्यंत तीव्र असून यानें शास्त्राध्ययन बाराव्या वर्षी पुरें केलें. विशेष अध्ययनाकरितां लवकरच हा काशी येथें आला. प्रथम यानें एका शांकरमतानुयायी आचार्याकडे अध्ययनास सुरुवात केली. पण याची एकदां सहज राघवानंदाशीं भेट झाली. राघवानंदानें याला पाहतांक्षणींच याच्या अल्पायुषीपणाबद्दल खेद प्रदर्शित केला, आणि ईश्वरभक्ति करण्यास सांगितलें.

यानें त्यांचा उपदेश ग्रहण केल्यावर त्यानें याचें नांव रामानंद असें ठेविलें. पुढें जेव्हां मृत्यूची वेळ आली तेव्हां हा समाधि लावून बसला. समाधि उतरल्यावर मृत्यु टळला असें याच्या ध्यानीं आलें आणि राघवानंदावर याची श्रद्धा दृढ झाली. योगाभ्यास व समाधि यांचें शिक्षण राघवानंदानेंच याला दिलें होतें. श्रद्धापूर्वक गुरूची सेवा बरेच दिवस केल्यावर हा यात्रेकरितां बाहेर पडला. यात्रेहून परत आल्यावर सध्यां पंचगंगा घाटावर जेथें याच्या पादुका आहेत तेथें हा राहूं लागला. श्रीवैष्णवसंप्रदायांत ब्राह्मणच आचार्यपदावर अधिष्ठित होतो. खाण्यापिण्याचे नियमहि कडक रीतीनें पाळले जातात. यात्रेकरितां हा प्रवासांत असतां यानें खाण्यापिण्याच्या बाबतींत नियम पाळले नव्हते. राघवानंदानें प्रायश्चित्त घेण्यास सांगितलें असतां यानें ती गोष्ट मानिली नाहीं. तेव्हां याला राघवानंदानें आपल्या संप्रदायांतून बाहेर काढिलें आणि यानेंहि आपला स्वतंत्र संप्रदाय स्थापन केला. 'जातिपाँति पूछै नहि कोई। हरिको भजै सो हरिका होई॥' खानपान व जातिपाति या नियमांना महत्त्व न देतां केवळ रामभक्तीला याच्या संप्रदायांत महत्त्व देण्यांत आलें. राधाकृष्णाच्या उपासनेला प्रतिस्पर्धी असा याचा हा रामसीतेच्या उपासनेवर आधारलेला पंथ होता, आणि याच्या शिष्यांनीं त्याबद्दल चांगलीच प्रगति केली. या वेळीं हिंदुस्थानांत मुसलमानांनीं जें आक्रमण चालविलें होतें त्याचें सिंहावलोकन केलें असतां रामानंदाच्या संप्रदायाचें स्वरूप चांगलें ध्यानांत येतें. रामानंदानें आपले ग्रंथ संस्कृत भाषेंत लिहिले. त्यामुळें याच्या विचाराचा प्रसार त्याच्या हयातींत लोकांत विशेष झाला नाहीं. याचीं फक्त दोन हिंदी पदें उपलब्ध झालीं आहेत. एक शिखाच्या ग्रंथसाहेबांत आहे, आणि दुसरें श्री. ग्रियर्सन यांच्याकडून मिळालेलें व श्री. बाबू श्यामसुंदरदास, काशी, यांनीं प्रसिद्ध केलेलें मारुतीची आरती असलेलें.

याचे शिष्य—१ अनंतानंद, २ सुखानंद, ३ सुरसरानंद, ४ नरहरियानंद, ५ पीपा, ६ कबीर, ७ भावानंद, ८ सेना, ९ धना, १० रैदास, ११ पद्मावती, १२ सुरसरी. यांपैकीं शेवटल्या दोन स्त्रिया आहेत. त्यांपैकीं पद्मावतीची कांहींच माहिती नाहीं. सुरसरी ही सुरसरानंदाची पत्नी होय. यांत निकृष्ट वर्गांतेहि शिष्य दिसतात.

आपल्या पहिल्या १२ शिष्यांसमवेत तीर्थयात्रा करीत व मायावादी, जैन व बौद्ध यांच्याशीं वादविवाद करून आपलें विशिष्टाद्वैत मत स्थापून लोकांस आपल्या मताकडे वळवून आपले शिष्य करीत करीत हा सर्व देश हिंडला. याच्या शिष्यांनींहि गोपालकृष्णोपासनेशीं चांगल्या रीतीनें टक्कर देत देत रामोपासनेचा प्रसार केला.

हिंदुसमाजाच्या निकृष्ट वर्गाविषयीं कळकळ हें वैष्णव धर्माचे आरंभापासूनच विशिष्ट लक्षण आहे. जन्माच्या फेऱ्यांतून वर चढतां चढतां ब्राह्मणकुलांत जन्म घेतल्यावरच मोक्ष मिळविण्याच्या मार्गाचा अवलंब करतां येतो, असें कट्टे वेदांती प्रतिपादीत. रामानुजाचार्य वगैरेंनीं ब्राह्मणाकडेच या मार्गाचा अवलंब करण्याचा अधिकार ठेवला होता. परंतु यानें आमूलाग्र सुधारणा घडवून आणून ब्राह्मण व इतर वर्ग यांत मुळींच भेद ठेविला नाहीं. जे जे विष्णुभक्त अगर भगवद्भक्त असतील, मग ते कोणत्याहि वर्णाचे असोत, त्यांनीं एके ठिकाणीं जेवण्यास सुद्धां हरकत नाहीं, असें हा म्हणे. नवीन धर्माच्या प्रसारास मातृभाषेचा उपयोग करणें या सुधारणेसहि यानेंच आरंभ केला. रामानंदानें महत्त्वाची अशी केलेली तिसरी सुधारणा म्हणजे कृष्ण व राधा यांच्या ऐवजीं शुद्ध राम व सीता यांच्या पूजेचा प्रघात पाडला.

रामानंदाच्या चरित्रावर हिंदींत बरेंच वाङ्मय आहे. पैकीं नाभादासाचें भक्तमाला हें विश्वसनीय दिसतें.

**रामानुजाचार्य**—( जन्म स. १०१७–समाधि स. ११३७ ) विशिष्टाद्वैतमताचे प्रमुख आचार्य. याचा पिता असुरी केशव भट्टर. तो श्रीपेरुम्बुमूरचा राहणारा. मामानें याचें नांव लक्ष्मण असें ठेवलें.

यानें कांजीवरम् येथें यादवप्रकाशापाशीं अध्ययन केलें. हा कांचीच्या देवराजाचा भक्त होता. याच्या आईचा पणजोबा अलबंदर म्हणून होता.

पुढें यानें परियनम्बी यास आपला गुरु केलें, पण याचें व त्याचें फार दिवस पटलें नाहीं. पुढें यानें बायको माहेरीं गेली असतां संन्यास घेतला. पुढें याच्या ज्ञानीपणामुळें यास श्रीरंगम् येथील अलबंदरच्या जागीं नेमण्यांत आलें.

अलबंदरला दिलेल्या वचनाप्रमाणें यानें ब्रह्मसूत्रावरील टीका, भगवद्गीताटीका, वेदांतसारम्, वेदांतसंग्रह आणि वेदांतदीप हे ग्रंथ लिहिले.

याची भाष्यकार म्हणून सर्वत्र कीर्ति पसरली आणि हा काश्मीरांत जाऊन आला. याचा शिष्य 'कुरथल्वर' याचें नांव पराशर ठेवून यानें त्याकडून सहस्रनामावर टीका लिहिली.

कुलोत्तुंग चोलानें यास शैव तत्त्वावर वाद करण्याकरितां बोलावलें. हा वैष्णव असल्यानें गेला नाहीं, पण आपला शिष्य कुरथल्वर यास संन्यासाचा वेष देऊन पाठविलें. पण त्याचा तेथें वध करण्यांत आला. हा गृहस्थाचा वेष घेऊन बिट्टीदेव होयसळाच्या राज्यांत गेला. तेथें बिट्टीदेवाच्या मुलीच्या अंगांतील भूत काढल्यानें त्याची याच्यावर श्रद्धा बसली. पुढें श्रीरंगम् येथें आला. 'कुरथल्वर' च्या मृत्यूबद्दल दुःख प्रदर्शित केलें. नंतर यानें आपल्या विशिष्टाद्वैत मताचा सर्वत्र प्रचार केला व वयाला एकशें वीस वर्षे झाल्यावर समाधि घेतली. याची समाधि होयसळ येथें आहे. याचें तत्त्वज्ञान म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांनीं संस्कृतमध्यें खंडनासह 'अद्वैतामोदः' या ग्रंथांत दिलें आहे. आणि तो ग्रंथ आनंदाश्रम-ग्रंथमालेंत प्रसिद्ध झाला आहे.

**रामाश्रम**—याचे पित्याचें नांव भट्टोजी. हा वत्सराजाचा गुरु होय. या वत्सराजानें स. १६४१ मध्यें बाराणशीदर्पण नांवाचें पुस्तक संस्कृतमध्यें लिहिलें. अमरकोशावरील प्रसिद्ध रामाश्रमी नांवाची टीका यानें लिहिली ( C. C. ). याचें नांव भानु दीक्षित असें होतें.

**रामिल**—एक प्राचीन नाटककार (मालविकाग्निमित्र).

**रामीरामदास**—( स. १६०५–१६७७ ) हा रामदासस्वामींचा ज्येष्ठ बंधु असून याचें दुसरें नांव गंगाधर असें होतें. हा रामदास-सांप्रदायांत जरी 'श्रेष्ठ' या नांवानें प्रसिद्ध आहे, तरी सर्वसामान्य लोक याला 'रामीरामदास' या नांवानेंच ओळखतात व स्वतः यानेंहि आपल्या कवितेंत 'रामीरामदास' असाच स्वनामोल्लेख केला आहे.

शके १५९९ च्या फाल्गुन वद्य १४ स यानें दहीफळ येथें आपला देह ठेवला. याची पत्नी सती गेली. यास रामचंद्रबाबा व शामजीबाबा असे दोन पुत्र होते. याचें वृंदावन दहीफळ येथें असून त्यास मोगलाईतून ८० रु. वर्षासन आहे ( म. क. च. भा. ५, पृ. १–२३ ). याचे ग्रंथ—सुगमोपाय व भक्तिरहस्य.

**रामेश्वरभट्ट**—( स. १५१३ सुमार ) काशींतील भट्ट घराण्याचा मूळ पुरुष. हा गोविंदभट्टाचा पुत्र. याच्यापासून या घराण्याचा लौकिक फार वाढला. या देशस्थ ऋग्वेदी आश्वलायन ब्राह्मणाच्या घराण्यांतील एकानें गाधीवंशचरित नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे. या घराण्याचें गोत्र विश्वामित्र असल्यानें वरील ग्रंथांत या घराण्यांतील माणसांची माहिती दिली आहे. यांत याच्या पैठणच्या विद्यापीठाला श्रीरामचंद्राच्या सैन्याची उपमा दिली आहे. हा मीमांसा, व्याकरण, न्याय व वेदांत या चारहि शास्त्रांत निष्णात होता. हा चमत्कार करून दाखवीत असे. या याच्या कीर्तीमुळें निजामशाहीच्या बादशहानें रामेश्वरभट्टाला एकदां सुवर्णमुद्रांकित निमंत्रण पाठवून आपल्या दरबारीं बोलाविलें व याचा बहुमान केला, असा उल्लेख सांपडतो. तेथून हा विद्यानगर येथें गेला. पुढें हा द्वारकेस यात्रेस जात असतां वाटेंत यास नारायणभट्ट नांवाचा पुत्र झाला ( स. १५१३ ). तेथें गेल्यावर यानें महाभाष्य व सुरेश्वरवार्तिक यांचें अध्ययन अनेक शिष्यांकडून करविलें. नंतर पैठणास येऊन हा काशीस गेला.

पुढें हा काशीसच कायम झाला. रामकृष्ण, कमलाकर आणि दिनकर हे याचे बाकीचे मुलगे तेथेंच झाले. त्यांच्या सोयरिकी वगैरे तेथेंच झाल्या. याची शिष्यपरंपरा फार मोठी होती. याच्या शिष्यांमध्यें अनंतभट्ट चितळे, दामोदरसरस्वती, माधवसरस्वती, गुजराथेंतील गोविंद द्विवेदी, दक्षिणेंतील वेदांताचे अध्यापक आचार्यभट्ट, विश्वनाथ तुळशी, गीतगोविंदाचा टीकाकार कनोज येथील शंकरमिश्र शर्मा वगैरे होत. वरील माधवसरस्वती हा मधुसूदनसरस्वतीचा गुरु होय. हल्लींच्या दर्भंगा राज्याचा मूळ संस्थापक, व दर्पण या ग्रंथाचा कर्ता, मिथिला येथील रहिवाशी, महेश ठक्कर हाहि

रामेश्वरभट्टाचाच शिष्य होय. सर्वच प्रांतांतील लोक याच्या शिष्यवर्गांत होते, असें वरील ग्रंथांत म्हटलें आहे.

**रामेश्वरभट्ट वाघोलीकर**—( स. १६४० सुमार ) पुण्याजवळ वाघोली म्हणून एक गांव आहे तेथील हा राहणारा, मोठा विद्वान् ब्राह्मण होता. तुकारामाचे अभंग इंद्रायणींत बुडविणारा तो हाच. पुढें तुकारामाच्या वह्या शाबूत निघाल्यावरून हा तुकारामाच्या मागें टाळकरी होऊन राहिला.

**रामोजी शेणवी कोठारी**—हा गोवें प्रांतांतील डिचोलीचा राहणारा. स. १६६२ च्या मे महिन्यांत शिवाजीचा मुक्काम वेंगुर्ल्यास होता. त्या वेळींहि शिवाजीनें मोंगलांविरुद्ध मिळविलेल्या जयाबद्दल अभिनंदन करण्यासाठीं गोवेकर अधिकाऱ्यांनीं याला वकील म्हणून धाडलें होतें. बरोबर मौल्यवान् नजराणाहि दिला होता. पण आधींच शिवाजी निघून गेला असल्यामुळें याला भेट घेतां आली नाहीं. पुढें आग्र्याहून शिवाजी सुखरूप सुटून आल्यावर हा रायगडीं शिवाजीला जाऊन भेटला व तहाची वाटाघाट करून परत आला. याच्याबरोबर शिवाजीनें आपला 'सकोपंत' नांवाचा वकील गोव्यास पाठविला; व त्याबरोबर गोव्याच्या सरकारला एक घोडा व पोषाखहि नजराणा म्हणून पाठविला. तेथें दोघांचा मित्रत्वाचा तह झाल्यावर सखोपंताबरोबर फादर गोंसाळू मातींस ह्या माणसास ३२२ असुर्फ्या किंमतीचा नजराणा देऊन शिवाजीकडे पाठविलें. तेव्हांच्या तहांत गोमांतकांत पळून आलेल्या वाडीकर सावंतानें 'जुनें' गोवें या शहराबाहेर जाऊं नये; व शिवाजीशीं लढाई करूं नये असें ठरलें. तहाची तारीख ५ डिसें. स. १६६७ ( श. १५८९ मार्ग. ३० ); ( शिवचरित्रप्रदीप, पा. १७९-१८० ).

**राय ईश्वरीप्रताप नारायणराय**—( जन्म स. १८०२ ) निम्बार्कसांप्रदायी. पडरौना राजवंशांत जन्म. प्रसिद्ध हिंदी कवि. ग्रंथ-रहस्यकाव्यशृंगार. हिंदी व संस्कृत कवि.

**रायनी भास्कर**—(स. १३००सुमार) तैलंगणांतील कौंडविडू येथील ब्राह्मण. तेलंगींत रामायणाचें यानें भाषांतर केलें. हा शालिवाहनाच्या तेराव्या शतकांत होता.

**राय पिठोरा**—पृथ्वीराज चौहान याला हें दुसरें नांव आहे.

**रायबागीण**—( स. १६५८-७० ) ही शूर स्त्री जगजीवनराम उदारामाची पत्नी. नवरा मेल्यावर हरचंदराय रजपुताची स्वारी झाली तेव्हां हिनें 'बहिणीची लज्जा राखा' असा जाहीरनामा काढून व चोळीचें निशाण करून ती परत फिरविली. तेव्हां औरंगजेबानें 'पंडिता,' 'राजव्याघ्री' म्हणजे 'रायबागन' असे हिला किताब दिले. स. १६७० सालीं शिवाजीनें सुरत लुटली हें कळतांच महाबतखानाबरोबर हिलाहि शिवाजीवर त्यानें पाठविलें. पण तेव्हां ही कैद झाली. पण शिवाजीनें हिचा सन्मान करून हिला परत धाडलें व हिनेंहि त्याची धर्मकन्या म्हणवून घेतलें ( सप्तप्रकरणात्मक शि. ब. ). हिचा पुत्र बाबूराव.

**रायमल्ल गुहिलोत**—( स. १४७३-१५०९ ) हा कुंभकर्णाचा पुत्र. याचा थोरला भाऊ उदयसिंह. उदयसिंहापासून यानें राज्य घेतलें ( उदयसिंह पाहा ). याचा पुत्र संग्रामसिंह ऊर्फ संगराणा. ज्वरतिमिरभास्करकार कायस्थ चामुंडाला याचा आश्रय होता.

**रायसिंग**—( स. १५०० ) बिकानेरच्या कल्याणसिंगचा मुलगा. हा अकबराचा सेनापति. याची मुलगी जहांगिरास दिली.

**रायसिंग सिसोदिया**—( स. १६६६ ) औरंगजेबाच्या दरबारांतील पंचहजारी महाराणा भीमसिंहाचा मुलगा. 'याच्या लष्कराच्या पाठी माझ्या लोकांनीं पाहिल्या असतील. याचे खालीं आपण उभें राहावें म्हणजे काय ?' असें औरंगजेबाच्या दरबारांत शिवाजीनें रायसिंगास म्हटलें ( सभा. ब. पृ. ४७ ). बखरींत जसवंतसिंगाचा उल्लेख आहे. पण तो पंचहजारी नसून सहाहजारी होता. म्हणजे शिवाजीपासून तो बऱ्याच वरच्या रांगेंत असला पाहिजे ( सरकारकृत शिवाजी १५९ ).

**रायसिन्हा**—( कुत्बुद्दीन लंगा पाहा ).

**रायाजी कान्होजी भोसले भापकर**—(स. १७३९-४७ सुमार ) हा कान्होजी भोसल्याचा मुलगा. कांहीं ठिकाणीं याचें नांव रामजी असेंहि दिलें आहे तें चुकीचें आहे. रायाजी हेंच नांव खरें आहे ( पे. द. २०. २३ ). बापाप्रमाणेंच याच्याहि क्रूरपणाचा फार बोभाटा होता. रघूजी व हा यांचा शेवटपर्यंत सरंजामाकरितां तंटा होता. हा निपुत्रिक मरण पावला.

**रावण**—याचें वेदावर भाष्य आहे ( C.C. ). त्यांतील कांहीं उतारे शतश्लोकीवरील आनंदगिरीच्या टीकेंत घेतले आहेत. याशिवाय याचा ऋग्वेदाचा पदपाठहि अर्धवट उपलब्ध झाला आहे. यावरून रावणानें वेदाचीं खंडें केलीं ही आख्यायिका उत्पन्न झाली असावी.

**रावसुरजन**—( स. १५५४ राज्यारोहण ) बुंदी संस्थानचा राजा. हा गादीवर आल्यापासून संस्थानास नवें वळण मिळालें. यानें रणथंभोरचा किल्ला आपल्या

ताब्यांत घेतला, पण तो पुढें अकबरानें घेतला. यानंतर बुंदीचे राजे मुसलमानी अमलाखालीं गेले.

**राष्ट्रकूट घराणें**—१ दंतिवर्मन् १ ला, २ इंद्र १ ला, ३ गोविंद १ ला, ४ कर्क १ ला, ५ इंद्र २ रा (कर्काचा पुत्र), ६ दंतिदुर्ग (स. ७४५–५८ सुमार), ७ कृष्ण १ ला (कर्काचा पुत्र. स. ७६८–७२), ८ गोविंद २ रा (स. ७७२–७८३), ९ ध्रुव (कृष्णाचा पुत्र व गोविंदाचा भाऊ. स. ७८३), १० गोविंद ३ रा (दुसऱ्या गोविंदाचा पुत्र. जगत्तुंग (?) स. ७८३–८१४), ११ अमोघवर्ष १ ला (स. ८१४–७७), १२ कृष्ण २ रा (स. ८७७–९३. अमोघवर्षाचा पुत्र), १३ जगत्तुंग (स. ९१३ सुमार याची मुलगी भाग्यवती), १४ इंद्र ३ रा (स. ९१३–२२), १५ अमोघवर्ष २ रा (स. ९२२), १६ गोविंद ४ था (स. ९२२–३४), १७ अमोघवर्ष ३ रा (स. ९३४–३७ हा तिसऱ्या इंद्राचा भाऊ), १८ कृष्ण ३ रा (स. ९३९–६५), १९ खोत्तिग (जगत्तुंग. स. ९६५–७३), २० कर्क २ रा (अमोघवर्ष ४ था. स. ९७२–७३), २१ इंद्र ४ था (तिसऱ्या कृष्णाचा नातू, मृत्यु स. ९८२).

वरील काल अगदीं निश्चित नाहींत. या घराण्याचे विवाहसंबंध गंग, कलचुरी, चालुक्य व चेदी घराण्यांशीं दिसतात. सुमारें दोनशें वर्षे यांचें राज्य भरभराटींत होतें (स. ७५३–९७३). महाराष्ट्रांतील लोकांपैकीं कांहीं आपणास रट्ठी व भोज म्हणवीत. त्यांच्या संघाचें नांव राष्ट्रकूट दिसतें. याचा अपभ्रंश राठोड होय. यांपैकीं दंतिदुर्गानें पहिल्या कीर्तिवर्म्याला जिंकून बदामीस (वातापी) राजधानी केली; आणि कांची, कलिंग, कोसल, मालव, लाट (गुजराथ) व टंक (पंजाब) देश जिंकले.

शिलालेखावरून हे यादवांपैकीं सात्यकीच्या घराण्यांतील होते. यांच्या एका मूळ पुरुषाचें नांव रट्ठ होतें. म्हणून यास राष्ट्रकूट हें नांव मिळालें.

दंतिदुर्गाचा पुत्र कृष्णानें वेरूळचें कैलासमंदिर खोदवून आपल्या कलाप्रियतेचें अद्वितीय स्मारक करून ठेवलें आहे. तिसऱ्या गोविंदानें विरोधी बारा राजांचा पराभव केला. आणि आपल्या राज्याला साम्राज्याचें स्वरूप आणलें. याचा भाऊ इंद्रराजानें गुजराथची शाखा सुरू केली. तिसऱ्या इंद्रानें कनोजच्या महीपालाला जिंकलें व सुराष्ट्र (काठेवाड) आपल्या राज्याला जोडलें. दुसऱ्या कर्काच्या वेळीं दुसऱ्या तैल चालुक्यानें याची सत्ता घेतली. हे अरब राजांशीं व व्यापाऱ्यांशीं चांगले संबंध ठेवीत, त्यामुळें यांचे राज्याबद्दल त्यांनीं धन्योद्गार लिहून ठेवले आहेत.

राष्ट्रकूट राजे हिंदुधर्मीय होते. यांच्या कारकीर्दींत बुद्धधर्म अधोगतीला गेला तरी ह्यांच्यापैकीं अमोघवर्षानें जैनांच्या दिगंबरपंथाचा पुरस्कार केला. जिनसेन, गुणभद्र वगैरे ९ व्या शतकांतील जैन लोकाग्रणींना राष्ट्रकूट राजांनीं मुक्तहस्तानें मदत केल्यामुळें जैनधर्माचा प्रसार झाला व कदाचित् जैनधर्माच्या प्रसारामुळेंच बुद्धधर्माचा ऱ्हास होण्यास मदत झाली असेल. परंतु जैन व वैदिकांमध्यें मात्र कलह उत्पन्न झाला. स. ९४९ मध्यें कृष्ण (३ रा राष्ट्रकूट) व चोलराजा राजादित्य यांच्यामध्यें जो घनघोर संग्राम झाला त्यास जैन व वैदिक यांमधील द्वेषाग्नीच मुख्यतः कारणीभूत होता.

संस्कृत ग्रंथरचनेस या राजांनीं चांगलें प्रोत्साहन दिलें. मात्र या काळांतील संस्कृत ग्रंथांची भाषा कृत्रिम सौंदर्यानें नटलेली दिसते. यांचे लेख कानडी व संस्कृत भाषेंत आहेत.

**राहप गुहिलोत**—(स. ११५० सुमार) मेवाडच्या राजघराण्यापैकीं हा रणसिंहाचा पुत्र. रणसिंहाला कर्णसिंहहि म्हणत. हा एकदां शिकार करीत असतां सोडलेला बाण चुकून कपिलदेव नांवाच्या ब्राह्मणास लागला. तेव्हां याला पश्चात्ताप होऊन प्रायश्चित्त म्हणून केळवड्याला यानें कपिलकुंड बांधलें (वीरविनोद, भा. १, पृ. २८८–८९).

याला कुष्ठरोग होता. त्यावर उपाय जोधपूरराज्यांतील सांडेराव येथील यतीनें केला. तेव्हांपासून त्याच्या शिष्यांचा सन्मान या राजघराण्यांत होऊं लागला. त्या यतीच्या सांगण्यावरून त्याचा एक शिष्य सरसल म्हणून होता त्याला यानें आपला पुरोहित केलें. सरसल पल्लीवाल जातीचा ब्राह्मण होता. तेव्हांपासून या घराण्याचें पौरोहित्य चौबीसे ब्राह्मणांकडून पल्लीवाल ब्राह्मणांकडे आलें. डुंगरपूर व बांसवाडे येथील घराण्यांत अद्यापि चौबीसे ब्राह्मण पुरोहित आहेत.

**राहिल चंदेल्ल**—(स. ८९०–९१०) विजयानंतर राहिल यानें राज्य केलें. याची पराक्रमाविषयीं बरीच ख्याति होती. याची राजधानी महोबा होय. राहिल राजाच्या पराक्रमाचें वर्णन पृथ्वीराज चव्हाणाच्या चंदभाटानेंहि केलें आहे. याच्या कन्येचा विवाह तत्कालीन चेदीच्या गादीवर असलेल्या कोक्कल राजाशीं झाला.

**राहुल**—गौतमबुद्धाच्या पुत्राचें नांव. याला बुद्धदेवानें कपिलवस्तु येथें सारिपुत्राकडून प्रव्रज्या दिली होती. हा वैभाषिक नांवाच्या दर्शनाचा आचार्य होता. हा प्रव्रज्या न घेतलेल्या ब्रह्मचाऱ्यांचा अग्रगण्य व पूज्य मानला जातो. प्रव्रज्या न घेतलेल्या ब्रह्मचाऱ्यांना सामनेर असें म्हणतात.

**राहुलपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं सत्तेचाळिसावा सिद्ध होय. हा जातीनें ब्राह्मण होता. याचा देश कामरूप. हा सरहपाच्या चवथ्या पिढींतील होय. यासच राहुलभद्र असें म्हणतात. यानें अचिन्त्यपरिभावना हा ग्रंथ लिहिला ( तं. ४८–७३ ).

**राक्षस**—पाटलिपुत्र येथील नंद घराण्याचा मुख्य प्रधान. हा जातीनें ब्राह्मण असून राजनीतींत अत्यंत निपुण होता. पण चाणक्यानें यावरहि विजय मिळवला. चंद्रगुप्ताला नंदाची गादी मिळवून दिली व याला चंद्रगुप्ताचा प्रधान होण्यास भाग पाडलें, असें विशाखदत्ताच्या मुद्राराक्षसावरून दिसतें.

**रिचर्ड केग्विन**—(स. १६८३) इंग्रज आरमारावरील एक अधिकारी. यानें स. १६८३ त मुंबईच्या डेप्युटी गव्हर्नरास कैद करून सर्व कारभार आपल्या ताब्यांत घेतला. यानें राजाच्या नांवानें जाहीरनामा काढून, आपण राजाचा मान राखीत आहों आणि बंडखोर कंपनीस शासन करीत आहों, असें जाहीर केलें. अशा रीतीनें एक वर्षभर यानें वाटेल तसा दंगा केल्यावर, कंपनीचा अधिकार अगदींच बुडतो कीं काय, असें लोकांस वाटूं लागलें. सुरतेच्या अधिकाऱ्यासहि कैद करण्याचा याचा इरादा होता. पण चार्लस राजानें स्वदस्तूरचा हुकूम पाठवून केग्विन यास पकडिलें. पुढें यास माफी देण्यांत आली ( त्रि. रि. पूर्वार्ध, पृ. ३०१ ).

**रुक्नुद्दीन इब्राहीम खल्जी**—( स. १२९६ खून ) दिल्लीचा बादशाहा. हा जलालुद्दीन फीरुझचा मुलगा. हा गादीवर बसण्याची बापाची इच्छा नसतांना देखील, याच्या आईनें यास गादीवर बसविलें. याच वेळेस अलाउद्दीन खल्जीनें साठ हजार फौज जमा करून दिल्लीचें तक्त बळकाविलें व हा याचा भाऊ अर्कलीखानाकडे पळून गेला. तेथें अलाउद्दीनानें सैन्य पाठवून या दोघां भावांस पकडून आणून ठार मारलें.

**रुक्नुद्दीन फीरूज गुलाम**—( स. १२३६ खून ) दिल्लीचा सुलतान. स. १२३६ त शम्सुद्दीन अल्तमश मरण पावल्यावर यास गादीवर बसण्याची इच्छा नसतांना देखील याला सरदारांनीं गादीवर बसविलें. यानें गादीवर बसल्यावर वाटेल तसा राज्यकारभार करण्यास सुरुवात केली. त्यामुळें यास प्रतिकार करण्यासाठीं पुष्कळ शत्रू उत्पन्न झाले. हा बंडें मोडण्यासाठीं दिल्लीच्या बाहेर पडला व तिकडेच याचा खून झाला ( स. १२३६ ). याच्यानंतर रझिया नांवाची स्त्री गादीवर बसली.

**रुक्नुद्दीन बार्वकशाह**—( स. १४६०–७४ ) बंगालचा राजा ).

**रुक्नुद्दौला**—(मृत्यु स. १७७५) निजामाचा दिवाण.

**रुक्मिणी**—एकनाथस्वामींची आई.

**रुखरस्वामी**—( स. १८१६ सुमार ) हा एक साधुपुरुष होता. खैरागड संस्थानच्या टिकाइतरायानें या स्वामीस प्रथम एक झोंपडी बांधून दिली. पुढें त्याच झोंपडीचें एक मोठें देऊळ बांधलें. या साधूस भविष्य चांगलें कळत असे, असा याचा लौकिक होता. पुढें हा स्वामी एकाएकीं नाहींसा झाला. पुढें ज्या वेळीं टिकाइत राजावर संकट आलें त्या वेळीं यानें पुन्हा प्रगट होऊन संकट टाळण्याविषयीं राजास उपाय सांगितले. यानें जिवंतपणींच समाधि घेतली असें म्हणतात.

**रुचिदत्तमिश्र सोदरकुल**—( स. १४७५ सुमार ) हा पक्षधर अथवा जयदेवमिश्राचा शिष्य होय. याची आई रेणुका व बाप देवदत्त. यास शक्तिदत्त व मणिदत्त नामक दोन बधु होते. ग्रंथ–गणेश उपाध्यायाच्या तत्त्वचिंतामणीवरील ‘ तत्त्वचिंतामणिपरीक्षा ’ नांवाची टीका व न्यायकुसुमांजली-प्रकाशमकरंद नांवाच्या वर्धमानानें उदयनाचार्याच्या न्यायकुसुमांजलीवर लिहिलेल्या टीकेवरील टीका ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ४५७ ).

**रुद्र**—( स. १५९६ ) राष्ट्रौढवंशमहाकाव्याचा कर्ता. याचा आजा केशव व पिता अनंत. प्रतापगिरीचा नारायणशाहा व त्याचा मुलगा प्रतापशाहा यांचा हा आश्रित होता. नारायणशाहाच्या आज्ञेवरून वरील काव्य यानें लिहिलें. यानें संस्कृतांत ‘ जहांगीरशाहचरितम् ’ हा ग्रंथ लिहिला, व त्याचे विभाग प्रतापशाहाचे सांगण्यावरून पाडले. त्याचा कांहीं भाग नाशिक येथें सांपडला आहे. राष्ट्रौढवंशमहाकाव्य बडोदा ओरिएंटल सीरीजमध्यें छापलें आहे.

**२**. ( १६५० सुमार ) कानडी कवि. वीरशैव. याचें गांव बोम्मूरु ( श्रीरंगपट्टजवळ ). यानें नागय्याचें चरित्र लिहिलें आहे. याचे ग्रंथ–करस्थळ, नागय्यचरित्र.

**रुद्रट**—( स. ८००–५० ) याच्या पित्याचें नांव भट्टवामुक. हा सामवेदी ब्राह्मण होता. नांवावरून हा काश्मीरी दिसतो. रुद्रटाला शतानंद असेंहि म्हणत. यानें ‘ काव्यालंकार ’ नांवाचा ग्रंथ लिहिला. तो नमिसाधुकृत टीकेसहित काव्यमालेंत छापला आहे. हा ग्रंथ फार विस्तृत असून त्याचे सोळा अध्याय आहेत. त्यांत संपूर्ण साहित्यशास्त्राचें समालोचन केलें आहे. त्यांत बहुतांशीं आर्यावृत्ताची योजना केलेली असून मधूनमधून क्वचित व

विशेषतः अध्यायांच्या शेवटीं निराळीं वृत्तें योजलेलीं आहेत. त्यांतील सर्व उदाहरणें रुद्रटानें स्वरचितच दिलेलीं आहेत. काव्यालंकाराची श्लोकसंख्या ७३४ आहे. पण बाराव्या अध्यायांत त्या श्लोकांशिवाय आणखी १४ श्लोक दिले असून त्यांत आठ प्रकारच्या नायिका व त्यांचे आणखी उपप्रकार वर्णिलेले आढळतात. हे श्लोक प्रक्षिप्त असावे, असें काव्यमालेच्या विद्वान् संपादकांचें मत आहे. परंतु हें मत संपूर्णपणें बरोबर दिसत नाहीं. कारण तेथें चार नायिकांच्या व्याख्येची जरूरी आहे. म्हणून त्यांत ते मूळचे असून बाकीचे दुसरीकडून घेतले गेले. कांहीं निश्चित तत्त्वांना अनुसरून अलंकारांचें वर्गीकरण करण्याचा प्रयत्न रुद्रटानें प्रथम केलेला आढळतो. रुद्रटानें कोणत्याहि ग्रंथकाराचा स्पष्ट नांवानें उल्लेख केलेला आढळत नाहीं. पण भरताचें नाट्यशास्त्र व मयूरकवीचें सूर्यशतक यांचा उल्लेख अनुक्रमें आचार्यैः ( १२·४ ), व रोगविमुक्ति ( १·९ ) या शब्दांनीं केलेला असावा असें दिसतें. हा रुद्रट व शृङ्गारतिलककर्ता रुद्रभट्ट हे एकच होत, असें वेबर, आफ्रेक्ट, बुल्हर व पिशेल यांचें मत आहे. पंडित दुर्गाप्रसाद, याकोबी व काणे हे ते भिन्न मानतात.

**रुद्रदामा क्षत्रप**—( स. १४०–१५८ ) हा जयदामा क्षत्रपाचा पुत्र. कच्छमधील अंधौ गांवीं याचे चार शिलालेख मिळाले आहेत. ते शा. शक ५२ मधील आहेत ( एपि. इंडि. भा. १६, पृ. २३–२५ ). त्यांमध्यें चष्टन व रुद्रदामन् या नांवांपुढें क्षत्रप या शब्दाऐवजीं राज्ञः असा शब्द घातला आहे. पण घ्सामोतिक व जयदामा या नांवांबरोबर तसा राज्ञः शब्दाचा प्रयोग नाहीं. यावरून या शकाच्या पूर्वींच हा राजा झाला असावा असें दिसतें. गिरनारजवळ अशोकाच्या चौदा आज्ञा कोरलेला खडक आहे. तेथेंच रुद्रदामन्चा एक शिलालेख कोरलेला आहे. त्यावरून युद्धाशिवाय मनुष्यवध करावयाचा नाहीं, अशी यानें प्रतिज्ञा केली होती असें दिसतें. हा आकारवंती ( सर्व माळवा ), अनूप, आनर्त ( उत्तर काठेवाड ), सुराष्ट्र ( दक्षिण काठेवाड ), श्वभ्र ( उत्तर गुजराथ ), मरु ( मारवाड ), कच्छ, सिंधुसौवीर, कुकुर, अपरांत, निषाद इत्यादि देशांचा राजा होता. याच्या राज्यांत चोरांचें भय नव्हतें. तसेंच याच्यावर याची प्रजा अनुरक्त होती. क्षत्रियांपैकीं वीर अशी पदवी धारण करणाऱ्या यौधेय लोकांना यानें नष्ट केलें होतें. दक्षिणपथाचा अधिपति सातकर्णी यास यानें दोनदां पराभूत केलें, पण जवळचा संबंधी असल्यामुळें त्याला ठार केलें नाहीं. पदच्युत केलेल्या राजांनाहि यानें पुनः त्यांच्या राज्यावर स्थापन केलें. हा धार्मिक होता. व्याकरण, संगीत, तर्क वगैरे शास्त्रांचा ज्ञाता; अश्व, रथ व हत्ती यांच्यावर बसण्यांत पटाईत; तलवार व ढाल यांनीं लढण्यांत कुशल आणि उत्तम सेनापति होता. याचा खजिना अगणित संपत्तीनें भरलेला होता. गद्य व पद्य अशा दोनहि तऱ्हांनीं लिहिण्यांत हा कुशल होता. महाक्षत्रप हें पद यानें स्वतः स्वीकारलें होतें. अनेक राजकन्यांनीं याला स्वयंवरांत वरलें होतें. याच्या वेळीं शा. शक ७२ मार्गशीर्ष वद्य १ रोजीं अतिवृष्टि झाली; आणि ऊर्जयंत ( गिरनार ) पर्वतावरून निघणारी सुवर्णसिकता, पलाशिनी वगैरे नद्यांना पूर येऊन सुदर्शन तलावाचा बांध वाहून गेला. तो बांध ४२० हात लांब आणि ७५ हात उंच होता असें म्हणतात. तो पुनः बांधून काढणें कठीण होतें. पण याच्या आज्ञेनें आनर्त आणि सुराष्ट्र या प्रांतांचा राजा सुविशाख यानें पहिल्यापेक्षां तिप्पट मजबूत बांधून काढला. त्याचा सर्व खर्च प्रजेवर कर-रूपानें न लादतां राजानें आपल्या खजिन्यांतूनच केला ( एपि. इंडि. भा. ८, पृ. ४२–४५; इंडि. अँटि. भा. ७, पृ. २२६–६१ ). या लेखावरून दिसून येतें कीं याची राजधानी काठेवाडांत नव्हती. याची राजधानी उज्जयनी असावी. याला दोन पुत्र होते. पहिला दामघ्सद ( दामजदश्री ), व दुसरा रुद्रसिंह. यांपैकीं पहिला मुलगा याच्यानंतर याच्या गादीवर आला.

स. १४५ मध्यें यानें आपला जांवई, आंध्र राज्यांतील राजा पुलोमायी याचा पराभव केला आणि काठेवाड, कच्छ, माळवा, सिंध, कोंकण वगैरे प्रांतांत स्वतंत्रतेनें राज्य करूं लागला. याशिवाय यानें, आंध्र राजा विलिवायकुर यानें नहपानापासून घेतलेल्या प्रांतांपैकीं, पुणें व नाशिक हे प्रांत खेरीज करून बाकीचे सर्व प्रांत परत मिळविले. यानें स. १५० पर्यंत राज्य केलें.

**२.** ( स. ३४८ सुमार ) हा कोणाचा पुत्र होता ही माहिती अद्यापि उपलब्ध झाली नाहीं. कारण याचीं नाणीं अद्यापि उपलब्ध नाहींत. याचें हें नांव व महाक्षत्रप ही अधिकारदर्शक पदवी याचा पुत्र स्वामि रुद्रसेन दुसरा याच्या नाण्यावर मिळते. याचा व स्वामि जीवदामा याचा कांहीं निकट संबंध म्हणजे ते पितापुत्र असावे. जीवदामाचा पुत्र रुद्रसिंह व नातू यशोदामा यांचीं नाणीं मिळालीं आहेत. त्यांवर त्यांना क्षत्रपच म्हटलें आहे.

**रुद्रदेव**—हा पैठणचा कवि. यानें धर्मशास्त्रावर 'संस्कारप्रतापनारसिंह' नांवाचा ग्रंथ संस्कृतांत लिहिला.

२. नेपाळच्या ठाकुरी घराण्यांतील राजा. हा नंददेवाच्या नंतर गादीवर आला व शेवटीं बुद्ध भिक्षु झाला.

३. हा रुद्रदेव व मेलांबिका (मेळलमहादेवी) यांचा पुत्र. नाथवाडीचा राजा (एपिग्राफिक कलेक्शन फॉर १९०९, नं. २२५).

**रुद्रधर**—(स. १४२५–१४६३) धर्मशास्त्रकार. हा मैथिल होता. याचे ग्रंथ–शुद्धिविवेक, श्राद्धविवेक, वर्षकृत्य, व्रतपद्धति. हा महामहोपाध्याय लक्ष्मीधर यांचा पुत्र व हलधराचा धाकटा भाऊ होय.

**रुद्रन्यायवाचस्पति**—(स. १६२५ सुमार) हा विद्यानिवास भट्टाचार्यांचा पुत्र असून विद्यावाचस्पतीचा नातू होता. या विद्यावाचस्पतीचा गौडच्या राजानें बहुमान केला होता. विश्वनाथ सिद्धान्तपंचानन हा याचा धाकटा भाऊ असून, गोविंदभट्टाचार्य चक्रवर्ति हा याचा पुत्र होता. त्याच्या बापाच्या आज्ञेवरून शके १५१० अथवा स. १५८८ त लक्ष्मीधराच्या कल्पतरूची नक्कल (दानखंड) करण्यांत आली. भवसिंहावर लिहिलेल्या कवितेवरूनहि याचा काल ठरवितां येतो. या भवसिंहाचा बाप मानसिंह हा अकबराचे वेळीं स. १५९३ ते १६०५ पर्यंत बंगालचे सुभेदारीवर होता. उपरिनिर्दिष्ट रुद्रन्यायवाचस्पति व भवनाथ सिद्धान्तवागीशाचा नातू रुद्रराम तर्कवागीश हे दोघेहि भिन्न होत. ह्या रुद्ररामाचा तत्त्वज्ञानावरील ग्रंथ रौद्री या नांवानें संबोधिला जातो. रुद्रन्यायवाचस्पतीनें खालील ग्रंथ लिहिले आहेतः—

(१) तत्त्वचिंतामणिदीधितिपरीक्षा.

(२) किरणावली–प्रकाश–निवृत्ति–परीक्षा.

(३) पदार्थ–खण्डन–व्याख्या.

(४) भवविलास–उपरिनिर्दिष्ट भवसिंहाच्या सन्मानार्थ लिहिलेली कविता.

(५) भ्रमरदूतम्.

(६) वृन्दावनविनोदकाव्य.

(हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ४७६–७७).

**रुद्रप्रताप**—बुंदेले घराण्यांतील एक पराक्रमी पुरुष. यानें आपल्या पराक्रमानें बुंदेले कुलास विशेष महत्त्व आणलें. यास बारा पुत्र झाले. ते एकापेक्षां एक पराक्रमी व शूर निपजले.

**रुद्रभट्ट**—'शृंगारतिलक' ग्रंथाचा कर्ता. हा व रुद्रट एक नाहींत.

२. हा वैष्णव ग्रंथकार वीर बल्लाळ होयसळाच्या कारकीर्दीत होऊन गेला. यानें 'जगन्नाथविजय' नांवाचा ग्रंथ लिहिला. हा ग्रंथ जैन कवींच्या धर्तीवर आहे. यांत कृष्णजन्मापासून बाणासुरयुद्धापर्यंत इतिहास आहे.

**रुद्रभूति**—हा आभीर घराण्यांतील एक राजा. हा उत्तम सेनानायक होता. याचा पहिल्या रुद्रसिंह क्षत्रपाच्या कारकीर्दीत (स. १८१) सेनापति म्हणून निर्देश आला आहे.

**रुद्रम्मा काकतीय**—(राज्यकाल स. १२६१–९१) हिला रुद्रदेव महाराज असेंहि म्हणत. ही गणपतीला सोम राणीपासून झालेली मुलगी होय. गणपतीला मुलगा नसल्यानें त्यानें हिला राज्यकारभाराचें शिक्षण दिलें.

मार्कोपोलोनें हिच्याबद्दल म्हटलें आहे—४० वर्षे हा देश या राणीच्या ताब्यांत आहे. हिच्या मागच्या राजापेक्षां हिनें आपलें राज्य व्यवस्थित चालविलें. ही न्यायी व लोकप्रिय आहे.

कांहीं ठिकाणीं असा उल्लेख आहे कीं, या राणीला मुम्मादेवी नांवाची एकच मुलगी होती, व हिनें महादेवाशीं लग्न केलें होतें. हिचा मुलगा रुद्र हा वयांत आल्यावर हिनें त्यावर राज्य सोंपविलें.

दोन शिलालेखांत असें म्हटलें आहे कीं, वीरभद्रेश्वर चालुक्याशीं हिनें लग्न केलें होतें.

**रुद्रराम**—(स. १७५० सुमार) हा भवानंद सिद्धांतवागीशाचा पुत्र. याचे ग्रंथ–१ वादपरिच्छेद, २ कारकव्यूह, ३ चित्ररूप, ४ अधिकरणचंद्रिका, ५ वैशेषिकशास्त्रीयपदार्थनिरूपण (हि. इं. लॉ., पा. ४८४).

**रुद्रसिंह क्षत्रप**—(स. १८१–१९०) हा रुद्रदामा क्षत्रपाचा दुसरा मुलगा. हा आपल्या थोरल्या भावाच्या म्हणजे दामघ्सदच्या मागाहून अधिकारावर आला असावा. याचीं चांदीचीं नाणीं शा. शक १०३–११० पर्यंतचीं मिळालीं आहेत (स. १८१–१८८). शा. श. ११०–११२ (स. १८८–१९०) मधील नाण्यांवर यास महाक्षत्रप लिहिलेलें नसून क्षत्रप असेंच लिहिलेलें आहे. त्याअर्थीं हा कोणाचा तरी मांडलिक किंवा नोकर म्हणून त्या वेळीं कारभार करीत असावा. पण शा. श. ११३–११८ पर्यंतच्या नाण्यांवर पुनः महाक्षत्रप लिहिलेलें आहे. त्यावरून हा मधलीं दोन वर्षे कोणाच्या तरी ताब्यांत गेला असावा असें दिसतें. याला ताब्यांत घेणारा महाक्षत्रप ईश्वरदत्त हा असावा. त्याचीं फक्त पहिल्या व दुसऱ्या वर्षाचींच नाणीं मिळतात. त्यांवर शक किंवा संवत् नसल्यामुळें तर्कावर भिस्त ठेवावी लागते. याच्या वेळचा

एक शिलालेख जामनगर राज्यांतील गुंदागांवीं मिळाला आहे. त्याचा काळ शा. श. १०३ वैशाख शुद्ध पंचमी असा आहे. त्या शिलालेखांत आभीर जातीचा सेनापति बाहक याचा पुत्र सेनापति रुद्रभूति यानें एक तलाव खोदल्याचा उल्लेख आहे ( भावनगर इन्स्क्रिप्शन्स, पृ. २२ ). याला तीन पुत्र होतेः–१ रुद्रसेन, २ संघदामा, ३ दामसेन. याच्यामागून जीवदामा क्रमानें राज्याधिकारी झाला.

२. ( स. ३०८–३१८ पर्यंत त्रुटित ) हा ( स्वामी ) जीवदामन्‌चा मुलगा. याची फार थोडीं नाणीं मिळालीं आहेत व त्यांवर संवत् नाहीं.

३. ( स. ३८८ ) हा (स्वामी) सत्यसिंह महाक्षत्रपाचा पुत्र. याचीं नाणीं शा. श. ३१० व त्यानंतरचींहि मिळालीं आहेत. पण शा. श. ३१० नंतरच्या नाण्यांवरील तिसरा अंक अस्पष्ट आहे. गुप्तवंशांतील महाप्रतापी राजा दुसरा चंद्रगुप्त यानें याचें सर्व राज्य जिंकून घेऊन क्षत्रपांचें राज्य समाप्त केलें. या चंद्रगुप्ताला विक्रमादित्य असें बिरुद होतें. राजपुतान्यांत यांची सत्ता याच्या वेळीं संपली. इतरत्रहि ती असल्याचा पुरावा नाहीं.

**रुद्रसेन वाकाटक**—( स. ३४४–४८ ) हा पहिल्या प्रवरसेनाचा नातू.

२. ( स. ३९०–९५ ) हा पहिल्या पृथ्वीषेणाचा पुत्र. प्रभावती गुप्ता ही गुप्तांपैकीं दुसऱ्या चंद्रगुप्ताची मुलगी.

**रुद्रसेन क्षत्रप**—( स. १९८–२२२ ) हा पहिल्या रुद्रसिंह क्षत्रपाचा ज्येष्ठ पुत्र. याचीं चांदीचीं नाणीं शा. श. १२२–१४४ पर्यंतचीं मिळालीं आहेत. याच्या वेळचा एक शिलालेख काठेवाडांतील जसदण राज्यांत गढा या गांवीं मिळाला आहे. तो शा. श. १२७ भाद्रपद बहुल ( कृष्ण ) पंचमीचा आहे ( भावनगर इन्स्क्रिप्शन्स, पृ. २२–२३ ). या शिलालेखांत मानसगोत्री प्रथानकाचा पुत्र आणि खराचा नातू यांनीं एक सत्र ( अन्नछत्र ) उघडल्याचा निर्देश आहे. याला पृथ्वीसेन आणि दामजदश्री असे दोन पुत्र होते. रुद्रसेन महाक्षत्रप झाला, पण त्याचे पुत्र क्षत्रपच राहिले. याच्या नंतर याचा धाकटा भाऊ हा उत्तराधिकारी झाला. अशीच यांच्या कुळांत चाल होती.

२. ( स. २५६–२७२ ) हा वीरदामन् क्षत्रपाचा पुत्र. याचीं नाणीं मिळालीं आहेत.

३. ( स. ३४८–३७६ ) हा रुद्रदामन्‌चा मुलगा.

४. ( ३८२–८८ ) हा सिंहसेनाचा मुलगा.

**रुय्यक किंवा रुचक**—( स. ११५० सुमार ) हा राजानक तिलकाचा पुत्र ( पिशेलची शृंगारतिलकाची प्रस्तावना, पा. २८–२९ पाहा). अलंकारसर्वस्व, सहृदयलीला आणि काव्यप्रकाशसंकेत हे याचे ग्रंथ आहेत. शिवाय १ अलंकारानुसारिणी, २ नाटकमीमांसा, ३ व्यक्तिविवेकविचार, ४ श्रीकण्ठसार, ५ साहित्यमीमांसा, ६ हर्षचरितवार्तिक, हेहि याचे ग्रंथ आहेत. रुचकप्रणीत काव्यप्रकाशसंकेत नामक टीका अलंकारसर्वस्वकारानेंच रचलेली होय, असें विमर्शिनीकार जयरथ म्हणतो. काव्यप्रकाशसंकेताच्या प्रास्ताविक श्लोकांत यानें तिलकापाशीं काव्यशास्त्राचें अध्ययन केल्याचा उल्लेख केला आहे. हा मंखाचा गुरु होता. मंख हा काश्मीरच्या जयसिंग राजाचा सांधिविग्रहिक होता.

**रुस्तुमजमान**—( स. ५।६।१६४६ ) हा थोरल्या रणदुल्लाखानाचा मुलगा. याला धाकटा रणदुल्लाखान असें म्हणतात. हा मुस्तफाखानाबरोबर कर्नाटकच्या स्वारीस निघाला. पुढें गदग-लक्ष्मेश्वरपर्यंत गेल्यावर मुस्तफाला याच्या राजद्रोहाची बातमी समजली, आणि त्यानें याला विशेष रक्तपात न करितां कैद केलें, व याची मालमत्ता जप्त केली. पण नंतर लौकरच याला माफी देऊन मालमत्ता परत देण्यांत आली. तेव्हांपासून मुस्तफाच्या विरुद्धपक्षांतील हा विशेष सावधपणानें राहण्यास शिकला. शहाजी व नंतर शिवाजी यांच्याशीं मित्रत्वाच्या नात्यानें हा वागूं लागला. थोरला रणदुल्ला मेल्यानंतर विजापूर दरबारांत धुमसत असलेली खवासखान व मुस्तफाखान यांच्यांतील दुफळी उघडकीस आली. बादशाहानें मुस्तफाच्या पक्षास उचलून धरल्यामुळें विरुद्ध पक्षाच्या सरदारांना कैद करण्याचें धोरण त्यानें स्वीकारलें, त्यांत यालाहि कैद केलें ( शि. च. नि., पा. ११८ ). अफजुलखानाच्या वधानंतर कोल्हापुरनजीक शिवाजीनें याचा पराभव केला, तेव्हां हा हुक्केरीकडे पळून गेला.

**रुस्तुमराव जाधव**—याची मुलगी सावित्रीबाई शाहूस दिली होती.

**रूप ( गोस्वामिन् )**—( स. १५००–६० सुमार ) हा हुसेनशाहाचा मंत्री. पिता मुकुंद व पुत्र कुमार. सनातन, रूप व वल्लभ हे तीन बंधु असून परमवैष्णव होते. उज्ज्वलनीलमणीवर जीवगोस्वामिकृत लोचनरोचिनी नांवाची टीका आहे. तिच्या प्रारंभींच्या श्लोकांत ही माहिती दिली आहे. हा व सनातन हे बंगाल्यांतील महान् वैष्णवसाधु चैतन्यप्रभु याचे शिष्य व बहुतेक समकालीन होते, असें कवि कर्णपूर यांच्या चैतन्यचंद्रोदय या नाटकावरून समजतें. यानें आपलें ‘ विदग्धमाधव ’ हें नाटक स. १५३३ मध्यें लिहिलें व उत्कलिकावल्लरी हा

ग्रंथ स. १५४९–१५५० मध्यें लिहिला असें डॉ. राजेन्द्रलाल यांच्या संस्कृत हस्तलिखितांचें समालोचन ( व्हा.९, पान २४०, क्रमांक ३१९ ) यावरून दिसतें. याचा पुतण्या जीवगोस्वामि. याचे ग्रंथः–ललितामाधव, दानकेलिकौमुदी ( थाणिका ) ही प्रसिद्ध झाली आहे. पद्यावली ग्रंथ याचाच असावा. बाकीचे ग्रंथ वर आलेच आहेत.

**रूपमती**—( लग्नकाल स. १५५७ ) माळव्यांतील बाझबहादुराची राणी. हिचा जन्म उज्जयनीच्या ईशान्येस असलेल्या सारंगपूर नामक गांवीं झाला. ही एका रजपूत ठाकूराची मुलगी ही रूपानें सौंदर्यवान् असून हिला संगीतशास्त्राचें चांगलें ज्ञान होतें. हिचा आवाज इतका मधुर होता कीं, कोणीहि हिच्या मंजुळ आलापलहरी ऐकून मुग्ध होऊन जात असे. ही एकदां एका वृक्षाखालीं निसर्गदेवतेचें स्तवन करीत बसला असतां, तेथें बाझबहादुर नांवाचा एक मुसलमान राजा आला. त्यानें हिचें गोड गाणें ऐकून, तो हिच्यावर अगदीं अनुरक्त झाला. त्यानें हिच्या सौंदर्याला पाहून, हिला आपली पट्टराणी होण्याची विनंति केली. पण हिनें त्याला असें सांगितलें कीं, ' मी रजपूत वीराची कन्या असल्यामुळें मला मुसलमानाशीं लग्न करतां येत नाहीं.' परंतु त्यानें हिची नाना प्रकारानें विनवणी करून तिची संमति मिळविली व हिच्याशीं स. १५५७ त लग्न लाविलें ( बाझबहादुर पाहा ).

लग्न झाल्यानंतर बाझबहादुर राज्यकारभारांत लक्ष घालीनासा झाला. हें पाहून अकबर बादशाहानें आदमखान नामक सरदारास त्याच्यावर पाठवून त्याचा पराभव केला व आदमखानानें त्याचा खजिना, राजचिन्हें व जनानखाना हस्तगत करून हिलाहि पण पकडली. तेव्हां तो हिचें सौंदर्य पाहून हिच्यावर लुब्ध झाला. पण ही फार पतिनिष्ठ असल्यामुळें हिनें विषप्राशन करून आत्महत्या केली ( आधमखान पाहा ). ही स्वतः कविताहि करीत असे. हिनें बाजबहादुरावर नाना प्रकारचीं प्रेमगीतें हिंदींत केलीं. तीं माळव्यांत कर्णप्रिय लोकगीतें होऊन राहिलीं आहेत. ज्या वेळीं बाझबहादुर मरण पावला असें कळलें, त्या वेळेस हिनें पुढील दोहा म्हणून प्राण सोडलाः

" तुम विन जियरा रहतहत, मांगत है सुखराज ।
रूपमति दुखिया भई, विना बहादुर बाज ।। १ ।। "

ही गायनकलेंत निष्णात असल्यामुळें; हिनें प्रसिद्ध भूपकल्याण राग शोधून काढला. एकंदरींत ही एक अद्वितीय स्त्री होऊन गेली, व हिनें आपल्या संगीत कलेनें व अलौकिक पतिप्रेमानें आपलें नांव माळव्याच्या इतिहासांत अजरामर करून ठेविलें.

**रूपराम**—औरंगजेबाच्या वेळचा प्रसिद्ध चितारी ( मं. १४. १. पा. ३–५ ).

**रूपराम कटारी**—( स. १७५० सुमार ) हा कटारी जातीचा हिंदुस्थानी ब्राह्मण. हा सुरजमल्ल जाटाचा राजपुरोहित असून मुख्य सल्लागार होता. कुंभेरीच्या लढाईनंतर जाटांचा व मराठ्यांचा स. १७५४ त तह झाला, तो याच्याच मध्यस्थीनें झाला. पेशव्यानें यास सुरजमल्लाकडून तीस लक्षांची खंडणी काढून घेण्यासाठीं साठहजार रुपये गुप्त रीतीनें दिले होते. हा मोठा कृष्णभक्त होता. यानें बरसाना येथें पुष्कळ देवळें बांधलीं. याला पैसा मिळविण्याचा फार नाद असे; पण तो पैसा हा दानधर्म, देवळें बांधणें वगैरेसारख्या धार्मिक कामांत खर्च करीत असे. यानें बरसाना येथें एक मंदिर बांधलें आहे, तें 'लाडिजीके मंदिर ' ( राधेचें मंदिर ) म्हणून प्रसिद्ध आहे ( जु. ऐ. गो. पृ. २ ).

**रूपराम चौधरी**—( मृ. स. १८१४ ) पेशव्यांचा एकनिष्ठ सेवक. हा पानशांचे तोफखान्यांत चौधरकीचे कामावर होता. यानें पेंढारी, भिल्ल व कोळी वगैरे लोकांचीं बंडें मोडलीं. हा नारायणरावाच्या वधापासून तों थेट शेवटच्या बाजीरावापर्यंत पेशव्यांच्या नोकरीस होता. हा मरण पावल्यावर याचा दत्तक मुलगा रामचंद्रराव याचें काम करूं लागला.

**रूपसाही**—( ग्रंथकाल स. १७५६ ) हा श्रीवास्तव कायस्थ असून पन्ना येथें राहत असे. यानें ' रूपविलास ' नांवाचा एक हिंदी ग्रंथ लिहिला आहे.

**रूपाजी भोजले**—( मुधोजी भोसले पाहा ).

**रेझाबेग**—( स. १६१५ सुमार ) इराणचा वकील. हा जहांगीर बादशाहाकडे आला होता. येतांना यानें बादशाहास नजराण्यादाखल पुष्कळ मौल्यवान् वस्तु आणिल्या होत्या. परंतु हा ज्या कामासाठीं आला होता, तें काम न होतां यास परत जावें लागलें.

**रेणुकाबाई**—( मृ. स. १८२२ ) ही जत संस्थानांतील कान्होजीरावाची वडील बायको. ही कान्होजीनंतर संस्थानचा कारभार पाहूं लागली ( स. १८१० ). ही मरण पावल्यावर हिची सवत साळूबाई कारभार पाहूं लागली.

**रेमती वेंकटराय**—( स. १६०० सुमार ) कर्नाटकचा कारभारी. विजयनगरच्या तिरुमल्लाचा मुलगा मरण पावल्यावर, त्याचीं मुलें अज्ञान असल्यामुळें हा कारभार पाहत असे.

**रेवणसिद्ध**—यानें शंकराचार्यांना चंद्रमौलीश्वर लिंग दिलें अशी प्रसिद्धि आहे. हे शंकराचार्य म्हणजे आद्य शंकराचार्य होत, असें कांहीं लोक म्हणतात.

२. ज्ञानेश्वरसमकालीन नाथपंथांतील या सिद्धाचें स्थान नेवासेंनजीक मर्मरगिरीवर आहे.

३. हा जातीनें जंगम होता. हा रेवगी या गांवीं राहत असे. यानें 'परमरहस्य' नांवाचा ग्रंथ लिहिला. याची समाधि सातारा जिल्ह्यांतील रेणावी या गांवीं आहे.

**रेवाशंकर**—(स. १८१८) गुजराथी कवि. हा जुनागडचा नागर ब्राह्मण. यानें दशमस्कंधसार, डाकुरलीला, रामलीला, कृष्णलीला, चंद्रायणा व पेंदा इत्यादि ग्रंथ लिहिले.

**रैदास**—(स. १५२० सुमार) मीराबाईचा गुरु. याच्या बापाचें नांव रग्घू व आईचें नांव घुरविनिया. हा जातीनें चांभार असून याचा जन्म काशीस झाला. व रामानंदाचा शिष्य हा कबीराचा समकालीन होय. यानें आपला सर्व वेळ ईश्वरभजनांत घालविला. गुजराथ प्रांतामध्यें याचे पुष्कळ अनुयायी आहेत, ते स्वतःस 'रविदासी' असें म्हणतात. यानें कांहीं कविताहि केल्या. हा १२० वर्षें जगून मरण पावला (कविताकौमुदी).

यास कोणी रविदास असेंहि म्हणतात. दक्षिणेंतील प्रसिद्ध रोहिदास चांभार हाच असावा असें दिसतें. चितोडची राणी 'झाली' ही या रविदासाची शिष्या होती (मु. रि. भा. १, पृ. ३५६).

हा चांभार उत्तर हिंदुस्थानांतील राहणारा असून मोठा कृष्णोपासक होता. कबीराचा व याचा आपल्या उपास्याच्या श्रेष्ठत्वाविषयीं झालेला संवाद कीर्तनकार उपयोगांत आणतात. तो खरा असल्यास हा कबीराचा समकालीन ठरतो. भक्तविजयांत महिपतीनें याचें चमत्कार-प्रधान चरित्र दिलें आहे (भक्ति. वि. अ. १५).

रविदास, रैदास व रोहिदास चांभार हे सर्व एकच दिसतात.

**रोषनआरा**—(स.१६१७-७१) शहाजहानची मुलगी. ही औरंगजेबाच्या पक्षाची होती. ही अविवाहित मेली.

**रोहिदास चांभार**—(रैदास पाहा).

---

## ल

---

**लखम सावंत**—(स. १६५१-७५) आदिलशाहीचा कोंकण प्रांताचा अधिकारी. देशमुखी संपादन करून कुडाळ हें संस्थान निर्माण करणाऱ्या खेम सावंताचा हा पुतण्या. यानें शिवाजीची वाढती शक्ति पाहून शिवाजीस मिळण्याचें ठरविलें; आणि आपला वकील पितांबर शेणवी यास शिवाजीकडे पाठवून उभयतांत पांच कलमांचा तह झाला. त्यामध्यें प्रांताचा निम्मा ऐवज शिवाजीस द्यावा व तीन हजार फौज ठेवून शिवाजीस गरज पडेल तेव्हां मदत करावी असें ठरलें. हा करार ता. ५-३-१६५९ रोजीं झाला (का. सं. प. या. ४११). परंतु याच्याकडून हा करार पाळला गेला नाहीं. म्हणून शिवाजीनें याच्यावर स. १६६२ मध्यें स्वारी केली. तेव्हां यानें 'फौज घोडा राउत मिळवून शिवाजीवर चालून जातों आणि कोंकण सोडवितों' (सभा. पृ. ६८) असा निरोप विजापुरीं पाठविला. त्याप्रमाणें तिकडून खवासखान व बाजी घोरपडे हे याच्या मदतीस निघाले. पण ते येण्यापूर्वीं शिवाजीनें यास पिटून लावलें व हा फिरंग्यांच्या आश्रयास गेला. पण त्यांनीं स्वतंत्र तह केल्यावर याला कोंडून राहणें अशक्य होऊन हा शिवाजीस शरण गेला. तेव्हां शिवाजीनें कुडाळची देशमुखी याजकडे कायम केली. शिवाय 'दरसाल सहा हजार होन द्यावे, वाडा बुरुजाचा बांधूं नये, कुडाळीं राहावें, जमाव करूं नये' अशाहि अटी घातल्या. सावंतांनीं यानंतर शिवाजीशीं विरोध केला नाहीं.

**लखमसी**—(लक्ष्मणसिंह गुहिलोत पाहा).

**लगध**—याचा ग्रंथ 'वेदांग-ज्योतिष' या नांवानें वैदिकांच्या म्हणण्यांत असून तो इसवी सनापूर्वीं १३ शें वर्षांच्या सुमारास रचला गेला. यांत तिथि व नक्षत्रें काढण्याच्या म्हणजे सूर्यचंद्राचें गणित करण्याच्या तोंडी हिशेबाच्या रीति दिल्या आहेत. या रीति सुचण्यापूर्वीं निदान पांचसहाशें वर्षें सूर्यचंद्रांच्या गतीचें अवलोकन होऊन चैत्रादि संज्ञा प्रचारांत आल्या होत्या. अवलोकन, तोंडीं गणित, लेखी गणित या क्रमानें आमच्या देशांत गणितशास्त्राची वाढ झाली. त्यांपैकीं लगधाची गणना तोंडीं गणित करणाऱ्या अत्यंत प्राचीन ज्योतिष्यांत करावी लागेल (प्राचीन चरित्रकोश पाहा).

**लघुसमंतभद्र**—( स. १००० सुमार ) यानें विद्यानंदाच्या 'अष्टसहस्रीवर' 'अष्टसहस्रीविषमपदतात्पर्यटीका' नांवाची एक टीका लिहिली. हा दिगंबर पंथाचा होता ( हि. इं. लॉ. ).

**लज्जा**—हैहयकुलांतील राजकन्या. बंगाल्यांतील पालांपैकीं विग्रहपालाची पत्नी.

**लतीफखान**—गुजराथच्या तातारखानाचा मुलगा.

२. ( स. १५३०सुमार ) गुजराथच्या निजामखानाचा मुलगा. याचा मुलगा दुसरा अहमद गादीवर आला.

३. ( स.१५०० सुमार) गुजराथच्या दुसऱ्या मुजफरखानाचा मुलगा. याचा मुलगा तिसरा महमूद म्हणून गादीवर आला.

**लद्धा**—पंजाबमधील नामदेवाचा हा एक अनुयायी.

**ललित (वज्र)**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं होय. याचा महामुद्रारत्नगीति ( तं. ४८।११२ ) नांवाचा एक ग्रंथ प्रसिद्ध आहे.

**ललितादित्य ( मुक्तापीड ) कर्कोटक**—( स. ६९९-७३५ ) काश्मीरच्या दुसऱ्या प्रतापादित्याचा हा मुलगा. हा स. ७४० मध्यें काश्मीर येथें राज्य करीत होता. यानें बांधलेल्या मंदिरांत मार्तंडमंदिर विशेष प्रसिद्ध आहे.

कनोजचा राजा यशोवर्मन् मौखरीस यानें राज्यावरून पदच्युत केलें असें म्हणतात. याशिवाय यानें तुर्क, तिबेटी आणि दर्द यांच्याशीं लढाया करून त्यांचा पराभव केला. परंतु सरतेशेवटीं याच्या उत्तरेकडील स्वाऱ्यांत मात्र याचा नाश झाला. याच्यानंतर याचा मुलगा कुवलयापीड हा गादीवर आला ( B. ). यानें माळव्याच्या गुप्तांपैकीं देवगुप्तास मारिलें ( २ देवगुप्त पाहा ).

**ललितापीड**—( चिप्पड जयापीड पाहा ).

**लल्ल**—( स. ४९९ सुमार ) याच्या एका ग्रंथांतील श्लोकांचें भास्कराचार्यांनें खंडन केलें आहे. यावरून याचा 'पाटीगणित' नांवाचा ग्रंथ असावा. हा दक्षिणेचा राहणारा असावा.

धीवृद्धिदतंत्र नांवाचा याचा गणितग्रंथ आहे. तो सुधाकर द्विवेदी यांनीं शोधून छापला आहे (स.१८८६). याचा 'रत्नकोश' नांवाचा मुहूर्तग्रंथहि आहे.

**लवणप्रसाद वाघेल**—( स. १२४१ सुमार ) गुजराथच्या दुसऱ्या भीम सोळंकीचा प्रधान. याचा पुत्र वीरधवल ( २ अर्णवराज पाहा ).

**लवसेन**—( स. ८०० सुमार ) बंगाल्यांतील पालांपैकीं देवपालाचा सेनापति. यानें आसाम व कलिंग जिंकले.

**लक्षसिंह गुहिलोत**—(स. १३८२-१४२१ सुमार) मेवाडच्या क्षेत्रसिंहानंतर हा त्याचा ज्येष्ठ पुत्र गादीवर आला. याला लाखा असेंहि म्हणत. हा युवराज असतांनाच यानें लढाईंत जोगा दुर्गाधिपाला पराभूत केलें, व त्याची कन्या, आणि हत्तीघोडे जिंकून घेतले ( भावनगर इन्स्क्रिप्शन्स, पृ. ११९ ). डोंगरांतील मेर लोकांना जिंकलें व त्यांचा वर्धन ( बदनोर ) नांवाचा प्रदेश ताब्यांत घेतला ( कीर्तिस्तम्भप्रशस्ति श्लो. ३६, कुंभलगडप्रशस्ति २१२ श्लोक ). याच्या कारकीर्दींत एक चांगली चांदीची खाण सांपडली. मगरा जिल्ह्यांतील जावर गांवीं सांपडलेल्या या खाणीमुळें राज्याची आर्थिक स्थिति फारच सुधारली व त्यामुळें काशी, प्रयाग व गया हीं क्षेत्रें पुष्कळसें धन मुसलमान राजांना देऊन यानें करमुक्त केलीं ( भावनगर इन्स्क्रिप्शन्स्, पृ. ११९, शृंगीऋषि येथील अप्रकाशित शिलालेख ).

ही करमाफी यानें पराक्रमाच्या जोरावर घडवून आणली नसून पैशाच्या जोरावर घडवून आणली, पण टॉडच्या लिहिण्याप्रमाणें यानें जरूर तर लढायाहि केलेल्या दिसतात. यानें अलाउद्दीन खल्जी व खिजरखां यांच्या वेळच्या लढायांत उध्वस्त झालेल्या इमारती दुरुस्त केल्या व तलाव, कुंड, किल्ले वगैरे अनेक इमारती नव्या बांधल्या. धनसंचय खूप झाला होता तरी त्याचा यानें चांगला उपयोग केला. दान, तुला वगैरेहि खूप केल्या ( भावनगर इन्स्क्रिप्शन्स्, पृ. ११९). चीखागांव एकलिंगजीला दिला. सूर्यग्रहणांत झोटिंगभट्टाला पिप्पली ( पीपली ) गांव व धनेश्वरभट्टाला पंचदेवालय ( पंचदेवळा ) गांव दिला ( एकलिंगजीच्या दक्षिणद्वारावरील प्रशस्ति ). याची आई द्वारकेच्या यात्रेला गेली असतां काबो नांवाच्या लुटारू जातीनें तिला वेढा देऊन लढाई सुरू केली तेव्हां काल्रू व धवल या आपल्या पुत्रांसह शार्दूलगडचा रावसिंह डोडियानें याच्या मातेस मदत केली व तिला मेवाडच्या हद्दीपर्यंत सुरक्षित पोंचविलें. याबद्दल यानें धवलला आपल्याकडे बोलावून घेऊन पांच लाखांची जहागिर दिली. धवलच्या वंशजाकडे सरदारगड ( लावा ) हें स्थान आहे व ते उदेपूर दरबारचे पहिल्या श्रेणीचे सरदार आहेत.

मंडोवरचा राव चूंडा राठोड आपल्या गोहिवंशीय राणीवर अधिक प्रेम करीत असे. म्हणून तिचा पुत्र कान्हा याला आपलें राज्य त्यानें देण्याचें ठरविलें. तेव्हां त्याचा ज्येष्ठ पुत्र रणमल्ल पांचशें स्वारांसह याच्या आश्रयाला येऊन राहिला. यानेंहि त्याला चाळीस गांव देऊन

आपला सरदार बनविलें व त्याची वहिण हंसबाई हिच्याशीं लग्न केलें ( मोकल गुहिलोत पाहा ).

यानें आपल्या शेवटल्या दिवसांत मोकलच्या संरक्षणाची जबाबदारी चूंडावर सोंपविली, व त्याच्या स्वार्थत्यागाबद्दल त्याला व त्याच्या वंशजांना दरबारकडून जाणाऱ्या पट्टे, परवाने वगैरेंच्या सनदांवर भाल्याचें चिन्ह करण्याचा अधिकार दिला. ती चाल अद्यापहि पाळली जाते.

याला चूंडा, राघवदेव, अज्जा, दूल्हा, डूंगर, गज, सिंह, लूणा, मोकल व बाघसिंह असे पुत्र होते.

**लक्ष्मण**—( स. ११३५ सुमार ) शारदातनय नांवाच्या ग्रंथकारानें अलंकारशास्त्रावर 'भावप्रकाशन' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. त्यानें आपल्या मंगलचरणाच्या श्लोकांत आर्यावर्तदेशांत मेरूत्तर नांवाचा एक प्रान्त आहे. त्याच्या दक्षिणेला माठर नांवाचा गांव आहे. तेथील काश्यपगोत्री लक्ष्मण नांवाच्या ब्राह्मणानें वेदभूषण नांवाचें भाष्य लिहिलें आहे. तो लक्ष्मण शारदातनयाचा प्रपितामह होता. त्यावरून याचा एक काळ पंचाहत्तर वर्षे त्याच्याआधीं धरतां येईल.

**२.** यानें भोजाच्या रामायणचंपूचें 'युद्धकांड' लिहून तो अपुरा असलेला ग्रंथ पुरा केला. त्यामुळें यास भोजचंपू लक्ष्मण म्हणत. हा स्मार्त ब्राह्मण वाराणसीवारू कुळांत जन्मला. पिता व्यंकटेश. याची बदर सरकार ही जन्मभूमि.

**३.** प्रबंधराज नांवाच्या तेलगू ग्रंथाचा कर्ता.

**४.** तेलगू कवि. १ आंध्रनामसंग्रह, २ सुभाषितरत्नाकर हे याचे ग्रंथ होत.

**लक्ष्मण आपाजी अंबेकर**—( स. १७७५ ) राघोबा दादाचा एक कारभारी. याचा पत्रव्यवहार प्रसिद्ध आहे (रा. खं. १२). हा देशस्थ ऋ. ब्राह्मण. चिंतो विठ्ठल रायरीकरांमार्फत लागला. याला साकुरें गांव इनाम होतें.

**लक्ष्मण गोविंद चिटणीस**—( स. १७७९ ) गोविंदराव चिटणीसाचा मुलगा. यावर नाना फडणीसाची मर्जी होती.

**लक्ष्मण चिंतामण धडफळे**—( स. १७४०-७३ ) पुरंदरे रोजनिशीचीं मूळ स्मरणें लिहिणारा पुरुष. याचीं स्मरणें पेशवेदप्तरांत उपलब्ध आहेत. त्यावरून पुढें पुरंदरे रोजनिशी लिहिली गेली. स. १७४० पासून १७७३ पर्यंत याचीं स्मरणें उपलब्ध आहेत. आणि त्यांतील नोंदी तंतोतंत जुळतात. हा स्वयंस्फूर्तीनें इतिहास लिहिण्याचा प्रयत्न फार महत्त्वाचा आहे ( धडफळे घराणें पाहा ).

**लक्ष्मणदेव कलचुरि**—( स. ९५० सुमार ) हा केयूराचा पुत्र. यानें कोसल, कोंकण व गुजराथ जिंकलीं. याची मुलगी बोंथादेवी दुसऱ्या तैलप पश्चिम चालुक्याची पत्नी.

**लक्ष्मण माणिक्य**—( स. १५००-१६०० ) यानें 'विख्यातिविजय' या नांवाचें सहा अंकी नाटक लिहिलें.

**लक्ष्मणराव लाडोजी शितोळे देशमुख**—हा महादजी शिंदे यांच्या बाळाबाई नांवाच्या मुलीचा दुसरा मुलगा.

**लक्ष्मण संभाजी**—( स. १७८९ ) नाना फडणीसाचा वकील. हा जयपुरास होता.

**लक्ष्मणसेन**—( स. ११७०-१२०० ) ( इख्तियारउद्दीन मुहम्मद खल्जी पाहा ).

**लक्ष्मदेव परमार**—( स. ११०० सुमार ) हा माळव्याच्या उदयादित्य परमाराचा पुत्र. यानें त्रिपुरीवर स्वारी करून शत्रूंचा नाश केला व मुसलमानांशीं लढाई केली. याला पुत्र नसल्यामुळें याच्या मागून याचा भाऊ नरवर्मा गादीवर आला.

**लक्ष्मम्मा**—रामराय आराविडूची चवथी बायको. हिचा पुत्र श्रीरंगराय.

**लक्ष्मसिंह गुहिलोत**—(स. १३०३ सुमार) सीसोदें येथील राणाशाखेंपैकीं हा जयसिंहाचा पुत्र. याला लखमसी असें म्हणत असत. यानें राणपुरच्या शिलालेखांत माळव्याचा राजा गोगादेव याला जिंकल्याचा निर्देश आहे ( राणपूर लेख-भावनगर इन्स्क्रिप्शन्स, पृ. ११४ ). हा आपल्या सात पुत्रांसह अलाउद्दीन खल्जीशीं झालेल्या चितोडच्या लढाईंत मारला गेला. सर्वांत ज्येष्ठ पुत्र अरिसिंह ( अरसी ) हाहि वीरोचित गतीला तेथेंच गेला. अरिसिंहाचा पुत्र हंमीर. सर्वांत धाकटा अजयसिंह जखमी होऊन घरीं गेला व तो याच्या मागें गादीवर आला. याला 'भड लखमसी' असें म्हटलेलें आढळतें. भड व गढ हीं भट शब्दाचीं अपभ्रष्ट रूपें दिसतात.

**लक्ष्मीदास**—( स. १५०० ) एक ज्योतिषी. वाचस्पतिमिश्र व केशव हे याचे अनुक्रमें बाप व आजे होत. सिद्धान्तशिरोमणीच्या गणिताध्याय व गोलाध्यायावर याची टीका आहे.

**लक्ष्मीदेव रट्ट**—( स. ११९० ) हा रट्ट घराण्यांतील असून तिसऱ्या कार्तवीर्यानंतर गादीवर बसला. हा जैन होता. याला लक्ष्मीधर म्हणतात. याची पत्नी चंद्रिका किंवा चंदलादेवी.

२. (स. १२२८–२९) हा चवथ्या कार्तवीर्याचा पुत्र. हा रट्टांपैकीं मल्लिकार्जुनानंतर गादीवर आला. याला देवगिरीच्या सिंधण यादवाच्या वीचण नांवाच्या प्रतिनिधीनें मांडलिक बनविलें.

३. यादव घराण्यांतील कृष्णदेवाचा मंत्री.

**लक्ष्मीदेवी**—ही गोव्याच्या कदंब घराण्यांतील दुसऱ्या विजयादित्याची पत्नी. हिचा पुत्र जयकेशिन् तिसरा.

२. (बाळंभट्ट पायगुंडे पाहा).

३. दुसऱ्या सेन रट्टाची पत्नी.

**लक्ष्मीधर**—ज्योतिषी भास्कराचार्याचा पुत्र, व जैत्रपाल यादवाचा आश्रित पंडित.

२. (स. १०५० सुमार) हा एक बंगाली कवि. हा शांडिल्यगोत्री ब्राह्मण असून बंगालमधील भट्टकोसल येथील राहणारा होय. हा जरी बंगालमध्यें राहणारा होता, तरी यानें धारा येथील भोजराजाच्या पदरीं राहून आपलें नांव सर्वश्रुत केलें. याचा काल स. अकरावे शतकांतील होय. कारण याचा जो आश्रयदाता भोज त्याचा काल स. १०१०–१०५० असा आहे.

यानें भोजाचे आश्रयास असतां महाकाव्य किंवा 'चक्रपाणिविजय' हा ग्रंथ लिहिला. त्यामध्यें बाणासुराची मुलगी उषा हिच्या लग्नाची गोष्ट वर्णिलेली आहे. याच्या बापाचें नांव वैकुंठभट्ट आणि आजाचें नांव अजितभट्ट असें होतें (इंडियन कल्चर, एप्रिल १९३५, पृ. ७०१).

३. (स. १५५०–७२) हा विजयनगरच्या पहिल्या तिरुमल्ल आरविडूच्या पदरीं होता. भरतशास्त्र व श्रुतिरंजिनी या ग्रंथांचा कर्ता.

४. (स. ११०४–५४) याच्या पित्याचें नांव भट्टहृदयधर. हा गोविंदचंद्र या कनोजच्या गाहडवाल राजाचा युद्धमंत्री. यानें 'व्यवहारकल्पद्रुम (कल्पतरु)' नांवाचा ग्रंथ धर्म व व्यवहार या विषयांवर लिहिला. हा ग्रंथ संपूर्ण उपलब्ध नाहीं.

५. (स. १५२०) प्रतापरुद्र गणपतीच्या नांवावर प्रसिद्ध असलेला 'सरस्वतीविलास' यानें लिहिलेला आहे. कृष्णदेवराय तुलुवानें वरील राजाला जिंकल्यानंतर हा त्याच्याकडे गेला (एपि. इंडि. ६, २३०).

**लक्ष्मीनाथ**—पिंगलार्थप्रदीप ग्रंथाचा कर्ता.

**लक्ष्मीबाई आंगरे**—(स. १७३९ सुमार) ही कान्होजीची पत्नी व सेखोजीची माता होय. सेखोजी वारला तेव्हां थो. बाजीरावानें हिला समाधानाचें पत्र धाडलें. त्याच्या उत्तरांत ही म्हणते, 'माझ्या घराण्याचा लौकिक संभाळणें हा मी स्वधर्म समजतें. मला पुत्रापेक्षां स्वामीकार्याच्या यशःसिद्धीचें महत्त्व अधिक वाटतें' (जु. ऐ. गो. ४५).

**लक्ष्मीबाई झांशीवाली**—(जन्म स. १८३५–मृत्यु स. १८५८ जून) ही मोरोपंत तांब्यांची मुलगी व झांशी संस्थानचा राजा गंगाधरराव नेवाळकर यांची पत्नी. गंगाधरराव वारल्यावर संस्थान खालसा झालें व हिला ५ हजार दरमहा पेन्शन मिळालें. स. १८५७ सालच्या बंडांत हिला इच्छा नसतां सामील व्हावें लागलें. हिनें दहा दिवस झांशीचा किल्ला लढवला, पण फितुरीमुळें इंग्रजांनीं किल्ला घेतला. तेथून निसटून काल्पीस ही पुरुषी वेषानें पेशव्यांना सामील झाली. हिच्याकडे सेनापतित्व येऊन हिनें ग्वाल्हेरचा किल्ला घेतला. तेथें निकरानें लढत असतां फितुरीमुळें, बंडवाल्यांच्या अव्यवस्थेमुळें व नेहमींचा घोडा नसल्यामुळें फळी फोडून पार जातांना ही शूर स्त्री इंग्रजांच्या समशेरीस बळी पडली.

**लक्ष्मीबाई भोसले**—ही शिवाजीमहाराजांची पांचवी पत्नी होती. हिचें लग्न शके १५७८ (स. १६५६) च्या सुमारास झालें. ही विचाऱ्यांची कन्या होय (शिवाजीनिबंधावली १, पृ. २०९–२२५).

**लक्ष्मीबाई शिंदे**—ही तुळजापूरकर भोपे कदम याजकडील होती. महादजी शिंद्याची पत्नी. ही महादजीच्या मृत्यूनंतर हयात होती. हिच्या लग्नासंबंधीं खालील उल्लेख ब्राउटननें केला आहे. 'स. १७९२ च्या एप्रिलांत महादजी तुळजापुरास गेला असतां तेथील मंदिरांत सुमारें बारा वर्षें वयाची एक सुंदर पण गरीब स्थितींत वाढलेली व आईबाप नसलेली मुलगी त्याच्या दृष्टीस पडली. लगेच त्यानें तिच्या चुलत्यास दहा हजारांची जहागिर ठरवून दुसऱ्या दिवशीं तिच्याशीं लग्न लावलें. नंतर ती त्याजबरोबर असतां महादजी मरण पावला. कांहीं वर्षांनीं वांकडें पाऊल पडून अब्रू बचावण्यासाठीं दतिया येथें हिनें विषप्राशन करून जीव दिला' (म. रि. उ. २, पा. ४११).

२. परशरामपंत प्रतिनिधीची बायको.

**लक्ष्मीश**—(स. १७०० च्या पूर्वी) कानडी कवि. रामानुजपंथी (श्रीवैष्णव). गोत्र–भारद्वाज. भ्राता–अण्णमांक. गांव–कडूरू तालुक्यांतील देवनुरु. यास लक्ष्मीपति असेंहि म्हणतात. संस्कृत जैमिनिअश्वमेधाच्या आधारें लिहिलेला ग्रंथ. याच्या ग्रंथाला कर्नाटकांत जितकी मान्यता आहे तितकी दुसऱ्या कोणत्याहि कवीच्या ग्रंथाला नाहीं. हा कवि अलीकडील असून याची भाषा

सोपी, मधुर व ललित असल्यामुळें लहानथोर सर्व दर्जांच्या लोकांना अत्यंत आवडते. हा कवि व याचें भारत माहीत नाहीं असा शिक्षित कर्नाटकी विरळा ( क. क. च. भा. २, पा. ५२३ ).

**लक्ष्मीवर्मा परमार**—( स. ११४३–७९ ) माळव्याच्या परमारांपैकीं यशोवर्म्याचा धाकटा पुत्र. याचा थोरला भाऊ अजयवर्मा हा धारचा राजा झाला, व याची शाखा आपणास महाकुमार म्हणून राहूं लागली. याचें दानपत्र वि. सं. १२०० ( स. ११४३ ) श्रावण शुद्ध १५ चें मिळालें आहे ( इंडि. अँटि १९. ३५२–५३ ). याचा पुत्र हरिश्चंद्रवर्मा.

यानें माळव्यांत स्वतंत्र राज्य स्थापिलें. स. ११४५ मध्यें अनहिलवाडच्या कुमारपाल चालुक्यानें माळवा काबिज केला. स. ११७९ मध्यें याचा मुलगा गादीवर आला.

**लाडी**—( दाहर व मुहम्मद कासीम पाहा ).

**लाडोजी सिधोजी शितोळे देशमुख नरसिंगराव**—( मृत्यु स. १७९३ ) याला महादजी शिंदे याची मुलगी बाळाबाई दिलेली होती. तिचें लग्न स. १७७६ मध्यें झालें. याला सिधोजी व लक्ष्मणराव असे दोन पुत्र होते. महादजीचा याच्या कर्तबगारीवर विश्वास होता असें दिसतें. महादजीनें दिल्लीच्या बादशहास ६५ हजारांची मासिक नेमणूक करून दिली व बादशहानें कांहीं गडबड करूं नये म्हणून शहानिजामुद्दीन फकीर व यास बादशहाचे बंदोबस्तासाठीं ठेवलें ( फ्रँक्लिन, पृ. १३२–१३४ ).

पूर्वीपासून मोठें असणारें शितोळे देशमुखांचें घराणें महादजीच्या संबंधानें अधिक बलिष्ठ होणें स्वाभाविक आहे. पुण्याजवळ पाषाण वगैरे यांचीं जहागिरीचीं गांवें आहेत तेथें याचा एक धाकटा भाऊ राहत असे. त्यानें कांहीं कज्जा केल्यावरून पेशव्यांनीं त्यास सजा केली ( स. १७८६ ). त्यासंबंधीं महादजीनें म्हटलें आहे, ' लाडोजी शितोळे आमचे आप्त. ते नानांचेहि आप्त. त्यांचे बंधु, वय लहान, पोक्त बुद्धि नाहीं. ऐसे असतां त्यांस नेऊन, उन्हांत उभे करून, पायाचे आंगठे धरून, डोकीवर दगड देऊन उभे केले. बेअब्रू केली. त्यांत आमचाच बदलौकिक झाला असें नाहीं. नानांचा आमचा भाऊपणा, तेव्हां जन त्यासच शब्द लावतील. गुन्हा केला तर गुन्हेगारी घ्यावी, तरी हे बेअब्रू धनीपणास उचित आहे कीं काय ? ''

दिल्लीस गुलाम कादरच्या बंडाव्याच्या वेळीं हा दिल्लीस बादशहाच्या बंदोबस्तास होता. पण गुलाम कादरच्या बंडामुळें फूस मिळून याच्या दोन पलटणांनीं तलबेकरितां ( पगाराकरितां ) दंगा केला. पण यानें व निजामुद्दीनानें युक्तीनें दंगा मोडून बंदोबस्त केला. पण गुलाम कादरचा वर्चष्मा वाढत जाऊन फितुरांमुळें महादजीस माघार घ्यावी लागली. गुलाम कादरहि अंमल बसवीत शहादऱ्यापर्यंत आला. हें वर्तमान ऐकतांच हा व निजामुद्दीन दिल्लीहून बादशहास न विचारतां रातोरात पळाले. 'त्यासमयीं याची वस्तभाव वीस उंट दिल्लीच्या सोद्यांनीं लुटून घेतली' ( हिंगणे पत्र १७८७ आगष्ट–डिसेंबर ). जोधपुराजवळ मेडत्याच्या स्वारींतहि हा आगाऊ व्यवस्थेकरितां पुढें गेला होता.

हा स. ९-४-१७९३ रोजीं मरण पावला. याच्यामागें बाळाबाई हयात होती.

**लाड्या न्हावी**—हा परशुराम श्रीनिवास ऊर्फ थोटेपंत यांच्या लोभांतील होता. आपलेपेक्षां याचा इतमाम अधिक ठेवून सारा कारभार याच्याकडे त्यांनीं सोंपविला होता. याची वर्तणूक नीट नाहीं म्हणून, बापू गोखले यानें याला कैद केलें; व कांगोरीच्या किल्ल्यावरून लोटून याला ठार मारलें ( म. रि. उ. ३, पा. ३६३ ).

**लादिनी बेगम**—ही नूरजहानला पहिल्या नवऱ्यापासून झालेली मुलगी.

**लाय पाटील**—( स. १६६१ ) शिवाजीच्या आरमारखात्यांतील एक नोकर. याचें घराणें कोळवाड ( चौल–अष्टागर ) येथें नांदत असे. सुभानजी खराडे सरनोबत आणि सुभानजी मोहिते हवालदार यांनीं याची चौकशी करून आदर करून सेवेशीं घेतलें. स. १६६१–६२ मध्यें शामराज नीळकंठ रोझेकर पेशवे व रोहिड्याचा पूर्वीचा किल्लेदार बाजी घोलप यांस जंजिरेकर सीदीवर रवाना केलें होतें, पण शामराजपंत स्वतः कैद होऊन ही मोहिम फुकट गेली. तेव्हां खुद्द मोरोपंत पेशव्यास ही कामगिरी सांगण्यांत आली ( स. १६७६ ). तेव्हां त्यानें यास जंजिऱ्यास रात्रीं शिड्या लावण्याची कामगिरी सांगितली. ती यानें पार पाडली. पण मोरोपंताचे धारकरी तेथें येऊं शकले नाहींत. मोरोपंतानें स्वतःकडे दोष घेऊन याची शिवाजीकडे शिफारस केली. तेव्हां शिवाजीनें यास पालखीचा मान देऊं केला. पण फार मोठा मान म्हणून यानें तो स्वीकारला नाही. म्हणून शिवाजीनें यास पालखी नांवाचें गलबत बांधून दिलें. शिवाय बादशहानें दिलेली पाटिलकी होतीच, म्हणून सरपाटिलकी दिली ( मं. त्रै. २, पृ. १२८–२९; प्रो. सरकारकृत शिवाजी, पृ. ३५१–आवृत्ति पहिली ).

**लॉर्ड लॉरेन्स**—( स. १८११-७९ ) हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल. लेखणी कां तलवार अशा स्वरूपाचा याचा पुतळा लाहोर येथें आहे.

**लालकवि**—हा छत्रसालाचा आश्रित. याचें नांव पुरोहित. गोरेलाल यानें छत्रसालाच्या सांगण्यावरून त्याचें काव्यमय चरित्र लिहिलें, तें 'छत्रप्रकाश' या नांवानें प्रसिद्ध आहे. हा महोबाचा राहणारा. तेथें हे दोघे पुष्कळ वर्षें एकत्र राहिले होते. बुंदेलखंड ग्याझेटियरमध्यें याचें अल्पचरित्र दिलें आहे. हा हिंदींमधील कवि असून तुळशीदासानंतरच्या कालांतला पहिल्या प्रतीचा कवि गणला जातो. पुष्कळ लढायांत हा छत्रसालाबरोबर हजर असून छत्रसालाच्या बाजूनें लढत होता. स. १७०७ च्या पुढील हकीगती याच्या ग्रंथांत नाहींत. हा त्या सुमारास युद्धांत मारला गेला असें समजतें. मरणसमयीं हा पन्नास वर्षांचा होता ( रा. गो. काटे ).

**लाल काऊंट**—( स. १७०७-१७६६ ) हिंदुस्थानांतील फ्रेंच सेनापति.

**लालकुंवर**—(स. १७१२) एक नर्तकी. हिला एकदां जहांदरशाह दिल्लीचा बादशाहा यानें आपलें सर्व राज्य अर्पण केलें होतें.

**लालदास**—( स. १५२८-१५३० ) हिंदी कवि. ग्रंथ- दशमस्कंद व हरिचरित्र.

२. गुजराथींतील कृष्णप्रभावकर्ता.

३. (स. १६५९) हा क्षत्रिय जातीचा गृहस्थ मांळव्यांत जन्मास आला. हा जहांगीरच्या वेळीं जन्मास आला. शहाजहानचा पुत्र दारा शुकोह याचा हा वेदान्तांतील गुरु होता. या दोघांचा संवाद 'बाबा लालसे बातचीत' या नांवानें प्रसिद्ध झाला आहे. हा संवाद मूळ फार्शीमध्यें आहे. यालाच मुसलमानी रियासतींत बाबालाल असें म्हटलें आहे ( मु. रि. भा. २, पा. ३६० ).

**लालाजी बल्लाळ**—( मृत्यु स. १८१९ ) हा बाळाजी गुळगुळे कोटेकर याचा दत्तक पुत्र होय. याचें मूळ गांव कोंकणांत आचरें असून हा सारस्वत ब्राह्मण होय.

यानें व याच्या बापानें स. १७३० पासून १८२० पावेतों ९० वर्षें सर्व उत्तर हिंदुस्थानची कमाविशी संभाळून, शिवाय व्यापार व पेढ्या देशभर स्थापून पैसा व लौकिक मिळविला. यावरून याची लायकी दिसून येते.

**लाला भवानीशंकर**—( स. १८०० सुमार ) यशवंतराव होळकरांचा एक मदतनीस. यानें आपल्या आठवणी फार्सीत लिहिल्या आहेत व त्यांचें रूपांतरहि इंदुरास प्रसिद्ध झालें आहे ( म. रि. उ. ३, पृ. ३५२ ).

**लाला सेवकराम**—( मृत्यु स. १७९२ ) हा कलकत्त्याच्या इंग्रजांकडे मराठ्यांचा वकील म्हणून होता. उत्तर हिंदुस्थानांतील कायस्थ घराण्यांत याचा जन्म झाला. याच्या बापाचें नांव लाला तुळजाराम व आजाचें लाला कृपाराम असें होतें. हे दोघेहि मराठ्यांचे नोकरींत होते. याचा चुलता लाला भवानदास व चुलत आजा लाला भगीरथ हे सुद्धां साताऱ्याच्या शाहु छत्रपतीच्या पदरीं नोकर म्हणून होते. अशा रीतीनें याच्या पूर्वीं याच्या घराण्याचा व मराठ्यांचा तीन पिढ्या संबंध आलेला होता.

बाप मेल्यावर जयपूर येथील मराठ्यांच्या वकिलीच्या कामावर याची नेमणूक झाली ( स. १७७० ). तें काम यानें स. १७७३ पर्यंत केलें. नंतर बारभाईचे कारस्थानाचे वेळीं हा पुण्यास आला. तेथें याच्याकडे शिलेदाराचें व पेशव्यांचे कचेरींतील कारकुनीचें काम आलें. पुढें याला कलकत्त्याच्या वकिलीच्या कामावर नेमलें. तेव्हां उंची व बहुमानाचा पोशाख, फत्तेह लष्कर नांवाचा हत्ती आणि एक घोडा असे वॉरन हेस्टिंग्जकरितां व तीन घोडे तीन कौन्सिलर्सकरितां, असा लवाजमा बरोबर घेऊन हा ता. १२ मार्च १७७७ रोजीं कलकत्यास जाण्याकरितां निघाला. स. १७७७ ते १७९० पर्यंत हा कलकत्ता येथें होता, त्या अवधींत यानें आपलें काम उत्कृष्ट रीतीनें बजावलें, असें प्रसिद्ध झालेल्या याच्या पत्रांवरून सिद्ध होतें ( इतिहाससंग्रह ). हा मराठींतून व मोडींतून उत्तम प्रकारें पत्रव्यवहार करीत असे. सुरवातीला याला सालीना ८०० रु. वेतन होतें. तें पुढें हळूहळू वाढत शेवटीं ३६०० रु. पर्यंत गेलें. परंतु हें सुद्धां वेतन पुरत नाहीं, असें हा आपले पत्रांत वरचेवर स्पष्ट लिहीत असे. कारण याला उच्च राहणीकरितां बराच खर्च करावा लागे. पालखी व अबदागीर वापरण्याचा हक्क याला बहाल केला होता.

याला चिमणलाल आणि गुलाबराम असे दोन मुलगे होते. चिमणलाल पुण्यास राहत असे व गुलाबराम बापाबरोबर कलकत्त्यास राहत असे. सेवकराम स. १७९२ चे सुमारास मरण पावला. याच्यानंतर याचा पुत्र गुलाबराम हा कलकत्त्याच्या वकिलीचें काम करूं लागला ( श्री. डी. बी. डिस्कळकर, एम्. ए. ).

**लाल्हणदेवी**—ही विग्रह प्रतिहाराची पत्नी व मलयवर्मची आई. हिच्या बापाचें नांव केल्हणदेव. तो नाडोळचा केल्हण चौहान असावा.

**लाहिनी**—( स. १०३२ ) अबूच्या परमारांपैकीं धुंधुकाची कन्या. ही चचपुत्र विग्रहराजाला दिली होती. ही विधवा झाल्यावर आपला भाऊ पूर्णपालापाशीं येऊन राहिली होती. हिनें वि. सं. १०९९ मध्यें वसिष्ठपुरांतील ( सिरोहीराज्य ) सूर्यमंदिर आणि सरस्वतीवापी यांचा जीर्णोद्धार केला. त्या विहिरीला अद्यापि लागवाव ( लाहिनीवापी ) असें म्हणतात ( एपि. इंडि. भा. ९, पृ. १२.१५ ).

**लिंगराज**—'मलयाद्रि नृसिंह चंडांशु' नामक ग्रंथाचा कर्ता. एक तैलंग.

**लिंगण्णा**—( स. १८०४ ) या कानडी कवीनें 'केळदिनृपविजय' नांवाचें कानडी काव्य केलें आहे. हें काव्य स. १८०४ मध्यें लिहिलें असून त्यांत स. १५०२–१७६५ पर्यंत आलेल्या केळदीघराण्यांतील राजांचीं चरित्रें वर्णिलीं आहेत.

**लिंगनाथ योगी**—( ग्रंथकाल स. १७२४ ) नाथसंप्रदायी मराठी कवि. चंदीचंदावराकडे होता. ग्रंथ-अमृतसार ( योग व परमार्थ ). गुरु कोनेरीनाथ ( म. क. च. भा. ५, पृ. ८१–८६ ).

**लिंगम्मा नायक**—( स. १६५० सुमार ) वेलोरच्या चिन्नबोम्मचा मुलगा. विजयनगरच्या तिसऱ्या वेंकटपतिदेव आरविदूनें याचें बंड मोडून वेलोर घेतलें.

**लिंगय्या**—काश्मीरच्या केयूरबाहूचा वृत्तान्त तेलंगींत लिहिणारा कवि.

**लिंगवान**—एक चिनी प्रवासी. हा चीनमधून आनाम येथें आला, व तेथून गयेला पोंचला. यानें महाबोधिवृक्षाच्या खालीं बुद्धदेव व बोधिसत्व यांच्या मूर्ति तयार केल्या.

**लिंबराज दैठणकर**—( स. १६०० सुमार ) मराठी साधु व कवि. हे दैठण ( जि. नगर ) चे राहणारे. हे भजन करीत असतां यांच्या खांद्यावर विठोबा नाचला, अशी आख्यायिका आहे. पंढरीच्या काल्याचा मान यांच्या घराण्याकडे आहे. हे एकनाथस्वामींचे शिष्य.

**लीलादेवी**—भोजाची पत्नी.

**लीलापा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं दुसरा सिद्ध. याची जात कायस्थ. हा मगध देशांतील रहिवासी होय. यासच लीलावज्र असें म्हणतात. याचा विकल्पपरिहारगीति ( तं. ४८।३ ) या नांवाचा एक ग्रंथ आहे.

**लीलाबाई**—( मुक्तेश्वर पाहा ).

**लुखजी जाधव**—( खून स. १६२९ ) हा विठोजी जाधवाचा पुत्र. याच्या पत्नीचें नांव गिरजा. भाऊ जगदेवराव. लुखजीचे पुत्र रघूजी, दत्ताजी, अचलोजी, बहादुरजी ( हा जगदेवरावाला दत्तक दिला ). बहादुरजीचा नातू मानसिंग. त्याची मुलगी अंबिकाबाई शाहू छत्रपतीस दिली होती. याच्या मर्जीविरुद्ध याची कन्या जिजाबाईचा विवाह शहाजीशीं याला करावा लागला. शिवाजीच्या वेळीं जिजाबाई गर्भार असतां यानें मोंगलांच्या साहाय्यानें निजामशाहीवर स्वारी करून तिच्यातर्फे लढणाऱ्या शहाजीचा पाठलाग केला आणि पुढें जिजाबाईस शिवाजी झाला, अशी कथा जुन्या बखरींतून दिली आहे.

हा प्रथम निजामशाही सरदार होता. नंतर हा मोंगलांस मिळाला. ही गोष्ट स. १६१८ मध्यें झाली नसून स. १६२१ मध्यें झालेली आहे ( प. सा. १४३; १४६ ).

निजामशाही दरबारांतून सर्व सरदार बाहेर पडत असतां खंडागळ्यांचा हत्ती पुढें निघाल्यावरून तंटा होऊन विठोजी भोसल्याचे पुत्र संभाजी व खेळोजी आणि याचे पुत्र दत्ताजी वगैरेंचें युद्ध होऊन त्यांत शहाजी मूर्च्छित झाला व संभाजी भोसले ठार झाला. तसेंच याचा पुत्र दत्ताजीहि मारला गेला. या वेळीं निजामशाहानें शहाजीची बाजू घेतल्यानें हा मोगलांना जाऊन मिळालेला दिसतो. शिवभारतांत वरील क्रमानें या गोष्टी दिलेल्या आहेत. पुढें हा दहा वर्षे मोंगलांकडे राहून पुनः निजामशाहाकडे आला. फत्तेखानास कैदेंत टाकल्यानें हा निजामशाहींत येण्यास तयार झाला. आणि तेव्हां याचा खून झाला. खुनाचें कारण, हा चांगल्या बुद्धीनें निजामशाहींत आला असतां दारूनें बेहोष झालेल्या निजामशाहानें याचा अपमान केला. तेव्हां हा बेहोष झाला. शेवटीं हमीदखान वगैरे सेनापतीनें भर दरबारांत यास ठार केलें ( शके १५५१, श्रावण शु. १५ ).

**लुचिकपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं छप्पनावा सिद्ध होय. जातीनें ब्राह्मण होता. याचा चंडविकाबिंदुस्फुरण ( तं. ५८।८३ ) हा ग्रंथ आहे.

**लुहिपा**—एक सिद्ध. हा पहिला सिद्ध होय. याच्या वेळीं धर्मपाल राजा होता ( स. ७६९–८०९ ). दारिकपा व डेंगिपा हे याचे शिष्य होत. याचे सात ग्रंथ व हिंदी कविता आहेत. हा शब्द लूहिपा असाहि लिहिलेला आढळतो.

**लेस्ली**—( मृत्यु स. १७७८ नवं. ३ ) हा एक इंग्रज सैन्याधिकारी होय.

**लोकनाथ**—मल्लप्रकाश ग्रंथाचा कर्ता.

**लोकमहादेवी**—पश्चिम चालुक्यांपैकीं दुसऱ्या विक्रमादित्याची पत्नी.

**लोकमहादेवी मधुरान्तकी**-त्यागवल्लीचें नामान्तर.

**लोकादित्य तुलुव**—हा चंद्रसेनाचा मुलगा. मयूरवर्मा कदंबाची मुलगी कनकावती ही याची पत्नी.

**लोलिंबराज**—( स. १६३३ ) हा जुन्नरच्या दिनकरभट्ट जोशाचा पुत्र. यानें एका मुसलमान मुलीशीं लग्न केलें होतें. तिचें नांव रत्नकला. याचे ग्रंथ—वैद्यजीवन ( वैद्यक ), हरिविलास ( भागवतटीका ). याचीं पदेंहि आहेत. याचें नांव त्र्यंबकराज दिसतें. हा आपणांस 'कविपातशाहा' म्हणवून घेतो.

**लौगाक्षि भास्कर**—( स. १६००-१७०० ) एक महापंडित. पिता मुद्गल. कवि रुद्राचा हा पुतण्या. याचें नांव भास्कर व आडनांव लौगाक्षि. हा काशीचा असावा. याचा ग्रंथ-न्यायसिद्धान्तदीप व अर्थसंग्रह. अर्थसंग्रहाचें मराठी भाषांतरहि कै. प्रो. शि. म. परांजपे यांनीं मराठींत प्रसिद्ध केलें आहे.

**लौजीनसरवानजी**—( मृत्यु स. १७७४ ) सुप्रसिद्ध जहाजें बांधणारा पारशी गृहस्थ. हा प्रथम धनजीभाई नांवाच्या व्यापाऱ्याकडे नोकरीस होता. पुढें आपल्या अंगच्या हुशारीनें व मुंबई सरकारच्या परवानगीनें मुंबईस यानें गलबतें बांधण्याचा कारखाना सुरू केला. पुढें याचा धंदा फार भरभराटीस येऊन याजकडे सरकारी आरमारी जहाजांची दुरुस्ती करण्याचें काम येऊं लागलें; व त्यामुळें हा थोड्याच वेळांत प्रसिद्धीस आला. यानें आपल्या माणकजी व वमनजी नांवांच्या दोन मुलांस या धंद्यांत घातलें व पुढें तीं मुलें याच्याचप्रमाणें प्रसिद्धीस आलीं ( इ. सं. ऐ. च. ११९-२६ ).

**ल्युवीन**—( स. १७७८ ) पुणें दरबारीं असणारा फ्रेंच वकील. इंग्रजांचें वर्चस्व झाल्यावर हा पुण्यांतून गेला.

---

# व

**वच्छराज**—' रसमंजरी ' हें गुजराथी काव्य लिहिणारा जंबूसरचा कबीरपंथी कवि.

**वजाहुल्मुल्क**—(स. १३७५ सुमार ) हा गुजराथच्या मुसलमान राजांचा मूळ पुरुष. हा रजपूत होता. नंतर मुसलमान झाला. याचाच मुलगा पहिला मुज्फरशाहा होय.

**वज्जड शिलाहार**—( स. १०१०-१७ सुमार ) हा ठाण्याच्या अपराजित शिलाहाराचा मुलगा. याचा स. १०१७ चा ताम्रपट सांपडला आहे. याच्यामागून याचा भाऊ अरिकेसरी गादीवर आला.

**वज्र**—( खि. पू. १६९ ) खारवेलचा सासरा. धृसीचा पिता.

**वज्रट**—वेदभाष्यकार उवटाचा पिता.

**वज्रदामन्**—( स. ९७७ ) कच्छपघाट घराण्यांतील जो लक्ष्मण त्याचा हा मुलगा होय. यानें कनोजच्या राजाचा पराभव केला आणि ग्वाल्हेर काबीज केलें. याच्यानंतर मंगलराज हा गादीवर आला ( B. ).

**वज्रपाणि**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं होय. हा दीपंकर विज्ञान याच्या मागून ( स. १०६५ ) तिबेटांत गेला व तेथें पुष्कळ ग्रंथांचा यानें अनुवाद केला. याचा ' वज्रपद ' नांवाचा ग्रंथ आहे.

**वज्रमित्र शुंग**—हा घोष किंवा घोषवसूचा पुत्र.

**वज्रहस्त ( पूर्व ) गंग**—( स. ९८४-१०१८ ) त्रिकलिंगाच्या प्राच्य गंगांपैकीं पहिला राजा. हा कामार्णवाचा पुत्र.

**२.** ( स. ८६३-७८ ) पूर्व गंगांपैकीं रणार्णवाचा पुत्र. यानें पंधरा वर्षें राज्य केलें.

**३.** पूर्व गंगांपैकीं दुसऱ्या गुणार्णवाचा पुत्र. विजगापट्टणच्या शिलालेखांत याचें नांव नाहीं.

**४.** ( स. ९८३-१०१७ ) पूर्व गंगांपैकीं चवथ्या कामार्णवाचा पुत्र.

**५.** ( स. १०३८-६८ ) पूर्व गंगांपैकीं सहाव्या मधुकार्णवाचा पुत्र. याच्या पत्नीचें नांव अनंगा.

याचा एक सं. १०५८ चा दानलेख सांपडला आहे. त्यांत याच्या कुलासंबंधीं पुढील माहिती आढळते. ' हा चंद्रवंशी असून याचें गोत्र आत्रेय होतें. कुलास नांव देणारा राजा कोणी गांगेय नांवाचा

होता. मात्र हा गांगेय म्हणजे भीष्म नव्हे. हे महेंद्रावरील गोकर्ण महादेवाच्या कृपेनें सत्ताधीश झाले. हे प्रथम मांडलिक होते तेव्हां यांना पंचमहाशब्द (पांच राजकीय शब्द) मिळाले. यांच्या पांच शाखा झाल्या होत्या, त्या पुनः नवव्या शतकांत एकत्र झाल्या. यांना परमभट्टारक हें स्वतंत्र राजाचें उपपद लावलें आहे. त्यांपैकीं याला राज्याभिषेक स. १०३८ मध्यें झाला. हा परममाहेश्वर होता. यानें वेंगी व ओरिसा येथील राजांचा पराभव केला. यानें तीस वर्षें राज्य केलें' (इंडि. अँटि. ४, पा. १७५–१८८). या लेखांत याचा राज्याभिषेककाळ वर्ष, महिना, चंद्रनक्षत्र व लग्न असा दिला आहे. हा लेख कलिंगनगराहून प्रसिद्ध झाला. हें ठिकाण म्हणजे गंजम जिल्ह्यांतील पालीकिमेडी तालुक्यांतील मुखलिंगम् होय. हें गांव समुद्र किनाऱ्यापासून कांहीं मैलांवर असून तेंच कलिंगनगर होय, असें आतां निश्चित झालें आहे (हिं. भा. अ. पा. ३०८–३९९).

**वज्रापीड कर्कोटक**—(स. ७३६–४३) हा कुवलयापीडानंतर काश्मीरच्या गादीवर आला.

याच्यानंतर याचा पुत्र राजराज हा गादीवर आला. याच्या पत्नीचें नांव अनंगा. याला गुणार्णव व अनन्तवर्मन् असें म्हणत असत.

**वडवानळ सिद्ध नागेश**—(स. १३९१) हा सिद्ध पुरुष ज्ञानेश्वराचा समकालीन मानतात. याचीं कांहीं पदें, अभंग व 'संकटहरणी शिवग्रंथ' (९४१ ओव्या) प्रसिद्ध आहेत.

**वणवीर**—(२ उदयसिंह व पन्ना दाई पाहा).

**वणंगोजी निंबाळकर**—जगपाळराव निंबाळकरांचें नामांतर.

**वत्सदेवी**—परगुप्ताची पत्नी.

**२.** ही भोगवर्मन् मौखरीची मुलगी. ही नेपाळच्या दुसऱ्या शिवदेव लिच्छवीची पत्नी. पुत्र जयदेव.

**वत्सभट्ट**—(भट्टि पाहा).

**वत्सभट्टी**—(स. ९६६) याच्या प्रशस्तीचा कुमारगुप्त व बंधुवर्मन् यांच्या मंदोसर येथील शिलालेखांत निर्देश आहे.

**वत्सराज**—(स. ११७५–१२२५ सुमार) हा जैन नाटककार होता. हा आपणांस कलिंजरचा राजा परमर्दिदेव चंदेल्लाचा प्रधान म्हणवितो. यानें पुढील नाट्यप्रकार लिहिले आहेतः-किरातार्जुनीय 'व्यायोग', रुक्मिणीहरण 'ईहामृग', त्रिपुरवध 'डिम', समुद्रमंथन 'समवकार', कर्पूरचरित्र 'भाण' व हास्यचूडामणी 'प्रहसन'. त्रैलोक्यवर्मा चंदेल्लाच्या अनुज्ञेवरून किरातार्जुनीय या नाटकाचा प्रथम प्रयोग झाला; व बाकीच्या पांच नाटकांचा प्रयोग त्रैलोक्यवर्मन्चा पिता परमर्दिदेव याच्या सांगण्यावरून झाला (नन्नुक पाहा).

**वत्सराज प्रतिहार**—(स. ७७०–८१४ सुमार) रघुवंशी प्रतिहारांपैकीं देवराजाचा पुत्र. यानें बंगालच्या राजावर विजय मिळवला. बंगालच्या राजाबरोबर झालेल्या लढाईत याचा सामंत मंदोरचा प्रतिहार राजा कक्कहि होता. जेव्हां यानें माळव्याच्या राजावर स्वारी केली तेव्हां याच्या मदतीला दक्षिणचा राष्ट्रकूट ध्रुवराज, आपला सामंत लाटदेशचा राठोड राजा कर्कराजसहित आला होता. त्या लढाईंत याचा पराजय झाला, व याला मारवाडांत जावें लागलें. बंगालच्या राजाकडून दोन पांढरीं छत्रें यानें मिळवलीं होतीं. तींहि राठोडानें याच्यापासून घेतलीं (ना. प्र. पत्रिका भा. २, पृ. ३४४–४६ व ३४५ वरील टीप १). यानें भंडीचें राज्य जिंकून घेतलें. रा. चिं. वि. वैद्य यांचें मत असें आहे कीं, वत्सराजानें भंडीचें राज्य घेतलें म्हणजे भंडीकुलांतील इंद्रायुधाचें राज्य घेतलें. भोज राजाच्या सागरताल येथील लेखांत असें लिहिलें आहे कीं, वत्सराजानें भंडी कुलापासून कनोजचें साम्राज्य घेतलें. दिगंबर जैन जिनसेनानें हरिवंशपुराण श. श. ७०५ (स. ७८३) मध्यें लिहिलें. त्यांत उत्तरेकडे कनोज येथें इंद्रायुध व मारवाडमध्यें याचें राज्य असल्याचें लिहिलें आहे (मुंबई ग्याझि. भा. २, पृ. १९७, टि. २). हा परममाहेश्वर होता. याच्या राणीचें नांव सुंदरीदेवी. तिच्यापासून याला नागभट झाला.

**वत्सराज सोळंकी**—(स. १०२५ सुमार) लाटदेशच्या सोलंकींपैकीं कीर्तिराजाचा पुत्र. याचा पुत्र त्रिलोचनपाल.

**२.** (स. १६४१) हा अमरकोशावरील टीकाकार. रामाश्रम याचा गुरु. यानें स. १६४१ मध्यें 'वाराणशीदर्पण' नांवाचा ग्रंथ संस्कृतमध्यें लिहिला. तसेंच वाराणशीदर्पण काशिकाहि यानेंच लिहिली (C. C.).

**वनस्फर**—(कुशानघराणें व विश्वस्फूर्जि पाहा).

**वय्याम्मा**—ही तंजावरच्या त्रिम्मप्पाची पत्नी व सेव्वाप्पाची आई. हिला वय्याम्बिका असेंहि म्हणत.

**वरगुण पांड्य**—(स. ८६२–७८) एक पांड्य राजा. स. ८७२ मध्यें यानें चोलांच्या राज्यावर स्वारी केली, व वेम्बिल येथील किल्ल्याचा नाश केला. पुढें स. ८७८ च्या सुमारास यानें गंगपल्लव अपराजित विक्रम-

वर्मन् याच्यावर स्वारी केली. याच सुमारास गंगबाण घराण्यांतील दिंडिक यानें याचा पराभव केला.

**वरदराज**—( स. ११५० सुमार ) हा आंध्र प्रांतांतील तर्कशास्त्रज्ञ. याचा 'तार्किकरक्षा' नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. या ग्रंथावर विष्णुस्वामीचा शिष्य ज्ञानपूर्ण अथवा ज्ञानदेव यानें 'लघुदीपिका' नांवाची टीका लिहिली ( हि. इं. लॉ., पा. ३७३-७४ ).

**वरदाचार्य**—( स. १६०० सुमार ) वेदांताचार्याचा शिष्य. याचें गांव कांची. हा रामानुजपंथाचा होता. याचे ग्रंथ-रहस्यनयसार, सत्यत्रयानिरूपण, वेदांतविजय व संततिलकभाण. याचे ग्रंथ सरस आहेत ( क. च. ).

**वरदादेवी अमाल**—( १ व्यंकटपतिदेवराय आर-विदु पाहा ).

**वररुचि**—( स. २०० सुमार) कात्यायन, कच्चायन व हा एकच असें कांहीं म्हणतात. पाणिनींच्या सूत्रावरील वार्तिकें लिहिणारा, व प्राकृतप्रकाश लिहिणारा हे भिन्न असावेत. प्राकृतप्रकाशावर याची टीकाहि आहे. याचा 'लिंगविशेषविधि' नांवाचाहि एक ग्रंथ आहे. बृहत्कथा सुद्धां याच्यापासून गुणाढ्याला मिळाली. हा पाणिनींच्या समकालीन असणें अशक्य नाहीं असें डॉ. श्री. व्यं. केतकर म्हणतात ( प्राचीन महाराष्ट्र, १.१३५ ).

**वराहमिहिर**—( स. ४९० ) यानें आपला काळ स्पष्टपणें कोठेंच सांगितला नाहीं. आर्यभट्टानंतर दुसरा नामांकित ज्योतिषी हाच होऊन गेला. विक्रमादित्याच्या नऊ रत्नांपैकीं हा एक होता, असें कांहींचें म्हणणें आहे. आदित्यदास हें याच्या वडिलांचें नांव होतें. कपित्थक या गांवीं यास सूर्यापासून वरप्रसाद प्राप्त झाला, अशी आख्यायिका आहे ( आदित्यदासतनयस्तदवाप्तबोधः कापित्थके सवितृलब्धवरप्रसादः । बृहज्जातक उपसंहाराध्याय ९ ).

यात्रा, विवाहगणित, होरा आणि संहिता या विषयांवर यानें ग्रंथ लिहिले आहेत. पंचसिद्धांतिका, बृहज्जातक, लघुजातक, योगयात्रा, विवाहपटल, समाससंहिता व बृहत्संहिता हे ग्रंथ याचे आहेत. बृहत्संहिता व लघुजातक यांचें आरबांत भाषांतर अल्बेरूनीनें केलें आहे. भास्कराचार्यांनीं पुष्कळ ठिकाणीं याचीं वचनें आधारभूत घेतलीं आहेत.

ज्योतिषशास्त्रावर ग्रंथ पुष्कळांचे झालेले आहेत, परंतु याच्याइतका अनेक शास्त्रांवर विचार करणारा ज्योतिषी फक्त हाच झाला. याच्या जातकग्रंथाचा जसा उपयोग होतो तसा संहिताग्रंथाचा मात्र फारसा होत नाहीं. यानें आपल्या वेळच्या हिंदुस्थानांतील एकंदर २८३ प्रांतांची यादी दिली आहे.

वराहमिहिर सहाव्या शतकांत होऊन गेला हें मात्र निश्चित आहे. यानें दृक्प्रत्ययानुसार अयनबिंदु निश्चित केले व याच्या वेळेपासूनच वर्षाऋतूची प्रवृत्ति आषाढाचे आरंभीं मानण्यांत येऊं लागली. तत्पूर्वी श्रावणांत दाक्षिणायनाचा व म्हणून वर्षाऋतूचा आरंभ मानला जात असे, असें याच्या ग्रंथांतील विधानावरून दिसतें.

**वरुण**—( स. १०४० सुमार ) एक ज्योतिषी. हा काश्मीरांतील चारमार गांवचा राहणारा. ब्रह्मगुप्ताच्या खंडखाद्यावर याची टीका आहे.

**वर्धमान उपाध्याय**—( स. १२५० ) हा गंगेश उपाध्यायाचा पुत्र होय. यास महोपाध्याय अथवा महा-महोपाध्याय अशी पदवी होती. यानें खालील ग्रंथ लिहिले आहेतः—

( १ ) 'तत्त्वचिंतामणिपरीक्षा', तत्त्वचिंतामणीवरील टीका, ( २ ) 'न्यायनिबंधपरीक्षा', 'न्यायवार्तिकतात्पर्य-परिशुद्धि' या ग्रंथावरील टीका, ( ३ ) 'न्यायपरिशिष्ट-प्रकाश', उदयनाचार्याच्या 'न्यायपरिशिष्ठा'वरील टीका, ( ४ ) 'प्रमेयनिबंधपरीक्षा' ( हा व 'प्रमेयतत्त्वबोध' हे दोन्ही एकच असावेत ), ( ५ ) 'किरणावलिप्रकाश', ( ६ ) 'न्यायकुसुमांजलिप्रकाश', ( ७ ) 'न्यायलीलावतीप्रकाश', ( ८ ) 'खंडनखंडप्रकाश.'

माधवाचार्यानें आपल्या 'सर्वदर्शनसंग्रहा'त पाणिनीदर्शनांत याचा निर्देश केला आहे. जयदेवानें याच्या दोन ग्रंथांवर टीका लिहिली आहे.

**वर्मलात**—( स. ६२८ ) भीनपालच्या चावडा-वंशांतील एक राजा. वसंतगडचा राज्जिल याचा सामंत होता. भीनपाल येथें राहणाऱ्या माघ कवीनें आपला वडील बंधु सुप्रभदेव हा याचा सर्वाधिकारी (मुख्य मंत्री) होता असें सांगितलें आहे ( शिशुपालवध, सर्ग २० कविवंशवर्णन १ ). यावरून हा भीनपालचा राजा होता असें दिसतें. पण याच्या वंशाची माहिती तेथें आढळत नाहीं. पण भीनपाल येथें राहणाऱ्या 'ब्राह्मस्फुटसिद्धांत' नांवाचा ग्रंथ करणाऱ्या ब्रह्मगुप्त ज्योतिषानें शा. श. ५५० ( स. ६२८ ) मध्यें म्हणजे वर्मलातच्या वेळच्या वसंतगडच्या शिलालेखानंतर तीन वर्षांनीं लिहिलें आहे कीं, भीनपालचा राजा व्याघ्रमुख आहे ( ब्राह्मस्फुटसिद्धांत ७१८ ). यामुळें व्याघ्रमुख हा वर्मलाताचा उत्तराधिकारी होता कीं वर्मलातालाच व्याघ्रमुख म्हणत असत कीं ही पदवी होती हें समजत नाहीं. तथापि भीनपालच्या चावडा-

वंशाचें राज्य वि. सं. ७९६ ( स. ७३९ ) पर्यंत होतें, यांत शंका नाहीं. कारण लाट देशच्या व सोळंकीचा सामंत असलेल्या पुलकेशी ( अवनिजनाश्रय ) च्या कलचुरी सं. ४९० ( स. ७३९ ) च्या दानपत्रांत अरबांच्या चढाईचें वर्णन आहे; त्यांत चावडांचें राज्य नष्ट केल्याचा निर्देश आहे. या वेळीं चावडांचें राज्य फक्त भीनपाल येथेंच होतें. वढवाण व पाटण ( अनहिलवाड ) येथील चावडांच्या राज्याची स्थापना अद्यापि झाली नव्हती. 'फुतूहुलबुलदान' नांवाच्या फार्सी तवारिखेंत असें लिहिलें आहे कीं ही अरबांची चढाई खलीफा हशीमच्या वेळीं जुनैदनें केली होती. शेवटीं भीनपालच्या चावड्यांचें राज्य रघुवंशी प्रतिहारांनीं जिंकलें.

**वली**—( स. १७२३ ) आद्य ऊर्दू कवि. याचा कवितासंग्रह प्रसिद्ध आहे ( क. कौं. भा. ४ ). हा मुहम्मदशाह मोगलचे कारकीर्दीत दिल्लीस गेला तेव्हां याचा तेथें सन्मान झाला. यापूर्वीचे कवि फार्सी भाषेंत लिहीत.

**वलीउल्ला**—नागपूरच्या चांद सुलतानाचा दासीपुत्र. याला पदच्युत करून बुर्हाण गादीवर आला.

**वलीउल्ला बाहमनी**—( स. १५२१ ) हा दुसऱ्या महमूदचा पुत्र. यास अहमद बेरीदनें गादीवर बसविला, पण लगेच विषप्रयोग झाला.

**वलीद खलीफा**—याच्या वेळीं सिंध जिंकला ( सूर्यदेवी व परमलदेवी पाहा ).

**वल्लपदन्नायक**—( स. १३४२ ) होयसळ घराण्यांतील जो बल्लाळ तिसरा त्याचा हा भाचा होय. याच्या बापाचें नांव सोमयदन्नायक. संगम घराण्यांतील पहिल्या हरिहरानें याला आपली मुलगी दिली होती.

तिसऱ्या बल्लाळानें यास स. १३०२ मध्यें आपला प्रधान केल्याचा उल्लेख आहे (Ep. Corn. IX, HK 90). मदुरेच्या सुलतानाविरुद्ध केलेल्या स्वारींत यानें तिसऱ्या बल्लाळाच्या बाजूनें चांगलें शौर्य गाजविलें.

**वल्लभदेव**—मेघदूत काव्याचा टीकाकार.

**वल्लभभट्ट**—( स. १७५३ सुमार ) अहमदाबादचा मेवाडी गुजराथी ब्राह्मण. यानें गुजराथींत लिहिलेलें धनुर्धारीवर्णन, कालिका, चौसष्ट जोगिणीवर्णन व बहुचरादेवीचें वर्णन प्रसिद्ध आहे. याचे गर्भे प्रसिद्ध आहेत.

**वल्लभलाल**—यांनें वाल्लभमताला अनुसरून गीतेवर तत्वदीपिका नांवाची टीका लिहिली आहे. गु. प्रिं. प्रेसनें दुसऱ्या आवृत्तांत छापलेल्या गीताटीकांत ती टीका छापली आहे.

**वल्लभसेन सोळंकी**—( स. १००९ ) अनहिलवाडच्या सोळंकी घराण्यांतील चामुंडाचा हा वडील मुलगा. यानें आपला मुलगा भीमदेव याचेसह गझनीच्या महमूदाचा पराभव करून तीन हजार मुसलमान कापून काढले. तेव्हां महमूद सोमनाथ लुटून परत जात असतां त्यानें अनहिलवाडवर स्वारी करून भीमदेवाचा पराभव केला, व त्याचा चुलता दुर्लभराज यास गादीवर बसविलें. वल्लभसेनानें फक्त सहाच महिने राज्य केलें. यानें माळव्यावर स्वारी केली होती. याच्यामागून याचा भाऊ दुर्लभराज गादीवर आला.

**वल्लभाचार्य**—( स. १४७९–१५३१ ) वल्लभाचार्य हा पुष्टिमार्गाचा संस्थापक. तेलगु प्रांतांतील कांकरव ( कंकरवाड ) गांवीं राहणाऱ्या लक्ष्मणभट्ट नांवाच्या कृष्णयजुर्वेद पढलेल्या एका तेलंगी ब्राह्मणाचा हा मुलगा होय. लक्ष्मणभट्टाच्या बायकोचें नांव 'एलमागार' असें होतें. तिला घेऊन तो काशीयात्रेस जात असतां वाटेंतच विक्रम संवत् १५३५ ( सन १४७९ ) वैशाख वद्य एकादशीस ती प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. या मुलाचें नांव वल्लभ ठेविलें. वल्लभानें कांहीं दिवस वृंदावनास व कांहीं दिवस मथुरेस वसती केली. या सुमारास गोवर्धन पर्वतावर देवदमन ( श्रीनाथजी ) या नांवानें गोपाळकृष्ण प्रगट झाले असें सांगतात. "त्या ठिकाणीं येऊन माझें दर्शन घे." असें वल्लभास देवानें स्वप्नांत येऊन सांगितलें; व आणखीहि त्यास कळविलें कीं, "कृष्णावतारीं गोकुळांतील माझे सवंगडी असलेले गोप पुन्हां या युगांत अवतीर्ण झाले आहेत, व त्यांच्याशीं मला पुन्हां पहिल्याप्रमाणें क्रीडा करितां यावी एतदर्थ त्यांस माझे भक्त अगर उपासक बनव." त्याप्रमाणें तेथें जाऊन वल्लभानें श्रीनाथजींचें दर्शन घेतलें. तेव्हां श्रीनाथजीनें "माझें एक देवालय बांधून उपासनेचा प्रसार कर." अशी आज्ञा केली. तेव्हां वल्लभानें पुष्टिमार्गाची स्थापना केली; व श्रीनाथजी या नांवानें प्रसिद्ध असलेल्या कृष्णाच्या एका विशिष्ट अवताराशीं आपल्या पंथाची सांगड घालून दिली. वल्लभाच्या पूर्वीच्या काळीं होऊन गेलेला ग्रंथकार विष्णुस्वामिन् याचा व वल्लभाचा वेदान्तविषयक सिद्धांत एकच आहे.

वल्लभाचार्यांचा व त्याचप्रमाणें विष्णुस्वामीचाहि वेदान्तविषयक सिद्धांत पुढीलप्रमाणें आहेः—आदिपुरुष अगर आत्मा एकटा असल्यामुळें त्यास बरें वाटेना; नाना रूपें धारण करावीं अशी त्यास इच्छा झाली. त्याप्रमाणें तो स्वतःच अचेतन सृष्टि, जीव ( जीवात्मा ) व अन्तर्यामिन् आत्मा झाला. "यथा सुदीप्तात्पावकाद्विस्फुलिङ्गाः

सहस्रशः प्रभवन्ते सरूपाः तथा " याप्रमाणें सर्व उत्पन्न झालें असून त्याचेच अंश होत. यानें आपल्या अतर्क्य शक्तीनें चित् व आनंद हे दोन गुण पहिल्यांत ( म्हणजे अचेतन सृष्टींत ) इंद्रियांना अगोचर किंवा अदृश्य अशा स्वरूपांत ठेविले; दुसऱ्यांत आनंद अगोचर स्वरूपांत ठेवला; व तिसऱ्याच्या ठायीं सर्वच गुण इंद्रियगोचर किंवा दृश्य स्वरूपांत ठेवले.

वल्लभानें आपल्या पंथाच्या प्रसारार्थ संस्कृत भाषेंत बरेच ग्रंथ रचिले आहेत. त्यांपैकीं तीन मुख्य होत. ते म्हणजे वेदान्तसूत्र-अणुभाष्य, सुबोधिनी व तत्त्वदीपनिबंध. याच्या १७ लहान पद्यग्रंथांपैकीं 'सिद्धान्तरहस्य' सुप्रसिद्ध आहे. वल्लभाचे चार व त्याच्या मुलाचे चार असे आठ शिष्य व्रज प्रदेशांत ( मथुरा-वृंदावनाचा आसमंत भाग ) राहत असून त्यांना 'अष्टछाप' अशी संज्ञा आहे. त्यांनीं व्रज किंवा हिंदी भाषेंत अनेक धार्मिक स्फुट कविता रचल्या आहेत. कृष्णकथेमधील अत्यंत शृंगारिक वाङ्मयहि या पंथांत आहे. त्यांपैकीं गोकुळनाथाचे 'चौरासीवार्ता' ( स. १५५१ ) आणि व्रजवासीदासाचे 'व्रजविलास' ( स.१७४३ ) हीं मुख्य आहेत. याच्या पंथाला पुष्टिमार्ग म्हणतात.

**वसिष्ठी**—ही गौतमीपुत्र शातकर्णीची बायको व पुलुमायीची आई. हिचा उल्लेख नाशिक आणि कार्ली येथील शिलालेखांत आढळतो. हिनें एक गांव बुद्धभिक्षूंना दिलें होतें. गौतमीपुत्राच्या पश्चात् हिचा मुलगा पुलुमायी हा महाराष्ट्रांत राज्य करीत असूनहि मद्रास प्रांतांतील धरणीकोट येथें कांहीं दिवस राज्य करीत असावा, असें भांडारकरांचें मत दिसतें ( Bhand. p. 28–29 ).

**वसिष्ठीपुत्र पुलोमायी**—( २ पुलोमायी आंध्र पाहा ).

**वसुदेव**—( वासुदेव पाहा ).

**वसुबंधु**—( स. ४८० सुमार ) एक बौद्ध आचार्य. याचा पिता कौशिक, थोरला भाऊ असंग व धाकटा भाऊ विलिंचीवत्स. याचा जन्म पेशावर येथें झाला. त्या वेळीं पेशावर ही गांधारची राजधानी होती.

हा प्रथम सर्वास्तिवादीपंथाचा असून वैभाषिक तत्त्वज्ञानाचा अभ्यास करी. पण यानें पुढें असंगाच्यामुळें महायान पंथाची दीक्षा घेतली. यानें आपल्या आयुष्याचीं बरींच वर्षे शाकल, कोशांबी व अयोध्या येथें घालावलीं व शेवटीं हा अयोध्या येथेंच मेला. वैभाषिक पंडित मनोरथ व संघभद्र याचे समकालीन होते. याच्या संस्कृत चरित्राचें चिनी भाषांतर फक्त मिळतें.

तसेंच याच्या बौद्ध तर्कशास्त्राचें चिनी व तिबेटी भाषांतर फक्त उपलब्ध आहे. यानें अनुमानासंबंधीं पंचावयवी वाक्याऐवजीं द्व्यवयवी वाक्य सुरू केलें. हा दिङ्नागाचा गुरु होता. हा वामनाच्या काव्यालंकार सूत्रवृत्तींतील एका उल्लेखावरून चंद्रगुप्तपुत्र समुद्रगुप्ताचा सचीव होता.

याचे ग्रंथ-अभिधर्मकोश, विज्ञप्तिपात्रतात्रिंशक; शिवाय यानें अवतंसक, निर्वाण, सद्धर्मपुंडरीक, प्रज्ञापारमिता, विमलकीर्ति व इतर कांहीं सूत्रें यांवर टीका लिहिल्या.

अभिधर्मकोश, हा ग्रंथ नीति, मानसशास्त्र व अध्यात्म यांची चर्चा करणारा असून सूत्रकारिकाबद्ध आहे. तो हीनयान पंथाचा ग्रंथ असला तरी महायानपंथाचेहि लोक तो ग्रंथ मानतात.

**वसुमित्र**—( खि.पू.१३३-१२३ ) हा अग्निमित्राचा पुत्र. याचा बाप सिंध प्रांतांत राज्य करीत असल्यामुळें व आजोबा मगध येथें राज्यावर असून म्हातारा असल्यामुळें सैन्याची सर्व जबाबदारी याचेवरच होती. पुष्यमित्रानें यास अश्वमेध यज्ञाकरितां सोडलेल्या घोड्याचा रक्षक नेमलें होतें. यानें १०० निवडक रजपूत व इतर सैन्य बरोबर घेऊन सिंधुनदीच्या दक्षिणेकडील यवनांचा पराभव केला व अश्व सोडवून आणला ( मालविकाग्निमित्र, अंक ५ ). हा सुज्येष्ठाच्या पश्चात् गादीवर आला (V. Smith, p. 214).

२. ( स. १२० सुमार ) कनिष्कानें बौद्धधर्मग्रंथांवर संस्करण करण्याकरितां विद्वानांची एक परिषद् भरावली होती. एकंदर पांचशें विद्वान् एकत्र झाले होत. त्यांचा हा नायक होता. त्या सभेंत सूत्रपिटकावर भाष्य लिहिलें गेलें (उपदेशशास्त्र). तसेंच विनय व अभिधर्मपिटकावरहि भाष्य लिहिलें. आणि तीं सर्व ताम्रपटावर खोदविलीं होतीं. त्याला महायानपंथाचें वाङ्मय म्हणतात ( अश्वघोष व कनिष्क पाहा ).

**वसुरात**—भर्तृहरीचा व्याकरणशास्त्राचा गुरु. याला व्याकरण चंद्राचार्यापासून मिळालें होतें.

**वस्तुपाल**—( मृत्यु स. १२४१ ) मंत्री आशराज ( अश्वराज ) याला कुमारदेवी नांवाच्या विधवेपासून हा झाला. याला तेजपाळ नांवाचा दुसरा एक भाऊ होता, असें मेरुतुंगाचार्यांनीं आपल्या प्रबंधचिंतामणींत लिहिलें आहे. वस्तुपालाच्या चरित्राची सामग्री अरिसिंहकृत 'सुकृतसंकीर्तन', जयसिंहकृत 'हम्मीरमदमर्दन', उदयप्रभकृत 'धर्माभ्युदय', व 'सुकृतकल्लोलिनी,' या ग्रंथांत मिळते. हे

ग्रंथ वि. सं. १२८६ पूर्वी झाले आहेत. तसेंच वस्तुपालाचा समकालीन असणारा बाळचंद्र यानें 'वसंतविलास' महाकाव्य लिहिलें. त्यांत व मेरुतुंगाचार्यकृत 'प्रबंध-चिंतामणि,' राजशेखरकृत 'प्रबंधकोश' यांत याचें संक्षिप्त चरित्र आलें आहे. सगळ्यांत विस्तृत चरित्र जिनहर्षकृत 'वस्तुपालचरित्र' या ग्रंथांत दिलें आहे.

याचें शंखासह युद्ध झालें होतें. एकदां दिल्लीचा मुइज्जुदीन बहरामशाह पश्चिमेकडे रवाना झाल्याची बातमी राणा वीरधवलाकडे येऊन पोंचली. तेव्हां अबू पर्वतापाशीं यानें त्याचा पराभव करून मुसलमानांचीं लाखों मुंडकीं वीरधवलाकडे रवाना केलीं. पुढें कच्छांतील भद्रेश्वरचा भीमसेन किंवा भीमसिंह यानें जाबालिपुरच्या सामंतपाल, आणि त्रिलोकसिंह या तीन चव्हाणबंधूंच्या साहाय्यानें वीरधवलावर स्वारी केली. त्यांत यानें खूप पराक्रम केला.

हा वडिलांपासूनच अत्यंत धनवान् होता. यानें उदार हस्तानें शेंकडों मंदिरें बांधलीं, विहिरी खोदल्या व धर्मशाळा बांधल्या. हा जैनधर्मी असून अबूच्या पहाडावर याची प्रशस्ति आहे. त्यावरून याची संपत्ति आणि व्यय यांची चांगली कल्पना येते.

हा लवणप्रसाद व वीरधवल वाघेलच्या वेळीं मंत्री होता. अबूच्या पहाडावर याच्या पुष्कळ प्रेक्षणीय इमारती आहेत.

**वस्तो**—(स. १५५० सुमार) शुकदेवाख्यान व सुभद्राहरण या गुजराथी काव्याचा कर्ता.

**वंगसेन**—हा गदाधराचा पुत्र. शार्ङ्गधर व भावमिश्र यांच्यामधील काळांत बंगालमध्यें झाला. याचे ग्रंथ-चिकित्सासारसंग्रह.

**वंगहुएन्त्से**—(स. ६४८ सुमार) चीनच्या बादशहानें दुसऱ्यांदा हर्षवर्धनाकडे पाठविलेल्या दूतदलाचा पुढारी. हा हिंदुस्थानांत येऊन हर्षाला भेटण्यापूर्वीच हर्षाचा देहांत झाला होता; व त्याचा सेनापति अर्जुन यानें राज्य ताब्यांत घेतलें होतें. अर्जुनानें यालाहि लुटून कांहीं चिनी सैनिक ठार केले. तेव्हां हा नेपाळांत पळाला. तेथें थोडक्याच दिवसांत चिनी व तिबेटी सैन्य जमवून यानें अर्जुनावर स्वारी केली. त्या युद्धांत अर्जुनाचा पराभव झाला तेव्हां यानें अर्जुनाला पकडून चीनमध्यें नेलें.

**वंशशेखर पांड्य**—(स. २०० सुमार) नदीच्या पुरानें मदुरा वाहवली. तिची वसाहत यानें पुनः केली. संगम नांवाची विद्वत्सभा स्थापिली, आणि चोलांचा पराभव केला.

**वाकाटकांची वंशावळ**—१ विंध्यशक्ति (स. २४८–२८४), २ (पहिला) प्रवरसेन (स. २८४–३४४)–गौतमीपुत्र (हा गादीवर आला नाहीं.), ३ (पहिला) रुद्रसेन (स. ३४४–४८), ४ (पहिला) पृथ्वीषेण (स. ३४८–३७५), ५ (दुसरा) रुद्रसेन (स. ३७५–३९५), ६ (पत्नी) प्रभावतीगुप्ता, (यांची दोन मुलें–) दिवाकरसेन (अज्ञान) (पालक–प्रभावतीगुप्ता) (स. ३९५–४०५), ७ दामोदरसेन (प्रवरसेन २ रा) (स. ४०५–४३५), ८ नरेंद्रसेन (स. ४३५–४७०), ९ (दुसरा) पृथ्वीषेण (स. ४७०–४८५), १० देवसेन (नरेंद्रसेनाचा दुसरा मुलगा) (स. ४८५–४९०), ११ हरिषेण (स. ४९०–५२०).

ही वंशावळ डॉ. काशीप्रसाद जयस्वाल यांच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या 'नागवाकाटक साम्राज्य इतिहास' या ग्रंथावरून घेतली आहे. ही व प्रो. आयंगार यांच्या लेखांत दिलेल्या वंशावळींत फरक आहे. याचें कारण हें कीं देवसेन व हरिषेण यांचीं नांवें अजंठा येथील एका त्रुटित लेखांत येतात. त्यांचा नरेंद्रसेन व पृथ्वीषेण यांच्याशीं कोणता संबंध होता, याविषयीं विद्वानांत मतभेद आहे. वर दिलेलीं कारकीर्दींचीं वर्षे अनुमानावर बसविलीं आहेत. तपशिलाकरितां अधिक खोल विचार करावयास पाहिजे. वाकाटक व भोज एकच.

कुशान आणि आंध्र घराण्यांचें राज्य संपल्यानंतर गुप्तांचें राज्य येईपर्यंत नाग, भारशिव व वाकाटक अशा तीन घराण्यांनीं हिंदुस्थानावर साम्राज्य गाजविलें, आणि त्यानंतर गुप्त साम्राज्य उदयास आलें. या घराण्यांचा परस्पर संबंध विवाहानें जोडलेला दिसतो. भारशिवांपैकीं पुढील सात पुरुषांची माहिती मिळते–१ नवनाग (स. १४०), २ वीरसेन (स. १७०), ३ हयनाग (स. २१०), ४ त्रयनाग (स. २४५), ५ बर्हिणनाग (स. २५०), ६ चरजनाग (स. २६०), ७ भवनाग (स. २९०–३१५). यांपैकीं भवनागाची मुलगी विंध्यशक्तीच्या नातवास गौतमीपुत्रास दिली होती. त्याचा पुत्र शिशुक हा अज्ञान असतांच वाकाटकांच्या हातांत सर्व सत्ता गेली. तसेंच गुप्तांपैकीं प्रभावती गुप्ता ही या घराण्यांत आली व तिच्यामुळें वाकाटकांचें साम्राज्य गुप्तांच्या हातांत गेलें (किलाकिलाराजवंश पाहा).

**वाक्पति**—'गौडवहो' या प्राकृत काव्याचा कर्ता व कनोजच्या यशोवर्म्याचा आश्रित.

**वाक्पतिराज**—(मुंज परमार पाहा).

**वागीश्वर**—मंख कवीच्या ग्रंथाची परीक्षा करणाऱ्या कवींतील एक.

**वाग्भट**—अष्टांगसंग्रहकार वाग्भट अष्टांगहृदयकाराहून वेगळा आहे.

१. ( स. १५० सुमार ) हा वैद्यकावरील बौद्ध ग्रंथकार. याच्या वेळीं शक राजे राज्य करीत होते. शक राजांना कांदे फार आवडत असें हा म्हणतो ( अष्टांगहृदय, प्र. ४९ ). हा सिंहगुप्तसुनू होता. अष्टांगसंग्रहाचा उल्लेख व उतारे अष्टांगहृदयांत आहेत.

३ ( स. ११२२–५६ ) हा जैन होता. याच्या पित्याचें नांव सोम आहे. प्राकृतांत वाग्भटाचें नांव बाहड असें येतें. हा कोणा राजाचा मंत्री होता. याचा अलंकारशास्त्रावरील 'वाग्भटालंकार' नांवाचा ग्रंथ सिंहदेवगणि याच्या टीकेसह काव्यमालेंत छापून प्रसिद्ध झाला आहे. हा ग्रंथ सविस्तर विवेचनात्मक असून त्यांत २६० पद्येंच आहेत. या ग्रंथाचीं परिच्छेद नांवाचीं पांच प्रकरणें आहेत. या ग्रंथांत एकच स्थळ गद्यात्मक आहे ( ३. १४ नंतर ). वाग्भटालंकारांत उदाहरणासाठीं दिलेल्या श्लोकांत अनहिलवाडच्या चालुक्य घराण्यांतील कर्णराजाचा पुत्र जयसिंह राजा याचा फार संबंध आलेला आहे. जयसिंहानें स. १०९३ पासून११४३ पर्यंत राज्य केलें ( इंडि. अँटि. ६, पा. १८० व २१३ आणि एपि. इंडि. १. २९३ ). यांतील वडनगरच्या लेखांत अनहिलवाडाच्या चालुक्यांचे वंशवृक्ष इत्यादि विषय आले आहेत. काव्यमालेच्या संपादकांनीं वाग्भटालंकाराच्या प्रस्तावनेंत प्रभाचंद्राच्या प्रभावकचरित्राच्या आधारें दाखविलें आहे कीं, वाग्भट हा स. ११२२ व ११५६ या वर्षीं विद्यमान होता.

४. ( स. १३००–१४०० सुमार ) हा जैन होता. याच्या पित्याचें नांव नेमिकुमार. हा मेवाडांतील राहडपुर व नलोटकपुर याच्या आसपासचा असावा. याचा 'काव्यानुशासन' नांवाचा ग्रंथ याच्या स्वतःच्या 'अलंकारतिलक' नांवाच्या टीकेसह काव्यमालेंत प्रसिद्ध झालेला आहे. ग्रंथाचा मुख्य भाग गद्य सूत्रात्मक असून त्याचें सोदाहरण विवरण टीकेंत आलेलें आहे. वाग्भटालंकारकर्ता वाग्भट आणि हा भिन्न होत. कारण वाग्भटालंकारकर्त्या वाग्भटाचा यानें आपल्या ग्रंथांत निर्देश केला आहे. हेमचंद्राचें ' काव्यानुशासन ' सर्वत्र प्रसिद्ध आहे.

**वाघोजी तुपे**—कान्होजी जेध्याच्या पदरच्या ' बारा मुळवे' म्हणून जिवास जीव देणाऱ्या साहाय्यकांपैकीं एक. कान्होजीच्या वतनाच्या भांडणांत याचा वडील भाऊ मारला गेला. कासारखिंडीच्या युद्धांत यानेंहि कामगिरी केली होती. अफजलखान प्रकरणीं याची उत्तम कामगिरी पाहून कान्होजीकडून शिवाजीनें याला आपल्या पदरीं घेतलें. याला पायदळावरील हजारी नेमून याची रवानगी कोंकणांत केली. तेथें मोगल सरदार नामदारखान आपलीं ठाणीं घालीत होता. त्यास पेणजवळच्या मिरे डोंगरावर गांठून शिवाजीनें निकरानें तोंड दिलें. या चकमकींत हा जखमी झाला.

**वाचस्पति**—( स. १७२५ सुमार ) हा तत्त्वज्ञानी वाचस्पति आणि वाचस्पतिमिश्र या दोघांहूनहि निराळा होय. यानें ' स्मृतिसारसंग्रह ' हा ग्रंथ लिहिला.

२. यानें माधवनिदान या वैद्यकग्रंथावर ' आतंकदर्पण' नांवाची टीका संस्कृत भाषेंत लिहिली आहे. हा पंधराव्या शतकांत होता.

**वाचस्पतिमिश्र**—( स. ८४१ सुमार ) धर्मकीर्ति आदिकरून बौद्ध तर्कज्ञांनीं वात्स्यायन व उद्योतकर या ब्राह्मण तर्कज्ञांवर टीकेची झोड उठवली. तेव्हां वात्स्यायन व उद्योतकर यांच्या समर्थनार्थ वाचस्पतिमिश्रानें ' न्यायवार्तिक ' या ग्रंथावर ' न्यायवार्तिकतात्पर्यटीका ' या नांवाची एक उत्कृष्ट टीका लिहिली.

हा जातीनें ब्राह्मण असून मिथिलेचा राहणारा होता. यानें ' न्यायवार्तिकतात्पर्य ' टीकेस सुरुवात करतांना ' न्यायसूत्रांत ' कोणींहि प्रक्षिप्त मजकूर दडपूं नये म्हणून सर्व सूत्रांची एक सूची तयार केली व तीस ' न्यायसूचीनिबंध ' असें नांव दिलें. ही सूची संवत् ८९८ म्हणजे स. ८४१ त लिहिली असें त्या सूचीवरच यानें दिलें आहे.

वाचस्पति हा नृग राजाच्या आश्रयास राहत असे. याच्या गुरूचें नांव त्रिलोचन असें होतें.

प्रत्यक्षाच्या, ' सविकल्पक ' व ' निर्विकल्पक ' या दोन भागांचें विवरण करतांना आपण वात्स्यायनाच्या टीकेचा अथवा उद्योतकराच्या उपटीकेचा आधार न घेतां आपला गुरु जो त्रिलोचन त्याच्या शिकवणीचाच फक्त आधार घेतला आहे, असें हा म्हणतो. हा त्रिलोचन वैभाषिक तत्त्वज्ञानावर लिहीत असे.

याचा तर्कशास्त्रावरील 'न्यायकणिका' या नांवाचा ग्रंथ आज मितीस उपलब्ध नाहीं. तत्त्वज्ञानाच्या सर्व विभागांतील ग्रंथांवर यानें टीका लिहिल्या होत्या असें म्हणतात. हिंदी तत्त्वज्ञानावरील ग्रंथांत याच्या शारीरभाष्यावरील ' भामतीटीका ' व सांख्यकारिकेवरील ' सांख्यतत्त्व-कौमुदी ' ह्या दोन ग्रंथांस फार महत्त्व आहे. याला

तत्त्वज्ञानाच्या सर्व पद्धतींचें ज्ञान होतें. याला 'सर्वतंत्र-स्वतंत्र' असें नामाभिधान मिळालें होतें.

न्यायवार्तिकतात्पर्यटीकेंत यानें माध्यमिक, विज्ञानवाद, सौत्रांतिक, वैभाषिक, ( वात्सीपुरीय ) या चार तत्त्वज्ञानाच्या शाखांचा निर्देश केला आहे व सर्वत्र दिङ्नाग व धर्मकीर्ति यांच्यावर टीकेची झोड उठवली आहे ( हि. इं. लॉ., पा. १३३-१३५ ).

ब्रह्माशीं जीवाचा संबंध प्रतिपादन करतांना गौडपादाचार्य व शंकराचार्य यांनीं आभास, प्रतिबिम्ब किंवा अवच्छेद यांपैकीं कोणत्याच वादाचा पुरस्कार केला नाहीं. पण यानें अवच्छेदवादाचा पुरस्कार केला आहे.

**२.** ( स. १४५० सुमार ) हा अभिनव वाचस्पतिमिश्र या नांवानें प्रसिद्ध आहे. हा धर्मशास्त्रकार म्हणून प्रसिद्ध आहे तरी आपण तत्त्वज्ञानावर १० ग्रंथ लिहिले आहेत असें स्वतःच हा आपल्या 'पितृभक्तितरंगिणी' या ग्रंथांत म्हणतो. हा राजा बहिरवेन्द्र व रामभद्र यांच्या दरबारीं होता. याच्या १० ग्रंथांपैकीं ४ उपलब्ध आहेत.

(१) अनुमानखण्डटीका (गंगेशाच्या ग्रंथावरील टीका), ( २ ) खण्डनखण्डोद्धार ( श्रीहर्षाच्या न्यायसूत्राच्या टीकेवरील टीका, ( ३ ) न्यायसूत्रोद्धार ( न्यायसूत्रावरील टीका, ( ४ ) शब्दनिर्णय. शेवटच्या ग्रंथाची प्रत अद्याप उपलब्ध नाहीं, परंतु याच्या द्वैतनिर्णयांत त्याचा उल्लेख आहे ( हि. इं. लॉ., पा. ४५९-६० ).

याचा 'विवादचिन्तामणि' हा ग्रंथ फार प्रसिद्ध आहे. हिंदु कायद्याच्या बाबतींत हिंदुस्थानांतील हायकोर्टें या ग्रंथाचा उपयोग करितात. यानें ३० ग्रंथ ( निबंध ) स्मृतींवर लिहिले, असा उल्लेख केला आहे. 'चिंतामणि' याच नांवाचें याचें ११ ग्रंथ आहेत. 'आचारचिंतामणि', 'आह्निकचिंतामणि', 'शुद्धिचिंतामणि', 'कृत्यचिंतामणि', 'तीर्थचिंतामणि', 'द्वैतचिंतामणि', 'नीतिचिंतामणि', 'व्ययचिंतामणि', 'शूद्रचिंतामणि', 'श्राद्धचिंतामणि', हीं त्यांचीं नांवें होत. यांशिवाय यानें निर्णय या नांवाचे कांहीं ग्रंथ केले आहेतः 'तिथिनिर्णय', 'द्वैतनिर्णय', 'महादाननिर्णय'. यांशिवाय यानें मृताशौच आणि जननाशौच यांविषयींहि माहिती दिलेली आहे. याच्या 'महार्णवा'चे कृत्य, आचार, विवाद, व्यवहार, दान, शुद्धि आणि पितृयज्ञ असे सात भाग केलेले आहेत. यांपैकीं 'कृत्यमहार्णव' हा ग्रंथ उपलब्ध असून त्यामध्यें सण, उत्सव, आणि उपवास यांविषयीं माहिती आलेली आहे. यांशिवाय याचे गयाश्राद्धपद्धति, चंदनधेनुप्रमाण आणि दत्तकविधि असे ग्रंथ आहेत.

हा आपणास महामहोपाध्याय आणि मिश्र किंवा संमिश्र असें म्हणवीत असे. महाराजाधिराज हरिनारायण या राजाचा हा 'पारिषद' होता. यानें आपल्या आश्रयदात्या राजांची वंशावळ आपल्या ग्रंथांत दिलेली आहे. रामभद्रदेव या राजाचाहि हा 'पारिषद' होता. आश्रयदात्याच्या सांगण्यावरून यानें ग्रंथ लिहिल असा उल्लेख आहे. हा वर्धमानाचा गुरु होता.

**वाचासुंदर**—( आनंदराव काशी पाहा ).

**वाञ्छेष्क**—( वशीष्क पाहा ).

**वाडीकर महार**—श्रीछत्रपति शिवाजीनें रोहिडा किल्ल्यावर यास अटकेंत ठेवलें होतें. नंतर सर्जा बुरुजाखालीं यास पुरून टाकण्याची सजा देण्यांत आली ( वि. रा. शिंदेकृत अस्पृश्यतेचा उद्गम ).

**वाणीनाथ**—( स. १५६९-१६०८ ) हा एक कवि असून यानें कच्छ आणि नवानगर येथील जाम घराण्याचा इतिहास काव्यात्मक लिहिला आहे. त्या काव्यात्मक ग्रंथाचें नांव 'जामविजय-काव्य' हें होय.

या ग्रंथांत यानें शत्रुशल्य किंवा सत्तर्सल आणि श्रीकंठ कवि यांचा उल्लेख केला आहे.

**वात्स्यायन**—( स. ३००-४०० सुमार ) हा कामसूत्राचा कर्ता होय. स. च्या ३ऱ्या शतकाच्या मध्यास यानें 'कामसूत्र' हा ग्रंथ लिहिला असें ठरविण्यांत आलें आहे. याच्या ग्रंथांत सामाजिक भाग असल्यामुळें तत्कालीन समाजस्थितीच्या दृश्याचा उत्तम नमुना म्हणून या ग्रंथाचा चांगला उपयोग होतो ( I. H. Q, Vol. VI, p. 397-98 ). याचा 'न्यायसूत्रभाष्य' नांवाचा एक ग्रंथ आहे. तसेंच 'पुरुषसामुद्रिकलक्षण' नांवाच्या याच्या ग्रंथांतील उतारा 'लिंगविशेषविद्या' या ग्रथांत आढळतो ( C. C. ). याला वाचस्पति हेमचंद्र यांनीं पक्षिलस्वामिन् म्हटलें आहे. याचा निर्देश सर्वदर्शनसंग्रहांत 'पक्षिलस्वामिन्' या शब्दानें आला आहे.

याच्या न्यायसूत्रावरील भाष्यापूर्वी आणखीहि कांहीं भाष्यें असावींत असें एके, केचित्, अन्ये वगैरे शब्दांनीं केलल्या निर्देशांवरून दिसून येतें. पण त्यांपैकीं एकहि आज उपलब्ध नाहीं. यानें कौटिल्याचें अर्थशास्त्र व पतंजलीचें महाभाष्य यांतील उतारा घेतला आहे.

याला द्रामिल, पक्षिलस्वामी वगैरे नांवें होतीं. हा दक्षिणेकडील कर्नाटकांतील असावा असें 'द्रामिल' या नांवावरून दिसतें. याचा कांचीशीं संबंध असावा. दिङ्नाग व धर्मपाल हे कांचीचेच होते. यानें द्राविड लोकांच्या

मुख्य खाण्याचा म्हणजे भाताचा निर्देश केला आहे. याच्या भाष्यावर भारद्वाजानें वार्तिक केलें आहे.

२. एक ज्योतिषी. याचा निर्देश हेमाद्रीनें परिशेष खंडांत ( २.७९२ ) केला आहे ( C. C. ).

३. अलंकारसूत्रग्रंथाचा कर्ता.

**वादुगी यादव**—( स. १००० पूर्वी ) हा राजगीच्या मागून गादीवर बसला असावा असें दिसतें.

**वादिराज**—याची महाभारतावर 'लक्षाभरण' नांवाची टीका आहे आणि ती नीलकंठाच्या पूर्वीची आहे.

२. ( स. १०२६ नंतर ) तिसऱ्या भिल्लम यादवानंतर गादीवर आला.

**वानकी**—चिनी प्रवासी. श्रीभोज येथें राहत असे.

**वानयुन**—चिनी प्रवासी. चीनमधून समुद्रद्वारा कलिंगांत गेला व तेथें मेला.

**वामदेव**—( चिरंजीव भट्टाचार्य पाहा ).

**वामदेव कवि**—मुनिमतमणिमाला ग्रंथाचा कर्ता. हा ग्रंथ धर्मशास्त्रप्रकरणाचा आहे.

**वामन**—(स. ८०० सुमार) याचा 'काव्यालंकारसूत्र' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. यावरील वृत्तीहि यानेंच स्वतः केली आहे. याचा हा ग्रंथ प्राचीन सूत्रपद्धतीनें लिहिला असून यानें त्याचे भाग व पोटभाग दाखविणारी परिभाषाहि जुन्या सूत्रकारांची उचललेली दिसते. काव्यालंकारसूत्राचे त्या पद्धतीनुसार अधिकरण नांवाचे पांच भाग केले असून प्रत्येक अधिकरणांत दोन किंवा तीन अध्याय आहेत. एकंदर अध्यायसंख्या १२ असून सूत्रसंख्या ३१९ आहे. याच्या ग्रंथांत व्याससूत्राप्रमाणें अध्यायांत अधिकरणें नसून कौटिल्यकृत अर्थशास्त्राप्रमाणें अधिकरणांत अध्याय आहेत. वामनाच्या या ग्रंथावरील एक टीकाकार सहदेव यानें म्हटलें आहे कीं काव्यालंकार एकदां प्रचारांतून नाहींसा झाला होता, पण पुढें भट्ट मुकुलाला त्याची प्रत मिळाली असतां त्यानें तो सांप्रदाय पुनः सुरू केला ( राजशेखरकृत काव्यमीमांसा, बडोदेप्रत टिप्पणी पा. ५ ). हा जयापीड राजाचा मंत्री होता, असा निर्देश राजतरंगिणींत आहे. त्यावरून हा स. ८०० च्या सुमारास हाता असें ठरतें. माधवकवींचीं कांहीं वाक्यें उद्धृत केलेलीं आहेत त्यांवरूनहि याचा काळ मिळण्यास मदत होते.

तसेंच हा नंतर जगत्तुंग राष्ट्रकूटाच्याकडेहि होता ( लिंगानुशासन ९ टीका ).

गायकवाडसीरीजमध्यें नुकताच वामनाचा 'लिंगानुशासन' नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध झाला आहे. त्याच्या संपादकाच्या मतें काव्यालंकारसूत्रकार वामन, काशिकावृत्तीचा कर्ता वामन आणि लिंगानुशासनाचा कर्ता वामन हे सर्व एकच होत. यावरील सहदेवाच्या टीकेचा उल्लेख वर आलाच आहे. याशिवाय 'साहित्यसर्वस्व' नांवाची महेश्वराची टीका इंडिया ऑफिसमध्यें आहे (पा. ३२१). भट्टगोपालाचीहि एक टीका असावी, असें याच सूत्रावरील गोपेंद्रतिप्पभूपालाची टीका वाणीविलास प्रेसमध्यें छापली आहे त्यावरून दिसतें.

याचें तेहतीस श्लोकांचें 'लिंगानुशासन' स्वतःच्या टीकेसह गाय. ओ. सीरीजमध्यें सहावा ग्रंथ म्हणून प्रसिद्ध झालें आहे. याचा विद्याधरव्याकरण नांवाचा ग्रंथ आहे.

यानें 'श्रीभवन' नांवाच्या गांवचा उल्लेख केला आहे, व त्याच्याशीं जगत्तुंगाचाहि संबंध दिसतो ( वणीदिंडोरी व राधनपूर शिलालेख ).

काशिकावृत्तीपैकीं १।२।५।६ या अध्यायांवरील वृत्ति यानें लिहिली, असें बह्वल्पार्थात् ( पा. सू. ५. ४. ४२ ) या सूत्रावरील शब्दरत्नांत म्हटलें आहे. पण याविषयीं मतभेद आढळतो.

**वामन पंडित**—( स. १६३६–१६९५ ) प्रसिद्ध मराठी कवि. हे मूळचे विजापूरचे देशस्थ ऋग्वेदी वासिष्ठगोत्री माध्वसांप्रदायी ब्राह्मण. पित्याचें नांव नरसिंह ( नरहरी ) आणि मातेचें नांव लक्ष्मी. लक्ष्मीचें माहेरचें गोत्र शांडिल्य. पंडितांच्या पत्नीचें नांव गिराबाई. यांचें अध्ययन काशीस झालें. यांना फार्सी भाषा उत्तम येत असे. यांचा गुरु सच्चिदानंद. यांचें घराणें जरी द्वैतमताचें माध्वसांप्रदायी होतें तरी यांनीं अद्वैतमत स्वीकारलें. वामन शेष, वामन पंडित, वामन पार्थसारथी व वामन या चार व्यक्ति भिन्न किंवा एक हें निश्चित नाहीं.

हे प्रथम विजापूरच्या दरबारीं होते. पण यांच्यावर बाटण्याचा प्रसंग येऊं घातला तेव्हां यांनीं विजापूर सोडलें आणि भिक्षावृत्ति पत्करली. नंतर काशीस जाऊन पंडित झाले. नंतर पंडितांशीं वाद करून विजय मिळवीत हिंडूं लागले. पण यांचें समाधान झालें नाहीं. शेवटीं हे मलयाचल पर्वताकडे गेले असतां यांनीं अद्वैतमताचा उपदेश एका यतीपासून घेतला, असें 'निगमसार' ग्रंथांत प्रारंभीं लिहिलें आहे.

हे महाबळेश्वराकडे जात असतां वाईच्या पश्चिमेस गुन्हेघर येथें समाधिस्थ झाले. गुन्हेघर भूगांव या समोर आहे व दोन्ही गांवांच्या मध्यें कृष्णानदी वाहत आहे. महादेव ऊर्फ विश्वात्मक गोसाव्यानें यांची समाध भूगांवीं कृष्णातीरीं खडकावर बांधली. नंतर शी. इंव कोरेगांवीं वृंदावन बांधलें. भूगांव व पांडववाडी जवळच आहेत.

यांनीं १२ लक्ष कविता लिहिली असें हनुमंतस्वामी रामदासचरित्रांत लिहितात. पण यांची उपलब्ध कविता ४०००० होईल.

यांचे अनेक शिष्य होते. त्यांपैकीं साम्राज्य वामन, विश्वनाथ वगैरेंनीं उत्तम काव्यें केलीं आहेत.

गिराबाई होत्या तोंपर्यंत यांचें अग्निहोत्र होतें, पण त्या निवर्तल्या तेव्हां यांनीं संन्यास घेतला.

यांचे प्रमुख ग्रंथ--( कृष्णाश्रयाच्या विनंतीवरून ) यथार्थदीपिका ( बावीस हजार ओव्यांची गीताटीका ), निगमसार ( वेदान्त स. १६७३ ), अपरोक्षानुभूति ( स. १७७५ ) अनुभूतिलेश. आख्यानें—रामजन्म, कंसवध, हरिविलास, कात्यायनीव्रत, जलक्रीडा, जटायुस्तुति, भीष्मप्रतिज्ञा. भाषान्तरें--शतकत्रय ( शृंगार, नीति व वैराग्य ), गंगालहरी, समश्लोकी गीता ( कृष्णाश्रयाच्या विनंतीवरून ).

यांना लांबलांब यमकें साधण्याचा नाद असल्यानें ‘ यमक्या वामन ’ असें म्हणत. शतकत्रय व यथार्थ-दीपिका यांचा कर्ता वेगळा असावा, असें पुष्कळांचें म्हणणें आहे.

**वामनभट्ट बाण**—( स. १३७५–१४२५ सुमार ) या संस्कृत कवीला ‘ अभिनव बाण ’ असेंहि म्हणतात. हा कोंडुविडूचा राजपुत्र वेम याच्या दरबारीं होता. याचे ग्रंथ–पार्वतीस्वयंवर ( नाटक ), पार्वतीपरिणय ( नाटक ), शृंगारभूषणभाण, सर्वचरित व वीरनारायणचरित ( यांत याच्या आश्रयदात्याचें चरित्र आहे ). याचीं नाटकें चांगलीं आहेत. कुमारसंभव काव्याची त्यावर छाया आहे.

**वामनराव पटवर्धन**—( मृत्यु स. १७७५ नवं. २ ) पेशवाईंतील एक सरदार. हा गोपाळराव पटवर्धनाचा भाऊ. हा हरिपंत फडक्याचा मदतनीस होता. याच्यामागें पांडुरंगरावाकडे सरदारी आली.

**वाल्टर रेनहार्ट**—हा जनरल सुमरु या नांवानें प्रसिद्ध आहे. बेगम सुमरु ही याची पत्नी होय.

**वालीज**—ही कवयित्री अव्हेयरची बहीण. हिला कारवार जातीच्या लोकांनीं वाढविलें. हिचें तामिळभाषेंत बरेंच काव्य आहे.

**वासवदत्ता**—उज्जयनीच्या चंद्र प्रद्योताची मुलगी व उदयनाची पत्नी.

**वासिष्क**—( स. १०२–१०६ ) हा कनिष्काचा मुलगा असावा. कनिष्क युद्धावर असतां हा उत्तर हिंदुस्थानांत राजप्रतिनिधी या नात्यानें काम करीत असे असें मानलें पाहिजे. याचीं नाणीं सांपडत नाहींत, यावरून हा बापाच्या पूर्वींच वारला असावा. याचे शिलालेख शा. श. २४ आणि २८ मधील मिळाले आहेत ( आर्कियालॉजिकल सर्वे रिपोर्ट, स. १९१०–११, पृ. ४१–४२ ).

**वासुदेव**—( स. ९००–१००० ) संस्कृत कवि. ‘ नलोदय ’ काव्याचा कर्ता. हा ग्रंथ कालिदासाचा नाहीं.

**वासुदेव अनंत**—हा प्रतिनिधींचा मुतालीक होय. हा पेशव्यांचे कैदेंतून पळून बाणकोटास इंग्रजांकडे गेला होता, सबब याच्या गांवाची बारभाईंनीं जप्ती केली.

**वासुदेव कवि**—‘ युधिष्ठिरविजयकाव्य ’ आणि ‘न्यायसारपंजिका’ या ग्रंथाचा कर्ता. हा कवि काश्मीराकडे राहत असे.

**वासुदेव कुशान**—( स. १५२–७६ ) हा हुविष्काच्या नंतर राज्य करूं लागला. यानें स. २२० पर्यंत राज्य केलें. हा कुशान घराण्यांतील शेवटचा राजा होय. कुशान घराणें स. २२६ चे सुमारास लुप्त झालें. याच्या वेळचीं नाणीं पाटलीपुत्र येथें सांपडलेलीं आहेत. याच्या वेळीं कुशानांचें राज्य बंगालचे उपसागरापर्यंत होतें. यमुनेपासून नर्मदा, काश्मीर, पंजाब, ते सिंध, गुजराथ बलुचिस्थान इ. मुलूखहि कुशानांच्या ताब्यांत होते. यानें कांहीं सोन्याचीं नाणीं पण पाडलीं होतीं. याचे कारकीर्दीत स. १६७ मध्यें बाबिलोनियांत प्रथम प्लेग सुरू झाला व तोच त्या वेळीं हिंदुस्थानच्याहि नाशास कारण झाला ( V. Smith, 276, 288, 290, 291, 294 ). हा स. १७६ मध्यें मरण पावला. याच्यानंतर कुशान घराणें नष्ट होऊन अश्वमेधिन् भारशिव हा राज्य करूं लागला ( Hist. of India, Jayswal, p. 7 ).

**वासुदेव जनार्दन हणमन्ते**—हे भोसल्यांचे पिढीजात नोकर. याचा पुत्र बाळकृष्ण.

**वासुदेवमिश्र**—( स. १२७५ सुमार ) हा जयदेव मिश्राचा पुतण्या व शिष्य. आपल्या गुरूच्या ग्रंथांतील दोषसमर्थनार्थ यानें गंगेशोपाध्यायाच्या तत्त्वचिंतामणीवर टीका लिहिली ( हि. इं. लॉ., पा. ४५६ ).

**वासुदेव सार्वभौम**—( स. १४५०–१५२५सुमार ) याचा जन्म बंगाल्यांत नडिआ येथें झाला. याचा पिता महेश्वर विशारद. यानें न्यायशास्त्राचें अध्ययन मिथिला येथें पक्षधरमिश्राकडे केलें. याच्या पांडित्यावर खूष होऊन गुरूनेंच याला ‘ सार्वभौम ’ अशी पदवी दिली.

मिथिलेंतील पंडित आपल्या ग्रंथाची प्रत बाहेर जाऊं नये याची काळजी घेत म्हणून यानें ‘तत्त्वचिंतामणि’ व ‘ कुसुमांजलि ’ हे ग्रंथ तोंडपाठ केले. तसेंच वाटेंत कोणी

धोका देऊं नये म्हणून नडिआस जाण्याचें निमित्त करून बनारसला गेला, व तेथें वेदान्ताचें अध्ययन केलें. नंतर हा नडिआस आला व वरील ग्रंथ स्मरणानें लिहून काढून यानें नडिआस पहिली तर्कशास्त्राची पाठशाळा सुरू केली. तेथें रघुनाथशिरोमणि ( नव्यन्यायशास्त्रावरील ग्रंथकार ) व वैष्णवपंथसंस्थापक चैतन्य हे दोन उत्कृष्ट शिष्य तयार केले. यानें आपलें शेवटलें आयुष्य ओरिसाच्या गजपति प्रतापरुद्राच्या आश्रयाखालीं घालविलें. यानें गंगेशाच्या ग्रंथावर ' सर्वभूषणनिरुक्ति ' नांवाची टीका लिहिली ( हि. इं. लॉ., पा. ४६१–६३ ).

याशिवाय रघुनंदन भट्टाचार्य ( धर्मशास्त्रकार ) व कृष्णानंद आगमवागीश ( तंत्रज्ञ ) हे याचे शिष्य होते.

**वासुपूज्य**—जैनांचा बारावा तीर्थंकर ( तीर्थंकर पाहा ).

**वास्को-द-गामा**—( मृत्यु स. १५२४ ) कालिकतच्या झामोरिनच्या द्वारां याचा हिंदुस्थानांत प्रवेश झाला. पोर्तुगीज सत्तेचा पाया घालणारा हा पहिला इसम होय.

**वांकोजी ढमढेरे**—हा पेशव्यांतर्फे कांहीं दिवस पुण्याचे अमलावर होता. हा जातीचा मराठा असून तळेगांवच्या ढमढेरे या घराण्यांतील होय. यानें पेशव्यांच्या कारकीर्दीत पावळचें ठाणें घेतल्याचा उल्लेख पेशव्यांचे शकावलींत आहे ( मं. वा. इ. श. १८३७ ले. १११ ).

**वांच्छेश्वर**—( स. १८१६ ) सत्याषाढश्रौतसूत्राच्या चोविसाव्या प्रश्नावर 'वांच्छेश्वरी महालिंगाख्या' नांवाची टीका यानें लिहिलेली आहे. फक्त त्या प्रश्नांतील आठव्या प्रश्नावर टीका नाहीं. हा स. १८१६ मध्यें परशुरामभाऊ पटवर्धन यांच्या आश्रयाला होता.

**विक्रम कदंब**—हा दुसऱ्या जयवर्मा कदंबाचा पुत्र. यास विक्रमांक म्हणत.

**विक्रम चोल**—(स.१११८–११३५) हा चोलांपैकीं पहिल्या कुलोत्तुंगाचा चवथा पुत्र होय. युवराज असतां हा वेंगीचा सुभेदार होता. यानें एलोर व कलिंग यांवर स्वारी केली. यानें तेलगू राजा भीम याचा पराभव केला; व १७।१८ वर्षें शान्तपणें राज्य केलें. जयमगोण्ड कवीनें आपलें कलिंगत्तुप्परणी हें काव्य याला अर्पण केलें आहे. हा वैष्णव असल्यानें रामानुजाचार्य हा याच्या राज्यांत येऊन राहिला. याच्यामागून याचा पुत्र दुसरा कुलोत्तुंग गादीवर आला.

**विक्रम गंग**—( बिट्टिदेव पाहा ).

**विक्रम पांड्य**—हा कुलशेखराचा मुलगा. याचे लेख तंजावर, अर्काटच्या दक्षिणेस व चिंगलपट येथें सांपडतात.

२. हा अभिषेक पांड्यांनंतर गादीवर आला. हा जैन होता.

**विक्रम ( देव ) चालुक्य**—(स. १०१२–११२७) हा चालुक्यांपैकीं पहिला कुलोत्तुंग याचा पुत्र. यानें १५ वर्षें राज्य केलें. आपल्या भावाप्रमाणें हाहि युवराज असतांना वेंगी देशाचा राजप्रतिनिधी असावा.

**विक्रमशाहा**—(स. १६७२–७८) जव्हारचा राजा. मोरोपंत पिंगळे यानें याचा पराभव केला तेव्हां हा मोगलांकडे नाशिक जिल्ह्यांत पळाला. पुढें भिल्ल, कोळी वगैरे जमवून ठाणें जिल्ह्यांत उत्तर भागांत धामधूम करूं लागला, व मोगलांतर्फे युद्ध करूं लागला तेव्हां याचा मराठ्यांनीं वध केला.

**विक्रमसिंह गुहिलोत**—( स. ११४८–५८ ) मेवाडचा राजा.

**विक्रमसिंह परमार**—( स. ११४४ ) आबूच्या परमारांपैकीं रामदेवाचा उत्तराधिकारी. हेमचंद्र ( हेमाचार्या )नें आपल्या द्वयाश्रय महाकाव्यांत लिहिलें आहे कीं, गुजराथच्या कुमारपाल सोलंकीनें आजमेरच्या आना ( अर्णोराजा )वर चढाई केली त्या वेळीं आबूचा विक्रमसिंह त्याच्या बरोबर होता ( द्वयाश्रयकाव्य, सर्ग १६ ३३–३४ ). जिनमंडनोपाध्यायानें आपल्या कुमारपालप्रबंधांत लिहिलें आहे कीं, हा लढाईंत आनाच्या बाजूस सामील झाला म्हणून कुमारपालानें याला कैद करून आबूचें राज्य त्याच्या बहिणीचा पुत्र यशोधवल यास दिलें. आबूच्या मंदिरावर वास्तुपालाची प्रशस्ति लावली आहे तींत रामदेवानंतर यशोधवलाचें नांव दिलें आहे. पण हेमचंद्र कुमारपालाच्या वेळचा असल्यामुळें त्याचें म्हणणें निर्मूल म्हणतां येत नाहीं. कुमारपाल सोलंकीनें अजमीरवर दोनदां स्वारी केली, पण मागाहूनच्या जैन लेखकांनीं एकच समजून घोंटाळा केला आहे. पहिली स्वारी वि. सं. १२०१ ( स. ११४४ ) च्या सुमारास झाली, त्या स्वारींत कुमारपाल विजयी झाला असें दिसत नाहीं. दुसरी स्वारी वि. सं. १२०७ ( स. ११५० ) मध्यें झाली तींत तो विजयी झाला. विक्रमसिंहाच्या वेळीं पहिली स्वारी झाली असावी. कारण सिरोही राज्यांतील अजारी गांवीं यशोधवलच्या वेळचा एक शिलालेख वि. सं. १२०२ ( स. ११४५ ) मधील मिळाला आहे त्यांत याला महामंडलेश्वर लिहिलें आहे ( राजपुताना म्युझियम, अजमेर ).

२. (स. १२९९-१३११) आबूच्या परमारांपैकीं प्रतापासहाचा उत्तराधिकारी. याच्या वेळचा एक शिलालेख वि. सं. १३५६ (स. १२९९) मधील सिरोही राज्यांतील वर्माण गांवीं मिळाला आहे. तो तेथें ब्रह्माणस्वामी नांवाच्या सूर्यमंदिराच्या खांबावर कोरला आहे. त्यावर याचा किताब महाराजकुल (महारावळ) असा लिहिला आहे. आबूवरील तेजपालाच्या मंदिरावरील वि. सं. १२८७ मधील दुसऱ्या प्रशस्तीमध्यें आबूच्या परमार राजा सोमसिंहालाहि राजकुल (रावळ) लिहिलें आहे. त्यावरून मेवाडच्या राजांप्रमाणें यांनांहि हे किताब धारण केले असें दिसतें. याच्या वेळीं जालोरच्या चौहाणानें याच्या राज्यांतील पश्चिमेकडील भाग घेतला व याच्या अंतसमयीं किंवा पुढें वि. सं. १३६८ (स. १३११) च्या सुमारास राव लुंभानें यांची राजधानी चंद्रावती घेऊन हें राज्य नाहींसें केलें. या वंशापैकीं कृष्णराज (कान्हडदेव) दुसऱ्याचे वंशज गुजराथेंत दांता येथें आहेत.

**विक्रमांकदेव चालुक्य**—(स. १०८०) दक्षिणेंतील कल्याणीचा चालुक्यवंशीय प्रसिद्ध राजा. याचाच मंत्री मिताक्षराकार विज्ञानेश्वर होय.

**विक्रमादित्य**—ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकांत विक्रमादित्य नांवाचा राजा होऊन गेला, याला निश्चित प्रमाण सांपडत नाहीं. याचा एकहि शिलालेख अद्याप उजेडांत आला नाहीं. हालाच्या प्राकृत 'सत्तसई' मध्यें विक्रमादित्याच्या दातृत्वाचा, कथासरित्सागर व बृहत्कथामंजरी यांमध्यें याच्या भूतवेतालादिकांवर मिळविलेल्या विजयाचा व जैनांच्या कालकाचार्य कथानकामध्यें यानें केलेल्या शकांच्या पराभवाचा उल्लेख आहे. पण हे सर्व ग्रंथ ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकानंतर कित्येक शतकांनीं झाले आहेत. त्यामुळें त्यांचा पुरावा म्हणून महत्त्व कमी झालेलें आहे. आतांपर्यंत विद्वानांनीं तत्कालीन इतिहासाची जी संगति लावली आहे त्यांत विक्रमादित्याला कोठेंहि निश्चित स्थान लाभत नाहीं.

ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकांत शकांनीं हिंदुस्थानावर स्वारी करून काठेवाड, माळवा, महाराष्ट्र, कोंकण इत्यादि प्रांत आपल्या अंमलाखालीं आणले होते यांत संशय नाहीं. कारण त्यांचा एक क्षत्रप नहपान व त्याचा जांवई ऋषभदत्त (उषवदात) याचे लेख नाशिक, कार्ले वगैरे ठिकाणीं सांपडले आहेत. त्यांत त्या प्रकारचें वर्णन आहे. पण या नहपानाचा पराभव करून ज्यानें शकांना या प्रांतांतून पिटाळून लावलें त्या गौतमीपुत्र सातकर्णीनें विक्रमादित्य ही पदवी धारण केल्याचें त्याच्या कोरीव लेखांवरून दिसत नाहीं. तसेंच एखादा संवत् स्वतःच्या नांवानें सुरू केल्याचेंहि दिसत नाहीं.

तसेंच प्रसिद्ध असलेल्या विक्रमसंवत्चा विक्रमकाल या नांवानें प्रथम उल्लेख नवव्या शतकांत आला. या ठिकाणींहि विक्रमपदानें 'विक्रमादित्य' हा अर्थ विवक्षित आहे काय याबद्दल संशय आहे. वि. सं. १०५० मध्यें लिहिलेल्या अमितगतीच्या सुभाषितरत्नसंदोहांत प्रथम शकाच्या नांवांतील 'विक्रम' हा शब्द विक्रमादित्य नृप या अर्थीं निःसंदिग्ध रीतीनें योजिलेला आढळतो. प्रो. कीलहॉर्न यानें या शकाच्या अनेक मितयांचें निरीक्षण करून असें अनुमान काढलें आहे कीं, हा शक कोणी विक्रमादित्यानें सुरू केला नसून या शकाचा वर्षारंभ शरदृतूंत असल्यानें पराक्रमाचा काळ म्हणून विक्रमशक असें त्याचें नांव पडलें, असें हर्षचरितादि ग्रंथांत म्हटलें आहे (यशोधर्मदेव पाहा).

**विक्रमादित्य गर्दभिल्ल**—(ख्रि. पू. ५७) उज्जयनीचा जो गर्दभिल्ल राजा त्याचा हा मुलगा होय. हा आपल्या बापानंतर उज्जैनीच्या गादीवर आला. गादीवर आल्यावर यानें आपल्या बापाच्या वेळीं शक राजांनीं जिंकलेला प्रदेश परत मिळविला आणि उज्जयनी येथें आपल्या घराण्याची स्थिरता केली.

या वेळीं याच्या दरबारीं, जैनांचा वाङ्मयविशारद सिद्धसेन दिवाकर होता. त्यानें (सिद्धसेन दिवाकरानें) विक्रमादित्य राजाचें धर्मांतर केलें, असा जैनांनीं उल्लेख केला आहे. सिद्धसेन दिवाकरानें विक्रमादित्याचें महावीरानंतर ४७० वर्षांनीं धर्मांतर केलें व हळुहळूं याच्या कारकीर्दींत जैनधर्माचा फैलाव होऊं लागला. हा विक्रमसंवत् सुरु करणारा असण्याचा संभव आहे. पण याला समकालीन निर्विवाद आधार नाहीं.

**विक्रमादित्य गंग**—(स. १०५५) हा गंगांपैकीं राजराजाचा पुत्र. बंकापूर शिलालेखावरून याचा काळ स. १०५५ हा निश्चित ठरतो. याला परमाडि (परमर्दि) असें म्हणत. हा बनवासी व गंगवाडी येथें राज्य करीत असे.

**विक्रमादित्य गुत्त**—(स. १२१३ सुमार) गुत्त घराण्यांतील आहवादित्य वीराचा पुत्र. याचें राज्य धार व म्हैसूर प्रांतांत होतें. या नांवाचे तीन राजे या घराण्यांत झाले.

**विक्रमादित्य गुहिलोत**—( स. १५३१–३६ ) रत्नसिंहाला मूल नसल्यामुळें हा त्याचा भाऊ त्याच्या मागून गादीवर आला. संग राण्यानें रणथंभोरची जहागिर याला दिली होती. हा वि. सं. १५८८ ( स. १५३१ ) मध्यें गादीवर बसला. हा राज्य चालविण्यास अगदीं नालायक होता. यानें सात हजार पहिलवान नोकरीला ठेविले. त्यांच्या शक्तीवर याचा फार विश्वास होता. त्यामुळें हा सरदारांची थट्टा करी. अशा स्थितींत जवळचीं विश्वासूक व पराक्रमी माणसें नष्ट होणें स्वाभाविक आहे.

माळव्याचें राज्य गुजराथच्या बहादुरशाहाला मिळाल्यामुळें तो बलिष्ठ झाला होता. त्यानें आपल्या मांडू येथील अधिकाऱ्यांच्या साहाय्यानें चितोडवर स्वारी केली तेव्हां राजमाता कर्मवतीनें बरांच मुलूख देऊन व मांडलिकता स्वीकारून तह घडून आणला. पण यामुळें याच्या वर्तनांत कांहींच सुधारणा झाली नाहीं. अनेक सरदार बहादुरशहाला जाऊन मिळाले. याच वेळीं मुहम्मदजमा याला आश्रय देऊन त्यानें हुमायुनाशीं विरोध सुरू केला. तातारखानाच्या नेतृत्वाखालीं हुमायुनाशीं दिलेल्या लढाईंत त्याचा पराजय झाला. तेव्हां त्याला चितोडसारख्या सुरक्षित किल्ल्याची फार जरूरी वाटूं लागली म्हणून त्यानें चितोडवर पुनः स्वारी केली. तिकडून हुमायूनहि त्यावर ग्वाल्हेरपर्यंत चालून आला होता. त्याला धर्मयुद्धाच्या सबबीवर तेथेंच त्यानें थांबविलें. इकडे राजमाता कर्मवतीनें सर्व रजपुतांना चितोडच्या संरक्षणाविषयीं विनंति करून देशभक्तीनें प्रेरित केलें, याला सुरक्षिततेकरितां बुंदीला पाठवून दिलें व तात्पुरता रावत बाघसिंगाला महाराणा केलें. पण शत्रूचें बळ वाढल्यामुळें बीकाखोहच्या बाजूची पंचेचाळीस हात भिंत सुरुंगानें उडाली. राजमाता कर्मवतीसुद्धां सर्व स्त्रियांनीं जोहार केला. अनेक रजपूत कामीं आले व शेवटीं किल्ला बहादूरशहाच्या ताब्यांत गेला. पण हुमायून येतो आहे असें पाहतांच थोडी सेना चितोडवर ठेवून आपण सर्व सेनेसह हुमायूनकडे वळला. मन्दसोरपाशीं युद्ध होऊन बहादुरशाहा मांडूकडे पळाला व शेवटीं पाठलागामुळें दीव बेटांत पोर्तुगीजांच्या आश्रयाला गेला, व परत येतांना तो मारला गेला.

बहादुरशहाच्या पराजयाची बातमी ऐकतांच रजपुतांनीं पुनः चितोड ताब्यांत घेतला पण शेवटीं सांगाचा थोरला भाऊ पृथ्वीराज याच्या रखेलीच्या पोरानें याला विश्वासघातानें ठार केलें. उदयसिंहालाहि तो मारणार होता, पण पन्ना नांवाच्या दाईनें त्याला वांचविलें.

**विक्रमादित्य ( पश्चिम ) चालुक्य**—( स. ६५५–८१ ) हा पश्चिम चालुक्यांपैकीं दुसऱ्या पुलकेशीचा तिसरा पुत्र. दुसऱ्या पुलकेशीनंतर पल्लव, पांड्य, चोल व केरल यांनीं बंड केलें. त्यांत कांहीं काळपर्यंत त्यांना जय मिळाला. पण यानें त्यांचा पराजय करून व कांची घेऊन आपल्या पूर्वजांची गादी मिळवली. याला सत्याश्रय व रणरसिक या पदव्या होत्या. सेन्द्रकाचा राजा याचा मांडलिक असल्याबद्दल एका शिलालेखांत निर्देश आहे. याचा पुत्र युद्धमल्ल ( पहिला ) ऊर्फ विनयादित्य ( सत्याश्रय ) हा बापामागून गादीवर आला.

२. ( स. ७३३–४६ ) हा पश्चिम चालुक्यांपैकीं विजयादित्याचा पुत्र. हा आपण 'पल्लव राजास मारून कांचीमध्यें प्रवेश केला' असें म्हणतो व त्याचप्रमाणें एका शिलालेखांत यानें कांची येथील राजास तीन वेळ जिंकलें, असा उल्लेखहि आढळतो. यानें पांड्य, चोल, केरल व कदंब यांना जिंकलें होतें. याच्या म्हणण्याप्रमाणें यानें कांची येथील राजा नन्दिपोतवर्मा यास ठार मारून कांचींत प्रवेश केला होता. तेथें यास पूर्वीचा राजा नरसिंहपोतवर्मा यानें केलेलीं पुष्कळ कारागिरीचीं कामें आढळलीं, असें एका ठिकाणी म्हटलें आहे. याच्या राणीचें नांव लोकमहादेवी किंवा त्रैलोक्यमहादेवी असें होतें, आणि ती हैहयराजकन्या होती. याच्यानंतर याचा पुत्र कीर्तिवर्मा दुसरा गादीवर आला. याच्या वेळीं डळमळीत झालेली राजसत्ता पुढें दुसऱ्या तैलपानें पुनः सावरली.

३. ( स. ९०० सुमार ) पश्चिम चालुक्यांपैकीं पहिल्या तैलानंतरचा राजा व पहिल्या तैलाचा मुलगा.

४. ( स. ९५० सुमार ) पश्चिम चालुक्यांपैकीं पहिल्या अय्यणाचा मुलगा. चेदीचा राजा लक्ष्मण याची मुलगी बोंथादेवी ही याची पत्नी होय.

५. (स. १००८–१८) कल्याणीच्या पश्चिम चालुक्यांपैकीं दशवर्मा ( यशोवर्मा ) चा पुत्र. याच्या मातेचें नांव भाग्यवती. त्रिभुवनमल्ल असहि हा आपणांस म्हणवीत असे. याचें मूळ नांव विभुविक्रम.

६. ( स. १०७६-११२६ ) हा पश्चिम चालुक्यांपैकीं दुसऱ्या सोमेश्वराचा भाऊ व पहिल्या सोमेश्वराचा पुत्र. यास परमादिकलिविक्रम ऊर्फ दुसरा त्रिभुवनमल्ल विक्रम क म्हणत. यानें कदम्बांचा कांहीं मुलूख घेतला. यानें चालुक्यविक्रमशक फाल्गुन शुद्ध पंचमी शके ९९७ (तारीख १४ फेब्रु. स. १०७६ ) रोजीं चालू केला. यानें राज्यारोहण केल्यावर लगेच वरील आपला शक सुरू केला. पण

याच्या मृत्यूनंतर तो नाहींसा झाला. यानें आपली मुलगी मैललदेवी ही जयकेशी कदंब राजास देऊन आपण चोल-राजकन्येशीं विवाह केला. यानें पुष्कळ लढाया मारल्या. याला आपल्या शत्रूंप्रमाणें भाऊबंदांबरोबरहि नेहमां युद्ध करावें लागलें. द्रविड, पांड्य, कोंकण, होयसळ या राजांचा यानें पराभव केला. याची राणी मलयमतीदेवी ही केरेयूर प्रांतावर स. १०९५ च्या सुमारास राज्य करीत होती, व राणी लक्ष्मीदेवी, याच्या सावलदेवी, जक्कलदेवी, चंदलदेवी आणि माळलदेवी इत्यादि बायका होत्या.

हा स. १०५५ च्या सुमारास आपल्या बापाच्या कारकीर्दीत बनवासीच्या सुभेदारीवर होता.

यानें यशस्वी अशा पुष्कळ स्वाऱ्या दक्षिणेंत केल्या. चोलांचा पराभव करून यानें वेंगी, चक्र-कोत्त (चक्र-कोट्ट) वगैरे प्रांत काबीज केले. यानें माळव्याच्या राजास मदत करून त्याचें राज्य ऊर्जितावस्थेस आणण्याचा प्रयत्न केला. याशिवाय यानें मध्य बंगाल व आसाम मध्यें मोहिमा केल्या असें म्हणतात (B.).

याच्याबद्दल बिल्हणकृत विक्रमांकदेवचरित या काव्यांत पुष्कळ माहिती मिळते. याच्या पदरीं मिताक्षराकार विज्ञानेश्वर होता.

**विक्रमादित्य पूर्व चालुक्य**—(स. ९२५--२६) चालुक्य-भीम पहिल्याचा हा मुलगा होय.

यानें (तैलपास) (चालुक्य-भीमाचा चुलता) ठार मारून आपण गादीवर बसला. यानें अकरा महिने राज्य केलें. स. ९२६ मध्यें पहिल्या अम्मराजाचा मुलगा भीम यानें याला राज्यावरून हाकून दिलें.

**विगताशोक**—(कुनाल पाहा).

**विग्रहपाल**—(स. ८५०–७५ सुमार) हा बंगालच्या पाल घराण्यांपैकीं राजा असून हा आपला चुलता देवपाला-नंतर गादीवर आला. कारण तो निपुत्रिक असावा. याचा विवाह हैहयकुलांतील लज्जा नांवाच्या राजकन्येशीं झाला असें भागलपूर लेखावरून दिसतें (म. यु. भा. ३, पा. २३३). याचा पुत्र नारायण.

२. (स. ९५०–७६ सुमार) हा दुसऱ्या गोपाळचा पुत्र. याचें गांगेय कलचुरीशीं युद्ध झालें व त्यानें मिथिला घेतली.

३. (स. १०५९–८०) हा बंगाल्यांतील पाल घराण्यांपैकीं नागपालाचा मुलगा. हा स. १०५९ मध्यें गादीवर आला. चेदीचा कर्ण, प्रतिहार सम्राटांच्या उत-रत्या काळांत आपली सत्ता बनारसच्या पूर्वेस विशेषतः चंपारण्यांत वाढवीत होता. त्याचा पराभव यानें केला. याचा 'आमगच्छी' येथील शिलालेख प्रसिद्ध आहे. त्यावरून पाल घराण्याची वंशावळ ठरते. तीच वंशावळ व वर्ष सर्वत्र आधारभूत आहेत. 'आमगच्छी' आतांपर्यंत दुरुस्त होत तीनदां प्रसिद्ध झाली आहे (इंडि अँटि. १४, पा. १६२; इंडि अँटि २१, पा. ९७,). यास कर्णानें आपली मुलगी दिली होती.

हा स. १०८० त मरण पावला. याला महीपाल दुसरा, सुरपाल दुसरा व रामपाल असे तीन मुलगे होते.

**विग्रह प्रतिहार**—(स. १२१० सुमार) याला लाल्हणदेवीपासून मलयवर्मा झाला. याचें म्लेच्छांशीं युद्ध झालें होतें तें कुतुबुद्दीन ऐबकशीं असावें.

**विग्रहराज चोहान**—चौहानवंशांतील एक राजा. यानें 'हरकेलि' नांवाचें नाटक लिहिलें आहे. हें दगडा-वर खोदलेलें 'ढाई दिनके झोपडे' या जागेवर सांपडलें आहे. तें सध्यां राजपुताना म्युझियम, अजमेर, येथें सुरक्षित ठेवलें आहे. तें अपूर्ण आहे.

**विजय**—(स. २०२-२०८) एक राजा (भांडार-कर पा, ५०).

**विजय चंदेल्ल** (स. ८७०-८९०) बुंदेलखंडांतील चंदेल्ल घराण्यांतील राजा. नन्नुकानंतर यानें राज्य केलें असावें. पण धंग राजाच्या लेखावरून नन्नुकानंतर जयशक्ति व विजयशक्ति यांनीं अनुक्रमें राज्य केलें व ते दोघेहि भाऊ होते. परंतु हर्षाच्या एका लेखांत नन्नुकाच्या पुढच्या राजाचें नांव जेज्जक (जयशक्ति) असें दिलें आहे.

२. (स. १३९९-१४२३) म्हैसूर संस्थानचा मूळ पुरुष. याच्यानंतर याचा मुलगा हिरेबेट्टद चामराज (हिरे-बेत्तड चाम १ ला) हा गादीवर आला.

**विजयजाट**—(स. १५०० सुमार) भरतपूर संस्थानच्या बालचंदाचा हा पुत्र होय. हा व याचा भाऊ सिजय हे दोघेहि बालचंद यास एका जाट राखेपासून झाले होते. त्यामुळें रजपूत लोक त्यांना जातींत घेईनात. तेव्हां त्यांनीं सिनसिनीचे जाट हें नांव धारण केलें. हल्लींचे भरतपूरचे संस्थानिक याचेच वंशज होत.

**विजयगुप्त**—(जन्म स. १४४९) बंगाली कवि. बाकरगंज जिल्ह्यांतील फुलश्री गांवीं वैद्यकुलांत पिता सनातन व रुक्मिणी यांच्यापासून जन्म झाला. याचें 'मनसासंगल' (रयणी) काव्य फार पवित्र मानलें जातें. हें काव्य गाऊन रात्रीं जागरण केलें जातें (क. कौ. ७).

**विजयगोंड चोल**—(स. १२६६ सुमार) एक राजा.

**विजयचंद्र गाहडवाल**—( स. ११५५–७० ) हा कनोजच्या गाहडवाल घराण्यापैकीं गोविंदचंद्राचा मुलगा. पृथ्वीराजरासोमध्यें याचें नांव विजेपाळ असें दिलें आहे, व यानें दिग्विजय केला असें म्हटलें आहे. याचेंहि हम्मीराशीं स. ११६८ मध्यें युद्ध झाल्याचें वर्णन आहे. त्यांत यानें बापापेक्षांहि हंमीराची खोड अधिक जिरवली असें दिसतें. याच्या वेळीं हंमीर म्हणजे खुश्रु, हा घोरीच्या भीतीनें गझनी सोडून लाहोर येथेंच येऊन राहिला होता ( स. ११५२ ). गझनीच्या राजवंशास या वेळीं उतरती कळा लागून तो अंताच्याजवळ पोहोंचला होता. याच्या मागून याचा पुत्र जयचंद्र गादीवर बसला. अजमीरच्या चाहमानांनीं कनोजच्या गाहडवालापासून याच्या वेळींच सम्राट्पणाचा मान हिसकावून घेतला असावा असें दिसतें. कारण, अजमीरच्या विग्रहपालानें दिल्ली जिंकून तेथें आपला लेख स. ११६३ मध्यें खोदविला आहे. त्यांत अशी फुशारकी मारली आहे कीं, विग्रहपालानें हिमालय व विंध्य यांतील प्रदेश जिंकून आर्यावर्तास म्लेच्छांपासून पूर्ण मुक्त केलें. याचा दिग्विजय स. ११६२ च्या पूर्वी झाला असावा. याचा राज्यारंभ स. ११५५ मध्यें होऊन याचे विस्तृत विजय स. ११५५–११६० पर्यंत मानले पाहिजेत ( पा. ३३० ).

**विजयध्वज**—(स.१५००सुमार) भागवताचे संस्कृत भाषेतील द्वैतमताचे टीकाकार. हे मध्वाचार्यांनीं स्थापलेल्या आठ मठांपैकीं पेजावर मठाचे अधिपति. यांच्या टीकेचें नांव ‘पदरत्नावलि’. ती ‘विजयध्वजी’ या नांवानें प्रसिद्ध आहे. आश्चर्य वाटण्यासारखी गोष्ट म्हणजे श्रीधरी भागवतापेक्षां यांचें भागवत मूळांतच फार वेगळें आहे. श्रीधरी भागवताच्या दशमस्कंधाचे नव्वद अध्याय असून ३९४६ श्लोक आहेत. पण विजयध्वजी भागवताच्या दशमस्कंधांतील अध्याय एक्शेंतीन असून एकंदर श्लोकसंख्या ४३७० आहे. श्रीधरी प्रतींतील पहिलाच अध्याय या प्रतांत दोन अध्यायांत विभागला आहे. श्रीधरी प्रतींतील १३, १४, १६ या अध्यायांतील ब्रह्मस्तुति, श्रीकृष्णकृत ब्रह्मदेव-गर्वपरिहार इत्यादि कथाभाग विजयध्वजी प्रतांत मुळींच आढळत नाहीं. गो–गोपांना पळवून कृष्णानें गो–गोपांचें रूप घेऊन एक वर्षपर्यंत वृंदावनांत वावरणें, पुढें ब्रह्मयाचा गर्वपरिहार होऊन त्यानें कृष्णाची स्तुति करणें वगैरे श्रीधरी प्रतींतील भाग या भागवतांत नाहीं. या भागवताचें समश्लोकी मराठी भाषांतर मल्लारी अंबाजी नांवाच्या कोणी गृहस्थानें केलें असून तें अर्धवट स्थितींत उपलब्ध आहे. या मल्लारी अंबाजीनें मध्वाचार्यांच्या ‘भारत तात्पर्यनिर्णय’ या संस्कृत ग्रंथाचें मराठींत भाषांतर केलें आहे. मल्लारी अंबाजी वामन पंडिताचा रामकालीन असावा. (ही माहिती ‘महाराष्ट्र वाङ्मयांत वैष्णवग्रंथाचें अस्तित्व’ या श्री. ना. बनहट्टी यांच्या रत्नाकरांतील ( १९२७ ) लेखावरून घेतली आहे. )

## विजयनगरचीं राजघराणीं

( १ ) **संगमवंश**—१ हरिहर १ ला ( स. १३३६–१३५५ ), २ बुक्क १ ला ( बायका जोम्मा, गौरी. स. १३५५–१३७७ ), ३ हरिहर २ रा ( बायका : मल्ला, पम्मा. स. १३७७–१४०४ ), ४ विरूपाक्ष १ ला ( स. १४०४–५ ), ५ बुक्क २ रा ( बायको तिप्पाम्बा. स. १४०५–१४०६ ), ६ देवराय १ ला ( बायका : हेमाम्बिका, मल्लयव्वी. स. १४०६–१४२२ ), ७ ( बुक्क ३ रा ऊर्फ वीर )विजयराय ( बायको : नारायणी, यानें कांहीं महिने राज्य केलें. स. १४२२ ), ८ देवराय २ रा ऊर्फ प्रौढदेवराय ( बायका : सिद्धला, पोन्नला. स. १४२२–४६ ), ९ मल्लिकार्जुन ( स. १४४६–१४६५ ), १० विरूपाक्ष २ रा ( राज्याभिषेक स. १४६५–८६ याला साळुव नरसिंहानें पदच्युत केलें. )

(२) **साळुववंश**—१ साळुव नरसिंह १ ला ( स. १४८६–१४९१ ), २ इम्मडी नरसिंह ऊर्फ तिम्म किंवा तिम्मय. स. १५०४ मध्यें नरस नायकानें पदच्युत केलें.

(३) **तुळुववंश**—१ नरसनायक (बायका : तिप्पाजी, नागला ओबाम्बिका, स. १५०४ ), २ वीर नरसिंह (स. १५०४–१५०९ ), ३ कृष्णदेवराय ( स. १५०९–३० ), ४ अच्युतराय (स. १५३०–४२ ), ५ व्यंकटराय ( खून १५४२ ), ६ तिरुमल्ल ( स. १५४३ आत्महत्या ). ७ सदाशिवराय ( स. १५४३–१५७० ).

(४) **आराविडुवंश**—श्रीरंग, १ तिरुमल १ ला ( रामरायाचा भाऊ. स. १५७०–१५७२ ), २ श्रीरंग १ ला (बायका : तिरुमला, कृष्णा. स. १५७२–८६ ), ३ व्यंकटपति (स. १५८६–१६१४), ४ श्रीरंग २ रा (स. १६१४), ५ राम २ रा ( स. १६१५–३३ ), ६ पेद्द व्यंकट २ रा ( बायको : बंगारा. स. १६३३–४५? ), ७ श्रीरंग ३ रा ( स. १६४४–७५ ), ८ व्यंकट ३ रा ( १६७८–९० ), ९ श्रीरंग ४ था ( स. १६९२ ), १० व्यंकट ४ था ( स. १७०७–१७१६ ).

**विजयपाल चंदेल्ल**—(स.१०३०–४०)हा विद्याधरानंतर गादीवर आला. याच्या बायकोचें नांव भुवनदेवी असें होतें. याचा पुत्र देववर्मा होय.

**विजयपाल प्रतिहार**—( स. ९६० ) रघुवंशी प्रतिहारांपैकीं देवपालाचा पुत्र. याच्या वेळचा एक शिलालेख अलवर राज्यांत राजोरगड येथें मिळाला आहे. तो वि. सं. १०१६ (स. ९६०) मधील आहे. त्या वेळीं याचा सामंत गुर्जर ( गूजर ) गोत्रांतील प्रतिहार तेथील स्वामी होता.

२. ( स. ९५५–९९० ) याच्या वेळीं कच्छवाह वज्रदामन् यानें देवपालाचा ग्वाल्हेर प्रांत घेतला. हा देवपालाचा भाऊ होय. याच वेळीं सबक्तगीनानें हिंदुस्थानावर स्वारी करून जयपाळाचा पराभव केला.

**विजयरंग चोकनाथ**—( मृत्यु स. १७३१ ) तेलगू कवि. याच्या वेळीं स.१७०९ मध्यें दक्षिणेंत भयंकर दुष्काळ पडला व महापूर आले. हा निपुत्रिक मरण पावला.

**विजयरक्षित**—( स. १२२५ ) यानें 'माधवनिदान' नांवाच्या वैद्यकग्रंथावर एक टीका लिहिली आहे. यानें 'योगरत्नमालाकार' गुणाकर याच्या मताचा उद्धार केला आहे.

**विजयराघव**—( स. १६४० सुमार ) तंजावरचा राजा. शहाजीकडे तंजावर येण्यापूर्वी याच्याकडे होतें. नंतर विजापूरकरांकरितां ते त्यानें जिंकून घेतलें.

**विजयराज पश्चिम चालुक्य**—(स. ५७२ सुमार) बुद्धवर्म्याचा पुत्र. याला विजयवर्मा म्हणत.

**विजयराज सोलंकी**—( स. ६४ ) गुजराथच्या मूळराज सोलंकीच्या पूर्वी हा होऊन गेला. गुजराथमधील खेडा येथें याचें एक दानपत्र मिळालं आहे. त्यांत जयसिंहराजाचा मुलगा बुद्धवर्मा व बुद्धवर्म्याचा पुत्र विजयराज असा वंशक्रम दिला आहे. या विजयराजानें कलचुरि संवत् ३८४ ( स. ६४३ ). वैशाख शुद्ध १५ ला जंबूसरच्या ब्राह्मणांना काशाकूलप्रदेशांतील ( तापीच्या उत्तरकडील प्रदेश असावा ) संधियर गांवच्या पूर्वेकडील परियर गांव दिला, त्या दिवशीं त्याचा मुक्काम विजयपूर येथें होता ( इंड. अँटि. ७. २४८–४९ ). हें विजयपूर म्हणजे सध्यांचें सुरत जिल्ह्यांतील ओरपाड तालुक्यांतील संधिएर होय. गुजराथमधील लाट प्रदेशावर कलचुरींचें राज्य बराच काल असल्यामुळें तेथें कलचुरि संवत् प्रचारांत होता. त्यामुळें त्यांच्यामागून तेथें राज्य करणाऱ्या सोलंकी किंवा गुर्जर राजांच्या ताम्रपटांत पुष्कळ ठिकाणी कलचुरिसंवत् वापरलेला आढळतो. विजयराज नांवावरून व लावलेल्या पदव्यांवरून हा सोलंकींपैकीं असावा असें दिसतें. पण वरील ताम्रपटांतील जयसिंहाचा बदामीच्या राजाशीं काय संबंध होता हें समजत नाहीं. पण कालदृष्ट्या बदामीच्या जयसिंहाहून हा अगदीं वेगळा आहे, हें स्पष्ट आहे. बदामीचा प्रसिद्ध राजा दुसरा पुलकेशी यानें गुजराथ जिंकलीं होती. तसेंच त्याच्याहि पूर्वी त्याचा पूर्वज मंगलीश यानें लाट देशावर राज्य करणाऱ्या कालचुरींचें राज्य घेतलें होतें. त्यावरून असें अनुमानितां येतें कीं, या दोघांपैकीं कोणीतरी आपल्या वंशजांना गुजराथेंत जहागीर दिली असावी. विजयराजानंतर झालेल्या पुरुषांची माहिती मिळत नाहीं.

जयसिंहराज–बुद्धवर्मा–विजयराज.

**विजयराय संगम**—( स. १४२२ ) देवरायाचा मुलगा रामचंद्र उदयगिरीचा सुभेदार होता. परंतु या त्याच्या भावानें त्याचें राज्य लवकरच घेतलें. हा आपणास तिसरा बुक्क असें म्हणवी.

**विजयवर्मा कदंब**—हा सत्यवर्म्याचा पुत्र.

**विजयसिंह गुहिलोत**—( स. ११०७–१११६ ) मेवाडच्या गादीवर हा वैरिसिंहानंतर आला. याचें नांव राणपूरच्या लेखांत वीरसिंह, कुंभलगडच्या प्रशस्तींत वैरसिंह व रावळ समरसिंहाच्या आबूवरील प्रशस्तींत तसेंच भेराघाट व करणवेल येथील लेखांत विजयसिंह असें आढळतें. याला अल्हणदेवी नांवाची कन्या होती. तिचा विवाह चेदिदेशच्या कलचुरि गयकर्णदेवाशीं झाला होता. उदयपुरापासून चार मैल असलेल्या पालडी गांवीं कार्तिक स्वामीच्या मंदिरावर याच्या वेळचा एक शिलालेख वि. सं. ११७३ ( स. १११६ ) ज्येष्ठ वद्य ३ चा आहे. तो बहुतेक आहाडहून आणून येथें लावला असावा ( राजपुतांना म्यु. १५–१६ पृ. ३. १ ). तसेंच याचें दोन पत्र्यांवरील एक ताम्रपत्र मिळालें आहे. त्यांतील संस्कृत लेखांत गुहदत्तापासून विजयसिंहापर्यंत वंशावळ दिली आहे. त्यावरील वि. सं. ११६४ ( ११०७ ) हा असावा.

**विजयसेन**—( स. १११९–५८ ) हा बंगाल्यांतील सेन घराण्यापैकीं हेमंतसेन व यशोराणी यांचा पुत्र. याची मूळ राजधानी मयूरभंजसंस्थानांतील काशीपुरी. पण यानें पालांना जिंकल्यावर गोदावरीजवळील विजयनगर राजधानी केली. हा हिंदुधर्माचा अभिमानी व संस्कृत पंडितांचा आश्रयदाता होता.

**विजयसेन क्षत्रप**—( स. २३९–२५० ) हा दामसेन महाक्षत्रपाचा तिसरा मुलगा. याचीं नाणीं शा. श. १६१–१७२ पर्यंतचीं मिळालीं आहेत. याच्यानंतर याचा धाकटा भाऊ दामजदश्री दुसरा हा अधिकारी झाला.

**विजयादित्य कदंब**—गोव्याच्या पहिल्या जयकेशीचा पुत्र. यानें पट्टीपोंबुच्यपुराच्या शांतरजगदेवाची आई विजलदेवीची बहीण चट्टलदेवीशीं लग्न केलें.

२. गोव्याच्या दुसऱ्या जयकेशीचा पुत्र. याचा भाऊ परमर्दि यानें लक्ष्मीदेव राजाची मुलगी लक्ष्मीदेवी हिच्याशीं लग्न केलें.

**विजयादित्य पश्चिम चालुक्य**—( स. ६९६-७३३ ) पश्चिम चालुक्यांपैकीं युद्धमल्ल ऊर्फ विनयादित्याचा मुलगा.

**विजयादित्य पूर्व चालुक्य**—(स. ७४६-६४) हा पूर्व चालुक्यांपैकीं तिसऱ्या विष्णुवर्धनाचा पुत्र. याला विजयादित्य भट्टारक असेंहि म्हणत..

२. ( स. ७९९-८४३ ) पूर्व चालुक्य घराण्यांतील चवथ्या विष्णुवर्धनाचा पुत्र. यानें गंग व रट्ट ( राष्ट्रकूट ) राजे यांच्याशीं १०८ लढाया केल्या.

याचीं दुसरीं नांवें-त्रिभुवनांकुश व नरेंद्र, मृगराज. याचा समकालीन रट्ट राजा तिसरा गोविंद हा होता.

३. ( स. ८४४-८८ ) पूर्व चालुक्यांपैकीं पांचव्या विष्णुवर्धनाचा मुलगा. यास गुणक असेंहि म्हणत. गंगाच्या मंगीराजाविरुद्ध यानें रट्टास मदत करून त्यास यानें लढाईंत ठार मारलें. तसेंच यानें मालखेडच्या ( राष्ट्रकूट ) दुसऱ्या कृष्णराजाचा पराभव करून त्याची राजधानी जाळली.

४. ( स. ९१८ ) हा पूर्व चालुक्यांपैकीं पहिल्या भीमाचा पुत्र. याच्या बायकोचें नांव मेलांबा. यानें सहा महिने राज्य केलें. यानें कलिंगाच्या राजाला जिंकलें. याला कोल्लभिगंडहि म्हणत.

५. ( स. ९२५ ) पूर्व चालुक्य घराण्यांतील पहिल्या अम्म-राजाचा हा मुलगा होय.

यानें अवघें सहा महिने राज्य केलें. याला ताह (तालप) यानें गादीवरून काढून टाकिलें. परंतु एक महिना राज्य केल्यानंतर ताह यालाहि चालुक्य-भीमाचा मुलगा दुसऱ्या विक्रमादित्यानें ठार मारिलें ( B. ). याचें दुसरें नांव बेट्ट. यानें पिठापुरम येथील घराणें सुरू केलें.

**विजयादित्य शिलाहार**—(स. ११३५-७०सुमार) कोल्हापूरचा शिलाहार. गंडरादित्याच्या मागाहून गादीवर आला.

**विजयालय चोलराज**—( स. ८४६-८० ) गंग-पल्लव-बाण यांनीं वरगुण पांड्याचा पराजय केल्यावर या चोल जहागिरदारानें डोकें वर काढलें. यानें आपल्या चौतीस वर्षांच्या कारकीर्दींत तंजावर, कन्याकुमारी, कांची वगैरे प्रांत हस्तगत करून तंजावरास राजधानी केली. याला परकेसरीवर्मा अशी पदवी होती. याचा पुत्र पहिला आदित्य होय.

**विठा रेणुकानंदन**—( स. १५७८ सुमार ) एक मराठी कवि. हा रेणुका देवीचा उपासक असून यास गोलटगांवकर असेंहि म्हणतात. याच्या गुरूचें नांव रेणुकानंदन असें असून तेंच नांव हा आपल्या नांवापुढें लावी. याचा उल्लेख दासोदिगंबराच्या संतविजयांत आहे. याची रामचरित्रावर भक्ति असून त्यावरच याचीं कांहीं पदें उपलब्ध आहेत ( मं. श. १८३६ वार्षिक ले. ४१ ).

**विठोजी होळकर**—( २ बाजीराव पेशवे व यशवंतराव होळकर पाहा ).

**विठोजी बाबाजी भोसले**—( जन्म स. १५५२ ) हा मालोजी भोसल्याचा कनिष्ठ भाऊ असून शहाजीचा चुलता होय. याचा जन्म वेरूळ येथें स. १५५२ त झाला. विठोजी व मालोजी पुढें देऊळगांव येथें राहूं लागले. तेथें असतांना यांचे वडील बाबाजी मृत्यु पावले. कांहीं काळ हे दोघे बंधु आपलें पाटिलकीचें वतन सांभाळून होते. पुढें हा मातोश्रीचा निरोप घेऊन फलटणच्या निंबाळकरांकडे रोजगारास गेला. बरोबर याचा भाऊ मालोजी हा होता.

हे दोघेहि तरुण मर्द पाहून निंबाळकरांनीं यांस प्रथम बारगिरी सांगितली. निंबाळकर कोल्हापूर प्रांतीं मुलूखगिरीस गेले असतां बरोबर या बंधुद्वयासहि घेऊन गेले होते. या कोल्हापूरच्या स्वारींत या दोघां बंधूंनीं उत्कृष्ट कामगिरी केली; आणि केवळ बारगिराचे छोटे सरदार बनले. इतकेंच नव्हे, पण निंबाळकरांनीं मालोजीस आपला जांवई केलें व १५०० स्वारांचीं मनसब दिली.

विठोजीस आठ पुत्र होते. त्यांचा वंशविस्तार गंगातीरीं वावी, मुंगी, बनसेंद्री, मंजेरी, कोराळे, भांबुरी, व कळस या गांवीं आहे ( म. द. रु. १ ).

**विठोबादादा चातुर्मासे**—( रामचंद्र अनंत बडवे पाहा ).

**विठ्ठल**—( स. १५६३ ) एक हिंदी कवि. हा वल्लभाचार्याचा मुलगा. यानें गादीवर आरूढ होऊन पुष्टिमार्गी कवींपैकीं आठ सर्वोत्तम कवींची निवड करून त्यांना ‘अष्टछाप’ ही संज्ञा दिली.

२. प्रसाद नांवाच्या संस्कृत ग्रंथाचा कर्ता.

३. निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, यांचे वडील.

४. नामदेवाच्या मुलांपैकीं एक.

५. तुकारामाच्या मुलांपैकीं एक.

**विठ्ठल कवि**—(स. १६८० सुमार) याचें संपूर्ण नांव विठ्ठल अनंत क्षीरसागर. वामन पंडिताचा समकालीन असणारा हा मराठी कवि बीडजवळील गौरीपूर गांवचा राहणारा होता. हा देशस्थ आश्वलायन ऋग्वेदी ब्राह्मण. याचा धंदा व्यापाराचा, पण हा सालोसाल पंढरीची यात्रा करीत असे. याचें कुलदैवत विठ्ठल; म्हणून हा आपणांस विठ्ठलदास हें टोपणनांव लावीत असे. याचे रुक्मिणीस्वयंवर, पांचालीस्तवन, सीतास्वयंवर, रसमंजरी, द्रौपदीवस्त्रहरण, विद्वज्जन व बिल्हणचरित्र असे सात ग्रंथ प्रसिद्ध आहेत. यानें प्रत्येक काव्याच्या शेवटीं काव्यांतील श्लोकसंख्या, रचनाकाल व नांव इत्यादि माहिती दिली आहे. निरनिराळीं वृत्तें, लांबलांब यमकें व अनुप्रास साधण्याची यास आवड होती. 'पांचालीस्तवन' व 'द्रौपदीवस्त्रहरण' यांत कांहीं कांहीं सबंध चरणच्या चरण सारखे आढळतात. म्हणून याला चित्रकवि असें म्हणतात. याचें रसमंजरी हें काव्य संस्कृतचें भाषांतर आहे. रसमंजरी मूळ संस्कृतांत भानुदासानें लिहिली आहे.

यानें अनेक कूट श्लोक केले आहेत, असें मोरोपंतांनीं सन्मणिमालेंत याच्यासंबंधीं केलेल्या आर्येवरून दिसतें. शिवाय याचीं बरींच पदें आहेत.

२. (स. १६१४) हा वऱ्हाडांतील कळंबूरचा असून श्रीवत्सगोत्री होता. याची रासक्रीडा प्रसिद्ध आहे.

३. (स. १३७५–१४५०) 'रससिंधु' ग्रंथाचा कर्ता. याचा पिता महादेव. याचें नांव विष्णु महादेव असेंहि आढळतें.

**विठ्ठल दीक्षित**—यानें काशी येथें 'मंडपकुंडसिद्धि' नांवाचा संस्कृत ग्रंथ शा. श. १५४१ फाल्गुन महिना शुक्लपक्ष द्वादशी रविवार रोजीं लिहिला.

**विठ्ठल नरसिंह विंचूरकर**—(स. १८०८–३६) नरसिंह खंडेराव मृत्यु पावल्यावर त्याच्या बायकोनें यास दत्तक घेऊन पेशव्यांकडून सरदारीचीं वस्त्रें देवविलीं. दुसऱ्या बाजीरावानें व बापु गोखल्यानें इंग्रजांशीं लढाई करण्याचें ठरविलें तेव्हां 'लढाई करणें योग्य नव्हे' हें यांनीं परोपरीनें सांगितलें. याचें म्हणणें ऐकलें नाहीं तरी यानें शेवटपर्यंत त्यांना सोडलें नाहीं.

हा जानेवारी स. १८३६ मध्यें मायेशूळाचे आजारानें मरण पावला. यास पांच बायका होत्या. पैकीं लक्ष्मीबाईस दोन पुत्र व तीन कन्या झाल्या. गंगाबाईस रघुनाथराव हा पुत्र झाला.

**विठ्ठल नरसिंह (नाईक सांखोळकर)**—(स. १७०० सुमार) एक मराठी कवि. हा गोव्यांतील केरीचा काश्यपगोत्री गौड सारस्वत ब्राह्मण. हा विद्वान् असून काशीच्या पंडितांकडून याला मानपत्र मिळालें होतें. याची कविता काव्यसंग्रहांत प्रसिद्ध झाली आहे: १ वामनचरित्र आर्या ९५, २ शुकरंभासंवाद आर्या ४९, ३ कबीरकथा, शिवाय सुमारें ६० पदें (म. क. च. भा. २, पा. ११७-१२२).

**विठ्ठल पिलदेव अत्रे**—(स. १६७० सुमार) हा ऋ. दे. ब्रा. होता. हा शिवाजीच्या पदरीं मोठ्या प्रतिष्ठेनें वावरत असे. हा फौजबंद असून 'सुभे मामले' करून असे. चंदीचा किल्ला घेतल्यानंतर तो किल्ला शिवाजीमहाराजांनीं याच्याकडे दिला. "पर्णालाख्यानां"तील याचा पराक्रम वाचकांना वाचण्यासारखा आहे. हा राघोबल्लाळाचा चुलत भाऊ होता (मं. त्रै. श. १८४६ व ५. ले. २).

**विठ्ठल बल्लाळ सुभेदार (परांजपे)**—(स. १८०३ पर्यंत) हा रघूजी भोसल्याचा सरदार होता. रघूजीच्या कारकीर्दीत ज्या अनेक सरदारांनीं पुढें येऊन त्यास राज्यविस्ताराचे कामीं मदत केली त्यांपैकीं हा एक होता. याचा मामा नरहर बल्लाळ रिसबूड. याचा मुलगा गणपतराव सुभेदार आप्पासाहेब भोसल्याच्या धामधुमींत प्रसिद्धीस आला.

**विठ्ठल भालेराव**—(स. १६७८) हा भूपाळगडचा सबनीस होय. ता. १३ डिसें. स. १६७८ रोजीं संभाजी दिलेरखानास जाऊन मिळाल्यावर संभाजीनें भूपाळगड घेण्याचें फर्मान सोडलें. भूपाळगडचा किल्लेदार फिरंगोजी नरसाळा व सबनीस विठ्ठल भालेराव यांनीं गड संभाजीच्या स्वाधीन केला. पुढें शिवाजी कडक शिक्षा करणार याची कुणकुण लागतांच दोघेहि पळून गेले. पण पुढें दोघेहि सांपडले. तेव्हां यास फार मारझोड केली आणि स्वराज्याच्या हद्दीबाहेर घालवून दिलें.

**विठ्ठल महादेव किबे ऊर्फ तात्या जोग**—(मृत्यु स. १८२६ मार्च २९) हा इंदूरच्या सरदार किब्यांचा पूर्वज. यशवंतराव होळकरांचा हा फडणीस होता. यशवंतराव मरण पावल्यावर तुळसाबाईचा हाच कारभारी होता. परंतु हा इंग्रजांस आंतून फितूर आहे अशी तुळसाबाईस शंका आल्यामुळें तिनें यास ता. २४।११।१८१८ रोजीं तुरुंगांत टाकलें. याच्या बायकोचें नांव रखमाबाई असें होतें.

**विठ्ठल सुंदर परशरामी**—(मृत्यु स. १७६३ आगष्ट) हा शुक्ल-यजुर्वेदी माध्यंदिन शाखेचा ब्राह्मण होता.

याचें राहण्याचें गांव संगमनेर. स. १७६२ त सलाबतजंगास कैद करून निजामअलीनें हैदरची गादी बळकावली.

त्याच सुमारास यालाहि त्यानें आपला दिवाण नेमिलें. त्यापूर्वी निजामअलीकडे रामदासपंताच्या वशिल्यानें याचा प्रवेश झाला होता. राघोबा व माधवराव यांच्या भांडणाची संधि साधून मराठ्यांचें राज्य उलथून पाडण्याचा यानें प्रयत्न केला. ही गोष्ट साधण्याकरितां रामराजास नालायक ठरवून जानोजी भोसल्याच्या हस्तें मराठेशाहीचा राज्यकारभार चालवावा व पेशव्यांना हाकलून द्यावें असा बेत यानें योजिला. यांची गणना साडेतीन शाहण्यांत होते. दुसरा शाहणा देवाजीपंत चोरघडे. याच्या मार्फत यानें जानोजीस फितविलें व आपला व्याही गमाजी मुतालिक याच्या मदतीनें प्रतिनिधीस फितविलें, व मोरोबा फडणीस, सदाशिव रामचंद्र शेणवी, आणि गोपाळराव पटवर्धन वगैरे असंतुष्ट मराठे सरदारहि निजामअलीस पेशव्यांविरुद्ध फितुर झाले. त्यांच्या बळावर निजामानें पुण्यावर चाल करून पुणें लुटलें व जाळलें. (मे १७६३). परंतु पुढें जानोजी प्रबल झाल्यास त्याला प्रतिस्पर्धी म्हणून यानें कोल्हापूरकरांशींहि राजकारण लावून ठेविलें. पण त्यामुळें जानोजीस बराच मुलूख देऊं करून राघोबादादाला त्यास निजामअलीच्या पक्षांतून फोडतां आलें. यानंतर पेशव्यांनीं निजामाशीं राक्षसभुवन येथें लढाई केली, तींत विठ्ठलसुंदर मारला गेला (आगष्ट १७६३). हा मोठा बुद्धिमान् व महत्त्वाकांक्षी होता. यानेंच निजामअलीस गादी मिळवून दिली. हा लष्करी डावपेंचांतहि निष्णात होता. विठ्ठलपंतास राजाबहादूर प्रतावंत हा किताब असून निजामशाहींत याची जहागीर 'गणेश' या नांवानें ओळखली जाते.

**विठ्ठल शामराज**—(स. १७७९-९४) अहल्याबाई होळकर यांच्या दरबारीं असलेला पेशव्यांचा वकील. यानें महेश्वर येथून अहल्याबाईच्या दिनचर्येचीं व राजकारणाचीं इत्थंभूत बातमीपत्रें पुण्यास पाठविण्याचा क्रम ठेवला होता. हा स. १७७९ पासून स. १७८३ व स. १७८४ पासून १७९४ पर्यंत महेश्वरदरबारीं होता. त्या वेळचीं उपलब्ध पत्रें कै. रा. ब. द. ब. पारसनीस यांनीं इतिहाससंग्रहांत दोन भागांत प्रसिद्ध केलीं आहेत. त्या पत्रांना 'महेश्वरदरबारचीं बातमीपत्रें' असें त्यांनीं नांव दिलें आहे. तीं त्यांना मेणवली येथील नाना फडणीसाच्या संग्रहांत सांपडलीं. हा पुणें दरबारच्या माहितीचा होता. हा प्रथम नाना फडणीसाकडून राघोबादादाच्या लष्करांतील बातमी आणण्याच्या कामावर होता. पुढें याची अहल्याबाईच्या दरबारीं नेमणूक झाली (महेश्वरदरबारचीं बातमीपत्रें प्रस्तावना).

**विठ्या महार**—(स. १५०० सुमार) हा मंगळवेढ्याचा महार. दामाजीपंत मंगळवेढेकर हा कमाविसदार असतांना दुर्गादेवीचा दुष्काळ पडला. त्या काळांत आपल्या प्रांतांतील गोरगरीबांच्या हालअपेष्टांनीं कळवळून जाऊन त्यानें सरकारी कोठारांतलें धान्य त्यांस देऊन त्यांचे जीव वांचविले. या त्याच्या कृत्याबद्दल तोहमत येऊन बादशाही धरणें आलें. अशा संकटांत दामाजीपंत असतां त्या गांवच्या या महारानें आपल्याजवळ होतें नव्हतें तेवढें सर्व द्रव्य सरकारांत भरून दामाजीपंताच्या नांवची रसीदीची पावती दिवाणांकडून आणून दिली व दामाजीपंताचे प्राण व अब्रू वांचविली.

बेदरच्या बादशाहानें महारांना त्यांच्या हक्काची सनद करून दिल्यानंतर त्याची पुनः उजळणी एकनाथाच्या वेळीं झाली.

राजवाड्यांना सांपडलेल्या महजरांत लिहिलें आहे कीं, 'हे देणें पाछाचें व दामाजीपंताचा हातचा कागद असे.' हा महजर सातारकर महाराजांच्या दप्तरांत सांपडला (मं. चतुर्थ सं., पा. ५३).

यावर मराठी कवींनीं रसभरित आख्यानें लिहिलीं आहेत.

**वित्तेश्वर**—(स. ८९९) हा एक भारतीय ज्योतिषी होता. यानें 'करणसार' नांवाचा ग्रंथ शके ८२१ मध्यें लिहिला. अल्बेरुनीनें याचा उल्लेख केला असून त्याच्याजवळ करणसाराचें एक अरबी भाषांतरहि होतें. वित्तेश्वर काश्मीरकडचा असावा.

**विदुलराय**—रंगनाथस्वामींचे बंधु. यांना अत्यास्वामी म्हणत.

**विद्याधर**—(स. १३०० सुमार) याचा साहित्यशास्त्रावरील 'एकावलि' हा ग्रंथ मुंबईसरकारच्या ग्रंथमालेंत प्रो. क. प्रा. त्रिवेदी यांनीं संपादिला आहे. एकावलीवर मल्लिनाथाची 'तरल' नांवाची टीका आहे. कामशास्त्रावर 'केलिरहस्य' नांवाचा ग्रंथहि यानें लिहिला आहे. उदाहरणें स्वतः विद्याधरकृत असून त्यांत ओरिसाच्या नरसिंह राजाची स्तुति आलेली आहे. हा नरसिंह म्हणजे केसरी नरसिंह (स. १२८२-१३०७) अथवा प्रताप नरसिंह (स. १३०७-१३२७) होय. यांतील कोणीतरी एक राजा विद्याधराचा आश्रयदाता होता, असें दिसतें.

**विद्याधर गंधर्व शिलाहार**—(स. ८००पूर्व सुमार) हा शिलाहारांचा मूळ पुरुष. तगर, ठाणें, व कोल्हापूर हे तीनहि वंश यापासून निघाले.

**विद्याधर चंदेल्ल**—(स. १०२०-३०) हा गंड चंदेल्लानंतर गादीवर आला.

**विद्याधिराज**—शंकराचार्यांचा आजा व शिवगुरूचा पिता.

**विद्यानंद**—( स. ८०० ) दिगंबर जैन आचार्य. ग्रंथ-१ आप्तमीमांसेवर आप्तमीमांसालंकृति टीका, २ अष्टसहस्रीवर टीका, ३ प्रमाणपरीक्षा, ४ श्लोकवार्तिक, ५ आप्तपरीक्षा. याला 'पात्र केसरी' म्हणत. जिनसेनानें आदिपुराणांत याची स्तुति केली आहे.

**विद्यानाथ**—( स. १३०० सुमार ) यानें 'प्रतापरुद्रयशोभूषण' नांवाचा साहित्यशास्त्रावरील सुप्रसिद्ध ग्रंथ केला. तो कुमारस्वामिनच्या रत्नापण नांवाच्या टीकेसह मुंबईसरकारच्या संस्कृतग्रंथमालेंत प्रो. त्रिवेदी यांनीं छापून प्रसिद्ध केला आहे. यांत तेलंगणांतील काकतीय वंशांतील प्रतापरुद्रदेव नांवाच्या राजाच्या वर्णनपर उदाहरणें आहेत. या राजाचें नांव वीरभद्र किंवा रुद्र असेंहि असून एकशिला किंवा अलीकडचें वारंगळ हें त्याची राजधानी होतें. स. १३२३ या वर्षी मुहम्मद तुघ्लकानें त्याला बंदिवान केलें.

यानें नाटकांतील अनेक प्रसंगांचें स्पष्टीकरण करण्याकरितां प्रतापरुद्रावर एक नाटक करूनच आपल्या ग्रंथांत घातलें आहे. हा कविहि होता.

**विद्यानिधि कवि**—( स. १६३० सुमार ) हा दक्षिणी पंडित शहाजहान बादशहाचे वेळीं मोठा प्रसिद्ध असून संन्याशी होता. शहाजहाननें याला 'सर्वविद्यानिधान' अशी पदवी दिली होती. याचा ग्रंथसंग्रह फार प्रचंड होता. 'विद्यानिधान कवींद्र सरस्वती,' अशा ठळक व सुंदर अक्षरावरून काशीबाहेर पसरलेले याच्या संग्रहांतील ग्रंथ अद्यापि हुडकून काढतां येतात. हा जसा मोठा पंडित होता तसा कर्ता पुरुषहि होता. याच्या वेळेस काशी व प्रयाग येथें जाणाऱ्या यात्रेकरूंकडून कर वसूल केला जाई. त्या त्रासांतून यानें आग्रा येथें शहाजहान बादशहाची गांठ घेऊन व आपल्या उत्कृष्ट वक्तृत्वानें शहाजहान व त्याचा पुत्र दारा शुकोह याजकडून करमाफीचा हुकूम मिळविला. सर्व हिंदुस्थानांत त्याबद्दल आनंद झाला, व बादशहानें यास 'सर्वविद्यानिधि' अशी पदवी दिली. लोकांनीं याजवर मानपत्राचा वर्षाव केला. त्यांपैकीं शंभर मानपत्रांचा संग्रह कलकत्त्याच्या एशियाटिक सोसायटीच्या ग्रंथसंग्रहालयांत अद्यापि पाहावयास सांपडतो.

**विद्यानिवास बानर्जी**—हा विद्यावाचस्पति बानर्जी यांचा पुत्र. विद्यानिवासाच्या एका मुलानें हिंदुस्थानभर मान्य असलेला 'न्यायग्रंथभाषापरिच्छेद' हा ग्रंथ लिहिला.

अंबर नांवाचा आणखी एक मुलगा होता. हा राजा मानसिंगाचा मुलगा राणा भावसिंग याच्या दरबारांत वकील होता.

**विद्यापति**—( स. १३७५–१४५० ) मैथिल ब्राह्मण व बंगाली कवि. याचे आजे जयदत्त हे संस्कृत पंडित असून त्यांना सदाचारीपणामुळें योगेश्वर म्हणत. याचा पिता गणपति. याला शिवसिंहानें बिस्कि गांव दिला होता. त्याचा व त्याची पत्नी लक्षिमां यांचा काव्यांत निर्देश आहे. याचे ग्रंथ–१ पुरुषपरीक्षा, २ शैवसर्वस्वसार, ३ दानवाक्यावली, ४ विवादसार, ५ गयापत्तन, ६ गंगावीक्यावली, ७ दुर्गाभक्तितरंगिणी, ८ कीर्तिलता. हा संस्कृत कवितेमुळेंहि लोकप्रिय असे. याचा मुख्य विषय म्हणजे 'राधाकृष्ण–प्रेम.' इतका सरस कवि क्वचित् असेल ( क. कौ. ७ ). चंडीदासाचें व याचें प्रेम होतें. याची भाषा बंगाली नसून हिंदी आहे. त्यांत थोडे मैथिली शब्द येतात असें कांहीं म्हणतात ( क. कौ. १ ).

**विद्यारण्य**—(जन्म स. १२९६; संन्यास स. १३३१; मृत्यु स. १३८६ ) हा काशीक्षेत्रीं असतां स. १३५६ ( शक १२७७ मन्मथ ) साल उलटल्यानंतर लवकरच बुक्करायानें शृंगेरीचा स्वामी विद्यातीर्थ याच्या आज्ञेनें विजयनगरास येण्याबद्दल याला आदरपूर्वक पत्र धाडलें, व आल्यावर याला बरोबर घेऊन तो स्वतः शृंगेरीस गेला व तेथें याच्या मठाची व्यवस्था लावून त्यानें याचे शिष्य व इतर आश्रित यांच्या निर्वाहासाठीं जमीन दान दिली, असा मजकूर मठाच्या एका हिशेबाच्या वहींत आढळतो ( ॲन्युअल रिपोर्ट ऑफ दि म्हैसूर आर्कोलॉजिकल डि. फॉर १९१६, नरसिंहाचारियर, बंगलोर १९१७ पा. ५७ ). स. १३८० मध्यें बुक्करायाचा मुलगा दुसरा हरिहर यानें विद्यारण्यास एक ताम्रशासन देऊन त्यांत याच्या पूर्वजांनीं शृंगेरीमठास दिलेलीं पूर्वीचीं सर्व दानपत्रें कायम केलीं असल्याचा मजकूर होता व त्याचीच नक्कल वरील जमाखर्चांत आहे, असें म्हणतात.

माधवाचार्यांच्या एकंदर ग्रंथांमध्यें यजमान या नात्यानें बुक्करायाचें नांव असून पहिला किंवा दुसरा हरिहर यांचा नामनिर्देशहि नाहीं. उलटपक्षी विद्यारण्याचे सर्व कोरीव लेख दुसऱ्या हरिहराच्या कारकीर्दीतील आहेत. विद्यारण्यकालज्ञान, शिवतत्त्वरत्नाकर, गुरुवंश वगैरे ग्रंथांतील याच्यासंबंधींच्या एकंदर आख्यायिकांत यानें पहिल्या हरिहरला सिंहासनावर बसविलें असें म्हटलें आहे, हें लक्षांत

ठेवल्यावर विद्यारण्य व माधवाचार्य या दोन्ही व्यक्ति जर एकच होत्या तर माधवाचार्यांच्या ग्रंथांत पहिल्या व दुसऱ्या हरिहराचें नांव कां येऊं नये, हा प्रश्न उद्भवतो. त्याच्या गुरूंचा विचार केला असतां, माधवाचार्य आपल्या ग्रंथांत विद्यातीर्थ व भारतीतीर्थ या दोघां गुरूंला नमन करतो. विद्यारण्याच्या ग्रंथांत भारतीतीर्थाला नमन नाहीं.

याच्या वेळच्या किंवा याच्या मागून एक दोन शतकांत रचलेल्या ग्रंथांत माधवाचार्य व विद्यारण्य यांचें स्पष्टपणें सारूप्य दार्खावलेलें आढळत नाहीं.

केळदीचा राजा बसवराज यानें स. १७०९ मध्यें लिहिलेल्या शिवतत्त्वरत्नाकरांत विद्यारण्याचें पूर्वाश्रमींचें नांव शिवधर्मन् होतें असें म्हटलें आहे. विद्यारण्याच्या आज्ञेनें भारतीकृष्णतीर्थ यतीनें रचली म्हटलेल्या विद्यारण्य-कालज्ञान नांवाच्या ग्रंथमालेंतील विद्यारण्यवृत्तावरून समजतें कीं, विजयनगर राज्याची स्थापना होण्यापूर्वी कांहीं काळ, हंपीजवळच्या मतंग डोंगराच्या गुहेंत विद्यारण्य राहत असतां सायण व माधव नांवांचे दोघे पुरुष संततीच्या अपेक्षेनें याच्याजवळ आले. तेव्हां यानें त्यांना संतति होणार नाहीं म्हणून सांगून, आपले शिष्य करून त्यांजकडून सायणीय व माधवीय नांवाची ग्रंथरचना करून घेतली. शृंगेरी मठांतील पंडित लक्ष्मणशास्त्री ह्यानें अठराव्या शतकाच्या अखेरीस रचलेल्या गुरुवंशांत अशीच आख्यायिका असून त्यांत सायणाऐवजीं माधव म्हटलें आहे. या तीनहि ग्रंथांवरून माधवाचार्य व विद्यारण्य हे एक नव्हत हें अगदीं स्पष्ट सिद्ध होतें ( इंडियन हिस्टॉरिकल क्वा. व्हा. ६, नं. ४, पा. ७०२–१७ ).

**विद्याविनोद**—भट्टिकाव्यावरील टीकाकार.

**विद्यासागर**—याची महाभारतावर 'मोक्षधर्मटीका' आहे. याचें नांव आनंदपूर्णमुनींद्र असेंहि आहे. हा अभयानंदाचा शिष्य.

**विनयविजय**—( स. १६१३–८१ ) हा गुजराथी वैश्य. गुरु कीर्तिविजय. याचा 'जैनन्याय' हा ग्रंथ महत्त्वाचा आहे. तो यानें जुनागडजवळ गुरु विजयसिंहाकरितां स. १६५१ मध्यें लिहिला.

**विनयाग्नि कवि**—काश्मीराकडील राहणारा. 'खंडप्रशस्ति' वृत्तीचा कर्ता.

**विनयादित्य गंग**—कलिंगच्या पूर्वगंग घराण्यांतल्या तिसऱ्या वज्रहस्ताचा मुलगा. यानें फार दिवस राज्य केलें नाहीं. हा एखाद्या प्रांताचा सुभेदार असावा ( इंडि. ॲंटि. १८८९-१७१ ).

**विनयादित्य पश्चिम चालुक्य**—(स. ६८१–९६) पहिल्या विक्रमादित्याचा हा मुलगा होय.

यानें कोंजेवरम् येथील पल्लव राजांवर विजय मिळविला, व चोल, पांड्य, हैहय, गंग वगैरे राजांचा पराभव केला. याला युद्धमल्ल असेंहि म्हणत. फ्लीटच्या मतें याला कुंकुममहादेवी नांवाची एक मुलगी होती. पण त्या विधानाबद्दल तोहि साशंक आहे.

**विनयादित्य होयसल**—( स. १०४८ ) हा होयसळ घराण्यांतील पहिला ऐतिहासिक राजा होय. हा पश्चिमेकडील चालुक्य विक्रमादित्य ६ वा याचा मांडलिक होता. याचा काल स. १०४८ असा आहे. याला १ ला त्रिभुवनमल्ल या नांवानें देखील उल्लेखितात.

**विनायक**—हा दशकुमारचरिताचा व्याख्याकार.

**विनायक काकतीय**—( स. १३६४ ) हा कृष्ण काकतीयाचा मुलगा. याला नागदेव असेंहि म्हणत. स. १३६४ मध्यें मुहम्मदशाह बाहामनीनें याचा निर्दयपणें खून केला. या वेळीं दिल्लीच्या बादशाहानें मुसलमानांविरुद्ध याला मदत देण्याचें नाकारलें.

**विनायकपाल प्रतिहार**—( स. ९३१ ) रघुवंशी प्रतिहारांपैकीं महेन्द्रपालाला महीदेवीदेवीपासून झालेला पुत्र. याच्या वेळचें दानपत्र मिळाले आहे. स. ९३१ त याची राणी प्रसाधनादेवीपासून दुसऱ्या महेंद्रपालाचा जन्म झाला. याच्या कारकीर्दीच्या शेवटापासून कनोजच्या प्रतिहारांचें राज्य निर्बल होत चाललें.

**विनायक रामचंद्र ऊर्फ दादा कुंटे**—यांनीं बायजाबाई शिंदे यांचें प्रवासवृत्त लिहून ठेवलें आहे.

**विनायकराव अमृतराव पेशवे**—( जन्म स. १७९२-मृत्यु स. १८५६) अमृतराव पेशव्याच्या पहिल्या बायकोचा मुलगा. लग्न ता. २३।४।१८०३ संगमनेर मुक्कामीं. वडिलांची सात लाखांची नेमणूक यालाहि चालू होती. हा काशीस राहत असे. अमृतरावाच्या गणपतिमंदिराची व्यवस्था नमुनेदार समजण्यांत येते. हा सालाची १॥ लाख दक्षणा देत असे. मिशनऱ्यांच्या तोंडून ख्रिस्तीधर्माचें वर्णन ऐकण्याचा याला नाद होता. स. १८२९ मध्यें चित्रकूटाजवळ करवी येथें वाडा बांधून हा राहूं लागला. करवी हें बांद्यापासून ४५ मैलांवर पयोष्णी नदीजवळ आहे. याची बहिण मैनाताई. याची मुलगी जोगांच्या घरांत दिली. हा स. १८५६ सालीं मेला. याचा वंश हयात आहे ( म. रि. उ. ३, पा. ५६३ ).

**विनीतदेव**—( स. ७०० सुमार ) हा बुद्ध तत्त्वज्ञ ललितचंद्राच्या वेळीं होऊन गेला. माळव्याच्या भर्तृहरीची बहीण ललिताचा आजा विमलास दिली होती. त्यावरून याचा काल ठरतो. याचे ग्रंथ–न्यायबिंदुटीका ( धर्मकीर्तीच्या न्यायबिंदूवर ), हेतुबिंदु टीका, तर्कन्यायटीका, समयबंधपरीक्षाटीका, संतानांतरसिद्धिटीका. हे सर्व मूळ ग्रंथ धर्मकीर्तीचे असून याची फक्त त्यांवर टीका आहे. तसेंच दिङ्नागाच्या आलंबनपरीक्षेवर याची टीका आहे. हे सर्व ग्रंथ फक्त तिबेटी भाषेंत उपलब्ध आहेत.

**विप्रनारायण**—( स. १७५४ सुमार ) एक मराठी कवि. यानें जैमिनिकृत अश्वमेधपर्वाचें मराठींत ओवीबद्ध भाषान्तर केलें आहे. याशिवाय श्रीधरकृत व नामापाठककृत असे दोन अश्वमेध मराठींत आहेत. कै. त्र्यं. गु. काळे यांना मिळालेलें याच्या ग्रंथाचें हस्तलिखित शा. श. १६७६ सालीं लिहिलेलें होतें. त्यावरून हा त्यापूर्वींचा ठरतो. हा यजुर्वेदी माध्यंदिन शाखेचा वसिष्ठगोत्री ब्राह्मण. नागनाथ–दादाजी ऊर्फ दामोदर-गोपीनाथ–गोपजी ऊर्फ नाथाजी–विप्रनारायण असा यानें आपला वंश दिला आहे. महीपतिकृत भक्तलीलामृताच्या ४७ व्या अध्यायांत एका नारायणभट्ट साधूचें चरित्र दिलें आहे. तो तापी नदीच्या तीरीं थारनेर नामक गांवीं राहत असे. प्रस्तुत चरित्रनायकहि तापीतीरवासीच होते. हे दोघे एकच होते काय ? ( म. क. च. भा. ४, पा. २०–२७ ). यानें हा ग्रंथ खानदेशांतल्या हाताळे क्षेत्रांत पूर्ण केला. तेथेंच याचे पूर्वज राहत होते ( मं. त्रै. व. १४.२ ले. ५ ).

**विभुविक्रम ( पश्चिम ) चालुक्य**—( स. १००८–१८ ) हा दशवर्म्याचा पुत्र. हा दुसऱ्या सत्याश्रयानंतर राजा झाला. याला विक्रमादित्य पांचवा व त्रिभुवनमल्ल पहिला असेंहि म्हणत. याच्या मागून याचा भाऊ जगदेकमल्ल पहिला ऊर्फ जयसिंह तिसरा हा गादीवर आला.

**विमल**—यानें उणादिसूत्रें कात्यायनानें केलीं असें तेराव्या शतकांत लिहिलें.

**२.** पद्मपादाचार्याचा पिता.

**विमलनाथ**—( तीर्थंकर पाहा ).

**विमलबोध**—याची महाभारतावर 'दुर्बोधपदभंजिनी' नांवाची टीका आहे. वैशंपायन व देवस्वामी यांची टीका पाहून हा लिहितो, असें यानें आरंभीं म्हटलें आहे.

**विमलादित्य चालुक्य**—( स. १०१५–२२ ) हा दानार्णव चालुक्याचा पुत्र, व शक्तिवर्म्याचा धाकटा भाऊ होय. याच्या बायकोचें नांव कुंदव्वा महादेवी असें होतें. चोलराज राजराजाची ही कन्या होती. यास विमलार्क असेंहि म्हणत.

**विरप्पा नायक**—(स. १५७३–९५) मदुरेचा नायक विश्वनाथ नायकाचा नातू. याचा पिता कृष्णप्पा नायक.

**विरूपा**—चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं तिसरा सिद्ध.

**विरूपाक्ष**—( स. १५८४ ) कानडी वीरशैव कवि. याचा गुरु–सिद्धवीरेश.

ग्रंथ–चन्नबसवपुराण.

बसवाची बहिण नागलांबिके, तिचा मुलगा चन्नबसव. त्याचें चरित्र या ग्रंथांत आहे. याचें भाषाशुद्धि, छंद वगैरेंकडे लक्ष कमी आहे. अनेक राजे व कवि यांच्या कालनिर्णयाला याच्या ग्रंथाचा फारच उपयोग आहे ( क. क. च. भा. २, पा. ३०८ ).

**विरूपाक्ष संगम**—( स. १३५४–७८ ) हा पहिल्या बुक्करायाचा तिसरा मुलगा. हा गादीवर आला नाहीं.

**२.** ( स. १४०६ सुमार ) हा दुसऱ्या हरिहर संगमाचा पुत्र. यानें स्वतः गादी मिळावी म्हणून पुष्कळ खटपट केली.

**३.** ( स. १४६५–१४८५ ) हा दुसऱ्या देवराय संगमाचा पुत्र. हा मल्लिकार्जुनानंतर गादीवर आला. याचा सेनापति नरसिंहराय साळुव, याला पदच्युत करून राजा झाला.

**४.** ( स. १६६५ ) हा मल्लिकार्जुन संगमाचा मुलगा. याला राजशेखर नांवाचा भाऊ होता.

याच्या वेळीं राज्य नरसिंहराय साळुवाच्या ताब्यांत जाऊं लागलें होतें.

**विरूबाई**—( मृत्यु स. १७१९ ) शाहूमहाराजांच्या मर्जीतील एक दासी ( फत्तेसिंग भोसले पाहा ). हिचा घरांत व बाहेर दाब होता.

**विलिवायकुर**—( यज्ञश्री शातकर्णि पाहा ).

**विशाखदत्त**—( स. ५७५ सुमार ) संस्कृत भाषेंतील मुद्राराक्षस नाटकाचा कर्ता. हा अवंतिवर्मन् मौखरीच्या पदरीं होता.

**विश्वनाथ**—( स. १३५० सुमार ) हा नारायणाचा नातू आणि चंद्रशेखराचा पुत्र होय. यानें कित्येक संस्कृत शब्दांच्या स्पष्टीकरणार्थ ओरिया भाषेंतील पर्यायशब्द काव्यप्रकाशावरील टीकेंत दिले आहेत, असें वामनाचार्य झळकीकरांनीं काव्यप्रकाशाच्या प्रस्तावनेंत दाखविलें आहे (पा. २५). यावरून हा ओरिसा प्रांतांतील ठरतो. विश्वनाथ

आणि त्याचा पिता यांना 'सांधिविग्रहिक महापात्र' अशी पदवी लावलेली आढळते. त्यावरून हे राज्याधिकारी ठरतात. तसेंच पहिल्या व दहाव्या परिच्छेदाच्या शेवटल्या भागावरून हा वैष्णव ठरतो. हा स्वतः कवि होता व यानें साहित्यशास्त्राचे नियम स्पष्ट करण्यासाठीं पदोपदीं स्वतःचे संस्कृत व प्राकृत श्लोक दिलेले आहेत. साहित्यदर्पणाशिवाय दुसरे अनेक ग्रंथ यानें पूर्वी लिहिले असून त्यांतील 'राघवविलास' नांवाचें संस्कृत महाकाव्य, 'कुवलयाश्वचरित' नांवाचें प्राकृत महाकाव्य, 'प्रभावतीपरिणय' व 'चंद्रकला' या नाटिका आणि 'प्रशस्तिरत्नावली' नांवाचा सोळा भाषांतील करंभक हे साहित्यदर्पणांत सांगितले आहेत. 'साहित्यदर्पण' लिहिल्यावर 'नरसिंहविजय' हें काव्य व काव्यप्रकाशावरील काव्यप्रकाशदर्पण नांवाची टीका हे दोन ग्रंथ यानें लिहिले. हा चवदाव्या शतकांत झाला.

२. (स. १४२५-५०) संस्कृतधर्मशास्त्रकार. पिता भट्टपूज्य. हा श्रीमाली गुर्जर होता. मदनसिंहराजाचा यास आश्रय असे. यानें 'मदनरत्न' हा ग्रंथ लिहिला. रत्नाकर, गोपीनाथ व गंगाधर हेहि याला मदत करीत, असें म्हणतात.

३. (जन्म स. १५८६) एक भारतीय ज्योतिषी. गोलग्रामांतील एका विद्वान् घराण्यांतील दिवाकराचा हा मुलगा होता. याचे ग्रंथः—सूर्यसिद्धांतावर गहनार्थप्रकाशिका व आणखी कित्येक ग्रंथ व टीका मिळून १८ ग्रंथ आहेत. हे सर्व ग्रंथ विश्वनाथानें काशी येथें लिहिले.

४. 'मृगांकलेखा' या नाटिकेचा कर्ता. याचा पिता त्रिमलदेव. हा गोदावरीतीरचा होता. तरी बनारसला राहत असे.

**विश्वनाथ नायक**—(मृत्यु स. १५६३) वीरप्पा नायकाचा पुत्र. हा मदुरेचा दिसतो.

**विश्वनाथ न्यायपंचानन**—(स. १६३४) हा तर्कज्ञ नवद्वीपचा राहणारा. याचा पिता विद्यानिवास व भाऊ रुद्रवाचस्पति. हा रघुनाथ शिरोमणीचा अनुयायी होता. यानें आपला 'भाषापरिच्छेद' स. १६३४ त लिहिला. यानें खालील ग्रंथ लिहिलेः–(१) अलंकारपरिष्कार, (२) नववादटीका, (३) न्यायसूत्रवृत्ति, (४) सुबर्थतत्त्वालोक अथवा कारकचक्र, (५) न्यायतंत्रबोधिनी अथवा न्यायबोधिनी, (६) पदार्थतत्त्वालोक, रघुनाथाच्या पदार्थखंडावरील टीका, (७) भाषापरिच्छेद (कारिकावली), (८) पिंगलप्रकाश (हि. इं. लॉ., पा. ४७९-८०).

**विश्वनाथ पंडित**--'ज्ञानप्रबोध' या गीतेवरील टीकेचा हा कर्ता. हा लाडकामराज नांवाच्या एका श्रीमान् व्यापाऱ्याकडे कोशाध्यक्ष होता. पुढें याचें व त्याचें न पटल्यामुळें त्यानें यास कैद केलें. पण याच्या बायकोच्या सांगण्यावरून याच्या कमलाकर नांवाच्या गुरूच्या शिष्यानें यास कैदेंतून सोडविलें. कैदेंतून सुटल्याबरोबर यानें संन्यास घेतला व उरलेलें आयुष्य ईश्वरभजनांत घालविलें. यानें 'ज्ञानचंद्रिका' नांवाचा एक गद्य ग्रंथ लिहिला.

**विश्वनाथभट्ट**—(स. १६५० सुमारें) 'शृंगारवाटिका' या संस्कृत नाटकाचा कर्ता. हा महादेवपुत्र व धुंडिराजशिष्य चित्तपावन ब्राह्मण होता. याचें उपनांव रानडे असावें. हें नाटक रामसिंहाच्या आज्ञेवरून लिहिलें.

२. (स. १३०० सुमार) याचें संस्कृत 'सौगंधिकाहरण' नाटक प्रसिद्ध आहे. त्याला प्रेक्षणक व साहित्यदर्पणांत व्यायोग म्हटलें आहे. याचा आश्रयदाता प्रतापरुद्र काकतीय होय.

**विश्वनाथसिंह**--(जन्म स. १७८९) यानें 'आनंदरघुनंदन' नांवाचें व्रजभाषेंतील पहिलें नाटक लिहिलें. हा रीवाँ येथील राजा असून जयसिंहाचा पुत्र होता. यानें हिंदींत अनेक काव्यग्रंथ लिहिले (क. कौ. १).

**विश्वरूप**--(स. ८००-८२५ सुमार) याची याज्ञवल्क्यस्मृतीवरील टीका 'बालक्रीडा' नांवानें प्रसिद्ध आहे. हा शंकराचार्यांचा अनुयायी असून याची टीका फार महत्त्वाची आहे. त्यांत मीमांसापद्धतीनें चांगलाच विचार केला आहे. याची टीका गद्य व पद्य अशा स्वरूपाची आहे.

२. मंडनमिश्राचें नामांतर.

३. (मुनीश्वर पाहा).

**विश्वरूपसेन**--हा बंगाल्यांतील सेन घराण्यापैकीं लक्ष्मणसेनाचा पुत्र होय. याच्या वेळीं सेन घराण्याचें राजकीय महत्त्व नष्ट झालें होतें.

**विश्ववर्त**--शृंगार, भंग, अलंकार व मंख यांचा पिता आणि मनोरथ ब्राह्मणाचा पुत्र.

**विश्ववर्मा**--(स. ४२३) अज्ञातवंशीय नरवर्म्याचा पुत्र. याच्या वेळचा गंगधार येथील शिलालेख वि. सं. ४८० (स. ४२३) चा मिळाला आहे (फ्लीट गु. इं. पृ. ७५७). याचा पुत्र बंधुवर्मा कुमारगुप्ताचा सामंत होता. कुमारगुप्त त्रि. सं. ४८० च्या सुमारास सम्राट् होता. गंगधारच्या शिलालेखावरून दिसून येतें कीं याचा मंत्री मयूराक्ष यानें विष्णूचें मंदिर, तांत्रिक शैलीचें मातृकागृह व विहीर बांधली.

**विश्वशंभु**--एकाक्षरनाममालेचा कर्ता. हा कवि काश्मीराकडील होता.

**विश्वसिंह क्षत्रप**--हा दुसऱ्या रुद्रसेन महाक्षत्रपाचा पुत्र. याचीं नाणीं उपलब्ध आहेत, पण त्यावरचा शकाचा आंकडा अस्पष्ट आहे. हा महाक्षत्रप होता.

**विश्वसेन क्षत्रप**--हा भर्तृदामाचा पुत्र. याचीं नाणीं उपलब्ध आहेत. पण त्यावर यास क्षत्रप म्हटलें आहे.

**विश्वंभर**--( स. १८०० सुमार ) भोसल्यांचा इंग्रजांकडील वकील व वेणीरामपंडिताचा भाऊ.

**विश्वंभरनाथ**--( स. १७०८ सुमार ) हा नाथ-संप्रदायापैकीं नाथनिरंजनाचा शिष्य. याचे पांच अध्यायांचें हिंदी व मराठी गोपीचंदाख्यान उपलब्ध आहे ( मं. वार्षिक १८३६, २३-२९ ).

**विश्वासराव पेशवे**—( जन्म स. १७४२ जुलै २२-मृत्यु स. १७६१ जाने. १४ ) बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब व गोपिकाबाई यांचा पुत्र. याची मुंज स. १७४९ च्या मार्चांत झाली, व स. १७५० च्या मेमध्यें दीक्षित पटवर्धनांच्या घराण्यांतील लक्ष्मीबाईशीं यांचें लग्न झालें. सर्व पेशव्यांत विश्वासराव फार सुंदर होता. शिंदखेडच्या स्वारींत याला सरदार केलें होतें. तेव्हा दत्ताजी शिंदे हा याचा कारभारी होता. जनकोजी हाहि या मोहिमेंत होता. तो व विश्वासराव हे समवयस्क मित्र होते. व त्यांची मैत्री अखेरपर्यंत होती. औरंगाबाद व शिंदखेड येथील या युद्धांत मराठ्यांनीं निजामाचा पूर्ण पराजय केला ( स. १७५७ आक्टो. ). उदगीर येथील लढाईत हा भाऊसाहेबांच्या बरोबर हजर होता. यानें हत्तीवरून उत्तम प्रकारें तिरंदाजी केली. याच्या हाताखालीं दहा हजार स्वतंत्र फौज नेमून दिली होती ( स. १७६० ). भाऊसाहेब उत्तरेंत अबदालीवर निघाले तेव्हां हाहि त्याज-बरोबर होता. भाऊसाहेबांनीं दिल्ली शहर स. १७६० त हस्तगत केलें त्या वेळेस तेथें त्यांनीं दरबार भरवून सर्वां-कडून यास नजरा करविल्या. या वेळीं यानें लष्करी दृष्टीनें किल्ल्याची पाहणी केली.

या सालांत आलेला दसरा मराठ्यांनीं विश्वासरावाच्या नेतृत्वाखालीं साजरा केला. शेवटच्या दिवशीं ( १४.१. १७६१ ) हा व भाऊसाहेब आपल्या सैन्याच्या मध्य-भागीं प्रथम हत्तीवर बसून लढत होते. लढाईस सुरुवात सकाळीं ८ वाजतां झाली. दुपारीं विश्वासराव हत्तीवरून उतरून दिल्पाक घोड्यावर बसले. तिसऱ्या प्रहरीं गोळी लागून तत्काळ प्राणोत्क्रमण झालें. जवळच भाऊसाहेब होते. त्यांनीं रावाचें शव हत्तीवरील आंबारींत ठेवविलें. व ते वैतागून निराशेनें शत्रुसैन्यांत घुसले.

शेवटीं गणेश वेदांती, काशीराज वगैरे मुत्सद्यांनीं एक लक्ष रु. दंड भरून याचें शव सोडवून घेतलें. यानें नाना-साहेबांना एक पत्र पानपताहून अखेरीच्या दिवसांत पाठ-विलें होतें. त्यांत म्हटलें होतें कीं, " फौज व खजिना पाठविणें. मी आपल्यासाठीं लिहीत नाहीं, माझ्यासारखे पुत्र आपल्यास आणखी आहेत, व होतील; परंतु भाऊ-साहेबांसारखा बंधू मात्र मिळणार नाहीं. " विश्वास-रावांची बायको पानतावर गेली होती ती पुण्यास आल्यावर दोन वर्षांनीं वारली.

**विश्वेश्वर**—एकनाथाचा समकालीन. अश्वचिकित्से-वरील मूळ संस्कृत ग्रंथावर यानें केलेली मराठी टीका आहे.

२. निर्णयकौस्तुभ नांवाच्या धर्मशास्त्रविषयक ग्रंथाचा कर्ता.

मदनपारिजात ग्रंथ मदनपाल राजाचा नसून तो याचा फक्त पुरस्कर्ता होता. त्याच्याच आश्रयानें यानें आपले मदनपारिजातादि ग्रंथ लिहिले. मिताक्षरेवरील सुबोधिनी मात्र स्वतःच्या नांवानें लिहिली. मदनपालावर दिलेल्या ग्रंथाशिवाय याचे कर्मविपाक, महादानपद्धति हे ग्रंथ आढळतात.

याचा पिता पेदिभट्ट, गोत्र कौशिक, व्यासारण्य मुनींचा हा शिष्य. पित्याच्या नांवावरून हा द्रवीड असावा असें दिसतें.

**विष्णु**—(स. १६०८) गोलग्रामचा ज्योतिषी. गणेश दैवज्ञाच्या बृहच्चिंतामणीवर याची ' सुबोधिनी ' टीका आहे. कमळाकर, विश्वनाथ व दिवाकर यांच्याच कुलांतील होत.

२. ( विठ्ठल पाहा ).

**विष्णु गबाजी ( तबीब ) चित्राव**—पुण्याच्या चित्राव घराण्याचा मूळ पुरुष (शिवरामभट चित्राव पाहा).

**विष्णुगुप्त**—(चंद्रगुप्त मौर्य पाहा). यालाच कौटिल्य, चाणक्य वगैरे नांवें आहेत.

**विष्णुचित्त कदंब**--(२ विजयादित्य कदंब पाहा).

**विष्णुदास नामा**—( नामा विष्णुदास पाहा ).

**विष्णुदास नामा पाठक**—( नामा पाठक पाहा ).

**विष्णु नरहर**—( स. १७७६ सुमार ) राघोबा-दादाचा साहाय्यक.

**विष्णु महादेव गद्रे**--( स. १७७४ सुमार ) पेशवाईंतील प्रमुख सावकार.

**विष्णुवर्धन ( पूर्व ) चालुक्य**—(स.६१५-६३३) ( पहिला बिट्ट-अरस, कुब्ज विष्णु-वर्धन ) याला विषमसिद्धि, मकरध्वज व बिट्ट म्हणत. कदाचित् हा कुबडा असेल.

पश्चिम चालुक्य घराण्यांतील वातापीचा ( बदामीचा ) जो पुलकेशिन् २ रा त्याचा हा धाकटा भाऊ होय. याच्या पित्याचें नांव कीर्तिवर्मन् पहिला हें होय.

याला पुलकेशिन् २ रा यानें सुभेदारीवर नेमिलें होतें. पुढें स. ६१५ मध्यें यानें वेंगी येथील पूर्व चालुक्य घराण्याची स्थापना केली. हा स्वतंत्र होऊन राज्य करूं लागला. यानें स. ६३३ पर्यंत राज्य केलें.

याच्यानंतर याचा मुलगा जयसिंह १ ला हा गादीवर आला. जयसिंहानें एकंदर ३३ वर्षे राज्य केलें ( B. ) ( दामोदर भारवि पाहा ).

यानें वेंगीराज शालंकायण याचा पराभव करून आपलें राज्य स्थापिलें. यानें राजमहेंद्री ही राजधानी केली. यानें सर्व कलिंगदेश जिंकला. याच्या आज्ञेवरून दरबारी कवि नन्नय्यभट्ट यानें महाभारताचें तेलगू भाषांतर केलें.

२. ( स. ६६३-६७२ ) हा इंद्र भट्टारकाचा मुलगा होय. याला 'सर्वलोकाश्रय' हें उपपद होतें. विषयसिद्धि हें बिरुद होतें. याचे दोन शिलालेख नेलोर व महेवाडा येथें आहेत.

३. ( स. ७०९-७४६ ) हा कोक्कीलीचा वडील भाऊ. त्याला पदच्युत करून हा गादीवर आला.

४. ( स. ७६४-९९ ) हा पहिल्या विजयादित्याचा मुलगा. यास विष्णुराजहि म्हणत.

५. ( स. ८४३-४४ ) हा दुसऱ्या विजयादित्याचा मुलगा. याला कलि विष्णुवर्धनहि म्हणत.

६. तिसऱ्या भीमचालुक्याचें नामांतर.

**विष्णुवर्धन वरीक**—( स. ३७२ ) हा व्याघ्रराताचा प्रपौत्र, यशोराताचा पौत्र, व यशोवर्धनाचा पुत्र. याच्या वंशाचें नांव वरीक असें होतें. भरतपूर राज्यांत बयानाच्या आसपास याचें राज्य होतें. बयाना येथील किल्ला विजयगड तेथें यानें पुंडरीक नांवाचा यज्ञ केला. त्याचा यूप येथें उभा असून त्याच्या वरील लेखांत वरील माहिती मिळते. तेथें दिलेला वि. सं. ४२८ (स. ३७२) फाल्गुन बहुल वदि, ५ काळ असा आहे ( फ्लीट गु. इं., पृ. २५२-५३ ).

**विष्णुवर्धन होयसल**—( स. ११०६-४१ ) ( बिट्टिदेव होयसल पाहा ).

**विष्णुवर्मा कदंब**—पहिल्या नागवर्मा कदंबानंतरचा राजा.

**विष्णुस्वामी**—द्रवीड देशांतील एका ब्राह्मण प्रधानाचा हा मुलगा होय. वल्लभाचार्यमार्गीय 'संप्रदायप्रदीप' ग्रंथांत असें लिहिलें आहे कीं, यानें शांकर सिद्धान्ताचें खंडन करून 'साकारसिद्धि' नांवाचा ग्रंथ लिहून एक नवीन वैष्णवसंप्रदाय काढला, व तो प्रचारांत आणिला. याच्या मतास बरेच लोक मिळाले. हा त्रिदंडी संन्यासी होता. संप्रदाय वाढूं लागतो न लागतो तों हा मरण पावला.

विष्णुस्वामीचें मत पुढें बरेच जणांनीं चालविलें. त्यांपैकीं ज्ञानदेव, केशव, हिरालाल, श्रीराम, श्रीधर आणि बिल्वमंगल वगैरे होत. परंतु बिल्वमंगल मरतांच ही गादी बुडाली. पुढें कांहीं वर्षांनीं वल्लभाचार्यांनीं तिचा जीर्णोद्धार केला. विष्णुस्वामीचा मतावलंबी गर्भश्रीकांतमिश्र नांवाचा होता यानें 'साकारसिद्धि' नामक ग्रंथ लिहिला, त्यावरून हा नृसिंह-उपासक होता. तो त्याचा आकार सच्चिदानंद रूपच मानणारा असे. परंतु नृसिंहाच्या जागीं पुरुषोत्तमास उभें केलें, आणि त्यास साकार सच्चिदानंद मानिलें.

**विसाजी आपाजी आठवले**—( स. १७७९ ) पेशव्यांचे एक सरदार.

**विसाजी कृष्ण बिनीवाले**—( मृत्यु स. १७८५ ) याचें मूळ ठिकाण कोंकणांतील राजापूर प्रांतांत तेरवण म्हणून गांव होतें. जातीचा हा कऱ्हाडा ब्राह्मण असून याचें आडनांव चिंचाळकर होय. विसाजीचा बाप कृष्णाजीपंत पुरंदरास येऊन राहिला. त्याचा वडील मुलगा विठ्ठलपंत पुण्यास सावकारी करी, कनिष्ठ मुलगा विसाजीपंत घोड्यांचा शोकी होता.

यानें नानासाहेब व भाऊसाहेब यांजकडे प्रवेश करून हुजरातींत दौलतराव काटे यांच्या पागेंत नोकरी मिळविली. नंतर यानें सन १७५७ पासून बळवंतराव मेहेंदळ्याचे हाताखालीं कर्नाटकांत कामें करून प्रसिद्धि मिळविली, तेव्हां, काटे याची पागा विसाजीस देण्यांत येऊन बिनीवर याची नेमणूक करण्यांत आली. तेव्हांपासून पुढील स्वाऱ्यांत चांगलीं कामें करून यानें माधवरावाकडून वाहवा मिळविली. सन १७६९ सालीं रामचंद्र गणेश कानडे याजकडे स्वारीचा मुख्य कारभार सांगितला तेव्हां त्याचे हाताखालीं याची नेमणूक झाली. तेव्हांपासून पुढें त्या स्वारींतील मोहिमांत यानें निःपक्षपातानें व धूर्ततेनें वागून, सरदारांच्या भांडणांत न पडतां, केवळ राज्याचे हिताचा विचार ठेविला. या याच्या शहाणपणा-

बद्दल याजवर माधवरावाचा केवढा इतबार होता हें यास लिहिलेल्या पत्रावरून व्यक्त होतें. दोघांच्या भांडणांवरून रामचंद्र गणेशास परत बोलाविल्यावर स्वारीचा मुख्य अधिकार यास मिळाला.

यानें दिल्लीपर्यंत मराठ्यांचा अंमल बसवून व शत्रूंस पादाक्रांत करून, ता. ११ फेब्रुवारी स. १७७१ रोजीं दिल्लीच्या किल्ल्यावर मराठ्यांचें निशाण चढविलें, आणि शहाअलम बादशहास अनुकूल करून घेऊन त्यास अलाहाबादेहून दिल्लीस आणलें. बादशहानें ता. २ सप्टेंबर स. १७७१ रोजीं विसाजी कृष्ण बिनीवाले यास शिक्केकट्यार देऊन मराठ्यांस बादशाही वजिराचे सर्व अधिकार व बक्षिगिरीचा फर्मान हीं दिलीं. विसाजी कृष्ण व महादजी शिंदे यांनीं, दिल्ली येथील पठाण व रोहिले यांचा अंमल दूर करून व सर्व शत्रूंस आपल्या बाहुप्रतापानें दिपवून सोडून, ता. २५ डिसेंबर स. १७७३ रोजीं शहाअलम बादशहास दिल्लीच्या तक्तावर मोठ्या समारंभानें आरूढ केलें. या कर्तबगारीमुळें यांची सर्व हिंदुस्थानांत वाहवा झाली. या प्रसंगीं माधवराव पेशव्यांनीं यांस पत्र लिहिलें, तें फार महत्त्वाचें व वाचनीय असें आहे (इतिहाससंग्रह, सन १९११ अं. १-३, पृ. ११६).

**विसाजी केशव लेले**—(स. १७७४ सुमार) उत्तरपेशवाईंतील एक सरदार.

**विसोबा खेचर**—(समाधि स. १३०९) हा शुक्ल-यजुर्वेदी ब्राह्मण मोठा सत्पुरुष होता. याचें उपनांव चाटी (धंदा) दिसतें. हा पैठणजवळील मुंगीचा राहणारा. हा औंढ्या नागनाथ येथें खिस्तीचा (सराफी) उदीम करून राहत असे, असें दासो दिगंबर म्हणतात. हा आपला गुरु सोपानदेव असें लिहितो. शिवाय ज्ञानदेवांना गुरु म्हणतो. हा नामदेवाचा गुरु होता. याचें 'हरिश्चंद्राख्यान' नांवाचें एक प्रकरण, कांहीं अभंग व पदें एवढेंच वाङ्मय उपलब्ध आहे. याची बार्शी येथें समाधि आहे. हा साधुपुरुष ज्ञानेश्वराच्या तीर्थयात्रेंत नामदेवादि मंडळीबरोबर हजर होता. नामदेव जेव्हां याच्या दर्शनास गेले तेव्हां सर्वाभूतीं परमेश्वर पाहणारा हा योगी पुरुष शिवलिंगावर पाय पसरून निद्रासुख भोगीत होता. याच्या अभंगांत पुढीलप्रमाणें नंदभाषा (व्यापारी) योजलेली दिसते. मुळु (पांच) वदनाचा। आंगळू (दहा) हाताचा। उदाणू (तीन) नेत्राचा। स्वामी माझा॥ याच भाषेंत नामदेव व तुकोबा यांचेहि कांहीं अभंग आहेत. याला परमेश्वराबद्दल प्रथम अविश्वास होता म्हणून यास ज्ञानेश्वरानें उपहासानें खेचर असें नांव दिलें.

**विज्ञानभिक्षु**—'सांख्यसारविवेक' नांवाच्या ग्रंथाचा कर्ता. भावा गणेश दीक्षिताचा हा गुरु. याचे अनेक ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

**विज्ञानेश्वर**—(स. १०७०-११००) हा याज्ञवल्क्य-स्मृतीवरील सुप्रसिद्ध मिताक्षरा टीकेचा कर्ता. या टीकेंत प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं यानें आपली माहिती दिलेली आढळते. तीवरून हा भारद्वाजगोत्री पद्मनाभ भट्टोपाध्यायाचा मुलगा व उत्तमपाद नामक गुरूचा शिष्य होता असें दिसतें. हा संन्यासी होता. सध्यांच्या हैद्राबाद संस्थानांतील कल्याणीनामक गांवीं याच्या काळीं सहावा विक्रमादित्य पश्चिम चालुक्य राजा राज्य करीत होता. त्याच्या पदरीं हा होता. त्या राजाची यानें फार स्तुति केली आहे. बंगालमधील दायविभागाची बाब खेरीज करून तसेंच मुंबई शहर व गुजराथ हे भाग सोडून देतां हिंदुस्थानांत ही टीका प्रमाण मानली जाते. या टीकेवर बाळंभट्ट, नंद पंडित, विश्वेश्वरभट्ट, मधुसूदन, गोस्वामी व हलायुधभट्ट इत्यादींनीं टीका लिहिल्या आहेत. यानें आशौचदशकटीका लिहिली. याच्या नांवावर त्रिंशच्छ्लोकभाष्य नांवाचा ग्रंथहि प्रसिद्ध आहे.

**विंध्यवर्मा परमार**—(स. १३७५ सुमार) हा माळव्याच्या परमारांपैकीं अजयवर्म्याचा पुत्र. गुजराथेंत दुसरा भीमदेव गादीवर असतां हा स्वतंत्र झाला असावा. याचा नातू अर्जुनवर्मा याच्या वि. सं. १२७२ च्या दानपत्रांत विंध्यवर्म्याचा उल्लेख वीरमूर्धन्य व गुजराथच्या राजाचा उच्छेद करणारा असा आहे. सोमेश्वर कवीनें आपल्या 'सुरथोत्सव' नांवाच्या काव्यांत गुजराथच्या सेनापतीकडून पराभव झाला म्हणून हा रण सोडून गेला व त्या सेनापतीचें गोगास्थान नांवाचें शहर उध्वस्त केलें आणि त्याच्या महालाचे ठिकाणीं विहीर खोदल्याचें लिहिलें आहे. (सुरथोत्सव सर्ग १५). याचा सांधिविग्रहिक काश्मीरी बिल्हण याहून वेगळा असा दुसरा बिल्हण होता. तसेंच सपादलक्ष प्रदेशांतील मंडलकर (मांडलगड, उदयपुर राज्यांत) येथील राहणारा जैन पंडित आशाधर सपादलक्ष देशांतून मुसलमानांमुळें माळव्यांत येऊन राहिला व त्याची बिल्हणाशीं मैत्री झाली (आशाधरकृत धर्मामृतशास्त्राची शेवटली प्रशस्ति, श्लो. १-७.)

**विंध्यशक्ति वाकाटक**—(स. २४८-२८४) हा वाकाटक वंशाचा मूळ पुरुष विष्णुवृद्धगोत्री ब्राह्मण होता. हा वाकाट किंवा वागाट गांवचा राहणारा. हें गांव ख्रि. पू. १५० वर्षांइतकें जुनें आहे, असें अमरावतीच्या शिलालेखावरून ठरतें. हें गांव झाशी जिल्ह्यांतील चिरगांवच्या

पूर्वेस सहा मैलांवर ओर्च्छा संस्थानांत आजहि प्रसिद्ध आहे. याच गांवीं द्रोणाचार्यांचा जन्म झाला अशी प्रसिद्धि आहे. विदिशानागवंशाचे राजांच्या पडत्या काळांत यानें त्यांची सत्ता टिकविण्यास साहाय्य केलें. म्हणून कर्तृत्वदर्शक 'विंध्यशक्ति' असें यास नांव प्राप्त झालें.

हा ब्राह्मण होता. यानें 'बृहस्पतिसव' यज्ञ केला होता. तो यज्ञ ब्राह्मणांशिवाय इतरांना करितां येत नाहीं. प्रथम यानें भारशिवांना सत्ता टिकविण्यास मदत करून मान्यता मिळवली. नंतर नवनाग किंवा भारशिव घराण्यांतील भवनागानें आपली मुलगी याच्या नातवास म्हणजे प्रवरसेनपुत्र गौतमीपुत्रास दिली. गौतमीपुत्रास तिचे ठिकाणीं शिशुक नांवाचा मुलगा झाला. भवनागास पुत्र नसल्यामुळें शिशुकाला भारशिवांचें राज्य मिळालें. त्या वेळीं आजा प्रवरसेन सर्व कारभार पाही. या क्रमानें विंध्यशक्तीच्या वंशजांकडे भारशिवांचें साम्राज्य आलें (किलकिला राजवंश पाहा).

**वीर केरल**—(स. १३०४) केरलच्या चेरमाण पेरुमाल राजाचा मुलगा. याला दोन बहिणी होत्या त्या आत्तिंगल येथें प्रबल झाल्या.

**वीरगंग होयसल**--विष्टिदेवाचें नामान्तर.

**वीरचंप चोल**—(स. १३१४) विजयनगरच्या इतिहासांत याचा निर्देश येतो.

**वीरदत्त**--मनोरथाचा मुलगा. पत्नी—गौरी. पुत्र—दंडिन् (हि. का. १०. ३२–३३)

**वीरदामा क्षत्रप**—(स. २३६) हा दामसेन क्षत्रपाचा पहिला मुलगा. दामाचे मागून यशोदामा उत्तराधिकारी झाला, त्याअर्थी हा अल्पवयी मेला असावा. याला रुद्रसेन दुसरा हा पुत्र होता.

**वीरदेव पूर्व चालुक्य**--(स. १०७८–११००) हा पहिल्या कुलोत्तुंगाचा दुसरा मुलगा. राजधानी जगन्नाथनगरी. याला विष्णुवर्धन म्हणत.

**वीरधवल वाघेल**—(स. १२५० सुमार) हा लवणप्रसादाचा मुलगा. यानें गुजराथच्या सोलंकींचें राज्य आपल्या पराक्रमानें कांहीं दिवस टिकविलें, आणि शेवटीं तें राज्य याच्या घराण्यांत आलें. याचा पिता दुसऱ्या भीमाचा मुख्य प्रधान होता आणि यानें तेंच काम अत्यंत प्रभावानें पुढें चालविलें. गुजराथच्या इतिहासांत याचें नांव आपल्याकडील बाजीराव पेशव्यासारखें आहे. अनहिलपट्टण हें याचें ठिकाण.

**वीर नरसिंह होयसल**—(१ व २ नरसिंह होयसल पाहा).

**वीर नारणीयार**—(गंडरादित्य पाहा).

**वीर पांड्य**—(कुलशेखर व पराक्रम पांड्य पाहा).

**२.** (मृत्यु स. ९७२–७३) एक राजा.

**३.** (स. १२९६–१३४२) हा बापाच्या खुनाबद्दल सूड उगविण्याकरितां सुंदर पांड्याशीं लढला. पण पराभव पावला तेव्हां दिल्लीच्या अलाउद्दीन खल्जीच्या आश्रयास गेला. पण मलीकाफूरनें द्वारसमुद्रावर स्वारी केली तेव्हां (स. १३१०) पांड्यांना लढावें लागलें. तेव्हां सुंदर पांड्य मदुरेहून पळाला (कुलशेखर २ रा पाहा).

**वीर बल्लाळ होयसल**—वीर हें सन्मानदर्शक उपपद लावून बल्लाळ नांव उच्चारीत (बल्लाळ होयसळ, जज्ञ व ५ भिल्लम यादव पाहा).

**वीरभद्र**—(स. १६२९–४५) बेदनूरचा राजा. हा भद्रापा नायकाचा पुत्र. बसवपट्टणाचा केंग हनुम हा वीरभद्राचा मांडलिक होता. परंतु केंग नायकानें वीरभद्राविरुद्ध बंडाचें निशाण उभारलें, त्यामुळें वीरभद्रानें त्याचा पराभव करून त्याची जहागीर काढून घेतली. अशा रीतीनें भणंग बनलेला केंगनायक वीरभद्राविरुद्ध मदत मागण्यासाठीं विजापूरदरबाराकडे गेला. त्या वेळीं रणदुल्ला व शहाजी हे आपापल्या सैन्यासह नुकतेच विजापुराकडे आले होते, व त्यांना कांहींतरी कामगिरी पाहिजेच होती. यामुळें केंगनायकाचें आमंत्रण त्यांच्या पथ्यावरच पडलें. त्यांनीं कर्नाटकांत स्वारी काढण्याचें तावडतोब कबूल केलें. या स्वारींत मलीक रैहान हा चार हजार स्वारांसह सामील झाला, व सर्वांनीं मिळून बेदनूर ऊर्फ रायगिरी किल्ल्यास वेढा दिला. तेव्हां वीरभद्राचा निरुपाय होऊन यानें रैहानच्या मार्फत तहाचें बोलणें लावलें. अखेर तीस लाख होन खंडणीदाखल द्यावे अशा अटीवर तह झाला. त्यांपैकीं सोळा लाख रोख व बाकीचे चौदा लाख तीन हप्त्यांनीं घेण्याचें ठरलें. रोख मिळालेले सोळा लाख रणदुल्लानें बादशाही खजिन्यांत भरले तेव्हां त्याच्या राजनिष्ठेचें सर्वत्र कौतुक झालें. पुढल्या वर्षीं यानें खंडणी देण्याची चालढकल चालविली व बसवपट्टणच्या केंगनायकावर पुनः हत्यार धरलें. तेव्हां विजापुराहून पुनः सैन्य रवाना होऊन वीरभद्राचा सर्व मुलूख जप्त करण्यांत आला. हा प्रथम इक्केरीचा राजा होता. इक्केरी हें स. १६३७ सालीं रणदुल्लाखान व शहाजी यांनीं घेतल्यानंतर हा बेदनूरास राहूं लागला (शिवभारत-प्रस्तावना १०५–६). हा निपुत्रिक मरण पावला.

**२.** (कृष्ण काकतीय पाहा).

**वीरभद्र वाघेल**—( स. १५९२–१५९३ ) वाघेल घराण्यांतील रामचंद्र राजाचा मुलगा. पुरें एक वर्ष सुद्धां हा गादीवर नव्हता.

हा फक्त विद्वानांचा आश्रयदाता नसून स्वतः मोठा विद्वान् आणि लेखक होता. वात्स्यायनाच्या कामसूत्राच्या आधारावर यानें 'कन्दर्पचूडामणि' हा ग्रंथ लिहिला ( स. १५७७ ). त्याचप्रमाणें याचा 'दशकुमारपूर्वकथासार' हा दुसरा ग्रंथ होय. प्रद्योतन पद्मनाभमिश्र हा प्रसिद्ध कवि याचे पदरीं होता ( Dr. Krishnaswami Aiyangar Commemoration Volume 1936, 50).

**वीरभद्रेश्वर चालुक्य**—याच्याशीं रुद्रम्मा काकतीय हिनें लग्न लावलें होतें.

**वीरभानुदेव गंग**—( स. १२५६–१२७५ ) हा कलिंग येथील पूर्व गंग घराण्यांतील पहिल्या नरसिंहाचा मुलगा. चालुक्य राजकन्या जाकल्ला हिच्याशीं यानें लग्न लाविलें होतें. याच्यानंतर याचा मुलगा नरसिंह २ रा हा गंगाच्या गादीवर आला.

**२.** ( स. १३०६–२५ ) कलिंगच्या गंग घराण्यांतील दुसऱ्या नरसिंहाचा मुलगा. याच्या बायकोचें नांव लक्ष्मी. याचा मुलगा तिसरा नरसिंह याच्यानंतर गादीवर आला.

**३.** ( स. १३५०–१३७८ ) कलिंगच्या गंग घराण्यांतील तिसऱ्या नरसिंहाचा मुलगा. याला तारा आणि हिरा या नांवांच्या दोन बायका होत्या. याच्यानंतर याचा मुलगा चौथा नरसिंह गादीवर आला.

**४.** ( स. १३९७–१४३० सुमार ) कलिंगच्या गंग घराण्यांतील चौथ्या नरसिंहाचा मुलगा. हा या घराण्यांतील शेवटचा राजा होय. याचा प्रधान कपिलेंद्र हा एका धनगराचा मुलगा. तो चढतां चढतां शेवटीं याचा प्रधान झाला. आणि पुढें याचें राज्य घेऊन त्यानें ओरिसा आणि कलिंग या देशांत गजपति घराण्याची स्थापना केली.

**वीरभानु वाघेल**—( रामचंद्र वाघेल पाहा ).

**वीर राजेन्द्र चोल**—( स. १०६३-७० ) हा चोल घराण्यांतील राजमहेन्द्राचा चुलता होय. हा त्याच्यानंतर गादीवर आला. याला पहिल्या सोमेश्वर पश्चिम चालुक्याशीं एकंदर पांचदां लढावें लागलें. प्रथम यानें त्याच्यापासून गंगवाडी प्रांत ( सरकार प्रांत ) जिंकला. नंतर वेंगीच्या राज्याचा बंदोबस्त करून कृष्णातुंगासंगमावर कुडळसंगम या ठिकाणीं चालुक्याचा मोठा पराभव केला. या वेळीं चालुक्यांच्या मदतीस चोलांचे सर्व बंडखोर मांडलिक आले होते. या लढाईत यास अपरिमित लूट मिळाली. त्या काळीं हत्तीचा युद्धांत भयंकर उपयोग होई. त्यानंतर यानें उलगै येथें केरळ, पांड्य, गंग व नोळंब या राजांचा पराभव केला, व चालुक्यराजाच्या आह्वानावरून पुनः कुडळसंगम येथें जाऊन त्यांना पळवून लावलें व तथें एक जयस्तंभ उभारला. पुढें यानें पहिल्या सोमेश्वर चालुक्यास त्याच्या भावाविरुद्ध गादीवर बसण्यास मदत करून त्याला आपली मुलगी दिली. बेझवाडा येथें वेंगीदेशच्या सैन्याचा पराभव करून तो देश खालसा केला आणि कलिंगदेशावर स्वारी केली. यानें वेंगीदेश आपला आश्रित व जांवई विक्रमादित्य चालुक्य यास दिला आणि स्वतः राजाधिराज राजराज ही पदवी धारण केली. पुढल्या वर्षी यानें कुडलसंगम येथें पुनः सोमेश्वर चालुक्याचा पराभव करून करडकिल येथें जयस्तंभ उभारला, व कांपलीशहर जाळलें ( स. १०६८ ). ब्रह्मदेशचा दक्षिणभाग ( तलैंग नांवाचा ) खालसा करून दर्यावर मोठा जय मिळविला (स. १०६९). लष्करी कामाप्रमाणें मुलकी कामांतहि हा मोठा प्रवीण होता. हा अखेरीस स. १०७० मध्यें मेला. याच्या मागें याचा पुत्र अधिराजराजेन्द्र हा गादीवर आला. यानें दुसऱ्या सोमेश्वर चालुक्यास पदच्युत केलें.

**वीरविजय संगम**—(स. १४२२–२३) हा विजयनगर घराण्यांतील पहिल्या देवरायाचा पुत्र होय. हा बुक्क ३ रा असेंहि आपणास म्हणवीत असे. याच्या बायकोचें नांव नारायणी असें होतें. यानें कांहीं महिने राज्य केलें.

**वीरश्री**—जतवर्मची पत्नी व कर्ण कलचुरीची कन्या.

**वीरसिंह ( पूर्व ) गंग**—( स. ७०० ) कलिंग नगर येथील पूर्व गंग घराण्याचा हा संस्थापक होय.

हा कोलाहल येथील अनंतवर्मन्चा वंशज होता असें म्हणतात. याला कामार्णव, दानार्णव, गुणार्णव १ ला, मारसिंह आणि वज्रहस्त १ ला असे एकंदर पांच मुलगे होते ( B. ).

**२.** ( बिल्हण पाहा ).

**वीरसेन आभीर**—( आभीर पाहा ).

**वीसलदेव वाघेल**—( स. १२४३–६१ ) धोलक्याचा राणा वीरधवलाचा हा तिसरा पुत्र. याला विश्वमल्ल किंवा विश्वल असेंहि म्हणतात. गुजराथचें राज्य घेतल्यानंतर हा मेवाड व माळवा येथील राजा लढला. या वेळीं मेवाडचा राजा जैत्रसिंह किंवा त्याचा पुत्र तेजसिंह असावा. तसेंच माळव्याचा राजा जयतुगिदेव परमार किंवा दुसरा जयवर्मा असावा. माळव्याच्या राजाशीं झालेल्या लढाईवर गणपति व्यासानें 'धाराध्वंस' नांवाचें

काव्य लिहिलें आहे. वि. सं. १३००–१८ ( स. १२४३ १२६१ ) पर्यंत यानें गुजराथवर राज्य केलें. याच्यानंतर याचा थोरला भाऊ प्रतापमल्ल याचा पुत्र अर्जुनदेव हा गुजराथचा राजा झाला. हा वाघेलवंशांतील पहिला राजा होय.

**वृत्तविलास**--( स. ११६० ) यानें अमितगतीच्या संस्कृत काव्याचें 'धर्मपरीक्षे' नांवानें कानडी रूपांतर केलें आहे.

**वृषसेन मौर्य**—(ख्रि.पू.२०७ सुमार) हा मौर्यवंशापैकीं संप्रतीचा पुत्र व शालिशूकाचा भाऊ. हा अफगाणिस्थान, कंदाहार व हिरात या भागांचा सुभेदार होता. पण पाटलिपुत्र येथें गृहकलह सुरू झाल्यानें हा वरील प्रांतांचा राजा होऊन स्वतंत्र झाला होता. याच्या वेळीं अँटियोकस दि ग्रेट याची स्वारी झाली. यानें थोड्या युद्धानंतर त्याच्याशीं तह केला. ग्रीक लेखकांनीं याला सोफागसेनस असें म्हटलें आहे. सुभागसेन असेंहि म्हटलेलें आढळतें. तारानाथाच्या मताप्रमाणें हा वृषसेन किंवा सुभागसेन हा गांधारचा राजा होता (राप्सन-केंब्रिज हिस्टरी, पा. ५१२). तिबेटांतील बौद्धग्रंथांत संप्रतीचा उत्तराधिकारी म्हणून याचेंच नांव लिहिलें आहे.

**वृंद**—( जन्म स. १६९५ ) हिंदी कवि. हा गौड ब्राह्मण. औरंगजेबाकडून अजीमुश्शानकडे गेला. याचे ग्रंथ–वृंदविनोदसतसई, भावपंचाशिका. याचे वंशज जयपूरकडे आहेत.

**वेदाजी किंवा वेदो भास्कर**—( स. १६६० सुमार ) हा अरणीचा महालकरी होय. हा महाल उत्तर अर्काटांत ( कर्नाटकांत ) आहे. वेदाजीच्या देखरेखीखालीं अरणी व वेणीदुर्ग हे दोन कोट असत. या महालाची पहिली सनद वेदाजी भास्करानें विजापूर दरबाराकडून शहाजीला पकडण्याच्या बाबतींत कामगिरी बजावून मिळविली; आणि पुढें कर्नाटकची जहागीर शहाजीकडे येतांच तो शहाजीसच मुख्य समजून त्यांस खंड-कमाविशी देऊं लागला.

यास श्रीनिवासराव, सुभाराव, कोनेराव, वगैरे आठ पुत्र होते ( चि. २८९ ). परंतु कोनेरावानेंच पुढें आपल्या बापाचा कारभार चालविला.

**( बाबा ) वेणीमाधवदास**—( स. १६२२ सुमार ) यानें तुळशीदासचरित्र लिहिलें तें ऐतिहासिकदृष्ट्या जुळतें.

**वेणीराम पंडित**—( स.१८००सुमार ) नागपूरच्या मुधोजी भोसल्याचा कलकत्त्यास इंग्रजांकडील वकील. याचा भाऊ विश्वंभर ( चेतसिंग पाहा ). यानें चेतसिंगच्या येथें हेस्टिंग्जला वांचविलें.

**वेणूबाई**--( स. १६२६–१६७८ ) ही समर्थ रामदासस्वामींची एक शिष्या होती. 'निवृत्तिराम' ग्रंथ मराठींत हिनें केला आहे. ही मिरज येथील देशपांड्यांची कन्या होय. लग्न लागलें त्याच दिवशीं नवरा मरून ही विधवा झाली. पुढें ही लवकरच समर्थांची शिष्या झाली व हिनें उरलेलें आयुष्य रामभजनांत व अध्यात्ममार्गांत घालविलें. शके १५७७ मध्यें हिनें मिरज येथें मठ स्थापन केला. हिचें शके १६०० च्या चैत्र वद्य १४ स सज्जनगडास देहावसान झालें. कौल, सीतास्वयंवर यांसारखे हिचे ग्रंथ उपलब्ध आहेत.

२. व्यंकटराव घोरपड्याची कन्या व त्रिंबकराव पेठ्याची पत्नी.

**वेदप्रबोध**--एक मोठा विद्वान्. कुमारपाल राजास जैनधर्मांतून पुनः वैदिक धर्मांत यानेंच आणलें. यास भट्टाचार्य असेंहि म्हणत.

**वेदशेखर**—दक्षिण हिंदुस्थानांतील एक राजा. अव्हैअरचा भाऊ जो तेरुवेल्लुवर त्याच्या वेळीं हा होता ( कविचरित्र ).

**वेदांतदेशिक**—(स. १२६९–१३७१) विशिष्टाद्वैतपंथाचा किडाम्बी अप्पूकूरचा शिष्य. जन्मस्थान तिरुवेल्लीपुर. यानें विशिष्टाद्वैतमतावर शंभरांपेक्षां जास्त ग्रंथ लिहिले. याचें विद्यारण्यास साहाय्य असे.

**वेलस्ली ( रिचर्ड कॉली, मार्किस )**—( स. १७६०–१८४२ ) हा गॅरेटचा वडील मुलगा. हा हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल होता ( स. १७९८–१८०५ ). हिंदुस्थानांत इंग्रजी साम्राज्याचा विस्तार क्लाइव्ह, हेस्टिंग्स व वेलस्ली यांच्यामुळें झाला.

हिंदुस्थानांत फ्रेंचांचा इंग्रजांनीं पाडाव केला तरी इंग्रजांचीहि स्थिति चांगली नव्हती. शिंदे, निजाम व टिपू यांच्याकडे फ्रेंच सैन्य पुष्कळ असून नेपोलियननें टिपूला मदत देण्याचें आश्वासन दिलें होतें. तेव्हां यानें पैशाच्या अभावीं तैनाती फौजेची पद्धत स्वीकारून राजेरजवाड्यांना ताब्यांत आणलें. हा नेपोलियनचा कट्टा द्वेष्टा होता. नेपोलियननें टिपूला पत्र लिहून आम्ही तुमचे मदतीस निघालों आहों, असें इजिप्तच्यापुढें येऊन लिहिलें. तेव्हां यानें एकदम उठाव करून टिपूला ठार केलें ( ता. ४-५-१७९९ ). नंतर यानें निजाम, गायकवाड, पेशवा, शिंदे, भोसले ( असई-आडगांव तह ), अर्काटचा

नबाब, तंजावरचा राजा, अयोध्येचा वजीर वगैरेंस ताब्यांत आणून नंतर हा पेशव्याला नष्ट करण्याच्या मार्गास लागला. हा मराठ्यांच्या भानगडींत पडला म्हणून यास ठपका देण्यांत आला, तेव्हां यानें राजीनामा पाठविला, पण पुढें कर्ज केल्याबद्दल यास परत बोलाविलें ( स. १८०५ ). या वेळीं नेपोलियनच्या धुमाकुळामुळें इंग्लंड अगदीं चिंताग्रस्त होतें. अशा स्थितींत यानें हिंदुस्थानांत उत्पन्न केलेली परिस्थिति सर्वांना अवेळीं वाटली. म्हणून याला परत बोलावून हिंदुस्थानांत शांतता उत्पन्न करण्याकरितां कॉर्नवालीसला पाठविण्यांत आलें. पण इंग्लंडचा विजय झाल्यानंतर पुढें याच्या धोरणाचा गौरव करण्यांत येऊन यास बक्षीस देण्यांत आलें.

**२.** ( आर्थर वेलिंग्टन )—( स. १७६९–१८५२ ) हा गॅरेट वेलस्लीचा चवथा मुलगा. हा सैन्यांत शिरल्यावर ( स. १७८७ ) हिंदुस्थानांत आला ( स. १७९७ फेब्रु. ). याचा थोरला भाऊ वेलस्ली रिचर्ड कॉली मार्किस हा याच्यानंतर एक वर्षानें गव्हर्नर जनरल म्हणून हिंदुस्थानांत आला.

टिपूचा नाश केल्यावर यानें धोंडजी वाघाला ठार केलें ( स. १८०० ). पुढें वसईचा तह झाला. तो पसंत नसल्यानें शिंदे–भोसले इंग्रजांविरुद्ध उठले. त्यांचा आसई ( स. १८०३ ) येथें पराभव करून त्यांना यानें पेशव्यापासून फोडलें. बाजीराव पेशव्यासंबंधीं याचें अगदीं वाईट मत होतें. अमृतराव पेशवा लायक मनुष्य आहे असें हा मानी. होळकराच्या हल्ल्यापासून पेशवाईचा बचाव यानेंच केला. पुढें हा इंग्लंडमध्यें गेल्यावर ( स. १८०५ ) नेपोलियनशीं युद्ध करण्यास यास पाठविण्यांत आलें. स. १८१४ ला हा पॅरिसमध्यें इंग्रजांचा वकील होता. वाटर्लूच्या लढाईंत हाच मुख्य सेनापति होता. नेपोलियनसारख्यावर जय मिळविल्यानें याचा मान फार वाढला. पुढें हा पार्लमेंटमध्यें शिरून मुख्य प्रधान झाला ( स. १८२८–३० ).

**३.** ( हेन्री )—( स. १७७३–१८४७ ) हा गॅरेटचा सर्वांत धाकटा मुलगा. हा रिचर्डचा धाकटा भाऊ. हा आपल्या भावाचा कारभारी म्हणून काम करी. स. १८०० मध्यें इंग्लंडला गेला.

**वेसुगि यादव**—( स. १००० सुमार ) हा दुसऱ्या भिल्लमानंतर गादीवर आला.

**२.** ( स. १०५० सुमार ) हा दुसऱ्या वादुगीनंतर गादीवर आला.

**वैकय्या**—( स. १५६१ सुमार ) यानें ' नरपतिविजय ' नामक काव्य रचिलें आहे. यांत कृष्णरायाचा जांवई रामराजा–जो तालिकोटच्या लढाईंत मेला–त्याचें पूर्वचरित्र आहे.

**वैज**—हा बेट त्रिभुवनमल्लाचा प्रधान होता. यानें पश्चिम चालुक्यांच्या मर्जीनें दिवस घालविले.

**वैदुंब शांडयन तिरुवयन**—हा कृष्ण ( तिसरा ) राष्ट्रकूटाचा मांडलिक होता.

**वैदुंब श्रीविक्रमादित्य**—हा राष्ट्रकूट कृष्ण तिसऱ्याचा मांडलिक होता.

**वैद्यनाथ पायगुंडे**—( स. १७०० नंतर ) एक संस्कृत धर्मशास्त्रकार. हा बाळंभट्ट किंवा बाळकृष्णाचा पिता, व नागोजी भट्टाचा शिष्य. याचा पिता रामभट्ट. याचे ग्रंथः—चातुर्मास्यप्रयोग, वेदांतकल्पतरुमंजरी, शास्त्रदीपिका व्याख्या प्रभा. उदाहरण चंद्रिकाकार भिन्न असावा. याची पत्नी लक्ष्मी.

**वैरट गुहिलोत**—(स. १०६८–८८) हा मेवाडच्या गादीवर योगराजानंतर आला. यानें योगराजाकडून मेवाडचें राज्य घेतलें. हा अल्लटापासून उत्पन्न झालेल्या एका शाखेपैकीं होता, असें कुंभळगडच्या अप्रकाशित लेखावरून समजतें.

**वैराजी सारंगी ( दर्यासारंग )**—हा एक शिवाजीचा आरमारी सेनापति होता. हा सुरतेवर निघाला होता ( प. सा. १३५८, स. १६७० नवं. २१ ).

**वैरिसिंह गुहिलोत**—( स. ११०३–७ ) हा हंसपालानंतर मेवाडच्या गादीवर आला. याची अल्हणदेवी नांवाची मुलगी गयकर्णदेव कलचुरींची पत्नी होती. तिनें बांधलेल्या शिवमंदिरावरील लेखावरून याचीहि माहिती मिळते. तो लेख कलचुरि संवत् ९०७ ( स. ११५५ ) मधील आहे. भेराघाटच्या लेखावरून हा अनेक सामंतांचा अधिपति आणि शत्रूंना डोंगरांत पळून लावणार होता असें कळतें ( एपि. इंडि. भा. २, पृ. ११–१२ ). यानें आहाड ( आघाट ) नगराला तट बांधला. याला बावीस पुत्र होते ( कुंभलगडचा अप्रकाशित लेख ).

याच्यानंतर याचा पुत्र विजयसिंह गादीवर आला.

**वैरिसिंह परमार**—हा माळव्याच्या परमारांपैकीं वाक्पतिराजाचा पुत्र. याला वज्रटस्वामी असेंहि म्हणत. हा शूर होता.

**२.** माळव्याच्या परमारांपैकीं कृष्णराजाचा पुत्र.

**वैरोचन वज्र**—चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं एक. यानें वीर वैरोचनगीतिका नांवाचा ग्रंथ लिहिला.

**वैष्णवाचार्य**—( रामभद्र दीक्षित पाहा ).

**व्यंकट नरसी**—शेवटल्या बाजीरावाच्या वेळची सुप्रसिद्ध नर्तकी. बाजीरावानें तीन दिवस हिचा अहोरात्र नाच करवून हिला सव्वीस हजार रुपये बक्षिस दिले. हिचें पहिलें नांव नरसी. विश्वगुणादर्शचम्पू काव्याचा कर्ता व्यंकटाध्वरि यानें हिच्या नाचांत कांहीं दोष काढून ते स्वतः हिला समजावून दिले. तेव्हांपासून ही त्याची शिष्या बनली. आणि त्याचें नांव हिनें आपल्या नांवापुढें जोडलें, अशी आख्यायिका भारतवर्ष खंड ३ जुन्या ऐतिहासिक गोष्टी पृ. २० वर दिली आहे. पण ती कालदृष्ट्या चुकीची दिसते. एक रामानुज नांवाचा पंडित डोक्याला सोन्याचा मुगुट घालून महाभाष्यखंडनकर्ता म्हणून रामशास्त्री प्रभुणे यांच्या वेळीं पुण्यांत मिरवत असे. शेवटीं वादविवादांत त्यानें अनंतभट्ट नांवाच्या प्रतिस्पर्ध्यावर अभिचार केला म्हणून रामशास्त्रींनें त्यावर बहिष्कार घातला तो कदाचित् वरील असावा.

**व्यंकटनाथ**—हा रामानुजाच्या विशिष्टाद्वैत मताचा असून यानें त्या मताला अनुसरून गीतेवर तात्पर्यचंद्रिका नांवाची टीका लिहिली आहे. ही टीका गीतेवरील रामानुजभाष्याचें विवरण करणारी आहे. गुजराथी प्रिं. प्रेसच्या गीताटीकांत ही दुसऱ्या आवृत्तींत छापली आहे.

२. हा शंकराचार्यांच्या अद्वैतमताचा असून यानें गीतेवर ब्रह्मानंदगिर्याख्यव्याख्यान नांवाची टीका लिहिली आहे. पण केवळ शांकरभाष्याचा विस्तार यांत नसून स्वतंत्रपणें पुष्कळ विवेचन केलें आहे. शिवाय अद्वैतमताचें समर्थन करतांना रामानुज व माध्व यांच्यावर बरीच कडक टीका केली आहे. तसेंच शांकराभाष्याला सोडूनहि स्वतंत्रपणें शब्दार्थ व विवेचन केलेलें आढळतें. गुजराथी प्रिं. प्रे. च्या गीताटीकांत दुसऱ्या आवृत्तींत ही टीका छापली आहे.

**व्यंकटपति आरविडु**—( स. १५८६–१६१४ ) विजयनगरच्या राजघराण्यापैकीं तालिकोट युद्धानंतरच्या पहिल्या श्रीरंगरायानंतरचा राजा. याच्यानंतर दुसरा श्रीरंग गादीवर आला. हा तिरुमल्ल आरविडूचा पुत्र. राज्यावर येण्यापूर्वी हा तामीळचा सुभेदार होता. याला राज्याभिषेक चंद्रगिरीस झाला. नंतर यानें आपली राजधानी पेनुकोंडा येथें नेली. यानें सदाशिवरायाचा खून केला अशी समजूत असल्यामुळें याच्याविरुद्ध लोकमत होतें. विजापूरकराच्या स्वारीमुळें यानें राजधानी चंद्रगिरीस नेली ( स. १५९२ ). पुढें वेलोरच्या नायकाचें बंड मोडून वेलोरलाहि यानें राजधानीचें स्वरूप दिलें ( स. १६०६ ). हा व्यंकटेशाचा भक्त होता. याचा गुरु ताताचार्य. यानें गोवळकोंड्याच्या मुहम्मदकुली कुत्बशाहाचा आणि दुसऱ्या इब्राहीम आदिलशहाचा पराभव केला.

याच्या कारकीर्दींत पोर्तुगीजांचा व इतर युरोपियनांचा संबंध विशेष आला. यानें त्यांना व विशेषतः पोर्तुगीजांना स्थिर होण्यास मदत केली. यानें दरबारांत कांहीं युरोपियन चित्रकार ठेवले होते.

याला ओबांबा, वेंकटाम्बा, रघवांबा वगैरे सहा बायका होत्या. तरी याला एकहि मुलगा नव्हता. यानें आपला भाऊ राम याचा मुलगा जवळ ठेवून त्याला चिक्कराय युवराज अशी पदवी दिली. पण याचा सासरा ओबराज व मेहुणा जगराय यांनीं त्याच्यासुद्धां सर्व घराण्याचा खून केला. पण याचमा नायकानें तिसऱ्या श्रीरंगाला वांचवून कसाबसा राजघराण्याचा बचाव केला ( श्रीरंग पाहा ).

याच्यानंतर याच्या राम नांवाच्या भावाचा मुलगा श्रीरंग हा गादीवर आला. हा स. १६१४ च्या आक्टोबर महिन्यांत मरण पावला. हा एक थोर राजा होता.

अप्पय्य दीक्षितानें कुवलयानंद व लक्षणरत्नावली हे दोन ग्रंथ याच्या आज्ञेवरून लिहिले.

हा शरिरानें सडपातळ, सुंदर डोळ्याचा व मोठा रूपवान् होता. याचा एक पुतळा तिरुपति येथें आहे.

साम्राज्यदृष्टीनें हा विजयनगरचा शेवटचा सम्राट् होय. यानें स. १६१२ मध्यें सम्राट् म्हणून राजा ओडेयरच्या म्हैसूर राज्याच्या स्वातंत्र्यास अनुमति दिली. तें राज्य अद्यापि परंपरा चालवीत आहे. पण याचेनंतर सरदार स्वतंत्र होऊं लागले.

२. ( स. १६३३–४५ सुमार ) हा विजयनगरच्या दुसऱ्या रामानंतरचा राजा. याला पेद्द व्यंकट म्हणत. याची पत्नी बंगारा.

३. ( स. १६७८–९० ) हा विजयनगरपैकीं तिसऱ्या श्रीरंग तुलुवानंतरचा राजा ( लिंगय्या नायक पाहा ).

४. ( स. १७०७–१६ ) हा विजयनगरच्या चवथ्या श्रीरंगानंतरचा राजा.

**व्यंकटपति रायसम**—( स. १५८० सुमार ) विजयनगरच्या पहिल्या श्रीरंग आरविडूचा राजकवि. यानें 'लक्ष्मीविलासम्' नांवाचें काव्य तेलगूंत लिहिलें.

**व्यंकटप्पा नायडू**—( स. १५८१ ) हा विजयनगरच्या श्रीरंग आरविडूचा सेनापति. हा ओबालानंतर सेनापति झाला. यानेंच तेलंगींत वीररसप्रधान 'चित्रांगदचरित्र' लिहिलें असावें.

**व्यंकट ( राय ) तुलुव**—( खून स. १५०२ )

याचें नांव व्यंकटाद्रि किंवा चिन्न व्यंकटाद्रि असून इतिहासामध्यें हा पहिला व्यंकट या नांवानें संबोधिला जातो. हा अच्युतरायाचा पुत्र. याच्या मातेचें नांव वरदादेवी अमाल किंवा वरदंबिका.

हा गादीवर आला तेव्हां अल्पवयी होता म्हणून याचा सर्व कारभार याच्या आतेचा नवरा सलाकम तिम्मराजू हा मुखत्यारीनें पाहूं लागला. पण त्याला रामराय व तिरुमल्ल आरविदु हे प्रतिस्पर्धी होते. ते अनेक दृष्टींनीं योग्य होते तरी त्यांना हा कैद करील म्हणून पळून जावें लागलें व गादीवर बसल्यापासून सहा महिन्यांच्या आंत याचा खून झाला. यानंतर थोडक्याच कालांत रामरायानें सदाशिवरायाला गादीवर बसविलें.

**व्यंकटमाधव**—(स. १०५०–११५० सुमार) याचें ऋग्वेदावर भाष्य होतें असें देवराजयज्वन्च्या निघण्टुभाष्यावरून दिसतें. डॉ. सरूप, डॉ. राज हे याला दहाव्या शतकाच्या सुमारास समजत असले तरी पं. भगवद्दत्ताच्या मतानें हा बाराव्या शतकांतील किंवा तत्पूर्वीचा आहे. पं. साम्बशिवशास्त्रींनें निघण्टुभाष्याच्या प्रस्तावनेंत स. १०५०-११५० हा याचा काळ मानला आहे. यानें निर्दिष्ट केलेले आपले समकालीन व नातेवाईक खालीलप्रमाणें होत. प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं असणाऱ्या श्लोकावरून असें दिसतें.

पितामह—माधव
पिता—वेङ्कटार्य हा ऋग्वेदी होता.
मातामह—भवगोल आश्वलायन असावा.
माता—सुन्दरी
स्वगोत्र—कौशिक
मातृगोत्र—वासिष्ठ
अनुज—सङ्कर्षण
पुत्र—वेङ्कट अथवा गोविंद
निवास—दक्षिणापथांतील चोलदेश. कावेरीच्या दक्षिणतीरावरील गोमान् गांव.
समकालीन राजा—एकवीर.

**व्यंकटराव काशी**—(स. १७७३–७५) नागपूरकर भोसल्यांचा वकील. जात प्रभु. मुधोजीनें यास रघूजीकरितां सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें आणण्याकरितां पुण्यास पाठविलें असतां हा नारायणरावाच्या खुनाच्या कटांत सामील झाला म्हणून कैद झाला. पण दादाचा पक्ष सोडण्याबद्दल करारपत्र घेऊन बारभाईंनीं यास सोडलें.

**व्यंकटराव घोरपडे**—(मृत्यु स. १७४५) हा इचलकरंजीच्या नारोपंताचा मुलगा व बाळाजी विश्वनाथ पेशव्याच्या अनूबाई नांवाच्या मुलीचा नवरा. कोल्हापूरचें सचीवपद याच्या वडिलांकडे होतें तें यांस मिळालें नाहीं म्हणून हा शाहूस मिळाला. शाहू-संभाजींचा तह झाल्यावर यास कोल्हापूर राज्यांत शाहूनें जहागीर देवविली. यानें गोव्यावर स्वारी करून पोर्तुगीजांना पराभूत केलें (स. १७३९). पुढें यानें इचलकरंजीस तट बांधला. याला पेशव्यांचा आधार असल्यानें हा शाहूशीं उद्धटपणें वागे. याची मुलगी वेणूबाई त्रिंबकराव पेठयास दिली होती. याचा मुलगा नारायणराव. साताऱ्यास याच्या नांवाचा व्यंकटपुरा प्रसिद्ध आहे.

२. (मृत्यु स. १७९५) हा नारायणरावाचा मुलगा. हा शूर असून यानें हरिपंत फडक्यांना गुजराथच्या स्वारींत मदत केली. पण हा व्यसनी असल्यामुळें कर्जबाजारी असे. याच्या मृत्यूनंतर याची पत्नी रमाबाईनें नारायणराव बाळासाहेब यास दत्तक घेतलें.

**व्यंकटराव पिंगळे**—(स. १८०७–१०) निजामाकडील पेशव्यांचा वकील. याचा पिता गोविंदराव. याच्यानंतर याचा भाऊ शामराव वकिलीचें काम पाहूं लागला.

**व्यंकटराव भावे**—(स. १७९१) हा रामदुर्ग संस्थानच्या भास्कररावाचा दत्तक पुत्र. पेशव्यांनीं यास टिपूच्या कैदेंतून सोडविलें व सरंजाम दिला.

**व्यंकटाद्रि आरविदु**—(स. १५६५) हा विजयनगरच्या रामराय आरविदूचा धाकटा भाऊ. तालिकोटच्या लढाईंत व सलाकमच्या विरुद्ध यानें रामरायास फार मदत केली. पण सदाशिवरायाला कैदेंत ठेवणें, तिरुमल्लानें राजा होणें वगैरे याला पसंत नव्हतें, त्यामुळें यानें बंड केलें. पण त्याचा उपयोग झाला नाहीं. याला कृष्णम्मा व रंगम्मा अशा दोन बायका आणि रंगप्पा व राम अशीं दोन मुलें होतीं. तालीकोटच्या लढाईनंतर हा लवकरच मेला असावा.

**व्यंकटाध्वरी**—(ग्रंथकाल स. १६३०-४०) हा एक वैष्णव कवि होता. हा कांची–मंडलामध्यें फार प्रख्यात विद्वान् होता. त्यानें वाजपेयादिक मोठाले यज्ञ केले.

व्यंकटाध्वरी हा लक्ष्मीचा उपासक होता. त्यानें नीति, अन्योक्ति, राजवर्णन इत्यादि विषयांवर बरेच काव्यग्रंथ केले आहेत. त्यांत याचे पुढील ग्रंथ फार प्रसिद्ध आहेत. ते 'विश्वगुणादर्शचंपू', 'लक्ष्मीसहस्र', 'हस्तिगिरिचंपू', व 'उत्तररामचंपू' हे होत. या ग्रंथांत उत्प्रेक्षा, श्लेष, शब्दसौंदर्य आणि प्रास इत्यादि उत्तम काव्याचे गुण विशेष आढळतात. विश्वगुणादर्शांत दोन गंधर्वांचा संवाद असून ते विमानांत बसून फिरत एक गुण व दुसरा दोष वर्णन करितो.

याच्या काव्यांत मद्रासमधील ब्रिटिश वसाहतींतील लोकांचा निर्देश आला आहे ( व्यंकट नरसी पाहा ).

याच्या पित्याचें नांव रघुनाथ व आजोबाचें नांव अप्पय होय. याचें गोत्र अत्रि दिसतें. कारण यानें आपणास आत्रेय म्हणवून घेतलें आहे. हा 'नीलकंठचंपू' ( स. १६३६ ) करणाऱ्या नीलकंठाचा सहचर होता.

**व्यंकटेश**—याच्या तैत्तिरीयसंहिताभाष्याची प्रत बोलपुर येथें शान्तिनिकेतनांत आहे. ती ग्रंथाक्षरांत आहे. त्यांत तीन शेवटलीं कांडें आहेत. याच्या भाष्याचें नांव 'वेदभाष्यसंग्रहसार' असें आहे. सायणाप्रमाणें सूत्रादिकांचा निर्देश यानें केला नाहीं. रुद्रभाष्यकार वेङ्कटनाथ व हा एक असण्याचा संभव आहे.

**व्यंकोजी ऊर्फ मन्याबापू भोसले**—( मृत्यु स. १८११ आगस्ट ) हा नागपूरच्या मुधोजी भोसल्याचा तिसरा मुलगा. हा बदामीचे स्वारींत हजर होता ( स. १७८६ ). याजकडे तेथें दिवाणाचा हुद्दा होता. मुधोजीनंतर चंद्रपूरचा व खंडोजीच्या मृत्यूनंतर छत्तीसगडचा सुभा यास मिळाला. हा इंग्रजांविरुद्ध वागतो म्हणून यास रघूजीनें कैदेंत ठेवलें होतें. याच्याकडे 'सेनाधुरंधर' हें पद होतें. मुलगा आप्पासाहेब हा गयावर्जन करून आल्यावर काशीस मेला.

**व्यंकोबाशास्त्री**—( स. १७९० ) नागपूरच्या दुसऱ्या रघूजीनें चिन्नूर येथें याचेकडून सोमयाग करवला ( ना. प्रां. इ. पृ. ३०८; बाबासाहेब भोसले पाहा ).

**व्यंगलम्बा**—ही विजयनगरच्या तिरुमल्ल आरविडूची पत्नी. हिच्या बापाचें नांव कृष्णराय आणि आईचें नांव चिन्नादेवी असून ही सदाशिवरायाची बहीण होती.

**व्याघ्रराज**—( स. ३८० ) अमरकंटकाजवळच्या मेखल देशांत हा राज्य करीत होता. अश्वमेधाच्या वेळीं समुद्रगुप्तानें याचा पराभव केला. पण त्यानें याचें राज्य यास परत देऊन मांडलिक केलें.

**व्यासजी**—( स. १५६३ सुमार ) हिंदी कवि. सनाढ्य ब्राह्मण. हरिराम व्यास असें नांव. वैष्णव. हितहरिवंशजीचा शिष्य. याचा ग्रंथ रासपंचाध्यायी.

**व्यासतीर्थ**—( समाधि स. १५३३ ) हा मध्वाचार्यांच्या शिष्यपरंपरेंतील होता.

पक्षधरमिश्र व हे यांचा वाद झाला. साळुव नरसिंह व कृष्णदेवराय तुळुव यांच्या दरबारीं हा राजगुरु होता.

---

# श

**शकमित्र**—मथुरेचा एक क्षत्रप राजा. याचा पुत्र मेदक.

**शकरखान**—गुजराथच्या पहिल्या अहमदचा हा दुसरा मुलगा.

याला मुहम्मद १ ला या नांवाचा एक भाऊ असून तो गादीवर आला होता. निझामखान नांवाचा याचा एक पुत्र होता.

**शक्तिकुमार गुहिलोत**—( स. ९७७-९३ ) मेवाडचा शालिवाहनानंतरचा राजा. हा राजा प्रभु, मंत्र व उत्साह या तीनहि शक्तींनीं युक्त होता. तसेंच याची राजधानी आटपुर ( आहाड ) वैभवसंपन्न होती. नरवाहनराजाचा अक्षपटलिक श्रीपति होता. त्याचे दोन पुत्र मत्तट व गुंदल हे याच्या दोन हातांसारखे होते ( इंडि. अँटि. ३९. १९१ ); आहाडच्या वि॰ सं. १०३४ ( स. ९७७ ) वैशाख शुद्ध १ च्या अप्रसिद्ध शिलालेखांत याला पुष्टि व थोडी अधिक माहितीहि मिळते. माळव्याच्या मुंजानें आहाडवर स्वारी केली व आहाड लुटलें. त्या वेळीं हथुंडीच्या धवळ राठोडानें मेवाडच्या राजाला साहाय्य केलें होतें. त्या वेळीं हाच मेवाडचा राजा असावा. त्या वेळीं मुंजानें मेवाडराज्यांतील चितोड व त्याच्या आसपासचा प्रदेशहि जिंकलेला दिसतो. कारण मुंजानंतर माळव्याचा राजा सिंधुराज( नवसासांक )चा पुत्र भोज चितोड येथें राहत असे व तेथें त्यानें 'त्रिभुवन नारायण' नांवाचें शिवमंदिर बांधलें. तें तेथें अद्यापि असून त्याला सध्यां 'मोकलजी' असें म्हणतात. पुढें माळव्याचा परमार राजा नरवर्मा याचा पराजय करून सिद्धराज जयसिंहानें मेवाडचा चितोड वगैरे भाग आपल्याकडे घेतला. पुढें कुमारपालानंतर पुनः चितोड मेवाडच्या राजाकडे आला. याच्या

वेळचे तीन शिलालेख मिळाले आहेत. एक वि. सं. १०३४ ( स. ९७७ ) वैशाख शुद्ध १ चा आटपुर( आहाड )चा कर्नल टॉडला मिळाला. त्यांत गुहदत्त( गुहिल )पासून शक्तिकुमारपर्यंत पुरी वंशावळ मिळते हें त्याचें महत्त्व आहे. दुसरा लेख अल्लट, नरवाहन व शक्तिकुमार यांच्या अक्षपटलाधीशांचें वर्णन करणारा आहे. तिसरा एक संवत्-रहित आहे. याच्या नंतर अंबाप्रसाद गादीवर आला.

**शक्तिवर्मा ( पश्चिम ) चालुक्य**—( स. १००३–१५ ) हा चालुक्यांपैकीं दानार्णवाचा सर्वांत वडील मुलगा होता. याला चालुक्यचंद्र असें म्हणत. अनुपलब्ध .माहितीचीं तीस वर्षे संपल्यावर हा राज्यावर आला.

**शक्तिस्वामिन्**—( स. ७२६ ) हा अभिनंद कवीचा पूर्वज काश्मीरच्या मुक्तापीडाच्या अमदानींत होता.

**शठकोपमति**—( स. १५५० सुमार ) अहोबल मठाचा गुरु. 'वासंतिकापरिणय' नाटकाचा कर्ता.

**शतधनुष मौर्य**—( ख्रि. पू. १९९–९१ ) मौर्य-वंशांतील देववर्म्याचा पुत्र. याच्या वेळीं पश्चिमोत्तर भारतावर ग्रीकांची सत्ता पूर्णपणें स्थापित झाली होती. डेमेट्रियसनें ख्रि. पू. २०० मध्यें हिंदुस्थानावर स्वारी केली. त्याचें राज्य याच्या वेळीं हिंदुस्थानांत चांगलें विस्तृत असून स्थिर झालें होतें. पतंजलीनें निर्दिष्ट केलेली दात्तामित्रि ही नगरी त्याच्या नांवाची असावी. याच्या वेळींच विदर्भहि स्वतंत्र झाला असावा. कारण पुष्यमित्राच्या वेळीं तो या साम्राज्यांत नव्हता, असें मालविकाग्निमित्रावरून कळतें.

**शत्रुघ्न**--( स. १५२८–८५ ) याचा 'मंत्रार्थदीपिका' नांवाचा ग्रंथ आहे. यानें उवटाचें यजुर्वेदभाष्य, गुणविष्णूचें छंदोगमंत्रभाष्य, हलायुधाचें कल्याणसर्वस्व, गौरधराची वेदविलासिनी हे वेदावरील ग्रंथ पाहून आपलें भाष्य लिहिलें होतें. यानें पूर्वीच्या भाष्यकारांचें भाष्य जरी घेतलें असलें तरी यानें कठीण स्थळें अत्यंत विशद केलीं आहेत. मंत्रार्थदीपिकेंत नित्यकर्म व संस्कार यांतील मंत्र आहेत. हा स. १५२८–८५ त जिवंत होता. याच्या षडङ्गशतरुद्रिय भाष्याचें वर्णन करीत असतां कै. महामहोपाध्याय हरप्रसादशास्त्रीनें हा संपूर्ण यजुर्वेदाचा भाष्यकार होता असा जो तर्क केला आहे तो बरोबर नाहीं. रुद्रभाष्य हा मंत्रार्थदीपिकेचाच एक भाग आहे. याला पंजाबमधील जालंदर येथील धर्मचंद्र राजाचा आश्रय होता.

**शबर**--उदयन पांड्याचें नामांतर.

**शबरस्वामिन्**--याबद्दल खालील परंपरागत श्लोक प्रसिद्ध आहेतः—

ब्राह्मण्यामभवत् वराहमिहिरो ज्योतिर्विदामग्रणीः ।
राजा भर्तृहरिश्च विक्रमनृपः क्षत्रात्मजायामभूत् ॥
वैश्यायां हरिचंद्रवैद्यतिलको जातश्च शंकुः कृती ।
शूद्रायाममरः षडेव शबरस्वामिद्विजस्यात्मजाः ॥

हा दीप्तस्वामीचा पुत्र. हा काश्मीरी होता. पूर्वमीमांसा-भाष्यकार.

**शबरिपा**--( स. ८०० सुमार ) हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं पांचवा सिद्ध. याचे ग्रंथ हिंदींत आहेत. या नांवाचे दोन सिद्ध झाले.

**शम्सुद्दीन ( बंगाल )**—( स. १३८३–८६ ) बंगालचा सुलतान जो सुलतान-उस-सलातीन त्याचा हा मुलगा होय. हा बापानंतर स. १३८३ मध्यें गादीवर आला.

हा दुर्वर्तनी असल्यामुळें याचें राज्य कंस नामक एका हिंदु जमीनदारानें बळकाविलें. हा स. १३८६ सालीं मरण पावला.

२. ( शाहामीर पाहा ).

३. ( स. १५३४–३५ ) काश्मीरच्या मुसलमानी वंशांतील जो मुहम्मदशहा त्याचा हा दुसरा मुलगा होय.

**शम्सुद्दीन अल्तमश गुलाम**—(स. १२१०-३६) गुलामवंशांतील दिल्लीचा बादशहा. कुतुबुद्दीन ऐबकचा पुत्र आरामशहा यास पदच्युत करून हा गादीवर आला. याचें मूळचें नांव अल्तमश असें आहे, पण गादीवर बसतांना शम्सुद्दीन असा यानें किताब धारण केला. याला सेनापति असतांना कुतुबुद्दीन ऐबकनें 'अमीरशिकार' अशी पदवी दिली होती. त्या पदवीचा निर्देश 'हंमीरमदमर्दन' या नाटकांत मीलच्छीकार या संस्कृत शब्दांत दिसतो. हा मूळ थोर घराण्यांतील असून हुषार, देखणा व बुद्धिमान् असल्यामुळें द्वेषबुद्धीनें याच्या भावांनीं याला गुलाम म्हणून विकलें होतें.

परंतु याच्या धन्यानें याला उत्तम शिक्षण देऊन कुतुबुद्दीनला विकलें होतें. हळुहळू हा कुतुबुद्दीनला इतका प्रिय झाला होता कीं, त्यानें याला आपली मुलगी दिली होती. पुढें यानें बऱ्याच लढाया केल्या. हा स. १२३६ त मरण पावला. यानेंच प्रथमतः अरबी नाणीं हिंदुस्थानांत सुरू केलीं.

**शम्सुद्दीन दामघानी**--(स. १३७४) फीरूझ तुल्लकनें यास गुजराथचा सुभेदार नेमलें. यानें वसूल वाढविण्याचा प्रयत्न केला तेव्हां लोकांनीं यास ठार केलें.

**शम्सुद्दीन पूर्बी**—( मलीक अली मुबारिक पाहा ).

**शम्सुद्दीन बाहमनी**--( स. १३९७ पदच्युत ) हा पहिल्या महमूदचा धाकटा पुत्र. पण याचा चुलतभाऊ फीरूजनें यास पदच्युत करून याचे डोळे काढले ( मु. रि. भा. १ ला, पृ. ३२० ).

**शम्सुद्दीन महमूदशाहा**—( अहमद पाहा ).

**शय्यम्भव**- ( खि. पू. ४२९ ) याचा जन्म वात्स्यगोत्रांत झाला. शांतिदेवीच्या साक्षात्कारामुळें यानें धर्माची दीक्षा घेतली. याचा मुलगा मनक याकरितां यानें दशवैकालिक सूत्र नांवाचा ग्रंथ रचिला. वयाच्या ६२ व्या वर्षी वीरनिर्वाणाब्द ९८ मध्यें हा मृत्यु पावला.

**शरण**—हा संस्कृतज्ञ पंडित बंगालच्या राजा लक्ष्मणसेनाचा आश्रित होता.

**शरणदेव**—( स. ११७२ ) हा 'दुर्घटवृत्ति' ग्रंथाचा कर्ता होय. हा व्याकरणांतील कांहीं अवघड स्थलांचें स्पष्टीकरण करणारा ग्रंथ होय.

**शरीफजी भोसले**--( जन्म स. १५९५ ) हा शहाजीचा कनिष्ठ बंधु असून शिवाजीचा चुलता होय. याचा जन्म स. १५९५ त घृष्णेश्वर येथें झाला व लग्न स. १६०६ मध्यें दौलताबाद येथें झालें.

शहाजीप्रमाणेंच हा सुद्धां प्रथम निजामशाहींत नोकर होता. पण पुढें हा मोगलांस मिळाला (म. द. रु. १ ). याच्या ताब्यांत चाकणचौऱ्यांशी हा परगणा होता. पातशाही उमरावांत याची गणना असे. याच्या वंशाचें वास्तव्य दौलताबाद येथें असे. याचा मुलगा त्रिंबकजी राजे हा होय. त्रिंबकजीचा मुलगा बाबाजी. त्रिंबकजीचा उल्लेख शहाजीनें अली आदिलशहास लिहिलेल्या पत्रांत आहे.

**शर्ववर्मन्**—कौमार, कालाप किंवा कातंत्र व्याकरणाचा कर्ता, कथासरित्सागरांत जरी शिववर्मा म्हटलें आहे तरी कथामंजरींत यास शर्ववर्माच म्हटलें आहे ( शालिवाहन पाहा ).

**शर्ववर्मन् मौखरी**--( स. ५७३-५७९ ) मौखरीवंशांतील ईशानवर्मनचा हा मुलगा होय. हा आपल्या बापानंतर कनोजच्या गादीवर आला. दामोदरगुप्त याचा समकालीन असून दामोदरगुप्तानें याच्याशीं लढाई केली होती. यानें हूणांचा पराभव केला होता. उत्तर हिंदुस्थानांत हा एक मोठा राजा होऊन गेला. त्या वेळीं याला गुप्त व हूण हे राजे प्रतिस्पर्धी होते. परंतु त्यांचा यानें पराभव करून त्यांना आपलें वर्चस्व मान्य करावयास लाविलें. याच्यानंतर कनोजच्या गादीवर अवंतिवर्मन् हा आला. परंतु याचें व अवंतिवर्मनचें नातें काय होतें हें मात्र उपलब्ध नाहीं ( मौखरी by E. A. Pires, p.89-94 ).

**शशधर**—( स. ११२५ सुमार ) यास महामहोपाध्याय अशी पदवी असून हा मिथिलेचा रहिवाशी होता. हा गंगेशाच्या पूर्वी परंतु उदयनाच्या मागाहून होऊन गेला असावा. कारण उदयनाच्या ग्रंथांतील उतारे यानें घेतले आहेत व त्याचा 'केचित्' असा उल्लेख केला आहे. बंगाली लोकांच्या म्हणण्याप्रमाणें शशधर व मणिधर ह्या दोन तर्कज्ञांच्या व्याप्तीच्या व्याख्येवर गंगेश उपाध्यानें स. च्या १२ व्या शतकांत 'सिंहव्याघ्रोक्तलक्षण' नांवाची टीका लिहिला.

**शशांकमुद्रा**—ही कल्याणपूरच्या वल्लभाची मुलगी. हिचें बनवासीच्या कदंबघराण्यांपैकीं मयूरवर्म्याशीं लग्न झालें.

**शहरबानो**—(स.१६७३सुमार) विजापूरचा बादशहा दुसरा अली यास शिकंदर व शहरबानो अशीं अनुक्रमें मुलगा व मुलगी अपत्यें होतीं. खवासखानानें हिला औरंगजेबाच्या मुलास देऊन औरंगजेबाशीं मैत्री करण्याचा प्रयत्न केला, पण ती गोष्ट अबदुल करीम, बहलोलखान वगैरेंना न आवडून त्याचा खून झाला. तेव्हां औरंगजेबानें हिच्याकरितां विजापूरला वेढा घातला. लोक नाखूष होते, पण संकट टाळण्याकरितां हीच पुरुषवेषानें दिलेरखानाच्या गोटांत गेली, व त्यानेंहि हिला दिल्लीस पाठवून दिलें. विजापूरचा वेढा पुढें शिवाजीमुळें उठला.

**शहाअलम**—( स. १७०७-१२ ) ( बहादुरशाहा पाहा ).

**२.** ( स. १७५९-१८०६ ) हा दिल्लीच्या मोगल घराण्यांतील दुसऱ्या अलमगीराचा मुलगा होय. याचें मूळ नांव अलीगौहर.

बापाच्या खुनानंतर यानें शहाअलम नांव धारण करून बादशाहीपद स्वीकारलें. परंतु दिल्ली याच्या ताब्यांत नव्हती. हा प्रथम इंग्रजांच्या आश्रयास गेला. स.१७६५ त यानें इंग्रजांस बंगाल, बहार व ओरिसा या प्रांतांच्या दिवाणगिरीची सनद दिली. पण शेवटीं मराठ्यांनीं याला दिल्लीस आणलें ( १७७० ).

पुढें नजीबखानाचा नातू गुलामकादर यानें याच्या कुटुंबांतील बायकामुलांस लाथांनीं व चाबकांनीं बेदम मारून वृद्ध शहाचे डोळे काढिले ( १७८८ ). अखेर शहानें महादजी शिंद्याची मदत घेऊन गुलामाचा वध करविला. तेव्हांपासून बादशाह व सर्व मोंगली साम्राज्य

मराठ्यांच्या हातीं आलें. हा स. १८०६ मध्यें ८६ वर्षांचा होऊन मरण पावला. हा राजकारणाला नालायक पण सज्जन व पापभीरु होता.

**शहा कासम निजाम**—( स. १५७० सुमार ) हा अहमदनगरच्या हुसेन निजामचा मुलगा.

**शहाजहान**—( स. १५९३-१६५८ ) हा पांचवा मोगल बादशाहा होय. शहाबुद्दीन मुहमद किरान ऊर्फ शहाजहान हा जाहांगीर ऊर्फ सेलीमचा जोधपूरच्या राजकन्येपासून झालेला पुत्र होय. नूरजहान व आसफखान यांच्या खटपटीमुळें यास राज्य मिळालें. बाप जिवंत असतां यानें दोनतीन वेळेस अयशस्वी बंडें केलीं होतीं.

स. १६२८ त राज्यावर आल्यावर यानें सर्व आप्तांना ठार केलें. स. १६३७ त शहाजीचा पराभव करून यानें अहमदनगरचा सर्व मुलूख आपल्या ताब्यांत घेतला. युरोपियन लोकांनीं हिंदुस्थानांत न यावें, याकरितां हा विशेष खबरदारी घेई. हा त्यांना धार्मिक बाबतींत हात घालूं देत नसे. हुगळी नदीच्या कांठीं असलेली पोर्तुगीजांची वखार, ते धार्मिक बाबतींत जुलूम करतात म्हणून स. १६३२ त फौज पाठवून यानें लुटली व त्यांची सर्व मालमत्ता जप्त केली. इराणी लोकांपासून यानें कंदाहार घेण्याचा प्रयत्न केला, पण यास यश आलें नाहीं. असफखानाची मुलगी मुम्ताज ही शहाजहानची बायको. तिच्यापासून याला ८ पुत्र व ६ कन्या अशीं १४ अपत्यें झालीं, त्यांपैकीं ८ लहानपणींच मेलीं. या मुम्ताजच्या स्मरणार्थ जगप्रसिद्ध ताजमहाल कबर त्यानें बांधली. वृद्धपणीं वडील पुत्र दारा याच्या हातीं यानें राज्यकारभार दिला होता. पुढें औरंगजेबानें सर्व भावांवर जय मिळवून राज्य मिळविलें. शहाजहाननें ८ वर्षे मुलाचा कारागृहवास भोगिला, व हा त्यांतच स. १६६६ झालीं मृत्यु पावला. त्याची कारकीर्द शांततेची गेली, व मोंगल अमदानीचा भरभराटीचा कळस याच्याच कारकीर्दींत झाला. हा मोठा विलासी व रंगेल असे. याच्यावर याची प्रजा फार संतुष्ट होती. याच्या दरबारचा डामडौल मोठ्या भपक्याचा असे. हा स्वतः राज्यकारभार अगदीं थोडा पाही. पण हाताखालचे कामगार यास उत्तम मिळाल्यानें याची कारकीर्द सुरळीत पार पडली. हल्लींचें दिल्ली शहर यमुनेच्या तीरीं यानेंच वसविलें. याच्या वेळीं तेथील चांदणीचौकांत सर्व पृथ्वींत उत्पन्न झालेल्या जिनसांचा सौदा व हिंदुस्थानांतील एकंदर संपत्तीचा विनिमय चालू असे. जुम्मामशीद, मोती मशीद, दिवाणी आम, दिवाणी खास वगैरे यानें बांधलेल्या इमारती प्रेक्षणीय आहेत. यानें दानधर्माहि बराच केला.

**शहाजी भोसले**—( स. १५९५-१६६४ ) याचा पिता मालोजी व आई उमाई. मालोजीला विठोजी नांवाचा भाऊ होता. त्याला मुलें झालीं तरी मालोजीस मूल नव्हतें. शहाशरीफ नांवाच्या फकीराच्या आशीर्वादानें मालोजीला तीन वर्षांच्या अंतरानें शहाजी व शरीफजी असे दोन मुलगे झाले. मालोजी इंदापूरच्या स्वारीवर गेला असतां तेथें तो लढाईंत मरण पावला.

तेव्हां याचें पालनपोषण आई व चुलता विठोजी यांच्याकडे आलें. याचें लग्न १६१५ च्या वर्षी निजामशाहींतील मोठा सरदार लुखजी जाधव याच्या जिजाबाई नांवाच्या मुलीशीं झालें.

नंतर एकदां दरबाराकरितां आलेले सरदार परत जात असतां खंडागळ्याचा हत्ती बेफाम झाला. त्याला आवरतांना लुखजी जाधवाचा मुलगा दत्താजी, विठोजी भोसल्याचा पुत्र संभाजीकडून, मारला गेला. त्याचा सूड घेण्याकरितां लुखजी जाधवानें संभाजीस मारलें. यामुळें लुखजीवर निजामशाहाची गैरमर्जी होऊन तो मोंगलांच्या आश्रयास गेला ( स. १६२१ ).

पुढें भातवडीच्या युद्धांत मोंगल व विजापूरकर यांचा पराभव मलिकंबरानें केला. तेव्हां यानें व विठोजीच्या मुलांनीं चांगलें शौर्य गाजविलें. परंतु त्यांच्यांत भाऊबंदीचे तंटे सुरू झाले आणि मलिकंबर याचा द्वेष करूं लागला. हें ओळखून हा विजापूरच्या इब्राहीम आदिलशाहाकडे गेला ( स. १६२५ ). तेथें यास सरलष्कर हा किताब मिळाला. त्या वेळीं यानें कर्नाटकावर स्वारी केली. इब्राहीम आदिलशाह व मलिकंबर हे मेले, तेव्हां हा पुनः निजामशाहींत आला ( स. १६२८ ). तेव्हां याची खानदेशांत दर्याखानावर रवानगी झाली. तेथून परत आल्यावर निजामशहानें लुखजी जाधवरावास मारविलें. आणि दरबार आपल्याहि विरुद्ध होत आहे असें पाहून हा सैन्यासह संगमनेरावरून पुण्यास आला आणि तेथें आदिलशाही मुलखास याचा उपद्रव पोंचला. तेव्हां मुरार जगदेवानें पुणें जाळून येथील वस्ती उठविली. या सुमारास याचा मुलगा संभाजी याचें लग्न शिवनेरीच्या विजयरावाच्या जयंती नांवाच्या मुलीशीं झालें. आणि गरोदर असणाऱ्या जिजाबाईस शिवनेरी येथें ठेवून हा दर्याखानाशीं लढण्यास गेला. नंतर हा मोंगलांचा सरदार अजमखानाकडे गेला. त्यानें यास मनसब देऊन शिवनेरीकडील भाग घेण्यासाठीं पाठविलें. तेव्हां यानें बालशिवाजीस प्रथम पाहिलें. नंतर

निजामशाही दरबारचा सूत्रचालक फत्तेखान याशीं मोगलांनीं तह केला आणि याची जहागीर त्याला देऊं केली. तेव्हां यानें मोगलांचा पक्ष सोडून विजापूरकरांच्या साहाय्यानें फत्तेखानाशीं लढण्याचें ठरविलें. फत्तेखानानें निजामशाही मोगलांच्या ताब्यांत देऊन त्यांचा सरदार होण्याचें ठरविलें. तेव्हां यानें नाशिक, संगमनेर, जुन्नर वगैरे भाग ताब्यांत घेऊन पेमगिरी येथें नवी स्वतंत्र निजामशाही उभारली ( स. १६३२ ). विजापूरकरांतर्फे मुरार जगदेवानें या राज्यास मान्यता दिली. ही निजामशाही तीन वर्षे टिकली. विजापूरला खवासखान व मुरार जगदेव यांचा पक्ष मागें पडून मुस्तफाखान सूत्रचालक झाला, आणि याची निजामशाही जिंकण्याकरितां त्यानें मोगलांना साहाय्य करण्याचें ठरविलें. तेव्हां मोगल सेनापति खानजमान व आदिलशाही सेनापति रणदुल्लाखान यांनीं याचा पाठलाग करून यास माहुलीच्या किल्ल्यांत कोंडलें. तेव्हां हा निजामशाहास मोगलांच्या ताब्यांत देण्यास तयार झाला व हा विजापूरकरांचा नोकर बनला. तेव्हांपासून याची योजना कर्नाटकच्या मोहिमांत झाली ( स. १६३७ ).

रणदुल्लानें तीन वर्षे बसवापट्टण हस्तगत करण्यासाठीं जी मोहीम चालविली तिच्यांत हा प्रमुख सरदार होता. यास त्या कामगिरीबद्दल बंगळूरचा किल्ला बक्षीस देण्यांत आला. पुणें परगणा व मावळांतील कांहीं भागहि यास जहागिरीदाखल देण्यांत आला. हा बंगळूरास राही आणि इकडे दादाजी कोंडदेव व्यवस्था पाही. स. १६३९ मध्यें हा इकडे आला होता, व परत जातांना जिजाबाई व शिवाजी यांना बंगळूरास नेलें. नंतर कर्यात मावळामधील गांवांचा पोटमोकासा शिवाजीच्या नांवें करून ( स. १६४१ ) त्याला आईसह इकडे धाडण्यांत आलें.

नंतर यानें कावेरीपट्टणच्या जगद्देवाचा पराभव करण्यांत आणि मदुरा व म्हैसूर येथील राज्यें जिंकण्यांत पुढाकार घेतला. बसवापट्टणच्या वीरभद्रास रणदुल्लानें राज्यभ्रष्ट केलें होतें. तरी त्याचा पक्ष घेऊन यानें निराळें धोरण सुरू केलें. विजापूरकरांचें अधिराज्य फैलावतांना कर्नाटकांतील हिंदु मांडलिकांना जगविण्याचें याचें धोरण असे. त्यामुळें मुस्तफाखान प्रभृति मुत्सद्यांना याच्या राजनिष्ठेबद्दल संशय येऊं लागला. चंदीच्या वेढ्यांत राचेवार मराठे विरुद्ध असतां हा त्यांच्याशीं घरोबा ठेवतो, अशी चाहडी अफजलनें मुस्तफाकडून विजापुरास लिहवली. तेव्हां यास पकडून विजापुरास नेण्यांत आलें. पण चौकशींत आरोप खोटा ठरल्यानें यास पांच लक्ष होनांचा बंगळूर प्रांत दिला.

इकडे शिवाजीनें बापूजी मुद्गल नऱ्हेकरामार्फत राजकारण करून कोंढाणा किल्ला घेतला. त्यामुळें यावर दरबारची पुनः गैरमर्जी झाली. शिवाय यानें गोवळकोंडेकराकडे पत्र पाठवून त्या दरबाराकडे जाण्याची इच्छा दर्शविली आणि जिंजीच्या वेढ्याच्या कामांत सेनापतीचा हुकूम न ऐकतां चालढकल करूं लागला. इत्यादि कारणांनीं यास विजापूरकरांनीं कैद केलें ( स. १६४८ जुलै २५ ). यानंतर चार महिन्यांनीं मुस्तफा मेला व विजापुरास नेतांना अफजलनें याचा अपमान केला. नंतर सिंहगड व बंगळूर हे किल्ले विजापूरकरांच्या ताब्यांत देण्याच्या अटीवर याची सुटका झाली ( स. १६४९ मे १६ ). 'महाराज' आणि 'फर्जंद' अशा पदव्या देण्यांत आल्या, व याला यानंतर चारपांच वर्षे जेनाखान पीरजादे या सरदाराच्या तंत्रानें वागावें लागे आणि शिवाजीलाहि शांत ठेवण्याची जबाबदारी यावर होती.

तथापि स. १६५४ च्या प्रारंभीं याची गणना विजापूरच्या राजनिष्ठ सरदारांत होती ( प. सा. ६६८ ). पण कनकगिरीच्या वेढ्यांत संभाजी तोफेचा गोळा लागून मेला, यांत अफजलचें कारस्थान असल्याचा यास संशय आला. त्यामुळें याला चंदावरची मसलत सांगून दूर रवाना केलें. तेव्हां शिवाजीकडेहि कोणी असावें म्हणून कान्होजी जेध्यास यानें पुण्यास रवाना केलें ( जेधेकरीना शि. प्र. ४३ ). तेव्हांच 'मला मानानें वागविण्याची इच्छा नसेल तर रजा द्या' असा निरोप यानें दरबाराकडे पाठविला ( प. सा. ७१० ). यानंतर मुहम्मद आदिलशाह मरून बडेसाहेबिणीचा कारभार सुरू झाला आणि औरंगजेबानें विजापुरावर स्वारी केली. त्या वेळीं याची गणना रुस्तुम जमा व बहलोलखान या बंडखोर सरदारांत होती ( प. सा. ७९२ ); आणि याचा औरंगजेबाशीं अंतस्थ पत्रव्यवहार चाले ( प. सा. २६१६ ). तथापि औरंगजेबानें उत्तरेकडे जातांना 'हा व शिवाजी यांना मी नोकरींत घेणार नाहीं' असें विजापूरकरांना कळविलें होतें ( प. सा. ७४४ ). इकडे स. १६५७ मध्यें यानें सद्रंपट्टण येथील डचांचें ठाणें जबरदस्तीनें ताब्यांत घेतलें (प. सा. ८१२). पुढें याची गणना बंडखोरांत होती (स. १६६० डिसें.), व यानें तेगनापट्टणला वेढा घातला, आणि डचांचा व्यापार साफ बुडाला ( प. सा. ८३९ ); व शेवटीं यानें तो किल्ला घेतला ( स. १६६१ फेब्रु. ४, प. सा. ८४६ ). नंतर हा तंजावरच्या मुलखांत लूट करूं लागला, पण तेथील नायकानें यास परत फिरविलें. याच वर्षी यानें पोर्टोनोव्हो हें बंदर घेतलें. नंतर ( स. १६६३

एप्रिल १ ) तंजावरच्या नायकानें विजापूरच्या सेनापतीशीं तह करून याच्या अरणी व बंगलोर या किल्ल्यांवर हल्ला करण्याचा करार केला. नंतर हा बंकापुरास गेला असतां याला कैद केलें. दोनच दिवसांनीं याची सुटका झाली आणि नव्या अधिकारारूढ पक्षानें याशीं संगनमत करून मदुरेच्या नायकाच्या ताब्यांतील, त्रिचनापल्लीच्या किल्ल्यावर यानें प्रथम हल्ला केला. तेव्हां तंजावरच्या राजानें यास मदत केली. या वेळीं हा व शिवाजी हे राजनिष्ठ लोकांत होते ( स. १६६३ जुलै ). पुढें हा होदेगिरी येथें शिकारीस गेला असतां घोड्यावरून पडून मृत्यु पावला ( स १६६४ जाने. २३ ).

एकंदरींत शहाजी व शिवाजी यांच्यांत वितुष्ट होतें, हा रूढ समज खरा दिसत नाहीं. दोघेहि स्वाभिमानी असल्यामुळें दोघांवरहि विजापूरदरबारचा रोष झाला, व त्यांना स्वसंरक्षणार्थ बंडखोर बनावें लागलें. परंतु शिवाजीला सभोंवारच्या परिस्थितीचें जें आनुकूल्य होतें व तेथील लोकांत असलेली आपलेपणाची भावना जागृत करून स्वतंत्र राज्य स्थापण्याची जी कामगिरी करतां आली ती शहाजीला कर्नाटकांत राहून करतां येणें शक्य नव्हतें. तथापि शहाजी पराक्रमी व अभिमानीं होता यांत शंका नाहीं ( द. वि. आपटे ).

**२. ( तंजावर )**--( स. १६८४-१७११ ) हा एकोजींचा वडील पुत्र. याच्यावर अनेक युद्धप्रसंग आले पण त्यांतून हा कसाबसा बाहेर पडला. याच्याजवळ वडिलांच्या वेळचे मुत्सद्दी होते व याची आई दिपाबाई हिचें याला उत्कृष्ट साहाय्य असे. तसेंच याचे दोघे भाऊहि मदत करीत.

हा कवींना आश्रय देई, व ख्रिश्चन मुलांना राजवाड्यांत ठेवून त्यांना संगीत शिकविण्याची व्यवस्था करी. याला मुलगा नव्हता म्हणून याचा भाऊ सरफोजी गादीवर आला. याची पत्नी चिमाबाई.

यानें शिवकथेवर 'चंद्रशेखरविलास' नांवाचें नाटक लिहिलें.

**३. ( अक्कलकोट )**--( स. १८२८ ) हा मालोजी भोसल्याचा मुलगा. हा त्यानंतर गादीवर आला. तेव्हां हा आठ वर्षांचा होता. याच्या वेळीं बोरगांवच्या शंकरराव देशमुखानें बंड केलें, पण तें इंग्रजांनीं मोडलें.

**४.** ( स. १८०० सुमार ) हा खेलोजी भोसल्याचा ( नांदनज व भांबोरें येथील ) मुलगा होय. याला कक्काजी, रुस्तुमजी व सुभानजी या नांवांचे तीन भाऊ होते.

हा पेशव्यांचे लष्करांत नोकर असल्याचा खुलासा कांहीं पत्रांत आला आहे. हा नोकरीनंतर गांवीं येऊन नांदनज मुक्कामीं राहिला. याचे वेळचा पत्रव्यवहार बराच सांपडला आहे. परंतु त्याचें अद्यापि वाचन चांगल्या रीतीनें न झाल्यामुळें खात्रीलायक हकीकत लिहितां येत नाहीं ( मं. सप्तम सं. वृ. श. १८४१ पृ. ६८ ).

**शहाताहीर निजाम**—हा पहिल्या बुर्हाण निजामचा पुत्र.

**शहानवाजखान**—( खून स. १७५८ ) निजामाचा अंमलदार. हा नासिरजंगास मिळाला. नासिरजंगास पकडल्यावर याला सात वर्षे अज्ञातवासांत राहावें लागलें. त्या वेळीं यानें 'मुआसिरउल्-अलम' हा ग्रंथ लिहिला. हा निजामाचा दिवाणहि होता ( स. १७५४ नंतर ).

**शंकर**—हा यादव घराण्यांतील जैत्रपाळाचा सेनापति होता. हा ब्राह्मण जातीचा असून फार पराक्रमी होता.

**२.** हा 'हर्षचरितसंकेत' नामक संस्कृत ग्रंथाचा कर्ता.

**३.** (स.१७६६) हा वासिष्ठगोत्री ब्राह्मण होता. याच्या पित्रादिकांचीं नांवें शुक्र, धनेश्वर व राम अशीं आहेत. यानें शक १६८८ मध्यें वैष्णवकरण नांवाचा ग्रंथ लिहिला. 'आपण विष्णुगुप्तमतानुसार ग्रंथ करतों' असें यानें म्हटलें आहे; तरी हा भास्कराचार्यांच्या मतानुसार असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें ( भा. ज्यो. ).

**शंकरगण कलचुरी**—(स. ६०० सुमार) हा कृष्ण कलचुरीचा पुत्र.

**२.** ( स. ९७० ) हा लक्ष्मणराज कलचुरीचा पुत्र.

**शंकरतनय**--प्रसिद्ध कवि अनंततनयाचा नातू. यानें आपल्या आजोबाच्या वळणावर कवित्व केलें होतें ( मं. त्रै. ४. २ ले. ५० ).

**शंकरदास**--( स. १७६० ) मराठी कवि. निरंजनचरित्र ( ३५८ ओव्या ), गणपतिस्वयंवर, गणपतिकार्तिकस्वामीभांडण ( म. वा. इ. १८३७, २२, २५, २६ ).

**शंकर दीक्षित**--( स.१७५० नंतर ) प्रद्युम्नविजयनाटककर्ता. याला सभासिंह बुंदेल्याचा आश्रय होता.

**शंकरदेव**--(स. १०९२) नेपाळचा ठाकुरी राजा.

**शंकरदेव जाधव**--( स. १३०९-१२ ) हा देवगिरीच्या रामदेवरावाचा मुलगा. हा अत्यंत शूर होता. पण याचा क्षुल्लक कारणानें अलाउद्दीन खल्जीनें पराभव केला. पुढें मलीक काफूरनें हा खंडणी देईना म्हणून यास ठार मारलें. अनहिलवाडच्या सोळंकीची मुलगी देवलदेवी याला देणार होते.

**शंकर नीळकंठ**--याचा 'कुंडार्क' ग्रंथ म. म. वासुदेवशास्त्री यांच्या संस्कृत टीकेसह छापला गेला आहे.

**शंकरभट्ट**—( स. १५७५–१६२५ ) संस्कृतधर्मशास्त्रकार. याचा पिता नारायणभट्ट व पुतण्या कमलाकरभट्ट. याचे ग्रंथः--द्वैतनिर्णय, धर्मप्रकाश व शास्त्रदीपिकेवर टीका.

**शंकरभट्ट भदे**—दुसऱ्या नागपूरच्या रघूजीच्या वेळचा मांत्रिक.

**शंकरमिश्र**—( स. १४५० सुमार ) याचा जन्म दरभंग्यांत सरिसव या गांवीं झाला. याच्या बापाचें नांव भवनाथमिश्र ऊर्फ अयाची दुबे असें होतें. हा जीवनाथाचा पुतण्या असून रघुदेव उपाध्याय अथवा कणाद व महेश ठक्कर यांचा शिष्य होता. हा नरेंद्रसिंहराय याचा समकालीन असून निरनिराळ्या विषयांवर बरेच ग्रंथ यानें लिहिले आहेतः

( १ ) पंडितविजय. ( २ ) आत्मतत्त्वविवेककल्पलता ( उदयनाचार्याच्या वादविवादावरील ग्रंथावरील टीका ). ( ३ ) आनन्दवर्धन, ( श्रीहर्षाच्या 'खण्डनखण्डखाद्य' या ग्रंथावरील टीका. याच ग्रंथावर प्रगल्भाचार्यानें लिहिलेल्या टीकेंत याच्या 'आनन्दवर्धन' ग्रंथाचा उल्लेख केला आहे ). ( ४ ) तत्त्वचिंतामणिमयूख ( गंगेशाच्या तत्त्वचिंतामणीवरील टीका ). ( ५ ) त्रिसूत्रिनिबन्धव्याख्या ( गोतमाच्या पहिल्या तीन सूत्रांवर उदयनाचार्यानें लिहिलेल्या टीकेवरील टीका ). ( ६ ) न्यायलीलावतीकण्ठाभरण ( वल्लभाचार्यांच्या 'न्यायलीलावती'-वरील टीका ). ( ७ ) भेदप्रकाश अथवा भेदरत्नप्रकाश. अद्वैतवाद वेदान्तावरील टीका. उलट सर्वज्ञात्ममुनी यानें आपल्या संक्षेपशारीरक या ग्रंथांत याच्या भेदप्रकाशावर टीका केली आहे. ( ८ ) गौरीदिगंबरप्रहसन ( शिव व पार्वती यांच्या विवाहप्रसंगावर लिहिलेलें एक नाटक. या नाटकाचा प्रयोग याच्या बापाच्या सांगण्यावरून करण्यांत आला होता ). ( ९ ) वैशेषिकसूत्रोपस्कार ( कणादसूत्रावरील लोकप्रिय टीका ). ( १० ) वेदिविनोद ( न्यायाच्या कांहीं भागावरील खल यांत केला आहे ). (११) बुद्धधिक्कार टीका. ( १२ ) अभेदधिक्कार. यांखेरीज यानें स्मृतीवर तीन महत्त्वाचे ग्रंथ लिहिले आहेत.

स. १४६२ मध्यें भेदप्रकाशाची एक हस्तलिखित प्रत लिहिली गेली. तेव्हां हा १४६२ च्या पूर्वीं होऊन गेला असला पाहिजे. परंतु हा वर्धमान उपाध्यायाचा गुरु होता ( हि. इं. लॉ., पा. ४५८–५९ ).

**शंकरराय**--(स.१४५३) हा हिंदु राजा खेळण्यावर राज्य करीत होता. मलीक उत्तुजारनें यावर स्वारी केली तेव्हां यानें त्याचा पराभव केला व त्यास ठार केलें (स.१४५३). याच्याजवळ तीनशें गलबतांचें मोठें आरमार होतें. त्यासुद्धां मुहम्मद गवाननें याचा पराभव केला, व कोंकणांत बहामनी राजांचा प्रवेश झाला ( स. १४६९ ).

**शंकरराव रघुनाथ ऊर्फ बाबासाहेब**—( स. १७९१–१७९८ ) यांचा जन्म स. १७६८ मध्यें झाला. धाकटे शाहूमहाराजांकडून यांस सचीव पदाचीं वस्त्रें मिळालीं. हे जात्याच भोळे होते. राज्यकारभार बरोबर चालत नाहीं असें पाहून पुणें दरबारनें नानाफडणीसाचा हस्तक बाजी मोरेश्वर यास व्यवस्थापक नेमलें. त्यानें स्वतःच सचीव होण्याकरितां यांचे फार हाल केले. त्या नराधमानें मारेकरी घालून जेजुरीस यांस मारण्याचा घाट घातला परंतु यांच्या प्रथम कुटुंबाच्या दक्षतेनें तो प्रयत्न फसला. प्रथम कुटुंब म्हणजे सखारामबापू बोकिलांची कन्या होय. द्वितीय प्रसिद्ध न्यायाधीश रामशास्त्री प्रभुणे यांची कन्या. तृतीय बाईचे आंबेकरांची कन्या. वामन भटजी गाखले यानें महादजी शिंद्यास सर्व हकीकत सांगितली. ती खरी असल्याची खात्री झाल्यावर त्यानें नानाफडणीसाची भर दरबारांत फजिती केली व बाबासाहेब यांस मुक्त केलें. हे स.१७९८त कैलासवासी झाले. यांस औरस संतति नव्हती म्हणून यांनीं भाऊबंदांपैकीं काशीराव मोरेश्वर यांचा मुलगा दत्तक घेऊन त्याचें नांव चिमणाजी शंकर ठेविलें व त्याला भोरचे अधिपति केलें.

**शंकरस्वामिन्**--( स. ५५० सुमार ) हा दिङ्नागाचा शिष्य. ग्रंथ–न्यायप्रवेशतर्कशास्त्र. हा नालंदा विद्यापीठांत मुख्य होता.

**शंकराचार्य**—( जन्म स. ७८८–गुहाप्रवेश स. ८२० ) मलबार प्रांतांत कालडी गांवीं यांचा जन्म झाला. यांच्या पित्याचें नांव शिवगुरु आणि मातेचें नांव श्रीअंबिका होय. हे जातीनें कृष्णयजुर्वेदाच्या तैत्तिरीयशाखेचे नंबुद्री ब्राह्मण होते. नंबुद्री ब्राह्मणांची कर्मठपणाबद्दल विशेष ख्याति आहे. कालडी हें गांव सध्यां कोचीन-शोरनूर लाइनीवर असून अलव्हायपासून पूर्वेस ६ मैलांवर आहे. या गांवीं पूर्णानदी आहे. शंकराच्या कृपेनें हे झाले म्हणून यांचें नांव शंकर असें ठेविलें. वैशाख शुद्ध दशमीला मध्याह्नकालीं यांचा जन्म झाला व त्याच महिन्याच्या पौर्णिमेस यांनीं गुहाप्रवेश केला. पण आचार्यांच्या मठांत चैत्र शुद्ध प्रतिपदा ते पंचमी असा सांप्रदाय आहे.

यांची मुंज होण्यापूर्वीच यांचे वडील वारले. आईनें

यांचें उपनयन करविलें आणि हे वेदशास्त्रांत पारंगत झाले. यांनीं विवाह करून संसार थाटावा अशी मातेची इच्छा होती. पण यांना संन्यास घेण्याची उत्सुकता उत्पन्न झाली होती. एकुलता एक मुलगा संन्यास घेणार असें ऐकतांच आई खिन्न झाली आणि आपल्या मृत्यूनंतर आपली क्रियाहि धर्माप्रमाणें होणार नाहीं, याबद्दल तिला फार वाईट वाटलें. 'तेव्हां संन्यासी झालों तरी मी तुझी क्रिया करीन' असें यांनीं वचन दिलें.

एकदां मायलेक नदीवर स्नानास गेलीं असतां सुसरीनें यांचा पाय पकडला. तेव्हां हे आईला म्हणाले, 'मी आतां मरणारच, तर आतां मला संन्यास घेण्याची परवानगी दे.' आईनें तें कबूल केलें. तोंच सुसरीनें यांचा पाय सोडला. तेव्हां आईला क्रियेबद्दल पुनः वचन देऊन हे नर्मदातीरीं गोविंदयतीपाशीं शिष्य म्हणून दाखल झाले. भगवत्पूज्यपाद गोविंदयति गौडपादाचार्यांचे शिष्य असून विद्वान् म्हणून त्यांची ख्याति होती. गोविंदयतींनीं यांना खऱ्या ज्ञानाचा उपदेश करून धर्माचा प्रचार करण्याची आज्ञा दिली.

नंतर हे काशीस येऊन राहिले. तेथें शिष्य तयार करण्यास आणि ग्रंथलेखनास यांनीं सुरुवात केली. यांच्या प्रतिपादनशैलीची आणि भाषाप्रभुत्वाची इतकी छाप पडली कीं सर्व प्रांतांतील विद्यार्थी यांच्याकडे येऊं लागले. त्यांतच पुढें प्रसिद्धीस आलेले पद्मपादहि यांना येऊन मिळाले.

विष्णुसहस्रनाम, उपनिषदें, गीता व ब्रह्मसूत्र यांवर यांनीं भाष्यें लिहिलीं. यांशिवाय यांची किरकोळ रचनाहि यापूर्वीपासूनच चालू होती. यापैकीं कांहीं लेखन हे आपल्या विद्वान् शिष्यांवर सोंपवीत असत. मनीषापंचक व चर्पटपंजरी हीं कांहीं विशेष प्रसंगानें घडलेलीं दिसतात.

नेहमीं वादविवाद आणि चर्चा चाललेली असे. खुद्द व्यास ब्राह्मणरूपानें यांच्याशीं वादविवाद करण्याकरितां आले होते अशी आख्यायिका आहे. असे वादविवाद होऊनच 'तत्त्वमसि' हें यांच्या तत्त्वज्ञानाचें ब्रीदवाक्य ठरलें, आणि त्याचा सर्वत्र जयजयकार होऊं लागला. तेव्हां काशीबाहेर यांनीं आपल्या विजययात्रेस सुरुवात केली.

विजययात्रेंत यांचा मोठा शिष्यसमुदाय आणि ग्रंथसंभार असे. जागोजाग राजेरजवाड्यांकडून यांचा सन्मान होई. खुद्द काशींतहि रतनसिंग नांवाच्या काशीच्या राजाचा यांना आश्रय असे.

हे प्रथम प्रयागास कुमारिलभट्टाकडे गेले, पण त्या महापंडितानें अग्नीला देह अर्पण केला असल्यामुळें, त्याच्याच सांगण्यावरून हे माहिष्मतीस मंडनमिश्राकडे गेले. तेथें यांचा, संसारीं राहून यज्ञादि करावे कां सर्वत्याग करून संन्यास घ्यावा, याविषयीं वाद झाला; आणि यांचा जय झाला. तेव्हां मंडनमिश्रानें यांचें शिष्यत्व पत्करून संन्यास घेतला. तेव्हां त्याला सुरेश्वराचार्य असें नांव देण्यांत आलें. याच वेळीं यांनीं मंडनमिश्राची पत्नी भारतीशीं वाद करण्याचा प्रसंग आला असतां अमरु राजाच्या शरिरांत प्रवेश करून अनुभव मिळविला व तिचाहि वादांत पराजय केला. त्या वेळीं केलेलें अमरुशतक आनंदवर्धनाच्या वेळेपासून प्रसिद्ध आहे.

पुढें दक्षिणेंत तुंगभद्रेपर्यंत प्रवास करून शारदेचें मंदिर बांधलें, आणि शृंगेरी मठाची स्थापना करून त्यावर सुरेश्वराचार्यांची योजना केली. आजहि शृंगेरीमठ, शारदामंदिर व तेथील आचार्यांची परंपरा आपणास प्रत्यक्ष पाहावयास मिळते.

याच वेळीं यांची माता मृत झाली आणि संन्याशाचे सर्व नियम बाजूस ठेवून या महापुरुषानें आपल्या मातेची यथासांग क्रिया केली. पण यामुळें तेथील कर्मठ नंबुद्री ब्राह्मणांनीं यांवर बहिष्कार घालून यांना क्रियाकर्मास, फार तर काय प्रेतवाहनासहि साहाय्य केलें नाहीं. यांनीं तिचीं खांडोळीं करून परसांतच मातेचें दहन केलें. यामुळें यांनीं तेथील ब्राह्मणांचा वेदाधिकार व संन्याशाचा सत्कार करण्याचा अधिकार नाहींसा केला आणि खांडोळीं करून परसांत प्रेत दहन करण्याची सक्ति केली. आजहि नंबुद्री ब्राह्मणांत या चालीचे अवशेष आहेत.

पुनः यांनीं विजययात्रा सुरू केली. धर्माच्या नांवाखालीं चालू असलेल्या अनिष्ट चाली बंद पाडल्या. शाक्तांचें प्रस्थ कमी केलें. याप्रमाणें सर्वत्र दौरे काढून शृंगेरीनंतर जगन्नाथपुरी, द्वारका, बद्रीकेदार अशा हिंदुस्थानच्या चारहि टोंकांस चार मठ स्थापून धर्मप्रसार व धर्मसंरक्षण व्हावें म्हणून कायमची व्यवस्था आखून दिली. तीच 'मठाम्नाय' या नांवानें सध्यां छापलेली मिळते. या मठांची योजना वाचली असतां लोकांचा तावा असलेली ही मठसंस्थेची योजना फार दूरदर्शीपणानें ठरविली आहे, आणि अत्यंत यशस्वी झाली आहे, असें दिसून येईल.

याचप्रमाणें काश्मीरांतहि यांचा जय होऊन शारदादेवीच्या सिंहासनावर यांचा सन्मान झाला. नंतर हे कामरूपांत गेले असतां पराजित झालेल्या पंडितानें यांच्यावर अभिचाराचा प्रयोग केला. व त्यामुळेंच यांना मूळव्याधीचा विकार जडला. तेथून बद्रीकेदारास गेले आणि तेथें यांनीं गुहाप्रवेश केला. यांची समाधि कोठेंहि नाहीं. यांनीं गुहा-

प्रवेश बत्तिसाव्या वर्षी केला किंवा अडतिसाव्या वर्षी केला अशीं दोन मतें आहेत. प्रारंभीं दिलेला काळ साधारणतः सर्वमान्य आहे.

शंकराचार्य यांचे कांहीं प्रमुख सिद्धांतः—१ सर्व सृष्टीच्या मूळाशीं एक तत्त्व आहे. त्याला ब्रह्म असें म्हणतात. २ ब्रह्मच तेवढें सत्य असून त्याशिवाय बाकी सर्व मिथ्या आहे. ३ जीव हा ब्रह्मच आहे. ४ जीव ब्रह्म होऊन जीवानें ब्रह्मस्वरूपांत राहणें यास मोक्ष असें म्हणतात. ५ (साहंकार) कर्म व (अपरोक्ष) ज्ञान एकत्र राहूं शकत नाहीं. (अविद्या, अध्यास म्हणजे माया यांच्या साहाय्यानें यांनीं अद्वैत सिद्ध केलें. परा व अपरा विद्या यांच्या विभागानें आणि प्रातिभासिक, व्यावहारिक आणि पारमार्थिक अशा तीन सत्ता मानून सर्व श्रुतिवाक्यांचा समन्वय केला.)

**शंकराजी केशव फडके** (हशमनीस)—(स. १७३३–६० सुमार). हा रत्नागिरीकडील कुर्धे गांवचा अत्रिगोत्री ऋग्वेदी ब्राह्मण. यानें वसईच्या मोहिमेंत पुढाकार घेऊन पराक्रम केला. म्हणून वसई जिंकल्यावर यालाच तेथें सुभेदार नेमलें. यांचें घराणें सरदार हसबनीस या नांवानें पुणें येथें शनवार पेठेंत नांदत आहे.

**शंकराजी नारायण पंतसचीव**—(स. १६५८–१७०७) यांचें घराणें मूळ पैठणकडील गांडापूरच्या देशपांड्यांचें. गोत्र अत्रि. विठ्ठल-कोन्हेर-मुकुंद-नारायण-शंकराजी असा याचा वंश आहे. नारो मुकुंद हे इकडे येऊन पाइटगांवच्या जोशीकुलकर्ण्याचें काम करूं लागले. भिडे यांच्या इतिहासांत मुकुंदाच्या पित्याचें नांव प्रल्हाद असें दिलें आहे आणि हें घराणें प्रथम मांगदरीस आलें असें लिहिलें आहे. शिवाजीनें भोरप किल्ला घेतला तेव्हां जवळच पाइटगांवीं असणाऱ्या नारो मुकुंदाला त्यानें भोरप व सुधागड किल्ल्याची सबनिसी दिली. त्यामुळें मोरोपंत पिंगळ्याशीं परिचय होऊन त्यांनीं शंकराजीस आपल्याकडे ठेवून घेतलें.

संभाजीच्या वेळीं महत्त्वाचीं कामें केल्यानें राजारामाच्या वेळीं प्रथम यास राजाज्ञापद मिळालें. नंतर अष्टप्रधानांतील सचीवपद मिळालें (स. १६९०).

हे राजाज्ञा असतां साताऱ्यास सर्जाखानानें वेढा घातला. त्यास पकडून लाख रुपये घेऊन यांनीं त्यास सोडलें. प्रतापगड, राजगड व तोरणा हे किल्ले यांनीं मोगलांकडून सोडविले (जें. श. व स. प. १६७–१०). यांना मदारुल-महाल म्हणजे 'राज्याधार' अशी पदवी होती.

राजारामाच्या वेळीं औरंगजेबाच्या स्वारीमुळें मराठी राज्याला अत्यंत बिकट वेळ आली होती. त्या वेळीं मराठी राज्याचें संरक्षण करणाऱ्या पुरुषांतील हे प्रमुख होत. या प्रांताची सर्व व्यवस्था राजारामानें हे व रामचंद्रपंत अमात्य यांच्यावर पूर्ण मुखत्यारीनें सोंपविली होती. यांनीं दिलेल्या सनदांस त्यांनीं मान्यता दिली होती (रा. खं. १५, पृ. ३८०). तसेंच साताऱ्याकडील व कोंकणपट्टींतील जो मुलूख काबीज होईल तोहि यांच्याकडे सोंपविला आणि त्याकरितां धनाजी जाधव यांच्या हाताखालीं दिला (ऐ. सं. सा. खं. १, पृ. ६६).

या प्रसंगीं जिंजीपासून साताऱ्यापर्यंतच्या मुलखावर नजर ठेवून बादशहाला तोंड द्यावयाचें आणि सर्व लष्करी दळणवळण कायम ठेवून जिंजीचा वेढाहि लढवावयाचा असें महत्त्वाचें कार्य राजा व पैसा यांशिवाय यांनीं पार पाडलें.

लहानमोठे अनेक प्रसंग उत्पन्न झाले त्यांना तोंड दिलें आणि देशांत व दरबारांत मोठेपणा मिळवल्यानें यांचें चारित्र्य मोठें उदात्त झालें आहे.

पुढें ताराबाईच्या वेळींहि बादशहाला जेर करून मराठ्यांचें स्वतंत्र राज्य कोणत्याहि प्रसंगाला तोंड देण्यास समर्थ असल्याचें यांनीं सिद्ध केलें.

बादशहाचा पाठिंबा घेऊन राज्य करण्यास आलेल्या शाहूमहाराजांस हे सामील झाले नाहींत. शिवाजीच्या तालमींत तयार झालेल्या पुरुषांचा प्रसंग पडेल तसें वागून कोणालाहि मिळण्याचा स्वभावच नव्हता. तीन पिढ्या एकनिष्ठेनें यांनीं राज्याची सेवा केली होती व एकनिष्ठ राहूं असें ताराबाईला वचनहि दिलें होतें.

शाहूनें भेटण्यास बोलावलें असतां यांना जातां आलें नाहीं. तेव्हां दुसऱ्या दिवशीं शाहू यांच्याकडे स्वतः निघाला. तेव्हां यांनीं हिरकणी खाऊन प्राण दिला. वचनाला बाध येण्यापेक्षां मरण बरें असें यांना वाटलें असावें. याची भोरजवळ आंबवडें येथें समाधि आहे.

यांची पत्नी येसूबाई. ती मांगदरी येथील शामाजीपंत महाशब्दे यांची कन्या होय. महादजीचे दत्तविधानानंतर यास दोन औरस पुत्र व एक कन्या झाली. औरस पुत्र नारो शंकर हे यांचे मागें सचीवपदाधिकारी झाले. नारोशंकर अल्पवयी असल्यानें येसूबाईनें सर्व कारभार पाहिला व शाहूस मिळून सर्व स्थिरस्थावर केलें.

**शंकराजी मल्हार नरगुंदकर**—(स. १६९२–१७२०) हा राजारामाच्या कारकीर्दींत सचीवपदावर होता (स. १६९२–९७). पण जिंजीस वेढा पडला असतां हा सर्वसंगपरित्याग करून काशीस जाऊन राहिला. पण तेथें

असतां हा दिल्लीच्या राजकारणांत शिरला. हुसेन अली-बरोबर तहाच्या अटी ठरविण्याकरितां हा कारभारी म्हणून दक्षिणेंत आला होता. यानें बाळाजी विश्वनाथ व चिमणाजी दामोदर मोघे यांचे मार्फत शाहूशीं तहाची वाटाघाट केली ( शाहूचरित्र, पा. ३८-३९ ). हा सय्यद व निजाम यांत बाळापूर येथें झालेल्या लढाईंत जखमी होऊन निजामाच्या हातांत सांपडला ( स. १७२० आगष्ट १० ).

**शंकराजी हरजी महाडीक**—हा शाहूच्या वडील वहिणीचा नवरा. याला दुर्गोजी व आबाजी असे मुलगे होते. हा प्रथम ताराबाईच्या पक्षांत होता. नंतर शाहूतर्फे कर्नाटकांत गेला ( स. १७०९ ). यानें रयतेवर जुलूम केल्यावरून शाहूनें यास लिहिलें 'ऐसा वतनदारीचा पेशा नर्मदेपासून रामेश्वरापर्यंत नाहीं. रयत चोराची नव्हे.'

**शंकरानंद**—( स. १०५० सुमार ) बौद्ध तर्कज्ञ. हा काश्मीरी ब्राह्मण होता. यानें धर्मकीर्तीच्या 'प्रमाणवार्तिक' ग्रंथावर टीका लिहिली. तसेंच धर्मकीर्तीच्या 'समबंधपरीक्षा' या नांवाच्या ग्रंथावर 'समबंधपरीक्षानुसार' या नांवाची टीका लिहिली. याचा तिसरा ग्रंथ 'अपोहसिद्धि' व चवथा 'प्रतिबंधसिद्धि' होय. या सर्व ग्रंथांचीं फक्त तिबेटी भाषांतरें उपलब्ध आहेत ( हिस्टरी ऑफ इंडियन लॉ., पा. ३४४-४५ ).

२. याची ईशावास्यदीपिका नांवाची ईशावास्य उपनिषदावर टीका आहे.

**शंकुक**—या साहित्यज्ञाच्या मताचें भट्टतौतानें खंडण केलें आहे.

**शंखधर**—प्रहसन या संस्कृत नाटकाचा कर्ता.

**शंखधर कविराज**—( स. ११०० ) 'लटकमेलक' प्रहसनाचा कर्ता.

**शंखा**—पहिल्या अमोघवर्ष राष्ट्रकूटाची मुलगी व तिसऱ्या नंदीवर्मन् पल्लवाची पत्नी.

**शंतनु तोमर**—( स. १२०० सुमार ) यानें सप्तशतीवर शांतनवी नांवाची टीका लिहिली आहे. याच्या पित्याचें नांव उद्धरण. यानें आपणास राजाधिराज व चक्रवर्ती म्हणवून घेतलें आहे.

**शंभुनाथ**—( स. १७४९ सुमार ) हिंदी कवि. याचे ग्रंथ—रसकल्लोल, रसतरंगिणी व अलंकारदीपक. हा भगवंतराव खीचीच्या पदरीं होता.

**शंभुराम**—आत्मविलास नामक संस्कृतांतील वेदांत ग्रंथाचा कर्ता.

**शंभुसिंग जाधव ( मालेगांवकर )**—( मृत्यु स. १७६०.) हा धनाजी जाधवाचा मुलगा होता. धनाजी मेल्यावर याच्या थोरल्या भावास ( चंद्रसेनास ) शाहूनें सेनापतिपद देऊन यास त्याचा मुतालिक नेमलें होतें.

चंद्रसेनाचें व शाहूचें वांकडें असल्यामुळें शाहूनें त्याचें पद काढून त्याच्या ( दुसऱ्या भावांस ) संताजीस दिलें. त्या वेळीं हा चंद्रसेनाबरोबर निघून गेला होता, परंतु परत हा पळून शाहूकडे आला. त्या वेळीं शाहूनें यास लिहिलेलीं पत्रें ता. १४।१०।१७२९ व ५। १। १७३० चीं शा. रो. पृ. १६-१७ मध्यें आहेत.

शाहूनें संभाजीवर पन्हाळ्याकडे स्वारी पाठविली, तींत यानें चांगलीच मदत केल्यामुळें शाहूची मर्जी याजवर बसली. पुढें शाहू-संभाजीची भेट होऊन वारणेचा तह ठरला. त्या भेटींत हा दोघां राजबंधूंच्या मागें हत्तीवर खवासखान्यांत बसला होता. स. १७३२ ता. १७ रोजीं शाहूनें यास मालेगांवच्या इनामाची सनद करून दिली. हा गांव अद्यापि याच्याच घराण्याकडे चालत आहे. स. १७३९ च्या कर्नाटकाच्या स्वारींत फत्तेसिंग भोसल्याबरोबर हा होता. याला एकच मुलगा असून त्याचें नांव अमरसिंग असें होतें. हा स. १७६० त मरण पावला.

**शाकटायन**—याची कांहीं माहिती आमच्या प्राचीन चरित्रकोश या ग्रंथांत दिली आहे. त्याशिवाय माहिती पुढें देत आहों. यास्कानें निरुक्तांत व महाभाष्यांत पतञ्जलीनें सर्व शब्द धातुज आहेत असें याचें मत दिलें आहे. धातूपासून शब्दांची सिद्धि करणारा उणादिसूत्रपाठ हा याचा ग्रंथ म्हणून प्रसिद्ध आहे. याचा उणादिसूत्रपाठ पाणिनीच्या पूर्वीचा असला पाहिजे. कारण याचा तीनदां व उणादींचा पाणिनीनें दोनदां आपल्या सूत्रपाठांत निर्देश केला आहे. तसेंच पाणिनिपूर्वकालीन चाक्रवर्मण या आचार्याचा पाणिनीनें व यानें निर्देश केला आहे. याची प्रकृतिप्रत्यय सांगण्याची पद्धति पाणिनीशीं जुळती आहे. तथापि पाणिनीनें साधलेले शब्द यानें दुसऱ्या पद्धतीनें साधलेले आढळतात. नारी वगैरे शब्द या दृष्टीनें पाहण्यासारखे आहेत. तथापि याचा सूत्रपाठ मूळ स्वरूपांत राहिला नसावा. कारण त्यांत मिहिर, दिनार, स्तूप या बुद्धोत्तरकालीन असंस्कृतोद्भव शब्दांची साधनिका आढळते. पण तीं सूत्रें कांहीं टीकाकारांच्या मतें मूळांत नव्हतीं, असें उज्वलदत्ताच्या टीकेवरून दिसतें. आफ्रेजनें उज्वलदत्ताची टीका प्रसिद्ध केली. तसेंच मद्रास युनिव्हर्सिटीनें श्वेतवनवासिन् व नारायण यांच्याहि टीका प्रसिद्ध केल्या आहेत. आणखीहि भोजाची टीका असावी. प्रो. पाठक यांनीं उणादिसूत्रें पाणिनीचींच असावींत असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे.

२. (स. ८७५) एक जैन व्याकरणज्ञ. याचा ग्रंथ–'शाकटायनप्रक्रियासंग्रह.' यानें स्वतःच आपल्या ग्रंथावर टीका केली असून तिचें नांव अमोघवर्ष राष्ट्रकूटाच्या स्मरणार्थ अमोघवृत्ति ठेवलें.

**शाक्यबोधि**—(स. ६७५ सुमार) हा बौद्ध तर्कज्ञ असून देवेंद्रबोधीचा शिष्य होता. यानें देवेंद्रबोधीच्या प्रमाणवार्तिकावर पंजिका लिहिली, असें तिबेटी ग्रंथावरून समजतें (हि. इ. लॉ.).

**शाक्यश्रीभद्र**—(स. ११२६–१२२४) हा विक्रमशिलेस मंत्री होता. इख्तियार मुहम्मदनें विक्रमशिलेचा नाश केल्यावर हा ओरिसांत गेला. नंतर नेपाळ व तेथून तिबेटांत गेला व लामाचा गुरु झाला. तेथें अनेक ग्रंथ लिहून जन्मभूमि काश्मीराकडे आला व मेला.

**शातकर्णि आंध्र**—(खि. पू. १७७) हा आंध्रांपैकीं कृष्णानंतर गादीवर आला. याला श्रीशातकर्णि असें म्हणतात. याशिवाय शातकर्णि या नांवाचा आणखी एक राजा झाला आहे. याशिवाय सुंदर शातकर्णि, चकोर शातकर्णि, शिवस्कंद शातकर्णि, यज्ञश्री शातकर्णि व चंडश्री शातकर्णि अशीं नांवें आढळतात. यावरून शातकर्णि हा शब्द या घराण्यांत कुलनामासारखा दिसतो.

हा शिमुकाचा मुलगा होता. हा पुष्यमित्र शुंगाचा समकालीन होता. यानें एक अश्वमेध केल्याचा निर्देश आहे. यानें उज्जयिनी जिंकली. याचा खारवेलानें पराभव केला होता (खि. पू. १७०). यानें कलिंगावर स्वारी केली तेव्हां त्यानें याचा पराभव केला, असें हाथीगुम्फेंतील लेखावरून दिसतें. याचा पुतळा नानाघाटांत आहे. याला दोन पुत्र असून त्यांचीं नांवें अनुक्रमें, कुमार वेदिसिरी, आणि कुमार हकुसिरी. पुराणांत यानंतरच्या राजाचें नांव पूर्णोत्संग असें दिलें आहे तें वेदिसिरीचें बिरुद असावें. शक्तिकुमार व हकुसिरी हे एक असण्याचा संभव आहे (प्राचीन महाराष्ट्राचा इतिहास १. पा. ४२१).

**शादीखान खल्जी**—अलाउद्दीन खल्जीचा पुत्र. पुढें याला ग्वाल्हेर येथें तुरुंगांत ठेवलें आणि डोळे काढून ठार केलें.

**शादीखान झैनुल आबिद्दीन**—(स. १४२२–७२) हा सिकंदरचा पुत्र. हा आपला भाऊ अमीरखान दक्षिणेकडे गेला असतां गादीवर बसला. हा निःपक्षपाती व रसिक होता. यानें हिंदूंना उदारपणें वागविलें.

**शामराज**—(स. १८३९ सुमार) हा एक कवि व ग्रंथकार होऊन गेला. याच्या गुरूचें नांव एकनाथ असें होतें. यानें हरिचरित्र नांवाचा एक ग्रंथ लिहिलेला आहे. ग्रंथ ओंवीवृत्तांत असून ९० अध्यायांचा आहे. त्याचीं पृष्ठें २२७ आहेत, व ओंवीसंख्या एकंदर ४३४६ आहे. हा ग्रंथ शके १७६१ च्या सुमारास लिहिला. ग्रंथाचे भाषेवरून पाहतां हा यजुःशाखीय ब्राह्मण असावा असें दिसतें. यानें श्रीमत् भागवताचा नवमस्कंधहि लिहिला असावा, असें अनुमानितां येतें (मं. त्रै. व. १२·३ लें. २३).

२. (ग्रंथकाल स. १७४४) मराठी कवि. याचा पिता लक्ष्मणभट. याचीं 'मुद्गलाख्यान'. व 'रुक्मिणीहरण' हीं दोन काव्यें प्रसिद्ध आहेत. हा सातारच्या राजोपाध्ये घराण्यापैकीं होता. याला सामराज असेंहि म्हणतात.

**शामराज नीळकंठ पारसनीस रोझेकर**—(स. १६४६-६२) हा दौलताबादजवळील रोझेगांवचा कुलकर्णी. वेरूळच्या भोसल्यांशीं याचा परिचय होता. तिकडून शहाजीनें याला जिजाबाईबरोबर पाठविलें, असें सभासदाच्या बखरींत आहे (पा. ३). याच्याकडे प्रथम सबनिशी होती. नंतर स. १६४६ त शिवाजीनें यास पेशवा केलें. याचा शिक्का 'श्रीशिवनरपति हर्षनिधान, शामराज मतिमत्प्रधान' असा आहे. यानें मुसेखोरें भागांतील कुलकर्णीवतन पेशवा असतां खरेदी केल्याचे कागद उपलब्ध आहेत. ते स. १६५२–५७ पर्यंतचे आहेत (पत्रसारसंग्रह ६२७; ६४५; ७२२). यांपैकीं तिसऱ्या कागदांत यास 'पेशवा' असें स्पष्ट म्हटलें आहे. स. १६६२ त शिवाजीनें यास सीदीवर पाठवून जंजिरा काबीज करण्याची कामगिरी सांगितली. त्यांत याचा पराजय झाला म्हणून पेशवेपद महादेव मतिमत्प्रधान याजकडे दिलें. याचें आडनांव रांझेकर किंवा करंजकर असेंहि लिहिलेलें आढळतें. पण तसा उच्चार पुणेंप्रांतांत रोझें गांव न सांपडल्यामुळें केलेला दिसतो. बखरींत यास पारसनीस म्हटलें आहे.

**शामराव गोविंदराव पिंगळे**—(स. १८१०) या सालीं यास पेशव्यांच्या निजामाकडील वकिलीचीं वस्त्रें मिळालीं. हा शेवटपर्यंत कामावर होता. याचा पुत्र नरहर.

**शामराव महाडीक**—(मृत्यु स. १८०२) होळकरांचा सरदार.

**शामाराध्य कवि**—(ग्रंथकाल स. १७३७ सुमार) मराठी भाषेंत ज्यांनीं बरीच मोठी ग्रंथरचना केली आहे असे जे कवी आहेत, त्यांपैकींच हा एक होय. यांनीं भारत, रामायण, भागवत, यांपैकीं बहुतेक आख्यानांवर रचना केली. किंबहुना भारत-रामायणादि ग्रंथ यांनीं रचले असावे. गीतेवर याची एक 'पदार्थमाला' नांवाची टीका आहे. ज्ञानेश्वरीवरहि त्या ग्रंथांतील कठीण शब्दांचा अर्थ

सांगणारा असा याचा कोश आहे. तसेंच (१) आश्वलायन-प्रश्नमाला, (२) नित्यानित्यविचार, (३) ज्ञानोदय-सिंधु, (४) कैवल्योपनिषद्भाष्य (मराठी) हे ग्रंथ यानें रचिलेले आहेत. याचें मूळचें नांव शामजी असें आहे. याचें उपनांव आराध्ये हें होय. हा गाणगापुरास राहत असे. याचे सर्व ग्रंथ अप्रसिद्ध आहेत. 'पदार्थमाला' ही टीका शके १६५९ त लिहिलेली आहे (मं. वा. इ. श. १८३७, ले. १८५).

**शार्ङ्गधर**—(स. ११७२ सुमार) हा ब्राह्मण अनंग-भीम राजाच्या कारकीर्दींत होता. हा चांगला विद्वान् असल्यामुळें हम्मीर राजानें यास आश्रय दिला होता. यानें हम्मीरविजय, शार्ङ्गधर व सुभाषित शार्ङ्गधर असे तीन ग्रंथ लिहिलेले प्रसिद्ध आहे (क. च.).

**२.** (स. १२४७ सुमार) हा सिंघण यादवाचा कार-भारी जो सोढ्ढल त्याचा पुत्र. यानें 'संगीतरत्नाकर' नांवाचा ग्रंथ सिंघणाच्या कारकीर्दींत लिहिला.

**३.** नन्नयभट्टाचा शिष्य व राजनरेन्द्राचा पुत्र.

**४.** (स. १३२५ सुमार) यानें शार्ङ्गधरपद्धति व शार्ङ्गधरसंहिता वगैरे वैद्यकावरील ग्रंथ केले. हा चौदाव्या शतकाच्या पूर्वार्धांत होऊन गेला, असें शार्ङ्गधरपद्धतीच्या प्रस्तावनेवरून दिसतें.

**शार्दूलवर्मन् मौखरी**—(स. ४२५–४५०) मौखरी वंशांतील जो यज्ञवर्मन् त्याचा हा मुलगा असून आपल्या बापानंतर हा गादीवर बसला.

हा पराक्रमी असून युद्धनिपुण होता. याच्याविषयींचे चांगले अभिप्राय शिलालेखांत सांपडतात. त्यावरून याची कारकीर्द लोकप्रिय झाली असावी असें दिसतें. हा देखणा असून याची राहणी उत्तम प्रकारची असे. याच्या अंगीं दातृत्व होतें, पण त्याचा उपयोग फक्त आप्तेष्ट व मित्र यांना झाला. याला कल्पतरूची उपमा दिल्याचें एका शिलालेखांत आढळून येतें. परंतु याची राज्यव्यवस्था चांगली नव्हती. करांचें ओझें जनतेवर फार असून तो सर्वांकडून सारखा वसूल केला जात नसे. न्यायाच्या बाब-तींतहि तीच तऱ्हा असे. एकंदरींत याच्या अंगच्या शौर्यामुळें राज्यकारभारांतील अव्यवस्था झांकून गेली. याच्यानंतर याचा मुलगा अनंतवर्मन् हा गादीवर आला (मौखरी by E. A. Pires, pp. 48-50).

**शालिवाहन**—(खि. पूर्व २३० ते ख्रिस्तोत्तर २२७) पुराणांतरीं ज्यांस आंध्रभृत्य म्हणून संबोधण्यांत आलें आहे, त्या आंध्र राजघराण्यांतील राजांनाच शात-वाहन घराण्यांतील राजे म्हणून अनेक शिलालेखांत म्हटलें आहे. 'शातवाहन' शब्दाचें अपभ्रष्ट रूप शालिवाहन असें झालें, व प्राकृतांत तरी या घराण्यांतील राजांना शालि-वाहन वंशाचे राजे असें म्हटलें गेलें आहे. या राजवंशाचें मूळ वसतिस्थान गोदावरी व कृष्णा या नद्यांच्या मुखां-जवळील प्रदेश. चंद्रगुप्त मौर्याचे कारकीर्दींत म्हणजे खि. पू. ३०० चे सुमारास गोदावरी व कृष्णा या नद्यांच्या मुखाजवळील प्रदेशांत चंद्रगुप्त मौर्याच्या सैन्याच्या खालो-खाल बलाढ्य सैन्य असलेलें यांचें राज्य असल्याचें मॅग-स्थिनीस यानें लिहून ठेविलें आहे. अशोकाच्या मृत्यूनंतर अशोकाच्या साम्राज्यांत जे घोंटाळे उत्पन्न झाले त्यांचा फायदा घेऊन आंध्राच्या सिमुक अथवा सिप्रक नांवाच्या राजानें आंध्रांचें स्वतंत्र राज्य स्थापन केलें असावें. स्वतंत्र राज्यस्थापनेनंतरहि ते विनयानें आपणांस आंध्रभृत्य असें म्हणवीत. शातवाहन हें या आंध्रराजांचें कुलनाम असावें. या घराण्यांतील राजे स्वतःचें नांव वगळून आपल्या कुलनामानेंच आपला निर्देश करीत असल्यामुळें या राजांसंबंधींच्या शिलालेखांत त्यांच्या वंशांतील कोणता राजा अभिप्रेत आहे हें ठरविणें कठीण होतें! या वंशांतील तीस राजांनीं हिंदुस्थानांत राज्य केलें.

सिमुकानंतरच्या दुसऱ्याच राजानें आंध्रांच्या राज्याचा विस्तार गोदावरीच्या उगमाजवळील नाशिक शहरापर्यंत वाढविला. तिसरा राजा श्रीशातकर्णी याचे कारकीर्दींत कलिंगाच्या खारवेल राजानें शातवाहनांची सत्ता अमान्य करण्याचें धाडस केल्याचा उल्लेख आढळतो (खि. पू. १७१). यानंतरच्या खि. पू. २८ वर्षापर्यंतचा शातवाह-नांचा इतिहास अद्याप अनुपलब्ध आहे. खि. पू. २८ मध्यें एका शातवाहन राजानें काण्वांच्या सुदर्शन नांवाच्या शेव-टच्या राजाचा वध करून आपलें साम्राज्य स्थापिलें व हिंदुस्थानांत आपली सत्ता अप्रतिहत केली.

महाराष्ट्राच्या उपलब्ध इतिहासांत या शालिवाहन अथवा शातवाहन राजवंशासच महाराष्ट्राचा आद्य राजवंश अस-ल्याचा मान प्राप्त झाला आहे. महाराष्ट्रांतील शिलालेखांत या वंशांतील पुलुमायी (स. १३०–१५४), यज्ञश्री (स. १५४–१७२), चतुष्पर्ण (स. १७२–१८५), माठरीपुत्र (स. १९०–१९७) अशा चार राजांचा विशेषतः निर्देश येतो. नाशिक, कान्हेरी, येथील लेण्यांतील शिलालेखांत व कोल्हापूर येथें व इतर ठिकाणींहि सांपडलेल्या नाण्यांवर या घराण्यांतील राजांचा इतिहास सांपडतो. या इतिहासाचें संकलन केलें असतां असें दिसतें कीं शालिवाहन राजांची मुख्य राजधानी मद्रास इलाख्यां-

तील हल्लींच्या गंतूर जिल्ह्यांतील धरणीकोट येथें होती व त्या काळीं या शहरास धनकटक असें म्हणत असत. गुजराथ राजधानी असलेल्या नहपान नांवाच्या परकी क्षत्रपाचा पराभव करून गौतमीपुत्र आणि पुलुमायी यांनीं महाराष्ट्रांत आपलें राज्य स्थापन केलें. या नव्या राजकीय विभागावर राजघराण्यांतील कुमार पैठण येथील प्रांतिक राजधानींत राहून महाराष्ट्राचा राज्यकारभार पाहत. यांनीं परकी म्हणजे शक राजांचा समूळ उच्छेद करून महाराष्ट्रांत हिंदवी राज्याची परंपरा सुमारें २ शतकें चालू ठेविली.

शालिवाहन राजांच्या काळीं बुद्धधर्म व हिंदुधर्म, दोन्हीहि समसमान होते. प्रांतिक अधिकारीवर्गांत महारथी अथवा महारठ्ठी, महाभोज, महासेनापति वगैरे अभिधानें असलेले सरदार व संस्थानिक असत. दुय्यम दर्जाच्या अधिकारीवर्गांत व मानकऱ्यांत अमात्य, भांडागारिक, नैगम ( व्यापारी ), सार्थवाह, श्रेष्ठी वगैरे अभिधानांचे लोक असल्याच्या नोंदी आहेत. तिसऱ्या वर्गांत लेखक, वैद्य, हालाकीय ( शेतकरी ), सुवर्णकार, गांधिक ( औषधें विकणारे ), वर्धक ( सुतार ), लोहवणिज, मालाकार, दासक ( कोळी ) अशीं ज्ञातिनामें आढळतात. चालू नाण्यांस कार्षापण हें नांव असे व तीं चांदीचीं व तांब्याचीं असत. शहराच्या व्यवस्थेकरितां निगमसभा असत. सार्वजनिक कार्याकरितां पैसा निगमसभेच्या स्वाधीन करीत व निगमसभा त्या पैशाचे हिशेब ठेवी. आंतर-राष्ट्रीय व्यापार भरभराटींत असावा असें दिसतें. सोपारा, कल्याण, भरुकच्छ अथवा भडोच, चौल, मंदगोरा ( बाणकोटजवळील मदनगड ), जयगड वगैरे बंदरांत परकीय देशांतून माल येई व तेथून हिंदुस्थानचा माल बाहेर जाई. टॉलेमीच्या भूगोलावरून पैठण व तगर हीं दोन मोठीं बाजारपेठेचीं केंद्रें असल्याचा दाखला उपलब्ध आहे.

या वंशांतील राजे आपल्या लेखांत शक वापरीत, त्यास शालिवाहनशक असें नांव पुढें प्राप्त झालें. शालिवाहनशकाची वर्षगणना शालिवाहनानें शकावर मिळविलेल्या एखाद्या जयापासून सुरू झालेली दिसते.

शालिवाहनासंबंधीं कांहीं आख्यायिका प्रसिद्ध आहेत. त्यांपैकीं कांहीं पुढें नमूद केल्या आहेत.

हा एक ब्राह्मणाच्या मुलीचा मुलगा. ही मुलगी आपले आईबाप निवर्तल्यामुळें दोन भावांसह फिरत फिरत पैठणला आली व तेथें एका कुंभाराच्या घरीं राहूं लागली. पुढें एकदां ती गोदावरी नदीवर गेली असतां तिच्यावर शेषाचें लक्ष गेलें व त्याच्यापासून जो मुलगा झाला तोच हा शालिवाहन होय. उज्जैनीच्या विक्रमादित्याला एका देवीनें सांगितलें कीं, 'तुझा मृत्यु एका दोन वर्षांच्या मुलीच्या मुलाकडून होईल.' तेव्हां त्यानें अशा मुलीच्या शोधार्थ वेताळाला पाठविलें. वेताळानें पैठणची सदर हकीकत राजास सांगतांच तो सैन्यासह त्याच्यावर चालून आला. पण या बालराजानें मातीचे घोडे, हत्ती, पायदळ खेळण्याकरितां केलेल्या सैन्यांत जीवन घालून विक्रमादित्याचा पराभव केला (कथासरित्सागर; Bhand, b. 53). हा शालिवाहन राजा म्हणजेच पुलुमायी आंध्र राजा असावा व विक्रमादित्य म्हणजे जयदामन् आणि रुद्रदामन् असावेत. कारण, पुलुमायीनें शकांचा पराभव करून आपल्या बापानें गमावलेले देश परत मिळविले होते ( Bhand, p. 53 ). एकदां हा राजा बागेंतील एका तळ्यांत आपल्या सख्यांसहवर्तमान जलक्रीडा करीत असतां त्यांपैकीं एकीवर यानें पाणी उडविलें. ती अतिशय दमली असल्यामुळें राजाला 'अंगावर पाणी उडवूं नका' असें म्हणाली ('मोदकेन ताडय माम्'). परंतु राजास संस्कृत न समजल्यामुळें त्यानें 'माउदक' याचा अर्थ मोदक असा घेऊन तो तिच्या अंगावर मोदक टाकूं लागला. त्यामुळें राणी हंसूं लागली. राजाला हंसण्याचें कारण समजल्यावर तो अतिशय लज्जित झाला. त्यानें ही हकीकत आपल्या शर्ववर्मन् नांवाच्या मंत्र्यास सांगून व्याकरण शिकण्याचा निश्चय केला, त्यामुळें शर्ववर्म्यानें पार्थना करून राजाला कातंत्र व्याकरण शिकविलें ( कथासरित्सागर ). याच गोष्टीचा उल्लेख तारानाथानें आपल्या बुद्धधर्माच्या इतिहासांत कांहीं नांवांचा फरक करून केला आहे. ह्युएनत्संग हाहि पण 'पाणीनीच्या व्याकरणांतून २५०० श्लोक काढून दक्षिणेंतील एका ब्राह्मणानें कातंत्र व्याकरण तयार केलें व तें शालिवाहनास अर्पण केलें,' असें म्हणतो.

**शालिवाहन गुहिलोत**—( स. ९७७ सुमार ) मेवाडच्या गादीवर नरवाहनानंतर हा आला. या शालिवाहनाचा व दक्षिणेंतील शककर्ता शालिवाहन याचा कांहीं लोकांनीं घोंटाळा केला आहे. विशेषतः इतिहासाच्या अज्ञानामुळें व आपला संबंध मोठ्या माणसाशीं जोडण्याच्या मोहानें याच्या वंशजांनीं आपला संबंध दक्षिणेंतील शककर्त्या शालिवाहनाशीं जोडल्याचें दिसतें.

याच्या वंशजांच्या ताब्यांत जोधपूर राज्यांतील खेड नांवाचा भाग होता. तेथून कांहीं लोक अनहिलवाड्याच्या सोळंकीच्या वैभवकाळीं तिकडे गेले. गुहिलवंशी साहरचा पुत्र सहजिग ( सेजक ) हा सोळंकी राजाचा अंगरक्षक म्हणून नियुक्त झाला. हा सोळंकी राजा बहुतेक सिद्ध-

राज जयसिंह असावा. तेव्हां त्याला काठेवाडांत जहागीर मिळाली. सहजिगचे पुत्र मूलुक व सोमराज असे दोन होते. त्यांतला मूलुक उत्तराधिकारी झाला. त्यांच्या वंशांतील लोकांकडे काठेवाडांत भावनगर, पालीठाणा, रेवाकांठा व गुजराथेंत राजपिंपळा हीं राज्यें आहेत. पण यांनीं व खेडच्या लोकांनीं आपला पूर्वज गुहिल याचें नांव गोहिल असें केलें आणि अज्ञानानें आपला पूर्वज शालिवाहन पैठणचा ठरवला; आणि आपण चंद्रवंशी म्हणवूं लागले. वास्तविक हे सर्व सूर्यवंशी आहेत.

**शालिशुक मौर्य**—( खि. पू. २०७–२०६ ) हा मौर्यवंशांतील संप्रतीचा पुत्र. याच्या वेळच्या अनेक गोष्टींची माहिती वृद्धगार्ग्यसंहितेंतील युगपुराणावरून सूचित होते. त्यांतच लिहिलें आहे कीं, संप्रति हा जैन साधु बनून निघून गेल्यावर गादीच्या वारसांत तंटे सुरू झाले. याला एक वडील भाऊ होता. त्याला ठार करून यानें गादी बळकावली ( बृहत्संहिता, पा. ३७ ). यावरून त्या वेळची स्थिति कशी होती याची कल्पना येते.

अशोकाच्या मागें त्याचा पुत्र जालौक यानें काश्मीरचें राज्य आपल्या नेतृत्वाखालीं स्वतंत्र केलें होतें. तसेंच याचा एक भाऊ वृषसेन यानें सिंधूच्या पश्चिमेकडील प्रदेश म्हणजे अफगाणिस्थान, कंदाहार व हिरात या भागांवर आपलें स्वतंत्र राज्य स्थापित केलें होतें. म्हणजे हे त्या प्रांतांवर सुभेदार होते आणि मुख्य राजसत्ता कमजोर झाल्यावर हे स्वतंत्र झाले म्हणजे राज्य अलग अलग रीतीनें फुटून स्वतंत्र होऊं लागलें. शालिशुकानें जरी राज्य कसेंबसें मिळवलें तरी त्यास एक वर्षापेक्षां जास्त राज्य उपभोगतां आलें नाहीं. एक वर्षानंतर याचाहि खून झाला. खि. पू. २०७–२०६ पर्यंत हा होता.

हा अत्यंत दुष्ट व अत्याचारी होता, असें युगपुराणांत लिहिलें आहे. याच्या वेळेस ग्रीकांचें हिंदुस्थानांत जोरानें आक्रमण सुरू होतें.

याच्या वेळीं अँटियोकस दि ग्रेटनें आपल्या सेनेसह भारतावर स्वारी केली, व त्यांत जय मिळविला. गार्ग्य-संहितेंत लिहिलें आहे कीं, साकेत, पांचाल, व मथुरासुद्धां ग्रीकांनीं घेतली. पाटलिपुत्र किंवा कुसुमध्वजहि त्यांनीं ताब्यांत घेतलें, पण आपसांतील कलहामुळें त्यांना एक वर्षापेक्षां अधिक दिवस इकडे राहतां आलें नाहीं. पण यांचें वर्चस्व जवळजवळ नष्ट झालें होतें.

**शाल्व**—एक जैन कवि. यानें ' शाल्व-भारत ' लिहिलें. हा कोंकणांत नगर-नगरी येथें राज्य करीत असलेल्या शाल्मल्ल-नरेंद्र नांवाच्या राजाच्या पदरीं होता. यानें जैन परंपरेस धरून आपलें भारत लिहिलें.

**शाहाअली निजाम**—पहिल्या बुन्हाणचा पुत्र. याचा पुत्र हुसेन गादीवर आला.

**शाहा तुर्कान**—( स. १२३६ ) शम्सुद्दीन अल्तमश-च्या अनेक बायकांपैकीं एक. ही प्रथम दासी होती. नंतर राणी झाली. नवऱ्यानें रझिया बेगमला बादशाहा करण्याचा हुकूम केला असतांहि हिनें फीरूझ नांवाच्या आपल्या मुलास गादीवर बसवून आपल्या हातांत सत्ता घेतली व अकुलीन म्हणून अपमान केलेल्या सर्वांचे सूड घेण्यास सुरुवात केली. सवतींची बेइज्जत केली. अन्य मुलांचे डोळे काढले व रझियेचा खून करण्याचें ठरविलें. तेव्हां बंड होऊन हिला पकडण्यांत आलें व हिचा मुलगा ठार मारण्यांत आला.

**शाहा निजामुद्दीन फकीर**—हा महादर्जीनें नेम-लेला बादशहाचा कारभारी. हा व लाडोजी शितोळे हे बादशहा गडबड करील म्हणून महादर्जीनें बंदोबस्ताकरितां ठेविले होते ( लाडोजी शितोळे पाहा ).

**शाहाबुद्दीन खल्जी**—(स. १३१६)खल्जी घराण्यां-तील अलाउद्दीनचा मुलगा. याचा धाकटा भाऊ उमरखानानें याचे डोळे काढून याला पदच्युत केलें ( स. १३१६ ).

**शाहामतखान**—( अमानतखान व मुबारिजखान पाहा ).

**२.** ( मृत्यु स. १८१४ ) पठाण सरदार. उत्तम सैन्य ठेवून हा कोणाचीहि चाकरी करी. हा यशवंतराव होळ-कराच्या मर्जीतला होता.

**शाहामीर**—( स. १३३४–४९ ) हा काश्मीरच्या मुसलमानी राजघराण्याचा संस्थापक. सोनदेव नांवाच्या काश्मीरच्या राजाच्या येथें हा नोकर राहिला. त्याचा मुलगा रणचंदाच्या वेळीं हा मुख्य प्रधान झाला. शेवटीं यानें आनंददेवाचा खून करून राज्य बळकावलें. आनंद-देवाच्या बायकोनें पुढें याच्याशीं लग्न लावलें (स. १३३४). तिचें नांव कवलदेवी ऊर्फ कोटा. राज्यावर येतांना यानें शम्सुद्दीन हें नांव धारण केलें. यानें राजा म्हणून चांगलें नांव कमावलें.

**शाहामुनि**—याचे पूर्वज मूळचे प्रयागांतील राहणारे होत. याचा पणजा रजपूत जातीचा शहाबावा म्हणून होता. याच्या आजाचें नांव जानाजी व बापाचें नांव मनासिंग होतें. हा मोठा भगवद्भक्त होता. हा सिद्ध-टेकास बापापासूनच राहत होता. यानें केलेला मराठी भाषेंत सिद्धांतबोध नांवाचा ५० अध्यायांचा ग्रंथ वेदांत

विषयावर आहे. तो शके १७०० मध्यें सातारा जिल्ह्यांतील पठारी मंडळ गांवीं यानें रचला. हा ग्रंथ मोठा सुरस आहे ( म. क. च. भा. २, पा. ७७–९४ ).

**शाहासुजा**—( रणजितसिंग पाहा ).

**शाहा हुसेन अर्घून**—अर्घून घराण्यांतील मीर्झा शाहबेगचा पुत्र. यानें स. १५२४ मध्यें बाबरच्या सांगण्यावरून सर्व सिंध प्रांत जिंकला. याला केंब्रिज हिस्टरीमधील वंशावळींत मीर्झा हुसेन अर्घून असें म्हटलें आहे ( मु. रि. भा. १, पृ. ३३१ ).

**शाहा हैदर**—अहमदनगरच्या निजामशाहींतील दुसऱ्या बुर्हाणचा मुलगा ( कें. हि. ).

**शाहर्यार मोगल**—जहांगीर मोगलाचा सर्वांत धाकटा मुलगा. याला आंधळा केलें होतें.

**शाहिस्तेखान**—( स. १६६५ एप्रिल ५) शिवाजीनें शाहिस्तेखानावर हल्ला केला, तेव्हां याच्या एका मुलाच्या प्रसंगावधानानें हा जगला. शिवाजीनें खानावर हल्ला केला असतां, याचा एक मुलगा याला उद्देशून म्हणाला, ' हे शिपाया, आपला जीव बचावण्याचें सोडून तो धोक्यांत कां घालीत आहेस? हे लोक शोधीत आहेत ते तुला मारण्याकरितां नसून शाहिस्तेखानास शोधींत आहेत. ' या शब्दांमुळें बोलणारा इसम खरा खान असें समजून ते लोक खऱ्या खानाला सोडून त्याच्यावर पडले, आणि खान निसटला ( प. सा. ३. ९३८ ).

हा मोगलांचा दक्षिणचा सुभेदार होता. याचा औरंगजेबाच्या घरांत जिव्हाळ्याचा नातेंसंबंध होता. यानें सत्त्याहत्तर हजार सैन्यानिशीं येऊन चाकणचा किल्ला घेतला आणि पुण्यास तळ दिला, आणि भोंवतालीं हल्ले सुरू केले. शिवाजीचें सामर्थ्य अत्यल्प असूनहि कादंबरीसारख्या अद्भुत घटना करून आणि जातीनिशीं साहसें करून याला त्यानें नामोहरम केलें.

**शाहू ( छत्रपति )**—( जन्म स. १६८२ मे १८, राज्यारोहण स. १७०८ जाने. १२, मृत्यु स. १७४९ डिसें. १५ ) हा छत्रपति संभाजी व येसूबाई यांचा पुत्र. याचें मूळ नांव शिवाजी. स्वतःच्या मुद्रेंतहि हा आपणांस शिवाजी म्हणवितो. याचें शाहू हें नांव औरंजेबानें ठेवलें अशी दंतकथा आहे. संभाजीच्या मृत्यूनंतर सूर्याजी पिसाळ फितुर झाल्यामुळें रायगड औरंगजेबाच्या ताब्यांत आला. तेव्हां हा व याची माता येसूबाई हे त्याच्या हातीं लागले (स.१६९०). औरंगजेब मेल्यानंतर अजमशहानें मराठ्यांत दुफळी उत्पन्न करण्याकरितां बऱ्हाणपूरच्यापुढें गेल्यानंतर यास सोडून दिलें (स. १७०७ एप्रिल). एकूण सतरा वर्षे यानें बादशहाच्या कैदेंत काढलीं. त्या अवधींत उद्धव योगदेव राजाज्ञा आणि जोत्याजी केसरकर यांनीं यास लहानपणीं शिक्षण दिलें. राजारामानें यास दोनतीन वेळां सोडविण्याचा प्रयत्न केला, पण तो निष्फळ झाला. तेथील वातावरणांत हा विलासप्रिय झाला असला तरी राज्य वाढविण्याची कल्पना याच्या अंतःकरणांत होती.

आतांपर्यंत औरंगजेबानें स्वतः आणि शाहूकडून लिहवून मराठ्यांशीं तह करण्याचा प्रयत्न केला होता. पण मराठ्यांचा आपल्या पराक्रमावरचा विश्वास इतक्या दिवसांच्या अनुभवानें वाढला असल्यामुळें ते तहास तयार झाले नाहींत. मोगलांविरुद्ध स्वतंत्र राज्य उभारण्याची कल्पना त्यांच्यांत चांगलीच रुजली होती. म्हणूनच खुद्द गादीचा मालक शाहूनेंहि औरंगजेबाच्या कैदेंतून तह करण्याबद्दलच्या लिहिलेल्या पत्रास मराठे भाळले नाहींत आणि समक्ष तो आला असतांहि एकदम स्वागत करण्यालाहि तयार झाले नाहींत. शाहू आणि त्याचा बाप संभाजी यांचा त्याग लोकांना आदर दाखविण्यास भाग पाडीत होता. पण ज्या स्वातंत्र्याकरितां मराठे तीस वर्षे लढत होते तें गमावून म्हणजे मोंगलांचा मांडलिक म्हणून शाहू महाराष्ट्रांत येत होता. त्यामुळें महाराष्ट्रांत शाहूचें स्वागत मोकळ्या मनानें होणें शक्य नव्हतें ( ताराबाई पाहा ).

दिल्लीची पातशाही बुडविण्याकरितां उत्पन्न झालेली मराठेशाही तिला सावरीत असल्याचा देखावा याच्या वेळेपासून दिसूं लागला. याच्या सुटकेकरितां गमावलेलें निर्भेळ स्वातंत्र्य मराठ्यांना पुनः केव्हांहि मिळवितां आलें नाहीं.

खंडो बल्लाळ आणि धनाजी जाधव हे खेड येथें शाहूस मिळाले आणि परशुराम त्रिंबक प्रतिनिधि पराभूत होऊन परत आला. तेव्हां शाहूनें सातारा येथें आपणांस राज्याभिषेक करून घेतला ( स. १७०८ जाने. १२ ). या वेळेपासून मराठी राज्यांत शाहू व ताराबाई असे दोन पक्ष निर्माण झाले. ते पक्ष मराठी राज्याच्या अखेरपर्यंत आपलें अस्तित्व व्यक्त करीत होते. शाहूच्या गैरहजेरींत मराठी राज्याचें ज्यांनीं एकनिष्ठेनें रक्षण केलें होतें आणि एकनिष्ठ राहण्याबद्दल वचनहि दिलें होतें त्यांना याबद्दल आपलेपणा असला तरी ताराबाईला सोडून याला येऊन मिळणें शक्य नव्हतें. त्यामुळें आरंभापासून मदत करणाऱ्या बाळाजी विश्वनाथाला पेशवाई देणें याला भाग पडलें ( स. १७१३ नवं. ).

त्यानें सय्यदबंधूंशीं संगनमत करून दिल्लीदरबारवर छाप ठेवली. शंकराजी मल्हार नरगुंदकरानें शाहू व मोगल

यांच्यांत एक तह घडवून आणला आणि याला शिवाजीच्या स्वराज्याखेरीज खानदेश, गोंडवन, वऱ्हाड, हैद्राबाद व कर्नाटक हे प्रांत मिळाले आणि दक्षिणेंतील मोगलाईंत चौथाई व सरदेशमुखी मिळाली. त्यामुळें याचें वजन महाराष्ट्रांत वाढलें. राजमाता येसूबाईलाहि या वेळीं दिल्लीहून सोडविलें.

बाळाजी विश्वनाथाच्या मागें बाजीराव व बाळाजी बाजीराव यांना हाताशीं धरून त्यांच्याकडून यानें राज्यविस्तार करविला. कोल्हापूरच्या संभाजीवर चाल करून त्याला जहागीर दिली आणि त्याचा कायमचा खटका तोडला ( स. १७३१ वारणेचा तह). ब्रह्मेंद्रस्वामींच्या सांगण्यावरून पेशव्याकडून जंजिऱ्याच्या सिद्दीवर मोहीम करून त्या प्रांतांतील हिंदूंना निर्भय केलें. हा जिवंत असे तोंपर्यंत यानें पेशव्यांना स्वतंत्रपणें वागूं दिलें नाहीं ( ऐ. टि. पा. ३५–३६ ). पेशवेंहि याची मर्जी संभाळून असत. शिवाय पेशव्यांच्या इतका सैन्याच्या दृष्टीनें मातब्बर कोणी नव्हता. त्यामुळें याला मरतेसमयीं शिवाजीच्या गादीचा मान ठेवून राज्यकारभाराची सर्व जबाबदारी पेशव्यावर कुलमुखत्यारीनें सोंपविणें भाग पडलें. यामुळें थो. शिवाजीनें केलेली राज्यव्यवस्था मोडली. अष्टप्रधान नांवाला राहिले. राजमंडळ नामशेष झालें. शेवटीं तर राजशकहि नाना फडणीसानें बंद केलेला दिसतो. शाहूची इच्छा राजमंडळ चालवावें अशी होती.

याला पुत्र नव्हता. एका राणीनें रघोजी भोसल्यास दत्तक घेण्याचा तगादा लावला. दुसऱ्या राणीनें कोल्हापूरच्या संभाजीस वारस करण्याचा आग्रह धरला. पण ताराबाईनें दुसऱ्या शिवाजीचा पुत्र रामराजाला गादी देण्याविषयीं शाहूकडून व्यवस्था करविली.

हा कैदेंत असतां औरंगजेबानें याचें मोठ्या थाटानें लग्न केलें, व पांच परगणे जहागीर दिले. ती अंबिकाबाई, दुसरी सावित्रीबाई, तिसरी सकवारबाई व चवथी सगुणाबाई. सकवारबाई याच्याबरोबर सती गेली. बाकीच्या पूर्वीच वारल्या होत्या. यांशिवाय तुरुंगांत असतां विरुबाई नांवाची एक दासी याच्या अगदीं मर्जीतील होती. याला फक्त गजराबाई नांवाची मुलगी होती. ती मल्हार रघूजी बांड्याला दिली.

२. ( राज्यकाल स. १७७७–१८०८ ) हा साताऱ्च्या रामराजाचा दत्तक पुत्र होय. दत्तविधानापूर्वी याचें नांव विठोजी असून हा त्र्यंबकजी वावीकराचा मुलगा होय. रामराजानें याला ता. १५ सप्टेंबर १७७७ रोजीं विधिपूर्वक दत्तक घेतलें, पण राज्याभिषेक लगोलग झाला नाहीं. पुढें एक वर्षानें हा अभिषेक मार्गशीर्ष व. ८ ( ता. ११-१२-१७७८ ) रोजीं साताऱ्यास मोठ्या समारंभानें झाला. अमृतराव पेठे व बाबूराव आपटे यांनीं सर्व सिद्धता केली. गोविंदराव व रामराव चिटणीस, अमात्य व मुत्सद्दी सर्व समारंभास आले होते. छत्रपतींच्या खर्चाची वगैरे व्यवस्था नीट बांधून कारभाऱ्यांनीं सर्व बंदोबस्त आपल्या हातांत ठेविला.

दत्तविधानसमयीं याचें वय १८ वर्षांचें होतें. याचीं एकंदर चार लग्नें झालीं. पैकीं शिर्के यांजकडील आनंदीबाई ऊर्फ माईसाहेब यांचे पोटीं ३ पुत्र झाले. वडील प्रतापसिंग राजे ( ज. १८-१-१७९३ ), दुसरा रामचंद्र ऊर्फ भाऊसाहेब ( ज. ८-६-१७९९ ) व तिसरा शहाजी उर्फ आप्पासाहेब ( ज. २१-७-१८०१ ).

सातारकर व कोल्हापूरकर छत्रपति पेशव्यांवर कधींच संतुष्ट नव्हते. अलीकडील तीस वर्षांत नानानें दोघांसहि दाबून टाकलें. तेव्हां कोल्हापूरकर व सातारकर छत्रपतींनीं पेशव्यांवर चाल करण्याचें ठरविलें, व त्याप्रमाणें यानें स. १७९८ मध्यें पेशव्यांवर चाल केली. त्यामुळें बाजीराव अत्यंत चिन्ताक्रान्त झाला. शेवटीं परशुरामभाऊनें हें प्रकरण मिटविलें ( स. रि. उत्तर वि. १ व ३ ).

**शांडिल्य**—यानें भक्तिसूत्रें केलीं. याचा काल बाराव्या शतकांतला आहे. हा बंगाल्यांतील जयदेव कवीचा समकालीन होय.

**शांत कदंब**—( शांतिवर्मा कदंब पाहा ).

**शांत ब्राह्मणी**—( मृत्युंजय ब्राह्मणी पाहा ).

**शांतरक्षित**—( स. ७०९ ) बौद्ध तर्कशास्त्रज्ञ. याचा जन्म लाहोरच्या राजकुलांत झाला. हा नालंदा विश्वविद्यालयांत पंडित होता. याला बोलावून तिबेटच्या राजानें एक विहार बांधला. तिबेटांत हा बोधिसत्व नांवानें ओळखला जातो. हा स. ७६२ पर्यंत तेरा वर्षे तेथें होता. याचे ग्रंथ—१ वादन्यायवृत्तिविपंचितार्थ ( धर्मकीर्तीच्या वादन्यायावर टीका), २ तत्त्वसंग्रहकारिका. या ग्रंथांचीं फक्त तिबेटी भाषांतरें उपलब्ध आहेत (हिस्टरी ऑफ इंडियन लॉजिक, पा. ३२३-२७ ).

**शांत लिंगपा**—( समाधि स. १६२३ ) याचा कर्णहस्तिकी नांवाचा लिंगायत मताचा एक मराठी ग्रंथ आहे. गांव वडगांव ( जि. सातारा ) येथील गादीचे संस्थापक ( म. सा. ).

**शांतिचंद्र**—( स. १५८४ नंतर ) हा जैन पंडित हीरविजयसूरीनंतर अकबराच्या दरबारांत होता. यानें अकबराची प्रशंसा करणारा 'कृपारस-कोश' नांवाचा ग्रंथ तयार

केला. अकबराच्या औदार्य व कारुण्यदर्शक साऱ्या सत्कार्यांचा या ग्रंथांत निर्देश आहे. हा जेव्हां फत्तेपुराहून पाटणकडे हरिविजयसूरीच्या दर्शनार्थ निघाला तेव्हां अकबरानें हिंसा न करण्याचें हीरविजयसूरीला कबूल केलेल्या दिवसांपेक्षां अधिक दिवस कबूल केलें आणि जिजिया कर उठवण्याचा हुकूम केला. हा स.१५८४ नंतर अकबराच्या दरबारीं होता.

**शांतिदास**—गुजराथींतील कृष्ण-गोपी संवादाचा कर्ता.

**शांतिनाथ**—जैनांचा सोळावा तीर्थंकर (तीर्थंकर पाहा).

**शान्तिपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं बारावा सिद्ध होय. हा जातीनें ब्राह्मण असून मगध देशांतील राहणारा होय. याच्या वेळेस महीपाल नांवाचा राजा होता (स. ९७४-१०२६). हा जालंधर (४६) चा शिष्य होता. यासच रत्नाकरशान्ति असें म्हणत असत.

उदंतपूरी (बिहारजवळ) च्या विहारामध्यें हा सर्वास्तिवादसंप्रदायांत प्रव्रजित झाला. हा अध्ययन करून विक्रमशिलाविहारमध्यें जनारिके महापंडिताजवळ गेला. पुढें नाडीपा हाहि याच्या सत्संगतींत आला. यानें आपली विद्या संपवून सोमपुरी विहारामध्यें हा महंत झाला. पुढें माळव्यांत गेला व तेथेंच योगाभ्यासामध्यें यानें पांच सहा वर्षें घालविलीं. नंतर मंगल देशांत विक्रम-शिला या गांवीं गेला. त्याच वेळेस सिलोनच्या राजानें यास आग्रहपूर्वक बोलाविलें म्हणून हा सिंहलद्वीपांत गेला. पण जातांना रामेश्वर येथें यास एक सार्थादार मिळाला, तोच पुढें कुटलिपा (सि. ४४) झाला. तेथें यानें सहा वर्षें धर्मप्रसार केला. नंतर परत आल्यावर राजा महीपालाच्या विनंतीवरून हा विक्रम-शिलाच्या पूर्वद्वारचा महा-पंडित झाला.

सर्व सिद्धांमध्यें याच्यासारखा जबरदस्त सिद्ध कोणीहि झाला नाहीं. याला "कलिकाल-सर्वज्ञ" असेंहि म्हणत असत. यानें १०० वर्षांपेक्षां अधिक आयुष्य घालवून नंतर देह ठेवला.

तन्जूरमध्यें दर्शन विषयावर याचे नऊशेंपेक्षां अधिक ग्रंथ आहेत. यानें छंदःशास्त्रावर "छंदोरत्नाकर" ग्रंथ लिहिला आहे. तंत्रावर २३ ग्रंथ यानें लिहिलेले सांपडतात, त्यांमध्यें सुखदुःखद्वयपरित्यागदृष्टि (४०।३७) हा ग्रंथ मागधी भाषेंत आहे.

चर्यागीतिमध्यें याच्या उत्कृष्ट गीति सांपडतात. हा विद्वान् गृहस्थ असल्यामुळें याच्या कविता सर्वमान्य होत्या. हा उत्कृष्ट हिन्दी कवि होता.

**शांतिवर्मा कदंब**—(स.४५०-७१) ककुत्स्थवर्मन् कदंबाचा पुत्र.

२. (स. ९२५ सुमार) हा बनवासीच्या नागवर्मा कदंबाचा पुत्र.

३. (स.१०८८) हा दुसऱ्या जयवर्मा कदंबाचा पुत्र.

**शांतिवर्मा रट्ट**—(स.१०७५सुमार) हा विट्टुगाचा पुत्र. हा दुसरा सोमेश्वर पश्चिमचालुक्य व सहावा सोमेश्वर यांचा मांडलिक होता. राजधानी हानगळ. पत्नी पांड्य कुलांतील सिरिया देवी.

**शितिकंठ**—हा जातीचा तैलंग स्मार्त ब्राह्मण होता. शालिवाहनाच्या १५ व्या शतकांत गंडीकोटा येथें याचा जन्म झाला. यानें पुष्कळ वय झाल्यावर काशीस जाऊन न्यायशास्त्राचें अध्ययन केलें, व तर्कसंग्रहावर तर्कसंग्रहदीपिका नांवाची टीका लिहिली. तिलाच कोणी शितिकंठी म्हणतात. न्यायशास्त्रांत पुष्कळ विद्यार्थी तयार केले व काशींतच हा मरण पावला (कविचरित्र; अन्नंभट्ट पाहा).

**शिदनाक महार**—(स. १६९०-१७०८ सुमार) सातारा जिल्ह्यांत तासगांव तालुक्यांत कळंबी म्हणून एक गांव आहे. तेथचा हा वतनदार महार. औरंगजेबाच्या हातून संभाजी राजा मारला गेल्यावर पुढें जी महाराष्ट्रांत बंडाळी माजली, त्या वेळीं ह्यां शिदनाकानें महार लोकांचें एक पथक उभारून धामधूम केली. पुढें याचा मराठे लोकांस पुष्कळ उपयोग झाला. शाहू राजा मोंगलांच्या कैदेंतून सुटून ताराबाईपासून आपलें राज्य मिळविण्यासाठीं आला, तेव्हां जे लहानमोठे मराठे सरदार त्यास मिळाले, त्यांत हाहि मिळाला. शाहूस राज्यप्राप्तीनंतर ज्यांनीं मदत केली त्या सर्वांस त्यानें त्यांच्या योग्यतेप्रमाणें देणग्या दिल्या. त्या वेळीं ह्यास कळंबी गांव इनाम दिला. तो अद्यापि याच्या वंशाकडे चालत आहे (भा. व. खं. ३, ऐ. गो. पृ. ३८).

२. (स. १७९५-१८१८ सुमार) हा शिदनाक महाराचा नातू. हा खर्ड्याच्या लढाईत होता. खर्ड्याच्या मैदानावर जेव्हां मराठ्यांच्या फौजेचा तळ पडला तेव्हां सरदार आपापल्या लोकांसह मिसलीप्रमाणें उतरले. याच्या गोटाच्या आसपास दुसऱ्या ब्राह्मण व मराठे सरदारांचे गोट होते. सवाई माधवराव कचेरीचे डेऱ्यांत बसले असतां एकानें विनंति केली कीं, "महाराचा गोट मध्येंच आहे. तो बाजूस काढावा." पेशव्यानें विनंति ऐकून आपल्या बाजूस बसलेल्या हिरोजी पाटणकर नांवाच्या वयोवृद्ध सरदाराकडे पाहिलें. तेव्हां तो मराठा सरदार बोलला कीं, "ही कांहीं जेवणाची पंगत नव्हे म्हणून

मध्येंच महाराचा गोट असल्यास हरकत नाहीं. ही तरवार धरणाऱ्या शूरांची पंगत आहे. येथें जातीचा विचार नाहीं, ज्याची तरवार खंबीर तो हंबीर." पाटणकराचें बोलणें ऐकून पेशव्यानें मान डोलवली.

पुढें लढाईच्या दिवशीं सरदार लोक पेशव्यास मुजरे करून लढाईस चालले. तेव्हां हाहि मुजऱ्यास आला. मुजरा करून व हात जोडून पेशव्यास म्हणाला, "महाराज, मी शिदनाक महार आहें. मी महार म्हणून माझा तिरस्कार कांहीं लोक करीत आहेत. आज आपल्या पायाचा दास कामगिरी कशी करतो ती पहावी." असें म्हणून हा युद्धास गेला.

पुढें लढाई चालू झाली. परशरामभाऊवर पठाणांनीं मोठी गर्दी करून भाऊस घोड्यावरून खालीं आणिलें. त्या वेळीं मराठे व पठाण यांची जी चकमक झाली तींत यानें अप्रतिम शौर्य दाखविलें. याची पटवर्धन मंडळींनीं मोठी तारीफ केली.

पेशवाई बुडाल्यावर हा शिदनाक बरींच वर्षे होता. चिंतामणराव आप्पा सांगलीकर दुखण्यानें फार आजारी असतां त्यांच्या भेटीस हा गेला होता. तेव्हां त्यांनीं मोठ्या समारंभानें ह्याची मुलाखत घेतली. आणि आपल्या पदरच्या मंडळीस याची माहिती करून दिली (भा. व. खं. ३, ऐ. गो., पृ. ३८–३९).

**शिदोजीराव निंबाळकर सरलष्कर ऊर्फ आपासाहेब निपाणकर**—हा कोल्हापूरच्या राजवाड्यांत एकदां भेटीस गेला असतां पुढील चौकांत तेथील राजानें वाघ सोडून दिला होता. हे पुढें जातात तों लोकांनीं वाघ मोकळा असल्याची वर्दी दिली. हे म्हणाले, "मी आतां मागें फिरणार नाहीं." हे पुढें जातात तों वाघ अंगावर येतो असें पाहून ह्यांनीं त्याचे पुढील पाय धरले, व मागील लोकांनीं तलवारीनें त्यास तोडलें. याच मनुष्यानें कोल्हापूरकर महाराजांची मुलगी मागितली होती. पण ती त्यांनीं दिली नाहीं म्हणून यानें स्वारी करून कोल्हापूर घेऊन जबरदस्तीनें मुलीशीं लग्न लावलें. असा हा उग्रकर्मा पुरुष होता (ऐतिहासिक गोष्टी व उपयुक्त माहिती, भाग १ ला, पृ. १५१).

**शिधोपंत**—आळंदी येथें राहणारा सुखवस्तु गृहस्थ. हा निवृत्ति इत्यादि भावंडांचा आजोबा होता.

**शिमुक**—(खि. पू. २००–२२५ सुमार) हा आंध्रांचा पहिला राजा होय. यानें अशोकाच्या मृत्यूनंतर आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें व राज्य करूं लागला. जुन्नर येथील नानाघाटच्या शिलालेखांत याचें नांव आढळतें. याचा सीप्रक, सिंधुक, सिशुक इत्यादि नांवांनीं उल्लेख केलेला आढळतो (Bhan. p. 34). तेथें याचा पुतळाहि आहे. काण्वांचा पराजय करणारा म्हणून याचा काल पुढें धरावा लागतो. तथापि तो खि. पू. २००–२२५ पर्यंत मागें असावा. काण्वांचा नाश पुलोमा किंवा आपीलक यानें केला असावा.

**शिरसाद गझनवी**—(स. १११५-१६) हा अलाउद्दौला मसूद तिसरा ऊर्फ अलकरीम याचा मुलगा. याला अर्सलानें पदच्युत केलें.

**शिराळशेटी**—(स. १३९६ सुमार) हा लिंगायत वाणी होता. श. १३१८ म्हणजे स. १३९६ या वर्षी दुर्गादेवीचा दुष्काळ पडला. तो १२ वर्षे होता. त्या वेळीं या श्रीमंत वाण्यानें गुजराथ व महाराष्ट्र ह्या देशांमध्यें हजारों बैल फिरते ठेवून देशांत धान्याचा पुरवठा केला, त्यामुळें देशाचा बराच बचाव झाला.

दुष्काळ संपल्यावर बेदरच्या बादशहानें यास बोलावणें पाठवून याचा मोठा सन्मान केला व 'तुला काय पाहिजे तें माग' म्हणून सांगितलें. स्वतःस जहागिरी वगैरे न मागतां यानें "साडेतीन घटका खावंदांनीं आपला अधिकार मला द्यावा" अशी बादशहाची प्रार्थना केली.

हें ऐकून बादशहास चमत्कार वाटला व तो आपल्या तख्तावरून खालीं उतरला व त्यावर बसण्यास शिराळशेटीस सांगितलें. यानें हात जोडून विनंति केली कीं "तख्तास पाय लावण्याची माझी योग्यता नाहीं. साडेतीन घटका आपला शिक्का माझे स्वाधीन असावा, व या अल्प काळांत मी जें जें करीन तें तें खावंदांनीं मंजूर करावें." बादशहानें याचें म्हणणें कबूल करून याच्या स्वाधीन शिक्का केला.

धर्मासंबंधीं ज्या देणग्या व इनामें ह्यापूर्वी बहामनी बादशहानें खालसा केलीं होतीं तीं सर्व यानें मोकळीं केलीं व आणखीहि देवस्थानांस वगैरे इनामें दिलीं. साडेतीन घटका भरतांच शिक्का बादशहापुढें ठेवून हात जोडून उभा राहिला. यानें लाखों रुपये उत्पन्नाच्या देवस्थानांच्या हिंदूंच्या देणग्या शिराळशेटीनें खुल्या केल्या आहेत व कित्येक तर नवीन दिल्या आहेत; परंतु स्वतःस कवडीचाहि फायदा करून घेतला नाहीं, हें पाहून याच्या निरपेक्षबुद्धीचें बादशहास व इतर सर्वांस मोठें आश्चर्य वाटलें. हा नको नको म्हणत असतांहि बादशहानें याच्या मुलास सरदारी दिली.

याच्या वंशांतील नामशेटी नांवाचा सरदार पुढें माणदेशांतील बंड मोडण्यास आला होता. त्याच्या

फौजेचा तळ वरकुटें नांवाच्या गांवाजवळ पडला होता. तेव्हांपासून त्या गांवास नामशेटीचें वरकुटें असें म्हणतात. हा गांव म्हसवडपासून दक्षिणेस चार कोसांवर आहे. ह्यावरूनच 'शिराळशेटीचें राज्य' असें अल्पकालपर्यंत मिळालेल्या अधिकारास म्हणतात. ही गोष्ट श्रावण शु. ६ स. घडली. म्हणून लोक याच्या नांवानें उत्सव करितात. तथापि लोक याची मूळची गोष्ट विसरले आहेत ( भा. व. खं. ३, ऐ. गोष्टी, पृ. ४६–४७ ).

**शिरोमणि कृष्णाचार्य**—( स. १७३० सुमार ) मोठे नैयायिक. यांनीं काशींच्या वज्रकंटक शास्त्र्याचा वादांत पराभव केला म्हणून शाहूंनीं यांस कालगांव इनाम दिला. हे मोठे विरक्त पंडित होते.

**शिलादित्य गुहिलोत**—( स. ६४६-७३४ ) उदेपूरच्या गादीवर नागानंतर हा आला. याला मेवाडच्या शिलालेखादिकांत शील म्हटलें आहे. याच्या वेळचा सामोली गांवीं एक शिलालेख मिळाला आहे. तो वि. सं. ७०३ (स. ६४६) मधील आहे (नागरी प्र. प. १. ३११-२४). त्यांत पुढीलप्रमाणें लिहिलें आहेः–' याच्या वेळीं वटनगरहून आलेल्या महाजनांच्या समुदायांत जेक ( जेंतक ) मुख्य होता, त्यांनीं आरण्यकागिरींत मिठाची खाण शोधली व महाजनांच्या आज्ञेनें जेंतक महत्तर (पदवी) नें देवीचें देऊळ बांधलें; शेवटीं देवबुक येथें अग्निकाष्ठें भक्षण केलीं. याचें एक तांब्याचें नाणें मिळालें आहे. त्यावर शील हीं अक्षरें स्पष्ट आहेत.' याच्यानंतर कालभोज ( अपराजित ) गादीवर आला. याला दुसरा महेंद्र म्हणत असावेत.

**शिलादित्य धराश्रय**—( स. ६७१ ) गुजराथेंतील चालुक्य घराण्यांतील एक प्रमुख पुरुष. हा जयसिंह धराश्रयाचा मुलगा. हा स. ६७१ मध्यें आपल्या बापाच्या राजवटींत युवराज असून एका प्रांताचा सुभेदार होता.

**शिलादित्य मैत्रक**—( स. ६०९ ) हा वलभीच्या दुसऱ्या धरसेनाचा पुत्र. याला 'परममाहेश्वर' असें विशेषण असलें तरी यानें बौद्धांनाहि देणग्या दिल्या होत्या. ह्यु–एन्–त्संगाच्या पूर्वी साठ वर्षें हा माळवा ऊर्फ मोलायोचा राजा दिसतो.

२. ( स. ६६६–७५ ) हा खरग्रहाचा पुत्र. याला परमभट्टारक, महाराजाधिराज व परमेश या पदव्या होत्या. या वंशांतील प्रत्येकास शिलादित्य म्हणत असावेत.

**शिलादित्य सोळंकी**—( स. ६७०–८२ ) लाटदेशाचा जहागिरदार जयसिंहवर्मा सोळंकीचा हा पुत्र. यानें श्र्याश्रय असें बिरुद धारण केलें होतें. याचीं दोन दानपत्रें मिळालीं आहेत. त्यांपैकीं एक कलचुरि संवत् ४२१ ( स. ६७० ) माघ शु. १३ ला नवसरीहून दिलें आहे ( बॉंबे. ए. सो. ज. १६-२-३ ) व दुसरें कलचुरि संवत् ४४३ ( स. ६८२ ) श्रावण शुद्ध १५ चें कार्मणेय ( कामलेज सुरतजिल्ह्यांतील ) च्या जवळ कुसुमेश्वर येथील छावणींतून दिलें आहे ( व्हिएन्ना ओरिएंटल कांग्रेस रिपोर्ट, ऑर्यन् सेक्शन, पृ. २२५–२६ ). या दोहोंतहि याला युवराज म्हटलें आहे. यावरून या दान देण्याच्या कालांत जयसिंहवर्मा जिवंत होता. आणि हा त्याच्या प्रान्ताचा अधिकारी होता. पण हा युवराज असतांनाच मृत्यु पावला. म्हणून मंगळराज गादीवर आला.

**शिव**—( जन्म स. १५८८ सुमार ) हा विष्णूच्या वर्णनांत दिलेल्या वंशांतील कृष्णाचा पुत्र, व नृसिंहाचा बंधु होय. यानें 'अनंतसुधारस' ग्रंथावर टीका लिहिली आहे, व 'मुहूर्तचिंतामणी' नांवाचा मुहूर्तग्रंथ केला आहे. याच्या पुतण्याच्या ग्रंथावरून जगद्गुरु गुरु असावा असें कळतें. याचा दुसरा पुतण्या रंगनाथ यानेंहि 'सिद्धांतचूडामणि'त याची फार स्तुति केली आहे. दुसरा एक शिवराम दैवज्ञाचा पुत्र. यानें 'जन्म-चिंतामणि' नांवाचा ग्रंथ लिहिला असें सुधाकर लिहितात.

२. ( ग्रंथकाल स. १८१५ ) शिव हा विश्वामित्र गोत्राचा होता. हा लक्ष्मेश्वर येथें राहत असे. यानें 'तिथिपारिजात' नांवाचा ग्रंथ शक १७३७ त लिहिला. तो गृहलाघवानुसारी आहे. त्यांत तिथि साधनार्थ तिथिचिंतामणीसारख्या सारण्या आहेत.

**शिवकल्याण**—( टीकारचनाकाल स. १६३५ ) हा त्रिमलाचा ( नित्यानंदाचा ) पुत्र व शिष्य. यानें अमृतानुभवावर संस्कृत भाषेंत नित्यानंददीपिका नांवाची टीका लिहिली आहे ( मं. वा. इ. १८३६, ले. ४३ ). यानें भागवतावर ओवीबद्ध टीका केली तीं अतिशय विस्तृत आहे. हा जोगाईच्या आंब्याचा राहणारा. हा पंढरपूरच्या पांडुरंगाचा उपासक होता.

**शिवचित्त कदंब**—( स. १२४६–५० ) हा गोव्याच्या त्रिभुवनमल्लाचा मुलगा.

२. ( परमादि कदंब पाहा ).

**शिवदास**—( स. १६०० सुमार ) हा चांगल्या प्रतीचा एक ग्रंथकार होऊन गेला. याचा गुरु नीलग्रीव हा होय. गुरूंनीं केलेला अपूर्ण ग्रंथ 'वेताळपंचवीशी' हा यानें पूर्ण केला. यानें वरील पूर्ण लिहिलेला ग्रंथ फारच जुन्यापैकीं होय. तो यानें रत्नागिरीस लिहिला ( मं. १८३६, वा. इ. ले. ८७ ).

२. एक मराठी कवि. याच्या गुरुचें नांव भगवंत. यानें बरींच पदें व अभंग केलें आहेत. यानें आपल्या गुरुवर एक आरती केली आहे ( मं वा. इ. शके १८३७, ले. १५८ ).

**शिवदासखेन**—हा गौडाल नांपालाचा पुत्र. याची चरकसंहितेवर एक टीका आहे. आणि 'चक्रसंग्रह' नांवाचा याचा एक ग्रंथ आहे. हा पंधराव्या शतकांतील दिसतो.

**शिवदिनबाबा**—( स. १६९८–१७७४ ) आईचें नांव सरस्वती व पित्याचें नांव कृष्ण यादव जोशी. हा एक मराठी कवि होता. केसरीनाथाचा शिष्य म्हणून यास शिवदिनकेसरी म्हणतात. हा पैठणचा राहणारा. वाजसनेयी ब्राह्मण, गोत्र कौशिक, आडनांव जोशी. याचा जन्म शके १६२० त झाला ( वैशाख वद्य ७ मृगुवासरीं सूर्योदयीं ). शके १६४४–४८ पर्यंत शिवदिनबावानें हिंदुस्थानभर प्रवास केला. शके १६९६ माघ व. १३ पैठण येथें यांचा मृत्यू झाला. बावांचा शिष्यसांप्रदाय फार मोठा असे. नरहरिनाथ हे यांचे पुत्र असून त्यांचीहि कविता उपलब्ध आहे.

यांचे ग्रंथः—विवेकदर्पण ( १६९३ ), ज्ञानप्रदीप, व भक्तिरहस्य. शिवाय निरनिराळ्या देवांवरील बरींच प्रासादिक पदें आहेत. जर्जरीवक्ष नांवाच्या मुसलमान अवलियानें यांच्या कीर्तनावर संतुष्ट होऊन यांना दीन (धर्म) अशी पदवी दिली. तेव्हांपासून शिवनाथाचें शिवदीन असें नांव झालें. तसेंच पैठणच्या शहा दावल या यांच्या बेठकींतल्या मुसलमान अवलियांवर 'वाहवा शहा दावल पीर जागते आवल' असें यांचें एक पद आहे.

यांच्या पत्नीचें नांव उमाबाई. उमाबाईचें पत्र मठांत उपलब्ध आहे. यांचे पुत्र नरहरीनाथ व गदाधरनाथ. नरहरीनाथाचा मुलगा लक्ष्मीनाथ हा मोठा अधिकारी पुरुष असून त्याची समाधी आळंदी येथें केसरीनाथाच्या समाधीशेजारीं आहे.

यांच्या गुरुपरंपरेस पुढीलप्रमाणें सुरुवात होते—श्रीआदिनाथ, मत्स्येंद्रनाथ, गोरखनाथ, गैनीनाथ, निवृत्तिनाथ, ज्ञाननाथ, सत्यामलनाथ वगैरे.

**शिवभट साठे**—( स. १७५६–८७ ) हा नागपूरकर भोसल्यांचा ओरिसाचा सुभेदार.

हा जानोजी भोसल्याचे पक्षाचा असून मुधोजीच्या विरुद्ध होता. पण माधवराव पेशवे व जानोजी यांच्या भांडणांत हा माधवराव पेशव्यास मिळाला.

मीर कासीम व मीर जाफर यांशीं संधान ठेवून बंगाल्यांत इंग्रजांचा प्रवेश न होऊं देण्याचा याचा प्रयत्न होता.

इंग्रजांनीं याच्याविरुद्ध जानोजीकडे लिहून यास सुभेदारीवरून कमी केलें व यास कैद करवलें ( ता. २४-४-१७६४ ). दोघेहि मीर इंग्रजांच्या कच्छपी असल्यानें यांस चौथाई मिळेना.

शेवटीं यानें इंग्रजांशीं युद्धहि करण्याचा प्रयत्न केला. पण इंग्रजांपुढें याचा टिकाव लागेना. दिल्लीच्या बादशहानें बंगाल ओरिसाची सनद इंग्रजांना दिल्यानें व घरची मदत नसल्यानें याचे प्रयत्न फिके पडले. याचा भाऊ भास्करराव.

जानोजीस हा कटक प्रांत सरळ ताब्यांत देईना तेव्हां जानोजीनें यावर भवानी काळूस पाठविलें तेव्हां हा इंग्रजांच्या आश्रयास गेला. व इंग्रजानें याला ठेवून घेतलें.

यानंतर शिवभट पेशव्यांकडे जाऊन नोकर राहिल्याचा दाखला सांपडतो. त्याची पुढील हकीकत उपलब्ध नाहीं.

स. १७५६ पासून आठ वर्षे ओरिसाच्या सुभेदारीचें काम शिवभट करीत होता. याच्या कारकीर्दीतील बराचसा भाग हिंदुस्तान सरकारच्या रेकॉर्ड ऑफिसनें प्रसिद्ध केलेल्या पत्रव्यवहारावरून कळून येतो (Calendar of Persian Correspondence, Vols. I-V ).

ओरिसांतील शिवभटाचा अंमल प्रजेस बराच सुखावह झाला. तो आला त्या वेळीं सर्व प्रांत उध्वस्त झाला असून सर्वत्र अव्यवस्था माजलेली होती. यानें सुव्यवस्था करून प्रांताची जमाबंदी उतरविली व त्यामुळें प्रांताचें उत्पन्नहि वाढलें. पुष्कळशा इंग्रज लेखकांनीं मराठ्यांच्या ओरिसांतील राज्यकारभाराविषयीं निंदा केली आहे परंतु शिवभटाच्या कारभारासंबंधानें त्यांनाहि स्तुतीच करावी लागली ( ना. प्रां. इ. ).

**शिवमार गंग**—( स. ६६८ ) हा पश्चिम गंग घराण्यांतील असून यानें आपला अंमल बऱ्याच प्रांतांवर गाजविला. अमोघवर्ष दिंडी कोंजेरांग या राजानें याचा आश्रय घेतला.

२. ( स. ८०५–८१० ) हा पश्चिम गंगांपैकीं दुसरा शिवमार होय. ध्रुव राष्ट्रकूटानें याला कैद केलें. सुटला तरी पुनः जिंकलें. तिसऱ्या गोविंदानें याला पुनः गादीवर बसविलें.

**शिवरथ**—काश्मीरच्या उच्चल राजाचा हा प्रधान होय.

२. ( स. ५४१–४२ ) हा बनवासीच्या कदंबांपैकीं मृगेशवर्म्याचा पुत्र व रविवर्म्याचा भाऊ.

**शिवराम घोरपडे**—हा मुरारराव घोरपड्याचा पुतण्या होय. हैदरानें मुराररावास मुलाबाळांसह ठार मारल्यावर पुढें हा हैदराशीं लढतच होता. पण सावर्शाचे लढाईंत ता. ९।१।१७७७ रोजीं जखमी होऊन हैदराकडे पाडाव झाला, मात्र दंड भरून सुटला. कालांतरानें मुराररावाचा दत्तक होऊन सोंडूरचा मालक झाला.

घोरपड्यांची एक शाखा हैदराचे नोकरींत होती, त्यांत शिवराम घोरपडे याचें नांव येतें. यास कुंदगोळकर असें म्हटलेलें आहे (म. रि. उत्तर वि. १ ला पृ. ४४५-४४६).

**शिवरामभट्ट चित्राव**—(मृत्यु स. १७५१) हा पेशवाईंत अत्यंत थोर साक्षात्कारी पुरुष होता. पेशवे, बाबूजी नाईक बारामतीकर, भोसले नागपूरकर, पंतसचीव वगैरेवर यांचें अत्यंत वजन असे. नानासाहेब पेशवे व चिमाजीअप्पा यांचे दर्शनास जात (पु. द. १. १३४). यांनीं पाषाणचा सोमेश्वर, नागेश्वर (भारतवर्ष २.पा. १३; पे. द. २२-२९१), केदारेश्वर, उद्धरचा रामेश्वर वगैरे भव्य देवालयें बांधलीं; व कित्येकांचे जीर्णोद्धार केले. पुण्याच्या गणेशखिंडीतलें गणपतिमंदिरहि यानेंच बांधलें. पाषाणच्या शिवलिंगाची पुनः प्रतिष्ठा केली (पु. द. ३. १०८-११३). पण यांचें सर्वांत स्मरणीय व प्रेक्षणीय काम म्हणजे पुणें येथील ओंकारेश्वराचें विशाल मंदिर होय. त्या मंदिराचें काम यांनीं सुरू केलें, आणि यांचे पुत्र कृष्णंभट यांनीं तें पुरें केलें. पेशव्यांनीं द. म. १००० रु. प्रमाणें ९ महिने पैसे दिले. बाकीचे पैसे यांनीं इतर राजेरजवाड्यांकडून मिळविले. मंदिराकरितां सुमारें १॥ लक्ष रु. खर्च झाले, असें उपलब्ध हिशोबावरून लक्षांत येतें.

यांचा पाषाणच्या सोमेश्वरास नित्य जाण्याचा नियम असे. एकदां गणेशखिंडींत यांना विपुल भूमिगत द्रव्य सांपडलें. भूमिगत द्रव्य राजाचें म्हणून यांनीं तें पेशव्यांचे स्वाधीन केलें. पेशव्यांनीं त्या रकमेचें व्याज म्हणून यांना द. सा. १८८८ रु. देण्याचें ठरविलें आणि यानेंहि त्या रकमेंतून पाषाण व पुणें येथें दोन अतिरुद्राचे स्वाहाकार करण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें त्या वेळेपासून आतांपर्यंत सरकारांतून ते पैसे मिळत आहेत, व दरवर्षी शिवरात्रीचे वेळेस ते स्वाहाकार चालू आहेत. शेवटीं हे संन्याशी होऊन पाषाण येथें यांनीं जिवंत समाधि घेतली. त्याची मिती शके १६७४ चैत्र व. ५ गुरुवार अशी राजवाडे खं.६पा.६४ वर दिली आहे, पण त्यांची पुण्यतिथि मात्र फाल्गुन शु. १ ला होत असते. यांचें घराणें ओंकारेश्वरापाशीं नांदत आहे. ओंकारेश्वराचें मंदिर याच घराण्याचे ताब्यांत असून पूजेअर्चेकरितां सरकारी नेमणूक आहे. हे गणो गवाजीच्या घराण्यांपैकीं वासुदेवभटाचे पुत्र होत.

याच प्रसंगानें गणो गबाजी चित्राव यांच्या घराण्याची थोडक्यांत माहिती पुढें देत आहों.

चिंचवडकर चित्राव घराणें—शिवरामभटांचे बंधु गोविंद भट यांचेपासून ही शाखा सुरू झाली. या घराण्यांत गोविंद–वामन–चिंतामण–विनायक–शंकर असे लोक झाले. शंकराची पत्नी उमाबाई फक्त हयात आहे. गोविंदला आणखीहि सिदंभट, रघुनाथ व गणेश अशीं मुलें होतीं, पण त्यांचीहि आतां नकल झाली आहे.

कडूसकर घराणें—शिवरामभटांचा एक चांगदेवभट नांवाचा भाऊ होता, त्यापासून कडूसची शाखा सुरू झाली. त्या शाखेंत भटंभट–आपाभट–त्रिंबकभट व शंभुभट अशीं माणसें होऊन नकल झाली. त्यांची सर्व मिळकत व मंदिर त्यांचे उपाध्ये थिटे हे सध्यां कडूस येथें वहिवाटींत आहेत.

चित्राव घराणें—चित्राव आडनांवानें ओळखलीं जाणारीं चार घराणीं प्रसिद्ध आहेत. त्यांपैकीं तीन ऋग्वेदी असून चवथें शुक्लयजुर्वेदी काण्वशाखेचें आहे. चित्रावांपैकीं, वाई आणि पुणें येथील दोनहि कौशिकगोत्री आहेत आणि इंदापूरचे भारद्वाजगोत्री आहेत आणि काण्वशाखेपैकीं पुण्याचा सुभेदार श्रीपत बापूजी हा उत्तर पेशवाईंत प्रसिद्ध होता. पुणें आणि वाई येथील घराणीं देवता आणि गोत्र या दृष्टीनें एक असलीं तरी त्यांचा संबंध दाखवतां येत नाहीं. वाईच्या घराण्याचे कागद, कै. राजवाडे यांनीं 'शिवकालीन ऐतिहासिक घराणीं' (खं. २०) या खंडांत छापले आहेत. त्यावरून वाईच्या चित्राव घराण्याची थोडी माहिती मिळते. आजहि वाईस चित्राव घराणें नांदत आहे.

पुणें शाखा—पुण्यास गणो गबाजी चित्राव (तबीब) हा प्रथम आला. त्याचा धंदा शस्त्रवैद्यकीचा असून तो शहाजी राजांच्या विश्वासांतील माणसांपैकीं एक होता व त्याला शिवाजीमहाराजांबरोबर राहण्याकरितां दौलताबादेहून मुद्दाम धाडण्यांत आलें होतें असें दिसतें. त्यानें येथें आल्यानंतर पुण्यास जागा मिळवली ती जागा मुरार जगदेवानें पुणें जाळलें तेव्हां बेचिराख जाहली (स. १६२९), म्हणून गांवच्या प्रमुख हक्कदारांनीं स्वतंत्र व विस्तृत जागा दिली. तीच अमृतेश्वराजवळील सध्यांचा चित्रावांचा वाडा होय. त्याची शिवकालीन सनद उपलब्ध आहे. गणो गबाजीचा बराच शिवकालीन पत्रव्यवहार उपलब्ध असून त्यापैकीं कांहीं प्रसिद्धहि झाला आहे.

त्यापैकीं एका पत्रांत जिजाबाईनें शिवाजीमहाराजांना ' चिरंजीव शिऊबा ' असें उल्लेखिलें आहे. हा पत्रव्यवहार स. १६१३-७७ सालापर्यंतचा आहे. त्यांत यास तबीब, इनामदार, पुरातन सेवक वगैरे शब्दांनीं संबोधिलें आहे. गणो गबाजीचा भाऊ विष्णु गबाजी. गणो गबाजीला संतति नव्हती. त्याचा भाऊ विष्णु गबाजी. याच वेळीं विष्णूचा चुलता आपदेवभट चित्राव हा विद्वान् म्हणून प्रसिद्धीस आला. मुरार जगदेवानें तुलापुरास सुवर्णतुला करून ज्या ब्राह्मणांस अग्रहार दिला (स.१६३३), त्या विद्वान् ब्राह्मणांत आपदेवभटाचें नांव आहे ( प. सा. ३६३ ). शिवाय अनेक निर्णयपत्रांवर त्यांच्या सह्या आहेत. त्यांनीं लिहिलेले कांहीं ग्रंथहि असावेत. यानंतर विष्णु गबाजीचा पुत्र त्रिंबक. त्रिंबकचे मुलगे वीरेश्वर व मोरेश्वर हे विद्वान् असून उलाढाली होते असें दिसतें. त्यांनीं शाहूमहाराज खानदेशांतून नाशकास येतांच त्यांची भेट घेतली व ' महाराष्ट्र राज्याचा हितचिंतक ' म्हणून जमिनीची सनद मिळविली ( स. १७०७-१७२८ ). महाराष्ट्रधर्म हा शब्द त्या वेळीं रूढ दिसतो. वीरेश्वराचा पुत्र रंगभट हा बराच कर्तृत्ववान् असून बारामतीकरांची त्यावर श्रद्धा होती. त्यामुळें भिऊबाई बारामतीकरांच्या पैशानें पुणें येथें सिद्धेश्वराचें देऊळ बांधलें गेलें. त्याची सर्व व्यवस्था वंशपरंपरेनें चित्राव घराण्याकडे देण्यांत आली ( स. १७४९ ) असें सदाशिवराव भाऊ यांच्या शिफारशीची एक यादी उपलब्ध आहे तीवरून दिसतें.

मूळचें अमृतेश्वराचें देऊळ याच सुमाराचें असावें ( स. १७५० ). कारण त्याचीहि पूजा भाऊसाहेबांनीं ( बाबूजी नाईक यांनीं ) रंगभटांना सांगितल्याचा सनदेंत निर्देश आहे. फक्त तें देवळाखालीं असणाऱ्या नाल्यानें वाहून गेल्यामुळें सवाई माधवराव पेशव्यानें नाना व हरिपंत यांच्या सल्ल्यानें त्याची दुरुस्ती केली (स.१७९०). आणि त्यानंतर नीळकंठ आबूजीनाईक बारामतीकरांनीं पिंपरीच्या इनामाच्या पुनः सनदा करून दिल्या ( स. १७९२ ). या वेळीं रंगभटाचा नातू व रघुनाथभटाचा पुत्र पांडुरंगभट होता. तेथील जमीन सध्यां चित्रावांकडे वहिवाटीस आहे. याच पांडुरंगभटानें विष्णूचें देऊळ व राममारुति वगैरेचीं देवळें बांधलीं. पांडुरंगाचा मुलगा रघुनाथ. रघुनाथ अज्ञात असतां त्याची आई रमाबाई घरचा कारभार पाहत होती, असें त्या वेळीं झालेल्या कांहीं हुकूमनाम्यांवरून दिसतें. पूजेकरितां ठेवलेल्या खेरे, हातवळणे वगैरे लोकांनीं आपला वहिवाटीचा हक्क सांगितल्यानें दावे झाले. प्रथम त्यांचा चित्रावांविरुद्ध निकाल लागून नंतर अनुकूल निकाल लागल्याचे दाखले आहेत. रघुनाथाचा पुत्र नारायणभट याची कारकीर्द मोठी असून त्या वेळीं पेशव्यांची सत्ता संपून इंग्रजी अंमल सुरू झाला. शेवटीं वृद्धापकाळ झाल्यामुळें व संतति नसल्यानें नीळो सखाराम धडफळे यांचा नारायण नांवाचा आठ वर्षांचा मुलगा दत्तक घेऊन त्याचें नांव विष्णु असें ठेवलें ( दत्तक पत्र स. १८५२ ). त्या वेळीं भाऊबंदांकडून परगोत्री दत्तक म्हणून प्रकरण कोर्टांत गेलें, पण शेवटीं अनुकूल निर्णय होऊन सरकारी हुकुमांनीं देवस्थानची व्यवस्था विष्णु नारायणांच्या ताब्यांत आली. त्यांनाहि संतति नसल्यानें नीळो सखाराम धडफळे यांचे नातू रंगो बामन धडफळे यांचा मुलगा दत्तात्रेय यास दत्तक घेऊन त्याचें नांव सिद्धेश्वर असें ठेवण्यांत आलें. तेच या ग्रंथाचे कर्ते सिद्धेश्वर विष्णु चित्राव होत.

**शिवराम लिमये**—हे पेशव्यांचे खासगी कारभारी होते म्हणून यांस खासगीवाले म्हणत. यांनीं पंढरपुरास विठोबाचें मंदिर बांधलें. यांचा पिता कृष्ण.

२. ( स. १७७३ ) हा शिवराम कृष्णाचा नातू. हा मोठा धाडसी व शक्तीचा पुरुष होता

**शिवरामस्वामी**—( स. १७४५ सुमार ) निजाम राज्यांतील कल्याणीस यांचा मठ आहे. यांचा पिता नारायण ऊर्फ पूर्णानंद. काश्यपगोत्री दे. ऋ. ब्राह्मण. येळेहाळी व आपचंद मठांत यांचा बराच अप्रसिद्ध ग्रंथसंग्रह आहे. यांचे ग्रंथ-१ गंडिकाख्यान ( काव्यसंग्रहांत प्रसिद्ध ), २ नानासाहेब पेशव्यास उपदेश वगैरे तेरा ग्रंथ ( म. क. च. ३, पृ. १०१-११० ). हे मराठींतील भक्त कवि होत.

**शिवराव पटवर्धन ( कुरुंदवाड )**—( रघुनाथराव पाहा ).

**शिवश्री पुलोमा**—( स. १५८-१६५ ) आंध्रांपैकीं एक राजा. यालाच पुलोमा तिसरा असें म्हणतात. हा पुलुमायीचा भाऊ असून त्याच्यानंतर गादीवर बसला ( Bhand. p. 34 ). याचीं नाणीं तैलंगण जिल्ह्यांत सांपडलीं आहेत. यानें स. १५८-१६५ पर्यंत राज्य केलें ( Bhand. p, 50 ).

**शिवसहायदास**—एक हिंदी कवि. हा जयपूरचा राहणारा. यानें शिवचौपाई आणि लोकोक्तिरसकौमुदी या नांवांचे दोन ग्रंथ लिहिले आहेत. यानें परवान असें नांव स्वीकारून नायिकाभेद सांगितला आहे.

**शिवस्कंदवर्मन् पल्लव**—( स. २५०-७५ ) हा पल्लव घराण्यांतील असून भारद्वाज गोत्री होता. हा आपणास ' धर्म-महाराजाधिराज ' ही पदवी लावीत असे.

याची राजधानी कांची येथें होती. यानें अग्निष्टोम, वाजपेय आणि अश्वमेध हे यज्ञ केले. त्यामुळें हा आपणास धन्य समजत असे. यानें ' धर्म ' ही पदवी महाराज याच्या अगोदर लावली. गोलशर्मन् नांवाच्या अत्रिगोत्री ब्राह्मणाला यानें एक गांव बक्षिस दिलें. या घराण्यांत अनेक स्कंदवर्मन् झाले आहेत. फक्त हाच शिववर्मन् या नांवानें ओळखला जातो.

**शिवस्कंध शातकर्णि**—यानें स. १६५-१७२ पर्यंत राज्य केलें ( Bhand. p. 50 ).

**शिवा**—वैशालीच्या चेतक लिच्छवीची मुलगी. ही उज्जैनीच्या चंद्रप्रद्योताची पत्नी होय. हिला प्रभावती, पद्मावती, मृगावती, ज्येष्ठा, सुज्येष्ठा आणि चेलना अशा सहा बहिणी होत ( Ct. Avasyaka Sutra, p. 677 ).

**शिवाजी**—( जन्म स. १६३०, राज्यारोहण स. १६७४, मृत्यु स. १६८० ) या स्वराज्यसंस्थापक थोर पुरुषाचा जन्म जुन्नर नजीक शिवनेरी किल्ल्यावर स. १६३० फेब्रुवारी १९ ( श. १५५१ फाल्गुन वद्य ३ ) रोजीं सूर्योदयानंतर ३० घटकांनीं सिंहलग्नावर झाला (शि. भा. पृ. ५६). त्या वेळीं बाप शहाजी दर्याखानावर स्वारी करण्यासाठीं उत्तरेकडे गेला होता. तो पंचहजारी मंनसब मिळवून परत आला तेव्हां त्यानें प्रथम शिवाजीस पाहिलें. पुढें पांचसहा वर्षें तो स्वतंत्र निजामशाही स्थापण्यासाठीं लढत होता तेव्हां याचें राहणें शिवनेरीवरच होतें. सातव्या वर्षी याला व याची माता जिजाबाई हिला शिवनेरीहून सिंहगडानजीकच्या ' खेड ' गांवीं दादाजी कोंडदेव याच्या देखरेखीखालीं ठेवण्यांत आलें ( प. सा. २५९० ). तेव्हां यास लिहिणें वाचणें शिकविण्यास सुरुवात झाली आणि तेथें जी पेठ वसविण्यांत आली तिला ' शिवापूर ' असें याचें नांव देण्यांत आलें (प.सा.२५९०).

या वेळीं विजापूरकरांचा सरदार या नात्यानें शहाजी कर्नाटकांत रणदुल्लाबरोबर अनेक पाळेगारांना जिंकण्यांत गुंतला होता. आणि तिकडील कामगिरीबद्दल त्यास बंगळूर हें शहर बक्षीस मिळालें होतें, तेथें यांनाहि नेण्यांत आलें. शिवाजीस बारावें वर्ष लागलें तेव्हां ( स. १६४१ ) शहाजीनें पुणें परगण्याचा पोट मोकासा याचे नांवें केला आणि नंतर जिजाबाईसह याची पुण्याकडे रवानगी केली.

देशीं आल्यावर दादाजीच्या देखरेखीखालीं याला पुस्तकी, लष्करी व व्यावहारिक शिक्षण मिळालें व निंबाळकर घराण्यांतील सईबाईशीं लग्न झालें. दादाजी हा कोंढाण्याचा सुभेदार व शहाजीचा पुणें मावळ प्रांतांतील व्यवस्थापक होता. व ही व्यवस्था लावण्यासाठीं दादाजी व शिवाजी यांनीं कसून मेहनत केली. तथापि ही व्यवस्था मनासारखी होण्याच्या कामीं अनेक अडथळे येत असत. एक तर मावळांतील सर्व भाग शहाजीच्या ताब्यांत दिलेला नव्हता. शिवाय शहाजीवर दरबारची गैरमर्जी झाल्यास त्याचा परिणाम याच्यावर होई.

पुढें दादाजी मरण पावला ( स. १६४७ ). तेव्हां शहाजी कर्नाटकच्या स्वारींत गुंतला आहे असें पाहून यानें कोंढाणा ताब्यांत घेतला आणि पुणें परगण्याचा कारभार शिवाजी स्वतः पाहूं लागला. पुढें लवकरच कर्नाटकांत शहाजीस लष्करी हुकमाची अवज्ञा केल्याबद्दल मुस्तफाखानानें कैद केलें आणि फत्तेखानास कोंढाणा घेण्याकरितां शिवाजीवर रवाना करण्यांत आलें. त्यास कोंढाणा घेण्याच्या कामीं यश न आल्यानें तो शिरवळवरून पुरंदराकडे वळला. कावजीनें शिरवळच्या कोटाजवळ त्याच्या सैन्यास मागें हटविलें,पण पुरंदरावर शिवाजीनें बाणांचा व दगडांचा वर्षाव करून तलवारीचा असा हल्ला चढविला कीं, त्याला पराभूत होऊन विजापूरास परत जावें लागलें. शेवटीं शिवाजीनें सिंहगड व संभाजीनें बंगळूर देऊन बापाची सुटका करवली आणि शिवाजी खेडेबारे सोडून पुरंदरावर राहूं लागला. शहाजीच्या सुटकेसाठीं यानें दिल्लीला पत्र लिहून आदिलशाहाला शह देण्याचा प्रयत्न केला पण दिल्लीचा शह येण्यापूर्वीच शहाजीची सुटका झालेली दिसते. यानंतर शहाजी चार वर्षें देशीं होता. आणि दरबारहि शहाजीचा शह पत्रद्वारें शिवाजीस देऊन त्यास पड घ्यावयास लावी.

या अवधींत पुणें व सुपें येथील मोकासे शहाजीच्या नांवें व इंदापूर परगण्याचा शिवाजीच्या नांवें चालू होता. या चार वर्षांत जेनाखान पीरजादे हा पुणें परगण्याचा सर हवालदार असून स. १६५५ पर्यंत त्याच्या संमतीनें शहाजीस हुकूम द्यावे लागत. कनकगिरीच्या वेढ्यानंतर शहाजीची नेमणूक जिंजीकडे झाली. यामुळें बापलेकांच्या भेटी होणें कठीण झालें.

मावळांतील हालचालींना आळा घालण्याकरितां आणि तोरणा व राजगड येथें किल्ल्यांचें बांधकाम सुरू करून चाललेली तयारी थांबविण्याकरितां फत्तेखानास सैन्य देऊन विजापूर दरबारनें शिवाजीवर पाठविलें. परंतु हा सावध असल्यामुळें त्याचा पराभव करूं शकला.

विजापूरचा मुहम्मद आदिलशाह मरणास टेकल्यामुळें कोंकणांतील अधिकारी विजापूराकडे गेले. अशा संधींत यानें राज्यविस्तार करण्याचें ठरविलें. जावळीचा चंद्रराव मोरे अलीकडे याशीं विरोध करूं लागला. शिवाय त्याच्या घरांत भाऊबंदकीहि होती. यानें चाल करून जावळी ताब्यांत घेतली पण चंद्रराव पळून रायगडीं गेला. तेव्हां यानें तोहि किल्ला घेऊन कल्याण भिवंडीपर्यंतचा मुलूख हस्तगत केला. सुपें येथें शहाजीनें ठेविलेला संभाजी मोहिते हा हवालदार अन्यायानें वागूं लागला व शहाजीचेहि हुकूम मानीना, यासाठीं त्याला कैद करून यानें सुपें ताब्यांत घेतलें. निळकंठराव मेल्यावर (स. १६५४) त्याच्या मुलांत तंटे लागले हें पाहून यानें पुरंदर किल्ला ताब्यांत घेतला आणि त्याची व्यवस्था लावली. आठ वर्षांपूर्वी द्यावा लागलेला कोंढाणा किल्ला व त्या सभोंवारचा खेडेबारे महालचा प्रदेश यानें ताब्यांत घेतला. आणि गडांचीं जुनीं नांवें बदलून नवीं ठेविलीं. कोंढाण्याचें नांव सिंहगड हें याच वेळीं ठेवण्यांत आलें.

तात्पर्य, शिवाजी सोळाव्या वर्षापर्यंत दादाजी कोंडदेवाच्या सल्ल्यानें वागे. पुढील नऊ वर्षें शहाजीच्या प्रतिनिधि म्हणून यानें काम केलें, पण सव्विसाव्या वर्षापासून मात्र स्वतःच्या जबाबदारीवर हालचाली सुरू करून विजापूरकरांचें आधिपत्य त्यानें उघड झुगारलेलें दिसतें.

या सुमारास विजापूर दरबारांत पक्षभेद माजून रुस्तुमजमा, सीद्दीजोहर वगैरे सरदारांनीं स्वतंत्र होण्याचा प्रयत्न चालविला होता त्यांतलाच याचा प्रकार भासला. विजापूरचें राज्य बुडविण्यास निघालेल्या औरंगजेबानें मात्र या प्रकारास उत्तेजन दिलें. 'विजापूरकरापासून मीं घेतलेले किल्ले व मुलूख मजकडे कायम ठेवण्यांत येत असतील तर मी मोंगलांची मनसबदारी पत्करण्यास तयार आहें' असें पत्र शिवाजीनें औरंगजेबाकडे धाडलें होतें. पण कांहीं अटींबद्दल मतभेद झाला आणि मोंगली सैन्य विजापूरकरांचें कल्याणी व बेदर घेण्यांत गुंतलें असतां यानें जुन्नर लुटून पुष्कळ संपत्ति मिळविली आणि अहमदनगरपर्यंत मोंगली मुलखांत धुमाकूळ सुरू केला. तेथें नौसीरखानाशीं गांठ पडल्यानें याला परत यावें लागलें. यानंतर जंजिऱ्याच्या सिद्द्यावर मराठ्यांनीं स्वारी केली. अशा प्रकारें मोंगलांशींहि यानें विरोधास सुरुवात केली. औरंगजेबास दिल्लीच्या हुकमावरून विजापूरकराशीं तह करावा लागला. त्यांत मोगलांना मिळणारा कांहीं मुलुख यानें आधींच काबीज केला होता. त्यामुळें शिवाजी व औरंगजेब यांचें युद्ध होण्याचा प्रसंग आला, पण शहाजहानच्या आजारीपणामुळें घाईनें औरंगजेबास दिल्लीकडे परतावें लागलें. त्या वेळीं यानें माफीचें पत्र पाठवून मोगलांचा विरोध तात्पुरता थोपवून धरला.

पुढें यानें अफजलखानाच्या ताब्यांतील कर्नाटकांतील मुलखावर चाल केली (स. १६५८ आक्टो.) याच्या सैन्याची संख्याहि तीन हजारांवरून दहा हजारांवर आली (स. १६५९). भोंवतालच्या मुलखावर दरारा वाढला. शहाजीची सुटका झाल्यावर यानें पहिलीं पांच वर्षें पड घेऊन पुढील चार वर्षें उघड चढावाचें धोरण स्वीकारलें. याच्या कसोटीची आतां वेळ आली.

गोपाळभट महाबळेश्वरकरास व समर्थांच्या चाफळच्या मठास या वेळीं यानें दिलेल्या देणग्या, या वेळची याची मनःस्थिति दर्शवितात. मक्केकडे जाणाऱ्या यात्रेकरूंची कोंकणांतील बंदरांत लूट व कल्याणभिवंडीकडील मशीद उध्वस्त केल्याची बातमी यानें 'हा मुसलमानावर आक्रमण करीत आहे' अशी समजूत झाली. मुसलमानांच्या लुटीचें कारण देऊन याचा 'निर्मूल फडशा' करण्याकरितां अफजलखानाची यावर रवानगी केली. अफजलखानानेंहि पंढरपूरादि क्षेत्रांस उपद्रव देऊन या स्वारीला धर्मयुद्धाचें स्वरूप आणलें. शेवटीं भेटींत अफजलखानानें शिवाजीची मुंढी खाकेंत दाबून हत्यार चालविण्याचा प्रयत्न केला. तेव्हां डोकें हिसडून घेऊन यानें त्याला देहान्त प्रायश्चित्त दिलें (स. १६५९ नवं. १०).

शिवाजीनें स्वतंत्र राज्याचा उपक्रम केला तो मोडून काढणें हें अफजलाच्या स्वारीचें उद्दिष्ट होतें. पण सामर्थ्य वाढविण्याकरितां राजकीय हेतूला धार्मिक भावनेचा आधार देण्यांत आला. पण त्यामुळें शत्रुपक्षाचें बल वाढून नेमका पराजय पदरीं आला. यापुढें मात्र विजापूरकरांच्या सेनापतीनें धार्मिक भावनेचा उच्चार केला नाहीं.

यानंतर याच्या हालचाली फार जोरानें सुरू झाल्या. दिल्लीकडे वकिलांमार्फत सलोख्याचे संबंध ठेवून आदिलशाही किल्ले व मुलूख घेण्याचा यानें सपाटा चालविला. पन्हाळा घेऊन गदग–लक्ष्मेश्वरापर्यंत खंडणी घेतली. रुस्तुमजमा व फाजलखान यांना शिवाजीशीं विरोध न करितां पळून जावें लागलें. शिवाजीनें पन्हाळ्यास ठाणें दिलें आणि नेताजीच्या द्वारा हुकेरी, धारवाड, अथणी, तिकोटें वगैरे भागांत धुमाकूळ घातला. तेव्हां विजापूरकरांनीं आपली कुवत ओळखून मोगलांची मदत मागितली आणि सीद्दीजोहरास सलाबतखान पदवी देऊन यावर रवाना केलें. त्यानें शिवाजीला पन्हाळ्यांत कोंडलें, रसद बंद केली. नेताजी व सीद्दी हिलाल यांचे वेढा उठविण्याचे सर्व प्रयत्न संपले. अचानक शाहिस्ते-

खानाचीहि स्वारी याच वेळीं झाली. तेव्हां शिवाजीनें धाडस करून सहाशें शिपायांनिशीं फळी फोडून जाण्याचें काम केलें आणि बाजी प्रभूनें जिवाची तमा न धरतां शत्रु-सैन्यास थोपवून धरलें, यामुळें हा पन्हाळ्याहून विशाळगडावर सुखरूप जाऊं शकला ( स. १६६०, जुलै १३ ).

मागें त्रिंबक भास्कराच्या नेतृत्वाखालीं पुष्कळसें सैन्य पन्हाळ्यांत गुंतलें होतें. त्यांनाहि परत येण्याचा शिवाजीनें हुकूम धाडला. वास्तविक सीद्दीजोहर फितुर नव्हता. तथापि अली आदिलशहा संशयखोर असल्यामुळें जोहरला बंडाचें निशाण उभारावें लागलें.

इकडे शाहिस्तेखान ७७ हजार स्वारांनिशीं व अनेक प्रकारच्या युद्धसामग्रीनिशीं आला. वाटेंत अनेक गांवें उध्वस्त केलीं आणि त्यानें चाकणच्या किल्ल्यास वेढा देऊन तो घेतला.

या वेळीं पन्हाळा व चाकण हे किल्ले गेल्यानें त्याचा वचपा काढण्यासाठीं कोंकणांत कांहीं किल्ले घेणें व पैसा मिळविणें आणि सैन्य संभाळून वाढविण्याचें धोरण यानें स्वीकारलेलें दिसतें.

शाहिस्तेखानानें पुण्यास तळ देऊन राजगडाकडे कांहीं सैन्य रवाना केलें. त्यांना अडविण्याकरितां शिवाजी व नेताजी हे सैन्यासह लोहगडच्या बाजूस गेले. तेव्हां कारतबखान व रायबागीण वगैरे मोगली सेनापति सैन्यासह उंबरखिंडीनजीक एका अरुंद मुळक्यावरून उतरण्याच्या खटपटींत असलेले दिसले. त्यांना वेढा देऊन हल्ला केला आणि त्यांना शरण येणें भाग पाडलें. 'जवळची सर्व युद्धसामग्री व द्रव्य मराठ्यांच्या स्वाधीन करून मोगली सेनापतींनीं निघून जावें' या करारावर तह झाला.

पण शाहिस्तेखान या अपमानाचा सूड उगविण्याकरितां दुसरें सैन्य पाठवील असा संभव होता. त्याला तोंड देण्याकरितां नेताजीची नेमणूक करून शिवाजी कोंकणाकडे जावयास निघाला.

प्रथम यानें दाभोळ व चिपळूण हीं शहरें ताब्यांत घेतलीं. नंतर आदिलशाही अधिकारी पळून गेल्यानें संगमेश्वर ताब्यांत घेतलें आणि तेथें अर्धें सैन्य ठेवून शिवाजी राजापुरास गेला. आणि पन्हाळ्याच्या वेढ्याच्या वेळीं इंग्रजांनीं शत्रूला मदत केली म्हणून त्यांच्या वखारी लुटल्या आणि खणून जाळून त्यांचा मागमूसहि राहणार नाहीं इतका नाश केला. विजापूरकरांचा कोणीच सरदार शिवाजीविरुद्ध लढण्यास तयार न झाल्यानें शृंगारपूरच्या सूर्यराव सुर्व्याकडे तें काम सोंपवावें लागलें. त्यानें अचानकपणें याच्या सैन्यावर हल्ला केला तेव्हां पिलाजी निळकंठ घाबरला. पण तानाजीनें प्रसंगावधानानें पुढाकार घेऊन शत्रुसैन्यास पळावयास लाविलें. शिवाजीला यामुळें फार राग आला. प्रथम त्याला भेटीस बोलावून वळविण्याचा प्रयत्न केला पण शेवटीं तो येईना तेव्हां स्वारी करून प्रभानवल्ली प्रांत ताब्यांत घेतला. पांच वर्षांपूर्वी जावळी व रायगड ताब्यांत आल्यानें ज्या शिवशाहीची प्राणप्रतिष्ठा झाली तिचा परिपोष लष्करीदृष्ट्या महत्त्वाचें असें हें शृंगारपूरचें राज्य हस्तगत झाल्यामुळें, करितां आला ( स. १६६१ एप्रिल ).

यानंतर दोन महिने याचा मुक्काम कोंकणांत पडला. या मुदतींत शिर्क्यांमार्फत यानें लखम सावंताशीं तह केला. याप्रमाणें विजापूरकरांचा पुष्कळ मुलूख शिवाजीनें घेतला आणि त्यांचे सरदारहि फोडले. पण याच्याविरुद्ध त्यांना प्रयत्नहि करतां आला नाहीं. या वेळीं अली आदिलशहा कर्नूळकडे सीदी जोहाराचें बंड मोडण्यांत गुंतला होता.

या पावसाळ्यांत यानें आपल्या अधिकाऱ्यांना पालख्या देणें, मुलकी व लष्करी भागांतील व्यवस्था निश्चित करणें वगैरे कामें केलीं. मोरोपंतास पेशवाई ( स. १६६२ एप्रिल ३ ), निळोपंतास मुज्मु आणि अण्णाजी दत्तोस सुरनिशी दिली ( १६ ऑगष्ट ).

याशीं लढण्याची कल्पना सोडून विजापूरकरांनीं या वेळीं अंतस्थ तह केला असें दिसतें.

आतां मात्र यास फक्त मोगलांशीं लढण्यास अवसर सांपडला. यानें नामदारखान नांवाच्या मोगली सरदारास मिरे डोंगरावर गांठून त्याचा पराभव केला.

इकडे शिवाजीनें, पुण्यास तळ देऊन राहिलेल्या, शाहिस्तेखानावर, थोड्या लोकांनिशीं मध्यरात्रीं हल्ला करून त्याचीं बोटें कापलीं आणि त्याच्या मुलास ठार मारिलें ( स. १६६५ एप्रिल ५ ). या अकल्पित हल्ल्यानें मोगली सैन्य आश्चर्यचकित होऊन गेलें असतां शिवाजीनें एकदम कोंकणांत उतरून कुडाळ प्रांत काबीज केला.

इकडे शाहिस्तेखानास परत बोलावून औरंगजेबानें दक्षिणच्या सुभ्यावर जसवंतसिंगाची नेमणूक केली. आणि त्यानें कोंढाण्यास वेढा घातला. तरी त्यास न जुमानतां शिवाजीनें सैन्यासह सुरतेवर जाऊन तें समृद्ध शहर चार दिवस लुटून कोट्यवधि रुपयांची संपत्ति मिळवली ( स. १६६४ जाने. ६–१० ). पुढें मराठ्यांनीं जसवंतसिंगाचा कोंढाण्याचा वेढा मारून काढला. यानंतर जयसिंग व दिलेरखान यांना मोठ्या सैन्यानिशीं याच्या पारिपत्याकरितां धाडण्यांत आलें. ते इकडे पोंचण्याच्या पूर्वी यानें अहमदनगरकडील मोगली मुलखांत लुटालूट केली.

पण याच वेळीं विजापूरकरांनीं सलोख्याचा तह मोडला तेव्हां यानें कुडाळ प्रांतावर स्वारी केली. मुधोळच्या बाजी घोरपड्यानें त्यांना मदत करण्याची तयारी केली. तेव्हां यानें विजापूरकरांच्या खवासखानास पळून लावलें आणि बाजी घोरपड्यास युद्धांत ठार मारिलें. वाडीचा सावंत या वेळीं विरुद्ध झाला. त्यालाहि यानें शरण आणलें. पुढें वेंगुर्ला व हुबळी हीं शहरें लुटलीं.

यानंतर मालवण बंदरांत जहाजांत बसून हा बनसूरच्या स्वारीत गेला ( स. १६६५ फेब्रु. ८ ). तेव्हां बरोबर २५ लहान व ३ मोठीं गलबतें घेतलीं असून गोवेकरांकडून विरोध न होतां हा बसनूरास गेला आणि लूट करून गोकर्णावरून परत कारवारास आला ( २२ फेब्रु. ). याचें आरमारी निशाण पांढरें होतें ( प. सा. १९०२ ). तेव्हां तेथील सुभेदार शेरखानानें गांवांतील व्यापाऱ्यांकडून यांस नजराणा देवविला. त्यांत इंग्रजी व्यापाऱ्यांनीं ११२ पौंड दिले.

या वेळीं जयसिंग व दिलेरखान दक्षिणेस पुण्यास येऊन पोंचले. त्यांनीं आपल्या सैन्याचा मुख्य तळ पुरंदरच्या बाजूस दिला. मोरेमंडळी हाताशीं धरून शिरवळकडे कांहीं सैन्य पाठविलें. विजापूरकर व गोवळकोंडेकर यांना शिवाजीला न मिळण्याविषयीं जरबेचीं पत्रें धाडलीं. मोगल व विजापूरकर यांनीं जुटीनें हल्ला केल्यास आपला निभाव लागणार नाहीं असें पाहून यानें पस्तीसांपैकीं २२ किल्ले देऊन जयसिंगाशीं तह केला ( स. १६६५ जून १२ ).

शिवाजीची व्यवस्था लागतांच जयसिंगानें आपल्यास दक्षिणेस बोलावणाऱ्या विजापूरकरावर शस्त्र उपसलें. नेताजी प्रथम विजापूरकरास व नंतर जयसिंगास मिळाला. विजापूरकर व गोवळकोंडेकर यांचा तह झाला. तेव्हां शिवाजीनें उत्तरेकडे औरंगजेबाच्या भेटीस जावें अशी योजना जयसिंगानें घडवून आणली. हा संभाजीसह राजगडावरून निघाला ( स. १६६५ मार्च ५ ) आणि आग्र्यास पोंचला ( १२ मे ). दरबारांत आपला योग्य मान ठेवला गेला नाहीं म्हणून यानें तक्रार केली. त्याचें पर्यवसान याला नजर कैदेंत ठेवण्यांत झालें. पण प्रसंग जाणून यानें मिठाईच्या पेटाऱ्यांत बसून आपली व संभाजीची सुटका करून घेतली ( आगष्ट २० ) आणि हुलकावणी देऊन जगन्नाथपुरीवरून प्रथम हा गोसाव्याच्या वेषानें राजगडास परत आला ( नवं. २० ) आणि नंतर संभाजीहि सुरक्षित येऊन पोंचला. परत आल्यावर यानें सलोख्यानें वागण्याची आपली इच्छा असल्याचें औरंगजेबास कळविलें. त्याप्रमाणें तह होऊन प्रतापराव मोगलांच्या दिमतीस सैन्यासह औरंगाबादेस राहिला. याच वेळीं विजापूरकरांशींहि याचा सलोखा झाला. पण तीन वर्षांनीं औरंगजेबानें मराठी सैन्यास अटकाव करण्याचा बेत केला आहे असें समजल्यानें व त्यानें काशीचें देवालय पाडल्यानें तह मोडला आणि प्रतापरावास परत बोलावण्यांत आलें आणि मोगलांशीं युद्धास सुरुवात झाली.

मधल्या चार वर्षांच्या स्वस्थतेच्या काळांत यानें निकरानें तोंड देण्याची तयारी केलेली दिसते. मारूं किंवा मरूं अशा तडफेनें युद्धास तोंड लागलें. धर्मरक्षण आणि स्वतंत्र राज्याची स्थापना या भावनेनें शिवाजीचें यापुढील चरित्र रंगलेलें दिसतें. तानाजी मालुसऱ्यानें सिंहगड घेतांना दाखविलेला पराक्रम आणि उदात्त भावना हीं तत्कालीन मराठ्यांच्या वृत्तीचीं द्योतक होतीं (स. १६७० फेब्रु. ४ ). पुरंदर, लोहगड, माहुली, कर्नाळा, रोहिडा वगैरे अनेक किल्ले यानें सहा महिन्यांच्या आंत घेतले. चढाईवांचून खरा बचाव होतच नाहीं असें या वेळीं मराठ्यांना वाटून ते चढाईच्या कामासाठीं अहमहमिकेनें पुढें येऊं लागले. आणि शिवाजीनेंहि त्यांच्याकडून विश्वासानें कामें करून घेतलीं.

शत्रूच्या मुलखांत चालून जाऊन मराठ्यांनीं सुरत दुसऱ्यांदा लुटली आणि परत येतांना दिंडोरीपाशीं दाऊदखानानें आडविलें. तेव्हां त्याशी समोरासमोर सामना देऊन पराजय केला.

महाबतखान, बहादुरखान व दिलेरखान यांनीं मोठ्या सैन्यानिशीं खानदेश व बागलण येथें किल्ल्यांना वेढे देऊन मराठ्यांना आडविण्याचा प्रयत्न केला. पण त्यानें त्यांच्यावर हल्ले चढवून त्यांना वेढे उठविणें भाग पाडलें ( मोरोपंत पाहा ).

मराठ्यांची उमेद सारखी वाढत चालली. शिवाजी लुटारू नसून जबरदस्त राजा आहे ही गोष्ट भोंवतालच्या सत्ताधाऱ्यांच्या ध्यानांत आली. तेव्हां इंग्रज व्यापारी व्यापाराबाबत सवलती मागण्याकरितां रायगडावर खेपा घालूं लागले ( स. १६७३ ). गोवळकोंड्याचा अबदुल्ला कुत्बशाह मेला तेव्हां त्यापुढील अबुल हसननें दरसाल एक लक्ष होन देण्याचें कबूल करून मोगलांना अडविण्याच्या कामीं मराठ्यांनीं पुढाकार घ्यावा या योजनेस मान्यता दिली ( स. १६७२ एप्रिल २१ ).

विजापूरचा अली आदिलशाह मरतांच सिकंदर गादीवर आला. तेव्हां मराठ्यांच्या विरुद्ध असणारा जो खवासखान त्याच्या हातांत सत्ता आली. तेव्हां अण्णाजी दत्तोमार्फत यानें पन्हाळा घेऊन ( पर्णालपर्वतग्रहणाख्यानम् ) आक्र-

मणास सुरुवात केली ( स. १६७३ मार्च ६ ). प्रतापरावानें उम्राणीनजीक बहलोलखानाचा पराभव केला ( १५ एप्रिल ). इतर सरदारांनीं हुबळी, बंकापूर वगैरे भागांत लुटालूट केली व सातारा, पांडवगड वगैरे किल्ले घेतले. महिमाजी शिंद्यानें सर्जाखानाचा पराभव केला. स्वतः शिवाजीनें कारवार प्रांतांत आपला अंमल बसविला. अशा प्रकारें स्वतः व स्वतःच्या हाताखालीं तयार झालेले मराठे सरदार एकाच वेळीं मोगल व विजापूरकर यांना तोंड देण्यास समर्थ असल्याचें दाखवून आपणास रायगडावर राज्याभिषेक करून घेण्याची यानें तयारी केली.

ही कल्पना बाळाजी आवजी व गागाभट्ट यांनीं यशस्वी केली. त्याप्रमाणें मुंज, सुवर्णतुला, वगैरे धार्मिक व लौकिक विधि होऊन शिवाजी महाराज छत्रपति झाले (स.१६७४जून६). हा समारंभ शके १५९६ ज्येष्ठ शु. १३ उजाडतां शनवारीं तीन घटका रात्र असतां झाला. पण तेराव्या दिवशीं राजमाता जिजाबाई निवर्तल्यानें तांत्रिक पद्धतीनें पुनः राज्याभिषेक करण्यांत आला ( आश्विन शुद्ध पंचमी ); ( निश्चलपुरी पाहा ).

यानंतरचें वर्ष खानदेशावर स्वारी, हबशाशीं युद्ध आणि फोंडा व कारवार प्रांतांत अंमल बसविण्यांत गेलें. जानेवारींत हा आजारी पडला व दुखण्यांतून उठल्यावर दसऱ्याच्या मुहूर्तावर कर्नाटकच्या स्वारीवर निघाला ( स. १६७६ ).

कुत्बशाहाची भागानगरास भेट घेऊन छत्रपति आणि कुत्बशहा हे बरोबरीचे आहेत हें सर्वांच्या नजरेंत भरेल अशा रीतीनें दाखवून दिलें ( स. १६७७ मार्च ४ ). आणि तेथूनच विजापूर दरबार दाक्षिणात्यांच्या जुटीच्या कल्पनेस मान्यता देत नसेल तर आम्हीं विजापूरचें राज्य बुडवून टाकूं अशी जाहीर घोषणा मालोजी घोरपडे यांना पत्र पाठविण्याच्या प्रसंगानें केली. नंतर हा जिंजीकडे गेला व तो किल्ला घेतला. आणि कर्नाटकांत आपल्या राज्याचा जम बसविला. आपला बंधु एकोजी याची समजूत घालण्याचा यानें प्रयत्न केला पण तो याच्या गोटांतून पळून गेला ( स. १७७७ जुलै ). तेव्हां संताजीराजे, रघुनाथपंत व हंबीरराव यांच्या हाताखालीं कांहीं सैन्य ठेवून हा तोरगळ व गदगवरून परत आला ( स. १६७८ जुलै ). या अवधींत मोरोपंत व अण्णाजी दत्तो यांनीं मोगलांचे हल्ले परतविण्याचें काम चांगलें केलें.

नंतर सावत्र आईच्या कारस्थानास कंटाळून असो किंवा बापाच्या गैरमर्जीमुळें असो, संभाजी परळीहून बायकोसह निघून मोगली सेनापति दिलेरखानास जाऊन मिळाला ( स. १६७८ डिसेंबर ). ही गोष्ट याच्या मनावर आघात करणारी झाली.

पुढें दिलेरखानानें विजापुरावर चाल केली तेव्हां मसुदखानानें याकडे मदत मागितली. यानें इंग्रजाशीं खांदेरी-उंदेरीकडे युद्ध चाललें होतें तरी दाक्षिणात्यांची जूट ही कल्पना धरून सैन्याचे दोन भाग केले व एकामार्फत जालनापुराकडील भाग लुटून जाळून फस्त केला. रणमस्तखान व जाबतेखान वगैरे मोगली सरदार १० हजार सैन्यानिशीं चालून आले पण त्यांना तोंड देत यानें पट्टागड गांठला. मोरोपंतानेंहि अहिवंत किल्ला घेऊन तिकडे धामधूम माजविली. स्वतःचा मुलूख सोडून विजापूरकडे गेला म्हणून औरंगजेबानें त्याला दोष दिला आणि तिकडेहि पराजय होऊन परत यावें लागलें ( स. १६७९ डिसें. ). संभाजीहि त्याला सोडून पन्हाळ्यास येऊन बापास भेटला (स. १६८० जाने. १३). राज्यावर कोणी बसावें, वाटणी करावी किंवा काय याबद्दल या वेळीं चर्चा झाली असावी. राजारामाची मुंज व लग्न करण्यासाठीं तो पन्हाळ्याहून रायगडास आला आणि तेथेंच दूषित ताप येऊन चैत्री पौर्णिमेस दोन प्रहरीं याचा अंत झाला ( स. १६८० एप्रिल ३ ).

शिवाजीमहाराजांचीं बायकामुलें—

( १ ) सईबाई—१ पुत्र व ३ कन्या ( संभाजी, सकबारबाई, राणूबाई, अंबिकाबाई ). ( २ ) सोयराबाई—१ पुत्र व १ कन्या ( राजाराम, बाळीबाई ऊर्फ दिपाबाई ). ( ३ ) सगुणाबाई—कन्या (राजकुवरबाई ऊर्फ नानीबाई). (४) पुतळाबाई. ( ५ ) लक्ष्मीबाई. ( ६ ) सकवारबाई—१ कन्या ( कमलाबाई ). ( ७ ) काशीबाई. (८) गुणवंताबाई. ह्या क्रमांकाप्रमाणें महाराजांचे विवाह झाले ( शिवाजी निबंधावली १, पा. २१०-२२५ ).

यांशिवाय रामदासस्वामींच्या एका हस्तलिखित चरित्रावरून यास मनोहर व मनसंतोष नांवांच्या दोन विवाहित स्त्रिया होत्या असें दिसतें.

या असामान्य पुरुषाच्या कर्तबगारीनें मराठ्यांना स्वराज्य लाभलें. त्यांच्या धार्मिक व सांस्कृतिक भावनेस राजाश्रय मिळाला, शूर पुरुषांना राजकारणास धार्मिकतेची बैठक देऊन त्यांत पडण्याविषयीं यानें स्फूर्ति दिली, आणि पुढील मराठेशाहीचा हा जनक झाला.

महाराष्ट्रीयांच्या अंगांतील अनेक गुणांच्या वाढीस अनुकूल असें वातावरण, याच्यामुळें निर्माण झालें. राजव्यवहारकोश, करणकौस्तुभ ( कृष्ण ज्योतिषीकृत ) वगैरे

ग्रंथांची निर्मिति व राज्याची पद्धतशीर घडणी या गोष्टी याच्या चौरस बुद्धीची साक्ष देतात ( द. वि. आपटे ).

२. ( राज्यकाल स. १७००-१७०७ ) हा छत्रपति राजारामास ताराबाईचे ठिकाणीं झालेला मुलगा. राजाराम मेल्यावर याला गादीवर बसविण्यांत आलें. त्या वेळीं हा साडेतीन वर्षांचा बालक होता. याची मुंज करून यास पन्हाळ्यास राज्याभिषेक करण्यांत आला. नंतर बुंदकर घाडग्याच्या भवानीबाई नांवाच्या मुलीशीं याचें लग्न झालें. शाहू आल्यानंतर संभाजीला पन्हाळ्यावर गादीवर बसवून याला व ताराबाईला तुरुंगांत टाकण्यांत आलें. पुढें हा देवी येऊन मेला ( स. १७१२ ). तेव्हां भवानीबाई गरोदर होती. तिचा पुत्र रामराजा. त्याच्या जिवावर सर्व उठले तेव्हां ताराबाईनें तो मेला असें उठवून त्याला पानगांवीं पाठवून दिलें.

३. ( स. १८३३-५५ ) तंजावरचे राजे. सरफोजीचे पुत्र. हे गादीवर आल्यानंतर ( स. १८३२ मार्च १७ ) नेमणूक मिळत होती. याची एक मुलगी मोहित्यांकडे दिली होती. तिची मुलगी सयाजीराव गायकवाडांना दिली. तिचा मुलगा फत्तेसिंग. फत्तेसिंगाची संतति हाच तंजावरकरांचा वंश होय.

**शिवाजी एसजी दाभाडे**—हा खंडेराव दाभाड्याचा धाकटा भाऊ. याला छत्रपतींनीं वऱ्हाडांत मोहिमेस पाठविलें होतें. तेथें युद्धप्रसंग होऊन देवलोकास गेले. याला संतान नाहीं ( रा. खं. ३.१६७ ).

**शिवाजी केशव टाळकुटे**—(स. १७६० सुमार) रघूजी भोसल्याचा ब्राह्मण सरदार.

**शिवाजीपंत मुत्सद्दी**—( स.१६००सुमार)निजामशहाच्या राज्यकारभारांत सुधारणा करण्याच्या बाबतींत यानें मलीकंबरास मदत केली. मलीकंबरानें याच्या मदतीनें जमीन महसुलाचे बाबतींत उत्तरेंतील तोडरमल्लाची पद्धत दक्षिणेंत सुरू केली. वरील कामांत मदत करण्याकरितां साहाजी आनंदराव व सखाराम मोकाशी वगैरे मदतगार होते.

**शिवाजी बल्लाळ जोशी**—( स. १७३९ ) हा रमाबाईचा पिता व माधवराव पेशव्याचा सासरा.

**शिवाजी भोसले** ( उमरावतीकर )—(स. १७७५) हा राणोजी भोसल्याचा नातू व सखोजीचा पुत्र होय. बारभाईनीं यास सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें देण्याचें ठरवून मुधोजी भोसल्याविरुद्ध उठविलें होतें. पण मुधोजीनें याचा मोड केला.

**शिवाजी रणछोड संझगिरी**—( स. १७५२ ) मुंबईस इंग्रजांकडे मराठ्यांचा वकिल. हा रणचोड कृष्णाचा पुतण्या असावा.

**शिवाजी विठ्ठल विंचूरकर**—( स. १७६७-९४ ) हा विठ्ठल शिवदेवाचा ज्येष्ठ पुत्र. यास स. १७६७ मध्यें सरदारीचीं वस्त्रें मिळालीं. पुढें स.१७६९ मध्यें यानें इतर सरदारांबरोबर उत्तर हिंदुस्थानांत जाऊन रोहिल्यांचा पाडाव केला. नाना फडणविसानें यास महादजी शिंद्याविरुद्ध फुस दिल्यामुळें हा कांहीं काळपर्यंत महादजीविरुद्ध वागे, नंतर महादजीचे रतपुतांशीं झालेल्या लढाईंत (स.१७८३) महादजीचें सैन्य माघार घेऊन परत फिरलें. व त्यांचा पाठलाग रजपूत करीत होते. त्या वेळीं महादजीनें यास पुढीलप्रमाणें विनंति केली. 'या संकटसमयीं मनांतील सर्व गोष्टी एकीकडे ठेवून तुम्हीं मला मदत केली असतां फौजेचा नक्षा राहिल. नाहीं तर आपले मालिकाचे कीर्तिस कलंक लागणार आहे.' तेव्हां यानें आपल्या फौजेची उठावणी केली; आणि जयपुरच्या रजपुत लोकांवर हल्ला करून त्यांचा अगदीं मोड केला; व त्यांची कत्तल उडवून त्यांस पळवून लाविलें. त्या रात्रीं महादजीनें याची गांठ घेऊन याचे बहुत उपकार मानिले, आणि त्या वेळेस जें समजुतीचें भाषण झालें त्यामुळें उभयतांचें पुनः सख्य झालें. या वेळेपासून महादजी यास काका असें म्हणूं लागला.

हा स. १७९४ मध्यें मरण पावला. यास तीन बायका होत्या व दोन पुत्र होते. परंतु दुर्दैवानें ते दोन्हीहि याच्या हयातींतच मृत्युमुखीं पडले. यानें प्रयाग येथें यमुनेचे पलिकडे रामेश्वराच्या नजीक वेणीमाधवाचें मंदिर बांधलें. त्याचप्रमाणें मथुरा येथें राधामाधवाचें मंदिर व नरसिंहपूर येथें श्रीनरसिंहाचे देवालयांतील गाभारा बांधिला. याचे नंतर याचा कनिष्ठ भाऊ खंडेराव यांस सरदारचीं वस्त्रें मिळालीं ( विंचूरकर घराण्याचा इतिहास, पृ. ९९-११८ ).

**शिवानंद**—( स. १७०९ ) हा 'कुलप्रदीप' या ग्रंथाचा कर्ता होय.

२. ( जन्म स. १७४४ ) हा नागर ब्राह्मण असून सुरतेचा रहिवासी होय. एक गुजराथी कवि. यानें शिवपार्वतीच्या स्तवनपर काव्यें रचलीं आहेत तीं रसाळ व गोड आहेत.

**शिवापा नाईक बिदनूरकर**—(मृत्यु स. १६६३) हा विजयनगरचा राजा श्रीरंगरायाचा मांडलिक असून बिदनूरचा डोंगराळ प्रांत याच्या ताब्यांत होता. श्रीरंग-

राय याच्या आश्रयानें वेलोर लढवीत असतां याचा पराजय झाला. हा मोठा बलिष्ठ होता ( रा. मा. चं. प्र. पृ. ८४-८५ ).

**शिहाबुद्दीन**—( स. १३६३-८६ ) हा काश्मीरच्या शहामीरचा पुत्र. हा शेर अलीनंतर गादीवर आला. यानें सिंध व नगरकोट जिंकले. याच्यानंतर हिंदाल गादीवर आला.

**शिहाबुद्दीन खल्जी**—माळव्याच्या नासिरुद्दीन खल्जीचा मुलगा.

**शिहाबुद्दीन सुलतानखान**—( स. १३३६-३७ ) बिहारचा सुभेदार. सुलतान मुहंमद तुघ्लकाच्या कारकीर्दीत यानें मक्ता अधिक चढवून बिहारची सुभेदारी मिळवली. पण मक्ता पुरा करितां न आल्यानें यानें बंड उभारलें. पण शेवटीं जीवदान मिळालें. शिहाबुद्दीन हें नांव, सुलतानखान ही पदवी आहे.

**शिहाबुद्दीन बुघ्रा**—( बुघ्राखान बल्बन पाहा ).

**शिहाबुद्दीन ऊर्फ मुइझुद्दीम घोरी**—( स. ११७३-१२०६ ) गुझ्झ लोक गझनीस सत्ताधीश असतांना घियासुद्दीन मुहंमदानें स. ११७३ मध्यें स्वारी करून गुझ्झ लोकांना हाकून दिलें व तेथें हा त्याचा धाकटा भाऊ असल्यानें याचीच नेमणूक केली. यानें स. ११७५ मध्यें हिंदुस्थानवर पहिली स्वारी करून मुलतान शहर व उच्छचा किल्ला काबीज केला. तो किल्ला तेथील राणीला तिच्या मुलीशीं लग्न करण्याचें आश्वासन देऊन यानें काबीज केला. परंतु पुढें यानें तिचा वचनभंग केला. नंतर यानें वालुकामय प्रदेशांतून अनहिलवाडच्या भीम वाघेलावर स्वारी केली परंतु तींत याचा पराभव झाला. स. ११७९ मध्यें पेशावर जिंकल्यावर स. ११८६ मध्यें यानें खुस्त्रव मलीकचा विश्वासघात करून लाहोर जिंकलें. स. ११९१ त यानें पृथ्वीराज चौहाणाचें भातिंदा नांवाचें ठाणें घेतलें. तेव्हां याचें व पृथ्वीराजाचें कर्नूलजवळील तरौरी येथें युद्ध झालें व त्यांत याचा पराभव झाला. शेवटीं स. ११९२ मध्यें १२००० घोडदळ बरोबर घेऊन यानें त्याजवर पुन्हां तरौरीजवळ स्वारी केली. तींत पृथ्वीराजाचा पूर्ण पराभव झाला. नंतर यानें अजमीरवर स्वारी करून ते शहर लुटलें ( कुत्बुद्दीन ऐबक, इख्तियारउद्दीन मुहम्मद खल्जी, पृथ्वीराज चौहान व जयचंद गाहडवाल पाहा ).

**शी**—( स. १०० सुमार ) हा दुसऱ्या कदफिसेसचा सेनापति होय. यानें राजाज्ञेवरून ७००० फौजेसह चीनवर स्वारी केली. परंतु डोंगराळ मुलखांतून जातांना सैन्याचे फार हाल झाले व याचा पराभव झाला ( कदफिसेस दुसरा पाहा ).

**शीतलनाथ**—हा जैनांचा दहावा तीर्थंकर होय.

**शीरशामक शिहाबुद्दीन**—( काश्मीरचा शहाबुद्दीन पाहा ).

**शीलभद्र**—( स. ६३५ ) हा पूर्व बंगाल्यांत ढाका जिल्ह्यांत रामपालगांवीं जन्मला. एका ब्राह्मण राजवंशांत याचा जन्म झाला होता. पण यानें राज्यपदाकडे लक्ष न देतां बौद्धांच्या सुप्रसिद्ध नालंदा येथील विद्यालयांतील सर्वश्रेष्ठ स्थान मिळविलें. त्या वेळीं नालंदा येथील विद्यालयांत १५१० अध्यापक आणि १० हजार विद्यार्थी होते.

याचें पहिलें नांव दंतदेव असें होतें. सोळाव्या वर्षीं हा आपलें अध्ययन पुरें करून अधिक शिकण्याकरितां नालंदा येथें गेला. धर्मपाल नांवाच्या महापंडितापाशीं अध्ययन करून हा मोठा ज्ञाता झाला.

या वेळीं दक्षिणेंतील एक महापंडित मगधराजाच्या धर्मपालाशीं वाद करण्याकरितां आला. पण धर्मपालाऐवजीं यानेंच त्याचा पराजय करून अलौकिक कीर्ति संपादन केली ( स. ५५४ ). याच्या उच्च वर्तनामुळें लोक यास शीलभद्र असें म्हणूं लागले. चीन देशांतल्या लोकांनीं याचा शीलभद्र नांवानेंच उल्लेख केला आहे.

धर्मपालाच्या नंतर नालंदा विद्यापीठाचें मुख्य स्थान याच्याकडे आलें. ह्यु-एन-त्संग याच्या दर्शनास आला होता.

**शीलुक प्रतिहार**—( स. ८२५ सुमार ) मंदोसरच्या प्रतिहारवंशांतील चंदुकाचा पुत्र. यानें त्रवणी व वल्ल हीं राज्यें आपल्या राज्यांत सामील केलीं. वल्लदेशाचा राजा भट्टिक ( भाटी ) देवराज यास पृथ्वीवर आपटून यानें त्याचें छत्र मिळविलें ( ज. रॉ. ए. सो. स. १८९४, पृ. ६ ). याचा पुत्र झोट.

**शुकदेवमिश्र**—( स. १७८० सुमार ) झाशीचा वैद्य. हा महादजी शिंदे व नारोशंकर राजेबहादूर यांना औषधें देत असे. यास दररोज २॥ रु. नेमणूक मिळे. महादजीनें याला एक गांवहि दिला होता.

**शुचिवर्मा गुहिलोत**—( स. १००७-२१ ) मेवाडच्या गादीवर हा अंबाप्रसादानंतर आला. हा अंबाप्रसादाचा धाकटा भाऊ होता. रावल समरसिंहाचा सं. १३४२ (स. १२८५) मधील व राणा कुंभकर्णाच्या वि. सं. १४९६ ( स. १४३९ ) मधील लेखांत याचें नांव गाळून शक्तिकुमारानंतर हा दिला आहे. पण आहाडच्या हस्तमातामंदिराच्या पायऱ्यांवरील लेखांत हा शक्तिकुमाराचा

पुत्र असें म्हटलें आहे. त्यावरून हा अंबाप्रसादाचा धाकटा भाऊ होता हें स्पष्ट होतें. धाकटा भाऊ गादीवर आल्यास बापाच्या मागें थोरल्या भावाचें नांव गाळून स्वतःचें नांव लिहिल्याचीं अशीं अनेक उदाहरणें आढळतात.

**शुभराय महाराज**—( स. १८०० सुमार ) साधु व कवि. हे मूळचे मद्रासकडील असल्यानें सुबराव या नांवानें प्रसिद्ध आहेत. यांचा जन्म मद्रासकडील परकोट प्रांतांतील मालूर गांवीं शके १६४७ सालीं झाला. पन्नामा व गिरधरराय हे यांचे आईबाप. हे हुषार असून टिपु सुलतानाकडे मोठ्या हुद्यावर होते. पण पुढें विरक्त होऊन पंढरपुरीं एक तप राहिले. व पुढें सोलापुरीं राहत असत. यांचीं वेदान्तपर मराठी पदें आहेत. रामजोशाला कीर्तनाला मठ देण्याचें नाकारल्यामुळें त्यानें यांच्या मठासमोर कीर्तन करून ' हटातटानें पटा रंगवुनी ' ही लावणी यांना उद्देशून म्हटली अशी आख्यायिका आहे ( म. क. च. भा. २, पा. ९४-१०१ ).

**शुभंकर गुप्त**—( स. १०८० सुमार ) बुद्ध तर्कज्ञ. हा अभ्याकरगुप्ताचा शिष्य. याच्या तर्कशास्त्रावरील ग्रंथावर हरिभद्रसूरींची टीका आहे. ग्रंथाचें नांव आढळत नाहीं.

**शुयेनहा**—हा चिनी प्रवासी सुयेनताई या प्रवाशाबरोबर हिंदुस्थानांत आला होता. हा येथेंच मृत्यू पावला.

**शूरपाल**—( स. १०९७-९८ ) हा बंगाल्यांतील पाल घराण्यापैकीं तिसऱ्या विग्रहपालाचा दुसरा मुलगा. यानें वारेन्द्रवर स्वारी करून तो देश हस्तगत केला.

**शूलपाणि**--( स. १३७५-१४६० ) बंगाल्यांतील संस्कृत धर्मशास्त्रकार. याची 'दीपकलिका' नांवाची याज्ञवल्क्य स्मृतीवरील टीका अगदीं थोडक्यांत आहे. याचा ' स्मृतिविवेक ' हा दुसरा ग्रंथ प्रसिद्ध आहे. हा आपल्या ग्रंथाच्या शेवटीं विवेक असा लावीत असे. असे यानें चवदा विवेक केले. उदाहरणार्थः—तिथिविवेक, दत्तकविवेक वगैरे. त्यांपैकीं ' श्राद्धविवेक ' फार प्रसिद्ध आहे.

हा बंगाली ब्राह्मणांपैकीं राधीयांतील ' साहुदियाल ' पोटजातीचा होता. ही जात बल्लालसेनाच्या वेळीं उदयास आली. रघुनंदनानें याला महामहोपाध्याय म्हटलें आहे. हा बंगालच्या लक्ष्मणसेन राजाचा न्यायाधीश होता. पण वरील काळा वरून ती गोष्ट संशयित आहे.

**शूद्रक**--( स. २०० सुमार ) यांजविषयीं अनेक आख्यायिका प्रसिद्ध आहेत. हा क्षत्रिय असून मृच्छकटिक नाटकाचा कर्ता होय. हा शिवभक्त असून यानें अश्वमेघ यज्ञ केला होता. प्रो. विल्सनच्या मतें आंध्रभृत्य घराण्याचा संस्थापक शिमुक आणि हा हे दोघे एकच होत. या मतास अनेक कारणांमुळें बरींच पुष्टी मिळते. दंडीच्या अवंतीसुंदरीकथासारांत याचें चरित्र दिलें आहे. त्यांत हा कवि असून उज्जयनी येथें राहत होता असें म्हटलें आहे. मृच्छकटिकांत यानें स्वतःच्या आयुष्यांतले प्रसंग वर्णिले आहेत असें म्हणतात. यासंबंधीं म्हैसूरच्या मिथिक सोसायटीचे प्रसिद्ध झालेले लेख ( कै. के. व्ही. लक्ष्मणराव ) पाहण्यासारखे आहेत.

याचा पद्मप्राभृतक भाण पाटण्याचे जी. जी. शर्मा यानें प्रसिद्ध केला आहे. शर्मांनीं प्रसिद्ध केलेल्या 'चतुर्भाणि' यांत आलेल्या चार भाणांपैकीं एक याचा आहे ( सौमिल्ल पाहा ).

**शृंगारगुप्त**--वासवदत्तावृत्ति नामक ग्रंथाचा कर्ता.

**शृंगारम्मा**--( स. १६८५ ) कानडी कवयित्री. ही श्रीवैष्णव सांप्रदायांतील होती. पिता—चिंतामणि देशिकेन्द्र, गुरु-श्रीनिवासाचार्य. ही म्हैसूरच्या चिक्कदेवराजाच्या दरबारांतील होती. हिचें कवित्व त्याला आवडत असे. ग्रंथ—पद्मिनीकल्याण (क. क. च. भा.२,पा.५१६).

**शेख नबी**--( स. १६१९ सुमार ) एक हिंदी कवि. हा जौनपुर जिल्ह्यांतील मउ नामक नांवाचा राहणारा. यानें ' ज्ञानदीप ' नांवाचें काव्य लिहिलें.

**शेख निजाम**--( स. १६९० सुमार ) छत्रपति संभाजीस पकडून देणारा औरंगजेबाचा सरदार. यास औरंगजेबानें ' मुकरबखान ' असा किताब दिला होता. यानेंच संभाजीस संगमेश्वरीं पकडलें. म्हणून औरंगजेबानें यास ' खान जमानबहादूर फत्तेजंग ' हा बहुमानाचा किताब दिला. याला इख्लासखान नांवाचा एक मुलगा होता.

**शेख निजामुद्दीन हसन**--(मृत्यु स. १३३८) एक मुसलमान कवि.

**शेख मिरा**--( स. १७०८-३६ ) हा प्रथम ताराबाईच्या पक्षाचा होता पण पुढें शाहूच्या पक्षाला मिळाला. शाहूनें स. १७३६ त याला सीद्दीचा पाडाव करण्यासाठीं पाठवलें होतें.

**शेख मुहम्मद**--( स. १६९६ ) हा एक मराठी कवि होता. हा धर्मानें मुसलमान होता तरी भागवतधर्मी बनला होता. चांभार गोंद्यापासून आठ कोसांवर असलेल्या रुई वाहिरे या गांवीं हा राहत असे. भक्तविजयांत याचें सुरस आख्यान आहे. यानें ' योगसंग्राम,' ( स. १६९६ ) ' निष्कलंकबोध,' 'ज्ञानसागर,' व 'पवनविजय' असे तीन अभंग ग्रंथ केलें आहेत. याच्या गुरूचें नांव चांद बोधले. हा पंढरीस वारी करण्यासाठीं जात असे. याला कबीराचा अवतार मानतात. याच्या संबंधानें पुढीलप्रमाणें म्हटलें

आहे. 'ज्ञान्याचा एका, नाम्याचा तुका, व कबिराचा शेखा.' हा गृहस्थाश्रमी होता. याच्या पुण्यतिथीचा दिवस फाल्गुन शुद्ध नवमी हा आहे ( महाराष्ट्र कवि च. १, पा. २३६-४८ ).

**शेख सल्ला**—( स. १५०० सुमार ) पुणें येथील प्राचीन सत्पुरुष. हा मूळ हिंदू होता. परंतु पुढें मुसलमान होऊन सर्व गांवांतील लोकांस मुसलमान होण्यापासून यानें वांचविलें.

**शेख सादी**—( स. ११८४-१३१३ ) फार्शी भाषेंतील लोकोत्तर कवि. हा शिराज येथील राहणारा असून फार बुद्धिमान् होता. हा सुफी साधु अबदुल कादिर जिलानीचा शिष्य. यानें 'गुलिस्तान' व 'बुस्तान' असे दोन ग्रंथ लिहिले. याच्या ग्रंथाचीं भाषांतरें इंग्रजी व इतर अनेक भाषांत झालीं आहेत.

**शेन-गुत्तुवन ( इमयवर्मन् ) चेर**—( स.१०० सुमार ) हा दुसऱ्या आदन चेराचा मुलगा. यानें 'राजसूय' यज्ञ केला होता.

**शेर अफकुन**—( मृत्यु स. १६०७ ) नूरजहानचा पहिला नवरा. हा प्रथम मुलतानच्या खानखानान नांवाच्या सरदाराजवळ नोकरीस होता. पुढें याचा विशेष पराक्रम दिसून आल्यामुळें अकबर बादशहानें स. १५९९ त सेलीमचे तैनातीस मेवाडचें स्वारींत पाठविलें. सेलीम ऊर्फ जहांगीरानें अकबर मेल्यावर याची नेमणूक बरद्वान येथें केली. व पुढें हा बंडवाल्यास सामील आहे असें पाहून, यास ठार मारिलें.

**शेरअली**—( मृत्यु स. १३६३ ) काश्मीरचा राजा. हा काश्मीरच्या शहा-मीरचा पुत्र. गादीवर आल्यावर यानें अलाउद्दीन हें नांव धारण केलें. याच्यानंतर याचा धाकटा भाऊ शिहाबुद्दीन राज्य करूं लागला.

**शेरखान**—हा गुजराथच्या सुलतान पहिल्या मुजफरशाहाचा मुलगा. याला पांच भाऊ होते.

**शेरखान लोदी**—( स. १६७७ सुमार ) विजापुरांतील तृणमल्ली प्रांताचा सुभेदार. याचा शिवाजीनें पराभव केला.

**शेरशाहा सूर**—( स. १५४०-४५ ) दिल्लीचा बादशाहा. हा अफगाणांपैकीं हसनखानाचा पुत्र. याचें मूळ नांव फरीदखान. शेर म्हणजे वाघ मारल्यानें शेरखान म्हणत. भावाशीं तंटा झाल्यानें जोनपूरचें राज्य सोडून हा आग्र्यास दौलतखान लोदीकडे नोकरीस राहिला. पुढें हा बिहारांत गेला. याला मोगलांनीं बादशाही बळकाविली हें पसंत नव्हतें. अफगाणांकडे पुनः बादशाही यावी अशी इच्छा होती. यानें बिहार ताब्यांत घेऊन चुनारगडाचा बंदोबस्त केला. हुमायूननें यावर स्वारी केली असतां हा शरण गेला. पण यानें आपलें सामर्थ्य वाढवून बंगालहि घेतला. व अखेरीस हुमायुनचा पराभव करून बादशाहीहि मिळविली ( स. १५४० ). बंगालची नीट व्यवस्था करून ग्वाल्हेर, रतनभोर वगैरे किल्ले घेतले. कालिंजरचा किल्ला घेत असतां दारूचा भडका होऊन हा मेला. हा फार कुशल राजा होता. यानें कालवे, धर्मशाळा, टपाल, नाणीं, प्रांत विभाग, वसूल, वजनें, मापें वगैरे प्रत्येक बाबतींत फार महत्त्वाच्या सुधारणा केल्या. मुसलमानींतील पहिला योग्य राजा अशी याची कीर्ति आहे. याला दोन पुत्र. आदिलखान व जलालखान.

**शेषकृष्ण दीक्षित**—( स. १६०० ) याचा मुलगा शेष वीरेश्वर दीक्षित. वीरेश्वराचा शिष्य सुप्रसिद्ध जगन्नाथ पंडित. यानें रामचंद्राच्या प्रक्रियाकौमुदीवर प्रक्रियाप्रकाश नांवाची टीका लिहिली. भट्टोजी दीक्षितानें प्रौढमनोरमा लिहिली, ती प्रक्रियाप्रकाशाची छाया आहे. म्हणून जगन्नाथ भट्टोजींवर गुरुद्रोही म्हणून तुटून पडतो. सत्यभामापरिणय, सत्यभामाविलास मुरारिविजय व कंसवध हीं नाटकें याचीच दिसतात.

**शेंगुत्तुवन चेर**—( स. १९० सुमार ) हा एक चेर वंशांतील राजा होता. या शब्दाचा अर्थ तांबड्या रंगाचा असा होतो. यानें नेदुमुडी किल्लीराज चोलाला पराभूत करून त्याच्या राज्यावर आपला अम्मल बसविला. हा मोठा पराक्रमी होता. यानें अश्वमेध यज्ञ केला होता. पश्चिम किनाऱ्यावरील वंजी येथें यानें पत्नीनी देवीचें मंदिर बांधलें. त्या देवळाच्या समारंभाकरितां सीलोनचा राजा गजबाहु आला होता. शेंगुत्तुवन याच्या मुलाचें नांव गजद्दष्टि.

**श्यामलदेवी**—ही माळव्याच्या परमारांपैकीं उदयादित्याची मुलगी. ही मेवाडच्या गुहिलवंशी विजयसिंह राजास दिली होती.

**श्यामसिंहदेव**—(स. १४०८ ) नेपाळांतील भाटगांवच्या सूर्यवंशांतील एक राजा. हा शक्तिसिंहानंतर गादीवर आला. याची मुलगी मल्लवंशजास दिली होती. यानंतर ठाकुरी घराणें गादीवर आलें.

**श्रीकक्कसूरि**—(स.१०१५सुमार) यानें 'मंच्छप्रबंध' नांवाचा ग्रंथ रचला. हा श्रीसिद्धसूरीचा उत्तराधिकारी होता.

**श्रीकर**—( स. ८००-१०५० सुमार ) संस्कृत धर्मशास्त्रकार. हा मैथिल होता. श्रीनाथाचा पिता श्रीकर व हा भिन्न होय. मिताक्षरा, चंडेश्वराचा राजनीतिरत्नाकर या ग्रंथांत याचे उतारे आले आहेत.

**श्रीकराचार्य कालगांवकर**—( स. १६९३ ) हे राजाराम छत्रपतीच्या वेळीं रघुनाथराव पंडितरावांनंतर पंडितरावांच्या जागेवर नेमले गेले.

**श्रीकंठ**—( ग्रंथकाल स. १५७५ ) 'रसकौमुदी' या संस्कृत ग्रंथाचा कर्ता. नवानगरच्या जाम सत्तर्सलच्या पदरीं हा होता. वाणीनाथाच्या 'जामविजय' काव्यांत याची विद्वान् म्हणून प्रशंसा आहे.

**२.** ( स. १२५० सुमार ) माधवनिदानचा टीकाकार व विजयरक्षिताचा शिष्य. आतंकदर्पणकार वाचस्पतीनें याचा निर्देश केला आहे.

**३.** ( स. १४०९ सुमार ) एक ब्राह्मण तत्त्वज्ञ. गुणरत्नानें आपल्या 'सद्दर्शनसमुच्चयवृत्ती'मध्यें याचा निर्देश केला आहे. यानें न्यायसूत्रावर 'न्यायालंकार' नांवाची टीका लिहिली आहे ( हि. इं. लॉ., पा. १५१ ).

**श्रीकृष्ण न्यायालंकार**—( स. १६५० सुमार ) हा गोविंद न्यायवागीशाचा पुत्र असून यानें न्यायसिद्धांतमंजरीवर 'भावदीपिका' नांवाची टीका लिहिली.

**श्रीगर्भ**—मंखकवीच्या तीस ग्रंथपरीक्षक पंडितांपैकीं एक.

**श्रीगिरींद्र**—( स. १४४२–४३ ) विजयनगरच्या संगम घराण्यांतील वीरविजयाचा पुत्र. पर्वतराय किंवा प्रभातदेवराय असेंहि हा आपणांस म्हणवून घेत असे. याचा वध झाला.

**श्रीगुप्त**—( स. २७५ सुमार ) हा गुप्तवंशाचा संस्थापक होय. याच्यामुळें वंशाला गुप्त असें नांव मिळालें. याच्या नांवामागें महाराज लावलेलें आढळतें. त्यावरून हा कोणाचा तरी मांडलिक असावा. याचा पुत्र घटोत्कच.

**श्रीचंद्र**—( स. ११३७–११६५ सुमार ) हा जैन तर्कज्ञ हर्षपुरीय गच्छाच्या हेमचंद्रसूरीचा शिष्य होता. यानें स. ११३७ मध्यें हरिभद्रसूरीच्या 'न्यायप्रवेशवृत्ति' या ग्रंथावर 'न्यायप्रवेशटिप्पण' नांवाची एक टीका लिहिली. स. ११६५ त यानें 'आवश्यकसूत्रावर' 'प्रदेश व्याख्याटिप्पणक' नांवाची टीका लिहिली ( हि. इं. लॉ., पा. २१० ).

**२.** हा जातीचा रजपूत होता. हा नीहार गांवीं राहत असे. हा तानसेनाच्या बरोबरीचा गाणारा होता. यांनीं शोधून काढलेल्या ध्रुपद गायकीस नीहारी म्हणूं लागले.

**श्रीदेव**—चाउही या चिनी प्रवाशानें हिंदुस्थानांत असतां धारण केलेलें नांव.

**श्रीदेवगुप्तसूरि**—यानें पार्श्वनाथाचा एक प्रासाद व एक उपोषणशाळा बांधली. यानें शत्रुंजयाची यात्रा केली. हा कवि व शास्त्रनिपुण होता.

हा विक्रम संवत् १०७२मध्यें कक्कसूरीचा उत्तराधिकारी झाला. यानें 'नवपदप्रकरण' नांवाचा ग्रंथ लिहिला.

**श्रीधर**—( स. ८५३ ग्रंथकाल ) यानें पाटी गणिताचा ३०० आर्यांचा एक ग्रंथ लिहिला आहे. त्यांतील आरंभींच्या कांहीं श्लोकांवरून, यापेक्षांहि दुसरा मोठा ग्रंथ लिहिला असला पाहिजे असा समज आहे. 'न्यायकंदली' म्हणून एक न्यायशास्त्रावर ग्रंथ आहे व त्याचा कर्ताही श्रीधरच आहे. न्यायकंदलीच्या कर्त्याची माता अब्बोका व पिता बलदेव होता. महावीर याच्या कालावरून ठरवलेला पाटीगणितकार श्रीधर याचा काल अधिक विश्वसनीय आहे.

**२.** ( स. ११५०–१२५० सुमार ) संस्कृत धर्मशास्त्रकार. याचा 'स्मृत्यर्थसार' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे ( आनंदाश्रम, पुणें ). त्यांत संस्कार, नित्यकर्म, श्राद्ध वगैरे विषय आहेत.

याचा पिता नागभर्तृ विष्णुभट्ट. गोत्र विश्वामित्र. याचा दुसराहि एखादा ग्रंथ असावा. याचा 'श्रीधरीय' म्हणून निर्देश येतो. हेमाद्रीनें याचे पुष्कळ उतारे घेतले आहेत.

**३.** कुंडार्णव या मराठी ओवीबद्ध ग्रंथाचा कर्ता ( १९६ ओव्या ). गोत्र वत्स. व्यंकटेश प्रेसमध्यें हा ग्रंथ छापला आहे.

**४.** ( कविताकाल स. १६८० ) या ब्राह्मण जातीच्या हिंदी कवीनें फुटकळ कविता बऱ्याच केल्या आहेत. शिवाय याचे पुढील ग्रंथ प्रसिद्ध आहेत. १ संगीत. २ जैनमुनिचरित्र. ३ कृष्णलीला. ४ जंगनामा. जंगगनाम्यांत फर्रुखसियर व जहांदरशाहा यांच्या युद्धाचें वर्णन आहे. यांशिवाय बाबु कृष्णदासानें याच्या नायिकाभेद व चित्रकाव्य वगैरेंचा निर्देश केला आहे.

**श्रीधरकवि**—( स. १७५० सुमार ) मराठी कवि. याच्या वडलाचें नांव रामकृष्ण व उपनांव कोशे. याचा 'तत्त्वबोध' ग्रंथ आहे ( ५६ श्लोक ). शिवाय नानासाहेब पेशव्यांना प्रार्थना व किरकोळ कविता आहे ( मं. द्वि. सं. वृ. शके १८५६, ले. ७ ).

**श्रीधरदास**—संस्कृत पंडित. बंगालच्या लक्ष्मणसेनाचा आश्रित.

**श्रीधर लक्ष्मण मुनशी**—( मृत्यु स. १८२५ ) हा प्रसिद्ध भवानीपंताचा पुतण्या. त्यानंतर हा दिवाण झाला. हा रघूजी भोसला विश्वासांतला होता. त्याचे परराष्ट्रीय राजकारण याच्या सल्ल्यानें चाले.

**श्रीधरस्वामी**—(समाधि स. १७३० जाने. २६) हा एक प्रख्यात महाराष्ट्र कवि व ग्रंथकार होता. याचे रामायण, भारत, भागवत इत्यादि ग्रंथ लोकप्रिय आहेत. नाझरें हें याचें मूळ गांव. नाझरें गांवचे हे देशपांडे ऊर्फ देशकुलकर्णी होत. याचा पणजा रंगोपंत घोडके यानें देशपांडेपण संपादिलें. हें याचें पहिलें आडनांव होय. पुढें याला नाझरेकरहि म्हणूं लागले. हा यजुर्वेदी वाजसेनीय माध्यंदिन-शाखेचा ब्राह्मण असून, याचें गोत्र वासिष्ठ व आनंदसांप्रदाय होता. याची पत्नी पार्वतीबाई. यानें संन्यास घेतल्यावर कांतानंद असें नांव घेतलें. यास टाकळी गांव इनाम मिळालें. हा पंढरपूर येथें समाधिस्थ झाला. याची समाधि कुंभारघाटावर आहे. श्रीधराचा बाप ब्रह्माजीपंत ( ब्रह्मानंद ) यानें ' आत्मप्रकाश ' नांवाचा ओवीबद्ध ग्रंथ शके १६०३ मध्यें लिहिला. याच्या एकंदर ग्रंथांपैकीं सहा ग्रंथ फार प्रसिद्ध आहेत. ते येणेंप्रमाणें:-( १ ) हरिविजय; शके १६२४, मार्गशीर्ष शु॥ २, पंढरपुरीं संपूर्ण केला. ( २ ) रामविजय; शके १६२५, श्रावण शु॥ ७, पंढरपुरीं संपूर्ण केला. ( ३ ) वेदान्तसूर्य; शके १६२५, माघ शु॥ ७, सिद्धाश्रमास संपूर्ण केला. ( ४ ) पांडवप्रताप; शके १६३४, माघ शु॥ १०, पंढरपुरास संपूर्ण केला. ( ५ ) जैमिनी अश्वमेध; शके १६३७, पौष शु॥ ७, पाथरी येथें संपूर्ण केला. ( ६ ) शिवलीलामृत; शके १६४० फाल्गुन शु॥ १५, बारामतीस संपूर्ण केला.

ह्याशिवाय यानें पांडुरंगमाहात्म्य, व्यंकटेशमाहात्म्य, अंबिकाउदय, संतमाला, संप्रदायपरंपरा इत्यादि ग्रंथ रचिले. याशिवाय संस्कृत पदें व आरत्याहि यानें रचिल्या आहेत.

राजश्री दत्तोबा गोसावी व मनोहर गोसावी बिन श्रीधर गोसावी, उपनाम नाझरेकर यांना शाहूमहाराजांनीं दिलेली इनाम सनद व श्रीधराची वंशावळ भारत इतिहास-संशोधक मंडळ अहवाल शके १८३३ मध्यें ( १०९ व ११० पानांवर ) आहे. शिवाय अधिक माहितीहि आहे ( मं. वा. इ. १८३७, ले. १७६-७७). याची वर्णनशैली अप्रतिम आहे. याची भाषा फार परिणामकारक व अप्रतिम असून महाराष्ट्रांतील स्त्रीपुरुष, विशेषतः स्त्रिया याचे ग्रंथ फार आवडीनें वाचतात.

**श्रीनाथ**—( स. १५९० ) एक ज्योतिर्षी. ' ग्रहचिंतामणि ' नांवाच्या करणग्रंथाचा कर्ता. याचा पिता राम व वडील बंधु रघुनाथ. हा राम मुहूर्तचिंतामणिकार असावा.

**श्रीनिवास दीक्षित**—जिंजीचा जो सुरप्पा नायक त्याचा हा एक आश्रित कवि होय. याला सुरप्पा नायकानें ' रत्नखेत दीक्षित ' ही पदवी बहाल केली होती.

यानें एकंदर १८ नाटकें लिहिलीं. त्यांपैकीं ' भावनापुरुषोत्तम ' हें सर्वोत्कृष्ट नाटक होय. याशिवाय यानें ' शतकांडविजयम् ' आणि अनेक दुसऱ्या टीका वगैरे ग्रंथ लिहिले आहेत.

**श्रीनिवासराव**—हा जुन्नरचा कारभारी होता. याला शहाजीनें पकडून याचे सर्व प्रांत आपणाकडे घेतले ( मु. रि. भा. १, पृ. २७२ ).

**श्रीपतफंदी**—अनंतफंदीचा मुलगा. यास सवाई फंदी म्हणत.

**श्रीपतराव पटवर्धन**—( स. १७७९ ) मिरजेचा पटवर्धन. हैदरच्या कैदेंत होता.

**श्रीपतराव प्रतिनिधी**—( मृत्यु ता. २५-११-१७४६ ) हा परशरामपंतांचा मुलगा. याचें दुसरें नांव श्रीनिवासराव. हा, चुलता माधवरावास दत्तक गेला. परंतु शाहूनें तें दत्तविधान खोटें ठरवून यास आपल्याजवळ ठेवून प्रतिनिधी केलें (स. १७१४), आणि याजवर अखेरपर्यंत अकृत्रिम लोभ ठेविला. यानें वेळोवेळीं बाळाजीस मदत करून आपला पराक्रम शाहूस दाखविला. शाहूकडे व तसेंच संभाजीकडे याचें चांगलें वळण होतें ( म. द. रु. १·१२९ ). बाजीरावाचें व याचें सख्य नव्हतें. पुढें मात्र नानासाहेबाशीं चांगलें सख्य झालें.

शाहू-संभाजीच्या समेटाअगोदर जें युद्ध झालें त्यांत यानें पुष्कळच पराक्रम दाखविला. संभाजीच्या बायका व इतर सरदार मंडळीस पकडून यानें साताऱ्यास आणिलें.

बाजीरावानें दहा हजार दंड भरून प्रतिनिधीपासून व्यंकटराव घोरपड्यांची सुटका केली !

सीदीच्या पाडावांत हा होता. याला निजामाकडून वऱ्हाडांतील जहागीर मिळाली. याच्या वडिलांच्या सांगण्यावरून हा खटावकराशीं जाऊन लढला व त्याचा पुरा मोड केला. याची स्त्री राधाबाई हिनें सहगमन केलें. याला मूल नव्हतें म्हणून शाहूनें याच्या धाकट्या भावास प्रतिनिधीपद दिलें. हा धार्मिक होता.

**श्रीपति**—( स. १०३९ सुमार ) याचे ' सिद्धांतशेखर ' आणि ' धीकोटिदकरण ' असे दोन ज्योतिषगणित-ग्रंथ आहेत. याचा ' रत्नमाला ' म्हणून मुहूर्तग्रंथ आहे आणि ' जातकपद्धति ' म्हणून जातकग्रंथ आहे. भास्कराचार्यानें याचा उल्लेख केलेला आहे.

मालाटीकेवरून याचें गोत्र काश्यप, आजाचें नांव केशव व पित्याचें नांव नागदेव होतें असें दिसून येतें.

धीकोटिदकरणावरूनहि हा लल्लाचा म्हणजे आर्यपक्षाचा अनुयायी दिसतो.

मूळ संस्कृत आहे व त्यावर याची स्वतःचीच मराठींत टीका असलेलें एक हस्तलिखित नेवासें येथील जोश्याच्या पोथ्यांत उपलब्ध झालें आहे (मं. द्वि. सं. १८३६, पा. ८१).

२. (ग्रंथकाल स. १७२०) हा हिंदी कवि काल्पीचा कान्यकुब्ज ब्राह्मण. काव्यसरोज, कविकल्पद्रुम, रससागर अनुप्रासविनोद, विक्रमविलास वगैरे याचे ग्रंथ होत. हा चांगला साहित्यज्ञ व कवि होता.

३. भास्कराचार्य ज्योतिषी यांचा भाऊ.

**श्रीपतिदास**—मराठी कवि. याची एक गर्भगीता आहे. तसेंच यानें मनाचें चरित्रहि लिहिलेलें दिसतें (मं. वार्षिक १८३६, क्र. अ.)

**श्रीपाद श्रीवल्लभ**—श्रीगुरुचरित्र या ग्रंथांत ५-१० पर्यंतच्या अध्यायांत याचें चरित्र वर्णिलें आहे. याचा जन्म पीठापूर येथें झाला. शाखा-आपस्तंब (कृ. य.), माता-सुमती, पिता-आपल राजा. हे दत्ताचे अवतार होत; व नृसिंहसरस्वती हे याचा अवतार होत, अशी भाविकांची समजूत आहे.

**श्रीपुरुष**—पृथ्वीकोंगाणी गंगाचें नामान्तर.

**श्रीभट्ट**—(कविताकाल स. १५३८) हा निम्बार्क-सांप्रदायी हिंदी कवि केशव काश्मीरीचा शिष्य. मुगलशतक (१०० पदें) व आदिवाणी हे याचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. पहिला ग्रंथ कृष्णभक्त आवडीनें वाचतात.

**श्रीमार पांड्य**—(स. ८३०-६२) हा वरगुण पांड्याचा पुत्र. याला परचक्रकोलाहल म्हणत. यानें सिलोनवर स्वारी करून तो देश जिंकला. याला दोन पुत्र होते. एक वरगुणवर्मन् व दुसरा परांतक वीर नारायण. यानंतर पहिला गादीवर आला.

**श्रीरंगराय आरविदु**—(स.१५७२-८६) विजयनगरच्या राजघराण्यापैकीं तालिकोट युद्धानंतरच्या पहिल्या तिरुमल्ल आरविदूचा दुसरा मुलगा. माता वेंकटाम्बा. याची पत्नी तिरुमल्ला व कृष्णा. याची राजधानी पेनुकोंडा. पेम्मसानी पेद्द तिम्मराज हा याचा मंत्री होता. याच्या राज्यांत सारखीं बंडें होत. याच्यावर स. १५७५ मध्यें अली आदिलशाहानें स्वारी केली तेव्हां यानें इब्राहीम कुत्बशाहाच्या मदतीनें त्यास परत धाडलें. पण पुढल्याच वर्षी याचा पराभव होऊन पेनुकोंडा अली आदिलशाहानें घेतला, व यास कैद केलें. स. १५८० मध्यें गोवळकोंड्याच्या राजानें याचा पराभव केला. हा विष्णुभक्त होता. याला मुलगा नव्हता. मिकरतिम्म, जगदेवराय व चेनापन्न हे याचे जांवई होत. याला मुसलमानांना सत्तेस बिलकुल आळा घालतां आला नाहीं.

२. (स. १६१४-१५) तिरुमल्ल आरविदूचा पुत्र व्यंकटपतीला मूलबाळ नव्हतें. त्यानें आपला भाऊ रामराजाचा पुत्र जवळ बाळगला आणि त्याला चिक्कराय युवराज पदवी दिली, आणि आपल्या मागें त्याला राज्य मिळावें अशी योजना केली. त्याप्रमाणें व्यवस्था झाली. पण ही गोष्ट व्यंकटपतीचा मेहुणा जगराय यास बिलकुल पसंत पडली नाहीं. त्यानें सैन्य उभारून त्रिचनापल्लीस जंगी लढाई दिली आणि याच्यासुद्धां सर्व राजघराण्याची कत्तल केली. पण याचम्मा नायकानें स्वामीभक्तीनें राजघराण्यापैकीं एका पांच वर्षांच्या मुलाला मोठ्या शिताफीनें वांचविलें आणि जगरायाशीं सामना देऊन त्याचा त्रिचनापल्ली येथें पराभव केला, आणि वांचविलेल्या मुलास तिसरा श्रीरंग हें नांव देऊन विजयनगरचें राज्य सुरू केलें.

३. (स. १६१४-७४) हा याचम्मा नायकानें वांचविलेला व गादीवर बसविलेला मुलगा. हा कोणाचा मुलगा हें निश्चित नाहीं. हा या सुमारास सुमारें पांच वर्षांचा होता. याला तिसरा श्रीरंग म्हणत. हा राजा असतांच राम व तिसरा व्यंकट हे राजे म्हणून प्रांत बळकावून कारभार करीत. हा स. १६४२ नंतर मुखत्यारीनें राज्य करूं लागला. याला हाणून पाडण्याचें काम मीरजुम्ला करी. याला विस्कळित झालेलें साम्राज्य जुळवितां आलें नाहीं. पुढें पुढें तर याला स्वतःचें असें सुरक्षित स्थानहि राहिलें नाहीं. आश्रय मिळेल तेथें हा पळपुट्यासारखें आयुष्य काढी. याचा शेवट काय झाला तें समजत नाहीं. ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीला सेंट जॉर्ज किल्ला बांधण्यास यानेंच परवानगी दिली. म्हणजे दहा वर्षांपूर्वी तात्पुरता दिलेला परवाना यानें कायम केला.

कोणत्याच ठिकाणीं यश येईना तेव्हां यानें वैतागाच्या भरांत दिल्लीस शहाजहान बादशाहाकडे मदत मागितली, व साम्राज्य सुसंघटित करून दिल्यास मुसलमानहि होण्यास तयार असल्याचें कळविलें. पण त्याच्या राज्यांत शेवटीं झालेल्या गडबडींत त्याला इकडे लक्ष देतां आलें नाहीं.

पण विजापूर व गोवळकोंडा येथील मुसलमान राजांनीं, घाटाखालचा मुलूख गोवळकोंडेकरानें व वरचा मुलूख विजापूरकरानें घेण्याचा आपसांत तह करून याला अगदीं जर्जर केलें. विजापूरच्या वतीनें शहाजी भोसल्यानें यावर

स्वारी केली. वेलोरजवळ गुडियत्तम येथील खिंडींतून व दुसऱ्या बाजूनें चंगम खिंडींतून विजापूरचीं सैन्यें यावर चालून आलीं. यानें शिकस्तीचा प्रयत्न करूनहि याला पराजित व्हावें लागलें. म्हैसूरच्या पूर्वेकडील भाग गेलाच होता. शहाजीनें जिंजी वगैरे भाग ताब्यांत घेतला आणि यास इक्केरीस म्हैसूरकराच्या आश्रयास जाऊन राहावें लागलें. म्हैसूरकरानें एरोडें येथें विजापूरकराचा पराभव करून याचा बचाव करण्याचा प्रयत्न केला, पण चहूंकडून त्रस्त होऊन यास अज्ञातवास पत्करावा लागला. याच्या राणीनें शिवाजीला विनंति केल्यावरून त्यानें तिला निर्वाहाकरितां नेमणूक करुन दिल्याचा एक रौप्यलेख उपलब्ध आहे. पण त्याच्या खरेपणाबद्दल शहानिशा झालेली नाहीं. येथें विजयनगरचें राज्य नामशेष झालें.

**श्रीवत्स**—मंख ग्रंथाच्या परीक्षक तीस पंडितांपैकीं एक.

**श्रीवत्सलांछन**—( स. १५५० सुमार ) 'काव्यपरीक्षा' या ग्रंथाचा कर्ता. मम्मटाच्या काव्यप्रकाशावर याची टीका आहे.

**श्रीवद**—( स. १४७७ सुमार ) यानें जोनराजानंतर काश्मीरचा इतिहास लिहिण्याचा प्रयत्न केला. यानें स. १४१२-१४७७ पर्यंतचा इतिहास लिहिला. हा ग्रंथ राजतरंगिणीचा तिसरा भाग असून त्याचें नांव 'कथाकौतुक' आहे. 'सुभाषितावलि' ग्रंथहि याचा आहे.

**श्रीवर्धदेव**—( स. ६५० सुमार ) कानडी जैन कवि. ग्रंथ-चूडामणि ( तत्त्वार्थमहाशास्त्रावर कानडी भाषेंतील टीका ). हा ग्रंथ अनुपलब्ध आहे. तुंबुलूला याचा जन्म झाला; आणि यानें वरील ग्रंथ केला असें देवचंद्राच्या 'राजावळीकथा' या कानडी ग्रंथांत लिहिलें आहे. तुंबुलूर आचार्य ( तुंबुलु गांवचा आचार्य ) असा याचा देवचंद्रानें निर्देश केला आहे. श्रवणबेळगोळच्या सदुसष्टाव्या शासनांत ( स. ११२९ ) याचा व याच्या ग्रंथाचा उल्लेख आहे. दंडी नांवाच्या संस्कृत भाषेंतील प्रसिद्ध कवीनेंहि याची प्रशंसा पुढील पद्यानें केली आहेः

'चूडामणिः कवीनां चूडामणिनामसेव्यकाव्यकविः। श्रीवर्धदेव एव हि कृतपुण्यः कीर्तिमाहर्तुम्। य एव उपश्लोकितो दण्डिना। जह्नोः कन्यां जटाग्रेण बभार परमेश्वरः। श्रीवर्धदेव संधत्से जिह्वाग्रेण सरस्वतीम्।' वरील दोन्ही श्लोक वरील शासनांत आहेत (क. क. च. भा. १ पा. ७).

**श्रीवर्धमान**—( ग्रंथकाल स. ११४० ) हा श्रीगोविंदसूरीचा शिष्य. यानें 'गणरत्नमहोदधि' नांवाचा ग्रंथ केला. हा ग्रंथ जुलियस् एजलिंग यानें संपादला आणि संस्कृत टेक्स्ट सोसायटीनें लंडन येथें स. १८८१ मध्यें प्रसिद्ध केला.

**श्रीविद्यानिकेतन**—जैनपंडित. कुमारिलभट्टानें याच्याजवळ जैनमताचा अभ्यास केला.

**श्रीशातकर्णि**—( आंध्र, शातकर्णि शालिवाहन व सातवाहन पाहा ).

**श्रीहर्ष परमार**—( स. ९४२-७२ ) माळव्याच्या परमारांपैकीं दुसऱ्या वैरिसिंहाचा पुत्र. याला दुसरा सीयक किंवा सिंहभटहि म्हणत असत. यानें दक्षिणेंतील राष्ट्रकूट राजा खोट्टिगदेवावर स्वारी केली होती. नर्मदेवर खलिघट्ट येथें त्याच्याशीं लढाई झाली त्यांत राष्ट्रकूटाचा पराजय झाला. या लढाईंत वागडचा स्वामी कंकदेव परमार हत्तीवर चढून लढत असतां मारला गेला ( बांसवाडाराज्यांतील अर्थूणा-पाणाहेडा येथील मंडलेश्वराच्या मंदिरावरील प्रशस्ति वि. सं. ११३६ ). स. ९७२ मध्यें दक्षिणेंतील राष्ट्रकूटांची राजधानी मालखेड शहर यानें लुटलें ( पाइअलच्छीनाममाला श्लो. १२८ ). यानें हूणांनाहि जिंकलें होतें. याच सुमारास धनपाल कवीनें आपली विदुषी बहीण सुंदरी हिच्याकरितां 'पाइअलच्छीनाममाला' नांवाचा प्राकृत कोश केला. याचें एक दानपत्र वि. सं. १००५ माघ वद्य अमावास्येचें मिळालें आहे ( पुरातत्त्व ( गुजराथी ) वि. सं. १९७९-८० पृ. ४४-४६ ).

याला मुंज आणि सिंधुराज ( सिंधुल ) असे दोन पुत्र होते. यांपैकीं मुंज याचा उत्तराधिकारी झाला.

२. ( स. ११७५ सुमार ) 'नैषधीयचरितम्' नांवाचें संस्कृत भाषेंतील काव्य करणारा कवि. नैषधीयचरिताशिवाय याचे पुढील ग्रंथ आहेतः—

गौडोर्वीकुलप्रशस्तिः, विजयप्रशस्तिः ( जयचंद्र गाहडवालप्रशस्तिः ), अर्णववर्णनम् ( अर्णवराजचालुक्यप्रशस्तिः ), छिंदप्रशस्तिः ( गयेचें छिंदघराणें ). या काव्यांशिवाय वेदान्तावरील 'खंडनखंडखाद्यम्' हा याचा ग्रंथ आहे. याला जयचंद्र गाहडवालाचा मुख्यतः आश्रय होता, तरी इतरहि राजांच्या दरबारांत याला मानमान्यता होती. म्हणून इतर राजांच्या प्रशस्त्या यानें केल्या आहेत, असें वरील यादीवरून दिसून येतें. राजशेखरानें प्रबंधकोशांत याचें चरित्र दिलें आहे. पण प्रबंधकोशाला ऐतिहासिक महत्त्व फार कमी आहे.

मम्मट व श्रीहर्ष यांच्यासंबंधीं पुढील आख्यायिका प्रसिद्ध आहे. यानें आपलें नैषधीयचरितम् हें काव्य मम्मटाला दाखविलें असतां मम्मटानें असे उद्गार काढले कीं, 'मला आधींच हें काव्य दाखविलें असतेंस तर मला काव्य-

दोषाचीं उदाहरणें दुसरीकडे पहावीं लागलीं नसती.' यावरून मम्मट व हा समकालीन असावेत. तसेंच याच्या काव्याबद्दल यांत अभिप्रायहि ग्रथित आहे. इंडियन अँटिक्केरीमध्यें भांडारकर, बुल्हर व तेलंग यांनीं याचा कालनिर्णय करण्याचा प्रयत्न केला आहे ( व्हॉ. १, २, ३, ४२, ४३ ). याच्या मातेचें नांव मामल्लदेवी व पिता हीर. निर्णयसागरमुद्रणालयानें प्रसिद्ध केलेल्या नैषधीय-चरिताच्या प्रस्तावनेंत म. म. शिवदत्त दाधीचानें या-संबंधीं बरीच माहिती एकत्र केली आहे.

**श्रीहीर**—श्रीहर्षपंडिताचा पिता.

**श्रुतसागरगणि**—( स. १४९३ सुमार ) हा जैन तर्कज्ञ दिगंबरपंथी सरस्वतीगच्छशाखेचा होता. यानें 'तत्त्वार्थदीपिका' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. नेमिचंद्र दत्त याच्या सेवेंत होता ( हि. इं. लॉ., पा. २१५ ).

**श्रेयांसनाथ**—हा जैनांचा अकरावा तीर्थंकर ( तीर्थंकर पाहा ).

**श्रेष्ठ**–रामदासस्वामींचे ज्येष्ठ बंधु (रामीरामदास पाहा).

**श्वेतवनवासिन्**—( स. १५०० पूर्वी ) उणादि-सूत्रावरील टीकाकार. याचा पिता आर्यभट्ट. जन्मस्थान उत्तरमेरु ( मलबार ).

## ष

**षडक्षरदेव**—( स. १६५५ ) कानडी कवि. हा वीरशैव होता. जन्मस्थान मळवळ्ळि तालुक्यांतील दनुगूरु गांव आहे असें दिसतें. गुरु–चिक्कवीर देशिक. चिक्कवीर हा दनुगूरु गांवच्या मठाचा स्वामी होता. ग्रंथ–राजशेखर-विलास ( स. १६५५ ), शबरशंकरविलास, बसवराजविजय ( स. १६७७ ). शिवाय वीरभद्रक, हाहि याचा एक ग्रंथ असावा. कविकर्णरसायन नांवाचा ग्रंथ यानें संस्कृतमध्यें केला आहे.

षडक्षरस्तोत्रहि यानें केलेलें आहे. याचा वीरभद्रा-दारणगद्य नांवाचा संस्कृत ग्रंथ उपलब्ध आहे ( क. क. च. ३. ३८६ ). केळदीच्या वीरभद्रदेवाची यांत स्तुति आहे.

याला वयाच्या अकराव्या वर्षी कविता करतां येऊं लागली. कानडींतील कंदपद्य नांवाचा छंद हा फार चांगल्या प्रकारें रचतो, अशी प्रसिद्धि आहे. याची वर्णन-शैली उत्कृष्ट आहे. याचा 'राजशेखरविलास' वगैरे सर्व ग्रंथ चंपूरूप आहेत. कालिदासाच्या अजविलापाप्रमाणें तिरु-कोळवी नाचीचा मुलगा मेला असतां तिनें केलेला या काव्यांतील विलाप प्रसिद्ध आहे. 'राजशेखरविलास' ही पद्य कादंबरी आहे म्हटलें तरी चालेल.

हा कानडींतील उच्च दर्जाचा कवि आहे.

हा यळंदुर मठाचा स्वामी होऊन तेथेंच समाधिस्थ झाला ( क. क. च. भा. २, पा. ४४२ ).

**षष्ठदेव कदंब**—( स. १००७ ) हा गोंवा येथील कादंब घराण्यांतील दुसरा राजा होय. हा पश्चिम चालुक्य जयसिंह याचा मांडलिक असावा.

**२.** ( स. १२५७ ) हा त्रिभुवनमल्ल कदंबाचा पुत्र. रट्ट व शिलाहार राजांनीं याचे प्रांत जिंकून घेतल्यामुळें याच्या हातांत फारच थोडी सत्ता शिल्लक राहिली होती.

## स

**सईबाई**—( लग्न स. १६४० एप्रिल १७, मृत्यु स. १६५९ सप्टें. ५ ) ही मुधोजी निंबाळकर २ रा याची मुलगी होय. हिचें लग्न शहाजी भोसल्याचा मुलगा शिवा-जीशीं झालें. पुत्र संभाजी. शिवाय सकवार, राणू व अंबिका अशा तीन मुली होत्या.

**सकवारबाई ऊर्फ सखूबाई**—ही शिवाजीची मुलगी होती. हिच्या आईचें नांव सईबाई असून तिची ही थोरली मुलगी. हिचें लग्न फलटणचे महादजी नाईक निंबाळकर यांच्याशीं झालें. हिचें लग्न पुण्यास झालें. बजाजीला शुद्ध करून घेतल्यावर हा संबंध जोडलेला दिसतो.

२. ( लग्न स. १६५७ जाने. ) ही शिवाजी-महाराजांची सहावी पत्नी होती. ही गायकवाडांची कन्या. हिला कमला नांवाची एक मुलगी होती ( शिवाजी–निबंधावली १, पान २०९ ते २२५ ).

३. ही राणोजी शिर्क्यांची मुलगी असून शाहूची बायको होती. हिचा व ब्रह्मेंद्रस्वामींचा पत्रव्यवहार उपलब्ध आहे. हिनें सहगमन केलें. ही कोल्हापूरच्या संभाजीच्या पक्षाची होती.

**सकोपंत**—( रामोजी शेणवी कोठारी पाहा. )

**सखारामबापू ( सखाराम भगवंत बोकील )**–( स. १७१६–८१ आगष्ट २ ) मराठेशाहींतील अत्यंत थोर राजकारणी पुरुष. शिवाजीच्या वेळेपासून याच्या घराण्यांतील लोकांनीं राजकारणांत प्रामुख्यानें भाग घेतला होता ( पंताजी गोपीनाथ बोकील पाहा ).

पंताजींचे पुतणे महादजी व गंगोपंत यांनीं शाहूमहाराजांना कैदेंत अत्यंत साहाय्य केलें होतें. म्हणून त्यास ते काका असें म्हणत. रायगडच्या पाडावांत शाहूबरोबर ही बोकील मंडळीहि औरंगजेबाच्या कैदेंत होतीं. गंगोपंत–भगवंत–सखाराम असा यांचा वंश आहे. निंबाजी व बाजी हे याचे बंधुहि राजकारणांत वावरत होते.

हा प्रथम महादजी ऊर्फ बावा पुरंदऱ्याकडे शिलेदार होता. बाजीरावानें याला आपणाकडे घेतलें, आणि शनवारवाडा बांधण्याच्या कामावर यास नेमलें ( स. १७३२ ), पण पुढें हा सरदारी करूं लागला. नानासाहेब पेशव्यांच्या उत्तरेकडील दोनहि स्वाऱ्यांत हा होता ( स. १७४१; १७४४ ). पण सतरा वर्षांचा सदाशिवरावभाऊ सेनापति व हा कारभारी असतां यानें व्यवस्थित हालचाली व कारभार करून अलोट संपत्ति मिळविली, शाहूचें कर्ज फेडलें आणि नानासाहेब व शाहू यांचा विश्वास संपादन केला ( स. १७४७ जाने. ). उत्तरेकडील राजकारणांत मल्हाररावाबरोबर यानें प्रामुख्यानें भाग घ्यावयास सुरवात केली (स. १७४८). पुढील तीन वर्षे राजकीय भानगडींमुळें महादजीपंताबरोबर यानें सासवडीं काढलीं असावींत. पुढें मात्र रघुनाथरावाचा कारभारी नेमून गुजराथच्या बंदोबस्ताकरितां याची रवानगी झाली ( स. १७५१ ).

येथून पुढें पानपतची लढाई संपेपर्यंतच्या राजकारणांत याचा प्रामुख्यानें भाग होता. त्यांत अमदाबादचा किल्ला सर करणें, रोहिल्यांचा पाडाव करून दोआब जिंकणें, कुंभेरीचा वेढा आणि दिल्लींत मराठ्यांचें वर्चस्व स्थापण्याचे कामीं यानें समाधानकारक कार्य करून दाखविलें. पुढेंहि रघुनाथरावाच्या स्वारींत हा कारभारी होता. पण पानपतयुद्धाच्या वेळीं मात्र याला दक्षिणेंत राहावें लागलें. नानासाहेबानें मृत्युसमयीं यास मुख्य कारभारी नेमलें, आणि पुढील बारा वर्षांत प्रत्येक आणीबाणीच्या प्रसंगीं मुख्य दिवाणगिरीचीं व शेवटीं सर्वाधिकारित्वाचीं कामें याच्याकडे सोंपविणें सर्वांना भाग पडलें ( स. १७६१–७२ ).

पानपतच्या युद्धामुळें चढाई करणाऱ्या निजामाचें पारिपत्य करण्याचें काम यानें पार पाडलें. पण तहाच्या कलमामुळें गैरसमज होऊन माधवराव व रघुनाथराव यांच्यांत बेबनाव होऊन हा कारभारांतून बाहेर पडला. घोडनदीच्या लढाईंत माधवराव पेशव्याचा पराभव केला आणि राक्षसभुवनच्या लढाईंत चातुर्यानें निजामाचा सपशेल पराभव केला, त्यामुळें माधवरावाची याच्या कर्तबगारीबद्दल खात्री झाली. पण तो याला डोईजड न होईल व प्रतिपक्षालाहि न मिळेल असें वागवी. पण मरतेसमयीं नारायणरावाला याच्या ताब्यांत देऊन याच्यावरील विश्वास त्यानें व्यक्त केला. वास्तविक राघोबाकडे याचा कल असे, पण त्यानें अयोग्य वर्तन करतांच त्यालाहि यानें बारभाईचें कारस्थान रचून योग्य धडा घालून दिला.

राघोबाला पेशवाई मिळाल्यानंतर त्यानें नारायणरावाचा खून करणाऱ्या सुमेरसिंग व मुहम्मद युसफ यांस भेटून बक्षिसें दिलीं. यामुळें राघोबा सर्वांच्या मनांतून उतरला. पुढें साबाजी भोसल्याला निजामानें आश्रय दिल्यानें राघोबा त्याचें पारिपत्य करण्यास निघाला. सिद्धटेकाहून पेडगांवास गेल्यावर सखारामबापू मुलाच्या मुंजीच्या निमित्तानें सासवडाकडे परतला. बाकीची मंडळी पुण्याकडे येऊं लागली. स्वारींत ठरल्याप्रमाणें सर्वांच्या विचारें राघोबाला पदच्युत करून गंगाबाईच्या नांवें पेशवाईच्या कारभारास सुरवात झाली ( नवं. १७७३ ). यालाच ' बारभाईचें कारस्थान ' असें म्हणतात. यांत प्रथम बापू, नाना, मोरोबा, तात्या, व त्रिंबकरावमामा हे पांच भाई प्रमुख होते. यानें गरोदर असणाऱ्या गंगाबाईची पुरंदरवर व्यवस्था लावली. नंतर राघोबा, निजाम, भोसले, होळकर, शिंदे व इंग्रज यांची व्यवस्था लावून राघोबाला ताब्यांत घेऊन जिकडेतिकडे स्थैर्य उत्पन्न केलें. या वेळीं बापूकडे सर्वांनीं एकमतानें सर्वाधिकार सोंपविले होते. आणि बापूनें आपल्या कर्तृत्वशक्तीचा चमत्कार सर्वांना दाखवून चकित केलें.

पुरंदरच्या तहानंतर बापू व नाना यांची चित्तशुद्धि राहिली नाहीं. बारभाईच्या कारस्थानानंतर याच्याकडे अनभिषिक्त पेशव्याचा दर्जा आला आणि नानाकडे याच्या हुकुमाच्या अंमलबजावणीचें काम आलें. पण महत्त्वाचे प्रसंग उलगडतांच नानानें परभारें आपल्या जबाबदारीवर

कामें उरकण्यास सुरवात केली. महादजी शिंद्यासारखा मनुष्य आपल्या लगामीं घेऊन नानानें आपलें पारडें जड केलें आणि बापूला निर्माल्य करून सोडलें. तेव्हांच्या राजकारणांत प्रत्येक मुत्सद्याला स्वतःचें महत्त्व ताजें ठेवावें लागे. बापूसारखाच एकदां महत्त्व पावलेल्या पण सध्यां निर्माल्य झालेल्या मोरोबानें कारस्थान उभारलें आणि पुणें ताब्यांत घेऊन कारभारास सुरवात केली. बापूनें मोरोबाला हाताशीं धरून नानाला नमविलें, आणि पुनः सहज रीतीनें नानाशीं तडजोड करून हें कारस्थान यानें नाहींसें केलें; व पुढें इंग्रज–मराठ्यांचें युद्ध होऊन राघोबानें राज्याची सोडचिठी देऊन तो शिंद्याचे स्वाधीन झाला ( स. १७७८ ).

पण पुढें बापूनें फितुरी केल्याच्या दोन चिठ्ठया राघोबानें शिंद्याच्या स्वाधीन केल्या. तेव्हां यास कैद करून सिंहगडावर पाठविलें ( स. १७७९ फेब्रु. २७ ). निजामाची मदत घेण्याबद्दल यास सुचविलें असतां 'अंतःकलहांत परक्यास हात घालूं दिला तर राज्यनाश होतो' असें बापूनें उत्तर दिलें ( ऐ. गो. २५० ). या चिठ्ठया बनावट आहेत असें बापूचें म्हणणें होतें. बापूला पळून जाण्याची संधि किंवा पुनः राज्यकारभार हातीं घेण्याची हरिपंत फडक्यानें सूचना केली असतां यानें फक्त काशीस पाठवीत असल्यास सुटण्याची इच्छा दर्शविली ( पर्शियन कॅ. ५. ३४९). याला तुरुंगांत टाकल्यावर याची ५० लाखाची जिंदगी सरकारजमा केली.

नानानें अडथळा करतो म्हणून बापूला कैदेंत टाकलें तरी याची व्यवस्था प्रथम पुढीलप्रमाणें ठेवली होती. 'दोन नोकर, नित्य-दानास १० रुपये, व्यतिपाताचे दिवशीं २। तोळे सोन्याच्या २८ पुतळ्या दानधर्मास, उत्तम जेवण, शाकभाजी, विड्याचीं पानें, श्राद्धविधि वगैरे सर्व बाबतींत तरतूद केली होती. प्रतापगडीं असतां दुधाकरितां एक गाय, व म्हैस पुण्याहून पाठविल्याची माहिती मिळते. सिंहगड, प्रतापगड, नगर, रायगड असें बापूला कैदी असतां नेण्यांत आलें. पण याला सोडविण्याचे प्रयत्न झाल्यानें याला बेडी घालण्यांत आली व याचे शेवटीं अत्यंत हाल करण्यांत आले. रायगडीं हा थोर पुरुष अतिसारानें मेला ( शके १७०३, श्रावण शु. १३ ). क्रियेकरितां नानानें ५ हजार रुपये खर्च करविले.

यानें एकंदर पांच लग्नें केलीं. त्यांपैकीं काशीबाई, राजूबाई व जिऊबाई या मागें हयात होत्या. हीं लग्नें उतारवयांत म्हणजे स. १७७६–७८ पर्यंत झालीं. याचा आकोपंत नांवाचा मुलगा याच्या हयातींतच वारला होता ( स.१७७५ मे ). आकोपंताला रघुनाथ चिमणाजी पंतसचीवाची मुलगी दिली होती. बापूची दुसरी एक मुलगी अंताजी माणकेश्वराचा मुलगा बहिरोपंत यास दिली होती. आणखी एक मुलगी होती ती शंकरराव रघुनाथ पंतसचीवाला दिली होती. शेवटीं जिऊबाईनें बापूचे चुलते धोंडो महादेव यांचे चिरंजीव दत्तक घेऊन त्याचें नांव यशवंतराव असें ठेविलें ( स. १८२५ ).

बापूला 'राजकारणांतील विधि', 'प्रतिसृष्टि करणारा', 'शहाणा' अशीं समकालीन पत्रांत विशेषणें लावलीं आहेत. तत्कालीन 'सख्या, देवा, विठ्ठला' या शहाण्यांत पूर्ण शहाणा म्हणून यास अग्रमान मिळाला आहे. राजकारणांतील शस्त्र व शास्त्र हा चांगलेंच जाणीत होता. पटवर्धनी दप्तरांत याच्याबद्दल व देशस्थ जातीबद्दल अत्यंत अनुदार उद्गार आढळतात. तथापि हा अत्यंत बुद्धिमान् व हातांत घेईल तें काम पार पाडणारा होता, याबद्दल समकालीन सर्वांची खात्री होती. तत्कालीन व्यक्तिप्रधान राजकारणांत स्वतःचें महत्त्व राखून राजकारण करावें लागे त्यामुळें समष्टीचा विचार करून केलेलें राजकारण क्वचित् आढळतें.

**सखाराम मोकाशी**—निजामशाहाच्या राज्यकारभारांत सुधारणा करण्याच्या कामांत यानें मलीकंबरास मदत केली.

**सखाराम हरि गुप्ते**—( स. १७२०–७९ ) हा प्रभु जातीचा सरदार प्रथम थो. बाजीरावाच्या वेळीं उदयास आला. हा प्रथम जंजिऱ्याच्या स्वारींत होता. ( स. १७३३ ). नंतर रघुनाथरावाबरोबर स्वाऱ्यांस जाऊं लागला आणि त्याचा कट्टा पुरस्कर्ता बनला. राक्षसभुवनचे लढाईत यानें अद्वितीय शौर्य गाजविलें व हैदरचे छावणींत शिरून त्याचा धुव्वा उडविला. नारायणरावाचे खुनानंतर याला कैद करण्यांत आलें व याची जिंदगी जप्त केली. याचें दादाचा पक्ष घेऊन फितुरी करण्याचें काम शेवटपर्यंत चालूं होतें. त्यामुळें बारभाईंची यावर अत्यंत अवकृपा होती. कडक शिक्षा भोगीत असतांहि हा म्हणे 'माझी शक्ति गेली, माझे प्राणहि चालले, माझी वाचा बंद झाली व श्वासोच्छ्वासहि बंद पडला तरी माझे अस्थींतूनहि रघुनाथराव हींच अक्षरें निघतील !' अशा निष्ठावंताची द्रव्यदंड देऊनहि याच्या बायकोस भेट घेतां आली नाहीं. बायको भेटण्यापूर्वीच यानें अवजड बेड्यांवर डोकें आपटून प्राण सोडला होता. पुढें भेटीबद्दल ठरलेली रक्कम वसूल करण्याबद्दल कारवाई चालूच होती ! महादजीनें नाना फडणीसाला त्याबद्दल मध्यस्ती केलेली आढळते. याची मुलगी बखरकार मल्हार रामराव चिटणीसाला दिली होती. याचें घराणें आंबेगांवकर या नांवानें प्रसिद्ध आहे.

**सखो विठ्ठल**—( स. १७०७ ) शाहूचा न्यायाधीश.

**सगनभाऊ**—( स. १७७८–१८४० ) प्रसिद्ध मराठी शाहीर. हा जातीनें शिकलगार मुसलमान होता. याच्या फडांत विविजान, येमा, बाळा, राघू व रामा गोंधळी सुंदर गाणारा होता. 'लावणी करावी सगनभाऊनें व म्हणावी रामा गोंधळ्यानें' अशी त्या वेळीं म्हणच असावी. 'दक्षिणच्या पेशव्यास घाला नव्हता आला । गंगाधरशास्त्र्यावरून राज्याचा नाश झाला' हा याचा पोवाडा फार प्रसिद्ध आहे. नंतर सातारचें राज्य जाईपर्यंत हा सातार्‍यास राहिला. याच्या कांहीं लावण्या भेदिक म्हणजे परमार्थपरहि आहेत. याचा गुरु गुरुनाथ सिद्ध होय. दुसर्‍या बाजीरावाच्या विलासकांडावर याच्या पंधरा लावण्या आहेत.

**सगुणाबाई घोरपडे**—ही प्रसिद्ध संताजीची सून असून पिराजीची बायको होती. हिला एक मुलगा असून त्याचें नांव राणोजी असें होतें.

**सगुणाबाई निंबाळकर**—हिचा पुत्र नरसिंगराव धारराव निंबाळकर ( म. रि. म. वि. १, पृ. १८० ).

**सगुणाबाई पेशवे**—जनार्दन बाजीराव पेशवे यांची पत्नी व रामजी अनंत भिडे यांची कन्या. हिच्या पुस्तकाची यादी पेशवे दप्तरांत प्रसिद्ध आहे.

**सगुणाबाई भोसले**—( लग्न स. १६५० ) ही शिरक्याची कन्या व शिवाजीची पत्नी. हिला एक मुलगी होती. तिचें नांव राजकुंवरबाई.

२. (मृत्यु स. १७५४) शाहू महाराजांची पत्नी. हिला धाकटी धनीण म्हणत. हिच्यावर शाहूचें प्रेम असून हीहि शाहूच्या मर्जीप्रमाणें वागे. हिची मुलगी राजसबाई. हिचा व ब्रह्मेंद्रस्वामींचा पत्रव्यवहार उपलब्ध आहे.

**सच्चिदानंद**—हा सदानंदाचा शिष्य. यानें ब्रह्मानुभव निवेदन करणारा 'अनुभवसार' नांवाचा ओवीबद्ध ग्रंथ केला ( मं. वार्षिक १८३६, क्र. २३ ). यानें 'स्वात्मबोध,' नांवाचा ग्रंथ लिहिला. भाषा जुनी आहे ( मं. श. १८३७ वार्षिक, ले. १३७ ).

**सच्चिदानंदबाबा**—(स. १२९० सुमार) ज्ञानेश्वरानें नेवासें येथें यांच्याकडून ज्ञानेश्वरी लिहविली. हे दे. ऋ. ब्राह्मण होते. यांचा 'ज्ञानेश्वरविजय' नांवाचा ग्रंथ होता. यांचे वंशज संगमनेरीं आहेत. त्यांचें उपनांव थावरे.

**सज्जनरंजन**—( स. १७७६-१८०४ ) याचें मूळचें नांव गोविंदा गोसावी. हा इंदापूरचा राहणारा. याचीं पदें या नांवानेंच प्रसिद्ध आहेत. हा चांगल्या-चांगल्यांचीं मनें रंजवीत असे.

**सज्जनसिंह**—( अजमसिंह व बाजी घोरपडे पाहा ).

**सटवोजीराव डफळे**—( मृत्यु स. १७०६ ) जत संस्थानचा संस्थापक व डफळपुरचा पाटील. प्रथम आदिलशाहा व नंतर औरंगजेबाकडून यानें जहागीर मिळविली. याचे बाबाजी व कान्होजी हे दोन मुलगे याच्या ह्यातींतच मेले. याची पत्नी येसूबाई.

**सणफुल्ल शिलाहार**—हा दक्षिण कोंकणमधील शिलाहार घराण्याचा उत्पादक होय. यानें स. ७८० मध्यें शिलाहार घराण्याची स्थापना केली.

हा राष्ट्रकूट घराण्यांतील कृष्णराज १ ला याच्या आश्रया( संरक्षणा )खालीं होता. याच्या नंतर याचा मुलगा धम्मियर हा गादीवर आला ( B. ).

**सतीबाई ऊर्फ बयाबाई शहापुरकर**—( स. १६४५ ) यांचे पति बाजीपंत किंवा बाळकृष्णपंत व पिता अंबाजी मुऱ्हार व चुलतचुलता दत्ताजी अनंत यांना म्हणजे सतीबाईच्या सासरच्या व माहेरच्या सर्व मंडळींना समर्थांचा अनुग्रह झाला होता. भीमस्वामीकृत चरित्रांत बाजीपंताबद्दल कमळाजीपंत आणि अंबाजीपंताबद्दल विसाजीपंत अशीं नांवें आहेत. सतीबाईचे भाचे भिकाजीबुवा ऊर्फ भीमाजीबावा किंवा भीमस्वामी यांची सद्गुरुवचनीं पूर्ण निष्ठा पाहून शके १५६७ मध्यें मसूर मुक्कामीं त्यांना समर्थांनीं अनुग्रह केला होता. तेव्हांपासून १० वर्षे ते समर्थांपाशीं होते.

**सत्तर्सल, सत्तर्साल, शत्रुतुल्य**—( स. १५६९–१६०८ ) हा नवानगर येथील जाम घराण्यांतील जो विभोजी त्याचा मुलगा होय.

याच्या आश्रयानें श्रीकंठकवीनें 'रसकौमुदी' ग्रंथ केला. स. १५९१ पासून हा सत्ता वाढवून स्वतंत्र झाला व त्याप्रमाणें इतर राजेहि याला मान देऊं लागले. यानें आपल्या राज्याची व्यवस्था उत्तम प्रकारें ठेविली होती. हा विद्येचा भोक्ता होता. याला अजोजी, जसोजी आणि विभोजी असे तीन मुलगे होते.

**सत्यदामा क्षत्रप**—हा दामघ्सद क्षत्रपाचा ज्येष्ठ पुत्र. याला महाक्षत्रप असें लिहिलेलें आढळत नाहीं. हा महाक्षत्रप होण्यापूर्वीच मेला असावा.

**सत्यवर्मा कदंब**—बनवासीच्या कदंबांपैकीं मृगवर्म्याचा पुत्र.

**सत्याश्रय ( पश्चिम ) चालुक्य**—( पुलकेशी पश्चिम चालुक्य व रविकीर्ति पाहा ).

( स्वामी ) **सत्यसिंह क्षत्रप**—याचीं नाणीं उप-

लब्ध नाहींत. पण याचें नांव व महाक्षत्रप ही पदवी याच्या स्वामि ( स्वामि ) रुद्रसिंह नांवाच्या पुत्राच्या नाण्यावरून कळून येते. याच्या पित्याचें नांव उपलब्ध नाहीं.

**सदम्बर**—( स. ७२५ सुमार ) एक शैव साधु. यानें पांड्य राज्यांत जैनांचा उच्छेद केला ( रामस्वामी आयंगार, एम्. ए. कृत 'दक्षिणेंतील जैन धर्माचा इतिहास' पा. ६६ ).

**सदानंद**—( स. १६६४-१७२९ नंतर ) एक महाराष्ट्रीय संत कवि. यानें आपल्या ग्रंथांत आत्मचरित्र थोडेंसें दिलें आहे. खानदेशांत धरण गांवीं मधुसूदन चिंतामणी धर्माधिकारी होते. त्याचा पुत्र सदाशिव हाच पुढें गुरुकृपेनें सदानंद नांवानें प्रसिद्धीस आला. याचे ग्रंथः—आनंदबोध, पराविद्या, आनंदप्रकाश ( र. श. १६३२ अश्विन ), भूगोलवर्णन, आत्मसारप्रकाश, संतमालिका, षड्रसादिप्रकरण, आनंदसार, वेदांतसार.

**सदाशिव चिमणाजी सचीव** ( भोर )—( स. १७५७-१७८७ ) चिमणाजी नारायणाचे तीन पुत्रांपैकीं वडील पुत्र सदाशिव चिमणाजी होत. या वेळीं सचिवांना पुणें दरबारास ५० हजारांचा नजराणा पाठवावा लागला. स. १७६३ मध्यें पेशवे-निजाम युद्ध झालें. त्यांत यांची फार नुकसानी झाली, व खजिना रिकामा पडला. यांनीं आंबवडें येथील श्रीनागनाथाचा जीर्णोद्धार केला व भोरास भोरेश्वराचें व मुरलीधराचें देवालय बांधलें.

**सदाशिव ( दीक्षित वाजपेयी ) ठकार**—( स. १७२० सुमार ) सातारचे कऱ्हाडे ब्राह्मण. हे नागपूरच्या भोसल्यांचीं शाहूदरबारांतील कामें कुशलतेनें उरकीत.

**सदाशिव दिनकर करमरकर**—हा नाना फडणीसाचा वकील. हा महादजीकडे होता. यानंतर कृष्णाजी भावे यांची नेमणूक झाली ( स. १७८८ ).

**सदाशिव नायक**—( स. १५१३-६० ) हा इक्केरीच्या राज्याचा संस्थापक. बुर्हाण निजामानें व इब्राहीम आदिलशाहानें रामराय आरविदूवर स्वारी केली तेव्हां यानें सेनापतित्व स्वीकारून त्यांचा पूर्ण मोड केला. याची राजधानी केलडी. हें विजयनगरचें सेनापति घराणें होय. यानें आपला भाऊ भद्रप्पा नायकास 'इम्मडी सदाशिव नायक' अशी पदवी देऊन गादीवर बसविलें व आपण वानप्रस्थाश्रम स्वीकारला. पण भद्रप्पास रामराय आरविदूनें ताबडतोब पदच्युत केलें ( स. १५६० ).

**सदाशिव पंडित**—'गूढदीपिनी' नामक वैद्यकावरील संस्कृत ग्रंथाचा कर्ता.

**सदाशिव माणकेश्वर**—( मृत्यु स. १८१६ ) हा दुसऱ्या बाजीरावाचा एक दिवाण होता. गोविंदराव पिंगळ्याच्या चाकरीस राहण्यापूर्वीं हा कथा करून पोट भरीत असे. निजामास टिपूशीं युद्ध करण्यांत सामील करून घेण्याकरितां त्याजकडे वकील म्हणून यास पाठविलें होतें. स. १८०२ सालीं झालेला वसईचा तह याला बिलकुल पसंत नव्हता. परंतु हा तह बाजीरावानें याच्या विरुद्ध केला. पुढें यास खूष ठेवण्याकरितां इंग्रजांशीं होणारा पेशव्यांचा सर्व व्यवहार याच्या मार्फत होऊं लागला. खुश्रुशेटचें व याचें शेवटीं वांकडें आलें.

त्रिंबकजी डेंगळ्याचें वजन बाजीरावाजवळ जास्त होऊन याचें बस्तान बिघडलें. परंतु लवकरच त्रिंबकजीस बाजीरावास इंग्रजांच्या स्वाधीन करावें लागलें. तेव्हां पुन्हां बाजीरावानें सदाशिव माणकेश्वरास आपल्या सल्लागारमंडळांत घेतलें ( स. १८१६ ). पुढें हा लवकरच वारला.

**सदाशिव रामचंद्र शेणवी**—( स. १७५६-८३ ) यास रामचंद्र बाबा शेणवी यांनीं दत्तक घेतलें. हा पराक्रमी होता, पण याचें पेशव्याशीं किंवा बारभाईशीं पटलें नाहीं. नानानें याचा बराच छळ केला.

**सदाशिवराय तुलुव**—( स. १५४२-७० सुमार ) हा विजयनगरचा राजा. हा व्यंकटरायानंतर गादीवर आला. याच्या पित्याचें नांव रंग क्षितींद्र. हा अच्युतरायाचा पुतण्या. हा गादीवर आला तेव्हा १३ ते १६ वर्षांचा होता. सलाकम तिम्मराजूच्या वेळीं कांहीं दिवस याला अज्ञातवासांत काढावे लागले. रामराय आरविदूनें सलाकम तिम्मराजूला ठार करून आपल्या ताब्यांत सर्व व्यवस्था घेतली आणि याला गादीवर बसविलें.

याची चुलत बहीण रामरायाची पत्नी होती. हा वयांत आला तेव्हां रामरायानें यास कैदेंत ठेवलें. हा तेरा वर्षे कैदेंत होता. याचें दर्शन लोकांना वर्षांतून एकदां होई. तथापि राज्यविस्तार किंवा व्यवस्था या दृष्टीनें रामरायांनीं चांगली व्यवस्था ठेवली होती. तालिकोटच्या युद्धानंतर रामरायाचा भाऊ तिरुमल्लानें स्वतःकडे सर्वाधिकार घेतले व राजधानी पेणुकोंडा केली. याचा खून त्यानें व त्याच्या मुलानें केला असावा.

**सदाशिवराव ऊर्फ भाऊसाहेब पेशवे**—( जन्म स. १७३० आगष्ट ३; मृत्यु स. १७६१ जाने. १४ ) हा चिमाजी आपाचा मुलगा. मुंज स. १७३६ मार्च २० ला झाली. पुढें लग्न झालें. (स.१७४०फेब्रु.) पत्नीचें नांव

उमाबाई. याचें दुसरें लग्न पेणच्या भिकाजी नाईक कोल्हटकरांच्या मुलीशीं झालें ( २३ एप्रिल स. १७५० ) तिचें नांव पार्वतीबाई.

कृष्णातुंगभद्रा दुआबांतील ठाणीं देशमुखांनीं उठविलीं होतीं तीं परत घेण्याकरितां हा गेला होता (स. १७४६). बहादूरभेंड्याचा किल्ला यानें घेतला ( स. १७४७ ). यानें यमाजी शिवाजीचें बंड मोडण्याकरितां रामराजाला बरोबर घेऊन सांगोल्यावर स्वारी करून बंड मोडलें व रामराज्याकडून मराठी राज्याची कायमची पूर्ण मुखत्यारी लिहून घेतली ( स. १७५० ). यानें आपला दिवाण रामचंद्रबाबा याच्या शिकवणीवरून नानासाहेब पेशव्याच्या दिवाणगिरीची मागणी केली. पण महादजीपंत पुरंदरे यास त्या जागेवरून कमी करण्याची त्याची इच्छा नसल्यानें यानें कोल्हापूरकराची पेशवाई स्वीकारली. पण भावाभावांत तंटा लागूं नये म्हणून महादाजीपंत पुरंदऱ्यानें आपल्या जागेचा राजीनामा दिला आणि हा पुण्याच्या पेशव्याचा दिवाण झाला ( स. १७५० ). तुंगभद्रा व कोरेगांव येथें झालेल्या लढायांत हा हजर होता ( स. १७५१–५२ ). यानंतरच्या दक्षिणेंतील लढायांत हा असे ( स. १७५८ ). उदगीरची लढाई तर याच्या नेतृत्वाखालींच झाली. उत्तरेंत नजीब व दक्षिणेंत सलाबत अशी त्या वेळीं स्थिति होती.

दिल्लीच्या बादशहानें अब्दाली व रोहिले यांच्यापासून बादशाहीचें मराठ्यांनीं संरक्षण करावें म्हणून मराठ्यांशी करार केला होता ( स. १७५२ मे ). त्याप्रमाणें प्रयत्न करूनहि रघुनाथरावादि लोकांना अब्दालीच्या जोरास आळा घालतां आला नाहीं. अब्दालीशीं रोहिल्यांचें सूत होतें. रजपूत मराठ्यांशीं विरुद्ध होते. दिल्लींतहि दोन प्रबळ पक्ष होते. शिंदे-होळकरांत विरोध होता. त्यांचा अब्दालीनें वेगवेगळा पराभव केला आणि दत्ताजी पडला तेव्हां याची पटदूराहून उत्तरेकडे रवानगी झाली ( स. १७६० मार्च १४ ).

हा निघाल्याबरोबर यानें सरदारांचे रुसवे काढून सर्वांना कामाला लावलें. बऱ्हाणपूर, भोपाळ, सिरोज, ओर्च्छा, नरवर, ग्वाल्हेर अशा मार्गानें यानें गंभीर नदी ओलांडली. अब्दालीनें वकील पाठवून याला नादीं लावलें. सुजाला याला वळवितां आलें नाहीं. अली गोहरहि अब्दालीला मिळाला. मराठ्यांच्या फौजा आग्र्याजवळ येतांच अब्दालीहि यमुनेच्या पलीकडे यांच्यावर नजर ठेवून राहूं लागला. मुचुकुंद तीर्थावर सर्व मराठे एकत्र झाले ( ६ जुलै ). यमुनेस उतार नसल्यानें प्रथम दिल्ली घेऊन नंतर अब्दालीस कोंडावा असें ठरलें. मथुरेंत याला जाठ सामील झाला. अब्दालीपासून दिल्ली घेतली ( २२ जुलै ). नारो शंकरला राजेबहादूर किताब देऊन दिल्लीचा बंदोबस्त त्याकडे सोंपविला. या वेळीं अब्दालीचें तहाचें बोलणें यानें धुडकावलें. युद्धाचा निर्णय लागल्याशिवाय शहाअलम दिल्लीस येईना म्हणून अली गोहरचा मुलगा जवानबख्त यास दिल्लीस युवराज केलें ( ता. १०।१०।६० ). दिल्लींत अन्न व पैसा याची टंचाई भासूं लागली तेव्हां 'दिवाण-इ-आम'च्या छताचे १७ लाख रुपये पाडले ( पे. द. २७.२५७ ). यानंतर तहाचें बोलणें यानें पुनः धुडकावलें, आणि अब्दालीला रसद पोंचविणारें कुंजपुरा हें ठाणें घेतलें ( १७ आक्टो. १७६० ).

पण मराठ्यांना आग्र्यापासून कुंजपुऱ्यापर्यंतचा दोनशें मैलांचा पश्चिम किनारा संभाळणें कठीण झालें. आणि अब्दालीनें बागपतापाशीं यमुना उतरून मराठ्यांचा दिल्लीशीं संबंध तोडला.

अब्दालीचा रस्ता बंद करण्यास गेले पण मराठ्यांचाच रस्ता बंद झाला. प्रथम अब्दालीवर हा गणोरापर्यंत चालून गेला, पण अब्दालीपुढें याचा निभाव लागेना. म्हणून याला खंदक खणून आवळून मदतीची वाट पाहत बसावें लागलें. दोनहि सेना दोन कोसांच्या अंतरानें समोरासमोर होत्या. खंदक ५० हात रुंद व १२ हात खोल होता, व रोज चकमकी चालूं होत्या ( नवंबर मध्यापासून जानेवारीच्या मध्यापर्यंत ). बळवंतराव मेहेंदळे व गोविंदपंत बुंदेले पडल्यावर अब्दालीला पायबंद पडेनासा झाला. बागपताचा उतार अब्दालीच्या ताब्यांत असल्यानें त्याला रसद मिळे, पण मराठ्यांची अन्नावांचून दुर्दशा झाल्यानें शत्रूवर तुटून पडून मरण्याची वेळ आली. चांदी-सोन्याचें सर्व सामान आटवून बादशाही शिक्क्याचीं नाणीं पाडलीं आणि दुसऱ्या बाजूस भाऊशाही, जनकोजीशाही व मल्हारशाही अशा अर्थाचीं भा. ज. म. अशीं अक्षरें घातलीं. पण हीं नाणींहि खलास झालीं. बिकानेरकडे काटेरी झुडपें व इकडे सक्त अब्दाली यामुळें मराठे टेकीस आले. शेवटीं गोल करून फळी फोडून जाण्याचें यानें ठरविलें. मराठे पूर्वाभिमुख व गिलचे पश्चिमाभिमुख होते. गिलच्यांच्या मागल्या बाजूस यमुना होती. सकाळीं आठला युद्ध सुरू झालें. दुपारीं तीनला विश्वासराव पडला आणि पळ सुरूं झाला. ऐन्यावेळीं ठरलेला बेत बदलून ठाण मांडून युद्ध केल्यानें राखीव सैन्य नव्हतें व सर्वांना बदललेल्या बेताची बातमीहि नव्हती. अब्दालीचा ताज्या दमाचा कतलबाज रिसाला चारनंतर पुढें येतांच मराठे पळूं लागले. यानंतरची मराठ्यांची दुर्दशा वर्णन करणें

अशक्य आहे. पहिलाच बेत कायम असता तर तोफखान्याच्या जोरावर हा दिल्लीस पोंचता व गिलचे यमुनेंत बुडण्याचा प्रसंग येता.

विश्वासराव पडल्यावर देहभान विसरून हा शत्रुसैन्यांत शिरला. हा व जनकोजी कोठें पडले याचा पत्ताहि लागला नाहीं. दुसऱ्या दिवशीं प्रेत शोधून काढून काशीराजानें याच्या प्रेताला अग्नि दिला. नाना फडणीस हा गर्दींत नाहींसा होईतोंपर्यंत याच्याजवळ होता. त्यानें आपल्या आत्मचरित्रांत स्वकीयांचें न ऐकल्याबद्दल यास दोष दिला आहे.

यानें केलेली मद्यबंदी पुष्कळ काल टिकली ( पे. द. ३२ २०६ ).

**सनंदनाचार्य**—श्रीशंकराचार्यांचा शिष्य.

**सन्मुखसिंग**—( स. १५७० सुमार ) हा जातीचा रजपूत असून खंडार येथील राहणारा होता. हा उत्तम ध्रुवपदिया तसाच उत्तम बीनकार असे. यानें मुसलमानी धर्माचा स्वीकार केला व त्यामुळें याचा प्रवेश अकबराच्या दरबारांत झाला. धर्मान्तरानंतर याचें नांव ' नौबतखान ' असें पडलें. यास तानसेनानें आपली मुलगी दिली होती. याचे वंशज बीनकार म्हणून ओळखले जातात. सारांश तानसेनाच्या मुलीचे वंशज ते ' बीनकार ' व मुलाचे वंशज जे गाणारे अशी प्रसिद्धि आहे.

**सफदरजंग**—( स. १७३९–५४ ) सातदखानाच्या पश्चात् त्याचा पुतण्या व जांवई सफदरजंग हा अयोध्या प्रांताचा कारभार पाहूं लागला. याच्या कारकीर्दींत या प्रांताची बरीच भरभराट झाली. यानें पुष्कळ लोकहिताचीं कामें केलीं. याच्या कारकीर्दीतील मुख्य गोष्टी म्हटल्या म्हणजे रोहिले, अबदाली व फरुखाबादचा नबाब यांच्याशीं युद्धें ह्या होत. एकदां तर याचा सबंध प्रांत रोहिल्यांच्या ताब्यांत गेला होता तो यानें मराठ्यांच्या मदतीनें परत मिळविला. यानें शेवटलीं सहा वर्षे दिल्लीच्या बादशाहाच्या वजीराचें काम केलें. याचें सबंध नांव अबूल मनसूरजंग. याची राजधानी फैजाबाद. हा फार शूर होता ( म. रि. म. वि. १, पृ. ३६० ).

**सफ्रा**—( स. १७२६–१७८८ ) फ्रेंचांचा सेनापति व दर्यावर्दी. सप्तवार्षिक युद्धांत यानें उत्कृष्ट कामगिरी केल्यानें यास अमेरिकेस वसाहतीच्या संरक्षणाकरितां पाठविलें. तिकडून परत येतांच याची नेमणूक हिंदुस्थानांत झाली. हैदरनें या वेळीं इंग्रजांविरुद्ध चांगलेंच वर्चस्व संपादिलें होतें. त्याच्याशीं याचें संगनमत झालें आणि यानें इंग्रजांचा समुद्रांत पुरा मोड केला. हा. स. १७८१–८४ पर्यंत हिंदुस्थानांत होता. याच्या कर्तृत्वामुळें इंग्रज कां फ्रेंच असें वातावरण उत्पन्न झालें होतें.

**सबक्तगीन गझनवी**—( स. ९७७-९७ ) गझनीच्या यामिनी घराण्याचा संस्थापक. हा गुलाम होता तरी अलप्तगीननें यास आपली मुलगी दिली. पिराईस पदच्युत केल्यावर हा गादीवर बसला, आणि आपल्या राज्यारोहणास बुखाऱ्याच्या दुसऱ्या नूहाची संमति मिळविली. हा गादीवर आला तेव्हां गझनीच्या भोंवतालचें लहान राज्य याचे ताब्यांत होतें. पण पुढील बारा वर्षांत उत्तरेकडील आक्ससनदीपर्यंत व पश्चिमेस अफगाणिस्थान व इराणपर्यंत यानें आपलें राज्य वाढविलें. स. ९७९ चे सुमारास पंजाबच्या जयपाल राजानें गझनीवर स्वारी केली पण तह करून त्यानें आपला बचाव केला. पुढें यानें त्याच्यावर स्वारी करून लूट मिळविली ( स. ९८६ ); व पुढें काबूलहि स्वाधीन करण्यास भाग पाडलें (स. ९८८). या स्वाऱ्या धार्मिक दृष्टीच्या नसून फक्त राजकीय दृष्टीच्या दिसतात. पुढें यानें अबू अली सुंजूर नांवाच्या इस्मायली पंथाच्या गृहस्थाचें पारिपत्य करून नूह राजाकडून खुरासान प्रांत मिळविला, व त्यावर महमूदची नेमणूक केली. याच्या या कामगिरीमुळें महमूदाला साम्राज्य वाढवितां आलें.

**समरसिंह गुहिलोत**—( स. १२७३–१३०२ ) तेजसिंहानंतर त्याचा पुत्र समरसिंह मेवाडच्या गादीवर आला. याच्या वेळच्या आबूच्या शिलालेखांत लिहिलें आहे कीं तुरुष्करूपी ( मुसलमानी ) समुद्रांत बुडणाऱ्या गुजराथचा यानें उद्धार केला ( इंडि. अँटि. भा. १६, पृ. ३५० ). हा लेख वि. सं. १३४२ (स. १२८५) मधला आहे. स. १२६६–१२८७ पर्यंत घियासुद्दीन बल्बन हा दिल्लीचा सुलतान होता. त्याच्या सेनापतीनें ही स्वारी केली असावी. दिल्लीच्या गुलाम सुलतानांच्या तवारिखा मोंगल बादशहांसारख्या विस्तृत लिहिलेल्या नसल्यानें त्यांत या स्वारीचा निर्देश नसल्यास आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. चीरव्याच्या शिलालेखांत 'शत्रूंच्या संहारांत सिंहासारखा' असा याचा निर्देश आहे. तलारक्ष क्षेमचा मुलगा मदन यास यानें चितोडचा तलारक्ष नेमलें असल्याचें चीरवालेखावरून कळतें.

जिनप्रभसूरीनें आपल्या तीर्थकल्पांत उलगखाच्या गुजराथ-विजयाचें वर्णन करीत असतां लिहिलें आहे कीं– ' वि. सं. १३५६ (स. १२९९) मध्यें अलाउद्दीनचा सर्वांत धाकटा भाऊ उलूखान ( उलगखां ) कर्णदेवाचा मंत्री माधव याच्या प्रेरणेनें दिल्लीहून गुजराथकडे आला. चित्त-

कूड( चित्रकूट–चितोड )चा स्वामी समरसिंहानें त्याला दंड देऊन मेवाडचें रक्षण केलें. सुलतानचा युवराज बागड देश ( बागड ) आणि मोडासा आदि नगरें नष्ट करीत असावलीला पोहोंचला. असावली अहमदाबादच्या जवळ आहे. राजा कर्णदेव ( गुजराथचा राजा करणघेला ) पळून गेला. ' हा ग्रंथकार या वेळीं हयात होता. फारसी तवारिखांत यानें दंड दिल्याची हकीगत नाहीं. तसेंच सनहि जमत नाहींत. तथापि फारसी तवारिखांपेक्षां ही माहिती अधिक विश्वासार्ह आहे असें ओझाजी मानतात.

अंचलगच्छाच्या पट्टावलीवरून समजतें कीं, या गच्छाचे आचार्य अमितसिंहसूरि यांच्या उपदेशानें यानें आपल्या राज्यांत जीवहिंसा बंद केली होती ( पीटर्सनचा पांचवा रिपोर्ट, ग्रंथकर्त्यांचें विवरण, पृ. २, तिसरा रिपोर्ट पृष्ठ १, विधिपक्ष गच्छीय प्रति क्रमण सूत्र सू. ५०४-१६).

याची आई जयतल्लदेवी. हिची जैनधर्मावर श्रद्धा होती. हिच्या आग्रहामुळें व वरील सूरीच्या उपदेशामुळें यांनीं वरील गोष्ट केली असेल.

याचा दुसरा पुत्र कुंभकर्ण होय. त्यापासून नेपाळचें राजघराणें उत्पन्न झालें असें मानतात.

**समशेरबहाद्दर**—( स. १७३४-६१ ) हा पहिल्या बाजीरावापासून मस्तानीस झालेला मुलगा. हा पानपतावर जखमी होऊन दीग येथें मृत्यु पावला. याची मुंज करावी अशी बाजीरावाची इच्छा होती, पण ती ब्राह्मणांनीं नाकारली अशी आख्यायिका आहे. याचें लग्न ता. १८ आक्टोबर १७५३ रोजीं झालें. निंबगिरीकरांची मेहेरबाई ही याची बायको होती. याचा शौर्याबद्दल फार लौकिक होता. हा सैन्यांत एक खासा सरदार असे. रमाबाई व फुलाबाई या दोन याच्या रक्षा होत्या. मेहेरबाईच्या पोटीं यास अलीबहाद्दर नांवाचा पुत्र झाला होता. हा मुसलमान असूनहि आपल्या हस्तें ' पांडुरंगा ' असें आपल्या पत्रांत श्रीकारापुढें लिही, आणि शिक्क्यांत नानासाहेब पेशव्यांचें चरण स्मरण करी.

२. ( स. १७८४–१८२३ ) अलीबहाद्दराचा मुलगा व पहिल्या समशेरबहाद्दराचा नातू. यास इंग्रजसरकारनें दरसाल चार लाखाचा तनखा करून देऊन याचें बांद्याचें राज्य स. १८०४ त खालसा केलें.

पुढें याचा भाऊ झुल्फिकारअली बांद्याचा नबाब झाला. तोहि त्याच सालीं वारला. त्याचा मुलगा अलीबहाद्दर नबाबगिरीवर असतां सत्तावन सालचें बंड झालें. त्या गडबडींत बांद्याचा उत्कृष्ट राजवाडा व सर्व जडजवाहीर जळून गेलें. त्यानंतर इंग्रजांनीं बांदा शहर आपल्या ताब्यांत घेऊन नबाबास ३६०७० ची नेमणूक देऊन आपल्या नजरेखालीं इंदुरास ठेविलें. तेथें याचे वंशज आहेत. बांदा येथील मशीद या नबाबाच्या वैभवाची साक्ष देते. कुटुंबास बाराशें रुपयांची नेमणूक देण्यांत आली.

**समंतभद्र**—( स. ६०० ) हा जैनांपैकीं दिगंबर पंथाचा महान् धर्मोपदेशक होता. श्रवणबेळगोळा येथील डोंगरांतील शिलालेख नं. ४४ यांत असें वर्णन आहे कीं ' यानें पाटलीपुत्र, माळवा, सिंध व टक्क देश ( पंजाब ) येथें ढोल पिटला ' ( म्हणजे वादी लोकांस उघड आव्हान केलें ). नंतर दक्षिणेंत कांचीस आला व तेथून कर्नाटकांत आला. हा ' आप्तमीमांसा ' ( देवागमस्तोत्र ) नांवाच्या महत्त्वाच्या जैन ग्रंथाचा कर्ता होय. आप्तमीमांसा या ग्रंथांत स्याद्वादसिद्धांताचें सुंदर विवेचन आहे. यानें उमास्वातीच्या तत्त्वार्थाधिगम सूत्रावर गंधहस्तिमहाभाष्य लिहिलें.

हा कर्नाटकांतील असावा. कानडी कवि याचा आदरपूर्वक उल्लेख करतात. मणुवकहळ्ळी या कर्नाटकांतील ठिकाणीं यानें तपश्चर्या केली, असें देवचंद्राच्या राजावली कथेंत लिहिलें आहे. याच्या संस्कृत व प्राकृत ग्रंथांवर कानडींत टीका उपलब्ध आहेत (क. क. च. भा. १ पा. १).

याशिवाय याचे युक्त्यनुशासन, रत्नकरंडक किंवा उपासकाध्ययन, स्वयंभूस्तोत्र व चतुर्विंशतिजिनस्तुति हे ग्रंथ होत. कांचीपूरच्या शिवकोटि महाराजाचा व याचा कांहीं संबंध होता व यानें त्याला शैव असून जैन करून घेतलें.

**समुद्रगुप्त**—( स. ३३६-८० ) गुप्त घराण्यांतील प्रसिद्ध पहिल्या चंद्रगुप्ताला लिच्छवीघराण्यांतील कुमारदेवीपासून झालेला पुत्र. प्रयाग येथील किल्ल्यांत अशोकाचा शिलालेख असलेल्या विशाल स्तंभावर याचाहि एक लेख कोरलेला आहे. त्यावरून पुढील माहिती मिळते—

हा विद्वान् आणि कवि होता. तसेंच विद्वानांच्या बरोबर राहण्यांत याला आनंद वाटत होता. यानें आपल्या बाहुबलानें अच्युत आणि नागसेन यांना पराजित केलें होतें, शेंकडों युद्धांत जय मिळवला होता, आणि याचें शरीर शेंकडों शस्त्राघातांच्या खुणांनीं सुशोभित होतें. कोसल( सिरपुर आणि संबलपुर याच्या आसपासचा प्रदेश )चा राजा महेंद्र, महाकांतार( मध्यप्रान्तांतील सोनपुरजवळचा जंगली भाग )चा व्याघ्रराज, कौराळचा ( उडीसापासून समुद्रावरील–केरळ नव्हे ) व पिष्टपुरचा (पिठापुर) महेन्द्र, गिरिकोट्टचा ( मद्रास, जि. गंजम ) स्वामिदत्त,

एरंडपल्लाचा ( मद्रास, चिकाकोलच्या जवळ एरंडपालि ) दमन, कांचीचा विष्णुगोप, अवमुक्तचा (?) नीळराज, वेंगीचा हस्तिवर्मा, पालक्कचा उग्रसेन, देवराष्ट्राचा (मद्रास–विजगापट्टमूचा भाग ) कुबेर आणि कुस्थलपुरचा धनंजय इत्यादि दक्षिणापथांतील राजांना यानें कैद केलें आणि शेवटीं मुक्त करून कीर्ति मिळविली. रुद्रदेव ( बहुतेक वाकाटवंशी रुद्रसेन प्रथम ), मतिल, नागदत्त, चंद्रवर्मा, गणपतिनाग ( बहुतेक पद्मावतीचा नागवंशी राजा ), नागसेन, अच्युत, नंदी, बलवर्मा (आसामच्या भास्करवर्म्याचा पूर्वज), इत्यादि आर्यावर्तातील प्रमुख राजांना नष्ट केलें, जंगली राजांना आपले सेवक बनविलें, समतट ( गंगा-ब्रह्मपुत्र यांच्यामधील समुद्रापर्यंतचा प्रदेश, जस्सोर, कलकत्ता वगैरे जिल्हे ), उवाक, कामरूप ( आसाम ), नेपाळ, कर्तृपूर ( गढवाल, कमाऊं, अलमोडा ) इत्यादि सीमान्त प्रदेशांतील राजांना, तसेंच मालव, अर्जुनायन, यौधेय, माद्रक, अभीर, प्रार्जुन, सनकानिक, कार्क, खर्परिक इत्यादि जातींना आपल्या स्वाधीन करून त्यांच्यापासून कर घेतला. तसेंच राज्यच्युत लोकांच्या वंशांना पुनः गादीवर बसविलें. देवपुत्र शाही, शहानुशाही ( हे कुशानवंशी राजांचे किताब आहेत. म्हणजे त्यांचे सूचक हे शब्द आहेत. ), शक, मुरुंड तसेंच सिंहल वगैरे द्वीपान्तरींचे राजे येऊन याला मुली भेट देत होते. हा दयाळु, हजारों गाई दान देणारा होता. याचा सर्व वेळ दीन, अनाथ, दुःखी यांना साहाय्य करण्यांत जात असे. हा संगीतविद्येंत निपुण व काव्यरचनेंत कविराज होता ( फ्लीट गु. इं., पृ. ६-१० ). दुसऱ्या शिलालेखावरून असें दिसतें कीं याला अनेक पुत्रपौत्र होते. पुष्कळ दिवस न झालेला अश्वमेधहि यानें केला होता. याचीं सोन्याचीं नाणीं मिळतात. त्यांवर अनेक कामांचा निर्देश करणारे छंदोबद्ध लेख आढळतात. ही चाल याच्या पुढल्या वंशजांनींहि उचलली. इतक्यांपूर्वी अशी छंदोबद्ध लेख नाण्यावर देण्याची प्रथा इतरत्र आढळत नाहीं. याच्या नाण्यांतून कुशानवंशी राज्यांच्या नाण्याचें अनुकरण दिसतें ( जॉन ऐलन्–काइन्स ऑफ दी गुप्त डाइनेस्टीज ). याची राणी दत्तदेवी. तिच्यापासून यास दुसरा चंद्रगुप्त झाला आणि तो याचा उत्तराधिकारी होता. याला आशियांतील नेपोलियन म्हणतात.

**सयाजी भोसले**—( स. १६९० सुमार ) हा परसोजी विठोजी भोसल्याचा मुलगा होय.

यानें कांहीं स्वारांसह जाऊन बाळापूर आकोल्याजवळ बंडखोर लोकांच्या पुढाऱ्यास धरून हुजूर पेश केलें; व परत घरीं आल्यावर सयाजीनें रयतेच्या अनुकूलतेनें नांदनज येथें नवीन एका गांवाची वसाहत करून त्याचें नांव अलमगीरपूर असें ठेविलें. त्यावरून अलमगीर बादशाहा खुप झाला व मोठ्या गौरवानें त्याचे परवाने सयाजीचे नांवें करून अलमगीरपूर हा गांव ११६०८५४ दामांचा ( दामांचा म्हणजे २९५०० रुपयांचा; ४० दाम–१ रुपया ) दिवाणी फौजदारी हक्कासह जहागीर म्हणून दिला. त्या अव्वल परवान्यांचीं इंग्रजींत भाषांतरें झालीं आहेत.

याला मृत्युसमयीं दोन मुलगे होते. त्यांपैकीं थोरला राजरूप व धाकटा रुस्तुमजी ( मं. सप्तम सं. वृ. श. १८४१, पृ. ६७ ).

**सय्यद इब्राहीम**—( स. १३३६ ) हांसी–सिसी प्रांताचा सुभेदार. हा मदुरेचा सुभेदार सय्यद जलालुद्दीन हसनचा पुत्र. सय्यद जलालुद्दीननें बंड करून स्वातंत्र्य जाहीर केलें तरी याला मुहम्मद तुघ्लकनें सुभेदारीवरून कमी केलें नाहीं, पण मुहम्मद तुघ्लक तेलंगणच्या स्वारींतून आजारी पडून परत फिरला तेव्हां तो मेला अशीच सर्वत्र बातमी उठली. तेव्हां प्रांतिक सुभेदार स्वतंत्र होऊं लागले. यानेंहि स्वातंत्र्य जाहीर केलें, म्हणूनच याचा वध करण्यांत आला.

**सय्यद जलालुद्दीन अहसन**—(स. १३३५–४०) मावरचा सुभेदार. मावर म्हणजे मदुरा होय. तेथें यानें स्वातंत्र्य जाहीर केलें. मुहम्मद तुघ्लक पारिपत्य करण्याकरितां निघाला पण आजारी पडल्यानें वरंगळच्या पुढें आल्यावर त्यास परत फिरावें लागलें. यानें इब्न बतूता नांवाच्या सुप्रसिद्ध मूर प्रवाशास मुलगी देऊन जांवई केलें होतें. त्यानें लिहिलें आहे कीं, 'यानें स्वातंत्र्य जाहीर केल्यावर पांच वर्षांनीं याच्या एका अधिकाऱ्यानें याचा खून केला व अलाउद्दीन उदौजी नांव धारण करून गादी मिळविली.'

**सय्यद लष्करखान**—( स. १७५२–५६ ) हा सलाबतजंग निजामाचा दिवाण, पुढें वऱ्हाडचा सुभेदार. शेवटीं मक्केला गेला.

**सय्यद हुसेन**—सय्यद बंधु म्हणून प्रसिद्ध असलेल्या बंधूंपैकीं एक. हा प्रथम तीन वर्षे दक्षिणेंत होता. दक्षिणेंत आपल्या तर्फेचे लोक नेमून यानें दिल्लीकडे मोर्चा फिरविला ( स. १७१९ फेब्रु. ) व पहिल्यास पदच्युत करून दुसरा बादशाहा बसविला. शेवटीं बंधूंत फूट झाली. बादशाहाचा 'तोडाभीम' येथें मुक्काम असतां याचा खून झाला ( स. १७२० आक्टो. ८ ). याचा भाऊ अबदुल्ला सय्यद. याच्याच मार्फत शाहूनें बाद-

शाहाशीं दुसरा तह केला, व बाळाजी विश्वनाथानें दिल्लीस जाऊन येसूबाईस सोडविलें.

**सरफोजी भोसले**—( स. १७११–२८ ) शहाजी निपुत्रिक वारल्यामुळें त्याचा भाऊ सरफोजी तंजावरचा राजा झाला. याचा सर्व काळ अर्काटचा नवाब व त्रिचनापल्लीकर याच्यापासून राज्य राखण्यांत गेला. यानंतर कनिष्ठ बंधु तुकोजीकडे राज्य गेलें.

**२.** ( स. १७९८–१८३२ ) हा तंजावरच्या अमरसिंहाचे थोरले बंधु तुळाजीचा दत्तक पुत्र. यास इंग्रजांनीं गादीवर बसविलें व तंजावर संस्थान पूर्णपणें आपल्या ताब्यांत घेतलें. यानें आपला वेळ ग्रंथसंग्रह, विद्याप्रसार वगैरे करण्यांत घालविला. याला इंग्रजी येत होतें. यानें अनेक ग्रंथ विद्वानांकडून तयार करविले. याला शिल्प, संगीत, वैद्यक व ज्योतिष हीं अवगत होतीं. यानें धार्मिक व शैक्षणिक सुधारणा केल्या. हा लंडनच्या रॉयल एशि. सोसायटीचा ऑनररी मेंबर होता. याचा पुत्र शिवाजी.

**सरजूराम पंडित**—( काव्यकाल स. १६९१ ) एक हिंदी कवि. जैमिनिपुराणभाषाग्रंथाचा कर्ता.

**सरदारसिंह**—( स. १७६८–१८४२ ) हा बांगोरच्या शिवदानसिंहाचा पुत्र. जवानसिंग निपुत्रिक मरण पावल्यानें याच्याकडे मेवाडचें राज्य आलें. यानें लालसिंगाला मारल्यानें सर्व याच्या विरुद्ध होते. यास मुलगा नव्हता म्हणून याचा भाऊ सरूपसिंहास गादी दिली ( वीरविनोद भा. २ ).

**सरबुलंदखान**—( मृत्यु स. १७४२ ) मुबारिजखानानंतरचा माळवा व गुजराथचा सुभेदार. निजामाचा मामा हमीदखानानें ते प्रांत बळकावले होते. मराठेहि त्याला सामील झाले. शेवटीं यानें मराठ्यांशीं केलेला तह अमान्य झाल्यानें जोधपूरच्या अभयसिंहास याच्या जागीं नेमलें.

**सरस्वतीगंगाधर**—( स. १४५८ सुमार ) यालाच नामधारक असें म्हणत. यानें नृसिंहसरस्वतीचरित्र मराठींत ओवीबद्ध लिहिलें तें ' गुरुचरित्र ' या नांवानें प्रसिद्ध आहे. गुरुचरित्र हा ग्रंथ बावन्न अध्यायात्मक असून तो दत्तोपासक ब्राह्मणांच्या नित्यपठणांत आहे. या ग्रंथांत ३१।३२ या अध्यायांत पतिव्रता व विधवा यांचे आचार दिले आहेत. अ. ३६।३७ यांत ब्राह्मणधर्माचा आचार दिला आहे, व ठिकठिकाणीं अनेक धर्मपर विचार सांगून समाजास वळण देण्याचा प्रयत्न केला आहे. या ग्रंथाच्या पठणानें पिशाचबाधा दूर होते, अशी भाविक लोकांची श्रद्धा आहे. हा आपस्तंबशाखेचा कौंडिण्यगोत्री साखरे आडनांवाचा गृहस्थ होय. सायंदेव–नागनाथ–देवराव–गंगाधर असा यानें आपला वंश दिला आहे. आईचें नांव सरस्वती व मातामहाचें चौंडेश्वर. शाखा आश्वलायन ( ऋग्वेदी ), गोत्र काश्यप असा मातृकुलाचा निर्देश आहे. यांपैकीं सायंदेव व नागनाथ नृसिंहसरस्वतीचे साक्षात् शिष्य होते. गुरुचरित्राचें संस्कृतमध्यें भाषांतर झालें आहे ( गुरुचरित्र अ. १३।१४; ४१–४२ ).

**सरहपा**—( स. ८०० सुमार ) हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं सहावा सिद्ध. जात ब्राह्मण. गांव नालंदा. याचें दुसरें नांव राहुलभद्र किंवा सरोजवज्र. शबरपा व नागार्जुन याचे शिष्य. याचे अनेक ग्रंथ व हिंदी कविता आहेत.

**सरूपचंद गुप्त**—( स. १७८० सुमार ) हा जैन व्यापारी असून गोहदचे राण्याचे पदरीं होता. यानें ग्वाल्हेरचा किल्ला घेण्यास इंग्रजांस मदत केली.

**सरूपसिंह गुहिलोत**—( स. १८४२–६१ ) सरदारसिंहानंतर हा त्याचा धाकटा भाऊ मेवाडच्या गादीवर आला. याच्या वेळीं याचें राज्य इंग्रजानें घेतलें व तैनाती फौजेचा तह केला.

**सरुर उल्मुल्क**—(स. १४३५ सुमार) हा दिल्लीच्या मुबारक सय्यदाचा प्रधान. यानें मुबारकचा खून केला व मुहम्मद सय्यदाला गादीवर बसविलें. त्यानें याचा खून केला.

**सर्जेराव घाटगे**—( खून स. १८०९ ) याला सखाराम व तुळोजी असेंहि म्हणत. हा कागलचा राहणारा. हा परशुरामभाऊ पटवर्धनाकडून नानाफडणिसाकडे आला ( स. १७७६ ). नानावर कठीण प्रसंग आला असतां हा दौलतराव शिंद्याकडे गेला, आणि आपल्या बायजाबाई नांवाच्या रूपवती मुलीस त्यास देऊन हा त्याचा दिवाण झाला. बाजीराव व नाना फडणीस यांना केलेल्या मदतीबद्दल यावयाच्या रुपयाकरितां यानें अनन्वित प्रकार केले. कित्येक ठार झाले, कांहीं पळाले व कांहींनीं आत्महत्या केल्या. महादजी शिंद्यांच्या बायकांना यानें चाबकानें सडकलें. त्यामुळें त्यांना अनुकूलता मिळून युद्ध सुरू झालें. हा कैद झाला. बायजाबाईनें सोडविलें, पण यानें शिंदे बायांवर मारेकरी घातले. यानें शेणवी सरदारांची कत्तल केली. दौलतरावाच्या पाठोपाठ हा उत्तरेकडे गेला. इंदूरलाहि यानें असाच कहर केला. इंग्रजानें याला कारभारांतून काढण्याची अट घातली, तथापि दौलतरावाला याला अगदीं दूर करितां आलें नाहीं. शेवटीं मानाजी फाकड्याचा मुलगा आनंदरावानें याचीं भररस्त्यांत खांडोळीं केलीं. पुष्करला

याची छत्री आहे. हा ठेंगू, जाड, बटबटीत, घारा, गोरा, सफेत केसाचा मोठा क्रूर पुरुष होता. मराठी राज्याला फांसावर चढविणारा हा यमदूतच होता.

**सर्फराजखान**—( मृत्यु स. १७४० ) हा मुर्शीद-कुलीखानाचा नातू. याच्या पित्याचें नांव शुजाखान. हा उद्दाम होता.

**सर्वदेवसूरि**—प्रमाणमंजरी ग्रंथाचा कर्ता.

**सर्वभक्षपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं पंचाहत्तरावा सिद्ध होय. जात शूद्र. भमर शहराचा राहणारा. हा शबरी ( २ ) आणि भूसुक यांचा शिष्य. याचा करुणा-चर्याकपालदृष्टि ( तं. ४८।४६ ) हा ग्रंथ होय.

**सर्वसेन**—संस्कृत ' हरिविजय ' काव्याचा कर्ता.

**सर्वज्ञ**—( स. १७०० ) कानडी कवि. वीरशैव. 'सर्वज्ञवचन' नांवाचा त्रिपदी छंदांतील याचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. याच्या प्रत्येक वचनाच्या शेवटीं सर्वज्ञ असें पद येतें. याच्या या ग्रंथांत अनेक विषयांसंबंधीं चांगले विचार आले आहेत. त्यामुळें याचीं वचनें मराठींतील तुकारामाप्रमाणें कर्नाटकांत सर्वसामान्य लोकांच्याहि तोंडीं आहेत ( क. क. च. भा. २, पा. ५३२ ).

**सर्वज्ञानदेव**—सुयेनताई या चिनी प्रवाशानें हिंदु-स्थानांत धारण केलेलें नांव.

**सर्वज्ञात्ममुनि**—( स. ९७८ ) यानें ' संक्षेपशारीर ' नांवाचा शंकराचार्यांच्या आत्माद्वैतमताला पुष्टि देणारा ग्रंथ लिहिला. जीवाचा आत्म्याशीं संबंध सांगतांना प्रतिबिम्बवादाचा हा स्वीकार करतो. याच्यापूर्वी वाचस्पतिमिश्रानें अवच्छेदवादाचें चांगलें प्रतिपादन केलें, पण तें सोडून यानें प्रतिबिम्बवाद स्वीकारला.

**सलहदी पूरबिया**—( स. १५३२ ) हा तंवर घराण्यांतील असून रायसेन येथील राजा होता. याला चितोडच्या सांगा( संग्रामसिंह )ची मुलगी दुर्गावती दिली होती. याचा गुजराथचा सुलतान बहादुरशहा यानें पराजय केला तेव्हां हा मुसलमान झाला. बहादुरशहा सुरुंग लावून चितोड उडवून देऊं लागला तेव्हां याला बायकामुलांबद्दल वाईट वाटूं लागलें. म्हणून यानें बहादुरशहाला सांगितलें कीं, तूं माझ्या बायका-मुलांना सतावूं नकोस, मी लढाई बंद करवतों. हें ऐकून बहादुरशहानें मलिकअली शेर नांवाचा अधिकारी बरोबर देऊन याला चितोडवर पाठविलें. तेव्हां याची पत्नी राणी दुर्गावती हिनें याचा अत्यंत धिःकार केला.

तेव्हां हा शत्रूवर तुटून पडला आणि कामीं आला. राणी दुर्गावतीहि सातशें रजपूत स्त्रिया व आपलीं दोन मुलें यांसह अग्नींत उडी घेऊन परलोकीं गेली (ब्रिग, फिरिश्ता भा. ४, पृ. १२२ ).

हा मुसलमान झाल्यामुळें याचें रायसेनचें राज्य याचा भाऊ लखमनसेन ( लक्ष्मणसिंह ) याच्या ताब्यांत होतें. बहादुरशहानें रायसेनच्या किल्ल्याला वेढा दिला तेव्हां याचा पुत्र भूपतराय यानें महाराणा विक्रमादित्याकडून मदत आणली. पण पुढें बहादुरशहानें रायसेनचा किल्ला घेतला ( स. १५३२ ).

**सलाकम तिम्म राजू**—( मृत्यु स. १५४२ ) हा विजयनगरच्या अच्युतराय तुळुवाचा मेहुणा. व्यंकट अज्ञान असल्यानें हाच मुखत्यारीनें कारभार पाही. रामराय आर-विदूनें याला ठार करून सर्व सत्ता आपल्या हातीं घेतली. हे एकाच नांवाचे दोन भाऊ होते व त्याचा उच्चार सकल तिम्म राजू असाहि आहे.

**सलाबतखान**—( शीद्दीजोहार पाहा ).

**सलाबतजंग**—( स. १७५१-६१ ) निजाम-अलीचा भाऊ व कृष्णामुखाचे दक्षिणेकडील गुंटूरचा जहागीरदार. हा अडोनीस राहात असे. हैदरानें याजवर स्वारी केली असतां याच्याजवळ असलेल्या फ्रेंच सैन्याचा यास उपयोग झाला नाहीं, तेव्हां यानें इंग्रजांची मदत मागितली व त्याचे खर्चाकरितां गुंटूर प्रांत लावून दिला. त्यामुळें निजामअलीस फार राग आला. यांच्या भांड-णाचा फायदा पेशव्यास उदगीरचे लढाईत मिळाला ( पे. द. २५. २६९, २७४ ). हे दोघे एक झाल्यावर पेशव्यांना यांचा मोड करणें कठीण झालें. क्लाईव्हनें अर्काटला शह देऊन मच्छलीपट्टण ताब्यांत घेतलें तेव्हां यानें इंग्रजांशीं तह केला ( स. १७५९ ). या तहान्वयें इंग्रजांना उत्तर सरकार प्रांत मिळाला व फ्रेंच सैन्याची हकालपट्टी झाली. याचें दुसरें नांव बसालतजंग. शेवटीं निजामअलीनें यास कैदेंत टाकलें व पुढें ठार मारून स्वतः गादी बळकाविली.

**सहजयोगिनी चिन्ता**—ही चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं होती. हिनें 'व्यक्तभावानुगततत्त्वसिद्धी' हा ग्रंथ लिहिला.

**सहजानंद**—( स. १६३८-१६७८ ) रामदासपंचा-यतनांतील रंगनाथ हे याचे परात्पर गुरु व गुरु ब्रह्मानंद. याचे ग्रंथ—ज्ञानदीपिका व अमृतानुभवावर संस्कृत टीका. योगवासिष्ठसार हा अपुरा ग्रंथ याचा नसून माधवदासाचा असावा, असें राजवाडे म्हणतात ( मं. वा. इ. १८३६, ले. ८८ ).

**सहजानंदस्वामी**—( स. १७७३ ) स्वामी नारा-यण तो हाच. हा मूळ अयोध्येकडील राहणारा होता.

यानें गुजराथी भाषेंत 'वर्तमानधर्म' या नांवाचें मत लोकांस शिकवून पुष्कळ लोकांस आपल्या मतांत ओढलें. या मताचें नांव 'स्वामीनारायणपंथ' असें जरी चालत आहे, तरी यास 'उद्धवसंप्रदाय' असें म्हणतात; व वल्लभसंप्रदायास यानें बराच अडथळा आणला आहे.

**सहजोबाई**—(स. १७८१) चरणदासाची शिष्या. हिंदी कवयित्री (क. कौ. १).

**सहदेव भाडळी**—एक शूद्र ज्योतिषी. याचीं वचनें मराठी व हिंदी या भाषांत आहेत, आणि तीं अत्यंत लोकप्रिय आहेत (मं. १८३५, वा. इ. ले. २९).

**सहर**—(कुत्बुद्दीन लंगा पाहा).

**संकट**—(स. ९०४) काश्मीरच्या शंकरवर्मनाचा हा पुत्र होय. गोपाळवर्मन् यास त्याचा प्रधान प्रभाकरदेव यानें ठार मारिल्यावर गादीवर आला. हा गादीवर आलेल्या दिवसापासून अवघ्या सहा दिवसांतच मरण पावला. तेव्हां शंकरवर्मन्‌ची विधवा स्त्री सुगंधा ही राज्य करूं लागली (B.).

**संगम**—(स. १३३६ सुमार) विजयानगरच्या संगम घराण्यांतील हा मूळ पुरुष होय. याच्या बायकोचें नांव कामाक्षी असें होतें. याला हरिहर १ला, कम्पन १ला, बुक्क १ला, मारप्पा आणि मुद्दप्पा असें पांच मुलगे होते.

२. (स. १३४८–६१) हा पहिल्या बुक्करायाचा पुतण्या व कंपनाचा मुलगा. याचा भाऊ सावण यानें नेलोरजवळचा एक गांव ब्राह्मणांना दिला (ता. ३ मे १३५६); व तत्पूर्वी एक वर्ष गादीवर आला, असें नेलोर ताम्रपटांत म्हटलें आहे.

**संगराजित्**—(महाबतखान पाहा).

**संग्रामदेव लोहर**—(स. १०२९–५९) काश्मीरचा राजा. यावर गझनीच्या महमूदनें स्वारी केली.

**संग्रामसिंह**—(स. १७७८–१८२३) 'काव्यार्णव' नांवाच्या हिंदी ग्रंथाचा कर्ता. सिंगरामऊचा राजा.

**संग्रामसिंह गुहिलोत** (ऊर्फ संगराणा)—(जन्म स. १४८२ एप्रिल १२, अभिषेक स. १५०९ मे २४, मृत्यु स. १५२८ जाने. ३०) हा रायमल्लाचा पुत्र. याला राज्य मिळेल असें ज्योतिषानें सांगितल्यामुळें राजमल्ल व पृथ्वीराज हे वडील बंधु याचा द्वेष करूं लागले, आणि याला अज्ञातवासांत बरेच दिवस घालवावे लागले. गादीवर आल्यावर इडरचा राजा रायमल्ल याला मुलगी देऊन त्याचा भीम नांवाचा चुलता व त्याला साहाय्य करणारा गुजराथचा मुजफरशाहा यांचा पराभव केला, आणि त्याचें राज्य त्यास मिळवून दिलें.

दिल्लीच्या इब्राहीम लोदीनें स्वारी केली असतां यानें त्याचा धौलपुराजवळ पराभव केला व बयानेपर्यंत त्याचा पाठलाग केला. पण तेव्हां याचा उजवा हात तुटला व पाय कायमचा लंगडा झाला.

मांडूचा महमूद (दुसरा) व साहेबखा यांच्या भांडणांत मेदिनीराय नांवाच्या रजपुताच्या साहाय्यानें महमूदनें राज्य मिळविलें; पण त्याला मेदिनीरायाचें भय वाटून तो गुजराथकडे पळाला. मेदिनीरायानें याच्या साहाय्यानें त्यावर स्वारी करून त्याचा पराभव केला व महमूदहि जखमी होऊन हातीं लागला. पण त्याला बरें करून व अर्धे राज्य देऊन यानें सोडून दिलें. ही गोष्ट उदारपणाची असली तरी राजकारणाच्या दृष्टीनें अत्यंत चुकीची होती.

पण गुजराथच्या सुलतानानें पुनः लढाईची तयारी करून मलिक अयाजच्या नेतृत्वाखालीं चढाईला प्रारंभ केला. कारण मागल्या लढाईच्या वेळीं यानें गुजराथचें खूपच नुकसान केलें होतें. मागें उदारपणानें सोडलेला मांडूचा सुलतान महाराण्याविरुद्ध नेमका मलिक अयाजला येऊन मिळाला. पण मुसलमानी अधिकाऱ्यांत मतभेद असल्यानें पिछेहाट होऊन तह करून सर्व परत फिरले.

नंतर बाबर हिंदुस्थानांत आला आणि त्यानें पानपतच्या पटांगणांत मुक्काम करून दिल्लीचा बादशहा इब्राहिम लोदी यास युद्धांत ठार करून दिल्लीचें राज्य घेतलें (स. १५२६ एप्रिल २०). यापूर्वीहि बाबर हिंदुस्थानांत आला होता. दिल्ली ताब्यांत आली तरी त्या वेळीं प्रबळ असणाऱ्या याला त्याला जिंकावयाचें होतें. प्रथम लढाया होऊन प्रत्येक ठिकाणीं याची सरशी झाली. बाबरहि निराश झाला होता. हा सारखा जवळ येत चालला आणि बाबरचें सैन्य भयभीत होऊं लागलें. शेवटीं बाबरनें दारू सोडली आणि दारू पिण्याचीं मूल्यवान् पात्रें गरीबांना वांटलीं. कुराणावर हात ठेवून मरेपर्यंत लढण्याच्या सर्वांकडून शपथा घेतल्या, व याला तहाच्या वाटाघाटीला लावून आपली तयारी जोरांत सुरू केली. शेवटीं तह फिसकटला व लढाई सुरू झाली (स. १५२७ मार्च १७). प्रथम याचा जय होता, पण तोफखान्याच्या जोरावर मुसलमानांनीं चारहि बाजूंनीं रजपुतांना वेढा दिला. याला मर्मस्थानीं बाण लागल्यामुळें बेशुद्ध स्थितींत परत नेलें. कोणीतरी जबाबदार आहे असें दाखविण्या-

करितां ' झाला अज्जा ' राजचिन्हयुक्त होऊन राजाचें काम करीत होता. पण शेवटीं बाबरचा जय होऊन मुसलमान हिंदुस्थानांत स्थिर झाले.

या पराजयाचें मुख्य कारण पहिल्या विजयानंतर बाबरला तयारी करण्यास सवड देणें हें होय. खांडव्यास जय झाल्यावर हल्ला न थांबतां चढाई केली असती तर याचा जय नक्की होता. तसेंच हे शत्रूंचीं साधनें लक्षांत घेऊन युद्ध करीत नव्हते. शत्रूचा व्यूह व तोफा या लक्षांत न घेतां रजपूत केवळ तरवारीनें शौर्यानें लढत असत. तोफा व बंदुका यांच्याकडे नव्हत्या. तसेंच हा हत्तीवर असल्यामुळें त्यावर नेम धरण्यास सोपें गेलें, व हा परत गेल्याचाहि सैन्यावर परिणाम झाला. या पराजयाचा परिणाम रजपुतांवर व सगळ्या हिंदुस्थानावर झाला.

मूर्च्छित स्थितींत याला नेल्यावर बसवा गांवापाशीं हा शुद्धीवर आला. पण याला युद्धभूमींतून परत आणल्याबद्दल फार वाईट वाटलें. यानें पुनः युद्ध करण्याचीहि धडपड केली, पण दुर्दैवानें याला ग्रासलें होतें. तथापि उत्साहानें यानें प्रयत्न सुरू केला. बाबरलाहि याचें भय होतें. सारखे हल्ले करून याचें बळ क्षीण केलें पाहिजे असें त्यानें ठरविलें व त्याप्रमाणें मेदिनीरायावर त्यानें स्वारी केली व तो चंदेरीपर्यंत आला तेव्हां हा ही संधि उत्तम आहे असें समजून चंदेरींकडे निघाला. इरिचगांवीं याचा मुक्काम असतां हा पुनः युद्धांत पडतो आहे असें पाहून युद्धविरोधी रजपुतांनीं याला विषप्रयोग करून ठार केलें. शेवटीं हा काल्पी येथें मेला.

यानें अठ्ठावीस विवाह केले होते असें म्हणतात. याला सात मुलें होतीं. त्यांचीं नांवें–×भोजराज, ×कर्णसिंह, रत्नसिंह, विक्रमादित्य, उदयसिंह, ×पर्वतसिंह व ×कृष्णसिंह. चार मुली होत्या—१ कुंवरबाई, गंगाबाई, पद्माबाई व राजबाई. मुलांपैकीं ×अशी खूण केलेले हा जिवंत असतांच परलोकवासी झाले होते.

बाबरानें याच्याविषयीं लिहिलें आहे कीं, ' राणा संग आपलें शौर्य व तरवार यांनीं सर्वश्रेष्ठ झाला होता. याची शक्ति इतकी वाढली होती कीं माळवा, गुजराथ किंवा दिल्ली येथील सुलतान याला स्वतंत्रपणें एकटे जिंकूं शकत नव्हते. यानें दोनशें शहरांतल्या मशिदी पाडल्या व शेकडों मुसलमानांना कैद केलें. याचा मुलूख दहा कोटींचा होता व याच्या सैन्यांत एक लक्ष स्वार होते. शिवाय सात राजे, नऊ राव आणि १०४ छोटे सरदार होते. याचे तीनहि उत्तराधिकारी असेच योग्य असते तर हिंदुस्थानांत मोंगलांचें राज्य झालें नसतें. '

२. ( स. १६९०–१७३४ ) मेवाडच्या दुसऱ्या अमरसिंहाचा मुलगा. औरंगजेबाच्या अखेरच्या दिवसांत यानें वडिलाच्या वेळीं गेलेला प्रांत परत घेतला. फर्रुखसियरला यानें जिजिया कर उठविण्यास सांगितलें. हा मोठा स्वाभिमानी, धार्मिक आणि प्रजाहितदक्ष राजा होता. टॉड म्हणतो, ' बापा रावळच्या गादीचें महत्त्व रक्षण करणारा हा शेवटचा राजा होय.' यानंतर दुसरा जगत्सिंह गादीवर आला.

**संग्रामापीड कर्कोटक**—( स. ७४३–७५० ) हा वज्रापीडानंतर काश्मीरच्या गादीवर आला.

**संघदामा क्षत्रप**—( स. २२२ ) हा रुद्रसिंहाचा दुसरा मुलगा. हा महाक्षत्रप झाल्यानंतरचीं याचीं चांदीचीं नाणीं शा. श. १४४–१४५ मधील मिळालीं आहेत. यानें दोन वर्षेंहि पुरें राज्य केलें नाहीं. यानंतर याचा धाकटा भाऊ दामसेन अधिकारी झाला.

**संघमित्रा**–सम्राट् अशोकाची मुलगी. ही सिलोनांत धर्मप्रसारार्थ गेली होती. हिचा एक स्तूप स्तूपाराम येथें आहे.

**संजय**—( स. १२८८ ) बंगालींत महाभारताचा अनुवाद करणारा भारद्वाजगोत्री बंगाली ब्राह्मण. हा कृतिवासस्चा समकालीन होता ( क. कौ. ७ ).

**संताजी घोरपडे**—( मृत्यु स. १६९७ जून ) हा बाजी घोरपड्याचा चुलत भाऊ म्हाळोजी म्हणून होता त्याचा पुत्र. शिवाजीच्या वेळीं उदयास आलेला पराक्रमी सेनापति. धनाजी व संताजी हे दोघे पराक्रमी पुरुष एकत्र राहूं शकत नव्हते. राजारामानें याला सेनापति केलें ( स. १६९१ ). पण पुढें तें पद धनाजीस दिलें ( स. १६९६ ). तेव्हां दोघांचा विरोध वाढला.

यानें म्हसवडच्या नागोजी मान्याच्या भावास हत्तीच्या पायीं दिलें होतें. त्यामुळें त्यानें आपल्या बायकोच्या सल्ल्यानें याचा पाठलाग केला आणि श्रमून हा एका ओढ्यावर स्नान करीत असतां तरवारीनें यास ठार मारलें.

नागोजी माने याचें मुंडकें तोबऱ्यांत घालून धनाजीकडे जात असतां तें वाटेंत पडलें; तें एका मुसलमान शिपायानें औरंगजेबास नजर केलें तेव्हां त्यानें आनंदोत्सव करून त्या शिपायास खुषखबरखान अशी पदवी दिली ( नारो महादेव व मुरारराव घोरपडे पाहा ). याचे पुत्र राणोजी व पिराजी.

**संताजी जाधव**—( स. १७११ ) धनाजीचा पुत्र व चंद्रसेनाचा वडील भाऊ. चंद्रसेन निजामाकडे गेल्यावर शाहूनें यास सेनापति नेमलें. पण याच्या चमत्कारिक

स्वभावामुळें याला तें झेपलें नाहीं. नंतर मानसिंग मोरे व त्यानंतर तें पद दाभाड्याकडे गेलें.

**संताजी भोसले ( नागपूरकर )**—( मृत्यु स. १७१९ फेब्रु. २८ ) याचा भाऊ बापूजी. हा बाळाजी विश्वनाथाबरोबर दिल्लीस गेला. तेव्हां झालेल्या कत्तलींत पंधराशें लोकांसह हा कापला गेला ( ना. प्रां. इ. १, पा. ५१–५३ ).

**संध्याकरनंदि**—हा बंगाल्यांतील पालराजांपैकीं रामपालाच्या सांधिविग्रहिक प्रधानाचा पुत्र.

**संप्रति मौर्य**--(ख्रि. पू.२१६-२०७) हा कुनालाचा पुत्र. हा अशोकाच्या वेळीं युवराजपदावर होता. पुढें सर्व कारभार हाच पाही, पण वडील बंधु दशरथानंतर हा प्रत्यक्ष गादीवर आला. बौद्ध वाङ्मयांत जें अशोकला महत्त्व आहे तें याला जैन वाङ्मयांत आहे. यानें जैनधर्माचे प्रचारक हिंदुस्तानाबाहेरील देशांत पाठविले होते. यानें योद्धयांनाहि साधूंचा वेष देऊन धर्मप्रचाराकरितां रवाना केलें. याला दुसरा चंद्रगुप्त म्हणत ( मौर्य साम्राज्यका इतिहास, पा. ६५० ). बारा वर्षांचा भयंकर दुष्काळ पडल्यावर हा श्रुतिकेवलि भद्रबाहूबरोबर दक्षिणेंत आला आणि यानें चंद्रगिरीवर प्राणत्याग केला. या सर्व गोष्टी पहिल्या चंद्रगुप्ताच्या नसून दुसऱ्या चंद्रगुप्ताच्या म्हणजे याच्या आहेत. याच्या वेळीं हें राज्य कमजोर झालें. याच्यानंतर शालिशुक गादीवर आला. तिबेटांतील ग्रंथांत याचा उत्तराधिकारी वृषसेन दिला आहे. तो तिकडचा याचा अधिकारी असावा.

**संभवनाथ**—जैनांचा तिसरा तीर्थंकर.

**संभाजी आंगरे**—( मृत्यु स. १७४१ डिसें. १२ ) हा कान्होजी आंगऱ्यास मथुराबाईपासून झालेला धाकटा मुलगा. मानाजी व संभाजी या भावांच्या भांडणांत पेशव्यांनीं मानाजीस हातीं धरून यास विरोध केला. यानें शाहूच्या आज्ञेवरून जंजिऱ्याची मोहिम चालविली असतां इंग्रजानें हबशास मदत केली. पुढें तर पेशवे व इंग्रज हे दोघे एकत्र होऊन त्यांनीं यास ताब्यांत घेतलें.

**संभाजी कावजी**–( मृत्यु स. १६६९ ) हा प्रथम शिवाजीचा भालदार होता. अफजलखानाच्या भेटीच्या वेळीं विश्वासूक म्हणून जिवा महाला व हा असे रक्षक बरोबर घेतले होते. शिवाजीस खानानें काखेंत दाबून धरलें आणि वार केला, तेव्हा शिवाजीनें वाघनखें चालविलीं. ही गडबड ऐकून सय्यदबंडा हा खानाचा शरीररक्षक पुढें धांवला. त्याचा समाचार जिवा महाला यानें घेतला. पालखीचे भोई गडबड करणार इतक्यांत यानें पट्यानें पालखीच्या भोयांच्या पायाच्या ढोण्या शिरा तोडून पालखी भुईस पाडली ( मराठीदप्तर, रुमाल १. पृ. ३० ), आणि खानाचें शिर कापून शिवाजीस दिलें. आणि तिघेजण जलदीनें गडावर आले. तेथें याची वाहवा करून चाकणच्या पागेवरील यास मुख्य नेमलें. पुढें कांहीं काळ शिवाजीची याच्यावर गैरमर्जी झाली होती. शाहिस्तेखानानें चाकणास वेढा घातला तेव्हां हा त्यास जाऊन मिळाला. ' बळकट घोडे उचलावे ऐसें बळ, मर्द होते' ( चि. २११ ) अशी याची शक्ति पाहून खान खूष झाला व चाकण सर केल्यावर यास तेथील हवालदार नेमलें. स. १६६९ अखेर मोगलांवरील मोहिम सुरू झाली तेव्हां चाकण लुटून सर केलें आणि शिवाजीच्या लोकांनीं यास ठार केलें.

**संभाजी भोसले**—(मृत्यु स. १६५५) हा शहाजीचा वडील पुत्र व शिवाजीचा ज्येष्ठ बंधु. याचा जन्म वेरूळ येथें झाला (मराठी दप्तर रु.१). याच्या बारशाच्या दिवशीं खुद्द मूर्तिजा निजामशाहा नामकरणविधीस हजर होता. हा आपल्या बापाबरोबर स. १६३६ मध्यें पुणें प्रांत सोडून कर्नाटकांत गेला. शिवनेरी गडाचा गडकरी विजयराव याची मुलगी जयंती ही संभाजीस दिली होती. बृहदीश्वर शिलालेखांत गडकऱ्याचें नांव विश्वासराव असें दिलें आहे. शिवाय गौरीबाई व पार्वतीबाई अशा आणखी दोन स्त्रिया यास होत्या. शहाजीस मिळालेल्या जहागिरींपैकीं बंगळूर व कोलार यांवर याचा अंमल स. १६४७ पासून होता. याचें वास्तव्य बहुतेक कोलार येथें असे. स. १६५५ मध्यें आदिलशाही अमलाखालीं कनकगिरीच्या संस्थानांत बंडाळी झाली तेव्हां संभाजी बंडखोरांवर चालून गेला. याच युद्धांत तोफेचा गोळा लागून हा मरण पावला. विजापुराहून त्याच कामावर रवाना झालेल्या अफझलखानानें याला पुढें पाठवून मागून याचा पाठपुरावा न केल्यामुळें हा मेला. यामुळें शहाजीचाहि अफझलखानावर राग झाला.

कोलार प्रांत चिक्क रायल तिम्मा गौडा याजपासून जिंकून तेथें शहाजीनें संभाजीस अधिकारी नेमलें. याची स्त्री मकाऊ आईसाहेब कसबे जिंतीनजीक पळसदेव ( भीमातीरीं ) येथें पाटिलकीच्या वतनावर शहाजीनें पोंचविली. यास उमाजीराजे नांवाचा पुत्र असून ( जन्म ता. २५ नवंबर १६५४ ) उमाजीच्या बायकोचें नांव सखूबाई असें होतें. यास मलकोजी नांवाचा पुत्र असल्याचा उल्लेख सांपडतो. शिवाय सुरतसिंग नांवाचा मुलगा

होता. त्याचींहि पत्रें उपलब्ध आहेत. तो उमाजीचा सख्खा भाऊ असून उमाजीपेक्षां वडील होता.

**संभाजी (छत्रपति)**—(जन्म स. १६५७ जून १४-वध स. १६८९ मार्च ११) हा थो. शिवाजीचा वडील मुलगा आणि मराठ्यांचा दुसरा छत्रपति. याचा जन्म पुरंदरास झाला. हा दोन वर्षांचा होतांच याची आई सईबाई वारली. तेव्हां जिजाबाईनें याला वाढविलें. याला जयसिंगानें केलेल्या पुरंधरच्या तहांत पांच हजारांची मनसब द्यावी असें ठरलें होतें. पुढें आग्र्याहून सुटून आल्यावर ती मनसब यास देण्यांत आली. त्याप्रमाणें हा बऱ्हाणपुरानजीक मोगलांच्या छावणींत दोन वर्षें जाऊन राहिला. नंतर अण्णाजी दत्तोस मदतीस देऊन विजापूरकरांशीं युद्ध करण्याचें काम यावर सोंपविण्यांत आलें (स. १६७२-७३). तेव्हांपासून हा पन्हाळ्यास राहूं लागला. पुढें यानें एका ब्राह्मणाच्या स्त्रीवर अत्याचार केल्यामुळें यास शृंगारपुरीं ठेवण्यांत आलें. तेथून हा स्त्रीसह रातोरात मोगलांकडील दिलेरखानास जाऊन मिळाला (स. १६७८ नवं.). पुढें हा पुनः शिवाजीकडे आला. तेव्हां यास पन्हाळगडावर नजरकैदेंतल्यासारखें ठेवून जनार्दनपंत हणमंत्याच्या नजरेखालीं दक्षिणेकडचा कारभार याच्याकडे सोंपविला होता.

शिवाजी परलोकवासी होतांच संभाजीस कळूं न देतां राजारामास गादीवर बसविलें आणि साबाजी भोसल्यानें त्याची क्रिया केली. सोयराबाईनें पुढाकार घेऊन याचा बंदोवस्त पक्का करण्याचीं पत्रें रवाना केलीं. याचा बंदोवस्त करणाऱ्या सोनाजी नायकास यानें ठार मारलें, किल्ला ताब्यांत घेतला आणि कऱ्हाडकडे असणाऱ्या सेनापति हंबीरराव मोहित्याला आपणाकडे वळविलें. चहूंकडे पत्रें लिहून आणि गोड बोलून लोक आपल्या लगामीं लावले. हिरोजी फर्जंद व जनार्दनपंत हणमंते यांस कैदेंत टाकलें. अण्णाजी दत्तो व मोरोपंत पिंगळे हे पन्हाळ्याकडे निघाले होते. त्यांना पकडून आणविलें. पण रायगड घेतल्यावर राज्याभिषेकाच्या वेळीं त्यांना सोडलें (स. १६८० जुलै ७). मोरोपंत मेला त्याचे जागीं त्याचा पुत्र निळोपंताची नेमणूक केली. याच सुमारास औरंगजेबानें रजपुतांवर पाठविलेला पुत्र अकबर रजपुतांना फितुर होऊन औरंगजेबाकडून पराभव पावून दुर्गादासाबरोबर दक्षिणेंत संभाजीकडे आला होता. त्याचा विचार मराठ्यांच्या साहाय्यानें औरंगजेबास तोंड देण्याचा होता. औरंगजेबहि त्याच्या पाठोपाठ दक्षिणेंत आला (स. १६८१).

पण या वेळीं रायगडावर संभाजीच्या विरुद्ध कट झाला. आणि यानें 'अण्णाजी दत्तो, त्याचा बंधु सोमाजी, हिरोजी फर्जंद, बाळाजी आवजी यांस परळीखालीं कैद करून मारलें.' 'कर्नाटकांत श्यामजी नाईक पुंडे यास कैद करविलें. महादेव अनंत व आणखी तीन इसम यांस हत्तीचे पायीं बांधून ठार केलें.' सोयराबाईलाहि यानें ठार केलें. या वेळीं तिच्या माहेरची शिर्केमंडळी प्राणभयानें मोगलांना मिळाली. असे अनेक लोक यानें ठार केल्याचे उल्लेख आहेत. जुन्या व स्थानिक लोकांसंबंधीं याला संशय वाटूं लागल्यामुळें यानें कविकलश ऊर्फ कवजीसारखा अगदीं परका मनुष्य जवळ केला असावा. तथापि अष्टप्रधानांचीं कामें जुन्या घराण्यांकडे थोड्या फरकानें चालू होतीं. रघुनाथ नारायण हणमंते हा मोठा नजराणा घेऊन लवाजम्यानिशीं यास भेटण्यास आला. तेव्हां यानें बिरवाडीस भव्य मंडप उभारून त्याची भेट घेतली. त्यास अमात्यपद दिलें, पण तो लवकरच परत गेला.

रायगडावर स्थिरता केल्यावर याला जंजिऱ्याच्या सीदी कासमकडे वळावें लागलें. पण त्याला पोर्तुगीजांची मदत होत असल्यामुळें याला पोर्तुगीजांवर स्वारी करावी लागली. चौलच्या वेढ्यांत यास अपयश आलें, पण फोंड्याच्या वेढ्यांत यास यश मिळालें (स. १६८३) व पुढें तह झाला (जाने. १६८४). पण युद्धाच्या खर्चाची रक्कम मागतांच सावंताला पुढें करून पोर्तुगीजांनीं पुनः युद्धाला सुरुवात केली. संभाजी तडफेनें सावंताला तोंड देत होता. सीदी, पोर्तुगीज व सावंत यांबरोबरच मोगलांशींहि याचे निकराचे सामने या वेळीं चालू होते.

शहाजादा शहाअलम दक्षिणेंत होता. त्याला बोलावून घेऊन बहादूरखानाला औरंगजेबानें इकडे धाडलें. त्यानें येतांच चांदवड जवळच्या अहिवंत किल्ल्यास वेढा घातला (स. १६८० जुलै). त्याच वेळीं हंबीररावानें बऱ्हाणपूर लुटलें आणि तो सुरक्षित परतला. संभाजीनें बहादूरखानाशीं धावपळीचें युद्ध सुरू ठेवलें. औरंगजेबाच्या हसनअली, दलपत बुंदेला, शिहाबुद्दीन वगैरे सेनापतींनीं याच्या मुलखांत धुमाकूळ सुरू केला. एकदां तर डोकीचें पागोटें जमिनीवर आपटून 'संभाजीचा पाडाव करीपर्यंत पुनः पागोटें घालणार नाहीं.' असें औरंगजेब बोलला (ता. ३०-७-१६८२).

मराठ्यांनीं त्यांना जागोजाग अडवून अगदीं जेरीस आणलें (जानी बेगम पाहा). कल्याण, औरंगाबाद, चांदा, बेदर, फलटण व रायगड एवढ्या विस्तृत टापूंत यानें बादशाहाशीं दिलेली लढाई इतिहासांत अगदीं अपूर्व आहे (स. १६८३).

पुढेंहि बादशाहानें जोराची मोहिम सुरू केली व आपण नगरपाशीं सूचना देत राहिला. पण त्यांतहि संभाजीलाच जय मिळाला ( स. १६८५ ).

तेव्हां तो खर्चाच्या दृष्टीनें अगदीं टेकीस आला. विजापूर व गोवळकोंडा येथील राज्यें संभाजीला मदत करीत असल्यामुळें याला आपणास जिंकतां येत नाहीं, याकरितां औरंगजेबानें तीं राज्यें जिंकून खालसा केलीं. मोगली सैन्य तिकडे गुंतलें असतां मराठी सैन्यानें लूट मिळवून आपली स्थिति सुधारली. पण याचा सेनापति हंबीरराव वाईकडे सर्जाखानाशीं लढत असतां गोळी लागून ठार झाला.

विजापूर व गोवळकोंडा हीं राज्यें घेतल्यावर औरंगजेबाचें सैन्य जिंजी वगैरे मराठ्यांच्या कर्नाटकांतील मुलुखाकडे वळलें, तेव्हां महाराष्ट्रांतील मराठ्यांच्या सैन्याला तिकडे जावें लागलें.

अशा स्थितींत चहूंकडे नाकेबंदी करून व बातमी ठेवून यास संगमेश्वरीं पकडलें ( शेखनिजाम पाहा ) आणि हत्तीवर बांधून बादशाहाकडे आणलें.

मुसलमानी धर्म स्वीकारण्याची मागणी यानें धिःकारपूर्वक नाकारली आणि हा मरणास तयार झाला. प्रथम याचे डोळे काढले व कलुषाची जीभ तोडली. पंधरा दिवसपर्यंत एक एक अवयव तोडून कुत्र्यास खावयास दिला, आणि शेवटीं याचा शिरच्छेद करण्यांत आला ( स. १६८९ मार्च ३, फाल्गुन वद्य ३० शके. १६१० )

पकडल्यापासून सव्वा महिन्यानें तुळापुराजवळ वढू येथें याचा शिरच्छेद झाला व त्या मस्तकाला तुळापुरीं अग्नि दिला.

**२.** ( कोल्हापूरचा )-( स. १६९३-१७६० ) हा छत्रपति राजाराम व राजसबाई यांचा मुलगा. याचा जन्म जिंजीस झाला. हा कोल्हापूरच्या गादीवरील दुसरा छत्रपति होय. यानें आपल्या शिवाजी नांवाच्या सावत्र भावास व त्याची आई ताराबाई यांना कैदेंत टाकून आपल्या आईच्या मदतीनें कोल्हापूरची गादी मिळविली ( स. १७१४ ). शिवाजी वेडसर होता.

हा गादीवर आल्यावर रामचंद्र नीळकंठ अमात्यानें आपला आज्ञापत्र नांवाचा राजनीतीवरील उत्कृष्ट ग्रंथ लिहिला ( स. १७१६ नवं. १९ ); आणि राजकारणांतून आपलें अंग काढून तो संन्यासी झाला. दमाजी थोराताच्या साहाय्यानें यानें शाहूच्या मुलुखावर शह बसविण्यास सुरुवात केली. शाहूनें बाळाजी विश्वनाथाच्या साहाय्यानें याचा वडगांवीं पराभव केला ( स. १७१८ ). हा पुनः त्रास देऊं लागला तेव्हां बाळाजीनें उरूणबहे येथें याशीं लढाई दिली ( स. १७२० ). शाहूचें आसन स्थिर होऊन उत्कर्ष होत चाललेला यास सहन होईना. हा कृष्णा व तुंगभद्रा यांच्यामधील प्रदेशावर आपली मालकी समजत असे. तिकडेहि आक्रमण सुरू झालें. तेव्हां चंद्रसेन व निजाम यांच्याशीं संगनमत करून यानें शाहूशीं झगडा सुरू केला. तीन वर्षें स्वारीवर होता ( स. १७२५-२८ ). तेव्हां कोल्हापूरचा कारभार राजसबाई पाहत असे. शेवटीं लढाईत याचा पराजय होऊन वारणेचा तह झाला आणि उघड चालू असलेला तंटा मिटला ( स. १७३१ ). पुढें परस्पर सलोख्यानें वागत. वरचेवर एकमेकांच्या भेटीहि घेत. तथापि किरकोळ राजकारणें चालत. बंडखोरांना उत्तेजन मिळे व प्रसंगीं साताराकर व पुणेकर यांच्याविरुद्ध डोकें वर करण्याचें काम शेवटपर्यंत चालू असे. वडगांवाहून टापेनर्जाक माळावर हा मृत्यु पावला. गांव वसवून त्याचें नांव संभापूर असें ठेवलें ( स. १७६० डिसें. २० ). याच्या सात बायकांपैकीं तोरगलच्या शिंदे घराण्यापैकीं जिजाबाई कर्तृत्ववान् होती.

सामान्यतः शाहू व हा प्रेमानें वागत. पेशव्यानें यास त्रास दिल्यास शाहू याचा पक्ष घेऊन पेशव्यांना जरब देत असे. आपल्यामागें साताऱ्याच्या गादीवर यालाच बसविण्याचा शाहूचा विचार होता. पेशव्यांनाहि सोयीच्या दृष्टीनें दोनहि छत्रपतींच्या गाद्या एक करण्याची आतुरता होती. पण शेवटीं ताराबाईनें रामराजाला गादीवर बसविण्याची शाहूकडून व्यवस्था करविली.

**संभाजी मुधोजी भोसले**—( मृत्यु स. १७१६ ) परसोजीचा भाऊ. शिवाजीचा अंत्यविधि याच्या हस्तें झाला असावा.

**संभाजी शिर्के**—हा प. रघूजीची पत्नी सकवारबाई हिचा भाऊ होय. हा प. रघूजीच्या प्रमुख मराठे सरदारांपैकीं एक होता ( ना. प्रां. इ. ).

**संभूनाथ बाबा**—( स. १७६९ सुमार ) हे जातीनें कासार असून यांचें उपनांव ‘ धुमाळ ’ असें होतें. नाथबाबांची समाधि तळेगांव ढमढेरे येथें आहे. समाधीजवळच श्रीविश्वेश्वराचें देऊळ आहे. तें ‘नाथां’चें देवालय या नांवानेंच संबोधिलें जातें.

**संयोगिता**—( जयचंद पाहा ).

**संवरभद्र**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं होता. यानें वज्रगीतावाद ( तं. ४४।२१ ) हा ग्रंथ लिहिला.

**संसारचंद्र**—(स. १४४०) यानें भवनचें (कांगडा) वज्रेश्वरीचें देऊळ बांधलें ( हिं. भा. अ. पा. ८२-८३ ).

**सागरपा**—हा चौऱ्यांशीं सिद्धांपैकीं चौऱ्याहत्तरावा सिद्ध होय. देश–कांची. यानें आलिकालिमहायोगभावना ( तं. ४८–८० ) हा ग्रंथ लिहिला.

**सातवाहन**—सातवाहन राजे मूळचे महाराष्ट्रीय असून त्यांपैकीं कांहीं शेवटले पुरुष आंध्रांत गेले असावेत. 'कुन्तलः शातकर्णिः' हें नांव वात्स्यायनाच्या कामसूत्रांत आलें आहे 'सातियपुतो'चा अशोकाच्या लेखांत निर्देश आहे. शातकर्णि शालिवाहन, सातवाहन व आंध्रभृत्य एकच होत.

यशिवाय काश्मीरांतहि एक सातवाहन दिविरवंशांतील दिद्दा राणीचा आजा होता. तिचा संग्रामदेव लोहर पुतण्या होय ( स. १००० सुमार ). त्याचा दक्षिणेंतील या घराण्याशीं कांहीं संबंध असावा.

**साताप्पा शिलारखाने**–(स.१७२०-६० सुमार) हा होनाजी बाळाचा आजा असून उत्तम लावण्या करी. याची समाधि पुणें येथें संगमावर बांधली. तेथें श्रावणी सोमवारीं तमासगीर हजेरी देतात. याचा पुत्र बाळा बहिरु होय.

**सादतअली**—( मृत्यु स. १८१४ ) अयोध्येचा नवाब.

**सादतखान**—(स.१७२४–३९) अयोध्येचा सुभेदार. यास मुहम्मद अमीन म्हणत. याचा बहुतेक काळ मराठे व नादीरशाहा यांच्याशीं लढण्यांत गेला. यानें फैजाबाद शहर वसविलें. नादिरशहाच्या छळानें यानें विष खाल्लें.

**सादुल्लाखान**—(मृत्यु. स. १६५५) शहाजहान बादशहाचा वजीर व औरंगजेबाचा शिक्षक. या पुरुषाचा कित्ता सर्वांनीं घ्यावा असें औरंगजेबानें याबद्दल लिहिलें आहे.

**साबाजी अनंत चतुर**—( चतुर साबाजी पहा ).

**साबाजी रघूजी भोसले**—पहिल्या रघूजीचा धाकटा मुलगा व जानोजीचा भाऊ ( भवानी काळो व मुधोजी भोसले पाहा ). याचा शिक्का–रघुवीर चरणीं तत्पर साबाजी भोसले निरंतर.

**सामराज**—सुदामचरित व धूर्तनर्तक प्रहसनाचा कर्ता.

**सामलभट**—( जन्म स. १६४० ) हा अहमदाबादेजवळ गोमतीपूरचा राहणारा. हा प्रसिद्ध गुजराथी कवि प्रेमानंद याचा विरोधी होय. हा जातीचा श्रीगौड माळवी ब्राह्मण असून यास संस्कृत, हिंदी, फार्सी वगैरे भाषा अवगत होत्या.

यानें एकंदर २६ काव्यें लिहिलीं. त्यांत राखीदास पाटील व गमानजी भाट यांची यास फार मदत झाली. 'रावणमंदोदरीसंवाद,' 'मदनमोहना,' 'राखीदासनी चरित्र,' वगैरे याचीं काव्यें सुप्रसिद्ध आहेत. याला मधून-मधून कूट श्लोक घालण्याची संवय होती. यानें सिंहासनबत्तिशी, वेताळपंचविशी, शुकबाहात्तरी, नंदबत्तिशी, रेवाखंड यांचीं गुजराथींत भाषान्तरें केलीं. तसेंच रणछोडदेवांवर कित्येक श्लोक व शिवपुराण हें लिहिलें.

**सामलवर्म**—( स. १०७९ सुमार ) हा बंगाल्यांतील वर्म घराण्यांतील जतवर्म व वीरश्री यांचा पुत्र. याचा पुत्र भोज हा वैष्णव होता. बौद्धांना देणगी दिल्यानें विष्णु प्रसन्न होतो असें हा मानी. हा वैदिकांचें आदरातिथ्य करी ( मॉडर्न रिव्ह्यू १९३२ ).

**सामंतसिंह गुहिलोत**—( स. ११७४ ) हा क्षेमसिंहानंतर मेवाडच्या गादीवर आला. यानें गुजराथच्या अजयपालास जिंकून चितोड परत घेतला ( स.११७४ ). याचें राज्य कीतू चौहाणानें घेतलें तें कुमारसिंह नांवाच्या धाकट्या भावानें परत मिळविलें व तो राजा झाला. तेव्हां हा बागड( डुंगरपूर )चा राजा झाला.

**सामंतसेन**—( स. १०८० ) बंगाल्यांतील सेन घराण्याचा मूळ पुरुष. याचा पुत्र हेमंतसेन. हा मूळचा कर्नाटकांतील होता. हा वृद्धपणीं गंगाकिनारीं येऊन राहिला.

**सायण**—( मृत्यु स. १३८७ ) हा माधवाचार्याचा सख्खा भाऊ. याचीं मातापितरें अनुक्रमें मायण व श्रीमती होत. हा कृष्णयजुर्वेदी भारद्वाजगोत्री बौधायनशाखेचा ब्राह्मण होता. शृंगेरीचे स्वामी विद्यातीर्थ व भारतीतीर्थ यांच्या सांगण्यावरून माधवाचार्य बुक्काचा कुलगुरु झाला, आणि त्याच्यामुळें सायण व भोगनाथ या बंधूंचाहि दरबारांत प्रवेश झाला. हा प्रथम कंपरायाचा महाप्रधान होता. हरिहरामागून तोच खरा राज्याचा वारस असल्यामुळें 'सुभाषितसुधानिधीं'त सायणानें त्याचा गौरव केला आहे. त्याचा पुत्र संगम. 'संगमाचें राज्य म्हणजे सायण मंत्र्यावर अवलंबून असलेलें राज्य' असें भोगनाथानें 'उदाहरणमालें'त म्हटलें आहे ( सोर्सेस वि. हि.१९१९, पा. ४९ ). यानें संगमाची प्रधानकी करीत असतां 'माधवीया धातुवृत्तिः,' 'प्रायश्चित्तसुधानिधिः' ( कर्मविपाक ) व 'अलंकारसुधानिधिः' हे ग्रंथ लिहिले. 'अलंकारसुधानिधि' लिहून झाल्यावर हा बुक्काच्या सेवेंत दाखल झालेला दिसतो. बहुतेक संगम मेल्यानंतर यास बुक्काला कथा सांगण्याच्या कामावर नेमिलें, असें माधवाचार्यानें पुरुषार्थसुधानिधींत म्हटलें आहे ( हि. का. व्हा. ६, पा. ७०८ ). नंतर वेदार्थाचें कामहि याच्याकडे आलें ( स. १३६० सुमार ).

बुक्क व हरिहर यांच्या वेळीं हा वेदभाष्याचें काम करीत असतां याला अनेक पंडितांचें साहाय्य घ्यावें

लागलें असेल. ऐतरेय आरण्यकावरील भाष्याचा कांहीं भाग उत्तमामृत स्वामीचा शिष्य ज्ञानामृत यतीनें रचिला, असा प्रथमारण्यकाच्या शेवटीं कांहीं प्रतींत निर्देश आहे. तसेंच वेदभाष्याला साहाय्य केल्याबद्दल नारायण वाजपेययाजी, नरहरी सोमयाजी व पंढरी दीक्षित या तिघांना कांहीं भूमिदान देण्यांत आल्याचा एक ताम्रपट उपलब्ध आहे. ताम्रपटावरून असें दिसतें कीं स. १३८१ मध्यें वेदभाष्याचें काम पुरें झालें होतें. त्याकरितां हरिहरपुत्र चिक्करायानें या ब्राह्मणांना कांहीं वराह ( नाणें ) दिले होते. त्यांबद्दल ही जमीन दिली ( म्हैं. अर्का. रिपोर्ट १९०८, पा. १४ ). तैत्तिरीयसंहितेच्या आरंभींच्या कांहीं भागाचें भाष्य, आरंभ व शेवट पाहतां माधवाचार्याचें असावें असें दिसतें.

प्रथम कृष्णयजुर्वेद, नंतर ऋग्वेद, नंतर सामवेद आणि नंतर अथर्ववेद अशीं यानें भाष्यें लिहिलीं. माधवानें भाष्याचा आरंभ केला म्हणून माधवीय वेदार्थप्रकाश असें यानें आपल्या भाष्याचें नांव शेवटपर्यंत ठेवलें. हें काम चालू असतां प्रथम माधवाचार्य वारले. नंतर बुक्कराय वारला. हरिहराची कारकीर्द सुरू झाली तेव्हां यानें अथर्ववेदाचें भाष्य लिहावयास घेतलें असें त्या वेदाच्या उपोद्घातावरून दिसतें. हें काम स. १३८१ ( श. १३०३ दुर्मति ) मध्यें पूर्ण झालेलें दिसतें.

याला कंपण, मायण व शिंगण नांवांचे तीन मुलगे होते. यांपैकीं सिंगण हा वेदविद्येंत निष्णात होता असें भोगनाथाच्या उदाहरणमालेंतील निर्देशावरून दिसतें ( सोर्सेस ऑफ दि विजयनगर हिस्टरी, पा. ४९ ).

**सायरस**—हखामनीषीय घराण्यांतील राजा ( कुरुस् व सिकंदर पाहा ).

**सारंग गख्खर**—( स. १५४० सुमार ) शेरशाहानें याचें कातडें काढून याला ठार केलें.

**सारंगदेव**—( स. १२७४–९६ ) हा वाघेल वंशांतील अर्जुनदेवाचा दुसरा पुत्र. हा आपला थोरला भाऊ रामदेव याच्यानंतर गादीवर आला. याच्या वेळचा शिलालेख आबू येथील विमलशाहच्या मंदिरांतील भिंतीवर लावलेला आहे (स.१२९३). यानें गोगदेवाचा पराभव केला होता असें फार्सी तवारिखांवरून समजतें. गोगदेव प्रथम माळव्याच्या राजाचा प्रधान होता, नंतर संधि साधून त्या राज्याचा अर्धा भाग त्यानें मिळविला होता. याच्या वेळीं काव्यप्रकाशवरील जयंती टीकाकार जयंत होऊन गेला.

**सारंगधर**—( स. १३९६ ) यानें हमीररासा व हंमीरकाव्य हिंदींत लिहिलें.

**सालवर्मन्**—( अनंतराज पाहा ).

**सालोमालो**—( तुकाराम पाहा ).

**सावण संगम**—( स. १३५१–६४ ) हा विजयनगरच्या पहिल्या कंपन संगमाचा पुत्र.

२. ( स. १३५० सुमार) मारप्प संगमाचा पुत्र.

**सावता माळी**—(समाधि स. १२९५) हा पंढरपूरनजीक अरणगांवचा राहणारा. मोडनिंब स्टेशनापासून तीन मैलांवर गांव आहे. तेथें याची बाग व विहीर अद्यापहि दाखवितात. हा ज्ञानेश्वराच्या तीर्थयात्रेंत होता. याचे कांहीं अप्रसिद्ध अभंग श्रीमंत बाळासाहेब मिरजकर यांचेकडे आहेत. 'सावत्यानें केला मळा । विठ्ठलपाई गोविला गळा' अशी याची वृत्ति होती. समाधि शके १२१७ आश्विन व. १४.

**सावित्रीबाई भोसले**—( मृत्यु स. १७३१ सुमार ) ही रुस्तुमराव जाधवाची मुलगी असून शाहूची बायको होती.

२. ( मृत्यु स. १८६० ) ही नागपूरच्या अप्पासाहेब भोसल्याची पत्नी. राज्य खालसा झाल्यावर हिला दहा हजार दरमहा वेतन मिळे ( ना. प्रां. इ. ४६६ ),

**साहसी**—( सुहांडी पाहा ).

**साहिलवर्मन्**—जयपाळ आणि सबक्तगीन यांच्या युद्धांत हा चंबाचा राजा जयपाळच्या बाजूनें हजर होता ( चंपा गॅझेटियर; हि. भा. अ. पा ४० ).

**साळुव**—( स. १५५० सुमार ) कानडी कवि. जैन. पिता-धर्मचंद्र, गुरु-श्रुतकीर्ति, ग्रंथ-साळू-भारत, रसरत्नाकर, वैद्यसांगत्य. शिवाय शारदाविलासहि याचाच असावा. याचा आश्रयदाता तैलपाच्या वेळचा कोंकणचा महामंडलेश्वर साळुवमल्ल हा होता. साळुवमल्लहि कवि होता. साळुवमल्ल व त्याच्या बहिणीचा मुलगा साळुवदेव यांच्या इच्छेनुसार यानें भारत लिहिलें.

याच्या साळुवभारताला नेमीश्वरचरित्र असेंहि म्हणतात. याच्यांत हरिवंश व कुरुवंश सांगितला आहे. रसरत्नाकर हा ग्रंथ शृंगारादि रस व नायकनायिका वगैरे भेद सांगणारा आहे. वैद्यसांगत्य हा ग्रंथ वैद्यकावरील आहे. शारदाविलास हा ग्रंथ अर्धवट उपलब्ध असून उपलब्ध असलेल्या दुसऱ्या आश्वासांत व्यंग्यार्थाचें महत्त्व वर्णिलें आहे. हा शेवटला ग्रंथ विशेषतः साळुवाची कीर्ति वाढावी म्हणून लिहिला आहे ( क. क. च. भा. २ पा. २४४ ).

**साळुव तिम्मद**—(स. १५१२-४२ सुमार) विजयनगरच्या कृष्णदेवराय तुळुवाचा मुख्य मंत्री. कृष्णराया-

नंतर विजयनगरच्या गादीवर येणाऱ्या अच्युतरायाचाहि हा कांहीं दिवस मंत्री होता.

**साळ्या रसाळ**—हा शुक्लयजुर्वेदी ब्राह्मण पंढरपुरास राहत असे. हा चांगला विद्वान् व विठोबाचा परमभक्त असे. यानें ओवीबद्ध रसाळरामायण केलें ( स. १७३८ ).

**सिकंदर**—( ख्रि. पू. ३५६-३२३ ) एक जगज्जेता पराक्रमी पुरुष. याचा जन्म मॅसिडोनियांतील पेला नांवाच्या शहरीं झाला. याचा पिता फिलिप व माता आलिंपिया. याचा गुरु प्रसिद्ध तत्त्ववेत्ता ॲरिस्टॉटल होय.

फिलिप हा मोठा महत्त्वाकांक्षी असून त्यानें लहानसें राज्यहि मिळविलें होतें. आपल्या पराक्रमी सैन्याच्या जोरावर त्यानें ग्रीस देशाच्या सेनापतीचें स्थान मिळविलें. पारसीकांशीं त्याचें लवकरच युद्ध होणार होतें, पण त्याचा खून झाला आणि त्याचें अपुरें राहिलेलें कार्य सिकंदरानें पुढें सुरू केलें.

हा वीस वर्षांचा नवा राजा गादीवर येतांच कांहीं जुन्या शत्रूंनीं डोकीं वर काढलीं. पण यानें सर्वांची वासलात लावून बापाची 'ग्रीसचा सेनापति' ही पदवीहि आपल्याला घेतली, आणि डॅन्यूब नदीपर्यंत मुलूख पादाक्रांत केला. पण खुद्द याच्या देशांतच याच्या गैरहजेरीचा फायदा घेऊन हा मेल्याची बातमी उठविली गेली आणि शेवटीं याला भयंकर कत्तल करून आपलें स्थान पुनः मिळवावें लागलें. पुढें पारसीकांना तोंड देण्याचें काम यावर सोंपविण्यांत आलें.

या वेळीं पारसीकांचा दारियस हा सम्राट् आशियामायनर, इजिप्त, तुर्कस्थान, इराण, अफगाणिस्थान, बलुचिस्थान व मध्य आशियाचा कांहीं भाग यांवर राज्य करीत होता आणि त्याचें भय युरोपांतील मॅसिडोनिया, ग्रीस वगैरे भागासहि उत्पन्न झालें होतें. त्याच्याजवळ लक्षावधि सैन्य आणि आरमारहि होतें. त्याच्याशीं तोंड देण्याची यानें तयारी सुरू केली.

सैन्याच्या तयारीबरोबर साधुसंतांचे आशीर्वाद घेण्याचेंहि याचें काम चालू असे. एकदां हा डायोजीनीस नांवाच्या साधूच्या दर्शनास गेला असतां तो तपस्वी सकाळचें ऊन्ह खात बसला होता. हा न कळत त्याचें ऊन्ह धरून उभा राहिला आणि विनंतिपूर्वक म्हणाला, 'मीं आपली काय सेवा करावी ?' तेव्हां त्या साधूनें तुटकपणें उत्तर दिलें, 'तेवढें ऊन्ह सोड म्हणजे झालें !' तेव्हां हा खजिल झाला. पण आपल्यासारख्या समर्थाशींहि निःस्पृह वर्तन करणाऱ्या त्याबद्दल याच्या मनांत अत्यंत आदर उत्पन्न झाला. तरी पण दुसऱ्या कांहीं प्रसंगीं अशा लोकांशीं दंडेली केल्याच्याहि याच्या गोष्टी आहेत. याचा भाकितें, शकुन यांवरहि विश्वास असला तरी कोणत्याहि प्रसंगीं धीर खचूं न देतां निराश न होणें हा याचा महत्त्वाचा गुण होता.

तयारी झाल्यावर यानें हेलेस्पांटच्या सामुद्रधुनींकडे कूच केलें, आणि ग्रॅनिकस नदीवर लढाईला सुरुवात झाली. आणि याच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें सैन्य थोडें होतें तरी आपणहून शत्रूवर चढाई करून साहसानें शत्रूच्या मध्यावर यानें जोराचा हल्ला केला; आणि एक पळाला म्हणून दुसरा पळाला या न्यायानें संपूर्ण शत्रुसैन्याला यानें पळावयास लावून अपूर्व जय मिळविला. तहाचें बोलणेंहि यानें झिडकारलें.

दारियसशीं दुसरी लढाई इस्सस गांवाजवळ झाली. तेथेंहि आपला जम बसत नाहीं असें पाहून यानें केवळ साहसानें दारियसवर निकराचा हल्ला करून त्याचें तोंड फिरविलें आणि राजा पळाला म्हणून सैन्यहि पळूं लागलें. हजारों लोक नुसत्या धांवपळींत चेंगरून मेले. दारियसनें आपलीं बायकामुलेंहि तेथेंच सोडलीं. पण यानें त्यांचा अपमान न करितां त्यांना सोडून दिलें. तेथल्या लुटींत प्रथम याला खऱ्या वैभवाची कल्पना आली.

याप्रमाणें यानें पारसीक साम्राज्य धुळीला मिळविलें. दारियस पळत एका नातेवाईकाच्या आश्रयास गेला. पण तेथें त्याच्या कपाळीं तुरुंगवासच आला. पण सिकंदरच्या पाठलागानें त्यालाहि पळण्याचा प्रसंग आला तेव्हां दारियसला जखमी करून तो पळाला व दारियस असहाय स्थितींत मेला.

यानंतर यानें हिंदुस्तानाकडे मोर्चा वळविला.

हा दिग्विजय करीत सिंधुनदापर्यंत आला आणि यानें उद्धांडपुरापाशीं सिंधूनद ओलांडला. उद्धांडपूर हें अटकच्या उत्तरेकडे सोळा मैलांवर आहे. त्या वेळीं सिकंदरजवळ पन्नास हजार सैनिक होते. सिंधूच्या पूर्वेकडील प्रदेशांतील अनेक राजांनीं सिकंदरचें वर्चस्व सहज मान्य केलें. या किरकोळ राजांत तक्षशिलेचा आम्भी ( आम्फिस ) विशेष ध्यानांत घेण्यासारखा आहे. आम्भीनें आपल्या शेजारीं असणाऱ्या प्रसिद्ध राजा पोरसच्या विरुद्ध सिकंदरला सर्व प्रकारची मदत केली. मोठ्या समारंभानें त्यानें सिकंदरचें स्वागत केलें. त्या जोरावर हा झेलम ओलांडून पुढें सरला व यानें राजा पोरसला नजराणा घेऊन भेटीस बोलावलें. पण त्यानें उलट कळविलें कीं 'मी नजराणा घेऊन येत नाहीं, तर सेना घेऊन येतों.'

याची हिंदुस्थानावर स्वारी झाली, तेव्हां उत्तर हिंदुस्थानांतील मल्लोई ( मल्ल किंवा मालव ) व क्षुद्रक या दोन स्वतंत्र क्षत्रिय जातींनीं आपल्यांत एकी व्हावी म्हणून परस्परांत लग्नव्यवहार सुरू केला. एकां वेळीं दहा दहा हजार मुलींचीं लग्नें लावण्यांत आलीं. पूर्वीं या जातींत वैर असून विवाहसंबंध होत नव्हते ( मॅक्‌क्रिंडल-दि इन्वेजन ऑफ इंडिया बाय् अलेक्झांडर दि ग्रेट, पृ.२८७).

अनेक राजांनीं बिलकूल आडेवेढे न घेतां याची अधीनता स्वीकारली, पण कांहीं ठिकाणीं याला भयंकर युद्धेंहि करावीं लागलीं. असें करतां करतां हा व्यास नदीपर्यंत आला. यापुढें जाण्याचें याच्या सैनिकांनीं नाकारलें. आपल्या दिग्विजयाचें स्मारक व्यास नदीच्या कांठीं करून व देवतांची पूजा करून हा तेथून झेलमकडे परत फिरला. झेलमपाशीं आल्यावर यानें मोठा दरबार भरवला व पोरसला व्यास नदीपासूनच्या प्रदेशावर क्षत्रप नेमलें. प्रांताधिकाऱ्यांना क्षत्रप असें म्हणत. हिंदुस्तानचा पश्चिमोत्तर भाग जिंकून यानें तीन भाग केले. झेलमपासून सिंधूपर्यंतच्या प्रदेशाचा क्षत्रप आम्भीला नेमलें. सिंधूच्या पश्चिमेकडील प्रदेशावर सेनापति फिलिप्पोस यास क्षत्रप नियुक्त केलें. तसेंच झेलमपासून व्यास नदीपर्यंतच्या भागावर पोरसला क्षत्रप नेमलें. अशा प्रकारें जिंकलेल्या प्रदेशाची व्यवस्था करून हा परत फिरला. पण परत जातांना यानें पहिल्या रस्त्यानें न जातां नवा मार्ग पत्करला. झेलम नदींत जहाजें व नावा यांची व्यवस्था करून जलमार्गानें हा परत फिरला. परत जातांना पंजाबच्या मध्यावरील प्रदेशांतील पराक्रमी लोकांशीं याला युद्ध करावें लागलें. शिलाई म्हणजे शिलि, अगलासोई, मल्लोई म्हणजे मल्ल किंवा मालव, आक्सिड्रोकाई म्हणजे क्षुद्रक यांचीं गणराज्यें म्हणजे प्रजासत्ताक राज्यें या भागांत होतीं. हे शूर लोक एकत्र होऊन याच्याशीं लढूं इच्छित होते पण सिकंदरनें नीतिकुशलतेनें पहिल्या दोहोंशीं वेगळें लढून त्यांचा पराजय केला. अगलासोईपैकीं वीस हजार स्त्रीपुरुष व मुलें यांनीं शत्रूच्या हातीं लागूं नये म्हणून आपणांस जाळून घेतलें. मल्लोई म्हणजे मल्ल किंवा मालव व आक्सिड्रोकाई म्हणजे क्षुद्रक या दोन जमाती एक होऊं शकल्या नाहींत. कारण संयुक्त सेनेचें सेनापति कोणीं व्हावें याबद्दल त्यांच्यांत मतभेद झाला. आपसांतील या भेदाचा यानें पुरा फायदा घेतला व मल्लोई म्हणजे मल्ल किंवा मालव यांच्यावर स्वारी करून त्यांचा पराजय केला व त्यांचा दूरपर्यंत पाठलाग केला. जरी सिकंदरचा जय झाला तरी मल्लोईशीं लढतांना हा चांगलाच जखमी झाला.

याच्या वेळीं सिंधची राजधानी अरोर होती. अरोर येथें हुसीकैनो राजा राज्य करीत होता. तो पराक्रमी होता, पण सिकंदरानें त्याचा पराजय केला. अशा प्रकारें सिंध जिंकून हा समुद्रतटावर आला व यानें आपल्या सैन्याचे दोन भाग केले. आपल्या न्यार्कस नांवाच्या सेनापतीच्या हाताखालीं एक भाग देऊन त्याला जलमार्गानें इराणकडे जाण्याची आज्ञा दिली. आपण सैन्याच्या दुसऱ्या भागासह बलुचिस्थान, मकरानचें अरण्य यांतून स्थलमार्गानें इराणकडे गेला. मार्गांत याचे अत्यंत हाल झाले. उन्हाळा व अन्नाभाव यांमुळें हजारों सैनिक मेले. कसा तरी हा सूसा येथें जाऊन पोंचला. पण आपल्या विस्तृत साम्राज्याचा उपभोग न घेतां ख्रि. पू. ३२३ मध्यें सूसा येथें मृत्यु पावला. शेवटीं हा दारु फार पीत असे.

सिकंदरसारख्या योद्धयाला त्या वेळच्या भारतीयांनीं योग्य प्रकारें तोंड दिलें आहे. पण आपसांतील दुहीमुळें त्यांचा पराजय झाला, पराक्रमाच्या अभावामुळें नव्हे, असें वरील माहितीवरून दिसून येतें. ससाण्याप्रमाणें वेगानें आक्रमण करणाऱ्या सिकंदरला हिंदुकुशापासून सिंधूपर्यंत येण्यास दहा महिने लागले आणि सिंधूपासून व्यासनदीपर्यंत येण्यास ऐकूणीस महिने लागले. हा काळच त्याला भारतीयांनीं कसा विरोध केला हें दर्शवितो.

या सिकंदरच्या स्वारीचें ऐतिहासिक दृष्ट्या फार महत्त्व आहे. या वेळीं युरोप व हिंदुस्थान यांचा प्रत्यक्ष संबंध आला. आजपर्यंत हिंदुस्थानांत आढळणाऱ्या गणित, ज्योतिष, लेखन किंवा इतर अनेक कला या वेळीं किंवा यानंतर हिंदुस्थानांत आल्या आणि हिंदुस्थानांतील संस्कृति व समाजव्यवस्था यांत नवयुग सुरू झालें अशी कल्पना होती. पण ती कल्पना उत्खननादिमुळें लागलेल्या शोधांनीं पार नष्ट झाली आहे. युरोपपेक्षां किती तरी पुरातनकालीं हिंदुस्थानांत विद्याकलादिकांचा उत्कर्ष झाला असून त्याचाच परिणाम जगावर झाला असें आतां ठरत आहे.

सिकंदरनें पंजाब प्रांत जिंकून तेथें आपला सुभेदारहि नेमला, पण हा मृत्यु पावल्यानें तिकडे घोटाळे सुरू झाले आणि चंद्रगुप्तासारखा पराक्रमी पुरुष पुढें येऊन त्यानें लवकरच आपली सत्ता स्थापली. चंद्रगुप्तानें एका ग्रीक राजकन्येशीं लग्न केलें. याच्या लष्करी शिस्तींत कवाइती पद्धत होती, तिचा परिणाम चंद्रगुप्तावर झाला असावा.

२. (स. १३५७-६७) बंगालचा राजा. हाजी इल्यास ऊर्फ शम्सुद्दीनचा पुत्र. फीरूजनें याचा पराभव केला होता.

३. ( स. १५२६ सुमार ) गुजराथचा राजा. हा दुसऱ्या मुजफरचा मुलगा. हा गादीवर आल्यावर लवकरच खून झाला. नंतर बहादुरशहा गादीवर आला.

४. ( बुतिसकन ) ( स. १३९६–१४१६ ) हा काश्मीरचा राजा. हिंदालचा पुत्र. बुतिसकन म्हणजे मूर्तिभंजक. यानें काश्मीरांतील अनेक देवालयांचा विध्वंस केला व ही पदवी धारण केली. तैमूरलंगाला हा शरण गेला, म्हणून त्यानें काश्मीरवर स्वारी केली नाहीं.

**सिकंदर आदिलशाह**–( स. १६७२–८६ ) हा विजापूरच्या दुसऱ्या अली आदिलशाहाचा मुलगा. त्यानंतर हा गादीवर आला. तेव्हां हा पांच वर्षांचा होता. खवासखान याचा मुख्य प्रधान होता. शिवाजीपेक्षां औरंगजेबाचा यास फार त्रास झाला. शिवाजीवर यानें बहलूलखानास पाठविलें. औरंगजेबानें बहादूरखानास खानजमान असा किताब देऊन इकडे पाठविलें. त्यानें खवासखानाशीं सख्यत्व केलें, पण इतक्यांत खवासखानाचा खून झाला व अब्दुल करीमखान प्रधान झाला. दिल्लीहून कुतुबखान व इस्लामखान रूमी हे आणखी विजापुरावर आले, पण त्यांचा विजापूरच्या बहलूलखानानें पराभव केला. तथापि विजापूरची अन्तःस्थिति बिघडली. पठाण सैनिक पगाराकरितां वरचेवर बंड करीत. औरंगजेबानें बहादूरखानाच्या जागीं दिलेरखानाची नेमणूक केली. अबदुल करीमखानानें राज्यांतून अंग काढून घेतल्यानें मसूदखान मुख्य प्रधान झाला. पण राज्याची स्थिति खालावत चालली. चिंतो चिमणाजीसारखे ब्राह्मण बंडखोर उघडपणें वावरूं लागले. शिवाजीनें एकामागून एक प्रांत घेतले. तेव्हां मसूदखानानें मोगलांविरुद्ध त्याचें साहाय्य घेतलें. दिलेरखानाकडून काम होत नाहीं म्हणून औरंगजेब स्वतः आला आणि स. १६८६ आक्टो. १५ रोजीं विजापूरचा किल्ला घेतला. याची भेट घेऊन वर्षास एक लक्ष रुपयांची नेमणूक करून दिली व सहुल्लाखानास विजापूरचा सुभेदार नेमलें. स्वतःजवळचें जडजवाहीर औरंगजेबाचे हातीं लागूं नये म्हणून यानें खंदकांत ओतलें असें म्हणतात.

यास पदच्युत केल्यावर औरंगाबादेस ठेवलें, पण पुढें जिवंत ठेवणें योग्य न वाटल्यावरून विषप्रयोग करून ठार करण्यांत आलें ( स. १७०१ ). त्या वेळीं याचें वय तेहतीस वर्षांचें होतें. याची कबर विजापुरीं आहे.

**सिकंदर लोदी**—( निजामखान पाहा ).

**सिकंदरशाह तुघ्लक**–( स. १३९४ ) हा मुहम्मदशाह तुघ्लकाचा पुत्र. तो जालेसर येथें मरण पावल्यावर ( २० जाने. स. १३९४ ) हा गादीवर आला ( २२ जाने. ). पण लवकरच आजारी पडून मेला ( ता. ८ मार्च स. १३९४ ). अबूबकरापासून दिल्लीचें तक्त घेतांना यानें बापाला फार मदत केली होती.

**सिकंदशाहा सूर**—( स. १५५४–१५५५ ) हा इब्राहीमानंतर दिल्लीचा बादशाहा झाला. अंगीं राज्य करण्याचें चातुर्य व धमक नसल्यानें याच्या शूरपणाचा कांहीं उपयोग झाला नाहीं. हुमायुनास अडविण्यासाठीं यानें फौज पाठविली, परंतु बहराम व अकबर यांनीं याचा पूर्ण मोड केला. पुढें हा पळून गेला व अज्ञातवासांतच मरण पावला. अशा प्रकारें सूर घराण्याचा शेवट झाला. अफगाणांचें वर्तन क्रूर असल्यामुळें लोकहि त्यांच्या राज्यास कंटाळले होते.

**सिद्दी मौला**—( स. १२९१ ) ( जलालुद्दीन फीरूज खल्जी पाहा ).

**सिधोजी लाडोजी शितोळे देशमुख**—हा महादजी शिंदे यांच्या बाळाबाई नांवाच्या मुलीचा मुलगा. हा दौलतरावाबरोबर खर्ड्याच्या लढाईंत हजर होता.

**सिद्धपाल केसरी**—( स. १५७५ सुमार ) मराठी कवि. पिता कुबेर व माता अंबा. ग्रंथ मल्हारिमाहात्म्य. उपनांव कृदांत ( मं. वा. इ. श. १८३७ ले. १२३ ).

**सिद्धराज जयसिंह**—( जयसिंह सिद्धराज पाहा ).

**सिद्धसेनगणि**—( स. ६०० ) हा श्वेतांबरपंथी जैन होता. यानें उमास्वातीच्या ‘ तत्त्वार्थाधिगम ’ सूत्रावर टीका लिहिली, हा भास्वामिन्चा शिष्य.

**सिद्धसेन दिवाकर**—( स. ५३३ सुमार ) एक जैन तत्त्वज्ञ आणि कवि. श्वेतांबर जैनांची अशी समजूत आहे कीं यानें ख्रि. पू. ५७ व्या वर्षी विक्रमादित्य राजास जैनधर्मात घेतलें. दिगंबर जैन याचा काल महावीरानंतर ७१४–७९८ ( स. १८७–२७१ ) हा मानतात. वृद्धवादिसूरि हा याचा गुरु होता. याकोबीच्या मतें याचा काल स. ६७० हा होय. यानें जैनधर्माची दीक्षा घेतल्यावर कुमुदचंद्र हें नांव धारण केलें असें म्हणतात ( विंटरनिट्झ-हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर, भा. २ ).

जैनांत न्यायावर व संस्कृतमध्यें लिहिणारा हा पहिलाच ग्रंथकार होय. यानें ‘ न्यायावतार ’ नांवाचा बत्तीस श्लोकांचा एक ग्रंथ लिहिला आहे. तसेंच यानें ‘संमतितर्कसूत्र’ नांवाचा प्राकृतांत तत्त्वज्ञानावर एक ग्रंथ केला आहे.

सतीशचंद्र विद्याभूषणांच्या मतें विक्रमादित्याच्या दरबारांतील क्षपणक हा होय.

यानें उपदेश केलेला विक्रमादित्य म्हणजे यशोधर्मदेवच असावा.

**सिद्धिचंद्र**—(स. १५९३) अकबराच्या दरबारांतील एक जैन पंडित. हा भानुचंद्राचा शिष्य. यानेंच बाणभट्टाच्या कादंबरीवर टीका लिहिली आहे. त्या टीकेच्या शेवटीं लिहिलेल्या वाक्यावरून यानें अकबराला सूर्यसहस्रनाम शिकविलें होतें असें दिसतें. तसेंच यानें शत्रुंजय तीर्थावरील करहि माफ करविला होता.

**सिद्धेश्वरभट्ट**—(स. १८०० सुमार) कोल्हापूरच्या छत्रपतींचे गुरु. मूळचे औरंगाबादेकडील शुक्लयजुर्वेदी ब्राह्मण. उपनांव देवपाठक. यांचा 'सरणी' नांवाचा प्राकृत ग्रंथ आहे. यांची समाधि कोल्हापूर येथें आहे. पुणें व कोल्हापूर येथें यांचा वंश आहे. सध्यांचे जगन्नाथ महाराज यांचे वंशज होत.

**सिद्धेश्वर मेघनाथभट्ट ब्रह्मे**—(स.१६६० सुमार) यांच्यावर शिवाजीमहाराजांची निष्ठा होती. 'स्वामीच्या अनुष्ठानबळें आपण राज्यास अधिकारी झालों व सकळ मनोरथ चिंतिलें पावलों' (स. प. पृ. ११३), असें श्रद्धापूर्वक मानून १०० होनांचें वर्षासन करून दिलें. 'संकटकाळीं सहकारी' मानण्याइतका शिवाजीचा यांजवर विश्वास होता.

**सिमुक शातवाहन**—(शिमुक पाहा).

**सिंगण**—वेदभाष्यकार सायणाचा मुलगा. हरिहराच्या मृत्यूनंतर दिलेल्या दानाच्या यादींत सायणानंतर याचें नांव आहे (रिपोर्ट ऑफ दि वर्किंग ऑफ दि अर्का. १९१४-१५, पा. ४२). हा मोठा वेदवेत्ता होता, असें भोगनाथाच्या उदाहरणमालेंतील लिहिण्यावरून दिसतें (सोर्सेस ऑफ विजयनगर हिस्टरी, पा. ४९).

**सिंगरार्य**—(स. १६८० सुमार) कानडी कवि. श्रीवैष्णव (रामानुज). कौशिक गोत्र. पिता—सौम्यनृसिंहसूरि किंवा अळ सिंगरार्य. माता—सिंगम्मा.

ग्रंथ—मित्रविन्दागोविंद (नाटक), यांतील एका श्लोकावरून राघवाभ्युदय व गीतरंगेश्वर असे दोन ग्रंथ याचे असावेत, पण ते उपलब्ध नाहींत.

तिरुमल्ल आर्याचा हा भाऊ. तिरुमल्ल हा म्हैसरच्या चिक्कदेवरायाचा अत्यंत स्नेही व विश्वासपात्र मंत्री व कवि होता. हाहि त्याच राज्याचा आस्थान पंडित होता.

कानडींत उपलब्ध असलेल्या नाटकांत याचेंच नाटक पहिलें होय. याचें नाटक हर्षाच्या रत्नावलीचें भाषान्तर आहे (क. क. च. भा. २, पा. ५०३). हा चिक्कदेवरायाचा वडील जो दोड्डदेवराय त्याचा हा पौराणिक होता.

**सिंगले**—विजयनगरच्या माधवाचार्यांची धाकटी बहीण. ही कवाडिग कुलांतील (कानडी) रामरसाला दिली होती, असें हंपीजवळच्या स. १४११ च्या शिलालेखांत म्हटलें आहे (साउथ इंडियन इन्स्क्रिप्शनस्, न्यू इंपीरियल सीरीज, व्हा. ४४, पा. ६०)

**सिंघण कलचुरी**—(स. ११८३-८४) हा बिज्जल कलचुरीचा चवथा मुलगा. हा दुर्बल असल्यामुळें चवथ्या सोमेश्वर चालुक्यानें आपला मांडलिक व सेनापति ब्रह्माच्या साहाय्यानें कलचुरींचें राज्य बुडवून अण्णेगिरी येथें नवें राज्य स्थापिलें.

**सिंघण यादव**—परम्मरदेव सिंहराज यादवाचें नामान्तर. कदाचित् हा त्याचा भाऊ असून त्यानंतर गादीवर आला असावा.

२. (स. १२१०-१२४७) हा पहिल्या जैत्रपालाचा मुलगा. याच्या कारकीर्दींत यादवांची सत्ता अतोनात वाढली. यानें कुंतलदेश काबीज करून माळवा, गुजराथ, चेदि देशांतील छत्तिसगड इत्यादि ठिकाणच्या राजांस व तुर्कांस जिंकिलें. यानें आंध्रांचा पराभव केला होता. तसेंच बल्लाळ होयसलाचा पराभव केला होता असें गदग लेखांत म्हटलें आहे. यानें पन्हाळ्याच्या शिलाहार भोजाचें राज्य आपल्या राज्याला जोडलें. तेव्हां हा मोठ्या सैन्यानिशीं पुष्कळ दिवस सातारा जिल्ह्यांत येऊन राहिला. या वेळीं मायणीचा संगमेश्वर (ता. खटाव) व भूषणगड हे बांधले व शिखर शिंगणापूर वसविलें असें म्हणतात.

याचा सेनापति खोलेश्वर हा उमरावतीचा ऋग्वेदी ब्राह्मण असून त्याला बिज्जल व राम असे दोन पराक्रमी मुलगे होते. खोलेश्वरानें गुजराथेवर अनेक स्वाऱ्या करून खंबायत येथें जयस्तंभ उभारला. याचा राम नांवाचा पराक्रमी मुलगा दुसऱ्या स्वारींत वीरधवलाचा मुलगा बिसलदेव याच्याशीं लढत असतां मारला गेला. बिज्जलानें कावेरीपर्यंत मुलूख काबीज करून शिमोघा हें आपलें मुख्य ठाणें केलें. सिंघणाचा मुख्य प्रधान सोढ्ढलचा पुत्र संगीतरत्नाकराचा कर्ता शार्ङ्गधर होय. पृथ्वीवल्लभ, विष्णुवंशोद्भव इत्यादि विशेषणें यानें धारण केलीं होतीं. याचा ध्वज सुवर्णगरुडचिन्हांकित असे. यादवांच्या मुख्य मंत्र्यास श्रीकरणाधिप अशी संज्ञा होती. भास्कराचार्यांचा नातू चांगदेव हा ह्याच्या दरबारीं मोठा ज्योतिषी होता. याचा पराक्रमी मुलगा जैत्रपाळ दुसरा हा बापाच्या अगोदरच मरण पावला होता. यानंतर याचा नातू कृष्णदेव हा राजा झाला.

**सिंधुदा**—(खारवेल पाहा).

**सिंधुराज परमार**—(मृत्यु स. १००९ पूर्वी) माळव्याच्या परमारांपैकीं श्रीहर्षाचा दुसरा पुत्र. हा

मुंजानंतर गादीवर आला. याला सिंधुल असेंहि म्हणत. याला कुमारनारायण व नवसाहसांक अशीं बिरुदें होतीं. याचा मुलगा भोज यास मुंजानें दत्तक घेतलें होतें, पण तो लहान असल्यानें मुंज मारला गेल्यावर हा गादीवर आला. यानें हूण ( एपि. इंडि. भा. १, पृ. २२८ ); कोसल ( दक्षिण ), बागड, लाट आणि मुरलवाले यांना जिंकलें होतें. हें नवीन साहस केल्यामुळेंच यानें 'नवसाहसांक' ही पदवी धारण केली असावी. पद्मगुप्त (परिमल) यानें यावर ' नवसाहसांकचरित ' हें काव्य लिहिलें, पण त्यांत ऐतिहासिक भाग कमी आहे. त्यावरून याच्या प्रधानाचें नांव रमांगद असें होतें. यानें नागवंशी राजकन्या शशिप्रभेशीं लग्न केलें होतें. हा गुजराथच्या चामुंडराज चालुक्याशीं लढत असतां मारला गेला.

२. ( स. ११६१ ) आबूच्या परमार घराण्याचा मूळपुरुष. जालोरचें सिंधुराजेश्वराचें मंदिर यानें बांधलें असावें. हा मारवाडचा राजा होता.

**सिंह गुहिलोत**—( स. ८१३–२८ ) मेवाडच्या भर्तृभटाचा पुत्र. याच्यानंतर दुसरा खुमाण गादीवर आला.

**सिंहनंदी**—गंगवाडीचें राज्य स्थापणारा जैन. हा समंतभद्राच्या मागाहून झाला.

**सिंहवर्मा पल्लव**—( स. ५७५–५८० ) हा विष्णुगोप पल्लवाचा भाऊ होय. याचा पुत्र सिंहविष्णु.

२. ( स. ४०४ ) जयवर्म्याचा पुत्र. याला मंदोसराच्या शिलालेखांत ( स. ४०४ ) क्षितीश म्हणजे राजा म्हटलें आहे.

**सिंहविष्णु पल्लव**—( स. ५७५–६०० ) याच्या पित्याचें नांव सिंहवर्मन्. यानें पश्चिम चालुक्य, चेर, चोल व पांड्य यांच्या बरोबर युद्धें केलीं. यानें सिंहल व मालव यांवर स्वाऱ्या केल्या होत्या ( साउथ इंडि. इन्स्क्रि., भा. २, पार्ट ३. ३५६, कविता २० ). पण हे मोघम उल्लेख आहेत. काशकुडी येथील लेखावरून यास अवनिसिंह म्हणत असत असें दिसतें. याचा मुलगा महेन्द्रवर्मा पहिला याचा लेख त्रिचनावल्ली येथें उपलब्ध झाला आहे. त्यांतहि यानें चोलदेश जिंकल्याचें लिहिलें आहे. हा मोठा विष्णुभक्त होता. डॉ. डुब्रिल यानें याचा काळ अंदाजानें स. ५७५-६०० हा दिला आहे. भारवि नांवाचा सुप्रसिद्ध कवि दुर्विनीताकडून कांचीस याच्या आश्रयास आला ( दंडिकृत अवंतिसुंदरीकथा ).

**सिंहसेन क्षत्रप**—( स. ३८२ ) हा रुद्रसेनाच्या बहिणीचा मुलगा. याचीं नाणीं मिळालीं आहेत.

**सीतल**—( स. १७२३ ) हरिदासाच्या टट्टी संप्रदायाचा महंत. यानें 'गुलजारचमन' ग्रंथाची चार भाषांत रचना केली आहे ( क. कौ. १ ).

**सीदी सात**—( मृत्यु स. १७३६ एप्रिल १९ ) यानें ब्रह्मेंद्रस्वामींस त्रास दिला म्हणून चिमाजी आपानें यास लढाईत ठार केलें.

**सीदी रेहान**—( स. १६३५ ) मुहम्मद आदिलशाहाकरितां यानें खवासखानास ठार केलें.

**सीदी जोहर**—( मृत्यु स. १६६१ ) मलीक अबदुल नांवाच्या कर्णूल प्रांताच्या आदिलशाही सरदाराचा हा गुलाम. त्याच्या मागें त्याच्या मुलास कैद करून हा अधिकारी झाला. हा बंडखोर होता, पण संधि साधून माफीपत्र लिहून दिलें आणि अफजलखान मेला व रुस्तुमजान धास्ती खाऊन परत फिरला अशा प्रसंगीं अली आदिलशहानें यास सलाबतखान पदवी देऊन शिवाजीवर पाठविलें. यानें शिवाजीस पन्हाळ्यांत अडकविलें तेव्हां शिवाजी पळाला. पण अलीस हा फितुर आहे असा संशय आला. तेव्हां यानें उघड बंड सुरू केलें. प्रत्यक्ष युद्धाची वेळ आली तेव्हां हा रायचूरकडे पळाला व तिकडेच मेला. याचा मुलगा सीदी अबदुल अर्जीज. याचा जांवई मसूद.

**सीदी बिलोल हबशी**—( स. १६२८ ) शहाजीचा नोकर. लोहगडचा हवालदार. शिवाजीकरितां माणकोजी दहातोंड्यानें यास जिंकलें.

**सीयक परमार**—( श्रीहर्ष पाहा ).

**सुखदेवमिश्र**—( जन्म स. १६३३ ) हिंदी कवि. एक कान्यकुब्ज ब्राह्मण. याचे वंशज सध्यां दौलतपूर ( जि. रायबरेली ) येथें आहेत. याचें जन्मस्थान कंपिला. याच्या पुढील सात ग्रंथांचा शोध आतांपर्यंत लागला आहेः १ वृत्तविचार, २ छंदविचार, ३ फाजिलअलीप्रकाश, ४ रसार्णव, ५ शृंगारलता, ६ अध्यात्मप्रकाश, ७ दशरथराय, ८ नखशि. हा कांहीं दिवस औरंगजेबाचा मंत्री फाजिलअलीशाह याचा मंत्री होता. नंतर मुरारमऊच्या देलीसिंह राजाकडे होता. यास कविराज ही पदवी दिली. हा पंडित व कवि होता.

**सुखनिधान**–( स. १७६३–७६ ) कनोजा ब्राह्मण. सदाशिवराव भाऊचा तोतया. याचें बंड मोडून शेवटीं धिंड काढून यास ठार केलें.

**सुजाउद्दीन**–( मृत्यु स. १७३९ ) हा सुजाउद्दीन जाफरखानाचा ( मुर्शीदकुलीखान ) जांवई होता. हा ब्रह्हाणपुरचा राहणारा असून जाफरखानाच्या वजनामुळें ओरिसा प्रांतांत ' नायब नाजीम ' म्हणून नेमला गेला.

**सुजाउद्दौला**—( स. १७५४–७५ ) हा सफदरजंगाचा पुत्र. स. १७५४ त त्याच्या मागून गादीवर आला. यानें आपली राजधानी लखनौ येथें आणली. यानें बादशहाचा वजीर गाजिउद्दीन यास हांकून दिलें व राजपुत्र अलीगोहर ( शहाअलम दुसरा ) यास बंगालवर स्वारी करण्याची सल्ला दिली. हा पानिपतच्या युद्धांत मुसलमानांच्या बाजूनें लढला. याला पुढें बादशहाच्या वजीरातीचें काम वंशपरंपरा मिळालें.

पाटण्याच्या कत्तलीनंतर मीर कासीमास यानें आश्रय दिला. तेव्हां याचें व इंग्रजांचें युद्ध होऊन त्यांत याचा पराभव झाला. परंतु पुन्हां यानें मराठे व पठाण यांच्या मदतीनें इंग्रजांशीं सामना दिला. पण दैव याला अनुकूल नव्हतें. शेवटीं यास इंग्रजांबरोबर तह करावा लागला.

मराठ्यांनीं पानिपतचा कलंक धुवून टाकण्याचा निश्चय केल्यानें त्यांची सगळीकडे सरशी होत होती. तेव्हां याला व इंग्रजांना सुरक्षितता पाहिजे असल्यामुळें यांनीं आपआपसांत तह केला. त्या तहान्वयें सुजाउद्दौल्यानें दरसाल २५ लाख रुपये सरहद्द-रक्षणाकरितां द्यावयाचें ठरलें व त्याप्रमाणें यानें ताबडतोब ५० लाख रुपये दिले; व दरबारीं रेसिडेंट ठेवून घेतला. पुढें यानें इंग्रजांच्या मदतीनें रामपूर संस्थान खेरीज करून सर्व रोहिलखंड ताब्यांत घेतलें.

**सुजानबाई भोसले** ( तंजावर )—( स. १७३६–३९ ) तंजावरचा राजा बाबासाहेब यांची ही पत्नी. त्यांना पुत्र नसल्यामुळें हिला गादीवर बसविण्यांत आलें. हिनें तीन वर्षें उत्तम कारभार पाहिला. पण सवाई शहाजीनें किल्लेदार सय्यदखानास फितवून राज्य घेतलें.

**सुजा मोगल**—( स. १६१६–१६५८ ) हा शहाजहान बादशहाचा दुसरा मुलगा. शहाजहाननें आजारी पडल्यावर यास बंगालवर नेमलें. शहाजहानची प्रकृति विशेष बिघडून गडबड सुरू झाली तेव्हां यानें एकदम आग्र्यावर चाल केली. तेव्हां दाराचा वडील मुलगा सुलेमान शुकोहची यावर योजना झाली. बरोबर राजा जयसिंगाला देण्यांत आलें. अलाहाबादेस लढाई होऊन याचा पराजय झाला (स. १६५७). त्याच सुमारास औरंगजेबानें दाराचा पराभव केला, तेव्हां सुलेमान शुकोह काश्मीरकडे पळाला. पुढें खजवा येथें औरंगजेबानें मीरजुम्लाच्या साहाय्यानें याचा पराभव केला ( स. १६५८ जाने. ५ ). पुढें राजमहाल येथें मीरजुम्ला व सुलतान मुहंमदनें याचा पराभव केला, तेव्हां हा आराकानमध्यें गेला व आराकानच्या राजाची गादी मिळविण्याचा यानें कट केला. तो फुटल्यानें याला दगडांनीं ठार मारण्यांत आलें ( स. १६५८ फेब्रु. ७ ). हा इराणी धर्माचा अनुयायी होता व दिल्लीदरबारांत इराण्यांचें वर्चस्व होतें म्हणून यास राज्य मिळण्याची फार आशा होती. औरंगजेबाचा मुलगा मुहम्मदला याची मुलगी दिली होती.

**सुजायतखान**—( स. १७२९–३७ ) हा वऱ्हाडचा सुभेदार. रघूजी भोसल्यानें याला पकडून पांच लाख दंड घेऊन सोडलें ( स. १७२९ ). हा एलिचपूरच्या नबाबास साहाय्य करी. हा कांहीं काळ बंगालचा सुभेदार होता. डफ लिहितो, हा स. १७२९ मध्यें विषप्रयोगानें मेला ( काळेकृत वऱ्हाडचा इतिहास, पृ. १८३ ).

**सुज्येष्ठ**—( २ वसुमित्र पाहा ).

**सुदत्त**—( अनाथ पिंडक पाहा ). अनाथ पिंडिकोवाद नांवाचें माज्झियनिकायांत एक सुत्त आहे. त्यावरून व इतर कांहीं उल्लेखांवरून सारिपुत्रानें याला अंतकाळीं उपदेश केला, व त्यायोगें हा वेदना भोगीत असतांहि शांतपणें मेला.

**सुबंधु**—( स. ६२५ सुमार ) वासवदत्तेचा कर्ता.

**सुभटवर्मा परमार**—( स. १२५० सुमार ) माळव्याच्या परमारांपैकीं विंध्यवर्म्याचा उत्तराधिकारी. यास 'सोहड' म्हणत. यानें गुजराथेवर स्वारी केली, पण भीमदेवाचा सामंत लवणप्रमादानें यास परत फिरविलें.

**सुभान कुली कुत्बशाह**—( स. १५५० ) जमशीदचा मुलगा. याचा कारभार दुःसह झाल्यामुळें जमशीदचा धाकटा भाऊ इब्राहीम गादीवर आला.

**सुमतिनाथ**—जैन तीर्थंकर.

**सुमतिविजय**—( टीकाकाल स. १६७५ ) रघुवंशावरील एक टीकाकार. हा विक्रमपूरचा ( बिकानेर ) राहणारा. याच्या टीकेंत भोजव्याकरणाचे उतारे आहेत. हा भोज म्हणजे भारमल्लीचा पुत्र होय.

**सुमेरसिंग गारदी**—(मृत्यु स. १७७४ जून) यानें नारायणराव पेशव्याला ठार मारलें. त्यानंतरहि रघुनाथरावाचा याला आश्रय होता. हा इंदूर येथें मेला. शेवटीं बारभाईनीं याचीं बायकामुलें पकडून आमरण कैदेंत ठेवलीं व चीजवस्त जप्त केली.

**सुयशस्**—( कुनाल पाहा ).

**सुरजमल्ल जाट**—( स. १७४३–स. १७६३ ) हा बापाच्या वेळेपासूनच मुखत्यारीनें काम करी. दिल्ली दरबारांतील प्रमुख सवाई जयसिंग याला पुत्र मानी. त्याच्या अश्वमेधाला हा हजर होता. त्याच्यामागें यानें ईश्वरसिंगाचा पक्ष घेतला व माधवसिंगाचा परा-

भवहि केला ( स. १७४७ ), त्यामुळें होळकराची याजवर इतराजी झाली. पुढें दिल्लीस यानें सफदरजंगाचा पक्ष स्वीकारून रोहिल्याचा पराभव केला व वाहवा मिळविली. पण पुढें सफदरजंगाचा पक्ष मागें पडून गाजीउद्दीनची सरशी झाली. त्यानें होळकर-शिंद्यांच्या मदतीनें यावर स्वारी करतांच जयाप्पा शिंद्याच्या साहाय्यानें ३० लक्ष खंडणी कबूल करून यानें बचाव करून घेतला, व गाजीउद्दीनाशीं सलोखा केला. पुढें पानपतच्या युद्धांत सदाशिवराव भाऊंनीं याचा सल्ला झिडकारला तेव्हां हा दिल्लीहून परत गेला. पण पराजित झालेल्या मराठ्यांना यानें उत्तम साहाय्य केलें. पुढें आग्र्याचा किल्ला घेतला. पुढें नजीबाशीं याचें शत्रुत्व होतें. तो स्वारी करणार असें पाहतांच हाच चालून गेला. शहादऱ्यापाशीं शिकारीस गेला असतां गैरसावध स्थितींत नजीबानें यास ठार करविलें. याची राजधानी दीग. पुत्र जवाहीर. याची छत्री गोवर्धन येथें कुसुमसरोवरावर आहे. हा मुत्सद्दी व योद्धा म्हणून अत्यंत श्रेष्ठ होता.

**सुरतिमिश्र**—हा हिंदी कवि कान्यकुब्ज ब्राह्मण होता. यानें अलंकारमाला, बिहारीसतसईवरील अमरचंद्रिका टीका, 'कविप्रिया' व 'रसिकप्रिया' यांवर टीका, रसरत्नमाला, सरसरसकाव्यसिद्धांत व रसरत्नाकार हे ग्रंथ लिहिले.

**सुरेश्वराचार्य**—( स. ९०३ सुमार ) यानें आद्यशंकराचार्यकृत बृहदारण्यक भाष्यावर वार्तिक केलें. यानें ब्रह्माशीं जीवाचा संबंध प्रतिपादतांना आभासवादाचा स्वीकार केला आहे. आभासवाद या शब्दाचा अर्थहि यानें जुन्या परंपरेप्रमाणें स्वीकारलेला दिसतो. वाघाच्या पिलाला जन्मभर शेळ्यांत ठेवलें तरी आपण व्याघ्र आहोंत असें ज्ञान होतांच तो वाघासारखा वागूं लागतो. त्याप्रमाणेंच जीवाला आपण परमात्मस्वरूप आहोंत असें ज्ञान झालें कीं तो तत्स्वरूप होतो, असें यानें प्रतिपादिलें आहे.

याचा 'नैष्कर्म्यसिद्धि' हा शंकराचार्यांच्या मतानुसार लिहिलेला ग्रंथ सध्यां उपलब्ध आहे.

शंकराचार्यांच्या यतिसंध्याविधीवर याचें श्लोकबद्ध वार्तिक आहे. तैत्तिरीय उपनिषदावरील आद्यशंकराचार्यांच्या भाष्यावर यांनीं वार्तिक लिहिलें आहे. दक्षिणामूर्तिस्तोत्रावरहि यांनीं मानसोल्लास नांवाचें वार्तिक केलें आहे.

**सुलतान आदम**—( स. १५४८-५३ ) सिंधुनदीवरील नीलाब प्रांतांतील गख्खर लोकांचा राजा. हुमायुनानें याचें राज्य खालसा केलें व यास कैदेंत टाकलें.

**सुलतान कुली कुत्बशाह**—(स. १५१२-४३खून) हा मूळचा हमदान ( इराण ) प्रांतांतला स. १४८२ नंतर महमूद शाहा बहामनींकडे आला व त्याजकडे खास तैनाती फौजेंत नोकरीस राहिला. तेलंगणच्या लढाईवर हा तेलंगणाचा तरफदार म्हणून गेला होता. दक्षिणी व सीद्दी मुसलमानांनीं महमूदशहाचा खून करण्याचें ठरविलें असतां यानें त्यास वांचविलें म्हणून त्यानें यास 'मलीक कुत्ब उल्मुक' असा किताब देऊन वजीर नायब केलें. बहादुर गिलनीनें युसुफआदिलशाहाची जमखिंडी घेतली असतां महमूदानें यास जमखिंडीवर पाठविलें. तेव्हां युसुफचा सेनापति त्यांत मारला गेला, आणि सेनापतिपद याच्याकडे आलें. तेव्हां यास तेलंगणांतील भोंगीर व दुर्गी हीं दोन गांवें मिळालीं. पुढें यानें कुलबर्ग्याचा सुभेदार दस्तुर दिनारचा मोड केला म्हणून यास होटगी व उद्‍गीर हीं दोन गांवें व 'अमीर-उल- उमराव' हा किताब मिळाला. विजयनगराच्या स्वारींत यानें पराक्रम गाजवला. पुढें सर्व कर्ती माणसें नाहींशीं झाल्यावर हा प्रमुख झाला. खुत्बा आपल्याच नांवानें वाची. महमूदशहाचे मागून हा स्वतःस शाहा म्हणवून घेऊं लागला ( ६ डिसें. १५१८ ). स. १५१२-१३ मध्यें गोवळकोंडा हें आपलें राजधानीचें शहर करून त्याचें नांव महमूदनगर असें यानें ठेविलें.

**सुलतानजी निंबाळकर**—( स. १७१५-२७ ) हा हैबतरावाचा पुत्र. हा सरलष्कर होता. हा कोल्हापूरकरांना मिळाला म्हणून शाहूनें याचा निषेध केला.

**सुलतान मुहम्मद**—औरंगजेबाचा पुत्र ( औरंगजेब पाहा ).

**सुलतानशाह लोदी**—मलीक बहीराम लोदीचा मुलगा.

**सुलतान हुसेन शर्की**—( स. १४५८-१४९९ ) या जौनपूरच्या शर्की राजानें ख्यालाच्या गाण्यांत सुधारणा करून त्याचा फैलाव केला.

**सुलेमान**—( स. ८५७ ) एक अरब प्रवासी. हिंदूंच्या साम्राज्यकल्पनेंत दुसऱ्याचें राज्य नाहींसें करण्याची कल्पना नाहीं असें यानें आपल्या प्रवासवृत्तांत लिहिलें आहे.

**सुलेमान शुकोह**—( स. १६३५-६० ) हा दाराचा मुलगा. औरंगजेबानें यास ठार केलें.

**सुविनय**—( स. १०० सुमार ) यानें चीनमध्यें बौद्धधर्माचा प्रचार केला.

**सुविधिनाथ**—हा जैनधर्माचा नववा तीर्थंकर ( तीर्थंकर पाहा ).

**सुस्थितवर्मन्**—( स. ६१९ सुमार ) बाणाचे हर्षचरित्र, निधनपूर येथील ताम्रपट आणि नालंदा येथील शिलालेख या तिन्हींवरून हा मौखरी नसून आसाममधील कामरूप येथील राजा होता असें सिद्ध झालें आहे. वरील शिलालेखावरून याच्या बापाचें नांव स्थितवर्मन् असून बायकोचें श्यामादेवी असें होतें.

हा महासेन गुप्ताचा समकालीन असून याची व महासेनाची ब्रह्मपुत्रा नदीच्या तीरावर लढाई झाली. तींत याचा पराभव झाला. हा एक प्रबळ राजा होता. याचा वचक मौखरी वंशांतील लोकांना होता. यानें आपणास 'महाराजाधिराज' ही पदवी धारण केली होती. 'श्रीमृगांक' असें याचें दुसरें नांव शिलालेखांत आढळतें ( E. I. XII, p. 69 ). याला सुप्रतिष्ठितवर्मन् आणि भास्करवर्मन् असे दोन मुलगे होते ( मौखरी by E. A. Piers, p. 95-102 ).

**सुस्सल**—( स. १११२-२८ ) काश्मीरचा राजा.

**सुहांदी**—( स. ६५० ) सिंधच्या सिंधुराज साहसीची पत्नी. हिनें चचाला राज्य मिळवून दिलें व त्याशीं लग्न केलें.

**सुंदर**—( स. १६०० सुमार ) एक हिंदी कवि. हा ग्वाल्हेरचा ब्राह्मण. शाहजहानच्या दरबारीं कविता ऐकवावयाचें काम करी. याला महाकविराज अशी पदवी होती. सुंदरशृंगार, सिंहासनबत्तिशी व बारहमासा असे याचे ग्रंथ आहेत. याची रचना शब्दचमत्कारपूर्ण आहे.

**सुंदरदास**—( स. १५९६-१६८० ) एक हिंदी कवि. याचा पिता परमानंद व माता सती. जन्मस्थान द्यौसा ( जयपूर राज्य ). हा दादू दयालाचा शिष्य. याला संस्कृत व फार्सी चांगलें येत असे. हा देखणा असून ब्रह्मचारी होता. याच्या लहानमोठ्या ग्रंथांची संख्या चाळीसपेक्षां जास्त आहे. याचे ग्रंथ सुंदरविलास, ज्ञानविलास, ज्ञानसमुद्र वगैरे. हा शांकरमत उत्तम प्रतिपादन करितो.

**सुंदरवर्मन् मौखरी**—( स. २८३-३१९ ) कनोजच्या मौखरी वंशांतील हा एक राजा असून क्षत्रवर्मन्नंतर गादीवर आला.

याला प्रथम बरींच वर्षे मूलबाळ नसल्यामुळें यानें चंद्रसेन नांवाच्या एका मुलास दत्तक घेतलें. त्यामुळें चंद्रसेनाचा मगधच्या गादीवरील वारसा हक्क सिद्ध झाला. परंतु पुढें यास कल्याणवर्मन् नांवाचा औरस पुत्र झाला. कल्याणवर्मनाचा जन्म झाल्यामुळें आपल्या वारसाहक्कांवर धाड येईल या भीतीनें चंद्रसेनानें आपल्या दत्तक बापाविरुद्ध युद्ध पुकारलें. चंद्रसेनानें लिच्छवी घराण्यांतील राजकन्येशीं लग्न केल्यामुळें लिच्छवी राजांनीं वरील लढाईत चंद्रसेनाच्या बाजूनें भाग घेतला. हा चंद्रसेन म्हणजे गुप्त घराण्यांतील जो चंद्रगुप्त पहिला तोच होय, असें रा: जयस्वाल यांनीं म्हटलें आहे.

शेवटीं चंद्रगुप्तानें ( चंद्रसेन ) याची राजधानी जें पाटलीपुत्र त्यास वेढा दिला. तेव्हां हा मारला गेला व याच्या राण्यांनीं आत्महत्या केली.

**सूदन**—( स. १७५३ ) सूदन या हिंदी कवीनें आपल्या 'सुजानचरित्र' या वीररसप्रधान काव्यांत सुरजमल्ल जाटाच्या चरित्रांतील स. १७४५-५३ मधील प्रसंग वर्णिले आहेत. ते ऐतिहासिकदृष्ट्या बरोबर आहेत. हें काव्य नागरीप्रचारिणी सभेनें प्रसिद्ध केलें आहे.

**सूरदासजी**—( स. १४८२-१५६० ) एक हिंदी भाषेंतील महाकवि व साधु. याची जन्मभूमि दिल्लीच्या जवळ असणारा 'सीही' गांव मानतात. पण कांहींच्या मतें मथुरा ते आग्रा सडकेवर असलेलें 'सनकता' हें गांव याची जन्मभूमि होय. हा सारस्वत ब्राह्मण असून याच्या पित्याचें नांव रामदास होय.

यानें आपल्या 'दृष्टिकूट' ग्रंथावर स्वतः टीका लिहून स्वत:विषयीं माहिती दिली आहे. त्यावरून हा ब्रह्मभट असून चंदवरदाई या महाकवीचा वंशज होता असें दिसतें. याला सहा भाऊ होते. ते सर्व मुसलमानांशीं झालेल्या युद्धांत मारले गेले. हा आंधळा होता.

यानें वल्लभाचार्यांच्या आज्ञेवरून 'श्रीमद्भागवत' अनेक पदांमध्यें गायिलें आहे. तीं पदें 'सूरसागर' या नांवानें प्रसिद्ध आहेत. वल्लभचार्यांच्या अष्टछाप मंडळांतील हा सर्वश्रेष्ठ कवि होय. याच्या 'साहित्यलहरी' ग्रंथांत सूरसागरांतील दृष्टकूट पदांचा संग्रह आहे. यांचा 'सूरसारावली' हा ग्रंथ 'सूरसागर' ग्रंथाची सूचि होय. याशिवाय ब्याहलो व नलदमयंती हीं याचीं काव्यें आहेत. हरिवंशावरील टीका अद्यापि उपलब्ध नाहीं. हा जन्मतः अंध नसावा. रामचरित्र गाण्यांत तुळसीदासानें प्रगट केलेलें चातुर्य यानें कृष्णलीला वर्णन करतांना प्रगट केलें आहे. यासंबंधीं हिंदीमध्यें पुढील कविता प्रसिद्ध आहेः 'सूर सूर तुळसी ससी, उडुगण केशवदास। अबके कवि खद्योतसम जहँजहँ करै प्रकाश॥' 'सूरदास सूर्य, तुळसीदास चंद्र आणि केशवदास नक्षत्रगण होय. बाकीचे कवि काजवे होत.' हे उद्धवाचे अवतार मानले जातात. यांची समाधि काशीच्या उत्तरेस दोन मैलांवर असलेल्या शिवपुरी गांवीं आहे.

**सूरदास मदनमोहन**--( कविताकाल स. १५०२-१५४२ ) हा हिंदी कवि ब्राह्मण जातीचा असून गौडीया सांप्रदायाचा वैष्णव होता. हा अकबराच्या वेळीं संडीळचा अमीन असतां सरकारी पैसा खर्च करून विरक्त झाला. याची सरस रचना सूरसागरांत आढळते. याचा ग्रंथ नाहीं.

**सूर्य**—( जन्म स. १५०८ ) हा सिद्धांतसुंदरकार ज्ञानराजाचा पुत्र. हा आपणांस सूर्यदास असें म्हणवितो. याचे ग्रंथ–१ लीलावतीटीका ( गणितामृतकूपिका ), २ बीजटीका, ३ श्रीपतिपद्धतिगणित, ४ बीजगणित ( स्वतंत्र ), ५ ताजिकग्रंथ (ताजिकालंकार), ६ काव्यद्वय, ७ बोधसुधाकर ( अध्यात्मग्रंथ ).

शिवाय याचीं पुढील आठ काव्यें आहेत–१ पद्यामृततरंगिणी, २ रामकृष्णकाव्य, ३ शंकराभरण, ४ नृसिंहचंपू, ५ विघ्नमोचन, ६ भगवतीगीत. रामकृष्णकाव्य, प्रसिद्ध असून राम व कृष्णपर दोन अर्थ त्यापासून निघतात. यांशिवाय आणखीहि याचे ग्रंथ असावेत.

**सूर्यमती**–ही काश्मीरच्या लोहर घराण्यांतील अनंतदेवाची पत्नी. पुत्र कलशाला गादीवर बसवून वानप्रस्थाश्रम स्वीकारला असतां या पतिपत्नींला त्याच्या छळामुळें आत्महत्या करावी लागली.

**सूर्यराव काकडे**—( मृत्यु स. १६७२ ) हा शिवाजीचा बाळमित्र व शूर योद्धा. हा जेध्याचा नातलग असून मोरे प्रकरणांत याचें शौर्य दिसून आलें. सभासद म्हणतोः भारतीं जसा कर्ण तसा हा होता.

**सूर्यराव सुर्वे**—( स. १६६१ ) कोंकणांतील शृंगारपूरचा राजा व आदिलशाहाचा मांडलिक. मोरे प्रकरणांत हा मोऱ्याच्या बाजूनें होता. पण शिवाजींची सरशी होतांच यानें त्यास कळविलें कीं मी तुमचा क्रीतपुत्र आहें. पण शिवाजीनें कोंकणावर स्वारी केली तेव्हां दस्तुमजमा तोंड देऊं शकत नाहीं असें पाहून तें काम यावर सोंपविलें. तेव्हां यानें मध्यरात्रीं अचानक हल्ला केला. पिलाजी नीलकंठ घाबरला, पण तानाजी मालुसरे पुढें झाला व त्यानें याची दाणादाण केली. पुढें बोलावलें असतांहि हा शिवाजीच्या भेटीस आला नाहीं. तेव्हां शिवाजीनें प्रभानवल्ली प्रांत घेऊन तेथील किल्ल्यास प्रतीतगड असें नांव दिलें. तेथें त्र्यंबक भास्कराची नेमणूक केली.

**सूर्याजी पिसाळ**—( स. १६८९ ) यानें फितुरी करून रायगड औरंगजेबाच्या ताब्यांत दिला, आणि मुसलमान होऊन वाई प्रांताची देशमुखी मिळविली. शाहूमहाराज सुटून आले तेव्हां त्यांनीं पिसाळाची कत्तल केली आणि त्याचे हाल करून ठार मारलें. याचें गांव ओझर्डे.

**सृष्टिधर**—महाभारतावरील टीकाकार. यानें देवबोध, विमलबोध, व चतुर्भुजमिश्र याच्या टीकांचा निर्देश केला आहे.

**सेऊणचंद्र यादव**—( स. ९०० सुमार ) हा दृढप्रहाराचा मुलगा होय. यानें सेऊणपूर स्थापून देशाचेंहि नांव सेऊणदेश असें ठेविलें. सेऊण देशांतल्या कांहीं भागास खानदेश असें म्हणूं लागले.

२. ( स. १०६९ ) हा यादव घराण्यांतील चवथ्या भिल्लमनंतर गादीवर आला. हा पराक्रमी असून यानें विक्रमादित्य चालुक्याला मदत केली.

**सेखोजी आंगरे**—(मृत्यु स.१७३३) कान्होजीची स्त्री जी मथुराबाई तिचा हा थोरला मुलगा. कान्होजीनंतर सरखेलीचा कारभार हाच पाहूं लागला. हा राजनिष्ठ व इमानी सेवक असून हवशांचें प्राबल्य मोडून मराठ्यांची अभिवृद्धि करण्याकरितां मनापासून झटत होता. याच्यांत भारदस्तपणा, शालीनता, कर्तृत्वाची आवड व उत्तम शौर्य हे विशेष गुण होते. याच्या वेळीं राजकोटच्या गाजीखानानें कोंकणांत लुटालूट केली. त्याचें यानें व चिमाजीनें पारिपत्य केलें. याच्या वेळीं कोंकणपट्टीवरील मुसलमानांचा अम्मल पूर्णपणें नाहींसा झाला.

स. १७३३ मध्यें यानें सीद्दीपासून थळचा मोठा किल्ला व रावळीचा किल्ला हस्तगत केला. त्यामुळें मुंबईस इंग्रजांस मोठी धास्ती पडली. 'रोझ' नांवाच्या जहाजाचा पाडाव केल्यावरून याला इंग्रजास दंडादाखल ७६०३ रु. व जहाज परत करावें लागलें. हवशी कमजोर होऊन आंगऱ्याचें प्राबल्य वाढूं नये म्हणून उंदेरी किल्ल्यांत आंगऱ्याविरुद्ध हवशास इंग्रजांनीं दारूगोळा पुरविला. पुढें हा इंग्रजांचा समाचार घेण्यास फार दिवस टिकला नाहीं. याचें वर्तन सर्वांशीं गोड व हा अष्टपैलू होता. सर्व बायामाणसांशीं याचें प्रेम व सलोखा होता.

याच्या वेळीं याच्या शिक्क्यांत निरंतर असें पद प्रथम जोडण्यांत आलें. शिक्का 'श्रीशाहू नृपतिप्रीत्या कानोजीतनुजन्मना' सेकोजी सरखेलस्य वजारत निरंतर.

**सेतेकर**—( स. १०० सुमार ) तेलगू कवि.

**सेना न्हावी**—( स. १४४८ सुमार ) हा रामानंदाचा शिष्य. पण यानें वेगळा पंथ स्थापिला. बांधवगडचे राजे याच्या शिष्यांपैकीं होते. भक्तविजयांत याची चमत्कारप्रधान माहिती दिली आहे ( भ. वि. ३४ ).

श्रावण वद्य द्वादशीस आपण समाधिस्थ झाल्याचें यानें लिहिलें आहे! ज्ञानेश्वरादि बंधूंचा फक्त याच्या अभंगांत निर्देश आहे.

**सेनाचार्य**—अमोघवर्ष राजाच्या पदरचा पंडित यानें जैनधर्माविषयीं कित्येक ग्रंथ लिहिले आहेत. याच्या ग्रंथांतील शकावरून हा शालिवाहनाच्या आठव्या शकांत होता ( कविचरित्र ).

**सेल्यूकस् निकेटर**—( ख्रि. पू. ३२३-३०० ) हा प्रथम सिकंदरचा एक प्रमुख सेनापति होता. तसाच दुसरा प्रमुख सेनापति अँटिगोनस हा होता. सिकंदर मेल्यानंतर ( ख्रि. पू. ३२३ ) दोघांमध्यें सारखीं युद्धें सुरू झालीं. सिकंदरच्या या साम्राज्यांत वर्चस्व कोणाचें असावें, हाच त्यांत हेतु होता. अशीं नऊ वर्षे सारखीं युद्धें चाललीं (स.पू. ३१३). प्रारंभीं अँटिगोनसचा जय होत होता. त्यानें याला पराजित करून पळवून लावलें होतें. पण ख्रि.पू. ३१२मध्यें यानें बाबिलोन ( पूसा ) जिंकलें. या वेळेपासून युद्धाची गति पालटली. सेल्यूकसचा सारखा जय होत गेला आणि यानें राजा पदवी धारण केली. यापुढें अँटिगोनसचीं सारखीं युद्धें चालूच होतीं. पण शेवटीं पराजित होऊन त्यास इजिप्तमध्यें पळून जावें लागलें. मग मात्र हा मॅसिडोनियन साम्राज्याच्या एशियाई भागाचा प्रतिस्पर्धीरहित राजा झाला. ख्रि. पू. ३०६ मध्यें याचा राज्याभिषेक मोठ्या थाटानें साजरा करण्यांत आला. या वेळेपासूनच विजेता या अर्थाची निकेटर अशी पदवी यानें धारण केली. इतिहासांत याला सीरियाचा राजा असें म्हटलें असलें तरी वास्तविक हा संपूर्ण पश्चिम व मध्य आशियाचा राजा होता. याच्या साम्राज्याची पूर्वेकडील सीमा हिंदुस्थानाला लागली होती. ख्रि. पू. ३०५ मध्यें यानें सिंध आणि पंजाब जिंकण्याच्या इच्छेनें हिंदुस्थानाकडे मोर्चा वळवला. तेथें चंद्रगुप्त मौर्य याच्याशीं युद्ध करण्यास सज्जच होता. त्यानें याचा सिंधूच्या काठीं पराजय केला. पण शेवटीं या दोघांचा तह झाला, आणि यानें आपली मुलगी चंद्रगुप्ताला देऊन स्नेह जोडला. कांहीं लोक म्हणतात यानें पाटलिपुत्रापर्यंत स्वारी केली होती, पण त्याला प्रमाण नाहीं. लैसन, श्लीगल, श्वातबैक इत्यादींनीं हा सिंधूपर्यंत आला होता असें सिद्ध केलें आहे. कदाचित् तह झाल्यानंतर व आप्तपणा जोडल्यानंतर हा पाटलिपुत्र येथें गेला असेल. पण युद्ध सिंधु नदीच्या तीरींच झालें आणि त्यांत चंद्रगुप्ताचा जय झाला. शेवटीं तर याच्या सैन्याचा चंद्रगुप्ताच्या सैन्यानें पाठलाग केला. जय झाला ही गोष्ट तहाच्या अटींवरूनहि लक्षांत येण्यासारखी आहे. तहाच्या अटी—१ चंद्रगुप्तानें सेल्यूकसला पांचशें हत्ती द्यावेत. २ सेल्यूकसनें चंद्रगुप्ताला पुढील प्रान्त द्यावेत: १ पॅरोपॅनिसडेई ( काबूल ), एरिया ( हिरात ), व आरॅकेशिया ( कंदाहार ), जिड्रोशिया ( मकरान ), स्ट्रेबो, एरियन, प्लूटार्क, जस्टिन व प्लिनी हे ग्रंथकार आपल्या प्राचीन पुस्तकांत असेंच मानतात.

इतकें झाल्यावर हा पुनः अँटिगोनसशीं युद्ध करण्याकरितां गेला. शेवटीं त्याचा पराजय होऊन तो ख्रि. पू. ३०१ मध्यें फ्रीगियांत मारला गेला.

ख्रि. पू. ३०३ मध्यें वरील तह झाला. तह झाल्यावर यानें मॅगेस्थनीज नांवाचा वकील चंद्रगुप्ताच्या दरबारीं ठेवला ( मेघाक्ष पाहा ).

**सेवकराम तुळजाराम**—( स. १७६५-८७ ) जयपूर व कलकत्ता येथें असलेला मराठ्यांचा वकील. याचीं पत्रें शुद्ध मराठी भाषेंत मोडींत लिहिलेलीं आढळतात. त्यांत याला दरमहा पगार तीनशें रुपये असून त्यांतील घरखर्चास फक्त ९४ राहत. ते पुरत नसल्याचें हा लिहितो ( म. व. पृ. ५७ ).

**सोच्छराज परमार**—दुसऱ्या कृष्णराजाचा पुत्र ( किराडूच्या देवळावरील लेख ).

**सोज**—( स. १७२७-१७९७ ) ऊर्दू कवि. याचें नांव सैय्यद मुहम्मद मीर. बापाचें नांव जिहाउद्दीन. हा तीर मारण्यांत व लेखनांत कुशल होता. हा फकिरी वेषांत राही. शेवटीं हा लखनौस आसफुद्दौलाचा गुरु झाला. याचें नांव मीर होतें. मीर तकीचें तेंच नांव असल्यानें यानें 'सोज' हें नांव धारण केलें. याचा एक दीवान प्रसिद्ध आहे ( क. कौ. ४ ).

**सोड्ढल**—( कथाकाल स. १०२६-५० ) या कायस्थ जातीच्या संस्कृत कवीनें 'उदयसुंदरीकथा' चंपूरूपानें लिहिली. कलादित्य-चंद्रपति-सोल्लपेय-सूर-सोड्ढल असा याचा वंश आहे. याचा गुरु-चंद्र व मातुल गंगाधर. याला ठाण्याच्या ( शिलाहार? ) चित्तराज, नागार्जुन व मम्मुनीराज या राजांचा आश्रय होता. लाट देशच्या वत्सराजानें याला बोलाविलें होतें. हा कवि आपणास वाल्मिकी व बाण यांच्या तोडीचा समजतो.

यादव घराण्यांतील जो सिंधण राजा त्याचा एक कारभारी. याचा पुत्र संगीतरत्नाकरकार शार्ङ्गधर.

**सोडास महाक्षत्रप**—( स. १५ सुमार ) हा मथुरेच्या राजुल क्षत्रपाचा मुलगा.

**सोनभट बहुतकर**—रामचंद्र निळकंठ अमात्यासारखे सुप्रसिद्ध पुरुष याच्या घराण्यांत झाले. भाऊबंदांनीं त्रास दिल्यामुळें या घराण्यांतील एक स्त्री गरोदरपणींच देशत्याग करून शिवापूरच्या ठकारदीक्षितांच्या घरीं येऊन राहिली. हें शिवापूर दादोजी कोंडदेवानें वसविलेलें होय. या बाईस मुलगा झाला तो सोनभट बहुतकर होय. ठकार हे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण असून शिवाजीच्या कुटुंबांत मुहूर्त वगैरे सांगण्यास ते जात असत. सोनभट हा विद्वान् निघाल्यामुळें ठकारांच्या ऐवजीं याचें जाणेंयेणें पडूं लागलें. सोनभटावर शिवाजीचा मोठा विश्वास जडला. सोनभटाला आबाजी व निळोबा असे दोन मुलगे होते. हेच शिवाजीच्या राज्यांत प्रसिद्धीस आलेले आबाजी सोनदेव व निळो सोनदेव होत.

**सोनजीराव भापकर**—( मृत्यु स. १७६१ ) थो. बाजीराव व नानासाहेब पेशवे यांच्या राजवटींतील एक प्रख्यात सेनानायक. लोणीचे पाटील. फार शूर. पानपतावर दहा हजार घोडदळाचे अधिपति. त्या वेळीं यांनीं एकदां सुजाउद्दौल्याचा पराजय केला होता. पानपतच्या शेवटच्या लढाईंत यांच्याकडे होळकरासह एक बगल संभाळण्याचें काम होतें. तेथेंच हे मृत्यु पावले.

**सोनाजी विश्वनाथ डबीर**—( मृत्यु स. १६६४ ) हा शिवाजीच्या पदरीं होता ( रा. खं. १७ पृ. १८ ). हा औरंगजेबाकडे तह करण्याकरितां गेला होता ( रा. खं. ८ पृ. ६ ). हा शाहिस्तेखानचा निरोप घेऊन राजगडावर शिवाजीकडे आला ( स. १६६० ). हा राजनीतिज्ञ असून यानें शिवाजीला राजनीति सांगितल्याचा शिवभारतांत निर्देश आहे. याची जिजाईबरोबर तुला झाल्याचा निर्देश आहे ( जे. श. )

**सोपानदेव**—(समाधि स. १२९७) हा ज्ञानेश्वराचा लहान भाऊ. यांनींहि पंचीकरण, हरिपाठ, नमन वगैरे प्रकरणें व सोपानदेवी या नांवाची गीतेवर एक समश्लोकी ओवीबद्ध टीका लिहिली आहे. यांच्या नांवावर दोन अगदीं भिन्न असे हरिपाठ उपलब्ध आहेत आणि तिसरा एक अर्धवट आहे ( मं. वार्षिक १८३६ क्र. ३७ ). यांचा जन्म शकें ११९९ मध्यें होऊन समाधि शकें १२१९ मार्गशीर्ष शु. १३८ सासवडीं झाली.

**सोमदेव**—( स. १०६३-८१ ) हा संस्कृतांतील कथासरित्सागराचा कर्ता. हा काश्मीरी कवि असून गुणाढ्याच्या पैशाची भाषेंतील बृहत्कथानुरोधानें यानें आपला लोकप्रिय ग्रंथ रचिला. याची भाषा प्रौढ असून कथालेखनांत याचें उत्कृष्ट कौशल्य दिसून येतें. 'क्रियानीतिवाक्यामृत' हाहि याचा दुसरा ग्रंथ आहे.

२. ( स. ११५० सुमार ) यानें 'ललितविग्रहराज' नाटक शाकम्भरींच्या विसलदेव चाहमानास अर्पण केलें.

**सोमदेवसूरि**—( स. ९५९ ) हा एक कवि असून दिगंबर जैन धर्माचा होता; यानें 'यशस्तिलकचंपू', 'नीतिवाक्यामृत,' 'युक्तिचिंतामणि' वगैरे संस्कृत ग्रंथ लिहिले आहेत. यानें 'यशस्तिलकचंपू'च्या शेवटीं स्वतःविषयीं व ग्रंथरचनेविषयीं कांहीं माहिती दिली आहे. तीवरून चंपूकाव्य श. ८८१ मध्यें राष्ट्रकूट राजा कृष्ण हा मेल्पाटी येथें राज्य करीत असतांना आणि त्याचा सामंत व अरिकेसरिन्चा पहिला मुलगा बद्यग हा गंगधारा येथें राज्य करीत असतांना तयार केलें असें दिसतें ( मं. त्रै. द. म. इ. सा. सं. २, पा. ३७ टीप ).

**सोमदेवज्ञ**—( स. १६३०-४२ ) एक ज्योतिषी. याचा पिता व आजा अनुक्रमें रुद्रभट्ट व कामभट्ट होत.

गुरु—चुलता बाळंभट्ट. याचा शिष्य वसुदेव ( गुजराथी ) जळगांवचा राहणारा.

याचे ग्रंथ—कल्पलता, कल्पवल्ली, पद्धतिभूषण ( स. १६३७), बृहत्कल्पलता, संवत्सरकल्पलता (स. १६४२). तिथिरत्न.

**सोमनाथभट्ट**—(स. १५००सुमार)तेलंगी ब्राह्मण. हा सूरिभट्टाचा पुत्र. व्यंकटाद्रि यज्वन्चा धाकटा भाऊ आणि निट्टिल घराण्यांतील होय. पार्थसारथिमिश्राच्या शास्त्रदीपिकेवर 'मयूखमालिका' नांवाची यानें टीका लिहिली.

**सोमसिंह परमार**—( स. १२३०-३६ ) आबूच्या परमारांपैकीं धारावर्षाचा पुत्र. यानें आपल्या पित्यापासून शस्त्रविद्या व चुलत्यापासून शास्त्रांचें अध्ययन केलें ( एपि. इंडि. भा.८, पृ. २११ ). याच्या वेळच्या मंत्री वस्तुपालाचा भाऊ तेजपाळ यानें आबूवर देलवाडागांवीं लूणवसही नांवाचें मंदिर बांधलें. हें आबूवरील मंदिरांत सौंदर्याच्या दृष्टीनें दुसरें आहे. कोडो रुपये लावून आपला पुत्र लूणसिंह ( लावण्यसिंह ) यास श्रेय मिळावें म्हणून स. १२३० मध्यें तें बनविलें. याची पूजा वगैरेकरितां यानें बारठ परगण्यांतील डबाणी हें गांव मंदिराला दिलें. त्या गांवीं मिळालेल्या वि. सं. १२९६ श्रावण शु. ५ च्या शिलालेखांत मंदिर, तेजपाळ आणि त्याची पत्नी अनुपमादेवी यांचा उल्लेख आहे. याच्या वेळचे तीन शिलालेख आतांपर्यंत मिळाले आहेत. ते वि. सं. १२८७-९३ पर्यंतचे आहेत ( एपि. इंडि. भा. ८, पृ. २०८-२२ ). हा गुजराथच्या दुसऱ्या भीमदेवाचा सामंत होता. यानें स्वतः

आपला पुत्र कृष्णराज ( कान्हडदेव ) याला युवराज केलें होतें, व त्याला हातखर्चाकरितां नाणागांव ( जोधपूर राज्यांतलि गोडवाड इलाख्यांतील ) दिलें होतें.

**सोमा**—ही गणपतीची बायको होती. हिच्यापासून रुद्रम्बा नांवाची मुलगी झाली. ती पुढें राणी झाली.

**सोमेश्वर कलचुरी**—( सोविदेव कलचुरी पाहा ).

**सोमेश्वर (पश्चिम) चालुक्य**—(स.१०४२–६८) हा दुसऱ्या जयसिंहानंतर गादीवर आला. याचा पिता आहवमल्ल. बिल्हणानें याच्या पराक्रमाचें फार वर्णन केलें आहे. यानें राजाधिराज चोलाचा कोप्पम येथें पराभव केला. पण पुढें त्याचा भाऊ राजेंद्रानें याचा पराभव केला. यानें भोजाचा पराभव करून धार घेतलें. याचे कारकीर्दींत कदम्ब वगैरेंनीं स्वतंत्र होण्याचा प्रयत्न केला. यानें कांची, गौंड, बंगाल, कामरूप वगैरे देशांवर स्वाऱ्या केल्या व कल्याण ही राजधानी केली. मैळालदेवी ही याची राणी बनवासी प्रांतावर स. १०५० च्या सुमारास राज्य करीत होती व दुसरी राणी केतलदेवी ही स. १०५४ मध्यें पोन्नवाड जिल्ह्यावर राज्य करीत होती. यानें बचलदेवी, चन्दलकब्बे ( चन्द्रिकादेवी ), मैळालदेवी व केतलदेवी या चार राण्या केल्या होत्या. याच्यामागून याचा पुत्र सोमेश्वर दुसरा हा राजा झाला. यानें तुंगभद्रेंत जलसमाधि घेतली. यानें अनेक काव्यें, कथा व नाटकें लिहिलीं असें विक्रमांकदेवचरितांत लिहिलें आहे ( ४. ४६-६८ ).

२. ( स. १०६९–७६ ) पहिल्या सोमेश्वराचा पुत्र. यानें कदम्ब, अलुप व चोल यांवर वचक बसविला. यास सोयीदेव ऊर्फ भुवनैकमल्ल असें म्हणत. याची राणी चोलकन्या होती. यानेंच चोल राजास गादीवर बसण्यास मदत केली होती.

यानें राजेंद्र चोलाचा पराभव केला. तिसरा जयसिंह ( नोलंबवाडी ) व सहावा विक्रमादित्य ( बनवासी ) या भावांपैकीं दुसऱ्यानें याला कैद करून राज्य घेतलें.

३. ( स. ११२६-३८ ) सहाव्या विक्रमादित्याचा पुत्र. यानें विज्जल व कलचुरी यांनीं डळमळीत केलेली चालुक्यसत्ता तात्पुरती पुनः प्रस्थापित केली. यानें आंध्र, द्रविड, मगध व नेपाळ येथील राजांवर स्वारी केली व मानसोल्लास ( अभिलषितार्थचिंतामणि ) ग्रंथ रचला ( स. ११२७ ). पुढें कलचुरी व गणपति या घराण्यांची वाढती सत्ता व म्हैसूरच्या बल्लाल होयसळ राजाचा उदय यांमुळें या चालुक्य-सत्तेस या वेळीं ग्रहण लागलें. यास भूलोकमल्ल म्हणत. याच्या नंतर जगदेकमल्ल दुसरा हा राजा झाला. याचें व कलचुरी राजा पेरमादि याचें वांकडें होतें ( B. ).

४. ( स. ११६३–८९ ) तिसऱ्या तैलाचा मुलगा. याला त्रिभुवनमल्ल तिसरा व वीर सोमेश्वर म्हणत. हा या घराण्याचा शेवटचा राजा होय. याच्या उत्तरेकडील राज्यांत वऱ्हाड व माळवा हीं सुद्धां येत. हे निरनिराळ्या प्रान्तांवर आपले राजपुत्र, राण्या व इतर नातलग यांना राजप्रतिनिधि नेमीत. अशा प्रतिनिधींचीं नांवें निरनिराळ्या शिलालेखांतून व ताम्रपटांतून पुष्कळ आलीं आहेत. शेवटीं यांचें उत्तरेकडील राज्य देवगिरीचे यादव व दक्षिणेकडील राज्य द्वारसमुद्राचा दुसरा बल्लाळ होयसळ यांनीं जिंकून घेतलें. यानें आपला सेनापति वर्मरसच्या मदतीनें कलचुरी राजा सिंघण याजवर स्वारी करून गेलेला प्रांत परत मिळविला होता.

हा धर्मपुरास राज्य करीत होता. हा फार बलाढ्य असून पुष्कळशा शिलालेखांवरून याच्या राज्याचा विस्तार अजमावतां येतो. याच्या नंतरच्या राजांनीं विशेष कांहीं केलें नाहीं. याच्यानंतर चालुक्यांच्या सत्तेस उतरती कळा लागली.

**सोमेश्वर चौहान**—( स. ११६९ ) पृथ्वीराजाचा पिता. हा अर्णोराज व कांचनदेवी यांचा पुत्र. कांचनदेवी सिद्धराज जयसिंहाची मुलगी. पृथ्वीराजाची माता कमलादेवी अनंगपाळ तुवराची मुलगी होय. याचें पालणपोषण सिद्धराज जयसिंहानें व कुमारपालानें केलें.

**सोमेश्वरदेव**—( स. १२३२–५२ ) कुमार व लक्ष्मी यांचा हा पुत्र. याची कीर्तिकौमुदी बँबे संस्कृत सीरीजमध्यें श्री. काथवटे यांनीं संपादून प्रसिद्ध केली आहे.

याचे ग्रंथ व प्रशस्ति पुढीलप्रमाणें उपलब्ध आहेत:—

ग्रंथ—१ सुरथोत्सव ( काव्यमालेंत प्रसिद्ध आहे ), २. रामशतक, ३ काव्यादर्श, ४ काव्यप्रकाशटीका, ५ उल्लाघराघव ( नाटक ), ६ कीर्तिकौमुदी.

प्रशस्ति—१ आबूच्याजवळ देलवाडागांवीं तेजपालानें बांधलेल्या लूणवसही मंदिरावरील प्रशस्ति. २ गिरनार पर्वतावरील तेजपालानें जीर्णोद्धार केलेल्या दोन मंदिरांवरील प्रशस्त्या. ३ वीर नारायण प्रासादावरील प्रशस्ति. ही होती असें जैन राजशेखराच्या प्रबंधकोशावरून कळून येतें. सध्यां उपलब्ध नाहीं.

**सोमेश्वर परमार**—( स. ११६१ ) आबूच्या परमारांपैकीं किराडूच्या शाखेंतील उदयराजाचा पुत्र. हा सिद्धराज जयसिंहाच्या कृपेंतील सामंत होता. सिंधुराजपुरचें गेलेलें राज्य यानें जयसिंहाच्या कृपेनें पुनः मिळ-

विलें, आणि जयसिंहानंतर गादीवर आलेल्या कुमारपालाच्या कृपेनें आपलें स्थान स्थिर करून यानें किराडू येथें पुष्कळ वर्षे राज्य केलें. यानें जज्जक राजापासून १००० घोडे दंड म्हणून घेतले व त्याचे दोन किल्ले जैसलमीर राज्यांतील तणुकोट्ट व नक्सर ( जोधपूर राज्यांतील ) हे घेतले ( स. ११६१ ). शेवटीं जज्जकला कुमारपाल सोलंकीच्या स्वाधीन करून किल्ले वगैरे त्याला दिले. या कृत्याच्या स्मरणार्थ किराडू येथें वरील अर्थाचा लेख कोरविला. तो लेख अद्यापि अप्रकाशित आहे.

**सोमेश्वर होयसळ**—( स. १२३४-५४ ) हा दुसऱ्या नरसिंहाचा मुलगा. हा चोल देशांत विक्रमपूर येथें राज्य करीत होता. याला बिज्जला व देवला ( चालुक्य-राजकन्या ) अशा दोन बायका होत्या.

**सोयराबाई**—( शिवाजी व संभाजी पाहा ).

**सोयीदेव**—पश्चिम चालुक्यांपैकीं दुसऱ्या सोमेश्वराचें नामान्तर.

**सोविदेव कलचुरी**—( स. ११६७-७५ ) बिज्जलचा पुत्र. याला सोमेश्वर किंवा रायमुरारी असें म्हणत.

**सोहिरोबा अंबिये**—( स. १७१४-९२ ) मराठींतील एक संत व कवि. सांवतवाडी संस्थानांतील बांदे गांवचे राहणारे व तेथील कुलकर्णी. यांचा जन्म शके १६३६ ( स. १७१४ ) च्या सुमारास झाला. जात सारस्वत ब्राह्मण. यांचे वंशज सध्यां गोंवें प्रान्तांत आहेत. हे कुलकर्ण करीत असतां सावंतवाडीच्या गादीवर खेमसावंत हे अल्पवयी होते. तेव्हां त्यांचा कारभार त्यांचे चुलते आबासाहेब हे पाहत असत. त्यांनीं एकदां एका खोलींत यांना कोंडून 'देव दाखवा' म्हणून फर्माविलें. तेव्हां एक ज्वाला उत्पन्न होऊन आबासाहेबांचे डोळे दिपले. तेव्हां यांना त्यानें सोडलें, पण यांनीं सांगितलें कीं, तुझी किंवा माझी आहुति घेतल्याशिवाय ही ज्वाला शान्त होणार नाहीं. पुढें लवकरच आबासाहेबानें दारूच्या कोठारांत आपणास जाळून घेतलें असें म्हणतात. पुढें गहिनीनाथ किंवा गैबनाथ यांनीं यांच्यावर अनुग्रह करून वरदहस्त मस्तकीं ठेवला. तेव्हांपासून यांनीं लेखणी खालीं ठेवली. यांच्या कवितेचा बराच भाग यांच्या बहिणीच्या हातचा आहे. आणखीहि कांहीं कविता या बहिणीनें पानावर लिहून ठेविली होती ती चुकीनें यांच्या मातेच्या हातून जाळली गेली. हे आपल्या वयाच्या साठाव्या वर्षी उत्तर हिंदुस्थानांत यात्रेकरितां गेले. तिकडेच शके १७०१ (स. १७७९) मध्यें महादजी शिंदे यांच्याशीं भेट झाली. त्या वेळीं महादजींना सडेतोड उत्तर म्हणून असलेलीं यांचीं दोन हिंदी पदें यांच्या वैराग्याची साक्ष देतात. पुढें हे उज्जनीस दहा वर्षे राहिले व तेथेंच एके दिवशीं हे मठांतून बाहेर पडले ते पुनरपि दिसले नाहींत. 'गादीवर दिसणें हें सरलें। अवघें प्राक्तन हें मुरलें,' हें पद फक्त बसण्याच्या जागीं आढळलें. शके १७१४, चैत्र शुद्ध नवमी या दिवशीं वयाच्या अठ्ठयाहत्तराव्या वर्षी यांनीं आपला देह सोडला ( म. क. वि. १, पा. ३७७-४०१ ).

**सौदा**—(स. १७११-८०) एक ऊर्दू कवि. याचें नांव मीर्झा मुहम्मद रफी. याचा जन्म दिल्लीचा. बाप व्यापारी होता म्हणून यानें 'सौदा' हें नांव घेतलें. हा सुलेमान कुलीखाचा शागीर्द म्हणजे शिष्य होता. हा प्रथम फार्सीत नंतर ऊर्दूंत कविता करूं लागल्यानें हा लवकर लोकप्रिय झाला. याचें गद्य व पद्य असें दोनहि प्रकारचें लिखाण आहे. हा शेवटीं लखनौस राहण्यास आला.

**सौमिल्ल**—कालिदासानें मालविकाग्निमित्र नाटकांत निर्देश केलेला एक नाटककार. याचें एकहि नाटक प्रसिद्ध नाहीं. कदाचित् यानें मृच्छकटिक नाटक लिहून तें शूद्रक या कल्पित व्यक्तीच्या नांवावर घातलें असावें.

**स्कंदगुप्त**—( स. ४५५-८० ) गुप्तवंशांतील कुमारगुप्ताला अनंतदेवीपासून झालेला मुलगा. हूणांच्या स्वारींत याचा पिता मारला गेला, तेव्हां यानें धीर न सोडतां तीन महिने हूणांना तोंड देऊन हूणांचा पराजय केला व आपलें राज्य टिकविलें ( भिटारीच्या स्तंभावरील याचा लेख, ज. बाँ. ब्रँ. ए. सो. भा. १६, पृ. ३४९-५०; फ्लीट गु. इं. पृ. ५३-५४ ). यानें क्रमादित्य, विक्रमादित्य, राजाधिराज व महाराजाधिराज अशा पदव्या धारण केल्या होत्या. हा परमवैष्णव होता. याच्या वेळचे दोन शिलालेख गुप्तसंवत् १३६ व १४१ (स. ४५५, व ४६०) मधील मिळतात. गु. सं. १३६ ( १३७, १३८ ) चा जुनागड येथील लेख ( फ्ली. गु. इं. लेखसंख्या १४ ) व गु. सं. १४१ चा काहाऊ येथील ( संयुक्त प्रान्तांतील गोरखपुर जिल्ह्यांतील ) लेख ( फ्ली. गु. इं. लेखसंख्या १५ ), तसेंच एक दानपत्र गुप्त-सं. १४६ ( स. ४६५ ) मधील मिळालें आहे. तसेंच अलाहाबाद जिल्ह्यांतील गढवा येथील विष्णुमंदिरासंबंधीं एक फुटका शिलालेख गुप्त-सं. १४८ (स. ४६७) मधील मिळाला आहे. त्यांतील राजाचें नांव फुटून गेलें आहे (फ्ली. गु. इं. १६, ६६). पण तो फुटका शिलालेख याचाच असावा. कारण तेथें दुसरा चंद्रगुप्त व कुमारगुप्त यांचे शिलालेख चांगले आढळतात. तसेंच

याचे चांदीच्या नाण्यांवर गुप्त-सं. १४१-१४८ (स. ४६०-४६७) पर्यंतचीं वर्षे आढळतात. याचीं सोन्याचांदीचीं अनेक प्रकारचीं नाणीं मिळतात (जा. ऐ. का. गु. डा. पा. ११४-३४, लेख १९-२१). शेवटलीं दहा वर्षे याला श्वेतहूणांशीं लढण्यांत घालवावीं लागलीं. याच्यानंतर पुरगुप्त गादीवर आला.

**स्कंदस्वामी**—याचें ऋग्वेदावर भाष्य आहे.

**स्टीफन्स**—(जन्म स. १५४९) 'ख्रिश्चनपुराण' नांवाच्या ओवीबद्ध मराठी ग्रंथाचा कर्ता.

**स्थाणुरवि चेरराज**—(स. ८०० सुमार) हा चेरवंशांतील एक राजा. हा आदित्य चेलराजाचा समकालीन व मित्र होता.

**स्थिरदेव**—(स. ९०० सुमार) मेघदूत काव्यावर टीका लिहिणारा पंडित.

**स्वामीनारायण**—(जन्म स. १७८१) यानें एक वैष्णवपंथ स्थापन केला आहे. त्यास 'स्वामीनारायणपंथ' असें म्हणतात. याला हरिकृष्ण असें म्हणतात. यानें संन्यास घेतल्यावर सहजानंद असें नांव घेतलें होतें. याचा जन्म अयोध्या प्रांतांत छपैया गांवांत सरवरीया जातीच्या ब्राह्मणकुलांत स. १७८१ (संवत् १८३७ रामनवमी) सालीं झाला. याची मुक्तानंदाच्या मार्फत रामानंदाशीं भेट झाली आणि यानें रामानंदाला गुरु केलें.

# ह

**हगान**—(हगामाश पाहा)

**हगामाश**—हा मथुरेचा क्षत्रप राजा असावा. कारण हें नांव असलेलीं कांहीं नाणीं मथुरा येथें सांपडलीं आहेत. त्यांत एका नाण्यावर हगान व हगामाश अशीं दोन्ही नांवें आहेत. कदाचित् हे एकामागून एक झालेले असावेत किंवा भाऊ असावेत.

**हणमंतभट गुळवणी**—(स. १७७५ सुमार) विद्यानर्जाक पारें नांवाचें गांव आहे तेथील हा ग्रामजोशी. भगवंतराव व भवानराव प्रतिनिधींचा साहाय्यकर्ता. याचाच नातू हणमंतराव सदाशिव हा भगवंतरावाची पत्नी राजसबाई यांचा कारभार करीत होता (म. रि. उ. १, पृ. ४३४-३८).

**हणमंतराव**—(स. १७८१-८२) रघुनाथरावदादाचा इंग्लंडांत गेलेला वकील.

**हदीया**—विजापूरच्या इब्राहिम आदिलशहाची मुलगी व मूर्तझा निजामाची पत्नी.

**हनुमत्**—यानें गीतेवर पैशाचभाष्य नांवानें एक टीका लिहिली आहे. गुजराथ प्रिंटिंग प्रेसनें छापलेल्या गीताटीकांत दुसऱ्या आवृत्तींत ही टीका छापली आहे.

२. (स. ११८०-१२०० सुमार) महानाटक किंवा हनुमन्नाटका कर्ता. याच्या चवदा अंकी व नऊ अंकी अशा दोन प्रती आहेत. हें हनुमानानें दगडावर लिहिलें आणि समुद्रांत बुडविलें, असें चंद्रशेखर नांवाच्या टीकाकारानें लिहिलें आहे. हें नाटक समुद्रांतून काढून भोजानें त्याचा पुनरुद्धार केला, अशी आख्यायिका आहे. याला नाटकापेक्षां काव्याचें रूप आहे. मधूनमधून संवाद आहेत.

**हनुमन्तस्वामी**—(स. १७८३-१८१८) हे समर्थांचे वडील बंधु जे श्रेष्ठ त्यांच्या नातवाचे नातू होत. यांनीं दप्तरांतील कागदपत्रांचें साहाय्य घेऊन समर्थांच्या चरित्रपर बखर लिहिली आहे.

ही बखर हनुमंतस्वामीच्या नांवानें प्रसिद्ध असली तरीहि हनुमंतस्वामीच्या आज्ञेवरून संस्थानचे कारभारी रा. रंगो लक्ष्मण मेढे यांनीं जुनीं कागदपत्रें व टिपणें पाहून शके १७१५ प्रमादीनाम संवत्सरीं प्रथम पुरी केली. त्या प्रतीवरून पुढें मल्हार रामराव चिटणीस व रंगो लक्ष्मण या उभयतांनीं मिळून प्रस्तुतची प्रत शके १७४० चे आश्विन शु. १० मीस तयार केली.

दोनहि प्रतींच्या कांहीं जुन्या नकला सत्कार्योत्तेजक सभेच्या संग्रहीं आहेत. शके १७११ श्रावण शु. ९ स समाप्त झालेली एक बखर सभेस मिळाली आहे. खुद्द बखरींत (पृ. १३) पाहिलें तर समर्थांचे नातू जे गंगाधरस्वामी यांनीं समर्थचरित्र स्वतः अवलोकन केलेल्या मा. आक्कासारख्या व्यक्तीच्या तोंडी माहितीवरून आणि श्रीकल्याण-उद्धव-वासुदेवादि समर्थशिष्यांनीं लिहून ठेविलेल्या चरित्रांच्या आधारें एक चरित्र स. १६४० त लिहिण्यास आरंभ केला आणि बहुधा त्यांचीच १६४५ मध्यें तयार झालेली परळीवरील प्रत या दोन प्रतींच्या

आधारें (पृ. ५३४) १७१५ तील प्रत तयार झाली असें स्पष्ट दिसतें. जरा अधिक बारकाईनें पाहिल्यास तत्कालीन कांहीं टिपणांचा किंवा चरित्रविषयक स्फुट ग्रंथांचाहि आधार या बखरीस आहे असें आढळून येतें. (अनंतदास रामदासीकृत प्रस्तावना, पा. १५).

**हबीब**—(स. १५५७-६१) काश्मीरच्या इस्माईलचा मुलगा. याच्यानंतर अकबर बादशहानें काश्मीरचें राज्य घेतलें.

**हबीब सुलतान**—विजापूरच्या आदिलशाही घराण्यांतील जो शेवटचा राजा सिकंदर त्याचा मुख्य कारभारी जो खवासखान दुसरा याची ही बायको होय.

**हमीदखान**--(स. १६२९) बुर्‍हाण निजामशाहाचा कारभारी व सेनापति. यानें लुखजी जाधवाचा भर दरबारांत खून केला.

२. (स. १७२५) गुजराथेंतील बंडखोर.

**हयग्रीवबास मानभाव**—(स. १२७५-१३२४) सुप्रसिद्ध मानभाव. ह्यांचें नांव हिरण्यगर्भभट्ट असें होतें. हे गोदावरीचे कांठीं पंचाळेश्वराजवळ राक्षसभुवन नांवाचें गांव आहे तेथील देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. यांच्या २८० श्लोकांच्या स्तोत्राचें नांव गद्यराजस्तोत्र. तें निर्यमक आहे. यांचे पिते माधवभट्ट. माता कावेरी. हे काशीस निघाले असतां वाटेंत कवीश्वराचार्यांची (भास्करची) भेट झाली व यानें त्यांचें शिष्यत्व पत्करलें. ह्यांना हयग्रीवाचार्य हें नांव प्राप्त झालें. हे पैठणास मृत्यु पावले.

**हयातं मुंहमद**—(स. १७७८) भोपाळचा राजा. नंतर फौलादखान राजा झाला.

**हरजी राजे महाडिक**—(स. १६६८-१६९४) हा परसोजीचा मुलगा, व थोरल्या शिवाजीमहाराजांचा जांवई. याचें शिवाजीच्या मुलीशीं लग्न स. १६६८ मध्यें झालें.

रघुनाथ नारायण हणमंते यास शिवाजीनें कर्नाटकचे कामावर नेमिलें होतें. रघुनाथपंतानें तिकडचा बंदोबस्तहि फार चांगला केला. पण संभाजीच्या राज्याभिषेकाच्या वेळच्या गडबडींत रघुनाथपंत विरुद्ध बाजूचे आहेत अशा समजुतीनें रघुनाथपंतांना पकडून स. १६८० च्या पौष महिन्यांत हरजीराजे महाडिक व श्यामजी नाईक पुंडे यांना कर्नाटकाचा कारभार सांगितला, असा शकावलींत निर्देश आहे. पण ही नेमणूक तात्पुरती असावी. पुढें रघुनाथपंत संभाजीमहाराजांकडे येऊन त्यांनीं आपल्याबद्दलचा संशय घालविला आणि संभाजीनेंहि रघुनाथपंताला अमात्यपद दिलें. पण रघुनाथपंताचें संभाजीशीं फार दिवस जमलें नाहीं. पुढें तो परत जात असतां मृत्यु पावला, तेव्हां कर्नाटकाचा कारभार हरजी राजे महाडिक व श्यामजी नाईक पुंडे यांजकडे पुनः सोंपविण्यांत आला (जे. श., मे महिना, स. १६८३).

कर्नाटकांत याच्या बरोबर श्यामजी नाईक पुंडे होता, पण त्याला संभाजीनें कैद करविल्यामुळें तिकडचा कारभार हा एकटाच पाहत असे. यानें तिकडे चांगला जम बसविला. स. १६८२ च्या चैत्रांत श्रीरंगपट्टण व त्रिचनापल्ली येथील सत्ताधीशांचा तंटा लागला. त्यांत यानें त्रिचनापल्लीकरांना मदत केली. लढाई होऊन श्रीरंगपट्टणचा सरदार कुमार व दोन हजार घोडे पाडाव केले. एकोजीच्या पश्चात् त्याची पत्नी दीपाबाई व मुलगा शहाजी यांच्याशीं सलोख्यानें वागून यानें कर्नाटक हें स्वतंत्र राज्यच निर्माण केलें. औरंगजेबानें विजापूर व गोवळकोंडें बुडविलें, पण त्याला या नव्याच मराठी राज्याकडे लक्ष द्यावें लागलें. संभाजीलाहि हा मागून वसूल पाठवीत नाहीं असें वाटल्यावरून संशय उत्पन्न झाला व त्यानें या प्रान्ताची व्यवस्था पाहण्याकरितां केसो त्रिमल पिंगळे यास पाठविलें. केसोपंताला औरंगजेबाच्या चढाईला तोंड देण्याचेंच मुख्य काम होतें. प्रथम हरजीचा व त्याचा विरोध येऊन निराळ्याच भानगडी उत्पन्न झाल्या. त्यामुळें औरंगजेबाची चढाई होऊं लागली तेव्हां हरजीनें समजुतीनें आपलें सैन्य व सामान केसोपंताच्या स्वाधीन केलें. त्यामुळें मराठ्यांचें बल वाढून हरजी व संताजी यांनीं अर्काटचें मजबूत ठाणें काबीज केलें. केसोपंतानेंहि चिंगळपट व कावेरीपाक हीं ठाणीं घेतलीं. कांचीला युद्ध झाल्यावर वांदिवाश येथें मोंगल-मराठ्यांचें तुंबळ युद्ध झालें (८।३।१६८८). पण पराजय कोणाचाच झाला नाहीं. इतक्यांत महाराष्ट्रांत संभाजी मारला गेला आणि ही बातमी येतांच हरजीनें केसोपंतास त्रिनोमाली येथें कैद केलें (संभाजी ९२-९३). पुढें राजाराम जिंजीस आल्यानंतर सर्वच परिस्थिति पालटली. हा शिवाजीमहाराजांचा जावई व मराठी राज्याला अत्यंत उपयोगी पडलेला सरदार शेवटीं जिंजीच्या वेढ्यांत मृत्यु पावला (स. १६९४).

**हरदत्तमिश्र**—(स.११०० सुमार) आपस्तम्बमंत्रपाठाचें दुसरें नांव एकाग्निकांड आहे. त्यावर हरदत्ताचें भाष्य आहे. हा आपणास 'पदवाक्यप्रमाणज्ञमहामहोपाध्याय' असें म्हणवून घेतो. याची व्याख्या विद्वत्ताप्रचुर आहे. सायणानें आपल्या माधवीय धातुवृत्तींत आणि

देवराजानें आपल्या निघण्टुभाष्यांत याचा निर्देश केला आहे. त्यावरून हा तेराव्या शतकाच्या पूर्वीचा ठरतो.

यानें आपस्तंबगृह्यसूत्रावर 'अनाकुला' आणि आश्वलायन गृह्यसूत्रावर 'अनाविला' नांवाची टीका लिहिली. शिवाय गौतमधर्मसूत्रावर 'मिताक्षरा' व आपस्तंबधर्मसूत्रावर 'उज्वला' नांवाची टीका लिहिली आहे. याच्या सर्व टीका महत्त्वाच्या आहेत.

हा दक्षिण हिंदुस्थानांतील असून याला चोलांची माहिती चांगली दिसते. याचें लिखाण अगदीं व्याकरणदृष्ट्या शुद्ध आहे.

याचा पिता पद्मकुमार. हा अग्निकुमाराचा धाकटा भाऊ आणि अपराजिताचा शिष्य. याचें मूळ नांव सुदर्शन. वामन व जयादित्य यांच्या काशिकावृत्तीवर 'पदमंजरी' नांवाची यानें टीका लिहिली आहे. शिवाय हरिहरतारतम्य व चतुर्वेदतात्पर्यसंग्रह हे याचे ग्रंथ आहेत. हे सर्व हरदत्त एकच मानितात. शंकरभट्टानें द्वैतनिर्णयांत असेंच मानलें आहे. हा आपल्या ग्रंथांत तामिळ शब्दाचा उपयोग करतो.

**हरपाळदेव**—( मृत्यु स. १३१८ ) हा देवगिरीच्या रामदेवराव यादवाचा जांवई होय. अलाउद्दीनाचे हातीं देवगिरि गेल्यानंतर यानें मोठा उठाव करून मुसलमान किल्लेदारास हाकून लाविलें आणि स्वतः स्वतंत्रतेनें राज्य करूं लागला. तेव्हां स. १३१८ मध्यें मुबारिक खल्जीनें यास पकडून याला जिवंत सोलून हाल करून मारिलें व महाराष्ट्र प्रांत आपल्या राज्यास जोडला.

२. ( स. ११४५–५५ ) हा ठाण्याच्या शिलाहारांपैकीं पहिल्या अपरादित्याचा मुलगा. याचे स. ११४५, ११४९, ११५० व ११५३ मधील लेख सांपडले आहेत ( मु. रि. भा. १ ला, पृ. १३७, १४६ ).

**हरभट पटवर्धन**—(समाधि स. १७५० डिसें. ३) पटवर्धनांचा मूळ पुरुष. हरभटबाबा कोतवडेकर हा शके १६८२ मार्ग. व. १ सोमवार ( स. १७६० डिसें. ३ ) रोजीं पुणें येथें समाधिस्थ झाला. याची समाधि ओंकारेश्वराजवळ धक्याचे पिछाडीस श्री. भुस्कुटे यांच्या शेजारच्या घरांत आहे. यांनीं मरणापूर्वी चतुर्थाश्रम घेतला होता ( मं. वार्षिक श. १८३७ पा. ३०२ ). यांचा पुत्र गोविंद हरि पटवर्धन.

**हरमॉइस**—( खि. पू. २० ) हा इंडो-ग्रीक लोकांचा शेवटला राजा. याच्या ताब्यांत पंजाबचा कांहीं भाग होता. याचा पहिल्या कदफिसेसनें पराभव करून पंजाब प्रांत काबीज केला. याच्या बायकोचें नांव कॅलीओप असें होतें ( V. Smith, p. 258 ).

**हरराज**—( स. १५५१ ) एक हिंदी कवि. हा कवि जेसलमेर येथील राजाचा आश्रित होता. यानें 'ढोला मारूरी चउपदी' हें काव्य लिहिलें. हा ग्रंथ राजस्थानी किंवा मारवाडी भाषेत आहे.

**हरसेवकमिश्र**—एक हिंदी कवि. यानें कामरूपकथेंत कामरूप देशाच्या राजकुमार आणि राजकुमारी यांची प्रेमकथा वर्णिली आहे. हा ओंडछा–नरेश पृथ्वीसिंहाचा आश्रित होता.

**हरिकवि ऊर्फ भानुभट्ट**—( स. १६८५ ) थोरल्या शिवाजीचा मुलगा जो संभाजी त्याच्या दरबारीं हा होता. याच्या बापाचें नांव नारायण अगर नारायणसूरि असें असून आईचें नांव अन्नपूर्णा असें होतें. जरी याचें नांव हरिकवि होतें तरी पण हा भानुभट्ट या नांवानें फार प्रसिद्ध होता. हा महाराष्ट्रांतील राहणारा होय. रंगनाथ हा याचा आजा आणि पद्मनाभ चुलता.

संभाजीचा गुरु जो कृष्णपंडित त्याच्या आज्ञेवरून यानें स. १६८५ मध्यें 'शंभुराजचरित' ( संभाजीचें चरित्र ) हा ग्रंथ संस्कृतांत लिहिला. संभाजीचा गुरु कृष्णपंडित आणि कविकलश हे दोघे बहुतेक एकच होत. वरील ग्रंथांत यानें संभाजीचे सुरतेच्या तापीकांताच्या मुलीशीं झालेल्या लग्नाचें वर्णन केलें आहे. त्या मुलीचें नांव चंपा असें होतें. याशिवाय यानें हैहयेंद्रचरित, हैहयेन्द्रचरितटीका, सुभाषितहारावलि वगैरे ग्रंथ लिहिले. 'शंभुविलासिका' हें हैहयेन्द्रचरितटीका याच ग्रंथाचें प्रसिद्ध नांव असून तो संभाजीच्या सांगण्यावरून यानें लिहिला. जरी हा संभाजीचा आश्रित होता तरी याचें वास्तव्य सुरत येथें जास्त असे. याचा बापच याचा गुरु होता. याला चक्रपाणि नांवाचा एक धाकटा भाऊ होता.

**हरिगुप्त ( आचार्य )**—( स. ५५० सुमार ) या जैन आचार्यास तोरमाण या हूण राजानें गुरु केलें होतें. त्याची राजधानी उत्तर हिंदुस्थानांतील पब्बैया (पार्वतिका किंवा पार्वती ) येथें हा राही. याचा शिष्य देवगुप्त. हा गुप्त घराण्यांतील म्हणवितो.

**हरिचरणदास**—( स. १६४१–८१ ) यानें कुमारसंभव काव्यावर 'देवसेना' नांवाची टीका लिहिली. ह्यानें आपणास 'राधाकृष्णचरणकमलसेवि' असें म्हटलें आहे. 'गुप्तवृंदावनरहस्य' हा ग्रंथहि याचा असावा.

**हरि दामोदर नेवाळकर**—(मृत्यु स. १७६५ मे ९) झांशीच्या राजघराण्याचा पूर्वज. हा थो. बाजीरावाच्या वेळीं निजामाला पायबंद घालण्याकरितां वऱ्हाडांत होता ( स. १७३५; पे. द. १७. ५१; ३०. १६९ ).

दमाजी गायकवाडाचा खानदेशांत बंदोबस्त करणारांत हा होता ( पे. द. २०.१५१; १५२; १८२ ). यानें चाकणचा किल्ला व विजयदुर्ग घेतला ( स. १७५५ ). पुढें याची उत्तरेकडे नेमणूक झाली. पेशव्यांच्या बहुतेक महत्त्वाच्या राजकारणांत हा असे. शेवटीं विजयनगरकडे उत्पन्न झालेल्या तोतयाच्या भानगडींत श्रम झाल्यानें यास ज्वर येऊं लागला, व हा मृत्यु पावला. याचा पुत्र रघुनाथ व शिवराम. शिवरामाचा पुत्र गंगाधर. तोच झांशीच्या लक्ष्मीबाईचा पति.

**हरिदास**—( कविताकाल स. १५४३–६० ) हिंदी कवि. हा टट्टीसांप्रदायाचा संस्थापक. हा मोठा गवई असून तानसेन याला गुरूप्रमाणें मान देई. हा सनाढ्य ब्राह्मण होता.. हरिदासजी के ग्रंथ, पदें व बानीं प्रसिद्ध आहेत. 'सिद्धांतके एकोणीस पद' व 'केलिमा' हे यांचे दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. याचे शिष्य मोठे महात्मे व कवि होते.

२. ( स. १७४४ ) क्षत्रिय जातीचा गुजराथी कवि. शिवविवाह व वेदांत या विषयावर याची गुजराथी कविता आहे.

३. 'पुरंजन' संस्कृत नाटकाचा कर्ता.

**हरिदास न्यायालंकार भट्टाचार्य**—(स. १४८०–१५४०) वासुदेव सार्वभौमाचा शिष्य. ग्रंथ–१ कुसुमांजलिकारिकाव्याख्या ( उदयनाच्या कुसुमांजलीवरील टीका ). २ तत्त्वचिंतामणिप्रकाश ( गंगेशाच्या तत्त्वचितामणीवरील टीका ). ३ मान्यालोकटिप्पणी ( जयदेवाच्या आलोकावरील उपटीका ) ( हि. इं. लॉ., पा. ४६५ ).

**हरिदासबावा**—( स. १५४० सुमार ) तानसेनाचे गुरु. हे कृष्णभक्त गवई वृंदावनास राहत. गवयांच्या मुखांतून यांचीं अनेक पदें ऐकूं येतात.

**हरिदासमिश्र**—( स. १४५० सुमार ) कुमारसंभव व रघुवंश यांवरील टीकाकार. ग्रंथ–दीपिका व प्रकाशिका. आई मूळदेवी, पिता विष्णुदास, आजा सक्तूमिश्र.

**हरिनारायण**—( समाधि स. १७२५ ) हा साधु तेरचा ऋग्वेदी ब्राह्मण. याचीं नामामृतलहरी, अभंग व पदें उपलब्ध आहेत. सुलतानजी निंबाळकर याचा शिष्य. शाहूनें हा व याची पत्नी यांच्या मूर्ति करविल्या होत्या. याच्या सांप्रदायांत 'अन्नपूर्णापते हरिनारायण' अशी गर्जना करतात ( म. क. च. भा. ५ ). समाधि बेनहाडी, ता. कर्जत, जि. नगर.

२. योगवासिष्ठावर सोळा हजार ओव्यांची टीका लिहिणारा मराठी ग्रंथकार. ग्रंथ आपचंदमठांत आहे ( मं. वा. इ. शके १८३५, ले. ४३ ).

**हरिनाथ**—मुकुंदराजाचा गुरु.

२. ( स. १३७५ सुमार ) स्मृतिसार व सारसमुच्चय या संस्कृत ग्रंथांचा कर्ता. हा महामहोपाध्याय व मैथिल होता.

**हरिपंत फडके**—( स. १७२९–९४ ) बाळंभट नांवाच्या नाना फडणीसाच्या घरच्या भिक्षुकाचा हा पुत्र. याचा भाऊ बापू हा पानपतच्या लढाईंत मेला. तेव्हां याची माधवराव पेशव्यानें कारकुनाच्या जागीं नेमणूक केली ( स. १७६२ ). केळशीमहालाची देशमुखी याला वतन देण्यांत आली होती. नारायणरावाच्या वधानंतर हा बारभाईंना मिळाला. यानें मोरोबाचें कारस्थान उघडकीस आणलें ( स. १७७४ ). राघोबाचा पाठलाग करून महीतीरीं त्याची फौज यानें उधळून लावली ( स. १७७५ फेब्रु. १७ ). होळकर व शिंदे माळव्यांत गेले तरी गुजराथेंत राघोबाशीं याच्या लढाया चालूच होत्या. कर्नल कीटिंग राघोबासह पुण्यावर चालून येत असतां यानें त्याशीं लढाई दिली. पहिलीस आनंदमोगरीची व दुसऱ्या लढाईस आरासची लढाई म्हणतात ( मे ). या लढाया बरोबरीच्या झाल्या. नर्मदातीरीं भाऊपीर येथील लढाई होण्याचा आलेला प्रसंग यानें टाळला ( स. १७७५ जून ११ ).

हैदराकडे याची नेमणूक झाली तेव्हां मानाजी फाकडे व बाजीपंत बर्वे या फितुर लोकांस यशवंतराव मान्याला तोफेच्या तोंडीं देऊन यानें आळा घातला ( स. १७७७ ). हैदरापासून खंडणी घेतली ( स. १७७८ ). हा पहिल्या इंग्रज–मराठे युद्धांत होता ( स. १७८१ ). हा पहिल्या व दुसऱ्या टिपूवरील स्वारींत प्रमुख होता ( स. १७८७, १७९२ ). पुढें महादजी शिंदे पुण्यास आल्यामुळें नानालाहि आपल्या विश्वासांतील सेनापति सैन्यासुद्धां जवळ पाहिजे होता म्हणून हा पुण्याकडे होता ( स. १७९३ ). पुढें हा सिद्धटेक येथें पोटदुखीनें मेला ( स. १७९४ जून २० ). हा नानाच्या पूर्ण विश्वासांतील होता. हा गेल्यामुळें नाना फडणीसाचें सामर्थ्य लंगडें पडलें. याचा पुत्र बाबा ऊर्फ रामचंद्र खर्ड्याच्या लढाईंत जरीपटक्यावर होता. याला चिंतामण, लक्ष्मण व माधव असे आणखी तीन मुलगे होते. हरिपंत नानाच्या पक्षांतील म्हणून याच्या मुलाला दुसऱ्या बाजीरावाचा छळ सोसावा लागला.

**हरिपाळ चालुक्य**—( स. ११७० सुमार ) 'संगीतसुधाकर' या संस्कृतभाषेंतील संगीतशास्त्रावरील ग्रंथाचा कर्ता. हा गुजराथेंत राज्य करीत होता. याच्या

पित्याचें नांव सामंतसिंह व आजा भीमदेव, असा संगीत-सुधाकराच्या शेवटीं यानें आपला उल्लेख केला आहे. हा मोठा कवि असून यानें अनेक ग्रंथ केले आहेत. क्षेमराज सोळंकी व हा एक असावा. याला 'विचारचतुर्मुख' अशी पदवी होती ( डॉ. एस्. कृष्णस्वामी यांचा स्मारक-ग्रंथ ).

**हरि बाबाजी केतकर**—( मृत्यु स. १७७९ ) महादजी शिंद्याचा सरदार. दादाशीं झालेल्या झटापटींत हा जखमी होऊन मेला.

**हरिबुवा भोंडवे**—( स. १७०७–७७ ) हे पारनेरचे शिंपी. यांचा पिता केरेश्वर व माता बचाई. यांची पत्नी गोडाई. यांना रखमा व तारा अशा दोन मुली होत्या. हे रामदासी असूनहि वारकरी होते. यांची पालखी पंढरीस जाते व तिचा उजवा मान आहे. हे प्रथम लावण्या करीत. नंतर अभंग करूं लागले. यांचे ग्रंथ-ज्ञानसागर ( मोक्षसिद्धिविवरण ), हरिबोध, पंचीकरण, संसारतोडा, स्वरोदय. जुन्नरनजीक नारायणगांवीं यांची समाधि आहे. यांचा पहिला ग्रंथ फार महत्त्वाचा आहे असें म्हणतात. यांचे रामदासपंथाचे गुरु शिवरामस्वामी.

**हरिभद्रसूरि**—( मृत्यु स. ४७८ ) एक जैन पंडित.

२. ( मृत्यु स. ११६६ सुमार ) हा नागेंद्रगच्छशाखेच्या आनंदसूरि व अमरचंद्रसूरि यांचा शिष्य. यास 'कलिकालगौतम' म्हणत. ग्रंथ–षड्दर्शनसमुच्चय, वैकालिक सूत्रावर निर्युक्ति, न्यायप्रवेशसूत्र व न्यायावतारवृत्ति. आईच्या आज्ञेवरून यानें १४०० ग्रंथ लिहिले. यानें खूण म्हणून ग्रंथाच्या शेवटीं 'विरह' शब्द वापरला आहे.

हा ब्राह्मण असून चित्रकूट पर्वताजवळच्या चितोरच्या जितारी राजाचा गुरु होता. याचे हंस व परमहंस हे शिष्य धर्मप्रसारार्थ तिबेटांत गेले असतां मारले गेले ( हि. इं. लॉ. पा. ४९–६० ).

**हरि भिडे**—( मृत्यु स. १७७५ सुमार ) राघोबाचा अभिमानी. याचा राक्षसभुवनचे लढाईंत हात तुटला. नापारच्या लढाईंत दगाबाजी केली म्हणून इंग्रजानें श्रीमंतांसमक्ष यास ठार केलें.

**हरियदेवी**—ही मेवाडच्या अल्लट राजाची पत्नी. ही एका हूण राजाची कन्या होती. हिनें हर्षपुर नांवाचें गांव स. ९७७ मध्यें वसविलें (इंडि. अँटि. भा. ३९, पृ. १९१).

**हरिराम**—एक गुजराथी कवि. याचीं काव्यें अनेक असून 'सीतास्वयंवर' सर्वांत उत्तम आहे.

**हरिराम तर्कवागीश**—( स. १६२५ सुमार ) हा रघुदेव व गदाधर यांचा गुरु. याचे ग्रंथ–१ तत्त्वचिंतामणिटीकाविचार, २ आचार्यमतरहस्यविचार, ३ रत्नकोशविचार, ४ स्वप्रकाशरहस्यविचार अथवा भट्टमतसिद्धांतविचार ( हि. इं. लॉ., पा ४६९ ).

**हरिराय**—शिक्षापत्री या ग्रंथाचा कर्ता.

**हरिवर्मन् कदंब**-( स. ५३७–५५० ) हा रविवर्मन् कदंबानंतर बनवासीच्या गादीवर आला. याच्या राज्याभिषेकाचा काळ स. ५३८ असावा ( एपि. इंडि. १४. १६६ सांगलीचा लेख पाहा ). याच्या कारकीर्दीच्या चवथ्या वर्षी शिवरथ हा उच्छंगी दुर्ग येथें राज्य करीत होता ( इंडि. अँटि. ६. ३० हल्सी येथील लेख ). पहिल्या पुलकेशी चालुक्यानें याचें राज्य घेतलें.

**हरिवर्मन् मौखरी**—( स. ४७५–५०० ) मौखरी वंशांतील एक राजा. अनंतवर्मनानंतर हा मगधच्या गादीवर आला. याचें व अनंतवर्मनाचें काय नातें होतें हें मात्र उपलब्ध नाहीं. करिकाल चोल यानें याच्या कारकीर्दीत किंवा याच्या मुलाच्या कारकीर्दीत मौखरींचा चांगलाच पराभव केला. याच्यानंतर याचा मुलगा आदित्यवर्मन् हा मौखरींच्या गादीवर आला. याच्या बायकोचें नांव जयस्वामिनी असें होतें.

**हरिश्चंद्र प्रतिहार**—यालाच रोहिल्लद्धि असें म्हणत. हा प्रारंभीं कोणा एका राजाचा प्रतिहार म्हणजे द्वाररक्षक होता. याला दोन बायका होत्या. एक ब्राह्मणकन्या होती आणि दुसरी क्षत्रियकन्या होती. हा स्वतः ब्राह्मण होता. क्षत्रियस्त्रीचें नांव भद्रा असून तिला शिलालेखांत राज्ञी असें म्हटलेलें आहे. तिला चार पुत्र होतेः १ भोगभट, २ कक्क, ३ रज्जिल, ४ दद्द. यानें आपल्या पराक्रमानें मांडव्यपुर( मंडोर )चा किल्ला घेऊन त्याला उंच कोट बांधला. हा मंडोरच्या प्रतिहारांचा मूळ पुरुष. याच्यानंतर रज्जिल अधिकारी झाला.

**हरिश्चंद्रदेव**—( स. १३२४ ) हा नेपाळांतील भाटगांवच्या सूर्यवंशी घराण्यांतील राजा. यानें स. १३२४ मध्यें नेपाळचें खोरें पादाक्रांत केलें.

**हरिश्चंद्रवर्मा**—( स. ११७८ ) माळव्याच्या परमारांपैकीं महाकुमारशाखेंतील लक्ष्मीवर्म्याचा पुत्र. याचे पुत्र उदयवर्मा व देवपाल. याचें एक दानपत्र पीपलियानगर ( भोपाळ राज्यांत ) येथें मिळालें त्यांत दोन दानांचा निर्देश आहे ( बंगा. ए. सो. ज. ७. ७३६ ).

**हरिषेण**—( स. ३८० सुमार ) सम्राट् समुद्रगुप्ताच्या पदरचा एक कवि. समुद्रगुप्तानें अनेक राजांचा उच्छेद करून त्यांचा प्रदेश आपल्या राज्यास जोडला, व दक्षिणहिंदुस्थानावरहि स्वारी केली. या दिग्विजयानंतर त्यानें या आपल्या दरबारी कवीला आपला पराक्रम गद्यपद्यात्मक

काव्यांत वर्णन करावयास सांगून तें वर्णन अशोकाच्या शिलास्तंभावर संस्कृतांत कोरून ठेविलें. तो स्तंभ अद्यापि प्रयागच्या किल्ल्यांत आहे. तो थोडा खराब झाला आहे तरी त्यावरून समुद्रगुप्ताच्या दिग्विजयाची पूर्ण कल्पना येते ( गुप्त. इन्स्क्रिप्शन ले. नं. १ ). ही प्रशस्ति चम्पू काव्याचा उत्कृष्ट नमुना आहे. हिचा प्रथमार्ध पद्यांत असून द्वितीयार्ध बहुतेक गद्यांत आहे. गद्यभागांत समास-प्राचुर्य असलें तरी एकंदर वर्णन अत्यंत सरस व रमणीय आहे. पद्यें तर फारच उत्कृष्ट आहेत, पण तीं बरींच खंडित झालीं आहेत.

**२.** ( स. ४९०–५२० ) वाकाटक घराण्यांतील शेवटचा राजा.

**हरिसिंग**—( स. १३२० सुमार ) मूळचा दाक्षिणात्य, पण नंतर नेपाळचा राजा. यानें महाराष्ट्रांतील तुळजाभवानी नेपाळांत नेऊन स्थापिली. पण ती चितोड-हून महाराष्ट्रांत आली असेल. कदाचित् राजपुतान्यांतून तिकडे गेली असावी.

**हरिहर**—( स. १२५०–१३०० ) संस्कृत भाषेंतील ग्रंथकार. हा विज्ञानेश्वराचा शिष्य असल्याचा याच्या एका हस्तलिखितांत निर्देश आहे. याचा व्यवहारावर एक ग्रंथ आहे. तसेंच पारस्कर–गृह्यसूत्रावर याची टीका आहे. विज्ञानेश्वराच्या 'अशौच–दशका'वर याची टीका आहे. त्यावरून हा त्याचा शिष्य दिसतो. यानें छंदोगपरिशिष्ट-प्रकाशावर भाष्य लिहिलें असावें.

**हरिहर संगम**—(स. १३३६–५५) हा यदुकुळांतील संगमाचा वडील मुलगा. याला कंप, बुक्क, मारप व मुद्दप असे चार भाऊ होते. हे पांचजण विजयनगरच्या राज्याचे संस्थापक होत. या साम्राज्याची स्थापना स. १३३६ मध्यें झाली. त्याला खरें स्थैर्य स. १३४६ मधील चिरस्मरणीय जयोत्सव होईपर्यंत आलें नव्हतें. प्रथम हा तिसऱ्या बल्लाळ होयसळाचा मंत्री व सेनापति होता. तेथेंच याला मुसलमानी राजकारणाचा परिचय झालेला दिसतो. पुढें आनेगुंदीच्या राज्यांत हा प्रमुख झाला. त्याच सुमारास विद्यारण्याशीं याचा परिचय होऊन याला धार्मिक व राजकीय व्यापक दृष्टि प्राप्त झाली. त्यांच्याच नांवानें तुंगभद्रेच्या दक्षिणतीरावर यानें विद्यानगर नांवाचें शहर वसविलें. पण या शहराला अनेक नांवें दिसतात. मुहम्मद तुघ्लकाच्या सरदारालाहि यानें मदत केली होती ( स. १३४० ). पण येथून पुढें दक्षिणेंतील राजांनीं एकी करून मुसलमानांना हाकून देण्याचें यानें धोरण स्वीकारलें. बल्लाळ होयसळानें रामेश्वरा-पर्यंत मुलूख जिंकून जयस्तंभ उभारला. यानेंहि स्वतंत्रता स्वीकारून पुष्कळ मुलूख काबीज केला. बल्लाळ होयसळ मदुरेचा राजा घियासुद्दीन दामघानीकडून त्रिचनापल्ली-जवळ कोप्पमच्या लढाईंत मारला गेला ( स. १७४२ ). तेव्हां यानें होयसळांचा बराच मुलूख काबीज केला व शेवटीं तर त्यांची राजधानी घेऊन त्यांना नामशेष केलें (स. १३४६). हा याच्या साम्राज्याचा खरा आरंभ होय. याच वेळीं वर उल्लेख केलेला जयोत्सव यानें केला, आणि शृंगेरीस जाऊन पुष्कळ दानधर्म केला.

दक्षिणेंतील मुसलमान सरदारांनींहि दिल्लीच्या बाद-शहाविरुद्ध बंड पुकारून अलाउद्दीन हसन कांगो बाहम-नीच्या नेतृत्वाखालीं गुलबर्ग्यास राज्य स्थापिलें ( स. १३४७); आणि हरिहरानें घेतलेल्या मुलखावर आपला हक्क सांगण्यास सुरवात केली व हक्क स्थापित करण्याकरितां भीमा उतरून सागर बळकाविलें ( स. १३५१ ); आणि आपले सरदार करबजूर, कणवारी व मुधोळ घेण्याकरितां पाठविले. त्यांना तोंड देणें अशक्य झाल्यानें मोठी रक्कम व कृष्णेच्या उत्तरेकडील पुष्कळसा मुलूख देऊन यास तह करावा लागला.

हा आपल्या भावांना प्रेमानें वागवी. त्यांना युवराज प्रांताधिकारी नेमी. मारप ( चंद्रगुत्ती ), बुक्क (होसपट्टण), कंप ( नेल्लूर व कडप्पा ), इत्यादि प्रकारें नेमणूक करून हा आनेगुंदी येथें राहून कारभार करी. हा व बुक्क हे विशेष कर्तबगार होते. आपल्या वृद्धावस्थेंत यानें बुक्कावर राज्य सोंपविलें.

**२.** ( स. १३७७–१४०४ ) पहिला बुक्क व गौरांबिका यांचा हा पुत्र. मुजाहिद बहामनीशीं याचें युद्ध सुरू होतें. त्यांत यास जय मिळाला ( स. १३७८ ). यानें कोंकणां-तील बंड मोडून खारेपाटण घेतलें. यानें वरंगळावर जय मिळविला. यानें मुद्गल व रायचूर घेतलें. पण फीरूज बहामनीनें बिनलढाऊ लोकांची कत्तल सुरू करतांच खंडणी देऊन यास तह करावा लागला. याला राजा वाल्मीकी व 'कर्नाटकविद्याविलास' म्हणत. याची राणी मल्लांबिका. दुसरी राणी पंपा. हा शांकरमतानुयायी होता तरी यानें जैनांना देणग्या दिल्या आहेत.

**हरिहर भट्टाचार्य**—( स. १५५९–६० सुमार ) हा प्रसिद्ध बंगाली पंडित रघुनंदनाचा पिता होय. याचा ज्योतिषावर 'समयप्रदीप' नांवाचा ग्रंथ आहे.

**हरीश्वर**—( स. ११६५ सुमार ) कानडी कवि. वीरशैव. गांव हळेबीड.

ग्रंथ–गिरिजाकल्याण, पंपाशतक, इत्यादि.

नरसिंह बल्लाळ होयसळाच्या ( स. ११४१–११७२ ) वेळीं हा कुलकर्णी ( कर्णिक ) होता. याचा गुरु हंपीचा मायदेव. याचा भाचा प्रसिद्ध राघवांक कवि. याच्याच वेळीं केरेय पद्मरस हा मंत्री होता. वीरशैव ( लिंगायत ) कवींपैकीं हा आद्य म्हणतां येईल. तसाच हा कवि म्हणूनहि श्रेष्ठ दर्जाचा आहे ( क. क. च. भा. १, पा. २२५ ).

**हर्ष**—( हर्षवर्धन पाहा ).

**हर्षगुप्त**—नेपाळच्या गोपाळघराण्यापैकीं परमगुरूचा पुत्र.

२. ( आदित्यवर्मन् मौखरी व आदित्यसेन पाहा ).

**हर्षगुप्ता**—ही कनोजचा दुसरा राजा आदित्य मौखरी याची पत्नी. ही हर्षगुप्ताची बहीण असावी.

**हर्ष चंदेल्ल**—(स. ९१०–९३०) राहिलनंतर त्याचा मुलगा हर्ष राज्य करूं लागला. याचा विवाह चाहमान कुलांतील कंचुका नामक कन्येशीं झाला होता. वि. सं. १०५३च्या एका लेखांत हर्षाला व त्याचा पुढें पराक्रमी झालेला मुलगा यशोवर्मा याला परमभट्टारक व परमेश्वर अशीं विशेषणें लावलीं आहेत. यावरून हर्ष हाच चंदेल्लचा पहिला स्वतंत्र राजा झाला असें अनुमान निघतें.

**हर्षमती**—तंत्रशास्त्रज्ञ प्रेमविधीची सासू. हर्षदेवाची पत्नी.

**हर्षमिश्र**—शांकरमतानुयायी पंडित. पंचदशींत याचा निर्देश आहे.

**हर्ष लोहर**—( स. १०८९–११०१ ) काश्मीरच्या लोहर घराण्यापैकीं कलशाचा मुलगा. कलशानें आपला पिता अनंतदेव याची सर्व संपत्ति मुद्रा करून याच्या नांवची करून ठेवली होती. कांहीं लोकांच्या सल्ल्यानें यानें बापाविरुद्ध बंड केलें. बंड लवकरच मोडलें गेलें व याला बंदिवास पत्करावा लागला. विषप्रयोगांतून हा बचावला. अशा स्थितींतहि कलशाच्या मनांत यालाच गादीवर बसवावें असें होतें. पण नोनक नांवाच्या मंत्र्यानें उत्कर्ष नांवाच्या याच्या भावाला गादीवर बसविलें. पण विजयमल्ल नांवाच्या याच्या तिसऱ्या भावानें खटपट करून उत्कर्षाला पराभूत करून ठार केलें व याला बंधमुक्त करून गादीवर बसविलें. हर्षानें सर्वांशीं चांगलेपणानें वागून उत्तम राजा म्हणून लौकिक मिळविला.

याचा दरबार म्हणजे विद्वानांचें आश्रयस्थान झाला. कलशाच्या वेळीं देशत्याग करून कर्नाटकांत विक्रमादित्य पश्चिम चालुक्याच्या आश्रयाला जाऊन राहिलेल्या, तेथें विद्यापति म्हणून सन्मान पावलेल्या आणि ज्याचा हत्ती तेथील सैन्याच्या अग्रभागीं चालत असे त्या बिल्हण पंडितालाहि हर्षाच्या औदार्याची वार्ता ऐकून आपण व्यर्थ काश्मीर सोडलें असें वाटलें ( रा. त. ७. ९३५–९३७ ). याचा सर्व वेळ शास्त्रीय वाद, नृत्यगायन यांत जात असे. पण लवकरच याच्या वैभवाचे दिवस संपले.

याला राज्य मिळवून देणारा याचा भाऊ विजयमल्ल यानें राज्यलोभानें बंड उभारलें. बंड लवकरच मोडलें गेलें आणि विजयमल्ल पळून गेला. पण यामुळें हर्षाच्या भोंवतालची सर्व परिस्थिति पालटली व जिकडेतिकडे संशयाचें वातावरण सुरू झालें. भोज नांवाचा याचा एक पुत्र होता त्याबद्दलहि यास संशय आला, तेव्हां तोहि पळून गेला. लवकरच याच्याच घराण्यांतील उच्छल नांवाच्या याच्या आप्तानें बंड उभारलें व याचा पाडाव केला. हर्षाच्या सैन्याची वाताहात होऊन राजधानी उच्छलाच्या ताब्यांत आली, तेव्हां याच्या राण्यांनीं स्वतःला जाळून घेतलें. आणि हा आपल्या विश्वासू सेवकांसह तेथून निसटून एका मठांत लपून राहिला. पण उच्छलाच्या हेरांनीं तेथेंहि याचा पाठलाग करून मठाला वेढा दिला. तेव्हां मात्र हा अगदीं निराश झाला. या वेळीं याला अशी बातमी समजली कीं आपल्या या दुर्दशेबद्दल सूड घेण्याकरितां आपला मुलगा परदेशाहून परत येत असतां वाटेंत युद्धांत मारला गेला. अशा रीतीनें चहूंकडून निराशा झाल्यामुळें हा शत्रूवर तुटून पडला आणि मृत्यु पावला. याच्या प्रेताचें दहन करण्यास कोणी दयाळु पुरुष पुढें आला असतां त्याला मोठ्या नाखुषीनें परवानगी दिली गेली. शेवटीं एखाद्या भिकाऱ्याप्रमाणें याचा दहनविधि पार पडला. याच्या मृत्यूमुळें काश्मीरांत पहिल्या लोहर घराण्याचा अंत होऊन उच्छलाच्या सातवाहन घराण्याची काश्मीरांत स्थापना झाली.

**हर्षवर्धन**—( मृत्यु स. ६४८ ) हा बैसवंशी रजपुतांपैकीं प्रभाकरवर्धनाला यशोमतीपासून झालेला दुसरा मुलगा. याला श्रीहर्ष, हर्ष व शीलादित्य असेंहि म्हणत असत. हा आपला भाऊ राज्यवर्धन याला बंगालच्या नरेंद्रगुप्तानें ( शशांकानें ) ठार मारल्यानंतर गादीवर आला. गादीवर आल्याबरोबर यानें आपल्या थोरल्या भावाला विश्वासघातानें मारणाऱ्या बंगालच्या नरेंद्रगुप्ताला मारण्याचा संकल्प केला, आणि आपला सेनापति सिंहनाद व स्कंदगुप्त यांच्या संमतीनें ‘माझे मांडलिक व्हा, नाहींतर युद्धाला तयार व्हा’ अशा अर्थाचीं पत्रें धाडलीं. दिग्विजयाकरितां हा निघाला आणि पहिला मुक्काम ठाणेश्वर

या आपल्या राजधानीपासून थोड्या अंतरावर सरस्वतीच्या तटावर गेला. तेथें प्राग्ज्योतिष ( बंगाल्यांतील राजशाही जिल्ह्यांतील नगर ) च्या भास्करवर्मा ( कुमार ) नांवाच्या राजानें पाठविलेल्या हंसवेग नांवाच्या दूतानें याला छत्र नजर केलें; आणि प्रार्थना केली कीं, भास्करवर्मा आपल्या मैत्रीची इच्छा करतो. तेव्हां यानें त्याचें म्हणणें मान्य करून त्याला समक्ष भेटीला बोलाविलें. तेथून कांहीं मैल पुढें गेल्यावर भंडि नांवाचा मंत्री याला येऊन मिळाला व त्यानें मालवराजाकडून आणलेली लूट याला नजर केली व राज्यश्री कनोजमधील कैदखान्यांतून निघून विंध्याटवीकडे गेल्याचें निवेदन केलें. हें ऐकतांच यानें भंडीला गौडराजाचें पारिपत्य करण्यास धाडलें व आपण विंध्याटवीकडे गेला. तेथें बहिणीला घेऊन याष्टिग्रह नांवाच्या स्थानावर आला (हर्षचरित ३-६-७). सारखे तीस वर्षेपर्यंत दिग्विजय व युद्ध करून यानें काश्मीरपासून आसामपर्यंत आणि नेपाळपासून नर्मदेपर्यंतचा मुलूख आपल्या स्वामित्वाखालीं आणला. दक्षिण हिंदुस्थानहि यानें जिंकण्याचा प्रयत्न केला पण बदामीच्या चालुक्यांपैकीं दुसऱ्या पुलकेशीनें याचा पराभव केला. म्हणून ती गोष्ट साधली नाहीं ( आहोळेचा शिलालेख एपि. इंडि. भा. ६, पृ. ६; इंडि. अँटि. भा. ७, पृ. १६३ ). हुएन्त्संग या चिनी प्रवाशानेंहि या याच्या पराजयाचा निर्देश केला आहे. याची राजधानी ठाणेश्वर आणि कनोज हीं दोनहि स्थलें होतीं. आपल्या भावाला ठार करणाऱ्या शत्रूचा नाश करीपर्यंत आणि आपल्या भोंवतालचे प्रदेश ताब्यांत घेईपर्यंत उजव्या हातानें जेवण करायचें नाहीं अशी यानें प्रतिज्ञा केली होती, असें हुएन्त्संग म्हणतो. ५००० हत्ती, २०००० स्वार, व ५०००० पायदळ इतक्या सैन्यासहित यानें सारखें सहा वर्षे युद्ध करून पंजाब, सिंध, मध्यप्रदेश, बंगाल, गुजराथ आणि राजपुताना हे प्रदेश आपल्या ताब्यांत घेतले. राज्य वाढल्यावर यानें सेनाहि वाढविली. हत्ती ६००० ठेवले व एक लक्ष स्वार वाढविले. तीस वर्षांनंतर याच्या शस्त्रांनीं विश्रान्ति घेतली व यानें शान्तिपूर्वक धर्मप्रचाराकडे लक्ष दिलें. सर्व राज्यांत जीवहिंसा व मांसभक्षण यांना मनाई केली. याच्या हुकुमांना न मानणारास प्राणदंड होई. प्रत्येक रस्त्यावर धर्मशाळा, अन्नपाणी व औषधें यांची व्यवस्था असे. प्रत्येक पांचव्या वर्षी हा 'मोक्षमहापरिषद्' प्रयाग येथें भरवीत असे व आपला सर्व खजिना दान करून टाकी. धर्मगुरूंमध्यें वादविवाद करवून ते स्वतः पारखीत असे. तेथें हा विद्वानांचा सत्कार करून सदाचारी लोकांना उत्तेजन देत असे. वि. सं. ७०१ ( स. ६४४ ) च्या सुमारास यानें प्रयाग येथें धर्ममहोत्सव केला होता. त्यांत मोठाले वीस राजे सामील होते ( बील–बुद्धिस्ट रेकार्डस् ऑफ दी वेस्टर्न वर्ल्ड, भा. १, पृ. २१३–१९ ). प्रयाग येथें यानें पहिल्या दिवशीं बुद्धाचा पुतळा, दुसऱ्या दिवशीं बापाची उपास्य देवता सूर्याची प्रतिमा व तिसऱ्या दिवशीं शिवाची प्रतिमा दिली असें हुएन्त्संग म्हणतो.

हा योद्धा होता तसाच विद्वान्‌हि होता. यानें रचलेली रत्नावलिः, प्रियदर्शिका व नागानंद हीं नाटकें याच्या विद्वत्तेची साक्ष देत आहेत. हीं नाटकें यानें धावक नांवाच्या कवीकडून लिहविलीं असें काव्यप्रकाशांतील एका वाक्यावरून लोक समजत आले आहेत. पण शोधान्तीं तें वाक्यच प्राचीन हस्तलिखितांत सांपडत नाहीं ( डॉ. बुल्हरचे शोध, पा. ६९ ). बाणाला यानें विपुल संपत्ति दिल्याचे निर्देश हर्षचरित्रांत व इतरत्र आहेत (हर्षच. उ. २, पा. ८२). आणि बाणानें याला उत्तम विद्वान् म्हणून वाखाणिलें आहे. जसा हा विद्वान् होता तसाच चित्रकलेंतहि निष्णात होता. बंसखेडा येथें मिळालेल्या याच्या दानपत्रांत यानें आपलें हस्ताक्षर चित्रलिपींत केलें आहे ( एपि. इंडि. भा. ४, पृ. २१०; तेथें याच्याजवळच्या फोटोंत राजाचें हस्ताक्षरहि आहे ). हा विद्वानांचा चाहताहि होता. बाणभट्टानें हर्षचरित लिहून याचें व आपलें नांव अमर केलें आहे. बाणभट्टाच्या हातून अपुरी राहिलेली त्याची कादंबरी पुरी करणारा त्याचा पुत्र पुलिंदभट्ट ( पुलिन ) हाहि याचा आश्रित होता. सूर्यशतककर्ता मयूर, मातंग व दिवाकर हे याचे आश्रित होत असें राजशेखरानें सूक्तिमुक्तावलींत म्हटलें आहे. वासवदत्ताकार सुबंधु व भक्तामरस्तोत्रकर्ता मानतुंगाचार्य जैन हेहि याच्याच वेळीं झाले.

याच्या मुलीचें लग्न वलभीपुरच्या ( वळा, काठेवाड ) ध्रुवभटा( दुसरा ध्रुवसेन )शीं झालें होतें असें चिनी यात्रेकरू हुएन्त्संग लिहितो.

यानें चीनच्या बादशहाकडे आपला एक ब्राह्मण राजदूत पाठविला होता. तो तेथून वि. सं. ७०० (स. ६४३) मध्यें परत आला. त्याच्यासह चीनच्या बादशहानेंहि आपलें दूतदल याच्या दरबारीं पाठविलें होतें. पुनः दुसऱ्यांदा चीनच्या बादशहानें आपलें दूतदल पाठविलें होतें. त्याचा मुख्य वंगहुएन्त्से होता ( स. ६४७ ). पण तो मगधांत पोंचण्यापूर्वींच वि. सं. ७०५ (स. ६४८) च्या सुमारास याचा देहान्त झाला. याचा सेनापति अर्जुन ( अरुणाश्व ) यानें राजसिंहासन ताब्यांत घेऊन चिनी यात्रेकरूंना लुटलें व कांहीं चिनी शिपाई मारले गेले. या

वेळीं वंगहुएन्त्से आपल्या लोकांसह नेपाळांत पळाला. थोडक्यांच दिवसांत तों नेपाळ व तिबेट येथील सैन्य घेऊन आला असतां अर्जुन पळाला. पण त्याला पकडून वंगहुएन्त्सेनें त्याला चिनांत नेलें (चवन्नेज 'मेमॉयर,' पृ. १९, टिप्पणी २ ). या प्रकारें हर्षवर्धनानें स्थापन केलेलें राज्य त्याच्याबरोबर लुप्त झालें व सर्व मांडलिक स्वतंत्र होऊन बसले.

वि.सं.६६४(स.६०७) मध्यें याला राज्याभिषेक झाला. त्या वेळीं यानें आपल्या नांवाचा संवत् सुरू केला. तो हर्ष किंवा श्रीहर्ष या नांवानें प्रसिद्ध आहे. अनुमानतः तो ३०० वर्षे चालून लुप्त झाला. राजपुतान्यांत हर्ष-संवत् असलेले शिलालेख मिळाले आहेत ( अजमेरचा राजपुताना म्युझियम्, स. १९१६-१७ चा रिपोर्ट, पृ. २, ले. सं. १ ).

हा प्रथम शिवाचा भक्त होता. पण बौद्धधर्मावर अधिक श्रद्धा असल्यामुळें हा मागाहून बौद्ध झाला असावा. याच्या मागून या घराण्याचा संगतवार इतिहास मिळत नाहीं. अयोध्या प्रांतांत बैसवाडा हा भाग बैसवंशी रजपुतांचें मुख्य स्थान आहे. त्यांतील तिळकचंदी बैस आपणांस मुख्य समजतात.

**हलायुध**—( स. ७६०-८० सुमार ) हा पहिल्या कृष्ण राष्ट्रकूटाच्या दरबारीं होता. याचे ग्रंथः-१ अभिधानरत्नमाला ( हलायुधकोश ), २ कविरहस्य, ३ मृतसंजीवनी ( पिंगलाच्या छंदःशास्त्रावरील टीका ). मृतसंजीवनींतील प्राकृत भाषेतील उदाहरणें ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचीं आहेत.

**२.** ( स. ११७८ सुमार ) हा धनंजयाचा पुत्र. मातेचें नांव उज्वला. याचा ग्रंथ-ब्राह्मणसर्वस्व. या ग्रंथांत काण्वशाखेला उपयुक्त अशा मंत्रांची यानें व्याख्या केली आहे. यानें शैवसर्वस्व, वैष्णवसर्वस्व, मीमांसासर्वस्व व पंडितसर्वस्व असे ग्रंथ केले. याचा द्विजनयन नांवाचाहि एक ग्रंथ आहे. हा बंगालच्या लक्ष्मणसेनाच्या दरबारीं न्यायाधीश होता. याचे ग्रंथ सर्वमान्य आहेत. याचे बंधु ईशान व पशुपति हेहि ग्रंथकार होते.

**३.** ( स. ११५०-१५०९ सुमार ) प्रकाश नांवाच्या ग्रंथाचा कर्ता. हा ग्रंथ कात्यायनाच्या 'श्राद्धकल्पसूत्रां'-वरील टीका आहे. याचा पिता संकर्षण.

**४.** ( स. १०००-११०० सुमार ) हा मैथिल किंवा बंगाली असावा. हा मोठा धर्मशास्त्रज्ञ असून याचे संस्कृत भाषेत कांहीं ग्रंथहि असावेत, असें अनेक ग्रंथांत येणाऱ्या याच्या उताऱ्यांवरून दिसतें. मिताक्षरेवरील टीका याची असावी.

**हसन**—(स. १७३५-८५ ) एक ऊर्दू कवि. याचें नांव गुलाम हसन व बापाचें नांव मीर गुलाम हुसेन 'जाहक'. हे मूळचे हिरातचे पण पोट भरण्यास इकडे आले. लखनौस कवि म्हणून याचा मोठा सन्मान झाला. हा उत्कृष्ट कवि होता. 'सहरुल्बयान' हा याचा कथाग्रंथ प्रसिद्ध आहे. याचा दीवान ( कवितासंग्रह ) नवलकिशोर प्रेसनें प्रसिद्ध केला आहे ( क. कौ. ४ ).

**हसन कांगो** किंवा **गंगू बाहमनी**—(स. १३४७-५८ ) हा दक्षिणेंतील गुलबर्ग्याच्या बाहमनी राज्याचा संस्थापक होय. यानें गादीवर बसल्यावर अलाउद्दीन अशी पदवी धारण केली. आपल्या मूळ उपकर्त्याचें नांव गंगू ब्राह्मण हेंहि कृतज्ञता दाखविण्याकरितां आपल्या नांवापुढें लावलें, म्हणून याचें नांव अलाउद्दीन हसन गंगू बाहमनी असें लिहिलें जातें. मधल्या घालमेलीच्या काळांत यानें जाफरखान अशी पदवी संपादन केली.

हा दिल्ली येथील गंगू नांवाच्या ब्राह्मणाच्या येथें गुलाम होता. या गंगू ब्राह्मणावर मुहम्मद तुघ्लकाची मेहेरबानी होती. फेरिस्त्यानें कांगो नांवाच्या ब्राह्मण जोशाच्या पदरीं हा नोकरीस होता असें म्हटलें आहे. एका बखरींत गंगरसपंत देशपांड्याकडे मिरजेस हा नोकर होता असेंहि आढळतें. हा अत्यंत इमानीपणें वागे, त्यामुळें यानें गंगूचा लोभ संपादन केला होता. एकदां याची पत्रिका पाहून याला राजयोग असल्याचेंहि त्यानें सांगितलें होतें.

याला अलाउद्दीन हसनशहा कांगो बाहमनी ही पदवी बंडखोरांचा पुढारी इस्मायल यानें दौलताबादेचा सुलतान झाल्यावर दिली.

**२.** ( स. १४७२-८५ ) काश्मीरच्या हाजीखानाचा पुत्र. नंतर याचा पुत्र मुहम्मद गादीवर आला.

**हसन खुस्रवखान**—(स. १३१६-२९) हा मूळचा हिंदु भंगी असून बाटून मुसलमान झाला आणि दिल्लीचा बादशहा मुबारक खल्जीचा नोकर बनला. लवकरच याला तेथें अग्रस्थान मिळालें. मदुरा जिंकण्याकरितां याची योजना झाली ( स. १३१८ ), पण ७०० मैलांचें अंतर सात दिवसांत पुरें करून यास मेण्यांतून दिल्लीस परत आणलें. इतकी मुबारकची यावर मर्जी होती. सैन्यांतले लोक याचे हुकूम मानीत नसत म्हणून यानें भंगी जातीच्या लोकांचें स्वतंत्र सैन्य उभारलें. त्यांत गुजराथेंतील ४०००० लोक होते. यावर मुबारकाची अत्यंत मर्जी असल्यानें रात्रीहि यास राजवाड्यांत राहावें लागे. कांहीं सबब सांगून संध्याकाळींच राजवाड्याच्या किल्ल्या यानें ताब्यांत घेतल्या आणि आंत आपले लोक भरले व रात्रीं मुबारकाचा

यानें खून केला, आणि राज्य बळकावलें. जिकडेतिकडे मुसलमानी धर्माचा उच्छेद करून हिंदुधर्माला पाठिंबा देण्यास सुरुवात केली, आणि मुसलमानांचा सूड घेतला. पण लवकरच याचा खून झाला.

**हसनखान फारुकी**—( स. १५०८ ) खानदेशच्या फारुकी घराण्यांतील पहिल्या मुबारकखानचा हा मुलगा होय.

**हसनशाह फारुकी**—( स. १५७६–७७ ) खानदेशच्या फारुकी घराण्यांतील दुसऱ्या मुहम्मदशाहचा पुत्र.

**हस्तामलक**—( स. ८५० सुमार ) आद्य शंकराचार्यांच्या चार शिष्यांपैकीं एक. कवीन्द्राचार्याच्या सूचीपत्रांत ऋग्वेदाचा भाष्यकार म्हणून याचें नांव आहे. हा प्रभाकरमिश्राचा पुत्र होता असें म्हणतात ( जर्नल ऑफ ओरिएण्टल रीसर्च, मद्रास, सन १९२९, पृ. ३९–५६ ). याचें एक स्तोत्र प्रसिद्ध आहे.

**हंबीरराव मोहिते**—( मृत्यु स. १६८७ डिसेंबर ) याचें मूळ नांव हंसाजी मोहिते असें असून स. १६७४ पावेतों हा शिवाजीच्या सैन्यांत पंचहजारी सरदार होता. परंतु विजापूरकरांच्या सैन्यावर प्रतापराव गुजर तुटून पडला असतां तो पडला, पण हंसाजीनें प्रसंगावधान राखून पळणाऱ्या सैन्यास प्रोत्साहन देऊन मुसलमानांचा पाडाव केला. तेव्हां शिवाजी खूष होऊन याला ' हंबीरराव ' असा किताब दिला, व प्रतापरावाच्या जागीं याची नेमणूक केली, असें सभासदी बखरींत म्हटलें आहे. पण यापूर्वीच्या भिकूजी मोहिते यासहि ' हंबीरराव ' हा किताब आढळतो ( ऐ. फा. सा. खं. २ पा. ३–४ टीप ). याचें मूळ उपनांव चव्हाण. हंबीररावानें स. १६७५ सालीं मोंगलांचा मुलूख लुटून मिळालेली लूट सुरक्षित रायगडीं पोंहचती केली. पुढच्या वर्षी हुसेनखान मायणाचा पराभव केला व पुष्कळ लूट मिळविली.

शिवाजी स. १६७८ त कर्नाटकांतून परत आला असतां त्यानें हंबीररावास व्यंकोजीजवळ ठेविलें होतें. व्यंकोजीची व याची एक लढाई झाली, परंतु शिवाजीची व व्यंकोजींची तडजोड झाल्यावर हा परत महाराष्ट्रांत यावयास निघाला. वाटेंत विजापूरच्या सैन्याचा पराभव करून कृष्णा व तुंगभद्रा यांमधील दुआब प्रांत जिंकला. स. १६७९ त मोगलांकडे पळून गेलेल्या संभाजीचा पाठलाग करण्याकरितां याची रवानगी झाली. परंतु हा जाण्यापूर्वीच संभाजी दिलेरखानाच्या छावणींत सुखरूप पोंहचला होता. पुढें याला मोगलांच्या विरुद्ध आदिलशाहाच्या मदतीस पाठविलें. यानें रणमस्तखानाचा पराभव केला; व विजापुरास वेढा देऊन बसलेल्या दिलेरखानाच्या सैन्याभोंवतीं फिरून त्यांना अन्नाची इतकी उणीव भासविली कीं पावसाळा संपल्याबरोबर दिलेरखानानें वेढा उठविला.

शिवाजीनंतर हा संभाजीच्या पक्षास येऊन मिळाला. याच्यामुळेंच संभाजीस ताबडतोब गादी मिळाली, व सोयराबाईकडील प्रमुख माणसांस यानेंच संभाजीच्या स्वाधीन केलें; व कोल्हापूरजवळ शहाअलम याचा यानें पराभव केला. स. १६८४ मध्यें औरंगझेबानें आपली छावणी अहमदनगरास आणल्यामुळें हंबीरराव अचानक बऱ्हाणपुरास जाऊन यानें तेथें मोकळ्या पडलेल्या खानदेशांतील खंडणी गोळा केली. शेवटीं स. १६८७ त हंबीरराव व सरदार सर्जाखान यांची वाईजवळ लढाई होऊन तींत मोंगलांचा पराभव झाला, पण हंबीरराव घायाळ होऊन मरण पावला.

**हंमीर गुहिलोत**—(मृत्यु स. १३६४) हा मेवाडच्या सीसोदिया राणा शाखेपैकीं अरिसिंहाचा पुत्र. याचा बाप अरिसिंह व आजा लक्ष्मसिंह हे सर्व अलाउद्दीन खल्जीनें चितोडवर केलेल्या स्वारींत मारले गेले होते. शिवाय याचे सात चुलतेहि त्याच लढाईंत कामास आले. फक्त याचा चुलता अजयसिंह हा जखमी होऊन सिसोदें येथें परत आला, आणि सिसोदें येथील जहागिरीचा मालक झाला. त्याला सज्जनसिंह आणि क्षेमसिंह असे दोन पुत्र होते.

अरिसिंहानें चंदाणे रजपूत जातीच्या एका गरीब कुळांतील पण अत्यंत सशक्त अशा स्त्रीशीं बापाला न कळत लग्न लावलें होतें. उनवा गांवीं शिकारीच्या मिषानें हा तिच्याकडे जाऊन राही. तिच्यापासून त्याला हंमीर नांवाचा मुलगा झाला.

अरिसिंह मारला गेल्यावर अजयसिंहाला ही गोष्ट कळली तेव्हां त्यानें अजोळाहून हंमीराला बोलावून घेतलें. याच वेळीं जोधपूर भागांतील गोडवाड जिल्ह्यांत मूंजा नांवाच्या ' बालेचा ' रजपुतानें लूटमार चालविली होती. त्यावर अजयसिंहानें आपले दोन पुत्र पाठविले, पण त्यांच्याकडून त्याचा बंदोबस्त झाला नाहीं. तेव्हां त्यानें तें काम अल्पवयी पण वीरप्रकृतीच्या हंमीरावर सोंपविलें. हंमीरानें काम अंगावर घेतलें तेव्हां मूंजा गोडवाडच्या नजीक सामेरी गांवीं उत्सवाला गेला होता. हा तेथें गेला आणि त्याचें डोकें कापून यानें आपल्या चुलत्यापुढें आणून ठेविलें. हा पराक्रम पाहून अजयसिंह अत्यंत खूष झाला,

आणि आपला उत्तराधिकारी म्हणून रक्ताचा टिळा याच्या कपाळीं लावला. वास्तविक हा अरिसिंहाचा पुत्र म्हणून उत्तराधिकारी होताहि. पण ही गोष्ट अजयसिंहाच्या मुलांना खपली नाहीं, आणि ते दोघेहि मेवाड सोडून दक्षिणेकडे चालते झाले. मेवाडच्या ख्याताप्रमाणें सज्जनसिंह व क्षेमसिंह या दोन भावांपैकीं सज्जनसिंहाच्या वंशांत गोब्राह्मणप्रतिपालक छत्रपति शिवाजीमहाराज जन्मास आले. मुधोळच्या बाजी घोरपड्याचें घराणें यांपैकींच होय.

अजयसिंग मेल्यावर हा सिसोदें येथील जहागिरीचा मालक झाला. याच्या वीर, साहस आणि निर्भीक प्रकृतीला मेवाडचें राज्य दुसऱ्याकडे गेलेलें पाहवणें शक्य नव्हतें. यानें त्या राज्यांत धुमाकूळ घालण्यास सुरुवात केली. अलाउद्दीन खल्जीच्या शेवटच्या दिवसांत दिल्लीची बादशाही दुर्बल झाली होती, आणि बादशहा मेल्यावर तर तेथें अधिक बखेडा सुरू झाला. त्यामुळें आपलें राज्य परत घेण्याची याला प्रबल इच्छा झाली. यानें मालदेवाचा मुलूख आपल्या राज्याला जोडण्यास प्रारंभ केला. याच्याशीं मेळ करावा म्हणून त्यानें आपली मुलगी याला देऊन पुष्कळसा मुलूख याला देकार म्हणूनहि दिला. पण यानें त्याच्या मरणानंतर त्याचा पुत्र जेसा किंवा जयसिंग याला पदच्युत करून चितोडचें राज्य ताब्यांत घेतलें आणि मेवाडवर पुनः गुहिलवंशाची सत्ता सुरू झाली ती आजपर्यंत आहे ( स. १३२६ सुमार ).

राव मालदेवाचा पुत्र जेसाच्या ताब्यांतून मेवाड गेल्यावर तो दिल्लीचा बादशहा सुलतान मुहम्मद तुघ्लक याच्याकडे गेला आणि त्याच्याकडून हंमीरावर स्वारी करवली. पण या लढाईंत बादशाही सैन्याचा पराभव झाला आणि बादशहाला तीन महिने चितोड येथें कैदेंत राहावें लागलें व शेवटीं पन्नास लाख रुपये, शंभर हत्ती, व कांहीं मुलूख देऊन सुटका करून घ्यावी लागली, असें कर्नल टॉड म्हणतो. ही लढाई सिंगोली गांवाच्या आसपास झाली. या विजयामुळें मेवाडच्या राज्यावर हंमीरचा पुरा ताबा बसला. याचा परिणाम मालदेवाच्या तिसऱ्या पुत्रावर होऊन त्यानें बादशहाची सेवा सोडून हंमीरची सेवा पत्करली. या पुत्राचें नांव वणवीर असें होतें, व त्याचा पुत्र रणवीर होय.

यानें जीलवाडा ( चेलाख्यपुर ) जिंकला आणि डोंगरांतील भिल्ल शत्रूंना युद्धांत ठार केलें; व पालनपुर जाळून टाकलें असें महाराणा मोकलच्या शृंगी ऋषि येथील शिलालेखावरून दिसतें ( स. १४२८ ). जीलवाड्याच्या राजाचें नांव राघव असें एकलिंगमाहात्म्यांत दिलें आहे. तसेंच यानें ईडरचा राजा जैत्रकर्ण यास जिंकलें व ठार केलें होतें. एकलिंगमाहात्म्यांत ईडरचें संस्कृतीकरण इलादुर्ग असें केलें आहे. यानें बांग्याच्या हाडा देवीसिंहाला बुंदी आपल्या सैन्याच्या सहायानें मिळवून दिली ( स. १३४१ ). यानें चितोड येथील अन्नपूर्णेचें मंदिर व कुंड बांधलें ( भावनगर इन्स्क्रिप्शन्स्, पृ. ९७, श्लो. १६ ).

याला खेता ( क्षेत्रसिंह ), लूंणा, खंगार, बैरसल ( वैरीसाल ) असे चार पुत्र होते. लूंणाचे वंशज लूंणावत सीसोदिये होत.

**२.** ( स. १७७३–७८ ) हा अल्पवयी गादीवर बसला व अपघातानें मेला. याच्या वेळीं महादजी शिंदे वगैरे मराठ्यांनीं मेवाडांतून अगणित संपत्ति नेली.

**हंसदास ( राज )**—( समाधि स. १८५५ ) याचें मूळ नांव नारायण असें होतें. हा परभणी येथील ऋग्वेदी ब्राह्मण. परमहंस-दीक्षा घेतल्यावर यास हंसराज हें नांव मिळालें. हे रामदासी होते. पहिले हंस आदिनारायण, त्यांच्यापासून सातवे हंस श्रीसमर्थ व त्यांच्यापासून हे सातवे हंस नारायण हंस ऊर्फ हंसराज होत असें मानण्यांत येतें. हे शके १७७७ त समाधिस्थ झाले. यांचे ग्रंथः— वेदेश्वरी ( शिवगीताटीका ), कथाकल्पलता, आगमसार, सदाचारटीका, लघुवाक्यवृत्तीटीका, चूडालाख्यान ( २२ शतकें ), संकेतकुबडी, ईशावास्योपनिषद् टीका, तत्वझाडा, ( गद्य ), अनुभवामृतटीका, ( रचना श. १७७१ सौम्य, विजयादशमी ), हंसकोश, वेद नांवानें लिहिलेलीं पदें, अभंग इत्यादि ( सं. सू. ).

**हंसपाल गुहिलोत**—( स. १०८८–११०३ ) मेवाडच्या गादीवर वैरटानंतर हंसपाल आला. राणपुरच्या मंदिरावरील शिलालेखांत याचें नांव वंशपाल दिलें आहे.

**हंसाजी मोहिते**—( हंबीरराव मोहिते पाहा ).

**हाजी इल्यास शम्सुद्दीन**—( स. १३५१–५७ ) बंगालचा राजा. मुहम्मद व फीरूज तुघ्लक यांनीं याशीं लढण्याचा प्रयत्न केला, पण त्यांना यश आलें नाहीं. यानें आपलें ठाणें लखनावती होतें त्याचें नांव गौड असें ठेविलें. पुढें त्या शहरास जन्नताबाद म्हणजे 'स्वर्गनगर' असें नांव मिळालें. पांडवा म्हणून एक जुनें शहर होतें त्यास फीरूजाबाद असें नांव दिलें. हीच बंगाल्यांतील पठाणांची राजधानी होती. हा भांग पीत असे म्हणून यास भांगरा असें नांव मिळालें होतें. यानंतर याचा पुत्र सिकंदर गादीवर आला.

**हाजी शम्सुद्दीन इल्यास भंगर**—( हाजी इल्यास शम्सुद्दीन पाहा ).

**हाजीखान हैदरशाह**—(स. १४७०) काश्मीरच्या शादीखानाचा पुत्र. हा गादीवर आल्यानंतर एक वर्षांत मारला गेला.

**हाजी मौला**—( स. १३०० ) अलाउद्दीन खल्जी रणथंभोरकडे गुंतला असतां यानें दिल्लीत बंड केलें. पण याला व याच्या साहाय्यकांना ठार करून दिल्ली ताब्यांत घेण्यांत आली.

**हाजी सय्यद सरसरी**—( स. १३४४ ) ईजिप्त-मधील खलीफा अबासीद अल् हकीम (२) याचा वकील. यानें मुहम्मद तुघ्लकाचें राज्यपद मान्य केल्याचें खलिपाचें पत्र आणलें. याचा दिल्लींत बादशाही सन्मान झाला. शुक्रवारीं झालेल्या प्रार्थनेंत खलिपानें मान्य केलेल्या सुलतानांचा यानें नामनिर्देश केला. नाण्यावर खलिपाचें नांव खोदण्याचा परिपाठ या वेळीं सुरू झाला (अलाउद्दीन तर्माशिरीन घियासुद्दीन मुहम्मद पाहा ).

**हातिम** ( स. १६९८-१७९१ ) ऊर्दू व फार्सी कवि. याचें नांव शेख जहूरुद्दीन हातिम. हा दिल्लीचा राहणारा होता. हा प्रथम शिपाईगिरी करी. नंतर हा फकीरी बाण्यानें राही व कविता करी. याच्या पंचेचाळिस शिष्यांपैकीं सौदा हा सर्वत्र प्रसिद्ध आहे. याचा दीवान (कवितासंग्रह ) प्रथम फार मोठा होता. त्यांपैकीं निवडक कवितांचा 'दीवाण जादा' नांवाचा संग्रह यानें केला. प्रथम हा 'रम्जा' असें नांव लावी.

**हातीं**—( स. १५२० सुमार ) सिंधुनदीवरील नीलाब प्रांतांतील गख्खर लोकांचा पुढारी. हा आपला चुलतभाऊ तातार यास ठार करून राजा झाला. हा बाबरला शरण गेला.

**हाफिज**—( मृत्यु स. १३९१ ) एक फार्सी महाकवि. याचें नांव मुहम्मद शम्सुद्दीन. हा इराणमधील शिराजचा राहणारा. हा शियापंथी होता. याच्या ग्रंथावरून लोक प्रश्न पाहतात. याच्या शिराज येथील कबरस्थानास 'खाके मुसल्ला' असें म्हणतात. याचीं कवितेचीं अनेक पुस्तकें असलीं तरी याच्या गज्जलाचा संग्रह अत्यंत लोकप्रिय आहे. हा इराण येथील लोकप्रिय कवि असून तेथें याच्या कविता लोकांच्या तोंडीं आहेत. याची कविता भक्तिप्रधान आहे असें कांहींना वाटतें, तर कांहींना व्यावहारिकतेच्या पलीकडे त्यांत कांहीं नाहीं असें वाटतें. यास मुहम्मद बाहमहीनें हिंदुस्थानांत बोलावलें होतें, पण समुद्रांतील वादळी लाटांना भिऊन हा परत फिरला. याला मुसलमान अधार्मिक समजत व ते याला मुसलमानी धर्माप्रमाणे पुरण्यासहि तयार नव्हते.

**हारीतराशि**—हा लकुलीशमतानुयायी कानफाट्या साधु होता. याचा शिष्य मेवाडांतील उदेपूरचा राजा काळभोज ऊर्फ बाप्पा रावळ. याच्याजवळ एक धेनु होती. तिची यानें सेवा केली होती. सर्वदर्शनसंग्रहांत लकुलीशदर्शन दिलें आहे.

**हाल**—( स.९९-१०२ सुमार) हा आंध्रांचा सतरावा राजा होय. यानें गाथासप्तशती या नांवाचें एक पुस्तक प्राचीन महाराष्ट्रभाषेंतून लिहिलेलें प्रसिद्ध आहे. तें कदाचित् एखाद्या कवीनें याला अर्पण केलें असावें.

**हितहरिवंश**—( स. १४९९ ) एक हिंदी कवि. हा गौड ब्राह्मण. याचा पिता केशवदासमिश्र व आईचें नांव तारामती. हा प्रथम मध्वानुयायी गोपाळभट्टाचा शिष्य होता. नंतर स्वप्नांत राधेनें मंत्र दिल्यावर यानें 'राधावल्लभ' सांप्रदाय काढला. यानें वृंदावन येथें राधावल्लभाची मूर्ति स्थापिली ( स. १५२५ ). याला संस्कृत उत्तम येई. याला कृष्णाच्या मुरलीचा अवतार मानतात. याच्या नांवावर असलेला 'राधानिधि' हा ग्रंथ चैतन्यप्रभूचा शिष्य प्रबोधानंद यानें लिहिला असें म्हणतात. मग हिंदींत याचीं फक्त ८४ पदें राहतात.

**हिमू किंवा हेमू**—( वध स. १५५६ ) सूर सुलतानाचा दिवाण. हा मुहम्मद सूरचा प्रधान होय. पठाणांविरुद्ध होता. यानें इब्राहिमखान सूरचा पराभव केला. बुंदेलखंडावर स्वारी केली, हुमायुनापासून दिल्ली व आग्रा घेतलीं. शेवटीं विक्रमादित्य हा किताब धारण केला. अकबरानें स. १५५६ मध्यें याचा पराभव करून यास ठार केलें.

**हिरण्यगर्भ भट्ट**—(हयग्रीवाचार्य महानुभाव पाहा).

**हिरे किंवा दोद्द चामराज**—( स. १५७१-७६ ) हा म्हैसूरचा राजा बेट्टादचा चवथा मुलगा. कृष्णराज नांवाच्या भावानंतर हा गादीवर आला. विजयनगरमधून हा स्वतंत्र झाला ( स. १५६४ ).

सदाशिवरायाच्या खुनानंतर विजयनगरच्या नवीन राजघराण्यास यानीं मानलें नाहीं. यानें श्रीरंगपट्टणच्या राजाची खंडणी देण्याचें टाळलें व तटबंदी केली. पुढें श्रीरंगपट्टणचा राजा देवाची प्रार्थना करीत असतां त्यास पकडण्याचा यानें प्रयत्न केला, पण तो फसला. हा निपुत्रिक मरण पावला. याच्या मागून याचा चुलत भाऊ बेत्तद गादीवर आला. पण याचा पुत्र राजा

ओडियर यानें म्हैसूरच्या स्वतंत्र राज्याला प्रथम मान्यता मिळविली.

**हिममित्र**—मंडनमिश्राचा पिता.

**हिरेबेट्टाद चामराज**—( हेरेबेत्तड चाम १ ला )–( स. १४२३–५८ ) म्हैसूर संस्थानचा मूळ पुरुष जो विजय त्याचा पुत्र.

**हिंदाल**--( स. १५०० सुमार ) दिल्लीच्या मोंगल घराण्याचा संस्थापक जो बाबर त्याचा हा तिसरा मुलगा होय. याला हुमायून, कामरान व मिर्झास्करी असे तीन भाऊ होते. त्यांपैकीं हुमायून दिल्लीच्या गादीवर आला.

२. ( स. १३८६–९६ ) काश्मीरचा सुलतान शहामीरचा मुलगा. हा आपला भाऊ शिहाबुद्दीननंतर गादीवर आला. गादीवर येते वेळीं यानें कुतुबुद्दीन असें नांव धारण केलें. ( मु. रि. भा. १ पा. ३१६ ).

**हिंमतबहादुर गोसावी**—( मृत्यु स. १८०४ ) याचें दुसरें नांव अनुपगीर गोसावी असें होतें. हा अनुपगीर अंतर्वेदींतील अनुप शहरचा राहणारा. यानें गोसाव्याचें एक छोटेंसें सैन्य तयार केलें. हा त्याचा गुरु व सरदारहि होता. यानें प्रथम अयोध्येचा नबाब सुजा याची चाकरी धरली. पुढें सुजाच्या मृत्यूनंतर हा स्वतंत्र राहूं लागला. मराठे, मोंगल, रजपूत वगैरेंपैकीं ज्यांना मिळालें असतां आपला फायदा होईल त्यांना हा मदत करी. याचा वडील भाऊ उमरावगीर हाहि शूर होता. तो बहुतेक अयोध्येच्या नबाबाच्या बाजूस असे.

नानासाहेब पेशव्यांच्या सांगण्यावरून दत्ताजीनें नजीबखानाचा धुव्वा उडविला. अखेर त्यानें सुजाची मदत मागितली. सुजानें अनुपगीरास दहा-बारा हजार सैन्य देऊन दत्ताजीवर रवाना केलें. पुढें दत्ताजी अनुपगीराच्या थापबाजीस फसला, व पुढें अबदाली व मागें सुजा अशा कैंचींत सांपडून त्याचा बदाऊ घटांत नाश झाला ( नवंबर-डिसेंबर). बक्सारच्या लढाईंत सुजातर्फे हा हजर होता (स. १७६३ ). सुजानें अंतर्वेदी प्रांत इजाऱ्यानें दिला ( स. १७७५ ). सुजानंतर नजीबखानानें याला सरदारी दिली व जयपुरास खंडणी–वसुलीस पाठविलें. पाटीलबावानें आपलें वर्चस्व दिल्लीस स्थापिलें, तेव्हां हा दिल्लीस कारस्थानांत गुंतला होता. शहाअलमनें याला 'राजा हिंमतबहादर' ही पदवी दिली. याच्यामार्फत पाटीलबावानें नजीब व दिल्लीदरबार यांना इंग्रजांविरुद्ध वळविण्याचा निष्फळ प्रयत्न केला. पुढें नजीब व अनुपगीर यांचें पटेनासें झालें, तेव्हां हा जयपुरास गेला. हा अनेक भानगडी करी. हा होळकर व अलीबहाद्दर यांच्या म्हणजे नाना फडणीसाच्या बाजूचा आहे असा महादजीस संशय होता. महादजी एकदां आजारी असतां यानेंच जादूटोणा, व अनुष्ठान करून, त्याची प्रकृति बिघडेल अशीं कृत्यें केलीं म्हणून पाटीलबावानें यास मथुरेस पकडलें. परंतु हा पळून जाऊन जरीपटक्याचा आश्रय घेऊन " श्रीमंतांच्या जरीपटक्याजवळ आलों आतां माझे अंगीं मुद्दा शाबीद करावा व जें करणें तें करावें. " असें म्हणूं लागला.

पुढें यानें अलीबहाद्दरास सांगून सबंध बुंदेलखंड स्वाऱ्या करून ताब्यांत घेतलें. अलीबहाद्दर बुंदेलखंडाचा मुख्य झाल्यावर अनुपगीरचें महत्त्व जास्त वाढलें. पुढें हा आपल्या जहागिरींत राहून अनेक भानगडी करूं लागला. स. १७८७ मध्यें मराठ्यांविरुद्ध बंड उभारून खंडणी देण्याचें यानें नाकारिलें. पुढें हा राणाखानामार्फत पाटीलबावास पुन्हां शरण आला. समशेरबहाद्दराचा हा दिवाण झाला. पण इंग्रजांस मिळून हा आपल्या धन्यावर उलटला. कर्नल पॉवेल याला हा ससैन्य जाऊन मिळाला ( १६ सप्टें. १८०३ ). या दोघांनीं बुंदेलखंड हस्तगत करून समशेरबहाद्दराचा पराभव बेटवा नदीवर केला ( १३ ऑक्टोबर ). याबद्दल इंग्रजांनीं याची जुनी जहागीर कायम करून थोडी नवीहि दिली. परंतु या मिळालेल्या जहागिरीचा उपभोग घेण्यास हा फार दिवस जगला नाहीं. हा काल्पी येथें मरण पावला ( १८०४ ). हा गृहस्थाश्रमी होता.

**हीरप**—( अनंतवीर्य पाहा ).

**हीरविजयसूरि**—( मृत्यु स. १५९२ ) एक जैन आचार्य. हा मूळचा गुजराथेंतील पालनपूरचा. याची कीर्ति ऐकून याला अकबर बादशहानें मुद्दाम बोलावून घेतलें. हा फत्तेपूर–शिक्री येथें पायीं आला तेव्हां अकबरानें यास पंहिल्या श्रेणींत घेऊन याचा सन्मान केला. या विरक्त साधूनें अकबरापासून फक्त जीवदयेचीच भिक्षा मागून घेतली. पर्युषणपर्वाचे बारा दिवस, नवरोज, रविवार, अकबराचा जन्ममास वगैरे दिवस निश्चित करून त्या वेळीं हिंसा बंद करण्यांत आली. याचा बदाऊनीच्या ग्रंथांत व विजयप्रशस्ति नांवाच्या महाकाव्यांत निर्देश आहे. यास त्यानें जगद्गुरु अशी पदवी दिली. दरबारांत शांतिचंद्राला ठेवून हा पाटणला परत आला ( स. १५८७ ). याला बादशहाकडून मिळालेलें अहिंसेचें आज्ञापत्र सर जॉन मालकमच्या मेमॉयर्स ऑफ सेंट्रल इंडियाच्या दुसऱ्या भागांत छापलें आहे व तें उज्ज-

यनीच्या जैनमंदिरांत अद्यापि सुरक्षित असल्याचें तेथें म्हटलें आहे. याशिवाय यानें अनेक धर्मकृत्यें केलीं.

**हीलीओद्रा**—( ख्रि. पू. २०० सुमार ) यवनराज अन्तलिकित यानें या नांवाचा दूत ( पूर्व ) माळव्याचा अधिकारी भावभद्र याच्याकडे पाठविला होता. हा भागवत किंवा वासुदेवधर्माचा अनुयायी झाला होता. याचा वेसनगर येथें एक शिलालेख असून त्यांत यानें आपण बांधलेल्या गरुडध्वजाचा निर्देश केला आहे. हा मौर्यांच्या अखेरीच्या कालांतील आहे ( मौर्यसाम्राज्याचा इतिहास पा. ६०३ ).

**हुएनत्संग**—( जन्म स. ६०६–मृत्यु स. ६६४ ) हा एक प्रसिद्ध चिनी प्रवासी होता. हा चीनमध्यें क्युशी जिल्ह्यांत होननफू गांवाजवळ स. ६०६ सालीं जन्मला. आपल्या वडील भावाप्रमाणें हाहि लहानपणींच बौद्ध भिक्षु झाला. यानें चीनभर कांहीं वर्षे प्रवास केला. शिगनफू राजधानींत असतां याची तेथें विद्वान् म्हणून ख्याति झाली. बौद्धधर्माचें मूलस्थान जो हिंदुस्थान तो पाहण्याची याची फार इच्छा होती. म्हणून हा स. ६२९ सालीं हिंदुस्थानकडे यावयास निघाला. सरहद्द ओलांडून जाऊं नये असा तेथील कायदा असल्यामुळें याला अनेक संकटें व हाल सोसावे लागले. शेवटीं हा हिंदुस्थानांत आला. काश्मीरांत दोन वर्षे अध्ययनांत घालविल्यावर मथुरेस गेला. नंतर, ठाणेश्वर, गंगा-यमुना नद्यांच्या कांठचीं स्थळें पाहून हा कानोज येथें पोंहचला. नंतर यानें बौद्ध-धर्मक्षेत्रें व हिंदुधर्मक्षेत्रें पाहिलीं. नालंदा येथें यानें दोन वर्षे संस्कृताचा अभ्यास केला. येथेंच त्यानें बौद्धतत्त्व-ज्ञानाचाहि अभ्यास केला. पुढें यानें जवळजवळ सर्व हिंदुस्थानभर प्रवास करून हा काबूल-मार्गानें १५ वर्षांनीं चीनला गेला ( स. ६४५ ). यानें येथून मोठा ग्रंथसंग्रह, मूर्ती व इतर अवशेष चीनला नेले. चीनच्या बादशहानें याचा सन्मान करून यास आपलें प्रवासवृत्त लिहिण्यास सांगितलें. यानें तें कबूल करून स. ६४८ मध्यें आपलें प्रवासवृत्त पुरें केलें. मरणापूर्वी त्यानें आपल्या शिष्याकडून आपण केलेल्या चांगल्या कृत्यांची यादी तयार करविली व ती आपल्या सर्व शिष्यांदेखत वाचून घेतली असें म्हणतात. हा स. ६६४ सालीं मरण पावला. यानें लिहून ठेविलेलें प्रवासवृत्त हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास लिहि-ण्याच्या कामीं फार उपयुक्त आहे.

तेविसाव्या वर्षी हा हिंदुस्थानांत येण्यास निघाला. याचा उद्देश बौद्धधर्माचा अभ्यास करणें आणि संस्कृत पुस्तकें जमविणें हा होता. चीनच्या उत्तरपश्चिम सीमेला ओलांडून आक्सस व जॅक्सर्टस नद्यांचे प्रदेश पाहून हिंदु-कुश पर्वत ओलांडून हा हिंदुस्थानांत शिरला. पश्चिमे-कडील भारत अवलोकन केल्यावर हा सम्राट् हर्षवर्धनाच्या दरबारांत आला. तेथून सर्व हिंदुस्थानभर प्रवास करून पामीर, कांशगर व खोतानवरून हा चीनला परत गेला.

**हुमायून ( ऊर्फ सिकंदर ) तुघ्लक**—( सिकंदर तुघ्लक पाहा ).

**हुमायून बाहमनी**—( स. १४५८–६१ ) हा दुसऱ्या अलाउद्दीनचा मुलगा.

**हुमायून मोगल**—( स. १५०५–१५५६ ) हा एक मोगल बादशाहा होऊन गेला. याचें नांव नासिरुद्दीन मुह-मंद असें होतें. हा बाबराचा वडील मुलगा असून याला आणखी तीन भाऊ होते. त्यांना यानें निरनिराळ्या प्रांतांचे आधिकारी नेमिलें होतें. गुजराथ व माळवा येथील बंदोबस्त नीट न राहिल्यानें ते प्रांत याच्या हातचे गेले. पुढें शेरखानानें बंड करून बंगाल व बहार प्रांत घेतले, व याला पळावयास लाविलें. स. १५५५ पर्यंत दिल्लीच्या तख्तावर शेरशाहा व त्याचे वंशज राज्य करीत होते. या १५ वर्षांत हुमायुनाचे अत्यंत हाल होऊन तो आश्रयार्थ भटकत होता. पुढें इराणांतून सैन्य आणून यानें आपलें तख्त मिळविलें, व पुन्हां तो बादशहा बनला. पण याचा उपभोग घेण्यास तो जगला नाहीं. हा जिन्यावरून पडून दिल्लीस मृत्यु पावला. याच्यांत हिकमत व जबाब-दारी ओळखण्याची पात्रता मुळींच नव्हती. हा कर्मा शूर नव्हता, पण आळशी व बेफिकीर वृत्तीचा असे. तथापि हा उदार, ममताळू व सौजन्यपूर्ण होता. विद्वानांचा आश्रयदाता असून स्वतः गणिती व ज्योतिषी होता.

**हुविष्क कुशान**—(स.१६२ सुमार) कनिष्काचा पुत्र. बाप स्वारीवर गेल्यावर हा राज्यकारभार पाहत असे. हा वशिष्काच्यानंतर गादीवर बसला. याचीं सर्व नाणीं हा गादी-वर आल्यानंतरचीं असावींत. याचें राज्य काबूल, काश्मीर, व मथुरा येथपर्यंत पसरलें होतें. हा कनिष्काप्रमाणेंच बुद्धधर्माचा आश्रयदाता होता असें दिसतें. कारण त्यानें मथुरेला एक स्वतःच्या नांवाचा मठ बांधून तो बुद्धांना दिलेला होता ( Cunningham-Arch. Rep. I. 238 ). यानें काश्मी-रांत हुशकपुर या नांवाचें एक शहर वसविलें. हें शहर अत्यंत महत्त्वाचें असून त्याला पश्चिमेकडील दरवाजा असें म्हणत असत. हें शहर पुष्कळ दिवसपर्यंत भरभराटींत होतें. हुएनत्संग स. ६३१ मध्यें याच राजधानींत आला होता. याला सध्यां उशकुर असें म्हणतात, व त्या

ठिकाणीं एक अत्यंत जुना स्तूप आहे. याच्या वेळचीं कांहीं सोन्याचीं नाणीं पण सांपडलीं आहेत. राजतरंगिणींत यास हुष्क म्हटलें आहे.

**हुशंगशाह घोरी**—( स. १४०५–१४३६ ) माळव्याचा सुलतान जो दिलावरखान घोरी त्याचा हा पुत्र होय. याचें मूळ नांव आलफ़खान असें होतें. हा आपल्या बापानंतर स. १४०५ मध्यें गादीवर आला ( अमीशाह ऊर्फ दिलावरखान घोरी पाहा ).

हा सरदारमंडळीस आवडत नसल्यामुळें त्यांनीं याला पदच्युत करून माळवा प्रांत गुजराथचा सुलतान मुज्फरशहाचा भाऊ नुस्रतच्या हवालीं केला. पण नुस्रतखानास माळवा प्रांत लवकरच सोडावा लागल्यामुळें, स. १४१८ मध्यें यानें गुजराथेवर स्वारी केली, पण तांत याचाच पराभव झाला. यानें मांडवगडचा किल्ला उत्कृष्ट रीतीनें बांधून मजबूत केला. शिवाय तेंथें एक जुम्मामशीद बांधिली. जरी याला आपला शत्रूंपासून बचाव करविला नाहीं, तरी हा आपल्या राज्यांत फार प्रिय होता. हिंदु लोकांच्या देवळांस धक्का न लावतां सर्वांस यानें ममतेनें व निःपक्षपातानें वागविलें. त्याबद्दल माळव्यांतील लोकांत अद्यापि याची आठवण निघते. यानेंच हुशंगाबाद शहर स्थापिलें.

यानें ओरिसाच्या जाजनगर किंवा जाजपुरावर व्यापाऱ्याच्या वेषानें जाऊन तेथील राजास कपटानें कैद करून त्याच्याकडून यानें पुष्कळ हत्ती मिळविले ( स. १४२२ ). नंतर यानें काल्पीवर स्वारी केली ( स. १४३३ ). याच्यानंतर त्याचा मुलगा गज्नीखान ऊर्फ मुहम्मदशाह हा तख्तनशीन झाला.

**हुसेन कुली**—गोवळकोंड्याच्या इब्राहिम कुत्बशाहचा पुत्र.

**हुसेनखान**— हा काश्मीरच्या हसनशाहचा मुलगा.

**हुसेन निजाम**—( स. १५५४–१५६५ ) हा अहमदनगरच्या निजामशाही घराण्यांतील बुर्हाणचा पुत्र. विजापूर, गोवळकोंडें, विजयनगर येथील राजे त्याच्यावर चालून आले, तेव्हां त्यानें त्यांच्याशीं तह केला. प्रसिद्ध चांदबिबी ही ह्याचीच मुलगी. तालीकोटच्या लढाईंत याच्या तोफखान्यानें उत्तम कामगिरी बजाविली. याच्याजवळ ६०० तोफा असून त्यांजवर चलीबी रूमीखान नांवाचा एक मुसलमान सरदार मुख्य होता. चलीबी रूमीखान हा आशियामायनरांतील असून युरोपांतील लष्करी खात्यांत तोफखान्याचें काम शिकून निपुण झाला होता.

हा स. १५६५ मध्यें आपल्या वयाच्या २४ वे वर्षी मरण पावला. याला पुष्कळ मुलें होतीं. याला वऱ्हाडच्या दर्या इमादशाहची मुलगी दौलतशाह ही दिली होती.

२. ( स. १६३०–३३ ) हा अहमदनगरच्या निजामशाहींतील दुसऱ्या मूर्तझाचा मुलगा. याला फत्तेखानानें गादीवर बसविलें. फत्तेखानानें निजामशाही मोगलांच्या स्वाधीन केली. शहाजीनें दौलताबाद घेतलें व फत्तेखान व हुसेनशहा यांस पकडून दिल्लीस पाठविलें. फत्तेखानानें बुर्हाण निजामशहास ठार केलें ही गोष्ट, बील म्हणतो, स.१६२८ मध्यें घडली व प्रो. सरकार म्हणतात, स. १६३२ फेब्रुवारींत घडली ( शि. च.प्र. पृ. ५४; शि. भा. प्र. ७७ ).

३. हा अहमदनगरच्या निजामशाहींतील हसनचा पुत्र.

**हुसेन लोदी**—लोदी घराण्यांतील जो निजामखान त्याचा मुलगा होय. याला इब्राहिम, इस्माईल व महमूद असे तीन भाऊ होते. त्यांपैकीं इब्राहिम हा दिल्लीच्या गादीवर आला.

**हुसेनशाहा लंगा**—(स. १४५६–१५०२) मुलतानचा राजा जो कुतुबुद्दीन लंगा त्याचा पुत्र.

२. ( स. १५२७–२८ ) हा मुलतानचा राजा महमूद लंगा त्याचा पुत्र. बाबर बादशाहच्या सांगण्यावरून पंजाबचा सुभेदार शाहा हुसेन अर्घून यानें मुलतानचा किल्ला काबीज केला व याचें राज्य घेऊन लंगा घराण्याची समाप्ति केली.

**हुसेनशाहा शर्की**—( स. १४५८–७९ ) हा जोनपूरच्या महमूदशाह शर्कीचा पुत्र. हा आपल्या मुहम्मद नांवाच्या भावानंतर गादीवर आला. हाच या घराण्यांतील शेवटचा पुरुष होय.

**हुसेन सय्यद**—( सय्यद हुसेन पाहा ).

**हृदयराम**—( स. १६२२ ) एक हिंदी कवि. हा पंजाबमधील राहणारा असून याच्या बापाचें नांव कृष्णदास होय. यानें स. १६२२ मध्यें संस्कृतमधील हनुमन्नाटकाच्या आधारावर हिंदीमध्यें हनुमन्नाटक लिहिलें आहे. यांतील कविता व संवाद सुंदर आहेत. हें तत्कालीं प्रसिद्ध असलेलें नाटक आहे.

**हेमचंद्र**—( स. १०८८–११७२ ) चाचिग नांवाच्या मोढवंशी वाण्यास चाहिणी किंवा पाहिणी नांवाच्या स्त्रीपासून हा झाला. वि. सं. ११४५ च्या कार्तिकी पौर्णिमेच्या रात्रीं याचा जन्म झाला. याच्या घरांत कुलदैवत चामुंडा व यक्ष गोनस असल्यानें दोनहि देवतांचीं आद्याक्षरें घेऊन याचें नांव प्रथम चांगदेव असें ठेवण्यांत

आलें. याला 'कलिकालसर्वज्ञ' असेंहि म्हणत. याच्या गांवाचें नांव धुंधुका. संस्कृतांत धुंधुकनगर किंवा धुन्धूकपुर असा याचा निर्देश येतो.

देवचंद्राचार्य अनहिलपट्टणहून फिरत फिरत धुंधुकाला आले. तेथें जैनमंदिरांत गेले असतां इतर मुलांबरोबर खेळत असलेला चांगदेव त्यांना आढळला. तो खेळत खेळत देवचंद्राचार्यांच्या गादीवर येऊन बसला. देवचंद्राचार्यांच्या लक्षांत चांगदेवाचें वैशिष्ट्य आल्याशिवाय राहिलें नाहीं. त्यांनीं याच्या आईकडे मुलाची मागणी घातली. आईची विशेष श्रद्धा असल्यानें तिनें चांगदेवास देवचंद्राचार्यांच्या स्वाधीन केलें; आणि त्यांनीं कर्णावती येथें उदयनमंत्र्याकडे पुढील व्यवस्थेकरितां त्याला ठेवून दिलें. परंतु ही गोष्ट चाचिग गांवाला गेला असतां त्याच्यामागें झाली होती. तो गांवाहून येतांच त्याला ही गोष्ट कळली. तो तडक देवचंद्राचार्यांकडे आला. देवचंद्राचार्य व उदयन यांनीं त्याचा मोठा सत्कार केला, आणि त्याच्याकडून मोठ्या खुबीनें दीक्षा देण्याची परवानगी मिळवली. दीक्षाविधि वि. सं. ११५४ माघ शुद्ध चतुर्दशीचे दिवशीं शनिवारीं झाला. हा समारंभ स्तंभतीर्थावर पार्श्वनाथाच्या मंदिरांत झाला. दीक्षा दिल्यावर याचें नांव सोमचंद्र असें ठेवण्यांत आलें. पुढें गुरुजीपाशीं तर्क, लक्षण, साहित्य वगैरे शास्त्रांचें अध्ययन करीत आठ महिने प्रवास करावा व चार महिने कोठेंतरी एका स्थळीं राहून चातुर्मास करावा असा क्रम कांहीं वर्षे चालला. हा नागपूर येथें धनदशेटजीच्या येथें, गौडदेशांत खिल्लार गांवीं व काश्मीरांत गेल्याचा आज पुरावा उपलब्ध आहे. याचें अगाध पांडित्य, तेजस्विता वगैरे पाहून वि. सं. ११६६ मध्यें नागपूर येथें याला आचार्यपदावर अधिष्ठित करण्यांत आलें. धनदशेटजीनें मोठा उत्सव केला आणि याचें नांव हेमचंद्राचार्य असें ठेवण्यांत आलें.

सिद्धराज जयसिंह चालुक्य आणि हेमचंद्राचार्य यांचा पुढें अत्यंत निकट संबंध आला. सिद्धराज हा वैदिकधर्मी होता, तथापि हेमचंद्राचार्यांनीं त्याच्याशीं विरोध न येऊं देतां मोठ्या सन्मानानें दिवस काढले. विरोधाचे प्रसंग आले तरी यानें आपल्या पांडित्यानें व समयसूचकतेनें आपली छाप सिद्धराजावर ठेविली होती.

सिद्धराज सोमनाथाच्या यात्रेला गेला तेव्हां हा त्याच्या बरोबर होता. त्या वेळीं सिद्धराज राजधानीच्या बाहेर आहे असें पाहून माळव्यांतील यशोवर्मन्नें सिद्धराजाच्या राज्यावर स्वारी केली. सांतु नांवाच्या प्रधानावर सिद्धराज परत येईपर्यंत राज्य सांभाळण्याची जबाबदारी होती. यशोवर्म्यानें सांतूला कळविलें कीं, सिद्धराजाच्या यात्रेचें पुण्य मला देण्याचें अभिवचन देत असशील तर मी परत जातों. तेव्हां सांतूनें ती गोष्ट मान्य केली. पण सिद्धराज परत आल्यावर त्याला ही गोष्ट समजली तेव्हां त्याला या गोष्टीचा फार राग आला. आणि त्यानें त्यावर स्वारी करून पराजित केलें आणि त्याला पकडून पत्तन येथें घेऊन आला. त्या वेळीं सिद्धराजाचा विजयोत्सव मोठ्या समारंभानें साजरा करण्यांत आला आणि त्याला सर्व सांप्रदायाच्या लोकांनीं आशीर्वाद दिले. त्या वेळीं यानेंहि एका सुंदर श्लोकांत राजाला आशीर्वाद दिला. तेव्हांपासून राजाची यावर विशेष मर्जी बसली आणि याला नवें व्याकरण करण्याविषयीं राजानें सुचविलें. यानेंहि काश्मीरमधून प्राचीन व्याकरणाच्या कांहीं प्रती आणविल्या, देशोदेशींच्या विद्वानांना बोलावून त्यांच्याशीं वाटाघाट केली आणि एक वर्षांत व्याकरणग्रंथ तयार केला. आणि त्याचें नांव राजा सिद्धराज व हेमचंद्र यांनीं संयुक्त 'सिद्धहेम' असें ठेवण्यांत आलें. राजानें त्या ग्रंथाला मिरवीत आणून दरबारांत ग्रंथाची प्रसिद्धि केली. तीनशें लेखक बसवून त्याच्या प्रती करविल्या व अठरा देशांत पाठवून दिल्या (महोपाध्याय जिनमंडनकृत कुमारपालप्रबंध आणि मेरुतुंगाचार्यकृत प्रबंधचिंतामणि). पण चंद्रप्रभसूरींच्या प्रभावकचरित्रांत यापेक्षां निराळी हकीकत आहे: अवंती येथील ग्रंथालयांत भोजाचें व्याकरण पाहून त्यानें याच्याकडून नवीन व्याकरण करविलें आणि त्याचा सर्वत्र प्रचार केला.

याच वेळीं दिगम्बर आणि श्वेताम्बर या दोन पंथवाल्यांमध्यें वाद झाला. त्यांत दिगम्बर जैनांच्या तर्फे सुप्रसिद्ध पंडित कुमुदचंद्र होते आणि श्वेताम्बर जैनांच्या बाजूनें वादिश्रीदेवसूरि आणि हेमचंद्र होते. शेवटीं श्वेताम्बर जैनांचा जय होऊन दिगम्बर जैनांना पराजित व्हावें लागलें. तथापि हेमचंद्राला सिद्धराजावर विशेष छाप बसवतां आली नाहीं. सिद्धराजानें जैनमंदिरावर ध्वज लावण्याला मनाई केल्याचें वर्णन सांपडतें. तसेंच सोमनाथाच्या यात्रेच्या वेळीं जैनधर्माच्या आचाराप्रमाणें सिद्धराज म्हणत असतांहि वाहनांत बसण्यांत इन्कार केला तेव्हां सिद्धराज हेमचंद्राला व्यवहारजड म्हणाला. तेव्हांहि खटका उडाल्याचें वर्णन आढळतें. पण सिद्धराज व हेमचंद्र यांचा संबंध सिद्धराजाच्या अखेरीपर्यंत कायम होता. सिद्धराज दिवंगत झाला तेव्हां हेमचंद्राचें वय चौपन्न वर्षांचें होतें (वि. सं. ११९९). सिद्धराजाला मुलगा नसल्यानें त्याच्याच घराण्यांतील

कुमारपालानें शेवटीं सिद्धराजाचें राज्य मिळविलें. या कुमारपालाचा सिद्धराज अत्यंत द्वेष करीत असल्यानें आणि याला मारण्याचाहि त्यानें प्रयत्न केला असल्यानें सिद्धराज असतांना कुमारपालाला अत्यंत संकटांत दिवस काढावे लागले. हेमचंद्र स्तंभतीर्थावर असतांना कुमारपालानें याला संकटांना कंटाळून 'माझ्या नशिबीं सुख आहे का?' म्हणून प्रश्न विचारला होता. तेव्हां यानें त्याला वि. स. ११९९ मार्गशीर्ष वद्य चतुर्दशी रविवार रोजीं तुला राज्याभिषेक होईल म्हणून लिहून दिलें होतें. कुमारपालानेंहि हें खरें झाल्यास आपणच राजे व्हाल असें सांगितलें. त्याच वेळीं सिद्धराजाच्या हेरांपासून त्याला पुस्तकांत लपवून हेमचंद्रानें त्याचें रक्षण केलें. पुढें भविष्याप्रमाणेंच कुमारपाल राजा झाला पण त्याला भविष्य सांगणाराचें विस्मरण पडलें. एकदां हेमचंद्र कुमारपालाला भेटावयास आला असतां अद्भुत चमत्कार करून त्याची भेट घ्यावी लागली. पुढें त्यानें पूर्वी वचन दिल्याप्रमाणें जैनधर्माच्या प्रचाराचें काम चांगल्या प्रकारें केलें. पूर्वी हेमचंद्र दरबारांत केवळ विद्वान् म्हणून सन्मान मिळवीत होता. आतां राजाचा गुरु म्हणून याचा सन्मान होऊं लागला. कुमारपालानंतर अजयपाल राजा झाला. त्याचा प्रधान यशपाल नांवाचा होता. त्यानें 'मोहराजपराजय' नांवाचें नाटक संस्कृत भाषेत लिहिलें आहे. त्यांत कुमारपालाच्या आध्यात्मिक जीवनाविषयीं बरीच माहिती दिली आहे. कुमारपालानें हेमचंद्राच्या उपदेशानें मद्यमांस सोडलें होतें. हिंसा बंद केली होती. जैनधर्माचा तो चांगलाच पुरस्कर्ता बनला होता. तथापि जुन्या धर्माचें दडपण हेमचंद्र पूर्णपणें दूर करूं शकला नव्हता. कुमारपालाच्या इच्छेकरितां हेमचंद्रानें सोरटी सोमनाथाची पूजा केल्याचा उल्लेख सांपडतो. स. ११७४ मध्यें कुमारपाल मेला. आणि त्यापूर्वी सहा महिने हेमचंद्र दिवंगत झाला होता. हेमचंद्राची रक्षा पवित्र म्हणून लोक मस्तकाला लावीत. त्यामुळें हेमचंद्राला ज्या ठिकाणीं जाळलें त्या ठिकाणीं एक मोठा खड्डा पडला. त्याला हेमखाड असें लोक म्हणत.

गुजराथचा इतिहासलेखक ए. के. फोर्बस यानें आपल्या रासमाला नांवाच्या ग्रंथांत हेमचंद्राचें वर्णन केलें आहे. त्यांत इतरत्र न आढळणाऱ्या कांहीं गोष्टींचा निर्देश आढळतो. त्यांपैकीं एक खालीं देतों.

कुमारपालानें सिसोदिया वंशांतील एका मुलीशीं लग्न केलें. मुलीला असें समजलें कीं, पट्टणला गेल्यानंतर हेमचंद्राकडून जैनधर्माची दीक्षा घ्यावी लागेल. तेव्हां तिनें पट्टणला जाणें नाकारलें. पण कुमारपालाचा जयदेव नांवाचा भाट होता. त्यानें तिच्यावर दीक्षा घेण्याचा प्रसंग येणार नाहीं असें आश्वासन देऊन तिला पट्टणला आणलें. हेमचंद्राच्या ही गोष्ट ध्यानांत आल्यावर त्यानें राणीला दीक्षा देण्यास पाठविण्याचा तगादा लावला. कुमारपालानें राणीस दीक्षा घेण्यास सांगितलें. तेव्हां राणीस दीक्षा टाळण्याकरितां पळून जात असतां वाटेंत सैन्यानें वेढा दिला तेव्हां राणीनें आत्महत्या केली. यावरून तत्कालीन स्थितीची चांगली कल्पना येते.

हेमचंद्राचे खालील ग्रंथ आज उपलब्ध झाले आहेतः— १ अनेकार्थकोष, २ अनेकार्थशेष, ३ अभिधानचिंतामणि ( नाममालाव्याख्या ), ४ अलंकारचूडामणि ( काव्यानुशासनव्याख्या ), ५ उणादिसूत्रवृत्ति, ६ काव्यानुशासन स्वकृत टीकेसह, ७ छन्दोनुशासन ( छंदोनुशासनवृत्ति ), ८ देशीनाममाला (सवृत्ति) ९ द्याश्रयकाव्य ( ऐतिहासिक, मूळ राजापासून चामुंडराज, वल्लभराज, दुर्लभराज, भीम, कर्ण व सिद्धराज जयसिंह यांपर्यंत वर्णन करणारा ऐतिहासिक ग्रंथ ), १० धातुपाठ (सवृत्ति), ११ धातुपारायण ( सवृत्ति ), १२ धातुमाला, १३ नाममाला, १४ नाममालाशेष, १५ निघंटुशेष, १६ प्रमाणमीमांसा (सवृत्ति), १७ बलाबलसूत्र (बृहद्वृत्ति), १८ बालभाषा, १९ सिद्धहेमव्याकरण ( सूत्र व वृत्ति ), २० योगशास्त्र, २१ विभ्रमसूत्र, २२ लिङ्गानुशासन ( सवृत्ति ), २३ शेषसंग्रहसारोद्धर २४ त्रिषष्टिशलाकाचरित ( याची पुरवणी परिशिष्टपर्व ).

यांशिवाय याचे अनेक ग्रंथ असावेत. याची अशी प्रसिद्धि आहे कीं, याच्या लेखनशाळेंत सातशें लेखक सदोदित काम करीत असत.

**हेमविजयगणि**—( स. १६३१ ) हा हीरविजयसूरीचें चरित्र असलेलें 'विजयप्रशस्ति' काव्य करणारा कवि. एकवीस सर्गांपैकीं शेवटले पांच गुणविजयगणीनें लिहिले व सर्व काव्यावर टीकाहि लिहिली.

**हेमाद्रि अथवा हेमाडपंत**—( स. १२६०–१२७५ सुमार) देवगिरीच्या महादेव व रामदेव राजांच्या कारकीर्दींत हा होऊन गेला. हा प्रख्यात ग्रंथकर्ता होता. याच्या धर्मशास्त्रावरील ग्रंथांच्या उपोद्घातांत याला महादेवाचा "श्रीकरणाधिप" अथवा "श्रीकरणप्रभु" असें म्हटलें आहे. दरबारचे कागदपत्र व हुकूम सोडण्याचें काम याचेकडे होतें. हा शुक्ल-यजुर्वेदी वत्सगोत्री ब्राह्मण होता. याच्या वडिलांचें नांव कामदेव व आजाचें नांव वासुदेव. हा उदार व विद्येचा भोक्ता होता. स्वतः विद्वान् असल्यामुळें

विद्वानांना याच्याकडे आश्रय मिळत असे. हा धार्मिक, शूर व सुशीलहि होता. धार्मिक आचारविचारांना सुव्यवस्थित रूप देण्याची मूळ कल्पना यानें काढली व ती यानें आपल्या देखरेखीखालीं 'चतुर्वर्गचिंतामणि' हा ग्रंथ करून पार पाडली. हा पंढरीच्या विठ्ठलाचा भक्त होता असें तेथील शिलालेखावरून दिसतें. पण तेथें पिता वामन दिला असल्यामुळें हा तो नसावा असें वाटतें.

चतुर्वर्गचिंतामणि हा हेमाद्रीचा मोठा ग्रंथ होय. या ग्रंथाचीं ( १ ) व्रतखंड, ( २ ) दानखंड, ( ३ ) तीर्थखंड, व ( ४ ) मोक्षखंड अशीं चार खंडें आहेत. यांशिवाय परिशेषखंड नांवाचें पांचवें एक खंड आहे. त्यांत देवता, श्राद्ध, मुहूर्त व प्रायश्चित्त वगैरेंचें विवेचन केलें आहे. वाग्भटाच्या अष्टांगहृदय नामक वैद्यकग्रंथावर आयुर्वेदरसायन नांवाची टीका यानें केली आहे. तसेंच बोपदेवाच्या मुक्ताफळ नांवाच्या ग्रंथावरहि 'कैवल्यदीपिका' नांवाची यानें टीका केली आहे.

महाराष्ट्रांत हा हेमाडपंत या नांवानें प्रसिद्ध आहे. विशिष्ट प्रकारच्या रचनेच्या देवळांना हेमाडपंती देऊळ असें म्हणतात. हीं चालुक्य शिल्पपद्धतीचीं असून तींत चुना न भरतां मोठाले दगड एकमेकांस सांधलेले असतात. मोडी लिपी यानेंच प्रचारांत आणिली असें म्हणतात. कै. वि. का. राजवाडे यांनीं कित्येक जुनीं हेमाडपंती मेस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. त्यांतून जमाखर्चाच्या व हिशेबाच्या पद्धती, कारभारांची अनेक शाखांनीं व्यवस्था, शिरस्ते वगैरे आहेत. बिभीषणानें याला ज्वारीचें बीं दिलें आणि तेंव्हांपासून हिंदुस्थानांत ज्वारी होऊं लागली असें म्हणतात. तसेंच मोडी लिपी व ढेकूण हींहि त्यानेंच दिलीं अशी दंतकथा आहे. त्यावरून असें अनुमान निघतें कीं, जंगल साफ करून दक्षिणेमधील शेतीस यानें उत्तेजन दिलें असावें; व मराठींत मोडी लिपीचा प्रचार याच्या वेळीं होऊं लागला असावा.

बोपदेवानें आपल्या मुक्ताफलांत याचें वर्णन 'गणकाग्रणीः' असें केलें आहे. ओवळें येथील ताम्रपटांत 'निर्जितझाडीमंडळ' व 'हस्तिपकाध्यक्ष' अशीं यास विशेषणें दिलेलीं आढळतात. तसेंच तेथें यास रामचंद्राचा मुख्य प्रधान म्हटलें आहे ( स. १२७२ ).

चक्रधराच्या महानुभाव सांप्रदायाचा प्रचार वाढूं लागला तेंव्हां ब्रह्मसानु व महदाश्रम या दोघांनीं चक्रधरांना विष व यंत्रासन ( आसनाखालीं खड्डा खणून ) यांनीं ठार करण्याचा प्रयत्न केला. पहिला देवगिरीकर यादवांचा गुरु होता आणि दुसरा हेमाद्रीचाच गुरु होता. हे दोन्ही प्रयत्न फसले. तथापि महानुभाव सांप्रदायाची छाप लोकांप्रमाणें त्या वेळच्या रामदेवराव यादवरावावरहि पडली आणि हेमाद्रीचें वजन दरबारांत कमी झालें. रामदेवरावाची पत्नी कामाइसानें तर महानुभावी पंथाची दीक्षाहि घेतली होती. शेवटीं तर बहुतेक चक्रधराला आपल्या मुलाकडून ठार केल्याबद्दल हेमाडपंतास क्लेशपूर्ण देहांत शासन भोगावें लागलें असावें, असें महानुभावी ग्रंथावरून (लीलाचरित्राचा जाखोबा पाठ) व महिकावती बखरीवरून दिसतें ( प्रो. वि. भि. कोलते, एम्. ए., यांच्या 'महाराष्ट्र शारदे'तील लेखावरून ).

२. ( स. १४००–५०सुमार ) यानें रघुवंशावर दर्पण नांवाची टीका लिहिली आहे. प्रक्रियाकौमुदीचा निर्देश केल्यामुळें वरील काळ ठरविण्यांत आला आहे. हा प्रसिद्ध हेमाद्रीहून वेगळा आहे. हा आपल्या पित्याचें नांव ईश्वर असें देतो.

**हैदर अली**—( स. १७२२–८२ ) हा म्हैसूरच्या गादीवर बसणारा उपरी राजा होय. हा स. १७४०च्या सुमारास म्हैसूरच्या लष्करांत उदयाला आला. यानें दिवाण व राजा या दोघांनाहि आपल्या ताब्यांत ठेविलें. पेशव्यांनीं केलेल्या स्वारीबद्दल त्यांस देऊं केलेली खंडणी न देण्याबद्दल यानेंच राजास सल्ला दिली व आपल्या मुलखांतून पेशव्यांचे कारकून हाकून लावले. तेंव्हां गोपाळ गोविंद पटवर्धनाच्या नेतृत्वाखालीं यावर स्वारी करण्यांत आली ( स. १७५९ ). यानें पेशवे अवदालीशीं लढण्यांत गुंतलेले पाहून व नंतर पानपतावर त्यांची झालेली वाताहात जाणून स. १७६१ ते ६४ दरम्यान मराठी मुलूख बराच काबीज केला. तेंव्हां पेशव्यांनीं स. १७७४ मध्यें याच्यावर स्वारी करून सर्व मुलूख सोडविला. हा पेशव्यास शरण आला व यानें ३२ लाख खंडणीहि दिली. पुन्हां यानें मलबारप्रांत पादाक्रांत केल्यावरून पेशव्यांनीं याच्यावर दुसरी स्वारी केली व ३० लाख रुपये खंडणी वसूल केली. याच्या मागोमागच हैदराला निजाम व इंग्रज यांच्या संयुक्त सैन्याशीं टक्कर द्यावी लागली, परंतु यानें युक्तीनें आपल्या म्हणण्याप्रमाणें तह घडवून आणून इंग्रजांशीं दोस्ती केली. यामुळें हा अर्थातच मराठ्यांची खंडणी देईनासा झाला व उलट त्यांना त्रास देऊं लागला. म्हणून पेशव्यांनीं पुनः तिसरी स्वारी केली ( स. १७७० ). यांत पेशव्यांना बराच मुलूख, स्वारी-खर्च ३६ लाख रुपये व दरसाल १४ लाख खंडणी देण्याचें यानें कबूल केलें.

या युद्धांत इंग्रजांनीं मदत केली नाहीं म्हणून हा त्यांचा सूड घेण्यास प्रवृत्त झाला. पुढें राघोबानें याच्यावर

स्वारी केली तींत यानें राघोबास दरसाल ६ लक्ष रुपये खंडणी कबूल केली. पुढें पेशव्यांच्या गृहकलहाचा फायदा घेऊन यानें मराठ्यांचा बराच मुलूख काबीज केला. राघोबाहि यास मिळाला व यानेंहि २४००० होन राघोबास मदत म्हणून दिले. पुढें यानें अनेक मराठे सरदारांचा पराभव केला. परंतु हरिपंत फडक्यापुढें याचें कांहीं न चालून यानें तहाचें बोलणें लाविलें व बराच पैसा दिला. याचें धोरण विरुद्ध पक्षाचा जोर दिसला कीं नमतें घ्यावयाचें असें होतें. पुढें इंग्रजांशीं याच्या लढाया होऊन त्यांतच याचा अंत चितूर येथें झाला (स. १७८२). १८ व्या शतकास उत्तरेस रणजितसिंग व दक्षिणेंत हैदर असे दोघे शूर व राज्यसंस्थापक उदयास आले. दोघेहि निरक्षर व उलट्या काळजाचे होते. हैदराच्या ठिकाणीं नीति, धर्म किंवा दया कांहीं नव्हतें. हा स्वत: सर्व काम पाहत असून फार कडक रीतीनें अम्मल चालवी. याला पांच भाषा चांगल्या बोलतां येत होत्या. हा सर्व काम झटपट उरकी. याची स्मरणशक्ति फार दांडगी असून अवघड आंकडेमोडींतहि हा कुशल असे. हा लोकांचा स्वभाव व गुण ओळखण्यांत तरबेज असल्यानें याला आपल्याभोंवतीं कार्यक्षम माणसें गोळा करितां आलीं. याच्या ताब्यांत स. १७६१ पासून पूर्ण सत्ता होती तरी राजा अशा अर्थाची सुलतान ही पदवी याच्यानंतर टिपूनें धारण केली.

**हैबतबुवा**—( मृत्यु स. १८३६ ) वारकरी संप्रदायांतील एक प्रसिद्ध पुरुष. यानें उत्तर हिंदुस्थानांतून दक्षिणेंत येतांना सुरक्षित पोंचल्यास ज्ञानेश्वराच्या समाधीपुढें सतत वीणा धरण्याचा नवस केला. तो अद्यापि चालू आहे. यानें प्रथम ‘ रूप पाहतां लोचनीं ’ हा अभंग म्हणावा,शेवटीं तुकाराम-ज्ञानेश्वराच्या आरत्या म्हणाव्यात, असा वारकरी भजनाचा क्रम सुरू केला. ‘ ज्ञानदेव तुकाराम ’ हें भजन यानेंच सुरू केलें असें म्हणतात. यानें सध्यांचा ज्ञानेश्वर व तुकाराम यांच्या पालख्यांच्या वारीचा सोहळा प्रथम सुरू केला, असें सध्यां कांहीं लोक म्हणतात. याचे वंशज सातारा जिल्ह्यांत आर्फळ येथें आहेत. आळंदीस ज्ञानेश्वराच्या समाधीस जातांना याची पायरी लागते. तीच याची समाधि होय.

**हैबतराव निंबाळकर**—( मृत्यु स. १७१४ ) शाहूनें यास सरलष्कर करून चंद्रसेनाचा याकडून पाडाव करविला. याला सेनापतिपद पाहिजे होतें. याच्यानंतर याचा पुत्र सुलतानजी यास सरलष्कर पद मिळालें.

**होती**—( खि. पू. १०–५८९ ) हा एक चिनी राजा. यानें पानाचाओ नांवाच्या सेनापतीच्या मदतीनें चिनी साम्राज्याची हद्द रोमन साम्राज्यापर्यंत नेऊन भिडवली. यानें दुसऱ्या कदफिसेसचा पराभव केला ( V. Smith, p. 294; २ कदफिसेस् व पानचाओ पाहा. ).

**होनाजी अनंत**—( स. १७१३ ) शाहूचा न्यायाधीश. बाळाजी विश्वनाथ पेशवा झाल्यावर तें पद पुनः याच्याकडे आलें.

**होनाजी बाळ**—( स. १७९०–१८१८ नंतर ) हा साताप्पाचा नातू व सयाजीचा मुलगा. यानें रंगाचा आणि खर्ड्याच्या लढाईचा पोवाडा केला आहे, त्यावरून हा सवाई माधवरावाच्या वेळीं उदयास आलेला दिसतो. रागदारीच्या लावण्या लोकप्रिय करण्याचें काम यानेंच केलेलें दिसतें. दु. बाजीरावास हा त्या म्हणून दाखवी. याचें स्वराज्य नष्ट होण्याच्या प्रसंगाचे दोन पोवाडे प्रसिद्ध आहेत. हा गवळ्याचाहि धंदा करी. याचा त्रिंबकजी डेंगळ्याशीं स्नेह असे. त्याच्या वाड्यांत याची बैठक असे. याचें कुळदेवत खळनाथ. जेजुरीच्या खंडोबाच्या दर्शनास गेला असतां यानें एक लावणी केली. याला मारेकऱ्यानें ठार केलें. मारेकरी प्रतिस्पर्ध्यानें किंवा खासगी कलागतीनें घातले गेले असावेत. याची पुणें येथें संगमावर समाधि होती. पण आतां तेथें एक बेलाचें झाड आहे. भाद्रपद कृष्ण चतुर्दशी हा याचा मृत्युदिन पुण्यांत अद्यापि साजरा होतो. भैरवींत लावण्या म्हणण्याबद्दल याची ख्याति होती. ‘ घनश्याम सुंदरा ’ ही याची भूपाळी सर्वांच्या तोंडीं असून त्यांतील गोडी प्रो. शि. म. परांजपे यांनीं विशद करून दाखविली आहे. यानें अनंतफंदी या समकालीन कीर्तनकाराची अत्यंत प्रशंसा केली आहे.

**होन्नम्म**—( स. १६८० सुमार ) कानडी कवयित्री. जात शूद्र असावी. गुरु–अळसिंगरार्य. हिला प्रथम संची होन्नी म्हणत असत. ग्रंथ–हदिबदेयधर्म ( पतिव्रतांचा धर्म ). म्हैसूरच्या चिक्कदेवरायाच्या (स. १६७३–१७०४) दासीसारख्या हलक्या कामावर ही होती. चिक्कदेवरायाची पट्टराणी यळंदूर-देवाजम्माणिच्या ही मर्जीतील होती. त्यावरून हिचेंहि गांव यळंदूर असावें असें वाटतें. राजा, राणी व गुरु यांचें हिच्या काव्यकौशल्य व विद्या यांबद्दल उत्कृष्ट मत होतें. आणि त्यांच्या इच्छेवरूनच हिनें वरील काव्य लिहिलें. घरांतील प्रत्येक माणसाला व्यवहारज्ञान व नीति कुशलतेनें शिकवणारें हिचें वरील काव्य अत्यंत लोकप्रिय आहे ( क. क. च. भा. २, पा. ५०५).

# क्ष

**क्षववर्मन्**—( स. २००–२८३ ) कनोजच्या मौखरी-वंशांतील हा पहिला पुरुष होय. याच्यानंतर सुंदरवर्मन् मौखरीच्या गादीवर आला.

**क्षीरस्वामी**—( स. १०५०–११०० ) याला भट्ट-क्षीरस्वामी असें म्हणतात. हा मध्यहिंदुस्थानचा रहिवाशी होता. हा ईश्वरस्वामीचा पुत्र. हा काश्मीरच्या जयापीडाचा गुरु व प्रतापरुद्राचा आश्रित होता ( ? ). गणरत्नमहोदधीचा कर्ता वर्धमान हा क्षीरस्वामीचा उल्लेख करतो. यावरून वरील काल निश्चित होतो. यानें अमरकोशावर 'अमरकोशोद्घाटन' नांवाची टीका लिहिली. कनोजजवळ काकुपदगांवीं ' क्षीरेश्वर महादेव ' नांवाचें दैवत आहे. त्यावरून याचें नांव क्षीरस्वामी पडलें असावें असा विद्वानांचा तर्क आहे. यानें प्रथम शिवाला नमन केलें असून पुढील सहा ग्रंथ केले आहेतः १ नामपारायण ( अमरकोशोद्घाटन ), २ क्षीरतरंगिणी ( धातु-(पाठ)वृत्ति ), ३ अमृततरंगिणी, ४ गणवृत्ति, ५ निपाताव्ययोपसर्गवृत्ति, ६ निघण्टुवृत्ति. या ग्रंथांवरून हा व्याकरणशास्त्रांत निष्णात असावा असें दिसतें. ' धातुजनामें ' हा सिद्धांत धरून यानें प्रत्येक शब्दाची फोड केली आहे. यानें पुढील कोश व कोशकार यांचा निर्देश केला आहेः १ कात्य, २ मुनि ( व्याडि ? ), ३ भागुरि, ४ माला व मालाकार, ५ वैदिक निघण्टु, ६ शाश्वत, ७ अमरमाला, ८ नाममाला, ९ अभिधानकार, १० अभिधानशेष, ११ अनेकार्थ, १२ श्रीहर्ष, १३ दुर्ग, १४ भोज, १५ रुद्र ( कृ. गो. ओककृत अमरकोश-प्रस्तावना, स. १९१३ ).

**क्षेत्रसिंह गुहिलोत**—( मृत्यु स. १३८२ ) हा मेवाडचा महाराणा हंमीरचा ज्येष्ठ पुत्र. याची खेता व खेतसी या नांवांनीं प्रसिद्धि आहे.

महाराणा हंमीरच्या वेळीं हाडांशीं सख्य होतें. पण पुढें वैरभाव उत्पन्न झाला तेव्हां यानें त्यांच्यावर स्वारी करून त्यांना पूर्ण कबजांत घेतलें. हाडा ही चौहानवंशाची एक शाखा असून तीमध्यें बुंदी व कोटा येथील राज्यें समाविष्ट आहेत. तसेंच यानें मांडलगड किल्ला फोडला. यानें माळव्याचा राजा अमीशाह याला चितोडजवळ जिंकलें. हा अमीशाह म्हणजे मांडूचा पहिला सुलतान दिलावरखां घोरी होय ( वाके आते मुश्ताकी, तुजुके जहांगिरी ). यानें इडरचा किल्ला जिंकला व तेथील राजा रणमल्ल याला कैद केलें. त्याचा पुत्र पुंजास गादी दिली. यानें जयपूर राज्यांतील सादळ ( सातल ) याला जिंकलें होतें.

याला सात पुत्र होते. लाखा, भाखर, माहप ( महीपाल ), भवणसी ( भुवनसिंह ), भूचर, सलखा व सखरा. तसेंच यास एका रखेलीपासून चाचा व मेरा असे पुत्र झाले.

यानें पनवाड गांव एकलिंगजीला दिलें. याचा एक शिलालेख ( स. १३६६ ) आषाढ वद्य १३ चा आहे ( रा. इ. पा. ५५५–५७१ ).

**क्षेमराज**—( स. १०३० सुमार ) हा काश्मीर प्रांतांतील एक शैवतत्त्वज्ञानी व अभिनवगुप्ताचा शिष्य. अभिनवगुप्ताच्या पारमार्थसारावर यानें भाष्य लिहिलें आहे. यानें स्वच्छंदोद्योत हा ग्रंथ आणि पुष्कळ वृत्ती लिहिल्या आहेत. स्पंदनिर्णय आणि स्पंदसंदोह या ग्रंथांचा कर्ता क्षेमेंद्र आणि हा क्षेमराज हे दोघे एकच असावेत असें बुल्हरचें मत आहे. यानें ' प्रत्यभिज्ञाहृदय ' व ' शिवसूत्रविमर्शिनी ' यांवर टीका लिहिल्या आहेत. काश्मिरी शैव सांप्रदायाचें सामान्य ज्ञान होण्याकरितां प्रत्यभिज्ञाहृदयावरची क्षेमराजाची टीका वाचणें जरूर आहे.

**क्षेमसिंह गुहिलोत**—( स. ११६८–७२ ) रणसिंहानंतर हा मेवाडच्या गादीवर आला. कुंभलगडच्या प्रशस्तीवरून याला माहणसिंह नांवाचा वडील बंधु असावा. पण तो पिता हयात असतांना मेल्यामुळें हा गादीवर आला असावा. याला सामंतसिंह व कुमारसिंह असे दोन पुत्र होते. याच्यानंतर मेवाडच्या गादीवर सामंतसिंह आला.

**क्षेमंकर**—( स. १४७० सुमार ) हा एक जैन मुनि होता. हा कदाचित् ' सिंहासनद्वात्रिंशिका ' किंवा ' विक्रमचरित ' या ग्रंथाच्या जैन भाषांतराचा कर्ता असून भाषांतराच्या कामीं त्यानें सिंहासनबत्तिशीची एखादी अतिशय जुनी महाराष्ट्री प्रत वापरलेली दिसते.

**क्षेमीश्वर**—( स. ९४० सुमार ) चंडकौशिक ( हरिश्चंद्रकथा ) नाटक व नैषधानंद काव्य यांचा कर्ता. हा राजशेखराच्या मागून झाला. हा कान्यकुब्जाच्या महीपाल प्रतिहाराचा आश्रित होता. हा व क्षेमेंद्र भिन्न होत. याला आर्य किंवा आचार्य म्हणत. याच्या पणज्याचें नांव विजयप्रकोष्ठ किंवा विजयकोष्ठ.

**क्षेमेंद्र**—( स. १०२०–१०८० सुमार ) या कवीनें आपल्याच ग्रंथांत जीं माहिती दिली आहे तीवरून असें समजतें कीं, हा कवि काश्मीर देशांत होऊन गेला. याचें दुसरें नांव 'व्यासदास' असें होतें. याचा आजा व बाप या दोघांचीं नांवें अनुक्रमें सिंधु व प्रकाशेंद्र अशीं होतीं. कांश्मीरचा राजा अनंत याच्या कारकीर्दींत ( स. १०२९–६४ ) यानें ग्रंथरचना केली. याचा अभिनवगुप्ताचार्य हा गुरु होता. सोमेंद्र हा याचा मुलगा असून उदयसिंह आणि राजपुत्र लक्ष्मणादित्य हे याचे शिष्य होते. यानें आपले बहुतेक ग्रंथ रामयशस्च्या सांगण्यावरून लिहिले. हा प्रथम शैव होता, नंतर वैष्णव झाला.

ग्रंथः—याचे ग्रंथ पुष्कळ आहेत; परंतु आजपर्यंत जेवढे उपलब्ध आहेत ते येणेंप्रमाणेंः—अमृततरंगकाव्य, अवसरसार, औचित्यविचारचर्चा, कनकजानकी, कलाविलास, कविकंठाभरण, चतुर्वर्गसंग्रह, चारुचर्या, चित्रभारत नाटक, दर्पदलन, दशावतारचरित्रकाव्य ( स. १०६६ ), दानपारिजात, देशोपदेश, नीतिकल्पतरु, नीतिलता, पद्यकादंबरी, पवमानपंचाशिका, बृहत्कथामंजरी, बौद्धावदानकल्पलता, महाभारतमंजरी, मुक्तावली, मुनिमतमीमांसा, राजावली, रामायणकथासार, ललितरत्नमाला ( उदय+कथा नाटिका ), लावण्यवती, लोकप्रकाशकोश, वात्स्यायनसूत्रसार, विनयवल्ली, वेतालपंचविंशति, व्यासाष्टक, शशिवंशमहाकाव्य, समयमातृका ( स.१०५० ), सुवृत्ततिलक, सेव्यसेवकोपदेश, क्षेमेंद्रप्रकाश.

२. मदनमहार्णवाचा कर्ता.

३. सारस्वतप्रक्रियाटीका ग्रंथाचा कर्ता.

४. पिता भूधर. नागर ब्राह्मण. गांव राजनगर. पेटलादच्या राजाच्या सांगण्यावरून यानें (१) लिपिविवेक, ( २ ) मातृकाविवेक असे दोन ग्रंथ लिहिले.

५. गुर्जर घराण्यांतील यदुशर्मन्चा मुलगा. यानें 'हस्तिज्ञानप्रकाश' नांवाचा ग्रंथ लिहिला.

---

# ज्ञ

**ज्ञानचंद्र**—( स. १३५० ) हा जैनधर्मी श्वेतांबरपंथी होता. यानें 'रत्नावतारिका' या ग्रंथावर टिप्पण लिहिलें आहे. राजशेखरसूरीचा हा शिष्य.

**ज्ञानदास**—( स. १६०४ सुमार ) एक बंगाली कवि. याचें गांव कंद्रा ( जि. वीरभूमि ). पिता आत्माराम. जात वैद्य. पदकल्पतरु नांवाचा १८६ कवितांचा याचा ग्रंथ प्रसिद्ध आहे ( क. कौ. ७ ).

**ज्ञानराज**—( जन्म स. १५०३ सुमार ) देवगिरीच्या राजाजवळ असणाऱ्या रामापासून हा सहावा पुरुष. 'सिद्धांतसुंदर' नांवाचा ज्योतिषावर याचा ग्रंथ आहे. याचा पुत्र चिंतामणीची त्या ग्रंथावर टीका आहे. ज्ञानराजाचे जातक, साहित्य व संगीत विषयावर ग्रंथ आहेत. पाथरी ( पार्थपुर ) हें याचें गांव ( भा. ज्यो ).

**ज्ञानसंबद**—एक शैव साधु. यानें आपल्या काव्यांत करिकाल चोलाचें वर्णन केलें आहे.

**ज्ञानश्री भद्र**—( स. १०५० सुमार ) बौद्ध तर्कज्ञ. हा मूळ काश्मीरी ब्राह्मण होता. यानें अनेक संस्कृत ग्रंथांचें तिबेटींत भाषांतर केलें व धर्मकीर्तीच्या प्रमाणविनिश्चयावर टीका लिहिली, असें तिबेटी ग्रंथांवरून दिसतें.

**ज्ञानश्री मिश्र**—( स. १०४० सुमार ) हा बौद्ध तर्कज्ञ विक्रमशिला विद्यापीठाचा आधार होता. याच्या कार्यकारणभावसिद्धीचें तिबेटी भाषांतर उपलब्ध आहे.

**ज्ञानेश्वर**—( स. १२७५–९६ ) महाराष्ट्रांतील भागवतधर्म-संस्थापक, महायोगी व अद्वितीय ग्रंथकार. हे वत्सगोत्री शुक्लयजुर्वेदी माध्यंदिन शाखेचे ब्राह्मण होते. यांच्या मातापित्यांचीं नांवें विठ्ठल व रखमाबाई अशीं असून यांचा श्रावण वद्य अष्टमीच्या मध्यरात्रीं म्हणजे गोकुळअष्टमीच्या दिवशीं कृष्णजन्माच्या वेळीं जन्म झाला. लोकहि यांना विष्णूचा अवतार मानितात. रखमाबाई या आळंदीच्या सिधोपंत कुलकर्ण्याच्या कन्या होत.

यांचें गांव नगर जिल्ह्यांतील आपेगांव व आजोळ आळंदी होय. ज्ञानेश्वराचे चुलत आजोबा हरिपंत देवगिरीच्या सिंघण यादवाचे सेनापति होते. ते एका लढाईत मारले गेले तेव्हां विठ्ठलपंत उदास झाले व तीर्थयात्रा करीत

आळंदीस आले. तेथें विवाह होऊन आपेगांवीं गेले. पुढें वैराग्य उत्पन्न होऊन काशीस जाऊन संन्यास घेतला व चैतन्याश्रम हें नांव प्राप्त झालें. संन्यासदीक्षा रामानंदानें दिली. संन्यास दिलेला विठ्ठलपंत सपत्नीक आहे, ही गोष्ट तीर्थयात्रा करीत रामानंद आळंदीस आले तेव्हां म्हणजे बारा वर्षांनीं त्यांच्या ध्यानांत आली. तेव्हां रामानंदांनीं विठ्ठलपंतास पुनः गृहस्थाश्रम स्वीकारावयास लावला. नंतर त्यास निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान व मुक्ताबाई अशीं अपत्यें झालीं. संन्याशाचीं मुलें म्हणून त्यांची मुंज लावण्यासहि ब्राह्मण तयार होईनात. विठ्ठलपंत व रखमाबाई यांना तर ब्राह्मणांनीं देहान्त प्रायश्चित्त सांगितलें आणि त्यांनींहि त्याप्रमाणें प्रयागक्षेत्रीं जाऊन गंगेंत देह विसर्जन केला. या वेळीं निवृत्ति दहा वर्षांचा व बाकीचीं भावंडें दोन दोन वर्षांनीं लहान होतीं. याच सुमारास हीं मुलें त्र्यंबकेश्वरीं आलीं असतां गहिनीनाथ नांवाच्या नाथपरंपरेंतील थोर पुरुषाची गांठ पडून निवृत्तीवर त्यांचा अनुग्रह झाला. आणि निवृत्तीनें आपला धाकटा भाऊ ज्ञानेश्वर यास नाथपरंपरेंत गोंविलें. यानंतर हीं मुलें आपेगांवीं आलीं व लोकांनीं यांस वाळींत टाकलें.

निवृत्ति व ज्ञानदेव कोरडी भिक्षा मागत आणि आपल्या भावंडांचें पोषण करीत. पुढें आळंदीस जाऊन उपनयन करण्याकरितां ब्राह्मणांचा निर्णय घेण्यास हे पैठणास आले असतां त्यांनीं विरुद्ध दिलेला निर्णयच यांच्या अलौकिक कार्यास प्रोत्साहक ठरला. वेदादि विद्या शिकणें यांना ब्राह्मणांच्या निर्णयामुळें अशक्य झालें. तेव्हां स्वतःच विद्या संपादून यांनीं ईश्वरप्राप्ति करून घेतली. वेद रेड्याकडून वदविले आणि ब्राह्मणांना आपली योग्यता पटवून दिली. त्यामुळें व यांचें योगसामर्थ्य पाहून नंतर पैठणच्या ब्राह्मणांनीं यांना शुद्धिपत्र दिलें.

ज्ञानेश्वरांनीं पैठणास असतां शंकराचार्यांचें गीताभाष्य, योगवासिष्ठ व भागवत वगैरे ग्रंथ पाहिले असावेत. पुढें आळ्याला वेद म्हणविलेल्या रेड्यास समाधि दिली व नेवाशास आले. तेथें ज्ञानेश्वरी लिहिली. सच्चिदानंद बाबाला जिवंत करून त्यालाच ज्ञानेश्वरीचा लेखक केला (स. १२९०). नंतर हे चाकणाहून पंढरपुरास आले. तेथें यांचा नामदेवाशीं परिचय झाला. नंतर ज्ञानेश्वरादि मंडळी, नामदेव व महाराष्ट्रीय संतमंडळ हे हिंदुस्थानभर तीर्थयात्रा करून पंढरीस परत आले. तेथून आळंदीस आल्यावर योगसामर्थ्यानें चमत्कार करणाऱ्या चांगदेवास त्याच सामर्थ्यानें निर्जीव भिंत चालवून यांनीं लज्जित केलें आणि पासष्ट ओव्यांत त्याला उपदेश केला. तो 'चांगदेवपासष्टी' या नांवानें प्रसिद्ध आहे.

यानंतर ज्ञानेश्वरानें आपला जिवंत समाधि घेण्याचा हेतु जाहीर केला व समाधीकरितां गुहा वगैरे तयार करविली. या अखेरच्या सोहळ्यास सर्व संतमंडळी आळंदीस आली होती. शेवटीं यांच्या गळ्यांत हार घालण्यांत आला आणि कपाळीं केशरी गंध लावण्यांत आलें. निवृत्तीनें ज्ञानदेवाला हात देऊन गुहेंत उत्तरेकडे तोंड करून आसनावर बसविलें. 'ज्ञानदेव म्हणे सुखी केलें देवा । पादपद्मीं ठेवा निरंतर ॥' अशी प्रार्थना केल्यावर ज्ञानेश्वरांनीं सर्वांचा आनंदानें निरोप घेतला. गुहेची शिळा बंद केली व सर्वांनीं भजन करून शिळेवर फुलें वाहिलीं. हा प्रसंग अत्यंत गंभीर होता. या वेळीं झालेल्या स्थितीचें शब्दचित्र मुक्ताबाई व नामदेव यांच्या पुढील शब्दांत आढळतें: 'मायबापें आम्हां त्यागियेलें जेव्हां । ऐसें संकट तेव्हां आलें नाहीं ।' 'नामा म्हणे । पेटला हुताशन । करा समाधान निवृत्तीचें ॥'

भावार्थदीपिका म्हणजे ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, चांगदेवपासष्टी, हरिपाठ व कांहीं अभंग हें यांचें लोकप्रसिद्ध वाङ्मय होय. यांचा ज्ञानेश्वरी हा ग्रंथ मराठींत अद्वितीय समजला जातो. तत्त्वज्ञानाचे प्रतिपादनाला यांनीं प्रसादपूर्ण काव्याचें रूप आणलें आहे. वारकरी संप्रदायांत तर यांच्या या ग्रंथाला धार्मिकदृष्ट्या पहिलें स्थान प्राप्त झालें आहे. यांच्या ज्ञानेश्वरीच्या उपसंहारांतील कांहीं ओव्या पुढीलप्रमाणें आहेत:

आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ॥
तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ॥
जे खळाची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मी रती वाढो ॥
भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ॥
दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ॥
जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥

# परिशिष्ट १ लें—कालगणनापद्धति

**अनंदविक्रमशक**—'पृथ्वीराजरासो' या ग्रंथांत सर्व कालविषयक निर्देश या शकांत करण्यांत आले आहेत. हे कालाचे निर्देश चुकीचे आहेत असें कविराज श्यामलदास म्हणतात. मोहनलाल पंड्या यांनीं या शकाचें केलेलें विवरण बरोबर दिसतें. कारण रासोंत दिलेले सर्व कालनिर्देश एक्याणव संख्येनें चुकलेले आढळतात. मोहनलालांचें म्हणणें हा स्वतंत्रच शक कवीनें सुरू केला असावा. यांतील शब्द आनंद नसून अनंद असा आहे. याचा अर्थ ९१ असा करतात. पण तो कसा याचा उलगडा नाहीं ( म. यु. भा. २. २८–३० ).

**अमली सन**—हा हिजरीचाच एक प्रकार आहे. ओढ्या (ओरिसा, उत्कल) प्रांताचा राजा इंद्रद्युम्न याच्या जन्मतिथीपासून म्हणजे भाद्रपद शुक्ल १२ पासून अमली वर्ष सुरू होतें, आणि संक्रमणकाळीं महिना सुरू होतो, असें या सनाचें वर्णन गिरीशचंद्र यांच्या Chronological Tables या पुस्तकांत आहे. याचे महिनेहि चांद्र असतील असें दिसतें. कन्यासंक्रांति भाद्रपद महिन्यांत द्वादशीपूर्वी किंवा नंतर केव्हांहि होऊं शकेल. एवढी गोष्ट खेरीजकरून विलायती आणि अमली सनाचा आरंभकाल आणि वर्षाचा अंक हीं एकच आहेत.

**आदिलशाही संवत्**—विजापूरच्या युसुफ आदिलशाहानें स. १६५६ मध्यें आपल्या नांवानें वर्षगणना सुरु केली, असें म्हणतात. पण तिचा उपयोग केल्याचें आढळत नाहीं.

**आर्य संवत्**—( वैदिक संवत् पाहा ).

**इलाही संवत्**—हा अकबर बादशहानें सुरू केला. ह्याला अकबरी सन असेंहि म्हणतात. हिजरी सन ९६३ रबिउस्सानी महिन्याची तारीख २ शुक्रवार, तारीख १४ फेब्रुवारी स. १५५६, शक १४७७ या दिवशीं अकबर बादशहा गादीवर बसला. हेंच वर्ष या सनाचें पहिलें मानिलें. अकबर व जहांगीर यांच्या नाण्यांवर हा सन पुष्कळदां आहे. शहाजहानच्या कारकीर्दींत हा सन मागें पडला. याचें वर्ष सौर आहे. अबुल फज्ल म्हणतो कीं, "या सनाचे महिने आणि दिवस नैसर्गिक सौर ( सावन ) आहेत. महिन्यांत दिवसाची क्षयवृद्धि होत नाहीं. महिने आणि दिवस यांचीं नांवें प्राचीन फार्सी आहेत. महिन्याचे दिवस २९ किंवा ३० असतात. त्यांतील प्रत्येकास निरनिराळीं नांवें आहेत. आठवडे मुळींच नाहींत. कांहीं महिन्यांचे ३२ दिवस आहेत." यांत महिन्याचे दिवस २९ किंवा ३० म्हटलें आहे, परंतु प्राचीन फारशी पंचांगांत ३० दिवस असतात. पारशी महिन्यांचीं परवर्दिन इत्यादि नांवें हल्लीं पंचांगांत असतात, तींच या सनाच्या महिन्यांचीं नांवें होत. इलाही सनाच्या वर्षांत १४७६–७७ मिळविले तर शकवर्ष येतें; आणि १५५५।५६ मिळवून इ. स. चें वर्ष येतें.

**कपिल संवत्**—ओरिसाच्या ( पूर्व ) गंग वंशांतील चवथ्या वीरभानूचा कपिलेंद्रदेव प्रधान होता. त्यानें हा संवत् सुरू केला. याचा आरंभ स. १४३५ च्या पूर्वी मानतात.

**कलचुरि संवत्**—( चेदि संवत् पाहा ).

**कलिवर्ष** किंवा **संवत्**—सनपूर्व ३१०२ या वर्षी कलियुग सुरू झालें. यांत सध्यांचा स. १९३७ मिळविला म्हणजे आजचें कलिवर्ष म्हणजे गतकलि ५०३९ येतो. शकांत ३१७९ मिळवून गतकलि निघतो. कलियुगाच्या आरंभापासूनच युधिष्ठिरसंवताचा आरंभ धरतात.

**कोल्लमकाल ( अथवा परशुरामकाल )**—याच्या वर्षाला कोल्लम आंड्ड असें म्हणतात. कोल्लम म्हणजे पश्चिमेकडील आणि आंड्ड म्हणजे वर्ष. हा काल मलबार प्रांतांत मंगलोरपासून कुमारीपर्यंत आणि तिनेवल्ली जिल्ह्यांत सुरू आहे. ह्याचें वर्ष सौर आहे. मलबारच्या उत्तर भागांत कन्नी ( कन्या ) मासापासून याचें वर्ष सुरू होतें; आणि तिनेवल्ली प्रांतांत चिंगम ( सिंह ) मासापासून होतें. मलबार प्रांतांत याच्या वर्षाचीं नांवें मेष, वृषभ इत्यादि राशींच्या नांवाचे अपभ्रंश आहेत. १००० वर्षांनीं ह्याचें एक चक्र होतें, आणि सांप्रतचें चक्र चौथें आहे असें म्हणतात. परंतु हल्लीं याची वर्षगणना १००० हून जास्त प्रमाणांत आहे. शकवर्ष १८१८ याच्या आरंभीं कोल्लमवर्ष १०७२ आहे. शक वर्ष ७४७ ( स. ८२५ ) या वर्षीं कोल्लमवर्ष पहिलें होतें. याच्या पूर्वी कोल्लमवर्ष प्रचारांत होतें असें दिसत नाहीं. कोल्लमवर्षांत ७४६।४७ मिळवून शकवर्ष होतें; आणि ९३५ मिळवून कार्तिकादि विक्रम संवत् येतो, व ८२४–२५ मिळवून सन येतो ( चेरमाण पेरुमाल पाहा ).

**ख्रिस्तिकाल**—इंग्रजी राज्य सुरू झाल्यानंतर हा काळ सर्वत्र प्रचारांत आहे. या सनाचें वर्ष सायन सौर आहे. वर्षारंभ जानेवारी १ तारखेस होतो. सांप्रत जाने-

वारी महिन्याचा प्रारंभ अमान्त पौषांत होतो. स. १७५२ मध्यें इंग्लंडांत न्यू स्टाईल सुरू झाली. शकांत ७८।७९ मिळवून सन काढतां येतो.

**गंग-संवत्**—इंद्राधिराज गंगाचें गंग-संवत् ८७ ( स. ६६३ ) मधील दानपत्र मिळालें आहे. त्यावरून स. ५७६ च्या सुमारास एक गंग-संवत् सुरू झालेला दिसतो.

२. स. ८७८–९७ पर्यंत राज्य केलें, तेव्हां आपल्या नांवानें सन सुरू केला. त्यावरून इतरांचा कालनिर्णय होतो. हा दुसरा गंग संवत् होय ( प्रवर्द्धमान गंग पाहा ).

**गुप्तकाल**—हा काल सांप्रत प्रचारांत नाहीं. पण याचा आरंभ स. ५७६ च्या सुमारास झाला असावा असें सिद्ध करण्याचा प्रयत्न झाला आहे ( ज्ञानकोश प्रस्ता. ५, पा. ११३ ). याचें वर्ष वर्तमान आहे; तें चैत्रादि आहे; आणि मास पौर्णिमान्त आहेत. शकवर्ष २४२ चैत्र शुक्ल प्रतिपदा हा गुप्तकालाचा आरंभ होय. गुप्तवर्षांत २४१ मिळविले म्हणजे शकवर्ष येतें; ३१९।२० मिळविले म्हणजे इसवी सन येतो. मध्य हिंदुस्थानांत आणि नेपाळांत हा काल प्रचारांत होता. गुप्त नांवाचे राजे याचा उपयोग करीत असत. हाच पुढें वलभी नांवानें चालूं लागला.

**चालुक्यविक्रमकाल**—पश्चिम चालुक्य राजा सहावा विक्रमादित्य यानें शालिवाहनशकाऐवजीं आपला एक शक प्रचारांत आणला. याला त्याच्या नांवावरून 'चालुक्यविक्रमकाल' व 'चालुक्यविक्रमवर्ष' म्हणत असत. या शकाचें पहिलें वर्ष म्हणजे त्याच्या राज्यारोहणाचें पहिलें वर्ष होय. अनळ अथवा नळ संवत्सर, शालिवाहन शक ९९८ म्हणजे स. १०७५-७६ होय. परंतु हा शक फाल्गुन शुद्ध पंचमी शालिवाहन शक ९९८ ( ता. १४ फेब्रुवारी स. १०७६ ) रोजीं सुरू झाला असें दिसतें. ही तारीख माबेल डफनें शिलालेखांच्या आधारें दिली आहे. इलियटनें हिरेसुदनूर, कुर्तकोटी, अरलेश्वर, लक्ष्मेश्वर, नरेगळ वगैरे ठिकाणच्या शिलालेखांवरून या शकाच्या आरंभाचें ( स. १०७५ ) वर्ष दिलें आहे. परंतु हें वर्ष याप्रमाणें एक येत नसून निरनिराळें येतें. मात्र त्यांत फारसा फरक न येतां एखाद्या वर्षाचेंच अन्तर येतें (इंडि. अँटि. पु. २२ )

**चिनी-संवत्**—चिनी देशाचा हिंदुस्थानशीं पुष्कळ घनिष्ठ संबंध होता. त्या वेळीं हिंदु यात्रेकरू व चिनी यात्रेकरू हे दोन्हीं देशांत जांत येत असत व हिंदु लोकांनीं त्याप्रमाणें आपल्या 'भ्रमण-वृत्तांतांत' चीन देशाची बरीच माहिती लिहिली आहे. विक्रमसंवत् १९९४ मध्यें चिनी संवत् ९६००२४३६ वर्षांचा मानतात; व हाच चिनी संवताचा प्रारंभकाल मानतात. चीनला फार्सी भाषेंत खता म्हणतात व चिनी सनाला 'खताई संवत्' असें म्हणतात. चिनी पंचांगांत सौर आणि चांद्र या दोन्ही रीतींनें वर्षगणना करतात.

**चेदिसंवत्**—हा काल सांप्रत प्रचारांत नाहीं. चेदिवर्ष ७९३ पासून ९३४ पर्यंतच्या कालांतले १० ताम्रपटादि लेख पाहून प्रो. कीलहॉर्न यानें असें अनुमान काढलें आहे कीं, चैत्रादि विक्रमसंवत् ३०५ (शकसंवत् १७० स. २४८।४९) आश्विन शुक्ल प्रतिपदा हा चेदिकालाचा आरंभ होय; याचें वर्ष अश्विनादि आहे; तें वर्तमान आहे; आणि त्याचे महिने पौर्णिमान्त धरतात. चेदिवर्षांत १६९–७० मिळविले म्हणजे शकवर्ष येतें; २४७-४८ मिळविले म्हणजे इसवीसनाचें वर्ष येतें. पश्चिम हिंदुस्थानांतले आणि मध्यहिंदुस्थानांतले कलचुरी राजे ह्या कालाचा उपयोग करीत असत. आणि त्यांच्यापूर्वीं देखील हाच काल हिंदुस्थानच्या त्या भागांत चालत असे असें दिसतें. पौर्णिमान्त आश्विन कृष्ण १ म्हणजे अमान्त भाद्रपद कृष्ण १ हा चेदिवर्षारंभ असावा, असें शं. बा. दीक्षितांचें मत आहे.

**जव्हार संवत्**–जव्हार संस्थानचे नेमीशाहा यांस शाहा ही पदवी मिळाल्यापासून हा नवीन शक सुरू झाला. ही गोष्ट शके १२६५ ज्येष्ठ शु. १२ रोजीं झाली. या शकाचा आरंभ मृगापासून धरतात. जव्हार संस्थानांत या शकाचा उपयोग करितात ( मं. वार्षिक १८३७, पा. १८८ ).

**जिन संवत्**–( वीर संवत् पाहा ).

**टिपू संवत्**—( मव्लूदी सन पाहा ).

**जुलूसी संवत्**–प्रत्येक मोगल बादशाहा आपल्या राज्याभिषेकाच्या दिवशीं हा सुरू करी.

**तुर्की संवत्**–प्राचीन इतिहासांत कांहीं कांहीं ठिकाणीं तुर्की संवत्चाहि उल्लेख मिळतो. या संवत्चा कुंस्तुंतुनीया नगरामध्यें प्रारंभ झाला. तुर्क लोक ह्या संवताची गणना सृष्टीच्या आरंभाबरोबर झाली असें धरतात. हा संवत् ख्रिस्ताच्या ग्रीकचर्च या सांप्रदायामध्येंहि प्रचलित आहे.

तुर्कांमध्यें दुसरा एक संवत् आहे; त्याची गणना गाजलीम बादशहाबरोबर करतात. प्रत्येक तीन वर्षांनीं एक अधिक मास धरतात. ज्या महिन्याला कुंभेची संक्रांत असेल त्या महिन्याच्या अमावास्येपासून वर्षारंभ होतो. ते युगाला करण असें म्हणतात आणि १२ वर्षांचें युग असें मानतात. वर्षाला 'ईल' असेंहि म्हणतात.

भाषा-तज्ज्ञांनीं इंग्रजीच्या Year या शब्दाची उत्पत्ति ह्या 'ईल' शब्दावरून मानली आहे. यांत बारा वर्षांचें एक चक्र धरतात. त्यांचीं नांवें तिबेटीवरून घेतलीं असावींत (मं. त्रै.१६, पृ. ५१). तसेंच पंडित खुन्नीलाल शास्त्रींनीं आपल्या 'नक्षत्रसूची' या पुस्तकांत तीं नांवें चीनमध्यें चालू असल्याचेंहि लिहिलें आहे. हीं नांवें प्रायः राशींचीं आहेत.

**दयानंद-संवत्**—स्वामी दयानंद यांचा जन्म विक्रमसंवत् १८८१ मध्यें झाला. यांचा मृत्यु विक्रम-संवत् १९४० मध्यें दिवाळीच्या दिवशीं झाला. पहिल्या प्रथम हा संवत् स्वामीजींच्या मृत्यूवरून धरला जात होता; पण विक्रमसंवताप्रमाणें 'महर्षि दयानंद शताब्दि' या नांवाचा उत्सव साजरा केला; या वेळेपासून त्यांच्या जन्मतिथीवरून या संवताचा आरंभ मानला जातो. याप्रमाणें विक्रमसंवत् १९८१ मध्यें ४२ वें वर्ष होतें आणि नवीन नियमानुसार १०१ वर्ष येतें.

**नेवार संवत्**—नेपाळांत हा काल शक १६९० पर्यंत सुरू होता. याचें वर्ष कार्तिकादि आहे व मास अमान्त आहेत. संस्कृत ग्रंथांत आणि ताम्रपटादि लेखांत याला नेपालकाल असें म्हणतात. याच्या वर्षांत ८००।८०१ मिळवून शकवर्ष येतें; ८७८।७९ मिळवून सनाचें वर्ष येतें; आणि ९३५ मिळवून कार्तिकादि विक्रम संवत् येतो (जयदेवमल्ल पाहा). नेपाळांत याचा प्रारंभ राजा राघवदेवानें केला आणि राजा पृथ्वीनारायणानें बंद करून शालिवाहनशक सुरू केला. नेवार हा नेपाळचा अपभ्रंश आहे.

**पार्थियन संवत्**—ह्या संवतचें नांव अद्यापिहि भारत-इतिहासमध्यें मिळत नाहीं, परंतु कधींकधीं याचा उल्लेख बुद्धाच्या समकालीन इतिहासामध्यें सांपडतो. विक्रमसंवतच्या १९० व्या वर्षीं अँटी ओकसच्या मृत्यूनंतर इराणांतील पार्थ लोकांनीं हा संवत् सुरू करून आम्ही स्वतंत्र आहोंत असें जाहीर केलें. पहिल्या प्रथम स्मिथसाहेबानें हा संवत् शोधून काढिला. या संवतचें नवें वर्ष एप्रिलआरंभीं सुरू होतें. याचा इ. पू. २४७ च्या आसपास आरंभ होतो.

**परशुरामशक**—(कोल्लमकाल पाहा).

**पारसी संवत्** (यज्दजर्द सन)—पारसी लोकांना मुसलमान 'आतिशपरस्त' (अग्निपूजक) असें म्हणतात. यांचा जुना संवत् इराणच्या पहिल्या राजापासून मोजला जातो. तो विक्रमसंवत् १९९४ (स. १९३७) मध्यें १८९९०६ होता. महिना तीस दिवसांचा आणि वर्ष बारा महिन्यांचें आहे. वर्षाच्या शेवटीं पांच दिवस अधिक धरून वर्षाचे ३६५ दिवस करतात. महिन्याच्या तीस दिवसांची आणि वर्षाच्या शेवटीं धरावयाच्या पांच दिवसांचीं वेगळालीं स्वतंत्र नांवें आहेत. पुनः एकशेंवीस वर्षांनीं महिन्याच्या अनुक्रमानें एक महिना अधिक धरतात आणि सौरमानाशीं जुळवून घेतात.

**फसली सन**—हें पिकाच्या हंगामाचें वर्ष अकबर यानें सुरू केलें. प्रथम हिजरी सनाचाच वर्षांक यास लाविला. परंतु हिजरी वर्ष केवळ चांद्र आहे (३५४ दिवसांचें आहे); व फसली हें सौर आहे; यामुळें पुढें वर्षाच्या अंकांत फरक पडत चालला. हिजरी सन ९६३, इसवी सन १५५६ या वर्षीं म्हणजे अकबर राज्यावर बसला त्या वर्षीं उत्तर हिंदुस्थानांत फसली सन सुरू झाला; आणि दक्षिण हिंदुस्थानांत शहाजहान बादशहानें स. १६३६ म्हणजे हिजरी सन १०४६ या वर्षीं तो सुरू केला. प्रथम त्यास वर्षांक हिजरी सनाचा म्हणजे १०४६ लागला. आणि त्या वेळीं उत्तरेकडील फसली सन १०४४ होता. यामुळें दक्षिणेकडील फसली वर्षाचा अंक उत्तरेच्या अंकापेक्षां जास्त झाला (हिजरी वर्ष केवळ चांद्र म्हणून असें झालें). वर्षारंभ दोहोंकडे भिन्न धरल्यामुळें आणखी कांहीं महिन्यांचें अंतर पडलें. हें वर्ष केवळ सरकारी असल्यामुळें आणि याचा धर्माशीं संबंध नसल्यामुळें ह्याचा वर्षारंभ अनियमित झाला असें दिसतें. मद्रास इलाख्यांत प्रथम ह्या वर्षाचा आरंभ आडी (कर्क) महिन्याच्या पहिल्या दिवशीं होत असे. इ. स. १८०० मध्यें इंग्लिश सरकारनें जुलईच्या १३ तारखेस ठरविला. मुंबई इलाख्याच्या कांहीं भागांत सूर्य मृगनक्षत्रीं जातो. त्या दिवशीं (हल्लीं जूनच्या ५, ६, किंवा ७ तारखेस) फसली वर्षाचा आरंभ होतो म्हणजे तो सौर आहे; परंतु याचे महिने मोहरम इत्यादि चांद्र आहेत. उत्तर हिंदुस्थानांत बहुधा सर्वत्र पूर्णिमान्त मानाच्या आश्विन कृष्ण प्रतिपदेस फसली वर्षाचा आरंभ होतो. म्हणजे तेथलें फसली वर्ष चांद्रसौर आहे. बंगाल्यांत फसली १३०० या वर्षाचा आरंभ स. १८९२ च्या सप्टेंबरांत झाला. आणि दक्षिणेंत स. १८९० च्या जून किंवा जुलई महिन्यांत फसली सन १३०० हें वर्ष लागलें. दक्षिणेंतील फसली सनाच्या वर्षांत ५१२।१३ मिळवून शक निघतो; आणि ५९०।९१ मिळवून इ. स. निघतो. बंगाल्यांतील फसली वर्षांत ५१४।१५ मिळविले म्हणजे शकवर्ष निघतें, आणि ५९२।९३ मिळवून इ. स. निघतो. बंगाल्यांतील फसली, विलायती आणि अमली या तिन्ही सनांचा अंक वर्षांत फार तर १८ दिवस खेरीज करून एकच असतो. या तिन्ही सनांहून बंगाली सन फक्त सुमारें ६।७ महिन्यांनीं धाकटा आहे. वस्तुतः बंगाली, विलायती, अमली आणि बंगाली फसली यांचें मूळ एकच

फसली सन हें होय. पुढें त्याच्या आरंभांत थोडा थोडा फरक पडला हें उघड दिसतें.

**फारुकी**—खानदेशांतील फारुकी राजांच्या कांहीं पत्रांत सूरसनाचा आंकडा दोहोंच्या फरकांनीं आढळतो, असें श्री. ग. ह. खरे यांनीं सिद्ध करून दाखविलें आहे ( मं. त्रै. १३ पा. ).

**बंगाली**—हा बंगाल्यांत प्रचारांत आहे. याचें वर्ष सौर आहे. याचा आरंभ मेषसंक्रांतीस होतो. महिन्याचीं नांवें चैत्र, वैशाख अशीं चालूंच आहेत. मेषसंक्रांतीला जो महिना सुरू होतो त्याला वैशाख म्हणतात ( यालाच तामिळ प्रांतांत चैत्र म्हणतात ). बंगाली सन १३४४ म्हणजे शकवर्ष १८५९ व इ. स १८३६।३७ होय. बंगाली सनांत ५१५ मिळविले म्हणजे शकवर्ष निघतें; ५९३।९४ मिळविले म्हणजे इ. स. निघतो ( मगी संवत् पाहा ).

**बुद्धनिर्वाणसंवत्**—याच्या निर्वाणकालाबद्दल विद्वानांत मतभेद असलें ( ज्ञानकोश प्रस्ता. ५, पा. १८ पाहा ) तरी ख्रि. पू. ४८७ हा काल बरोबर असण्याचा संभव आहे, असें पं. गौ. हि. ओझा यांना वाटतें (प्राचीन लिपिमाला द्वितीयावृत्ति, पा.१६४), व व्ही. ए. स्मिथचेंहि तसेंच म्हणणें आहे. आम्हीं निर्वाणकाल ख्रि. पू. ४९० असा दिला आहे. तें एक मत आहे.

**ब्रह्मदेशसंवत्**—ब्रह्मदेशांत या संवताचा आरंभ बौद्धधर्माच्या प्रचाराबरोबर झाला. विक्रमसंवताच्या ४८६ वर्षांपूर्वी या संवताची सुरुवात धरतात. ब्रह्मदेशांतील बौद्ध साहित्यांत याचा निर्देश आढळतो.

**मगीसंवत्**—हा एक बौद्धसंवताचा प्रकार आहे. हा चितागांग प्रांतांत सुरू आहे. हा बंगाली संवताहून ४५ वर्षांनीं लहान आहे. बौद्धधर्माचा प्रचार ज्या प्रांतांत जेव्हांपासून झाला तेव्हांपासून असे कांहीं संवत् सुरू केलेले दिसतात.

**मव्लुदी सन**—ही वर्षगणना म्हैसूरच्या टिपूनें सुरू केली. हिजरीसन मुहम्मद पैगंबराच्या पलायनापासून सुरू झाला. पण हा जन्मापासून झाला ( स. ५७५ एप्रिल २० ). ही वर्षगणना चांद्रसौर आहे. वर्षारंभ चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून धरीत ( मंडळांतील नाणीं, पा. ६–७ ).

**महावीरनिर्वाणसंवत्** ( वीर-निर्वाणसंवत् ).

**मौर्यसंवत्**—मौर्यविरोधी कलिंग देशचा प्रतापी जैनसम्राट् खारवेल याचा ' हाथी-गुफा ' या ठिकाणीं एक शिलालेख सांपडला आहे त्यावरून ह्या संवतचा काल सांपडतो. मौर्यसम्राट् चंद्रगुप्त यानें हा संवत सुरू केला होता. जैनधर्मी प्रसिद्ध विद्वान् हेमचंद्रसूरीनें बुद्ध-संवतापासून १५५ वर्षे बाद करून चंद्रगुप्ताचा शासनकाल सिद्ध केला. वि. पू. ४७० वर्ष म्हणजे पहिल्या महावीरस्वामीचा निर्वाणकाल मानला आहे. आतां ४७० मधून १५५ वजा केले तर ३१५ उरतात; यावरून हें सिद्ध होतें कीं, वि. पू. ३१५ वे हें वर्ष या संवताचें पहिलें वर्ष होय. हा संवत् कार्तिक शुक्ल अथवा चैत्र शुक्ल ह्या दोन्ही रीतीनें सुरू होतो. पूर्व आणि उत्तर हिंदुस्थानांत चैत्र शुक्लपासून मोजतात आणि दक्षिण व पश्चिम हिंदुस्थानांत कार्तिक शुक्लप्रमाणें मोजतात.

**युधिष्ठिर-शक**–( कलिसंवत् पाहा ).

**राजशक** ( अथवा **राज्याभिषेकशक** )—मराठी राज्याचा संस्थापक शिवाजी यानें हा काल सुरू केला. शिवाजीस राज्याभिषेक झाला त्या दिवसापासून, म्हणजे ज्येष्ठ शुक्ल १३ शक १५९६ आनंदसंवत्सर या दिवशीं हा सुरू झाला. याचें वर्ष सदरहू तिथीस बदलतें. बाकी सर्व गोष्टींनीं याची पद्धति दक्षिणेंतील चांद्रसौर अमान्त शकवर्षाप्रमाणें आहे. या कालाच्या वर्षांत १५९५।९६ मिळवून शकवर्ष येतें, आणि १६७३।७४ मिळवून इसवी सनाचें वर्ष येतें. हा नानाफडणीस व सखारामबापू यांनीं बहुधा गैरसोयीचा म्हणून हुकूम काढून स. १७७७ मध्यें बंद केला असें धडफळे यादींत लिहिलें आहे ( मं. वा. इ. १८३५, पृ. ३७५ ). म्हणजे हा शक १०४ वर्षे चालला. पण सातारचे छत्रपति हा शेवटपर्यंत वापरीत. पण हा सार्वत्रिक करण्याचा केव्हांच प्रयत्न झालेला दिसत नाहीं.

**लक्ष्मणसेनकाल**–हा काल तिरहूत आणि मिथिला या प्रांतांत विक्रमकाल किंवा शककाल यांबरोबर प्रचारांत आहे. याच्या आरंभकालाविषयीं मतभेद आहे. कोलब्रूक( स. १७९६ )च्या मतें याचें पहिलें वर्ष स. ११०५ त होतें. बुकनन( स. १८१० )च्या मतें तें स. ११०५ किंवा ११०६ मध्यें होतें. स. १७७६ पासून १८८० पर्यंतच्या तिरहूत प्रांतांतील पंचांगांवरून दिसतें कीं तें स. ११०८ किंवा ११०९ मध्यें होतें. बुकनन म्हणतो कीं, वर्षाचा आरंभ आषाढांतील पौर्णिमेच्या दुसरे दिवशीं म्हणजे पौर्णिमांत श्रावण कृष्ण प्रतिपदेस होतो. परंतु राजेंद्रलाल मित्र ( स. १८७८ ) आणि जनरल कनिंगहम म्हणतात कीं, तो ( पूर्णिमान्त ) माघ वद्य प्रतिपदेस होतो. डॉक्टर कीलहॉर्ननें स. ११९४ पासून १५५१ पर्यंत या कालांतले दहा लेख पाहून त्यावरून असें अनुमान काढलें कीं, या कालाचें वर्ष कार्तिकादि आहे; महिने अमान्त आहेत; आणि

याचें पहिलें वर्ष शक १०४०।४१ मध्यें होतें. अकबरनामा या ग्रंथांतील अबुल फज्ल याच्या लेखाशीं हें अनुमान मिळतें. याप्रमाणें या कालाच्या वर्षांत १०४०।४१ मिळवून शकवर्ष येतें; ११०८।०९ मिळवून इसवी सन येतो; आणि ११७५ मिळवून कार्तिकादि विक्रमसंवत् येतो.

**वलभिसंवत्**—गुप्त या नांवाच्या ठिकाणीं वलभि हें नांव येऊन पुढें चालला. याच्या चौथ्या शतकांत हा काठेवाड प्रांतांत सुरू झाला, आणि या वेळीं याच्या वर्षाचा आरंभ चैत्रांत होता, तो हा पूर्वीच्या कार्तिक शुद्ध प्रतिपदेस म्हणजे ५ महिने मागें गेला. याचें वर्ष वर्तमान व कार्तिकादि आहे. महिने पौर्णिमान्त आणि अमान्त दोन्ही आहेत. वलभिवर्षांत २४०।४१ मिळविले म्हणजे शकवर्ष येतें; आणि ३१८।१९ मिळविले म्हणजे इसवी सन येतो. गुप्तसंवत् अथवा वलभिसंवत् ८२ पासून ९४५ पर्यंत कालांतले ताम्रपटादि लेख सांपडले आहेत.

**विक्रमसंवत्**—सांप्रत हा संवत् गुजराथ व बंगाल या प्रांतांखेरीज सगळ्या उत्तर हिंदुस्थानांत प्रचारांत आहे. नर्मदेच्या उत्तरेस याचें वर्ष चैत्रादि आहे आणि महिने पूर्णिमान्त आहेत. परंतु गुजराथेंत वर्ष कार्तिकादि आहे, आणि मास अमान्त आहेत. काठेवाड आणि गुजराथ यांच्या कांहीं भागांत विक्रमसंवताचें वर्ष आषाढादि आहे आणि मास अमान्त आहेत.

स. ४५०-८५० पर्यंत या कालाला मालवकाल म्हणत. याचा निर्विवाद असा निर्देश प्रथम एका काव्यांत येतो ( विक्रमादित्य पाहा ). शकांत १३४।१३५ मिळवून कार्तिकादि विक्रमवर्ष येतें आणि १३५ मिळवून चैत्रादि वर्ष निघतें ( विक्रमादित्य गर्दभिल्ल पाहा ).

**विलायती सन**—हा हिजरीचाच एक प्रकार आहे. हा सन बंगालच्या कांहीं भागांत आणि मुख्यतः उत्कल प्रांतांत चालतो. याचें वर्ष सौर आहे. परंतु महिन्यांचीं नांवें चांद्रच आहेत. वर्षाचा आरंभ कन्यासंक्रांतीच्या दिवशीं होतो. महिन्याचा आरंभ बंगाल्यांत संक्रांतीच्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या दिवशीं होतो; परंतु विलायती सनाच्या महिन्यांचा आरंभ संक्रांतीच्या दिवशींच होतो. विलायती सनाच्या वर्षांत ५१४।१५ मिळविले म्हणजे शकवर्ष निघतें; ५९२।९३ मिळविले म्हणजे इसवी सन निघतो. हा सूरसनाचाच एक प्रकार होय.

**वीरनिर्वाणसंवत्**—महावीर स्वामी निर्वाणाला गेल्यापासून हा मोजतात. ते ख्रि. पू. ५२६ अश्विन वद्य अमावास्येस निर्वाणाला गेले. विक्रमसंवतांत ४७०, सनांत ५२७ व शकांत ६०५ मिळविले कीं, हा सन येतो.

**वैदिक संवत्**—यालाच आर्यसंवत् किंवा सृष्टिसंवत् असें म्हणतात. वैदिक लोक सृष्टीच्या आरंभापासून वर्षगणना करितात आणि तिचा आपल्या धर्मकृत्यांतील संकल्पापूर्वी नित्य उल्लेख करितात. सध्यां ब्रह्मदेवाच्या दिवसाचा दुसरा प्रहर, श्वेतवाराहकल्प, वैवस्वतमन्वंतर, चातुर्युगांतील अठ्ठाविसाव्या कलियुगाचा प्रथम चरण आहे. कलिसंवत् वर दिला आहे. याची एकूण संख्या सध्यां दोन अब्जाला थोडी कमी होते.

**शककाल**--ज्योतिषकरणग्रंथांत ह्याच काल घेतात. ज्योतिष्यांनीं ह्यास आश्रयस्थान दिल्यामुळेंच हा इतकीं वर्षें टिकला. नाहींतर गुप्तकाल, शिवाजीचा राज्याभिषेकशक, इत्यादि अनेक कालांप्रमाणें कधींच लयास गेला असता. सांप्रत तिनवेल्ली आणि मलबारचा कांहीं भाग हे प्रदेश खेरीजकरून सगळ्या दक्षिण हिंदुस्थानांत व्यवहारांत ह्याच काल मुख्यत्वें आहे. हिंदुस्थानच्या इतर भागांत स्थानिक कालाबरोबर हा काल चालतो. ह्याचें वर्ष चांद्र आणि सौर आहे. तामिळ आणि बंगाल प्रांतांत सौरवर्ष चालतें आणि इतर प्रांतांत चांद्रवर्ष चालतें. त्यांत चांद्रवर्ष चैत्रादि आहे आणि सौरवर्ष मेषादि आहे. नर्मदोत्तर भागीं ह्याचे महिने पौर्णिमान्त आहेत, आणि दक्षिण भागीं अमान्त आहेत. शालिवाहनशकांत ७८ मिळविले असतां इ. स. येतो; आणि १३४ मिळविले असतां विक्रमसंवत् येतो. हा शालिवाहन व शक यांचे युद्धांत शालिवाहनाचा जय झाला तेव्हां सुरू झाला असावा.

**सप्तर्षिकाल**—सांप्रत हा काळ काश्मीरांत व त्याच्या आसपासच्या प्रदेशांत आहे. अल्बेरूनीच्या वेळीं हा काळ काश्मीरांत, मुलतानांत आणि कांहीं इतर प्रांतांतहि चालू होता असें दिसतें. राजतरंगिणींत सगळा इतिहास ह्याच काळाच्या वर्षांनीं सांगितला आहे. कधीं-कधीं या काळास लौकिककाळ किंवा शास्त्रकाळ म्हणतात. सप्तऋषींना गति आहे. ते शंभर वर्षांत एक नक्षत्र आक्रमितात आणि २७०० वर्षांत भचक्र फिरतात या समजुतीवर ही कालगणना प्रचारांत आली.

**सिंहसंवत्**—हा संवत् गुजराथ आणि काठेवाड या प्रांतांत सुरू होता. सिंहसंवत् ३२, ५१, ९३, ९६, यांतील लेख सांपडले आहेत ( इंडि. अँटि. १८·१९ ). त्यावरून असें अनुमान आहे कीं, याचें वर्ष चांद्रसौर आहे; त्याचा अंक वर्तमान असतो; महिने अमान्त आहेत; (फक्त एका उदाहरणांत पूर्णिमान्त आहेत.) वर्ष बहुधा

आषाढादि आहे; चैत्रादि अथवा कार्तिकादि खचित नाहीं. सिंहसंवतांत १०३५।३६ मिळवून शकवर्ष येतें, १११३।१४ मिळवून इसवी सन येतो आणि ११७० मिळवून आषाढादि विक्रमसंवत् येतो ( गौ. ओ. ).

**सूरसन** अथवा **शुहूर ( महिने ) सन**—याला कधीं कधीं अरबी सन असेंहि म्हणतात. स. १३४४, हिजरी, सन ७४५ या वर्षी सूरसन सुरू झाला. आणि प्रथम हिजरी सनाचा अंक ७४५ हाच त्यास लाविला. फसली सन दक्षिणेंत सूरसनानंतर २९२ वर्षांनीं हिजरी सन १०४६ या वर्षी सुरू झाला, तेव्हां सूरसन १०३७ होता. म्हणून सूरसन आणि दक्षिणी फसली सन यांत ९ अंतर पडलें. मराठ्यांच्या कारकीर्दीत सूरसन फार प्रचारांत होता. हा मुंबई इलाख्यांतील फसली सनाहून ९ वर्षांनीं लहान आहे; परंतु इतर सर्व गोष्टींत दोन्हीं एकच आहेत. ह्याच्या वर्षाचा आरंभ सूर्य मृगनक्षत्रीं जातो तेव्हां होतो. म्हणून याचें वर्ष सौर आहे. परंतु याचे महिने मोहरम इत्यादिक चांद्र आहेत. सूरसनाच्या वर्षांत ५२१।२२ मिळविले म्हणजे शक येतो आणि मृगापूर्वी ६०० व मृगानंतर ५९९ मिळवून सन येतो. बंगाली, विलायती आणि अमली हे सन उत्तरेकडील फसलीचे विशेष प्रकार होत; आणि उत्तरेकडील फसली, दक्षिणी फसली व सूरसन हे हिजरीचे विशेष प्रकार होत.

मराठेशाहींतील मोडी पत्रांत सुमा अशीं अक्षरें सूरसनाकरितां वापरलेलीं दिसतात. पण तीं सु काढून दोन रेघा असाव्यात.

उत्तरकालीन मराठी पत्रांत हा फार वापरण्यांत येई. या वर्षाची गणना अंकांनीं न करतां शब्दांनीं करण्याची रीत आहे. या वर्षांत १ पासून १० आणि २० पासून ( दहांचा आंकडा ) १०० पर्यंत, तसेंच पुढें शत आणि सहस्र या अंकांना पुढील निरनिराळीं नांवें आहेत.

| | | |
|---|---|---|
| १ इहिदे | ११ इहिदे अशर | १२२ इसन्ने अशरीने मया |
| २ इसन्ने | २० अशरीन | २०० मय्या तैन |
| ३ सल्लास | ३० सल्लासीन | ३०० सल्लास मय्या |
| ४ आर्बा | ४० आर्बैन | ४०० अर्बा मय्या |
| ५ खमस | ५० खमसैन | ५०० खमस मय्या |
| ६ शीत | ६० शीतैन | १००० अल्लफ |
| ७ सब्बा | ७० सब्बैन | ११०० मय्या व अल्लफ |
| ८ सम्मान | ८० सब्ब नीन | १२०० मय्या तैन व अल्लफ |
| ९ तिस्सा | ९० तिस्सैन | १२३० सल्लासीन मय्या तैन व अल्लफ. |
| १० अशर | १०० मय्या | १३१३ सल्लास अशर सल्लास-मय्या व अल्लफ. |

**सेल्युकस-संवत्**—सिकंदरच्या मृत्यूनंतर १२ वर्षांनीं सेल्युकसनें हा संवत् सुरू केला. भारतीय पंचांगांत ज्याला स्थान मिळालें तो हा पहिला विदेशी संवत् होय. विशेषतः हा संवत् नाण्यांवर सांपडतो. याचा पहिला दिवस आक्टोबरची पहिली तारीख मानिली जाते. हा संवत् खि. पू. ३१२ पासून प्रचलित आहे. हें पंचांग व यूनानी पंचांग सारखेंच होतें.

**हर्षसंवत्**--कनोजच्या राजा हर्षवर्धनानें आपल्या राज्याभिषेकापासून ( स. ६०७ ) हा संवत् सुरू केला. अल्बेरुनीच्या वेळीं कनोज व मथुरा येथें हा संवत् सुरू होता. हल्लीं हा प्रचारांत नाहीं. या कालाच्या दुसऱ्या व तिसऱ्या शतकांतील दहाबारा ताम्रपट व शिलालेख मिळाले आहेत. त्यांत फक्त संवत् असें म्हटलें आहे. हर्षसंवतांत ५२८ मिळवून शक येतो व ६०६।७ मिळवून सन येतो.

**हिजरी**—हा मूळचा अरबस्थानांतला होय. मुसलमानांच्या अमलापासून तो ह्या देशांत आला. हिजरा म्हणजे पळणें. मुसलमानांचा पैगंबर मुहंमद हा इ. स. ६२२ ता. १५ जुलै; शक ५४४ श्रावण शुक्र १ गुरुवार ( मुसलमानी शुक्रवारच्या ) रात्रीं मक्केहून मदिनेस पळून गेला. म्हणून या सनास हिजरी म्हणतात आणि त्या पळण्याची वेळहि या सनाची आरंभ-वेळ धरिली आहे. ( मुहम्मदाचा जन्म अरबस्थानांतील मक्का येथें स. ५७५ एप्रिल २०, मृत्यु स. ६३२. ) ह्या सनाचे महिने मोहरम इत्यादि चांद्र आहेत आणि अधिक मास मुळींच धरीत नाहींत, यामुळें वर्ष केवळ चांद्र म्हणजे ३५४ किंवा ३५५ दिवसांचें आहे आणि यामुळें दर ३२ किंवा ३३ सौर वर्षांत या सनाच्या वर्षाचा अंक कोणत्याहि सौर कालाच्या वर्षाच्या अंकापेक्षां १ नें वाढतो. शुक्ल प्रतिपदा किंवा द्वितीया या तिथीस चंद्रदर्शन झाल्यापासून महिना सुरू होतो. महिन्याचा पहिला दिवस, दुसरा दिवस म्हणण्याऐवजीं पहिला चंद्र, दुसरा चंद्र, असें म्हणतात. असे चंद्र ( दिवस किंवा तारखा ) महिन्यांत २९ किंवा ३० होतात. वाराचा आणि तारखेचा आरंभ सूर्यास्तीं होतो. यामुळें आमची गुरुवारची रात्र मुसलमानी शुक्रवारची रात्र होय. दिवसांस वाराचें नांव दोघांचें एकच असतें.

---

# परिशिष्ट २ रें—वंशावळी, वंशावरील टीपा व राजवंश यांची सूचि

☞ या ग्रंथाला शुद्धिपत्र किंवा पुरवणीपत्र जोडण्याचें काम मुद्दाम राखून ठेवलें आहे. अभ्यासकांनीं लक्षांत आलेल्या चुका आम्हांकडे कळविण्याची कृपा करावी. म्हणजे तसें शुद्धिपत्र व पुरवणीपत्र प्रसिद्ध करण्याची व्यवस्था करण्यांत येईल.

